# Works Already Published

An edition of Yāska's Nirukta with Durga's Vṛtti and explanatory notes in Sanskrit in the

## Ānandāshrama Sanskrit Series.

**Words in Ṛgveda Vol. I, Price Rs. 12.**

IN THE PRESS

An edition of Yāska's Nirukta with an introduction and notes in English for the Government Sanskrit Series ( Bhandarkar Oriental Research Institute, Poona ).

इचलकरंजीग्रंथमाला

ग्रंथांक ९ वा

निघंटूवरील यास्ककृत

# निरुक्ताचें मराठी भाषांतर

भाषांतर करणार

वैजनाथ काशिनाथ राजवाडे, एम्. ए.

Words in Ṛgveda वगैरे ग्रंथांचे कर्ते

इचलकरंजीग्रंथमालाकचेरी, पुणें २.

आश्विन वद्य १३ शी शके १८५७ २५ आक्टोबर १९३५

किंमत नक्की रुपये १२

( टपालहशील वेगळें )

निरुक्ताचें

हें

भाषांतर

कृतोपकाराच्या जाणिवेनें

मी

श्रीमंत सरकार

नारायणराव गोविंद ऊर्फ बाबासाहेब घोरपडे

अधिपति संस्थान इचलकरंजी

यांस

अर्पण करीत आहें.

आरंभाप्रमाणें तें भाषांतर जर साहित्यपत्रिकेंतच छापत राहिलें असतें तर बहुतकरून तें माझ्याहातून पुरें झालें नसतें व यदाकदाचित् तें पुरें झालें असतें तरी तें सबंध छापून निघण्यास निदान ५० वर्षे लागलीं असतीं. पुरें होऊन व छापून तें आज (२५ आक्टोबर १९३५) प्रसिद्ध होत आहे. याचें सर्व श्रेय श्रीमंतांस आहे

वै. का. राजवाडे

# वाचकांस दोन शब्द

माझी दृष्टि अगदीं निकामी झाल्यामुळें व प्रुफें तपासण्यास ज्यांचें साहाय्य मला मिळालें किंवा घ्यावें लागलें त्यांचें निरुक्ताविषयीं पूर्ण अज्ञान, संस्कृताचें बेताबाताचें ज्ञान आणि मराठीशुद्धलेखनाच्या कल्पना ह्यांमुळें ह्या ग्रंथांत पुष्कळ अशुद्धें राहिलीं आहेत. तेव्हां वाचकांस अशी आग्रहाची विनंति आहे कीं त्यांनीं शुद्धिपत्राच्या द्वारें पहिल्याप्रथम मूळनिरुक्तांत व नंतर भाषांतरांत दुरुस्त्या कराव्यात. प्रस्तावना ग्रंथाच्या आरंभीं असावी अशी सर्वांची अपेक्षा असते; परंतु त्या नेहमींच्या पद्धतिविरुद्ध मीं ह्या ग्रंथांत आचरण केलें आहे. भाषांतर संपल्यावर ज्या ग्रंथाचें निरुक्त हें भाष्य होय तो निघंटुग्रंथ छापणें आवश्यक वाटलें; नंतर ओघानेंच निघंटूचें परीक्षण करावें लागलें. तदनुरोधानेंच निरुक्तसिद्धांतांचें विवेचन हातीं घ्यावेंसें वाटलें. ऋग्वेदांतील भाषा किंवा शब्द व्याकरणदृष्ट्या अशुद्ध होत ही समजूत खोडून टाकण्याकरितां ऋग्वेदाचें व्याकरण ह्या मथळ्याखालीं एक लहानसा निबंध जोडणें भाग पडलें. नंतर निरुक्तांत वेळोवेळीं प्रक्षिप्तें कशीं घुसडलीं गेलीं ह्याचें सविस्तर वर्णन केलें आहे. त्यानंतर यास्काची विवरणपद्धति कोणत्या प्रकारची आहे त्याचें वर्णन केलें आहे. त्याचप्रमाणें यास्कभाष्यावर वृत्ति लिहिणारा जो दुर्गाचार्य त्याच्याही विवरणपद्धतीचें वर्णन केलें आहे. डॉ. स्कूल्ड नांवाच्या यूरोपीय विद्वानानें निरुक्तावर एक विस्तृत ग्रंथ लिहिला आहे; त्यांत येणाऱ्या मुद्यांचा विचार केला आहे. डॉ. काशिनाथ बापूजी पाठक ह्यांनीं उणादिसूत्रें व निरुक्तांत दिलेल्या व्युत्पत्ति ह्या दोहोंमध्यें जी तुलना केली आहे ती व इतर पुरावा लक्षांत घेऊन यास्काचा काल ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. निरुक्त हा फार चमत्कारिक ग्रंथ आहे, त्यांतील पद्धत पुष्कळांना समजत नाहीं हें दाखविण्याकरितां डॉ. सरूप यांनीं केलेल्या निरुक्ताच्या इंग्रजी भाषांतराचें समालोचन केलें आहे. शेवटीं आठ सूची जोडल्या आहेत; निरुक्तांत येणारे विशिष्ट शब्द व विशिष्ट विषय ह्या सूचींच्या द्वारें सहज सापडतील अशी योजना केली आहे. नंतर शुद्धिपत्र जोडावें लागलें आहे. अगदीं शेवटीं विषयानुक्रमणिका दिली आहे; त्या अनुक्रमणिकेंत ज्यांची व्युत्पत्ति केली आहे असे सर्व शब्द, सर्व अवतरणें व निरुक्तांत आलेले सर्व विषय क्रमानें थोडक्यांत नमूद केले आहेत. ह्या सर्व उपकरणांचा अभ्यासकांस उपयोग होईल अशी उमेद आहे.

२५ आक्टोबर
१९३५

भाषांतरकर्ता

---

# यास्कप्रणीत निरुक्ताचें मराठी भाषांतर

भाषांतरकार :- **वैजनाथ काशिनाथ राजवाडे**, एम्. ए.

## उपोद्घात

ऋग्वेदी दशग्रंथी ब्राम्हणाला जे दहा ग्रंथ पाठ करावे लागतात त्यांत निरुक्ताचा अंतर्भाव होतो. संहिता, पदें, ब्राह्मण, आरण्यक, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद, आणि ज्योतिष अशीं ह्या दहा ग्रंथांची नांवें आहेत. निरुक्त ही निघंटूवरील टीका होय. परंतु ह्या दोन्ही ग्रंथांनाही निरुक्त ही संज्ञा पूर्वींपासून पडली आहे. सायणाचार्य निरुक्त व निघंटु हे दोन्ही ग्रंथ एकच समजतात. निघंटु हा ऋग्वेदांतील शब्दांचा समुदाय असून त्याचे पांच अध्याय केले आहेत. पहिल्या तीन अध्यायांत एकार्थवाची शब्दांचें वर्गीकरण केलें आहे. चवथ्यांत अनेकार्थवाची शब्द व संस्कारविहीन आणि कठीण असे शब्द ह्या दोहोंचा समावेश केला आहे. पांचव्यांत देवतांची नांवें दिलीं आहेत. यास्कानें आपल्या निरुक्तांत हाच क्रम ठेविला आहे. निरुक्ताच्या पहिल्या अध्यायांत निरुक्तशास्त्राचा उद्देश, त्याच्यावर येणारे आक्षेप, व त्यांचें निरसन व निरुक्तग्रंथाचें वर्गीकरण अशा गोष्टी येतात. दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायांत निघंटूच्या पहिल्या तीन अध्यायांत आलेल्या शब्दांची व्युत्पत्ति व त्यांचीं उदाहरणें दिलीं आहेत. चवथा, पांचवा व सहावा ह्यांत निघंटूच्या चवथ्या अध्यायांत येणाऱ्या शब्दांचा विचार केला आहे. ह्या सहा अध्यायांना पूर्वषट्क म्हणतात. ह्या पूर्वषट्काचे तीन भाग पडतात. ते तीन भाग म्हणजे पहिला प्रास्ताविक अध्याय हा एक भाग. दुसरा व तिसरा हा नैघण्टुक भाग होय. चवथा ते सहावा ह्याला नैगम अशी संज्ञा दिली आहे. उत्तरषट्काला त्यांत देवतांसंबंधी विचार आहे म्हणून दैवतकाण्ड अशीही संज्ञा आहे. अध्याय तेरा व चौदा हे यास्कानें रचिले नसून कोणीतरी दुसऱ्यानें रचिले आहेत, म्हणून त्याला परिशिष्ट अशी संज्ञा आहे. निरुक्त शब्दाचें निर्+उक्त असे दोन भाग होतात. निर् म्हणजे निःशेषतः म्हणजे निःशेषेंकरून जें उक्त म्हणजे म्हटलेलें किंवा सांगितलेलें तें निरुक्त. निरुक्तांत शब्दांचा सामग्रयानें विचार केला जातो. त्यांत शब्दांचे केवळ अर्थ दिले नसून त्या अर्थांशीं जुळेल अशी व्युत्पत्ति केली जाते व प्रत्येक शब्दाची बारकाईनें छाननी केली जाते. शब्दाचा अर्थ काय आहे हें पहिल्याप्रथम लक्षांत घेतलें पाहिजे व तदर्थवाचक धातु शोधून काढला पाहिजे. अशा धातूचें रूप शब्दाशीं जुळलें तर फारच चांगलें. न जुळलें तरी फार किंवा मुळींच तोटा नाहीं. कधींकधीं शब्द व धातुरूप यांमध्यें फारसें

साम्य नसेल किंवा मुळींच नसेल. त्याबद्दल अचंबा वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण धातूंची विलक्षण रूपें होत असतात व कालांतरानें ह्या रूपांतही विलक्षण फरक घडून येतो. तेव्हां व्युत्पत्ति करणाऱ्यानें शब्दाच्या अर्थाकडेच लक्ष द्यावें. शब्दाचे जितके अर्थ असतील तदनुरूप त्या शब्दाच्या वेगवेगळ्या व्युत्पत्ति केल्या पाहिजेत. निरुक्तात यास्कानें ज्या व्युत्पत्ति दिल्या आहेत त्या वरील दिलेल्या सिद्धांताला अनुलक्षूनच आहेत. त्या किती समजंस आहेत व बुद्धीला किती पटतात हा निराळा प्रश्न आहे. त्याचा ऊहापोह येथें न करितां उपसंहारांत केला जाईल. निरुक्त हा ग्रंथ आज पंचविसशें वर्षे पूज्य मानला गेला आहे. तो वैदिक लोक नुसता पाठ करितात. परंतु पाठ करण्यांत कांहींच स्वारस्य नाहीं. अशा पाठ करणाऱ्यांना यास्क भारवाही म्हणजे ओझें वाहणारे असें म्हणतो. ह्या दोषापासून मुक्त होण्याचा एकच मार्ग आहे. तो मार्ग म्हणजे निरुक्ताचा अर्थ समजून घेणें हा होय. निरुक्तग्रंथ वैदिकांना व इतरांना समजावा ह्या हेतूनेंच मी त्याचें मराठी भाषांतर आरंभिलें आहे. वेदांना मानणारे लोक त्याचा उपयोग करतील अशी मला आशा आहे. वाचकांनीं भाषांतरांत होणाऱ्या चुका माझ्या नजरेस आणाव्यात अशी त्यांना माझी आग्रहाची विनंति आहे.

---

# यास्कप्रणीत निरुक्ताचें मराठी भाषांतर

## अध्याय पहिला

### खंड १ ला

**समाम्नायः समाम्नातः । स व्याख्यातव्यः**

वैदिक शब्दांचा संग्रह ऋषींनीं संगृहीत केला आहे. त्याचें विवरण करणें आहे.

**तम् इमं समाम्नायं निघण्टवः इति आचक्षते । निघण्टवः कस्मात् । निगमा इमे भवन्ति । छन्दोभ्यः समाहृत्य समाहृत्य समाम्नाताः ते निगन्तवः एव सन्तः निगमनात् निघण्टवः उच्यन्ते इति औपमन्यवः**

त्या ह्या वैदिक शब्दकोशाला निघंटु म्हणण्याची चाल आहे. निघंटु हा शब्द कोणत्या धातूपासून उत्पन्न झाला ? हे (इमे) निघंटु निगम आहेत. म्हणजे वेदाच्या निरनिराळ्या भागांतून घेऊन एकत्र केलेले असे ते वेदाचे अर्थ निश्चित करणारे आहेत (निगमनात्). ह्यावरून मूळचा शब्द निगन्तु असून कांहीं कारणानें निघंटु असा उच्चारला गेला, असें निरुक्तकार औपमन्यव म्हणतो.

**अपि वा आहननात् एव स्युः समाहताः भवन्ति । यत् वा समाहृताः भवन्ति**

अथवा निघंटु हा शब्द आ+हन् याच धातूपासून निघाला असेल; कारण हे वैदिक शब्द एके ठिकाणीं पठित (समाहताः) आहेत. किंवा सम्+आ+हृ या धातू-पासून तो शब्द बनला असेल. कारण हे निघंटुसंज्ञक शब्द वेदाच्या निरनिराळ्या भागांतून घेतले ( समाहृताः ) आहेत.

**टीपः**—निरुक्तशास्त्राचा असा सिद्धांत आहे कीं प्रत्येक नाम कोणत्या तरी धातूपासून निघा-लेलें असतेंच. नामाला जितके अर्थ असतील तितके अर्थ लक्षांत घेऊन त्या नामाची तदर्थक धातूपासून व्युत्पत्ति केली पाहिजे. निघंटु या शब्दामध्यें तीन अर्थ अंतर्भूत होतात. ह्या कोशांतील शब्द एकत्र आणण्याचें कारण वेदाचा अर्थ निश्चित करणें हें होय. नि+गमय्=निश्चित करणें. तेव्हां निघंटु हा मूळचा निगन्तु असा शब्द होता. म्हणजे गम् धातूला तु हा प्रत्यय लावून निगन्तु असा शब्द बनला होता. परंतु कालांतरानें निघंटु असा त्याचा उच्चार केला गेला. हें औपमन्यवाचें मत यास्काचार्यांना इतर मतांहून जास्त पसंत होतें, म्हणून या व्युत्पत्तीला त्यानें अग्रस्थान दिलें आहे. परंतु दुसऱ्या कांहीं निरुक्तकारांनीं आ+हन् अशी व्युत्पत्ति दिली होती. त्यामुळें यास्क म्हणतो कीं आ+हन् या-पासूनच निघंटुशब्द झाला असेल; कारण निघंटु शब्दाचा एकत्र आणलेले शब्द असाही अर्थ होतो. कोणी विचारतील कीं समाहत ह्याचें निघंटु असें रूपांतर कसें झालें ? त्याला निरुक्तकारांचें असें उत्तर आहे कीं शब्दांमध्यें फाजील अक्षरें येतात; किंवा एका अक्षराबद्दल दुसरें अक्षर येतें; अक्षरें मागेंपुढें होतात; एखादवेळेस अक्षरही नाहींसें होतें; धातूंचे जे अर्थ प्रचारांत आहेत त्याहून कधींकधीं ह्यांचे भिन्न अर्थ होतात. ह्या त्यांच्या सिद्धांतामुळें समाहन्तु या मूळ शब्दांत सम्+आ याच्या ठिकाणीं

नि आला आणि हन्तु याचें घंट्ट असें रूप झालें. परंतु ह्या दोन व्युत्पत्तींमध्यें ठिकठिकाणांहून आणणें हा अर्थ येत नाहीं. त्यासाठीं समाहर्तु हाही मूळ शब्द असेल असें मानण्यास हरकत नाहीं. वरीलप्रमाणें येथेंही 'समा' ह्याच्याबद्दल 'नि' घ्यावा व हर्तु ह्याचें घंटु हें रूप कसें तरी झालें असें म्हणावें. अर्थाप्रमाणें व्युत्पत्ति केलीच पाहिजे, हवी तशी ओढाताण झाली तरी चालेल असें बहुतेक निरुक्तकारांचें मत होतें. त्यांना जर कोणीं विचारलें असतें कीं राजनिघंट्ट ह्यांतील निघंटुशब्दाची व्युत्पत्ति कशी कराल तर घट् किंवा घण्ट् ह्या धातूपासून तो निघाला आहे असें त्यांनीं स्पष्ट उत्तर दिलें असतें. कारण राजनिघंट्ट ह्यांत वरील तीन अर्थ येत नाहींत; एके ठिकाणीं आणणें एवढाच त्याचा अर्थ आहे. तेव्हां तो घट् किंवा घण्ट् या धातूपासून उत्पन्न झाला आहे.

**तत् यानि एतानि चत्वारि पदजातानि नामाख्याते च उपसर्गनिपाताश्च तानि इमानि भवन्ति**

आतां व्याकरणामध्यें शब्दांचे जे प्रसिद्ध चार वर्ग केले आहेत, म्हणजे नाम आणि आख्यात व उपसर्ग आणि निपात, ते चार वर्ग निघंटूंचे पडतात.

**तत्र एतत् नामाख्यातयोः लक्षणं प्रदिशन्ति**

ह्यांपैकीं नाम व आख्यात ह्यांचें असें लक्षण करतातः—

**भावप्रधानम् आख्यातम् । सत्त्वप्रधानानि नामानि**

ज्या शब्दामध्यें भाव म्हणजे क्रिया ही प्रधान असते तो शब्द आख्यात होतो. ज्या शब्दांमध्यें सिद्ध वस्तु (सत्त्व) प्रधान असतात तीं नामें होत.

आख्यात व नाम ही जेव्हां वेगवेगळीं असतात तेव्हां एकामध्यें क्रिया प्रधान व दुसऱ्यामध्यें सिद्ध वस्तु प्रधान असें म्हणणें बरोबर आहे. परंतु

**तत् यत्र उभे भावप्रधाने भवतः**

जेथें म्हणजे वाक्यांत दोन्ही एकत्र येतात तेथें त्या दोन्ही शब्दांत म्हणजे त्या वाक्यांत क्रिया ही प्रधान असते.

**टीपः**—वरील टीपेंत निरुक्तकारांचा सिद्धांत सांगितला आहे. प्रत्येक वाक्यांत क्रिया ही प्रधान असलीच पाहिजे. नुसतें क्रियापद घालूनही वाक्य होऊं शकेल; पण नुसतें नाम घातल्यानें वाक्य होणार नाहीं. नाम आणि आख्यात यांच्याशिवाय वाक्यच नाहीं. तेव्हां असा प्रश्न उत्पन्न होतो कीं सत्त्व हें प्रधान कीं क्रिया ही प्रधान? जणूं काय दोघांमध्यें भांडण सुरू होतें. तेव्हां निरुक्तकार क्रिया ही प्रधान असा निकाल देतात.

**पूर्वापरीभूतं भावम् आख्यातेन आचष्टे व्रजति पचति इति ।**

क्रियेचे पहिला, मागूनचा (पूर्वापरीभूतं भावं) असे भाग पडतात. अशी क्रिया आख्यातानें दर्शविली जाते; जसें:—जातो, शिजवितो.

**टीपः**—'जातो' ह्यांत कुठून कोठें जातो असा प्रश्न उत्पन्न होतो. घरांतून निघून रस्त्यानें अमक्या एका ठिकाणापर्यंत म्हणजे बाजार, शाळा वगैरेपर्यंत 'जातो' ही क्रिया चाललेली असते. पावलापाठीमागून पाऊल टाकून किंवा दुसऱ्या कोणत्या रीतीनें म्हणजे घोड्यावर बसून, गाडींत बसून, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाणें, ही क्रिया 'जातो' ह्या शब्दानें सांगितली जाते. विस्तव पेटविणें, भांड्यांत पाणी घालणें, पाण्याला आधण आल्यावर त्यांत तांदूळ वैरणें, मध्यें शिजला कीं नाहीं म्हणून शीत चेपून

पहाणें, मधूनमधून ढवळणें, पाणी कमती झालें असल्यास ज्यास्त पाणी घालणें, ज्यास्त झालें असल्यास काढून घेणें व शिजल्याबरोबर भांडें खालीं उतरणें, ह्या सर्व गोष्टी 'शिजवितो' ह्यामध्यें येतात.

**उपक्रमप्रभृति अपवर्गपर्यन्तम्**

प्रत्येक क्रियेला उपक्रम म्हणजे प्रारंभ आणि अपवर्ग म्हणजे शेवट असतो. म्हणजे आरंभापासून शेवटपर्यंत जें कांहीं चाललेलें असतें ती क्रिया.

**टीपः**—'उपक्रमप्रभृति अपवर्गपर्यन्तम्' हे शब्द 'पूर्वापरीभूतम्' याच्या आधीं किंवा नंतर घालावयास पाहिजे होते. तशानें अर्थ खालीलप्रमाणें ज्यास्त स्पष्ट झाला असता. तो अर्थ असाः—

ज्याला आरंभ आहे व शेवट आहे व ज्याला पायऱ्या आहेत म्हणजे पहिल्या प्रथम अमुक गोष्ट, नंतर अमुक असा क्रम असतो तो भाव.

**मूर्तं सत्त्वभूतं सत्त्वनामभिः व्रज्या पक्तिः इति**

चालू असलेली क्रिया जेव्हां पुरी होते तेव्हां तिला मूर्त स्वरूप येतें; म्हणजे तिचा 'साध्यपणा' जाऊन तिला 'सिद्ध' स्वरूप येतें. असें झालें म्हणजे नामानें तिचा निर्देश करितात. 'नामभिः' याच्या पाठीमागें 'सत्त्व' शब्द उगाच घातलासा वाटतो. तो हस्तदोष असूं शकेल किंवा कोणी अजाण मनुष्यानें तो घुसडला असेल. 'व्रजति' आणि 'पचति' ह्या क्रिया जेव्हां संपतात तेव्हां त्या सिद्धस्वरूप क्रिया व्रज्या आणि पक्ति ह्या नामांनीं दर्शविल्या जातात.

**टीपः**—प्रत्येक नाम क्रियेपासून झालें आहे असे वरतीं म्हटलेंच आहे. गाय, घोडा, पुरुष, हत्ती, खुर्ची वगैरे नामें एके काळीं 'साध्य' अशा अवस्थेंत होतीं असें निरुक्तकारांचें म्हणणें आहे. गौ ह्या शब्दांत गम् किंवा गा असा कोणचा तरी धातु आहे. पहिल्याप्रथम गाय चालतांना दृष्टीस पडल्याबरोबर पाहणारानें तिला 'जाणारी' (गौः) अशी संज्ञा दिली व ती संज्ञा सगळ्या गाईबैलांना लागू झाली. कोणी म्हणेल, जाणाऱ्या अशा लक्षावधि वस्तु आहेत; ह्या सगळ्यांना गौः असें कां म्हणत नाहींत ? त्याला निरुक्तकारांचें एक उत्तर, बोलणारांची मर्जी किंवा अनेक वस्तूंना एक नाम देण्यापेक्षां तें एकालाच देणें ज्यास्त सोईस्कर. अनेक वस्तूंना जर एकच नांव दिलें तर गोंधळ माजेल. नामें कशीं अस्तित्वांत आलीं हा अतिशय कठीण प्रश्न आहे. धातूपासून नामें झालीं असा ठाम सिद्धांत ठोकून देणें चुकीचें होईल. धातूंपासून कांहीं नामें झालीं असतील. परंतु मनुष्य जसा शहाणा होत गेला व त्याला ज्यास्तज्यास्त अनुभव येत चालला तसा त्यानें प्रत्येक वस्तूला कांहीं एका गुणामुळें--तिच्यांत असणाऱ्या कांहीं विशेष गोष्टीवरून---अमुक एक नांव दिलें असावें. गो, अश्व, वगैरे नांवें धातूंपासून निघालीं नसून कांहीं विशेष गुणांवरून पडलीं असावींत. भाषा ही बहुतेक अंशीं कृत्रिम आहे.

**अदः इति सत्त्वानाम् उपदेशः। गौः अश्वः पुरुषः हस्ती इति**

जेव्हां अनेक वस्तूंचा निर्देश करावयाचा असतो तेव्हां ही किंवा हा (अदः) असें सर्वनाम वापरतात. पण ज्या वेळेस प्रत्येक गोष्ट निराळी सांगावयाची असते तेव्हां निरनिराळीं नामें वापरावीं लागतात, जसें:—गाय, घोडा, पुरुष, हत्ती.

**टीपः**—अदः ह्या शब्दानें पाहिजे त्या वस्तूचा निर्देश होईल, जसे 'ही' हें सर्वनाम गाय, दौत, समई, खुर्ची, अशा कोणच्याही स्त्रीलिंगी नामाला लागेल. तसेंच 'हा' हें पुंलिंगी नामांना व 'हें' हें नपुंसकलिंगी नामांना लागेल. अदः ह्या शब्दांत तो, ती, तें, वगैरे सर्वनामांचा अंतर्भाव होतो. सर्वनाम ह्या शब्दाचा अर्थ सर्व वस्तूंचें म्हणजे पाहिजे त्या वस्तूचें नांव, हें सगळ्यांस माहीतच आहे.

**भवति इति भावस्य। आस्ते शेते व्रजति तिष्ठति इति**

प्रत्येक क्रिया ' भवति ' ह्यानेंच सांगितली जाते. भवति म्हणजे होतो. अमका एक मनुष्य काय होतो? तर तो बसतो, खातो, निजतो, पळतो वगैरे कोणचीही क्रिया त्याच्यामध्यें होते. सगळ्या क्रियांचें मूळ भवति. बसतो, निजतो, जातो, उभा राहतो हीं भावाचीं विशिष्ट रूपें होत.

**टीपः**—'भावप्रधानं आख्यातम्' व 'भवतीति भावस्य' येथें एकवचन वापरलें आहे व 'सत्त्वप्रधानानि नामानि' आणि 'अदः इति सत्त्वानाम् उपदेशः' येथें अनेकवचन वापरलें आहे. ह्याचें कारण भाव म्हणजे क्रिया ही सर्व क्रियांच्या व सत्त्वांच्या मूळाशीं आहे. अनेक नामें एका क्रियेपासून उत्पन्न होतात व कोणचीहि क्रिया असली तरी भाव याचीच कोणत्या तरी रूपानें ती आवृत्ति होते. भाव एक व या भावापासूनच अनेक नामें उत्पन्न होतात. येथें वस्तु कशा उत्पन्न होतात असा प्रश्न नसून नामें कशी अस्तित्वांत आलीं असा प्रश्न आहे.

## खंड २ रा.

**इन्द्रियनित्यं वचनम् औदुम्बरायणः**

बोललेलें (वचनम्) इंद्रियांवर अवलंबून असतें [ इंद्रियनित्यम् ] असें औदुंबरायण ह्याचें मत आहे. येथें नित्य ह्या शब्दाचा अर्थ नित्य नसून अवलंबून असणारें असा आहे. हीं इंद्रियें तोंड व कान हीं होत. त्यांचा व्यापार जोपर्यंत चालला आहे तोपर्यंत शब्दाला अस्तित्व. तोंडांतून शब्द बाहेर पडला व ऐकणारानें तो ऐकला म्हणजे त्या शब्दाचें अस्तित्व संपलें. अशा रीतीनें जर शब्द नष्ट होतो तर

**तत्र चतुष्ट्वं न उपपद्यते**

शब्दांचे नाम, आख्यात, उपसर्ग व निपात असे जे चार वर्ग ते होतच नाहींत व

**अयुगपदुत्पन्नानां वा शब्दानाम् इतरेतरोपदेशः**

वाक्यांतील सगळे शब्द एका वेळीं तोंडांतून निघत नाहींत. ते एकामागून एक निघतात. म्हणून एका वेळीं उत्पन्न न झालेल्या शब्दांचा [ अयुगपदुत्पन्नानां शब्दानाम् ] परस्परांशीं व्याकरणानें ठरविलेला संबंध [ इतरेतरोपदेशः ] जुळतच नाहीं. तसेंच

**शास्त्रकृतो योगश्च**

निरुक्तशास्त्रानें जी शब्दांची व्युत्पत्ति केली जाते [ शास्त्रकृतः योगः ] तिलाही वांव नाहीं; कारण सगळे शब्द जर आपल्यापुढें असतील तर मग त्यांचा संबंध कर्ता, कर्म, क्रियापद असा जुळवितां येईल. शब्द जर उच्चारल्याबरोबर नाहींसे होतात तर संबंध कशाचा जुळवावयाचा? एका शब्दासंबंधानेंही तीच अडचण. गोशब्दाचे ग् आणि ओ असे दोन अवयव पडतात. आपण ' ग् ' उच्चारतों तों ' ओ ' नाहीं व ' ओ ' उच्चारतों तों ' ग ' नाहीं; तर मग व्युत्पत्ति कशाची करावयाची?

**व्याप्तिमत्त्वात् तु शब्दस्य**

व्यक्तिशः शब्द जरी नश्वर असले तरी स्फोट हा नश्वर नाहीं. शब्द म्हणजे

स्फोट; हा व्याप्तिमान् आहे; म्हणजे तो मनांत कायमचा असतो. उच्चारलेले व ऐकलेले शब्द ह्या स्फोटास जागे करितात. तेव्हां वर्गीकरण वगैरे स्फोटामध्यें होतें. कोणी विचारतील कीं शब्द पाहिजेत कशाला ? खुणांनीं सुद्धां व्यवहार चालेल. याला उत्तर

**अणीयस्त्वाच्च शब्देन संज्ञाकरणं व्यवहारार्थं लोके**

जगांत [ लोके ] परस्पराबरोबर जो व्यवहार होतो [ व्यवहारार्थम् ] त्यांत वस्तूचा शब्दांनीं निर्देश करणें [ शब्देन संज्ञाकरणम् ] खुणांपेक्षां जास्त सोयीचें असतें [अणीयस्त्वात् ]. जेथें शब्द समजत नसतील किंवा परस्परांना परस्परांचीं भाषा कळत नसेल त्यावेळीं खुणांनीं अर्थ कळविणें अपरिहार्य असतें व त्यानें कामगिरी बरोबर होत नाहीं.

**तेषां मनुष्यवत् देवताभिधानम्**

शब्दांचा जो मनुष्यांमध्यें अर्थ [ मनुष्यवत् ] तोच देवांमध्यें अर्थ [ देवताभिधानम् ]. देव कांहीं आपसांत निराळी भाषा बोलत नाहींत. तर मग मंत्र कशाला ? आम्ही जे बोलूं ते देव समजतीलच. याला उत्तर

**पुरुषविद्याऽनित्यत्वात् । कर्मसंपत्तिः मन्त्रो वेदे**

माणसांचें ज्ञान ( पुरुषविद्या ) अनित्य असतें. क्षणांत माणसांना विसर पडतो. माणसांना बरोबर शब्द आठवत नाहींत. चुका होण्याचा अतिशय संभव. यज्ञांत जर आपण भलतें बोललों तर यज्ञकर्म सफल होणार नाहीं. म्हणून यज्ञादिकर्म फलसंपन्न होण्यास ( संपत्तिः ) वेदांत मंत्र सांगितले आहेत.

**टीपः**—ह्या प्रकरणांतील भाषा पाणिनीच्या सूत्रासारखी फार त्रोटक आहे. प्रत्येक शब्दांतून वाक्यासारखा अर्थ काढावा लागतो.

**षड् भावविकाराः भवन्ति इति वार्ष्यायणिः**

भाव म्हणजे क्रिया; हिचे सहा विकार म्हणजे रूपें होतात, असें वार्ष्यायणि म्हणतो. तीं सहा रूपें खालीलप्रमाणें

**जायते अस्ति विपरिणमते वर्धते अपक्षीयते विनश्यति इति**

जायते म्हणजे जन्माला येतो, अस्ति म्हणजे त्याला आस्तित्व येतें, विपरिणमते म्हणजे त्याच्यांत बदल होतो, वर्धते म्हणजे वाढतो, अपक्षीयते म्हणजे तो क्षीण होत जातो, विनश्यति म्हणजे तो मरतो. ह्या प्रत्येक विकाराचें खालीलप्रमाणें लक्षण किंवा वर्णन केलें आहेः—

**जायते इति पूर्वभावस्य आदिम् आचष्टे**

जायते हा विकार पहिला जो भाव म्हणजे जन्म त्याचा केवळ प्रारंभ सांगतो, म्हणजे जन्मतो एवढाच त्यापासून अर्थ निघतो. पण

**न अपरभावम् आचष्टे**

त्यानें अपरभाव म्हणजे पुढें सांगितलेला भाव म्हणजे अस्तित्व हें सांगितलें जात नाहीं. तर मग कोणी म्हणेल कीं ज्याअर्थी अस्तित्व सांगितलें जात नाहीं त्याअर्थी जो जन्मतो त्याला अस्तित्व नसावें. ह्याला उत्तर

**न प्रतिषेधति**

जायते ह्यानें अस्तित्वाचा निषेध केला नाहीं. जी वस्तु जन्माला येते तिला अस्तित्व असलेंच पाहिजे. परंतु जायते ह्यानें जन्मतो एवढेंच घ्यावयाचें; तेथें अस्तित्व असून-ही 'जायते' ह्यानें त्याचा निर्देश केला जात नाहीं.

**अस्ति इति उत्पन्नस्य सत्त्वस्य अवधारणम्**

अस्ति ह्यानें जन्माला आलेली जी वस्तु तिचें अस्तित्व निश्चितपणें सांगितलें जातें. 'जायते' ह्या विकारांत अस्तित्व असूनहि त्याचा निर्देश नव्हता; तो 'अस्ति' ह्यानें स्पष्ट केला जातो. येथें आचष्टे हें कियापद अध्याहृत आहे.

**विपरिणमते इति अप्रच्यवमानस्य तत्त्वाद् विकारम् (आचष्टे)**

'विपरिणमते' ह्यानें अस्तित्वांत असलेल्या वस्तूंत विकार म्हणजे बदल होतो हें सांगितलें जातें. त्या वस्तूचें अस्तित्व [तत्त्व] हें कांहीं नष्ट होत नाहीं [अप्रच्यवमानस्य].

**वर्धते इति स्वाङ्गाभ्युच्चयं (आचष्टे)**

'वर्धते' [वाढतो] यानें वस्तूच्या अंगांची वाढ [स्वाङ्गानाम् अभ्युच्चयम्] सांगितली जाते; म्हणजे वस्तु शरीरानें वाढते; किंवा

**सांयोगिकानां वा अर्थानां अभ्युच्चयम् (आचष्टे)**

वस्तूंशीं ज्या गोष्टींचा संबंध आहे त्यांची वाढ सांगितली जाते. जसें

**वर्धते विजयेन इति वा**

मनुष्य विजयानें वाढतो. विजय हा मनुष्याचें कांहीं अंग नाहीं. ती एक बाह्य वस्तु आहे. ही बाह्य वस्तु तो मिळवितो. हें जें मिळविणें ती त्या मनुष्याची एका प्रकारची वाढ होय. हें उदाहरण पहिल्या प्रथम देण्याचें कारण 'सांयोगिकानां वा अर्थानाम्' हे शब्द जवळ आहेत म्हणून. किंवा

**वर्धते शरीरेण इति वा**

मनुष्य शरीरानें वाढतो.

**अपक्षीयते इति एतेन एव व्याख्यातः प्रतिलोमम्**

'अपक्षीयते' हा विकार 'वर्धते' ह्याच्या उलट आहे म्हणून 'वर्धते' ह्याचें जें लक्षण किंवा वर्णन त्याच्या उलट 'अपक्षीयते' ह्याचें. म्हणजे 'वर्धते विजयेन' ह्याच्या उलट 'अपक्षीयते पराजयेन'; म्हणजे त्याचा पराभव होतो. म्हणजे पराभव हा त्या मनुष्याचा क्षय किंवा ऱ्हास. 'वर्धते शरीरेण' ह्याच्या उलट 'अपक्षीयते शरीरेण'; पूर्वी शरीराची वाढ झाली; आतां शरीराचा ऱ्हास होतो.

**विनश्यति इति अपरभावस्य आदिम् आचष्टे**

'विनश्यति' ह्यानें फक्त वस्तूचा विनाश सांगितला जातो. अपरभाव म्हणजे विनाश. पण

**न पूर्वभावम् आचष्टे**

विनाशाच्या आधींचा जो भाव म्हणजे अपक्षय तो सांगितला जात नाहीं; तर मग

ऱ्हास झाल्याखेरीज किंवा झिजल्याखेरीज मनुष्य मरतो कीं काय ? ह्याला उत्तर

**न प्रतिषेधति**

विनाशामध्यें जरी ऱ्हास असतो तरी तो ऱ्हास सांगण्याचा 'विनश्यति' ह्या विकाराचा उद्देश नाहीं. हें ' विनश्यति ' ह्याचें जें लक्षण तें ' जायते ' ह्या लक्षणासारखेंच आहे. ' जायते ' ह्यानंतर ' अस्ति ' येतें. परंतु जायंत ह्यांत अस्तित्व असूनहि त्याचा निर्देश नसतो. जायते ह्यानें 'जन्मतो' एवढेंच सांगावयाचें असतें. त्याप्रमाणें 'विनश्यति' ह्यामध्यें ऱ्हास असूनही तो सांगण्याचा हेतू नसतो.

ह्याप्रमाणें भाव म्हणजे क्रिया हिची सहा रूपें सांगितलीं; म्हणजे क्रिया सहा प्रकारच्या असतात हें सांगितलें.

**अतः अन्ये भावविकाराः एतेषाम् एव विकाराः भवन्ति**

ह्यांहून दुसरेही भावविकार म्हणजे दुसऱ्या क्रिया (पुष्कळ) आहेत. त्या ह्या सहा प्रकारांचेंच निरनिराळे प्रकार होत.

**इति ह स्म आह**

असें वार्ष्यायणि म्हणतो.

**ते यथावचनम् अभ्यूहितव्याः**

येथें न सांगितलेल्या दुसऱ्या अनेक क्रिया ह्या सहापैकीं कोणत्या विकारामध्यें अंतर्भूत होतात हें त्या त्या क्रियेवरून म्हणजे त्या त्या क्रियेच्या अर्थावरून तर्कानें ओळखावें.

**टीप**:—भावाचे हे सहा विकार सजीव वस्तूंना लागू पडतील. मनुष्यें, जनावरें, पाखरें, झाडें वगैरे सजीव आहेत. तीं जन्माला येतात, तीं अस्तित्वांत आलीं असें समजतें, त्यांची स्थित्यंतरें होतात, तीं वाढतात, झिजतात व मरतात. परंतु हें सर्व दगडामातीला कसें लागूं पडेल ? यच्चयावत् क्रिया कांहीं सजीवासंबंधानेंच घडतात असें नाहीं. नदीचें पाणी पर्वतापासून खालीं येतें, समुद्रावर बर्फाचा डोंगर तरंगतो, धरणी कांपते, ह्या क्रिया सहा भावविकारांपैकीं कोणत्या विकारांत अंतर्भूत होतील ? सजीवांचेंही बसणें, उठणें, खाणें, पिणें, धांवणें, उडणें कोणत्या सदरांत येईल ? जन्मणें,वाढणें, झिजणें, मरणें, हे विपरिणामांत अंतर्भूत होत नाहींत काय ? 'विनश्यति' खेरीज अस्तित्व बाकीच्या चार विकारांतही आहे. ह्या सहा विकारांचें प्रयोजन कांहीं दिसत नाहीं. ते परस्पराहून भिन्न नसून व्यापकही नाहींत. वैयाकरणांनीं हे सहाच विकार कां व ज्यास्त कां नाहींत असा प्रश्न केला व तसा प्रश्न करणें बरोबर आहे. ह्या खंडाची येथें कांहीं एक जरूर नाहीं.

## खंड ३.

**न निर्बद्धाः उपसर्गाः अर्थान् निराहुः इति शाकटायनः**

उपसर्ग जर नामांना व क्रियापदांना जोडले नसले ( निर्बद्धाः ) तर त्यांना कांहीं अर्थ नसतो असें शाकटायन म्हणतो.

**टीप**:—स्वतः उपसर्गांना कांहीं अर्थ नसतो. नामें व क्रियापदें यांमध्यें लपून राहिलेला अर्थ उपसर्ग बाहेर काढतात एवढीच त्यांची कामगिरी असें महाभाष्यकारांचें मत आहे.

**नामाख्यातयोः तु कर्मोपसंयोगद्योतकाः भवन्ति**

नामें व क्रियापदें ह्यांच्यामध्यें कांहीं ज्यास्त अर्थ आला आहे (कर्मोपसंयोग), हें

फक्त उपसर्ग दाखवितात [द्योतकाः भवन्ति]. उपसर्गांना स्वतःचा अर्थ नाहीं, ते नामें आणि क्रियापदें ह्यांचा ज्यास्त अर्थ दाखविणारीं केवळ चिन्हें होत. 'तु' या निपातानें दोन मतांपैकीं शाकटायनास कोणचें मत पसंत होतें हें दाखविलें जातें.

**उच्चावचाः पदार्थाः भवन्ति इति गार्ग्यः**

उपसर्ग पदें असून त्यांचे नानाप्रकारचे अर्थ होतात असें गार्ग्य म्हणतो.

**टीपः**—पदार्थाः = पदानां अर्थाः। उपसर्गाः पदानि। तेषां पदानां उच्चावचाः अर्थाः असा अन्वय केला पाहिजे.

**तत् यः एषु पदार्थः प्राहुः इमे तम्**

ह्यांच्यामध्यें जो अर्थ दिसतो तो हे सांगतातच.

**टीपः**—यः एषु पदार्थः ह्याची एषु पदेषु यः अर्थः अशी फोड केली पाहिजे. उपसर्ग ह्या पदांमध्यें जो अर्थ दिसतो तो त्यांचाच अर्थ आहे; 'नामें व आख्यातें' ह्या पदांचा तो अर्थ नाहीं असें गार्ग्य ठासून म्हणतो.

गार्ग्यानें पदशब्दावर जोर दिला आहे. उपसर्ग जर पदें आहेत तर त्यांना अर्थ असलाच पाहिजे, हें गार्ग्याचें म्हणणें बरोबर आहे. ऋग्वेद वाचीत असतांना उपसर्गांचे किती भिन्न भिन्न अर्थ होतात हें स्पष्ट निदर्शनास येतें.

तो अर्थ कोणचा असें कोणी विचारील तर

**नामाख्यातयोः अर्थविकरणम्**

नामें आणि क्रियापदें ह्यांचा अर्थ बदलणें हा उपसर्गांचा अर्थ.

**टीपः**—स्वतःला अर्थ असल्याशिवाय उपसर्ग नामें व क्रियापदें यांचा अर्थ कसा बदलूं शकतील?

**आ इति अर्वागर्थे**

'आ' या उपसर्गाचा अर्थ अर्वाक् म्हणजे खालीं; जसें, 'आ गहि' देवा, तूं खालीं ये. 'आ' ह्याचा हा खरा अर्थ नसून ज्या क्रियापदांना 'आ' लावतात त्या क्रियापदांचा उलट अर्थ 'आ' ह्यानें होतो. गच्छ=जा, आ+गच्छ=ये. नय=ने, आ+नय=आण.

**प्र परा इति एतस्य प्रातिलोम्यम्**

प्र व परा ह्या उपसर्गांनीं आ ह्याच्या उलट अर्थ दाखविला जातो; जसें, प्रपतेत्=वर जाईल, परापतन्ति=वर जातात.

**अभि इति आभिमुख्यम्**

अभि ह्यानें कडे हा अर्थ दाखविला जातो; जसें, 'इन्द्रम् अभिगच्छति=इंद्राकडे जातो. ह्या उपसर्गाचे दुसरेही अर्थ आहेत. अस्तु=असो; पण अभ्यस्तु=पराभव करो.

**प्रति इति एतस्य प्रातिलोम्यम्**

प्रति ह्यानें अभि ह्याच्या उलट अर्थ दाखविला जातो. अभि ह्यानें अनुकूल अर्थ दर्शविला जातो, तर प्रति ह्यानें प्रतिकूल म्हणजे शत्रुत्व दर्शविलें जातें. अप्रति हा शब्द ऋग्वेदांत बऱ्याच वेळां आला आहे. हा शब्द अव्यय किंवा विशेषण असा वापरला आहे. शत्रूला पुनः तोंड वर काढतां येत नाहीं असा अप्रति ह्या शब्दांत अर्थ आहे.

**अति सु इति अभिपूजितार्थे**

अति आणि सु हीं ज्या शब्दांमागें लावतात ते शब्द ह्या उपसर्गांनीं पूज्य ( अभिपूजित ) होतात; जसें, अतिधनः=ज्याच्याजवळ पुष्कळ धन आहे असा. सुजनः= सज्जन. सु ह्याचा अभिपूजित किंवा चांगला असा अर्थ आहे. पण ऋग्वेदांत अति ह्याचा तसा अर्थ नाहीं. अति हा उपसर्ग शेकडों ठिकाणीं आला आहे व बऱ्याच ठिकाणीं त्याचा अर्थ 'ओलांडणें' असा आहे. शत्रु आड आला असतांना त्याला पलीकडे सारून किंवा दुसऱ्या कोणच्या तरी युक्तीनें पलीकडे जाणें, ह्या अर्थी अति वापरला आहे. नावाडी जसा नावांतून लोकांना नदीपलीकडे नेतो तसें आम्हांला संकटाच्या पलीकडे ने अशी इंद्रादिकांना विनंति केली जाते. अति ह्यानें अतिशय, वर्चस्व, जोर, असेही अर्थ दर्शविले जातात. ' सु ' ह्याचा अर्थ सुकर असाही होतो.

**निस् दुस् इति एतयोः प्रातिलोम्यम्**

अति ह्याच्या उलट निस्, सु ह्याच्या उलट दुस्; जसें निर्धनः हें अतिधनः ह्याच्या उलट; दुर्जनः हे सुजनः ह्याच्या. निस् ह्यानें बाहेर असा अर्थ दर्शविला जातो. अद्भ्यः निरौब्जत् किंवा निरधमत्=(वृत्राला इंद्रानें) पाण्यांतून हुसकाऊन लाविलें किंवा बाहेर फेकून दिलें. सुवित=सु+इत म्हणजे कल्याण, ह्याच्या उलट दुरित=दुस्+इत= संकट, अकल्याण, सुग ह्याच्या उलट दुर्ग.

**नि अव इति विनिग्रहार्थीयौ**

नि आणि अव हें उपसर्ग विनिग्रह हा अर्थ दाखवितात; विनिग्रह म्हणजे दाबून टाकणें. जसें, निगृह्णाति, अवगृह्णाति. ह्या दोहोंचाही अर्थ दाबून टाकतो, कोंडून ठेवतो, असा होतो.

**उत् इति एतयोः प्रातिलोम्यम्**

उत् हा उपसर्ग वरील दोन उपसर्गांच्या उलट आहे; जसें, उद्गृह्णाति, बाहेर काढतो, मोकळें सोडतो; किंवा(सूर्यः) उदेति म्हणजे ( सूर्य आपल्या घरांतून ) बाहेर येतो.

**सम् इति एकीभावम्**

सम् ह्या उपसर्गाचा अर्थ एकत्र करणें असा होतो; जसें, समेति=एकत्र येतो.

**वि अप इति एतस्य प्रातिलोम्यम्**

वि आणि अप ह्यांचा अर्थ 'सम्'च्या उलट; जसें, वि+एति, अव+एति=वेगळा होतो.

**अनु इति सादृश्यापरभावम्**

अनु हा सादृश्य आणि केलेल्या कृतीसारखी कृति दाखवितो; जसें, अनुरूपम् म्हणजे सदृश. अन्वेति ह्याचा अर्थ एक जातो त्याच्या पाठोपाठ दुसरा जातो. सादृश्यापरभावम् असा समाहारद्वंद्व होत नाहीं. सादृश्यापरभावौ असें पाहिजे. कदाचित् सादृश्यरूपम् अपरभावम् असा यास्काच्या मनांतील अर्थ असेल. तसा अर्थ असल्यास अनुगच्छति हें एकच उदाहरण पुरें होईल. कोणी एक जातो व त्याच्या पाठीमागून जाणारा तशीच म्हणजे जाण्याची क्रिया करतो.

**अपि इति संसर्गम्**

अपि हा संसर्ग म्हणजे निकटपणा दाखवितो; जसें, अपिकक्षः म्हणजे खांकेचा अगदीं आंतील भाग; अपिशर्वरी म्हणजे रात्रीचा मधला भाग.

**उप इति उपजनम्**

उप हा उपजन म्हणजे आधिक्य दाखवितो; जसें, उपजायते म्हणजे तेरावा महिना म्हणजे अधिक मास येतो. उप ह्याचा नेहमींचा अर्थ जवळ असा आहे; जसें, उपागहि=जवळ ये; उपैति=जवळ जातो. उप ह्याचा उपजन हा अर्थ क्वचित् होतो.

**परि इति सर्वतोभावम्**

परि ह्याचा अर्थ जिकडेतिकडे, सर्वत्र; जसें, पर्येति, जिकडेतिकडे किंवा सभोंवार जातो. परि ह्याचा अर्थ पासून, टाकून देणें, ओलांडणें, असाही होतो. सोमः पवित्रं पर्येति=सोमरस गाळण्यांतून पडतो.

**अधि इति उपरिभावम् ऐश्वर्यं वा**

अधि ह्या शब्दाचा अर्थ वर आणि ऐश्वर्य असा होतो. अधितिष्ठति=वर असतो; अधिपतिः म्हणजे सर्वांवर अमंल करणारा राजा किंवा ईश्वर.

**एवम् उच्चावचान् अर्थान् प्राहुः**

ह्याप्रमाणें उपसर्गांचे भिन्नभिन्न अर्थ होतात.

**ते उपेक्षितव्याः**

ते अर्थ निरुक्ताच्या साहाय्यानें शोधून काढावेत.

**टीपः**—प्रत्येक उपसर्गाचा एकच अर्थ यास्कानें दिला आहे व तो यास्ककालीन संस्कृताला धरून आहे. ऋग्वेदांत प्रत्येक उपसर्गाचे भिन्न भिन्न अर्थ होतात ते दाखवावयास पाहिजे होते. वर अति आणि सु ह्यांचे यास्कानें न दिलेले अर्थ दिले आहेत. ह्यांहूनही अति ह्याचे दुसरे अर्थ आहेत. प्रत्येक उपसर्गाचे सर्व भिन्न अर्थ देऊं गेल्यास ग्रंथ फार वाढेलः उपसर्गांच्या अर्थासंबंधानें एक स्वतंत्र मोठा ग्रंथ लिहितां येईल.

## खंड ४ था

**अथ निपाताः**

आतां निपातांसंबंधानें बोलूं.

**उच्चावचेषु अर्थेषु निपतन्ति**

निपात हे भिन्न भिन्न अर्थांमध्यें पडतात ( म्हणजे त्यांचे भिन्न भिन्न अर्थ होतात) म्हणून त्यांस निपात म्हणतात.

**अपि उपमार्थे**

( कांहीं ) निपातांचा उपमा दाखविण्याकरितां उपयोग करितात.

**अपि कर्मोपसंग्रहार्थे**

कांहींचा पुष्कळ वस्तु (कर्म) एकत्र आणण्याकरितां (उपसंग्रहार्थे) उपयोग करितात.

**अपि पदपूरणाः**

आणि ऋचांच्या चरणांत अक्षरें कमी पडल्यास भरतीसाठीं कांहींचा उपयोग करितात,

**तेषाम् एते चत्वारः उपमार्थे भवन्ति**

त्यांपैकीं हे चार उपमा दाखवितात.

**इव इति भाषायां च**

इव हा प्रस्तुतच्या संस्कृतांमध्यें ( भाषायाम् )

**अन्वध्यायं च**

आणि वेदांत उपमा दर्शविण्याकरितां घालितात.

**अग्निरिव [ मन्यो त्विषितः सहस्व ]**

हे मन्यु, अग्नीप्रमाणें तेजस्वी असा जो तूं तो तूं शत्रूंचा पराभव कर (ही ऋचा ऋ० सं० १० । ८४ ह्या सूक्तांत दुसरी आहे).

**इन्द्रः इव**

इन्द्र इव ध्रुवः तिष्ठ. (ऋ० सं० १० । १७३ । २)=हे राजा इंद्राप्रमाणें ह्या राष्ट्रांत तूं कायमचा रहा.

**इति**

हीं दोन उदाहरणें उपमेचीं होत.

**न इति प्रतिषेधार्थीयः भाषायाम्**

प्रतिषेध दाखविण्याकरितां 'न' ह्याचा चालू संस्कृतांत उपयोग करितात; पण

**उभयम् अन्वध्यायम्**

वेदांत दोन्हीही अर्थीं म्हणजे उपमार्थी वप्रतिषेधार्थी 'न' चा उपयोग केलेला आढळतो.

**नेन्द्रं देवममंसत ( ऋ० सं० १० । ८६ । १ )**

इंद्र देवाला मानिते न झाले.

**इति प्रतिषेधार्थीयः**

ह्या उदारणांत ' न ' नकारार्थ दाखवितो.

**पुरस्तात् उपाचारः तस्य यत् प्रतिषेधति**

वाक्यांत ज्याचा निषेध करावयाचा असतो त्याच्या आधीं 'न' चा उपयोग कारितात.

**दुर्मदासो न सुरायाम् ( ऋ० सं० ८ । २ । १२ )**

सुरा पिऊन मदमत्त लोक जसे (दांडगाई करितात).

**इति उपमार्थीयः**

येथें ' न ' उपमार्थीं वापरला आहे.

**उपरिष्टात् उपाचारः तस्य येन उपमिमीते**

वाक्यांत ज्याच्याशीं तुलना करावयाची असते त्याच्यानंतर ' न ' घालतात.

**टीपः**—हा नियम गद्यांत सर्वत्र पाळला जाणें शक्य आहे. परंतु ऋग्वेदांत कोठें कोठें ह्या नियमाचें उल्लंघन होतें; जसें

**पवमानो अजीजनत् दिवश्चित्रं न तन्यतुम् । ज्योतिर्वैश्वानरं बृहत् ॥ (ऋ० सं०९।६१।१६)**

पवमानः सोमः बृहत् वैश्वानरं ज्योतिः अजीजनत् जनयति यथा दिवः चित्रं तन्यतुं जनयन्ति =स्वर्ग जसा रंगीबेरंगी वीज उत्पन्न करतो तसा सोम लाल भडक तेज उत्पन्न करतो. येथें 'न' तन्यतुं

ह्याच्या आधीं घातला आहे. गद्यांत 'तन्यतुं न' असा प्रयोग असता.

**चिद् इति एषः अनेककर्मा। आचार्यः चित् इदं ब्रूयात् इति पूजायाम्**

चिद् ह्या निपाताचे अनेक अर्थ होतात; जसें, आचार्यच हें सांगूं शकतील. येथें चिद् यानें पूजा म्हणजे बहुमान दर्शविला जातो.

**आचार्यः कस्मात्। आचार्यः आचारं ग्राहयति आचिनोति अर्थान् आचिनोति बुद्धिम् इति वा**

आचार्य हा शब्द कसा झाला ? तो शिष्याकडून आचार घेववितो म्हणजे शिष्याला चांगला आचार कोणचा हें सांगतो व तदनुरूप त्याला वागावयास लावितो; अथवा तो शिष्यापासून गुरुदक्षिणा म्हणून पुष्कळ धन (अर्थान्) जमा करतो; अथवा शिष्याची बुद्धि वाढवितो.

**टीपः**—आचार्यासंबंधानें जें जें कांहीं म्हणावयाचें असतें तें ह्या तीन व्युत्पत्तींत आलें आहे. पण खरी व्युत्पत्ति 'आचारे साधुः' (म्हणजे सदाचारांत जो निपुण किंवा सदाचार शिकविण्यांत जो निपुण तो )आचार्यः अशी आहे.

**दधि चिद् इति उपमार्थे**

'दह्याप्रमाणें' येथें चिद् उपमार्थी आहे.

**कुल्माषान् चिद् आहर इति अवकुत्सिते**

'अरे (भिजल्यामुळें) नासलेले, कुजलेले जवस तरी खाण्याकरितां आण, (दुसरें तूं काय आणशील ?)' येथें तिटकारा दर्शविला जातो.

**कुल्माषाः कुलेषु सीदन्ति**

कुंटुंबामध्यें ते अगदीं खालीं बसतात म्हणजे पदार्थांत ह्या धान्याचा अगदीं खालचा दर्जा असतो म्हणून ह्याला कुल्माष म्हणतात. कुल्माष = कुल् (कुलेषु) + मा + षा (सीदन्ति). येथें मा फुकट घातला आहे, त्याचा कांहीं अर्थ नाहीं. कशीतरी व्युत्पत्ति दिलीच पाहिजे ह्याचें हें एक मासलेवाइक उदाहरण होय. निरुक्तांत असलीं उदाहरणें शेकडों सांपडतात.

**टीपः**—चित् हा शब्द ऋग्वेदांत अनेक वेळां आला आहे, तेव्हां यास्कानें त्यांतील उदाहरणें द्याव-यास पाहिजे होतीं. निरुक्तग्रंथाला यास्ककालीन संस्कृताशीं कांहीं कर्तव्य नाहीं. वैदिक शब्दांची व्युत्पत्ति देणें हा त्या ग्रंथाचा मुख्य उद्देश होय.

**नु इति एषः अनेककर्मा**

नु ह्याचेही अनेक अर्थ होतात.

अ बला म्हणतो कीं अमुक एक गृहस्थ हें काम करील. परंतु बला तसें वाटत नाहीं म्हणून तो अला म्हणतो

**इदं नु करिष्यति इति हेत्वपदेशे। कथं नु करिष्यति इति अनुपृष्टे**

'तुम्हाला वाटतें हा हें काम करील ?' ह्या उदाहरणांत नु निपातानें हेतूचा अपदेश केला आहे, म्हणजे सुचविलेलें काम करण्याला हा मनुष्य हेतु म्हणजे कारण (अपदेश) होत नाहीं, म्हणजे हें काम करण्याला हा योग्य नाहीं असें नु निपातानें दर्शि-

विलें जातें. तेव्हां अ बला पुन्हां म्हणतो, मला वाटतें कीं हा मनुष्य हें काम खास करील. तेव्हां ब पुन्हां विचारतो "हा कसें करील ?" त्याला अ बनें प्रश्न केल्यावरून (अनुपृष्टे) म्हणतो, "हा काम कसें करील म्हणून म्हणतां ?" किंवा अ बला खालील-प्रमाणें उत्तर देईल

**ननु एतत् अकार्षीत् इति च**

"अहो, ह्यानें हें काम (एतद्) केलेंच आहे."

**टीपः**—यास्ककालीन संस्कृतांत 'नु' चा असा उपयोग करीत असतील. पण त्या उपयोगाचें खरें मर्म आपणांस कळणें शक्य नाहीं.

**अथापि उपमार्थे भवति**

आणखी 'नु' हा उपमा दर्शवितो.

**वृक्षस्य नु ते पुरुहूत वयाः** (ऋ० सं. ६।४।३)

=वृक्षस्य इव ते पुरुहूत शाखाः.

येथें 'नु'चा अर्थ इव आणि वयाः ह्याचा अर्थ शाखाः. बाकीचे शब्द सोपे असल्यामुळें त्यांचा अर्थ दिला नाहीं. सगळ्या उदाहरणाचा अर्थ खालीलप्रमाणें:—

ज्या तुला पुष्कळ लोक बोलावतात (पुरुहून) तो तूं हे इंद्रा, तुझ्या (ते) संरक्षण करण्याच्या शक्ति किंवा उपाय झाडाच्या फांद्यांप्रमाणें आहेत. जशा झाडाला अनेक फांद्या तशा लोकांचें संरक्षण करण्याचे इंद्रापाशीं अनेक उपाय किंवा अनेक साधनें आहेत.

**वयाः शाखाः वेतेः। वातायनाः भवन्ति**

वयाः म्हणजे शाखाः म्हणजे फांद्या. वया हा शब्द 'वी' जाणें ह्यापासून झाला आहे. कारण फांद्या वाऱ्याला जाण्याचे मार्ग होतात, म्हणजे फांद्यांमधून वारा जातो.

**शाखाः खशयाः। शक्नोतेः वा**

शाखा हा शब्द मूळचा ख-शय असा होता. तो कांहीं कारणानें शा-खा असा उलट उच्चारला गेला. फांद्या 'ख' म्हणजे रिकाम्या जागेंत निजतात (शयाः). रिकामी जागा असेल तरच फांद्या वाढतात. अथवा फांद्या पानें, फुलें व फळें देऊं शकतात(शक्).

कोणच्या निपातांचें कर्मोपसंग्रह हें नांव आहे तें आतां सांगावयाचें आहे.

**अथ यस्य आगमात् अर्थपृथक्त्वम् अह विज्ञायते स कर्मोपसंग्रहः**

ज्याच्या अध्याहारानें ( आगमात् ) निरानिराळ्या वस्तूंचें पृथक्त्व खात्रीनें (अह) जाणिलें जातें त्याला कर्मोपसंग्रह अशी संज्ञा आहे.

उदाहरणार्थ, रामलक्ष्मणभरतशत्रुघ्नाः असा समास आहे. हे रामलक्ष्मण वगैरे चौघेजण एक नसून भिन्न भिन्न आहेत. हें कशानें कळतें ? समासाच्या विग्रहानें. तो विग्रह असाः— रामश्च लक्ष्मणश्च भरतश्च शत्रुघ्नश्च. 'च' विग्रहांत आणिल्यानें निरनिराळे पुरुष ध्यानांत येतात. पण

**न तु औद्देशिकम् इव विग्रहेण पृथक्त्वात्**

ह्या निरनिराळेपणा स्पष्टपणें ( औद्देशिकम् ) म्हणजे 'च' शब्द घालून सांगितल्यासारखा नाहीं. कारण समासांतले शब्द निराळे आहेत ( पृथक्त्वात् ) हें विग्रहानें कळतें. विग्रह न केल्यास सगळा समास एकव्यक्तिवाचक कोणी समजेल.

**च इति समुच्चयार्थः**

'च' हा निपात दोन किंवा अधिक वस्तूंचा समुच्चय म्हणजे एकत्रितपणा दाखवितो आणि

**उभाभ्यां संप्रयुज्यते**

दोनही शब्दांनंतर म्हणजे प्रत्येक नामानंतर घालावा लागतो. पण 'च' ह्यानें दोनच वस्तु जोडल्या जातात असें नाहीं; दोहोंहून अधिकही वस्तु जोडल्या जातात; जसें, रामश्च लक्ष्मणश्च भरतश्च शत्रुघ्नश्च. शिवाय 'च' हा निपात प्रत्येक नामानंतर घातलाच पाहिजे असें नाहीं. शेवटल्या नामानंतर घातला असता चालतो; जसें, रामः लक्ष्मणश्च अथवा रामः लक्ष्मणः भरतः शत्रुघ्नश्च.

यास्कानें दोनच वस्तु कां घेतल्या हें समजत नाहीं. त्याच्या वेळीं दोनच वस्तूंचा समास होत होता कीं काय ? व 'च' हा प्रत्येक नामानंतर घातलाच पाहिजे असा प्रचार व नियम होता कीं काय ?

**अहं च त्वं च वृत्रहन् ( संयुज्याव )** [ ऋ० सं० ८ । ६२ । ११ ]

हे वृत्राला ठार करणाऱ्या इंद्रा, मी आणि तूं, असे दोघेजण एकत्र होऊं या.

**अस्मिन् एव अर्थे आकारः**

ह्याच अर्थी म्हणजे समुच्चयार्थी 'आ' हा निपात वापरतात; जसें

( अग्निः... प्रेदु हव्यानि वोचति ) **देवेभ्यश्च पितृभ्य आ** [ ऋ० सं० १० । १६ । ११ ] इति

(हाच अग्नि,) देवांना आणि पितरांना (तुमच्याकरितां मी हवी आणिले आहेत असें सांगतो म्हणजे देवांना व पितरांना तो हवि देतो).

येथें आ=च.

**वा इति विचारणार्थे**

'वा' हा निपात विचारणा म्हणजे अनिश्चितपणा दाखवितो; जसें

**हन्ताहं पृथिवीमिमां निदधानीह वेह वा** [ ऋ० सं० १० । ११९ । ९ ] इति

(पुष्कळ सोमरस प्यायल्यानें इंद्राला स्फुरण चढतें व अशा वेळीं तो विचारतो, सोमरस प्यायल्यानें हा मी तयार आहें), सांगा ( हन्त ) मी ह्या पृथिवीला येथें ठेऊं कीं येथें ठेवूं ?

**अथ अपि समुच्चयार्थे भवति**

शिवाय 'वा' याचा समुच्चय असाही अर्थ होतो.

**वायुर्वा त्वा मनुर्वा त्वा** [ गन्धर्वाः सप्तविंशतिः । ते अग्रे अश्वमायुञ्जंस्ते अस्मिञ्जवमादधुः ॥ [काठक सं० १३ । १४ । मै० सं० १ । ११ । १ ] इति

हे अश्वा, वायु व मनु व सत्तावीस गंधर्व हे तुला रथाला जोडीत आहेत. ते अश्वाला पूर्वकाळीं (अग्रे) रथाला जोडते झाले आणि त्याच्यामध्यें वेग घालते झाले.

येथें 'वा'चा अर्थ 'आणि' असा आहे.

**अह इति च ह इति च विनिग्रहार्थीयौ पूर्वेण संप्रयुज्येते**

अह व ह हे दोन निपात दोन वाक्यांपैकीं पहिल्या वाक्यांत घालतात व जेथें विनिग्रह म्हणजे वेगळेपणा किंवा भेद दाखवावयाचा असतो तेथें त्यांचा उपयोग करितात.

**अयम् अह इदं करोतु अयम् इदम्**

ह्याला हें काम करूं द्या आणखी ह्या दुसऱ्याला हें करूं द्या.

**इदं ह करिष्यति इदं न करिष्यति इति**

हा हें काम करील, हें करणार नाहीं.

**अथापि उकारः एतस्मिन् एवार्थे उत्तरेण संप्रयुज्यते**

उ हाही निपात ह्याच अर्थी म्हणजे भेद दाखविण्यासाठीं वापरला जातो. परंतु दोन वाक्यांपैकीं दुसऱ्या वाक्यांत त्याचा उपयोग करितात.

**मृषा इमे वदन्ति सत्यम् उ ते वदन्ति इति**

हे खोटें बोलतात, परंतु ते खरें बोलतात.

**अथापि पदपूरणः ( भवति )**

शिवाय 'उ' हा पादपूरणासाठीं घालतात.

**इदमु त्यत्० पुरस्तात् तमसः ० अस्थात् ( ऋ० सं० ४।५१।१ )**

ही ती प्रकाशणारी उषा अंधकारामधून पूर्वदिशेकडे बाहेर येत आहे.

**तदु प्रयक्षतममस्य कर्म ( ऋ० सं० १।६२।६ )**

ह्या इंद्राचें तें कृत्य अतिशय स्तुत्य ( प्रयक्षतमं ) आहे.

ह्या दोन्हीं उदाहरणांत 'उ' हा पदपूरणार्थ आहे.

**हि इति एषः अनेककर्मा**

हि ह्या निपाताचे अनेक अर्थ आहेत. अ बला म्हणतो हा हें काम करील. तेव्हां ब म्हणतो

**इदं हि करिष्यति इति हेत्वपदेशे**

"तुम्हाला वाटतें हा हें करील?" ह्या वाक्यांत हि ह्यानें हें काम करण्याला हा योग्य नाहीं ( हेत्वपदेशे = हेतोः अपदेशे ) हा अर्थ दाखविला जातो.

तेव्हां अ पुनः म्हणतो, मला वाटतें हा करील, तेव्हां ब म्हणतो

**कथं हि करिष्यति इत्यनुपृष्टे**

हा कसें करील हो? हा प्रश्न अनें जें पुनः म्हटलें त्याला उत्तर म्हणून आहे.

**कथं हि व्याकरिष्यति**

हा कसें करील, सांगा. असें ब हेवा [ असूयायां ] दाखवण्यासाठीं दांत-

ओठ खाऊन मोठ्यानें म्हणतो.

**किल इति विद्याप्रकर्षे**

किल हा निपात बोलणारा आपल्याला विशेष प्रकारची माहिती किंवा ज्ञान आहे हें दाखवण्याकरितां घालतो

**एवं किल**

( तद् आसीद् युद्धम्)=(तें युद्ध)अशा प्रकारचें (झालें).

येथें बोलणारा युद्धांत हजर असून त्याचें खात्रीलायक वर्णन करतो. हें किल निपातानें दाखविलें जातें.

ह्या विधानाबद्दल शंका येऊन ऐकणारा विचारतो

**अथापि न ननु इति एताभ्यां संप्रयुज्यते**

असें खात्रीनें ( किल ) नसेल ( न किंवा ननु ) झालें.

ह्याप्रमाणें शंका येऊन प्रश्न केला असतांना किल हा शब्द न किंवा नु ह्याला जोडून घालतात ( संप्रयुज्यते ).

**मा इति प्रतिषेधे**

मा ह्याचा प्रतिषेध म्हणजे निषेध दाखवण्यासाठीं उपयोग करितात. जसें

**मा कार्षीः**=करूं नकोस, **मा हार्षीः इति च**=नेऊं नकोस.

**खलु इति च ( प्रतिषेधार्थे )**

खलु ह्याचाही निषेध दाखवण्याकरितां उपयोग करितात. जसें

**खलु कृत्वा**

**न करून**

**खलु कृतम्**

**न केलेलें.**

**अथापि पदपूरणः एवं खलु तद् बभूव इति**

खलु पदपूरणाकरितांही ( अपि ) घालतात.जसें, असें तें झालें. ह्या ठिकाणीं खलु पदपूरण आहे असें यास्क समजतो. परंतु खरोखर (खलु) असें झालें असाही अर्थ होईल.

**शश्वत् इति विचिकित्सार्थीयः भाषायाम्.**

चालू संस्कृतांत शश्वत् हा जेथें विचारनिश्चय दर्शवावयाचा असतो तेथें घालतात. एकजण दुसऱ्याला विचारतो 'कांहो असें झालें ?' तेव्हां दुसरा म्हणतो

**शश्वदेवम् इत्यनुपृष्टे**

हो, असें झालें. जेव्हां प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें असतें तेव्हां असा प्रयोग करितात.

**एवं शश्वत् अस्वयंपृष्टे**

वरच्याच्या उलट एवं शश्वत् असा जेव्हां प्रयोग करितात तेव्हां आपण दुसऱ्याला प्रश्न न घालतां तिसरा जेव्हां विचारतो तेव्हां असा प्रयोग करितात.

**टीप**:—हे बोलण्याचे सर्व प्रकार वेदिक वाङ्मयांतले नाहींत. ते यास्ककालीन संस्कृतांतले असावेत. म्हणून 'शश्वदिति विचिकित्सार्थीयो भाषायाम्' येथेंच फक्त भाषायां घालून चालणार नाहीं. बोलण्यांतील ह्या प्रकाराचें खरें रहस्य आपणांस कळणें अशक्य आहे.

**नूनमिति विचिकित्सार्थीयो भाषायाम्**

निश्चय दाखविण्याकरितां नूनं ह्याचा उपयोग चालू संस्कृतांत करितात.

**उभयम् अन्वध्यायम्**

पण वेदांत. दोन्हीं कारणाकरितां म्हणजे निश्चय दाखवण्याकरितां आणि पादपूरण करण्याकरितां त्याचा उपयोग करितात.

**विचिकित्सार्थीयश्च पदपूरणश्च**

'नूनम्' हा विचिकित्सा दाखवितो व पादपूरकही होतो.

**टीप**:—विचिकित्सार्थीयश्च पदपूरणश्च हे दोन शब्द मागाहून कोणीतरी घुसडले असावेत. कारण उभयमन्वध्यायं यामध्यें त्यांचा अंतर्भाव होतो.

**अगस्त्य इन्द्राय हविर्निरुप्य मरुद्भ्यः संप्रदित्सांचकार**

तुला हवि देतों असें इंद्राला वचन देऊन अगस्त्यानें मरुतांना तो हवि देण्याची इच्छा दर्शविली तेव्हां

**स इन्द्र एत्य परिदेवयांचक्रे**

इंद्रानें अगस्त्याकडे येऊन ( आ इत्य ) रडून तक्रार केली ( परिदेवयांचक्रे ).

**टीप**:—ऋचा रचण्याला जें कारण होतें त्या कारणाला निदान अशी संज्ञा आहे. अगस्त्य इन्द्राय वगैरे पुढील ऋचेचें निदान होय. पण खरोखर पाहतां मरुतांची इंद्राबद्दल अगस्त्यापाशीं ही तक्रार होय.

## खंड ६ वा.

**न नूनमस्ति नो श्वः कस्तद्वेद यदद्भुतम् ।**
**अन्यस्य चित्तमभिसंचरेण्यमुताधीतं विनश्यति ॥** [ ऋ० सं० १।१७०।१ ]

**न नूनम् अस्ति अद्यतनम्**

खात्रीनें आजचा हवि तर नाहींच.

**नो एव श्वस्तनम्**

उद्यांचाही नाहींच.

**अद्य अस्मिन् द्यवि**

'अद्य' शब्द कसा झाला ? अद्य = अ + द्य. अ = अस्मिन्, द्य = द्यवि. अस्मिन् द्यवि = ह्या दिवशीं.

**द्युः इति अह्नो नामधेयं द्योतते इति सतः**

'द्यु' हें दिवसाचें नाम आहे. 'द्यु' हा शब्द कशापासून झाला ? द्युत् धातूपासून. कारण दिवस प्रकाशतो ( द्योतते ).

**श्वः उपाशंसनीयः कालः**

श्वः ( = उद्यां ) हा शब्द कसा झाला? तो उप + आ + शंस् ह्यापासून झाला आहे, म्हणजे त्या काळाची म्हणजे उद्यांची वाट पहावयाची असते.

**ह्यः हीनः कालः**

ह्यः हा शब्द कसा झाला? तो 'हा' धातूपासून झाला आहे. कारण तो टाकलेला ( हीनः ) म्हणजे गेलेला काळ असतो.

**कः तद् वेद यद् अद्भुतम् = कः तद् वेद यद् अभूतम्**

जें झालेलें नाहीं (अभूतम् ) म्हणजे जें व्हावयाचें आहे तें होईल म्हणून कोण जाणतो? तें होईलच अशी कोण खात्री बाळगतो?

**इदमपि इतरत् अद्भुतम् अभूतमिव**

वैदिक भाषेहून भिन्न अशा लौकिक भाषेमध्यें जो अद्भुत शब्द आहे तोही न झाल्यासारखाच या अर्थी आहे. बोलण्यांत आपण नेहमीं म्हणतो कीं ही अद्भुत गोष्ट झाली. कोणचीही गोष्ट अद्भुत असल्यास तिच्यावर सहसा विश्वास बसत नाहीं; ती न झाल्यासारखीच असते. अद्भुतं = अभूतम्.

**अन्यस्य चित्तम् अभिसंचरेण्यम् अभिसंचारि**

अभिसंचरेण्यम् = अभिसंचारि.

दुसऱ्याचें मन हें नेहमीं चलबिचल करणारें असतें. म्हणजे माणसाचे विचार भराभर बदलत असतात. अभिसंचरेण्य हा शब्द अभि + सम् + चर् ह्याला ' एण्य ' हा प्रत्यय लागून झाला आहे.

**अन्यः नानेयः**

अन्य शब्द कशापासून झाला आहे? अन्यः = अ + न्यः. अ म्हणजे न, आणि न्यः म्हणजे ( आ ) नेयः. म्हणजे परक्या मनुष्याला सज्जनांनीं घरांत आणूं नये (न आनेयः); कारण न जाणों तो वाईट मनुष्य असेल. दुर्गाचार्य नानेयः ह्याचा दुसरा अर्थ करितात तो असाः--नानेयः = नानात्वेन व्यवस्थितस्य अपत्यम् असत्कुलप्रसूतः = बाहेरख्याली मनुष्याचा किंवा चंगीभंगी मनुष्याचा ( नानात्वेन व्यवस्थितस्य ) मुलगा म्हणजे वाईट कुलांत जन्मलेला.

**टीपः**—ह्या व्युत्पत्ति कांहीतरी आहेत; त्यांत कांही अर्थ नाहीं.

**चित्तम् चेतनेः**

चित्त हा शब्द 'चित्' विचार करणें, जाणणें ह्या धातूपासून झाला आहे.

**उत आधीतं विनश्यति = अपि आध्यातं विनश्यति**

शिवाय मनांत आणलेलें नाहींसें होतें. अमकें करावयाचें म्हणून मनुष्य मनांत आणतो परंतु तें लगेच विसरतो.

**आध्यातम् अभिप्रेतम्**

आध्यातम् = अभिप्रेतम् = मनांत ठरविलेलें.

**टीपः**—यास्क 'आधीतं' शब्द हा 'आध्यातं' असें समजतो म्हणजे तो ध्यै धातूपासून झाला

आहे असें समजतो. ती त्याची चूक आहे. तो शब्द आ+धी म्हणजे ध्यानांत आणणें ह्यापासून झाला आहे.

सबंध ऋचेचा अर्थः—

आज तर नाहींच; उद्यांही नाहीं ; कारण जें घडून आलें नाहीं तें घडेल असें कोण खात्रीनें सांगेल ? उद्यांचा दिवस अजून यावयाचा आहे. तेव्हां उद्यां अमुक एक गोष्ट घडणार हें कोणीं खात्रीनें सांगावें ? बोलून चालून दुसऱ्याचें मन अस्थिर असणारच. शिवाय मनांत ठरविलेली गोष्ट मनांतून नाहींशी होते. तेव्हां आम्हांला हवि मिळेल हें कशावरून ?

## खंड ७ वा

**अथापि पदपूरणः**

नूनं हा निपात पदपूरणही आहे.

**नूनं सा ते प्रति वरं जरित्रे दुहीयदिन्द्र दक्षिणा मघोनी ।**
**शिक्षा स्तोतृभ्य माति धग्भगो नो बृहद्वदेम विदथे सुवीराः** ( ऋ० सं० २।११।९ )

भाष्यांत यास्कानें नूनं शब्द पदपूरण असल्याकारणानें गाळला आहे.

**सा** = ती. **ते** = तुझी. प्रति + दुहीयत् = **प्रतिदुग्धाम्** = दूध देवो म्हणजे देवो. प्रति याचा अर्थ मोबदला. मोबदल्यानें देवो. स्तोता स्तुति देतो म्हणजे करतो; त्याचा मोबदला म्हणून स्तुति केलेला देव धन वगैरे देतो. **वरं** = उत्तम वस्तु. **जरित्रे** = स्तुति करणाऱ्याला. **वर** शब्द वृ धातूपासून झाला आहे. वृ म्हणजे पसंत करणें. **वरयितव्यो भवति** = पसंत करावयाचा असतो. आपल्याला जी गोष्ट पाहिजे आहे ती मागावयाची असते. **जरिता** = **गरिता** = स्तवन करणारा. जृ धातूचा पाणिनीय संस्कृतामध्यें स्तुतिकरणें असा अर्थ नाहीं. तसा अर्थ वेदांत आहे. म्हणून जृबद्दल गृ धातु द्यावा लागला. **दक्षिणा मघोनी** = धनयुक्त दक्षिणा. मघोनी=**मघवती** = धनयुक्त. **मघम् इति धननामधेयम्** = मघ हें धनाचें एक नांव आहे. **मंहतेर्दानकर्मणः** = 'मघ' शब्द 'मंह्' देणें, ह्यापासून झाला आहे. **दक्षिणा दक्षतेः समर्धयतिकर्मणः** = दक्षिणाशब्द ज्या धातूचा अर्थ समृद्ध करणें, पूर्ण करणें, असा आहे अशा दक्ष् धातूपासूनझाला आहे. **व्यृद्धं समर्धयति इति** = व्यृद्धं (वि + ऋद्धम्) म्हणजे ऋद्ध किंवा पूर्ण नसेल तें म्हणजे यज्ञयागादि कर्म दक्षिणा ही पूर्ण करिते. ऋत्विजाला दक्षिणा दिल्याशिवाय यज्ञयागादि कर्म पूर्ण होत नाहीं. **अपि वा प्रदक्षिणागमनात्** = किंवा दक्षिणेला दक्षिणा हें नांव पडण्याचें कारण सोमयागांत ऋत्विजांना ज्या गाई द्यावयाच्या असतात त्या वेदीचा दक्षिणेकडील जो भाग त्याच्यापुढून उत्तरेच्या बाजूनें दुसरीकडे न्यावयाच्या असतात, म्हणजे त्या गाईंना एका प्रकारची प्रदक्षिणा करावयाची असते, म्हणजे त्यांना डावीकडून उजवीकडे जावयाचें असतें. **दिशमभिप्रेत्य** = म्हणून दक्षिणा हा

शब्द दक्षिण दिशेला अनुलक्षून बनला असावा. **दिक् हस्तप्रकृतिः** = दक्षिण दिशेला 'दक्षिणा' हें नांव पडलें तें उजव्या हाताला अनुलक्षून. दंतकथा अशी आहे कीं प्रजापति पूर्वेकडे तोंड करून उभा राहिला तेव्हां त्याच्या उजव्या हाताला जी दिशा होती तिला दक्षिणा हें नांव पडलें. हस्तप्रकृतिः ह्या समासाचा विग्रह येणेंप्रमाणें:— हात आहे प्रकृति म्हणजे मूळ म्हणजे कारण जिचे ती. तेव्हां तो हात कोणता? त्याला उत्तर, **दक्षिणः हस्तः** = उजवा हात. उजव्या हाताला दक्षिण हें नांव पडावयाचें काय कारण? त्याला उत्तर, **दक्षतेः उत्साहकर्मणः** म्हणजे ज्या धातूचा अर्थ उत्साह म्हणजे जोर असणें किंवा समर्थ असणें असा आहे अशा दक्ष् धातूपासून तो झाला आहे. डाव्या हातापेक्षां उजव्या हातांत जोर ज्यास्त असतो. किंवा '**दाशतेः दानकर्मणः**= ज्या धातूचा अर्थ देणें असा आहे त्या दाश् धातूपासून तो शब्द झाला असावा; कारण दक्षिणा उजव्या हातानें द्यावयाची असते. **हस्तः हन्तेः** = हस्त शब्द हन् धातूपासून झाला आहे. कारण, **प्राशुर्हनने** = तो मारण्यांत डाव्या हातापेक्षां ज्यास्त चपल असतो. शिक्षा = **देहि देहि स्तोतृभ्यः कामान्** = स्तोत्यांना इच्छित वस्तु दे. मा अतिधक् = **मा अस्मान् अतिदंहीः** = **मा अस्मान् अतिहाय दाः** = आम्हांला टाकून दुसऱ्याला देऊं नकोस. **भगः नः अस्तु** = आम्हांला धन मिळो. **बृहद् वदेम स्वे वेदने** = विदथे म्हणजे स्वे वेदने म्हणजे आम्ही आपल्या यज्ञांत तुझी पुष्कळ स्तुति करूं. **भगः भजतेः** = 'भग' शब्द भज् भोगणें, सेवणें या धातूपासून झाला आहे. **बृहद् इति महतो नामधेयम्** = 'बृहत्' हें 'महत्' ( मोठें ) ह्याचें एक नांव आहे. **परिवृढं भवति** = बृहत् शब्द वृह् धातूपासून झाला आहे. कारण जी वस्तु मोठी असते ती सर्व बाजूंनीं वाढलली असते. सुवीराः = **वीरवन्तः** = वीर म्हणजे मुलगे त्यांसहित. येथें 'सु' ह्याचा अर्थ जवळ असणें असा आहे. किंवा (वा)सुवीराः = **कल्याणवीराः** म्हणजे ज्यांचे मुलगे कल्याण करणारे आहेत असे. **वीरः वीरयति अमित्रान्** = वीर शब्द वि+ईर् (घालवून देणें) ह्या धातूपासून झाला आहे. कारण वीर पुरुष शत्रूंना हाकलून देतो. **वेतेः वा स्यात् गतिकर्मणः** = किंवा ज्या धातूचा अर्थ जाणें असा आहे त्या 'वी' धातूपासून झाला असेल. कारण वीर पुरुष जिकडे तिकडे जातो, तो कधीं स्वस्थ बसत नाहीं. **वीरयतेः वा** = किंवा तो वीर शब्द शौर्याचीं कामें करणें ह्या धातूपासून झाला असेल.

**टीपः**-ह्या ऋचेचा अर्थ बराच निराळा आहे. दक्षिणा मघोनी ह्याचा अर्थ उषा असा आहे. उषेचें दक्षिणा असें एक नांव आहे. हे इंद्रा, तुझें जो स्तवन करितो त्याला धनवान् अशी जी उषा ती उत्तम वस्तु देवो. तूं स्तोत्यांना धन दे. भग म्हणजे दाता असा जो तूं तो तूं आम्हांला जाळून टाकूं नकोस (मा अतिधक्). पुत्रांसहित आम्ही यज्ञांमध्यें तुझें पुष्कळ स्तवन करूं. धक् हें दह् धातूचें आज्ञार्थी द्वितीयपुरुषाचें एकवचन आहे. त्याचा 'दा' देणें ह्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं. धक् हें रूप ऋग्वेदांत आणखी दोनतीन वेळां "जाळ" ह्या अर्थी आलें आहे. यास्काच्या भाषेंतलें 'दंहीः' हें कोणत्या धातूचें रूप आहे तें कळत नाहीं. दुर्ग आपल्या वृत्तींत यास्काच्या भाष्यांतील शब्द देऊन त्यांचें विवरण करितो. पण त्याच्या वृत्तींत 'दंहीः' शब्द आलेला नाहीं. तो म्हणतोः- मा अस्मान् अतिहाय अतीत्य

प्रयोजनवाची अर्थ करण्याचें कांहीं कारण नाहीं. पूरुषादः हें वयः ह्याचें विशेषण आहे, गौः ह्याचा अर्थ प्रत्यंचा असा यास्क व सायण ह्या दोघांनीं केला आहे. परंतु ऋचेचा अर्थ निराळा आहे असें मला वाटतें. ह्याच्या आधींच्या ऋचेंत वज्राचें वर्णन आहे. तेव्हां गौः याचा अर्थ वीज असा होणें शक्य आहे. ऋचेचा अर्थ खालीं दिल्याप्रमाणें असावा.

"वीज ( गौः ) झाडांवर पडून गडगडाट करते. त्याबरोबर प्रेतें खाणारे पक्षीहि भीतीनें वर उडतात." ह्या ऋचेचा दुसरा अर्धः 'अथेदं विश्वं भुवनं भयात इन्द्राय सुन्वदृषये च शिक्षत्' असा असून त्याचा अन्वयार्थ असा आहेः— अथ इदं विश्वं सर्वं भुवनं जगत् भयाते बिभेति । ऋषिः इन्द्राय सोमं सुन्वत् सुनोति । इन्द्रश्च ऋषये शिक्षत् धनं ददाति = (वीज पडून पक्षी उडतात) तेव्हां सगळे जग तें पाहून भितें व भिऊन ऋषी इंद्राला सोम अर्पण करून त्याचा राग नाहींसा करतो; इंद्र ऋषीला धन देतो.

गौः=माध्यमिका वाक् असा अर्थ यास्क व सायण ह्यांनीं इतर ठिकाणीं केला आहे. तोच अर्थ येथें करण्यास कांहीं हरकत नाहीं.

**आदित्यः अपि गौः उच्यते**

आदित्याला सुद्धां गौः म्हटलें आहे.

**"उतादः परुषे गवि"** ( ऋ. सं ६।५६।३)

परुषे=पर्ववति=ज्याला पेरें (पर्व) म्हणजे अहोरात्र वगैरे भाग आहेत अशा आदित्याच्या ठिकाणीं. कालाचे लहान मोठे सर्व भाग आदित्य घडवून आणतो. ते त्याच्या शरीराचे अवयव होत.

**भास्वति इति औपमन्यवः**

परुषे=भास्वति म्हणजे प्रकाशानें युक्त अशामध्यें असा औपमन्यव अर्थ करतो. सगळी ऋचा खालीलप्रमाणें आहे.

उतादः परुषे गवि सूरश्चक्रं हिरण्ययम् । न्यैरयत् रथीतमः=उत रथीतमः सूरः अदः हिरण्ययं चक्रं परुषे गवि न्यैरयत् = आणखी सर्वांत शूर (रथीतमः) असा सूर्य आपलें सोनेरी चाक निरनिराळ्या रंगांनीं चित्रविचित्र असलेल्या (परुषे) आकाशांत (गवि) फिरवितो (न्यैरयत्). येथें गो शब्दाचा अर्थ आदित्य नाहीं. देवांना जसा गो शब्द लावतात तसा अंतरिक्षालाहि लावला आहे.

**अथापि अस्य एकः रश्मिः चन्द्रमसं प्रति दीप्यते**

आणखी ह्याचा ( आदित्याचा ) एक किरण चंद्राकडे जाऊन त्याला प्रकाशित करतो.

**तत् एतेन उपेक्षितव्यम्**

तें खालील ऋचेवरून ध्यानांत आणावें. एतेन ह्याचा मंत्रार्थ जाणण्याची इच्छा करणारा शिष्य असा नेहमींप्रमाणें दुर्ग अर्थ करतो.

**आदित्यतः अस्य दीप्तिः भवति इति**

आदित्यापासून ह्याची ( चंद्राची ) दीप्ति ( प्रकाश ) होते ( चंद्राला प्रकाश सूर्यापासून मिळतो ) हें (तत् ) पुढील वाक्यावरून (एतेन) लक्षांत आणावें (उपेक्षितव्यम्). तें वाक्य असें:—

**सुषुम्नः सूर्यरश्मिः चन्द्रमाः गधर्वः ( यजु० वाजसनेयिसंहिता १८।४० )**

सुषुम्न नांवाचा सूर्याचा किरण हाच चंद्रमा. हा एक गंधर्व आहे.

**इत्यपि निगमो भवति**

( सूर्यापासून चंद्राला प्रकाश मिळतो ) असा यजुर्मंत्र आहे. ( यजुर्मंत्रानें हेंच सिद्ध होतें.)

**सोऽपि गौः उच्यते**

ह्या सुषुम्न रश्मीलाहि गौः असें म्हटलें आहे.

**अत्राह गोरमन्वत ( ऋ. सं. १।८४।१५) इति**

**तत् उपरिष्टात् व्याख्यास्यामः**

ह्या मंत्राची व्याख्या पुढें (निरुक्त ४।२५) देऊं.

**टीपः**—'तदेतेन०इत्यपि निगमो भवति' हें प्रक्षिप्त आहे. आदित्याचा एक किरण चंद्राकडे जाऊन त्याला प्रकाशित करतो, त्यालाहि गौः म्हटलें आहे असा सरळ संबंध आहे. मधील शब्दांची कांहीं जरूरी नाहीं. ती पुनरुक्ति होय. तिच्यापासून ज्यास्त अर्थ कांहीं निघत नाहीं. यास्क ऋग्वेदांतील उदाहरण ज्याअर्थीं देतो त्याअर्थीं इतर वेदांतील उदाहरणें देण्याचें त्याला कांहीं कारण नव्हतें. तो नेहमीं एकच उदाहरण देत असतो.

**सर्वे अपि रश्मयः गावः उच्यन्ते**

( सुषुम्नाला ' गौः ' म्हटलें आहे इतकेंच नव्हे तर ) सर्व किरणांनाहि 'गावः' असें म्हटलें आहे.

## खंड ७ वा

**ता वां वास्तून्युश्मसि गमध्यै यत्र गावो भूरिशृङ्गा अयासः ।**

**अत्राह तदुरुगायस्य वृष्णः परमं पदमव भाति भूरि ( ऋ. सं. १।१५४।६)**

**तानि वां वस्तूनि कामयामहे गमनाय यत्र गावः भूरिशृङ्गाः बहुशृङ्गाः**

ता = तानि = तीं. वाम् = तुम्हां दोघांचीं. वास्तूनि = घरें. उष्मसि=कामयामहे = आम्ही इच्छा करतों. गमध्यै = गमनाय = जाण्याकरितां. यत्र = जेथें. गावः = बैल. भूरिशृङ्गाः = बहुशृंगाः = पुष्कळ शिंगाचे.

**भूरि इति बहुनः नामधेयम्**

'बहु' ह्याचें 'भूरि' असें एक नांव आहे.

**प्रभवति इति सतः**

सतः ही षष्ठी आहे. जेव्हां 'बहु' हें प्रभवति म्हणजे अम्मल करते तेव्हां त्या क्रियेचें म्हणजे त्या क्रियेपासून 'भूरि' शब्द उत्पन्न होतो. 'भूरि' शब्द प्र+भू ह्याच्यापासून झाला आहे. कोणतीहि गोष्ट पुष्कळ असली म्हणजे तिचा अम्मल सर्वत्र चालतो. यास्क

'सतः सत्याः सताम्' अशीं षठ्यंतरूपें शब्दांची व्युत्पत्ति दिल्यानंतर कोठेंकोठें वापरतो. जसें:– उषाः कस्मात्। उच्छतीति सत्याः ह्या व्यत्पत्तीचें विवरण करतांना दुर्ग म्हणतोः—विवासयति हि इयं तमांसि। तस्मात् उच्छति इत्येवम् अस्या एतस्मिन् कर्मणि सत्याः कर्तरि कारके उषाः इत्येतत् अभिधानं भवति (निरुक्त २।१८) = उषा अंधःकाराला घालवून देते म्हणून उच्छति = घालवून देते ही क्रिया जेव्हां ती करीत असते तेव्हां त्या क्रियेचें म्हणजे त्या क्रियेपासून उषाः हें रूप निघतें.

**शृङ्गं श्रयतेः वा**

शिंगाला शृंग म्हणण्याचें कारण तें डोक्याचा आश्रय करतें. शृंग शब्द 'श्रि' ह्या धातूपासून निघाला आहे.

**शृणातेर्वा शम्नातेर्वा**

किंवा शृ = हिंसा करणें अथवा शम् (तोच अर्थ) ह्यापासून निघाला असेल.

**शरणाय उद्गतम् इति वा**

शृङ्गम् = शृं + गम्. शृं = शरणाय. गम् = उद्गतम्. अथवा संरक्षण करण्याकरितां तें डोक्यांतून निघालें असतें. दुर्गाच्या वृत्तींत ही व्युत्पत्ति नाहीं.

**शिरसः निर्गतम् इति वा**

शृं = शिरसः. गम् + निर्गतम्. किंवा डोक्यापासून तें निघालें असतें म्हणून त्याला शृंग म्हणतात.

**अयासः अयनाः**

अयासः म्हणजे जाणारे, सर्वत्र संचार करणारे.

**तत्र तत् उरुगायस्य विष्णोः महागतेः**

अत्र = तत्र. अह हा पादपूरण निपात असल्यामुळें भाष्यांत गाळला आहे.

उरुगायस्य = महागतेः मोठी आहे गति ज्याची = वृष्णः = विष्णोः=विष्णूचें.

**परमं पदं परार्ध्यस्थम् अवभाति भूरि**

परमं = उंच जें स्थान ( परार्ध्य ) तेथें असणारें ( स्थम् ).

ह्या मंत्रांत यजमान व त्याची बायको ह्यांना मन्त्रद्रष्टा म्हणतोः– "हे दंपती! तुम्हीं तेथें जावें म्हणून तुमच्याकरितां आम्ही त्या घरांची ( वास्तूनि ) इच्छा करतों म्हणजे तुम्हांला उत्तम वसतिगृह मिळावें अशी आमची इच्छा आहे. त्या वसतिगृहांत ( यत्र ) लांबलांब पसरलेले ( भूरिशृङ्गाः ), सतत गमन करणारे ( अयासः ), किरण ( गावः ) आहेत. त्या ठिकाणीं महागति जो विष्णु त्याचें अतिशय उंच असें पद म्हणजे आदित्यमंडल अतीशय प्रकाशतें.

' जेथें देवांची संगति इच्छिणारे, उत्तम उत्तम अन्न म्हणजे अमृत पिऊन, आनंद पावतात तेथें तें विष्णूचें गोड अन्न खाण्याची मला फार उत्कट इच्छा आहे. उरुक्रम

जो विष्णु त्याच्या उत्तमस्थानीं अमृताचा मेघ आहे, असें हिच्या आधींच्या ऋचेंत म्हटलें आहे. प्रस्तुतच्या ऋचेंत ' वाम् ' हें कोणाला उद्देशून म्हटलें आहे तें समजत नाहीं. कोणी तरी दोन देवता ' वाम् ' शब्दांनीं उद्दिष्ट असाव्यात. त्या दोन देवता विष्णु व इंद्र असतील. ऋचेचा अर्थ पुढीलप्रमाणें दिसतो.

"जेथें पुष्कळ किंवा लांब शिंगाच्या दुभत्या (अयासः ?) गाई आहेत अशा ठिकाणच्या घरांत राहण्याची आमची इच्छा आहे. त्याच ठिकाणीं उरुक्रम जो विष्णु त्याचें उच्च जें निवासस्थान तें अतिशय प्रकाशलें." ह्यावरून स्तोत्याची विष्णुलोकास जाण्याची इच्छा स्पष्ट दिसते. येथें विष्णूला वृषन् ( बैल ) असें गौरवानें म्हटलें आहे. वृषन्, गो, वगैरे विशेषणें गौरव दर्शवितात. कधीं कधीं ते शब्द केवळ शोभार्थ किंवा पादपूरण असतात.

**पादः पद्यतेः**

' पाद ' शब्द पद् = जाणें ह्यापासून निघाला आहे.

**तन्निधानात् पदम्**

जेथें पाय ठेवला जातो त्याला पद म्हणतात. तेव्हां पद शब्दहि पद् = जाणें ह्यापासून निघाला आहे.

**पशुपादप्रकृतिः प्रभागपादः**

पशोः पादाः । पशुपादाः । पशुपादाः प्रकृतिः यस्य सः प्रभागवाची पादः प्रभागपादः

कोणत्याही वस्तूचा चवथा जो भाग त्याला पाद म्हणतात. जनावराला चार पाय असतात. त्या प्रत्येकाला पाद म्हणतात. वस्तूच्या चौथ्या भागाला पाद म्हणण्याचें मूळ कारण ( प्रकृतिः ) जनावराच्या चार पायांपैकीं एक पाद होय. जनावराच्या पादापासून वस्तूच्या भागाला ' पाद ' म्हणण्याची चाल पडली आहे.

**प्रभागपादसामान्यात् इतराणि पदानि**

संहितेचीं पदें, वाक्यांतील पदें वगैरेंत पद शब्द घालण्याचें कारण तींहि संहितेचे व वाक्याचे भाग होत. ऋचेमध्यें ' पदं ' शब्द आला आहे. तो कसा उत्पन्न झाला ह्याची मीमांसा करावी लागली व त्यांतून एकदोन अनुमानें निघालीं. एका शब्दाचे अनेक अर्थ होण्याचें हेंच कारण. लक्षणेनें एका शब्दाचे अनेक अर्थ होतात. तथापि शब्दाची व्युत्पत्ति एकच. हें विधान निरुक्तसिद्धांताला विरुद्ध आहे.

**एवम् अन्येषाम् अपि सत्त्वानां संदेहाः विद्यन्ते**

जसे गो शब्दाचे अनेक अर्थ वर दाखविले व तद्विषयक संदेह दूर केला तसे ( एवम् ) इतर पृथिवीवाचक नामांविषयींहि ( सत्त्वानाम् ) संदेह उत्पन्न होतो. त्यांचा अर्थ काय व त्यांची अर्थाप्रमाणें कशी व्युत्पत्ति करावी असा प्रश्न उत्पन्न होतो.

**तानि चेत् समानकर्माणि समाननिर्वचनानि**

त्या पदांचा जर (चेत्) सारखाच (एकच) अर्थ होत असेल (समानकर्माणि) तर त्यांची व्युत्पत्ति एकच.

**नानाकर्माणि चेत् नानानिर्वचनानि**

परंतु त्यांचे जर भिन्न अर्थ होत असतील ( नानाकर्माणि ) तर त्यांची भिन्न व्युत्पत्ति केली पाहिजे (नानानिर्वचनानि).

**यथार्थं निर्वक्तव्यानि**

अर्थाप्रमाणें त्यांची व्युत्पति केलीच पाहिजे.

हा अर्थ वरील दोन वाक्यांत आलाच आहे. पुनरुक्तीची कांहीं जरूर नाहीं. म्हणून हे शब्द प्रक्षिप्त वाटतात.

**इति इमानि एकविंशतिः पृथिवीनामधेयानि अनुक्रान्तानि**

ह्याप्रमाणें पृथ्वीच्या एकवीस नावांचा अनुक्रमानें आम्हीं विचार केला.

नुसत्या गो शब्दाचा विचार केल्यानें 'सगळ्या एकवीस नांवाचा विचार केला असें कसें म्हणतां येईल ?

**तत्र निर्ऋतिः**

त्या एकवीस नामांमध्यें 'निर्ऋति' हा शब्द आहे.

**निरमणात्**

पृथ्वीला निर्ऋति म्हणण्याचें कारण तिच्यावर राहणारें सर्व प्राणी अत्यंत सुख भोगतात. निः = नि. ऋतिः – रमणम्. ऋति हा 'रम्' धातूला 'ति' प्रत्यय लावून व र्‌चें संप्रसारण करून झाला आहे. हें शब्दरूप साधतांना रम्‌मधील 'अम्' चा लोप झाला हें सांगावयास नको.

**ऋच्छतेः कृच्छ्रापत्तिः इतरा**

कृच्छ्रापत्तिः अर्थः यस्याः सा इतरा निर्ऋतिः ऋधातोः

परंतु वाईट स्थिति (कृच्छ्रापत्तिः) असा जेव्हां निर्ऋति शब्दाचा अर्थ होतो तेव्हां तो शब्द निः + ऋ ह्यापासून होतो. निः (= अतिशय) + ऋ (= जाणें) = संकटांत पडणें. अत्यंत वाईट अवस्था ती निर्ऋति.

**सा पृथिव्या संदिह्यते । तयोः विभागः**

निर्ऋतीचे अर्थ कृच्छ्रापत्ति व पृथिवी ह्यांपैकीं अमक्या एका ऋचेंत कोणता अर्थ असा संदेह उत्पन्न होतो. त्या दोन अर्थांची विभागणी केली पाहिजे. म्हणजे कोणता अर्थ कोठें लागू पडतो हें स्पष्ट सांगितलें पाहिजे.

**तस्याः एषा भवति**

ह्यर्थी जो निर्ऋति शब्द तत्संबंधीं पुढील ऋचा होय. तींत निर्ऋति शब्दाचे दोन्हीहि अर्थ आले आहेत.

## खण्ड ८ वा.

**य ईं चकार न सो अस्य वेद य ईं ददर्श हिरुगिन्नु तस्मात् ।**
**स मातुर्योना परिवीतो अन्तर्बहुप्रजा निर्ऋतिमा विवेश (ऋ. १।१६४।३२)**

**बहुप्रजाः कृच्छ्रम् आपद्यते इति परिव्राजकाः**

ज्याला पुष्कळ संतति होते तो संकटांत पडतो असा परिव्राजक म्हणजे संन्यस्त ( संसार ज्यांनीं टाकून दिला आहे असे) ह्या ऋचेचा अर्थ करतात.

**वर्षकर्म इति नैरुक्ताः**

परंतु ह्या ऋचेंत पाऊस कसा पडतो किंवा पाऊस पडणें एवढाच अर्थ आहे असें नैरुक्त म्हणतात.

**य ईं चकार इति करोतिकिरती संदिग्धौ वर्षकर्मणा**

'चकार' हें कृ = करणें व कॄ = शिंपडणें ह्या दोहोंचेंहि रूप होतें. तेव्हां दोहोंपैकीं येथें कोणता अर्थ हा संशय उत्पन्न होतो. कोणताहि अर्थ असला तरी तो वर्षकृतीला लागू पडतो, 'पाऊस तयार केला' व 'पावसाचें सिंचन केलें' असे दोन्हीहि अर्थ चकार ह्यांतून निघतील. 'य ईं चकार' याचा 'ज्यानें ह्याला (ईम्) म्हणजे वर्षावाला केलें हा किंवा त्याचें सिंचन केलें' हा अर्थ.

**न सः अस्य वेद मध्यमः**

मध्यम जो मेघ तो वर्षाव म्हणजे काय हें जाणत नाहीं.

**सः एव अस्य वेद मध्यमः यः ददर्श आदित्योपहितम्**

आदित्यानें म्हणजे सूर्यकिरणांनीं हा मेघ तयार केला आहे असें जो पाहतो तो मध्यमच इंद्र हा वर्षाव काय आहे हें जाणतो. इंद्राला पावसाची कृति किंवा शास्त्र कळतें, मेघाला कळत नाहीं.

**स मातुः योनौ माता अन्तरिक्षम्**

येथें माता म्हणजे अंतरिक्ष. अंतरिक्षाला माता म्हणण्याचें कारण

**निर्मीयन्ते अस्मिन् भूतानि**

सर्व प्राणी येथें निर्माण होतात. पाणी हें जीवनाचें कारण. तें पाणी अंतरिक्षांत निर्माण होतें. तेव्हां सर्व जीव येथेंच उत्पन्न होतात म्हणून अंतरिक्षाला माता म्हणजे निर्माता असें म्हटलें आहे.

**योनिः अन्तरिक्षम्**

योनि म्हणजे अंतरिक्ष. कारण

**महान् अवयवः**

अंतरिक्ष हा ब्रह्मांडाचा मोठा भाग आहे. म्हणजे अंतरिक्षवाची योनि शब्द अव + यु ह्यापासून झाला आहे. यु = जोडणें. अव + यु = तुकडा पाडणें. अंतरिक्ष हा ब्रह्मांडाचा मोठा तुकडा आहे.

**परिवीतः वायुना**

परिवीतः = परिवीतः वायुना = ज्याच्याभोंवतीं वारा गेला आहे.

वाऱ्यामुळें मेघ इकडे तिकडे हालचाल करतो.

**परिवीतः = परि + वि + इतः = ज्याच्याभोंवतीं गेला आहे असा.**

**अयमपि इतरः योनिः एतस्मात् एव**

हा जो दुसरा म्हणजे लौकिक भाषेंतला 'योनि' शब्द तोहि 'यु' धातूपासून झाला आहे. कारण

**परियुतो भवति**

त्याच्या भोंवतीहि स्नायु आणि मांस असतें. दुर्गाच्या पठांत 'भवति' याच्यानंतर ' स्नाय्ना मांसेन च' हे शब्द होते असें दिसतें व तसे शब्द असणें जरूर आहे.

**बहुप्रजाः भूमिम् आपद्यते वर्षकर्मणा**

निर्ऋतिम् = भूमिम्. आविवेश=आपद्यते. बहुप्रजाः=बहुशः प्रजायमानः (दुर्ग).

मेघ पावसाच्या रूपानें जन्म घेऊन पृथ्वीकडे जातो.

ह्या पाठांत ऋचेचा फक्त वर्षपर अर्थ दिला आहे. तो असाः—मेघ वर्षाव करतो किंवा पाऊस पाडतो. पण पाऊस कसा उत्पन्न होतो हें त्याला माहीत नसतें. परंतु अंतरिक्षामध्यें पाण्याची वाफ झालेली जो पाहतो त्याला ही कृति कळते. वायु ज्याच्याभोंवतीं आहे असा आकाशाच्या एका भागांत असणारा मेघ जोरानें पावसाचा जन्म घेऊन भूमींत शिरतो.

परिव्राजकांचा अर्थ दुर्गानें आधीं दिला आहे. तेव्हां दुर्गाच्या पाठांत त्या प्रकारचें यास्कभाष्य असावें. परिव्राजकांचा अर्थ असाः—जो गर्भ करतो म्हणजे गर्भाचें आधान करतो त्याला गर्भाचें स्वरूप कळत नाहीं. पण जो तें तत्त्व पाहतो तो त्याच्यापासून अलिप्त राहतो म्हणजे प्रजोत्पादनाच्या कामांत तो पडत नाहीं. प्रजोत्पादनकर्ता आईच्या योनींत गुरफटला जाऊन पुनः पुनः जन्म घेतो व त्यामुळें संकटांत पडतो. दुर्गानें केलेला अर्थ जरा भिन्न आहे. तो असाः—

शरीरामध्यें गर्भ कसा लपलेला असतो (हिरुक्) हें जो बरोबर पाहतो त्यालाच हें प्रजोत्पादन म्हणजे काय आहे हें कळतें. परिवीतः = जरायूनें वेष्टित असा. मातुर्योनौ = गर्भाशयाचें ठिकाणीं. बहुप्रजाः = ज्याला फार मुलें झालीं आहेत असा.

**शाकपूणिः संकल्पयांचक्रे सर्वाः देवताः जानामि इति**

मला सगळ्या देवता माहीत आहेत असा अभिमानयुक्त विचार शाकपूणीच्या मनांत आला. तेव्हां

**तस्मै देवता उभयलिङ्गा प्रादुर्बभूव**

त्याच्या समोर जिच्यामध्यें पुरुषाचीं व स्त्रीचीं दोन्हीहि चिन्हें होतीं अशी देवता प्रकट झाली.

**तां न जज्ञे**

ती त्याला ओळखतां आली नाहीं.

**तां पप्रच्छ विविदिषाणि त्वा इति**

तुला जाणण्याची मला इच्छा आहे; (तेव्हां तूं कोण आहेस असें) त्यानें तिला विचारलें.

**सा अस्मै एताम् ऋचम् आदिदेश । एषा मद्देवता इति**

अहं देवता यस्यां सा मद्देवता

ह्या ऋचेंत मी देवता आहें असें म्हणून पुढील ऋचा ती त्याला सांगती झाली.

हें पुढील खंडाचें निदान होय. पुढील खंडाचा निर्ऋति शब्दाशीं किंवा पृथिवी-वाचक कोणत्याहि शब्दांशीं संबंध नाहीं.

## खंड ९ वा

**अयं स शिङ्क्ते येन गौरभीवृता मिमाति मायुं ध्वसनावधि श्रिता ।**
**सा चित्तिभिर्नि हि चकार मर्त्यं विद्युद्भवन्ती प्रति वव्रिमौहत**

(ऋ. १।१६४।२९)

**अयं सः शब्दायते**

शिङ्क्ते = शब्दायते.

तो हा गडगडाट करीत आहे.

**येन गौः अभिप्रवृत्ता**

अभीवृता = अभिप्रवृत्ता.

जिला गति दिलेली आहे अशी. दुर्गाच्या पाठांत अभिप्रवृत्ता शब्दाच्या ऐवजीं अभीवृता असाच पाठ आहे.

**मिमाति मायुं शब्दं करोति**

मिमाति मायुं = शब्दं करोति = हंबरडा फोडते.

**मायुमिव आदित्यम् इति वा**

किंवा मायु म्हणजे आदित्य. आदित्य जसा प्रकाशमान असतो तशी ती स्वतःला प्रकाशमान करते. आदित्याला मायु म्हणण्याचें कारण तो सर्वभूतनिर्माता आहे. मायु शब्द निर् + मा ह्यापासून झाला आहे. वास्तविक पहातां मा किंवा मी = शब्द करणें हाच धातु मायु शब्दांत आहे.

**वाक् एषा माध्यमिका**

येथें गौ म्हणजे माध्यमिका वाक् म्हणजे अंतरिक्षांत होणारा आवाज.

**ध्वंसने मेघे अधिश्रिता**

ध्वसनौ = ध्वंसने मेघे = जो तिचा ध्वंस करावयाला बघतो अशा मेघांत.

अधिश्रिता = त्याच्यावर अवलंबून असणारी म्हणजे त्याच्यांत गुरफटलेली.

**सा चित्तिभिः कर्मभिः**

चित्तिभिः = कर्मभिः.

चित्ति म्हणजे कृति; म्हणजे चटचटा शब्द करणें.

**नीचैः निकरोति मर्त्यम्**

मनुष्याला ( मर्त्यं ) ती खालती करते; म्हणजे ओणावयाला लावते. मनुष्याला विजेकडे पाहवत नाहीं, 'हि' हा निरर्थक निपात असल्यामुळें भाष्यांत तो गाळला आहे. 'नि' हा उपसर्ग करोति ह्याला जोडला असून त्याचा 'नीचैः' असाहि अर्थ केला आहे. वास्तविक 'नि' 'करोति' ह्याला जोडावयास नको.

**विद्युद्भवन्ती प्रत्यूहते वव्रिम्**

प्रति + औहत = प्रत्यूहते = आपलें रूप झांकून टाकते.

**वव्रिः इति रूपनाम वृणोति इति सतः**

वव्रि म्हणजे रूप. रूपाला वव्रि नांव पडण्याचें कारण रूप सर्वांगाला झांकून टाकतें. वृ (झांकून टाकणें) ह्याचें वव्रि हें नामरूप होय.

**वर्षेण प्रच्छाद्य पृथिवीं तत् पुनः आदत्त**

पावसानें (वर्षेण) पृथिवीला आच्छादून तें पाणी माध्यमिका वाक् पुनः वर घेते.

हा सारांशरूप अर्थ चौथ्या चरणाचा आहे. सर्व ऋचेचा यास्कानें केलेला अर्थ असाः—माध्यमिका वाचेला (गौः) ज्यानें चवताळविली आहे (अभिवृता=अभिप्रवृत्ता) व ज्या नाश करणाऱ्याच्या तावडींत सांपडल्यामुळे ती हंबरडा फोडीत आहे असा मेघ गर्जना करीत आहे. ती विजेचें रूप घेऊन व चट्‌चट् असा शब्द करून मनुष्यमात्राला खालीं लवावयाला लाविते व नंतर आपल्या रूपाचा उपसंहार करते.

खरा अर्थ थोडासा भिन्न आहे. गौः=पाणी. त्या गाईला (पाण्याला) मेघानें गराडा घातला आहे (अभीवृता) व त्या नाशकारक शत्रूच्या तावडींत ती सांपडली आहे. त्यामुळें ती हंबरडा फोडीत आहे. तथापि मेघ गर्जना करीत राहतोच. (ह्या पहिल्या अर्धांत एक प्रकारची उपमा आहे. वाघ किंवा सिंह गाईवर झडप घालतो व ती त्याच्या तावडींत सांपडल्यामुळें हंबरडा फोडते. तिकडे लक्ष न देतां तो हिंस्र पशु गर्जना करीत राहतोच.) तावडींत सांपडलेली ती गाय विजेचें रूप धारण करिते व आपल्या प्रकाशानें म्हणजे भरपूर लवण्यानें मर्त्य जो वृत्र त्याला खालीं ढकलते म्हणजे चीत करिते. ज्यानें तिला झांकून टाकलें होतें ( वव्रिम् ) त्यालाच सूड घेण्याकरितां ( प्रति ) ती झांकून टाकते.

पहिल्या अर्धांत मेघाचें व दुसऱ्या अर्धांत 'गौ'चें वर्णन आहे; म्हणून ऋचे-मध्यें दोन देवता होत. पण शेवटीं मेघाचा नाश झाल्यामुळें गौ ही मुख्य देवता ठरते. हें यास्कानें सांगितलें नाहीं. तथापि शाकपूणीनें ह्या मुख्य देवतेची अटकळ केलीच असली पाहिजे.

## खंड १० वा

**हिरण्यनामानि उत्तराणि पञ्चदश (निघंटु १।२)**

पुढील सुवर्णाचीं नांवें पंधरा होत

**हिरण्यं कस्मात्**

'हिरण्य' शब्द कसा झाला ?

**ह्रियते आयम्यमानम् इति वा**

लांब केलेलें आयम्यमानं म्हणजे कडी, गोट, पाटल्या वगैरे रूपांनीं तयार केलेलें सोनें लोक सोनारापासून घेऊन जातात.

हिरण्यम् = हिर् = अ + ण् + यम्. हिर् = हि = ह्रियते. अयम् = आयम्. णं=(यमा)नं. आयम्+यमानं = आयम्यमानम्

**ह्रियते जनात् जनम् इति वा**

हिर्+य=ह्रिय=ह्रियते. नम् = (जनात् जनम् )= व्यवहारामध्यें सोन्याचें नाणें एकाच्या हातून दुसऱ्याच्या हातीं जातें.

**हितरमणं भवति इति वा**

हि=हित. रण्+म्=रमणम्. सोनें हितकर असून मन रमवितें. ह्या व्युत्पत्तींत 'य' टाकून द्यावयाचा.

**हृदयरमणं भवति इति वा**

हिर्=हृदय. रण् + म्=रमणम्. रमवितें. ही व्युत्पत्ति फक्त महाराष्ट्रपाठांत दिली आहे.

**हर्यतेः वा स्यात् प्रेप्साकर्मणः**

हर्य्=इच्छा करणें ह्या धातूपासून कदाचित् हा शब्द बनला असेल.

हिर्+य=हर्य. ह्या व्युत्पत्तींत 'अण्' टाकून द्यावयाचा.

हिरण्य, हिरि, हरि, हरित् व लॅटिनमधला ऑरम् ह्या सगळ्यांचा अर्थ सोनें. हे बहुतेक सारखेच शब्द आहेत. सुवर्णवाची मूळ शब्दाचे हे भिन्न भिन्न उच्चार होत.

**अन्तरिक्षनामानि उत्तराणि षोडश (१।३)**

पुढील अंतरिक्षाचीं नांवें सोळा होत.

**अन्तरिक्षं कस्मात्**

अन्तरिक्ष शब्द कसा बनला ?

**अन्तरा क्षान्तं भवति**

अन्तरि=अन्तरा. क्षम् = क्षान्तम्. द्यावापृथिवींच्या मध्यें असून (अन्तरा) तें पृथिवीचा शेवट होतें; म्हणजे पृथिवीच्या सर्व बाजूंनीं अंतरिक्ष असतें. क्षान्तम्= क्षा + अन्तम्.

**अन्तरा इमे इति वा**

इमे म्हणजे द्यावापृथिवी. त्यांच्यामध्यें ( इमे अन्तरा ) आकाश निवास करतें. क्षम् = क्षियति. हीच खरी व्युत्पत्ति होय.

**शरीरेषु अन्तर अक्षयम् इति वा**

किंवा सर्व शरीरांच्या आंत (अन्तर्) अक्षय म्हणजे क्षय नसलेलें असें अन्तरिक्षम्=अन्तर् + इक्षम्. इक्षम् = अक्षयम्. आत्म्याला अंतरिक्ष (आकाश) असें उपनिषदांत म्हटलें आहे.

**तत्र समुद्रः इति एतत् पार्थिवेन समुद्रेण संदिह्यते**

ह्या अंतरिक्षवाचक नामांमध्यें (तत्र) समुद्र हें नांव पृथिवीवरील समुद्रासारखें असल्यामुळें संदेह उत्पन्न होतो. म्हणजे अमक्या एका ऋचेंत आलेला समुद्र शब्द अंतरिक्षवाची आहे कीं समुद्रवाची आहे असा संशय उत्पन्न होतो.

**समुद्रः कस्मात्**

'समुद्र' शब्द कसा झाला ? त्याचा अर्थ जर अंतरिक्ष असेल तर

**समुद्द्रवन्ति अस्मात् आपः**

त्याच्यापासून म्हणजे अंतरिक्षापासून पाणी पृथिवीकडे धांवत जातें (द्रवन्ति).

**समभिद्रवन्ति एनम् आपः**

पृथिवीवरील समुद्राकडे नद्यांचे पाणी धांवत जातें. पार्थिव समुद्र वर सांगितला आहे म्हणून 'एतम्' च्या ऐवजीं 'एनम्' घातलें आहे. ही पृथिवीवरील समुद्राची व्युत्पत्ति झाली.

**संमोदन्ते अस्मिन् भूतानि**

स=सं. मुद्र = मोदन्ते. माशासारखे प्राणी तेथें राहून आनंद पावतात. म्हणजे सं + मुद् पासून 'समुद्र' शब्द.

**समुदको भवति**

किंवा त्याच्यामध्यें (उद्र) उदक सांचलेलें (सं) असतें. हीच खरी व्युत्पत्ति होय. ग्रीक भाषेंत हूद्र ( hudra ) म्हणजे पाणी. हूद्र आणि उद्र हे एकच.

**समुनत्ति इति वा**

समुद्र पृथिवीचा पुष्कळ भाग भिजवून टाकतो. समुनत्ति = सम् + उनत्ति. उन्द् = भिजविणें. उन्द् = उद्. उद् + रं = उद्र = उदक. उद् ( उदक ) ह्यापासून उन्द् धातु निघाला नसेल कशावरून ?

**तयोः विभागः**

ह्या दोन समुद्रामधील विभाग पुढील ऋचेंत दाखविला आहे. म्हणजे त्या ऋचेंत दोन्ही समुद्र आले असून एक अंतरिक्षवाची आहे व दुसरा समुद्रवाची आहे.

**तत्र इतिहासम् आचक्षते**

त्या ऋचेसंबंधीं खालीलप्रमाणें इतिहास सांगतात. म्हणजे त्या ऋचेचें निदान पुढीलप्रमाणें होय.

**देवापिश्च आर्ष्टिषेणः शंतनुश्च कौरव्यौ भ्रातरौ बभूवतुः**

ऋष्टिषेणाचे देवापि व शंतनु मुलगे असून कुरुकुलांत जन्मलेले ते दोघे भाऊ भाऊ होते.

कुरुकुलांतला ऋष्टिषेण ह्याचे हे दोघे मुलगे होते एवढें म्हटलें असतें म्हणजे चाललें असतें. कौरव्यौ = कुरुकुलांत जन्मलेले असा अर्थ करावा.

**स शंतनुः कनीयान् अभिषेचयांचक्रे**

शंतनु हा धाकटा असूनहि त्यानें आपणास राज्याभिषेक करून घेतला.

**देवापिः तपः प्रतिपेदे**

त्यामुळें देवापीनें तप करण्याचें पतकरलें.

**ततः शंतनोः राज्ये द्वादश वर्षाणि देवो न ववर्ष**

त्यामुळें बारावर्षे शंतनूच्या राज्यांत पाऊस पडला नाहीं.

**तम् ऊचुः ब्राह्मणा अधर्मः त्वया चरितः**

त्याला ब्राह्मण म्हणाले, "तूं अधर्माचरण केलें आहेस.

**ज्येष्ठं भ्रातरम् अन्तरित्य अभिषेचितम्**

थोरल्या भावाच्या व राज्याभिषेकाच्या मध्यें येऊन म्हणजे त्याच्या राज्याभिषेकाच्या आड येऊन तूं स्वतःला राज्याभिषेक करून घेतलास.

**तस्मात् ते देवो न वर्षति इति**

म्हणूनच तुझ्या राज्यांत ( ते = ते राज्ये ) पाऊस पडत नाहीं."

**शंतनुः देवापिं शिशिक्ष राज्येन**

तेव्हां शंतनूनें देवापीला राज्य दिलें.

शिक्ष् हें शक् देणें ह्या धातूचें चिकीर्षितज रूप होय.

**तम् उवाच देवापिः**

देवापि त्याला म्हणाला.

**पुरोहितः ते असानि याजयानि च त्वा इति**

मी तुझा पुरोहित होतों व तुझ्याकडून यज्ञ करवितों.

हल्लींच्या यज्ञांत पुरोहित असा कोणीहि नसतो. हल्लीं पुरोहित म्हणजे धार्मिक बाबतींत राजाला सल्ला देणारा व राजाचीं धर्मकृत्यें करणारा असा ब्राह्मण होय. पण ऋग्वेदकालीं पुरोहिताशिवाय यज्ञ होतच नसे म्हणून अग्नीला **'यज्ञस्य पुरोहितं'** असें म्हटलें आहे.

**तस्य एतत् वर्षकामसूक्तम्**

पाऊस पडावा अशी इच्छा दर्शविणारें जें सूक्त देवापीला दिसलें तें हें.

**तस्य एषा भवति**

त्या सूक्तापैकींच पुढील ऋचा होय.

दोन 'तस्य' शब्द आल्यामुळें घोटाळा होतो. ह्या खंडांत यास्कानें बोलण्यांत येणारी भाषा वापरली आहे.

## खंड ११ वा

**आर्ष्टिषेणो होत्रमृषिर्निषीदन् देवापिर्देवसुमतिं चिकित्वान् ।**
**स उत्तरस्मादधरं समुद्रमपो दिव्या असृजद्वर्ष्या अभि** । ऋ. सं. १०।९८।५

**आर्ष्टिषेणः ऋष्टिषेणस्य पुत्रः**

आर्ष्टिषेण म्हणजे ऋष्टिषेणाचा पुत्र.

**इषितसेनस्य इति वा**

किंवा इषितसेनाचा.

'अर्थनित्यः परीक्षेत' (निरु० २।१) ह्याचें हें उदाहरण होय. ऋष्टिषेण ह्याचा अर्थ ऋष्टिनामक आयुधें हीं सेना आहेत ज्याचीं तो. तो अर्थ मनाला पटत नाहीं. राजे लोक परप्रांतावर स्वाऱ्या करण्याकरितां सेना पाठवितात (इषित) म्हणून इषितसेन हीच व्युत्पत्ति बरोबर. ऋष्टि व इषित ह्या दोहोंतहि ष् व इ हीं अक्षरें आहेत.

**सेना सेश्वरा**

सेना म्हणजे स + इन ( ईश्वर ). जिला मालक म्हणजे सेनापति असतो ती सेना.

**समानगतिर्वा**

स = समाना. इ जाणें ह्यापासून इनम् (= गतिः ). शिपाई लोक सारख्या पद्धतीनें चालतात. शिस्तीमुळें मागेंपुढें कोणाचेंहि पाऊल पडत नाहीं.

**पुत्रः पुरु त्रायते**

पु = पुरु. त्रः = त्रायते. जो सर्वपरी आईबापांचें रक्षण करतो तो.

**निपरणात् वा**

किंवा मुलगा पितरांना पिंड देतो म्हणून.

नि + पृ = पिंड देणें. ह्या 'पृ' धातूपासून पुत्र शब्द झाला असेल. निपृणाति ददाति हि असौ पिण्डान् पितृभ्यः इति पुत्रः असें दुर्ग म्हणतो. किंवा

**पुत् नरकम् । ततः त्रायते इति वा**

पुत्रः = पुत् + त्रः. पुत् हें एका नरकाचें नांव आहे. त्या नरकापासून पुत्र आई-बापाचें (त्रः). रक्षण करितो

ही शेवटली व्युत्पत्ति स्मृतिग्रंथांत दिलेली असते.

**होत्रम् ऋषिः निषीदन्**

होत्याचें कर्म करणारा ऋषि. होत्रं निषद् = होत्याच्या कामावर बसणें म्हणजे होतृकर्म करणें.

**ऋषिः दर्शनात्**

ऋषि हा शब्द दृश् धातूपासून झाला आहे. कारण

**स्तोमान् ददर्श इति औपमन्यवः**

स्तोम म्हणजे सूक्तें पाहता (ददर्श) झाला म्हणून तो ऋषि असें औपमन्यव म्हणतो. मंत्र ऋषींनीं रचले नसून ते त्यांना दिसले. ऋषिः = दृशिः. म्हणजे मूळचा शब्द दृशिः.

**तत् यत् एनान् तपस्यमानान् ब्रह्म स्वयंभु अभ्यानर्षत् तत् ऋषीणाम् ऋषित्वम् इति विज्ञायते**

ऋषींना ऋषि म्हणण्याचें कारण ते तप करीत असतांना स्वयंभू जो वेद तो त्यांना दिसला (अभ्यानर्षत्) असें ब्राह्मणवचन आहे (इति विज्ञायते).

म्हणजे ऋषि शब्द ऋष् दिसणें ह्यापासून झाला आहे. 'ऋष्' याला प्रथम-भूतकाळीं 'आन्' लागून 'आनर्षत्' असें रूप होतें. अभि हा उपसर्ग आहे. ऋषी गतौ (धा० ६।७). अभ्यानर्षत् = अभ्यागच्छत् (दुर्ग). तप करणाऱ्या ऋषींकडे वेद स्वतः होऊन आला असा दुर्ग अर्थ करतो. ब्राह्मणकाळीं ऋष् धातूचा अर्थ काय होता तें कळत नाहीं. ही भिन्न व्युत्पत्ति आहे. तथापि 'वा' शब्द घातला नाहीं. ब्राह्मणवचन तैत्तिरीय आरण्यक (२।९) ह्यांत आहे. पण तेथें 'अभ्यानर्षत्' व 'तद् ऋषीणाम्' ह्यांच्यामध्यें 'ते ऋषयः अभवन्' असे जास्त शब्द आहेत. पण त्या शब्दांची कांहीं जरूर नाहीं; गुर्जरपाठांत व दुर्गवृत्तींत ते शब्द नाहींत; महाराष्ट्रपाठांत आहेत.

**देवापिः देवानाम् आप्त्या स्तुत्या च प्रदानेन च**

देवापि या शब्दाचा येथें विशेष अर्थ आहे. जसें निरुक्त २।६ मध्यें 'पूरुषादः' ह्याचा 'पुरुषान् अदनाय' असा विशेष अर्थ यास्कानें केला तसाच देवापि या शब्दाचा विशेष अर्थ येथें केला आहे. तो शब्द केवळ एका मनुष्याचें नांव नसून विशेष कारणाकरितां ऋचेंत घातला आहे. देवापिः = देवानाम् आप्तिः = जो देव मिळवितो, आपल्या बाजूला आणतो असा मनुष्य. तो कोणत्या साधनांनीं देवांना आपल्या बाजूला आणतो ? उत्तरः— स्तुतीनें (स्तुत्या) व हवि देण्यानें (प्रदानेन) देवापिः = स्तुति व हवि ह्यांनीं आपल्या बाजूला देवांना वळवून.

'ऋषिर्दर्शनात्' येथें 'दर्शनात्' याजबद्दल 'अर्षणात्' असा पाठ असेल. त्याला आधार म्हणून ब्राह्मणवचन दिलें असलें पाहिजे. ही व्युत्पत्ति यास्काला पसंत असल्यामुळें त्यानें ती प्रथम दिली असावी व नंतर औपमन्यवाचें मत दिलें असावें.

**देवसुमतिं देवानां कल्याणीं मतिम्**

सु = कल्याणीं. देवांची बहाल मर्जी मिळते

**चिकित्वान् । चेतनावान्**

असें तो जाणता झाला. कित् = जाणणें. चिकित्वान् = चेतनावान् = जाणणारा. एवढा अर्थ यास्कानें दुसऱ्या चरणांतून काढला आहे. त्याचें कारण वेदांतील प्रत्येक

शब्द सार्थ आहे व कांहीं शब्दांत खोल अर्थ भरला आहे हें दाखविण्याचा त्याचा हेतु होय. वास्तविक पाहतां तसा खोल अर्थ येथें नाहीं. खरा अर्थ पुढीलप्रमाणें आहे:—

ऋष्टिषेणाचा मुलगा, देवापि ऋषि, होतृकर्म करीत असतांना देवाची म्हणजे पर्जन्याची बहाल मर्जी संपादन करिता झाला ( चिकित्वान् ).

**स उत्तरस्मादधरं समुद्रम्। उत्तरः उद्धततरः भवति**

उत्तरः = उत् + हत + तरः. 'उपसर्गात् छन्दसि धात्वर्थे' (पा.५।१।११८)= धात्वर्थविशिष्टे साधने वर्तमानात् स्वार्थे वतिः स्यात् = धातूचा अर्थ ज्यांत आहे अशा उपसर्गाला 'वत्' प्रत्यय उगाच लावलेला आढळतो. जसें:— उद्वतः = उद्गतात्. निवतः = निर्गतात्. उत् व नि ह्यांचेच 'उद्गत' व 'निर्गत' असे अर्थ आहेत. त्यांना 'वत्' प्रत्यय उगाच लावलेला आहे. पाणिनीनें 'वत्' प्रत्ययापुरतेंच विधान केलें आहे. यास्ककालीन वैय्याकरणांनीं इतर तद्धितप्रत्ययासंबंधानेंहि तसें विधान केलें होतें असें दिसतें. तसें असल्यास यास्क हा पाणिनीहून पुरातन ठरतो. उत् ह्याच्यामधेंच उद्धत अर्थ आहे व त्याला 'तर' प्रत्यय लावला आहे. 'उत्तर' = तडाखे देऊन खूप वर ढकललेला.

वास्तविक पाहतां उपसर्गांनाच तद्धित प्रत्यय लाविलेले आढळतात; व तसे प्रत्यय लावण्याचें कारण उपसर्गांपासून नामें व विशेषणें तयार करणें हें होय. परावत्, प्रवत्, उद्वत्, निवत् हीं स्त्रीलिंगी नामें होत. उत्तर, प्रतर, अवतर हीं विशेषणें होत.

**अधरः अधोऽरः**

अधर हा शब्द मूळचा अधोऽर असा होता. अधः = खालीं. अरः = जातें. अरति = गच्छति. जें खालीं जातें तें अधर.

वास्तविक 'अधर' हा शब्द मूळचा 'अधस्तर' असा असावा. म्हणजे 'अधस्' ह्या अव्ययाला 'तर' प्रत्यय लावून त्याचें विशेषण केलें असावें. कालेंकरून त्याचा अधर असा उच्चार झाला असावा.

**अधः न धावति**

अधः = न धावति. अधः = अ + धः. अ = न. धः = धावति. धांवत नाहीं तें अधः म्हणजे अधस् शब्द धाव् धातूला अ लावून बनविला आहे.

**इति ऊर्ध्वगतिः प्रतिषिद्धा**

ह्या व्युत्पत्तीनें वर जाण्याच्या गतीचा प्रतिषेध केला आहे. म्हणजे जें खालीं खालीं जातें, वर जाऊं शकत नाहीं तें अधर; जसें पाणी.

व्युत्पत्ति देण्यांत गुंतल्यानें उत्तरार्धाचा अर्थ देण्यास यास्क विसरला. तो अर्थ असा:—"वरच्या समुद्रांतून ( उत्तरस्मात् ) खालच्या समुद्राकडे (अधरं समुद्रमभि) तो म्हणजे देवापि स्वर्गांत वास करणारें (दिव्याः) व वर्षाकालाला योग्य असें (वर्ष्याः) पाणी (अपः) सोडता झाला (असृजत् ). म्हणजे योग्य ऋचा म्हणून त्यानें खूप पाऊस पाडला.

**तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय**

तो अर्थ ( तस्य ) जास्ती ( भूयसे ) स्पष्ट व्हावा म्हणून ( निर्वचनाय ) पुढील ऋचा ( उत्तरा ) दिली आहे.

## खंड १२ वा

**यद्देवापिः शंतनवे पुरोहितो होत्राय वृतः कृपयन्नदीधेत्।**
**देवश्रुतं वृष्टिवनिं रराणो बृहस्पतिर्वाचमस्मा अयच्छत्। १०।९८।७॥**

**शंतनुः शं तनो अस्तु इति वा**

शंतनुः=शम्+तनुः. हे शरीरा ( तनो ) तुला सुख ( शम् ) होवो (अस्तु). अशी शंतनु शब्दाची व्युत्पत्ति किंवा

**शम् अस्मै तन्वा अस्तु इति वा**

ह्याला शरीरानें ( तन्वा ) सुख होवो; अशीहि व्युत्पत्ति असेल.

दुर्गाच्या मतें तुमच्या शरीराला सुख होवो असें तो रोग्यांना म्हणत असे म्हणून त्याचें नाम शंतनु असें पडलें. पण प्रश्न हा आहे की नांव जन्मल्याबरोबर पडलें किंवा तो मोठा झाल्यावर पडलें ?

**पुरोहितः पुरः एनं दधति**

ऋत्विजाला ' पुरोहित ' असें नांव पडण्याचें कारण त्याला ( एनम् ) पुढें ( पुरः ) ठेवतात ( दधति ) म्हणजे यज्ञांत त्याला अग्रस्थान देतात.

**होत्राय वृतः**

होतृकर्म करण्याकरितां निवडलेला.

**कृपायमाणः**

कृपयन् = कृपायमाणः = कृपाळू होऊन.

**टीपः**--कृपयन् ह्याचा अर्थ प्रज्वलित करणारा असा बहुतकरून असावा. 'कृप्' ह्या नामाचा ज्वाला असा अर्थ होतो असें एका मासिकांत मी सिद्ध केलें आहे.

**अन्वध्यायत्**

अदीधेत्=अन्वध्यायत्=सारखा चिंतन करीत राहिला.

वास्तविक ' अदीधेत् ' ह्यामध्यें धी(=विचार करणें, ध्यान करणें) असा धातु आहे; ' ध्यै ' धातु नाहीं. ' धी ' धातूचीं रूपें पुष्कळ वेळां ऋग्वेदांत आलीं आहेत.

**देवश्रुतं देवाः एनम् शृण्वन्ति**

ज्यानें केलेली स्तुति देव ऐकतात तो देवश्रुत्.

**वृष्टिवनिं वृष्टियाचिनम्**

वन्=याच्=मागणें, याचना करणें. जो पर्जन्याची याचना करितो तो वृष्टिवनि. यास्कानें ' देवश्रुतं ' व ' वृष्टिवनिं ' हीं ' देवापिं ' अध्याहृत घेऊन त्याचीं विशेषणें केलीं आहेत; व तसें करितांना त्यानें ' मत्वा ' शब्द अध्याहृत घेतला असावा.

कारण दुर्ग तो शब्द अध्याहृत घेतो. परंतु यास्क व दुर्ग ह्या दोघांचीहि चूक झाली आहे. **वृष्टिवनि=वृष्टीची देणगी.** जसा ‘ सनि ’ शब्द ‘ सन् ’ देणें ह्यापासून झाला आहे, तसा ‘ वनि ’ ‘ वन् ’ ह्यापासून निघाला आहे. ‘ देवश्रुतं ’ हें ‘ वृष्टिवनिं ’चें विशेषण आहे व त्याचा अर्थ देवानें म्हणजे पर्जन्यानें देऊं केलेली असा आहे.

**रराणः रातिः अभ्यस्तः**

रा=(देणें) ह्याचा अभ्यास केल्यानें ‘ ररा ’ होतें; व त्याला ‘ आन ’ प्रत्यय लावून वर्तमानकालीन विशेषण तयार होतें. रराण=देणारा.

**बृहस्पतिः ब्रह्मा आसीत्**

त्या यज्ञांत बृहस्पति हा ब्रह्मा होता. होता, उद्गाता, अध्वर्यु व ब्रह्मा असे यज्ञांत चार ऋत्विज असतात. कोणती ऋचा केव्हां म्हणावी हें बृहस्पति सांगतो. परंतु तसा अर्थ येथें घेणें जरूर नाहीं. बृहस्पति म्हणजे वाक्पति. हा एक देव आहे.

**सः अस्मै वाचम् अयच्छत्**

तो बृहस्पति ह्या देवापीला वाचा देता झाला म्हणजे योग्य ऋचा त्यानें त्याला म्हणावयास सांगितली किंवा सुचविली

**बृहत् उपव्याख्यातम्**

बृहत् इति महतो नामधेयं वगैरे व्युत्पत्ति निरुक्त १।७ मध्यें दिली आहे.

बृहस्पतिः = बृहताम् पतिः. बृहताम् म्हणजे मोठ्या देवांचा पति तो बृहस्पति. किंवा बृहतः पतिः. द्यौला ऋग्वेदांत बृहत् म्हटलें आहे; त्याचा पति म्हणजे त्याला जिंकणारा. बृहस्पति. म्हणजे मूळचा इंद्र होय. पण पुढें तो निराळा देव मानिला गेला. ऋचेचा अर्थ पुढीलप्रमाणें:—

“ जेव्हां देवापि शंतनूचा पुरोहित झाला व त्याची होतृस्थानीं निवड झाली तेव्हां अग्नि प्रज्वलित करून तो ध्यान करिता झाला. तेव्हां पर्जन्यदेव देऊं करील अशी वृष्टीची देणगी देणारा बृहस्पति त्याला योग्य ऋचा देता झाला. म्हणजे ज्या ऋचेनें पर्ज्यन्य देव खूष होऊन वृष्टि देईल अशी ऋचा सुचविता झाला.

## खण्ड १२ वा

**साधारणानि उत्तराणि षड् दिवश्च आदित्यस्य च (१।४)**

पुढील नामें ‘द्यौ’ आणि ‘आदित्य’ ह्या दोघांनाहि लागतात. व तीं सहा आहेत. म्हणजे त्यांतील प्रत्येक नामाचा अर्थ द्यौ आणि आदित्य असा होतो.

**यानि तु अस्य प्राधान्येन उपरिष्टात् तानि व्याख्यास्यामः**

परंतु केवळ आदित्याचींच जीं नामें त्यांची व्याख्या आम्ही पुढें करणार आहोत (निरु. १२-१२।१८).

**अस्य** ह्यानें नजीक जो आदित्य शब्द तो दर्शविला जातो.

**आदित्यः कस्मात्**

आदित्याला 'आदित्य' हें नांव पडावयाचें काय कारण?

**आदत्त रसान्**

आदित्य = आदत्त= घेतो. काय घेतो? तर पृथ्वीवरचे रस शोषून घेतो. किंवा

**आदत्त भासं ज्योतिषाम्**

प्रकाशणाऱ्या ग्रहनक्षत्रादिकांचें तेज हरण करितो; सूर्य उगवला म्हणजे ग्रह व नक्षत्रें दिसत नाहींत. ह्या दोन व्युत्पत्तींत आ + दा हा धातु आहे. किंवा

**आदीप्तः भासा इति वा**

तो तेजानें प्रकाशित झालेला असतो. म्हणजे आ + दीप् हा धातु आहे.

ह्या तीनहि व्युत्पत्ति अर्थानुरोधानें केल्या आहेत व त्यांत अक्षरसाम्य दिसतें म्हणून त्या दिल्या आहेत.

**अदितेः पुत्रः इति वा**

अदितीचा मुलगा म्हणून तो आदित्य. ही व्युत्पत्ति खरी असूनहि ती शेवटीं देण्याचें कारण आदित्य शब्दानें जे अर्थ सूचित होतात ते ह्या व्युत्पत्तींतून निघत नाहींत.

**अल्पप्रयोगं तु अस्य एतत् आर्चाभ्याम्नाये**

ऋचाम् अयम् आर्चः. आर्चः + अभ्याम्नायः = आर्चाभ्याम्नायः = ऋचांचा समुदाय किंवा संग्रह म्हणजे ऋग्वेदाचीं दहा मंडलें.

परंतु आदित्याचें ( = सूर्याचें ) आदित्य हें जें नांव त्याचा प्रयोग ऋग्वेदांत थोडा आहे. म्हणजे आदित्य (=सूर्य) अशा अर्थाच्या ऋचा फारच थोड्या आहेत.

**सूक्तभाक् सूर्यम् आदितेयम् अदितेः पुत्रम्**

आदितेय हें नुसतें सूक्तभाक् असतें, हविर्भाक् नसतें. आदितेय ह्या नांवानें सूर्याला हवि दिलेल्या आढळत नाहींत. आदितेय = सूर्य असें सूक्तांतून मात्र सांपडतें. ' आदितेयं ' हा शब्द व हें रूप फक्त ऋ० १०।८८।११ ह्यांतच आलें आहे.

**यदेदेनमदधुर्यज्ञियासो दिवि देवाः सूर्यमादितेयम् (१०।८८।११)**

ह्यांत सूर्य व आदितेयं हे शब्द आले आहेत. आदितेयम् = अदितेः पुत्रम्. दुर्गाच्या मतें सूक्तभाक् वगैरे आदितेयं ह्या शब्दासंबंधानें आले आहेत. तो म्हणतो " दुसऱ्या टीकाकारांच्या मतें ' आदित्य ' हा शब्द अल्पप्रयोग आहे; पण हें त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं; कारण आदित्य या नामाला सूक्तभाक् वगैरे शब्द लागूं पडत नाहींत. ' आदित्य ' हा शब्द केवळ सूक्तभाक् नसून हविर्भाक्हि आहे. उदाहरणार्थ, ' आदित्यं बहुरूपम् आलभेत ' ( मैत्रायणीसंहिता २।५।११). तेव्हां हे शब्द आदितेयं ह्या संबंधानेंच असावेत. " कदाचित् ह्या शब्दांचा पुढीलप्रमाणें अर्थ असेल. आदित्य ह्या शब्दाचा प्रयोग सूक्त आणि हवि ह्या दोहींसंबंधानें फार थोडा आहे. परंतु आदितेय हें नांव फक्त सूक्तांतच येतें. त्याचा हवीशीं कधींहि संबंध येत नाहीं."

दुर्ग व इतर टीकाकार ह्यांचा घोटाळा होण्याचे कारण 'सूक्तभाक्' वगैरे शब्द होत. ते खरोखर प्रक्षिप्त दिसतात. 'अस्य' ह्यानें आदित्यच दर्शविला जातो. सूर्याला आदित्य फारच थोड्या ठिकाणीं म्हटलेलें आहे. शिवाय आदितेय हें नांव फक्त ऋग्भाक् असें म्हटलें पाहिजे. कारण तें एकाच ऋचेंत आलें आहे.

**एवम् अन्यासाम् अपि देवतानाम् आदित्यप्रवादाः स्तुतयो भवन्ति**

दुसऱ्या देवांचीहि आदित्य ह्या नांवानें स्तुति केलेली आढळते.

**तत् यथा एतत्**

जसें पुढील उदाहरण.

**मित्रस्य वरुणस्य अर्यम्णः दक्षस्य भगस्य अंशस्य इति**

हीं नांवें पुढील ऋगर्धांत आलीं आहेत:—

**शृणोतु मित्रो अर्यमा भगो नस्तुविजातो वरुणो दक्षो अंशः** (ऋ. सं. २।२७।१)

पहिल्या अर्धांत 'आदित्येभ्यः' असें ह्या देवांना उद्देशून म्हटलें आहे यास्कानें सगळी ऋचा किंवा ऋगर्ध न देतां नुसतीं नांवें कां दिलीं हें सांगतां येत नाहीं. शिवाय नामांचा क्रमहि थोडा बदलला आहे. ऋचा फार मोठी म्हणून यास्क भ्याला कीं काय? किंवा दुसऱ्या कोणी गडबड केली? तद्यथा याच्यानंतर एतत् शब्दाचें प्रयोजन नाहीं.

**अथापि मित्रावरुणयोः**

भाष्यांतील ह्या शब्दानंतर 'आदित्यप्रवादाः स्तुतयो भवन्ति। यथा' इतकें अध्याहृत आहे. आणखी मित्र व वरुण ह्यांची आदित्य या नांवानें स्तुति केलेली आढळते. जसें:—

**आदित्या दानुनस्पती** (ऋ. सं. २।४१।६)

मित्र व वरुण हे आदित्य दानाचे पति होत आदित्या = आदित्यौ.

**दानपती**

दानुनः=दानस्य. दानु शब्द पुल्लिंगी व नपुंसकलिंगीहि आहे. त्याचें दानुनः हें नपुंसकलिंगी षष्ठ्यन्त एकवचनी रूप होय.

**अथापि मित्रस्य एकस्य**

वरील प्रमाणेंच अध्याहृत शब्द घ्यावयाचे आहेत. आणखी एकट्या मित्राची आदित्य ह्या नांवानें स्तुति आढळते.

**प्र स मित्र मर्तो अस्तु प्रयस्वान्। यस्त आदित्य शिक्षति व्रतेन** (ऋ. ३।५९।२)

हे आदित्या मित्रा! जो तूं सांगितलेलीं कर्मे करितो किंवा तुला हवि अर्पण करितो तो मनुष्य धनवान् (प्रयस्वान्) होवो (प्र + अस्तु).

**इत्यपि निगमो भवति**

अशीहि ऋचा आहे.

ह्या वाक्याची कांहीं जरूर दिसत नाहीं. वरील दोन उदाहरणांच्या शेवटीं तसें वाक्य घातलें नाहीं.

**अथापि वरुणस्य एकस्य**

आणखी एकट्या वरुणाचीहि तशी स्तुति केलेली आढळते.

**अथा वयमादित्य व्रते तव** (ऋ. सं. १।२४।१५)

हे आदित्या वरुणा, तुझें व्रत पाळणारे म्हणजे तूं नेमून दिलेलीं कामें करणारे आम्हीं अदितीच्या समोर पापमुक्त असे होऊं ( अनागसो अदितये स्याम )

कंसांत घातलेले शब्द भाष्यांत नाहींत.

**व्रतमिति कर्मनाम**

व्रत म्हणजे कर्म.

**निवृत्तिकर्म वारयति इति सतः**

निवृत्तिरूप कर्म असा ज्याचा अर्थ आहे तो 'व्रत' शब्द 'वारय' = टाळणें ह्या धातूपासून झाला आहे.

जो सोमयाग करितो त्याला पुष्कळ गोष्टी टाळावयाच्या म्हणजे टाकावयाच्या असतात. त्या अशाः—नेमलेल्या जागेपासून न हलणें, नेमून दिलेल्या अन्नाशिवाय अन्न न खाणें, स्त्रीसमागम न करणें, लौकिक विषयासंबंधानें न बोलणें, वगैरे.

**इदम् अपि इतरत् व्रतम् एतस्मात् एव**

लौकिक भाषेंतला जो 'व्रत' शब्द तोहि ह्याच धातूपासून, शाकाव्रत, एकधान्य वगैरे जीं व्रतें स्त्रीपुरुष करितात त्यांना शाक व विशिष्ट धान्य ह्याशिवाय इतर अन्न खाण्याची मनाई असते. चतुर्मासांत कोणी मीठ वगैरे सोडतात.

**वृणोति इति सतः**

किंवा हा लौकिक 'व्रत' शब्द 'वृ' पसंत करणें ह्या धातूपासून झाला असेल. कारण पुष्कळ व्रतांमधून एक व्रत निवडावयाचें असतें.

आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें यास्कानें येथेंहि 'अथवा' किंवा 'वा' घातलें नाहीं.

**अन्नमपि व्रतमुच्यते**

अन्नाला सुद्धां व्रत म्हणतात.

**यत् आवृणोति शरीरम्**

कारण अन्न रक्त, मांस, मेद, वगैरेनें शरीर आच्छादून टाकतें.

नियमो व्रतमस्त्री तच्चोपवासादिपुण्यकम् । ( अमर २।७।३७)

तद् व्रतमुपवासकृच्छ्रचान्द्रायणादिकम् । ( क्षीरस्वामी ). व्रत शब्दाचा 'अन्न' असा अर्थ अमरकोशांत नाहीं. तो अर्थ यास्काला ब्राह्मणग्रंथांत सांपडला असावा. जो अग्निहोत्रादि व्रत स्वीकारतो त्याला विशिष्ट गाईचें दूध प्यावें लागतें; त्या गाईला 'व्रतधुक्' ( = व्रताला लागणारें दूध जी गाय देते ती ) असें म्हणतात.

## खण्ड १४ वा

**स्वर आदित्यः भवति**

स्वर् = आदित्य. आदित्याला 'स्वर्' म्हणण्याचें कारण

**सु अरणः**

स्वर् = सु + अर् = सु + अरणः = जो चांगलें गमन करितो तो. किंवा

**अथवा सुईरणः**

स्वर् = सु + अर् = सु + ईर् = ईरणः. ईर् = जाणें

जाणें हा ज्या धातूंचा अर्थ असेल त्यांपैकीं जे 'स्वर्' शब्दाला जवळ असतील तेवढेच येथें घेतले आहेत.

**स्वृतः रसान्**

स्वर् = स्वृ = सु + ऋ ( जाणें ). स्वृतः. = सु + ऋतः. सूर्य हा पाण्यासारखे जे रस त्यांच्याकडे आपल्या किरणांनीं जातो.

**स्वृतो भासं ज्योतिषाम्**

किंवा ग्रहनक्षत्रांच्या ( ज्योतिषाम् ) तेजाकडे तो जातो. कशाकरितां ? त्यांचें तेज हिरावून घेण्याकरितां.

**स्वृतः भासा इति वा**

किंवा त्याच्याभोंवतीं प्रकाश गेलेला असतो. म्हणजे तो प्रकाशमय आहे. तेव्हां ' स्वर् ' ह्यामध्यें ' अर् ', ' ईर् ' किंवा ' ऋ ' ह्यांपैकीं कोणता तरी धातु असावा.

स्वृ शब्दोपतापयोः ( धातुपाठ १।९५७ ) हा धातु यास्कास कां सुचला नाहीं ? सूर्य ताप देतो म्हणून तो 'स्वर्'. अवेस्तामध्यें 'स्वर्' सारखा 'ह्वर्' शब्द आहे.

**एतेन द्यौः व्याख्याता**

'द्यु' वाचक जो स्वर् शब्द त्याच्याहि ह्याच व्युत्पत्ति होत. कारण द्युलोक सुद्धां सगळीकडे गेलेला आहे; सूर्यकिरणांनीं तो रस ओढून घेतो; ग्रहनक्षत्रांच्या तेजाचें हरण करितो व सूर्याचा प्रकाश त्याच्यांत व त्याच्याभोंवतीं पसरलेला असतो.

**पृश्निः आदित्यो भवति**

सूर्याला पृश्नि म्हणतात. कारण,

**प्राश्नुते एनम् वर्णः इति नैरुक्ताः**

रंग ( वर्णः ) त्याला ( एनम् ) व्यापून टाकतो; असें नैरुक्त म्हणतात.

पृश्नि = प्र + अश्नि = प्र + अश्नुते. र् चा ऋ संप्रसारणानें होतो. किंवा

**संस्प्रष्टा रसान्**

पृश्निः = स्पृश्नि = सम् + स्प्रष्टा. सूर्य हा चांगल्या रीतीनें स्पर्श करितो. कशानें व कशाला ? आपल्या किरणांनीं रसमय पदार्थांना, किंवा

**संस्प्रष्टा भासं ज्योतिषाम्**

ग्रहनक्षत्रांच्या प्रकाशाला हिरावून घेण्याकरितां तो त्याला स्पर्श करितो. किंवा

**संस्पृष्टा भासा इति वा**

प्रकाश त्याला सर्व बाजूनीं ( सम् ) स्पर्श करितो.

**अथ द्योः**

'द्यु'ला सुद्धां पृश्नि म्हणतात. कारण,

**संस्पृष्टा ज्योतिर्भिः पुण्यकृद्भिः च**

ग्रहनक्षत्रें व पुण्यवान् लोक द्युलोकास स्पर्श करितात; म्हणजे ग्रह व नक्षत्रें हीं द्युलोकांत आहेत व पुण्यवान् लोक पुण्यप्रभावानें तेथें जातात.

पृश्नि ह्याचा अर्थ चित्रविचित्र. निरनिराळ्या रंगाचा असा आहे. हा शब्द विशेषण असल्यामुळें सूर्याला तीनदां, मण्डूकांना तीनदां, गाईना व बैलांना सहा वेळां, मरुतांच्या आईला पंधरा वेळां व आकाशाला तीन चार वेळां लाविलेला ऋग्वेदांत आढळतो. ह्या शब्दाचा मूळचा अर्थ रंग (१), त्यानंतर त्या रंगाच्या गाई (२), मग त्या रंगाचे बेडूक (३), नंतर आकाश (४), व सूर्य (५). मरुतांची आई जी पृश्नि ती सुद्धां मूळची चित्रविचित्र आकाश असावें. द्युलोकाला लावलेला पृश्नि-शब्द एकदांहि आढळला नाहीं.

**नाकः आदित्यो भवति**

नाक या शब्दाचा अर्थ आदित्य. कारण

**नेता रसानाम्**

तो जलादिक रस आपल्या किरणांनीं नेतो.

' नाक ' आणखी ' नेता ' ह्यांच्यामध्यें असलेलें ' न ' हें अक्षर व्युत्पत्तीला पुरें आहे. किंवा

**नेता भासाम्**

तो ग्रहनक्षत्रांचें तेज नेतो. किंवा

**ज्योतिषां प्रणयः**

ग्रहनक्षत्रांचा तो पुढारी आहे.

प्रणयः = प्र + नयः = प्र + नेता.

**अथ द्यौः**

आतां द्युलोकाला नाक म्हणतात त्याचें कारण

**कम् इति सुखनाम**

सुखाचें एक नांव 'कम्' आहे.

**तत् प्रतिषिद्धं प्रतिषिध्येत**

त्या 'क'चा प्रतिषेध करून पुनः प्रतिषेध करावयाचा; म्हणजे 'क' च्या पाठीमागें 'अ' लाविला म्हणजे 'अक' होतें. त्याचा प्रतिषेध करण्याकरितां 'न' पाठीमागें लाविला म्हणजे 'नाक' असा शब्द बनतो.

**न वै अमुं लोकं जग्मुषे किंचन अकम् ( काठक सं. २१।२ )**

**न वै अमुं लोकं जग्मुषे किंचन असुखम्**

त्या लोकास जो जातो त्याला कोणतेंहि असुख म्हणजे दुःख नसतें. कारण

**पुण्यकृतः हि एव तत्र गच्छन्ति**

पुण्य करणारेच लोक तेथें जातात.

महाराष्ट्रपाठांत भाष्यांतील 'जग्मुषे' बद्दल 'गतवते' आहे.

ऋग्वेदांत 'नाक' शब्द ३१ वेळां आला आहे. त्यापैकीं ३० ऋचांत त्या शब्दाचा अर्थ स्वर्ग किंवा द्युलोकाचा एक भाग असा आहे. फक्त एक ऋचा संशयित आहे.ती अशीः-

ते नाकमर्यो अगृभीतशोचिषं रुशत्पिप्पलं मरुतो वि धूनुथ (५।५४।१२)=हे मरुतः अर्यः ईश्वराः यूयं तम् अगृभीतशोचिषं रुशत्पिप्पलं नाकं विधूनुथ=हे मरुतांनों ज्याच्या ज्वाला पकडतां येत नाहींत (अगृभीतशोचिषं) व ज्याची प्रज्वलित फळें असतात अशा त्या नाकाला तुम्ही गदगदां हालवितां.

मरुत् जेव्हां प्रवासाला निघतात तेव्हां ते पृथिवी वगैरे सर्व लोक हालवून सोडतात. तेव्हां येथेंहि नाक म्हणजे स्वर्गलोक असाच अर्थ असावा. ह्या अर्थाला दोन शब्दांची हरकत दिसते. ते शब्द म्हणजे 'अगृभीतशोचिषम्' व 'रुशत्' हे होत. सूर्याच्या ज्वाला कोणासहि पकडतां येणार नाहींत व त्यालाच 'रुशद्वत्सम्' असें कांहीं ठिकाणीं म्हटलें आहे. येथें कदाचित् नाक = सूर्य असा अर्थ असेल. पण खात्रीचें एकहि उदाहरण नाहीं.

**गौः आदित्यो भवति**

सूर्याला गौहि म्हणतात. कारण

**गमयति रसान्**

तो आपल्या किरणांनीं जलादिक रस वर नेतो. किंवा

**गच्छति अन्तरिक्षे**

तो अंतरिक्षांत जातो. येथें अन्तरिक्षे म्हणण्यापेक्षां दिवि असें म्हणावें. कारण सूर्य द्युलोकांत प्रवास करितो.

गौ यामध्यें ग हें अक्षर आहे. त्यानें गम् धातु सूचित होतो. त्या धातूचा सूर्याशींहि संबंध आहे.

**अथ द्यौः**

द्युला सुद्धां गौ म्हणतात. कारण

**यत् पृथिव्याः अधि दूरं गता भवति**

पृथिवीपासून द्युलोक फार दूर गेलेला आहे. आणखी

**यच्च अस्यां ज्योतींषि गच्छन्ति**

हिच्यांत ग्रहनक्षत्रें जातात.द्यूचाहि गम् धातूशीं संबंध आहे; म्हणून तिला गौ म्हणतात.

**विष्टप् आदित्यः भवति**

विष्टप् = आदित्य. कारण

**आविष्टः रसान्**

तो जलादिक रसामध्यें शिरलेला असतो. किंवा

**आविष्टः भासं ज्योतिषाम्**

ग्रहनक्षत्रांच्या प्रकाशांत तो शिरलेला असतो; म्हणजे त्यांचा प्रकाश तो घेतो. किंवा

**आविष्टः भासा इति वा**

प्रकाश त्याच्यामध्यें शिरलेला असतो.

**अथ द्यौः**

द्युलाहि विष्टप् म्हणतात. कारण

**आविष्टा ज्योतिर्भिः पुण्यकृद्भिश्च**

द्युलोकांत ग्रहनक्षत्रें व पुण्यवान् लोक शिरलेले असतात.

विष्टप्' हा शब्द ऋग्वेदांत बारा वेळां आला आहे व त्याचा अर्थ स्वर्गासारखा एखादा लोक असावा असें दिसतें. ह्या तीन विष्टपावर चढून जा किंवा कोणाला तरी चढव असें ( ऋ. ८।९।५ ) येथें म्हटलें आहे. कोठें ब्रध्नाचें किंवा समुद्राचें किंवा ऋताचें विष्टप् असेंहि म्हटलें आहे. सूर्यवाची विष्टप् कोठेंहि आढळत नाहीं. तो शब्द वि + स्तभ् ह्यापासून निघाला असावा. विश् + त + प् = विष्ट + प् अशी यास्क व्युत्पत्ति करतो.

**नभः आदित्यो भवति**

आदित्याला नभहि म्हणतात. कारण

**नेता रसानाम् । नेता भासाम् । ज्योतिषां प्रणयः**

'नाक' याच्या व्युत्पत्तीप्रमाणें ही व्युत्पत्ति आहे. ती पहा.

**अपि वा भनः एव स्यात् विपरीतः**

किंवा मूळ शब्द भनः असाच असेल. त्याचीं अक्षरें उलटून नभस् शब्द बनला असावा. भनः=भासनः=प्रकाशणारा.

**न न भाति इति वा**

किंवा नभः = न् + अ + भः. न् = न. अ = न. भः = भाति. तो प्रकाशत नाहीं असें नाहीं. तर प्रकाशतोच.

**एतेन द्यौः व्याख्याता**

द्यूलाहि नभस् म्हणतात. त्याचीहि अशीच व्युत्पत्ति.

ग्रीक भाषेंत nephos (नेफॉस )=मेघ.

नभस् शब्दाचे पाणी, मेघ व द्युलोक असे तीन अर्थ स्पष्ट दिसतात. एका उदाहरणांतच 'नभस्' ह्याचा अर्थ 'सूर्य' असावा असें वाटतें. मूळ अर्थ कदाचित् मेघ असेल. कारण ग्रीक भाषेंत नेफॉस ( nephos ) ह्या शब्दाचा तोच अर्थ. आहे. मेघाचा पाण्याशीं संबंध आहे म्हणून पाणी हा अर्थ अस्तित्वांत आला असेल. मेघ द्युलोकांत उत्पन्न होतात अशी समजूत असल्यामुळें 'द्यु' हा अर्थ निघाला असेल व रूपकानें सूर्याला ' नभस् ' म्हटलें गेलें असेल.

## खंड १५ वा.

**रश्मिनामानि उत्तराणि पञ्चदश ( १।५ )**

पुढील पंधरा नामांचा रश्मि हा अर्थ आहे.

**रश्मिः यमनात्**

रश्मिः = यश्मिः = यमिः

रश्मि शब्द यम्=आखडणें, ओढून घेणें ह्यापासून निघाला आहे. रश्मि ह्याचा मूळ अर्थ दोर किंवा लगाम असा होता. नंतर तो शब्द सूर्याच्या किरणांना लावला गेला. कारण किरण हे दोरासारखे दिसतात.

**तेषाम् आदितः साधारणानि पञ्च अश्वरश्मिभिः**

त्यांपैकीं पहिलीं पांच नामें घोड्याच्या लगामालाही लाविलीं जातात; म्हणजे तीं नामें सूर्यरश्मि व अश्वरश्मि यांना साधारण होत; म्हणजे त्यांचा अर्थ किरण व लगाम असा होतो.

**दिङ्नामानि उत्तराणि अष्टौ ( १।६ )**

पुढील आठ नामांचा अर्थ दिशा.

**दिशः कस्मात् । दिशतेः**

दिक् शब्द कसा झाला ? तो दिश्=देणें, अर्पण करणें, ह्या धातूपासून झाला आहे. कारण त्या त्या दिशामध्यें असणाऱ्या देवतांना हवि वगैरे देतात असें दुर्ग म्हणतो. दिश=दाखविणें. आकाशाचे निरनिराळे भाग बोटानें दाखविले जातात; म्हणून दिशांना दिक् नांव. पडलें असावें. किंवा

**आसदनात्**

ह्या दिशा निरनिराळ्या वस्तूंच्या संनिध असतात.

**अपि वा अभ्यशनात्**

किंवा हा शब्द अभि+अश् ह्यापासून झाला असेल; कारण दिशा सर्व पदार्थ व्यापून टाकतात.

सद् व अश् ह्यांत आणि 'दिश्' ह्या शब्दांत केवळ वर्णसाम्य आहे. तथापि अर्थामुळें ह्याही व्युत्पत्ति शक्य आहेत असें यास्क म्हणतो. 'सद्' ह्याचें 'सिद्' 'शिद्' व नंतर 'दिश्' व 'अश्' ह्याचें 'दश्' व नंतर 'दिश्' असें रूपांतर झालें असेल.

**तत्र काष्ठाः ( १।६।५ ) इति एतत् अनेकस्य अपि सत्त्वस्य नाम भवति**

**ह्या वर्गांत 'काष्ठा' म्हणून एक नाम आहे; त्याचे एकाहूनही अधिक अर्थ होतात.**

**काष्ठाः दिशो भवन्ति**

दिशांना काष्ठा नांव आहे. कारण

**क्रान्त्वा स्थिताः भवन्ति**

काष्ठाः=का+ष्ठाः.का=क्रान्त्वा; ष्ठाः=स्थाः=स्थिताः. दिशा ह्या पुष्कळ प्रदेश आक्रमून मग थांबतात.

आकाशाच्या प्रत्येक बाजूच्या पहिल्या बिंदूपासून निघून शेवटच्या बिंदूपर्यंत एकएक दिशा जाते.

**काष्ठाः उपदिशो भवन्ति**

मधल्या ज्या दिशा त्यांनाही काष्ठा म्हणतात; कारण

**इतरेतरं क्रान्त्वा स्थिताः भवन्ति**

एकमेकींकडे जाऊन मग त्या थांबतात. जसें

आग्नेयी दिशा पूर्वेकडून निघून दक्षिणेकडे जाते म्हणजे ही उपदिशा दोन दिशा व्यापते. आग्नेयी दिशा एका बाजूला पूर्वेकडे जाते व दुसऱ्या बाजूनें दक्षिणेकडे जाते. ह्याप्रमाणेंच इतर अवांतर दिशा समजाव्या.

**आदित्यः अपि काष्ठा उच्यते । क्रान्त्वा स्थितः भवति**

आदित्याला काष्ठा नांव आहे. कारण पूर्व सोडून आकाश ओलांडून पश्चिमेला पोहोंचल्यावर तो थांबतो.

**आज्यन्तः अपि काष्ठा उच्यते । क्रान्त्वा स्थितः भवति**

आजेः अन्तः=आज्यन्तः. शर्यतीच्या दुसऱ्या टोंकालाही काष्ठा म्हणतात.

कारण तें टोंक सर्व शर्यतीची जागा ओलांडून मग स्थिर होतें. शर्यतीचें शेवटचें टोंक कोणतें असा प्रश्न निघाल्यास हें टोंक, तें टोंक, असें करीत करीत ज्याच्या पलीकडे तें जाऊं शकत नाहीं असें जें शेवटलें टोंक तें तेथेंच थांबतें.

**आपः अपि काष्ठाः उच्यन्ते । क्रान्त्वा स्थिताः भवन्ति**

पाण्यालाही काष्ठा म्हणतात. कारण पाणी वाहून वाहून शेवटीं थांबतें.

**इति स्थावराणाम्**

ही व्युत्पत्ति स्थावर म्हणजे स्थिर पाण्याची झाली.

काष्ठानाम् याला अतिष्ठन्तीनाम् व अनिवेशनानाम् हीं विशेषणें असल्यामुळें त्या शब्दाचा अस्थावर (=वाहणारें पाणी) असा अर्थ यास्कानें केला असावा.

काष्ठा शब्दाचा दिशा असा अर्थ अमरांत सांपडतो (१।१।३). अवांतर दिशा व आदित्य हे अर्थ यास्काला कोठें सांपडले तें कळत नाहीं. निघंटुकारानेंही दिग्वाचक शब्दांमध्यें काष्ठा शब्द घातला आहे.

## खंड १६ वा.

**अतिष्ठन्तीनामनिवेशनानां काष्ठानां मध्ये निहितं शरीरम् ।**
**वृत्रस्य निण्यं वि चरन्त्यापो दीर्घं तम आशयदिन्द्रशत्रुः (१।३२।१०)**

**अतिष्ठन्तीनामनिवेशमानाम् इति अस्थावराणाम्**

अतिष्ठन्तीनाम् व अनिवेशनानाम् ह्या विशेषणांनीं पाणी स्थावर नसून वाहणारें होतें असें दर्शविलें जातें.

अतिष्ठन्तीनाम्=उभें किंवा स्थिर, न राहणाऱ्या (पाण्याच्या).

अविद्यमानं निवेशनं यासाम्=ज्याला निवेशन म्हणजे विश्रांति नाहीं.

**काष्ठानां मध्ये निहितं शरीरम् । मेघः शरीरम्**

पाण्याच्या मध्यें ठेविलेलें शरीर. शरीर म्हणजे मेघ.

**शरीरं शृणातेः शम्नातेर्वा**

शरीर हा शब्द 'शृ' किंवा 'शम्' ह्यापासून झाला आहे. कारण शरीराची हिंसा होते. 'शृ' हा धातु शरीराला जवळ आहे; कारण त्यांत 'श्' व 'ऋ' अशीं शरीरशब्दांत असणारीं दोन अक्षरें आहेत. 'शम्' यांत फक्त 'श्' आहे. या दोहींचाही अर्थ हिंसा करणें.

**वृत्रस्य निण्यं निर्णामम्**

**निण्यं=नि+ण्यं=निर्णामम्=यत्र असौ नीचैः नमति तं प्रदेशम्=जेथें वृत्र खालीं नमतो, लपलेला असतो असा प्रदेश. नि=निर्. ण्यं=नामं.**

**विचरन्ति विजानन्ति आपः इति**

विचरन्ति=विजानन्ति=जाणतात. **कोण जाणतात? जल जाणतें.**

**दीर्घं द्राघतेः**

दीर्घ शब्द 'द्राघ्' धातूपासून झाला आहे. 'द्राघ्' धातूपासून 'दीर्घ' कीं दीर्घ शब्दापासून 'द्राघ्'? बहुतकरून दीर्घपासून 'द्राघ्' धातु निघाला असावा. 'दृ' पासून दीर्घ शब्द झाला आहे असें क्षीरस्वामी म्हणतो.

**तमः तनोतेः**

'तमस्' शब्द 'तन्' (=विस्तृत करणें) ह्यापासून झाला आहे. कारण अंधकार पसरलेला असतो. 'तम्' गुदमरणें ह्यापासून तो झाला आहे; कारण अंधारांत गुदमरल्याप्रमाणें वाटतें.

**आशयत् आशेतेः**

'शी' धातूला 'आ' उपसर्ग लागून त्याचें 'आशयत्' हें भूतकालीं तृतीय-पुरुषाचें एकवचन होय.

**इन्द्रशत्रुः इन्द्रः अस्य शमयिता वा शातयिता वा । तस्मात् इन्द्रशत्रुः**

इन्द्रशत्रुः-इंद्र ह्याचा नाश करणारा. 'शम्' व 'शद्' ह्या दोहींचाही अर्थ नाश करणें तेव्हां 'शत्रु' शब्द ह्यांपैकीं कोणत्याही धातूपासून निघाला असेल. खरोखर 'शद्' धातूपासूनच तो शब्द निघाला आहे. 'शातयति इति शत्रुः' (क्षीरस्वामी). इन्द्रः अस्य शत्रुः असें म्हणावयाच्याऐवजीं शत्रु शब्दाची व्युत्पत्तीच यास्कानें दिली आहे. त्याच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें 'यस्य' बद्दल त्यानें 'अस्य' घातलें आहे. तस्मात इन्द्रशत्रुः=म्हणून वृत्राला इन्द्रशत्रु असें म्हटलें आहे.

'इन्द्रस्य शत्रुः' असा जर विग्रह केला असता तर इंद्राला ठार करणारा असा त्याचा अर्थ झाला असता व समासाचा स्वरही बदलला असता. ह्या स्वरभेदासंबंधानें ब्राह्मणग्रंथांत एक गोष्ट सांगितली आहे. ती अशीः—इंद्रानें त्वष्टयाचा मुलगा विश्वरूप ह्याला ठार मारलें; तेव्हां त्वष्टयानें सोमयाग आरंभिला व इंद्राला बोलाविलें नाहीं. इंद्रानें यज्ञाला विघ्न केलें व सोम पिऊन तो निघून गेला. राहिलेल्या सोमरसानें त्वष्टयानें अभिचारक्रिया सुरू केली आणि 'स्वाहा इन्द्रशत्रुर्वर्धस्व' हे शब्द उच्चारिले. त्याच्या मनांत 'इंद्राला ठार मारणारा असा तूं उत्पन्न होऊन वाढ' असें म्हणावयाचें होतें. परंतु 'इन्द्रशत्रुः' हा समास त्यानें भलत्या स्वरानें उच्चारल्याकारणानें 'इन्द्र याला ठार मारील' असा त्या समासाचा अर्थ झाला व जसें मागितलें तसें मिळालें ह्या न्यायानें इंद्रानें वृत्राला ठार मारिलें (तै. सं. २।५।२). स्वरमाहात्म्य कथन करण्याकरितां ही कथा रचली गेली आहे हें स्पष्ट आहे.

ऋचेचा अर्थ असाः—

स्थिर न राहणाऱ्या, विश्रांति न घेणाऱ्या पाण्याच्यामध्यें गुप्त ठेवलेलें जें वृत्राचें शरीर त्याच्यावर पाणी वाहूं लागलें. ह्या रीतीनें वृत्र दीर्घ अंधकारांत निजता झाला.

'विचरन्ति' ह्याचा यास्कानें 'विजानन्ति' असा अर्थ केला आहे. त्याचें विवरण दुर्गानें पुढीलप्रमाणें केलें आहे. वृत्रस्य निण्यं निर्णामं यत्र असौ नीचैः नमति तं प्रदेशं विजानन्ति इव यतः तेन प्रदेशेन विचरन्ति प्रचरन्ति = वृत्र जेथें लपला आहे तो प्रदेश जणूं काय त्या ओळखतात; कारण त्या प्रदेशानें त्या वाहतात. एवढा लांबलचक अर्थ यास्काच्या मनांत होता कीं नव्हता हें सांगतां येत नाहीं. बहुतकरून 'विचरन्ति'=ओळखतात एवढाच अर्थ त्याच्या मनांत असेल. 'विजानन्ति आपः इति' येथें 'इति' शब्द कां घातला तें समजत नाहीं.

(१) शर्यत, (२) शर्यतीची जागा, (३) संग्रामस्थल, (४) तबेला, व (५) तुरुंग असे काष्ठा शब्दाचे पांच अर्थ असावेत. पाणी व दिशा हे अर्थ कोठेंही लागूं पडत नाहींत. प्रस्तुत ऋचेंत काष्ठा म्हणजे तुरुंग. इतर तुरुंग स्थिर, न हलणारे, असे असतात. पण हा

तुरुंग अस्थिर ( अतिष्ठन्तीनां ), कधीं न थांबणारा ( अनिवेशनानां ) असा होता. ह्या तुरुंगांत वृत्राचें शरीर इंद्रानें टाकलें. निण्यं=निर्धास्त विचरन्ति=वर बसून जातात. पाणी त्या शरीरावर बसून निर्धास्त जातें. वाहणाऱ्या पाण्यांत वृत्रदेह टाकला जातो. जसा कोणी घोड्यावर बसून संचार करतो तशा अब्देवी वृत्रदेहावर बसून संचार करूं लागल्या. शरीरं हें विचरन्ति ह्याचें कर्म होय. रजांसि चित्रा विचरन्ति तन्यवः (५.५३.३)=तन्यवः चित्रा चित्राणि रजांसि विचरन्ति=गर्जना करणारे मरुत् प्रज्वलित घोड्यांवर बसून जातात. ह्याप्रमाणें काष्ठा, विचरन्ति व निण्य ह्यांचे मी अगदीं निराळे अर्थ केले आहेत.

'इति स्थावराणाम्' (खंड १५) ह्या शब्दांवरून यास्कानें जींत काष्ठा शब्दाचा स्थावर पाणी असा अर्थ त्याला वाटला अशी एखादी ऋचा उद्धृत केली असावी; कारण प्रस्तुत खंडांत ऋचा पठन केल्यानंतर 'इति अस्थावराणाम्' असे शब्द त्यानें घातले आहेत.

**तत् को वृत्रः । मेघः इति नैरुक्ताः**

आतां वृत्र कोण ? वृत्र म्हणजे मेघ असें नैरुक्त म्हणतात.

**त्वाष्ट्रः असुरः इति ऐतिहासिकाः**

इंद्राला मारण्याकरितां त्वष्ट्यानें उत्पन्न केलेला असुर असें इतिहासकार म्हणतात. गुर्जरपाठांत 'त्वाष्ट्रः असुरः इति ऐतिहासिकाः' हे शब्द नाहींत. ते दुर्गाच्या वृत्तींत आढळतात; पण ते मागून घुसडले असावेत; कारण दुर्ग त्यांचें विवरण करीत नाहीं. जर ते यास्काच्या निरुक्तांत असते तर दुर्गानें वृत्रासुराबद्दलची ब्राह्मणांतील कथा दिली असती. पुढें जे शब्द आले आहेत त्यांचा 'मेघः इति नैरुक्ताः' ह्याच्याशींच संबंध दिसतो.

**अपां च ज्योतिषश्च मिश्रीभावकर्मणः वर्षकर्म जायते**

पाणी व वीज ह्यांचें मिश्रण होऊन त्या मिश्रणक्रियेपासून वर्षाव उत्पन्न होतो. 'धूमज्योतिःसलिलमरुतां संनिपातः क्व मेघः' असें मेघाचे वर्णन कालिदासानें मेघदूतांत केलें आहे.

**तत्र उपमार्थेन युद्धवर्णाः भवन्ति**

अशी खरी स्थिति असतांना ( तत्र ) युद्धाचीं वर्णनें केवळ रूपकें होत. यास्क रूपकाबद्दल उपमा शब्द वापरतो. उपमा एव अर्थः तेन=उपमा ( रूपक ) म्हणूनच.

**अहिवत्तु खलु मन्त्रवर्णाः ब्राह्मणवादाश्च**

परंतु मंत्रांमध्यें जीं वर्णनें येतात व ब्राह्मणांमध्यें जे अर्थवाद दिलेले असतात ते अहीसंबंधानें असतात. ह्या शब्दांचे येथें कांहीं एक प्रयोजन नाहीं. मेघ म्हणजे वृत्र; त्याच्याशीं इंद्र लढतो अशा अर्थाच्या ऋग्वेदांत कितीतरी ऋचा आहेत. त्या मानानें मेघ

म्हणजे अहि अशा अर्थाच्या ऋचा फारच थोड्या आहेत. अर्थवादांत तर अहीचा नामनिर्देशही नसतो. शिवाय 'तु' शब्द पूर्वी जें विधान केलें असतें, तें खोडून टाकण्याकरितां घातलेला असतो. पूर्वी केलेलें विधान युद्धासंबंधीं आहे. हें विधान 'अहिवत्' वगैरे शब्दांनीं खोडलें नाही. 'तु' याचा दुर्ग 'च' असा अर्थ करितो. 'अहिवत्तु'=अहिवत् च. म्हणजे ऋग्वेदांतील वर्णनांत वृत्राशीच इंद्र लढतो असें नाहीं; तर तो अहीशींहि लढतो. पण 'तु' चा अर्थ 'च' कधींहि होत नाहीं. निरुक्तांत जे शब्द सांपडले त्यांचा अर्थ देणें दुर्गाला भाग पडलें. वास्तविक हे शब्द प्रक्षिप्त होत.

**विवृद्ध्या शरीरस्योस्रातांसि निवारयांचकार तस्मिन् हते प्रसस्यन्दिरे आपः**

शरीर खूप वाढवून तो पाणी अडविता झाला. (इंद्रानें) त्याला ठार मारल्यावर पाणी वाहूं लागलें.

हींही दोन वाक्यें प्रक्षिप्तच होत; कारण वृत्रानें किंवा अहीनें स्वतःचें शरीर फुगविलें असें वर्णन कोठेंही नाहीं.

**तदभिवादिनी एषा ऋक् भवति**

तशा युद्धाचें कथन करणारी ही पुढील ऋचा आहे.

पुढील ऋचेंत 'अहिगोपाः' असा शब्द आला आहे. तेव्हां वरील प्रक्षिप्तें ज्यानें घातलीं त्याला अहीसंबंधानें यास्कानें कांहीं म्हणावयास पाहिजे होतें असें वाटून ती उणीव भरून काढण्याकरितां वरील प्रक्षिप्तें त्यानें मुद्दाम घुसडलीं व 'तदभिवादिनी' ह्याचा 'अहि'शीं संबंध जोडला.

## खंड १७ वा.

**दासपत्नीरहिगोपा अतिष्ठन्निरुद्धा आपः पणिनेव गावः ।**
**अपां बिलमपिहितं यदासीद् वृत्रं जघन्वाँ अप तद्ववार (१।३२।११)**
**दासपत्नीः दासाधिपत्न्यः**

दासपत्नीः =दासाधिपत्न्यः

दासः कर्मकरः । तं हि ताः अधिष्ठाय पान्ति रक्षन्ति । स हि कर्मणा श्रान्तः तासु पीतासु विश्रान्तः आप्यायितो भवति (दुर्ग). दास=मजूर. तो काम करून थकला भागला असतो. पाणी प्यायल्यावर व विश्रांति घेतल्यावर तो ताजातवाना होतो.

हा अर्थ यास्काच्या मनांत असेल कीं नाहीं हा प्रश्न आहे. अधिपतिप्रमाणें अधिपत्नी ह्या शब्दाचा अर्थ असल्यास दासांवर अंमल चालविणाऱ्या असा अर्थ होईल. पण दासाच्या हातांत सांपडल्यावर त्याच्यावर त्या अंमल कसा चालवितील? यास्काच्या मनांत काय अर्थ होता तें समजत नाहीं. दासाच्या स्त्रिया

असा अर्थ दिसतो. कारण पुढील शब्द जो 'अहिगोपाः' त्याचा अहीनें रक्षण केलेल्या, आपल्या स्वाधीन ठेवलेल्या, असा अर्थ होतो. दासपत्नीः हें ' अपः ' ह्याचें तीनदां व 'नवतिं पुरः' ह्याचें एकदां असें विशेषण म्हणून ऋग्वेदांत आढळतें. पाणी व किल्ले हे दोन्हीही दासांच्या ताब्यांत होते. किल्ले इंद्रानें फोडले व पाणी जिंकून तें आर्यांच्या स्वाधीन केलें ( अर्यपत्नीरकृणोदिमा अपः १०।४३।८ ).

**दासः दस्यतेः । उपदासयति कर्माणि**

दास शब्द ' दस् ' धातूपासून झाला आहे. तो शेतकाम वगैरे शेवटास नेतो (उपदासयति). आर्यांचे शत्रु ते दास. दास हें नांव कदाचित् एखाद्या अनार्य जातीचें असेल. दास म्हणजे मजूर हा अर्थ फार अर्वाचीन आहे.

**अहिगोपाः अतिष्ठन् । अहिना गुप्ताः**

अहिगोपाः=अहिना गुप्ताः=अहीनें लपवून ठेवलेलें. अतिष्ठन्=होतें.

अहिनाम्नो दस्योः (९$\frac{८८}{४}$) म्हणजे अहि नांवाची दस्यूची एक जात होती. तें नांव वृत्राला दिलें गेलें. वृत्र पाणी लपवून ठेवतो म्हणून ' अहिना गुप्ताः ' असा विग्रह केला आहे परंतु गोप शब्दाचा अर्थ सर्वत्र रक्षण करणारा असा आहे. अहिगोपाः= अहि ( वृत्र ) गाईंना आपल्या नजरेखालीं ठेवतो; त्यांना तो दुसरीकडे जाऊं देत नाहीं; त्याची नजर इतकी तीक्ष्ण व कडक असते. ' अहिः गोपाः यासां ताः अहिगोपाः.'

**अहिः अयनात् । एति अन्तरिक्षे**

अहि शब्द इ (=जाणें) ह्यापासून झाला आहे; कारण तो अंतरिक्षांत जातो. मेघ आकाशांत संचार करीत असतात.

**अयम् अपि इतरः अहिः एतस्मादेव**

सर्पवाची लौकिक शब्द जो अहि तोही ह्याच धातूपासून झाला आहे. तो जमिनीवरून सरपटत जातो.

**निर्ह्रसितोपसर्गः आहन्ति इति**

निर्ह्रसितः उपसर्ग यस्मिन्. मूळ शब्द आहिः असा होता. 'आहिः' हें नांव सर्पाला पडण्याचें कारण तो दंश करून ठार करतो (आहन्ति). आहि ह्यांतील कालेंकरून 'आ' चा 'अ' झाला. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें यास्कानें येथें ' वा ' गाळला आहे. वास्तविक ही निराळी व्युत्पत्ति आहे.

**निरुद्धा । आपः पणिनेव गावः । पणिः वणिक् भवति । पणिः पणनात्**

पणि = वणिक् वणि = वाणी. पण् = विकणें ह्यापासून पणिः.

**पणिक् पण्यं नेनेक्ति**

वणिक् = पणिक्. पणिक् = प+णिक्. प=पण्यम=विकावयाची वस्तु. निक्= **नेनेक्ति**=शुद्ध करतो. विकावयाचे जिन्नस स्वच्छ ठेवले पाहिजेत.

**अपां बिलमपिहितं यदासीत्। बिलं भरं भवति**

बिलम्=भिलम्=भिरम=भरम्. भोंक पाण्यानें भरलेलें असतें; म्हणजे बिल शब्द भृ भरणें ह्यापासून झाला आहे.

**वृत्रं जघ्निवान् अपववार तत्**

जघन्वान्=जघ्निवान्. अप तत् ववार=अपववार तत्=तें मोकळें करतां झाला.

**वृत्रः वृणोतेर्वा वर्ततेर्वा वर्धतेर्वा**

वृत्र शब्द वृ आच्छादणें ह्यापासून झाला असेल; कारण वृत्र ( मेघ ) पाणी आपल्या शरीरानें आच्छादून टाकतो. किंवा तो वृत् असणें ह्यापासून झाला असेल; कारण वृत्र आकाशांत असतो. किंवा तो वृध् वाढणें ह्यापासून झाला असेल; कारण वृत्र ( मेघ ) फुगत जातो.

**यत् अवृणोत् तत् वृत्रस्य वृत्रत्वम् इति विज्ञायते**

वृत्राला वृत्र म्हणण्याचें कारण त्यानें पाणी आच्छादून टाकिलें.

**यद् अवर्तत तत् वृत्रस्य वृत्रत्वम् इति विज्ञायते**

अवर्तत=होता.

**यद् अवर्धत तत् वृत्रस्य वृत्रत्वम् इति विज्ञायते**

अवर्धत=वाढता झाला. हीं वचनें कोणत्या ब्राह्मणांतून घेतलीं आहेत हें समजत नाहीं. वृ आच्छादणें ह्यापासूनच वृत्र शब्द झाला आहे. ह्या खंडांत दिलेल्या सर्व व्युत्पत्ति एक खेरीज करून काल्पनिक आहेत. इति विज्ञायते=असें ब्राह्मणग्रंथांत म्हटलें आहे.

ऋचेचा अर्थः—

जसा पणी गाई अडवून ठेवतो तसें पाणी दासाच्या ताब्यांत असल्यामुळें व अहीची त्याच्यावर कडक नजर असल्याकारणाने, तें अडकून राहिलें. पाण्याचें बीळ जें झांकून टाकलें होतें तें वृत्राला ठार करून इंद्रानें उघडें केलें.

## खंड १८ वा.

**रात्रिनामाणि उत्तराणि त्रयोविंशतिः ( १।७ )**

पुढील तेवीस नामें रात्रीचीं होत.

**रात्रिः कस्मात्। प्ररमयति भूतानि नक्तंचारीणि**

रात्रि शब्द कसा झाला ? रात्रीं संचार करणाऱ्या प्राण्यांना ती रमविते.

रात्र रात्रीं हिंडणाऱ्या भूतांना म्हणजे हिंस्र जनावरें, भुतें वगैरेंना हिंडविते.

**उपरमयति इतराणि ध्रुवीकरोति**

उपरमयति=ध्रुवीकरोति=स्थिर करते. इतर भूतांना ती एके ठिकाणीं थांबविते म्हणजे विश्रांति देते. ' ध्रुवीकरोति ' हा शब्द प्रक्षिप्त असावा; कारण ' प्ररमयति ' ह्याचा अर्थ दिला नाहीं; तेव्हां ' उपरमयति ' ह्याचाही अर्थ देण्याचें प्रयोजन नव्हतें.

**रातेर्वा स्यात् दानकर्मणः । प्रदीयन्ते अस्याम् अवश्यायाः**

किंवा 'रा'(=देणें) ह्या धातूपासून तो शब्द झाला असेल; कारण रात्रीं दंव पडतें.

'प्रदीयन्ते' ह्याऐवजीं 'प्ररीयन्ते' असा मूळ पाठ असेल; कारण 'रात्री' शब्दांत ' रा ' धातु आहे, ' दा ' धातु नाहीं. ' राति सुखं रात्रिः ' असें क्षीर स्वामी म्हणतो. ऋग्वेदांत ' रात्री ' असा शब्द आहे; ' रात्रि ' असा नाहीं. अमरांत ' **रात्री** ' शब्द नाहीं. ' रात्रि ' किंवा ' रात्री ' निघंटूंत (१।७) नाहीं.

**उषोनामानि उत्तराणि षोडश (१।८) । उषाः कस्मात् । उच्छतीति सत्याः ।**

पुढील सोळा नांवें उषेचीं होत. उषा हें नांव कशापासून ? (उषा) उजळते ही क्रिया जेव्हां दर्शवावयाची असते तेव्हां उषेला उषस् म्हणतात.

**रात्रेः अपरः कालः**

रात्रीचा शेवटचा काल तो उषा. निघंटु १।८ मध्यें उषस् नाहीं.

**तस्याः एषा भवति**

उषेसंबंधाची पुढील ऋचा होय

## खंड १९

**इदं श्रेष्ठं ज्योतिषां ज्योतिरागाच्चित्रः प्रकेतो अजनिष्ट विभ्वा ।**
**यथा प्रसूता सवितुः सवायँ एवा रात्र्युषसे योनिमारैक् ॥ ऋ० सं० १।११३।१**
**इदं श्रेष्ठं ज्योतिषां ज्योतिः आगमत्**

आगात्=आगमत्. आगमत् असा पर्याय देण्याचें कारण 'इणो गा लुङि.' ( पा० २।४।४५ )= लुङ्मध्यें म्हणजे द्वितीय भूतकाळीं ' इ ' धातूला 'गा' आदेश **होतो**. ह्याचा अर्थ असा कीं ह्याअर्थीं 'गा' जाणें हा धातु पाणिनीय **संस्कृतांत नव्हता**. **'आगमत्'** दुर्गवृत्तींत नाहीं.

**चित्रं प्रकेतनं प्रज्ञाततमम् अजनिष्ट विभूततमम्**

चित्रः=चित्रम्=पूजनीय किंवा दर्शनीय. प्रकेतः=प्रकेतनम्=प्रज्ञाततमम्= अतिशय तेजस्वी.. विभ्वा=विभूततमम्=अतिशय मोठें. मूळ शब्द विभ्वन्; ह्याचें 'विभ्वा' एवढेंच रूप ऋग्वेदांत आढळतें.

**' चित्रः प्रकेतः ' व ' विभ्वा ' हे शब्द पुल्लिंगी आहेत; परंतु यास्कानें त्यांचें**

नपुंसकलिंग केलें आहे. तसें करण्याचें कारण ते तीनही शब्द ज्योतिः ह्याचीं विशेषणें आहेत अशी त्याने आपली समजूत करून घेतली हें. तशी समजूत व्हावयाचें कारण 'प्रकेतः' ह्या शब्दाचा त्याला अर्थ कळला नाहीं हें. तो शब्द कित् ( जाणणें ) ह्यापासून झाला आहे; म्हणून प्रकेतनं म्हणजे प्रज्ञाततमम् असा अर्थ तो करतो. परंतु 'प्रकेतः' ह्या शब्दाचा अर्थ ध्वज असा आहे. ' चित्रः प्रकेत उषसो महाँ असि अग्ने (ऋ०सं० १।९४।५)=हे अग्नि तूं उषेचा मोठा, झळकणारा ध्वज आहेस असें म्हटलें आहे. तोच अर्थ प्रस्तुत ऋचेंत आहे.

**यथा प्रसूता सवितुः प्रसवाय रात्रिः आदित्यस्य**

सवाय=प्रसवाय. सवितुः=आदित्यस्य.

सविता म्हणजे आदित्य; त्याला जन्म देण्याकरितां जशी रात्र प्रसूत होते;

**एवं रात्री उषसे योनिम् अरिचत् स्थानम्**

एवा=एवम्. योनिम्=स्थानम्. औरक्=अरिचत्=रिकामी करती झाली. तशी रात्र उषेला जागा रिकामी करून देती झाली. रात्रीबद्दल रात्रिः पाहिजे.

**स्त्रीयोनिः अभियुतः एनाम् गर्भः**

स्त्रीयोनीला योनि म्हणण्याचें कारण तिला ( एनाम् ) गर्भ सर्व बाजूंनीं चिकटलेला असतो. म्हणजे योनि शब्द यु(=मिसळणें) ह्या धातूपासून झाला आहे. २।८ मध्यें ' अयमपि इतरः योनिः एतस्मात् एव । परियुतो भवति' असें म्हटल्यावर प्रस्तुत खंडांत त्या शब्दाची व्युत्पत्ति देण्याचें काय कारण होतें ? तेथें योनिः हा शब्द पुंल्लिंगी आहे व त्याचा स्त्रीयोनिः असा दुर्ग अर्थ करतो. परंतु तेथें, प्रस्तुत खंडांतल्या व्युत्पत्तीमुळें व लिंगामुळें, त्या शब्दाचा भिन्न अर्थ असावा असें वाटतें. भगं योनिर्द्वयोः ( अमर २।६।७६) म्हणजे योनि शब्द पुंल्लिंगी व स्त्रीलिंगी आहे व त्याचा अर्थ 'स्त्रीलिंग'. २।८ मध्यें 'परियुतः' अशी तर येथें 'अभियुतः' अशी व्युत्पत्ति दिली आहे. तेव्हां प्रश्न असा उत्पन्न होतो कीं खरी व्युत्पत्ति कोणती व व्युत्पत्तीचें स्थान कोणतें ? २।८ मध्यें योनि शब्द अंतरिक्षवाची आहे असें म्हणून त्याची व्युत्पत्ति दिली आहे; तेव्हां स्त्रीयोनि ह्या शब्दाची व्युत्पत्ति साहजिकपणें तेथेंच योग्य. येथें योनि म्हणजे स्थान एवढेंच ह्मटलें आहे; त्याची व्युत्पत्ति दिली नाहीं. ह्यावरून 'योनि' शब्दाची दिलेली व्युत्पत्ति प्रक्षिप्त होय. यास्ककालीं 'योनि' शब्द पुंल्लिंगी होता; प्रक्षेपकाच्या कालीं तो स्त्रीलिंगी झाल्यामुळें त्याला निराळी व्युत्पत्ति द्यावीशी वाटली. पण पूर्वीं व्युत्पत्ति दिली आहे हें तो विसरला.

ऋचेचा अर्थः— ' ज्योतींमधील अतिशय श्रेष्ठ असें हें ज्योति ( उषा ) उदयाला आलें आहे. तिचा झळकणारा मोठा ध्वज ह्मणजे अग्नि हा जन्माला आला आहे. ज्याअर्थीं सवित्याला जन्म देण्याकरितां ती ( उषा ) प्रसूत होत आहे त्याअर्थीं रात्र उषेला जागा रिकामी करून देत आहे. '

'प्रकेतः' ह्या शब्दानें कदाचित् उषेचा उल्लेख केला असेल. तिलाही देवांचा झळकणारा ध्वज ह्मणावयाला कांहीं हरकत नाहीं.

दुसऱ्या अर्धाचा अर्थ दुर्गाचार्यानें पुढीलप्रमाणें केला आहे:— यथा प्रसूता प्रकर्षेण सूता प्रसवम् अनुप्राप्ता। सूतिशब्दः प्रसवार्थः। रात्रिः आदित्यस्य प्रसवाय आदित्योत्सृष्टे देशे जायते एवमेव रात्रिः उषसोऽपि जन्मार्थं योनिं स्थानम् अवकाशम् उषसः आत्मलाभाय आरैक् आरेचयति। ददाति इत्यर्थः। यथा उषा आदित्यस्य जन्मनः हेतुः तदनन्तरजन्मत्वात् एवम् रात्रिः उषसः जन्मनः हेतुः =प्रसूता ह्मणजे प्रसवकाल जवळ आहे जिचा अशी. सूति=प्रसव. आदित्याला जन्म देण्याकरितां त्यानें जो प्रदेश सोडून दिलां आहे तेथें रात्र जन्माला येते. त्याचप्रमाणें उषेला जन्म देण्याकरितां ती जांगा सोडते. उषेनंतर आदित्य जन्माला येतो ह्मणून ती त्याच्या जन्माचें कारण; त्याचप्रमाणें रात्रीनंतर उषा जन्माला येते ह्मणून रात्र उषेच्या जन्माचें कारण. दुर्गाच्या वृत्तींत थोडासा घोटाळा झाला आहे असें दिसतें. 'रात्रिः आदित्यस्य प्रसवाय आदित्योत्सृष्टे देशे जायते' ह्या शब्दांवरून रात्र आदित्याला जन्म देते असा अर्थ होतो; पण पुढें रात्र उषेला जन्म देते व उषा सूर्याला जन्म देते असें म्हटलें आहे; तेव्हां 'आदित्यस्य प्रसवाय' हे शब्द घालावयास नको होते.

प्रसूता ह्या शब्दाचा अर्थ 'प्रसूत होणारी' असा मी केला आहे. परंतु त्या शब्दाचा वेगळा अर्थ असावा असें मला वाटतें. ऋग्वेदांत बऱ्याच ठिकाणीं प्रसव ह्याचा अर्थ आज्ञा असा आहे. उदा० 'तस्य वयं प्रसवे याम उर्वीः (३।३३।६). प्रसूत ह्याचाही आज्ञप्त असा अर्थ आहे. उदा० 'देवानां दूतः पुरुध प्रसूतः अनागान्नो वोचतु सर्वताता' (ऋ० सं० ३।५४।१९). 'सव ह्याचा अर्थ हालचाल, गति असा होतो. तेव्हां दुसऱ्या अर्धाचा अर्थ पुढीलप्रमाणें असेल. ज्याअर्थी सवित्याला (सवितुः) हालावयास म्हणजे प्रवास करावयाला लाव (सवाय) अशी उषेला आज्ञा होते (प्रसूता) त्याअर्थीं रात्र उषेला जागा मोकळी करून देते; म्हणजे रात्र गेल्यावर उषा उगवते व ती उगवल्यावर सविता आपला प्रवास सुरू करतो. 'प्रसूता' ह्याचा लौकिक अर्थ घेणें बरोबर नाहीं.

## खण्ड २०

**रुशद्वत्सा रुशती श्वेत्यागादारैगु कृष्णा सदनान्यस्याः।**
**समानबन्धू अमृते अनूची द्यावा वर्णं चरत आमिनाने॥ १।११३।२**
**रुशवत्सा सूर्यवत्सा**

रुशन् वत्सः यस्याः सा=प्रकाशमान जिचा वत्स अशी. असा प्रकाशणारा वत्स म्हणजे सूर्य. म्हणून रुशद्वत्सा=सूर्यवत्सा. रुशन् हें सूर्याचें व रुशती हें उषेचें नांव आहे.

**रुशत् इति वर्णनाम। रोचतेः ज्वलतिकर्मणः**

रुशत् हें एका रंगाचें नांव आहे. तो शब्द रुच् (=जळणें) ह्यापासून झाला आहे. रुश्(=प्रकाशणें) हा वैदिक धातु होय. त्याचीं रुशत्, रुशतः, रुशता, रुशती, रुशतीं, रुशद्भिः, रुशन्, रुशन्तः, रुशन्तम् अशीं रूपें आढळतात. यास्ककालीन संस्कृतांत रुश हिंसायां ( धा० ६।१३८ ) रुश् हिंसा करणें ह्याअर्थी असल्यामुळें रुच् पासून रुशत् अशी व्युत्पत्ति त्यानें दिली आहे. दुर्गाच्या वृत्तींत ही व्युत्पत्ति दिली नाहीं. ' रुशत् 'हा शब्द निघंटूंत ( ४।३।५२ ) अनवगत म्हणून दिला आहे. ह्याची व्युत्पत्ति निरुक्त ६।१३ मध्यें दिली असल्यामुळें येथें ती प्रक्षिप्त होय.

**सूर्यम् अस्याः वत्सम् आह। साहचर्यात्। रसहरणाद्वा**

मंत्रद्रष्टा सूर्य हा उषेचा वत्स असें म्हणतो. कारण उषा व सूर्य हीं दोघें सहचर आहेत. मातेच्या बरोबर जसा वत्स असतो तसा उषेच्या बरोबर सूर्य असतो. किंवा जसा वत्स मातेच्या स्तनांतला रस म्हणजे दूध ओढून घेतो तसा सूर्य उषःकालीं पडलेला रस म्हणजे दंव ओढून घेतो. म्हणून तो तिचा वत्स. पण ऋग्वेदकालीन ऋषिलोक सूर्याला उषेचा पुत्र मानीत व त्या मताला ऋग्वेदांतलाच आधार मिळतो. इंद्रानें उषेपासून सूर्याला उत्पन्न केलें ( उषसः स्वर्जनत् २।२१।४ ) असें म्हटलें आहे. निरुक्तकारांना अमका देव अमक्याचा मुलगा असें म्हणणें रुचत नसे म्हणून ते अशा वर्णनाचा निराळा अर्थ करीत.

**रुशती श्वेत्यागात्। श्वेत्या श्वेततेः**

श्वेत्या हा शब्द ' श्विता वर्णे ' (धा० १।७४३) म्हणजे पांढरें होणें ह्यापासून झाला आहे. मूळ शब्द 'श्वेती' की 'श्वेत्या'? 'श्वेत्यागात्' ह्या संधीचा विग्रह 'श्वेत्या+ आगात्' किंवा ' श्वेती+आगात् ' असा होईल. मूळ शब्द श्वेत; त्याचे स्त्रीलिंग श्वेती असेंच व्हावें. १०।७५।६ यांत ' श्वेत्या ' हें तृतीयेचें एकवचन असून तें एका नदीचें नांव आहे तेव्हां ' श्वेती ' असा शब्द असावा. श्वेत हे विशेषण अग्नीला पांच वेळां व सूर्याला च. वेळा लावलें आहे. चित्रो यदभ्राट् श्वेतो ( १।६६।३ )=अग्नि सूर्याप्रमाणें झळकतो असे म्हटलें आहे. सूर्य व अग्नि ह्यांना पांढरें हें विशेषण लावतां येणार नाहीं. ' रुशती ' व ' श्वेती ' ह्यांचा ' झळकणारी ' असा एकच अर्थ असावा.

**अरिक्त् कृष्णा सदनानि अस्याः। कृष्णवर्णा रात्रिः**

आरैक्=अरिचत्=रिकामी करती झाली. कृष्णा=कृष्णवर्णा रात्रिः=कृष्णा म्हणजे काळया रंगाची रात्र.

**कृष्णं कृष्यतेः। निकृष्टः वर्णः**

कृष्ण शब्द कृष् ओढणें ह्यापासून झाला आहे; कारण काळा रंग सर्वांत खालीं ओढलेला म्हणजे हलक्या दर्जाचा आहे.

**अथ एने संस्तौति**

एने म्हणजे वर सांगितलेल्या उषा व रात्र. दुसऱ्या अर्धांत ऋषि दोघींची स्तुति म्हणजे वर्णन करतो.

**समानबन्धू समानबन्धने**

समानबन्धू = समानबन्धने = या दोहोंचें बंधन म्हणजे सूर्य. सूर्याच्या अस्ताला रात्र बांधली असते व उदयाला उषा. परंतु बन्धु म्हणजे बाप असा ऋग्वेदांत अर्थ आहे. जसें 'द्यौर्मे पिता जनिता नाभिरत्र बन्धुः' ( १।१६४।३३ ). रात्र व उषा या दोघींचाही पिता द्यु होय. देवी दिवो दुहितरा उषासानक्ता ( १०।७०।६ ) =उषा व रात्र ह्या द्यूच्या मुली.

**अमृते अमरणधर्माणौ। अनूची अनूच्यौ।**

अमरण हा धर्म म्हणजे स्वभाव आहे ज्यांचा अशा. अनूची=अनूच्यौ. अन्वक् ह्याचें स्त्रीलिंग अनूची. उषा व रात्र एकमेकींचा पाठलाग करतात.

**इतरेतरम् अभिप्रेत्य**

अनूची हें विशेषण एकमेकीला उद्देशून आहे; म्हणजे रात्र उषेच्या पाठीमागून जाते व उषा रात्रीच्या पाठीमागून जाते. उषा रात्रीच्या पाठीमागून जाते हें स्पष्ट आहे; परंतु रात्र उषेच्या पाठीमागून कशी जाईल ? उषेच्या पाठीमागून सूर्य जातो व सूर्याच्या पाठीमागून रात्र जाते. कदाचित् सूर्य हा उषेचा मुलगा असल्या-कारणानें तीं दोघें एकच असें कवीनें मानलें असावें.

**द्यावा वर्ण चरतः। ते एव द्यावौ द्योतनात्**

द्यावा=द्यावौ. उषा व रात्र ह्या दोन्हीही द्यावौ आहेत; कारण दोन्हीहि प्रकाशतात ( द्योतनात् ). उषा स्वयंप्रकाश आहे किंवा तिला सूर्याचा प्रकाश मिळतो. रात्र चंद्र व नक्षत्रें यांनीं प्रकाशित होते. दुर्ग म्हणतोः— रात्रिरपि स्वेन तमोवीर्येण नक्षत्रगणेन वा स्वम् अधिकारं प्रति द्योतते. तमोवीर्य=पुष्कळ अंधकार. तेव्हां त्यानें रात्र प्रकाशते हें म्हणणें कसें शोभेल ?

**अपि वा द्यावा चरतः। तया सह चरतः इति स्यात्**

किंवा द्युलोक फिरतो; त्याच्याबरोबर ह्या दोघीही फिरतात असा अर्थ असेल. 'द्यु' शब्द ऋग्वेदांत पुल्लिंगी व स्त्रीलिंगीही आहे. येथें यास्कानें तो स्त्रीलिंगी धरला आहे. द्यावा ही तृतीया असून त्याचा अर्थ द्युलोकांतून, द्युमार्गानें, असा आहे. उषा व रात्र द्युमार्गानें जातात. दिवा यान्ति मरुतो भूम्याग्निः (१।१६१।१४) ह्या ऋचेंत दिवा, भूम्या, अन्तरिक्षेण ह्या तृतीया असून त्यांचे अर्थ द्युलोकीं, पृथिवीवर व अंतरिक्षांत असे आहेत. यास्कानें वर्ण ह्याचा अर्थ दिला नाहीं.

**आमिनाने आमिन्वाने अन्योन्यस्य अध्यात्मं कुर्वाणे**

आमिनाने=आमिन्वाने=अन्योन्यस्य अध्यात्मं कुर्वाणे. उषाः अपि रात्रेः अधि आत्मानं निर्मिमीते रात्रिः अपि उषसः। इतरेतरसंश्लिष्टे हि इमे रात्र्युषसी=उषा रात्री-पासून आपल्याला निर्माण करते व रात्र उषेपासून आपल्याला निर्माण करते; म्हणजे त्या एकमेकींस चिकटलेल्या आहेत असा दुर्ग अर्थ करतो.

आमिनाने ह्याचा अन्वय वर्ण ह्याच्याशीं आहे. वर्ण म्हणजे रंग. नक्ता च चक्रुरुषसा विरूपे कृष्णं च वर्णमरुणं च सं दधुः (१।७३।७)=देवांनीं भिन्न रूपाच्या रात्र व उषा निर्माण केल्या. त्यांपैकीं एकींत त्यांनीं काळा रंग घातला व दुसरींत तांबडा रंग घातला. नक्तोषासा वर्णमामेम्याने ( १।९६।५ ) =रात्र व उषा एकमेकींचा रंग नाहींसा करणाऱ्या. आ+मि=नाश करणें. 'मि'चें वर्तमानकालीं धातुसाधित विशेषण आत्मनेपदीं 'मिनान' व परस्मैपदीं 'मिनन्' असें होतें. 'मि' चा अभ्यास होऊन 'मेमि' होतें; त्याला 'आन' प्रत्यय लागून 'मेम्यान' असें धातुसाधित विशेषण बनतें.

वर्णम् आमिनाने=एकमेकींचा रंग नाहींसा करणाऱ्या. उषा रात्रीचा काळा वर्ण घालविते म्हणजे रात्रीला हांकलून देते; व रात्र उषेचा रंग घालविते म्हणजे तिला घालवून देते. 'आमिनाने' ह्याचा यास्कानें भलता अर्थ केला आहे. 'वर्ण चरतः' असा मुळांतला क्रम ठेवल्यावरून 'वर्ण' हा शब्द 'चरतः' ह्याचें कर्म त्यानें मानलें असावें. पण त्यानें त्या दोन शब्दांचा अर्थ काय केला असावा हें समजण्याला मार्ग नाहीं.

**अहर्नामानि उत्तराणि द्वादश ( १९ )। अह्नः कस्मात्। उपाहरन्ति अस्मिन् कर्माणि**

पुढील बारा नांवें दिवसाचीं होत. अहर् शब्द कसा झाला? दिवसाला अहर् म्हणण्याचें कारण लोक दिवसां कामें उरकून घेतात. अहर्=अ+हर्=आ+हर्. 'हृ' चा गुण होऊन 'हर्' होतें.

'अहर्' आणि 'स्वर्' यांच्यामध्यें बरेंच साम्य आहे. 'स्वर्' ह्याचें अवेस्तांत 'व्हर्' होतें असें १४ व्या खंडांत सांगितलेंच आहे. 'अहर्' शब्दाचा एकेकाळीं सूर्य हा अर्थ असावा.

**तस्य एष निपातः भवति वैश्वानरीयायाम् ऋचि**

पुढें दिलेल्या वैश्वानराच्या ऋचेंत 'अहर्' शब्दाचा गौण निर्देश (निपातः)आहे

## खंड २१

**अहश्च कृष्णमहरर्जुनं च वि वर्तेते रजसी वेद्याभिः ।**
**वैश्वानरो जायमानो न राजावातिरज्ज्योतिषाग्निस्तमांसि ( ऋ० सं० ६।९।१ )**
**अहश्च कृष्णं रात्रिः। शुक्लं च अहर् अर्जुनम्**

काळा दिवस म्हणजे रात्र. अर्जुनम्=शुक्लम्=पांढरें. दिवस पांढरा असतो.

अर्जुन शब्द लॅटिन अर्जेंटम् ( argentum ) म्हणजे रुपें ह्यासारखा आहे. रुप्याला argentum नांव पडण्याचें कारण तें पांढरें असतें.

**विवर्तेते रजसी वेद्याभिः वेदितव्याभिः प्रवृत्तिभिः**

वेद्याभिः=वेदितव्याभिः प्रवृत्तिभिः । न हि तासां प्रवृत्तीनाम् अन्तः अस्ति अहनि च रात्रौ च प्राणिनाम् । अतः ताः वेदितव्याः एव भवन्ति बहुत्वात् । न हि विदिताः नाम ताः कदाचित् (दुर्ग)=प्राणिमात्र रात्रंदिवस कामें करीत असतात. त्यांच्या कर्मपर प्रवृत्तीला अंतच नाहीं. त्या सर्व कोणालाही कधींही कळल्या नाहींत.

वेद्याभिः हा शब्द एकंदर ५ वेळां ऋग्वेदांत आला आहे. सर्व ठिकाणीं वेद्या म्हणजे धनभांडार असा अर्थ असावा असें वाटतें.

**वैश्वानरः जायमानः इव उद्यन् आदित्यः सर्वेषां ज्योतिषां राजा अवाहन् अग्नि ज्योतिषा तमांसि**

न=इव. जायमानः=उद्यन्. राजा=आदित्यः. सर्वेषां ज्योतिषां राजा=(उगवणारा आदित्य हा) सर्व ज्योतिर्गणाचा राजा. अवातिरत्=अव+अतिरत्=अव+अहन्.

'अग्निः' शब्द 'ज्योतिषा' याच्या आधीं यास्कानें कां घातला तें समजत नाहीं. तो नेहमीं ऋचेंतलाच पदक्रम ठेवीत असतो.

रजसी ह्याचा अर्थ दुर्ग रञ्जके असा करतो व तो शब्द कृष्णम् अहः व अर्जुनम् अहः ह्यांचें विशेषण आहे असें समजतो. तो म्हणतोः—ज्योतिषा हि भूतानि अहः रञ्जयति तमसा रात्रिः = प्रकाशानें दिवस वस्तुमात्राला रंगवितो म्हणजे सर्व वस्तूंना प्रकाशाचा लेप देतो; रात्र ही अंधकाराचा लेप देते. यास्क व दुर्ग ऋचेचा अर्थ पुढीलप्रमाणें करतात. वस्तुमात्राला भिन्न भिन्न रंग देणारे रात्र व दिवस हे अनंत प्रवृत्तींसह एकापाठीमागून एक फिरत असतात. सर्व ज्योतिर्गणाचा राजा जो सूर्य तो जसा उगवल्याबरोबर अंधकार नाहींसा करतो तसा वैश्वानर अग्नीही अंधकार आपल्या प्रकाशानें नाहींसा करतो.

विवर्तेते ह्याचा कर्ता रात्र (अहश्च कृष्णं) व दिवस (अहरर्जुनं च) कीं रजसी असा प्रश्न आहे. १।७३।७ व ५।१।४ ह्यांत उषासानक्ता ह्यांना विरूपे व १।१२३।७ त त्यांना विषुरूपे अहनी असें म्हटलें आहे. तेव्हां प्रस्तुत ऋचेंतही उषासानक्ता कर्ता असावा असें म्हणतां येईल. पण ह्या विवरणाच्या आड रजसी व विवर्तेते हे शब्द येतात. रजसी हें रजस ह्याचें द्विवचन असून त्याचा अर्थ द्यावापृथिवी असा आहे. ह्या दोघीजणी आपल्या अपार संपत्तीसह (वेद्याभिः) रात्रंदिवस हिंडत असतात; राजा वैश्वानर अग्नि जन्मल्याबरोबर आपल्या तेजानें अंधकार नाहींसा करतो. न=ताबडतोब, बरोबर. विवर्तेते ह्याचा कर्ता अहः कृष्णमहरर्जुनं नसून रजसी आहे. विश्वं त्मना बिभृतो यद्ध नाम वि वर्तेते अहनी चक्रियेव (१।१८५।१) =ह्या दोघीजणी धनासह (त्मना) सर्व (विश्वं) धन (नाम) घेतात (बिभृतः) व रात्रंदिवस (अहनी) चक्राप्रमाणें (चक्रिया इव) गरगर फिरतात. ह्या ऋचेवरून अहः कृष्णमहरर्जुनं म्हणजे अहनी; रजसी=द्यावापृथिव्यौ; वेद्या=नाम=धन; असा अर्थ असावा. रात्र व उषा ह्या एकीमागून एक हिंडतात. विवर्तेते ह्याचा कर्ता उषासानक्ता मानल्यास रजसी ह्याचा भलता अर्थ करावा लागतो. शिवाय उषासानक्ता ह्यांना आ

चरतो अन्यान्या ( १।६२।८) अशी क्रिया लाविली आहे. त्या एकत्र कधीं नसतात. अपान्यत् एति अभि अन्यत् एति विषुरूपे अहनी सं चरेते ( १।१२३।१ )= एक जाते व एक येते; अशा रीतीनें भिन्न वर्णाचे हे दोन दिवस म्हणजे उषा व रात्र ह्या संचार करीत असतात. द्यावापृथिवी ह्या एकमेकीसह भ्रमण करतात.

**मेघनामानि उत्तराणि त्रिंशत् ( १।१० ) । मेघः कस्मात् । मेहति इति सतः**

पुढचीं तीस नांवें मेघवाचक होत. मेघ कशापासून ? मेघ जेव्हां वर्षतो तेव्हां त्याला मेघ म्हणतात.

**आ उपर उपल इति एताभ्यां साधारणानि पर्वतनामभिः**

' उपर ' व ' उपल ' ह्या दोन शब्दांच्या आधींचे शब्द मेघांचीं नांवें असून पर्वतांचींही नांवें होत.

**उपरः उपलः मेघः भवति । उपरमन्ते अस्मिन् अभ्राणि**

मेघाला उपर किंवा उपल म्हणतात. उपलः=उपरः. मेघाला उपर म्हणण्याचें कारण मेघामध्यें अभ्र जाऊन रममाण होतात.

**उपरताः आपः इति वा**

किंवा पाणी मेघांत थांबतें.

पहिली व्युत्पत्ति प्रक्षिप्त दिसते. मेघ व अभ्र यांचा अर्थ एकच. अभ्र शब्दाचा दुसरा कांहीं अर्थ असल्यास नकळे. ' उपल ' शब्द ' उपलप्रक्षिणी ' ( ९।११२।३ ) येथेंच आला आहे व तेथें त्याचा अर्थ खात्रीनें मेघ नाहीं. उपर शब्द विशेषण असून त्याचे दोन तीन अर्थ असावेत असें वाटतें. ते अर्थ (१) खालीं असणारा, (२) पाठीमागूनचा व (३) वरचा.

**तेषां एषा भवति**

पुढील ऋचा त्यांच्या संबंधानें आहे.

पण ते कोण ? उपर व उपल यांसंबंधानें बोलणें चाललें आहे. तेव्हां तेषां बद्दल तयोः किंवा तस्य पाहिजे. परंतु पुढील ऋचेंत उपराः असा बहुवचनी शब्द आहे म्हणून यास्काला तयोः किंवा तस्य ह्याच्याबद्दल तेषां हा शब्द घालावा लागला. किंवा तेषां=मेघानाम् असें यास्कास म्हणावयाचें असेल.

## खंड २२

**देवानां माने प्रथमा अतिष्ठन् कृन्तत्रादेषामुपरा उदायन् ।**
**त्रयस्तपन्ति पृथिवीमनूपा द्वा बृबूकं वहतः पुरीषम् ॥ १०।२७।२३**
**देवानां निर्माणे प्रथमाः अतिष्ठन् । माध्यमकाः देवगणाः**

मानेः=निर्माणे. प्रथमाः=माध्यमकाः देवगणाः=मध्यम लोकांत म्हणजे अंत-

रिक्षांत राहणारे देवांचे संघ. गुर्जर व महाराष्ट्र ह्या दोहोंतही ' माध्यमकाः' असा पाठ आहे. तो चुकीचा आहे. ' माध्यमिकाः ' असाच पाठ पाहिजे.

**प्रथमः इति मुख्यनाम । प्रतमः भवति**

प्रथम म्हणजे मुख्य. प्रथमः= प्र+थमः= प्र+तमः=प्रकृष्टतमः=अतिशय श्रेष्ठ. ग्रीक प्रोटॉस्= पहिला. लातिन प्रोटार=दोहोंत पहिला.

**कृन्तत्रम् अन्तरिक्षम् । विकर्तनं मेघानाम्**

कृन्तत्रं=अन्तरिक्षम्. अंतरिक्षाला कृंतत्र म्हणण्याचें कारण अंतरिक्ष मेघांना कापतें. म्हणजे कृन्त् कापणें ह्यापासून कृन्तत्र शब्द झाला आहे. ' कृन्तत्रं० मेघानां ' हे शब्द गुर्जरपाठांत व दुर्गवृत्तींत नाहींत.

**विकर्तनेन मेघानाम् उदकं जायते**

मेघ कापल्यावर पाणी उत्पन्न होतें म्हणजे पृथिवीवर आकाशांतून येतें. कृन्तत्रात् उत्कृत्तात् प्रदेशात् एषां मेघानाम् इन्द्रेण उपराः आपः उत् आयन् आगताः आगच्छन्ति च= ह्या मेघाच्या इंद्रानें कापून काढलेल्या भागांतून उपर म्हणजे पाणी पूर्वीं पडलें व आतां पडत आहे. उपर म्हणजे मेघ; तथापि एथें अर्थ पाणी; पाणी मेघांत असतें म्हणून पाण्याबद्दल उपर शब्द घातला आहे असें दुर्ग म्हणतो. त्यानें दुसऱ्या पादाचें हें विवरण केलें आहे.

**त्रयस्तपन्ति पृथिवीमनूपाः पर्जन्यः वायुः आदित्यः शीतोष्णवर्षैः ओषधीः पाचयन्ति**

तीन अनूप म्हणजे पर्जन्य, वायु आणि आदित्य हे तिघे थंडी, उष्मा व पाऊस ह्यांनीं ओषधि पक्व करतात. शीत, उष्ण व वर्ष हे कोणाचे धर्म हा येथें प्रश्न उत्पन्न होतो. अनुक्रम पाहिल्यास पर्ज्यन्यापासून शीत, वायूपासून उष्ण म्हणजे उष्मा व आदित्यापासून वर्ष असा संबंध घ्यावा लागतो. पण तसा संबंध घेणें बरोबर होणार नाहीं. ' वर्षशीतोष्णैः ' असा समास असावयास पाहिजे होता. 'वर्षादिभिः पर्ज्यन्यादयः ओषधीः पाचयन्ति ' असें दुर्ग म्हणतो तें बरोबर आहे.

**अनूपाः अनुवपन्ति लोकान् स्वेन स्वेन कर्मणा**

ह्या तिघांना अनूप म्हणण्याचें कारण हे तिघे आपाआपल्या कृतीनें पृथिवीवर उपकार करतात. म्हणजे ' अनूप ' शब्द ' अनु+वप् ' ह्यापासून झाला आहे. म्हणजे अनूप=अनु+उप्=अनु+वप् ; ' वप् ' धातूला संप्रसारण होऊन ' उप् ' होतें.

**अयमपि इतरः अनूपः एतस्मात् एव । अनूप्यते उदकेन**

' पाणथळ प्रदेश ' ह्या अर्थाचा जो लौकिक शब्द तोही ह्याच धातूपासून (अनु+वप् ) ह्यापासून झाला आहे. जलप्रायमनूपं स्यात् ( अमर २।१।१० ). कारण असा प्रदेश उदकानें ' अनुगृहीत ' म्हणजे डबडबलेला असतो.

**अपि वा अन्वाप् इति स्यात् । यथा प्राक् इति**

किंवा ' अनूप ' शब्द मूळचा ' अन्वाप् असा असेल जसा ' प्राक् '.

**तस्य अनूपः इति स्यात् । यथा प्राचीनम् इति**

त्या ' अन्वाप् ' शब्दाचें अनूप असें रूपांतर झालें असेल. जसें प्राक् ह्याचें प्राचीन होतें. परंतु 'अक्' किंवा 'अञ्च्' ह्यांतला 'अ' प्राचीन शब्दांत कायमच आहे. 'प्राक्' ह्याला 'ईन' प्रत्यय लागून प्राचीन शब्द झाला आहे. 'अञ्च्' ह्यांतील 'अ' हा 'ई' किंवा 'ऊ' होतो; ह्याचीं दुसरीं उदाहरणें देतां येतील. तीं अशीं: उदक्, सम्यक्, प्रत्यक्, अन्वक् ह्यांचीं द्वितीया बहुवचनीं रूपें अनुक्रमें उदीचः, समीचः, प्रतीचः व अनूचः अशीं होतात. दुर्ग वैयाकरण असून येथें तो ' प्राक् इत्येवं सतः प्राचीनम् ' इतकेंच म्हणतो. दिलेलें उदाहरण बरोबर नाहीं असें म्हणण्याची त्याची छाती झाली नाहीं. अनुगता आपोऽत्र अनूपम् ( क्षीरस्वामी ). द्व्यन्तरुपसर्गेभ्यः अपः ईत् ( पाणिनि ६।३।९७ )= द्वि, अन्तर् व उपसर्ग ह्यांच्यानंतर समासांत येणाऱ्या अप् शब्दाचें ईप् होतें. जसें:- द्वे=द्व; द्व+अप्=द्वीपम्. अन्तर्+अप् =अन्तरीपम्. प्रति+अप्=प्रतीपम्. सम्+अप्=समीपम्. ' ऊदनोर्देशे ' ( पाणिनि ६।३।९८ )= ' अनु ' ह्या उपसर्गानंतर ' अप् ' शब्दाच्या ' अ ' ला देश असा अर्थ असेल तर ' ऊ ' असा आदेश होतो.

**द्वा बृबूकं बहुत· पुरीषम् । वाय्वादित्यौ उदकम्**

द्वौ = वाय्वादित्यौ. दोन म्हणजे वायु आणि आदित्य. बृबूकं = उदकम्.

**बृबूकम् इति उदकनाम । ब्रवीतेर्वा शब्दकर्मणः । भ्रंशतेर्वा**

उदकाचें एक नांव बृबूक. कारण पाणी वाहतांना किंवा आकाशांतून पडतांना आवाज करतें. म्हणजे ' बृबूक ' हा शब्द ' ब्रू ' धातूपासून झाला असेल. ब्रू अभ्यासानें बुब्रू; उलटापालटीनें ब्रुबृ. 'ब्रु' धातूचें संप्रसारणानें 'बृ' झालें आहे. ब्रुबू + कं = ब्रुकम्. किंवा ' भ्रंश् ' ह्या धातूपासून झाला असेल. कारण पाणी मेघांतून खालीं पडतें. भ्रंश् = ब्रंश् = ब्रुंश् = ब्रु. ब्रु + बूकं = ब्रुबूकं.

**पुरीषम् पृणातेः पूरयतेर्वा**

पुरीष = पाणी. पाण्याला पुरीष म्हणण्याचें कारण तें डबकीं, सरोवरें, नद्या वगैरे भरून टाकतें. म्हणजे ' पुरीष ' शब्द ' पृ ' किंवा ' पूर् ' भरून टाकणें ह्यापासून झाला आहे. पृ = पूर = पुर्. पुर् + ईषं = पुरीषम्. ' पुरीषं प्रीणयितृ पूरयितृ वा ' ( दुर्ग ). तेव्हां त्याच्या प्रतींत पाठ 'प्रीणातेः' असा असावा.

यास्कानें केलेला ऋचेचा अर्थः—

जेव्हां देव निर्माण झाले तेव्हां मुख्य म्हणजे अंतरिक्षांतील देव उभे राहिले. ते देव म्हणजे मेघ. ह्या देवांना जेव्हां इंद्र कापतो तेव्हां पाणी मिळतें. पर्ज्यन्य, वायु व आदित्य हे पाऊस, थंडी व उष्मा ह्यांनीं पृथिवीला तापवितात; म्हणजे ओषधि पक्क करतात. त्यांपैकीं दोघेजण म्हणजे वायु व आदित्य हे पाणी पृथिवीवर पाडतात.

पण हा अर्थ बरोबर नाहीं. मान ह्याचा अर्थ प्रासाद असा आहे. उदा०:—

भोजस्येदं पुष्करिणीव वेश्म परिष्कृतं देवमानेव चित्रम् ( १० । १०७ । १० )= भोजाचें घर एखाद्या कमळांनीं भरलेल्या तळ्यासारखें ( पुष्करिणीव ) व देवांच्या प्रासादासारखें सजलेलें आहे. त्याच अर्थी ' मान ' हा शब्द ऋग्वेदांत पांच वेळां आला आहे. ' कृन्तत्र ' व ' धन्व ' असे दोन प्रदेश ' धन्व च यत् कृन्तत्रं च कति स्विता वि योजना' (१०।८६।२०) यांत आले आहेत. ' धन्व ' व ' कृन्तत्र ' हीं दोन विशिष्ट प्रदेशांचीं नांवें दिसतात. ' उपर ' शब्दाचे ' वरचा ' ' खालचा ' व ' पाठीमागला ' असे तीन अर्थ होतात. प्रस्तुतच्या ऋचेंत पहिला अर्थ लागू पडतो. अनूप शब्द फक्त ह्या ऋचेंत व ९।१०७।९ येथें आला आहे. त्याचा अर्थ कळत नाहीं. बृबूक शब्द फक्त येथेंच आला आहे. पुरीष म्हणजे उदक. बृबूक हें पुरीष ह्याचें विशेषण असल्यास त्याचा पुष्कळ असा अर्थ कदाचित् होईल. किंवा त्याचा अर्थ उदकच असेल. ऋचेचा अर्थ पुढीलप्रमाणें असावाः—

देवांच्या प्रासादांत कांहीं देव पहिल्या प्रतीचे होते. त्यांच्यापैकीं ( एषां ) कांहीं श्रेष्ठ ( उपराः ) असे कृंतत्र प्रदेशांतून वरतीं आले होते. त्यांपैकीं तिघे पृथिवीला तापवितात ; आणि पाण्यानें भरलेले दोघे ( अनूपा = अनूपौ ) पृथिवीवर खूप पाणी सोडतात.

पृथिवीवरून ऋभुसारखे कांहीं लोक अद्भुत कृतींनीं स्वर्गाला गेले असतील. त्यांच्यामधीलही श्रेष्ठ असे पांचजण पृथिवीवरील कृंतत्र प्रदेशांतून तेथें गेले असतील. ह्या पांचांपैकीं तीन पृथिवीला तापवितात व राहिलेले दोन तिला भिजवितात. हे पांच देव पांच ऋतु असावेत. त्यांपैकीं वसंत, ग्रीष्म व शरद् हे पृथिवीला तापवितात; वर्षा व हेमंत तिला भिजवितात.

## खण्ड २३ वा

**वाङ्नामानि उत्तराणि सप्तपञ्चाशत् (१।११ )। वाक् कस्मात् । वचेः**

पुढील पंचाहत्तर नांवें वाचेचीं होत. वाक् शब्द कशापासून झाला ? वच् = बोलणें ह्यापासून.

**तत्र सरस्वती (१।११।२२) इति एतस्य नदीवत् देवतावच्च निगमाः भवन्ति**

त्यांपैकीं सरस्वती हें एका विशिष्ट नदीचें व एका विशिष्ट देवतेचें नांव आहे; व अशा दोन्ही अर्थांच्या ऋचा आहेत.

**तत् यत् देवतावत् उपरिष्टात् तत् व्याख्यास्यामः**

देवतावाचक जो सरस्वती-शब्द त्याची व्याख्या निरुक्त ११।२६ येथें देणार आहोंत.

**अथ एतत् नदीवत्**

पुढील उदाहरणांत सरस्वती म्हणजे नदी होय.

'वत्' चा अर्थ २।१६ मध्यें 'अग्निवत्' संबंधानें दिलाच आहे. तो अर्थ म्हणजे 'इति कृत्वा'. नदीवत् = नदीम् इति कृत्वा = नदी म्हणून. देवतावत् = देवताम् इति कृत्वा = देवता म्हणून. सरस्वती = वाक् ह्याचेंच उदाहरण वास्तविक द्यावयास पाहिजे होतें. तें न देण्याचें कारण तसें उदाहरण ऋग्वेदांत सांपडत नाहीं. निघंटु ग्रंथ यास्कानें रचला नाहीं हें सिद्ध करण्यास अनेक पुराव्यांपैकीं हा एक पुरावा आहे. कारण त्यानें जर निघंटु रचला असता तर 'वाक्' वाचक सरस्वती शब्दाचें त्यानें उदाहरण दिलें असतें. सरस्वती नदी व देवता असा जो यास्कानें भेद केला आहे त्याला कारण एवढेंच दिसतें कीं जेथें प्रवाह, लाटा वगैरेंचें वर्णन असेल तेथें सरस्वती ही नदी व जेथें तसें वर्णन नसेल तेथें देवता. एकाच सूक्तांत सरस्वती नदी व देवता अशी आढळते. ६।६१ मध्यें दोन्ही प्रकारच्या ऋचा आहेत. नदीला उद्देशून निराळें सूक्त व देवतेला उद्देशून निराळें अशी रचना नाहीं.

## खण्ड २४ वा

**इयं शुष्मेभिर्बिसखा इवारुजत्सानु गिरीणां तविषेभिरूर्मिभिः।**
**पारावतघ्नीमवसे सुवृक्तिभिः सरस्वतीमा विवासेम धीतिभिः** (६।६१।२)
**इयं शुष्मैः शोषणैः। शुष्मम् इति बलनाम। शोषयति इति सतः**

शुष्मैः = शोषणैः = शोषून घेणाऱ्यांनीं.

बलवाचक 'शुष्म' असें नाम आहे. बलाला शुष्म नांव पडण्याचें कारण बल शत्रूचें बल शोषून टाकतें. 'प्रति शुष्यतु यशो अस्य देवाः' (७।१०४।११) येथेंच तेवढा 'शुष्' धातूचा प्रयोग आढळतो. हे देवांनो! त्याचें धन वाळून जावो किंवा नाश पावो, असा ह्या उदाहरणाचा अर्थ दिसतो. शुष्मेभिः = तविषेभिः = बलवद्भिः. येथें शुष्मेभिः हें 'तविषेभिः' प्रमाणें 'ऊर्मिभिः'चें विशेषण आहे.

**बिसं बिस्यतेः भेदनकर्मणः वृद्धिकर्मणो वा**

'बिस्' भेदणें किंवा वाढविणें ह्यापासून 'बिस' शब्द झाला असेल.

बिस = भिस = भिसें. कमळांतील भिसें पटकन मोडतें व लवकर वाढतें. पण येथें 'बिस' = भिसें कशावरून? व 'खा' हें 'खन्' पासूनच झालें आहे असें म्हणण्याला आधार काय? 'खा' शेवटीं असलेला असा एवढाच शब्द ऋग्वेदांत आहे. भिसें खणून काढावयाचें म्हणजे काय? 'बिसखाः' म्हणजे काय हेंच समजत नाहीं. कदाचित् तें इंद्राचें नांव असेल. इंद्र जसा पर्वतशिखरें फोडतो तशी असा अर्थ असेल

**सानु समुच्छ्रितं भवति। समुन्नुन्नमिति वा**

सानु शब्द 'सम् + उत् + श्रि' ह्यापासून झाला आहे. किंवा 'सम् + उत् + नुद्' ह्यापासून. अशा व्युत्पत्ति देण्याचें कारण 'सानु' हा पर्वताचा उंच गेलेला भाग असतो. अशा व्युत्पत्ति देण्याला सानु शब्दांतील 'स' हा वर्ण पुरा

आहे. सनोति ददाति सुखमिति सानुः (क्षीरस्वामी). सानु व स्नु हे शब्द एकच. 'स्नौति अम्भः इति स्नुः (क्षीरस्वामी). ष्णु प्रस्रवणे (= पाझरणें). ज्याच्यावरून पाणी पाझरतें तो 'स्नु'.

**महद्भिः ऊर्मिभिः**

तविषेभिः = महद्भिः. तवस् = बल. तविष = बलवान्.

**पारावतघ्नीं पारावारघातिनीम्। पारं परं भवति। अवारम् अवरम्**

पारावत = पार + अवत. अवत = अवार. पारावार = पलीकडचा व अलीकडचा तट. घ्नी = घातिनी = पाडणारी. पार = पर = पलीकडचा. अवार = अवर = अलीकडचा. पारावतम् = परावतः इदम्. परावत् हें स्वर्गाचें नांव आहे. तत्संबंधीं जो प्रदेश तो पारावत. अतिशयोक्तीनें नदी स्वर्गाला प्रहार करते असें कवीनें म्हटलें आहे.

**अवनाय**

अवसे = अवनाय = रक्षणासाठीं.

**सुप्रवृत्ताभिः शोभनाभिः स्तुतिभिः**

सुवृक्तिभिः = सुप्रवृत्ताभिः = चांगल्या म्हटलेल्या. दुर्गाचार्याच्या वृत्तींत 'सुप्रयुक्ताभिः' असा पाठ आहे. सुप्रयुक्ताभिः = स्वरसौष्ठवादियुक्ताभिः (दुर्ग) = ज्या स्तुतींत योग्य स्वर, भाषासौंदर्य वगैरे गुण आहेत अशा स्तुतींनीं. 'शोभनाभिः' हा शब्द महाराष्ट्रपाठांतच आहे. त्याची कांहीं आवश्यकता नाहीं. कारण 'सु' ह्याच्यामध्यें त्या शब्दाचा अर्थ येतो. 'वृक्ति' शब्द 'वृत्' ह्यापासून झाला आहे असें यास्काचें मत होतें कीं काय? किंवा 'सुप्रवृत्ताभिः स्तुतिभिः' हा त्या शब्दाचा नुसता अर्थ दिला आहे? बहुतकरून 'वृक्ति' शब्दांत वृत् धातु असावा असेंच त्याचें मत असेल. वास्तविक 'वृक्ति' शब्द 'व्रश्च्' = कापणें ह्यापासून झाला आहे. स्तुतिसंबंधानें ऋग्वेदांत 'तक्ष्' = तासणें, 'व्रश्च्' = कापणें, 'वी' विणणें वगैरे शब्द येतात. सुवृक्तिः = चांगली कापलेली, उत्तम तयार केलेली स्तुति. सुवृक्ति हें विशेषण नसून नाम आहे.

**सरस्वतीं नदीं कर्मभिः परिचरेम**

आविवासेम, = परिचरेम. धीतिभिः = कर्मभिः. नेहमीच्या पद्धतीप्रमाणें यास्कानें 'परिचरेम कर्मभिः' असें म्हणावयास पाहिजे होतें. कारण धीतिभिः हा शब्द आविवासेम ह्याच्यानंतर आला आहे. कर्मभिः असा पर्याय देऊन 'स्तुतिभिश्च अनेकप्राकाराभिः' असा अर्थ दुर्ग देतो. सुवृक्तिभिः = धीतिभिः = स्तुतिभिः. त्वां मृजन्ति दश योषणः सुतं सोम ऋषिभिर्मतिभिर्धीतिभिर्हितम् (९।६८।७) येथें धीतिभिः = मतिभिः = स्तुतिभिः.

ऋचेचा अर्थ :— ही सरस्वती नदी पर्वतांच्या शिखरांचे आपल्या जोरदार लाटांनीं तुकडे तुकडे करते. आमच्या कल्याणाकरितां आम्ही स्वर्गाला प्रहार करणाऱ्या ह्या सरस्वतीची चांगल्या स्तुतींनीं परिचर्या करतों.

**उदकनामानि उत्तराणि एकशतम् (१।१२)। उदकं कस्मात्। उनत्ति इति सतः**

पुढील १०१ नामें पाण्याचीं होत. उदक शब्द कसा झाला ? जेव्हां पाणी भिजविण्याची क्रिया करतें तेव्हां त्यास उदक म्हणतात. म्हणजे उन्द् भिजविणें ह्यापासून उदक-शब्द झाला आहे.

**नदीनामानि उत्तराणि सप्तत्रिंशत्** (१।१३)। **नद्यः कस्मात्। नदनाः भवन्ति। शब्दवत्यः**

पुढील सदतीस नामें नदीवाचक होत. नदी शब्द कसा झाला ? नदनाः = शब्दवत्यः. 'नद्' = आवाज करणें ह्यापासून. णद अव्यक्ते शब्दे ( धा० १।५४ ). महाराष्ट्रपाठांत नदना इमा भवन्ति असें आहे. पण इमाः ह्याची कांहीं जरूरी नाहीं.

**बहुलम् आसां नैघण्टुकं वृत्तम्**

गौण असा ( नैघण्टुकं ) ह्यांचा म्हणजे नद्यांचा प्रयोग (वृत्तम्) ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं ( बहुलम् ) आहे.

**आश्चर्यम् इव प्राधान्येन**

प्राधान्येन = प्राधान्येन वृत्तम्. नदी ही प्रधानदेवता असें वर्णन क्वचित् येतें. 'इव' ह्यानें थोडेपणा दर्शविला जातो. म्हणजे प्रधानदेवतावाचक अशी एखाददुसरी ऋचा असण्याचा संभव आहे. आश्चर्यम् = विरळा. हल्लींच्या संस्कृतांत 'आश्चर्य' याचा अर्थ विरळा असा नाहीं. 'बहुल' शब्द यास्काच्या भाषेंत नेहमीं नपुसकलिंगी असतो.

**तत्र इतिहासम् आचक्षते। विश्वामित्रः ऋषिः सुदासः पैजवनस्य पुरोहितः बभूव**

ह्या नद्यांच्या संबंधानें (तत्र) एक गोष्ट सांगतात. विश्वामित्र ऋषि पिजवनाचा मुलगा सुदास् ह्याचा पुरोहित होता.

**विश्वामित्रः सर्वमित्रः। सर्वं संसृतम्**

विश्वामित्रः = विश्वमित्रः = सर्वमित्रः. सृ + व = सर्व. ' व ' हा नामकरण प्रत्यय होय. सर्व शब्द 'सम् + सृ' ह्यापासून झाला आहे; कारण तें सगळीकडे पसरलें असतें. म्हणजे तें सर्व व्यापतें. सर्व पुरुष, सर्व गाई, सर्व शहरें, येथें सर्व ह्याचा यच्चयावत् असा अर्थ होतो. 'विश्वामित्र' यांतील विश्व शब्दाची व्युत्पत्ति कां दिली नाहीं ? 'विश्वं विशतेः' म्हणजे विश्व हें सर्व वस्तूंत शिरलेलें असतें अशी कांहीं तरी व्युत्पत्ति द्यावयास पाहिजे होती.

**सुदाः कल्याणदानः। पैजवनः पिजवनस्य पुत्रः**

सुदाः = सु + दाः = कल्याणदानः = सुखकर आहे दान ज्याचें असा. पैजवनः = पिजवनस्य पुत्रः.

**पिजवनः पुनः स्पर्धनीयजवो वा। अमिश्रीभावगतिर्वा**

पिजवनः = पि + जवनः. पि = स्पर्धनीय. जवनः = जवः. ज्याची गति स्पर्धा करण्याजोगी होती तो पिजवन. म्हणजे स्पर्धनीय ह्या शब्दांतून ' पि ' हें अक्षर घ्यावयाचें. पि = अमिश्रीभावः. जवन = गति. पिजवनाला पिजवन म्हणण्याचें

कारण त्याच्या गतीशीं दुसऱ्या कोणाची गति मिसळत नसे. त्याच्या गतीची कोणाशाही बरोबरी करतां येत नसे. ' पि ' याचा अमिश्रीभाव असा अर्थ कसा निघाला तो कळत नाहीं. कदाचित् ' पि ' = ' वि '. पिजवनः = विजवनः. वि विशिष्टम् अमिश्रीभूतं जवनं यस्य सः = ज्याची गति विशिष्ट आहे असा.

**स वित्तं गृहीत्वा विपाट्छुतुद्र्योः संभेदम् आययौ । अनुययुः इतरे**

संभेदम् = संगमम्. सुदास् राजापासून पुष्कळ धन घेऊन तो विपाट् व शुतुद्री ह्या नद्या जेथें मिळतात तेथें आला. दुसरे लोक त्याच्या पाठोपाठ गेले.

**स विश्वामित्रः नदीः तुष्टाव गाधाः भवत इति**

उथळ व्हा अशी विश्वामित्रानें नद्यांना विनंति केली. तुष्टाव = स्तुति केली = विनवणी केली.

**अपि द्विवत् । अपि बहुवत् । तत् यत् द्विवत् उपरिष्टात् तत् व्याख्यास्यामः**

द्विवत् = द्वे इति कृत्वा. बहुवत् = बह्व्यः इति कृत्वा. कधीं कधीं ह्या दोन नद्यांचा द्विवचनी प्रयोग असतो; कधीं कधीं बहुवचनी असतो. जेथें ह्या नद्यांचा दोन म्हणून निर्देश आहे त्या ऋचेचें विवरण आम्ही पुढें करणार आहों ( निरु० ९।३९ ).

**अथ एतत् बहुवत्**

पुढील ऋचेंत त्यांचा निर्देश ( दोन असा नसून ) अनेक म्हणून आहे.

## खण्ड २५ वा

**रमध्वं मे वचसे सोम्याय ऋतावरीरुप मुहूर्तमेवैः ।**
**प्र सिन्धुमच्छा बृहती मनीषावस्युरह्वे कुशिकस्य सूनुः ( ३।३३।५ )**
**उपरमध्वं मे वचसे सोम्याय सोमसंपादिने**

सोम्याय = सोमसंपादिने = सोम संपादन करणाऱ्याला.

सोमाः हि अनेन अस्मद्वचसा देवतानामन्नभूताः बहवः संपादिताः । ताः यूयम् अस्मै प्रतिविशिष्टाय वचसे सत्यतार्थं कथं नाम सत्यम् इदं स्यात् इत्येवमर्थम् उपरमध्वम् ( दुर्ग ) = ह्या आमच्या स्तुतीनें देवांचें अन्न जो सोमरस तो पुष्कळ संपादित होतो; तेव्हां तुम्हांला सोम मिळावा ह्या हेतूनें आपल्या गतीचा वेग मंद करा. इतका अर्थ सोम्याय ह्या शब्दांतून दुर्ग काढतो. परंतु सोम्य हा शब्द पाहिजे त्या ठिकाणीं सामान्यार्थी योजिलेला आढळतो. सोम्य हें विशेषण जेव्हां इन्दु, मधु, अन्धस्, मद वगैरेंना लावतात तेव्हां त्या विशेषण व विशेष्य ह्या दोहोंचाही अर्थ सोम एवढाच होतो. इंद्रवगैरे देवतांना जेव्हां ' सोम्य ' शब्द लाविलेला असतो तेव्हां त्या शब्दाचा अर्थ ' सोमार्ह ' असा होतो. जेव्हां तो शब्द ऋत्विक् वगैरेंना लावितात तेव्हां त्याचा अर्थ ' सोम तयार करणारे ' असा होतो. उपरमध्वं वचसे सोम्याय एथें सोम्य शब्दाला

अर्थ नाहीं. कदाचित वचसे सोम्याय = सोमसहिताय वचसे = ' मी तुमची **स्तुति** करणार आहे व तुम्हांला सोम देणार आहें ' असा अर्थ निष्पन्न होईल.

**ऋतावरीः ऋतवत्यः**

ऋतावरीः = ऋतवत्यः. ऋतावन् हा पुल्लिंगी शब्द; त्याचें स्त्रीलिंग ऋतावरी.

**ऋतम् इति उदकनाम । प्रति ऋतं भवति**

ऋत हें उदकाचें एक नांव आहे. उदकाला ' ऋत ' म्हणण्याचें कारण तें देशादेशाला ( प्रति ) जातें ( ऋतम् ). म्हणजे ' ऋत ' शब्द ऋ = जाणें ह्यापासून झाला आहे.

**मुहूर्तम् एवैः अयनैः अवनैः वा**

एवैः = अयनैः = गमनैः. किंवा एवैः=अवनैः. दोहोंचाही अर्थ गमनांनीं. एवैः एभिः उदकैः अतिप्रवृद्धैः उपरमध्वम् । अवनैर्वा कामैः एतैः अस्मत्प्रार्थनाविशेषैः उत्तरम गृहान् गच्छेम वित्तं प्रापयेम इत्येवमादिभिः निमित्तैः प्रार्थ्यमानाः अस्माभिः उपरमध्वम् । अथवा अयनैः चित्रैः गमनैः वेगवद्भिः यैः यूयम् अभिप्रवृत्ताः तैः उपरमध्वम् ( दुर्ग ) = एव म्हणजे हें वाढलेले पाणी; त्यासह तुम्हीं थांबा. किंवा एवैः म्हणजे अवनैः. नदी उतरून घरीं जाऊं, द्रव्य मिळवूं अशा नानाप्रकारच्या इच्छा मनांत धरून विनविल्या जाणाऱ्या तुम्ही थांबा. किंवा एवैः म्हणजे गतींनीं. ज्या नानाविध गतींनीं तुम्हीं जात आहां त्या गतींसह थांबा. एव म्हणजे उदक कशावरून ? दुसरा अर्थ यास्काच्या मनांत होता कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं. एव याचा अर्थ गमन करून 'अय्' किंवा 'अव्' ( = जाणें ) ह्यापासून तो शब्द झाला असेल असें त्याला म्हणावयाचें असेल. दुर्गाच्या प्रतींत उदकैर्वा 'अवनैर्वा अयनैर्वा' असा पाठ असावा. 'एव' ह्याचा खरा अर्थ घोडा असा आहे. 'नद्या जणूं काय घोड्यावर बसून जात आहेत.' रथं युयुजे सिन्धुरश्विनम् ( ऋ० १०।७५।९ ) = सिंधूनें घोड्याची गाडी जोडली असें म्हटलें आहे.

**मुहूर्तः मुहुः ऋतुः**

मुहूर्तः = मुहुः + ऋतुः. हुर्च्छ् + क्तः । धातोः पूर्वं मुट् च म्हणजे हुर्च्छा कौटिल्ये ( धा० १।२११ ) भूतभूतकालीं क्त प्रत्यय लावून हुर्च्छ् + त = हुर्त असें रूप होतें; हुर्त ह्याच्या आधीं मु प्रत्यय लावल्यानें मु + हूर्तः = मुहूर्तः शब्द बनतो असें तारानाथकृत वाचस्पत्यकोशांत म्हटलें आहे. कदाचित् यास्कानें दिलेलीच व्युत्पत्ति बरोबर असेल. मुहूर्तः = भराभर जाणारा काल.

**ऋतु अर्तेः गतिकर्मणः । मुहुः मूढः इव कालः**

ऋतु शब्द 'ऋ' = जाणें ह्यापासून. मुहुः शब्द 'मुह्' = गूढ होणें ह्यापासून. 'मुहुः' यानें दर्शविलेला काल इतका अल्प असतो कीं, त्याची कल्पना करणारा मनुष्य अगदीं मूढ होतो म्हणजे भांबावून जातो. म्हणून तो काल जणूं काय मूढ झालेला

असतो. त्या कालाला स्वतःचें जणूं काय भान नसतें. मूढः इव यः कालः ऋतुः सः मुहूर्तः इति उच्यते (दुर्ग) = अगदीं अल्प जो काल तो मुहूर्त. ह्यावरून दुर्गाचा पाठ भिन्न म्हणजे पुढीलप्रमाणें असावा:– 'मुहुः मूढः। मूढः इव कालः मुहूर्तः'. कदाचित् 'मुहुः मूढः इव कालः' ह्यांत 'मुहुः' शब्दाची व्युत्पत्ति व मुहूर्त शब्दाचा अर्थ अशा दोन गोष्टी दुर्गाच्या मनांत असतील.

**यावत् अभीक्ष्णं च इति। अभीक्ष्णं अभिक्षणं भवति**

मुहूर्त म्हणजे 'अभीक्ष्ण'. 'अभीक्ष्ण' ह्यानें जितका (यावत्) काल दर्शविला जातो तितकाच काल मुहूर्त ह्यानें दर्शविला जातो. अभीक्ष्णम् = अभिक्षणम्. अभीक्ष्ण हा शब्द अभिक्षण असा आहे. 'तत् हि क्षणम् आभिमुख्येन स्थितं भवति' (दुर्ग)= जें कांहीं अभीक्ष्ण असतें तें क्षणभर टिकतें.

**क्षणः क्षणोतेः। प्रक्ष्णुतः कालः**

'क्षण' शब्द 'क्षण्' = हिंसा करणें ह्यापासून झाला आहे. किंवा प्रक्ष्णुत म्हणजे अतिशय जखम केलेला, कापून कापून अगदीं बारीक झालेला जो काळ तो क्षण. 'क्ष्णु तेजने' (धा० २।२७) तेजन=धार देणें. घांसून घांसून ज्या कालाला जणूं काय धार आली असते असा काल. ह्यावरून 'क्ष्णु' धातूपासूनही 'क्षण' शब्द झाला. म्हणजे ही दुसरी व्युत्पत्ति होय.

**कालः कालयतेः गतिकर्मणः**

'कालय्' = जाणें ह्यापासून 'काल' शब्द झाला. पण वास्तविक 'कालय्' हाच धातु काल ह्या नामापासून झाला आहे. 'कलयति आयुः कालः, (क्षीरस्वामी)= आयुष्य मोजतो म्हणून कालाला काल म्हणतात.

**प्राभिह्वयामि सिन्धुं बृहत्या महत्या**

प्र + अच्छा + अह्वे=प्राभिह्वयामि=उद्देशून मोठ्यानें बोलतों. बृहत्या=महत्या.

**मनीषया मनसः ईषया स्तुत्या प्रज्ञया वा**

मनीषा = मनीषया = मनसः ईषया = स्तुत्या अथवा प्रज्ञया. मनीषा म्हणजे स्तुति किंवा प्रज्ञा.

मनसः ईषा म्हणजे मनाची गति. ही मानसिक गति स्तुतिरूप किंवा प्रज्ञारूप असेल. ऋग्वेदांत मनीषा शब्दाचे अर्थ स्तुति व दान असे आहेत. प्रज्ञा हा अर्थ अर्वाचीन आहे. 'बुद्धिर्मनीषा धिषणा धीः प्रज्ञा' (अमर १।३।१). मनुते मनीषा। मनसः एव ईषा वा (क्षीरस्वामी).

**अवनाय। कुशिकस्य सूनुः। कुशिको राजा बभूव**

अवस्युः = कल्याण किंवा रक्षण इच्छिणारा. अवनाय हा अर्थ गोळाबेरजेनें दिला आहे. कुशिक हा एक राजा होता. तें नांव त्याला पडण्याचें कारण

**क्रोशतेः शब्दकर्मणः**

क्रुश् = शब्द करणें. 'स हि साधु एव क्रियताम् इत्येवं नित्यकालमेव क्रोशयति' (दुर्ग)=जें चांगलें असेल तेंच करा असें तो नेहमीं ओरडून सांगतो. क्रुश आह्वाने रोद-

ने च ( धा. १।८८१ ). क्रोशयति हें रूप बरोबर दिसत नाहीं. दुर्गानें बहुतकरून 'क्रोशति' असेंच लिहिलें असावें. किंवा

**क्रंशतेर्वा स्यात् प्रकाशयतिकर्मणः**

क्रंश् = प्रकट करणें 'स हि प्रकाशयिता साधूनां धर्माणाम् आत्मना एव' (दुर्ग) = चांगले धर्म स्वतः होऊन तो प्रकट करतो.

**साधुविक्रोशयिता अर्थानाम् इति वा**

विक्रोशयिता = दाता. किंवा साधु जनांना तो द्रव्य देतो.

'साधुविक्रोशयिता' हा मूळचा समास होता किंवा 'साधुषु विक्रोशयिता' असा पाठ होता किंवा साधु शब्द मागून कोणी डकविला हें सांगतां येत नाहीं. बहुतकरून तो मागूनच डकविला असेल. 'विक्रुश्' (= मोठ्यानें हांक मारणें) हा आपट्यांच्या कोशांत पहिल्या गणांतील धातु म्हणून दिला आहे. ह्या कांहींतरी व्युत्पत्ति आहेत हें सांगावयास नको.

ऋचेचा अर्थः– हे नद्यांनो (ऋतावरीः), माझ्या स्तुतीकरितां व मी तुम्हांला सोम देणार आहें ह्याकरितां क्षणभर घोड्यावरून जातांना थांबा. कल्याणाच्या इच्छेनें मी कुशिकाचा मुलगा मोठी स्तुति करून नदीला विनवितों.

**नद्यः प्रत्यूचुः**

नद्यांनीं उत्तर दिलें.

## खण्ड २६ वा.

**इन्द्रो अस्माँ अरदद्वज्रबाहुरपाहन्वृत्रं परिधिं नदीनाम् ।**
**देवोऽनयत्सविता सुपाणिस्तस्य वयं प्रसवे याम उर्वीः (३।३३।६)**

**इन्द्रः अस्मान् अरदत् वज्रबाहुः**

वज्र आहे हातांत ज्याच्या अशा इंद्रानें आम्हांला खणून काढलें म्हणजे मेघांना वज्रानें फोडून इंद्रानें पाणी वाहावयास लाविलें.

**रदतिः खनतिकर्मा**

रद् = खणणें. रद् विलेखने (धा० १।५३ ). विलेखनं = भेदनं = फोडणें. विलेखनं = कोरणें ? ऋग्वेदांत रद् (१) कापणें (२) अडथळे कापून, फोडून मार्ग सुगम करणें, (३) मोकळें करणें, व ह्या सर्व कृतींचा परिणाम (४) देणें. प्रस्तुत ऋचेंत, मोकळें करणें.

**अपा .न् वृत्रं परिधिं नदीनाम् इति व्याख्यातम्**

दुसऱ्या चरणाचा अर्थ स्पष्ट आहे (व्याख्यातं). तो असाः– पाण्याला (नदीनां) गराडा घालणारा (परिधिं) जो वृत्र त्याला इंद्रानें ठार केलें.

**देवोऽनयत्सविता**

इंद्रानें आम्हांला वाटेनें नेलें म्हणजे वहावयास लाविलें. सू = पुढें ढकलणें. सविता म्हणजे इंद्र. इंद्राला सविता म्हणण्याचें कारण तो पाणी पुढें ढकलतो. म्हणजे वहावयास लावितो.

**सुपाणिः कल्याणपाणिः**

कल्याण करणारे ज्याचे हात आहेत असा. दुर्गाच्या प्रतींत कल्याणपाणिः हा शब्द नव्हता. 'सुपाणिः प्रशस्तपाणिः इत्यर्थः (दुर्ग). प्रशस्तपाणिः = मोठ्या हाताचा. सुपाणिः = हातांनीं.

**पाणिः पणायतेः पूजाकर्मणः । प्रगृह्य पाणी देवान् पूजयन्ति**

पण् = पूजा करणें; ह्यापासून पाणि, हात जोडून लोक देवांची पूजा करतात. 'पण् = पूजा करणें' ह्यापासून पाणि शब्द झाला आहे ह्याला हा लौकिक आधार दिला आहे. पण ही खरी व्युत्पत्ति कशावरून ?

**तस्य वयं प्रसवे याम उर्वीः**

त्याच्या आज्ञेनें ( प्रसवे ) आम्ही सर्वत्र पसरून ( उर्वीः ) जात आहोंत.

**उर्व्यः ऊर्णोतेः । वृणोतेः इति और्णवाभः**

उर्वी शब्द 'ऊर्णु' = आच्छादणें ह्यापासून झाला आहे. तो 'वृ' धातूपासून झाला आहे असें और्णवाभ म्हणतो. 'वृ'चा संप्रसारणानें 'उ' होतो. ऋ = रु. उ + रु = उरु. उर्वी हें उरु शब्दाचें स्त्रीलिंग होय. लॅटिन् Urus = रुंद. उर् विस्तृत होणें असा धातु ऋग्वेदाच्या आधीं असावा. उराणः हें विशेषण उर् पासून उत्पन्न झालें आहे.

**प्रत्याख्याय अन्ततः आशुश्रुवुः**

पहिल्याप्रथम नाहीं म्हणून ( प्रत्याख्याय ) शेवटीं ( अन्ततः ) त्याला त्यांनीं वचन दिलें. परंतु सातव्या व आठव्या ऋचांत नद्या नाहीं म्हणाल्या असें दिसत नाहीं. 'वृत्राला मारून इंद्रानें आम्हांला मोकळें केलें; हें इंद्राचें कृत्य स्तुत्य आहे हें तूं विसरूं नकोस; पुढच्या पिढ्या तूं रचिलेलीं जीं सूक्तें म्हणतील त्या सूक्तांत आमचा निर्देश कर; जनांमध्यें आम्हांस कमीपणा आणूं नकोस; आतां तूं जा' एवढेंच त्या म्हणतात. आठव्या ऋचेंतले 'नमस्ते' ह्या शेवटल्या शब्दांपासून कदाचित् प्रत्याख्यान हा अर्थ निघेल. 'आशुश्रुवुः' म्हणजे अभिवचन दिलें हा अर्थ दहाव्या ऋचेंतून काढला असावा. परंतु तसा अर्थ निघत नाहीं हें पुढील खंडांत स्पष्ट होईल.

## खंड २७ वा.

**आ ते कारो शृणवामा वचांसि ययाथ दूरादनसा रथेन ।**
**नि ते नंसै पीप्यानेव योषा मर्यायेव कन्या शश्वचै ते (३।३३।१०)**

**आशृणवाम ते कारो वचनानि**

हे स्तोत्या ! आम्ही तुला ( तें ) अभिवचन देतों. आशृणवाम=अभिवचन देतों. वचांसि = वचनानि. वचन = अभिवचन ? ह्या ऋचेंत आज्ञार्थ तीनदां आला आहे. परंतु तो आज्ञार्थ नसून तिन्ही क्रियापदें नजीकचा भविष्यकाळ दाखवितात. शृणवाम = आम्ही ऐकूं. कदाचित् शृणवाम हा भूतकालवाचक प्रयोग असेल.

**याहि दूरात् अनसा च रथेन च**

ययाथ = याहि. असा अर्थ करणें ही केवळ दांडगाई होय. अशा दांडगाईचें कारण यास्काला अभिवचन दिलें हा अर्थ काढावयाचा होता; म्हणून त्यानें 'आ' हा उपसर्ग शृणवाम याला जोडला. वास्तविक तो उपसर्ग ययाथ याला जोडला पाहिजे. 'तूं लांबून (दूरात्) बैलगाडया (अनसा) व घोडयाच्या गाडया (रथेन) घेऊन आला आहेस' असा खरा अर्थ आहे. ऋग्वेदांत उपसर्ग, मध्यें एखादें वाक्य व नंतर क्रियापद ह्याचीं आणखीं उदाहरणें सांपडतील. ह्याच्या वरच्याच ऋचेंत 'ओ षु स्वसारः कारवे शृणोत ययौ वो दूरादनसा रथेन' (३।३३।९); येथें 'आ' हा 'ययौ' ह्याला जोडावयाचा आहे. विश्वामित्र म्हणतोः-हे भगिनींनो, माझें ऐका. बैलगाडया व घोडयाच्या गाड्या घेऊन मी लांबून तुमच्याकडे आलों आहें. त्याला प्रस्तुत ऋचेंत नद्यांचें उत्तर आहे.

**निनमाम ते**

नि + नंसै = निनमाम. नम् + स् = नंस्. नंस् + ऐ = नंसै. निनमाम = तुझ्या करितां आम्ही वांकूं. परंतु निनंसै एकवचन आहे; अनेकवचन नाहीं.

**पाययमाना इव योषा पुत्रम्**

पीप्याना = पाययमाना = पाजणारी. 'पाजणारी स्त्री जशी बालकाच्या तोंडांत स्तन देण्याकरितां लवते तशी तुला बालक समजून मी लवेन.' येथें 'पीप्याना' हें 'पीप्यानाय' अशा अर्थी असावें. म्हणजे पीप्यानाय बालाय=ज्याला पाजावयाचें आहे अशा बालकासाठीं. कारण पुढील उपमेंत मर्याय असें चतुर्थ्यंत शब्दरूप आलें आहे. पी = पिणें. त्याचा अभ्यास केल्यावर पीपी. पीपी + आना = पीप्याना.

**मर्याय इव कन्या परिष्वजनाय**

शश्वचै = परिष्वजनाय = आलिंगण्यासाठीं. परंतु हा अर्थ चुकीचा आहे. 'श्वच्' याचा अर्थ खालीं पडणें किंवा पाडणें असा आहे. 'अवासृजः प्रस्वः श्वञ्चयो गिरीनुदाज उस्राः' (१०।१३८।२) = हे इंद्रा, तूं पाणी (प्रस्वः) सोडून दिलेंस (अवासृजः); पर्वतांना (गिरीन्) भुईवर लोळविलेंस किंवा निजविलेंस (श्वञ्चयः) आणि गाईंना (उस्राः) कोंडवाडयांतून बाहेर काढलेंस. उच्छ्वञ्चस्व पृथिवि मा निबाधथाः (१०।१८।११) = हे पृथिवी या प्रेतावर हलकीच पड. त्याला इजा करूं नकोस. उच्छ्वञ्चस्व वि नम वर्धमानः (१०।१४२।६) = हे अग्नि, वृद्धि पावणारा तूं खालीं ये. स्वज् = आलिंगन देणें असा स्वतंत्र धातु ऋग्वेदांत आहे. 'आलिंगन देणें' अशा अर्थी 'सस्वजै' असेंच रूप ऋचेंत आलें असतें. श्वच् ह्याला अभ्यास होऊन शश्वच् रूप झालें. शश्वच् + ऐ = शश्वचै. शश्वचै हें क्रियापद आहे, नाम नाहीं. तें नाम आहे असें समजून यास्कानें त्याचा 'निनंसै' ह्याच्याशीं संबंध जोडला आहे. दुसऱ्या अर्धाचा अन्वय पुढीलप्रमाणें आहे:-- पीप्याना योषा इव अहं ते त्वदर्थे निनंसै। मर्याय कन्या इव अहं ते त्वदर्थे शश्वचै = पाजणारी स्त्री जशी बालकाला पाजण्याकरतां लवते तशी मी तुजकरतां लवेन; इतकेंच नाहीं तर तरुणी जशी

मर्दानें आपल्या आंगावर पडावें म्हणून अंथरुणावर पडते तशी मी तुजसाठीं तळावर पडेन.

'निनंसै' ह्यानें पाणी बरेंच कमी होईल एवढेंच दर्शविलें जातें; पण 'शश्वचै' ह्यानें तें अगदीं तळाला जाईल असें दर्शविलें जातें. दुसऱ्या उपमेंत फारच खुबी आहे. दोहोंतही विनोद आहे. 'पुत्रोपमया कदाचित् अयं क्रोधम् इयात् इति मन्वानाः सत्यः पतिकन्यासंबद्धाम् अन्याम् उपमां नद्यः उपाददिरे । मर्याय मनुष्याय कन्या नवोढा शश्वचै ते परिष्वजनाय । कथं नाम परिष्वजेत माम् अयम् इत्यभिप्रायेण यथा सा निनमेत् एवं वयं तव निनमाम, (दुर्ग)= तूं आम्हांस पुत्रवत् आहेस असें उपमेनें सुचविल्यानें हा कदाचित् रागावेल असें वाटून मर्दानें आपल्यास आलिंगन द्यावें म्हणून नवोढा जशी लवते तशा आम्ही लवूं अशी दुसरी उपमा देऊन नद्या त्याला खूष करतात. येथें दुर्गानेंही यास्काचीच चूक कायम ठेविली आहे.

**निनमै इति वा**

निनंसै = निनमै. निननाम हें बरोबर नाहीं असें वर सांगितलेंच आहे. पण पहिल्यानें 'शृणवाम' असें बहुवचनी क्रियारूप आल्यानें 'निनंसै = निनमाम' असें क्रियारूप देणें यास्कास भाग पडलें.

**अश्वनामानि उत्तराणि षड्विंशतिः (१।१४) । तेषाम् अष्टौ उत्तराणि बहुवत्**

पुढील सव्वीस नांवें घोड्याचीं होत. त्यांपैकीं शेवटलीं आठ नांवें बहुवचनी असतात.

(१) अव्यथयः, (२) श्येनासः, (३) सुपर्णाः, (४) पतङ्गाः, (५) नरः, (६) ह्वार्याणाम्, (७) हंसासः, (८) अश्वाः अशीं तीं होत. ह्या आठांमध्यें 'अश्वाः' असा बहुवचनी शब्द घातला आहे. परंतु ऋग्वेदांत अश्व शब्द एकवचनी पुष्कळदां आला आहे. तेव्हां अश्व शब्द बहुवचनीच असतो असें म्हणण्यास निघंटुकारास काय कारण झालें तें समजत नाहीं.

**अश्वः कस्मात् । अश्नुते अध्वानम्**

अश्व शब्द कसा झाला? तो रस्ता व्यापतो म्हणजे रस्त्यानें जातो. म्हणून घोड्याला अश्व म्हणतात. 'अश्' = व्यापणें ह्यापासून अश्व शब्द झाला आहे.

**महाशनः भवति इति वा**

किंवा तो फार खातो म्हणून. अश् = खाणें ह्यापासून अश्व शब्द झाला असेल. महत् अशनम् यस्य सः महाशनः. १।१२ मध्यें 'यः कश्च अध्वानमश्नुवीत' एवढेंच म्हटलें आहे. तेथें अश् खाणें ही व्युत्पत्ति दिली नाहीं. त्यावरून 'महाशनो भवतीति वा' ही व्युत्पत्ति प्रक्षिप्त असावी.

**तत्र दधिक्राः (७) इति एतत्**

त्या अश्वनामांमध्यें दधिक्रा असें नांव आहे. तें नाम कसें झालें?

**दधत् क्रामति इति वा । दधत् क्रन्दति इति वा । दधत् आकारी भवति इति वा**

दधिक्राः = दधि + क्राः. दधि = दधत्. क्राः = क्रामति. स्वाराला पाठीवर धारण करून (दधत्) जो जातो तो दधिक्रा. म्हणजे दधिक्राः हा शब्द धा व क्रम् ह्या धातूंपासून झाला आहे. किंवा क्राः = क्रन्दति = खिंकाळतो. किंवा दधिक्रा = दध् + इक्रा. दध् = दधत्. इक्राः = अक्राः = आक्राः = आकारी. त्याच्या पाठीवर स्वार असल्याकारणानें त्याला एक प्रकारचा आकार येतो. 'स हि अधिरूढे अश्वारोहे आकुञ्चितग्रीवः विपुष्पितसर्वगात्रः आकृतिमान् भवति (दुर्ग) = अश्वारोह म्हणजे स्वार पाठीवर बसल्यानें त्या घोड्याची मान आकुंचित होते व सर्व गात्रें फुगतात; त्यामुळें त्याला विशेष आकार येतो. दधिक्राः = दधि + क्राः. दधि = दधिः = देणारा किंवा दान. क्र = देणें. क्राः = देणारा. जो धन देतो तो दधिक्रा, अशी व्युत्पत्ति असावी.

**तस्य अश्ववत् देवतावच्च निगमाः भवन्ति। तत् यत् देवतावत् उपरिष्टात् तत् व्याख्यास्यामः (१०।३१)। अथ एतत् अश्ववत्**

दधिक्रा हा अश्व व देवता अशा दोन्ही प्रकारच्याही ऋचा आहेत. देवतार्थी जो दधिक्रा शब्द त्याची व्युत्पत्ति आम्ही पुढें देणार आहों. पुढील ऋचेंत 'दधिक्रा' अश्वार्थी आहे.

## खंड २८ वा

**उत स्य वाजी क्षिपणिं तुरण्यति ग्रीवायां बद्धो अपिकक्ष आसनि।**
**क्रतुं दधिक्रा अनु संतवीत्वत्पथामङ्कांस्यन्वा पनीफणत्। (४।४०।४)**
**अपि सः वाजी वेजनवान् क्षेपणम् अनु तूर्णम् अश्नुते अध्वानम्**

उत = अपि. स्यः = सः, वाजी = वेजनवान्. वाजी ह्याचा खरा अर्थ वाज = लूट; ती घेऊन जाणारा तो वाजी. 'वेजनवान् भयवान्। परेभ्यो भयदाता। परेषां हि तं दृष्ट्वा भयम् उत्पद्यते। चलनवान् वा। स हि नित्यं चलनशीलः' (दुर्ग). वेजनवान् = भय देणारा. त्याला पाहून शत्रूला भय वाटतें. किंवा वेजनवान् = चलनवान्. तो नेहमी चालत असतो. 'ओविजी भयचलनयोः' (धा० ७।२३) ह्या धातुपाठांतील अर्थावरून वाजी ह्याचें यास्कानें व दुर्गानें असे अर्थ केले आहेत.

क्षिपणिं = क्षेपणम् अनु. क्षेपणिं क्षेपणमनु कशाघातम् अनु (दुर्ग) = चाबकाचा तडाखा लागल्याबरोबर. क्षिपणि हा शब्द फक्त येथेंच आला आहे. तेव्हां त्याचा खरा अर्थ कळणें अशक्य आहे. कदाचित् पाऊल असा अर्थ असेल. तुरण्यति = तुरण् + यति = तूर्णम् अश्नुते अध्वानं = भराभर रस्ता चालूं लागतो. तुरण् हा धातु ऋग्वेदांत चार वेळां आला आहे. चारीही ठिकाणीं त्याचा अर्थ त्वरा करणें असा दिसतो. तेव्हां 'क्षिपणिं तुरण्यति' = पाऊल भराभर उचलतो असा अर्थ होईल.

**ग्रीवायां बद्धः। ग्रीवा गिरतेर्वा। गृणातेर्वा। गृह्णातेर्वा**

मानेच्या ठिकाणीं बांधलेला. मानेला ग्रीवा म्हणण्याचें कारण कंठ गिळतो. म्हणजे ग्रीवा शब्द गॄ=गिळणें ह्यापासून झाला असेल. किंवा गॄ = शब्द करणें ह्यापासून. कारण कंठांतून आवाज निघतो. किंवा उदकादिकांचें कंठानें ग्रहण केलें जातें. किंवा 'तस्यामेव वा गृह्यते यः शृङ्खलीक्रियते' (दुर्ग)=ज्याला शृंखला घालावयाची

असते त्याची प्रथम मान पकडतात. म्हणजे ग्रह् धातूपासून ग्रीवा शब्द झाला असेल.

**अपिकक्षे आसनि इति व्याख्यातम्**

अपिकक्षे व आसनि ह्यांचे अर्थ स्पष्ट आहेत. अपिकक्ष ह्याचा अर्थ दिला असता तर बरें झालें असतें. 'अपिकक्षे कक्षायाम्' (दुर्ग)=खाकेंत. घोड्याच्या खाकेंत दोरी घातलेली पाहिली नाहीं. खाकेंत दोरी कशाला घालावयाची ? गाडीला घोडा जुंपला असतांना मानेखालून वादी घातलेली असते. पण जेव्हां नुसतें घोड्यावर बसावयाचें असतें, तेव्हां त्याच्या तोंडांत फक्त लगाम असतो. दुसरीकडे कोठेंही तो बांधलेला पाहिला नाहीं. पोटाखालून वादी घेतात ती फक्त जीन हालूं नये म्हणून. तेव्हां तीन ठिकाणीं बांधण्याची काय रीत होती तें समजत नाहीं. 'अपिकक्षः' हा घोड्याचा कोणता भाग असतो तो समजत नाहीं.

**क्रतुं दधिक्राः कर्म वा प्रज्ञां वा**

क्रतु म्हणजे कर्म किंवा शहाणपण. क्रतुं म्हणजे गतिरूप कर्म.

**अनु संतवीत्वत् । तनोतेः पूर्वया प्रकृत्या निगमः**

'संतवीत्वत्' हा 'तन्' धातूचा पूर्व प्रकृतीनें प्रयोग केला आहे. म्हणजे तें रूप 'तन्' धातूपासून झालें आहे. निगमः = रूप. दुर्ग म्हणतोः— 'षड्विधो हि धातुः। प्रकृत्यन्तः सनन्तश्च यङन्तो यङ्लुगेव च। ण्यन्तो ण्यन्तसनन्तश्च षड्विधो धातुरुच्यते ॥ आसां षण्णां धातुप्रकृतीनां या पूर्वा प्रकृतिः तया एष निगमः। न सन्प्रकृत्यादीनाम् अन्यतमया = धातूच्या सहा प्रकृति असतात. त्या सहा म्हणजे (१) शुद्ध (२) चिकीर्षित (३ व ४) चर्करीत (५) कारित (६) व कारित-चिकीर्षित. 'संतवीत्वत्' हें तन् धातूचें शुद्ध रूप कसें झालें तें दुर्गानें दाखवावयास पाहिजे होतें. वास्तविक 'तवीत्वत्' हें 'तु' (=वाढणें, वाढविणें) ह्याचें चर्करीत रूप आहे. 'तु' ह्याचें चर्करीत रूप 'तवीतु'; तवीतु + अति = तवीत्वति. लेट्मध्यें शेवटचा 'इ' गळतो आणि 'तवीत्वत्' एवढें शिल्लक राहतें. 'अनुसंतवीत्वत्' = सारखी वाढवीत जातो. क्रतुम् = गतिम्. क्रतुम् अनुसन्तवीत्वत् = आपली गति सारखी वाढवीत जातो. क्रतुम् आत्मीयं गमनकर्म प्रज्ञां वा अश्वारोहस्य संतनोति। कामम् अभिप्रेतेन अर्थेन शीघ्रगामित्वात् दधिक्राः अश्वः अनुसंतनोति इत्यर्थः (दुर्ग) = दधिक्रा घोडा आपली गति वाढवितो किंवा स्वाराचें शहाणपण आपल्या गतीनें दाखवितो. सारांश जलद जलद चालून स्वाराच्या मनांतली इच्छा पूर्ण करतो. यास्ककालीन व्याकरणांत पूर्वप्रकृति म्हणजे काय होतें तें समजत नाहीं. कदाचित् 'तन्' यांतला 'त्' तेवढाच घ्यावयाचा असेल व त्याला 'वीत्वत्' असा प्रत्यय जोडावयाचा असेल. पण हा सगळा फुकट तर्क आहे. यास्काच्या मनांतला अर्थ कळणें अशक्य आहे. ७।४।६५ ह्या सूत्रांत पाणिनि 'आपनीफणत्' हा शब्द देतो; परंतु 'संतवीत्वत्' देत नाहीं. तेव्हां त्याच्याही मतानें 'तवीत्वत्' हें चर्करीत रूप नसावें असें दिसतें. पण त्यानें 'दविध्वत्' हें 'धु' धातूचें चर्करीत रूप दिलें आहे. 'तवीत्वत्' हें 'दविध्वत्' ह्या

सारखेंच आहे. भट्टोजीदीक्षित 'ध्वर्' पासून 'दविध्वत्' झालें आहे असें म्हणतात.

**पथाम् अङ्कांसि पथां कुटिलानि**

अङ्कांसि = कुटिलानि = मार्गांतील वेड्यावांकड्या जागा. अङ्कांसि ह्याचा अर्थ मोठाले खड्डे किंवा उंचवटे किंवा वळणें असा कांहींतरी असेल. 'अङ्कसं परि दधिक्राव्णः सहोर्जा तरित्रतः' (४।४०।३) = अंकस्मधून किंवा अंकस्च्या पलीकडे (परि) जोरानें (ऊर्जा सह) ओलांडून जाणाऱ्या (तरित्रतः) दधिक्राव्याचें. तृ= ओलांडणें. तेव्हां अंकस् म्हणजे मोठा खड्डा असावा. येथें अङ्कस् पुल्लिंगी आहे. ऋग्वेदांत हा शब्द दोनदांच आला आहे.

**पन्थाः पततेर्वा पद्यतेर्वा पन्थतेर्वा**

पथिन् शब्द पत् (धा० १।८७०) किंवा पद् (धा० ४।६३) किंवा पन्थ् (धा० १०।४२) ह्यांपैकीं कोणत्या तरी धातूपासून झाला असेल. तीनही धातूंचा अर्थ जाणें.

**अङ्कः अञ्चतेः**

अञ्चु गतौ (धा० १।८८७). अञ्च् जाणें ह्यापासून अङ्कस्.

**आपनीफणत् इति फणतेः चर्करीतवृत्तम्**

आपनीफणत् हें फण्चें चर्करीत रूप होय. फण् ह्याचा अभ्यास पनीफण्. पनीफण् + अति = पनीफणति. लेट्मुळें 'ति' ह्यांतील 'इ' गळला आहे. आपनीफणत् हें पाणिनीनें ७।४।६५ त दिलें आहे. फण् धातूचें हें एकच रूप ऋग्वेदांत आहे. फण् = ओलांडणें हा अर्थ असेल.

ऋचेचा अर्थ :— मान, अपिकक्ष व तोंड ह्या तीन ठिकाणीं बांधलेला दधिक्रा-अश्व आपलें पाऊल झपाझप टाकतो, आपली गति वाढवितो, मार्गांतील मोठमोठे खड्डे झपाट्यानें ओलांडून जातो.

**दश उत्तराणि आदिष्टोपयोजनानि (१।१५) इत्याचक्षते साहचर्यज्ञानाय**

पुढील दहा नांवें घोड्यांचीं असून त्यांजवर बसणारे कोण हेंही घोडा व बसणारा ह्यांचें साहचर्य दाखविण्याकरितां सांगितलें आहे असें म्हणतात. 'इत्याचक्षते साहचर्यज्ञानाय' हे शब्द येथें कां घातले आहेत तें समजत नाहीं.' हरी इन्द्रस्य रोहितः अग्नेः' वगैरे निर्देश असल्यामुळें अमक्या घोड्यांचा अमका उपयोग करतो असें आचार्यांनीं सांगावयास नको.

**ज्वलतिकर्माणः उत्तरे धातवः एकादश (१।१६)**

पुढच्या अकरा धातूंचा अर्थ जळणें असा आहे.

**तावन्ति एव उत्तराणि ज्वलतः नामधेयानि नामधेयानि**

पुढील तितकींच नांवें जळत्या पदार्थांचीं होत. नामधेयानि नामधेयानि ही द्विरुक्ति अध्याय संपला हें सांगण्याकरितां आहे.

---

# अध्याय ३ रा

## खंड १ ला.

**कर्मनामानि उत्तराणि षड्विंशतिः ( २।१ )**

पुढील २६ नामें कर्मवाचक आहेत.

**कर्म कस्मात् । क्रियते इति सतः**

कर्म शब्द कसा झाला ? जेव्हां कर्म **केलें** जातें तेव्हां त्याला कर्म म्हणतात. म्हणजे कृ(=करणें ) पासून कर्म शब्द झाला आहे. जेव्हां कर्म **मिळविलें** जातें तेव्हां त्याला अपस् म्हणतात; जेव्हां **शेवटास जातें** तेव्हां त्याला दंस म्हणतात.

कर्मशब्दाची व्युत्पत्ति इतकी उघड उघड आहे की ती देण्याचें कोणाच्याही मनांत येणार नाहीं. जरी ती व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत आढळते तरी ती प्रक्षिप्त असावी असें खास वाटतें.

**अपत्यनामानि उत्तराणि पञ्चदश (२।२)**

पुढील पंधरा नामें अपत्यवाचक होत.

**अपत्यं कस्मात् । अपततं भवति**

अपत्य शब्द कसा झाला ? बापापासून निघून जणूं काय अपत्य वेगळें **पसरलें जातें;** म्हणजे अप+तन् ह्यापासून तो शब्द झाला आहे. अथवा

**न अनेन पतति इति वा**

अपत्यम् = अ + पत्यम्. अ = न. पत्यं = पतति. अपत्य झाल्यानें बाप नरकांत पडत नाहीं. अपत् = न पडणें. अपति = न पडण्यांत. नरकांत न पडूं देण्यांत जें साधु म्हणजे योग्य तें अपत्य.

वास्तविक अप, आविस् व स ह्यांना त्य प्रत्यय लागून अपत्य, आविष्ट्य व सत्य शब्द बनले आहेत.

**तद्यथा जनयितुः प्रजा एवमर्थीये ऋचौ उदाहरिष्यामः**

जनयिता म्हणजे उत्पन्न करणारा असा जो पुरुष त्याचीच प्रजा ह्या अर्थाच्या दोन ऋचा आम्ही पुढें देत आहोंत. प्रजा ह्या शब्दानंतर भवति हें क्रियापद अध्याहृत आहे. एवमर्थीये हा शब्द तथा ह्या अर्थी आहे. एवमर्थीया ऋक् । एवमर्थीये ऋचौ एवम् अर्थः = एवमर्थः. एवमर्थः विद्यते ययोः ते एवमर्थीये = ज्यांच्यांत असा अर्थ आहे अशा दोन ऋचा. एवमर्थीय रूप पाणिनीच्या कोणत्याही सूत्रानें सिद्ध होत नाहीं. मतौ छः सूक्तसाम्नोः (पा० ५।२।५९) हें सूत्र एथें लागू पडत नाहीं; कारण, एवमर्थ ह्यानें सूक्त किंवा साम दर्शविलें जात नाहीं. रैवतिकादिभ्यः छः (पा० ४।३।३१) हा आकृतिगण

मानून त्यानें एवमर्थीय शब्द कदाचित् सिद्ध होईल. अशीं अपाणिनीय रूपें निरुक्तांत बरींच आढळतात. त्यावरून व अव्यवस्थित वाक्यरचनेवरून यास्क पाणिनीच्या आधीं झाला असावा असें वाटतें. तद्यथा जनयितुः प्रजा भवति तथा किंवा जनयितुः प्रजा इत्यर्थे ऋचौ उदाहरिष्यामः असें वाक्य पाहिजे. दुर्ग म्हणतो :— अत्र पुनर्विवदन्ते । द्वयोःसंनिपाते किं क्षेत्रिणः अपत्यम् उत बीजिनः इति =दोघे हक्क सांगूं लागले असतां मूल ज्याची बायको (क्षेत्रं) त्याचें कीं ज्याचें बीज त्याचें असा वाद आहे. याचें उत्तर पुढील दोन ऋचांत आहे.

## खंड २ रा.

**परिषद्यं ह्यरणस्य रेक्णो नित्यस्य रायः पतयः स्याम ।**
**न शेषो अग्ने अन्यजातमस्त्यचेतानस्य मा पथो वि दुक्षः (ऋ० सं० ७।४।७)**
**परिहर्तव्यं हि न उपसर्तव्यम्**

परिषद्यं = परिहर्तव्यम् = टाळावें. (म्हणजे) न उपसर्तव्यम् = जवळ जाऊं नये.

**अरणस्य रेक्णः । अरणः अपार्णः भवति । रेक्णः इति धननाम । रिच्यते प्रयतः**

अरणः = अ + रणः = अप + ऋणः = अपार्णः. प्रवत्सतरकम्बलवसनार्णदशानामृणे ह्या वार्तिकानें अपार्ण शब्द सिद्ध होत नाहीं. त्यावरून वार्तिककालाच्या वेळीं तो शब्द प्रचारांतून गेला असावा. ऋण म्हणजे जल. ज्याच्याशीं आपला उदकसंबंध नाहीं तो अपार्ण. म्हणजे अरण = परका. रेक्ण म्हणजे धन. धनाला रेक्ण म्हणण्याचें कारण मेलेल्या (प्रयतः) मनुष्याच्या पाठीमागें तें राहतें. म्हणजे रेक्ण शब्द रिच् (= शिल्लक राहणें) पासून झाला आहे. प्रयतः = परलोकास जाणाऱ्याचें.

**नित्यस्य रायः पतयः स्याम । पित्र्यस्य इव धनस्य**

नित्यस्य = पित्र्यस्य इव=बापापासून आलेल्याचे जसे आम्ही मालक होतों तशा धनाचे. रायः = धनस्य = धनाचे.

**न शेषो अग्ने अन्यजातमस्ति । शेषः इति अपत्यनाम । शिष्यते प्रयतः**

शेषस् = अपत्य. अपत्याला शेषस् म्हणण्याचें कारण परलोकास जाणाऱ्याच्या (प्रयतः) पाठीमागें तें शिल्लक राहतें. म्हणजे शेषस् शब्द शिष् (= शिल्लक राहणें) पासून झाला आहे.

**अचेतयमानस्य तत् प्रमत्तस्य भवति**

हें अचेतानस्य ह्या एका शब्दाचें विवरण आहे. अचेतानस्य = अचेतयमानस्य = ज्याला कळत नाहीं, म्हणजे जो वेडा आहे (प्रमत्तस्य) त्याचें तें अपत्य होतें.

**मा नः पथः विदूदुषः इति**

पथः = नः पथः. विदुक्षः = विदूदुषः. मा विदूदुषः = दूषित करूं नकोस.

ऋचेचा अर्थः— परक्याचें धन टाकूनच दिलें पाहिजे. आम्ही स्वतःच्या धनाचे मालक होऊं इच्छितों. हे अग्नि, दुसऱ्यानें उत्पन्न केलेलें मूल स्वतःचें होत नाहीं. जो

अप्रबुद्ध किंवा मूर्ख असतो त्याचेंच तें होतें. आमचे मार्ग दुसऱ्याचें मूल आम्हांस देऊन तूं दूषित करूं नकोस.

ह्या ऋचेच्या आधींच्या ऋचेंत 'मा त्वा वयं सहसावन्नवीरा माप्सवः परिषदाम मा दुवः (७।४।६) = हे धनवान् अग्नि, निर्धन असे आम्ही तुझ्याभोंवतीं बसूं नये' असें म्हटलें आहे. एथें परि + सद् = भोंवतीं बसणें असा अर्थ आहे. प्रस्तुत ऋचेचाही अर्थ अपत्यपर नसून धनपर आहे. अरण शब्द अ + रण असा समास असावा. अ = अतिशय. रण = धन. अरण = अतिशय धन किंवा अतिधनवान्. सद् = देणें. नि + त्य = धनानें भरलेलें. अन्यस्य जातं धनम् अन्यजातं = दुसऱ्याचें धन. शेषस् = धन. चित् + आनः = चेतानः = देणारा. अचेतानस्य = जो धन देत नाहीं त्याचे. पथः =धन. दुह् + स् = दुक्ष्. मा दुक्षः = देऊं नकोस. धनिकाचें ( अरणस्य ) धन ( रेक्णः ) वाटावयाचें असतें ( परिषद्यं ); म्हणून अतिशय ( नित्यस्य ) धनाचे दाते ( पतयः ) आम्ही होऊं इच्छितों ( स्याम ). दुसऱ्यानें दिलेलें धन ( अन्यजातं ) हें खरें धन ( शेषः ) नव्हे. हे अग्नि, जो धन देत नाहीं त्याला (अचेतानस्य) धन (पथः) देऊं नको ( मा दुक्षः ).

न शेषो अग्ने अन्यजातमस्ति इत्यनेन विशेषलिङ्गेन उपपन्नम् एतद्भवति जनयितुरेव प्रजा भवति न क्षेत्रिणो नापि क्रेतुः अन्यस्य वा कस्यचित् इति ( दुर्ग ) = दुसऱ्यानें उत्पन्न केलेलें मूल आपलें होत नाहीं; ह्या शब्दांवरून जो उत्पन्न करतो त्याचेंच तें मूल होतें; तें नवऱ्याचें किंवा विकत घेणाराचें किंवा दुसऱ्या कोणाचेंही होत नाहीं हें सिद्ध होतें. यस्मात् एव अपेत्य ततं भवति तस्यैव अपत्यम् ( दुर्ग ) =अपत्य शब्दाच्या व्युत्पत्तीवरूनही हेंच सिद्ध होतें.

**तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय**

त्याच अर्थाचें जास्त विवरण करण्याकरितां पुढील ऋचा दिली आहे.

## खंड ३ रा.

**नहि ग्रभायारणः सुशेवोऽन्योदर्यो मनसा मन्तवा उ ।**
**अधा चिदोकः पुनरित्स एत्या नो वाज्यभीषाळेतु नव्यः ( ऋ० सं० ७।४।८ )**
**न हि ग्रहीतव्यः अरणः सुसुखतमः अपि अन्योदर्यः**

ग्रभाय = ग्रहीतव्य. ग्रभाय ही ग्रभ शब्दाची चतुर्थी आहे. ग्रभाय = ग्रहणाय ( भवति ). सुशेवः = सुसुखतमः अपि = कितीही चांगला, कितीही सुखदायक असला तरी. यास्कानें अन्योदर्यः हा मूळांतील शब्द कायम ठेविला आहे. ह्यावरून तो शब्द यास्ककालीं प्रचारांत होता असें दिसतें. पाणिनीच्या वेळीं अन्योदर्य शब्द प्रचारांत नव्हता; कारण तो समानोदर्य ( ४।४।१०८ ) व सोदर्य ( ४।४।१०९ ) ह्यांच्याविषयींच सूत्रें देतो.

**मनसा अपि न मन्तव्यः मम अयम् इति**

मन्तवै = मन्तव्यः मम अयं इति = हा माझा आहे असें मनालासुद्धां मानतां येत नाहीं.

महाराष्ट्रपाठांत ममायं ह्याच्यानंतर पुत्रः असा शब्द आहे. परंतु त्याची कांहीं आवश्यकता नाहीं. मन्तवै = मन्तुम्. मन्तु शब्दाचें मन्तवै हें चतुर्थीचें एकवचन असें एकेकाळीं मानलें जात असे. प्रभाय प्रमाणें मन्तवै हीहीं चतुर्थीच. पहिल्या अर्धाचा अन्वय पुढीलप्रमाणें:—अन्योदर्यः अरणः प्रभाय न हि सुशेवः। मनसा मन्तवै उ अपि न सुशेवः = दुसऱ्याच्या पोटीं जन्मलेला परका आपला म्हणून घेण्याला योग्य नाहींच नाहीं; मनानें सुद्धां तो तसा मानण्याला योग्य नाहीं.

**अथ सः ओकः पुनरेव तत् एति यतः आगतः भवति**

अधा = अथ. इत् = एव. चित् शब्द निरर्थक म्हणून भाष्यांत गाळला आहे. वास्तविक अधा चित् = परंतु किंवा कारण असा अर्थ होतो. चित् ह्यानें अधा ह्याला जोर येतो. यतः आगतः भवति हे शब्द अध्याहृत आहेत. परंतु हे तीन शब्द दुर्गवृत्तींत नाहींत.

**ओकः इति निवासनाम उच्यते**

ओकस् शब्दानें राहाण्याच्या ठिकाणाचें एक नांव सांगितलें जातें.

उच्यते ही कदाचित् ओकस् शब्दाची व्युत्पत्ति असेल. उच्यते इति सतः असें म्हणावयास पाहिजे होतें. हें वाक्य दुर्गवृत्तींत नाहीं.

**ऐतु नः वाजी वेजनवान् अभिषहमाणः सपत्नान् नवजातः स एव पुत्र इति**

आ + एतु = ऐतु = येवो. वाजी = वेजनवान् = कंप देणारा म्हणजे शत्रूला थरथर कांपावयास लावणारा. विजी भयचलनयोः ( धा० ६।९ ) ह्या धातूशीं वाजी ह्या शब्दाचा कांहीं एक संबंध नाहीं. वाज म्हणजे लुटींत मिळविलेलें धन. वाजी म्हणजे लढाई जिंकून लूट आणणारा शूर पुरुष. अभीषाट् = अभिषहमाणः सपत्नान् = शत्रूला जिंकणारा. सह् = जिंकणें. नव्यः = नवजातः = नुकताच जन्मलेला. स एव पुत्रः इति = तोच खराखरा पुत्र म्हणून तोच आम्हांला मिळो.

अरणः = अतिशय धन. सुशेवः = धनानें भरलेलें. अन्यस्य उदरे भवः = दुसऱ्याच्या भांडारांत असणारें. प्रभाय = देण्याला. मनसा = धनानें ( युक्त ). मन्तवै = मागण्याला. अधा = धनासह. ओकस् = स्वतःचें ठिकाण, भांडार. वाजी = अभीषाट् = नव्यः = धनानें भरलेलें. दुसऱ्याच्या भांडारांतलें ( अन्योदर्यः ) धन ( अरणः ), कितीही अपार असलें ( सुशेवः=मनसा युक्तः ) तरी, देतां येत नाहीं ( प्रभाय ) अगर मागतां येत नाहीं ( मन्तवै ). तें धन (सः अरणः) वृद्धीसह (अधा) परत ( पुनर् ) आपल्या भांडाराकडे ( ओकः ) जातेंच ( चित् एति ). आमच्याकडे अमूप ( वाजी = अभीषाट् = नव्य ) धन ( अरणः ) येवो ( ऐतु ) असा अर्थ असावा.

**अथ एतां दुहितृदायाद्ये उदाहरन्ति**

पुढील ऋचा मुलीला पितृधनाचा वांटा मिळतो हें दाखविण्याकरतां कांहीं स्मृतिकार उदाहृत करतात. दाय रिक्थम् आदत्ते असौ दायादः दायादा वा। दायादस्य भावः दायाद्यम् = जो बापाच्या दौलतीचा वांटा घेतो तो दायाद व जी घेते ती दायादा. तिला किंवा त्याला धन मिळण्याचा हक्क तो दायाद्य.

**पुत्रदायाद्ये इत्येके**

एषा ऋक् पुत्रदायाद्ये इत्येके मन्यन्तेः–पण कित्येक(धर्मशास्त्रवेत्ते) म्हणतात कीं ही ऋचा पुत्रालाच दायभाग मिळावा असें सिद्ध करते. 'एके पुनः धर्मविदः मन्यन्ते यत् पैतृकं वित्तं तत् पुत्रस्य एव दायाद्यं न दुहितुः इति। यथा दुहितापि दायाद्यम् अर्हति तथा इयम् ऋक् निरुच्यते' (दुर्ग) = कित्येक धर्मशास्त्रवेत्ते म्हणतात कीं, पित्याचें धन पुत्राचेंच, मुलीचें नव्हे. मुलीलाही पितृधनाचा वांटा मिळावा हें सिद्ध करण्याकरितां पुढील ऋचेचें विवरण केलें आहे. ह्या शब्दावरून पुढील ऋचा पुत्रदायाद्यपर नाहीं असें दुर्ग म्हणतो. परंतु पुत्रदायाद्ये ह्या सप्तमी विभक्तीवरून दुर्गानें केलेला अर्थ बरोबर दिसत नाहीं. पुत्रदायाद्ये इत्येके हे शब्द मूळ निरुक्तांत नसावेत असें वाटतें. मूळ निरुक्तांत जर ते असते, तर दुसरा अर्थही यास्कानें दिला असता.

## खंड ४ था.

**शासद्वह्निर्दुहितुर्नप्त्यं गाद्विद्वाँ ऋतस्य दीधितिं सपर्यन्।**
**पिता यत्र दुहितुः सेकमृञ्जन् सं शग्म्येन मनसा दधन्वे (ऋ. सं. ३।३१।१)**
**प्रशास्ति वोढा संतानकर्मणे दुहितुः पुत्रभावम्**

शासत् = प्रशास्ति = अधिकारयुक्त वाणीनें सांगतो किंवा जाहीर करतो. वह्निः = वोढा = नवरा.

यः उद्वोढा स्त्रियाः भवति सः तस्यां या जायते दुहिता तस्याः पुत्रभावं प्रशास्ति संतानकर्मणे अर्थाय (दुर्ग) = जो कोणी एखाद्या स्त्रीशीं विवाह करतो तो हेला मुलगा न होतां जरी मुलगीच झाली तरी तिच्यापासूनही माझी वंशवृद्धि होईल असें समजूनही माझा पुत्र असें जाहीर करतो. संतानकर्मणे व पुत्रभावं हे शब्द अध्याहृत घेतले आहेत.

**दुहिता दुर्हिता। दूरे हिता**

दुहिता = दु + हिता. दु = दुर्. पुत्र नेहमीं सुहित व दुहिता दुर्हित. पूर्वकाळीं मुलीपेक्षां मुलगा जास्त पसंत असे व हल्लींही जुन्या लोकांत तीच समजूत आहे. दुर्हित = वाईट दिलेली म्हणजे नकोशी. म्हणजे दुहितृशब्द दुर् + धा ह्यापासून झाला आहे. किंवा दुहिता = दु + हिता. दु = दूरे. मुलगी जितकी दूर दिली जाईल तितकें चांगलें. जवळ असल्यास 'मला हें द्या, मला तें द्या' अशी ती सारखी कटकट लावणारच. किंवा स्वतःचें घर सोडून दुसऱ्याच्या घरीं ती दिली जाते म्हणजे ती दूर होते. किंवा

**दोग्धेर्वा**

सा हि नित्यमेव पितुः सकाशात् द्रव्यं दोग्धि प्रार्थनापरत्वात् (दुर्ग)= नेहमीं विनवण्या करून करून बापापासून मुलगी सारखी पैसे उकळीत असते. दुहितृ शब्द दुह् (=दूध काढणें) पासून झाला आहे. अँग्लोसॅक्सन् दोह्तॉर् (Dohtor), जर्मन तोख्तर् (Tochter), ग्रीक थुगदर् (Thugather) आणि अवेस्ता दुघेतर् किंवा दुगेदर् असे ह्या भाषांत दुहितृसमान शब्द आढळतात. दुहितृ-शब्दांत जर कोणता धातु असेल तर तो दुह् हाच. यास्कानें त्याला शेवटचें स्थान दिलें आहे; ह्याचें कारण मुली हल्लीं कांहीं दूध काढीत नाहींत. दुहितृशब्द उच्चारल्याबरोबर जे वाईट अर्थ मनांत उभे राहतात त्यांना उद्देशून यास्कानें व्युत्पत्ति दिल्या आहेत.

**नप्तारम् उपागमत् दौहित्रं पौत्रम् इति**

नप्त्यं = नप्तारम् = नातवाकडे. गात् = उपागमत् = जातो. दुहितेचा जो मुलगा तो माझा पौत्र असें तो नातवाला समजतो. पौत्र म्हणजे पुत्राचा पुत्र. दुहिता ही पुत्र असें मानल्याशिवाय दौहित्र हा पौत्र कसा होईल? ह्यावरून दुहिता हीही पुत्र हें सिद्ध होतें.

**विद्वान् प्रजननयज्ञस्य । रेतसः वा**

ऋतस्य = प्रजननयज्ञस्य. ऋत म्हणजे यज्ञ. तो यज्ञ म्हणजे प्रजोत्पत्ति करणें किंवा,ऋतस्य = रेतसः. ऋत म्हणजे रेत.

**अङ्गात् अङ्गात् संभूतस्य हृदयात् अधि जातस्य मातरि प्रत्यृतस्य विधानं पूजयन्**

हें रेत पुरुषाच्या प्रत्येक अंगापासून उत्पन्न होऊन हृदयापासून निघून आईच्या ठिकाणीं गेलेलें असतें. म्हणजे रेतस् हें मूळचें ऋत; म्हणजे ऋ(= जाणें) ह्यापासून रेतस्. दीधितिम् = विधानम् = विधि. सपर्यन् = पूजयन्. यथैव हि पुत्रजन्मने प्रजननयज्ञः तन्यते तथैव हि दुहितृजन्मने अपि। यैःएव हि मन्त्रैः येनैव च विधानेन पुत्रगर्भः आधीयते तैरेव मन्त्रैः तेनैव च विधानेन दुहितृगर्भः अपि (दुर्ग) = पुत्रजन्माकरितां जी खटपट करावी लागते तितकीच दुहितृजन्माकरतां लागते. दोहोंच्याही गर्भाधानाला तेच मंत्र म्हणावे लागतात व तोच विधि करावा लागतो.

**अविशेषेण मिथुनाः पुत्रा दायादाः इतिः**

मुलगे व मुली हीं दोघेंही दायभागाला पात्र असतात. त्यांच्यामध्यें कोणताही विशेष म्हणजे भेद नसतो. मिथुन म्हणजे पुरुष व स्त्री हीं दोघेंही.

**तत् एतत् ऋक्श्लोकाभ्याम् अभ्युक्तम्**

ह्या विधानाला ऋचेचा व श्लोकाचा आधार आहे. अभ्युक्तं म्हणजे अधिकारयुक्त वाणीनें म्हटलेलें.

**अङ्गादङ्गात् संभवसि हृदयादधिजायसे। आत्मा वै पुत्रनामासि स जीव शरदः शतम् ( कौषीतकि-आरण्यक ४।११ )**

तूं प्रत्येक अंगापासून उत्पन्न झाला आहेस; हृदयापासून जन्मला आहेस; पुत्र नांवाचा तूं माझा आत्माच आहेस; तो तूं शंभर वर्षें जग.

वास्तविक हा श्लोकच आहे. आरण्यकांत आल्यामुळें त्याला ऋक्संज्ञा प्राप्त झाली आहे.

**अविशेषेण पुत्राणां दायो भवति धर्मतः। मिथुनानां विसर्गादौ मनुः स्वायंभुवोऽब्रवीत्**

धर्मानें म्हणजे कायद्यानें मिथुनपुत्रांना म्हणजे मुलांना व मुलींना पित्याचें द्रव्य सारखेंच मिळालें पाहिजे; त्यांत भेद नसावा; असें स्वयंभूचा मुलगा जो मनु तो सृष्टीच्या आरंभीं म्हणता झाला.' हा श्लोक कोणत्याही स्मृतिग्रंथांत आढळत नाहीं. मिथुन शब्दाचा मुलगा व मुलगी असा अर्थ नसून जुळीं मुलें असा अर्थ असावा. जुळ्या मुलांना पितृधन सारखेंच मिळालें पाहिजे.

**न दुहितरः इत्येके**

न दुहितरः दायाद्यम् अर्हन्ति = कित्येक स्मृतिकार ( एके = एके धर्मविदः ) म्हणतात कीं मुली दायभाग घेण्याला अपात्र आहेत.

**तस्मात् पुमान् दायादः अदायादा स्त्री इति विज्ञायते**

अथ यत् स्थालीं रिञ्चन्ति न। दारुमयं तस्मात् पुमान् दायादः स्त्री अदायाद् ( मैत्रा. सं. ४।६।४ )= सोमयागांत निरनिराळ्या देवतांना उद्देशून अग्नींत सोमाहुति द्यावयाच्या असतात. ह्या आहुतींना ग्रह म्हणतात. त्यांतील एका ग्रहाचें नांव आग्रयण असें आहे.यावेळीं सोम मातीच्या भांड्यांत घेतात; परंतु आहुति लांकडाच्या भांड्यांतून दिली जाते. ह्यावरून एक गोष्ट सिद्ध होते ती ही कीं पुरुषाला दायभाग मिळतो, स्त्रीला मिळत नाहीं; कारण मातीची थाळी रिकामी करतात व त्यांतील सोम लांकडाच्या भांड्यांत ओततात. हल्लींच्या मैत्रायणी संहितेंत ' स्त्री अदायाद् ' असा पाठ आहे.

**तस्मात् स्त्रियं जातां परास्यन्ति न पुमांसम् ( मत्रौ. स. ४।६।४ )**

अथ यत् स्थालीं परास्यन्ति न दारुमयं तस्मात् स्त्रियम् इत्यादि = मातीची थाळी फेंकून देतात व अवभृथस्नानाला जातांना लांकडाचें भांडें बरोबर नेतात; म्हणूनच मुलगी जन्मल्याबरोबर तिला टाकून देतात; मुलाला टाकून देत नाहींत. परास्यन्ति म्हणजे दुसऱ्याला देऊन टाकतात ( परस्मै प्रयच्छन्ति ) असा दुर्ग अर्थ करतो, पण तो अर्थ बरोबर नाहीं. जन्मल्याबरोबर मुलींना रानांत सोडीत, कित्येक वेळां ठारही मारीत. मुलींना ठार मारतात ही गोष्ट हल्लींही कधींकधीं ऐकूं येते.

**स्त्रीणां दानविक्रयातिसर्गाः विद्यन्ते न पुंसः**

स्त्रीचें दान केलें जातें, विक्रय केला जातो व ती टाकलीही जाते ; ह्या गोष्टी पुरुषाच्या ठिकाणीं होत नाहींत. ब्राह्मविवाहांत कन्यादान केलें जातें ही गोष्ट सुप्र-

सिद्ध आहे. अतिसर्ग = टाकणें. अतिसर्गः परित्यागः। परित्यज्यते हि कन्या स्वबन्धुभिः स्वयंवरे यो बलिष्ठः स गृह्णातु इति । यो वा तुभ्यं रोचते तं वृणीष्व इति । स एष क्षत्रियाणाम् एव स्वयंवरधर्मः नेतरेषां वर्णानाम् । स पुनरयम् इतरेषामपि वर्णानाम् अदायार्हत्वे कन्यायाः लिङ्गं भवति (दुर्ग) = कन्येचे बंधु तिला म्हणतात ‘ ह्या स्वयंवरांत जो बलिष्ठ असेल तो तुला घेऊन जावो किंवा जो तुला आवडत असेल त्याला तूं वर. स्वयंवराची चाल फक्त क्षत्रियांमध्येंच आहे, इतर वर्णांत नाहीं हें खरें; तथापि इतर वर्णांतील स्त्रियांनाही पितृधनाचा भाग मिळूं नये असें ह्या गोष्टीवरून दिसतें. दुर्गानें अतिसर्गाचा केलेला हा अर्थ बरोबर नाहीं. अतिसर्ग म्हणजे टाकून देणें.

**पुंसः अपि इत्येके । शौनःशेपे दर्शनात्**

दान, विक्रय व अतिसर्ग ह्या गोष्टी पुरुषाच्या संबंधानेंहि घडतात असें कित्येक म्हणतात. शुनःशेपाच्या आख्यानामध्यें ह्या तीनही गोष्टी दिसून येतात. बापानें आपला मधला मुलगा जो शुनःशेप त्याला हरिश्चंद्राला विकलें; पशूप्रमाणें आपला वध होणार म्हणून त्यानें वरुणाची कृपा भाकिली व विश्वामित्रानें त्याला दत्तक घेतलें. ह्या गोष्टीच्या आड विश्वामित्राचे मुलगे आले म्हणून विश्वामित्रानें त्यांचा त्याग केला अशी कथा ऐतरेयब्राह्मणाच्या तेहतिसाव्या अध्यायांत व महाभारतांत आहे. तेव्हां दायभागाला स्त्री योग्य नाहीं ह्या विधानाला ‘ स्त्रीणां दानविक्रियातिसर्गाः विद्यन्ते ’ हा पुरावा होऊं शकत नाहीं.

**अभ्रातृमतीवादः इत्यपरम्**

जिला भाऊ नाहीं तिच्यासंबंधानें हा वाद आहे असें दुसरें एक मत आहे. अपरं = अपरं मतम्. अपरं हा पाठ बरोबर नाहीं, वरतीं सर्वत्र एके असें म्हटलें आहे; तेव्हां एथें अपरे असा पाठ असावा. स्त्रीला दायभाग मिळावा कीं न मिळावा हा प्रश्न सर्व स्त्रियांसंबंधानें उत्पन्न होत नाहीं; जिला भाऊ नाहींत तिच्या संबंधानेंच तो वाद उत्पन्न होतो.

**अभ्रातर इव योषास्तिष्ठन्ति हतवर्त्मनः । अभ्रातृकाः इव योषाः तिष्ठन्ति संतानकर्मणे पिण्डदानाय हतवर्त्मानः**

अभ्रातरः = अभ्रातृकाः. पाणिनिनियमानें अभ्रातरः असा बहुव्रीहि समास होत नाहीं; तो अभ्रातृकाः असाच झाला पाहिजे. हतवर्त्मनः = हतवर्त्मानः. हतवर्त्मनः हें रूप चुकीचें आहे. संतानकर्मणे पिण्डदानाय हे शब्द अध्याहृत घेतले आहेत. संतानकर्मणे पिण्डदानाय हतवर्त्मानः = संतानकर्म चालू ठेवणें म्हणजे वंशवृद्धि करणें व तसें करून पितरांना पिंड देणें हा जो मार्ग तो ज्यांनीं मारला आहे म्हणजे कुंठित केला आहे अशा. अमूर्या यन्ति जामयः सर्वा लोहितवाससः असा ह्या ऋचेचा पहिला अर्ध आहे. सबंध ऋचेचा अर्थः—ज्यांना भाऊ नाहीं अशा स्त्रिया जशा नवऱ्याच्या वंशाच्या वाढीचा व त्याचप्रमाणें त्याच्या पितरांना पिंड देण्याचा मार्ग खुंटवितात तशा तांबडीं वस्त्रें नेसलेल्या म्हणजे सतत रक्तस्राव करणाऱ्या ह्या बाया म्हणजे रक्तवाहिन्या

रक्ताचा मार्ग खुंटित करणाऱ्या होवोत. हतः वर्त्म यासां ताः = ज्यांचा (रक्त वाहण्याचा) मार्ग बंद झाला आहे अशा (रक्तवाहिन्या). हतः वर्त्म याभिः = ज्यांनीं (वंशवृद्धीचा व पिंडदानाचा) मार्ग खुंटविला आहे अशा.

अजमीर एथें छापलेल्या अथर्वसंहितेंत ऋचा पुढीलप्रमाणें आहे:—अमूर्या यन्ति योषितो हिरा लोहितवाससः। अभ्रातर इव जामयस्तिष्ठन्तु हतवर्चसः (अथर्वसं. १।१७।१). ह्या ऋचेंत जामयः बद्दल योषितः व योषाः बद्दल जामयः, सर्वाः बद्दल हिराः आणि हतवर्त्मनः बद्दल हतवर्चसः असे पाठ आहेत हिराः = रक्तवाहिन्या. हतवर्चसः = ज्यांचें बल नाहींसें झालें आहे अशा. अथर्वसंहितेचे ९ प्रकार आहेत असें म्हणतात. यास्कानें कोणत्या अथर्वसंहितेंतून ऋचा घेतली तें समजत नाहीं. दुर्ग यास्काचे शब्द जसेच्या तसेच देतो, परंतु विवरण करतांना तो तिष्ठन्तु असा ऋचेचा पाठ घेतो व ऋचेचा अर्थ पुढीलप्रमाणें करतो:—

प्रसवमार्गवहनरोगिणी या स्त्री भवति तस्याः तत्प्रतीकारकर्मणि विनियुज्यते। अमूः याः यन्ति स्रवन्ति नाड्यः रक्तम् अजस्रम् अविरताः स्त्रियः इव अति लोहितवस्त्राः सर्वाः एताः तिष्ठन्तु उपरमन्तु हतलोहितवहनमार्गाः अस्य मन्त्रस्य वीर्येण। यथा काश्चित् अभ्रातृकाः योषाः हतभर्तृवंशमार्गाः तिष्ठन्ति संतानकर्मणे पिण्डदानाय एवम् एताः नाड्यः तिष्ठन्तु = रोगामुळें ज्या स्त्रीचा प्रसूतिमार्ग सारखा रक्तबंबाळ असतो त्या स्त्रीचा तो रोग बरा करण्याकरितां जो विधि केला जातो त्या विधींत ह्या मंत्राचा विनियोग केला जातो. अतिशय तांबडें असें वस्त्र ज्यांचें झालें आहे अशा स्त्रियांप्रमाणें ह्या ज्या नाड्या रक्त सारखें स्रवत आहेत त्या तसें करण्यापासून थांबोत. रक्त वाहण्याचा त्यांचा तो मार्ग बंद पडो. ज्यांना भाऊ नाहींत अशा स्त्रिया जशा नवऱ्याच्या वंशवृद्धीच्या व पितरांना पिंड देण्याच्या मार्गाच्या आड येतात म्हणजे नवऱ्याच्या वंशवृद्धीचा मार्ग बंद पाडतात त्याप्रमाणें ह्या नाडया रक्त वाहण्याचा मार्ग बंद पाडोत.' ह्याप्रमाणें हतवर्त्मनः ह्याचे दोन अर्थ करावे लागतात.

**इति अभ्रातृकायाः अनिर्वाहः औपमिकः**

ह्या ऋगर्धांत जी उपमा आहे तिच्यावरून अभ्रातृका अशी जी स्त्री तिच्याशीं विवाह करणें निषिद्ध आहे ही गोष्ट अनुमानानें सिद्ध होते. ऋचेचा पहिला अर्ध मूळ निरुक्तांत नसतांनाही महाराष्ट्रपाठांत तो घातला गेला आहे.

**तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय**

ह्याच गोष्टीचें जास्त विवेचन व्हावें म्हणून पुढील ऋचा दिली आहे.

## खंड ५ वा.

**अभ्रातेव पुंस एति प्रतीची गर्तारुगिव सनये धनानाम्।**
**जायेव पत्य उशती सुवासा उषा हस्रेव नि रिणीते अप्सः (ऋ. सं १।२४।७)**
**अभ्रातृका इव पुंसः पितॄन् एति अभिमुखी संतानकर्मणे पिण्डदानाय न पतिम्**

अभ्राता = अभ्रातृका. पुंसः = पितॄन्. पुंसः शब्द भाष्यांत कां घातला तें समजत नाहीं. ऋचेंतील ज्या शब्दांचा अर्थ यास्क भाष्यांत देतो त्या शब्दांचा उल्लेख तो करीत नसतो. प्रतीची = अभिमुखी=कडे. प्रतीची हा शब्द प्रत्यच् ह्याचें स्त्रीलिंग आहे; व प्रत्यच् शब्द प्रति + अञ्च् ह्यापासून झाला आहे. प्रति + अञ्च् = कडे, सामोरें, जाणें.

संतानकर्मणे० पतिम् हे शब्द अध्याहृत आहेत. जिला भाऊ नाहीं अशी स्त्री वंशवृद्धीकरितां व पितरांना पिंड देण्याकरितां आपल्या बापाकडे जाते, पतीकडे जात नाहीं; म्हणजे ती बापाच्या वंशाची वृद्धि करते व तसें करून त्याच्या पितरांना पिंड पोंचविते. वास्तविक विवाहित स्त्रीनें नवऱ्याची वंशवृद्धि केली पाहिजे व त्याच्या पितरांना पिंड पोंचविले पाहिजेत. अभ्रातृका स्त्री जशी आपल्या पित्याकडे परत जाते तशी उषा लोकांकडे दररोज परत येते.

**गर्तारोहिणी इव धनलाभाय दाक्षिणाजी**

गर्तारुक् = गर्तारोहिणी. सनये धनानाम् = धनलाभाय. दाक्षिणाजी हा शब्द अध्याहृत घेतला आहे. सायणभाष्यांत दाक्षिणाजा असा पाठ आहे. दाक्षिणाजी=दाक्षिणात्या = दक्षिण हिंदुस्थानांत जन्मलेली. दक्षिणस्यां दिशि भवा दाक्षिणा. दाक्षिणा म्हणजे दक्षिणेकडील भूमि; अशा भूमींत जी जन्मते ती दाक्षिणाजा. दाक्षिणाजी हें रूप कसें झालें तें समजत नाहीं. दाक्षिणा स्त्री असें दुर्गवृत्तीच्या कांहीं पोथ्यांत सांपडतें. तेव्हां तो मूलपाठ असण्याचा पुष्कळ संभव आहे.

**गर्तः सभास्थाणुः । गृणातेः । सत्यसंगरो भवति**

गर्त म्हणजे सभेमध्यें ठेवलेला, ज्याच्यावर फासे टाकावयाचे असा, चौरंग. चौरंगाला गर्त म्हणण्याचें कारण त्याच्यावर जें पडलेलें दान असेल तेंच सांगावयाचें, खोटें सांगावयाचें नाहीं असा तत्संबंधीं कायदा आहे. म्हणजे गर्त शब्द 'गॄ' धातूपासून झाला आहे. संगरः = प्रतिज्ञा ( अमर ३।३।१६७ ).

**तं तत्र या अपुत्रा या अपतिका सा आरोहति । तां तत्र अक्षेण आघ्नन्ति । सा रिक्थं लभते**

महाराष्ट्रपाठांत अक्षेण ह्याच्याबद्दल अक्षैः असा पाठ आहे. दुर्गवृत्तींत 'तत्रगता सती अपुत्रा रिक्थं लभते' एवढेच शब्द आहेत; म्हणजे 'तां तत्र अक्षेण आघ्नन्ति' हे शब्द नाहींत. जिला नवरा नाहीं व पुत्र नाहीं अशी स्त्री चौरंगावर चढते म्हणजे बसते; तेथें तिला लोक फाशांनीं मारतात व मग तिला धन मिळतें. असा दक्षिण हिंदुस्थानांत रिवाज आहे. नवऱ्याचा ज्या धनभागावर हक्क असेल तो धनभाग त्याच्या भावांपासून तिला मिळतो असें दुर्ग म्हणतो. एवम् उषाः अपरकाले रात्र्यां नभः आरोहति ( दुर्ग ) = अशा स्त्रीप्रमाणें रात्र संपते तेव्हां उषा आकाशांत चढते म्हणजे येते.

**श्मशानसंचयोऽपि गर्तःउच्यते । गुरतेः । अपगूर्णो भवति**

पुरलेल्या माणसांच्या खड्ड्यांवरील जे मातीचे ढीग असतात त्यांनांही गर्त

अशी संज्ञा आहे. अपगूर्णः=उद्यतः. अशा ढिगांच्या संचयाला गर्त म्हणण्याचें कारण तो वरतीं आलेला असतो. गुरी उद्यमने ( धा०पा० ६।११६ ). 'गुर्' उद्युक्त होणें. असे खड्डे लोकांचा नाश करण्याला अगदीं तयार असतात. तेथें असणारीं पिशाच्चें माणसें मरतात केव्हां व स्मशानांत येतात केव्हां अशी सारखी वाट पाहतात. माणसें मरावयास लागलीं म्हणजे त्यांना अत्यानंद होतो. ह्याअर्थी असणारा गर्त शब्द 'गुर्' धातूपासून झाला आहे. 'अपगूर्णो भवति' हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत.

**श्मशानं श्मशयनम् । श्म शरीरम्**

श्मशानं = श्म + शानम्. शानं=शयनम् = निजणें. श्मशानम् = मेलेल्या देहांची निजण्याची जागा.श्म म्हणजे शरीर. शरीराला श्म म्हणण्याचें कारण सरतेशेवटीं तें त्या ठिकाणीं निजतें. ' तत् हि तत्र शेते ' असे दुर्गाचे शब्द आहेत; त्यावरून 'श्म शरीरं शेतेः' असा त्याचा पाठ असावा.

**शरीरं शृणातेः शम्नातेः वा**

शरीर शब्द ' शृ ' किंवा ' शम् ' हिंसा करणें ह्यापासून झाला आहे. दुर्ग म्हणतोः–ही व्युत्पत्ति निरुक्त २।१६ एथें वृत्राच्या शरीरासंबंधानें दिली आहे. वास्तविक वृत्राला शरीर वगैरे कांहीं नसतें; तेव्हां तेथें दिलेली शरीर शब्दाची व्युत्पत्ति त्या ठिकाणीं गौण म्हणजे अनवश्यक आहे; एथें ती मुख्य आहे. ह्या दुर्गाच्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. शरीर शब्दाची एथें दिलेली व्युत्पत्ति प्रक्षिप्त असावी. नसल्यास दुसरा शरीरं हा शब्द मूळ पाठांत नसावा. म्हणजे तो ' श्म शरीरं शृणातेः शम्नातेः वा ' असा किंवा 'श्म शरीरं शम्नातेः' एवढाच मूळ पाठ असेल. म्हणजे श्म = शम. श्म शम् नाश पावणें ह्यापासून झाला आहे.

**श्मश्रु लोम । श्मनि श्रितं भवति**

श्मश्रु = लोम. लोम म्हणजे रोम. श्मश्रु = श्म + श्रु. श्म = श्मनि. हें श्मन् शब्दाचें सप्तमीचें एकवचन होय. श्रु = श्रितम् = अवलंबून असलेलें. लोम ह्याला श्मश्रु म्हणण्याचें कारण ते अंगावर असतात. ' श्रितं ' ह्याच्या ऐवजीं गुर्जरपाठ 'शृतं' असा आहे; तो चुकीचा आहे.

**लोम लुनातेर्वा लीयतेर्वा**

लोम शब्द ' लू ' छेदणें, कापणें, (धा. पा. ९।११ ) किंवा ' ली ' चिकटून असणें (धा. पा. ४।३३) ह्यापासून झाला आहे. केंस कापतात व ते अंगावर असतात.

**न उपरस्य आविष्कुर्यात् । यत् उपरस्य आविष्कुर्यात् गर्तेष्ठाः स्यात् प्रमायुकः यजमानः इत्यपि निगमो भवति**

यूपाचा खालचा जो पांचवा भाग त्याला उपर म्हणतात. हा भाग तासलेला नसतो; म्हणजे मूळचें लांकूड जसें खडबडीत असेल तसा तो असतो. हा भाग खड्ड्यांत पुरावयाचा असतो. तो बाहेर दाखवूं नये म्हणजे तो दिसतां कामा नये.

तो दृष्टीस पडल्यास यजमान गर्तेमध्यें जाऊन पडतो म्हणजे मरतो असें ब्राह्मण-वचन आहे. गर्त म्हणजे श्मशानसंचय; हा अर्थ दाखविणारें हें ब्राह्मणवचन आहे. महाराष्ट्रपाठ ' आविः कुर्यात् ' असा दोन्ही ठिकाणीं आहे. हल्लींच्या मैत्रायणीसंहितेंत ( ३।९।४ ) पहिल्या ' आविष्कुर्यात् ' बद्दल ' आविः कर्तवै ' व गर्तेष्ठाः 'बद्दल ' रथेष्ठाः ' किंवा ' रतेष्ठाः ' किंवा 'रर्तेष्ठा' असे पाठ आहेत.

**रथः अपि गर्तः उच्यते । गृणातेः स्तुतिकर्मणः । स्तुततमं यानम्**

रथालाही गर्त म्हणतात, रथ ह्या अर्थी गर्त शब्द गृ स्तुति करणें ह्यापासून झाला आहे. रथाला गर्त म्हणण्याचें कारण सर्व वाहनांत तें वाहन अति स्तुत्य म्हणजे श्रेष्ठ होय.

**आरोहथो वरुण मित्र गर्तम् ( ऋ. सं. ५।६२।८ ) इत्यपि निगमो भवति**

हे मित्रावरुणांनो, तुम्ही रथांत चढतां अशी अर्थाची ऋचाही आहे.

गर्तारुक् शब्द गर्तम् आरोहति असा समास आहे. वरील ऋचेंत गर्तम् आरोहथः ह्याचा जो अर्थ तोच अर्थ गर्तारुक् ह्याचा असला पाहिजे. भेद एवढाच कीं गर्तारुक् नंतर इव आहे, आरोहथः नंतर नाहीं. पण तेवढ्यानें अर्थभेद कां व्हावा ?

**जाया इव पत्ये कामयमाना सुवासाः ऋतुकालेषु**

उशती = कामयमाना. ऋतुकालेषु हें अध्याहृत आहे. ऋतुकालीं सुंदर सुंदर वस्त्रें लेऊन स्त्री जशी नवऱ्याला स्वतःचें सौंदर्य दाखविते तशी उषा लोकांना आपलें सौंदर्य दाखविते.

**उषाः हसना इव दन्तान् विवृणुते रूपाणि**

हस्रा = हसना = स्मित करणारी. दन्तान् हें अध्याहृत आहे. निरिणीते = निवृणुते = उघड करते; उघडून दाखविते. अप्सः = रूपाणि. जशी एखादी हंसरी स्त्री आपले दांत दाखविते तशी उषा रात्रीनें झांकून टाकिलेली सर्व वस्तूंचीं रूपें प्रकट करते. उजाडल्याबरोबर सर्व जग दिसूं लागतें.

ऋचेचा यास्कानें केलेला अर्थः—जिला भाऊ नाहीं अशी विवाहित कन्या पित्याच्या वंशवृद्धीकरितां व त्याच्या पितरांना पिंड मिळावेत म्हणून आपल्या माहेरच्या माणसांकडे येते तशी उषा लोकांकडे येते; जिला पुत्र नाहीं अशी दक्षिण हिंदुस्थानांतील स्त्री धनलाभाकरितां ज्या चौरंगावर फांसे टाकतात त्या चौरंगावर येऊन बसते ( व द्यूतकार सासऱ्याकडून मिळणारें धन तिला देववितात ) तशी उषा द्युलोकीं येऊन बसते; ऋतुकालीं पतिसमागमाची इच्छा करणारी स्त्री जशी सुंदर वस्त्रें परिधान करून त्याला आपलें सौंदर्य दाखविते तशी उषा लोकांपुढें प्रगट होते; जशी एखादी हसतमुख स्त्री आपले सुंदर दांत दाखविते तशी उषा अंधारांत अदृश्य झालेल्या वस्तूंचीं रूपें दाखविते.

**इति चतस्रः उपमाः**

अशा ह्या ऋचेंत चार उपमा आहेत.

भ्रातृ शब्द भ्रा धातूपासून झाला आहे. भ्रा = देणें. धन. भ्राता = देणारा. भ्रात्र व भ्रातृत्व म्हणजे धन. बभ्रे व बभ्राणः हीं कदाचित् भ्रा धातूचीं रूपें असतील व बभ्रि हें नाम असेल. अ = अतिशय. भ्रा = धन. मत्वर्थी त प्रत्यय. अभ्रा = अति धनवती. प्रति+अञ्च् = धन देणें. प्रतीची = गर्तारुक् = धन देणारी. जा = या = धन. जाया = धनवती. सु = वासस् = धन. सुवासाः = धनवती. हस्कार, हस्कृति, हस्कर्ता व हस्त ह्यांत हस् ( = देणें; धन ) हा धातु आहे. हस्+रा = हस्रा = धन देणारी. पौंस्य ( =धन ) हें पुंस्चें तद्धित रूप. सुभग व सौभग ह्या दोहोंचाही अर्थ धन; तसा पुंस् व पौंस्य ह्यांचाही. इ = देणें. एति = देतो.

बृहन्तं गर्तमाशाथे (५।६८।५) = मित्र व वरुण पुष्कळ (बृहन्त) धन (गर्तं) देतात (आशाते). नमस्वन्ता धृतव्रताधि गर्ते मित्रासाथे वरुणेळास्वन्तः (५।६२।५) = धनवान् (नमस्वन्तौ) व धनदाते (धृतव्रतौ) असे मित्र व वरुण धनांत (गर्ते = इळासु अन्तः) धन घालतात (आसाथे) अधिगर्त्यस्य मध्वः (५।६२।७) = धनानें भरलेल्या धनाचें. स्तुहि श्रुतं गर्तसदं युवानम्(२।३३।११) = धनवान् (श्रुतं) व धन देणारा (गर्तसदं = युवानं) जो अग्नि त्याची याचना कर. गॄ = देणें. गॄ+त = गर्त = दिलेलें, धन. गर्त शब्द एकंदर ८ वेळां आला आहे. दोन ठिकाणीं म्हणजे गर्तारुक् व आरोहथ एथें आरुह् धातु असल्यामुळें गर्त म्हणजे रथ असा अर्थ प्रथम मनांत येतो. पण आरुह् हा धातु ऋग्वेदांत देणें ह्या अर्थी आढळतो. आ रोहतायुर्जरसं वृणानाः (१०।१८।६) = हे देवांनो, दाते (वृणानाः) तुम्ही धन (आयुः = जरसं) द्या (आरोहत). पवस्व देवायुषमिन्द्रं गच्छतु ते मनः । वायुमा रोह धर्मणा (९।६३।२२) = हे दात्या (देव) सोमा, धन (आयुषं) दे (पवस्व); तुझें धन (मनः) आमच्या भांडाराकडे (इन्द्रं) जावो; धनासह (धर्मणा) धन (वायुं) दे (आरोह). आरोह सूर्ये सुकृतस्य लोकं (१०।८५।२०)= हे सूर्ये, पतीला धन (सुकृतस्य लोकं) दे (आरोह) पुण्यलोकांत चढ असा अर्थ केला जातो तो चुकीचा आहे. गर्तारुक् = धन देणारी. गर्तम् आ रोहथः = धन देतात.

रि = देणें. असुर्यं वर्णं नि रिणीते अस्य तत् ( ९।७१।२ ) सोम स्वतःचें अमूप ( असुर्यं ) धन ( वर्णं = तत् ) देतो ( नि रिणीते ). दीर्घाप्साः (१।१२२।१५) व सहस्राप्साः (९।८८।७) एथें अप्सस् म्हणजे धन. एषा प्रतीची दुहिता दिवो नॄन् । योषेव भद्रा नि रिणीते अप्सः (५।८०।६) = द्यूची मुलगी उषा, धनवती ( भद्रा ) असल्यामुळें, धन ( नॄन् = अप्सः ) देते. निरिणीते = अप्सः = धन देते.

धनवती ( अभ्राता = जाया = सुवासाः ) व धन देणारी ( गर्तारुक् = उशती = हस्रा ) उषा लोकांजवळ धन सांठावें ( धनानां सनये ) म्हणून त्यांस धन ( नि = पुंसः = अप्सः ) देते ( एति = रिणीते ). ह्या ऋचेंत ४ इव आहेत; ते सर्व निरर्थक वाटतात; कदाचित् इव सार्थ असेल.

**न अभ्रात्रीम् उपयच्छेत । तोकं ह्यस्य तत् भवति इति अभ्रातृकायाः उपयमनप्रतिषेधः प्रत्यक्षः पितुश्च पुत्रभावः**

जिला भाऊ नाहीं अशा स्त्रीशीं लग्न करूं नये; कारण ती आपल्या बापाची वारस होते. ह्यावरून प्रस्तुत ऋचेंत अभ्रातृकेशीं लग्न करणें निषिद्ध आहे हें स्पष्ट होतें व तिला होणारा मुलगा तिच्या बापाचा पुत्र होतो हेंही स्पष्ट आहे.

अथर्वसंहितेंतील ऋचा देऊन उपमेनें अभ्रातृकेशीं लग्न करूं नये असें सिद्ध केलें आहे तेव्हां प्रस्तुत ऋचेची कांहीं आवश्यकता नव्हती.

'पितुश्च पुत्रभावः' हें विवाहप्रतिषेधांतून अनुमानानें निघतें. ती बापाकडे जाते म्हणजे त्याची ती पुत्र होते. हा सगळा भाग प्रक्षिप्त असावा असें वाटतें. त्यामुळें चवथ्या खंडाच्या शेवटचे शब्द 'तस्योत्तरा भूयसे निर्वचनाय' हेही प्रक्षिप्त असावेत.

**पिता यत्र दुहितुः अप्रत्तायाः रेतस्सेकं प्रार्जयति**

सेकं = रेतस्सेक = रेत सिंचन करणारा असा पति. ऋञ्जन् = प्रार्जयति = संपादन करतो. अ+प्रत्ता = न दिलेली. अप्रत्तायाः हा शब्द अध्याहृत आहे. (यत्र) जेव्हां (= तेव्हां) बाप जी दिली गेली नाहीं म्हणजे जिचें लग्न झालें नाहीं (अप्रत्तायाः) म्हणजे जिच्याशीं कोणी लग्न करूं इच्छित नाहीं अशा आपल्या मुलीकरतां नवरा मिळवितो.

**संदधाति आत्मानं संगमेन मनसा इति**

सं+दधन्वे = संदधाति = ठराव करतो. आत्मानं हा शब्द अध्याहृत आहे. शग्म्येन = संगमेन. संदधाति अभिसंदधाति आत्मानं यत् अत्र अपत्यम् उत्पत्स्यते तत् मम इति। संगमेन मनसा विगतापुत्रत्वसंतापेन चेतसा। न अहम् अपुत्रः इयम् एव पुत्रिका मम पुत्रः। योहि अस्यां उत्पत्स्यते स पौत्रः मम भविष्यति इत्येवं सुखेन मनसा संदधाति आत्मानं तस्यां पुत्रिकायाम् ।तत्र एवं सति यः तस्याम् एव कृतपुत्रिकाधर्मिण्याम् उत्पद्यते दौहित्रः तमेव नप्ता मम अयम् इत्येवम् उपगच्छति मातामहः (दुर्ग) हिच्यापासून जें अपत्य उत्पन्न होईल तें माझें असें स्वतःचें समाधान करतो. संगमेन म्हणजे मी निपुत्रिक आहे हें भाजणारें दुःख ज्यांत नाहीं अशा मनानें. मी निपुत्रिक नाहीं; ही पुत्रिका माझा पुत्र. हिच्यापासून जो पुत्र जन्माला येईल तो माझा पौत्र. असें तो स्वसमाधान करतो. ही दुहिता माझी पुत्रिका म्हणजे पुत्र. हिच्यापासून जन्मणारा माझा नातू अशा समजुतीनें तो नातवाकडे (नप्त्यं) जातो (गात् = उपगच्छति) अशा रीतीनें सगळी भिस्त तिच्यावर ठेवतो.

शासद्वह्नि ही ऋचा अति कठीण आहे. बऱ्याच शब्दांचा अर्थ करणें बहुतेक अशक्य आहे. स्मृतिकारांनीं ओढाताण करून अस्वाभाविक अर्थ व विवरण केलें आहे. हे स्मृतिकार कोण? हल्लींच्या स्मृतिग्रंथांत ही ऋचा आढळत नाहीं. यास्ककालीन स्मृतिग्रंथ नाहींसे झाले.

नप्त्यं हें नप्ती शब्दाचें द्वितीयेचें एकवचन. नप्तीः नप्त्यौ नप्तीः नप्त्यः। नप्त्यं असा नप्ती शब्द चालतो. ऋग्वेदांत नप्त्यं, नप्तीः, नप्त्यः, नप्त्या, नप्तीभिः व नप्त्योः एव-

ढींच रूपें आढळतात. आदितेः नप्तीः, रथस्य नप्त्यः, रणस्य नप्त्या, विवस्वतः नप्तीभिः, असे प्रयोग आहेत. नप्ती शब्द स्त्रीलिंगी आहे. तेव्हां नप्त्यं नप्तारं हा अर्थ चुकीचा आहे. नपात्‌चा अर्थ अपत्य असा निघंटूंत दिला आहे; नातू हा अर्थ दिला नाहीं. नपात् = (१) दाता, (२) दान, (३) धन असे अर्थ असावेत. नप्ती ह्याचेही तेच अर्थ असावेत. दुहितुः नप्त्यं = दुहितेचें धन. ही दुहिता कोणाची ? दु = हि = तृ = देणें किंवा धन. तिन्ही एकत्र केल्यानें दुहितृ शब्द बनतो व त्याचा अर्थ अतिशय धन असा होतो. दुहितुः नप्त्यं = धनाचें दान. वह्निः = धनाचा वाहक किंवा दाता. ऋतस्य धनस्य दीधितिं दानं विद्वान् सपर्यन्. धि = देणें. अभ्यासानें दीधि. दीधि+तिः = दान. विद् = देणें. विद्वान् = देणारा. सपर् किंवा सबर् = धन. सपर्यन् = धन देणारा, देणारा. पि = देणें. पि+ता = दाता. सेक = धनाचा प्रवाह. शग्म = धन. शग्म्य = धनानें भरलेलें. मनस् = धन. सं = धन. धन्व् = देणें. जसें:- तं० देवासो देवं दधन्विरे (८।१९।१) = धनवान् देव धनवान् अग्नि देते झाले. धनाचें (ऋतस्य) दान ( दीधितिं ) देणारा ( विद्वान् = सपर्यन् ) दाता ( वह्निः ) धनाचें ( दुहितुः ) दान ( नप्त्यं ) देता झाला ( शासत् = गात् ). ह्यावेळीं ( यत्र ) दाता ( पिता ), धनाचें ( दुहितुः ) दान ( सेकं ) देणारा ( ऋञ्जन् ) भरपूर ( शग्म्येन ) धनानें ( मनसा ) युक्त असें धन ( सं ) देता झाला ( दधन्वे ) - असा खरा अर्थ असावासें वाटतें.

ऋग्वेदासारखा चमत्कारिक ग्रंथ जगांत खास नसेल. शब्द अगदीं परिचित असे वाटतात; पण त्यांचा अर्थ अनपेक्षित होतो.

**अथ एतां जाम्याः रिक्थप्रतिषेधे उदाहरन्ति**

मुलीला दायभाग मिळूं नये असें सिद्ध करण्याकरितां स्मृतिकार पुढील ऋचा उदाहृत करितातः—

**ज्येष्ठं पुत्रिकायै इत्येके**

परंतु कित्येक म्हणतात कीं, सासरा आणि जामात ह्यांच्यामध्यें ठराव झाल्यावर जर त्या सासऱ्याला मुलगे झाले तर जिला पुत्रिका असें मानिलें गेलें तिला द्रव्याचा सर्वांत मोठा भाग मिळावा अशा अर्थाची ही ऋचा आहे.

'ज्येष्ठं पुत्रिकायै इत्येके' हे शब्द प्रक्षिप्त असावेत; कारण यास्कानें ऋचेचा तसा अर्थ केला नाहीं.

## खंड ६ वा.

**न जामये तान्वो रिक्थमारैक् चकार गर्भं सनितुर्निधानम् ।**
**यदी मातरो जनयन्त वह्निमन्यः कर्ता सुकृतोरन्य ऋन्धन् (ऋ. सं. ३।३१।२)**
**न जामये भगिन्यै । जामिः अन्ये अस्यां जनयन्ति जाम् अपत्यम् ।**

जामये = भगिन्यै = बहिणीला.

दुसरें म्हणजे परकुलांतील लोक तिच्यांत 'जा' म्हणजे अपत्य उत्पन्न करतात म्हणून तिला जामि म्हणावयाचें. म्हणजे जामि शब्द जन् जा 'उत्पन्न करणें' ह्या पासून झाला आहे. जा+मिः = जामिः, किंवा मि नामकरण प्रत्यय.

**जमतेः वा स्यात् गतिकर्मणः। निर्गमनप्राया भवति**

'जम्' जाणें ह्यापासून जामि शब्द झाला असेल. कारण बहिण बहुतकरून परकुलांत जाते म्हणजे तिचें लग्न होतें. ह्या दोन्हीही व्युत्पत्ति प्रक्षिप्त आहेत कारण त्या दुर्गवृत्तींत नाहींत.

**तान्वः आत्मजः पुत्रः रिक्थं प्रारिचत् प्रादात्**

तान्वः = आत्मजः = पुत्रः. दुर्गवृत्तींत पुत्रः शब्द नाहीं, व त्याची जरूरीही नाहीं. तान्वः म्हणजे शरीरापासून झालेला. अङ्गादङ्गात्संभवसि ( खंड ४ ) ही ऋचा पहावी. आरैक् = प्रारिचत् = प्रादात् = देता झाला.

**चकार एनां गर्भनिधानीं सनितुः हस्तग्राहस्य**

गर्भं निधानम् = गर्भनिधानीं = गर्भधारण करणारी.दुर्गवृत्तींत गर्भनिधानं असें आहे. सनितुः = हस्तग्राहस्य = लग्नांत हस्तग्रहण करणाऱ्या नवऱ्याची. एनां हा शब्द अध्याहृत घेतला आहे.

**यत् इह मातरः अजनयन्त वह्निं पुत्रम् अवह्निं च स्त्रियम्**

गुर्जरपाठांत 'यदिह' याच्या ठिकाणीं 'यदी' असें आहे; व दुर्गवृत्तीच्या उत्तम पुस्तकांत यदी असेंच आहे, व त्यांत 'इह' हा शब्द गाळला आहे. यदी = यदि = जेव्हां. जनयन्त = अजनयन्त. वह्निं = पुत्रम्. पुत्राला वह्नि म्हणण्याचें कारण तो वधूचा वोढा असतो; म्हणजे तो लग्नानें वधू मिळवतो. 'अवह्निं च स्त्रियम्' हे शब्द अध्याहृत घेतले आहेत. स्त्री ही स्वतः वधू असल्याकारणानें तिला अवह्नि म्हटलें आहे.

**अन्यतरः संतानकर्ता भवति पुमान् दायादः**

अन्यः = अन्यतरः. कर्ता = संतानकर्ता. दुर्गवृत्तींत 'कर्ता भवति सन्तानकर्मणः' असें आहे. ' भवति पुमान् दायादः' हे शब्द अध्याहृत आहेत.

**अन्यतरः अर्धयित्वा जामिः प्रदीयते परस्मै**

अन्यः = अन्यतरः. ऋन्धन् = अर्धयित्वा = वाढवून. सुकृतोः = तयोः उभयोः अपि सुकृतयोः सुतराम् एकेन अपि प्रयत्नेन कृतयोः उत्पादितयोः = मुलगा व मुलगी हीं एकाच म्हणजे सारख्याच प्रयत्नानें उत्पन्न होतात, त्यांपैकीं असा सुकृतोः याचा दुर्ग अर्थ करतो. खरा अर्थ खंडाच्या शेवटीं दिला आहे. शेवटले तीन शब्द अध्याहृत आहेत. ही ऋचा पहिल्या ऋचेपेक्षांही कठीण आहे. स्मृतिकार आणि यास्क यांनीं केलेला अर्थ ओढाताणीचा व चुकीचा आहे हें सांगणें नको.

' चकार गर्भं सनितुर्निधानं ' ह्याचा अर्थ लागत नाहीं. दुर्ग ह्या शब्दांचा पुढीलप्रमाणें अर्थ करतोः– "करोति गर्भनिधानं सनितुः हस्तग्राहस्य भगिनी भर्तुः। प्रसवसमर्थां करोति। पुष्णाति इत्यर्थः = जो तिच्याशीं लग्न करितो तो तिच्या ठायीं

गर्भ ठेवतो. असा गर्भ धारण करण्याला बहिणीला भाऊ समर्थ करतो म्हणजे तिला खायलाप्यायला घालून धष्टपुष्ट करतो." जा = मि = धन. जा + मिः = धनाचा सांठा. किंवा जा धनम्। तेन युक्तः मिः धनं यस्य सः = अतिनवान्. ह्या दुसऱ्या विग्रहानें जामि शब्द बहुव्रीहि होतो व त्यामुळें तिन्ही लिंगीं वापरला जातो. न = धन. जसें:– न जामिभिर्वि चिकिते वयो नो विदा देवेषु प्रमतिं चिकित्वान् (१।७१।७) = अग्नि आम्हांला (नः) धनासह (जामिभिः) धन (न = वि = वयः) देतो (चिकिते); हे अग्नि दाता (चिकित्वान्) तूं आमच्या धनभांडारांत (देवेषु) धन (प्रमतिं) दे [प्रमतिं] दे [विदा] म्हणजे घाल, नवेदस शब्द न+वेदस् असा आहे; न=वेदस्=धन तनू = धन. तन्वा युक्त = तान्चः = धनवान् रिच् = देणें. रिच् + थं = दान, धन. धनवान् [तान्व] अग्नि धनभांडारांत भर पडावी म्हणून [जामये] धन [न = रिक्थं] देता झाला [रिरिचे]. चकार = देता झाला. गर्भ = निधानं = धनभांडार. स = नि = तृ = धन. सनिता = धन. अग्नि धनाचा [सनितुः] सांठा [गर्भं = निधानं] देता झाला [चकार]. सनितुः हा दुहितुः सारखा शब्द आहे [खंड ५ पहा].

मा = देणें. मा + तृ = देणारा. मातरः = देणारे देव. जेव्हां [यदी] देणारे देव [मातरः] दात्याला [वन्हिं] धनयुक्त करते झाले [जनयन्त] सु = कृत् = धन. सु धनम्। तेन युक्तं कृत् धनं ययोः तौ सुकृतौ। तयोः. हे दोन धनवान् कोण? वन्हिं हें एकवचन आहे. वन्ही असें द्विवचन असल्यास सुकृतोः वगैरेचा कांहींतरी अर्थ लागेल. त्या दोन धनवंतांपैकीं [सुकृतोः] एक [अन्य] दाता [कर्ता] होतो; व एक संचय करणारा [ऋन्धन्?] होतो.

ऋक् फारच कठीण आहे व तिचा अर्थ करणें बहुतेक अशक्य आहे. स्मृतिकारांनी केलेला अर्थ चुकीचा आहे; माझा चुकीचा नाहीं कशावरून?

## खंड ७ वा.

**मनुष्यनामानि उत्तराणि पञ्चविंशतिः (२।२)। मनुष्यः कस्मात्**

पुढील २५ नामें मनुष्यवाचक होत. मनुष्य शब्द कशापासून?

**मत्वा कर्माणि सीव्यन्ति**

मनुष्याः = मनु + स्याः. मनु = मत्वा. स्याः = सीव्यन्ति. विचार करून [मत्वा] मग कामें शिवतात म्हणजे करतात. म्हणजे मन् विचार करणें व षिव् शिवणें ह्या दोन धातूंपासून झाला आहे. षिवु तन्तुसंताने [धा० पा० ४।२].

**मनस्यमानेन सृष्टाः**

मनु = मनस्यमानेन. स्याः = सृष्टाः. आनंदित होऊन प्रजापति ह्यांस निर्माण करता झाला. मनुष्य सर्व प्राण्यांत श्रेष्ठ; म्हणून त्याला उत्पन्न करतांना प्रजापतीला अत्यानंद झाला. इतर प्राण्यांच्यावेळीं केव्हां केव्हां त्याला त्रासही झाला असेल, किळसही आला असेल.

**मनस्यतिः पुनः मनस्वीभावे**

मनस्यमानेन ह्यांत जो मनस्य् धातु त्याचा अर्थ आनंद, हर्ष पावणें. मनस्वीभावः प्रहृष्टता [दुर्ग]. पण मनस्वी म्हणजे शहाणा, विचारी. मनुष्याला उत्पन्न करतांना प्रजापतीला फार शहाणपणा, फार चातुर्य दाखवावें लागलें, फार विचार करावा लागला.

**मनोः अपत्यम्। मनुषः वा**

मनु + स्यः. स्यः प्रत्यय अपत्यार्थी. किंवा मनुस् + यः. यः अपत्यार्थी. मनोर्जातावञ्यतौ षुक् च [पा० ४।१।१६१] = मनूपासून जन्मलेला अशा अर्थी मनुशब्दापासून शब्द सिद्ध करावयाचा असेल त्यावेळीं मनु शब्दाला अञ् किंवा यत् प्रत्यय लागून शिवाय आधीं ष् आगम होतो. मनु + ष् + अञ् = मानुषः. मनु + ष् + अञ् = मनुष्यः. मूळशब्द मनुस् असून त्यापासून मानुष व मनुष्य शब्द झाले असें मीं मनुस् शब्दावरील एका निबंधांत सिद्ध केलें आहे.

**तत्र पञ्चजनाः ( २३ ) इत्येतस्य निगमाः भवन्ति**

ह्या २५ नामांत पञ्चजनाः असा शब्द असून तो शब्द ज्या ऋचांत आढळतो अशा ऋचाही आहेत. [पुढील ऋचा त्यांपैकीं होय].

## खंड ८ वा.

**तदद्यवाचः प्रथमं मसीय येनासुराँ अभि देवा असाम।**
**ऊर्जाद उत यज्ञियासः पञ्चजना मम होत्रं जुषध्वम्॥ १०।५३।४॥**
**तत् अद्यवाचः परमं मंसीय**

प्रथमं=परमं = श्रेष्ठ. मसीय = मंसीय= मनन करणार आहें, म्हणणार आहें. इतर ठिकाणीं मन् + स् = मंस् असेंच सांपडतें. मंसीय असें रूप पाहिजे; परंतु छंदाकरिता अनुस्वार गाळला आहे.

**येन असुरान् अभिभवेम देवाः**

असाम = भवेम. अभिभवेम = पराभव करूं. ज्या उत्तम स्तुतीनें, हे देवांनो, आम्ही शत्रूंचा पराभव करूं.

**असुराः असुरताः स्थानेषु**

असुराः = अ + सु + राः. राः = रताः आपल्या स्थानीं ते असावे तसे [सु] सुखी किंवा आनंदी नसतात [अ + रताः] म्हणून ते असुर. असुरांना एके ठिकाणीं राहणें गोड वाटत नाहीं म्हणून ते सर्वत्र संचार करतात व लोकांना त्रास देतात. किंवा

**अस्ताः स्थानेभ्यः इति वा**

स्वर्गांतून [स्थानेभ्यः] देवांनीं त्यांना फेकून दिलें म्हणून ते असुर. म्हणजे अस् फेकणें ह्यापासून असुर. अस् + उरः. उराः = ताः किंवा

**अपि वा असुःइति प्राणनाम। अस्तः शरीरे भवति। तेन तद्वन्तः**

असु म्हणजे प्राण. प्राणाला असु म्हणण्याचें कारण तो प्राण शरीरांत ठेवलेला असतो. अस् ठेवणें ह्यापासून असु. ह्या असूनें [तेन] युक्त [तद्वन्तः] ते असुर. र हा मतुबर्थी प्रत्यय. किंवा

**सोः देवान् असृजत तत् सुराणां सुरत्वम्। असोः असुरान् असृजत तत् असुराणाम् असुरत्वम् इति विज्ञायते**

सु म्हणजे प्रशस्त म्हणजे उत्तम असा प्रजापतीच्या शरीराचा भाग; तो भाग म्हणजे डोकें; त्यापासून प्रजापतीनें देवांना उत्पन्न केलें म्हणून सुरांना म्हणजे देवांना सुर म्हणतात. असु म्हणजे अप्रशस्त म्हणजे घाणेरडा असा प्रजापतीच्या शरीराचा भाग; तो पाय किंवा त्याहूनही वाईट म्हणजे गुदद्वार; त्यापासून त्यानें असुरांना उत्पन्न केलें असें ब्राह्मणवचनावरून कळतें. हें ब्राह्मण कोणतें तें कळत नाहीं. सु व असु ह्यांना लाविलेला राः = सृष्टाः = उत्पन्न केलेले या अर्थी प्रत्यय लाविला आहे. अशा व्युत्पत्ति देणें हा सूड घेण्याचाच बालिश प्रकार होय. अशा सुडाचीं उदाहरणें महाभारत वगैरे ग्रंथांत आढळतात. विश्वामित्र जेव्हां वसिष्ठाची गाय नेऊं लागला तेव्हां आपली सुटका होत नाहीं हें पाहून ती संतापली व तिच्या गुदद्वारांतून शकयवन वगैरे बाहेर पडले. सुरन्ति सुराः। सुरऐश्वर्ये (धा० ६।५९) यद्वा सुरा एषामस्तीति सुराः। सुष्ठु राजन्ते इति वा (अमर १।१।७ क्षीरस्वामी) = ऐश्वर्य किंवा सत्ता चालविणारे ते सुर. किंवा समुद्रमंथन केल्यावर सुरा बाहेर आली; ती पिणारे ते सुर. किंवा चांगले शोभतात ते सुर. सुरायाः अपानात् असुराः। सुरविरुद्धाः वा। अस्यन्ति देवान् इति वा (अमर १।१।१२ क्षीरस्वामी) = सुरा प्यायला मिळाली नाहीं ज्यांना ते असुर. किंवा सुरांच्या विरुद्ध ते असुर. किंवा देवांना फेंकून देतात ते. ह्याही व्युत्पत्ति कुचकामाच्या आहेत. असुर शब्द ऋग्वेदांत थोडे अपवाद वगळून देवांनाच लावलेला आढळतो. पारशी व हिंदू ह्यांची जेव्हां फारकत झाली तेव्हां ते एकमेकाच्या धर्माला दूषणें लावूं लागले. अहुर (= असुर) हा पारशी लोकांचा मुख्य देव आहे. हिंदूंच्या देवांना पारशी लोक भुतें म्हणूं लागले व हिंदु लोक असुर शब्द देवांच्या शत्रूंना लावूं लागले. असुरस्य माया असा मी एक निबंध लिहिला आहे; त्यांत त्या शब्दाचें विस्तृत विवेचन केलें आहे.

**ऊर्जाद उत यज्ञियासः। अन्नादाश्च यज्ञियाश्च**

ऊर्जादः = अन्नादाः. ऊर्जादः = घृत व क्षीर भक्षणारे. यज्ञियासः = यज्ञियाः. यज्ञ म्हणजे हवि; ते घेण्यास जे पात्र ते यज्ञिय.

**ऊर्क् (निघण्टुः २।७।१५) इति अन्ननाम। ऊर्जयति इति सतः**

ऊर्क् हें अन्नाचें एक नांव आहे. अन्न बल देतें (ऊर्जयति) तेव्हां त्यास ऊर्क् म्हणतात. ऊर्जय् = बल देणें ह्यापासून ऊर्क्. पण ऊर्जय् हा धातु ऊर्क्पासून झाला आहे. किंवा

**पक्वं सुप्रवृक्णम् इति वा**

पक्क चा प गाळावयाचा, क ह्यांतील अक्षरें फिरवावयाचीं; वक् अशी फिरवा फिरव केल्यावर व चा उ करावयाचा व त्याला रेफार जोडावयाचा. वक् = ऊक् = ऊर्क् म्हणजे पच् पासून ऊर्क् शब्द होतो. किंवा वृक्णं ह्यांतील व् चा ऊ, व ऋ चा र् करावयाचा व ण गाळावयाचा म्हणजे ऊर्क् शब्द उत्पन्न होतो. म्हणजे वृश्च् कापणें ह्यापासून उर्क् शब्द झाला आहे. देवराज सुप्रवृक्तं असा पाठ घेतो, पण वृश्च्चें भूतभूतकाळीं विशेषण वृक्ण होतें. दुर्ग देवराजाप्रमाणें विवरण करून पच् व वृश्च् हे दोन्हीही धातु ऊर्क् मध्यें आहेत असें म्हणतो. धान्य जेव्हां पक्क होतें तेव्हां तें सुप्रवृक्ण होतें म्हणजे सहज ( सु + प्र ) कापलें ( प्र = वृक्णं ) जातें. वृश्च् ह्या धातूपासून ऊर्क् शब्द झाला आहे; त्यांत पच् धातु नाहीं. ह्या सर्व व्युत्पत्ति निराधार आहेत.

**पञ्चजना मम होत्रा जुषध्वम्। गन्धर्वाः पितरो देवा असुरा रक्षांसि इति एके**

पंचजन म्हणजे गंधर्व वगैरे असें कांहीं लोक म्हणतात. पंचजन नांवाच्या पांच आर्य जाति होत्या. त्यांना पञ्च कृष्टयः (ऋ० सं० १०।६०।४॥१०।११९।६), पञ्च क्षितीः ( ७।५५।४ ), पञ्च क्षितीः मानुषीः ( ७।७९।१ ), पञ्चमानुषान् ( ८।९।२ ), पञ्च चर्षणीः ( ५।८६।२॥७।१५।२॥९।१०१।१ ), पञ्च जाता ( ६।६१।१२ ), पञ्च भूमा (७।६९।२), व पञ्च व्राताः (९।१४।२ ) अशींही नांवें होतीं. ते प्रसिद्ध असून त्यांना इतका मान असे कीं त्यांची देवांबरोबर गणना होत असे. ( १।८९।१०॥६।५१।११ ). ते अग्नि, इंद्र, मित्र व अश्विन यांना प्रिय असून पहिल्या दोन देवांची मुख्यत्वेंकरून पूजा करीत. ( ६।६१।४॥८।६३।७ ). ह्या दोघांना पंचजनांत सतत रहावेंसें वाटे ( ५।८६।२ ) व पंचजनांना टाकून तूं आमच्याकडे ये अशी इतर आर्यांना इंद्राची विनवणी करावी लागे. उषा पहिल्याप्रथम त्यांना उठवी ( ७।७५।४॥७।७९।१ ). हे पांच संघ यदु, तुर्वश, द्रुह्यु, अनु व पुरु असे असावेत. ते काल्पनिक नसून खरोखरीचे आर्य होते; ते सुधारलेले असून त्यांना सर्वत्र मान असे. हा इतिहास ऐतरेयब्राह्मणकालीं पार विसरला गेला व देव, मनुष्य, गंधर्व, अप्सरस्, सर्प व पितर् हे पंचजन अशी समजूत झाली ( ऐत. ब्रा. १३।७ ). पंचजनांत असुर व राक्षस ह्यांचा अंतर्भाव केल्यास पञ्चजना मम होत्रं जुषध्वं असे ऋषि कसें म्हणेल असा प्रश्न यास्कापुढें उभा रहावयास पाहिजे होता. शूद्र व निषाद ह्यांसंबंधानेंही तीच शंका यावयास पाहिजे होती. आचार्यांविषयीं अत्यादर व परंपरेला चिकटणें ह्यांपासून विद्येची फार हानि झाली आहे. आदर वाटणें साहजिक आहे व तो वाटावाही. पण आदरानें अंधळें होणें बरोबर नाहीं. पाणिनि वगैरे मनुष्यच; त्यांच्याहातून चुका झाल्या नाहींत कशावरून ? चुका असल्यास त्या दाखविणें हें कर्तव्य समजलें पाहिजे.

**चत्वारो वर्णाः निषादः पञ्चमः इति औपमन्यवः**

पंचजन म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चार वर्ण व निषाद हा

पांचवा. शूद्र हा वेदबाह्य, त्याला माझें होत्र सेवन कर असें कोणी म्हणेल काय ? औप-मन्यवाचीं बहुतेक मतें चमत्कारिक होतीं.

**निषादः कस्मात् । निषदनः भवति**

निषाद शब्द कसा झाला ? निषद्य निषद्य हन्ति ( दुर्ग ) = बसून बसून म्हणजे कोठें तरी, न दिसेल अशा ठिकाणीं लपून बसून तो हिंस्र पशु मारतो. म्हणजे नि + सद् ह्यापासून निषाद शब्द झाला आहे. गुर्जरपाठांत निषदनःभवति हें वाक्य नाहीं. निषदनःच्या जागीं निषूदनः असा शब्द असण्याचा संभव आहे. निषू-दनः = ( हिंस्र पशूंना ) ठार मारणारा.

**निषण्णम् अस्मिन् पापकम् इति नैरुक्ताः**

ज्यांच्यांत पाप ( ठाणें देऊन ) बसलें आहे ते निषाद असें नैरुक्त म्हणतात. अर्थ जरी भिन्न तरी धातु तोच. स्तेन, तायु वगैरेची व्युत्पत्ति नैरुक्त अशीच देतात. त्यांना जिकडे तिकडे पाप दिसत होतें. दुर्गवृत्तींत सौधन्वना इत्येके मन्यन्ते । स च रथ-कारः । तस्य भिन्नकालम् आधानं श्रूयते । मन्त्रभेदश्च' असें ज्यास्त आहे. तेव्हां त्याच्या निरुक्तपाठांत 'सौधन्वनाः इत्येके' असा पाठ होता कीं काय ? निषाद म्हणजे रथकार ह्या म्हणण्यास आधार काय ? रथकार हे वैश्य, फार झाले तर, शूद्र असतील. सुधन्व्याचे मुलगे - ऋभु – हे रथकार होते. अद्‌भुत कृत्यें करून ते देव झाले. पण ते पांच नसून तीनच होते. तेव्हां पंजचन म्हणजे सुधन्व्याचे मुलगे हें म्हणणें बरोबर नाहीं.

ऋचेचा यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला अर्थः— ज्यानें, हे देवांनो, आम्ही असुरांचा पराभव करूं असा वाचेचा तो भाग आज मी पहिल्याप्रथम म्हणेन. हे हवि भक्षण करणारे देव व पंचजनहो, तुम्ही माझा हवि ( होत्रं ) घ्या.

तत् = वाक्, ऊर्ज्, यज्ञ व होत्र ह्या सर्वांचा अर्थ धन. प्रथमं = धनानें भरलेलें. मन् = मागणें. मसीय = मागेन. दि = देणें. दि + वः = देवः = देणारा किंवा धन-वान्. अ = सु = र = धन. असुरः = अति धनवान्. अभिभवेम = मागें टाकूं. जुष् = देणें. आज मी धनाचा ( वाचः ) खूप मोठा भाग ( प्रथमं तत् ) मागेन ( व मिळ-वीन ) कीं ज्यानें धनवान् होऊन ( देवाः ) आम्ही धनवंतांना मागें सारूं. अहो धनिक व धनद ( ऊर्जादः = यज्ञियासः ) पंचजनहो, मला ( मम = मह्यं ) धन ( होत्रं ) द्या ( जुषध्वं ). असा अर्थ असावा.

**यत्पाञ्चजन्यया विशा । पञ्चजनीनया विशा ।**

पाञ्चजन्यया = पञ्चजनीनया. प्रतिजनादिभ्यः खञ् ( पा० ४।४।९ ) ह्यानें पाञ्चजनीन असें होईल. यत् शब्द भाष्यांत कां गाळला हें समजत नाहीं.

यत्पाञ्चजन्यया विशेन्द्रे घोषा असृक्षत । अस्तृणाद्बर्हणा विपोऽर्यो मानस्य स क्षयः ( ८।६३।७ ) ज्याअर्थीं ( यत् ) इंद्राच्या ठायीं ( इन्द्रे ) पंचजनांच्या धनासह ( विशा ) धनें ( घोषाः ) ठेविलीं किंवा ओतलीं जात आहेत ( असृक्षत ) त्याअर्थीं

तो आपल्या धनांतून ( बर्हणा = बर्हणया ) किंवा धनानें ( बर्हणा ) युक्त अशीं धनें ( विपः ) देतो ( अस्तृणात् ); तो धनाचा (अर्यः = मानस्य) खजिना (क्षयः ) आहे.

यत्पाञ्चजन्यया विशा हे शब्द कोणतें मत सिद्ध करण्याकरितां यास्कानें उदाहृत केले ? औपमन्यवाचें कीं इतर ? किंवा पंचजन म्हणजे मनुष्य हें सिद्ध करण्याकरितां ? अमरकोशांत मनुष्यगणांत पंचजन शब्द आहे ( २।६।१ ); पञ्चभिः भूतैः जातः = पंचमहाभूतांपासून झालेली अशी ह्या शब्दाची व्युत्पत्ति क्षीरस्वामी देतो. पंचजन म्हणजे पांच आर्य जाति हा वैदिक अर्थ ब्राह्मणकालीं विसरला गेला. औपमन्यवाचें मत सिद्ध करण्याकरितां म्हणजे पंचजन म्हणजे मनुष्य हें सिद्ध करण्याकरितां हे शब्द उद्धृत केले असावेत.

**पञ्च पृक्ता संख्या । स्त्रीपुंनपुंसकेषु अविशिष्टा**

पृक्ता = स्त्रीपुंनपुंसकेषु अविशिष्टा. पञ्चला पञ्च म्हणण्याचें कारण ती संख्या पृक्त म्हणजे संपृक्त आहे. म्हणजे त्या संख्येचा संपर्क सर्व लिंगाशीं असतो. एक, द्वि, त्रि व चतुर ह्यांचीं विशेष्याच्या लिंगाप्रमाणें रूपें बदलतात जसें एकः एका एकम्. पण विशेष्य कोणत्याही लिंगीं असो, पञ्चशब्दाचें रूप बदलत नाहीं. पञ्च शब्द पृच् धातूपासून झाला आहे. एक वगैरेंची व्युत्पत्ति खंड दहांत दिली आहे.

**बाहुनामानि उत्तराणि द्वादश (२।४) बाहू कस्मात् । प्रबाधते आभ्यां कर्माणि**

पुढील बारा नामें बाहुवाचक आहेत. बाहु शब्द कसा झाला ? ह्यांनीं म्हणजे दोन्ही हातांनीं लोक कामें जोरानें शेवटास नेतात. कामाला बाधा करणें म्हणजे तीं शेवटास नेणें. म्हणजे बाध् पासून बाहु शब्द झाला आहे. वहति बाहते वा । बाहृ प्रयत्ने ( धा० १।६४६ ). हात लहानमोठी वस्तु वाहून नेतात म्हणजे वह् पासून बाहु; किंवा हात प्रयत्न करतात; म्हणजे बाह् प्रयत्न करणें ह्यापासून. उणादिगणांत बाध् पासून बाहु असें सांगितलें आहे. (अमर २।६।८० क्षीरस्वामी) बाहुः कस्मात् असें न म्हणतां बाहू असें द्विवचन घालण्याचें कारण दोन्ही हातांनीं काम जोरानें होतें; एका हातानें तितक्या जोरानें होत नाहीं. एका हातानें आपण लिहितों; दोन्ही हातांनीं लिहितां येईल काय ? दोन्ही हातांनीं जेवावयास लागलों तर जेवण लवकर आटपेल काय ?

**अङ्गुलिनामानि उत्तराणि द्वाविंशतिः ( २।५ ) अङ्गुलयः कस्मात्**

पुढील बावीस नामें अंगुलिवाचक होत. अङ्गुलिशब्द कशापासून ?

**अग्रगामिन्यः भवन्ति इति वा**

अङ्ग् + गुलयः. अङ्ग् = अग्रे. गुलयः = गामिन्यः. काम करतांना बोटें पुढें सरसावतात. बोटें पुढें गेलीं नाहींत तर काम कसें करतां येईल ? किंवा

**अग्रगालिन्यः भवन्ति इति वा**

अङ्ग् = अग्रे. गुलयः = गालिन्यः. बोटांच्या शेवटापासून पाणी गळतें. किंवा

**अग्रकारिण्यः भवन्ति इति वा**

अङ्गु = अग्रे. लयः = कारिण्यः. बोटांच्या अग्रांनीं कामें करतात. किंवा

**अग्रसारिण्यः भवन्ति इति वा**

लयः = सारिण्यः. ही व्युत्पत्ति फक्त महाराष्ट्रपाठांत आहे. कामें करतांना बोटांचीं अग्रें पुढें सरतात.

**अङ्कनाः भवन्ति इति वा**

अङ्गुलयः = अङ्कनाः. अङ्ग् = अङ्क्. उलि हा प्रत्यय. अंगुलि शब्द अङ्क् चिन्हित करणें ह्यापासून झाला आहे. बोटांना पाणी किंवा रंग लागला असल्यास जेथें तीं बोटें लागतात तेथें त्यांचीं चिन्हें उठतात.

**अञ्जनाः भवन्ति इति वा**

अङ्ग् = अञ्ज् = माखणें. जेथें रंगानें माखलेलीं बोटें लागतात ती जागा बोटांच्या चिन्हांनीं माखली जाते. ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं.

**अपि वा अभ्यञ्चनादेव स्युः**

किंवा अभि + अञ्च् ह्याच धातूपासून अङ्गुलि शब्द झाला असेल. बोटें वस्तूंकडे ( अभि ) जातात ( अञ्चन्ति ). गुर्जरपाठांत अभ्यञ्जनात् असें आहे. तो पाठ चुकीचा आहे. ये तु अभ्यञ्जनाः इति अधीयते तेषाम् अभ्यज्यते आभिः इति अङ्गुलयः ( दुर्ग ) = अभ्यञ्जनात् ह्याच्या जागीं कित्येक अभ्यञ्जनाः असें वाचतात; म्हणजे अङ्गुलयः = अभि + अञ्जनाः, ह्यांनीं म्हणजे बोटांनीं वस्तु माखली जाते म्हणून तीं अभ्यञ्जनाः म्हणजे अङ्गुलयः. इतर लोक अभि + अञ्च् पासून अङ्गुलि असें म्हणतात तें यास्क नाखुषीनें शेवटीं मान्य करतो. लातिन–अंग्विस् = हाताचें किंवा पायाचें नख. तेव्हां अङ्गुलि म्हणजे नखयुक्त असा अर्थ होईल. हाताचा नखयुक्त भाग तो अङ्गुलि.

**तासाम् एषा भवति**

त्या अंगुलिसंबंधाची पुढील ऋचा होय.

## खंड ९ वा.

**दशावनिभ्यो दशकक्ष्येभ्यो दशयोक्त्रेभ्यो दशयोजनेभ्यः ।**
**दशाभीशुभ्यो अर्चताजरेभ्यो दश धुरो दश युक्ता वहद्भ्यः ( १०।९४।७ )**
**अवनयः अङ्गुलयः भवन्ति । अवन्ति कर्माणि**

येथें अवनि म्हणजे अंगुलि. अंगुलींना अवनि म्हणण्याचें कारण त्या कामांचें रक्षण करतात किंवा भक्षण करतात म्हणजे कामें शेवटास नेतात. धातुपाठांत ( १। ६०१ ) अव्चे रक्षण वगैरे अर्थ दिले आहेत; पण त्यांत भक्षण नाहीं. तो दुर्गास कोठें सांपडला? ह्या ऋचेंत अंगुलींवर रूपकें केलीं आहेत. अंगुलि ग्रावे धरतात व ते हलवून सोम वाटतात व त्याचा रस काढतात. अवनि म्हणजे रथ. ह्या दहा अंगुलि दहा रथ होत.

**कक्ष्याः प्रकाशयन्ति कर्माणि**

अंगुलींना कक्ष्य म्हणण्याचें कारण त्या कामें ( करून तीं ) प्रकट करतात. म्हणजे कक्ष्य शब्द प्र + काश् ह्यापासून झाला आहे. कक्ष्या = झूल. कक्ष्येव युक्त ( १०।१०।१३ ) व कक्ष्याश्वेव वाजिना ( ७।१०४।६ ) एथें 'जशी कक्ष्या घोड्याला कवटाळते' असें म्हटलें आहे. ही कक्ष्या दोरी नसून झूल असली पाहिजे. दहा बोटें झुलीसारखे ग्राव्यांना कवटाळतात.

**योक्त्राणि योजनानि इति व्याख्यातम्**

व्याख्यातं म्हणजे स्पष्ट. अंगुलींना योक्त्र व योजन म्हणण्याचें कारण स्पष्ट आहे. अंगुलि कामाला लावल्या जातात. युज्यन्ते कर्मसु ही त्यांची व्युत्पत्ति सर्वांस माहीत आहे. योक्त्र शब्दाची व्याख्या योजन शब्दानें होते असें दुर्ग म्हणतो; पण ती त्याची चूक आहे. योक्त्र शब्द ऋग्वेदांत तीनदां आला आहे. घोडा किंवा बैल जुवाला जुंपण्याची दोरी–जिला मराठींत जुपणी म्हणतात ती–असा त्या शब्दाचा अर्थ असावा. धन, रथ वगैरे योजन शब्दाचे अनेक अर्थ आहेत. एथें कोणता अर्थ असेल?

**अभीशवः अभ्यश्नुवते कर्माणि**

अंगुलींना अभीषु म्हणण्याचें कारण त्या कामें व्यापतात म्हणजे करतात. अभि + अश् पासून अभीशु. अभीशु म्हणजे लगाम किंवा कासरा.

**दश धुरो दश युक्ता वहद्भ्यः**

दश धुरः एते ग्रावाणः । दशभिः दशभिः अङ्गुलीभिः ये एते युक्ताः वहन्ति ग्रावाणः तेभ्यः ( दुर्ग )=ग्रावे हेच दहा धुरा; दहा दहा बोटांनीं धरलेले जे हे ग्रावे मागें पुढें सरत आहेत त्यांना. हा अर्थ चुकला आहे. ज्या अंगुलींनीं ग्रावे पकडले जातात. त्यांच्यावर निरनिराळीं रूपकें केलीं आहेत. त्या रथ ( अवनयः ), घोडयाच्या झुली ( कक्ष्या ), जुंपण्या ( योक्त्राणि ), घोडे ( योजनानि ), लगाम ( अभीशवः ) होत, असें म्हटलें आहे. ग्रावे अंगुलिरूप रथांत बसतात. ग्रावे हे घोडे व अंगुलि त्या घोडयांच्या झुली. ह्या घोडयांना जुवाला जुंपण्याच्या जुंपण्या होत. ग्रावे दहा घोडयांवर बसतात. ग्रावे घोडे; त्यांचे ह्या अंगुलि लगाम. हे घोडे अंगुलिरूप जुवें मानांवर घेतात. ( दश धुरो वहद्भ्यः ). हे ग्रावे दहा घोडया ( युक्ताः ) ओढून नेतात. अशा चमत्कारिक कल्पना केल्या आहेत. अजरेभ्यः = ज्या ग्राव्यांत जरा म्हणजे धन आहे ते. अ ( = अति ) + जरा ( = धन ). अर्चत = त्यांची स्तुति करा. अर्क किंवा शूषं शब्द अध्याहृत आहे. अर्कम् अथवा शूषम् अर्चत = त्यांना स्तुति अर्पण करा. निरुक्तकारांच्या व्युत्पत्तिशास्त्राची ह्या ऋचेच्या विवरणांत कमाल झाली आहे. ग्राव्यांना व अंगुलींना रथ वगैरे म्हणणें रुचलें नाहीं म्हणून त्यांनीं असा अचरटपणा केला आहे. निरुक्तशास्त्र खोटें आहे, तें शास्त्रच नव्हे हें ह्या एका उदाहरणावरून स्पष्ट होतें. ह्या सूक्तभर ग्राव्यांच्या संबंधानें नानाप्रकारच्या कल्पना केल्या आहेत.

पर्वत, वृषभ, घोडे वगैरे त्यांस म्हटलें आहे. सर्वांच्या आधीं ते सोम खातात व मदानें मोठाल्या गर्जना करतात. सोम पिऊन पिऊन त्यांचीं तोंडें पिवळीं झालीं आहेत. निरुक्तकार ह्या कविकल्पनांना रजा देतात व आपल्या शास्त्राचा उपहास करून घेतात. सायणाचार्यांनीं यास्काचीच री ओढली आहे. दश अवनयः येषां, दश कक्ष्याः येषां, दश योक्त्राणि येषां, दश योजनानि येषां, दश अभीशवः येषां असे हे बहुव्रीहि समास असून अध्याहृत ग्रावभ्यः ह्याचीं तीं विशेषणें होत.

**धूः धूर्वतेः वधकर्मणः**

धूर्व् हाणणें पासून धूः. अंगुलींना धुरः म्हणण्याचें कारण त्या ग्राव्यांनीं सोम ठेंचतात. धुर्वी हिंसार्थः (धा. पा. १।५७४). दशधुरः एते ग्रावाणः असें दुर्ग म्हणतो; ग्राव्यांना धुरः म्हणण्याचें कारण ते सोमाला मारतात म्हणजे ठेंचतात.

**इयम् अपि इतरा धूः एतस्मादेव । विहन्ति वहम्**

लौकिक जो धुर् शब्द तोही ह्याच (धातू-) पासून. कारण जूं वशिंडाला (वहं) सारखे तडाखे देत असतें. धूर्वति = विहन्ति. धूर्व् = धु + उ + र् + व् = धु + (उ) + र् + (व्) = धुर्.

**धारयतेर्वा**

किंवा धुर् शब्द धृ धारण करणें ह्यापासून झाला असेल. कारण जूं मानेवर धारण केलें असतें. धृ = धु = ध् + र् + उ = ध् + उ + र् = धुर्

**कान्तिकर्माणः उत्तरे धातवः अष्टादश (२।६)**

पुढील अठरा धातु इच्छा करणें ह्या अर्थीं आहेत.

**अन्ननामानि उत्तराणि अष्टाविंशतिः (२।७) अन्नं कस्मात् । आनतं भूतेभ्यः । अत्तेः वा**

अन्नवाचक पुढील नामें अठ्ठावीस आहेत. अन्न शब्द कसा झाला? अन्नं = अ + त् + नं. अ = आ. त् + नं = नतम्. प्राणिमात्राच्यापुढें नम्रपणें तें येतें. (आनतं) म्हणून अन्नाला अन्न म्हणावयाचें. किंवा अद् खाणें ह्यापासून. निरुक्तकार शब्दांत दिसणारा धातु टाकून देतात. पण एथें अद् धातु पहिल्या प्रथम देण्यास कोणती हरकत होती? अन्न खातात नाहींतर काय करतात? निरुक्तकार निरुत्तर करण्याकरितां पुढील शक्कल लढवितील. खाण्याच्या अगोदर अन्न तोंडाजवळ आणलें तर पाहिजे. आणणें (आननं) ही पहिली क्रिया, खाणें ही मागूनची. म्हणून आ + नतं ह्यापासून अन्न. आनीतं अशीही व्युत्पत्ति देतां येईल.

**अत्तिकर्माणः उत्तरे धातवः दश (२।८)**

खाणें ह्या अर्थाचे पुढील धातु दहा आहेत.

**बलनामानि उत्तराणि अष्टाविंशतिः (२।९) बलं कस्मात् । भरं भवति । बिभर्तेः**

बलवाचक पुढील नामें अठ्ठावीस होत. बल शब्द कसा झाला? बलं = ब + लं. ब = भ. लं = रं. बल अंगांत भरलेलें असतें. म्हणजे भृ पासून बल शब्द झाला

आहे. दुर्गवृत्तींत बिभर्तेर्वा असें आहे. दुर्ग म्हणतोः—भ्रियते हि स यो बलिष्ठो भवति। बिभर्तेर्वा । स ह्यन्येषां भर्ता भवति = जो बलिष्ठ असतो त्याला लोकांनीं पोसावयाचें असतें. किंवा जो बलिष्ठ असतो तो इतरांचा राजा होतो. कोणताही अर्थ असला तरी धातु भृ च. पहिल्या अर्थांत त्याचें भ्रियते असें कर्मणिरूप; दुसऱ्यांत बिभर्ति. भर्ता ह्याचा अर्थ पोसणारा असा असेल. बलिष्ठाला लोक पोसतात किंवा बलिष्ठ लोकांना पोसतो.

**धननामानि उत्तराणि अष्टाविंशतिः एव ( २।१० )। धनं कस्मात् । धिनोति इति सतः**

धनवाचक पुढील नामेंही अठ्ठावीसच. धन शब्द कसा झाला? धन जेव्हां तृप्त करतें तेव्हां त्यास धन म्हणावयाचें. रिक्थ, द्रविण वगैरे धनवाचक शब्द अन्य कारणांनीं अस्तित्वांत आले. धन शब्द धिवि प्रीणने ( धा० १।५९४ ) ह्यापासून झाला आहे.

**गोनामानि उत्तराणि नव ( २।११ )**

गोवाचक पुढील नामें नऊ आहेत. गो ( गाय ) संबंधानें निरु० २।५ मध्यें जी चिकित्सा झाली ती ह्या सदरांत यावयास पाहिजे होती.

**क्रुध्यतिकर्माणः उत्तरे धातवः दश ( २।१२ )**

रागावणें ह्या अर्थाचे पुढील धातु दहा आहेत.

**क्रोधनामानि उत्तराणि एकादश ( २।१३ )**

क्रोधवाचक पुढील नामें अकरा आहेत.

**गतिकर्माणः उत्तरे धातवः द्वाविंशशतम् ( २।१४ )**

गतिवाचक पुढील धातु १२२ होत. दुर्गपाठ द्वाविंशं शतं असा आहे.

**क्षिप्रनामानि उत्तराणि षड्विंशतिः ( २।१५ )। क्षिप्रं कस्मात् । संक्षिप्तः विकर्षः**

लवकर ह्या अर्थाचीं पुढील नामें २८ होत. क्षिप्र शब्द कसा झाला ? ताणलें जाण्याचा संक्षेप होतो. रबर ताणलें जातें व लांब होतें. सोडल्याबरोबर तें आखूड होतें. म्हणजे सं + क्षिप् पासून क्षिप्र. पण क्षिप् फेंकणें ह्यापासून क्षिप्र कां नसेल ! क्ष झला वस्तु नेऊन देत नाहीं; तो वेळ व श्रम वाचविण्याकरितां ती त्याच्याकडे फेंकतो.

**अन्तिकनामानि उत्तराणि एकादश ( २।१६ )। अन्तिकं कस्मात् । आनीतं भवति**

जवळ ह्या अर्थाचीं नामें अकरा होत. अन्तिक शब्द कसा झाला ? अन्तिकं = अ + न् + त् + इ + क् + अम्. अ = आ. न् + इ = नि म्हणजे नी. त् + अम् = तम्. क् हें अक्षर उगाच मध्यें शिरलें. वास्तविक अम् + तः = अन्तः. अन्त + इकं = अन्तिकम्. अं म्हणजे मी. अन्तम शब्द अंपासूनच झाला आहे. अहं हें एकेकाळीं अम् असें असेल. माझें तें नजीक.

**संग्रामनामानि उत्तराणि षट्चत्वारिंशत् ( २।१७ )। संग्रामः कस्मात्**

पुढील संग्रामवाचक नामें ४६ होत. संग्राम शब्द कसा झाला ?

**संगमनात् वा**

योद्धे किंवा सैन्यें जेथें एकत्र येतात तो संग्राम. म्हणजे सं + गम् पासून संग्राम झाला.

**संगरणात् वा**

योद्धे एकमेकाला पाहून आरोळ्या ठोकतात किंवा युद्धाचे नियम ठरवितात. म्हणजे सं + गृ पासून संग्राम. किंवा

**संगतौ ग्रामौ इति वा**

दोन गांवें भांडणाकरितां एके ठिकाणीं येतात. ही शेवटची व्युत्पत्ति बरोबर दिसते.

**तत्र खलः ( ३८ ) इति एतस्य निगमाः भवन्ति**

ह्या संग्रामवर्गांत खल शब्द आहे. त्याचीं उदाहरणें ऋग्वेदांत आहेत. खल शब्द फक्त एकदांच आला आहे. तथापि उदाहरणें आहेत असें ठोकून म्हटलें आहे. ही एक लिहिण्याची पद्धत आहे. खंड ७ ह्याचा शेवट पहा. दुर्ग निगमाः संदिग्धा भवन्ति असें म्हणून खल धान्याचें खळें व संग्राम असा दोन्ही अर्थीं आहे म्हणजे संदिग्ध आहे, त्याचा उलगडा पुढील खंडांत केला आहे असें लिहितो; तेव्हां संदिग्धाः असा अधिक शब्द त्याच्या पोथींत होता कीं काय असा प्रश्न उत्पन्न होतो.

## खंड १० वा.

**अभीदमेकमेको अस्मि निष्षाळभी द्वा किमु त्रयः करन्ति।**
**खले न पर्षान् प्रतिहन्मि भूरि किं मा निन्दन्ति शत्रवोऽनिन्द्राः ( १०।४८।७ )**

अभिभवामि इदम् एकम्. अभि + अस्मि = अभिभवामि. इदं हें इमंबद्दल तिरस्कार दाखविण्याकरितां घातलें आहे. इदं जगत् असा दुर्ग अर्थ करतो तो बरोबर नाहीं.

**एकः अस्मि निष्षहमाणः सपत्नान्**

निष्षाळ् = निष्षहमाणः = पराभव करणारा. सपत्नान् ( अध्याहृत ) = शत्रु.

एकटा मी सगळ्या सपत्नांचा पराभव करतों. वास्तविक निष्षाळ् एकः अहम् इदम् एकम् अभ्यस्मि असा अन्वय आहे.

**अभिभवामि द्वौ**

अभी + अस्मि = अभिभवामि. पहिला अभी संधीनें झाला आहे त्याची पुनरुक्ति हा आहे. वास्तविक दीर्घ अभी नको आहे. कदाचित् सुलभ उच्चाराकरितां अभि ह्यांतील इ लांबविला असेल. मी दोघांचाही पराभव करतो.

**किं मा त्रयः कुर्वन्ति**

उ निरर्थक म्हणून गाळला आहे. पण उ = खलु = खरोखर. करन्ति = कुर्वन्ति. खरोखर तीन ( जरी आले तरी ते ) माझें काय करणार ?

**एकः इता संख्या**

गेलेली जी संख्या तिचें नांव एक. म्हणजे इ जाणें ह्यापासून एक. इ + कः = एकः. दुर्ग म्हणतोः— संख्या ही संज्ञा जो पहिल्याप्रथम पावतो तो एक किंवा दोन तीन वगैरे संख्या उत्पन्न करण्याला जो जातो तो एक. १ + १ = २. २ + १ = ३. ह्याप्रमाणें संख्या एक ह्याच्या साहाय्यानें तयार होतात.

**द्वौ द्रुततरा संख्या**

द्वौ म्हणजे दोन ही संख्या एकापेक्षां ज्यास्त पळणारी, ज्यास्त चपळ आहे. म्हणजे द्रु धावणें ह्यापासून द्वि.

**त्रयः तीर्णतमा संख्या**

जी दोनला ओलांडून जाते ती संख्या तीन. म्हणजे तॄ-पासून त्रि.

**चत्वारः चरिततमा संख्या**

तिहीच्या पलीकडे जी जाते ती चार. चल् पासून चतुर्. पञ्चची व्युत्पत्ति ८ व्या खंडांत, षष्‌ची ४।२७ व सप्तन्‌ची ४।२६ यांत दिली आहे.

**अष्टौ अश्नोतेः**

आधींच्या सात संख्यांना ही व्यापून टाकते म्हणून हीस अष्ट म्हणतात. अश् व्यापणें पासून अष्टन्.

**नव न वननीया । न अवाप्ता वा**

नव = न + व. व = वननीय. वन् भोगणें पासून नवन्. नवमी, नवग्रह वगैरेंत जो नव शब्द आहे तो शुभ नव्हे. नवरत्न व रामनवमी ह्यांतील नव शुभ आहे कीं नाहीं ? न् + अ + व. न् = न. अव = अवाप्त. नव ही न मिळाल्यासारखीच संख्या आहे. दहा मिळेपर्यंत मनुष्य उतावळा होतो. ' न अवाप्ता वा ' ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. तेव्हां ती प्रक्षिप्त होय.

**दश दस्ता । दृष्टार्था वा**

दस् उपक्षये पासून दशन्. दहा ही शेवटची संख्या. अकरा वगैरे संख्या १ + १०, २ + १० अशा मिळवणीनें झाल्या आहेत. पुढील संख्यांत हिचें प्रयोजन ( अर्थः ) दिसतें. १ + १० वगैरेंत १० ही संख्या पुनः पुनः दिसते. दश् पासून दशन्. ह्या व्युत्पत्ति गमतीदार आहेत खऱ्या. लातिन, ग्रीक वगैरे भाषांत बहुतेक असेच संख्यावाचक शब्द आहेत त्यांची वाट काय ?

**विंशतिः द्विः दशतः**

दशतः म्हणजे दहांचा समुदाय ( तः ); ह्या दोनदां घेतला म्हणजे विंशति संख्या सिद्ध होते.

लातिन विजिंटी. विजिंता, त्रिजिंता, क्द्रजिंता, क्किन्कजिंता, सेक्सुआजिंता, सेप्तुअ-जिंत, आक्टोजिंता, नोनाजिंता ह्या लातिन संख्यावाचक शब्दांतील जिंती व जिंता व संस्कृत विंशति, त्रिंशत्, चत्वारिंशत् ह्यांतील इंशत् ह्यांत कांहींसें साम्य आहे. जिंती व जित् आणि इंशति व इंशत् हे कशाचे तरी अपभ्रंश असावेत. वि हा 'द्वि'चा अव-शेष. जिंती, जित्, इंशति, इंशत् हे दशवाचक शब्द असावेत. संस्कृत षष्टि, सप्तति अशीति व नवति आणि इंग्रजी सिक्स्टि, सेव्हन्टि, एटि, नाइन्टि ह्यांतील ति व टि हेही दशवाचक होत. हे टेन् (दहा) ह्याचे अवशेष असतील.

**शतं दशदशतः**

दशतः दशधागृहीतः शतं भवति. श + तम्. श = दश. तं = दशतम् पहिल्या दश मधील द व दशतं मधील दश गळून शतं शब्द बनला आहे. लातिन सेंटम्. शतं सेंटम् कसे बनले हें सांगतां येत नाहीं.

**सहस्रं सहस्वत्**

सहस्रं = सहस् + रम्. सहस् = बल. रं = वत्. सहस्र संख्या बलवान् असते.

**अयुतं नियुतं प्रयुतं तत् तत् अभ्यस्तम्**

हजाराची दहा वेळां पुनरुक्ति केल्यानें अयुत म्हणजे दहा हजार. अयुत दहा वेळां घेतला कीं नियुत व नियुत दहा वेळां घेतला म्हणजे प्रयुत. अयुतं, प्रयुतं व नियुतं असा संख्याक्रम कांहीं ग्रंथांत सांपडतो. युत म्हणजे अभ्यस्त असा अर्थ यास्कानें केला असावा. अयुत हें मूळचें आयुत असावें. यु मिसळणें ह्यास आ, नि, व प्र उपसर्ग लागून हे तीन शब्द बनले आहेत.

**अम्बुदः मेघः भवति । अरणम् अम्बु । तद्ः**

अम्बुदः = मेघः. अंबुद म्हणजे मेघ. गुर्जरपाठ अर्बुदः असा आहे. दुर्ग-वृत्तींत हें वाक्य नाहीं. उदकाला अम्बु म्हणण्याचें कारण तें जातें म्हणजे वाहतें. अह् जाणें ह्यापासून अम्बुद. पाणी देणारा तो अम्बुद. महाराष्ट्रपाठांत तद्ः अम्बुदः असें आहे.

**अम्बुमद् भवति इति वा । अम्बुमद् भाति इति वा**

महाराष्ट्रपाठांत ह्या दोन वाक्यांची उलटापालट झाली आहे. दुर्गवृत्तींत हीं वाक्यें नाहींत. त्यांचें प्रयोजन येथें दिसत नाहीं. तीं कोणत्या तरी नपुंसकलिंगी शब्दाला उद्देशून असलीं पाहिजेत. पण अम्बुदः शब्द पुंलिंगी आहे. तें पाण्यानें भर-लेलें (अम्बुमद्) असतें किंवा दिसतें. अर्बुदं भवति असे जे पुढें शब्द आहेत त्यांच्या-नंतर पहिलें वाक्य घालणें योग्य होईल. तेथें दुसरें वाक्य गाळलेंच पाहिजे. अर्बुद ही संख्या जणूं काय पाण्यानें भरलेली असते.

**स यथा महान् बहुः भवति वर्षन् तदिव अर्बुदम्**

तो मेघ ( सः ) जसा वृष्टि करावयाच्या वेळीं ( वर्षन् ) मोठा (महान् = बहुः) होतो म्हणजे पाण्यानें फुगलेला असतो तशी अर्बुद ही संख्या फुगलेली असते. वर्षन् =

वृष्टि करीत असतांना असा अर्थ घेतल्यास वृष्टीनें मेघ लहान लहान होत जाईल अशी शंका उत्पन्न होते. महान् = बहुः. बहुः प्रक्षिप्त असावा; कारण महान् म्हट-ल्यावर त्याची आवश्यकता नाहीं.

सः इव अर्बुदं असें न म्हणतां तदिव अर्बुदं असें म्हणण्याचें कारण अर्बुद हा नपुंसकलिंगी शब्द. ऋग्वेदांत व यास्कभाष्यांत असलीं उदाहरणें पुष्कळ आढळ-तात. अर्बुद हा शब्द मूळचा अम्बुद होता. अर्बुद नांवाचा एक शत्रु होता. हा अर्बुद शत्रु म्हणजे मेघ. ऋग्वेदांत अम्बु व अम्बुद शब्द नाहींत. मेघवाचक अर्बुद शब्द लक्षणेनें संख्यावाचक झाला कीं काय हें सांगतां येत नाहीं.

**खलेन पर्षान् प्रतिहन्मि भूरि । खले इव पर्षान् प्रतिहन्मि भूरि**

न = इव. पर्ष शब्द यास्ककालीं प्रचारांत होता असें दिसतें. पर्ष=धान्याच्या पेंढ्या. धान्याच्या खळ्यांत (खले) शेतकरी जसा खूप धान्यांच्या पेंढ्या झोडतो त्याप्रमाणें संग्रामांत (खले) मी पुष्कळांना ठोकतो. खलशब्द एथें यास्क व दुर्ग ह्यांच्या मतें ह्यर्थी आहे. खल व पर्ष हे शब्द एथेंच फक्त आले आहेत. त्यामुळें त्यांचा अर्थ ठरवितां येत नाहीं. एथें खल म्हणजे संग्राम असा अर्थ नाहीं हें खास. एक येवो, दोन येवोत, तीन येवोत, हवे तितके येवोत, सर्वांना मी चोप देतों व परत फिरवितों असें इंद्र म्हणतो.

**खलः इति संग्रामनाम । खलतेः वा । स्खलतेः वा**

खलः = संग्रामः. खल नाश करणें ह्यापासून खल शब्द झाला असेल; कारण रणांत लढणाऱ्यांचा नाश होतो, असें दुर्ग म्हणतो. खल संचये ( धा० पा० १। ५४६ ). लढणारांचे लढाईत ढीग पडतात. लढवय्ये रणांत पडतात. स्खल संचलने ( धा० १।५४६ )

**अयम् अपि इतरः खलः एतस्मात् एव । समास्कन्नः भवति**

धान्यखल अर्थाचा जो लौकिक खळ शब्द तोही ह्याच दोन धातूंपासून. खळ्यांत धान्य झोडलें जातें व पडतें. किंवा खळें धान्यानें भरलेलें असतें. स्कन्दिर् गति-शोषणयोः ( धा० १।१००४ ) सम् + आ + स्कन्नः = समागतः = चहूंकडून आलेला भरलेला. ही निराळी व्युत्पत्ति आहे. पण अशा ठिकाणीं यास्क विकल्पवाची शब्द घालीत नाहीं.

**किं मा निन्दन्ति शत्रवोऽनिन्द्राः । ये इन्द्रं न विदुः**

अनिन्द्राः = ये इन्द्रं न विदुः = ज्यांना इंद्र माहीत नाहीं. महाराष्ट्रपाठ विविदुः असें आहे. किंवा

**इन्द्रः हि अहम् अस्मि अनिन्द्राः इतरे इति वा**

खराखरा इंद्र मी आहें; इतर अनिंद्र होत असें वाक्य करावें.

ज्यांना इंद्र माहीत नाहीं म्हणजे ज्यांना इंद्राचा इंगा ठाऊक नाहीं ते इंद्र भेकड आहे वगैरे निंदा कां करतात ? अनिंद्र व इंद्रवत् असे दोन लोकसमूह असून

ते एकमेकाचे कट्टे शत्रु होते. इन्द्रवत् ह्यांतील इन्द्र शब्द कालानें बलवाचक झाला. जे इन्द्रवत् ते बलिष्ठ व जे अनिन्द्र ते दुर्बल, भेकड असे मानले गेले. स्वतः दुर्बल, भेकड (अनिन्द्राः) असे हे लोक मला दुर्बल, भेकड म्हणून माझी निंदा करतात काय?

**व्याप्तिकर्माणः उत्तरे धातवः दश ( २।१८ )**

व्यापणें ह्या अर्थाचे पुढील धातु दहा.

**तत्र द्वे नामनी आक्षाणः ( २।१८।३ ) आश्नुवानः आपानः ( २।१८।६ ) आप्नुवानः**

त्यांत दोन नामें म्हणजे विशेषणें आहेत. आक्षाणः = आ + अश्नुवानः. आपानः = आप्नुवानः.

मक्षू ता त इन्द्र दानाप्नस आक्षाणे शूर वज्रिवः। यद्ध शुष्णस्य दम्भयो। जातं विश्वं सयावभिः (१०।२२।११) = हे शूर वज्रिवः इन्द्र, यत् यदा ह एव त्वं सयावभिः (देवैः) शुष्णस्य विश्वं जातं दम्भयः तदैव दानाप्नसः ते तव ता तानि मक्षू मक्षूणि आक्षाणे (अभवन्) = हे धनवंता दात्या इन्द्रा, धनवान् देवांना बरोबर घेऊन जेव्हां शुष्णाचें तूं सर्व धन हरण केलेंस तेव्हांच तुझें तें धन आक्षाणाला मिळालें. शूर = वज्रिवः इन्द्र = धनवन्. दानेन धनेन युक्तम् अप्नः यस्य तस्य. जातं = धन. विश्वं = धनयुक्त, अतिशय. आ + क्ष + आ + न = आक्षाण = अत्यंत धनवान्. आ = क्ष = न = धन. धनानें (आ = क्ष = आ) युक्त धन (न) आहे ज्याच्याजवळ तो आक्षाण, असा मी अर्थ करितों. आक्षाणे योद्धृभिः व्याप्यमाने त्वयि अवस्थितानि तानि कर्माणि स्तोतारः स्तुवन्ति असा सायणाचार्य अर्थ करतात. म्हणजे ते तव कर्माणि व त्वयि अवस्थितानि कर्माणि असा कर्माणि ह्याचा दुहेरी अन्वय लावतात. ह्या विवरणांत कर्माणि स्तोतारः स्तुवन्ति हे शब्द अध्याहृत आहेत. आक्षाणे ह्याचा यास्कानें केलेला अर्थ घेतला आहे. आक्षाण हें एखाद्या धनिकाचें नांव असेल. आक्षाणापाशीं असलेलें धन तूं दिलेलें असा मी अर्थ करतों.

तं नो दात मरुतो वाजिनं रथ आपानं ब्रह्म चितयत् दिवेदिवे (२।३४।७) = हे मरुतः दिवेदिवे रथेनः अस्मभ्यं वाजिनं तं दात दत्त। तथा आपानं चितयत् ब्रह्म दत्त = हे मरुतांनो, आम्ही कायमचे धनिक व्हावें म्हणून (दिवेदिवे) आमच्या धनांत (रथे) धन द्या म्हणजे धनाची भर टाका. वाजिन = वाजयुक्तं = धनयुक्तं = धनानें भरलेलें. तं = धनम्. रथे = धनभांडारांत. आपानं = चितयत् = (धन) देणारें. पा = देणें. आ = धन. आ + पा + आनं = धन देणारें. चित् = (धन) देणें. चितयत् = धन देणारें. ब्रह्म = धन. आपानं चितयत् ब्रह्म = धन देणारें म्हणजे धनाची वाढ करणारें धन. आप् + आनः आप्नुवानं (यास्क) = मिळविणारे.

तुम्ही आले असतां ( रथे = रंहणे = युष्मदीये आगमने निमित्तभूते सति ) दररोज तुमचे गुण वर्णन करणारी ( चितयत् = प्रज्ञापयत् = युष्मद्गुणप्रख्यापकं )

स्तुति ( ब्रह्म = स्तुतिं ) अर्पण करणारा (आपानं = आप्नुवानं), अन्नवान् किंवा बलवान् ( वाजिनं ) असा पुत्र ( तं = पुत्रं ) हे मरुतांनो, आम्हांस द्या ( दात = दत्त) असा सायणाचार्य अर्थ करतात.

आपानासो विवस्वतो जनन्त उषसो भगम् । सूरा अण्वं वि तन्वते ( ९।१०।५) = प्रकाशणारें धन देणारे धनवान् सोम धन देतात ( वितन्वते ). जनन्तः = आपानासः = देणारे. विवस्वतः = उषसः = प्रकाशणारें धन. भगं = अण्वं = धन. सूराः = धनवान्.

**वधकर्माणः उत्तरे धातवः त्रयस्त्रिंशत् ( २।१९ )**

ठार मारणें ह्या अर्थाचे पुढील धातु तेहतीस.

**तत्र वियातः ( २।१९।१९ ) इत्येतत् वियातयते इति वा वियातय इति वा**

ह्यांत वियात असें पद आहे. तें वियातः = वियातयते असें किंवा वियातः = वियातय अशा अर्थी असेल.

वियातयते नानाप्रकारं शत्रून् यातयते यः सः वियातः = जो शत्रूंना नानातऱ्हांनीं पळावयास लावतो तो किंवा वियातय एवम् उच्यते यः स्तोतृभिः सः = शत्रूंना तऱ्हतऱ्हेनें पळवून लाव असें ज्याला स्तोते म्हणतात तो असा दुर्ग अर्थ करतो. निघंटूवरील देवराजाच्या टीकेंत वियातयते ह्याच्याबद्दल वियातयनः असा पाठ आहे. वियातय ह्याच्याबद्दल वियातयितर् असाही एक पाठ आहे असें देवराज म्हणतो. परंतु हें सर्व पांडित्य व्यर्थ आहे. कारण कोणत्याही वेदांत वियातः असा शब्द नाहीं. मूळ शब्द निराळा असून वियातः हें हस्तदोषानें लिहिलें गेलें असेल.

**आखण्डल प्र हूयसे ( ऋ० सं० ८।१७।१२ ) आखण्डयितः**

आखण्डल ( २।१९।२२ ) = आखण्डयितः. आखण्डयितः हें आखण्डयितृ ह्याचें संबोधन. जो शत्रूंचे किंवा मेघांचे तुकडे तुकडे उडवितो तो. महाराष्ट्रपाठांत खण्ड खण्डयतेः असे आखण्डयितः ह्याच्यानंतर ज्यास्त शब्द आहेत. शाचिगो शाचिपूजनायं रणाय ते सुतः । आखण्डल प्रहूयसे; ह्या ऋचेंत शाचिगो, शाचिपूजन व आखण्डल अशीं ३ संबोधनें आहेत. शा = चि = गु = पू = जन = धन. शाचिगो = शाचिपूजन = हे धनवंता. तेव्हां आखण्डल ह्याचाही तोच अर्थ असावा. हे तीन शब्द ह्या ऋचेंतच काय ते आले आहेत.

निघंटूंत आखण्डल शब्द तळित्च्या नंतर दिला आहे; एथें अर्धीं कां ?

**तडित् ( २१ ) इति अन्तिकवधयोः संसृष्टकर्म । ताड्यति इति सतः**

तडित् ह्या शब्दांत जवळचें व ठार करणें ह्या दोन्ही अर्थांचा समावेश होतो. अन्तिक ह्या अर्थी तडित् शब्द ( २।१६।१ ) अन्तिकनामांत दिला आहे. मारणें म्हणजे ताडन करणें असा जेव्हां अर्थ असतो तेव्हां तडित् शब्द वापरतात. ठार करण्याचे पुष्कळ प्रकार असतील; त्या प्रत्येक प्रकाराला निरनिराळें नांव आहे.

विद्युत् अपि च तडित् इति उच्यते । सा पुनः कर्तरि कारके ताडयति इति सतः = विजेला तडित् असें म्हणतात. ह्याअर्थी असणारा तडित् शब्द तड् ताड् ह्यापासून झाला आहे असें दुर्ग म्हणतो. परंतु अंतिक किंवा वध ह्या अर्थी असणाऱ्या तडित् शब्दाची व्युत्पत्ति तो देत नाहीं. दुर्गपाठ निराळा असावा. विद्युत् अपि च तडित् इति उच्यते । ताडयति इति सतः असा तो पाठ असेल.

## खंड ११ वा.

**त्वया वयं सुवृधा ब्रह्मणस्पते स्पार्हा वसु मनुष्या ददीमहि ।**

**या नो दूरे तळितो या अरातयोऽभि सन्ति जम्भया ता अनप्नसः (२।२३।९)**

**त्वया वयं सुवर्धयित्रा ब्रह्मणस्पते स्पृहणीयानि वसूनि मनुष्येभ्यः आददीमहि**

सुवृधा = सुष्ठु वर्धयित्रा. स्पार्हा = स्पार्हाणि = स्पृहणीयानि. वसु = वसूनि. मनुष्या = मनुष्या + आ. मनुष्या = मनुष्येभ्यः. आ + ददीमहि.

**याश्च नः दूरे । तळितः याश्च अन्तिके । अरातयः अदानकर्माणः वा अदानप्रज्ञाः वा**

तळितः = अन्तिके. अरातयः = अदानकर्माणः = जे धनदान करीत नाहींत ते. किंवा अदानप्रज्ञाः = ज्यांना धन देण्याची बुद्धि होत नाहीं ते. अभिसन्ति हें भाष्यांत गाळलें आहे; कारण कळत नाहीं.

**जम्भय ताः अनप्नसः । अप्नः इति रूपनाम ( निघ० ३।७।८ ) आप्नोति इति सतः**

जभि नाशने ( धा. १०।१८३ ), जम्भय = नाश कर. अप्नस् = रूप. आप्नोति = मिळवितो. रूप जेव्हां मिळविलें जातें तेव्हांच त्याला अप्नस् हें नांव मिळतें. म्हणजे आप् मिळविणें ह्यापासून अप्नस्. अप् = नस् = धन. अप् + नस् = अप्नस् = अतिशय धन; ही खरी व्युत्पत्ति व हाच खरा अर्थ. यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला ऋचेचा अर्थः — हे ब्रह्मणस्पति, उत्तम रीतीनें ( सु ) वाढविणारा ( वृधा ) जो तूं त्या तुझ्या साहाय्यामुळें आम्हीं मनुष्यांपासून इष्ट (स्पार्हा) धन मिळवूं ( आददीमहि ). आमचे दूरचे शत्रु ( अरातयः ) व जे जवळचे (तळितः) आम्हांला (नः) उपद्रव देतात ( अभिसन्ति ) त्या रूपहीनांचा नाश कर. त्यांची हालचाल बंद कर ( जम्भय ) व त्यांना रूपहीन कर असा दुर्ग अर्थ करतो. कर्महीन ( अनप्नसः ) जे हे लोक त्यांचा नाश कर असा सायणाचार्य अर्थ करतात.

ब्रह्मणः धनस्य पतिः दाता. ब्रह्मणस्पतिः = धनदाता. सु धनम् । तेन युक्तं वृध् धनं यस्य स सुवृध् = अतिशय धन आहे ज्याच्याजवळ असा. किंवा सु धनं वर्धयति ददाति असौ सुवृध् = जो धन देतो तो. स्पार्ह हें स्पृह् चें तद्धित रूप होय. स्पृह् धनम् । तेन युक्तं स्पार्हं = धनयुक्त म्हणजे अतिशय. स्पृहयद्वर्णो अग्निः = ( २।१०।

५ ); स्पृहयत् स्पृहयति ददाति वर्णं धनम् असौ स्पृहयद्वर्णः = धन देतो तो. स्पृह् = देणें; धन. पुरुस्पृह् ह्यांतील स्पृह्चा अर्थ धन. मनुष्या = मनुष्याणि. मनुष्य व स्पार्ह ह्यांचा अर्थ एकच. देवाः ० पुरुस्पृहो मानुषासो यजत्राः ( १०।४६।१० ); ह्यांतील चारही शब्दांचा अर्थ धनयुक्त व धन देणारे. मनुस् शब्द मन् = याचना करणें, देणें ह्यापासून बनला असेल. मनुषा धनेन युक्तानि मनुष्याणि. हे ब्रह्मणस्पति, तूं धनद असल्यामुळें तुझ्या साहाय्यानें आम्हीं अतिशय धन मिळवूं असा पहिल्या अर्धाचा अर्थ. दूरे = धनभाण्डारे. दृ = देणें; धन. दृ धनम् । तेन युक्तं रं धनं दूरम्. तळितः = विजेसारखे येऊन पडणारे शत्रु किंवा धनानें विजेप्रमाणें लखलखणारे. अ = अतिशय. राति - धन. ज्यांच्याजवळ अतिशय धन आहे असे शत्रु. तळितः व अरातयः ह्यांचा अर्थ एकच. जे शत्रु आम्हांला आपल्या धनभांडारामुळें त्रास देतात (अभिसन्ति) त्यांना ते निर्धन (अनप्रसः ) होतील अशा रीतीनें त्रास दे (जम्भय).

**विद्युत् तडित् भवति इति शाकपूणिः । सा हि अवत डयति दूराच्च दृश्यते**

ह्या ऋचेंत तडित् म्हणजे वीज असें शाकपूणि म्हणतो; कारण ती ( ज्या वस्तूवर पडते तिला ) खालीं येऊन ( अव ) ताडन करते व दूर असतांना दिसते. प्रस्तुत ऋचेंत दूरे शब्द आहे; तेव्हां तींत तडित् म्हणजे वीज. तडित् शब्दांत विजेच्या आवाजाचें अनुकरण असावें. तड् ताड्पासून तडित् असें शाकपूणि म्हणतो. ह्यावरून १० व्या खंडाच्या शेवटीं ताडयति इति सतः हें प्रक्षिप्त होय. ह्या व्युत्पत्तीचा अंतिक अर्थाशीं संबंध दिसत नाहीं.

**अपि तु इदम् अन्तिकनाम एव अभिप्रेतं स्यात्**

पण ( तु ) पुढील ऋचेंतील ( इदं ) तडित् शब्द जवळ ह्या अर्थीच अभिप्रेत असावा.

**दूरे चित् सन् तळिदिवाति रोचसे ( १।९४।७ )। दूरे अपि सन् अन्तिके इव संदृश्यसे इति**

चित् = अपि. तळित् = अन्तिके. अति रोचसे = संदृश्यसे. महाराष्ट्रपाठांत सन्दृश्यसे असें आढळतें, पण तसें लिहिणें बरोबर नाहीं; अनुस्वारच पाहिजे. हे अग्नि, दूर असूनही तूं जवळच्या सारखा दिसतोस. पण एथेंही तडित् म्हणजे वीज. विजेसारखा दूर असतांनाही तूं प्रकाशतोस. अतिरोचसे = संदृश्यसे असा अर्थ बरोबर नाहीं. तडित् म्हणजे वध ह्या अर्थी यास्कानें ऋचा द्यावयास पाहिजे होती. पण तसें त्याला करतां आलें नाहीं ह्याचें कारण तडित् शब्द फक्त दोनदां ऋग्वेदांत आला आहे.

**वज्रनामानि उत्तराणि अष्टादश (२।२० ) वज्रः ( ९ ) कस्मात् वर्जयति इति सतः**

वज्रवाचक पुढील नामें अठरा. वज्र शब्द कसा झाला ? वर्जयति = वियोजयति प्राणैः प्राणिनः (दुर्गः). जेव्हां वज्र प्राण्यांचे प्राण हरण करतें तेव्हां त्यास वज्र संज्ञा प्राप्त होते.

**तत्र कुत्सः ( ११ ) इति एतत् कृन्ततेः**

त्यांत कुत्स शब्द आहे; तो कृन्त् कापणें ह्यापासून. वज्र जेव्हां शीर कापतें तेव्हां त्यास कुत्स संज्ञा प्राप्त होते.

**ऋषिः कुत्सो भवति । कर्ता स्तोमानाम् इति औपमन्यवः**

कुत्स नांवाचा ऋषि होता. त्याला कुत्स म्हणण्याचें कारण तो स्तोम करी असें औपमन्यव म्हणतो. कुत्सः = क् + उ + त् + सः. क् = कर्ता. स् + त् + उ = स्तु = स्तोमान्.

**अत्रापि अस्य वधकर्म एव भवति**

विशिष्ट ऋषि ह्या अर्थीं जो कुत्स शब्द त्यांतही वध हाच अर्थ आहे. म्हणजे हाही कुत्स शब्द कृन्त् कापणें ह्यापासून झाला आहे. गुर्जरपाठ अथापि आहे; पण तो अशुद्ध होय; कारण अथापि ह्यानें केलेल्या विधानाचें नवीन कारण देऊन समर्थन केलें असतें; एथें कर्ता स्तोमानां ह्याचें समर्थन करावयाचें नसून त्याच्या उलट विधान करावयाचें आहे; म्हणून अत्रापि हाच पाठ बरोबर आहे.

**तत्सखः इन्द्रः शुष्णं जघान इति**

कारण कुत्साचा मित्र जो इन्द्र तो शुष्णाला मारता झाला. शुष्णाचें डोकें कापलें म्हणजे पर्यायानें कुत्सानेंच तें कापलें असें बहारीचें कारण यास्काचार्य देतात. वज्रवाचक कुत्स शब्दाचें उदाहरण यास्कानें द्यावयास पाहिजे होतें पण सांपडतच जर नाहीं तर देणार कुठून ?

**ऐश्वर्यकर्माणः उत्तरे धातवः चत्वारः ( २।२१ )**

सत्ता चालविणें ह्या अर्थाचे पुढील धातु चार.

**ईश्वरनामानि उत्तराणि चत्वारि( २।२२ )**

सत्ताधीशवाचक पुढील नामें चार

**तत्र इनः (४) इति एतत् सनितः ऐश्वर्येण इति वा**

त्यांत इन शब्द आहे. तो सन् भोगणें ह्यापासून झाला आहे. ज्याला ऐश्वर्य भोगतें म्हणजे ऐश्वर्याला ज्या सत्ताधीशाच्या ठायीं राहणें आवडतें तो सनः म्हणजे इनः. अथवा सनितम् अनेन ऐश्वर्यम् इति वा = जो ऐश्वर्य भोगतो तो. म्हणून सन् पासून इन. जितकी अचरट व्युत्पत्ति तितकी निरुक्तकारांस पसंत. पहिलीला अग्रस्थान ह्यामुळेंच. एति इति इनः इति क्षीरस्वामी ( अमर ३।३।१११ ).

अत इनोषि विधते चिकित्वः ( ६।५।३ ) = हे दात्या ( चिकित्वः ) ह्या धनभांडारांतून ( अतः ) हवि देणाऱ्यास ( विधते ) किंवा धन देणाऱ्यास धन देतोस ( इनोषि ). ह्यावरून इनोति असौ इनः = दाता; म्हणजे इ ( = देणें ) ह्यापासून इन.

## खंड १२ वा.

**यत्रा सुपर्णा अमृतस्य भागमनिमेषं विदथाभिस्वरन्ति ।**

**इनो विश्वस्य भुवनस्य गोपाः स मा धीरः पाकमत्रा विवेश ( १।१६४।२१ )**

**यत्र सुपतनाः आदित्यरश्मयः अमृतस्य भागम् उदकस्य अनिमिषन्तः वेदनेन अभिस्वरन्ति इति वा अभिप्रयन्ति इति वा**

यत्रा = यत्र. देवत्रा, मर्त्यत्रा यांत जो त्रा तोच यत्रा, अत्रा, तत्रा ह्यांत एकेकाळीं होता. सुपर्णाः = सुपतनाः. आदित्यरश्मयः हें अध्याहृत. पर्ण शब्द पत् पासून निघाला आहे. महाराष्ट्रपाठ सुपर्णाः सुपतनाः असा आहे. अमृतस्य = उदकस्य. अमृतस्य शब्द भाष्यांत कां घातला ? अनिमेषं = अनिमिषन्तः = डोळे न मिटतां. दुर्गपाठ अनिमिषमाणाः असा होता. अनिमिषमाणाः इव = आदरवन्तः ( दुर्गः )= अत्यादरानें, फार काळजीनें. विदथा = वेदनेन = ज्ञानानें, आपल्याला काय करावयाचें आहे तें जाणून. अभिस्वरन्ति = अभितपन्ति = ( पृथिवींतलें पाणी घेऊन सर्व जग ) तापवितात. किंवा अभिप्रयन्ति = सूर्यमंडलाकडे ( परत ) जातात. दुर्गपाठ प्रयान्ति असा होता. ह्याप्रमाणें अभि + स्वृ ह्याचे तापविणें व जाणें असे दोन्ही अर्थ एथें लागू पडतात.

**ईश्वरः सर्वेषां भूतानां गोपायिता आदित्यः**

इनः = ईश्वरः. विश्वस्य = सर्वेषाम्. भुवनस्य = भूतानाम्. गोपाः = गोपायिता. आदित्यः अध्याहृत.

**स मा धीरः पाकमत्रा विवेश इति । धीरः धीमान् । पाकः पक्तव्यः भवति । विपक्वप्रज्ञः आदित्यः**

धीरः = धी + रः. रः = मान्. धीरः = बुद्धिमान्. पाकं = पाकः = विपक्वः. विभक्तीः संनमयेत् ( निरु० २।१ )= अर्थाकरितां विभक्ति बदलाव्यात ह्या उपदेशाचें हें उदाहरण होय. हा पाक कोण तर ज्याची बुद्धि किंवा ज्ञान फार पक्व दशेला गेलें आहे असा आदित्य.

**इति उपनिषद्वर्णः भवति**

उपनिषद् म्हणजे रहस्यविद्या किंवा वेदांतविद्या. हा मंत्र उपनिषद् स्वरूपाचा आहे. ह्यांत गूढार्थ आहे. उपनिषद्भावेन वर्ण्यते इति मन्त्रः उपनिषद्वर्णः ( दुर्गः ).

**इति अधिदैवतम्**

असा देवतापर म्हणजे सूर्य ही जी देवता तिला अनुलक्षून वरील अर्थ केला आहे.

**अथ अध्यात्मम्**

आतां आत्मपर अर्थ.

**यत्र सुपतनानि इन्द्रियाणि अमृतस्य भागं ज्ञानस्य अनिमिषन्ति वेदनेन अभिस्वरन्ति इति वा अभिप्रयन्ति इति वा**

सुपर्णाः = सुपतनानि. इन्द्रियाणि अध्याहृत. महाराष्ट्रपाठ सुपर्णाः सुपतनानि असा आहे. अमृतस्य = ज्ञानस्य. अनिमिषं = अनिमिषन्ति = डोळे न मिटतां, फार काळजीनें. इंद्रियें विषयांकडे जाऊन व काळजीनें त्यांचें ज्ञान संपादन करून त्या ज्ञानासह पुरुषाच्या बुद्धीला तापवितात म्हणजे बुद्धि ज्यास्त ज्यास्त विषय-ग्राहक होते.

**ईश्वरः सर्वेषाम् इन्द्रियाणां गोपायिता आत्मा**

भुवनस्य = इन्द्रियाणाम्. आत्मा अध्याहृत.

**स मा धीरः पाकमत्राविवेश इति । धीरः धीमान् पाकः पक्तव्यो भवति । विपक्वप्रज्ञः आत्मा**

इति आत्मगतिम् आचष्टे. ह्याप्रमाणें मंत्र आत्म्याची गति म्हणजे आत्म्याला ज्ञान कसें मिळतें तें सांगतो. एथें सुद्धां इति उपनिषद्वर्णः भवति असें म्हणावयास पाहिजे होतें; कारण आत्मपर अर्थ वरील आदित्यपर अर्थाहून फार गूढ आहे. एवढेंच नाहीं तर आदित्यपर अर्थ गूढ नसून आत्मपर अर्थच गूढ आहे. इति उपनिषद्वर्णः भवति हें चुकीनें वर घातलें गेलें असावें. तें वाक्य एथेंच पाहिजे.

ऋचेचा देवतापर अर्थः—जेव्हां सूर्याचे किरण आपआपला पाण्याचा भाग घेऊन व आपल्याला काय करावयाचें आहे तें जाणून पृथिवीला तापवितात किंवा सूर्यमंडलाकडे परत जातात तेव्हां सर्व प्राणिमात्रांचा ईश जो सूर्य तो बुद्धिमान् व विपक्वप्रज्ञ असल्यामुळें माझ्यांत शिरतो.

अध्यात्मपर अर्थः— जेव्हां इंद्रियें ज्ञानाचा आपआपला भाग घेऊन व आप-ल्याला काय करावयाचें आहे हें जाणून बुद्धीला तापवितात म्हणजे विषय ग्रहण कर-ण्याला बुद्धीला ज्यास्त ज्यास्त तयार करतात तेव्हां सर्व इंद्रियांचा ईश जो आत्मा तो बुद्धिमान् व विपक्वप्रज्ञ असल्यामुळें माझ्यामध्यें शिरतो.

इनः सूर्ये प्रभौ ( अमर ३।३।१११ ); इन म्हणजे सूर्य किंवा प्रभु. पण हे दोन्हीही अर्थ ऋग्वेदांत नाहींत. वसुन इनस्पति ( १।५३।२ ) = इंद्र हा धनाचा दाता आहे. इनः० सखा० धृष्णुः ( ७।२०।५ ); एथें तिन्ही शब्दांचा अर्थ दाता. इन इनस्य वसुनः ( १।१४९।१ ); इनस्य = वसुनः = धनाचा. धी ( = धन ) + रः = धीरः = धनवान्. सु = पर्ण = विश्व = भुवन = अमृत = विदथ = धन. पाक = धनहीन. स्वयं यजस्व दिवि देव देवान् किं ते पाकः कृणवन्नप्रचेताः ( १०।७।६ ) = हे धनवंता ( देव ) अग्नि, आमच्या धनांत ( दिवि ) तूंच ( स्वयं ) धन [ देवान् ] घाल [ यजस्व ]. निर्धन [ पाकः = अप्रचेताः ] तुला [ ते ] काय [ किं ] देणार [ कृणवत् ] ? अग्नीला अपाक [ = धनवान् ] म्हटलें आहे [ ६-११-४।६-१२-२ ]. ज्या धनभांडारांतला [ यत्र ] धनाचा [ अमृतस्य ] भाग घेतात [ स्वरन्ति ] किंवा देतात [ स्वरन्ति ] तेथें [ अत्र ] अतिशय धनाचा [ विश्वस्य = भुवनस्य ] तो दाता [ इनः = गोपाः ] निर्धन [ पाकं ] जो मी त्या मला [ मा ] सधन करता झाला

[ आविवेश ]. अ = नि = मि = स = धन. अनिमिषं भागं = अतिशय धन. विदथा = विदथानि = धनानि. अभि = धन. विश् = धन देणें. आ = धन. हा दाता कोण ? सूक्त १।१६४ ह्यांतील बहुतेक ऋचा गूढार्थपर आहेत. सर्व देवांत मोठा जो देव तो दाता असावा. अमृत, इन वगैरेंचे अर्वाचीन अर्थ घेतल्यानें ऋचेचा भलता अर्थ होतो.

## खंड १३ वा.

**बहुनामानि उत्तराणि द्वादश ( ३।१ )। बहु कस्मात्। प्रभवति इति सतः**

पुष्कळ ह्या अर्थाचीं पुढील नामें बारा. बहु शब्द कसा झाला ? जी वस्तु पुष्कळ असते तिची सत्ता सर्वत्र चालते; तेव्हां बहु शब्दाचा उपयोग करावयाचा. म्हणजे बहु = भू. बंहते बहु ( अमर ३।१।६३ क्षीरस्वामी ). बहि वृद्धौ ( धा० १।६३४ ).

**ह्रस्वनामानि उत्तराणि एकादश [ ३।२ ]। ह्रस्वः ह्रसतेः**

ह्रस्ववाचक पुढील नामें अकरा. ह्रस् क्षय पावणें ह्यापासून ह्रस्व. ह्रस शब्दे ( धा० पा० १।७१२ ).

**महन्नामानि उत्तराणि पञ्चविंशतिः [ ३।३ ]। महान् कस्मात्**

मोठें ह्या अर्थाचीं पुढील नामें पंचवीस. महान् शब्द कसा झाला ?

**मानेन अन्यान् जहाति इति शाकपूणिः**

महान् = म + हा + न्. म = मानेन. हा = जहाति. न् = अन्यान्. लोकांत मान पावल्यानें जो दुसऱ्यांना मागें टाकतो तो महान् असें शाकपूणि म्हणतो. महत् शब्दाची काय व्युत्पत्ति ? ह्या शब्दांत हा नाहीं व त् आहे.

**मंहनीयः भवति इति वा**

किंवा मोठा मनुष्य मंहनीय म्हणजे पूज्य असतो म्हणून तो महान्. मह पूजायां ( धा० पा० १।७३१ ) व महि वृद्धौ (धा० पा० १।६३५) असे दोन धातु आहेत. मंहनीय हें महि वृद्धौ ह्यापासून आहे, मह पूजायां पासून नाहीं.

**तत्र ववक्षिथ [ १४ ] विवक्षसे [ १५ ] इति एते वक्तेः वा वहतेः वा साभ्यासात्**

त्यांमध्यें ववक्षिथ व विवक्षसे अशीं दोन नामें आहेत; तीं वच् किंवा वह् ह्याला अभ्यास होऊन झालीं आहेत. वच्, ववच्. ववच् + स् + इ + थ = ववक्षिथ. वह्, ववह्. ववह् + स् + इ + थ = ववक्षिथ. वच्, विवच्. विवच् + स् + अ + से = विवक्षसे. वह, विवह्. विवह् + स् + अ + से = विवक्षसे. हीं दोन नामें असलीं पाहिजेत असें महन्नामानि ह्या शब्दांवरून दिसतें. पण दुर्ग हीं आख्यातें आहेत असें म्हणतो. सायणाचार्य विवक्षसे नाम आहे असें म्हणतात ( महन्नाम एतत् ऋ० सं० १०।

२११ व १०।२४।१ सायणभाष्य । विवक्षसे इति महन्नाम वक्तेर्वा वहतेर्वा सनन्तस्य रूपम् ऋ० सं० १०।२१।८ सायणभाष्य ) व विवक्षसे त्वं महान् भवसि असा सर्वत्र अर्थ करतात. ववक्षिथ = वहसि किंवा वहति असें ते म्हणतात. ह्या शब्दाचा महत् असा अर्थ त्यांनीं केला नाहीं. ववक्षिथ हा शब्द दहा वेळां आला आहे. त्यांपैकीं कोठेंही महान् अर्थ संभवत नाहीं. चार ठिकाणीं तें द्वितीयान्तकर्मयुक्त व इतर चार ठिकाणीं तृतीयान्तशब्दयुक्त असें आढळतें; राहिलेल्या दोन ठिकाणां-पैकीं एकांत तें कर्मणि असावें व दुसऱ्यांत कर्म अध्याहृत आहे असें वाटतें. कांहीं असलें तरी तें क्रियारूप आहे, नाम नाहीं. विवक्षसे हा शब्द ( १०।२१।१-८॥१०।२४।१-३ व १०।२५।१-११ ) बावीस वेळां आला आहे व वि वो मदे ह्याच्यापासून कांहीं शब्द सोडून तो आढळतो. जसें:—अग्निं न सुवृक्तिभिर्होतारं त्वा वृणीमहे । यज्ञाय वृक्तबर्हिषे वि वो मदे शीरं पावकशोचिषं विवक्षसे [ १०।२१।१ ] = वृक्तबर्हिषे यज्ञाय शीरं पावकशोचिषं होतारं त्वाम् अग्निम् = सुवृ-क्तिभिः आवृणीमहे न सद्यः. ह्या ऋचेंत वि वो मदे व विवक्षसे हे शब्द विनाकारण घुसडले आहेत. यज्ञाय वृक्तबर्हिषे शीरं पावकशोचिषम् एवढ्यानें छंद व अर्थ दोन्ही पुरे होतात. वः युष्मभ्यं वि धने मदे दानाय वि धनं वक्षसे वहनाय असा अर्थ होईल. मदे हें मद् ह्याचें व वक्षसे हें वक्षस् म्हणजे वह् + स् + अस् ह्याचें चतुर्थी-एकवचन होईल. विचेतसे ह्यांतील वि ह्याचा धन असा अर्थ आहे. तेव्हां वि मदे = वि वक्षसे = धनं दातुं असा अर्थ केल्यास वक्षस् हें नाम होईल. मदे व वक्षसे हे तुमर्थी शब्द होत.

**गृहनामानि उत्तराणि द्वाविंशतिः [ ३।४ ] । गृहाः कस्मात् । गृह्णन्ति इति सताम्**

घर ह्या अर्थाचीं पुढील नामें बावीस. गृह शब्द कसा झाला ? जेव्हां घरें पाहुणे वगैरेंना आंत घेतात तेव्हां त्यांना गृह म्हणावें. तीं जर दुसरी क्रिया करीत असतील तर त्यांना दम, दुरोण, अस्त अशीं नांवें द्यावींत.

**परिचरणकर्माणः उत्तरे धातवः दश [ ३।५ ]**

सेवा करणें ह्या अर्थाचे पुढील धातु दहा.

**सुखनामानि उत्तराणि विंशतिः [ ३।६ ] सुखं कस्मात्**

सुखवाचक पुढील नामें वीस. सुख शब्द कसा झाला ?

**सुहितं खेभ्यः । खं पुनः खनतेः**

सुखं = सु + खम्. सु = सुहितम्. खं = खेभ्यः. इंद्रियांना चांगल्या रीतीनें दिलेलें. सुख शब्द ऋग्वेदांत नेहमीं रथाला लावलेला आढळतो व ह्याचा अर्थ धनानें भरलेला असा आहे. ख शब्द कसा झाला विचाराल तर तो खन् खणणें पासून झाला आहे. शरीरांत खणलेलीं भोंकें म्हणजे इंद्रियें. ऋग्वेदांत खं = खाण.

**रूपनामानि उत्तराणि षोळश [ ३।७ ] । रूपं रोचतेः**

रूपवाचक पुढील नामें सोळा. रूप शब्द रुच् शोभणें पासून झाला आहे. रुप् धातु दहाव्या गणांत असून त्याचे अर्थ [ १ ] तयार करणें, [ २ ] चिन्हित करणें, [ ३ ] पाहणें असे आहेत. तेव्हां ह्या धातूपासून रूप शब्द निघाला असें म्हणण्यास कोणती हरकत ? यास्ककालीं हा धातु नव्हता कीं काय ?

**प्रशस्यनामानि उत्तराणि दश [ ३।८ ]**

स्तुत्य ह्या अर्थी पुढील नामें दहा.

**प्रज्ञानामानि उत्तराणि एकादश ( ३।९ )**

प्रज्ञावाचक पुढील नामें अकरा.

**सत्यनामानि उत्तराणि षट् ( ३।१० ) । सत्यं कस्मात् । सत्सु तायते**

सत्यवाचक पुढील नामें सहा. सत्य शब्द कसा झाला ? सत्यं = सत् + त्यम्. त्यं = तायते. सज्जनांमध्यें पसरलें असतें म्हणून तें सत्य. सत्याला सज्जनांशिवाय दुसरें ठिकाण नाहीं. अथवा

**सत्प्रभवं भवति इति वा**

सत् + त्यम्. त्यं = प्रभवम्. सज्जनांमधूनच सत्य निष्पन्न होतें. ह्या दोन व्युत्पत्तींत त्यांचे भिन्न अर्थ आहेत. शाकटायनानें सत्य शब्दाची निराळी व्युत्पत्ति दिली आहे. ( निरु० १।१३ ). तेव्हां ती यास्कास मान्य नसावी म्हणून त्यानें एथें निराळ्या व्युत्पत्ति दिल्या आहेत. पहिला अध्याय यास्काचा नव्हे असें माझें मत आहे.

**अष्टौ उत्तराणि पदानि ( ३।११ ) पश्यतिकर्माणः धातवः चायति प्रभृतीनि च नामानि आमिश्राणि**

पुढील आठ पदें धातु व नामें ह्यांची भेसळ होय. पाहणें ह्या अर्थी धातु व चायति व तदनंतरचीं त्याच अर्थाचीं नामें अशीं तीं मिश्र पदें होत. महाराष्ट्रपाठांत उत्तरे धातवः असें आहे. पण उत्तराणि म्हटल्यावर उत्तरे शब्दाची जरूर नाहीं. दुर्ग म्हणतोः—कांहीं टीकाकार म्हणतात कीं, हीं आठ पदें कोठें धातु तर कोठें नामें होतात. पण दुसरे टीकाकार म्हणतात कीं चिक्यत्, चन, विचर्षणि व विश्वचर्षणि हीं चार नामें व बाकीचीं पदें धातु आहेत.

[ १ ] चिक्यत्, [ २ ] चाकनत्, [ ३ ] आचक्ष्म, [ ४ ] चष्टे, [ ५ ] विचष्टे, [ ६ ] विचर्षणिः, [ ७ ] विश्वचर्षणिः, [ ८ ] अवचाकशत्, अशीं तीं आठ पदें आहेत. ह्यांत चन नाहीं. ऋग्वेदांत चिक्यत् नसून निचिक्यत् असें पद आहे. चाकन्, चाकन, चाकनः चाकनत्, चाकनन्त, चाकनाम, चाकन्तु, चाकन्धि, चाकन्यात्, चकनन्त अशीं कन् धातूचीं १० रूपें आहेत; त्यांपैकीं चाकनत् मात्र घेतलें आहे. चक्ष्म किंवा आचक्ष्म असें रूपच नाहीं. चक्ष्चीं, अभिचष्टे, अवचष्टे, विचक्षे, संचक्षे वगैरे बरींच रूपें आहेत. चष्टे व विचष्टे हीं रूपें नाहींत. अवचाकशत् खेरीज प्रचाकशत्, विचाकशत्, चाकशीमि, चाकशीति अशीं

रूपें आहेत. अनेक रूपांपैकीं कांहीं घेणें हा निघंटूंत अपवाद नाहीं. नामें व धातु ह्यांची कोठें कोठें भेसळही आढळते. चर्षणि म्हणजे लोक व धन. विचर्षणिः = विश्वचर्षणिः = धनवान्. चर्षणि ह्याचा पाहणारा अर्थ कसा निघाला हें कळत नाहीं.

**नव उत्तराणि पदानि सर्वपदसमाम्नाय ( ३।१२ )**

(१) हिकं, (२) नुकं, (३) सुकं, (४) आहिकं, (५) आकीं (६) नकिः, (७) माकिः, (८) नकीं, (९) आकृतं ह्यांत हि, नु व सु ह्यांना कं जोडून पहिले तीन शब्द झाले आहेत. वास्तविक तीं पदें एक नसून हि कं, नु कं व सु कं अशीं वेगळीं लिहिलेलीं असतात. आहिकं असें पद नाहीं. आकीं ( ऋ. सं. १।१४।९ ) हें एकदांच आलें असून त्याचा अर्थ कळत नाहीं. नाकिः (= कोणीही नाहीं. ) हा शब्द न + किः असा संयुक्त शब्द आहे. ह्याचे एकवचनीं व बहुवचनीं असे दोन्ही प्रकारचे प्रयोग आढळतात. नकीं = कोणीही नाहीं असा अर्थ ( ८।७८।४ ) एथें आहे; पण ( ८।७८।५ ) ह्यांत त्याचा न असा अर्थ आहे. माकिः हा अर्थानें नाकिः सारखा च शब्द आहे. माकीं हाही तसाच. तो ह्या खंडांत कां दिला नाहीं ? आकृतं असें पद ऋग्वेदांत नाहीं. ह्या खंडांत तीन क्रियाविशेषणें व तीन निषेधात्मक सर्वनामें आहेत; आकीं ह्याचा अर्थ कळत नाहीं; पण तेंही क्रियाविशेषण असावें. राहिलेलीं दोन पदें ऋग्वेदांत नाहींत. सर्वपदांची गणना कोठें दिसत नाहीं. सर्वजातींचीं पदें म्हणावींत तर क्रियारूपें कोठें आहेत ?

**अथ अतः उपमाः ( ३।१३ ) । यत् अतत् तत्सदृशम् इति गार्ग्यः**

आतां ह्याच्यापुढें उपमा म्हणजे उपमावाचक शब्द दिले आहेत. जेव्हां (यत्) वस्तु ती नसून ( अतत् ) तिच्यासारखी ( तत्सदृशं ) आहे ( असें म्हणतात तेव्हां उपमा होते ) असें गार्ग्य म्हणतो.

हें लक्षण थोडक्या शब्दांत असून स्पष्ट आहे. साधर्म्यम् उपमा भेदे हें मम्मटानें दिलेलें लक्षण तीनच शब्दांत आहे हें खरें; पण त्याचा अर्थ सहज लक्षांत येत नाहीं.

**तत् आसां कर्म**

आसाम् उपमानां तत् कर्म = वस्तु ती नसून तिच्यासारखी आहे म्हणजे वस्तु भिन्न असून त्यांच्यांत साधर्म्य आहे हें दाखविणें उपमांचें कार्य आहे. मुख व चंद्र ह्या भिन्न वस्तु आहेत; पण मुख चंद्र नसून चंद्रासारखें आहे असें उपमा दाखविते.

**ज्यायसा वा गुणेन प्रख्याततमेन वा कनीयांसं वा प्रख्यातं वा उपमिमीते**

ज्यायसा गुणेन कनीयांसं गुणम् उपमिमीते । प्रख्याततमेन गुणेन प्रख्यातं गुणम् उपमिमीते = शुभ्रपणा हा गुण चंद्रांत ज्यास्त आहे व मुखांत कमी आहे; तथापि कवि मुखाच्या शुभ्रपणाची चंद्राच्या शुभ्रपणाशीं तुलना करतो. शौर्य ह्या गुणानें रामचंद्र प्रख्याततम आहे; त्या मानानें शिवाजीसारखे पुरुष नुसते प्रख्यात होत. तथापि कवि शिवाजी रामचंद्रासारखा आहे असें म्हणतो. पण शौर्य रामचंद्रांत अतोनात आहे, शिवाजीसारख्या पुरुषांत कमी आहे असें म्हटलें असतां

दोन्ही प्रकारच्या उपमा एकाच जातीच्या होतील. कदाचित् शुभ्रपणांत चंद्र प्रख्याततम आहे, पण मुख मुळींच प्रख्यात नाहीं तथापि मुखाची चंद्राशीं तुलना होते असें यास्कास वाटल्यावरून त्यानें दोन प्रकार केले असतील. यास्क गुणागुणांत तुलना होते असें म्हणतो पण तसें म्हणणें बरोबर नाहीं. एकगुणविशिष्ट अशा दोन वस्तूंत तुलना होते; तुलना होण्याचें कारण समान गुण. गुणेन ज्यायसा, गुणेन कनीयांसं, गुणेन प्रख्याततमेन व गुणेन प्रख्यातं असा अन्वय केल्यास गुणानें जो ज्यास्त किंवा गुणानें जो प्रख्याततम त्याच्याशीं गुणानें जो कमी किंवा नुसता प्रख्यात त्याची तुलना कवि करतो असा अर्थ होईल; पण तसा अन्वयार्थ यास्काच्या मनांत नसावा. दुर्ग अप्रख्यातं असें पद घेतो; पण शिवाजी वगैरेंतील शौर्य हा गुण अप्रख्यात कसा म्हणतां येईल ? प्रख्याततम ह्यांतील तम प्रत्ययावरून प्रख्यात असेंच पद पाडणें योग्य दिसतें. ज्यायसा वगैरे उपमेचें लक्षण नसून लक्षणाची ज्यास्त फोड आहे.

**अथापि कनीयसा ज्यायांसम्**

उपमिमीते ह्या क्रियापदानें वाक्य पुरें करावयाचें. कधीं कधीं कवि कमी गुणाशीं ज्यास्त गुणाची म्हणजे कमी योग्यतेच्या किंवा हीन अशा वस्तूशीं ज्यास्त योग्यतेच्या वस्तूची तुलना करतो.

## खंड १४ वा.

**तनूत्यजेव तस्करा वनर्गू रशनाभिर्दशभिरभ्यधीताम्** ( ऋ. सं. १०।४।६ )

**तनूत्यक् तनूत्यक्ता**

दुर्गवृत्तीच्या कांहीं पोथ्यांत तनूं त्यक्त्वा चौर्याभिप्रायेण हर्तव्यं वा मर्तव्यं वा इति कृताध्यवसायौ असें आहे. त्याचा अर्थः—चोरी करूं किंवा मरूं असे जिवावर उदार झालेले. तनूत्यक्ता हा पाठ बरोबर नसावा. तनूत्यक्तौ असा पाहिजे. तनूत्यक्तौ = तन्वा त्यक्तौ = ज्यांना त्यांच्या शरीरानें टाकून दिलें आहे, जे जे जिवावर उदार झाले आहेत असे. तनूत्यजा = तनूत्यजौ = तनूत्यक्तौ. तनूत्यक् तनूत्यजौ तनूत्यजः असा तो शब्द चालतो. तनूं त्यजति असौ तनूत्यक्. ऋग्वेदभाषेंत तन्वं त्यजति असौ असा विग्रह होईल.

**वनर्गू वनगामिनौ**

वनर्गू = वनर् + गू. वनर् = वन. गू = गामिनौ. रानांत राहून वाट मारणारे, वाटमारे.

**अग्निमन्थनौ बाहू तस्कराभ्याम् उपमिमीते**

अग्नीचें मंथन करणारे बाहू दर्जानें श्रेष्ठ; तथापि दर्जानें कनिष्ठ असे जे चोर त्यांच्याशीं ऋषीनें बाहूंची तुलना केली आहे.

**तस्करः तत्करोति यत् पापकम् इति नैरुक्ताः**

तस्करः = तस् + करः. तस् = तत्. जें पापयुक्त असतें तें करतो म्हणून

चोराला तस्कर म्हणतात अशी निरुक्तकार व्युत्पत्ति करतात. वाईट शब्दांची व्युत्पत्ति देतांना त्यांना पाप दिसतें. तायु पद्दा. ( ४।२४ ). तद्बृहतोः करपत्योः चोरदेवतयोः सुट् तलोपश्च ( पा. ६।१।१५७ वार्तिक ). तत् करोति ह्याच्याबद्दल महाराष्ट्रपाठ तत्करः भवति असा आहे.

**तनोतेः वा स्यात्**

किंवा तन् पासून तस्कर शब्द झाला असेल. कारण तस् हें तन्पासून व कर कृपासून झालें आहे. तेव्हां

**संततकर्मा भवति अहोरात्रकर्मा वा**

चोर सतत काम करणारा असतो म्हणून तो तस्कर. तस् = सं + तत. करः = कर्मा. म्हणजे तो अहोरात्रकर्मा; रात्रंदिवस जो चोरी करतो तो तस्कर.

**रशनाभिर्दशभिरभ्यधीताम् । अभ्यधीताम् इति अभ्यधाताम्**

अभ्यधीताम् = अभ्यधाताम्. अभ्यधीताम् = प्रतिनिबध्नीतः ( दुर्गः ). दुर्गवृत्तींत तनोतेः वा, अहोरात्रकर्मा वा व अभ्यधातां नाहीं. तनोतेः वा हे शब्द नसले तरी संततकर्मा ह्या त्या शब्दांचा अर्थ दिला आहे. संततकर्मा = अहोरात्रकर्मा असा अर्थ असल्यामुळें वा नको आहे. धी = धरणें, पकडणें. अभि + अ + धीतां = अभ्यधीतां पकडते झाले, किंवा पकडले गेले. बाहू शब्द अध्याहृत घेण्यास आधार काय ? ह्या ऋगर्धाचा पुढील अर्धाशीं कांहीं संबंध नाहीं व मागच्या ऋचांशींही संबंध नाहीं. जिवावर उदार झालेल्या व रानांत राहणाऱ्या चोरट्यांना जसें दोऱ्यांनीं म्हणजे बोटांनीं बांधून टाकलें, हा या ऋगर्धाचा अर्थ असावा हे दोघे कोण ? कदाचित् सोम कुटणारे दोन ग्रावे असतील. दुर्ग म्हणतो :—दोन चोर जसे वाटमारूंना दोऱ्यांनीं बांधतात तसे दोन हात अग्नीला पकडतात. प्र तं मह्या रशनया नयन्ति ( ४।१।९. )=मोठ्या दोरीनें अग्नीला पुढें ओढून नेतात. ही रशना म्हणजे स्तुति असें सायणाचार्य म्हणतात. रशनाभिः दशभिः ह्याचा अर्थ ते देत नाहींत. अश्वं न त्वा वाजिनं मर्जयन्तोऽच्छाबर्ही रशनाभिर्नयन्ति ( ९।८७।१ )=जसें घोड्याला दोरीनें बांधून नेतात तसें सोमरस काढणारे ब्राह्मण सोमाला स्नान घालून दहा बोटांनीं धरून त्याला दर्भाकडे नेतात. एथें रशना म्हणजे बोटें. अग्नीला बोटांनीं कोण धरील ? सोम बोटांनीं धरणें अगदीं साहजिक आहे. तनू व त्यज् ह्या दोहोंचाही अर्थ धन. तनूः धनम् । तेन युक्तं त्यक् ययोः तौ = ज्यांच्यापाशीं अतिशय धन आहे असे. ईळते त्वाग्ने सुत्यजं ( ८।६०।१६ ); सुधनम् । तेन युक्तं त्यक् यस्य तम्. सुत्यक् व तनूत्यक् ह्यांचा अर्थ एकच. ये युध्यन्ते प्रधनेषु शूरासो ये तनूत्यजः । ये वा सहस्रदक्षिणा तांश्चिदेवापि गच्छतात् ( १०।१५४।३ ); एथें तनूत्यजः = सहस्रदक्षिणाः = अति श्रीमान्. त्यज् शब्द ह्या दोन समासांतच आढळतो. त्यजस् ( = धन ) असाही शब्द आहे. वनर्गु शब्द अध्रिगु, पृश्निगु, सप्तगु व सुगु ह्यांसारखा आहे. गु = धन. सुगुः = अति धनवान्. वन् = देणें वन किंवा वनर् = धन. वनर्गु = धनवान्. अप्यो वनर्गुः (१।१४५।५); अप् = वनर् =

गु = धन; अप्यः = वनर्गुः = धनवान्. वनर्गु शब्द ऋग्वेदांत दोनदांच आला आहे. तस्कर शब्द ऋग्वेदांत ५ वेळां आला असून सर्व ठिकाणीं त्याचा अर्थ चोर असा आहे. अतसाय्य ह्यांत तस म्हणजे धन; अ = अति; अतसाय्य = धनानें भरलेला. तेव्हां तस् हा एके काळीं धातु असून त्याचा अर्थ देणें असा असावा. तस् = क = र = धन. तस्करः = अति धनवान्. पथ एकः पीपाय तस्करो यथा एष वेद निचीनाम् ( ८।२९।६ ) = एक ( देव म्हणजे पूषा ) श्रीमानासारखा धन देतो. एथें तस्करः = श्रीमान् असा अर्थ असेल. तनूत्यजौ = वनर्गू = अति धनवान्. तस्करौ इव = दोन श्रीमानांप्रमाणें. अति धनाढ्य अशा दोन श्रीमानांना जसें दोऱ्यांनीं बांधतात तसें दोन प्राव्यांना सोम कुटणारे दहा दोऱ्यांनीं बांधतात म्हणजे दहा बोटांनीं धरतात. कदाचित् एथेंही चोरच अर्थ असेल. अरणि शब्द स्त्रीलिंगी असल्यामुळें तस्करांशीं त्यांची तुलना केली नसावी. अधीतां असें एक पद दिलें आहे व तो शब्द प्रस्तुत ऋचेंतच आला आहे. हा धातु कोणता? अधि + इतां अशीं दोन पदें असावींत. एतु इतां यन्तु अशीं आज्ञार्थी रूपें आहेत. अभि + अधि + इतां = सभोंवतीं गेलेले असोत, गराडा घातलेले असोत, वेढलेले, बांधलेले असोत.

**ज्यायान् तत्र गुणः अभिप्रेतः**

तत्र म्हणजे ह्या ऋचेंत गुण = दर्जा, मान्यता. दुर्गः—एवमत्र बाव्होर्ज्यायान् गुणः अभिप्रेतः। तयोः प्रशस्तत्वात्। अप्रशस्तयोः तस्करयोः कनीयान् = बाहु प्रशस्त म्हणजे स्तुत्य म्हणून त्यांचा दर्जा ज्यास्त; चोर अप्रशस्त म्हणजे निंद्य म्हणून त्यांचा दर्जा कमी असा ऋषीचा अभिप्राय आहे. पण हात कोणाचे ह्याच्यावर त्यांचा दर्जा अवलंबून राहील.

## खंड १५ वा.

**कुह स्विद्दोषा कुह वस्तोरश्विना कुहाभिपित्वं करतः कुहोषतुः।**
**को वां शयुत्रा विधवेव देवरं मर्यं न योषा कृणुते सधस्थ आ (१०।४०।२)**
**क स्विद् रात्रौ भवथः क दिवा**

कुह = क. कु + ह = कुह. इ + ह = इह. त्र या अर्थी एके काळीं ह प्रत्यय होता. कु + ह = कु + अ = क. ह चा सुलभ उच्चाराकरितां अ झाला असावा. यह (यत्र) तह (तत्र) हे शब्द एके काळीं प्रचारांत असावेत. अत्र ह्या अर्थी अह शब्द ऋग्वेदांत आढळतो. दोषा = रात्रौ = रात्रीं. वस्तोः = दिवा = दिवसां. भवथः अध्याहृत.

**क अभिप्राप्तिं कुरुतः। क वसथः**

अभिपित्वं = अभिप्राप्तिम्. पित्वं = प्राप्तिम्. हा अर्थ चुकीचा आहे. पित्व = सोम, सोमपान, अन्न. आपित्व, प्रपित्व, अभिपित्व, अपपित्व व सपित्व ह्या सोमपानाच्या निरनिराळ्या वेळा होत्या किंवा निरनिराळ्या वेळचीं हीं सोमपानें होतीं. करतः = कुरुतः. ऊषथुः = वसथः.

**कःवां शयने**

शयुत्रा = शयने = शयनावर.

शयु = मूल. शयुत्रा = शयुत्रौ = मुलाचें रक्षण करणारे. युवं ह कृशं युवम श्विना शयुं० उरुष्यथः (१०।४०।८), युवं शयोरवसं पिप्यथुर्गवि (१।११९।६) ह्या दोन ऋचांत अश्विनांनीं एका मुलाला दूध पाजून त्याचें रक्षण केलें असें म्हटलें आहे. शयु असें अग्नीला दोनदां (१।३१।२॥३।५५।६) व इंद्राला एकदां (४।१८।१२) म्हटलें आहे. दिवो नपाता वृषणा शयुत्रा (१।११७।१२) हीं तीन संबोधनें आहेत व धन देणारे, व शत्रूचे रक्षण करणारे असें अश्विनांना म्हटलें आहे. प्रस्तुत ऋचेंत शयुत्रा म्हणजे शयने अशी रीं सायणाचार्यांनीही ओढिली आहे! विधवा व योषा ह्यांनीं हा घोटाळा उत्पन्न केला!

**विधवा इव देवरम्**

विधवा जशी दिराला. ह्यानंतर देवरः कस्मात्। द्वितीयः वरः उच्यते असा महाराष्ट्रपाठ आहे. त्याचा अर्थः— देवर शब्द कसा झाला! दे = द्वि. दुसऱ्या वराला (नवऱ्याला) देवर म्हणतात.

**विधवा विधातृका भवति**

विधवा = वि + धवा. धव = धाता = आश्रय देणारा, पोसणारा असा भर्ता. जिला धाता नाहीं ती विधवा. धव धा पासून. अथवा

**विधवनात् वा। विधावनात् वा इति चर्मशिराः**

धू कांपणें. नवरा मेल्यामुळें ती फार (वि) कांपते म्हणून विधवा. अथवा वि+ धाव् पासून. नवरा मेल्यामुळें ती सैरावैरा धांवते व जो दिसेल त्याच्या पाठीमागें लागते. ही दुसरी व्युत्पत्ति चर्मशिरानें दिली आहे.

**अपि वा धवः (निघंटु २।३।३) इति मनुष्यनाम। तद्वियोगात् विधवा**

किंवा धव = मनुष्य. ह्याचें उदाहरण म्हणून देवराज प्रस्तुत ऋचेंतील विध- वेव देवरं हे शब्द देतो. धव शब्द ऋग्वेदांत नाहीं. धुनोति धवः [ अमर २।६।११ क्षीरस्वामी ] मनुष्य म्हणजे पुरुष. त्याच्या वियोगानें स्त्री विधवा होते. विगतः धवः भर्ता यस्याः सा ( अमर २।६।११ क्षीरस्वामी ) अँग्लो-सॅक्सन विड्वे किंवा विडवे. लातिन विडयुअस् = वियुक्त झालेला किंवा झालेली; लॅटिन् विडयुआ = (१) ज्याच्यावर द्राक्षाचे वेल वाढविले नाहींत असें झाड; (२) वियुक्त (स्त्री किंवा पुरुष); (३) विधवा. विद् = वियुक्त करणें. हाच धातु विधवा या शब्दांत असावा.

**देवरः दीव्यतिकर्मा**

देवर शब्द दीव् जुगार खेळणें ह्यापासून. दुर्गः— देवरः इति एष शब्दः दीव्यत्यर्थः। स हि भर्तुः भ्राता नित्यकालमेव तया भ्रातृभार्यया देवनार्थं व्रियते = देवर ह्याचा अर्थ जो खेळतो तो. भावाची बायको आपल्याबरोबर क्रीडा करण्या- करितां नवऱ्याच्या भावाची निवड करते. दिव् व वृ ह्या दोन धातूंपासून देवर शब्द

झाला अशी दुर्गाची समजूत असावी असें दिसतें. सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञी श्वश्र्वां भव। ननान्दरि सम्राज्ञी भव सम्राज्ञी देवृषु (१०।८५।४६); ह्या ऋचेवरून मूळ शब्द देवृ असावा. देवा देवरौ देवरः देवरं असा हा शब्द चालतो. यास्ककालीं देवृ शब्द प्रचारांत नव्हता कीं काय? पाणिनीय संस्कृतांत देवृ व देवर असे दोन्ही शब्द आहेत. मातृ, पितृ वगैरे शब्दांची व्युत्पत्ति जशी काल्पनिक तशी ह्या शब्दाचीही. वर जो महाराष्ट्रपाठ दिला आहे तो ह्या व्युत्पत्तीनंतर द्यावयास पाहिजे होता. भलत्या ठिकाणीं व्युत्पत्ति दिल्याचें आणखीही एक उदाहरण (निरुक्त ४।२७) एथें आढळेल.

**मर्यः मनुष्यः मरणधर्मा। योषा यौतेः। आकुरुते सद्मस्थाने**

मर्यः = मनुष्यः. मनुष्याला मर्य म्हणण्याचें कारण मरणें ही मनुष्याची एक स्वाभाविक अवस्था आहे. मरणं प्रकृतिः शरीरिणां असें रघुवंशांत कालिदास म्हणतो. मर्य म्हणजे मर्द. जो शत्रूला मारतो तो मर्य. मर्य शब्दाचा अर्थ एका लेखांत मी ठरविला आहे. यु मिश्रणे ( धा० २।२३ ) पासून योषा. पुरुषदेहाशीं मिश्रित होते म्हणून स्त्री योषा. १४ व्या खंडांतील ऋचा व ही ऋचा ह्यांत उपमादर्शक इव आला आहे. 'इदमिव' ( ३।१३।१ ) चीं हीं दोन उदाहरणें होत. यास्क नेहमीं एक उदाहरण देत असतो; येथें दोन कां? त्यानें दिलेलें उदाहरण कोणतें व प्रक्षिप्त कोणतें?

**अथ निपाताः पुरस्तात् एव व्याख्याताः ( १।४ )**

आतां निपातांचा अर्थ सांगावयाचा आहे. त्यांचें निरूपण पूर्वीच केलें आहे. हें सगळें वाक्य प्रक्षिप्त आहे; कारण एथें उपमादर्शक शब्दांचा विचार चालला आहे. दोषा, वस्तोः व अभिपित्वं हे शब्द करथः व ऊषतुः ह्या क्रियापदांचीं कर्में होत. तिहींचा अर्थ धन. त्रिर्वाजवतीरिषो अश्विना युवं दोषा अस्मभ्यमुषसश्च पिन्वतम् ( १।३४।३३ ) = हे अश्विनांनो, आम्हांस खूप ( वाजवतीः ) धन ( इषः = दोषाः = उषसः ) द्या ( पिन्वतं ). दोषावस्तर् हा समास ऋग्वेदांत तीनदां आला आहे. वस् ( = देणें ) + तृ = देणारा. दोषा धनं वस्ते ददाति असौ दोषावस्ता. हे दोषा-वस्तर् = हे धनदात्या. वस् + तुः = देणारा; धन. वस्तोः ही षष्ठी आहे. ऋग्वेदांत षष्ठ्यंत कर्में पुष्कळ वेळां येतात. क्षपो राजन्नु तं त्मनाग्ने वस्तोरुतोषसः ( १।७९।६ ) = हे अग्नि, तूं फार ( त्मना ) धन ( क्षपः = वस्तोः = उषसः ) देणारा ( राजन् ) आहेस. एकस्या वस्तोरावतं रणाय ( १।११६।२१ ) = हे अश्विनांनो, तुम्हीं खूप ( एकस्याः ) धन ( वस्तोः ) दिलेंत ( आवतं ). प्रस्तुत ऋचेंत ऊषतुः हें ऊषथुः पाहिजे. शय् = देणें. शय् + उः = शयुः = दाता; दान. शयुत्रौ = धन देणारे. कुह यान्ता सुष्टुतिं काव्यस्य दिवो नपाता वृषणा शयुत्रा ( १।११७।१२ ) = हे धन-दाते ( दिवः नपातौ = वृषणौ = शयुत्रौ ) अश्विनांनो, कोणाच्या एथें ( कुह ) धनाचें ( काव्यस्य ) दान ( सुष्टुतिं ) देणार ( यान्तौ ) अहांत? स = ध = स्थ = धन. सधस्थे = सधस्थाय = धनाचा सांठा व्हावा म्हणून—हे धनदाते ( शयुत्रा )

अश्विनांनो, जशी विधवा नियोगाकरितां दिराला जवळ घेते, जशी तरुणी मर्दाला कामपूर्तीकरितां जवळ घेते, तसा धनाचा सांठा व्हावा म्हणून कोण तुम्हांला जवळ करीत आहे, कोणीं तुम्हांला अडकवून ठेविलें आहे. असा खरा अर्थ आहे. कोण, कोण, कोण सांगा तो मनुष्य आहे कीं ज्याच्या घरीं तुम्ही धनाच्या राशीच्या राशी करीत अहां? कोणीं तुम्हांला अडकवून ठेविलें आहे? अशा रीतीनें उतावळी दर्शविली आहे.

**यथा इति कर्मोपमा**

कर्मणा उपमा कर्मोपमा. यथा शब्दानें उपमान व उपमेय ह्या दोहोंत क्रिया हा सामान्यधर्म असतो.

**यथा वातो यथा वनं यथा समुद्र एजति** ( ऋ० सं० ५।७८।८ )

ह्याचा पुढील अर्थ पुढीलप्रमाणें. एवा त्वं दशमास्य सहावेहि जरायुणा. जसा वारा, जसें वन, जसा समुद्र हलतो तसा हे दहा महिन्याच्या गर्भा हाल व जरायूसह मातेच्या उदरांतून खालीं [ म्हणजे बाहेर ] ये. येथें हालणें हा साधारण धर्म. ह्या सूक्तांत ९ ऋचा आहेत. त्यांपैकीं पहिल्या सहांचा शेवटल्या तीन ऋचांशीं कांहीं-एक संबंध नाहीं.

**भ्राजन्तो अग्नयो यथा** ( ऋ० सं० १।५०।३ )

आधींचे पाद पुढीलप्रमाणें. अदृश्रमस्य केतवो वि रश्मयो जनाँ अनु ह्याचे [ सूर्याचे ] किरण [ केतवः = रश्मयः ] अग्नीप्रमाणें झळकणारे [ विभ्राजन्तः ] जनांवर पडलेले दिसतात. प्रकाशणें, झळकणें हा साधारण धर्म.

**आत्मा यक्ष्मस्य नश्यति पुरा जीवगृभो यथा** ( ऋ० सं० १०।९७।११ )

ह्याच्या आधींचा अर्थ पुढीलप्रमाणें. यदिमा वाजयन्नहमोषधीर्हस्त आ दधे. ह्या ओषधि ज्याक्षणीं मी हातांत घेतों त्याच क्षणीं क्षयरोगाचा आत्मा नाश पावतो. तो कसा तर जिवंत पकडलेल्या [ चोरा ] चा आत्मा ठार मारण्याच्या अगोदरच नाश पावतो तसा. एथें नाश पावणें हा साधारण धर्म. यास्कानें हें एकच उदाहरण दिलें असावें. कारण वरील दोन उदाहरणांत उपमान तेवढें आहे; साधारण धर्म जी क्रिया ती उपमेयांतही आहे हें दाखवावयास पाहिजे. तिसऱ्या उदाहरणांत उपमेय व उपमान हीं दोनीही आहेत. वृषभं यथाजुरं [ ८।१।२ ], यस्य स्वादिष्ठा सुमतिः पितुर्यथा [ ८।८६।४ ], ह्या दोन ठिकाणीं साधारण धर्मक्रिया नाहीं.

**आत्मा अततेः वा । आप्तेः वा**

अत् जाणें ह्यापासून आत्मा. आत्मा सर्व ठिकाणीं गेलेला आहे. असें स्थल नाहीं कीं, जेथें आत्मा गेलेला नाहीं. किंवा आप् मिळविणें ह्यापासून. प्रत्येक व्यक्ति आत्मा मिळविते. ह्यावर शंका अशी कीं, प्रत्येकजण आत्मा मिळवितो म्हणजे आत्मे अनेक होतील. पण आत्मा एकच असल्यामुळें हें निर्वचन बरोबर नाहीं.

**अपि वा आप्तः इव स्यात् यावत् व्याप्तिभूतः इति**

तो व्यापक (व्याप्तिभूतः) म्हणजे सर्वत्र असल्यामुळें प्रत्येक व्यक्ति जणूं काय तो मिळविते. हें निर्वचन योग्य होईल. सर्वत्र असणारा आत्मा प्रत्येक वस्तूंत असणारच. विभक्त नसून तो विभक्त दिसतो. ही व्युत्पत्ति नव्हे तर आप् पासून आत्मा ह्याचें हें विवरण आहे.

**अग्निर्न ये भ्राजसा रुक्मवक्षसः ( ऋ० सं० १।६८।२ )। अग्निः इव ये भ्राजस्वन्तः रुक्मवक्षसः**

न = इव. भ्राजसा = भ्राजस्वन्तः = प्रकाशणारे, झळकणारे. दुर्गवृत्तींत भ्राजस्वन्तः ह्याच्याबद्दल भ्राजिष्णुतया रोचनाः किंवा रोचमानाः असें आहे. भ्राजस् ची भ्राजसा ही एकवचनी तृतीया आहे. महाराष्ट्रपाठांत ये व भ्राजस्वन्तः ह्याच्यामध्यें मरुतः = भ्राजमानाः रोचिष्णूरस्काः असे ज्यास्त शब्द आहेत. रुक्मवक्षसः = रोचिष्णूरस्काः. रुक्म = रोचिष्णु. वक्षः = उरः. रुक्म म्हणजे सूर्य (?), नंतर सूर्यासारखा झळकणारा अलंकार (२). वक्षःसु रुक्माः असें ऋग्वेदांत तीनदां (१।१६६।१०॥५।५४।११॥७।५६।१३) व वक्षःसु रुक्मान् असें एकदां (१।६४।४) आलें आहे. मरुत् हे नटवे होते व ते अंगावर नानाप्रकारचे अलंकार घालीत. त्यांच्या छातीवर सूर्याच्या आकाराचे सोनेरी बिल्ले असत. झळकणाऱ्या त्या बिल्ल्यांच्या प्रभेनें (भ्राजसा) मरुत् अग्नीसारखे दिसत होते. रोचिष्णूरस्काः हा शब्द दुर्गवृत्तींतून महाराष्ट्रपाठानें घेतला असेल. मूळांत भ्राजस्वन्तः होतें कीं भ्राजमानाः होतें हें सांगतां येत नाहीं. दुर्ग म्हणतो :—दुर्मदासो न सुरायां (निरु० १। ४) हें न (=इव) ह्याचें उदाहरण आधींच दिल्यामुळें कित्येकांच्या निरुक्तपाठांत अग्निर्न ये हें उदाहरण नसतें. दधिचित् (निरुक्त १।४) एथें चित् उपमार्थी आहे खरें; पण चित् उपमाप्रकरणांत ओघानें आला आहे; शिवाय छांदस उदाहरण देणें इष्ट आहे म्हणून पुढील खंडांत चतुरश्चित् हें उदाहरण यास्क देतो असें दुर्ग म्हणतो. पण तेथेंच दुर्मदासो न सुरायां ह्याप्रमाणें छांदस उदाहरण देण्यास काय हरकत होती? यास्काचार्यांच्या कृतीचें समर्थन करणें हाच दुर्गाचा हेतु सर्वत्र दिसतो. मूळच्या स्थितींतला निरुक्त ग्रंथ दुर्गाच्या आधींच कित्येक शतकें नाहींसा झाला होता. त्यांत नानाप्रकारचे बदल होत गेले, ज्यास्त मजकूर घातला गेला. ह्या ज्यास्त मजकुरापैकींच निरुक्ताचा पहिला अध्याय आहे असें माझें मत आहे.

## खंड १६ वा.

**चतुरश्चिद्ददमानाद्बिभीयादा नि धातोः।**

**न दुरुक्ताय स्पृहयेत् (१।४१)**

**चतुरः अक्षान् धारयते इति। तद्यथा कितवात् बिभीयात् एवमेव दुरुक्तात् बिभीयात्। न दुरुक्ताय स्पृहयेत् कदाचित्**

चतुरः = चतुरः अक्षान् = चार फांसे. गुर्जरपाठांत अक्षान् नाहीं; पण तो शब्द आवश्यक आहे. चित् = यथा. ददमानात् = धारयते इति कितवात् = (चार

फांसे ) हातांत घेतो म्हणून त्या जुगार खेळणाऱ्यापासून. चार फांसे टाकल्यानें भलतेंच दान पडतें. तीन किंवा दोन फांश्यांचें दान इतकें भयंकर नसतें. भयंकर दान पडल्यानें ज्याच्या विरुद्ध डाव जातो तो पण हरतो व भिकेला लागतो. धारयते इति तत् ह्याबद्दल दुर्गवृत्तींत धारयमाणात् आहे. तत् ह्यानें विषयारंभ होतो; तत् = आतां; तद्यथा हें चतुरः ह्याच्या आधीं घ्यावें. जसा एखादा जुगारी अट्टल जुगाऱ्याच्या हातांत चार फांसे पाहून भितो तशाप्रमाणें (एवमेव) घाणेरड्या शब्दांना ( दुरुक्तात् ) भ्यावें. वाईट भाषेची कधींही (कदाचित्) इच्छा करूं नये. वाईट भाषण ऐकूं नये. व बोलूं नये. चतुरः ददमानात् व न दुरुक्ताय स्पृहयेत् हे वगळून बाकीचे सर्व शब्द अध्याहृत आहेत. न दुरुक्ताय स्पृहयेत् ह्या पदामुळें दुरुक्तात् वगैरे अध्याहृत शब्द यास्कास सुचले असावेत. चित् हा शब्द एथें उपमार्थी आहे. दण्डो ददतेः धारयतिकर्मणः ( निरुक्त २।२ ); दद् = धारण करणें, हातांत धरणें. आ निधातोः ह्याचें विवरण भाष्यांत नाहीं. निधातोः आ = टाकण्याच्या आधीं. दान पडण्याच्या आधीं छाती धडधडते; पडल्यावर तितकें भय वाटत नाहीं असा दुर्ग अर्थ करतो.

न दुरुक्ताय स्पृहयेत् हे शब्द खेरीज करून बाकीची सर्व ऋचा दुर्बोध आहे. ददमानः म्हणजे देणारा असा अर्थ ४।२६।६ त आहे. ह्या दोन ऋचांखेरीज हा शब्द दुसरे कोठें आला नाहीं. दम् = देणें; ददम् अभ्यासानें. चतुरः म्हणजे ४ नसून असंख्य असा अर्थ आहे. रायः समुद्रान् चतुरोऽस्मभ्यं सोम विश्वतः । आ पवस्व सहस्रिणः ( ९।३३।६ ) = हे सोमा, तुझ्या खजिन्यांतून ( विश्वतः ) आम्हांला चार म्हणजे अमूप ( चतुरः = सहस्रिणः ) असे धनाचे (रायः) समुद्र म्हणजे भांडार दे (आ + पवस्व), आ = धन. धा = देणें. धा + तुः = देणारा. ददमान व निधातु ह्यांचा अर्थ एकच. असंख्य (चतुरः) धन (आ) देणाऱ्यापासून (ददमानात् = निधातोः) सुद्धां ( चित् ) माघार घ्यावी ( बिभीयात् ) म्हणजे दुसऱ्याचें धन – असंख्य असलें तरी– घेऊं नये. उक्त म्हणजे बोललेलें असा अर्थ नसून दिलेलें धन असा अर्थ आहे. अत्रेदु मे मंससे सत्यमुक्तं (१०।२७।१०) = हे इन्द्रा तूं मला (मे) धन (सत्यं = उक्तं) देतोस. इदं सूक्तं मरुतो जुषन्त (७।५८।६) = हे मरुतांनो, हें म्हणजे पुष्कळ धन (सु + उक्तं) द्या (जुषन्त). सु धनम्। तेन युक्तम् उक्तं धनम्. स्वर्गिरो ब्रह्म सूक्तं जुषेरत (१०।६५। १४) = अहो देवांनो, धन द्या (जुषेरत). स्वर् = गिरः = ब्रह्म = सु = उक्तं = धन. नू नव्यसे नवीयसे सूक्ताय साधया पथः (९।९।८) = हे सोम, आमच्याजवळ धनाचा खूप सांठा व्हावा म्हणून (सूक्ताय) धन (पथः) दे (साधय). नव्यस् = नवीयस् = धनानें भरलेलें; नव = धन. इन्दो सूक्ताय वचसे वयो धाः (९।९०।६) = हे सोमा, आम्ही श्रीमंत व्हावें म्हणून धन (वयः) धाः (दे). सूक्ताय = वचसे = धनलाभाय = धनवान् व्हावें म्हणून. सूक्ताय म्हणजे लोकांस आम्ही धन द्यावें म्हणून असाही अर्थ होईल. जें धन उदारपणें लोकांस दिलें जातें तें सूक्त; जें दिलें जात नाहीं म्हणजे केवळ

सांठविलें जातें तें दुरुक्त. स्पृह् = देणें (खंड ११ स्पार्ह शब्द पहा). जो धन सांठवितो अशा कृपणास किंवा नुसतें सांठवून ठेवण्यास धन देऊं नये.

ह्यानंतर ब्राह्मणा व्रतचारिणः व वृक्षस्य नु ते पुरुहूत वयाः ह्या दोन उपमा निघंटु ३।१३ त आहेत. ब्राह्मणाः व्रतचारिणः इत्येतदुपरिष्टात् व्याख्यास्यते (निरुक्त ९।६)। वृक्षस्य नु ते पुरुहूतवयाः इत्येत् पुरस्तात् व्याख्यातम् (निरुक्त १।४).चालू खंडांत ह्या उपमांचा निर्देश केला नाहीं. तसा उल्लेख दुर्गाच्या प्रतींत होता कीं नव्हता तें ठरवितां येत नाहीं.

**आ इति आकारः उपसर्गः पुरस्तादेव व्याख्यातः**

उपसर्ग जो आ त्याचें व्याख्यान मागें (निरुक्त १।३) केलें आहे.

**अथापि उपमार्थे दृश्यते । जार आ भगम् (ऋ० सं० १०।११।६)। जारः इव भगम्**

ह्या शिवाय आ हा उपमादर्शक असा ऋग्वेदांत आढळतो. जारः आ भगम् = जारः इव भगम् = जसा जार म्हणजे आदित्य पृथिवीवरील किंवा अंतरिक्षांतील भग म्हणजे सेव्य रस वर नेतो किंवा स्वतःचा प्रभा वर नेतो त्याप्रमाणें हे अग्नि, तूं आपल्याला – आपल्या ज्वालांना व प्रकाशाला – वर उचलून ने.

**आदित्यः अत्र जारः उच्यते । रात्रेः जरयित । स एव भासाम्**

ह्या ऋचेंत आदित्याला जार म्हटलें आहे. आदित्याला जार म्हणण्याचें कारण तो रात्रीला जीर्ण म्हणजे म्हातारी करतो म्हणजे रात्र हाकलून देतो, व चंद्रनक्षत्र वगैरेंचा प्रकाश तोच जीर्ण करतो म्हणजे नाहींसा करतो. स एव भासां हे शब्द प्रक्षिप्त असावेत; कारण उदाहृत ऋचा उपेसंबंधीं आहे.

**अथापि निगमः भवति । स्वसुर्जारः शृणोतु नः (६।५५।५) इति । उषसम् अस्य स्वसारम् आह साहचर्यात् रसहरणात् वा**

जरा म्हणजे आदित्य असा अर्थ जींत आहे अशी ऋचाही आहे. बहिणीचा जार आमचें ऐको अशी ती ऋचा. ऋषि उषा ह्याची म्हणजे आदित्याची बहीण असें म्हणतो. उषा आदित्याची स्वसा कशी? दोघें एकत्र संचार करतात म्हणून. बहीण व भाऊ जशीं एकत्र संचार करतात तशीं हीं दोघें. आदित्य भाऊ व उषा बहीण ही भाषा केवळ औपमिक होय. तसें नसल्यास दोघेंही जमिनीवर पडलेलें दंव वगैरे वाफेच्या रूपानें हरण करतात. रसहरणानें उषा आदित्याची बहीण कशी होते तें कळत नाहीं. नवराबायकोही सह संचार करतील व रस हरण करतील. सूर्येण सरति अथवा स्वयं सूर्येण सह रसान् सारयति अशी कदाचित् स्वसृ शब्दाची व्युत्पत्ति करून वरील दोन अर्थ निष्पन्न केले असतील. स्वसुः जारः हे शब्द द्व्यर्थी आहेत. बहिणीचा जार ही भाषा पूषा व उषा ह्यांना लावलेली पाहून ऐकणाराचें मन दुखावेल व त्याला राग येईल. स्व = सृ = धन. जॄ = देणें. स्वसुः जारः = धनाचा दाता जो पूषा तो आम्हांस (नः)धन देवो (शृणोतु). अशी ही शब्दकोटी आहे. ऋग्वेदांत अशा कोट्या व असे श्लेष वारंवार आढळतात.

**अपि तु अयं मनुष्यजारः एव अभिप्रेतः स्यात्। स्त्रीभगः तथा। भजतेः**

परंतु जार शब्दानें जारकर्म करणारा माणूसच मंत्रद्रष्ट्याला अभिप्रेत असेल; त्याप्रमाणें भग शब्दानें स्त्रीभग अभिप्रेत असेल. भग शब्द भज् सेवणें ह्यापासून झाला आहे; कारण मैथुनेच्छु लोक त्या भगाचें सेवन करतात म्हणजे उपभोग घेतात. तसा अर्थ असल्यास उदीरय पितरा जार आ भगं ह्याचा अर्थः – स्त्रीनें जाराला पाहतांच तिचें भग जसें उचलून वर येतें तसा हे अग्नि तूं स्वतःला अरणीकडे किंवा द्यावापृथिवीकडे उचलून धर म्हणजे तुझ्या ज्वाला वर येवोत.

भग म्हणजे स्त्रीभग असा अर्थ ऋग्वेदांत कोठेंही नाहीं.

जार म्हणजे जार कर्म करणारा असा अर्थ बऱ्याच ठिकाणीं आहे. पण त्याचा अर्थ दाता असाही आहे. हविषां जारः (१।४६।४) = हवि किंवा धन देणारा. प्रबोधय जरितर्जारमिन्द्र (१०।४२।२।) = हे स्तोत्या, दाता जो इंद्र त्याला जागें कर. ईरय = दे. उदीरय प्रति मा सूनृता उषः (१।४८।२) हे उषे, मला धन (सूनृताः) दे. एरया रयिं (९।१०२।३) = धन दे. (आ + ईरय). गातुमेरय (१०।१२३।२);गातुं = धनम्. आ + ईरय = देहि. प्रस्तुत ऋचेंत ईरय ह्याला उत् आणि आ असे दोन उपसर्ग लाविले आहेत उत् व आ ह्यांचा धन असाही अर्थ होतो. जारः त्वं हे अग्ने पितरौ भगम् उत् आ ईरय = हे अग्नि, दाता तूं धन दे.

द्यावापृथिवी हीं दोघें धनवान् होत. द्यु व पृथिवी हीं धनवाचक होत. रोदसी हें द्यावापृथिवीचें एक नांव आहे. रोदसी दे म्हणजे द्यावापृथिवींतील धन दे अशीं वाक्यें ऋग्वेदांत आढळतात. द्यु बाप व पृथिवी माता; दोघेंही पितरौ. म्हणजे द्यावापृथिवींतील धन. प्रस्तुत ऋचेंत आ उपमादर्शक नाहीं. आ म्हणजे इव हा अर्थ प्रबोधय पुरंधिं जार आ ससतीमिव ( १।१३४।३ ) = हे अग्नि, जार जसा ( आ = इव ) झोपीं गेलेल्या ( ससतीं ) जारिणीला उठवितो तसा तूं उषेला ( पुरंधिं ) उठीव ( प्रबोधय ) ह्या ऋचेंत असावासें वाटतें. आ व इव हे दोन्ही उपमावाचक निपात ह्या ऋचेंत घातले आहेत.

**मेषःइति भूतोपमा। मेषोभूतोऽभि यन्नयः ( ८।२।४० )**

मेषः ही भूतोपमा आहे. पुढील ऋचेंत मेषोभूतः असे शब्द आहेत. मेषः भूतः = मेंढा झालेला. म्हणजे खरोखरचा मेंढा नसून मेंढा झाला म्हणजे मेंढ्यासारखा दिसला. मेंढा होऊन मेध्यातिथीकडे जाणारा ( अभियन् ) इंद्र, त्याची गांठ घेता झाला ( अयः ). षड्विंश ब्राह्मणांत ( १।१ ) मेंढा होऊन इंद्र मेध्यातिथीकडे गेला व तेथें सोम प्यायला अशी कथा आहे असें सांगून अयः = अगमयः = जावयास लाविलें असा सायणाचार्य अर्थ करतात. मेषः इव किंचित् उत्तरम् अब्रुवन् = मेंढ्याप्रमाणें कांहींएक उत्तर न देतां म्हणजे गुपचुप रीतीनें असा दुर्ग अर्थ करतो. असा अर्थ केल्यास भूतोपमा कशी होईल ? मेंढा नसतांना मेंढा होणें हीहि उपमा नव्हे. अभि त्यं मेषं पुरुहूतमिन्द्रं ( १।५१।१ ) एथें मेषं = शत्रुभिः स्पर्धमानं असा

अर्थ देऊन सायणाचार्य विकल्पानें प्रस्तुत ऋचेंत केलेला अर्थ देतात. मेंढ्याचें रूप घेऊन इंद्र मेधातिथीकडे गेला व तेथें सोम प्यायला; मेधातिथीनें त्याला मेष म्हणून हाक मारिली; तेव्हांपासून इंद्राला मेष हें नांव पडलें. मिष स्पर्धायां (धा.पा.६।७१) ह्या धातूपासून मेष हें नांव; मेषः=स्पर्धा करणारा हा पहिला अर्थ; ब्राह्मणग्रंथांच्या आधारें दुसरा, म्हणजे मेंढा. पण १।५१।११ ह्या ऋचेंत इंद्राला मेषं, पुरुहूतं, ऋग्मियं व वस्वः अर्णवं अशीं विशेषणें लाविलीं आहेत. सर्व विशेषणांचा धनवानाला असा अर्थ आहे. मा = इष् = धन. मा + इष् + अः = मेषः=धनवान् ही मेष शब्दावर कोटी आहे. मेंढ्याचें सोंग घेण्याचें काय कारण ? उत्तरः-इंद्र मेंढा झाला हें कोण म्हणतो ? मेष शब्दाचा तो अर्थ आहे; पण एथें मेष=मा+ इष् + अ म्हणजे धनवान्. भू = धन. भू + तः=धनवान्. धनवान् इंद्र मेधातिथीकडे धन (अयः) देण्यासाठीं गेला. अयः शब्द ४।५ ऋचांत आला आहे. तेथें त्याचा अर्थ सोनें व लोखंड असा आहे. अयः = धन. यन् = देणारा. अभि = अभ्यगच्छत् = जाता झाला. "इन्द्रागच्छ हरिव आगच्छ मेधातिथेर्मेष वृषणश्वस्य मेने गौरावस्कन्दिन् अहल्यायै जार कौशिक ब्राह्मण गौतम ब्रुवाण" अशा शब्दांनीं अग्निष्टोम यज्ञांत सुब्रह्मण्य नांवाचा ऋत्विक् इंद्राला हांक मारतो. इन्द्र व हरि ह्यांचे अर्थ स्पष्ट आहेत. कदाचित् हरिवः ह्याचे घोडेवाल्या व धनवंता असे दोन अर्थ असतील. मेधातिथेर्मेष = ( १ ) हे मेधातिथीच्या मेंढ्या; ( २ ) हे धनवंताला धन देणाऱ्या ( इन्द्रा ). मेनाभवो वृषणश्वस्य सुक्रतो ( १।५१।१३ )– हे अद्भुत कृत्यें करणाऱ्या (सुक्रतो) इंद्रा, तूं बैलगाडी हाकणाऱ्याची (वृषणश्वस्य) बायको (मेना) झालास. बैल (वृषन्) आहेत घोडे (अश्व) ज्याचे असा वृषणश्वा म्हणजे बैलगाडी हाकणारा. वृषणश्वस्य मेने = ए बैलगाडी हाकणाऱ्याची बायको. हा विनोद पुढील अर्थानें नाहींसा करावयाचा. वृ = सन् = अश्व = सु = क्रतु = धन. मा = ई = नृ = दण, देणारा. मा + ई + नृ – मेनृ. मेना देणारा. हे धनवंता, तूं अमूप धन देणारा झालास. बाकीच्या संबोधनांना ऋग्वेद किंवा इतर संहिता ह्यांत आधार नाहीं. तरी त्यांतही दोन अर्थ असतील. गौर = हरिण. ग = आ = उ = र = धन. गौर = हे धनवंता. जार = ( १ ) जारा; ( २ ) दात्या. अहल्या = ( १ ) एक ऋषिपत्नी; ( २ ) हल = नांगर; हल्या = पीक; अहल्या = अतिशय पीक, धन. मी कौशिक ब्राह्मण गौतम आहें असें खोटें बोलणाऱ्या. कु = शि = क = ब्रह्मन् = गो = धन. कौशिक = ब्राह्मण = गौतम = धनवंता. ब्रुवाण = देणाऱ्या. इन्द्र व हरिवः हीं वगळून बाकीचीं सगळीं भूतोपमेचीं उदाहरणें होत. इंद्र श्येन होऊन सोम हरण करता झाला. अशीं भूतोपमेचीं आणखी उदाहरणें सांपडतील. पण ह्यांत उपमा कोठेंही दिसत नाहीं. तें नसून तें होणें असें उपमेचें आणखी एक लक्षण नैरुक्तांनीं किंवा तत्कालीन आलंकारिकांनीं केलें होतें कीं काय ?

**मेषः मिषतेः । तथा पशुः पश्यतेः**

मिष् पाहणें ह्यापासून मेष; तसेंच पश्य् पाहणें ह्यापासून पशु. मेष ह्यानें पशु शब्द सुचला. मिषु सेचने ( धा. पा. १।७०० ) व मिष स्पर्धायां असे मिष्चे दोन अर्थ आहेत. मिष् में में करणें ह्यापासून झाला असावा.

**अग्निः इति रूपोपमा । हिरण्यरूपः स हिरण्यसंदृगपांनपात्सेदु हिरण्यवर्णः ( ऋ० सं० २।३५।१० ) हिरण्यवर्णस्य इव अस्य रूपम्**

अग्निः ही रूपोपमा होय. रूपेण समानधर्मेण उपमा = रूप हा सामान्य धर्म आहे जींत अशी उपमा. निघंटूंत (३।१३) तद्रूपः व तद्वर्णः असें आहे. हिरण्यरूपः हिरण्यवर्णः इति रूपोपमा असें म्हणावयास पाहिजे. अग्निः ह्यानें कांहीं बोध होत नाहीं. उदाहृत ऋचेंत अग्नि शब्द नाहीं; वर्णन अपां नपात् ह्याचें आहे. अपां नपात् म्हणजे वैद्युताग्नि असें दुर्ग म्हणतो. हिरण्यरूपः = हिरण्यवर्णस्य इव अस्य रूपम्. हिरण्यस्य इव अस्य रूपं असें पाहिजे. हिरण्यवर्ण कोण ? हिरण्यसमानरूपः असें दुर्गवृत्तींत आहे; समासविग्रह नाहीं. हिरण्यसंदृक् हिरण्यमिव संदृश्यमानः प्रीतिजनकः। हिरण्यवर्णः हिरण्यमिव वरणीयः प्रार्थनीयः भूतानां असे दुर्ग अर्थ देतो. पण रूप = संदृक् = वर्ण = रंग. सोन्यासारखा दिसणारा अग्निः. रूप, सं, दृक् व वर्ण ह्याचा धन असाही अर्थ आहे. हिरण्य धन आहे ज्याच्यापाशीं तो हिरण्यरूप वगैरे. अग्नि हा धनवान् , म्हणून ऋचेंत त्यास हिरण्यवदाः असें म्हटलें आहे. सेदु= सः +इत् + उ = तोच.

**था इति च**

था हाही उपमादर्शक शब्द आहे असा दुर्ग अर्थ करतो. अग्निः इति रूपोपमा ह्यानंतर था इति च आल्यानें था इति च रूपोपमा असा समज होतो. पण यास्कानें दिलेल्या उदाहरणावरून तसा अर्थ नाहीं. था इति च हे शब्द निघंटूंत नाहींत. तद्रूपः । तद्वर्णः । तद्वत् । तथा असा क्रम आहे. तथा म्हणजे था असें यास्कानें मानलें असावें; कारण उपमाप्रकरणांत तथा असा उपमादर्शक शब्द नाहीं.

था इति च हें वत् इति सिद्धोपमा हें सर्व प्रकरण संपल्यावर म्हणजे १७ वा खंड संपल्यावर यावयास पाहिजे. था हीही सिद्धोपमा होय. तद्रूपः । तद्वर्णः । तद्वत् । तथा हाच निघंटुक्रम बरोबर आहे. तद्रूपः तद्वर्णः हे शब्द रूपोपमासूचक-तद्वत् तथा हे सिद्धोपमासूचक. तथा = त + था = तत् + था. तद्वत् = तथा. निरुक्तांत अजाणपणें बरेच ठिकाणीं फिरवाफिरव केलेली आढळते.

**तं प्रत्नथा पूर्वथा विश्वथेमथा ( ऋ० सं० ५।४४।१ )। प्रत्ने इव पूर्वे इव विश्वे इव इमे इव**

प्रत्नथा = प्रत्ने इव. पूर्वथा = पूर्वे इव. विश्वथा = विश्वे इव. इमथा = इमे इव. प्रत्नथा = (भृगूसारख्या) चिरंतन महर्षींप्रमाणें. पूर्वथा = पूर्वकालीन स्रष्ट्यांप्रमाणें. विश्वथा = सर्व ऋषींप्रमाणें. इमथा = हल्लींच्या यज्ञ करणाऱ्यांप्रमाणें. त्या (तं) इंद्राला धन देण्यास विनव. यथेति कर्मोपमा व था ह्यांत भेद काय ? पूर्वीच्या ऋषींनीं विन-

वणी केली; तशी तूं कर. विनवणी करणें हें कर्म दोघांना साधारण. प्रकारवचने थाल् (पा. ५।३।२३) हें सूत्र व था ह्यांचा अर्थ एकच. तथा = त्याप्रमाणें; यथा = ज्याप्रमाणें. पूर्वथा = पूर्वींच्या ऋषींप्रमाणें. पण हा अर्थ ऋग्वेदांत क्वचित् आढळतो. विद्था = विद्थेन = धनेन. वृथा = वृथेन = धनेन. उक्था = उक्थेन = धनेन. प्रत्नथा = प्रत्नथेन वगैरे. प्रत्न= पूर्व = विश्व = इम = धन. तूं धनासह ( प्रत्नथा = पूर्वथा = विश्वथा = इमथा ) धन ( वृजनं ) देतोस ( दोहसे ) असा ऋचेचा थोडक्यांत अर्थ आहे. इमस्य पाहि अन्धसः ( ८।१३।२१ ) = खूप धन ( इमस्य = अन्धसः ) दे (पाहि ). इमस्य ही इम ची षष्ठी. इ = देणें. इ + म = दान, धन. इमथा हा शब्द ऋग्वेदांत एकदांच म्हणजे प्रस्तुत ऋचेंतच आला आहे. विश् = देणें. विश् + वं = धन. हे चारी शब्द धनासह ह्या अर्थी आहेत. इमे इव इति एथें इति = ह्याअर्थी.

**अयम् एततरः अमुष्यात्**

एत = आ + इत = आलेला. तर = ज्यास्त. अयं ( = हा ) त्या (वस्तू) पासून (अमुष्मात्) अधिक जवळ आलेला असतो (एततरः). अयं = जवळचा पदार्थ; असौ = दूरचा पदार्थ. अयं = आयं = आ + यं. यं इ जाणें ह्यापासून.

**असौ अस्ततरः अस्मात्**

अस् फेकणें ह्यापासून असौ. तो (असौ) पदार्थ ह्या (पदार्था) पासून (अस्मात्) ज्यास्त (दूर)फेकला असतो.

**अमुथा यथा असौ इति व्याख्यातम्**

अमुथा = अमु + था. अमु = असौ. था = यथा. अमुथा = जसा तो त्याप्रमाणें. असौ अमू अमी वगैरे. अमु असौ शब्दाचें एक रूप. असौ शब्दानें अमुथा शब्द सुचला. असौ इति व्याख्यातं = असौ शब्दाची व्युत्पत्ति आतांच दिली आहे. किंवा इति व्याख्यातं = हें स्पष्ट आहे. अमुथा शब्द ऋग्वेदांत नाहीं.

**वत् इति सिद्धोपमा। ब्राह्मणवत् वृषलवत् । ब्राह्मणाः इव । वृषलाः इव**

सिद्धेन उपमा = सिद्ध असलेल्या वस्तूशीं उपमा. वत् हा तद्धितप्रत्यय सिद्ध वस्तूशीं उपमा केली आहे असें दर्शवितो. सिद्ध = अस्तित्वांत असलेली, प्रसिद्ध. साध्य = अस्तित्वांत येणारी. ब्राह्मणवत् = ब्राह्मणाः इव. वृषलवत् = वृषलाः इव. ब्राह्मण अध्ययन, अध्यापन वगैरे करितां, शुद्धाचार व शुद्ध उच्चार ह्याकरितां सिद्ध म्हणजे प्रसिद्ध आहेत. केचित् वृषलाः ब्राह्मणवत् अधीयते शुद्धम् आचरन्ति शुद्धम् उच्चरन्तिच. अध्ययन वगैरे गोष्टी ब्राह्मणांत सिद्ध असून त्या कांहीं वृषलांकडून साधिल्या जातात. वृषल अज्ञान, अशुद्धाचरण, वाईट उच्चार, शिव्या वगैरे करितां प्रसिद्ध होत. ब्राह्मणाः वृषलवत् आचरन्ति एथें वृषलांत सिद्ध म्हणजे प्रसिद्ध असलेले दोष कांहीं ब्राह्मणांकडून साधले म्हणजे आचरले जातात. सिंहः इव शूरः, चन्द्रः इव शुभ्रः, कमलम् इव मुखं वगैरे उपमा सिद्धोपमा कां होऊं नयेत ? सिंहांत शौर्य, चंद्रांत पांढरेपणा, कमलांत सौंदर्य हे गुण सिद्ध म्हणजे प्रसिद्ध आहेत. सिद्धोपमा = सिद्धा एव

एषा उपमा लोके (दुर्ग) = लोकांत प्रचलित असलेली उपमा. कुणबटासारखा, महारा-सारखा, चांभारासारखा वगैरे निंदा लोकभाषणांत येतात; पण ब्राह्मणासारखा ही भाषा प्रचलित नाहीं. सिंहासारखा शूर, वाघासारखा क्रूर, शेळीसारखा शेळपट ह्या वगैरे उपमा लोकप्रचलित आहेत. सिद्धोपमा ह्याचा मीं निराळा अर्थ केला आहे.

**वृषल वृषशीलः भवति वृषाशीलः वा**

वृषलः = वृष + लः. वृष = वृषः अथवा वृषा. लः = शीलः. वृषल बैलासारखा असतो. दुर्गवृत्तींत ब्राह्मणाः इव वृषाशीलः वा नसून ब्राह्मणवत् अधीते वृषलवत् आक्रोशति एवढेंच आहे. वत् इति सिद्धोपमा ह्यानंतरचे सर्व शब्द प्रक्षिप्त होत; कारण पुढील खंडांत वत् ह्याचें वैदिक उदाहरण यास्क देतो.

## खंड १७ वा.

**प्रियमेधवदत्रिवज्जातवेदो विरूपवत् ।**

**आङ्गिरस्वन्महिव्रत प्रस्कण्वस्य श्रुधी हवम् (ऋ-सं० १।४६।३)**

**प्रियमेधः प्रियाः अस्य मेधाः**

यस्य न घालतां यास्क अस्य घालतो. ज्याला यज्ञ (मेधाः) प्रिय तो प्रियमेध. मेध= धन. ज्याला धन प्रिय तो प्रियमेध.

**यथा एतेषाम् ऋषीणाम् एवं प्रस्कण्वस्य शृणु ह्वानम्**

ज्याप्रमाणें तूं ह्या ऋषीचें (बोलावणें ऐकलेंस) तसें प्रस्कण्वाचें बोलावणें ऐक. श्रुधि = शृणु.हवं = ह्वानम्.

**प्रस्कण्वः कण्वस्य पुत्रः कण्वप्रभवः**

प्रस्कण्वः = प्र + कण्वः. प्र = प्रभवः. कण्वापासून प्रभव म्हणजे उत्पत्ति ज्याची तो प्रस्कण्व म्हणजे कण्वाचा पुत्र. कण्वस्य पुत्रः हा कण्वप्रभवः ह्याचा अर्थ असल्यामुळें तो मूळांत नसावा. म्हणजे हे दोन शब्द प्रक्षिप्त होत.

**यथा प्राग्रम्**

ज्याप्रमाणें प्राग्र.

प्रगतम् अग्रं प्राग्रम्. प्रगतं ह्यांतील गतं जाऊन प्र राहतो. तो अग्रच्या आरंभीं घातल्यानें प्राग्रं होतें. त्याप्रमाणें प्रभवः ह्यांतला भवः जाऊन प्र उरतो तो कण्वच्या आधीं घातल्यानें प्रस्कण्व शब्द बनतो. प्रस्कण्वहरिश्चन्द्रौ ऋषी (पा० ६।१।१५३); प्र + कण्वः = प्रस्कण्वः. हरि + चन्द्रः = हरिश्चन्द्रः. ह्या शब्दांत ते विशिष्ट ऋषिवाचक असतांना स् येतो. ऋषि हा अर्थ नसतो तेव्हां प्रकण्व व हरिचन्द्र असे समास बन-तात. कण्वकुलांत मेध्यातिथि नांवाचा मोठा पुरुष होऊन गेला. त्याला कण्वाचा पुत्र (ऋ० सं० ८।८।४) व काण्व (८।२।४०) म्हटलें आहे. मेध्यातिथींला प्रस्कण्व कोठेंही म्हटलें नाहीं; तथापि यास्क म्हणतो त्याप्रमाणें प्रस्कण्व म्हणजे कण्वाचा पुत्र

किंवा प्रकृष्टः कण्वः अशी व्युत्पत्ति केल्यास प्रस्कण्व म्हणजे मेध्यातिथिच असावा असें वाटतें.

**अर्चिषि भृगुः संबभूव**

भृगु ज्वालेंत (अर्चिषि) जन्मला (संबभूव). भृगुः भृज्यमानः न देहे. भृगूला जाळण्याकरितां आगींत टेविलें; पण तो जळला नाहीं. देहे हें दह् जाळणें ह्याचें द्वितीय भूतकाळाचें तृतीयपुरुषी एकवचनी रूप. भ्रस्ज पाके (धा० ६।४) ह्यापासून भृगु.

**अङ्गारेषु अङ्गिराः**

अंगार म्हणजे विझलेले कोळसे; त्यांमध्यें जो उत्पन्न झाला तो अङ्गिरस्. बृहदारण्यक उपनिषदांत (१।५।८) अङ्गानां रसः अशी व्युत्पत्ति दिली आहे.

**अङ्गाराः अङ्कनाः**

अकि लक्षणे (धा० १।८७) चिन्हित करणें ह्यापासून अङ्गार. कोळशाचा डाग हात वगैरेस लागतो. अङ्कनाः नंतर अञ्चनाः असें अधिक महाराष्ट्रपाठांत आहे.

**अत्र एव तृतीयम् ऋच्छत इति ऊचुः। तस्मात् अत्रिः**

अत्रिः = अत्र. ह्याठिकाणींच (अत्र एव) तिसऱ्याकडे जा (ऋच्छत) म्हणजे तिसरा तुम्हांस ह्या आगींतच मिळेल असें लोक म्हणाले म्हणून तिसरा जो बाहेर आला त्याला अत्रि हें नांव पडलें. अथवा

**न त्रयः इति**

अत्रिः = अ + त्रिः. अ = न. त्रिः = त्रयः. ह्या ठिकाणीं तीनच आहेत असें नाहीं, खणा, तुम्हांस चवथा सांपडेल असें लोक म्हणाले म्हणून अत्रि हें नांव. इति नंतर वा पाहिजे होतें.

**विखननात् वैखानसः**

म्हणून लोक खणावयास लागले; खणतात तोंच वैखानस सांपडला. म्हणजे वैखानस हें नांव वि + खन् ह्यापासून. दुर्ग म्हणतो :– प्रजापतीनें आपलें रेत अग्नींत टाकलें, त्याची ज्वाला झाली. त्या ज्वालेंत भृगु जन्मला, पण आश्चर्य हें कीं, त्याचें अंग जळलें नाहीं. ज्वाला निमाल्या. ज्वालाहीन कोळशांतून अंगिरस् जन्मास आला. आणखी पाहतात तों अत्रि; तो तेथेंच जन्मास आला व तो तिसराही होता ह्या दोन्हीं कारणांनीं त्याला अत्रि म्हणूं लागले. आणखी खणतात तों वैखानस बाहेर आला. ह्या सगळ्या लौकिक किंवा हरदासी व्युत्पत्ति होत. त्यांना शास्त्रीय महत्त्व काडीइतकें नाहीं. गोष्टीकरतां भृगु व वैखानस शब्दांची व्युत्पत्ति देणें जरूर पडलें. वैखानस शब्द ऋग्वेदांत नाहीं.

**भरणात् भारद्वाजः**

भृ पोसणें पासून भारद्वाज हें नांव. हे शब्द फक्त महाराष्ट्रपाठांत आहेत. ही खरोखर भरद्वाज शब्दाची व्युत्पत्ति होईल. भरत् भृ पासून. जो धन नेतो तो भरद्वाज.

**विरूपः नानारूपः**

विरूपः = वि + रूपः. वि = नाना = विविध. विशिष्टऋषिवाचक विरूप हें नांव ऋग्वेदांत एकदांच (८।७५।६) आलें आहे. ३।५३।७ मध्यें अंगिरसांना विरूपचे, द्यूचे व असुराचे पुत्र असें म्हटलें आहे व १०।६२।५ व ६ त ते अंगिरसाचे मुलगे असून अग्नीपासून जन्मले असें म्हटलें आहे. एकवचनी जो विरूप शब्द (८।७५।६) त्यांच्याशीं ह्यांचा संबंध होता कीं नाहीं हें समजण्यास मार्ग नाहीं. हेही ऋषिच होते. विरूपास इरषयः (१०।६२।५), ३।५३।७ मधील विरूपाः हे विरूपासः पासून वेगळे असावेत. विरूपवत् ह्यांतील विरूप एकवचनी कीं अनेकवचनी ?

**महिव्रतः महाव्रतः इति**

महिव्रतः = महाव्रतः, ज्याचीं कृत्यें (व्रत) मोठीं आहेत असा. महि धनम्। तेन युक्तं व्रतं धनं यस्य सः महिव्रतः. महिव्रत = जातवेदः = हे अतिधनवाना; असा खरा अर्थ आहे. प्रियमेध (एकवचनी) हें नांव इतर ऋषींच्या नांवांबरोबर (१।१३९।९ व ८।५।२५) आलें आहे. बहुवचनी प्रियमेध इंद्र, अग्नि, अश्विन् व इंद्राचे घोडे ह्यांची स्तुति करतात. ह्यापलीकडे त्यांच्याविषयीं ज्यास्त माहिती मिळत नाहीं. अत्रि हा मोठा ऋषि होता. दस्यूंनीं त्याच्यावर अनेक संकटें आणिलीं व नानाप्रकारें त्याचा छळ केला; पण अश्विनांनीं प्रत्येक प्रसंगीं खावयाला देऊन त्याचा जीव वाचविला व त्याची सुटका केली. ह्या ऋषीची हकीगत मी एका स्वतंत्र लेखांत दिली आहे. अग्नीला अङ्गिरः असें १६ वेळां,व अङ्गिरस्तम ४ दां संबोधिलें आहे. त्याला प्रथमो अङ्गिराः, प्रथमः अङ्गिरस्तमः, अङ्गिराः व अङ्गिरस्तमं असें एक एकदां म्हटलें आहे. ह्यावरून अग्नीचा अङ्गिरस् कुलाच्या संस्थापकाशीं निकट संबंध होता हें स्पष्ट आहे. उषेला अङ्गिरस्तमा, इंद्राला अङ्गिरस्तमः असें दोन दोनदां म्हटलें आहे. इंद्राला अङ्गिराः असें एकदांच म्हटलें आहे. पण अंगिरस कुलाशीं इंद्राचा विशेष संबंध आलेला दिसतो. कदाचित् देवांना लाविलेल्या अंगिरस् शब्दाचा धनवान् अर्थ असेल, तसा असल्यास तो शब्द मूळचा धनवान् वाचक असून एका विशिष्ट धनाढ्य कुलाला लावला गेला. दुर्गानें अत्रि वगैरे ऋषींच्या उत्पत्तीसंबंधानें जी कथा दिली आहे ती त्याला कोणत्या ब्राह्मणांत सांपडली तें कळत नाहीं. ऐतरेयब्राह्मणांत (१३।१०) प्रजापतीच्या रेतापासून मनुष्य, सूर्य, आदित्य, भृगु, अंगिरस् व निरनिराळे पशु उत्पन्न झाले असें सांगितलें आहे. तत् भृगुरभवत् । ये अङ्गाराः आसन् ते अङ्गिरसोऽभवन् = रेत प्रदीप्त होऊन त्याला भृगु हें रूप आलें. प्रदीप्त झालेल्या रेताचे जे लाल कोळसे तेच अंगिरस् झाले. अशी दोन नांवांची उत्पत्तिकथा सांपडते. यास्कानें दिलेल्या व्युत्पत्ति कोणत्या ब्राह्मणांत आहेत तें मला अजून समजलें नाहीं.

**अथ लुप्तोपमानि अर्थोपमानि इति आचक्षते**

अथ शब्दानें नवीन विषयाला प्रारंभ झाला आहे असें दाखविलें आहे. लुप्ता उपमा येषु तानि लुप्तोपमानि. अर्थेन उपमा येषु तानि अर्थोपमानि. उपमा=उपमा-

वाचक शब्द. ज्यांत उपमावाचक शब्द नसतो त्यांना अर्थोपम असें (पूर्वाचार्य) म्हणतात. अर्थोपम ही सर्वसंमत व पुराण संज्ञा आहे असे आचक्षते ह्यानें दर्शविलें आहे.

लुप्तोपमांना अर्थोपम असें म्हणतात. पण लुप्तोपम काय? पद कीं वाक्य? टिपूसारख्या शूराला पाहून पुरुषव्याघ्र किंवा वाघ असे उद्गार पाहणाऱ्याच्या तोंडून निघतील. दोन्ही उद्गारांत उपमावाचक शब्द नाहीं. पुरुषव्याघ्रः गच्छति किंवा व्याघ्रः गच्छति असें वाक्यही तोंडांतून निघेल. पद असो किंवा वाक्य असो; तेथें उपमा आहे असें अर्थावरून कळतें.

रूपक व अतिशयोक्तींत उपमाशब्द गाळला असतो. राजसिंहः = राजा सिंहः इव; पुरुषव्याघ्रः = पुरुषः व्याघ्रः इव. ह्या समासांत इव शब्द गाळलेला आहे. पण उपमान व उपमेय हीं दोन्ही समासांत आहेत. कमलसुन्दरं एथें उपमेय नाहीं. 'व्याघ्रो गच्छति' ह्या वाक्यानें 'वाघ जातो' व वाघासारखा शूर पुरुष जातो' असे दोन्ही अर्थ निष्पन्न होतील. अर्वाचीन अलंकारग्रंथांत शाब्दी उपमा व आर्थी उपमा असे दोन प्रकार आढळतात. जेथें उपमावाचक शब्द असतो ती शाब्दी; जेथें तो नसतो ती आर्थी.

**सिंहः व्याघ्रः इति पूजायाम्**

जेव्हां एखाद्याची पूजा करावयाची असते म्हणजे त्याच्याविषयीं पूज्यभाव दाखवावयाचा असतो तेव्हां त्याला सिंह, वाघ असें म्हणतात. पण,

**श्वा काकः इति कुत्सायाम्**

जेव्हां एखाद्याविषयीं कुत्सा म्हणजे तुच्छपणा किंवा निंदा दाखवावयाची असते तेव्हां त्याला कुत्रा, कावळा असें म्हणतात.

संस्कृतांत शेकडों अन्योक्ति आहेत; त्यांपैकीं कांहीं पूजायां ह्या सदरांत व कांहीं कुत्सायां ह्या सदरांत मोडतील. निघंटूंत दिलेल्या उपमामालिकेंत ब्राह्मणा व्रतचारिणः; तद्रूपः व तद्वर्णः हीं तीन लुप्तोपम होत. बाकीच्यांत उपमावाचक शब्द आहेत. यास्कानें दिलेल्या उदाहरणांत उपमेची खुबी, उपमेपासून होणारा आनंद, फारच थोड्या ठिकाणीं भासतो. निघंटूंत उपमाप्रकरण कां घातलें व तें ह्या अध्यायांत ओघानें कसें येतें तें समजत नाहीं. निघंटूंत घुसडाघुसड फार झाली आहे.

**काकः इति शब्दानुकृतिः**

कावळ्याला काक हें नांव पडण्याचें कारण कावकाव असा जो आवाज कावळा करितो त्याचें त्या नांवांत अनुकरण आहे.

**तत् इदं शकुनिषु बहुलम्**

शब्दानुकरण हें पक्ष्यांच्या नांवांत पुष्कळ आढळतें. यास्काचें हें म्हणणें बरोबर आहे. कोकिल, उलूक, घुबड, चिमणी, कृकवाकु, कोंबडा, तित्तिरि व इंग्रजी क्रो, कुकु, आउल, टिरविट् हीं शब्दानुकृतींचीं उदाहरणें होत. परंतु पुष्कळ वेळां आकार, रंग, कृति, सादृश्य, वसतिस्थान वगैरेवरूनहि पक्ष्यांना नांवें दिलीं जातात.

जसें:— आकारावरून क्रॉस् बिल् (Cross-bill), हॉर्न् आउल् (Horn-owl); रंगावरून ब्लॅक् स्वान (Black-swan); कृतीवरून वुड्पेकर (Wood-pecker); कृति व रंग यांवरून ब्लॅक्डायव्हर (Black diver); सादृश्यावरून सिझर टेल् (Scissor tail), कॅनव्हास् बॅक् (Canvas back); वसतिस्थानावरून गिनीफाउल् (Guinea-fowl). यासंबंधीं विस्तृत वर्णन विविधज्ञानविस्ताराच्या १९२२ च्या ६ व्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या माझ्या लेखांत सांपडेल.

**न शब्दानुकृतिः विद्यते इति औपमन्यवः । काकः अपकालयितव्यः भवति**

परंतु औपमन्यव म्हणतो कीं पक्ष्यांच्या नांवांत शब्दानुकृति बिलकुल नसते. कावळ्याला काक म्हणण्याचें कारण कावळा हा अपशकुनी असल्यामुळें त्याला हांकलून द्यावें लागतें. म्हणजे अप + काल् ह्याच्यापासून काक शब्द झाला आहे. दोहोंत समान अक्षर का हें आहे.

**तित्तिरिः तरणात् । तिलमात्रचित्रः इति वा**

तॄ = पाण्यावर तरणें. ह्याच्यापासून तित्तिरि हें नांव. कारण हा पक्षी पाण्यावर तरंगत असतो किंवा त्याचें अंग तिळासारख्या लहान लहान ठिपक्यांनीं चित्रित असतें. म्हणजे तित्तिरि ह्या नांवांत तिर् म्हणजे तिल हा शब्द आहे. तिलस्य मात्रा येषां तानि तिलमात्राणि चिन्हानि तैः चित्राः. तिर किंवा तिल ह्याचा अभ्यास केल्यानें तित्तिरि शब्द बनतो. अभ्यास करण्याचें कारण त्या पक्ष्याच्या अंगावर तिळासारखे असंख्य ठिपके असतात.

**कपिञ्जलः कपिः इव जीर्णः । कपिः इव जवते । ईषत् पिंगलः वा । कमनीयं शब्दं पिञ्जयति इति वा**

कपिञ्जलः = कपिम् + जलः, कपिम् = कपिः इव, जलः = जीर्णः. कपिंजल हा पक्षी रंगानें माकडासारखा मळकट असतो. किंवा जलः = जवते = धावतो. तो पक्षी माकडासारखा धावतो. कपिञ्जलः = क + पिञ्जलः. कः ईषत् = थोडका. पिञ्जलः = पिंगलः. त्या पक्षाचा वर्ण कांहींसा पिंगट असतो. किंवा कपिञ्जलः = क + पिञ्जलः, क = कमनीयम् शब्दं. पिंजलः = पिंजयति = प्रकट करतो, उच्चारतो. हा पक्षी गोड आवाज काढतो.

**श्वा आशुयायीः । शवतेः वा स्यात् गतिकर्मणः । श्वसितेः वा**

श्वा = शु + आ, शु = आशु; आ = यायी. कुत्रा भरभर जातो म्हणून तो श्वा. दुर्गपाठ श्वा शुयायी असा आहे. आशुयायी असा नाहीं. किंवा शव् जाणें ह्यापासून तो शब्द बनला असेल. किंवा श्वस् 'श्वासोच्छ्वास करणें', 'धापा टाकणें' ह्यांपासून तो झाला असेल.

**सिंहः सहनात् । हिंसेः वा स्यात् विपरीतस्य । संपूर्वस्य वा हन्तेः । संहाय हन्ति इति वा**

सिंहः = संहः = स + न् + ह= सहन. 'सह्' 'पराभव करणें' यापासून

सिंह. तो सर्व प्राण्यांचा पराभव करतो. किंवा हिंस्=ह् + इ + न् + स् = स् + इ+ न् + ह्+अ= सिंहः. गुर्जरपाठांत स्यात् नाहीं. दुर्गवृत्तींत ही व्युत्पत्ति दिली नाहीं. किंवा सिंहः = संहः = सम् + हः, हः = हन्ति. तो सगळया प्राण्यांना ठार मारतो म्हणून संह म्हणजे सिंह. किंवा सिंहः = संहः. सम् = संहाय; हः = हन्ति. प्राणिमात्रावर जाऊन त्यांना ठार करतो. दुर्ग म्हणतो ही शेवटची व्युत्पत्ति वैय्याकरणांनीं केली आहे. तशी व्युत्पत्ति कोणत्या व्याकरणग्रंथांत आहे ? ही व्युत्पत्ति कुणीतरी दुर्ग-वृत्तींत घुसडली असावी कारण दुर्ग तिचें विवरण करीत नाहीं. हिनस्ति सिंहः (अमर २।५।१ क्षीरस्वामी). भवेद्वर्णागमाद्धंसः सिंहो वर्णविपर्ययात् ( उणादि ).

**व्याघ्रः व्याघ्राणात् । व्यादाय हन्ति इति वा**

व्याघ्रः = वि + आघ्रः. आघ्रः आजिघ्रति. वाघाचें घ्राणेंद्रिय इतकें तिखट असतें कीं त्याला पाहिजे त्या वस्तूचा लांबूनहि वास घेतां येतो किंवा व्याघ्रः = वि + आ + घ्रः. आ = आदाय; घ्रः = हन्ति. मारावयाचा प्राणी जर निसटून गेला तर त्याला पकडून (व्यादाय) व पूर्वीच्या ठिकाणीं आणून वाघ त्याला मारितो.

## खंड १९ वा.

**अर्चतिकर्माणः उत्तरे धातवः चतुश्चत्वारिंशत्** (३।१४)

पूजा करणें ह्या अर्थाचे पुढील धातु ४४ आहेत.

**मधाविनामानि उत्तराणि चतुर्विंशतिः** (३।१५)

बुद्धिवान् ह्या अर्थाचीं पुढील नामें २४ आहेत.

**मेधावी कस्मात् । मेधया तद्वान्भवति । मेधा मतौ धीयते । स्तोतृनामानि उत्तराणि त्रयोदश** (३।१६)

मेधावी शब्द कसा झाला ? मेधावी हा मेधा म्हणजे बुद्धि तिनें युक्त असतो. मेधा = मे + धा. मे = मतौ. धा = धीयते. बुद्धि मनांत ठेवलेली असते. मेधते संग-च्छते अस्यां मेधा (अमर १।४।२ क्षीरस्वामी) = तिच्यांत विचारी पुरुष किंवा विचार करण्याची वस्तु मिळून जाते म्हणून ती मेधा. मेधावी व मेध् धातु ऋग्वेदांत नाहींत. मेधा म्हणजे धन असा अर्थ ऋग्वेदांत आहे; बुद्धि हा अर्थ अर्वाचीन आहे.

ह्याच्यानंतर स्तोता स्तवनात् असें महाराष्ट्रपाठांत अधिक आहे. यास्क सोप्या शब्दांची व्युत्पत्ति देत नसतो.

**यज्ञनामानि उत्तराणि पञ्चदश** ( ३।१७ ) । **यज्ञः कस्मात् । प्रख्यातं यजतिकर्म इति नैरुक्ताः**

यज्ञवाचक पुढील नामें १५. यज्ञ शब्द कसा झाला ? प्रख्यातं म्हणजे सर्वांना ठाऊक अशी जी यजति क्रिया ती पुरी झाली म्हणजे तो यज्ञ होतो असें नैरुक्त म्हणतात. यज्ञ शब्दाची व्युत्पत्ति सोपी आहे यजयाच० नङ्. (पा० ३।३।९०). यज् + नः = यज्ञः. तथापि ह्या शब्दाच्या आणखी व्युत्पत्ति आहेत.

**याच्ञो भवति इति वा**

यज्ञाची याचना केली गेली म्हणून तो यज्ञ. यज्ञ शब्द याच् धातूपासून झाला आहे. याच्ञा अत्र विद्यते याच्ञः । प्रज्ञाश्रद्धार्चाभ्यो णः (पा० ५।२।१०) इति सूत्रात् अन्यत्रापि णः =ज्यांत याचना असते तो याच्ञः. प्रज्ञा, श्रद्धा व अर्चा ह्यांना णः म्हणजे वृद्धिकारक अः प्रत्यय लाविल्यानें प्राज्ञः ,श्राद्धः व आर्चः असे शब्द बनतात. ह्यांखेरीज आणखीही कांहीं शब्दांना हा प्रत्यय लागतो. यज्ञो वै देवानां न समभवत् । तं भृत्या समभावयन् । यत् भृतिं वनुते यज्ञस्य संभूत्यै (मैत्रा० ३।६।९)= देवांचा यज्ञ सिद्धीस जाईना; तेहां त्यांनीं ब्राह्मणांना दक्षिणा देऊन (भृति = दक्षिणा) तो सिद्धीस नेला. यज्ञ सिद्धीस नेण्याकरितांच दक्षिणा द्यावयाची असते. दुर्गवृत्तींत न समभवत्च्या ठिकाणीं अन्नं समभूत् असा पाठ आहे. अन्नं हें चूक आहे. न पाहिजे. समभूत् हा खरा पाठ असावा. सिद्धीस जा अशी यज्ञापाशीं याचना केली म्हणून तो याच्ञः.

**यजुरुन्नः भवति इति वा**

किंवा यज्ञः = यज् + नः. यज् = यजुर्भिः. नः = उन्नः. यज्ञांत यजुर्वेदाचा भाग ऋचांपेक्षां ज्यास्त असतो. प्रत्येक क्षणीं यजुर्मंत्र म्हणावयाचा असतो. ह्या मंत्रांनीं यज्ञ चिंब भिजून जातो (उन्नः). म्हणून यज्ञाला यज्ञ म्हणतात.

**बहुकृष्णाजिनः इति औपमन्यवः**

यज्ञः = य + ज् + नः. य = इ + अ. अ + ज् + इ + नः = अजिनः. यज्ञांत पुष्कळशीं कृष्णाजिनें (काळ्या हरणाचीं कातडीं )वापरावीं लागतात. म्हणजे अजिन ह्याचें रूपांतर यज्ञ. अशी औपमन्यव व्युत्पत्ति देतात. ह्या आचार्याचें डोकें खरोखरच सुपीक होतें. दुर्ग म्हणतो :– सोमयागांत दोन, यजमानकृत्यांत दोन, व्रीहि कांडतांना एक, धर्मपात्रें ठेवण्याला एक अशीं यज्ञांत अनेक कृष्णाजिनें लागतात.

**यजूंषि एनं नयन्ति इति वा**

यज्ञः = यज् + नः यज् = यजूंषि. न = नयन्ति. आरंभापासून शेवटापर्यंत यज्ञ यजुर्मंत्रांच्या साहाय्यानें जातो. यजुरुन्नः भवति इति वा ह्याच्यानंतर ही व्युत्पत्ति द्यावयास पाहिजे. औपमन्यवाला इतका मान दिला जात असे कीं तो म्हणेल तो सिद्धांत अशी समजूत होती, त्यानें सिद्धांत ठोकून दिल्यावर एखादी व्युत्पत्ति देणें म्हणजे एक प्रकारचें धाष्टर्यच होतें. ही शेवटली व्युत्पत्ति प्रक्षिप्त असावी.

**ऋत्विङ्नामानि उत्तराणि अष्टौ (३।१८) । ऋत्विक् कस्मात् । ईरणः । ऋग्यष्टा भवति इति शाकपूणिः । ऋतुयाजी भवति इति वा**

ऋत्विक् ह्या अर्थाचीं पुढील नामें आठ. ऋत्विक् = ऋ + तु + इ + क्. इ + ऋ = ई ऽ = पाठविणें. तो स्तुति देवांकडे पाठवितो (ईरति) म्हणून तो खरोखर ईरण. ऋत्विक् हा त्या शब्दाचा अपभ्रंश. ही व्युत्पत्ति मूळ निरुक्तांत असेल कीं नसेल हा प्रश्न आहे. ऋत्विक् = ऋतु + इक्. ऋतु = ऋक्. इक् = इज् = यज् = यष्टा. ऋचा

म्हणून तो यज्ञ करतो म्हणून तो ऋत्विक् असें शाकपूणि म्हणतो. किंवा ऋतूऋतूंत म्हणजे प्रत्येक प्रसंगीं तो देवांना हवि देतो किंवा यजमानाकडून योग्य काळीं यज्ञ करवितो म्हणून तो ऋत्विक्. ऋतौ यजति किंवा ऋतून् यजति अशी खरी व्युत्पत्ति असावी. ऋतून् = हवि किंवा धन.

**याञ्चाकर्माणः उत्तरे धातवः सप्तदश (३।१९)। दानकर्माणः उत्तरे धातवः दश ( ३।२० )**

याचना करणें ह्या अर्थाचे पुढील धातु १७. दान करणें ह्या अर्थाचे पुढील धातु १०.

**अध्येषणाकर्माणः उत्तरे धातवः चत्वारः (३।२१)**

सत्कृत्य प्रार्थना अध्येषणा ( दुर्गः ) = सत्कार करून मग जी विनवणी केली जाते ती अध्येषणा. ह्या अर्थाचे पुढील धातु ४. (१) परिस्रव (२) पवस्व (३)अभ्यर्ष (४) आशिषः असे हे प्रार्थना ह्या अर्थी ४ धातु आहेत. परिस्रव = गाळण्यांतून पड. पवस्व=शुद्ध हो. अभ्यर्ष = धांव. अगस्त्यः ० सत्या देवेषु आशिषो जगाम (ऋ ० सं ० १।१७९।६ ). आ याहि पूर्वीरति चर्षणीराँ अर्य आशिष उप नो हरिभ्याम् ( ३।४३। २ ).सत्या भवन्तु आशिषो नो अद्य (७।१७।५). यदग्ने स्यामहं त्वं त्वं वा घा स्या अहम् । स्युष्टे सत्या इहाशिषः (८।४४।२३). सन्ति ह्यर्य आशिष इन्द्र आयुर्जनानाम् (८।५४। ७). एवढ्याच ५ ठिकाणीं आशिषः शब्द आला आहे व तो नाम आहे. त्याचा अर्थ धन. आशीः आशिषौ आशिषः असा तो चालतो. तेव्हां आशिषः ह्याच्या जागीं दुसरा कांहीं तरी शब्द पाहिजे. पहिल्या तीन धातूंत अमकें कर एवढाच अर्थ आहे. त्यांत जर प्रार्थना समजावयाची तर देहि, धेहि, धत्स्व, आगहि आयाहि वगैरेंत प्रार्थना कां समजूं नये? निघंटुकारानें हवे तसे वर्ग केले आहेत व त्यांत हवे ते शब्द दडपले आहेत.

**स्वपिति सस्ति इति द्वौ स्वपितिकर्माणौ (३।२२)**

निजणें ह्या अर्थी स्वप् व सस् हे धातु दोन. स्वपिति हें रूप ऋग्वेदांत नाहीं. ह्या वर्गांत शी धातु कां नाहीं घातला? त्या धातूंचीं रूपें ऋग्वेदांत आलीं आहेत.

**कूपनामानि उत्तराणि चतुर्दश (३।२३)।कूपः कस्मात्। कुपानं भवति कुप्यतेः वा**

विहीर ह्या अर्थाचीं पुढील नामें १४. कूप शब्द कसा झाला? कूपः = कू + पः. कू = कु = कुत्सित, थोडें. पः = पानम्. विहिरीचें पाणी मोठ्या कष्टानें काढलें जातें. पोटभर पाणी मिळत नाहीं व त्यामुळें तहान भागत नाहीं. हौदावर गर्दी झाल्या-मुळें बोलाचाल व मारामार होते तशी विहिरीवर होते. पाणी काढण्यास मधेंच कोणी घुसल्यास इतर लोक संतापतात. कुत्सिताः आपः अत्र। अथवा कोः ( भूगर्भात् ) आपः अत्र कूपः ( अमर १।९।२६ क्षीरस्वामी ) = विहिरींत पाणी वाईट किंवा थोडें असतें किंवा पृथिवीच्या पोटांतून विहिरींत पाणी येतें म्हणून कूप हें नांव.

**स्तेननामानि उत्तराणि चतुर्दश एव (३।२४)। स्तेनः कस्मात्। संस्त्यानम् अस्मिन् पापकम् इति नैरुक्ताः**

चोर ह्या अर्थी पुढील नामेंही १४ च. स्तेन शब्द कसा झाला ? स्तेनः स्त्येनः = स्त्यानः. स्त्यै संघाते (धा० १।९३५) दाटणें ह्यापासून स्तेन. कारण चोराच्या ठिकाणीं पाप दाट भरलेलें असतें असें नैरुक्त म्हणतात. खंड १४ त तस्कर शब्दाची व (अध्याय ४ खंड २४) तायु शब्दाची व्युत्पत्ति पहा. दुर्ग म्हणतो वैयाकरण दुसरी एखादी व्युत्पत्ति देत असतील. पण ते नैरुक्तांचीच व्युत्पत्ति देतात. स्ति धन. धन चोरणारा तो स्तेन.

**निर्णीत- अन्तर्हित- नामधेयानि उत्तराणि षट् (३।२५)**

निश्चित केलेलें व लपविलेलें ह्या दोन्ही अर्थाचीं पुढील नामें ६. नामानि बद्दल नामधेयानि कां घातलें तें समजत नाहीं.

**निर्णीतं कस्मात्। निर्णिक्तं भवति**

निर्णीत शब्द कसा झाला ? निर्णीत = निर् + नीतं. नीतं = निक्तं = धुतलेलें, धुऊन शुद्ध केलेलें. ज्याचा निर्णय केला जातो तें जणूं काय धुतलें जातें व शुद्ध केलें जातें. धडधडीत नी धातु असून नीत ह्यांत निज् धातु आहे म्हणणें ह्याला वेड न म्हणावें तर काय म्हणावें ? निर्णीत शब्द ऋग्वेदांत नाहीं. ह्या वर्गांत सनुतर् शब्द आहे. तो ऋग्वेदांत १२ वेळां आहे. एक ऋचा (५।२।४) वगळून बाकीच्यांत त्याचा अर्थ ताबडतोब असा आहे. सायनाचार्य सर्वत्र अंतर्हित अर्थ करतात. पण तेही निर्णीत असा अर्थ कोठेंही देत नाहींत. आणखी एक शब्द हिरुक्. हा एक वेळांच आला आहे; व तेथें त्याचा अर्थ वेगळा, दूर असा आहे.

**दूरनामानि उत्तराणि पञ्च (३।२६)। दूरं कस्मात्। द्रुतं भवति दुरयं वा**

दूर ह्या अर्थी पुढील नामें ५. दूर शब्द कसा झाला ? जें दूर असतें तें जणूं काय पळालेलें असतें. म्हणजे द्रु पळणें पासून दूर किंवा दूरं = दुरं = दुः + अयं. जें दूर असतें त्याकडे मनुष्य मोठ्या कष्टानें जातो. म्हणजे अय् जाणें ह्याला दुर् जोडून दूर शब्द बनला आहे. दूयते अत्र दूरं (अमर ३।१।६९ क्षीरस्वामी)

**पुराणनामानि उत्तराणि षट् (३।२७)। पुराणं कस्मात्। पुरा नवं भवति**

जुनें ह्या अर्थी पुढील नांवें ६. पुराण शब्द कसा झाला ? पुराणं = पुरा + नं. नं = नवम्. जुनी वस्तु पूर्वी केव्हांतरी नवी होती. पुरातन शब्दाचा अपभ्रंश पुरा अन व नंतर पुराण अशी परंपरा दिसते. ऋग्वेदांत पुराण शब्द आहे, पुरातन नाहीं.

**नवनामानि उत्तराणि षट् एव (३।२८)। नवं कस्मात्। आनीतं भवति**

नवें ह्या अर्थी पुढील नामेंही ६ च. नव शब्द कसा झाला ? जें नवें असतें तें. नुकतेंच कोठून तरी आणिलें असतें. म्हणजे आ + नी पासून नव शब्द. नू = आज ह्यापासून नव = आजचें.

## खंड २० वा.

द्विशः उत्तराणि नामानि ( ३।२९ )

पुढील वर्गांत एकाच अर्थाच्या दोन दोन नामांची जोडी केली आहे. जसें

**प्रपित्वे अभीके इति आसन्नस्य। प्रपित्व प्राप्ते । अभीके अभ्यक्ते**

आसन्नस्य नामनी असा अन्वय. जवळचें ह्या अर्थी प्रपित्व व अभीक हीं नामें होत. प्रपित्वे = प्र + प् + इ + त्वे. प् = आप्. त्वे = प्ते. इ गाळावयाचा. प्र + आप् + प्ते = प्राप्ते = मिळविलेल्यांत. अभीके = अभि + इके. इके = आके. आक अञ्च् जाणें पासून. अञ्चूचें भूतभूतकाळीं विशेषण अक्त. अभि + अक्ते = अभ्यक्ते = कडे गेलेल्यांत.

**आपित्वे नः प्रपित्वे तूयमा गहि ( ऋ० सं० ८।४।३ ) अभीके चिदुलोककृत् ( १०।१३३।१ )**

आपित्वे आपानकाले प्रपित्वे प्राप्ते तूयं शीघ्रम् आगहि आगच्छ = सोम पिण्याचा समय झाल्यामुळें लवकर ये (दुर्ग). अभीके चिदु लोककृत्संगे समत्सु वृत्रहा= अभीके अभ्यागते एतस्मिन् संगे संग्रामकाले प्राप्तेपु समत्सु संभक्षयितृषु उद्यतायुधेषु शत्रुषु लोककृत् स्थानकृत् एषु वृत्रहा शत्रुहन्ता भविष्यति = ही लढाई जवळ आल्या- मुळें व आयुधें घेतलेले व आम्हांस खाऊन टाकण्यास तयार झालेले शत्रू जवळ आले असल्यामुळें स्थान देणारा इंद्र आमचे शत्रु ठार करील असा दुर्ग अर्थ करतो. अभीके = अभ्यागते (संगे) व अभीके प्राप्ते (समत्सु संभक्षयितृषु शत्रुषु) असे अभीके ह्याचे त्यानें अर्थ केले आहेत. समत् = सम् + अद्. अद् = खाणें. आपित्व, प्रपित्व, अभिपित्व ह्या सोमपानाच्या तीन भिन्न वेळा असाव्यात. सोमपानाची विशिष्ट वेळ किंवा विशिष्ट वेळचें सोमपान हा एक अर्थ. आ = प्र = अभि = पि = त्व धन. आपित्व = प्रपित्व = अभिपित्व = अतिशय धन, धनभांडार. आपित्वे नः प्रपित्वे तूयमागहि = हे इंद्र नः अस्माकम् आपित्वे प्रपित्वे च तूयं त्वरितम् आगहि आगच्छ = हे इन्द्रा, आमच्या सोमपानाच्या दोनही वेळां लवकर ये. हा एक अर्थ. हे इन्द्र नः अस्मभ्यम् आपित्वे प्रपित्वे आ धनं तूयं धनं गहि देहि = हे इन्द्रा, आमचें धनभांडार भरलेलें असावें म्हणून धन दे. तू = धनवृद्धी करणें, धनसंपन्न करणें किंवा होणें. तू + य = धनसंपन्न होण्याचें साधन म्हणजे धन. अपपित्व, अभिपित्व, आपित्व, प्रपित्व व सपित्व असे ५ शब्द ऋग्वेदांत आहेत. सर्वांच्या शेवटीं पित्व आहे. अभि, आ, प्र व स ह्यांचा अर्थ धन असा होतो. पि = देणें, धन. त्व हा भाववाचक प्रत्यय नसून तो शब्द धनवाचक नाम आहे. अभिपित्वं = आपित्वं = प्रपित्वं = सपित्वं = अतिशय धन. अप + पि + त्वं = कमी धन. इम इन्द्र भरतस्य पुत्रा अपपित्वं चिकितुर्न प्रपि- त्वम् (३।५३।२४) = हे इन्द्रा, हे भरताचे मुलगे थोडे धन ( अपपित्वं ) देत आहेत (चिकितुः); पुष्कळ धन (प्रपित्वं) देत नाहींत. अभीक = अ + भी + क. अ = भी= क = धन. अभीक = अतिशय धन. अ = नाहीं. अभीक = ज्यांत धन नाहीं असें म्हणजे

दारिद्य. अभि + अञ्च् = कडे जाणें, शत्रूवर चाल करून जाणें. अभीक = हल्ला, लढाई असे अभीक ह्याचे तीन अर्थ आहेत. तिसऱ्या अर्थांतून तावडी, ताबा असा चौथा अर्थ निघतो. दुरितात् अभीके = दारिद्याच्या तावडींत. आस्नो वृकस्य वर्तिकाम् अभीके= लांडग्याच्या तोडांत सांपडलेल्या वर्तिकेला. अभीके चिदु लोककृत् संगे समत्सु वृत्रहा= वृत्राला मारणारा इन्द्र लढाईत ( अभीके = संगे = समत्सु ) सुद्धां ( चित् ) ( दोन्ही सैन्यांची भीड झालेली असतांनाही ) ऐसपैस जागा करतो म्हणजे रक्षण करतो. हा एक अर्थ. अभीके = संगे = समत्सु = संपत्तींत. अ = भी = क = सं = ग = सं = अद = धन. वृत्र = संपत्तीच्या आड येणारा. वृत्र म्हणजे दारिद्य. दारिद्याचा नाश करणारा संपत्तींत धनाची भर टाकतो. चित् + कृत् = उ + कृत् = लोक + कृत् = धन देणारा, चित् = उ = लोक = धन. असा दुसरा अर्थ. प्रावन्मनुं दस्यवे कर् अभीकं ( ९।९२।५ ) = मनूला म्हणजे मनुष्याला धन ( प्र ) देता झाला ( आवत् ) व दस्यूला म्हणजे मानवशत्रूला दारिद्य देता झाला. प्रपित्व व अभीक हीं नामें आहेत. विशेषणें नाहींत.

दुर्गवृत्तींत निरुक्तपाठ 'आपित्वे नः' व 'अभीके चित्' एवढाच आहे.

**इति अपि निगमौ भवतः**

अशीं ऋग्वेदांतील दोन उदाहरणेंही आहेत.

**दभ्रम् अर्भकम् इति अल्पस्य । दभ्रं दभ्नातेः । सुदम्भं भवति । अर्भकम् अव हृतं भवति**

अल्पस्य नामनी; अल्प ह्या अर्थी दभ्र व अर्भक हीं दोन नामें आहेत. दभ् हिंसा करणें ह्याला र लागून दभ्र शब्द झाला आहे; जसें रध्र, विप्र, दस्र. दभ् पासून दभ्र असें म्हणण्याचें कारण जें अल्प असतें त्याचा सहज ( सु ) नाश ( दम्भं ) होतो. अर्भकं = अ + र् + भ् + अ + कं. अ = अव. र् = ऋ. भ् = ह्. कं = तं. अव + ह् + ऋ + तं = अवहृतं = लहानशी वस्तु पळविली जाते.

**उपोप मे परामृश मा मे दभ्राणि मन्यथाः ( १।१२६।७ )**

सर्वाहमस्मि रोमशा गन्धारीणामिवाविका हा दुसरा अर्ध आहे. भावयव्य राजा स्त्रीचें अंग केसाळ पाहून तिच्याकडे जाईना. तेव्हां ती म्हणाली: —हे राजा, माझ्या ( त्या भागाला ) अगदीं जवळ ( उप + उप ) येऊन स्पर्श कर ( परामृश ). माझ्या केसांकडे लक्ष देऊं नकोस; गंधार देशांतील स्त्रियांनीं बाळगलेली मेंढी जशी केसाळ असते तशी मी आहे. मेंढीला जर लोक टाकीत नाहींत तर तूं मला कां टाकतोस? मृश् व मन् ह्यांचा अर्थ ऋग्वेदांत देणें असा आहे. मला ( मे = मह्यं ) पुष्कळ धन ( उप + उप ) दे ( परामृश ); मला ( मे ) थोडकें ( दभ्राणि ) देऊं नकोस ( मा मन्यथाः ). ह्या ऋगर्धाशीं दुसऱ्या अर्धाचा कांहीं एक संबंध नाहीं. पहिला अर्ध लोकांच्या तोंडीं असावा व कोणीतरी अर्वाचीन संस्कृतज्ञानें दुसऱ्या अर्धानें समस्यापूरण केलें असावें. दुसऱ्या अर्धावरून स्त्री बोलत आहे असें गृहीत धरून पहिल्या

अर्थाचा स्त्रीपर अर्थ केला गेला. भूरिदा भूरि देहि मे मा दभ्रं भूर्याभर (४।३२।२०) =पुष्कळ धन देणारा तूं (भूरिदाः), पुष्कळ धन (भूरि) दे (देहि); थोडकें (दभ्रं) देऊं नकोस (मा); पुष्कळ (भूरि) दे (आभर). एथें भूरि व दभ्र ह्यांचा धनाशीं संबंध आहे. हाच अर्थ 'उपोप' ह्या ऋगर्धांत आहे. दुर्गानें पहिला अर्थ दिला आहे व तत्स-मर्थनार्थ गोभिलगृह्यसूत्र (३।५।३) 'नाजातलोम्न्योपहासमिच्छेत्' उदाहृत केलें आहे. जिला लव आली नसेल अशा स्त्रीशीं समागम करूं नये असा त्या सूत्राचा अर्थ.

**नमो महद्भ्यो नमो अर्भकेभ्यो (१।२७।१३)**

मोठ्या देवांना नमस्कार (तसा) धाकट्या देवांना नमस्कार. अर्भक म्हणजे लहान मूल असाही अर्थ ऋग्वेदांत आहे. अर्भ ह्याला क लागून अर्भक शब्द झाला आहे. अर्भ शब्द ११ वेळां व अर्भक ६ वेळां ऋग्वेदांत असतांना अर्भक तेवढा कां घेतला. अर्भ व अर्भक यांच्या उलट महस् व महत्. महाधने = मोठ्या लढाईत व अर्भे = छोट्या लढाईत असे प्रयोग ऋग्वेदांत आढळतात.

**इति अपि निगमौ भवतः**

अशीं ह्या शब्दांचीं उदाहरणेंही आहेत.

**तिरः सतः इति प्राप्तस्य**

नामनी भवतः हें अध्याहृत. प्राप्त ह्या अर्थी तिरः व सतः हे दोन शब्द आहेत. अप्राप्तस्य इति एके अधीयते । तथापि योज्यम् = अप्राप्तस्य असाही कित्येक पाठ घेतात; तसाही अर्थ लावावा.

**तिरः तीर्णं भवति**

तिरः = तीर्णम्. तॄ तरणें ह्यापासून तिरः. तीर्ण सारखें तिरः हें विशेषण आहे. आपण तरून ज्या वस्तूकडे जातो. ती प्राप्त होते.

**सतः संसृतं भवति**

सतः = स + तः. स = सृ. तः = तम्. सतः = सृतम्. जिच्याकडे आपण सरतो ती सतः.

**तिरश्चिदर्यया परि वर्तिर्यातमदाभ्या (५।७५।७)**

तिरः अपि अप्राप्ते दूरे एव स्थाने यदि अवस्थितौ स्थः तथापि अर्यया ईश्वरया अपि रथगत्या देवगत्या शीघ्रम् आयातम् । द्विवचनं अः' सावग्रहत्वात् पदस्य । किंच । परिवर्तिर्यातम् । यद्यपि क्वचित् अनिवृत्तौ स्थः तथापि परिवर्तनं कृत्वा ततः आयातम् । हे अदाभ्या अहिंस्यौ अनुपहिंसितौ । अथवा । अदब्धया अनुपहिंसितया गत्या आयातं (दुर्गः) = दूर ठिकाणीं जरी असलां तरी रथाला जोराची गति देऊन देव ज्या गतीनें सचार करतात त्या गतीनें लवकर या; किंवा अर्यऽया असें सावग्रह पद असल्यामुळें तें अश्विनौ ह्याचें विशेषण करावें. जरी रथ फिरविला नसेल तरी तो फिरवून ज्या ठिकाणीं बसलां असाल तेथून या, अहो अहिंस्य अश्विनांनो. अदब्धा हें अदब्धया समजून तें गति शब्दाचें विशेषण करावें. ज्या गतीच्या आड कोणी येऊं शकत नाहीं. त्या

गतीनें या. तिरः ह्याचा अर्थ दुर्ग अप्राप्त म्हणजे दूर असा करतो. पण त्यानें प्राप्त हाच अर्थ लावावयास पाहिजे होता. वर्तिः व परि हीं भिन्न पदें आहेत; तथापि दुर्ग परिवर्तिः असा एक शब्द करून त्याचा परिवर्तनं कृत्वा असा अर्थ करतो. अदब्धा हें द्विवचनच आहे. अर्यया ह्याचा अर्यी स्वामिनौ व वर्तिः ह्याचा यज्ञगृहं असा सायणाचार्य अर्थ करतात. वर्तिः म्हणजे देणगी, धन व त्या शब्दाचा या धातूच्या भिन्न भिन्न रूपांशीं अन्वय होत असल्याकारणानें त्या धातूचा देणें असा अर्थ मीं एका निबंधांत केला आहे. अर्यया शब्द कठीण आहे. तथापि उप ० इन्द्र याहि ० तिरश्चिदर्यः सवना पुरूणि ( ४।२९।१ ) = शत्रूनें पुष्कळ सोमसवनें जरी तुला अर्पण केलीं तरी त्यांना न जुमानतां आमच्याकडे ये. तिरो अर्यो हवनानि श्रुतं मे (७।६८।२) = हे अश्विनांनो, शत्रूचें बोलावणें न जुमानतां आमचें बोलावणें एका. वहन्तु त्वा० हरयः० तिरश्चिदर्यः सवनानि वृत्रहन् ( ८।३३।१४ ), तिरश्चिदर्यः सवना वसो गहि (८।६६।१२), तिरो मर्त्यस्य कस्य चित्परिह्वृतिं वयं धनानि विश्वधा भरेमहि (९।७९।२) = कोणीही मर्त्य आड ( परिह्वृतिं ) आला तरी त्या अडथळ्याला न जुमानतां आम्ही सर्व रीतीनें धन मिळवूं. तिरो विश्वाँ अर्चतो याह्यर्वाङ् ( १०।८९।१६ ) = सगळ्या भक्तांना ( अर्चतः ) टाकून देऊन इकडे ये. ह्या सर्व ऋचांवरून तिरः म्हणजे टाळून, टाकून व न जुमानून असा अर्थ निघतो. अर्यया = अर्ययाणि = शत्रूंचीं ( सवनें किंवा बोलावणीं किंवा अडथळे ). शत्रूंच्या सवनांना किंवा बोलावण्याला किंवा अडथळ्याला न जुमानतां हे अहिंस्य अश्विनहो, आम्हांला धन ( वर्तिः ) द्या (यातं). परि = तिरः. तिरः नंतर चित् पुष्कळ वेळां येतो. तिरः चित् अजीबाद टाळून, न जुमानतां. तिरः शब्दाचा ज्या नामाशीं संबंध असतो तें द्वितीयान्त असतें. तिरः ह्याचा दूर अर्थ कोठेंहि नाहीं. तिरः ह्याचे वर दिलेले अर्थ तिरः ओलांडणें ह्यापासून निघतात. तिरः हें अव्यय आहे.

**पात्रेव भिन्दन् सत एति रक्षसः (७।१०४।२१) इति निगमौ भवतः**

इन्द्रो यातूनामभवत्पराशरो हविर्मथीनामभ्याविवासताम् । अभीदु शक्रःपरशुर्यथा वनं पात्रेव भिन्दन् सत एति रक्षसः = हवि चोरणारे ( हविर्मथीनां ), यज्ञाभोवतीं घिरट्या घालणारे ( अभि आ विवासतां ) असे जे जादुगार (यातूनां) त्यांचा नाश करता झाला (अभवत् पराशरः). जसा कोणी कुऱ्हाडीनें (परशुना) झाडें (वना) किंवा रानेंच्या रानें तोडून जमीनदोस्त करतो किंवा मातीचे घडे (पात्रा) फोडीत (भिन्दन् ) जातो तसा इन्द्र (शक्र) यज्ञाभोवतीं असणाऱ्या (सतः) राक्षसांवर ( रक्षसः ) हल्ले करतो (अभि एति) च करतो (इत् उ).यथा पात्राणि भिन्दन् कश्चित् अभ्येयात् एवम् अभ्येतु रक्षसः भिन्दन् । सतः प्रदेशात् । दूरात् इत्यर्थः असा अर्थ दुर्ग करतो. सतः= प्राप्तान् (सायणाचार्य) = आलेल्यांस. सतः हें रूप ऋग्वेदांत १६ वेळां आलें आहे. सत् चा मूळ अर्थ असणारें, असणारा. सत् सतौ सतः असा हा शब्द चालत असावा. विश्वे सतो मघवानो म आसन् (१०।२७।४) = धनवान् देव मला धन देते झाले;

विश्वे = सतः = मघवानः = धनवान्. सतो नूनं कवयः सं शिशीत (१०।५३।१०) = हे धनिक (सतः) दात्यांनो (कवयः) धन (सं=नूनं) द्या (शिशीत). महस्ते सतः (१।३६।३; ८।१०१।११), घोरस्य सतः (४।३६।६), एथें सतःषष्ठी आहे. सतां हें षष्ठीचें बहुवचन. सतामुराणं (१।१७३।७) = धन (सतां) देणाऱ्याला = (उराणं); किंवा धनवंताचें किंवा बलवंताचें रक्षण करणाऱ्याला; त्वमग्ने इन्द्रो वृषभः सतामसि (२।१।३) हे अग्ने, तूं इंद्र आहेस; [धनाचा (सतां) दाता (वृषभः) आहेस;] किंवा धनवंत किंवा बलवंत ह्यांचा पुढारी आहेस. सतां ज्येष्ठतमाय (२।१६।१) = धनवंतांत जो ज्येष्ठ त्याला. विश्वेषां ० सतां ज्येष्ठतमा (६।६७।१) = सर्व धनवंत किंवा बलवंत देवांत ज्येष्ठ जे मित्रावरुण त्यांना. सतश्च गोपां (१।९६।७) = धनाचा (सतः) दाता (गोपां) जो अग्नि त्याला. सतो अस्य राजा (७।८७।६) = अतिशय ( अस्य ) धनाचा (सतः) दाता (राजा) वरुण. ह्या ठिकाणीं सत् = धन. भिन्दन् सत एति रक्षसः ( ७।१०४।२१) = धनवान् (सतः) असे जे धनरक्षक ( रक्षसः ) त्यांना इंद्र मातीच्या घड्याप्रमाणें फोडीत जातो. सत् म्हणजे प्राप्त किंवा अप्राप्त असा अर्थ कोठेंही नाहीं.

**त्वः नेमः इति अर्धस्य । त्वः अपततः । नेमः अपनीतः**

अर्धा ह्या अर्थी त्वः व नेमः हे दोन शब्द आहेत. अर्ध शब्द ऋग्वेदांत आहे त्याची काय वाट ? पचाति नेमो नहि पक्षदर्धः (१०।२७।१८) = अर्ध्यांनी शिजविलें-अर्ध्यांनीं नाहीं. त्वः = तु + अः. तु = ततः. त्व तन् पसरणें ह्यापासून. अर्धे सगळ्यापासून वेगळें (अप) पसरलेलें (ततः) म्हणजे केलेलें असतें. नेमः = ने + मः. ने = नीतः. नी नेणें पासून नेम. कारण सगळ्यापासून अर्धे दूर (अप) नेलेलें (नीतः) म्हणजे केलेलें असतें.

**अर्धं हरतेः विपरीतात् । धारयतेः वा स्यात् । उद्धृतं भवति । ऋध्नोतेः वा स्यात् । ऋद्धतमः विभागः**

अर्ध = अर् + ध + म्. ध = ह. ह = हर् = ह् + अ + र्. उलटापालटीनें (विपरीतात्) अ+ र् + ह = अर्ह = अर्ध. किंवा धृ धारण करणें ह्यापासून धृ = धर् = ध् + अ + र्. उलटापालटीनें अ + र् + ध् = अर्ध् = अर्ध्. एथेंही विपरीतात् म्हणावयास पाहिजे. स्यात् (असेल), ह्या शब्दानें यास्काला ही व्युत्पत्ति पहिल्याइतकी पसंत नाहीं असें दर्शविलें जातें. अर्धे सगळ्यांतून ( उत् ) धरलेलें ( धृतं ) म्हणजे काढलेलें असतें. उद्धृतं = उत् + हृतं असाही संधिविभाग होईल. तसें असल्यास हरतेः विपरीतात् ह्यानंतर तें वाक्य आलें पाहिजे. अर्ध शब्द ऋध् समृद्ध होणें ह्यापासून झाला असेल. ऋध् = अर् + ध् = अर्ध्. अर्ध् + अम् = अर्धम्. अर्धा तुकडा म्हणजे सगळ्या तुकड्यांत चत्कोर निस्कोर ह्यांहून वस्तूचा मोठा भाग असतो. पण पाऊण हा भाग अर्ध्यापेक्षां मोठा आहे कीं नाहीं ?

**पीयति त्वो अनु त्वो गृणाति ( ऋ० सं० १।१४७।२) इति निगमो भवतः**

अर्धे लोक ( त्वः ) म्हणजे असुर तुझा द्वेष करतात ( पीयति ); दुसरे अर्धे

( त्वः ) म्हणजे देव तुझी स्तुति करतात ( अनुगृणाति ). खरोखर त्वः = एक ( निरुक्त १।७ ). एकजण ( त्वः ) अग्नीचा द्वेष करतो; एकजण स्तुति करतो.

**नेमे देवा नेमे असुराः ( काठक सं० १४।२ ) इत्यपि निगमौ भवतः**

देवाश्च वै असुराश्च अस्मिन् लोके आसन् हें आधीं आहे. देवाश्च वै असुराश्च अस्पर्धन्त । नेमे देवाः आसन् नेमे असुराः ( मैत्रा० सं० १।११।९ ) देव व असुर एकमेकाशीं लढत होते. देव निम्मे होते; व असुरही निम्मे होते.

**नेन्द्रो अस्तीति नेम उ त्व आहुः ( ऋ० सं० ८।१००।३ )**

इंद्र असा देवच नाहीं असें कांहींजण म्हणतात. नेम म्हणजे कांहीं, अर्धे असे ऋग्वेदांत दोन अर्थ आहेत. तिसराही अर्थ आहे; पण तो ठरवितां येत नाहीं.

**ऋक्षाः स्तृभिः इति नक्षत्राणाम्**

स्तृभिः हें स्तृ ह्याचें एकच रूप ऋग्वेदांत आढळतें; म्हणून तेंच रूप एथें दिलें आहे. स्ता स्तारौ स्तारः असा तो शब्द चालतो. स्तारः असें म्हणावयास पाहिजे. ऋक्ष व स्तृ हे नक्षत्रवाची शब्द आहेत. नक्षत्र शब्द ऋग्वेदांत असून तो घातला नाहीं; कारण तो घातल्यानें जोडीला बाध येतो.

**नक्षत्राणि नक्षतेः गतिकर्मणः**

नक्षत्राणां असा शब्द वर आला आहे म्हणून नक्षत्राणि असा अनेकवचनी शब्द घातला आहे. नक्ष् जाणें ह्यापासून नक्षत्र. नक्ष् धातु धातुपाठांत नाहीं. तो यास्ककालीं प्रचारांत होता. नक्ष् व्यापणें, जाणें असा धातु ऋग्वेदांत आहे. नक्षत्रें आकाशांत संचार करतात किंवा आकाश व्यापून टाकतात म्हणून त्यांना नक्षत्र ही संज्ञा.

**नेमानि क्षत्राणि इति च ब्राह्मणम् ( शतपथ ब्रा० २।१।२।१८ )**

हीं ( इमानि ) नक्षत्रें क्षत्र म्हणजे धन ( निघंटु २।९।९ ) नाहींत असा दुर्ग अर्थ करतो. न इमानि क्षत्राणि । नाना ह वै एतानि अग्रे क्षत्राणि आसुः । यथैव असौ सूर्यः एवं तेषाम् एषः उद्यन्नेव वीर्यं क्षत्रम् आदत्ते । तस्मात् आदित्यः नाम यत् एषां वीर्यं क्षत्रम् आदत्त ( शतपथ ब्रा० २।१।२।१८ ) = हीं खरोखर क्षत्रें नाहींत. पूर्वीं हीं क्षत्रें पुष्कळच होतीं. पण जसा सूर्य ताऱ्यांचें क्षत्र म्हणजे बल हिराऊन घेतो व त्यांना नक्षत्र म्हणजे बलहीन करतो त्याप्रमाणेंच हा ( राजा ) उगवतांच ( म्हणजे गादीवर बसतांच ) त्यांचें वीर्य हरण करिता झाला ( आदत्त ). ज्याअर्थीं त्यांचें बल हरण करिता झाला त्याअर्थीं तो आदित्य ह्या नांवास पात्र होतो.

ते ह देवाः ऊचुः । यानि वै तानि क्षत्राणि अभूवन् न वै तानि क्षत्राणि अभूवन् इति तत् वै नक्षत्राणां नक्षत्रत्वम् । तस्मात् ऊचुः । सूर्यः नक्षत्रः एव स्यात् । एष हि एषां वीर्यं क्षत्रम् आदत्त ( शत० ब्रा० २।१।२।१९ ) = देव म्हणाले, हीं जीं क्षत्रें होतीं ( म्हणून म्हणतात ) तीं वास्तविक क्षत्रें नव्हतीं. नक्षत्रांना नक्षत्र नांव पडण्याचें कारण सूर्य हा नक्षत्र आहे. कारण तो ह्यांचें ( ताऱ्यांचें ) क्षत्र म्हणजे

वीर्य हरण करता झाला. राजाला क्षत्रियांनीं मान दिलाच पाहिजे, त्याचा अधिकार, त्याचें वर्चस्व मानलेंच पाहिजे असा सिद्धांत ठोकून देण्याकरितां नक्षत्र शब्दाची वरीलप्रमाणें हरदासी व्युत्पत्ति दिली आहे. ह्याच कथेला अनुलक्षून पाणिनीनें 'नभ्राण् नपात्. नक्षत्रनक्रनाकेषु प्रकृत्या' (६।३।७५) ह्या सूत्रांत नक्षत्र शब्द घातला आहे; नक्षत्र वगैरे शब्दांत निषेधार्थी न चा अ होत नाहीं असा सूत्राचा अर्थ. नक्षत्र शब्द ऋग्वेदांत ११ वेळां आला आहे. दोन ठिकाणीं नक्षत्र म्हणजे तारे असा अर्थ स्पष्ट आहे. चोरांप्रमाणें तारे रात्रीबरोबर निघून जातात (१।५०।२); जसे लोक काळ्या घोड्याला सोन्याच्या अलंकारांनीं सजवितात तसे पितर द्युला ताऱ्यांनीं सजविते झाले (१०।६८।११). चंद्राला नक्षत्रांमध्यें ठेविलें आहे (१०। ८५।२) नक्षत्रांसहित अंतरिक्ष आमचें बोलावणें ऐको (३।५४।१९). उगवणारें प्रकाशमय नक्षत्र असा सूर्य (७।८१।२) लोकांना प्रकाश देण्याकरितां अग्नीनें सूर्य-नक्षत्राला द्युलोकीं चढविलें (१०।१५६।४). १०।८८।१३ त अग्नीला व ७।८६।१ त नाक (म्हणजे द्युलोक) ह्याला नक्षत्र म्हटलें आहे. ६।६७।६ त नक्षत्र उत विश्वदेवः असें सूर्याला म्हटलें असावेंसें वाटतें; नक्षत्रः = विश्वदेवः = अति धनवान्; न = क्षत्र = विश्व = देव = धन. हाच अर्थ विशां नक्षत्रशवसां (१०।२२।१०) एथें आहे. विश् = न = क्षत्र = शवस् = धन. १०।८८।१३ त अग्निं नक्षत्रं असें आहे; एथें नक्षत्र शब्द प्रकाशणारा व धनवान् असा द्व्यर्थी असावा. १०।१११।७ त नक्षत्र शब्दाचा अर्थ समजत नाहीं. ज्याअर्थी सूर्याला नक्षत्र म्हटलें आहे त्याअर्थी नक्ष् प्रकाशणें असा धातु असावा. नक्ष्चा तसा अर्थ मला ऋग्वेदांत आढळला नाहीं. सोनें वगैरे धन प्रकाशतें म्हणून त्यास नक्षत्र म्हटलें असेल किंवा न + क्षत्र असा तो शब्द बनला असेल. नक्ष (= रात्र) + अत्र म्हणजे अक्त (= उजेड) असा नक्षत्र शब्द बनला असावा असें एके वेळीं मला वाटत होतें. रात्रीचे दिवे असा त्या शब्दाचा मीं अर्थ केला होता. मॅक्बेथ नाटकांत ताऱ्यांना रात्रीच्या मेणबत्त्या म्हटलें आहे. यूरोपस्थ विद्वान् रात्रीचा त्राता (नक्ष + त्र) अशी व्युत्पत्ति देतात. ब्राह्मण-वचनानुसार यास्कानें दिलेली व्युत्पत्ति वैकल्पिक आहे म्हणून वा शब्द पाहिजे होता; पण अशा ठिकाणीं यास्काची तसा शब्द घालण्याची पद्धत नाहीं असें मागें अनेकदां सांगितलें आहे.

**ऋक्षाः उदीर्णानि इव ख्यायन्ते**

ऋक्षाः = ऋ + क्षाः. ऋ = ऋ = उत् + ईर्णानि. क्षाः = ख्याः = ख्यायन्ते नक्षत्रांना ऋक्ष म्हणण्याचें कारण जणूं काय (इव) कोणी त्यांना वर (उत्) फेकून दिलें आहे (ईर्णानि) अशीं तीं दिसतात (ख्यायन्ते). म्हणजे ऋ ईर् जाणें व ख्या पाहणें ह्या दोन धातूंपासून ऋक्ष शब्द झाला आहे. लाटिन उर्सस्, ग्रीक आर्क टयूरस् = आस्वल. उर्सा = आस्वलीण. आर्क्टॉस = सप्तऋषि. हे सप्तऋषि मूळचे सप्तऋक्ष होते. ऋक्ष म्हणजे तारा हा अर्थ अर्वाचीन आहे. नक्षत्रमृक्षं भं तारा (अमर १।२।

२२ ), ऋषति गच्छति ऋक्ष्णोति तमः वा ( क्षीरस्वामी ) अमरांत ऋक्ष नपुंसकलिंगी आहे. पण ऋग्वेदांत तो पुल्लिंगी आहे. ऋक्षाच्छभल्लभाल्लुकाः ( अमर २।५।४ ). ऋक्ष्णोति हिनस्ति ऋक्षः ( क्षीरस्वामी ). ऋक्ष शब्द ऋग्वेदांत चार वेळां आला आहे. व ऋक्षादंहसो मुचत् ( ८।२४।२७ ) = जो अस्वलासारख्या संकटांतून सोडवितो. एथें ऋक्ष = अस्वल.

**स्तृभिः स्तीर्णानि इव ख्यायन्ते.**

जेव्हां नक्षत्रें पसरल्यासारखीं दिसतात तेव्हां त्यांना स्तृभिः म्हणावें. स्तृभिः म्हणजे नक्षत्रें अशी निघंटुकार व यास्क ह्या दोघांनींही चूक केली आहे. स्तृभिः हाच मूळ शब्द अशी त्यांची समजूत होती कीं काय ? स्तारः स्तीर्णानि असें म्हणावयास पाहिजे. स्तृभिः ह्यांत ख्या नाहीं; फक्त स्तृ पसरणें हा धातु आहे. ख्यायन्ते हा ऋक्षाः० ख्यायन्ते ह्यांतील ख्यायन्ते ह्याचा अनुवाद असावा. ग्रीक ॲस्टर, लातिन स्टेला.

**अमी य ऋक्षा निहितास उच्चैः ( ऋ० सं० १।२४।१० )**

नक्तं ददृश्रे कुहचित् दिवेयुः हे जे उंचावर ( उच्चा ) ठेविलेले ( निहितासः = निहिताः ) तारे ( ऋक्षाः ) रात्रीं ( नक्तं ) दिसतात ( ददृश्रे ) ते दिवसां ( दिवा ) कोठें (कुह) बरें ( चित् )जातात (ईयुः) ? ऋक्ष नुसते तारे नसून सप्तर्षि होत.

**पश्यन्तो द्यामिव स्तृभिः ( ऋ० सं० ४।७।३ ) इत्यपि निगमौ भवतः अधा हि त्वा जगृभ्रिरे मर्तासः ( ४।७।२ )**

ताऱ्यांनीं (स्तृभिः) भरलेला स्वर्ग (द्यो) जसा सुंदर दिसतो तसा ठिणग्यांनीं भरलेला पाहून (पश्यन्तः) मर्त्य (मर्तासः = मर्ताः) ह्यामुळेंच ( अधा हि ) तुझा ( त्वा ) स्वीकार करते झाले (जगृभ्रिरे). ह्याहून चांगलें उदाहरण म्हणजे अरुषस्य दुहितरा विरूपे स्तृभिरन्या पिपिशे सूरो अन्या (६।४९।३) = द्यूच्या (अरुषस्य) भिन्न रूपाच्या (विरूपे) दोन मुली म्हणजे रात्र व उषा. ह्यांपैकीं एक—रात्र—तारांनीं भूषित होते व दुसरी म्हणजे उषा सूर्यानें (सूरः). किंवा पिपिशे नाकं स्तृभिर्दमूनाः ( ऋ० सं० १।६८।५ ) = गृहपति (दमूनाः) जो अग्नि तो ताऱ्यासारख्या आपल्या ठिणग्यांनीं स्वर्ग (नाकं) अलंकृत करता झाला. स्तृभिः ऋग्वेदांत आठ वेळां आला आहे.

**वम्रीभिः उपजिह्विकाः इति सीमिकानाम्**

सीमिका शब्द अमरांत नाहीं. तो यास्ककालीं प्रचारांत होता. सीमिकाः = पिपीलिकाः (दुर्ग) = मुंग्या. वाळवी असेल. वम्रीभिः व उपजिह्विका ह्यांचा अर्थ मुंग्या. वम्रीभिः एवढेंच रूप असून तें फक्त एका ऋचेंतच आहे. वम्रीभिः असें म्हणण्याचें कारण त्याला वम्र्यः (वम्रीचें बहुवचन) करतां येत नव्हतें कीं काय ?

**वम्र्यः वमनात् । सीमिकाः स्यमनात् । उपजिह्विकाः उपजिघ्र्यः**

वम् ओकणें ह्यापासून वम्री. बहुवचनी रूप देण्याचें कारण अन्यवचनी रूप ऋग्वेदांत नाहीं. यास्कानें एथें वम्र्यः हें रूप दिलें आहे. त्याला वरतीं स्तारः रूप देतां आलें असतें. स्यम् जाणें (दुर्ग) ह्यापासून सीमिका. कारण त्या सारख्या चाल-

तातच. स्यमु शब्दे (धा. १।८५१) व स्यम वितर्के ( धा.१०।१६० ) एवढेच दोन धातु धातुपाठांत सांपडतात. ज्याप्रमाणें नक्षत्र शब्दाची व्युत्पत्ति यास्कानें ऋक्ष व स्तृ ह्यांच्या आधीं दिली तशीं सीमिका शब्दाचीही वम्र्यः वमनात् ह्याच्या आधीं द्यावयास पाहिजे होती. उपजिह्विकाः = उप + जिह्विकाः. जिह्विकाः = जिघ्र्यः. जिह्विका घ्रा वास घेणें ह्यापासून. मुंग्यांचे घ्राणेंद्रिय फार तिखट असतें. त्यांना लांबचा वास घेतां येतो. उपजिघ्री हा शब्द नदीसारखा चालतो. हा शब्द अमरांत नाहीं. वम्रीभिः पुत्रमग्रुवो अदानं (ऋ० सं० ४।१९।९) निवेशनात् हरिव आजभर्थ = हे इंद्रा ( हरिवः = हरि नांवाचे घोडे आहेत ज्याचे अशा हे इन्द्रा ) दान न देणारा जो अग्रूचा पुत्र त्याला तूं वम्रींच्या साहाय्यानें त्याच्या निजावयाच्या जागेंतून (निवेश-(नात्) बाहेर ओढलेंस ( आजभर्थ = आ जहर्थ). वारुळांतून (निवेशनात्); वम्रीभिः= उपजिह्विकाभिः असा सायणाचार्य अर्थ करतात. अग्रुवः हा शब्द ऋग्वेदांत१० वेळां आला असून अग्नीच्या आया म्हणजे पाणी असा त्याचा अर्थ आहे. आया अग्नीला वाढवितात. तेव्हां अग्रूंचा पुत्र म्हणजे अग्नीच असावा. हा अग्नि पाण्यांत लपून बसतो. बाहेर येत नाहीं. देव त्याला युक्तीनें बाहेर काढतात व काम करायला लावतात. जेथें अग्नि निजतो तेथून (निवेशनात्) त्यास इंद्रानें वम्रींनीं बाहेर काढलें. अग्नीचें काम हवि देण्याचें. तो लपून बसतो तेव्हां तो अदान होतो व त्यामुळें देवांची उपासमार होते. म्हणून लपून बसणाऱ्या व देवांना हवि न देणाऱ्या ( अदानं ) ह्या अग्नीला इंद्र बाहेर ओढता झाला. कशानें ? वम्रीभिः. उत त्यं पुत्रं अग्रुवः परावृक्तं शतक्रतुः । उक्थेभिरिन्द्र आभजत् ( ऋ० सं० ४।३०।१६ ) = बहुधन ( शतक्रतुः ) इंद्र इजा पावलेला जो अग्रूचा मुलगा त्याला स्तोत्रांचा ( उक्थेभिः ) भाग देता झाला ( आभजत् ). फार कामामुळें अजारी पडलेल्या ( परावृक्तं ), क्षीण पावलेल्या, अग्नीची उक्थांनीं इंद्र समजूत घालतो. तेव्हां वम्रीभिः = उक्थेभिः असा अर्थ असेल. दुर्ग ही ऋचा मुळींच देत नाहीं. तो म्हणतो उपजिह्विका व वम्रीभिः हे दोन्ही शब्द एकाच ऋचेंत आढळतात. पण हें त्याचें म्हणणें चुकीचें आहे.

**यदत्त्युपजिह्विका यद्वम्रो अति सर्पति ( ऋ० सं० ८।१०२।२१ )। इत्यादि निगमौ भवतः सर्वं तदस्तु ते घृतम्**

जें ( यत् ) उपजिह्विका खाते ( अत्ति ), जें ओलांडून ( अति ) वम्र जातो ( सर्पति ) तें ( तत् ) सर्व तुझें घृत ( घृतं ) म्हणजे खाद्य असो. एथें वम्र शब्द आहे, वम्रीभिः नाहीं म्हणून दुर्गाची चूक झाली असें वर म्हटलें आहे. दुर्गाचा पाठ इत्यपि निगमो भवति असा होता. यत् अत्ति भक्षयति उपजिह्विका अन्तरनुप्रविष्टा यच्च अतिसर्पति आर्द्रया मृदा परिवेष्टयन् एव वम्रः। बहिर्न शक्नोति अत्तुं खादिरसारादि ( दुर्ग ) = जें आंत शिरून उपजिह्विका खाते, जें वम्र ओल्या मातीनें लिंपून त्याच्या आंतून सरपटतो; कारण खैराला बाहेरून त्याला खातां येत नाहीं. उपजिघ्रति इति उपजिह्विका । वमति उदकम् इति वम्रः अशी व्युत्पत्ति देऊन सायणाचार्य

म्हणतात कीं जरी हे शब्द समानार्थक आहेत तरी वम्र उपजिव्हिकेची एक जात आहे असें समजावें. ही ऋचा तैत्तिरीय संहितेंत ( ४।१।१० ) दिली आहे. तिजवरील सायणभाष्य पुढीलप्रमाणें आहे. जिव्हाः प्रधानज्वालाः । तत्समीपवर्तिनी क्षुद्रज्वाला उपजिव्हिका । अस्माभिः अरण्यात् आनीतेषु दारुषु मध्ये यत् दारु महारण्ये दावाग्नेः उपजिव्हिका स्वल्पज्वाला अत्ति भक्षयति । ईषत् दहति इत्यर्थः । वम्रशब्दः पिपीलिकासदृशं क्षुद्रजीवम् आचष्टे । स च यत् काष्ठम् अतिसर्पति अतिशयेन सर्पति प्राप्नोति । काष्ठावयवेषु तत्र तत्र सारं भक्षयति इत्यर्थः = जिव्हा मोठ्या ज्वाला. उपजिव्हिका लहान ज्वाला. रानांतून आणलेल्या लाकडांतील जें लाकूड लहान ज्वाला खाते, मुंगीसारखा क्षुद्र प्राणी ज्या काष्ठाचे अवयव भक्षण करतो. एथें उपजिव्हिका व वम्र समानार्थक नाहींत. उपजिव्हिका उपदीपिका पिपीलिकासदृशः क्षुद्रजीवः । वम्रः वल्मीकः अतिसर्पति अतिव्याप्नोति अतीत्य अनुवर्तते ( शुक्लयजुर्वेद ११।७४ वरील महीधरभाष्य ) = उपजिव्हिका म्हणजे मुंगीसारखा क्षुद्र प्राणी; वम्र म्हणजे वल्मीक ( वारूळ ? ) ज्याच्या पलीकडे जातो. उपजिव्हिका व वम्र ह्यांचे अर्थ निश्चित करणें कठीण आहे. वम्र शब्द ऋग्वेदांत पांचदां आला असून त्यांपैकीं एका ठिकाणीं तो वम्रक असा आढळतो. वम्र हें एक स्तोत्याचें नांव आहे. हा वम्रक पायांनीं इंद्राकडे गेला व इंद्रानें त्याला धन दिलें ( १०।९९।१२ ). ह्याच सूक्ताच्या ५ व्या ऋचेंत वम्रस्य असें रूप आलें आहे. ह्या ऋचेचा अर्थ समजत नाहीं. वम्र स्तुति करीत असतांना कोणाला तरी मारतो ( १।५१।९ ). अश्विन त्याचें रक्षण करतात ( १।११२।१५ ). वम् बोलणें ह्याचीं अवमीत् व वमन् अशीं दोन रूपें आढळतात. वम्र = बोलणारा, स्तुति करणारा. उपजिव्हिका एका प्राण्याचें नांव असावें. जें उपजिव्हिका खाते व जें वम्र नांवाचा स्तोता तुझ्याकडे सारतो तें सर्व घृत तुला मिळो. उपजिव्हिका म्हणजे पळी तर नसेल ? जें खोलगट पळी खाते म्हणजे खोलगट पळीनें घेतलें जातें व जें वम्र तुझ्यांत टाकतो तें सर्व घृत तुला मिळो. पळी ही अग्नीची एक जिव्हाच होय. ह्या ऋचेला तज्जुषस्व यविष्ठ हे शब्द कृष्ण, शुक्ल, मैत्रायणी व काठक ह्या चार यजुःसंहितांत जोडलेले आढळतात. ते ऋ० सं० ८।१०२।२० व्या शेवटीं आहेत. अशी पुस्ती जोडलेल्याचीं उदाहरणें यजुःसंहितांत सांपडतात. दुर्गाच्या वृत्तींत तैत्तिरीयके पठ्यते असें म्हटलें आहे. दुर्ग नेहमीं मैत्रायणींतले उतारे देतो. तेव्हां सर्वत्र सारखाच पाठ असतांना तैत्तिरीयके असें कां म्हणेल ? तो ऋचांच्या मूळाचा उल्लेख कोठेंच करीत नाहीं. म्हणून तैत्तिरीयके पठ्यते हें प्रक्षिप्त होय.

**ऊर्दरं कृदरम् इति आवपनस्य ।**

आ उप्यते यवादि धान्यं यस्मिन् ( दुर्ग ) = ज्याच्यांत धान्य ठेवतात असें बुरुडानें केलेलें टोपलें, कणगा. सर्वमावपनं ( अमर २।९।३३ ). ह्या अर्थी ऊर्दर व कृदर हे शब्द होत.

**ऊर्दरम् उद्दीर्णं भवति। ऊर्जे दीर्णं वा**

ऊर्दरं = ऊ + र् + द + रं. ऊ + र् = उत्. द + रं = दीर्णं. भोकें असणारें टोपलें वगैरे भांडें. किंवा ऊ + र् = ऊर्जे = अन्नाकरितां. धान्य ठेवण्याकरितां भोकांचें भांडें.

**तमूर्दरं न पृणता यवेन ( ऋ० सं० २।१४।११ ) । इत्यपि निगमो भवति । इन्द्रं सोमेन तम् ऊर्दरम् इव पूरयति यवेन**

जसा कोणी कणगा यवानें भरतो तसे इंद्राला सोमानें भरा. ऊर्दर हा शब्द फक्त ह्याच ऋचेंत आढळतो. यास्क ह्या खंडांत व जेथें जेथें इत्यपि निगमो भवति हे शब्द येतात तेथें ऋचेचा अर्थ देत नाहीं. शिवाय त्यानें ऊर्दरं शब्द न ठेवतां आवपनं शब्द घातला असता. पृणत = पूरयत. पूरयति नव्हे. 'यथा कश्चित् आवपनं यवेन पूरयति तथा हे शब्द मनांत आणून किंवा दुर्गवृत्तींतल्या पूरयत ह्याचें पूरयति करून वर दिलेलें विवरण घुसडलें असावें.

**कृदरं कृतदरं भवति**

कृदरं = कृ + दरं. कृ = कृत. ज्यांत भोकें केलीं आहेत असें भांडें. हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. ते यास्काचे असल्यास ऊर्दरं ह्याच्या व्युत्पत्तीनंतर यावयास पाहिजे होते.

**समिद्धो अञ्जन् कृदरं मतीनाम् ( मैत्रा० सं० ३।१६।२ ) इत्यपि निगमो भवति**

घृतमग्ने मधुमत् पिन्वमानः० वाजिनं० वक्षि प्रियमा सधस्थम् = हे भगवन् अग्ने समिद्धः संदीप्तः त्वम् अञ्जन् गमयन् आत्मानं प्रति कृदरम् आवपनं मतीनाम् । देवानां हि सर्वेषां घृतम् आवपनं मतीनाम् । तेहि तत्र सर्वाः मतीः प्रक्षिपन्ति मम इदं स्यात् इति । तत् एवं गुणयुक्तं घृतं मधुमत् मधुस्वादयुक्तं पिन्वमानः । पिबन् इत्यर्थः। अथवा देवान् प्रति प्रक्षारयन् प्रियम् एतं वाजिनम् ( अश्वं ) देवानां सधस्थं समानं स्थानम् आ आभिमुख्येन शीघ्रतरं वक्षि वह प्रापय = हे अग्नि मनांचें भांडागार जें हें मधुर घृत तें स्वतः पिऊन किंवा देवांकडे वहात लाऊन हा प्रियवाजी ( घोडा ) देवांच्या राहण्याच्या ठिकाणीं ताबडतोब ने. घृताला मनांचें भांडागार म्हणण्याचें कारण 'मला मिळो मला मिळो' ह्या इच्छेनें देवांचें मन घृताकडे लागलें असतें. ते आपले सर्व विचार घृतांत नेऊन सांठवितात ( दुर्ग ). कृदर शब्द ऋग्वेदांत नाहीं. मतीनां म्हणजे स्तुतीचें कृदरं म्हणजे सांठवण जें घृत तें वाढवून तें देवांकडे घेऊन जा असा अर्थ असावा.

**इति निगमो भवति**

ह्याच्याबद्दल इति निगमौ एवढेंच दुर्गवृत्तींत आहे व तोच पाठ बरोबर दिसतो; कारण यास्क जोडीविषयीं बोलतो. तमूर्दरं न पृणता समिद्धो अञ्जन् इत्यपि निगमौ भवतः असा दुर्गस्वीकृत पाठ असावा.

## खंड २१ वा.

**रम्भः पिनाक इति दण्डस्य । रम्भः आरभन्ते एनम्**

रंभ व पिनाक ह्यांचा अर्थ काठी. काठीला रंभ म्हणण्याचें कारण म्हातारे लोक पडूं नये म्हणून ह्याचा (एनं) अवलंब करतात (आरभन्ते). एतंच्या ऐवजी एनं म्हणण्याचें कारण दंड शब्दाला उद्देशून तो आहे. आरभ् धरणें हा अर्थ आपटयांच्या कोशांत दिला आहे, पण उदाहरण दिलें नाहीं. रंभ आ + रभ् पासून झाला आहे.

**आ त्वा रम्भं न जिव्रयो ररम्भ (८।४६।२०) इत्यपि निगमो भवति। आरभामहे त्वा जीर्णा इव दण्डम्**

दुर्गवृत्तींत आ त्वा रम्भं एवढेंच आहे. इत्यपि निगमो भवति नाहीं. आररम्भ = आरभामहे. जिव्रयः = जीर्णाः. न = इव. रम्भं = दण्डम्. रम्भ शब्द फक्त एकाच ऋचेंत आला आहे. रभ् = धरणें, पकडणें, ह्या धातूपासून रम्भ हें नाम; पकडाव-याची, धरण्याची वस्तु; ती वस्तु काठी असावी. जसे म्हातारे रंभाला आश्रयाकरितां धर-तात तसे, हे इंद्रा, आम्ही तुला आश्रयाकरितां धरतों. भाष्यासंबंधानें खंड २० चा शेवट पाहणें.

**पिनाकं प्रतिपिनष्टि एनेन**

पिनाक शब्द पिंप् कुटणें ह्यापासून झाला आहे. कारण ह्यानें म्हणजे काठीनें मनुष्य कुटतो. पिनाक व पिनष्टि ह्यांमध्यें पिन हीं दोन अक्षरें आहेत. एनेन; वर दिलेली एनं वरील टीप पहा. पिनाक शब्द ऋग्वेदांत नाहीं.

**कृत्तिवासाः पिनाकहस्तोऽवततधन्वा (काठकसं० ९।८) इत्यपि निगमो भवति**

पिनाकहस्तः कृत्तिवासा अवततधन्वा (मैत्रा सं० १।१०।४). अवततधन्वा पिनाकहस्तः कृत्तिवासाः (तै० सं० १।८।६). अवततधन्वा पिनाकहस्तः कृत्तिवासाः (वाज० सं० ३।६१). दुर्गवृत्तींत तैत्तिरीयपाठ आहे. पण विवरण मैत्रायणीपाठाचें आहे. तेव्हां तोच पाठ त्याला मान्य होता. मागाहून तैत्तिरीयपाठ त्याच्या जागीं घातला गेला. हल्लींच्या निरुक्तांत काठकपाठ आहे. ह्या चारी संहितांत शब्द तेच आहेत. फक्त त्यांचा क्रम बदलला आहे. हे तीनही शब्द रुद्राचीं विशेषणें होत. कृत्ति म्हणजे चामडें; हें आहे वस्त्र ज्याचें तो कृत्तिवासाः. पिनाक म्हणजे दंड आहे हातांत ज्याच्या तो पिनाकहस्तः. सायणाचार्य (तैत्तिरीयसंहिताभाष्य १।८।६) पिनाकनामकं धनुः असें म्हणतात. उवट (वाज० सं० भाष्य ३।६१) पिनाकः रुद्राङ्कुशः व महीधर पिना-काख्यं धनुः असें म्हणतात. पिनाकोऽजगव धनुः (अमर १।१।३५) व पिनाकोऽस्त्री शूलशंकरधन्वनोः (अमर ३।३।१४). ज्याअर्थी अवततधन्वा असें विशेषण आहे त्या अर्थीं पिनाक म्हणजे त्रिशूल असा अर्थ करणें जरूर आहे. त्रिशूळ आहे हातांत ज्याच्या तो पिनाकहस्तः. पिनह्यते पिनाकः धनुः (अमर १।१।३५) व अपिनह्यते पिनाकं त्रिशूलं (अमर ३।३।१४) अशी क्षीरस्वामी व्युत्पत्ति देतो. अवततं धनुः यस्य सः

अवततधन्वा = ज्याचें धनुष्य प्रत्यंचा ओढल्यामुळें लांबविलें जातें (ज्याविकर्षेण विस्तारितधनुष्कः) असा सायणाचार्य अर्थ करतात; पण उवट अवतारितधनुष्कः व महीधर अवरोपितधनुष्कः म्हणजे ज्याच्यावर प्रत्यंचा चढविली नाहीं असें धनुष्य आहे ज्याचेपाशीं तो असा अर्थ करतात व तोच बरोबर आहे. आ त्वा रम्भं कृत्तिवासाः पिनाकहस्तः इति निगमौ असा दुर्गपाठ आहे व तोच बरोबर आहे. कृत्तिवासाः पिनाकहस्तः असा क्रम दुर्ग एथें देतो पण विवरण करतांना तो मैत्रायणींतला क्रम देतो. असा त्याच्या वृत्तींत विरोध आहे. यास्कानें काठकपाठच घेतला होता असें ह्यावरून सिद्ध होतें.

**मेनाः ग्नाः इति स्त्रीणाम्। स्त्रियः स्त्यायतेः अपत्रपणकर्मणः। मेनाः मानयन्ति एनाः। ग्नाः गच्छन्ति एनाः**

मेना व ग्ना हे शब्द स्त्रीवाचक आहेत. स्त्यै लाजणें पासून स्त्री शब्द. स्त्रिया लाजाळू असतात. स्त्यायते अस्यां गर्भः (अमर १।६।१ क्षीरस्वामी) = स्त्रीच्या मध्यें गर्भ घट्ट होतो म्हणून तिला स्त्री म्हणतात. महाभाष्यांत (१।२।३।५२) हीच व्युत्पत्ति दिली आहे. स्त्यै शब्दसंघातयोः (धा. पा. १।९३५). लाजणें हा अर्थ यास्ककालीं होता. मेनाः = म् + ए + नाः. ए = अ. म् + अ + न + अ = म् + अ+अ + न = मान. पुरुष स्त्रियांना मान देतात म्हणून त्या मेना. ग्नाः = ग् + नाः. न = म. म = म् + अ. ग् + अ + म = गम्. पुरुष स्त्रियांकडे कामपूर्तीसाठीं गमन करतात म्हणून त्या ग्नाः प्रांक गामॉस = विवाह.

**अमेनांश्चिज्जनिवतश्चकर्थ ( ऋ० सं० ५।३१।२ )**

हे इन्द्रा, ज्यांना बायका नव्हत्या (अमेनान्) त्यांना सुद्धां (चित्) बायकांनीं युक्त (जनिवतः) तूं केलेंस. ह्या ऋक्पादाचा दुसरा अर्थ आहे. जे धनहीन (अमेनान्) होते त्यांस तूं सधन (जनिवतः) केलेंस. कवीच्या मनांतील खरा अर्थ हाच. मेना शब्द ऋग्वेदांत ७ वेळां आला असतां अमेनान् असें निषेधार्थी उदाहरण देण्याचें कांहीं कारण नव्हतें. मेनाभवो वृषणश्वस्य सुक्रतो (खंड १६ पान पहा) अशा सारखें उदाहरण देणें शक्य होतें. जोडीकरितां जनिसारखे स्त्री ह्या अर्थाचे बरेच शब्द असतां निघंटुकारानें दोनच शब्द घेतले.

**ग्नास्त्वा कृन्तन्नपसोऽतन्वतेन ( मैत्रा० सं० १।९।४ ) इति निगमौ भवतः**

संहितेंत अतन्वत असतांना निरुक्तांत अतन्वतेन असा अपपाठ कां व कसा आला हें सांगतां येत नाहीं. हे वस्त्रा, तुला बायका (ग्नाः) कातत्या झाल्या व विणकर (अपसः) तुला ताणते झाले. बायका सूत काढतात व विणकर त्यांचें वस्त्र बनवितात. अपसः अल्पकाः अनुपजातपुंस्काः जननासमर्थाः कुविन्दपुत्रकाः (दुर्ग) = जीं मोठीं झालीं नाहींत, प्रजोत्पादनशक्ति ज्याच्यांत अजून आली नाहीं अशी विणकऱ्यांचीं लहान लहान मुलें हा अर्थ दुर्गानें कोठून आणला हें समजत नाहीं. अपस् शब्द अमरांत नाहीं. तो वैदिक शब्द असून त्याचा अर्थ वस्त्र व मग विणकर असा होता.

पुढें रथ करणारा कुशल कारागीर, कुशल काम व काम असे अर्थ होत गेले. ऋभूंना अपसः असें म्हटलें आहे. स्त्रियांना व पुरुषांना दोघांनाही कुशल कारागीर ह्या अर्थी लावलेला तो शब्द आढळतो. दक्षिणा घेतल्यानें पाप लागतें; तें टाळण्याकरितां वरील मंत्र वस्त्र घेण्याच्या आधीं म्हणावयाचा असतो. अमेनाँश्चित् ग्नास्त्वा कृन्तन् इति निगमौ असा दुर्गपाठ आहे. ग्ना शब्द ऋग्वेदांत सुमारें २० वेळां आला आहे. बऱ्याच ठिकाणीं देवपत्नी व कांहीं ठिकाणीं धन असे अर्थ आहेत. केवळ स्त्री असा अर्थ ऋग्वेदांत नसावेसें वाटतें. ब्राह्मणकालीं स्त्री असा अर्थ झाला असावा.

**शेपः वैतसः इति पुंस्प्रजननस्य। शेपः शपतेः स्पृशतिकर्मणः। वैतसः वितस्तं भवति**

पुरुषांचें जननेंद्रिय ह्या अर्थी शेप व वैतस असे दोन शब्द होत. शप् स्पर्श करणें ह्यापासून शेप. शप् आक्रोशे (धा. पा. १।१०२५) = शाप देणें एवढाच अर्थ धातुपाठांत आहे. शिश्नो मेढ्रं मेहनशेफसी (अमर २।६।७६) ह्यांत शेफस् शब्द आहे. शेपः असें पाठांतर सांपडतें. शिनोति घर्षति भगम्। शेफश्च (क्षीरस्वामी) म्हणजे शि घर्षण करणें ह्यापासून शेफस् किंवा शेपस्. शुनःशेप येथें शेप म्हणजे शेपूट; कारण शुनःशेपासारखीं शुनःपुच्छ व शुनोलाङ्गूल अशीं ऐतरेयब्राह्मणांत नांवें आहेत. शेप म्हणजे शेपूट हा अर्थ लाक्षणिक कीं मूळचा हें ठरवितां येत नाहीं. जेव्हां पुरुषाचें प्रजोत्पत्तिसाधन वितस् म्हणजे क्षीण होतें तेव्हां त्याला वैतस म्हणतात. म्हणजे वि + तस् क्षीण होणें ह्यापासून वैतस. वेतस म्हणजे वेत ह्याचें वैतस हें रूपांतर असेल. तसें असल्यास वैतस म्हणजे पुरुषलिंग हा अर्थ लाक्षणिक असेल. हिरण्यो वैतसः हे शब्द ऋग्वेदांत (४।५८।५) आले आहेत. वेति अम्भः अनुवर्तते वितस्यते वा इति वेतसः (अमर २।४।२९. क्षीरस्वामी)

**यस्यामुशन्तः प्रहराम शेपम् (ऋ० सं० १०।८५।३७)**

तां पूषन् शिवतमामेरयस्व यस्यां बीजं मनुष्या वपन्ति। या न ऊरू उशती विश्रयाते यस्यामुशन्तः प्रहराम शेपम् = हे पूषा, ज्या योनींत मनुष्यें बी पेरतात, जी कामातुर होऊन (उशती) आमच्या मांड्या (ऊरू) रुंदावते (विश्रयाते) व जिच्यांत कामातुर होऊन (उशन्तः) आम्ही शेप सोडतों ती सुखदायक योनि रुंद कर. असें गर्भाधानाच्या वेळीं नवरा पूषन्ला म्हणतो.

**त्रिस्मान्हः श्नथयो वैतसेन (१०।९५।५) इत्यपि निगमौ भवतः**

हे पुरूरव्या, दिवसांतून तीनदां तूं मला वैतसानें मारीत असस. ह्याच्या आधींच्या ऋचेंत पुढील शब्द आहेत. यस्मिन् चाकन् दिवा नक्तं श्नथिता वैतसेन = ज्या घरांत जेव्हां त्याला वाटेल तेव्हां (चाकन्) तो तिला दिवसारात्रीं वैतसानें बडवीत असे. १६ व्या ऋचेंत आपल्याला दिवसांतून एकदां घृताचा थेंब मिळे आणि म्हणूनच मी तृषाक्रांत अशी हिंडत आहें, असें ती म्हणते. हे मूढा, तुला मी आतां मिळणार नाहीं असेंही १३ व्या ऋचेंत ती म्हणते. पुरूरवा तिची नानाप्रकारें

विनवणी करतो पण ती ना म्हणते. ह्यावरून त्यानें तिचा छळ केला असावा. तेव्हां वैतस म्हणजे पुरुषलिंग नसून वेळूचें दांडकें असावें. ह्या दोन ऋचांखेरीज वैतस शब्द इतरत्र कोठेंही नाहीं. दुर्गवृत्तींत त्रिः स्मान्हः व इति निगमौ असें आहे.

**अया एना इति उपदेशस्य**

अया एना हीं दर्शक सर्वनामें होत.

उपदेश म्हणजे हातानें, बोटानें, कशानें तरी जवळची किंवा दूरची वस्तु दाखविणें. अया एना ह्यांनीं जवळचीच वस्तु दाखविली जाते. वास्तविक सर्व दर्शक-सर्वनामें उपदेशाखालीं आलीं पाहिजेत. तया तेन, एतया एतेन, अयोः एनोः, वगैरेंचा विचार एथें व्हावयास पाहिजे. अया हें आ (ही) ह्याचें तृतीयेचें एकवचन. एना हें अ (हा किंवा हें) ह्याचें तृ० एक०. अनया, अनयोः, अनेन, एनेन वगैरे रूपें अर्वाचीन होत. जसें रमाचें रमया, रमयोः तसें आ चें अया, अयोः; जसें रामचें रामेण तसें अ चें एन.

**अया ते अग्ने समिधा विधेम ( ऋ० सं० ४।४।१५ ) इति स्त्रियाः**

हे अग्नि, ह्या समिधेनें तुझी आम्ही सेवा किंवा पूजा करतों ( विधेम ). विध् ह्यानें ज्याची पूजा करावयाची असते त्याच्या नांवाची चतुर्थी असावी लागते. ज्यानें पूजा करावयाची तें तृतीयांत असतें. इति स्त्रियाः उपदेशः. उपदेशः हें अध्याहृत. ह्या ऋचेंत अया ह्यानें स्त्रीलिंगी जी समित् ती दाखविली जाते.

**एना वो अग्निं नमसा ( ७।१६।१ ) इति नपुंसकस्य**

नमसा यानंतर आ हुवे शब्द आहेत. तुमच्याकरितां (वः) अग्नीला ह्या स्तुतीनें किंवा हवीनें ( नमसा ) मी बोलावितों. इति नपुंसकस्य उपदेशः = ह्या ऋचेंत एना नपुंसकलिंगीं आहे.

**एना पत्या तन्वं सं सृजस्व ( ऋ० सं० १०।८५।२७ ) इति पुंसः**

हे वधू, ह्या पतीशीं आपला देह मिसळ किंवा ह्याच्याशीं शारीरिक संबंध कर. इति पुंसः उपदेशः = एथें एना पुंलिंगीं आहे. एना हें एकदांच स्त्रीलिंगी असें वापरलें आहे. ती ऋचा पुढीलप्रमाणें:--परो दिवा पर एना पृथिव्या परो देवेभिरसुरैर्यदस्ति (ऋ० सं० १०।८२।५) = स्वर्गलोक, ही पृथिवी, बलवान् असुर ह्यांच्या पलीकडे ( परः ) जें आहे. परः ह्याचा ज्या नामांशीं संबंध असतो त्यांची तृतीया असते. एना हें पृथिवीचें विशेषण. यास्कानें हें उदाहरण द्यावयास पाहिजे होतें. ऋग्वेदांत एना पुंलिंगी १२ वेळां, नपुंसकलिंगी १७ वेळां व स्त्रीलिंगी एकदां आलें आहे. मित्रमेना दधाम (१०।१०८।३ ) येथें एना हें मूळचें एनं ( इन्द्रं ) असावें. एन ह्याचें एना असें लांबट रूप कां झालें हें सांगतां येत नाहीं. मूळचा ना प्रत्यय तर नसेलना? अया २४ वेळां आलें असून धिया वगैरे नामांशीं त्याचा संबंध आला आहे; पण ६ ठिकाणीं नाम अध्याहृत आहे. अनेन हें तीनदां आलें आहे. एन हें मूळचें रूप; ह्याचें अनेन मध्यें रूपांतर कां व कसें झालें तें सांगतां येत नाहीं. अयोः (=अनयोः) दोनदां

आलें असून तें एकदां पुलिंगी व एकदां स्त्रीलिंगी असें आहे. एनोः ( एतयोः ) हें चारही वेळीं पुंलिंगी आहे. अनयोः व एतयोः किंवा एनयोः ऋग्वेदांत नाहीं. एना एनानि ह्या अर्थी ५ वेळां आलें आहे. अया व एना ही जोडी निघंटूंत घालण्याचें कारण तीं केवळ वैदिक रूपें होत.

**सिषक्तु सचते इति सेवमानस्य**

जो ( दुसऱ्याची ) सेवा करतो म्हणजे ( दुसऱ्याला ) साहाय्य करतो त्याच्या संबंधानें हीं दोन क्रियापदें वापरलीं जातात. सच् (=साहाय्य करणें) ह्याचीं निदान २५ निरनिराळीं रूपें ऋग्वेदांत आहेत. सिषक्तु हें सच् ह्याचेंच रूप होय. एक आज्ञार्थी व दुसरें स्वार्थी. अशीं दोनच रूपें देण्याचें कारण कशी तरी जोडी जमवावयाची हें असावें. इति नामनी सेवमानस्य असें दुर्ग म्हणतो. हीं क्रियारूपें आहेत, नामें नव्हत. इति सेवमानस्य क्रिये भवतः असें म्हणावयास पाहिजे. निघंटुकार फक्त जोड्या देतो. पुढील जोडी पहा.

**स नः सिषक्तु यस्तुरः ( ऋ० सं० १।१८२ ) यः तुरः स नः सेवतां**

सिषक्तु = सेवताम्. यो रेवान् यो अमीवहा वसुवित् पुष्टिवर्धनः असे पहिले दोन पाद आहेत. जो धनवान् ( रेवान् ), धन देणारा ( वसुविद् ), धन वाढविणारा (पुष्टिवर्धनः) व दारिद्र्याचा नाश करणारा (अमीवहा) तो दाता (तुरः) देव आम्हाला द्रव्यसाहाय्य करो.

**सचस्वा न स्वस्तये (ऋ० सं० १।१।९) सेवस्व नः स्वस्तये। स्वस्ति इति अविनाशनाम**

सचस्व = सेवस्व. आमच्या कल्याणाकरितां ( स्वस्तये ) आम्हांस द्रव्यसाहाय्य कर. स्वस्ति हा शब्द अविनाश ह्या शब्दाचा पर्याय आहे. नाशाचा अभाव म्हणजे स्वस्ति. दुर्गपाठ व महाराष्ट्रपाठ अविनाशिनाम असा आहे. अविनाशिनः अर्थस्य नाम ( दुर्ग ). पण हा पाठ अशुद्ध आहे. स्वस्ति म्हणजे नष्ट होणारी वस्तु नसून कल्याण हा त्याचा अर्थ आहे. स्वस्तये, श्रवसे, सूनृतायै वगैरे चतुर्थ्या अंतिम हेतु दाखवितात. द्रव्य कशाला पाहिजे ? संपत्ति कायम रहावी, सतत सुखांत रहावें असा त्या शब्दांचा अर्थ.

**अस्तिः अभिपूजितः स्वस्ति इति। अति सु इति अभिपूजितार्थे (निरुक्त १।३)**

अभिपूजित असा ज्याचा अर्थ आहे असा सु शब्द अस्ति ह्याला लावल्यानें स्वस्ति शब्द झाला आहे. स्वस्ति=सुखी असतो; ह्यापासून सुखी, सन्मान्य स्थिति. गुर्जरपाठ स्वस्ति इति असा नसून सु अस्ति असा आहे. स्वस्ति हा शब्द सु+अस्ति असा नसून स्व+स्ति असा आहे. स्व=स्ति=धन. स्वस्ति=अतिशय धन, धनसमृद्धि. स्वस्तये=धनसमृद्धीसाठीं, धन कमी न व्हावें म्हणून. स नः सिषक्तु सचस्व नः इति निगमौ असें नेहमीप्रमाणें दुर्ग म्हणतो. तेव्हां इत्यपि निगमौ भवतः असा पाठ असावा. तो हल्लींच्या निरुक्तांत नाहीं. तसा मूळ पाठ असल्यास ऋचांचीं विवरणें प्रक्षिप्त होत;

कारण इत्यपि निगमौ भवतः असे शब्द जेथें येतात तेथें ऋचांचा अर्थ यास्क देत नसतो.

**भ्यसते रेजते इति भयवेपनयोः**

नामनी असें वरीलप्रमाणें एथेंही दुर्ग म्हणतो. भिणें व कांपणें ह्या अर्थीं हे दोन शब्द होत. भ्यस भये ( धा. १।६२९ ). रेज् धातुपाठांत नाहीं.

**यस्य शुष्माद्रोदसी अभ्यसेताम् ( ऋ० सं० २।१२।१ )**

ज्याचें बल ( शुष्मात् ) पाहून द्यावापृथिवी भिऊन कांपूं लागल्या.

**रेजते अग्ने पृथिवी मखेभ्यः ( ऋ० सं० ६।६६।९ ) इति निगमौ भवतः**

धनवान् जे मरुत त्यांना पाहून ( मखेभ्यः ) हे अग्नि, पृथिवी भिऊन कांपूं लागते. एथें अग्नीचा वास्तविक कांहीं संबंध नाहीं. तो पादपूरक शब्द आहे. मख= धन. हा शब्द विशेषणासारखा आहे. मखेभ्यः = मखवद्भ्यः. यस्य शुष्माद्रोदसी रेजते अग्ने पृथिवी इति निगमौ असा दुर्गपाठ आहे.

**द्यावापृथिवीनामधेयानि उत्तराणि चतुर्विंशतिः ( निघ० ३।३० )**

द्यावापृथिवीवाचक पुढील २४ नामें होत. ह्या २४ पैकीं १२ नामें देवराजास कोठेंही सांपडलीं नाहींत; म्हणून तो प्रत्येक ठिकाणीं निगमः अन्वेषणीयः=उदाहरण शोधून काढावें असें म्हणतो. रजसी ह्याचेंही उदाहरण शोधून काढावें असें तो म्हणतो. परंतु आठ नऊ उदाहरणें सहज सांपडतील. दूरे, अन्ते, अपारे, मही, घृतवती, बहुले, गभीरे, गंभीरे, उर्वी, पृथ्वी, हीं द्यावापृथिवींचीं विशेषणें होत, नांवें नव्हत. ह्या एका गणावरून निघंटुकाराचें ज्ञान किती व कसलें होतें हें लक्षांत येण्याजोगें आहे.

**तयोः एषा भवति**

पुढील ऋचा त्यांच्यासंबंधानें आहे.

## खंड २२ वा.

**कतरा पूर्वा कतरापरायोः कथा जाते कवयः को वि वेद ।**
**विश्वं त्मना बिभृतो यद्ध नाम विवर्तेते अहनी चक्रियेव (ऋ० सं० १।८१५।१)**
**कतरा पूर्वा कतरा अपरा अनयोः । कथं जाते**

अयोः=अनयोः २१ खंडांतील अयावरील टिप्पणी पहा.ह्या दोघींपैकीं आधींची कोण व मागूनची कोण ? कथा=कथम्. यथा तथा प्रमाणें कथा. कथं व इत्थं (इत्था) हे बदल कालान्तरानें झाले.

**कवयः कः एने विजानाति**

एने हें अध्याहृत असून द्यावापृथिवी ह्यांना उद्देशून आहे. वि वेद=विजानाति. हे प्राज्ञहो, तुमच्यापैकीं कोण ह्यांना जाणतो ? एनेची जरूर नाहीं. अहो प्राज्ञहो, तुमच्यापैकीं ह्या गोष्टी कोण जाणतो असा अर्थ आहे.

**सर्वम् आत्मना बिभृतः यत् ह एनयोः कर्म**

विश्वं=सर्वम्. त्मना=आत्मना. एनयोः ( अध्याहृत ) द्यावापृथिवींला उद्देशून. नाम=कर्म. ह्यांचें जें कांहीं काम तें सर्व ह्या स्वतः चालवितात. खरा अर्थः—यद् नाम यदर्थम् अनयोः नाम नमनं यस्मात् भूतग्रामधारणार्थम् एते नते परिणामत्वेन तत् सर्वम् एते बिभृतः ( दुर्ग )= सर्व भूतजात ह्या दोघींचाच परिणाम, ह्या दोघीं-पासूनच सर्व कांहीं निर्माण होतें व त्या सर्वांचा भार त्या सहन करतात.नाम म्हणजे नमन असा अर्थ करून वर दिलेलें विवरण दुर्ग करतो.

**विवर्तेते च एनयोः अहनी अहोरात्रे चक्रयुक्ते इव**

एनयोः ( अध्याहृत ) द्यावापृथिवींला उद्देशून. एनयोः=दोघींच्यामध्यें. अहनी= अहोरात्रे. अहनी शब्द भाष्यांत नको; कारण ज्याचा अर्थ द्यावयाचा तो शब्द यास्क उच्चारीत नाहीं. चक्रिया=चक्रयुक्ते. जणूं काय ह्यांना चाकें लाविलीं आहेत असे दिवस व रात्र एका पाठीमागून गरगर फिरत येतात. हें सर्व द्यु व पृथिवी ह्यांच्यामध्यें घडतें.

**इति द्यावापृथिव्योः महिमानम् आचष्टे आचष्टे**

ह्याप्रमाणें ही ऋचा द्यावापृथिवींचा महिमा वर्णन करिते. आचष्टे आचष्टे ही द्विरुक्ति अध्याय संपला हें दाखविण्याकरितां. उभे यथा नो अहनी नि पात उषासानक्ता करतामदब्धे ( ४।५५।३ )=उषासानक्ता उभे अहनी यथा नः अस्मभ्यं नि धनं पातः दत्तः तथा अदब्धे उषासानक्ता अस्मभ्यं नि धनं करतां दत्ताम्; उभे अहनी=उषासा-नक्ता. अहनी शब्द ऋग्वेदांत ७ वेळां आला आहे. सर्व ठिकाणीं उषासानक्ता म्हणजे दिवसरात्र हा अर्थ. अयोः म्हणजे ह्या उषासानक्तांपैकीं. ह्या दोघींपैकीं पूर्वी जन्माला कोण आली व मागाहून कोण आली ? त्या जन्मल्या कशा त्याचें उत्तर ज्ञात्यांना तरी ठाऊक आहे काय ? जगांत जें कांहीं ( यत् ह ) धन आहे ( नाम ) तें सर्व ( विश्वं ) त्या आपल्या धनांतून ( त्मना ) देतात ( बिभृतः ). उषा व रात्र ( अहनी ) फिरतात. चक्रिया ह्याचा अर्थ कळत नाहीं. वर्तयत तपुषा चक्रियाभि ( २।३४।९) = हे मरुतांनो, आपल्या प्रज्वलित ( तपुषा ) धनांतून ( चक्रिया ) धन ( अभि ) द्या ( वर्तयत ). आववर्तदवरान् चक्रियावसे ( २।३४।१४ )=त्रित आमच्या कल्याणासाठीं ( अवसे ) आपल्या धनांतून ( चक्रिया ) धन ( अवरान् ) देता झाला ( आववर्तत् ). उषासानक्ता ( अहनी ) आपल्या धनांतून ( चक्रिया ) धन ( वि ) देतात ( वर्तेते ) क्रा=देणें. चक्रिः=देणारा; दान, धन. चक्रिये अहनी=धनवान् व धन देणाऱ्या ( चक्रिये ) उषासानक्ता. चक्रिया=धनांतून असाही अर्थ असेल. अश्मानं चित् स्वर्यं वर्तमानं प्र चक्रियेव रोदसी मरुद्भ्यः ( ५।३०।८ )=धनवती ( चक्रिये रोदसी ) मरुतांना ( मरुद्भ्यः ) धन ( अश्मानं=चित्=स्वर्यं=प्र ) देत्या झाल्या. वर्तमानं व इव ह्यांचा अर्थ कळत नाहीं. कदाचित् इव चा अर्थ धन असेल. चौथा चरण कठीण आहे.

---

# अध्याय ४ था

## खंड १ ला.

**अथ नैगमं काण्डम्**

आतां नैगम कांडाला आरंभ करूं. निगम म्हणजे अनवगत आहे संस्कार ज्याचा अशा व ज्यांचे एकाहून जास्त अर्थ आहेत अशा शब्दांचा ज्या कांडांत विचार केला आहे तें नैगम.

**एकार्थम् अनेकशब्दम् इत्येतद् उक्तम्**

अनेक शब्दांचा एकच अर्थ ज्यांत दिला आहे असें जें कांड त्याचा आतां-पर्यंत विचार झाला. हें संस्कृत वाईट आहे. एकार्थं व अनेकशब्दं हीं कशाचीं विशे-षणें? एकः अर्थः यस्मिन् दीयते तत् एकार्थं काण्डम् । अनेके शब्दाः यस्मिन् दीयन्ते तत् अनेकशब्दं काण्डम् । एतत् काण्डम्. एकार्थं हें नैघण्टुक कांडाचें वर्णन कदाचित् चालेल. पण अनेकशब्दं हें चालणार नाहीं. कारण नैगमकांडांतही अनेकशब्दांचा विचार केला आहे. एतावन्तः समानकर्माणो धातवः । एतावन्ति अस्य सत्त्वस्य नाम-धेयानि ' असें १।२० त नैघण्टुक हें नांव न देतां त्याचें नुसतें वर्णन आलें आहे. तेथें ' एकार्थम् अनेकशब्दं ' हे शब्द नाहींत. हें अशुद्ध वाक्य यास्काचें नसावें. 'एकार्थवाचिनः शब्दा उक्ताः ' असें म्हणावयास पाहिजे. नैघंटुककांडाचीं अशीं निराळीं लक्षणें कां दिलीं तें समजत नाहीं. १।२० ह्यांतील बराचसा भाग कोणी मागाहून घातला असावा असे वाटतें.

**अथ यानि अनेकार्थानि एकशब्दानि तानि अतः अनुक्रमिष्यामः**

ज्या शब्दांचे अनेक अर्थ होतात त्या शब्दांचें आतां क्रमानें विवरण करूं. हें संस्कृत मागच्याहून वाईट आहे. तेथें काण्डं असें अध्याहृत नाम घेऊन त्याचीं एका-र्थम् अनेकशब्दं हीं विशेषणें आहेत असें म्हणतां आलें. पण एथें यानि व तानि हीं सर्वनामें आणि अनेकार्थानि एकशब्दानि हीं विशेषणें ह्यांचा कोणत्या अध्याहृत नामाशीं संबंध जुळवावयाचा? 'यानि' काय? यानि पदानि असें म्हटल्यास त्याच्याशीं 'एकशब्दानि' हे कसें जुळेल? एकशब्दानि हें गाळल्यास वाक्य सुधारेल. परंतु जसें एकार्थं ह्याच्या उलट अनेकार्थानि तसें अनेकशब्दं ह्याच्या उलट कांहीं घालणें जरूर आहे असें वाटल्यावरून एकशब्दानि घातलें गेलें.

**अनवगतसंस्कारांश्च निगमान्**

न अवगतः संस्कारः रूपसिद्धिः येषां तान्—जे निगम म्हणजे वेदांत येणारे शब्द कसे बनले हें सांगतां येत नाहीं अशा शब्दांचेंही क्रमानें विवरण करूं. १।२० एतावताम् अर्थानाम् इदम् अभिधानम् एवढेंच म्हटलें आहे. अनवगतसंस्कारांचा तेथें मुळीं उल्लेख नाहीं.

**तत् ऐकपदिकम् इति आचक्षत**

ह्या कांडाला किंवा प्रकरणाला ऐकपदिक ही संज्ञा पूर्वाचार्यांनीं लाविली आहे. नैगम ही संज्ञा १।२० तही नाहीं, एथेंही नाहीं. तेथील लक्षण अपुरें आहे. एथील लक्षण अशुद्ध आहे. यास्काच्या निरुक्तांत इतरांनीं फेरबदल केला असला पाहिजे. ऐकपदिक हीच संज्ञा योग्य आहे. नैघंटुक कांडांत वर्गांचा निर्देश आहे. ह्या प्रकरणांत परस्परांशीं असंबद्ध अशा शब्दांचा निर्देश आहे. एकानि पदानि एकपदानि तेषाम् इदम् ऐकपदिकं प्रकरणं काण्डं वा. नैगम ही संज्ञा सर्व निघंटूला लागूं पडेल, कारण निघंटूंतील सर्व शब्द निगम म्हणजे वेदांतले आहेत. अनेकार्थी शब्दांचा व अनवगतसंस्कारांचा क्रमानें विचार करूं असें म्हटलें आहे. पण अनेकार्थी शब्द अमुक व अनवगतसंस्कार अमुक असे ह्या प्रकरणाचे दोन गट केले नाहींत. दोन्हींची भेसळ झाली आहे. त्यामुळें यास्कालाही कांहीं शब्द समजले नाहींत. निघंटूंत ऐकपदिक प्रकरणांत असे वेगळे दोन गट होते कीं काय हें समजण्यास मार्ग नाहीं. कदाचित् अनवगतसंस्कार हे मागाहून घातले गेले असतील. नैघंटुक कांडांत एकार्थी अनेक शब्द तर ऐकपदिकांत अनेकार्थी शब्द अशीच वाटणी केली गेली असेल.

' एकार्थम् अनेकशब्दम् इत्युक्तं ' ह्याचें विवरण दुर्ग पुढीलप्रमाणें करतो :— एकोऽर्थः पृथिव्यादिः अनेकेषां गवादिशब्दानां यत्र कथ्यते अनेके च गवादिशब्दाः पृथिव्यादेः एकस्य अर्थस्य अभिधायिनः यत्र कथ्यन्ते तत् इदम् एकार्थम् अनेकशब्दं प्रकरणम् । अत्र एकेन अर्थेन अनेके शब्दा लक्ष्यन्ते अनेकैः शब्दैः एकोऽर्थः । ततो लक्षितलक्षणया वृत्त्या प्रकरणं लक्ष्यते = ज्यांत गवादिसारख्या अनेक शब्दांचा पृथिवी वगैरे एक अर्थ सांगितला आहे व गवादि अनेकशब्द पृथिवीसारख्या एका अर्थाचे वाचक आहेत असें म्हटलें आहे तें एकार्थ अनेकशब्द प्रकरण. एका अर्थानें अनेक शब्द लक्षित होतात व अनेक शब्दांनीं एक अर्थ लक्षित होतो. ही झाली लक्षणा. नंतर लक्षितलक्षणेनें प्रकरण लक्षित होतें. म्हणजे एकार्थ ह्यानें अनेक शब्द व अनेक शब्द ह्यानें एक अर्थ लक्षित होतो व दोन्ही मिळून प्रकरण लक्षित होतें.

' यान्यनेकार्थानि० अनुक्रमिष्यामः ' ह्याचें दुर्गानें केलेलें विवरणः — यानि एतानि दयति–अकूपारादीनि पदानि अनेकैः अर्थैः उपदया–दान–दहन–हिंसादिभिः अर्थवन्ति यानि च एतानि अर्थजातानि उपदया–दान–दहन–हिंसादीनि एकशब्द–वाच्यानि तानि एवम् इतरेतरविशेषणविशेष्यभावलक्षणोपलक्षितानि एकप्रकरणताम् उपगतानि व्याख्यया अनुक्रमिष्यामः । वर्णयिष्यामः इत्यर्थः = जीं अकूपार दयति वगैरे पदें दया–दान वगैरे अनेक अर्थांनीं अर्थयुक्त होतात व जे दया–दान वगैरे अर्थ एक एक पदाचे असतात त्यांचें आतां विवरण करूं. ह्या दोहोंचा विशेषण-विशेष्य असा संबंध आहे, दयति वगैरे शब्द दया वगैरे अर्थांशीं संबद्ध आहेत व

दया वगैरे अर्थ दयति वगैरे शब्दांशीं संबद्ध आहेत. शब्दांनीं अर्थ लक्षित होतात व अर्थांनीं शब्द लक्षित होतात ह्या सर्वांचा प्रकरणानुरोधानें विचार करूं. असा कसा तरी अर्थ ह्या शब्दांतून दुर्गानें काढला आहे. एकशब्दानि ह्याचा कशाशीं संबंध आहे, तें कशाचें विशेषण आहे हें दुर्ग सांगत नाहीं व तें कोणासही सांगतां येणार नाहीं. अशा शब्दांची व्याख्या कशी करावी ह्याबद्दल दुर्गानें बृहद्देवता नांवाच्या ग्रंथांतला एक श्लोक दिला आहे. तो असा :—तत्त्वं पर्यायशब्देन व्युत्पत्तिश्च द्वयोरपि। निगमो निर्णयश्चेति व्याख्येयं नैगमे पदे ॥ = नैगम कांडांतील पदाचा पर्याय देणें म्हणजे त्या रीतीनें त्या पदाचा अर्थ करणें, पद व पर्याय ह्या दोहोंचीही व्युत्पत्ति देणें, तें पद ज्या ऋचेंत असेल अशी ऋचा उद्धृत करणें व ऋचेचा अर्थ देऊन पदाचा अमका अर्थ ठरविणें, - ह्या सर्व गोष्टी व्याख्येंत अंतर्भूत होतात.

**जहा जघान इत्यर्थः**

जहा ( निघण्टु ४।१।१ ) = जघान. जहा हें नैगम पद. जघान हा पर्याय. 'इत्यर्थः' हे शब्द यास्क वापरीत नाहीं. ते प्रक्षिप्त असावेत. जहा हा शब्द कसा बनला हें सांगतां येत नाहीं म्हणजे तो अनवगतसंस्कार शब्द आहे.

## खंड २ रा.

**को नु मर्या अमिथितः सखा सखायमब्रवीत्। जहा को अस्मदीषते (८।४५।३७) मर्या इति मनुष्यनाम। मर्यादाभिधानं वा स्यात्।**

मर्य = मनुष्य. पण मर्य म्हणजे मर्द, नुसता मनुष्य नव्हे. किंवा मर्या =मर्यादा.

**मर्यादा मर्यैः आदीयते**

हे शब्द गुर्जरपाठांत नाहींत पण दुर्गवृत्तींत आहेत. मर्यादा = मर्या + आदा. आदा = आदीयते. मर्द जी घेतात ती मर्यादा, म्हणजे मनुष्यांची वागण्याची रीत.

**मर्यादाः मर्यादिनोः विभागः**

मर्यादा = मर्यादिनोः विभागः. मर्य म्हणजे एका जमिनीचा शेवट. आदि म्हणजे शेजारील जमिनीचा आरंभ. शेवट व आरंभ ही जी एक ओळ ती मर्यादा. मृता या भूमिः उपक्षीणा सा मर्या इत्युच्यते। विषयान्तः इत्यर्थः। आदिः अन्यस्य विषयस्य उपक्रमः उच्यते। मृतायाश्च भूमेः आदेश्च विभागकारिणी या भूमिः सा मर्यादा इत्युच्यते (दुर्गः) = संपलेल्या जमिनीला मर्या म्हणतात; म्हणजे जेथें एक जमीन संपते ती मर्या. आदि म्हणजे दुसऱ्या जमिनीचा आरंभ. ह्या दोघींचा विभाग करणारी जागा ती मर्यादा. मर्यादिनोः हें नपुंसक आहे. पण आदि शब्द पुंलिंगी आहे. मर्यादा विद्यते अनयोः तौ मर्यादिनौ तयोः मर्यादिनोः विभागः = ज्या दोन शेतांना मर्यादा आहे तीं शेतें मर्यादी. त्यांचा विभाग पाडणारी रेघ ती मर्यादा असा अर्थ असावा. येथें यास्कानें 'वा' शब्द घातला नाहीं. मर्यादा-शब्दाची ही दुसरी व्युत्पत्ति येथें कां दिली तें समजत नाहीं,

**मेथतिः आक्रोशकर्मा**

अमिथितः = न मिथितः; ह्यांत जो मिथ् धातु त्याचा अर्थ (कर्म) शिव्या देणें (आक्रोश).

**अपापकं जघान कम् अहं जातु**

ज्यानें पाप केलें नाहीं अशा कोणाला व केव्हां मी मारलें आहे? जातु = कदाचित्. जहा = जघान. बाकीचे चार शब्द यास्कानें अध्याहृत घेतले आहेत.

**कः अस्मत् भीतः पलायते**

ईषते = पलायते. भीतः हें पद अध्याहृत आहे. जरी ईष् धातूचा जाणें असा अर्थ आहे तरी संदर्भावरून त्याचा अर्थ पळणें असा एथें होतो. म्हणजे सामान्य गतियाची धातूचा एथें विशिष्टगति असा अर्थ केला पाहिजे. निघंटूंत (२।१४) ईषति गतिवाचक म्हणून दिला आहे; पण ती चूक आहे. ईष् ह्याचा पळणें हाच अर्थ सर्वत्र आहे. निघंटूमुळें यास्क व दुर्ग हे आपली बुद्धि चालवीतनासे झाले. जुन्याचा एवढा अम्मल आम्हां हिंदूंवर चालला आहे. ऋचेचा यास्कानें केलेला अर्थः—हे माणसांनो, खरोखर कोणचा मित्र, त्याला जर शिवीगाळ केली नसेल, तर आपल्या मित्राला टाकून बोलला आहे? ज्यानें पाप केलें नाहीं अशा कोणाला मीं मारलें आहे? मला भिऊन कोण पळून गेला आहे? दुर्ग म्हणतो:--ही ऋचा इंद्रवाक्य आहे. 'मा न एकस्मिन्नागसि मा द्वयोरुत त्रिषु। वधीर्मा शूर भूरिषु (८।४५।३३) = हे शूर इंद्रा, आम्हीं एक पाप केलें, दोन केलीं, तीन केलीं किंवा पुष्कळ केलीं तरी आम्हांला शिक्षा करूं नकोस!' ह्याच अर्थाला अनुसरून प्रस्तुत ऋचा आहे. अमिथित म्हणजे पाप न करणारा. ज्यानें पाप केलें नाहीं असा मनुष्य मला मारूं नको असें मला कसें म्हणेल? तुम्ही पाप करतां म्हणून मी तुम्हांस शासन करतों. मर्या ह्याचा मर्यादा असा अर्थ असल्यास ऋचेचा पुढीलप्रमाणें अर्थ होईलः—माणसांनो, ही काय तुमची रीत (मर्यादा) कीं शिवीगाळ मारहाण केली नसतांना मारूं नको म्हणून मला म्हणतां! ही काय रीत झाली? पण शब्द मर्याः असा आहे; मर्या असा असता तर 'मर्याँ अमिथितः' असें लिहिलें गेलें असते. शिवाय 'को' चीं का व उ अशीं दोन पदें करावयास पाहिजेत. 'को नु मर्या=का उ खलु नु खलु मर्या रीतिः' असा अर्थ होईल. ही यास्काची शक्कल कीं दुसऱ्या कोणाची हें सांगतां येत नाहीं. दुर्ग आणखी एका प्रकारचा अर्थ देतोः—मीं पाप केलें नाहीं, मला मारूं नकोस असें कोण म्हणेल? पापी असो किंवा नसो मीं आजवर कोणाला बरें मारलें आहे? मी मारहाण करणारा नाहीं. मी सौम्य स्वभावाचा आहे. जातु शब्द जघान व पलायते ह्या दोघांकडेही घेतल्यास चालेल. पापी नसणाऱ्या कोणा माणसाला मीं आजवर मारलें आहे? मला भिऊन आजवर कोण बरें पळून गेला आहे! 'जातु' हा दोन वाक्यांच्या मध्यें घातल्यानें तो कोणत्या क्रियापदाबरोबर घ्यावयाचा असा प्रश्न उत्पन्न होतो. सायणाचार्यांनीं केलेला अर्थः-को नु कः खलु हे मर्याः मनुष्याः अमिथितः

अनाक्रुष्टः इन्द्रात् अन्यः सखा सखायं प्रति जहा अहं कं जघान को वा अस्मत् अस्मत्तः भीतः ईषते पलायते इत्यब्रवीत् वदति। इन्द्रः एव एतादृशस्य वचनस्य वक्ता इत्यभिप्रायः—हे मनुष्यांनो, मीं कोणाला मारलें, मला भिऊन कोण पळून गेला आहे असें इंद्राखेरीज कोण मित्र मित्राला म्हणतो? इंद्रच असें म्हणेल. सायणाचार्यांनीं केलेला अर्थ कळत नाहीं. मला जो शिव्या देतो त्याला मी ठोकतों व तो भिऊन पळून जातो असें इंद्र म्हणतो कीं काय? असें इंद्र म्हणत असल्यास तो साधारण माणसासारखाच होईल. सायणाचार्य शेवटीं म्हणतातः—मा न एकस्मिन्नागसि इत्यादिकया श्रुत्या नूनम् ऋषिम् इन्द्रः आजहार इत्यत्र ऋषिः विस्मयते—मी एक दोन तीन किंवा पुष्कळ पापें केलीं तरी मला मारूं नकोस असें ऋषि म्हणत असतांनाही इंद्र त्याला मारतो; त्यामुळें ऋषि विस्मय पावतो. तें पाहून इंद्र त्याला म्हणतो. ऋचा २ ते ४२ ह्या इंद्रपर आहेत असें अनुक्रमणिकेंत म्हटलें आहे. पण प्रस्तुत ऋचा इंद्रपर आहे असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं. ऋचेवरून भाषण मित्रामित्रांतलें आहे असें दिसतें. कोणा एकाला त्याचे मित्र म्हणतात, तूं आम्हांला मारा म्हणून म्हणतोस त्यामुळें आम्हांला पळून जावें लागतें. त्यावर तो उत्तर करतोः—अहो मर्दांनो, एकानें दुसऱ्याला शिवीगाळ केली नसेल तर तो मारा ह्याला असें कसें म्हणेल? मारा असे मीं म्हटलें कधीं व मला भिऊन पळाला कोण? उगीच कांहीं तरी तक्रार करतां. ऋचेचा पुढील किंवा पूर्वींच्या ऋचांशीं कांहीं संबंध दिसत नाहीं. 'जहा' हा शब्द येथेंच आला आहे. तो हन् मारणें, हा टाकणें किंवा हा जाणें ह्यांपैकीं कोणत्या धातूपासून किंवा दुसऱ्या एखाद्या धातूपासून झाला हें ठरवितां येत नाहीं. हा जाणें, अभ्यासानें जहा व तेंच आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचें एकवचन असेल. जहा=निघ. मी निघ कोणाला म्हटलें व निघ म्हटल्यामुळें कोण निघून गेला आहे असाही अर्थ होईल. मिथ् धातूचीं मिथती, मिथतीः व मिथत्या अशीं तीन रूपें ऋग्वेदांत आढळतात. ह्या तीनही ठिकाणीं मिथ्=पीडा देणें, त्रास देणें. मेथामसि व मेथेते अशींही रूपें आढळतात; पण तीं मिथ् धातूचींच रूपें किंवा मेथ् म्हणून निराळाच धातु होता हें सांगतां येत नाहीं. मेथामसि=राग आणूं. अमिथितः=ज्याला पीडा दिली गेली नाहीं असा किंवा ज्याला राग आणिला नाहीं असा. जो मला पीडा देतो किंवा राग आणतो त्यालाच मी जा म्हणून म्हणतों; इतरांना कोणाला मी जा म्हणून म्हटलें आहे असा ऋचेचा अर्थ होईल. धातुपाठांत मिथ् किंवा मेथ् धातु नाहीं. मिट्ट (धा. १।८९३) मेट्ट (धा. १।८९४) मेधाहिंसनयोः। थान्तौ इमौ इति स्वामी असें धातुपाठांत म्हटलें आहे. मिथ् हिंसा करणें ह्याचें पाणिनीय संस्कृतांत मेथति असें रूप होतें. परंतु ऋग्वेदांत मिथति असें रूप होतें. मेथतिः आक्रोशकर्मा असा धातु आपल्यांच्या कोशांत आहे. तेव्हां यास्क पाणिनीच्या मागाहून झाला असें घ्यावयाचें कीं काय? कांहीं असलें तरी आक्रोश करणें हा यास्ककालीन अर्थ ऋचांना लावणें बरोबर नाहीं. शिवाय मेथ्चें मिथ् कोणत्या नियमानें होतें? शब्दांचे अर्वाचीन अर्थ

घेऊन ऋचांचा अर्थ करणें हा प्रमाद होय. शब्दांचे अर्थ ऋग्वेदकालीं भिन्न होते. जहा हें अनवगतसंस्कार पद. जघान हा त्याचा पर्याय. 'जहा' ची व्युत्पत्ति यास्कानें दिली नाहीं. जघानप्रमाणें जहा शब्द हन् पासून झाला आहे असें त्याचें मत असेल. जहा ज्यांत आहे असा निगम म्हणजे ऋचा दिल्यावर शेवटीं ह्या शब्दाच्या अर्थाचा निश्चय यास्कानें केला नाहीं.

**निधा ( २ ) पाश्या भवति । यत् निधीयते । पाश्या पाशसमूहः । पाशः पाशयतेः ।**

निधा = पाश्या = जाळें. जाळ्यास निधा म्हणण्याचें कारण तें जमिनीवर पांखरें, जनावरें पकडण्यासाठीं ठेवलें असतें. पाश्या म्हणजे पाशांचा, दोऱ्यांचा समूह. पाशादिभ्यो यः ( पा० ४।२।४९ ). पाश हा पश बन्धने ( धा० पा० १०। १८६ ) ह्या धातूपासून झाला आहे. विपाशनात्. पाश ( दोरी ) आवळून किंवा सर्व बाजूंनीं बांधतो.

## खंड ३ रा.

**वयः सुपर्णा उप सेदुरिन्द्रं प्रियमेधा ऋषयो नाधमानाः ।**

**अप ध्वान्तमूर्णुहि पूर्धि चक्षुर्मुमुग्ध्यस्मान्निधयेव बद्धान् ( १०।७३।११ )**

**वयः वेः बहुवचनम् । सुपर्णाः सुपतनाः । आदित्यरश्मयः । उपसेदुः इन्द्रं याचमानाः**

विः वी वयः असा वि ( म्हणजे पक्षी ) शब्द चालतो. वयः हें 'वि' चें बहुवचन. हें सांगण्याची कांहीं जरूर नव्हती. 'वेर्बहुवचनं' हे शब्द प्रक्षिप्त असावेत. पर्ण म्हणजे पतन म्हणजे उडणें. सुपर्णाः = उडणारे किंवा चांगले उडणारे वास्तविक वयः व सुपर्णाः ह्या दोहोंचाही अर्थ पक्षी. पक्षी ह्या अर्थीं सुपर्ण शब्द ऋग्वेदांत वापरला आहे. एकार्थवाची शब्द ऋचांत पुष्कळदां येतात. ऋग्वेदांत प्रत्येक शब्द विशिष्टार्थी असतो हें मत बरोबर नाहीं. चांगले उडणारे कोण ? आदित्याचे किरण. नाधमानाः = याचमानाः. याचना करणारे आदित्याचे किरण इंद्रापाशीं गेले. ध्वान्तम् = आध्वस्तम् = अंधकारानें झाकलेलें. ध्वान्त हें ध्वंस्चें भूतभूतकाळीं विशेषण. पण हा अर्थ व ही व्युत्पत्ति चुकीची आहे. ध्वान्तं म्हणजे अंधकार. ध्वान्तं तमो अव दध्वसे ( १०।११३।७ )= अंधकार नाहींसा झाला. ध्वान्तं = तमः. क्षुब्धस्वान्त ध्वान्त० मथमनस्तमः ( पा० ७।२।१८ ) ह्या सूत्रानें ध्वन्चें ध्वान्त अंधकार ह्या अर्थींच होतें; इतर अर्थीं ध्वनित असें होतें. खरी व्युत्पत्ति कळणें अशक्य.

**चक्षुः ख्यातेर्वा चष्टेर्वा**

चक्षुः शब्द ख्या सांगणें किंवा चक्ष् पाहणें ह्यापासून झाला आहे. डोळा पाहिलेलें मनाला सांगतो. किंवा डोळा पाहतो. डोळ्याचें काम नुसतें पाहणें नाहीं तर पाहिलेलें मनाला सांगणें हें होय म्हणून पहिली व्युत्पत्ति अगोदर.

**पूर्धि पूरय । देहि इति वा**

लोकांचे डोळे अंधकारानें भरले आहेत ते तेजानें भर. दुर्ग म्हणतोः– अंधकार असतो तोंपर्यंत डोळा अपूर्ण असतो तो तेजानें पूर्ण होतो. पूर्धि = देहि = लोकांचे डोळे लोकांना परत दे.

**मुञ्च अस्मान् । पाशैः इव बद्धान्**

मुमुग्धि = मुञ्च. मुच् अभ्यासानें मुमुच्: मुमुच्+धि = मुमुग्धि. निधया=पाशैः. यास्ककृत अर्थः– चांगले उडणारे पक्षी म्हणजे आदित्याचे किरण. याचना करणारे ते इंद्रापाशीं जातात. अंधकारानें नष्ट झालेला आमचा डोळा उघड. तो तेजानें भर किंवा लोकांना तो परत दे. दोऱ्यांनीं आम्ही बांधल्यासारखे आहोंत. आम्हांला मोकळे सोड. खरा अर्थः– पक्षी हेच कोणी याचना करणारे ऋषि; धनाची आवड असल्यामुळें ( प्रियमेधा ) ते इंद्राजवळ जातात ( व म्हणतात हे इंद्रा ) अंधकाराचें आच्छादन दूर कर; आमचा डोळा तेजानें भर; आम्ही जणूं काय जाळ्यांत बांधले गेलों आहोंत; त्यांतून आम्हांला मोकळे कर, अंधकार हेंच जाळें. हें काव्य आहे. पण निरुक्तकारांना सर्वत्र सूर्यकिरण दिसतात; त्यामुळें ते अर्थाची ओढाताण करतात. निधा शब्द अर्वाचीन संस्कृतांत नाहीं हें खरें; तथापि तो अनवगतसंस्कार वा मानावा हें समजत नाहीं. 'विधा' 'संधा' प्रमाणें तो ' धा ' ला उपसर्ग लागून झाला आहे. हा शब्द आणखी एकदांच आला आहे. ' गृभ्णाति रिपुं निधया निधापतिः ( ९।८३।४ ) = जाळ्यांचा पति–सोम–हा शत्रूला जाळ्यांत पकडतो.

**पार्श्वतः श्रोणितः शितामतः । पार्श्वं पर्शुमयम् अङ्गं भवति । पर्शुः स्पृशतेः । संस्पृष्टा पृष्ठदेशम् । पृष्ठं स्पृशतेः । संपृष्टम् अङ्गैः । अङ्गम् अङ्गनात् अञ्चनात् वा**

पार्श्वतः = बरगड्यांतून. श्रोणितः = ढुंगणांतून. शितामतः ह्याचा अर्थ काय ? हा अनवगतसंस्कार आहे. पार्श्व हा शरीराचा बरगड्यांनीं भरलेला भाग असतो. पर्शु हा स्पृश् धातूपासून झाला आहे. कारण ही पर्शु पाठीला चिकटलेली असते. पर्शुः म्हणजे स्पर्शुः. पार्श्वास्थनि तु पर्शुका (अमर २।६।६९ ) पूर्यते पर्शुः । पर्शुरेव पर्शुका ( क्षीरस्वामी ) = पृ भरणें ह्यापासून पर्शु. पर्शु व पर्शुका एकच. अमरकोशांत पर्शु शब्द नाहीं. पृष्ठ सुद्धां स्पृश्पासून. पृष्ठं = स्पृष्टम्. पृष्ठ अंगांनीं चिकटलेला शरीराचा भाग. पृष्यते सिच्यते पृष्ठं (क्षीरस्वामी ) = पृष् शिंपडणें ह्यापासून पृष्ठ. उणादिप्रमाणें पृष् किंवा स्पृश् ह्यापासून पृष्ठ. अङ्ग् जाणें किंवा अञ्च् जाणें ह्यापासून अंग. शरीर अंगाकडे गेलेलें असतें. अङ्गति अङ्गम् क्षीरस्वामी.

**श्रोणिः श्रोणतेः गतिचलाकर्मणः । श्रोणिः चलति इव गच्छतः**

गतिनिमित्तं चलनं यस्य कर्म सोऽयं गतिचलाकर्मा । तस्य गतिचलाकर्मणः– गतीनें उत्पन्न केलेलें चलन ज्याचा अर्थ असा जो श्रोण् धातु त्याच्यापासून श्रोणि शब्द झाला आहे. जाणाऱ्या मनुष्याची श्रोणि जणूं काय हलते. म्हणजे श्रोणीला स्वतःचें चलन नसून चालणाऱ्याच्या गतीमुळें चलन मिळतें. पायांना स्वतःचें चलन

आहे तसें श्रोणीला नाहीं. पायांच्या चलनामुळें श्रोणि जणूं काय हलते. श्रोण्यते संहन्यते श्रोणिः ( क्षीरस्वामी ) = घट्ट झालेला जो भाग तो श्रोणि. श्रोणृ संघाते ( धा० १।४५७ ).

**दोः शिताम (३) भवति । दोः द्रवतेः**

शिताम म्हणजे बाहु. श्रितम् अंसभावेन एतत् कार्ये भवति इति शिताम ( दुर्गः )= बाहु हा खांद्याच्या रूपानें शरीराला जोडलेला असतो. शिताम = श्रितम्. म्हणजे शिताम शब्द श्रि = अवलंबून असणें ह्या धातूपासून झाला आहे. शिताम शब्दाची ही व्युत्पत्ति दुर्गाची आहे कीं यास्काची आहे हा प्रश्न. यास्काची असल्यास हल्लींच्या निरुक्तपाठांतून ती गळली असावी. दोस् (बाहु) द्रु जाणें किंवा हलणें ह्या धातूपासून झाला आहे. म्हणजे हात हालतो त्यामुळें त्यास दोस् हें नांव पडलें. दुर्ग म्हणतोः—तस्यहि प्राणेन पशुः द्रवति = पुढच्या पायाच्या जोरावर पशु धावतो. द्यति ददाति वा दोः ( क्षीरस्वामी ) = खंडन करतो किंवा देतो म्हणून बाहूला दोस् हें नांव पडलें. म्हणजे दोस् हा शब्द दो खंडणें किंवा दा देणें ह्यापासून झाला असावा. शिताम म्हणजे बाहु असें म्हणण्याचें कारण दुर्ग पुढीलप्रमाणें देतोः— पशोर्हि बाह्यानिच अवदानानि आभ्यंतराणि च भवन्ति । तत्र पार्श्वे श्रोण्यौ अंसौ इति बाह्यानि । जिह्वाहृद्यकृतादीनि आभ्यंतराणि । तत्र एवम् सति पार्श्वतः श्रोणितः इति एतयोः अन्तरा वर्तमानः शितामशब्दः किम् अन्यत् दोष्णः अभिदध्यात् = यज्ञामधील पशूचीं बाह्य व आभ्यंतर अशीं दोन प्रकारचीं अंगें अग्नींत द्यावयाचीं असतात. बाह्य अंगें दोन पार्श्वे, दोन टेंग्या व दोन खांदे व आंतील अंगें जीभ, हृदय, यकृत् वगैरे होत. पार्श्व व श्रोणि हीं बाह्य अंगें सांगितल्यानंतर शिताम शब्दानें राहिलेलें तिसरें बाह्य अंगच दाखविलें पाहिजे. तें राहिलेलें अंग म्हणजे अंस किंवा अंसापासून लोंबणारा हात.

**योनिः शिताम इति शाकपूणिः । विषिता भवति**

शाकपूणीच्या मतें शिताम म्हणजे योनि. दुर्ग म्हणतोः— तत्र योनिः अनवदानीया एव । योनिसमानदेशस्तु गुदो नाम अवदानम् अस्ति । स योनिशब्देन उच्यते = अग्नींत योनि द्यावी असें म्हणणें अशास्त्रीय होय. परंतु योनीसारखाच शरीराचा जो गुद नामक भाग तो अग्नींत देतात. विष् व्यापणें ह्यापासून भूतभूतकाळीं विशेषण विषित. विषित = व्याप्त; कारण गुदप्रदेश पुरीषानें भरलेला असतो किंवा गुदप्रदेश ही पोकळी आहे. म्हणजे तेथें असणारें मांस दिलें असतें. सित = बांधलेलें; विषित म्हणजे न बांधलेलें, ढिलें. शिताम म्हणजे योनि हें म्हणण्याचें कारण पुढीलप्रमाणेंः- स हि श्रोण्यनन्तरो भवति । श्रोण्यनन्तरंच शिताम शब्दः उच्यते ( दुर्गः ) = शरीरांत योनिभाग म्हणजे गुदभाग हा टेंग्यांनंतर येतो. व पार्श्वतः श्रोणितः शितामतः येथेंहि श्रोणितः ह्याच्यानंतर शितामतः आलें आहे. तेव्हां शिताम म्हणजे योनि म्हणजे गुद.

**श्यामतः यकृत्तः इति तैटीकिः । श्यामं श्यायतेः । यकृत् यथाकथाच कृत्यते**

तैटीकि म्हणतो :—शिताम म्हणजे यकृत्. शिताम=शिआम, श्याम. श्यैङ्गतौ (धा० १।९८८) श्याम हा शब्द श्यै जाणें ह्यापासून झाला आहे. यकृत् हें श्याम रंगाचें असतें; म्हणून शिताम म्हणजे यकृत्. यकृत् हेंहि अवदान सांगितलें आहे. श्यामतः व यकृत्तः एथें तस् हा पंचम्यर्थी प्रत्यय आहे. यकृत् = य + कृत्. य= यथा-कथा च; कृत् = कृत्यते. यकृत् हा भाग सहज कापला जातो. यथाकथा च ह्याऐवजीं दुर्गाचा पाठ यथाकथंचित् असा आहे; व त्या शब्दाचा तो अनायासेन एव असा अर्थ करतो. तेन यथाकथाचहस्ताभ्यां णयतौ (पाणिनी ५।१।९८) यथाकथाच याला ण व हस्त शब्दाला यत् असे प्रत्यय लागतात. यथाकथाच दीयते कार्यं वा याथाक-थाचम् = अनादरेण देयं कार्यं वा = जें आदराशिवाय दिलें जातें किंवा केलें जातें त्याला याथाकथाचम् असें म्हणतात. अनादरेण= अनायासेन. दक्षिणपार्श्वे कृष्णमांसांशः कालखण्डं कालखञ्जं वा उच्यते । यमं करोति यकृत् ( क्षीरस्वामी ) = उजव्या बरग-डीच्या खालचा काळ्या रंगाचा जो मांसभाग त्याला कालखंड, कालखञ्ज किंवा यकृत् म्हणतात. यकृत् हा शब्द यम + कृ ह्यापासून झाला आहे.

**शितिमांसतः मेदस्तः इति गालवः । शितिः श्यतेः**

शितामतः = शितिमांसतः । शिताम = शितिमांस म्हणजे पांढरें मांस. हें पांढरें मांस म्हणजे मेदस्. शो तनूकरणे (धा० ४।३९ ) दुर्ग म्हणतोः— परो हि विवेकः तेजसः मेदसि एव अवतिष्ठते = तेजाचें जें अतिशय शुद्ध रूप तें मेदामध्यें असतें.

**मांसं माननं वा । मानसं वा । मनः अस्मिन् सीदति इति वा । मेदः मेद्यतेः**

मांसम् = मान् + सम्. मान् = माननम्. ज्याच्याविषयीं आदर वाटतो त्याच्या-करतां मांसान्न तयार करतात. ह्या व्युत्पत्तींत सम् हा प्रत्यय मान् याला लावलेला आहे. मांसम् = मान् + सम् = मानसम्. आपण मांस मोठ्या आनंदानें खाण्यासाठीं घेतों. किंवा जें मनस्वी म्हणजे शहाणे लोक असतात ते खाण्यासाठीं मांस घेतात. मांसम् = मन् + अ + सम्. मन् = मनः; अ = अस्मिन्; सम् = सीदति. सर्वांचें मन मांसाकडे लागतें. मांस खाण्याचा मोह आवरतां येत नाहीं. मिद् स्नेहने (धातुपाठ ४।१३७) मिद् स्निग्ध होणें, पातळ होणें. पार्श्वतः श्रोणितः शितामतः हे शब्द मैत्रायणीसंहिता (४।१३।७) व तैत्तिरीयब्राह्मण (३।६।११) येथून घेतले आहेत. हा होत्याला प्रैष म्हणजे आज्ञा आहे. त्या प्रैषांतील मुख्य भाग पुढीलप्रमाणें होयः— इन्द्राग्नी छागस्य हविष आत्ताम् ०........पार्श्वतः श्रोणितः शितामतः उत्सादतः अङ्गात् अङ्गात् अवत्तानां करत एव इन्द्राग्नी जुषेतां हविः होतर्यज = छागरूपी हवी इंद्र व अग्नि खावोत. निरनिराळ्या भागांतून कापलेलें मांस सेवोत. हे होत्या, तूं याज्या म्हण. पार्श्वश्रोणी प्रसिद्धे । शितामशब्देन दोः यकृद्वा अभिधीयते । उत्सादशब्देन गुद-काण्डम् । ततः ऊर्ध्वम् अङ्गात् अङ्गात् सर्वस्मात् अन्यस्मात् अवयवात् अवत्तानाम् हविषां यानि अवदानानि तानि सर्वाणि इन्द्राग्नी एव करतः कुरुताम् । ततः हविरिदम् जुषे-ताम् । तदर्थं हे होतर् यज याज्यां पठ । (तैत्तिरीयब्राह्मण [ ३।६।११ ] वरील

सायणाचार्यांचें भाष्य). शिताम म्हणजे बाहु किंवा यकृत् एवढाच अर्थ सायणाचार्य देतात. ते व्युत्पत्तीच्या भानगडींत पडत नाहींत.

## खंड ४ था.

**यदिन्द्र चित्र मेहनास्ति त्वादातमद्रिवः। राधस्तन्नो विदद्वस उभयाहस्त्या भर ( ऋ० सं० ५।३२।१ )**

**यत् इन्द्र चित्र ( ४ ) चायनीयम्**

चित्र = चायनीयम्. चित्रशब्द चायृ पूजायाम् ( धातुपाठ १।९०५ ) ह्या पासून झाला आहे. चायनीय असें म्हणावयाच्या ऐवजीं चायनीयम् असें म्हटलें आहे. त्याचें कारण यास्क चित्रशब्द राधः ह्याचें विशेषण आहे असें समजतो. दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या खंडांत विभक्तीः संनमयेत् = अर्थाकरितां शब्दांच्या विभक्ति वाटेल तशा बदलाव्यात असें म्हटलें आहे.

**मंहनीयम् धनम् अस्ति। यत् म इह न अस्ति इति वा। त्रीणि मध्यमानि पदानि। त्वया नः तत् दातव्यम्**

मेहना = मंहनीयम्. म्हणजे पूजनीय. धनम् हा शब्द येथें अध्याहृत घेतला आहे. मेहना = म + इह + न. ‘ यत् म इह न अस्ति ’ ह्यांतील तीन मधलीं पदें म्हणजे म + इह + न हीं घेऊन मेहना शब्द झाला आहे असें गार्ग्य म्हणतो. त्याचा अर्थ ‘ जें मजजवळ नाहीं तें ’ असा होतो. त्वादातम् = त्वा + दातम्. त्वा = त्वया; आणि दातम् = दातव्यम्. जें आमचेजवळ नाहीं तें तूं आम्हांस दिलें पाहिजे असें.

**अद्रिवन्। अद्रिः आदृणाति एनेन। अपि वा अत्तेः स्यात्। ते सोमादः ( ऋ० संहिता १०।९४।९ ) इति ह विज्ञायते।**

अद्रिवः ही अद्रिवान् शब्दाची संबुद्धि आहे. अद्रि म्हणजे वज्र. वज्राला अद्रि म्हणण्याचें कारण त्या वज्रानें इंद्र पर्वत फोडतो. अनेन ह्याच्या ऐवजीं एनेन शब्द घालण्याचें कारण अद्रिवन् ह्याच्यामध्यें अद्रि म्हणजे वज्र हा शब्द आला आहे हें. किंवा अद्रि शब्द अद् खाणें ह्यापासून झाला असेल. ज्यानें सोम ठेंचून त्याचा रस काढतात तो ग्रावा. ते ग्रावे सोम खातात असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. ह्या वचनावरून ग्राववाचक जो अद्रि शब्द तो अद् खाणें ह्यापासून झाला आहे हें सिद्ध होतें.

**राधः इति धननाम (निघ० २।१०।१७)। राध्नुवन्ति एनेन। तत् नः वित्तधन**

राधस् हें धनाचें नांव आहे. राधस् शब्द कसा झाला ? धनानें लोक इतरांना खूष करतात किंवा स्वतःला खूष करून घेतात. अनेन ह्याच्या ऐवजीं एनेन म्हणण्याचें कारण धन शब्द आधीं आला आहे हें. विदद्वसो = वित्तधन = ज्याच्याजवळ धन आहे अशा. विदत् विद्यते वसु यस्य सः.

**उभाभ्यां हस्ताभ्याम् आहर। उभौ समुब्धौ भवतः**

उभयाहस्ति = उभाभ्यां हस्ताभ्याम् = दोन्ही हातांनीं आभर = आहर, दे. उभौ हा शब्द उभ पूरणे ( धातुपाठ ६।३८ ) ह्यापासून झाला आहे. समुब्धौ = संपूर्णौ = भरलेलें. कशानें भरलेलें हें सांगितलें नाहीं. उभौ हें जेव्हां हस्तौ ह्याचें विशेषण असेल तेव्हां संपूर्णौ म्हणजे कशानें तरी भरलेलें असा अर्थ होऊं शकेल. परंतु उभौ पुरुषौ एथें उभौ ह्याचा संपूर्णौ हा अर्थ कसा लागू पडेल ? यास्कानें दिलेला ऋचेचा अर्थः —हे वज्र धारण करणाऱ्या इन्द्रा, तुजजवळ जें पूजनीय धन असेल व जें तूं आम्हांस द्यावें तें, हे धनवान् इन्द्रा, दोन्ही हातांनीं आम्हांस दे. मेहना ह्याची गार्ग्यानें जी फोड केली आहे तिजप्रमाणें मजजवळ जें नाहीं तें तूं आम्हांस द्यावें असा अर्थ होईल. इन्द्र = चित्र = मेहन = विद्द्वसो = हे धनदात्या. इन्द्र = चित् = मिह् = विद् = देणें. इन्द् + र = इन्द्र. चित् + र = चित्र. मिह् + अन = मेहन. विदत् वेत्ति ददाति वसु असौ विदद्वसुः असा क्रियारूप व कर्म ह्यांचा समास केला आहे. अद् = देणें; धन. रि = धन. अद्रिः = अतिशय धन. अद्रिवः = हे धनवंता. त्वा = धन. उज्जातमिन्द्र ते शव उत्त्वामुत्तव क्रतुं ( ८।६२।१० ) एथें जात, शवस्, त्वा व क्रतु ह्यांचा अर्थ धन. त्वाभिः = धनैः ( २।२०।२ ). त्वा = दा = धन.त्वादा+ तं = धनानें भरलेलें. उभयाविन् ह्यांतील उभया शब्दाचा अर्थ धन. हस् = देणें; हस् + तिः = हस्तिः = धन. उभया धनम् । तेन युक्ता हस्तिः धनं यस्मिन् तत्. त्वादातं = उभयाहस्ति = अमूप. हे धनवंता धनदात्या इंद्रा किंवा दात्या, तुजजवळ जें अमूप धन आहे तें अमूप धन आम्हांस दे असा खरा अर्थ आहे. दमूनाः ( ५ ) दममनाः वा । दानमनाः वा । दान्तमनाः वा । अपि वा दमः इति गृहनाम । तन्मनाः स्यात् । मनः मनोतेः । दमूनाः = दममनाः = दमे मनः यस्य सः = ज्याचें मन दाबांत आहे असा. द = दान आणि मूनः = मनाः. ज्याचें मन दान देण्यांत गुंतलें असतें. द = दान्त ज्याचें मन ज्यांनीं आपलें मन ताब्यांत ठेवलें आहे अशा पुरुषांकडे जातें असा मनुष्य. पहिली व्युत्पत्ति व ही व्युत्पत्ति ह्यांमध्यें फारसा फरक नाहीं. दमूनाः = दम + मूनाः = दम + मनाः = ज्याचें मन घरांत असतें म्हणजे जो हें माझें घर असें समजतो असा अग्नि. ही शेवटली व्युत्पत्ति कांहींशी बरोबर आहे. पण ही शेवटीं घालण्याचें कारण यास्कास ती पसंत नव्हती हें. म्हणून तो स्यात् शब्द घालतो. ग्रीक डीमॉस ( Domos ) लॅटिन् दोमस् ( Domus ) म्हणजे घर; डॉमिनॉस म्हणजे घराचा मालक. तोच अर्थ दमूनस् ह्या शब्दाचा होय. मनस् शब्द मन् विचार करणें ह्यापासून झाला आहे. ही व्युत्पत्ति दुर्गानें दिली नाहीं म्हणून ती प्रक्षिप्त होय.

## खंड ५ वा.

**जुष्टो दमूना अतिथिर्दुरोण इमं नो यज्ञमुप याहि विद्वान् ।**
**विश्वा अग्ने अभियुजो विहत्या शत्रूयतामा भरा भोजनानि ॥ (ऋ० सं० ५।४।५)**
**अतिथिः अभ्यतितः गृहान् भवति । अभ्येति तिथिषु परकुलानि इति वा**

अतिथि हा शब्द अत् जाणें ह्यापासून झाला असून त्याचा अर्थ जो लोकांच्या घरीं जातो तो. किंवा तो शब्द अ आणि तिथि ह्यांपासून झाला असेल. अ=अभ्येति. जो विशिष्ट म्हणजे पूर्णिमा वगैरे तिथींना परकुलांकडे म्हणजे यजमानकुलांकडे जातो तो. महाराष्ट्रपाठांमध्यें परगृहाणि इति वा हें जास्त घातलें आहे त्याची कांहीं जरूरी नाहीं. नास्ति तिथिः अस्य अतिथिः। अतति सततं गच्छति वा। अध्वनीनोऽतिथिर्ज्ञेयः। तिथिपर्वोत्सवाः सर्वे त्यक्ता येन महात्मना। अतिथिः स हि विज्ञेयः शेषः प्राघूर्णिकः स्मृतः (क्षीरस्वामी). एकरात्रं तु निवसन् अतिथिर्ब्राह्मणः स्मृतः। अनित्यं हि स्थितो यस्मात् तस्मादतिथिरुच्यते (मनुस्मृति ३।११२)

**दुरोण इति गृहनाम। दुरवाः भवन्ति दुस्तर्पाः**

दुरोण म्हणजे घर. हा शब्द कसा झाला ? दुरोणः=दुर्+ओणः. ओण हा शब्द अव् तृप्त करणें (धातुपाठ १।६०१) ह्यापासून झाला आहे. दुः कठिणम् अवः तृप्तिः येषां ते दुरवाः = ज्यांची तृप्ति करणें कठीण होतें अशीं घरांतील माणसें. दुरवाः=दुस्तर्पाः. दुर्ग म्हणतोः— 'कुटुंबतन्त्राणि हि दुर्भराणि' हें अवतरण कोठून घेतलें आहे तें समजत नाहीं. कुटुंबाच्या मागण्या कधींहि पुरवत नाहींत. दुस्तर्पाः हा दुरवाः या शब्दाचा अर्थ आहे; परंतु तो शब्द प्रक्षिप्त असावा. कारण यास्क असे अर्थ देण्याच्या भानगडींत पडत नाहीं. दुरोणः हें पुल्लिंगी आहे कीं नपुंसकलिंगी आहे ? इदं हि वां प्रदिवि स्थानमोक इमे गृहा अश्विनेदं दुरोणम् (५।७६।४) ह्या ऋचेवरून दुरोण हा शब्द नपुंसकलिंगी आहे. दुरोणः हें पुल्लिंगी रूप निरुक्तांत कसें आलें तें समजत नाहीं. दुर्गाच्या वृत्तींत (व निघण्टूवरील देवराजाच्या टीकेंतहि) दुरोणः असाच पाठ आहे.

**इमं नः यज्ञम् उपयाहि विद्वान् सर्वो अग्नेः अभियुजः विहत्य शत्रूयताम् आहर भोजनानि। विहत्य अन्येषां बलानि शत्रूणां भवताम् आहर भोजनानि इति वा। धनानि इति वा**

ज्ञाता असा तूं आमच्या ह्या यज्ञाकडे ये. विश्वाः=सर्वाः. शत्रूयताम्=शत्रूणां भवताम्=जे शत्रु होतात त्यांचीं. शत्रूणां भवताम् असा दुर्गानें घेतलेला पाठ नसावा; कारण शत्रूयताम् ये अस्माकम् शत्रुत्वं कामयन्ते कर्तुं तेषाम् असें तो म्हणतो. अन्येषां बलानि हें ऋचेंतील कोणत्या शब्दाचें किंवा शब्दांचें विवरण आहे तें समजत नाहीं. दुर्गवृत्तींत अन्येषां शब्द नाहीं. तो म्हणतोः— 'तेषां बलानि ततः यानि तेषां भोजनानि अन्नानि धनानि वा तानि अस्मभ्यं आहर'. अन्येषां शब्द प्रक्षिप्त असावा. यास्कानें अभियुजः ह्या शब्दाचा बलानि असा अर्थ केला असावा. जे आमचे शत्रु होतात त्यांचीं सैन्यें नाहींशीं करून त्यांचें अन्न किंवा धन आम्हांस दे असा त्यानें अर्थ केला असावा. बलानि० धनानि इति वा ह्याचा त्यांचीं सैन्यें व तदनंतर त्यांचें अन्न किंवा धन आम्हांस दे असा दुर्ग अर्थ करतो. अभियुजः=शत्रुसेनाः असें दुर्ग म्हणतो. परंतु बलानि हा शब्द यास्कानें कोठून आणला ह्याचा तो विचार करीत

नाहीं. आभर = आहर = आणून दे. भोजनानि म्हणजे भोजन ( अन्न ) किंवा धन. अन्नवाची भोजन शब्द अर्वाचीन आहे. भोजन ह्याचा अर्थ धनच. महाराष्ट्रपाठांत आहर, विहृत्य आणि भवताम् ह्यांबद्दल आभर, निहृत्य आणि भवनात् असे अनुक्रमें पाठ आहेत. युज् म्हणजे मित्र. जसें:- ते नः सन्तु युजः सदा वरुणो मित्रो अर्यमा। ( ८।८३।२ ) = वरुण मित्र व अर्यमा हे आमचे सदैव साहाय्यकारी असोत. इन्द्र स्तोममिमं मम कृष्वा युजश्चिदन्तरम् ( १।१०।९ ) = हे इंद्रा, तुझा जो मित्र मी त्या माझी ही स्तुति आपल्या अंतःकरणांत ठेव. जुष्टी दक्षस्य सोमिनः सखायं कृणुते युजम् ( ८।६२।६ ) = यजमानानें दिलेला सोमरस सेवन करून इंद्र त्या यजमानाला आपला मित्र करतो. ह्या उदाहरणांवरून युज् म्हणजे मित्र. ह्याच्या उलट अभियुज् म्हणजे शत्रु. विश्वा अभियुजो वज्रिन्० वृह ( ८।४५।८ ) = हे वज्रहस्त इंद्रा, सगळ्या शत्रूंना कापून काढ. उतस्मास्य तन्यतोरिव द्योः ऋघायतः अभियुजो भयन्ते ( ४।३८।८ ) = लोक जसे मेघांचा गडगडाट ऐकून भितात त्याप्रमाणें इंद्र आयुधें परजूं लागला म्हणजे शत्रु भितात. हा शब्द स्त्रीलिंगी आहे. म्हणून त्याचें विशेषण विश्वाः असें आहे. ऋचेचा अर्थः-- हे ज्ञात्या अग्नि, गृहपति ( दमूनाः ) व घरोघर ( दुरोणे ) प्रिय ( जुष्टः ) असा अतिथि तूं आमच्या ह्या यज्ञाकडे ये. सर्व शत्रूंना ठार मारून आमच्याशीं ते शत्रुत्व करतात म्हणून ( शत्रूयताम् ) त्यांचें धन आम्हांस दे.

पहिल्या अर्धाचा दुसरा अर्थ पुढीलप्रमाणें:-- हे अग्नि, धनवान् ( जुष्टः = दमूनाः = अतिथिः ) व दाता ( विद्वान् ) असा तूं अमूप ( इमं ) धन ( यज्ञं = उप ) आमच्या ( नः ) खजिन्यांत ( दुरोणे ) दे. ( याहि ) म्हणजे टाक. जु = स्त = धन. अ = ति = थि = धन. दु = र = ऊ = न =धन; दुरोणं = धनभांडार. इ = मं = धन. यज्ञ = उप = धन. या = देणें. विद् = देणें, विद्वान् = देणारा.

**मूषः मूषिकाः इत्यर्थः । मूषिकाः पुनः मुष्णातेः । मूषः अपि एतस्मादेव**

मूषः = मूषिकाः. इत्यर्थः हा शब्द मागें म्हटल्याप्रमाणें प्रक्षिप्त वाटतो. मुष् चोरणें ( धातुपाठ ९।५८ ) ह्यापासून मूषिक शब्द झाला आहे. मूषः हाहि याच धातूपासून झाला आहे. मूट्-ड् मूषौ मूषः असा हा शब्द चालतो. ह्या शब्दाचें मूषः हें एकच रूप ऋग्वेदांत असून तें एकाच ऋचेंत आलें आहे. लातिन व ग्रीक मुस्. इंग्लिश माउस् .

## खंड ६ वा.

**सं मा तपन्त्यभितः सपत्नीरिव पर्शवः।**

**मूषो न शिश्ना व्यदन्ति माध्यःस्तोतारं ते शतक्रतो वित्तं मे अस्य रोदसी**
( ऋ० सं० १।१०५।८ )

**संतपन्ति माम् अभितः सपत्न्यः इव । इमाः पर्शवः कूपपर्शवः**

मला सर्व बाजूंनीं त्रास देतात. सपत्नीः = सपत्न्यः. सपत्नीप्रमाणें. पर्शवः = कूपपर्शवः = विहिरीच्या बाहेर आलेल्या विटा.

**मूषिकाः इव अस्नातानि सूत्राणि व्यदन्ति । स्वाङ्गाभिधानं वा स्यात् शिश्नानि व्यदन्ति इति ।**

मूषः = मूषिकाः = उंदीर किंवा घुशी. न = इव. शिश्ना = शिश्नानि = अस्नातानि सूत्राणि. शिश्नें म्हणजे न धुतलेलीं, कोरीं किंवा खळ लावलेलीं सुतें. व्यदन्ति = खातात. किंवा शिश्न म्हणजे उंदराच्या एका अवयवाचें नांव असेल. म्हणजे उंदीर आपलीं शिश्नें खातात.

**संतपन्ति मा आध्यः कामाः स्तोतारं ते शतक्रतो**

व्यदन्ति = संतपन्ति = ताप देतात. आध्यः = कामाः = इच्छा. सोमेन यक्ष्ये दास्ये भोक्ष्ये इत्येवमादयः ( दुर्ग ) = सोमयाग कसा करीन, दक्षिणा देईन, यज्ञफल भोगीन वगैरे चिंता.

**वित्तं मे अस्य रोदसी जानीतं मे अस्य द्यावापृथिव्यौ इति**

वित्तं = जानीतम्. रोदसी = द्यावापृथिव्यौ. इति=म्हणजे. वित्तं मे अस्य रोदसी हे ऋचेंतले शब्द भाष्यांत घालण्याचें कारण समजत नाहीं. ह्या सूक्तांतील प्रत्येक ऋचेच्या शेवटीं हे शब्द येतात.

**त्रितं कूपे अवहितं एतत् सूक्तं प्रतिबभौ**

विहिरींत टाकलेल्या त्रिताला हें सूक्त दिसलें. ऋषि मंत्रद्रष्टे होत. त्यांनीं मंत्र रचले नाहींत. यास्कानें केलेला ऋचेचा अर्थः–विहिरीच्या बाजूंतून पुढें आलेल्या विटा सपत्नीप्रमाणें मला त्रास देतात. उंदीर जसे कोरीं सुतें किंवा आपलीं शिश्नें चावून खातात तशा हे इंद्रा, काळज्या मला खात आहेत. अहो द्यावापृथिवींनो, माझी ही दीनवाणी स्थिति ओळखा. शिश्न ह्याचा नेहमींचा अर्थ नसून तत्सदृश शेपूट असा अर्थ असेल. उंदीर आपलीं शेपटें चावतांना आपण पाहतों असा शिश्न शब्दाचा दुर्ग अर्थ करतो. शिश्न ह्याचा कोरें सूत असा यास्क अर्थ करतो. तसा अर्थ व्युत्पत्तीनें कीं नुसत्या तर्कानें त्यानें केला आहे तें समजण्यास मार्ग नाहीं. शिश्ना ह्यांतील श्नानें तर अस्नात शब्द सुचला नसेल ? ह्या सूक्तांत 'त्रितःकूपेऽवहितो देवान् हवत ऊतये । तच्छुश्राव बृहस्पतिः कृण्वन्नंहूरणादुरु (१७) अशी ऋचा आहे. तिचा अर्थः— विहिरींत टाकलेला ( अवहितः ) त्रित जीवितरक्षणाकरितां देवांचा धावा करतो. ती त्याची हाक बृहस्पतीनें ऐकिली व संकटांतून ( अंहूरणात् ) पार पडण्यास त्याला पुष्कळ वाव दिली (कृण्वन् उरु). विहिरींत टाकणें हें एथें वास्तविक नसून लाक्षणिक असेल. विचारांच्या काहूरांतून त्रिताला सुटका करून घ्यावयाची होती. तीच विचारांची काहूर प्रस्तुत ऋचेंत असावी. त्यांनाच पर्शवः असें म्हटलें आहे. पर्शु ( भाला) हा शब्द एथें व पृथुपर्शवः ह्या समासांत आला आहे. पर्शु म्हणजे काळजी असा अर्थ एथें असावा; तसा अर्थ कसा निघतो तें सांगतां येत नाहीं. पर्शु शब्द स्त्रीलिंगी आहे. सवती जशा आपल्या गाऱ्हाण्यांनीं नवऱ्याला चोहींकडून भाजतात तशा काळज्या मला भाजीत आहेत.

वित्तं मे अस्य रोदसी ह्याचे दोन अर्थ आहेत; एक यास्कानें दिलेला व दुसरा:— हे धनवती द्यावापृथिवीनो, मला ( मे=मह्यं) अमूप (अस्य) धन द्या (वित्तं). रुद् = देणें; रुद् + अस् = रोदस्; स्त्रीलिंग रोदसी = धनवती, धन देणारी. शतक्रतो हाही शब्द सार्थ आहे. शतक्रतो = हे अत्यंत धनवंता. आध्य: = धनाभाव असा अर्थ असावा. तूं धनवंत व मी तुझा (ते) याचक (स्तोतारं); तथापि दारिद्र्य (आध्य:) मला तोडतोडून खात आहे किंवा कुरतडून कुरतडून खात आहे. मूष: हा शब्द एथेंच आल्यामुळें त्याचा निश्चित अर्थ करतां येत नाहीं. वृको न तृष्णजं मृगं एथें वृक म्हणजे लांडगा; तसा एथें मूष: म्हणजे उंदीर असा अर्थ असावा. शिश्न म्हणजे लिंग. शिश्नदेव = लिंगदेव, लिंगपूजक. पण शिश्नचा धन असाही अर्थ असावा. मा शिश्नदेवा अपि गुर्ऋतं न: ( ७।२१।५ ) = (१) लिंगदेव आमच्या ( न: ) यज्ञासमीप (ऋतं) न (मा) येवोत (अपि गु:); (२) धनवान् ( शिश्नदेवा: ) लोक आम्हांस (न:) धन ( मा = अपि = ऋतं ) देवोत ( गु: ). पण धन हा अर्थ एथें आहे कीं नाहीं हें ठरवितां येत नाहीं. अहं सो अस्मि य: पुरा सुते वदामि कानि चित् । तं मा व्यन्त्याध्यो वृको न तृष्णजं मृगम् (१।१०५) = (१) मी तोच आहे कीं जो ( य: ) पूर्वकालीं (पुरा ) सोमरस काढल्यावर नानाप्रकारच्या ( कानिचित् ) स्तुति बोललों (वदामि). त्या (तं) मला (मा), जसा (न) लांडगा (वृक:) तहानेनें व्याकुळ झालेल्या व पाणी पिण्यास आलेल्या ( तृष्णजं ) हरणाला (मृगं) खाऊन टाकतो तसें, दारिद्र्य (आध्य:) खाऊन टाकीत आहे. पुरा सुते वदामि कानि चित् = (मी धनवान् होतों) तेव्हां कितीतरी धन दिलें आहे असाही दुसरा अर्थ आहे. तो लक्षांत घेतां आध्य: म्हणजे दारिद्र्य असाच अर्थ योग्य दिसतो. कूपे अवहित: ह्या शब्दांनीं एक दंतकथा अस्तित्वांत आली त्या दंतकथेमुळें पर्शव: म्हणजे कूपपर्शव: असा यास्कास अर्थ करावा लागला. पण तो चुकीचा असावा. अर्थ लाक्षणिक आहे. ह्या ऋचेच्या आधींची ऋचा पुढीलप्रमाणें आहे:—

**तत्र ब्रह्म इतिहासमिश्रम् ऋङ्मिश्रं गाथामिश्रं च भवति**

त्रिताला हें सूक्त दिसलें. हें जें ब्रह्म म्हणजे सूक्त त्याचा इतिहास म्हणजे खरोखर घडलेली गोष्ट हिच्याशीं संबंध आहे. हा इतिहास ऋचेंत सांगितलेला आढळतो म्हणजे त्रित: कूपे अवहित: ( १७ ) ह्या ऋचेंत सांपडतो व गाथांत म्हणजे लौकिक श्लोकांत आढळतो. ते श्लोक यास्कानें किंवा दुसऱ्या कोणीही दिले नाहींत. ब्रह्म ऋङ्मिश्रं म्हणजे काय ? ब्रह्म म्हणजे जर वेद किंवा सूक्त तर तें ऋङ्मयच असलें पाहिजे. ब्रह्म गाथामिश्र कसें असेल ! ब्रह्म म्हणजे वेद व गाथा म्हणजे लौकिक श्लोक ह्यांचा संबंध काय ? हें वाक्य प्रक्षिप्त दिसतें. त्रितं कूपेऽवहितं० ह्याचें विवरण करणें प्रक्षेपकास अवश्य वाटल्यावरून त्यानें हें वाक्य घातलें असावें. ' तत्रेतिहासो वर्तते । स इतिहास: ऋङ्मयो गाथामयश्च भवति ' असें प्रक्षेपकास म्हणावयाचें होतें. ह्या वाक्याचें दुर्गानें केलेलें विवरण:— तत्र तस्मिन् सूक्ते ब्रह्म इतिहासमिश्रम् । इति-

हासयुक्तमित्यर्थः। तद्यथा। 'त्रितः कूपेऽवहितः इत्येवमादि। ऋङ्मिश्रं गाथामिश्रं च भवति। स पुनरितिहासः ऋग्बद्धो गाथाबद्धश्च। ऋक्प्रकार एव कश्चित् गाथा इत्युच्यते। पण हें विवरण वर दिलेल्या कारणांमुळें समाधानकारक नाहीं. माझ्या मतें हें वाक्य प्रक्षिप्तच आहे. गाथा म्हणजे ऋचेचाच एक प्रकार हें म्हणणें चुकीचें आहे.

**त्रितः तीर्णतमो मेधया बभूव**

त्रित ह्याला त्रित नांव पडण्याचें कारण तो बुद्धीनें इतरांच्या पलीकडे गेला होता. म्हणजे त्रित शब्द तॄ पलीकडे जाणें, तरून जाणें ह्यापासून झाला आहे. 'त्रयः तीर्णतमा संख्या' (निरु० ३।१०) एथेंही धातु तोच; फक्त विवरण निराळें.

**अपि वा संख्यानाम एव अभिप्रेतं स्यात्**

किंवा त्रित हें नांव देण्याचें कारण तीन ही संख्याच असेल. कारण

**एकतः द्वितः त्रितः इति त्रयः बभूवुः**

एकत, द्वित व त्रित असे तिघे होऊन गेले. पुरोडाश करण्याकरितां व्रीहि सडाव्या लागतात. मुसळानें व्रीहि ठेचणें हें पाप होय. ह्या पापाचें क्षालन कशानें होईल अशी देवांना काळजी पडली. तेव्हां अग्नि त्यांस म्हणाला, ज्याच्यावर हें पाप घालतां येईल असा एक पुरुष मी निर्माण करतों. तुम्ही फक्त मजमध्यें आपलें वीर्य ठेवा. त्यांनीं तसें केल्यावर अग्नीनें देववीर्ययुक्त एक कोलीत घेऊन त्याच्यांतून पाणी पाडलें, त्यापासून एकत जन्मास आला. दुसऱ्यांदां पाडलें तेव्हां द्वित जन्मास आला, तिसऱ्यांदा पाडलें तेव्हां त्रित जन्मास आला. असे हे तिघे जन्माला आले. ते देव होते. वेदीमध्यें अध्वर्यु तीन रेघा काढतो. एकताय स्वाहा म्हणून पहिल्या रेघेवर तो पाणी सोडतो, द्विताय स्वाहा, त्रिताय स्वाहा असें म्हणून अनुक्रमें दुसऱ्या दोन रेघांवर पाणी सोडतो. ह्या कृतीनें झालेलें पाप ह्या तीन देवांवर टाकलें जातें व देव पापमुक्त होतात. ही कथा मैत्रायणीसंहिता (४।१।९), काठकसंहिता (३१।८,) व तैत्तिरीयसंहिता (१।१।८) व तैत्तिरीयब्राह्मण (३।२।८) येथें दिली आहे. ते वै देवास्तं नाविन्दन् यस्मिन् यज्ञस्य क्रूरं मार्क्ष्यामहे इति। सोऽग्निरब्रवीत् अहं वः तं जनयिष्यामि यस्मिन् यज्ञस्य क्रूरं मार्क्ष्यध्वे इति। सः अपः अङ्गारेण अभ्यपातयत्। ततः एकतः अजायत। द्वितीयं ततो द्वितः। तृतीयं ततः त्रितः (काठकसंहिता ३१।७). 'सः अपः' ह्याच्याबद्दल 'भार्या' व 'अभ्यपातयत्' ह्याबद्दल 'अभ्यपादयत्' असें दुर्गवृत्तींत आढळतें. दुर्गाला हे शब्द कोणत्या यजुःसंहितेंत सांपडले तें कळत नाहीं.

## खंड ७ वा.

**इषिरेण ते मनसा सुतस्य भक्षीमहि पित्र्यस्येव रायः।**
**सोम राजन् प्रण आयूंषि तारीरहानीव सूर्यो वासराणि (ऋ० सं० ८।४८।७)**
**ईषणेन वा। एषणेन वा। अर्षणेन वा**

इषिरेण = ईषणेन = ईष् जाणें ह्यापासून इषिर. इषिरेण हें मनसा ह्याचें विशे-

पण. अथवा इष् इच्छिणें ह्यापासून. अथवा ऋष् दिसणें ह्यापासून इषिरेण मनसा = तुझ्याकडे सर्वस्वीं गेलेल्या मनानें, किंवा तुझी इच्छा करणाऱ्या मनानें, किंवा तुझें दर्शन झालेल्या मनानें. ईषण, एषण व ऋषण हीं नामें आहेत; 'वना' लावून तीं विशेषणें करावयाचीं किंवा प्रत्येकाला सह जोडावयाचें ?

**ते मनसा सुतस्य भक्षीमहि पित्र्यस्येव धनस्य**

रायः = धनस्य. रायः ह्याचा अर्थ देण्याचें काय प्रयोजन ? तो शब्द यास्क-कालीं प्रचारांत नव्हता कीं काय ? अर्वाचीन संस्कृतांत रैः रायौ रायः वगैरे 'रै' चीं रूपें आहेत. भज् = वाटा घेणें किंवा देणें. भज् + स् + ई + महि = भक्षीमहि= वाटा मिळवूं किंवा देऊं.

**प्रवर्धय च नः आयूंषि सोम राजन्**

प्रतारीः = प्रवर्धय = वाढीव. प्र + तृ = वाढविणें. अव + तृ = कमी करणें, नाश करणें. ऋचेंतील शब्दांचा क्रम एथें कां फिरविला तें समजत नाहीं.

**अह्नानीव सूर्यो वासराणि । वासराणि वेसराणि । विवासनानि वा । गमनानि इति वा**

वासराणि = वेसराणि=वसंतांतील. वेसराणि द्विसराणि । शीतोष्णाभ्यां हि द्वाभ्यां तानि सरन्ति । तेषु हि शीतोष्णं भवति । रात्रौ शीतं दिवा उष्णम् ( दुर्गः ) = वासराणि म्हणजे वसंत ऋतूंतील. वेसर म्हणजे द्विसर. वसंतऋतूंत रात्रीं थंडी व दिवसा उष्मा असतो म्हणून त्या ऋतूंतील दिवस द्विसर. यास्काच्या मनांत वेसर ह्याचा कोणता अर्थ होता तें कळत नाहीं. त्याच्यावेळीं वेसर शब्द प्रचारांत असावा. अर्वाचीन संस्कृतांत तो नाहीं. किंवा वासराणि = विवासनानि = थंडीची हकालपट्टी करणारे. हिवाळ्यांत असणारा अंधकार घालविणारे असाही अर्थ होईल. किंवा वासराणि म्हणजे जाणारे. आपट्यांच्या कोशांत वेस् जाणें असा धातु दिला आहे. त्याच्यापासून वेसर = जाणारा. विसृतानि विस्तीर्णानि सन्ति वासराणि इत्युच्यन्ते ( दुर्गः ) = वासर हा वि + सृ = पसरणें ह्यापासून झाला असून त्याचा अर्थ विस्तीर्ण असा आहे. गमनानि ह्यानें यास्क विसृतानि सुचवितो कीं काय ? अर्वाचीन संस्कृतांत वासर म्हणजे दिवस. वासराणि = अहानि. ऋग्वेदांत अर्थाची पुनरुक्ति पुष्कळ ठिकाणीं आढळते. ऋ० सं० ८।६।३० मध्यें ज्योतिःपश्यन्ति वासरम् । परो यदिध्यते दिवा = जें दिवसा प्रज्वलित होतें असें वासर ज्योतिः लोक पाहतात. येथें वासरं हे ज्योतिः ह्याचें विशेषण आहे. तां वां धेनुं न वासरीमंशुं दुहन्त्यद्रिभिः ( १।१३७।३ ) = त्या प्रसिद्ध वासरी धेनूचें जसें दूध काढतात तसें ग्राव्यांनीं सोमाचें दूध काढतात. एथें वासरीं हें धेनूचें विशेषण आहे. तेव्हां वासर म्हणजे प्रकाशणारें असा अर्थ चांगला दिसतो. वासरं ज्योतिः = प्रकाशणारें ज्योतिस् म्हणजे सूर्य. वासराणि अहानि = प्रकाशणारे दिवस. वासरी धेनुः = प्रकाशणारी तेजस्वी गाय. वास् प्रकाशणें ह्यापासून वासर-शब्द झाला असावा. ह्या ऋचेचे दोन अर्थ होतात. ( १ ) जसे ( इव ) भाऊबापाचें

( पित्र्यस्य ) धन एकमेकांस वांटून देतात तसे आम्ही उत्सुक ( इषिरेण ) मनानें ( मनसा ) काढलेल्या रसाचा ( सुतस्य ) भाग तुला ( ते ) देतों ( भक्षीमहि ); सूर्य जसा दिवस ( अहानि = वासराणि ) वाढवितो तसा हे राजा सोमा, आमचें आयुष्य तूं वाढीव. ( २ ) हे दात्या ( सोम = राजन् ) तूं ( ते ) आपल्या अमूप ( इषिरेण ) धनांतून ( मनसा ) दिलेलें ( सुतस्य ) धन आम्ही बापाच्या धनाप्रमाणें वाटून घेऊं. हे दात्या ( इव ) धनवान् ( सूर्यः ) तूं आम्हांस ( नः ) अमूप ( वासराणि ) धन ( प्र = आयूंषि = अहानि ) दे ( तारीः ). इष् = इच्छिणें; इच्छा. ( १ ) इषिर = उत्सुक; ( २ ) इ = सि = र = धन; इषिर = अमूप. ते = ( १ ) तुला; ( २ ) त्वां. सु = ( १ ) सोमरस काढणें; ( २ ) सु = देणें. भज् = ( १ ) वाटून देणें; ( २ ) वाटून घेणें. प्र + तारीः = ( १ ) वाढीव; प्र = धन; तारीः = दे. आयुः = ( १ ) आयुष्य; ( २ ) आ = यु = धन. अहानि = ( १ ) वासराणि = दिवस. ( २ ) अ = ह = धन; वा = सर = धन. सूर्यः = ( १ )सूर्य; ( २ ) सु = उर् + य = धन. सोम= ( १ ) सोमा; ( २ ) सु = देणें; सु + म = सोम = दात्या. राजन् = ( १ ) राजा; ( २ ) दात्या. यास्कानें पहिला अर्थ दिला आहे. इषिर ह्याचा त्यानें निराळा अर्थ केला आहे.

**कुरुतन इति अनर्थकाः उपजनाः भवन्ति । कर्तन हन्तन यातनेति**

कुरुत ह्याला न हें लावलेलें अधिक अक्षर फुकट आहे. उपजनाः = अधिक अक्षरें. बहुवचन कशास? न शिवाय आणखी अधिक अक्षरें कोणतीं? 'अनर्थकः उपजनः भवति' असें म्हणावयास पाहिजे. तप्-तनप्-तन-थनाश्च (पा० ७।१।४५) आज्ञार्थी जो द्वितीयपुरुषी बहुवचनी त-प्रत्यय त्याच्या जागीं गुण घेणारा 'त' व 'तन', गुण न घेणारे 'तन' व 'थन' असे आदेश वेदांत होतात. जसें शृणोतन = शृणुत. सुनोतन = सुनुत. जुजुष्टन = जुषध्वम् ष्टन = स्थ. परंतु भूतकाळींही असे आदेश होतात. जसें अजभर्तन = अजभर्त = अहरत. अजगन्तन = अगच्छत. अब्रवीतन = अब्रूत. अभूतन = अभूत. अकृणोतन = अकुरुत. अयातन = अयात. याथन = याथ, गाथन = गाथ अशीं थनांत रूपेंही सांपडतात. जसें कर्तन, हन्तन, यातन. हीं रूपें कशासाठीं दिलीं आहेत? ह्यांचीं उदाहरणें यास्क देत नाहीं, पण दुर्ग देतो. हें वाक्य प्रक्षिप्त असावें.

**जठरम् उदरम् भवति । जग्धम् अस्मिन् ध्रियते धीयते वा**

जठरं = उदरं = पोट. जठर शब्द अर्वाचीन संस्कृतांत आहे. त्याच्या अर्थाविषयीं प्रश्नच नसावा. अनवगतसंस्कार म्हणून तो ऐकपदिक प्रकरणांत घातला आहे. जठरं = ज + ठरम्. ज = जग्धम्. ठरं = धरम्. खाल्लेलें ज्याच्यांत धरलें जातें (ध्रियते) तें. ज = जग्धम्. ठ = ध = धीयते = ठेविलें जातें. र हा नामकरण प्रत्यय. उदरं ह्याची व्युत्पत्ति कां दिली नाहीं? नैगम कांडाच्या व्याख्येप्रमाणें त्याचीही द्यावयास पाहिजे.

## खंड ८ वा.

**मरुत्वाँ इन्द्र वृषभो रणाय पिबा सोममनुष्वधं मदाय।**
**आसिञ्चस्व जठरे मध्व ऊर्मिं त्वं राजासि प्रदिवः सुतानाम्** ( ऋ०सं०३।४७।१)

**मरुत्वान् इन्द्र मरुद्भिः तद्वान्। वृषभः वर्षिता अपाम्। रणाय रमणीयाय संग्रामाय**

मरुत्वान् = मरुद्भिः. तद्वान् = मरुतांसहित. वृषभ म्हणजे पाण्याचा वर्षाव करणारा. रण म्हणजे रमणीय संग्राम. रण शब्द हा मूळचा रमणीय. ऋग्वेदांत रण् रमणें असा धातु आहे. परंतु रण (=संग्राम) हा शब्द रण् रमणें ह्यापासूनच झाला आहे असें निश्चयानें सांगतां येत नाहीं. झाला असल्यास जेथें शूर पुरुष लढतांना रमतात तें रण असा अर्थ होईल.

**पिब सोमम् अनुष्वधम् अन्वन्नं मदाय मदनीयाय जैत्राय**

अनुष्वधम् = अन्वन्नम् = अन्न खाल्ल्यानंतर लागलीच. स्वधा = अन्नम्, परंतु स्वधा म्हणजे तृप्ति. 'स्वधा च यत्र तृप्तिश्च तत्र माममृतं कृधि' (९।११३।१० )= हे सोमा, जेथें तृप्ति असेल तेथें मला अमर करून ठेव. अनुष्वधम् म्हणजे तृप्ति होईतोंपर्यंत. मदाय = मदनीयाय जैत्राय. ह्या शब्दांचा अर्थ दुर्ग पुढीलप्रमाणें देतो. मदाय मदनीयाय पानाय युष्मदर्थम् अस्माभिः संस्कृतम्। जैत्राय इति अध्याहृतं भाष्यकारेण। द्विविधो हि मदः। संमोहकरः जैत्रश्च। तयोः जैत्रः इष्टः संग्रामे = तूं प्यावास म्हणून आम्ही हा सोमरस काढला आहे. भाष्यकारानें जैत्राय हा शब्द येथें अध्याहृत घेतला आहे. मद दोन प्रकारचा असतो. एक संमोह म्हणजे गुंगी आणणारा व दुसरा जय देणारा. त्यांपैकीं जय देणारा मद लढाईंत इष्ट असतो. मदनीय म्हणजे मद आणण्याजोगा. हा शब्द येथें यास्कानें कां घातला हें समजत नाहीं. जैत्राय एवढाच शब्द पुरे होता. जैत्राय = जय मिळविण्याकरितां. परंतु जैत्रस्तु जेता यो गच्छत्यलं विद्विषतः प्रति (अमर० २।८।७५) = शत्रूंना जो जोरानें सामोरा जातो म्हणजे पुरा पडतो अशा जेत्याला जैत्र म्हणतात. मद उत्पन्न होऊन इंद्रानें एकट्यानें शत्रूंवर चालून जावें व त्यांस जिंकावें असा मदनीयाय जैत्राय ह्या शब्दांचा अर्थ असेल. जैत्र म्हणजे शत्रूला जिंकून मिळविलेलें धन असा अर्थ ऋग्वेदांत आहे; पण धन मदनीय कसें असेल? मदाय = मद उत्पन्न करण्यासाठीं हाच अर्थ ठीक आहे.

**आसिञ्च स्वजठरे मधुनः ऊर्मिम्**

सिञ्चस्व असा पदपाठ असतां यास्कानें सिञ्च स्वजठरे असें म्हटलें आहे. मध्वः = मधुनः, आपल्या पोटांत सोमाची धार सोड.

**मधु सोमम् इति औपमिकम्। माद्यतेः। इदम् अपि इतरत् मधु एतस्मात् एव**

मधु म्हणजे सोम. सोमाला मधु हें रूपकानें म्हटलें आहे. यास्क रूपकाच्या ऐवजीं उपमा शब्द वापरतो. सोमाला मधु म्हणण्याचें कारण सोम मद उत्पन्न करितो

म्हणून. ( सोम मधु ) = मधु शब्द मद् मद उत्पन्न करणें ह्यापासून झाला आहे. लौकिक जो मधु शब्द तोहि ह्याच धातूपासून झाला आहे.

**त्वं राजा असि पूर्वेषु अपि अहस्सु सुतानाम्**

प्रदिवः = पूर्वेषु अहस्सु. प्र = पूर्वेषु आणि दिवः = अहस्सु द्यु म्हणजे दिवस. प्रदिवः ह्याचा अर्थ पूर्वीच्या दिवशीं असा नसून नेहमीं असा आहे. सोमावर तुझी नेहमींची सत्ता आहे. प्रदिवः = प्रततेषु द्युषु = रोजच्या रोज, नेहमीं. यास्कानें केलेला अर्थः—हे पाण्याचा वर्षाव करणाऱ्या इंद्रा, संग्राम लढण्यासाठीं व अंगांत आवेश उत्पन्न करण्यासाठीं अन्न खाल्ल्यानंतर मरुतांसह सोम पी; आपल्या पोटांत सोमाचा प्रवाह सोड; पूर्वकालीं सोमरसाचा तूं राजा होतास ( तसा आतांही आहेस ). वरील भाषांतरांत वृषभ म्हणजे हे बैला, अनुष्वध म्हणजे तृप्ति होईपर्यंत व प्रदिवः म्हणजे नेहमीं असा अर्थ करणें जरूर आहे. ऋचेचा वर दिलेला अर्थ उद्दिष्ट नसून तो निराळाच आहे. इंद्रभक्तांना इंद्र बैल आहे व तो फार खातो व फार पितो असें म्हटल्यानें चीड येईल; ती न यावी व इंद्राचा अपमान न व्हावा म्हणून मंत्र रचणारा म्हणतो कीं, माझ्या मनांतला अर्थ पुढीलप्रमाणें आहे. हे दात्या ( इन्द्र ), तूं धनवान् ( वृषभः = मरुत्वान् ) असल्यामुळें आम्ही सदोदित श्रीमंत असावे म्हणून ( रणाय = मदाय ) आम्हांस अमूप ( अनुष्वधं ) धन ( आ = सोमं ) दे ( पिब ). आमच्या धनभांडारांत ( जठरे ) धनाचा ( मध्वः ) साठा ( आ = ऊर्मिं )टाक (सिञ्च). तूं ( त्वं ) धनाचा ( प्र = दिवः = सुतानां ) दाता ( राजा ) आहेस ( असि ). अशी ही ऋचा द्व्यर्थी आहे. मरुत् = वृ = स=भ = र = न = सोम = अ = नु=स्व=ध = म = द = आ = मधु = ऊर्मि = प्र = दिवः = सुत = धन. पिब = दे. सिञ्चस्व = टाक. राजा = दाता. ऋग्वेदांतील बऱ्याच ऋचांचे असे दोन अर्थ होतात.

## खंड ९ वा.

**तितउ परिपवनं भवति । ततवत् वा । तुन्नवत् वा । तिलमात्र तुन्नम् इति वा**

तितउ = परिपवनम् = चाळणी. चालनी तितउः पुमान् ( अमर २।९।२६ ) परंतु निरुक्तांत तितउ नपुंसकलिंगी आहे. आपट्यांच्या कोशांत परिपवन पुल्लिंगी आहे. परिपवन शब्द अमरांत नाहीं. परिपवन = चाळून शुद्ध करणारी; चाळणारी. तितउ= तित + उ. तित = तत. उ = वत्. तत म्हणजे लांबवलेलें, पसरलेलें चामडें. अशा चामड्यानें युक्त जी वस्तु ती तितउ. किंवा तित = तुन्न. तुद् भोंक पाडणें. तुन्न म्हणजे भोंक. छिद्रांनीं युक्त ती तितउ. ति = तिलमात्र, त = तुन्न. तिळाच्या आकाराचीं तुन्नें म्हणजे छिद्रें आहेत जिला अशी. ही तिसरी व्युत्पत्ति पतंजलीच्या महाभाष्यांत दिली नाहीं. ती दुर्गाच्या आधीं केव्हांतरी निरुक्तांत घुसडली गेली. तनोति सारं तितउः ( क्षीरस्वामी ) = जी पिठाचें सार म्हणजे चांगलें पीठ चाळून देते ती. क्षुद्रच्छिद्रशतोपेतं चालनं तितउः स्मृतः इति कात्यः.

## खंड १० वा.

**सक्तुमिव तितउना पुनन्तो यत्र धीरा मनसा वाचमक्रत।**
**अत्रा सखायः सख्यानि जानते भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधि वाचि (ऋ० सं० १०।७१।२)**

**सक्तुम् इव परिपवनेन पुनन्तः।**

तितउना = परिपवनेन. चाळणीनें सातू जसे शुद्ध करतात म्हणजे चाळून कोंडा वगैरे काढतात तसे शुद्ध करणारे.

**सक्तुः सचतेः। दुर्धावः भवति। कसतेः वा स्यात् विपरीतस्य। विकसितः भवति**

सक्तु शब्द सच् चिकटणें ह्यापासून झाला आहे. दुर्धावः = दुखं धाव्यते, प्रक्षाल्यते. चिकट असल्यामुळें तो धुऊन काढायला कठीण जातें. किंवा कस् फुलणें ह्या धातूचीं अक्षरें उलट करून म्हणजे सक् करून व त्याला नामकरण प्रत्यय तु लावून सक्तु शब्द झाला असेल. कारण सातूचें पीठ फुललेलें असतें.

**यत्र धीराः मनसा वाचम् अकृषत प्रज्ञानम्.**

वाचम् = प्रज्ञानम्. म्हणजे शहाणपण. अत्र केचित् अकृषत प्रज्ञानम् इति अधीयते प्रज्ञार्थत्वात् वाचः ( दुर्गः ) = ह्या ठिकाणीं कांहीं टीकाकार अकृषत प्रज्ञानम् असा पाठ घेतात. कारण, ज्ञान हेंच वाचेचा उपयोग म्हणजे वाचा ही ज्ञान देण्यासाठीं असते. ह्यावरून प्रज्ञानं हा शब्द दुर्गाच्या निरुक्तपाठांत नव्हता. धीराः प्रज्ञानवन्तः ध्यानवन्तः. धीर म्हणजे ज्ञानी किंवा ध्यानस्थ म्हणजे विचार करणारे. धीराः धीमन्तः मेधाविनः असें दुर्ग म्हणतो. त्यावरून त्याच्या पाठांत प्रज्ञानवन्तः ध्यानवन्तः हे शब्द नसावेत.

**तत्र सखायः सख्यानि संजानते**

अत्र = तत्र, जानते = संजानते; तत्र सखायः समानख्यानाः समानख्यानानाम् एव समानेषु शास्त्रेषु कृतश्रमाणाम्। तद्यथा। वैयाकरणानाम् वैयाकरणाः एव नैरुक्तानाम् नैरुक्ताः एव। सख्यानि सखिभावान् जानते। विज्ञानानि संजानते। इतरेतरस्य यो विज्ञानप्रकर्षः तं जानते ( दुर्गः ) वैयाकरण वैयाकरणांचें ज्ञान ओळखतात; नैरुक्त नैरुक्तांचें ज्ञान ओळखतात. ह्याप्रमाणें समानशास्त्रांत श्रम केलेले लोक एकमेकांचे श्रम व त्या श्रमांचें फल ओळखतात.

**भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधिवाचि**

महाराष्ट्रपाठांत वाचि ह्यानंतर इति आहे. त्याची कांहीं जरूर नाहीं.

**भद्रं भगेन व्याख्यातम्। भजनीयम् भूतानाम्। अभिद्रवणीयम्। भवत् रमयति इति वा। भाजनवत् वा**

भद्र शब्दाची व्युत्पत्ति भग शब्दाच्या व्युत्पत्तीसारखीच आहे. स्त्रीभगः तथा

स्यात् भजतेः ( निरुक्त ३।१६ ). भद्र शब्द भज् सेवणें ह्यापासून झाला आहे. पण ही व्युत्पत्ति चुकीची आहे. भद् स्तुति करणें. भदि कल्याणे सुखेच (धातुपा. १।१२). भद् स्तुति करणें ह्याला र लावून भद्र शब्द झाला आहे. ऋग्वेदांत भन्दते भन्दमानः भन्दिष्ठः भन्दनाः अशीं रूपें आढळतात. भगाप्रमाणें भद्र प्राण्यांना सेवावेंसें वाटतें. भद्रम् = भ + द्रम्. भ = अभि, द्रम् = द्रवणीयम् ज्याच्याकडे धावावेंसें वाटतें तें भद्र भ + द + रम्. भ + द् = भवत्. रम् = रमयति. ज्याच्याजवळ तें असतें ( भवत् ) त्याला तें रमवितें. भद्रम् = भाजनवत्. मूळ शब्द भद्र व पर्यायशब्द भाजनवत् ह्या दोहोंत 'भ' अक्षर सामान्य आहे. सन्ति हि कल्याणरूपाः पुरुषाः ये तस्य भाजनम् ( दुर्गः ) = सुखाला पात्र असे कांहीं नशीबवान् पुरुष असतात. भाजनवत् म्हणजे योग्य पुरुषांजवळ असणारें.

**लक्ष्मीः लाभात् वा । आलक्षणात् वा । लप्स्यनात् वा । लाञ्छनात् वा लषतेः वा स्यात् प्रेप्साकर्मणः । लग्यतेः वा स्यात् आश्लेषकर्मणः । लज्जतेः वा स्यात् अश्लाघाकर्मणः**

लक्ष्मी शब्द लभ् मिळविणें ह्यापासून झाला असावा. लक्ष्मी आणि लभ् ह्या दोहोंमध्यें ल हें समान अक्षर आहे. लक्ष्मी शब्द उच्चारल्याबरोबर लाभणें हा अर्थ पहिल्याप्रथम मनांत येतो म्हणून लभ् धातु. किंवा लक्ष् दर्शनाङ्कनयोः ( धातुपाठ १०।५ ) पहाणें किंवा चिन्हित होणें ह्यांपासून झाला असावा. कारण ज्याच्याजवळ लक्ष्मी असते त्याच्याकडे सर्व लोक पाहातात व जणुं काय त्याच्यावर एक प्रकारचा छाप मारला जातो. लप्स्यनात् वा ह्या शब्दांचा दुर्ग अर्थ देत नाहीं. म्हणून ते त्याच्या प्रतींत नसावेत. लप्स्यन हा शब्द लभ् + स्य् + अन ह्यांपासून बनविला आहे. पण तो तसा कसा बनवितां येईल ? शिवाय लाभ व लप्स्यन ह्यांच्यामध्यें फारसा फरक नाहीं. लाभ म्हणजे मिळणें व लप्स्यन म्हणजे मिळवावयाचा असणें.लक्ष्मी मिळवावयाची असते. लप्स्यनात् वाः– किंवा लच्छ्= लक्षणें (धातुपाठ १।२०६) ह्यापासून झाला असावा. आलक्षण आणि लांछन ह्या दोहोंचाही अर्थ एकच. गुर्जरपाठ लञ्छनात् असा आहे. किंवा लष् = इच्छा करणें (धातुपाठ १।८१३) ह्यापासून कदाचित् झाला असेल. प्रेप्सा=इच्छा. स्यात् घालण्याचें काय कारण ? खरोखर सर्व लोक धनाची पहिल्या प्रथम इच्छाच करतात. तिचा लाभ फारच थोड्यांना होतो. इच्छा हा अर्थ पहिल्याप्रथम मनांत येतो. यास्काची मनोरचना विलक्षण दिसते. किंवा लग् = कवटाळणें (लगे संगे) ( धातुपाठ १।७८७ ) ह्यापासून झाला असावा. कारण लक्ष्मी मनुष्याला चिकटून असते. किंवा लज्ज् व्रीडने = (धातुपाठ ६।११) ह्यापासून झाला असेल. दुर्ग म्हणतोः–ये हि लक्ष्मीवन्तो भवन्ति ते स्वयम् आत्मानम् न श्लाघन्ते = श्रीमंत लोकांना स्वतःची चहा नसते. पण हें म्हणणें जगाच्या अगदीं उलट आहे. श्रीमन्तांना डौल कितीतरी चढतो. अश्लाघा म्हणजे निंदा. श्रीमंतांची लोक निंदा करतात. कारण, बहुतेक श्रीमंतांचा पैसा लबाडीनें, दुष्ट कृत्यांनीं मिळविलेला असतो. अश्लाघा हा लज्ज् धातूचा अर्थ यास्ककालीं होता.

पाणिनीच्या वेळेस लाजणें असा त्याचा अर्थ झाला. लक्ष्मी गरीबांच्याजवळ जावयाला लाजते. महाभाष्यांत ह्या ऋचेवरील भाष्य पुढीलप्रमाणें आहे:— सक्तुः सचतेः। दुर्धावो भवति। कसतेर्वा विपरीतात्। विकसितो भवति। तितउ परिपवनं भवति। ततवद्वा तुन्नवद्वा। धीराः ध्यानवन्तः। मनसा प्रज्ञानेन वाचमक्रत वाचमकृषत। अत्रा सखायः सख्यानि जानते। अत्र सखायः सन्तः सख्यानि जानते। सायुज्यानि जानते। क। एष दुर्गो मार्गः एकगम्यः वाग्विषयः। के पुनस्ते। वैयाकरणाः। कुत एतत्। भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधि वाचि। एषां वाचि भद्रा लक्ष्मीः निहिता भवति। लक्ष्मीः लक्षणात्। भासनात्। परिवृढा भवति। = या भाष्यांत व प्रस्तुत खंडांत बरेंच साम्य आहे. पण फरकही बराच आहे. खंड ९ व १० हे महाभाष्यांत मिसळले आहेत, 'तिलमात्र तुन्नमितिवा' ही तितउ शब्दाची व्युत्पत्ति व 'लक्षणात्' ही खेरीज करून लक्ष्मी शब्दाच्या इतर व्युत्पत्ती दिल्या नाहींत. भद्र शब्दाचीही व्युत्पत्ती दिली नाहीं. महाभाष्यांत मनसा = प्रज्ञानेन, धीराः = ध्यानवन्तः, 'सख्यानि संजानते' ह्याच्याबद्दल 'सायुज्यानि जानते' असें आढळतें. महाभाष्यांत 'क० वैय्याकरणाः। कुतः एतत्' हे शब्द जास्त आहेत. यास्काच्या निरुक्तांत महाभाष्यकारानें मुद्दाम बदल केला किंवा त्याच्या वेळीं निरुक्तपाठ त्यानें जसा दिला आहे तसाच होता हें सांगतां येत नाहीं. एवढें मात्र स्पष्ट आहे कीं महाभाष्याचा काळ व दुर्गाचा काळ ह्यांच्यामध्यें पुष्कळ गोष्टी, विशेषेंकरून व्युत्पत्ति, घुसडल्या गेल्या. ऋचेचा अर्थः— चाळणीनें सातू म्हणजे सातूचें पीठ जसें लोक शुद्ध करतात तसें जेव्हां मनानें पूर्ण विचार करून बुद्धिवान् किंवा विचारी लोक भाषण करतात तेव्हां खरे जे मित्र म्हणजे खरे ज्ञाते ते त्या भाषणांतील सखिभाव म्हणजे खुबी ओळखतात. कारण, ह्या बुद्धिवान् लोकांच्या वाणींत खरोखर कल्याणकारक लक्ष्मीच ठेवलेली असते. म्हणजे विचारी पुरुषाची भाषा अर्थानें मातबर असते. बुद्धिमान् लोकांच्या बोलण्यांत वरवर दिसणाऱ्या अर्थापेक्षां निराळाच अर्थ असतो. त्याचें प्रस्तुत ऋचा हें नमुनावजा उदाहरण आहे. सच् = तु = देणें, दिलेलें धन. सच् + तु = धन. इ = देणें; इ + व = धन. इव ह्याचा नामासारखा उपयोग केला आहे. ति = त = उ = धन. पु = देणें. यत्र = ज्या धनभांडारांत. धी = र = धन. धीराः = धनवान् लोक. म = नस् = धन. वाच् = धन. कृ = देणें. अत्र = त्या धनभांडारांत. स = ख = धन. सखायः = धनवान् लोक. सखा = धन. जा = देणें. भद् = र = धन. लक्ष्मीः = धन. जेथें धन (सक्तुं = इव) देणारे (पुनन्तः) धनवान् लोक (धीराः) आपल्या धनांतून (तितउना = मनसा) धन (वाचं) देतात (अक्रत) तेथें ते धनवान् लोक (सखायः) अमूप धन (सख्यानि) देतात, (जानते); कारण त्यांच्या (एषां) धनांत (वाचि) अमूप (भद्रा) धन (लक्ष्मीः) भरलेली (निहिता) असते.

**शिप्रे (११) इति उपरिष्टात् व्याख्यास्यामः**

शिप्रे ह्या शब्दाची व्युत्पत्ति व अर्थ आम्ही पुढें (निरुक्त ६।१७ येथें) देऊं.

## खंड ११ वा.

**तत्सूर्यस्य देवत्वं तन्महित्वं मध्या कर्तोर्विततं सं जभार।**
**यदेदयुक्त हरितः सधस्थादाद्रात्री वासस्तनुते सिमस्मै (ऋ॰ सं० १।११५।४)**
**तत् सूर्यस्य देवत्वम् तत् महित्वम्**

तेंच सूर्याचें देवपण व तेंच मोठेपण.

**मध्ये यत् कर्मणां क्रियमाणानां विततं संह्रियते**

कर्तोः = कर्मणां क्रियमाणानाम्. संजभार = संह्रियते. असें कर्मणि रूप करण्याचें कारण क्रियेचें सौकर्य दाखवावयाचें आहे. संजहार असें जर म्हटलें असतें तर त्यांत सूर्याला प्रयत्न करावा लागला असा अर्थ उत्पन्न झाला असता. कर्मणि प्रयोगानें प्रयत्नाभाव दर्शविला आहे. दुर्ग म्हणतो:—मध्या मध्ये यत् कर्मणां क्रियमाणानाम् अनेकेषाम् अवगणय्य सर्वान् कर्मकर्तॄन् मिषतां तेषां विततम् एतत् प्रकाशजालम् एवम् अति महत्। महतापि कालेन तत् दुरुपसंहारम् अन्यैः। यत् एकेन मुहूर्तेन अनायासेन एव भगवता सूर्येण संह्रियते तत् अस्य देवत्वं तच्च महत्त्वम् अहं मन्ये = "अनेक कर्में केलीं जात असतांना, तीं कर्में व त्यांचे कर्ते ह्यांना न जुमानतां त्यांच्या देखत एवढें मोठें हें प्रकाशाचें जाल, कीं दुसऱ्या कोणालाही तें आवरतां येणार नाहीं, असें एका क्षणांत यत्किंचित् श्रमाशिवाय भगवान् सूर्य आवरूं शकतो. ह्याचमुळें तो देव आहे व मोठा आहे असें मी मानतों." पण हा अर्थ चुकीचा आहे. कारण संजभार ह्या क्रियेचा कर्ता रात्री आहे. विततम् म्हणजे मागावर घातलेलें कापड. मध्याकर्तोः= करीत असतांना म्हणजे विणीत असतांना मध्येंच. रात्र आपलें मागावर घातलेलें कापड मध्येंच म्हणजे पुरें व्हावयाच्या आधींच गुंडाळते. सूर्य उगवल्याबरोबर अंधकार नाहींसा होतो. अंधकार हेंच मागावर घातलेलें कापड. ह्या वाक्यांतील कर्ता सहज ध्यानांत येण्याजोगा आहे. म्हणून व तत्संबंधीं तुच्छता दर्शविण्याकरितां कवीनें गाळला आहे.

**यदा असौ अयुङ्क्त हरणान् आदित्यरश्मीन्**

यत् = यदा; इत् पदपूरण असल्यामुळें भाष्यांत घातलें नाहीं. असौ हें अध्याहृत घेतलें आहे. अयुक्त = अयुङ्क्त. गुर्जरपाठांत अयुक्त हाच ऋचेंतील शब्द ठेविला आहे. अयुक्त हें तृतीय भूतकाळाचें तृतीयपुरुषीं एकवचन होय. अयुङ्क्त हें पहिल्या भूतकाळाचें तृतीयपुरुषीं एकवचन. कदाचित् अयुक्त हाच पाठ मूळचा असेल. हरितः = हरणान्, आदित्यरश्मीन्. हरित् शब्द हृ नेणें ह्यापासून झाला आहे. हरितः म्हणजे नेणारें. कोण नेणारें? सूर्याचे किरण. ते काय नेतात? जल वगैरे. अथवा,

**हरितः अश्वान् इति वा**

हरितः म्हणजे हरित् नांवाचे सूर्याचे घोडे. हाच अर्थ खरा आहे. परंतु निरुक्तकारांचा व्युत्पत्तीवरून अर्थ ठरवावयाचा असा सिद्धांत असल्यामुळें यास्कानें पहिला अर्थ दिला आहे.

**अथ रात्री वासः तनुते सिमस्मै । वेसरम् अहर् अवयुवती सर्वस्मात्**

आत् = अथ. परंतु आत् ह्याचा अर्थ लगेच असा आहे. वासः = वेसरम्, अहर्. वेसर शब्दाचें विवरण खंड ७ ह्यांत पहावें. वेसरम् अहर् = (तेजस्वी दिवस). अवयुवती हें अध्याहृत आहे. सिमस्मै = सर्वस्मात्. परंतु हा अर्थ चुकीचा आहे. सिम हा शब्द पूर्ववाक्यांत गेलेल्या मुख्य शब्दाच्या स्थानीं असतो. तो मुख्य शब्द म्हणजे सूर्य. सिमस्मै = त्याच्याच करितां म्हणजे सूर्याच्या करितां. दुर्ग म्हणतो :— यदा असौ भगवान् सूर्यः अयुक्त युनक्ति हरितः रसहरणान् रश्मीन् आत्मनि अस्तं गच्छन् सधस्थात् पृथिवीलोकात् आकृष्य । पृथिवी हि तेषां रसादानार्थं सहस्थानम् । इतो हि ते सर्वे एव रसान् आददते । अथ तदैव उपसंहृतसर्वरश्मिजाले भगवति सूर्ये रात्रिः वासः वेसरम् अहर् अवयुवती अवमिश्रयन्ती सिमस्मात् सर्वस्मात् लोकात् अहर् अपकृष्य सा तमः तनुते । तत् एवम् एतदपि सूर्यस्यैव माहाभाग्यं यदस्य संनिधौ तमो नश्यति यश्चानेन उत्सृष्टो देशः स तमसा छाद्यते इत्यभिप्रायः । " जेव्हां भगवान् सूर्य हरितः म्हणजे रसहरण करणारे रश्मि अस्ताला जातांना सधस्थात् म्हणजे पृथिवीलोकापासून ओढून अयुक्त म्हणजे आपल्या ठिकाणीं त्यांचा संग्रह करतो. तेव्हां रात्री सर्व वस्तूं-पासून दिवस वेगळा करून अंधकार पसरते. हें सगळें कृत्य सूर्याच्याच ऐश्वर्याचें फल होय. ह्याच्या शेजारीं अंधकार नाहींसा होतो; आणि हा जो देश सोडून जातो तो देश अंधकार झांकून टाकतो." असा अर्थ करण्यांत यास्क व दुर्ग ह्या दोघांचीहि चूक झाली आहे. अयुक्त म्हणजे आपल्या ठिकाणीं स्थापितो असा अर्थ कधींही होणार नाहीं. सधस्थ म्हणजे तबेला किंवा पागा. तेथें असलेले घोडे सूर्य आपल्या रथाला जोडतो, हाच ह्या शब्दांचा अर्थ आहे. ज्याक्षणीं ( यदा इत् ) तबेल्यांतून ( सधस्थात् ) घोडे ( हरितः ) आणून रथाला जोडतो ( अयुक्त ) तेव्हांच ( आत् ) रात्र ( रात्री ) त्याच्याकरितां ( सिमस्मै ) म्हणजे त्या सूर्याला भिऊन, त्याच्या दरा-र्‍यानें, आपलें अंधकाररूपी विणलें जाणारें वस्त्र ( वासः ) गुंडाळते ( तनुते ). हा अर्थ असला पाहिजे. परंतु 'तनुते' ह्या शब्दाचा 'गुंडाळतो' असा अर्थ मला अजून सांपडला नाहीं. तन् = ताणून फाडणें असा अर्थ असावा. आदधिक्राः शवसा पञ्चकृष्टीः सूर्य इव ज्योतिषापस्ततान ( ४।३८।१० ) । सद्यश्चिद्यः शवसा० ( १०।१७८।३ ) = सूर्य जसा प्रकाशानें तमोरूप वस्त्राचे वाभाडे उडवितो तसा दधिक्रा किंवा पांच आर्यजातींचे वाभाडे उडविता झाला. एथें तन् = फाडून तुकडे तुकडे करणें. सूर्य आलासा पाहून रात्र अंधकार-वस्त्र फाडून नाहींशी करती झाली.

**अपि वा उपमार्थे स्यात् । रात्री इव वासः तनुते इति**

किंवा चवथा पाद उपमापर असेल. दुर्ग म्हणतो:— 'वासः इव रात्री तमः तनुते । पूर्वत्र वेसरम् अहर् अवयुवती तमः तनुते इति नास्ति उपमा । इह पुनः वासः इव तमः तनुते इत्येवं उपमा ' = ' वस्त्राप्रमाणें रात्र अंधकार पसरते. पहिल्या विवरणांत रात्र वासः म्हणजे प्रकाशणारा दिवस सर्व वस्तूंपासून काढून त्यांच्याबदल

अंधकार पसरते असा अर्थ केल्यामुळें तेथें उपमा नाहीं. परन्तु ह्या दुसऱ्या विवरणांत वस्त्राप्रमाणें अंधकार पसरते असा अर्थ केल्यानें उपमा होते.' दुर्गानें इव शब्द निरुक्तांत वासः ह्याच्या आधीं व रात्री ह्याच्यानंतर असतांना तो वासः ह्याच्यानंतर घेतला आहे. पण तसें करण्याला दुर्गानें कांहीं आधार दिला नाहीं. रात्रीप्रमाणें कोणीतरी वस्त्र पसरतें. हें वस्त्र पसरणारें कोण ? यास्काच्या मनांतील अर्थ निराळा दिसतो. तो अर्थ पुढीलप्रमाणें असावा:— 'जेव्हां सूर्य आपले रश्मि जुंपतो म्हणजे काम करावयाला लागतो तेव्हां रात्रीप्रमाणें तोही आपलें प्रकाशरूप वस्त्र सर्व ठिकाणीं पसरतो.' परंतु पुढें दिलेले शब्द कदाचित् ह्या अर्थाच्या आड येतील. ते शब्द असे.

**अथापि निगमो भवति । पुनः समव्यद्विततं वयन्ती । समनात्सीत्**

तदर्थक एक ऋचाही आहे ती अशी:- समव्यत् = समनात्सीत्. समव्यत् = सम् + अव्यत्. वि = विणणें = अ + वि + अत् = अव्यत्. सम् + नह् = गुंडाळणें, वळकटी करणें. सम् + अ + नह् + सीत् = सम् + अह् + नाह् + सीत् = समनात्सीत् = बरोबर बांधून टाकती झाली, गुंडाळती झाली. पुनः समव्यद्विततं वयन्ती मध्या कर्तोर्न्यधाच्छक्म धीरः । उत्संहायास्थाद्व्यृतूँरदर्धररमतिः सविता देव आगात् (ऋ. सं. २।३८।४)ह्या ऋचेचीं पदें. पुनः । सम् अव्यत् । विततम् । वयन्ती । मध्या । कर्तोः । निअधात् । शक्म । धीरः । उत् । संऽहाय । अस्थात् । वि । ऋतून् । अदर्धः । अरमतिः । सविता । देवः । आ । अगात् । वयन्ती वस्त्रं वयन्ती नारी इव रात्रिः विततम् आलोकं पुनः समव्यत् संवेष्टयते । पुनः शब्दः पूर्वेद्युः अपि एवम् अकार्षीत् इति द्योतयति । धीरः प्रज्ञः अपि सर्वः लोकः कर्तोः क्रियमाणं कर्म शक्म कर्तुं शक्यम् अपि मध्या मध्ये उपक्रान्तं कर्म अपरिसमाप्य न्यधात् निहितवान् । सवितरि उपरते इति शेषः । सर्वो लोकः संहाय शय्यां विहाय उदस्थात् । अवशिष्टं कर्म कर्तुं पुनः उत्तिष्ठति । संपूर्वः जहातिः शय्यापरित्यागे वर्तते । सविता सर्वस्य प्रसविता सूर्यः अरमतिः अनुपरतिः देवः द्योतमानः आगात् आगच्छति उदेति । ऋतून् कालविशेषांश्च व्यदर्दः विदारयति = वस्त्र विणणाऱ्या एखाद्या स्त्रीप्रमाणें रात्र पसरलेला प्रकाश पुनः गुंडाळून ठेवते. पुनः ह्या शब्दानें आदल्या दिवशींही तिनें असेंच केलें होतें हें सुचविलें जातें. मनुष्य कितीं शहाणा असला तरी तो आपलें काम शेवटास न नेतां, सूर्य अस्ताला गेल्यामुळें, तसेंच अपुरें खालीं ठेवितो. राहिलेलें काम पुरें करण्याकरितां सर्व लोक हातरूण टाकून उठतात. सूर्य आपल्या कामाला खळ न पाडतां पुनः उगवतो आणि ऋतूंना फाडून टाकतो. दुर्ग म्हणतो:— "यथा योषित् काचित् वासः वयन्ती पुनः संवेष्टयति अस्तमयकाले पुनश्च वितनोति आदित्ये उदिते एवं इयं रात्रिः पुनरेव तमः संवेष्टयति योषिदिव वासः वयन्ती । कदा पुनः संवेष्टयति । यदा मध्या मध्ये कर्तोः कर्मणां क्रियमाणानां लौकिकवैदिकानां विततम् एतत् रश्मिजालं शक्म स्वात्मप्रसवात् अपत्यभूतं न्यधात् नीचैर्धत्ते लोकानां प्रकाशनाय । अथवा शक्म इति कर्मनाम स्यात् । यदा स्वं प्रकाशं पुनः कर्म निधत्ते निदधाति उदेति धीरः धीमान्

आदित्यः तदा अहनि उपस्थिते पुनः संवेष्टयति रात्रिः तमः इति । अस्तमयं प्रति पुनः वासः इव तनोति इति । एवम् एतस्मिन् अपि मन्त्रे सामर्थ्यात् असति उपमा-शब्दे वाससा तमः उपमीयते । यथा इह तथा पूर्वस्मिन् अपि निगमे इत्येवं एके मन्यन्ते । " जशी एखादी वस्त्र विणणारी स्त्री सूर्यास्ताच्या वेळीं तें वस्त्र पुनः गुंडाळते व सूर्य उगवला म्हणजे पुनः पसरते तशी रात्र अंधकार गुंडाळते. ती केव्हां गुंडाळते ? वैदिक व लौकिक कर्मे चाललीं असतांना मध्येंच. हें पसरलेलें रश्मिजाल स्वतःच्या मुलासारखें सूर्य लोकांना प्रकाश मिळावा म्हणून खालीं धरतो. किंवा शक्म म्हणजे कर्म असा अर्थ होईल. तसा अर्थ घेतल्यास ' न्यधात् शक्म धीरः ' ह्याचा अर्थ बुद्धिवान् सूर्य आपलें प्रकाश देण्याचें काम सुरू करतो तेव्हां दिवस जवळ आल्या कारणानें रात्र अंधकार पुनः गुंडाळते. व अस्ताच्या वेळीं वस्त्राप्रमाणें अंधकार पुनः पसरते. ह्या मंत्रांतही उपमादर्शक शब्द नसूनही वस्त्राशीं अंधकाराची तुलना केली आहे असें अर्थावरून दिसतें. त्याप्रमाणें प्रस्तुत ऋचेंतही तशा प्रकारची उपमा आहे असें कांहीं टीकाकार म्हणतात. दुर्ग पुढें म्हणतो:— ' अपरे पुनः अपि वा उपमार्थे स्यात् इत्यत्र एवं वर्णयन्ति । रात्रीव वासः तनुते इत्यत्र वासःशब्दः अहःशब्दपर्यायवाची । तस्य उक्ता व्युत्पत्तिः वेसरम् अहर् इति । सा रात्रिः वासः तनुते । अहः तनुते इत्यर्थः । रात्रिप्रान्ते हि शुक्लमहर् लक्ष्यते । तेन ज्ञायते रात्र्या इव इदं ततम् इति । एवम् उपमार्थत्वम् एके मन्यन्ते । यदा च अयम् अर्थः तदा पुनः समव्यद्विततं वयन्ती इत्यत्र पुनः समवेष्टयत् अहः रात्रिः विततम् इव वासः वयन्ती । कदा । यदा मध्ये कर्मणां न्यधात् निदधाति अस्तं गच्छन् आदित्यः स्वमण्डले शक्म रश्मिजालं । यदा च उदस्थात् उत्तिष्ठति स्वरश्मीन् उपसंहृत्य व्यदर्धः व्यधात् विदधाति ऋतून् अहोरात्रलक्षणान् । यदा एवम् एष सविता देवः अरमतिः पर्याप्त-मतिः आगात् आगच्छति तदा रात्रिः तनुते वासः अहर्लक्षणम् पुनः संवेष्टयति इत्येवं मन्यन्ते । यदत्र अर्थाविरोधि तत्प्रतिपत्तव्यम्':– दुसरे टीकाकार अपि वा उपमार्थे स्यात् ह्याचा निराळा अर्थ करतात. रात्री व वासः तनुते एथें वासः म्हणजे दिवस. वासस् शब्दाची वेसरम् अहर् अशी व्युत्पत्ति पूर्वीं दिलीच आहे. रात्र वासः म्हणजे दिवस पसरते. कारण, रात्र संपावयाच्या वेळीं पांढरा दिवस दिसतो. तेव्हां रात्रीच जणूं काय दिवस पसरते अशी समजूत होते. ह्या रीतीनें उपमा ह्या ऋचेंत आहे असें कांहीं लोक म्हणतात. असा जर अर्थ असेल तर पुनः समव्यद्विततं वयन्ती येथें वस्त्र विणणाऱ्या स्त्रीप्रमाणें रात्र दिवस पुनः गुंडाळते असा अर्थ होईल. केव्हां गुंडाळते ? जेव्हां कर्में चाललीं असतांना मध्येंच अस्ताला जाणारा सूर्य आपलें शक्म म्हणजे रश्मिजाल स्व-मंडलांत आणून ठेवतो तेव्हां. पण जेव्हां तो उगवतो तेव्हां आपले रश्मि घेऊन अहोरात्ररूपी ऋतु पुनः सुरू करतो. असें जेव्हां घडतें तेव्हां अरमतिः म्हणजे पर्याप्तमति असा सूर्य येतो. तेव्हां रात्र दिवसरूपी वस्त्र पुनः गुंडाळते. असे दोन प्रकारचे भिन्न अर्थ ह्या ऋचेचे होतात. तेव्हां वाचकांनीं अर्थाला विसंगत नसेल असा ह्या दोहोंमध्यें जो असेल तो घ्यावा.

ह्या तीनही अर्थांत ओढाताण आहे व कांहीं शब्दांचे भलते अर्थ केले आहेत. खरा अर्थ पुढीलप्रमाणें असावा.:-- पुनः समव्यत् विततं वयन्ती मध्या कर्तोः = विणकरीण (वयन्ती) मागावर घातलेलें वस्त्र (विततम्) मध्येंच (मध्याकर्तोः) म्हणजे पुरें व्हावयाच्या अगोदरच पुनः (पुनः) गुंडाळूं लागली (सम् + अव्यत्). न्यधात् शक्म धीरः = प्राज्ञ (धीरः) आपली करामत (शक्म) सुरू करता झाला (न्यधात्). उत् संहाय अस्थात् = संहाय उदस्थात् = तो अंथरूण सोडून उठला. वि ऋतून् अदर्धः = ऋतून् व्यदर्धः व्यधारयत् = घटिकांसारखे दिवसाचे भाग त्यानें हातीं घेतले. अरमतिः सविता देवः आगात् = ज्याच्या कामाला खळ नाहीं (अरमतिः = अ + रमतिः) असा सविता देव उदयाला आला (आगात्). ही ऋचा यास्कानें उपमार्थ दर्शविण्याकरतां उद्धृत केली नसून 'रात्र सूर्योदयाच्या वेळीं आपलें अंधकाररूपी वस्त्र तें पुरें न करतां गुंडाळते.' हा अर्थ स्पष्ट करण्याकरितां उद्धृत केली आहे. मी जो अर्थ केला आहे त्याला पुढील शब्द कदाचित् आड येतील असें म्हटलें आहे. परंतु पुनः समव्यत् ह्याचा जो मी अर्थ केला आहे तो तत्सूर्यस्य ह्या ऋचेच्या मी केलेल्या अर्थाशीं विसंगत नाहीं. सूर्यस्य = सूर्यः स्यः; सु = उ = र = य = धन. स = य = धन. सूर्यः = स्यः = धनवान् दाता. धनवान् दाता (सूर्यः = स्यः) आपल्या धनांतून (कर्तोः) धन (तत् = देवत्वं = तत् = महित्वं = मध्या = वि = ततं = सं) देतो (जभार). धनवान् (हरितः) असा तो आपल्या धनांतून (सधस्थात्) जेव्हां (यत्) धन (आ=इत्) देतो (अयुक्त) तेव्हां त्याला (अस्मै) धनवान् (रात्रीवा = सः) आपल्या धनांतून (आत्) धन (सिं) देतो (तनुते) देव = महि = धन. त्व = धन. म = ध = य = धन. कृ = तु = देणें, धन. कर्तुः = धन. स = धन. युज् = देणें. ह = रि = त = धन. स = ध = स्थ = धन. अ = धन. आत् = धनांतून. रा = तृ = ई = धन. रात्री + वान् = रात्रीवान् = धनवान्. ऋतावाप्रमाणें रात्रीवा. सः = धनवान्. तन् = देणें. सि = देणें, धन. अस्मै = त्या धनवंताला. असा अर्थ उद्दिष्ट आहे. पुनः समव्यद्विततं वयन्ती = (१) विणणारी (रात्र) पुन्हा मागावर पसरलेलें (विततं) वस्त्र गुंडाळती झाली (सम् = अव्यत्), हा अर्थ पान १२ वर दिलाच आहे; (२) दात्री (वयन्ती) अमूप (पुनः = विततं) धन (सं) देती झाली; पु = न र् = सं = वि = ततं = धन. वी = (१) गुंडाळणें; (२) देणें. वय् = (१) विणणें; वी = देणें, वी +अ = वय; वय + अन्ती हा दुसरा अर्थ उद्दिष्ट आहे.

## खंड १२ वा.

**इन्द्रेण सं हि दृक्षसे संजग्मानो अबिभ्युषा ।**

**मन्दू समानवर्चसा ( ऋ० सं० १।६।७ )**

**इन्द्रेण हि संदृश्यसे संगच्छमानः अबिभ्युषा गणेन**

संदृक्षसे = संदृश्यसे. संजग्मानः = संगच्छमानः. अबिभ्युषा हें कशाचें विशेषण ? गणेन ह्या अध्याहृत नामाचें. तर मग इन्द्रेण ह्याचा अर्थ काय ? ईश्वरेण दीप्तेन

वा = समर्थ किंवा देदीप्यमान. ह्या अर्थामुळें इन्द्रेण हें गणेन ह्याचें विशेषण. हे इन्द्र हे शब्द अध्याहृत घ्यावयाचे. हे इंद्र, तूं समर्थ किंवा देदीप्यमान ( इन्द्रेण ) व न भिणारा ( अबिभ्युषा ) असा जो मरुद्गण त्यांच्यासह जातांना दिसतोस.

**मन्दू मदिष्णू युवां स्थः । अपि वा मन्दुना तेन इति स्यात्**

मन्दू = मदिष्णू = आनंदी. 'युवां स्थः' अध्याहृत. तुम्ही दोघे (इंद्र व मरुद्गण) आनंदी आहांत. किंवा मन्दू म्हणजे मन्दुना असें तेन म्हणजे गणेन ह्याचें विशे॰षण होईल.

**समानवर्चसा इति एतेन व्याख्यातम्**

मन्दू ह्याच्या विवरणानें समानवर्चसा ह्याचें विवरण आपोआप होतें. मन्दू ज्यावेळेस प्रथमेचें द्विवचन असेल त्यावेळेस समानवर्चसा = समानवर्चसौ. परंतु ज्यावेळेस मन्दू म्हणजे मन्दुना असें गणेन ह्याचें विशेषण केलें जाईल तेव्हां समानवर्चसा हेंही गणेन ह्याचें विशेषण होईल. यास्कानें ऋचेचा केलेला अर्थः—हे इंद्रा, तूं समर्थ किंवा देदीप्यमान व न भिणारा असा जो मरुद्गण त्याच्याबरोबर जातांना दिसतोस. तुम्ही दोघे आनंदी व सारख्या बलाचे आहांत. किंवा आनंदी व समानबल अशा मरुद्गणासह. सायणाचार्यांनीं केलेला अर्थः— हे मरुद्गणा, तूं न भिणारा जो इंद्र त्याच्यासह जातांना दिसतोस. तुम्ही दोघे आनंदी व समबल आहांत. किंवा आनंदी व समबल असा जो इंद्र त्याच्यासह. ऋचा कोणाला उद्देशून रचिली आहे हें समजावयाला मार्ग नाहीं. कदाचित् कुत्साला ऋषि म्हणत असेल. भुवत्ते सख्ये कुत्सो निकामः । स्वे योनौ नि षदतं सरूपा ( ४।१६।१० ) ' प्र मुञ्चस्व परि कुत्सादिहा गहि (१०।३८।६ ), यासि कुत्सेन सरथमवस्युः ( ४।१८।११ ) = इंद्र व कुत्स ह्यांमध्यें फार सख्य होतें, इंद्र कुत्साला आपल्या रथांतून घेऊन जाई व कुत्साला सोडून जाणें इंद्राला अवघड होई. ह्या उताऱ्यांवरून प्रस्तुत ऋचेंत ऋषि कुत्साला उद्देशून बोलत नसेल कशावरून ? ह्या सूक्तांतल्या बहुतेक ऋचा परस्पराशीं असंबद्ध आहेत. तेव्हां अमकी ऋचा अमक्याला उद्देशून रचिली आहे असें निश्चितपणें म्हणतां येत नाहीं. तथापि कुत्स किंवा दुसरा कोणी संबोधित आहे असें समजण्यास हरकत नाहीं. मन्दू शब्द फक्त दोनदां आला आहे. ( १०।६१।१५ ) त ' नासत्या॰ मन्दू हितप्रयसा विक्षु यज्यू ' असें आहे. हितप्रयसा व यज्यू ह्यांप्रमाणें मन्दू द्विवचन आहे. मन्दू = हितप्रयसौ = यज्यू = धन देणारे अश्विन. एथेंही मन्दू द्विवचन असल्यास दोघे कोण ? इन्द्राकुत्सा वहमाना रथेन वामत्या अपि कर्णे वहन्तु ( ५।३१।९ ) एथें इंद्र व कुत्स ह्यांची जोडी आहे व दोघेही धन देणारे असा उद्दिष्ट अर्थ आहे. हे कुत्सा, तूं न भिणाऱ्या इंद्राबरोबर जातांना नेहमीं दिसतोस, दोघे तुम्ही सोम पिणारे ( मन्दू ) व समबल आहांत; असा प्राथमिक अर्थ आहे. या अर्थांत खुबी आहे. इंद्रासारखा तूं सोम पितोस व त्यामुळें तुला जोम आला पाहिजे; शिवाय इंद्रासारखा तूं बळकट आहेस; तरी न भिणारा जो इंद्र याच्याबरोबर तूं नेहमीं असतोस, त्याला

क्षणभरही सोडीत नाहींस. तेव्हां याचा अर्थ एवढाच कीं तूं भ्याड असला पाहिजेस आणि म्हणूनच एकटा कधींहि आढळत नाहींस. उद्दिष्ट अर्थ पुढीलप्रमाणें :–हे दात्या, धन (स) देणारा (जग्मानः) तूं धनानें खच्चून भरलेल्या (अबिभ्युषा = मन्दूसमानवर्चसा) धनांतून (इन्द्रेण) धन (सं) देतोस (दक्षसे). इन्द्र = सं० = मन् = दु = ऊ = स = मा = न = वर्चस् = धन. भी = दारिद्र्याला भिणें व देणें. अ = नाहीं. बिभीवान् = दारिद्र्याला भिणारा; अ = न भिणारा. अ = धन. अ + बिभीवान् = धन देणारा (धनाचा सांठा). मन्दूसमानवर्चस् = धनानें खच्चून भरलेला (सांठा). सं दोनदां आला आहे. दश् = गम् = देणें. सं जग्मानः = धन देणारा. सं दक्षसे = धन देतोस. पहिल्या विवरणांत दोन्ही सं जग्मानः ह्याला जोडावेत. संजग्मानः = नेहमीं नेहमीं जाणारा. हि = नेहमीं. नेहमींला जोर आणण्यासाठीं दुसऱ्या विवरणांत हि = धन. सं = हि = धन.

## खंड १३ वा.

**ईर्मान्तासः सिलिकमध्यमासः संशूरणासो दिव्यासो अत्याः ।**
**हंसा इव श्रेणिशो यतन्त यदाक्षिषुर्दिव्यमज्ममश्वाः (ऋ० संहिता १।१६३।१०)**
**ईर्मान्ताः समीरितान्ताः**

ईर्मान्ताः = समीरितान्ताः. ईर्मान्ताः = ईर्म + अन्ताः. ईर्म = समीरित; ईर्मान्ताः = पसरलेलें; विरळविरळ असणारें. ईर्म शब्द ऋग्वेदांत पांच वेळां आला आहे. व पांचही ठिकाणीं त्याचा अर्थ 'ताबडतोब, क्षणांत' असा असावा. पण तो अर्थ ईर्मान्त या सामासिक शब्दांत आहे कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. येथें अंत म्हणजे काय हेंच समजत नाहीं. घोडे एका ओळींत शर्यतीकरितां उभे आहेत. तेव्हां त्यांचे अंत म्हणजे शेवटले घोडे असा अर्थ घ्यावयाचा कीं अंत म्हणजे त्यांचे पाय असा करावयाचा? तसा असल्यास ईर्मान्तासः ह्याचा अर्थ चपल पायांचे असा होईल. ईर्माणः अन्ताः (पादाः) येषां ते ईर्मान्ताः = चपल पायांचे. ईर् प्रेरणा करणें याला मन् प्रत्यय लाऊन ईर्मन् शब्द झाला असावा. परंतु ऋग्वेदांत ईर्मा एवढेंच रूप आढळतें व प्रत्येक ठिकाणीं तें अव्यय आहे.

**पृथ्वन्ताः वा**

ईर्म म्हणजे पृथु. ज्यांचे अन्त म्हणजे ऊर किंवा जघन जाड आहेत. पण ईर्म शब्दाचा पृथु हा अर्थ कसा झाला हें यास्क सांगत नाहीं. कदाचित् 'समीरित' ह्याचाच पृथु असा अर्थ असेल. म्हणजे पृथ्वन्ताः हा वेगळा अर्थ नसून समीरितान्ताः ह्याचाच पर्याय किंवा विवरण असेल. महाराष्ट्रप्रतींत समीरितान्ताः व पृथ्वन्ताः ह्यांच्यामध्यें सुसमीरितान्ताः असा शब्द आहे. तो प्रक्षिप्त होय.

**सिलिकमध्यमाः संसृतमध्यमाः**

सिलिक = संसृत. सिलिक = सलक = सरक = सर. हा सर शब्द सृ हलणें ह्यापासून झाला आहे. 'सं' हा उपसर्ग सृत ह्याला अर्थाकरितां जोडला आहे.

संसृतमध्यमाः संश्लिष्टमध्यमाः इत्यर्थः । तेषां हि सप्तानां ये मध्यमाः त्रयः इतरेतरम् उत्पीड्य संश्लेषेण अवस्थिताः । अथवा पृथुजघनोरस्कानां सतां मध्यमाः शरीरप्रदेशाः सप्तानाम् अपि संश्लिष्टाः संलग्नाः तनवः । निरुदराः ते अश्वाः इत्यर्थः (दुर्ग). सिलिक म्हणजे संसृत म्हणजे संश्लिष्ट. एकंदर सात घोड्यांपैकीं मधले जे तीन घोडे ते एक-मेकांला चिकटून उभे आहेत; किंवा त्यांचे जघन व छात्या ह्या प्रशस्त असून त्यांचीं पोटें वगैरे अगदीं लहान आहेत. म्हणजे ते निरुदर आहेत. सिलिक शब्द फक्त येथेंच आला आहे. तेव्हां त्याचा अर्थ ठरविणें अशक्य आहे. सिलिक व संसृत ह्यांमध्यें 'स' हें एकच समान अक्षर होय. सिलिकमध्यमाः ह्याचा अर्थ मधले घोडेहि विरळविरळ उभे आहेत असा कदाचित् असेल. किंवा अंत म्हणजे जसे पाय घेतले तसें मध्यम म्हणजे कंबरा असाही अर्थ असेल. सिंहकटीप्रमाणें घोड्यांचाही कटिप्रदेश लहान असणें ही सौंदर्याची व चापल्याची खूण असेल. ज्यांच्या कंबरा बारीक ते सिलिकमध्यम. पण ह्या सगळ्या कल्पना होत; व हेंच विधान पुढील व्युत्पत्तींना लागूं आहे.

**शीर्षमध्यमाः वा**

सिलिक = शीर्ष = प्रधान. यो हि तेषां सप्तानां मध्यमः स शिरोभूतः । प्रधानः इत्यर्थः (दुर्ग). या सातांपैकीं मधला घोडा मुख्य असतो.

**अपि वा शिरः आदित्यो भवति यत् अनुशेते सर्वाणि भूतानि मध्ये च एषां तिष्ठति**

सिलिक = शिरस् ; सिल् = शिर. हें शिर म्हणजे आदित्य. आदित्याला शिर हें नांव देण्याचें कारण आदित्य सर्व प्राणिमात्रांमध्यें प्राणरूप असा असतो. म्हणजे शिरस् शब्द शी निजणें ह्याच्यापासून झाला आहे. हा सूर्य ह्या घोड्यांच्या मध्यें असतो. म्हणून हे घोडे शीर्षमध्यम. दुर्गाच्या प्रतींत एषां ह्याच्याऐवजीं एतेषां असा पाठ होता. एतेषां ह्यानें तो अश्व समजतो. परंतु एषां किंवा एतेषां ह्यांचा संबंध सर्वाणि भूतानि ह्यांच्याशीं असला पाहिजे. तथापि सिलिकमध्यमाः म्हणजे शिरोमध्यमाः ह्याचा अर्थ ज्यांच्या मधल्या भागीं (मधल्या घोड्याच्या पाठीमागें) सूर्य बसला असतो असे घोडे असा अर्थ असला पाहिजे.

**इदम् अपि इतरत् शिरः एतस्मात् एव**

लौकिक जो शिरस् शब्द तो 'शी' निजणें ह्यापासूनच झाला आहे. कारण, समाश्रितानि एतत् इन्द्रियाणि भवन्ति । इंद्रियें ह्यावर म्हणजे डोक्यावर अवलंबून असतात. हें वाक्य 'शी' निजणें ह्यापासून शिरस् शब्द झाला आहे ह्या विधानाच्या समर्थनार्थ घातलें आहे असें प्रथमदर्शनीं वाटतें. परंतु समाश्रितानि ही व्युत्पत्ति अगदींच निराळी आहे. यास्कानें आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें भवन्ति ह्याच्यानंतर इति वा घातलें नाहीं. शिरस् शब्द 'श्रि' आश्रय करणें ह्यापासून झाला आहे असें दुसरी व्युत्पत्ति म्हणते. अनुशेते ह्याचा अर्थ देतांना 'शेते आस्ते तस्मात्

सर्वभूताश्रयणात् शिरः आदित्यः ' असें दुर्ग म्हणतो. तेव्हां 'शी' व 'श्रि' हे दोन्ही धातु एकच असें त्याचें मत होतें कीं काय?

**संशूरणासो दिव्यासो अत्याः । शूरः शवतेः गतिकर्मणः**

शूरणासः ह्यांतील शूर शब्द शव् जाणें ह्यापासून झाला आहे. शूर मनुष्य जोरानें शत्रूकडे जातोच जातो; त्याच्याकडे पाठ फिरवीत नाहीं. संशूरणासः = संगताः शूरेण भगवता आदित्येन संशूरणाः (दुर्ग). = शूर जो भगवान् आदित्य त्याच्यासह असणारे. परंतु सं हा उपसर्ग शूरणासः ह्याच्याकडे जात नसून यतन्ते ह्या क्रियापदाकडे जातो. शूरणासः, धीरणासः हे शब्द कसे बनले हें सांगतां येत नाहीं. मूळ शब्द शूरणाः असा असल्यास तो शूरणाः शूरणासौ शूरणासः असा चालत असेल. नास् म्हणजे नासिका असा शब्द शेवटीं असल्यास शूरांच्या नासिकांप्रमाणें ज्यांच्या नासिका आहेत असे असा अर्थ होईल. लढाईला जाणारे किंवा शर्यतींत गुंतलेले घोडे जेव्हां धावत सुटतात तेव्हां त्यांच्या नाकपुड्या ईर्ष्येनें फुरफुरतात.

**दिव्याः दिविजाः । अत्याः अतनाः**

दिव्य म्हणजे द्युलोकीं जन्मलेले. दिविभवाः दिव्याः म्हणजे द्युलोकीं असणारे असाही विग्रह चालेल. अतनाः म्हणजे जाणारे. अत्य ह्याचा नेहमींचा अर्थ घोडा असा आहे. परंतु ऋचेंत अश्वाः असा शब्द आल्याकारणानें अर्थाची पुनरुक्ति टाळण्याकरितां अत्याः म्हणजे जाणारे असा यास्कानें अर्थ केला आहे. निरुक्तिकारांचें असें मत होतें कीं ऋग्वेदांत अर्थपुनरुक्ति न होईल अशा रीतीनें शब्दांचा अर्थ केला पाहिजे. परंतु ऋग्वेदांत अर्थपुनरुक्ति हवी तितकी येते व ती टाळण्याकरतां शब्दांचे चमत्कारिक अर्थ करावे लागतात.

**हंसा इव श्रेणिशो यतन्ते । हंसाः हन्तेः घ्नन्ति अध्वानम्**

हंस शब्द हन् ताडणें ह्या धातूपासून झाला आहे. कारण जातांना ते रस्त्याला पायानें ताडन करतात.

**श्रेणिशः इति । श्रेणिः श्रयतेः समाश्रिताः भवन्ति**

श्रेणि शब्द श्री आश्रय करणें ह्यापासून झाला आहे. कारण श्रेणीमध्यें असणारे प्राणी त्या श्रेणीचा अवलंब करतात. हंस असो, मनुष्य असो; कोणीही श्रेणी सोडून जात नाहीं. गुर्जरपाठांत श्रेणिः ह्याच्या ऐवजीं श्रोणिः असा प्रामादिक पाठ आढळतो.

**यदाक्षिषुः यदापन् दिव्यम् अज्मम् अजनिम् आजिम् अश्वाः**

यदा आक्षिषुः = यदा आपन् = जेव्हां घोडे व्यापतात. अक्ष् व्यापणें ह्याचें तृतीयभूत रूप आक्षिषुः. अज्मम् = अजनिम्, म्हणजे जेथें लोक जात येत असतात असा वाहणारा, रहदारीचा रस्ता. दुर्गाच्या पाठांत आजिम् शब्द नव्हता. आजिम् म्हणजे शर्यत किंवा शर्यतीची जागा. अज्म ह्याचा एथें रस्ता असा अर्थ नसून शर्यतीची जागा असा अर्थ आहे.

ऋचेचा अर्थ– जेव्हां स्वर्गांतील घोडे स्वर्गांतील शर्यत धावूं लागतात तेव्हां चपल

पायांचे (ईर्मान्तासः) बारीक कंबरेचे (सिलिकमध्यमासः) ईर्ष्येनें फुरफुरणाऱ्या नाकांचे (शूरणासः) ते घोडे हंसाप्रमाणें एक ओळ करून चढाओढीनें धांवतात (संयन्तते). यत् म्हणजे चढाओढ करणें. 'संयतन्ते' कोण पुढें जातो अशी चढाओढ करतात.

**अस्ति आदित्यस्तुतिः अश्वस्य । आदित्यात् अश्वः निःस्तष्टः इति**

अश्वाची स्तुति म्हणजे आदित्याची. दुर्ग म्हणतोः—आत्मैवैषां रथो भवति आत्माश्वाः इत्येवं प्रक्रमेण सूर्यदैवतः एष मन्त्रः । स पुनरयं अश्वस्तुतौ विनियुक्तः । तत् असमंजसम् इति मन्यमानः भाष्यकारः प्रतिसमाधित्सुः आह = आत्मा हाच देवांचा रथ, आत्मा हाच त्यांचे घोडे ह्या न्यायानें प्रस्तुत ऋचेची देवता सूर्य होय. परंतु तिचा विनियोग अश्वस्तुतीमध्यें केला आहे हें बरोबर नाहीं, असें मनांत आणून भाष्यकार ह्या शंकेचें समाधान करतो. अश्वाची स्तुति म्हणजे आदित्याची स्तुति. कारण, घोडा हा आदित्यापासून म्हणजे आदित्याला तासून निर्माण केला आहे. पुढील ऋचा हीच गोष्ट सांगते.

**सूरादश्वं वसवो निरतष्ट (ऋ० संहिता १।१६३।२) इत्यपि निगमो भवति**

वसूंनीं सूर्यापासून घोडा तासून निर्माण केला अशी ऋचाहि आहे. 'आदित्यात् अश्वः निरतष्टः इति' हे शब्द प्रक्षिप्त असावेत. कारण ऋचेचा अर्थ स्पष्ट आहे. जेव्हां जेव्हां इत्यपि निगमो भवति असे शब्द येतात तेव्हां यास्क विवरण देत नाहीं. प्राथमिक अर्थात पहिले तीन शब्द दुर्बोध आहेत; परंतु उद्दिष्ट अर्थात ते दुर्बोध नाहींत. ईर् = म = अन्त = सि = लि = क = मध्य = म = शु = ऊ = र = नस् = धन. तीनही शब्दांचा अर्थ धनवान्. दिव्य = दिव् + य = धनानें भरलेले. अ = धन. अस = धनवान्. हन् = स = धन. श्रेणि = शु = अ = ई = नि = शस् = धन. श्रेणिश = इव = अमूप धन. सं = धन. यत् = देणें. अज् = देणें. अज्म = धन. अश्वाः = धनवान्. अक्ष = देणें. धनिक दाते जेव्हां (यत्) धन देतात तेव्हां ते अमूप धन देतात.

## खंड १४ वा.

**कायमानो वना त्वं यन्मातॄरजगन्नपः । न तत्ते अग्ने प्र मृषे निवर्तनं यद्दूरे सन्निहाभवः (ऋ० सं० ३।९।२)**

**कायमानः चायमानः । कामयमानः इति वा । वनानि**

कायमानः = चायमानः = पाहणारा. चायृ पूजानिशामनयोः (धा० १।९०५). चाय् ह्याचें काय् होऊन कायमानः शब्द बनला. कायमानः = कामयमानः अथवा कामयमानः ह्यांतील 'म' गळून कायमानः झालें असेल. येथें पंचविध निरुक्तांपैकीं वर्णनाश झाला आहे. हा शब्द, किंवा काय् धातूचें हेंच एकरूप ऋग्वेदांत आहे. एके काळीं काय् धातु अस्तित्वांत असावा. वना = वनानि = लांकडें.

**त्वं यत् मातृः अपः अगमः उपशाम्यन्**

अजगन् = अगमः. गन् जाणें हा वैदिक धातु आहे. गन् अभ्यासानें जगन्. अ + जगन् + स् = अजगन्. उपशाम्यन् = विझून. उपशाम्यन् = अनुगच्छन् (दुर्ग), पण अजगन् असल्यावर अनुगच्छन् कशाला?

**न तत् ते अग्ने प्रमृष्यते निवर्तनं**

प्रमृषे = प्रमृष्यते = प्रमृज्यते = लुप्यते.

**दूरे यत् सन् इह भवसि जायमानः**

यत् दूरे सन् = दूरे यत् सन् = पदांचा क्रम कां बदलला तें समजत नाहीं. अभवः = भवसि. जायमानः (अध्याहृत). यास्ककृत अर्थः—लाकडांची इच्छा करणारा तूं जेव्हां मातृभूत जलदेवतांकडे विझून गेलास व जन्मून दूर असतांना येथें आलास तेव्हां तुझा परत येण्याचा मार्ग लुप्त होत नाहीं. विजेच्या रूपानें अंतरिक्षांतील मेघांतून अग्नि पृथिवीकडे येतो तेव्हां प्रकाशाची ओळ लांबवर पसरलेली दिसते. सायणाचार्यकृत अर्थः—अरण्यांची इच्छा असूनही तूं मातृभूत जलदेवतांकडे जातोस व त्यांत प्रविष्ट होऊन दिसेनासा होतोस. हें तुझें नाहींसें होणें आम्हांस सहन होत नाहीं. तेथें नष्ट होऊन अरणींतून तूं क्षणांत बाहेर येतोस हें आम्हांस रुचत नाहीं. प्रमृषे हें क्रियापद नसून कर्तुं, गन्तुं सारखें तुमन्तार्थी आहे. प्रमृषे सोढुं न भवति न शक्यते = सहन होत नाहीं. वना = वनानि = पाणी. कायमानो वना = तृषार्त होऊन यन्मातॄ० = जेव्हां तूं जलमातांकडे गेलास म्हणजे मेघांत लुप्त झालास. न तत्ते० इहाभवः = दूर असून एका क्षणांत तूं एथें आलास हें तुझें परतणें विसरण्याजोगें नाहीं, असा खरा अर्थ दिसतो.

**लोधं नयन्ति पशु मन्यमानाः (ऋ० सं० ३।५३।२३)**

**लुब्धम् ऋषिं नयन्ति पशुं मन्यमानाः**

लोधं (निघंटु ४।११) = लुब्धम्. ऋषिं (अध्याहृत). पशु = पशुम्. यस्मिन्निगमे एष शब्दः सा वसिष्ठद्वेषिणी ऋक् । अहं च कापिष्ठलो वासिष्ठः । अतस्तां न निर्ब्रवीमि = ज्या ऋचेंत हा लोध-शब्द आला आहे तींत वसिष्ठाबद्दल द्वेष दर्शविला आहे. मी कापिष्ठल वसिष्ठ आहें. म्हणून त्या ऋचेचें विवरण मी करीत नाहीं असें दुर्ग म्हणतो. न सायकस्य चिकिते जनासो लोधं नयन्ति पशु मन्यमानाः । नावाजिनं वाजिना हासयन्ति न गर्दभं पुरो अश्वान्नयन्ति (ऋ० सं० ३।५३।२३) = पुरा खलु तमसः क्षयो मा प्रापदिति शापात् निवृत्तं मौनिनं विश्वामित्रं वसिष्ठपुरुषा बद्ध्वा आनीतवन्तः । तान् प्रति विश्वामित्रो ब्रूते । हे जनासः जनाः सायकस्य अवसानकारिणः विश्वामित्रस्य मन्त्रगणसामर्थ्यं न चिकिते भवद्भिर्न ज्ञायते । अत एव लोधं लुब्धं तपसः क्षयो मा भूदिति लोभेन तूष्णीं स्थितम् ऋषिं पशु मन्यमानाः पशुवत् मन्यमानाः एते नयन्ति । बद्ध्वा स्वकीयं देशं प्रापयन्ति । एवं स्वसामर्थ्यं प्रदर्श्य विसदृशो वसिष्ठो मया सह स्पर्धितुं नार्हति इति धिक्करोति । वाचाम् इनः वाजिनः सर्वज्ञः । अवाजिनं तद्विलक्षणं मूर्खजनं वाजिनः वागीशाः न हासयन्ति हास्यास्पदं न

कुर्वन्ति । तेन सह न स्पर्धन्ते इत्यर्थः । तथा गर्दभं रासभम् अश्वात् पुरः पुरस्तात् न नयन्ति । एवमेव विसदृशो वसिष्ठो न मया सह स्पर्धितुम् ईष्टे इत्यर्थः = शापाचा क्षय होऊं नये म्हणून शाप न देण्याचा निश्चय करून मौन धारण करून विश्वामित्र बसला असतांना वसिष्ठाचे लोक त्याला बांधून घेऊन आले. तेव्हां तो त्या लोकांस म्हणतोः— हे लोकहो, सायक म्हणजे शेवट करणारा— गप बसणारा— जो मी त्या माझ्या मंत्रसिद्धीचें सामर्थ्य तुम्हांस माहित नाहीं. तपाचा क्षय होऊं नये म्हणून गप बसलेल्या मला पशूच आहे असें समजून तुम्ही आपल्या देशास नेत आहांत. अशा रीतीनें आपलें सामर्थ्य दाखवून तो म्हणतो, वसिष्ठाची माझ्याशीं स्पर्धा करण्याची ताकद काय ? वाचेचे इन ईश ते वाजिन. अवाजी म्हणजे मूर्ख, अपंडित. वागीश मूर्खाशीं स्पर्धा करून त्याला फजीत करीत नाहींत. गाढवाला घोड्यापुढें कोणी नेत नाहींत. माझ्याशीं स्पर्धा करण्याची वसिष्ठाची योग्यताच नाहीं. असा अर्थ सायणाचार्य करतात. विश्वामित्र वसिष्ठाची गाढवाशीं तुलना करतो म्हणूनच दुर्ग रागावतो व ह्या ऋचेचा अर्थ मी देत नाहीं असें म्हणतो. सायणाचार्यांनीं केलेला अर्थ वसिष्ठ-विश्वामित्रांच्या संबंधीं एक कथा आधारभूत घेऊन केला आहे. ही कथा पौराणिक आहे. वसिष्ठ व विश्वामित्र ह्यांचा मैत्रीचा किंवा शत्रुत्वाचा संबंध— कसलाही संबंध— ऋग्वेदांत कोठेंही आला नाहीं. विश्वामित्र हा ऋषि होता. तो राजा असल्याची ऋग्वेदांत वार्ताही नाहीं. प्रस्तुत ऋचा ज्या सूक्तांत आहे. त्यांत विश्वामित्राचें नांव चार वेळां आलें आहे. तेवढ्यावरून प्रस्तुत ऋचा विश्वामित्रासंबंधीं आहे असें कसें म्हणतां येईल ? ‘ विश्वामित्रा अरासत ब्रह्मेंद्राय वज्रिणे ’ असें १३ व्या ऋचेंत आलें आहे. त्यानंतर १४ पासून २४ पर्यंत विश्वामित्राचें नांवही नाहीं. ह्यांपैकीं कांहीं ऋचांत रथाची प्रार्थना केली आहे. २१ त इंद्राला प्रार्थना केली आहे. २२ त इंद्रमाहात्म्य गाइलें आहे. तेव्हां २३ त एकदम वसिष्ठ–विश्वामित्रसंबंध कसा यावा ? लोध हा शब्द फक्त ह्याच ऋचेंत आला आहे. त्याचा अर्थ लुब्ध असा करून तो विश्वामित्राला उद्देशून आहे असें मानण्यास कांहीं आधार नाहीं. हासयन्ति म्हणजे हास्यास्पद करतात हा अर्थ अगदीं चुकीचा आहे. हास् स्पर्धा करणें हा तीनचार वेळां ऋग्वेदांत आला आहे. एष सूर्येण हासते पवमानो अधि द्यवि ( ९।२७।५ ) = सोम द्युलोकीं सूर्याशीं स्पर्धा करीत आहे. सायक शब्द ऋग्वेदांत ८ वेळां आला आहे. ५ ठिकाणीं सायक व वज्र ह्यांची सांगड आहे म्हणजे सायक ह्याचा अर्थ वज्र होय. ‘ अर्हन् बिभर्षि सायकानि धन्वन् ( २।१३।१० ) = हे रुद्रा, धनुष्यावर तूं बाण ठेवतोस ’ येथें सायकानि म्हणजे बाण असावेत. प्रस्तुत ऋचेचा अर्थः— न सायकस्य चिकिते = सायकाचें माहित नाहीं. सायकस्य म्हणजे वज्राचें असा अर्थ केल्यास वज्राचें काय ? ‘ बलं ’ अध्याहृत घेऊं. वज्राचें बल माहित नाहीं. जनासः लोधं नयन्ति पशु मन्यमानाः = लोध हा पशु आहे असें समजून त्याला लोक घेऊन जात आहेत. नावाजिनं वाजिना हासयन्ति = अवाजी म्हणजे शूर नव्हे असा;

त्याला शूराशीं स्पर्धा करावयास लावीत नाहींत. न गर्दभं पुरो अश्वान्नयन्ति = गाढवाला घोड्याच्या पुढें नेत नाहींत. लोक भलतेंच करीत आहेत. त्याला वज्र किंवा बाण ह्याचा महिमा नाहींसा वाटतो. वेडेपणा दाखविण्याकरितां दोन दृष्टान्त दिले आहेत असा सारांश असेल. ऋचा मागच्यापुढच्याशीं असंबद्ध असल्याकारणानें खरा अर्थ कळणें अशक्य आहे.

**शीरं पावकशोचिषम् पावकदीप्तिम् । अनुशायिनम् इति वा । आशिनम् इति वा**

पावकशोचिषं = पावकदीप्तिम् = ज्याच्या ज्वाला पावन करतात असा. शोचिः शुच् जळणें ह्यापासून झाला असून शोचिः शोचिषी शोचींषि असा चालतो. शीरं = अनुशायिनम्. अनुप्रविश्य सर्वभूतानि शेते ( दुर्ग ) = सर्व प्राणिमात्रांत शिरून तेथेंच निजतो किंवा असतो तो. शीरं = आशिनम्. अश्नोति व्याप्नोति सर्वभूतानि (दुर्ग) = जो प्राणिमात्रांस व्यापतो तो. पहिल्या व्युत्पत्तींत शी (निजणें) ह्याला नामकरण 'र' प्रत्यय लागतो. शी + रः = शीरः. दुसऱ्यांत अश् व्यापणें हा धातु. अश् + इन = आशिन. शीरशोचिषं हें अग्नि ह्याचें विशेषण दोनदां ( ८।७१।१० व १४ ) आलें आहे. शीराणि शोचींषि यस्य तम् = ज्याच्या ज्वाला शीर म्हणजे तेजस्वी किंवा लालभडक किंवा दाहक आहेत असा कांहीं अर्थ असला पाहिजे. किंवा शॄ फोडणें ह्यापासून शीर शब्द झाला असेल. जो ज्वालांनीं पाहिजे तें फोडतो तो शीर. हा शब्द शीरं असा चारदां व शीरशोचिषं असा दोनदां आला आहे. ह्याची व्युत्पत्ति व अर्थ दोन्ही ठरवितां येत नाहींत. शीरशोचिषं व पावकशोचिषं ह्यांचा अर्थ एकच असल्यास शीर = पावक. अग्नीला पावक पुष्कळ ऋचांत म्हटलें आहे. 'शीरं पावकशोचिषं' हे चार ऋचांत आले आहेत. त्यांपैकीं यास्काच्या मनांत कोणती ऋचा होती हें सांगतां येत नाहीं.

## खंड १५ वा.

**कनीनकेव विद्रधे नवे द्रुपदे अर्भके ।**
**वभ्रू यामेषु शोभेते ( ऋ० संहिता ४।३२।२३ )**
**कनीनके कन्यके**

कनीनके = कन्यके = दोन चिमुकल्या बाहुल्या. इवे प्रतिकृतौ (पा. ५।३।९६) अमक्यासारखी प्रतिकृति अशा अर्थीं ज्याची प्रतिकृति, त्या शब्दाला कन् प्रत्यय लावतात. बाहुली ही कन्येची प्रतिकृति. तेव्हां कन्या शब्दाला कन् प्रत्यय लाऊन कन्यका हा शब्द झाला आहे. ऋग्वेदांत कनीन म्हणजे लहान, कनी म्हणजे लहान मुलगी. कन असा ऋग्वेदाच्या आधीं लहान ह्या अर्थीं एखादा शब्द असावा. त्यालाच ईयस् व इष्ठ हे प्रत्यय लावून कनीयस् व कनिष्ठ हे शब्द झाले आहेत. कनीन ह्याला अल्पार्थीं का प्रत्यय लाऊन लहानशी कन्या, लहानशी बाहुली ह्या अर्थीं कनी-

नका शब्द बनला आहे. ऋग्वेदांत कनी व कन्या हे एकाच अर्थी शब्द आहेत.

**कन्या कमनीया भवति । क इयं नेतव्या इति वा । कमनेन आनीयते इति वा । कनतेः वा स्यात् कान्तिकर्मणः**

कन्या = क + नी + आ = कम + नी + या = कमनीया. कन्या शब्द कम् प्रेम करणें ह्यापासून झाला आहे. क = क, न्या = नी + आ = नेतव्या किंवा नेया. हिला कुठें नेऊन टाकावी? ही कशाला जन्माला आली? पूर्वकालीं मुलींच्याबद्दल फार अनादर होत असे व पुष्कळ वेळां लोक मुलींना ठार मारीत असत. क = कमनेन = प्रेमानें. न्या = आनीयते. माहेरीं प्रेमानें ती आणिली जाते. कमनेन आनीयते इति वा' हें वाक्य जरी दुर्गवृत्तींत आहे तरी दुर्गानें त्याचें विवरण केलें नाहीं, ह्यावरून तें दुर्गवृत्तींत प्रक्षिप्त होय. शिवाय गुर्जरपाठांत तें नाहीं. कमनीया भवति व कमनेन आनीयते ह्यांमध्यें कोणताहि अर्थभेद नाहीं. शोभणें ह्या अर्थी जो कन् धातु त्यापासून कदाचित् कन्या शब्द झाला असेल. ह्या सगळ्या व्युत्पत्ति चुकल्या आहेत. कन किंवा कना म्हणजे लहान हा मूळ शब्द आहे. त्याच्यापासूनच कनी, कनीन, कन्या हे शब्द झाले आहेत. कन्या शब्दाप्रमाणें कनीनका ह्या शब्दाचीही व्युत्पत्ति यास्कानें द्यावयास पाहिजे होती. कनीनिका म्हणजे डोळ्यांतील बाहुली हाही शब्द कनीनक याचें स्त्रीलिंग होय. कनीनक म्हणजे लहान पुरुष. हा शब्द कनीन ह्याला 'क' लावून झाला आहे. तथापि 'कन दीप्तौ' (अमर. २।६।९२) असें क्षीरस्वामी म्हणतो. क्षीरस्वामी कन्या शब्दाचीही तीच व्युत्पत्ति देतो. कन्यायाः कनीन च (पा. ४।१।११६). कन्या शब्दाला कनीन हा आदेश होतो. परंतु वास्तविक पाहतां कन्या हा कन ह्याला या लावून झालेला शब्द होय.

**कन्ययोः अधिष्ठानप्रवचनानि सप्तम्याः एकवचनानि इति शाकपूणिः**

विद्रधे, नवे, द्रुपदे, अर्भके हे चार शब्द सप्तमीचें एकवचन असून कन्या म्हणजे बाहुल्या त्यांचें उभें राहण्याचें जें ठिकाण (अधिष्ठान) त्याचे वाचक म्हणजे वर्णनपर विशेषणें होत असें आचार्य शाकपूणि म्हणतो.

**विद्धयोः दारुपाद्वोः**

विद्धयोः दारुपाद्वोः कन्ययोः प्रवचनानि. परंतु यास्काच्या मतें हे चारी शब्द कनीनके ह्याचीं विशेषणें होत. विद्रधे = विद्धे = ज्यांचा अधोभाग पोखरलेला आहे. बाहुल्यांचा खालचा भाग पोकळ असल्याकारणानें त्यांना लाकडाच्या बैठकीवर सहज उभें करतां येतें. द्रुपदे = दारुपाद्वौ. द्रु = दारु, इंग्लिश ड्रुइड् शब्दामध्यें द्रु आहे. द्रु म्हणजे ओक वृक्ष. लाकडांचे पाय आहेत ज्यांना अशा बाहुल्या दारुपाद्वौ. दारुपाद्: दारुपाद्वौ दारुपाद्वः असा हा शब्द चालतो. त्याचें षष्ठीचें द्विवचन दारुपाद्वोः

**दारु दृणातेः वा द्रूणातेः वा । तस्मादेव द्रु**

दृ किंवा द्रू फोडणें ह्यांपासून दारु शब्द झाला आहे. द्रु झाड हा शब्दही ह्याच धातूंपासून झाला आहे.

**नवे नवजाते । अर्भके अवृद्धे**

नवे = नवजाते = नुकत्याच जन्माला आलेल्या. अर्भके म्हणजे न वाढलेल्या. अर्भ किंवा अर्भक म्हणजे लहान.

**ते यथा तदधिष्ठानेषु शोभेते एवं बभ्रू यामेषु शोभेते । बभ्रवोः अश्वयोः संस्तवः**

त्या बाहुल्या जशा आपल्या बैठकीवर शोभतात तशा ह्या सोनेरी रंगाच्या घोड्या यामांमध्यें शोभतात. यामेषु आजिस्थानेषु यमनस्थानेषु वा बन्धनस्थानेषु मन्दुराख्येषु (दुर्ग). याम म्हणजे शर्यतीची जागा किंवा घोडयांना जेथें बांधतात तो तबेला. परंतु याम याचा नेहमींचा अर्थ धांवणें, त्वरेनें जाणें असा आहे. बभ्रू म्हणजे सोनेरी रंगाच्या इंद्राच्या ज्या घोडया त्यांची ह्या ऋचेंत स्तुति किंवा वर्णन आहे.

विद्रधे हा शब्द कसा झाला हें सांगतां येत नाहीं. विद्रधा हा मूळ शब्द; विद्रं धत्ते असौ विद्रधाः. विद् देणें ह्याला नामकारक र प्रत्यय लागून विद्र म्हणजे धन हा शब्द झाला असेल. जी धन देते ती विद्रधा. हा स्त्रीलिंगी शब्द असल्याकारणानें ह्याचें प्रथमेचें द्विवचन विद्रधे. अशी कदाचित् ह्या शब्दाची व्युत्पत्ति असेल. परंतु बाहुल्या धन देणाऱ्या कशा असतील? विद्रधे हें बभ्रू ह्यांचें विशेषण शोभेल. "प्र ते बभ्रू विचक्षण शंसामि गोषणो नपात् । माभ्यां गा अनु शिश्रथः", ह्या बावीसाव्या ऋचेंत घोडयांची स्तुति असून त्यांच्याकडून मला गाई दे असें म्हटलें आहे. तेव्हां विद्रधे हें बभ्रू ह्याचें विशेषण होईल. नवे ह्या शब्दानें बाहुल्या अगदीं नव्या ताज्या, करकरीत, असें दर्शविलें आहे. अर्भके म्हणजे चिमुकल्या, द्रुपदे ज्यांचे पाय लांकडी आहेत अशा. विद्रधेखेरीज बाकीचे तीन शब्द कनीनके ह्याचीं विशेषणें असावींत. शंका फक्त विद्रधे शब्दाबद्दल आहे. ऋचेचा शाकपूणीनें केलेला अर्थः—भोंक पाडलेल्या नव्या करकरीत व लहानशा लांकडी बैठकीवर जशा दोन बाहुल्या शोभतात त्याप्रमाणें ........ वगैरे.

**इदं च मे अदात् इदं च मे अदात् इति ऋषिः प्रसंख्याय आह । सुवास्त्वा अधि तुग्वनि । सुवास्तुः नदी । तुग्व तीर्थं भवति**

राजानें मला हें दिलें. मला तें दिलें असें ऋषी गणना करीत पुढील ऋचेंत सांगतो. सुवास्तु नांवाची नदी आहे. तुग्व म्हणजे तीर्थ; म्हणजे नदी पार जाण्याची वाट, उतार. तुग्व शब्द कसा झाला? तूर्णम् एतत् आयन्ति. तु = तूर्णम्. ग्वं = गच्छन्ति. इकडे नदी पार जाण्याकरतां लोक त्वरेनें येतात. म्हणून ह्याला तुग्व म्हणतात. म्हणजे तुग्व शब्द तृ तरणें व गम् जाणें ह्यांपासून झाला आहे. अदान्मे पौरुकुत्स्यः पञ्चाशतं त्रसदस्युर्वधूनाम् । मंहिष्ठो अर्यः सत्पतिः । ( ऋ० सं० ८।१९।३६)॥ उत मे प्रयियोर्वयियोः सुवास्त्वा अधि तुग्वनि । तिसृणां सप्ततीनां श्यावः प्रणेता भवद्वसुर्दियानां पतिः (८।१९।३७)॥ पुरुकुत्साचा मुलगा त्रसदस्यु पूज्य, उत्तम धनी, सत्ताधीश हा मला पन्नास बायका देता झाला. आणखी सुवास्तु नदीच्या तीरावर तो मला दोनशें दहा गाई देता झाला. ३७ व्या ऋचेंतील बहुतेक शब्द

कठीण आहेत. त्यांचा अर्थ लागत नाहीं, हेंच बरोबर होईल. प्रयियोः व वयियोः हीं मे शब्दाचीं विशेषणें किंवा सुवास्त्वाः ह्याचीं विशेषणें हें ठरवितां येत नाहीं. सुवास्तु ही नदी कशावरून व तुग्व म्हणजे तीर्थ कशावरून?

**कुविन्नं सन्ते मरुतः पुनर्नः ( ऋ० सं. ७।५८।१ ) पुनर्नो नमन्ते मरुतः**

नंसन्ते = नमन्ते. गुर्जरपाठांत नमन्ते नसून नवन्ते असें आहे. नंसन्ते ह्याचा अर्थ 'देतात' असा असला पाहिजे. मरुत् हे आम्हांला पुनः पुनः पुष्कळ धन देतात. नम् ह्याचा अर्थ कदाचित् देणें असा असेल. नम् + स = नंस्. नंस् + अन्ते = नंसन्ते.

**नंसन्ते इति उपरिष्टात् व्याख्यास्यामः ( निरुक्त ७।१७ )**

**ये ते मदा आहनसो विहायसस्तेभिरिंद्रं चोदय दातवे मघम् ( ऋ० संहिता ९।७५।५ )**

**ये ते मदाः आहननवन्तः वञ्चनवन्तः तैः इन्द्रं चोदय दानाय मघम्**

आहनसः ( २३ ) = आहननवन्तः. आहनसः = आहन + सः आहन = आहनन. सः = वन्तः आहननवन्तः पटवः वञ्चनवत्वेन संमोहयितारः ( दुर्ग ). आहननवन्तः म्हणजे हुषार, कपटानें मोह घालणारे; आहनसः ह्याचा खरोखर अर्थ प्रिय आहे. यास्क व दुर्ग व्युत्पत्तीनें त्याचा अर्थ जिकडून तिकडून मारणारे, कपटानें मोहून टाकणारे असा करतात. परंतु ऋग्वेदांत जेथें जेथें आहनस् शब्द आला आहे त्या सर्व ऋचा लक्षांत घेतां आहनस् म्हणजे प्रिय हाच अर्थ खरा आहे. दुर्ग वञ्चनवन्तः हा शब्द आहननवन्तः ह्याचा पर्याय आहे असें समजतो, व विहायसः ह्याचा अर्थ महान्तः असा देतो. परंतु वञ्चनवन्तः हा विहायसः ह्याचा अर्थ असावा. तसा नसेल तर यास्कानें विहायसः हा शब्द निरर्थक म्हणून टाकला आहे असें म्हणावें लागेल. विहायसः = वञ्चनवन्तः = कपटानें फसविणारे. विहायसः = विहाय + सः. विहाय = वञ्चन. सः = वन्तः. महाराष्ट्रपाठांत वञ्चनवन्तः ह्याच्याऐवजीं वचनवन्तः असें आहे. दुर्गाच्या प्रतींत वञ्चनवन्तः ह्याच्यानंतर महान्तः असा शब्द होता कीं काय? आहननवन्तः = हत्यारबंद, हत्यारांनीं मारणारे, ताब्यांत घेणारे. असा कदाचित् यास्काच्या मनांतील अर्थ असेल. दातवे = दानाय. ऋगर्थाचा अर्थः—हे सोमा, तुझे जे मद, प्रिय व दांडगे आहेत त्यांनीं इंद्राला आम्हांला धन देण्यासाठीं प्रेरणा कर.

## खंड १६ वा.

**उपो अदर्शि शुन्ध्युवो न वक्षो नोधा इवाविरकृत प्रियाणि ।**

**अद्मसन्न ससतो बोधयन्ती शश्वत्तमागात् पुनरेयुषीणाम् (ऋ० सं० १।१२४।४)**

**उपादर्शि । शुन्ध्युवः । शुन्ध्युः आदित्यः भवति शोधनात् ।**

उपो = उप + उ; उ हा निपात असल्यामुळें भाष्यांत तो गाळला आहे. उप + अदर्शि = दिसली आहे. उपश्लिष्टा दृश्यते (दुर्ग) वेढलेली दिसते. शुन्ध्यु

म्हणजे आदित्य. आदित्याला शुन्ध्यु म्हणण्याचें कारण तो सर्व वस्तु शुद्ध करतो. शुध् शौचे (धातुपाठ ४।८५) ह्या धातूपासून शुन्ध्यु शब्द झाला आहे.

**तस्यैव वक्षः भासः । अध्यूढम्**

तस्यैव = तस्य + एव. मूळ शब्द इव असावा. एव हें चुकीनें पडलें असावें. कारण, न = इव. दुर्गही इव असेंच म्हणतो. वक्षः = भासः. त्याचें वक्षःस्थळ म्हणजे त्याचा उजेड. गुर्जरप्रतींत भासा असा पाठ आहे. परंतु तो चुकीचा आहे. भासा अध्यूढम् हें वक्षः याचें विशेषण होईल व त्याचा अर्थ ज्याच्यावर प्रकाश चढला आहे असा होईल. परंतु अध्यूढम् ही वक्षः ह्याची व्युत्पत्ति आहे. भासः ह्याला वक्षस् म्हणण्याचें कारण प्रकाश सूर्यमंडलावर चढलेला असतो. म्हणजे वक्षस् शब्द वह् ह्यापासून झाला आहे. अध्यूढं = वर चढलेला. वक्षस्थल हें शरीरावर चढलेलें असतें. प्रकाशाची रास सूर्यमंडलावर जशी छातीप्रमाणें उभारलेली असते त्याप्रमाणें उषा ही त्याच मंडलावर चिकटलेली दिसते असा दुर्ग अर्थ करतो. ऋग्वेदांत शुन्ध्यु म्हणजे तरुण आणि शुन्ध्यू म्हणजे तरुणी. शुन्ध्यु शब्द शुन्ध्युः शुन्ध्यू शुन्ध्यवः; शुन्ध्युम्.... असा चालतो; व शुन्ध्यू हा शुन्ध्यूः शुन्ध्युवौ शुन्ध्युवः, शुन्ध्युवम् असा चालतो. बृहस्पतीला (७।९७।७) शुन्ध्युः, इन्द्राला (८।२४।२४) शुन्ध्युः आणि शुन्ध्युम् (१०।४३।१), मरुतांना शुन्ध्यवः (५।५२।९) असें म्हटलें आहे. उषेला शुन्ध्यूः (१०।१३८।५), मतीला शुन्ध्युवं (७।८८।१), सूर्याच्या घोड्यांना शुन्ध्युवः (१।५०।९) व अश्विनांनीं विमदाला जी स्त्री (योषणाम्) आणून दिली तिला शुन्ध्युवं असें म्हटलें आहे. प्रस्तुत ऋचेंत शुन्ध्युवः म्हणजे तरुणीचें असा अर्थ आहे. यास्कानें ह्या शब्दाचे आदित्य वगैरे जे अर्थ दिले आहेत त्यांना आधार कांहींएक नाहीं. तरुणीच्या (शुन्ध्युवः) वक्षस्थलाप्रमाणें (वक्षो न) उषेचें वक्षस्थल दिसूं लागलें आहे. अपोर्णुते वक्षः (१।९२।४) आविर्वक्षः कृणुषे (६।६४।२) आविर्वक्षांसि कृणुते विभाती (१।१२३।१०) ह्या तिन्हीं ठिकाणीं उषा आपलें वक्षःस्थल प्रकट करते असा अर्थ आहे.

**इदमपि इतरत् वक्षः एतस्मात् एव । अध्यूढं काये**

लौकिक जो वक्षस् शब्द तो ह्याच धातूपासून (वह्) झाला आहे. त्या भागाला वक्षस् म्हणण्याचें कारण तो शरीरावर पुढें आलेला दिसतो. ह्या रीतीनें निरुक्तकार वैदिक व लौकिक शब्दांच्या व्युत्पत्तीमध्यें भेद दाखवितात. देवदेवतांना वक्षस्थल वगैरेंची कांहीं जरूरी नाहीं. ह्यांच्या ठिकाणीं वक्षस् म्हणजे प्रकाशच.

**शकुनिः अपि शुन्ध्युः उच्यते । शोधनादेव । उदकचरो भवति**

मद्गु (हंस) नांवाच्या पक्ष्याला शुन्ध्यु म्हणतात, त्याचें कारण तो नेहमीं पाण्यांत असतो व त्यामुळें त्याचें अंग नेहमीं स्वच्छ असतें. अमरामध्यें शुन्ध्यु शब्द नाहीं.

**आपः अपि शुन्ध्यवः उच्यन्ते शोधनादेव**

पाणी शुद्ध करतें म्हणून पाण्याला शुन्ध्यवः असें म्हणतात. शुन्ध्यवः ह्याच्या-

बद्दल शुन्ध्युवः असें पाहिजे. कारण आपः स्त्रीलिंगी आहे.

**नोधाः ऋषिर्भवति । नवनं दधाति**

नोधाः = नो + धाः. नो = नवनम् = स्तुति. ‘ नु ’ धातुला गुण होऊन नो झाला आहे. धाः = दधाति = करतो. जो स्तुति देतो–करतो तो नोधाः.

**स यथा स्तुत्या कामान् आविष्कुरुते एवम् उषाः रूपाणि आविष्कुरुते**

तो जसा स्तुति करून आपल्या इच्छा प्रकट करतो त्याप्रमाणें उषा आपलीं रूपें प्रकट करते. एथें नोधाः हें ऋषीचें नांव नसून इंद्राचें आहे. सद्यो भुवद्वीर्याय नोधाः ( १।६१।१४ ); सुनीथाय नः शवसा न नोधाः० जगम्यात् ( १।६२।१३ ) ह्या दोन ऋचांत इंद्राला नोधाः म्हटलें आहे. इंद्राप्रमाणें उषा प्रिय वस्तु प्रकट करते.

**अप्नसत् । अप्न अन्नं भवति । अप्नसादिनी इति वा । अप्नसानिनी इति वा**

अप्न म्हणजे अन्न. अन्न तयार करावयाला जी बसते ती अप्नसादिनी किंवा जी अन्न देते म्हणजे वाढते ती अप्नसानिनी. म्हणजे अप्नसत् ह्यांतील सत् हें सद् बसणें किंवा देणें ह्याचें रूप असेल. अप्न शब्द ( १।५८।२ ) एथें काय तो आला आहे; तेथें त्याचा निश्चित अर्थ काय तें सांगतां येत नाहीं. अद्यते अस्मिन् तत् अप्न गृहम् अशी व्युत्पत्ति व अर्थ असेल. पहारा करण्याकरतां जो घरांत जागत बसतो तो अप्नसत्. धीरो ह्यस्यप्नसद्विप्रो न जागृविः ( ८।४४।२९ ) = हे अग्ने, अप्नसत् विप्रः इव जागृविः असि = हे अग्नि, राखण करणाऱ्या शहाण्या माणसाप्रमाणें तूं नेहमीं जागत राहतोस. सूनो अस्यप्नसद्वा ( ६।४।४ ) = हे सहसः सूनो अग्ने त्वं अप्नसद्वा असि. हे अग्नि तूं घराचा राखण करणारा आहेस. निपर्वता अप्नसदो न सेदुः ( ६।३०।३ ) = पहारेकऱ्याप्रमाणें पर्वत उभे आहेत.

**ससतो बोधयन्ती शश्वत्तमागात् पुनरेयुषीणाम् । स्वपतः बोधयन्ती शाश्वतिकतमा आगात् पुनरागामिनीनाम्**

ससतः = स्वपतः. शश्वत्तमा = शाश्वतिकतमा. शश्वत् हा शब्द ऋग्वेदांत नाम व अव्यय अशा दोन्ही तऱ्हेचा आहे. नाम शश्वन् शश्वन्तौ शश्वन्तः । शश्वन्तम् शश्वन्तौ शश्वतः असा पुल्लिंगीं व शश्वती शश्वत्यौ शश्वत्यः असा स्त्रीलिंगीं चालतो. नाम असतांना त्याचा अर्थ पुरुषव्यक्ति किंवा स्त्रीव्यक्ति असा होतो व एकदोन वेळां शत्रु असाहि त्याचा अर्थ होतो. जेव्हां तो शब्द अव्यय असतो तेव्हां त्याचा अर्थ ‘ नेहमीं ’ असा होतो. शश्वत्तमा ह्याचा अर्थ सर्व स्त्रीव्यक्तींत उत्तम असा आहे. शश्वती हा शब्द उषांना दोन तीन वेळां लावला आहे. परायतीनामन्वेति पाथ आयतीनां प्रथमा शश्वतीनाम् ( १।११३।८ ) उषा गेलेल्या उषांच्या मार्गानें जाते व येणाऱ्या उषांच्यामध्यें ती पहिली होय. ईयुषीणामुपमा शश्वतीनां विभातीनां प्रथमोषा व्यश्वैत ( १।११३।१५ ) येऊन गेलेल्या व प्रकाशणाऱ्या उषांमध्यें श्रेष्ठ व पहिली अशी ही उषा प्रकाशूं लागली आहे. व्युष्टिषु० शश्वतीनाम् ( १।१७१।५ ) उषांच्या उदयकालीं. शश्वती म्हणजे स्त्री व ह्या तीन ऋचांत ती स्त्री किंवा त्या स्त्रिया म्हणजे

उषा. शश्वत्तमा = शश्वतीनाम् उपमा अथवा प्रथमा. ईयुषीणां शश्वत्तमा असा अन्वय आहे. ईयुषीणां शश्वत्तमा = ईयुषीणां गतवतीनां शश्वतीनाम् उषोव्यक्तीनाम् इयम् उषाः शश्वत्तमा उत्तमा शश्वती नारी = होऊन गेलेल्या उषांमध्यें ही उत्तम उषा होय. शाश्वतिकतमा हा अर्थ चुकलेला दिसतो. अर्वाचीन संस्कृतांत शश्वत् हें अव्यय असल्यामुळें यास्कानें शश्वत् म्हणजे शाश्वतिक असें त्या शब्दाचें विशेषण बनविलें आहे. पुनरेयुषीणाम् = पुनरागामिनीनाम्. एयुषीणाम् = आ + ईयुषीणाम्. आ + ईयुषी ह्याचा अर्थ आलेली असा होईल. येणारी असा कसा होईल ? वर दिलेल्या ( १।११३।१५ ) ह्या ऋचेंत ईयुषीणाम् ह्याचा जो अर्थ केला आहे तोच प्रस्तुत ऋचेंत आहे. आ हा उपसर्ग ईयुषीणाम् इकडे न घेतां आगात् इकडेच घेणें योग्य आहे. पुनर् शब्दाला फारसा अर्थ नाहीं. पुनरागात् = पुनः आली. सर्वांत उत्तम जी उषा ती पुनः आली. असें कवि स्तुतीच्या भरांत म्हणतो. ऋचेचा अर्थः— एखाद्या सुंदर तरुणीच्या वक्षस्थलाप्रमाणें उषेचें वक्षःस्थल दिसूं लागलें आहे. इंद्राप्रमाणें तीही प्रियवस्तु प्रकट करीत आहे किंवा देत आहे. पहारेवाल्याप्रमाणें झोपीं गेलेल्या लोकांना उठवणारी व येऊन गेलेल्या उषांमध्यें उत्तम अशी ही उषा पुनः आली आहे.

**ते वाशीमन्त इष्मिणः। ईषणिनः इति वा। एषणिनः इति वा। ऋषणिनः इति वा।**

इष्मिणः = ईषणिनः. ईष् = ईषणम् = जाणें. इष्मिणः = जाणारे; किंवा, इष्मिणः = एषणिनः. ईष् = एषणम् = इच्छा. इष्मिणः = इच्छा करणारे; किंवा, इष्मिणः = एषणिनः. ईष् = एषणम् = इच्छा. इष्मिणः = इच्छा करणारे; किंवा, इष्मिणः = ऋषणिनः. ईष् = ऋषणम् = बघणें. इष्मिणः = पाहणारे. खंड ७ ह्यांत इषिर शब्दाची अशीच व्युत्पत्ति केली आहे. इष्मिणः हें मरुतांना तीनदां व इष्मिणम् हें रुद्राला एकदां लाविलें आहे. इष्मिणः हा शब्द शुष्मिणः ह्यासारखा कानाला लागतो. शुष्मिन् हा शब्द शुष्म म्हणजे बल ह्याला इन् लाऊन झाला आहे. परंतु इष्मिन् हा इष्मपासून झाला आहे असें म्हणण्याला कांहीं आधार नाहीं. कारण, इष्म शब्द ऋग्वेदांत नाहीं. इष्मिन् शब्द इषिर शब्दाप्रमाणें इष् म्हणजे धन ह्यापासून झाला असेल. किंवा इष्मिणः हें इषुमन्तः ह्याचेंच रूपांतर असेल.

**वाशी इति वाङ्नाम ( निघण्टु १।११ ) वाश्यते इति सत्याः**

जेव्हां वाचा शब्द करते, बोलते तेव्हां तिला वाशी असें नांव मिळतें.

वाशीभिः अश्मन्मयीभिः (१०।१०१।१०) व वाशीम् आयसीम् (८।२९।३) ह्या दोन ऋचांवरून वाशी हें एक दगडाचें किंवा लोखंडाचें हत्यार असावें. तें हत्यार कदाचित् 'घण' असेल. श्रियसे कं भानुभिः सं मिमिक्षिरे ते रश्मिभिस्त ऋक्कभिः सुखादयः। ते वाशीमन्त इष्मिणो अभीरवः (१।८७।६) शोभेकरतां अलंकार घालणारे (सुखादयः) मरुत् तेजाशीं (भानुभिः = रश्मिभिः = ऋक्कभिः) एकजीव झाले आहेत (संमिमिक्षिरे). ते भेकड नसून ( अभीरवः ) म्हणजे ते धीट असल्यामुळें त्यांच्या हातांत वाशी व

इष् आहे. ह्या अर्थावरून वाशी म्हणजे घणासारखें आयुध व इष् म्हणजे इष् (बाण) असे ह्या शब्दांचे अर्थ असतील. वाशी म्हणजे वाणी हा अर्थ ऋग्वेदांत नाहीं. अग्नीच्या संबंधानें जेव्हां वाशी शब्द येतो तेव्हां त्याचा अर्थ धन असा असावा.

**शंसावाध्वर्यो प्रति मे गृणीहीन्द्राय वाहः कृणवाव जुष्टम्** (ऋ० सं० ३।५३।३)

ह्या ऋगर्धाचा अर्थ यास्कानें दिला नाहीं. कारण, त्यांतील शब्द स्पष्ट आहेत. हे अध्वर्यो आवां शंसाव । मे प्रतिगृणीहि मह्यं प्रतिगरं देहि । आवाम् इन्द्राय जुष्टं वाहः कृणवाव = हे अध्वर्यु, आपण दोघे शस्त्र म्हणूं या; तूं मला प्रतिगर म्हणजे अनुमति दे. आपण दोघे इंद्राला प्रिय असें स्तोत्र देऊं या म्हणजे म्हणूं या. शंसाव = शस्त्रं ब्रवाव = शस्त्र म्हणूंया. शस्त्र होता म्हणत असतो. परंतु म्हणण्याच्या अगोदर तो अध्वर्यूची परवानगी मागतो. सोमयागांत दिवसांतून तीन सवनें होत असतात. प्रत्येक सवनाच्या वेळीं होता अध्वर्यूची परवानगी मागतो. शोंसावोमित्याह्वयते प्रातःसवने त्र्यक्षरेण. होता शोंसावों ह्या तीन अक्षरांनीं प्रातःसवनाच्या वेळीं अध्वर्यूची परवानगी मागतो. ओं म्हणजे परवानगी. ही परवानगी अध्वर्यु 'शंसामोदैवों' ह्या शब्दांनीं देतो. शंसामोदैवों = शंस + आमोदः + एव + ओं = म्हण, तें ऐकण्यापासून आम्हाला आनंदच होईल; ही मी परवानगी देतों (ओं). अध्वर्यो शोंसावोमित्याह्वयते मध्यंदिने षळक्षरेण = 'अध्वर्यो शोंसावों' ह्या सहा अक्षरानि मध्यंदिनसवनाच्या वेळीं सकाळच्याप्रमाणेंच परवानगी मागतो व अध्वर्यु पूर्वीप्रमाणेंच तशी परवानगी त्याला देतो. अध्वर्यो शो शोंसावोमित्याह्वयते तृतीयसवने सप्ताक्षरेण = तृतीयसवनाच्या वेळेला होता 'अध्वर्यो शो शोंसावोम्' ह्या सात अक्षरांनीं परवानगी मागतो व ती त्याला मिळते. परवानगी मागणें ह्याला आह्वाव व रुकार ह्याला प्रतिगर असा शब्द आहे. अग्रेण होतारं बहिः सदस्तः प्राङ्मुखः प्रतिगरायोपविशति । अध्वर्यो शों ३ सावो ३ मित्युच्य माने सों ३ सावो दैवो ३ मिति प्रतिपर्यावर्तते । (मान० श्रौ० २।४।२३–२५) = अध्वर्यु सदसूच्या बाहेर होत्याच्या पुढें व पूर्वेकडे तोंड करून प्रतिगर म्हणजे रुकार देण्यास बसलेला असतो. जेव्हां होता "अध्वर्यो शों ३ सावो ३ म्" म्हणतो तेव्हां 'सों ३ सावो दैवो ३ म् अशीं अक्षरें म्हणत अध्वर्यु त्याच्याकडे वळतो.

**अभिवहनस्तुतिम्**

ह्या ऋचेंत अभिवहनाची स्तुति केली आहे असें मी समजतों. मन्ये हें क्रियापद येथें अध्याहृत आहे. दुर्गाचा पाठ अभिवहनस्तुतिः असा होता व तोच पाठ बरोबर आहे. "वाहिष्ठो वां हवानां स्तोमः इति वोढृतमः स्तोमः" = "हे अश्विनांनो, सगळ्या स्तुतीमध्यें तुम्हांला अतित्वरेनें बोलावणारी ही आमची स्तुति होवो; ह्या शब्दांनीं स्तोम हा वाहिष्ठ म्हणजे वोढृतम म्हणजे सर्वांहून जलदीनें वाहून आणणारा असा अर्थ होतो, असें निरुक्त ५।१ येथें म्हटलें आहे. वाहः म्हणजे बोलावणारी

स्तुति. अभिवहन म्हणजे जाऊन घेऊन येणें. अभिवहनाची स्तुति म्हणजे त्याचें वर्णन. एथें स्तुति शस्त्ररूप आहे.

**अभिषवणप्रवादां स्तुतिं मन्यन्ते**

परंतु, इतर लोक ह्या ऋचेंत अभिषवणाविषयीं स्तुति म्हणजे वर्णन केलें आहे असें म्हणतात. अभिषवणस्य प्रवादः यस्यां सा अभिषवणप्रवादा. अभिषवण म्हणजे सोमरस काढणें. दुर्ग म्हणतोः— वाहशब्दे उदकवाहाभिधानसारूप्यं वर्तते । इन्द्राय इदं वाहः सोमोदकपूर्णम् अधिषवणफलकाख्यं वाहः जुष्टं प्रियं यथा स्यात् तथा कुर्वः । तद्धि सुशस्तं सुप्रतिगीर्णं च इन्द्रस्य प्रीतिजनकं भवति = वाह शब्दाचें उदक वाहणें ह्याशीं साम्य दिसतें. वाहस् म्हणजे अधिषवणाचें फलक. तें फलक पाण्यानें व सोमानें भरलेलें असतें. हें फलक इंद्राला जसें गोड होईल तसें आपण करूं या. दुर्गानें घेतलेला अधिषवण हा पाठ चुकलेला आहे. वेदींत उपरव नांवाचे दोन लहानसे खड्डे केलेले असतात; त्यांपैकीं प्रत्येकावर एक एक लांकडी फळी ठेवलेली असते. त्या फळीचें नांव अधिषवण ह्या दोन फळ्यांवर चामडें पसरलेलें असतें. चामड्यावर एक लहानसा पाटा ठेवलेला असून त्याच्यावर सोम कुटण्याकरितां पांच लहानसे ग्रावे म्हणजे दगड ठेवलेले असतात. सोम व पाणी ह्यांनीं अधिषवण फळ्या भरलेल्या असतात. ह्या दुर्गाच्या म्हणण्याला आधार मला मिळाला नाहीं. प्रस्तुत ऋचेंत सोमरस काढण्याचें नांवहि नाहीं. तेव्हां अभिषवणाचें वर्णन आहे असें जें कांहीं लोक म्हणतात तें बरोबर नाहीं. शिवाय अभिषवणाच्या वेळीं शस्त्र म्हणत नाहींत देवतांना उद्देशून जेव्हां सोम दिला जातो तेव्हांच शस्त्रें म्हणतात. अभिषवण म्हणजे सोमरस काढण्याची क्रिया हिला कोणीहि ग्रह म्हणत नाहींत. सोमरस काढतांना वसतीवरी नांवाच्या जलाचा उपयोग करतात. त्यावेळेला ग्रावस्तुत् नांवाचा ऋत्विग् सामें म्हणतो. पण ह्या सामांनाही शस्त्र म्हणतां येत नाहीं. वसतीवरी ह्यांना औपचारिक रीतीनें ग्रह म्हणतात. तेव्हां कदाचित् सामांना औपचारिक रीतीनेंच शस्त्र म्हणण्याची चाल असेल. परंतु अभिवषणाचा प्रस्तुत ऋचेंत कोणत्याही प्रकारचा उल्लेख नाहीं. वाहः म्हणजे स्तुति असें वर म्हटलें आहे. त्या शब्दाचा सोमहवि असा अर्थ केल्यास चालेल. देवतांना अर्पण करतांना " इन्द्राय त्वा, इन्द्रवायुभ्यां, सूर्याय, मित्रावरुणाभ्यां ( जुष्टं गृह्णामि ) अशी भाषा वापरतात. सबंध सूक्त इन्द्रस्तुतिपर आहे. प्रस्तुत ऋचा इन्द्रस्तुतिपर असून तींत शंसाव व प्रतिगृणीहि अशीं शस्त्रसूचक व प्रतिगरसूचक क्रियापदें योजिलीं आहेत. त्या शब्दांवरून वाहः म्हणजे सोमग्रह असा अर्थ केल्यास चालेल.

**ऐन्द्रीत्वेव शस्यते**

ऐन्द्री इन्द्रपरा ऋक् तु एव शस्यते शस्त्रम् इति पठ्यते. परंतु (तु) स्तुति अभिवहनाची असो किंवा अभिषवणाची असो; शस्त्र जें म्हणावयाचें असतें तें इंद्रपरच असतें. दुर्ग म्हणतोः— एवम् इयम् अभिवहनस्तुतिः अथवा अधिषवणप्रवादा स्तुतिः । उभयथापि तु इयम् ऐन्द्रीत्वेव शस्यते । इदमेवैकम् अभिधानम् अत्र व्युत्पाद्यते इत्य-

भिप्रायः = अशारीतीनें ही अभिवहनाची किंवा अधिषवणाची स्तुति होऊं शकेल. परंतु दोन्ही तऱ्हेच्या अर्थात ऐन्द्री हीच म्हटली जाते. 'ऐन्द्रीत्वेव शस्यते ह्या शब्दांतून ह्या ऋचेंत वाहः ह्या एकच शब्दाची व्युत्पत्ति केली आहे असा अर्थ निघतो.' परंतु तो अर्थ कसा निघतो हें समजत नाहीं.

**परितक्म्या (२७) इति एतत् उपरिष्टात् व्याख्यास्यामः**

परितक्म्या ह्या शब्दाची फोड निरुक्त ११।२५ येथें आम्ही करणार आहों.

## खंड १७ वा.

**सुविते सु इते सूते सुगते प्रजायाम् इति वा**

सुविते = सु + इते. सु = सुव्, सुव् + इते. सुविते = सुगते. इते = गते. सुगत = चांगलें गेलेलें म्हणजे झालेलें; म्हणजे कल्याण. सुविते = सूते = प्रजायाम्. 'सू' जन्म देणें ह्याचें भूतभूतकाळीं विशेषण सूत. सूत ह्याचेंच रूपांतर सुवित. सूत = जन्म दिलेला. जन्म कोणाला दिलेला ? प्रजेला म्हणजे मुलांना. सुवित = प्रजा = मुलें. सूते देवदत्ता पुत्रम् इति प्रजायते इत्यर्थः (दुर्ग). देवदत्ता ही स्त्री पुत्र प्रसवते; म्हणजे प्रसूत होते. सूते हा शब्द दुर्ग सू ह्याचें वर्तमानकाळीं तृतीयपुरुषाचें एकवचन समजतो. परंतु ती त्याची चूक होय. सू ह्याचें भूतभूतकाळीं विशेषण सूत. व सूत ह्याचें सप्तमीचें एकवचन सूते.

**सुविते मा धाः इत्यपि निगमो भवति**

सुविते ह्या शब्दाचे वर जे दोन अर्थ दिले आहेत तद्वाचक सुविते मा धाः अशी ऋचाही आहे. अनु मे इदं व्रतं व्रतपतिः मन्यताम् अनुदीक्षां दीक्षापतिः । सुविते मा धाः (मैत्रा० सं० १।२।७) = मी जें हें व्रत स्वीकारलें आहें त्याला व्रतपति आपली संमति देवो; मी जी दीक्षा घेतली आहें तिला दीक्षापति आपली संमति देवो. हे घृता, मला कल्याणांत किंवा सुप्रजेंत ठेव म्हणजे माझें कल्याण कर किंवा मला पुष्कळ अपत्यें होऊं देत. ही भाषा ऋत्विक् एकमेकाशीं सख्य करितांना उच्चारतात व तसा उच्चार करतांना ते तानूनप्त्र नांवाच्या घृताचा उपयोग करतात. तनूनपात् ह्याला उद्देशून जें घृत तयार केलें असतें तें तानूनप्त्र. सोमयागांत यजमान व ऋत्विग् हें घृत बोटाला लावतात व तसें करून आपण एकमेकांला दगा देणार नाहीं असें अभिवचन देतात. सुवित शब्द हा दुरित ह्याच्या उलट असून तो अनेकदां ऋग्वेदांत आला आहे. सुवित ह्याची यास्कानें दिलेली दुसरी व्युत्पत्ति ओढूनताणून आणलेली आहे. दुरित म्हणजे जसें संकट तसें सुवित म्हणजे कल्याण. इ जाणें ह्याचें भूतभूतकाळीं विशेषण 'इत'. सु + इत सुवित. दुः + इत दुरित. सुविते हें सप्तम्यन्त रूप असल्यामुळें यास्काला सूते प्रजायाम् असें निर्वचन करणें सोयीचें पडलें. परंतु 'स नो विश्वान्या भर सुवितानि शतक्रतो' (८।९३।२९) = हे इंद्रा, तूं आम्हांला सगळीं सुखें आणून दे. 'अजीजनत् सुविताय श्रवांसि' (७।७९।३) =

उषा आमच्या सुखाकरतां धन उत्पन्न करती झाली. महे नो अद्य सुविताय बोध्युषो महे सौभगाय प्र यन्धि । चित्रं रयिं यशसं धेह्यस्मे ( ७।७५।२ ) = हे उषे, आमच्या सुखाकरतां उगव. आम्हांला पुष्कळ धन दे. स नो नेषत्० अग्निः वामं सुवितं वस्यो अच्छ (१।१४१।१२ ) = अग्नि आम्हांला धनाकडे नेवो. ह्या ऋचांमध्यें सुवित म्हणजे प्रजा हा अर्थ कसा लागू पडेल ? एथें सुवित म्हणजे कल्याण, सुख, धन असाच अर्थ आहे. केवळ एकटें उदाहरण घेऊन सुवित शब्दाचे दोन अर्थ करणें अशास्त्रीय होय. निघण्टूकारानें इतर कांहीं शब्दांप्रमाणें हाही शब्द निघण्टूंत विनाकारण घातला आहे. सुवित शब्दाबद्दल इतका खटाटोप करण्याची मुळींच जरूर नव्हती. तो शब्द अनवगत व अनेकार्थ नाहीं.

**दयति अनेककर्मा**

दय् ह्याचे एकाहून अधिक अर्थ आहेत.

**नवे न पूर्वं दयमानाः स्याम ( मैत्रा० सं० ४।१३।८ ॥ निरुक्त ९।४३ ) इति उपदयाकर्मा**

नव्या धान्यानें जुन्या धान्याचें आम्ही रक्षण करणारे होऊं. एथें दय् ह्याचा अर्थ उपदया म्हणजे रक्षण. पूर्वीच्या धान्यांपासूनच नवीन धान्य उत्पन्न होतें. तेव्हां नवीन धान्यानें पूर्वीच्या धान्याचें एकप्रकारें रक्षणच होतें. ऋग्वेदांत दय् चा रक्षण करणें हा अर्थ बहुतकरून नाहीं. एको देवत्रा दयसे हि मर्तान् ( ७।२३।५ ) देवांमध्यें तूंच एकटा मनुष्यांचें रक्षण करतोस, असा अर्थ ऋचा वाचल्याबरोबर कोणीही करील. परंतु 'मघा च धृष्णो दयसे विसूरीन् ( ६।३७।४ ) तूं स्तोत्यांना (सूरीन् = सूरिभ्यः) धन देतोस; एथें सूरीन् हें सूरिभ्यः ह्या अर्थी आहे. त्याचप्रमाणें मर्तान् हें मर्तेभ्यः ह्या अर्थी असणें अगदीं शक्य आहे.

**य एक इत् वि दयते वसु (ऋ॰ सं० १।८४।७) इति दानकर्मा वा विभागकर्मा वा**

जो एकटाच धन देतो किंवा वांटून देतो. एथें दय् ह्याचा देणें किंवा विभागून देणें असा अर्थ आहे. य एक इद्धि दयते वसु मर्ताय दाशुषे = जो एकच हवि देणाऱ्या मनुष्याला धन देतो. येथें देतो हाच अर्थ आहे. विभागून देतो असा अर्थ नाहीं.

**दुर्वर्तुर्भीमो दयते वनानि ( ऋ० सं० ६।६।५ ) इति दहतिकर्मा । दुर्वर्तुः दुर्वारः**

ज्याचें निवारण करतां येत नाहीं असा भयंकर अग्नि अरण्यें जाळतो. एथें दय् = जाळणें. परंतु दय् नाश करणें हा अर्थही एथें लागू पडेल. स्थिराचिदन्ना दयते वि जम्भैः ( ४।७।१० ), अग्निर्वृत्राणि दयते पुरूणि ( १०।८०।२ ) अर्हन्निदं दयसे विश्वमभ्वम् (२।३३।१०) ह्या तीन ऋचा व यास्कानें दिलेली पुढील ऋचा ह्यांवरून दय् नाश करणें हाच अर्थ जिकडे तिकडे लागू पडतो. जाळून टाकणें हा एक नाशाचाच प्रकार आहे. दुर्वर्तुः = दुर्वारः. वर्तुः हा शब्द 'वृ' वारणें ह्याला 'तु' हा प्रत्यय लावून झाला आहे. दुर्वर्तुः म्हणजे निवारण करण्याला कठीण.

**विद्वद्वसुर्दयमानो वि शत्रून् ( ऋ० सं० ३।३४।१ ) इति हिंसाकर्मा**

धन देणारा (विदद्वसुः) व शत्रूंचा नाश करणारा (इन्द्र). एथें दय् हिंसा करणें. वर म्हटल्याप्रमाणें नाश करणें हा अर्थ एथेंही लागू आहे.

**इमे सुता इन्दवः प्रातरित्वना सजोषसा पिबतमश्विना तान्। अयं हि वा मूतये वन्दनाय मां वायसो दोषा दयमानो अबूबुधत्**

ही ऋचा खिलापैकीं आहे. दुर्ग आपल्या वृत्तींत मां वायसो........अबूबुधत् एवढेंच देतो व बाकीचे तीन चरण हुडकून काढा असें म्हणतो. ऋचेचा अर्थः— सकाळीं गमन करणारे (प्रातरित्वना = प्रातरित्वनौ = प्रातर्यावाणौ) अहो अश्विनहो, हा सोमरस काढला आहे तो मिळून (सजोषसा) तुम्ही प्या. वंदनाच्या संरक्षणाकरतां हा मनुष्य तुम्हांला (बोलावीत आहे). कावळा उडत असतां त्यानें मला सायंकाळीं जागें केलें. गुर्जरपाठांत अयम् बद्दल अहम् आहे. तसा पाठ घेतल्यास वंदनाचें रक्षण करण्याकरतां मी तुम्हांला बोलावितों असा अर्थ होईल.

**दयमान इति**

यास्क दयमानः ह्याचा अर्थ देत नाहीं. दुर्ग डीयमानः असा अर्थ देतो. म्हणजे डी (डय्) 'उडणें' असा तो अर्थ करतो. परंतु 'दय्' दया करणें असा अर्थ यास्काच्या मनांत असेल व तो अर्थ अगदीं प्रसिद्ध आहे म्हणून त्यानें दिला नसेल. दयमान इति ह्याला स्वर कां दिले आहेत तें समजत नाहीं. दयमान हें मूळचें 'डयमान' तर नसेल ना? तसें असल्यास दयमानः = डयमानः. दुर्गाच्या आवृत्तींत डीयमानः असें आढळतें तें चतुर्थगणांतील 'डी' ह्याचें वर्तमानकाळीं विशेषण होय.

**नू चित् (३०) इति पुराणनवयोः। नूच (३१) इति च**

नूचित् हा निपात असून त्यानें जुने व नवे असे दोन अर्थ होतात. नूच ह्या निपाताचेही तेच अर्थ होतात.

**अद्या चिन्नु चित्तदपो नदीनाम्। (ऋ० सं० ६।३०।३) अद्य च पुरा च तत् एव कर्म नदीनाम्**

अद्या = अद्य; चित् = च; नु = पुरा; चित् = च; तत् अपः = तत् एव कर्म. अपः = कर्म. एव हें अध्याहृत घेतलें आहे. वास्तविक नु ह्याचा अर्थ 'अद्य' असाच आहे. 'पुरा' म्हणजे पूर्वकालीं असा नाहीं. अद्याचित् = नू चित्. ही फक्त अर्थाची द्विरुक्ति आहे. चित् = अपि. अद्याचित् = अद्य अपि = आजही. नूचित् = अद्य अपि. यास्कानें नव ह्या अर्थी नूचित् ह्याचें उदाहरण द्यावयास पाहिजे होतें.

**नूच पुराच सदनं रयीणाम् (ऋ० सं० १।९६।७)। अद्यच पुराच सदनं रयीणाम्**

नूच = अद्यच. आजही व पुरातन कालींही धनाचें स्थान असणारा जो अग्नि. पुराणाभिधायित्वे पर्येष्यम् अस्य उदाहरणम् = पुराणार्थी 'नूच' ह्याचें उदाहरण शोधलें पाहिजे असें दुर्ग म्हणतो. ह्या दोन्हीहि उदाहरणांत नू याचा अर्थ अद्य असाच आहे. नूचित् म्हणजे न ह्या अर्थाच्या ऋचा ऋग्वेदांत पुष्कळ आढळतात. 'यं रक्षन्ति प्रचे-

तसो वरुणो मित्रो अर्यमा । नूचित् स दभ्यते जनः' (१।४१।१)=ज्या मनुष्याचें प्राज्ञ असे वरुण, मित्र व अर्यमन् हे रक्षण करतात त्याला कधींही इजा होत नाहीं. 'नूचित्=कधींही नाहीं.' नूचिद्यथा नः सख्या वियोप दसन्न उग्रोऽविता तनूपाः' (४।१६।२०)= जेणेंकरून आपल्या मैत्रीपासून आमची कधींही ताटातूट करणार नाही तेणेंकरून उग्र असा जो इंद्र तो आमच्या शरीराचें रक्षण करणारा असो. नूचित् याचा 'अगदीं खात्रीनें' असाही अर्थ होतो. 'उतो नू चिद्य ओजसा शुष्णस्याण्डानि भेदति ' (८।४०।१०)= जो इन्द्र आपल्या शक्तीनें शुष्णाचें अंड अगदीं खात्रीनें फोडून टाकतो. निघण्टुकारानें नूचित व नूच हे अनेकार्थी म्हणून निघण्टूंत घातले यास्कानें ते सर्व अर्थ द्यावयास पाहिजे होते. ते त्यानें दिले नाहींत ह्यावरून निघण्टूचा तो कर्ता खास नव्हता.

**रयिः इति धननाम रातेर्दानकर्मणः**

रयि ह्याचा अर्थ धन. धन ह्याला रयि म्हणण्याचें कारण तें दिलें जातें. म्हणजे रयि हा शब्द 'रा' देणें ह्यापासून झाला आहे. ही व्युत्पत्ति दुर्गाच्या वृत्तींत नाहीं. ह्यावरून ती प्रक्षिप्त होय.

## खंड १८ वा.

**विद्याम तस्य ते वयमकूपारस्य दावने ( ऋ० सं० ५।३९।२ )**
**विद्याम तस्य ते वयम् अकुपरणस्य दानस्य**

अकूपारस्य = अकुपरणस्य. 'पृ' भरणें ह्याच्यापासून परण. कुत्सितं परणं. यस्य तत् कुपरणम्. न कुपरणम् अकुपरणम्. कुपरणम् = ज्याची भरती कुत्सित म्हणजे अल्प असते तें. ह्याच्याउलट अकुपरणम् म्हणजे पुष्कळ ( धन ). अकूपार शब्द एथें व १०।१०९।१ ह्या ऋचेंत असा दोनदांच ऋग्वेदांत आला आहे. १०। १०९।१ एथें अकूपारः हें एका देवाचें नांव असावेंसें वाटतें. अ = कु = उ = पा = र = धन. अतिशय धन किंवा ज्याच्यापाशीं अतिशय धन आहे तो असे त्या शब्दाचे अर्थ असावेत. अकूपारस्य तस्य ते = अकूपार जो तूं त्या तुझें. दावने = दानस्य. 'या'पासून जसा यावन्, 'इ' पासून इत्वन्, तसा 'दा' पासून दावन् शब्द होतो व त्याचा अर्थ 'देणारा' असा आहे. भूरिदावा म्हणजे पुष्कळ देणारा. दावन् शब्दाच्या चतुर्थीचें एकवचन दाव्ने असें झालें पाहिजे. दावने म्हणजे दानस्य असा यास्क अर्थ करतो. 'इदृशस्य दानस्य वयमेव लब्धारः स्याम इत्यभिप्रायः' असें दुर्ग म्हणतो. शिवाय 'अत्र अश्रूयमाणः' अपि धनशब्दः अध्याहृतः = जरी ऋचेमध्यें धन शब्द नाहीं तरी (दावने = दानस्य) ह्या शब्दाकरितां धन शब्द यास्कानें अध्याहृत घेतला आहे असेंही तो म्हणतो. तेव्हां दुर्गाच्या प्रतींत अकुपरणस्य धनस्य दानस्य असा पाठ असावा. दा = वन = दान. दावने म्हणजे देण्याच्या वेळीं; दावने हा सप्तम्यंत शब्द आहे व असला पाहिजे. 'देवस्य वयं सवितुः सवीमनि श्रेष्ठे स्याम वसुनश्च दावने (६।७१।२) ह्या उदाहरणांत सवीमनि हें सप्तमीचें एकवचन असल्याकारणानें दावने हेंहि सप्तमीचें एकवचन

असलें पाहिजे. ' सद्यस्ते रायो दावने स्याम ' (२।११।१२) हें उदाहरण ' इन्द्र तव शर्मन् स्याम ' ( १।५१।१५ ) ' वैश्वानरस्य सुमतौ स्याम ' ( १।९८।१ ) ' वयं मित्रस्या वसि स्याम सप्रथस्तमे (५।६५।५) 'तेषां वः सुम्ने० स्याम' (७।६६। १३ ) ह्यांसारखेंच आहे. शर्मन् ( शर्मणि ), सुमतौ, अवसि, सुम्ने हीं सगळीं रूपें सप्तम्यंत आहेत. तेव्हां दावने हेंही सप्तम्यंतच असलें पाहिजे. ऋचेंतील ' विद्याम ' ह्याचा अर्थ स्याम असा आहे. ' दावने स्याम ' ही एक बोलण्याची पद्धत आहे. ' स्यामास्य रत्निनो विभागे ' ( ७।४०।१ ) = धनवान् जो सविता त्यानें केलेल्या धनाच्या वाटणींत आम्ही हजर असूं. ह्या सारखेंच ' विद्याम दावने' हें वाक्य आहे. 'अकूपार' म्हणजे अति संपत्तिमान् असा जो तूं त्या तूं केलेल्या वांटणींत ( दावने ) आम्ही हजर असूं (विद्याम). असा 'विद्याम तस्य ते वयमकूपारस्य दावने' ह्या शब्दांचा अर्थ होतो. अकूपारस्य आणि रत्निनः ह्या दोहोंचाही बहुतेक अर्थ एकच ! दुर्ग म्हणतो ' अकूपारस्य दावने ' असा क्रम ऋचेंत असून दावने अकूपारस्य असा क्रम निघंटूंत आढळतो. ह्यावरून असें अनुमान निघतें कीं निघंटु हा ग्रंथ पूर्वकालीन ऋषींनीं रचिला असून यास्कानें केवळ त्यावर भाष्य रचिलें आहे. एकानेंच जर दोन्ही ग्रंथ रचिले असते तर निघण्टूंत शब्दांचा भिन्न क्रम त्यानें दिला नसता. यास्कानें निघण्टु ग्रंथ रचला नाहीं ह्याला दुर्गानें दाखविलेल्या क्रमभंगाहूनहि अधिक जोरदार पुरावे आहेत. ते जागजागीं दिले असून प्रस्तावनेंत त्या सर्वांचा संग्रह केला आहे. दावने हा शब्द ऋग्वेदांत अठ्ठावीस वेळां आला आहे. तो अनवगतसंस्कार असल्याकारणानें निघण्टूंत घातला गेला व अकूपारस्य दावने एथील अकूपारस्य हाही शब्द अनवगतसंस्कार असल्याकारणानें तोही घातला गेला. निघण्टुकार ऋग्वेदांतील पाहिजे तिथले शब्द जसेच्या तसे उचलतो. 'दावने' हा शब्द त्यानें पहिल्याप्रथम घेतला व अकूपारस्य हा शब्द त्याच वेळीं त्याच्या डोक्यांत आल्यामुळें त्यानें मागून घातला. त्याला हा क्रम बदलतां आला असता; परंतु शब्दांची निवड करण्यांत त्यानें फारसें तारतम्य किंवा फारशी काळजी दाखविली नाहीं.

**आदित्यः अपि अकूपारः उच्यते । अकूपारः भवति दूरपारः**

अकूपार हें आदित्याचेंही नांव आहे. कारण तो अकूपार म्हणजे 'अकुत्सित' म्हणजे ' कुत्सित नसणारा ' म्हणजे ' अतिशय मोठा असा जो द्युलोकांतील मार्ग त्याच्या पार जातो. अकूपारः = दूरपारः. दूरपारः हा शब्द दुर्गवृत्तींत नाहीं; व त्याची जरूरीही नाहीं. आदित्याला ' दूरपार ' म्हणण्यानें कोणता अर्थ निष्पन्न होतो ? ' दूरपार ' ( दूर आहेत तीर ज्याचे ) हें विशेषण नदीला किंवा समुद्राला शोभेल, तें सूर्याला लागूं पडणार नाहीं.

**समुद्रः अपि अकूपारः उच्यते । अकूपारः भवति महापारः**

समुद्रालासुद्धां अकूपार म्हणतात. अकूपारः = महापारः, ज्याचे तीर विस्तीर्ण आहेत असा. एथें महापारः ह्याच्याऐवजीं दूरपारः हाच शब्द योग्य दिसतो. न कुं

पृणाति मर्यादापालनात् ( अमर १।९।१ क्षीरस्वामी ) = जो पृथिवी पाण्यानें भरून टाकीत नाहीं तो; समुद्र मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं.

**कच्छपः अपि अकूपारः उच्यते । अकूपारः न कूपम् ऋच्छति इति**

कांसवालाही अकूपार म्हणतात. कारण, अकूपारः = अ + कूप + अरः = न कूपम् ऋच्छति = जो विहिरींत जात नाहीं; तर नदी, समुद्र अशा मोठ्या ठिकाणीं तो असतो. पण कांसव विहिरींतही असतें. ही कांहींतरी व्युत्पत्ति आहे. अमरामध्यें 'समुद्रोऽब्धिरकूपारः' ( १।९।१ ) एवढेंच आहे. यास्काच्या वेळीं अकूपार या शब्दाचे आदित्य व कांसव हे दोन अर्थ प्रचारांत असतील.

**कच्छपः कच्छं पाति । कच्छेन पाति इति वा । कच्छेन पिबति इति वा**

कच्छ म्हणजे मुख. पाति म्हणजे रक्षण करतो. जो आपलें तोंड रक्षण करतो तो कच्छप. प्रसंग आला असतांना कांसव आपलें तोंड आपल्या पोटाखालीं घालतो. अथवा, कच्छेन म्हणजे कढईसारख्या आपल्या अंगानें इतर अंगें रक्षण करतो तो. अथवा, मुखानें पितो म्हणून तो कच्छप. 'पाति' व 'पिबति' या दोहोंचाही अर्थ एकच. 'कच्छेन पाति' एथें कच्छ म्हणजे कढईसारखें अंग हा अर्थ दुर्गानें दिला आहे; परंतु कच्छ म्हणजे मुख हा त्या शब्दाचा अर्थ यास्कानें केला असावा.

**कच्छः खच्छः खच्छदः । अयमपि इतरः नदीकच्छः एतस्मादेव । कम् उदकम् तेन छाद्यते**

'कच्छः = खच्छः = खच्छदः.' ख = पोकळ जागा. मुख पोकळ जागा झांकून ठेवतें म्हणून मुखाला कच्छ म्हणतात. लौकिक जो कच्छ शब्द तोहि छद् धातूपासूनच झाला आहे. कारण, कम् म्हणजे पाणी त्या नदीकच्छानें झांकलें जातें. नदीकच्छः येथील नदी शब्द यास्कानें घातला नसावा असें वाटतें. जलप्रायमनूपं स्यात्पुंसि कच्छस्तथाविधः ( अमर २।१।१० ) जलानें भरलेल्या प्रदेशाला अनूप किंवा कच्छ म्हणतात. कच्छ म्हणजे दलदलीचा प्रदेश. ह्यावरून नदी शब्द कोणी तरी मागाहून घातला असें वाटतें. कारण, कच्छाचा नदीशीं संबंध अगदीं आवश्यक नाहीं. कच्छचें रण हा जो प्रदेश तेथें त्याच्याशीं समुद्राचा संबंध आहे, नदीचा नाहीं. कम् उदकं तेन छाद्यते ह्याऐवजीं केन उदकेन छाद्यते हें म्हणणें जास्त योग्य होईल. कारण दलदलीचा प्रदेश थोडक्या पाण्यानें झांकलेला असतो.

**शिशीते शृङ्गे रक्षसे विनिक्षे ( ऋ० सं० ५।२।९ ) निश्यति शृङ्गे रक्षसः विनिक्षणाय ।**

शिशीते = निश्यति. 'शो तनूकरणे' ( ४।३९ धा. पाठ ) = धार देणें. ह्यापासून श्यति. म्हणजे शिशीते ह्यांत शो धातु आहे; पण हें म्हणणें चुकीचें आहे. शिशीते ह्यांत 'शा' धातु आहे. तो मिमीते मिमाते मिमते ह्याप्रमाणें चालतो. म्हणजे त्याचीं रूपें शिशीते शिशाते शिशते ह्याप्रमाणें होतात. शिशानः हें त्याचें वर्तमानकालीं विशेषणरूप. ह्या धातूचीं शिशीहि शिशीतम् शिशीत शिशीताम् शिशीमसि

अशींही रूपें आढळतात. शिवाय हा धातु परस्मैपदीही आहे. त्याचीं शिशामि, शिशाति, शिशाधि, शिशातु, शिशा:, शाधि, आशाथे अशीं रूपें आढळतात. रक्षसे= रक्षसः. विनिक्षे=वि+नि+क्षे. क्षे=क्षणनाय. म्हणजे विनिक्षे ह्यांत 'क्षण्' जखम करणें हा धातु आहे. पण हेंही म्हणणें बरोबर नाहीं. विनिक्षे = वि+निक्षे. निश्+स्+ए = निक्षे. 'निश्' नाश करणें ह्याच्यापासून नेशत् असें रूप ऋग्वेदांत आढळतें. ऋग्वेदांत कर्मार्थी चतुर्थी पुष्कळ वेळां येते. जसें, वृत्राय हन्तवे एथें वृत्राय हें हन्तवे ह्याचें कर्म होय. त्याप्रमाणें रक्षसे हें 'विनिक्षे' ह्याचें कर्म होय. निघण्टुकारानें शिशीते एवढेंच रूप कां घेतलें हें समजत नाहीं. ह्या शब्दांतील संस्कार अनवगत नाहीं. तेव्हा त्यानें 'शा' ह्याचे अनेक अर्थ आहेत अशा समजुतीनें तो शब्द घातला असावा. 'शा' धार देणें हा मूळ अर्थ. ह्याच्यापासून भिन्नभिन्न अर्थ उत्पन्न होतात. जसें:-सं त्वा शि शामि जागृहि अदब्धं विप्र मन्मभिः (१०।८७।२४) = हे अग्नि (विप्र), अहिंसित (अदब्धम्) असा जो तूं त्या तुला मी आपल्या स्तुतींनीं (मन्मभिः) जागें करतों (संशिशामि), जागा हो (जागृहि). विशंविशं युधये सं शिशाधि (१०।८४।४) = हे इन्द्रा, सगळ्या लोकांना युद्धासाठीं स्फुरण आण. तं शिशीता सुवृत्तिभिः त्वेषं सत्वानम् (८।४०।१०) = बलिष्ठ (त्वेषम्), लढवय्या (सत्वानम्) असा जो इंद्र त्याला आपल्या स्तुतींनीं (सुवृत्तिभिः) चेतवा (शिशीत). इमा गिरो अश्विना युष्मयन्तीः संशिशीतम्० (२।३९।७) = अहो अश्विनांनो, तुमची इच्छा करणाऱ्या ह्या ज्या स्तुति त्यांचा स्वीकार करून त्यांना उत्तेजन द्या. त्वामुग्रमवसे सं शिशीमसि (१।१०२।१०) = उग्र जो तूं त्या तुला आमचें कल्याण कर म्हणून स्तुतींनीं आम्ही प्रेरणा करतों. न्योषतं हतं नुदेथां नि शिशीतमत्रिणः (७।१०४।१) = हे इंद्रासोमांनो, शत्रूंना (अत्रिणः) जाळा (ओपतम्), हाणा (हतम्), लाथा मारून हाकलून द्या (नुदेथाम्), त्यांना जखमा करा (निशिशीतम्). शग्धि पूर्धि प्र यंसि च शिशीहि (१।४२।९) यांतील सर्व क्रियापदांचा अर्थ 'दे.' धार देणें ह्या अर्थाच्या ऋचा फार आहेत त्या खालोखाल देणें ह्या अर्थाच्या व त्याच्याही फार खालीं इतर अर्थांच्या. यास्काच्या लक्षांत निघण्टु-काराचा हेतु आला नाहीं, हें स्पष्ट आहे. यास्कानें निघण्टु रचिला नाहीं ह्या विधानाला बळकटी देणारा हा एक पुरावा आहे.

**रक्षः रक्षितव्यम् अस्मात्। रहसि क्षणोति इति वा।**

त्याच्यापासून स्वतःचें रक्षण करावयाचें असतें म्हणून शत्रूला 'रक्षस्' म्हणतात. म्हणजे 'रक्ष्' ह्या धातूपासून रक्षस् शब्द झाला आहे. किंवा रक्षः = र + क्षः. र = रहसि = एकांतांत, कोणी न पाहील अशा ठिकाणीं. क्ष = क्षणोति = जखम करतो. किंवा

**रात्रौ नक्षते इति वा**

र = रात्रौ; क्ष = नक्षते. जो रात्रीं संचार करतो (नक्षते) तो. म्हणूनच

राक्षसांना ' नक्तंचर ' असें म्हटलें आहे.

**अग्निः सुतुकः सुतुकेभिरश्वैः (ऋ० सं० १०।३।७)। सुतुकनः सुतुकनैः इति वा। सुप्रजाः सुप्रजोभिः इति वा।**

सुतुकः = सुतुकनः. तुक् जाणें; तुकनम् = गति. शोभनं तुकनं यस्य सः सुतुकनः. सुतुकेभिः = सुतुकनैः. चांगली गति आहे ज्याची असा अग्नि, चांगली गति आहे ज्यांची अशा अश्वांबरोबर एथें येवो ( एह गम्याः ). धातुपाठांत तुक् धातु नाहीं. तुकन हा शब्द यास्ककालीं प्रचारांत असावा. अथवा सुतुकः = सुप्रजाः. सुतुकेभिः = सुप्रजोभिः. नञ्दुः सुभ्यो० नित्यमसिच् प्रजामेधयोः ( पाणिनी ५।४।१२२ ) ह्या सूत्रानें सुप्रजस् हा शब्द बनतो. तोक शब्दाचा जो अर्थ तोच तुक शब्दाचा असें यास्क समजतो. परंतु 'तुक' म्हणजे 'धन' असा अर्थ असावा असें वाटतें. अग्निः सुतुकः सुतुकेभिरश्वै रभस्वद्भी रभस्वाँ एह गम्याः एथें रभस्वद्भिः = त्वरितैः. रभस्वान् = त्वरितः असा दुर्ग अर्थ करतो. वेदांत रभस् ह्याचे तीन अर्थ होतात. रभस् शब्द ऋग्वेदांत ३० वेळां आला आहे त्यांपैकीं सात ऋचांत त्याचा अर्थ तेजस् किंवा तेजस्वी, सहा ऋचांत वेग किंवा बल, किंवा वेगवान् किंवा बलवान्, आणि चार ऋचांत धन किंवा धनवान् असा अर्थ होतो असें वाटतें. राहिलेल्या तीन ऋचांत त्या शब्दाचा अर्थ लक्षांत येत नाहीं. सुतुक हा शब्द सहा वेळां आला आहे. त्या सर्व ठिकाणीं धनवान् हा अर्थ लागू पडतो. प्रस्तुत ऋचेंत अग्नि हा सुधन व त्याचे घोडेही सुधन असा अर्थ करण्यास कोणत्याहि तऱ्हेचा बाध येत नाहीं. अग्नि वगैरे देवांना व घोड्यांना वाजी हें विशेषण लावलेलें ऋग्वेदांत पुष्कळ आढळतें. सुतुक ह्याच्याबद्दल वाजी शब्द घेतल्यानें ' वाजी अग्निः वाजिभिः अश्वैः इह आगच्छतु ' असा अर्थ मनाला चांगला पटतो. कारण, धन घेऊन देवांनीं यावें अशीं इच्छा सूक्तें रचणारांनीं पुष्कळ वेळां प्रकट केली आहे.

**सुप्रायणा अस्मिन् यज्ञे विश्रयन्ताम्। सुप्रगमनाः**

सुप्रायणाः = सुप्रगमनाः. सुप्रायणाः = सु + प्र + अयनाः. अयनम् = गमनम्. हे शब्द प्रैष ६ वा ह्यांतून घेतले आहेत. हा प्रैष यज्ञद्वारासंबंधीं आहे. यज्ञांत हवि घेण्यासाठीं सर्व देवांनीं यावें व यज्ञगृहांत शिरण्यास त्यांना कोणतीही अडचण पडूं नये म्हणून ह्या यज्ञांत ( अस्मिन् यज्ञे ) यज्ञगृहाचीं द्वारें देवांना सहज आंत येतां येईल इतकीं ( सुप्रायणाः ) उघडीं राहोत ( विश्रयन्ताम् ). निघण्टूंत प्रायणाः हा शब्द कां घातला हें समजत नाहीं. संस्कार व अर्थ ह्या संबंधानें सुप्रायणाः ह्या शब्दांत कोणतीही अडचण दिसत नाहीं.

## खंड १९ वा.

**देवा नो यथा सदमिद्वृधे असन्नप्रायुवो रक्षितारो दिवेदिवे ( ऋ० सं० १।८९।१ )। देवाः नः यथा सदा वर्धनाय स्युः अप्रायुवः अप्रमाद्यन्तः रक्षितारः च अहनि अहनि**

सदम् = सदा. इत् निपात निरर्थक असल्याकारणानें भाष्यांत गाळला आहे. परंतु इत् हा निरर्थक नाहीं. त्याचा अर्थ 'एव' असा आहे. सदमित् = सदैव. वृधे = वर्धनाय. असन् = स्युः. ऋग्वेदांत अस्तु बद्दल असत् व सन्तु बद्दल असन् येतें. दुर्ग म्हणतोः—असन् । स्युः इत्यर्थः । भाष्येऽपि स्युः इत्येष एव पाठः । असन् इत्येष प्रमादपाठः= कित्येक पोथ्यांत स्युः ह्याच्याबद्दल असन् हा पाठ आढळतो तो चुकीचा आहे. स्युः हाच पाठ बरोबर आहे. हल्लींच्या सर्व प्रतींत स्युः असाच पाठ आढळतो. अप्रायुवः (३७) = अप्रमाद्यन्तः = प्रमाद न करणारे. हा अर्थ यास्कानें कसा काढला तें समजत नाहीं. अप्रायु अप्रायुवः अप्रायुभिः अशीं तीन रूपें ऋग्वेदांत आहेत. 'एषा० रयिमप्रायु- चक्रे । सुविताय० विभाति ' (५।८०।३) = ही ( उषा ) आम्हांस टाकून न जाणारें न वगळणारें ( अप्रायु ) धन देते. ती आमच्या कल्याणाकरतां प्रकाशते. 'तं वो वाजानां पतिमहूमहि श्रवस्यवः । अप्रायुभिर्यज्ञेभिर्वावृधेन्यम्' ( ८।२४।१८ ) = धनाचा पति ( वाजानां पतिम् ) व त्याला कधीं न वगळणाऱ्या ( अप्रायुभिः ) अशा हवीनीं पुष्ट होणारा ( वावृधेन्यं ) असा जो इंद्र त्याला आम्ही धनाच्या इच्छेनें हाक मारीत आहोंत. 'यु' वेगळें करणें हा धातू ऋग्वेदांत पुष्कळ वेळां येतो. उपस्थाय मातरम् अन्नम् ऐट्ट तिग्मम् अपश्यत् अभि सोमम् ऊधः । प्रयावयन् अचरत् गृत्सो अन्यान् महानि चक्रे ( ऋ० सं० ३।४८।३ ) = इंद्र आईजवळ जाऊन खायला ( अन्नं ) मागूं लागला ( ऐट्ट ). जवळच त्यानें मादक ( तिग्मम् ) सोमानें भरलेलें भांडें ( ऊधः ) पाहिलें. दुसऱ्यांना ( अन्यान् ) बाजूला सारून ( प्रयावयन् ) एकटा तो त्या भांड्या- कडे गेला ( अचरत् ), व नंतर त्यांतील सोम पिऊन त्यानें मोठीं शूरकर्मे केलीं. एथें प्रयावयन् ह्याचा अर्थ ' दूर करणारा ' असा आहे. तोच 'यु' धातू अप्रायुवः ह्याच्या- मध्यें असावा असें वाटतें. प्र + आ + युः = प्रायुः. नप्रायुः अप्रायुः. अप्रायुः अप्रायू अप्रायुवः असा हा शब्द चालत असेल. अप्रायुवः दूर न करणारे; जवळ घेणारे. देवांनीं आम्हांला जवळ घ्यावें व नेहमीं आमची वृद्धि करावी व दररोज आमचें रक्षण करावें अशी इच्छा ऋगर्धांत प्रकट केली आहे. मूळांतील शब्दांचा ज्या वेळीं अर्थ द्यावयाचा असतो त्या वेळीं ते शब्द यास्क भाष्यांत उच्चारीत नाहींत. तेव्हां अप्रायुवः हा शब्द एथें प्रक्षिप्त असेल. दिवेदिवे = अहनि अहनि.

**च्यवनः (३८) ऋषिर्भवति। च्यावयिता स्तोमानाम्। च्यवानम् इत्यपि अस्य निगमाः भवन्ति**

च्यवन नांवाचा एक ऋषि होता. त्याला च्यवन म्हणण्याचें कारण तो तोंडां- तून स्तोम बाहेर टाकीत असे. च्यावयिता स्तोमानाम् हे शब्द दुर्गाच्या वृत्तींत नाहींत. दुर्ग म्हणतोः— भाष्यकारानें च्यवन जींत आहे अशी ऋचा दिली नाहीं, ह्याचें कारण च्यवन हें नांव सुप्रसिद्ध आहे. च्यवान ह्या नांवानेंही ह्या ऋषीसंबंधींच्या ऋचा आहेत.

**युवं च्यवानं सनयं यथा रथम् पुनर्युवानं चरथाय तक्षथुः (ऋ० सं० १०।३९।४)।**
**युवां च्यवनं सनयं पुराणं यथा रथं पुनः युवानं चरणाय ततक्षथुः**

युवं = युवाम्. च्यवानम् = च्यवनम्. सनयम् = पुराणम्. यास्क मूळांतले शब्द अर्थ देतांना उच्चारीत नाहीं. तेव्हां भाष्यांतील 'सनयं' हा शब्द प्रक्षिप्त होय. चरथाय = चरणाय. चर् धातूला अथ प्रत्यय लागून चरथ शब्द झाला आहे. तक्षथुः = ततक्षथुः = तुम्ही तासून तयार केला. जसा कोणी जुना झालेला लांकडी रथ तासून पुनः नवीन करतो, त्याप्रमाणें 'म्हातारा झालेला जो च्यवान त्याला इकडे तिकडे हालचाल करण्याकरतां तुम्ही पुनः तरुण केलें.

**युवा प्रयौति कर्माणि । तक्षतिः करोतिकर्मा ।**

तरुण मनुष्याला युव म्हणण्याचें कारण तो सपासप कामें करतो. म्हणजे युव शब्द 'यु' ह्या धातुपासून झाला आहे. लॅटिन्मध्यें 'जुव्हेनिस्' असा तरुण ह्या अर्थी शब्द आहे व तो 'जुव्हो' मदत करणें, आनंद देणें ह्यापासून झाला आहे. तो शब्द आणि युवन् हे एकच. तक्ष् म्हणजे करणें, परंतु तक्ष् ह्याचा मूळ अर्थ 'तासणें' असा आहे. जो तासतो तो तक्षा म्हणजे सुतार. प्रस्तुत ऋचेंत तक्ष् हा लाक्षणिक अर्थानें वापरला आहे. च्यवन शब्द ऋग्वेदांत सहा वेळां आला आहे. त्यांपैकीं चार वेळां इंद्राला व एकदां अग्नीला तो लाविला आहे. च्यवन म्हणजे पाडणारा. शत्रूला किंवा पर्वतांना जो पाडतो, जमीनदोस्त करतो तो. च्यवन नांवाचा ऋषि ऋग्वेदांत कोठेंही आला नाहीं. ज्याला अश्विनांनीं तरुण केलें अशा च्यवानाचें नांव आठवेळां, दोनदां एका ऋषीचें म्हणून व एकदा अश्विनांचें विशेषण असें ऋग्वेदांत आलें आहे व दोन ठिकाणीं च्यवान शब्दाचा अर्थ कळत नाहीं. महाभारतांतील व पुराणांतील च्यवनभार्गव नांवाचा जो ऋषि त्याचा ऋग्वेदांत कोठेंही उल्लेख नाहीं. च्यवन शब्द दुर्ग म्हणतो त्याप्रमाणें च्यावन असा असला पाहिजे. च्यावयति इति च्यावनः. पाणिनीय व्याकरणाप्रमाणें च्यवन हा शब्द अशुद्ध होय. म्हणून तो निघण्टुकारानें निघण्टूंत घातला. यास्काला निघण्टुकाराचा हा हेतु समजला नाहीं.

**रजो ( ३९ ) रजतेः । ज्योतिः रजः उच्यते ।**
**उदकं रजः उच्यते । लोकाः रजांसि उच्यन्ते ।**

रञ्ज रागे ( रंग देणें ) ( धा० पा० १।१०२४ ) ह्याच्यापासून रजस् शब्द झाला आहे. प्रकाशाला रजस् म्हणतात. उदकाला रजस् म्हणतात. द्युलोक वगैरेंना रजांसि म्हणतात.

**असृगहनी रजसी उच्येते ।**

रक्त ( असृक् ) आणि दिवस ह्यांना रजसी म्हणतात. असृक् च अहः च असृगहनी. मासिमासि रजो ह्यासां दुष्कृतान्यपकर्षति ( वासिष्ठधर्मसूत्र २८।४ ) = महिन्यामहिन्याला जो रक्तस्राव होतो त्यानें स्त्रियांनीं जीं कांहीं व्यभिचारपापें केलीं असतील त्यांचा नाश होतो असें दुर्ग म्हणतो. पण त्यानें रजस् म्हणजे रक्त ह्याचें ऋग्वेदांतून उदाहरण द्यावयास पाहिजे होतें. अहश्च कृष्णं अहरर्जुनंच विवर्तेते रजसी ( निरुक्त २।२१ ) हें रजस् म्हणजे दिवस ह्या अर्थाचें उदाहरण दुर्ग देतो.

परंतु रजसी ह्याचा यास्क आणि दुर्ग ह्यांनीं केलेला अर्थ चुकीचा आहे असें त्या-ठिकाणीं सांगितलेंच आहे. असृगहनी ह्या पाठाविषयीं बराच संशय येतो. बहुत-करून असृक् शब्द कुणीतरी घुसडला असावा. अहनी रजसी उच्येते हाच कदाचित् पाठ असेल. अहनी म्हणजे रात्र आणि दिवस. त्याचें उदाहरण यास्काच्या मतें अहश्च कृष्णमहरर्जुनं च हें होय. रजसी ह्या शब्दाचा अहनी म्हणजे रात्र आणि दिवस असा अर्थ यास्क सर्वत्र करतो असें दिसतें. परंतु सर्व ठिकाणीं रजसी म्हणजे द्यावापृथिव्यौ असाच अर्थ आहे. महाराष्ट्रपाठांत ‘ रजांसि चित्रा विचरन्ति तन्यवः ( ५।६३।५ ) इत्यपि निगमो भवति ’ असा अधिक पाठ आहे. यास्कानें रजस् शब्दाच्या भिन्न अर्थांचीं उदाहरणें दिलीं नाहींत. हे अर्थ प्रसिद्ध आहेत म्हणून त्यानें उदाहरणें दिलीं नसावींत. उदकं रजः उच्यते ह्याचें भुवो यज्ञस्य रजसश्च नेता ( ऋ० सं० १०।८।६ ) हें उदाहरण म्हणून दुर्ग देतो व तें त्याच्या प्रतींत असावें असें वाटतें. कारण तो ‘ ज्योती रजः उच्यते ’ ह्या संबंधानें ‘ ह्या अर्थाचीं उदाहरणें पुष्कळ असल्यामुळें भाष्यकार उदाहरण देत नाहीं ’ असें म्हणतो. वास्तविक भाष्यकारानें कोणत्याच अर्थाचें उदाहरण दिलें नाहीं. रजस् शब्द जेव्हां एकवचनी असतो तेव्हां त्याचा अर्थ प्रकाश किंवा उदक; अनेकवचनी असतांना त्याचा अर्थ लोक किंवा जगें; व द्विवचनी असतांना त्याचा अर्थ रात्र व दिवस असा होतो असें यास्क म्हणतो. परंतु रजांसि ह्याचा प्रकाश आणि उदक असेही अर्थ होतात. त्याचप्रमाणें रजस् ह्या एकवचनी शब्दाचा लोक असा अर्थ होतो. यास्कानें कदाचित् रजस् हा एकवचनी असतांना कोणते अर्थ होतात व अनेकवचनी असतांना कोणता अर्थ होतो एवढेंच सांगितलें असेल. ‘ अहनी रजसी उच्येते ’ हें कोणीतरी मागाहून घातलें असेल. रजस्चे वर जे अर्थ दिले आहेत ह्याशिवाय ह्या शब्दाचा धन असा अर्थ आहे. बऱ्याच ऋचांत रजस् शब्द व्यर्थी वापरला आहे, तेथें धन असा गूढार्थ आहे.

**हरः ( ४० ) हरतेः । ज्योतिः हरः उच्यते । उदकं हरः उच्यते । लोकाः हरांसि उच्यन्ते**

हरस् शब्द हा हृ ‘ नेणें ’ ह्यापासून झाला आहे. प्रकाशाला हरस् म्हणतात. पाण्याला हरस् म्हणतात. लोक म्हणजे जगें ह्यांना हरांसि म्हणतात. गुर्जरप्रतींत हरांसि ह्या ठिकाणीं हराः असा पाठ आहे. महाराष्ट्रपाठांत ‘ असृगहनी हरसी उच्येते । प्रत्यग्ने हरसा हरः शृणीहि (ऋ० सं० १०।८७।२५) इत्यपि निगमो भवति’ असा अधिक पाठ आहे. ‘ प्रत्यग्ने हरसः हरः शृणीहि ’ हें हरसी ह्याचें उदाहरण नसून प्रकाश किंवा उदक ह्याचें कदाचित् होईल; तेव्हां तें उच्यते ह्याच्या नंतरच द्यावयास पाहिजे. तसेंच रजांसि चित्रा विचरन्ति तन्यवः हें लोकाः रजांसि उच्यन्ते ह्याच्यानंतर द्यावयास पाहिजे. महाराष्ट्रपाठांत क्रमभंगाचीं आणखीही उदाहरणें आहेत. हरः हरसा, हरसे व हरसः अशा रूपांनीं हरस् शब्द ऋग्वेदांत नऊ वेळां

आला आहे व हरस्वती हा एकदां आला आहे. 'हरस्वती' हा शब्दखेरीज करून बाकीचीं सर्व उदाहरणें दहाव्या मंडळांतील होत. हरस् म्हणजे ज्वाला, जोर असे अर्थ आहेत. प्रत्यग्ने हरसा हरः शृणीहि (१०।८७।२५)= हे अग्नि, शत्रूचा जोर तूं आपल्या स्वतःच्या जोरानें हाणून पाड. निघण्टुकारानें हरस् शब्द हा अनेकार्थी म्हणून घातला किंवा अनवगतसंस्कार म्हणून घातला हें समजत नाहीं. हरस् ह्याचा धन हा गूढार्थ असतो. दुर्ग 'ज्योतिर्हरः उच्यते' ह्याचें 'या ते अग्ने हरःशया तनूः' हें उदाहरण देतो. परंतु तेथें हरस् म्हणजे प्रकाश असा अर्थ नाहीं. 'या ते अग्ने अयःशया तनूः या ते अग्ने रजःशया या ते अग्ने हरःशया तया नः पाहि' (वाज० सं० ५।८)=हे अग्नि, लोखंडांत असणारी, रुप्यांत असणारी व सोन्यांत असणारी अशा ज्या तुझ्या तीन तनु त्यांनीं आमचें रक्षण कर. एथें रजस् आणि हरस् ह्याचा अर्थ दुर्ग म्हणतो त्याप्रमाणें प्रकाश नाहीं.

**जुहुरे वि चितयन्तः (ऋ० सं० ५।१२।२)। जुह्विरे विचेतयमानाः**

जुहुरे (४१) = जुह्विरे. पाणिनीय संस्कृतांत 'हु' आहुती देणें (धातुपाठ ३।१) ह्याचें लिट्चें आत्मनेपदी तृतीयपुरुषीं अनेकवचनी रूप जुह्विरे असें होतें. परंतु ऋग्वेदांत प्रत्यय धातूला सेट्चा इ न लागतां पुष्कळ वेळां लाविला जातो. येथें संस्कार नियमशुद्ध नाहींत असें निघण्टुकारास म्हणावयाचें असेल. परंतु पाणिनीय नियमानें संस्कार जरी अशुद्ध असला तरी तो अनवगत नाहीं. तेव्हां जुहुरे हा शब्द निघण्टूंत घालण्याचें कांहीं कारण नव्हतें. जर जुहुरे घातला तर जुव्हिरे ('ह्वे'चें लिट्चें तृतीय पु. अनेकवचन) हेंहि घालावयास पाहिजे होतें. वि चितयन्तः = विचेतयमानाः। कर्मकर्तृसाधनानां याथात्म्यं वेदांतदर्शनेन जानानाः = कर्म, कर्ता व साधनें ह्यांचें ज्यांना वेदाभ्यासानें यथार्थ ज्ञान होतें ते असा दुर्ग अर्थ करतो. परंतु 'चित्' प्रज्वलित करणें असा अर्थ ऋग्वेदांत आहे. जुहुरे वि चितयन्तः = अग्नि प्रज्वलित करून त्यांत आहुति दिली.

**व्यन्तः (४२) इत्येषः अनेककर्मा। पदं देवस्य नमसा व्यन्तः (ऋ० सं० ६।१।४) इति पश्यतिकर्मा। वीहि शूर पुरोळाशम् (ऋ० सं० ३।४१।३) इति खादतिकर्मा।**

व्यन्तः ह्याचे पुष्कळ अर्थ होतात. ह्या ऋचेंत व्यन्तः ह्याचा अर्थ 'पाहणारे' असा आहे. वीहि = खा.

**वीतं पातं पयस उस्रियायाः (ऋ० सं० १।१५३।४)। अश्नीतं पिबतं पयसः उस्रियायाः। उस्रिया इति गोनाम। उस्राविणः अस्यां भोगाः**

वीतं = अश्नीतम्. पातं = पिबतम्. उस्रिया म्हणजे गाय. गाईला उस्रिया म्हणण्याचें कारण तिच्यापासून दूध वगैरे भोग्य वस्तु पाझरतात. महाराष्ट्रपाठ उत्स्राविणः असा आहे व तोच कदाचित् बरोबर असेल. उत्स्रु = बाहेर स्रवणें. उत्स्राविणः बाहेर स्रवणारे. महाराष्ट्रप्रतींत उस्रा इति च असें जास्त आहे. उस्रा इति च =उस्रा हेंहि गाईचें नांव होय. परंतु उस्रा याचा अर्थ किरण किंवा दिवस असा आहे. निघण्टु-

कारानें वी धातूचें व्यन्तः एवढेंच रूप कां घेतलें हें समजत नाहीं. अध्याय ३ खंड २० एथें स्तृभिः व वम्रीभिः अशीं निघण्टूतलीं तृतीयांत रूपें दिलीं आहेत. ऋग्वेदांत ते शब्द तृतीयान्तच आढळतात म्हणून ते निघण्टुकारानें जसेच्या तसेच घेतले असतील. परंतु वी धातूचें व्यन्तः एवढेंच रूप ऋग्वेदांत नाहीं. वेमि, वेषि, वेति, वेतु, वीथः, व्यन्ति, व्यन्तु, व्यन्ता, व्यन्तः, वेवेति, वेवीयते, अव्यत्, अव्यत, अव्यन् अशीं क्रियारूपें; वीतिं, वीती, वीतये अशीं नामरूपें; वीत हें विशेषण; देववीः प्रावीः दुराव्यम् अशीं सामासिक रूपें ऋग्वेदांत आढळतात. यास्कानें दिलेल्या अर्थाशिवाय 'वी'चे प्रेम करणें, द्वेष करणें, तृप्त करणें, जाणें व देणें असेही अर्थ आहेत. अग्नीषोमा हविषः प्रस्थितस्य वीतं हर्यतं वृषणा जुषेथाम् ( १।९३।७ ) एथें वीतं = हर्यतं = जुषेथाम् = प्रेम करा, सेवन करा. देववीः = देवांना हवी देऊन तृप्त करणारा. उपाह तं गच्छथो वीथो अध्वरं ( ऋ० सं० १।१५१।७ ) एथें वीतः = गच्छथः. व्यन्तः हें रूप ऋग्वेदांत चार वेळां आलें आहे. अवो व्यन्तो अजरा अग्नयो व्यन्तो अजराः ( ऋ० सं० १।१२७।५ ) = ज्यांना जरा माहीत नाहीं व जे कल्याण ( अवः ) देतात ( व्यन्तः ) असे अग्नि. गोमदश्वावद्रथवद्व्यन्तो यूयं पात स्वस्तिभिः सदा नः (ऋ० सं० ७।२७।५) =गाई, घोडे व रथ ह्यांनीं युक्त असें धन देणारे तुम्ही आमचें सदैव रक्षण करा. अभ्रातरो न योषणो व्यन्तः पतिरिपो न जनयो दुरेवाः। पापासः ( ४।५।५ ) = ज्यांना भाऊ नाहीं अशा स्त्रिया, नवऱ्याचा द्वेष करणाऱ्या बायका, ह्यांच्याप्रमाणें द्वेष करणारे व दुष्कर्मे करणारे पापी लोक. पदं देवस्य नमसा व्यन्तः एथें व्यन्तः ह्याचा अर्थ 'तृप्त करणारे' असा आहे; 'पाहणारे' असा नाहीं. प्रयाज व अनुयाज ह्यांमध्यें आज्यस्य व्यन्तु, वेतु, वीताम् अशीं देवांच्या संख्येप्रमाणें रूपें येतात. एथें 'वी'चा अर्थ खाणें. यास्कानें दिलेल्या उदाहरणांवरून खाद् व अश् हे भिन्नार्थ धातु आहेत असें तो समजतो. दुर्ग अश्नीतं ह्यासंबंधानें म्हणतोः—उस्रियायाः पयसः इति श्रूयमाणे पयस्याज्ये प्रतीयेते। तयोः आज्यं पेयं तत् पातम् इत्यनेन संबद्ध्यते। पारिशेष्यात् वीतम् इत्यस्य शब्दस्य पयस्यया सह संबन्धः। सा च नातिकठिना नातिद्रवा अशनयोग्या। तस्मात् वीतम् इत्येष शब्दः अशनार्थः इति उपपद्यते। लोकेऽपि हि नातिकठिने नातिद्रवे अशनशब्दः प्रसिद्धः अश्नाति पायसम् इति = ह्या मंत्रामध्यें पयस उस्रियायाः हे शब्द आहेत. गाईच्या दुधापासून पयस्या व आज्य उत्पन्न होतात. तेच पदार्थ एथें प्रतीत आहेत. आज्य हें पेय आहे; म्हणून त्याचा पातं ह्याच्याशीं संबंध. तेव्हां अर्थातच वीतं ह्याचा पयस्येशीं संबंध आहे. ही पयस्या फार कठीणहि नसते व प्रवाहीहि नसते. म्हणून ती खाण्याला योग्य असते. जो पदार्थ फार कठीण नसतो व प्रवाही नसतो त्यासंबंधानें अश् धातूचा उपयोग करतात. असा वीतं व पातं ह्यांच्यामध्यें दुर्गानें भेद केला आहे. परंतु तसा भेद करण्याचें कांहीं कारण नाहीं. ऋग्वेदांत अर्थपुनरुक्ति ही अपवाद नसून अगदीं सामान्य गोष्ट आहे. वीतं व पातं ह्याचा अर्थ एकच.

**त्वामिन्द्र मतिभिः सुते सुनीथासो वसूयवः। गोभिः क्राणा अनूषत। गोभिः कुर्वाणाः अस्तोषत**

क्राणाः ( ४३ ) = कुर्वाणाः. अनूषत = अस्तोषत. दुर्ग गोभिः क्राणा अनूषत इति निगमः। गोभिः कुर्वाणाः अस्तोषत इति निर्वचनम्। त्वामिन्द्र इति शेषः असें म्हणतो. तेव्हां त्याच्या प्रतींत गोभिः क्राणा अनूषत एवढेच शब्द होते व तेच शब्द यास्क-भाष्यांत होते असें त्याच्या विवरणावरून दिसतें. ही ऋचा ऋग्वेदांत नाहीं व ती दुसऱ्या कोणत्या संहितेंत आहे हेंही अजून आढळून आलें नाहीं. हे इन्द्र सुनीथासः वसूयवः क्राणाः गोभिः सुते मतिभिः त्वाम् अनूषत = हे इंद्रा, धनवान् ( सुनीथासः ) धनेच्छु ( वसूयवः ) क्राणाः (?) गाईचें दूध मिसळून सोम तयार झाल्यावर तुझी स्तुतीनें स्तुति करितात. गोभिः ह्याचा स्तुतींनीं असा अर्थ दुर्ग करतो. परंतु गोभिः श्रिणीत मत्सरं एथें जो गोभिः ह्याचा तोच अर्थ प्रस्तुत ऋचेंत आहे. क्राणा (७ वेळां), क्राणाः (३ वेळां) व क्राणासः क्राणाय आणि क्राणस्य एक एक वेळां असे ऋग्वेदांत आले आहेत. तो शब्द अग्नि सोम, मरुत्, उषा, इंद्र ह्यांचें विशेषण म्हणून आढळतो. त्याचा अर्थ ठरवितां येत नाहीं. ढोबळ अर्थ कर्तबगार जोरदार असा होईल. कृ ह्याला आन लावून क्राण असा शब्द होईल. क्राणस्य ह्या रूपावरून क्राण हा मूळ शब्द असावा. किंवा कॄ = स्तुति करणें ह्याला आन लावून क्राण झाला असेल. कदाचित् क्रा स्तुति करणें असा एखादा धातु असेल; क्रा + आन = क्राण. क्राणा हें त्याचें कोणतें रूप हें सांगतां येत नाहीं. ज्याअर्थी क्राणा हें अग्नीचें विशेषण असें आढळतें त्यावरून तें स्त्रीलिंग नव्हे. क्राणा हा शब्द ऋग्वेदांत आला असतांना त्यांतील एखादी ऋचा उदाहरणाकरितां न घेतां जिचें मूळ सांपडत नाहीं अशी बाहेरची ऋचा यास्कानें कां घेतली हें समजत नाहीं.

**आतू षिञ्च हरिमीं द्रोरुपस्थे वाशीभिस्तक्षताश्मन्मयीभिः ( ऋ० सं० १०।१०१।१० )। आसिञ्च हरिम् द्रोः उपस्थे द्रुममयस्य। हरिः सोमः हरितवर्णः। अयमपि इतरः हरिः एतस्मादेव। वाशीभिस्तक्षताश्मन्मयीभिः वाशीभिः ( ४४ ) अश्ममयीभिः इति वा वाग्भिः इति वा**

तु व ईम् हे निरर्थक असल्यामुळें गाळले आहेत. परंतु ईम् हा निपात निरर्थक नसून त्याचा अर्थ 'हा' असा आहे. आतू सिञ्च = ओतच. द्रोः = द्रुममयस्य. हरिः = सोमः. सोमाला हरि म्हणण्याचें कारण त्याचा रंग ( वर्ण ) पिवळा (हरित) असतो. हरी म्हणजे सोन्याच्या रंगाचा असा अर्थ आहे. पाणी व दूध मिसळल्यावर सोमाचा रंग पालटतो. त्या पालटलेल्या रंगाला उद्देशून सोमाला हरि म्हटलें आहे. लौकिक कपिवाचक शब्द जो हरि त्याचीही हीच व्युत्पत्ति, म्हणजे माकडाचा रंग पिंगट असतो म्हणून त्याला हरि म्हणतात. 'शिरीषकुसुमप्रख्याः केचित् पिंगलकप्रभाः वानराः इति श्रूयन्ते रामायणे' असें दुर्ग म्हणतो. ह्यावरून हरि म्हणजे पिंगट वर्णाचा. अश्मन्मयीभिः = अश्ममयीभिः = दगडाच्या. परंतु जर वाशीभिः म्हणजे

शाभिः असा अर्थ असेल तर अश्मन्मयीभिः = अशनमयीभिः = व्यापनसमर्थाभिः. ऋचेचा अर्थः— हे अध्वर्यु, ह्या सोमाला लाकडावर म्हणजे अधिषवणफलकावर टाक. अहो अभिषव करणारे लोकहो, अधिषवणफलकावर पडलेला हा जो सोम त्याला दगडाच्या वरवंट्यांनीं कुटा. किंवा ऋचेचा दुसरा अर्थ होईल तो असाः— हे उन्नेत्या, हा सोम द्रोणकलशामध्यें ओत. अहो होत्यांनो, कलशामध्यें हा ओतला जात आहे त्याची प्रशस्त अशा वाणींनीं स्तुति करा. पहिल्या अर्थांत तक्षत म्हणजे कुटा व दुसऱ्यांत संस्कुरुत म्हणजे पिण्याला योग्य करा. वाशी व अश्मन्मयी ह्या शब्दांचे हे दुसरे अर्थ अस्वाभाविक होत. दगडाच्या घणांनीं ठेंचा व लाकडाच्या भांड्यांत तो रस ओता असाच अर्थ आहे. परंतु वाशी इति वाङ्नाम वाश्यते इति मत्याः असें निरुक्त ४।१६ यांत म्हटलें आहे. त्यामुळें यास्कास हा दुसरा अर्थ करावा लागला. वाशी हा शब्द वाङ्नामामध्यें घातला आहे ( निघण्टु १।११ ).

**स शर्धदर्यो विषुणस्य जन्तोर्मा शिश्नदेवा अपि गुर्ऋतं नः ( ऋ० सं० ७।२१।५ )। सः उत्सहतां यः विषुणस्य जन्तोः विषमस्य। मा शिश्नदेवाः अब्रह्मचर्याः। शिश्नं श्नथतेः। अपि गुर्ऋतं नः। सत्यं वा यज्ञं वा।**

शर्धत् = उत्सहताम् = उत्साहानें येवो. आमच्या यज्ञाला येण्यास उत्साह वाटो. सःम्हणजे कोण ? जो आपलीं इंद्रियें ताब्यांत ठेवण्याला समर्थ ( अर्यः ) आहे तो. जो जितेंद्रिय असेल त्यालाच आमच्या यज्ञाला येण्याला उत्साह वाटेल. यः शब्द यास्कानें अध्याहृत घेतला आहे. विषुणस्य = विषमस्य. आणि जो यज्ञाचा विध्वंस करणाऱ्या ( विषुणस्य = विषमस्य ) माणसाला ( जन्तोः ) शिक्षा करण्यास समर्थ आहे. त्याला उत्साह वाटेल शिश्नदेवाः = अब्रह्मचर्याः. परंतु जे शिश्नांशीं खेळतात म्हणजे ज्यांना ब्रह्मचर्यव्रत पाळतां येत नाहीं ते आमच्या यज्ञास न येवोत. ऋतं = सत्यं वा यज्ञं वा. जेव्हां ऋत म्हणजे यज्ञ, तेव्हां वरीलप्रमाणें अर्थ होतो. पण जेव्हां ऋत म्हणजे सत्य तेव्हां ह्या पापी लोकांना आमचा खरा खरा अर्थ न कळो. अपिगुः = विदुः. शिश्न शब्द श्नथ् हिंसा करणें ह्यापासून झाला आहे. शिश्नं श्नथतेः हें दुर्गवृत्तींत नाहीं. धातुपाठांत ‘ श्नथ् ’ धातु नाहीं. तो यास्काच्या वेळीं प्रचारांत होता असें दिसतें. ऋचेचा यास्कानें केलेला अर्थ चुकीचा आहे. ‘ शर्ध् ’ हिंसा करणें. सः म्हणजे इंद्र शर्धत् म्हणजे ठार करो. अर्यः = अरेः = शत्रूचा. जन्तोः म्हणजे प्राण्याला. जो प्राणी आमच्याशीं शत्रुत्व करतो त्याला. विषुण हा शब्द ‘ विष् ’ इजा करणें ह्याला उन प्रत्यय लावून झाला आहे. भीमो विवेषायुधेभिरेषामपांसि ( ऋ० सं० ७।२१।४ ) = भयंकर असा इंद्र ( भीमः ) ह्यांचीं ( एषां ) कर्में ( अपांसि ) आयुधांनीं ( आयुधेभिः ) नाश करिता झाला ( विवेष ). एथें विष् म्हणजे नाश करणें ह्याच्यापासून विवेष रूप झालें आहे. तोच धातु विषुण शब्दामध्यें आहे. विषुणस्य = नासाडी करणाऱ्याला. ज्यांचा देव शिश्न म्हणजे जे लिंगपूजा करतात ( शिश्नदेवः ) त्यांनीं आमच्या यज्ञास येऊं नये; कारण, ते आमच्या यज्ञाची नासाडी करतील. ‘ शर्ध् ’

उत्साह वाटणें असा अर्थ ऋग्वेदांत नाहीं. धातूच्या पाठीमागें जेव्हां अपि येतो तेव्हां तो निकटपणा दाखवितो. मा अपिगुः = जवळ जाऊं नये.

## खंड १० वा.

**आ घा ता गच्छानुत्तरा युगानि यत्र जामयः कृणवन्नजामि । उप बर्बृहि वृषभाय बाहुमन्यमिच्छस्व सुभगे पतिं मत् ( ऋ० सं० १०।१०।१० ) आगमिष्यन्ति तानि उत्तराणि युगानि**

आगच्छान् = आगमिष्यन्ति. घ हा निरर्थक म्हणून गाळला आहे; परंतु 'घ'चा अर्थ 'खात्रीनें' असा आहे. ऋचि तु नु घ मक्षु तङ् कुत्रोरुष्याणाम् ( पाणिनि ६।३।१३३ ) = ऋचेमध्यें तु, नु, घ, मक्षु, त, कुत्र आणि उरुष्य ह्यांचे शेवटले स्वर दीर्घ होतात. ह्या नियमानें घ चा घा झाला आहे. ता=तानि. उत्तरा=उत्तराणि. तीं पुढचीं युगें येतीलच येतील.

**यत्र जामयः करिष्यन्ति अजामि कर्माणि ।**

कृणवन् = करिष्यन्ति. अजामि = अजामिकर्माणि. ज्या युगांत स्त्रिया स्त्रियांना अनुचित ( अजामि ) कर्में करतील.

**जामि अतिरेकनाम**

अतिरेक म्हणजे आधिक्य किंवा पुनरुक्त. जामि ह्याचा पुनरुक्त हा एक अर्थ आहे. तत् यत् समान्याम् ऋचि समानाभिव्याहारं भवति तत् जामि भवति ( निरुक्त १०।१६ ) = एकाच ऋचेमध्यें समानार्थी जेव्हां शब्द येतात तेव्हां एकापेक्षां अधिक जे शब्द त्यांना जामि म्हणतात. दुर्ग म्हणतो जामि शब्दाचा जींत पुनरुक्त अर्थ आहे अशी ऋचा शोधिली पाहिजे. तशी ऋचा ही होय:—कण्वा इन्द्रं यदक्रत स्तोमैर्यज्ञस्य साधनम् । जामि ब्रुवत आयुधम् ( ८।६।३ ) = जेव्हां कण्वानीं आपल्या स्तुतींनीं इंद्राला यज्ञ साधणारा केला तेव्हां आयुध व्यर्थ ( जामि ) आहे असें ते म्हणाले. म्हणजे इंद्र सहाय्यक असल्यावर आयुधांची जरुरी नाहीं.

**बालिशस्य वा**

अतिरेक नाम हें अतिरेकस्य नाम असें पाहिजे. कारण नाम ह्याचा बालिशस्य व असमानजातीयस्य ह्यांच्याशींहि संबंध आहे. परंतु अशीं अशुद्ध उदाहरणें पूर्वींहि दाखविलीं आहेत. जामि = बालिश = मूर्ख. स हि बालः इव शेते प्रमादित्वात् धर्मकार्येषु = बालिश मनुष्य धर्मकार्यांत प्रमाद करतो म्हणून तो एखाद्या लहान पोरासारखाच असतो अशी बालिश शब्दाची व्युत्पत्ति दुर्गानें दिली आहे. ह्या अर्थाचीहि ऋचा शोधून काढिली पाहिजे असें तो म्हणतो. मलाहि उदाहरण सांपडलें नाहीं.

**असमानजातीयस्य वा**

जामि म्हणजे असमानजातीय. स्त्री व पुरुष हे परस्परांना असमानजातीय होत. जामिः = जा+मिः, जा = जातीय = असमानजातीय. जामि ह्याचे ऋग्वेदांत

पुष्कळ अर्थ आहेत. परमं जामि तन्नौ (ऋ० सं० १०।१०।४) = तुझ्यामाझ्यामध्यें बहिणभावंड असा निकट संबंध आहे. एथें जामि = संबंध. जामिमजामिं प्र मृणीहि शत्रून् (४।४।५) = शत्रू संबंधी असोत किंवा नसोत त्यांना ठार कर. एथें जामि = संबंधी. जामी सयोनी मिथुना समोकसा (१।१५९।४) = रात्र व उषा ह्या एका घरांत राहणाऱ्या जुळ्या (मिथुना) बहिणी होत. जामी = बहिणी. गर्भं ददासि जामिषु (ऋ० सं० १०।२१।८). जामिषु = स्त्रीषु. भगस्य स्वसा वरुणस्य जामिरुषः (१।१२३।५) = हे उषे, तूं भगाची बहीण व वरुणाची बायको आहेस. हे सगळे अर्थ असमानजातीय ह्यांत अंतर्भूत होत नाहींत. कारण जामित्व हा संबंध समानजातीयांमध्येंसुद्धां होऊं शकेल. बालिश ह्याचा अर्थ पंढ असा असल्यास तो स्त्रीला किंवा पुरुषाला असमानजातीय होईल. परंतु जामि म्हणजे षंढ ह्या अर्थाची ऋचा सांपडत नाहीं. अजामिकर्माणि = संबंध्यांना न शोभणारी किंवा बहिणीनां न शोभणारी. हिंदुलोकांमध्यें बहीणभावंडाचे विवाह पूर्वींहि होत नसत. परंतु ते इजिप्त व इराण देशांत होत होते. त्याला अनुलक्षून तर ही ऋचा रचिली नसेल? फार प्राचीन काळीं अशीं लग्नें होत असत.

**उपजनः**

उपजनः ह्याचा ज्याच्याशीं संबंध तो शब्द घालावयास पाहिजे होता. कदाचित् 'जाः स्त्री मिः उपजनः' असें मूळ असेल. जाः, जास्पति, जास्पत्यम् ह्यांत **जाः** म्हणजे बायका. जाः हा अनेकवचनी शब्द आहे. जा व जामि ह्यांचा अर्थ एकच. 'जा'ला मि लावून अर्थ भिन्न होत नाहीं असें यास्कास म्हणावयाचें असेल. अवेस्तांत जामि = प्रसूति. जामय म्हणजे प्रसूत होणें.

**उपधेहि । वृषभाय बाहुम् । अन्यम् इच्छस्व सुभगे पतिं मत् इति व्याख्यातम्**

उपबर्बृहि = उपधेहि = ठेव. बृह् ह्याचीं बर्हय व बर्हयः अशीं रूपें आढळतात. हर्यश्वाय बर्हया समापीन् (७।३१।१२) = हर्यश्वाय इन्द्राय आपीन् संबर्हय. आपि म्हणजे मित्र. परंतु तो अर्थ एथें लागत नाहीं. आपि म्हणजे स्तोत्र किंवा हवि असा अर्थ असेल. तसा असल्यास संबर्हय म्हणजे अर्पण कर असा अर्थ होईल. तेव्हां उपबर्बृहि म्हणजे 'अर्पण कर' 'दे' असा अर्थ असेल. इति व्याख्यातम् = स्पष्ट आहे. म्हणजे हे शब्द इतके सोपे आहेत कीं, त्यांचें विवरण करावयास नको. इच्छस्व = अन्वेषयस्व = शोधून काढ. ऋचेचा अर्थः—अशीं युगें पुढें खास येणार आहेत कीं ज्यांत बहिणी बहिणींना न शोभणारीं किंवा संबंधी संबंध्यांना न शोभणारीं अशीं कृत्यें करतील. हे प्रिय भगिनी, (सुभगे) एखाद्या तरुणाला विवाहांत हात अर्पण कर. माझ्याहून भिन्न असा पति शोधून काढ. उपबर्बृहि उपधेहि वृषभाय बाहुं शयनीये = अंथरुणावर आपला बाहु नवऱ्याला उशीवजा दे, म्हणजे तुझ्या हातावर निजतांना डोकें टेकूं दे असा अर्थ दुर्ग करतो.

## खंड २१ वा.

**द्यौर्मे पिता जनिता नाभिरत्र बंधुर्मे माता पृथिवी महीयम्।**
**उत्तानयोश्चम्वोर्योनिरन्तरत्रा पिता दुहितुर्गर्भमाधात् ( ऋ० सं० १।१६४।३३)**
**द्यौः मे पिता पाता वा पालयिता वा जनयिता**

पिता=पाता वा पालयिता वा. पितृशब्द पा किंवा पाल्य् रक्षण करणें ह्यापासून झाला आहे. लातिन पेतर. जनिता=जनयिता.

**नाभिः अत्र बन्धुः मे माता पृथिवी महती इयम्**

मही=महती. दुर्ग म्हणतोः–नहनमेव नाभिः । अत्र एतस्मिन् द्युलक्षणे पितरि उदकदानेन अनुग्रहीतरि सति संतानोत्पत्यनुग्रहक्रमेणैव शुक्रात्मनोत्पत्तिः उपपद्यते इत्येवम् अभिसमीक्ष्य उक्तं द्यौर्मे पिता जनिता नाभिरत्र इति । बन्धुर्मे । अङ्गसंबन्धकारणात् बन्धुः । मे माता पृथिवी मही । 'पृथिवीत्वम्' इति मातुः मन्त्रेण पृथिवीत्वं संपाद्यमानं दृष्ट्वा एवम् आह बन्धुर्मे माता पृथिवी महीयम् इति । उदकं हि द्युलोकात् पतितं पार्थिवेन धातुना संपृक्तम् ओषधिभावम् आगम्य शरीरभावेन अवतिष्ठते इत्येतत् अपेक्ष्य सर्वभूतानां द्यावापृथिव्यौ मातापितरौ उच्येते तत्र तत्र । तत्कृतस्य हि उपकारस्य अभावे सति इतरौ मातापितरौ अकिञ्चित्करौ एव भवतः । तस्मात् उपपद्यते द्यावापृथिव्योः मातापितृभावः = नाभि म्हणजे बांधणें. द्यु हा पिता. तो उदक देऊन जेव्हां अनुग्रह करतो तेव्हां संतानोत्पत्तीकरितां शुक्राची उत्पत्ति होते. म्हणून द्युला माझा पिता, जनिता, नाभि असें म्हटलें आहे. आईचा अंगाशीं संबंध असल्याकारणानें तिला बंधु म्हटलें आहे. द्युलोकापासून पडलेलें पाणी जेव्हां पार्थिव धातूशीं मिसळतें तेव्हां औषधि उत्पन्न होतात; त्या औषधि मनुष्य खातो तेव्हां शरीर उत्पन्न होतें. हें सर्व लक्षांत घेऊन द्यावापृथिवींना सर्व प्राणिमात्रांचे आईबाप म्हटलें आहे. जर द्यावापृथिवी असल्या प्रकारचा अनुग्रह करणार नाहींत तर प्राण्यांच्या मातापितरांपासून संतानोत्पत्तीचें काम मुळींच होणार नाहीं. नाभि व बन्धु ह्या दोहोंचाही अर्थ उत्पत्तिस्थान. वैश्वानर नाभिरसि क्षितीनाम् ( ऋ. सं. १।५९।१ )=हे वैश्वानरा, तूं लोकांचें उत्पत्तिस्थान आहेस. गन्धर्वो अप्सु अप्या च योषा सा नो नाभिः ( ऋ. सं. १०।१०।४ )=गंधर्व व पाण्यांत राहणारी स्त्री हीं दोघेंही आपलें उत्पत्तिस्थान होत. अरणीं नाभि मेमि ( ऋ. सं. १०।१२४।२ )=मी अग्नि पुनः अरणी जें माझें उत्पत्तिस्थान, तिकडे जातों. नाभि शब्दाचे अनुक्रमें ( १ ) बेंबी ( २ ) कोणत्याही वस्तूचा मध्य ( ३ ) उत्पत्तिस्थान ( ४ ) ज्याच्यावर एखादी वस्तु अवलंबून असते तें असे अर्थ होत. युवोर्हि नः सख्या पित्र्याणि समानो बन्धुः (ऋ. सं. ७।७२।२) व समानं वां सजात्यं समानो बन्धुरश्विना ( ऋ. सं. ८।७३।१२ ) एथें कवि अश्विनांना आपले सजातीय म्हणतो. तुमचें व माझें उत्पत्तिस्थान एकच असें या दोन ऋचांत म्हटलें आहे. स्वसार ईं जामयो मर्जयन्ति सनाभयो वाजिनमूर्जयन्ति ( ऋ. सं. ९।८९।४ )= हाताच्या दहा अंगुली ( बोटें ) ह्या दहा बहिणी व सोमाच्या दहा बायका. ह्यांचें

उत्पत्तिस्थान एकच म्हणजे हात. रथानां न येऽराः सनाभयः (ऋ. सं. १०।७८।४) रथांच्या अरा जशा एका नाभींतून निघतात तसे मरुत् एका नाभीपासून म्हणजे एकाच आईबापापासून जन्मले आहेत. ऋ. सं. ५।५९।५ आणि ८।२०।२१ एथें मरुतांना सबन्धवः म्हटलें आहे. मिथुना सबन्धू (ऋ. सं. १०।१०।९) यम व यमी ह्यांना जुळीं व सबन्धू म्हणजे एका आईबापापासून जन्मलेलीं असें म्हटलें आहे. उषा व रात्र ह्यांना समान बंधू (ऋ. सं. १।११३।२) म्हटलें आहे. कारण त्या दोघींचाही बन्धु म्हणजे बाप हा एकच द्यु होता. प्रस्तुत ऋचेंत पिता, जनिता, नाभिः आणि बन्धुः ह्या चारींचाही अर्थ एकच.

**बन्धुः संबंधनात् । नाभिः संनहनात्**

नातेवाइकांना बन्धु म्हणण्याचें कारण ते एकमेकांना बांधले असतात. म्हणजे ते एका पुरुषापासून जन्मले असतात. म्हणजे बन्धु शब्द बन्ध् बांधणें ह्यापासून झाला आहे. नाभि शब्द नह् बांधणें ह्यापासून झाला आहे. नहनमेव नाभिः व अङ्गसम्बन्धकारणात् बन्धुः ह्या दुर्गानें दिलेल्या विवरणांत बन्धु व नाभि ह्या शब्दांच्या व्युत्पत्ति अंतर्भूत झाल्या आहेत. नाभिशब्दाच्या आधीं बन्धु शब्दाची व्युत्पत्ति देण्याचें कारण 'नाभिरत्र बन्धुर्मे माता पृथिवी महती इयम्' हें वाक्य होय. यास्क नाभिः व बन्धुः हे दोन्ही शब्द मातेला लावतो असें दिसतें. ह्यांत 'बन्धुः' हें शेवटीं आल्याकारणानें त्याची व्युत्पत्ति यास्कानें आधीं दिली असावी.

**नाभ्या संनद्धा गर्भा जायन्त इति आहुः । एतस्मादेव ज्ञातीन् सनाभयः इति आचक्षते । सबन्धवः इति च । ज्ञातिः संज्ञानात्**

गर्भ नाळानें बांधलेले असे जन्मतात असें म्हणतात. ह्याचमुळें ज्ञातींना सनाभि व सबन्धु असें म्हणतात. आहुः व आचक्षते ह्यांचा कर्ता स्मृतिकाराः हा अध्याहृत शब्द असावा. जनन्यां संस्थितायां तु समं सर्वे सहोदराः । भजेरन्मातृकं रिक्थं भगिन्यश्च सनाभयः (मनुस्मृति ९–१९२) = आई मेली असतांना तिचें धन तिचे मुलगे व मुली ह्या दोघांनींहि वांटून घ्यावें. एथें मुलगे व मुली ह्यांना सनाभि म्हणजे एका आईपासून जन्मलेले असें म्हटलें आहे. सनाभ्योऽप्यशुचिर्भवेत् (मनु० ५–८४) = सनाभ्यानें सुतक पाळावें. एथें सनाभ्य म्हणजे समान ज्ञातीचा. एतस्मादेव ह्या शब्दांवरून नाभ्यः संनद्धाः म्हणजे आईच्या नाभीशीं बांधलेले असा अर्थ यास्कानें केला असावा. ज्ञाति शब्द ज्ञा धातूपासून झाला आहे. ज्ञातिबांधव एकमेकांला ओळखतात म्हणून त्यांना ज्ञाति म्हणतात. वरील दोन वचनें व ज्ञातिः संज्ञानात् ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहींत. नाभिरत्र एथें अत्र शब्दाचा अर्थ कळत नाहीं.

**उत्तानयोश्चम्वोर्योनिरन्तः । उत्तानः उत्ततानः उर्ध्वतानः वा**

उत्तानः = उत् + तानः. उत् = उत्त = भिजलेलें. किंवा उत् = ऊर्ध्व. उत्तान म्हणजे आकाश. तें पसरलेलें (तान) असून मेघांनीं भिजलेलें असतें. किंवा तें वर (ऊर्ध्व) पसरलेलें (तान) असतें. ह्या शब्दांचा दुर्ग पुढीलप्रमाणें अर्थ करतो.

अनयोः चम्वोः द्यावापृथिव्योः उत्तानयोः । ऊर्ध्वमेव हि अनयोः अन्तरा च प्रविधारणीयः 'अन्तः' प्राणः ततः इति उत्ताने द्यावापृथिव्यौ । 'प्राणेन हि इमे वायुना सूत्रभूतेन विधृते तिष्ठतः ' । एतयोः द्यावापृथिव्योः उत्तानयोः यः एषः अन्तरिक्षाख्यः अन्तः मध्ये योनिः अत्र एतस्मिन् अवकाशदानोपकारत्वे प्रवृत्ते सति = दोन चमू म्हणजे द्यावापृथिवी ह्यांना उत्तान म्हणण्याचें कारण ह्यांच्याबाहेर व आंत सर्वत्र प्राणवायु पसरलेला आहे. 'प्राणवायूनें द्यावापृथिवी ह्या सावरल्या आहेत.' असें उपनिषदांत म्हटलें आहे. म्हणून द्यावापृथिवी ह्यांना उत्तान म्हटलें आहे. ह्या दोघींच्या मध्यें अंतरिक्ष नांवाचा योनि ( स्थान ) आहे व हें अंतरिक्ष सर्व वस्तूंना राहण्याला अवकाश म्हणजे जागा देतें. ऋग्वेदांत उत्तान ह्याचा अर्थ उंच असा आहे. जसें :- अनायतो अनिबद्धः कथायं न्यङ्ङुत्तानोऽव पद्यते न ( ४।१३।१ ) = न बांधलेला हा उंच असलेला सूर्य खालीं कसा पडत नाहीं ? द्युला किंवा अंतरिक्षाला उत्ताना असें म्हटलें आहे. मही समैरत् चम्वा समीची उभे ते (ऋ० सं० ३।५५।२) = ते उभे समीची समीच्यौ मही मह्यौ महत्यौ चम्वा चम्वौ इन्द्रः समैरत् = संगतीनें जाणाऱ्या मोठ्या अशा त्या दोन्ही चमूंना इंद्र प्रेरणा देता झाला. ह्या दोन चमू म्हणजे द्यावापृथिवी. त्याच चम्वोः ह्यानें निदर्शित असतील असें वाटत नाहीं. कारण, द्यौर्मे पिता एथें द्यौः हें पुल्लिंगी आहे. 'उत्तानयोः चम्वोः योनिः अन्तः' ह्याचा शब्दशः अर्थ 'उंच जे दोन चमू त्यांच्यामध्यें असणारा योनि' असा होतो.

**तत्र पिता दुहितुः गर्भं दधाति पर्जन्यः पृथिव्याः**

अत्रा = तत्र. आधात् = दधाति. एथें पिता म्हणजे पर्जन्य व दुहिता म्हणजे पृथिवी. एकाच ऋचेंत द्यु हा पिता व पर्जन्य हा पिता असें बरोबर दिसत नाहीं. दोन्हीं ठिकाणीं 'द्यु' हाच पिता असला पाहिजे. पृथिवी ही 'द्यू' ची मुलगी व बायको असें म्हणणें शोभत नाहीं हें खरें. चवथ्या चरणाचा दुर्ग पुढीलप्रमाणें अर्थ करतोः- पिता पर्जन्यः द्युलोकाख्यः । द्यौः एव हि रसान् प्राजयति तस्मात् सा एव अत्र पर्जन्यशब्देन भाष्यकारेण उक्ता । दुहितुः पृथिव्याः उपरि गर्भं सर्वभूतगर्भोत्पत्तिहेतुभूतोदकम् आधात् आदधाति । ददाति इत्यर्थः । अत्र पृथिवी एव दुहितृशब्देन उक्ता । सा हि द्युलोकात् दूरे निहिता । दोग्धेर्वा । सा हि दोग्धि द्युलोकम् इति दुहिता । सा हि द्युलोकात् पतितम् उदकम् उपजीवति एव ।=पिता म्हणजे पर्जन्य म्हणजे द्युलोकच. कारण द्यु ही रस जमा करते. म्हणूनच भाष्यकारानें पिता म्हणजे पर्जन्य असें म्हटलें आहे. सर्व प्राणिमात्रांच्या उत्पत्तीचें कारण जें उदक हेंच गर्भ. हा गर्भ दुहिता जी पृथ्वी तिच्याठायीं पर्जन्य ठेवितो. म्हणजे उदक देतो. पृथ्वीला दुहितृ म्हणण्याचें कारण पृथ्वी ही द्युलोकापासून फार दूर ठेविली आहे. दुहिता = दु + हिता. दु = दूरे. हिता = निहिता. किंवा दुहितृ शब्द दुह् धातूपासून झाला असेल. कारण पृथिवी द्युलोकाचें दूध काढते म्हणजे द्युलोकापासून जें पाणी पडतें तिच्यावर ती आपली उपजीविका करते. ( निरुक्त ३।४ ). दुसऱ्या अर्धाचा मला अर्थ लागत नाहीं. ह्या

सूक्तांतील बहुतेक ऋचांत गूढार्थ आहे. ह्या ऋचा कूटासारख्या आहेत म्हणून त्यांचा अर्थ करतां येत नाहीं.

**शंयुः सुखंयुः**

शंयुः = सुखंयुः. महाराष्ट्रपाठ सुखयुः असा आहे. दुर्गवृत्तींत शंयुः सुखंयुः हे शब्द नाहींत. ते प्रक्षिप्त असावेत; कारण शंयु ह्या शब्दाचा अर्थ पुढील ऋचेच्या भाष्यांत यास्कानें निराळा दिला आहे.

**अथा नः शंयोररपो दधात ( ऋ० सं० १०।१५।४ )। रपः रिप्रम् इति पापनामनी भवतः शमनं च रोगाणां यावनं च भयानाम्**

अरपः ह्यांतील रपः व रिप्र ह्या शब्दांचा अर्थ पाप असा आहे. शंयोः = शं + योः. शं = शमनं रोगाणाम् = रोग नाहींसे करणें. म्हणजे ' शं ' मध्यें ' शम् ' धातु आहे. योः. = यावनं भयानां = सर्व प्रकारचीं भयें घालविणें. म्हणजे योः ह्याच्या मध्यें ' यु ' वेगळें करणें, टाकून देणें हा धातु आहे. रपः म्हणजे रोग वगैरे. ओषधीः प्राचुच्यवुः यत्किंच तन्वोरपः ( ऋ०सं० १०।९७।१० ) = शरीराला जी कांहीं रोगराई झाली असेल ती वनस्पती दूर करतात. परान्यो वातु यद्रपः (ऋ. सं. १०।१३७।२)= ह्या क्षयी माणसाला जो रोग झाला आहे तो विशिष्ट वारा आपल्याबरोबर वाहून नेवो. त्रायन्तां विश्वा भूतानि यथायमरपा असत् (ऋ. सं. १०।१३७।५) = हा रोगी रोगमुक्त व्हावा म्हणून सर्व भूतें त्याचें रक्षण करोत. रिप्र म्हणजे घाण. विश्वं हि रिप्रं प्रवहन्ति देवीरुदिदाभ्यः शुचिरा पूत एमि ( ऋ. सं. १०।१७।१० ) = ह्या अब्देवी सगळी घाण वाहून नेत आहेत. त्याबरोबर पाण्यामधून मी शुद्ध असा बाहेर येत आहे. गृभ्णाति रिप्रमविरस्य तान्वा शुद्धो देवानामुपयाति निष्कृतम् (ऋ.सं.९।७८।१)= गाळणें ( अविः ) ह्या सोमाची घाण घेतें; त्यामुळें शरीरानें शुद्ध असा होऊन सोम देवांच्या घरीं जातो. क्रव्यादमग्निं प्र हिणोमि दूरं यमराज्ञो गच्छतु रिप्रवाहः ( ऋ. सं. १०।१६।९ ) = प्रेताचें मांस खाणारा हा जो अग्नि त्याला मी दूर यमराजाकडे पाठवीत आहे. घाण वाहणारा असा तो तिकडे जावो. उच्छन्तुषसः सुदिना अरिप्राः ( ऋ. सं. ७।९०।४ ) = सुंदर दिवस आणणाऱ्या, ज्यांच्यामध्यें एवढासुद्धां मळ नाहीं अशा ह्या उषा उगवल्या आहेत. ह्यावरून रपस् म्हणजे रोगराई व रिप्र म्हणजे घाण हे अर्थ सिद्ध होतात. पदपाठामध्यें शं आणि योः अशीं वेगळीं पदें केलेलीं आढळतात. शं च योश्च व शंयोः असे दोन्ही प्रकारचे प्रयोग ऋग्वेदांत आहेत. शं च योश्च रुद्रस्य वश्मि ( ऋ. सं. २।३३।१३ ); ( बृहस्पतिः ) अथाकरद्यजमानाय शं योः (ऋ. सं. १०।१८२।२ ) जरी शं आणि योः हीं वेगळीं पदें आहेत. तरी यत्, तत्, रेवत् अशीं विशेषणें लाविल्यामुळें शंयोः हें एकच पद होय. बृहस्पते० शंयोर्यत्ते मनुर्हितं तदीमहे ( ऋ. सं. १।१०६।५ ) = हे बृहस्पते यत् शंयोः मनुषे हितं तत् ईमहे याचामहे. शंयोः संबंधानें धत्त, दधात, दधातन, यच्छ, वृड्क्षी, वहतं, स्रवन्तु, वश्मि, करत्, भर अशीं क्रियापदें घातलेलीं असतात. शं योः ह्या दोहोंचा अर्थ सुख,

कल्याण. नुसत्या 'शं' चाही अर्थ सुख असा होतो; परंतु नुसत्या योः चा तसा अर्थ नाहीं. दुर्ग म्हणतोः—" शंयोः हा शब्द जर पंचम्यन्त किंवा षष्ठ्यंत असेल म्हणजे शंयोः हें एकच पद असेल तर शंयु म्हणजे बृहस्पतीचा पुत्र होईल." शंयूचा तसा अर्थ असल्यास यजमान, माझे पितर मला धन देवोत अशी शंयूला प्रार्थना कशाकरितां करील? स्वतः पितर धन द्यायाला समर्थ आहेत. तेव्हां पंचमीचा अर्थ एथें लागू पडत नाहीं. (यजमानः बृहस्पतिपुत्रात् शंयोः अर्थं नापेक्षते). शंयोः ही चतुर्थ्यर्थी षष्ठी समजली तर त्याचें कल्याण करण्याचें सामर्थ्य पितरांमध्यें कसें असेल? म्हणून भाष्यकारानें शंयोः ह्या एकपदाचीं दोन पदें करून त्यांचे निराळे अर्थ केले आहेत.

**अथापि शंयुः बार्हस्पत्यः उच्यते**

बृहस्पतीच्या मुलाला शंयु म्हणतात.

**तच्छंयोरावृणीमहे गातुं यज्ञाय गातुं यज्ञपतये (मैत्रा० सं० ४।१३।१०) इत्यपि निगमो भवति। गमनं यज्ञाय गमनं यज्ञपतये।**

गातुं = गमनम्. यज्ञाला व यज्ञपतीला देवांकडे जाण्याची वाट आम्ही शंयूपासून मागतो. परंतु असा अर्थ केल्यास तत् याची काय वाट? तत् हें शंयोः ह्याचेंच विशेषण आहे. आम्ही देवांजवळ सुख (शंयोः) व यज्ञाला आणि यज्ञपतीला देवांकडे जाण्याची वाट मागत आहों. यास्काच्या मनांत शंयूबद्दलची पौराणिक कल्पना असल्यामुळें शंयोः म्हणजे शंयूपासून असा त्यानें अर्थ केला आहे. परंतु ऋचांचा अर्थ करतांना पुराणें वगैरे बाजूला ठेवलीं पाहिजेत. ऋचांचा अर्थ ऋचांच्या साह्यानें केला पाहिजे. शंयु म्हणजे बृहस्पतीचा पुत्र असा अर्थ करण्याला ऋचेमध्यें कोणतेही कारण नाहीं असें दुर्ग म्हणतो तें बरोबर आहे. ही ऋचा ऋग्वेदाच्या बाष्कलशाखेंत आहे; शाकल शाखेंत नाहीं. एवढ्यामुळेंच ह्यांना भिन्नशाखा मानिल्या आहेत.

## खंड २२ वा.

**अदितिः अदीना देवमाता**

अदितिः (४९) = अदीना = अदीनानि = दीन नाहींत अशी. किंवा अदितिः = देवमाता = देवांची आई. निःस्वस्तु दुर्विधो दीनो दरिद्रो दुर्गतोऽपि सः (अमर० ३।१।४९) दीङ् क्षये (धा. पा. ४।२८) ह्यापासून अदिति शब्द झाला आहे. ही कांहींतरी व्युत्पत्ति आहे. अदिति शब्द कसा झाला हें सांगणें कठीण आहे. जे दीन म्हणजे दरिद्री नाहींत ते अदिति. यास्कानें देवमाता वा असें कां म्हटलें नाहीं तें समजत नाहीं. वा नसल्याकारणानें अदीना हें देवमाता ह्याचें विशेषण आहे असें

घातलें. निघण्टूंत अदिति शब्द अनवगतसंस्कार आहे व अनेकार्थहि आहे म्हणून घातला असावा. अदिति हा शब्द देवांची आई, पृथ्वी, अग्नि, रुद्र, सोम, व गाय ह्यांना लावलेला आढळतो. तो अग्नि वगैरेंना लक्षणेनें लाविला आहे. परंतु निघण्टुकाराच्या मतें अदिति शब्दाचे हे भिन्न भिन्न अर्थ होत. यास्कानें निघण्टु रचिला नाहीं ह्या म्हणण्याला हा एक जास्त पुरावा आहे. सर्व निरुक्तांत हा खंड अगदींच लहान आहे.

## खंड २३ वा.

**अदितिर्द्यौरदितिरन्तरिक्षमदितिर्माता स पिता स पुत्रः।**
**विश्वे देवा अदितिः पञ्च जना अदितिर्जातमदितिर्जनित्वम्। (ऋ०सं०१।८९।१०)**
**इति अदितेः विभूतिम् आचष्टे। एनानि अदीनानि इति वा**

ह्या ऋचेंत ऋषि अदितीचें माहात्म्य कथन करितो. हे द्यौः वगैरे देव व इतर प्राणिमात्र अदीन आहेत म्हणजे दीन नाहींत. एतानि ह्याच्याऐवजीं एनानि घालण्याचें कारण ऋचेंत द्यौः वगैरे जे शब्द आले आहेत त्यांचा एथें निर्देश केला आहे हें. अदीनानि हा अर्थ अस्वाभाविक आहे. अदिती ही एके काळीं फार मोठी देवता होती. अदिति हा शब्द बहुतेक ठिकाणीं स्त्रीलिंगी आहे. ऋग्वेदांत सर्वनामांचें लिंग तीं ज्या नामांना लाविलेलीं असतील त्यांच्या लिंगाप्रमाणें बदलतें. सा पिता व सा पुत्रः असें म्हणावयास पाहिजे होतें. परंतु पिता व पुत्र हे पुल्लिंगी असल्याकारणानें सा चा सः झाला असावा. ब्रह्मांडांत जें कांहीं आहे तें सर्व अदितीच, तीहून भिन्न असें कांहीं नाहीं असें ऋषी म्हणतो. जनित्वं = जनिष्यमाणम्.

**यमेरिरे भृगवः ( ऋ. सं. १।१४३।४ )। एरिरे इति ईर्तिः उपसृष्टः अभ्यस्तः**

एरिरे = आ + ईरिरे. ईर्तिः म्हणजे 'ईर्' धातु हा उपसृष्ट आहे म्हणजे त्याला 'आ' हा उपसर्ग लागला आहे; व त्याचा अभ्यास झाला आहे (अभ्यस्तः). ईर्, हा अभ्यासानें इ + ईर् = इर्. ईर् + इरे = ईरिरे. आ + ईरिरे = एरिरे. पाणिनीच्या नियमानें ईर् ह्याचा अभ्यास होत नाहीं. पण ऋग्वेदाला तो नियम लागू नाहीं. अर्वाचीन व्याकरणाच्या नियमांना अनुसरून जीं रूपें नसतील तीं अनवगतसंस्कार होत असें निघण्टुकाराचें मत होतें. त्यामुळेंच त्यानें ईरिरे, जुहुरे वगैरे शब्द निघण्टूंत घातले आहेत. ईर् चा अर्थ जाणें नसून ठेवणें असा आहे. तं देवा बुध्ने रजसः ० न्येरिरे( ऋ. सं. २।२।३ ) = त्याला ( अग्नीला ) देवांनीं द्युलोकीं ठेविलें. त्वे वसूनि ० एरिरे यज्ञियासः ( ऋ. सं. ६।५।२ ) = हे अग्नि, तुझ्यांत देवांनीं धन ठेविलें. परंतु "सौधन्वनासो अमृतत्वमेरिरे। ( ऋ. सं. ३।६०।३ ) = सुधन्व्याचे मुलगे अमृतत्वाप्रत गेले म्हणजे अमर झाले.

## खंड २४ वा.

**उत स्मैनं वस्त्रमथिं न तायुमनुक्रोशन्ति क्षितयो भरेषु**
**नीचायमानं जसुरिं न श्येनं श्रवश्चाच्छा पशुमच्च यूथम् (ऋ० सं० ४।३८।५)**
**अपि स्म एनं वस्त्रमथिम् इव वस्त्रमाथिनम्। वस्त्रं वस्तेः**

उत = अपि. वस्त्रमथिं = वस्त्रमाथिनम्. ऋचेंतील वस्त्रमथिं हा शब्द भाष्यांत घालवयास नको होता; कारण वस्त्रमाथिनम् हें त्याचें विवरण आहे. वस्त्रमाथिन् म्हणजे वस्त्र चोरून नेणारा. दुर्गाच्या वृत्तींत वस्त्रमाथिनम् नसून वस्त्रमथिनम् आहे. मथि हिंसासंक्लेशनयोः (धा. पा. १।४६); मथे विलोडने (धा. पा. १।८७३); परंतु एथें मथ् चोरणें असा अर्थ आहे. मथ् धातूचा तो अर्थ यास्ककालीं होता हें स्पष्ट आहे. वस्त्रमथिनम् = वस्त्रापहर्तारम् (दुर्ग). न = इव. वस्त्र शब्द वस् आच्छादणें (धा० पा० २।१३) ह्यापासून झाला आहे. ही व्युत्पत्ति इतकी स्पष्ट आहे कीं ती निरुक्तांत देण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें.

**तायुः इति स्तेननाम। संस्त्यानम् अस्मिन् पापकम् इति नैरुक्ताः। तस्यतेः वा स्यात्**

तायु म्हणजे चोर. चोराला तायु म्हणण्याचें कारण त्याच्या ठिकाणीं पाप (पापकम्) दाटलेलें (संस्त्यानम्) असतें. म्हणजे स्त्यै 'संघाते' (धा० पा० १।९३५) दाटणें ह्यापासून तायु शब्द झाला आहे असें निरुक्तकाराचें म्हणणें आहे. यास्क हा निरुक्तकार असल्याकारणानें त्याला ही व्युत्पत्ति मान्य आहे. किंवा हा शब्द तसु उपक्षये (धा० पा० ४।१०६) म्हणजे तस् क्षय पावणें ह्यापासून कदाचित् झाला असेल. चोर अधार्मिक असल्याकारणानें त्याचा नाश होतो. तायु शब्द अवेस्तांत आहे. तो कसा झाला हें कोण सांगेल ? जसा पा पासून पायु शब्द होतो तसा ता म्हणजे तन् ह्यापासून तायु शब्द झाला असेल. जो वस्तु लांबवितो (तनोति) तो तायु.

**अनुक्रोशन्ति क्षितयः संग्रामेषु। भरः इति संग्रामनाम भरतेर्वा हरतेर्वा। नीचायमानं नीचैः अयमानम्**

भरेषु = संग्रामेषु. भर म्हणजे संग्राम. संग्रामाला भर म्हणण्याचें कारण लढाईंत योद्धे नेले जातात (भ्रियन्ते); किंवा लढणाऱ्यांचें जीवित व धन हिरावलें जातें (ह्रियन्ते). नीचायमानं = नीचा + अयमानम्. नीचा = नीचैः अयमानः = धावणारा, पळणारा, झडप घालणारा.

**नीचैः निचितं भवति। उच्चैः उच्चितं भवति**

नीच शब्द नि + चि ह्यापासून झाला आहे. नियतम् अञ्चति न्यङ् निम्नं चीयते नीचम्। नीचैः विद्यते अस्य वा (क्षीरस्वामी अमर० ३।१।७१). न्यङ् ह्याचीं नीचः, नीचा, नीचे, नीचः वगैरे रूपें होतात. 'नीच' पासूनच नीचैः हें अव्यय

झालें आहे. न्यङ् ह्याच्यामध्यें अञ्च् धातु आहे ( धा० पा० १।८८७ ). उच्चैः हा शब्द उत् + चि ह्यापासून झाला आहे. उच्चीयते उच्चम् । डः । उदश्चो वा । आचपराचादिवत् । मयूरव्यंसकादिर्वा ( क्षीरस्वामी, अमर ३।१।७० ) = उच्च शब्द उत् + चि पासून झाला असेल किंवा उत् + अञ्च् पासून झाला असेल. अञ्च् ह्याचा अञ् जसा आच, पराच इत्यादि शब्दांमध्यें नाहींसा होतो तसा एथें नाहींसा झाला असेल. मयूरव्यंसकादयः ( २।१।७२ पाणिनि ) ह्या गणांत उच्चावचम्, उच्चनीचम् आचपराचम् वगैरे शब्द नियमविरुद्ध बनले आहेत असें म्हटलें आहे. उच्चैः व नीचैः ह्यांच्या व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहींत.

**जस्तम् इव श्येनम्**

जसुरिम् ( ५१ ) = जस्तम् = बद्धम्. धातुपाठांत जस् धातूचे 'हिंसा करणें' 'ताडणें', 'रक्षण करणें', 'मोकळे करणें' असे अर्थ आहेत. आपट्यांच्या कोशांत 'जाणें', 'थकणें', 'दुर्लक्ष करणें' असे आणखी अर्थ दिले आहेत. परंतु 'जस्' ( दोरी वगैरेनें ) बांधणें हा अर्थ यास्ककालीं होता असें दिसतें. राजेलोक ससाण्याच्या पायाला बारीकसा दोर बांधून इतर पक्षी धरण्याकरतां सोडतात. ती कल्पना एथें आहे असें दुर्ग म्हणतो. परंतु जस् भुकेनें व्याकुळ होणें असा धातु असून त्याची जसमानम्, जसमानाय, जसुः, जसुम्, जसुरिम्, जसुरये अशीं रूपें व नामें ऋग्वेदांत आढळतात. वृकाय जसुरये ( ६।१३।१५ ) आणि वृकाय जसमानाय ( ७।६८।८ ) = भुकेनें व्याकुळ झालेल्या लांडग्याला. वि या जानाति जसुरिम् वि तृष्यन्तम् ( ५।६१७ ) = जी स्त्री भुकेनें व्याकूळ झालेले व तहानेनें व्याकूळ झालेले अशा लोकांना जाणते. जसुः = खाखा ( १०।३३।२ ) व जसुम् = तोंड ( थोबाड ) ( १०।६८।६ ). जसुरिं म्हणजे भुकेनें व्याकूळ झालेला हाच अर्थ एथें आहे. भुकेनें व्याकूळ झाल्यामुळेंच ससाणा झडप घालतो.

**श्येनः शंसनीयं गच्छति**

श्येन = श् + य् + ए + न. श् = शंस. न = नी व ये = यम्. ससाण्याला श्येन म्हणण्याचें कारण त्याची गति प्रशंसनीय असते. श्यायते श्येनः ( क्षीरस्वामी अमर २।५।१५ ). श्यैङ् गतौ ( धा० पा० १।९८८ )

**श्रवश्चाच्छा पशुमच्च यूथम् । श्रवश्च अपि पशुमच्च यूथम्**

अच्छा = अपि. अपि ह्याच्या ऐवजीं दुर्गवृत्तींत अभि असें आहे; आणि तेंच बरोबर आहे. अभि = अभिसंधाय = लक्ष देऊन, उद्देशून. प्रशंसां च यूथं च. श्रवः = प्रशंसां = स्तुति. श्रवश्च अभिसंधाय कथं नाम श्रूयेमहि प्रशस्येमहि जितम् एभिः इत्येवम् अर्थम् अभिसंधाय ( दुर्ग ) = ह्यांनीं जिंकलें अशी लोकांच्या तोंडून प्रशंसा होईल अशा हेतूनें. धनं च यूथं च इति वा. श्रवः = धनम्. ऋग्वेदांत श्रवः ह्या शब्दाचा अर्थ प्रशंसा नसून धन किंवा अन्न असा आहे. परंतु यास्काला प्रशंसा हाच अर्थ मान्य होता. कारण तो अर्थ त्यानें पहिल्या प्रथम दिला आहे.

**यूथम् यौतेः । समायुतं भवति**

यूथ शब्द ‘ यु ’ मिसळणें ह्यापासून झाला आहे. कारण यूथांतील म्हणजे कळपांतील प्राणी एकत्र आले असतात. यूथं म्हणजे समायुतं. ह्यांतील युतम् ‘ यु ’ मिश्रणे ( धा. पा. २।२३ ). यास्कानें व दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थः—कापड चोरून नेणाऱ्या चोराला पाहून किंवा ज्याच्या पायाला लहान दोर बांधला आहे अशा ससाण्याला कोंबडीं, बदकें नेण्याकरतां आकाशांतून खालीं येतांना पाहून जसे लोक एकच ओरड करतात तसे कीर्ति किंवा धन आणि पशूंचे कळप ह्यांना उद्देशून होणाऱ्या लढायांमध्यें लोक स्वसंरक्षणासाठीं इंद्राच्या नांवाचा घोष करतात. परंतु अर्थ जरासा भिन्न आहे. चोर काय करतो ? कापडें चोरून नेतो. भुकेनें व्याकूळ झालेला ससाणा काय करतो ? जमिनीवर पडलेलें अन्न ( श्रव ) व शेळयामेंढ्यांचे कळप उचलून नेण्याकरतां झडप घालतो. म्हणून ‘श्रवश्चाच्छा पशुमच्च यूथम्’ ह्याचा अन्वय अनुक्रोशन्ति क्षितयो भरेषु ह्याच्याशीं करावयाचा नाहीं. चोर कपडे चोरून नेतो आहे असें पाहून किंवा खाखावलेला ससाणा अन्न व शेळयामेंढ्या उचलून नेण्याकरतां झडप घालतो आहे असें पाहून लोक जसे एकच गिल्ला करतात तसे लढाईंत गुंतलेले लोक इंद्र या बाजूला किंवा त्या बाजूला मदत करण्याकरतां जात आहे असें पाहून एकच गिल्ला करतात. वर दिलेला अर्थ दिखाऊ आहे; खरा अर्थ पुढीलप्रमाणेंः—उ + त + स् + म + आ + इ + नं = उतस्मैनम्. वस् + तृ + म + अ + थिं = वस्त्रमथिम्. न + त + आ + युं = नतायुम्. अ + नु = अनु. क्रन्ति = उशन्ति = क्रोशन्ति = देतात. क्रतु शब्दांतला जो क्र धातु त्याचें क्रन्ति व उश्चें उशन्ति हीं दोन्हीं रूपें एकत्र केल्यानें क्रोशन्ति शब्द बनतो. क्षि = ति = धन. क्षितयः = धनवान् लोक. भ = र = धन, भरेषु = धनभांडारांत. नि + इ + च + अ + य + म + अ + नं = नीचायमानम्. ज + सु + रिं = जसुरिम्. न + शि + अ + इ + नं = नश्येनम्. श्रवस् = वचन. प + शु = धन. यु + उ + थं = यूथम्. अद् + श = अच्छ; अच्छा = अच्छानि = धनें. च = धन. प्रत्येक एकाक्षराचा अर्थ धन. तीं एकत्र केल्यानें अमूप धन असा अर्थ. धनवान् लोकांच्या धनभांडारांत अमूप धन देतात म्हणजे घालतात. उतस्मैनं = वस्त्रमथिं = नतायुं = अनु = नीचायमानं = जसुरिं = नश्येनं = पशुमत् = चाच्छा = चयूथं.

**इन्धान एनं जरते स्वाधीः (ऋ. सं. १०।४५।१) । गृणाति**

जरते ( ५२ ) = गृणाति = स्तुति करतो. मनांत चांगल्या इच्छा बाळगणारा ( स्वाधीः ) यजमान अग्नीला प्रज्वलित करून ( इन्धानः ) त्याची स्तुति करतो. जरते हें रूप अवनगतसंस्कार नाहीं. निघण्टुकारानें जॄ धातूचे अनेक अर्थ दिले आहेत म्हणून जरते शब्द निघण्टूंत घातला असावा. बृहदग्नयः समिधा जरन्ते ( ७।७२। २४ ), घृतेनाहुतो जरते ( १०।६९।१ ) एथें जरते म्हणजे वाढतो, जास्त प्रज्वलित होतो. क्रतुप्रावा जरिता शश्वतामव इन्द्र इत् भद्रा प्रमतिः सुतावताम् (१०।१००।१)

= सुतावतां शश्वताम् इन्द्रः इत् एव ऋतुप्रावा जरिता अवः भद्रा प्रमतिः = जे लोक इन्द्रास सोम अर्पण करितात त्यांना तो धन देतो; ( ऋतुप्रावा = जरिता = धन देणारा ) त्यांचें तो कल्याण ( अवः ) करतो; त्यांचा तो भला (भद्रा) मित्र (प्रमतिः) आहे. न यं जरन्ति शरदो न मासा न द्याव इन्द्रमवकर्षयन्ति ( ६।२४।७ ) = वर्षे, महिने, दिवस इंद्राला म्हातारपण आणीत नाहींत व त्याच्या शक्तीचा ऱ्हास करीत नाहींत. ग्रावाणेव तदिदर्थं जरेथे ( २।३९।१ ) = जसे ग्रावे सोमाकडेच जातात तसे अश्विन नेमलेल्या ठिकाणाकडेच जातात. असे जॄ धातूचे अनेक अर्थ आहेत.

**मन्दी ( ५३ ) मन्दन्तेः स्तुतिकर्मणः**

मन्द् स्तुति करणें ह्यापासून मन्दी शब्द झाला आहे. मदि स्तुति मोद मद स्वप्न कान्ति गतिषु ( धा. पा. १।१३ ). प्र मन्दिने पितुमदर्चता वचः ( ऋ. सं. १।१०१।१ ) । प्रार्चत मन्दिने पितुमत् वचः = स्तुत्य असा जो इंद्र त्याला सोमयुक्त ( पितुमत् ) स्तुति ( वचः ) अर्पण करा. ऋग्वेदांत मन्द् याचा स्तुति करणें असा अर्थ नाहीं. त्याचा मुख्य अर्थ सोमपानानें हर्ष पावणें, उल्हसित होणें व उल्हसित करणें असा आहे. मन्दानो अंधसः = सोम पिऊन उल्हसित होणारा; सोमपानानें स्फुरण आलेला असें इन्द्राविषयीं पुष्कळदां म्हटलें आहे. यस्य मन्दानो अन्धसो माघोनं दधिषे शवः ( ६।४३।४ ) = ज्या सोमपानानें स्फुरण पाऊन इन्द्र त्याला योग्य असें बल धारण करता झाला. एना मन्दानो जहि शूर शत्रून् ( ६।४४।१७ ) = ह्यानें म्हणजे सोमपानानें स्फुरण पाऊन शत्रूला मार. यद्वा शक्र परावति समुद्रे अधि मन्दसे । अस्माकमित् सुते रणा समिन्दुभिः ( ८।१२।१७ ) = हे इन्द्रा, स्वर्गांत किंवा अंतरिक्षांत, जेथें कोठें तूं सोमपानानें मजा मारीत असशील तेथून येऊन आम्ही दिलेला सोम पिऊनच मजा मार. मन्दन्तु त्वा मन्दिनो वायविन्दवः ( १।१३४।२ ) = हे वायु, हर्ष देणारे किंवा स्फुरण आणणारे सोम तुला हर्ष देवोत किंवा स्फुरण आणोत. मन्द् या धातूपासूनच मन्दी हा शब्द उत्पन्न झाला आहे. मन्दी मन्दिनौ मन्दिनः असा तो चालतो. कांहीं ठिकाणीं तो मन्दिम् अशा रूपांत आढळतो. एमेनं सृजता सुते मन्दिमिन्द्राय मन्दिने ( १।९।२ ) = हे अध्वर्यूनो, स्फुरण आणणारा जो सोम तो इन्द्राला स्फुरण यावें म्हणून पिण्याच्या भांड्यांत ओता. एथें मन्दिम् म्हणजे हर्षविणारा, स्फुरण आणणारा सोम. मन्दिने म्हणजे हर्ष पावणारा, स्फुरण आलेला इन्द्र. हर्ष किंवा स्फुरण हें सोमपानानेंच उत्पन्न होतें असें नाहीं; तर त्या भावना स्तुतींनींही उत्पन्न होतात; जसें:-जातवेदः सुशस्तिभिः मन्दस्व धीतिभिः ( १०।१४०।३ ) = हे अग्नि, स्तुतींनी हृष्ट हो. मत्स्वा सुशिप्र मन्दिभिः स्तोमेभिः ( १।९।३ ) = हे इन्द्रा, हर्ष देणाऱ्या किंवा स्फुरण आणणाऱ्या स्तुति ऐकून सोम पी. ( १ ) ह्या अर्थापासूनच आणखी चार पांच अर्थ उत्पन्न होतात. इमं कामं मन्दया गोभिरश्वैः (३।३० २० ) = हे इन्द्रा, गाई व घोडे देऊन हीं माझी कामना पूर्ण कर. एथें मन्दया = कामना पूर्ण करून मला हर्ष दे. ( २ ) कया त्वन्न ऊत्याभि प्रमन्दसे वृषन् । कया

स्तोतृभ्य आभर ( ८।९३।१९ ) = हे इन्द्रा, तूं मला कोणती देणगी देणार आहेस सांग. स्तोत्यांना धन देच. प्रमन्दसे = कोणती देणगी देऊन तूं मला हर्षविणार आहेस ? श्वित्यञ्चो मा० धियंजिन्वासो अभि हि प्रमन्दुः ( ७।३३।१ ) = धन देणारे वसिष्ठ कुलांतले पुरुष मला धन देते झाले. अभिप्रमन्दुः = धन देऊन हर्षविते झाले. ( ३ ) उत मेऽरपद्युवतिर्ममन्दुषी प्रतिश्यावाय वर्तनिम् । (५।६१।९) = ही स्त्री खूष होऊन श्यावाश्वाला मला रथ देती झाली. ममन्दुषी = खुष झालेली. ( ४ ) धिष्व वज्रं हस्त आ दक्षिणत्राभिप्रमन्द पुरुदत्र मायाः ( ६।१८।९ ) = हे दानशूरा (पुरुदत्र) इन्द्रा, उजव्या हातांत वज्र धारण कर व मायी लोकांच्या माया हाणून पाड. अभिप्रमन्द = हाणून पाडून हर्षयुक्त हो. ( ५ ) मन्दस्व होत्रादनुजोषमन्धसोऽध्वर्यवः स पूर्णां वष्ट्यासिचम् ( २।३७।१ ) = हे इन्द्रा, होत्याच्या पात्रांतून ( होत्रात् ) हवा तितका ( अनुजोषम् ) सोम पी ( मन्दस्व ). अहो अध्वर्यूनो, ह्याला भरपूर ( पूर्णाम् आसिचम् ) सोम पाहिजे आहे. मन्दस्व = पिऊन हर्षयुक्त हो. ह्यावरून अनेकार्थ म्हणूनच मन्दीशब्द निघण्टूंत घातला गेला असावा. वास्तविक मन्दिः किंवा मदिः अनेककर्मा असें म्हणावयास पाहिजे होतें. कारण, नुसत्या मन्दी ह्या स्वरूपांत हे विविध अर्थ येत नाहींत.

गौर्व्याख्यातः

गौः ( ५४ ) ह्या शब्दाची व्युत्पत्ति व भिन्नार्थ निरुक्त २।५ ह्यामध्यें दिलेच आहेत. वास्तविक ते सगळे अर्थ एथें द्यावयास पाहिजे होते. गो शब्दाचे ह्यांहूनही अधिक अर्थ असावेत असें वाटतें. हा शब्द देवदेवतांना पुष्कळ वेळां लावलेला आढळतो. वास्तविक तो प्रयोग रूपकानें किंवा अतिशयोक्तीनें केलेला असतो. परन्तु निरुक्तकारांच्या मतें तो शब्द त्या त्या देवाला व देवतेला सकारण दिलेला असतो. तें कारण ते व्युत्पत्तीनें प्रकट करितात. निघण्टुकारानें अशा अनेक अर्थांकरितांच तो शब्द निघण्टूंत घातला. दुर्ग म्हणतोः—यत्तु उक्तम् " अथापि अस्य एको रश्मिः चन्द्रमसं प्रति दीप्यते सोऽपि गौः इत्युच्यते । अत्राह गोरमन्वत इति तत् उपरिष्ट त् व्याख्यास्यामः " ( निरुक्त २।६ ) इति तदिदं उच्यते = सूर्याचा एक रश्मि चंद्राकडे जाऊन त्याला तेजोयुक्त करतो. त्या किरणालाही गौः असें म्हणतात. 'अत्राह गोरमन्वत ' हें त्या अर्थाचें उदाहरण. त्याचें निर्वचन आम्ही पुढें करणार आहोंत असें जें यास्कानें म्हटलें तदनुरूप तें व्याख्यान येथे ( पुढील खंडांत ) द्यावयाचें आहे.

## खंड २५ वा.

**अत्राह गोरमन्वत नाम त्वष्टुरपीच्यम् ।**
**इत्था चंद्रमसो गृहे ( ऋ० सं० १।८४।१५ )**
**अत्र ह गोः सममंसत आदित्यरश्मयः**

अत्राह = अत्र ह. वास्तविक अत्राह = अत्र + अह. अह हा शब्द 'अ'ला ह लावून बनला आहे. कुह = कोठें. इह = एथें. त्याप्रमाणें अह म्हणजे एथें. अत्र आणि अह ह्यांचा अर्थ एकच. अर्थाची द्विरुक्ति ऋग्वेदांत वारंवार आढळते हें मागें सांगितलेंच आहे. अमन्वत = सममंसत = रुकार दिला. रुकार कोणी दिला ? उत्तरः– आदित्यरश्मयः म्हणजे आदित्यरश्मींनीं. आदित्यरश्मयः हें अध्याहृत पद आहे.

**स्वं नाम अपीच्यम् अपगतम् अपचितम् अपिहितम् अन्तर्हितं वा**

गुर्जरपाठांत अपचितं हें अपगतं ह्याच्या आधीं घातलें आहे व स्वं नाम ह्याच्याबद्दल सन्नाम असा तेथें पाठ आहे. नाम = स्वं नाम = आपलें स्वतःचें जाणें, किंवा स्वतःची स्थापना. दुर्गवृत्तींत स्वं किंवा सत् नाहीं. अपीच्यम् = अपगतम् = दूर गेलेलें. अपीच्य हा शब्द अपि + अञ्च् ह्यापासून झाला आहे. अञ्च् म्हणजे जाणें. अपि = अप. किंवा अपीच्यम् = अपचितम्. अपीच्यं ह्यांतील च्य हा 'चि' जमविणें ह्यापासून झाला आहे. अपचितं म्हणजे दूर ठिकाणीं जमविलेला. किंवा अपीच्यम् = अपिहितम्. अपीच्यं ह्यांतील अपि काढून घेतल्यावर इच्य राहतें. त्यांत हित म्हणजे धा धातु कोठें आहे हें समजत नाहीं. दुर्गवृत्तींत अपिहितम् नाहीं. कदाचित् अपिहितम् हा अपीच्यम् ह्याचा अर्थ असेल. किंवा अपीच्यम् = अन्तर्हितम् = आंत ठेवलेलें. एथेंसुद्धां तीच शंका आहे. अपि ह्याचा अर्थ अन्तर् म्हणजे आंतमध्यें. ऋग्वेदांत धातूंना जेव्हां अपि हा उपसर्ग लावलेला असतो तेव्हां तो निकटपणा– आंतीलपणा– दाखवितो. अपिहितम् प्रमाणें अन्तर्हितम् हाही अपीच्यं ह्याचा अर्थ असेल; व दुर्गहि तसेंच म्हणतो. "प्रतीच्यम् अपीच्यम् इति हि अन्तर्हितनामसु पठितम्" (निघण्टु ३।२५) असें तो म्हणतो. अपीच्यं हा शब्द अपि + अञ्च् ह्यापासून झाला असून त्याचा अर्थ 'गुह्य' असा आहे.

**अमुत्र चन्द्रमसो गृहे**

इत्था = अमुत्र. पण इत्था ह्याचा अमुत्र हा अर्थ कोठेंही नाहीं. ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थः— सूर्याचे किरण आपल्यापैकीं एकाच्या चंद्रमंडलाकडे जाण्याला व तेथें ठाणें देण्याला रुकार देते झाले. त्वष्टुः ही पंचमी होईल किंवा षष्ठी होईल. त्वष्टुः = आदित्यात्. आदित्यमंडलापासून त्या किरणाचें चंद्रमंडलाकडे जाणें. किंवा त्वष्टुः = आदित्यस्य. म्हणजे आदित्याच्या किरणांनीं रुकार दिला. ऋचेचा खरा अर्थ काय हें समजणें कठीण आहे. गो शब्द देवदेवतांना लावतात हें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां गोः हें त्वष्टुः ह्याचें रूपकानें विशेषण असावें. चन्द्रमसः हेंही पद त्वष्टुः ह्याचेंच विशेषण असावें. सूर्यामासा चन्द्रमसा (ऋ० सं० १०।६४।३) एथें चन्द्रमसा हें सूर्यामासा ह्याचें विशेषण आहे. प्रस्तुत ऋचेच्या आधींची ऋचा पुढीलप्रमाणें आहे. "इच्छन्नश्वस्य यच्छिरः पर्वतेष्वपश्रितम्। तद्विदच्छर्यणावति" = घोड्याचें जें डोकें पर्वतांवर कुठें तरी असलेलें इन्द्र शोधीत होता तें त्याला शर्यणावत् एथें आढळलें. तेव्हां त्वष्ट्याचें घर शर्यणावत् हें कदाचित् असेल. पण ह्या म्हणण्याला कोणताही

आधार नाहीं. तथापि शर्यणावत् हें त्वष्ट्याचें घर असें मानल्यास ऋचेचा अर्थ पुढीलप्रमाणें होईल. आल्हाद देणारा (चन्द्रमसः) व बैलासारखा बळकट (गोः) असा जो त्वष्टा त्याच्या घरीं ह्या रीतीनें गूढ असलेली ती वस्तु म्हणजे घोड्याचें शिर शोधणारांना तेथें सांपडलें व तेंच तें हें असा त्यांनीं रुकार दिला." परंतु ऋचेचा खरा अर्थ कळणें अशक्य आहे असें वर म्हटलेंच आहे.

**गातुः (५५) व्याख्यातः**

गातु शब्दाचा अर्थ (निरुक्त ४।२१) एथें दिलाच आहे. ह्यानंतर महाराष्ट्रपाठांत 'गातुं कृणवन्नुषसो जनाय (ऋ० सं० ४।५१।१) इत्यपि निगमो भवति' असा अधिक पाठ आहे. पण त्याची कांहीं जरूरी नाहीं. गातुं यज्ञाय गातुं यज्ञपतये हें एक उदाहरण मागें (निरु० ४।२१) दिलेंच आहे.

**दंसयः कर्माणि । दंसयन्ति एनानि**

दंसयः (५६) = कर्माणि. कर्माला दंसयः म्हणण्याचें कारण कामकरी लोक कामें संपवितात. दंसयन्ति = उपक्षपयन्ति (दुर्ग). गुर्जरपाठांत दंसयन्ते असें आहे. एतानि बद्दल एनानि घालण्याचें कारण कर्माणि हा शब्द कथित म्हणजे आधीं सांगितला आहे. त्याचेंच एथें अनुकथन आहे.

**कुत्साय मन्मन्नह्यश्च दंसयः (ऋ. सं. १०।१३८।१) इत्यपि निगमो भवति**

ह्या शब्दांचा अर्थ दुर्ग पुढीलप्रमाणें करतो. "अह्यः अहौ निवासिन्यः आपः। मेघनिवासिनीः इत्यर्थः ताश्च दीर्यमाणाः रिणन् आगच्छन् पृथिवीलोकम् । तदेतत्सर्वमपि युष्मदश्वैः क्रियते । किं पुनः अर्थम् उद्दिश्य ते एवं कुर्वन्ति । मन्मन् मन्यमानाः कुत्साय पृथिवीं कृन्तते कृषीवलाय दंसयः कृषिकर्माणि सफलानि कर्तुम्" = "अहि म्हणजे वृत्र; त्याच्या ठिकाणीं असणारें म्हणजे मेघांमध्यें असणारें पाणी पृथ्वीलोकाकडे आलें. हीं सर्व कृत्यें तुझ्या घोड्यांनीं केलीं. कोणता उद्देश मनांत ठेवून त्यांनीं हीं कृत्यें केलीं? उत्तरः–कुत्स म्हणजे पृथिवी नांगरणारा जो शेतकरी त्याचीं कृषिकर्में सफल करण्याच्या उद्देशानें." हा कांहीं तरी अर्थ आहे हें सांगणें नको. दंसयः हा शब्द फक्त एथेंच आला आहे. दंसयः हें बर्हयः ह्यासारखें क्रियापद आहे. बृह् पासून जसें बर्हणा तसें दंस्पासून दंसना हें नाम उत्पन्न झालें आहे. इन्द्र, अश्विन व त्यांचा रथ ह्यांना दंसिष्ठ हें विशेषण लावलेलें आढळतें. दंसस् म्हणजे अद्भुतकर्म. दंसना ह्याचाही अर्थ तोच. तेव्हां दंस् = अद्भुतकृत्यें करणें असा एकेकाळीं धातु असावा. त्याचेंच दंसयः हें एकच रूप व एकाच म्हणजे पुढील ऋचेंत आढळतें. तव त्य इन्द्र सख्येषु वह्नय ऋतं मन्वाना व्यदर्दिरुर्वलम् । यत्रा दशस्यन्नुषसो रिणन्नपः कुत्साय मन्मन्नह्यश्च दंसयः (ऋ. सं. १०।१३८।१) = हे इन्द्र ऋतं मन्वानाः तव सख्येषु वर्तमानाः त्ये ते वह्नयः वलं व्यदर्दिरुः विदारितवन्तः यत्र यस्मिन्विदारणे कृते सति त्वम् उषसः दशस्यन् ददत् अपः रिणन् ददत् कुत्साय दंसयः अद्भुतकर्मा-

णि अकरोः = हे इन्द्रा, तुझी आज्ञा पाळणारे ( ऋतं मन्वानाः ) व तुझे मित्र असे जे मरुत ( वह्नयः ) त्यांनीं वलाला फाडून टाकिलें; तसें झाल्यावर उषा व जल देऊन [illegible] अद्भुत कृत्यें केलीस. दशस्यन् व रिणन् हीं इन्द्राचीं वर्तमान-कालीन विशेषणें होत. मन्मन् व अह्यः ह्या दोन शब्दांचा अन्वयार्थ लागत नाहीं. मन्मन हें रूप येथें व 'प्रष्टा ह्यमथो अस्य मन्मन्' ( ऋ. सं. ६।६३।१ ) येथें आलें आहे ह्या दुसऱ्या ठिकाणीं मन्मन् = मन्मानि = स्तुतीत. अह्य: हा शब्द येथें [illegible] अह्यो न चारवः ( ऋ. सं. ९।७७।३ ) आणि शतचक्र योऽह्यो वर्तनिः ( ऋ. सं. १०।१४४।४ ) ह्या ठिकाणीं आला आहे. शवटच्या ठिकाणच्या शब्दांचा अर्थ कळत नाहीं. परंतु सोम ( इन्दवः ) हे अह्यांसारखे ( अह्यः ) सुंदर ( चारवः ) आहेत, असा पहिल्या उताऱ्याचा अर्थ होतो मूळ शब्द अह्य असा असावा. अह्य अह्यो अह्यः असा तो चालत होता असें वाटतें अह्य हा शब्द अह्याशुव ह्या समासामध्यें उरला आहे. पण त्याचा काय अर्थ तें कळत नाहीं. मन्मन् ही सप्तमी असल्यास तिचा अर्थ स्तुतीत म्हणजे कुत्मानें स्तुति केल्यावर असा होईल. दशस्यन् व रिणन् ह्याप्रमाणें मन्मन् हें वर्तमानकालीन विशेषण असल्यास अह्यः हें त्याचें कर्म होईल म्हणजे उषसः दशस्यन् अपः रिणन् अह्यश्च मन्मन् त्वम् कुत्साय दंसयः. अह्यः मन्मन् = अह्यांना मान देऊन पण ह्या अशी क्रिया हे अह्य कोण होते हें कळत नाहीं. कांहीं झालें तरी दंसयः हें क्रियापदच आहे; व त्याचा अर्थ तूं अद्भुत कृत्यें केलीस असाच आहे.

**स तूताव नैनमश्नोत्यंहतिः ( ऋ. सं. १।९४।२ )। स तुताव न एनम् अंहतिः अश्नोति**

तूताव ( ५७ ) = तुताव = तो वाढतो. म्हणजे त्याला पैसा वगैरे मिळतो. ज्या हवी देणाऱ्यावर अग्नीची कृपा असते त्याला चांगले पुत्र होतात. त्याची सत्ता सर्वत्र अबाधित अशी चालते. त्याला सर्वत्र सिद्धि मिळते. असा ऋचेच्या पूर्वार्धाचा अर्थ आहे. तोच तूताव ह्या पदानें दर्शविला आहे. गुर्जरपाठांत तुताव ह्याच्याबद्दल तूताव असें आहे; तो पाठ अशुद्ध आहे. अशा मनुष्याला संकट ( अंहतिः ) व्यापीत नाहीं. मूळांत अश्नोति अंहतिः असा क्रम आहे. तो भाष्यांत कां ठेविला नाहीं तें समजत नाहीं. तूताव हा शब्द अनवगतसंस्कार म्हणून निघण्टूंत घातला गेला. पाणिनीय नियमानें तो तुताव असा असावयास पाहिजे होता. परंतु अभ्यास दीर्घ झालेल्याचीं उदाहरणें ऋग्वेदांत पुष्कळ आढळतात. उदा० तूतुजानः, तूतुजिः, दाधर्षि; मामहानम्, दाधार, जागार, तूतोः, तूतोत. तुजादीनां दीर्घोऽभ्यासस्य ( पाणिनी ६।१।७ ). तुजादि हा आकृतिगण आहे.

**अंहतिश्च अंहश्च अंहुश्च हन्तेः निरूढोपधात् विपरीतात्**

अंहति, अंहस् आणि अंहु हे तिन्ही शब्द हन् धातूपासून झाले आहेत. निरूढा उपधा यस्मात् सः निरूढोपधः म्हणजे ज्याची उपधा म्हणजे ज्याचा उपान्त्य

स्वर काढून घेतला आहे ( निरूढा = निः + ऊढा ) असा धातु. हन् ह्यांतील उपान्त्य स्वर काढून घेतल्यावर ह् न् अशीं दोन व्यंजनें रहतात. त्यांची उलटा-पालट केल्यावर ( विपरीतात् ) नह् अशीं तीं होतात. मागें अ जोडल्यावर व पुढें अति, अस् व उ हे प्रत्यय लावल्यावर अंहति, अंहस् आणि अंहु असे तीन शब्द सिद्ध होतात. ह्या तिहींचाही अर्थ पापें किंवा संकटें. पापें व संकटें मारतात, त्रास देतात.

**बृहस्पते चयस इत्पियारुम् ( ऋ. सं. १।१९०।५ ) । बृहस्पते यत् चातयसि देवपीयुम्**

चयसे ( ५८ ) = चातयसि = नाश करतोस. पियारुम् = देवपीयुम् = देवांना त्रास देणाऱ्याला. यत् हें कोणत्या शब्दाबद्दल घातलें आहे तें समजत नाहीं. " यस्मात् त्वम् एवं करोषि तस्मात् न ते पापबुद्धयः त्वां सम्यक् पश्यन्ति इत्यभिप्रायः " ( दुर्ग ). = " ज्या अर्थीं तूं असें करतोस म्हणजे देवनिंदकांचा नाश करतोस त्या अर्थीं ते पापबुद्धि लोक तुझ्याकडे चांगल्या विचारानें पाहात नाहींत. " ह्यावरून यत् हें अध्याहृत पद आहे. वास्तविक अध्याहृत पद घेण्याची जरूरी नाहीं. इत् हा निरर्थक निपात असल्यामुळें तो गाळला आहे. परंतु तो निपात निरर्थक नाहीं. कारण चयसे इत् = चातयसि एव = तूं नाश करतोसच करतोस असा अर्थ आहे. चयसे हें चि किंवा चय् धातूचें रूप आहे हें ठरविलें पाहिजे. निघण्टुकारानें चयसे हा शब्द अनवगतसंस्कार म्हणून घातला नसून त्यामध्यें जो धातु आहे त्याचे अनेक अर्थ आहेत ह्याकरितां तो घातला आहे. कृतानीदस्यकर्त्वा० ऋणा च धृष्णुश्चयते ( ९।४७।२ ) = सोमानें जीं करावयाचीं कृत्यें आहेत तीं केलींच आहेत. दाता ( धृष्णुः ) धन [ ऋणा = ऋणानि ] देतो [ चयते ]. एथें चयते = देतो. अस्मिन् यज्ञे विचयेमा भरे कृतं वाजयन्तो भरे कृतम् ( १।१३२।१ ) = ह्या यज्ञांत, ह्या लढाईंत धन इच्छिणारे आम्ही पुष्कळ धन [ कृतं ] मिळवूं ( विचयेम ). एथें विचयेम = रास करूं, घालूं. मा तत्कर्म वसवो यत् चयध्वे ( ६।५१।७ ) = हे देवांनो, ज्याचा तुम्हाला तिटकारा आहे ( चयध्वे ) तें कर्म आम्हांला करूं देऊं नका. एथें चय् = तिटकारा करणें. ह्या रूपांखेरीज चयत् चयमानाः आणि चयिष्ठं अशींही रूपें आढळतात. हीं सगळीं रूपें चि धातूचीं असावींत. त्वया वयं पवमानेन सोम भरे कृतं वि चिनुयाम शश्वत् ( ९।९७।५८ ) = हे सोमा तुझ्या साहाय्यानें आम्ही लढाईंत नेहमीं पुष्कळ धन मिळवूं. वि चिनुयाम = विचयेम. प्र पर्वाणि जातवेद शृणीहि क्रव्यात् क्रविष्णुः विचिनोतु वृक्णम् ( १०।८७।५ ) = हे अग्नि, शत्रूचे अवयव पार तोडून नाहींसे कर ( प्र शृणीहि ). मांसाहार करणारा अग्नि (क्रव्यात् = क्रविष्णुः) छिन्नविछिन्न केलेल्या शत्रूला ( वृक्णं ) ठार करो ( विचिनोतु ). असे चि धातूचे अनेक अर्थ आहेत.

**पीयतिर्हिंसाकर्मा**

पीय् = हिंसा करणें. त्याला ' उ ' लागून पीयुः असा शब्द बनतो. धातुपाठांत पीय् नाहीं. तो धातु यास्ककालीं प्रचारांत असावा. पीय् 'हिंसा करणें ' ' त्रास देणें ' ' निंदा करणें ' ह्याचीं पीयति, पीयतः, पीयोः, पीयन्ति, व पीयत्नवे अशीं रूपें ऋग्वेदांत आढळतात. परंतु पियारुं एथें पि ह्रस्व आहे. तेव्हां तो शब्द पीय् धातूपासून कसा झाला असेल ? गुर्जरपाठांत पीयतिः ह्याच्याबद्दल पीयुतिः असें आहे.

**वियुते ( ५९ ) द्यावापृथिव्यौ वियवनात्**

वियुते = द्यावापृथिव्यौ. द्यावापृथिवींना वियुते म्हणण्याचें कारण त्या वेगळया केल्या गेल्या आहेत. इमे वै सहास्ताम् । ते शम्यामात्रं व्यैताम् इति ह विज्ञायते ( मैत्रा. संहिता ४।१।७ ) = ह्या दोघीजणी एकेकाळीं एकत्र राहात होत्या. पुढें कांहीं कारणानें शम्या इतक्या दूर दूर होत गेल्या, असें ब्राम्हणांत म्हटलें आहे. शम्या हें अग्निहोत्रांत वापरलें जाणारें एक हत्यार आहे. द्यावापृथिवी सहास्ताम् । ते शम्यामात्रम् एकम् अहर् व्यैताम् शम्यामात्रम् एकम् अहः ( तै. ब्राह्मण ३।२।६ ) = द्यावापृथिवी ह्या एकत्र होत्या. त्या दररोज शम्याप्रमाणानें दूर दूर होत गेल्या. गुर्जरपाठ वियवनात् नसून वियमनात् आहे; तो चुकीचा आहे. वि + यम् = निराळे ( वि ) दाबांत ठेवणें. यु + त = युत; यम् पासून युत कसें होईल ? वास्तविक वियुते हें इतर विशेषणांप्रमाणें द्यावापृथिवींचें विशेषण आहे.

**समान्या वियुते दूरे अन्ते ( ऋ० सं० ३।५४।७ ) ।**

समान्या = समान्यौ = समानपरिमाणे = द्यावापृथिवी ह्या सारख्या प्रमाणाच्या आहेत. वियुते = विमिश्रीभूते = पूर्वी त्या मिश्र म्हणजे एके ठिकाणीं होत्या; परंतु मागून त्या वेगळया झाल्या. दूरे अन्ते दोघींचाही अन्त म्हणजे शेवट फार दूर आहे. अजूनपर्यंत त्यांचा शेवट कोणालाही सांपडला नाहीं असें दुर्ग विवरण करतो. समानीः हें विशेषण उषसः ह्यांना लावलें आहे. ( ऋ. सं. ४।५१।९ ). एथें समानीः म्हणजे त्याच.

**समानं संमानमात्रं भवति**

समानं = संमानं = संमानमात्रम् = ज्यांचें माप ( मात्रा ) सारखें ( संमान ) आहे. वास्तविक मान असल्यावर मात्रा ह्याची जरूर नाहीं. समानं = संमानं असेंच म्हणावयास पाहिजे. समानमात्रम् असें म्हटल्यास चालेल. समाना मात्रा यस्य = सारखी मात्रा ( माप ) आहे ज्याचें.

**मात्रा मानात् । दूरं व्याख्यातम्**

मात्रा हा शब्द मा मोजणें ह्यापासून झाला आहे. दूरे अन्ते ह्यांत जो दूर शब्द आहे त्याचें निर्वचन पूर्वी केलें आहे.

**अन्तः अततेः**

अन्त शब्द अत् जाणें ह्यापासून झाला आहे. अन्त हा नेहमीं दूरदूरच जातो. वियुते, दूरं, समानं, मात्रा व अन्तः ह्यांच्या व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहींत. ही व्युत्पत्ति

भाष्यांत आहे असें देवराज म्हणतो. पण ती दुर्ग देत नाहीं.

**ऋधक् ( ६० ) इति पृथग्भावस्य प्रवचनं भवति**

ऋधक् ह्यानें पृथक्भाव म्हणजे वेगळेपणा दाखविला जातो.

**अथापि ऋध्नोत्यर्थे दृश्यते**

याखेरीज ऋधक् हा शब्द ऋध्नोति म्हणजे समृद्ध होतो ह्या अर्थीं सांपडतो.

**ऋधगया ऋधगुताशमिष्ठाः ( कपिष्ठल संहिता ३।१०॥ वाज० सं० ८।२० । ) ऋध्नुवन् अयाक्षीः ऋध्नुवन् अशमिष्ठाः इति च**

ऋधक् = ऋध्नुवन्. अयाः = अयाक्षीः = ( तूं ) हवी दिल्या. ऋधगयाः । त्वम् अल्पमपि हुतम् अस्माभिः सत् हविः ऋधक् एव ऋद्धमेव देवतातृप्तिसमर्थं बहु कुर्वन् अयाः । त्वं यागम् अकार्षीः इत्यर्थः । अपि च ऋधगुताशमिष्ठाः । यदपि किंचित् विगुणम् अकार्ष्म वयम् अस्मिन् यज्ञे तदपि सर्वमेव असमृद्धं समृद्धं सगुणमेव कुर्वन् पापम् अस्य यज्ञस्य अशमिष्ठाः शमितवान् असि । (दुर्गः) = हे अग्नि, आम्ही दिलेला हवि अल्प असूनही जेणें करून देवतांची तृप्ति होईल असा पुरेसा करून आमचा याग तूं शेवटास नेलास व जें कांहीं असमृद्ध म्हणजे विगुण होतें तें समृद्ध म्हणजे सगुण करून यागांत घडलेलें पाप शांत करता झालास. पृथक्भाव ह्या अर्थाचें उदाहरण यास्कानें द्यावयास पाहिजे होतें. दुर्ग पुढील उदाहरण देतो. यदिन्द्र दिवि पार्ये यदृधग्यद्वा स्वे सदने यत्र वासि । अतो नो यज्ञमवसे नियुत्वान् सजोषाः पाहि गिर्वणो मरुद्भिः (ऋ. सं. ६।४०।५) = हे इन्द्रा, लढाईत ( दिवि पार्ये ) किंवा दुसऱ्या ठिकाणीं ( ऋधक् ) किंवा आपल्या घरीं किंवा अन्यत्र कोठें तूं असशील तेथून मरुतांना घेऊन व आमच्या कल्याणासाठीं ( अवसे ) देणग्या घेऊन ( नियुत्वान् ) आमच्या ह्या यज्ञाचें रक्षण करण्याकरतां ये. एवमेके पृथग्भावोदाहरणम् एताम् ऋचं व्याचक्षते = ह्याप्रमाणें पृथक्भावाचें उदाहरण म्हणून कांहीं टीकाकार ह्या ऋचेचें असें व्याख्यान करतात. पण ही ऋचा यास्काच्या ग्रंथांत होती किंवा ह्या टीकाकारांनीं पृथग्भावाचें उदाहरण म्हणून ऋग्वेदांतून ती घेतली हें दुर्गवृत्तीवरून स्पष्ट होत नाहीं. अपरे पुनः य एव एष भाष्यकारेण निगमः पठितः ऋधगयाः इति तत्रैव एतौ द्वौ अपि अर्थौ इति मन्यन्ते । = पण दुसरे टीकाकार म्हणतात कीं भाष्यकारानें 'ऋधगयाः' ही जी ऋचा दिलेली आहे तिच्यांतच हे दोन्हीही अर्थ आहेत असें दुर्ग म्हणतो. ह्यावरून यास्कानें ऋधक् शब्दाचें ऋधगयाः एवढेंच उदाहरण दिलें असावें. ऋधक् ह्याचे आणखीही कांहीं अर्थ होतात व ते पृथक्भाव ह्यापासूनच निघतात. स्पशो दधाथे ओषधीषु विक्षु ऋधक् यतो अनिमिषं रक्षमाणा ( ७।६१।३ ) = हे मित्रावरुणांनो, डोळ्याचें पातें न लवूं देतां सतत रक्षण करणारे तुम्ही, ओषधींत व लोकांत असे प्रत्येक ठिकाणीं ( ऋधक् ) संचार करणारे ( यतः ) हेर ( स्पश ) ठेवतां. एथें ऋधक् = वेगवेगळ्या ठिकाणीं. ऋधक् सा वो मरुतो दिद्युदस्तु यद्व आगः पुरुषता कराम ( ७।५७।४ ) हे मरुतांनो, प्रमादवश ( पुरुषता )

मनुष्यें म्हणून जेव्हां केव्हां आम्ही तुमचा अपराध करूं तेव्हां तुमचें शस्त्र (विद्युत्) आमच्यापासून दूर राहो. ऋधक् = दूर. किं स ऋधक् कृणवद्यं सहस्रं मासो जभार शरदश्च पूर्वीः (४।१८।४) = ज्याला त्याची आई आपल्यापोटीं हजार महिने व पुष्कळ वर्षे धारण करिती झाली तो इन्द्र ह्या गोष्टीच्या विरुद्ध असें काय करील? ऋधक् = विरुद्ध. हे तीनही अर्थ पृथग्भावांत अंतर्भूत होतात. ऋधगित्था स मर्तः शशमे देवतातये। यो नूनं मित्रावरुणावभिष्टय आचक्रे हव्यदातये (८।१०१) = जो मनुष्य स्वकल्याणार्थ हवी देण्याकरतां मित्रावरुणांना जवळ करतो–(आचक्रे) तो ह्या रीतीनें देवसंघाची सफल स्तुति करतो. ऋधक् = सफल. अग्ने० ऋधक् देवान् इह यजा चिकित्वः (३।२५।१) = हे ज्ञात्या अग्नि, तूं प्रत्येक देवाला ह्या यज्ञांत हवि दे; किंवा सफल रीतीनें देवांना हवि दे. एथें ऋधक् ह्याचे दोन्हीही अर्थ संभवतात. ऋधगयाः ह्या ऋचेंत ऋधक् शब्दाचे दोन्हीही अर्थ आहेत असें इतर दुसरे टीकाकार म्हणतात असें वर म्हटलें आहे. ते दोन्हीही अर्थ पुढीलप्रमाणें: मिश्राणि अपि हवींषि हुतानि संति। त्वम् अग्ने ऋधक् एषु च कृत्वा ततो देवान् अयाक्षीः न ते संमोहः अस्ति इत्यभिप्रायः। (दुर्ग)–(अग्नींत) मिश्र हवीही दिले जातात; पण कोणता हवि कोणाला हें जाणून हे अग्नि, तूं ते वेगवेगळे (ऋधक्) करतोस व त्या त्या देवाला देतोस. तुझा कधींही घोंटाळा होत नाहीं. एथें ऋधक् म्हणजे पृथक्. ऋधगुताशमिष्ठाः एथें ऋधक् ऋध्नुवन्, परंतु भाष्यकाराच्या मतानें ऋधगयाः. ह्या ऋचेंत दोन्हीही ठिकाणीं ऋधक् शब्दाचा एकच अर्थ आहे. कारण ऋधक् शब्द ऋध्नोति ह्या अर्थींही सांपडतो. (अथापि ऋध्नोत्यर्थे दृश्यते) असें म्हणून ऋधगयाः हें उदाहरण तो देतो. ऋधक् शब्दाचे दोन अर्थ करण्यापेक्षां एकच अर्थ करणें चांगलें असें दुर्ग म्हणतो.

**अस्याः (६१) इति च अस्य (६२) इति च उदात्तं प्रथमादेशे**

जेव्हां वस्तूचा प्रथम निर्देश करावयाचा असतो त्यावेळेस हे दोन शब्द घातले असतां त्यांचा स्वर उदात्त असतो.

**अनुदात्तम् अन्वादेशे**

पण जेव्हां पूर्वीं सांगितलेल्या वस्तूचा ह्या दोन शब्दांनीं निर्देश केला जातो तेव्हां त्यांचा स्वर अनुदात्त असतो.

**तीव्रार्थतरम् उदात्तम्**

तीव्रः अर्थः यस्य तत् तीव्रार्थम् = ज्याचा अर्थ जोरदार आहे असें. दोन वस्तूंमध्यें ज्याचा अर्थ जास्त जोरदार आहे ती वस्तु तीव्रार्थतर.

**अल्पीयोऽर्थतरम् अनुदात्तम्**

अल्पीयान् अर्थः यस्य तत् अल्पीयोऽर्थम् = ज्याचा अर्थ जास्त कमजोर आहे तें अल्पीयोर्थम्. दोन वस्तूंमध्यें जी जास्त कमजोर ती अल्पीयोऽर्थतर. ह्या दोन्हीं ठिकाणींही तर प्रत्ययाची जरूरी नाहीं. तीव्रार्थ व अल्पार्थ असा वास्तविक भेद आहे.

अल्पीयोऽर्थतर एथें ईयस् व तर असे एका अर्थाचे दोन प्रत्यय घातले आहेत. त्या दोहोंचीही जरुरी नाहीं.

**अस्या ऊ षु ण उप सातये भुवोऽहेळमानो ररिवाँ अजाश्व(ऋ०सं०१।१३८।४).**

**अस्यै नः सातये उपभव अहेळमानः अक्रुध्यन्**

ऊ व सु हे निपात निरर्थक असल्यामुळें भाष्यांत गाळले आहेत. णः = नः. षु मुळें न चा ण झाला आहे व ऊ मुळें सु चा षु झाला आहे. उपभुवः = उपभव= जवळ हो. अहेळमानः = अक्रुध्यन् = न रागावतां. ज्या शब्दांचा अर्थ यास्क देतो ते शब्द तो भाष्यांत घालीत नाहीं. म्हणून अहेळमानः हा शब्द प्रक्षिप्त दिसतो.

**ररिवान् रातिः अभ्यस्तः**

'रा' चा अभ्यास केल्यानें 'ररा' असें होतें. द्वितीयभूतकाळीं परस्मैपदी तृ० पु० अनेकवचन ररुः असें होतें. त्यापासून विशेषण ररिवान्.

**अजाश्व इति पूषणम् आह**

ऋषि पूषाला अजाश्व म्हणतो. दुर्गवृत्तींत रातिः अभ्यस्तः अजाश्व इति पूषणमाह हे शब्द नाहींत.

**अजाश्व अजाः अजनाः**

अजाश्व ह्यांतील अज शब्दाचा अर्थ जाणारे. 'अजाश्व अजनाश्व गमनाश्व छागाश्व वा' असें दुर्गवृत्तींत आहे. अजनाश्व हें कदाचित् अजाः अजनाः ह्याचें रूपांतर असेल किंवा अजाः अजनाः ह्याऐवजीं अजनाश्व असा पाठ असेल. दुर्ग म्हणतोः—अस्या अस्यै सातये लब्धये। कथं नाम वयम् अर्थम् अभिप्रेतं लभेमहि इत्येतम् अर्थम् उद्दिश्य = अभिप्रेत अर्थ आम्हांला कसा मिळेल ह्या उद्देशानें, म्हणजे तो अर्थ देण्याकरितां. पुनः तो म्हणतोः 'अत्र सातिः प्रधाना इति कृत्वा 'अस्याः' इत्येतत्पदम् अन्तोदात्तम्। अन्तोदात्तम् अपि सत् उदात्तम् इत्युक्तं भाष्यकारेण एकदेशस्य उदात्तत्वात् = सातिः हा शब्द ह्या ऋचेंत मुख्य आहे म्हणून अस्याः हें पद अन्तोदात्त आहे. अन्तोदात्त न म्हणतां भाष्यकार त्याला उदात्त म्हणतो. कारण त्या शब्दांतील एक भाग उदात्त आहे.

**अथानुदात्तम्**

आतां अनुदात्ताचें उदाहरण घेऊं.

**दीर्घायुरस्या यः पतिर्जीवाति शरदः शतम् ( ऋ० सं० १०।८५।३९ ). दीर्घायुः अस्याः यः पतिः जीवतु सः शरदः शतम्**

जीवाति = जीवतु. हिचा जो पति तो दीर्घायु होवो म्हणजे शंभर वर्षे जगो.

**शरत् शृताः अस्याम् ओषधयः भवन्ति**

शरत् ह्याला शरत् म्हणण्याचें कारण त्या ऋतूंत ओषधी शृत म्हणजे पक्क होतात. किंवा

**शीर्णाः आपः इति वा**

त्या ऋतूंत पावसाळ्यांत पडलेलें पाणी नाहींसें होतें. शीर्यन्तेस्यां पाकेनौषधयः शरत् ( क्षीरस्वामी अमर १।३।१९ ) शृतं पाके ( पाणिनि ६।१।२७ ) = श्रातिश्रपयत्योः क्ते शृभावो निपात्यते क्षीरहविषोः पाके । शृतंक्षीरं। क्षीरहविर्भ्या-मन्यत्तु श्राणं श्रपितं वा = क्षीर किंवा हवि पक्व झाला आहे असें म्हणण्याच्या वेळीं श्रा व श्रप् ह्या धातूंचें भूतभूतकालचें विशेषण शृत असें होतें. परंतु ह्या दोन वस्तूं-खेरीज इतर वस्तु पक्व झाल्या आहेत असें म्हणण्याच्या वेळीं श्राण व श्रपित, अशींच रूपें होतात असें वार्तिककार म्हणतो. त्याच्या मतानें शृणाः ओषधयः असें म्हणतां येणार नाहीं. ह्यावरून यास्ककालीं शृत शब्द पाहिजे त्या पक्व वस्तूला लावीत असत. परंतु वार्तिककाराच्या काळीं तो शब्द क्षीर व हवि ह्यानांच लावावा असें ठरलें. ह्या-वरून यास्क वार्तिककाराच्या आधीं झाला असावा. ऋग्वेदांत शृतं हविः (९।११४।४ ) व श्रातं हविः ( १०।१७९।२ ) असे प्रयोग आहेत. शृत व श्रात ह्यांमधील वार्तिककारानें दाखविलेला भेद यास्ककालीं होता कीं नाहीं हें समजण्यास मार्ग नाहीं. अस्याः इति अस्य इति च एतत्पदद्वयम् स्त्रीपुंसविषयं स्वरकृतात् विशेषात् प्रधाना-भिधायि वा भवति गुणाभिधायि वा। 'उदात्तं प्रथमादेशे' प्रथमः इति मुख्यनाम। प्रधानं कंचित् अर्थम् अभिदधत् एतत्पदद्वयम् उदात्तं भवति । प्रधानम् अर्थम् अनु यो वर्तते गुणभावेन तस्य एतत्पदद्वयम् अन्वादेशे वर्तमानम् अनुदात्तं भवति । लोकोऽपि हि यत् तीव्रार्थतरम् उत्कृष्टार्थं प्रधानतरं तत् उदात्तम् इति प्रसिद्धम् । तद्यथा । उदात्तम् एतत् कुलम् इति । अल्पीयोर्थतरम् अनुदात्तम् । अल्पीयसा अर्थेन यत् युक्तं भवति तत् अनु-दात्तम् उच्यते । अप्रधानम् इत्यर्थः ( दुर्गः ) = अस्याः व अस्य हीं दोन पदें त्यांचा जो स्वर असेल त्याप्रमाणें प्रधान वस्तु दाखवितात किंवा गौण वस्तु दाखवितात. जेव्हां प्रथम म्हणजे मुख्य किंवा प्रधान अशी वस्तु हीं दोन पदें दाखवितात तेव्हां तीं उदात्त असतात. परंतु जेव्हां तीं गौण वस्तु दाखवितात तेव्हां तीं अनुदात्त असतात. जगांतही जी वस्तु उत्कृष्ट किंवा मुख्य असते तिला उदात्त म्हणण्याची चाल आहे. जसें, 'हें कुल उदात्त आहे'. परंतु जी वस्तु क्षुद्र असते तिला अनुदात्त म्हणजे अप्रधान म्हणतात. तीव्रार्थतरम् उदात्तम् अल्पीयोऽर्थतरम् अनुदात्तम् ह्या शब्दांमुळें दुर्गाला वरील अर्थ करावा लागला. कुल, चरित्र, शील ह्यांना उदात्त म्हणतात. परंतु त्यांना अनुदात्त म्हटल्याचें ऐकिवांत नाहीं. भाष्यांत हे शब्द मूळचे नसावेत. प्रथमा-देशे ह्याचा अर्थ पहिल्याप्रथमच सांगणें; व अन्वादेशे ह्याचा सांगितलेली वस्तु पुनः सांगणें असा आहे. महाभाष्यांतहि अन्वादेश ह्याचा अर्थ कथितानुकथनम् असा आहे. अन्वादेशः कथितानुकथनमात्रम् ( महा. भा. २।४।३२।२ ) अस्यै सातये एथें सातये शब्द ऋचेंत प्रथमच आला आहे म्हणून अस्यै हें त्याचें विशेषण उदात्त आहे; परंतु 'दीर्घायुरस्या यः पतिः एथें अस्याः ह्या पदानें पूर्वार्धांत जो पत्नीम् शब्द आला आहे त्याचा उल्लेख आहे. म्हणून अस्याः हें पद अनुदात्त आहे. वास्तविक नियम पुढील-

प्रमाणें करावयास पाहिजे. जेथें अस्याः अस्य वगैरे विशेषणें विशेष्ययुक्त असतात तेथें तीं उदात्त असतात व जेथें पूर्वीं सांगितलेल्या वस्तूंना उद्देशून तीं घातलेलीं असतात तेथें तीं अनुदात्त असतात. कित्येक टीकाकार प्रथमादेशे म्हणजे प्रारंभे असा अर्थ करतात. परंतु, 'स हि स्वसृत् पृषदश्वो युवा गणोऽया ईशानस्तविषीभिरावृतः । असि सत्य ऋणयावानेद्योऽस्या धियः प्राविताथा वृषा गणः ( १।८७।४ ) = सर्वत्र सत्ता चालविणारा ( ईशानः ), बलानें युक्त ( तविषीभिः आवृतः ), स्वेच्छेनें संचार करणारा ( स्वसृत् ), रंगीबेरंगी घोड्यांवर बसणारा ( पृषदश्वो ) व अयस् नांवाच्या आर्यजातींचा असा तो मरुतांचा तरुण गण आहे. अहो मरुतांनो, तुमचा हा बलयुक्त ( वृषा ) गण धन देणारा ( ऋणयावा ), निंदेला पात्र न होणारा ( अनेद्यः ), सत्य ( सत्यः ) व हें धन ( अस्याः धियः ) देणारा ( प्राविता ) आहे. " एथें अस्याः हें चतुर्थपादांत असूनहि उदात्त आहे. त्याचें कारण त्याचें विशेष्य जें धियः तें त्याच्या शेजारींच घातलें आहे. दुर्ग म्हणतो त्याप्रमाणें अस्याः ह्यानें कोणतीही प्रधान वस्तु दाखविली नाहीं. अस्याः ह्या शब्दानें पुष्कळ असा अर्थ दाखविला आहे. अस्याः धियः प्राविता = पुष्कळसें धन देणारा. अस्यै सातये = पुष्कळ धन देण्यासाठीं. विशेषण आणि विशेष्य हीं जेव्हां एकत्र असतात तेव्हां अस्याः वगैरे शब्द उदात्त असतात असें वर म्हटलें आहे. परंतु ह्याला अपवाद आहे. त्वामस्या व्युषि देव पूर्वे दूतं कृण्वाना अयजन्त हव्यैः । ( ऋ. सं. ५।३।८ ) = हे अग्नि, हिच्या ( अस्याः ) उगवण्याच्या वेळीं ( व्युषि ) पूर्वीचे ऋषि ( पूर्वे ) तुला दूत करून ( दूतं कृण्वानाः ) तुझ्यांत हवि अर्पण करिते झाले ( अयजन्त हव्यैः ). एथें अस्याः हा शब्द उदात्त आहे. कारण अस्याः ह्यानें अस्याः उषसः हें एकदम सूचित होतें. म्हणजे कधीं कधीं विशेष्य हें अध्याहृत असतें. एतदस्या अनः शये एथें अस्याः हें अनुदात्त आहे. कारण त्याचें विशेष्य जें उषस् तें पूर्वींच्या म्हणजे १० व्या ऋचेंत सांगितलें आहे. प्रतिकेतवः प्रथमा अदृश्रन्नूर्ध्वा अस्या अञ्जयो वि श्रयन्ते । उषो अर्वाचा बृहता रथेन ज्योतिष्मता वाममस्मभ्यं वक्षि ( ७।७८।१ ) ह्या ऋचेंत अस्याः हें अनुदात्त आहे. त्याचें कारण पहिल्या पादांत उषसः हें अध्याहृत आहे; म्हणजे " अस्याः प्रथमाः केतवः प्रति अदृश्रन् " असा तो पाद अर्थानें आहे. उषस् शब्द दुसऱ्या अर्धांत आला आहे. त्याला उद्देशून अस्याः हें अनुदात्त झालें आहे असें म्हणतां येईल कीं नाहीं हा प्रश्न आहे. सुपर्णं वस्ते मृगो अस्या दन्तो गोभिः संनद्धा पतति प्रसूता । ( ६।७५।११ ) एथें वस्ते ह्याचा कर्ता इषुः हा शब्द अध्याहृत आहे. म्हणून अस्याः हें अनुदात्त आहे. सुमङ्गलीरियं वधूरिमां समेत पश्यत । सौभाग्यमस्यै दत्त्वायाथास्तं वि परेतन ( १०।८५।३३ ) = ही वधू भाग्यवान् आहे ( सुमङ्गलीः ). सगळेजण या ( समेत ) आणि हिला पहा. हिला सौभाग्य देऊन ( दत्त्वाय ) नंतर ( अथ ) घरीं ( अस्तं ) परत जा (परेतन). एथें अस्यै हें वधूला उद्देशून घातलें आहे. म्हणून तें अनुदात्त आहे.

अनुदात्त अस्यै ह्याचें ऋग्वेदांत हेंच काय तें एकटें उदाहरण आहे. यास्कानें उदात्त अस्यै ह्याचें उदाहरण न देतां उदात्त अस्याः ह्याचें उदाहरण द्यावयास पाहिजे होतें. उदात्त अस्याः हें ऋग्वेदांत २४ वेळां आलें आहे. उदात्त व अनुदात्त ह्या संबंधाचा नियम अस्यां, अस्मै, अस्मात् आणि अस्मिन् ह्यांनांही लागू आहे. तशींही उदाहरणें यास्कानें द्यावयास पाहिजे होतीं. इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु । दशास्यां पुत्रानाधेहि पतिमेकादशं कृधि ( १०।८५।४५ ) = हे दात्या इन्द्रा, हिला तूं पुत्रवती व भाग्यवती कर. हिला दहा पुत्र दे; व अकरावा तिचा पति असो. एथें अस्यां हें इमां ह्या शब्दाला उद्देशून असल्यामुळें अनुदात्त आहे. वयं ते अस्यामिन्द्र द्युम्नहूतौ सखायः स्याम महिन प्रेष्ठाः ( ६।२६।८ ) = हे महान् इन्द्रा, ह्या धनाच्या वांटणींत आम्ही जे तुझे प्रियतम मित्र त्यांना वाटा असूं दे. एथें अस्यां हें द्युम्नहूतौ ह्याचें विशेषण असल्यामुळें उदात्त आहे. अस्मा इदु स्तोमं संहिनोमि ( १।६१।४ ) = ह्या इन्द्रालाच मी स्तुति अर्पण करतों. एथें अस्मै अध्याहृत इन्द्राय ह्याचें विशेषण असल्यामुळें उदात्त आहे. ह्या सूक्ताच्या पहिल्या सहा व आठ ह्या ऋचांचा प्रारंभ 'अस्मा इदु' ह्यानें झाला आहे; व प्रत्येक ठिकाणीं इन्द्राय हें पद अध्याहृत असून अस्मै हें उदात्त आहे. अस्मै बहूनामवमाय सख्ये यज्ञैर्विधेम नमसा हविर्भिः ( २।३५।१२ ) = बहूनाम् अवमाय अस्मै सख्ये यज्ञैः नमसा हविर्भिः विधेम = सगळ्या देवांत शेवटला (अवमाय) असा जो हा आमचा मित्र अग्नि त्याला आम्ही हवि अर्पण करतों. एथें सख्ये हें विशेष्य असून अस्मै हें त्याचें विशेषण आहे. म्हणून तें उदात्त आहे. यो अस्मै हव्यैर्घृतवद्भिरविधत् प्र तं प्राचा नयति ब्रह्मणस्पतिः ( २।२६।४ ) = जो कोणी ह्याला घृतयुक्त हवि अर्पण करतो त्याला ब्रह्मणस्पति पूर्वेच्या मार्गानें नेतो. एथें अस्मै हें ब्रह्मणस्पतीला उद्देशून आहे. जरी विशेष्य दुसऱ्या पादांत आलें आहे व विशेषण पहिल्या पादांत आलें आहे तरी अस्मै हें अनुदात्त आहे. अभ्रा इन्द्रस्य गिरयश्चिदृष्वा गम्भीरे चिद्भवति गाधमस्मै ( ६।२४।८ ) = मोठाले ( ऋष्वाः ) पर्वतसुद्धां ( गिरयः ) इन्द्राच्यापुढें टेंकड्या ( अभ्राः ) बनतात; त्याच्यापुढें खोलसुद्धां उथळ होतें. एथें अस्मै हें इन्द्राय ह्या शब्दाला उद्देशून असल्यामुळें अनुदात्त आहे. अस्मादहं तविषादीषमाण इन्द्राद्भिया मरुतो रेजमानः । ( १।१७१।४ ) = अस्मात् तविषात् इन्द्रात् भिया ईषमाणः रेजमानः हे मरुतः अहम् अस्मि. एथें अस्मात् हें इन्द्रात् ह्याचें विशेषण असल्याकारणानें उदात्त आहे. यदा सत्यं कृणुते मन्युमिन्द्रो विश्वं दृह्ळं भयत एजदस्मात् ( ४।१७।१० ) = यदा इन्द्रः मन्युं सत्यं कृणुते तदा दृह्ळं अपि विश्वं एजत् अस्मात् भयते. एथें अस्मात् हें इन्द्रः याला उद्देशून असल्यामुळें अनुदात्त आहे. नराशंसमिह प्रियमस्मिन्यज्ञ उप ह्वये ( १।१३।३ ) एथें यज्ञ हें विशेष्य आहे; व अस्मिन् हें त्याचें विशेषण असल्यामुळें उदात्त आहे. समिधाग्निं दुवस्यत घृतैर्बोधयतातिथिम् अस्मिन्हव्या जुहोतन ( ८।४४।१ ) = समिधा देऊन अग्नीची सेवा करा. घृत ओतून

अतिथीला प्रज्वलित करा व नंतर त्याच्यांत आहुति घाला. एथें अस्मिन् हें अग्निम् ह्याला उद्देशून आहे म्हणून तें अनुदात्त आहे. उदात्तअनुदात्ताविषयीं मी जो वर नियम दिला आहे, त्याला अपवादही आहेत. पण ते अपवाद एथें देण्याचें फारसें कारण नाहीं.

**अस्य इति अस्याः इत्येतेन व्याख्यातम्**

अस्याः ह्याविषयीं वर जें निर्वचन केलें आहे तें अस्य ह्यालाही लागू आहे. गुर्जरपाठांत अस्या अस्येत्येतेन व्याख्यातम् असें आहे. पण तो पाठ चुकीचा आहे; कारण विवेचन अस्याः ह्याचें केलें आहे, अस्य ह्याचें नाहीं. 'अस्या ऊ षु ण उपसातये भुवः' हें अस्याः ह्याचें उदाहरण नसून अस्यै ह्याचें आहे. यास्कानें तसें उदाहरण कां दिलें हें समजत नाहीं. उदात्त अस्याः ह्याचीं उदाहरणें ऋग्वेदांत अनेक आहेत. त्यांपैकीं 'अस्या धिय' हें वर दिलेंच आहे.

## खंड २६ वा.

**अस्य वामस्य पलितस्य होतुस्तस्य भ्राता मध्यमो अस्त्यश्नः।**
**तृतीयो भ्राता घृतपृष्ठो अस्यात्रापश्यं विश्पतिं सप्तपुत्रम् (ऋ. सं. १।१६४।१)**
**अस्य वामस्य वननीयस्य**

वामस्य = वननीयस्य. संभज्यमानस्य अथवा याज्यमानस्य = स्तुतींनीं भजण्याजोगा किंवा याचना करण्याजोगा जो आहे त्याचें. वाम शब्द वन् = भजणें (वन् संभक्तौ धा. पा. १।४६४) अथवा वन् याचना करणें (वनु याचने धा. पा. ८।८) ह्यापासून झाला आहे. वाम ह्यांत वम् धातु असला पाहिजे. ऋग्वेदांत वमन् असें एकच रूप सांपडतें. अथैतद्वचः पणयो वमन्नित् (ऋ. सं. १०।१०८।८) = नंतर पणी हें भाषण ओकते झाले (वमन्). एथें 'वम्' चा अर्थ ओकणें असा असावा. कदाचित् 'बोलणें' असाही असेल. वम् स्तुति करणें किंवा भोगणें असा एके काळीं धातु असावा व त्याच्यापासून वाम शब्द निघाला असावा.

**पलितस्य पालयितुः**

पलितस्य = पालयितुः. पलित शब्द पाल् रक्षण करणें ह्यापासून झाला आहे. हा शब्द ऋग्वेदांत पांच वेळां आला आहे. दिवा न नक्तं पलितो युवाजनि (१।१४४।४) व 'वने तस्थौ पलितो धूमकेतुः' (१०।४।५) ह्या दोन ऋचांत पलितः हें अग्नीचें विशेषण आहे. नि वेवेति पलितो दूत आस्वन्तर्महाँश्चरति रोचनेन। वपूंषि बिभ्रदभि नो विचष्टे (३।५५।९). एथें पलित हें सूर्याचें विशेषण आहे असें वाटतें. विधुं दद्राणं समने बहूनां युवानं सन्तं पलितो जगार (१०।५५।५). एथें विधु म्हणजे चंद्र असल्यास पलित हा सूर्य होईल, किंवा राहु किंवा केतु होईल. पण ह्या ऋचेचा अर्थच करणें कठीण आहे.

**होतुः ह्वातव्यस्य**

होतुः = ह्वातव्यस्य = ज्याला बोलवावयाचें आहे त्याचें. परंतु अग्नि तो देवांना बोलावतो किंवा हवि देतो म्हणून तो शब्द त्याला नेहमीं लावितात. अस्य वामस्य पलितस्य होतुः ह्या चार शब्दांनीं वाक्य पुरें होत नाहीं. होत्याचें काय तें ऋचेंत सांगितलें नाहीं.

**तस्य भ्राता मध्यमो अस्ति अशनः**

अश्नः = अशनः = व्यापणारा = वायु.

**भ्राता भरतेः हरतिकर्मणः**

हरण करणें ह्या अर्थाचा जो भृ धातु त्यापासून भ्रातृशब्द झाला आहे. एथें भ्राता ह्याचा अर्थ भाऊ असा नाहीं; त्यामुळें

**हरते भागम्**

पाण्याचा भाग जो हरण करतो तो भ्राता.

**भर्तव्यो भवति इति वा**

किंवा ज्याचें पोषण करावयाचें असतें तो. स हि द्युलोकात् आदित्येन उदकेन भ्रियते हरतिच उदकं द्युलोकात् ( दुर्गः ) = वायु द्युलोकांतून आदित्य जें पाणी देतो त्यानें पोसला जातो व तो स्वतः द्युलोकापासून पाणी घेऊन तें जिकडे तिकडे नेतो. अश्न शब्द ऋग्वेदांत १० वेळां आला आहे. त्यापैकीं सहा ठिकाणीं तो शब्द इंद्राच्या शत्रूचें नांव आहे. तो शत्रु पाणी लपवीत असे. [ आदर्दृतम् अपिहितानि अश्ना ( ४।२८।५ ), अश्ना अपिनद्धं मधु पर्यपश्यन् (१०।६८।८) ]; व इंद्र त्याला मारून पाणी मोकळें करीत असे. शत्रुवाची हा अश्न शब्द अश् खाणें ह्यापासून झाला असावा. अश्न किंवा मेघ हा जणूं काय पाणी भक्षून टाकतो. मृगो नाश्नः ( १।१७३।२ ) = हिंस्र पशूप्रमाणें खाऊन टाकणारा इंद्र. दश प्राक्सानु वि तिरन्त्यश्नः ( १०।२७।१५ ) = दहा देव रक्षणासाठीं अश्न म्हणजे पाणी सारखें (अनु) देतात ( वितिरन्ति ). येथे अश्नः हें प्रथमैकवचनी रूप आहे; त्यामुळें त्याचा बरोबर अर्थ करतां येत नाहीं. नृभिर्धूतः सुतः अश्नैरव्यो वारैः परिपूतः ( ८।२।२ ) = ऋत्विजांनीं स्नान घातलेला ( धूतः ), अश्नानीं ( अश्नैः ) रस काढलेला ( सुतः ) व मेंढीच्या ( अव्यः ) केंसांनीं ( वारैः ) गाळलेला ( परिपूतः ) असा सोम. एथें अश्न म्हणजे पाणी असेल. कारण सोमरस पाण्यांत मिसळावयाचा असतो. कदाचित् अश्नैः म्हणजे ग्रावभिः असाही अर्थ असेल. कारण, सोम हा रस काढण्यासाठीं ग्राव्यांनीं ठेंचावयाचा असतो. तेव्हां प्रस्तुत ऋचेंत अश्नः म्हणजे पाणी किंवा मेघ असावा.

**तृतीयो भ्राता घृतपृष्ठः अस्य अयम् अग्निः**

ह्याचा तिसरा भाऊ घृतपृष्ठ म्हणजे हा अग्नि. ह्याचा ( अस्य ) म्हणजे वायूचा व भ्राता म्हणजे हविर्भागहर्ता असें दुर्ग म्हणतो. पण अग्नि हा वायूचा तिसरा भाऊ कसा होईल? ह्याला दुर्ग पुढील उत्तर देतोः—वायुः आदित्यः अग्निः इत्येवं परिसं-

त्याय वायोः तृतीयः अग्निः भवति = वायु, आदित्य व अग्नि अशी गणना करून वायु पहिला, आदित्य दुसरा व अग्नि तिसरा होतो. पण आदित्य व अग्नि हे प्रकाशमय आहेत; व वायु हा अदृश्य आहे. तेव्हां या तिघांची जोडी कशी होणार ? ह्या प्रश्नाचें "वायुना ज्योतिषा इति ह विज्ञायते" असें दुर्गानें उत्तर दिलें आहे. ब्राम्हण ग्रंथांत वायूला ज्योति म्हटलें आहे.

**तत्र अपश्यं सर्वस्य पातारं वा पालयितारं वा विश्पतिम्**

अत्र = तत्र. विश्पतिं = सर्वस्य पातारं वा पालयितारं वा. विश्पतिम् = विश्वपतिम्. पण विश्पति ह्याचा अर्थ लोकांचा राजा असा आहे व अग्नीला विश्पति असें बहुतेक ठिकाणीं म्हटलें आहे.

**सप्तपुत्रम् सप्तमपुत्रम्**

सप्तपुत्रम् = सप्तमपुत्रम्. अदितीला मुलें व्हावींत म्हणून इच्छा झाली. तिनें अन्न शिजवून ब्राम्हणांना वाढलें, व राहिलेलें आपण खाल्लें. त्या खाण्यापासून तिला धाता व अर्यमा असे पुत्र झाले. पुनः तिनें तसेंच केलें तेव्हां मित्र व वरुण जन्माला आले व अशाच कृतीनें तिसऱ्यांदा तिला अंश व भग झाले. चवथ्या खेपेला मेलेलें अण्ड ( मृत अण्ड ) ती प्रसवली. त्यापासून मार्तांड ( सूर्य ) हा जन्माला आला, ( मैत्रा. सं. १।६।१२ ). ह्या ब्राम्हणांतील गोष्टीवरून सूर्य हा अदितीचा सातवा पुत्र होता.

**सर्पणपुत्रम् इति वा**

सप्तपुत्र म्हणजे सर्पणपुत्र. सर्पणाः पुत्राः यस्य सः सर्पणपुत्रः. सर्पण म्हणजे सतत जाणारे; कधीं न थांबणारे असे सूर्याचे रश्मि तेच त्याचे मुलगे.

**सप्त सृप्ता संख्या**

सप्त शब्द सृप् हलणें ह्यापासून झाला आहे. कारण सात ही संख्या सदाच्या पुढें गेलेली असते.

**सप्त आदित्यरश्मयः इति वदन्ति**

आदित्याचे रश्मि सात असतात असें म्हणतात. वदन्ति ह्याच्याबद्दल दुर्गवृत्तींत मन्यन्ते असें आहे. मन्त्रविदो मन्यन्ते असें तो म्हणतो. सप्तपुत्र म्हणजे सर्पणपुत्र किंवा सात रश्मि पुत्र आहेत ज्याचे असा सूर्य असा अर्थ मंत्रविद् करतात. परंतु प्रस्तुत पाठावरून 'सप्तादित्यरश्मयः इति वदन्ति' ह्याचा संबंध सर्पणपुत्रम् ह्याच्याशीं नसून 'सप्त' ह्याच्याशींच आहे असें वाटतें. ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थः—स्तुतींनीं भजण्याजोगा, पालन करणारा व यज्ञांत बोलावण्याजोगा जो हा सूर्य त्याचा भ्राता म्हणजे उदकभाग घेऊन जाणारा किंवा उदकानें ज्याचें पोषण करावें लागतें असा अंतरिक्षांत राहणारा सर्वव्यापी वायु आहे. ( आदित्य द्युलोकांतील उदकानें त्याचें पोषण करतो व तोही द्युलोकांतून उदक नेतो. म्हणून तो सूर्याचा भ्राता. ) ह्या वायूचा तिसरा भ्राता म्हणजे ऐन्द्राग्न हवींचा भाग नेणारा किंवा

स्तुतीचा भाग नेणारा, ( घृतपृष्ठ म्हणजे जो नेहमीं घृतानें भरलेला असतो ) असा हा पृथ्वीवरील अग्नि. (वायु,आदित्य, अग्नि अशा क्रमानें अग्नि हा वायूपासून तिसरा होतो. कोणी म्हणेल ही तिघांची जोडी होण्याला साधारण धर्म कोणता ? त्याला उत्तरः— वायु हाही ज्योतीच आहे. कारण 'वायुना ज्योतिषा' असें वेदांत म्हटलें आहे ). अशा ह्या तीन ज्योतींमध्यें हाच मी प्रधान असा पाहिला. तो विश्पति म्हणजे सगळ्या जगाचा पालनकर्ता आहे. जो हा सप्तपुत्र सूर्य त्यालाच मी प्रधान असा पाहिला.

सूक्त सूर्यदेवत आहे. म्हणून ह्या मंत्रांत सूर्य प्रधान. म्हणून 'अस्य वामस्य' एथें 'अस्य' अन्तोदात्त आहे. वायु हा अप्रधान असल्यामुळें 'घृतपृष्ठो अस्य' एथील 'अस्य' शब्द अनुदात्त आहे. ह्याप्रमाणें एकाच मंत्रांत 'अस्य' हा शब्द उदात्त व अनुदात्त असा सांपडतो. कोणी विचारील कीं, अनुदात्त जो अस्य शब्द तो सूर्याला उद्देशून आहे असें तुम्ही कां म्हणत नाहीं ? शिवाय असें करण्यानें तृतीय ह्या शब्दाचाही अर्थ बरोबर लागतो. ह्या आक्षेपाला पुढीलप्रमाणें उत्तरः—ज्याअर्थी पहिला अस्य शब्द अन्तोदात्त व दुसरा अनुदात्त आहे त्याअर्थी त्या दोहोंच्या अर्थांतही भेद असला पाहिजे. सूक्त आदित्यपर असल्यामुळें वायु हा अप्रधान होय. म्हणून अनुदात्त 'अस्य' अप्रधानविषय असल्यामुळें त्याचा वायूशींच संबंध जोडला पाहिजे. असें केल्यानें 'उदात्तं प्रथमादेशे अनुदात्तम् अन्वादेशे' ह्याची ही उपपत्ति बरोबर लागते. दुसरे कित्येक टीकाकार प्रथमादेश म्हणजे प्रारंभ असें म्हणतात. प्रारंभीं असणारा जो अस्य शब्द तो उदात्त असतो. भाष्यांत दिलेल्या 'अस्या ऊ षु णः' ह्या उदाहरणावरूनही प्रारंभ असाच अर्थ ठरतो. अन्वादेश म्हणजे 'अस्य' ह्या शब्दाचा मागाहून निर्देश. म्हणून तो अनुदात्त. परंतु असा अर्थ केल्यास 'तीव्रार्थतरम् उदात्तम्' व 'अल्पीयोर्थतरम् अनुदात्तम्' ह्याला विरोध येतो. म्हणून मी केलेला अर्थच बरोबर आहे. ब्राह्मणांत आदित्यास अदितीचा सातवा पुत्र म्हटलें आहे म्हणून तो सप्तपुत्र. किंवा त्याला सात रश्मि असतात म्हणून; किंवा त्याचे रश्मि नेहमीं गतिमान् ( सर्पणाः ) असतात, क्षणभरही ते थांबत नाहींत म्हणून तो सप्तपुत्र. ऋचेचा खरा अर्थ काय हें कळणें अशक्य आहे. अश्न हा शब्द 'अश्' खाणें ह्यापासून झाला असावा, असें वर म्हटलेंच आहे. विश्पति हें बहुतेक ठिकाणीं अग्नीचेंच विशेषण आहे. अग्नीच्या सात आया होत्या असें ऋग्वेदांत म्हटलेलें आढळतें. अवर्धयन्सुभगं सप्त यह्वीः श्वेतं जज्ञान मरुषं महित्वा ( ३।१।४ ) = द्यूच्या सात मुली ( यह्वीः ), जन्माला आलेला ( जज्ञानम् ), प्रकाशणारा ( अरुणम् श्वेतम् ), भाग्यवान् ( सुभगम् ) असा जो अग्नि त्याला वाढवित्या झाल्या. दिवो यह्वीः० स ना अत्र युवतयः सयोनीरेकं गर्भं दधिरे सप्तवाणीः ( ३।१।६ ) = द्यूच्या सात मुली ( यह्वीः, वाणीः ) ह्या पुरातन कालीं ( सना ) एक गर्भ धारण करत्या झाल्या. सप्त प्रियासोऽजनयन्त ( ४।१।१२ ) = द्यूच्या सात प्रिय मुली अग्नीला जन्म देत्या झाल्या. अस्य वामस्य ही सूक्तांतील पहिली ऋचा आहे. परंतु हिच्या आधीं एखादी दुसरी

ऋचा असावी असा संशय येतो. अस्य होतुः म्हणजे ह्या होत्याचा पहिला भाऊ अमका होता असें ह्या नष्ट झालेल्या ऋचेंत म्हटलें असावें. तसें असल्यास त्याचा मधला भाऊ अमका व तिसरा अमका असें म्हणणें बरोबर दिसतें. होतृ शब्द अग्नीलाच मुख्यत्वेंकरून लावलेला असतो. समिधा, काष्ठें वगैरे देऊन जो प्रज्वलित होतो तो पलित; जो रानें वनें भक्षण करीत जातो तो अश्न; घृताहुतींनीं जो माखला जातो तो घृतपृष्ठ. ह्यांमध्यें सात आयांचा मुलगा व जनांचा पति मला दिसला. ही सर्व ऋचा अग्निपर आहे असें मला वाटतें. 'सप्तादित्यरश्मय इति वदन्ति अथवा मन्यन्ते' हें वचन पुढील खंडांतील ऋचेस अनुलक्षून असेल. सप्त युञ्जन्ति = सप्त रश्मयः युञ्जन्ति.

## खंड २७ वा.

**सप्त युञ्जन्ति रथमेकचक्रमेको अश्वो वहति सप्तनामा**
**त्रिनाभि चक्रमजरमनर्वं यत्रेमा विश्वा भुवनाधि तस्थुः (ऋ० सं० १।१६४।२)**
**सप्त युञ्जन्ति रथम् एकचक्रम् एकचारिणम्**

एकचक्रं = एकचारिणम् = एकच संचार करणारा. सात रश्मि किंवा सतत गमन करणारे रश्मि जो आकाशांत एकटाच संचार करतो अशा रथाला म्हणजे सतत गमन करणाऱ्या आदित्याला जोडतात. म्हणजे उदय पावल्याबरोबर आदित्य हा किरणांनीं युक्त होतो व एकटाच आकाशांत संचार करूं लागतो. एकटाच म्हणण्याचें कारण आदित्यप्रकाशानें दुसरे ज्योति अदृश्य होतात. रथं = रंहणं = गमन करणारा. रथ शब्द रंह् जाणें ह्यापासून झाला आहे.

**चक्रं चकतेर्वा चरतेर्वा क्रामतेर्वा**

ही चक्र शब्दाची व्युत्पत्ति एथें अस्थानीं होय. कारण एकचक्रं म्हणजे एकचारिणं एवढेंच एथें म्हटलें आहे. ती व्युत्पत्ति त्रिनाभि चक्रं ह्याच्यानंतर यावयास पाहिजे; व दुर्गवृत्तींत ती तेथेंच दिली आहे.

**एकः अश्वः वहति सप्तनामा आदित्यः**

ह्या रथाला सप्त नांवाचा घोडा म्हणजे आदित्य ओढून नेतो. वर जो पहिल्या पादाचा अर्थ दिला आहे तो दुर्गानें केलेला अर्थ आहे. तेथें रथ म्हणजे आदित्य असें म्हटलें आहे; तेव्हां अश्व म्हणजे आदित्य असें म्हणणें बरोबर दिसणार नाहीं. परंतु दुर्ग म्हणतोः—एकः एव अश्वः अशनः व्यापनः सर्वभूतानां वहति गच्छति सप्तनामा सप्तस्तुतिः अथवा सप्तरश्मिः = सर्व प्राणिमात्रांना व्यापून टाकणारा असा आदित्य वहति म्हणजे जातो. एथें अश्व व वहति ह्यांचे नेहमींचे अर्थ सोडून निराळे अर्थ केले आहेत.

**सप्त अस्मै रश्मयः रसान् अभिसंनामयन्ति**

आदित्याला सप्तनामा असें म्हणण्याचें कारण सात (सप्त) रश्मि सर्व रस

ह्याच्याकडे नेतात (अभिसंनामयन्ति). सप्त = सप्तरश्मयः; नाम = अभि + सं + नाम + यन्ति. अथवा,

**सप्त एनम् ऋषयः स्तुवन्ति इति वा**

सात ऋषि ह्याची स्तुति करतात. सप्त = सप्तऋषयः; नाम = स्तुवन्ति. नम् = नमणें, स्तुति करणें. वास्तविक सप्तनामा म्हणजे सप्त ह्या नांवाचा.

**इदम् अपि इतरत् नाम एतस्मात् एव अभिसंनामात्**

इतर म्हणजे लौकिक; म्हणजे व्याकरणांतील जो नाम शब्द तो ह्याचपासून म्हणजे अभिसंनाम ह्यापासून झाला आहे. तदपि स्वम् अर्थं प्रत्याययितुं क्रियापदस्य गुणभावेन आभिमुख्येन संनमति (दुर्ग) = नाम हें स्वतःचा अर्थ स्पष्ट करण्याकरतां क्रियापदाला गुणभूत होऊन त्याला म्हणजे क्रियापदाला मुख्यत्वेंकरून नमतें. क्रिया मुख्य व नाम वगैरे गौण, हा निरुक्तकारांचा सिद्धांत प्रसिद्ध आहे. एतस्मादेव अभिसंनामात् ह्या शब्दांवरून 'सप्त एनम् ऋषयः स्तुवन्ति इति वा' हें प्रक्षिप्त असावें. कारण, अभिसंनामात् ह्याचा अभिसंनामयन्ति ह्याच्याशीं संबंध आहे. यास्क नेहमीं 'एतस्मादेव' एथेंच थांबतो. म्हणून 'अभिसंनामात्' हें प्रक्षिप्त असावें. कारण नाम शब्द नम् धातूपासून झाला आहे. अभिसनामय् हें कारितरूप आहे. व्याकरणांतला जो नाम शब्द त्याला ह्या कारित रूपाशीं कांहीं करावयाचें नाहीं. स्तुवन्ति ह्याच्याबद्दल नमन्ति असा मूळ पाठ असावा. तसा पाठ असल्यास 'सप्त एनम् ० इतिवा' हें प्रक्षिप्त नसून 'अभिसंनामात्' हें प्रक्षिप्त असावें.

**संवत्सरप्रधानः उत्तरः अर्धर्चः**

पहिली अर्धी ऋचा आदित्यपर आहे. परंतु ऋचेचा दुसरा अर्ध संवत्सरपर आहे.

**त्रिनाभि चक्रं त्र्यृतुः संवत्सरः**

त्रिनाभि = त्र्यृतुः. चक्रं = संवत्सरः. संवत्सरचक्राला तीन नाभि असतात. नेहमींच्या चाकाला एकच नाभि असते. परंतु ह्या संवत्सररूपी चाकाला तीन नाभि आहेत. 'चकतेर्वा चरतेर्वा क्रामतेर्वा' ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत चक्रं ह्या शब्दानंतर आहे. दुर्ग म्हणतोः—त्रिनाभिसंयुक्तं कालचक्रं चकनधर्मि । चकनं चलनम् उच्यते। चरणधर्मि क्रमणधर्मि वा = तीन नाभींनीं युक्त असें जें हें कालचक्र त्याचा चकन म्हणजे चलन हा धर्म आहे, म्हणजे चक्र शब्द 'चक्' धातूपासून झाला आहे; किंवा चर् किंवा क्रम् या धातूपासून झाला आहे.

**ग्रीष्मः वर्षाः हेमन्तः इति**

ते तीन ऋतु उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा हे होत.

**संवत्सरः संवसन्ते अस्मिन् भूतानि**

ज्याच्यामध्यें प्राणी एकत्र राहातात तो संवत्सर; म्हणजे संवत्सर हा शब्द सं + वस् ह्या धातूपासून झाला आहे. समस्तानि हि भूतानि एतस्मिन् संवसन्ति । मैथु-

नाभिप्रायो वा स्यात् संवासः ( दुर्गः ) = सर्वभूतें ह्यांत एकत्र राहातात. संवास ह्याचा अर्थ सहवास असा नसून मैथुन हा अर्थ कदाचित् असेल. संवसन्ति ऋतवोऽस्मिन् संवत्सरः सर्वर्तुपरिवर्तस्तु स्मृतः संवत्सरो बुधैः इति भागुरिः ( क्षीरस्वामी अमर १।३।२० )

**ग्रीष्मः ग्रस्यन्ते अस्मिन् रसाः**

ग्रीष्म शब्द ग्रस् भक्षणें ह्यापासून झाला आहे. कारण पृथ्वीवरील सर्व रस ह्या ऋतूंत आदित्य खाऊन टाकतो. गिरत्यम्बु ग्रीष्मः ( क्षीर. १।३।१८ ) ग्रसते रसान्; ग्रस + मनिन् ( उणादि १।१४७ ).

**वर्षाः वर्षति आसु पर्जन्यः**

वर्षा शब्द वर्ष् वर्षणें ह्यापासून झाला आहे. कारण ह्या ऋतूंत पर्जन्य वर्षतो.

**हेमन्तः हिमवान्**

हेमन्तः = हिम + न्तः. न्तः = वान्. ज्याच्यामध्यें बर्फ पडतें तो हेमन्त. हिमान्तोस्य हेमन्तः ( क्षीर. अमर १।३।१८ )

**हिमं पुनः हन्तेर्वा हिनोतेर्वा**

हिमवान् ह्यांतील हिम शब्द 'हन्' नाश करणें ह्यापासून झाला आहे. कारण, थंडी किंवा बर्फ ओषधिवनस्पतींचा नाश करतो. हन् गमन करणें हाही अर्थ एथें लागू होईल. कारण थंडी प्राण्यांना क्षयाप्रत पाठविते असें दुर्ग म्हणतो. किंवा 'हि' ह्या धातूपासून झाला आहे. 'हि' तृप्त करणें. हिमानें धान्यें तृप्त म्हणजे पुष्ट होतात. किंवा 'हि' पाठविणें ह्यापासून हिम शब्द झाला असेल. थंडी प्राण्यांना यमसदनास पाठविते.

**अजरम् अजरणधर्माणम्**

अजरम् = अ + जरम्. जरम् = जरणधर्माणम्. दुर्गपाठ अजरणधर्मि असा आहे; व तोच बरोबर आहे. कारण चक्र शब्द नपुंसकलिंगी आहे. अजरणधर्माणं हें संवत्सराला लागेल. परंतु एथें संवत्सर हें विशेष्य नसून चक्र हें विशेष्य आहे. ह्या संवत्सर चक्राला जरा माहीत नाहीं.

**अनर्वम् अप्रत्यृतम् अन्यस्मिन्.**

अनर्वम् = अन् + अर्वम्. अर्व शब्द ऋ जाणें ह्यापासून झाला आहे. हें संवत्सरचक्र दुसऱ्या कोणत्याही वस्तूवर अवलंबून नाहीं. अप्रत्यृतं = अ + प्रति + ऋतम् = ( दुसरी ) कडे गेलेलें नाहीं तें.

**यत्र इमानि सर्वाणि भूतानि अभिसंतिष्ठन्ते.**

इमा = इमानि. विश्वा = विश्वानि = सर्वाणि. भुवनानि = भूतानि = प्राणिमात्र. पण भुवनानि ह्याचा अर्थ ( स्वर्ग मृत्युलोक वगैरे ) भुवनें असा आहे. अधितस्थुः = अभिसंतिष्ठन्ते. अभिसंतिष्ठन्ते = आश्रितानि विनाशम् उपयान्ति । विनाशः अपि संस्था उच्यते ( दुर्गः ) = ह्या चक्रावर अवलंबून असणारे प्राणिमात्र विनाश

पावतात. ह्या दुर्गानें काढलेला अर्थ यास्काच्या मनांत होता किंवा नव्हता तें समजत नाहीं. हीं सगळीं भुवनें ह्या चाकावर अवलंबून आहेत असा अर्थ असावा. सूर्याहून मोठी अशी कोणतीही वस्तु पूर्वींच्या लोकांस माहीत नव्हती. म्हणूनच ' सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ' असें म्हटलें आहे. ऋचेचा अर्थः--सात देव एकचाकी रथ जुंपतात म्हणजे तयार करितात. त्या रथाला सप्त नांवाचा एकच घोडा ओढून नेतो. ह्या चाकाला तीन नाभि आहेत. त्याला जरा माहीत नाहीं. म्हणजे तें कधीं मोडत नाहीं. त्याला कसलाही अडथळा होत नाहीं; व त्याच्यावर सर्व जगतें बसलीं आहेत म्हणजे अवलंबून आहेत.

**तं संवत्सरं सर्वमात्राभिः स्तौति**

त्या ह्या संवत्सराचें सर्व मापांनीं ऋषि वर्णन करतो ( स्तौति ).

**पञ्चारे चक्रे परिवर्तमाने ( ऋ. सं. १।१६४।१३ ) इति पञ्चर्तुतया**

पांच अरा आहेत ज्याला असें चाक फिरत असतांना. अशा ह्या ऋचेंत संवत्सर पांच ऋतूंचा बनला आहे असें ऋषि म्हणतो. संवत्सरं पञ्चर्तुतया स्तौति असा अन्वय आहे. पञ्च ऋतवः यस्मिन् सः पञ्चर्तुः तस्य भावः पञ्चर्तुता तया. गुर्जरपाठ पञ्चर्तुतायाः असा आहे; परंतु तो बरोबर नाहीं. पञ्चर्तुतायाः उदाहरणम् असा अर्थ करावा लागेल.

**पञ्चर्तवः संवत्सरस्य इति च ब्राह्मणम् हेमंतशिशिरयोः समासेन**

संवत्सराचे पांच ऋतु असतात, असें ब्राह्मणवचन आहे. पांच ऋतु म्हणण्याचें कारण हेमंत व शिशिर ह्या दोन्हींचा एकाच ऋतूंत अन्तर्भाव केला आहे. समास म्हणजे एकत्रीकरण. हेमन्तशिशिरसमासेन असा दुर्गपाठ व गुर्जरपाठ आहे.

**षळर आहुरर्पितम् ( ऋ० सं० १।१६४।१२ ) इति षळृतुतया**

सहा अरा आहेत ज्याला अशा चक्रावर संवत्सर ठेवला आहे असें म्हणतात. षळृतुतया स्तौति असा अन्वय होय. गुर्जरपाठांत षळृतुतायाः असा पाठ आहे. षळृतुतायाः उदाहरणम्. अराः प्रत्यृताः नाभौ. अरा ह्यांना ' अरा ' म्हणण्याचें कारण ह्या चाकाच्या नाभींत गेल्या असतात ( प्रति + ऋताः ). म्हणजे अर शब्द ' ऋ ' जाणें ह्यापासून झाला आहे.

**षट् पुनः सहतेः**

षळरे ह्यांतला जो षट् शब्द तो ' सह् ' पराभव करणें ह्यापासून झाला आहे. कारण ती संख्या त्याच्या आधींच्या संख्यांचा पराभव करते. म्हणजे त्या सर्व संख्या षट् यामध्यें आहेत. पुनः ह्याचा अर्थ ' आणि ' सारखा आहे.

**द्वादशारं न हि तज्जराय ( १।१६४।११ )। द्वादश प्रधयश्चक्रमेकम् ( १।१६४।४८ ) इति मासानाम्**

मासानाम् एतौ पादौ भवतः इति वाक्यशेषः असा अन्वय दुर्ग करतो. पण

मासानां उदाहरणे भवतः असा अन्वय बरा दिसतो. बारा आहेत अरा ज्याला असें हें संवत्सरचक्र कधींही जीर्ण होत नाहीं. द्वादश प्रधी म्हणजे एक चाक होतें. चक्रं रथाङ्गं तस्यान्ते नेमिः स्त्री स्यात्प्रधिः पुमान्। ( क्षीर० अमर २।८।५७ ). ह्यावरून प्रधि म्हणजे चाकाची धाव. प्रधि शब्द ऋग्वेदांत आणखी ४ वेळां आला आहे. ( १ ) उत प्रधिमु दहन्नस्य विद्वान् ( १०।१०२।७ ); ( २ ) त्वया विभिन्नं भरति प्रधिं पिता ( १०।१३८।६ ); ( ३ ) युगेव नभ्येव न उपधीव प्रधीव ( २।३९ ४ ); ( ४ ) उत दासस्य वर्चिनः सहस्राणि शतावधीः। अधिपञ्च प्रधीँरिव ( ४। ३०।१५ ) ह्या चार ठिकाणीं सायणाचार्य प्रधि शब्दाचे अनुक्रमें पुढीलप्रमाणें अर्थ करतातः—( १ ) अक्षच्छिद्रकाष्ठः प्रान्तकाष्ठः ( २ ) रथचक्रस्य पार्श्वफलके (३) चक्रबाह्यवलयौ ( ४ ) चक्रस्य परितः स्थितान् शंकून्. ह्यांपैकीं चक्रबाह्यवलयं म्हणजे धाव हा अर्थ स्पष्ट आहे. बाकीचे तीन अर्थ कळत नाहींत. गण्डपृष्ठः प्रधिः इति उच्यते असें दुर्ग म्हणतो. पण तोही अर्थ कळत नाहीं. बारा तुकड्यांची धाव केली असल्यास बारा प्रधि म्हणजे एक चाक असें म्हणतां येईल. पुरातनकाळीं लोखंडाची धाव बनवतां येत नसेल. ती लांकडाचीच बनविली गेली असावी. बारा वक्र तुकडे एकमेकांत अडकवून धाव केली गेली असेल. प्रधि शब्दाचा निश्चित अर्थ समजत नाहीं.

**मासाः मानात्**

मास शब्द मा मोजणें ह्यापासून झाला आहे. सूर्यामासौ एथें मास् म्हणजे चंद्र. अवेस्तांत माह्. चंद्राला मास् म्हणण्याचें कारण त्याच्या गतीवरून महिन्यांतील दिवसांची संख्या मोजली गेली असावी.

**प्रधिः प्रहितो भवति**

प्रधि शब्द प्र + धा ह्यापासून झाला आहे. प्रान्ते धीयते इति प्रधिः ( क्षीरस्वामी २।८।५७ ). प्रधीला प्रधी म्हणण्याचें कारण तो जोरानें घातलेला म्हणजे अडकविलेला असतो. पण तो कोठें अडकविलेला असतो तें यास्क सांगत नाहीं.

**तस्मिन्त्साकं त्रिशता न शंकवोऽर्पिताः षष्टिर्न चलाचलासः** ( १।१६४।४८ )

तस्मिन् चक्रे साकं सह त्रिशता न शंकवः अर्पिताः। त्रिशतानि अहोरात्राणि शङ्कवः इव अर्पिताः। षष्टिः न षष्ट्यधिकानि त्रीणि अहोरात्रशतानि शंकवः इव अर्पितानि प्रक्षिप्तानि। द्वितीयो नकारः समुच्चयार्थे। चलाचलासः चलानि अचलानि च। चलानि अनवस्थायित्वात्। अचलानि अहोरात्रभावं न मुञ्चन्ति। ( दुर्गः ) = त्या चाकांत शंकूप्रमाणें ३६० अहोरात्र घातले आहेत. ' षष्टिर्न ' एथील न समुच्चय दाखवितो. म्हणजे त्रिशता ही संख्या व षष्टि ही संख्या ह्यांचा समुच्चय म्हणजे बेरीज करावयाची आहे असें नकार सुचवितो. अहोरात्र हे एकामागून एक धावत असतात ते कधीं स्थिर नसतात म्हणून ते चल. परंतु अहोरात्र हा जो त्यांचा स्वभाव तो ते कधीं सोडीत नाहींत. अमरांत संख्या, खिळा, हत्यार व एका प्रकारची शिंपली

असे शंकु शब्दाचे चार अर्थ दिले आहेत. प्रधी हे लाकडाचे तुकडे असल्यास ते खिळयांनीं जोडले गेले असावेत. नेहमींच्या चाकाला दहावीस खिळे लागत असतील. परंतु ह्या संवत्सरचक्राला ३६० खिळे लागतात. नेहमींच्या चाकाचे खिळे स्थिर असतात; परंतु हे अहोरात्ररूपी खिळे अतिशय चल आहेत. चल ह्याची द्विरुक्ति होऊन चलाचल शब्द बनला आहे. चल + अचल असे त्या शब्दाचे अवयव नाहींत. ऋग्वेदांत उपमादर्शक शब्द कारण नसतांना कधीं कधीं दोनदां येतो. त्याप्रमाणें न हा एथे दोनदां आला आहे.

**षष्टिश्च ह वै त्रीणिच शतानि संवत्सरस्याहोरात्राः इति च ब्राह्मणं समासेन**

संवत्सराचे ३६० अहोरात्र असतात, असें ब्राह्मण–वचन आहे. हें ब्राम्हण-वचन कोठलें तें सांपडलें नाहीं. समासेन म्हणजे दिवस व रात्र हे एकच समजून' म्हणजे दोन्ही मिळून एक दिवस होतो अशा समजुतीनें वर्षाचे ३६० दिवस होतात.

**सप्तशतानि विंशतिश्च तस्थुः ( १।१६४।११ )**

आ पुत्रा अग्ने मिथुनासो अत्र सप्तशतानि विंशतिश्च तस्थुः = आतस्थुः पुत्राः एतस्मिन् चक्रे मिथुनाः । कस्य । अग्नेः । अग्निशब्दः अस्मिन्मन्त्रे संबोधनान्तः षष्ठ्या विपरिणम्यते अग्नेः पुत्राः आतस्थुः इति । अग्निश्च अत्र आदित्यः एव अभिप्रेतः । तस्य अहोरात्राः पुत्रत्वेन उच्यन्ते तत्कृतत्वात् अहोरात्राणाम् ( दुर्गः ) = अग्ने हें जरी संबुद्धीचें रूप आहे तरी अग्नेः अशी त्या शब्दाची विभक्ति बदलली पाहिजे. अग्नि म्हणजे आदित्य तो अहोरात्र करतो म्हणून अहोरात्र हे त्याचे पुत्र. हे सातशेवीस जुळे ( मिथुनासः ) पुत्र ह्या चाकावर बसतात. अग्ने हा शब्द एथें कां घातला हें समजत नाहीं.

**सप्त च वै शतानि विंशतिश्च संवत्सरस्य अहोरात्राः ( ऐतरेय आरण्यक ३।२।१ ) इति च ब्राह्मणम् विभागेन विभागेन**

वर्षाचे ७२० अहोरात्र असतात, असें ब्राह्मणवचन आहे. वर अहोरात्र ३६० तर एथे ते ७२० ह्याचें कारण एथें दिवस आणि रात्र हे वेगळेवेगळे ( विभागेन ) मोजले आहेत. अहोरात्र हें एक जणूं काय बहीणभावंडांचें जुळेंच. पण या बहीणभावंडांना पुत्राः असें कसे म्हणतां येईल? कदाचित् पुत्र शब्दांत दुहितृ शब्दाचा अन्तर्भाव असेल. भ्रातृपुत्रौ स्वसृदुहितृभ्याम् ( पाणिनी १।२।६८ ) पण अहर् शब्द नपुंसकलिंगी आहे, ह्याची काय वाट? विभागेन विभागेन ह्या द्विरुक्तीनें अध्याय संपला हें दर्शविलें जातें.

---

# अध्याय ५ वा

## खंड १ ला

**स्रस्निमविन्दच्चरणे नदीनाम् ( १०।३२।६ )। संस्नातं मेघम्**

सास्निः (निघंटु ४।२।१) = संस्नातम्. सास्निः = स + स्निः. स = सम्. स्नि = स्नातम्. संस्नात काय? मेघ. मेघ पाण्यानें संपूर्ण स्नान केलेला म्हणजे भरलेला असतो. हा ददि, पपि, ययि, जग्मि, जघ्नि वगैरे शब्दांप्रमाणें बनला आहे. स्ना धातूला अभ्यास होऊन सस्ना होईल व सस्ना + इ = सास्निः. सन् ह्यापासूनहि अभ्यासानें व इ प्रत्यय लागून तो तयार होईल. हा शब्द सस्नि, सस्निः, सस्निं व सस्निना ह्या रूपांनीं ऋग्वेदांत ९ वेळां आला आहे. नवांपैकीं २ ऋचांत याचा अर्थ स्नात म्हणजे चकचकित, तेजस्वी, देदीप्यमान, व ६ ऋचांत समर्थ. राहिलेल्या एका ऋचेंत त्याचा अर्थ ठरवितां येत नाहीं. प्रस्तुत ठिकाणीं त्याचा अर्थ वज्र असा असावा. दुर्गानें केलेला अर्थः— जेथें नदी म्हणजे पाणी संचार करतें अशा अंतरिक्षांत इंद्राला पाण्यानें डबडबलेला मेघ सांपडला. विन्द् = मिळविणें ह्या अर्थीं एथें नसून त्याचा पकडणें, हातांत घेणें असा अर्थ आहे. पाणी (नदीनां) वाहूं लागावें (चरणे) म्हणून इंद्र वज्र हातांत घेता झाला. पुढील चरण 'अपावृणोत् दुरो अश्मव्रजानां' असा असून 'दगडाच्या कोंडवाड्यांचीं दारें उघडिता झाला' असा त्याचा अर्थ आहे. इंद्रानें वज्राचे घाव घालून कोंडवाड्यांचीं दारें उघडलीं व जलरूप गायांना बाहेर काढलें.

**वाहिष्ठो वां हवानां स्तोमो दूतो हुवन्नरा (ऋ० ८।२६।१६)। वोळ्हृतमो ह्वानानां स्तोमः दूतः हुवत् नरौ**

वाहिष्ठ (२) = वोळ्हृतमः = सर्व आणण्यामध्यें श्रेष्ठ. वह् + तृ = वोढृ = वोळ्हृ. हवानाम् = ह्वानानाम्. हु = बोलावणें यापासून नाम हव. नरा = नरौ. भाष्यांत हवत् शब्द जशाचा तसा ठेविला आहे; आह्वयति असें म्हणावयास पाहिजे होतें. ऋचेचा अर्थः—हे अश्विनांनो, सर्व आह्वानामध्यें श्रेष्ठ म्हणजे तुम्हांला तावडतोब आणणारा असा हा स्तोमरूपी दूत बोलावीत आहे.

**नराः मनुष्याः नृत्यन्ति कर्मसु**

मनुष्यांना नर म्हणण्याचें कारण मनुष्यें काम करीत असतांना नाचतात म्हणजे हालचाल करितात. नर हा शब्द नृत् = नाचणें यापासून झाला आहे. मनुष्याला नर केव्हां म्हणावें? तो काम करीत असेल त्यावेळीं. 'शूर' व दाता ह्या अर्थीं 'नर' शब्द ऋग्वेदांत पुष्कळ वेळां आला आहे. प्रस्तुत ऋचेंत नर म्हणजे दाते अश्विन्. नृ = (१) शूर कृत्यें करणें; (२) देणें; नृ हें नाम ना नरौ असें चालतें.

**दूतः ( ३ ) जवतेर्वा द्रवतेर्वा वारयतेर्वा**

दूत शब्द हा मूळचा जूत असेल. जू म्हणजे वेगानें जाणें. जो वेगानें जातो तो जूत म्हणजे दूत. ‘जू’ शब्द धातुपाठांत नाहीं. किंवा ‘दूत’ शब्द द्रु =धांवणें यापासून झाला असेल. दूताला धांवावें लागतें. किंवा तो शब्द वार् = टाळणें यापासून झाला असेल. कारण दूताला अनर्थ टाळावयाचे असतात. ‘दूत’ आणि ‘वारयति’ यांच्यामध्यें सामान्यवर्ण त् हा एकच दिसतो. महाराष्ट्रपाठांत दूतो देवानामसि मर्त्यानाम् (ऋ० १०।४।९) इत्यपि निगमो भवति’ असे शब्द जास्त आहेत. या उदाहरणाची वास्तविक आवश्यकता नाहीं. कारण स्तोमो दूतो० येथें दूत शब्द आलाच आहे.

**वावशानः ( ४ ) वष्टेर्वा वाश्यतेर्वा**

वश् = इच्छा करणें किंवा वाश् = ओरडणें यापासून वावशान शब्द झाला असेल. वश् हा अभ्यासानें ‘वावश्’ होतो. त्याला ‘आन’ हा प्रत्यय लागून ‘वावशान’ शब्द झाला आहे. वाश् धातूशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं.

**सप्त स्वसृररुषीर्वावशानः ( ऋ० १०।५।५ ) इत्यपि निगमो भवति**

अरुषीः = प्रकाशणाऱ्या, चकाकणाऱ्या. अग्नि हा प्रकाशणाऱ्या सात बहिणींची इच्छा करितो. पाण्याला सात बहिणी म्हटलें आहे. अग्नि पाण्यापासून जन्मतो अशी एक कथा आहे.

**वार्यं ( ५ ) वृणोतेः । अथापि वरतमम्**

वृ ( = पसंत करणें, याचना करणें ) यापासून ‘वार्य’ झाला आहे. वार्य = धन. अतिशय उत्तम जी वस्तु तिलाहि वार्य म्हणतात. अथापि वरतमम् या शब्दानें निराळी व्युत्पत्ति दर्शविली नसून निराळा अर्थ सांगितला आहे.

**तद्वार्यं वृणीमहे वरिष्ठं गोपयत्यम् ( ऋ० सं० ८।२५।१३ ) । तत् वार्यं वृणीमहे वर्षिष्ठं गोपयितव्यम् । गोपयितारः यूयं स्थ । युष्मभ्यम् इति वा**

वरिष्ठम् = वर्षिष्ठम् । वर्षिष्ठ हा शब्द दुर्गवृत्तींत नाहीं. वरिष्ठ व वर्षिष्ठ हे दोन्ही शब्द ऋग्वेदांत आहेत. दोहींचाहि अर्थ श्रेष्ठ असा होतो. गोपयत्यम् = गोपायितव्यम् = रक्षण करण्याजोगें; किंवा गोपायितारः यूयं स्थ = तुम्ही ज्याचें रक्षण करणारे आहांत असें. गुर्जरपाठ गोपितारः असा आहे. पण तो अशुद्ध आहे. युष्मभ्यमिति वा याचा ‘अथवा युष्मभ्यं यौष्माकीणं यत् भवति तत् वृणीमहे’ असा दुर्ग अर्थ करितो. परंतु युष्मभ्यमिति वा हें ऋचेंतील कोणत्या शब्दाचें विवरण आहे हें कळत नाहीं. कदाचित् गोपायितव्यम् असा अन्वय असेल. गोपायितव्यम् याचे दोन अर्थः–(१) गोपयितारो यूयं स्थ = ज्याचें रक्षण करणारे तुम्ही आहांत असें. (२) जें तुमच्यासाठीं रक्षण करावयाचें असतें तें. परंतु देवांच्यासाठीं धन रक्षण करण्याचें काय कारण ? धनाचें रक्षण करण्याला स्वतः ते समर्थ आहेत. पदपाठ गोपऽयत्यम् असा आहे. गोपयत्यं सर्वेषां रक्षकं यत्नैः पालनीयं वा असा सायणाचार्य अर्थ करितात. मित्रो यत्पाति वरुणो यदर्यमा असा ह्या

ऋचेचा दुसरा अर्थ आहे. ज्याचें मित्र, वरुण व अर्यमा रक्षण करतात असें असा त्या शब्दांचा अर्थ होतो. तेव्हां गोपयत्यं म्हणजे मित्र वगैरेनीं रक्षण करण्याजोगें, इतकें मोठें असा अर्थ असेल. नित्य, आविष्ट्य, सनुत्य ह्यांतील त्य गोपयत्यं यांत असल्यास गोपय ह्याचा अर्थ काय? वार्यं शब्द कठीण नसून गोपयत्यं हाच शब्द व्युत्पत्ति व अर्थ ह्या दोहोंसंबंधानें अतिशय कठीण आहे. वरिष्ठं व गोपयत्यं ह्याचा अतिशय धनानें भरलेलें असा अर्थ असेल.

**अन्धः ( ६ ) इति अन्ननाम । आध्यानीयं भवति**

अन्धस् हें अन्नाचें नांव आहे. अन्नाला अन्धस् म्हणण्याचें काय कारण? अन्धः = अ + न् + धस्; अ = आ; धस् = ध्या; न् = नीयम् = ज्याचें ध्यान करावें लागतें असें. अन्न कसें मिळेल याची लोकांना सदा काळजी बाळगावी लागते. ‘अन्धस्’ शब्द ऋग्वेदांत पुष्कळ वेळां आला आहे. अन्धस् = सोम. श्येनो यदन्धो अभरत्परावतः । (९।६८।६) = श्येनानें परावत् स्वर्गांतून सोम आणला; पिबास्यन्धो० इन्द्र स्वाहा ररिमा ते मदाय । (३।३५।१) = हे इन्द्रा! अन्धस् पी; मद आणण्याकरितां तुला तें आम्ही देत आहोंत. तस्मा इदन्धः सुषुमा० (४।१६।१) = त्याच्यासाठीं आम्ही अन्धस्चा रस काढीत आहों. शुक्रमन्धः (४।२७।५) = झळकणारें अन्धस्; तुभ्येदेते मरुतः० सुन्वन्त्यन्धः ( ५।३०।१६ ) = इंद्रा! तुझ्यासाठींच हे मरुत् अन्धस्चा रस काढीत आहेत. असावि देवं गोऋजीकमन्धः (७।२१।१) = गाईच्या दुधानें युक्त अशा अन्धस्चा रस काढिला आहे. शुभ्रमन्धः अप्सु धूतः नृभिः सुतः (९।६२।५) = झळकणारें अन्धस्, पाण्यामध्ये घातलेला व ग्राव्यांनीं रस काढलेला. या सर्व उताऱ्यावरून अन्धस् म्हणजे सोमच. अन्धस् = अन्न असें म्हणण्याला कांहींच कारण नाहीं.

**आमत्रेभिः सिंचता मद्यमन्धः ( ऋ० सं० २।१४।१ )। आसिंचत अमत्रैः मदनीयम् अन्धः**

आमत्रेभिः ह्यांतील आ + सिञ्चत. अमत्रभिः = अमत्रैः = भांड्यांनीं. मद्यम् = मदनीयम्। गुर्जरपाठांत ‘मदनीयम्’ नसून ‘मद्यम्’ असेंच आहे. मद्यम् = मद उत्पन्न करणारें. भांड्यानें कलशांतून इन्द्रासाठीं मद उत्पन्न करणारा सोम ओता.

**आमत्रं पात्रम् । अमा अस्मिन् अदन्ति । अमा पुनः अनिर्मितं भवति । पात्रं पानात्**

अमत्रं = पात्रं = भांडें. अनिर्मित म्हणजे ज्याला माप नाहीं असें. ह्या भांड्यांतून ज्याला मोजणार नाहीं इतकें पितात, म्हणून त्याला अमत्र म्हणावयाचें. अमत्र म्हणजे खूप मोठें भांडें. अमत्रम् = अम + त्रम्. अम = अमा. त्रम् = अदन्ति. अमा = अ + मा. मा = मितम् = निर्मितम्; अमा = अनिर्मितं = ज्याला माप नाहीं असें, हवें तितकें, बेसुमार. पा = पिणें यापासून पात्रशब्द. अशा सोप्या शब्दाची व्युत्पत्ति यास्क खास देणार नाहीं. तेव्हां ही व्युत्पत्ति प्रक्षिप्त असावी.

**तमः अपि अन्धः उच्यते । न अस्मिन् ध्यानं भवति न दर्शनम् । अन्धं तमः इति अभिभाषन्ते ।**

अन्धकारालाहि अन्धस् म्हणतात. अन्धः = अ + न् + धः, अ = न. न् + धस् = ध + न = ध्यानं = दर्शनम्. ज्याच्यामध्यें कांहीं दिसत नाहीं तें. न दर्शनम् हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. ध्यानं दर्शनकृतं भवति चक्षुषो दृष्टिनिरोधात् = डोळ्यांना दिसत नाहीं. दिसण्याच्या आड कांहींतरी येतें; म्हणून दर्शनानें उत्पन्न झालेला वस्तुविषयक विचार होत नाहीं असें दुर्ग म्हणतो. 'न दर्शनम्' हे शब्द प्रक्षिप्त असावेत.

लौकिक भाषेंत अन्धं तमः अशी बोलण्याची पद्धत आहे. जेव्हां अंधकार दाट असतो, कांहीं दिसत नाहीं, तेव्हां अन्धं तमः असें म्हणतात. 'ध्वान्ते गाढेन्ध-तमसं क्षीणेत्वतमसम्' ( अमर १।७।३ ) अमरांत अन्धतमस् असा शब्द आहे.

**अयमपि इतरः अन्धः एतस्मादेव । पश्य दृक्षण्वान्न विचेतदन्धः । ( ऋ० सं० १।१६४।१६ ) इत्यपि निगमो भवति ।**

लौकिक भाषेंत आंधळा या अर्थी जो अन्ध शब्द आहे त्याचीहि हीच व्युत्पत्ति. ज्याला दर्शनानें उत्पन्न झालेलें वस्तुविषयक ज्ञान नसतें तो अन्ध. अन्ध म्हणजे आंधळा. हा शब्द ऋग्वेदांतहि येतो. तेव्हां 'अयमपि इतरः' असें म्हणण्याचें कांहीं कारण नाहीं.

ज्याला डोळे आहेत तो पाहतो. आंधळ्याला दिसत नाहीं व त्यामुळें त्याला समजत नाहीं अशी ऋचा आहे. तमः अपि अन्धः उच्यते याचें उदाहरण यास्कानें दिलें नाहीं रात्र्यश्चिदन्धो अति देव पश्यसि ( ऋ. सं० १।९४।७ ) = 'रात्रीच्या अन्धकारांतूनहि हे देवा ! तूं पहातोस' असें उदाहरण द्यावयास पाहिजे होतें.

## खंड २ रा.

**सश्चन्ती भूरिधारे पयस्वती ( ५।७०।२ ) । असज्यमाने इति वा ।**

सश्चन्ती = असज्जमाने = एकमेकाला न चिकटणाऱ्या. षञ्ज् संगे ( धा. पा. १।१०।१२ ) हा धातु परस्मैपदी आहे. न चिकटणाऱ्या याअर्थी 'असज्यन्त्यौ' असें रूप पाहिजे. 'असज्यमाने' असें कर्मणि रूप देण्याचें कांहीं कारण नाहीं. कदाचित् 'असज्जमाने' असें यास्कानें लिहिलें असेल. षस्ज गतौ ( धा. पा. १।२०२ ) या धातूचें सज्जति असें रूप होतें. पण हा आत्मनेपदीहि आहे असें भट्टोजी दीक्षित म्हणतात व सज्जति असें रूप देतात. 'सश्च्' व 'सस्ज्' हे उच्चारानें कांहींसे सारखे आहेत; तेव्हां सस्ज धातु यास्काच्या मनांत असावा. यास्क-कालीं सस्ज् = याचा चिकटणें असा अर्थ असेल. सश्च् धातूचीं रूपें ऋग्वेदांत पुष्कळ आलीं आहेत व त्या धातूचे भरणें, आडवणें, थांबणें, पाळणें, मदत–सेवा

करणें, देणें, आश्रय घेणें असे भिन्न अर्थ आहेत. प्रस्तुत ऋचेंत 'असश्चन्ती' म्हणजे न थांबणाऱ्या, न थांबतां दूध देणाऱ्या असा अर्थ आहे. (आ वह) दुहानां धेनुं पिप्युषीमसश्चतम् (२।३२।३) दूध देणारी लष्ट व न अडणारी गाय आणून दे. असा प्रजावती गृहे असश्चन्ती दिवे दिवे । इळा धेनुमती दुहे (८।३१।४) = या यजमानाच्या घरीं, जिला पुष्कळ वासरें आहेत, दूध देतांना जी थांबत नाहीं अशी धेनू रोजच्यारोज दूध देते. या नो दोहते त्रिरहन् असश्चुषी (९।८६।१८) = दिव-सांतून तीन वेळां न अडतां जी आम्हांस दूध देते प्र ते धारा असश्चतो [illegible] यन्ति वृष्टयः (९।५७।१) = हे सोमा! आकाशांतून जशी वृष्टि [illegible] त्याप्रमाणें तुझ्या धारा न थांबतां भांड्यांत पडतात. प्रस्तुत ऋचेत द्यावापृथिवींना [illegible] म्हटलें आहे. या दोन गाई जल देतांना अडत नाहींत. त्या सारख्या जल देतात.

अव्युदस्यन्त्यौ इति वा

असश्चन्ती = अव्युदस्यन्त्यौ । अव्युदस्यन्त्यौ यांत धातु कोणता ते स[illegible] नाहीं. दुर्ग 'दस्' धातु आहे असें म्हणतो व 'अनुपक्षियन्त्यौ' याचा 'अविदर्य-स्यन्त्यौ' असा अर्थ देतो, परंतु 'दस्' धातु असल्यास अविदस्यन्त्यौ असें रूप पाहिजे. अविदस्यन्त्यौ ही असश्चन्ती याची व्युत्पत्ति नसून अर्थ असावा असें वाटतें. कारण असश्चन्ती यांत 'दस्' धातूचें कोणतेंहि रूप दिसत नाहीं. 'अव्युदस्यन्त्यौ' हाच मूळचा पाठ समजल्यास त्याचे अ + वि + उत् + अस्यन्त्यौ असे भाग पड-तात. असश्चन्ती यांत अस् धातु समजल्यास निषेधार्थ कशानें उत्पन्न होईल? शिवाय अस् काढून घेतल्यास अश्चन्ती हीं अक्षरें राहतात तीं कोठून आलीं? तेव्हां अविद-स्यन्त्यौ असाच मूळ पाठ असावा व तो असश्चन्ती याचा अर्थ असावा. एक अर्थ एकमेकांस न चिकटणाऱ्या, दुसरा, कधींहि क्षय न पावणाऱ्या किंवा ज्यांना कधींहि विपर्यास म्हणजे उलट स्थिति होणार नाहीं अशा.

बहुधारे । उदकवत्यौ

भूरिधारे = बहुधारे = पुष्कळ धारा देणाऱ्या. पयस्वती = उदकवत्यौ. पयस याचे दूध व पाणी असे दोन अर्थ असूं शकतील. असश्चन्ती भूरिधारे पयस्वती घृतं दुहाते सुकृते शुचिव्रते । राजन्ती अस्य भुवनस्य रोदसी अस्मे रेतं सिंचतं मनुर्हितम् = असश्चन्ती भूरिधारे पयस्वती सुकृते शुचिव्रते अस्य भुवनस्य राजन्ती रोदसी घृतं दुहाते । हे द्यावापृथिव्यौ यत् रेतः मनुर्हितं तत् अस्मे सिंचतम् । येथें द्यावापृथिवी या दोन गाई अशी कल्पना केली आहे. त्या गाई दुहाते म्हणजे दूध देतात. दूध या अर्थी या ऋचेंत पयः, घृतं, रेतः असे तीन शब्द घातले आहेत. पावसाची सतत धार चालते; पावसाचें पाणी हेंच दूध; त्याचा सारखा वर्षाव होतो. तेव्हां पयस्वती याचा ज्यांना दूध आहे अशा व ज्यांच्याजवळ पाणी आहे अशा असा दुहेरी अर्थ केला आहे.

**वनुष्यतिः ( ८ ) हन्तिकर्मा अनवगतसंस्कारः भवति । वनुयाम वनुष्यतः । ( ८।४०।७ ) इत्यपि निगमो भवति**

वनुष्यतिः याचा अर्थ मारणें. परन्तु वनुष्यत् हें रूप कसें बनलें हें समजत नाहीं. मूळ धातु 'वनु' त्याला लेट्चा स् लागून वनुष् होतें व चतुर्थगणाचा 'य' लागून 'वनुष्य' होतें. त्याचीं वनुष्यामि, वनुष्यावः वगैरे रूपें झालीं पाहिजेत. जे आमची हिंसा करितात (वनुष्यतः) त्यांची आम्ही हिंसा करूं. (वनुयाम) असें उदाहरण आहे.

**दीर्घप्रयज्युमति या वनुष्यति वयं जयेम पृतनासु दूढ्यः । ( ७।८२।१ ) दीर्घप्रततयज्ञम् अभिजिघांसति यः वयं तं जयेम पृतनासु दूढ्यम् दुर्धियम् पापधियम्**

दीर्घप्रयुज्यम् = दीर्घप्रततयज्ञम् = पुष्कळ दिवस टिकणारे (दीर्घ) लांबणारे (प्रतत) यज्ञ करणारा. अतिवनुष्यति = अभिजिघांसति = मारण्याची इच्छा करितो. अति = अभि. यज् + युः = यज्युः = हवि देणारा. २।१४।८ त अध्वर्यूंना यज्यवः म्हटलें आहे. यज्यु शब्द इंद्र, वरुण, मरुत्, अश्विन ह्यांना लाविलेला आढळतो, तेथें त्याचा अर्थ हवि घेणारा किंवा धन देणारा असा असला पाहिजे. अयज्युः = ( १ ) हवि न देणारा व ( २ ) धन न देणारा. प्रयज्यु हें विशेषण मरुतांना ७ वेळां, इंद्राला दोनदां व अग्नीला एकदां लाविलें आहे. प्रयज्युः = पुष्कळ हवि घेणारा किंवा पुष्कळ धन देणारा. हवि देणाऱ्याला प्रयज्यो असें एकदां म्हटलें आहे. दीर्घप्रयज्यु हा शब्द प्रस्तुत ऋचेंतच आढळतो. दीर्घप्रयज्युः = दीर्घकाल हवि देणारा. दूढ्यः = दूढ्यम् = दुर्धियम् = पापधियम्. दुर्गवृत्तीच्या कांहीं पोथ्यांत दूढ्यः दुर्धियः पापधियः असें सांपडतें. परंतु दूढ्यः याचा 'यः' याच्याशीं संबंध असल्यामुळें यास्कानें दूढ्यम् असें एकवचनीं रूप घातलें आहे. परंतु दूढ्यम् असे एकवचनीं रूप ऋग्वेदांत नाहीं. ऋग्वेदांत सर्वत्र दूढ्यः हें अनेकवचनच आहे. दूढ्य हा मूळचा शब्द दु + ध्यः असा होय. सुधीप्रमाणें दुर्धी असा मूळचा शब्द असावा. परंतु उच्चाराकरितां त्या शब्दाचें दूढी असें रूपान्तर झालें. दूढ्यः, दूढया, दूढ्ये अशीं या शब्दाचीं रूपें आढळतात. दुर्धीः म्हणजे वाईट स्तुति करणारा, शाप देणारा. सतत हवि देणाऱ्याला जो मारण्याची इच्छा करतो त्या दुष्टाला आम्ही लढाईंत जिंकूं.

वनुष्यति याचें हें एक उदाहरण पुरें होय. वनुयाम वनुष्यतः इत्यपि निगमो भवति हे शब्द प्रक्षिप्त असावेत. इत्यपि निगमो भवति म्हटल्यावर यास्क दुसरें उदाहरण देत नाहीं.

**पापः पाता अपेयानाम् । पापत्यमानः अवाङ् एव पतति इति वा । 'पापत्यतेः वा स्यात्'**

पापधियं याच्यामध्यें पाप शब्द आला आहे. त्याची व्युत्पत्ति येथें दिली आहे. पापः = पा + अपः पा = पाता. अपः = अपेयानाम्. पिण्यास ज्या अयोग्य वस्तु त्या जो पितो तो पाप म्हणजे पापी. दारू वगैरे पिऊं नये असें स्मृतींत म्हटलें आहे. ती

पिणारा तो पापी. किंवा पापः = पापत्यमानः; पत् पासून पापत् (यङ् लुगन्त) पापकर्में करून सारखा पडत पडत जाऊन शेवटीं खालीं खालींच नरकांत जो पडतो तो. गुर्जरपाठ 'पापञ्चमानः' असा आहे; पण तसा पाठ दुर्गवृत्तींत नाहीं. पापञ्चमानः = पापकर्मांनीं पक्क होऊन जो नरकांत जातो तो पाप. हा पाठ सरस दिसतो; कारण पापत्यमानः पतति यांत पत् धातु दोनदां येतो म्हणून हा पाठ बरोबर नाहीं. किंवा यङ् लुगन्त रूप पापत् याच्यापासून पाप. 'वा स्यात्' यानें ही व्युत्पत्ति बरोबर नाहीं असें सुचविलें आहे. दुर्गवृत्तींत ही व्युत्पत्ति दिली नाहीं. हिंसा करणें या अर्थी वनुष्य् पुष्कळ वेळां ऋग्वेदांत आला आहे. पण रेभो वनुष्यते मती (९।७।६) = स्तुति करणारा सोम स्तुतीनें स्तवितो. वनुष्य् स्तुति करणें. वनु हा धातु हिंसा करणें व स्तुति, पूजा करणें असा द्व्यर्थी ऋग्वेदांत आढळतो. निघण्टुकारानें अनेकार्थी म्हणून तो शब्द निघण्टूंत घातला असावा.

**तरुष्यतिः (९) अपि एवंकर्मा । इन्द्रेण युजा तरुषेम वृत्रम् (ऋ० सं० ७।४८।२) इत्यपि निगमो भवति**

तरुष्यति याचाहि तोच अर्थ म्हणजे मारणें हा अर्थ. सहाय्यकारी (युजा) इंद्र जवळ असल्यानें आम्ही वृत्राला ठार मारूं असेंहि वैदिक उदाहरण आहे. ऋग्वेदांत तरुष्यति असें रूप नाहीं. तरुष्य् याचें तरुष्यतः एवढेंच रूप आढळतें. तरुष् असा विकरणसहित धातु घेतल्यास त्याचीं तरुषेम, तरुषन्ते, तरुषन्त व तरुषः अशीं रूपें आढळतात. वनुप्रमाणें 'तरु' हा मूळ धातु; त्याला लेट्चा स् लागून तरुष् असें रूप बनतें. तरु याचे देणें व नाश करणें असे दोन अर्थ आहेत. यो विप्रैः वाजं तरुता = जो विप्रांना धन देतो. नास्य वर्ता न तरुता महाधने नार्भे = लहान किंवा मोठ्या लढाईत ज्याला पाठीमागें हटविणारा किंवा नाश करणारा कोणी नाहीं.

**भन्दना भन्दतेः स्तुतिकर्मणः । पुरुप्रियो भन्दते धामभिः कविः (३।३।४) इत्यपि निगमो भवति । स भन्दना उदियर्ति प्रजावतीः (९।८६।४१) इति च ।**

भन्द् = स्तुति करणें, यापासून भन्दना हें नाम झालें आहे. भदि कल्याणे सुखेच (धा. पा. १।१२). ज्याच्यापाशीं पुष्कळ प्रिय वस्तु आहेत असा कवि म्हणजे अग्नि देवांकडून (धामभिः) स्तविला जातो, असेंहि उदाहरण आहे. = तो प्रजेनें युक्त अशा स्तुति वर नेतो अशीहि ऋचा आहे. येथें 'सः' म्हणजे यज्ञ करण्याच्या वेळीं मी सोमरस काढीन असें जो म्हणतो तो असा दुर्ग अर्थ करितो. परंतु 'सः' म्हणजे सोमः असा अर्थ घेणें बरोबर होईल. सोम हा प्रजायुक्त स्तुति इंद्राकडे नेतो. मला प्रजा होवो असें स्तोता स्तुतींत म्हणतो. ती स्तुति सोम इंद्राकडे पोचवितो. हें दुसरें उदाहरण येथें देणें योग्य आहे; कारण भन्दना भन्दतेः ह्याचें उदाहरण पाहिजे आहे.

**अन्येन मदाहतो याहि तूयम् ( १०।१०।८ )। अन्येन मत् अहनः गच्छ क्षिप्रम्**

आहनः ( ११ ) = अहनः; याहि = गच्छ; तूयम् = क्षिप्रम्.

**आहंसि इव भाषमाणा इति असभ्यभाषणात् आहनाः इव भवति**

असें बोलणारी तूं मला जणूं काय मारतेसच म्हणून तूं आहनः असें मनांत आणून यम यमीच्या असभ्य भाषणामुळें तिला आहनः असें म्हणतो. असभ्य भाषणामुळें यमी जणूं काय आहनाः होते. आहनः शब्द ऋग्वेदांत सर्वत्र प्रिय या अर्थी आला आहे. अहं सोममाहनसं बिभर्मि (१०।१२५।२) = प्रिय असा जो सोम म्हणजे चन्द्र त्याला मी नेतों. ये ते मदा आहनसो विहायसस्तेभिरिन्द्रं चोदय दातवे मघम् ( ९।७५।५ ) = हे सोमा ! तुझे जे प्रिय आणि मोठे मद त्यांनीं इंद्राला धन देण्याला प्रेरणा कर. कदु व्रव आहनो वीच्या नॄन् ( १०।१०।६ ); येथें यमी यमाला आहनः म्हणते. यमानें कोणत्याहि प्रकारचें असभ्य भाषण केलें नव्हतें; तेव्हां यास्कानें केलेला अर्थ तेथें कसा लागू पडेल ? शिवाय अन्यमिच्छस्व सुभगे पतिं मत् ( १०।१०।६ ); येथें यम यमीला सुभगे म्हणतो; तेव्हां प्रस्तुत ऋचेंत 'आहनस्' म्हणजे प्रिय असाच अर्थ घेतला पाहिजे. आहनः = हे प्रिय बहिणी. ( भांडारकर ॲनल्सच्या १९१९ च्या पहिल्या अंकाच्या पहिल्या भागांत ( पृ. ४५ ) मी 'आहनस्' शब्दाचा अर्थ ठरविला आहे. )

**एतस्मात् आहनः स्यात्**

या आहनस् शब्दापासून 'आहनः' हें संबोधन होईल. संबोधन होईल असें म्हणण्याचें काय कारण ? तें संबोधन आहेच. हें वाक्य अपभ्रष्ट दिसतें. दुर्ग म्हणतो 'यः अयम् असत् प्रदेशः स्त्रियाः असौ अपि हि यस्य संनिधौ संकीर्त्यते सः आहन्यते इव असभ्यत्वात्तस्य । 'अयज्ञियो वै पुरुषः अमेध्यः आहनः स्यात् जायते ( मै. सं. १।६।४ ) इति विज्ञायते = स्त्रीच्या शरीराचा जो घाणेरडा प्रदेश त्याचें नांव एखाद्या मनुष्यापाशीं काढल्यास त्या मनुष्याला जणूं काय तडाखा बसतो; म्हणून त्या प्रदेशास आहनस्य म्हणतात. मनुष्य हा हवि घेण्याला योग्य नाहीं; कारण आहनस्यापासून त्याचा जन्म होतो असें मैत्रायणीयब्राह्मणांत म्हटलें आहे; तेव्हां 'आहनः' याबद्दल 'आहनस्यम्' असा पाठ असावा. एतस्मात् आहनस्यं स्यात् = यामुळेंच स्त्रीयोनीला 'आहनस्य' हें नांव पडलें आहे. "आहनस्याद्वै रेतः सिच्यते रेतसः प्रजाः प्रजायन्ते।" (ऐ. ब्रा. ३०।१०) = आहनस्यापासून रेत पडतें. येथें 'आहनस्य' याचा अर्थ स्त्रीची योनि नसून पुरुषाचें लिंग असा आहे. आहनस्या या नांवाच्या चावट अशा ८ ऋचा म्हणावयाच्या असतात; त्या घाणेरड्या ऋचा म्हटल्याबद्दल प्रायश्चित म्हणून व्याहनस्या नांवाची ऋचा म्हणावयाची असते. यास्कानें 'आहनः' बद्दल 'अहनः' असें भाष्यांत रूपांतर केलें आहे; पण तें रूपांतर दुर्गवृत्तींत सांपडत नाहीं; तेव्हां 'अहनः' हा अपपाठ असावा.

**ऋषिः नदः [ १२ ] भवति । नदतेः स्तुतिकर्मणः ।**

एका ऋषीचें नांव नद असें आहे. नद् = स्तुति करणें यापासून त्या ऋषीला 'नद' असें नांव पडलें. नद् = स्तुति करणें असा धातु धातुपाठांत नाहीं. नदि समृद्धौ ( धा. पा. ११६७ ) याचें नन्दति असें होतें.

**नदस्य मा रुधतः काम आगन् ( ११७९।४) । नदस्य मा रुधतः कामः आगमत् संरुद्धप्रजननस्य ब्रह्मचारिणः । इति ऋषिपुत्र्याः विलपितं वेदयन्ते ।**

नदस्य = नदनस्य = स्तुति करणाऱ्याचा. आगन् = आगमत्. रुधतः =संरुद्धप्रजननस्य ब्रह्मचारिणः = ज्यानें प्रजननकर्म थांबविलें आहे असा ब्रह्मचारी जो अगस्त्य त्यांची म्हणजे त्याच्याशीं संभोग करण्याची. ऋषीची जी मुलगी लोपामुद्रा तिनें या शब्दांनीं विलाप केला असें निदानकार कळवितात. निदान = ऋचा उत्पन्न होण्याचें कारण. हीं कारणें देणारे जे लोक ते निदानकार. त्यांनीं वरील आख्यायिका दिली आहे. या आख्यायिकेंत तथ्य नाहीं. यमस्य मा यम्यं काम आगन् समाने योनौ सहशेय्याय(१०।१०।७)=एकास्थलीं शेजारीं शेजारीं निजण्याला मला यमीला यमासंबंधीं इच्छा उत्पन्न झाली आहे. 'नदस्य मा काम आगन्' हें 'यमस्य मा काम आगन्' या सारखेंच वाक्य आहे. नदाविषयीं माझ्या मनांत कामवासना उत्पन्न झाली आहे. ज्याच्याविषयीं कामवासना उत्पन्न झाली त्याला नद म्हटलें आहे. 'वृषणं' असें त्याला ऋचेच्या दुसऱ्या अर्धांत म्हटलें आहे. नद = बैल? रुधतः ह्याचा अर्थ लक्षांत येत नाहीं. वाट अडविणारा हा जो दांडगट पुरुष त्याच्याविषयीं माझ्या मनांत कामवासना उत्पन्न झाली आहे असा ह्या शब्दांचा अर्थ असेल कीं नाहीं तें ठरवितां येत नाहीं.

## खंड ३ रा.

**न यस्य द्यावापृथिवी न धन्व नान्तरिक्षं नाद्रयः सोमो अक्षाः ( १०।८९।६ )**

दुसरा अर्ध पुढीलप्रमाणें:—यदस्य मन्युरधिनीयमानः शृणाति वीळु रुजति स्थिराणि । ज्याअर्थीं इंद्राचें बल शत्रूवर हल्ला करून बळकट वस्तु फोडून टाकतें त्याअर्थीं त्याची बरोबरी द्यावापृथिवी किंवा वाळवंटें किंवा आकाश किंवा पर्वत करूं शकत नाहींत. एकटा सोम तेवढा त्याला व्यापून टाकतो. येथें 'सोमो अक्षाः' यांतील अक्षाः ( १३ ) याचा अर्थ काय? असा प्रश्न आहे.

**अश्नोतेः इति एके ।**

कांहींजण म्हणतात कीं अश् = व्यापणें याला लेट्चा स लागून अक्षाः असें रूप सिद्ध होतें. अश् + स = अष् + स = अक्ष् + स = अक् + ष अक्ष; यांपासून अक्षाः.

**अनूपे गोमान् गोभिरक्षाः सोमो दुग्धाभिरक्षाः ( ९।१०७। )**

गोभिः गोमान् सोमः अनूपे अक्षाः दुग्धाभिः गोमान् सोमः अनूपे अक्षाः = ज्यामध्यें पाणी आहे अशा भांड्यांत (अनूपे) गाईनीं युक्त ( गोभिः गोमान् = दुग्धाभिः गोमान् ) असा सोम क्षरतो, पडतो. गोमान् = गाईनीं म्हणजे गाईच्या दुग्धानें युक्त. गोभिः = गाईच्या दुग्धानें; दुग्धाभिः = दूध काढलेल्या गायींनीं. दुग्धाभिः = गोभिः. गोभिः दुग्धाभिः गोमान् = दुधांत मिसळलेला. दुधांत मिसळलेला सोम पाण्यांत पडतो. म्हणजे सोमरस पाण्यांत व दुधांत मिसळला जातो.

**लोपाशः सिंहं प्रत्यञ्चमत्साः ( १०।२८।४ )**

ही ऋचा येथें देण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं व ती दुर्गवृत्तींतही नाहीं. हा तुकडा येथें कसा आला हा एक प्रश्न आहे. ज्यानें हा तुकडा येथें घातला असेल त्याला ' अक्षाः ' सारखेंच ' अत्साः ' हें रूप वाटलें असावें; परंतु अत्साः व अक्षाः यांच्यामध्यें साम्य नाहीं. ' अत्साः ' मध्यें ' अत् ' धातु असावा. कोल्हा सिंहावर उलटून जातो असा त्या शब्दाचा अर्थ आहे. या तुकड्यावर भाष्य नाहीं; त्याअर्थी तो कोणीतरी घुसडला असावा.

**क्षियति निगमः पूर्वः क्षरतिनिगमः उत्तरः इति एके**

कांहीं जण म्हणातात कीं या ऋचेंतील पहिला 'अक्षाः' याचा अर्थ 'क्षियति' म्हणजे वसति करितो व दुसरा जो ' अक्षाः ' त्याचा अर्थ क्षरति म्हणजे पाझरतो. अनूपे गोमान् गोभिः यदा क्षियति अथ सोमः दुग्धाभ्यः क्षरति. यदा व अथ हे शब्द अध्याहृत घेतले आहेत. अक्षाः = क्षियति. दुग्धाभिः = दुग्धाभ्यः. अक्षाः = क्षरति. अनूपे देशे गोमान् गोभिः सहितः यदा क्षियति निवसति अथ तदा सूयवसत्वात् तस्य देशस्य सोमः दुग्धाभ्यः पुनः पुनः दुग्धाभ्यः अपि गोभ्यः क्षरति एव ( दुर्ग ). जेथें पाणी पुष्कळ आहे अशा प्रदेशांत जेव्हां गोधनवान् असा कोणी मनुष्य गाई घेऊन राहतो, तेव्हां तेथें अतिशय गवत असल्याकारणानें गाई सारख्या दूध देत असतात; अशा गाईपासून सोमच जणूं काय पाझरतो, म्हणजे त्या गाईचें दूध सोमासारखें रुचकर असतें. टीकाकारांनीं केलेला हा अर्थ अगदीं अस्वाभाविक आहे.

**सर्वे क्षियतिनिगमाः इति शाकपूणिः**

वर जीं दोन उदाहरणें दिलीं आहेत त्यांत 'अक्षाः' हा शब्द तीनदां आला आहे. तिन्हीं ठिकाणीं त्याचा अर्थ राहतो असा आहे असें शाकपूणि म्हणतो. शाकपूणिच्या या विधानाचें विवरण करीत असतां दुर्ग अक्षाः = निवसाः असा अर्थ करतो. इंद्र द्यावापृथिवी वगैरेंत कोठेंहि रहात नाहीं; तो सोमाच्या ठिकाणींच राहतो असा पहिल्या ऋचेचा अर्थ, सोम गाईंच्या कासेंत राहतो असा दुसऱ्या ऋचेचा अर्थ. पण 'क्षि' धातूचें 'अक्षाः' हें रूप कसें होईल? 'क्षियतिनिगमः' येथें निगम= अर्थ; क्षियति इति निगमः अर्थः यस्य स क्षियतिनिगमः. अक्षाः हें क्रियापद सोमासंबंधानें पुष्कळ वेळां आलें आहे. त्याचप्रमाणें अक्षरः, अक्षरत्, अक्षरन् अशींहि

रूपें आलीं आहेत. अक्षाः यांत क्षर हाच धातु आहे; 'क्षि' नाहीं. पहिल्या ऋचेंत सोमो अक्षाः या शब्दांचें प्रयोजन दिसत नाहीं. तेथें दुसरे कोणते तरी शब्द मूळचे असावेत; ते कोणते तें सांगतां येत नाहीं. इंद्राला कोणी व्यापूं शकत नाहीं, त्याची बरोबरी कोणी करूं शकत नाहींत अशा अर्थाच्या पुष्कळ ऋचा आहेत. न द्याव इन्द्रमोजसा नान्तरिक्षाणि वज्रिणम् । न विव्यचन्त भूमयः (८।६।१५) वज्रयुक्त इंद्राला तिन्ही स्वर्ग, तिन्हीं अन्तरिक्षें व तीनहि पृथिवी व्यापूं शकत नाहींत. न यं विविक्तो रोदसी नान्तरिक्षाणि वज्रिणम् (८।१२।२४) = ज्या वज्रयुक्त इंद्राला द्यावापृथिवी व अन्तरिक्षें व्यापूं शकत नाहींत. न ते विव्यङ् महिमानं रजांसि (७।२१।६) = स्वर्ग वगैरे लोक तुझा महिमा व्यापूं शकत नाहींत. न त्वा विव्याच रज इन्द्र पार्थिवं अनु स्वधां ववाक्षिथ (८।८८।५) = जेव्हां तूं पोटभर सोम प्यायलास तेव्हां एवढी विस्तृत पृथिवी असूनहि ती तुला व्यापूं शकली नाहीं. नाह विव्याच पृथिवी च नैनं यत्सोमासो हर्यश्व ममन्दन (३।३६।४) = जेव्हां सोमानें इंद्राला उल्हसित केलें तेव्हां त्याला पृथिवी सुद्धां व्यापूं शकली नाहीं. या सर्व उताऱ्यावरून प्रस्तुत ऋचेंत महिमानं विव्यचन्त यत् असे तीन शब्द अध्याहृत घेतल्यास ऋचेचा अर्थ करतां येईल. तो असा :—जेव्हां (यत्) सोम इंद्राच्या पोटांत उतरला (अक्षाः) तेव्हां द्यावापृथिवी वगैरे कोणीही त्याला व्यापूं शकले नाहींत.

**श्वात्रम् (१४) इति क्षिप्रनाम। आशु पतनं भवति।**

श्वात्र हें क्षिप्रवाचक नाम आहे. श्वात्रम् = शु+आ+त्रम्. शु+आ यांची उलटापालट केल्यानें आशु; त्रम् त्+र+अं=अतरं= अतन=जाणें. जें लौकर जातें तें श्वात्र.

**स पतत्रीत्वरं स्था जगद्यच्छ्वात्रमग्निरकृणोत् जातवेदाः (१०।८८।४) सः पतत्रि च इत्वरं स्थावरं जंगमं च यत् तत् क्षिप्रम् अग्निः अकरोत् जातवेदाः**

स्था=स्थावरम् = स्थायिक, न हलणारें; श्वात्रम् = क्षिप्रम्; जगत्= जंगमम्; अकृणोत्= अकरोत्. दोन 'च' व 'तत्' अध्याहृत घेतले आहेत. ज्याच्याजवळ धन आहे (जातवेदाः) असा अग्नि ताबडतोब उडणारें (पतत्रि) जाणारें (इत्वरम्) स्थायिक (स्थावरं) हालणारे (जंगमं) हें सर्व करिता झाला. श्वात्र शब्दाचा अर्थ धन किंवा धनासारखी प्रियवस्तु असा असावा. ती प्रियवस्तु जल किंवा सोम अशी असूं शकेल. प्रस्तुत ऋचेंत अग्नीनें चार प्रकारच्या वस्तु उत्पन्न केल्या असें म्हटलें आहे. त्या चार वस्तु म्हणजे (१) उडणारे पक्षी (पतत्रि), (२) चालणारीं माणसें व जनावरें (इत्वरं), ३ न हलणारे पर्वत वगैरे (स्था), ४ वाहणारे (जगत्). ही वाहणारी वस्तु म्हणजे पाणी सर्वांस प्रिय असतें. इंद्र, अग्नि यांना श्वात्र म्हणजे प्रिय म्हटलें आहे. अग्नि श्वात्रासह जन्मास येतो. श्वात्रभाजा वयसा = प्रियवस्तु ज्यांत आहेत अशा धनासह. स्तुतीला व सोमाला श्वात्र्य म्हटलें आहे. श्वात्र याचा अर्थ कदाचित् सुवर्ण असा असेल. अग्नि हिरण्यासहित

जन्मास आला असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. स्तुती व सोम हिरण्य देतात म्हणून ते श्वात्र्य. जरि श्वात्र शब्दाचा निश्चित अर्थ देतां येत नाहीं तरी कोणती तरी प्रिय वस्तु असा त्या शब्दाचा अर्थ असावा.

**ऊतिः [ १५ ] अवनात्। आत्वा रथं यतोतये सुम्नाय वर्तयामसि [८।६८।१] इत्यपि निगमः भवति**

ऊति शब्द अव् रक्षणें यापासून झाला आहे. 'अव' यांतील 'व' ला संप्रसारण करून अऊ असें रूप होतें. 'अउ' या ठिकाणीं दीर्घ 'ऊ' येतो. या 'ऊ' ला 'ति' लागून 'ऊति' हें नाम बनतें ( निरुक्त २।२ ).

हे इंद्रा! रथाला जसा वळवितात तसा तुला रक्षणाकरितां व सुखाकरितां आम्ही आपल्याकडे वळवितों असेंहि उदाहरण आहे. आवर्तयामसि = आवर्तयामः = वळवितों. ऊतये = सुम्नाय = कल्याणाकरितां. ऊति शब्द ऋग्वेदांत शेंकडों वेळां आला आहे व बहुतेक ठिकाणीं त्याचा अर्थ 'धन' असाच आहे. ऊतीसारखा ऊम शब्द आहे; व देवांना व मरुतांना 'ऊमाः' किंवा 'ऊमासः' म्हटलें आहे. या दोहींतहि 'ऊ' आहे. ऊति याच्या जोडीला विभूति, राति, अभिष्टि, राधस्, रै, प्रशस्ति, भद्र, रयि, वाज, इष्टि, पोष, धी, मेधा, धन, सुम्न, वामं असे धनवाचक शब्द येतात; म्हणून धन हा ऊति शब्दाचा पहिला अर्थ; ऊति म्हणजे रक्षण असा दुसरा अर्थ आहे. कोठें कोठें रक्षण व धन असे दोन्हीहि अर्थ असावेसे वाटतें. मरुतांना ऊतयः म्हणजे रक्षण करणारे किंवा धन देणारे असें म्हटलें आहे.

**हासमाने [ १६ ] इति उपरिष्टात् व्याख्यास्यामः**

हासमाने ह्याची व्याख्या पुढें ( निरुक्त ९।३९ ) देऊं. हासमाने स्पर्धमाने परस्परेण हर्षमाणे वा असें तेथें म्हटलें आहे. हास् = स्पर्धा करणें किंवा हर्ष पावणें. अनेकार्थी म्हणून हास् ऐकपदिकांत घातला आहे. पण हास् स्पर्धार्थीच आहे. हर्ष पावणें असा अर्थ कोठेंहि नाहीं. हर्ष् किंवा हृष् प्रथमगण आत्मनेपदी असा धातु यास्ककालीं होता. धातुपाठांत हृष अलीके ( १।७१० ) व हृष तुष्टौ ( ४।१२३ ) असे दोन धातु आहेत. ह्यावरून पाणिनीच्या आधीं यास्क झाला असावा.

**वम्रकः पड्भिरुपसर्पदिन्द्रम् [१०।९९।१२]। पानैः इति वा। स्पाशनैः इति वा**

पड्भिः = पानैः = सोमपान घेऊन. पड्भिः = पड् + भिः. पड् = पान किंवा पड् = स् + प + अ + शन = स्पाशन. स्पाशन म्हणजे गुणवर्णन ज्यांत आहे अशा स्तुति ( दुर्ग ). स्पशग्रहणसंश्लेषणयोः ( धा० १०।१४७ ); स्पाशन = ( गुण ) ग्रहण. हा शब्द अमरांत नाहीं व आपट्यांच्या कोशांतही नाहीं. महाराष्ट्र पाठांत ह्याच्यानंतर 'स्पर्शनैः इति वा' असें ज्यास्त आहे. स्पश बाधनस्पर्शनयोः ( धा० १।९१२ ). स्पाशनैः = स्पर्शनैः = गुणस्पर्शनानें, गुणवर्णनानें. पड्भि = पड् + भिः. पड् = स्पर्शन. ही महाराष्ट्रपाठांत निराळी व्युत्पत्ति आहे. ती प्रक्षिप्त होय. यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला अर्थः—वम्रक सोमपान किंवा गुणवर्णनपर स्तुति

यांसह इंद्राजवळ गेला. पड्भिः हा शब्द ऋग्वेदांत एकंदर ६ वेळां आला आहे; साही ठिकाणीं ह्याचा अर्थ पायांनीं असा आहे. पड्भिः हस्तेभिश्चकृमा ( ४।२।१४ ) = पायांनीं व हातांनीं जें पाप आम्हीं केलें असेल; एथें हस्त शब्द असल्यामुळें पड्भिः म्हणजे पायांनीं असाच अर्थ असला पाहिजे. वम्रक पायांनीं इंद्राजवळ गेला. एथें पायांनीं हा शब्द कशाला ? पायांनीं जावयाचें नाहींतर कशानें ? उत्तरः—पड्भिः ह्याचा अर्थ धनांतून असा आहे. एक धनवान् दाता [वम्रकः] आपल्या धनांतून (पड्भिः) पुष्कळ ( उप ) धन ( इन्द्रं ) देता झाला ( सर्पत् ). सर्व ऋचांत पड्भिः ह्याचे वरीलप्रमाणें दोन अर्थ करावे लागतात. पद् किंवा पड् ह्याचें पड्भिः एवढेंच रूप ऋग्वेदांत आहे. पट् किंवा पड् हा पद् ह्याचा निराळा उच्चार असेल किंवा तो स्वतंत्र शब्द असेल, त्याचा धन हा दुसरा अर्थ कसा होईल ह्याला उत्तर नाहीं.

**ससं न पक्वमविदच्छुचन्तं [ १०।७९।२३ ] । स्वपनम् एतद् माध्यमिकं ज्योतिः अनित्यदर्शनम् । तत् इव अविदत् जाज्वल्यमानम्**

ससं ( १८ ) = स्वपनं = ( वर्षांतून आठ महिने ) निजून राहणारें. हें अंतरिक्षांतील ( माध्यमिकं ) विद्युत्–नांवाचें तेज ( ज्योतिः ). विजेला स्वपन म्हणण्याचें कारण तिचें दर्शन नेहमीं होत नाहीं ( अनित्यदर्शनं ); तें ४ महिने म्हणजे पावसाळ्यांतच होतें. स्वपनबद्दल गुर्जरपाठ स्वप्न असा आहे व दुर्गवृत्तीच्या उत्तम पोथ्यांतही स्वप्न असेंच आहे. कांहीं गुर्जर पोथींत माध्यमिकंबद्दल मध्यमं आहे. सस् निजणें हा वैदिक धातु आहे; ह्याच्यापासून सस् (निजणारें). न = इव. त्या ( तत् ) ज्योतिप्रमाणें. शुचन्तं = जाज्वल्यमानं = प्रकाशणारा ( हा शब्द दुर्गवृत्तींत नाहीं ) = ( अग्नि ). मातरिश्वा त्याला मिळविता झाला ( अविदत् ). मातेचा गुह्य प्रदेश शोधीत शोधीत बाल अग्नि विस्तृत पसरलेल्या अशा पाण्यांत एका क्षणांत शिरला. आईच्या मांडीवर बसून स्तनपान करीत असतांना ज्वलत् असा तो मातरिश्व्याला आढळला. कशाप्रमाणें देदीप्यमान ? पक्वं ससं. पक्व म्हणजे अभिव्यक्त ( स्पष्ट दिसणारें ) असा दुर्ग अर्थ करतो. अन्तरिच्छन्ति तं । गृभ्णन्ति जिव्हया ससं (८।७२।३) = देव पाण्यांच्या आंत अग्नि हुडकतात ( इच्छन्ति ) व त्याला त्याच्या जिभेनें पकडतात. एथें अग्नीला ससं म्हटलें आहे. आमासु चिद्दधिषे पक्वमन्तः पयः कृष्णासु रुशद्रोहिणीषु ( १।६२।९ ) = हे इंद्रा, काळ्या व तांबड्या अशा पारठ्या ( आमासु ) गाईच्या ओटींत ( अन्तर् ) तूं लाल लाल ( पक्वं रुशत् ) दूध ( पयः ) घालतोस. ह्या गाई म्हणजे रात्र व उषा. ह्या दोहींच्या पोटीं सूर्य जन्मास येतो. अशा तऱ्हेचें वर्णन पुष्कळ ऋचांत आलें आहे. महि ज्योतिर्निहितं वक्षणासु आमा पक्वं चरति बिभ्रती गौः ( ३।३०।१४ ) = अचुळांत ( वक्षणासु ) घातलेलें ( निहितं ) मोठें (महि) तेज ( ज्योतिः ) धारण करणारी ( बिभ्रती ) पारठी ( आमा ) गाय ( गौः ) चालली आहे ( चरति ). ही गाय म्हणजे रात्र किंवा उषा होय. महिज्योतिः जो सूर्य त्याला पक्व म्हटलें आहे. आमा सती मधुमत् पक्वमग्ने । कृष्णा सती रुशती० एषा० पयसा

पीपाय ( ४।३।९ ) = पाण्ठी असून गोड पक्क दूध धारण करते; काळी असून तिची कास लाल लाऊ दुधानें कशी फुगली आहे. एथें रुशती हा शब्द रुशता पाहिजे आहे. आमासु पक्कमैरय आ सूर्यं रोहयो दिवि ( ८।८९।७ ); एथें पक्कं = सूर्य. सस म्हणजे अग्नि व पक्क म्हणजे सूर्य असाच अर्थ ह्या दोन शब्दांचा प्रस्तुत ऋचेंत आहे. मातरिश्वा पक्कं न इव शुचन्तं ससम् अप्सु अविदत् = पाण्यांत सूर्याप्रमाणें प्रकाशणारा अग्नि मातरिश्व्याला सांपडला. ह्याच खरा अर्थ आहे. अग्नीला सस कां म्हटलें हें सांगतां येत नाहीं.

**द्विता च सत्ता स्वधया च शंभुः ( ३।१७।५ ) । द्वैधं सत्ता मध्यमे च स्थाने उत्तमे च**

द्विता = द्वैधं. द्विता = द्वि + ता. द्वि = द्वै. ता = धं. द्वैधं = दोन प्रकारांनीं. द्वित्र्योश्च धमुञ् ( पा. ५।३।४५ ) = प्रकार दाखवावयाचा असल्यास द्वि व त्रि ह्याला धा प्रत्ययाप्रमाणें धं असाहि प्रत्यय लागतो व तसें करतांना इ ची वृद्धि होते. द्वि + धं = द्वैधं. द्विधा शब्द यास्ककालीं नव्हता कीं काय ? द्विता = द्विधा असें म्हणण्यास काय हरकत होती ? दोन प्रकारचें अस्तित्व ( सत्ता ); तें मध्यम स्थानीं म्हणजे अंतरिक्षांत व उत्तम स्थानीं म्हणजे द्युलोकीं. सुखभूः शंभुः = शं + भुः. शं = सुख. ही सत्ता सुख देणारी आहे. अग्नीच्या आधींचा हवि नेणारा व देवांना पृथिवीवर आणणारा ( होता ) व अग्नीहून हें काम उत्तम तऱ्हेनें करणारा असा कोणी दूत होता. तो दोन ठिकाणीं असे व देवांना सोम देऊन ( स्वधया ) त्यांना सुख देई. अंतरिक्षांत वायु व द्युलोकीं सूर्य असें दोन प्रकारचें त्याचें स्वरूप होतें व पाऊस पडून व अन्न देऊन ( स्वधया ) तो लोकांस सुख देई असें दुर्ग म्हणतो. पण अग्नि हा देव व माणसें ह्यांच्यामध्यें दूताचें काम करतो; तेणेंकरून तो पृथिवी व द्युलोक ह्या दोन्हीं ठिकाणींही असतो. द्विताचा हा अर्थ इतरत्र लागू पडत नाहीं. तो इंद्र, वरुण, सोम वगैरे संबंधानेंही योजिला आहे. हा शब्द ऋग्वेदांत एकंदर २९ वेळां आला आहे. इमं विधन्तो अपां सधस्थे द्विता दधुर्भृगवो विक्ष्वायोः ( २।४।२ ) = जलदेवतांच्या मांडीवर ( सधस्थे ) बसलेल्या ह्या अग्नीला सेवा करणारे ( विधन्तः ) भृगु आयूच्या प्रजेमध्यें ( आयोः विक्षु ) कायमचे ( द्विता ) ठेविते झाले. द्विता होतारं मनुषः ( ३।२।१ ) = मनूचा कायमचा झालेला जो होता अग्नि त्याला. नि बर्हिषि प्रिये सददध द्विता ( ८।१३।२४ ) = इंद्र कायमचा बर्हिरासनावर बसता झाला. द्विता यो भूदमृतो मर्त्येष्वा होता मन्द्रतमो विशि ( ८।७१।११ ) = यः मन्द्रतमः अमृतः अग्निः मर्त्येषु विशि आ मध्ये द्विता होता भूत अभवत् = आनंद देणारा ( मन्द्रतमः ) अमर अग्नि मनुष्यांचा ( मर्त्येषु = विशि ) कायमचा होता झाला. यं देवासो अध द्विता नि मर्त्येष्वा दधुः ( ८।८४।२ ) देवांनीं ज्या अग्नीला मनुष्यांमध्यें कायमचें ठेविलें. यत्सीमनु द्विता शवः ( १।३७।९ ) = आणि म्हणूनच ( यत् ) ह्या मरुतांत (सीम् अनु) बल (शवः) कायमचें आहे. मम द्विता राष्टं क्षत्रियस्य (४।४२।१)=

क्षत्रिय जो मी त्या माझें राज्य कायमचें आहे. अध द्यौश्चित्ते अप सा नु वज्राद्द्वितानमद्वियसा ( ६।१७।९ ) = ती द्यौ तुझ्या वज्राला भिऊन कायमची खालीं लवली. सर्वत्र कायमचा हाच अर्थ लागूं पडतो. द्विता = द्वितया = दोन वेळां, अनेक वेळां, नेहमींचा असा अर्थ होत गेला असेल. सत्ता नि योना कलशेषु सीदति ( ९।८६।६ ) = बसणारा ( सत्ता ) सोम आपल्या स्थानीं ( योना = योनौ ) म्हणजे कलशांत ( कलशेषु ) बसतो ( नि + सीदति ). सोमः पुनानः कलशेषु सत्ता (९।९६।२३) = शुद्ध केला जाणारा व कलशांत बसणारा सोम. सत्ता शब्द असा एकंदर तीन वेळां आला आहे. सद् ( बसणे ) + तृ = सतृ. सत्ता सत्तारौ सत्तारः वगैरे. द्विता ह्याचा भलता अर्थ केल्यानें सत्ता म्हणजे अस्तित्व असा अर्थ करावा लागला. यस्त्वद्धोता पूर्वो अग्ने यजीयान् द्विता च सत्ता स्वधया च शंभुः। तस्यानु धर्म प्र यजा चिकित्वोऽथा नो धा अध्वरं देववीतौ ( ३।१७।५ ) = हे अग्नि तुझ्या ( त्वत् ) आधींचा ( पूर्वाः ) देवांना हवि देणारा ( यजीयान् )व देवांना नेहमीं ( द्विता ) दर्भासनावर बसवणारा ( सत्ता ) व स्वतःच्या जिव्हेनें ( स्वधया ) हवि देणारा ( शंभुः ) होता होता; त्याच्या ( तस्य ) कर्तव्याप्रमाणें ( धर्म अनु ), हे ज्ञात्या ( चिकित्वः ) हवि दे ( प्र + यज ) आणि ( अथा ) आमचा ( नः ) हवि ( अध्वरं ) देवांनीं खावा म्हणून ( देववीतौ ) दे ( धाः ). असा प्राथमिक अर्थ असून उद्दिष्टार्थ पुढीलप्रमाणें आहेः—हे दात्या ( अग्ने ) तुझ्या पूर्वीचा जो दाता ( होता = यजीयान् ) आपल्या धनांतून ( द्विता = स्वधया ) धन देत असे (शंभुः) त्याच्याप्रमाणें आम्हांला (नः), हे दात्या (चिकित्वः) आमची धनवृद्धि व्हावी म्हणून ( देववीतौ ), पुष्कळ ( अधा = अध्वरं ) धन ( प्र = आ ) दे ( यज ). द्वि = त = धन. द्विता = द्वितात् = धनात्. स्व = धा = धन. स्वधया = धनात्.

**मृगं न व्रा मृगयन्ते ( ८।२।६ )। मृगम् इव व्रात्याः प्रैषाः**

न = इव. व्राः ( २० ) = व्रात्याः प्रैषाः. गोभिर्यदीमन्ये अस्मन्मृगं न मृगयन्ते अभित्सरन्ति धेनुभिः ( ८।२।६ ) = हे इंद्रा, जरी ( यत् ) आमच्याहून ( अस्मत् ) इतर ( अन्ये ) यजमान स्तुतींनीं ( गोभिः ) व हवींनीं ( धेनुभिः ) तुजकडे जातात किंवा तुला आपल्याकडे ओढतात ( अभित्सरन्ति ), तथापि तूं आमच्याकडेसच ये. कारण व्याध ( व्राः ) जसे मृगाच्या शोधांत असतात ( मृगयन्ते ) तसे आमचे हे प्रैष तुझ्या शोधांत आहेत. आमच्या ह्या प्रैषांत म्हणजे आमंत्रणांत विशेष भक्ति भरलेली आहे; असा लांबलचक अर्थ दुर्ग करतो. सायणः–व्याध जसे मृगाचा शोध लावून त्याला जाळ्यांत अडकवूं पाहतात तसे आमच्याहून इतर यजमान, इंद्राच्या शोधांत असतात व दुग्धयुक्त सोमानें ( गोभिः ) त्याला अडकवूं पाहतात, त्यांना तसें करण्याचा अधिकारच नाहीं. तसेंच जें स्तुतींनीं ( धेनुभिः ) कुत्सित अशा रीतीनें इंद्राकडे जातात ( अभित्सरन्ति ) त्यांना स्तुति कशी करावी हें कळत नाहीं. व्राः = वरीतारः जालादिभिः = जाळें वगैरेंनीं अडकवणारे व्याध. त्सर छद्मगतौ

( धा० १।५५५ ) कपटानें जाणें. सायणाचार्यांनीं व्राः म्हणजे प्रैष असा यास्ककृत अर्थ घेतला नाहीं. व्रात्यः संस्कारहीनः स्यात् ( अमर २।७।२४ ); ज्याची मुंज झाली नाहीं तो व्रात्य एवढाच अर्थ अमरांत आहे. ( २ ) शूद्र बाप व क्षत्रिय आई ह्यांच्यापासून झालेला व (३) नीच मनुष्य असे आणखी दोन अर्थ आपट्यांच्या कोशांत सांपडतात. व्रा शब्द ऋग्वेदांत ६ वेळां आला आहे. प्रस्तुत ऋचा व १।१२६।५ ह्यांत त्याचा अर्थ जमाव असा आहे. बाकीच्या ४ ऋचांत (१।१२१।२, १।१२४।५, ४।१।१६ व १०।१२३।२ ) ह्याचा सुंदर स्त्री असा अर्थ आहे. त्सर धातु ५ वेळां आला आहे. त्सरति, त्सरत् ( दोनदां ), अत्साः व तत्सार अशीं त्याचीं रूपें आढळतात. त्सारी व त्सरु हीं नामें त्याच धातूपासून उत्पन्न झालीं असतील. लोपाशः सिंहं प्रत्यञ्चम् अत्साः ( १०।२८।४ ) = समोरून येणाऱ्या ( प्रत्यञ्चं ) सिंहाला गाढव ( लोपाशः ? ) पकडतो (अत्साः). सद्यो जातः तत्सार युज्येभिः (१।१४६।६)= जन्मल्याबरोबर अग्नीला त्याच्या मित्रांनीं (युज्येभिः) म्हणजे ऋत्विजांनीं पकडलें. त्सर् पकडणें हा अर्थ प्रस्तुत ऋचेंतही लागू पडतो. मृग् धातूचें मृगयन्ते एवढेंच रूप व तें प्रस्तुत ऋचेंतच सांपडतें. मृगयन्ते = मृगाला पकडतात. मृगचा वाघ वगैरे हिंस्र पशु असा अर्थ आहे. गोभिर्यदीमन्ये अस्मन्मृगं न व्रा मृगयन्ते । अभित्सरन्ति धेनुभिः ( ८।२।६ ) = यत् यस्मात् न यथा व्राः जनसंघाः मृगं व्याघ्रं गोभिः मृगयन्ते धेनुभिः अभित्सरन्ति तथा अस्मत् अन्ये यजमानाः ईम् एतम् इन्द्रं गोभिः मृगयन्ते धेनुभिः अभित्सरन्ति = जसे लोक जमून ( व्राः ) गाईबैलांच्या साहाय्यानें ( गोभिः धेनुभिः ) वाघाला ( मृगं ) पकडतात ( मृगयन्ते = अभित्सरन्ति ) त्याप्रमाणें. ज्याअर्थीं इतर यजमान गाईच्या दुधानें म्हणजे दुग्धमिश्रित सोमानें पकडतात त्याअर्थीं. त्रय इन्द्रस्य सोमाः सुतासः सन्तु देवस्य ( ८।२।७ )। त्रयः कोशासः श्चोतन्ति तिस्रः चम्वः सुपूर्णाः ( ८।२।८ ) = इंद्राकरितां सोमानें भरलेले तीन हंडे असूं द्या ( म्हणजे तो ह्या हंड्यांकडे धांव घेईल ) असा खरा अर्थ आहे. अर्वाचीन संस्कृत व व्युत्पत्ति ह्यांच्यावर अवलंबून राहिल्यास भलता अर्थ होतो हे स्पष्ट आहे. गाय, बैल वगैरे जनावर रानांत बांधून लोक वाघाची वाट लपून पहात बसतात व वाघ त्या जनावराजवळ आला म्हणजे त्याला पकडतात हें सर्वांनीं ऐकलें आहे. युवां मृगेव वारणा मृगण्यवो दोषावस्तोर्हविषा नि ह्वयामहे ( १०।४०।४ ) = वाघ पकडणारे ( मृगण्यवः ) आमिष दाखवून ( हविषा ) हिंस्र वाघांना ( मृगा वारणौ ) तें आमिष खाण्याला बोलावितात तसे आम्ही, हे अश्विनांनो, तुम्हांला हवि खाण्यास बोलावीत आहोंत. ह्या ऋचेवरून प्रस्तुत ऋचेचा अर्थ लक्षांत येईल.

## खंड ४ था.

**वराहः [ २१ ] मेघः भवति । वराहारः**

वराह म्हणजे मेघ. मेघाला वराह म्हणण्याचें कारण वराहः = वर + आहः.

आहः = आहारः. वरम् आहारः यस्य सः = ज्याचें अन्न वर म्हणजे उदक आहे. मेघ म्हणजे वृत्र; हा उदक खातो.

**वरम् आहारम् आहार्षीः इति च ब्राह्मणम्**

तूं श्रेष्ठ ( वरं ) अन्न ( आहारं ) चोरून घेतलेंस ( आहार्षीः ) असें ब्राह्मण-वचन आहे. हल्लीं उपलब्ध असलेल्या ब्राह्मणांत हें वचन सांपडत नाहीं.

**विध्यद्वराहं तिरो अद्रिमस्ता [ १।६१।७ ] इत्यपि निगमः भवति**

वराह म्हणजे मेघ ह्यासंबंधानें ऋचाही आहे. दूर असलेल्यावर ( तिरः ) वज्र ( अद्रिं ) फेकणाऱ्या ( अस्ता ) इंद्रानें वराहाला म्हणजे मेघाला मारलें (विध्यत् ). वराह म्हणजे डुक्कर. पण डुक्कर मारण्याला इंद्र कशाला पाहिजे ? म्हणून वराह म्हणजे मेघ. वज्रानें इंद्र मेघ फोडतो हें प्रसिद्ध आहे. इंद्र खादाड होता; तो म्हशी व सोमानें भरलेले हंडे ह्यांचा फन्ना करी. अद्रि म्हणजे पर्वत; ह्याच्या पलीकडे असलेल्या डुकराला बाण फेंकून विष्णूनें मारलें. इंद्राकरितां तो अन्नसामुग्री तयार करतो असें एका ऋचेंत म्हटलें आहे. ती ऋचा पुढें आली आहे. महाराष्ट्रपाठांत ‘ विध्यद्वराहं तिरो अद्रिमस्ता ’ हें ‘ वराहः मेघः भवति वराहारः ’ ह्याच्यानंतर व ‘ वरमाहारमाहार्षीरितिच ब्राह्मणं ’ हें ‘ अयम् अपि० एतस्मात् एव ’ ह्यानंतर घातलें आहे; ह्यानें गोंधळ मात्र झाला आहे; अर्थसुधारणा मुळींच नाहीं. वरम् उदकं ददाति आदत्ते वा वर्षितुम् इति वराहः मेघः. वराह म्हणजे ( १ ) डुक्कर, ( २ ) मेघ व ( ३ ) पर्वत; हे सर्व अर्थ ज्यांत प्रकट होतील अशा सर्व प्रकारच्या व्युत्पत्ति देवराज निघंटु १।१०।१३ त देतो; ह्या सर्व काल्पनिक होत.

**अयम् अपि इतरः वराहः एतस्मात् एव । वृहति मूलानि**

लौकिक ( डुक्कर ह्या अर्थी ) जो वराह शब्द त्याचीही हीच व्युत्पत्ति. तोही उत्तम उत्तम ( वरं ) झाडाझुडपांचीं मुळें ( आहारं ) खाण्यास घेतो. किंवा वराहः = व् + अ + र् +आ +हः. र = ऋ. व् + ऋ + ह् = वृह् = उपटतो. वृहू अथवा बृहू उद्यमने ( धा. ६।६६ ). गुर्जरपाठ वृहति असा आहे. जो मुळें उपटतो तो वराह. किंवा

**वरं वरं मूलं वृहति इति वा**

वराह ह्या शब्दांत वर व वृह असे दोन्हीही असतील. वर + आहः. वर = वरं वरं मूलं व वर दाखविल्याप्रमाणें वृह्. दुर्ग वृहति मूलानि ही व्युत्पत्ति देत नाहीं; त्यामुळें त्याच्या वृत्तींत ‘ इति वा ’ नाहीं. ‘ वृहति मूलानि ’ हें प्रक्षिप्त होय.

**वराहमिन्द्र एमुषम् [ ८।७७।१० ] इत्यपि निगमः भवति**

वराह म्हणजे डुक्कर हा शब्द जींत आहे अशी ऋचाही आहे. विश्वेत्ता विष्णुराभरदुरुक्रमस्त्वेषितः । शतं महिषान् क्षीरपाकमोदनं वराहमिन्द्र एमुषम् (८।७७।१०) = उरुक्रमः त्विषितः विष्णुः ता तानि विश्वा विश्वानि इत् अपि आभरत् इन्द्रे इन्द्रार्थे आहरत् । कानि तानि । शतं महिषान् क्षीरपाकम् ओदनम् एमुषं वराहं च = मोठीं

पावलें टाकणारा ( उरुक्रमः ) व बलयुक्त ( त्वेषितः ) विष्णु त्या ( ता ) सगळ्या ( विश्वा ) वस्तु–१०० रेडे, दुधांत शिजविलेलें ( क्षीरपाकं ) व मोठा थोरला ( एमुषं ? ) डुक्कर-आणता झाला किंवा इंद्राला ( इन्द्रे ) देता झाला. एमुषं शब्द फक्त एथेंच आला आहे. त्याचा अर्थ देणें अशक्य आहे. दुर्ग ऋचा यज्ञपर लावतो. तो म्हणतोः—विष्णु इंद्रानें त्याला चेतवलें म्हणून ( त्वेषितः ) धन आणता झाला; पुष्कळ ( शतं ) महायज्ञ ( महिषान् ) म्हणजे प्रायणीयापासून सर्व सोमक्रतु ( क्षीर-पाकम् ओदनं ). हे सोमक्रतु त्यानें कोठून आणले ? असुरांना गोंधळविणारा एक असुर डुकराचें सोंग घेऊन सुरांमध्यें मिसळला; त्याला इंद्रानें कपटानें मारलें; त्याच्या पोटांतून हे सोमक्रतु आले. मैत्रायणीसंहितेंत ( ३।८।३ ) पुढील गोष्ट सांगितली आहेः— एकदां यज्ञ देवांच्यामधून नाहींसा झाला. देव त्याला शोधूं लागले पण तो त्यांना सांपडेना. ज्या जागेंत तो लपला होता तिच्यावर पांखरें घिरट्या घालींत होतीं. पांखरांप्रमाणें इंद्रही घिरट्या घालूं लागला तेव्हां त्याच्या नजरेस यज्ञ पडला. मला यानें ओळखलें असें जाणून यज्ञानें विचारलें, तूं कोण ? इंद्र म्हणाला किल्ल्यांत मारणारा. पण तूं कोण ? यज्ञ म्हणाला, किल्ल्यांतून आणणारा. किल्ल्यांत मारणारा म्हणून म्हणतो काय ? तर मग एथून २१ दगडी किल्ले आहेत; त्यांच्यामध्यें एक डुक्कर आहे; त्याला मार; कारण त्याच्या पोटांत असुरांची अपार संपत्ति भरली आहे. इंद्रानें वराहाला लांबून मारलें. तेव्हां इंद्र यज्ञाला म्हणाला, तूं म्हणालास कीं किल्ल्यां-तून मी आणणारा. तर मग ह्या डुकराला घेऊन ये. विष्णु हाच यज्ञ. तो इंद्राच्या साहाय्यानें डुकराला मारून त्याला घेऊन आला. तत्संबंधानें ही ऋचा आहे. ह्या कथेचा आधार घेऊन दुर्गानें ऋचेचा अर्थ केला आहे. तो अर्थ अस्वाभाविक आहे हें सांगणें नको. सायणाचार्य ही कथा देतात पण ऋचेच्या उत्तरार्धाचा ते थोडासा निराळा करतात. शतं म्हणजे अपरिमित; महिष म्हणजे मोठमोठ्या ( किंमतीच्या ) वस्तु किंवा अशा वस्तु आणणारे रेडे; वाफा निघताहेत असें अन्न; व ज्याच्या पोटांत असुरांची सर्व संपत्ति भरली होती तो एमुष नांवाचा किंवा ज्यानें असुरांची सर्व संपत्ति आपल्या पोटांत ठेवली होती ( एमुषं = आ + मुषं ) असा डुकराचें सोंग घेणारा असुर. सायणाचार्य नैरुक्तांनीं केलेला अर्थही देतात. तो असाः— हे इंद्रा, तूं आज्ञा केली म्हणून ( त्वेषितः ) भरभर चालून ( उरुक्रमः ) विष्णु म्हणजे सूर्य तूं उत्पन्न केलेलें सर्व पाणी ( विश्वा ता = सर्वाणि तानि उदकानि ) यजमानांना देता झाला. शिवाय शेकडों गाई, बैल, म्हशी वगैरे पशु; किंवा असंख्यात मोठमोठाले यज्ञ; खीर किंवा चरु, पुरोडाश; किंवा पाऊस पाडून सर्वांच्यासाठीं अन्न; एमुष म्हणजे आमुष म्हणजे पाऊस चोरणारा वराह म्हणजे ढग त्यालाही मारता झाला. ह्या अर्थांत सायणाचार्यांनीं मोठमोठाले यज्ञ चरु व पुरोडाश उगाच आणले आहेत; कारण नैरुक्त यज्ञपर अर्थ करीत नाहींत. हाही अर्थ अस्वाभाविक आहे. दुर्ग एमुष ह्याचा अर्थ देत नाहीं. पदपाठांत इन्द्रः असें पद आहे. तें मी इन्द्रे असें केलें आहे. पण इन्द्र

हें संबोधन समजल्यास अर्थ ठीक होईल. हे इन्द्रा, तूं पाठविलेंस म्हणून ( त्वेषितः = त्वा + इषितः = त्वया इषितः ) मोठमोठीं पावलें टाकून ( उरुक्रमः ) विष्णूनें इंद्राला जे पदार्थ पाहिजे होते ते सर्व— म्हणजे १०० रेडे, दूधपाक व एक भला मोठा डुक्कर— आणून दिल्या. (त्या सर्व इंद्रानें खाऊन टाकल्या.) दुर्ग त्वा + इषितः अशीं दोन पदें न घेतां त्वेषितः असें एकच पद घेतो; पण दोन पदें घेणें बरें. यास्काच्या मनांत दुर्गानें दिलेला अर्थ असावा.

**अङ्गिरसः अपि वराहाः उच्यन्ते । ब्रह्मणस्पतिर्वृषभिर्वराहैः ( १०।६७।७ )**

अंगिरसांनाही वराह म्हटलें आहे. स ईं सत्येभिः सखिभिः शुचद्भिर्गोधायसं वि धनसैरदर्दः । ब्रह्मणस्पतिर्वृषभिर्वराहैर्घर्मस्वेदेभिर्द्रविणं व्यानट् ( १०।६७।७ ) = ब्रह्मणस्पति म्हणजे स्तुतींचा पति इंद्र बलिष्ठ व तेजःपुंज अशा मित्रांच्या साहाय्यानें मेघाला फोडता झाला व जलरूपी धन देता झाला. दुर्ग म्हणतो, ह्या ऋचेंत अंगिरस-पर असा एकही शब्द नाहीं, सूक्ताच्या तिसऱ्या ऋचेंत मात्र अंगिरस नांव आलें आहे. तेव्हां ह्या ऋचेंतही वराह म्हणजे अंगिरस असें यास्कानें मानलें असावें. खरा अर्थः— बैल व डुक्कर ह्यांच्यासारखे दांडगे जे मरुत् त्यांना घेऊन. वृषभिः = वृषबलैः. वराहैः = वराहबलैः अङ्गिरसः अपि० वराहैः हें बहुतकरून यास्कानें निरुक्तांत घातलें नसावें; कारण अंगिरसांना वराह म्हणण्यास सबळ कारण नाहीं हें त्याच्या लक्षांत सहज आलें असतें.

**अथापि एते माध्यमकाः देवगणाः वराहवः उच्यन्ते**

आणखी मध्यम म्हणजे अंतरिक्ष त्यांत राहणारे जे देवगण त्यांना वराह म्हटलें आहे. हे देवगण म्हणजे मरुत्, रुद्र वगैरे असे दुर्ग म्हणतो. पण मरुतांनाच रुद्र म्हटलें आहे. देवगण = मरुद्गण. मध्यमे भवाः माध्यमिकाः; माध्यमक हे व्याकरण-शुद्ध नाहीं; तथापि दुर्गवृत्तींतही माध्यमक असेंच आहे.

**पश्यन् हिरण्यचक्रान् अयोदंष्ट्रान् वि धावतो वराहून् ( १।८८।५ )**

सोन्याचीं चाकें ज्यांच्या रथाला आहेत असे, लोखंडी दाढा आहेत ज्यांना असे धावणारे वराह जे मरुत् त्यांना पाहून. वि + धावतः = जिकडे तिकडे धाव-णाऱ्यांना. किंवा वि + पश्यन् = जिकडे तिकडे पाहून. मरुत् हा एकच देवगण, तर देवगणाः असें यास्कानें बहुवचन कां घातलें ? ही ऋचा मरुतांविषयीं आहे; तेव्हां बहुवचनाला जुळेल अशी इतर वेदांतून ऋचा शोधिली पाहिजे. तशी न सांपडल्यास मरुतांचे ४९ गण आहेत असें ब्राह्मणांत म्हटलें आहे, त्याला अनुसरून बहुवचन असेल असें दुर्ग म्हणतो.

**स्वसराणि अहानि भवन्ति । स्वयंसारीणि । अपि वा स्वर् आदित्यः भवति । स एनानि सारयति**

स्वसर म्हणजे दिवस. दिवसांना स्वसर म्हणण्याचें कारण, स्वसराणि = स्व + सराणि. स्व = स्वयम्. सराणि = सारीणी. दिवस स्वतः होऊन हलतात. त्यांना

हलवावयाला कोणी लागत नाहीं. किंवा स्वसराणि = स्व + सराणि. स्व = स्वर् = आदित्य = सूर्य. तो ह्यांना (दिवसांना) हलवितो. दुर्गवृत्तींत 'भवति' नाहीं. एतानिबद्दल एनानि घालण्याचें कारण अहानि शब्द आधीं आला आहे.

**उस्रा इव स्वसराणि (१।३।८) इत्यपि निगमः भवति**

जींत स्वसराणि शब्द आहे अशी ऋचाही आहे. विश्वे देवासो अप्तुरः सुतमा गन्ततूर्णयः। उस्रा इव स्वसराणि (१।३।८) = इव यथा उस्राः स्वसराणि आगच्छन्ति तथा हे तूर्णयः अप्तुरः विश्वे देवासः देवाः सुतम् आ गन्त गच्छत = जसे किरण (उस्राः) दिवसांकडे (स्वसराणि) येतात तसे हे देवांनो तुम्ही सोमरसाकडे त्वरित या. अप्तुरः = पाणी, म्हणजे पाणी अडविणारा जो वृत्र, त्याला मारणारे. तूर्णयः = त्वरा करणारे. उस्रा ह्याचा भलता अर्थ केल्यानें स्वसराणि ह्याचा चुकीचा अर्थ करावा लागला. स्वसर शब्द ऋग्वेदांत १२ वेळां आला आहे. १ वयो न स्वसराणि अच्छा (२।१९।२) = पक्षी जसे घरट्यांकडे. २ आ हंसासो न स्वसराणि गन्तन मधोर्मदाय मरुतः (२।३४।५) = हे मरुतांनो, हंस जसे घरट्यांकडे तसे तुम्ही सोम पिण्यास या. (सोम हें मरुतांचें जणूं काय घरटें). ३ इमानि तुभ्यं स्वसराणि येमिरे (३।६०।६) = हे इंद्रा, तुला हीं स्वसरें म्हणजे सोम दिला आहे. (इंद्राला सोम घरासारखा). ४ युवो रथो अध्वरं देववीतये प्रति स्वसरमुप याति पीतये (६।६८।१०) = हे अश्विनांनो, तुमचा रथ सोम पिण्याकरितां (पीतये = देववीतये) अध्वररूपी घराकडे जातो. ५ अभि त्वा नक्तीरुषसो ववाशिरे अग्ने वत्सं न स्वसरेषु धेनवः (२।२।२) = गोठ्यांत असणाऱ्या वासराकडे गाई हंबरडा फोडीत जातात त्याप्रमाणें हे अग्नि, रात्र व उषा ह्या तुझ्याकडे हंबरडा फोडीत येतात. ६ धेनुर्न शिश्वे स्वसरेषु पिन्वते जनाय रातहविषे महीमिषम् (२।३४।८) = जो हवि देतो अशा मनुष्याला मरुद्गण पुष्कळ धन देतो; जशी गाय गोठ्यांत असणाऱ्या वासराला पुष्कळ दूध देते. ७ अभि वत्सं न स्वसरेषु धेनव इन्द्रं गीर्भिर्नवामहे (८।८८।१) जशा गाई गोठ्यांत असलेल्या वासराला हाक मारतात त्याप्रमाणें आम्ही स्तुतींनीं इंद्राला हाक मारतो. ८ धियः पिन्वानाः स्वसरे न गाव ऋतावरीरभि वावश्र इन्दुम् (९।९४।२) = दुधानें टरटरलेल्या गाई जशा गोठ्यांतल्या वासराला उद्देशून हंबरडा फोडतात तशा ह्या स्तुति सोमाला उद्देशून हंबरडा फोडतात. ९ स इन्द्र स्तोमवाहसामुप श्रुधि उप स्वसरमा गहि (८।९९।१) = हे इन्द्र, स्तुति करणाऱ्यांच्या स्तुति ऐक व घराकडे (सोमाकडे किंवा यजमानगृहीं) ये. १० तिस्रो नासत्या० परावतः० स्वसराणि गच्छते (१।३४।७) = हे अश्विनांनो, तुमचें घर जे तीन स्वर्ग तिकडे जा. ११ उषा याति स्वसरस्य पत्नी (३।६१।४) = स्वसर म्हणजे वरुण; त्याची बायको उषा येत आहे. १२ विश्वाः पिन्वथः स्वसरस्य धेनाः (५।६२।२) = वरुणाच्या (स्वसरस्य) नद्या (धेनाः) तुम्ही दोघेजण पाण्यानें फुगवितां. प्रस्तुत ऋचेंत 'गाई (उस्राः) जशा गोठ्यांकडे (स्वसराणि) तसे तुम्ही सोमाकडे या'

असाच अर्थ आहे. उस्रा शब्दाचे गाय, उषा व धन असे तीन अर्थ आहेत. अयमुशानः पर्यद्रिमुस्राः ( ६।३९।२ ) = दगडांच्या मजबूत कोंडवाड्यांत असलेल्या गाईंची इच्छा करणारा. एथें उस्राः म्हणजे गाई. वर जीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांपैकीं कांहींत गावः, धेनवः असे शब्द आले आहेत; तेव्हां उस्राः म्हणजे गाईच. घरटें, घर, गोटा व वरुण असे स्वसर शब्दाचे ४ अर्थ आहेत. त्या शब्दाची व्युत्पत्ति करणें अशक्य आहे.

**शर्याः अङ्गुलयः भवन्ति । सृजन्ति कर्माणि**

शर्या म्हणजे बोटें. बोटांस शर्या म्हणण्याचें कारण शर्या = श + र् + या. श = स्. र = ऋ. या = ज्. स् + ऋ + ज् = सृज्. बोटें कामें उत्पन्न करतात. दुर्गवृत्तींत 'शर्याः० कर्माणि' नाहीं. महाराष्ट्रपाठांत 'सृजन्ति कर्माणि' नाहीं. पण ते शब्द आवश्यक आहेत. कारण बोटांना शर्या कां म्हणतात हें सांगितलें पाहिजे.

**शर्याः इषवः शरमय्यः । शरः शृणातेः**

शर्या म्हणचे बाण. बाण हे शर नांवाच्या गवताचे किंवा वेताचे केलेले असतात म्हणून ते शर्या. गुन्दस्तेजनकः शरः ( अमर २।४।१६२ ) शर म्हणजे बाण हा अर्थ एथें लागूं पडणार नाहीं; कारण बाणमय बाण ह्याचा कांहीं अर्थ होत नाहीं. शृ हिंसा करणें ( धा० ९।१६ ) ह्यापासून शर. ही व्युत्पत्ति शर म्हणजे बाण ह्याला लागेल; शर म्हणजे गवत किंवा वेत ह्याला लागणार नाहीं.

**शर्याभिर्न भरमाणो गभस्त्योः ( ९।११०।५ ) इत्यपि निगमः भवति**

जींत शर्या शब्द आहे अशी ऋचाही आहे. जसा [ न ] कोणी शराच्या बाणांनीं एखाद्याला इजा करतो तसे हातांत ( गभस्त्योः ) धरलेल्या ग्राव्यांनीं सोमाला इजा करा म्हणजे कुटा. अभ्यभि हि श्रवसा ततर्दिथोत्सं न कंचिज्जनपानमक्षितम् । शर्याभिर्न भरमाणो गभस्त्योः = हे सोम अक्षितं जनपानम् उत्सं श्रवसा गभस्त्योः शर्याभिः भरमाणः त्वं न अभि अभि ततर्दिथ = हे सोमा, तूं जोरानें ( श्रवसा ) हातांत धरलेल्या भाल्यांनीं लोकांनीं पिण्याजोग्या व ज्याचें पाणी कधीं संपणार नाहीं अशा मेघाला ( उत्सं ) फोडून टाकलेंस. इंद्राप्रमाणें सोमही लोकांना पिण्याचें पाणी मिळावें म्हणून मेघ फोडतो. न दोनदां आला; त्याचा अर्थ एका क्षणांत. भरमाणः म्हणजे अर्पिलेला; गभस्त्योः म्हणजे हातांनीं. हातांनीं इंद्र वगैरेंना अर्पिलेल्या त्वां भाल्यांनीं मेघाला टोंचलेंस व तत्काळ फोडलेंस असा अर्थ आहे. गभस्त्योः शर्याभिः ह्याच्यापेक्षां गभस्त्योः भरमाणः असा अन्वय योग्य दिसतो. शर्य व शर्या ह्या दोहोंचाही अर्थ बाण किंवा भाला. शर्य म्हणजे जो बाण सोडतो किंवा भाला टाकतो तो. शर्या म्हणजे अंगुलि असा अर्थ कोठेंही नाहीं. गभस्त्योः ह्या शब्दामुळें शर्याभिः म्हणजे अंगुलींनीं असा अर्थ केला असावा. शर्या० कर्माणि हें प्रक्षिप्त होय.

**अर्कः ( २४ ) देवः भवति यत् एनम् अर्चन्ति**

अर्क म्हणजे देव. देवास अर्क म्हणण्याचें कारणः–ज्याअर्थीं ह्याला ( देवाला )

पूजितात. देव शब्द आधीं आला आहे म्हणून एनं. अर्च् पूजा करणें ( धा० १।२०४ ) पासून अर्क.

**अर्कः मन्त्रः भवति । यत् एनेन अर्चन्ति**

अर्क म्हणजे मंत्र. ज्याअर्थीं ह्यानें ( मंत्रानें ) पूजा करतात त्याअर्थीं अर्क म्हणजे मंत्र.

**अर्कम् अन्नं भवति । यत् अर्चति भूतानि**

अर्क=अन्न. कारण अन्न प्राणिमात्राची पूजा म्हणजे सेवा करते. दुर्ग म्हणतो:— जो पूज्य असतो त्यास उत्तम अन्न देऊन त्याची आपण पूजा करतों किंवा अन्न सर्वांस पूज्य आहे. हा अर्थ बरोबर नाहीं.

**अर्कः वृक्षः भवति । यत् वृतः कटुकिम्ना**

अर्क रुईचें झाड. रुईला अर्क म्हणण्याचें कारण तें झाड कडवेपणानें भरलें असतें व - आच्छादणें पासून अर्क. अर्कः स्फटिकसूर्ययोः ( अमर ३।३।४ ). अर्क शब्दाचे नऊ दहा अर्थ आहेत; अमरकालीं दोनच होते. निघंटूंत अर्क म्हणजे अन्न ( २।७।१८ ), वज्र ( २।२०।१० ), मंत्र व रुई ( ४।२।२४ ) असे अर्थ आहेत. देव अर्थ नाहीं. यास्कानें वज्र अर्थ कां दिला नाहीं ? इन्द्रः पूर्भिदातिरद्दासमर्कैः ( ३।३४।१ ) किल्ले फोडणाऱ्या इंद्रानें दासाला वज्रानें मारलें; हें उदाहरण देवराज देतो. वज्रवाचक आणखीही उदाहरणें देतां येतील. जसें:— सो अर्केण वि बबाधे तमांसि [१०।६८।९]. यस्मा अर्कं सप्तशीर्षाणमानृचुस्त्रिधातुमुत्तमे पदे (८।५१।४)= ज्या इंद्राला स्वर्गलोकीं सात डोक्याचें, बळकट असें वज्र देव देते झाले. बृहस्पतिर्हन्त्यमित्रमर्कैः ( ६।७३।३ ). आ सूर्यो न भानुमद्भिरर्कैरग्ने ततन्थ रोदसी वि भासा ( ६।४।६ ) = हे अग्नि सूर्याप्रमाणें प्रकाशानें तूं द्यावापृथिवींना पसरलेंस. अर्कैः = भासा = प्रकाशानें जज्ञानःसूर्यमपिन्वो अर्कैः ( ९।९७।३१ ) = हे सोमा, जन्मल्याबरोबर तूं सूर्याला प्रकाशानें भरून टाकलें. इन्द्रायार्कं जुन्हा समञ्जे ( १।६१।५ ) = जुहूनें मी इंद्राला हवि ( अर्क ) देतों. मधुमन्तं घृतश्चुतं विप्रासो अर्कमानृचुः (८।५१।१० ) = ऋत्विक् इंद्राला मधानें व घृतानें थबथबणारा हवि देते झाले. पुनानो अर्कं पुरुभोजसं नः ( ७।९।२ ) = आम्हांला पुष्कळ धन देणारा. महामर्कं मघवन् चित्रमर्च ( १०।११२।९ ) = हे इंद्रा, पुष्कळ धन दे. यच्छन्तु चन्द्रा उपमं नो अर्कम् ( ७।३९।७ ) = देव आम्हांस उत्तम धन देवोत. आवो यस्य द्विबर्हसोऽर्केषु सानुषगसत् । आजाविन्द्रस्येन्दो प्रावो वाजेषु वाजिनम् ( ९।८७४।५ ) यस्य द्विबर्हसः इन्द्रस्य अर्केषु आजौ वाजेषु वाजिनं तम् इन्द्रं हे इन्दो त्वं प्रावः स इन्द्रः तत्र आनुषक् असत् भवतु = हे सोम, ज्या विजयी ( द्विबर्हसः ) इंद्राच्या लढायांत तूं त्याला साहाय्य केलें तो तुजपाशीं सतत ( आनुषक् ) असो. अर्केषु = वाजेषु = आजौ = लढाईत. तुभ्येदेते मरुतः सुशेवा अर्चन्त्यर्कं सुन्वन्त्यन्धः [५।३०।६] = हे इंद्रा, तुझ्यासाठींच हे मरुत् स्तुति गात आहेत व सोमरस काढीत आहेत. ह्यामुळेंच मरुतांना यूचे वैतालिक

म्हणजे द्यूला जागें करणारा असें म्हटलें आहे. जसें:— ऋतावरी दिवो अर्कैरबोधि [ ३।६१।६ ]=द्यूचे वैतालिक [ अर्कैः ] उषेला जागे करते झाले. दिवो अर्का अमृतं नाम भेजिरे [ ५।५७।५ ] द्यूचे भाट जे मरुत् ते धन वाटते झाले. अग्नीलाही अर्क म्हटलें आहे. जसें :– बृहस्पतिरुषसं सूर्यं गामर्कं विवेद [ १०।६७।५ ] = [ दस्यूचा किल्ला फोडून ] बृहस्पतीनें उषा, सूर्य, गाय आणि अग्नि मनुष्यांना दिले. अर्को वो श्लोकमाघोषते दिवि [ १।८३।५ ] = अग्नि द्युलोकीं मोठ्यानें स्तुतिगान गातो. अर्क म्हणजे स्तोता. जसें:— अर्को यद्वो मरुतो हविष्मान् गायद्गाथं सुतसोमो दुवस्यन् (१।१६७।६ ) = हे मरुतांनो, स्तोता गाणें गात आहे व हवि देत आहे. इन्द्र त्वामर्क ईट्टे वसूनाम ( ७।२४।५ ) = इंद्रा, स्तोता तुजपाशीं द्रव्याची याचना करीत आहे. देव ह्या अर्थीं अर्क शब्दाचें उदाहरण मला सांपडलें नाहीं. रुई किंवा झाड हा अर्वाचीन अर्थ आहे. अर्क नपुंसकलिंगी ऋग्वेदांत नाहीं. मंत्र ह्या अर्थीं अर्क शब्द इतर अर्थापेक्षां कितीतरी पटीनें आला आहे. हवि, वज्र, धन, लढाई, वैतालिक, स्तोता असे अर्क शब्दाचे अनेक अर्थ आहेत. ह्यांतील बरेच अर्थ उघड उघड आहेत. ते निघंटुकारास व यास्कास न सुचावे हें नवल आहे. गायत्र, अर्क व साम हीं विशिष्ट प्रकारचीं गाणीं होतीं असें दिसतें ( १।१६४।२४ व ८।१६।९ ). अर्कम् अर्च् = स्तुति अर्पणें, स्तुति करणें.

## खंड ५ वा.

**गायन्ति त्वा गायत्रिणोऽर्चन्त्यर्कमर्किणः । ब्रह्माणस्त्वा शतक्रत उद्वंशमिव येमिरे ( १।१०।१ ) गायन्ति त्वा गायत्रिणः**

गायत्र रचणारे तुझी ( गायत्रानें ) स्तुति गातात. गायत्रिणः म्हणजे साम गाणारे तुझी सामांनीं स्तुति गातात ( दुर्ग ).

**प्रार्चन्ति ते अर्कम् अर्किणः**

प्र व ते अध्याहृत घेतले आहेत. अर्क रचणारे तुला अर्क देतात. अर्किणः म्हणजे होते ऋचा म्हणून तुझी पूजा करतात ( दुर्ग ). 'ते' च्या बद्दल दुर्गवृत्तींत त्वां आहे. चौथ्या खंडाच्या वृत्तीच्या शेवटीं अर्क म्हणजे देव ह्या अर्थाची पुढील ऋचा आहे व प्रस्तुत ऋचेच्या वृत्तीच्या शेवटीं अर्किणः म्हणजे मन्त्रिणः असें दुर्ग म्हणतो; म्हणजे अर्क = देवं व अर्किणः = मंत्र रचणारे व म्हणणारे; अर्क शब्दाचे दोन्ही अर्थ एथें आहेत असें दुर्ग म्हणतो. चौथ्या खंडाच्या भाष्याच्या शेवटीं कटु-किम्ना हा शब्द आहे; तेव्हां अर्क शब्दाच्या ४ अर्थांपैकीं प्रस्तुत अर्कमर्चन्त्यर्किणः एथें कोणता अर्थ आहे हें यास्कानें सांगितलें नाहीं. भाष्यांत 'ते' शब्द मूळचा कीं त्वां मूळचा ? ते = तुला; तेव्हां अर्क = मंत्र व प्रार्चन्ति = म्हणतात; त्वाम् अर्क = देव जो तूं त्या तुला; प्रार्चन्ति = स्तवितात. यास्कानें अर्क शब्दाचे एथें कोणते अर्थ केले तें ठरवितां येत नाहीं.

**ब्राह्मणास्त्वा शतक्रत उद्वंशमिव येमिरे वंशम् इव**

ब्रह्माणः = ब्राह्मणाः. ब्राह्मण हा जातिवाचक शब्द आहे कीं ब्रह्म म्हणजे स्तुति रचणारा ह्या अर्थी आहे हें सांगतां येत नाहीं. ऋग्वेदांत ब्रह्माणः म्हणजे स्तुति रचणारे. खांब जसा लोक उभारतात त्याप्रमाणें स्तुति करणारे नानाप्रकारच्या स्तुतींनी तुला उचलून धरतात. शतक्रतो = हे असंख्य धन धारण करणाऱ्या. वंश शब्द एथें व उद्वंशान् आणि अवंशे ह्या शब्दांत आला आहे. अवंशे द्यामस्तभायद् बृहन्तम् (५।१५।२) = खालून टेका न देतां, खांबांचा आधार न देतां, द्युला इंद्रानें वरचेवर ठेविलें आहे. अवंशे धीरः शच्या समैरत् (४।५६।३) = त्या अद्भुत शक्तिमान् देवानें अद्भुत शक्तीनें ह्या दोघींना खांबांचा आधार न देतां वर उचलून ठेविलें आहे. नक्षन्ते नाकं निर्ऋतेरवंशात् (७।५८।१) ह्याचा अर्थ कळत नाहीं. पण वंश म्हणजे खांब असा तिहींतही अर्थ आहे. तोच अर्थ एथें गायत्रिणः = आर्किणः = ब्रह्माणः = धनवान्. त्वा = अर्क = त्वा = धन. गायन्ति = अर्चन्ति = येमिरे = देतात. हे धनवंता (शतक्रतो), व दात्या (इव) धनवान् धन देतात. उत् = वंशं = धन. इव = हे दात्या. असा उद्दिष्ट अर्थ आहे. पहिल्या प्राथमिक अर्थांत गायत्र, अर्क व ब्रह्म हीं तीन प्रकारचीं स्तुतिपर गानें असावींत.

**वंशः वनशयः भवति । वननात् शूयते इति वा**

वंशः = वन् + शः. वन् = वनें. शः = शयः. जो रानांत झोप घेतो तो. वांसा रानांत झोप घेत उभा असतो. किंवा वन् = वननात् = भोगण्यानें. शः = शूयेते = लठ्ठ होतो. चिमण्या वगैरेनीं त्याचीं पानें व देठ किती खाल्ले तरी तो वाढतच असतो.

**पविः (२५) रथनेमिः भवति । यत् विपुनाति भूमिम् । उत पव्या रथानामद्रिं भिन्दन्त्योजसा (५।५२।९) तं मरुतः क्षुरपविना व्ययुः (मैत्रा० सं० १।१०।१४) इत्यपि निगमौ भवतः**

पवि म्हणजे गाडीची किंवा चाकाची धाव. धावेला नेमि म्हणण्याचें कारण ज्याअर्थी धाव जमिनीला खणते म्हणजे चर पाडते. पूञ् पवने (धा० ९।१०). पवने = शुद्ध करणें. देवराज पवि [वज्र] हा पवतिः गतिकर्मा म्हणजे पु किंवा पव् जाणें ह्यापासून झाला आहे असें म्हणतो. वि + पू = विदारण करणें, खणणें, हा अर्थ यास्ककालीं कदाचित् असेल. उत पव्या० ओजसा = आणखी ते मरुत् रथांच्या धावेनें जोरानें [ओजसा] पर्वत फोडतात. [देवांना वृत्राचें मर्म म्हणजे काळीज सांपडेना]; तं मरुतः व्ययुः = तेव्हां मरुतांनीं क्षुराकृति रथनेमीनें त्याला छिन्नविच्छिन्न केलें [व्ययुः] असे दोन मंत्र आहेत. पवि शब्द ऋग्वेदांत २१ वेळां आला आहे. ह्या पवींचा संबंध मरुतांशीं फार वेळां येतो. मरुतांचे पवि सोन्याचे असून (हिरण्ययेभिः पविभिः १।६४।११, हिरण्ययाः पवयः १।१८०।१) बळकट असत [वीळुपविभिः ५।५८।६ व ८।२०।२]. त्यांना सुऱ्या बांधलेल्या असत [पविषु क्षुरा

अधि० धिरे १।१६६।१० ]. ह्या पवींनीं ते पर्वत [ १।६४।११ व ५।५२।९ ] व पृथिवी [ १।८८।२ ] फोडीत त्या पवींतून नद्या वहावयास लागत [ प्रति ष्टोभन्ति सिन्धवः पविभ्यः १।१६८।८ ]. अश्विनांच्या सोनेरी रथांत ३ पवि असत [ त्रयः पवयः मधुवाहने रथे १।३४।२ ] त्यामुळें तो रथ तेजानें झळकत असे [ पविभिः स्वानः ७।६९।१ ]. ह्या पवींतून पाऊस पडे [ प्रुषायन्ते वां पवयः १।१३९।३। हिरण्ययावां पवयः प्रुषायन् [१।१८०।१]. तुझ्या पवीला धार दे व त्यानें शत्रूला तडाखे लगाव असें इंद्राला म्हटलें आहे [ सूर्कं संशाय पविमिन्द्र तिग्मं वि शत्रून् ताळ्हि १०।-१८०।२ ]. घोड्यांवर किंवा रथांत न ठेवतां हे पवि इंद्र फेकी व दस्यूंना ठार करी [ ५।३१।५ ]. पूषाचें चाक मोडत नाहीं, त्याच्या रथाचा कोश खालीं पडत नाहीं, त्याचा पवि बिघडत नाहीं [ ६।५४।३ ]. झाड जसें करवतीनें कापतात तसें हे अग्नि चहाडखोराला पवीनें कापून काढ [६।८।५ ]. पवि फेक [ ९।५०।१ ] असें सोमास म्हटलें आहे. ह्या शत्रूंवर पवि पडोत [ अधि उ नु एषु पवयः ववृत्युः [ १०।२७।६ ] असें इंद्राला व तुमचा एक पवि शत्रूवर पडला [ १।६२।२ ] असें मित्रावरुणांना म्हटलें आहे. ह्या सर्व वर्णनावरून पवि म्हणजे रथाची धाव नसून वज्र असावें. हें वज्र किंवा हीं वज्रें रथांत ठेविलीं असत; त्यांना धार देत व त्यांना सुऱ्या बांधीत. तीं शत्रूवर फेकीत. त्यांतून पाऊस पडे.

**वक्षः ( २६ ) व्याख्यातम्**

वक्षस् शब्दाचें विवरण केलें आहे [ निरुक्त ४।१६ ].

**धन्व ( २७ ) अन्तरिक्षं भवति। धन्वन्ति अस्मात् आपः। तिरो धन्वाति रोचते ( १०।१८७।२ ) इत्यपि निगमः भवति**

धन्व म्हणजे अंतरिक्ष. अंतरिक्षास धन्व म्हणण्याचें कारण त्यांतून पावसाचें पाणी धावतें. धवि गतौ [ धा० पा० १।५९८ ]. धन्वन्ति = जातात. तिरो धन्व० अशी ऋचाही आहे. यः परस्याः परावतस्तिरो धन्वाति रोचते। स नः पर्षदति द्विषः [ १०।१८७।२ ] = जो अग्नि सर्वांत उंच अशा स्वर्गांतून, अंतरिक्ष आडवें आलें असतांनाही [ तिरः = अति ] प्रकाशतो तो आम्हांस संकटांतून [ द्विषः ] किंवा शत्रूंपासून तारो (पर्षत्). धन्व शब्दाचा वाळूचें मैदान असा अर्थ १८ वेळां आला आहे. उदाहरणार्थः— जनं न धन्वन् अभि सं यदापः सत्रा वावृधुः हवनानि यज्ञैः [ ६।३४।४ ] = निर्जल वालुकामय मैदानांत असणाऱ्या माणसाला पाणी जसें ताजेंतवानें करतें तसे हवि इंद्राला ताजातवाना करतात. धन्वन्निव प्रपा असि त्वमग्ने [ १०।४।१ ] = हे अग्नि, वाळूच्या मैदानांत असणाऱ्या पाणपोईप्रमाणें तूं आहेस. धनुष्य अर्थ १६ वेळां आला आहे. जसें:—धन्वना गा धन्वनाजिं जयेम [ ६।७५।५ ] धनुष्याच्या साहाय्यानें आम्हीं गाई जिंकतों, लढाया जिंकतों. पाणी हा अर्थ ४ वेळां. जसें:—समुद्रस्य धन्वन् आर्द्रस्य पारे ( १।११६।४ ) = समुद्रस्य धन्वन् धन्वनि आर्द्रस्य समुद्रस्य पारे मध्ये = समुद्राच्या पाण्यांत, समुद्रामध्यें. प्र

धन्वानि ऐरत ( ८।२०।४ ) = मरुत् पाऊस पाडते झाले. म्हणूनच मरुतांना धन्वच्युतः असें म्हटलें आहे ( १।१६८।५ ). धन्वर्णसो नद्यः ( ५।४५।२ ) = जलानें तुडुंब भरलेल्या नद्या. धन्व = अर्णः = पाणी. धन हा अर्थ ५।७।७ व ९ ९७।१७ ह्यांत असेल. धन्व हें एका प्रदेशाचें नांव असावें; तो कोणता प्रदेश हें सांगतां येत नाहीं. न यस्य द्यावापृथिवी न धन्व नान्तरिक्षं नाद्रयः ( १०।८९।६ ) = ज्या इंद्राचा महिमा द्यावापृथिवी, धन्व, अंतरिक्ष, पर्वत ह्यांना व्यापता येत नाहीं. ह्या ऋचेवरून धन्व हें अंतरिक्षाहून निराळें असलें पाहिजे. अष्टौ व्यख्यत् ककुभः पृथिव्याः त्री धन्व योजना सप्त सिन्धून् ( १।३५।८ ) = पृथिवीचे ८ भाग, तीन धन्व, तीन योजन व ७ सिंधु सविता पाहता झाला. धन्व च यत् कृन्तत्रं च कति स्वित्ता वि योजना (१०।८६।२० ) = धन्व व कृंतत्र ह्यामध्यें किती योजनें असतील? तिरो धन्वाति रोचते ह्या प्रस्तुत ऋचेंत धन्व हा अंतरिक्षासारखा प्रदेश असावा. कदाचित् तें अंतरिक्षाचें नांव असेल. धन्व हा शब्द ( निघंटु १।३।५ ) एथें आला असतांना पुनः एथें घालण्याचें कारण तो अनेकार्थी आहे हें.

**सिनम् ( २८ ) अन्नं भवति । यत् सिनाति भूतानि । येन स्मा सिनं भरथः सखिभ्यः ( ३।६२।१ ) इत्यपि निगमः भवति**

सिन म्हणजे अन्न. अन्नास सिन म्हणण्याचें कारण तें प्राणिमात्राला बांधतें म्हणजे पोसतें. क्व त्यत् इन्द्रावरुणा यशो वां येन स्मा सिनं भरथः सखिभ्यः = हे इंद्रावरुणांनो, तुमचें तें धन ( यशः ) कोठें आहे कीं ज्यानें तुम्हीं तुमच्या मित्रांना म्हणजे आम्हांस अन्न देतां ? ह्या शिवाय आणखी दोन ठिकाणीं तो शब्द आला आहे. यो वृत्राय सिनमत्राभरिष्यत् प्र तं जनित्री विदुष उवाच ( २।३०।२ ) = ज्यानें वृत्राला सिन दिलें त्याला आई म्हणाली. सुमङ्गलं सिनवदस्तु सातम् ( १०।१०२।११ ) = दान ( सातं ) सुमंगल व सिनवत् असो. तिन्हीं ठिकाणीं धन हा अर्थ लागतो. इंद्रावरुणांजवळ धन ( यशः ) असतें म्हणून ते भक्तांना धन [ सिनं ] देतात. इंद्र वृत्राला वज्ररूपी धन देतो. याचक धनाची देणगी मागतो.

**इत्था ( २९ ) अमुथा इति अनेन व्याख्यातम्**

दुर्गवृत्तींत व्याख्यातः आहे. पदं व्याख्यातं, निगमः व्याख्यातः. अमुथा शब्दाचें विवरण निरुक्त ३।१६ त केलें आहे. इत्था = इत् + था. इत् = इदं. इत्था = ह्या प्रकारानें. हा शब्द एथें कां घातला ? निरुक्त ३।१६ त यावयास पाहिजे होता. परंतु निघंटुकारानें इत्था ह्याचे अनेक अर्थ आहेत असें जाणून तो शब्द ऐकपदिक प्रकरणांत घातला असावा. १ इत्था = अशा प्रकारें. जसें:—इन्द्र त्वम् अविता इत् असि इत्था स्तुवतः [ ८।१३।२६ ] = हे इंद्रा, अशा रीतीनें स्तवन करणाऱ्याचा तूं रक्षक आहेसच आहेस. २ इत्था = इदानीं = आतां. जसें:—गन्ता नूनं नोऽवसा यथा पुरा इत्था कण्वाय बिभ्युषे [ १।३९।७ ] = हे मरुतांनो, भिणाऱ्या कण्वाकडे पूर्वीप्रमाणें आतांही तावडतोब धन घेऊन या. इत्था बिभ्युषे = अशा प्रकारें भिणाऱ्याकडे असाहि

अर्थ होईल. नू इत्था ते पूर्वथा च प्रवाच्यं [ १।१३२।४ ] = हे इंद्रा [ तूं जें वीर्य-कर्म केलें आहे याची ] प्रशंसा पूर्वी व आतांही केली पाहिजे. नू = इत्था = आतां ३ इत्था = खरोखर जसें:— बळित्था महिमा वामिन्द्राग्नी पनिष्ठ आ [ ६।५९।२ ] = हे इंद्राग्नि, तुमचा महिमा खरोखर स्तुत्य आहे. बट् = इत्था = खरोखर. सत्यमित्था वृषा इत् असि (८।३३।२०) = हे इंद्रा, तूं खरोखर बलिष्ठ आहेस. सत्यं = इत्था = खरोखर. हा शब्द समासांत किंवा समास नसतांनाहि धी ह्या शब्दाला जोडलेला किंवा त्याच्या पूर्वी घातलेला आढळतो, तेव्हां त्याचा अर्थ इतका असतो. जसें:----त्वदेति द्रविणं वीरपेशा इत्थाधिये दाशुषे मर्त्याय [ ४।११।३ ] = जो इतके हवि किंवा इतक्या स्तुति तुला अर्पण करतो त्याला तुजपासून वीरपुत्रयुक्त धन येतें म्हणजे मिळतें. वायविन्द्रश्च दाशुष आ यातमुप निष्कृतम् । मक्षू इत्था धिया नरा [ १।२।८ ] = हे वायो त्वम् इन्द्रश्च इत्था धिया इत्थाधियौ नरौ युवां दाशुषः निष्कृतं = गृहमध उप आयातं = हे शूर वायुइंद्रानो, पुष्कळसें धन घेऊन [ इत्थाधियौ ] हवि देणाऱ्याच्या घरीं तावडतोब [ मक्षू ] या. युवोरित्थाधि सद्मसु अपश्याम हिरण्ययम् [१।१३९।२] = हे मित्रावरुणांनो, तुमच्या घरांत किती तरी सोनें आम्हीं पाहिलें. इत्था + धी प्रमाणें: इत्था भग शशमानः [ १।२४।४ ], इत्था नमस्विनः [ १।३६।७ ] असेहि प्रयोग सांपडतात.

**सचा ( ३० ) सह इत्यर्थः । वसुभिः सचाभुवा ( ८।३५।१ ) । वसुभिः सहभुवौ**

सचा = सह. इत्यर्थः शब्द यास्क वापरीत नसतो. सचाभुवा = सहभुवौ = एकत्र असणारे. हे सहा एकत्र असणाऱ्या अश्विनांनो, अग्नि, इंद्र, वरुण, विष्णु, आदित्य, रुद्र, वसु, उषा व सूर्य ह्यांच्यासह [ सजोषसा ] सोम प्या, असा ऋचेचा अर्थ आहे. यास्क सचाभुवा म्हणजे ह्या देवतांसहवर्तमान असा अर्थ करतो; पण तो चुकीचा आहे. सहवर्तमान हा अर्थ सजोषसा ह्याचा आहे. अश्विनांची जोडी असते म्हणून ते सचाभुवा. भवतं सचाभुवा [ १।३४।११; १।१५७।४ ] = तुम्ही एकत्र असा. मित्रावरुण [ २।३१।१ ] व रोदसी [ १०।७६।१ ] ह्यांना सचाभुवा म्हटलें आहे. रात्र व दिवस ह्यांना सचाभुवा [ १०।७६।१ ] म्हटलें आहे. एका वासराची आई मेल्यावर ऋभूनीं त्याच्याकरितां एक सचाभू गाय तयार केली [ तक्षम् वत्साय मातरं सचाभुवं [ १।१११।१ ]. इंद्राचें वज्र इंद्राजवळ सारखें असे म्हणून तें सचाभू ( वज्रं सचाभुवं १।१३१।३ ). यास्कानें सचा शब्दाचेंच उदाहरण द्यावयास पाहिजे होतें. हा शब्द ऋग्वेदांत सुमारें ७० वेळां आला आहे. ऋग्वेदाच्या पूर्वी तो सचा, सचानौ, सचानः असा सव्यय किंवा सविभक्तिक शब्द असेल; पण ऋग्वेदांत तो अव्ययासारखा आहे. सच् साहाय्य करणें, बरोबर असणें, संगत धरणें ह्यापासून सचा शब्द झाला असावा. न स सखा यो न ददाति सख्ये सचाभुवे सचमानाय पित्वः ( १०।११७।४ ) = सतत जवळ असणाऱ्या मित्राला जो अन्न देत नाहीं

तो मित्रच नव्हे. सचमानाय व सचाभुवे ह्या दोहोंचा अर्थ एकच. अश्विनांच्या रथाला सचनः ( १।११६।१८ ) म्हणजे सदोदित त्यांच्यापाशीं असणारा असें म्हटलें आहे. विष्णु इंद्राला लढाईंत मदत करतो ( विष्णुना सचानः ६।२०।२ ). यः सोम सख्ये तव रारणत् देव मर्त्यः । तं दक्षः सचते कविः ( १।९१।१४ ) = हे सोमा जो मनुष्य तुझ्या मैत्रींत रममाण होतो त्याला अद्भुत शक्तिमान् व धनवान् सोम सहाय्य करतो किंवा त्याच्यापाशीं सदोदित असतो. नासुन्वता सचते पुष्यता ( ५।३४।५ )=कितीही धनवान् असला तरी जो सोमहवि इंद्राला देत नाहीं त्याची संगत इंद्र धरीत नाहीं. हे सगळे अर्थ सचा शब्दांत येतात. यदिन्द्रो अनयद्रितो महीरपो वृषन्तमः । तत्र पूषा भवत् सचा ( ६।५७।४ ) = जेव्हां बलिष्ठ इंद्रानें पाणी आणलें तेव्हां त्या कामांत पूषा त्याचा सहाय ( मदतनीस ) होता. वि तां दुहे अर्यमा कर्तरी सचाँ एष तां वेद मे सचा ( १।१३९।७ ) = जी गाय देवांनीं अंगिरसांना दिली तिचें दूध अर्यमा मित्रानें ( सचा ) काढलें; तीच ही गाय माझ्या मित्रानें ( अग्नीनें ) मला दिली. इन्द्र इत् हर्योः सचा (१।७।२) = इंद्र आपल्या घोड्यांचा सहवासी आहे. त्यांच्याशी तो एकजीव झाला आहे. सुते सचा हे शब्द पुष्कळ ऋचांत आले आहेत. हवामहे त्वा वयं प्रयस्वन्तः सुते सचा ( १।१३०।१ ) व सुते हि त्वा हवामहे ( १।१६।४ ) ह्या दोहोंचा अर्थ एकच आहे. पहिलींत प्रयस्वन्तः ( हवि अर्पण करणारे ) व सचा शब्द अधिक आहेत. तेव्हां सचा हें संबोधन असावें. हे मित्रा, आतां सोमरस काढला आहे ( सुते ), तेव्हां आम्ही तुला बोलावीत आहों. कस्य वृषा सुते सचा नियुत्वान् वृषभो रणत् ( ८।९३।२० ) = बलिष्ठ व दाता ( नियुत्वान् ) इंद्र कोणाच्या घरीं सोमपानांत गर्क झाला आहे ( रणत् )? एथें सचा इन्द्रः = सखा इंद्र असा अर्थ. संदर्भाप्रमाणें सचा शब्दाचे सखा सखायौ सखायः हे सखे असे भिन्नविभक्तिक व भिन्नवचनी अर्थ होतात. सचा ह्याचें सका होऊन शेवटीं सखा रूप होण्याचा संभव आहे.

**चित् ( ३१ ) इति एष निपातः अनुदात्तः पुरस्तात् एव व्याख्यातः**

चित् ह्या अनुदात् निपाताचें पूर्वीच ( निरुक्त १।४ ) विवरण केलें आहे.

**अथापि पशुनाम इह भवति उदात्तः**

शिवाय हाच चित् शब्द उदात्त असून तें पशूचें नांव असें पुढील ऋचेंत ( इह ) आहे.

**चिदसि मनासि ( मैत्रा० सं० १।२।४ ) । चिताः त्वयि भोगाः चेतयसे इति वा**

दुर्गवृत्तींत चिदसि मनासि धीरासि इतका मंत्र दिला आहे. यास्क चिदसि एवढ्याचाच अर्थ देतो; तेव्हां भाष्यांत चिदसि एवढेंच असावें. चित् = चिताः त्वयि भोगाः = हे गाई, तुझ्या ठिकाणीं सर्व उपभोग्य वस्तु जमल्या आहेत. किंवा चिदसि= चेतयसे = जाणतेस. चिदसि ह्याचें हें अर्थ दुर्गवृत्तींत नाहींत. ते प्रक्षिप्त असावेत.

प्रक्षिप्तें घालण्यानें चिदसि एवढ्याचा चेतयसे असा अर्थ केला कीं चित् ह्याचा केला हें सांगतां येत नाहीं. पहिल्या अर्थीं चित् चि जमा करणें ह्यापासून; दुसऱ्या अर्थीं चित् जाणणें ह्यापासून. सोम गाय देऊन विकत घ्यावयाचा असतो. त्यावेळीं जो मंत्र म्हणतात त्यांतील हे शब्द होत. हे धेनु तूं चित् आहेस, मन आहेस, धी आहेस. तिहींचा अर्थ बुद्धि. वाजसनेयिसंहितेंत मनोसि ( ४।१९ ) असें आहे व तोच शुद्ध शब्द आहे. मनासि हें अशुद्ध होय. उवट व महेश्वर—वाजसनेयसंहितेवरील भाष्यकार—त्यांचे तर्कपर अर्थ करतात. ते अर्थ एथें देण्याची आवश्यकता नाहीं. धेनूवर सर्व गुणांचा अध्यारोप केला आहे. तूं सोनें, रुपें, ऋत, वैश्वदेव, चित्, मन, धी, दक्षिणा, यज्ञिया व अदिति आहेस असें म्हटल्यानें ह्या शब्दांचा गाय हा अर्थ होत नाहीं. बुद्धि ह्या अर्थीं चित् शब्द उदात्त आहे. ऋग्वेदांत चित् अनुदात्तच आहे व त्याचे अनेक अर्थ आहेत म्हणूनच ऐकपदिकांत तो घातला गेला. पहिल्या अध्यायांत जे अर्थ दिले आहेत ते लौकिक होत. वैदिक अर्थ पुढीलप्रमाणें:—( १ ) चित् = अपि = देखील, ही. जसें:—धन्वन् चित् रुद्रियासः । मिहं कृण्वन्ति ( १।३८।७ ) = वाळूच्या मैदानांतही ( चित् ) मरुत् मेघ उत्पन्न करतात. हा अर्थ ऋग्वेदांत फार वेळां आला आहे. ( २ ) चित् = एव. जसें:—सद्यश्चिद्यः शवसा पञ्चकृष्टीः सूर्य इव ज्योतिषापस्ततान ( १०।१७८।३ ) = सूर्य जसा आपल्या प्रकाशानें रात्रीनें तयार केलेलें अंधकाररूपी वस्त्र टरकावून टाकतो तसा जो आपल्या बळानें पांच आर्यसमाज एका क्षणांतच ( सद्यः चित् ) टरकावून टाकतो. ( ३ ) चित् = इव. जसें:—विप्राय जरते यदुक्था नि ष्म मावते वहथा पुरा चित् ( ६।६५।४ ) = पूर्वीप्रमाणें ( पुरा चित् ) आतांही माझ्यासारख्या स्तुति करणाऱ्याला स्तुत्य असें धन द्या. ( ४ ) चित् च = आणि. जसें:—कीरिश्चिद्धि त्वामीट्टे दूत्याय रातहव्यः स्वध्वरः (८।१०३।१३)= व ( चित् ) हव्य देऊन स्तोता दूताचें काम करण्याला तुला विनवीत आहे. चित् हें निरर्थक असण्याचाही एथें संभव आहे. परोमात्रमृचीषममिन्द्रमुग्रं सराधसम् । ईशाने चिद्वसूनाम् ( ८।६८।६ ) = ज्याचें शौर्य मापतां येत नाहीं, स्तुत्य, उग्र, धनवान् व ( चित् ) धनाधीश जो इंद्र त्याला. एथेंही चित् भरतीसाठीं घातला असावा. ( ५ ) नू + चित् ह्याचे अर्थ ४।१७ त दिले आहेत. ( ६ ) या चिन्नु वज्रिन् कृणवः ( ४। २९।१४ ) = जीं जीं कृत्यें तूं केलीं आहेस. या + चित् + नु = जीं कांहीं, जीं जीं. ( ७ ) कः + चित् अशासारखीं सर्वनामेंही चित् लावून उत्पन्न होतात. ( ८ ) अमी य ऋक्षा निहितास उच्चा नक्तं ददृश्रे कुह चित् दिवेयुः ( १।२४।१० ) = हीं जीं उंचावर ठेवलेलीं तारे किंवा सप्त ऋषि नक्षत्रें रात्रीं दिसतात तीं दिवसां कोठें बरें ( कुह + चित् ) जातात ? ( ९ ) यच्चिद्धि ते विशो यथा प्र देव वरुण व्रता । मिनीमसि द्यविद्यवि ( १।२५।१ ) दररोज जेव्हां जेव्हां किंवा यदाकदाचित् जर ( यत् + चित् + हि ) हे देवा वरुणा तूं घालून दिलेले नियम ( व्रता ) अज्ञजनाप्रमाणें ( विशः यथा ) आम्ही मोडूं ( मिनीमसि ). द्यविद्यवि = दररोज. यच्चिद्धि = जेव्हां जेव्हां.

**आ ( ३२ ) इति आकारः उपसर्गः पुरस्तात् एव व्याख्यातः**

उपसर्ग जो आ त्याचें विवरण पूर्वींच ( १।३ ) केलें आहे.

**अथापि अध्यर्थे दृश्यते। अभ्र आँ अपः ( ५।४८।१ )। अभ्रे आ अपः। अपः अभ्रे अधि इति**

शिवाय ‘ अधि ’ जो अर्थ त्याअर्थीं आ आढळतो. अभ्र आँ अपः = अभ्रे आ अपः = अपः अभ्रे अधि. गुर्जरपाठांत अभ्रे आ बद्दल अभ्र आ असून अपः अधि- नंतर आहे; अभ्रे ह्याच्या आधीं नाहीं. दुर्गवृत्तींत अभ्रे आ बद्दल अभ्रे आँ आहे. अभ्रांत म्हणजे मेघांत असणारें पाणी. ‘ आ ’ चा सप्तम्यर्थ पुष्कळ ऋचांत येतो. उपमावाचक आ पूर्वीं ( ३।१६ ) म्हणजे उपमाप्रकरणांत आला आहे. अधि उपरि- भावम् ऐश्वर्यं वा ( निरुक्त १।३ ). पण ‘ आ ’ चा दोहोंपैकीं कोणताही अर्थ नाहीं. ‘ आ ’ चे पुढीलप्रमाणें अर्थ आहेतः—( १ ) आ = मध्यें. आ सप्तम्यर्थीं असतो. उदाहरण वर दिलेलें. आणखी उदाहरणेंः—दमूना गृहपतिर्दम आँ अग्निर्भुवत् ( १। ६०।४ ) = दमूनाः गृहपतिः अग्निः दमे आ भुवत् अभवत्. दमे आ = घरांत. सोम रारन्धिनो हृदि गावो न यवसेषु आ ( १।९१।१३ ) = हे सोमा, गाई जशा गवता- मध्यें रममाण होतात तसा तूं आमच्या हृदयांत रममाण हो. यवसेषु आ = गवतांत. ( २ ) आ = पासून. जसेंः—विश्वा च न उपमिमीहि मानुष वसूनि चर्षणिभ्य आ ( १।८४।२० ) = हे इंद्रा मनुकुलाचा अभिमानी तूं आम्हांस चर्षणीपासून सर्व धन दे ( उपमिमीहि ). चर्षणिभ्यः आ = पांच आर्यजातींपासून. हृद आ जायमाना अस्मत् सुकीर्तिः ( १।६०।३ ) = अंतःकरणापासून जन्मलेली आमची ( आम्ही केलेली ) स्तुति. ( ३ ) आ = करितां. जसेंः—प्र वः पूष्णे दावने आँ अच्छा वोचेम वसुता- तिमग्नेः ( १।१२२।५ ) = तुम्हांला ( वः = युष्मभ्यं ) धन मिळावें म्हणून ( पूष्णे = दावने आ ) अग्नीपाशीं आम्ही धनदान ( वसुताति ) मागतों ( अच्छा वोचेम ). ( ४ ) आ = कडे. जसेंः अस्माञ्च तांश्च प्र हि नेषि वस्य आ ( २।१।१६ ) = हे अग्नि, आम्हांला व त्यांना धनाकडे ( वस्यः आ ) नेच ने. ( ५ ) आ = हून. जसेंः—दिव- श्चिदा ते रुचयन्त रोकाः ( ३।६।७ ) = हे उषे, तुझें तेज ( रोकाः ) द्यूच्या तेजा- हूनही ज्यास्त शोभतें. दिवः आ चित् = द्यूहूनही. ( ६ ) आ = वर. जसेंः—आ बर्हिः सीद ( ३।४१।३ ) = बर्हिरासनावर बस. ( ७ ) नी, दा, वह्, गम् वगैरेना आ लावल्यानें त्या धातूंचे उलट अर्थ होतात. नी = नेणें. आ + नी = आणणें. गम् = जाणें. आ + गम् = येणें. आ हा उपसर्ग कितीतरी धातूंना लाविला गेला आहे.

**द्युम्नं ( ३३ ) द्योततेः। यशः वा अन्नं वा**

द्युत् प्रकाशणे पासून द्युम्न. अर्थ यश किंवा धन. द्युम्नं = द्यु + म्नं. द्यु द्युत् पासून निघणें अशक्य आहे. द्यु प्रकाशणें ह्यापासून तो झाला असावा. अद्यौत्, द्यौत् अशीं त्या धातूचीं रूपें आढळतात. द्युत् धातूही ऋग्वेदांत आहे. अस्मे द्युम्नमधि रत्नं

च प्रेहि ( ७।२५।३ )। अस्मासु द्युम्नं च रत्नं च धेहि. अस्मे + अधि = अस्मासु = आम्हांत. आम्हांत धन ठेव. पण धेहि = देहि असा पुष्कळ ठिकाणीं अर्थ आहे. अस्मे अधि = अस्मभ्यं = आम्हांला. द्युम्नं = रत्नं = धन. धन हाच अर्थ बहुतेक ठिकाणीं आहे. द्युम्न = बल. जसें:—द्युम्नैः अभिसन्तो अर्यः क्षपो मदेम शरदश्च पूर्वीः ( ४।१६।१९ ) = शत्रूला ( अर्यः ) बलानें ( द्युम्नैः ) जिंकून ( अभिसन्तः ) वर्षानुवर्षें आनंदानें राहूं. द्युम्न = संग्राम. जसें:—द्युम्नेषु पृतनाज्ये पृत्सु तूर्षु श्रवःसु च। इन्द्र साक्ष्व अभिमातिषु = इंद्रा शत्रूला लढाईंत जिंक. द्युम्न = किल्ला, कोंडवाडा. जसें:—दृळ्हा चित् स प्र भेदति द्युम्ना ( ५।८६।१ ) = तो किल्ले किंवा कोंडवाडे कितीही मजबूत असले तरी पार फोडून टाकतो. सप्तम्यंत सर्व शब्दांचा लढायांत असा अर्थ आहे. द्युम्न = स्तुति. जसें: — गिरा। द्युम्नैरभि प्र णोनुमः (१।७८।१)= हे अग्नि आम्ही तुला स्तुति करून नमतों. धन, बल, संग्राम, स्तुति, यज्ञ ह्यांचा ऋग्वेदांत अतिनिकट संबंध आहे. द्युम्न ह्याचा यश हा अर्थ कोठेंही नाहीं. धनवाचक शब्दांचा यास्क अन्न असा अर्थ करतो.

## खंड ६ वा

**पवित्रं ( ३४ ) पुनातेः।**

पू शुद्ध करणें; ह्यापासून पवित्र. पूञ् पवने ( धा. ९।१० ).

**मन्त्रः पवित्रम् उच्यते। येन देवाः पवित्रेण आत्मानं पुनते सदा ( खैलिक १७।३ ) इत्यपि निगमः भवति.**

मंत्राला पवित्र म्हणतात. मंत्र ह्या अर्थीं पवित्र शब्द जींत आहे अशी ऋचाही आहे. तेन सहस्रधारेण पावमन्यः पुनातु माम् असा उत्तरार्ध आहे. ज्या मंत्रानें देव स्वतःला सदा शुद्ध करून घेतात त्याच सहस्रधार मंत्रानें सोम मला शुद्ध करो. देव म्हणजे ऋत्विक् व यजमान. कारण देव कधींही पाप करीत नाहींत; तेव्हां मंत्रानें ते स्वःस शुद्ध कां करतील असें दुर्ग म्हणतो. दुर्गवृत्तींत पावमन्यः नसून पवमानः आहे. मंत्राला सहस्रधार म्हणण्याचें कारण मंत्र सोमपर आहे व सोम हजारों धारांनीं गाळण्यांतून पडतो. वास्तविक पवित्र म्हणजे गाळणें, गाळण्याला हजारों भोकें असतात. सोम गाळण्यांतून गळून शुद्ध होतो व पिणाऱ्याला शुद्ध करतो. देव ह्या सोमपानानें शुद्ध होतात; तेव्हां मनुष्य सोमपानानें शुद्ध होतील यांत काय नवल?

**रश्मयः पवित्रम् उच्यन्ते। गभस्तिपूतो नृभिरद्रिभिः सुतः ( ९।८६।३४ ) इत्यपि निगमः भवति**

किरणांना पवित्र शब्द लावला आहे. अरण्यांत असतांना सूर्यकिरणांनीं सोम शुद्ध झालेला असतो ( गभस्तिपूतः ); ऋत्विक् ( नृभिः ) ग्रावे ( अद्रिभिः ) तो ठेचतात व त्याचा रस काढतात ( सुतः ). दुर्ग ही ऋचा देतो; पण त्याच्या आधीं ‘ गभस्ति-पूतः ’ हा शब्द जींत आहे अशी मैत्रायणी संहितेंतली ( मैत्रा० सं० १।३।४ ) ऋचा

देतो. तेव्हां असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, यास्कानें कोणती ऋचा भाष्यांत घेतली होती. कदाचित् गभस्तिपूतः एवढाच शब्द भाष्यांत असेल. कांहीं टीकाकारांनीं ऋग्वेदांतील तर कांहींनी मैत्रायणीसंहितेंतील ऋचा घेतली. त्यामुळें दुर्गाला दोन्ही ऋचा घ्याव्या लागल्या. ऋग्वेदांत गभस्ति म्हणजे हात गभस्तिपूतः म्हणजे हातांनीं शुद्ध केलेला. अद्रिभिः सुतः पवते गभस्त्योः (९।७१।३) = ग्राव्यांनीं कुटलेला व दोन हातांनीं शुद्ध केलेला. मृज्यमानो गभस्त्योः(९।२०।६)=दोन हातांनीं शुद्ध केलेला. सूर्याचें हात म्हणजे सूर्याचें किरण. किरण हा अर्थ लाक्षणिक असून तो ऋग्वेदकालानंतरचा आहे. पण ह्या सर्व ऋचांत गभस्तीबद्दल पवित्र शब्द कोठें घातला आहे ? पवित्र म्हणजे किरण अशी ऋचा पाहिजे आहे. गभस्ति म्हणजे किरण; त्यांनीं पूत; अतएव गभस्ति हेच पवित्र असें अनुमान काढावें लागते पवित्रवन्तः परि वाचमासते (९।७३।३) ही ऋचा कित्येक टीकाकार येथें देतात असें दुर्ग म्हणतो. पवित्रवन्तः परि वाचमासते = पवित्र म्हणजे शुद्धकरण्याचें सामर्थ्य; तद्युक्त जे सोमाचे रश्मि ते सोमांत असणारी जी माध्यमिका वाक् ( म्हणजे गडगडाट ) तिच्यांत ( परि ) जाऊन बसतात ( आसते ) असा सायणाचार्य अर्थ करतात. पण पवित्र म्हणजे गाळणें; तद्युक्त म्हणजे गाळण्यांतून गाळलें जाणारे सोम वाचा बोलतात. सायणकृत अर्थांत सुद्धां पवित्र म्हणजे किरण असा अर्थ नाहीं. सोमाः० पवित्रवन्ते अक्षरन् ( ९।१०१।४ ) = सोम गाळण्यांतून वहात आहेत. पवित्रवन्तः हें सोमाचेंच विशेषण.

**आपः पवित्रम् उच्यन्त । शतपवित्राः स्वधया मदन्तीः (७।४७।३) बहूदकाः**

जलाला पवित्र म्हणतात. शत=बहु. पवित्र=उदक. शतपवित्राः=बहूदकाः. दुर्गवृत्तींत बहूदकाः नसून बहुपावयित्र्यः आहे. सिंधूंना शतपवित्रा म्हटलें आहे. बहूदकाः= पुष्कळ जल आहे ज्यांत अशा. बहुपावयित्र्यः = पुष्कळांना शुद्ध करणाऱ्या. दुर्गाच्या प्रतींत बहूदकाः नव्हतें कीं काय ? तो शब्द अवश्य आहे; कारण जलाला पवित्र म्हणतात असें यास्क म्हणतो. शतानि पवित्राणि यासां ताः = ज्यांच्यांत शेंकडों गाळणीं आहेत म्हणजे ज्या पाहिजे ती वस्तु शुद्ध करतात अशा नद्या. स्वधा म्हणजे सोम; स्वधया म्हणजे सोमपानानें आनंदित.

**अग्निः पवित्रम् उच्यते । वायुः पवित्रम् उच्यते । सोमः पवित्रम् उच्यते । सूर्यः पवित्रम् उच्यते । इन्द्रः पवित्रम् उच्यते**

अग्नि, वायु, सोम, सूर्य व इंद्र ह्यांना पवित्र म्हणतात.

**अग्निः पवित्रं स मा पुनातु वायुः सोमः सूर्य इन्द्रः । पवित्रं ते मा पुनन्तु इत्यपि निगमः भवति**

अग्नि वगैरेना ज्यांत पवित्र म्हटलें आहे असा मंत्रही आहे. अग्नि वगैरे सर्व पवित्र; ते मला शुद्ध करोत. हा मंत्र कोठें आहे तें समजलें नाहीं. पवित्र म्हणजे गाळणें हा अर्थ बहुतेक ठिकाणीं आहे. पण क्वचित् शुद्ध करण्याचें साधन असाही अर्थ असतो. जसें:—यत्ते पवित्रमर्चिषि अग्ने विततमन्तरा । ब्रह्म तेन पुनीहि नः (९।

६७।२३ ) = हे अग्नि, तुझ्या ज्वालेंत जें शुद्ध करण्याचें सामर्थ्य भरलें आहे त्यानें आमची स्तुति शुध्द कर. यत्ते पवित्रमर्चिवदग्ने तेन पुनीहि नः ( ९।६७।२४ ); अर्चिवत् पवित्रं = अर्चिरूप पवित्र. त्वंच पवित्रं कृणुते स्वधावान् ( १०।३१।८ ) = सोम कातडी पवित्र करतो म्हणजे तेजस्वी करतो.

**तोदः (३६) तुद्यतेः**

तुद् टोचणें ( धा० ६।१ ) पासून तोद.

## खंड ७ वा.

**पुरु त्वा दाश्वान् वोचेऽरिरग्ने तव स्विदा। तोदस्येव शरण आ महस्य** ( १।१५०।१ )। **बहु दाश्वान् त्वाम् एव अभिव्हयामि**

**पुरु** = बहु = पुष्कळ ( हवि ). पुरु दाश्वान् = बहुदानवान् = पुष्कळ दान देणारा असा दुर्ग अर्थ करतो. त्वा = त्वाम् एव. एव अध्याहृत. वोचे अभिव्हयामि = **बोलावितों.** दुर्गवृत्तींत अभिव्हयामि नाहीं. वोचे आव्हयामि इत्यर्थः इतकेंच दुर्ग म्हणतो.

**अरिः अमित्रः ऋच्छतेः। ईश्वरः अपि अरिः एतस्मात् एव**

अरिः = अमित्रः = शत्रु. शत्रूला अरि म्हणण्याचें कारण तो हिंसा करतो. ऋच्छ् हिंसायां ह्यापासून. ऋ + इ; ऋ चा गुण अर्. अर् + इ=अरिः. अरिः=ईश्वरः = प्रभु, सत्ताधीश. सत्ताधीशाला अरि म्हणण्याचें कारण तोही शत्रूला मारतो. ईश्वरार्थी अरि शब्द ह्याच धातूपासून. ऋच्छ् गति–इन्द्रियप्रलय–मूर्तिभावेषु ( धा० ६। १६ ); ह्यांत हिंसा अर्थ नाहीं. शिवाय ऋच्छ्पासून अरि शब्द च्छ चा लोप केल्याशिवाय होणार नाहीं. ऋगतौ ( धा० ३।१६ ) ह्यापासून अरि शब्द निघेल. इयर्ति अरिः ( अमर २।८।१० क्षीरस्वामी ).

**यत् अन्यदेवत्याः अग्नौ आहुतयः हूयते इति एतद्दृष्ट्वा एवम् अवक्ष्यत्**

दुसऱ्या देवतांना दिलेल्या आहुति अग्नींतच दिल्या जातात. पण त्या असंख्येय असल्या तरी अग्नि त्यांचे ग्रहण करतोच करतो. हें पाहून ( मनांत आणून ) मंत्रद्रष्टा असें ( म्हणजे पुढीलप्रमाणें ) ऋचेंत म्हणाला. देवतान्तात् तादर्थ्ये यत् ( पा. ५।४।२४ ); अन्याः देवताः अन्यदेवताः। अन्यदेवताभ्यः इमाः अन्यदेवत्याः = इतर देवतांना अर्पिलेल्या. अवक्ष्यत् हें वच् चें लङ्गंत रूप आहे; तें यास्क भूतकालार्थी वापरतो. यास्क पाणिनीच्या आधींचा ह्या म्हणण्याला हें एक प्रमाण आहे. गुर्जरपाठ अवक्षत् चुकीचा आहे; कारण वच् चें अवक्षत् रूप कधींही होणार नाहीं. दुर्गवृत्तींत ह्या दोहोंपैकीं कोणताही पाठ नाहीं. दुर्ग अवोचत् शब्द घालतो.

**तोदस्येव शरण आ महस्य। तुदस्य इव शरणे अधि महतः**

तोदस्य = तुदस्य. तुद शब्द अमरांत नाहीं. तुद् = हाणणें, यातना देणें

( आपट्यांच्या कोश ). तुद = मोठा खड्डा असा यास्कानें व दुर्गानें अर्थ केला आहे. तुदस्य=तुन्नस्य ( दुर्ग ). आ = अधि. शरणे अधि = शरणे. महस्य = महतः. ऋचेचा यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला अर्थः–हे अग्नि, पुष्कळ आहुति (बह) देणारा ( दाश्वान् ) मी तुलाच बोलावितों; ( ह्याचें कारण ) तुझ्याच ( तव स्वित् ) असंख्य स्तुति उच्चारण्याला मी समर्थ ( अरिः ) आहें ( अस्मि ). मोठ्या ( महस्य ) एखाद्या खड्ड्याच्या ( तोदस्य ) भगदाडांत ( शरणे ) जसें किती पाणी पडलें तरी नाहींसें होतें तसें तुजमध्यें कितीही आहुत्या टाकल्या तरी त्याचा मागमूससुद्धां रहात नाहीं. खड्ड्याचा दृष्टांत अग्नीचें आहुतिग्रहणसामर्थ्य दाखवितो. ऋषीनें दृष्टांत ह्याच हेतूनें घातला आहे. तव स्विदा हे शब्द यास्कानें भाष्यांत गाळले आहेत. अरि म्हणजे भक्त. अरिगूर्तः ( १।१८६।३ ) = अरीनें म्हणजे भक्तानें स्तविलेला. तोद शब्द ऋग्वेदांत एकंदर ५ वेळां आला आहे. इंद्राला ‘ तोदो वातस्य ’ ( ४।१६।११ ) म्हटलें आहे. तोदः० अर्यात् ( ६।१२।३ ) असें अग्नीसंबंधानें म्हटलें असावेंसें वाटतें. आ भानुना पार्थिवानि ज्रयांसि महस्तोदस्य धृषता ततन्थ ( ६।६।६ ) = मोठा जो तोद त्याच्या तेजानें ( भानुना ) अग्नि जोरानें द्युलोक ( पार्थिवानि ज्रयांसि ) पसरता झाला. अग्निस्तोदस्य रोदसी० ततान ( ६।१२।१ ) = अग्नि तोदाच्या ( तेजानें ) द्यावापृथिवींना पसरता झाला. तोदः वातस्य ( ४।१६।११ ) = वाऱ्यालासुद्धां मंदगतीनें चालण्याबद्दल टोंचणारा किंवा तडाखे देणारा इंद्र. बाकीच्या तिहींत तोद म्हणजे अग्नि किंवा अग्नीचा प्रकाश असा अर्थ असावा. खरा अर्थ ठरवितां येत नाहीं. तोदस्येव शरणे आ महस्य = महस्य तोदस्य इव एव शरणे आ अधि = प्रकाशमान् जो महान् देव तूं त्या तुझ्या आश्रयाखालीं ( शरणे ). हे अग्ने पुरुदाश्वान् अहं त्वा त्वां वोचे ब्रवीमि। अरिः अहं महस्य तोदस्य तव स्वित् एव शरणे अधि अस्मि = हे अग्नि पुष्कळ (पुरु) हवि देणारा मी तुला सांगतों कीं, तुझा भक्त मी महान् तोद जो तूं त्या तुझ्याच ( स्वित् = इव ) आश्रयाखालीं राहणारा मी आहें. आ दोनदां आला आहे त्याचा अन्वय शरणे ह्याच्याशीं. तोद ह्याची व्युत्पत्ति करून यास्कानें ऋचेचा निराळा अर्थ केला आहे.

**स्वञ्चाः [ ३६ ] सु अञ्चनः। आजुह्वानो घृतपृष्ठः स्वञ्चाः [ ५।३७।१ ] इत्यपि निगमः भवति**

स्वञ्चाः = सु + अञ्चाः. अञ्चाः = अञ्चनः = जाणारा. जींत स्वञ्चाः शब्द आहे. अशी ऋचाही आहे. सं भानुना यतते सूर्यस्याजुह्वानो घृतपृष्ठः स्वञ्चाः= ज्याला आहुति दिल्या जात आहेत ( आजुह्वानः ) व ज्याची पाठ घृतानें तुळतुळीत झाली आहे ( घृतपृष्ठः ) असा अग्नि स्वतेजानें सूर्याच्या तेजाशीं स्पर्धा करतो म्हणजे बरोबरी करतो. आजुह्वानः व घृतपृष्ठः ह्या दोन विशेषणांच्या अर्थाशीं स्वञ्चाः ह्याचा अर्थ जुळला पाहिजे. स्वञ्चाः स्वञ्चौ स्वञ्चः। स्वञ्चं असा हा शब्द चालतो. स्वञ्चाः, स्वञ्चः व स्वञ्चं एवढींच रूपें ऋग्वेदांत आहेत. सुप्रतीकं सुदृशं स्वञ्चं (६।१५।१०)

व सुसंदृशं सुप्रतीकं स्वञ्चं (७।१०।३) ह्यांतील सर्व शब्द अग्नीचीं विशेषणें आहेत व सर्वांचा अर्थ सुंदर, तेजस्वी असा आहे. पण स्वञ्चाः (५।३७।१) म्हणजे जलद जाणारा असाही अर्थ आहे; जसेः—अत्यासो न मरुतः स्वञ्चः (७।५६।१६), स्पशः स्वञ्चः सुदृशो नृचक्षसः (९।७३।७), हरितः० ऋज्वञ्चः स्वञ्चः (४।६।९) एथें. पण एथेंही 'सुंदर' अर्थ नाहीं असें खात्रीनें म्हणतां येत नाहीं. यं देवासो अददुः सूर्यायै कामेन कृतं तवसं स्वञ्चं (६।५८।४) = देवांनीं बलवान् (तवसं) व सुंदर (स्वञ्चं) व मदनानें प्रेरित असा जो पूषन् त्याला सूर्येला दिलें. स्वञ्चं म्हणजे सुंदर असाच अर्थ आहे. स्वञ्चचे दोन अर्थ असल्याकारणानें तो ऐकपदिकांत घातला गेला. सु + अञ्चाः असा पदविभाग पदपाठांत दिला आहे. अञ्च् चीं धातुरूपें ऋग्वेदांत नाहींत. ऋग्वेदाच्या पूर्वकालीं तो धातु अस्तित्वांत असेल व जाणें ह्या खेरीज शोभणें असाही त्या धातूचा अर्थ असेल.

**शिपिविष्टः (३७) विष्णुः इति विष्णोः द्वे नामानि भवतः**

शिपिविष्ट व विष्णु अशीं विष्णूचीं दोन नावें आहेत.

**कुत्सितार्थीयं पूर्वं भवति इति औपमन्यवः**

त्यांपैकीं पहिल्याचा वाईट अर्थ आहे असें औपमन्यव म्हणतो.

## खंड ८ वा.

**किमित्ते विष्णो परिचक्ष्यं भूत्प्र यद्ववक्षे शिपिविष्टो अस्मि।**
**मा वर्पो अस्मदप गूह एतद्यदन्यरूपः समिथे बभूथ (७।१००।६)**
**किं ते विष्णो अप्रख्यातम् एतद् भवति अप्रख्यापनीयम्**

इत् निरर्थक म्हणून गाळला आहे. परिचक्ष्यं = अप्रख्यापनीयं = सांगण्याला अयोग्य. दुर्गवृत्तींत परिख्यापनीयं आहे व अप्रख्यातं नाहीं. 'अप्रख्यातं' ची जरूर नाहीं. भूत् = भवति. हें अप्रख्यात म्हणून न सांगण्याजोगें रूप आहे कीं काय?

**यत् नः प्रब्रूपे शेपः इव निर्वेष्टितः अस्मि इति अप्रतिपन्नरश्मिः**

नः अध्याहृत. प्र ववक्षे = प्रब्रूपे = मोठ्यानें म्हणतोस. वच् हें अभ्यासानें ववच् होतें. ववच् + से = ववक्षे. शिपिविष्टः = शिपि + विष्टः. शिपिः इव विष्टः. शिपिः = शेपः = पुरुषाचें लिंग. विष्टः = निर्वेष्टितः. वेष्टितः = समोवतालीं गुंडाळलेला. निः = नाहीं. न गुंडाळलेला, कशानें? रश्मींनीं किरणांनीं न गुंडाळलेला, म्हणजे अप्राप्तरश्मिः = ज्याला किरण प्राप्त झाले नाहींत. उदयकालीं सूर्य किरणहीन असतो. हा घाणेरडा अर्थ झाला. किंवा

**अपि वा प्रशंसानाम एव अभिप्रेतं स्यात्**

शिपिविष्ट हें प्रशंसादर्शक असें सूर्याचें नांव अभिप्रेत असेल. ज्यांनीं सूर्याला शिपिविष्ट हें नांव दिलें त्यांच्या मनांत ह्या नांवानें सूर्याची स्तुति करण्याचा हेतु असेल.

**किं ते विष्णो प्रख्यातम् एतद् भवति प्रख्यापनीयं**

परिचक्ष्यं = प्रख्यापनीयं. शिपिविष्ट हें नांव इतकें प्रख्यात आहे कीं तें प्रख्यात करावयास कशाला पाहिजे?

**यत् उत प्रब्रूषे शिपिविष्टः अस्मि इति प्रतिपन्नरश्मिः । शिपयः अत्र रश्मयः उच्यन्ते । तैः आविष्टः भवति**

शिपिविष्टः = प्रतिपन्नरश्मिः = ज्याला किरण प्राप्त झाले आहेत अशाला. शिपिविष्टः = शिपि+विष्टः. शिपि = शिपिभिः. विष्टः = आविष्टः. शिपि म्हणजे किरण. त्यांनीं आविष्ट तो शिपिविष्ट म्हणजे किरण ज्याच्यांत सर्वबाजूंनीं शिरले आहेत असा. परिचक्ष्यं व शिपिविष्ट ह्यांचे असे विरुद्ध अर्थ होतात.

**मा वर्पो अस्मदप गूह एतत् । वर्पः (निघण्टु ३।८।३) इति रूपनाम । वृणोति इत सतः**

हा चरण जशाचा तसा दिला आहे. असें यास्क कधींकधीं करतो; पण तसें करण्याचा हेतु माझ्या लक्षांत अजून आला नाहीं. शेप इव वेष्टनत्वग्विवर्जितः=ज्याच्या वरची कातडी मागें गेली आहे असें पुरुषाचें लिंग असा श्रीभोजनिवास अर्थ करतो. उपमानयोगात् कुत्सितार्थीयम् एतद् इति औपमन्यवः = ज्याअर्थीं पुरुषाच्या लिंगाशीं सूर्याची तुलना केली आहे त्याअर्थीं शिपिविष्ट शब्दाचा हा अर्थ घाणेरडा आहे असें औपमन्यव म्हणतो. देवराज म्हणतोः—प्रशंसानाम इति आचार्यः = पण आचार्य यास्क ह्याच्या मतें शिपिविष्ट शब्दाचा घाणेरडा अर्थ नसून स्तुतिपरच आहे. देवराजाला यास्कभाष्याची मिळालेली प्रत हल्लींच्या सर्व प्रतींहून भिन्न होती असें दिसतें. वर्पस् = रूप. रूपाला वर्पस् म्हणण्याचें कारण रूप शरीराला आच्छादितें. जेव्हां रूप शरीराला आच्छादितें असें म्हणावयाचें असेल तेव्हां रूपाबद्दल वर्पस् शब्द वापरला जातो. वृ + पस् = वर्पस्. वृङ् संभक्तौ असा उणादिमध्यें धातु दिला आहे. रूप शरीराला भजतें म्हणजे भोगतें. उणादिसूत्रें यास्कानंतर झालीं असावीं. यास्क पाणिनीहून जुना झाला हें एक प्रमाण आहे. 'वर्पः० सतः' दुर्गवृत्तींत नाहीं.

**यत् अन्यरूपः समिधे संग्रामे भवसि संयतरश्मिः**

अन्यरूपः = संयतरश्मिः = ज्यानें आपल्यांत सर्व किरण एकत्र केले आहेत असा. समिधे = संग्रामे. सम् + इ + धे = समिधे. हा शब्द भाष्यांत नको आहे. यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला ऋचेचा अर्थः—हे विष्णु, ज्याअर्थीं तूं मी शिपिविष्ट (म्हणजे पुरुषाच्या लिंगाप्रमाणें बीभत्स) आहे असें पुनः पुनः आम्हांस सांगतोस त्याअर्थीं अप्रख्यात म्हणजे कोणाला ठाऊक नाहीं असें व जें सांगण्याजोगेंही नाहीं असें काय एकच तुझें रूप आहे? (दुसरीं रूपें तुला नाहींत काय?) असा घाणेरडा अर्थ. किंवा हे सूर्या, प्रख्यात म्हणजे सर्वांना माहित असें व जें जगजाहीर केलें

पाहिजे असें ( सकाळच्या तीन चार घटकांतील ) रश्मियुक्त असें तुझें एकच रूप आहे काय ! कारण, मी शिपिविष्ट म्हणजे रश्मियुक्त आहें असें तूं वारंवार आम्हांस म्हणतोस; असा स्तुतिपर अर्थ. हें ( शिपिविष्ट ) रूप आमच्यापुढें कथन करूं नकोस; आमच्यापासून तें लपव ( अपगूह ). कारण, संग्रामांत निराळेंच म्हणजे सर्व रश्मींनीं युक्त–देदीप्यमान–असें रूप तूं धारण करतोस. मा वर्पः अस्मत् अप गूह एतत् = आमच्यापुढें हें ( शिपिविष्ट ) रूप कथन करूं नकोस, आमच्यापासून तें लपव, असा दुर्ग अर्थ करतो. हे शिपिविष्टा, तुझे पराक्रम जाणून मी तुझ्या त्या ( शिपिविष्ट ) नांवाची स्तुति करतों असें ह्या ऋचेच्या आधींच्या म्हणजे पुढील खंडांत दिलेल्या ऋचेंत म्हटलें आहे. ह्यावरून परिचक्ष्यं म्हणजे सर्वत्र जाहीर करण्याजोगें असा अर्थ होईल. मी शिपिविष्ट आहें असें मोठ्यानें तूं सांगतोस; हें तूं काय सांगावयास पाहिजे ? ह्या शिपिविष्ट नांवाचा महिमा ( वर्पः ) आमच्यापासून लपवूं नको. ( असें म्हणण्याचें कारण ) तूं लढाईंत निराळेंच रूप धारण केलें होतेंस. असा प्रस्तुत ऋचेचा अर्थ असावा. पण मा वो वचांसि परिचक्ष्याणि वोचं ( ६।५२।१४ ) = तुम्हांला ज्या टाळावयाजोग्या ( परिचक्ष्याणि ) स्तुति वाटतात त्या मला कधींही उच्चारूं देऊं नको; एथें परिचक्ष्याणि म्हणजे टाळावयाजोग्या असा अर्थ आहे. त्यामुळें परिचक्ष्यंचा खरा अर्थ ठरवितां येत नाहीं. शिपिविष्टेति चाख्यायां हीनरोमा च यो भवेत् । तेनाविष्टं तु यत्किंचित् शिपिविष्टेति च स्मृतः (कलकत्ता महाभारत–शांतिपर्व–अध्याय ३४२ श्लोक ६९)॥ यास्को मामृषिरव्यग्रो नैकयज्ञेषु गीतवान् । शिपिविष्ट इति ह्यस्मात् गुह्यनामधरो ह्यहम् ( ७० )॥ स्तुत्वा मां शिपिविष्टेति यास्क ऋषिरुदारधीः । मत्प्रसादादधो नष्टं निरुक्तमभिजग्मिवान् ( ७१ ) = शिपिविष्ट असा जेव्हां कोणी संबोधिला जातो तेव्हां त्या शब्दाचा अर्थः—शिपि म्हणजे बिनकेसाचा ( हीनरोमा ) जो कोणी असेल तो; तो ज्या ज्या वस्तूंत शिरेल ती ती वस्तु शिपिविष्ट अशी समजली जाते ( स्मृतः ). यास्क ऋषीनें अव्यग्र मनानें अनेक यज्ञांत माझी स्तुति गाइली आहे. शिपिविष्ट हें माझेंच गूढ नांव. शिपिविष्ट ह्या नांवानें त्या उदारबुद्धि यास्क ऋषीनें माझी स्तुति केली म्हणून माझ्या प्रसादानें त्याचें खोल जागीं नाहींसें झालेलें निरुक्त त्याला मिळालें. ह्या कथेंत शिपिविष्ट शब्दाची निराळीच व्युत्पत्ति दिली आहे. शिवाय सूक्ताचा कर्ता यास्क ऋषि व तो अनेक यज्ञांत विष्णूची शिपिविष्ट नांवानें स्तुति करतो व नष्ट झालेलें त्याचें निरुक्त त्याला परत मिळतें अशी दंतकथा आहे. शिपिना आविष्टः शिपिविष्टः. हें विष्णूला नांव कां पडलें ह्याचें कारण ह्या दंतकथेंत दिलें नाहीं. स्मृतः = शिपिविष्ट इति अहं ज्ञातः, असा अन्वय असल्यास यत् किंचित्‌ला क्रियापद नाहीं. ह्या दंतकथेचा प्रस्तुत ऋचेचें विवरण करण्याला कांहींच उपयोग नाहीं.

**तस्य उत्तरा भूयसे निवर्चनाय**

पुढील ऋचा ह्या विषयाचें ज्यास्त विवरण व्हावें म्हणून ( दिली आहे. )

## खंड ९ वा.

**प्रतत्ते अद्य शिपिविष्ट नामार्यः शंसामि वयुनानि विद्वान् ।**

**तं त्वा गृणामि तवसमतव्यान् क्षयन्तमस्य रजसः पराके ( ७।१००।५ )**

**तत् ते अद्य शिपिविष्ट नाम अर्यः प्रशंसामि । अर्य: अहम् अस्मि ईश्वरः स्तोमानाम् ।** अर्यः त्वम् असि इति वा

प्र + शंसामि = प्रशंसामि = स्तुति करतों. अर्यः हें अहं ( अध्याहृत ) चें विशेषण होईल. मी स्तोमांचा अर्य म्हणजे ईश्वर म्हणजे स्वामी, कर्ता आहें. असा अर्थ करावा. किंवा तूं धनी आहेस असा अर्थ करावा. धनी कशाचा? स्तोमांचा. अरि = भक्त, शत्रु, धनी. अर्यः ही षष्ठी. अर्यः ते स्वामिनः तव = सत्ताधीश जो तूं त्या तुझें.

**तं त्वा स्तौमि तवसम् अतव्यान् । तवसः इति महतः नामधेयं ( निघण्टु ३।३।६ )**

गृणामि = स्तौमि. हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. तवस हा महद्वाची शब्द आहे. तवसः = मोठा. पण ही चूक आहे. तवस् = बल. तवः तवसी तवांसि असा बलवाची तवस् शब्द नपुंसक आहे. बलवान् ह्या अर्थी तोच शब्द वापरलेला आहे व तो तवाः तवसौ तवसः । तवसं ० असा चालतो. तवस असा अकारांत शब्द नाहीं. तवसं = बलवन्तम्. तवीयान् ह्याचा तव्यान् हा अपभ्रंश आहे. तव्यान् तव्यांसौ तव्यांसः असा तो चालतो. तव्यान् = बलवान्. अ + तव्यान् = बलहीन.

**उदितः भवति**

हेही शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. उदितः महान् भवति = उगवला म्हणजे तो मोठा होतो, असा अर्थ असेल. पण 'तवसः = भवति' हे प्रक्षिप्त आहे.

**निवसन्तम् अस्य रजसः पराके पराक्रान्ते**

क्षयन्तं = निवसन्तं = राहणाऱ्याला. पराके = पराक्रान्ते = दूर प्रदेशीं. पराके = परा+ के. के = क्रान्ते. परा + क्रम् पासून पराक. ह्या ( अंतरिक्ष ) लोकाच्या अति दूर ठिकाणीं राहणाऱ्याला, असा यास्क व दुर्ग अर्थ करतात. पण पराके अस्य रजसः द्युलोकस्य क्षयन्तं राजन्तं = अति उंचावर ह्या द्युलोकीं राज्य करणाऱ्याला असा खरा आहे. परा + अञ्च् पासून पराक. परा हे अर्वा ह्याच्या उलट. अर्वा = खालीं. परा = उंच. पराके = पृथिवीहून अति उंचावर. क्षि = राज्य करणें. वयुनानि विद्वान् हे शब्द यास्कानें सोडून दिले आहेत. वयुनानि = शूरकर्में; विद्वान् = जाणणारा. ऋचेचा अर्थः— हे शिपिविष्टा, समर्थ जो तूं त्या तुझ्या ( अर्यः ते ) त्या नांवाची ( तत् नाम ) तुझीं शूरकृत्यें जाणणारा ( वयुनानि विद्वान् ) मी स्तुति करतों. उंचावरील ह्या द्युलोकावर राज्य करणारा, बलवान् ( तवसं ) अशा तुझी बलहीन ( अतव्यान् ) मी स्तुति करतों. शिपिविष्ट नांवासंबंधानें डॉ. घाटे ह्यांचें पुढीलप्रमाणें म्हणणें आहे. सूर्य नरकांत म्हणजे दक्षिणेकडे जातो ( रजसः पराके

क्षियन्तं ७।१००।५ ) तेव्हां उत्तरेकडे कांहीं महिने त्याचे किरण मंदतेज होतात. तेव्हां कवि म्हणतोः--हे विष्णु ( हे सूर्या ), शिपिविष्ट ह्या नांवाची तुला लाज वाटण्याचें कारण नाहीं. असुरांना मारण्याकरितां हें मंदतेज कवच ( वर्पः ) तुला घालावें लागतें. आतां असुर ( अंधकार ) मारले आहेस तेव्हां पुन्हा आपलें देदीप्यमान रूप धारण कर. ह्या म्हणण्याला टिळकांच्या उत्तरध्रुवाजवळ आर्यांचें मूल वसतिस्थान ( पान ३३२ ) ह्याचा आधार घेतला आहे. ते पुढें म्हणतातः--बलि व वामन ह्या गोष्टींचाही संबंध दक्षिणायनाशीं आहे. इंद्र वृत्राला मारून अडविलेल्या पाण्याला वाट करतो व उषा आणि सूर्य ह्यांना अंधारकोठडींतून बाहेर काढतो; त्यावेळीं विष्णु त्याला मदत करतो. बलि म्हणजे वृत्र किंवा अंधकार. वामन म्हणजे विष्णु. तो आपलें तिसरें पाउल बलीच्या डोक्यावर ठेवतो. ( डॉ. घाटे ह्यांचीं ऋग्वेदावरील व्याख्यानें पा० १७९-१८० ). शिपिविष्ट ह्याचा नक्की अर्थ केल्याशिवाय कोणतेंहि विधान करणें बरोबर नाहीं. पराके व रजस् ह्यांचा अर्थ चुकला आहे.

**आघृणिः ( ३९ ) आगतहृणिः**

आघृणिः = आ + घृणिः. आ = आगत. घृणिः = हृणिः = दीप्ति किंवा क्रोध. आघृणिः = ज्याच्याभोवतीं तेज आहे किंवा ज्याला क्रोध येतो असा. निंदा, लाज, दया ह्या अर्थी हृणि शब्द आपट्यांच्या कोशांत सांपडतो. अमरांत हृणीया ( = घृणा ) असा शब्द आहे; हृणि नाहीं. यास्ककालीं कोणत्या अर्थी तो शब्द प्रचारांत होता तें कळत नाहीं. ऋग्वेदांत हृ क्रुद्ध होणें ह्याचीं हृणीषे, हृणीते, हृणीथः, वगैरे रूपें सांपडतात; पण हृणि नाम सांपडत नाहीं. गभस्तिघृणिरश्मयः ( अमर १।२।३४ ); घृणि = किरण. आसमन्तात् घृणयः यस्य स आघृणिः = ज्याच्या भोवतीं किरणजाल आहे असा. घृण, घृणा व घृणि असे शब्द ऋग्वेदांत आहेत. त्या सर्वांचा अर्थ कडक, प्रखर ऊन. आघृणिः हें सर्वत्र पूषन्चें विशेषण आहे. पूषन्नें आपल्या तेजाच्या साहाय्यानें अग्नि लपला होता तें स्थल शोधून काढलें.

**आघृणे सं सचावहै ( ६।५५।१ ) । आगतहृणे संसेवावहै**

आघृणे = आगतहृणे. संसचावहै = संसेवावहै = आपण एकमेकांस साहाय्य करूं या. सच् = एकत्र होणें. हे पूषन्, आपण एकत्र होऊं या.

**पृथुज्रयाः ( ४० ) पृथुजवः**

पृथुज्रयाः पृथुजवः = फार वेगाचा. पृथु ज्रयः यस्य स पृथुज्रयाः. ज्रय व ज्रयस् असा अकारांत व सकारांत हा शब्द आहे. ज्रि किंवा ज्रय् वेगानें जाणें ह्या धातूपासून तो शब्द निघाला आहे. उरुज्रयः हाही शब्द त्याच अर्थी आहे. परिज्रयः ( सर्वत्र वेगानें जाणारे ) असाही शब्द आहे. तेव्हां तीनही शब्द द्यावयास पाहिजे होते. किंवा ज्रय किंवा ज्रयस् शब्द द्यावयाचा होता. पण तोही शब्द ऐकपदिकांत देण्याचें प्रयोजन नाहीं. कारण वेग असा एकच अर्थ ह्या शब्दाचा आहे. व्युत्पत्ति

म्हटली तर तीहि दिली नाहीं. उरुज्रयः व परिज्रयः हे अनेकवचनी शब्द आहेत हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

**पृथुज्रया अमिनादायुर्दस्योः ( ३।४९।२ )। प्रामापयत् आयुः दस्योः**

अमिनात् = प्र + अमापयत्. ‘ प्रामापयत् ’ दुर्गवृत्तींत नाहीं. अमिनात् = नाश करता झाला. मि ( ९ वा गण ) नाश करणें, हा धातु ऋग्वेदांत पुष्कळदां आला आहे. अति बलवान् किंवा अति वेगवान् इंद्र दस्यूंच्या आयुष्याचा नाश करता झाला. मीङ् हिंसायाम् ( धा० ४।३१ ) ह्याचें ‘ मीनातिमिनोतिदीङां । ( धा० ६।१ ५० ) मापय् हें णिजन्त रूप. प्र + अ + मापय् + अत् = प्रामापयत् = नाश करविला. पण इंद्रानें कोणाकडून दस्यूंच्या जिवाचा नाश केला ? इंद्र स्वतः समर्थ नव्हता कीं काय ? ‘ प्रामापयत् आयुः दस्योः ’ हें प्रक्षिप्त आहे.

## खंड १० वा.

**अग्निं नरो दीधितिभिररण्योर्हस्तच्युती जनयन्त प्रशस्तम् ।**
**दूरेदृशं गृहपतिमथर्युम् ( ७।१।१ )**
**दीधितयः अङ्गुलयः भवन्ति । धीयन्ते कर्मसु**

दीधितयः = अङ्गुलयः = बोटें. बोटांस दीधिति म्हणण्याचें कारण सर्व कामांत बोटें घातलीं जातात. बोटांचा उपयोग केल्याशिवाय खाणें पिणें वगैरे कृत्यें होणार नाहींत. धा धातूपासून दीधिति शब्द झाला आहे. पण धापासून दीधिति शब्द निघणें अशक्य आहे. दीधि ( स्तुति करणें, प्रार्थना करणें ) असाच धातु पाहिजे व तसा धातु ऋग्वेदांत आहे. दीधय, दीध्यत्, दीधयन्, दीधेत्, दीध्ये, दीधिम वगैरे त्या धातूचीं रूपें ऋग्वेदांत आहेत. दीध्यान हें रूप सुमारें बारा वेळ आलें आहे. दीधि + तिः = प्रार्थना, स्तुति.

**अरणी । प्रति ऋतः एने अग्निः । समरणात् जायते इति वा**

अग्नि ह्यांच्याकडे ( अरणींकडे ) जातो ( म्हणून अरणींना अरणि म्हणतात .) ऋ जाणें पासून अरणि. ( ऋचा ) अर् + अ + निः = अरणिः. एते न म्हणतां एने म्हणण्याचें कारण अरणी शब्द आधीं आला आहे. किंवा दोघींच्या एकत्र ( सं ) जाण्यानें ( अरणात् ) म्हणजे येण्यानें अग्नि जन्मास येतो. अरणींच्या घर्षणामुळें अग्नि उत्पन्न होतो. धातु तोच; पण विवरण भिन्न.

**हस्तच्युती हस्तप्रच्युत्या**

हस्तच्युती = हस्तप्रच्युत्या = हातांच्या गतीनें. हस्तच्युती शब्द भाष्यांत घालण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. च्यु = हलविणें, पाडणें. च्यु + तिः = च्युतिः = हलविणें. हस्तच्युतेभिरद्रिभिः सुतं सोमं ( ९।११।४ ) = हातांनीं हलविलेल्या प्राव्यांनीं कोढलेला सोमरस. नृभिः सोम प्रच्युतो ग्रावभिः ग्रावभिः सुतः ( ९।८०।४ ) = हे सोमा, तुला मनुष्यांनीं हलविलें आहे व ग्राव्यांनीं कुटलें आहे.

**जनयन्त प्रशस्तम् । दूरेदर्शनम् । गृहपतिम्**

जनयन्त शब्द जशाचा तसा ठेवण्याचें काय कारण ? अजनयन् किंवा अजनयन्त म्हणावयास पाहिजे होतें. प्रशस्तं = स्तविलेल्या. दूरेदृशं = दूरेदर्शन = दुरून, लांबून ज्याचें दर्शन होतें, जो दिसतो त्याला. दूरे दृश्यते असौ दूरेदृक् तं. दूरेदृक् हें विशेषण मरुतांना व सूर्याला लाविलें आहे.

**अतनवन्तं**

अथर्युं = अतनवन्तं = जाणाऱ्याला. हा शब्द एथेंच आला आहे. अथर् + युः = अथर्युः. अवेस्तांत आतर् हें अग्नीचें नांव आहे. अगेनी स्त्रीलिंगी पण आतर पुंलिंगी असें त्या भाषेंत आहे. जो रात्रंदिवस अग्नि प्रज्वलित ठेवतो त्याला अथ्रवन् म्हणतात. वेदांत अथर्वन्. अथर् + वन् = अग्नि आहे ज्याचेपाशीं असा. अथ्रवन् ह्या शब्दावरून अग्नीचें मूळ नांव अथर् असून पुढें तें आतर् असें उच्चारलें गेलें असावें. किंवा अध्वर्युः = हवि देणारा; त्याप्रमाणें अथर्युः = अथर् देणारा. अथर्वन् मध्यें अथर् आहे. अथर् म्हणजे हवि किंवा धन असा अर्थ असेल. देवांना हवि देणारा किंवा देवभक्तांना धन देणारा तो अथर्यु. अथर्व = हविष्मान् किंवा धनवान्. किंवा अथर् हें एका आर्यजातीचें नांव असेल. त्या जातीचा जो अग्नि तो अथर्. ४।६।८ त अथर्यः शब्द आहे; त्याचा अर्थ ध्यानांत येत नाहीं. ऋचेचा अर्थः—लोक स्तुत्य ( प्रशस्तं ), दुरून दिसणारा ( दूरेदृशं ), गृहपति, व सर्वत्र संचार करणारा ( अथर्युं ) असा जो अग्नि त्याला अरणी हलवून व स्तुति करून उत्पन्न करते झाले.

## खंड ११ वा.

**एकया प्रतिधा पिबत्साकं सरांसि त्रिंशतम् । इन्द्रः सोमस्य काणुका ( ८।७७।४ ) ।**

**एकेन प्रतिधानेन अपिबत् । साकं सह इत्यर्थः**

एकया = एकेन. प्रतिधा = प्रतिधानेन. दुर्गवृत्तीच्या एका उत्तम पोथींत प्रणिधानेन असा पाठ आहे व तोच पाठ त्यानें घेतला असावा; कारण, सप्रणिहितेन एव चेतसा ( = एकाग्रचित्तानें ) असा तो अर्थ देतो. एकेन प्रतिधानेन = एकदांच तोंडाला ( भांडें ) लावून. साकं = सह. सहेत्यर्थः हे शब्द प्रक्षिप्त आहेत; कारण साकं शब्द अर्वाचीन संस्कृतांत आहे ( अमर ३।४।४ ). शिवाय इत्यर्थः असे शब्द यास्क कधीं वापरीत नाहीं. ऋग्वेदांत साकं चे सह आणि एकसमयावच्छेदेंकरून असे दोन अर्थ आहेत. एथें अर्थ दुसरा.

**इन्द्रः सोमस्य काणुका कान्तकानि इति वा । क्रान्तकानि इति वा । कृतकानि इति वा**

काणुका = काणुकानि = काणु + कानि. काणु = कान्त. कान्तकानि = प्रिय. किंवा काणु = क्रान्त. क्रान्तकानि = तोंडापर्यंत भरलेलीं. किंवा काणु = कृत. कृतकानि = ऋत्विजांनीं मंत्र म्हणून तयार केलेलीं. किंवा

**इन्द्रः सोमस्य कान्तः इति वा । कणेघातः इति वा । कणेहतः कान्तिहतः**

काणुका = कान्तः. इंद्र सोमाला प्रिय ( असणारा ). किंवा काणुका = काणु + का. काणु = कणे. कण = अभिलाषाची कमाल. कणेमनसी श्रद्धाप्रतीघाते (पा० १।४।६६ ) । कणेहत्य अथवा मनोहत्य पयः पिबति = उत्कट इच्छा नाहींशी होईपर्यंत दूध पितो. यः आकणेघातं पिबति स कणेघातः = जो उत्कट इच्छेचा पुरा मोड होईपर्यंत पितो तो कणेघातः किंवा कणेकणं घातयति असौ कणेघातः किंवा कणेहतः = कान्तिहतः. कणे = कान्तिः = अभिलाष. कणेघातः व कणेहतः ह्यांचा अर्थ एकच; तेव्हां दोन देण्याचें काय कारण ? कणेघातः ह्याच्या ऐवजीं कणेहतः असा पाठ असावा व कोणीतरी कणेहतः = कान्तिहतः असें विवरण केलें असावें. कालांतरानें तें विवरण निरुक्तांत घुसडलें गेलें असावें. पाणिनीच्या वेळीं कणेहत्य एवढें अव्ययच प्रचारांत होतें. यास्ककालीं कणेहतः किंवा कणेघातः असा प्रयोग असावा. प्रतिधा व काणुका हे शब्द एथेंच आले आहेत. त्यांपैकीं प्रतिधा शब्दाचा कसातरी अर्थ ठरवितां येतो; पण काणुका शब्दाचा अर्थ करणें अशक्य आहे. इन्द्रः सोमस्य त्रिंशतं सरांसि साकम् अपिबत् = इंद्र एकदम ( साकं ) सोमाचीं—सोमरसानें भरलेलीं—तीस तळीं प्यायला. प्रतिधा = प्रतिधया. काणुका = काणुकया ? प्रतिधा व काणुका ह्यांचा कदाचित् एकच अर्थ असेल. तो अर्थ एका घुटक्यासरशीं असा असण्याचा संभव आहे. काणुका कामयमानः इन्द्रः । अथवा । कान्तकानि इत्यादयः निरुक्तोक्ताः काणुकाशब्दविकल्पाः योजनीयाः ( तन्त्रवार्तिके १।३।४९ ) = काणुका म्हणजे इच्छा करणारा, किंवा त्या शब्दाचे निरुक्तांत दिलेले अर्थ घ्यावेत असें तंत्रवार्तिक म्हणतें. कदाचित् काणा—शब्दाप्रमाणें काणुका शब्द कोणत्यातरी चांगल्या अर्थीं असेल. इंद्र सोमरसानें कांठापर्यंत भरलेलीं ३० तळीं एका घुटक्यासरशीं पिऊन टाकतो यांत अतिशयोक्ति असून वस्तुस्थितीला विरोध आहे; हा विरोध पुढील अर्थानें नाहींसा होतो. दाता ( इन्द्रः = सोमः = स्यः ) धनानें खच्चून भरलेल्या ( एकया = प्रतिधा = काणुका ) खजिन्यांतून मुबलक धन ( साकं = सरांसि = त्रिंशतं ) देता झाला ( अपिबत् ). एथें सर्व शब्दांवर शाब्द किंवा आर्थ श्लेष आहे; पा व पिब् ह्यांचे पिणे व देणे असे दोन अर्थ होतात.

**तत्र एतत् याज्ञिकाः वेदयन्ते । त्रिंशत् उक्थपात्राणि माध्यंदिने सवने एकदेवतानि । तानि एकस्मिन् काले एकेन प्रतिधानेन पिबन्ति । तानि अत्र सरांसि उच्यन्त**

ह्या तळ्यांच्या संबंधानें याज्ञिक असें ( एतत् ) कळवितात ( वेदयन्ते ). माध्यंदिनसवन एका देवतेला म्हणजे इंद्राला उद्देशून केलेलें असतें. त्यांत उक्थ नांवाचीं ३० सोमपात्रें असतात. ग्रह म्हणजे एका देवतेला किंवा अनेक देवतांना अर्पण करण्याकरितां पात्रांत घेतलेला सोमरस. उक्थ हें एका ग्रहाचें नांव आहे. उक्थस्थाली किंवा उक्थ्यस्थाली नांवाचें सोमानें भरलेलें एक मोठें भांडें असतें. ह्याचे तीन भाग करतात;

प्रत्येकांत दहा दहा चमस सोम असतो. तो ३० उक्थपात्रांत घालून नंतर हवन करावयाचें असतें. हें हवन प्रत्येक ऋत्विक् व यजमान करतात व नंतर राहिलेलें एकदम पिऊन टाकतात. ह्या उक्थपात्रांतील सोम सर्वजण एका वेळीं एकाग्रचित्तानें ( एकेन प्रतिधानेन ) पितात. ह्या ३० उक्थपात्रांना एथें तळीं म्हटलें आहे. इंद्र सोम झोडतो असें विनोदपर वर्णन ऋग्वेदांत आहे. त्री साकमिन्द्रो मनुषः सरांसि सुतं पिबत् वृत्रहत्याय सोमम् ( ५।२९।७) = वृत्राला मारण्याकरितां मनुष्यांचीं तीन सरोवरें भरतील इतका सोमरस इंद्र एका दमांत प्यायला. त्री सरांसि मघवा सोम्यापाः ( ५।२९।८ ). त्रीणि सरांसि पृश्नयो दुदुह्रे वज्रिणे मधु ( ८।७।१० ) = मरुतांनीं इंद्रासाठीं तीन तळीं सोम तयार केला. हा विनोद बाजूला ठेऊन याज्ञिकांनीं ह्या तळ्यांचा यज्ञपर अर्थ केला.

**त्रिंशत् अपरपक्षस्य अहोरात्राः त्रिंशत् पूर्वपक्षस्य इति नैरुक्ताः**

( हीं तीन तळीं म्हणजे ) उत्तर म्हणजे कृष्णपक्षाचे तीस अहोरात्र ( म्हणजे १५ दिवस ) व तीस पूर्व म्हणजे शुक्लपक्षाचे असें नैरुक्त म्हणतात.

**तत् याः एताः चान्द्रमस्यः आगामिन्यः आपः भवन्ति रश्मयः ताः अपरपक्षे पिबन्ति**

हें ( एताः ) जें ( याः ) चंद्रामध्यें असणारें ( चान्द्रमस्यः ) प्रतिपदा, द्वितीया, वगैरे तिथींना येणारें ( आगामिन्यः ) पाणी ( आपः ) असतें ( भवन्ति ) तें (ताः) कृष्णपक्षांत ( अपरपक्षे ) सूर्याचे किरण ( रश्मयः ) पिऊन टाकतात. तत् ह्यानें नैरुक्ताच्या म्हणण्याला प्रारंभ होतो.

**तथापि निगमः भवति । यमक्षितिमक्षितयः पिबन्ति ( मैत्रायणीसंहिता २।२। ७ ) इति**

त्या अर्थाची ऋचाही आहे. क्षय न पावणाऱ्या ( अक्षितिं ) ज्या ( यं ) चंद्राला क्षय न पावणारे ( अक्षितयः ) देव म्हणजे सूर्यकिरण पिऊन टाकतात. ‘ यथाक्षितिं ’ असा दुर्गानें पाठ घेतला आहे व तोच बरोबर आहे. जसे सूर्यकिरण चंद्राला पितात तसे इंद्रादि देव तुझ्यावर उपजीविका करोत. ‘ ज्या ( यं ) चंद्राला सूर्यकिरण पितात ’ एथील ‘ ज्या ’ ला ‘ तो ’ असें उत्तरार्धांत पाहिजे; पण तद्विषयक सर्वनाम उत्तरार्धांत नाहीं. दुर्ग म्हणतो:— यं असा पाठ घेतल्यास ‘ सः त्वाम् आप्याययतु ’ असें वाक्य अध्याहृत घेतलें पाहिजे.

**तं पूर्वपक्षे आप्याययन्ति । तथापि निगमः भवति । यथा देवा अंशुमाप्याययन्ति ( मैत्रा० सं० २।२।७ ) इति**

त्या चंद्राला शुक्लपक्षांत भरून टाकतात. सूर्यकिरण चंद्राचें तेज कृष्णपक्षांत हिरावून शुक्लपक्षांत तें त्यांस परत देतात; त्यानें चंद्र धष्टपुष्ट होतो. तशा अर्थाची ऋचाही आहे. ज्या प्रकारानें देव म्हणजे सूर्यकिरण चंद्राला ( अंशुं ) तेजानें भरून टाकतात. ‘ यथा देवा अंशुमाप्याययन्ति यथाक्षितिमक्षितयः पिबन्ति । तेन न इन्द्रो

वरुणो बृहस्पतिराप्याययन्तु भुवनस्य गोपाः ' असा संबंध मंत्र आहे. यथा = येन प्रकारेण. तेन = तेन प्रकारेण. प्रस्तुतच्या मैत्रायणी संहितेंत ' यथा देवा ' बद्दल यथादित्या व ' तेन न ' बद्दल एवास्मान् असा पाठ आहे. ज्याला क्षय झाला आहे तो बरा व्हावा म्हणून काम्येष्टि करावयाची असते; त्या इष्टींत हा मंत्र म्हणतात. शुक्लपक्षांत प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत पाणी येत असतें; तें पाणी कृष्णपक्षांत सूर्यकिरण शोषून घेतात. ही कल्पना यास्काम कोठून मिळाली तें मला कळलें नाहीं. पाण्यामुळें चंद्र शुभ्र अशी कल्पना असावी. पण निरुक्त २।६ त सुषुम्न नांवाचा सूर्याचा एक रश्मि चंद्राकडे जातो व त्यामुळें चंद्र प्रकाशतो असें म्हटलें आहे. दोहींचा मेळ कसा ?

**अध्रिगुः ( ४३ ) मन्त्रः भवति गवि अधिकृतत्वात्**

एका मंत्राला अध्रिगु म्हणतात. तसें म्हणण्याचें कारण यागांत गाय मारावयाची असते; तत्संबंधीं हा मंत्र; म्हणून तो अध्रिगु. अध्रिगुः = अध्रि + गुः. अध्रि = अधिकृत्य. कृ मधला ऋ म्हणजे र् अधि = अध् + इ ह्यांच्यामध्यें जाऊन पडला; त्यामुळें अधि अध्रि झाला. गवि अधिकृतः मन्त्रः अध्रिगुः. पण यज्ञांत नेहमीं गायच मारतात असें नाहीं; बोकडही मारतात; म्हणून

**अपि वा प्रशासनम् एव अभिप्रेतं स्यात् तच्छब्दवत्त्वात् । अध्रिगो शमीध्वं सुशमि शमीध्वं शमीध्वमध्रिगो ( मैत्रा० सं० ४।१३।४ काठक सं. १६।२१ ) इति**

किंवा ज्याला त्या मंत्रांत आज्ञा ( प्रशासनं ) केली आहे त्याचें नांव अध्रिगु असल्यामुळें मंत्रालाही अध्रिगु नांव पडलें. अध्रिगूला आज्ञा केली आहे; तीच (एव) आज्ञा ह्या मंत्राला तें नांव देण्यांत अभिप्रेत असावी. ज्यानें मंत्राला अध्रिगु नांव दिलें त्याच्या मनांत ज्याला आज्ञा केली गेली तो अध्रिगु नांवाचा देव किंवा मनुष्य असावा. यस्मै प्रशासनं कृतं स एव अभिप्रेतः स्यात् असें म्हणणें बरोबर होईल. यास्काची भाषा सदोष असते. सः ( अध्रिगु ) शब्दः तच्छब्दः । तच्छब्दः विद्यते यस्मिन् स मन्त्रः तच्छब्दवान् । तस्य भावः तच्छब्दवत्त्वात्. त्या मंत्रांत अध्रिगु हा शब्द आहे. तेव्हां ज्या अध्रिगूला आज्ञा केली त्याचें नांव मंत्रांत असल्यामुळें मंत्राला अध्रिगु नांव पडणें अगदीं स्वाभाविक. प्रशासनं बद्दल गुर्जरपाठ प्रशंसानाम हा चुकीचा आहे; कारण मंत्रांत कोणाची स्तुति केली नाहीं. ह्या मंत्राला ' दैव्याः शमितार उत मनुष्याः आरभध्वं ' ह्यानें आरंभ होतो. हे देवांमधील व मनुष्यांमधील पशु कापणारे लोक हो, सुरू करा; ह्या प्राण्याला नीट कापा व त्याचे शरीराचे भाग वेगळे करा; असें म्हटल्यावर शेवटीं अध्रिगो शमीध्वं वगैरे शब्द येतात. हे अध्रिगो, ह्या पशूला निष्प्राण करा ( शमीध्वं ); अगदीं निश्चल होईल असा ( सुशमि ) निश्चल करा. शमीध्वं शब्द तीनदां व अध्रिगो दोनदां उच्चारला आहे. अशी ही आज्ञा आहे. शमीध्वं हें अनेकवचन; पण अध्रिगो एकवचन, त्यामुळें कारक अशुद्ध आहे. अध्रिगुश्च विपापश्च देवानां शमितारौ । ता एनं प्रविद्वांसौ श्रपयतं यथास्य श्रपणं तथा (मैत्रा० सं० ४।१३।४)

= अध्रिगु व विपाप असे देवांचे यज्ञपशु मारणारे ह्या पशूला जसें शिजविलें पाहिजे तसे ह्या पशूला शिजवोत. ह्या वचनावरून अध्रिगु हा देवांचा पशुमारक होता. शमीध्वं ह्याला दैव्याः शमितारः उत मनुष्याः हा कर्ता असला पाहिजे. तर मग अध्रिगो ह्याचा अर्थ व अन्वय काय ? हे शमितारः हे अध्रिगो असा अन्वय केला पाहिजे. पण शमितारः ह्यांतच अध्रिगूचा अंतर्भाव होत असल्याकारणानें त्याचा वेगळा निर्देश करण्याची जरूर नव्हती. किंवा अध्रिगो व सुशमि ह्यांचा अर्थ एकच असेल.

**अग्निः अपि अध्रिगुः उच्यते ।**

**तुभ्यं श्चोतन्त्यध्रिगो शचीवः ( ३।२१।४ )। अधृतगमन । कर्मवन्**

अग्नीलाही अध्रिगु म्हणतात. स्तोकासो अग्ने मेदसो घृतस्य = हे अग्नि मेद व घृत ह्यांचे थेंब ( स्तोकासः = स्तोकाः ) अथवा धारा तुजसाठीं गळत आहेत (श्चोतन्ति). अध्रिगो = अ + ध्रि + गो. ध्रि = धृत. गो = गमन. गोशब्द गम् किंवा गा जाणें ह्यापासून ( निरुक्त २।५ ). ज्याची गति कोणी धरीत म्हणजे थांबवीत नाहीं. शचीवः = कर्मवन्, शची म्हणजे कर्म. शची म्हणजे अद्भुत शक्ति, अद्भुत कर्म, धन. शिक्षा शचीवः तव नः शचीभिः ( १।६२।१२ ) = हे धनवान् इंद्रा आम्हांला धन दे. व्यहन् व्यंसं मघवा शचीभिः ( १।१०३।२ ) = इंद्र व्यंसाला स्वशक्तीनें मारता झाला.

**इन्द्रः अपि अध्रिगुः उच्यते । अध्रिगव ओहमिन्द्राय ( १।६१।१ ) इत्यपि निगमः भवति**

इंद्रालाही अध्रिगु म्हणतात. अध्रिगवे० अशी ऋचाही आहे. अप्रतिबद्धगमन जो इंद्र त्याला मी स्तुति अर्पण करतों. पहिल्या अर्धांत 'प्र० हर्मि स्तोमं' असें आहे. दुसऱ्या अर्धांत स्तोमंच्या ऐवजीं ओहं आहे. ( ४।१०।१ ) त स्तोमैः व ओहैः असे दोन्ही शब्द आले आहेत. अध्रिगु ह्यांत अध्रि व गु असे दोन शब्द असावेत. अध्रि हा अधि ह्याचा अशुद्ध उच्चार असेल. अधिगताः गावः येन सः अधिगुः. मानव-जातीचें गाई हेंच पूर्वकाळीं धन होतें; याची साक्ष लातिनमधील पिक्यूनिआ शब्द देतो. पेका = गाय. पिक्यूनिआ = धन. रुद्रांना ( १।६४।३ ) व मनुष्यांना ( ८।२२।११ ) अध्रिगावः म्हटलें आहे. यदध्रिगावो अध्रिगू० अश्विना हवामहे । वयं गीर्भिः ( ८।२२।११ ) = अध्रिगु जे अश्विन त्यांना अध्रिगाव आम्ही स्तुतींनीं बोलावितों. अध्रिगौ व अध्रिगु म्हणजे गोधनवाले. अश्विनांना अध्रिगू ( ५।७३।२ ) व सोमाला अध्रिगो ( ९।९८।५ ) म्हटलें असून, अध्रिगु एका मनुष्याचें नांव होतें. ( १।११२।२०॥८।१२।२॥८।२२।१० ). सोमाला व अश्विनांना अध्रिगु म्हणतात असेंही म्हणावयास पाहिजे होतें. अध्रिगु हें विशेषण असल्यामुळें तें पाहिजे त्याला लावतां येईल. निघंटूंत तो शब्द घालण्याचीं कारणें दुर्बोधता व व्युत्पत्तीचा कठिणपणा.

**आङ्गूषः (४४) स्तोमः। आघोषः। एनाङ्गूषेण वयमिन्द्रवन्तः (१।१०५।१९)। अनेन स्तोमेन वयम् इन्द्रवन्तः**

आङ्गूषः = आङ् + गू + षः. आङ् = आ. गू = घो. आङ्गूष म्हणजे मोठ्यानें केलेली स्तुति ( स्तोमः ). आङ्गूष शब्द आघोष शब्दाचा अपभ्रंश आहे असें यास्काचें मत दिसतें. आघोष शब्द ऋग्वेदांत नसला तरी आघोष् व आघोषय् असे धातु आहेत; घोष ( मोठ्यानें केलेली स्तुति ) शब्द तर पुष्कळदां आला आहे. आङ्गूष कदाचित् अपभ्रंश असेल, कदाचित् स्वतंत्र शब्द असेल. अशा शब्दांचे धातु काढणें ही व्यर्थ खटाटोप होय. एन = अनेन. आङ्गूषेण = स्तोमेन. 'अभि ष्याम वृजने सर्ववीराः' हा दुसरा पाद. ह्या स्तोमानें इंद्राला आमच्या बाजूला करणारे ( इन्द्रवन्तः ) आम्ही सर्व पुत्र घेऊन लढाईत ( वृजने ) शत्रूला जिंकूं ( अभिष्याम ). सर्ववीराः = सर्व पुत्र घेऊन.

## खंड १२ वा.

**आपान्तमन्युस्तृपलप्रभर्मा धुनिः शिमीवाँञ्छरुमाँ ऋजीषी।**
**सोमो विश्वान्यतसा वनानि नार्वागिन्द्रं प्रतिमानानि देभुः (ऋ० सं० १०।८९।५)**
**आपान्तमन्युः आपातितमन्युः**

आपान्त = आपातित = ज्यानें आपला क्रोध ( शत्रूवर अस्त्राप्रमाणें ) टाकला आहे. दुर्गवृत्तींत आपादित आहे. आपादितदीप्तिः उत्पादितमन्युः वा शत्रुभिः (दुर्ग)= जो आपली दीप्ति सभोंवती पसरतो; किंवा ज्याचा क्रोध शत्रु उत्पन्न करतात. पान्त पत् किंवा पद् पासून झाला असें यास्क व दुर्ग मानतात. पण पा रक्षण करणें ह्यापासून वर्तमानकालीन विशेषण पान् = रक्षण करणारा. पान् पान्तौ पान्तः। पान्तं वगैरे. आ ते दक्षं मयोभुवं वन्हिमद्या वृणीमहे। पान्तमा पुरुस्पृहं ( ९।६५।२८ ) = हे सोम, तुजपाशीं ( ते ) बलवान् ( दक्षं ), सुख देणारा ( मयोभुवं ), सर्व बाजूंनीं ( आ ) रक्षण करणारा ( पान्तं ), व सर्वांना आवडणारा ( पुरुस्पृहं ) असा नेता ( वन्हि ) मुलगा आम्ही मागतों. पान्तम् + आ = आपान्तं = सर्व बाजूंनीं रक्षण करणाऱ्याला. मन्यु शब्दाचा बहुतेक ठिकाणीं अर्थ (१) बल; (२) कांहीं ठिकाणीं क्रोध; ( ३ ) सोम बल देतो म्हणून मन्यु म्हणजे सोम; ( ४ ) व बलानें धन मिळतें म्हणून धन. आपान्तः मन्युः सोमः येन सः = जो सोम पितो तो. मन्युषाविणं ( ८।३२।२१ ) = मन्यु म्हणजे सोम; त्याचा जो रस काढतो ( साविनं ) त्याच्याकडे. ९।९८।८ त पान्तः सोमः, १।१२२।१ त पान्तं० अन्धो यज्ञं, व १०।८८।१ त हविः पान्तं, ह्या तीनही उदाहरणांत पान्त म्हणजे पिण्यास योग्य. पा पासून पानीय ( पिण्याजोगा ) ह्याअर्थी पान्त शब्द कसा झाला तें सांगतां येत नाहीं. पान्त पा पासून झाला कीं दुसऱ्या कोणत्या धातूपासून झाला हेंही ठरवितां येत नाहीं. आपान्तः मन्युः येन सः = जो सोम पितो तो. पान्त ह्याचा नक्की अर्थ ठरविल्याशिवाय आपान्तमन्युः ह्याचा खरा अर्थ ठरवितां येत नाहीं.

**तृप्रप्रहारी**

तृपलप्रभर्मा = तृप्रप्रहारी. तृपल = तृप् + अ + ल = तृप् + ल = तृप् + र= तृप्र. प्र + भर्मा = प्र + हर्मा. हर्मा = हारी. महाराष्ट्रपाठांत क्षिप्रप्रहारी सृप्रप्रहारी असे ज्यास्त शब्द आहेत. दुर्गाच्या वृत्तींत तृप्रप्रहारी तप्तप्रहारी क्षिप्रप्रहारी वा असें आहे. तृप्रप्रहारी = तप्तप्रहारी = तापलेल्या शस्त्रांनीं किंवा अस्त्रांनीं प्रहार करणारा. किंवा तृप्र = क्षिप्र त्वरेनें, जलद, प्रहार करणारा. दुर्गप्रतींत तप्तप्रहारी क्षिप्रप्रहारी वा असे शब्द होते कीं ते विवरणासाठीं त्यानें वृत्तींत घातले हें सांगतां येत नाहीं. बहुतकरून विवरणासाठीं त्यानें ते घातले असावेत. महाराष्ट्रपाठांत सृप्रप्रहारी ही आणखी एक व्युत्पत्ति किंवा अर्थ दिला आहे. तृप्र = सृप्र = सरपटणारें ( अस्त्र ). अस्त्रानें, अस्त्र टाकून मारणारा. तृप्र ह्यांतील तृ च्या जागीं स् घालून सृप्र. प्र हंसासस्तृपलं मन्युमच्छामादस्तं वृषगणा अयासुः ( ९।९७।८ ) = हंसासारखे जलद जाणारे ( हंसासः ). बैलांचे संघ म्हणजे बैलासारखा दांडगा असा मरुद्गण घराकडे ( अस्तं ) म्हणजे पिण्याला योग्य ( तृपलं ) अशा सोमाकडे ( मन्युम् अच्छ ) वेगानें ( प्र ) गेला ( अयासुः ). तृप् = पिणें. तृप् + अलं = पिण्याला योग्य, मधुर. भृ + मन् = भर्मन्. भृ = हृ = हरण करणें. वेगानें ( प्र ) हरण करणारा ( भर्मा ). तृपलं पेयं सोमं प्र हरते असौ तृपलप्रभर्मा असा अर्थ असेल. तृपल शब्द ऋग्वेदांत दोनदांच आला आहे.

**सोमः वा इन्द्रः वा**

असा कोण ? तर सोम किंवा इंद्र. यास्क व दुर्ग ह्यांनीं पहिल्या दोन पदांचा जो अर्थ केला आहे त्यानें सोम किंवा इंद्र असें म्हणतां येईल. पण मी केलेल्या अर्थाप्रमाणें इंद्रच; कारण इंद्र सोम पितो व त्यानेंच सोमहरण केलें. तिसऱ्या पादांत सोमः शब्द आल्यानें यास्कास सोमो वा इन्द्रो वा असें म्हणावें लागलें व पहिल्या दोन पदांचा भलता अर्थ करावा लागला.

**धुनिः धूनोतेः**

धू कापविणें. धुनिः = शत्रूंना चळचळ कांपविणारा. धुञ् धूञ् कम्पने ( धा० ५।९ ). धुनयन्त सिन्धवः ( २।२८।४ ) = नद्या वेगानें वाहूं लागल्या. ह्या उदाहरणावरून धु वाहणें, जोरानें, वेगानें जाणें असा धातु असावा. वं धुनिरिन्द्रधुनिमर्तीर्ऋणोरपः ( १।१७४।९ ) = हे इंद्रा, तूं स्वतः जोरानें धावणारा ( धुनिः ) असून जोरानें धावणारें ( धुनिमतीः ) पाणी ( अपः ) वाहावयाला लावलेंस. धुनिः = जोरानें धांवणारा.

**शिमी ( निघण्टु २।१।२४ ) इति कर्मनाम । शमयतेः वा । शक्नोतेः वा**

शिमी = कर्म. कर्माला शिमी म्हणण्याचें कारण शम् शांत होणें; शमय् = शांत करणें. जें अनिष्ट शमवितें तें शिमी. किंवा शक् पासून. शक् = शिम्. शिम् + ई = शिमी. ज्यानें अनिष्ट घालवूं शकतो असें कर्म. शिमीची व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत

नाहीं. शिमी म्हणजे अद्भुतकर्म. शिमीवान् = अद्भुत कर्म करणारा. शरुमान् शब्दाचें विवरण यास्क कां देत नाहीं तें कळत नाहीं. शरुमान् = हिंसावान् = नाश करणारा ( दुर्ग ). शॄ हिंसायां ( धा० ९.१६ ) ह्यापासून. शरु म्हणजे बाण, भाला अशासारखें अस्त्र. आरे सा२:३ मरु२:० शरुः ( १।१७२।२ ) = हे मरुतांनो, तुमची ती शरु आमच्यापासून दूर असो.

**ऋजीषी सोमः यत् सोमस्य पूयमानस्य अतिरिच्यते तत् ऋजीषम्**

सोम हा ऋजीषी. कारण

सोमरस शुद्ध होऊन जो भाग शिल्लक राहतो तो ऋजीष. त्या भागाला ऋजीष म्हणण्याचें कारण,

**अपार्जितं भवति**

तो भाग टाकला जातो अप + अर्ज् = टाकून देणें. अर्ज्पासून ऋजीष. अर्ज् संपादन करणें. अप + अर्ज् = संपादन न करणें, न ठेवणें, टाकणें.

**तेन ऋजीषी सोमः**

ऋजीष म्हणजे चोथा; त्यानें सोम युक्त असतो, म्हणून तो ऋजीषी.

**अथापि ऐन्द्रः निगम भवति । ऋजीषी वज्री (५।४०।४) इति । हर्योः अस्य स भागः धानाः च इति**

जींत इंद्राला ऋजीषी म्हटलें आहे अशी ऋचा आहे (म्हणून इंद्रही ऋजीषी). ऋजीषयुक्त, वज्रयुक्त इंद्र, अशी ती ऋचा. ऋजीष व चणे ( धाना ) हा त्याच्या घोड्यांचा वाटा किंवा खाणें.

**धानाः भ्राष्ट्रे हिताः भवन्ति ।**

भाजण्याकरितां चणे मातीच्या तव्यावर किंवा परळावर ( भ्राष्ट्रे ) ठेवतात. म्हणजे धा ठेवणें ह्यापासून धानाः किंवा

**फले हिताः भवन्ति इति वा**

तव्यावरून काढल्यावर ते निवडण्याकरितां फळीवर ठेवतात. धातु तोच. दुर्ग ह्यापुढें म्हणतोः— अथवा खले हिता भवन्ति = ते खळ्यांत ठेवले जातात. फले बद्दल खले असा पाठ एखाद्या पोथींत दुर्गास सांपडला असेल किंवा खले हिता भवन्ति इति वा असें ज्यास्त विवरण एखाद्या पोथींत असेल. कोणतेंही विवरण असो, धा हा धातु. धाचें हित हें भूतभूतकालीन विशेषण.

**बब्धां ते हरी धानाः उप ऋजीषं जिघ्रताम् ( प्रैष ६६ ) इत्यपि निगमः भवति**

ऋजीष ज्यांत आहे असें वेदवचनही आहे. प्रैष म्हणजे आज्ञा. हे प्रैष ऋग्वेदांतील शब्द एकत्र करून रचलेले असतात. पण बहुतेक भाषा अर्वाचीन असते. हारियोजन नांवाचें कर्म चालू असतां मैत्रावरुण नांवाचा एक ऋत्विज होत्याला विशिष्ट मंत्र म्हण म्हणून सांगतो. त्या प्रैषांपैकीं बब्धां वगैरे उतारा घेतला आहे. हे इंद्रा तुझे ( ते ) घोडे ( हरी ) चणे ( धानाः ) खावोत ( बब्धां ) व सोमाचा

चोथा (ऋजीषं) हुंगोन (उप जिघ्रतां) किंवा नघळोत. वेदांचा आधार असल्यामुळें हे प्रैष वेदतुल्य किंवा वेदवचनें असे समजले जातात. इंद्राचे घोडे ऋजीष खातात म्हणून ऋजीषी; व लक्षितलक्षणेनें त्यांचा धनीही ऋजीषी; अशी युक्ति यास्कानें लढविली आहे.

**आदिना अभ्यासेन उपहितेन उपधाम् आदत्ते बभस्तिः अत्तिकर्मा**

भस् भक्षणें (अत्तिकर्मा) हा धातु. त्याच्या आरंभींच्या व्यंजनाचा अभ्यास म्हणजे द्विरुक्ति करून अभ्यासानें उत्पन्न झालेलें ब हें व्यंजन भस् ह्याला आधीं जोडावयाचें; तसें केल्यानें बभस् अस्तित्वांत येतें. बभस् ह्याला तां प्रत्यय लावण्याच्या वेळीं घसिभसोर्हलि च (पा० ६।४।१००) ह्या सूत्रानें बभस् ह्यांतील स्च्या आधींचा जो अ तो लुप्त होतो. उपधाम् आदत्ते = उपान्त्य अक्षर घेतो म्हणजे नाहींसें करतो. बभ् + स् + तां. नंतर तां चें धां, भ् चा ब्, व स् चा लोप झाल्यावर बब् + धां = बब्धां असें रूप सिद्ध होतें. आदिना वगैरे भाषा स्पष्ट नाहीं. अभ्यासेन आदिना उपहितेन = अभ्यासम् आदौ उपधाय बभस्तिः भस् धातुः उपधाम् उपान्त्यम् अकारम् आदत्ते लुम्पति, असा अर्थ आहे.

**सोमः सर्वाणि अतसानि वनानि। न अर्वाक् इन्द्रं प्रतिमानानि दभ्नुवन्ति। यैः एनं प्रतिमिमते न एनं तानि दभ्नुवन्ति। अर्वाक् एव एनम् अप्राप्य विनश्यन्ति इति**

विश्वा = विश्वानि = सर्वाणि. अतसा = अतसानि. दभुः = दभ्नुवन्ति. ज्यांच्याशीं (यैः) ह्याला (एनं) देव झुंजावयाला लावतात (प्रतिमिमते) ते शत्रु ह्याला हिंसा करीत नाहींत म्हणजे करूं शकत नाहींत. ऋचेंत इंद्र आधीं आला आहे. त्याचाच अनुवाद एनं ह्यानें केला आहे. खालच्या खालींच (अर्वाक् एव) म्हणजे ह्याला (एनम्) न पोंचतां (अप्राप्य) नष्ट होतात (विनश्यति) असा ऋचेचा अर्थ आहे (इति).

**इन्द्रप्रधाना इति एके। नैघण्टुकं सोमकर्म। उभयप्रधाना इति अपरम्**

ह्या ऋचेंत इंद्र व सोम अशा दोन देवता आहेत; तेव्हां ऋचेची देवता कोण? कांहीं म्हणतात कीं ऋचेची मुख्य देवता इंद्र आहे. पाद १, २ व ४ इंद्रपर असून सोमानें केलेलें कृत्य (सोमकर्म) गौण (नैघण्टुकं) आहे. इंद्र व सोम हे दोन्हीही ऋचेच्या मुख्य देवता होत असें दुसरें मत आहे. ऋचेंतील शब्द इंद्राला व सोमाला— दोघांनाही— लागू पडतात. एके म्हटल्यावर अपरे पाहिजे; किंवा एकं (मतं) अपरं (मतं) असें पाहिजे. पण यास्काची भाषा फारशी सुसंगत नसते. वनानि ह्यानंतर यास्कानें अध्याहृत क्रियापद द्यावयास पाहिजे होतें. यास्क शब्दाला शब्द देतो; ऋचेचा उलगडा तो कधीं करीत नाहीं. ऋजीष म्हणजे सोमाचा चोथा हा अर्थ अर्वाचीन आहे; कदाचित् ह्या शब्दाचा खरा अर्थ न कळल्यामुळें याज्ञिकांनीं तसा अर्थ केला असेल. ऋजीष शब्द अमरांत नाहीं. इंद्र, सोम, मरुत् व ज्या श्येनानें

सोम स्वर्गांतून खालीं आणला त्याला ऋजीषिन् हें विशेषण लावलेलें आढळतें. सोमाच्या चोथ्याशीं मरुत् व श्येन ह्यांना काय करावयाचें होतें. ऋजीष म्हणजे अचाट धैर्य असा अर्थ सर्वत्र लागू पडतो. महावीरं तुविबाधमृजीषं ( १।३२।६ )= मोठा वीर, असंख्य शत्रूंचा नाश करणारा (तुविबाधं) व अचाट धैर्याचा ( ऋजीषं ). एथें इंद्र सोमाचा चोथा असा अर्थ कसा करतां येईल ? ऋज् = जोरानें जाणें. ईष्‌चा तोच अर्थ. ऋज् + ईष् = ऋजीष्. ऋञ्जते ईषते असौ ऋजीषः असा शब्द बनला असेल. नंतर अचाट धैर्य ह्या अर्थीं तो शब्द योजला गेला असेल. इंद्र मूर्तिमंत अचाट धैर्य ( ऋजीषं ). ऋजीषी = अचाट धैर्याचा. जोरानें, साहसानें शत्रूवर चाल करणें हें धैर्याचें मुख्य चिन्ह होय. सोमो विश्वान्यतसा वनानि हे शब्द ऋचेंत असंबद्ध आहेत. मूळ शब्द नाहींसे होऊन हे शब्द सहजगत्या घातले गेले असतील. अतस = अतसानि = वनानि = झाडें, अरण्यें. अतस शब्द अग्निसंबंधानें योजिलेला आढळतो. तं धक्षि अतसं न शुष्कं (४।४।४) = हे अग्नि, वाळलेल्या ( शुष्कं ) लाकडाप्रमाणें ( अतसं न ) त्या शत्रूला जाळ. सोमावर इंद्र, अग्नि वगैरेंच्या गुणांचा व कृत्यांचा अध्यारोप केलेला आढळतो. एथें अग्नीप्रमाणें सोम लांकडें, अरण्यें जाळतो असें म्हटलें आहे. हा पाद प्रक्षिप्त वाटतो. बाकीचे ३ पाद इंद्रपरच आहेत. ३ ऱ्या पादामुळें कोणती देवता प्रधान हा प्रश्न उत्पन्न झाला. दुर्ग ३ ऱ्या पादाचा पुढीलप्रमाणें अर्थ करतो :—अशा गुणांनीं युक्त सोम अतसानि म्हणजे ज्यांचा कधीं क्षय होत नाहीं असें जल ( वनानि ) किंवा वनस्पति ह्यांना आपल्या महिम्यानें व्यापून टाकतो. एथें सोम गौण आहे. सर्व ऋचा इंद्रपरच असे जे म्हणतात त्यांचें मत मान्य केल्यास ३ ऱ्या पदाचा अर्थ असाः—जसा ( इव अध्याहृत ) सोम जल किंवा वनस्पति व्यापून टाकतो तसा इंद्र सर्व जग व्यापून टाकतो. उभयप्रधान असेल तेव्हांः—जो सोम जल व वनस्पती व्यापून टाकतो तो व इंद्र आमचें कल्याण करोत. प्रतिमानानि = शत्रु. प्र साक्षते प्रतिमानानि भूरि ( १०।१२०।६ ) = असंख्य ( भूरि ) शत्रूंचा ( प्रतिमानानि ) इंद्र जोरानें (प्र) पराभव करतो ( साक्षते ). न अर्वाक् इंद्र प्रतिमानानि देभुः= पृथिवीवर असलेले ( अर्वाक् ) शत्रु इंद्राला त्रास देऊं शकत नाहींत. कारण इंद्र फार पराक्रमी आहे. त्याच्या गुणांचें वर्णन पहिल्या अर्धांत केलें आहे. ह्या ऋचेचा उद्दिष्ट अर्थः—ज्याच्यापाशीं अतिशय धन आहे असा दाता पुष्कळ धन देतो. आपान्तमन्युः = तृपलाप्रभर्मा = धुनिः = शिमीवान् = शरुमान् = ऋजीषी = सोमः =देभुः = अतिधनवान्. विश्वानि = अतसानि = वनानि = अर्वाक् = इन्द्रं = प्रति = मानानि = पुष्कळ ( धन ). न = धन. ददाति अशासारखें क्रियापद अध्याहृत आहे.

**श्मशा (४६) आशु अश्नुत इति वा**

श्मशा = शु + अशा. शु = आशु = जलद. अशा = अश्नुते. जलद = जमीन व्यापून टाकणारी नदी किंवा कालवा. किंवा

**श्म अश्नुते इति वा**

श्मशा = श्म + शा. शा = अशा = अश्नुते. श्म म्हणजे शरीर व्यापून टाकणारी नाडी.

**अत्र श्मशा रुधद्वाः (१०।१०५।१)। अवारुधत् श्मशाः वार् इति**

अव + रुधत् = अवारुधत्. कदा वसो स्तोत्रं हर्यत आव श्मशा रुधद्वाः। दीर्घं सुतं वाताप्याय (१०।१०५।१) = हे धनवान् (वसो) इंद्रा, कालवा किंवा नदी (श्मशा) पाण्याला (वार्), किंवा शरीरांतील नाडी शरीरांतल्या रसाला (वार्) अडवून धरते त्याप्रमाणें कामना पूर्ण होण्याची इच्छा करणाऱ्या (हर्यतः) ह्या यजमानासाठीं म्हटलेलें हें स्तोत्र तुला केव्हां अडवून धरील ! वाताप्य म्हणजे पाणी; तें मिळावें म्हणून दीर्घसत्ररूपी असें हें स्तोत्र आहे. असा दुर्ग अर्थ करतो. पण सायणाचार्य पुढीलप्रमाणें अर्थ करतातः—हे धनवान् इंद्रा, कालवा जसा पाणी अडवितो व भलतीकडे जाऊं देत नाहीं तसें आमचें हें स्तोत्र स्तुतिप्रिय (हर्यते = हर्यतं) अशा तुला केव्हां अडवील व भलतीकडे जाऊं देणार नाहीं (वाः=वारयिष्यति)! कशाकरितां अडवावयाचें व भलतीकडे जाण्यापासून परावृत्त करावयाचें ? दीर्घसत्रांतला सोम तूं प्यावा म्हणून ! सोम प्यायल्यानें काय होईल? पाणी मिळेल (वाताप्याय). वाः = वारयिष्यति. पदपाठाप्रमाणें सायण हर्यते पद घेतो; पण दुर्ग हर्यतः असें पद मानतो. हे वसो स्तोत्रं म आ हर्यते तुभ्यं वाताप्याय श्मशा सुतं वाः दीर्घं कदा अव रुधत्. पुरूणि अस्मै सवनानि हर्यते इन्द्राय सोमा हरयो दधन्विरे (१०।९६।६) सवनांवर प्रेम करणाऱ्या इंद्राकडे सोम धावतात. त्याप्रमाणें हर्यते हें तुभ्यं अध्याहृत ह्याचें विशेषण असावें. वाताप्यं हें सोम (१।१२१।८), रवि (९।९३।५), व महित्व (१०।२६।२) ह्यांचें विशेषण आहे. त्याचा पाणी हा अर्थ नाहीं. इष्ट असा अर्थ असावा. तेव्हां वाताप्याय हें राये अध्याहृत ह्याचें विशेषण केल्यास चालेल. हे धनवान् इंद्रा, धन मिळावें म्हणून (वाताप्याय) स्तोत्रावर प्रेम करणाऱ्या तुला श्मशा हा दीर्घ कालपर्यंत सोमरस (सुतं वाः) केव्हां अर्पण करील ! पातवे वाः (१।११६।२२), दुहे यदेनी दिव्यं घृतं वाः (१०।१२।३), ईरते घृतं वाः (१०।९९।४) अशा तीन ठिकाणींच वाः शब्द आला आहे व तीनही ठिकाणीं त्याचा अर्थ पाणी असा आहे. रुधत् व श्मशा ह्यांचा अर्थ ठरवितां येत नाहीं मूळ श्मशन् व श्मशा त्याचें प्रथमैकवचन असा मी तर्क केला आहे. श्मशा = स्तोता (?). खरा अर्थ कळणें अशक्य आहे.

## खंड १३ वा

**उर्वशी (४७) अप्सराः। उरु अभ्यश्नुते। उरुभ्याम् अश्नुते। उरु अस्याः वशः**

उर्वशी ही एक अप्सरा होती. ह्या अप्सरेला उर्वशी म्हणण्याचें कारण उर्वशी = उरु + अशी. उरु = महत् यशः. अशी = अभि + अश्नुते. तिचें यश फार विस्तृत होतें. अथवा उरु = ऊरूभ्यां = मांड्यांनीं. अशी = अश्नुते = उपभोग घेते. ती मांड्यांनीं मैथुनोपभोग घेते. उर्वशी = उर् + वशी. उर् = उरुः वशी वशः कामः विद्यते अस्याः तिची कामवासना जब्बर होती. अप्सरस् शब्द कसा झाला ?

**अप्साः अप्सारिणी अप्सः इति रूपनाम (निघण्टु ३।७।६)। अप्सानीयं भवति। आदर्शनीयम्। व्यापनीयं वा**

अप्साः= अप् + साः. साः =सार् = सारिणी. ती नेहमीं पाण्याकडे सरते म्हणजे जाते; कारण तिचा जन्म पाण्यापासून. किंवा अप् = अद्भ्यः. साः= सार् = सृता. ती पाण्यापासून निघाली म्हणजे जन्मास आली. अप्सृता अशी व्युत्पत्ति दुर्गानें घेतलेल्या निरुक्ताच्या पोथींत होती कीं काय ? अथवा रूपाला अप्स म्हणतात. कारण अप्सः = अ + प्सः = प्सानीयं. प्सा भक्षणें ( २।४५ ). प्सा धातु ऋग्वेदांत नाहीं. अप्सानीयं = रूप कांहीं खावयाचें नाहीं. तर मग ? तें सर्व बाजूंनीं ( आ ) पाहण्याजोगें असतें. अप्सः = अप् + सः. अप् = आप् = वि + आप्. सः = अनीयं. डोळ्यांतून जीं किरणें बाहेर पडून वस्तु व्यापतात त्यांनीं रूप व्यापलें जातें. डोळ्यांतले किरण जर रूपावर न पडतील तर रूप दिसेल कसें ?

**स्पष्टं दर्शनाय इति शाकपूणिः**

अप्सः= अ + प्सः. प्सः= प् + स् + अः= स् + प् + अः= स्पः= स्पष्टं. रूप पाहण्याला स्पष्ट असतें. पण 'अ' ची काय वाट ! मागील वा व स्पष्टं ही एकत्र लिहिल्यास वास्पष्टं असें होतें. वास्पष्टं = वा + आस्पष्टं. आस्पष्टं = आ + स्पष्टं. अप्सः ह्यांतील अ = आ. आस्पष्टं = सर्व बाजूंनीं पाहण्याला स्पष्ट. किंवा अस्पष्टं दर्शनाय = रूप इतकें झळझळीत, दैदीप्यमान असतें कीं, तें स्पष्ट दिसत नाहीं, जसें सूर्याचें तेज.

**यदप्सः इति अभक्षस्य**

वर जी अप्सानीयं अशी व्युत्पत्ति दिली तिला वैदिक आधार आहे. यदेनश्चकृमा वयं यदप्सश्चकृमा वयं ( मैत्रायणी संहिता १।१०।२ ॥ काठकसंहिता ९।४ ) = जें आम्हीं पाप केलें असेल. अप्सः = एनः = पाप. वरुणप्रघास नांवाचें कर्म केल्यानें सर्व पाप नाहींसें होतें. अप्सः म्हणजे अभक्ष्यभक्षणापासून झालेलें पाप ह्याचें हें उदाहरण. परंतु अप्सस् व एनस् हे एकार्थी शब्द आहेत. यत् ग्रामे यदरण्ये यत्सभायां यदिन्द्रिये असा प्रथमार्ध आहे. ग्रामांत, अरण्यांत, सभेंत, किंवा जननेंद्रियानें जें पाप असा त्याचा अर्थ. एथें अभक्ष्यभक्षणवाचक शब्द कोठें आहे !

**अप्सो नाम इति व्यापिनः**

वर व्यापनीयं वा अशी अप्ससूची दुसरी व्युत्पत्ति दिली तिला आधार पृथिव्याः पुरीषमसि यदप्सो नाम ( मैत्रा० सं० २।८।१ ). अग्निचितींतल्या दुसऱ्या चितींत अश्विनी नांवाच्या विटा ठेवावयाच्या असतात; पहिली वीट ठेवण्याच्या वेळीं वरील मंत्र म्हणावयाचा असतो. हे इष्टके, तूं पृथिवीचें पुरीष आहेस; ह्या पुरीषाचें नांव अप्सस्. पुरीष म्हणजे पूरक. अप्सस् व पुरीष एकच. पुरीष पूरक त्याप्रमाणें अप्सस् ही पूरक म्हणजे व्यापक. हें व्यापीचें ( व्यापनीयं ) उदाहरण. पुरीष व अप्सस् हे दोन्हीही कठीण शब्द आहेत. पुरीष ह्याचा ग्राम्य अर्थ आहे कीं काय असा संशय

येतो. अपः सनोति अप्सः। अपां गुणः रसः। अप्सः रसः असें उवट ( यजुः सं० १७।४ ) म्हणतो.

**तद्राः भवति रूपवती। तत् अनया आत्तम् इति वा। तत् अस्यै दत्तम् इति वा**

तत् + राः. तत् = अप्सः = रूप. राः० वती. अप्सः + राः = रूप + वती. रा हा मत्वर्थी प्रत्यय. किंवा अप्सरा रूपवती असते. भवति शब्द प्रक्षिप्त असावा; कारण तद्राः ह्याचा अर्थ रूपवती असा आहे. भवति शब्दाकरितां अप्सराः शब्द अध्याहृत घ्यावा लागतो. किंवा तत् म्हणजे रूप, अनया म्हणजे हिनें ( उर्वशीनें किंवा अप्सरेनें ), आत्तं म्हणजे घेतलें. तिनें रूप घेतलें, धारण केलें म्हणून ती अप्सरा. रा देणें. रा + तं = रातं. राः = रातं = ( आ ) + दत्तं = आत्तं. किंवा तिला तें ( रूप ) परमेश्वरानें दिलें. राः = रातं = दत्तं. एथें आ अध्याहृत घ्यावयास नको. ह्या सगळ्या व्युत्पत्ति उर्वशीला लागू. पण रंभा वगैरे दुसऱ्याहि अप्सरा होत्या तेव्हां अप्सरस्‌ची काय व्युत्पत्ति !

**तस्याः दर्शनात् मित्रावरुणयोः रेतः चस्कन्द। तदभिवादिनी एषा ऋक् भवति**

तिला पाहतांच मित्रावरुणांचें रेत स्खलन पावलें. पुढील ऋचा ती ( तत् ) गोष्ट सांगते ( अभिवादिनी ). तिला पाहून अशा अर्थाचे शब्द पुढील ऋचेंत नाहींत.

## खंड १४ वा.

**उतासि मैत्रावरुणो वसिष्ठोर्वश्या ब्रह्मन् मनसोऽधि जातः।**
**द्रप्सं स्कन्नं ब्रह्मणा दैव्येन विश्वे देवा पुष्करे त्वाददन्त ( ७।३३।११ )**
**अपि असि मैत्रावरुणः वसिष्ठ उर्वश्याः ब्रह्मन् मनसः अधि जातः**

उत=अपि.

**द्रप्सं स्कन्नं ब्रह्मणा दैव्येन। द्रप्सः संभृतः प्सानीयः भवति**

द्रप्सः = द्र + प्सः. द्र = संभृतः = सगळें घेतलेलें. संभृत असा शब्द नसून संद्रुत असा शब्द असावा. कारण, संभृत ह्यांतील भृपेक्षां संद्रुत यांतील द्रु हें द्रप्स याला जास्त जवळ आहे. संद्रुत = धावणारें. पुरुषाच्या लिंगांतून स्त्रीच्या योनींत रेत धावतें. प्सः = प्सानीयः. प्स = खाणें. पुरुषरेत स्त्रीयोनि घेते ( संभृतः ) व खाऊन टाकते ( प्सानीयः ), व्युत्पत्तिशास्त्र हें घाणेरडें शास्त्र आहे. द्रप्स म्हणजे सोम. रेताला द्रवशब्द लक्षणेनें लाविला असेल. सोम व रेत दोन्हीं पातळ व इष्ट.

**सर्वे देवाः पुष्करे त्वा अधारयन्त**

विश्वे = सर्वे. अददन्त = अधारयन्त.

**पुष्करं अन्तरिक्षम्। पुष्यति भूतानि**

पुष्कर म्हणजे अंतरिक्ष. अंतरिक्षाला पुष्कर म्हणण्याचें कारण सर्व प्राणिमात्राचें किंवा पंचमहाभूतांचें पोषण अंतरिक्ष करतें. अंतरिक्ष म्हणजे अवकाश; जर अवकाश–ऐसपैस जागा–नसेल तर प्राणी जगतील कसे व पृथिवी, आप वगैरे कोठें राहतील ! अंतरिक्षवाची पुष्कर शब्द पुष् ( पोसणें ) पासून.

**उदकं पुष्करम् । पूजाकरम् ।**

उदकालाही पुष्कर म्हणतात. तसें म्हणण्याचें कारण पुष्करं = पुष् + करं. पुष् = पुज् = पूजा. देवांची पूजा करतांना पाण्याचा सारखा उपयोग होतो.

**पूजयितव्यम्**

पुष् = पूजयितव्यं. पाणी स्वतः पूजनीय आहे. एथें वा पाहिजे. वास्तविक पूजयितव्यं ह्याची जरूर नाहीं. तो शब्द प्रक्षिप्त असावा.

**इदम् अपि इतरत् पुष्करम् एतस्मात् एव**

कमलवाची जो लौकिक शब्द तोही पूज् पासूनच. किंवा

**पुष्करं वपुष्करं वा**

पुष्करं = पुष् + करं. पुष् = व + पुष्. कमलें अंगावर घातल्यानें पुरुष व स्त्रिया वपुष्कर म्हणजे सुंदर दिसतात. कमल हें पुष्प होय. तेव्हां पुष्प कशापासून ? कमलार्थी पुष्कर शब्द ऋग्वेदांत आहे.

**पुष्पं पुष्यतेः**

पुष्प विकसने ( धा० ४।१६ ) ह्यापासून पुष्प. गुर्जरपाठ पुष्यतेः हा हस्तदोष होय. ऋग्वेदांत पुष्कर शब्द ६ वेळां आला असून एके ठिकाणीं त्याचा अर्थ कमल असून बाकीच्या पांच ठिकाणीं त्याचा अर्थ उदक आहे. यास्ककालीं त्याचा अर्थ अंतरिक्ष असाही होता. पुष्करं करिहस्ताग्रे वाद्यभाण्डमुखे जले । व्योम्नि खण्डफले पद्मे तीर्थौषधिविशेषयोः ( अमर ३।३।१८७ ) असे अमरांत पुष्कराचे ८ अर्थ आहेत. जेव्हां पुष्कर म्हणजे अंतरिक्ष तेव्हां पुष्कं वारि राति ददाति. जेव्हां पाणी किंवा कमल तेव्हां पुष्णाति; अशा क्षीरस्वामी व्युत्पत्ति देतो. बृहद्देवता ( ७।७८३-७८९ ) ग्रंथांत पुढीलप्रमाणें कथा आहेः—अदितीचे मुलगे जे मित्र व वरुण ते एका सत्रांत गुंतले असतांना उर्वशी त्यांच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर त्यांचें रेतःस्खलन झालें. तें रेत एका कुंभांत पडलें; त्याच क्षणीं त्या कुंभांतून अगस्त्य व वसिष्ठ जन्मास आले. तें रेत जलीं, स्थलीं व कुंभांत पडलें. स्थलीं पडलेल्या रेतापासून वसिष्ठ, कुंभांतून अगस्त्य व जलांतून एक तेजस्वी मत्स्य जन्मास आला. कोणी एकजण पाणी घेत असतां पाण्यांतल्या कमलांत वसिष्ठ दिसला. अशा नानाप्रकारच्या कथा आहेत. ऋचेचा अर्थः—शिवाय ( उत ) हे ब्राह्मणा ( ब्रह्मन् ) वसिष्ठा, तूं उर्वशीच्या मनांतून जन्मला असून मित्र व वरुण ह्यांचा पुत्र आहेस. देवांच्या केलेल्या ( दैव्येन ) स्तुतीनें ( ब्रह्मणा ) रेत स्खलन पावलें ( चस्कन्द ). सर्व देव तुला पुष्करांत ठेवते झाले. याच्या आधींच्या ऋचेंत विजेपासून ज्योतीरूपानें वर येतांना तुला मित्र व वरुण

पाहते झाले; तो तुझा एक जन्म; अशा स्थितींत असणाऱ्या तुला अगस्त्य लोकांना देता झाला असें म्हटलें आहे. ह्या ऋचेवरून उर्वशी म्हणजे वीज असावी. ह्या विजेला पाहून मित्र व वरुण ह्यांचें रेत स्खलन पावलें व त्या स्खलन पावलेल्या रेतापासून वसिष्ठ जन्मला. एक मानसोत्पत्ति व एक रेतापासून उत्पत्ति ह्या दोन ऋचा घेऊन निरनिराळया कथा रचल्या गेल्या. १० व्या ऋचेंत विजेपासून निघाला एवढेंच म्हटलें आहे; तिच्या मनापासून जन्मला असें म्हटलें नाहीं.

**वयुनं ( ४८ ) वेतेः । कान्तिः वा प्रज्ञा वा**

वी गति-व्याप्ति-प्रजन-कान्ति-असन-खादनेषु ( धा० २।३८ ); वी व्यापणें किंवा प्रकाशणें ह्यापासून वयुन. वयुन = ( १ ) प्रकाश, तेज; ( २ ) प्रज्ञा. वय् ( विणणें ) + उनं = वयनं = विणलेलें, पसरलेलें. विणणें ह्याचे लाक्षणिक अर्थ अनेक होतील. प्रकाश पसरलेला असतो. धन तयार केलेलें असतें. कर्मे तयार केलेलीं असतात. (१) प्रकाश. ह्याचें उदाहरण पुढील खंडांत दिलेली पहिली ऋचा ( २ ) धन. दावने पुरूणि यत्रा वयुनानि भोजना ( ८।४४।७ ); वयुनानि = भोजनानि = धनानि. ( ३ ). कर्मे. अभिपश्यन्ती वयुना जनानां ( ७।४६।४ ). ( ४ ) मार्गदर्शक. वयुनं च वाघतां ( ३।३।४ ). ( ५ ) व्यक्ति. इदं नो अग्ने अध्वरं होतर् वयुनशो यज। चिकित्वान् दैव्यं जनम् ( ६।५२।१२ ) = हे होत्या अग्नि, तूं देवांना ( दैव्यं जनं ) जाणतोस ( चिकित्वान् ) म्हणून हा आमचा हवि ( अध्वरं ) देवांना व्यक्तिशः ( वयुनशः ) दे. (६) वेगवेगळे. अच्छिद्रा गात्रा वयुना कृणोत ( १।१६२। १८ ) = गात्रांना छिद्रें न पाडतां वेगळीं वेगळीं करा. ( ७ ) स्तुति. एवा ते गृत्समदाः शूर मन्मावस्यवो न वयुनानि तक्षुः (२।१९।८ ) = हे शूर इंद्रा, ह्याप्रमाणें ( एवा ) धन इच्छिणाऱ्या ( अवस्यवः ) गृत्समदांनीं विलंब न लावितां ( न ) तुझ्या ( ते ) स्तुति ( मन्म वयुनानि ) तयार केल्या आहेत ( तक्षुः ). याशिवाय आणखीही अर्थ असतील. ( ८ ) वयुनं = विणलेलें वस्त्र. चतुष्कपर्दा युवतिः सुपेशा घृतप्रतीका वयुनानि वस्ते ( १०।११४।३ ) = चार पेडांची वेणी घातलेली, सुरूप ( सुपेशाः ), घृताप्रमाणें पिवळी ( घृतप्रतीका ) युवति वस्त्रें ( वयुनानि ) अंगावर घालीत आहे.

## खंड १५ वा.

**स इत्तमोऽवयुनं ततन्वत्सूर्येण वयुनवच्चकार ( ६।२१।३ )। स तमः अप्रज्ञानं ततन्वत्**

'इत्' निरर्थक निपात म्हणून गाळला आहे. अवयुनं = अविद्यमानं वयुनं प्रज्ञानं यस्मिन् तत् = अप्रज्ञानं = ज्यांत कोणत्याही वस्तूचें स्पष्ट ज्ञान होत नाहीं असें. इंद्र ज्यांत कशाचेंहि ज्ञान होत नाहीं असा अंधकार पसरिता झाला. ततन्वत् म्हणजे नाहींसा करता झाला असा दुर्ग अर्थ करतो.

**स तं सूर्यंग प्रज्ञानवत् चकार**

तो इंद्र त्याला ( सूर्याला ) उगवावयाला लावून त्याच्या साहाय्यानें जग प्रज्ञानयुक्त करतो. जग रात्रीं अस्पष्ट किंवा अज्ञात होतें; तें सूर्य उगवतांच ज्ञात होतें. 'तं' ह्या शब्दानें दुर्गाला अध्याहृत शब्द घेऊन असा अर्थ करावा लागला. मूळ पाठ तत् ( तमः ) असाच असला पाहिजे. यास्कानें एका वाक्याचीं दोन वाक्यें चुकीनें केलीं आहेत. ततन्वत् हें तमः ह्याचें विशेषण आहे. ततन्वत् तमः = पसरलेला अंधकार. वयुन ह्याचा प्रज्ञान हा अर्थ एथें नसून प्रकाश असा अर्थ आहे. ज्यांत प्रकाश नव्हता असा पसरलेला जो अंधकार तो इंद्र सूर्याच्या साहाय्यानें प्रकाशमय करता झाला असा खरा अर्थ आहे. इदमु त्यत्पुरुतमं पुरस्ताज्ज्योतिस्तमसो वयुनावदस्थात् ( ४।५१।१ ) = हें तें उत्तमोत्तम ( पुरुतमं ) प्रकाशयुक्त ( वयुनावत् ) ज्योति ( उषा ) अंधकारांतून ( तमसः ) वर येत आहे ( अस्थात् ). ही ऋचा व प्रस्तुत ऋचा ह्यांचा अर्थ एकच.

**वाजपस्त्यं ( ४९ ) वाजपतनम् । सनेम वाजपस्त्यं ( ९।९८।१२ ) इत्यपि निगमो भवति**

वाजपस्त्यं = वाज + पस्त्यम्. पस्त्यं = प + स् + त् + य् + अम्. प + त् + अम् = पतनम्. वाज = अन्न. सोम आमचें अन्न ( वाज ) आहे अशा समजुतीनें ज्याच्यावर देव झडप घालतात ( पतनं ) तो ( दुर्ग ). जींत वाजपस्त्यं शब्द आला आहे अशी ऋचाही आहे.

**वाजगन्ध्यं ( ५० ) गध्यत्युत्तरपदम् । अश्याम वाजगन्ध्यं ( ९।९८।१२ ) इत्यपि निगमः भवति**

वाजगन्ध्यं ह्यांत उत्तरपद पस्त्यं नसून गध् ग्रहण करणें ह्यापासून उत्पन्न झालेला गन्ध्यं शब्द आहे. 'गध्यत्युत्तरपदं' हें दुर्गवृत्तींत नाहीं. वाजगन्ध्यं शब्द जींत आहे अशी ऋचाही आहे.

**तं सखायः पुरोरुचं यूयं वयं च सूरयः ।**

अश्याम वाजगन्ध्यं सनेम वाजपस्त्यम् ( ९।९८।१२ ) = हे मित्रांनो, हे प्रज्ञ हो ( सूरयः ) ज्याचा प्रकाश पुढें पडला आहे ( पुरोरुचं ) अशा त्या सोमाचा तुम्ही आम्ही उपभोग घेऊं या ( सनेम ), त्याचें आपण भक्षण करूं या ( अश्याम ). तो सोम कसा ? वाजगन्ध्यं = ज्याला पक्वान्नाचा ( वाज ) वास (गन्ध्यं) येत आहे किंवा अन्न ( वाज ) घेणारा ( गन्ध्यं = ग्रहीतारं ) किंवा अन्न ( वाज ) स्वतःशीं मिसळून घेणारा ( गन्ध्यं = संमिश्रयितारं ) असे तीन अर्थ दुर्ग देतो. पहिल्या अर्थाला यास्काचा आधार नाहीं. २ व ३ ह्याला गध्यं गृण्हातेः व गध्यतिः मिश्रीभावकर्मा ह्यांचा आधार आहे. ह्यांचा अर्थ पुढें दिला जाईल. वाजपस्त्यंचा अर्थ वर दिला आहे. ऋचेंत वाजगन्ध्यं नंतर वाजपस्त्यं शब्द आला असतांना निघण्टूंत त्यांची उलटापालट कां केली तें सांगतां येत नाहीं. वाजपस्त्य शब्द ऋग्वेदांत दोनदांच

आला आहे. अजाश्वः पशुपा वाजपस्त्या धियंजिन्वः ( ६।५८।२ ) = बोकड ज्याचे घोडे ( अजाश्वः ), पशूंचें पालन करणारा ( पशुपाः ), धन देणारा ( धियंजिन्वः ) व वाजपस्त्य असा पूषा. पस्त्य हें दोन ठिकाणीं ( ऋ० सं० ४।५५।३, ८।२७।५ ) विशेषण आहे. पस्त्यावत् हें विशेषण सोमाला ( ९।९७।१८ ), स्तोत्याला ( १। १५१।२ ), घरांना ( ४।५४।५ ) लावलें आहे. मरुतांना पस्त्यासदः ( ६।५१।९ ) म्हटलें आहे. सोमरस देवांना अर्पण करण्याऱ्या कांहीं लोकांचें पस्त्य हें नांव आहे ( १।१६४।३०॥६।४९।९॥७।९७।५॥९।६५।२३ ). पस्त्यावत् ह्यांतील पस्त्य ह्याचा घर, आसन असा अर्थ असावा. वाजपस्त्य = धनाचें आगर. सोम आणि वाज ह्यांचा संबंध अनेक ठिकाणीं आला आहे. अभ्यर्ष वाजं, प्र वाजमिन्दुरिष्यति, गच्छन् वाजं सहस्रिणं, वाजं जेषि बृहत्, भरद् वाजं, सम्निर्ओजं, अशीं वाक्यें कितीतरी देतां येतील. गन्ध्य शब्द एथेंच आला आहे. वाजं न गध्यं ( ४।१६।११ ), यो मावते जरित्रे गध्यं वाजं भरति ( ४।१६।१६ ), वाजस्य गध्यस्य सातौ ( ६।१०।६ ) ह्या ठिकाणीं गध्य म्हणजे इष्ट. तोच अर्थ गन्ध्य ह्याचा असेल. वाज म्हणजे धन त्यासारखा किंवा त्यासाठीं गन्ध्य म्हणजे इष्ट.

**गध्यं ( ५१ ) गृण्हातेः । ऋज्रा वाजं न गध्यं युयूषन् ( ४।१६।११ ) इत्यपि निगमः भवति**

ग्रह् घेणें ह्यापासून गध्य. गध्यं = ग + ध् + यं. ग = ग्र. ध् = ह ( णी ) गृ + हणी + यं = ग्रहणीयं. गध्यं जींत आहे अशी ऋचाही आहे. ऋज् ( धावणें ) + रः = ऋज्रः. ऋज्रा = ऋज्रौ = जोरानें दवडणारे (घोडे). वाजं न = धनासारखे. गध्यं = इष्ट. गध्यौ अश्वौ असा अन्वय. कशासारखे गध्य ( इष्ट ) ? धनासारखे. गध्यौ ह्याचें गध्यं हें रूप वाजं शब्दामुळें झालें. युयूषन् = रथाला जोडून. धावणारे घोडे रथाला जुंपून ( तूं जातोस ). ऋज्रा ऋज्रेण ऋजुना मार्गेण वाजं न गध्यं वाजम् इव ग्रहणार्ह भोक्तुम् आभिमुख्येन युयूषन् पुनः पुनः आत्मानं संमिश्रयन् शत्रुभिः (दुर्ग) = सरळ मार्गानें जाणारा व अन्नाप्रमाणें घेण्याला योग्य असा तूं शत्रूंशीं पुन्हां पुन्हा लगट करणारा.

**गध्यतिः ( ५२ ) मिश्रीभावकर्मा । आगधिता परिगधिता (१।१२६।६) इत्यपि निगमः भवति**

गध् = मिसळणें. गध् धातु जींत आहे अशी ऋचाही आहे. आगधिता आगृहीता आमिश्रिताच । परिगधिता परिमिश्रीकृता । बाहुभ्यां मया परिष्वक्ता इत्यर्थः (दुर्ग) = आगधिता म्हणजे सर्व बाजूंनीं घेतलेली, माझ्या शरीराशीं मिसळलेली; परिगधिता म्हणजे सर्व बाजूंनीं मिसळलेली; म्हणजे बाहूंनीं कवटाळलेली. आगधिता परिगधिता या कशीकेव जङ्गहे । ददाति मह्यं यादुरी याशूनां भोज्या शता ( १।१२६।६ ) अशी सबंध ऋचा आहे. आगधिता, परिगधिता, कशीका, जङ्गहे, यादुरी व याशूनां हे शब्द एथेंच आले आहेत. त्यामुळें अर्थ कांहीं तरी करावा लागतो. कवटाळलेली जी

स्त्री मला कवटाळते ( जङ्गहे ) व मला शेकडों मैथुनें ( याशूनां ) देते, असा दुर्ग अर्थ करतो. कशीका म्हणजे विशिष्ट जातीचें मुंगूस. मुंगूस ( स्त्री ) मुंगसाला जशी कवटाळते तशी ( दुर्ग ). सायणाचार्यही तोच अर्थ देतात. पदकार यादुरी व याशूनां अशीं पदें पाडतो; पण या + आदुरी व या + आशूनां अशीं दोन दोन पदें घेण्यास कोणती हरकत ? सर्वतोपरी विनविलेली (आगधिता परिगधिता) जी स्त्री मला शेकडों ( शता ) उत्तम ( भोज्या ) घोडे ( आशूनां ) देते ( ददाति ). कशीका इव = कशीका नांवाच्या उदार स्त्रीप्रमाणें. असाही अर्थ होईल व तो जास्त संभवनीय दिसतो. आदुरी व जङ्गहे ह्यांचा अर्थ मुळींच करतां येत नाहीं. गध् धातुपाठांत नाहीं. गध् घेणें व मिसळणें हे दोन्हीहि अर्थ दुर्ग तीनही ऋचांत लावतो.

**कौरयाणः ( ५३ ) कृतयानः। पाकस्थामा कौरयाणः ( ८।३।२१ ) इत्यपि निगमः भवति**

कौरयाणः = कौर + यानः. कौर = कृत. कौर = क् + औ + र. र = ऋ. क् + ऋ = कृ. औ = त. कौरयाण शब्द जींत आहे अशी ऋचाही आहे. पाकस्थामा एका राजाचें नांव. हें नांव तीनदां ( ८।३।२१,२२,२४ ) आलें आहे. तो दाता होता व स्तोत्यास त्यानें उत्तमोत्तम घोडा दिला. कुरयाणस्य पुत्रः कौरयाणः असा तद्धित असावा. कुरेभ्यः कुरेषु वा यानं गमनं यस्य सः कुरयाणः. कुर शब्द ऋग्वेदांत नाहीं.

**तौरयाणः ( ५४ ) तूर्णयानः। स तौरयाण उप याहि यज्ञम्। मरुद्भिरिन्द्र सखिभिः सजोषाः इत्यपि निगमः भवति**

तौरयाणः = तौर + यानः. तौर = तुर = तूर्ण. जो झटपट शत्रूवर चाल करतो तो. तौरयाण शब्द जींत आहे अशी ऋचाही आहे. ही ऋचा ऋग्वेदांत नाहीं; कशांत आहे तें सांगतां येत नाहीं. हे इंद्रा, त्वरित गमन किंवा शत्रूवर चाल करणारा तूं मरुत् जे तुझे मित्र त्यांना घेऊन आमच्या यज्ञाप्रत ये. दुर्ग पुढीलप्रमाणें पहिला अर्ध देतो. जातं यत्त्वा परि देवा अभूषन् महे भराय पुरुहूत विश्वे। स वावृधान इह पाहि सोमं मरुद्भिरिन्द्र सखिभिः सुतं नः। जातं यत्त्वा इत्यादि ( ३।५१।८ ). दुर्गानें दिलेल्या ऋचेंत ऋग्वेदांतील दुसरा अर्ध पहिला केला आहे व प्रथमार्धांतील वावृधानः, सोमं व सुतं नः ह्यांच्याजागीं अनुक्रमें तौरयाणः, यज्ञं व सजोषाः असे शब्द घातले आहेत. अशा प्रकारची उलटापालट व ऋग्वेदांतील शब्दांच्या जागीं दुसरे शब्द घालणें असा प्रकार अथर्ववेदांत व कोठें कोठें यजुःसंहितांत आढळून येतो. तूर्वयाण हें विशेषण अग्नीला ( १।१७४।३ ) व इंद्राला ( १०।६१।२ ) लावलें आहे. तूर्वयाण = लवकर गमन करणारा. तौरयाण शब्द तूर्वयाण याचेंच रूपांतर असेल.

**अह्रयाणः ( ५५ ) अह्रीतयानः। अनुष्टुया कृणुह्यह्रयाणः ( ४।४।१४ ) इत्यपि निगमः भवति**

अह्रयाणः = अ + ह्र + यानः. ह्र = ह्रीत = लाजलेलें. गमनाबद्दल ज्याला लाज वाटत

नाहीं तो. अह्रयाण शब्द जींत आहे अशी ऋचाही आहे. अनुष्ठुया अनुष्ठानेन कृणुहि कुरु। कर्मणा एतत् संपादय यत् अहं ब्रवीमि (दुर्ग) = अनुष्ठान म्हणजे कर्म; कर्म करून मी जें मागतों तें दे. पण अग्नि कोणतें कर्म करून इच्छा पुरविणार? ऋतून् प्र शासन् वि दधौ अनुष्ठु (१।९५।३) = शास्ता अग्नि ऋतु करता झाला. अनुष्ठु हें क्रियाविशेषण. जसें धृष्णु व आशु ह्यांपासून धृष्णुया व आशुया, तसें अनुष्ठुपासून अनुष्ठुया. या लावून क्रियाविशेषण होतें. अनुष्ठु व अनुष्ठुया ही रूपें एक-एकदांच आलीं आहेत. दोहोंचाही अर्थ तावडतोब असा असेल. अनुष्ठुया कृणुहि = (मी म्हणतों तें) तावडतोब कर. अह्रयाण हें अर्ह् धातूचें वर्तमानकालीन विशेषण असेल. अर्ह्याण =पूज्य. किंवा ह्रय् ह्रास पावणें असा एके काळीं धातु असावा. तो धातु ऋग्वेदांत नाहीं. ह्रय् + आन = ह्रयाण = नाश पावणारा. अ + ह्रयाणः = न नाश पावणारा. अह्रय (न नाश पावणारें) हें विशेषण ऋग्वेदांत अनेकदां आलें आहे. अर्ह्याणं (१।१२।१०) हें इंद्राचें व अह्रयाणा (७।८०।२) उषेचें विशेषण आहे.

**हरयाणः (५६) हरमाणयानः। रजतं हरयाणे (८।२५।२२) इत्यपि निगमः भवति**

हरयाणः = हर + यानः. हर = हरमाण. ज्याचें वाहन सतत चालत असतें असा. हरयाण शब्द जींत आहे अशी ऋचाही आहे. ऋज्रमुक्षण्यायने रजतं हरयाणे। रथं युक्तमसनाम सुषामणि = आम्हांस उक्षण्यायनापासून भरधाव जाणारा घोडा (ऋज्रं), हरयाणापासून रुपें (रजतं) व सुषामन्पासून घोडे जोडलेला रथ मिळाला. उक्षण्यायन, हरयाण, व सुषामन् हे तीन दानशूर राजे असावेत. ज्याचें वाहन नित्य चालत असतें व जो चांगलीं सामें म्हणतो अशा उक्षण्यायनापासून ऋजु मार्गानें जाणारा (ऋज्रं), रुप्याचा (रजतं) व अश्वयुक्त (युक्त) रथ आम्हांस मिळाला असा दुर्ग अर्थ करतो. कौरयाण, तौरयाण, अर्ह्याण व हरयाण ह्यांत यान असल्या-मुळें यान म्हणजे वहान झाला जुळतील असे कौर, तौर, अर्ह व हर ह्यांचे अर्थ करावे लागले. अर्ह्याण यांत यान म्हणजे वाहन नाहीं. बाकीच्या तिहींत यान असेल. यान म्हणजे गमन.

**य आरितः कर्मणिकर्मणि स्थिरः (१।१०१।४)। प्रत्यृतः स्तोमान्**

आरितः (५७) = आ + रितः. आ = प्रति. रितः = ऋतः. आरितः = प्रत्यृतः = कडे गेलेला किंवा जाणारा. कशाकडे? स्तोमान् = स्तोमांकडे. जो इंद्र प्रत्येक याज्ञिक कृत्यांत (कर्मणि कर्मणि) स्तोम म्हणजे स्तुति ऐकण्याकरितां जातो व तेथें थांबून राहतो (स्थिरः). हा शब्द विश्वु आरितः (२।२१।३), पूर्भिदारितः (२।३३।५) व आरितः पूर्भिद् (१०।१११।१०) असा आणखी ३ वेळां आला आहे. अर् = जाणें. आरय् प्रयोजक. आर् + इतः = आरितः (भूतभूतकाळचें विशे-षण) = जावविलेला, बोलाविलेला, लढाई चालू असतांना बोलाविलेला. आरितः हें

चारही ठिकाणीं इंद्राचें विशेषण आहे. ज्याला प्रत्येक यज्ञांत किंवा लढाईंत बोलावितात असा इंद्र व जो शेवटपर्यंत टिकतो ( स्थिरः ).

**व्रन्दी ( ५८ ) व्रन्दतेः मृदूभावकर्मणः**

मृदूभावः = मऊ झाल्याची स्थिति. मृदूभावः कर्म अर्थः यस्य. अमृदु मृदु भवति मृदूभवति. मृदूभाव हें मृदूभूपासून नाम. व्रन्द् = मऊ होणें. ह्यापासून व्रन्दी.

## खंड १६ वा.

**नि यद्वृणक्षि श्वसनस्य मूर्धनि शुष्णस्य चिद्व्रन्दिनो रोरुवद्वना ( ऋ० सं० ( १।५४।५ )**

**निवृणक्षि यत् श्वसनस्य मूर्धनि शब्दकारिणः**

श्वसनस्य = शब्दकारिणः = आवाज करणाऱ्याच्या. ऋग्वेदांत श्वस् = आवाज करणें. पोप्रुथद्भिः, नानदद्भिः व शाश्वसद्भिः हीं विशेषणें मरुतांना लाविलीं आहेत ( १।३०।१६ ). शब्दकारिणः हा अर्थ दिल्यावर श्वसनस्य हा शब्द भाष्यांत नको होता. त्याचा एथें वायु हा अर्थ आहे हें सांगण्यासाठीं तो शब्द घातला असावा.

**शुष्णस्य आदित्यस्य च शोषयितुः। रोरूयमाणः**

शुष्णस्य = शोषयितुः = सर्व रसांचें शोषण करणाऱ्याच्या. तो कोण तर आदित्य. शुष्ण म्हणजे आदित्य हें सांगण्यासाठीं शुष्णस्य भाष्यांत घेतलें आहे. श्वसन म्हणजे वायु व शुष्ण म्हणजे आदित्य; हे दोन भिन्न देव आहेत; ह्यासाठीं ' च ' अध्याहृत. गुर्जरपाठांत ' च ' नाहीं. रोरुवत् = रोरूयमाणः = जोरानें ओरडणारा.

**वनानि इति वा। वधेन इति वा**

वना = वनानि. अथवा वना = वधेन. वन् हिंसा करणें ह्यापासून वना = वननेन = वधेन. सायण भाष्यांत ' वधेन ' बद्दल ' धनानि ' असा पाठ घेतला आहे. यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला अर्थः— हे इंद्रा ज्याअर्थीं ( यत् ) सो सो सो आवाज करणाऱ्या ( श्वसनस्य ) वायूच्या व सर्व रस शोषून घेणाऱ्या ( शुष्णस्य ) आणि कठीण द्रव्यें मऊ करणाऱ्या ( व्रन्दिनः ) अशा आदित्याच्या सुद्धां ( चित् ) डोक्यावर ( मूर्धनि ) गर्जना करीत ( रोरुवत् ) तूं पावसाचें पाणी ( वना ) पाडतोस (निवृणक्षि). जर वना म्हणजे वधेन असा अर्थ घ्यावयाचा असेल तर उदकवाची शब्द अध्याहृत घेतला पाहिजे. मेघाचा वध करून ( वना = वधेन ) तूं ह्या दोघांच्या डोक्यावर पाऊस पाडतोस. वधेनबद्दल धनानि पाठ घेतल्यास मेघाचें धन म्हणजे पाणी असा अर्थ करावा असें सायणाचार्य म्हणतात. खरा अर्थः— हे इंद्रा ज्याअर्थीं गर्जना करणाऱ्या ( श्वसनस्य ) शुष्णाच्या सुद्धां डोक्यावर, स्वतः गर्जना करीत ( रोरुवत् ), तूं पाऊस ( वना ) पाडतोस. शुष्णाशीं लढून इंद्रानें त्याचा नाश केला असें पुष्कळदां वर्णन आलें आहे. इंद्राचे शत्रु हा निबंध मी मुंबईच्या रॉयल् एशि-

आर्टिक् सोसायटीच्या नियतकालिकांत प्रसिद्ध केला आहे; तो पहावा. व्रन्दिनः शब्द एथें व ह्याच्या आधीच्या ऋचेंत ( १।५४।४ ) अशा दोनच ठिकाणीं आला आहे. ४ मध्यें 'मायिनो व्रन्दिनः' असें आहे. दोन्ही शब्द 'शम्बरस्य' ह्याचीं विशेषणें होत.

**अव्रदन्त वीळिता ( २।२४।३ ) इत्यपि निगमः भवति**

व्रद् मऊ करणें हा धातु जींत आला आहे अशी ऋचाही आहे. अश्रथ्नन् दृळ्हा अव्रदन्त वीळिता दृळ्हा = दृढानि = बळकट. वीळिता = वीळितानि = बळकट. श्रथ् = श्लथ् = ढिलें करणें. अव्रदन्त = अश्रथ्नन्. देवांनीं मजबूत किल्ले ढिले केले. व्रद पासून व्रन्दिन् शब्द झाला असल्यास व्रन्दी = ढिले करणारा, उदकरूपी गाईंना जर्जर करणारा असा अर्थ होईल. व्रद् धातूचें अव्रदन्त एवढेंच रूप ऋग्वेदांत आहे.

**वीळयतिः च व्रीडयतिः च संस्तम्भकर्माणौ । पूर्वेण संप्रयुज्येते**

गुर्जरपाठांत ळ व ड च्या बद्दल ल आहे. वीळ् व व्रीड् ह्या धातूंचा अर्थ घट्ट करणें, मजबूत करणें. संस्तम्भ = घट्टपणा, मजबुती. वीळयस्व व वीळयासि अशीं क्रियारूपें, वीळित भूतभूतकाळचें विशेषण, व वीळु हें विशेषण, हीं ऋग्वेदांत आढळतात. वीळ शब्द अनेक वेळां आला आहे. अक्ष वीळो वीळित वीळयस्व ( ३।५३।१९ ) = मजबूत ( वीळो ) मजबूत केलेल्या ( वीळित ) हे रथाच्या आसा ( अक्ष ) मजबूत हो ( वीळयस्व ). व्रीड् ह्याचें कसलेंही रूप ऋग्वेदांत नाहीं. हे दोन धातु पूर्वी सांगितलेल्या शब्दाशीं म्हणजे व्रन्दी शब्दाशीं युक्त असे आढळतात. असा कदाचित् अर्थ असेल. पण व्रन्दिनः शब्द दोनदांच आला आहे व तेथें ह्या दोहोंपैकीं एकही धातु नाहीं. वरीलप्रमाणें दुर्ग अर्थ करतो. पूर्वेण संप्रयुज्येते हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत; पण त्यांचा अर्थ तो देतो.

**निष्षपी ( ५६ ) स्त्रीकामः भवति । विनिर्गतपसाः**

स्त्रीलंपटाला निष्षपी म्हणतात. तसें म्हणण्याचें कारण निष्षपी = निः + सपी. निः = विनिर्गत. सपी स् + अ + प् + ई = प् + अ + स् + ई = पसाः ज्याचें लिंग ( मैथुनाकरितां नेहमी ) बाहेर आलेलें असतें असा पुरुष. ज्याची कामवासना कधीं तृप्त होत नाहीं असा.

**पसः सपतेः स्पृशतिकर्मणः**

सप् स्पर्श करणें ह्यापासून पसस्. कारण पुरुषलिंग स्त्रीयोनीला स्पर्श करतें. स्पर्श करणें ह्या अर्थीं धातुपाठांत नसून सप समवाये ( धा० १।४०१ ) ह्याअर्थी आहे. लिंग योनीशीं समवेत होतें. गुर्जरपाठ स्पसः स्पसतेः किंवा स्पशतेः असा आहे व दुर्गवृत्तीच्या कांहीं पोथ्यांतही तो पाठ आहे. पण हा पाठ चुकीचा आहे. पसि नाशने ( धा० १०।८३ ) ह्यापासून पसस् शब्द कां नाहीं ! लिंग योनीचा नाश करते म्हणजे योनीला दुखवितें. हें व्युत्पत्तिशास्त्र म्हणजे चारगटपणाच होय.

**मा नो मघेव निष्षपी परा दाः ( १।१०४।५ )। स यथा धनानि विनाशयति मा मस्त्वं तथा परादाः**

कामासक्त मनुष्य ( निष्षपी ) जसा पैसा घालवितो तसा तूं आमचा नाश करूं नको. मघा = मघानि = धनानि. परा + दा = नाश करणें. परा + दा ह्याचे (१) दुसऱ्याच्या ताब्यांत देणें, ( २ ) ज्याचा माल त्यास देणें, (३) विकणें, व (४) नाश करणें असे अर्थ आहेत. एथें नाश करणें असा अर्थ असावा. निष्षपी = निः + सपी. सपते असौ सपी. निः + सपी = जो पार ( निः ) देऊन टाकतो तो, उधळ्या. जसा उधळ्या संपत्तीचा नायनाट करतो तसा आमचा नायनाट करूं नको असा अर्थ असेल.

**तूर्णाशं ( ६० ) उदकं भवति। तूर्णम् अश्नुते। तूर्णाशं न गिरेरधि ( ८।३२।४ ) इत्यपि निगमः भवति**

तूर्णाशं = उदकम्. उदकाला तूर्णाश म्हणावयाचें कारण तूर्णाशं = तूर्ण + अशं. तूर्ण = तूर्णम्. अशं = अश्नुते = व्याप्नोति. पाणी जमिनीवर पसरतें. तू + णशं तू = त्वरित. णाशं = नश्यति. पाणी जमिनींत ताबडतोब मुरतें किंवा पाण्याची वाफ होते. अशीही व्युत्पत्ति होईल. पाहिजे ती व्युत्पत्ति चालेल. तूर्णाशं वगैरे ऋचाही आहे. प्रतिश्रुताय वो धृषत्तूर्णाशं न गिरेरधि। हुवे सुशिप्रमूतये ( ८।३२।४ ) = वः युष्माकं श्रुताय ऊतये सुशिप्रम् इन्द्रं प्रति हुवे। कथम्। गिरेः अधि तूर्णाशं न इव। धृषत् धैर्येण. श्रुताय = ऊतये = कल्याणासाठीं. सुशिप्रं = ज्याच्या डोकीवर मुकूट किंवा शिरस्त्राण आहे अशाला. गिरेः अधि = पर्वतांतून. धृषत् हें बहुतेक ठिकाणीं क्रियाविशेषण असतें. तूर्णाशं, (?) मेघापासून ( गिरेः अधि ) जसे लोक पाण्याला आव्हान करतात तसा इंद्राला मी बोलावितों, असा दुर्ग अर्थ करतो.

**क्षुम्पम् ( ६१ ) अहिच्छत्रकं भवति। यत् क्षुभ्यते**

क्षुम्पं = अहिच्छत्रकं = छत्री, कुत्र्याचें मूत. कुत्र्याच्या मुतास क्षुम्प म्हणण्याचें कारण ज्याअर्थीं स्पर्श झाल्याबरोबर तें गदगदां हलतें किंवा त्याचा चूर होतो म्हणजे क्षुभ संचलने ( धा. ४।१३३ ) पासून क्षुम्प.

**कदा मर्तमराधसं पदा क्षुम्पमिवास्फुरत्।**

कदा नः शुश्रवद्गिर इन्द्रो अङ्ग ( १।८४।८ )

**कदा मर्तम् अनाराधयन्तम्**

अराधसं = अनाराधयन्तं = जो ( इंद्राची ) आराधना करीत नाहीं त्याला राध् to propitiate अ + राध् + अस्. अस् = अय्. अ = अन्. राध् + अय = आराधय्. पण राधस् म्हणजे धन. यः राधः आर्येभ्यः न ददाति सः अराधाः = जो आर्यांना धन देत नाहीं तो. अराधसं दोनदां व अराधसः ४ वेळां ऋग्वेदांत आला

आहे. पदा पणीन् अराधसो वि बाधस्व (८।६४।२) = हे इंद्रा जे आम्हांला धन देत नाहींत त्यांना लाथाड. पणीन् न्यक्रमीः अभि विश्वान् राजन् अराधसः (१०।६०।६) = हे राजा धन हे न देणाऱ्या सर्व पणींना पादाक्रांत कर.

**पादेन क्षुम्पम् इव अवस्फुरिष्यति**

पदा = पादेन. अवस्फुरत् = अवस्फुरिष्यति. गुर्जरपाठ अवस्फुरसि किंवा अवस्फुरति आहे. स्फुर् = लाथाडणें. जी लाथ झाडीत नाहीं त्या गाईला अनपस्फुरां (६।४८।११) व अनपस्फुरन्ती (४।४२।१०) असें म्हटलें आहे. क्षुम्प शब्द एथेंच आला आहे. कांहीं तरी क्षुद्र वस्तु असेल.

**कदा नः श्रोष्यति च गिरः इन्द्रः अङ्ग**

शुश्रवत् = श्रोष्यति. गुर्जरपाठ शृणोति. दुर्गाच्या पुढें असलेल्या पोथ्यांत लोकः पादेन क्षुम्पम् इव अवस्फुरसि असा पाठ होता. शृणोति तृतीयपुरुष व स्फुरसि द्वितीयपुरुष ह्यांचा त्याला मेळ घालतां येईना. इंद्रा तूं केव्हां ठार करतोस (स्फुरति) व इंद्र आमच्या स्तुति केव्हां ऐकेल असा अर्थ केला पाहिजे असें तो म्हणतो. पण अवस्फुरिष्यति व श्रोष्यति हेच पाठ बरोबर असावेत असें तो मत देतो व शुद्ध पाठ शोधा म्हणून सांगतो.

**अङ्ग इति क्षिप्रनाम । अञ्चितम् इव । अङ्कितं भवति**

अङ्ग = लवकर, झटकन. जें लवकर करावयाचें असतें तिकडे जणूं काय आपण जातो. अञ्च् जाणें ह्यापासून अङ्ग. किंवा झटकन करण्याच्या वस्तूवर चिन्ह किंवा खूण केली असते. अङ्क् चिन्ह करणें ह्यापासून. अङ्ग शब्दाची व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. अङ्ग = अरे, अहो (अमर ३।४।७) व पुनरर्थे अङ्ग (३।४।२०). यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला ऋचेचा अर्थः—जो त्याची आराधना करीत नाहीं अशा माणसाला कुत्र्याच्या छत्रीप्रमाणें इंद्र पायानें केव्हां कुसकरून टाकील व आमच्या स्तुति केव्हां बरें (अङ्ग) ऐकेल? अराधसं व अवस्फुरत् ह्याचे खरे अर्थ वर दिले आहेत. क्षुम्पचा अर्थ कळणें अशक्य आहे. स्फुर् ह्याला अप लागलेला आढळतो. अव हा अपचा अपभ्रंश असेल.

**निचुम्पुणः (६२) सोमः । निचान्तपृणः । निचमनेन प्रीणाति**

निचुम्पुण = सोम. दुर्गवृत्तींत 'सोमः भवति' असा पाठ आहे. सोमाला निचुम्पुण हें नांव कां? निचुम्पुणः = निचुम् + पुणः. निचुम् = निचान्त. पुणः. = पृणः. जो प्यायला असतां (निचान्तः) संतोष देतो (पृणः) तो. हा व्युत्पत्तीचा सारांश. निचमनेन = पाण्यानें. प्रीणाति = आनंद देतो. चम् व पृ ह्या दोन धातुंपासून निचुम्पुण. 'निचमनेन' हा शब्द दुर्गवृत्तींत नाहीं. यास्क व्युत्पत्तीचा अर्थ देत नाहीं. निचमनेन प्रीणाति हे शब्द प्रक्षिप्त होत.

## खंड १८ वा.

**पत्नीवन्तः सुता इम उशन्तो यन्ति वीतये । अपां जग्मिर्निचुम्पुणः ( ८।९३।२२ ) पत्नीवन्तः सुता इम अद्भिः सोमाः**

अद्भिः व सोमाः हे अध्याहृत. हे सोम पत्नीवान् कशानें ? अद्भिः आप् ह्या त्यांच्या बायका आप् शब्द स्त्रीलिंगी आहे; सोम पुंलिंगी. सोमरस पाण्यांत मिसळतात. हा दोघांचा शरीरसंबंध.

**कामयमानाः यन्ति वीतये पानाय अपां गन्ता निचुम्पुणः**

उशन्तः = कामयमानाः = आपल्याला देव केव्हां पितील अशी इच्छा करणारे. वीतये = पानाय = प्यावें म्हणून. वीतये भाष्यांत घालण्याचें कारण नाहीं. जग्मिः = गन्ता. पाण्यांत मिसळलेले ( पत्नीवन्तः ) व इच्छा करणारे किंवा उतावळे झालेले ( उशन्तः ) हे सोम, इंद्रानें आपणांस प्यावें म्हणून ( वीतये ) घाईनें जात आहेत ( यन्ति ). निचुम्पुण शब्द एथेंच आला आहे. अपां जग्मिर्निचुम्पुणः ह्याचा पूर्वार्धाशीं कांहीं संबंध नाहीं. त्या शब्दांचा कांहींतरी अर्थ करावा लागतो. पाण्याच्या ( अपां ) वीर्यानें युक्त असा सोम ( निचुम्पुणः ) देवांकडे सारखा जातोच जातो ( जग्मिः ). कदाचित् पहिल्या अर्धाचा अन्वयार्थ पुढीलप्रमाणें असेलः— इमे (सोमाः) सुताः । उशन्तः पत्नीवन्तः ( देवाः ) वीतये यन्ति = सोमरस काढला आहे. सोमपानाची इच्छा करणारे किंवा उतावळे झालेले देव बायका घेऊन सोम पिण्याला जातात. सोम ( निचुम्पुणः ) पाण्याकडे (अपां) जातो ( जग्मिः ) असा अर्थ होईल. निचुम्पुण–शब्द एथेंच आला आहे; तथापि निचुम्पुण म्हणजे समुद्र असाही अर्थ आहे असें यास्क म्हणतो. दुर्ग म्हणतो समुद्रार्थीं निचुम्पुणाचे उदाहरण शोधलें पाहिजे. उदाहरण नाहींच तर सांपडणार कोठून ?

**समुद्रः अपि निचुम्पुणः उच्यते । निचमनेन पूर्यते**

समुद्राला सुद्धां निचुम्पुण म्हणतात. कां ? तर निचुम्पुणः = नि + चुम् + पु + णः. चम् + णः = चमनं. नि + चमनं = पाणी. पु = पूर्यते. समुद्र पाण्यानें भरला असतो.

**अवभृथः अपि निचुम्पुणः उच्यते । नीचैः अस्मिन् क्वणन्ति**

अवभृथालाही निचुम्पुण म्हणतात. कां ? तर निचुम्पुणः = निचु + पुणः निचु = नीचैः. पुणः = क्वणन्ति. अवभृथस्नान करतांना खालच्या आवाजानें बोलतात. वरुणप्रघास नांवाची इष्टि व सोमयाग ह्यांत अवभृथस्नान सांगितलें आहे. कात्यायन–श्रौत–सूत्रांत ( तूष्णीमित्याभ्यवेत्य मज्जयति अवभृथेति ५।१४० ) स्नान करतांना गप रहावें असें सांगितलें आहे. ' उपांशु अवभृथेष्ट्या चरन्ति इति श्रुतिः = अवभृथ इष्टींत सर्व कर्म गुपचूप होतें असें वाजसनेयिसंहितेवरील उवट भाष्यांत म्हटलें आहे. मानवश्रौतसूत्रांत ( २।५।४ ) पुटपुटत जप करावा असें सांगितलें आहे. इतर श्रौतसूत्रें मोठ्यानें जप करावा असें म्हणतात. अवाचीनानि पात्राणि जलमध्ये

भ्रियन्ते यस्मिन् यज्ञविशेषे सः अवभृथः = स्नान करीत असतांना कांहीं पात्रें खालीं पाण्यांत धरतात म्हणजे टाकतात म्हणून ह्या स्नानाला अवभृथ म्हणतात. अवभृथ शब्दाची ही व्युत्पत्ति निचुम्पुण शब्दावर लादली आहे. ती अशी

**नीचैः दधति इति वा**

निचु = नीचैः. पुणः = दधति. पात्रें ज्यांत खालीं धरतात तें. नि नितरां चुम्पति गच्छति असौ निचुम्पुणः। चुपि मन्दायां गतौ ( धा० १।४०४ ) अशी महीधर व्युत्पत्ति देतो ( वा० सं० ३।४८ ). पण ८।२७ त निचुम्पुण = नितरां मन्दं गच्छ असें त्याचें क्रियापद बनवितात. अवभृथ निचुम्पुण हे शब्द दोन्ही ठिकाणीं एकच पण अर्थ लहरीप्रमाणें भिन्न !

**अवभृथ निचुम्पुण ( वा० सं० ३।४८।८।२७ ) इत्यपि निगमः भवति**

निचुम्पुण म्हणजे अवभृथ ह्या अर्थी यजुर्वाक्यही आहे. मैत्रायणीसंहिता ( १। ३।३९), काठकसंहिता ( ४।१३ ) व मानवश्रौतसूत्र ( २।५।४।३० ) ह्यांत अवभृथ निचुङ्कुण व तैत्तिरीयसंहिता ( १।४।४५।२ ), तैत्तिरीय ब्राम्हण ( २।६।६।३ ) व आपस्तम्बश्रौतसूत्र ( १३।१९।१० व १९।१०।५ ) ह्यांत अवभृथ निचुङ्कुण असा पाठ आहे. अवभृथाभिमानी जो वरुण त्याला ह्या मंत्रानें संबोधिलें आहे.

**निचुम्पुण निचुङ्कुण इति च**

निचुम्पुण निचुङ्कुण असाही निगम आहे. हें अवतरण सांपडत नाहीं. 'निचुम्पुण' शब्दाच्या ऐवजीं कांहीं संहितांत निचुङ्कुण असा पाठ आहे असें यास्कास म्हणावयाचें होतें कीं काय ? 'निचुङ्कुण' शब्दाची व्युत्पत्ति किंवा विवरण निचुम्पुण शब्दासारखेंच असें दुर्ग म्हणतो. तेव्हां त्याच्या पाठांत निचुम्पुण शब्द नसावा. 'निचुङ्कुणः इति च' असा त्याचा पाठ असावा. यास्कानें भाष्यांत निचुङ्कुण शब्दाचा उल्लेख केला असेल कीं नाहीं हा प्रश्न आहे.

**पदिः ( ६३ ) गन्तुः भवति यत् पद्यते**

जाणाऱ्याचें ( गन्तुः ) नांव पदि. ज्याअर्थीं जाणारा जातो ( पद्यते ). जो जातो तो पदि; पदि म्हणजे पक्षी.

## खंड १९ वा

**सुगुरसत्सुहिरण्यः स्वश्वो बृहदस्मै वय इन्द्रो दधाति ।**
**यस्त्वायन्तं वसुना प्रातरित्वो । मुक्षीजयेव पदिमुत्सिनाति ( १।१२५।२ )**
**सुगुः भवति सुहिरण्यः स्वश्वः । महत् च अस्मै वयः इन्द्रः दधाति**

असत् = भवति. अस् ( होणें ) + अ + ति = असति. शेवटला इ जाऊन असत्. 'सु'वत् ह्या अर्थी. ज्याच्या घरीं गाई, घोडे, सोनें आहेत तो सुगुः इत्यादि. बृहत् = महत् = पुष्कळ. 'च' अध्याहृत. वयः (धन किंवा अन्न) हा शब्द वैदिक आहे. अन्नं असें भाष्यांत पाहिजे. अन्नार्थी वयः शब्द यास्ककालीन भाषेंत होतो कीं काय ?

**यः त्वायन्तम् अन्नेन प्रातरागामिन् अतिथे मुक्षीजयेव पदिमुत्सिनाति कुमारः**

वसुना = अन्नेन = अन्नानें, अन्न देऊन. प्रातरित्वः = प्रातरागामिन् (अतिथे) = हे सकाळीं येणाऱ्या अतिथे. इ + वन् = इत्वन्. प्रातरित्वन्ची संबुद्धि. कुमारः अध्याहृत. पक्ष्याला (पदिं) दोरीनें (मुक्षीजया) जसें (इव) एखादें पोर बांधतें (उत्सिनाति).

**मुक्षीजा मोचनात् च सयनात् च ततनात् च**

मुच् + सी + जा. दोरी पांखराच्या तंगडीवर टाकतात (मोचनात्) व तिनें पांखराला बांधतात (सयनात्) व गांठ गच्च बसावी म्हणून ती दोरी ताणतात (ततनात्). मुच् = मोचनात्. सी = सयनात्, सि बांधणें ह्यापासून. पण जा = ततनात् कसें. ततन हें तन् पासून नाम कसें होईल? ततनात् असा शब्द नसून यास्कानें दुसरा कोणता तरी शब्द घातला असावा जननात् असेल. जननात् असेल काय? जा = जननात्. दोरी जननेंद्रियावर टाकून तिनें पोरगे पांखराला बांधतें. मुक्षीजा, पदिं व उत्सिनाति एथेच आले आहेत. 'मुच्यमाना सती बन्धनं जयतीति मुक्षीजा मृगपक्ष्यादिबन्धनी रज्जुः' अशी सायणाचार्य व्युत्पति करतात. दुर्गानें केलेला अर्थः— त्याला गाई, घोडे, सोनें मिळतें. इंद्र त्याला पुष्कळ अन्न देतो. जो, हे सकाळीं येणाऱ्या अतिथे तुला येतांना (त्वा + आयन्तं) पाहून अन्नानें तुला बांधून टाकतो. (कसा तर) जसा एखादा पोरगा पक्ष्याला दोरीनें बांधतो तसा. विद्या संपादन करून गुरूला दक्षिणा देण्याकरितां राजाकडे सकाळींच ब्रह्मचारी येतो. त्याला राजा इतकें धन देतो कीं त्याचा पाय तेथून हालत नाहीं असा सायणाचार्य अर्थ करतात. दोन्ही अर्थांत फारसा फरक नाहीं. मुक्षीजया हे मुक्षीजा शब्दाचें तृतीयैकवचन मानण्यास काय आधार? मुक्षीजया = मुक्षीजयेन असें कां नसेल? वसुना जसें नपुंसक तसें मुक्षीजय नपुंसक असेल. कोणतेंही रूप असो मुक्षीजया व पदिं ह्यांचा अर्थ ठरविणें बहुतेक अशक्य आहे. सिनाति = बांधतो. उत्सिनाति = मोकळें करतो. जसा कोणी मुक्षीजयानें पदीला मोकळा करतो तसा उदारधी पुरुष धन देऊन (वसुना) कोणाला तरी दारिद्र्यांतून मोकळा करतो. ह्या सूक्तांत एका दानशूराची स्तुति केली आहे. त्याचें नांव प्रातरित्वा. तो सकाळीं धन देतो; अतिथींचें आदरातिथ्य करतो. त्यामुळें त्याची प्रजा व आयुष्य वाढतें व त्याला अतिशय धन मिळतें. (१). त्याचेंच वर्णन प्रस्तुत ऋचेंत चालू आहेसें वाटतें. त्याला गाई घोडे वगैरे मिळतात. इंद्र त्याला पुष्कळ धन देतो. दुसऱ्या अर्धांत प्रातरित्वः ह्या संबोधनानें घोटाळा केला आहे. प्रातरित्वा असें रूप पाहिजे. त्वायन्तं = तुझ्या (म्हणजे इंद्राच्या) भक्ताला. त्वा + आयन्तं असा पदकार पदविभाग करतो. त्वायन्तः, त्वायतः, त्वायता, त्वायद्भ्यः अशीं रूपें ऋग्वेदांत आहेत. पहिल्या अर्धांत इन्द्रः असें तृतीयपुरुषीं रूप आहे. पण दुसऱ्या अर्धांत त्वायन्तं असें पद घेतल्यास तृतीयपुरुष जाऊन द्वितीय पुरुष घ्यावा लागतो. पण असा पुरुषभेद ऋग्वेदांत वारंवार दृष्टीस

पडतो. जो प्रातरित्वा तुझ्या भक्ताला धन देऊन दारिद्र्यांतून मोकळा करतो. कसा? तर मुक्षीजयेव पदिम्. पण हे शब्द नेहमी दुर्बोधच राहणार. प्रातरित्वः हें संबोधन असल्यानें अर्थ बदलावा लागतो. हे सकाळीं येणाऱ्या अतिथे तुला येतांना ( त्वा आयन्तं ) पाहून जो तुला धन देऊन मोकळा करतो. ऋग्वेदांत पद् = पडणें. पदिः पडलेला. तुरुंगांत पडला असेल तर सरकारांत दंड भरून, शत्रूच्या कारागृहांत पडला असेल तर सुटकेकरितां शत्रूला करभार देऊन सुटका करतो. मुक्षीजा = तुरुंगांतून किंवा शत्रूच्या कारागृहांतून सुटका करण्याकरितां दिलेला पैसा असा अर्थ कां नसेल?

**पादुः ( ६४ ) पद्यतेः । आविः स्वः कृणुते गूहते बुसं स पादुरस्य निर्णिजो न मुच्यते (१०।२७।२४) । आविः कुरुते भासम् आदित्यः । गूहते बुसम्**

पद् जाणें ह्यापासून पादु. कृणुते = कुरुते. स्वः = आदित्यः. भासं अध्याहृत. स्वः म्हणजे भासं असा अर्थ यास्क करतो कीं काय कोण जाणें. तसें असल्यास आदित्यः हें अध्याहृत.

**बुसम् इति उदकनाम ( निघण्टुः १।१२।२० ) । ब्रवीतेः शब्दकर्मणः । भ्रंसतेः वा**

बुसं=उदकम्. ब्रू आवाज करणें ह्यापासून बुस. ब्रू व बुस ह्यांत ब व उ (ऊ) हीं अक्षरें समान. पाणी वाहतांना आवाज करतें. किंवा भ्रंस् पडणें ह्यापासून. पाणी मेघांतून पडतें. भ् + र् + अ + स्. भ् = ब्. र् = ऋ = उ. ब् + उ = बु. स् + अ = स. बु + स = बुस. भ्रंशतेः वा ( देवराज ). विपूर्वात् स्नातेः ( देवराज ). वि = बु = बु. स्ना = सा = स. विशेषेण स्नाति अनेन. सगळ्यांत उत्तम स्नान पाण्यानें होतें. देवराजः– ‘ बुस उत्सर्गे ’ (धा० ४।११३). मेघ पाणी सोडतात. ब्रवीतेः शब्दकर्मणः ही व्युत्पत्ति देवराज देत नाहीं.

**यत् वर्षन् पातयति उदकं रश्मिभिः तत् प्रत्यादत्ते**

वर्षाव करून जें पाणी सूर्य पृथिवीवर पाडतो तें किरणांनीं तो परत घेतो. हा ऋचेचा सारांश आहे. दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थः— आदित्य प्रकाश प्रकट करतो व किरणांत पाणी लपवितो. शुद्ध करणाऱ्या ( निर्णिजः ) त्याचें ( अस्य ) तें ( सः ) गमन ( पादुः ) त्याला सुटत नाहीं ( न मुच्यते ). सूर्याला सारखें चालावें लागतें; चालण्यापासून त्याची कधींही मुक्तता होत नाहीं. बुस शब्द एथेंच आला आहे. अंधकार असा अर्थ कां नसेल? इंद्र सूर्य प्रकट करतो व अंधकार लपवितो. ‘ पादुरस्य निर्णिजो न मुच्यते ’ हे शब्द कठीण आहेत. पादुशब्द एथेंच आला आहे. अस्य इन्द्रस्य निर्णिजः घृतरूपवेषस्य पादुः पतनं न मुच्यते न विरमति = इंद्राला घृत हवि नेहमीं मिळतो; तो कधीं थांबत नाहीं. निर्णिज् = स्वच्छ सफेत पोषाख. ‘ प्र वां घृतस्य निर्णिजो ददीरन् ( ७।६४।१ ) = हे मित्रावरुणांनो तुम्हांला घृताचे पोषाख दिले जात आहेत. घृताचा पोषाख म्हणजे घृत हवि.

## खंड २० वा.

**वृकः ( ६५ ) चन्द्रमाः भवति । विवृतज्योतिष्कः वा । विकृतज्योतिष्कः वा । विक्रान्तज्योतिष्कः वा**

वृक म्हणजे चंद्रमा. चंद्राला वृक कां म्हटलें आहे ? वृकः = वृ + कः. वृ = ( वि ) वृ ( त ). कः = ( ज्योतिष् ) कः. चंद्राचें तेज लपलेलें नसून जिकडे तिकडे स्पष्ट ( विवृत ) पसरलेलें असतें. किंवा व् ( इ ) + कृ + ऋ + ( त् ) + अ = व् + ऋ + क् + अ = वृक. चंद्राचें तेज थंड असतें; इतरांच्या सारखें उष्ण नसते. उष्णता हा तेजाचा स्वभाव; थंडपणा ही विकृति. किंवा व् ( इ ) + क् + र् + अ ( अन्त ) = व् + र् + क् + अ = व् + ऋ + क् + अ = वृक. ह्या दोन व्युत्पत्तींतील क ज्योतिष्क-मधून घेण्याची जरूर नाहीं. घेतल्यास विकृत व विक्रान्त ह्यांतील क टाकून द्यावा. अशा अर्थाप्रमाणें व्युत्पत्ति झाल्या.

## खंड २१ वा

**अरुणो मासकृद्वृकः पथा यन्तं ददर्श हि ।**

**उज्जिहीते निचाय्या तष्टेव पृष्ट्यामयी वित्तं मे अस्य रोदसी ( १।१०५।१८ )**

**अरुणः आरोचनः । मासकृत् मासानां च अर्धमासानां च कर्ता भवति चन्द्रमाः वृकः**

अरुणः = अ + रु + नः. अ = आ. रु = रोच. आ + रुच् ( प्रकाशणें ) ह्यापासून अरुण शब्द. मास = मासानां च अर्धमासानां च. कृत् = कर्ता. वृक म्हणजे चंद्र हा महिने व पंधरवडे करतो. अवेस्तांत माह म्हणजे चंद्र. महिना शब्द फारसी आहे.

**पथा यन्तं ददर्श नक्षत्रगणम् । अभिजिहीते निचाय्य येन येन योक्ष्यमाणः भवति चन्द्रमाः**

चंद्र मार्गानें जाणाऱ्याला पहातो. मार्गानें जाणारा कोण ? नक्षत्रसमुदाय. 'नक्षत्र-गणं ' अध्याहृत. ' हि ' निरर्थक म्हणून भाष्यांत घेतला नाहीं. उज्जिहीते = अभिजि-हीते = कडे जातो. ज्या ज्या नक्षत्रांत चंद्रास जावयाचें असतें तें नक्षत्र पाहून ( निचाय्य ) मग त्या नक्षत्राकडे चंद्र जातो. अश्विनी भरणी वगैरे २७ नक्षत्रें आहेत. चंद्राचा प्रत्येक नक्षत्राशीं योग येतो. निचाय्य ह्याच्यानंतरचे शब्द अध्याहृत आहेत.

**तक्ष्णुवन् इव पृष्ठरोगी ।**

तष्टा = तक्ष्णुवन् = ताशीत असतांना. तष्टा म्हणजे सुतार एवढाच अर्थ नसून तासणारा हाही अर्थ घ्यावयाचा. पृष्ट्यामयी = पृष्ठरोगी = ज्याच्या पाठीला रोग झाला आहे, रोगानें ज्याची पाठ वांकली आहे असा.

**जानीतं मे अस्य द्यावापृथिव्यौ इति ।**

वित्तं = जानीतम्. रोदसी = द्यावापृथिव्यौ. ' इति ' शब्द एथें कां घातला तें समजत

नाहीं. यास्काला अनुसरून दुर्गानें ऋचेचा केलेला अर्थः—प्रकाशणारा किंवा सर्वत्र प्रकाश पाडणारा( अरुणः ), महिने व आठवडे ह्यांचा कर्ता जो चंद्रमा( वृकः ) तो मार्गानें जाणाऱ्या नक्षत्रगणाला पाहतो (तो कसा तर) रोगानें ज्याची पाठ वांकली आहे तो जसा झाडाकडे तोडण्याच्या उद्देशानें टक लावून पहातो तसा चंद्रमा त्याला ज्या नक्षत्रांत शिरावयाचें असते त्याजकडे टक लावून पहातो. मजकडे मुळीं पहात नाहीं. म्हणून हे द्यावापृथिवींनो, ही माझी आपत्ति जाणा (व मला विहिरींतून काढा). लांडगा ह्या अर्थी वृक शब्द ऋग्वेदांत अनेकदां आला आहे. तोच अर्थ एथें न घेण्याचें कारण मासकृत् हीं दोन पदें असतांना यास्क तें एक पद आहे असें मानतो हें. चंद्रमा हा लक्षणेनें वृक होईल. दस्यवे वृक (=शत्रूंना लांडग्यासारखा) असे शब्द ऋग्वेदांत तीनचार वेळां आले आहेत. पण यास्काला लक्षणा माहीत नसावीसें वाटतें. वृकः म्हणजे चंद्रमा असें मानल्यास ऋचेचा बहुतेक वर दिलेला अर्थ होईल. पण मा सकृत् हीं दोन पदें व वृक म्हणजे लांडगा असें घेतल्यास अर्थ निराळा होईल. अरुणः वृकः पथा यन्तं मा मां सकृत् ददर्श हि खलु = लाल रंगाच्या लांडग्यानें मी वाटेनें जात असतांना मजकडे एकदां टवकारून पाहिलें. तष्टा हा शब्द सुतार किंवा लाकुड-तोड्या ह्या अर्थी सात वेळां आला आहे. पृष्टि + आमयी ह्यांतील पृष्टि शब्द ‘ तस्याग्ने पृष्टीर्हरसा श्रृणीहि (१०।८७।१०) = ‘हे अग्नि त्या शत्रूचे पृष्टि जोरानें कापून टाक ’ एथें आला आहे. पृष्टि म्हणजे शरीराचा भाग. तो कोणता भाग हें सांगतां येत नाहीं. कदाचित् बरगड्या असा अर्थ असेल. आमय् = रुग्ण होणें. ज्याच्या पृष्टि रुग्ण झाल्या आहेत असा. असा सुतार किंवा लाकुडतोड्या जसा झाडाकडे वळून पाहतो तसें लांडग्यानें मजकडे वळून पाहिलें. उज्जिहीते = (डोंगरा) वर जातो. निचाय्य हा शब्द एथें व ‘वैश्वानरं मनसाग्निं निचाय्य’ (३।२६।१) ह्या ऋचेंत आला आहे. निचाय्य = पाहून, ध्यानांत आणून. उज्जिहीते निचाय्य तष्टेव पृष्ट्यामयी = बरगड्या वाकलेला लाकुडतोड्या झाडाकडे टक लावून पहातो तसा लांडगा मजकडे पाहून निघून गेला असा अर्थ असेल. वित्तं मे अस्य रोदसी हे शब्द ह्या सूक्तांतील प्रत्येक ऋचेच्या शेवटीं आले आहेत. त्यांचा कोणत्याही ऋचेशीं संबंध नाहीं. मे मम अस्य संकटस्य इदं संकटं वित्तं जानीतं = हें माझें संकट ऐका.

**आदित्यः अपि वृकः उच्यते । यत् आवृङ्क्ते**

ऋग्वेदांत आदित्यालाही वृक म्हटलें आहे. त्याचें कारण ज्याअर्थी सूर्य अंध-काराचा नाश करतो. आ + वृज् = नाश करणें. ह्यापासून वृक. वृकाचे जसे अर्थ तशा त्याच्या व्युत्पत्ति. वृजी वर्जने (धा०२।१९).

**अजोहवीदश्विना वर्तिका वामास्नो यत्सीममुञ्चतं वृकस्य (१।११७।१६)। आह्वयत् उषा अश्विनौ आदित्येन अभिग्रस्ता । तां अश्विनौ प्रमुमुचतुः इति आख्यानम्**

सूर्यानें ग्रासलेल्या उषेनें अश्विनांचा धावा केला. तेव्हां अश्विनांनीं तिला सोडविलें अशी कथा आहे. आह्वयत्बद्दल अह्वयत् व मुमुचतुः बद्दल मुमुंचतुः असा

गुर्जरपाठ आहे. मुमुंचतुः हा पाठ अशुद्ध आहे. यास्क ऋचेचें भाष्य देत नाहीं. वर्तिका म्हणजे उषा. वर्तिकेला अश्विनांनीं सोडविलें असें ५ ऋचांत आलें आहे. वर्तिका कोण? वर्तिका म्हणजे रानचिमणी (अमर २।५।३६). लांडगा चिमणीवर झडप घालील काय? लांडग्याच्या (वृकस्य) जबड्यांत सांपडलेली चिमणी, हे अश्विनहो, तुमचा धावा करती झाली (अजोहवीत्). तेव्हां(यत्) त्याच्या जबड्यांतून (आस्नः) तुम्हीं तिला सोडविली. चिमणीला वाचविलें हा चमत्कार मानतां येईल. 'आस्नो वृकस्य वर्तिकामभीके युवं नरा नासत्यामुमुक्तं (१।११६।१४)' एथें अभीके = तावडींतून. तावडींत सापडलेली वर्तिका ही चिमणी नसून घोडी किंवा वर्तिका नांवाची स्त्रीसुद्धां असेल. अशा वर्तिकेला लांडग्याच्या जबड्यांतून अश्विन सोडवितात. वर्तिका म्हणजे उषा ह्याला आधार कांहीं नाहीं. अश्विनांच्या गोष्टींत लांडगे व लांडग्या बरेच वेळां येतात. वृक म्हणजे आदित्य नव्हे. अजोहवीत् = आह्वयत्. यत् = यदा = तदा. सीं = तिला म्हणजे वर्तिकेला. आस्नः = आस्यात्.

**श्वा अपि वृकः उच्यते । विकर्तनात् । वृकश्चिदस्य वारण उरामथिः (८।६६।८) उरणमथिः**

कुत्र्यालाही ऋग्वेदांत वृक म्हटलें आहे. कुत्रा वृक कसा? कारण तो हरिण वगैरे फाडतो. वृकः = व् + ऋ + क् + अः. व् = वि. क् + अ + ऋ = कऋ = कऋ(तनात्) = विकर्तनात्. उरामथिः = उरणमथिः. उरा = उरणः. उरण = मेंढा (अमर २।९।७६). उरामथिः = मेंढयांचा नाश करणारा. ऋचेचा दुर्गकृत अर्थः- ह्याचा (अस्य) म्हणजे इंद्राचा मेंढ्यांचा नाश करणारा (उरामथिः) कुत्रासुद्धां शत्रूंचें निवारण करतो(वारणः). मेंढयांचा नाश लांडगा करतो; तेव्हां वृक म्हणजे लांडगा कां नाहीं? उत्तरः-इंद्र कुत्रे बाळगतो, लांडगे बाळगीत नाहीं. वृकश्चिदस्य वारण उरामथिरा वयुनेषु भूषति (८।६६।८) = अस्य इन्द्रस्य वयुनेषु उरामथिः वारणः वृकः चित् अपि आभूषति आभवति = इंद्राच्या शौर्याच्या कृत्यांत मेंढया चोरणारा हिंस्र लांडगाही सेवेस सादर असतो (आभूषति). मृगो न वारणः = वाघसिंहा(मृगः)सारखा (न) क्रूर (वारणः). मथ् = चोरणें. उरामथिः = मेंढया चोरणारा. वय् (विणणें) + उन = वयुन = विणलेलें कापड, कुशल कारागिरी. आ + भू + स् (लेट्चा) = आभूष = जवळ असणें. असा अर्थ असावा.

**उरणः ऊर्णावान् भवति । ऊर्णा पुनः वृणोतेः ऊर्णोतेः वा**

उरणः = ऊर्ण (अवान्). ऊर्णा म्हणजे लोकर ज्याला असते तो उरण. पण (पुनः) ऊर्णा कशापासून? वृञ् वरणे (धा० ५।८) ह्यापासून. वृ = व् + ऋ. व् = उ. ऋ = अर् = र् + अ = र. उर + नः = उरणः. किंवा ऊर्णु धातूपासून. उः = एवम् उच्चैः रणः अस्य = ज्याचा डमडमडम् असा मोठा आवाज असतो तो (क्षीरस्वामी-अमर २।९।७६). ग्रीक एरिइस् (Aries).

**वृद्धवाशिनी अपि वृकी उच्यते**

बुढ्या कोल्हीलाही ऋग्वेदांत वृकी म्हटलें आहे. वाशिनी किंवा वृद्धवाशिनी शब्द अमरांत नाहीं. कोल्हीला वृद्धवाशिनी हें नांव एखाद्या गोष्टीवरून पडलें असेल. ह्या अर्थीही वृक शब्द विकर्तनापासून म्हणजे वि + कृत् पासून झाला आहे असें दुर्ग म्हणतो; पण तसें म्हणण्यास आधार काय? वृकी ह्यांतील वृ = वृद्धा. की = कवते = वाशते = शब्द करते. वृद्धा च असौ वाशिनी च = जी वृद्ध असून खूप ओरडते ती वृकी असें यास्काच्या मनांत असेल.

**शतं मेषान् वृक्ये चक्षदानमृज्राश्वं तं पितान्धं चकार (१।११६।१६) इत्यपि निगमः भवति**

वृकी म्हणजे वृद्ध कोल्ही ह्या अर्थी ऋचाही आहे. क्षद् = देणें. क्षदसे (१।२५।१७) = देतोस. चक्षद् अभ्यासानें. चक्षद् + आनं = चक्षदानं = देणाऱ्याला. वृकीला शंभर मेंढे देणाऱ्या ऋज्राश्वाला बाप अंधळा करता झाला. चक्षदानं = चक्षत् + दानं = दान पुकारता झाला (चक्षत्) असा दुर्ग अर्थ करतो; ती त्याची चूक आहे. एथें सुद्धां वृकी म्हणजे लांडगीण.

**जोषवाकं (६६) इति अविज्ञातनामधेयम्। जोषयितव्यं भवति**

अविज्ञातं ह्याला दुसरा शब्द जोषवाकं. अविज्ञातं = न समजेल असें. जोषयितव्यं = ज्ञापयितव्यं (दुर्ग) = लोकाला समजून द्यावयाचें (असते; कारण पुटपुटलेलें अस्पष्ट असतें).

## खंड २२ वा.

**य इन्द्राग्नी सुतेषु वां स्तवत्तेष्वृतावृधा।**
**जोषवाकं वदतः पज्रहोषिणा न देवा भसथश्चन (६।५९।४)।**
**यः इन्द्राग्नी सुतेषु वां सोमेषु स्तौति तस्य अश्नीथः**

सुतेषु = सुनेषु सोमेषु. स्तवत् = स्तौति. तेषु ऋतावृधा ह्या शब्दांचें विवरण यास्कभाष्यांत कां नाहीं तें कळत नाहीं. सायणाचार्यांनीं आपल्या भाष्यांत जो निरुक्ताचा उतारा घेतला आहे त्यांत स्तौति तेषु ऋतस्य वर्धयितारौ न तस्य अश्नीथः असा पाठ आहे. तस्य अश्नीथः हे शब्द पुढील अर्धांतून अध्याहृत घेतले आहेत.

**अथ यः अयं जोषवाकं वदति विजञ्जपः**

जोषवाकं वदतः = अथ यः अयं जोषवाकं वदति विजञ्जपः = पण (अथ) जो कोणी गुपचूप (जोषवाकं = विजञ्जपः) बोलतो, असा गुपचूप बोलणारा तो विजञ्जपः. विजञ्जपः केवलम् उदकतीरे अवस्थितः अन्यत्र वा। जपनशीलः एव न कर्मकारी (दुर्ग) = जो नदीतीरीं किंवा अन्यत्र एकांतांत बसून जप करीत राहतो, वैदिक कर्में करीत नाहीं तो विजञ्जप. विजने (विजं) जपति इति विजंजपः. दुर्गवृत्तीच्या उत्तम तीन पोथ्यांत विविजंजपः असा शब्द आहे. विविजं (= विविक्ते

= एकांतांत) + जपः. विजंजपः व विविजंजपः ह्यांपैकीं भाष्यांत कोणता पाठ होता तें सांगतां येत नाहीं. विजंजप किंवा विविजंजप असा शब्द अमरांत नाहीं. जोषवाकं = अविज्ञातं असा दुर्ग सारांश देतो. अविज्ञातं म्हणजे कोणाला समजत नाहीं अशा रीतीनें जो जप करीत बसतो तो.

**प्रार्जितहोषिणौ**

पज्रहोषिणा = प्रार्जितहोषिणौ. पज्र = प्रार्जित = खूप मिळविलेले. होषिणौ = हवि घेणारे. इंद्र व अग्नि ह्यांना इतर देवांपेक्षां अधिक हवि मिळतात, असा अर्थ काढण्यांत पुष्कळ दांडगाई झाली आहे. पज्र म्हणजे हवि व हवि देणारा. कक्षीवानाला पज्र व पज्रिय म्हणजे हवि देणारा असें म्हटलें आहे. हु ( = हवि देणें ) + स् ( लेट्चा ) = होष्. तमु प्र होषि मधुमन्तमस्मै सोमं ( ६।४४।१४ ) = ह्या इंद्राला ( अस्मै ) गोड ( मधुमन्तं ) सोम मी अर्पण करतों ( प्र होषि ). होष हें 'हु' पासून नाम. प्रहोषे० अदेवयोः ( १।१५०।२ ) = जो देवांना भजत नाहीं अशा मनुष्याच्या यज्ञांत. प्रहोष = हवि, यज्ञ. अमात्० अन्धसः० प्रहोषिणः ( ८।९२।४ ) = ज्याचा हवि दिला जातो ( प्रहोषिणः ) असा सोम इंद्र पिता झाला. पज्रेण कृतः होषः पज्रहोषः । पज्रहोषाः विद्यन्ते ययोः तौ पज्रहोषिणौ = पज्रानें म्हणजे हवि देणाऱ्यानें दिलेले हवि ( होषाः ) ज्यांना मिळतात असे इंद्र व अग्नि.

**न देवौ तस्य अश्नीथः**

इंद्र व अग्नि हे देव त्याचा हवि भक्षण करीत नाहींत. भस् धातु ऋग्वेदांत ३ वेळां आला आहे. भस् अभ्यासाने बभस् व त्याचेंच रूपांतर बप्स् हा ११ वेळां आला आहे. 'तस्य' अध्याहृत. यास्कानें केलेला ऋचेचा अर्थः-- सोमरस काढल्यावर, हे इंद्राग्नी, जो तुमची स्तुति करतो त्याचाच हवि तुम्ही खातां. पण जो जप करीत असतांना पुटपुटतो म्हणजे जो मोठ्यानें स्तुति करीत नाहीं त्याचा हवि, ज्यांना पुष्कळ हवि दिले जातात असे तुम्ही दोन देव घेत नाहीं. ऋतावृधौ म्हणजे सत्य किंवा यज्ञ किंवा उदक वाढविणारे असा दुर्ग अर्थ करतो. न अश्नीथः असें सायणाचार्यांनीं केलेल्या पूर्वार्धाच्या भाष्यांत 'न' चुकीनें पडला आहे. न देवा भसथः ह्यांतील 'न'चा अर्थ न कळल्यामुळें भलता अर्थ केला गेला आहे. खरा अर्थ पुढीलप्रमाणें:-- हे ऋतस्य धनस्य वर्धयितारौ इन्द्राग्नी यः यजमानः सुतेषु तेषु सोमेषु वां युवां स्तवत् स्तौति जोषवाकं जुष्टां प्रियां वाकं वाक्यं स्तुतिं वदतः तस्य हविः हे पज्रहोषिणौ देवौ युवां न सद्यः एव भसथः भक्षयथः = हे धनवृद्धि करणारे ( ऋतावृधा ) इंद्र व अग्नि, जो यजमान सोमरस काढल्यावर ( सुतेषु ) तुमची ( वां ) स्तुति करतो ( स्तवत् ) त्या मधुर स्तुति करणाऱ्याचा ( जोषवाकं वदतः ) त्याचा हवि ( तस्य ), ज्या तुम्हांस यजमान हवि देतो ते तुम्ही देवहो, विलंब न लावितां (न) खातां ( भसथः ). जोषं जुष्टं वाकं जोषवाकं जुष्टा मधुरा स्तुतिः. जोषं हें क्रियाविशेषण ऋग्वेदांत 'खूप होईल अशा रीतीनें' ह्या अर्थीं बरेच वेळां आलें आहे. जोष-

वाकं ह्यांत जोषं हे वाकचें विशेषण आहे. वाक शब्द विशिष्ट प्रकारची स्तुति ह्या अर्थीं ३ वेळां आला आहे. तूष्णीमर्थे सुखे जोषं (अमर ३।३।२५२); जोषं = तूष्णीं. असा अर्वाचीन अर्थ घेऊन ऋचेचा भलता अर्थ केला आहे. अर्वाचीन संस्कृत व पाणिनीय व्याकरण ह्यांनीं ऋचांचा उलगडा कधीं होणार नाहीं.

**कृत्तिः ( ६७ ) कृन्ततेः । यशो वा अन्नं वा**

कृती छेदने ( धा० ६।१५४ ) पासून कृत्ति. कृती वेष्टने ( धा० ७।१० ) पासून कां नाहीं ? शंकर कृत्ति पांघरतो. कृत्ति = यश किंवा अन्न. यश शत्रूंचें मर्म छेदतें व अन्न फार खाल्लें तर आयुष्य छेदतें म्हणून यश व अन्न ह्यांना कृत्ति म्हणतात.

**महीव कृत्तिः शरणा त इन्द्र ( ८।९०।६ )। सुमहत् ते इन्द्र शरणम् अन्तरिक्षे कृत्तिः इव**

मही = सुमहत् = फार मोठें. इव कृत्तिः = कृत्तिः इव. हे शब्द भाष्यांत शेवटीं कां घातले तें कळत नाहीं. शरणा = शरणम्. अन्तरिक्षे = अंतरिक्षांत असलेलें घर. अन्तरिक्षं असा गुर्जरपाठ आहे व तो योग्य वाटतो. कारण इंद्राचें घर अंतरिक्षांत आहे असें म्हणण्यानें इंद्राला कमीपणा येतो. सर्व अंतरिक्ष इंद्राचें घर. पण दुर्गवृत्तींत अन्तरिक्षलोके असें आहे; त्यावरून त्यानें अन्तरिक्षे हा पाठ घेतला असावा. हे इंद्रा, तुझें घर ( शरणा ) यश किंवा अन्न ह्यासारखे विस्तृत आहे. यश विस्तीर्ण असतें; त्याचप्रमाणें अमरत्वरूप अन्नही विस्तृत असतें असें दुर्ग म्हणतो. शरणा व कृत्ति हे शब्द स्त्रीलिंगी आहेत. शरणा = आश्रय, संरक्षण. इंद्रानें दिलेला आश्रय किंवा केलेलें संरक्षण कृत्तीप्रमाणें विस्तीर्ण आहे. कृत्ति शब्द एथेंच आला आहे. त्याचा अर्थ चामडें. चामडें किंवा चामड्याची ढाल जशी देहाचें रक्षण करते त्याप्रमाणें इंद्रानें दिलेला आश्रय सर्व तऱ्हेनें रक्षण करतो.

**इयम् अपि इतरा कृत्तिः एतस्मात् एव सूत्रमयी**

ही जी सूत्रांची बनविलेली कृत्ति ( म्हणजे कंथा ) तीही ह्याच धातूपासून. कापडाचे तुकडे घेऊन कंथा बनविलेली असते.

**उपमार्थे वा**

किंवा कंथेला कृत्ति उपमेनें म्हणजे लक्षणेनें म्हणत असतील. 'इयम् अपि इतरा कृत्तिः एतस्मात् एव । सूत्रमयी उपमार्थे वा' अशीं दोन वाक्यें केल्यास अर्थ बरोबर लागेल. कृत्ति म्हणजे चामडें हा अर्थ एकदम लक्षांत येतो. चामडें ह्या अर्थी जो लौकिक शब्द कृत्ति तो ह्याच धातूपासून. कारण चामडें जनावराच्या अंगापासून कापून काढावें लागतें. सूत्रांची बनविलेली जी कंथा तिलाही कृत्ति म्हणतात. कपड्याचे धागे करून ती बनवितात. म्हणून ती कृत्तिसुद्धा ह्याच धातूपासून. किंवा कंथेला कृत्ति उपमेनें म्हणजे लक्षणेनें म्हणत असतील. कारण कंथेशीं कर्तनक्रियेचा संबंध दिसत नाहीं.

कृत्तिवासाः पिनाकहस्तोऽवततधन्वा इत्यपि निगमो भवति

निरुक्त ३।२१ पाहणें. महाराष्ट्रपाठांत कृतिं वसान आचर पिनाकं बिभ्रदा गहि ( तै० सं० ४।५।१०।४।। वाज० सं० १६।५१ ) हें उदाहरण आहे. चामडें पांघरून हिंड; धनुष्य घेऊन ये हा त्याचा अर्थ. ह्या उदाहरणाचा आरंभ 'मीढुष्टम शिवतम' असा आहे.

**श्वघ्नी ( ६८ ) कितवः भवति। स्वं हन्ति। स्वं पुनः आश्रितं भवति**

श्वघ्नी = कितवः = द्यूतकार, जुगार खेळणारा. कितवाला श्वघ्नी म्हणण्याचें कारण श्वघ्नी = स्वघ्नी = स्वं हन्ति = ( द्यूतकार ) स्वतःचें धन मारतो म्हणजे हरतो. पण ( पुनः ) स्वंची व्युत्पत्ति काय ? आ + श्रि पासून स्वं. कारण स्व म्हणजे धन किंवा स्वतःची कोणतीही वस्तु स्वतःवर अवलंबून असते ( आश्रितं ). गुर्जरपाठ व दुर्गवृत्तीच्या उत्तम पोथ्यांतला पाठ आशृतं आहे; पण ती लिहिण्यांतील किंवा उच्चारांतील चूक असावी. स्यति सीयते वा स्वः (अमर—क्षीरस्वामी ३।३।२१२), स्व (=धन) संपतें ( स्यति ) किंवा बांधलें जातें ( सीयते ). लॅटिन सुआ. किंवा स्वा किंवा सुअस्.

**कृतं न श्वघ्नी वि चिनोति देवने ( १०।४३।५ )। कृतम् इव श्वघ्नी विचिनोति देवने**

न = इव. जसा ( इव ) द्यूतकार ( श्वघ्नी ) सर्व दानांत कृत दान पडावें म्हणून जुगारींत ( देवने ) प्रयत्न करतो ( विचिनोति ). फासे अशा रीतीनें टाकतो कीं कृतदान पडलेंच पाहिजे. कृतं म्हणजे सर्वांत मोठें दान हा अर्थ अमरांत नाहीं. युगपर्याप्तयोः कृतं ( अमर ३।३।७७ ), कृत एका युगाचें नांव व कृतं = पुरे. सर्व युगांत कृतयुग जसें श्रेष्ठ तसें सर्व दानांत कृतदान श्रेष्ठ असा यास्ककालीं अर्थ असेल. धन, अपार धन ह्याअर्थीं कृत शब्द ऋग्वेदांत ११ वेळां आला आहे. श्वघ्नी शब्द ६ वेळां आला असून अपतिघ्नी, सपत्नघ्नी, वृत्रघ्नी व पारावतघ्नी ह्यांसारखा स्त्रीलिंगी दिसतो. उषा ( ऋ० सं० १।९२।१० ) व इंद्र ( २।१२।४।।४।२०।३।।८।४६।३८ १०।४३।५ ) ह्यांची श्वघ्नीशीं तुलना केली आहे. शुना श्वभिर्वा हन्ति असौ श्वघ्नी = कुत्रा किंवा कुत्रे घेऊन जी मृग ठार करते ती, असा व्युत्पत्तीवरून अर्थ असेल. प्रस्तुत ऋचेंत व ८।४२।९ मध्यें द्यूत करणारी असा अर्थ दिसतो. श्वघ्नी ह्या शब्दाचा तो अर्थ कसा झाला हें सांगतां येत नाहीं. ह्या दोन अर्थांत कौशल्य, हातचलाखी हें सामान्य असेल. द्यूत करणारी हा लाक्षणिक अर्थ असण्याचा संभव आहे. ऋचेचा अर्थः —जशी ( न ) द्यूत करणारी स्त्री द्यूतांत ( देवने ) खूप धन ( कृतं ) मिळविते. सरकशीसारखा तर खेळ नसेल ना ? कुत्र्यांच्या मदतीनें एखादी स्त्री विलक्षण खेळ करून दाखवीत असेल, हत्ती, वाघ, सिंह ह्यांना कबजांत आणीत असेल. त्यामुळें प्रेक्षक तिच्यावर पैसे उधळीत असतील. श्वघ्नं विद्यते अस्य सः श्वघ्नी असा कदाचित् हा शब्द बनला असेल; पण श्वघ्न म्हणजे काय तें सांगतां येत नाहीं. धन असा अर्थ असल्यास श्वघ्नी म्हणजे उदार, धनवान्, दाता असा अर्थ होईल. उदार धन-

'अर्थ असल्यास श्वघ्नी म्हणजे उदार, धनवान्, दाता असा अर्थ होईल. उदार धन-वान् दाता ( श्वघ्नी ) धन-भांडारांत ( देवने ) पुष्कळ ( कृतं ) धन ( न = वि ) देतो ( चिनोति ) असा दुसरा अर्थ असेलसा वाटतो.

**कितवः किं तव अस्ति इति शब्दानुकृतिः। कृतवान् वा आशीर्नामकः।**

कितवः = कि + तवः. कि = किम्. तवः = तव. तुझें काय लागतों असें जो म्हणतो तो कितव. किं तव ह्या शब्दांचें कितव ह्या शब्दांत अनुकरण आहे. किंवा कितवः = कित + वः. कित = कृत = सर्वांत उत्तम दान. वः = वान्. ह्याला उत्तम दान पडो ( कृतवान् ) असा मित्र द्यूतकाराला आशीर्वाद देतात म्हणून कृतवान् म्हणजे कितव. आशीः नाम निमित्तं यस्मिन् स आशीर्नामकः. आशीर्वाद हें कितव शब्द अस्तित्वांत येण्याचें कारण. किं तव अस्तीति पणते कितवः ( क्षीरस्वामी-अमर. २।१०।४४ ).

**समम् ( ९८ ) इति परिग्रहार्थीयं सर्वनाम अनुदात्तम्**

परिग्रह म्हणजे संग्रह. ह्या अर्थी सम शब्द आहे. परिग्रहः अर्थः परिग्रहार्थः। परिग्रहार्थे वर्तमानं परिग्रहार्थीयम्. हें तद्धितरूप कोणत्याही पाणिनीनियमानें सिद्ध होत नाहीं. जरी हा शब्द अनुदात्त आहे तरी तो सर्वनाम आहे. पण 'प्रातिपदिक-स्यान्त उदात्तः' या नियमानें हा शब्द अन्तोदात्त पाहिजे. तो तसा नाहीं. यास्क एथें समं ह्याचा स्वर सांगतो व तो अनेकार्थ आहे असेंही दर्शवितो असें दुर्ग म्हणतो. समं, समस्मै, समस्मात्, समस्य, समस्मिन् व समे अशीं रूपें ऋग्वेदांत आढळतात. असुन्वन्तं समं जहि ( १।१७६।४ ), मा नो वृकाय वृक्ये समस्मा अघा-यते रीरधता यजत्राः ( ६।५१।६ ), उरुष्या णो अघायतः समस्मात् ( ५।२४।३ ), कुवित्समस्य जेन्यस्य शर्धतोऽभिशस्तेरवस्परत् ( ६।४२।४ ), तया समस्य हृदयमा रिख ( ६।५३।८ ), रक्षा सु नो अररुषः स्वनात्समस्य कस्य चित् ( ९।२९।५ ), रक्षा समस्य नो निदः ( ९।६१।३० ). ह्या सर्व उदाहरणांत सम म्हणजे सर्व म्हणण्यापेक्षां सम म्हणजे व्यक्ति म्हणणें बरोबर होईल. हीं वरील उदाहरणें दुर्जना-विषयीं आहेत. दुष्ट, घातकी, सोमरस न अर्पण करणाऱ्या व्यक्तींना ठार कर, त्यांच्यापासून आम्हांस सोडीव, त्यांच्या ताब्यांत आम्हांस देऊं नका, अशी त्यांत विनंति केली आहे. स वैरदेय इत्समः ( ५।६१।८ ) = ती व्यक्ति, तो पुरुष वैरच करतो असा मी अर्थ करतों. सायणाचार्य अगदीं उलट अर्थ करतात. नहि नु ते महिमनः समस्य न मघवन् मघवत्त्वस्य विद्म ( ६।२७।३ ) = हे इंद्रा, तुझ्या सर्व ( समस्य ) महत्त्वाचें, तुझ्या मघवत्त्वाचें आम्हांस ज्ञान नाहीं. अन्ने समस्य यदसन् मनीषाः ( १०।२९।४ ) = सर्वांच्या इच्छा ज्याअर्थी अन्नासंबंधीं होत्या. क उ नु ते महिमनः समस्यास्मत्पूर्व ऋषयोऽन्तमापुः ( १०।५४।३ ) = आमच्या आधीच्या कोणत्या ऋषींना तुझ्या सर्व महत्त्वाचा अंत लागला? ह्या ३ उदाहरणांत सम म्हणजे सर्व. 'नभन्तामन्यके समे' हे शब्द ८।३९ तील प्रत्येक ऋचेच्या शेवटीं आहेत. त्यांचा

ऋचांच्या अर्थाशीं कांहींएक संबंध नाहीं. १०।१३३ तील प्रत्येक ऋचेच्या शेवटीं 'नभन्तामन्यकेषां ज्याका अधि धन्वसु' ( = दुसऱ्यांच्या म्हणजे शत्रूंच्या धनुष्यांना लाविलेल्या प्रत्यंचा तुटोत ) असे शब्द आहेत. तेव्हां 'नभन्तामन्यके समे' = सर्व ( समे ) शत्रु नाश पावोत असा अर्थ असावा अनुदात्त सर्वनाम जो सम शब्द त्याचे दोनच अर्थ आहेत असें वरील उदाहरणांवरून वाटतें. पण यास्क सर्व असा एकच अर्थ देतो. सम हा अन्तोदात्त असून त्याचा अर्थ 'सारखा' असा व एवढाच आहे.

## खंड २३ वा.

**मा नः समस्य दूढ्यः परि द्वेषसो अंहतिः। ऊर्मिर्न नावमा वधीत् (८।७५।९)।**

**मा नः सर्वस्य दुर्धियः पापधियः सर्वतः द्वेषसः अंहतिः ऊर्मिः इव नावम् आवधीत्**

समस्य = सर्वस्य. पण सम = व्यक्ति हाच अर्थ येथें आहे. दूढ्यः = दुर्धियः = पापधियः = दुष्टबुद्धीच्या. दुर्धियः ह्याचें सुलभ उच्चाराकरितां दूढयः असें रूप बनलें. पापधियः हा शब्द घालण्याचें कांहीं कारण नाहीं. तो शब्द प्रक्षिप्त वाटतो. परि = सर्वतः = कोणीकडूनही. न = इव.

**ऊर्मिः ऊर्णोतेः। नौः प्रणोत्तव्या भवति। नमतेः वा**

ऊर्णुञ् आच्छादने (धा० २।२९) पासून ऊर्मि. लाटा समुद्राला किंवा नावांना आच्छादितात. ऊर्वति ऊर्मिः ( क्षीरस्वामी–अमर १।९।५ ). णुद प्रेरणे (धा० ६।२) ढकलणें, ह्यापासून नौः. किंवा नम् = नमणें ह्यापासून. होडी लाटांपुढें नमते. नुद्यते नौः ( क्षीरस्वामी–अमर १।९।१० ). ग्रीक नौस् व लॅटिन नाव्हिस्. यास्कानें व दुर्गानें केलेला अर्थः—लाट जशी नावेला तडाखे देते तशी सर्व तऱ्हेनें ( परि ) द्वेष करणाऱ्या ( द्वेषसः ) सर्वांच्या ( समस्य ) पीडा ( अंहतिः ) आम्हांस तडाखे न मारो. परितः द्वेषांसि यस्य तस्य परिद्वेषसः = सर्व तऱ्हेनें किंवा बाजूनें पीडा करणाऱ्याची म्हणजे त्यानें केलेली. सम ह्याचा 'कोणीही' असा अर्थ करावा. परिद्वेषसः दूढयः समस्य अंहतिः = सर्व तऱ्हेनें पीडा करणाऱ्या दुष्टबुद्धि कोणत्याही मनुष्यानें केलेली पीडा. द्वेषस् शब्द नपुंसक आहे. परिद्वेषसः हें समस्य ह्याचें विशेषण.

**तत् कथम् अनुदात्तप्रकृति नाम स्यात्। दृष्टव्ययं तु भवति**

निरुक्त १।८ पहा. गुर्जर व महाराष्ट्रपाठ द्रष्टव्ययं असा आहे. दुर्गवृत्तींत कांहीं पोथ्यांत द्रष्टव्ययं व कांहींत दृष्टव्ययं आहे. सम ह्याला विभक्तिप्रत्यय लागतात; ह्याचीं पुढील उदाहरणें:—

**उतो समस्मिन्ना शिशीहि नो वसो (८।२१।८) इति सप्तम्याम्। शिशीतिः दानकर्मा**

समशब्दः सप्तम्यां दृष्टव्ययः ह्या उदाहरणांत सम ह्याला सप्तमी विभक्ति

लागली आहे. व्यय म्हणजे विभक्तिप्रत्यय लागून शब्दरूप बदलणें. अ -व्ययांत शब्दाचें रूप बदललेलें नसतें. शा = देणें. ह्याचें शिशीहि हें आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचें एकवचन. उतो समस्मिन्ना शिशीहि नो वसो वाजे सुशिप्र गोमति = हे सुशिप्र वसो समस्मिन् गोमति वाजे नः अस्मान् आ शिशीहि = हे मुकुट धारण करणाऱ्या (सुशिप्र), धनवान् ( वसो ) इंद्रा, आम्हांस गाईनीं भरलेल्या अशा सर्व धनांत दे म्हणजे सर्व धन दे.

**उरुष्या णो अघायतः समस्मात् ( ५।२४।३ ) इति पञ्चम्याम्। ऊरुष्यतिः रक्षाकर्मा**

पञ्चम्यां दृष्टव्ययः = सम ह्याला एथें पंचमी विभक्ति लागली आहे. पीडा करणाऱ्या ( अघायतः ) व्यक्तीपासून ( समस्मात् ) आमचें रक्षण कर. उरुष्य् = रक्षण करणें. उरु ( विस्तृत प्रदेशांत, दूर ) + स्य = उरुष्य.

**अथापि प्रथमा बहुवचने। नभन्तामन्यके समे**

समः दृष्टव्ययः. 'सम' ला प्रथमेच्या बहुवचनाचीही विभक्ति लागलेली आढळते. जसें, नभन्तामन्यके समे. मागील खंडाचा शेवट पहा (पान ४०१).

## खंड २४ वा.

**हविषा जारो अपां पिपर्ति पपुरिर्नरा। पिता कुटस्य चर्षणिः ( १।४६।४ ) हविषा अपां जरयिता**

जारः = जरयिता = जीर्ण करणारा म्हणजे शोषून टाकणारा.

**पिपर्ति पपुरिः इति पृणातिनिगमौ वा। प्रीणातिनिगमौ वा**

पिपर्ति व पपुरि हीं पृ पुरविणें ह्याचीं रूपें ( निगमौ ) किंवा प्रीण् तृप्त करणें ह्याचीं रूपें. पृणातिनिगमौ = पूरयत्यर्थौ। प्रीणातिनिगमौ = प्रीणयत्यर्थौ. निगमौ = निगमस्थौ शब्दौ ( दुर्ग ). निगम = ( १ ) ऋचा; ( २ ) वैदिक शब्द; ( ३ ) वैदिक रूप; २ व ३ ह्यांच्यांत फरक नाहीं. पिपर्ति व पपुरि ह्यांत धातु पृ; प्रीण् नव्हे. जो धन पुरवितो तो तृप्त करतोच; तेव्हां पृ मध्यें प्रीण् चा अर्थ येतो; अर्थाप्रमाणें व्युत्पत्ति हा निरुक्तसिद्धांत असल्यामुळें पृ व प्रीण् असे दोन्ही धातु ह्या दोन शब्दांत आहेत असें यास्क म्हणतो.

**पिता। कृतस्य कर्मणः। चायिता आदित्यः**

कुटस्य ( ७० ) = कृतस्य ( कर्मणः ). 'कृत' चा अपभ्रंश कुट. चर्षणिः ( ७१ ) = चायिता = पाहणारा = साक्षी. असा द्रष्टा आदित्य. चायृ पूजानिशामनयोः ( धा० १।९०५ ). 'चर्षणि' चायृ धातूपासून. यास्कानें केलेला अर्थः— पाणी शोषणारा ( अपां जारः ), पालन करणारा ( पिता ), केलेल्या कर्माचा साक्षी ( कुटस्य चर्षणिः ) व हवीनें पूरण करणारा ( पपुरिः ) म्हणजे तृप्त करणारा जो आदित्य तो, हे अश्विनांनो ( नरा = नरौ ) तुम्हांला हवि देऊन (हविषा) तृप्त करतो

(पिपर्ति). यास्कानें नरा हा शब्द भाष्यांत गाळला आहे व पिता-शब्द जशाचा तसा ठेविला आहे. कुटस्य व चर्षणि ह्या दोन शब्दांचे अर्थ कळत नाहींत. 'कुटस्य' फक्त एथेंच आला आहे. अग्नि हा जलदेवतांचा ( अपां ) पुत्र असून नवरा किंवा जारही आहे. तो सर्व देवांना हवि देऊन ( हविषा ) तृप्त करतो ( पपुरिः हविषा पिपर्ति ). तो सर्वांचा पिता आहे. इन्द्राग्नी ह्यांना चर्षणी म्हटलें आहे ( १।१०९।५ ). चर्षणि हें एका आर्य जातीचें नांव. इंद्र ह्या जातीला जिंकतो; तो व अग्नि तींत मिसळून जातात. तेव्हां चर्षणिः म्हणजे चर्षणि जातीचा देव. ' कुटस्य ' शब्दाचा अर्थ करणें अशक्य आहे. कुटस्य पिता असा अन्वय असेल; पण कुटस्य म्हणजे काय ?

**शम्बः ( ७२ ) इति वज्रनाम। शमयतेः वा शातयतेः वा**

शम्ब हें वज्राचें एक नांव. शम्ब शब्द शमय् शांत करणें, प्राण घेऊन गुपचीप ठेवणें ह्यापासून. शम उपशमे ( धा० ४।९५ ) ह्याचें प्रयोजक रूप शमय्. किंवा शद्‌ऌ शातने ( धा० १।८८० ) = कापून टाकणें, ह्यापासून. शद्‌चें प्रयोजक रूप शातय्. वज्र प्राण घेऊन निश्चल करतें किंवा कापून टाकतें. शम्बः = शम् + बः. शम्ब व शद् ह्यांत श हें समानाक्षर.

**उग्रो यः शम्बः पुरुहूत तेन ( १०।४२।७ ) इत्यपि निगमो भवति**

शम्ब म्हणजे वज्र ह्या अर्थाची ऋचाही आहे. आराच्छत्रुमप बाधस्व दूरमुग्रो यः शम्बः पुरुहूत तेन ( १०।४२।७ ) = हे पुरुहूत इंद्रा, तुझें जें उग्र वज्र त्यानें शत्रूला दुरूनच ठार कर. आरात्, दूरं व अप ह्या सर्वांचा अर्थ दुरून. शम्ब शब्द फक्त एथेंच आला आहे. शम्बर हा इंद्राचा शत्रु. शम्बानें मारला जातो तो शम्बर कीं काय ? शम्बराचे किल्ले इंद्र वज्रानें फोडून टाकतो.

**केपयः ( ७३ ) कपूयाः भवन्ति। कपूयम् इति पुनाति कर्म कुत्सितम्। दुष्पूयं भवति**

केपयः = कपूयाः. पण कपूय म्हणजे काय ? कपूयं = क + पूयम्. क = ( कुत्सितं ) कर्म = वाईट कर्म. क ह्यानें कुत्सित व कर्म हे दोन्ही अर्थ सूचित होत असतील. पापी प्रायश्चितानें वाईट कर्माचें क्षालन करतो ( पुनाति ). असें कर्म करणारे ते कपूय म्हणजे केपयः. जरी प्रायश्चित करतो तरी कपूयं = क + पूयम्. क = कष्टेन = दुः. वाईट कर्माचें क्षालन कष्टानें होतें. म्हणजे कपूय ह्यांतील 'क' चे कुत्सित कर्म व कष्टानें असे दोन अर्थ. केपयः शब्द एकदांच आला आहे. केपयः हे ' केपि ' शब्दाचें बहुवचन. केपि शब्द ऋग्वेदांत नाहीं. केपि ह्यांत पूय कोठें आहे ?

## खंड २५ वा.

**पृथक् प्रायन् प्रथमा देवहूतयोऽकृण्वत श्रवस्यानि दुष्टरा।**

**न ये शेकुर्यज्ञियां नावमारुहमीर्मैव ते न्यविशन्त केपयः ( १०।४४।६)**

**पथक् प्रायन्। पृथक् प्रथतेः। प्रथमा देवहूतयः। ये देवान् आह्वयन्त**

पृथक् शब्द प्रथ् धातूपासून. प्रथ प्रख्याने ( धा० १।७६६ ॥ १०।२० ). प्रथ विस्तारे असा अर्थ ऋग्वेदकालीं असावा. ' पृथक् प्रथतेः ' दुर्गवृत्तींत नाहीं. देवहूतयः = ये देवान् आह्वयन्त = ज्यांनीं देवांना ( यज्ञांत ) बोलाविलें असे. दुर्गवृत्तींत आह्वयन्ते आहे.

**अकुर्वत श्रवणीयानि यशांसि दुरनुकराणि अन्यैः**

अकृण्वत = अकुर्वत. श्रवस्यानि = श्रवणीयानि = यशांसि = यशस्कर कृत्यें किंवा कर्में. श्रुतिः स्त्री श्रवणं श्रवः ( अमर २।६।९४ ). श्रवस्य म्हणजे श्रवणीय. श्रवणीय काय असतें तर यश किंवा यशस्कर कर्म.

**दुरनुकराणि अन्यैः**

दुष्टरा = दुः + तरा = दुष्टराणि = अन्यैः दुरनुकराणि = ज्यांचें अनुकरण इतरांना करता येत नाहीं अशीं ( कृत्यें ).

**ये अशक्नुवन् यज्ञियां नावम् आरोढुम्**

जे यज्ञरूपी नावेंत चढूं शकले. हें 'अकृण्वत श्रवस्यानि' ह्याचें विवरण असून त्यांत उत्तरार्धांतील कांहीं शब्द घेतले आहेत. जे यज्ञ करतात ते देवयानमार्गानें स्वर्गास जातात. हें विवरण मूळचें कीं मागाहून कोणीं घुसडलें तें सांगतां येत नाहीं. अशीं विवरणें यास्क देत नसतो. अथ ये न अशक्नुवन् यज्ञियां नावम् आरोढुम् शेकुः = अशक्नुवन्. आरुहं = आरोढुम्. गुर्जरपाठांत एथें व ह्याच्या आधींच्या वाक्यांत आरोल्हुं आहे. पण जे यज्ञरूपी नावेंत चढूं शकले नाहींत, म्हणजे ज्यांनीं यज्ञ केले नाहींत किंवा जे करूं शकले नाहींत.

**ईर्मा एव ते न्यविशन्त । इह एव ते न्यविशन्त । ऋणेन एव ते न्यविशन्त अस्मिन् लोके इति वा**

ईर्मा = इह. ते एथेंच राहिले. ईर्मा = ऋणेन = ( वाईट कर्माच्या ) ऋणानें बद्ध होऊन ते ह्या जगींच शिरतात म्हणजे जन्मास येतात. महाराष्ट्रपाठ ' ऋणे ह ' असा आहे. ऋणांत रुतून ते वगैरे. ' ऋणेन ( किंवा ऋणे ह ) अस्मिन् लोके ' हें दुर्गवृत्तींत नाहीं. दुर्ग म्हणतोः—तदुक्तम् ' अथ य इह कपूयचरणा अभ्याशो ह यत्ते कपूयां योनिम् आपद्येरन् श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चण्डालयोनिं वा ' ( छा० उ० ५।१०।७ ) = ज्यांचें आचरण वाईट असतें ते ताबडतोब ( अभ्याशः ह यत् ) वाईट योनीप्रत म्हणजे कुत्रा किंवा डुक्कर किंवा चंडाल ह्यांच्या जन्माला जातात.

**ईर्मः इति बाहुनाम । समीरिततरः भवति**

ईर्मः = बाहु. बाहूला ईर्म म्हणण्याचें कारण ( इतर अंगांपेक्षां ) तो झटकन् बाहेर काढला जातो म्हणजे काम करण्यास तयार होतो. ईर् + मः = ईर्मः = हात या अर्थी ईर्म शब्द अमरांत नाहीं; ईर्मम् = व्रणः ( अमर २।६।५४ ). हात ह्या अर्थी असलेल्या ईर्म शब्दाची व्युत्पत्ति एथें देण्याचें कांहीं कारण नव्हतें; कारण तो अर्थ एथें नाहीं. ईर्मा शब्द ऋग्वेदांत ५ वेळां आला आहे व सर्व ठिकाणीं त्वरित,

ताबडतोब असा त्याचा अर्थ होतो. ऋचेचा यास्कानें व दुर्गानें केलेला अर्थः—ज्यांनीं देवांना यज्ञकर्मांत बोलाविलें, ज्यांनीं श्रवणीय व इतरांना करतां येणार नाहींत अशीं धर्मकृत्यें केलीं ते वेगळया मार्गानें गेले.पण जे यज्ञिय नावेंत चढूं शकले नाहींत म्हणजे जे यज्ञ करूं शकले नाहींत ते कुत्सिताचरणी असल्यामुळें इहलोकींच राहिले. हा अर्थ चुकला आहे. पृथक् शब्द ऋग्वेदांत १२ वेळां आला आहे व त्याचा अर्थ जलद, तातडीनें असा आहे. जसें:-आपश्चिदस्मा अरमन्त देवीः पृथग्व्रजन्तीः परिषीमवृञ्जन् ( ३।५६।४ ) = ह्याला पाहून किंवा ह्याच्या आज्ञेनें ( अस्मै ) नद्यांचें पाणी ( आपः देवीः ) एकदम थांबतें ( अरमन्त ) व जोरानें ( पृथक् ) वहात असतां ( व्रजन्तीः ) ह्याला ( सीं ) टाळतात ( परि + अवृञ्जन् ). देवहूति = ( १ ) देवांना यज्ञांत बोलाविणें व हवि देणें, ( २ ) जेथें देवांना बोलावितात किंवा हवि देतात असा यज्ञ; ( ३ ) हवि. श्रवस्य = धन. श्रवस् व श्रवस्य एकच. स वाजस्य श्रवस्यस्य दाता ( ८।९६।२० ); वाजस्य = श्रवस्यस्य. विश्वा दधे वार्याणि श्रवस्या ( १।१४९।५ ) = अग्निः विश्वानि वार्याणि श्रवस्यानि दधे ददाति; वार्याणि = श्रवस्यानि = धनानि. दुष्टर = ज्याचा नाश करता येत नाहीं असें. पृतनासु दुष्टरा० इन्द्राग्नी ( ५।८६।२ ) = लढायांत ज्यांचा कोणीही नाश करूं शकत नाहीं असे इन्द्र व अग्नि. आ नो अग्ने रयिं भर० विश्वासु पृत्सु दुष्टरं ( १।७९।८ ). 'केपयः' नाम कीं विशेषण कीं क्रियाविशेषण हें मुळीं ठरवितां येत नाहीं. ( यजमानांनीं ) देवांकडे पाठविलेले पहिले हवि जलद गेले व ज्याचा नाश होणार नाहीं असें धन ते हवि ( यजमानांना ) देते झाले. ह्या हविरूप नावेंत जे चढूं शकले नाहींत म्हणजे ज्यांनीं देवांकडे हवि पाठविले नाहींत ते ताबडतोब ( ईर्मा एव ) मेले ( न्यविशन्त ). नि + विश् = निजणें, स्वस्थ पडणें. तस्य मे तन्वो बहुधा निविष्टाः ( १०।५१।४ )= त्या माझीं पुष्कळ शरीरें नष्ट झालीं ( असें अग्नि म्हणतो ).

**एता विश्वा सवना तूतुमा कृषे स्वयं सूनो सहसो यानि दधिषे ( १०।५०।६ )**
**एतानि सर्वाणि स्थानानि। तूर्णम् उपाकुरुषे। स्वयं बलस्य पुत्र यानि धत्स्व**

एता = एतानि. विश्वा = विश्वानि = सर्वाणि. सवना = सवनानि = स्थानानि. तूतुम् ( ७४ ) = तूर्णम्. आ + कृषे ( ७५ ) = उपाकुरुषे. दुर्गवृत्तींत एकदां कुरुष्व व एकदां कुरुषे असें आहे. सहसः = बलस्य. सूनो = पुत्र. सूनो सहसः ह्या ऋचेंतील क्रम अनुसरून यास्कानें पुत्र बलस्य असें म्हणावयास पाहिजे होतें. दधिषे = धत्स्व. दुर्गवृत्तींत दधिषे धारयसि असें आहे. मूळपाठ काय होता तें कळत नाहीं. कृषे ह्याचें कुरुष्व व दधिषे ह्याचें धत्से असें यास्ककृत विवरण असेल. हीं सगळीं स्थानें ( त्या त्या देवतेचें रूप घेऊन व ) त्यांकडे पुनः पुनः जाऊन तूं तयार करतोस किंवा कर; जीं स्थानें तूं स्वतः, हे बळाच्या पुत्रा, धारण करतोस किंवा धारण कर. सवना = सवनानि असा सायणाचार्य अर्थ करतात व तोच बरोबर आहे. 'तु'= वाढविणें; तूतु अभ्यासानें. तूतु + मन् = तूतुमन्. तूतुमानि बहुवचन. पदकार तूतुमा

असें पद देतो व निघंटूंत तूतुमाकृषे असें संयुक्त पद दिलें आहे. तूतुमा = तूर्णीमि ( सायण ). हे बलपुत्रा, तूं हीं सगळीं सवनें वाढविलीं ( तूतुमा ) आहेस व तीं तूं स्वतः पोटांत धारण करतोस, असा अर्थ आहे. सूनो सहसः ह्या विशेषणावरून कित्येक ही ऋचा अग्निपर लावतात; पण इंद्रही बलपुत्र असल्यामुळें ऋचा इंद्रपर लावण्यास हरकत नाहीं असें दुर्ग म्हणतो.

**अंसत्रं ( ७५ ) अंहसः त्राणम् । धनुः वा कवचं वा**

अंसत्रं = अंस + त्रं. अंस = अंहसः = संकटापासून. त्रं = त्राणं = रक्षण करणारें. तें काय ? धनुष्य किंवा कवच. लढाईंत सैनिकांचें रक्षण ह्या दोहींनीं होतें. दोन पोथ्यांत अंसत्राणं असें आहे. अंस म्हणजे खांदे त्यांचें रक्षण करणारें. ही व्युत्पत्ति स्वाभाविक दिसते. अंसत्र शब्द ऋग्वेदांत फक्त ३ वेळां आला आहे. वास्तोष्पते ध्रुवा स्थूणांसत्रं सोम्यानाम् । द्रप्सो भेत्ता पुरां शश्वतीनामिन्द्रो मुनीनां सखा ( ८।१७।१४ ) = हे वास्तोष्पते, इंद्र हा सोममय ( द्रप्सः ) असून जे सोम अर्पण करतात त्यांचा किंवा सोमाई जे देव त्यांचा मजबूत ( ध्रुवा ) आधारस्तंभ ( स्थूणा ) व अंसत्र ( ? ) आहे. टिकाऊ ( शश्वतीनां ) किल्ले ( पुरां ) फोडणारा ( भेत्ता ) व मुनींचा सखा आहे. अंसत्र म्हणजे छप्पर असा अर्थ एथें चांगला लागतो. पण ये अंसत्रा य ऋधग्रोदसी ( ४।३४।९ ); ह्या ऋचेंत ऋभूंचीं अद्भुत कृत्यें म्हणजे अश्विनांचा रथ व इंद्राचे घोडे तयार करणें, म्हाताऱ्या आईबापांना तरुण करणें अशीं वर्णिलीं आहेत. द्यावापृथिवी ( रोदसी ) उत्तम रीतीनें ( ऋधक् ) तयार करणें ( ततक्षुः ) हें अद्भुत कृत्य आहे. पण छप्परें ( अंसत्रा = अंसत्राणि ) तयार कोणीही करील; तें करावयाला ऋभु नकोत. तेव्हां अंसत्र ह्याचा अंतरिक्ष असा अर्थ असेल; कारण ऋचेंत रोदसी शब्द आहे. पुढील ऋचा हें तिसरें उदाहरण. छप्पर व अंतरिक्ष अशासारखाच एथें अर्थ असावा. उसाचा रस कढविण्याची कढई किंवा त्याहूनही मोठें भांडें असा अंसत्राचा अर्थ असेल. धनुर्वा कवचं वा एथें जो कवच शब्द त्याची व्युत्पत्ति

**कवचं कु अञ्चितं भवति । काञ्चितं भवति । काये अञ्चितं भवति इति वा**

कवचं = कु + अचं. अचं = अञ्चितं = वाकडें झालेलें. कवच कांहींसें तिरकस असतें. किंवा कवचं = कव् + अचं. कव् = क = ईषत् = थोडेंसें, कांहींसें. कु व क ह्या दोहींचा अर्थ तोच. कव् = काये. कवच अंगांत घालतात. कवते कवचः. कवच खण खण आवाज करतें. किंवा कं वञ्चयति = विधात्याला फसवितें. विधाता ठार मारूं पहातो; पण कवच ह्याला फसवितें. अशा २ व्युत्पत्ति क्षीरस्वामी देतो ( अमर २।८।६५ ).

## खंड २६ वा

**प्रीणीताश्वान् हितं जयाथ स्वस्तिवाहं रथमित् कृणुध्वम्।**
**द्रोणाहावमवतमश्मचक्रमंसत्रकोशं सिञ्चता नृपाणम् (१०।१०१।७)**
**प्रीणीत अश्वान्। सुहितं जयथ। जयनं वः हितम् अस्तु**

हितं = सुहितं = अतिशय ( सु )हित होईल अशा रीतीनें. जयाथ = जयथ. जय तुम्हांस हितकर होवो. हें 'हितं जयाथ' ह्याचें विवरण आहे. दुर्ग म्हणतो जय पुष्कळदां अहितकर असतो; कारण लढाईत पुत्र मित्र वगैरे मारले जातात.

**स्वस्तिवाहनं रथं कुरुध्वम्**

स्वस्तिवाहं = स्वस्तिवाहनं = कल्याण आणणारा. कृणुध्वं = कुरुध्वम्. 'इत्' निरर्थक म्हणून भाष्यांत गाळलें आहे. परंतु इत् निरर्थक नाहीं. कृणुध्वम् इत् =कराच. इत् = च. स्वस्तिवाहं = अभिपूजितवाहं = ज्याचे घोडे ( वाहाः ) अभिपूजित म्हणजे आदरास पात्र होतील असा ( रथ ) असा अर्थ दुर्ग करतो. स्वस्तिवाहनं दुर्गवृत्तींत नाहीं. 'अस्तिः अभिपूजितः स्वस्ति' ( निरुक्त ३।२१ ) अभिपूजित शब्द ह्या व्युत्पत्तींतून दुर्गानें घेतला आहे.

**द्रोणाहावम्। द्रोणं द्रुममयं भवति**

द्रोणं = द्रुममयम्. द्रोणं = द्रो + नम्. द्रो = द्रुः = द्रुमः. लाकडाचा केलेला असतो म्हणून डोणीला द्रोण म्हणतात. द्रोण शब्द नपुंसक आहे. द्रोण, कलश व योनि हे समानार्थक शब्द होत. अमरकोशांत द्रोण पुंलिंगी आहे (२।९।८८). यास्क-कालीं तो नपुंसक होता कीं काय? 'द्रोणं द्रुममयम् एतं रथं' असा दुर्ग अन्वय करतो.

**आहावः आह्वानात्। आवहः आहवनात्**

आ + ह्वे पासून आहाव शब्द झाला आहे. आहावस्तु निपानं स्यादुपकूप-जलाशये ( अमर० १।९।२६ ) = ढोरांना पिण्याकरितां विहिरीजवळ जी डोण असते ती. पाणी पिण्याकरितां गुरांना तेथें बोलावितात, म्हणून डोणीला आहाव म्हणतात. आहाव शब्दासारखा जो आवह शब्द तो आ + वह् पासून. पाणी पिण्यासाठीं गुरें तेथें आणतात. आवह शब्द अमरकोशांत नाहीं.

**अवतः अवातितः महान् भवति**

अव + अत् ( = जाणें ) पासून अवत. विहीर खोल खोल ( अव ) गेलेली ( अतितः ) असते. जितका खोल तितका तो खड्डा मोठा होतो. पण खोल गेल्यानें मोठा कसा होईल हा प्रश्न आहे. दुर्गवृत्तींत 'महान्' शब्द अवातितः ह्याच्या आधीं आहे. कोठें असला तरी महान् शब्द कां घातला तें कळत नाहीं. अर्वाचीन अवट शब्द अवत ह्याचा अपभ्रंश असेल काय? अवन्ति अस्मात् अवटः (अमरः १।७।२)= ज्याच्यापासून —आंत पडूं नये म्हणून— आपला बचाव करतात असा खड्डा, अशी क्षीरस्वामी व्युत्पत्ति देतो. 'अव' ला त लागून अवत शब्द झाला असेल. अवत, उत्स, उद्रिन् असे शब्द एकत्र येतात व तत्संबंधानें सिच् ( वर्षाव करणें ) ह्या धातूचा उप-

योग केलेला आढळतो. अवत शब्द एकंदर १८ ठिकाणीं आला आहे. १६ ठिकाणीं त्याचा अर्थ मेघ किंवा बुधला असा असावा; दोन ठिकाणीं विहीर असा असेल.

**अश्मचक्रम् अशनक्रम्। असनचक्रम् इति वा**

अश्म = अशन. शत्रूंनीं फेकलेलीं चक्रें रणभूमि व्यापून टाकतात किंवा अश्म = असन. रणांत चक्रें फेंकलीं जातात.

**अंसत्रकोशम्। अंसत्राणि वः कोशस्थानीयानि सन्तु**

तुमचीं अंसत्रें म्हणजे धनुष्यें किंवा कवचें कोशाच्या ठिकाणीं असोत. गुर्जर-पाठांत वः बद्दल वा आहे; पण ' वा ' शब्द नको आहे; ' वः ' च पाहिजे. अंसत्र शब्द अमरांत नाहीं.

**कोशः कुष्णातेः। विकुषितः भवति। अयमपि इतरः कोशः एतस्मादेव। संचयः आचितमात्रः महान् भवति**

कुष निष्कर्षे ( धा० ९।४६ ) = पोखरणें; ह्यापासून कोश. कारण कोश चामड्याचा असल्यामुळें पोकळ असतो व आंतून पोखरल्यासारखा दिसतो. हा जो दुसरा ( म्हणजे लोकभाषेंत असणारा ) कोश शब्द तो ह्याच धातूपासून म्हणजे कुष् पासून. संचयः = पैसे सांठविण्याचा कोश. दुर्गवृत्तींत संचयकोशः आहे. कांहीं महाराष्ट्रपोथ्यांत संचयः कोशः असें आहे. आचिताः मात्राः यस्मिन् = ज्यांत पैशाच्या रकमा किंवा थैल्या ( मात्राः ) भरलेल्या असतात. त्यामुळेंच तो मोठा म्हणजे फुगलेला असतो. दुर्गवृत्तींत मात्राभिः आचितः असें आहे. अशा संचयास कोश कां म्हणतात त्याचें हें विवरण होय. कूयते शब्द्यते कोशः। कुष्यते आकृष्यते आयस्थानेभ्यः (क्षीरस्वामी – अमर. ९।९१ ). कु + शः = कोश; नाणीं वाजतात. किंवा पैसा, शेत, व्यापार वगैरे जीं मिळकतीचीं ठिकाणें तेथून ओढला म्हणजे आणिला जातो. कु किंवा कुष् पासून कोश.

**सिञ्चत नृपाणं नरपाणम्**

नृपाणं = नरपाणम् = नर हेच पाणी आहे ज्यांत.

**कूपकर्पणा संग्रामम् उपमिमीते**

अशा रीतीनें मंत्रद्रष्टा संग्रामाला विहिरीची उपमा देतो. संग्रामांतील वस्तू व कार्ये आणि कूपसंबंधी वस्तु व कार्यें ह्यांत त्याला साम्य दिसतें. यास्कानें केलेला ऋचेचा अर्थ :– घोड्यांना ( खायला प्यायला घालून) खुषींत आणा. ( तसें करून ) हितकर जय मिळवा. कल्याण किंवा जय घेऊन येईल अशा रीतीनें रथ तयार करा. आहाव-स्थानीं रथ करून, चक्रायुधें सर्वत्र टाकून व त्यांनीं रणभूमि चिकार भरून, धनुष्यें व कवचें हे पोहरे कल्पून, त्या पोहऱ्यांनीं नररूपी पाणी ह्या संग्रामकूपांतून बाहेर ओता. दुर्ग असाच अर्थ देतो. फक्त चांगले घोडे ज्याला जुंपले आहेत असा ( रथ ) असा तो 'स्वस्तिवाहं' चा अर्थ करतो. ऋचेच्या पहिल्या अर्धांत लढाईच्या तयारीचें वर्णन दिलें आहे. ती लढाई लाक्षणिक आहे. रथांना जोडण्याचे व बसण्याचे जे

घोडे त्यांना खुराक देऊन हुषार करावें लागतें. एथें ग्रावे म्हणजे वरवंटे हे घोडे. त्यांचा सोमाशीं सर्वांच्या आधीं संबंध येतो. ह्या संबंधामुळें ग्रावे सोम सर्वांच्या आधीं पितात, मोठ्यानें आरोळ्या ठोकतात, चैन करतात असें विनोदानें ( ऋ० सं० १०।९४ ) म्हटलें आहे. प्रीणीत अश्वान् = ग्रावे हे घोडे; त्यांना खायला प्यायला घालून खुषींत आणा. हितं जयाथ = चर्माच्छादित फलकावर ठेविलेला ( हितं ) सोम जिंका; म्हणजे तो चांगला वाटा. स्वस्तिवाहं रथम् इत् कृणुध्वं = स्वस्ति म्हणजे कल्याण ( जय ) वाहून आणील असा रथ तयार करा. दोन हात किंवा दहा बोटें हा रथ. हा रथ घोडे ओढून नेतात. हा रथ सोमरस आणतो म्हणजे तयार करतो. हात वरवंटे हलवितात; त्यानें सोम वाटला जातो. इष् + कृणुध्वं = तयार करा. इष्कृणुध्वं हें ह्या सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत आलें आहे. तेव्हां इत् = इष्? दुसऱ्या अर्थाचा अर्थ मुख्यत्वेंकरून 'अवत' शब्दावर अवलंबून आहे. आधींच्या दोन ऋचांत अवताला दोर बांधीत व तो उलटा करून त्यांतील पेय दुसऱ्या भांड्यांत किंवा तोंडांत ओतीत किंवा लहान भांड्यांनीं त्यांतील पेय काढून घेत असें वर्णन आहे. द्रोणाहावं = द्रोण म्हणजे कलश अशा मोठ्या भांड्यांनीं ज्यांतून पिण्याकरितां पेय काढतात असें. आहाव म्हणजे भांडेंभर पेय किंवा भांडें. द्रोण किंवा कलश यांच्याइतकें पेय काढून घेणारें भांडें तें आहाव. अश्मचक्रं हा शब्द कठिण आहे. मेघरूपी अवताला अश्मास्य ( २।२४।४ ) हें विशेषण लाविलें आहे. ह्या मेघरूपी बुधल्याच्या तोंडांत दगड बसविला आहे. तेव्हां चाकासारखा वाटोळा दगड ज्याच्या तोंडांत बसविला आहे असा अवत. अंसत्र = खांदे झाकणारें चिलखत असा अर्थ असेल. ह्या अवतांतून चिलखतासारख्या प्रशस्त भांड्यांत पेय ओतावयाचें. नृपाणं = नृ म्हणजे शूर; त्यांनीं पिण्याजोगा. ( असा जो ) अवतं = बुधला त्यांतील पेय सिञ्चत = ओता. अवत = बुधला. कोश = ह्याहून लहान भांडें. आहाव कोशाहून लहान. पण एथें सर्व कांहीं मोठ्या प्रमाणावर आहे. अवत म्हणजे प्रचंड बुधला. कोश चिलखतासारखें. आहाव डोणी एवढें. बुधला दगडाच्या राक्षसी बुचानें बंद केला आहे. तें बूच काढून सोमरस शूरांनीं पिण्यासाठीं बुधल्यांतून कोशांत व कोशांतून आहावांत ओतावयाचा. दुसऱ्या अर्थांत लढाईचा खरोखरचा किंवा लाक्षणिक संबंध कोणताही नाहीं.

**काकुदं ( ७६ ) तालु इति आचक्षते**

काकुद म्हणजे तालु असें आचार्य किंवा कोशकार म्हणतात. तालु तु काकुदं ( अमर २।६।९१ ). पण ऋग्वेदांत काकुद् शब्द असून तो स्त्रीलिंगी आहे. अमरांतील काकुदं नपुंसकलिंगी आहे. दोहोंचा अर्थ एक नाहीं. काकुद् = खोलबशी, पातेली, पातेलें, हंडा अशासारखें भांडें.

**जिव्हा कोकुवा। सा अस्मिन् धीयते**

काकुदं = काकु + दं. काकु = कोकुवा. दं = धीयते. जिच्यांत ( अस्मिन् )

कोकुवा म्हणजे जीभ ठेविली जाते ती तालु. बहुव्रीहीचा विग्रह करतांना यास्क यत् चीं रूपें घालीत नाहीं. ईषत् कवते। अथवा काकु ददाति तत् काकुदं (क्षीरस्वामी – अमर २।६।९१) = किंचित् आवाज करते (कवते) अथवा काकु म्हणजे कापरा आवाज जी करते ती तालु.

**जिव्हा कोकुवा। कोकूयमाना वर्णान् नुदति**

जिभेला कोकुवा म्हणण्याचें कारण कोकुवा = कोकु + वा. कोकु = कोकूयमाना. वा = वर्णान्. शब्द करतांना (कोकूयमाना) जीभ वर्ण म्हणजे अक्षरें फेंकते. कुङ् शब्दे (धा० १।९।७६) ह्याचें यङ्लुगन्त कोकूय्. कोकूय् + अ + माना = कोकूयमाना. गुर्जरपाठांत वर्णान्च्या जागीं एनां आहे. परंतु कोकूयमानाः एनां नुदति हें वाक्य अशुद्ध होईल. कोकूयमानाः (उच्चार्यमाणाः शब्दाः) एनां (जिह्वां) नुदन्ति असें वाक्य पाहिजे. उच्चारले जाणारे शब्द हिला (जिभेला) ढकलतात म्हणजे हलवितात म्हणून जिभेला कोकुवा म्हणतात. 'कोकूयमाना जिव्हा' असें असल्यास 'एनां' कशाबद्दल? 'तालु' शब्द नपुंसक असल्यामुळे एनां हें 'तालु' बद्दल खास नाहीं.

**कोकूयतेः वा स्यात् शब्दकर्मणः**

अथवा कोकूय् = शब्द करणें ह्यापासून कोकुवा शब्द झाला असेल. कोकूय् + आ = कोकुव् + आ = कोकुवा. म्हणजे कू ह्रस्व होऊन य् च्या जागीं व् आला. पहिल्या व्युत्पत्तींत व ह्या व्युत्पत्तींत फरक एवढाच कीं पहिलींत वा (= वर्णान्) सार्थ आहे असें दाखविलें आहे. तथाविधं हि सा कुर्वाणा शब्दं तालुनि वर्णान् नुदति। तस्मात् कोकुवानुदनात् काकुदं स्यात् (दुर्ग) = कोकूयमाना म्हणजे कोकु असा शब्द करणारी जीभ तालूकडे वर्ण ढकलते. जिभेच्या ह्या ढकलण्यानें काकुदं शब्द झाला असेल. कोकुवानुद = काकु (वा नु) द् = काकुद् = काकुदं. 'कोकूयतेर्वा० कर्मणः' हें दुर्गवृत्तींत व गुर्जरपाठांतही नाहीं. जिव्हा कोकुवा हें दुसऱ्यांदा आल्यानें दुर्गाचा घोटाळा झाला असावा. वास्तविक हे शब्द गाळावयास पाहिजेत. गैरसमजुतीनें ते शब्द दुसऱ्यांदा घातले गेले असावेत. 'काकुदं'च्या दोन व्युत्पत्ति. कोकुवा + धा (नं) = काकुदं. कोकू (यमाना एनां नु) द (ति) = कोकू + द = काकुदं. गुर्जरपाठांत वर्णान् च्या जागीं एनां चुकीनें पडलें असावें. 'जिव्हा कोकुवा। सा अस्मिन् धीयते। कोकूयमाना वर्णान् नुदति इति वा' असा मूळ पाठ असेल. 'कोकूयमाना (जिव्हा) एनत् (तालु) नुदति' असा गुर्जरपाठ असण्याचा संभव आहे व हाच खरा पाठ असेल. जीभ तालूच्या खालीं किंवा तालूंत ठेविलेली असते म्हणून तालु काकुद हा पहिल्या व्युत्पत्तीचा अर्थ. शब्द उच्चारतांना जीभ तालूला (एनत्) वर ढकलते असा दुसरीचा अर्थ.

**जिह्वा जोहुवा**

हु हवि देणें किंवा हांक मारणें. अभ्यासानें यङ्लुगन्त जोहु. जोहु + आ =

जोहुवा = जिव्हा. अन्नाचा हवि जिभेवर ठेवतात. किंवा जिभेच्यामुळें आपण एक-मेकांस हांक मारतों. लेढि जिव्हा । लोला च ( क्षीरस्वामी. अमर २।६।९१ ) = लिह् चाटणें ह्यापासून जिव्हा; किंवा लुड् विलोडणें ( लडबडणें, हलणें ) पासून. लोल शब्द लुड् पासून निघाला आहे; तोच धातु जिव्हा शब्दांत आहे.

**तालु तरतेः । तीर्णतमम् अङ्गम्**

तृ तरणें ह्यापासून तालु. कारण तालु सर्व अंगाहून अतिशय तरून गेलेलें अंग आहे. सर्वांच्या बरोबर पोहून तालु अतिशय उंच जागेवर बसली आहे. तीर्णतमं म्हणजे अतीशय विस्तीर्ण असा दुर्ग अर्थ करतो.

**लततेः वा स्यात् विपरीतात्**

लत्ची उलटापालट तल्; त्यापासून तालु शब्द झाला असेल. 'लत्' धातु-पाठांत नाहीं. गुर्जरपाठांत स्यात् व विपरीतात् ह्यांच्यामध्यें 'लम्बकर्मणः' असें आहे.

**यथा तलम्**

तल शब्दही लत्ची उलटापालट होऊन झाला आहे.

**लता इति अविपर्ययः**

पण लता शब्द लत्ची उल्टापालट न करतां झाला आहे. दुर्गवृत्तींत 'अवि-पर्ययेण' आहे. तलति आहारः अस्मिन् ( क्षीरस्वामी--अमर २।६।९१) = जींत आहार स्थिर होतो ती तालु. तल प्रतिष्ठायां ( धा. १०।६५ ).

## खंड २७ वा.

**सुदेवो असि वरुण यस्य ते सप्त सिन्धवः ।**
**अनुक्षरन्ति काकुदं सूर्म्यं सुषिरामिव ( ऋ० सं० ८।६९।१२ )**

**सुदेवः त्वं कल्याणदानः यस्य तव देव सप्त सिन्धवः प्राणाय अनुक्षरन्ति काकुदं सूर्म्यं सुषिरामिव इत्यपि निगमो भवति**

हें भाष्य गुर्जरप्रतींत आहे. सुदेवः = कल्याणदानः = ज्यानें केलेलें दान कल्याणकारक असतें. वरुणानें दिलेल्या धनानें कल्याण होतें. देवः दानात् ( निरुक्त ७।१५ ) = देव शब्द दा देणें ह्यापासून. देव = दान. सु कल्याणं दानं यस्य स सुदेवः. ते = तव. 'देव' अध्याहृत आहे. अनुक्षरन्ति ह्याच्या आधीं 'प्राणाय' अध्या-हृत घेतलें आहे. ह्या सात नद्या प्राणरक्षणासाठीं सतत ( अनु ) वाहतात ( क्षरन्ति ). बाकीचे शब्द जसेचे तसे ठेविले आहेत. शेवटीं 'इत्यपि निगमो भवति' घातलें आहे. हे शब्द अवतरणानंतर येतात; एथें अवतरण नाहीं; ऋचेचें केवळ भाष्य आहे. महाराष्ट्रप्रतींतलें भाष्य पुढीलप्रमाणें आहे. सुदेवः त्वं कल्याणदेवः कमनीयदेवः वा भवसि वरुण यस्य ते सप्त सिन्धवः । सिन्धुः स्रवणात् । यस्य ते सप्त स्रोतांसि तानि ते काकुदम् अनुक्षरन्ति । सूर्मि कल्याणोर्मि स्रोतः सुषिरम् अनु यथा । वीरिटं ( ७६ ) तैटीकिः अन्तरिक्षम् एवम् आह । पूर्वं वयतेः । उत्तरम् इरतेः । वयांसि इरन्ति

अस्मिन्। भांसि वा। तत् एतस्याम् ऋचि उदाहरन्ति। अपि निगमः भवति. सुदेवः= कल्याणदेवः = कल्याण करणारा देव. सु = कल्याण. अथवा सुदेवः = कमनीयदेवः= प्रेम करण्याजोगा देव. सु = कमनीयः. असि = भवसि. सिन्धुः स्रवणात्. स्रु = वाहणें; ह्यापासून सिन्धु शब्द. पण सिन्धुः स्यन्दनात् (स्यन्द् जाणें; ह्यापासून सिन्धु शब्द) असें यास्क म्हणतो ( निरुक्त ९।२६ ). स्यन्दते सिन्धुः ( अमर १।९।१ क्षीरस्वामी ). सिन्धवः = स्रोतांसि = प्रवाह. ज्या अर्थी सिन्धु म्हणजे प्रवाह ( स्रोतः ) त्याअर्थी सिन्धुशब्द स्रु धातूपासून झाला आहे. जसा अर्थ तशी व्युत्पत्ति असा निरुक्तसिद्धांत आहे. 'तानि' अध्याहृत. तुझे जे ७ प्रवाह आहेत ते तुझ्या ताळूकडे वाहतात. सूर्म्यं = सूर्मि. सूर्मि = सु + ऊर्मि = कल्याणोर्मि = ज्याच्या लाटा कल्याणकारक आहेत असा प्रवाह. 'स्रोतः' ( अध्याहृत ) ह्याचें सूर्म्यं म्हणजे सूर्मि हें विशेषण. सुषिरां = सुषिरम् = पोकळ केलेली जागा ( जशी विहीर, तळें ). अनु हा शब्द चुकीनें ऋचेंतील इव बद्दल पडला असावा. इव = यथा. लाटांनीं युक्त ( सूर्मि ) प्रवाह विहिरींत, तळ्यांत जसा वहात जातो तसे तुझे ते ७ प्रवाह तुझ्या ताळूंत वहात जातात. दुर्गापुढें भाष्य कोणतें होतें तें समजत नाहीं. कांहीं शब्दांचें तो पुढीलप्रमाणें अर्थ देतो. सुदेवः = शोभनः देवः = सुंदर देव. सप्त सिन्धवः = प्रसिद्ध सिंधु, रावी, चीनाव वगैरे नद्या किंवा अंतरिक्षांतील अश्वा, नितुन्ना, अभ्रपत्नी, मेघपत्नी, वर्षयन्ती, पुरस्तादरुन्धा अशा सात नद्या; किंवा सात समुद्र. सूर्म्यं सुषिरां = नगरोदकनिःसरण-भूमि = शहरांतील पाणी शहराबाहेर घालविण्याचीं गटारें. शहरभर पसरलेलें पाणी ह्या गटारांतून शहराबाहेर जातें. पतंजलीच्या महाभाष्यांतील ह्या ऋचेचें विवरणः— सुदेवः असि वरुण सत्यदेवः असि यस्य ते सप्त सिन्धवः सप्त विभक्तयः अनुक्षरन्ति काकुदम्। काकुदं तालु। काकुः जिह्वा। सा अस्मिन् उद्यता इति काकुदम्। सूर्म्यं सुषिरामिव। तद्यथा शोभनाम् ऊर्मिं सुषिराम् अग्निः अन्तः प्रविश्य दहति एवं तव सप्त सिन्धवः सप्त विभक्तयः तालु अनुक्षरन्ति। तेन असि सत्यदेवः = काकु म्हणजे जीभ; ती उचलली असतां जेथें जाऊन पोचते ती काकुद म्हणजे तालु. सात सिंधु म्हणजे सात विभक्ति. अग्नि पोकळ लाटेंत शिरून ती जशी जाळून टाकतो त्याप्रमाणें सात विभक्ति ताळूकडे जातात. म्हणून तूं सत्यदेव. हा अर्थ अगदीं अस्वाभाविक आहे. उतारा देण्याचें कारण काकुद शब्दाची व्युत्पत्ति व शोभनाम् ऊर्मि असा सूर्म्यं शब्दाचा अर्थ. काकुः = जीभ; दं = उद्यता = उंच गेलेली (महा०); कोकुवा = जीभ; दं = धीयते ( यास्क ). आ यत्पतन्त्येन्यः सुदुघा अनपस्फुरः। अपस्फुरं गृभायत सोम-मिन्द्राय पातवे ( ८।६९।१० ) = ज्या अर्थी लाथ न मारणाऱ्या ( अनपस्फुरः ), पुष्कळ किंवा सहज दूध देणाऱ्या ( सुदुघाः ) गाई ( एन्यः ) कलशांत पडल्या आहेत ( म्हणजे सोमरस गोक्षीरांत मिसळला आहे ), त्या अर्थी गडबड करणारा ( अपस्फुरं ) सोम इंद्राला पिण्याकरितां घ्या. अपादिन्द्रो अपादग्निर्विश्वे देवा अमत्सत। वरुण इदिह क्षयत्तमापो अभ्यनूषत वत्सं संशिश्वरीरिव ( ८।६९।११ ) = इंद्र व

अग्नि प्यायले; विश्वेदेव पिऊन हृष्ट झाले आहेत. वरुण फक्त (प्यायल्याशिवाय) एथें उरला आहे. गाई जशा वासराला दुधानें तुंद करतात तसें पाण्यानें त्याला तुंद केलें आहे. यानंतर प्रस्तुत ऋचा. तिचा अर्थः—हे वरुणा, तूं मोठा भाग्यवान् (सुदेवः) आहेस. ज्या तुझ्या पानपात्रांत सात नद्या वाहात आहेत तें पानपात्र लाटांनीं भरलेल्या समुद्राप्रमाणें ( प्रशस्त व खोल ) आहे. सात नद्या जशा समुद्रांत पडतात तशा त्या तुझ्या पानपात्रांत पडतात. काकुद् = पानपात्र ( Words in Ṛgveda Vol. I. pp 91-92 पहा ). काकुदम् अनु = काकुदि = पानपात्रांत. क्षर् = वाहणें. सूर्मि = लाटांनीं युक्त. सुषिरा शब्द एथेंच आला आहे; त्याचा अर्थ समुद्र असावा. उद्दिष्ट अर्थः—हे दात्या ( वरुण = इव ) ज्या तुझ्या भांडारांत (ते) दाते (सिन्धवः) अपार धन ( सप्त = अनु = काकुदं = सूर्म्यं = सुषिरां ) देतात ( क्षरन्ति ) तो तूं मोठा धनवान् ( सुदेवः ) असला पाहिजेस ( असि ).

**वीरिटं तैटीकिः अन्तरिक्षम् एवम् आह ॥ पूर्वं वयतेः उत्तरम् इरतेः। वयांसि इरन्ति अस्मिन् ॥ भांसि वा**

बीरिट म्हणजे अंतरिक्ष असें तैटीकि पुढीलप्रमाणें (एवं) सांगतो (आह) म्हणजे सिद्ध करतो. वि + इर् + इटं. बि = वि. वि = वय् जाणें ह्यापासून. वय गतौ (धा० १।४७६ ). उत्तर पद–इरिटं हें इर् जाणें ह्यापासून. वि = वयांसि = पांखरें. विः = पांखरूं. जेथें पांखरें संचार करतात तें बीरिटं म्हणजे अंतरिक्ष. किंवा बि = भांसि = तारे वगैरे. जेथें तारे वगैरे संचार करतात तें. ह्या व्युत्पत्ति महाराष्ट्रपाठांतच आहेत. दुर्गाला त्या ठाऊक नाहींत. 'बीरिटमन्तरिक्षं० भांसि वा' हें गुर्जरपाठांत नाहीं. तैटीकि हें नांव निरुक्त ४।३ त आलें आहे.

**तद् एतस्याम् ऋचि उदाहरन्ति। अपि निगमः भवति**

बीरिट शब्द जींत आहे अशी पुढील ऋचा उदाहृत करतात. गुर्जरपाठांत 'अपि' च्या आधीं इति आहे. 'तद् एतस्याम् ऋचि उदाहरन्ति' व 'अपि निगमः भवति' हीं वाक्यें परस्परविरुद्ध आहेत. एतस्याम् ऋचि हें पुढें येणाऱ्या ऋचेला उद्देशून आहे. 'अपि निगमः भवति' ह्याच्या आधीं ऋक् दिली असली पाहिजे. महाराष्ट्र पाठांत ' अपि निगमः भवति ' विनाकारण घातलें आहे. गुर्जरपाठांत 'इत्यपि निगमः भवति' ह्याच्या आधीं ऋक् सगळी किंवा अर्धी दिली असली पाहिजे. इतकेंच नव्हे तर बीरिट शब्दाची व्युत्पत्तिही दिली असली पाहिजे. ती व्युत्पत्ति कोणची हा प्रश्न आहे. गुर्जरपाठ दुर्गवृत्तीशीं बहुतेक जुळतो. तेव्हां ती दुर्गानें दिलेली व्युत्पत्ति असावी.

## खंड २८ वा.

**प्रवावृजे सुप्रया बर्हिरेषामा विश्पतीव बीरिट इयाते।**
**विशामक्तोरुषसः पूर्वहूतौ वायुः पूषा स्वस्तये नियुत्वान् ( ७।३९।२ )**
**प्रवृज्यते सुप्रायणं बर्हिः एषाम्**

प्रवावृजे = प्रवृज्यते = कापून ( आसनाच्या रूपानें ) तयार केलें आहे. वृज् = कापणें. अभ्यासानें ववृज्. ववृज् + ए = ववृजे. वावृजे ह्यांतील व चा वा उच्चाराकरितां. सुप्रयाः = सुप्रायणं = जेथें सहज जातां किंवा बसतां येतें असें. प्रयस् = प्र + यस्. यस् = अयनम्. सु = वत्. प्रयस् ह्याचा नेहमीचा अर्थ हवि. तो अर्थ सोडून देण्याचें कारण आसनाशीं हवीचा कांहीं संबंध नाहीं हें. दर्भासनावर बसावयाचें असतें. तें आसन जितकें सुबक व मऊ असेल तितकें मन त्याजवर बसण्यास उत्सुक होतें. परंतु दर्भावर पिंड ठेवतात हें विसरतां कामा नये. देवांना खाण्यासाठीं हवि दर्भावर ठेवतात. तेव्हां प्रयस् म्हणजे हवि हाच अर्थ योग्य आहे. सुप्रयाः हें पुलिंगी रूप असून सुप्रयसं ( अग्निं ) व सुप्रयसा ( इन्द्रावरुणौ ) अशीं आणखीं दोन रूपें ऋग्वेदांत आढळतात. वास्तविक बर्हिः नपुसकलिंगी असल्यामुळें सुप्रयः असें रूप पाहिजे होतें व मूळचें तसें कदाचित् रूप असेल. सु + प्र + याः असा पदपाठ नसून सु + प्रयाः असाच आहे. प्र + याः हें पद ( ३।२९।१५ ) मध्येंच आलें आहे व तेथें तें अनेकवचनी असून त्याचा अर्थ 'वेगानें जाणारे' असा आहे. तो शब्द व तो अर्थ एथें घेण्याचें कारण नाहीं.

**एयाते सर्वस्य पातारौ वा पालयितारौ वा**

आ + इयाते = एयाते. 'इ' जाणें ह्याचीं वर्तमानकालीं तृतीयपुरुषी रूपें इते इयाते इयते. एयाते = दोघे येतात. विश्पती = विश् + पती. विश् = ( विश्व ) = सर्व. पती = पातारौ किंवा पालयितारौ. पा किंवा पालय् = रक्षण करणें. पति शब्द पा किंवा पालय् ह्यापासून झाला असावा.

**बीरिटम् अन्तरिक्षम्। भियो वा भासो वा ततिः**

बीरिट म्हणजे अंतरिक्ष. अंतरिक्षाला बीरिट म्हणण्याचें कारण बीरिटं = बी + रि + टम्. बी = भियः. टं = तं = ततिः. आकाश हें भयाची पसरलेली एक रांगच आहे. अधांत्री असलेल्या आकाशाकडे पाहिलें म्हणजे भीति वाटते. किंवा बी = भासः=ग्रहनक्षत्रें. ग्रहनक्षत्रांच्या तेथें रांगा लागलेल्या आहेत. म्हणून बीरिट म्हणजे भीतति किंवा भास्तति. भीतननं व भास्तननं असें दुर्गवृत्तींत आहे. ह्या विवरणांत विश्पती हें वायुः व पूषा ह्यांचें विशेषण मानलें आहे. त्यामुळें ' इव ' निरर्थक म्हणून टाकून वाचयाचा.

**अपि वा उपमार्थे स्यात्**

किंवा इव निरर्थक नसून उपमावाचक असेल

**सर्वपती इव राजानौ बीरिटे गणे मनुष्याणाम्**

विश् = ( विश्व ) = सर्व. पती = धनी. विश्पती = राजानौ = सर्वांचे पती म्हणजे राजे. ह्या विवरणांत पती म्हणजे 'पातारौ वा पालयितारौ वा' असा अर्थ घ्यावयाचा नाहीं. राजे कोठें जातात किंवा येतात ? बीरिटे = मनुष्याणां गणे = जनसमूहांत. ह्याअर्थीं बीरिट शब्दाची व्युत्पत्ति जुळेल अशी करावी असें दुर्ग म्हणतो. बीर्

+ इट. वीर् = वीराः इट = अट = संघात. ज्याला जशी वाटेल तशी व्युत्पत्ति त्यानें करावी. कोणी वीर् = बिअर् (दारू). ती मिळण्यासाठीं हिंडणारा घोळका. अशी ही विनोदार्थ व्युत्पत्ति करील. कोणतीही थट्टा चालेल.

**रात्र्याः विवासे**

अक्तोः = रात्र्याः. अक्तु म्हणजे रात्र. उषसः = विवासे = गेल्यावर. उच्छी विवासे ( ऋा० १।२१६ ). विवासः = समाप्तिः. दुर्गाला यास्ककृत विवरण समजलें नाहीं. तो म्हणतोः— अक्तोः रात्र्याः अपगमे उषसश्च आगमनकाले. अक्तोर्व्युष्टौ ( ५।३०।१३ व ६।२४।९ ), उपसो यामन्नक्तोः ( ६।३०।४ ), या दोन ऋचांत अक्तोः = उषसः असा अर्थ आहे. यामन् = यामनि = प्रवासांत. यामन् ह्याच्याबद्दल प्रस्तुत ऋचेंत पूर्वहूतौ हा शब्द आहे.

**पूर्वस्याम् अभिहूतौ**

पूर्वहूतौ = पूर्वस्याम् अभिहूतौ= पहिलें बोलावणें किंवा आमंत्रण केल्याबरोबर, सगळ्यांच्या आधीं देवांना बोलावल्याबरोबर. ‘ ओषा अगन् प्रथमा पूर्वहूतौ ’ ( १।१२३।२ ) व ‘याह देवी पूर्वहूतौ मंहना दर्शता भूः ( ६।६४।५ ), ह्या दोन ऋचांत पूर्वहूतींत उषा पहिल्याप्रथम येते असें म्हटलें आहे. पूर्वेषां हूतौ = श्रेष्ठ देवी जी उषा तिला बोलाविल्याबरोबर. कदाचित् उषा स्वतः उठते व देवांना हवि घेण्यास हाक मारते असा अर्थ असेल.

**वायुश्च नियुत्वान् पूषा च**

वायुः व पूषा ह्यांना जोडण्याकरितां दोन ‘च’ अध्याहृत घेतले आहेत.

**स्वस्त्ययनाय । नियुत्वान् । नियुतः अस्य अश्वाः । नियुतः नियमनात् वा । नियोजनात् वा**

स्वस्तये = स्वति + अयनाय = सुखानें संसाररूपी प्रवास व्हावा म्हणून. ‘स्वस्तये’ हें स्वस्ति शब्दाचें चतुर्थीचें एकवचन. क्रियार्थोपपदस्य च कर्मणि स्थानिनः ( पा० २।३।१४ ) ह्या सारखा नियम यास्कानें लागू केला असावा. नाहीं तर स्वस्तये = कल्याणासाठीं, सुखासाठीं एवढा अर्थ पुरा होता. स्वस्तये म्हणजे स्वस्त्यये अशी तर कल्पना यास्काच्या डोक्यांत आली नसेलना ? स्वस्त्यये = स्वति + अये. अये = अयनाय. नियुत्वान्=नियुतः अस्य अश्वाः=ह्याचे ( अस्य ) घोडे नियुत् नांवाचे म्हणून हा (वायु) नियुत्वान्. ‘नियुद्भिः तद्वान्’ असा तद्धिताचा विग्रह करावयास पाहिजे. यास्कानें बहुव्रीहिसारखा विग्रह केला आहे व यस्य ह्याच्याबद्दल अस्य घातला आहे. ‘नियुत्वान्’ हा शब्द ‘पूषा स्वस्तये’ ह्यानतर आला आहे; तथापि यास्कानें तो ‘वायुश्च’ ह्यानंतर भाष्यांत घातला आहे. कारण वायूला नियुत्वान् म्हणतात. घोड्यांना नियुत् म्हणण्याचें कारण नियुतः नियमनाद्वा. नि + यम् (= ताब्यांत ठेवणें ) ह्यापासून नियुत्. किंवा नियोजनात्. नि + युज् ( = रथाला जोडणें ) ह्यापासून. अशा दोन अर्थाप्रमाणें व्युत्पत्ति. पण ह्या खऱ्या व्युत्पत्ति नव्हत. नि + यु + त् =

नियुत् = देणगी. नियुत्वान् = देणगीवाला, देणग्या देणारा. नि + यु = देणें. उदा० ' वायुश्च यत् नियुवैते भगश्च ( ७।४०।२ ) = वायु व भग जें धन देतात. नियुवाना नियुतः स्पार्हवीरा इन्द्रवायू सरथं यातमर्वाक् ( ७।९१।५ ) = ज्यांत स्पृहणीय असे शूर पुत्र आहेत अशा देणग्या (नियुतः) देणारे हे इंद्र व वायु रथांत बसून खालीं या. यास्कानें केलेला ऋचेचा अर्थः—जेथें सहज जातां येईल असें बर्हीचें आसन कापून तयार केलें आहे. रात्र गेल्यावर पहिल्या हाकेबरोबर अंतरिक्षांत असणारे ( बीरिटे अवस्थितौ ) व सर्वांचे पालक (विश्पती) पूषा व नियुत् नांवाचे घोडे आहेत ज्याचे ( नियुत्वान् ) असा वायु लोकांच्या ( विशां ) कल्याणाकरितां येतात. इव जर गाळला नाहीं तर सर्वांचे राजे जसे ( इव ) लोकसमूहांत ( बीरिटे ) येतात तसे असा उपमार्थी अर्थ करावा. सुप्रयाः ह्याचा खरा अर्थ वर विशद केलाच आहे. विशां हें विश्पती ह्याच्याशीं जोडावयाचें. बीरिटे हा शब्द फक्त एथेंच आला आहे. त्याचा अर्थ यज्ञांत असा करावा. विश् म्हणजे प्रजा. दोन राजांप्रमाणें वायु व पूषा थाटानें यज्ञास येतात. केव्हां ? उषेनें या दोघांना सगळ्यांच्या आधीं ( पूर्वे ) बोलाविल्याबरोबर ( हूतौ ). वायु व पूषा हे दोघे धन देणारे ( नियुत्वान् ). स्वस्तये = आमच्या कल्याणासाठीं. किंवा बीरिटे = रथे ( ? ) जसे राजे रथांत बसून येतात तसे वायु व पूषा रथांत बसून येतात असाहि कदाचित् अर्थ असेल.

**अच्छ ( ७८ ) अभेः । आप्तुम् इति शाकपूणिः**

अभि ह्यापासून अच्छ शब्द निघाला आहे. ' अभि ' ह्याचा जो अर्थ तोच अच्छ ह्याचा असा दुर्ग अर्थ करतो. पण यास्काचा उद्देश व्युत्पत्ति करणें हा आहे.

आप् ( मिळविणें ) ह्यापासून अच्छ शब्द निघाला आहे असें शाकपूणि म्हणतो. 'अच्छ' याचा अर्थ अभि नसून 'मिळविण्याकरितां' असा अर्थ आहे असें दुर्ग म्हणतो. पण ही त्याची चूक आहे. स रत्नं मर्त्यो वसु० अच्छा गच्छति (१।४१।६) एथें अच्छ = आप्तुं = मिळविण्याकरितां असा शाकपूणि अर्थ करील. पण अर्थानुरोधानें व्युत्पत्ति असा नैरुक्तांचा सिद्धांत असल्यामुळें आप् धातूपासून अच्छ शब्द निघाला आहे असें शाकपूणि म्हणतो. अच्छ, परि, ईं, सीं हे शब्द ह्या प्रकरणांत घालण्याचें कारण व्युत्पत्ति नसून ते इतर कारणाकरितां घातले असावेत. अच्छ म्हणजे कडे हा मूळ अर्थ. प्र यातन सखीँरच्छा सखायः ( १।१६५।१३ ) = हे मरुतांनो, तुम्ही मित्र म्हणून मित्रांकडे लवकर ( प्र ) या. ह्या प्राथमिक अर्थापासून इतर अर्थ निघाले आहेत. स रत्नं मर्त्यो वसु० अच्छा गच्छति ( १।४१।६ ) = तो मनुष्य धनाकडे जातो म्हणजे धन मिळवितो. नो नयतं वस्यो अस्या अच्छा ( २।३९।५ ) = हे अश्विनांनो आम्हांस धनाकडे न्या म्हणजे आम्हांस धन द्या. कमच्छा युञ्जाथे रथं ( ५।७३।४ ) = कोणाकडे ( जाण्यास ) रथाला घोडे जोडतां ? बोध-

यन्मा हरिभ्यां कुमारः साहदेव्यः । अच्छा ( ४।१५।७ ) = जेव्हां ( यत् ) सहदेवीचा पुत्र घोडे घेऊन ( हरिभ्यां ) मजजवळ ( मा अच्छा ) आला ( बोधत् = अभवत् ). अच्छा गिरः सुमतिं गन्तमस्मयू ( १।१५१।७ ) = हे अश्विनांनो, आमच्यावर तुमचें प्रेम असल्यामुळें ( अस्मयू ) आमच्या स्तुतींकडे ( गिरः = सुमतिं ) म्हणजे स्तुति ऐकण्याकरितां या. अच्छा = आ. गन्तं = यातं. अच्छा + गन्तं = आयातं=या. ह्वे, जॄ, नु, वच् , वद् ह्या धातूंस अच्छ जोडला असतांना स्तुति करणें, मन वळविणें, याचना करणें असे अर्थ उत्पन्न होतात अच्छा वद तवसं गीर्भिराभिः ( ५।८३।१ ) = जोरदार ( तवसं ) जो पर्जन्य त्याचें ह्या स्तुतींनीं मन वळव. अच्छा विवक्मि रोदसी० मनीषा ( ३।५७।४ ) = स्तुतीनें ( मनीषा = मनीषया ) मी द्यावापृथिवींची स्तुति करतों. प्र वः पूष्णे दावने आँ अच्छा वोचेयं वसुतातिमग्नेः ( १।१२२।५ ) = वः युष्माकं पूष्णे दावने अग्नेः वसुतातिं प्र वोचेय आ वोचेय अच्छा वोचेय = तुम्ही धनवान् व्हावें म्हणून ( पूष्णे = दावने ) अग्नीपासून ( अग्नेः ) धनाची मी याचना करतों. प्र सिन्धुमच्छा बृहती मनीषावस्युरव्हे (३।३३।५ ) = कल्याणेच्छु ( अवस्युः ) असा मी नदीची स्तुति करून ( बृहती मनीषा = बृहत्या महत्या मनीषया ) तिचें मन वळवितों. प्र + अच्छ + अव्हे = अनुकूल करण्याकरितां हाक मारतों. अच्छा मित्रं वरुणमिन्द्रं वोचेः ( ७।९३।७ ) = हे अग्नि, ( हे निष्पाप आहेत असें ) मित्र, वरुण व इंद्र ह्यांस सांग म्हणजे त्यांचें मन आमचे संबंधानें अनुकूल करून घे. अच्छ ऋषे मारुतं गणं ( ५।५२।१४ ) = हे ऋषि, मरुत्संघाची स्तुति कर. अच्छ = अच्छा वद. एथें अच्छ हें क्रियापदासारखें वापरलें आहे. कथा दाशेम नमसा सुदानूनेवयामरुतो अच्छोक्तौ प्रश्रवसो मरुतो अच्छोक्तौ ( ५।४१।१६ ) = प्रश्रवसः सुदानून् एवयामरुतः नमसा अच्छोक्तौ कथा दाशेम = धनवान् ( प्रश्रवसः ), दाते ( सुदानून् ) व घोड्यांवर बसणारे ( एवयाः ) असे जे मरुत् त्यांची अनुकूल मनोवृत्ति करण्याकरितां ( अच्छोक्तौ ) हवि देऊन ( नमसा ) त्यांची कशी ( कथा ) सेवा करूं ( दाशेम ). अच्छ + उक्तिः = अच्छोक्तिः = हे चांगले लोक आहेत अशी उक्ति. अच्छ + वच् ह्याचा जो अर्थ तोच अच्छोक्ति नामांत आहे. अनेकार्थी म्हणून अच्छ शब्द ह्या प्रकरणांत घातला आहे.

**परि ( ७९ ) ईं ( ८० ) सीं ( ८१ ) इति व्याख्याताः**

ह्या तीन शब्दांचें विवरण पूर्वीं केलें आहे. परि ( निरुक्त १।३ ), ईं ( १।७ ), व सीं ( १।९ ). गुर्जरपाठांत व्याख्यातं असें आहे. पण दुर्गवृत्तींत व्याख्याताः असेंच आहे. निघंटुकारानें हे शब्द ह्या प्रकरणांत अनेकार्थ म्हणून घातले असावेत. आ कलशेषु धावति पवित्रे परि षिच्यते ( ९।१७।४ )= सोमः पवित्रे परि सिच्यते कलशेषु आ धावति=सोम गाळण्यामधून ओतला जातो व पाण्यानें भरलेल्या भांड्याकडे धाव घेतो. पवित्रे परि=गाळण्यांतून. परि=मधून. रयिं समुद्रादुत वा दिवस्पर्यस्मे धत्तं (१।४७।६ ) = हे अश्विनांनो आम्हाला समुद्रांतून किंवा द्युलोकापासून धन द्या. दिवःपरि समुद्रात्

वा परि. परि=पासून. भद्रा अश्वा हरितः सूर्यस्य परि द्यावापृथिवी यन्ति सद्यः (१।११५।३) = सूर्याच्या कल्याण करणाऱ्या (भद्राः), सुवर्णमय (हरितः) घोड्या (अश्वाः) एका दिवसांत (सद्यः) स्वर्ग व पृथिवी ह्यांच्या भोंवतीं (परि) जातात. परि = भोंवतीं. असे परिशब्दाचे तीन मुख्य अर्थ आहेत. ह्या तीन अर्थांतून आणखीही अर्थ निघतील; पण विस्तरभयास्तव ते एथें देत नाहीं. 'ईं'चे पुष्कळ प्रकारचे प्रयोग आहेत. स ईं रेभो न प्रतिवस्त उस्राः (६।३।६) = तो हा (ईं) अग्नि सूर्याप्रमाणें (रेभः न) किरणें (उस्राः) पांघरतो. नक्तं य ईमरुषो यो दिवा (६।३।६) = जो हा (ईं) अग्नि रात्रीं (नक्तं) व दिवसा प्रकाशमान (अरुषः) असतो. ह्या दोन उदाहरणांत ईम् = अयम्. य ईं चकार न सो अस्य वेद (निरुक्त २।८). ईं = एतं गर्भं मेघं वा. इमा इन्द्रं वरुणं मे मनीषा अग्मन्० । उपेमस्थुः (४।४१।९) = ह्या माझ्या स्तुति इंद्र व वरुण ह्यांच्याकडे गेल्या (अग्मन्) व त्यांच्या (ईं) जवळ (उप) उभ्या राहिल्या. ईं = एतौ इन्द्रावरुणौ. स ईं वृषाजनयत्तासु गर्भं स ईं शिशुर्धयति (२।३५।१३) = बृषबल (वृषा) तो हा अग्नि त्या स्त्रियांच्या उदरीं (तासु) गर्भ उत्पन्न करता झाला (अजनयत्). तो (सः) बाल (शिशुः) त्यांचें (ईं) स्तनपान करतो (धयति). ईं (१) = अयम्. ईं (२) = एताः मातृः. ईं०इन्द्रं (५।२९।२), ईं० इयं (५।३८।२), ईम् एनं (१।९।२), एनं०ईं (१०।४४।३), असे ईम्चे भिन्न प्रयोग आढळतात. 'ईं' बद्दल कोणताही नियम ठरवितां येत नाहीं. ह्या शब्दाचा ईम् व ईमिति अशा दोन प्रकारांनीं पदकारानें निर्देश केला आहे. ईमिति असा भेद फक्त ११ वेळांच केला आहे. ईम् शंभराहून जास्त वेळां आला आहे. असे दोन प्रकार करण्याचें प्रयोजन माझ्या ध्यानांत आलें नाहीं. कोठें कोठें संहितेंत ईम्चा म् नाहींसा होतो. जसें:–समी सखायो अस्वरन् (९।४५।५) = सखायः ईं ईम् एतं सोमं सम् अस्वरन्. पण समीं रेभासो अस्वरन् (८।९७।११) = रेभासः रेभाः स्तोतारः ईम् एतम् इन्द्रं सम् अस्वरन्. 'ईम्'चा म् गेल्याचीं उदाहरणें नऊ दहा आहेत. ईम् शब्द ऐकपदिक प्रकरणांत घालण्यांत निघंटुकाराचा काय हेतु होता तें कळत नाहीं. तो शब्द अनेकार्थी नाहीं. निरुक्ताच्या पहिल्या अध्यायांत तो निरर्थक आहे असें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. ईमला सर्वत्र अर्थ आहे. अर्थ नाहीं असें जेथें वाटतें तेथें ऋचेचा अर्थ कळत नाहीं असेंच म्हणणें योग्य होईल. सीं ह्याचे दोन अर्थ आहेत अशा समजुतीनें किंवा तो शब्द अगदीं अपरिचित आहे म्हणून निघंटूंत तो घातला असावा. एकेकाळीं हें सर्वनाम असावें. पूर्वी सांगितलेल्या शब्दाची–मग तो शब्द त्याच ऋचेंत किंवा पूर्वीच्या ऋचेंत आला असो—पुनरुक्ति न व्हावी म्हणून या शब्दाचा उपयोग केलेला असतो. अपोषा अनसः सरत्संपिष्टादह बिभ्युषी । नि यत्सीं शिश्नथद्वृषा (४।३०।१०) = बिभ्युषी उषाः संपिष्टात् अनसः अप सरत् यत् यदा वृषा सीं शिश्नथत् = भ्यायलेली उषा मोडलेल्या गाडीपासून दूर गेली, कारण बैलासारख्या दांडग्या इंद्रानें तो रथ मोडून टाकला किंवा तिला मारहाण केली. एथें सीं 'अनस्' किंवा 'उषस्' शब्दाबद्दल आहे. सीं हें एथें कर्म आहे. एतदस्या

अनः शये सुसंपिष्टं विपाश्या। ससार सीं परावतः ( ४।३०।११ ) = अस्याः उषसः एतत् सुसंपिष्टम् अनः विपाशि विपाट्नद्याम् आ शये शेते। सीं परावतः ससार = चुराडा झालेली ही तिची गाडी विपाश् नदींत पडली आहे; ती ( सीं ) स्वतः स्वर्गास ( परावतः ) निघून गेली आहे. एथें सीं कर्ता आहे. वहन्ति सीमरुणासो रुशन्तो गावः ( ६।६४।३ ) = लाल, झळकणारे बैल हिला नेतात. उषा शब्द ऋचा २ मध्यें आला आहे. त्याजबद्दल सीं एथें आला आहे. हा कोणत्याही लिंगीं कोणत्याही वचनीं व कोणत्याही विभक्तींत घातलेला आढळतो. ( १।३६।१ ) मध्यें सीं अग्नीबद्दल, ( १।१२२।६ ) त 'हवानि' बद्दल, ( १।६१।११ ) त 'सिन्धवः' बद्दल आहे. व ( ५।८५।७ ) त 'तेषां', आणि (८।१००।७) त तस्य ह्या अर्थीं तो शब्द आहे. कांहीं थोड्या ठिकाणीं तो पूर्वी आलेल्या शब्दाबद्दल घातला नाहीं. त्वं सीं वृषन्नकृणोः ( ६।१।१ ) एथें सीं 'च' ह्या अर्थीं आहे. 'तो (सीं) तूं' असें किंवा 'त्वां'च असें त्वं सीं ह्याचें भाषांतर होईल. परिविष्टं जाहुषं विश्वतः सीं ( १।११६।२० ) एथें व ( १।३३।९,१।१००।१४,५।४७।२ ) एथें विश्वतः सीं असे शब्द आले आहेत. परि, विश्वतः व सीं ह्या सर्वांचा 'सर्व बाजूंनीं, चहूंकडून' असा अर्थ होईल. पण सीं ह्याचा तो अर्थ करणें अगदीं आवश्यक आहे असें वाटत नाहीं. सीं उभे रोदसी (१।३३।९), सीं रोदसी ( १।१००।१४ ), सीं जाहुषं ( १।११६।२० ), सीं द्यावापृथिवी ( ५।४७।२ ) असा अन्वय व सीं म्हणजे त्या ( प्रसिद्ध ) असा अर्थ करण्यास हरकत दिसत नाहीं. उत श्रुतं सदने विश्वतः सीं ( १।१२२।६ ) एथें सीं हा शब्द हवेमा ( इमानि हवानि ) ह्याबद्दल आहे. तथापि सीं म्हणजे चहूंकडून असा अर्थ निघंटुकाराच्या मनांत असेल. पहिल्या मंडळांत १५ वेळां, २ त २ वेळां, ३ त ९ वेळां, ४ त १० वेळां, ५ त ३ वेळां, ६ त ५ वेळां, ७ त १ वेळां, ८ त ५ वेळां, व १० त १ वेळ असा ५१ वेळां 'सीं' ऋग्वेदांत आला आहे. नवव्या मंडळांत तो मुळींच नाहीं. १० व्यांत फक्त एकदांच आहे. पुरातन ऋग्भागांत तो फार वेळां आला असून कालेंकरून तो प्रचारांतून जात चालला हें स्पष्ट आहे. ऋग्वेदाच्या आधीं तो फार प्रचारांत असावा. कदाचित् ह्या सर्वनामाची दुसरींही रूपें प्रचारांत असतील.

**एनं ( ८२ ) एनां ( ८३ ) अस्याः अस्य इति एतेन व्याख्यातं (निरुक्त ३।२५)**

अस्याः व अस्य ह्यांचे प्रयोग त्यांच्या स्वरांवर अवलंबून असतात, असें जें वर म्हटलें आहे तेंच एनं व एनां ह्यांना लागू आहे. दुर्गाला हें कोडें उकललें नाहीं म्हणून तो उदाहरणें शोधून काढा असें म्हणतो. एनं असा एक प्रकारचाच स्वर आहे. एनां व एनां एथें मात्र स्वरभेद आहे. एनां हें एकदांच आलें आहे व तें आशिरं ह्याचें विशेषण आहे ( ८।६।१९ ). एनां म्हणजे हें असा सायण अर्थ करतो; पण खरा अर्थ पांढरें असा आहे. तेव्हां एनां येथें स्वरभेद नसल्यानें प्रयोगभेद नाहीं. निघंटुकाराला काय म्हणावयाचें आहे तें यास्काच्या लक्षांत चांगलें आलें नाहीं.

एनां ह्याचीं दोनच उदाहरणें ऋग्वेदांत आहेत. त्या उदाहरणांवरून निघंटुकाराला काय म्हणावयाचें होतें तें स्पष्ट होईल. उप ह्वये सुदुघां धेनुमेतां सुहस्तो गोधुगुत दोहदेनाम् ( १।१६४।२६ ) = एतां सुदुघां धेनुम् उप ह्वये । उत सुहस्तः गोधुक् एनां दोहत् = ह्या सहज दूध देणाऱ्या गाईला मी हाक मारतों व कुशल हाताचा गवळी तिचें दूध काढो. एतां धेनुं हिचा पुन्हा निर्देश करावयाचा आहे तेव्हां एतां न घालतां एनां घातलें पाहिजे. उत त्वः पश्यन्न ददर्श वाचमुत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम् ( १०।७१।४ ). निरुक्त १।१९ पहा. एथें एनां ह्यानें वाचं चा पुनर्निर्देश केला आहे. शुनःशेपो ह्यह्वद् गृभीतस्त्रिष्वादित्यं द्रुपदेषु बद्धः । अवैनं राजा वरुणः ससृज्याद् विद्वाँ अदब्धो विमुमोक्तु पाशान् ( १।२४।१२ ) = गृभीतः त्रिषु द्रुपदेषु बद्धः शुनःशेपः हि आदित्यं वरुणम् अह्वत् । विद्वान् अदब्धः राजा वरुणः एनम् अव ससृज्यात् । पाशान् वि मुमोक्तु च = पकडलेला (गृभीतः) व तीन खोड्यांत (द्रुपदेषु) अडकविलेला (बद्धः) शुनःशेप अदितीचा पुत्र जो वरुण त्याला हाक मारिता झाला. ज्ञाता व ज्याला कोणी हिंसा करूं शकत नाहीं ( अदब्धः ) असा राजा वरुण त्याला ( एनं ) मोकळा करो ( अव ससृज्यात् ), त्याचे पाश सोडून टाको ( विमुमोक्तु ). एथें शुनःशेपाचा पुनर्निर्देश करण्याकरितां एनं शब्द घातला आहे. तेव्हां सामान्य नियम असा दिसतो कीं वस्तूचा पुनर्निर्देश करावयाचा असल्यास तो लिंगाप्रमाणें एनं, एनां, एनान्, एनाः, एने ह्यांनीं करावा. हा नियम द्वितीया व तृतीया ह्या विभक्तींपुरताच असावा. पुनर्निर्देशाचीं दिलेल्या पांच रूपांपेक्षां ऋग्वेदांत ज्यास्त रूपें नाहींत. हनामैनाँ इति त्वष्टाब्रवीत् ( १।१६१।५ ) = त्यांना ( ऋभूंना ) ठार मारूं असें त्वष्टा म्हणाला. त्वष्ट्यानें इंद्राकरितां बनविलेल्या सोमपात्राचीं ऋभूंनीं चार पात्रें केलीं. तेव्हां त्वष्टा संतापून वरील शब्द बोलला. ऋक् ४ त ऋभूंचें कृत्य वर्णिलें आहे. एनान् चा असा प्रयोग आणखी ७ ऋचांत आढळतो. एनाः ५ वेळां आला असून, ( ९।९७।२९ ) त धाराः, (१०।१९।२, १०।१९।८ व १०।१०८। ५ ) त गावः, व १०।३०।१४ त आपः ह्यांबद्दल तो घातला आहे. १। १४६।२ व १०।८२।१ ह्यांत एने ह्यानें द्यावापृथिवी निर्दिष्ट आहेत. वर जो नियम अनुमानानें काढला आहे त्याला बरेच अपवादही आहेत. एनं० पूषणं ( ६।५६।१ ), इन्द्रं० एनं ( ७।२८।५,८।२।३७ ), एनं० वज्रिणं ( ८।६६।७ ), एनं० युवानं ( १०। ३२।८ ), नृपतिं० एनं ( १०।४४।३ ), एनं० सूर्यं ( १०।८८।११ ), एनं० वृषभं ( १०।१०२।५ ), पुर० एनाः (८।९७।१४), येथें 'एनं' च्या बद्दल एतं व एनाःच्या बद्दल एताः पाहिजे. दुसऱ्या तऱ्हेचे अपवाद म्हणजे एनंच्या जागीं एतं व एनाःच्या जागीं एताः घालणें. जसें:- तीव्रो वो मधुमाँ अयं शुनहोत्रेषु मत्सरः । एतं पिबत काम्यं ( २।४१।१४ ). एतं ह्यानें मत्सरः पुनर्निर्दिष्ट होतो; तेव्हां एनं पाहिजे. आणखी 'एतं'चीं उदाहरणें:-(५।१८।३, ६।४१।३, ६।४१।४, ९।१५।७, ९।१५।८, ९।३८। ३ व ९।६१।७). एता अर्षन्ति । एता वि पृच्छ किमिदं भनन्ति (४।१८।६). एथें 'एता

वि पृच्छ' बद्दल 'एना वि पृच्छ' पाहिजे. प्रजापतिर्मध्रमेना रराणः (१०।१६९।४). एथेंही एनाः पाहिजे; कारण १–३ ऋचांत गाईचें वर्णन आलें आहे. एनं, एनां, वगैरे संबंधींचा नियम ऋग्वेदप्राक्कालीं बरोबर पाळला गेला असेल. पुढें त्यांत ढिलाई होऊं लागली असावी. ह्या ढिलाईचीं उदाहरणें वर दिलींच आहेत. यास्कानें हा नियम आपल्या भाष्यांत कडक रीतीनें पाळला आहे. जे थोडे अपवाद सांपडतात ते अज्ञानामुळें पुढील अध्यापकांनीं घुसडले असावेत. पाणिनीय संस्कृतांतही हा नियम पाळला गेला (पा० २।४।३२ व ३४ ). एनं व एनां ह्यांहून ऋग्वेदांत जास्त रूपें आहेत तीं सर्व द्यावयास पाहिजे होतीं. शिवाय हीं रूपें अस्याः व अस्य ह्यांच्या शेजारींच द्यावयास पाहिजेत. ऐकपदिक प्रकरणांत तीं कां दिलीं हें समजत नाहीं. हा विशिष्ट प्रयोगाचा प्रश्न आहे, अर्थाचा नाहीं.

**सृणिः ( ८४ ) अंकुशः भवति। सरणात्। अङ्कुशः अञ्चतेः। आकुचितः भवति इति वा**

सृणि म्हणजे अंकुश. सृ = जाणें ह्या धातूपासून तो शब्द झाला आहे. सृ गतौ ( धा० १।९६० ). सृ + निः = सृणिः. अञ्च् जाणें ह्यापासून अङ्कुश. अञ्चु गतौ ( धा० १।८८७ ). अञ्च् + उ + शः = अङ्कुशः. अङ्कुशः = अं + कुशः. अं = आ. कुशः = कुचितः. कुच कौटिल्ये ( धा० १।८८२ ). किंवा कुच = वांकडें असणें, ह्यापासून तो शब्द झाला असेल. अंकुश वांकडा असतो.

**नेदीय इत्सृण्यः पक्कमेयात् (१०।१०१।३) इत्यपि निगमः भवति। अन्तिकतमम् अङ्कुशात् आयात् पक्कम् औषधम् आगच्छतु इति आगच्छतु इति**

नेदीयः०एयात् अशी ऋचाही आहे. आगच्छन्तु इति नेदीयः = अन्तिकतमम् = अती जवळ. अन्तिकतरं पाहिजे. सृण्यः = अङ्कुशात्. सृणि म्हणजे अंकुश; ह्यापासून. एयात् = आयात् = आलें. आगच्छतु ह्या शब्दावरून आयात् शब्द भाष्यांत नसावा. एयात् = आ + इयात् = आगच्छतु. पक्कं = पक्कम् औषधम्. 'आगच्छतु इति' ह्याची द्विरुक्ति अध्याय संपला हें दाखविते. अंकुश जेथें पोंचेल त्याच्याही अलीकडचें पिकलेलें धान्य आम्हास मिळो. धान्य दाट उगवल्यामुळें खुरप्याला लांब जावें लागत नाहीं. सुबत्ता होवो असा अभिप्राय. युनक्त सीरा वि युगा तनुध्वं कृते योनौ वपतेह बीजम्। गिरा च श्रुष्टिः सभरा असन्नो नेदीय इत्सृण्यः पक्कमेयात् (१०।१०१।३)=हे मजुरांनो, नांगर (युगा )जोडा (युनक्त), चकाऱ्या ( सीराः ) पाडा (वि तनुध्वं); अशा तयार केलेल्या (कृते) जागेंत (योनौ) बी पेरा (वपत). बोलतां बोलतां ( गिरा ) आम्हांस(नः) धान्यसमृद्धि ( सभराः श्रुष्टिः ) असो ( असत् ); ( ती इतकी कीं ) सृण्यानें (सृण्यः) नजीकच्या ( नेदीयः इत् ) लोंबीकडे ( पक्कं ) जावें ( एयात् ). सृण्यः असा प्रथमैकवचनी शब्द आहे. वृक्षो न पक्वः सृण्यो न जेता ( ४।२०।५ ) = वृक्षाप्रमाणें पक्व, सृण्याप्रमाणें जेता असें इंद्राविषयीं म्हटलें आहे. तेव्हां सृण्य हें कापणीचें हत्यार असावें. ' सृण्यौ ' शीं अश्विनांची तुलना केली आहे ( १०।१०६।६ ). जुहूभिः सृण्या तुवि-

ष्वाणिः ( १।५८।४ ) = जुहूंतील घृतानें व सृणीनें मोठा आवाज करणारा अग्नि. सृण्या हें सृणि किंवा सृणी ह्या शब्दाचें तृतीयैकवचन असावें. पण सृणि किंवा सृणी शब्द प्रस्तुत ऋचेंत नाहीं. सृण्य हें कापणीचें हत्यार असावें. दुर्गवृत्तींत अन्तिकतमं शब्द नाहीं; व आयात् बद्दल आगच्छेत् आहे. जेथें 'इत्यपि निगमो भवति' असें वाक्य येतें तेथें अवतरणाचा अर्थ यास्क देत नाही असें मी वारंवार म्हटलें आहे. त्याला प्रस्तुत ऋचा अपवाद आहे. विवरण प्रक्षिप्त नसून भाष्याचा आवश्यक भाग आहे. 'आगच्छतु इति आगच्छतु इति' हे शब्द विवरणाखेरीज घालतां येणार नाहींत.

# अध्याय ६ वा

## खंड १ ला

**त्वमग्ने द्युभिस्त्वमाशुशुक्षणिस्त्वमद्भ्यस्त्वमश्मनस्परि । त्वं वनेभ्यस्त्वमोषधीभ्यस्त्वं नृणां नृपते जायसे शुचिः ( २।१।१ )**

**त्वम् अग्ने द्युभिः अहोभिः**

द्युभिः = अहोभिः. अहोभिः हा पर्यायशब्द घातल्यावर द्युभिः कां ?

**त्वम् आशुशुक्षणिः । आशु इति च शु इति च क्षिप्रनामनी भवतः । क्षणिः उत्तरः क्षणोतेः**

आशुशुक्षणिः (निघण्टु ४।३।१)= आशु + शु + क्षणिः. आशु व शु ह्या दोहोंचाही अर्थ 'लवकर' पुढील (उत्तरः) जो क्षणिः तो क्षण्=जखम करणें (धा० ८।३) ह्यापासून. दुर्ग म्हणतोः—शु एथें उगाच-पण पुढें उपयोगीं पडेल म्हणून—सांगितला आहे. पण हें त्याचें म्हणणें चुकीचें आहे. किंवा

**आशु शुचा क्षणोति इति वा । सनोति इति वा । शुक् शोचतेः**

आशुशुक्षणिः = आशु + शुक् + क्षणिः. किंवा मधलें पद शु नसून शुक् (ज्वाला) असेल. जो तावडतोब (आशु) ज्वालेनें (शुचा) जखम करतो (क्षणोति). किंवा शुच् + सनिः = शुक्षणिः. जो तावडतोब ज्वालेनें हवि भक्षण करतो किंवा धन देतो. हें अग्नीचें विशेषण. शुच् जळणें किंवा जाळणें ह्या अर्थीं शुच् धातुपाठांत नाहीं. शुच् शोके ( धा०१।१८३ ).

**पञ्चम्यर्थे वा प्रथमा । तथा हि वाक्यसंयोगः**

आशुशुक्षणिः ही प्रथमा पंचम्यर्थीं असेल. आशुशुक्षणेः असा बदल केल्यानें वाक्यसंयोग होतो म्हणजे वाक्य सुसंगत होतें. पुढील अद्भ्यः वगैरे शब्द पञ्चम्यंत आहेत तेव्हां हाही पंचम्यंत करावा.

**आ इति आकारः उपसर्गः पुरस्तात् । चिकीर्षितजः उत्तरः । आशुशोचयिषुः इति**

आ + शुशुक्षणिः. आरंभींचा (पुरस्तात्) आ हा उपसर्ग आहे. पुढील (शुशुक्षणिः) हा चिकीर्षितज आहे म्हणजे सन्नन्त आहे. शुच् अभ्यासानें शुशुच्. शुशुच् + स = शुशुक्ष. शुशुक्ष + निः = शुशुक्षणिः. आ + शुशुक्षणिः = आ + शुशोचयिषुः = पेटवणाऱ्यापासून.

**शुचिः शोचतेः ज्वलतिकर्मणः । अयम् अपि इतरः शुचिः एतस्मात् एव । निःषिक्तम् अस्मात् पापकम् इति नैरुक्ताः**

शुच् = जळणें किंवा जाळणें ह्यापासून शुचि ( ऋचेंतील शेवटचा शब्द ). शुचिः = जळणारा. लौकिक जो शुचि ( = शुद्ध ) शब्द तोही ह्याच ( धातू )पासून.

घाण जळून गेल्यानें जागा शुद्ध होतें. पाप जळून गेल्यानें मनुष्य शुद्ध होतो. पण नैरुक्तांच्या मतें निः + सिच् पासून शुचि शब्द झाला आहे. कारण प्रायश्चित्तानें पाप पार ( निः ) धुवून जातें ( सिक्तं ). नैरुक्तांनीं स्तेन ( ४।२४ ) तायु ( ४।२४ ) तस्कर ( ३।१४ ) ह्यांची अशीच व्युत्पत्ति केली आहे. आ + शुच् ह्यापासूनच आशुशुक्षणि शब्द झाला आहे. सह् + स ( लेट् ) + निः = सक्षणिः. ह्याप्रमाणें शुशुच् + स ( लेट् ) + निः = शुशुक्षणिः. बाकीच्या व्युत्पत्ति केवळ क्लृप्ति दाखविणाऱ्या. दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थः—हे नृपति, अग्नि द्युभिः म्हणजे पूर्णिमा वगैरे तिथींना, नृणां म्हणजे ऋत्विजांनीं मथित केलेला असा तूं जन्मतोस. तूं सर्वत्र प्रकाशतोस. पाणी, पाषाण, झाडें, ओषधि ह्यांपासून ज्वालायुक्त तूं जन्मतोस.

द्युभिः यागदिवसैः निमित्तभूतैः जायसे यागार्थं मथनेन उत्पद्यसे इत्यर्थः। यद्वा तादृशैः दिवसैः सहितो जायसे = यज्ञाचे जे दिवस त्यामुळें तूं जन्माला येतोस; म्हणजे यज्ञासाठीं मंथनानें तूं जन्मतोस; किंवा यागदिवसासह जन्मतोस; म्हणजे यागदिवस आले म्हणजे तूं जन्मलासच ( सायण ). आशुशुक्षणिः = आ सर्वतः दीप्यमानः । यद्वा आशु शीघ्रं शुच् दीप्तः सन् यतः सेव्यते इति । आशु शुचं शोकं सनोति ददाति शत्रुभ्यो दाहादिना इति आशुशुक्षणिः = सभोंवार सर्व ठिकाणीं प्रकाशणारा; किंवा प्रज्वलित असतांना ताबडतोब सेविला जातो ( सन्यते = सेव्यते = संभज्यते ); किंवा दाह वगैरे प्रकारांनीं शत्रूला ताबडतोब दुःख देतो ( सायण ). अश्मनः = मेघात् पाषाणाद्वा = मेघापासून, पाषाणापासून(सायण). आशुशुक्षणिः हा शब्द पंचम्यंत कल्पून यास्कानें केलेला ह्या शब्दाचा अर्थ वर दिलाच आहे; पण तशा अर्थाची आवश्यकता नाहीं. नृणां नृपते, वसूनां वसुपते, रयीणां रयिपते अशी ऋग्वेदांत बोलण्याची पद्धत आहे. मनुष्यांचा किंवा देवांचा जो पति तो नृणां नृपति. द्युभिः शब्द घोटाळा करणारा आहे. क्षयं बृहन्तं परिभूषसि द्युभिः (३।३।२) = हे अग्नि तूं तेजानें (द्युभिः) मोठ्या द्युचा ( क्षयं बृहन्तं ) पराभव करतोस (परिभूषसि). सुप्रकेतैर्द्युभिरग्निर्वितिष्ठन् रुशद्भिर्वर्णैरभि राममस्थात् (१०।३।३) = झळझळित तेजानें अग्नि जागृत होऊन रात्रीचा ( रामं ) पराभव करिता झाला. ह्या दोन उदाहरणांवरून द्युभिः म्हणजे तेजानें, ज्वालांनीं युक्त असा अर्थ करितां येईल. द्युभिः व आशुशुक्षणिः ह्या प्रत्येकाला जायसे शब्द जोडावयाचा आहे. तूं तेजांनीं (=तेजासह ) जन्मतोस; तूं प्रकाशमान जन्मतोस; असा ह्या दोन वाक्यांचा अर्थ होतो. इन्द्र आशाभ्यस्परि सर्वाभ्यो अभयं करत्(२।४१।१२)=इंद्र सर्व दिशांना म्हणजे तेथें राहणाऱ्या प्राण्यांना अभय देता झाला. आशाभ्यः ( २ ) असें विभक्त्यंत रूप निघंटूंत देण्याचें कारण आशा शब्दाचें पञ्चम्यंत रूप ऋग्वेदांत एकदांच आलें आहे असें असेल; वास्तविक आशा हेंच रूप द्यावयास पाहिजे होतें. ( १ ) परा ह यत् स्थिरं हथ नरो वर्तयथा गुरु। वि याथन वनिनः पृथिव्या व्याशाः पर्वतानाम् ( १।३९।३ ) = हे मरुतांनो, तुम्ही बळकट बसलेल्याला लाथाडतां, जड वस्तूला गरगर फिरवितां, अरण्यें व

पृथिवीच्या व पर्वताच्या आशा तुम्ही ओलांडून जातां ( वि + याथन ). ( २ ) उप प्रागात् ० देवानामाशा उप वीतपृष्ठः ( १।१६२।७ ) = ज्याची पाठ लकाकत आहे असा हा अश्वमेधीय घोडा देवांच्या आशांकडे गेला आहे. ( ३ ) अस्मभ्यं सूरयः स्तुता विश्वा आशास्तरीषणि ( ४।३७।७ ) = हे ऋभूंनो, आम्ही तुमची स्तुति केली आहे ( स्तुताः ); म्हणून आम्हांला सर्व आशा द्या ( तरीषणि ? ). ( ४ ) अस्माकासश्च सूरयो विश्वा आशास्तरीषणि ( ५।१०।६ ) = आमचे देव आम्हांला सर्व आशा देवोत (तरीषणि ?). (५) पूषेमा आशा अनुवेद सर्वाः ( १०।१७।५ ) = पूषा ह्या सर्व आशा जाणतो किंवा देतो. ( ६—७ ) देवानां युगे प्रथमेऽसतः सदजायत । तदाशा अन्वजायन्त (१०।७२।३) ॥ भूर्जज्ञे उत्तानपदो भुव आशा अजायन्त (१०।७२।४) = ' सत् ' नंतर आशा उत्पन्न झाल्या; भूमधून आशा उत्पन्न झाल्या. आशा शब्द एकंदर आठ वेळां आला आहे. ६ व ७ ह्यांत आशा म्हणजे दिशा. १ त आशा = अफाट विस्तार. २,३,४,५ व प्रस्तुत ऋचा ह्यांत आशा = स्वर्ग. आशाः=तीन स्वर्ग. परावत् व रोचन तीन आहेत. प्रस्तुत ऋचेचा अर्थः—देवांच्या सर्व प्रदेशांपासून इंद्र आम्हांस अभय देवो. थोडी जरी चूक झाली तरी देव रागावतात व शासन करतात; तसें त्यांनीं करूं नये म्हणून इंद्रास विनंति. आशाभ्यः न घालतां आशाः घालणें जरूर होतें.

**आशाः दिशः भवन्ति । आसदनात्**

आशा म्हणजे दिशा. दिशांना आशा म्हणण्याचें कारण ह्या दिशा सर्वत्र बसतात म्हणजे असतात. दिक् म्हणजे अवकाश ( space ); अवकाश नाहीं असें ठिकाण कोठें आहे? सर्व कांहीं अवकाशांत आहे. आ + सद् पासून आशा.

**आशाः उपदिशः भवन्ति । अभ्यशनात्**

आशा म्हणजे उपदिशा ( आग्नेयी वगैरे ); उपदिशांना आशा म्हणण्याचें कारण त्या एकमेकींचा उपभोग घेतात किंवा दिशांचा दोहीं टोंकांनीं उपभोग घेतात म्हणजे दिशांना चिकटलेल्या असतात. अश् पासून आशा. ( दिक् शब्द पहा. निरुक्त २।१५ ).

**काशिः ( ३ ) मुष्टिः । प्रकाशनात्**

काशि = मूठ. मुठीला काशि म्हणण्याचें कारण मूठ जेव्हां आपण उघडतो तेव्हां मुठींत लपविलेली वस्तु प्रकाशांत येते म्हणजे दिसते.

**मुष्टिः मोचनात् वा । मोषणात् वा । मोहनात् वा**

मुष्टिः = मुच् + टिः. नवरानवरी, खेळगडी वगैरे एकमेकांच्या मुठी सोडतात. किंवा मुष् + तिः = मुष्टिः. चोरलेली वस्तु मुठींत ठेवली असते. किंवा मुह् + टिः = मुष्टिः. मुठींत काय आहे अशा विचारानें माणूस गोंधळतो.

**इमे चिदिन्द्र रोदसी अपारे यत्संगृभ्णा मघवन् काशिरित्ते ( ३।३०।५ ) इमे चित् इन्द्र रोदसी रोधसी द्यावापृथिव्यौ विरोधनात्**

भाष्यांत चित् शब्द कां ठेवला? पाणिनीय संस्कृतांत चित् हें स्वतंत्र पद नाहीं. तें कश्चित्, केचित् अशा शब्दांतच आढळतें. रोदसी = रोधसी = द्यावापृथिव्यौ. द्यावापृथिवींना रोदसी म्हणण्याचें कारण त्या प्राणिमात्रांना अडकवून ठेवतात ( विरोधनात् ).

**रोधः कूलम् । निरुणद्धि स्रोतः**

रोधः = तीर ( कूलं ). तीराला रोधस् म्हणण्याचें कारण तें नदीचें पाणी अडवून ठेवतें; सर्वभर पसरूं देत नाहीं. रुणद्धि अम्भः रोधः ( अमर १।९।७ क्षीरस्वामी ). रोधसी ह्यावरून यास्काला रोधस् शब्द सुचला.

**कूलं रुजतेः विपरीतात् । लोष्ठः अविपर्ययेण**

रुज् भङ्गे ( धा० ६।१३५ ), ह्या धातूचीं अक्षरें उलटावयाचीं. रुज् = र् + उ + ज् = ज् + उ + र्. 'ज् = क्' व 'र् = ल्' ह्यानें क् + उ + ल् = कुल् = कूल. तीर पाण्यानें भंगलें जातें, कूलति कूलं (अमर १।९।७क्षीरस्वामी); कूल आवरणे (धा० १।५२६ ). 'रुज्'च्या अक्षरांची उलटापालट न करतां लोष्ठ शब्द उत्पन्न होतो. रुज्+टः=रोज् + टः = लोष् + टः=लोष्टः = लोष्ठः. अमर (२।९।१२) लोष्टानि असें नपंसुक देतो. लुष्यते लुषति वा लोष्टम् ( अमर २।९।१२ क्षीरस्वामी ). धातुपाठांत लुष् धातु नाहीं. लूष भूषायां ( धा० १।६७८ ) व लूप हिंसायां ( १०।७७ ) असे धातु आहेत. लोष्ट संघाते ( १।२५९ ) असा धातु आहे. ह्या धातूपासून लोष्ट शब्द कीं नामापासून लोष्ट धातु हें ठरवितां येत नाहीं. व्युत्पत्तीचा मोह यास्कास आवरता आला नाहीं. त्यामुळें ऋचेचा अर्थ एथवर थांबला.

**अपारे दूरपारे**

अपारे = दूरपारे = ज्यांना पार म्हणजे अंत किंवा शेवट नाहीं अशा; ज्यांचे शेवट दूर आहेत; अफाट. पार म्हणजे पलीकडचें तीर.

**यत् संगृभ्णासि मघवन्**

संगृभ्णाः =संगृभ्णासि. संगृण्हासि असें पाहिजे होतें; कारण, ग्रभ् धातुपाठांत नाहीं; तो धातु वैदिक आहे. यास्ककालीं ग्रभ् धातु प्रचारांत होता कीं काय?

**काशिः ते महान्**

इत् निरर्थक म्हणून गाळला आहे. महान् अध्याहृत. इत् सार्थ आहे. काशिः ते तव इत् एव = मूठ म्हणावी तर तुझीच; कारण, ह्या द्यावापृथिवी इतक्या अफाट असूनही तूं मुठींत धरतोस.

**अहस्तमित् सं पिणक् कुणारुम् ( ३।३०।८) अहस्तम् इन्द्र कृत्वा संपिण्ढि परिक्कणनं मेघम्**

अहस्तं = अहस्तं कृत्वा = हस्तरहित करून, हात तोडून. इत् निरर्थक म्हणून गाळला आहे. सं पिणक् = संपिण्ढि = कुसकरून टाक, ( शत्रूचें ) पीठ कर. कुणारुं ( ४ ) = परिक्कणनं मेघं = गर्जना करणाऱ्या मेघाला. क्कणमधील वला

संप्रसारण होऊन कुण्. कुण् + आरुः = कुणारुः. ह्याच ऋचेंत वृत्राला पियारुं म्हटलें आहे. पिय् ( हिंसा करणें ) + आरुः = पियारुः = हिंसा करणारा. कुणारु शब्दाचा तोच अर्थ कशावरून नसेल? क्वण् धातु ऋग्वेदांत नाहीं. हात नव्हते अशा कुणारूला हें इंद्रा तूं चुरडून टाकलेंस. अपाद् अहस्तो अपृतन्यत् इन्द्रम् ( १।३२।७ ) = ज्याला हातपाय नव्हते असा वृत्र इंद्राशीं लढूं लागला. तेव्हां इंद्रानें वृत्राचे हात तोडले असें म्हणणें बरोबर नाहीं·

## खंड २ रा.

**अलातृणो वल इन्द्रव्रजो गोः पुरा हन्तोर्भयमानो व्यार ।**

**सुगान् पथो अकृणोन्निरजे गाः प्रावन् वाणीः पुरुहूतं धमन्तीः ( ३।३०।१० )**

**अलातृणः अलम् आतर्दनः मेघः**

अलातृणः = अल + आ + तृणः. अल = अलम्. तृणः = तर्दनः. हिंसा करण्याला ( आदतर्दयितुं ) समर्थ ( अलं ). मेघ जलाला फार त्रास देतो; म्हणून तो अलातृणः. प्र स्कम्भदेष्णा अनवभ्रराधसोऽलातृणासो विदथेषु सुष्टुताः ( १।१६६।७ ) ह्या ऋचेंत मरुतांना अलातृणासः म्हटलें आहे. त्या शब्दाचा अर्थ ठरवितां येत नाहीं. मरुतांजवळ धन ( देष्ण=राधस् ) असतें; तेव्हां अलातृण ह्याचाही धनवान् असा अर्थ असेल. वलापाशीं गोधन आहे म्हणून तो अलातृण. ऋग्वेदांत अरं शब्द आहे, अलं नाहीं. तृण ( गवत ) हा शब्द ऋग्वेदांत आहे; पण 'अला' काय ? शिवाय मरुतांना तृणाशीं काय करावयाचें आहे ?

**वलः वृणोतेः । व्रजः व्रजति अन्तरिक्षे**

वृ आच्छादणें पासून वर म्हणजे वल. वल ( मेघ ) जल झांकतो. मेघाला व्रज म्हणण्याचें कारण तो अंतरिक्षांत जातो म्हणजे संचार करीत असतो. व्रज म्हणजे कोंडवाडा.

**गोः एतस्याः माध्यमिकायाः वाचः**

मध्यम प्रदेशांत असणारी वाक् म्हणजे वीज; ती एथें गाय.

**पुरा हननात् भयमानः व्यार**

हन्तोः=हननात्. हन् + तुः=हन्तुः=मारणें. मार खाण्याच्या आधींच भयभीत होऊन पलायन करता झाला ( वि + आर ).

**सुगान् पथो अकृणोन्निरजे गाः । सुगमनान् पथः अकरोत् निर्गमनाय गवाम्**

कधीं कधीं यास्क ऋक्पाद जशाचा तसा भाष्यांत उतरतो; कारण कळत नाहीं. सुगान् = सुगमनान्. अकृणोत् = अकरोत्. निरजे = निः + अजे = निर्गमनाय. गुर्जरप्रतींत 'निर्गमनाय'बद्दल निरजनाय आहे; अज गतिक्षेपणयोः (धा० १।२३०); तेव्हां निरजनाय असा भाष्यांत पाठ असेल; पण तो शब्द दुर्गवृत्तींत नाहीं. गाः = गवां = गाईना ( बाहेर जातां यावें म्हणून ); ह्या गाई म्हणजे जल.

**प्रावन् वाणीः पुरुहूतं धमन्तीः । आपः वा वहनात् । वाचः वा वदनात्**

वाणीः = आपः. पाणी वाहतें म्हणून पाण्याला वाणी म्हटलें आहे. म्हणजे 'वाणी' शब्द वह् = वाहणें ह्यापासून झाला आहे. किंवा वाणी म्हणजे वाक्. वाचेला वाणी म्हणण्याचें कारण वाचा वदते. म्हणजे वाणी शब्द वद् = बोलणें ह्यापासून.

**बहुभिः आहूतम् उदकं भवति । धमतिः गतिकर्मा**

पुरुहूतं = पुरु + हूतं. पुरु = बहुभिः. हूतं = आहूतम्. पाणी (उदकं) सर्वांस पाहिजे असतें. सर्वजण पावसाला बोलावतात म्हणून पुरुहूतं म्हणजे उदक. धम् = जाणें ह्यापासून धमन्तीः. यास्ककृत ऋचेचा अर्थः— जलाला त्रास देणारा (अलातृणः) व अंतरिक्षांत संचार करणारा (व्रजः) मेघ (वलः) विजेचा कडकडाट ऐकून (गोः) तडाखा बसण्याच्या (हन्तोः) आधींच (पुरा) भयभीत होऊन (भयमानः) विगलित झाला (व्यार); तेव्हां जलानें वहावें म्हणून (निरजे गाः) इंद्र सुखकर (सुगान्) मार्ग (पथः) करता झाला (अकृणोत्); उतरत्या मार्गानें जाणाऱ्या (धमन्तीः) नद्या (वाणीः) सर्वांस पाहिजे असें उदक (पुरुहूतं) रक्षित्या झाल्या (प्रावन्); किंवा लोकवाणी (वाणीः) पाण्याकडे जाणारी (धमन्तीः) म्हणजे पाणी आलें पाणी आलें असें म्हणणारी, लोकांना पाहिजे अशा पाण्याकडे (पुरुहूतं) गेली (प्रावन्) म्हणजे पाण्याची स्तुति करूं लागली. पण ऋचेचा अर्थ पुढीलप्रमाणें असावाः–हे इन्द्रा ! गाईंचा (गोः) कळप (व्रजः) हाच वल तो वज्राघात होण्याच्या आधींच भयभीत होऊन पळून गेला (व्यार). गाईंना बाहेर काढण्याकरितां इंद्रानें मार्ग सुकर केले; त्यामुळें स्तुति (वाणीः) इंद्राला (पुरुहूतं) नमत्या झाल्या (प्रावन्). गाः हें निरजे ह्या तुमन्ताचें कर्म आहे. अज् = हाकलून देणें, बाहेर काढणें. निर् + अज् + ए (तुमन्त प्रत्यय). गाईंनीं बाहेर पडावें म्हणून. प्रावन् हा मूळचा प्रवन् होय. मुखोच्चाराकरितां किंवा अपभ्रंशानें त्याचा प्रावन् उच्चार झाला. प्रु = नमणें. अभि प्रवन्त समनेव योषाः कल्याण्यः स्मयमानासो अग्निम् । घृतस्य धाराः (४।५८।८) = जशा स्मितवदन (स्मयमानासः) सुंदरी (कल्याण्यः) समानपतीला (समनं) नमस्कार करतात किंवा चहुबाजूंनीं आलिंगितात (अभिप्रवन्त) त्याप्रमाणें घृताच्या धारा अग्नीला नमस्कार करतात किंवा आलिंगितात. धम् = कवटाळणें; जसें:– सं बाहुभ्यां धमति संपतत्रैः (१०।८१।३) = तो एक देव बाहूंनीं द्यावापृथिवींना आच्छादितो किंवा कवटाळतो. आवत्तमिन्द्रः शच्या धमन्तं (८।९६।१३) = स्तुति करणाऱ्या (धमन्तं) द्रप्स नांवाच्या राजाचें इंद्रानें स्वसामर्थ्यानें रक्षण केलें. वाणी ह्याचा बहुतेक ठिकाणीं अर्थ स्तुति (१) कांहीं थोड्या ठिकाणीं पाणी (२).

## खंड ३ रा.

**उद्वृह रक्षः सहमूलमिन्द्र वृश्चा मध्यं प्रत्यग्रं शृणीहि ।**

**आ कीवतः सललूकं चकर्थ ब्रह्मद्विषे तपुषिं हेतिमस्य (३।३०।१७) उद्धर रक्षः सहमूलम् इन्द्र**

उत् + वृह = उत् + हर = उपटून टाक. वृह् = नाश करणें, मोडणें. वि + वृह् ह्याचीं उदाहरणें बरींच आहेत. उत् + वृह् ह्याचीं दोन; प्र + वृह्चीं चारपांच. इंद्रा, राक्षसांना ( चेटकें करणारांना ) मुळासकट उपटून टाक.

**मूलं मोचनात् वा मोषणात् वा मोहनात् वा**

मुच् किंवा मुष् किंवा मुह् पासून मूल. झाडांचें मूळ जमिनींतून सोडवावयाचें असतें ( मोचनात् ); किंवा चोरावयाचें असतें ( मोषणात् ); किंवा मूळ न सांपडल्यामुळें माणूस गोंधळतो ( मोहनात् ). कांहींतरी व्युत्पत्ति व कांहींतरी अर्थ. ' मूल ' शब्दाची व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं.

**वृश्च मध्यं प्रति शृणीहि अग्रम् । अग्रम् आगतं भवति**

त्यांच्या शरीराचा मधला भाग कापून टाक; व अग्र म्हणजे डोकें तोडून टाक. झाडाचें जसें मूळ, मधला भाग व अग्र, तसें जादूवाल्यांचें. त्यांचा अजीबात नाश कर. अग्रं = अ + ग् + र् + अ + म्. अ = आ. ग् + अ = ग. र् + म् = तं. झाडाचें अग्र पुढें आलेलें असतें. हीहि व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं.

**आ कियतः देशात्**

कीवतः = कियतः ( देशात् ) = कोठून तरी. कोणत्या ठिकाणीं हा जादूगार होता हें लोकांना कळूं नये किंवा तर्कानें सुद्धां समजूं नये अशा रीतीनें उपटून टाक. कीवतः शब्द एथेंच आला आहे. त्याचा अर्थ करणें कठीण आहे.

**सलल्लूकं संलुब्धं भवति । पापकम् इति नैरुक्ताः**

सररूकं ( ६ ) = सलल्लूकं = संलुब्धं. चकर्थ = कुरु ( दुर्ग ). प्रतिपक्षाला गोंधळवून ( संलुब्धं = संमूढं ) टाक. ' भवति ' दुर्गवृत्तींत नाहीं. सलल्लूकं = पापकं. आमच्याहून त्याला अधिक पापी कर असा नैरुक्त अर्थ करतात. 'र्' चा 'ल्' होईल; पण सलल्लूकं म्हणजे संलुब्धं कसें? दोन्ही शब्दांत स व (ल्लू) लु आहेत. 'ल' चा 'ब्' व 'कं' चा 'धं' करून कसातरी संलुब्धं शब्द बनवावयाचा. सररूकं म्हणजे पापकं हा अर्थ कसा काढतां येतो हेंही समजत नाहीं. नैरुक्तांनीं स्तेन, तायु व तस्कर ह्यांची जशी व्युत्पत्ति केली आहे तशी 'सररूकं'ची केली असावी. 'सलल्लूकं संलुब्धम् अस्मिन् पापकम् इति नैरुक्ताः' असें भाष्य असलें पाहिजे. सररूकं = संलुब्धं = अतिशय लुब्ध झालें आहे पाप ज्याच्यांत तो सररूक. पहिल्याप्रथम नैरुक्तांनीं केलेली व्युत्पत्ति देऊन मग यास्क स्वतःची व्युत्पत्ति देतो.

**सररूकं वा स्यात् सर्तेः अभ्यस्तात्**

सृ अभ्यासानें सर्सृ. सर्सृ = सर् + स् + ऋ. ऋ = अर्. सर् + अर् = सरर्. सरर् + ऊकं = सररूकं = भराभर (आंत आंत) सरणारा किंवा पळणारा. सररूकं चकर्थ = त्याला पळणारा करतो = त्याला पळवून लावतो. आ ह्याचा चकर्थ ह्याच्याशीं संबंध आहे. यास्क व दुर्ग हे 'कीवतः आ' असा पञ्चम्यर्थीं अन्वय करतात. आ + कृ = जवळ करणें. कीवतापासून सररूकाला तूं जवळ केलेंस म्हणजे वाचविलेंस,

पण कीवत् व सररूक हे दोन्हीही शब्द दुर्बोध आहेत; दोन्हीही दोन व्यक्तींचीं नांवें असतील. तुझा भक्त जो सररूक त्याला तूं त्याचा शत्रु जो कीवत् त्याच्यापासून वाचविलेंस; किंवा सररूक म्हणचे वज्र. तें इंद्रानें कीवत् म्हणजे वज्र ठेवण्याचें म्यान त्यांतून बाहेर काढलें. हवा तो अर्थ करावा. कियत् शब्द ऋग्वेदांत आला आहे. कीवत् हा त्याचा अपभ्रंश मानणें बरोबर होणार नाहीं.

**तपुषिः तपतेः। हेति हन्तेः**

तप्=भाजणें; ह्यापासून तपुषि=भाजणारी. तपुषिः=तापयित्री (दुर्ग). हन् पासून हेति. हेतिः=हन्त्री (दुर्ग). वास्तविक हि पासून हेति. ब्रह्म म्हणजे देवांच्या स्तुति; त्यांचा द्वेष करणाऱ्यावर (ब्रह्मद्विषे) जळतें अस्त्र फेक (अस्य).

**त्यं चिदित्था कत्पयं शयानं (५।३२।६) सुखपयसम्। सुखम् अस्य पयः**

कत्पयं (७) = कत् + पयं. कत् = क. पयं = पयसम्. क = सुख. सुखकर आहे पय म्हणजे उदक ज्याचें असा मेघ. सुखम् अस्य पयः हा 'सुखपयसं' चा विग्रह देण्याची आवश्यकता नव्हती. अशा रीतीनें (इत्था) निजलेल्या (शयानं) त्या मेघाला (कत्पयं) इंद्रानें मारलें (जघान). त्याच सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत प्रयुतं शयानं असें आहे. तेव्हां कत्पयं = प्रयुतं = लांबलचक असा अर्थ कां नसेल? हा शब्द एथेंच आला आहे.

**विस्रुहः (८) आपः भवन्ति। विस्रवणात्। वया इव रुरुहुः सप्त विस्रुहः (६।७।६) इत्यपि निगमः भवति**

विस्रुह् = पाणी. पाण्याला विस्रुह् म्हणण्याचें कारण तें वाहतें (विस्रवणात्). वि + स्रु पासून विस्रुह्. विस्रुहः जींत आहे अशी ऋचाही आहे. तस्येदु विश्वा भुवनानि मूर्धनि वया इव रुरुहुः सप्त विस्रुहः (६।७।६) = इव यथा विस्रुहः मूर्धनि वयाः शाखाः रोहन्ति तथा तस्य वैश्वानरस्य अग्नेः मूर्धनि विश्वा विश्वानि सप्त भुवनानि रुरुहुः रोहन्ति = विस्रुहाच्या डोक्यावर जशा शाखा तशा अग्नीच्या डोक्यावर सगळीं म्हणजे सात भुवनें उभीं आहेत. विस्रुह् म्हणजे वृक्ष किंवा पर्वत कां नसेल? प्रसर्स्राणो अनुबर्हिर्वृषा शिशुर्मध्ये युवाजरो विस्रुहा हितः (५।४४।३) = पसरणारा (प्रसर्स्राणः), बळकट (वृषा), बालक (शिशुः), तरुण (युवा), जरारहित (अजरः) अशा अग्नीला विस्रुहानें (विस्रुहा) बर्हिरासनावर (बर्हिः अनु = बर्हिषः मध्ये) ठेवलें. विस्रुह् कोण? विस्रुह् शब्द दोनदांच आला आहे. बर्हिरासनावर, विस्रुहाच्या मध्यें अग्नि ठेवला गेला. विस्रुह् = बर्हि (?). प्रस्तुत ऋचेंत वयाः व प्रस्रुहः ह्यांचा अर्थ एकच असेल. सप्त = असंख्य. झाडावर जशा असंख्य शाखा तशीं अग्नीच्या डोक्यावर असंख्य भुवनें. वैश्वानर = पृथिवी; तिच्या डोक्यावर म्हणजे तिच्यावर सर्व प्राणिमात्र (भुवनानि) झाडांच्या फांद्यांप्रमाणें वाढतात व वाहणाऱ्या (सप्त = सर्पणाः) नद्या (विस्रुहः) वाहतात किंवा सात (सप्त) समुद्र (विस्रुहः) पृथिवीवर फांद्यांप्रमाणें पसरले आहेत असा दुर्ग व कित्येक टीकाकार अर्थ करतात; तो अर्थ अस्वाभाविक आहे.

**वीरुधः ( ९ ) ओषधयः भवन्ति । विरोहणात् । वीरुधः पारयिष्णवः । (१०।९७।३) इत्यपि निगमः भवति**

वीरुधः = ओषधि. ओषधि वाढतात म्हणून त्यांना वीरुधः म्हटलें आहे. वि + रुह् पासून वीरुध्. वीरुधः जींत आहे अशी ऋचाही आहे. पारयिष्णूः पारयिष्णवौ पारयिष्णवः असा हा स्त्रीलिंगी शब्द चालतो. ( रोगांतून ) पार पाडणाऱ्या ( पारयिष्णवः ) ओषधि. वि + रुध् पासून वीरुध् शब्द असण्याचा ज्यास्त संभव आहे. याला प्रमाण 'वि यो वीरुत्सु रोधन् महित्वोत प्रजा उत प्रसूषु अन्तः ( १।६७।५ ) = यः अग्निः विरोधन् वीरुत्सु प्रसूषु च अन्तः महित्वा महत्त्वेन प्रजाः प्रजायते = लतांवर चढणारा (विरोधन्) जो अग्नि लतांपासून जन्मास येतो. विरोधन् = विरोहन्. रुध् व रुह् एकच. वीरुध् शब्द १२ वेळां आला आहे. सर्व ठिकाणीं ओषधि, लता हाच अर्थ आहे. ८ ठिकाणीं 'वीरुध्' चा अग्नीशीं संबंध येतो. अग्नि वीरुधांपासून जन्मतो व जन्मल्याबरोबर त्यांच्यावर चढतो. सोमाला 'वरिधां पतिः' ( ९।११४।२ ) म्हटलें आहे. वीरुध् ह्या रोग्याला वीर्य देवोत असें एकींत ( १०।९७।२१ ) व एकींत ही जी बलवत्तम वीरुध् मी खणून काढीत आहें तिनें माझी सवत मरो ( १०।१४५।१ ) असें म्हटलें आहे. प्रस्तुत ऋचेंत रोगांतून पार पाडणाऱ्या वीरुध् असा अर्थ आहे. विरोहति विरुणद्धि वा वीरुध् ( अमर २।४।९ क्षीरस्वामी ). 'वि'ला दीर्घत्व आलें आहे; त्यामुळेंच वीरुध् शब्द निघंटूंत घातला गेला असावा. अर्थ एकच.

**नक्षद्दाभं ( १० ) अश्नुवानदाभम् । अभ्यशनेन दभ्नोति इति । नक्षद्दाभं ततुरिं पर्वतेष्ठां ( ६।२२।२ ) इत्यपि निगमः भवति**

नक्षत् = अश्नुवान = व्यापणारा. पण यास्क अश्नुवान = अभ्यशनेन (व्यापनेन) असा अर्थ करतो. दभ्नोति इति दाभः=हिंसा करणारा. नक्षद्दाभं शब्द जींत आहे अशी ऋचाही आहे. जो शत्रूला सर्व बाजूंनीं व्यापून (अभ्यशनेन) त्याचा नाश करतो, जो संकटांतून पार पाडतो व जो पर्वतावर बसतो अशा इंद्राला. नक्ष् धातूचे ( १ ) व्यापणें, ( २ ) पोचणें, ( ३ ) जाणें, ( ४ ) सेवा करणें, ( ५ ) साहाय्य करणें असे अर्थ आहेत. यास्क व दुर्ग पहिला अर्थ घेतात. नश् + स् ( लेट् ) = नक्ष् = नाश करणें. यः दभ्नोति स दाभः. दाभान् यः नक्षति नाशयति स नक्षद्दाभः असा अर्थ असेल.

**अस्कृधोयुः ( ११ ) अकृध्वायुः । कृधु इति ऱ्हस्वनाम । निकृत्तं भवति**

अस्कृधोयुः = अस् + कृध् + ओयुः. अस् = अ. कृध्=कृधु. ओयुः=आयुः. ज्याचें आयुष्य ऱ्हस्व नाहीं असा = दीर्घायु. कृधु = ऱ्हस्व = लहान, छोटें. लहानाला कृधु म्हणण्याचें कारण लहान वस्तु मोठ्या वस्तूंतून कापून ( कृत्त ) लहान ( नि ) केली असते. कृत् = कापणें; ह्यापासून कृधु. अनिरेण वचसा फल्ग्वेन प्रतीत्येन कृधुनातृपासः ( ४।५।१४ ) एथें कृधुना हें वचसा ह्याचें विशेषण असून त्याचा खोटें, फुकट असा अर्थ आहे. मम स्वनात् कृधुकर्णो भयाते ( १०।२७।५ ) एथें कृधु-

कर्ण हें विशेषनाम असावें. कृधुकर्ण म्हणजे लहान कानाचा असा अर्थ नसून लांब कानाचा असाही अर्थ असेल. कृधु शब्द अमरांत नाहीं. अवोरित्था वां छर्दिषो अभिष्टौ युवोर्मित्रावरुणावस्कृधोयु ( ६।६७।११ ) हे मित्रावरुणौ वां युवयोः छर्दिषः कल्याणस्य अभिष्टौ दाने अवोः आवयोः अस्मभ्यम् इत्था एतावत् अस्कृधोयु धनम् अस्तु. अस्मे धत्तं यदसदस्कृधोयु ( ७।५३।३ ) = ( हे द्यावापृथिवींनो, तुमच्यापाशीं खूप धन आहे म्हणून ) आम्हांला अस्कृधोयु धन द्या. दोन्हीं ठिकाणीं अस्कृधोयु म्हणजे पुष्कळ असा अर्थ असेल. यु हा प्रत्यय दिसतो; तो गव्यु, अश्वयु वगैरेंत आहे. अस्कृधः + यु = अस्कृधोयु. अस्कृधः ह्याचा अर्थ व व्युत्पत्ति काय ?

**यो अस्कृधोयुरजरः स्वर्वान् ( ६।२२।३ ) इत्यपि निगमः भवति**

अस्कृधेयु शब्द जींत आहे अशी ऋचाही आहे. यः ह्याचा पूर्वार्धांतील रायः ह्याच्याशीं संबंध आहे. ज्याला जरा नाहीं ( अजरः ), ज्यांत सूर्य म्हणजे अतिशय धन भरलें आहे असें अस्कृधोयु धन दे ( तम् आभर ). तीनही उदाहरणांत अस्कृधोयु हें धनवाचक शब्दाचें विशेषण आहे.

**निशृम्भाः ( १२ ) निश्रथ्यहारिणः**

निशृम्भाः = नि + शृ + ऋ + म् + भाः. ऋ = अर्, श् + र् + अ = श्र = श्रथ्. नि + श्रथ् = निश्रथ्य. भाः = हाः = हारिणः. निश्लथया दृढया गत्या हारिणः = ढिल्या नाहीं तर नेटाच्या गतीनें घेऊन जाणारे.

## खंड ४ था.

**आजासः पूषणं रथे निशृम्भास्ते जनश्रियम् । देवं वहंतु बिभ्रतः (६।५५।६ ) आवहन्तु अजाः पूषणं रथे निश्रथ्यहारिणः । जनश्रियं जातश्रियम्**

आजासः = आ + अजासः. अजासः = अजाः. आ + वहन्तु = आवहन्तु. महाराष्ट्रपाठ ‘ निश्रथ्याहारिणः ’ असा आहे; तो चूक आहे. निशृम्भाः = निश्रथ्यहारिणः. निश्रथ्य ह्याचा अर्थ काय ? हें नि + श्रथ् ह्याचें ल्यबन्त रूप आहे. आपट्यांच्या कोशांत श्रथ् = (१) इजा करणें. (२) ढिलें करणें. (३) प्रयत्न करणें व (४) आनंदित होणें असे चार अर्थ दिले आहेत. निश्रथ्य = प्रयत्न करून. हारिणः = नेणारे. निश्रथ्य = संबध्य व हारिणः = हर्तारः असा निशृम्भाः ह्याचा सायणाचार्य अर्थ करितात. संबध्य ( स्वतःला, रथाला ) बांधून म्हणजे जोडून. या शब्दाचा खरा अर्थ समजत नाहीं. निशृम्भाः = नि + शृम्भाः ( ? ). हा शब्द एथेंच आला आहे. त्यांत ‘ शृम्भ् ’ असा धातु असल्यास त्याचीं रूपें ऋग्वेदांत आढळत नाहींत. ‘ शृभ् ’, किंवा ‘ शृम्भ् ’ असा धातु धातुपाठांत किंवा आपट्यांच्याही कोशांत नाहीं. यूरोपीय पंडित ‘ स्थिर पायाचे, स्थिर गतीचे ’ असा अर्थ करतात. पण खरा अर्थ कळणें कठीण आहे. जनश्रियं = जातश्रियम् = ज्याच्यांत सौंदर्य उत्पन्न झालें आहे अशाला.

जन = जात. पण जन म्हणजे पंचजन; त्यांचा पूषा देव होता. पंचजनांना शोभा आणणारा. अग्निश्रियः मरुतः (३।२६।५), (अग्निः) घृतश्रीः (१।१२८।४), (इन्द्र) हरिश्रियं (८।१५।४) ह्यांत अमक्या सारखी शोभा आहे ज्याची किंवा ज्यांची असा अर्थ आहे. जनश्रियं ह्यांत उपमा नाहीं. (मरुतः) गणश्रियः (१।६४।९), (अग्नेः) गणश्रियः (८।२३।४), ह्यांत गण म्हणजे संघ, त्याला शोभा आणणारे किंवा आणणारा असा अर्थ असावा; किंवा पूषा म्हणजे पंचजनांची मूर्तिमंत संपत्ति. ऋचेचा अर्थः—पंचजनांची मूर्तिमंत संपत्ति असा जो देव पूषा त्याला वेगानें जाणारे व रथांत (रथे) वाहून नेणारे (बिभ्रतः) ते प्रसिद्ध (ते) बोकड (अजासः) इकडे आणोत (आवहन्तु).

**बृबदुक्थः (१३) महदुक्थः। वक्तव्यम् अस्मै उक्थम् इति बृबदुक्थो वा**

बृबदुक्थः=बृबत् + उक्थः. बृबत्=बृहत् = महत्. ज्याच्या स्तुति (उक्थानि) मोठ्या आहेत तो बृबदुक्थः. बृहत् ह्यांतील 'ह' चा ब उच्चार केला गेला. किंवा बृबत् = ब्रुवत् = वक्तव्यम्. ज्याची स्तुति केली पाहिजे असा. एथें 'ब' (ब्रुवत्) बद्दल ब उच्चारला गेला. दुर्गवृत्तींत वक्तव्योक्थः. असा समास आहे व तोच पाठ बरोबर आहे. वक्तव्यम् अस्मै उक्थं हें त्या समासाचें विवरण करणारें वाक्य आहे. बृहदुक्थ हें अग्नीला (५।१९।३) म्हटलें आहेसें वाटतें. बृहदुक्थ हें एका स्तोत्याचें नांव आहे (१०।५४।६।१०।५६।७).

**बृबदुक्थं हवामहे (८।३२।१०) इत्यपि निगमः भवति**

बृबदुक्थ शब्द जींत आहे अशी ऋचाही आहे. बृबदुक्थ म्हणजे स्तुत्य जो इंद्र त्याला आम्ही बोलावतों.

**ऋदूदरः (१४) सोमः। मृदूदरः। मृदुः उदरेषु इति वा**

ऋदूदरः = ऋदु + उदरः. ऋदु = मृदु. सोमाचा आंतील भाग पोकळ असल्यामुळें मऊ असतो. एथें उदर सोमाचें. किंवा तो पिणाऱ्याच्या पोटांत मऊ असतो म्हणजे पोटांत गेल्यावर ओकाऱ्या येऊं देत नाहीं. दुर्गवृत्तींत मृदूदरः ह्याचें हें दुसरें विवरण आहे.

**ऋदूदरेण सख्या सचेय (८।४८।१०) इत्यपि निगमः भवति**

(जो प्यायल्यावर मला त्रास देणार नाहीं अशा) सौम्य (ऋदूदरेण) मित्राची (सख्या) संगति मला मिळो (सचेय). ऋदूवृधा (८।७७।११) ह्या शब्दावरून ऋदू असा पहिला अवयव असला पाहिजे. (२।३३।५) त रुद्राला ऋदूदरः व (३।५४।१०) त मरुतांना आणि आदित्यांना ऋदूदराः म्हटलें आहे. तेव्हां हे देवही मृदूदर होते कीं काय? इंद्राचे बाहू 'ऋदूपे चित् ऋदूवृधा' आहेत (८।७७।११). ऋदू म्हणजे जल असा अर्थ घेतल्यास ऋदूदर म्हणजे जलाकरितां मेघ फोडणारा व ऋदूवृधा म्हणजे जल वाढविणारे असा अर्थ होईल. ऋदूपे चित् = ऋदूपामध्येंही; पण ऋदूप म्हणजे काय? ऋदूं पिबति तत् ऋदूपं वालुकाप्रदेशः = जल पिऊन टाक-

णारा वाळूचा प्रदेश. अशा वाळवंटांत सुद्धां ( चित् ) पाणी वाढविणारे असा कदाचित् अर्थ असेल. किंवा कीलालपे ( १०।९१।१४ ) व शुचिपे ( १०।१००।२ ) ह्यांप्रमाणें ऋदूपे हे ऋदूपाः ह्याचें चतुर्थीचें एकवचन असल्यास ऋदूपाला सुद्धां देणारे, ऋदूची वृद्धि करणारे असा अर्थ होईल. रयि, वयः, अन्न वगैरेंना वृध् शब्द लावलेला आढळतो. तेव्हां ऋदू = रयि = वयः = धन असा अर्थ असेल. इंद्राला पुरंदर हें नांव पडण्याचें कारण तो किल्ल्यांत लपविलेलें गोधन किल्ले फोडून बाहेर काढतो. तेव्हां ऋदूदर = किल्ल्यांत अडकलेलें गोधन किल्ले फोडून बाहेर काढणारा असा अर्थ असला पाहिजे. यास्कानें केलेला अर्थ साफ चुकला आहे.

**ऋदूपे ( १५ ) इति उपरिष्टात् व्याख्यास्यामः**

ऋदूपे शब्दाचें विवरण पुढें ( ६।३३ ) त करूं. ऋदूपे शब्दाचा अर्थ वर केला आहे.

**पुलुकामः ( १६ ) पुरुकामः। पुलुकामो हि मर्त्यः ( १।१७९।५ ) इत्यपि निगमः भवति**

पुलुकामः = पुलु + कामः. पुलु = पुरु. ज्याच्या मनांत पुष्कळ कामना आहेत तो पुलुकामः. मर्त्याच्या मनांत पुष्कळ वासना असतात.

**असिन्वती (१७) असंखादन्त्यौ**

असिन्वती=असंखादन्त्यौ=भक्षण न करणाऱ्या. हा अर्थ आहे, व्युत्पत्ति नव्हे.

**असिन्वती बप्सती भूर्यत्तः ( १०।७९।१ ) इत्यपि निगमः भवति**

न खाणाऱ्या ( असिन्वती ) अशा त्या खाणाऱ्या ( बप्सती ) दाढा पुष्कळ ( भूरि ) खातात ( अत्तः ). न खाणाऱ्या व खाणाऱ्या ह्यांतील विरोध घालविण्याकरितां दुर्ग असंखादन्त्यौ इव म्हणजे जणूं काय खात नाहींत अशा असा अर्थ करतो. असंखादन्त्यौ स्तोतारं = स्तोत्याला न खाणाऱ्या असा सायणाचार्य अर्थ करतात. सिनम् अन्नं भवति ( निरुक्त ५।५ ) ह्यावरून अ + सिन् + वन् = न खाणारा असा यास्कानें अर्थ केला असावा; पण तो अर्थ बरोबर नाहीं. सि = बांधणें; ह्याच्यापासून निषेधार्थी असिन्वं, असिन्वा, असिन्वन् व असिन्वती अशीं रूपें ऋग्वेदांत आलीं आहेत. त्यं० असिन्वं वव्रं० आददुग्रः ( ५।३२।८ ) = जो पाणी आच्छादून टाकतो पण ज्याला कोणी बंधन घालूं शकत नाहीं अशा त्या वृत्राला उग्र इंद्रानें पकडलें ( आदत् ). अ + सिन्वं = बंधनरहित. असिन्वा ते वर्ततामिन्द्र हेतिः ( १०।८९।१२ ) = हे इंद्रा तुझें तें अस्त्र ( हेतिः ) अडथळ्याशिवाय ( असिन्वा ) जावो. असिन्वन् दंष्ट्रैः पितुरत्ति भोजनं ( २।१३।४ ) = बापानें दिलेलें अन्न अडथळा न येतां किंवा न थांबतां ( असिन्वन् ) इंद्र दाढांनीं खातो. प्रस्तुत ऋचेंत असिन्वती = न थांबणाऱ्या, निर्बंधाशिवाय.

**कपनाः (१८) कम्पनाः क्रिमयः भवन्ति। मोषथा वृक्षं कपनेव वेधसः (५।५४।६) इत्यपि निगमः भवति**

कपनाः = कम्पनाः = कांपविणारे. हे कांपविणारे कृमि होत. गुर्जरपाठ व दुर्गवृत्तीच्या कांहीं पोथ्यांत कृमयः आहे. किडे ( कपना ) जसे (इव) झाडाचा नाश करतात त्याप्रमाणें हे कर्तबगार ( वेधसः ) मरुतांनो, तुम्ही मेघाचा नाश करतां. कपना शब्द एथेंच आला आहे. कपना = लाकुडकापे असा अर्थ कां नसेल ? झाडांना कांपावयास लावतात किंवा स्वतः कांपतात म्हणून कृमि कपन.

**भाऋजीकः ( १९ ) प्रसिद्धभाः । धूमकेतुः समिधा भाऋजीकः ( १०।१२।२ ) इत्यपि निगमः भवति**

भाऋजीकः = भा + ऋजीकः. ऋजीक = प्रसिद्ध = अलंकृत ( ६।२१ ). धूम आहे केतु ( ध्वज ) ज्याचा असा अग्नि समिधा मिळाल्यामुळें ज्वालायुक्त ( भा – ऋजीक ) होतो. लाकडें मिळाल्यामुळें ज्वाला दुरून दिसतात. ऋजुका अकुटिला अप्रतिहता प्रसिद्धा भाः दीप्तिः यस्य सः ( देवराज ). ऋजीक शब्द आविर्ऋजीक, गोऋजीक व भाऋजीक अशा तीन समासांतच येतो. आविर्ऋजीको विदथा निचिक्यत् ( ४।३८।४ ) या शब्दांचा मला अर्थ कळला नाहीं. आविर्ऋजीकः हें दधिक्राव्याचें विशेषण आहे. पिबा तु सोमं गोऋजीकमिन्द्र ( ६।२३।७ ); असावि० गोऋजीकमन्धः ( ७।२१।१ ); इमा हि वां गोऋजीका मधूनि ( ३।५८।४ ); ह्या तीनही ठिकाणीं सोम गाईच्या दुधानें मिश्रित असा अर्थ आहे. भाऋजीकः ( ३।१।१२, १०।१२।२ ), भाऋजीकं ( १।४४।३।।३।१।१४ ), ह्या चारी ठिकाणीं भाऋजीक हें अग्नीचें विशेषण आहे. आविः आविष्कृतम् ऋजीकं येन, गोः गोपयः ऋजीकं यस्य, भाः ऋजीकं यस्य असा ह्या सामासिक शब्दांचा विग्रह आहे. विग्रहावरून ऋजीक म्हणजे रूप असा अर्थ असावा. ज्यानें आपलें रूप प्रकट केलें आहे तो ( आविर्ऋजीकः ), गाईचें दूध हें रूप आहे ज्याचें तो ( गोऋजीकः ), ज्वाला ( भाः ) रूप आहे ज्याचें तो ( भाऋजीक ) असा अर्थ योग्य दिसतो.

**रुजानाः ( २० ) नद्यः भवन्ति । रुजन्ति कूलानि । सं रुजानाः पिपिष इन्द्रशत्रुः ( १।३२।६ ) इत्यपि निगमः भवति**

रुजानाः = नद्यः. नद्या जेव्हां तटांचा भंग करतात तेव्हां त्यांना रुजानाः हें नांव पडतें. इंद्राचा शत्रु जो वृत्र तो नद्यांचा पुरा चुराडा करता झाला. नातारीदस्य समृतिं वधानां ( इंद्राच्या वज्रासारख्या माऱ्यापासून वृत्र सुरक्षित राहूं शकला नाहीं ) असा आधींचा पाद आहे. तेव्हां प्रस्तुत पादाचा अर्थ पुढीलप्रमाणें असेल. इन्द्रशत्रुः रुजानः संपिपिषे = इंद्राचा शत्रु जो वृत्र त्याचा वज्राचे तडाखे खाऊन खाऊन (रुजानः) अगदीं (सं) चुराडा झाला(पिपिषे). म्हणजे रुजानाः हे मूळचें रुजानः असें असेल. वृत्राला इंद्राच्या वज्राच्या माऱ्यांतून सुटतां येईना व तो नद्या चुरडिता झाला ह्या दोहोंची एकवाक्यता होत नाहीं. रक्षसः सं पिनष्टन ( ७।१०४।१८ ), अनसः० संपिष्टात् ( ४।३०।१० ) पुरो० संपिणक् ( ४।३०।१३ ), संपिषन्ति ओषधिं ( १०।८५।३ ), सं पिणक् कुणारुं ( ३।३०।८ ), शिरो दासस्य सं पिणक् वधेन ( ४।

१८।९ ), उषासमिन्द्र संपिणक् ( ४।३०।९ ), अहिं सं पिणक् ( ६।१७।१० ), व पुरं सं पिणक् ( ८।१।२८ ),. ह्या सर्व ऋचांत चुराडा केलेली वस्तु भरीव आहे. नदीला किंवा पाण्याला चुरडल्याची कल्पना कोठेंही नाहीं. पण रुजानाः म्हणजे काय? रुजानाः = रुज्यमानाः = पीडिलेल्या. ह्या पीडिलेल्या नद्या म्हणजे नद्यांचें पाणी असेल. इंद्राचा शत्रु जो वृत्र तो नद्यांना पीडा देत होता व त्यांचा चुराडा करीत होता; तोच वृत्र आतां इंद्राच्या वज्राच्या माऱ्यापासून स्वतःचें रक्षण करूं शकला नाहीं. वृत्रा ! नद्यांच्या पाण्याचा चुराडा करीत होतास नाहीं ? पण आतां तुझी कशी तारांबळ होत आहे ! हें विवरण मी वर केलेल्या विवरणापेक्षां सरस व बरोबर दिसतें.

**जूर्णिः ( २१ ) जवतेः वा । द्रवतेः वा । दूनोतेः वा**

जु ( जाणें ) + र्णिः = जूर्णिः. द्रु ( धावणें ) = ञु = जु + र् . जुर् + निः = जूर्णिः. दु ( इजा करणें ) = जु . जु + र्णिः = जूर्णिः. जूर्णि म्हणजे एक प्रकारचें अस्त्र. अस्त्र वेगानें जातें ( जवते ), धांवतें ( द्रवति ), इजा करतें ( दुनोति ) म्हणून-जूर्णि शब्द ह्या तीन धातूंपैकीं कोणत्याही धातूपासून निघाला असेल. अर्थाप्रमाणें व्युत्पत्ति ह्या नियमाला अनुसरून ह्या तीन व्युत्पत्ति दिल्या आहेत. जॄ = हिंसा करणें असा ऋग्वेदांत धातु आहे. जॄ + निः = जूर्णिः. जूर्यति ( १।१२८।२ ) = जाळून टाकतो, नाश करतो; हें जॄ धातूचें रूप आहे. कदाचित् जूर्व् (हिंसा करणें) ह्यापासूनही जूर्णि शब्द निघाला असेल.

**क्षिप्ता जूर्णिर्न वक्षति ( १।१२९।८ ) इत्यपि निगमः भवति**

फेकलेलें ( क्षिप्ता ) अस्त्र ( जूर्णिः ) आमच्याकडे पोचणार ( वक्षति ) नाहीं. जूर्णि शब्द एकंदर ४ वेळां आला आहे. प्रस्तुत ऋचा वगळून बाकीच्या तीन ठिकाणीं त्या शब्दाचा अर्थ स्तुति किंवा हवि असा आहे. प्रतीची जूर्णिर्देवतातिमेति (६।३९।२) = स्तुति किंवा हवि देवसंघाकडे जातो. परि त्रिधातुरध्वरं जूर्णिरेति नवीयसी ( ८।७२।९ ) = नवीन व दृढ अशी स्तुति किंवा हवि यज्ञांतून देवांकडे जातो. अग्ने रेभो न जरते ऋषूणां जूर्णिर्होता ऋषूणाम् ( १।१२७।१० ) = हविर्युक्त ( जूर्णिः ) ऋषूंचा होता – अग्नि – एखाद्या स्तोत्याप्रमाणें ( रेभः न ) स्तुति करीत आहे. प्र रातिरेति जूर्णिनी घृताची ( ६।६३।४ ) = अश्विनांकडे घृतपूर्ण ( घृताची ) व स्तुतियुक्त (जूर्णिनी) हवि (राति) वेगानें (प्र) जातो(एति). एथें जूर्णिनी शब्द आहे. प्रस्तुत ऋचा फार दुर्बोध आहे. तिचा अर्थ करणें कठीण आहे. सर्व ऋचा पुढीलप्रमाणें आहे:— प्रप्रा वा अस्मे स्वयशोभिरूती परिवर्ग इन्द्रो दुर्मतीनां दरीमन् दुर्मतीनाम् । स्वयं सा रिषयध्यै या न उपेषे अत्रैः । हतेमसन्न वक्षति क्षिप्ता जूर्णिर्न वक्षतिः— दुर्मतीनां परिवर्गे दुर्मतीनां दरीमन् दरीमणि वः युष्माकम् इन्द्रः स्वयशोभिः स्वबलेन ऊती ऊत्या बलेन प्रप्र अतिवेगेन अवतु । अत्रैः हता या ईम् एषा नः उप इषे इति सा स्वयं रिषयध्यै असत् अस्तु । क्षिप्ता सा न वक्षति न वक्षति = दुष्टांचा संहार ( परिवर्गे = दरीमन् ) होत असतांना इंद्र त्वरेनें ( प्रप्र ) स्वबलानें ( स्वयशोभिः = ऊती ) आमचें

रक्षण करो (अवतु). शत्रूंनीं (अत्रैः) फेकलेलें (हता=क्षिप्ता) अस्त्र जें (या) आमच्याकडे ( नः ) येत आहे त्याचा स्वतःचाच ( स्वयं ) नाश होवो ( रिषयध्यै असत् ). वह् + स ( लेट् ) किंवा वच् + स ( लेट् ) ह्या दोन धातूपासून वक्षति होईल. पण वह् व वच् दोन्ही सकर्मक आहेत. वक्षति ह्याला एथें कर्म नाहीं. वक्षति हें कर्मणि असण्याचा म्हणजे वक्ष्यते ( = उह्यते ) ह्या अर्थी असेल. तसा कर्मणि प्रयोग असल्यास जूर्णि ( स्तुति किंवा हवि ) जशी (न) देवांकडे नेली जाते (वक्ष्यते) तसें हें अस्त्र आमच्या-कडे नेलें जाणार नाहीं. जूर्णि म्हणजे स्तुति हाच अर्थ एथेंही असेल.

**परि घ्रंसमोमना वां वयो गात् ( ५।६९।४ ) पर्यगात् वां घ्रंसम् अहर् अव नाय अन्नम्**

परि + गात् = परि + अगात् = पर्यगात्. घ्रंसं = अहर् = रोजच्या रोज. ओमना ( २२ ) = अवनाय = ( तुमची ) तृप्ति करण्याकरितां. अवनेन असा कित्येक पाठ घेतात असें दुर्ग म्हणतो. गुर्जरपोथ्यांतही तोच पाठ आहे. अवनेन = रक्षण कर-णाऱ्या मंत्रानें (दुर्ग). वयः = अन्नं = हवि. तुम्ही तृप्त व्हावें म्हणून हवि तुमच्याकडे दररोज जातो, हा अर्थ चुकला आहे. अत्रि हा अश्विनांचा भक्त होता. दस्यूंनीं त्याला होळींत घालून, भुयारांत टाकून, झाडाच्या चिरफळींत कोंबून त्याचा नानाप्रकारांनीं छळ केला. भुयारांत असतांना तो भुकेनें मरत होता; अश्विनांनीं त्याचा जीव वाचविण्या-करितां ऊन ऊन अन्न पाठविलें व तेथून त्याची सुटका केली. त्या जीवरक्षणाला उद्देशून हे शब्द आहेत. घ्रंसं = ऊन. घ्रंसं वयः = ऊन ऊन अन्न. ओमना = ओम-नेन = जीवनसाधनानें युक्त. असें तें तुमचें ( वां ) अन्न सर्व अडचणींतून ( परि ) अत्रीकडे गेलें. युवमत्रयेऽवनीताय तप्तमूर्जमोमानमश्विनावधत्तं ( १।११८।८ ) = हे अश्विनांनो, भुयारांत टाकलेल्या ( अवनीताय ) अत्रीला ( अत्रये ) तुम्ही प्राणरक्षक ( ओमानं ) ऊन ( तप्तं ) अन्न ( ऊर्जं ) दिलेंत ( अधत्तं ). अशा तऱ्हेचीं अवतरणें भांडारकर-संशोधन-शालेच्या एका त्रैमासिकांत 'अत्रि' ह्या लेखांत मी दिलीं आहेत.

## खंड ५ वा

**उपलप्रक्षिणी ( २३ ) उपलेषु प्रक्षिणाति । उपलप्रक्षेपिणी वा**

उपलप्रक्षिणी = उपल + प्र + क्षिणी. उपल = उपलेषु. प्र + क्षिणी = प्रक्षि-णोति. दगडांवर जी यव ठेचते ती उपलप्रक्षिणी. दुगवृत्तींत 'प्रक्षिणोति' आहे. किंवा प्रक्षिणी = प्रक्षेपिणी. लाल लाल झालेल्या तप्त दगडांवर भाजण्याकरितां जी यव टाकते ती; किंवा यव खालीं पाडण्याकरितां जी त्यावर दगड फेकते ती. असा दोन तऱ्हेचा अर्थ दुर्ग देतो. उपल शब्द एथेंच आला आहे. पाहिजे तो अर्थ करावा. ह्या व्युत्पत्तीनंतर महाराष्ट्रपाठांत पुढील ज्यास्त शब्द आहेतः—इन्द्र ऋषीन् पप्रच्छ दुर्भिक्षे केन जीवति इति । तेषाम् एकः प्रत्युवाच । शकटः शाकिनी गावो जालमास्यन्दनं वनम् । उदधिः पर्वतो राजा दुर्भिक्षे नव वृत्तयः । इति । सा निगद-

व्याख्याता = दुष्काळांत मनुष्यानें जीव कसा राखावा असें इंद्रानें ऋषींना विचारलें तेव्हां त्यांपैकीं एकानें पुढील उत्तर दिलें. छकडा, शाकिनी (?), गाई, जाळें, रथ, रान, समुद्र, पर्वत व राजा असे दुष्काळांत जीव राखण्याचे नऊ प्रकार आहेत. या श्लोकाचा अर्थ स्पष्ट आहे; विवरणाची जरूरी नाहीं. पण विवरणाची जरूर आहे. माल किंवा माणसें नेण्याकरितां बैलगाडी (शकट) हाकावी. वाडग्यांत भाज्या करून विकाव्या किंवा नुसत्या भाज्यांवर निर्वाह करावा. अमरकोशांत शाकिनी शब्द नाहीं. शाकं = पुत्रपुष्पादि (२।४।१३६ अमर). पत्रपुष्प वगैरे ज्यांत उगवतात असें शेत (शाकिनी). भाज्यांचें शेत (आपट्यांचा कोश). शेत (मॅक्डोनेल). गाईचें दूध विकणें (गावः) किंवा गाई राखणें. मासे धरणें (जाळें). धनिकांचे रथ हाकणें (अस्यन्दनं). अ + स्यन्दनं = न वाहणारे पाणी (मॅक्डोनेल). स्यन्दनं बद्दल अस्यन्दनं अक्षरपूर्तीकरतां घातलें असेल. रानांत रानशेणी, लांकडें काटक्या गोळा करणें (वनं). नावाड्याचें काम करणें (उदधिः). डोंगरावर शेळ्यामेंढ्या राखणें किंवा शिकार करणें (पर्वतः). राजाच्या घरीं भिक्षा मागणें किंवा नोकरी करणें (राजा). हीं सगळीं कामें वैश्य व शूद्र करतात आपत्कालीं ब्राह्मणांनीं तीं करावीं. हें सगळें बृहद्देवताग्रंथांतून घेतलें आहे. अनावृष्ट्यां तु वर्तन्त्यां पप्रच्छर्षीन् शचीपतिः। काले दुर्गे महत्यस्मिन् कर्मणा केन जीवथ (बृह० ६।१३७) ॥ शकटः शाकिनी गावः कृषिरस्यन्दनं वनम्। समुद्रः पर्वतो राजा एवं जीवामहे वयम् (६।१३८). ह्या उताऱ्यांत जालं बद्दल कृषिः, उदधिः बद्दल समुद्रः व दुर्भिक्षे नव वृत्तयः बद्दल एवं जीवामहे वयं असें आहे. हल्लीं उपलब्ध असलेला बृहद्देवता ग्रंथ महाराष्ट्रपाठकालीन बृहद्देवताग्रंथाहून कांहींसा वेगळा आहे. दुर्गवृत्तींत ह्या वृत्तींचा मुळींच उल्लेख नाहीं. ह्याचें कारण बृहद्देवताग्रंथाला बराचसा आधार यास्काचें निरुक्त आहे. निरुक्तानंतर तो ग्रंथ रचला गेला. असें असूनही महाराष्ट्रपाठांत बृहद्देवतेचा हा उतारा घुसडला. हा केवळ अविचार होय. आपत्कालीं ब्राह्मणांनीं कोणता धंदा करावा ह्याविषयीं 'कृषिः शिल्पं भृतिर्विद्या कुसीदं शकटं गिरिः। सेवानूपं नृपो भैक्ष्यमापत्तौ जीवनानि तु (याज्ञवल्क्यस्मृति– द्वितीय आपद्धर्मप्रकरण श्लोक ४२), व 'विद्या शिल्पं भृतिः सेवा गोरक्षा विपणिः कृषिः। गिरिर्भैक्ष्यं कुसीदं च दश जीवनहेतवः (मनुस्मृति १० ११६), असे श्लोक आहेत. ह्या उताऱ्यांत कांहीं गोष्टी सारख्या आहेत; भेद बराच आहे. ऋचा केव्हां व कां रचल्या गेल्या हें एका निदान नांवाच्या ग्रंथांत ग्रथित केलें होतें. तो ग्रंथ आतां उपलब्ध नाहीं. प्रस्तुत अधिक पाठ हें पुढील खंडांतील पहिल्या ऋचेचें निदान होय. पण तें धडधडीत प्रक्षिप्त होय.

## खंड ६ वा.

**कारुरहं ततो भिषगुपलप्रक्षिणी नना। नानाधियो वसूयवोऽनु गा इव तस्थिमेन्द्रायेन्दो परिस्रव (९।११२।३)**

**कारुः अहम् अस्मि। कर्ता स्तोमानाम्**

कारुः = कर्ता स्तोमानाम् = स्तुति रचणारा. कृ=करणें. ह्यापासून कारु. अस्मि अध्याहृत. दुर्गवृत्तींत आसम् आहे. दुष्काळांत मी होता होतों किंवा लोकांचे स्तुति-पाठ गाइलें असा दुर्ग अर्थ करतो. कर्ता स्तोमानां असल्यावर भाष्यांत कारुः नको आहे.

**ततः भिषक् । ततः इति संताननाम पितुः वा पुत्रस्य वा**

तत म्हणजे संतान. हे संतान बाप किंवा मुलगा असेल. पिता पुत्रं संतनोति बाप (कुलाचा) पुत्ररूपी ताणा ताणतो. पुत्रः पित्रा संतन्यते = पुत्ररूपी ताणा बापाकडून ताणला जातो; म्हणून दोघेहि तत. तन् ताणणेंपासून तत. संतानार्थी ( संताननाम ) तत शब्द. वास्तविक संतान शब्द नको आहे. ततः इति पितुः वा पुत्रस्य वा नाम असें म्हटल्यानें अर्थ स्पष्ट होतो. तसें न केल्यास संताननाम ह्यांतील नाम शब्द पितुः आणि पुत्रस्य ह्यांच्याशीं जोडावा लागतो. यास्काची भाषा कधीं कधीं घोटाळा करणारी असते. भिषक् = ब्रह्मा. यज्ञाला जो रोग होतो तो ब्रह्मा नांवाचा ऋत्विक् बरा करतो. यज्ञांतील दोषांचें तो प्रायश्चित्तानें परिमार्जन करतो. किंवा भिषक् = खरोखरचे रोग बरे करणारा वैद्य.

**उपलप्रक्षिणी सक्तुकारिका । नना नमतेः । माता वा दुहिता वा**

उपलप्रक्षिणी = यव भाजून सातू करणारी. यज्ञांत दासी यव भाजून कुटते. तें पीठ सोमरसांत घातल्यानें यवाशिर बनतें. किंवा लोकांच्या घरीं सातूचें पीठ करणारी बाई. दोहीं प्रकारचें काम नीच; कारण तें काम दासी करतात. नम् नमणें पासून नना. ही नना आई होईल किंवा मुलगी होईल. मुलाला पाजतां वेळीं आई लवते म्हणून ती नना. बापाची सेवा करतांना मुलीला वाकावें लागतें म्हणून तीही नना.

**नानाधियः नानाकर्माणः । वसूयवः वसुकामाः**

नानाधियः = नानाकर्माणः = निरनिराळीं कामें किंवा धंदे करणारे. धीः = काम, धंदा. वसूयवः = वसुकामाः = धनाची इच्छा करणारे. वसु + युः = वसूयुः; युः = इच्छा करणारा.

**अनु आस्थिताः स्मः गावः इव लोकम्**

तस्थिम = आस्थिताः स्मः. तस्थिम अशीं क्रियारूपें वापरण्याच्या ऐवजीं आस्थिताः अशीं भूतभूतकालीं विशेषणें वापरण्याचा प्रघात महाभाष्यकालीं पडला होता. त्याची सुरवात यास्ककालीं झाली असावी. 'लोकं' अध्याहृत. गाः = गावः. गाई जशा नाना प्रकारांनीं लोकांच्या उपयोगीं पडतात त्याप्रमाणें आम्ही निरनिराळीं कामें करून लोकांच्या उपयोगीं पडलों व तसें करून स्वतःची उपजीविका केली. लोकम् अनु = लोकांत. आस्थिताः = राहिलों.

**इन्द्राय इन्दो परिस्रव इति अध्येषणा**

हे सोमा, गाळण्यांतून इंद्राकरितां पाझर अशी सोमाला विनंति केली आहे.

नना शब्द फक्त एथेंच आला आहे. तत शब्द आणखी दोनदां ( ८।९.१।५ व ६ ) आला आहे. ततस्य = पितुः असा सायणाचार्य तेथें अर्थ करतात. तोच अर्थ एथें असेल. तत = बाप असा अर्थ असल्यास नना = आई असा अर्थ होईल. अर्वाचीन संस्कृतांत तत म्हणजे मुलगा; तात म्हणजे बाप. गाः = गावः असें यास्क म्हणतो; पण गाः हें इतरत्र सर्व ठिकाणीं द्वितीयेचें बहुवचन आहे. अनु + तस्थिम एथें 'अनु' चा अर्थ 'आ' आहे. आ + स्था = बसणें ( गाडींत घोड्यावर वगैरे ). वयं गाः अनु तस्थिम = आम्ही बैलांवर बसलों; किंवा आम्हीं गाईचें अनुकरण केलें असाही अर्थ होणें शक्य आहे. सर्व सूक्त कठीण आहे. प्रस्तुत ऋचेंत सोमाचे उद्गार असतील. मी स्तोता ( कारुः ) आहें. नंतर ( ततः ) स्वतःला बरा करणारा ( भिषक् ) म्हणजे स्वतःचा काळा रंग काढून टाकणारा आहें. दगडावर ठेचणारी बाई मीच आहें ( उपलप्रक्षिणी नना ). आम्ही गाईवर बसतों ( अनु गाः तस्थिम ) म्हणजे सोम गोक्षीराशीं मिसळतो. गाः इव एथील इव निरर्थक असेल. आमच्यापाशीं नानाप्रकारचें द्रव्य आहे ( नानाधियः ); आम्ही धन देणारे आहोंत ( वसूयवः ). इन्द्रायेन्दो परिस्रव हें पालुपद प्रत्येक ऋचेच्या शेवटीं आहे. त्याचा ऋचेच्या अर्थाशीं कांहींएक संबंध नाहीं; तथापि दुर्ग म्हणतोः- दुष्काळांत आम्हीं पैशास्तव हीन धंदे केले; तें पाप कथन करून आम्ही निष्पाप झालों आहों; तेव्हां आतां, हे सोमा, मनांत किंतु न आणतां तूं गाळण्यांतून गळ व शुद्ध हो. मी जो अर्थ केला आहे तो स्वकपोलकल्पित असण्याचा संभव आहे.

**आसीन ऊर्ध्वामुपसि क्षिणाति ( १०।२७।१३ ) । उपस्थे**

उपसि = उप + सि. सि = स्थे. उपसि = उपस्थे = अंतरिक्षांत. इंद्र अंतरिक्षांत ( उपसि ) बसून ( आसीनः ) वर असलेली ( ऊर्ध्वां ) द्यु-रूप जी गाय तिला पान्हवतो ( क्षिणाति ) व पाऊस पाडावयास लावतो, असा दुर्ग अर्थ करतो. आदित्यरूपी इंद्र स्वकीय मंडलांत बसून ( उपसि आसीनः ) वर गेलेला ( ऊर्ध्वां ) आपला प्रकाश खालीं ओढतो ( क्षिणाति ) व सर्वत्र पसरतो ( सायण ). प्रस्तुत ऋचा अग्निपर असावी असें वाटतें. आईच्या मांडीवर ( उपसि ) बसलेला ( आसीनः ) वर असलेली जी द्यु–बाई ( ऊर्ध्वा ) तिला आपल्या ज्वालांनीं त्रास देतो ( क्षिणाति ) म्हणजे भाजतो. पृथिवीवर पेटविलेल्या अग्नीच्या ज्वाला द्युलोकाला पोचतात. पितुर्न पुत्र उपसि प्रेष्ठः ( ५।४३।७ ) = बापाच्या मांडीवर बसलेल्या मुलाप्रमाणें. उपसि शब्द एकंदर दोनदां ऋग्वेदांत आला आहे.

**प्रकलविद् ( २१ ) वणिक् भवति । कलाश्च वेद प्रकलाश्च**

प्रकलविद् = वणिक् = वाणी. वाण्याला प्रकलविद् म्हणण्याचें कारण तो लहान मोठीं सर्व नाणीं, मापें, जाणतो. प्र + कल + विद्. कल = कलाः. प्र + कल = प्रकलाः. विद् = जाणणें. कल शब्द ऋग्वेदांत नाहीं. प्रकल एथेंच फक्त आला आहे.

**दुर्मित्रासः प्रकलविन्मिमानाः ( ७।१८।१५ ) इत्यपि निगमः भवति**

बारकाईनें पाहणारे ( प्रकलविद् = प्रकलविदः ), फसविणारे ( दुर्मित्रासः ) वाणी जसे जिनसा खोट्या तऱ्हेनें मापतात ( मिमानाः ) तसे हे मेघ, थोडकें थोडकें पाणी देणारे, इंद्राच्या वज्राचे आघात खाऊन मग खूप पाणी देतात ( दुर्ग ). प्रकलविदः = अजानन्तः = अल्पबुद्धीचे (सायण). सायणाचार्य ऋचा मेघपर लावीत नाहींत. तृत्सु हे सुदासाचे मित्र होते; पण त्याच्याशीं ते द्रोह करूं लागले ( दुर्मित्रासः ); तेव्हां इंद्रानें त्यांना बडवून पळावयास लावलें; त्यामुळें सुदासाला त्यांनीं टाकलेलें सर्व द्रव्य मिळालें. मिमानाः = सुदासा बाध्यमानाः (सायण) = सुदासानें ठोकलेले. मिमानाः ह्याचा अर्थ दुर्ग देत नाहीं. मिमाति मायुं = हंबरडा फोडते (१।१६४ २९) एथें मा = ओरडणें. मिमानाः = ओरडत. प्रकलविद् ह्याचा अर्थ कळत नाहीं. प्रकलविद् हें संबोधन असावें. हे प्रकलविद् इंद्रा, हे दुष्ट तृत्सु ओरडत पळून गेले व त्यांचे सर्व धन सुदासास मिळालें. वसुविद् = धन देणारा; त्याप्रमाणें प्रकलविद् = धन देणारा असा अर्थ असेल. प्रकृष्टा कला संख्या यस्य तत् प्रकलम् असंख्यं धनं वेत्ति ददाति असौ प्रकलविद्. प्रकलविद् = हे असंख्य धनदात्या. पहिल्या अर्थात तृतीय पुरुष व दुसऱ्या अर्थात द्वितीय पुरुष किंवा ह्या दोन पुरुषांची उलटापालट ऋग्वेदांत अनेकदां दिसून येते. यास्कानें प्रकल शब्दांतून कला शब्द काढला. कला असल्याशिवाय प्रकला ( कलांचे अवयव ) कोठून येणार ? म्हणून 'कलाश्च वेद प्रकलाश्च' असें तो म्हणतो.

**अभ्यर्धयज्वा ( २६ ) अभ्यर्धयन् यजति**

अभ्यर्धयज्वा = अभ्यर्ध + यज्वा. अभ्यर्ध = अभ्यर्धयन् = वाढवून. यज्वा = यजति = देतो. जो वाढवून धन देतो तो अभ्यर्धयज्वा. ऋध् = वृद्धि होणें. अर्धय् = वृद्धि करणें. अभि + अर्धयन् = वृद्धि करणारा. अर्ध शब्द १४ वेळां व अर्ध्य २ वेळां ऋग्वेदांत आला आहे. त्याचे २ ठिकाणीं अर्धा, ६ ठिकाणीं स्थान, दोन ठिकाणीं भाग किंवा भागीदार असे अर्थ आहेत. बाकीच्या ६ ठिकाणीं अर्थ लागत नाहीं. अर्धं हविर्भागं यजति असौ अर्धयज्वा.

**सिषक्ति पूषा अभ्यर्धयज्वा ( ६।५०।५ ) इत्यपि निगमः भवति**

मिम्यक्ष येषु रोदसी नु देवी सिषक्ति पूषा अभ्यर्धयज्वा । श्रुत्वा हवं मरुतो यद्ध याथ भूमा रेजन्ते अध्वनि प्रविक्ते = ज्यांच्यांत देवी रोदसी एकवटून जाते ( मिम्यक्ष ), ज्यांची हविर्भाग देणारा ( अर्धयज्वा ) सेवा करतो ( अभि सिषक्ति ), ते तुम्ही मरुतहो, जेव्हां स्तोत्याचें बोलावणें ( हवं ) ऐकून मार्गस्थ होतां ( याथ ), तेव्हां रस्त्यानें सर्व प्राणी ( भूमा ) कांपू लागतात ( रेजन्ते ) व रस्ता मोकळा होतो ( प्रविक्ते ). युवां पूषेवाश्विना० जरते हविष्मान् ( १।१८१।९ ) = हे अश्विनांनो, हवि देणारा यजमान पूषाप्रमाणें तुमची स्तुति करतो. ह्या ऋचेवरून पूषाकडे हवि देण्याचें व स्तुति करण्याचें काम एकेकाळीं होतें. मी अभि हा उपसर्ग सिषक्ति क्रियापदास जोडतों. पूषा अभ्यर्धयज्वा यांचा छंदाकरितां संधि केला नाहीं. स्वस्ति पूषा असुरो दधातु नः (५।

४९।११) व रथं पूषा अविष्ठु माहिनः ( १०।२६।९ ) हीं संधि न केल्याचीं आणि स नः पूषाविता भुवत् ( ३।६२।९ ) तां पूषानु यच्छतु (४।५७।७) व पूषोत नो यमत् ( ५।४६।५ ) हीं संधि केल्याचीं उदाहरणें होत.

**ईक्षे ( २७ ) ईशिषे । ईक्षे हि वस्य उभयस्य राजन् ( ६।१९।१० ) इत्यपि निगमः भवति**

ईश् + से = ईक्षे. ईक्ष् ह्याला इ हें विकरण लावलें नाहीं. विकरण न लावल्याचीं उदाहरणें शेकडों सांपडतील. हे राजा इंद्रा, द्युलोकांत व पृथिवीवर असणाऱ्या दोहीं ठिकाणच्या ( उभयस्य ) धनावर ( वस्यः ) तुझी सत्ता आहे. ईक्षे रायः० चर्षणीनां ( ४।२०।१० ) हें ईक्षे चें दुसरें उदाहरण होय. अत्र यत्स्वे सधस्थे देवानां दुर्मतीरीक्षे ( ८।७९।९ ) = हे सोमा, रक्षण कर ( अत्र ) कारण देवांच्या स्वतःच्या घरीं ( सधस्थे ) वाईट लोक ( दुर्मती ) मला दिसत आहेत. ईक्षे ह्याचे असे दोन अर्थ असल्याकारणानें निघंटूंत तो शब्द घातला गेला. ईशिषे हें सरळ रूप १३ वेळां आलें आहे.

**क्षोणस्य ( २८ ) क्षयणस्य । महः क्षोणस्याश्विना कण्वाय ( १।११७।८ ) इत्यपि निगमः भवति**

क्षोणस्य = क्षयणस्य = घराचे. हे अश्विनांनो, तुम्हीं कण्वाला मोठें ( महः = महतः ) घर दिलें. युवं श्यावाय रुशतीमदत्तं महः क्षोणस्याश्विना कण्वाय = हे अश्विनौ युवं युवां श्यावाय कण्वाय महः महतः क्षोणस्य रुशतीम् अदत्तं = हे अश्विनांनो, तुम्ही काळ्या ( श्याव ) कण्वकुलांतील मनुष्याला मोठा जो क्षोण त्याची रुशती दिली. रुशती = तेजस्वी. रुशती स्त्री असेल किंवा घोडी, गाय पाहिजे ती स्त्रीलिंगी वस्तु असेल. क्षोण हें एखाद्या राजाचें नांव असेल. त्याची रुशती ही मुलगी असेल. कोळशासारखा काळा नवरा व विजेसारखी लखलखणारी बायको, असा चमत्कार अश्विनांनीं केला. 'युवां श्यावाय रुशतीम् अदत्तं' व 'युवां कण्वाय महः महतः क्षोणस्य क्षयणस्य गृहस्य दातारौ अभवतं' अशीं दोन वाक्यें यास्क व दुर्ग करतात; पण वाक्य एकच आहे. क्षोण = क्षयण असें घेतल्यास क्षि ( राहणें ) ह्यापासून क्षोण शब्द कसा होईल? क्षि + न = क्षेण, असें रूप पाहिजे. क्षु = आवाज करणें ( धा० २।२६ ) ह्यापासून क्षोण शब्द निघेल. पण व्युत्पत्तीच्या भानगडींत पडण्याचें कारण नाहीं. क्षोणस्य = क्षीणस्य असें कित्येक टीकाकार म्हणतात, पण यास्क क्षयणस्य म्हणतो. तेव्हां क्षीणस्य ह्याचा विचार करण्याची जरूर नाहीं असें दुर्ग म्हणतो. महः व क्षीणस्य हीं दोन्हीही विशेषणें मानल्यास विशेष्य कोणतें? तें अध्याहृत घेतलें पाहिजे.

## खंड ७ वा.

**अस्मे ते बन्धुः वयम् इत्यर्थः**

अस्मे ( २९ ) = वयम्. दुर्गवृत्तीवरून अस्मे हें पद ६ व्या खंडाच्या शेवटीं होतें. त्याचीं उदाहरणें या खंडांत दिलीं आहेत. अस्मे हें पद ऐकपदिकांत घाल-

ण्याचें कारण तें सातही विभक्तींच्या अर्थानें वापरलेलें आढळतें. म्हणून तें अनेकार्थी आहे असें यास्क म्हणतो कीं काय ? अस्मे याचा आम्ही हा एकच अर्थ. फक्त त्याचा संबोधनाखेरीज करून पाहिजे त्या विभक्तींत उपयोग केला आहे. इतर अनेकार्थ शब्दांप्रमाणें ह्याला अनेकार्थ मानतां येईल कीं नाहीं हा प्रश्न आहे. एकच पद निरनिराळ्या विभक्त्यर्थी कां वापरलें गेलें हा दुसरा प्रश्न. ह्याचें उत्तर सध्यां मला सुचत नाहीं. गौहिरण्यमजा धेनुर्वत्स ऋषभ एवच। अनड्वान् मिथुनौ गावौ वासश्च क्रमको दश = गाय, सोनें, मेंढी वगैरे दहा वस्तु देऊन सोम विकत घ्यावयाचा असतो. अजा देतांना तिला उद्देशून एक यजुर्मंत्र म्हणावयाचा असतो ( मैत्रा०सं० १।२।५॥ काठक सं० २।६॥ तै० सं० १।२।७ ). त्या मंत्रांत 'अस्मे ते बन्धुः' हे शब्द आहेत. मी तुझा बंधु आहे असें म्हणण्यानें यजमान अजेचें वीर्य आपल्या शरीरांत आणतो. अस्मे = वयं असें यास्क कां म्हणतो तें कळत नाहीं. अस्मे = अहं हें बरोबर दिसतें. अहं किंवा वयं ह्या अर्थी अस्मे शब्द ऋग्वेदांत नाहीं. कदाचित् पुढील उदाहरणांत अस्मे = अहं असेल. धनुर्हस्तादाददानो मृतस्यास्मे क्षत्राय वर्चसे बलाय । अत्रैव त्वमिह वयं सुवीरा विश्वाः स्पृधो अभिमातीर्जयेम ( १०।१८।९ ) = बलासाठीं ( क्षत्राय = वर्चसे = बलाय ) मृताच्या हातांतलें धनुष्य मी ( अस्मे ? ) घेतों ( आददानः ); हे मृता, तूं एथेंच रहा; आम्ही वीरपुत्रांच्या साहाय्यानें शत्रूंना ( स्पृधः = अभिमातीः ) जिंकून टाकूं. अस्मे = अस्माकं ( सायण ). पण अस्मे = अहं हा अर्थ बरा दिसतो.

**अस्मे यातं नासत्या सजोषाः ( ७।११८।११ )। अस्मान् इत्यर्थः**

हे अश्विनांनो, तुम्ही दोघे बरोबर ( सजोषाः ) आमच्याकडे ( अस्मे = अस्मान् ) या. सजोषाः हें क्रियाविशेषण आहे.

**अस्मे समानेभिर्वृषभ पौंस्येभिः ( १।१६५।७ )। अस्माभिः इत्यर्थः**

हे शूरा ( वृषभ ), तुझ्या बरोबरीचे ( समानेभिः = समानैः ), पौरुष-युक्त ( पौंस्येभिः = पौंस्यैः ) असे जे आम्ही त्या आम्हांला बरोबर घेऊनच ( अस्मे = अस्माभिः ) तूं अनेक शूर कृत्यें केलींस.

**अस्मे प्र यन्धि मघवन्नृजीषिन् ( ३।३६।१० )। अस्मभ्यम् इत्यर्थः**

हे अद्भुत कृत्यें करणाऱ्या ( ऋजीषिन् ) धनवंता ( मघवन् ) इंद्रा, आम्हांला ( अस्मे = अस्मभ्यं ) धन दे ( प्र + यन्धि ). यम् ( देणें ) + धि = यन्धि.

**अस्मे आराच्चिद् द्वेषः सनुतर्युयोतु ( ६।४७।१३ ) अस्मत् इत्यर्थः**

इंद्र, दुरूनच ( आरात् चित् ) म्हणजे दूर असलेलेंही संकट किंवा भय ( द्वेषः ) आम्हांपासून ( अस्मे = अस्मत् ) कायमचें ( सनुतः ) दूर ठेवो ( युयोतु ) यु = वेगळें करणें.

**ऊर्व इव पप्रथे कामो अस्मे ( ३।३०।१९ )। अस्माकम् इत्यर्थः**

गुरांच्या कळपाप्रमाणें आमची ( अस्मे = अस्माकं ) इच्छा वाढत गेली. ऊर्व =

वडवाग्नि असा दुर्ग अर्थ करतो. पण ऊर्व = कळप किंवा कोंडवाडा असा ऋग्वेदांत अर्थ आहे. ते एतमूर्वं वि भजन्त गोनाम् (१०।१०८।८) = त्यांनीं गाईंचा हा कळप वाटून घेतला. ऊर्वान् दयन्त गोनाम् (७।१६।७) = त्यांनीं गाईंचे कळप दिले. कोंडवाडा हा अर्थ फार ठिकाणीं आहे.

**अस्मे धत्त वसवो वसूनि ( मैत्रा० सं० १।३।३८ ) । अस्मासु इत्यर्थः**

हे धनवंतांनो, आम्हांस धन द्या. अस्मे = अस्मासु ह्याचीं ऋग्वेदांत निदान तीन उदाहरणें आहेत. (४।३३।१०॥ ४।३४।१०॥ ९।६८।१०). 'इत्यर्थः' हे शब्द ७ ठिकाणीं आले आहेत. त्यांची कोठेंही जरूर नाहीं. इत्यर्थः हें यास्क-भाष्यांत इतरत्र एखाद्या ठिकाणीं आढळतें. तें प्रक्षिप्त असावें.

**पाथः ( ३० ) अन्तरिक्षम् । पथा व्याख्यातम् ( निरु० २।२८ ) श्येनो न दीयन्नन्वेति पाथः (७६३।५) इत्यपि निगमः भवति**

पाथः = अंतरिक्ष. त्याची व्युत्पत्ति पथिन् शब्दाप्रमाणें.

सूर्य ससाण्याप्रमाणें धांवत ( दीयन् ) अंतरिक्षमार्गानें ( पाथः ) सारखा जातो ( अन्वेति ).

**उदकम् अपि पाथः उच्यते । पानात् । आ चष्ट आसां पाथो नदीनाम् (७।३४।१० ) इत्यपि निगमः भवति**

पाण्यालाही पाथः म्हणतात. पाण्याला तें नांव पडण्याचें कारण पाणी प्यायलें जातें. पा (पिणें)+थः =पाथः. ह्या (रश्मिरूप) नद्यांना वरुण पाणी (पाथः) दाखवितो (आचष्टे).

**अन्नम् अपि पाथः उच्यते । पानात् एव । देवानां पाथ उप वक्षि विद्वान् ( १०।७०।१० ) इत्यपि निगमः भवति**

अन्नालाही पाथः म्हणतात. अन्नाला पाथः नांव पडण्याचें कारण पातळ अन्न प्यायलें जातें. पा (पिणें) पासून अन्नार्थी पाथः. हे अग्नि, हवि देणारा (विद्वान्) तूं देवांचें अन्न देवांना नेऊन दे. पाथः शब्दाचे ९ ठिकाणीं स्थान व ५ ठिकाणीं हवि असे दोनच अर्थ आहेत. देवानां पाथः (देवांचें स्थान, देवलोक) असे चारपांच ठिकाणीं आले आहेत. त्यांपैकीं एका ठिकाणीं देवांचें पेय व बाकीच्या ठिकाणीं देवलोक असा त्या शब्दांचा अर्थ असावा. दोन ठिकाणीं (३।३१।६ व १०।९२।१५) त्या शब्दाचा अर्थ कळत नाहीं. पाथ्यो वृषा (६।१६।१५ ) =देवलोकीचा एक समर्थ रहिवासी. सहस्रपाथाः (७।१।१५) = हजारो हवि देणारा. श्येनो न दीयन् अन्वेति पाथः (७।६३।५) = ससाण्याप्रमाणें धावणारा सूर्य देवलोकाभोवतीं जातो. अन्वेति =पर्येति. आ चष्ट आसां पाथो नदीनां ( ७।३४।१० ) = त्या नद्यांचें मूलस्थान (देवलोक) वरुण पाहतो. देवलोकार्थी पाथः शब्दाची व्युत्पत्ति ठाऊक नाहीं. पा = रक्षण करणें असा त्यांतील धातु असेल.

**सवीमनि ( ३१ ) प्रसवे । देवस्य वयं सवितुः सवीमनि ( १०।७।१२ ) इत्यपि निगमः भवति**

सवीमनि = प्रसवे. सू + ईमन् = सवीमन्. प्रसव हाही शब्द प्र + सू पासून झाला आहे. देवस्य वयं सवितुः सवीमनि श्रेष्ठे स्याम वसुनश्च दावने । यो विश्वस्य द्विपदो यश्चतुष्पदो निवेशने प्रसवे चासि भूमनः = यः सविता विश्वस्य द्विपदः चतुष्पदः भूमनः निवेशने प्रसवे च असि तस्य देवस्य सवितुः श्रेष्ठ सवीमनि वसुनः दावने च वयं स्याम = दोन पायाच्या व चार पायाच्या सर्व प्राण्यांना निजविण्यांत (निवेशने) व जागे करण्यांत ( प्रसवे ) जो तूं समर्थ आहेस त्या सविता देवाच्या म्हणजे तुझ्या श्रेष्ठ दानाच्या वेळीं ( सवीमनि ), धन दानाच्या समयीं ( वसुनः दावने ) आम्ही हजर राहूं. प्रसव = उठविणें व कामें करावयास लावणें. पण सवीमन् = दान. स्यात् उत्पादे फले पुष्पे प्रसवो गर्भमोचने (अमर ३।३।२०९); उत्पत्ति, फल, पुष्प व जन्म देणें असे प्रसव शब्दाचे चार अर्थ अमर देतो. यास्ककालीं ह्या शब्दाचा कोणता अर्थ होता तें सांगतां येत नाहीं. प्रसवे = सर्वार्थाभ्यनुज्ञाने ( दुर्ग )= सर्व पदार्थ किंवा धन देणें. तस्य वयं प्रसवे याम उर्वीः ( ३।३३।६ ) = ह्याच्या (इंद्राच्या) आज्ञेनें (प्रसवे) आम्ही सर्वभर ( उर्वीः ) जातों. एथें प्रसव = आज्ञा. 'श्रेष्ठे स्याम सवितुः सवीमनि' हें १०।३६।१२ एथेंहीं आले आहे. अर्थ वर दिला आहे. इदं हि नूनमेषां सुम्नं भिक्षेत मर्त्यः । आदित्यानामपूर्व्यं सवीमनि ( ८।१८।१ ) = एषाम् आदित्यानाम् सवीमनि इदम् अपूर्व्यं सुम्नं मर्त्यः हि नूनं भिक्षेत = ह्या आदित्यांनीं केलेल्या दानांत ( सवीमनि ) मनुष्याला हें श्रेष्ठ ( अपूर्व्यं ) धन (सुम्नं ) मिळेल. ते हि देवस्य सवितुः सवीमनि क्रतुं सचन्ते सचितः सचेतसः ( १०।६४।७ ) = सविता ज्यावेळीं धन देईल ( सवीमनि ) त्यावेळीं हेही धनवान् ( सचितः = सचेतसः ) देव धन ( क्रतुं ) देतात ( सचन्ते ). ह्या चारही ऋचांत सवीमन् = धन; पण पुढील ऋचेंत त्याचा 'जागें करणें' असा अर्थ आहे. प्र बाहू अस्राक् सविता सवीमनि निवेशयन् प्रसुवन् अक्तुभिर्जगत् ( ४।५३।३ ) = आपल्या प्रकाशानें (अक्तुभिः) प्राण्यांना ( जगत् ) जागे करणारा (प्रसुवन् ) व निजविणारा (निवेशयन् ) सविता प्राणिमात्राला जागे करण्याकरितां ( सवीमनि ) आपले हात पसरतो ( अस्राक् ) . असा एकंदर ५ वेळां हा शब्द ह्याच विभक्तींत ऋग्वेदांत आला आहे. सविता हा शब्द सू = देणें, जागें करणें, आज्ञा करणें ह्यापासून झाला आहे. अनेकार्थी म्हणून सवीमनि हा शब्द ऐकपदिकांत घातला गेला.

**सप्रथाः (३२) सर्वतः पृथु । त्वमग्ने सप्रथा असि (५।१३।४) इत्यपि निगमः भवति**

सप्रथाः = स + प्रथाः. स = सर्वतः. प्रथाः = पृथुः. सर्वत्र पसरलेला तो सप्रथाः. हे अग्नि, तूं सर्वत्र पसरला आहेस. अग्नि जिकडे तिकडे आहे. वातस्य प्रथसः ( १०।८९।११ ) = वाऱ्याच्या विस्ताराहून. एथें प्रथः = विस्तार. प्रथश्च यस्य सप्रथश्च नामानुष्टुभस्य हविषे । हविर्यत् ( १०।१८१।१ ) = आनुष्टुभस्य हविषः हविर्युक्तस्य यस्य अग्नेः नाम हविः प्रथश्च सप्रथश्च = स्तुत्य ( आनुष्टुभस्य ) व हविर्युक्त ( हविषः ) जो अग्नि त्याचा हवि ( नाम = हविः = प्रथः ) धनयुक्त (सप्रथः) असतो.

एथें प्रथस् = हवि व धन. शर्म शब्दाला दहादा, छर्दिःला दोनदां व वर्म, नाम आणि मन्म ह्यांना एकएकदां सप्रथः हें विशेषण लाविलें आहे. शर्मन् सप्रथस्तमे, अवसि सप्रथस्तमे, व सप्रथस्तमं वचः हींही एकएकदां आलीं आहेत. शर्म, छर्दिः व वर्म ( कवच ) ह्यांना विस्तृत ( सप्रथः ) म्हणण्यास हरकत नाहीं. स्तुति ( वचः, मन्म ) सुद्धां विस्तृत असेल, पण 'विश्वं प्रतीची सप्रथा उदस्थात्' ( ५।७७।२ ) = सगळी-कडे ( विश्वं ) जाणारी ( प्रतीची ) उषा उगवली. सप्रथाः = धनयुक्त. उषा धन घेऊन उगवते. तेव्हां प्रथस् = धन. भवा मित्रो न शेव्यः० विभूतद्युम्न एवया उ सप्रथाः ( १।१५६।१ ) = हे विष्णु, घोड्यावर बसून जाणारा ( एवयाः ) तूं मित्राप्रमाणें धनयुक्त हो. शेव्यः = विभूतद्युम्नः = सप्रथाः = धनयुक्त. नि त्वा होतारमृत्विजं दधिरे वसुवित्तमम् । श्रुत्कर्णं सप्रथस्तमं विप्राः ( १।४६।७ ) = देवांना हवि देणारा ( होतारं = ऋत्विजं ), धनवान् ( वसुवित्तमं = सप्रथस्तमं ) असा जो अग्नि त्याला विप्र घरीं ठेवते झाले. अग्निं सुम्नाय दधिरे पुरो जनाः । श्रुत्कर्णं सप्रथस्तमम् ( १०।-१४०।६ ) = जनाः श्रुत्कर्णं सप्रथस्तमम् अग्निं सुम्नाय पुरो दधिरे = धनवान् जो अग्नि त्याला धनासाठीं ( सुम्नाय ) पुरोहित करते झाले. श्रुत्कर्णं = ( १ ) स्तुति ऐक-णाऱ्याला; (२) धनवन्ताला, नराशंसं सुधृष्टममपश्यं सप्रथस्तमम् । दिवो न सद्ममखवसम् ( १।१८।९ ) = द्युसारखा ( दिवो न ) धनवान् ( सप्रथस्तमम् = सद्ममखसं ) व धीट ( सुधृष्टमं ) जो नराशंस त्याला मी पाहिलें. ह्या सर्व ठिकाणीं प्रथः = धन. जुषस्व सप्रथस्तमं वचो देवप्सरस्तमम् । हव्या जुह्वान आसनि ( १।७५।१ ) = तोंडांत ( आसनि ) हवि ( हव्या ) ओतणारा ( जुह्वानः ) तूं हविर्युक्त ( सप्रथस्तमं = देव-प्सरस्तमं ) स्तुति ( वचः ) घे ( जुषस्व ). मित्राय वोचं० सप्रथः ( १।१२९।३ ) = मित्राला हविर्युक्त ( सप्रथः ) स्तुति अर्पण करतों ( वोचं ). मन्म० सप्रथः ( ६।६८।-९ ) = हविर्युक्त स्तुति. ह्या ठिकाणीं प्रथः = हविः. अभि यो महिना दिवं मित्रो बभूव सप्रथाः । अभि श्रवोभिः पृथिवीम् ( ३।५९।७ ) = यः सप्रथाः मित्रः दिवं पृथिवीं च महिना श्रवोभिः अभिबभूव = जो मित्र सामर्थ्यवान् ( सप्रथाः ) असल्यामुळें, साम-र्थ्यानें (महिना = श्रवोभिः) द्यु व पृथिवी ह्यांचा पराभव करता झाला. प्रथः = सामर्थ्य. ( १ ) विस्तार, ( २ ) धन; ( ३ ) हवि व ( ४ ) सामर्थ्य; असे प्रथस् ह्याचे ४ अर्थ आहेत. अग्नि वगैरे सप्रथाः म्हणजे धनवान् किंवा सामर्थ्यवान् होत. शर्म व छर्दिः हीं जशीं विस्तृत तशीं धनयुक्तही असतील. निघंटूंत नुसता सप्रथाः शब्द न घालतां सप्रथः किंवा प्रथः शब्द घालावयास पाहिजे होता. पण यास्क शब्दाचें एकच रूप देतो. विवरणांत दुसरीं रूपें घेणें जरूर आहे.

**विदथानि ( ३३ ) वेदनानि । विदथानि प्रचोदयन् ( ३।२७।७ ) इत्यपि निगमः भवति**

विदथानि = वेदनानि = विज्ञानानि = ज्ञान. लोकांचें ज्ञान वाढविणारा, ज्ञानास उत्तेजन देणारा ( अग्नि ). विदथ शब्दाचे अनेक अर्थ आहेत. बहुतेक ठिकाणीं यज्ञ

हा अर्थ आहे. ( १ ) अस्मिन्नो अद्य विदथे यजत्रा विश्वे देवा हविषि मादयध्वम् ( ६।५२।१७ ). = हवि घेण्याला पात्र असे तुम्ही ( यजत्राः ) हे विश्वेदेवांनो, आमच्या ह्या यज्ञांत हवि भक्षण करून ( हविषि ) आनंदित व्हा. विदथे = यज्ञे. ( २ ) वयं ते इन्द्र विश्वह प्रियासः सुवीरासो विदथमा वदेम ( २।१२।१५ ) = तुला प्रिय असणारे आम्ही नेहमीं ( विश्वह ), पुत्रासह, हे इंद्रा, तुझी स्तुति करूं. विदथं= स्तुति. अधा जिव्री विदथमा वदाथः ( १०।८५।२७ ) = हे नवरानवरींनो, म्हातारे झालां असतांनाही ( जिव्री ) सुख ( विदथं ) भोगाल ( आ वदाथः ). कदाचित् वरील ऋचेंतही सुख भोगूं असा अर्थ असेल. (३) अजेष्म पूरुं विदथे मृध्रवाचम् (७।१८।-५ ) = शत्रुत्वाची भाषा बोलणारा ( मृध्रवाचं ) जो पूरु त्याला संग्रामांत ( विदथे ) आम्हीं जिंकलें. ( ४ ) मेधाकारं विदथस्य प्रसाधनमग्निं ( १०।९१।८ ) = धन देणाऱ्या अग्नीला. मेधा = विदथं = धन. विदथानि प्रचोदयन् ( ३।२७।७ ) = धन देणारा. ( ५ ) वेद यस्त्रीणि विदथानि एषां देवानां जन्म ( ६।५१।२ ) = ह्या सूर्याला तीन स्वर्ग ( विदथानि ), ह्या देवांचा समुदाय ( एषां देवानां जन्म ) माहीत आहे ( वेद ). ( ६ ) एन्द्र याहि उप नः परावतो नायमच्छा विदथानीव सत्पतिरस्तं राजेव सत्पतिः ( १।१३०।१ ) = राजा जसा घरीं ( विदथानि = अस्तं ) येतो तसा तूं हे इंद्रा, आमच्या यज्ञाकडे ( नायम् अच्छा ) ये. ( ७ ) स रेवान् याति प्रथमो रथेन वसुदावा विदथेषु प्रशस्तः ( २।२७।१२ ) = धन देणारा ( वसुदावा ), धनवान् ( रेवान् ), सभांतून ज्याची प्रशंसा होत असते ( विदथेषु प्रशस्तः ) असा तो रथांत बसून सर्वांच्या अग्रभागीं ( प्रथमः ) जातो. सोमो वीरं कर्मण्यं ददाति । सादन्यं विदथ्यं सभेयं ( १।९१।२१ ) = शूर ( वीरं = कर्मण्यं ) व सभाधीट ( सादन्यं = विदथ्यं = सभेयं ) असा पुत्र सोम देतो. ( ८ ) उभे हि विदथे कविरन्तश्चरति दूत्यम् ( ८।३९।१ ) = अद्भुतशक्ति ( कविः ) जो अग्नि तो दोन्ही लोकांच्या मध्यें दूतकर्म करतो. विदथं = लोक. विदथे = द्यावापृथिवी. (९) अन्तर्महे विदथे येमिरे नरः ( ५।५९।२ ) = शूर जे मरुत् ( नरः ) ते द्यावापृथिवीच्या मध्यें ( अन्तर् ) जातात ( येमिरे ). महे = महान्, विदथे = द्यावापृथिवी. असे विदथ ह्याचे अनेकार्थ आहेत.

## खंड ८ वा

**श्रायन्त इव सूर्यं विश्वेदिन्द्रस्य भक्षत । वसूनि जाते जनमान ओजसा प्रति भागं न दीधिम ( ८।९९।३ )**

**समाश्रिताः सूर्यम् उपतिष्ठन्ते । अपि वा उपमार्थे स्यात् । सूर्यम् इव इन्द्रम् उपतिष्ठन्ते इति**

श्रायन्तः = समाश्रिताः. 'इव' अनर्थक म्हणून गाळला आहे. 'उपतिष्ठन्ते' अध्याहृत. सर्व रश्मि सूर्यावर अवलंबून असल्याकारणानें त्याची स्तुति करतात ( उपतिष्ठन्ते ). किंवा 'इव' अनर्थक नसून उपमार्थी असेल. रश्मि जसे सूर्याची स्तुति करतात तशी इंद्राचीही करतात.

**सर्वाणि इन्द्रस्य धनानि विभक्ष्यमाणाः**

विश्वा = विश्वानि = सर्वाणि. ' इत् ' अनर्थक. भक्षत = विभक्ष्यमाणाः. वसूनि = धनानि. इंद्राचें सर्व धन वाटून टाकणारे ( रश्मि ).

**स यथा धनानि विभजति जाते च जनिष्यमाणे च**

जनमाने = जनिष्यमाणे. जन् + अ + मानः = जनमानः = जन्मास येणारा. स धनानि विभजति ' हें वाक्य अध्याहृत. न = यथा. तो ( इंद्र ) जसा जन्मलेले ( जाते ) व जन्मास येणारे ( जनमाने ) ह्या सर्वांना धन वाटून देतो तसें.

**तं वयं भागम् अनुध्यायाम ओजसा बलेन**

' तं वयं ' अध्याहृत. प्रति = अनु. दीधिम = ध्यायेम. ओजसा = बलेन. दुर्गानें दिलेला अर्थः— इंद्र म्हणजे सूर्य; त्याचीं सर्व धनें म्हणजे उदकें आपआपसांत वाटून घेणारे व सर्वपरी त्याच्यावर अवलंबून असणारे रश्मि त्याच्याकडे जातात; किंवा रश्मि जसे सूर्याकडे जातात तसे इंद्राचीं धनें म्हणजे उदकें आपसांत किंवा लोकांना वाटून देणारे व इंद्रावर अवलंबून असणारे ते रश्मि उदकासाठीं इंद्राकडे जातात. इंद्र किंवा सूर्य ऐश्वर्यबलानें ( ओजसा ) जन्मलेले व जन्मास येणारे अशा सर्व प्राणिमात्रांना धन वाटून टाकतो व त्या वाटून दिलेल्या धनभागावर सर्वजण आपली उपजीविका करतात. त्याप्रमाणें आम्हीही आपला भाग घेऊं ( अनुध्यायाम ). ' न ' अनर्थक असेल किंवा त्याचा अनु हा अर्थ असेल. ह्या विवरणांत अर्थाची ओढाताण झाली आहे. भज् (वाटणें) + स + त = भक्षत = वाटा. हे जनहो, इंद्राचें सर्व ( विश्वा ) धन ( वसूनि ) जन्मलेले ( जाते ) व जन्मास येणारे (जनमाने) अशा सर्व माणसांना वाटून टाका (भक्षत). 'श्रायन्त इव सूर्यं' व 'प्रति भागं न दीधिम' हे शब्द कठीण आहेत. यः शिश्राय मघवा काममस्मे ( १०।४२।६ ) = जो धनवान् ( मघवा ) इंद्र आम्हांला ( अस्मे = अस्मभ्यं ) इच्छित धन ( कामं ) देता झाला ( शिश्राय ). ह्या ऋचेंत श्रि = देणें. श्रायन्तः = देणारे. इंद्रानें बलानें ( ओजसा ) मिळविलेलें धन इतकें आहे कीं, वाटणाराला आपण सूर्यच वाटतों आहों कीं काय असें वाटतें. सूर्यं श्रायन्तः इव = जणूं काय तुम्ही सूर्य वाटीत आहांत. अयं मम भागः अयं मम भागः इति वयं भागं प्रति न दीधिम = हा माझा भाग, हा माझा असा विचारच आम्ही मनांत आणणार नाहीं ( न दीधिम ). प्रत्येकानें किती धन घेतलें तरी तें संपणार नाहीं. पितृधन वाटतांना भांडण होतें, कारण तें किती असलें तरी अपुरेंच पडतें; म्हणून भांडणें होतात. इंद्राचें धन अमित आहे; भांडणाला जागाच नाहीं असा अर्थ असावा. तव श्रवांसि उपमानि उक्था ( ८।९९।२ ) सूर्यं श्रायन्ते इव ( ८।९९।३ ) = हे इंद्रा तुझें अनुपम ( उपमानि ) व प्रशंसोद्गाराला पात्र ( उक्थ्या = उक्थ्यानि ) धन ( श्रवांसि ) सूर्याला ( सूर्यं ) जणूं काय ( इव ) दिपवून टाकीत आहे ( श्रायन्ते ) असाही अन्वय करतां येईल. ह्या अन्वयांत श्रायन्तः असें पद नसून तें ' श्रायन्ते ' आहे.

**ओजः ओजतेः वा उब्जतेः वा**

ओज् = वाढणें ह्यापासून किंवा उब्ज आर्जवे ( धा० ६।२३ ) = सरळ जाणें ह्यापासून ओजस्. ओज् = वाढणें हा धातु धातुपाठांत नाहीं. ऋग्वेदाच्या पूर्वकालीं उज् धातु प्रचारांत असावा. उज् + रः = उग्रः = बलवान्. उज् + अस् = ओजस् = बळ. उब्ज् = खालीं जाणें ( न्यग्भावार्थस्य ) असें दुर्ग म्हणतो. पण तो अर्थ धातुपाठांत नाहीं.

**आशीः ( ३५ ) आश्रयणात् वा। आश्रपणात् वा। अथ इयम् इतरा आशीः आशास्तेः**

आ + श्रि पासून आशीः. दीक्षिताला व्रतधुक् गाईचें दूध प्यावयाचें असतें. अशा दुधाचें जें दहीं त्याला आशिर म्हणतात. हें आशिर सोमरसांत घालावयाचें असतें. तसें केल्यानें दध्याशिर बनतें असें दुर्ग म्हणतो. किंवा आ + श्रप् ( पाके ) ह्यापासून. कारण तें दूध किंचित् (आ) दधिरूपानें पक्व म्हणजे परिणत झालेलें असतें. श्रप् पासून शिरं ( दुर्ग ). लौकिक जो आशिष् शब्द तो आ + शास् ( इच्छिणें ) ह्यापासून. आशीः हिताशंसाहिदंष्ट्रयोः (अमर ३।३।२२९). हिताची आशा ती आशीः. आशसनम् आशीः (क्षीरस्वामी). आशीः आशिरौ आशिरः। आशिरं। आशिरा॥ आशी आशिषौ आशिषः। आशिषं। आशिषा असा दोन तऱ्हेनें हा शब्द चालतो. त्यातील धातूचें भूतभूतकाळाचें विशेषण आशीर्त व आशिष्ट. आशीर्वान् हें तद्धित रूप. आशिरौ व आशिषौ हीं रूपें ऋग्वेदांत नाहींत. बाकींचीं वर दिलेलीं सर्व रूपें ऋग्वेदांत आढळतात. हा शब्द स्त्रीलिंगी आहे. आशीः म्हणजे गाईचें ऊन ऊन, ताजें दूध. विश्वा इत्ते धेनवो दुह्र आशिरं घृतं दुह्रत आशिरम् ( १।१३४।६ ) = हे वायु, सर्व गाई तुजसाठीं ऊन ( घृतं ) किंवा शुभ्र दूध ( आशिरं ) देतात. सोम अशा दुधाची वाट पहात असतो. इमे० सोमास्तीव्राः। शुक्रा आशिरं याचन्ते ( ८।२।१० ) = हे तिखट ( तीव्राः ) किंवा मादक, शुभ्र ( शुक्राः ) दूध ( आशिरं ) मागत आहेत ( याचन्ते ). दुधांत मिसळलेल्या सोमाला आशीर्वान् म्हटलें आहे. ( १।२३।१॥८।९५।७ ). क्षीरैर्मध्यत आशीर्तः ( ८।२।९ ) = मधोमध ( मध्यतः ) घातलेल्या दुधांत ( क्षीरैः ) मिसळलेला ( आशीर्तः ) सोम. आशीर्त ह्या विशेषणावरून सोमरसांत घालावयाच्या दुधाला आशीः अशी संज्ञा होती. पुढें आशीः ह्याचा अर्थ सोमरसांत मिसळावयाचा द्रवपदार्थ. मध्यत आशीर्तः। दध्ना ( ८।२।९ ) = दह्यांत मिसळलेला सोम. दध्याशीः = दहीं हें मिसळण आहे ज्यांत असा सोम. यवाशीः = यवाचें पीठ किंवा त्या पिठाची दारू ज्यांत मिसळलेली असते असा सोम. गवाशीः = गाईचें दूध ( गो ) ज्यांत मिसळलेलें असतें असा सोम. रसाशीः = रस ( गोरस ? ) ज्यांत मिसळलेला असतो असा सोम. कित्येक वेळां पुरोडाश, दूध व सोमरस ह्यांचें मिश्रण करीत. आशिरं पुरोळाशमिन्द्रेमं सोमं श्रीणिहि ( ८।२।११ ) = इंद्रा, दूध, पुरोडाश व सोम मिसळ. गोश्रिताः सोमासः व गवाशिरः सोमाः ( १।१३७।१ ) ह्याचा अर्थ एकच;

गोश्राताः = गाईच्या दुधानें मिश्रित. गवाशीः ह्यांत आशीः ह्याचा मूळचा अर्थ जाऊन मिसळण्याचा द्रव पदार्थ असा झाला. आ + शीः ह्यांतील शीः 'शृ = मिसळणें' ह्यापासून झाला असेल. यत्ते राजन् शृतं हविस्तेन सोमाभि रक्ष नः (९।११४।४) = हे राजा सोमा, तुझा जो क्षीरमिश्रित (शृतं) हवि त्यानें आमचें रक्षण कर. शृतपा = क्षीर-मिश्रित सोम पिणारा (७।१८।१६॥१०।२७।६) = मिसळलेला सोम पिणारा. शृत= शिजविलेला हाहि अर्थ ऋग्वेदांत आहे (१०।१६।१ व २). शृतपाकं पचन्तु (१।-१६२।१०) = चांगला शिजवोत. शृतास इद्रहन्तस्तदाशत (९।८३।१) = वाहणारे श्रृतसोम तें (क्षीर किंवा जल) खातात. एथें श्रृतासः = शिजविलेले, उकळलेले. सोम उकळीत होते कीं काय अशी शंका येते. श्रृतं पाके (पाणिनि ६।१।२७) ह्यानें श्रा किंवा श्रप् ह्याचें भूतभूतकाळचें श्रृत हें रूप असें पाणिनि म्हणतो तें बरोबर नाहीं. श्रृ हा वैदिक धातु; ह्याजपासून श्रृत. आशीः = विनंति. जसें:—श्रृणोतु शक्र आशिषम् (८।९३।१८) = इंद्र आमची विनंति ऐको. स्युः ते सत्या इहाशिषः (८।४४।२३) = (हे अग्नि, मी जर तुझ्याठिकाणीं असतों व तूं माझ्या ठिकाणीं असतास तर) तुझ्या (द्रव्याविषयीं) प्रार्थना खास खऱ्या, सफल, झाल्या असत्या. परंतु ह्या दोन्हीही ठिकाणीं विनंति किंवा प्रार्थना हा अर्थ असलाच पाहिजे असें म्हणतां येणार नाहीं. आशीः म्हणजे सोमहवि असा अर्थ एथेंही होईल. इंद्र सोमहवि (पुरोडाश वगैरेंत) मिसळो (शृणोतु). शृ = मिसळणें ह्यापासून शृणोतु. तूं दिलेले सोमहवि सफल होतीलच असा दुसऱ्या उदाहरणाचा अर्थ असेल.

**इन्द्राय गाव आशिरम् (८।६९।६) इत्यपि निगमः भवति**

इंद्रासाठीं गाई दूध (आशिरं) देत्या झाल्या (दुदुहे).

**सा मे सत्याशीर्देवान् गम्यात् (मैत्रा० सं० १।४।५) इति च**

ती माझी सफल होणारी (सत्या) विनंति देवांकडे जावो अशी ही ऋचा आहे. 'शृण्वन्तु ते' हे लगेच शब्द आले आहेत; त्यावरून आशीः = विनंति असा अर्थ असावा. परंतु हे शब्द हल्लींच्या मैत्रायणीसंहितेंत नाहींत. ते दुर्गवृत्तींत घुसडले असावेत. ह्या यजुर्मंत्रांत तैत्तिरीयसंहितानुरोधानें आणखीही बदल केले आहेत. जुष्टात् जुष्टतरा हे पुढें शब्द आले आहेत; तेव्हां आशीः म्हणजे सोमहवि असाच अर्थ असावा. विनंति गोड म्हणण्यापेक्षां हवि गोड म्हणणें योग्य दिसतें.

**यदा ते मर्तो अनु भोगमानळादित्ग्रसिष्ठ ओषधीरजीगः (१।१६३।७)। यदा त मर्तः भोगम् अन्वापत् अथ ग्रसितृतमः ओषधीः अगारीः**

अनु + आनट् = अनु + आपत् = मिळविता झाला. आत् = अथ = तेव्हां. इत् निरर्थक. ग्रसिष्ठः = ग्रसितृतमः = सर्वांहून ज्यास्त खाणारा. ग्रस् + इष्ठः = ग्रसिष्ठः. ऋग्वेदांत धातूंनाही ईयस् व इष्ठ प्रत्यय लागतात. अजीगः (३६) = अगारीः = गिळता, खाता झाला.

**जिगर्तिः गिरतिकर्मा वा गृणातिकर्मा वा गृह्णातिकर्मा वा**

अजीगः ह्यांत धातु गृ. ह्या 'गृ' चा अर्थ गिळणें (गिरति), स्तुति करणें (गृणाति) किंवा ग्रहण करणें (गृह्णाति) असा असेल. 'गृणातिकर्मा वा' दुर्गवृत्तींत नाहीं व त्या शब्दांची जरूरही नाहीं. कारण स्तुतीचा एथें कांहीं संबंध नाहीं. गिळणें व घेणें असे दोन्ही अर्थ एथें संभवतात असें यास्क म्हणतो. गॄ निगरणें (धा० ६।१२९). गॄ शब्दे (९।२६). अजीगः हा शब्द ऋग्वेदांत १५ वेळां आला आहे. त्यापैकीं १३ वेळां (तूं) जागें केलेंस असा व दोनदां (तूं) गिळलेंस असा अर्थ आहे. गृ गिळणें व जागें करणें हा धातु असून अजीगर् हें त्याचें भूतकाळचें तृतीय पुरुषाचें एकवचन आहे. गृ जागें करणें ह्याचीं जागृहि, जागृतं, जाग्रतः, जाग्रत् अशींही रूपें आढळतात. निघंटुकारानें अजीगः शब्द अनेकार्थी म्हणून निघंटूंत घातला. दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थः— जेव्हां मनुष्य तुझा उपभोग घेई (म्हणजे तुझ्यावर बसून परत येई) तेव्हां अतीशय खाणारा (ग्रसिष्ठः) तूं ओषधि खाऊन टाकीस. पण अर्थ थोडा निराळा आहे. जेव्हां मनुष्य तुला भोग्य वस्तु (चारा वगैरे) देई (आनट्) तेव्हां विलंब न लावतां (आत् + इत्), अती खादाड (ग्रसिष्ठः) तूं चारा (ओषधीः) खाऊन टाकीस (अजीगः). भोग शब्द ऋग्वेदांत एकंदर ६ वेळां आला आहे. एकदां (३।३७।९) त्याला 'हिरण्ययं भोगं' म्हटलें आहे. म्हातारा झालेल्या घोड्याला व जुगार खेळणाऱ्याला जो भोग मिळत असतो तोही मला मिळत नाहीं (१०।३४।३). आम्हांला डोळे दे, प्राण दे, भोग पुनः दे (१०।५९।६). इंद्र सूर्याचे ९९ भोग वज्रानें कापून टाकतो (५।२९।६). साप जसा हाताभोवतीं विळखे घालतो (६।७५।१४). प्रस्तुत ऋचेंतील भोग शब्दाचा एथील अर्थ ठरवितां येत नाहीं. तोबरा, खुराक असा अर्थ असेल. तोबरा अडकविल्याबरोबर भुकेनें व्याकुळ झालेला तूं खुराक एकदम गिळून टाकीस. अनु = काम घेतल्यानंतर.

**मूरा अमूर न वयं चिकित्वो महित्वमग्ने त्वमङ्ग वित्से (१०।४।४)। मूढाः वयम्। अमूढः त्वम् असि। न वयं विद्मः महत्त्वम् अग्ने। त्वं तु वेत्थ**

गुर्जरप्रतींत मूल्हाः, मूल्हः व विद्म असे पाठ आहेत. मूराः = मूढाः वयम् = आम्ही मूर्ख आहोंत. अमूर (१७) = अमूढः त्वम् असि = तूं अमूढ (ज्ञाता) आहेस. विभक्तीः संनमयेत् (निरुक्त २।१) = अर्थाकारितां विभक्ति बदलाव्यात. ह्या अधिकारसूत्रानें अमूर ह्या एका शब्दापासून वाक्य बनविलें आहे. चिकित्वः = विद्मः. चिकित्वः हें चिकित्वन् ह्याचें संबोधन आहे. चिकित्वः = हे ज्ञात्या किंवा दात्या. विद्मः = जाणतों. महित्वं = महत्त्वम्. अङ्ग = तु = पण. अङ्ग = च. वित्से = वेत्थ = जाणतोस. अग्नीला अमूर १० वेळां, इंद्र व मित्रावरुण ह्यांना एकएकदां, देवांना ६ दां, मित्रावरुणांच्या हेरांना एकदां, असें म्हटलें आहे. 'मूर' हें विशेषण इंद्राच्या शत्रूंना ३ दां, पुरूरव व इंद्राचे घोडे ह्यांना एकएकदां, व मनुष्यांना दोनदां लावलें आहे. मूरदेव (ज्यांचे देव मूर आहेत) हा शब्द तीनदां आला आहे. 'मूर'चा मूळ

अर्थ मर्त्य असावा. मर्त्य ह्यापासून मूढ अर्थ निघाला असेल. मुह् धातु नसून मृ किंवा मृ धातु असेल.

**शशमानः ( १८ ) शंसमानः। यो वां यज्ञैः शशमानो ह दाशति ( १।१५१।७ )। इत्यपि निगमः भवति**

शशमानः = शंसमानः = स्तुति करणारा. शंसमानः हा अर्थ असावा. शंस् पासून शशमान असें यास्क म्हणत नसेल. शम् = हवि देणें त्याच्यापासून शशमान. ईजे यज्ञेभिः शशमे शमीभिः ऋधत् वारायाग्नये ददाश ( ६।३।२ ) = जो अग्नीला हवि देतो; एथें यज्ञैः = शमीभिः; ईजे = शशमे; शशमानाय दाशुषे ( १।८५।१२ ), ईजानाय शशमानाय ( १।११३।२० ), शशमानाय सुन्वते ( १।१४१।१० ), ह्या उदाहरणांवरून शम् म्हणजे हवि देणें हाच अर्थ निश्चित होतो. शशमान खेरीज शशमे, शशमते, अशमिष्ठाः, अशमिष्ट अशीं क्रियारूपें असून शमितृ व शमी अशीं नामरूपेंही आढळतात. विप्रस्य वा यच्छशमान उक्थ्यं वाजं ससवाँ अभि यासि भूरिभिः ( १०।११।५ ) = विप्राला उत्तम ( उक्थ्यं ) धन (वाजं) देणारा (शशमानः = ससवान् ) तूं पुष्कळ धन घेऊन ( भूरिभिः ) त्याजकडे जातोस. एथें शम् = देणें असा कदाचित् अर्थ असेल. कदाचित् म्हणण्याचें कारण शशमानः = शम्यमानः = हवि दिले जाणारा असा कर्मणि प्रयोगही असण्याचा संभव आहे. शशमानास उक्थैः (४।१६।१५ ) = स्तुतींनीं स्तवणारे. शम् = स्तवणें. अनेकार्थ म्हणून शशमानः निघंटूंत घातला गेला असेल. स्तुति करणारा ( शशमानः ) जो तुम्हांस हवि ( यज्ञैः ) देतो ( दाशति ). एथेंही शशमानः = हवि देणारा.

**देवो देवाच्या कृपा ( १।१२७।१ )। देवः देवान् प्रति अक्तया कृपा**

देवाच्या = देवान् प्रति अक्तया = देवांच्याकडे गेलेल्या. कृपा = सामर्थ्याद्व्ययया कल्पितया गत्या ( दुर्ग ); दुर्ग काय म्हणतो तें कळत नाहीं. विवरणाच्या शेवटीं कृपा म्हणजे कल्पनया असें तो म्हणतो. पण 'कल्पनया' म्हणजे काय ? 'देवाच्या' शब्द फक्त एथेंच आला आहे. घृताची, प्रतीची, विषूची, समीची वगैरे शब्दांसारखा 'देवाची' देवांकडे जाणारी हा अर्थ बरोबर आहे. कृप् = ज्वाला. कृपा = ज्वालेनें. य ऊर्ध्वया स्वध्वरो देवो देवाच्या कृपा। घृतस्य विभ्राष्टिमनु वष्टि शोचिषाजुव्हानस्य सर्पिषः = स्वध्वरः अध्वरसहितः हविषां नेता यः देवः अग्निः ऊर्ध्वया देवाच्या कृपा शोचिषा आजुव्हानस्य आहूयमानस्य घृतस्य सर्पिषः विभ्राष्टिं पतन्तीं धाराम् अनु सततं वष्टि इच्छति = हवि घेऊन जाणारा जो अग्नि देवांकडे जाणाऱ्या आपल्या ज्वालेनें घृताच्या धारेची सारखी इच्छा करीत असतो. कृपा = शोचिषा = ज्वालेनें. सूरो न हि द्युता त्वं कृपा पावक रोचसे ( ६।२।६ ) = हे अग्नि, सूर्य जसा द्युतीनें तसा तूं ज्वालेनें शोभतोस. स्वया कृपा तन्वा रोचमानः ( ७।३।९ ) = स्वतःच्या ( तन्वा = स्वया ) ज्वालेनें शोभणारा. उदु तिष्ठ० कृपा० भासा बृहता ( ८।२३।५ ) = आपल्या मोठ्या प्रकाशानें, ज्वालेनें उभा रहा. दविद्युतत्या रुचा परिष्टोभन्त्या कृपा। सोमाः शुक्राः (९।६४।२८)

= झळकणाऱ्या तेजानें ( रुचा = कृपा ) झळकणारे सोम. चितयन्त्या कृपा क्षामन् रुरुचे उषसो न भानुना ( ६।१५।५ ) = उषा जशी तेजानें तसा अग्नि जळणाऱ्या ज्वालेनें शोभतो. ह्या सर्व उदाहरणांत कृप् = ज्वाला. हा शब्द स्त्रीलिंगी आहे. यज्ञेभिरद्भुतक्रतुं यं कृपा सूदयन्त इत् ( ८।२३।८ ) = अतिशय धनवान् ( अद्भुतक्रतुं ) जो अग्नि त्याला हवि देऊन तृप्त करतातच करतात ( सूदयन्ते इत् ). एथें कृपा = यज्ञेभिः = हवींनीं. ज्वाला मुख्य अर्थ; हवि लाक्षणिक.

**कृप् कृपतेः वा कल्पतेः वा**

ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. कृपू सामर्थ्यें (धा० १।७६३). ह्या अर्थावरून कृपा = सामर्थ्याख्यया कल्पितया गत्या असें दुर्ग म्हणतो. कृप् धातूचें कृपति रूप होत नाहीं. कृपो रो लः (पा० ८।२।१८) ह्यानें क्लृप् होतें. क्लृप् कल्पतेः एवढेंच म्हणावयास पाहिजे. कृप् =प्रज्वलित होणें किंवा करणें, जळणें किंवा जाळणें ह्या अर्थी ऋग्वेदांत आहे. कृपयन् ( १०।९८।६ ) = ( अग्नि ) प्रज्वलित करणारा. कृपमाणं ( १।११८।८ ) = जळत असलेला. कृप् धातूचा दुसराही अर्थ असावा; पण तो ठरवितां येत नाहीं.

## खंड ९ वा.

**अश्रवं हि भूरिदावत्तरा वां विजामातुरुत घा वा स्यालात्।**
**अथा सोमस्य प्रयती युवभ्यामिन्द्राग्नी स्तोमं जनयामि नव्यम् ( १।१०९।२ )**
**अश्रौषं हि बहुदातृतरौ वाम्**

अश्रवं = अश्रौषं = मीं ऐकलें आहे. भूरिदावत्तरा = भूरिदावत्तरौ = बहुदातृतरौ = पुष्कळ अधिक देणारे. गुजराथ प्रतींत बहुदायितरौ असा चुकीचा पाठ आहे. दा + वन् = दावन् = दान. दावन् कोणत्या लिंगीं आहे हें ठरवितां येत नाहीं; ( चतुर्थ्यन्त एकवचनी ) एवढेंच रूप ऋग्वेदांत आढळतें. 'भूरि दाव यस्य स भूरिदावा' कीं भूरि दाति असौ भूरिदावा ? सुतं पाति असौ सुतपावा; त्याप्रमाणें भूरिदावा. तेव्हां 'भूरि दाव यस्य स भूरिदावा' हाच विग्रह योग्य दिसतो. वयं हि ते चकृमा भूरि दावने सद्यश्चिन्महि दावने ( ८।४६।२५ ) एथें भूरि व महि हे शब्द दावने ह्याचें कर्म होत. भूरि दावने = पुष्कळ देण्याकरितां, पुष्कळ द्यावेंस म्हणून. दावा म्हणजे दाता असें यास्क म्हणतो. भूरिदावन् + तरः = भूरिदावत्तरः. न् = त् (?). दुर्गवृत्तींत बहुदातृतरौ नाहीं. भूरिदावत्तरा भूरिदातारौ ( दुर्ग ).

**विजामातुः असुसमाप्तात् जामातुः**

विजामातुः ( ३।४० ) = असुसमाप्तात् जामातुः = ज्याच्यांत जांवईपणा पुरा नाहीं; जांवयांत असावे लागतात असे गुण ज्याच्यांत नाहींत असा मनुष्य. वि = असुसमाप्तात्. गुर्जरपाठ असमाप्तात्.

**विजामाता इति शश्वत् दाक्षिणाजाः क्रीतापतिम् आचक्षते**

विकत घेतलेल्या ( क्रीत ) स्त्रीचा जो पति त्याला दक्षिणेकडील लोक विजामाता असें म्हणतात. दाक्षिणाजाः हा शब्द चुकीचा आहे. दुर्गवृत्तीच्या उत्तम पोथ्यांत दक्षिणाजाः असा पाठ आहे; इतर पोथ्यांत दाक्षिणात्याः. दक्षिणापश्चात्पुरसस्त्यक् ( पा० ४।२।९८ ) ह्या सूत्रानें दाक्षिणात्याः. दक्षिणा हें अव्यय आहे. दक्षिणा किंवा दक्षिणस्यां जाताः दक्षिणाजाः. दाक्षिणाजी ( निरुक्त ३।५ ) पहा.

**असुसमाप्तः इव वरः अभिप्रेतः**

विजामातुः ह्या पदानें जो ( आवश्यक गुणांनीं ) पुरा नाहीं असा नवरा एथें अभिप्रेत आहे. नवरा तर खराच; पण जणूं काय ( ? ) तो समाप्तगुण नाहीं. इव शब्दाचें स्वारस्य लक्षांत येत नाहीं. यास्ककालचा दक्षिणेकडील प्रघात वेदकालींही होता त्याला आधार काय ? स नो अजामीन् उत वा विजामीन् अभि तिष्ठ शर्धतः ( १०।६९।१२ ) = संबंधी किंवा परके कसलेही शत्रु असोत; दोघांनाही जिंक. इतर ऋचांत ( जसें १।११ ।३॥१।१२४।६ ) जामि व अजामि शत्रु असें येतें. जामि व विजामि ह्यांत फरक नाहीं. असेल तर जामि म्हणजे संबंधी व विजामि म्हणजे अति जवळचा संबंधी असा फरक असेल; त्याप्रमाणें जामाता म्हणजे जांवई; विजामाता म्हणजे अति स्नेही असा. आईबापांप्रमाणें जो सासूसासऱ्यांस वागवितो असा. तो सगळें धन त्यांस देतो. त्याच्यावर बायकोचें वजन इतकें असतें कीं तो स्वतःच्या आईबापांस विसरतो.

**जामाता जाः अपत्यम् । तन्निर्माता**

जामाता = जा + माता. जा = अपत्यम्. माता = निर्माता. परि पाहि नो जाः ( १।१४३।८ ), अनमीवो रुद्र जासु नो भव ( ७।४६।२ ) एथें जाः = मुलें. जायां मिमीते जामाता ( अमर २।६।३२ क्षीरस्वामी ) = बायको मिळवितो तो. ग्रीक शब्दांत ग च्या जागीं ज घातल्यानें ( १ ) जामॉस ( २ ) जॉमप्रॉस ( ३ ) जामेति ( ४ ) जामेतिस् असे शब्द बनतील. जामा = लग्न, लग्न करणें ह्याला तृ प्रत्यय लावल्यानें जामातृ म्हणजे मुलीला लग्नांत देणारा किंवा मुलीला स्वतःकरितां किंवा मुलाकरितां घेणारा. मुलीचा बाप लग्नांत पैसे घेणारा किंवा देणारा असल्यास त्याला विजामातृ म्हटलें असेल. मुलगी विकत घेणाऱ्यापासून हवे तितके पैसे उपटण्याची हल्लीहि कोठें-कोठें चाल आहे. तसेंच मुलीच्या बापापासून हुंड्याच्या रूपानें पैसे उकळण्याची प्रसिद्धि आहेच. तेव्हां मुलीच्या बापास हवे तितके पैसे देणाऱ्या वरापासून किंवा वराच्या बापापासूनहि ज्यास्त धन देणारे अश्विन् आहेत. मुलीला बाप नसल्यास तिचा भाऊ ( स्याल ) पैसे घेतो. कदाचित् स्याल आणि विजामातृ ह्यांचा एकच अर्थ असेल. वरील जामप्रॉस शब्दाचे चार अर्थ असून त्यांत श्वशुर असा अर्थ आहे. तेव्हां विजामातृ म्हणजे श्वशुरहि असेल.

**उत घा वा स्यालात्। अपि च स्यालात्। स्यालः आसन्नः संयोगेन इति नैदानाः। स्यात् लाजान् आवपति इति वा। लाजाः लाजतेः। स्यं शूर्पं स्यतेः। शूर्पम् अशनपवनम्। शृणातेः वा**

उत = अपि च. ' घा वा ' अनर्थक. स्यालः = स् + इ + आ + लः. आ + स् = आस्. इ + लः = न्नः. स्याल = साला, मेव्हणा. मेव्हणा बहिणीच्या नवऱ्याला जवळ होतो; त्याचें कारण बहिणीचा पतीशीं संयोग म्हणजे विवाह. ही व्युत्पत्ति नैदान देतात. ऋचांचा हेतु ( निदान ) शोधून काढणारे ते नैदान. एथें नैरुक्ताः असा शब्द पाहिजे; नैदान व्युत्पत्तीच्या भानगडींत कां पडतील? किंवा स्यालः = स्य + आ + लः. स्य = स्यात्. आ = आवपति. लः = लाजान्. सुपांतल्या (स्यात्) लाह्या घेऊन विवाहाचे वेळीं स्याल त्या लाह्या अग्नींत टाकतो. लाज भर्जने ( धा० १।२३८ ). लाज्=भाजणें; ह्यापासून लाज. ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. स्यं = शूर्पं = सूप. सुपाला स्य म्हणण्याचें कारण सुपांतून तूस बाहेर फेकला जातो. सो = फेकणें; ह्यापासून स्य. फेकणें हा अर्थ धातुपाठांत नाहीं. षो अन्तकर्मणि ( धा० ४।४१ ); सो = शेवटास नेणें. शूर्पं = शू + र् + पं. शू = अशनं. पं = पवनं. खाण्याचे पदार्थ सूप शुद्ध करतें म्हणून सुपाला शूर्प म्हणतात. किंवा शॄ हिंसायां ( धा० ९।१६ ). शॄ = कापणें; ह्यापासून शूर्प. शूर्पं = शूर् + पं. शूर् 'शॄ = कापणें' ह्यापासून. वेताच्या चिरफळ्या करून मग त्यांचें सूप करतात. प हा नामकरणप्रत्यय. शीयते शीर्यते वा अनेन इति शूर्पं ( अमर २।९।२६ क्षीरस्वामी ). शो तनूकरणे ( धा० ४।३९ ); शो = बारीक करणें. वेताच्या पातळ चिरफळ्या कराव्या लागतात. शो किंवा शॄ ह्यापासून शूर्प. श्यायते श्यालः। स्यम वितर्के। अस्माद्वा स्यालः ( अमर २।६।३२ क्षीरस्वामी ). श्यै गतौ ( धा० १।९८८ ) ह्यापासून श्याल. स्यम वितर्के ( धा० १०। १६० ) ह्यापासून स्याल. ऋग्वेदांत स्याल; अर्वाचीन संस्कृतांत श्याल. उच्चार बदलला कीं व्युत्पत्ति बदललीच. श्याल बहिणीच्या नवऱ्याकडे पैसे मागण्यास किंवा पैसे देण्यास जातो म्हणून तो श्याल. तो तर्क वितर्क करीत बसतो म्हणून स्याल. स्याल शब्द फक्त ह्याच ऋचेंत आला आहे; तेव्हां ऋग्वेदकालीं त्याचा अमका अर्थ होता हें कसें ठरवितां येईल?

**अथ सोमस्य प्रदानेन युवाभ्याम् इन्द्राग्नी स्तोमं जनयामि नव्यं नवतरम्**

अधा = अथ. प्रयती = प्रदानेन. यम् = देणें. यम् + तिः = यतिः = दान. प्रयतिः = प्रदान. प्रयती = प्रयत्या. युवभ्यां = युवाभ्याम्. नव्यं = नवतरं = अगदीं नवीन. ऋचेचा यास्कानें केलेला अर्थः— गुणहीन जांवई किंवा मेव्हणा ह्यांच्याहून तुम्ही खूप धन देणारे आहांत असें मीं ऐकलें आहे. म्हणून, हे इंद्राग्नी, सोमपान देऊन तुम्हांसाठीं मी अगदीं नवीन स्तुति तयार करीत आहें.

**ओमासः ( ४१ ) इति उपरिष्टात् व्याख्यास्यामः**

ओमासः ह्या शब्दाची व्युत्पत्ति व अर्थ पुढें ( १२।४० ) देऊं. ओमासः =

ओमाः = अवितारः = रक्षण करणारे; किंवा अवनीयाः = सोमपानानें तृप्त करण्यास योग्य असा तेथें अर्थ व व्युत्पत्ति दिली आहे. अव् = रक्षण करणें किंवा तृप्त करणें ह्यापासून ओमासः. अव रक्षण-गति-कान्ति-प्रीति-तृप्ति–अवगम–प्रवेश–श्रवण–स्वाम्यर्थ–याचन-क्रिया–इच्छा–दीप्ति–अवाप्ति–आलिङ्गन–हिंसा–दान–भाग–वृद्धिषु ( धा० १ ६०१ ). ह्यांपैकीं कोणते अर्थ यास्ककालीं प्रचारांत होते हें सांगतां येत नाहीं. हा शब्द ऋग्वेद (१।३।७) एथेंच फक्त आला आहे. तो आ + ऊमासः ह्यांचा संधि होऊन झाला असावा. ऊम शब्द ऊमाः, ऊमासः, ऊमेभिः, ऊमैः व ऊमेभ्यः अशा रूपांनीं ऋग्वेदांत १२ वेळां आला आहे. ऊम म्हणजे देव असा उल्लेख १० वेळां व एकदां मरुत् असा आला आहे. ( १।१६९।७ ) त ऊमैः ह्याचा अर्थ सांगतां येत नाहीं. (१।३।७) त 'आ' हा उपसर्ग दोनदां आला आहे; ओमासः असें पद नाहीं. ऊम हा अव् = देणें ह्यापासून झाला असेल.

## खंड १० वा.

**सोमानं स्वरणं कृणुहि ब्रह्मणस्पते । कक्षीवन्तं य औशिजः ( १।१८।१ )**
**सोमानं सोतारं प्रकाशनवन्तं कुरु ब्रह्मणस्पते**

सोमानं = सोतारम्. सु + मन् = सोमन्. सोमा सोमानौ सोमानः । सोमानं०. सोमानं = सोमरस काढणाऱ्याला. भाष्यांत 'सोमानं' शब्द घालावयास नको होता. तो घातल्यानें घोटाळा झाला; कारण महाराष्ट्रपाठांत 'सोमानं सोमानां' असा पाठ घेतला गेला. त्यामुळें दुर्गवृत्तीच्या चांगल्या पोथ्यांत 'सोमानाम् अनेकेषां स्वरणं सोतारं' असें विवरण केलें गेलें; हें विवरण चुकीचें आहे. कारण स्वरणं = प्रकाशनवन्तं = यशस्वी असा अर्थ यास्कानें दिला आहे. स्वरणं म्हणजे सोतारं असा अर्थ नाहीं. सोतारं बद्दल स्तोतारं हवें होतें. स्वृ शब्दोपतापयोः ( धा० १।९५७ ); म्हणून स्वरणं शब्दयितारं स्तुवन्तं असे शब्द दुर्गवृत्तींत आहेत; पण त्यानंतर यशस्विनं हाही शब्द घातला आहे. प्रकाशनवन्तं हा शब्द यास्कानें अध्याहृत घेतला आहे असें दुर्ग म्हणतो. पण ती त्याची चूक आहे. दुर्गवृत्तींत यशस्विनं शब्द कां आला हें सांगतां येत नाहीं. कृणुहि = कुरु.

**कक्षीवन्तम् इव**

इव शब्द अध्याहृत घेतला आहे. कक्षीवानाप्रमाणें. हा कक्षीवान् कोण ?

**यः औशिजः**

उशिक्चा मुलगा जो कक्षीवान् तो. कक्षीवान् नांवाचा. अग्नीला उशिक् ७ वेळां म्हटलें आहे. त्या शब्दाचा दूत असा अर्थ असेल. उशिक् हें एका ऋषिकुलाचें नांव आहे. ते मूळचे अग्निभक्त होते; परंतु कालांतरानें इंद्राचेही ते भक्त झाले. उशिक् कुलांतील लोक औशिज. कक्षीवानाला औशिज प्रस्तुत ऋचेंतच म्हटलें आहे. कक्षीवान् हें नांव १२ वेळां आलें आहे. एक कक्षीवान् मोठा ऋषि होऊन गेला. अहं

कक्षीवान् ऋषिरस्मि विप्रः ( ४।२६।१ ) = मी स्तोत्रें रचणारा कक्षीवान् नांवाचा ऋषि आहे, असें एकजण प्रौढीनें म्हणतो. राजे लोक ह्याला सहस्रावधि गाई देत. दुसऱ्या एका कक्षीवानाला अश्विनांनीं वाचविले. त्यालाच किंवा दुसऱ्या एखाद्या कक्षीवानाला एक सुंदर बायको करून दिली. ह्या दोन किंवा तीन पैकीं औशिज कोण तें ठरवितां येत नाहीं.

**कक्षीवान् कक्ष्यावान्। औशिजः उशिजः पुत्रः। उशिक् वष्टेः कान्तिकर्मणः**

कक्षीवान् = कक्ष्यावान्. कक्ष्या रज्जुः अश्वस्य ( निरुक्त २।२ ). घोड्याला बांधण्याची दोरी ज्याचेजवळ आहे तो कक्षीवान्. पण कक्षीवानाला घोड्याच्या रज्जूशीं काय करावयाचें होतें? व्युत्पत्ति देण्याचा तडाखा; मग त्या व्युत्पत्तींत अर्थ असो नसो. दुर्गवृत्तींत कक्षीवान् कक्षयातद्वान् असें आहे. कक्षा = खाक. खाका आहेत ज्याला तो कक्षीवान्. पण खाका कोणाला नाहींत? मूळपाठ कक्ष्यावान् कीं कक्षावान् हें सांगतां येत नाहीं. महाराष्ट्रपाठ कक्ष्यावान् आहे व कांहीं गुर्जर पोथ्यांत तोच पाठ आहे. उशिक्चा मुलगा तो औशिज. वश कान्तौ (धा० २।७०). वश्= इच्छा करणें. संप्रसारणानें उश्. उश् + इज् = उशिज्.

**अपि तु अयं मनुष्यकक्ष एव अभिप्रेतः स्यात्**

किंवा ( अपि तु ) कक्षीवान् ह्यांतील कक्ष शब्दाचा मनुष्याची खाक असाच अर्थ त्या नांवांत अभिप्रेत असेल. एथें कक्षीवान् ह्या नांवाचा कोणी मोठा ऋषि नसून विशिष्ट प्रकारच्या खाका आहेत ज्याला असा उशिक्चा मुलगा तो.

**तं सोमानं सोतारं मां प्रकाशनवन्तं कुरु ब्रह्मणस्पते**

सोमानं = सोतारं. अर्थ वर दिला आहे. 'मां' अध्याहृत. सोमरस काढणारा जो मी त्या मला हे ब्रह्मणस्पति प्रसिद्ध कर. पहिल्या अर्थांत कक्षीवानाप्रमाणें ह्या सोमरस काढणाराला प्रसिद्ध कर. दुसऱ्या अर्थांत कक्षीवान् जो मी त्या मला प्रसिद्ध कर. ह्या दुसऱ्या अर्थांतही सोमानं बद्दल महाराष्ट्रपाठांत सोमानां आहे. ऋचेचा खरा अर्थः— हे ब्रह्मणस्पति, उशिक्चा मुलगा जो कक्षीवान्, जो सोमरस काढतो व तुझी स्तुति करतो ( स्वरणं ) त्याला धनवान् कर. कुरु = धनवान कर. कृ ह्याचे देणें, ठेवणें वगैरे अनेक अर्थ होतात. कक्षीवनाला एथें स्वरणं म्हटलें आहे; त्याप्रमाणें कक्षीवन्तं स्तोतारं यभिरावतं ( १।११२।११ ) एथें त्याला स्तोतारं म्हटलें आहे. 'कक्षीवानाला कर' असें अर्धवट वाक्य होतें. काय कर असा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो. त्याला स्वरणं कृणुहि = प्रकाशनवन्तं कुरु असें यास्क उत्तर देतो. पण ती त्याची चूक आहे. दुर्ग प्रकाशनवन्तं अध्याहृत आहे असें मानतो तीही चूकच. कोणतीही भाषा असो करणें ह्यांत अनेक अर्थ भरले आहेत. त्वं नो अग्ने सनये धनानां यशसं कारुं कृणुहि स्तवानः ( १।३१।८ ), कृणुहि वस्यसो नः (४।२।२०), अशा ऋचांत काय कर ह्याला धनवान कर असें उत्तर आहे. तें एथें अध्याहृत आहे असें मानल्यासही चालेल.

## खंड ११ वा.

**इन्द्रा सोमा समघशंसमभ्यघं तपुर्ययस्तु चरुरग्निवाँ इव ।**
**ब्रह्मद्विषे क्रव्यादे घोरचक्षसे द्वेषो धत्तमनवायं किमीदिने ( ७।१०४।२ )**
**इन्द्रासोमौ अघस्य शंसितारम्**

इन्द्रासोमा = इन्द्रासोमौ. अघशंसं = अघस्य शंसितारं = पाप कथन करणाऱ्याला ( दुर्ग ). हे लोक कुकर्में करणारे आहेत अशा कंड्या जो पिकवितो त्याला. अघः शंसः यस्य सः अघशंसः. अघः हें शंसः ह्याचें विशेषण आहे. शंस = शाप. ज्याचा शाप घात करतो तो अघशंस.

**अघं हन्तेः। निर्ह्रसितोपसर्गः आहन्ति इति**

हन् पासून अघ. आहन्ति तत् आघं असें पाहिजे. पण आहन्ति ह्यांतील आ हा उपसर्ग ऱ्हस्व झाला आहे. निर्ह्रसितः उपसर्गः यस्मिन् = ज्याच्यांतील आ हा उपसर्ग ऱ्हस्व केला आहे असें आहन्ति हें क्रियारूप. अघं हें नाम; अघशंस हें त्याचें विशेषण. अघं = दुष्ट जन. यास्कानें सम् व अभि हे शब्द गाळले आहेत. दुर्ग अभ्यघं असा समास मानतो. अभ्यघं = पापम् एव कर्तुम् आभिमुख्येन नित्यकालम् एव अवस्थितः तं ( दुर्ग ) = जो नित्य पाप करण्याकरितां तयारी करून बसला आहे अशाला. पण सम् व अभि हे उपसर्ग ययस्तु ह्याला जोडावयाचे आहेत. यस् धातु एथें व प्रयस्ता ( ३।५३।२२ ) ह्या शब्दांत असा दोनदांच आला आहे. यस् = हाणणें, सडकणें. सम् + अभि + ययस्तु = सर्व बाजूंनीं हणो. यास्कानें ययस्तु गाळलें आहे.

**तपुः तपतेः। चरुः मृच्चयः भवति । चरतेः वा। समुच्चरन्ति अस्मात् आपः**

तप् पासून तपुस्. तपुस् = भाजणारें अस्त्र. तपुः तपुषी तपूंषि असा तो शब्द चालतो. चरु हा मातीचा गोळा असतो. चरुः = च + र् + उः. च = चयः. र् = ऋ = मृत्. म्हणजे चरु शब्द चि व मृत् ह्यांपासून झाला आहे. चिरुः होण्याऐवजीं चरुः असा शब्द प्रचारांत आला. किंवा चर् पासून. कारण चरूतून पाणी ( आपः ) बाहेर ( उत् ) येतें ( चरन्ति ). चरु शब्द ऋग्वेदांत ६ वेळां आला आहे. ( १ ) चरुर्न यः तम् ईङ्खय ( ९।५२।३ ) = चरूप्रमाणें जो आहे त्याला फेकून दे. ( २ ) स नो वृषन् अमुं चरुं सत्रादावन् अपा वृधि ( १।७।६ ) = हे बलिष्ठा, दात्या इंद्रा, हा ( धनानें भरलेला ) चरु उघड. ( ३ ) अपिधाना चरूणामङ्काः सूनाः परि भूषन्ति अश्वम् ( १।१६२।१३ )= अश्वमेधीय अश्वाच्याभोंवतीं चरूंचीं झांकणें, अंक व सूना ठेविलीं आहेत. ( ४ ) असिं सूनां नवं चरुं ( १०।८६।१८ ) = सुरा, सूना व नवा चरु. ( ५ ) भक्षमकरं चरौ अधि ( १०।१६७।४ ) = चरूंत सोमभक्ष ठेविला आहे. ( ६ ) चरुः अग्निवान् ( ७।१०४।२ ) = अग्नीनें भरलेला चरु. ह्या साही उदाहरणांवरून चरु म्हणजे भांडें असावें. एकांत सोमरस भरला आहे. दोहोंत मांस किंवा रक्त भरलेलें असावें. एकांत धन व राहिलेल्या दोहोंत दाहक पदार्थ भरलेला असावा. हा दाहक पदार्थ भांड्यासकट फेकावयाचा.

**ब्रह्मद्वेष्टे क्रव्यम् अदते घोरख्यानाय। क्रव्यं विकृत्तात् जायते इति नैरुक्ताः**

ब्रह्मद्विषे = ब्रह्मद्वेष्ट्रे = स्तुति करणाऱ्यांचा जो द्वेष करतो त्याला. क्रव्यादे = क्रव्यम् अदते = कच्चें मांस खाणाऱ्याला. गुर्जरपाठ अदने आहे; तो चुकीचा आहे. घोरचक्षसे = घोरख्यानाय = ज्याचें दर्शन (ख्यान) भयंकर आहे अशाला. चक्षसे= ख्यानाय. चक्षिङः ख्याञ् (पा० २।४।५४) ह्या सूत्रानें चक्ष् ह्याला ख्या आदेश होतो. चक्ष व्यक्तायां वाचि दर्शने अपि (धा० २।७). चक्ष् पासून चक्षस् नाम. चक्षस् = ख्यानं = दर्शन. पण असा अर्थ ऋग्वेदांत नाहीं. घोरौ चक्षसौ यस्य = ज्याचे डोळे भयंकर आहेत असा. चक्षस् = डोळा. दुर्ग दर्शन असा अर्थ करतो. वृत्तींत तो ख्यानाय शब्द देत नाहीं. महाराष्ट्रपाठांत ब्रह्मद्वेष्ट्रे नंतर ब्राह्मणद्वेष्ट्रे व घोर-ख्यानाय ह्याच्या आधीं घोरचक्षसे असे शब्द आहेत; पण त्यांची जरूर नाहीं. कृत्= कापणें ह्यापासून क्रव्य शब्द झाला आहे. कारण प्राणी जेव्हां कापतात तेव्हां क्रव्य म्हणजे मांस मिळतें. वि + कृत् = नाना प्रकारांनीं किंवा जोरानें कापणें. कृत् ला वि उपसर्ग अर्वाचीन संस्कृतांत जोडतात. लातिन केरो, ग्रीक सारो=मांस. ऋग्वेदांत क्रविस् (मांस) असाही शब्द आहे. क्रविस् व क्रव्य ह्यांत कृत् धातु नसून निराळा धातु असावा. तो कोणता तें सांगतां येत नाहीं. हु पासून जसा हविः शब्द तसा क्रु पासून क्रविस् झाला असेल. हव्यप्रमाणें क्रव्य. पण क्रु धातूचा अर्थ काय? कापणें? क्रु धातु ऋग्वेदांत नाहीं. इति नैरुक्ताः ह्या शब्दांवरून यास्कानें क्रव्य शब्दाची दुसरी एखादी व्युत्पत्ति दिली असावी.

**द्वेषः धत्तम् अनवायम् अनवयवम् यत् अन्ये न व्यवेयुः अद्वेषसः इति वा**

द्वेषः = सर्वलोकद्वेष्यतां (दुर्ग) = सर्व लोक द्वेष करतील अशा स्थितीला द्वेषः = पीडा, इजा. व्यस्मत् द्वेषो वितरं व्यंहो व्यमीवाँश्चातयस्वा (२।३३।२) = आमच्यापासून पीडा दूर कर. द्वेष, अंहः व अमीवा ह्या सर्वांचा अर्थ 'पीडा, इजा.' द्वेषः म्हणजे शत्रु असाही अर्थ आहे. द्वेषांसि हें त्या शब्दाचें बहुवचन. दुर्गानें दिलेला अर्थ बरोबर नाहीं. अनवायं = अनवयवं = सकलम् इत्यर्थः (दुर्गः) = जींत तुकडे बिकडे नाहींत अशी स्थिति; पुरी. अनवायं = अन् + अवायं. अवायं = अवयवं = तुकडा. यु = वेगळे करणें ह्यापासून अवयव. गुर्जरपाठांत अनवायं बद्दल अव्यवेयं आहे. अनवायं शब्द भाष्यांत नको होता. किंवा अनवायं = यत् अन्ये न व्यवेयुः = जें दुसऱ्यांना दूर करतां येणार नाहीं तें. दुसरे कोण? अद्वेषसः म्हणजे त्याचे शत्रु नव्हत असे मित्र. कितीं खटपट केली तरीं जी मित्रांना दूर करतां येणार नाहीं अशी स्थिति. अनवायं = अन् + अव + अयं. 'अयं' इ धातूपासून. व्यवेयुः = वि + अव + ईयुः = वेगळे करतील. अनवायं ह्यांत 'इ' धातु आहे. अव ते हेळो वरुण नमोभिरव यज्ञेभिरीमहे हविर्भिः (१।२४।१४) = हे वरुणा! तुझा राग (हेळः) हवींनीं (नमसा = हविर्भिः = यज्ञेभिः) आम्ही दूर करतों (ईमहे). अव त्वानेना नमसा तुर इयाम् (७।८६।४) = त्वरा करणारा मी (तुरः) तुला म्हणजे तुझ्या रागाला (त्वा)

हवीनें नाहींसें करीन. इयं धीर्भूया अवयानमेषाम् ( १।१८५।८ )=ही स्तुति देवांचे मी जे अपराध केले असतील त्यांचें निराकरण करणारी होवो. अवयानम् = घालविणारी; निराकरण करणारी ( स्तुति ). ह्या तीन उदाहरणांवरून अव + इ किंवा अव + या ह्यांचा दूर करणें असा अर्थ होतो. अनवायम् ह्यांतील अय हें नाम इ किंवा ई ह्यापासून झालें आहे. अव + अयः = दूर करणें. दूर करणें ही क्रिया ज्यांत नाहीं असें जें शासन किंवा इजा ती अनवाय. जी इजा मंत्रतंत्रांनीं, औषधोपचारांनीं दूर करतां येत नाहीं अशी. शत्रूला अशी इजा करा कीं, ती कोणत्याही उपायानें बरी करतां येणार नाहीं. अव्यवेयम् अनवयवं हा गुर्जरपाठ बरोबर दिसतो; व तोच मूळ पाठ असेल. यदन्ये न व्यवेयुः अद्वेषसः इति हें अव्यवेयं चें विवरण मागाहून घुसडलें गेलें असावें. अव्यवेयम् अनवयवं वा हे शब्द स्पष्ट आहेत. त्या प्रक्षिप्तांतही अद्वेषसः शब्द आणखी प्रक्षिप्त आहे. अन्ये कोण ? अद्वेषसः. अन्ये न व्यवेयुः इति वा हें प्रक्षिप्त घातल्यावर अद्वेषसः हा शब्द मागाहून केव्हांतरी घातला गेला.

**किमीदिने किम् इदानीम् इति चरते । किम् इदं किम् इदम् इति वा पिशुनाय चरते**

किमीदिने = किम् + ईद् + इने. ईद् = इदानीम्. इने = चरते. आतां काय चाललें आहे हें पहाण्याकरितां जो हिंडत असतो अशा दुष्टाला. किंवा ईद् = इदम्. हें काय, हें काय आहे, हें काय आहे असें विचारीत जो हिंडतो त्याला. दुर्गवृत्तींत किम् इदं एकदांच आहे व मूळ तसेंच असेल. टिळक म्हणतात कीं, अक्केडिअन भाषेंत किम्मु आणि दिन्ने अशीं दोन भुतें होतीं. ते दोन शब्द मिळून किमीदिन् शब्द झाला आहे. किम्मु + दिन्ने ह्यापासून किमीदिन् शब्द होईल कीं नाहीं हा संशय आहे. इन् हा प्रत्यय आहे. तो काढल्यावर किमीद् राहतें. ग्रीक भाषेंत खुमिआ (रस) असा शब्द आहे. अरबी भाषेंतून किमया शब्द आला आहे. किमीद् = विष असा अर्थ असेल. जो विषप्रयोग करतो तो किमीदी. यातुधाना किमीदिना ( १०।८७।२४ ) = जादूटोणा, विषप्रयोग करणारे. ह्या दोन शब्दांवरून किमीदिना = यातुधाना = जादूटोणा करणारे असाच अर्थ योग्य दिसतो. ( ७।१०४।२३ ) तही मंत्रतंत्र, जादू करणारे हाच अर्थ आहे. चरते पिशुनाय असें पाहिजे. किम् इदम् इति वा चरते. असा कोण ? तर पिशुन. पिशुनो दुर्जनः खलः ( अमर ३।१।४७ ). किमीदिने = पिशुनाय = कुटाळक्या, लावालावी करणाऱ्याला.

**पिशुनः पिंशतेः विपिंशति इति**

पिश् + उनः = पिशुनः. पिश् अवयवे (धा० ६।१५६). पिश् = तुकडे करणें, छिन्नविच्छिन्न करणें ह्यापासून पिशुन. जो खऱ्याचें खोटें करतो तो पिशुन. किंवा गोष्ट किती क्षुल्लक असली तरी ती जो फुगवून सांगतो तो. विपिंशति = फुगवून सांगतो. दुर्गानें पहिल्या अर्धाचा केलेला अन्वयार्थः–हे इन्द्रासोमौ अभ्यघम् अघशंसं संतापयतम् । स च युवाभ्यां संताप्यमानः चरुः इव अग्निसंयुक्तः ययस्तु क्षयं गच्छतु = हे इंद्रा-

सोमांनो, पाप करण्याकडे ज्याचें लक्ष आहे अशा कुटाळक्या करणाऱ्याला भाजून काढा. मातीचें भांडें जसें आगींत भाजलें जातें तसा तो भाजून जाऊन क्षय म्हणजे नाश पावो. संतापयतं हें अध्याहृत आहे. पण दोन वाक्यें करण्याची जरूर नाहीं. हें इन्द्रासोमौ अघशंसम् अघम् अग्निवान् चरुः इव तपुः समभियस्तु = आगीनें भरलेलें भांडें जसें फेकलें असतां माणसाला भाजून टाकतें तसें तुमचें दाहक अस्त्र कुटाळक्याला जाळून टाको. हा खरा अर्थ आहे.

## खंड १२ वा

**कृणुष्व पाजः प्रसितिं न पृथ्वीं याहि राजेवामवाँ इभेन। तृष्वीमनु प्रसितिं द्रूणानोऽस्तासि विध्य रक्षसस्तपिष्ठैः** ( ४।४।१ )

**कृणुष्व पाजः। पाजः पालनात्**

'कृणुष्व' बद्दल 'कुरुष्व' पाहिजे होतें. यास्कानें कृणुष्व कां ठेविलें तें सांगतां येत नाहीं. निरुक्त (११।३४ व १२।८) एथें 'कृणुष्व' बद्दल 'कुरुष्व' आहे. पाजस् शब्द पाल रक्षणें ( धा० १०।७६ ) पासून. पाजस् = बल. बलाला पाजस् म्हणण्याचें कारण बल रक्षण करतें. पाजः ह्याचें ( १ ) तेज, ( २ ) ज्वाला, ( ३ ) धन व (४) बल असे अर्थ आहेत. ज्वाला जेव्हां अर्थ असतो तेव्हां धातु कोणता ?

**प्रसितिम् इव पृथ्वीम्। प्रसितिः प्रसहनात्। तन्तुः वा जालं वा**

न = इव. प्रसिति प्र + सह् = पराभव करणें ह्यापासून. महाराष्ट्रपाठ प्रसयनात् आहे. सि = बांधणें. सि + अन = सयन = बांधणें हीच व्युत्पत्ति बरोबर आहे. प्रसितिः = तन्तु = दोर किंवा जाळें. प्रसिति म्हणजे ज्वाला असाही अर्थ आहे.

**याहि राजा इव अमात्यवान् अभ्यमनवान् स्ववान् वा**

अमवान् = अमात्यवान्. अम = अमात्य. अमात्यांसह राजा जसा येतो तसा ये. किंवा अमवान् ( ४५ ) = अभ्यमनवान् ( अभि + अमनवान् ) = रोग घेऊन. राजा जसा शत्रुसेनेंत रोग पसरतो तसा. अभ्यमितः = व्याधितः (अमर २।६।५८) = रोगी. अभ्यमन ( रोग ) शब्द अमरांत नाहीं. किंवा अमवान् = स्ववान्. अम = आत्म = स्व. स्वतःचें धन किंवा सैन्य घेऊन जातो तसा. अर्वाचीन संस्कृतांतील शब्दांशीं ऋग्वेदांतील शब्द जुळविण्याचा हा प्रयत्न व्यर्थ आहे. अम = बल, जोर, गर्जना, प्रवाह. अमवान् = बलिष्ठ. अम शब्द ऋग्वेदांत बरेच वेळां आला आहे.

**इराभृता गणेन। गतभयेन हस्तिना इति वा**

इभेन = इ + भेन. इ = इरा = अन्न. भ = भृत्. इराभृता = अन्न (पोटांत) घालणाऱ्या. गणेन ( अध्याहृत ) = सैन्यसमुदायानें ( युक्त ). राजा जसा धष्टपुष्ट सैनिक घेऊन जातो तसा. किंवा इभेन = इ + भेन. इ = इत = गत. भेन = भयेन. अभयेन = गतभयेन हस्तिना अध्याहृत. ज्याला भय नाहीं अशा हत्तीवर बसून. हा सर्व वेडेपणा आहे. इभ = हत्ती हा अर्वाचीन अर्थ आहे ( अमर २।८।३६ ). इभ्य

आढ्यो धनी ( अमर ३।१।१० ); हत्ती किंवा गजांतलक्ष्मी ज्याच्यापाशीं आहे तो **इभ्य. इभ शब्द ऋग्वेदांत** ६ वेळां आला आहे. अर्थ धन. इभो राजा (९।५७।३) = धनवान् राजा. तोकाय० इभाय० राये ( १।८४।१७ ) = धनाकरितां. शश्वदिभं ( ६।२०।८ ) व स्मदिभं ( १०।४९।४ ) हीं इंद्राच्या दोन मातबर शत्रूंचीं नांवें आहेत. इभ्यान्न राजा वनानि अत्ति ( १।६२।४ ) = राजा जसा धनिकांना खाऊन टाकतो तसा अग्नि अरण्यें खाऊन टाकतो. तेव्हां प्रस्तुत ऋचेंतही इभ म्हणजे धन.

**तृष्व्या अनु प्रसित्या द्रूणानः । तृष्व्या अनु प्रसित्या**

तृष्वीं = तृष्व्या = त्वरित. प्रसितिं = प्रसित्या = गत्या = गतीनें. क्षिप्रम् अनु-प्रसितया गत्या (दुर्ग). क्षिप्रम् अनुप्रसितया गत्या असा दुर्गाचा पाठ होता कीं काय? द्रूणानः = नाश करणारा. हा शब्द फक्त एथेंच आहे. द्रू धातूचीं दुसरीं रूपें ऋग्वेदांत नाहींत. द्रू हिंसायां ( धा० ९।९ ), द्रू विदारणें ( धा० ९।२१ ).

**तृष्वी इति क्षिप्रनाम । तरतेः वा त्वरतेः वा**

तृष्वी = क्षिप्र. तृष्वी = तृ + स्वी. तृ तरणें किंवा त्वर् त्वरा करणें पासून तृ. स्वी प्रत्यय. जेव्हां मनुष्य संकट तरून जातो किंवा त्वरेनें काम करतो तेव्हां तृष्वी शब्द प्रचारांत येतो. तृपु ( निघंटु २।१५।१० ) = क्षिप्र. निघंटूंत तृष्वी शब्द नाहीं व तो प्रस्तुत ऋचेंतच आला आहे. तृपु हें क्रियाविशेषण असें आढळतें; पण तृपुं व तृपुणा ह्या रूपांवरून तो शब्द विशेषणही आहे. तृष्वी हें तृपुचें स्त्रीलिंग. तृप् = तहान लागणें ह्यापासून तृपु झाला असेल. तृपु = तहान लागलेला; ह्यापासून त्वरित अर्थ निघाला असावा. हा शब्द अग्निसंबंधानेंच वापरला आहे. तृपु यदन्ना तृपुणा ववक्ष तृपुं दूतं कृणुते यह्वो अग्निः ( ४।७।११ ) = ज्या अर्थीं ज्वालेनें (तृपुणा) अग्नि भराभर (तृपु) अन्न नेतो त्या अर्थीं तो ज्वालेलाच दूत करतो. तृपुः = ज्वाला असा मी ह्या ऋचेंत अर्थ करतों.

**असिता असि विध्य रक्षसः तपिष्ठैः तृप्ततमैः प्रपिष्टतमैः इति वा**

अस्ता = असिता = (अस्त्र) फेकणारा. ऋग्वेदांत अस्ता; पण अर्वाचीन संस्कृतांत असिता. तपिष्ठैः = तप्ततमैः = अतीशय तापविलेल्यांनीं. किंवा तृप्ततमैः = अतीशय संतुष्ट अशांनीं. किंवा प्रपिष्टतमैः = अतीशय चेंदामेंदा करणाऱ्यांनीं. दुर्ग तप्ततमैः एवढाच अर्थ देतो; सायणाचार्य तृप्ततमैः गाळनात. वास्तविक तप्ततमैः एव-ढेंच पाहिजे. तप् धातूला ईयस् व इष्ठ प्रत्यय लागून तपीयस् व तपिष्ठ रूपें तयार होतात. तपिष्ठ = अतीशय भाजणारें. तपिष्ठ व तृप्त ह्यांच्यांत त् व प् पुरतें व प्रपिष्ट ह्यांत प् व प् पुरतेंच साम्य आहे. दुर्गानें केलेला अर्थ :–हे अग्नि, आपलें बळ जाळ्या-प्रमाणें विस्तीर्ण कर म्हणजे पसर व जसा एखादा राजा अमात्य बरोबर घेऊन किंवा रोगराईचीं साधनें घेऊन, किंवा स्वकीय सैन्य घेऊन, धष्टपुष्ट सैनिक बरोबर घेऊन किंवा न भिणाऱ्या हत्तीवर बसून जातो तसा तूं जा. त्वरित व सतत गतीनें नाश करीत, ज्या अर्थीं तूं अस्त्रें फेकणारा आहेस त्याअर्थीं पार भाजून टाकणाऱ्या अस्त्रांनीं

राक्षसांना छिन्न विच्छिन्न कर. खरा अर्थ :- पाजः म्हणजे ज्वाला. हे अग्नि, तूं आपली ज्वाला दोरा – (प्रसितिं) प्रमाणें (न) लांबवर पसर. बलिष्ठ राजा जसा धनासाठीं (इभेन) शत्रूवर चाल करतो तसा तूं आमच्या शत्रूंवर चाल कर. त्वरेनें चाल करणारा (द्रूणानः) तूं सतत (अनु) व भराभर (तृष्वीं) ज्वाला (प्रसितिं) फेक (अस्तासि) व पार भाजून टाकणाऱ्या अस्त्रांनीं राक्षसांना छिन्नविच्छिन्न कर. दोन्हीं ठिकाणीं प्रसिति म्हणजे ज्वाला असाच अर्थ घेणें बरोबर होईल. न = त्वरेनें. पाजः पृथु कुरु = प्रसितिं पृथ्वीं कुरु = आपली ज्वाला पसर. अग्नीला पृथुपाजा (३। २।११) म्हटलें आहे.

**यस्ते गर्भममीवा दुर्णामा योनिमा शये (१०।१६२।२)। अमीवा (४६) अभ्यमनेन व्याख्यातः**

अमवान् ह्यांतील अम शब्दाचा अभ्यमन (रोग) असा वरील ऋचेंत अर्थ केला आहे. तोच अर्थ अमीवा शब्दाचा. अम रोगे (धा० १०।१८७); अम् + ईवा = अमीवा. अग्ने त्वमस्मद्युयोध्यमीवा अनग्नित्रा अभ्यमन्त कृष्टीः (१।१८९।३) = हे अग्नि, आमच्यापासून रोग दूर कर (युयोधि); अग्नि न पाळणारे असे जे लोक त्यांना ते रोग पीडा देवोत. अम् = पीडा देणें असा धातु अमन्त ह्यांत असेल. त्याच्यापासून अमीवा.

**दुर्णामा क्रिमिः भवति। पापनामा**

क्रिमि = किडा. त्याला दुर्णामा म्हणण्याचें कारण त्याचें नांव उच्चारल्यानें पाप लागतें. दुः दुष्टं नाम यस्य स दुर्णामा. पापप्रदेशे नतः परिणतः उत्पन्नः = घाणेरड्या, पापमय ठिकाणीं उत्पन्न झालेला, असा दुर्ग अर्थ करतो. दुः दुष्टे पापे प्रदेशे नाम नमनं नतिः यस्य सः असा विग्रह दुर्गानें केला असावा. अमीवा एक प्रकारचा क्रिमि.

**क्रिमिः क्रव्ये मेद्यति। क्रमतेः वा स्यात् सरणकर्मणः। क्रामतेः वा**

क्रिमिः = क्रि + मिः. क्रि = क्रव्ये. मिः = मेद्यति = धष्टपुष्ट होतो. मांसांत जो वाढतो तो क्रिमिः. किंवा क्रिमिः = क्रमिः. क्रम् सरपटणें, हलणें ह्या धातूपासून झाला असेल. किंवा क्रिमिः = क्रामिः. क्राम् पासून. ही व्युत्पत्ति देण्याची जरूर नाहीं. कारण क्रमतेः व क्रामतेः ह्यांमध्यें क्रम् हाच धातु. क्षीरस्वामीही क्रम् पासून क्रिमि असेंच म्हणतो (अमर २।५।१४). कृमि शब्दाची व्युत्पत्ति दुर्ग देत नाहीं. अरबींत गिर्मिझ; ग्रीक खोम. अमीवा फक्त एथें आणि (१०।१६२।१) त पुंलिंगी आहे. इतरत्र सर्वत्र तो स्त्रीलिंगी असून त्याचे दारिद्र्य, दुष्काळ, रोग, जादू असे अर्थ आहेत. पुंलिंगी अमीवन् शब्द असावा व तो १० व्या मंडळांत दोनच ठिकाणीं येतो. त्याचा अर्थ भूत असा करावा. यास्क किडा असा अर्थ करतो. (१०।१६२) त कोणीतरी भूत, पिशाच स्त्रीयोनींत शिरून गर्भनाश, गर्भपात करतो; त्याला मंत्रानें मी घालवितों असें म्हटलें आहे. दुर्गानें केलेला अर्थः— वाईट ठिकाणीं उत्पन्न

झालेला ( दुर्णामा ) असा जो किडा तुझ्या गर्भात, तुझ्या योनींत लपून राहिला आहे ( त्याला मी तेथून मंत्रानें नाहीसा केला आहे ). ज्याचें नांव घेणें म्हणजे पाप होय असें जें भूत– हा खरा अर्थ.

**अतिक्रामन्तो दुरितानि विश्वा। अतिक्रममाणाः दुर्गतिगमनानि सर्वाणि**

अतिक्रामन्तः = अतिक्रममाणाः. अर्वाचीन संस्कृतांतसुद्धां क्रामन्तः रूप बरोबर आहे. यास्ककालीं क्रम् धातु परस्मैपदी चालत नव्हता कीं काय? दुरितानि ( ४७ ) = दुर्गतिगमनानि = दुर्गतीला जाणारीं ( नेणारीं कृत्यें ). दुरित = दुः + इत = संकट. त्याच्या उलट सुवित. दुरित शब्द निघंटूंत कां घातला तें समजत नाहीं. तो अनेकार्थ नाहीं व दुर्बोधही नाहीं. दुरित शब्द पुष्कळदां ऋग्वेदांत आला असून दुरितानि हें रूप ८ वेळां आलें आहे. प्रस्तुत ऋचा कोठून घेतली तें कळत नाहीं. दुर्गतिगमन हा ओढाताणीचा अर्थ आहे. विश्वा = सर्वाणि.

**अप्वा ( ४८ )। यत् एनया विद्धः अपवीयते। व्याधिः वा भयं वा। अप्वे परेहि ( १०।१०३।१२ ) इत्यपि निगमः भवति**

अप्वा = अप् + वा. अप् = अप. वा = वीयते. अर्थ रोग किंवा भय. रोग किंवा भय ह्यांना अप्वा म्हणण्याचें कारण व्याधीचा किंवा भयाचा ज्यास मार बसतो ( विद्धः ) तो प्राण गमावतो ( अप + वीयते ). अप्वा आधीं आल्या कारणानें एतया बद्दल एनया. ही सबंध ऋचा ( ९।३३ ) त दिली आहे. अप्वा शब्द एथें देण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें. अप्वे फक्त एकाच ऋचेंत आला आहे.

**अमतिः ( ४९ ) अमामयी मतिः। आत्ममयी**

अमतिः = अ + मतिः. अ=अमामयी = आत्ममयी. अमा = आत्मा. आत्ममयी= स्वयंपूर्ण (मति). आत्मप्रकाशमयी मतिः यस्य स आदित्यः (दुर्ग) = स्वतःचा प्रकाश पसरण्याची ज्याची बुद्धि असा सूर्य. वरील एका ऋचेंत अमवान् = स्ववान् असा यास्कानें अर्थ दिला आहे; त्यावरून अम = आत्म = स्व. अममयी असें न म्हणतां अमामयी कां म्हटलें तें सांगतां येत नाहीं.

**ऊर्ध्वा यस्यामतिर्भा अदिद्युतत् ( मैत्रा० सं० १।२।५ ) इत्यपि निगमः भवति**

ज्याची ( सूर्याची ) स्वप्रकाशमय मति म्हणजे तेज वर प्रकाशतें. अमति शब्दाचे चार अर्थ ऋग्वेदांत आहेत :– (१) प्रकाश, ( २ ) बल, (३) दारिद्र्य, (४) संकट. ( १ ) अमतिर्न दर्शता विद्युन्न ( १।६४।९ ) = मरुतांची बायको सूर्यप्रकाशाप्रमाणें, विजेप्रमाणें सुंदर होती. ( २ ) वावृधानाममतिं क्षत्रियस्य ( ५।६९।१ ) = क्षत्रियाचें बल वाढविणारे. ( ३ ) वि बाधते अमतिर्नग्नता जसुः ( १०।३३।२ ) = दारिद्र्य, नागवेपणा, भूक त्रास देत आहे. ( ४ ) युयोता शरुमस्मदाँ आदित्यास उतामतिम्। ऋधक् द्वेषः कृणुत ( ८।१८।११ ) = अहो आदित्यांनो, आमच्यापासून घातक अस्त्र व संकट दूर ठेवा. अम्=पीडा देणें ह्यापासून २, ३, व ४ अर्थीं अमति झाला असेल. प्रकाशार्थी अमति शब्दाची व्युत्पत्ति देतां येत नाहीं. प्रस्तुत ऋचेंत

अमतिः व भाः ह्यांचा अर्थ प्रकाश. ऋग्वेदांतील उदाहरण न घेतां मैत्रायणीसंहितेंतील उदाहरण घेण्याचें कारण दिसत नाहीं.

**श्रुष्टी ( ५० ) इति क्षिप्रनाम। आशु अष्टि इति**

श्रुष्टी = श्रु + ष्टी. श्रु = श् + र् + उ. श् + उ = शु = आशु. र् व्यर्थ. ष्टी = अष्टि. लवकर ( आशु ) व्यापतें ( अष्टि ) म्हणून श्रुष्टी = क्षिप्र = लवकर. श्रुष्टी ही श्रुष्टि ह्याची एकवचनी तृतीया आहे. श्रुष्टिः = ( १ ) धन, ( २ ) हविः. नृभ्यो यदेभ्यः श्रुष्टिं चकर्थ (१।६९।४) = हे इंद्रा, ज्याअर्थी तूं ह्या हवि देणाऱ्यांना धन दिलेंस. धिया अश्विना श्रुष्टी आ गतम् (८।८७।६)= हे अश्विनांनो, धन घेऊन या. श्रुष्टी = श्रुष्ट्या = धिया = धनेन. अध्वर्यवः कर्तना श्रुष्टिमस्मै ( २।१४।९ ) = हे अध्वर्यूंनो, ह्याला हवि द्या. श्रुष्टी वां यज्ञ उद्यतः ( ६।६८।१ ) = हे इंद्रावरुणांनो, तुम्हांला हवि दिला आहे. अग्नीला हविष्मान् म्हटलें आहे; त्याप्रमाणें श्रुष्टीवानूही म्हटलें आहे ( ७।७३ ३ ). अनेकार्थी म्हणून श्रुष्टी शब्द निघंटूंत घातला आहे. दिविष्टि, गविष्टि, अभिष्टि ह्या शब्दांप्रमाणें श्रुष्टि शब्दांत स्ति हा शेवटला अवयव आहे. श्रु + स्तिः = श्रुष्टिः. श्रु = स्ति = धन. श्रुष्टीवरीः सुखवत्यः ( ६।२२ ) त्यावरून हा अनेकार्थी शब्द आहे असें दुर्ग म्हणतो. श्रुष्टि म्हणजे सुख हा अर्थ यास्कानें एथें द्यावयास पाहिजे होता.

## खंड १२ वा

**ताँ अध्वर उशतो यक्ष्यग्ने श्रुष्टी भगं नासत्या पुरन्धिम् ( ७।३९।४ )**
**तान् अध्वरे यज्ञे उशतः कामयमानान् यज अग्ने**

अध्वरे = यज्ञे. उशतः = कामयमानान्. अध्वरे व उशतः हे शब्द भाष्यांत घालण्याचें कारण दिसत नाहीं. महाराष्ट्रपाठ अग्नेः असा आहे तो चुकीचा आहे.

**श्रुष्टी भगं नासत्यौ च अश्विनौ। सत्यौ एव नासत्यौ इति और्णवाभः। सत्यस्य प्रणेतारौ इति आग्रायणः। नासिकाप्रभवौ बभूवतुः इति वा**

नासत्या = नासत्यौ = अश्विनौ. ' च ' अध्याहृत. नासत्यौ = न + अ + सत्यौ. अ = न. दोन न एकमेकांचा नाश करितात व ज्याला ते जोडलेले असतात तें निश्चित आहे असें दाखवितात. न + अ = न + न = एव. अश्विन हे खात्रीनें सत्य आहेत असें और्णवाभ म्हणतो. पाणिनीही ( ६।३।७५ ) हीच व्युत्पत्ति देतो. नासत्यौ = ना + सत्यौ. नृ नये ( धा० १।८११ ); ना = नेणारा; ना + सत्यः = सत्याला नेणारा; नासत्यौ = सत्याला नेणारे; सत्यस्य प्रणेतारौ = सत्याचे उत्पादक; असें आग्रायण म्हणतो; किंवा नासत्यौ = नास + त्यौ. नास = नासा = नासिका. त्य प्रत्यय प्रभवार्थी. नासिका ज्यांचा प्रभव म्हणजे जन्मस्थान ते नासत्य असें ऐतिहासिक म्हणतात असें दुर्ग म्हणतो. अश्विन शब्दाची व्युत्पत्ति (१२।१)त दिली आहे.

**पुरन्धिः (५१) बहुधीः। तत् कः पुरन्धिः। भगः पुरस्तात्। तस्य अन्वादेशः इति एक मतम्। इन्द्रः इति अपरम्। स बहुकर्मतमः। पुरां च दारयितृतमः।**

पुरन्धिः = पुरं + धिः. पुरं = पुरु = बहु. पुष्कळ आहे धी म्हणजे कर्मे ज्याचीं तो पुरन्धि. गुर्जरपाठ बहुभिः आहे; तो चुकीचा आहे. दुर्गवृत्तींत पुरन्धिः बहुधीः नाहीं. आतां (तत्) पुरन्धि म्हणजे बहुधी कोण ? मागें (पुरस्तात्) भग शब्द आला आहे. पुरन्धि शब्दानें त्याचा पुन्हा निर्देश (अन्वादेशः) केला आहे असें एक मत आहे. पुष्कळ आहे धी म्हणजे धन ज्याच्याजवळ तो पुरन्धि. भग हा धनाधिपति; म्हणून तो पुरन्धि. पुरन्धि इन्द्र असें दुसरें मत. कारण पुष्कळ (बहु) कामें (कर्म) करणाऱ्यांमध्यें तो श्रेष्ठ आहे. कर्मवाचक नामामध्यें धी शब्द आला आहे (निघंटु २।१). शिवाय पुरं = पुरां. धिः = दिः = दारयितृतमः. शत्रूंचे किल्ले (पुरां) फोडणारे पुष्कळ देव आहेत. त्यांत इन्द्र श्रेष्ठ. ही निराळी व्युत्पत्ति होय.

**वरुणः इति अपरम्। तं प्रज्ञया स्तौति। इमाम् नु कवितमस्य मायाम् (५।८५।६) इत्यपि निगमः भवति**

पुरन्धि म्हणजे वरुण असें आणखी एक मत आहे. कोणी एक मंत्रद्रष्टा त्याची बुद्धीबद्दल स्तुति करतो. बुद्धिवाचक नामांत धी शब्द आला आहे (निघंटु ३।९). ती स्तुति अशीः–कवि म्हणजे अद्भुत कृत्यें करणारे देव; त्यांत श्रेष्ठ जो वरुण त्याच्या ह्या बुद्धीला (कोणीही विरोध करूं शकत नाहीं). ज्याची इतकी विलक्षण बुद्धी तो पुरन्धि. पण माया म्हणजे बुद्धि नसून अद्भुत शक्ति किंवा पराक्रम असा अर्थ आहे. पुरन्धि शब्द ऋग्वेदांत विशेषण असा कोठेंही नाहीं. त्या शब्दाचे (१) स्त्री, (२) धन, (३) एक विशिष्ट देवता व (४) इन्द्र असे अर्थ आहेत. नासत्यांचा उषेशीं विशेष संबंध आहे. त्यामुळें प्रस्तुत ऋचेंत पुरन्धि म्हणजे उषा असावी असा भांडारकर त्रैमासिकाच्या अंकांत मी तर्क केला आहे. पुराणी देवि युवतिः पुरन्धिः (३।६१।१) असें उषेसंबंधानें म्हटलें आहे. (५।४९।५ व ६।२१।९) त इंद्र व पुरन्धि भिन्न देवता आहेत. ऋचेचा यास्कानें केलेला अर्थः—हे अग्नि, हवींची इच्छा करणाऱ्या त्या सर्व देवांना व भग, अश्विन, इंद्र किंवा वरुण ह्यांना त्वरेनें (श्रुष्टी) ह्या यज्ञांत हवि दे. श्रुष्टी व पुरन्धि ह्यांचा खरा अर्थ वर दिलाच आहे. श्रुष्टी = हविषा = हवीनें. पुरन्धि = उषेला.

**रुशत् (५२) इति वर्णनाम। रोचतेः ज्वलतिकर्मणः**

रुशत् = वर्णः = रंग. रुच्=जळणें ह्या धातूपासून रुशत्; रुच दीप्तौ अभिप्रीतौ च (धा० १।७४६); रुच्=प्रकाशणें, आवडणें. जळणें हा अर्थ धातुपाठांत नाहीं. रुश हिंसायां (धा० ६।१३८); रुशि (१०।२५५) अर्थ माहीत नाहीं. हिंसार्थी रुश् धातूपासून रुशत् (झळकणारें) निघत नाहीं. तर मग रुशत् ह्यांत धातु कोणता ? रुच्=प्रकाशणें हा. अर्थनित्यः परीक्षेत (निरुक्त २।१) ह्याचें हें ठळक उदाहरण होय. पण ऋग्वेदांत रुश्=झळकणें, प्रकाशणें हा धातु होता; त्याचें रुशत् हें वर्तमानकालीन

विशेषण फक्त उरलें आहे. रुशन्, रुशन्तं, रुशन्तः, रुशतः, रुशत्, रुशता, रुशद्भिः, रुशती व रुशन्तीं अशीं रूपें आढळतात. उषेला रुशती व रुशद्गौः, व सूर्याला रुशन् असें म्हटलें आहे. पारठ्या गाईच्या कासेंत झळकणारें दूध इंद्र वगैरेंनीं घातलें असें वर्णन येतें. पारठी गाय म्हणजे उषा किंवा रात्र. तिच्या कासेंत झळकणारें दूध म्हणजे सूर्य. आमासु चित् दधिषे पक्वमन्तः पयः कृष्णासु रुशद्रोहिणीषु ( १।६२।९ ) = हे इंद्रा, तूं पारठ्या ( आमासु ) अशा काळ्या व झळकणाऱ्या गाईंत झळकणारें दूध घातलेंस. कृष्णा सती रुशता० पयसा पीपाय ( ४।३।९ ) = रात्र काळी असूनही तिच्या पोटांत झळकणारें दूध घातल्यानें ती फुगली. रुशती म्हणजे सुंदर स्त्री असाही अर्थ आहे. युवं श्यावाय रुशतीमदत्तं ( १।११७।८ ) = (हे अश्विनांनो), तुम्हीं काळ्याला झळकणारी सुंदर बायको दिलीत. निघंटुकारानें अनेकार्थ म्हणून रुशत् शब्द निघंटूंत घातला. रुशत् ह्याचा वर्ण अर्थ नाहीं. परि वर्णं भरमाणो रुशन्तं ( ९।९७।१५ ) = गाळण्यांतून गळून ( परि ) झळकणारा रंग धारण करणाऱ्या सोमाला. रुशद्भिर्वर्णैरभि राममस्थात् ( १०।३।३ ) = आपल्या झळकणाऱ्या तेजानें अग्नीनें काळ्याचा-अंधकाराचा-पराभव केला. ह्या दोन ऋचांत रुशत् हें वर्णाचें विशेषण आहे.

**समिद्धस्य रुशददर्शि पाजः ( ५।१।२ ) इत्यपि निगमः भवति**

प्रज्वलित केलेल्या अग्नीचा प्रकाशणारा रंग ( रुशत् ) दिसत आहे व त्याचें बल ( पाजः ) अप्रतिम आहे असा दुर्ग अर्थ करतो. पण रुशत् नाम नसून पाजः ह्याचें विशेषण आहे. रुशत् पाजः = झळकणारें तेज. रुशत् हें पयः ( १।६२।९ ), अर्चिः ( १।९२।५ ), अनीकं ( ४।५।१५ ), वासः ( ७।७७।२ ), ऊधर् ( १०।३१।११ ), अग्नि ( ४।७।९ ), भानु ( ६।६५।१ ), तनू ( १०।८५।३० ) ह्या शब्दांचें विशेषण आहे. रुशद्वत्सा रुशती (१।११३।२) = रुशन् सूर्यः वत्सः यस्याः सा रुशती उषाः. एथें रुशन् व रुशती हीं मूळचीं विशेषणें पण एथें नामें होत.

## खंड १४ वा

**अस्ति हि वः सजात्यं रिशादसो देवासो अस्त्याप्यम् ( ८।२७।१० )**
**अस्ति हि वः समानजातिता**

सजात्यं = समानजातिता = तीच जात असणें म्हणजे देवत्व (दुर्ग) - देवांची जात देवत्व. तुमची समान जात आहे म्हणजे तुम्ही सर्व देव आहांत. जात ह्याचा जाति हा अर्थ ऋग्वेदांत नाहीं. सजात = मित्र. इमं सजाता अनु वीरयध्वमिन्द्र सखायो अनु सं रभध्वम् ( १०।१०३।६ ) = हे मित्रांनो (सजाताः = सखायः) ह्या इंद्राची स्तुति करा (वीरयध्वं) किंवा त्याचें साहाय्य मागा. वि हि अख्यं मनसा वस्य इच्छन् इन्द्राग्नी ज्ञास उत वा सजातान् ( १।१०९।१ ) = हे इंद्राग्नी, धनाच्या इच्छेनें मी संबंधीं (ज्ञासः) व मित्र (सजातान्) ह्यांना मनातें पाहिलें. सजात्यं =

मैत्री. समानं वां सजात्यं समानो बन्धुरश्विना (८।७३।१२) = हे अश्विनांनो, तुमचें आमच्याशीं सारखें (समानं) सख्य (सजात्यं = बन्धुः) आहे. युष्मे इद्वो अपि ष्मसि सजात्ये (८।१८।१९) = हे आदित्यांनो, तुमच्या (युष्मे = वः) मैत्रींत (सजात्ये) आम्ही एकवटून गेलों आहों (अपि स्मसि). जात = (१) जन्मलेला, (२) पुत्र, मूल, (३) धन, (४) बल, (५) हवि, (६) संघ. सजात = पुत्रयुक्त, पुत्रासारखा. सजात्यं = पुत्राप्रमाणें वागविणें, माया, सख्य, असा अर्थ निष्पन्न झाला असेल.

**रेशयदारिणः**

रिशादसः = रेशयदारिणः. रिश हिंसायां (धा० ६।१३९). रेशयन्तं दारयन्ति ते रेशयदारिणः = हिंसकाला जे फाडून टाकतात ते. वास्तविक रेशयद्दारिणः असा शब्द पाहिजे. हा पाठ कांहीं घेतात असें दुर्ग म्हणतो. तो रेशयदासिनः असा पाठ घेतो व रेशयति हिंसावान् भवति तस्मै ये आयुधानि अस्यन्ति = हिंसकांवर जे अस्त्रें फेकतात ते असा तो अर्थ करतो. रेशयत् + आसिनः = रेशयदासिनः. रिशादस् असा मूळचा शब्द; तो द्रविणोदस् वगैरे शब्दांप्रमाणें रिशादाः रिशादसौ रिशादसः रिशादसं असा चालतो. हिंसा करणें ह्या अर्थी रिश् ऋग्वेदांत नसून खाणें ह्या अर्थी आहे. उस्रा ऊर्जस्वतीः ओषधीः आ रिशन्तां (१०।१६९।१) = अन्न किंवा धन देणाऱ्या (ऊर्जस्वतीः) गाई (उस्राः) वनस्पती खावोत. सुयवसं रिशन्तीः शुद्धाः अपः सुप्रपाणे पिबन्तीः (६।२८।७) = चांगलें गवत खाणाऱ्या व पाणवठ्यावर स्वच्छ पाणी पिणाऱ्या गाई. यत् अपाम् ओषधीनां परिंशम् आ रिशामहे (१।१८७।८) = पाणी व वनस्पती ह्यांचा परिंश (?) आम्ही खातों. अशीं तीनच उदाहरणें रिश् धातूचीं आहेत. रिशा = अन्न, धन. रिशां ददाति असौ रिशादाः = धन देणारा. यन्तं सुम्नं रिशादसा (५।६७।२) = हे धनदात्यांनो, धन (सुम्नं) द्या (यन्तं).

**अस्ति आप्यम्। आप्यम् आप्नोतेः**

आप्यं = आप् + यम्. जसें गम् + यं = गम्यं. आप्यम् आप्नोतेः हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. आपिः = मित्र, आपेः भावः आप्यं सख्यं. सजात्यं व आप्यं ह्यांचा अर्थ एकच. अमापिः अज्ञाः असजात्या अमतिः (१०।३९।६) = दारिद्र्यांत (अमतिः) मित्र नाहीं (अन् + आपिः), आप्त नाहीं, (अ + ज्ञाः) मैत्री नाहीं (अ + सजात्या). हे हिंसकांवर आयुधें टाकणारे किंवा हिंसकाला फाडून टाकणारे देवहो, तुम्ही सर्व देव आहांत; तुमच्यापासून आम्हांस धन मिळावयाचें आहे असा यास्क व दुर्ग अर्थ करतात. हे धनदात्यांनो, तुमचें आमचें (पितृपरंपरागत) सख्य आहे असा खरा अर्थ.

**सुदत्रः (५४) कल्याणदानः। त्वष्टा सुदत्रो विदधातु रायः (७।३४।२२) इत्यपि निगमः भवति.**

सुदत्रः = सु + दत्रः. सु = कल्याण. दत्रं = दानम्. चांगलें (सु) दान

करणारा त्वष्टा धन देवो. यो रत्नधा वसुविद् यः सुदत्रः (१।१६४।४९). रत्नधाः = वसुविद् = धन देणारा. सुदत्र = दानवान्, धन देणारा. अग्ने० सुदत्र (७।८।३) असा तीन वेळां सुदत्र शब्द आला आहे. दद् (देणें) + त्रः+रं=दत्रम्. जसें विप्, शुच् शक्, नम् ह्यांना र लावून विप्र, शुक्र, शक्र, नम्र शब्द बनतात, तसा दत्र शब्द. दद दाने (धा० १।१७). दत्र शब्द ऋग्वेदांत ३ वेळां आला असून दत्रवान्, गोदत्र, पुरुदत्र व अदत्रया ह्यांतही तो आहे. सर्वत्र धन किंवा दान हा अर्थ आहे. सुदत्रः = दानवान्. हा शब्द निघंटूंत घालण्याचें कारण दिसत नाहीं.

**सुविदत्रः (५५) कल्याणविद्यः। आग्ने याहि सुविदत्रेभिरर्वाक् (१०।१५।९) इत्यपि निगमः भवति**

सुविदत्रः = कल्याणविद्यः = ज्याचें ज्ञान कल्याणकारक आहे असा. विद् (जाणणें) + अत्रः=विदत्रः. ह्यांतही दत्र शब्द आहे. 'सु' व 'वि' हे उपसर्ग होत. हे अग्नि, ज्यांचें ज्ञान कल्याणकारक आहे अशा पितरांना घेऊन ये. सु + वि + दत्राः = पुष्कळ धन देणारे. या वां शतं नियुतो याः सहस्रमिन्द्रवायू विश्ववाराः सचन्ते। आभिर्यातं सुविदत्राभिरर्वाक् (७।९१।६)=हे इंद्रवायु, तुमच्यापाशीं सर्व धनानें भरलेलीं (विश्ववाराः) शंभर, हजार दानें आहेत; त्या धनानें भरलेल्या (सुविदत्राभिः) देणग्यांनीं खालीं या. दत्र = देणगी.

**आनुषक् (५६) इति नाम आनुपूर्वस्य। अनुषक्तं भवति। स्तृणन्ति बर्हिरानुषक् (८।४६।१) इत्यपि निगमो भवति**

आनुपूर्व म्हणजे क्रम; तद्वाचक नाम आनुषक् हें होय. अनु + सच् = अनुषच्. तस्य भावः आनुषक् = एकामागून एक असणें. आनुपूर्वस्य भावः आनुपूर्वम्. आनुषक् शब्द ऋग्वेदांत ३४ वेळां आला आहे. आनुपूर्वाला आनुषक् म्हणण्याचें कारण ज्या गोष्टींत आनुपूर्व असतें तिचें अवयव एकमेकाला चिकटलेले (अनुषक्त) असतात. ते दर्भ ओळीनें किंवा दाट पसरतात. ह्या शब्दाचे एकाहून ज्यास्त अर्थ आहेत. दस्रा हि विश्वमानुषक् मक्षूभिः परिदीयथः (८।२६।६) = हे अश्विनांनो, तुम्ही चपळ घोड्यांच्या साहाय्यानें (मक्षूभिः) ब्रह्मांडाभोंवतीं (विश्वं परि) एका क्षणांत (आनुषक्) हिंडतां (दीयथः). आनुषक् = क्षणांत. वयं वो० आनुषक्० हवामहे (८।२७।७) = आम्ही तुम्हांस सारखे हाका मारीत आहोंत. आनुषक् = एकसारखे. कांहीं ऋचांत व्यानुषक् असा शब्द आहे. व्यानुषक् इषं स्तोतृभ्य आ भर (६।६।६)= स्तोत्यांना सतत किंवा तावडतोब धन दे. आनुषक् हें अव्यय आहे, नाम नाहीं. हा शब्द कसा बनला तें सांगतां येत नाहीं. ऋधक्, पृथक्, आनुषक् ह्यांच्या शेवटीं अञ्च् आहे; ऋध् + अञ्च्; पृथ् + अञ्च्; पण आनुष् + अञ्च् असें असेल तर आनुष् काय ?

**तुर्वणिः (५७) तूर्णवनिः। स तुर्वणिः महाँ अरेणु पौंस्ये (१।५६।३) इत्यपि निगमः भवति.**

तुर्वणिः = तुर् + वनिः. तुर् = तूर्ण. त्वरेनें ( तूर्ण ) जो भोगतो ( वनिः ) तो. इंद्र (स्तोत्याला) त्वरित मदत करतो; तो प्रभावानें मोठा आहे; जेथील बलांत (पौंस्ये) रेणु म्हणजे धूळ किंवा दोष नाहीं अशा संग्रामांत ( अरेणुपौंस्ये ) किंवा अंतरिक्षांत (त्याचें बल प्रकाशतें ). तुर्वणिः = तुर् + वनिः. तुर् = तुर = योद्धा. वन् = हिंसा करणें. शत्रूचा नाश करतो तो तुर्वणिः. संगे समत्सु तुर्वणिः पृतन्यून् ( ४।२०।१ ) = लढाईत ( संगे = समत्सु ) शत्रूंचा ( पृतन्यून् ) नाश करणारा ( तुर्वणिः ). नृषाह्ये अमित्रान् पृत्सु तुर्वणे ( ६।४६।८ ) = लढाईत ( नृषाह्ये = पृत्सु ) शत्रूंचा नाश करणाऱ्या हे इंद्रा. तुर्वण म्हणजे लढाई असाही शब्द आहे.

**गिर्वणाः ( ५८ ) देवः भवति । गीर्भिः एनं वनयन्ति**

गिर्वणाः = गिर् + वनाः. गिर्वणाः = देवः. देवाला गिर्वणस् म्हणण्याचें कारण त्याला ( एनं ) स्तुतींनीं ( गीर्भिः ) भजतात. वनु ( धा० १।८३८ ); अर्थ दिला नाहीं. तथापि संभक्तौ ( पूजा करणें ) हा अर्थ असावा. वनयति व वानयति अशीं दोन्हीं रूपें होतात. दुर्गवृत्तींत गिर्वणसे असें चतुर्थ्यंत पद दिलें आहे; पण निघंटूंत गिर्वणाः असेंच आहे. गिर्वणसे असें पद देऊन गीर्वननीयः असा दुर्ग अर्थ देतो; त्यावरून गीर्वणसे चुकीनें पडलें असावें. अर्वाचीन संस्कृतांत गीर्वाणः ( अमर १।१।-९ ) गीः एव निग्रहानुग्रहसमर्थः वाणः अस्त्रम् येषां ते गीर्वाणाः अशी क्षीरस्वामी व्युत्पत्ति देतो. गिर्वणस् शब्दाचा विग्रह ऋग्वेदांतच आहे. इमं मे मरुतो गिरमिमं स्तोममृभुक्षणः । इमं मे वनता हवम् ( ८।७।९ ) = हे धनवान् ( ऋभुक्षणः ) मरुतांनो, आमची ही स्तुति, आमचें हें बोलावणें, ग्रहण करा किंवा ऐका. श्रृणुतं जरितुर्हवमिन्द्राग्नी वनतं गिरः ( १।३।२ ). ह्या दोन उदाहरणांवरून वन् = ऐकणें किंवा ग्रहण करणें असा अर्थ दिसतो. गिरं गिरो वा वनते असौ गिर्वणाः. ऋग्वेदांत गिर्वणः गिर्वणसं व गिर्वणसे अशीं तीनच रूपें आहेत. निघंटूंत मूळचें गिर्वणाः नसून गिर्वणः असें पद असेल. गिर्वणस् सारखा यज्ञवनस् शब्द आहे. वरुणं० यज्ञवनसं ( २।१।-२ ) = हवि घेणाऱ्या वरुणाला.

**जुष्टं गिर्वणसे बृहत् ( ८।६।७ ) इत्यपि निगमः भवति**

( दूध जसें तापवितात तसें साम ) प्रिय ( जुष्ट ) व मोठें ( बृहत् ) इंद्रासाठीं ( गिर्वणसे ) तापवा म्हणजे तयार करा. गिर्वणस् शब्द ४० ठिकाणीं इंद्रपर आहे. तें विशेषण अग्नीला दोनदां, इंद्राग्नींना एकदां व सोमाला एकदां लावलें आहे. तेव्हां गिर्वणस् म्हणजे इंद्र असाच अर्थ घेणें योग्य होईल. गिर्वणस् म्हणजे देव हा अर्वाचीन अर्थ होय.

## खंड १५ वा

**असूर्ते सूर्ते रजसि निषत्ते ये भूतानि समकृण्वन्निमानि ( १०।८२।४ )**
**असुसमीरिताः । सुसमीरिते । वातसमीरिताः । माध्यमकाः देवगणाः**

असूर्ते ( ५९ ) = असूर्ताः. विभक्तीः संनमयेत् ( निरुक्त २।१ ) = जरूर

लागल्यास नामांच्या विभक्ति बदलाव्यात. रजसि ह्याची असूर्ते व सूर्ते अशीं परस्पर विरुद्ध विशेषणें कशीं असतील? विरोध आहे तो दूर करण्याकरितां एका विशेषणाची विभक्ति बदलली पाहिजे. असूर्ताः = असु + ऊर्ताः. ऊर्ताः = ईर्ताः = ईरिताः. असु = प्राणवायु. वायुनें प्रेरित ते असूर्ताः. ईरिताः ह्याला सम् उपसर्ग लागून समीरिताः. असूर्ते ह्याच्यांत सम् नाहीं. सूर्ते (५९) = सु + ऊर्ते. ऊर्ते = ईर्ते = ईरिते. सम् वरीलप्रमाणें सुसमीरिते = विक्षिप्ते = विस्तीर्णे. अंतरिक्ष सर्वत्र फेकलें आहे म्हणजे पसरलें आहे. असुसमीरिताः = वातसमीरिताः. दुर्ग वातसमीरिताः इत्यर्थः म्हणतो तेव्हां हा शब्द भाष्यांत प्रक्षिप्त होय. गुर्जरपाठ वाजसमीरिताः असा आहे. वायूनें प्रेरित कोण? मध्यमस्थानांतील (माध्यमकाः) देवगण म्हणजे मरुत्. ह्या मरुतांचे ४९ गण आहेत (निरुक्त ११।१३ दुर्गवृत्ति). माध्यमकाः हा अशुद्ध तद्धित आहे. माध्यमिकाः पाहिजे.

**ये रसेन पृथिवीं तर्पयन्तः भूतानि च कुर्वन्ति। ते आयजन्त इति अतिक्रान्तं प्रतिवचनम्**

ये = जे. रसेन पृथिवीं तर्पयन्तः (अध्याहृत) = पृथिवीला रसानें म्हणजे उदकानें तृप्त करून म्हणजे पाऊस पाडून. समकृण्वन् = च कुर्वन्ति. च अध्याहृत घेण्याची जरूर नाहीं. ऋचेंत 'ये समकृण्वन्' असे शब्द आहेत. बोलतांना व गद्यांत संबंधीसर्वनामांचा प्रयोग आधीं व नंतर दर्शकसर्वनामांचा. प्रस्तुत ऋचेंत हा नियम पाळला गेला नाहीं. कारण 'ते आयजन्त' हें पहिल्या अर्धांत व 'ये समकृण्वन्' दुसऱ्या अर्धांत आहे. प्रतिवचनं म्हणजे ज्याच्याशीं 'ये' चा संबंध आहे तो शब्द. अतिक्रान्तं म्हणजे क्रम मोडून आधीं गेलें आहे. हा क्रम बहुतेक ऋचांत पाळला आहे. पण छंदाकरितां कांहीं ऋचांत तो मोडलाही आहे. जसें:— उषो वाजं हि वंस्व यश्चित्रो मानुषे जने। तेना वह सुकृतो अध्वराँ उप ये त्वा गृणन्ति वह्नयः (१।४८। ११) = उषे, धन दे जें मनुवंशांत आहे; त्या धनासह यज्ञाप्रत त्यांना घेऊन ये जे तुझी स्तुति करतात. एथें क्रमभंग स्पष्ट आहे. सर्व ऋचा चाळणें कंटाळवाणें आहे; म्हणून क्रमपालन व क्रमभंग ह्यांचें प्रमाण ठरवितां येत नाहीं. असूर्त व सूर्त हे शब्द प्रस्तुत ऋचेंतच आले आहेत. सृ पासून सूर्त असें पाणिनी म्हणतो (८।२।६१). प्रस्तुत ऋचेंत निषत्ते आहे; तें अर्वाचीन संस्कृतांत निषण्णे होतें. रजसि शब्दाचीं असूर्ते, सूर्ते व निषत्ते अशीं तीन विशेषणें. बैठे किंवा स्थिर लोक (निषत्तं रजः), हालणारें (सूर्तं) व न हलणारें (असूर्तं). पृथिवी स्थिर, अंतरिक्ष चल, द्युलोक अचल. ह्या तीन लोकांत असणाऱ्या ज्या देवांनीं हे सर्व प्राणी निर्माण केले असा अर्थ असेल. निश्चित कांहीं सांगतां येत नाहीं. यास्कानें दिलेली व्युत्पत्ति व अर्थ अगदीं चुकीचे आहेत.

**अम्यक्सा त इन्द्र ऋष्टिः (१।१६९।३)। अमाक्ता इति वा। अभ्यक्ता इति वा**

अम्यक् (६०) = अमाक्ता. अम्यक् = अ + मि अथवा मी + अक्. मि

अथवा मी = मां. अक् = अञ्चिता. ऋष्टि = एक प्रकारचें अस्त्र. शत्रूकडील प्रत्येकजण म्हणतो, मजकडे ( मां प्रति ) न ( अ ) फेकली ( अञ्चिता ) जाईल तर बरें. अमा + अक्ता. अमा = जोरानें असा कदाचित् यास्काच्या मनांत अर्थ असेल. अथवा अमि + अक्. अमि = अभि. अक् = अञ्चिता. ही ऋष्टि शत्रूवर ( अभि ) फेकली ( अञ्चिता ) जाते. अम्यक्, यादृश्मिन्, जारयायि व काणुका हे शब्द अविस्पष्टार्थ आहेत असें निरुक्त १।१५ त म्हटलें आहे. त्यांपैकीं अम्यक्ची व्युत्पत्ति एथें दिली आहे ती चुकीची आहे; म्यक्ष् हा धातु; अ + म्यक्ष् = अम्यक्. अपो सु म्यक्ष वरुण भियसं मत् ( २।२८।६ ) = हे वरुणा, मजपासून भय दूर ( अप + उ ) ठेव ( म्यक्ष ). म्यक्ष् = ठेवणें. हे इंद्रा, तुझी ती ऋष्टि तुझ्या हातांत ठेविली आहे. असा प्रस्तुत ऋचेचा अर्थ. मिम्यक्ष वज्रो नृपते गभस्तौ ( १०।४४।२ ) = हे शूरांच्या नायका, वज्र हातांत ठेविलें आहे. ऋष्टि हें मरुतांचें अस्त्र आहे; तथापि इंद्रही तें हातीं घेतो असें दिसतें.

**यादृश्मिन् धायि तमपस्यया विदत् ( ५।४४।८ )। यादृशे अधायि तम् अपस्यया अविदत्**

यादृश्मिन् ( ६१ ) = यादृशे. यादृश् + स्मिन् = यादृश्मिन्; सर्वस्मिन् प्रमाणें. यादृक्ष्मिन् असें व्हावयास पाहिजे. धायि = अधायि = ठेविला गेला. विदत् = अविदत्. ज्या कामनेंत ( यादृश्मिन् ) यजमान मन घालतो ( धायि ) ती कामना हवि व स्तुति अशा कर्मांनें ( अपस्यया ) तो मिळवितो. सबंद ऋचा कठीण आहे; ती मला कळली नाहीं. ज्या यजमानाच्या घरीं ( यादृश्मिन् = यस्मिन् ) अग्नि ठेविला जातो त्या यजमानाला ( तं ) अग्नि धन ( अपस्यया ) देतो, असा अर्थ असेल.

**उस्रः पितेव जारयायि यज्ञैः ( १।१२।४ )। उस्र इव गोपिता अजायि यज्ञैः**

पिता = गोपिता = गाईचा बाप = आंडिल बैल. उस्रः पिता = गोपिता, असा भाष्यांत समास केला आहे; त्यामुळें उस्रः हें पद भाष्यांत नको होतें; किंवा उस्रः पिता गोपिता असें म्हणावयास पाहिजे होतें. जारयायि (६२) = जा + र् + अ + या + यि = जा ( र् + या ) यि = अजायि. आंडिल बैलाचा वासरांनीं वंशविस्तार होतो. त्याप्रमाणें अग्नीचे अनेक अग्नि होऊन विस्तार होतो असा दुर्ग अर्थ करतो. जारयायि = जार् + अयायि. जार् = जारः. अग्नीला उषेचा जार म्हटलें आहे (१।६९।१ व ५). उस्रः = उषसः. उषेचा जार जो अग्नि तो हवींनीं ( यज्ञैः ) याचिला जातो ( अयायि ). हा केवळ तर्क आहे; त्याला आधार कांडीचा नाहीं.

## खंड १६ वा.

**प्रवोऽच्छा जुजुषाणासो अस्थुरभूत विश्वे अग्रियोत वाजा ( ४।३४।३ ) प्रास्थुः वः जोषयमाणाः**

प्र+अस्थुः=प्रास्थुः. जुजुषाणासः=जोषयमाणाः. जुष परितर्पणे (धा० १०।३०१).

जोषयति परस्मैपदी आहे. जुषी प्रीतिसेवनयोः ( धा० ६।८ ) म्हणून जुषते हें रूप आत्मनेपदी. पण दुर्ग 'प्रस्थितानि यानि एतानि हवींषि तानि यूयं जोषयमाणाः देवैः सेव्यमानाः वा' असा 'प्रास्थुः वः जोषयमाणाः' ह्याचा अर्थ करतो. तानि हें जोषयमाणाः ह्याचें कर्म. किंवा प्रस्थितानि एतानि हवींषि । जोषयामाणाः देवैः सेव्यमानाः अशीं दोन स्वतंत्र वाक्यें करावीं असा दुर्गाचा आशय दिसतो. पण जोषयमाणाः हें रूप अशुद्ध आहे. जुषमाणाः शुद्ध होय. यास्ककालीं जोषयमाणाः शुद्ध असेल. वास्तविक जुजुषाणासः हें कर्मणि विशेषण असून अध्याहृत यज्ञाः हें त्याचें विशेष्य होय. प्यायले जाणारे हवि तुमच्याकडे निघाले आहेत. ' अच्छा ' निरर्थक म्हणून गाळला आहे.

**अभवत सर्वे**

अभूत = अभवत. दुर्गवृत्तींत भवत आहे व तेंच बरोबर आहे. विश्वे = सर्वे.

**अग्रगमनेन इति वा। अग्रसंपादिनः इति वा। अपि वा अग्रम् इति एतत् अनर्थकम् उपबन्धम् आददीत**

अग्रिया ( ६३ ) = अग्रगमनेन. अग्रिया = अग्र + इया. अग्र = अग्र्. इया = गमनेन. किंवा अग्रि + या. अग्रि = अग्रे. या = यानेन = गमनेन. ह्यानंतर महाराष्ट्रपाठांत अग्रगरणेन इति वा ज्यास्त आहे. गरणेन हा अग्रियामधील कशाचा अर्थ ? किंवा अग्रिया = अग्र + इया. इया = संपादिनः. हा अर्थ इयामधून कसा निघतो. अग्रसंपादिनः = सर्वांच्या आधीं स्वतःस संपादन करून घेणारे. किंवा अग्रं हा शब्द अर्थांत कांहीं फरक न करतां इया हा उपबंध घेत असेल. अग्रं भवत व अग्रिया भवत ह्या दोहोंचाही अर्थ एकच. वास्तविक अग्रियाः + उत = अग्रिया उत असें पाहिजे; पण छंदाकरिता अग्रियोत असा अशुद्ध संधि केला आहे. सोमाला अग्रिय हें विशेषण १० वेळां, अग्नि, इंद्र, वायु व त्वष्टा ह्यांना एकएकदां लाविलें आहे. 'उषसाम् अग्रिया इव' अशी उर्वशी स्वतःची श्रेष्ठ उषेशी तुलना करते. हे ऋभूंनो, प्यायले जाणारे हे सोम हवि तुमच्याकडे निघाले आहेत; तुम्ही सर्व वाजहो, पुढें (अग्रिया) व्हा.

**अध्दीन्द्र प्रस्थितेमा हवींषि चनो दधिष्व पचतोत सोमम् ( १०।११६।८ )**

**अद्रि इन्द्र प्रस्थितानि इमानि हवींषि**

इत् निरर्थक म्हणून गाळलें आहे ( अद्रि + इत् + इन्द्र ). प्रस्थिता = प्रस्थितानि = पाठविलेलीं, अर्पिलेलीं. इमा = इमानि.

**चनः दधिष्व । चनः इति अन्ननाम.**

दधिष्व बद्दल धारय कां घातलें नाहीं ? दध धारणे ( धा० १।८ ) ह्याचें आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचें एकवचन दधस्व होईल. धि धारणे ( धा० ६।१२५ ) ह्याचें धिष्व होईल. धि हा वैदिक धातु असून त्याचीं धिष्व, धिषे, दधिष्व, दधिषे वगैरे रूपें होतात. धारण करणें व देणें असे त्याचे अर्थ आहेत. चनः (६४) हें अन्नाचें नांव आहे. वचन ह्या शब्दांतील 'व' जाऊन व शेवटल्या 'न' चा नस् होऊन 'चनस्' शब्द बनला आहे असें निघंटूचा टीकाकार देवराज म्हणतो. चनः । चायतेरन्ने ह्रस्वश्च ( उ.

सू.४।२०१) इति असुनन्तः। चकारात् नुडागमे यलोपः। (सायण१।३।६). चाय ह्याला अन्न ह्याअर्थीं असुप्रत्यय लागतो. चा ह्याचा च होतो व च आणि य मध्यें न येऊन य चा लोप होतो. चनस् ची व्युत्पत्ति देतां येत नाहीं हें म्हणणें योग्य होईल. धन व हवि असे चनस् ह्याचे दोन अर्थ आहेत. तत् सविता चनो धात् ( १।१०७।३ ) = सविता तें धन देवो. इमं यज्ञं। चनो धाः ( ६।१०।६ ) = हे अग्नि, ह्या हवीचा ( चनः = यज्ञं ) स्वीकार कर. अग्नीला चनोहितः ( ३।२।२ ) म्हणजे हवि देण्यासाठीं पाठविलेला असें विशेषण लाविलें आहे. चन् = देणें ह्यापासून चनिष्टं ( द्या ) असें क्रियारूप सांपडतें; त्याप्रमाणें चनस्यतं ( द्या ) हेंही सांपडते. चनिष्ठ ( प्रिय ) हें विशेषण चन् धातूपासून झालें आहे. चन् = देणें ह्यापासून चनस्.

**पचतिः नामीभूतः। तं मेदस्तः प्रति पचताग्रभीष्टाम् ( मैत्रा० सं० ४।१३।९ ) इत्यपि निगमः भवति**

पच् धातूपासून पचत ( ६५ ) हा सविभक्तिक शब्द ( नाम ) झाला आहे. जसें यज् व दृश् पासून यजत व दर्शत हीं विशेषणें. त्याप्रमाणें पच् पासून पचत. पचत = पचतं; हें चनः ह्याचें विशेषण. पचत हें एकवचन आहे. पचता हें हवींषि ह्याचें विशेषण म्हणून तें बहुवचनी असें दुर्ग म्हणतो. जेथें मेद व वपा एकत्र असतात त्या प्रदेशाच्या ठिकाणीं त्या ( तं ) शिजविलेल्या पशूला इंद्र व अग्नि ह्यांनीं घेतलें. मेदस्तः = मेद व वपा जेथें असतात त्या ठिकाणापासून. पचता = पचतं. हें 'तं' चें विशेषण. ग्रभ् ( ग्रह् ) चा तिसरा भूतकाळ अ + ग्रभ् + इष्टां = अग्रभीष्टां = अग्रहीष्टाम्. हा उतारा मैत्रावरुण नांवाच्या ऋत्विजानें उच्चारलेल्या प्रैषांतून घेतला आहे. किंवा

**अपि वा मेदसश्च पशोश्च सात्त्वं द्विवचनं स्यात्**

पचता हें द्विवचन आहे असें मानण्याचें कारण जरी 'तं' हें विशेष्य एकवचनी आहे तरी मेद व पशु हे दोन पदार्थ ( सत्त्व ) असल्यामुळें पचता हें विशेषण ह्या दोन पदार्थांना लागू आहे. मेदः पशुश्च द्वे सत्त्वे ( पदार्थौ ). तयोः इदं सात्त्वं. पशु म्हणजे पशूची वपा. तेव्हां मेद व वपा असे दोन भिन्न पदार्थ होतात. पण पचता असें रूप कां घ्यावयाचें ? पचत कां नाहीं ? पचत हें 'तं' चेंच विशेषण आहे. उताऱ्याचा खरा अर्थः— त्याच्याच मेदांत ( मेदस्तः ) शिजविलेल्या पशूला इंद्राग्नींनें घेतलें म्हणजे त्याचा स्वीकार केला. Boiled in one's own fat ( स्वतःच्याच मेदांत उकळलेलें ) अशी इंग्रजी म्हण आहे.

**यत्र हि एकवचनार्थः प्रसिद्धं हि तत् भवति। पुरोळा अग्ने पचतः (३।२८।२) इति यथा**

जींत 'पचत' ह्याचा एकवचनी अर्थ आहे ती ऋचा प्रसिद्धच आहे. एकवचनस्य अर्थः एकवचनार्थः. हे अग्नि, तुझ्यासाठीं हा पुरोडाश ( पुरोळाः ) पक्व केला आहे. असें हें प्रसिद्ध उदाहरण आहे.

**शुरुधः ( ६६ ) आपः भवन्ति। शुचं संरुन्धन्ति। ऋतस्य हि शुरुधः सन्ति पूर्वीः ( ४।२३।८ ) इत्यपि निगमः भवति**

शुरुधः = शु + रुधः. शु = शुक् = दीप्ति किंवा ताप. पाणी ताप कमी करतें म्हणजे कोणतीही तापविलेली किंवा तप्त झालेली वस्तु पाण्यांत घातल्यानें थंड होते. ह्या ऋचेचा अर्थ १०।४१ त दिला आहे. हा शब्द ऋग्वेदांत १० वेळां आला आहे. ९ ऋचांत दान, धन असा अर्थ आहे. एका ऋचेचा ( ६।३।३ ) अर्थ कळत नाहीं. विनः सहस्रं शुरुधो रदन्तु ऋतावानो वरुणो मित्रो अग्निः (७।६२।३) = धनवान् वरुण, मित्र व अग्नि, आम्हांस हजारो देणग्या ( शुरुधः ) देवोत. प्रस्तुत ऋचेंतील 'ऋतस्य' च्या जागीं ३।३८।५ त अस्य ( इन्द्रस्य ) आहे. ऋत व इंद्र ह्यांच्या अनेक देणग्या आहेत. 'ऋत' चे अर्थ अजून मी ठरविले नाहींत. शुरुध् शब्दाची व्युत्पत्ति देणें अशक्य आहे. शुरुधः एवढेंच रूप ऋग्वेदांत सांपडतें.

**अमिनः ( ६७ ) अमितमात्रः। महान् भवति। अभ्यमितः वा। अमिनः सहोभिः ( ६।१९।१ ) इत्यपि निगमः भवति**

अमिनः = अ + मिनः. मिनः = मितः = मोजलेला. अमिनः = न मोजलेला. अमिता मात्रा यस्य = ज्याचें माप मापिलें जात नाहीं तो. असा पुरुष मोठा ( महान् ) असतो ( भवति ). महान् भवति हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. किंवा अमिनः = अभि + अमितः. अमितः = अहिंसितः. अभि + अम् = हिंसा करणें. अभ्यमन शब्दाचा अर्थ ६।१२ त पाहणें. अमिन शब्द येथें व १०।११६।४ त आला आहे. मि = नाश करणें. मिनः = नाश केलेला. अमिनः = न नाश केलेला. मिनः ऋग्वेदांत नाहीं. मा मोजणें ह्याचें भूत भूतकाळचें विशेषण मित. मि नाश करणें ह्याचें मिन होत असेल. सहोभिः = बलेन = बळानें.

**जञ्झतीः (६८) आपः भवन्ति। शब्दकारिण्यः। मरुतो जञ्झतीरिव (५।५२।६ ) इत्यपि निगमः भवति। अप्रतिष्कुतः ( ६९ ) अप्रतिष्कृतः। अप्रतिस्खलितः वा। अस्मभ्यमप्रतिष्कुतः ( १।७।६ ) इत्यपि निगमः भवति**

जञ्झतीः = आपः. पाण्याला जञ्झती म्हणण्याचें कारण वाहतांना पाण्याचा तसा आवाज होतो. ( जेव्हां मरुत ऋष्टिनामक आयुधें सोडतात तेव्हां ) मरुतांच्या पाठोपाठ विजा धो धो वाहणाऱ्या पाण्याप्रमाणें ( जातात ). जञ्झतीः शब्द फक्त एथेंच आला आहे. कडाक्यानें भांडणाऱ्या बायका असाही अर्थ होईल. कजाग स्त्रिया कडाडतात व नवऱ्यांच्या पाठोपाठ धांवतात; तशा विजा कडाडतात व मरुतांच्या पाठीं लागतात. अप्रतिष्कुतः = अ + प्रति + ष्कुतः. ष्कुतः = ष्कृतः. प्रतिष्कृतः = पराङ्मुख केलेला. ष्कुतः = स्खलितः. किंवा स्खलन न पावलेला. (हे सदा दान करणाऱ्या, बलिष्ठ इंद्रा, तूं ) आमच्यासाठीं पराङ्मुख न होतां किंवा स्खलन न पावतां ( हा धनानें भरलेला हंडा उघड ). कवत्नवे, अकवाभिरूती, व अकवैः ह्या शब्दांवरून कु = हिंसा करणें असा एकेकाळीं धातु होता. जिगत्नु व जिघत्नु ह्यांप्रमाणें कवत्नु ( हिंसा

करणारा ). कव = हिंसा. 'कु' चें कुतः हें भूतभूतकालीन विशेषण. प्रति उपसर्गानें स् लागतो. अप्रतिष्कुतः = अहिंसितः

**शाशदानः ( ७० ) शाशाद्यमानः। प्र स्वां मतिमतिरच्छाशदानः ( १।३३।१३ ) इत्यपि निगमः भवति**

शाशदानः = शाशाद्यमानः. शद शातने ( धा० १।८८० ). ह्याचें यङ् लुङंत शाशाद्यते. शाशदानः = पुन्हा पुन्हा किंवा जोरानें कापला जाणारा. पुन्हा पुन्हा किंवा जोरानें कापलेला ( शाशदानः ) वृत्र लोकांना पाणी द्यावयाचें नाहीं हा जो त्याचा ( स्वां ) निश्चय ( मतिं ) तो सोडता झाला. हा अर्थ अगदीं उलट झाला आहे. वृत्राला कापून टाकणारा इंद्र लोकांना पाणी देण्याचा आपला निश्चय वाढविता झाला; हा खरा अर्थ. शद् = ( १ ) हिंसा करणें, ( २ ) देणें, ( ३ ) ऐश्वर्य भोगणें, ( ४ ) नटणें. ( १ ) साक्षाम तान् बाहुभिः शाशदानान् ( ७।९८।४ ) = हिंसा करणाऱ्या त्या शत्रूंना आम्ही बाहूंनीं चीत करूं. ( २ ) त्वया ह्यग्ने वरुणो धृतव्रतो मित्रः शाशद्रे अर्यमा सुदानवः ( १।१४१।९ ) = हे अग्नि, तुझ्यामुळें, धनवान् वरुण, मित्र व अर्यमा आम्हांस धन देतात. ( ३ ) तमु स्तुष इन्द्रं० यस्मिन् पुरा वावृधुः शाशदुश्च ( २।२०।४ ) = ज्याच्यामुळें आमचे वाडवडील पूर्वीं ऐश्वर्य भोगते झाले त्या इंद्राची मी स्तुति करतों. ( ४ ) कन्येव तन्वा शाशदाना ( १।१२३।१० ) = नवपरिणीत वधूप्रमाणें नटणारी उषा. असे 'शद्' चें अनेक अर्थ आहेत. प्रस्तुत ऋचेंत शाशदानः = दाता असाही अर्थ असेल.

## खंड १७ वा.

**सृप्रः ( ७१ ) सर्पणात् । इदम् अपि इतरत् सृप्रम् एतस्मात् एव। सर्पिः वा तैलं वा**

सृप् + रः = सृप्रः. शक्र, शुक्र, विप्र वगैरे शब्दांप्रमाणें. हा जो दुसरा म्हणजे लौकिक सृप्र शब्द तोही ह्याच म्हणजे सृप् धातूपासून. ह्या सृप्रचा अर्थ तूप किंवा तेल. हे दोन्ही पदार्थ सर्पतात म्हणजे वाहतात. हा शब्द अमरकोशांत नाहीं. आपटयांच्या कोशांत सृप्र = चंद्र.

**सृप्रकरस्नमूतये ( ८।३२।१० ) इत्यपि निगमः भवति। करस्नौ बाहू । कर्मणां प्रस्नातारौ सुशिप्रम् ( ७२ ) एतेन व्याख्यातम्। वाजे सुशिप्र गोमति ( ८।२१।८ इत्यपि निगमः भवति**

पसरणारे म्हणजे लांबवर जाणारे बाहू आहेत ज्याचे त्या इंद्राला रक्षणासाठीं ( आम्ही बोलावीत आहोंत ). सृप्रं० ऊर्वे ( ४।१०।२ ) व सृप्रा करस्ना ( ३।१८ ५ ) ह्यांत सृप्र हा शब्द असामासिक आहे; सृप्रदानुं ( १।९६।३ ), सृप्रदानू ( ८। २५।५ ), सृप्रभोजसं ( ६।४८।१४ ), सृप्रवन्धुरः ( १।१८१।३ ), व सृप्रकरस्नं ( ८।३२।१० ) ह्या समासांत सृप्र हें प्रथम पद आहे. करस्नाचें विशेषण असतांना

सृप्र ह्याचा अर्थ पसरणारा, लांबवर जाणारा. दानु व भोजस् ह्यांचें विशेषण असतांना त्याचा अर्थ विस्तृत. सृप्रं० ऊर्वं = विस्तृत, लांबवर पसरलेला गुरांचा कळप. वन्धुर ह्याचा अर्थ कळत नाहीं. सृप्र शब्द निघंटूंत कां घातला तें समजत नाहीं. करस्नौ = बाहू. करस्नौ = कर + स्नौ. कर = कर्मणां. स्नौ = प्रस्नातारौ. कामाला पुरें स्नान घालणारे म्हणजे काम शेवटास नेणारे म्हणून हात करस्नौ. खरी व्युत्पत्ति माहीत नाहीं. करस्न शब्द ऋग्वेदांत ४ वेळां असून त्यांपैकीं एकदांच समासांत आला आहे. स्तोतुर्दुरोणे० सृप्रा करस्ना दधिषे वपूंषि (३।१८।५) = हे अग्नि, तूं लांब (सृप्रा = सृप्रेण) हातानें (करस्ना = करस्नेन) स्तोत्याच्या घरीं धन (वपूंषि) ठेवतोस. ह्या ऋचेंत सृप्र व करस्न हे दोन्ही शब्द आले आहेत. पृथू करस्ना बहुला गभस्ती अस्मद्र्यक् सं मिमीहि श्रवांसि (६।१९।३) = हे इंद्रा, तुझे हात (करस्ना = गभस्ती) लांब (पृथू = बहुला) आहेत; त्यांनीं आम्हांला धन दे. ह्या ऋचेवरून पृथु, बहुल व सृप्र ह्यांचा अर्थ एकच. १०।६७।६ त करेण (हातानें) शब्द आला आहे. 'करस्न' आधीं कीं 'कर' आधीं हें ठरवितां येत नाहीं. जी सृप्र शब्दाची व्याख्या म्हणजे व्युत्पत्ति तीच सुशिप्र ह्यांतील शिप्रा ह्याची. ह्या ऋचेचें विवरण ५।२३ त केलें आहे.

**शिप्रे हनू नासिके वा। हनुः हन्तेः। नासिका नसतेः**

शिप्रे = हनू. दोन हनू कोणत्या? किंवा शिप्रे = नासिके. दोन नाकें कशाला? हन् पासून हनु. हनु काय मारते? नस् = मिळविणें किंवा नमणें; त्यापासून नासिका. नाक वायु मिळवितें व लवलेलें असतें. काय ही व्युत्पत्ति देण्याची हाव! दुर्ग म्हणतो, वाजे सुशिप्र गोमति ह्या ऋचेंत शिप्रा म्हणजे हनु किंवा नाक असा अर्थ दाखविणारा एकही शब्द नाहीं; म्हणून भाष्यकार पुढील ऋचा देतो.

**वि ष्यस्व शिप्रे वि सृजस्व धेने (१।१०१।१०) इत्यपि निगमः भवति**

हे इंद्रा, तुझे जे लांब हनू (?) ते हवि खाण्याकरितां सैल कर; किंवा हवींचा सुगंध घेण्याकरितां नाकपुड्या सैल कर; खालच्या दाढा (धेने) किंवा जीभ व पडजीभ (धेने) ह्याही हवि खाण्याकरितां सैल कर असा दुर्ग अर्थ करतो. शिप्रे व धेने ह्या दोहोंचाही अर्थ चुकला आहे. शिप्राः शीर्षसु वितता हिरण्ययीः (५।५४।११) = मरुतांच्या डोक्यांवर सोन्याचे मुगूट किंवा शिरस्त्राणें होतीं. शिप्राः शीर्षन् हिरण्ययीः (८।७।२५) अर्थ तोच. ह्या दोन ऋचांवरून शिप्रे म्हणजे मुगूट किंवा शिरस्त्राण हाच अर्थ ठरतो. आ ते हनू हरिवः शूर शिप्रे रुहत्सोमो न पर्वतस्य पृष्ठे (५।३६।२) = हे इंद्रा, पर्वताच्या पृष्ठावर जसा पाण्याचा पूर चढावा तसा सोम तुझ्या हनूवर व शिप्रांवर चढला आहे, असें इंद्राचें विनोदपर वर्णन केलें आहे. इंद्र सोम पितां पितां त्यांत बुडून गेला तो इतका कीं तो त्याच्या मुगुटावर वाहूं लागला. हनू म्हणजे दाढा. शिप्रे ह्या द्विवचनावरून शिरस्त्राणाचे दोन भाग असतील; एक डोळ्यांखेरीज सर्व तोंड झाकून टाकणारा व दुसरा डोक्यावर. खाण्या-

पिण्याच्या वेळीं हे काढून ठेवावे लागत. हे लोखंडाचेही असत. ऋभूंना अयःशिप्राः (४।३७।४) म्हटलें आहे. एका राजाचें नांव दशशिप्र आहे (८।५२।२). एक दास वृषशिप्र होता (७।९९।४); त्याच्या डोक्यावर बैलाचें मुंडकें होतें कीं काय ? मनूनें विशिशिप्राला जिंकलें (५।४५।६). इंद्राला हरिशिप्र (१०।९६।४ व १२), अग्नीला हिरिशिप्र (२।२।५) व मरुतांना हिरण्यशिप्र (२।३४।३) म्हटलें आहे. इंद्राला शिप्रिन्, शिप्रावान् व सुशिप्र म्हटलें आहे. सुशिप्र हें विशेषण अग्नीला (५।२२।४), रुद्राला (२।३३।५) व विश्वे देवांना (७।३७।१) एकएकदां लाविलें आहे. शिप्रा शब्दाचा संबंध बहुतेक इंद्राशीं आहे. कधीं कधीं इंद्र ह्या शिप्रांनीं सोम पितो. वनोति शिप्राभ्यां शिप्रिणीवान् (१०।१०५।५) एथें इंद्राला शिप्रिणीवान् म्हटलें आहे. 'शिप्रिणी' ही शिप्रे पेक्षां आकारानें मोठी असेल. शिप्रे म्हणजे हनू किंवा नाकपुड्या असा अर्थ करण्याला कांहींएक आधार नाहीं. यास्कास हा अर्थ कोठें मिळाला तें कळत नाहीं. हनू = दोन अनवळ्या. पण अनवळ्या दोन कशा व सोम पिण्याशीं त्यांचा काय संबंध ? देवराज (निघंटूवरील टीकाकार) म्हणतो:— कोठें कोठें शिप्र शब्दाचा शिरस्त्राण अर्थ होतो; जसें शिप्राः शीर्षसु वितता हिरण्ययीः. परंतु सर्वत्र शिरस्त्राण अर्थ आहे असें म्हणावयास तो धजावत नाहीं; आचार्य नांवाचा मनावर केवढा पगडा ! स्पष्ट बोलण्याची लाज ! देवराज शिप्र असा अकारांत शब्द मानतो; परंतु शिप्रा असा आकारांत स्त्रीलिंगी शब्द आहे. ही शिप्रा वरच्या बाजूस प्रशस्त तव्यासारखी असावी. त्या दोन असून एक डोक्यावर व दुसरी तोंड झाकणारी असून दोहोंना जोडणारी खीळ, किंवा सांखळी असावी. ही खीळ, किंवा सांखळी काढल्यानें शिप्रा एकमेकापासून विलग होत (वि ष्यस्व = बंधनापासून मोकळया कर) व तोंड मोकळे होई. धेना = (१) जीभ; (२) प्रवाह. वि सृजस्व धेने = सोमाचे दोन प्रवाह - तोंडाच्या चिरफळीच्या प्रत्येक बाजूस एक एक–तोंडांत सोड. इंद्र खादाड व सोमानें भरलेले हंडेच्या हंडे, तळयांचीं तळीं फन्ना करणारा होता.

**धेना दधातेः**

धा = धरणें पासून धेना. दुर्गवृत्तींत धेनाची व्युत्पत्ति नाहीं. धे चोखणें, स्तनपान करणें ह्यापासून धेना शब्द झाला असावा. जीभ लांब व प्रवाह किंवा धार लांब, म्हणून प्रवाह किंवा धार हा अर्थ लक्ष्य. व्यस्य धारा असृजद्वि धेनाः (३।१।९) =अग्नि द्युलोकांतून पाण्याच्या धारा सोडता झाला. धेनाः = धाराः. एथेंही वि + असृजत् क्रियापद आहे. ४।१० त शिप्रे इति उपरिष्टात् व्याख्यास्यामः असें म्हटलें होतें. तें व्याख्यान किंवा व्युत्पत्ति एथें केली आहे. पण शिप्रे व सुशिप्र अशीं दोन पदें घालण्याचें प्रयोजन लक्षांत येत नाहीं. कदाचित् मत्स्वा सुशिप्र (१।९।३), पिब्रा० सुशिप्र (३।१२।३) अशा ऋचांवरून शिप्रे म्हणजे हनू किंवा नासिके हा अर्थ स्पष्ट होईल असें निघंटुकारास व यास्कास वाटलें असावें. खाण्यापिण्याचा जेथें संबंध

नाहीं तेथेंही सुशिप्र शब्द वापरलेला आढळतो. जसें:— वज्री सुशिप्रो हर्यश्वः ( ८।६६।४ ). जसें शक् + रः = शक्रः, तसे शिप् + रा = शिप्रा अशी व्युत्पत्ति असेल, पण शिप्‌चा अर्थ काय? स ईं पाहि य ऋजीषी तरुत्रो यः शिप्रवान्वृषभो यो मतीनाम्। यो गोत्रभिद्वज्रभृद्यो हरिष्ठाः स इन्द्र चित्राँ अभि तृन्धि वाजान्॥ ( ६।१७।२ ) ह्या ऋचेंत शिप्रवान् असा शब्द आहे. म्हणजे 'शिप्र' ह्याला वत् प्रत्यय लाविला आहे. हा शिप्र शब्द पुल्लिंगी किंवा नपुंसकलिंगी असेल. व त्याचा अर्थ मुगुट किंवा शिरस्त्राण असा असून धन असाही अर्थ असेल. उतो समस्मिन्ना शिशीहि नो वसो वाजे सुशिप्र गोमति ( ८।२१।८ ). सुशिप्र = मुकुट किंवा शिरस्त्राण धारण करणारा असा अर्थ नसून धनवान् असा अर्थ आहे; कांहीं ऋचांत सुशिप्र ह्याच्यावर श्लेष असून त्याचे दोन्हीही अर्थ होतात.

**रंसु ( ७३ ) रमणात्। स चित्रेण चिकिते रंसु भासा ( २।४।५ ) इत्यपि निगमः भवति**

रम् पासून रंसु. रम् + सु = रमणीयेषु = रमणीय द्युलोक, अंतरिक्ष व पृथिवी ह्या ठिकाणीं किंवा अग्निहोत्रांत. तो अग्नि रमणीय तीन लोकांत ( रंसु ) किंवा सर्व अग्निहोत्रांत सुंदर ( चित्रेण ) तेजानें ( भासा ) जाणला जातो ( चिकिते ). रंसु शब्द एथें व रंसुजिव्हः ह्या समासांत आला आहे. अर्थ ठरविणें अशक्य आहे. रंसु सारखा दंसु शब्द आहे. दंसु रश्मिषु० नव्येषु रश्मिषु ( १।१३४।४ ), आ पृक्षुधो वीरुधो दंसु रोहति ( १।१४१।४ ), दंसुजूतः० शूरः ( १।१२२।१० ), अधोगिन्द्रः स्तर्यो दंसुपत्नीः ( ४।१९।७ ) असा चार ठिकाणीं दंसु शब्द आला असून त्याचाही अर्थ ठरवितां येत नाहीं. गप्पा मारणें शक्य आहे. रं = अरं = पुरेंसें. सु = चांगलें. रंसु = पुरेंसें चांगलें. अग्नि आपल्या धनयुक्त ( चित्रेण ) ज्वालेनें ( भासा ) खूप ( रंसु ) पाहिजेल तितकें धन देतो. कित् = देणें. चिकिते = देतो. दंसु = रंसु. किंवा रण् ( रमणें, रमविणें ) + सु = रंसु. रंसु = रमणीय ( धन ).

**द्विबर्हाः ( ७४ ) द्वयोः स्थानयोः परिवृढः। मध्यमे च स्थाने उत्तमे च। उत द्विबर्हा अमिनः सहोभिः ( ६।१९।१ ) इत्यपि निगमः भवति**

गुर्जरपाठ परिवृल्हः आहे. द्विबर्हाः = द्वि + बर्हाः. द्वि = द्वयोः. तीं दोन स्थानें म्हणजे मध्यम म्हणजे अंतरिक्षलोक व उत्तम म्हणजे द्युलोक. बर्हाः = परि-वृढः = वाढलेला. बृह् ( वाढणें ) पासून बर्हस्. द्विबर्हाः हें विशेषण अग्नि, इंद्र, रुद्र, उषा ह्यांस लावलें असून तें वसिष्ठालाही लावलें आहे. द्विबर्हसं रयिं असें तीन वेळां आलें आहे. अदितीला अद्रिबर्हाः व बृहस्पतीला द्विबर्हज्मा असें म्हटलें आहे. समासाखेरीज बर्हस् शब्द ऋग्वेदांत कोठेंही आढळत नाहीं. परिज्माप्रमाणें द्विबर्हजा शब्द आहे. परिज्मा = सभोंवतीं हिंडणारा. द्विबर्हाभोंवतीं हिंडणारा तो द्विबर्हज्मा. द्विबर्ह द्युलोक असेल. बर्हस् म्हणजे धन असा अर्थ घेतल्यास द्विबर्हस् म्हणजे अतीशय धन आहे ज्याच्याजवळ किंवा ज्यांत तें द्विबर्हस् होईल. द्विबर्हसं रयिं = धनानें भर-

लेलें धन. अद्रि म्हणजे वज्र; त्यानें मिळविलेलें धन आहे ज्याच्याजवळ तो अद्रिबर्हाः. आ द्विबर्हा अमिनो यातु इन्द्रः ( १०।११६।४ ) = धनवान् ( द्विबर्हाः ) व अहिंसित ( अमिनः ) इंद्र येवो. द्विबर्हस् व अमिन हे दोन्ही शब्द दुर्बोध आहेत. अमिनः ह्याचें विवरण (६।१६) त केलें आहे.

**अक्रः (७५) आक्रमणात् । अक्रो न बभ्रिः समिथे महीनाम् ( ३।१।१२) इत्यपि निगमः भवति**

अक्रः = अ + क्रः. अ = आ. क्रः = क्रमणः. अक्रः = तटाची भिंत. अशा भिंतीस अक्र म्हणण्याचें कारण ती किल्ल्याच्या किंवा शहराच्या भोंवतीं जाते. मोठ्या शत्रू-सेनांनीं (महीनां) चालविलेल्या लढाईंत ( समिथे ) जो प्राकाराप्रमाणें ( अक्रः न ) रक्षण करणारा ( बभ्रिः ). अक्र शब्द ऋग्वेदांत ६ वेळां आला आहे. तें सूर्याचें नांव असावें. अच् ( प्रकाशणें ) + रः = अक्रः. बभ्रिः = हविषां भर्ता. नेता = हवि नेणारा. महीनां समिथे = महतीनाम् अपां सहवासे. पाण्यांतून निघाल्याबरोबर, हवि नेणारा अग्नि, सूर्याप्रमाणें ( अक्रः न ) दर्शनीय ( दिदृक्षेयः ). अक्रः न किंवा अक्राः न अशी उपमा ( १।१८९।७, ३।१।१२, ४।६।३, १०।८७।२ ) चार वेळां आहे. १।१४३।७–त अग्नीला अक्रः म्हणजे प्रकाशमान, देदीप्यमान व १।१२०।२–त अश्विनांना अक्रौ म्हटलें आहे. आक्रमिता, अनाक्रान्तः वगैरे अर्थ सायणाचार्य देतात; पण ते बरोबर नाहींत. अक्र ४ वेळां अग्नी, एकदां अश्विन, व एकदां आदित्य, यांच्या संबंधानें आला आहे. ह्या सर्व ठिकाणीं प्रकाशणारा हाच अर्थ योग्य दिसतो.

**उराणः ( ७६ ) उरु कुर्वाणः । दूत ईयसे प्रदिव उराणः ( ४।७।८ ) इत्यपि निगमः भवति**

उराणः = उर + आनः. उर = उरु. आनः = कुर्वाणः. ( थोडका जरी हवि असला तरी तो ) विस्तीर्ण करणारा ( उराणः ) म्हणजे देवतांची तृप्ति होईल इतका मोठा करणारा दूत जो तूं त्या तुझी आम्ही याचना करतों (ईयसे). उराण हा शब्द अग्नीसंबंधानें पांचदां, इंद्र, सोम व यजमान ह्यां संबंधानें एकएकदां, असा ८ वेळां आला आहे. देवतातिम् उराणः ( ३।१९।२॥४।६।३ ) = हवि देणारा किंवा नेणारा. प्रदिवः उराणः ( ४।६।४॥४।७।८ ) = नेहमीं हवि देणारा किंवा नेणारा. होता गूर्त-मना उराणः ( ६।६३।४ ) = हवि देणारा. ह्याच तिन्ही शब्दांचा अर्थ आहे. प्रजाम् उराणः ( ९।१०९।९ ) = प्रजा देणारा सोम. इंद्राला सताम् उराणं ( १।१७३।७ ) म्हणजे देवांचा त्राता ( ? ) म्हटलें आहे. अहेम यज्ञं पथाम् उराणाः ( ७।७३।३ ) = देवांना ( पथां ? ) हवि देणारे आम्ही हवि ( यज्ञं ) पाठवितों ( अहेम ). सताम् उराणं खेरीज करून उराणः म्हणजे देणारा हा अर्थ लागतो. सताम् उराणं = देवांना अन्न किंवा धन देणारा असा अर्थ असेल. उर् + आनः = उराणः. उर् धातु ऋग्वे-दांत नाहीं. उरु कुर्वाणः हा अर्थ कोठेंही लागत नाहीं.

**स्तियाः (७७) आपः भवन्ति । स्त्यायनात् । वृषा सिन्धूनां वृषभः स्तियानाम् ( ६।४४।२१ ) इत्यपि निगमः भवति**

स्तियाः = आपः. पाण्याला स्तिया म्हणण्याचें कारण तें घट्ट होतें, किंवा पीठ वगैरे पाण्यानें एकत्र होतें म्हणजे त्याचा गोळा होतो. स्त्यै संघाते ( धा० १।९३५ ) ह्यापासून स्तिया. पाण्याचा ( सिन्धूनां = स्तियानां ) वर्षाव करणारा ( वृषा = वृषभः ). ( ७।५।३ ) ह्यांत नेता सिन्धूनां वृषभः स्तियानां असें आहे. वृषा किंवा वृषभ म्हणजे बैल, नवरा. स्तियानां फक्त दोनदां आला आहे, अर्थ नद्यांचा असा असावा.

**स्तिपाः ( ७८ ) स्तियापालनः । उपस्थितान् पालयति इति वा । स नः स्तिपा उत भवा तनूपाः ( १०।६९।४ ) इत्यपि निगमः भवति**

स्तिपाः = स्ति + पाः. स्ति = स्तियाः = पाणी. पाः = पालनः. अर्थ कूप; कारण विहीर पाण्याचें पालन करते. गुर्जरपाठ रतृषां पालनः असा आहे. दुर्गवृत्तीच्या उत्तम पोथ्यांत स्तिपालनः असें आहे. पण स्तियापालनः हाच पाठ बरोबर दिसतो. किंवा स्ति = ( उप ) स्थि ( तान् ) = आलेल्या. दुर्ग या गाळतो; त्यावरून स्ति-पालनः असा पाठ त्यानें घेतला असावा. स्तिपालनः = उपस्थितान् पालयति. ( हे अग्नि ) तो तूं कूपाप्रमाणें ( स्तिपाः = स्तिपाः इव ) आमचें रक्षण कर. स्ति ह्याचें स्तीन् असें रूप दोनदां आलें आहे. उप नो वाजान् मिमीहि उप स्तीन् (७।१९।११) = हे इंद्रा आम्हांस धन दे. स्तीन् = वाजान् = धन. त्रायस्व गृणत उत स्तीन् ( १०।१४८।४ ) = हे इंद्रा, स्तोते व त्यांचें धन राख. स्तीन् पाति रक्षति असौ स्तिपाः = धनरक्षक. तनूपाः = देहांचें रक्षण करणारा. कूपः हा अर्थ निराधार आहे.

**जबारु ( ७९ ) जवमानरोहि जरमाणरोहि गरमाणरोहि इति वा । अग्रे रुप आरुपितं जबारु ४।५।७ ) इत्यपि निगमः भवति**

जवमान असा महाराष्ट्रपाठ आहे. सायणस्वीकृतपाठांत गरमाणरोहि नसून जर-माणरोहि जवमानरोहि असा क्रम आहे. जबारु = जब + आरु. जब = जवमान. आरु = रोहि. आदित्यमंडल त्वरेनें जात जात स्वर्गाच्या मध्यभागीं चढतें. किंवा जबा = जरमाण = सर्व प्राण्यांना जीर्ण करीत. किंवा जबा = गरमाण = सर्व रस गिळीत. ( सूर्याचें ) मंडल ( जबारु ) भूमीच्या ( रुपः ) पूर्वेस ( अग्रे ) देवांनीं चढविलें (आरु-पितं = आरोपितं ) स्थापिलें आहे. पदपाठ अरुपितं आहे. हा शब्द येथेंच आला आहे; त्याचा अर्थ कळत नाहीं. रिपः शब्द तीनदां आला आहे; त्याचा अर्थ कळत नाहीं.

**जरूथं ( ८० ) गरूथम् । गृणातेः । जरूथं हन् यक्षि राये पुरन्धिम् ( ७।१।६ ) इत्यपि निगमः भवति**

जरूथं = गरूथं = स्तोत्र. गृ = ( स्तुति करणें ) पासून जरूथं. दुर्ग गृणातेः देऊन जरतेः स्तुतिकर्मणः जरूथं असेंही म्हणतो. ( वसिष्ठ तुजकडे ) स्तोत्र (जरूथं) पाठवून ( हन् = गमयन् ) धनासाठीं ( राये ) अनेक कामें करणारा किंवा फार धन देणारा ( पुरन्धि ) जो तूं त्या तुला पूजितो (यक्षि = यजति), असा दुर्ग अर्थ करतो. जरूथं ( = परुषभाषिणं किंवा जरणीयं ) रक्षोगणं = कठोर भाषण करणारे किंवा जर्जर ठोकण्याजोगे राक्षस असा सायणाचार्य अर्थ करतात; तो अर्थ बराच योग्य आहे.

जरूथ नांवाचा एक आर्यांचा शत्रु होता. विश्वा अग्नेऽप दहारातीर्येभिस्तपोभिरदहो जरूथम् ( ७।१।७ ) = हे अग्नि, ज्या तप्त अस्त्रांनीं जरूथाला तूं जाळलेंस त्यांनीं सर्व शत्रूंना जाळून टाक. अग्निरद्भ्यो निरदहज्जरूथम् ( १०।८०।३ ) = अग्नीनें जरूथाला जाळून बाहेर काढलें. जरूथाला ठार करून त्याचें धन ( पुरंधि ) आम्हांस धन मिळावें म्हणून ( राये ) दे ( यक्षि ). जरूथ शब्द निघंटूंत घालण्याचें कांहीं कारण नव्हतें. जॄ ( जर्जर करणें ) + ऊथः = जरूथः अशी व्युत्पत्ति असेल.

**कुलिशः ( ८१ ) इति वज्रनाम। कूलशातनः भवति। स्कन्धांसीव कुलिशेना विवृक्णाहिः शयत उपपृक् पृथिव्याः ( १।३२।५ )। स्कन्धः वृक्षस्य। समास्कन्नः भवति।**

वज्राचें नांव कुलिश. वज्रास कुलिश म्हणण्याचें कारण वज्र पर्वतांच्या किंवा नद्यांच्या तटांचा भंग करतें. झाडाच्या फांदीला स्कंध म्हणतात; कारण फांदी झाडावर चढलेली ( समास्कन्नः ) असते.

**अयम् अपि इतरः स्कन्धः एतस्मात् एव। आस्कन्नं काये।**

हा दुसरा जो स्कन्ध म्हणजे खांदा तोही ह्याच धातूपासून. खांद्याला स्कन्ध म्हणण्याचें कारण तो शरीरावर चढलेला असतो. आस्कन्नं नपुंसकलिंगी कां? स्कन्धस् (फांदी) नपुंसकलिंगी आहे, तेव्हां स्कन्धः वृक्षस्य। समास्कन्नं भवति। अयम्० एतस्मात् एव। आस्कन्नः काये अशीं लिंगें फिरविलीं पाहिजेत. स्कन्दिर् गतिशोषणयोः ( धा० १।१००४ ). आस्कन्द् = वर जाणें. स्कंध शब्दाची व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. स्कन्धस् शब्द ऋग्वेदांत नपुंसकलिंगी आहे.

**अहिः शयते उपपर्चनः पृथिव्याः**

उपपृक् = उपपर्चनः = संपर्क करणारा. जशा ( इव ) कुऱ्हाडीनें ( कुलिशेन ) तोडलेल्या ( विवृक्णा = विवृक्णानि ) फांद्या ( स्कन्धांसि ) भुईवर पडून राहतात तसा वज्राच्या आघातानें छिन्नविछिन्न झालेला अहि पृथिवीवर पडून राहिला. पृथिव्याः उपपृक् = पृथिवीला कवटाळणारा, असा अर्थ असावा. पृथिवी बायको, अहि नवरा; शयन हें साधर्म्य; उपपृक् पृथिव्याः हें फक्त अहीला लागतें. रथं न कुलिशः ( ३।२।१ ) एथें कुलिश म्हणजे वज्र नाहीं. कुलिश = रंधा, कुऱ्हाड, करवत.

**तुञ्जः ( ८१ ) तुञ्जतेः दानकर्मणः**

तुञ्ज् ( देणें ) ह्यापासून तुञ्ज. रयिं तुञ्जानो अभि वाजमर्ष (९।८७।६) = हे सोमा, धन ( रयिं ) देणारा ( तुञ्जानः ) तूं धनाकडे ( वाजं ) धाव (अभि + अर्ष).

## खंड १८ वा.

**तुञ्जे तुञ्जे य उत्तरे स्तोमा इन्द्रस्य वज्रिणः। न विन्धे अस्य सुष्टुतिम् (१।७।७)**
**दाने दाने ये उत्तरे स्तोमाः इन्द्रस्य वज्रिणः न अस्य तैः विन्दामि समाप्तिं स्तुतेः**

तुञ्जे तुञ्जे = दाने दाने. प्रत्येक दानाच्या वेळीं ज्या अधिक अधिक स्तुति ह्या वज्री इंद्राच्या मी करतों त्यांनीं त्याच्या स्तुतीची समाप्ति मला सांपडत नाहीं. स्तुति

पुरशी झाली असें वाटत नाहीं. कारण तो धनाच्या राशी पाडतो. विन्धे = विन्दामि. अयं वां वत्सो मतिभिर्न विन्धते हविष्मन्तं हि गच्छथः ( ८।९।६ )=हे अश्विनांनो, हा वत्स तुम्हांला स्तुतींनीं अडकवूं, थांबवूं शकत नाहीं; कारण तुम्हांला जो हवि देतो त्याच्याकडेसच तुम्ही जातां. य उक्थेभिर्न विन्धते (८।५१।३)=जो इंद्र स्तुतींनीं पकडला, थांबविला, जात नाहीं. ह्यांवरून विन्ध् = पकडणें, थांबविणें. एकाहून एक उत्तम ( उत्तरे ) अशा कितीही स्तुति दानप्राप्तीनंतर केल्या तरी ह्याची खरीखरी स्तुति मला कांहीं पकडतां येत नाहीं. सुष्टुतिं = स्तुतेः समाप्तिं = स्तुतीची समाप्ति, पूर्ण स्तुति; पण सुष्टुतिः = योग्य स्तुति.

**बर्हणा ( ८६ ) परिबर्हणा । बृहच्छ्रवा असुरो बर्हणा कृतः ( १।५४।३ ) इत्यपि निगमः भवति**

बर्हणा = परिबर्हणा = वृद्धि किंवा हिंसा. बृहि वृद्धौ ( धा० १।७३७ ). परि उपसर्ग कां लावला तें कळत नाहीं. हिंसा अर्थ वैदिक आहे. पुरो हरिभ्यां असें पुढें शब्द आहेत. फार धन आहे ज्याच्याजवळ ( बृहत् + श्रवाः ), बलिष्ठ ( असुरः ) असा जो इंद्र त्याला त्याच्या घोडयांनीं पुढें म्हणजे संग्रामाच्या अग्रभागीं केलें म्हणजे नेलें ( कृतः ). बर्हणा = ( १ ) धन, ( २ ) बल, ( ३ ) स्तुति, ( ४ ) करवत. ( १ ) आ नो गन्तं रिशादसा वरुण मित्र बर्हणा ( ५।७१।१ ) = हे वरुणा, हे मित्रा, धन देणारे ( रिशादसा = रिशादसौ ) धनासह ( बर्हणा = बर्हणया ). ( २ ) त्वं तदुक्थमिन्द्र बर्हणा कः प्र यच्छता सहस्रा शूर दर्षि ( ६।२६।५ ) = हे शूरा इंद्रा, जेव्हां तूं शेंकडों, हजारों ( शत्रूंच्या किल्ल्यांना ) बलानें ( बर्हणा = बर्हणया ) फोडून टाकलेंस तेव्हां तूं स्तुत्य कृत्य ( उक्थं ) केलेंस ( कः ). ( ३ ) परि सुवानास इन्दवः मदाय बर्हणा गिरा । सुता अर्षन्ति धारया ( ९।१०।४ ) = रस काढलेले ( सुवानासः = सूयमानाः = सुताः ) गाळण्यांतून धारेनें गळून ( परि ) मद आणण्याकरितां स्तुतीसह ( बर्हणा = बर्हणया = गिरा ) धावत आहेत ( अर्षन्ति ). ( ४ ) यत्रा वो दिद्युत् रदति क्रिविर्दती रिणाति पश्वः सुधितेव बर्हणा ( १।१६६।६ ) = हे मरुतांनो, जेथें ( यत्रा ) तुमचें दंताळ ( क्रिविर्दती ) अस्त्र ( दिद्युत् ), धारेची ( सुधिता ) करवत ( बर्हणा ) जशी ( इव ) जनावरें ( पश्वः ) कापीत जाते ( रिणाति ), तसें शत्रु कापीत जातें. प्रस्तुत ऋचेंत बर्हणा म्हणजे बलानें असा अर्थ लागतो. घोडयांनीं इंद्राला जोरानें पुढें नेलें. दुर्गानें ऋचेचा भलता अर्थ केला आहे; तो असाः— मोठा आवाज करणारा ( बृहच्छ्रवाः ) वृत्रासुर किंवा मेघ वज्रानें ( बर्हणा ) घोडे खालीं येण्याच्या अगोदर ( पुरः = पुरा ) वर्षाव करणारा ( वृषभः ) केला ( कृतः ).

## खंड १९ वा.

**यो अस्मै घ्रंस उत वा य ऊधनि सोमं सुनोति भवति द्युमाँ अह ।**
**अपाप शक्रस्ततनुष्टिमूहति तनूशुभ्रं मघवा यः कवासखः ( ५।३४।३ )**
**घ्रंसः इति अहर्नाम । ग्रस्यन्ते अस्मिन् रसाः**

दिवसाचें नांव घ्रंस. दिवसाला घ्रंस नांव पडण्याचें कारण दिवसा सूर्य रस भक्षण करतो (ग्रस्यन्ते). घ्रंसः = ग्रंसः = ग्रसः. दिवस पाणी वगैरे भक्षण करतो. ग्रस्यन्तेच्या बद्दल देवराजाच्या टीकेंत गृह्यन्ते आहे. खरा पाठ कोणता? घ्रंस शब्द ऋग्वेदांत ४ वेळां आला आहे. अग्निं घ्रंसं (१।११।८) = प्रज्वलित अग्नीला. परि घ्रंसम् ओमना वां वयो गात् (६।६९।४) = हे अश्विनांनो, तुम्हीं दिलेलें (वां) ऊनऊन (घ्रंसं) अन्न (वयः) सर्व अडथळे न जुमानतां (परि) अत्रीकडे गेलें (गात्). ५।४४।७ ह्यांत घ्रंसं रक्षन्तं ह्याचा अर्थ व अन्वय लागत नाहीं. प्रस्तुत ऋचेंत घ्रंसे = ऊन दुधांत. घर्म व घ्रंस ह्यांचा अर्थ तापविलेलें, ऊनऊन दूध.

**गोः ऊधः। उद्धततरं भवति। उपोनद्धम् इति वा**

ऊधः म्हणजे गाईची कास. कासेला ऊधः म्हणण्याचें कारण कास इतर अंगांपेक्षां उंच गेलेली असते. ऊधः = ऊ + धः. ऊ = उत्. धः = हः = हतं. उत् + हन् पासून ऊधस्; किंवा ऊ = उत्; धः = नद्धम्. कास पोटाला बांधलेली असते. उप + उत् + नह् पासून ऊधस्. उमात्ति ऊधः (अमर २।९।७३ क्षीरस्वामी).

**स्नेहानुप्रदानसामान्यात् रात्रिः अपि ऊधः उच्यते**

एथें ऊधः म्हणजे रात्र. रात्रीला ऊधस् म्हणण्याचें कारण दोहोंत साधारण धर्म स्निग्धरस देणें; कास दूध देते; रात्र दहिंवर देते; म्हणजे रात्रीला ऊधस् लक्षणेनें म्हटलें आहे. पण तसा अर्थ घेण्याचें कारण नाहीं. ऊधन् = कास. दूध तापविलेलें असो किंवा गाईच्या कासेंतून निघालेलें गरम असो; त्यांत सोमरस घालून पेय तयार करीत असत. श्रातं मन्ये ऊधनि श्रातम् अग्नौ सुश्रातं मन्ये तदृतं नवीयः (१०।१७९।३) = हवि (ऋतं) कासेंत पक्व (श्रातं) झालेला असो किंवा विस्तवावर पक्व झालेला असो; तो हवि उत्तम शिजलेला मी मानतों; एथें ऊधनि म्हणजे कासेंत.

**सः यः अस्मै अह्नि अपि वा रात्रौ सोमं सुनोति भवति अह द्योतनवान्**

अह शब्द भाष्यांत जशाचा तसा कां ठेवला? अह = अत्र = एथें, ह्या जगीं. अह = खालीनें (दुर्ग). द्युमान् = द्योतनवान् = प्रकाशयुक्त, प्रसिद्ध; खरा अर्थ धनवान्. द्युमान् असि क्रतुमान् इन्द्र धीरः (१।६२।१२) येथें द्यु, क्रतु व धी ह्या सर्वांचा अर्थ धन.

**अपोहति अपोहति शक्रः तितनिषुं धर्मसंतानात् अपेतम् अलंकरिष्णुम् अयज्वानम्**

अप अप ऊहति = अप + ऊहति अपऊहति. अप दोनदां म्हणून ऊहति दोनदां उच्चारावयाचा. दोनदां अपोहति घेतल्यानें समूळ, पार, नाश करतो असा अर्थ निघतो. ततनुष्टिं (८१) = तितनिषुं. 'तन्'चें चिकीर्षितज रूप तितनिष्. त्याच्यापासून नाम तितनिषुः. तितनिषु कोण तर अनन्वित कृत्यांनीं जो सतत

संपत्तीचा विस्तार करीत असतो तो. म्हणजे तितनिपुं = धर्मसंतानात् अपेतं = परंपरागत जो वैदिक धर्म, जी वैदिक धर्माची परंपरा, तिजपासून दूर दूर गेलेला म्हणजे धर्म झुगारून देणारा. तोच अलंकरिष्णुः = पुरे (अलं) झाला तुमचा वैदिक धर्म असें म्हणणारा. म्हणजे अयज्वा = यज्ञयाग न करणारा. अलंकरिष्णु हा शब्द तनूशुभ्रं तनूशोभयितारं ह्याच्यानंतर पाहिजे; एथें तो अस्थानीं होय.

**तनूशुभ्रं तनूशोभयितारम्। मघवा यः कवासखः। यस्य कपूयाः सखायः**

तनूशुभ्रं = तनू + शुभ्रम्; शुभ्रं = शोभयितारम्, शरीर शोभिवंत करणाऱ्यास. दुर्गवृत्तींत शरीरशोभयितारं आहे. तनूशुभ्रं शब्द भाष्यांत घालण्याची जरूर नव्हती.

कवासखः = कवा + सखः; कवा = कपूयाः; कपूयाः = प्रायश्चित्तानें ज्याचें क्षालन करावें लागतें असें वाईट कर्म करणारे ( निरुक्त ५।२४ ). अशा माणसाचाही इन्द्र नाश करतो, असा दुर्ग अर्थ करतो. तो म्हणतोः- -कित्येक यः कवासखः हें 'तनुशुभ्रं' चें अथवा 'ततनुष्टिं' चें विशेषण समजतात; ती कोणी निराळी व्यक्ति समजत नाहींत. दिविष्टि, गविष्टि, अभिष्टि, श्रुष्टि ह्या शब्दांसारखा ततनुष्टि शब्द आहे; स्ति किंवा ष्टि प्रत्यय असावा. श्रु + ष्टिः = श्रुष्टिः. नु + ष्टिः=नुष्टिः. अभि + ष्टिः = अभिष्टिः. श्रुष्टि म्हणजे धन. तसा नुष्टि म्हणजे स्तुति असा अर्थ कां नसेल? तता नुष्टिः स्तुतिः येन सः = ज्यानें स्तुति केली आहे तो. नुष्टि शब्द ऋग्वेदांत नाहीं. 'शुभ्रं' चा शोभयितारं अर्थ कोठेंही नाहीं. मरुतांना तनूषु शुभ्राः ( १।८५।३ ) = शरीरानें शोभणारे. 'कवासखः' चा अर्थ अगदीं चुकला आहे. कव ही एक आर्य जात होती. पितरांना कव्यैः ( १०।१५।९ ) हें विशेषण लाविलें आहे. इन्द्राला अकवारि ( ३।४७।५ ) व सरस्वतीला अकवारी ( ७।९६।३ ) म्हटलें आहे. इन्द्र हा कवांचा मित्र व अकवांचा अरि होता. जो सतत स्तुति करतो ( ततनुष्टिं ) व जो शरीरानें शोभिवंत म्हणजे गौरवर्ण, त्याला कवांचा मित्र जो इंद्र ( शक्रः = मघवा = दाता ) संकटापासून दूर दूर ( अप + अप ) नेतो ( ऊहति ), असा अर्थ असावा.

**न्याविध्यदिलीबिशस्य दृह्ळा विशृङ्गिणमभिनच्छुष्णमिन्द्रः ( १।३३।१२ )**
**निरविध्यत् इलाबिलशयस्य दृह्ळानि**

न्याविध्यत् = न्यविध्यत् = नि + अविध्यत्. नि = निर्. निर् + अविध्यत् = फोडून टाकता झाला. नि = खालीं. नि + अविध्यत् = फोडून खालीं फेकता झाला. इलीबिशस्य ( ८५ ) = इली + बि + श + स्य. इली = इला = पृथिवी; बि = बिल; श = शय. पृथिवीच्या बिळांत निजून-लपून-राहिलेल्या ( वृत्राचीं ). हा शब्द एथेंच आला आहे. वृत्राला इलीबिश कां म्हटलें तें कुणीं सांगावें? दृह्ळा = दृह्ळानि = बळकट किल्ले. गुर्जरप्रतींत दृह्ला व दृह्लानि असें आहे.

**व्यभिनत् शृङ्गिणं शुष्णम् इन्द्रः**

शिंगें ज्याला आहेत अशा शुष्णाला इन्द्र फोडता झाला.

## खंड २० वा.

**अस्मा इदु प्र भरा तूतुजानो वृत्राय वज्रमीशानः कियेधाः ।**
**गोर्न पर्व विरदा तिरश्चेष्यन्नर्णांस्यपां चरध्यै ( १।६१।१२ )**

**अस्मै प्रहर तूर्णं त्वरमाणः । वृत्राय वज्रम् ईशानः कियेधाः कियद्धा इति वा क्रममाण धाः इति वा ।**

इत् व उ निरर्थक म्हणून गाळले आहेत. प्र भर = प्रहर. तूतुजानः = तूर्णं त्वरमाणः. तूर्णं शब्द दुर्गवृत्तींत नाहीं. तुज् देणें. तूतुजानः = देणारा ता सूरिः पृणति तूतुजानः ( ६।३७।५ ) = दाता ( तूतुजानः ) इंद्र ( सूरिः ) तीं ( धनें ) देतो ( पृणति ). तूतुजिः ( दान ) हें नाम. अतूतुजिं चित् तूतुजिरशिश्नत् ( ७।२८।-३ ) = दाता इंद्र हवि न देणाऱ्याला ( अतूतुजिं ) मारतो ( अशिश्नत् ) किंवा तूतुजानः = इजा करणारा, कापणारा. तुजन् (१।६१।६) = इजा करणारा, कापणारा. कियेधाः ( ८६ ) = किये + धाः. किये = कियत् = कितीतरी. कियत् + धाः = कितीतरी म्हणजे अतीशय उदक धारण करणारा ( वृत्र ). किंवा किये = क्रममाण. संचार करीत असतांना ( क्रममाणः ) अपरिमित उदक धारण करणारा. असा जो वृत्र त्याजवर वज्र टाक. दुर्ग म्हणतोः---कित्येक टीकाकार कियेधाः हें इंद्राचें विशेषण समजतात. कितीतरी म्हणजे अपरिमित बल धारण करणारा किंवा शत्रूकडे जाणारा व बळ धारण करणारा इंद्र असा अर्थ घ्यावा. कियेधाः इन्द्रः असाच अन्वय आहे. वृत्रस्य चिद्विदद्येन वर्म तुजन्नीशानस्तुजता कियेधाः ( १।६१।६ ) = ज्या इजा करणाऱ्या वज्रानें इजा करणारा व सत्ताधारी इंद्र वृत्राचें मर्मस्थान हुडकता झाला. एथेंही कियेधाः आहे. असा दोनच ठिकाणीं हा शब्द आला आहे. अर्थ व व्युत्पत्ति देतां येत नाहीं. रत्नधाः, वयोधाः प्रमाणें कियेधाः दिसतो; पण किये काय ? कियत्+धाः ह्याचें उच्चाराकरितां कियेधाः रूप होणें अशक्य नाहीं. कियेधाः = कितीतरी धन देणारा, असा अर्थ असेल.

**गोः इव पर्वाणि विरद मेघस्य । इष्यन् अर्णांसि अपां चरणाय**

न = इव. पर्व = पर्वाणि. मेघस्य अध्याहृत. गाईचीं किंवा बैलांचीं पेरें (अवयव ) जसा खाटीक कापतो तसा मेघाचे अवयव काप. वृत्र म्हणजे मेघ. चरध्यै = चरणाय. नद्यांचें ( अपां ) पाणी ( अर्णांसि ) वहावें म्हणून तें मेघांतून जोरानें बाहेर ढकलीत ( इष्यन् ). इष् = प्रेरणा करणें, बाहेर ढकलणें, हाकणें; इच्छा करणें असा अर्थ नाहीं. तिरश्चा शब्दाचा अर्थ यास्कानें दिला नाहीं. तिरश्चा तिर्यग्गामिना ( वज्रेण ) असा दुर्ग अर्थ करतो. पण तिरश्चा हें क्रियाविशेषण असावें.

तिर्यक् शब्द ऋग्वेदांत नाहीं. तिरश्चा = आरपार. तिरकस जाणारें असा अर्थ नाहीं. मेघाचे अवयव आरपार कापून काढ.

**भूमिः ( ८७ ) भ्राम्यतेः । भूमिरस्यृषिकृन्मर्त्यानाम् ( १।३१।१६ ) इत्यपि निगमः भवति**

'भ्रम्'चें संप्रसरणानें भृम्. भृम् + इः = भृमिः = हिंडणारा. हे अग्नि, तूं मर्त्यांना संसारांत हिंडविणारा आहेस व दर्शन ( ऋषि ), सत्यज्ञान देणारा ( कृत् ) तूंच आहेस, असा वेदान्तपर अर्थ दुर्ग करतो. आपिः पिता प्रमतिः सोम्यानां असे आधींचे शब्द आहेत. आपिः = मित्र. पिता = बाप. प्रमतिः = सखा, बाप. भृमिः= पोसणारा, बाप. हा शब्द ऋग्वेदांत ५ वेळां आला आहे. दोन ठिकाणीं पोसणारा, दोन ठिकाणीं हवि व राहिलेल्या एका ठिकाणीं वृत्र असा त्याचा अर्थ दिसतो. हे अग्ने, तूं सोमहवि देणाऱ्यांचा मित्र, बाप, पोसणारा आहेस व तूं ऋषि करतोस. ऋषिं चकार ( ७।८८।४ ) = वरुण वसिष्ठाला ऋषि म्हणजे स्तोता करता झाला.

विष्पितः ( ८८ ) विप्राप्तः । **पारं नो अस्य विष्पितस्य पर्षन् ( ७।६०।७ ) इत्यपि निगमः भवति**

विष्पितः = विस् + पितः. विस् = वि. पितः = प्राप्तः. सर्वत्र ( वि ) जो प्राप्त तो विष्पित म्हणजे विस्तीर्ण. ( हे मित्र, वरुण व अर्यमन् ) आम्हांस ह्या विस्तीर्ण संसारमार्गाच्या पार नेवोत. अति नो विष्पिता पुरु नौभिरपो न पर्षथ ( ८।८३।३ ) = जसे नावाडी नावेनें नदीपार नेतात तसे तुम्ही, देवांनो, सर्व ( पुरु= पुरूणि ) संकटांच्या ( विष्पिता = विष्पितानि ) पार नेतां. असा दोन ठिकाणीं हा शब्द आला आहे. विष्प् + इ + तं = विष्पितम्. विष्प् धातु एकेकाळीं प्रचारांत असावा. ( १।१९१।१२ ) ह्यांत विष्पुलिङ्गकाः शब्द आहे. विष्प् + उ = विष्पु = विष असा अर्थ असेल. विष्प् = इजा करणें असा अर्थ करावा.

## खंड २१ वा.

**तन्नस्तुरीपमद्भुतं पुरु वारं पुरु त्मना । त्वष्टा पोषाय विष्यतु राये नाभा नो अस्मयुः ( १।१४२।१० )**

**तत् नः तूर्णापि**

तुरीपं ( ८।९ ) = तुर् + ईपम्. तुर् = तूर्णम्. ईपम् = आपम् = आप्यते. जें त्वरित मिळतें तें म्हणजे उदक. तन्नस्तुरीपमध पोषयित्नु देव त्वष्टर्विरराणः स्यस्व । यतो वीरः कर्मण्यः सुदक्षो युक्तग्रावा जायते देवकामः ( ३।४।९ ) = हे देवा त्वष्टया, आम्हांला तुरीप ( ? ) व पोषक असें द्रव्य, देणारा ( रराणः ) तूं, सोड (वि + स्यस्व); ज्यांच्यापासून कर्मकारी ( कर्मण्यः ), हवि देणारा ( सुदक्षः ), सोमरस काढण्याकरितां हातांत नेहमीं ग्रावे घेतलेला व देवभक्त असा शूर पुत्र जन्मास येईल. तें द्रव्य म्हणजे रेत, तें पुरुषाच्या लिंगांतून पाडावयाचें. तुरीप शब्द असा दोनदांच आला आहे.

अर्थ काय ? तुरीप आणि पोषयित्नु ह्यांचा अर्थ एकच असेल. ( १०।१८४।१ ) ह्यांत त्वष्टा रूपाणि पिंशतु = त्वष्टा योनीला आकार देवो व आ सिञ्चतु प्रजापतिः = प्रजापति योनींत रेत पाडो असें म्हटलें आहे; तेव्हां (३।४।९) ह्यांत तत् म्हणजे रेत असेल कीं नसेल तें सांगतां येत नाहीं. बहुतकरून दोन्ही ऋचांत तत् हें धनाला उद्देशून असेल. धन पोसतें व चांगलें पोषण झाल्यास संतति उत्तम निपजते.

**महत् संभृतम् आत्मना । त्वष्टा धनस्य पोषाय विष्यतु इति**

अद्भुतं ( निघंटु ३।३ ) = महत्. संभृतं दुर्गवृत्तींत नाहीं. पुष्कळ देश आच्छादून टाकतें म्हणून वारं हें तुरीपं ह्याचें विशेषण असें दुर्ग म्हणतो. संभृतं हा पुरु ह्याचा अर्थ कीं वारं ह्याचा तें कळत नाहीं. पुरु दोनदां आला आहे; दुसऱ्या 'पुरु'ह्याचा बहु असा अर्थ दुर्ग देतो. त्मना = आत्मना = स्वतः; दुसऱ्या कोणी पुष्कळ केलें नाहीं; स्वतःच तें पुष्कळ. पोषाय = धनस्य पोषाय = धन वाढविण्याकरितां. धनपोषाय इत्यर्थः असें दुर्ग म्हणतो. धनस्य शब्दाची जरूर नाहीं. पोप ह्याचाच अर्थ धन आहे. अग्निना रयिमश्नवत् पोषमेव दिवेदिवे ( १।१।३ ); अरासत रायः पोषं च ( १।१६६।३ ); तावस्मभ्यं पुरुवारं पुरुक्षुं रायस्पोषं विष्यतां नाभिमस्मे ( २।४०।४ ); ह्या ऋचांत रयि, पोष, रायः, वार, क्षु ह्या सर्वांचा अर्थ धन. 'इति' दुर्गवृत्तींत नाहीं. तो शब्द कां घातला तें कळत नाहीं. कदाचित्

**अस्मयुः अस्मान् कामयमानः**

अस्मयुः इति असा मूळ पाठ असेल. अस्मयुः म्हणजे ( इति ) = अस्मान् कामयमानः = आमच्यावर प्रेम करणारा. सो = बांधणें. वि + सो = मोकळें करणें, सोडणें. यास्कानें नाभा व नः हे दोन शब्द सोडले आहेत; नः नाभा = अस्माकं नाभौ मध्यें ( दुर्ग ) = आमच्यामध्यें; किंवा न + अभानः = न अदीप्यमानः दीप्यमानः एव (दुर्ग) = अती तेजस्वी ( त्वष्टा ). पोषसंबंधानें जी तिसरी ऋचा दिली आहे तिचें प्रस्तुत ऋचेशीं बरेंच साम्य आहे. पुरुवारं, रायः, पोषं विष्यतां, नाभि, अस्मे यासारखे पुरु, वारं, रायः, पोषाय, विष्यतु, नाभा व नः शब्द आहेत. वारं = धन. 'पुरु'चीं तत्, तुरीपं, अद्भुतं, पुरु, नाभा हीं विशेषणें होत. आम्ही धनवान् व्हावें म्हणून ( पोषाय = राये ) आम्हांस पोषक ( तुरीपं ), अतीशय ( अद्भुतं ), खूप ( पुरु ), धनानें भरलेलें ( त्मना पुरु ), देवो. नाभा = नाभिं = धन. त्मना = धनेन. प्रति अस्मभ्यं यंसि त्मनमूर्जं ( १।६३।८ ) = आम्हांला धन ( त्मनं = ऊर्जं ) देतोस. धन हा एक आत्माच आहे. नः नाभा = अस्माकं नाभौ धने = आमच्या धनांत असा अर्थ असेल.

**रास्पिनः ( ९० ) । रास्पी रपतेः वा रसतेः वा । रास्पिनस्यायोः ( १।१२२।४ ) इत्यपि निगमः भवति**

रास्पी = रा + स् + पी. रा = र. र + प् = रप् = शब्द करणें; किंवा र + स् = रस् = शब्द करणें. मूळ शब्द रास्पिन आहे; रास्पिन् नव्हे. प्र वो नपातमपां

कृणुध्वं प्र मातरा रास्पिनस्यायोः = हे ऋत्विजहो, अपांनपात् जो अग्नि व त्याच्या दोन माता ह्यांची स्तुति करा ( प्रकृणुध्वं ) किंवा त्यांना हवि द्या. आयुनामक आर्य-संघाचा अग्नि तो आयुच; त्याला रास्पिन कां म्हटलें तें कळत नाहीं. (५।४३।१४) त रास्पिरासः शब्द आहे. रास्प म्हणजे हवि किंवा स्तुति अर्थ असल्यास रास्पिन म्हणजे हवि किंवा स्तुति घेऊन जाणारा. रास्पिन व रास्पिर हे एक एकदांच आले आहेत; दोन्ही दुर्बोध आहेत. रास्पिन म्हणजे उदक किंवा पुत्र असा दुर्ग अर्थ करतो. रास्पिनस्य = आयोः = स्तोत्याला आयु म्हणजे पुत्र मिळावा म्हणून किंवा उदक मिळावें म्हणून.

**ऋञ्जतिः ( ९१ ) प्रसाधनकर्मा**

ऋञ्ज् = प्रसाधन करणें, अलंकृत करणें. भाऋजीक (६।४) ह्यांत ऋञ्ज् धातु आल्यामुळें भाष्यकारानें एथें ऋचा दिली नाहीं; पण कित्येक पुढील ऋचा देतात असें दुर्ग म्हणतो; दूतं वो विश्ववेदसं हव्यवाहममर्त्यम् । यजिष्ठमृञ्जसे गिरा (४।८।१) = तुमचा दूत, सर्व धन आहे ज्याच्यापाशीं ( विश्ववेदसं ), हवि नेणारा ( हव्यवाहं ), अमर्त्य व देवांना हवि देण्यांत श्रेष्ठ ( यजिष्ठं ) असा जो अग्नि त्याला मी स्तुतीनें अलंकृत करतों ( ऋञ्जसे ). महाराष्ट्रपाठांत ही ऋचा नसून पुढील आहे; आ व ऋञ्जस ऊर्जां व्युष्टिषु ( १०।७६।१ ) = उषा ( ऊर्जा ? ) उगवतांच ( व्युष्टिषु ) तुम्हां देवांना मी स्तुतींनीं अलंकृत करतों. गुर्जरपाठांत कोणतीच ऋचा दिली नाहीं. ऋञ्ज् अनेकार्थ म्हणून एथें दिला आहे जसें; (१) अग्ने० आ राधश्चित्रमृञ्जसे ( ५।१३।६ ) = हे अग्नि, आम्हांला धन ( राधः = चित्रं ) देतोस; ( २ ) समस्मिन् ऋञ्जते गिरः ( १।६।९ ) = सर्व स्तुति ह्याच्या ( इंद्राच्या ) ठिकाणीं एकत्र होतात; ( ३ ) येना सहन्ते ऋञ्जत स्वरोचिषः ( ५।८७।५ ) = ज्याच्या साहाय्यानें देदीप्यमान ( स्वरोचिषः ) मरुत् शत्रु जिंकतात ( ऋञ्जत = सहन्ते ); ( ४ ) स जिह्वया चतुरनीक ऋञ्जते ( ५।४८।५ ) अनेक ज्वालायुक्त अग्नि जिभेनें खाऊन टाकतो; ( ५ ) दुर्वर्तुः स्मा भवति भीम ऋञ्जन् ( ४।३८।८ ) = भयंकर असा दधिक्रा दवड करीत असतांना ( ऋञ्जन् ) त्याला कोणी अडवूं शकत नाहीं; ( ६ ) अहं कुत्समार्जुनेयन्मृञ्जे ( ४।२६।१ ) = अर्जुनाचा (जो) मुलगा कुत्स, त्याला मी साहाय्य करतों; (७) दैव्या होतारा प्रथमान्यृञ्जे ( ३।४।७ ) = देवांचे जे पहिले हविर्दाते त्यांची मी स्तुति करतों. स्तुति करणें हा अर्थ पुष्कळ ठिकाणीं आहे. प्रसाधनकर्मा न म्हणतां स्तुतिकर्मा म्हणणें योग्य होईल. पण स्तुतीशिवाय आणखी ६ अर्थ आहेत व त्याच कारणाकरितां तो निघंटूंत घातला गेला.

**ऋजुः ( ९२ ) इति अपि अस्य भवति। ऋजुनीती नो वरुणः ( १।९०।१ ) इत्यपि निगमः भवति**

ऋञ्जतिः प्रसाधनकर्मा ह्यापासून ऋजु हाही शब्द झाला आहे. वरुण आम्हांस सरळ नेण्यानें ( ऋजुनीती = ऋजुनीत्या ) नेवो ( नयतु ); दुर्ग ऋजुनीती = ऋजुनीतिः

असें वरुण ह्याचें विशेषण करतो; ऋजु म्हणजे प्रसिद्ध असाही तो अर्थ करतो. (१) ऋजु म्हणजे सरळ जसें; ऋजुना पथा ( १।४१।५ ), ऋजवः सन्तु पन्थाः (१०।८५ २३ ); पथिभिः रजिष्ठैः ( ८।१०१।१० ); ह्या तीनही ऋचांत ऋजु = सरळ. विद्वान् पथः पुरएता ऋजु नेषति ( ५।४६।१ ) = वाटा जाणणारा पुढारी आम्हांस सरळ (सुरक्षित) नेईल; (सरळ जो मार्ग तो सुरक्षित); ( २ ) सरळ जाणारा म्हणजे देवांना मानणारा; ऋजुः इत् शंसः वनुयात् वनुष्यतः। देवयन् इत् अदेवयन्तम् अभ्यसत् ( २।२६।१ ) = देवांना मानणारा स्तोता ( ऋजुः शंसः = देवयन् ) दुष्टांचा ( वनुष्यतः = अदेवयन्तं ) नाश करो ( वनुयात् ); त्यांचा पराभव करो ( अभि + असत् ); ( ३ ) सरळ वागणूक; ऋजुं मर्तेषु वृजिना च पश्यन् ( ४।१।१७ ) = मनुष्यांमधील सरळ वर्तन व दुष्ट वर्तन (वृजिना = वृजिनानि) पहात. (४) सरळ जाणारा देवांना हवि देतो म्हणून ऋजु = हवि; तमर्यमाभि रक्षति ऋजूयन्तं ( १।१३६।५ ) = हवि देणाऱ्याला त्याला अर्यमा राखतो. ( ५ ) अशा देवभक्ताला जें धन मिळतें तेंहि ऋजु जसें; देवांना भद्रा सुमतिर्ऋजूयतां ( १।८९।२ ) = पारितोषिक देणाऱ्या (ऋजूयतां ) देवांपासून पुष्कळ (भद्रा) धन (सुमतिः) मिळतें. इंद्राला ऋजुक्रतुः म्हटलें आहे; धनानें भरलेलें ( ऋजुना युक्तः ) धन ( क्रतुः ) आहे ज्याच्याजवळ तो ऋजुक्रतुः ( १।८१।७ ). सिषक्तु माता मही रसानः० ऋजुहस्ता ऋजुवनिः ( ५।४१।१५ ) = धन आहे हातीं जिच्या, धनदान करणारी ( ऋजुवनिः ) मोठी आई (पृथिवी) आम्हांस साहाय्य करो ( सिषक्तु ). ऋज् = भरधांव जाणें ह्यापासून ऋजु शब्द झाला असावा. इन्द्रं० अश्वाः। अभि श्रव ऋज्यन्तो वहेयुः ( ६।३७।३ ) = भरधांव धावणारे घोडे इंद्राला धनाकडे नेवोत. ऋज्यन्तः = भरधांव धावणारे. ऋज् + रः = ऋज्रः = भरधांव धावणारा. हा शब्द मूळचा विशेषण; पण तो नामासारखाही वापरला आहे. ऋज्रः = भरधांव धावणारा घोडा. ऋज्राश्व ह्या विशेषनामांत ऋज्र शब्द आहे. ऋजीति, ऋजिप्य व ऋजीष ह्या शब्दांतही तो असावा. अनेकार्थ म्हणून ऋजु शब्द निघंटूंत घातला गेला. लॅटिन रेक्टस् व इंग्लिश राइट हे शब्द ऋजु शब्दाला जवळजवळ आहेत. रेक्टस् ( rectus ) = ( १ ) सरळ; ( २ ) सन्मार्गी. धातु रेगो ( rego ) वाट दाखविणें.

**प्रतद्वसू (९३) प्राप्तवसू। हरी इन्द्र प्रतद्वसू अभि स्वर ( ८।१३।२७ ) इत्यपि निगमः भवति**

प्रतद्वसू =प्रतत्+वसू; प्रतत् =प्राप्त. ज्यांनीं धन मिळविलें आहे असे (प्रतद्वसू) घोडे. हे इंद्रा, रथाला ज्यांच्याजवळ धन आहे असे घोडे जोडून (युजानः) सोम पिण्यास ये ( अभि स्वर ). इंद्राच्या घोड्यांचें धन म्हणजे सोमाचा चोथा व भाजलेले हरभरे असें दुर्ग म्हणतो. पण घोड्यांना वाजी म्हणतात; त्याचें कारण घोडे संग्रामांत जाऊन लूट आणतात. प्रतद्वसूसारखा कृतद्वसू शब्द आहे ( ८।३१।९ ); तो शब्द कोण्यातरी दोन व्यक्तींचें विशेषण आहे. सायणाचार्य प्राप्तवसू अशी यास्कानीं दिलेली

व्युत्पत्ति देऊन विस्तीर्ण धनौ असाहि अर्थ देतात; हा अर्थ प्रतत् = प्रतत = विस्तीर्ण असें प्रतत् याचें रूपांतर व अर्थ त्यांनी केला असावा; पण प्रतत् = प्रतत तर कृतत् बरोबर काय? कृतवसू असा मूळचा समास असून उच्चाराकरितां वसूच्या आधीं त् जोडला गेला आहे, असें ते म्हणतात. दोन्ही शब्द दुर्बोध आहेत. कदाचित् प्र + तत् + वसु व कृ + तत् + वसु असे ह्या दोन समासांचे अवयव असतील; प्र, कृ व तत् ह्यांचा कधीं कधीं धन असा ऋग्वेदांत अर्थ होतो. प्रतद्वसू = कृतद्वसू = ज्यांच्याजवळ अमूप धन आहे असे घोडे किंवा कोणीतरी दोन व्यक्ती असा अर्थ असावा.

## खंड २२ वा.

**हिनोता नो अध्वरं देवयज्या हिनोत ब्रह्म सनये धनानाम् ।**
**ऋतस्य योगे वि ष्यध्वमूधः श्रुष्टीवरीर्भूतनास्मभ्यमापः ( १०।३०।११ )**
**प्रहिणुत नः अध्वरं देवयज्यायै**

हिनोत ( ९४ ) = प्रहिणुत. हिनोत = हिनुत. कृणोत, सुनोत ह्याप्रमाणें हिनोत. देवयज्या = देवयज्यायै = देवांना तृप्त करण्याकरितां. दुर्गवृत्तींत देवयज्यायै नाहीं; परंतु तो देवयजनार्थं असा त्या शब्दाचा अर्थ देतो.

**प्रहिणुत ब्रह्म धनस्य सननाय**

हिनोत = प्रहिणुत. धनानां = धनस्य. सनये = सननाय = मिळविण्यासाठीं. धनस्य सननाय दुर्गवृत्तींत नाहीं; सनये लब्धये धनानां असे त्याचे शब्द आहेत. षण संभक्तौ ( धा० १।४६५ ); सन् + अनं = सननं = भोग. धनस्य सननाय = धन भोगण्यासाठीं. षणु दाने (धा० ८।२): सननाय = देण्यासाठीं, देवांनीं आम्हांस धन द्यावें म्हणून. सन् मिळविणें असा अर्थ आपट्यांच्या कोशांत आहे; सननाय = मिळविण्याकरितां. सनन शब्द कोणत्याही कोशांत नाहीं. सनिस्त्वध्येषणा याच्ञा (अमर २।७।३२ ); सनिः = सेवा किंवा याचना; लाभ अर्थ अमरांत नाहीं म्हणून सनये बद्दल सननाय.

**ऋतस्य योगे यज्ञस्य योगे। याज्ञे शकटे इति वा**

ऋतस्य = यज्ञस्य. योगे = संयोगे (दुर्ग); ऋतस्य योगे = यज्ञसंबंधांत, यज्ञ चालू असतांना. किंवा योग म्हणजे यज्ञ चालू असतांना जो जुंपला जातो तो शकट. ऋतस्य यज्ञस्य योगे शकटे म्हणजे याज्ञे शकटे. शकटाच्या खालीं अधिषवणचर्म असतें; गाईच्या पोटाखालीं जशी कास तसें शकटाच्या खालच्या भागास अधिषवणचर्म अडकविलें असतें. अधिषवणचर्म म्हणजे ज्याच्यावर सोम कुटतात तें चामडें. ऋतस्य योगे हे शब्द भाष्यांत घालण्याचें कारण दिसत नाहीं.

**शकटं शकृदितं भवति । शनकैः तकति इति वा । शब्देन तकति इति वा**

शकटं = शक + टं. शक = शकृत् = शेण. टं = तं = इतं = गेलेलें. गाडीला जुंपण्याच्या वेळीं बैल हगतो व तें कृत्य आटोपल्यावर गाडी चालूं लागते

( इतं ). गुर्जरपाठ शकृदटं आहे. टं = अटं = चालणारी. किंवा शकटं = श + क + टं. श = शनकैः = हळूहळू; टं = तं = त; क + त = कत = तक= तकति = जाते. बैलगाडी सावकाश चालते. किंवा श = शब्देन; बैलगाडी करकर शब्द करीत चालते. ऋग्वेदांत शकट शब्द नाहीं; पण शकटी ( १०।१४६।३ ) आहे.

श्रुष्टीवरीर्भूतनास्मभ्यमापः । सुखवत्यः भवत अस्मभ्यम् आपः

श्रुष्टीवरीः = सुखवत्यः = सुख देणाऱ्या. श्रुष्टी शब्द ( निरुक्त ६।१२ ) त पहा. यास्कानें केलेला ऋचेचा अर्थः—देवांना तृप्त करण्याकरितां हवि (देवांकडे) पाठवा; धनलाभासाठीं स्तोत्र पाठवा; यज्ञ चालला असतांना कास खुली करा ( म्हणजे सोमांत पाणी मिसळा ); हे जलदेवतांनो, आम्हांला सुखावह व्हा. पहिला अर्ध ऋत्विजांना उद्देशून आहे असें आपलें मत देऊन कित्येक 'आपः' ह्यांना उद्देशून तो आहे असें दुर्ग म्हणतो. ह्या सूक्ताची शेवटची ऋचा ( १५ ) अशी आहे :—जलदेवता आल्या व दर्भासनावर बसल्या; त्यांच्या येण्यामुळें हवि देण्याला योग्य झाला आहे; तेव्हां इंद्राकरितां सोमरस काढा; ११ ते १४ त धन द्या अशी त्यांना प्रार्थना केली आहे; तेव्हां श्रुष्टीवरीः = धन देणाऱ्या असाच अर्थ एथें आहे. १३ व्या ऋचेंत इंद्राय सोमं सुषुतं भरन्तीः = इंद्राला उत्तम रीतीनें काढलेला सोमरस नेऊन देणाऱ्या (जलदेवता) असें आहे तेव्हां प्रस्तुत ऋचा त्यांनाच उद्देशून आहे. हि = देणें; हिनोत = द्या. हे जलदेवतांनो आमचा हवि ( देवांस ) द्या; आम्हांला धन मिळावें म्हणून हवीसह (देवयज्या = देवयज्यया = हवीसह) स्तुति देवांना अर्पण करा; पाणी मिसळलें आहे (ऋतस्य उदकस्य योगे मिश्रणे ) आतां गाईची कास सैल करा ( व निघालेलें दूध सोमरसांत मिसळा ); व आम्हांला धनदात्या व्हा. देवयज्या म्हणजे 'देवांना हवि' हा अर्थ जाऊन हवि हा सामान्य अर्थ शिल्लक राहिला; उदा० अश्याम ते सुमतिं देवयज्यया ( १।११४।३ ) = हे रुद्रा तुला हवि देऊन तुजपासून आम्ही धन ( सुमतिं ) मिळवूं. हि धातु अनेकार्थ म्हणून निघंटूंत घातला आहे. हि = ( १ ) ठेवणें; जसें अहित, निहित, पुरोहित; ( २ ) लपविणें; जसें:—गुहा हितं = गूढ ठिकाणीं लपलेल्या अग्नीला; ( ३ ) अर्पण करणें; जसें:—तुभ्यं० जना इमे० धासिं हिन्वन्ति अत्तवे (८।४३।२९ ) = हे अग्नि, हे लोक खाण्याकरितां तुला पोषक अन्न ( धासिं ) देत आहेत; ( ४ ) तृप्त करणें; जसें:—त्वामग्ने मनीषिणः त्वां हिन्वन्ति चित्तिभिः ( ८।४४।१९ ) = हे अग्नि, स्तोते तुला हवींनीं तृप्त करतात; ( ५ ) बोलावणें; जसें:—प्र नूनं जातवेदसमश्वं हिनोत वाजिनम् । इदं नो बर्हिरासदे ( १०।१८८।१ ) = ह्या आमच्या बर्हिरासनावर बसण्याला अग्नीला बोलवा; ( ६ ) पाठविणें; जसें:—अस्मान् राये महे हिनु ( ६।४५।३० ) = हे इंद्रा, आम्हांला पुष्कळ धनाकडे पाठीव; ( ७ ) भरणें; जसें:— तया नो हिनुही रथम् ( ६।४५।१४ ) = धनानें आमचा रथ भर; ( ८ ) ग्रहण करणें, पिणें; जसें:—सोमं हिनोतं मान्यस्यकारोः ( १।१८४।४ ) = हे अश्विनांनो, ऋषिपुत्र ( मान्यस्य ) जो स्तोता त्याचा सोम घ्या किंवा प्या; ( ९ )

साहाय्य करणें; जसें:—स घा वीरो न रिष्यति यमिन्द्रो ब्रह्मणस्पतिः सोमो हिनोति मर्त्यम् ( १।१८।४ ) = ज्या मनुष्याला इंद्र, ब्रह्मणस्पति व सोम साहाय्य करतात त्याला कधींही पीडा होत नाहीं; ( १० ) तयार करणें, रचणें; जसें:—अस्मा इदु-स्तोमं सं हिनोमि रथं न तष्टेव ( १।६१।४ ) = जसा सुतार रथ तयार करतो तसा मी ह्याच्याकरितां स्तोत्र तयार करतों; ( ११ ) कुटणें; जसें:—जामयो हरिं हिन्वन्ति अद्रिभिः ( ९।२६।५ ) = स्त्रिया ( अंगुलि ) सोम ग्राव्यांनीं कुटतात किंवा वाटतात; ( १२ ) धावणें; जसें:-हिन्वानासो न सप्तयः ( ९।६५।२६ ) = धावणाऱ्या घोड्यां-प्रमाणें; ( १३ ) धने हिते = संग्रामांत; जसें:—यस्त्वा देवि सरस्वति उपब्रूते धने हिते । इन्द्रं न वृत्रतूर्ये ( ६।६१।५ ) = हे देवी सरस्वती, जसे लोक लढाईंत इंद्राला हाका मारतात तसा जो कोणी लढाईंत तुला हाका मारतो; धनेहिते = वृत्रतूर्ये = लढाईंत; ( १४ ) हित = मित्र; जसें:—क्षेत्रस्य पतिना वयं हितेनेव जयामसि ( ४।-५७।१ ) = मित्र जो क्षेत्रस्य पति त्याच्या साहाय्यानें आम्ही जिंकूं. असे अनेक अर्थ ' हि ' धातूचे आहेत.

**चोष्कूयमाण इन्द्र भूरि वामम् ( १।३३।३ )। ददत् इन्द्रः बहु वननीयम्**

चोष्कूयमाणः ( ९५ ) = ददत्. वामं = वननीयं = भोगण्यास योग्य असें धन. वन संभक्तौ ( धा० १।४६४ ) पासून वाम ( निघंटु ३।८।९ ). वास्तविक वम् पासून वाम शब्द झाला असला पाहिजे; हा धातु ऋग्वेदकालीं प्रचारांतून गेला.

**एधमानद्विळुभयस्य राजा चोष्कूयते विश इन्द्रो मनुष्यान् ( ६।४७।१६ )। व्युदस्यति एधमानान् अहर् द्वेष्टि असुन्वतः**

चोष्कूयते ( ९६ ) = व्युदस्यति = वि + उत् + अस्यति = पार फेकून देतो; एधमानद्विट् = एधमानान् द्वेष्टि = संपन्नांचा द्वेष करतो; एध वृद्धौ ( धा० १।२ ); एधमानान् = धनानें वृद्ध अशांचा; एधमानान् = दीप्यमानान् असा दुर्ग अर्थ करतो; पण 'एध्'चा तसा अर्थ नाहीं. इंद्र संपन्नांचा द्वेष कां करतो ? ते त्याला सोमरस देत नाहींत म्हणून. असुन्वतः = सोमरस न काढणाऱ्यांना. अहर् शब्द दुर्गवृत्तींत नाहीं व त्याची जरूरही नाहीं. अहरहः एधमानान् किंवा अहरहः असुन्वतः = दिवसेंदिवस संपन्न होणाऱ्यांना किंवा कोणत्याही दिवशीं सोमरस न काढणाऱ्यांना, असा अहर् याचा अर्थ करावा. एधमानद्विट् याचें एधमानान् द्वेष्टि असें यास्कानें वाक्य केलें आहे. फेकून कां देतो ? कारण तो संपन्नांचा द्वेष करतो.

**सुन्वतः अभ्यादधाति**

जे सोमरस काढतात त्यांना ठेवतो ( अभि + आ + दधाति ); कोठें ? सुकृतस्य लोके = पुण्य ( कर्म करणाऱ्यांच्या ) लोकीं; सुकृतस्य लोके हे शब्द गुर्जर-पाठ व महाराष्ट्रपाठ ह्या दोहोंतही नाहींत. पण ते दुर्गाच्या प्रतींत होते.

**उभयस्य राजा दिव्यस्य च पार्थिवस्य च**

उभयस्य = दिव्यस्य च पार्थिवस्य च = उभय म्हणजे स्वर्ग व पृथिवी ह्यांतील

धनाचा (राजा); पार्थिवस्य बद्दल दुर्गवृत्तींत मानुषस्य आहे. जे सोमरस काढीत नाहींत त्या लोकांना (विशः) इंद्र पार फेकून देतो व जे काढतात त्या मनुष्यांना (मनुष्यान्) इंद्र स्वर्गांत ठेवतो असा विशः व मनुष्यान् ह्या दोन शब्दांमध्यें दुर्ग भेद करतो; परंतु तसा भेद करण्याचें कारण नाहीं; विशः = मनुष्यान्. एधमानद्विट् ह्या एका शब्दावरून चोष्कूयते म्हणजे व्युदस्यति असा यास्क अर्थ करतो. इन्द्र चोष्कूयसे वसु ( ८।६।४१ ) = इंद्रा, तूं धन देतोस. असा तीनदां चोष्कूय् धातु आला आहे. त्यांपैकीं दोन ठिकाणीं देणें हा अर्थ आहे. तेव्हां तिसऱ्या ठिकाणींही तोच अर्थ असला पाहिजे. उभयस्य राजा ह्या शब्दांवरूनही देणें हाच अर्थ ठीक दिसतो; इंद्र सर्व धनाचा अधीश असल्यामुळें लोकांना धनसंपन्न करतो. एध् = संपन्न होणें असा सर्व ठिकाणीं अर्थ आहे व ती संपत्ति अग्नि वगैरेंच्या कृपेनें मिळते असें म्हटलें आहे. तेव्हां एधमानांचा इंद्र द्वेष कां करतो ह्याचें कारण असे धनसंपन्न (एधमान) लोक त्याचे भक्त नसतील हें.

**चोष्कूयमाणः इति चोष्कूयतेः चर्करीतवृत्तम्**

चोष्कूयति म्हणजे चोष्कूय् ह्या धातूचें चर्करीतरूप चोष्कूयमाण. कूयतेः चर्करीतवृत्तं असें म्हणावयास पाहिजे. नुद् चें जसें नोनुद् तसें कूय् चे चोष्कूय्. चोष्कूयते इति च असा मूळ पाठ असावा. चोष्कूय् अनेकार्थ म्हणून निघंटूंत घातला गेला.

**सुमत् स्वयम् इत्यर्थः। उप प्रागात्सुमन्मेऽधायि मन्म ( १।१६२।७ )। उपप्रैतु मां स्वयं यत् मे मनः अध्यायि यज्ञेन**

सुमत् ( ९७ ) = स्वयम् = स्वतः होऊन; ‘ इत्यर्थः ’ हे शब्द यास्क क्वचित् वापरतो. उपप्रागात् = उपप्रैतु = पाशीं येवो. ‘ मां ’ अध्याहृत. स्वयं शब्द गुर्जरपाठांत गळला आहे व ‘ मे ’ शब्दाबद्दल ‘ मम ’ आहे. मन्म = मनः; दुर्ग ‘मनः’ अध्याहृत समजतो; कारण तो मन्म म्हणजे मननीयम् अर्थजातं ( ध्यानांत ठेवण्याजोगें धन ) असा अर्थ करतो. अधायि = अध्यायि = ध्यानांत आणिलें गेलें. यज्ञेन ( अध्याहृत ). ह्या यज्ञामुळें मला धन मिळेल म्हणून जी धनाशा मी मनांत बाळगिली त्या आशेनुरूप मजकडे धन येवो. माझ्या मनानें जें आहे म्हणजे इच्छिलें आहे तें मजकडे येवो, असा यास्क अर्थ करतो. देवानामाशा उपवीतपृष्ठः। अन्वेनं विप्रा ऋषयो मदन्ति देवानां पुष्टे चकृमा सुबन्धुम् असे मन्म नंतर शब्द आहेत. मे सुमत् मन्म अधायि। वीतपृष्ठः देवानाम् आशाः उप उपप्रागात्। विप्राः ऋषयः एनम् अनुमदन्ति। सुबन्धुं वयं देवानां पुष्टे चकृम = माझी योग्य ( सुमत् ) किंवा चांगली रचलेली प्रार्थना ( मन्म ) देवांना मी दिली आहे ( अधायि ); त्यामुळें कांतियुक्त पाठ ज्याची आहे असा हा अश्व देवांच्या प्रदेशाकडे खास गेला; स्तुति करणारे ( विप्राः ) ऋषि त्याची स्तुति करीत आहेत ( अनुमदन्ति ); आम्ही सुदैवी (सुबन्धुं) असा जो हा अश्व त्याला देवांपाशीं ठेविलें आहे; असा ऋचेचा अर्थ

आहे. सुमत् हें 'मन्म' चें विशेषण आहे. हा शब्द ६ वेळां आला असून दोनदां (१।१४२।७ व ८।८७।४) बर्हिः ह्याचें, एक एकदां (५।२।४) यूथंचें, (१०।३२।३) धनं (अध्याहृत) चें व प्रस्तुत ऋचेंत मन्म चें विशेषण आहे. सुमदंशुः (१।१००।१६) हें श्यावा (घोडी) चें विशेषण आहे; सुमान् अंशुः यस्याः सा सुमदंशुः; पण अंशु चा अर्थ मला कळला नाहीं. जसें परा, प्र, उत्, सं, नि ह्यांना वत् लागून परावत्, प्रवत्, उद्वत्, संवत् व निवत् शब्द झाले आहेत तसा 'सु' ला मत् लागून सुमत् शब्द झाला आहे; निघंटूंत तो कां घातला गेला तें समजत नाहीं. स्वयं हा अर्थ म्हणून दिला आहे; व्युत्पत्ति म्हणून दिला नाहीं. पण स्वयं हा 'सुमत्' चा विपरिणाम आहे असें दुर्ग म्हणतो.

**इति आश्वमेधिकः मन्त्रः**

असा हा अश्वमेधांतील मंत्र आहे. अश्वमेधांत १६ आहुति द्यावयाच्या असतात. त्यावेळीं जे मंत्र म्हणतात त्यांपैकीं प्रस्तुत मंत्र होय.

**दिविष्टिषु (९८) दिवः एषणेषु**

दिविष्टिषु = दिव् + इष्टिषु; दिव् = दिवः; इष्टिषु = एषणेषु. ज्या क्रिया केल्यानें लोक स्वर्गाची इच्छा करतात त्या क्रिया दिविष्टि. एषणं = इच्छा. दिविष्टि, गविष्टि, वस्यःइष्टि, पश्वःइष्टि, अश्वंइष्टि ह्यांच्या शेवटीं इष्टि आहे; वस्यः, पश्वः व अश्वं ह्या द्वितीया आहेत; तेव्हां दिवं व गाः अशा दिविष्टि व गविष्टि ह्यांतही द्वितीया असाव्या. ते इत् विप्रा ईळते सुम्नमिष्टये (६।७०।४) = स्तोते (विप्राः) त्यांना (ते) म्हणजे द्यावापृथिवींना धनप्राप्तीसाठीं (सुम्नम् इष्टये) स्तवितात; एथें सुम्नं हें इष्टये ह्याचें कर्म आहे. दिविष्टि शब्द १२ वेळां आला आहे व त्याचा अर्थ सर्व ठिकाणीं यज्ञ असा आहे. द्यु म्हणजे धन; ज्यांत धन (द्यु) मिळनें (इष्टि) तो यज्ञ दिविष्टि; ज्यांत गाई मिळतात तो गविष्टि.

**स्थूरं राधः शताश्वं कुरुङ्गस्य दिविष्टिषु (८।४।१९)। स्थूरः समाश्रितमात्रः महान् भवति**

स्थूरं शब्द सम् + आ + श्रि पासून झाला आहे; कारण स्थूर किंवा स्थूल जी वस्तु असते तींत सर्व मापें (मात्राः) एकत्र (सम्) आश्रय घेऊन असतात (आश्रित); त्यामुळें स्थूर वस्तु मोठी (महान्) होते. समाश्रिताः मात्राः यस्मिन् स स्थूरः; समस्ताः (सम्) हि तत्र मात्राः आस्थिताः भवन्ति असें दुर्ग विवरण करतो; त्यावरून त्यानें घेतलेला पाठ समाश्रित नसून समास्थित असावा. स्था + ऊरः = स्थूरः.

**अणुः अनु स्थवीयांसम् । उपसर्गः लुप्तनामकरणः**

स्थूलः स्थवीयान्, स्थविष्ठः. अति स्थूलाच्या (अनु) मागून जें येतें तें अणु; वास्तविक जें स्थूल नाहीं तें अणु; अण शब्दे (धा० १।४४६); जें ध्वनि करतें (अणति) तें अणु. उपसर्ग जो अनु तो खरोखर मूळचा अनुः होता; नाम बनविणारा (नामकरणः) जो विसर्ग तो उपसर्गाच्या बाबतींत लुप्त झाला आहे. ह्यावरून प्रश्न

उत्पन्न होतो तो नाम आधीं कीं उपसर्ग आधीं ? विसर्गाचा लोप झाला आहे असें म्हणण्यानें नाम आधीं असें होतें; पण हें म्हणणें अनु स्थवीयांसं ह्याच्या विरुद्ध जातें; अनु स्थवीयांसं असा पाठ नसून अनुः असा पाठ असावा; अणुः अनुः । उपसर्गः लुप्तनामकरणः असा मूळ पाठ असेल. गुर्जरपाठ उपसर्गलुप्त नामकरणः असा आहे; पण तो अशुद्ध असल्यामुळें दुर्बोध आहे; उपसर्गे लुप्तः नामकरणः असा शुद्ध पाठ होईल.

**यथा संप्रति**

जसा 'संप्रति' हा शब्द नामकरण प्रत्यय लुप्त होऊन झाला आहे (तसा); यास्क काय म्हणतो तें समजत नाहीं. दुर्ग म्हणतोः— सांप्रतं हें नाम योग्य आहे; पण लोक सांप्रतं बद्दल संप्रति शब्द वापरतात. दुर्गालाही यास्क काय म्हणतो तें कळलें नसावें. यथा प्रति असा मूळपाठ असल्यास मूळनाम प्रतिः ( = शत्रु ); त्यांतील विसर्गाचा लोप होऊन प्रति उपसर्ग बनला.

**कुरुङ्गः राजा बभूव । कुरुगमनात् वा । कुलगमनात् वा**

कुरुंङ्ग नांवाचा राजा होता; ह्या राजाला कुरुङ्ग नांव पडण्याचें कारण कुरुङ्गः=कुरुं + गः; कुरुं = कुरून्; तो राजा कुरूंकडे मित्र किंवा शत्रु म्हणून जात असे; किंवा कुरुं = कुलम्; तो शत्रूंचीं कुलें जिंकण्याकरितां जात असे.

**कुरुः कृन्ततेः । क्रूरम् इति अपि अस्य भवति । कुलं कुष्णातेः । विकुषितं भवति**

कृत् = कृन्त् ( कापणें ) पासून कुरु; कुरु शत्रूला कापून काढतात; कुरु = कृ = कृन्त्. क्रूर शब्दही कृत् पासून झाला आहे; कुरु = कृ (कृत्); कृ + रं = क्रूरम्; क्रूर माणूस कापून काढतो. कुष निष्कर्षे ( धा० ९।४६ ); कुष् = ( आंतलें ) बाहेर काढणें; कुलाचा विस्तार जेव्हां होतो तेव्हां तें घराबाहेर जातें म्हणजे नवीन घरांत त्याचा समावेश करावा लागतो. कुल संस्त्याने ( धा० १।८६७ ); संस्त्यान = संघात; कुलांतील माणसें एकत्र राहतात. काय हें व्युत्पत्तीचें वेड ! केवढ्या भराऱ्या ! कुरुङ्ग हें नांव एथेंच आलें आहे. ऋचेचा अर्थः— कुरुंगानें केलेल्या यज्ञांत शंभर किंवा शेंकडों घोडे ज्यांत आहेत असें प्रचंड ( स्थूरं ) धन होतें.

**दूतः ( ९९ ) व्याख्यातः**

दूत शब्दाची व्युत्पत्ति पूर्वीं ( निरुक्त ५।१ ) एथें दिली आहे; निघंटूंत दूत शब्द घालण्याचें कारण समजत नाहीं.

**जिन्वतिः ( १०० ) प्रीतिकर्मा । भूमिं पर्जन्या जिन्वन्ति दिवं जिन्वन्त्यग्नयः ( १।१६४।५१ ) इत्यपि निगमः भवति**

जिन्व् = प्रेम करणें; जिवि प्रीणने ( धा० १।५९५ ). पाऊस पृथ्वीला तृप्त करतो; अग्नि स्वर्गाला तृप्त करतो. जिन्व अनेकार्थ आहे; ( १ ) देणें; जसें:–जिन्व वाजान् ( ३।१५।६ ) = धन दे; बहुतेक ठिकाणीं हाच अर्थ आहे; ( २ ) रक्षण

करणें किंवा साहाय्य करणें; जसें:—इन्द्रोतिभिर्बहुलाभिर्नो अद्य० जिन्व ( ३।५३।२१ ) = इंद्रा, पुष्कळ धन देऊन आमचें रक्षण कर किंवा आम्हांला साहाय्य कर; ( ३ ) घेणें; जसें: —इमा ब्रह्म शस्यमानानि जिन्वत ( १०।६६।१२ ) = हीं म्हटलीं जाणारीं स्तोत्रें घ्या; ( ४ ) जिंकणें; जसें:–अस्माकं ब्रह्म पृतनासु जिन्वतम् ( १।१५७।२ ) = लढाईत आमच्यासाठीं धन जिंका; ( ५ ) जाणें; जसें:–उप प्रजिन्वन् उशतीरुशन्तं पतिं न नित्यं जनयः ( १।७१।१ ) = स्त्रिया जशा उत्सुक होऊन उत्सुक अशा पतीकडे जातात; (६) भिजविणें; जसें:–आ वर्तनिं मधुना जिन्वथस्पथः ( ४।४५।३ ) = हे अश्विनांनो, पाण्यानें ( मधुना ) मार्ग तुम्ही भिजवितां; प्रस्तुत ऋचेंत भिजविणें हाच अर्थ आहे; पाऊस भूमीला ( उदकानें ) भिजवितो; अग्नि मूला भिजवितो. तृप्त करणें हा अर्थ कोठेंही नाहीं.

## खंड १३ वा.

**अमत्रः अमात्रः। महान् भवति। अभ्यमितः वा**

अमत्रः ( १०१ ) = अ + मत्रः; मत्रः = मात्रा; ज्याला माप (मात्रा) नाहीं तो अमात्र. असा मनुष्य मोठा असतो; किंवा मत्रः = मितः = हिंसितः; मि = हिंसा करणें; अभि + अ + मितः = अहिंसितः; ज्याची कोणी हिंसा करूं शकत नाहीं तो.

**महाँ अमत्रो वृजने विरप्शी ( ३।३६।४ ) इत्यपि निगमः भवति**

इंद्र मोठा ( अमत्रः = महान् ) असून रणांत गर्जना करतो ( विरप्शी ) असा दुर्ग अर्थ करतो; पण विरप्श म्हणजे सोमरसाचा प्रवाह; असा प्रवाह ज्याला मिळतो तो विरप्शी. वृजने = यज्ञे. अमत्र शब्द ८ वेळां आला असून ४ ठिकाणीं त्याचा अर्थ हंडा किंवा हौद ह्यांसारखें मोठें भांडें असा आहे; अमत्रेभिः सिञ्चता मद्यमन्धः ( २।१४।१ ) = इंद्राच्या तोंडांत हौदासारख्या भांड्यांनीं मदकर सोम ओता. चारी ठिकाणीं इंद्राचा संबंध आहे; ह्याच कारणास्तव इंद्राला अमत्रिन् ( ६।२४।९ ) व अमत्र ( १।६१।९ व ३।३६।४ ) म्हटलें आहे; सोमरसाचा हौद असें इंद्राला विनोदानें म्हटलें आहे; इंद्र मोठा हौद आहे; यज्ञांत सोमप्रवाह गट्ट करणारा आहे. ( ४।२३।६ ) त त्या शब्दाचा अन्वयार्थ कळत नाहीं; तेव्हां त्या हौदाचें आम्हीं कसें वर्णन करावें असा अर्थ असेल. 'पात्रामत्रं च भाजनम्' अमर (२।९।३३); अमत्रि आधेयं अस्मिन् तत् अमत्रं ( क्षीरस्वामी ).

**स्तवे वज्र्यृचीषमः ( १०।२२।२ )। स्तूयते वज्री ऋचा समः**

स्तवे = स्तूयते; ऋचीषमः ( १०२ ) = ऋचा समः = ऋचेंत कितीही स्तुति भरलेली असो; तिच्या बरोबरीला इंद्र येतो; स्तुतीहून त्याची करणी कधींही कमी पडत नाहीं; अशा इंद्राची ( आज आम्ही ) स्तुति करतों. ऋचीषम शब्द ८ वेळां आला असून तो इंद्राला लावला आहे. 'ऋचीषम'सारखा ऋतीषह शब्द आहे; तो तीनदां इंद्राला व दोनदां वीरपुत्राला लावला आहे. ऋतिऽसह असा पदपाठ आहे; त्याप्रमाणें

ऋचिऽसम असला पाहिजे; ऋतचें ऋति तसें ऋच्चें ऋचि; दीर्घत्व उच्चाराकरितां; दोन्ही शब्द शूर ह्या अर्थी असावेत; पण ते कसे तें सांगतां येत नाहीं.

**अनर्शराति ( १०३ ) अनश्लीलदानम् । अश्लीलं पापकम् । अश्रिमत् विषमम्**

अनर्शरातिं = अन् + अर्श + रातिम्; अन् = अ. अर्श = अ + र् + श् + अ; श् + र् + अ = श्र = श्ल; अ + श्ल = अश्ल = अश्लील. रातिं = दानम्; ज्याचें दान अश्लील नाहीं त्याला. अश्लील म्हणजे पापकारी. पापकर्माला अश्लील म्हणण्याचें कारण अश्लीलं = अश्ली + लं; अश्ली = अश्रि; लं = मत्; ज्याला काने कोपरे आहेत ( अश्रिमत् ) जें वाटोळें, गरगरित नाहीं, असें कर्म अश्लील म्हणजे विषम, ज्यांत समता नाहीं असें. अश्लील शब्द मूळचा अश्रीर; अश्रीरा तनूर्भवति रुशती ( १०। ८५।३० ) = तेजस्वी ( रुशती ) शरीर निस्तेज ( अश्रीरा ) होतें. श्रीः = कांति; विश्वा वः श्रीरधि तनूषु पिपिशे ( ५।५७।६ ) = हे मरुतांनो, तुमच्या शरीरभर तेज चकाकत आहे. श्री + रा = श्रीरा = तेजस्वी; अश्रीरा = तेजोहीन. नि अर्शसानम् ओषति ( १।१३०।८ ) = इंद्र पीडा करणाऱ्या शत्रूला जाळतो. अर्श् = पीडा करणें, द्रोह करणें; अनर्शा पीडारहिता रातिः यस्य सः = ज्याच्या दानांत यत्किंचितही पीडा नाहीं असा.

**अनर्शरातिं वसुदामुप स्तुहि ( ८।९९।४ ) इत्यपि निगमः भवति**

ज्याच्या दानांत पीडा नाहीं व जो धन देतो त्या इंद्राची स्तुति कर.

**अनर्वा ( १०४ ) अप्रत्यृतः अन्यस्मिन्**

अनर्वा = अन् + अर्वा; अर्वन् ऋ जाणें ह्यापासून; अर्वा = जाणारा; प्रति = ( दुसऱ्या ) कडे; दुसऱ्याकडे आश्रयासाठीं जाणारा तो अर्वा. त्याच्या उलट अनर्वा. अर्वन् म्हणजे घोडा. इंद्रादिकांना घोडा, बैल, महिष असें म्हटलें आहे; त्या शब्दांनीं बळ, शौर्य दर्शविलें जातें. अर् ( जाणें ) + वन् = अर्वन् = (भरधांव) जाणारा अशी व्युत्पत्ति असेल. इंद्र वगैरेंना अनर्वन् म्हटलें आहे; त्याचप्रमाणें वाज म्हणजे धन ( २।६।५ ) व श्लोक म्हणजे कीर्ति ( १।५१।१२ ) ह्यांनाही तें विशेषण लावलें आहे. अर्वा म्हणजे शूर; ज्याच्याहून कोणी शूर नाहीं तो अनर्वा. अनर्वाणं वाजं = ज्याच्याहून ज्यास्त नाहीं असें धन. अनर्व हा शब्द दोनदां आला आहे; चक्रमजरमनर्वं ( १।१६४।२ ) = ज्याला जरा नाहीं, ऱ्हास नाहीं ( अनर्व ) असें चाक. अनेहो दात्रमदितेरनर्वं ( १।१८५।३ ) = अदितीच्या दानाला क्षय नाहीं. अनर्वाणं वाजं = क्षय न पावणारें धन व अनर्वाणं श्लोकं = क्षय न पावणारी कीर्ति असाही अर्थ असेल. अनर्वा क्षेति ( १।९४।२ ) = ( ज्याच्यावर अग्नीची कृपा आहे ) तो ऱ्हास न पावतां राज्य करतो; किंवा अनर्वा = ज्याला प्रतियोद्धा नाहीं असा.

**अनर्वाणं वृषभं मन्द्रजिह्वं बृहस्पतिं वर्धया नव्यमर्कैः ( १।१९०।१ ) । अनर्वम् अप्रत्यृतम् अन्यस्मिन् वृषभं मन्द्रजिह्वं मन्दनजिह्वं मोदनजिह्वम् इति वा बृहस्पतिं वर्धय नव्यम् अर्कैः अर्चनीयैः स्तोमैः**

अनर्वाणम् = अनर्वम् = अप्रत्यृतम् अन्यस्मिन्. अनर्व शब्द कां घातला तें समजत नाहीं; तो वैदिक शब्द आहे. मन्द्रजिह्वं = मन्दनजिह्वं = ज्याची जिव्हा हर्ष उत्पन्न करते त्याला. मन्द्रजिह्वं शब्द भाष्यांत घालण्याचें कारण दिसत नाहीं. मन्द्र-जिह्वं = मोदनजिह्वम् इति वा. मन्द्र = मोदन. मन्द्र शब्द मन्द् पासून किंवा मुद् पासून. ही दुसरी व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. अर्कैः = अर्चनीयैः स्तोमैः; स्तोम अर्च-नीय कसे असतील ? दुर्गवृत्तींत 'अर्कैः मन्त्रैः' आहे. नव्यं म्हणजे स्तुत्य. वर्धय = स्तुति कर, जयजयकार कर.

**असामि ( १०५ ) सामि प्रतिषिद्धम् । सामि स्यतेः**

'सामि' चा प्रतिषेध ज्यांत आहे तें असामि. षो अन्तकर्मणि ( धा० ४। ४१ ); सो संपविणें, ह्यापासून सामि. सो + मि = सामि. ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. ग्रीक हेमि अर्धा; लॅटिन सेमि. सामि शब्द अर्वाचीन संस्कृतांत आहे; पण ऋग्वेदांत नाहीं.

**असाम्योजो बिभृथः सुदानवः ( १।३९।१० ) । असुसमाप्तं बलं बिभृथः कल्या-णदानाः**

असामि = अ + सामि; सामि = सुसमाप्तं = पार संपलेलें. ज्याची परिसमाप्ति झाली नाहीं तें असामि. ओजः = बलम्. सुदानवः = सु + दानवः; सु = कल्याण; दानु = दान. सु हा मत्वर्थीही असतो; सुदानवः=धनवान्. 'असामि' हा शब्द ९ वेळां आला असून ६ ठिकाणीं विशेषण व ३ ठिकाणीं क्रियाविशेषण असा वापरला आहे. निघं-टूंत तो घालण्याचें कारण दिसत नाहीं; तो अनवगत म्हणतां येत नाहीं व त्याचा एकच अर्थ आहे; तो अर्थ म्हणजे अर्धे नव्हे असें, पुरें, अतीशय.

## खंड २४ वा.

**मा त्वा सोमस्य गल्दया सदा याचन्नहं गिरा। भूर्णि मृगं न सवनेषु चुक्रुधं क ईशानं न याचिषत् ( ८।१।२० )**

**मा चुक्रुधं त्वा सोमस्य गालनेन। सदा याचन् अहं गिरा गीत्या स्तुत्या**

गल्दया = गालनेन; दुर्गवृत्तींत गलनेन आहे व त्याचा अर्थ धमनिपूरणेन असा केला आहे; धमनि म्हणजे नाडी; ती सोमानें भरून टाकण्यानें. गिरा = गीत्या स्तुत्या = गाण्यानें व स्तुतीनें. गिरा शब्दाचे अर्थ देण्याचें कांहीं कारण नाहीं.

**भूर्णिम् इव मृगं न सवनेषु चुक्रुधं**

न = इव. हा इव शब्द 'मृगं' च्या नंतर व 'न' च्या जागीं पाहिजे. चुक्रुधं शब्द मा नंतर पाहिजे कीं सवनेषु नंतर पाहिजे ? यास्काच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें सवनेषु नंतर पाहिजे.

**कः ईशानं न याचिष्यति इति**

याचिषत् = याचिष्यति; महाराष्ट्रपाठ याचिष्यते. 'इति' = ह्यासाठीं, म्हणून.

धनाधीशाची कोणीही याचना करील म्हणून मी याचना करीत आहे; तेव्हां रागावूं नको. दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थः— प्रत्येक सवनामध्यें तुझ्या नाड्या सोमानें भरतांना नेहमीं नेहमीं ( मला हें दे मला तें दे अशी ) याचना करून व स्तुति करून एखाद्या इकडे तिकडे हिंडणाऱ्या ( भूर्णि ) हिंस्र पशूप्रमाणें ( मृगं न ) तुला क्रोध न आणों ( म्हणजे झालें ). धनाधीशाची कोण बरें याचना करणार नाहीं? मी सारखा मागतों म्हणून तूं सिंहाप्रमाणें किंवा वाघाप्रमाणें चवताळून जाऊं नको. गल्दा शब्द एथेंच आला आहे; त्यामुळें त्याचा अर्थ ठरविणें अशक्य आहे.

**गल्दाः ( १०६ ) धमनयः भवन्ति। गलनम् आसु धीयते**

गल्दाः = धमनयः = नाड्या; गल्दाः = गल् + दाः; गल् = गलनं = गाळलेला सोम; दाः = धाः = धीयते; गाळलेला सोम नाड्यांत घालतात म्हणून धमनीला गल्दा म्हटलें आहे. गुर्जरपाठांत ' गल्दाः० धीयते ' नाहीं. दुर्गवृत्तींत 'गल्दा धमनिः भवति। गलितम् अस्यां धीयते ' असें आहे व तोच खरा पाठ असावा; कारण गल्दया हें एकवचन आहे. कोणी म्हणेल कीं गल्दा म्हणजे धमनि ह्या अर्थाचा दर्शक असा एकही शब्द ऋचेंत नाहीं; त्याला उत्तर म्हणून पुढील ऋचाः—

**आ त्वा विशन्त्विन्द्व आ गल्दा धमनीनाम्**

हे इंद्रा धमनींपैकीं ( धमनीनां ) ज्या सोम गाळून घेणाऱ्या धमन्या (आगल्दाः = आगलनाः ) आहेत व ज्या पोटाकडे जातात ( अधोवाहिन्यः ) त्यांतून सोम तुझ्या पोटांत शिरोत; असा दुर्ग अर्थ करतो. खरोखर आगल्दाः हें इन्दवः ह्याचें विशेषण आहे. ऋचेचा राहिलेला भाग शोधून काढा असें दुर्ग म्हणतो. चातुर्मास्य यागांत वरुणप्रघास नांवाचें पर्व आहे; त्यांत वाजिन नांवाचा एक भक्ष असतो; आदल्या रात्रीं दूध विरजून दहीं करावयाचें; त्या दह्यांत ताजें उकळलेलें दूध ओतलें म्हणजे त्या मिश्रणाचें गठ्ठा व पाणी होतें; गठ्ठयाला आमिक्षा म्हणतात; ती बाजूस काढून ठेवावयाची; राहिलेलें पाणी तें वाजिन. हें वाजिन ऋत्विज् व यजमान पितात; पितांना ' आ मा विशन्त्विन्दव आगल्दा धमनीनाम्। रसेन मे रसं पृण। तस्य ते वाजिभिर्भक्षं कृतस्य ( मानवश्रौतसूत्र १।७।२।१८ ) असें प्रत्येकजण म्हणतो. आपस्तंबश्रौतसूत्रांत ( ८।७ १० ) गल्दाबद्दल गल्गा व हिरण्यकेशिश्रौतसूत्रांत ( ५।२ ) गग्ला आहे. आ गल्दा, गल्गा, किंवा गग्ला धमनीनां ह्यांचा अर्थ लागत नाहीं. आ त्वा विशन्त्विन्दवः हे शब्द ऋग्वेदांत येतात ( १।१५।१ ); त्यामुळें श्रौत्रसूत्रांतील 'मा' च्या जागीं 'त्वा' उच्चारला गेला असावा व त्यामुळें वर दिलेले शब्द इंद्राला उद्देशून म्हटले आहेत असा समज झाला. यास्कानें आ मा विशन्त्विन्दवः असेंच लिहिलें असावें. आगल्दाः हा एक शब्द नसून त्यांतील 'आ' हा उपसर्ग आहे व त्याचा अन्वय विशन्तु ह्याच्याशीं आहे. दुर्ग आगल्दाः एक शब्द समजतो व त्याचा आगलनाः असा अर्थ करतो. त्या शब्दानें त्याचा घोटाळा झाला व हा मंत्र कोठला तें त्याला कळलें नाहीं.

**नाना विभक्ती त्वेते**

पण ( तु ) गल्दाः व धमनीनां ह्या पदांच्या विभक्ति भिन्न म्हणजे गल्दाः हें प्रथमान्त व धमनीनां हें षष्ठ्यन्त आहे; तेव्हां गल्दा म्हणजे धमनि हा अर्थ कसा निष्पन्न होईल ? उत्तर

**गलनाः धमनीनाम् इति अत्र अर्थः**

धमनींपैकीं ( धमनीनां ) ज्यांतून सोम पोटांत गळतो त्या असा एथें अर्थ आहे; गल्दा=विशिष्ट काम करणाऱ्या धमनि. दुर्गवृत्तींत गलनाः० अर्थः हे शब्द नाहींत. गल्दया ही तृतीया व गल्दाः ही प्रथमा अशा भिन्न विभक्ति; तथापि अर्थ एकच. गल्दया = धमन्या; ह्याला ज्ञापक आगल्दा धमनीनां. पण त्याचा हा अर्थ बरोबर दिसत नाहीं. महाराष्ट्रपाठ आगलनाः आहे व त्वेतेच्या जागीं त्येते आहे. नानाविभक्ती + इति ह्यांचा संधि होत नाहीं; कारण नानाविभक्ती हें द्विवचन आहे; म्हणून तो पाठ अशुद्ध आहे. ज्याअर्थी दुर्गवृत्तींत 'गलना० अर्थः' हे शब्द नाहींत, त्याअर्थी ते प्रक्षिप्त होत. त्याचा पाठ ' नानाविभक्ती त्वेते । न तु नानार्थे ' असा असेल. गल्दया व गिरा ह्यांचा अर्थ एकच असावा. सोमस्य गल्दया सोमस्य गिरा सदा याचन् अहं त्वां मा चुक्रुधं = नेहमी मी दिलेल्या सोमाची स्तुति गाऊन व तुला मी उत्तम सोमपान दिलें आहे तेव्हां मला तूं धन दे अशी सारखी याचना करून तुला राग आणण्याचा संभव आहे; पण रागावूं नको; तुजपाशीं याचना करावयाची नाहीं तर कोणापाशीं ? भूर्णि शब्द ऋग्वेदांत १४ वेळां आला आहे; बहुतेक ठिकाणीं त्याचा अर्थ बळकट असा दिसतो. भूर्णिं मृगं न = सिंह किंवा वाघ अशा पशूंप्रमाणें ( मृगं न ) बळकट जो तूं त्याला.

## खंड २५ वा.

**न पापासो मनामहे नारायासो न जह्लवः ( ८।६१।११ )। न पापासः मन्यामहे। न अधनाः। न ज्वलनेन हीनाः**

पापासः = पापाः. मनामहे = मन्यामहे. अरायासः = अ + रायासः = अ + धनाः = अधनाः. जह्लवः = ज्वलनेन हीनाः. जह्लवः = ज् + अ + ह् + ल् + अ + व + : = ज् + व + ल् + अ + ह् + अ + : = ज्वल + हः; हः = हीनाः. दुर्गवृत्तीच्या उत्तम पोथ्यांत ज्वलहीनाः असें आहे. जे अग्नि प्रज्वलित करीत नाहींत, अग्निहोत्र ठेवीत नाहींत, ते जह्लवः.

**अस्ति अस्मासु ब्रह्मचर्यम् अध्ययनं तपः दानकर्म इति ऋषिः अवोचत्**

आम्हामध्यें ब्रह्मचर्य, अध्ययन, तप व दानकर्म आहे असें ऋषि ह्या ऋचेंत म्हणत आहे. आम्ही पापी नाहीं म्हणजे आम्ही ब्रह्मचारी असून वेदाध्ययन व तप करतों व दानही देतों; कारण आमच्याजवळ धन आहे. हा अर्थ न पापासः व न अरायासः ह्यांतून निघेल; पण न जह्लवः ह्यांतून कोणता अर्थ काढावयाचा ? दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थः--- आम्ही आपल्याला पापी मानीत नाहीं; कारण आमच्यांत ब्रह्मचर्य, अध्ययन व तप आहे. हें सगळें असेल; पण धन कोठें आहे ? असें जर कोणी

म्हणेल तर आमच्यापाशीं धन आहे, आम्ही दानकर्म करूं शकतों असें आम्ही उत्तर देऊं. धनही असेल, पण अग्निहोत्र कोठें आहे? ह्याला उत्तर आम्ही अग्नि प्रज्वलित करतों; अग्निहोत्र ठेवतों; तेव्हां आम्ही पापी नाहींच नाहीं. दुर्गवृत्तींत 'इति ऋषिः अवोचत्' नाहीं. वृत्तीच्या उत्तम पोथ्यांत दानकर्म नाहीं. पाप शब्द अर्वाचीन अर्थी फक्त (१०|१०|१२) त आहे; इतरत्र स्तुति न करणारा, हवि न देणारा, घातकी असा अर्थ आहे. (१०|१५५|१) त अरायि व (१०|१५५|२) त अराय्यं आहे; अराय्यं हे 'अरायी' चें द्वितीयैकवचन आहे. अराय पुंलिंगी व अरायी स्त्रीलिंगी. अ + रा = न देणें. अरायासः = अरायाः = हवि न देणारे. जह्नवः शब्दाचा अर्थ देतां येत नाहीं. यास्कानें दिलेली व्युत्पत्ति त्याच्या नेहमींच्या पद्धतीची आहे. जह्लु हें 'ह्लु' धातूचें अभ्यासानें रूप होईल; ह्लु = ह्नु; ह्नुणाति ह्यांत ह्नु धातु आहे. ह्नुणाति = अपहार करतो, हिसकून घेतो. जह्नुः = हिसकून घेणारा, दुसऱ्याच्या धनाचा अपहार करणारा. ह्या अर्थाला कल्पनेशिवाय कोणताही आधार नाहीं. तिन्ही शब्दांचा अर्थ बहुतेक एकच असावा. इंद्रभक्त नसून आम्ही इंद्राची खोटी स्तुति करीत नाहीं असा अर्थ असेल.

**बकुरः (१०८) भास्करः । भयंकरः । भासमानः द्रवति इति वा**

बकुरः = ब + कुरः; ब = भास्; कुरः = करः; भास् + करः = भास्करः = तेजःसमूह; किंवा ब = भ = भयम्. उदकसमूह किंवा मेघ भयंकर असतो. किंवा ब = भासमानः. रः = द्रवति = धावतो. दुर्गवृत्तींत भास्वद्द्रवणः असें आहे; अर्थ मेघ; कारण मेघ विजेनें प्रकाशित असून धावतो.

## खंड २६ वा.

**यवं वृकेणाश्विना वपन्तेषं दुहन्ता मनुषाय दस्रा ।**
**अभिदस्युं बकुरेणा धमन्तोरु ज्योतिश्चक्रथुरार्याय (१।११७।२१)**
**यवम् इव वृकेण अश्विनौ निवपन्तौ**

यवं=यवम् इव; इव शब्द दुर्गवृत्तींत नाहीं व वपन्तौ ह्याच्या आधीं नि हा उपसर्ग नाहीं. हे अश्विनांनो, नांगरानें उकरलेल्या जमिनींत (वृकेण) जवस पेरणारे तुम्ही; नांगरानें लोक जसा जवस पेरतात त्याप्रमाणें जल पेरणारे अश्विन् असा इव मुळें अर्थ करावा लागतो; पण 'इव'ची जरूर नाहीं.

**वृकः लाङ्गलं भवति । विकर्तनात् । लाङ्गलं लगतेः । लाङ्गूलवत् वा ।**

वृकः = लाङ्गलं = नांगर; नांगराला वृक म्हणण्याचें कारण नांगर जमीन कापीत जातो. वृकः = व् + ऋ + क् + अ + :; व् + अ = व = वि; क् + ऋ = कृ = कृत् = कापणें; म्हणजे वृक शब्द कृत् कृन्त् कापणें यापासून झाला आहे. लगे संगे (धा० १।७८७); नांगर जमिनींत रुततो (सङ्ग); म्हणून लगे धातूपासून लाङ्गल; किंवा लग कुटिलायां गतौ (धा० १।७९४); नांगर वाकडा वाकडा (?)

जातो म्हणून लग पासून. महाराष्ट्रपाठ लङ्गते आहे; लगि गतौ (धा० १।१४६) त्याचें रूप लङ्गति = जातो. नांगर चालतो म्हणून लगि पासून लांगल; लग् + अलं = लङ्गलं; किंवा लङ्ग् + अलं = लंङ्गलं; किंवा नांगराला शेपूट असतें म्हणजे त्याचा मागचा भाग शेपटासारखा असतो म्हणून नांगराला लाङ्गल म्हणतात.

**लाङ्गूलं लगतेः । लङ्गतेः । लम्बतेः वा**

लगे संगे (धा० १ । ७८७); शेपूट ढुंगणाला चिकटलें असतें; किंवा लगि कुटिलायां गतौ (धा० १।७९४); शेपूट वाकडी वाकडी हलतें; किंवा लगि गतौ (धा० १ । १४६); शेपूट जातें म्हणजे हलतें; किंवा लम्ब अवस्रंसने (धा० १ । ३७७); शेपूट लोंबतें म्हणून लम्ब् पासून. अर्थाप्रमाणें व्युत्पति करावी असा निरुक्तांत (२ । १) सिद्धांत आहे. लाङ्गल व लाङ्गूल शब्दांची व्युपत्ती दुर्गवृत्तींत नाहीं; निरुक्तांत हवें तें दडपून देण्यास काय हरकत? हवें त्यानें हवें तें बरळावें!

**अन्नं दुहन्तौ मनुष्याय दर्शनीयौ**

इषं = अन्नम्. इषं म्हणजे बहुतेक ठिकाणीं धन. दुहन्ता = दुहन्तौ = देणारे. मनुषाय = मनुष्याय; मूळ शब्द मनुस्; त्यापासून मानुष व मनुष्य शब्द उत्पन्न झाले आहेत; मनुष शब्द अशुद्ध आहे; त्यामुळें मनुषाय व मनुषस्य हीं रूपेंहीं अशुद्ध होत. दस्रा = दस्रौ = दर्शनीयौ = सुंदर; दस्र = द + स् + र् + अ; द + र् + स् + अ = दर्स = दर्श (नीय). दस् + रः = दस्रः; दस् + मः = दस्मः. अश्विनाना दस्र व इंद्राला दस्म म्हटलें आहे. दस् = क्षय पावणें, नाहींसें होणें असा धातु ऋग्वेदांत आहे. दस्र व दस्म ह्यांत तो धातु खास नाहीं. दंसस् = अद्भुत कर्म; दस् = अद्भुत कर्म करणें असा ऋग्वेदप्राक्कालीं धातु असावा. दस्र = अचाट कृत्यें करणारा; दस्म = सर्वांहून अचाट कृत्यें करणारा; दस्रौ = शत्रूणां दासयितारौ वा दंसयितारौ वा कर्मणां कृष्यादीनां कारयितारौ वा वर्षाद्यनुग्रहेण (दुर्ग) = शत्रूंचा नाश करणारे किंवा पाऊस पाडून कृषि वगैरे कामें करवून घेणारे; हा दुसरा अर्थ 'दंसयितारौ वा' ह्याचा दिसतो; म्हणून तिसरा 'वा' नको आहे. दुर्गवृत्तींत दर्शनीयौ नाहीं.

**अभिधमन्तौ दस्युं बकुरेण ज्योतिषा वा उदकेन वा**

बकुरेण = ज्योतिषा = तेजानें; किंवा उदकेन = पाण्यानें. दस्यु म्हणजे पाणी झाकणारा वृत्र; त्याचा तेजानें किंवा उदकानें नाश करणारे. दुर्ग म्हणतोः— दस्यु म्हणजे पाण्याचा नाश करणारें दुर्भिक्ष. अश्विनांपैकीं एक अंतरिक्षांत असतो व तो पाऊस पाडतो; दुसरा द्युलोकांत असून प्रकाश किंवा ऊन पाडतो; पिकांना पाऊस आणि ऊन ह्या दोहोंचीही जरूर आहे. अशा रीतीनें अश्विन दस्यूचा नाश करतात.

**आर्यः ईश्वरपुत्रः**

आर्यः = ईश्वरपुत्रः; ईश्वर म्हणजे राजा; राजाचा मुलगा ऋज्राश्व. ह्या मुलावर रागावून बापानें त्याचे डोळे काढले. पण ऋज्राश्व अश्विनभक्त असल्यामुळें

त्यांनी त्याच्याकरितां ( आर्याय ) विस्तीर्ण ( उरु ) दृष्टि( ज्योतिः ) तयार केली ( चक्रथुः ); अश्विनांनीं त्याला उत्तम डोळे दिले. गुर्जरपाठ 'ईश्वरः पुत्रः' अशुद्ध आहे. ऋचेचा खरा अर्थ भिन्न आहे. वप् चे ( १ ) पेरणें, ( २ ) कापणें, ( ३ ) देणें, ( ४ ) नाश करणें, असे चार अर्थ ऋग्वेदांत आहेत. लांडगा हें अश्विनांचें लाडकें जनावर होतें; त्याच्याकडून त्यांनीं यवाचा नाश केला म्हणजे यव त्याला खावयास दिले; धान्याचा नाश झाल्यावर मनुष्यांनीं काय खावें? तेव्हां अद्भुत कृत्यें करणाऱ्यां अश्विनांनीं मनुष्यांना अन्न ( इषं ) दिलें; प्रकाश अडविणारा जो दस्यु त्याला बकुरानें (?) हाकलून दिलें ( अभिधमन्ता ) व आर्यास विस्तीर्ण उजेड करून दिला. उरु ज्योतिर्जनयन्नार्याय ( ७।५।६ ) = आर्यासाठीं विस्तीर्ण प्रकाश उत्पन्न करणारा ( अग्नि ); एथें आर्य म्हणजे ऋज्राश्व नव्हे. बकुर शब्द एथें व ( ९।१।८ ) यांत आला आहे. तमीं हिन्वन्ति अग्रुवो धमन्ति बाकुरं दृतिं ( ९।१।८ ) = अंगुलि सोम ठेचतात व त्याचा रस काढतात व बकुराची दृति फुगवितात. बकुर म्हणजे काय? वारा कीं एखादें जनावर? दृति म्हणजे कातड्याची मऊ पिशवी किंवा लोहाराचा कातडी भाता; तो वाऱ्यानें फुगवितां येतो. यदेमि प्रस्फुरन्निव दृतिर्न ध्मातो अद्रिवः। मृळा सुक्षत्र मृळय (७।८९।२) = हे वरुणा, ज्याअर्थीं वाऱ्यानें फुगविलेल्या भात्याप्रमाणें मी थरथर कांपत येत आहे त्याअर्थीं मजवर दया कर, दया कर. बकुर म्हणजे वारा तर नसेल? बाकुरं दृतिं = वाऱ्यानें फुगणारी कातडी पिशवी. अश्विन वाऱ्यानें दस्यूला फुगवितात व फोडतात म्हणजे मेघ वाऱ्यानें नाहींसा होतो व ऊन पडतें.

**बेकनाटाः ( १०९ ) कुसीदिनः भवन्ति। द्विगुणकारिणः वा। द्विगुणदायिनः वा। द्विगुणं कामयन्ते इति वा**

बेकनाटाः = कुसीदिनः = व्याजबट्टा करणारे. कुसीदं वृद्धि जीविका ( अमर २।९।४ ); कुसीद = वृद्धि ( व्याजबट्टा ) करून उपजीविका. व्याजबट्टा करणाऱ्यांना बेकनाट म्हणण्याचें कारण बेकनाटाः = बे + क + नाटाः; बे = द्वे = दोन; क = पट; नाटाः = कारिणः; व्याजानें दिलेली रक्कम सावकार दुप्पट करतात. किंवा नाटाः = दायिनः = देणारे; पण सावकार दुप्पट देत नाहींत तर घेतात; तेव्हां मूळपाठ दापिनः असावा. किंवा नाटाः = कामयन्ते = इच्छा करतात. दुर्गवृत्तींत द्विगुणकामिनो वा असें आहे. पदपाठ बेकऽनाटान् असा आहे. हा शब्द पुढील ऋचेंतच फक्त आला आहे.

**इन्द्रो विश्वान् बेकनाटाँ अहर्दृश उत क्रत्वा पणीँरभि ( ८।६६।१० )। इन्द्रः सर्वान्बेकनाटान् अहर्दृशः सूर्यदृशः ये इमानि अहानि पश्यन्ति न पराणि इति वा अभिभवति कर्मणा पणीन् च वणिजः**

महाराष्ट्रपाठ इन्द्रः यः सर्वान् असा आहे; पण यः ची आवश्यकता नाहीं. विश्वान् = सर्वान्. अहर्दृशः = अहर् + दृशः; अहर् = सूर्य; ज्यांना सूर्य ह्याच जन्मीं दिसतो, पुढच्या जन्मीं आपल्यास सूर्य दिसणार नाहीं म्हणजे आपल्याला पुढचा जन्म

नाहीं असें ज्यांस वाटतें अशा लोकांना; किंवा अहर् = अह्वानि; ये इमानि अह्वानि पश्यन्ति ( दशः ) न पराणि = ज्यांना ऐहिक ( इमानि ) दिवस दिसतात, पारलौकिक ( पराणि ) दिवस दिसत नाहींत म्हणजे कुकर्माचें फल आपल्यास परलोकीं भोगावें लागेल असें ज्यांस वाटत नाहीं अशांना. अह्र् ह्याचा एकेकाळीं सूर्य असा अर्थ असावा. स्वर्दशः म्हणजे जिवंत लोक; किंवा नुसते लोक. तोच अर्थ अह्र्दशः चा असावा. हा शब्द फक्त एथेंच आला आहे. सूर्यदशः हा शब्द यास्कानें घातला नसावा; कारण सूर्यदशः हें विशेषण चांगल्या लोकांना योग्य आहे, दुर्जनांना नाहीं. अभि = अभिभवति = जिंकतो. क्रत्वा = कर्मणा = शूर कृत्यांनीं. पणीन् = वणिजः = वाण्यांना. उत = च. इन्द्रः क्रत्वा विश्वान् बेकनाटान् विश्वान् अह्र्दशः उत विश्वान् पणीन् अभिभवति असा अन्वय आहे; अहर्दशः = देवान्. पणि = आर्यांचे शत्रु; तेव्हां बेकनाट म्हणजे दस्यु असतील; खरा अर्थ कळणें अशक्य आहे. क्रत्वा = अद्भुत कृत्यांनीं किंवा शौर्यानें. देवो देवान् क्रतुना पर्यभूषत् ( २।१२।१ ) = देवानें ( इंद्रानें ) अद्भुत पराक्रमानें देवांचा पराभव केला; ह्या ऋचेवरून अहर्दशः हे देव असतील व बेकनाटान् हें अहर्दशःचें विशेषण असेल; पण एकदांच येणाऱ्या अशा शब्दांचा अर्थ ठरवितां येत नाहीं.

## खंड २७ वा.

**जीवान्नो अभि धेतनादित्यासः पुरा हथात्। कद्ध स्थ हवनश्रुतः (८।६७।५)। जीवतः नः अभिधावत आदित्याः पुरा हननात्। क नु स्थ ह्वानश्रुतः**

जीवान् = जीवतः = जिवंत अशांना, जिवंत आहों अशा स्थितींत. अभि धेतन = अभिधावत = कडे धांवा. आदित्यासः = आदित्याः. हथात् = हननात्. कत् = क. ह = नु = खरोखर. हवन = ह्वान; हु = हाक मारणें; हा वैदिक अर्थ आहे, अर्वाचीन नव्हे; म्हणून हवन = व्हान (=हाक मारणें). हे आदित्यांनो, ठार होण्याच्या अगोदर, जिवंत आहों तोंच आमच्याकडे धावा; स्तोत्यांचें बोलावणें किंवा हांका ऐकणारे ( म्हणजे हांक ऐकल्याबरोबर धांवून येणारे ) तुम्ही आहांत तरी कोठें ?

**इति मत्स्यानां जालम् आपन्नानाम् आर्षं वेदयन्ते**

जाळ्यांत सांपडलेल्या माशांचें हें ( इति ) आर्ष आहे असें निदानकार कळवितात. ऋषीनें पाहिलें तें आर्ष; एथें मत्स्य हे ऋषि. दुर्गाचा पाठ निराळा असावा; तो म्हणतोः— ऋषेर्वा मत्स्यबन्धनकारुण्याभिभूतस्य आर्षम्। मत्स्यानां केचित् मन्यन्ते = मासे जाळ्यांत बांधले गेलेले पाहून गहिंवरलेल्या ऋषीचें हें आर्ष आहे; कित्येक म्हणतात माशांचें. ऋषेर्वा ह्यांतील ' वा ' प्रक्षिप्त आहे; कारण दुर्ग स्वतःचें मत सांगून मग दुसऱ्यांचें मत देतो. मत्स्यः सांमदो मैत्रावरुणिः मान्यः वा बहवो वा मत्स्याः जालबद्धाः आदित्यान् अस्तुवन् = संमद नांवाचा एक मोठा मासा होता त्याचा मुलगा मत्स्य; किंवा मित्रावरुणांचा मुलगा मान्य; किंवा जाळ्यांत बांधले गेलेले पुष्कळसे मासे आदि-

त्यांना जाळ्यांतून सुटण्यासाठीं स्तवूं लागले; मत्स्य, मान्य किंवा पुष्कळ मासे हें सूक्त पाहते झाले असें अनुक्रमणींत आहे. दुर्ग निराळेंच निदान देतो; त्याच्यापुढें अनुक्रमणी नव्हती कीं काय ?

धीवराः सहसा मिनान् दृष्ट्वा सारस्वते जले ।
जालं प्रक्षिप्य तान् बध्द्वोदक्षिपन् सलिलात् स्थलम् ॥
शरीरपातभीत्यास्ते तुष्टुवुश्चादितेः सुतान् ।
मुमुचुस्तान् ततस्ते च प्रसन्नास्तान् समूदिरे ॥

धीवराः क्षुद्भयं मा वो भूत् स्वर्गं प्राप्स्यथेति च ( बृहद्देवता ६।८८-९० ) ॥ = सरस्वतीच्या पाण्यांत मासे पाहतांच कोळ्यांनीं जाळें टाकून व माशांस त्यांत बांधून पाण्यांतून त्यांना जमिनीवर फेकून दिलें; आपल्या शरीराचा जमिनीवर आपटल्यानें नाश होईल अशा भीतीनें माशांनीं अदितीच्या पुत्रांची म्हणजे आदित्यांची स्तुति केली; तेव्हां कोळ्यांनीं माशांना जाळ्यांतून सोडलें; प्रसन्न होऊन मासे म्हणाले, तुम्हांला भुकेचें भय कधीं होणार नाहीं व तुम्ही स्वर्गाला जाल. दुर्ग बृहद्देवतेंतले उतारे देतो; तेव्हां वरील कथा तो कसा विसरला हें समजत नाहीं. ह्या निदानामुळें ऋचेचा भलता अर्थ केला गेला आहे. सूक्ताशीं माशांचा कांहींएक संबंध नाहीं; धेतन ह्यांत धि धातु आहे, धाव् नाहीं. तस्मिन् तदेनो वसवो नि धेतन (१०।३७।१२) = अहो देवांनो, त्या ( दुष्टा ) वर तें पाप घाला. वसू यत् धेथे ( १।१५८।२ ) = हे अश्विनांनो, जें (धन) तुम्ही देतां. धेथे हेंही धि चें रूप आहे. हथ म्हणजे हनन नाहीं; तर ( शस्त्राचा ) तडाखा; एथें मृत्यूचा तडाखा; तो तडाखा बसण्याच्या अगोदर आम्हांला ( नः ) जीव म्हणजे प्राण द्या ( अभि धेतन ). आ नो जीवान् वरुण तासु शाधि ( २।२८।९ ) = ( भविष्यकाळीं उषा उगवतील ) तेव्हांही हे वरुणा, आम्हांस जीव म्हणजे दीर्घायुष्य दे; जीव म्हणजे दीर्घायुष्य; कदाचित् धन असाही अर्थ होईल; कारण धनावाचून जीवित व्यर्थ. प्रस्तुत ऋचेंत तोच अर्थ असावा.

**मत्स्याः मधौ उदके स्यन्दन्ते । माद्यन्ते अन्योन्यं भक्षणाय इति वा**

मत्स्याः = मत् + स्याः; मत् = मधु; मधौ = उदके ( निघंटु १।१२।११ ). स्याः = स्यन्दन्ते; स्यन्दू प्रस्रवणे ( धा० १।७६२ ); स्यन्द = वाहणें; स्यन्दन्ते = गच्छन्ति ( दुर्ग ); पाण्यांत जातात म्हणजे इकडे तिकडे हिंडतात किंवा राहतात म्हणून माशांना मत्स्य म्हणतात. किंवा मत् = मद् ; स्य नामकरणप्रत्यय. एकमेकाला खाऊन टाकण्यास ते मत्त होतात. माद्यति मत्स्यः ( अमर १।९।१७ क्षीरस्वामी ). 'धि' धातूचे धिष्व, दधिष्व, दधिषे, धिषे वगैरे आणखीही रूपें आहेत.

**जालं जलचरं भवति । जलेभवं वा । जलेशयं वा**

जले चरति भवति शेते वा = पाण्यांत हलतें, असतें, किंवा निजतें म्हणजे स्वस्थ असतें; जलचें तद्धितरूप जाल.

**अंहुरः ( १११ ) अंहस्वान् । अंहूरणम् इति अपि अस्य भवति**

अंहुरः = अंहु + रः = अंहस्वान्; अंहु = अंहस्. अंहूरणं हा शब्दही ह्याच (अंहस्) पासून झाला आहे. अंहस् आ हन्ति; ही व्युत्पत्ति (निरु० ४।२५) दिली आहे. आ हन्ति श्रेयसः विनश्यति इति अंहः पापम्। रः मत्वर्थीयः। अंहुरः (निघंटु ४।३।१११ देवराज).

**कृण्वन्नंहूरणादुरु (१।१०५।१७) इत्यपि निगमः भवति**

(विहिरींत टाकलेला त्रित मला तारा म्हणून देवांना हाका मारूं लागला); संकटांतून किंवा कोंडमाऱ्यांतून (अंहूरणात्) ऐसपैस (उरु) जागा करणारा (कृण्वन्) (जो बृहस्पति तो ती हाक ऐकता झाला). त्रित अगदीं लहान व खोल अशा विहिरींत गुदमरून मेला असता; पण बृहस्पतीनें विहीर रुंदट केली. अंहूरण म्हणजे अंधकूप (दुर्ग) = अति काळोखाची विहीर. अंहुर ह्यांतील उ दीर्घ होऊन व त्याला ण प्रत्यय लागून अंहूरण शब्द तयार झाला. अंहुर, अंहति, अंहु हीं अंहस्चींच रूपांतरें होत (निरु० ४।२५); अंहु शब्द ऋग्वेदांत आहे. उर्वी सती भूमिरंहूरणाभूत् (६।४७।२०) = जागा विस्तीर्ण असूनही एकाएकी अरुंद म्हणजे अडचणीची झाली; असा ह्या अंहूरण शब्द दोनदांच आला आहे व दोन्ही ठिकाणीं बृहस्पतीचा संबंध आहे.

**सप्त मर्यादाः कवयस्ततक्षुस्तासामेकामिदभ्यंहुरो गात्** (१०।५।६)। **सप्त एव मर्यादाः कवयः चक्रुः। तासाम् एकाम् अपि अधिगच्छन् अंहस्वान् भवति**

सप्त = सप्त एव. ततक्षुः = चक्रुः. इत् = अपि. इत् अनर्थक असेल किंवा त्याचा अपि अर्थ असेल असें दुर्ग म्हणतो. अभि + गात् = अधिगच्छन्. दुर्गवृत्तींत अभिगच्छन् आहे व तेंच बरोबर आहे. अंहुरः = अंहस्वान् भवति. अर्थाकरितां अभिगात् ह्याचें अभिगच्छन् असें रूपांतर करून अंहुरः भवति असें वाक्य यास्कानें बनविलें आहे. प्राज्ञांनीं लोकांना सात मर्यादा घालून दिल्या आहेत; त्यांपैकीं एकीचें जरी अतिक्रमण झालें तरी मनुष्य पापी होतो. त्या सात मर्यादा कोणत्या ? उत्तरः—

**स्तेयं तल्पारोहणं ब्रह्महत्यां भ्रूणहत्यां दुष्कृतस्य कर्मणः पुनः पुनः सेवां पातके अनृतोद्यम् इति**

महाराष्ट्रपाठ स्तेयमतल्पारोहणं असा आहे; तो चुकीचा आहे; कारण अतल्पारोहण हें पातक नाहीं. गुर्जरपाठ दुष्कृतकर्मणः असा आहे. स्तेयं वगैरे सर्व द्वितीया असण्याचें कारण मर्यादाः ततक्षुः एथें मर्यादाः ही द्वितीया आहे. (१) पानं, (२) अक्षाः, (३) स्त्रियः, (४) मृगया, (५) दण्डः, (६) पारुष्यं व (७) अन्यदूषणं अशीं सात महापातकें मनुस्मृतींत सांगितलीं आहेत (म. स्मृ. ७।५०-५१); पण त्याच मनुस्मृतींत (११।५५) ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वङ्गनागमः। महान्ति पातकान्याहुस्तत्संसर्गश्च पञ्चमम् अशीं पांचच महापातकें सांगितलीं आहेत. ब्रह्मह- सुराप —गुरुतल्पग—मातृपितृयोनिसंबन्धग - स्तेन—नास्तिक—निन्दितकर्माभ्यासि—पतितात्यागि-अपतितत्यागिनः पतिताः (गौतमधर्मसूत्र २१।१). गुरुतल्पं सुरापानं भ्रूणहत्या ब्राह्मणसुवर्णापहरणं पतितसंयोगश्च (वसिष्ठ स्मृति २।१८।१९) अशीं पांच महापातकें

आहेत. खून, कामवासना, लोभ, खादाडपणा, गर्व, असूया व आळस अशीं सात महापातकें रोमन क्याथलिक धर्मांत आहेत. महापातकें किती व कोणतीं हें परिस्थिति ठरविते. सात पातकांना उद्देशून ही ऋचा आहे कीं नाहीं हा प्रश्न आहे. ह्या ऋचेच्या आधींच्या ऋचेंत सप्त स्वसॄः अरुषीः वावशानः = देदीप्यमान ७ बहिणींचा समागम इच्छिणारा अग्नि असें आहे; त्याच बहिणी मर्यादा शब्दानें उद्दिष्ट असाव्यात; मर्य ( मर्द ) जो अग्नि त्याचा स्वीकार करणाऱ्या ( आदाः = आददानाः ). अद्भुत कार्यें करणारे ( कवयः ) जे देव त्यांनीं अग्नीसाठीं ७ बायका तयार केल्या; त्यांपैकीं एकीकडे जरी तो गेला तरी तो तेजस्वी होतो. अंहुर शब्द फक्त एथेंच आला आहे; तो अंह् + उरः असा बनला असेल. संकटांत ( अंह् = अंहसः ), अडचणींत, विस्तीर्ण, ऐसपैस जागा करणारा म्हणजे संकटांतून सोडविणारा अग्नि. वर जीं महापातकें सांगितलीं आहेत त्यांचा ऋग्वेदाशीं यत्किंचितही संबंध नाहीं; ऋग्वेदकाल दांडगाईचा, मारामारीचा होता; त्या काळांत असले विचार मनांत येणें अशक्य होतें.

**बत ( ११२ ) इति निपातः खेदानुकम्पयोः**

बत हा निपात असून त्यानें खेद व अनुकंपा दर्शविली जाते. खेदानुकम्पा-संतोषविस्मयामन्त्रणे बत ( अमर० ३।३।२४६ )। खेदेः— अहो बत महत् कष्टम् । अनुकम्पायांः— बत निःस्वः असि । संतोषेः— बत प्राप्ता सीता । विस्मयेः— अहो बतासि स्पृहणीयवीर्यः । आमन्त्रणेः— बत वितरत तोयं तोयवाहाः ( क्षीरस्वामी ). यास्ककालीं पहिले दोनच अर्थ होते.

## खंड २८ वा.

**बतो बतासि यम नैव ते मनो हृदयं चाविदाम । अन्या किल त्वां कक्ष्येव युक्तं परिष्वजाते लिबुजेव वृक्षम् ( १०।१०।१३ )**

**बतः बलात् अतितः भवति दुर्बलः बत असि यम**

बतः = ब + तः; ब = बलात्; तः = अतितः; अत् = जाणें; अतितः = गतः. बळापासून गेलेला तो बत; म्हणजे दुर्बल. महाराष्ट्रपाठ अतीतः ( अति + इतः ) असा आहे. दुर्ग व्युत्पत्ति न देतां दुर्बलः दुर्बलहृदयः असा अर्थ देतो. पदपाठ बतः आहे; पण बत + उ असे दोन शब्द असावेत. बत बत ह्या द्विरुक्तीनें आश्चर्य द्विगुणित होतें; तूं काय आहेस हें मुग्ध ठेविलें आहे. राम राम राम ! किती चमत्कारिक माणूस रे तूं ! 'तुझी मला कीव ( अनुकम्पा ) येते' असा सायणाचार्य व दुर्ग अर्थ करतात. बतः व बत शब्द एथेंच आले आहेत. बलात् अतितः म्हटल्यावर यास्क दुर्बलः शब्द घालणार नाहीं; तो शब्द प्रक्षिप्त असावा. बत = अरेरे.

**न एव ते मनः हृदयं च विजानीमः**

अविदाम = विजानीमः; अविदम् अविदाव अविदाम असा तुद धातूप्रमाणें विद धातु चालतो. न अविदाम = आम्हीं जाणलें नाहीं. गुर्जरपाठ विजानामि आहे.

हृद् व मनस् ह्यांचा अर्थ एकच. जसें:— इन्द्राय हृदा मनसा मनीषा ( १।६१।२ ).

**अन्या किल त्वां परिष्वङ्क्ष्यते कक्ष्या इव युक्तं लिबुजा इव वृक्षम्**

परिष्वजाते = परिष्वङ्क्ष्यते = कवटाळील. कक्ष्या = कक्षजाता ( दुर्ग ); कक्षौ च तृणवीरुधौ ( अमर ३।३।२० ); कक्षजाता = लतेपासून उत्पन्न झालेली लिबुजा म्हणजे लता; धाकट्या लतेपासून वाढलेली मोठी लता किंवा गवतांत वाढलेली लता. दुर्गाच्या मतें एक इव व्यर्थ आहे. भली मोठी झालेली ( कक्ष्या ) लता ( लिबुजा ) जशी आपल्याशीं संयुक्त ( युक्तं ) म्हणजे शेजारीं असलेल्या झाडाला कवटाळते. जर दोन्ही इव सार्थ असतील तर कक्ष्या जशी अश्वाला किंवा लता जशी वृक्षाला असा अर्थ होईल असेंही तो म्हणतो. हा दुसरा अर्थ बरोबर आहे; पहिला ओढाताणीचा आहे. कक्ष्या रज्जुः अश्वस्य ( निरुक्त २।२ ); पण हा अर्थ एथें योग्य दिसत नाहीं; कारण दोरी घोड्याला कवटाळीत नाहीं तर बांधते किंवा पकडते. कक्ष्या म्हणजे झूल असा अर्थ असेल; झूल जशी घोड्याला कवटाळते किंवा लता जशी वृक्षाला. परिष्वज् म्हणजे पकडून ठेवणें असाही अर्थ आहे. युक्त = (१) जुंपलेला; (२) घोडा. जसें:— दश युक्तावहन्ति ( १।१६४।१४ ).

**लिबुजा व्रततिः भवति । लिबुजा लीयते विभजन्ति इति**

लिबुजा = व्रततिः = लता. लतेला लिबुजा म्हणण्याचें कारण लिबुजा = लि + बु + जा; लि = लीयते = कवटाळते; ली श्लेषणे ( धा० ९।३१ ). बु = ब = भ; भ + जा = भज; ( वि ) भजन्ति; लता झाडाला कवटाळते व लोक तिचे तुकडे करतात; म्हणून लतेला लिबुजा म्हणतात हा शब्द एथेंच आला आहे. लिबुपासून जन्मलेली ती लिबुजा; पण लिबु काय ?

**व्रततिः वरणात् च सयनात् च ततनात् च**

व्रततिः = व्र + त + तिः; व्र = वृ = झाकणें; लता झाडाला झाकते ( वरणात् ). त = स = सि=बांधणें; लता झाडाला बांधून टाकते (सयनात् ); शयनात् असा गुर्जरपाठ आहे; त=श = शी; लता झाडावर झोपीं जातें (शयनात्). ति = त=तन् = पसरणें; लता झाडावर पसरलेली असते (ततनात् ). ततन शब्द कसा बनला ? स चा त कसा झाला ? लिबुजा व व्रतति ह्यांच्या व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहींत. व्रततिः व्रीणातेः असें दुर्ग ( निरुक्त १।१४ ) म्हणतो; व्रीड् ( धा० ४।३४ ); किंवा व्री वरणे ( धा० ९।३२ ). व्रतति शब्द मूळचा प्रतति; प्र चा व्र जपादिगणामुळें ( अमर २।४।९ क्षीरस्वामी ). प्रकृष्टा ततिः अस्याः सा प्रततिः; व्रत, व्रात, व्रतति हे शब्द साधण्याकरितां व्रत धातूची कल्पना केली पाहिजे असें भोज म्हणतो ( अमर ३।३।६७ क्षीरस्वामी ). ज्यानें व्रतति शब्दाची व्युत्पत्ति एथें घुसडली त्याच्या डोळ्यापुढें मुक्षीजा मोचनाच्च सयनाच्च ततनाच्च ( निरुक्त ५।१९ ) ही व्युत्पत्ति असावी.

**वाताप्यं ( १६३ ) उदकं भवति । वातः एतत् आप्याययति**

वाताप्यं=उदकम् ; पाण्याला वाताप्य म्हणण्याचें कारण वाताप्यं=वात + आप्यं;

आप्यं = आ + प्यं = आप्याययति; वारा पाणी वाढवितो; प्यायी वृद्धौ (धा० १।४८९); वाऱ्यानें पाणी वाढतें म्हणजे फुगतें. आप्याययति = शीतीकरोति (दुर्ग) = थंड करतो; वाऱ्यानें पाणी गार होतें; पण प्याय् किंवा प्याई ह्यांचा थंड करणें असा अर्थ नाहीं.

**पुनानो वाताप्यं विश्वश्चन्द्रम् (९।९३।५) इत्यपि निगमः भवति**

सर्व जगाला (विश्व) आनंद देणारें (चन्द्रम्) पाणी (वाताप्यं) शुद्ध करणारा (पुनानः) सोम. नू नो रयिमुप मास्व पुनानो वाताप्यं विश्वश्चन्द्रं असें वाक्य आहे. हे सोम पुनानः पूयमानः त्वं नः अस्मभ्यं वाताप्यं विश्वश्चन्द्रं रयिम् उप मास्व देहि = हे सोमा, शुद्ध होणारा तूं आम्हांला धन त्वरित दे. वाताप्यं व विश्वश्चन्द्रं हीं रयिंचीं विशेषणें. चन्द्र शब्दाच्या आधीं स्व, विश्व वगैरे आल्यास चन्द्र चें श्चन्द्र होतें. चन्द्र = धन. सर्व (विश्व) धन आहे ज्यांत तें विश्वश्चन्द्रं; तेव्हां वाताप्यं चा असाच कांहींतरी अर्थ असावा. हा शब्द ऋग्वेदांत ४ वेळां आला असून १।१२१।८ त हरिं (= सोमं), १०।२६।२ त महित्वं व १०।१०५।२ त वाताप्याय हे इन्द्राय अध्याहृत ह्याचें विशेषण आहे; नाम असें कोठेंही नाहीं. सोम, धन, इंद्र व मोठेपणा हीं इष्ट आहेत; वाताप्य म्हणजे इष्ट असा एखादा अनुकूल अर्थ घ्यावा. १।१८७ सूक्तांत सोमाला वातापे असें संबोधन लाविलें आहे. वातः आपिः यस्य स वातापिः = वारा मित्र आहे ज्याचा; पर्वतावर वाढणाऱ्या सोमाला वाऱ्याचें अतीशय साह्यम्य होतें. वातापेः इदं वाताप्यं. सोमासारखें गोड, उत्तम, श्रेष्ठ तें वाताप्य.

**वने न वायो न्यधायि चाकन् (१०।२९।१)। वने इव वायः वेः पुत्रः चायन् इति वा कामयमानः इति वा**

न = इव. वायः = वेः पुत्रः = पाखराचा पुत्र, लहान पाखरूं. चाकन् (११४) = चायन् = पाहणारा; चायृ पूजा निशामनयोः (धा० १।९०५); किंवा चाकन् = कामयमानः; कन् = इच्छा करणें; अभ्यासानें चाकन्. कनी दीप्तिकान्तिगतिषु (धा० १।४६१).

**वा इति च यः इति च चकार शाकल्यः। उदात्तं तु एवम् आख्यातम् अभविष्यत्**

वायः हें एक पद नसून 'वा' व 'यः' अशीं तीं दोन पदें आहेत असें शाकल्य म्हणतो; परंतु ('वा' व 'यः' अशीं दोन पदें असतीं तर) 'न्यधायि' हें क्रियापद उदात्त असतें. अधायि हें पद अनुदात्त आहे, पण 'यद्वृत्तान्नित्यं' (पा० ८।१।६६) = यत् चें कोणतेंही रूप वाक्यांत असलें तर त्याच्यानंतर येणारें क्रियापद नेहमीं उदात्त असतें; ह्या नियमानें अधायि असा स्वर पाहिजे; तो नाहीं म्हणून 'वा' व 'यः' अशीं दोन पदें नाहींत. गुर्जरपाठांत एवं च्या ठिकाणीं एतत् आहे; पण तो पाठ बरोबर नाहीं.

**असुसमाप्तश्च अर्थः —**

शिवाय ( च ) अर्थ अगदीं ( सु ) अपुरा राहिला असता. यः ला सः पाहिजे; तसा शब्द एथें नाहीं. 'वा' नें विकल्प दाखविला जातो; एथें विकल्प नाहीं. सायणाचार्यांनीं स्वतःचें भाष्य न देतां शेवटल्या पांच ओळी वगळून सबंध दुर्गवृत्ति उतरून घेतली आहे; कश्चित् आह हे शब्दही घातले नाहींत; आणखी दोन तीन ठिकाणीं कश्चित् आह असें म्हटलें आहे; पण दुर्गाच्या नांवाचा उल्लेख कोठेंही नाहीं. वन म्हणजे वृक्ष किंवा वृक्षावर असलेलें घरटें; त्यांत एखादा लहान पक्षी (वायः) ठेवला असतांना तो जसा भयानें इकडे तिकडे पाहतो किंवा आपल्या आईबापांची उत्सुकतेनें वाट पाहतो; तसा उत्सुक आमचा शुद्ध स्तोम, हे अश्विनांनो, ( भुरणौ ) तुमच्याकडे जात आहे (अजीगः). शुचिः = शुद्ध, दोषरहित. भुरणौ = जगाचे पोषक किंवा शीघ्र जाणारे. ऋचेचा हा पहिला अर्थ अश्विनपर असून दुसरा इंद्रपर आहे; दोन अर्थांचा परस्पर कांहींएक संबंध नाहीं; ऋक् भिन्नार्थ अर्धांची बनली आहे. अग्नि, अश्विन व उषा ह्यांचा निकट संबंध आहे. अग्नीला विभृत म्हणजे पक्षानें आणलेला असें म्हटलें आहे; मातरिश्व्यानेंही तो आणला अशी कथा आहे. वीनें आणलेला तो वायः म्हणजे अग्नि; तो वनांत ठेविला आहे म्हणजे प्रज्वलित केला आहे ( नि + अधायि ); तुमची इच्छा करणारा ( चाकन् ) हा झळकणारा ( शुचिः ) स्तोम, हे अश्विनांनो, तुम्हांला स्तवीत आहे किंवा जागें करीत आहे. गृ = स्तवणें किंवा जागें करणें. न = संप्रति. ऋचेचा निश्चित अर्थ करतां येत नाहीं. स्तोम व न्यधायि ह्यांची जोडी इतर ठिकाणींही आढळते. रानाकडे जसा पक्षी पाठवावा तसा हा उत्सुक स्तोम तुमच्याकडे पाठविला जात आहे व तो तुम्हांला जागें करील. वासोवायः ( १०।२६।६ ) = वस्त्रें विणणारा; ह्या समासांत वाय शब्द आहे; मराठींत विणकर नावाचा पक्षी आहे; इंग्लिशमध्यें Weaver-bird; वायः पक्ष्याचें नांव असेल; किंवा वायः = पक्ष्याचें अंडें; तें जसें झाडावर ठेवलें असतें तसा हा स्तोम वगैरे; वायः शब्द कठीण आहे खास. कन् चीं चाकन् खेरीज चाकन, चाकनः, चाकनत्, चाकनन्त, चाकनाम, चाकन्तु, चाकन्धि, चाकन्यात् अशीं आणखीं रूपें आहेत; चाकन् = चायन् हें एखाद्या ऋचेंत चालेल; पण इतरत्र चालणार नाहीं.

**रथर्यति ( ११५ ) इति सिद्धः। तत्प्रेप्सुः। रथं कामयते इति वा**

सिद्धः म्हणजे धातूपासून बनलेलें नाम रंह् ( = जाणें ) पासून रथ; त्याच्यापासून रथर्य् हा नाम धातु. सिद्धः रथः त्या रथाची ( तत् ) इच्छा करणारा (प्रेप्सुः). दुर्गवृत्तींत इति सिद्धः। तत्प्रेप्सुः व ' इति वा ' हे शब्द नाहींत; रथर्यति = रथं हर्यति ( दुर्ग ) = रथाची इच्छा करतो; ह चा लोप होऊन रथर्यति रूप बनलें; हर्यति = कामयते ( निघंटु २।६ ).

**एष देवो रथर्यति ( ९।३।५ ) इत्यपि निगमः भवति**

हा सोम रथाच्या गतीची इच्छा करतो; रथाप्रमाणें धावतो असा अर्थ आहे. रथर्य् धातु कसा बनला तें माहीत नाहीं. ता रथर्यतः साकं सूर्यस्य रश्मिभिः (८।१०१

२ ) = मित्र व वरुण सूर्याच्या रश्मींबरोबर धांवतात. यदेतशेभिः पतरैः रथर्यसि ( १०।३७।३ ) = हे सूर्या, जेव्हां तूं आपल्या उडणाऱ्या, सोनेरी घोड्यांसह धांवतोस. रथर्य् तीन ऋचांतच आला आहे.

## खंड २९ वा.

**धेनुं न इषं पिन्वतमसक्राम् ( ५।६३।८ )। असंक्रमणीम्**

असक्रां ( ११६ ) = अ + स + क्रां; स = सं; क्रां =क्रमणीम्; असंक्रमणीं= आमच्यापासून न जाणारीला, आम्हांला सोडून दुसरीकडे न जाणाऱ्या, जिला आम्ही आपलें धन ( इषं ) म्हणतो अशा गाईला ( धेनुं ) धष्टपुष्ट करा ( पिन्वतं ). एथें नः असें पद नसावें; न ( = इव ) असें असावें; कारण पुरु हि वां ० देष्णं = तुमच्यापाशीं पुष्कळ देण्याजोगें धन आहे असें ऋचेच्या आरंभीं आहे व तदनंतर प्रस्तुत शब्द आले आहेत; म्हणून गाईला जशी लोक लठ्ठ करतात तसें धन लठ्ठ करा. असक्रां शब्द एथेंच आला आहे; तो दधिक्रा व रुधिक्रा ह्या शब्दांसारखा दिसतो; व्युत्पत्ति व अर्थ देतां येत नाहीं; कदाचित् सश्च + रा = सक्रा = अडणारी अशी व्युत्पत्ति व अर्थ असेल; असश्चन्ती भूरिधारे पयस्वती घृतं दुहाते ( ६।७०।२ ) = दुधाळ ( पयस्वती ), सतत धारांनीं दूध देणाऱ्या ( भूरिधारे ) व न अडणाऱ्या (असश्चन्ती ) अशा गाई म्हणजे द्यावापृथिवी घृत म्हणजे उदक देतात; एथें असश्चन्ती म्हणजे न अडणाऱ्या. असक्रां धेनुं यथा जनाः पिन्वन्ति तथा असक्राम् इषं पिन्वतं = न अडणाऱ्या गाईला जसे लोक धष्टपुष्ट करतात तसें धन न अडेल, न संपेल इतकें लठ्ठ म्हणजे पुष्कळ करा.

**आधवः ( ११७ ) आधवनात्। मतीनांच साधनं विप्राणां चाधवं ( १०।२६।४ ) इत्यपि निगमः भवति**

आ + धू ( हलविणें ) पासून आधव; आधववनात् = आकम्पनात् ( दुर्ग ). ( हे पूषा ) मतीनां म्हणजे स्तुति किंवा यज्ञ त्यांचा साधन म्हणजे त्या सफल करणारा व विप्र म्हणजे स्तोते त्यांना कांपविणारा म्हणजे त्यांच्या बुद्धींना चालना देणारा असा जो तूं त्या तुझी ( आम्ही स्तुति करतों ). यदीमनु प्रदिवो मध्व आधवे गुहा सन्तं मातरिश्वा मथायति ( १।१४१।३ ) = जेव्हां गुहेंत असणाऱ्या ह्याला ( ईम् ) मातरिश्व्यानें चोरून आणलें ( मथायति ); कधीं ? पुरातनकालीं (अनु प्रदिवः); कसें ? सोम ( मध्वः ) देऊन ( आधवे ). असा आधव शब्द दोनदां आला आहे. धू = हलविणें, हलवून देणें; जसें:– षष्टिं सहस्रा नैगुतो वसूनि वृक्षं न पक्वं धूनवत् (९।९७ ५३) = जसा कोणी झाड हालवून पिकलेलीं फळें पाडतो तसा सोम ६०००० धनें देतो. अस्मे देवासो अव धूनुता वसु ( १०।६६।१४ ) = अहो देवांनो, आम्हांला धन द्या. आधवः = देणारा; विप्राणाम् आधवः = स्तोत्यांना धन देणारा. मति=धन; साधनं = दाता.

**अनवब्रवः ( ११८ ) अनवक्षिप्तवचनः । विजेषकृदिन्द्र इवानवब्रवः (१०।८४।५) इत्यपि निगमः भवति**

अनवब्रवः = अन् + अव + ब्रवः; अव = अवक्षिप्त = झिडकारलेलें; ब्रवः ( ब्रू पासून ) = वचन; ज्याचें बोलणें कोणीही झिडकारूं शकत नाहीं असा. लढाई करणाऱ्या ( विजेषकृत् ) इंद्राप्रमाणें ज्याचें वचन कोणीही झिटकारूं शकत नाहीं असा. नव = ब्रव = स्तुति; ज्याची कोणी ( योग्य ) स्तुति करूं शकत नाहीं असा; इंद्र इतक्या लढाया जिकतो कीं त्यांचें वर्णन करणें अशक्य आहे असा अर्थ असावा. हा शब्द एथेंच आला आहे.

## खंड ३० वा.

**अरायि काणे विकटे गिरिं गच्छ सदान्वे ।**
**शिरिम्बिठस्य सत्वभिस्तेभिष्ट्वा चातयामसि ( १०।१५५।१ )**

**अदायिनि काणे विकटे**

अरायि = अ + रायि = अदायिनि; रा = देणें; रायी = देणारी; अरायी= न देणारी; ह्या शब्दाचीं अरायि ( संबोधन ) व अराय्यं अशीं दोनच रूपें व अराय ( पुंल्लींगी ) ह्याचें अरायासः हें एकच रूप अशीं तीन रूपें ऋग्वेदांत आहेत.

**काणः अविक्रान्तदर्शनः इति औपमन्यवः**

काणः = अविक्रान्तदर्शनः ; ज्याचें दर्शन विक्रांत म्हणजे भयप्रद नसतें असा; काण्याला पाहून कोणीही भीत नाहीं, उलट त्याची चेष्टा होते. काणोविक्रान्तदर्शनः ह्यांत काणोच्या पुढें अवग्रह असेल तेव्हां वरील अर्थ; अवग्रह नसेल तेव्हां ज्याचें दर्शन भयप्रद असतें असा ; कारण काण्याची वक्रदृष्टि पाहून पोरें भितात. हा काण शब्दाचा अर्थ कीं व्युत्पत्ति हें समजत नाहीं; व्युत्पत्ति असण्याचा संभव आहे; कारण यास्क हल्या त्या शब्दाची व्युत्पत्ति देतो. काणः = क्राणः = क्रान्तः = ( वि ) क्रान्त (दर्शनः) ; क्रम् धातूपासून काण असें औपमन्यव म्हणतो; औपमन्यवानें विक्रान्त दर्शनः असेंच लिहिलें असावें; कारण

**कणतेः वा स्यात् अणूभावकर्मणः । कणतिः शब्दाणूभावे भाष्यते अनुकणति इति**

अणूभाव म्हणजे लहान होणें असा ज्या धातूचा अर्थ ( कर्मणः ) आहे, त्या कण् पासून काण शब्द झाला असेल; औपमन्यवाप्रमाणें यास्काला क्रम् पासून काण असें मान्य आहे. कण शब्दे ( धा० १।४५० ), कण गतौ ( धा० १।७९५ ), कण संकोचे ( धा० १०।१५५ ) असे ३ कण धातुपाठांत आहेत. संकोच म्हणजे अणूभाव असें घेतल्यास चालेल ; पण त्याअर्थी कण् १० व्या गणांतला आहे. कण् लहान आवाज करणें ; कण शब्दे ( धा० १।४५० ); कण् चा यास्ककालीं जरा भिन्न अर्थ होता. भाष्यते = चालू भाषेंत प्रयोग आहे ; जसें = अनुकणति = कोणी

बारक्या आवाजानें बोलत आहे किंवा कण्हत आहे. यास्ककालीं संस्कृत लोकभाषा होती.

**मात्राणूभावात् कणः । दर्शनाणूभावात् काणः**

मापाचा लहानपणा अशा अर्थी असणाऱ्या कण् पासून ( धान्याचा ) कण. महाराष्ट्रपाठ काणः अशुद्ध आहे. जवळचें दिसणें ( दर्शनस्य दृष्टेः अणूभावः ) अशा अर्थी असणाऱ्या कण् पासून काण. लहान आवाज काढणें, जवळचें दिसणें ह्या अर्थींही कण धातु यास्ककालीं असेल. सर्व अर्थांत बारीकपणा हें सामान्य आहे. दुर्गवृत्तींत काणो विक्रान्तदर्शनः इति औपमन्यवः हें दर्शनाणूभावात् काणः ह्यानंतर दिलें असून कणतेः वा स्यात् अणूभावकर्मणः हें नाहीं; कोणीतरी शब्दाणूभाव, मात्राणूभाव व दर्शनाणूभाव ह्यांतून कणतिः अणूभावकर्मा असा अर्थ काढला असेल.

**विकटः विक्रान्तगतिः इति औपमन्यवः । कुटतेः वा स्यात् । विकुटितः भवति**

विकटः = वि + क् + अटः; क् = क्रान्तः; अटः = गतिः; ज्याची गति भयंकर आहे तो विकट असें औपमन्यव म्हणतो. ' इति औपमन्यवः ' दुर्गवृत्तींत नाहीं. विक्रान्तगतिः = विकृतगतिः (दुर्ग); विकृत = बरोबर नाहीं अशी, चमत्कारिक. किंवा कुट कौटिल्ये (धा० ६।८५)=वाकडें होणें; ह्यापासून विकट शब्द झाला असेल; कारण विकट मनुष्य वांकडा झालेला असतो; विकुटितः = कुब्जीभूतः ( दुर्ग ). स्यात् नंतर विपरीतस्य महाराष्ट्रपाठांत आहे; पण कुटचें कट होण्यांत वैपरीत्य म्हणजे कुट् ह्याचें टुक् झालें नाहीं; कु यांतील उ च्या जागीं अ आला एवढेंच.

**गिरिं गच्छ सदानोनुवे शब्दकारिके**

सदान्वे ( ११९ ) सदा + न्वे; न्वे = नोनुवे = शब्दकारिके = बडबडणाऱ्ये. नु स्तुतौ (धा० २।२५); नु चे चर्करीतानें नोनु; नोनु पासून नोनुवा हें नाम; नोनुवे ही त्याची संबुद्धि. ' नु ' शब्द करणें हा अर्थ धातुपाठांत नाहीं. सदान्वे हा शब्द एथेंच आला आहे; हा शब्द कसा बनला व त्याचा अर्थ काय हें सांगतां येत नाहीं. दानु हें वृत्राच्या आईचें नांव; तिचे मुलगे ते दानव; सदान्वे = सदानवे = दानवांसहित असा अर्थ असेल. अनार्य हे अदाते, भयंकर नजरेचें व भयंकर आकाराचे; त्यांची आईही तशीच; हे डोंगराळ लोक. हे दुष्टे ! नीघ आपल्या पोरांना घेऊन; जा डोंगराकडे. काणे, विकटे व सदान्वे हे एथेंच आले आहेत; त्या सर्वांचा वाईट अर्थ आहे एवढेंच म्हणतां येईल; यास्कानें केलेले अर्थ अर्वाचीन आहेत.

**शिरिम्बिठस्य सत्वभिः । शिरिम्बिठः मेघः । शीर्यते बिठे । बिठम् अन्तरिक्षम् । बिठं बीरिटेन व्याख्यातम्**

शिरिम्बिठः ( १२० ) = मेघः; मेघाला शिरिंबिठ म्हणण्याचें कारण शिरिम्बिठः = शिरिं + बिठः; शिरिं = शीर्यते = फोडला जातो; शॄ हिंसायां ( धा० ९।१६ ); त्याच्यापासून शिरि; बिठं = अन्तरिक्षम्. बीरिटंची जी व्याख्या, जी व्युत्पत्ति (निरुक्त ५।२८ ) तीच बिठंची. बिठं = बि + ठम्; बि = भि = भियः; किंवा बि = बा =

भा= भास्; ठ=त = ततिः; भयाचा किंवा तेजाचा ज्यांत विस्तार आहे असें स्थान. बिठ शब्द ऋग्वेदांत नाहीं.

**तस्य सत्वैः उदकैः इति वा स्यात्। तैः त्वा चातयामः**

सत्वभिः = सत्वैः = उदकैः; सत्वं = उदक ( निघंटु १।१२ ). इति स्यात् हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. तेभिः = तैः. चातयामसि = चातयामः; चातय् नाश करणें ह्या अर्थी लोकभाषेंत प्रसिद्ध आहे; प्रचातितः हा शब्द नेहमीं बोलण्यांत लोक वापरतात असें दुर्ग म्हणतो; पण धातुपाठांत चते याचने ( धा० ११८९० ) म्हणजे चत् याचना करणें असा अर्थ आहे, नाश करणें असा अर्थ नाहीं; आपट्यांच्या कोशांत चातय् लपावयास लावणें, भेवडावणें असें आहे; घालवून देणें, नाश करणें असा अर्थ ऋग्वेदांत आहे.

**अपि वा शिरिम्बिठः भारद्वाजः कालकर्णोपेतः अलक्ष्मीः निर्णाशयांचकार। तस्य सत्वैः कर्मभिः इति स्यात्**

किंवा शिरिंबिठ म्हणजे भारद्वाज; त्याला कालकर्णा म्हणजे अलक्ष्मी तिनें घेरलें होतें (उपेतः); तिचा त्यानें नायनाट केला; त्याच्या सत्वांनीं म्हणजे कर्मांनीं; असा अर्थ असेल; दुर्गवृत्तींत कालकर्णोपेतः याचा अर्थ दिला नाहीं. कालकर्णा हा शब्द अमरांत नाहीं, आपट्यांच्या कोशांत कालकर्णी किंवा कालकर्णिका = आपत्ति, दारिद्र्य. महाराष्ट्रपाठ निर्नाशयांचकार असा आहे. ही ऋचा दुर्भिक्षाधिदेवता किंवा कालकर्णा म्हणजे अलक्ष्मी ( दारिद्र्य ) हिला उद्देशून आहे. दुष्काळांत किंवा दारिद्र्यांत सांपडलेल्या लोकांना दुसऱ्याला देण्याची बुद्धि होत नाहीं; दुष्काळांत अन्न न मिळाल्यामुळें दृष्टि मंद होते व चालणें वेडेवाकडें असतें; अलक्ष्मी स्वतःच मंददृष्टि व विकटगति असते असे अर्थ दुर्ग अरायि काणे व विकटे ह्या शब्दांचे करतो. बृहद्देवतेंत ( ८।६० ) हें सूक्त अलक्ष्मीचा नाश करणारें आहे असें म्हटलें आहे. अरायि काणे सूक्तं च पञ्चवारं दिने दिने। अलक्ष्मीनाशनं सत्यं कुले लक्ष्मीः प्रवर्धते ( ऋग्विधानं ४३२ ) = दररोज पांच वेळां हें सूक्त म्हटल्यानें दारिद्र्याचा नाश होऊन कुलांत लक्ष्मी वाढते. अद्यापि योऽलक्ष्म्या अभिभूतो भवति स आस्यदघ्ने उदके अवतीर्य सूक्तमेतत् जपति। तस्य अलक्ष्मीः निर्नश्यति ( दुर्ग ) = (भारद्वाजानें हें सूक्त जपल्याबरोबर जसें त्याचें दारिद्र्य नष्ट झालें तसें) हल्लींही जो खोल पाण्यांत उतरून हें सूक्त जपतो त्याच्या दारिद्र्याचा पुरा नाश होतो. शिरिंबिठ भारद्वाजाला हें सूक्त दिसलें व त्यानें ह्या सूक्ताचा जप केल्यामुळें त्याचें दारिद्र्य नाहींसें झालें असें ह्या सूक्ताचें निदान म्हणजे उत्पत्तिकारण सांगतात. सूक्ताच्या ५ ऋचा असून २ ऱ्या ऋचेंत एथून हाकलून दिली, तेथून हाकलून दिली; अशा ह्या अरायीला हे ब्रह्मणस्पति तूं बैलासारखा शिंगांनीं फाडून टाक; ३ रींत नदींत हें जें लाकूड तरंगत आहे त्याला पकड आणि लांब लांब निघून जा; ४ थींत इंद्राचे शत्रु मारले जातात; ५ वींत ह्या शत्रूंनीं गाई व अग्नि पळविला होता; तें धन त्यांनीं देवांना परत

दिलें; आतां ह्या देवांना कोण त्रास देईल ? ह्या पांची ऋचांत दुष्काळ, किंवा दारिद्य ह्यांचें नांवही नाहीं. शिरिंबिठ हें इंद्राचें नांव असावें; सत्वन् = शूर शिपाई; सत्वन् म्हणजे उदक, कर्म किंवा नांव असा अर्थ कोठेंही नाहीं. तमुष्टुहि इन्द्रं यो ह सत्वा यः शूरः ( १।१७३।५ ); युध्मा सत्वा ( ६।१८।२ ); अस्माकेभिः सत्वभिः शूर शूरैः ( २।३०।१० ); अशा सत्वन् म्हणजे शूर ह्या अर्थाच्या पुष्कळ ऋचा देतां येतील. ही बाई कोण हें सांगतां येत नाहीं; तथापि शिरिंबिठाच्या शूर शिपायांच्या साह्याय्यानें तुला हाकलून देऊं असें कवि म्हणतो; शिरिंबिठ हें एखाद्या राजाचें नांव असेल व अरायी हें त्या राजाशीं शत्रुत्व करणाऱ्या एखाद्या स्त्रीचें नांव असेल; ही स्त्री अमूकच हें जेथें ठरवितां येत नाहीं त्या सूक्ताचा दारिद्र्य किंवा दुर्भिक्ष घालविण्याकरितां जप करीत बसणें फलदायक कसें होईल ? तैः त्वा चातयामः = तैष्ट्वा चातयामः असा संधि ह्या विवरणांत दोनदां केला आहे.

**तैः त्वा चातयामः। चातयतिः नाशने**

चातय् = नाश करणें; प्रस्तुत ऋचेंत हाकलून देणें.

**पराशरः ( १२१ ) पराशीर्णस्य वसिष्ठस्य स्थविरस्य जज्ञे**

( म्हातारपणानें ) जर्जर झालेला ( पराशीर्णस्य ), बुढ्ढा ( स्थविरस्य ) जो वसिष्ठ त्याच्यापासून जन्मला म्हणून पराशराला पराशर म्हणतात; पराशरः = परा + शरः; शरः = शीर्णः = छिन्नविच्छिन्न झालेला. दुर्गवृत्तींत पराशीर्णजः आहे; पराशीर्णस्य = स्थविरस्य; स्थविरस्य हें पराशीर्णस्य ह्याचा अर्थ असल्यामुळें प्रक्षिप्त होय; पराशरः पराशीर्णजः एवढेंच मूळ असेल.

**पराशरः शतयातुर्वसिष्ठः ( ७।१८।२१ ) इत्यपि निगमः भवति**

पराशर, शतयातु व वसिष्ठ हीं तीन पुरुषांचीं नांवें होत; पराशर हा वसिष्ठाचा मुलगा असें ऋग्वेदांत कोठेंही म्हटलें नाहीं; ही पौराणिक कथा होय.

**इन्द्रः अपि पराशरः उच्यते। पराशातयिता शत्रूणाम्**

इंद्रालाही पराशर म्हणतात; पराशरः = परा + शरः; शरः = शातयिता; शत्रूंचा नाश करणारा तो पराशर. शद् कांपणें ( धा० १।८८० ) पासून शरः; ही व्युत्पत्ति चुकीची आहे; परा शृणीहि तपसा यातुधानान् पराग्ने रक्षो हरसा शृणीहि ( १०।८७।१८ ) = हे अग्नि, जादूटोणा करणाऱ्यांना आपल्या ज्वालांनीं जाळून टाक. पराशर शब्द दोनदांच आला आहे व दोन्ही ठिकाणीं परा + शृ हाच धातु आहे.

**इन्द्रो यातूनामभवत्पराशरः ( ७।१०४।२१ ) इत्यपि निगमः भवति**

जादूटोणा करणाऱ्यांचा इंद्र नाश करणारा झाला.

**क्रिविर्दती ( १२२ ) विकर्तनदन्ती**

क्रिविर्दती = क्रिविः + दती; क्रिवि = क्रि + वि = वि + क्रि; क्रि कृत् कांपणें ह्यापासून; कापण्याकरितां ( विकर्तन = विकर्तनाय ) दांत ( दन्ताः ) आहेत जिला. क्रिवि नांवाचा एक मोठा देव होऊन गेला; त्याच्याशीं इंद्राची तुलना केली आहे;

क्रिवीप्रमाणें इंद्राला पोटभर सोम पाजतों ( १।३०।१ ); हे अश्विनांनो, क्रिवीप्रमाणें सोम पिण्यास या ( ८।८७।१ ); सोमाला क्रिवि म्हटलें आहे ( ९।९।६ ); ह्या क्रिवीनें शत्रुसेनांचा नाश केला ( ५।४४।४ ); एका क्रिवीला इंद्रानें जमीनदोस्त केलें ( २। १७।६, २।२२।२, ८।५१।८ ); दुसऱ्या एका क्रिवीला अश्विनांनीं वाचविलें ( ८।-२०।२४, ८।२२।१२ ); असा ९ वेळां क्रिवि शब्द आला आहे. दती हा क्रिविर्दती ह्या शब्दांतच आला आहे; तेव्हां त्याचा दांत हा अर्थ आहे कीं नाहीं हा प्रश्न आहे; असल्यास क्रिवीप्रमाणें दांत आहेत जिचे असा अर्थ होईल; दन् म्हणजे नाश करणें अशा अर्थाचा धातु ऋग्वेदांत आहे; त्यापासून दती उत्पन्न होणें अशक्य आहे; तथापि दती दन् पासून निघाला असल्यास क्रिवीचा नाश करणारी असा अर्थ होईल. यास्कानें केलेला अर्थ त्याच्या नेहमीच्या पद्धतीचा आहे.

**यत्रा वो दिद्युद्रदति क्रिविर्दती ( १।१६६।६ ) इत्यपि निगमः भवति**

हे मरुतांनो, जेथें तुमचें क्रिवीचा नाश करणारें शस्त्र ( दिद्युत् ) कापीत जातें ( रदति ). क्रिवि हा जसा इंद्राचा तसा मरुतांचाही शत्रु असेल.

**करूळती ( १२३ ) कृत्तदती**

करूळती = करू + ळती; करू = कृत्त; ळती = लती = दती; जिचे दांत कापले आहेत ती; करू हें कृत् कांपणें ह्यापासून; ळती हा दतीचा अपभ्रंश.

**अपि वा देवं कंचित् कृत्तदन्तं दृष्ट्वा एवम् अवक्ष्यत्**

हें वाक्य दुर्गवृत्तींत नाहीं. किंवा कांपलेल्या दांतांच्या एका देवाला पाहून ऋषीनें त्याला हें नांव दिलें असेल; अवक्ष्यत् हें ऌङन्त रूप आहे; पण त्याचा अशा रीतीनें केलेला उपयोग अपाणिनीय आहे; असें असतें तर तसें झालें असतें अशा ठिकाणीं ऌङ् चा उपयोग केला जातो. पण येथें शुद्ध भूतकाळीं ऌङ् चा उपयोग केला आहे; निरुक्त ७।२३ तही ऌङ् शुद्ध भूतकाळीं वापरला आहे.

## खंड ३१ वा

**वामंवामं त आदुरे देवो ददात्वर्यमा। वामं पूषा वामं भगो वामं देवः करूळती ( ४।३०।२४ )**

**वामं वननीयं भवति। आदुरिः आदरणात्**

वन संभक्तौ (धा० १।४६४); वन् भोगणें ह्यापासून वाम; कारण वाम म्हणजे धन हें भोगावयाचें असतें. वम् देणें ह्यापासून वम्र व वम्रक हे शब्द झाले आहेत; वम्रः = हवि देणारा; तोच धातु वामं ह्यांत आहे; चतुःशृङ्गोऽवमीद्गौर एतत् ( ४।-५८।२ ) = चार शिंगाची गाय हें घृत देती झाली; अवमीत् = देती झाली. वामं-वामं = सर्व धन. ते = तुला. आ + दृ = आदर करणें, ह्यापासून आदुरि. ज्याचा देव आदर करतात किंवा जो देवांना आदर दाखवितो असा यजमान. आदुरे शब्द एथेंच आला आहे; त्याचा अर्थ करतां येत नाहीं. उप प्लवद मण्डूकि वर्ष मा वद

तादुरि ( निरुक्त ९।७ ) ह्या ऋचेंत तादुरि शब्द आला आहे; त्याचा दुर्गानें तावदुदरि=जेवढें शरीर तेवढ्या पोटाचा असा अर्थ केला आहे. तादुरी, आदुरी व यादुरी हे शब्द कांहींसे सारखे दिसतात; पण ह्यांचा अर्थ करतां येत नाहीं. ददाति मह्यं यादुरी याशूनां भोज्या शता ( १।१२६।६ )=जी ( या ) मला शेकडों उत्तम ( भोज्या ) घोडे ( आशूनां ) देते ( ददाति ); एथें यादुरी शब्द आहे.

**तत् कः करूळती । भगः पुरस्तात् तस्य अन्वादेशः इति एकम्**

आतां ( तत् ) हा करूळती कोण ? ह्याच्या आधीं ( पुरस्तात् ) भग आला आहे; त्याचें करूळती नांवानें अनुकथन ( अन्वादेशः ) आहे असें एक मत आहे.

**पूषा इति अपरम् । सः अदन्तकः । अदन्तकः पूषा इति च ब्राह्मणम् ( शतपथ ब्राह्मण १।७।४।८ )**

करूळती नांवानें पूषन्‌चा निर्देश आहे असें दुसरें मत आहे; कारण त्याला दांत नाहींत. पूषन्‌ला दांत नाहींत असें ब्राह्मणवचन आहे. रुद्राला द्यावयाच्या भक्षाला प्राशित्र म्हणतात; तो भक्ष देवांनीं पहिल्यांदा पूषन्‌ला दिला; दांत न लावतां तो भक्ष खावयाचा असतो; पूषन्‌नें दांत लावले म्हणून त्याचे दांत पडले अशी कथा आहे. कोणी म्हणतील कीं भग जितका करूळतीला जवळ आहे तितका पूषन् नाहीं; पण भगाला करूळती म्हणण्याचें कारण नाहीं; कारण त्याचे दांत पडल्याचें ऐकिवांत नाहीं. भग कीं पूषन् हा वाद निराधार आहे; वामं शब्द प्रत्येक देवाशीं जोडला आहे; तेव्हां देवः करूळती हा अर्यमन्, भग व पूषन् ह्यांहून निराळा असावा. शिवाय करूळती किंवा कृत्तदती हें स्त्रीलिंग आहे; तें पूषन् किंवा भग ह्यांचें विशेषण कसें होईल ? यास्कानें दिलेली व्युत्पत्ति चुकीची आहे; करूळती हें देवः ह्याचें विशेषण आहे; करूळत आहे ज्याच्याजवळ तो करूळती; पण करूळत काय ?

**दनो विश इन्द्र मृध्रवाचः ( १।१७४।२ ) दानमनसः नः मनुष्यान् इन्द्र मृदुवाचः कुरु**

दनः ( १२४ ) = द + नः; द = दान ; नः = मनसः; दानमनसः= दान देण्याकडे ज्यांचें मन आहे अशांना ; ' नः ' अध्याहृत; कदाचित् द = दानमनसः व नः = अस्मभ्यम् असाही विभाग करण्यास यास्क भिणार नाहीं. विशः = मनुष्यान्; ' कुरु ' अध्याहृत. मृध्रवाचः = मृध्र + वाचः ; मृध्र = मृदु. हे इंद्रा, ह्या लोकांना दानानुकूल कर व त्यांची वाणी मृदु कर. हा सर्व अर्थ चुकला आहे. दन् जिंकणें, ताब्यांत आणणें ; दनः हें भूतकालचें द्वितीयपुरुषाचें एकवचन. दनः = अदनः = तूं जिंकलेंस; स इद्दासं तुवीरवं पतिर्दन् षळक्षं त्रिशीर्षाणं दमन्यत् (१०।९९।६)=तो जिंकणारा ( दन् ) धनी ( पतिः ) ६ डोळ्यांच्या व तीन डोक्यांच्या दासाला जिंकता झाला ( दमन्यत् ) ; एथें दन् हें वर्तमानकालचें विशेषण आहे. विश् म्हणजे प्रजा; ह्या प्रजा तीन प्रकारच्या ; दैवीर्विशः, मनुषीर्विशः व मृध्रवाचः विशः. मृध् (हिंसा करणें ) + रः = मृध्रः = हिंसक ; हिंसक आहे वाचा ज्यांची त्या मृध्रवाचः. हे इंद्रा,

तूं वाईट भाषा बोलणाऱ्या लोकांस जिंकलेंस हा खरा अर्थ. दनः ह्याचा भलता अर्थ केल्यानें मृध्रवाचः ह्याचा खोटा अर्थ करावा लागला. हे इंद्र त्वं मृध्रवाचः अमर्षणवचनाः विशः प्रजाः दनः अदमयः = हे इंद्रा, तूं असह्य भाषण करणाऱ्या लोकांना जिंकलेस असा सायणाचार्य अर्थ करतात; तोच बरोबर आहे.

**अवीरामिव मामयं शरारुरभि मन्यते (१०।८६।९)। अवीराम् इव माम् अयं बालः अभिमन्यते संशिशरिषुः**

अवीरां = अबलाम्, न विद्यन्ते वीराः यस्याः सा अवीरा = जिला शूर पुत्र नाहींत अशी; न वीरा अवीरा असा यास्क विग्रह करतो. उताहमस्मि वीरिणी इन्द्रपत्नी = मला शूर पुत्र आहेत व मी इंद्राची बायको आहें असा उत्तरार्ध आहे. माझे शूर पुत्र व इंद्र तुझा खरपूस समाचार घेतील असें इंद्रपत्नी म्हणते. शरारुः (१२५) संशिशरिषुः बालः = हिंसा करण्याची इच्छा करणारा मूर्ख (बालः अध्याहृत). शरारु शब्द शॄ (हिंसा करणें ह्या) पासून; शॄ चें चिकीर्षितज रूप शिशरिष् ; शिशरिष् + उः = शिशरिषुः; शॄ पासून शर व शरु शब्द झाले आहेत. जसें वन्द् पासून वन्दारु तसें शॄ पासून शरारु; आरु हा प्रत्यय. संशिशरिषुः = शरीरं त्यक्तुम् इच्छन् (दुर्ग) = आपल्या प्राणावर उदार झालेला; माझ्यावर हात टाकलान् कीं त्याचा प्राण गेलाच. पण शरारुः = बलात्कार करणारा. अभिमन्यते = माझ्यावर हात टाकण्याची इच्छा करतो (दुर्ग); पण मला कोणी नाहीं असा हा घातकी समजतो (अभिमन्यते) असा खरा अर्थ. यास्ककालीं शॄ ला सं उपसर्ग लावीत असावेत. संशय व संश्रय ह्यांत सं आहे; तसा सं + शॄ चा प्रयोग होत असावा.

**इदंयुः (१२६) इदं कामयमानः। अथापि तद्वदर्थे भाष्यते**

इदंयुः = इदं + युः; यु इच्छार्थी. सर्व शब्दांचें दर्शक म्हणून इदं घेतलें आहे; इदंयुः असा शब्द ऋग्वेदांत नाहीं. वसूयुः धनाची इच्छा करणारा; किंयुः = कशाची इच्छा करणारा; अश्वयुः, गव्युः वगैरे आणखी कित्येक उदाहरणें आहेत. शिवाय इदंयु हा शब्द इदंवत् ह्या अर्थीही ऋग्वेदांत वापरला आहे. भाष्यते = चालू भाषेंत वापरला जातो असा अर्थ एथें नाहीं. 'यु' चा अर्थ वत् ; 'इदंयु' चा तद्वत् ; इदं व तत् ह्यांनीं हवा तो पदार्थ दर्शविला जातो.

**अश्वयुर्गव्यू रथयुर्वसूयुरिन्द्रः (१।५१।१४) इत्यपि निगमः भवति**

इंद्राजवळ घोडे, गाई, रथ व धन आहे. इंद्र देतो, मागत नाहीं. वास्तविक यु चा अर्थ देणारा; अश्वयुः = घोडे देणारा; अध्वर्युः = अध्वरयुः = हवि (अध्वर) देणारा; अथर्युः = अथर देणारा; अथर्युः हें अग्नीचें विशेषण आहे; पण अथर काय? अथर्वन् शब्दांतही अथर् आहे; अथर म्हणजे धन, हवि कीं दुसरीच कांहीं वस्तु? यास्कानें अध्वर्यु शब्दाची केलेली व्युत्पत्ति (निरु. १।८) बरोबर नाहीं. यु अनेकार्थी म्हणून निघंटूंत घातला गेला; यु हा प्रत्यय धातूंनाही लावतात; जसें:—पा + युः = रक्षण करणारा; जायुः = जिंकणारा ; धायुः = पोसणारा; तायुः = (वस्तु)

लांबविणारा; वायुः = वाहणारा; तन्युः = गडगडाट करणारा. यु हा प्रत्यय नसून देवय्, गव्य्, वाजय् वगैरे नामधातूंना उ हा नामकरण प्रत्यय लाविला आहे; देवय् + उः = देवयुः; गव्य् + उः = गव्युः; वाजय् + उः = वाजयुः.

## खंड ३२ वा.

**किं ते कृण्वन्ति कीकटेषु गावो नाशिरं दुह्रे न तपन्ति घर्मम् ।**

**आ नो भर प्रमगन्दस्य वेदो नैचाशाखं मघवन्रन्धया नः ( ३।५३।१४ )**

**किं ते कुर्वन्ति कीकटेषु गावः। कीकटाः (१२७) नाम देशः अनार्यनिवासः कीकटाः किं कृताः। किं क्रियाभिः इतिप्रेप्साः वा**

कृण्वन्ति = कुर्वन्ति. कीकट हें अनार्य ज्यांत राहतात अशा देशाचें नांव आहे. निघंटूंत कीकटेषु असें सप्तम्यंत रूप दिलें आहे. कीकटाः वगैरे वाक्य दुर्गवृत्तींत नाहीं. वृत्तीच्या शेवटीं कीकटाः अनार्यदेशनिवासिनः असें आहे. वरील वाक्य प्रक्षिप्त असावें; कारण कीकटाः = की + कटाः; की = किम्; कटाः = कताः = कृताः. निरुक्त ५।२४ त कुटस्य = कृतस्य अशी व्युत्पत्ति केली आहे; त्यासारखीच प्रस्तुत व्युत्पत्ति होय. ईश्वरानें अशा लोकांना कां निर्माण केलें कोणाला ठाऊक; असा अर्थ दर्शविणारें कीकट हें नांव आहे. हें नांव कोणीं दिलें? आर्यांनीं कीं अनार्यांनीं? अनार्य आपल्या देशास कीकट म्हणत असावेत; तेव्हां त्या नांवाची व्युत्पत्ति त्यांच्या भाषेंत असेल; संस्कृत व्युत्पत्ति व्यर्थ होय. इंग्लंड, फ्रान्स वगैरेची संस्कृति शब्दांनीं व्युत्पत्ति करणें हास्यापद होईल. किंवा की = किम्; कटाः = कताः = कृताः = क्रियाः = क्रियाभिः. आम्हांला आर्यांच्या क्रियांशीं – धर्माचरणाशीं – काय करावयाचें आहे अशी (इति) इच्छा (प्रेप्सा) म्हणजे विचार ज्यांच्या मनांत घोळत असतो असे लोक. इतिप्रेप्साः येषां ते इतिप्रेप्साः; ह्यावरून यास्क कीकट म्हणजे लोक समजतो, देश समजत नाहीं. व्युत्पत्ति किं + कृ अशीच; फक्त अर्थ भिन्न. गुर्जरप्रतींत 'वा' नाहीं.

**न एव च आशिरं दुह्रे। न तपन्ति घर्मं हर्म्यम्**

'एव च' अध्याहृत. दुह्रे शब्द भाष्यांत तसाच ठेवण्याचें कारण दिसत नाहीं. दुह्रे = दुह्यन्ते (दुर्ग). त्यांचें दूध आशिराकरितां – सोमरसांत – मिसळण्याकरितां काढीत नाहींत. 'च' शब्द व्यर्थ आहे; तो पुढच्या वाक्यांत पाहिजे. हर्म्यं दुर्गवृत्तींत नाहीं व त्याची जरूर नाहीं; घर्मं घरणं असें सायणानें घेतलेल्या उताऱ्यांत आहे. घर्म = ऊन दूध. ते गावः = ताः गावः (दुर्ग). कीकटलोकांत असणाऱ्या गाई काय करतात? त्यांचें दूध आशिरासाठीं उपयोगांत आणीत नाहींत व अग्निहोत्र्याला पिण्यालाही तें तापवीत नाहींत; हा अर्थ यास्कभाष्याला धरून आहे; पण तो बरोबर नाहीं. कीकट देशांतील बैलवजा लोक (ते गावः) काय करीत असतात? (ते आपले आयुष्य फुकट घालवितात; कारण) ते गाईचें दूध आशिराकरितां काढीत नाहींत किंवा अग्निहोत्र्याला पिण्याकरितां तापवितही नाहींत असा खरा अर्थ आहे.

**आहर नः प्रमगन्दस्य धनानि। मगन्दः कुसीदी। मांगदः। माम् आगमिष्यति इति ददाति। तदपत्यं प्रमगन्दः। अत्यन्तकुसीदिकुलीनः**

आभर = आहर = आणून दे. वेदः = धनानि. मगन्दः = कुसीदी = सावकारी करणारा. मांगदः व च दुर्गवृत्तींत नाहीं. मगन्दः = म + गं + दः; म = माम्; गं = (आ) गमिष्यति; द = ददाति. गुर्जरप्रतींत गमिष्यतिच्या आधीं आ नाहीं. (हे कर्जाऊ दिलेलें धन) मजकडे (दामदुप्पट होऊन) येईल (अशा आशेनें कर्ज) जो देतो तो मगन्द; मगन्दाचा (तस्य) मुलगा (अपत्यं) प्रमगन्द. प्र हा पुत्रार्थी उपसर्ग आहे; जसा प्रस्कण्व (निरुक्त ३।१७) ह्यांतील प्र. जो भयंकर (अत्यन्त) व्याजबट्टा करतो (कुसीदिन्) त्याच्या कुलांत जन्मलेला (कुलीनः) हा 'प्र' चा दुसरा अर्थ दिसतो. प्र = पुत्र किंवा अत्यन्त. दुर्गवृत्तीच्या कांहीं पोथ्यांत कुसीद असें आहे; अत्यन्त म्हणजे पराकाष्ठेचा; कुसीद म्हणजे व्याजबट्टा ज्याचा आहे म्हणजे जो करतो त्याच्या कुलांत जन्मलेला. गुर्जरपाठ 'अत्यन्तकुसीदः कुलीनः' आहे; तो अत्यन्तकुसीदकुलीनः असाच असला पाहिजे; दोन्ही पाठांत हा पाठ चांगला आहे.

**प्रमदकः वा। यः अयम् एव अस्ति लोकः न परः इतिप्रेप्सुः**

प्रमगन्दः = प्र + म + गं + दः. प्र + म + द + गं + := प्रमदकः = अतीशय माजलेला, मदोन्मत्त. तो कोण तर जो हाच लोक कायतो आहे, परलोक नाहीं असा विचार मनांत बाळगतो तो म्हणजे नास्तिक. अशी व्युत्पत्ति असेल; किंवा

**पण्डकः वा। पण्डकः पण्डगः। प्रार्दकः वा। प्रार्दयति आण्डौ। आण्डौ आणी इव व्रीडयति**

प्रमगन्दः = प्र + म + ग + न्द +:; प्र = प; ग + := कः; न्द = ण्ड; प + ण्ड + कः = पण्डकः; म गाळावयाचा. पण्डकः = पण्डगः; कः = गः. पण्ड = षंढ (अमर २।६।३९) कामवासना तृप्त करण्याकरितां जो नपुंसकाकडे जातो (गः) तो. किंवा प्रमगन्दः = प्र + म + ग + न्द+ :; ग +: = क :; म गाळावयाचा. न्द = र्द. प्र = प्रा; प्रा + र्द + कः = प्रार्दकः. तो कोण? प्रार्दयति आण्डौ = आण्डौ आणी इव व्रीडयति = गाडीच्या आसाचे खिळे जसा आस बसविणारा फिरवून फिरवून घट्ट करतो तशा स्वतःच्या अंडकुल्या वाटोळ्या फिरवून फिरवून शेवटीं अगदी खची करून टाकतो तो. गुर्जरपाठ व्रीलयति आहे. हा सर्व चहाटळपणा आहे व तो (पण्डकः पासून व्रीडयति पर्यंत) मागाहून घुसडला गेला असावा. शत्रूला शिव्या देण्याची ही उत्तम युक्ति आहे! यास्क इतक्या थरावर बहुतकरून गेला नसावा. हा शब्द एथेंच आला आहे.

**तत्स्थं नैचाशाखम्। नीचाशाखः नीचैः शाखः। शाखाः शक्नोतेः। आणिः अरणात्**

नीचा शाखः = नीचैः शाखः = ज्याची शाखा म्हणजे कुल नीच आहे

असा. तत्स्थं = अशाच्या ठिकाणीं असणारें (धन). तत्स्थं नैचाशाखं हें नीचैः शाखः ह्यानंतर पाहिजे. दुर्गवृत्तींत 'तत्स्थं' नाहीं; पण त्याचा अर्थ आहे. शक् पासून शाखा; फांदी हवी तिकडे जाऊं शकते. निरुक्त १।४ यांत शाखाः खशयाः शन्कोतेर्वा असें आहे. ऋ अर् = जाणें; ह्यापासून आणि. आणिः = अरणिः. खिळा भोंकांत जातो. ही व्युत्पत्ति आणी इव व्रीडयति ह्या नंतर पाहिजे. शाखा व आणि ह्यांच्या व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहींत. निरुक्तांत हवें तें दडपलें गेलें आहे.

**तत् नः मघवन् रन्धय इति । रध्यतिः वशगमने**

रध् ताब्यांत देणें. रध हिंसासंराध्योः (धा० ४।८७); संराद्धि = निष्पत्ति. वशगमन हा अर्थ धातुपाठांत नाहीं; तो वैदिक अर्थ आहे. रध्यतिः वशगमने दुर्गवृत्तींत नाहीं. इंद्रा, तें धन आमच्या स्वाधीन कर. नीचावया अभवत् वृत्रपुत्रा (१। ३२।९)= वृत्र आहे पुत्र जीचा तिचे हात (वयाः) खालीं गेले; वयाः = शाखाः. नीचाशाखा व नीचावया ह्यांचा अर्थ एकच. तिचा मुलगा तो नैचाशाख. त्याला आमच्या कबज्यांत दे असा अर्थ आहे. वृत्र हा शत्रुवाचक शब्द बनला गेला; शत्रूला प्रमगंद कां म्हटलें गेलें किंवा प्रमगंद नांवाचा कोणी विशिष्ट शत्रु होता हें समजण्यास मार्ग नाहीं. तें कीकट देशाच्या राजाचें नांव असेल; त्याचें धन म्हणजे गाई; नैचाशाख ही त्याला शिवी असेल.

**बुन्दः (१२८) इषुः भवति । भिन्दः वा । भयदः वा । भासमानः द्रवति इति वा,**

बुन्दः = इषुः = बाण; बाणाला बुन्द म्हणण्याचें कारण बाण शरीर फोडतो. बुन्दः = ब् + उ + न् + द् + अः; ब् = भ्; अ = इ; भ् + इ = भि; न् + द् + उ = न्दुः; भि + न्दुः = भिन्दुः = फोडणारा. किंवा बाण भय उत्पन्न करतो म्हणून तो बुन्द. बुन्दः= ब् + उ + न् + दः; ब् = भ्= भय. उ व न् गाळावयाचे; भय + दः = भयदः = भय देणारा. किंवा ब् = भ् = भास; न् = मानः; दः = द्र = द्रवति. बाण झळकत धावतो. हवें तें वरळावें!

## खंड ३३ वा.

**तुविक्षं ते सुकृतं सूमयं धनुः साधुर्बुन्दो हिरण्ययः ।**
**उभा ते बाहु रण्या सुसंस्कृत ऋदूपे चिदृदूवृधा (८।७७।११)**
**तुविक्षं बहुविक्षेपं महाविक्षेपं वा**

तुविक्षं = तुवि + क्षं; तुवि = बहु; क्षं = विक्षेपं; ज्याच्यापासून पुष्कळ बाण फेकले जातात असें. गुर्जरपाठ बहुविक्षं आहे; तो अशुद्ध आहे. तुविक्षंची कदाचित् तुवि + विक्षं अशी फोड करावयाची असेल; विक्षं = विक्षेपं. 'महाविक्षेपं वा' दुर्गवृत्तींत नाहीं. तुवि = महान्, ज्याच्यापासून बाण लांब फेकला जातो असें. तुविक्ष व द्युक्ष ह्या दोन शब्दांच्याच शेवटीं क्ष आहे; दिवः क्षेति असौ द्युक्षः = द्यूवर सत्ता चालविणारा, द्यूस जिंकणारा. त्याप्रमाणें तुविक्षं = पुष्कळांवर सत्ता चालविणारें, पुष्कळांना

जिंकणारें, ठार करणारें असा अर्थ असावा. तुवि शब्दाचा महान् अर्थ नाहीं. तुविक्षं शब्द भाष्यांत घालण्याचें कारण नव्हतें.

**ते सुकृतं सुमयं सुसुखं धनुः**

सुमयं = सुसुखं. मयः = सुख; शत्रू मारून मित्रांना किंवा धनुर्धारीला सुख देणारें. सू दीर्घ छंदाकरितां. गोमय, शकमय, अश्मन्मय ह्यांत जो मय प्रत्यय तोच 'सु' ह्याला लाविला असावा; सु + मयं = उत्तम. मयस् (सुख) ह्याच्या अंतीं स् आहे. सुकृतं चांगलें बनविलेलें म्हणून सुमयं = उत्तम.

**साधयिता ते बुन्दः हिरण्मयः**

साधुः = साधयिता = कार्य साधणारा. संदर्भाप्रमाणें साधु शब्दाचे शूर, इष्ट, पुरें, सरळ, चांगला, वेगवान्, दयाळू असे अर्थ होतात; एथें वेगवान्, उत्तम. हिरण्ययः = हिरण्मयः.

**उभौ ते बाहू रण्यौ रमणीयौ सांग्राम्यौ वा**

उभा = उभौ. रण्यौ = रमणीयौ; किंवा सांग्राम्यौ = संग्राम करण्यास योग्य. रण्य शब्दाचे दोन्ही अर्थ आहेत; एथें दुसरा अर्थ योग्य दिसतो.

**ऋदूपे अर्दनपातिनौ गमनपातिनौ**

ऋदूपे = ऋदू + पे; ऋदू = अर्दन. अर्द् ह्यांतील र्चें संप्रसारणानें ऋ झालें व द् चा दू झाला. अर्द गतौ ( धा० १।५५ ); अर्दन = गमन; पे = पातिनौ. जे बाणांच्या गमनानें ( अर्दनेन ) शत्रूला पाडतात. गमनपातिनौ हा अर्दनपातिनौ ह्याचा अर्थ आहे; असे अर्थ यास्क देत नसतो. महाराष्ट्रपाठांत गमनपातिनौ नंतर शब्दपातिनौ दूरपातिनौ वा असें जास्त आहे; ऋदू = शब्द; ह्या अर्थाला आधार काय ? बाणांच्या आवाजानें पाडणारे. ऋदू = ऋ + दू = दू + ऋ; ऋ = र; दू + र = दूर. दूरवर बाण फेकून शत्रूला पाडणारे. चित् निरर्थक म्हणून गाळला आहे; पण चित् शब्द ऋदूपे व ऋदूवृधा ह्यांचा विरोध दाखवितो. शिवाय ऋदूपे हें बाहूचें विशेषण होणार नाहीं; ऋदूपा असें रूप पाहिजे. ऋदूपे = ऋदू नाहींसें होण्याच्या समयींही, संकटांतही असा अर्थ असावा; पण तसा अर्थ ऋदूपे ह्यांतून काढण्याचा मार्ग मला आढळला नाहीं. ऋदूपे हा शब्द शुचिपे व कीलालपे प्रमाणें चतुर्थी एकवचनी दिसतो. शुचि म्हणजे झळकणारा सोम; तो पिणारा तो शुचिपाः; शुचिपे = झळकणारा सोम पिणाऱ्याला. कीलाल ( पाणी ? ) पिणाऱ्या अग्नीला. ऋदूपे = ऋदू पिणाऱ्याला (तुला).

**मर्माणि अर्दनवेधिनौ गमनवेधिनौ**

ऋदूवृधा = ऋद् + वृधा; ऋदू = अर्दन; वृधा = वृधौ = वेधिनौ; बाणांच्या गमनानें ( अर्दन = गमन ) मर्म भेदणारे ( वेधिनौ ). गमनपातिनौप्रमाणें गमनवेधिनौ प्रक्षिप्त. ऋदू = मर्म (दुर्ग); पण तसा अर्थ केल्यास अर्दन कशाचा अर्थ! शब्दवेधिनौ दूरवेधिनौ असें महाराष्ट्रपाठांत जास्त आहे. अर्थाकरितां वृधा = वेधिनौ असा बदल केला

आहे; पण ऋदूवृधा = ऋदू वाढविणारे असा सरळ अर्थ आहे; पण ऋदू काय ? निरुक्त ६।४ त ऋदूपे इति उपरिष्टात् व्याख्यास्यामः असें म्हटलें होतें; त्या ऋदूपे शब्दाचें एथें विवरण केलें आहे. ऋदूदरेण ह्याची व्याख्या त्या खंडांत केली आहे; ऋदूदरेण = मृदूदरेण अशी व्युत्पत्ति तेथें दिली आहे. ऋदूदर, ऋदूपे व ऋदूवृधा ह्या तिहींत ऋदू आहे. पुरंदर व गोदर ह्यांत असणारा दर ऋदूदर शब्दांत आहे. पुरंदर = किल्ले फोडणारा (इंद्र). गोदर = गाई फोडणें म्हणजे गाई ज्यांत मिळतात असा संग्राम. इन्द्र चित्रमा दर्षि राधः (१।११०।९) = हे इंद्रा, तूं धन फोडतोस म्हणजे गोठे फोडून त्यांतील गोधन देतोस. ऋदूदर म्हणजे ऋदू फोडणारा; तेव्हां ऋदू म्हणजे धन. ऋदूपा = पुष्कळ धन जो पाळतो म्हणजे बाळगितो असा मनुष्य; अशा मनुष्यालासुद्धां (ऋदूपे चित्) धनवृद्धि करणारे (ऋदूवृधा). रयिवृधः, वयोवृधः, अन्नवृधः ह्यांतील वृध व ऋदूवृधा ह्यांतील वृध एकच. यास्कानें ऋदूचे भलते अर्थ केले आहेत. ऋदूपे ह्याचा दुसराही एक अर्थ निरुक्त ६।४ त मी केला आहे तोही पहावा. यास्कानें सुसंस्कृता ह्याचा अर्थ किंवा तो शब्द भाष्यांत दिला नाहीं. सुसंस्कृता सुसंस्कृतौ बाहू = उत्तम बनविलेले बाहू. ह्या ऋचेवरील स्वतःचें भाष्य न देतां सायणाचार्यांनीं यास्काचें भाष्य दिलें आहे.

## खंड ३४ वा.

**निराविध्यद्गिरिभ्य आ धारयत्पक्वमोदनम्। इन्द्रो बुन्दं स्वाततम्** (८।७७।६)
**निरविध्यत् गिरिभ्यः। आधारयत् पक्वम् ओदनम् उदकदानं मेघम्।**

निराविध्यत् = निरविध्यत्. ओदनं = आ + उद + दनं; उद = उदक; दनं = दानं; 'आ' व्यर्थ. उदक देणाऱ्या (दानं) मेघाला इंद्र फोडता झाला (आ + धारयत् = आदारयत्). पक्वं = उदक देण्याला समर्थ अशा मेघाला. पक्वं हें ओदनं याचें विशेषण.

**इन्द्रो बुन्दं स्वाततम्**

बाण धनुष्यावर ठेवून व धनुष्याची दोरी कानापर्यंत ओढून इंद्रानें मेघ भेदिला व उदकपूर्ण अशा ह्या मेघाला पर्वतापासून फोडून काढलें; असा यास्क व दुर्ग ह्यांनीं अर्थ केला आहे. आ बुन्दं वृत्रहा ददे जातः पृच्छद्वि मातरम्। क उग्राः के ह शृण्विरे (८।४५।४) = जन्मल्याबरोबर इंद्रानें बुंद हातीं घेतला व बलिष्ठ (उग्राः) असे कोण लोक प्रसिद्ध आहेत असें आईस विचारलें. बुन्द शब्द असा तीनदां आला आहे व एके ठिकाणीं (८।४५।४) धनुष्य असाच अर्थ आहे. मनुष्य धनुष्य हातीं घेऊन मग शिकारीस जातो. साधुर्बुन्दो हिरण्ययः एथें बुंद म्हणजे बाण. प्रस्तुत ऋचेंत त्याचा अर्थ ठरविणें कठीण आहे. बाण किंवा धनुष्य असा अर्थ घेतल्यास कृत्वा शब्द अध्याहृत घ्यावा लागतो. निराविध्यत् ह्याचें बुन्दं हें कर्म घेतल्यास बुन्द म्हणजे वराह वगैरे वन्य पशु होऊं शकेल. ह्याच सूक्तांतील १० व्या ऋचेंत

विष्णु इंद्राला १०० रेडे, क्षीरौदन व भला मोठा डुक्कर देता झाला असें म्हटलें आहे. प्रस्तुत ऋचेंतील पक्वम् ओदनं व क्षीरपाकम् ओदनं एकच; तेव्हां स्वाततं बुन्दं म्हणजे एमुषं वराहं म्हणजे लांब देहाचा डुक्कर; अशा डुकराला इंद्रानें डोंगरांतून (गिरिभ्यः आ) हुसकून लाविलें (निराविध्यत्) व क्षीरपाक दिला. मुषायत् विष्णुः पचतं सहीयान् विध्यत् वराहं तिरो अद्रिम् अस्ता (१।६१।७) = बाण फेकणारा (अस्ता) बलिष्ठ (सहीयान्) विष्णु पाक करण्याला योग्य (पचतं) अशा डुकराचा नाश करता झाला; डुक्कर डोंगरापलीकडे होता (अद्रिं तिरः); त्याला बाण मारून विष्णुनें जखमी केलें (विध्यत्). गिरिभ्यः ही पंचमी असल्यामुळें निर् + आ + विध् = हुसकाऊन लावणें असा मी अर्थ केला आहे. अवविद्ध = खालीं टाकलेला असा शब्द अत्रीला लावलेला आहे; तेव्हां विध् = टाकणें; निर् + विध् = बाहेर टाकणें, हुसकावणें. मारलेल्या वराहाचें मांस दुधांत शिजवून त्याचा क्षीरपाक झाला. विष्णूनें लांबलचक (स्वाततं) अशा वराहाला (बुन्दं) डोंगरांतून (गिरिभ्यः आ) हुसकावून लाविलें व जखमी केलें; नंतर वराहमांस दुधांत शिजवून तें पक्व ओदन इंद्रास दिलें. तेव्हां बुन्द याचे बाण, धनुष्य व वराह असे तीन अर्थ असावेत. अनेकार्थ म्हणून बुन्द शब्द निघंटूंत घातला गेला असावा. बुन्द म्हणजे वज्र असें देवराज म्हणतो; पण त्यानें यास्कानें दिलेला अर्थ द्यावयास पाहिजे होता. बुन्दः वज्रं भवति असा यास्क पाठ होता कीं काय?

**वृन्दं (१२९) बुन्देन व्याख्यातम्। वृन्दारकः च**

जी बुन्द शब्दाची व्युत्पत्ति तीच वृन्द शब्दाची. मोठा समुदाय शत्रूचा गट फोडतो, शत्रूला भय दाखवितो, व शत्रूवर चाल करून जातो. वृन्द शब्द ऋग्वेदांत नाहीं. वृणोति वृन्दं (अमर २।५।४१ क्षीरस्वामी); समुदाय व्यक्तींना झांकतो. वृन्दारक शब्दाचीही तीच व्युत्पत्ति. ऋग्वेदांत हाही शब्द नाहीं; तो निघंटूंतही नाहीं; तो भाष्यांत यास्कानें घातला कीं दुसऱ्या कोणी? वृन्द + आरकन् (अमर १।१।९ क्षीरस्वामी); वृन्दारकाः = देवाः; किंवा वृन्दारक म्हणजे हत्ती (दुर्ग). वृन्दारकः सुरे पुंसि मनोज्ञश्रेष्ठयोः (मेदिनी) = देव, पुरुष, मनोज्ञ, व श्रेष्ठ ह्या अर्थीं वृंदारक.

## खंड ३५ वा.

**अयं यो होता किरु स यमस्य कमप्यूहे यत्समञ्जन्ति देवाः। अहरहर्जायते मासि मास्यथा देवा दधिरे हव्यवाहम् (१०।५२।३)**

**अयं यः होता कर्ता स यमस्य**

किः(१३०)= कर्ता; कि व कृ ह्यांत क् सामान्य आहे. किः = कः (सायण)=कोण. हा जो देवांना बोलावणारा किंवा हवि पोचविणारा (होता) तो यम म्हणजे आदित्य त्याला करतो म्हणजे जन्म देतो. प्रातःकाळीं अग्नि सूर्य प्रसवतो व सायंकाळीं सूर्य अग्नि प्रसवतो असें मैत्रायणी संहितेंत (१।५।७) म्हटलें आहे (दुर्ग). किः कः सः (सायण) = हा कोण; तो काय करतो.

**कम् अपि ऊहे अन्नम् अभिवहति यत् समश्नुवन्ति देवाः**

कम् = अन्नम्. अपि = अभि. ऊहे = वहति. समञ्जन्ति = समश्नुवन्ति. तो काय करतो ह्याला उत्तरः–जें अन्न देव खातात तें तो (देवांकडे) नेतो. यमस्य =यजमानस्य ( सायण ) = यजमानानें दिलेलें ( हविर्लक्षण अन्न ).

**अहरहः जायते मासे मासे अर्धमासे अर्धमासे वा**

मासि मासि मासे मासे। अर्धमासे अर्धमासे वा = महिन्या महिन्याला किंवा दर पंधरवड्याला. अहरहः ह्यानें अग्निहोत्र, मासे मासे ह्यानें पितृयज्ञ व पंधरवड्यानें दर्श व पूर्णमास सूचित होतात; ह्या प्रत्येक प्रसंगीं अग्नि जन्मतो म्हणजे प्रज्वलित केला जातो. दुर्गवृत्तींत अर्धमासे नंतर 'वा' नसून 'च' आहे व तोच शब्द बरोबर दिसतो. दररोज सूर्यरूपानें व महिन्या महिन्यानें चंद्ररूपानें अग्नि जन्मतो असा अर्थ कित्येक करतात असें सायणाचार्य म्हणतात.

**अथ देवाः निदधिरे हव्यवाहम्**

अथा = अथ. दधिरे = निदधिरे. म्हणून देवांनीं अग्नीला हविर्वाहक केलें. ही ऋचा ज्या सूक्तांत आहे त्या सूक्तांत होता जर मी झालों तर मला कोणतें काम पडेल व त्याबद्दल मला काय मिळेल असें अग्नि विचारतो (ऋक् १); मी जेव्हां होता होतों तेव्हां सर्व देव व मरुत् मला जेव्हां तेव्हां काम सांगत; हे अश्विनांनो, तुम्हांला रोजच्यारोज मला हवि द्यावा लागे (२); जो कोणी होता होतो त्याला यमाशीं कांहीं कर्तव्य नाहीं; तो जें अन्न देतो तेंच देव खातात; तो रोज जन्मतो (म्हणजे रोज त्याला काम आहेच) म्हणून देव त्याला महिन्या महिन्याला हविर्वाहक नेमीत गेले (३); मी जेव्हां होता होतों तेव्हां मला फार कष्ट पडले व विश्रांति नव्हती; (देव म्हणतात) अग्नि आमचा यज्ञ सर्वप्रकारें सिद्धीस नेतो (४); हे देवांनो, मी तुम्हांला अमृत (हवि) देईन; तुम्हांला स्फुरण येण्याजोगें सामर्थ्य देईन; इंद्राला सर्व शत्रुसेना जिंकतां येतील अशाकरितां त्याच्या हातांत वज्र ठेवीन (५); ३३३९ देव अग्नीची पूजा करते झाले; घृतानें त्याला त्यांनीं अभिषेक केला; बर्हिरासनावर त्याला बसविलें (६). असा ह्या सूक्ताचा सारांश आहे. २ ऱ्या ऋचेंत एक हव्यवाह अग्नि आपली हकीकत सांगतो; ३ त अग्नीचें काम फार कष्टाचें आहे; दररोज त्याला रखडावें लागतें; म्हणून देव महिन्याला निरनिराळा हव्यवाहक नेमूं लागले; ४ त दुसरा एक अग्नि आपल्याला फार कष्ट पडले म्हणून सांगतो; ऋचेच्या दुसऱ्या अर्धांत यज्ञ तयार करण्याचें काम फार कठीण आहे असें देव कबूल करतात; ५ त अग्नि ही सर्व दगदग सोसण्यास कबूल होतो; ६ त देव त्याला विधिपूर्वक कामावर नेमतात; असा ऋचांचा परस्पर संबंध असावा. प्रस्तुत ऋचा तिसरी आहे. किरु स यमस्य हे शब्द कठीण आहेत. यमाचा (यमस्य) तो (सः) कोण (किः)? कोणी नाहीं असा मी त्यांचा अर्थ करतों. ऋचेचा अर्थः–हा जो होता त्यानें यमगृहीं जाऊन विश्रांति घेतां कामा नये; तो जें अन्न (कं) देतो (ऊहे = वहति) तेंच कायतें देव खातात (समञ्जन्ति); तो रोज जन्मतो म्हणजे

प्रज्वलित केला जातो; म्हणूनच (अथा) देव दर महिन्याला निराळा हव्यवाह नेमूं लागले (दधिरे). किः हा शब्द एथेंच आला आहे; तें कशाचें रूप व त्याचा अर्थ काय हें सांगतां येत नाहीं.

**उल्बं ( १३१ ) ऊर्णोतेः वा । वृणोतेः वा**

उल्बं = उल् + बं; उल् = उर् = ऊर्; बं = ण = णु; ऊर् + णु = ऊर्णु. किंवा वृ = वृ + ऋ; संप्रसारणानें व् = उ; उ + ऋ = ऊर्. ऊर्णु किंवा वृ आच्छादणें ह्यापासून उल्ब. उल्ब = गर्भाभोवतालचा कोशेटा. हा शब्द पुढें दिलेल्या ऋचेंतच आला आहे.

**महत्तदुल्बं स्थविरं तदासीत् (१०।५१।१) इत्यपि निगमः भवति**

( जें वेष्टून अग्नि पाण्यांत शिरला) तें उल्ब मोठे होतें. स्थविरं = महत.

**ऋबीसं(१३२)अपगतभासम् । अपहृतभासम् । अन्तर्हितभासम् । गतभासं वा**

ऋबीसं = ऋ + बीसम्; ऋ (जाणें) = ऋत = अपगत; बीसं = भासं; ज्यांतून उजेड निघून गेला आहे अशी जागा. किंवा ऋ = हृ = अपहृत; ज्यांतील प्रकाश काढून घेतला आहे. सायणभाष्यांत ह्या दोन व्युत्पत्तींच्यामध्यें अपचितभासं आहे; 'ऋ' पासून चित कसा निघेल? किंवा 'ऋ'पासून अन्तर्हित कसें निघेल? ही व्युत्पत्ति सायणभाष्यांत नाहीं. किंवा ऋ = ऋत = गत. अपगत व गत ह्यांत फरक काय? चित = जमलेला; अपचित = न जमलेला. हित = ठेवलेला; अन्तर्हित = लपलेला. हे पहिल्या दोन व्युत्पत्तींचे अर्थ होत.

## खंड ३६ वा.

**हिमेनाग्निं घ्रंसमवारयेथां पितुमतीमूर्जमस्मा अधत्तम् ।**
**ऋबीसे अत्रिमश्विनावनीतमुन्निन्यथुः सर्वगणं स्वस्ति( १।११६।८)**
**हिमेन उदकेन ग्रीष्मान्ते अग्निं घ्रंसम् अहर् अवारयेथाम्**

हिमेन = उदकेन. ग्रीष्मान्ते (अध्याहृत) = उन्हाळा संपावयाच्या वेळीं. घ्रंसम् ( निघंटु १।९।६, निरुक्त ६।१९) = अहर् = दिवस. उन्हाळा संपावयाच्या वेळीं हे अश्विनहो, तुम्ही अग्नीसारख्या ( अग्निं ) जाळणाऱ्या दिवसाचें (घ्रंसं) निवारण केलें; प्रखर उन्हाळा झाला तेव्हां तुम्हीं पाऊस पाडला. अग्निं = अग्नीसारखा.

**अन्नवतीं च अस्मै ऊर्जम् अधत्तम् अग्नये**

पितुमतीं = अन्नवतीं = पुरोडाशयुक्त. अस्मै = अस्मै अग्नये. 'च' अध्याहृत व पुरोडाशयुक्त घृत ( ऊर्जे ) ह्याला म्हणजे अग्नीला ( त्याच्या अनुग्रहानें पाऊस पडावा म्हणून ) तुम्हीं त्याला दिलें.

**यः अयम् ऋबीसे पृथिव्याम् अग्निः अन्तर् ओषधिवनस्पतिषु अप्सु**

ऋबीसे = पृथिव्यां = ओषधिवनस्पतिषु अप्सु. ऋबीस म्हणजे पृथिवी; तिच्यांत म्हणजे तिजवरील ओषधि, वनस्पति व पाणी ह्यांच्या आंत असलेला. अत्रिं = अग्निम्; अत्रिं = अद् +त्रिं=खाणाऱ्याला; अग्नि सर्वभक्षक आहे. अवनीतं=अन्तर् =आंत नेलेला.

**तम् उन्निन्यथुः सर्वगणं सर्वनामानम्**

तं अध्याहृत्. सर्वगणं = सर्वनामानं = ( ओषधि वगैरे अग्नीचींच नांवें आहेत) त्या नामगणासह. हे अश्विनांनों, ओषधिरूपानें अग्नीला पृथिवीच्या पोटांतून तुम्हीं बाहेर ( उत् ) आणलें (निन्यथुः). भाष्यांत स्वस्त्ययनाय असा शब्द असावा; कारण तो दुर्गवृत्तींत आहे. स्वस्ति = स्वस्तये = स्वस्त्ययनाय = जगाच्या कल्याणासाठीं.

**गणः गणनात् । गुणः च**

गण् ( मोजणें ) पासून गण; समुदाय मोजला जातो म्हणून तो गण. गुणशब्दही गण्पासूनच; कारण गुणाकारांत विशिष्ट अंक अमुक वेळां मोजला जातो.

**यत् वृष्टे ओषधयः उद्यन्ति प्राणिनः च तत् अश्विनोः रूपम् । तेन एनौ स्तौति स्तौति**

पाऊस पडल्याबरोबर (वृष्टे) ओषधि व गांडुळें वगैरे प्राणी बाहेर येतात; ही जी (यत्) करामत (रूपं) ती (तत्) अश्विनांची; त्या अधिकाराचें ( करामतीचें ) वर्णन करून ऋषि अश्विनांची प्रस्तुत ऋचेंत स्तुति करतो. स्तौति स्तौति ही द्विरुक्ति अध्याय संपला हें दाखविण्याकरितां. अमरकोशांत ऋबीस शब्द नाहीं; आपट्यांच्या कोशांत तो वैदिक म्हणून म्हटलें आहे. ऋबीसपक्वं नाश्नीयात् ( मानव श्रौ० १ । ५ । ६ । १४ ) = पृथिवीच्या पोटांत पक्व झालेलें खाऊं नये (असा निषेध आहे). हा निषेध ज्यानें अग्न्याधान केलें असेल त्याला लागू आहे. हल्लीं उपलब्ध असलेल्या मानवश्रौतसूत्रांत ऋबीसपक्वस्य असा पाठ आहे. ऋबीस शब्दाचा पृथिवी असा अर्थ केल्यानें ऋचेचा भलता अर्थ केला गेला. अत्रि हा प्रसिद्ध ऋषि होऊन गेला; शत्रूंनीं त्याचा अतिशय व नानाप्रकारें छळ केला; त्याला भुयारांत कोंडलें व त्याची उपासमार केली; त्यानें अश्विनांचा धावा केला तेव्हां त्यांनीं त्याजकडे ऊनऊन पेय पाठविलें व अनुयायासह त्याला बाहेर काढलें. शत्रूंनीं त्याला जाळण्याचा प्रयत्न केला; पण अश्विनांनीं बर्फाचा वर्षाव करून आग विझविली. ह्या दोन गोष्टी प्रस्तुत ऋचेंत आहेत. घ्रंसं म्हणजे दिवस नाहीं; घ्रंसं हें 'अग्नि'चे विशेपण आहे; भडकलेल्या (घ्रंसं) आगीचें (अग्निं) तुम्हीं बर्फाचा वर्षाव करून ( हिमेन ) निवारण केलें ( अवारयेथां ) म्हणजे आग त्याच्यापर्यंत येऊं दिली नाहीं. पितु म्हणजे सोमरस; सोमरसपूर्ण ( पितुमतीं ) अन्न ( ऊर्जं ) त्या अत्रीला ( अस्मै ) तुम्हीं दिलें ( अधत्तं ). भुयारांत ( ऋबीसे ) नेलेल्या ( अवनीतं ) अत्रीला ( अत्रिं ) त्याच्या अनुयायांसह ( सर्वगणं ), त्या सर्वांनीं सुख भोगावें ( स्वस्ति ) म्हणून, तुम्हीं बाहेर काढलें असा खरा अर्थ आहे.

---

# अध्याय ७ वा.

## खंड १ ला.

**अथ अतः दैवतम्**

ह्यानंतर (अतः) दैवतकांडाला आरंभ करूं (अथ). अथातोऽनुक्रमिष्यामः (२।५) व तानि अतोऽनुक्रमिष्यामः (४।१) असा नैघंटुक व नैगमकांड ह्यांचा आरंभ केला आहे; अथातो देवतानामानि अनुक्रमिष्यामः असा आरंभ पाहिजे होता.

**तत् यानि नामानि प्राधान्यस्तुतीनां देवतानां तत् दैवतम् इति आचक्षते**

तत् शब्दानें विषयाला -- एथें दैवताच्या लक्षणाला -- आरंभ केला आहे. प्राधान्येन स्तुतयः यासां = ज्यांच्या प्रधानदेवता म्हणून स्तुति केल्या जातात अशांची. स्तुति दोन प्रकारची; देवता (१) प्रधान म्हणून व (२) गौण म्हणून; एका ठिकाणीं प्रधान असलेली देवता दुसरे ठिकाणीं गौण होईल; सूक्त इन्द्रपर असून त्यांत अग्नि आल्यास तो तेथें गौण असतो. कांहीं देवता कधींही प्रधान नसतात; त्या नेहमीं गौणच; याप्रमाणें गौणत्व दोन प्रकारचें असतें. प्राधान्येकरून ज्यांच्या स्तुति केल्या जातात अशा देवतांचीं जीं नांवें त्यांना दैवतकांड म्हणतात. तत् = तानि; तानि (तत्) दैवतम् ह्या लक्षणाची भाषा अपूरी वाटते; नांवें हीं दैवतकांड किंवा ज्या प्रकरणांत अशा नांवांचा विचार केला जातो तें प्रकरण दैवत? निघंटूच्या पांचव्या अध्यायांत देवतांच्या नांवांच्या नुसत्या याद्या आहेत; ह्या यादी दैवतकांड होत. परंतु नैघंटुक, नैगम व दैवत असे शब्द निघंटूंत आले नाहींत. एथील पद्धत भिन्न असल्यामुळें ज्यानें पूर्वषट्क लिहिलें तोच उत्तरषट्काचा कर्ता मानण्यास थोडीशी हरकत आहे. कांड ही संज्ञा निघंटु व निरुक्त ह्या दोहोंतही नाहीं. १।२० त नैघंटुक, नैगम व दैवत ह्यांच्या लक्षणांचा विचार केला आहे. आचक्षते ह्या शब्दानें दैवत वगैरे नांवें जुनीं आहेत हें सिद्ध होतें.

**सा एषा देवतोपपरीक्षा**

हें दैवत प्रकरण म्हणजे देवतांचा बारकाईनें (उप) केलेला विचार (परीक्षा). जसें दैवतं ह्या एकवचनानें तानि ह्याचें तत् झालें, तसें तत् एतत् (दैवतं) ह्यांचें उपपरीक्षा ह्या स्त्रीलिंगामुळें सा (तत्) एषा (एतत्) असें रूपांतर करावें लागलें. ह्या प्रकरणांत प्रत्येक देव व देवता ह्यांचे स्वभाव, कार्य व नांव ह्याविषयीं विचार केला जाईल.

**यत्कामः ऋषिः यस्यां देवतायाम् आर्थपत्यम् इच्छन् स्तुतिं प्रयुङ्क्ते तद्दैवतः स मन्त्रः भवति**

यः कामः यस्य सः = ज्याची जी इच्छा असेल तिनें प्रेरित झालेला. अर्थस्य पतिः अर्थपतिः। तस्य भावः आर्थपत्यम्. आर्थपत्यम् इच्छन् = अमक्या वस्तूचा आपण धनी

व्हावें अशी इच्छा करणारा. यस्यां देवतायां स्तुतिं प्रयुङ्क्ते = ज्या देवतेची स्तुति करतो. सा देवता यस्य स तद्देवतः. तद्देवतः हा पाठ चुकीचा आहे. आपल्याला अमकी एक वस्तु मिळावी म्हणून ज्या देवतेची (एखाद्या मंत्रांत) आपण स्तुति करतों त्या मंत्राची ती देवता होय. ह्या लक्षणांत दोष आहेत. आर्थपत्यम् इच्छन् यस्यां देवतायाम् ऋषिः मन्त्रं प्रयुङ्क्ते तद्देवतः स मन्त्रः भवति अशी लक्षणाची भाषा पाहिजे. यत्कामः हा शब्द व्यर्थ आहे. यत्कामः स्तुतिं प्रयुङ्क्ते तं कामम् आप्नोति असें वाक्य पाहिजे; पण तशा वाक्याची जरूर नाहीं. यत्कामः गाळावयास पाहिजे; स्तुतिं बद्दल मन्त्रं पाहिजे; किंवा येन मन्त्रेण स्तुतिं प्रयुङ्क्ते असें पाहिजे. दुर्ग आर्थपत्यंचा वर दिलेला अर्थ करतो; पण तो त्या शब्दाचा दुसराही अर्थ देतोः- अमकी एक देवता अमका अर्थ देण्यास समर्थ आहे (देवतायाम् आर्थपत्यं) असें जाणून (इच्छन्); पण तो अर्थ ओढून ताणून केला आहे व त्याची जरूरही नाहीं.

**ताः त्रिविधाः ऋचः**

त्या ऋचा तीन प्रकारच्या. स्तुति, मंत्र व ऋक् हे शब्द यास्कानें एकाच अर्थी वापरले आहेत.

**परोक्षकृताः प्रत्यक्षकृताः आध्यात्मिक्यः च**

देवताः यासु परोक्षं कृताः। अथवा। देवतां परोक्षं कृत्वा कृताः = ज्यांत देवता परोक्ष असतात (म्हणजे समोर नसतात) त्या ऋचा परोक्षकृत; किंवा परोक्ष देवतेला उद्देशून रचलेल्या

देवताः यासु प्रत्यक्षं कृताः ताः। अथवा। देवतां प्रत्यक्षं कृत्वा कृताः। ज्यांत देवता प्रत्यक्ष असतात त्या; किंवा प्रत्यक्ष देवतेला उद्देशून केलेल्या.

आत्मनि इति अध्यात्मम्; अध्यात्मम् इमाः आध्यात्मिक्यः = स्वतःसंबंधीं.

**तत्र परोक्षकृताः सर्वाभिः नामविभक्तिभिः युज्यन्ते प्रथमपुरुषैः च आख्यातस्य**

ह्या (तत्र) तिहींत परोक्षकृत ऋचांत ज्याची स्तुति केली असते त्याचें नांव सातांपैकीं कोणत्याही विभक्तीनें युक्त असतें व क्रियापद प्रथमपुरुषीं म्हणजे इंग्रजीभाषेप्रमाणें तृतीयपुरुषीं असतें. ऋचा विभक्तींनीं व तृतीयपुरुषानें युक्त असतात (युज्यन्ते) असा शब्दशः अर्थ.

## खंड २ रा.

**इन्द्रो दिव इन्द्र ईशे पृथिव्याः** (१०।८९।१०)

इंद्राची स्वर्गावर व पृथिवीवर सत्ता आहे. 'इन्द्रः' ही प्रथमा विभक्ति. ऋग्वेदांत ईशे (= ईष्टे) हें तृतीयपुरुषीं आहे.

**इन्द्रमिद्गाथिनो बृहत्** (१।७।१)

गाथा रचणारे (गाथिनः) इंद्रालाच (इन्द्रम् इत्) पुष्कळ (बृहत्) स्तवतात (अनूषत). 'इन्द्रं' ही द्वितीया; 'अनूषत' तृतीय पुरुष. अनूषत ह्या क्रियापदासाठीं

सगळी ऋचा देणें अवश्य होतें; कारण अनूषत ऋचेच्या शेवटीं आलें आहे.

**इन्द्रेणैते तृत्सवो वेविषाणाः (७।१८।१५)**

आपो न सृष्टा अधवन्त नीचीः = पाणी (आपः) सोडलें (सृष्टाः) म्हणजे जसें ( न ) खालीं खालीं (नीचीः) धावत जातें त्याप्रमाणें इंद्रानें जखमी केलेले (वेविषाणाः) हे तृत्सु लोक पळत सुटले (अधवन्त). विष् = जखमा करणें, इजा करणें; वेविषाणाः = विष्यमाणाः. 'इन्द्रेण' तृतीया; 'अधवन्त' तृ० पु०.

**इन्द्राय साम गायत (८।९८।१)**

इंद्राला साम गा. 'इन्द्राय' चतुर्थी; 'गायत' हें मध्यम पुरुषी. हें उदाहरण बरोबर नाहीं. य इन्द्राय वचोयुजा ततक्षुर्मनसा हरी । शमीभिर्यज्ञमाशत (१।२०।२) = ज्या ऋभूंनीं आज्ञा होतांच स्वतःस रथाला जुंपून घेणारे ( वचोयुजा ) घोडे ( हरी ) इंद्राकरितां मनानें (मनसा) तयार केले त्यांना अशा अद्‌भुत कृत्यांबद्दल (शमीभिः) हविर्भाग ( यज्ञं ) मिळाला ( आशत ). 'ततक्षुः' तृ०पु०. 'इन्द्राय' ह्या चतुर्थीशीं पुष्कळ ऋचांत मध्यमपुरुषी क्रियापदाचा संबंध येतो.

**नेन्द्रादृते पवते धाम किंचन (९।६९।६)**

इंद्राशिवाय (जेथें इंद्र नसेल तें) कोणतेंही ( किंचन ) स्थल (धाम) शुद्ध होत नाहीं. 'इन्द्रात्' पञ्चमी; 'पवते' तृ० पु०.

**इन्द्रस्य नु वीर्याणि प्र वोचं (१।३२।१)**

इंद्राचीं (इन्द्रस्य) सर्व शूर कृत्यें (वीर्याणि) मीं मोठ्यानें ( प्र ) वर्णन केलीं आहेत. 'इन्द्रस्य' षष्ठी; 'वोचं' प्रथम पुरुष. षष्ठीचा क्रियापदाशीं संबंध बहुतकरून येत नाहीं; तथापि पूर्वीरिन्द्रस्य रातयो न वि दस्यन्त्यूतयः ( १।११।३ ) अशासारखी ऋचा द्यावयास पाहिजे होती; एथें दस्यन्ति हें तृतीयपुरुषी आहे.

**इन्द्रे कामा अयंसत । इति**

इच्छा (कामाः) इंद्राच्या ठिकाणीं (इन्द्रे) बद्ध आहेत (अयंसत) म्हणजे इंद्राच्या स्वाधीन आहेत. 'इन्द्रे' सप्तमी; 'अयंसत' तृ०पु०. खिलांतली ऋचा देण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. तस्मिन् ब्रह्माणि पूर्वथेन्द्र उक्था समग्मत (१।८०।१६) = त्या इंद्राच्या ठायीं ( तस्मिन् इन्द्रे ) स्तुति (ब्रह्माणि = उक्था) पूर्वींप्रमाणें ( पूर्वथा ) एकवटल्या आहेत (समग्मत). 'प्रथमपुरुषैः च आख्यातस्य' हे शब्द गाळले पाहिजेत; कारण क्रियापद कोणत्याही पुरुषीं असलेलें आढळतें. ही परोक्षकृत ऋचांचीं उदाहरणें होत.

**अथ प्रत्यक्षकृताः मध्यमपुरुषयोगाः त्वम् इति च एतेन सर्वनाम्ना**

मध्यमः पुरुषः मध्यमपुरुषः । मध्यमपुरुषेण योगः यासां ताः. ज्यांचा मध्यम पुरुषी क्रियारूपाशीं व त्वं ह्या सर्वनामाशीं संबंध असतो अशा प्रत्यक्षकृत ऋचा होत. परोक्षकृताच्या लक्षणांत युज्यन्ते हें क्रियारूप होतें; तेंच एथें घालावयास पाहिजे होतें. योगशब्द समासांत असल्यानें सर्वनाम्ना ह्याच्याशीं त्याचा संबंध येत नाहीं; यास्काची भाषा ढिली असते ह्याचें हें उदाहरण होय. नुसतें त्वं हेंच रूप येतें असें नाहीं; युवं,

यूयं अशींही रूपें येतात; कधीं कोणतेंच रूप नसूनही वाक्य द्वितीयपुरुषी आहे हें क्रियापदावरून लक्षांत येतें.

**त्वमिन्द्र बलादधि (१०।१५३।२)**

हे इंद्रा, तूं बलापासून (बलात् अधि) जन्मला आहेस (जातः.) 'जातः' ह्यांत मध्यम पुरुषाचें चिन्ह नाहीं. सहसो जात ओजसः। त्वं वृषन् वृषेदसि अशी ऋचा आहे. हे इन्द्र त्वं बलात् सहसः ओजसः अधि जातः असि। हे वृषन् त्वं वृषा इत् खलु असि. बलात् = सहसः = ओजसः = बलापासून. अधि पंचम्यर्थी आहे. वृषा = दाता. असि मध्यम पुरुष.

**वि न इन्द्र मृधो जहि (१०।१५२।४) इति**

हे इन्द्र नः अस्माकं मृधः शत्रून् विजहि = हे इंद्रा, आमच्या शत्रूंना ठार कर. एथें त्वं नाहीं; वरच्या उदाहरणांत आहे. अशीं हीं दोन उदाहरणें होत ( इति ).

**अथापि प्रत्यक्षकृताः स्तोतारः भवन्ति। परोक्षकृतानि स्तोतव्यानि**

आणखी ( गोष्ट सांगावयाची म्हणजे ) स्तोते प्रत्यक्ष असतात म्हणजे संबोधिले जातात व ज्यांची स्तुति करावयाची असे पदार्थ परोक्ष असतात.

**मा चिदन्यद्विशंसत(८।१।१)। कण्वा अभि प्र गायत(१।३७।१)। उप प्रेत कुशिकाश्चेतयध्वं (३।५३।११)। इति**

अहो मित्रांनो (सखायः), इंद्राखेरीज दुसऱ्याची (अन्यत्) कदापि (चित्) स्तुति करूं नका. अहो कण्वांनो, मरुद्गणाचीच (मारुतं शर्धः) स्तुति करा. अहो कुशिकांनो, जवळ (उप) जलदी (प्र) या (इत) व अग्नि प्रज्वलित करा (चेतयध्वं) अशीं हीं तीन उदाहरणें होत. ह्यांत स्तोते प्रत्यक्ष असून स्तुत्य पदार्थ परोक्ष आहेत.

**अथ आध्यात्मिक्यः उत्तमपुरुषयोगाः अहम् इति च एतेन सर्वनाम्ना**

आध्यात्मिक ऋचांचा उत्तम म्हणजे इंग्रजीप्रमाणें प्रथम पुरुषाशीं व अहं ह्या सर्वनामाशीं संबंध येतो. एथेंही 'योग' शब्द बरोबर नाहीं.

**यथा एतत्। इन्द्रः वैकुण्ठः ( १०।४८ व १०।४९ )। लवसूक्तम् ( १०।११९ )। वागाम्भृणीयम् (१०।१२५) इति**

जसें हें म्हणजे उदाहरणार्थ; विकुंठा नांवाच्या असुरस्त्रीनें तप केल्यामुळें इंद्र तिच्या पोटीं जन्मला; त्यानें ' अहं भुवं० ह्या दोन सूक्तांत आपलें विचार प्रगट केले आहेत. ह्या गोष्टीला ऋग्वेदांत कांहीं आधार नाहीं; विकुण्ठा व वैकुण्ठ हीं नांवेंही नाहींत.सूक्ताचें निदान म्हणून कोणीतरी केव्हांतरी ही गप्प रचली. ह्या सूक्तांत इंद्र बोलत नसून दुसरा कोणीतरी इंद्राची बतावणी करीत आहे. लवाचें रूप घेऊन सोमपान करीत असतांना इंद्राला ऋषींनीं पाहिलें; तेव्हां इंद्र स्वतःचें वर्णन करूं लागला. ह्या गोष्टीलाही आधार नाहीं; लव नांव ऋग्वेदांत नाहीं. सोमपानानें एकाला स्फुरण येतें व त्या आवेशांत तो बढाई मारूं लागतो. महर्षि अंभृण ह्याची ब्रह्मविद्येंत पारंगत झालेली वाक् नांवाची मुलगी ह्या सूक्तांत स्वतःचे विचार

मांडते. ही कथाही पूर्वीप्रमाणेंच. अम्भृग असें पद ऋग्वेदांत (१।१२३।५) आहे व तें एका इंद्रशत्रूचें नांव आहे. अशीं हीं आध्यात्मिक सूक्तें होत. ४।२६, ४।२७,४।४२ १०।१५९, १०।१६६ हींही सूक्तें आध्यात्मिकवर्गांत येतील. 'अहं' विषयक तुरळक ऋचा पुष्कळ आहेत. ८।१४।१ ते ३ ह्यांत भक्त इंद्राला म्हणतोः-इंद्रा, तूं भक्त व मी इंद्र अशी जर स्थिति असती तर तुला मी काय दिलें नसतें ? वर जो सूक्तांचा निर्देश केला आहे त्यांतील प्रत्येकाची पहिली ऋचा घेऊन दुर्गानें तिचें विवरण केलें आहे; ह्या तीन ऋचा भाष्यांत होत्या कीं आध्यात्मिक ऋचांचें स्वरूप दाखविण्याकरितां दुर्गानें ह्या उदाहृत केल्या हें सांगतां येत नाहीं; बहुतकरून दुर्गानेंच त्या उदाहृत केल्या असाव्या.

## खंड ३ रा.

**परोक्षकृताः प्रत्यक्षकृताः च मन्त्राः भूयिष्ठाः । अल्पशः आध्यात्मिकाः**

परोक्षकृत व प्रत्यक्षकृत मंत्रांची संख्या अतिशय आहे; पण आध्यात्मिक मंत्र फारच थोडे आहेत.

**अथापि स्तुतिः एव भवति न आशीर्वादः । इन्द्रस्य नु वीर्याणि प्र वोचं(१।३२) इति यथा एतस्मिन् सूक्ते**

आणखी ( ऋचांसंबंधीं सांगावयाची गोष्ट म्हणजे ) कित्येकांत नुसती स्तुतिच म्हणजे वर्णनच असतें, आशीर्वाद नसतो. जसें इन्द्रस्य० वोचं (खण्ड २ पहा). यथा शब्द व्यर्थ आहे. इति यथा किंवा इति एतस्मिन् सूक्ते एवढें पुरें आहे.

**अथापि आशीः एव न स्तुतिः । सुचक्षाः अहम् अक्षीभ्यां भूयासं सुवर्चाः मुखेन सुश्रुत् कर्णाभ्यां भूयासम् ( मानवगृह्यसूत्र १।९।२५) इति**

कोठें आशीर्वाद असतो, स्तुति नसते. जसें:-डोळयांनीं मी डोळस व्हावें,तोंडानें कांतियुक्त व कानांनीं स्पष्ट ऐकणारा व्हावें. मधुपर्क घेतल्यानंतर जावई हा मंत्र म्हणतो व मंत्र म्हणत असतांना शरीराच्या त्या त्या भागाला स्पर्श करतो. शिवाय आश्वलायनगृह्यसूत्रांत ( ३।६ ) म्हटलें आहे कीं शिंक किंवा जांभई आल्यास, घाणेरडें दृष्टीस पडल्यास, दुर्गंध आल्यास, डोळा लवल्यास किंवा कानांत आवाज झाल्यास हा मंत्र जपावा.

**तत् एतत् बहुलम् आध्वर्यवे याज्ञेषु च मन्त्रेषु**

अध्वर्यूला जे मंत्र म्हणावयाचे असतात त्यांत व यज्ञसंबंधीं मंत्रांत आशीर्वाद फार येतात. तत् एतत् = तें हें म्हणजे आशीर्वाद; बहुलं = पुष्कळ. आध्वर्यवे म्हटल्यावर याज्ञेषु च मन्त्रेषु ह्याची आवश्यकता नाहीं. सोमयागांत आशीर्वचनें जागजागीं सांपडतातः-हे सोमा, तुझें तेज दे, धन दे, भिऊं नकोस म्हणून यजमानाला सांगा हे देवींनो, आम्ही कृतघ्न होणार नाहीं, आम्हांस पीडा करूं नका ( मैत्रा० १।३।३ ). अशी प्रत्येक देवतेला विनंति केलेली आढळते.

**अथापि शपथाभिशापौ । अद्या मुरीय यदि यातुधानो अस्मि (७।१०४।१५)। अधा स वीरैर्दशभिर्वि यूयाः (७।१०४।१५)। इति**

कांहींत ऋषि शपथ घेतो तर कांहींत तो शाप देतो. वसिष्ठाला कोणी तूं जादूगार (यातुधान) आहेस असें म्हटलें तेव्हां तो शपथ घेऊन म्हणतोः—जर मी जादूगार असेन तर आजच्या आज, आतांच, मरेन. पण (जो तूं जादूगार आहेस असा माझ्यावर खोटा आरोप करतो) त्याचा दहाही पुत्रांपासून (वीरैः) ताटातूट होवो म्हणजे ते मरोत. असा वसिष्ठ शाप देतो. शपथश्च अभिशापश्च शपथाभिशापौ. हीं शपथ व शाप ह्यांचीं उदाहरणें.

**अथापि कस्यचित् भावस्य आचिख्यासा । न मृत्युरासीदमृतं न तर्हि (१०।१२९।२)। तम आसीत्तमसा गूह्ळमग्रे (१०।१२९।३)**

कोठें एखाद्या तत्त्वाचें (भावस्य) किंवा वस्तुस्थितीचें वर्णन (आचिख्यासा) केलेलें असतें. आचिख्यासा = कथन. (तेव्हां) मृत्यु नव्हता; अमरत्व (अमृतं) ही नव्हतें; मृत्यु नव्हता म्हणजे सगळे अमर होतें असें नव्हे; तर त्यावेळीं कांहींच नव्हतें. (सृष्टि निर्माण होण्याच्या) अगोदर (अग्रे) तमांत (तमसा) तम लपलेलें होतें (म्हणजे सर्वत्र गाढ अंधकार होता). ही केऑस (Chaos) च्या आधीची स्थिति होय. ह्या दोन ऋचांच्या शेवटीं म्हणजे 'अग्रे' नंतर 'इति' नाहीं; 'इति' नसल्यानें ऋचेला स्वर दिले आहेत; जेथें 'इति' शब्द असतो तेथें ऋचा स्वररहित लिहितात.

**अथापि परिदेवना कस्माच्चित् भावात् । सुदेवो अद्य प्रपतेदनावृत् (१०।९५।१४)। न वि जानामि यदि वेदमस्मि (१।१६४।३७)। इति**

कांहीं परिस्थितीमुळें (भावात्) शोक (वर्णिला) असतो. राजा (सुदेवः) आज स्वर्गास निघून जाईल (प्रपतेत्); तो परत येणार नाहीं (अनावृत् = अपरावर्तमानः). उर्वशी पुरूरव्याला (त्याची विनवणी झुगारून देऊन) सोडून जाते; त्यामुळें वैतागून मी स्वर्गाला निघून जाईन, परत येणार नाहीं अशी तो तिला भीति घालतो. परिदेवना = मन्युपूर्वकः विलापः (दुर्ग) = रागयुक्त शोक. एथें राग आहे पण शोक नाहीं; भेवडावणें आहे. मी हें (शरीर) आहें किंवा (आत्मा) आहें हें मला माहीत नाहीं. मला हें कळलें असतें तर बरें झालें असतें असा हा निंदायुक्त विलाप आहे असें दुर्ग म्हणतो. खेद असेल, शोक नाहीं. अशीं विलापाचीं उदाहरणें होत. परिदेवनेचीं दोन उदाहरणें कां?

**अथापि निन्दा प्रशंसे । केवलाघो भवति केवलादी (१०।११७।६)। भोजस्येदं पुष्करिणीव वेश्म (१०।१०७।१०)। इति**

कोठें निंदा तर कोठें प्रशंसा असते. जो आपण मात्र खातो (केवलादी) त्याला पापच लागतें (केवलघः). केवलः स्वयमेव अत्ति असौ केवलादी; केवलम् अघं यस्य स केवलाघः. एथें आपलपोट्याची निंदा आहे. दात्याचें (भोजस्य) हें घर

कमलिनीसारखें सजलेलें आहे. ह्या सूक्तांत दानशूराच्या प्रत्येक वस्तूची वाखाणणी केली आहे. हीं निंदा व प्रशंसा ह्यांचीं उदाहरणें.

**एवम् अक्षसूक्ते ( १०।३४ ) द्यूतनिन्दा च कृषिप्रशंसा च**

ह्याचप्रमाणें अक्षसूक्तांत जुगारीची निंदा व शेतकीची प्रशंसा केली आहे. निन्दाप्रशंसेचीं वरील उदाहरणें दिल्यावर व इति म्हटल्यावर यास्क त्यासंबंधानें आणखी उदाहरणें खास देणार नाहीं म्हणून हें वाक्य प्रक्षिप्त होय.

**एवम् उच्चावचैः अभिप्रायैः ऋषीणां मन्त्रदृष्टयः भवन्ति**

ह्याप्रमाणें नानाप्रकारच्या ( उच्चावचैः ) अर्थांनीं ( अभिप्रायैः ) भरलेले मंत्र ऋषींना दिसतात. ऋषि ऋचा करीत नाहींत; त्यांना त्या दिसतात.

## खंड ४ था.

**तत् ये अनादिष्टदेवताः मन्त्राः तेषु देवतोपपरीक्षा**

'तत्' ह्यानें विषयास आरंभ केला जातो. आदिष्टाः देवताः येषु ते आदिष्ट-देवताः = ज्यांत देवता सांगितल्या आहेत ते मंत्र आदिष्टदेवत; त्याच्या उलट जे मंत्र ते अनादिष्टदेवत. त्या मंत्रांत देवता कोण त्याचा बारकाईनें ( उप ) विचार ( परीक्षा ) करावयाचा आहे.

**यद्देवतः स यज्ञः वा यज्ञाङ्गं वा तद्देवताः भवन्ति**

ज्या यज्ञांत किंवा यज्ञाङ्गांत मंत्रांचा विनियोग केला असतो त्या यज्ञाची किंवा यज्ञांगाची जी देवता ती त्या मंत्रांची देवता. या देवता यस्य स यद्देवतः । सा देवता येषां ते तद्देवताः. दुर्ग म्हणतोः—अग्निष्टोमाची देवता अग्नि; अग्निष्टोमांत ज्यांत देवता सांगितली नाहीं असा जर मंत्र आला असेल तर त्याची अग्नि ही देवता समजावी. ज्या मंत्रांत देवता संदिग्ध असते त्यांची देवता प्रकरणावरून निश्चित करावी असा नियम आहे. सवनें हीं यज्ञाचीं अंगें होत; प्रातःसवन, माध्यंदिनसवन व तृतीय-सवन ह्यांच्या देवता अनुक्रमानें अग्नि, इंद्र व आदित्य होत; ह्या सवनांत जर अनादिष्ट-देवत असा मंत्र आला तर त्या त्या सवनाप्रमाणें त्या मंत्राची देवता ठरवावी.

**अथ अन्यत्र यज्ञात् प्राजापत्याः इति याज्ञिकाः । नाराशंसाः इति नैरुक्ताः**

पण असे पुष्कळ मंत्र आहेत कीं ज्यांचा यज्ञांत विनियोग केलेला नसतो; अशा यज्ञबाह्य यज्ञाची देवता कोण? त्यांची देवता प्रजापति असें याज्ञिक म्हणतात. अनिरुक्तो हि प्रजापतिः ( मैत्रायणीसंहिता ३।६।५ ) = प्रजापतीला उद्देशून कोण-ताही हवि दिला जात नाहीं; प्रजापति अनिरुक्त व मंत्र अनिरुक्त; म्हणून दोन अनिरुक्तांची जोडी. निरुक्त = स्पष्ट सांगितलेला; ज्यांत देवता स्पष्ट किंवा मुळींच सांगितली नाहीं तो मंत्र अनिरुक्तच; प्रजापतीला हवि द्यावा असें कोठेंही स्पष्ट सांगि-तलें नाहीं म्हणून प्रजापति अनिरुक्त; अनिरुक्त मंत्र अनिरुक्त प्रजापतीचे. नराशंस म्हणजे अग्नि ( ८।६ ). सर्व देवतांत अग्नीला अधिक हवि मिळतात. तेव्हां अना-

दिष्टदेवत मंत्र अग्निपर. 'अग्निर्हि सर्वा देवता' हें वचन यजुःसंहितांत वारंवार येतें. अग्नि म्हणजे सर्व देव; तेव्हां सर्व हवि व सर्व मंत्र अग्नीचे. नराशंस म्हणजे यज्ञ असेंही कित्येक म्हणणारे आहेत ( निरुक्त ८।६ ); यज्ञ सर्व वस्तूंत श्रेष्ठ; यज्ञाहून श्रेष्ठ कांहीं नाहीं; यज्ञापासून सर्व जगत् निर्माण झालें; तेव्हां सर्व मंत्र यज्ञपर म्हणजे अनादिष्ट देवत मंत्राची देवता यज्ञ. नरांची म्हणजे मनुष्यांची ज्यांत स्तुति केली असते ते मंत्र नराशंस; म्हणजे अशा मंत्रांची देवता मनुष्य; पण मनुष्याची बुद्धि किती तरी अल्प ! त्याची स्तुति गूढार्थमंत्र करतील काय ?

**अपि वा सा कामदेवता स्यात् । प्रायोदेवता वा**

किंवा अशा मंत्राची इच्छेनुरूप ( काम ) देवता होईल. अशा मंत्रांत जीं विशेषणें असतील तीं अमक्या देवतेला उद्देशून आहेत असें ठरवितां येत नाहीं; तेव्हां आपण त्या मंत्राची वाटेल ती देवता कल्पावी. कामेन कल्पिता देवता कामदेवता. प्रायः म्हणजे अधिकार ( दुर्ग ); ज्या मंत्रसमूहांत अनादिष्टदेवत मंत्र असतो त्या समूहाची जी देवता ती त्या मंत्राची देवता. त्या समूहांत अमक्या एका देवतेचा अधिकार असतो म्हणजे त्या देवतेला उद्देशून ते मंत्र असतात. किंवा प्रायः म्हणजे बाहुल्य ( दुर्ग ).

**अस्ति हि आचारः बहुलं लोके देवदेवत्यम् अतिथिदेवत्यं पितृदेवत्यम्**

देवतान्तात् तादर्थ्ये यत् ( पा० ५।४।२४ ) = समासाच्या शेवटीं देवता शब्द असून त्याला तदर्थे ( त्याच्यासाठीं ) ह्याअर्थी यत् प्रत्यय लागतो. अग्निः देवता अग्निदेवता । अग्निदेवतायै इदं ( हविः ) अग्निदेवत्यम्. देवाः देवता देवदेवता । अतिथयः देवता अतिथिदेवता । पितरः देवता पितृदेवता । देवदेवतायै इदं देवदेवत्यं वगैरे. सगळ्या देवांचा, सगळ्या अतिथींचा व सगळ्या पितरांचा एक एक गट; त्यांच्याकरितां जो हवि तो देवदेवत्यं वगैरे. लोकांत विस्तृत ( बहुलं ) असा आचार म्हणजे पद्धत आहे; तो आचार म्हणजे विशिष्ट देवता, विशिष्ट अतिथि व विशिष्ट पितर् ह्यांना हवि दिल्यावर बाकीचें अन्न सगळ्यांना मिळून द्यावयाचें. त्याप्रमाणें पुष्कळ मंत्र विशिष्ट देवतांना उद्देशून असतात; बाकीच्या राहिलेल्या मंत्रांची देवता सर्व देव होत. प्रायः शब्दाचा हाच अर्थ बरोबर दिसतो. बहुलं शब्द नपुंसक आहे ( निरुक्त २।२४ ). अनादिष्टदेवता मंत्रांसंबंधीं इतकीं भिन्न मतें सांगितलींत पण निर्णय काय ? उत्तर

**याज्ञदैवतः मन्त्रः इति**

यज्ञस्य अयं याज्ञः । देवतानाम् अयं दैवतः अशा मंत्रांची देवता यज्ञ होईल किंवा सर्व देव होतील. दुर्ग म्हणतोः—विष्णुर्वै यज्ञः ( तै. सं. ५।२।८।७ ) =यज्ञ म्हणजे विष्णु; विष्णु म्हणजे आदित्य असें नैरुक्तमत आहे. द्युलोकचे सर्व देव आदित्यच; तेव्हां असे मंत्र आदित्यपर किंवा अग्निर्वै सर्वा देवता ह्या ब्राह्मणवचनाप्रमाणें अग्निपर (दैवत). कोठें आदित्यपर तर कोठें अग्निपर असा निर्णय. 'इति' शेवटला निर्णय दाखविण्यासाठीं.

यास्क निर्णय देण्याच्या खटपटींत पडत नसतो; तो निरनिराळीं मतें देतो. यज्ञः एव देवता यज्ञदेवता। यज्ञदेवतायाः अयं याज्ञदैवतः असा कदाचित् अर्थ होईल; असें मंत्र यज्ञदेवत मानावेत. दुर्ग म्हणतोः—यद्देवतः स यज्ञः ह्याचा दुसऱ्या तऱ्हेनेंही अर्थ करतां येईल. तो असाः—यज्ञ म्हणजे हवि. सांनाय्य नांवाचा हवि असतो; तो प्रकृतियागांत इन्द्रपर किंवा महेंद्रपर असतो; ह्या हवीच्या संस्करणप्रसंगीं 'इषेत्वा ऊर्जेत्वा' हा मंत्र म्हणावयाचा असतो; त्या मंत्रांत देवता सांगितली नाहीं; तथापि तो इन्द्रपर किंवा महेन्द्रपर समजावा. कुविदङ्ग (ऋ. सं. १।१३१।२) हाही अनाविष्कृतदेवत मंत्र आहे; प्राजापत्यहवि घेण्याच्या वेळीं तो म्हणतात; म्हणून त्याची प्रजापति ही देवता. ध्रुवा घृतानें भरून दर्भावर ठेवावयाची असते; हें कर्म दर्शपूर्णमासाचें अंग होय; त्यावेळीं 'ऋषभोऽसि शाक्वरः (मैत्रायणींसंहिता १।१।१२) हा मंत्र म्हणावयाचा असतो; ह्या मंत्रांत देवता सांगितली नाहीं; तथापि हें अंग प्रजापतिपर असल्यामुळें तो मंत्रही प्राजापत्य. यज्ञाखेरीज मंत्रांचा विनियोग मुंज, ब्रह्मयज्ञ, जप, प्रायश्चित्त अशा कर्मांत करावयाचा असतो. देवता, ऋषि वगैरे ज्यांचे माहीत नाहींत असे मंत्र जर कोणी म्हणेल किंवा म्हणवील तर तो नरकांत पडेल असा कडक नियम असल्यामुळें देवता कोठली तरी आणलीच पाहिजे. उपाकरणादि कर्में प्रजापतिपर असतात; तेव्हां त्यांत म्हणावयाचे अनाविष्कृतदेवत मंत्रही प्रजापतिपर असे याज्ञिक म्हणतात. नराशंस म्हणजे सूर्य किंवा अग्नि; तेव्हां असे मंत्र सौर्य किंवा आग्नेय असें नैरुक्तांचें मत. अशा मंत्रांची देवता आपल्याला वाटेल ती कल्पावी; किंवा आपल्या मनांतली इच्छा (काम) जी पूर्ण करील ती देवता कल्पावी. प्रायोदेवता ह्याचा निराळा अर्थ नाहीं.

**अपि हि अदेवताः देवतावत् स्तूयन्ते। यथा अश्वप्रभृतीनि ओषधिपर्यन्तानि (निघंटु ५।३)**

जे पदार्थ किंवा प्राणी देवता नाहींत ते देवता आहेत (देवतावत्) असें कल्पून त्यांची स्तुति वेदांत केली आहे. वत् प्रत्ययाचा विशिष्ट अर्थ आहे (निरुक्त २। १६ व २।२३). निघंटु ५।३ त अशा पदार्थांची व प्राण्यांची नामावली दिली आहे; त्यांत अश्व हें पहिलें व ओषधि हें शेवटलें नाम.

**अथापि अष्टौ द्वन्द्वानि (निघंटु ५।३।२९-३६)**

ह्या खंडांतील शेवटलीं आठ नांवें जोड्या होत (जसें उलूखल मुसले). ह्या तिसऱ्या खंडाचा विचार निरुक्ताच्या नवव्या अध्यायांत केला आहे.

**स न मन्येत आगन्तून् इव अर्थान् देवतानाम्**

गुर्जरपाठ अर्थां किंवा अर्थानां असा आहे; तो चुकीचा आहे. अश्व वगैरे देवता नसून देवतांच्या आगंतुक वस्तूसारख्या आहेत असें आक्षेपकानें मत देऊं नये. मनुष्यांप्रमाणें देवतांना कांहीं वस्तु उपभोगाकरितां लागतात; त्या नाहींत तर देवपण नाहीं असें मात्र नाहीं; देहाखेरीज प्राणी नाहीं; पण घरदार नसेल तर प्राणी नाहीं

असें कदापि म्हणतां येणार नाहीं. जसें घरेंदारें मनुष्य नव्हत तसें घोडे वगैरे देवता नव्हत असें कोणी म्हणूं नये.

**प्रत्यक्षदृश्यम् एतत् भवति**

ह्या वस्तूही देवता आहेत हें प्रत्यक्ष दृष्टोत्पत्तीस येतें असा मी अर्थ करतों. पण दुर्ग निराळा अर्थ करतो; तो म्हणतोः–ह्या वस्तु देवता नाहींत हें उघड आहे; घोडे, रथ वगैरे मनुष्याचीं उपभोगसाधनें होत; त्यांना जशी मनुष्यही संज्ञा देतां येत नाहीं तशी देवतांच्या घोडे, रथ वगैरेंना देवता ही संज्ञा देतां येत नाहीं. हा अर्थ प्रथमदर्शनीं योग्य वाटतो; पण यास्क 'स न मन्येत' ह्यानें प्रारंभ करतो व कां मानूं नये ह्याचीं कारणें देतो. प्रत्यक्षदृश्यम् एतत् भवति एथून कारणें देण्याला सुरवात होते. शिवाय 'स न मन्येत आगन्तून् इव अर्थान् देवतानां' व 'प्रत्यक्षदृश्यम् एतत् भवति' हीं दोन वाक्यें एकत्र कशीं करतां येतील? यास्क हा श्रद्धावान् असल्यामुळें अश्वादि वस्तु देवता आहेत हें उघड आहे असें म्हणेलच.

**माहाभाग्यात् देवतायाः**

महान् भागः यस्याः सा महाभागा। तस्याः भावः माहाभाग्यम्. भाग म्हणजे ऐश्वर्य; प्रत्येक देवतेचा भाग मोठा असतो. तो इतका कीं, तिला पाहिजे त्या वस्तूचें रूप धारण करतां येतें.

**एकः आत्मा बहुधा स्तूयते। एकस्य आत्मनः अन्ये देवाः प्रत्यङ्गानि भवन्ति**

आत्मा एक; पण त्याची अनेक प्रकारें, अनेक रूपांनीं, स्तुति केलेली आढळते. आत्मा एक; पण (आत्म्याहून भिन्न दिसणारे) इतर देव त्याचीं प्रत्यंगें म्हणजे अंगें होत. एथें प्रत्यङ्ग शब्द अङ्ग ह्याअर्थी वापरला आहे; पण दुर्ग म्हणतोः– अग्नि, इंद्र व सूर्य हे आत्म्याचीं अंगें व ह्या तीन देवांचीं अन्य स्वरूपें व अश्वादि पदार्थ हे आत्म्याचीं प्रत्यंगें होत. पण यास्क अंगें तीन असें सांगत नाहीं. 'माहाभाग्यात् देवतायाः' एथील देवता म्हणजे आत्मा व त्या एका देवतेचीं दुसरे देव अंगें होत असा दुर्ग अर्थ करतो. मीं निराळा अर्थ केला आहे.

**अपि च सत्त्वानां प्रकृतिभूमभिः ऋषयः स्तुवन्ति इति आहुः**

प्रकृतेः भूमानः तैः = प्रकृति म्हणजे आत्मा; त्याचे अनेक विकार (भूमानः) त्यांनीं. शिवाय सत्त्व म्हणजे पदार्थ; हे पदार्थ प्रकृतिभूत जो आत्मा त्याचे असंख्य विकार होत; म्हणूनच ऋषि त्या पदार्थांची स्तुति करतात असें आत्मवादी म्हणतात. कोण म्हणतात हें सांगितलें नाहीं. सत्त्वानां स्तुवन्ति हें वेडेवाकडें संस्कृत आहे; सत्त्वानि स्तुवन्ति असें पाहिजे. प्रकृतिभूमभिः = प्रकृतिभूमानः इति कृत्वा असा अर्थ करावा लागतो.

**प्रकृतिसार्वनाम्यात् च**

सर्वाणि नामानि सर्वनामानि। तेषां भावः सार्वनाम्यम्. प्रकृतेः सार्वनाम्यम्=(ह्या जगतांत जीं नांवें आहेत तीं) सर्व नांवें प्रकृतीचीं म्हणजे आत्म्याचीं. दुर्ग म्हणतोः–नतिमात्रं नाम नमनं संज्ञा। सर्वत्वेन नाम सर्वनाम। प्रकृतेः सर्वनाम प्रकृतिसर्वनाम। तस्य

भावः = नाम म्हणजे नति, नमन, संज्ञा; प्रकृतिच नांवानें सर्व, म्हणजे सर्व ही प्रकृतीची संज्ञा; सर्व वस्तु प्रकृतिच. असा अर्थ केल्यास सत्त्वानां प्रकृतिभूमभिः स्तुवन्ति व प्रकृतिसार्वनाम्यात् ह्या दोहोंत भेद नाहीं. कांहीं पोथ्यांत सार्वनाम्यात् असा पाठ आहे तो चुकीचा आहे.

**इतरेतरजन्मानः भवन्ति । इतरेतरप्रकृतयः**

इतरेतरात् जन्म यासां ताः = ज्यांचा एकमेकापासून जन्म होतो अशा. अग्नीपासून प्रातःकाळीं सूर्य जन्मास येतो; पण सायंकाळीं सूर्यापासून अग्नि जन्मतो. दक्षापासून अदिति व अदितीपासून दक्ष. असा प्रकार देवतांमध्येंच घडतो. देवतांच्या प्रभावाचें हें एक उदाहरण होय. इतरेतरे प्रकृतिः यासां ताः = देवता परस्परांच्या प्रकृति म्हणजे जनक होत. इतरेतर जन्मानः व इतरेतरप्रकृतयः ह्या दोहोंचा अर्थ एकच; इतरेतरप्रकृतयः हें प्रक्षिप्त असावें. इतरेतरजन्मानः म्हणजे इतरेतरप्रकृतयः असें दुर्ग म्हणतो. कोणी म्हणेल देव जन्म घेतात कशाला? उत्तर

**कर्मजन्मानः । आत्मजन्मानः । आत्मा एव एषां रथः भवति । आत्मा अश्वाः । आत्मा आयुधम् । आत्मा इषवः । आत्मा सर्वं देवस्य देवस्य इति**

कर्मार्थं कर्मफलसिद्ध्यर्थं जन्म यासां ताः = लोक जीं धार्मिक कर्में करतात तीं देव नसतील तर सफळ कशीं होतील? आत्म्यानें देवांचीं रूपें घेतल्याशिवाय कर्मांना सफलता नाहीं; म्हणून आत्मनः जन्म यासां ताः = सर्व देवता आत्म्यापासून जन्मतात. ह्यांचा (देवांचा) रथ म्हणजे आत्माच; घोडे आत्मा; आयुध आत्मा; बाण आत्मा; देवांचें सर्व कांहीं आत्मा. गुर्जरपाठांत अश्वाः नसून अश्वः आहे; पण रथाला पुष्कळ घोडे लावतात. आत्मा एव० देवस्य हें वाक्य कोठून घेतलें तें कळत नाहीं.

## खंड ५ वा.

**तिस्रः एव देवताः इति नैरुक्ताः । अग्निः पृथिवीस्थानः । वायुः वा इन्द्रः वा अन्तरिक्षस्थानः । सूर्यः द्युस्थानः**

देवता तीनच असें नैरुक्त म्हणतात; पृथिवीवर राहणारा अग्नि, अंतरिक्षांत राहणारा वायु किंवा इन्द्र, द्युलोकीं राहणारा सूर्य अशा त्या तीन देवता होत. पृथिवीवर व द्युलोकीं एकैकच देवता असून अंतरिक्षांत दोन देवता असण्याचें कारण अग्नि व सूर्य ह्यांचें एकच रूप असतें; पण अंतरिक्षांतील देवतेचीं दोन रूपें आहेत; (१) वायुरूप; वायु हा सतत वाहतो; (२) विद्युद्रूप; वीज पावसाळ्यांत दिसते; वीज हें इंद्राचें रूप असें दुर्ग म्हणतो.

**तासां माहाभाग्यात् एकैकस्याः अपि बहूनि नामधेयानि भवन्ति**

त्या तीनही देवता महाभाग म्हणजे ऐश्वर्ययुक्त असल्यामुळें एकेकीला अनेक नांवें असतात. ऐश्वर्यामुळें ह्या तीन देवतांना अनेक रूपें धारण करता येतात व रूपांवरून निरनिराळीं नांवें पडतात. पुष्कळ नांवें पडण्याचें हें कारण असेल किंवा

**अपि वा कर्मपृथक्त्ववात्। यथा होता अध्वर्युः ब्रह्मा उद्गाता इति अपि एकस्य सतः**

निरनिराळ्या कृतींमुळें हीं नांवें पडलीं असतील; अडचणीमुळें चार ऋत्विज् न मिळाल्यामुळें एकालाच चौघांचीं कामें करावीं लागतात. शस्त्र म्हणतांना होता, स्तोत्र म्हणतांना उद्गाता, हवि देतांना अध्वर्यु, यज्ञांत येणाऱ्या अडचणी दूर करतांना ब्रह्मा अशीं एकालाच चार नांवें पडतात. दुर्ग म्हणतोः—कुण्डपायिनाम् अयनं म्हणून एक यज्ञ आहे; त्यांत ७ जणांना दीक्षा घ्यावी लागते; यजमान वगळून सहा जणांना १६ ऋत्विजांचीं कामें करावीं लागतात व त्या त्या कामाप्रमाणें त्यांना निराळीं नांवें पडतात. पण दुर्गानें दिलेलें उदाहरण बरोबर नाहीं; कारण ह्या सहांत होता वगैरे ४ जण असतातच.

**अपि वा पृथक् एव स्युः। पृथक् हि स्तुतयः भवन्ति। तथा अभिधानानि**

किंवा देवता तीन नसून अनेक नांवांप्रमाणें अनेक देवता असतील; कारण ह्या अनेक देवतांच्या स्तुति परस्परापासून अगदीं वेगळ्या असतात. तशींच नांवेंहि भिन्न असतात. स्तुति भिन्न व नांवें भिन्न ह्यावरून देवता तीन नसून अनेक असाव्यात. हीं तीन कारणें यास्क पुढीलप्रमाणें खोडून टाकतो.

**यथो एतत् कर्मपृथक्त्वात् इति। बहवः अपि विभज्य कर्माणि कुर्युः। तत्र सस्थानैकत्वं। संभोगैकत्वं च उपेक्षितव्यम्**

भिन्न कर्मांमुळें एकालाच भिन्न नांवें पडतात असें जे म्हणतात त्यांना उत्तर (तिघांनींच सर्व कामें न करतां) अनेक देवता तीं कामें वाटून करतील. तर मग सर्व देवता एक हें जें मत तें टाकून द्यावयाचें कीं काय? उत्तर समानं स्थानं सस्थानं एकाच ठिकाणीं असणाऱ्या देवतांचें सहवासापुरतें एकत्व. संभोगेन एकत्वं = संभोग म्हणजे एकमेकांच्या उपयोगीं पडणें; त्यानेंही एकत्व उत्पन्न होतें. असें हें दोन प्रकारचें एकत्व आहे; तें लक्षांत घेणें जरूर आहे. वेदांती एक आत्मा मानतात; नैरुक्त तीन देवता व याज्ञिक अनेक देवता मानतात. याज्ञिकांना पहिले दोन पक्ष मान्य नाहींत; तेव्हां प्रतिपक्षी - विशेषेकरून वेदांती - विचारतो कीं देवतैकत्व नाहींच कीं काय? त्याला याज्ञिकांचें उत्तरः—खरे एकत्व नाहीं; जें आहे तें सापेक्ष आहे. संभोग म्हणजे एकमेकांच्या उपयोगी पडणें किंवा एका कार्यांत अनेकांनीं गुंतणें हा अर्थ आपल्यांच्या कोशांत नाहीं. अमरांत संभोगशब्द नाहीं. कांहीं पोथ्यांत संस्थानैकत्वं असा पाठ आहे; तो चुकीचा आहे.

**यथा पृथिव्यां मनुष्याः पशवः देवाः इति स्थानैकत्वं च संभोगैकत्वं च दृश्यते**

उदाहरणार्थ (यथा) पृथिवीवर माणसें, पशु व देव राहतात; तेव्हां त्यांच्यामध्यें जें एकत्व ते पृथिवीमुळें होय; त्यांच्यांत खरे एकत्व नाहीं; ते परस्परांहून भिन्न आहेत. माणसें, जनावरें व देव परस्परांच्या उपयोगी पडतात म्हणून संभोगैकत्व. माणसें जनावरांना खावयास घालतात; जनावरें माणसाला दूध देतात, नांगर, गाड्या ओढतात; देव पाऊस, ऊन पाडून दोघांच्याही उपयोगी पडतात; देवांना मनुष्यांकडून

घृत, मांस वगैरे मिळतें. अशा प्रकारचें एकत्व आपण पाहतों. सस्थानैकत्वं व स्थानैकत्वं असे भिन्न शब्द न वापरतां कोणता तरी एक शब्द वापरणें योग्य आहे; मूळ शब्द कोणता तें ठरवितां येत नाहीं.

**यथा पृथिव्याः पर्जन्येन च वाय्वादित्याभ्यां च संभोगः। अग्निना च इतरस्य लोकस्य**

जसें पृथिवीच्या उपयोगी पाऊस, वारा व सूर्य पडतात. अंतरिक्ष व द्युलोक ह्यांना अग्नि उपयोगी पडतो. संभोगैकत्वं एकाच ठिकाणीं असतें असें नाहीं; भिन्न लोकीं राहणारे देव एकमेकांच्या उपयोगी पडतात. इतर लोक अग्नीच्या उपयोगी कसे पडतात? पर्जन्य, वायु व आदित्य ह्यांना पृथिवी हवि देते; अग्नीलाही हवि पृथिवीच देते.

**तत् एतत् नरराष्ट्रम् इव**

एकत्व व अनेकत्व हीं नरराष्ट्राप्रमाणें होत. नर अनेक; तथापि राष्ट्र ह्या दृष्टीनें ते एकच. तसेच देव अनेक; पण संघ ह्या दृष्टीनें ते एकच. चौथ्या खंडाच्या शेवटीं आत्मा एक व सर्व वस्तु म्हणजे आत्मा असें एकत्व सांगितलें; ह्या खंडांत नैरुक्त तीन देवता मानतात असा आरंभ करून त्या कोणत्या तें सांगितलें; ह्या तिहींपैकीं प्रत्येक देवतेला ऐश्वर्यामुळें किंवा त्यांना भिन्न कामें करावीं लागतात त्यामुळें अनेक नांवें पडतात; याज्ञिक म्हणतात कीं भिन्न कर्मांमुळें भिन्न नांवें पडतात हें म्हणणें बरोबर नाहीं; जितकीं नांवें तितक्या देवता हेंच म्हणणें बरोबर होय; ह्या विधानानें एकत्वाला बाध येतो हें खरें. याज्ञिकांच्या मतें एकत्व सापेक्ष आहे, खरोखरीचें नाहीं. यास्क नैरुक्त असल्यामुळे देवतात्रित्वपक्ष त्याला मान्य होता असें गृहित धरलें पाहिजे. अंतरिक्षांत वायु व इंद्र अशा दोन देवता कां ह्या आक्षेपाला दुर्गानें दिलेलें उत्तर समाधानकारक नाहीं. अंतरिक्षांत दोन कर्मे चालतात; तीं दोन कर्मे वारा वाहणें व पावसाळ्यांत वीज चमकणें. ह्या दोन कर्मांमुळें जर दोन देवता तर अग्नीला देवांना खालीं आणावें लागतें, हवि पोचवावे लागतात, प्रकाश पाडावा लागतो; तेव्हां पृथिवीवरही तीन देवता पाहिजेत. त्याचप्रमाणें द्युलोकीं सूर्य उगवतो, पृथिवीवरील रस वाफेच्या रूपानें तो वर नेतो, पाऊस पाडतो; तेव्हां तेथेंही एकाहून अनेक देवता पाहिजेत. अंतरिक्षांत दोन देवता कां ह्याचें समाधानकारक उत्तर मला माहीत नाहीं.

## खंड ६ वा.

**अथ आकारचिन्तनं देवतानाम्। पुरुषविधाः स्युः इति एकम्**

आतां देवतांच्या आकाराविषयीं विचार करूं. देवताकारचिंतनं असा एक समास असणें इष्ट आहे. पण यास्काची भाषा लौकिक असते; तींत शास्त्रीय सुबद्धता नसते. पुरुषाणां विधा इव विधा यासां ताः = मनुष्यांच्या स्थितीप्रमाणें स्थिति (विधा) आहे ज्यांची त्या. देवता मनुष्याप्रमाणें असाव्यात असें एक मत आहे. 'मतं' अध्या-

हृत. विधाः ह्यांतील विसर्ग गुर्जरपाठ व महाराष्ट्रपाठ ह्या दोहोंतही गाळला आहे ह्याचें कारण विसर्गानंतर स्युः आलें आहे हें. विधा = प्रकार, स्थिति. मनुष्यासारख्या देवता असतात असें म्हणण्याचीं कारणें पुढीलप्रमाणें

**चेतनावद्वत् हि स्तुतयः भवन्ति। तथा अभिधानानि**

चेतना विद्यते येषां ते चेतनावन्तः। चेतनावतां स्तुतयः इव (वत्) स्तुतयःभवन्ति पहिला वत् मतुबर्थी; दुसरा तुल्यार्थी. सचेतनांच्या जशा स्तुति असतात तशाच देवतांच्या स्तुति असतात. देवतांचीं नांवेंही सचेतनांच्या नांवांप्रमाणेंच असतात. सचेतनांत जनावरेंही येतात; म्हणून पुरुष शब्द वापरावयास पाहिजे होता.

**अथापि पौरुषविधिकैः अङ्गैः संस्तूयन्ते। ऋष्वा त इन्द्र स्थविरस्य बाहू (६। ४७।८)। यत्संगृभ्णा मघवन् काशिरित्ते (३।३०।५)**

पुरुषस्य अयं पौरुषः। पौरुषः विधिः येषां तानि; पौरुषविधि + कं = पौरुषविधिकं; क प्रत्यय पा० ५।४।१५४ यानें. विधिः = विधा = प्रकार. विधा किंवा विधि असा एकच शब्द सर्वत्र वापरणें इष्ट होय. अङ्ग = अवयव. संस्तूयन्ते = वर्ण्यन्ते. देवतांना मनुष्यांच्या अवयवांप्रमाणें अवयव असतात अशीं वर्णनें आढळतात. जसें:— हे इंद्रा, तूं लठ्ठ (स्थविरस्य) व तुझे बाहूही लठ्ठ (ऋष्वा = ऋष्वौ). स्थविर व ऋष्व ह्या दोहोंचाही अर्थ लठ्ठ, जाड. 'इमे चिदिन्द्र रोदसी अपारे' हे आधींचे शब्द. हे मघवन् इन्द्र यत् यस्मात् इमे अपारे रोदसी चित् अपि संगृभ्णाः समगृण्हाः तस्मात् ते तव इत् एव काशिः = हे इंद्रा, अफाट असे द्युलोक व पृथिवीलोक हेही ज्याअर्थी तूं मुठींत पकडतोस त्याअर्थी मूठ म्हणावी तर तुझीच. मनुष्यांना बाहू व मूठ असते त्याप्रमाणें देवांना.

**अथापि पौरुषविधिकैः द्रव्यसंयोगैः। आ द्वाभ्यां हरिभ्यामिन्द्र याहि (२।१८।४)। कल्याणीर्जाया सुरणं गृहे ते (३।५३।६)**

संस्तूयन्ते अध्याहृत. शिवाय मनुष्यांप्रमाणें देवांचाही बाह्यवस्तूंशीं संबंध वर्णिला आहे. इंद्रा, दोन (चार, सहा, आठ, दहा, तुला वाटेल तितके) घोडे घेऊन (सोम पिण्याला) ये (आ याहि). (इंद्रा, तूं सोम प्यायलास; आतां ताबडतोब घरीं जा; अरे कां थांबलाहेस?) घरीं सुंदर (कल्याणीः) बायको आहे; मनोरंजक (सुरणं) सर्व कांहीं तेथें आहे. कल्याणीः = सुंदर किंवा रंजविणारी. सुरणं = मनोरंजन करणारें. घोडे, बायको ह्या सर्व बाह्य वस्तु.

**अथापि पौरुषविधिकैः कर्मभिः। अद्धीन्द्र पिब च प्रस्थितस्य (१०।११६।७)। आ श्रुत्कर्ण श्रुधी हवम् (१।१०।९)**

संस्तूयन्ते अध्याहृत. शिवाय मनुष्यांप्रमाणें देवही कामें करतात अशीं वर्णनें आहेत. इंद्रा, (तुजसाठीं हा सोम रस काढला आहे; तुजसाठीं पुरोडाश भाजला आहे;) हा पुरोडाश खा (अद्धि) आणि तुजकडे पाठविलेला (प्रस्थितस्य) हा सोम पी. हे तिखट कानाच्या इंद्रा, माझें बोलावणें ऐक. आ = सर्व दिशांतील, आसमंतात्

भागांतील (आवाज). श्रुत् = ऐकणारे. आश्रुतौ कर्णौ यस्य स त्वम्. खाणें, पिणें, ऐकणें ह्या मनुष्यांच्या क्रिया देवांतही असतात. ह्या सर्व कारणांमुळें देव मनुष्यांसारखेच असले पाहिजेत.

**अपुरुषविधाः स्युः इति अपरम्**

माणसांप्रमाणें देवता नसाव्यात असें दुसरें मत.

**अपि तु यद् दृश्यते**

तु ह्या निपातानें वरील पुरुषविधत्व खोडून टाकतों असें दर्शविलें जातें. आतां माणसांतल्यासारखें जें कांहीं देवतांत दिसते. ह्या अर्धवट वाक्याची समाप्ति पुढील खंडांत.

## खंड ७ वा.

**अपुरुषविधं तत्। यथा अग्निः वायुः आदित्यः पृथिवी चन्द्रमाः इति**

तें मनुष्यांसारखें नव्हे; अग्नि, वायु वगैरे इंद्रियगोचर देव होत; त्यांच्यांत मनुष्यांसारखें कांहीं नाहीं. त्याप्रमाणें इंद्रियगोचर जे नाहींत त्या इंद्रादि देवांनाही तीच गोष्ट लागू.

**यथो एतत्। चेतनावद्वत् हि स्तुतयः भवन्ति इति। अचेतनानि अपि एवं स्तूयन्ते। यथा अक्षप्रभृतीनि ओषधिपर्यन्तानि ( निघंटु ५।३।४ ते २२ )**

पुरुषविधत्व सिद्ध करणारे म्हणतात कीं देवांची सचेतनांना लागू पडेल अशी स्तुति केली आहे; त्याला उत्तरः— अचेतन वस्तूंचीही सचेतनांच्यासारखी स्तुति केलेली आढळते. जसें अक्षांपासून ओषधींपर्यंतच्या अचेतन वस्तूंची स्तुति केलेली आढळते.

**यथो एतत् पौरुषविधिकैः अङ्गैः संस्तूयन्ते इति। अचेतनेषु अपि एतद्भवति। अभिक्रन्दन्ति हरितेभिरासभिः ( १०।९४।२ ) इति ग्रावस्तुतिः**

देवांना मनुष्यांच्यासारखे अवयव असतात; त्याला उत्तरः— अचेतन वस्तूंच्या वर्णनांतही ही गोष्ट आढळते. (दारूच्या निशेंत लोक जसे आरडाओरड करतात तसे). सोम ठेचणारे ग्रावे पिवळ्या झालेल्या ( हरितेभिः ) तोंडांनीं ( आसभिः ) आनंदानें आरोळ्या ठोकतात ( अभिक्रन्दन्ति ) असें हें ग्राव्यांचें वर्णन आहे.

**यथो एतत्। पौरुषविधिकैः द्रव्यसंयोगैः इति। एतद् अपि तादृशम् एव। सुखं रथं युयुजे सिन्धुरश्विनम् ( १०।७५।९ ) इति नदीस्तुतिः**

मनुष्यांप्रमाणें देवांचा बाह्य वस्तूंशीं संबंध असलेला वर्णिलेला आढळतो; त्याला उत्तरः- हेंही तसेंच म्हणजे वरीलप्रमाणेंच. सिंधु सुखानें चालणारा म्हणजे दचके न देणारा अश्वयुक्त रथ जोडती झाली हें नदीचें वर्णन आहे.

**यथो एतत्। पौरुषविधिकैः कर्मभिः इति। एतद् अपि तादृशम् एव। होतुश्चित्पूर्वे हविरद्यमाशत ( १०।९४।२ ) इति ग्रावस्तुतिः एव**

माणसांप्रमाणें देव कृत्यें करतात; त्याला उत्तर:— हेंही तसेंच. होता जो अग्नि त्याच्याही आधीं भक्षणीय हवि (सोमरस) हे ग्रावे खातात असें पुन्हां ग्राव्यांचेंच वर्णन आहे.

**अपि वा उभयविधाः स्युः**

किंवा देवता साकार व निराकार अशा दोन्ही प्रकारच्या असतील.

**अपि वा अपुरुषविधानाम् एव सताम् एते कर्मात्मानः स्युः। यथा यज्ञः यजमानस्य**

देवता वस्तुतः अपुरुषविध; असें असूनही पुरुषविध दिसणारे देव त्यांचे कर्मात्मे असतील; म्हणजे कांहीं कारणाकरितां, कर्में करण्याकरितां, त्यांनीं देह धारण केला असेल. हा 'अपि वा उभयविधाः स्युः' ह्याचाच विस्तार किंवा विवरण असावें; वास्तव पुन्हां 'अपि वा' नको होतें. जसा यजमानाचा कर्मात्मा यज्ञ. हें उलट दिसतें; यज्ञ निराकार; त्याचा यजमान कर्मात्मा होईल. यज्ञ स्वतः कांहीं करूं शकत नाहीं; सर्व कांहीं यजमानद्वारा त्याला करतां येतें. परंतु दुर्ग म्हणतोः— इदमेतेनाङ्गं संस्क्रियते इदमेतेनाङ्गमुपधीयते (शतपथ ब्राह्मण ११।२।६।१३) = ह्या कर्मानें हा अवयव (इदम् अङ्गम्) संस्कृत होतो; ह्या कर्मानें हा नवीन अवयव प्राप्त होतो. अशा रीतीनें यजमान यज्ञस्वरूप होऊन स्वर्गास जातो; म्हणून यज्ञ हा यजमानाचा आत्मा. संस्कृतममुष्मिन् लोके उपैति (मैत्रा० सं० ४।१।८) = (अग्निचिति नामक यज्ञानें) संस्कृत झालेलें शरीर स्वर्गाप्रत जातें. पण ह्या विवरणांत दोष आहे तो असाः— यजमान कांहीं अपुरुषविध नाहीं व यज्ञ पुरुषविध नाहीं. यज्ञः यजमानस्य ह्याचा अर्थ मला कळत नाहीं.

**एष च आख्यानसमयः**

महाभारतादि आख्यानग्रंथांचा हाच सिद्धांत आहे. भार सहन होईना म्हणून स्त्रीरूप धारण करून पृथिवी ब्रह्मदेवाची याचना करूं लागली (महाभारत आदिपर्व अध्याय ६४). अग्नीनें ब्राह्मणरूपानें कृष्ण व अर्जुन ह्यांची मला खांडववन द्या अशी याचना केली (महाभा० आदि० अ० २२४–२२५). उभयविधाः स्युः ह्याचीं हीं उदाहरणें बरोबर होत. यज्ञो यजमानस्य हें अप्रस्तुत म्हणून प्रक्षिप्त असावें. पुरुषविध (१), अपुरुषविध (२), कार्यासाठीं उभयविध (३) व नित्य उभयविध (४) अशीं ४ मतें दुर्ग मांडतो; चौथें मत अपि वा उभयविधाः स्युः ह्यांतून निघतें असें तो म्हणतो; पण त्याचें म्हणणें मला कळत नाहीं.

## खंड ८ वा.

**तिस्रः एव देवताः इति उक्तं पुरस्तात्। तासां भक्तिसाहचर्यं व्याख्यास्यामः**

नैरुक्तांच्या मतें देवता तीनच असें मागें (७।५) सांगितलें आहे. भक्त्या युक्तं साहचर्यं. भज् वाट्यास येणें ह्यापासून भक्ति. प्रत्येक देवतेच्या वाट्यास विशिष्ट

लोक, सवन, ऋतु, छंद, स्तोम आणि साम येतात ही भक्ति; प्रत्येक देवतेच्या सहचर देवता असतात हें साहचर्य. भक्तिसाहचर्यं हा समाहारद्वन्द्व पाणिनीनियमानें होत नाहीं; तथापि यास्कानें तो समाहारद्वन्द्व केला आहे. कोणत्या गोष्टी त्यांच्या वाट्यास येतात व त्यांच्या सहचर देवता कोणत्या हें आतां सविस्तर सांगू.

**अथ एतानि अग्निभक्तीनि । अयं लोकः प्रातःसवनं वसन्तः गायत्री त्रिवृत् स्तोमः रथन्तरं साम**

पुढील गोष्टी अग्नीच्या वाट्यास येतात. अग्नौ अग्नये वा भक्तिः येषां तानि. ' अथ ' ला विशेष अर्थ नाहीं; तो इंग्लिश नाउ ( now ) ह्या अर्थी आहे. हा लोक म्हणजे पृथिवी, तीन सवनांपैकीं पहिलें, वसंत ऋतु, गायत्री छंद, त्रिवृत् स्तोम, रथंतर साम. गायत्री छंदांतील तीन ऋचा घेऊन त्या निरनिराळ्या प्रकारांनीं म्हणावयाच्या; ह्या समुदायाला त्रिवृत् स्तोम म्हणतात. तीन ऋचांपैकीं प्रत्येक ऋचा तीनदां म्हणावयाची हा एक प्रकार. क्रम तोच; पण प्रत्येक ऋचा एकएकदांच म्हणावयाची हा दुसरा. ऋचांचा क्रम तीन प्रकारांनीं बदलावयाचा; जसें:— १, २, ३; २, ३, १; ३, १, २. प्रत्येक ऋचा एकएकदांच म्हणावयाची हा तिसरा; गायत्री छंदांतील ऋचा घेऊन तिचें साम बनवावयाचें; जसें:— अभि त्वा शूर नोनुमः ( ७।३२।२२ ) ह्या ऋचेपासून बनविलेल्या सामाला रथंतर म्हणतात.

**ये च देवगणाः समाम्नाताः प्रथमे स्थाने (निघंटु ५।२ व ३)। अग्नायी पृथिवी इळा इति स्त्रियः**

प्रथम स्थान म्हणजे पृथिवी; तिच्यावर असणाऱ्या देवांचे गण जे सांगितले आहेत ते अग्नीच्या वाट्यास येतात; ते अग्नीवर अवलंबून असतात. अग्नायी, पृथिवी व इळा अशा ह्याच्या तीन बायका.

**अथ अस्य कर्म वहनं च हविषाम् आवाहनं च देवतानाम् । यत् च किंचित् दार्ष्टिविषयिकम् अग्निकर्म एव तत्**

आतां ह्याचें काम म्हणजे देवतांकडे हवि नेणें व देवतांना घेऊन येणें. देवान् आवह = देवांना घेऊन ये असें अग्नीला पुष्कळ ऋचांत म्हटलें आहे. दृष्टेः विषयः दृष्टिविषयः । तस्य इदं दार्ष्टिविषयिकम्; एथें इक प्रत्यय पाणिनीच्या कोणत्याही सूत्रानें लागत नाहीं. लहानापासून मोठ्यापर्यंत सर्व वस्तु दृष्टीच्या टप्प्यांत आणण्याचें सर्व कांहीं काम अग्नीचेंच; त्याच्याच प्रकाशानें सर्व वस्तु दिसतात; अग्नि प्रज्वलित नसेल तर रात्रीं कांहीं दिसणार नाहीं; सर्व वस्तु दृष्टिविषय होण्याला अग्नीचें साहाय्य पाहिजे ह्या कल्पनेचें रहस्य हिंदुस्थानांतल्या लोकांस कळणार नाहीं; पण उत्तरध्रुवाकडे राहणाऱ्या लोकांच्या लक्षांत तें सहज येईल. आर्यलोक उत्तरध्रुवाकडे रहात होते ह्याचें प्रस्तुत विधान हें स्मारक होय. उत्तरायण व दक्षिणायन ह्यांचें मूळ उत्तरध्रुवाजवळच्या आर्यांच्या वसतींतच आहे; कित्येक महिने सूर्यदर्शन व्हावयाचें नाहीं अशा स्थितींत शेकोट्यांचीच आराधना करावी लागे त्यांत काय नवल!

**अथ अस्य संस्तविकाः देवाः इन्द्रः सोमः वरुणः पर्जन्यः ऋतवः**

आतां ह्याच्याबरोबर ( सं ) ज्यांची स्तुति किंवा वर्णन ( स्तवः ) केलें जातें असे देव सांगूं. सं सह स्तवः संस्तवः । संस्तवम् अर्हन्ति किंवा संस्तवे वर्तमानाः संस्तविकाः. हा तद्धितही पाणिनीनियमानें होत नाहीं. ते देव इंद्र वगैरे. अग्नि व इंद्र ( ३।२५।४ ), अग्नि व सोम ( १।९३।१ ), अग्नि व वरुण ( ४।१।४ ), अग्नि व पर्जन्य ( ६।५२।१६ ) व अग्नि व ऋतु ( १।१५।४ ) अशीं उदाहरणें दुर्ग देतो. ह्या जोडप्यांत अग्नीचें नांव पहिलें आहे म्हणून त्याचें प्राधान्य.

**आग्नावैष्णवं च हविः । न तु ऋक् संस्तविकी दशतयीषु विद्यते**

अग्नि व विष्णु ह्या दोघांना मिळून हवि देतात; परंतु दोघांची जींत स्तुति किंवा वर्णन केलें आहे अशी ऋचा ऋग्वेदांत नाहीं. देवताद्वन्द्वे च (पा० ६।३।२६) ह्या सूत्रानें अग्नाविष्णू; देवताद्वन्द्वे च (७।३।२१) ह्यानें आग्नावैष्णवं; पण इद्वृद्धौ (पा० ६।३।२८) ह्यानें आग्निवैष्णवं असें व्हावयास पाहिजे होतें; परंतु 'विष्णौ न' ह्या वार्तिकानें आग्नावैष्णवं असें राहतें. आग्नावैष्णवं हा शब्द ऐतरेय ब्राह्मणांत दोनदां आला आहे; तथापि तो पाणिनीला आठवला नसावा. संख्याया अवयवे तयप् ( पा० ५।२।४२ ) = संख्या वाचकपदाला तितके अवयव हें दाखविण्याकरितां तय प्रत्यय लावतात; दश अवयवाः यस्य स दशतयः ऋग्वेदः । दशतयी ऋक्संहिता; दशतयीषु न म्हणतां दशतय्यां म्हणावयास पाहिजे; पण दशतयीषु म्हणण्याची चाल पडली.

**अथापि आग्नापौष्णं हविः । न तु संस्तवः**

आणखी अग्नि व पूषा ह्या दोघांना उद्देशून हवि दिला जातो; पण दोघांची एकत्र स्तुति केलेली आढळत नाहीं. अग्निश्च पूषा च अग्नापूषणौ ( देवताद्वन्द्वे च ६।३।२६ ); अग्नापूषणौ देवते अस्य तत् आग्नापौष्णं हविः ( देवताद्वन्द्वे च ७।३।२१ ); आग्निपौष्णं (इद्वृध्दौ ६।३।२८). दुर्गवृत्तीच्या कांहीं पोथ्यांत आग्नावैष्णवं ह्या धर्तीवर आग्नापौष्णवं असा पाठ आहे तो प्रामादिक आहे. आग्नापौष्णं हें रूप पाणिनीच्या कोणत्याही नियमानें साधत नाही व त्या संबंधानें वार्तिकही नाहीं; ह्यावरून असें अनुमान निघेल कीं यास्क वार्तिककारानंतर झाला असावा.

**तत्र एतां विभक्तस्तुतिम् ऋचम् उदाहरन्ति**

त्या संबंधानें जींत निरनिराळी स्तुति आहे अशी ऋचा दोघांच्या स्तुतिसंबंधानें देतात. विभक्ता स्तुतिः यस्यां सा विभक्तस्तुतिः. विभक्तिस्तुतिं असा महाराष्ट्र पाठ आहे; विभक्त्या विभागेन स्तुतिः यस्यां सा; पण तो पाठ चांगला नाहीं. अग्नि व पूषा ह्या दोघांना एकत्र असा हवि कोणत्याही संहितेंत नाहीं; यास्कानें कांहीं तरी दडपून दिलें असें संभवत नाहीं; तेव्हां अथापि आग्नापौष्णं हविः वगैरे प्रक्षिप्त असावें व ह्यामुळेंच पुढील खंडही प्रक्षिप्त असावा.

## खंड ९ वा.

**पूषा त्वेतश्च्यावयतु प्र विद्वाननष्टपशुर्भुवनस्य गोपाः। स त्वैतेभ्यः परि ददत्पितृभ्योऽग्निर्देवेभ्यः सुविदत्रियेभ्यः (१०।१७।३ )**

**पूषा त्वा इतः प्रच्यावयतु विद्वान् अनष्टपशुः भुवनस्य गोपाः इति। एष हि सर्वेषां भूतानां गोपायिता** आदित्यः

भुवनस्य = भूतानाम्. गोपाः = गोपायिता. गोपा ह्याचा मूळ अर्थ गाईचें रक्षण करणारा; नंतर रक्षण करणारा. गुप् ह्याचें गोपायति हें धातुरूप व गोपायिता हें तृजन्त नामरूप. सर्व भूतांचे म्हणजे सर्व प्राण्यांचें रक्षण करणारा पूषा म्हणजे आदित्य किंवा सूर्य. अनष्टपशुः = ज्याच्या नजरेखालून कोणीही पशु नाहींसा होत नाहीं असा. पूषा मूळ मार्गरक्षक व पशुरक्षक; एथें त्याला मृतांना इहलोकांतून हलविण्याचें काम दिलें आहे. प्रच्यावयतु = हलवो. यास्क व नैरुक्त पूषाला स्वतंत्र देव मानीत नाहींत; पूषा म्हणजे सूर्याचेंच एक रूप. एष हि० आदित्यः हें एखाद्या ब्राह्मणातलें किंवा उपनिषदांतलें वाक्य असावेंसें वाटतें.

**स त्वा एतेभ्यः परिददत् पितृभ्यः इति सांशयिकः तृतीयः पादः**

स त्वा वगैरे तिसऱ्या पादाविषयीं संशय आहे. संशयम् आपन्नः (पा० ५।१ ७३ ) सांशयिकः = संशयाचा विषय झालेला.

**पूषा पुरस्तात्। तस्य अन्वादेशः इति एकम्**

आधीं म्हणजे पहिल्या अर्धांत पूषा आला आहे; त्याचें सः ह्यानें कथन (अन्वादेशः) केलें आहे असें एक मत आहे.

**अग्निः उपरिष्टात्। तस्य प्रकीर्तना इति अपरम्**

पुढें अग्नि आला आहे; त्याचें सः ह्यानें कथन केलें आहे असें दुसरें मत आहे. प्रकीर्तना = आधीं कथन.

**अग्निर्देवेभ्यः सुविदत्रियेभ्यः। सुविदत्रं धनं भवति। विन्दतेः वा एकोपसर्गात्। ददातेः वा स्यात् द्व्युपसर्गात्**

सुविदत्रं = धनम्. हा शब्द विन्द् (= मिळविणें) ह्याला एक उपसर्ग म्हणजे सु लावून झाला असेल; किंवा दा (= देणें) ह्याला दोन उपसर्ग म्हणजे सु व वि लागून तो शब्द बनला असेल. सुविदत्र म्हणजे धन; तें आहे ज्यांच्याजवळ ते सुविदत्रिय. गुर्जरपाठ ददातेः नसून दधातेः असा चुकीचा आहे. ऋग्वेदांत दत्र शब्द आहे; विदत्र नाहीं. दद् + त्रं = दत्रं = दान. यजत्रप्रमाणें विदत्र शब्द बनवितां येईल; पण यजत्र हें विशेषण आहे; विदत्र हें नाम असलें पाहिजे. त्वष्टा, अग्नि व सनि ह्यांना सुदत्र विशेषण लाविलेलें आढळतें. अग्नीला व पितरांना सुविदत्र म्हटलें आहे. बृहस्पतेः सुविदत्राणि राध्या (२।२४।१०) एथें सुविदत्र नाम आहे. सुविदत्रिय हा शब्द प्रस्तुत ऋचेंतच आला आहे; तें रूप ऋचेच्या सोईकरितां बनविलें असेल. बहुतकरून सुविदत्र ह्यांत सु + वि + दत्र असे अवयव असतील,

ऋचेचा यास्ककृत अर्थ :—हे मृता, ज्याच्या ताब्यांतला पशु कधींही नाहींसा झाला नाहीं, जो सर्व प्राणिमात्रांचा रक्षक व जो सर्व जाणतो ( विद्वान् ) तो पूषा तुला एथून (इहलोकांतून) जावयाला लावो (प्रच्यावयतु); तो पूषा (चंद्रमंडलाच्या समीप राहणाऱ्या ) पितरांच्या हवालीं (पितृभ्यः ) तुला करो ( परिददत् ); (नंतर) अग्नि ( पितरांपासून तुला घेऊन) दानशील ( सुविदत्रियेभ्यः ) जे देव त्यांच्या हवालीं तुला करो. दक्षिणायनानें पितृलोकाला मृत जातो असें निरुक्त १४।८ त म्हटलें आहे व चंद्रमंडलापासून विद्युन्मंडलाकडे जातो असें छांदोग्योपनिषदांत ( ५।१०।२ ) सांगितलें आहे. वर दिलेला अर्थ तृतीय पादांतील सः म्हणजे पूषा असें मानल्यानें होतो. पण सः म्हणजे अग्नि असें मानल्यास अर्थ पुढीलप्रमाणें :—ह्या पितरांपासून ( ऐतेभ्यः पितृभ्यः ) तुला घेऊन तो अग्नि तुला दानशील देवांच्या स्वाधीन करो. पुनर्नो नष्टमाजतु ( ६।५४।१० ) = आमचा नाहींसा झालेला पशु पूषा हाकून परत आणो; माकिर्नेशत् ( ६।५४।७ ) = आमचें कोणतेंही जनावर नष्ट होऊं देऊं नकोस; आजा नष्टं यथा पशुं ( १।२३।१३ ) = नष्ट झालेल्या पशूला जसा तूं हाकलून आणतोस तसा नष्ट झालेल्या अग्नीला हाकलून आण; लपलेल्या अग्नीला पूषानें शोधून काढलें ( १।२३।१४ ); पूषाला अनष्टवेदसं हें विशेषण लाविलें आहे ( ६।५४।८ ); यस्य पूषा प्रसवे याति विद्वान् सं पश्यन् विश्वा भुवनानि गोपाः ( १०।१३९।१ ) = सवित्याच्या आज्ञेनें ( प्रसवे ) सर्वज्ञ ( विद्वान् ) व सर्व प्राणिमात्रांचा रक्षक सर्वत्र न्याहाळीत जातो. पूषा ह्याप्रमाणें गोपाल ( गुराखी ) होता. आ तत्ते० पूषन् अवो वृणीमहे। येन पितॄन् चोदयः ( १।४२।५ ) = हे पूषा, ज्या धनानें तूं आमच्या वाडवडिलांना धनयुक्त केलेंस तें धन आम्ही तुजजवळ मागत आहों. पूषाचा पितरांशीं एवढाच संबंध आला आहे. प्रेत कदाचित् कोठें दडून बसेल; त्याला तेथून हुसकून देण्याचें पूषाचें काम; पितरांकडे पोचविण्याचें अग्नीचें काम. पितरांना सुविदत्र म्हटलें आहे; यमगृहीं ते देव झाले आहेत; तेव्हां देवेभ्यः सुविदत्रियेभ्यः हीं पितृभ्यः ह्याचींच विशेषणें. पूषाचा संबंध इहलोकांशींच; अग्नीचा दोन्ही लोकांशीं. यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला अर्थ ओढाताणीचा आहे. ऋचेच्या प्रथमार्धांत पूषाची स्तुति म्हणजे निर्देश आहे व द्वितीयार्धांत अग्नीचा निर्देश आहे; म्हणून ही ऋचा विभक्तस्तुतीचें उदाहरण आहे.

## खंड १० वा.

**अथ एतानि इन्द्रभक्तीनि। अन्तरिक्षलोकः माध्यंदिनं सवनं ग्रीष्मः त्रिष्टुप् पञ्चदशः स्तोमः बृहत् साम**

पुढील गोष्टी इंद्राच्या वाट्याला येतात; अंतरिक्ष लोक, माध्यंदिनसवन, ग्रीष्म ऋतु, त्रिष्टुभ् छंद, पंचदश स्तोम व बृहत् साम. त्रिष्टुभ् छंदांतील ३ ऋचा घेऊन त्या ऋचा ३ + १ + १ = ५, १ + ३ + १ = ५, १ + १ + ३ = ५ एकूण १५;

किंवा ३ + १ + १ = ५, १ + १ + १ = ३, ३ + १ + ३ = ७ एकूण १५; ह्याप्रमाणें म्हणावयाच्या. पाठांची संख्या १५ म्हणून हा ऋचांचा समुदाय ( स्तोम ) पंचदश. त्वामिद्धि हवामहे ( ६।४६।१ ) ह्या ऋचेचें बनविलेलें साम तें बृहत्.

**ये च देवगणाः समाम्नाताः मध्यमे स्थाने याः च स्त्रियः**

मध्यम स्थान म्हणजे अंतरिक्ष; त्यांत असणारे जे देवगण व ज्या स्त्रिया त्या इंद्राच्या होत. हे देवगण निघंटु ५।४ व ५ त व अदिति वगैरे स्त्रिया ५।५ च्या शेवटीं सांगितल्या आहेत.

**अथ अस्य कर्म रसानुप्रदानम्। वृत्रवधः। या का च बलकृतिः इन्द्रकर्म एव तत्**

ह्याचें काम रस ( म्हणजे दंव, पाऊस वगैरे ) देणें व वृत्राचा ( मेघाचा ) वध करणें; ( इतकेंच नव्हे तर जगांत ) जीं कांहीं बलाचीं कामें होतात तीं सर्व इंद्राचींच.

**अथ अस्य संस्तविकाः देवाः अग्निः सोमः वरुणः पूषा बृहस्पतिः ब्रह्मणस्पतिः पर्वतः कुत्सः विष्णुः वायुः**

ह्याच्याबरोबर ज्यांची स्तुति केली जाते असे देव म्हणजे अग्नि वगैरे ( दहाजण ).

**अथापि मित्रः वरुणेन संस्तूयते। पूष्णा रुद्रेण च सोमः**

( इंद्राची जशी वरुणासह स्तुति केली असते तशी ) मित्राची वरुणाबरोबर स्तुति केली असते. मित्र व वरुण हे दोन्हीही अंतरिक्षांतले देव. सोमाची पूषा व रुद्र ह्यांच्याबरोबर ( स्तुति केली असते ). सोम व रुद्र हे अंतरिक्षांतले देव होत; पण पूषा हा द्युलोकीं असतो; तथापि सोम व पूषा ह्यांची एकत्र स्तुति केली असते.

**अग्निना च पूषा। वातेन च पर्जन्यः**

पूषाची अग्नीसह स्तुति केली असते. न तु ऋक् संस्तविकी म्हणजे त्या दोघांची एकत्र स्तुति नसते असें आठव्या खंडांत म्हटलें आहे; तेव्हां एथें अग्नि अंतरिक्षांतला किंवा द्युलोकांतला असला पाहिजे; परंतु तसेंही उदाहरण सांपडत नाहीं, शोधलें पाहिजे असें दुर्ग म्हणतो. ह्यानंतर ' वायुना संस्तवः ' असें दुर्गवृत्तींत आहे; पण त्याचें उदाहरण दिलें नाहीं ह्यावरून वृत्तींत ते शब्द घुसडले असावेत. वृत्तीच्या दोन पोथ्यांत वायु व आदित्य ह्यांची स्तुति सप्त ऋषयः ह्या ऋचेच्या चौथ्या पादांत आहे असेंही म्हटलें आहे; निरुक्त व दुर्गवृत्ति ह्यांत हवें तें दडपून दिलें जातें ह्याचें हें ठळक उदाहरण होय. पर्जन्याची वाताबरोबर स्तुति केली आहे. हे दोन्ही अंतरिक्षांतले देव होत.

## खंड ११ वा.

**अथ एतानि आदित्यभक्तीनि। असौ लोकः तृतीयं सवनं वर्षाः जगती सप्तदशः स्तोमः वैरूपं साम**

पुढील गोष्टी आदित्याच्या वाट्याला येतात. ७।५ त सूर्यो द्युस्थानः असें आहे; एथें सूर्य शब्दाच्या ऐवजीं आदित्य शब्द कां घातला आहे?

असौ लोकः = द्युलोक. वर्षाः = पावसाळा. सप्तदश स्तोम पुढीलप्रमाणें ७ प्रकारचाः—

३ + १ + १ = ५, १ + ३ + १ = ५, १ + ३ + ३ = ७ एकूण १७;
३ + १ + १ = ५, १ + ३ + ३ = ७, १ + ३ + १ = ५ एकूण १७;
३ + १ + १ = ७, १ + १ + १ = ३, १ + ३ + ३ = ७ एकूण १७;
३ + ३ + १ = ७, १ + ३ + ३ = ७, १ + १ + १ = ३ एकूण १७;
१ + १ + १ = ३, १ + ३ + १ = ५, ३ + ३ + ३ = ९ एकूण १७;
३ + ३ + १ = ७, १ + ३ + १ = ५, १ + १ + ३ = ५ एकूण १७;
३ + ३ + १ = ७, १ + ३ + १ = ५, १ + १ + ३ = ५ एकूण १७.

यद् द्याव इन्द्र ते शतं (८।७०।५) ह्या ऋचेंतून उत्पन्न झालेलें साम वैरूप.

**ये च देवगणाः समाम्नाताः उत्तमे स्थाने याश्च स्त्रियः**

उत्तम स्थान म्हणजे द्युलोक; त्यांत असणारे सर्व देव व सर्व स्त्रिया ह्याच्या.

**अथ अस्य कर्म रसादानं रश्मिभिः च रसधारणम्**

(वाफेच्या रूपानें जल वगैरे) रस किरणांनीं घेणें व किरणांनींच तो धरून ठेवणें हें त्याचें काम. रसादानादि असें दुर्ग म्हणतो त्यामुळें त्याच्या प्रतींत रश्मिभिश्च रसधारणं होतें कीं नव्हतें हें सांगतां येत नाहीं. महाराष्ट्रपाठ रसाधारणं आहे. रश्मिभिः शब्द दोहोंच्यामध्यें आहे; दिसण्यांत त्याचा संबंध रसधारणं याच्याशीं आहे; पण रसादानं ह्याच्याशींही तो शब्द घेतला पाहिजे.

**यच्च किंचित् प्रवह्लितम् आदित्यकर्म एव तत्**

चलनवलनादि (प्रवह्लितं) सर्व काम आदित्याचेंच. प्रवह्लित शब्द कोणत्याही कोशांत सांपडत नाहीं. वह्ल परिभाषणहिंसाच्छादनेषु (धा० १।६४२); वह्ल = बोलणें, हिंसा करणें, आच्छादणें; ह्यांपैकीं प्रवह्लित ह्याचा कोणता अर्थ असेल तें सांगतां येत नाहीं; बहुतकरून निराळाच अर्थ असावा.

**चन्द्रमसा वायुना संवत्सरेण इति संस्तवः**

चन्द्रमस्, वायु व संवत्सर ह्यांच्यासह आदित्याची स्तुति म्हणजे वर्णन केलेलें आढळतें. अथास्य संस्तविकाः देवाः असे शब्द एथें वापरले नाहींत; तीनच देवता आहेत म्हणून तसे शब्द घातले नाहींत असें दुर्ग म्हणतो; पण अथास्य संस्तविकाः देवाः चन्द्रमाः वायुः संवत्सरश्च असें म्हटल्यानें कोठें बिघडत होतें? अग्नीचे संस्तविक देव पांचच आहेत. भाषा बदलण्याचें कारण समजत नाहीं. संस्तवः ह्याच्या आधीं इति शब्द कशाला?

**एतेषु एव स्थानव्यूहेषु ऋतुच्छन्दःस्तोमपृष्ठस्य भक्तिशेषम् अनुकल्पयीत**

पृथिवी, अंतरिक्ष व द्युलोक हीं तीन स्थानें; ह्या प्रत्येकांत त्या त्या देवाचा ऋतु वगैरे व्यूह म्हणजे समुदाय सांगितला आहे; त्या समुदायांत राहिलेल्या ऋतु, छंद, स्तोम व पृष्ठ म्हणजे साम ह्यांचा समावेश करावा. भक्तेः शेषः भक्तिशेषः = शिष्टा भक्तिः = राहिलेली वाटणी. शिष्टानाम् ऋतुच्छन्दःस्तोमसाम्नां भक्तिः एतेषु एव स्थानेषु कल्पयितव्या अशी भाषा पाहिजे. स्तोम ह्याबद्दल पृष्ठ शब्द घातला आहे व अनुकल्पयेत ह्याच्याबद्दल अनुकल्पयीत असें अशुद्ध रूप वापरलें आहे; अशीं अशुद्ध रूपें क्वचित् आश्वलायनश्रौतसूत्रांत सांपडतात; त्यांचाच हा अनुवाद आहे; ही भाषा यास्काची नव्हे.

**शरद् अनुष्टुभ् एकविंशः स्तोमः वैराजं साम इति पृथिव्यायतनानि**

एकविंश स्तोमः—

३ + ३ + १ = ७, १ + ३ + ३ = ७, ३ + १ + ३ = ७ एकूण २१;
३ + १ + १ = ५, १ + ३ + ३ = ७, ३ + ३ + ३ = ९ एकूण २१;
३ + ३ + ३ = ९, १ + ३ + १ = ५, ३ + १ + ३ = ७ एकूण २१;
३ + ३ + ३ = ९, १ + १ + १ = ३, ३ + ३ + ३ = ९ एकूण २१.

ह्या ऋचेवर बसविलेलें साम तें वैराज.

**हेमन्तः पङ्क्तिः त्रिणवः स्तोमः शाक्करं साम इति अन्तरिक्षायतनानि**

१० । १३४ सूक्तांतील सगळ्या व ५ । ६ ह्यांतील बऱ्याच ऋचा पंक्तिछंदांत आहे; ५ । ६ तील ७ वी ऋचा पंक्तिछंदाचें उत्तम उदाहरण होय. गायत्रीछंदाचे पांच पाद एकत्र केल्यानें पंक्तिछंद तयार होतो. त्रिणव स्तोम :—

३ + ५ + १ = ९, १ + ३ + ५ = ९, ५ + १ + ३ = ९ एकूण २७;
३ + ३ + १ = ७, १ + ३ + ५ = ९, ५ + ३ + ३ = ११एकूण २७.

प्रो ष्वस्मै पुरोरथं ( १०।१३३।१ ) ह्या ऋचेवर बसविलेलें साम ते शाक्कर.

**शिशिरः अतिच्छन्दाः त्रयस्त्रिंशः स्तोमः रैवतं साम इति द्युभक्तीनि**

२।२२।१ हें व प्रो ष्वस्मै पुरोरथं ( १०।१३३।१ ) हें अशीं अतिच्छंदाचीं दोन उदाहरणें ऐत० ब्रा० १६।३ त दिलीं आहेत. पहिल्या ऋचेंत ६४ तर दुसरींत ५४ स्वरोच्चार आहेत. जगतींत चार अक्षरें घातलीं म्हणजे ५२ स्वरोच्चारांचा अतिछंद होतो असेंही म्हटलें आहे.

त्रयस्त्रिंश स्तोमः—

३ + ७ + १ = ११, १ + ३ + ७ = ११, ७ + १ + ३ = ११ एकूण ३३;
३ + ५ + ३ = ११, ३ + ३ + ५ =११, ५ + ३ + ३ = ११ एकूण ३३;
३ + ५ + १ = ९, १ + ३ + ७ = ११, ७ + ३ + ३ = १३ एकूण ३३;
३ + ५ + ५ = १३, ५ + ३ + ३ = ११, ३ + ३ + ३ = ९ एकूण ३३;
३ + ७ + ५ = १५, ५ + ३ + ३ = ११, ३ + १ + ३ = ७ एकूण ३३.

रेवतीर्न सधमादे ( १।३०।१३ ) ह्या ऋचेवर बसविलेलें साम तें रैवत. द्यौः भक्तिः येषां तानि = जीं द्युलोक भजतात म्हणजे ज्यांचा द्युलोकाशीं संबंध आहे अशा. एथें आयतन शब्दाच्या ऐवजीं भक्ति शब्द घातला आहे; तसें करण्याचें कारण द्वायतनानि असा उच्चार कठीण वाटला असेल. एतेष्वेव० द्युभक्तीनि हें सर्व प्रक्षिप्त होय; कारण त्याची भाषा यास्कभाषेहून अगदीं वेगळी आहे; शिवाय ह्या ऋतुछंद वगैरेंचा प्रस्तुत विषयाशीं कांहीं संबंध नाहीं.

## खंड १२ वा.

**मन्त्राः मननात् । छन्दांसि छादनात्**

मन् + त्रः = मन्त्रः; जो मनन केला जातो तो मंत्र. ज्याच्यापासून यज्ञ, देव व आत्मन् ह्यांचें ज्ञान विचार करणाऱ्यास मिळतें ते मंत्र असें दुर्ग म्हणतो. छद् आच्छादणें ह्यापासून छन्दस्. यदेभिरात्मानमाच्छादयन् देवा मृत्योर्बिभ्यतस्तच्छन्दसां छन्दस्त्वमिति विज्ञायते असें वाक्य दुर्गवृत्तींत आहे; त्याच्या प्रतींत तसें वाक्य असावेंसें वाटतें. देवा वै मृत्योर्बिभ्यतः त्रयीं विद्यां प्राविशन् । ते छन्दोभिरच्छादयन् । यदेभिरच्छादयन् तच्छन्दसां छन्दस्त्वम् असें छान्दोग्योपनिषदांत ( १।४ ) आहे. दुर्गानें उतारा कोणत्या ब्राह्मणांतून घेतला असावा ? छान्दोग्योपनिषदांतून घेतला असल्यास तें वाक्य जसेंच्या तसें त्यानें घेतलें नाहीं. ह्यानंतर महाराष्ट्रप्रतींत स्तोमः स्तवनात् असे अधिक शब्द आहेत; दुर्गवृत्तींत व गुर्जरपाठांत ते नाहींत; स्तु + मः = स्तोमः.

**यजुः यजतेः**

यज् = यज्ञ करणें; यज् + उः = यजुः = हवि देण्याचा मंत्र.

**साम संमितम् ऋचा**

मा = मोजणें. सामन् =स +अ+म+न् =स+म + अ+न् ; स=सं; मा=मितम् ; जें ऋचेनें बरोबर मोजलें जातें तें साम. ही लौकिक व्युत्पत्ति होय. गायलेली ऋचा तें साम. सा + मन् = सामन् ; सा = देणें; अशी व्युत्पत्ति असेल. सा = वाक्; अमः = प्राणः. वागेव सा प्राणोऽमः । तस्मात्साम ( छा० उ० १।६।१ ). ऋक् सामाला माझ्याशीं तूं मैथुन कर म्हणून म्हणाली; सामानें तसें करण्याचें नाकारलें; दोन ऋचांनीं विनवणी केली तरी नकारच; तिघींनीं विनवणी केल्यावर साम कबूल झाला. तस्मात् तिसृभिः स्तुवन्ति तिसृभिरुद्गायन्ति तिसृभिर्हि साम संमितं ( ऐत० ब्रा० १२। १२ ) = म्हणून तीन ऋचांनीं स्तवतात व गातात; कारण एक साम म्हणजे तीन ऋचा. सामवेद्यांनीं मत्सरानें व द्वेषानें ही कथा रचली असावी. यास्कानें ह्या दोन व्युत्पत्ति द्यावयास पाहिजे होत्या.

**अस्यतेर्वा**

सा = स् + आ = आस् = अस् = फेंकणें. तें ऋचेवर फेंकलें असतें. तस्मादृचि अध्यूढं साम गीयते (छा० उ० १।६व७) = म्हणून ऋचेवर चढविलेलें साम गाइलें जातें.

फेकलेलें म्हणजे चढविलेलें. ऋक् ही स्त्री; तिच्यावर साम चढतें. सामवेदी ऋग्वेदांतल्या ऋचा घेऊन त्यांच्यापासून सामें बनवितात.

**ऋचा समं मेने इति नैदानाः**

प्रत्येक ऋचेचें निदान म्हणजे उत्पत्तिकारण ज्यांत दिलें आहे तो निदान नांवाचा ग्रंथ; निदान काढणारे ते नैदान. ते म्हणतातः— ऋचेसारखें साम प्रजापति मानता झाला किंवा मी स्वतः ऋचेसारखा आहे असें मानता झाला. म्हणून सम पासून साम. हें वचन कोणत्या ब्राह्मणांतून घेतलें आहे तें समजत नाहीं. ऋचांचें निदान काढणारे व्युत्पत्तीच्या भानगडींत पडणार नाहींत; नैदानाः ह्याच्याबद्दल नैरुक्ताः असा शब्द पाहिजे; कारण व्युत्पत्ति देणें हें नैरुक्तांचेंच काम आहे.

**गायत्री गायतेः स्तुतिकर्मणः। त्रिगमना वा विपरीता**

स्तुत्यर्थ गै धातूपासून गायत्री. किंवा गायत्री=गाय + त्री; गाय = गमनं; गा जाणें ह्यापासून गाय. त्रीणि गायानि गमनानि पादाः यस्याः सा त्रिगाया; त्रि व गाय ह्यांचा विपर्यय म्हणजे गाय आधीं व त्रि मागून असें केल्यानें गायत्री शब्द झाला असेल. गायत्रीचे तीन पाद असतात; त्यावर ही कोटी उभारली आहे.

**गायतो मुखादुदपतत् इति च ब्राह्मणम्**

प्रजापति गात असतांना त्याच्या तोंडांतून ही उडाली असें ब्राह्मणवाक्य आहे. हें ब्राह्मणवाक्य सांपडत नाहीं. गायत् + री = गायत्री; गायत् = गायतः. री? गायते च त्रायते च (छा० उ० ३।१२।१); गाय + त्रा = गायत्रा = गायत्री. गायतः विप्रान् अवश्यं त्रायते (अमर २।४।५० क्षीरस्वामी)। गायन्तं त्रायते गायत्री (अमर ३।७।२२ क्षी०). त्रिगमना० ब्राह्मणं हें दुर्गवृत्तींत नाहीं.

**उष्णिक् उत्स्नाता भवति। स्निह्यतेर्वा स्यात्कान्तिकर्मणः**

उष्णिक् = उ + स्नि + क्; उ = उत्; स्निक् = स्नाता. गायत्रीपेक्षां उष्णिक्मध्यें चार अक्षरें अधिक आहेत; त्या अक्षरांनीं तो छंद उत्स्नात असतो. उत्स्नाता = उद्वेष्टिता इव (दुर्ग)= जणूं काय चार अक्षरें त्या छंदाला वेटाळतात. उत्स्नाता = पार शुद्ध केलेली असाही अर्थ होईल; चार अक्षरें त्या छंदाला अतीशय शुद्ध करतात. किंवा स्निह् प्रिय असणें ह्यापासून. उ = उत्; ष्णिक् = स्निक् = स्निह्. ष्णिह प्रीतौ (धा० ४।९।४); प्रीतिः = कान्तिः = आवडणें. यास्काचा धातुपाठ निराळा असावा. उष्णिक् छंद प्रीति उत्पन्न करतो म्हणजे तो सर्वांस प्रिय असतो.

**उष्णीषिणी वा इति औपमिकम्। उष्णीषं स्नायतेः**

उष्णिक् = उष्णीषं = उष्णीषिणी. जणूं काय (इव) अधिक चार अक्षरें त्या छंदाचें पागोटेंच. उपमायाः इदम् औपमिकम्; उपमा = उत्प्रेक्षा; जणूं काय पागोटें घातलेला छंद; एथें उपमा म्हणजे उत्प्रेक्षा होय. यास्क उपमा शब्द रूपक व उत्प्रेक्षा ह्या अर्थीं वापरतो; उ = उत्; ष्णि = स्नि = स्ना = शुद्ध होणें; परीटघडीचें पागोटें स्वच्छ असतें.

**ककुभ् ककुभिनी भवति**

ककुभ्ला ककुभ् म्हणण्याचें कारण तिच्या मध्यावर जणूं काय वशिंड असतें. पहिला व तिसरा पाद आठ आठ अक्षरांचा व मधला बारा अक्षरांचा; हा मधला पाद इतरांच्या मानानें उचललेला म्हणजे वशिंडासारखा दिसतो.

**ककुभ् च कुब्जश्च कुजतेर्वा उब्जतेर्वा**

कुजतेः कौटिल्यार्थस्य असें दुर्ग म्हणतो; पण कुजु स्तेय करणें (धा० १।१९९). उब्जतेः न्यग्भावार्थस्य (दुर्ग); उब्ज आर्जवे (धा० ६।२३). ह्या दोहोंपैकीं कोणत्याही धातूपासून ककुभ् व कुब्ज शब्द झाले असतील. ककुभ् शब्द कुजचें कोणतें रूप आहे? कुजचें अभ्यासानें ककु करणें व ज् च्या जागीं भ् घालणें. हा छंद कुटिल किंवा वक्र आहे; गायत्रीसारखा सरळ नाहीं. किंवा कक् + उभ्; उभ् उब्जपासून; कक् उपसर्गासारखा डकविलेला. ह्या छंदाचे पहिला व दुसरा असे दोन पाद नमून असतात; कारण त्यांतील अक्षरें १२ नसून प्रत्येकीं ८ च असतात; वा बद्दल च घातल्यास अर्थ सुलभ होईल. ककुभ् = ककु + उभ्; ककु = कुक = कुज्; उभ् = उब्ज्; कुब्ज = कु + उब्ज; कु = कुज्.

**अनुष्टुभ् अनुष्टोभनात्। गायत्रीमेव त्रिपदां सतीं चतुर्थेन पादेन अनुष्टोभति इति च ब्राह्मणम्**

अनु + स्तुभ् पासून अनुष्टुभ्; ष्टुभु स्तम्भे (धा० १।३९४); स्तुभ् = टेका देणें, सांवरणें. तीन पादांची असलेल्या गायत्रीलाच चौथा पाद लावून अनुष्टुभ् सांवरते असें ब्राह्मणवचन आहे. कोणतें ब्राह्मण? गाईला किंवा कोणत्याही जनावराला तीन पाय पुरणार नाहींत; चौथा पाय शरीर स्थिर करण्यास पाहिजेच.

**बृहती परिबर्हणात्**

बृह वृद्धौ (धा० १।७३६); परिबर्हण = वाढ. अनुष्टुभ् पेक्षां बृहतींत चार अक्षरांची वाढ असते.

**पङ्क्तिः पञ्चपदा**

पंक्तिछंदाचे पांच पाद असतात. पचि व्यक्ती करणें (धा० १।१७४); पच् = व्यक्त करणें. पञ्च व पङ्क्ति हे शब्द पच् धातूपासून असें दाखविण्याचा यास्काचा हेतु असेल. पदपङ्क्तिः पञ्च (पिंगल ३।४६); यास्काच्या मनांत पदपंक्ति छंद असेल कारण नुसत्या पंक्तीचे चार पाद असतात; पण पदपंक्ति पांच पादांची असून प्रत्येक पाद चार अक्षरांचा असतो. मागील खंडांत वर्णिलेला पंक्तिछंद ह्या दोहींहून निराळा आहे.

**त्रिष्टुभ् स्तोभत्युत्तरपदा। का तु त्रिता स्यात्। तीर्णतमं छन्दः। त्रिवृत् वज्रः। तस्य स्तोभनी इति वा**

त्रिष्टुभ् = त्रि+स्तुभ्. स्तोभति म्हणजे स्तुभ् उत्तरपद आहे जींत ती. त्रिता=त्रित्वं= त्रि म्हणजे तीन ही संख्या. पण त्रि जें प्रथम पद तें काय आहे? त्याची व्युत्पत्ति काय असेल?

सर्व छंदांना ओलांडून जाणारा हा छंद आहे; म्हणजे तृ तरणें ह्यापासून त्रि. सर्व छंदांना तरून जाणारा व टेका देणारा म्हणून तो त्रिष्टुभ्. त्रि = त्रिवृत् = तीन सांध्यांचा; वज्राला तीन सांधे असतात. वज्राला टेका देणारी किंवा स्थिर करणारी ती त्रिष्टुभ्. वज्राची स्तुति करणारी असा दुर्ग अर्थ करतो; कारण त्रिष्टुभ् व वज्र दोन्ही इंद्राची; तेव्हां वज्राची स्तुति म्हणजे इंद्राचीच असें तो म्हणतो.

**यत् त्रिरस्तोभत् तत् त्रिष्टुभस्त्रिष्टुप्त्वम् इति विज्ञायते**

तीनदां तिनें टेका दिला म्हणून त्रिष्टुभ्ला त्रिष्टुभ् म्हणतात असें ब्राह्मणवचन आहे. कोणतें ब्राह्मण ? दुर्गवृत्तींत हें वचन नाहीं. त्रिष्टुभ्ला तीन पाद असतात असें विवरण यास्क देत नाहीं; कारण गायत्रीलाही तीन पाद असतात. ह्या खंडांतील सर्व व्युत्पत्ति हरदासी तऱ्हेच्या आहेत.

## खंड १३ वा.

**जगती गततमं छन्दः । जलचरगतिर्वा । जल्गल्यमानोऽसृजत् इति च ब्राह्मणम्**

गत अभ्यासानें जगत. ज = तमं=श्रेष्ठ, अतीशय. जगतीछंद अती लांब जातो. अतिछंद वगळून राहिलेल्या छंदांत हा छंद फार मोठा. ज = जलचर. जलचराप्रमाणें त्याची गती म्हणजे विस्तार असतो. जलचर म्हणजे पाण्याची लाट असा दुर्ग अर्थ करतो. जगती = ज + ग + ती; ग = गल्; गल् अभ्यासानें जल्गल्; जल्गल् = जल्गल्यमानः. ग्लै हर्षक्षये (धा० १।९२९); ग्लै = ग्लानि येणें. असृजत् मधला त् = ती. हर्षाचा नाश झाला आहे अशा मनःस्थितींत प्रजापति हा छंद निर्माण करता झाला. ब्राह्मण कोणते ?

**विराट् विराजनाद्वा विराधनाद्वा विप्रापणाद्वा । विराजनात् संपूर्णाक्षरा । विराधनात् ऊनाक्षरा । विप्रापणात् अधिकाक्षरा**

विराट् = वि + राट्. हा शब्द वि + राज् किंवा वि + राध् किंवा वि + प्र + आप् पासून झाला असेल. वि + रा + (धना) त् = विराट्. वि + (प्) रा + (पणा) त् = विराट्. विराट्च्या प्रत्येक ओळींत दहा अक्षरें असतात त्यामुळें तो विराजमान (विराजनात्) असतो; दहा ही पूर्ण संख्या; दहापेक्षां कमी किंवा अधिक अक्षरें पूर्ण नव्हत. गायत्रीछंद संपूर्णाक्षर नाहीं. विराट्मध्यें जगती वगैरे छंदांपेक्षां कमी अक्षरें असल्यामुळें तिला नम्रपणा (विराधनात्) स्वीकारावा लागतो. गायत्री वगैरेपेक्षां तिनें अधिक अक्षरें मिळविलीं आहेत (विप्रापणात्).

**पिपीलिकमध्या इति औपमिकम् । पिपीलिका पेलतेः गतिकर्मणः**

पिपीलिकमध्या हें नांव एका छंदाला उपमेनें पडलें. पिपीलिकस्य मध्यः इव मध्यः यस्याः सा. त्रिपाद् अणिष्ठमध्यमा (पिंगल ३।५७) = तीन पाद व मधला पाद अती बारीक; हा पाद मुंगीच्या कंबरेसारखा किंवा मुंगीसारखा दिसतो. पेल् जाणें-

( धा० १।५४२ ). पेल् = पील्; अभ्यासानें पिपील्; पिपील् + इक = पिपीलिक.

**इति इमाः देवताः अनुक्रान्ताः**

ह्याप्रमाणें ह्या ( तीन ) देवता— अग्नि, इंद्र व सूर्य— क्रमानें वर्णिल्या आहेत. इति शब्दानें विषयसमाप्ति दर्शविली आहे. तिस्रः एव देवताः हा विषय; त्याचें एथपर्यंत विवरण केलें. ह्या वाक्यावरून इति संस्तवः ( खंड ११ ) ह्यानंतरचा व इति इमाः० एथपर्यंतचा मजकूर प्रक्षिप्त असावा. पुढील वाक्यावरून सर्व देवतांचें निरूपण केलें असें अनुमान निघतें.

**सूक्तभाजः हविर्भाजः ऋग्भाजश्चभूयिष्ठाः । काश्चित् निपातभाजः**

ह्या देवतांपैकीं कांहीं सूक्तभाक् आहेत; म्हणजे कांहीं देवतांचें वर्णन सबंध सूक्तांत केलें जातें. सोमाचें वर्णन सबंध नवव्या मंडलांत आहे; ह्याचा उल्लेख करावयास पाहिजे होता. कांहीं देवतांना फक्त हवि दिला जातो; त्यांचें सूक्तांत वर्णन नसतें. पण त्या एखाद्या ऋचेंत, किंवा ऋगर्धांत किंवा पादांत किंवा गौण म्हणून वर्णन केल्या असतील. ही देवतांची विभागणी सदोष आहे. कांहीं देवता सूक्तभाक् व हविर्भाक्ही असतात. बहुतेक देवता ( भूयिष्ठाः ) एकेका ऋचेंतच वर्णिल्या असतात. पण दुर्ग म्हणतो त्याप्रमाणें कांहींना अर्धी ऋचा व कांहींना पाव ऋचा दिलेली असते. कांहींना तीन तीन चार चार ऋचा दिल्या असतील. मुख्य देवतांचेंसुद्धां अशा तऱ्हेचें त्रोटक वर्णन केलें असेल. एक देवता सूक्तभाक्, अनेकऋग्भाक्, ऋग्भाक्, अर्धर्चभाक् व पादभाक् असेल. सबंध सूक्तांत नसल्या म्हणजे त्या निपातभाक् म्हणजे गौण झाल्या. मुख्य देवतासुद्धां कधीं कधीं गौण असतात; तेव्हां कांहीं निपातभाक् असतात असें म्हणतां येत नाहीं. पण अशा कांहीं देवता आहेत कीं त्या सदोदित गौणच. काश्चित् निपातभाजः ह्यानंतर एव-शब्द घालणें जरूर आहे. अल्पाः देवताःसूक्तभाजः भूयिष्ठाः ऋग्भाजः । सोमः नवमं मण्डलं भजते । सर्वाः निपातभाजः अपि सन्ति । एतासु काश्चित् सूक्तभाजः एव । काश्चित् हविर्भाजः एव । काश्चित् सूक्तभाजः हविर्भाजश्च असें म्हणावयास पाहिजे होतें.

**अथोत अभिधानैः संयुज्य हविः चोदयति**

आणखी देवतानामांना विशेषणें जोडून तशा देवतांना हवि देण्यास वेद आज्ञा करतो. अभिधान=विशेषण. वैश्वानर, जातवेदस्, सुरभिमत्, पवमान, पथिकृत्, व्रतपति, व्रतभृत, वाजभृत्, रक्षोहन्, अनीकवत्, रुद्रवत्, अन्नवत्, अन्नपति, वसुमत् वगैरे विशेषणें अग्नीला लाविलेलीं आढळतात. अधिराज, क्षेत्रंजय, वाज्रिन्, वृत्रहन्, वृत्रतुर्, अंहोमुच्, मन्युमत्, मनस्विन्, अभिमातिहन्, अभिमातिषाह्, अर्कवत्, अश्वमेधवत्, घर्मवत्, सूर्यवत्, इन्द्रियवत् वगैरें इंद्राचीं. बाकीच्या देवतांना एखादुसरें विशेषण लावलेलें आढळतें; कित्येकांना एकही नसतें. हीं विशेषणें यजुर्वेदांत हवीसंबंधानें येतात. ऋग्वेदांतले शब्द घेऊन बरींचशीं विशेषणें बनविलीं आहेत.

**इन्द्राय वृत्रघ्ने इन्द्राय अंहोमुचे इति**

जसें इंद्राला वृत्रहन् व अंहोमुच् हीं विशेषणें लाविलीं आहेत. इन्द्राय वृत्रघ्ने एकादशकपालं निर्वपेत् ( मैत्रा० सं० २।२।११ ); इन्द्राय अंहोमुचे एकादशकपालं निर्वपेत ( मैत्रा० सं० २।२।७ ). वृत्रहन् = वृत्राला मारणारा. अंहोमुच् = संकटांतून, दारिद्र्यांतून सोडविणारा. महाराष्ट्रपाठांत इन्द्राय वृत्रघ्ने व इन्द्राय अंहोमुचे ह्या दोहों-मध्यें इन्द्राय वृत्रतुरे असें अधिक शब्द आहेत. इन्द्राय वृत्रतुरे एकादशकपालं निर्वपेत् ( मैत्रा० सं० २।२।११ ).

**तानि अपि एके समामनन्ति। भूयांसि तु समाम्नानात्। यत्तु संविज्ञानभूतं स्यात् प्राधान्यस्तुति तत् समामने**

तीं विशेषणें सुद्धां कांहीं निघंटुकार निघंटुसमाम्नायांत घालतात. अशा विशे-षणांचा निघंटुसमाम्नायांत समावेश केल्यास तीं अतोनात होतील. ऋग्वेदांत देव-तांचीं विशेषणें अतीशय आहेत; तीं समाविष्ट करणें म्हणजे समान्नाय फुकट वाढविणें होय. पण जें विशेषण देवतेचें रूढ नाम म्हणून झालें असेल ( संविज्ञानभूतं ) म्हणजे ज्या नामीभूत विशेषणाची प्राधान्येंकरून स्तुति केली असेल तेवढेंच मी निघंटुसमा-म्नायांत समाविष्ट करतों.

**अथ उत कर्मभिः ऋषिः देवताः स्तौति। वृत्रहा पुरंदरः इति। तानि अपि एके समामनन्ति। भूयांसि तु समाम्नानात्। व्यञ्जनमात्रं तु तस्य अभिधानस्य भवति**

आणखी देवतांनीं जीं कृत्यें केलीं असतील तद्वाचक विशेषणें योजून ऋषि देवांची स्तुति किंवा वर्णन करतात; जसें वृत्राला इंद्र मारतो म्हणून तो वृत्रहा, किल्ले फोडतो म्हणून पुरंदर. भूयांसि वगैरे वरील प्रमाणें. पण ( अशीं कर्मवाचक विशेषणें समाविष्ट करूं नयेत कारण ) तसें विशेषण त्या रूढ झालेल्या नांवाचें ( अभिधानस्य ) केवळ द्योतक ( व्यञ्जनमात्रं ) असतें. वर अभिधान म्हणजे विशेषण असा अर्थ केला आहे; एथें विशेषनाम असा अर्थ करावा लागतो. कसल्याप्रकारचा इंद्र? वृत्राला मारणारा, किल्ले फोडणारा. अशीं विशेषणें समाविष्ट करण्यानें लाभ कोणता?

**यथा ब्राह्मणाय बुभुक्षिताय ओदनं देहि स्नाताय अनुलेपनं पिपासते पानी-यम् इति**

जसें भुकेल्या ब्राह्मणाला भोजन, स्नान केलेल्याला गंध व तृषार्ताला पाणी दे. एथें भुकेला, स्नान केलेला, तृषार्त हीं विशेषणें; त्यांना विशेष्याशिवाय अस्तित्वच नाहीं; तीं परावलंबी होत. त्याप्रमाणें वृत्रहा, पुरंदर वगैरेंना इंद्राशिवाय अस्तित्व नाहीं; तेव्हां स्वतंत्र नांवें म्हणून त्यांचा समावेश करूं नये. पण कांहीं विशेषणें विशेष-नामें होतात; ह्याची वृत्रहन्, पुरंदर हींच उदाहरणें होत. जीं विशेषणें विशेषनामें म्हणून भाषेंत रूढ झालीं असतील त्यांचा समावेश करण्यास हरकत नाहीं. स्नाताय अनुलेपनं हें बुभुक्षिताय व पिपासते ह्यांच्यामध्यें घालावयास नको होतें. ही म्हण होती कीं काय? समामनन्ति व समामने ह्या शब्दांवरून यास्कासारख्यांनीं निघंटु रचला असें अनुमान निघतें; पण निरुक्त १।२० त इमं ग्रन्थं समाम्नासिषुः म्हणजे श्रुतर्षींनीं निघंटु

रचला असें यास्क म्हणतो; तेव्हां कोणते शब्द निघंटुसमाम्नायांत समाविष्ट करावे अशा वादांत तो शिरणार नाहीं; निघंटु म्हणजे त्याच्या मतें वेदच. हा सर्व वाद यास्कानंतर उत्पन्न झाला असावा; तो निरुक्तांत घुसडला गेला. कदाचित् यास्ककालीं व यास्काच्या पूर्वीं तो वाद उत्पन्न झाला असेल. कांहींही असो अशा वादांत यास्क खास शिरणार नाहीं. इति इमाः देवताः अनुक्रान्ताः हें वाक्य सर्व देवतांचें विवरण झाल्यानंतर म्हणजे बाराव्या अध्यायाच्या शेवटीं यावयास पाहिजे. खंड १४ त अथातोऽनुक्रमिष्यामः असें जो म्हणतो तो इति इमाः देवताः अनुक्रान्ताः असें कसें म्हणेल ? ११ चा शेवटला अर्धा भाग आणि १२ व १३ हे खंड प्रक्षिप्त होत.

## खंड १४ वा.

**अथातः अनुक्रमिष्यामः**

आतां ( अथ ) ह्यापुढें ( अतः ) अनुक्रमानें देवता घेऊं.

**अग्निः पृथिवीस्थानः । तं प्रथमं व्याख्यास्यामः । अग्निः कस्मात् । अग्रणीः भवति । अग्रं यज्ञेषु प्रणीयते । अङ्गं नयति संनममानः**

अग्नि हा पृथिवीवर राहणारा; त्याचें म्हणजे अग्नि शब्दाचें पहिल्याप्रथम विवरण करूं. अग्नि शब्द कसा बनला ? अग् + निः = अग्निः; अग् = अग्र; नि=नयति. सर्व कृत्यांत अग्नि स्वभक्तांना अग्रभागीं नेतो म्हणजे त्यांचीं सर्व कामें तो सिद्धीस नेतो; किंवा देवांचा सेनापति असल्यामुळें तो देवसेनेला अघाडी नेतो. अग्निहोत्र, इष्टि, पशु व सोम अशा यज्ञांत गार्हपत्यांतून त्याला पूर्वेकडे असलेल्या आहवनीयाकडे नेतात. शब्दावयव तेच; विवरण भिन्न; पहिल्या विवरणांत तो नेतो; दुसऱ्यांत त्याला नेतात. यज्ञांत अग्निप्रणयन हें पहिलें कृत्य म्हणून अग्रं म्हणजे पहिल्याप्रथम असा दुर्ग अर्थ करतो. अग् = अङ्गम्. सर्व कृत्यांत पुढारी होऊन ( संनममानः ) तो इतर सर्व साधनें स्वांगभूत करतो; किंवा काष्ठादिकांचा आश्रय करून ( संनममानः ) त्यांना आत्मसात् करतो. संनममानः = प्रह्वीभवन् = नमून, गौणत्व स्वीकारून असा सायणाचार्य अर्थ करतात; कारण पेटण्याच्या आधीं अग्नि अगदीं बारीक किंवा क्षुल्लक असतो.

**अक्नोपनः भवति इति स्थौलाष्ठीविः । न क्नोपयति न स्नेहयति**

अग्निः = अ + ग्निः; ग्निः = क्निः. क्नूयी शब्दे उन्दे च ( धा० १।४८६ ) ह्याचें प्रयोजकरूप क्नोप् (पा० ७।३।३६) होतें. अ = नाहीं. जो भिजवीत (क्नोपयति = स्नेहयति ) नाहीं ( अ = न ) तो अग्नि. अग्नि सर्व रस नाहींसें करून वस्तु रूक्ष करतो; आगीनें ओलावा ( स्नेह ) नाहींसा होतो. अशी व्युत्पत्ति स्थौलाष्ठीवि करतो. धातुपाठांत उन्दे असें आहे; यास्ककालीं दुसरा एखादा धातुपाठ असेल; त्यांत उन्दे बद्दल स्नेहने शब्द असावा.

**त्रिभ्यः आख्यातेभ्यः जायते इति शाकपूणिः । इतात् अक्तात् दग्धात् वा नीतात्**

अग्नि शब्द तीन धातूंपासून झाला आहे असें शाकपूणि म्हणतो; म्हणजे इत, अक्त किंवा दग्ध व नीत ह्यांपासून. इत, अक्त, दग्ध व नीत हीं रूपें त्या त्या धातूचीं दर्शक होत. इ + त = इत. अञ्ज् + त = अक्त. दह् + त = दग्ध. नी + त = नीत.

**स खलु एतेः अकारम् आदत्ते। गकारम् अनक्तेर्वा दहतेर्वा। नीः परः**

अग्निः = अ + ग् + निः. ह्यांतील अ हें अक्षर 'इ' जाणें ह्या धातूच्या ज्यांत अ आहे अशा रूपांतून तो (शाकपूणि) घेतो. 'अयानि', आज्ञार्थी किंवा 'अयन' हें नाम ह्यांपैकीं एकांतून अ घ्यावयाचा. अनक्ति म्हणजे अञ्ज् धातु; त्याच्या अङ्ग्धि ह्या रूपांतून किंवा दह् च्या दग्ध ह्या रूपांतून ग् घ्यावयाचा. अ + ग् ह्या-नंतर (परः) नीः ठेवावयाचा. तो जन्मास जातो (एति), सर्व वस्तु व्यक्त करतो (वि + अनक्ति) किंवा जाळतो (दहति) व हवि देवांकडे नेतो (नयति) म्हणून त्याला अग्नि हें नांव पडलें. तो यज्ञभूमीकडे जाऊन स्वतःला (स्वकीयम् अङ्गं) इंधनाकडे नेतो व हवि तयार करण्यास प्रेरणा करतो असा अर्थ सायणाचार्य करतात. खलु (= खरोखर) ह्यानें आश्चर्य दर्शविलें जातें; काय चमत्कारिक मनुष्य हो! तो 'इ'पासून अ घेतो वगैरे! काय अचरटपणा! इतात्० नीताद्वा व स खलु० नीःपरः ह्या दोहोंचाही अर्थ एकच; तेव्हां दोन्ही घालण्याचें कारण दिसत नाहीं. स खलु वगैरेनें शाकपूणीचा उपहास केला आहे असें दिसतें; तसा उपहास यास्क करणार नाहीं; कारण सर्व प्रकारच्या व्युत्पत्ति त्याला संमत असतात; तेव्हां स खलु वगैरे शब्द प्रक्षिप्त असावेत. लॅटिनमध्यें इग्निस् = अग्नि. अङ्गति=ऊर्ध्वं गच्छति. अग् + निः = अग्निः. किंवा अञ्च् + निः = अग्निः. अग्नि, अग्र व अग्रु ह्यांत अग् हा धातु स्पष्ट दिसतो. अग् धातूचीं रूपें ऋग्वेदांत आहेत कीं नाहींत हें सांगतां येत नाहीं.

**तस्य एषा भवति**

हीं (पुढील ऋचा) त्याची (अग्नीची) आहे.

## खंड १५ वा.

**अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम्। होतारं रत्नधातमम् (१।१।१)**
**अग्निम् ईळे अग्निं याचामि। ईळिः अध्येषणाकर्मा पूजाकर्मा वा**

ईळे = याचामि = याचना करतों. अध्येषणा = याच्ञा (दुर्ग) = याचना. सनिः अध्येषणा (अमर २।७।३२); अध्येषणा = वडील माणसांना विनंति करून एखादें काम करण्यास सांगणें. अध्येषणा म्हणजे याचना असा अर्थ अमरांत नाहीं. किंवा ईड् = पूजा करणें (पूजाकर्मा). ईड स्तुतौ (धा० २।९). प्रस्तुत ऋचेंत पूजा असा अर्थ नाहीं असें दुर्ग म्हणतो; पण याचना किंवा पूजा ह्यांपैकीं कोणताही अर्थ लागतो असें यास्काचें मत दिसतें.

**पुरोहितः व्याख्यातः। यज्ञश्च**

पुरोहित शब्दाचें विवरण (निरुक्त २।१२) केलेंच आहे. यज्ञशब्दाचेंही विवरण केलें आहे (निरुक्त ३।१९). यज्ञश्च ह्याबद्दल गुर्जरपाठ यज्ञस्य असा आहे; यज्ञस्य पुरोहितं असा त्या पाठाचा संबंध.

**देवः दानात् वा दीपनात् वा द्योतनात् वा। द्युस्थानो भवति इति वा। यो देवः सा देवता**

देव देतात किंवा प्रकाशतात म्हणून तदर्थक दा, दीप् किंवा द्युत् ह्यांपैकीं कोणत्या तरी धातूपासून देव शब्द झाला असेल. अर्थावरून शब्दाची व्युत्पत्ति केली पाहिजे असें निरुक्तकारांचें ठाम मत होतें. किंवा देवांचें स्थान द्यु म्हणजे द्युलोक; म्हणून 'द्यु' पासून देव. सर्व देवांचें मूलस्थान द्यु; अग्नि व इंद्र हे कर्तव्याकरितां पृथिवी व अंतरिक्ष ह्यांत वास करतात. वास्तविक दि (= देणें) + व = देव. शेव, एव हे शब्द शि + व आणि इ + व ह्यांपासून बनले आहेत; 'व' हा प्रत्यय रण्व, कण्व, ऋष्व, सर्व, विश्व अशा शब्दांतही आहे. यो देवः सा देवता हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. जो देव ती देवताच. प्रत्येक सूक्ताच्या आरंभीं ऋषि, देवता, छंद वगैरे सांगतात; तेथें देव न घालतां देवता शब्द कां घालतात ? उत्तरः— देव व देवता ह्यांत भेद नाहीं; देवता शब्द घालण्याची चाल पडली .

**होतारं ह्वातारम्। जुहोतेः होता इति और्णवाभः**

ह्वे (= बोलाविणें) + तृ = होतृ = बोलावणारा. हु + तृ = होतृ = देणारा; अशी व्युत्पत्ति और्णवाभ देतो. हु दानादानयोः (धा० ३।१); हु देणें किंवा घेणें ह्यापासून होतृ. होतृ ह्याचा ह्वे धातूशीं संबंध दिसत नाहीं; हु धातु ह्वे हून वेगळा असून त्याची हविष्, होम वगैरे रूपें आढळतात; हु च्या मानानें ह्वे धातूचीं रूपें ऋग्वेदांत फारच थोडीं आहेत. देणें ह्याच अर्थीं हु ऋग्वेदांत येतो. हु हवि देणें असा और्णवाभाचा अर्थ होय.

**रत्नधातमं रमणीयानां धनानां दातृतमम्**

रत्न + धा + तमम् ; रत्नानां = रमणीयानां (धनानां); धा=दाता; रत्नधातमं= रमणीय धन देणाऱ्यांत श्रेष्ठ अशाला. त्न हा प्रत्यय प्रत्न, नूत्न व रत्न ह्यांत आहे; र, प्र व नू ह्यांचा अर्थ धन; रत्न = धनाची रास. रथ ह्यांत र (= धन) शब्द आहे. ऋत्विजं ह्याचें विवरण यास्कानें केलें नाहीं व भाष्यांत तो शब्द घातलाही नाहीं; तसें करण्याचें कारण कळत नाहीं. यज्ञाचा पुरोहित, देव, ऋत्विक्, होता व धनदात्यांत श्रेष्ठ जो अग्नि त्याची मी याचना करतों असा यास्ककृत अर्थ. पुरोहित, देव, ऋत्विज् व होतृ ह्यांचा धन देणारा असाही अर्थ होईल. यज्ञस्य धनस्य देवं दातारं = धनाच्या दात्याला. पुरः = हि = धनम्; पुरोहित = पुष्कळ धन देणारा. ऋ (= देणें) + तुः= धनम्; यज् पासून इज् = देणें; ऋत्विज् = धन देणारा. अग्निः = दाता अग्नि. एकार्थीं अनेक शब्द एकाच ऋचेंत वापरणें हें ऋग्वेदाचें वैशिष्ट्य आहे.

**तस्य एषा अपरा भवति**

तत्संबंधी ही आणखी एक ( ऋचा ) होय. एषापरा = एषा + अपरा किंवा एषा व परा अशीं दोन भिन्न पदें. हा दुसरा पाठ घेतल्यास परा पुढची म्हणजे अग्निमीळे हिच्या पुढची असा अर्थ होईल; तसा अर्थ एथेंच तेवढा लागू होईल; कारण अग्निः पूर्वेभिः ही ऋचा अग्निमीळे नंतरची आहे; पण इतरत्र अपरा असाच शब्द घेतला पाहिजे.

## खंड १६ वा.

**अग्निः पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरुत। स देवाँ एह वक्षति ( १।१।२ )**
**अग्निः यः पूर्वैः ऋषिभिः ईळितव्यः। अस्माभिश्च नवतरैः**

यः शब्द अध्याहृत. पूर्वेभिः = पूर्वैः. ईड्यः = ईळितव्यः = याचना करण्यास योग्य. अस्माभिः अध्याहृत. उत = च. नूतनैः = नवतरैः = अगदीं अलीकडच्यांकडून.

**स देवान् इह आवहतु इति**

सः अध्याहृत. एह = आ + इह. आ + वक्षति = आवहतु. आवक्षति = आणतो; देवांना खालीं घेऊन येणें हें अग्नीचें नित्याचें काम; वक्षति ह्या वर्तमानकालाबद्दल वहतु हें आज्ञार्थी रूप भाष्यांत घालण्याचें कारण प्रत्येक ऋचेंत आशीर्वाद असलाच पाहिजे हें. अग्नि देवांना खालीं आणो व देव आमच्या आशा पूर्ण करोत. वह् + स् ( लेट्चा ) = वक्ष्. इति शब्द ऋचेवरील भाष्य संपलें हें दाखविण्याकरितां. पूर्वीच्या ऋषींनीं याचना करण्यास योग्य व आमच्यासारख्या अगदीं अलीकडच्यांकडूनही याचना करण्यास योग्य जो अग्नि तो देवांना एथें आणो. महाराष्ट्रपाठांत ईळितव्यः ह्याच्यानंतर वन्दितव्यः असा जास्त शब्द आहे; परंतु ईळिः अध्येषणाकर्मा असा १५ व्या खंडांत अर्थ दिल्यामुळें ईळितव्यः ह्याचा अर्थ देण्याची जरूर नाहीं. इड्य म्हणजे दाता किंवा धनयुक्त असाही ऋग्वेदांत अर्थ आहे. पायुः ईड्यः ( १०।१००।९ ), पावक ईड्यः ( ३।२७।४ ), दस्म ईड्यः ( २।१।४ ); ह्या स्थळीं प्रत्येक शब्दाचा अर्थ दाता असा आहे. स० हव्यः स ईड्यः स सुष्टुतः इन्द्रः सत्यराधाः ( ४।२४।२ ) एथें चारीही विशेषणांचा अर्थ धनयुक्त असा आहे. तोच अर्थ प्रस्तुत ऋचेंत आहे. ऋष् ( = देणें, ) ह्या धातूपासून ऋष्व, ऋषि व ऋषु हे शब्द उत्पन्न झाले आहेत. ऋषि = ( १ ) धन, ( २ ) धनार्थी, ( ३ ) दाता. आ याहि शिप्रिन् ऋषिवः शचीवः ( ८।२।२८ ) = हे धनवन्ता व धनदात्या ये. शिप्रिन् = ऋषिवः = शचीवः; शिप्र = ऋषि = शची = धन. ऋचेचा उद्दिष्ट अर्थः—अग्नि पूर्वकालीं दिलेल्या व हल्लीं दिलेल्या धनांनीं युक्त आहे; म्हणून तो धन इकडे आणो. देव = (१) धन, (२) धनवान्, (३) दाता. देव अग्नीला धन सतत देत आले आहेत; तें इतकें कीं त्याच्या धनदानाला कधींच खळ पडणार नाहीं.

**स न मन्येत अयमेव अग्निः इति । अपि एते उत्तरे ज्योतिषी अग्नी उच्येते**

ह्याच (म्हणजे पृथिवीवरील) काय तो अग्नि (दुसरीकडे अग्नि नाहीं) असें त्यानें (प्रतिपक्ष्यानें) मानूं नये; हे वरचे ज्योतीही अग्नि म्हटले जातात.

**ततः नु मध्यमः**

आतां (नु) त्यांपैकीं (ततः) पुढील ऋचेंत मध्यम म्हणजे अंतरिक्षांत असणारा अग्नि (सांगितला आहे).

## खंड १७ वा.

**अभि प्रवन्त समनेव योषाः कल्याण्यः स्मयमानासो अग्निम् । घृतस्य धाराः समिधो नसन्त ता जुषाणो हर्यति जातवेदाः (४।५८।८)**

**अभिनमन्त । समनसः इव योषाः । समनं समननाद्वा । संमाननाद्वा**

अभिप्रवन्त = अभिनमन्त. महाराष्ट्रपाठ अभिनवन्त असा आहे. नमन्त व नवन्त हीं दोन्हीं रूपें अशक्य आहेत; दुर्गवृत्तींत अभिनमन्ति असा शब्द आहे व तोच बरोबर आहे; सायणभाष्यांतही अभिनमन्ति असेंच आहे. समनेव = समना + इव; समना = समनसः. दुर्गवृत्तींत समानमनसः असें आहे. सगळ्यांचीं मनें नवऱ्यावर सारखीं आहेत अशा म्हणजे नवऱ्याला खूष करणाऱ्या. सम् + अन् ह्यापासून किंवा सं + मान् ह्यापासून समन. जुटीनें श्वासोच्छ्वास करणाऱ्या किंवा जुटीनें मान देणाऱ्या. समनं नपुंसकलिंगी कां? योषाः ह्याचें विशेषण असल्यामुळें तो शब्द समनाः असा पाहिजे.

**कल्याण्यः स्मयमानासः अग्निम् इति औपमिकम्**

कल्याण्यः म्हणजे रूपयौवनादिगुणयुक्त. स्मयमानासः = स्मयमानाः = स्मित करणाऱ्या. घृतधारांना हीं विशेषणें लाविलीं आहेत व अग्नीला त्यांचा पति मानलें आहे; ही केवळ उपमा होय; कारण हीं विशेषणें योषांनाच योग्य.

**घृतस्य धाराः उदकस्य धाराः । समिधः नसन्त । नसतिः आप्नोतिकर्मा वा नमतिकर्मा वा**

घृतस्य = उदकस्य. समिधः = समिन्धयन्त्यः (दुर्ग) = प्रज्वलित करणाऱ्या (उदकाच्या धारा). नस् = पोचणें किंवा नमणें; नसन्त = प्राप्नुवन्ति एवढेंच दुर्गवृत्तींत आहे.

**ता जुषाणो हर्यति जातवेदाः । हर्यतिः प्रेप्साकर्मा । अभिहर्यति इति**

हर्य् = मिळविण्याची इच्छा करणें. त्या मिळविण्याची अग्नि इच्छा करतो (अभिहर्यति). हर्यति = अभिहर्यति. इति = म्हणजे. अभि बद्दल महाराष्ट्रपाठ वि आहे. यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला अर्थ :— रूपयौवनादि गुणांनीं युक्त व किंचित् स्मित करणाऱ्या, नवऱ्यावर एकचित्त आहे ज्यांचें अशा स्त्रियांप्रमाणें उदकाच्या धारा आलिंगन

देण्याकरितां अग्नीवर ळवतात; प्रज्वलित करणाऱ्या त्या अग्नीला पोचतात; प्रीति करणारा (जुषाणः) जातवेद अग्नि त्यांची इच्छा करतो. दुर्ग म्हणतो:— उदकाच्या आहुति पृथिवीवरील अग्नींत द्याव्या असा विधि नाहीं; उदकधारा व स्त्रिया ह्यांच्या-मध्यें कोणतेंही साधर्म्य नाहीं; (धारा व योषा हे शब्द स्त्रीलिंगी आहेत एवढेंच साधर्म्य; पाण्याच्या बारीक धारा व तरुण स्त्रिया ह्यांची तुलना करणें हें हास्यास्पद होय); उलट वैद्युताग्नींत उदकद्रवन होतच असतें. स्त्रियांप्रमाणें पर्जन्यधारा झळ-कतात व सुंदर दिसतात; तेव्हां एथें पार्थिवाग्नि न घेतां वैद्युताग्निच घेतला पाहिजे. घृतं = उदकं (निघ० १।१२।१०); हा एकच अर्थ निघंटूंत दिला आहे; त्यामुळें ऋचा मध्यमाग्निपर आहे असें यास्कास म्हणणें भाग पडलें. पण घृत म्हणजे तूप असाच एथें अर्थ आहे. गोघृत पिवळसर असल्यामुळें सुंदर व स्मित करीत आहेसें दिसतें; शिवाय प्रज्वलित अग्नींत पडतांना तें जास्त सुंदर दिसणारच. तुलना विनो-दपर आहे. घृत (तूप) नपुंसक; त्याला कोण विचारतो! पण त्याची धारा म्हट-ल्याबरोबर आली काव्यकल्पनेला स्फूर्ति! घृतधारेनें पाटावाचें नेसलेली तरुणी मना-पुढें उभी राहते; सौंदर्य, यौवन, हास्यवदन वगैरे गोष्टी झटकन् मनांत येतात. नवरा बिछान्यावर पडला आहे; त्याला कोण आधीं कवटाळते अशी स्पर्धा चालू आहे; प्रत्येक जण स्मित करीत आहे, मुरके मारीत आहे. हा सर्व स्त्रीलिंगाचा महिमा! ऋचा रचणारे मनुष्यच होते; त्यांचा स्त्रियांविषयीं ओढा पुष्कळ ठिकाणीं दिसून येतो. जसें नु धातूपासून नवन्त तसें प्रु धातूपासून प्रवन्त झालें असावें. प्रु धातूचीं दुसरीं रूपें ऋग्वेदांत नाहींत असें वाटतें. समनेव ह्याची समना + इव अशी पदकार फोड करतो; पण समन + इव अशी फोड करावयास पाहिजे; समन = सम-नम्; मन = धन; समनः = धनवान्; समना = धनवती. समन व समना हे दोन्ही शब्द सुभग व सुभगा ह्यांसारखे असून त्यांचा बहुतेक ठिकाणीं पति व पत्नी असा अर्थ आहे. ते आचरन्ती समनेव योषा मातेव पुत्रं बिभृतामुपस्थे (६।७५।४) = आई जशी पुत्राला मांडीवर घेते किंवा स्त्री जशी नवऱ्याला उपस्थावर घेते त्या-प्रमाणें बाणाला त्या स्वसंनिध ठेवतात; एथें पुत्रं प्रमाणें समनं अशी द्वितीया आहे. कल्याण व कल्याणी ह्यांचाही अर्थ सुभग व सुभगा ह्यांच्यासारखा. कल्याणी = सुंदर. जशा सुंदर स्त्रिया स्मित करीत नवऱ्याकडे जातात (अभिप्रवन्त) तशा घृताच्या धारा अग्नीकडे जातात; त्या त्याला धन (समिधः) देतात (नसन्त); धनवान् अग्नि (जातवेदाः), दाता असल्यामुळें (जुषाणः) तें धन (ताः=समिधः) भक्तांस देतो (हर्यति). समिध् चा अर्थ धन होतो; उदस्तम्भीत् समिधा नाकमृष्वः (३।५।१०) = धनवान् (ऋष्वः) अग्नि द्युलोकाला (नाकं) धनानें (समिधा) वर (उत्) उचलून धरता झाला (अस्तम्भीत्). जुष् = देणें; जुषाणः = देणारा. हरि = सोनें; हर्यति = सोनें देतो; देतो. एनं गच्छन्ति समनं न योषाः (१०।१६८।२) ह्यासारखेंच अभिप्रवन्त समनेव योषाः हें वाक्य आहे.

**समुद्रादूर्मिर्मधुमाँ उदारत् ( ४।५८।१ ) इति आदित्यमु उक्तं मन्यन्ते। समुद्राद्धि एषः अद्भ्यः उदेति इति च ब्राह्मणम् ( कौषीतकिब्रा० २५।१ )**

समुद्रात्० उदारत् ह्या ऋचेंत आदित्य म्हणजे सूर्य सांगितला आहे म्हणजे ऋचेची देवता सूर्य आहे असें मानतात. हा सूर्य समुद्रांतून, पाण्यांतून वर येतो असें ( कौषीतकिब्राह्मणांत ) म्हटलें आहे. पाण्यांतून पार्थिव अग्नि कधीं निघणार नाहीं; कारण त्या दोघांचा विरोध आहे. ऋचेची देवता सूर्य असें असलें तरी त्याचा अग्नीशीं काय संबंध ! सूर्याला अग्नि म्हणतात ह्याला काय आधार ! उत्तर

**अथापि ब्राह्मणं भवति अग्निः सर्वाः देवताः ( ऐत० ब्रा० ६।३ ) इति**

अग्नि म्हणजे सर्व देवता असें एक ब्राह्मणवचन आहे. म्हणून सूर्यसुद्धां अग्नि. सूर्य द्युलोकीं राहतो म्हणून तेथील अग्नि द्युलोकस्थ. मधु म्हणजे धन. धनयुक्त ( मधुमान् ) धनाचा साठा ( ऊर्मिः ) समुद्रांतून ( समुद्रात् ) वर ( उत् ) आला ( आरत् ). हा सांटा म्हणजे सूर्य; समुद्रादूर्मिरुदियर्ति वेनः (१०।१२३।२) = धनवान् (ऊर्मिः) दाता ( वेनः ) जो सूर्य तो समुद्रांतून वर ( उत् ) येतो ( इयर्ति ); एथें तीच कल्पना आहे. उत् इयर्ति = धन देतो असाही अर्थ होईल; त्याचप्रमाणें उत् आरत् =धन देता झाला. समुद्रः=सम् + उत् + रः =धनाचा सांठा. सम् =उत् = रः = धन. सर्व ऋचेंत धन व देणें ह्या अर्थाचे शब्द आहेत. ऋचेशीं अग्नीचा यत्किंचितही संबंध नाहीं.

**तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय**

( अग्नि म्हणजे सर्व देवता ) ह्या अर्थाचें जास्त स्पष्टीकरण व्हावें म्हणून पुढील ( ऋचा दिली आहे ).

## खंड १८ वा.

**इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान्। एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ( १।१६४।४६ )**

**इमम् एव अग्निं महान्तम् आत्मानम् एकम् आत्मानं बहुधा मेधाविनः वदन्ति**

'इमम् ० एकम् आत्मानम्' ह्यांतील 'एकं' शब्द वगळून बाकीचे सर्व अध्याहृत आहेत. अग्निं = महान्तम् आत्मानं = एकम् आत्मानम् = अग्नि म्हणजे महान् आत्मा म्हणजे एक आत्मा. ह्यालाच ज्ञाते ( विप्राः = मेधाविनः ) अनेक प्रकारांनीं ( बहुधा ) बोलतात ( वदन्ति ) म्हणजे त्याला भिन्न भिन्न नांवें देतात. गुर्जरपाठांत महान्तं नंतर 'च' जास्त आहे; त्यानें भलता अर्थ म्हणजे ह्या अग्नीला व महान् आत्म्याला असा होतो; पण अग्नि हा महान् आत्म्याहून भिन्न नाहीं.

**इन्द्रं मित्रं वरुणम् अग्निं दिव्यं च गरुत्मन्तम्। दिव्यः दिविजः। गरुत्मान् गरणवान् गुर्वात्मा महात्मा इति वा**

तीं नांवें म्हणजे इंद्र, मित्र, वरुण, अग्नि व दिव्य गरुत्मान्. दिव्यः = दिविजः = द्युलोकीं जन्मलेला. गरुत्मान् = गरणवान्; गरुत् = गरणम् = स्तुति; गरणवान्

= स्तुतींनीं युक्त, स्तुत्य; किंवा गरणं गिळणें; गरणवान् = जलादि रस गिळणारा म्हणजे शोषणारा. किंवा गरु = गुरु; त्मान् = आत्मा; गरुत्मान् = गुरु + आत्मा = महात्मा. द्युलोकीं असणारा आदित्य हाही महान् आत्मा. यास्कानें सुपर्णः शब्द गाळला आहे व ऋचेचें भाष्य एथेंच संपविलें आहे. दुर्गानें यास्कभाष्याचा दिलेला अर्थ :— ह्याच अग्नीला ज्ञाते इन्द्र, मित्र, वरुण व आदित्य म्हणतात; हा महान् आत्मा एक असूनही ज्ञाते त्याला अग्नि, यम, मातरिश्वा अशीं अनेक नांवें देतात. अग्निः सर्वाः देवताः हें स्पष्ट करण्याकरितां ही ऋचा यास्कानें दिली आहे व भाष्यांत इममेव अग्निं असे शब्द घातले आहेत. वास्तविक ऋचा अग्निपर नसून एकं सत् ह्यासंबंधीं आहे. इंद्र, मित्र वगैरे नांवांप्रमाणें अग्नि हेंहि महान् आत्म्याचें नांव आहे. गरुत्मान् शब्द ऋग्वेदांत फक्त दोनदां येतो; गरुत्मान् = पंखांचा. सुपर्णः = पक्षी. सः = तो ( प्रसिद्ध सूर्य ). ऋचा जितकी स्पष्ट असावी तितकी नाहीं; इंद्र वगैरे नांवें देतात तीं कोणाला? अग्नीला ( अग्निमाहुः )? अग्निं यमं० एथें ही तीच शंका. यम व मातरिश्वन् हीं अग्नीचीं नांवें कीं अग्नि, यम, मातरिश्वन् हीं एकं सत् ह्याचीं? ३।२६।२ त मातरिश्वानं हें 'अग्नि' चें विशेषण आहे; तेव्हां अग्नीला हीं निरनिराळीं नांवें आहेत असाही अर्थ होईल.

**यस्तु सूक्तं भजते यस्मै हविर्निरुप्यते अयमेव सोऽग्निः। निपातम् एव एते उत्तरे ज्योतिषी एतेन नामधेयेन भजेते**

( इतर ज्योतींनाही अग्नि शब्द लावतात हें जरी खरें आहे तरी ) ज्याच्या-संबंधानें सबंध सूक्त असतें व ज्याला हवि दिला जातो तो हाच ( म्हणजे पृथिवी-वरीलच ) अग्नि; इतर जे अंतरिक्षांतील व द्युलोकांतील अग्नि तत्संबंधानें सबंध सूक्तही नाहीं व त्यांना हवीही देत नाहींत. हे जे वरील ( म्हणजे अंतरिक्षांतील व द्युलोकां-तील ) ज्योति त्यांना अग्नि हें नांव निपात म्हणजे गौणत्वानेंच लाविलें असतें. निपात = अप्रधान, गौण.

## खंड १९ वा.

**जातवेदाः ( निघ० ५।१।२ ) कस्मात्। जातानि वेद। जातानि वा एनं विदुः। जाते जाते विद्यते इति वा। जातवित्तः वा जातधनः। जातविद्यः वा जातप्रज्ञानः**

जातवेदस् शब्द कशापासून? जातवेदाः = जात + वेदाः. जात = जातानि = जन्मलेल्या, उत्पन्न झालेल्या वस्तु; वेदः = वेद = जाणतो; किंवा वेदः = विदुः = जाणतात. सर्व सृष्ट वस्तु हा जाणतो किंवा ह्या त्याला जाणतात म्हणून तो जात-वेदस्. जात = जाते जाते = प्रत्येक सृष्ट वस्तूंत; वेदस् = विद्यते = असतो. ज्यांत अग्नि नाहीं असा पदार्थ नाहीं. जातवित्तः = जातधनः = ज्याचेपाशीं धन आहे असा. वेदः = धन. वेदस् = विद्या = प्रज्ञानम्. जातप्रज्ञानः = ज्याच्याजवळ ज्ञान आहे असा. सायण-भाष्यांतील निरुक्त उताऱ्यांत जातप्रज्ञः असा पाठ असून जातधनः व जातप्रज्ञः ह्या

प्रत्येकानंतर आणखी एक 'वा' आहे. जातधनः व जातप्रज्ञानः किंवा जातप्रज्ञः हे शब्द प्रक्षिप्त असावेत; कारण यास्क भाष्यांतील विवरणाचें विवरण करीत नाहीं.

**यत्तत् जातः पशून् अविन्दत तत् जातवेदसो जातवेदस्त्वम् इति ब्राह्मणं (मैत्रा० सं० १।८।२)। तस्मात् सर्वान् ऋतून् पशवः अग्निम् अभिसर्पन्ति (मैत्रा० सं० १।८।२) इति च**

जन्मल्याबरोबर तो पशूंना मिळविता झाला ही जी गोष्ट तीच जातवेदस्ला 'जातवेदस्' हें नांव पडण्याचें कारण असें ब्राह्मणवचन आहे. जातवेदाः = जातः अविन्दत; जात = जन्मलेला; विद् विन्द मिळविणें. हल्लींच्या मैत्रायणी संहितेंत यत्तत् नसून यत् एवढेंच आहे. सायणभाष्यांत इति हि ब्राह्मणं असें आहे. सर्व ऋतूंत पशु अग्नीकडे जातात असेंही ब्राह्मणवचन आहे. हें ब्राह्मणवचन व्युत्पत्तीसाठीं नसून अग्नीला पशु कशाकरितां पाहिजेत ह्याला उत्तर म्हणून दिलें आहे. वेदस् = धन; जा = धन; जात = ज्यांत धन आहे असें; धनयुक्त धन म्हणजे अतीशय धन ज्याच्यापाशीं आहे तो जातवेदस् हीच कायती खरी व्युत्पत्ति.

**तस्य एषा भवति**

ही (पुढील ऋचा) त्याची (जातवेदस् संबंधाची) आहे.

## खंड २० वा.

**प्र नूनं जातवेदसमश्वं हिनोत वाजिनम्। इदं नो बर्हिरासदे (१०।१८८।१)**
**प्रहिणुत जातवेदसं कर्मभिः समश्नुवानम्**

प्र + हिनोत = प्रहिणुत = प्रेरणा करा. अश्वं = (कर्मभिः सम्) अश्नुवानं = कर्मांनीं हें सर्व जग व्यापून टाकणाऱ्याला. अशू व्याप्तौ (धा० ५।१८); अश् (= व्यापणें) + वः = अश्वः = व्यापणारा. दुर्गवृत्तींत अश्नुवानं च्या आधीं सं नाहीं.

**अपि वा उपमार्थे स्यात् अश्वमिव जातवेदसम् इति**

किंवा अश्वं ह्यानें उपमा दर्शवावयाची असेल; ती अशी (इति); अश्वाप्रमाणें धनवान्. अश्व रणांतून पाठीवर लूट घेऊन येतो त्यामुळें तो धनवान्; त्याप्रमाणें अग्नि धनवान्. घोड्याप्रमाणें शीघ्रगति असें दुर्ग म्हणतो; तेव्हां अश्वमिव ह्यानंतर जातवेदसं हा शब्द त्याच्या पाठांत नसावा.

**इदं नो बर्हिः आसीदतु इति**

त्यानें ह्या आमच्या दर्भासनावर बसावें म्हणून (त्याला प्रेरणा करा). नूनं निरर्थक म्हणून भाष्यांत गाळलें आहे; पण वाजिनं कां गाळलें समजत नाहीं. वाजिनं = कांपविणारा किंवा ज्वालांनीं चलनवान् म्हणजे पसरणारा असा दुर्ग धातु लक्षांत घेऊन अर्थ करतो; ओविजी भय चलनयोः (धा० ६।९); विज् = (१) भिणें, (२) हलणें; वेजयति = कांपवितो; विजति = हलतो. पण वाजिनं=जातवेदसं= अश्वं= धनवानाला असा अर्थ आहे. दुर्गकृत अर्थः– शत्रूला कांपविणारा किंवा ज्वालांनीं पसर-

णारा व घोड्याप्रमाणें शीघ्रगति जो जातवेदस् त्यानें आमच्या ह्या दर्भासनावर बसावें व आम्हांस कर्मफलसिद्धि द्यावी अशी त्याला प्रेरणा करा. उद्दिष्ट अर्थ :— धनवान् ( प्र = नूनं = जातवेदसं = वाजिनं ) अशा अग्नीला आम्हांला पुष्कळ (इदं) धन (बर्हिः) देण्याकरितां (आसदे) विनवा (विनोत). बृह् (=वाढविणें)ह्यापासून बर्हिः; बर्हिः म्हणजे दर्भ असाही अर्थ आहे. सद् = (१) बसणें, (२) देणें. इदं = हें = पुष्कळ.

**तदेनत् एकमेव जातवेदसं गायत्रं तृचं दशतयीषु विद्यते**

तत् ह्यानें विषयाचा आरंभ केला आहे. गायत्रीछंदांत जातवेदस् संबंधाच्या लागोपाठ येणाऱ्या तीन ऋचांचा संघ असा हा एकच दशमंडलांत (ऋग्वेदांत) आहे. गुर्जरपाठ एकमिव असा आहे; एव ह्यानें खात्री तर इव ह्यानें थोडीशी शंका दर्शविली जाते; कदाचित् आणखी एखादा तृच नसेल कोणी सांगावें !

**यत्तु किंचित् आग्नेयं तत् जातवेदसानां स्थाने युज्यते**

( जातवेदस नांवाचा तृच एकच ) पण ( तु ) जेथें जातवेदस तृच अनेक लागतात तेथें जो एखादा आग्नेय तृच सांपडेल तो वापरतात.

**स न मन्येत अयमेव अग्निरिति। अपि एते उत्तरे ज्योतिषी जातवेदसी उच्येते**

खंड १६ वा पहा.

**ततो नु मध्यमः। अभि प्रवन्त समनेव योषाः इति। तत् पुरस्तात् व्याख्यातम्**

ततो नु मध्यमः खंड १६ वा पहा. अभि प्रवन्त ह्या ऋचेचें विवरण खंड १७ त केलें आहे. ह्या ऋचेंत अग्नि प्रधान न मानतां जातवेदस् प्रधान मानावा.

**अथ असौ आदित्यः। उदु त्यं जातवेदसम् (१।५०।१) इति। तदुपरिष्टात् व्याख्यास्यामः**

उदु त्यं हें सूर्य हा जातवेदस् ह्याचें उदाहरण; त्या ऋचेचें विवरण निरुक्त १२।१५ त करूं. जातवेदस् म्हणजे धनवान्; हें विशेषण कोणत्याही देवाला लावतां येईल व तें सूर्य वगैरेना लावलें गेलें; कालांतरानें तें अग्नीचेंच विशेषण झालें व त्यालाच जातवेदस् म्हणूं लागले.

**यस्तु सूक्तं भजते यस्मै हविर्निरुप्यते अयमेव सोऽग्निर्जातवेदाः। निपातमेव एते उत्तरे ज्योतिषी एतेन नामधेयेन भजेते**

खंड १८ वा पहा.

## खंड २१ वा.

**वैश्वानरः (३) कस्मात्। विश्वान् नरान् नयति। विश्वे एनं नराः नयन्ति इति वा**

वैश्वानर शब्द कशापासून ? वैश्व + नरः; वैश्व = विश्व = विश्वान्; नरः=नरान्;

नयति अध्याहृत. सर्व लोकांना इहलोकांतून स्वर्गास नेतो किंवा यच्चयावत् क्रियांकडे नेतो म्हणजे त्या करावयास लावतो; किंवा सर्व लोक त्याला सर्व कर्मांत सहाय म्हणून नेतात. ह्या व्युत्पत्तींत वैश्व म्हणजे विश्व असें मानावें लागतें; तें बरोबर नाहीं म्हणून पुढील व्युत्पत्ति

**अपि वा विश्वानरः एव स्यात्। प्रति ऋतः सर्वाणि भूतानि। तस्य वैश्वानरस्य एषा भवति**

किंवा वैश्वानर हा मूळचा विश्वानरच असेल. विश्वानर शब्दाची व्युत्पत्ति :— विश्वान् + अरः = विश्वानरः; विश्वान् = सर्वाणि भूतानि; अरः = ऋतः = गेलेला; सर्व भूतांकडे म्हणजे सर्वांठायीं गेलेला; ऋ जाणें ह्यापासून अर. विश्वानर नांवाचा कोणी एक देव असेल; त्याचा पुत्र वैश्वानर असा दुर्ग अर्थ देतो; तेव्हां त्याच्या पाठांत स्यात् च्या आधीं कश्चित् व भूतानि नंतर तस्यापत्यं असे शब्द असावेत व तोच पाठ योग्य दिसतो; कारण त्या वैश्वानरासंबंधी ही ( पुढील ऋचा ) आहे असें म्हटलें आहे. विश्वानर जो वैश्वानर तत्संबंधी किंवा विश्वानराचा पुत्र जो वैश्वानर तत्संबंधी असे दोन निराळे पाठ घेतल्यानें निराळे अर्थ होतील.

## खंड २२ वा.

**वैश्वानरस्य सुमतौ स्याम राजा हि कं भुवनानामभिश्रीः। इतो जातो विश्वमिदं वि चष्टे वैश्वानरो यतते सूर्येण ( १।९८।१ )**

**इतः जातः सर्वम् इदम् अभिविपश्यति। वैश्वानरः संयतते सूर्येण। राजा यः सर्वेषां भूतानाम् अभिश्रयणीयः तस्य वयं वैश्वानरस्य कल्याण्यां मतौ स्याम इति**

विश्वं = सर्वम्. विचष्टे = अभिविपश्यति. यतते = संयतते; संयतते = संगच्छते (दुर्ग) = मिसळतो. यः अध्याहृत. भुवनानां=सर्वेषां भूतानाम्. अभिश्रीः=अभिश्रयणीयः = आश्रय करण्याजोगा; दुर्गवृत्तींत आश्रयणीयः असें आहे. हि आणि कं निरर्थक म्हणून भाष्यांत गाळले आहेत. तस्य वयं अध्याहृत. सुमतौ=कल्याण्यां मतौ. इति ह्यानें एकवाक्य करावें असें दर्शविलें जातें; नाहींतर चार भिन्न वाक्यें होतात; शिवाय आशीर्वादानें वाक्यसमाप्ति होणें केव्हांही इष्टच असतें. यास्ककृत अर्थः— पृथिवीवर जन्मून तेथूनच ( इतः ) हें सर्व जो पाहतो, व जो वैश्वानर सूर्याशीं मिसळतो ( म्हणजे आपलें तेज सूर्याच्या तेजांत मिसळतो ) व राजा म्हणून सर्व भूतांनीं आश्रय करण्याजोगा जो आहे त्याच्या कल्याणकारक मतींत आपण असूं या ( म्हणजे त्याचा अनुग्रह आपण मिळवूं या ). उद्दिष्ट अर्थः— धनवान् अग्नीच्या ( वैश्वानरस्य ) धनदानांत ( सुमतौ ) आपण असूं या ( आपणांस तो धन देवो ); कारण तो सर्व धनाचा ( भुवनानां ) राजा व साठा ( अभिश्रीः ) आहे; धनवान् ( इतः = जातः ) तो अतीशय ( इदं ) धन (विश्वं = वि ) देतो ( चष्टे ); धनदानांत वैश्वानर सूर्याशीं चढाओढ करतो ( यतते ).

हि = कं = वि = धन. सु धनम् । तेन युक्ता मतिः धनं सुमतिः = अतीशय धन. भुवनं = धन. अभि धनम् । तेन युक्ता श्रीः धनं यस्य सः. इ = देणें, दान, धन. जा = धन. इतः = जातः = धनवान्. विश्वं = धन. इदं = हें, एवढें, पुष्कळ. चष्टे = देतो. यत् = चढाओढ करणें.

**तत् कः वैश्वानरः । मध्यमः इति आचार्याः । वर्षकर्मणा हि एनं स्तौति**

तत् ह्यानें विषयाला आरंभ होतो. वैश्वानर कोण? मध्यम म्हणजे वैद्युताग्नि असें आचार्य म्हणतात; कारण मंत्रद्रष्टा त्याची वर्षकर्मसंबंधानें स्तुति म्हणजे वर्णन करतो. आचार्याः = निरुक्तकार.

## खंड २३ वा.

**प्र नू महित्वं वृषभस्य वोचं यं पूरवो वृत्रहणं सचन्ते। वैश्वानरो दस्युमग्नि-र्जघन्वाँ अधूनोत्काष्ठा अव शम्बरं भेत् ( १।५९।६ )**

**प्रब्रवीमि तत् महित्वं माहाभाग्यं वृषभस्य वर्षितुः अपाम्**

प्र + वोचं = प्रब्रवीमि = मोठ्यानें सांगतों. नु निरर्थक म्हणून गाळलें आहे. महित्वं = माहाभाग्यं = मोठेपणा. वृषभस्य = वर्षितुः अपां = जल वर्षणाऱ्याचें.

**यं पूरवः पूरयितव्याः मनुष्याः वृत्रहणं मेघहनं सचन्ते सेवन्ते वर्षकामाः**

पूरवः = पूरयितव्याः मनुष्याः ( निघं० २।३।२० ) = ज्यांच्या कामना पूर्ण करावयाच्या आहेत असे मनुष्य. वृत्रहणं = मेघहनं = मेघ फोडणाऱ्याला. सचन्ते = सेवन्ते = सेवा करतात. वर्षकामाः ( अध्याहृत ) = पावसाची इच्छा करणारे.

**दस्युः दस्यतेः क्षयार्थात्। उपदस्यन्ति अस्मिन् रसाः। उपदासयति कर्माणि**

दसु उपक्षये ( धा० ४।१०७ ); दस् = क्षय पावणें; दस् + युः = दस्युः. ज्याच्यांत जलादि रस क्षय पावतात तो दस्यु; (किंवा पाऊस न पाडल्यामुळें) ऐहिक व पारमार्थिक कर्मांचा ( कर्माणि ) जो क्षय करतो ( उपदासयति ) तो दस्यु.

**तम् अग्निः वैश्वानरः घ्नन् अवाधूनोत् अपः काष्ठाः । अभिनत् शम्बरं मेघम्**

तं ( अध्याहृत ) = त्या दस्यूला. जघन्वान् = घ्नन्. अव + अधूनोत् = खालीं फेकता झाला. काष्ठाः = अपः = पाणी. भेत् = अभिनत्. शम्बरं = मेघम्. दुर्गवृत्तींत महित्वं च्या आधींचा तत् शब्द, अधूनोत् च्या आधींचा अव उपसर्ग व दस्युः दस्यतेः क्षयार्थात् ही व्युत्पत्ति नाहीं; घ्नन् बद्दल हतवान् आहे. यास्ककृत अर्थः— मनुष्य मेघाला मारणाऱ्या ज्या वैश्वानर अग्नीची सेवा करतात त्या पाऊस पाडणाऱ्या अग्नीचें माहात्म्य मी उच्चरवानें वर्णन करतों; वैश्वानर अग्नि दस्यूला मारून पाणी खालीं फेकता झाला व शंबर म्हणजे मेघ त्याला फोडता झाला.

**अथ असौ आदित्यः इति पूर्वे याज्ञिकाः**

पण वैश्वानर म्हणजे आदित्य असें पूर्वकालीन याज्ञिक म्हणतात. दुर्गवृत्तींत 'अथ' नाहीं. विधि, मंत्र, अर्थवाद ह्यांचा विचार करून व यज्ञाचें खरें स्वरूप ठरवून

त्याप्रमाणें जे यज्ञ करतात ते पूर्वींचे याज्ञिक असा दुर्ग अर्थ करतो.

**एषां लोकानां रोहेण सवनानां रोहः आम्नातः**

हे लोक म्हणजे पृथिवी, अंतरिक्ष व द्युलोक; हे चढण्याचा जो क्रम तोच सवनांचा क्रम वेदांत सांगितला आहे; म्हणजे प्रातःसवन पहिलें, माध्यंदिन दुसरें, तृतीयसवन तिसरें. प्रजापतीनें अग्नि व वसु ह्यांना प्रातःसवन, इंद्र व रुद्र ह्यांना माध्यंदिनसवन व विश्वेदेव आणि आदित्य ह्यांना तृतीयसवन नेमून दिलें (ऐत० ब्रा० १२।२ ); अग्नि पृथिवीवरचा, इंद्र अंतरिक्षांतला व आदित्य द्युलोकांतले अशी व्यवस्था असल्यामुळें प्रातःसवन पृथिवीचें, माध्यंदिन अंतरिक्षाचें व तृतीयसवन द्युलोकचें असा सवनांचा चढता क्रम आपोआप सिद्ध होतो. स्वर्गाला जाण्याची ज्याला इच्छा झाली असेल त्या यजमानाकरितां होत्यानें हंसःशुचिषत् ( ४।४०।५ ) हा मंत्र किंवा तार्क्ष्य-सूक्त ( १०।१७८ ) एकदम न थांबतां म्हणावें ( ऐत० ब्रा० १८।६ ); किंवा थांबत थांबत म्हणावें (ऐत० ब्रा० १८।७). थांबण्याचा प्रकार पुढीलप्रमाणें:--प्रत्येक पादाच्या शेवटीं थांबावें; तसें केल्यानें त्याला पृथिवीलोक मिळतो; प्रत्येक ऋगर्धानंतर थांबावें म्हणजे अंतरिक्षलोक मिळतो; तीन पाद म्हटल्यावर थांबावें म्हणजे स्वर्ग मिळतो; सबंध ऋचा म्हणावी म्हणजे आदित्यमंडळांत कायमचें स्थान मिळतें. हा चढण्याचा क्रम झाला; आतां उतरलें पाहिजे; उतरण्याच्या वेळीं होता तीन पाद म्हणून थांबतो; तसें केल्यानें आदित्यमंडळांतून उतरून स्वर्गलोकीं तो वास करतो; प्रत्येक ऋगर्ध म्हटल्यावर थांबल्यानें अंतरिक्षलोकीं तो उतरतो व नंतर प्रत्येक पादानंतर थांबून तो पृथिवीवर येतो; असें केल्यानें यजमानाला स्वर्ग मिळून पृथिवीवरही त्याला पुष्कळ वर्षें रहावयास सांपडतें. पण कांहीं लोक केवळ स्वर्गेच्छु असल्यामुळें होता त्यांच्या-करितां हा उलट क्रम करीत नाहीं; त्यामुळें त्यांना पृथिवीवर फार दिवस रहावयास सांपडत नाहीं; ही आपत्ति टाळण्याकरितां

**रोहात् प्रत्यवरोहः चिकीर्षितः**

चढल्यानंतर उतरण्याची इच्छा बहुतेकांना असते. चढणें व उतरणें खरोखरीचें नसून ते मंत्र किंवा सूक्त म्हणण्याचे दोन प्रकार होत.

**ताम् अनुकृतिं होता आग्निमारुते शस्त्रे वैश्वानरीयेण सूक्तेन प्रतिपद्यते ( ऐत० ब्रा० १२।३ )**

( चढण्याचें अनुकरण होता शस्त्रें म्हणून करतो; त्याचप्रमाणें ) उतरण्याचेंहि अनुकरण त्याला शस्त्रांनींच करावें लागतें. अग्निष्टोमांत तृतीयसवनाचें साम यज्ञाय-ज्ञिय नांवाचें असतें; यज्ञायज्ञा वो अग्नये (ऋ० सं० ६।४८) हें सूक्त गावयाचें असतें. स्तोता जें साम गातो त्याला स्तोत्रिय म्हणतात. यथा वाव स्तोत्रमेवं शस्त्रं (ऐत० ब्रा० १०।५) = जसें स्तोत्र तसेंच शस्त्र; स्तोत्र किंवा स्तोत्रिय व शस्त्र ह्यांच्या ऋचा एकच. जें आधीं गाइलें जातें त्याचेंच शंसन केलें पाहिजे असा नियम आहे; तेव्हां तृतीयसवनांत स्तोत्रिय व शस्त्र ह्यांच्या ऋचा यज्ञायज्ञा वो अग्नये इत्या-

दिच पाहिजेत; पण तृतीयसवन द्युलोकचें; द्युलोकदेवता आदित्य; त्याचेंच शंसन केलें पाहिजे; म्हणून नियमानें जरी यज्ञायज्ञिय शस्त्र म्हटलें पाहिजे तरी तो नियम बाजूला ठेऊन वैश्वानराय पृथुपाजसे ( ऋ० सं० ३।३ ) हें शस्त्र होता म्हणतो. ३।३ हें वैश्वानरीय सूक्त आहे.

**सोऽपि न स्तोत्रियम् आद्रियेत। आग्नेयो हि भवति**

त्यानें ( होत्यानें ) स्तोत्रियाकडे लक्ष देऊं नये; कारण स्तोत्रिय ऋचांची देवता अग्नि आहे. ह्याचें स्पष्टीकरण वर केलेंच आहे. अपि ह्यानें होत्याला सर्व नियम माहित असूनही असा अर्थ दर्शविला जातो.

**ततः आगच्छति मध्यस्थानाः देवताः रुद्रं च मरुतश्च**

नंतर ( द्युलोकांतून उतरल्यावर ) म्हणजे आदित्यशस्त्र म्हटल्यावर होता रुद्र व मरुत् ह्या ज्या अंतरिक्षस्थ देवता त्यांच्याकडे येतो म्हणजे आदित्यशंसन करून मग तो मध्यमस्थानदेवतांचें शंसन करतो. आगच्छति ह्यानें शस्त्ररूप प्रत्यवरोहणक्रिया दर्शविली जाते; आगच्छति = ( रुद्रं मरुतश्च ) शंसति.

**ततः अग्निम् इहस्थानम्। अत्रैव स्तोत्रियं शंसति**

नंतर तो इहस्थान म्हणजे पृथिवीस्थ जो अग्नि ( त्याच्याकडे येतो ) व येथेंच स्तोत्रिय ऋचांचें शस्त्र म्हणतो. दुर्गवृत्तींत तं स्तोत्रियं आहे व तो पाठ उत्तम आहे; यज्ञायज्ञा वो अग्नये हें स्तोत्रिय; त्याचेंच तो शस्त्र करतो म्हणजे त्या ऋचा एथें म्हणतो; कारण पृथिवीवर अग्नीचेंच शंसन केलें पाहिजे.

**अथापि वैश्वानरीयः द्वादशकपालः भवति। एतस्य हि द्वादशविधं कर्म**

शिवाय वैश्वानराला द्यावयाचा पुरोडाश हा बारा कपालांवर भाजला जातो; ह्याचें म्हणजे आदित्याचें कर्म बारा प्रकारचें असतें. कपाल म्हणजे बारकी पातळ वीट; ही तापवून तिच्यावर पुरोडाश भाजतात; कपालांच्या संख्येप्रमाणें पुरोडाश एककपाल, द्विकपाल, पञ्चकपाल, अष्टाकपाल, एकादशकपाल, द्वादशकपाल असा असतो. निरनिराळ्या देवतांना निरनिराळे पुरोडाश द्यावयाचे असतात. आग्नेयम् अष्टाकपालं निर्वपेत् ( मैत्रा० सं० २।१।३ ), ऐन्द्रम् एकादशकपालं निर्वपेत् ( मैत्रा० सं० २।१।२ ) अशीं काम्येष्टीमध्यें विधिवचनें आहेत. अग्नये वैश्वानराय द्वादशकपालं निर्वपेत् ( मैत्रा० सं० २।१।२ ) = अग्निवैश्वानराला बारा कपालांवर भाजलेला पुरोडाश द्यावा. सूर्य बारा महिने प्रकाशतो; तें त्याचें बारा प्रकारचें काम; बारा ही संख्या सूर्यालाच लागू आहे; म्हणून वैश्वानर म्हणजे सूर्य किंवा आदित्य.

**अथापि ब्राह्मणं भवति असौ वै आदित्यः अग्निर्वैश्वानरः ( मैत्रा० सं० २। १।२ ) इति**

हा आदित्य अग्निवैश्वानर असें ब्राह्मणवचनही आहे.

**अथापि निविद् सौर्यवैश्वानरी भवति। आ यो द्यां भात्या पृथिवीम् इति**

तत्तद्देवतास्तुतियुक्तानां पदानां समूहः निविद् = निविद् म्हणजे त्या त्या देव-

तेच्या स्तुतींतील एकत्र केलेल्या पदांचा समूह. निरनिराळ्या ऋचांत देवतांची निरनिराळी स्तुति केलेली असते; तीं स्तुतिपदें किंवा वाक्यें एकत्र केल्यानें निविद् बनते. कुन्तापाध्याय म्हणून ऋक्संहितेला जोडलेलें एक प्रकरण असतें; त्यांत ह्या निविद् दिलेल्या असतात; त्यांपैकीं प्रस्तुत निविद् आठवी होय. शस्त्र म्हणण्याचें आधीं निविद् म्हणावयाची असते ( ऐत० ब्रा० १०।१ ). मी शस्त्र म्हणतों, मला आज्ञा असावी असें होता अध्वर्यूला म्हणतो; ह्या मागणीला आहाव म्हणतात ( ऐत० ब्रा० १२।१ ); अध्वर्यु रुकार देतो; त्या रुकाराला प्रतिगर म्हणतात; ह्यानंतर होता निविद् म्हणतो. प्रस्तुत निविदूचे १५ तुकडे असून आ यो द्यां० हा आठवा तुकडा आहे; त्याचा अर्थ :— जो द्युलोकाला व पृथिवीला प्रकाश देतो. असा प्रकाश देणारा सूर्यच.

**एष हि द्यावापृथिव्यौ आभासयति**

कारण हाच द्युलोकाला व पृथिवीला प्रकाश देतो. सूर्यः एव वैश्वानरः। तस्येयं सौर्यवैश्वानरी = सूर्य हाच वैश्वानर; त्याची निविद् ती सौर्यवैश्वानरी.

**अथापि छान्दोमिकं सूक्तं सौर्यवैश्वानरं भवति**

शिवाय छंदोमसंबंधी सूक्ताची देवता सूर्यवैश्वानर आहे. द्वादशाह नांवाच्या सत्रांत नवरात्र म्हणून एक भाग असतो; त्याचे तीन त्र्यह असतात; शेवटल्यांतील प्रत्येक दिवसास छंदोम ही संज्ञा आहे. छन्दोमे नियुक्तं छान्दोमिकम् = छंदोमांत जो त्र्यह प्रयुक्त म्हणजे म्हटलें जाणारें जें सूक्त तें छान्दोमिक.

**दिवि पृष्ठो अरोचत इति**

दिवि पृष्ठो अरोचताग्निर्वैश्वानरो बृहन्।० ज्योतिषा बाधते तमः ( य० वा० सं० ३३।९२ ) = द्युलोकीं असलेला ( पृष्टः = स्थितः ) महान् अग्नि वैश्वानर प्रकाशतो व स्वतेजानें अंधकार नाहींसा करतो.

**एष हि दिवि पृष्ठो अरोचत**

कारण द्युलोकीं असणारा हा ( सूर्यच ) प्रकाशतो. दिवि पृष्ठो अरोचतेति वैश्वानरीयम्। दिवि इति तत् अमुष्य लोकस्य रूपम् ( कौषी० ब्रा० २६।१७ ) = दिवि पृष्ठो अरोचत ह्याची देवता वैश्वानर; कारण दिवि शब्द त्या ( अमुष्य ) लोकाचा दर्शक आहे; दिवि शब्दापुढें ऋचेंत असलेल्या अग्नि शब्दाला कांहीं किंमत नाहीं.

**अथापि हविष्पान्तीयं सूक्तं सौर्यवैश्वानरं भवति**

हविष्पान्तमजरं० जुष्टमग्नौ ( ऋ० सं० १०।८८।१ ); सर्व सूक्ताला हविष्पान्तीय म्हणण्याचें कारण पहिल्या ऋचेच्या आरंभीं हविष्पान्तं हे शब्द आहेत; हविष्पान्तं हें ज्यांत आहे तें सूक्त हविष्पान्तीय; मतौ छः सूक्तसाम्नोः ( पा० ५।२। ५९ ). ह्या सूक्ताच्या बाराव्या ऋचेंत 'देवा वैश्वानरं केतुमन्हामकृण्वन्' (= वैश्वानराला देवांनीं दिवसांचा कर्ता केलें ) असें आहे; आदित्याखेरीज दिवस कोण करणार ? म्हणून हें सबंध सूक्त सूर्यवैश्वानराचें म्हणजे सूर्याचें.

**अयमेव अग्निः वैश्वानरः इति शाकपूणिः**

वैश्वानर म्हणजे हाच ( म्हणजे पृथिवीवरील ) अग्नि असें शाकपूणि म्हणतो.

**विश्वानरौ एते उत्तरे ज्योतिषी । वैश्वानरः अयम् । यत् ताभ्यां जायते**

वरील म्हणजे अंतरिक्ष व द्युलोक ह्यांतील ज्योति विश्वानर; हा वैश्वानर; कारण त्यांच्यापासून हा जन्मतो.

**कथं नु अयम् एताभ्यां जायते इति**

हा त्यांच्यापासून कसा बरें जन्मतो? कथं नु ह्यानें शंका दर्शविली आहे. कथं नु करिष्यति इत्यनुपृष्टे ( निरु० १।४ ); पण एथें पुनः प्रश्न कोठें आहे? इति शब्दाचें प्रयोजन कळत नाहीं.

**यत्र वैद्युतः शरणम् अभिहन्ति यावत् अनुपात्तः भवति । मध्यमधर्मा एव तावत् भवति उदकेन्धनः शरीरोपशमनः**

जेव्हां ( यत्र ) वीज घरावर ( शरणं ) आपटते ( अभिहन्ति ) तेव्हां जोपर्यंत तो जड पदार्थ ती वीज घेत नाहीं तोपर्यंत त्या विजेचा मध्यमस्थानचा म्हणजे अंतरिक्षांतला धर्म कायम राहतो; म्हणजे त्या विजेचें जळण पाणी असतें व जड पदार्थाच्या संयोगानें ती वीज विझते. वीज घरांत शिरते पण घर पेट घेत नाहीं; जोपर्यंत तिचा पाण्याशीं म्हणजे मेघाशीं संबंध आहे तोपर्यंत ती जिवंत राहते; पण जर घरानें पेट घेतला तर तिचें मूळचें स्वरूप नष्ट होतें. मध्यमः मध्यस्थानीयः धर्मः यस्य स मध्यमधर्मा; उदकम् उपशमनं यस्य स उदकोपशमनः; शरीरम् उपशमनं यस्य स शरीरोपशमनः.

**उपादीयमानः एव अयं संपद्यते । उदकोपशमनः शरीरदीप्तिः**

जड पदार्थानें घेतल्याबरोबर तो वैद्युताग्नि हा म्हणजे पार्थिवाग्नि होतो; म्हणजे पाण्यानें तो विझतो; जड हें पेटण्याचें साधन होतें. घरावर वीज पडल्यास तें पेटतें; घर जड; तें पार्थिवाग्नि पेटण्याचें साधन होतें; पेटलेल्या घरावर पाणी टाकल्यास ती आग विझते. शरीरं दीप्तिः यस्य सः; दीप्तिः = पेटविण्याचें साधन. ह्याप्रमाणें वैद्युताग्नीपासून पार्थिवाग्नि जन्मतो. शरण व शरीर हे शब्द यास्कानें कोणत्या अर्थी वापरले आहेत तें कळणें कठीण.

**अथ आदित्यात् । उदीचि प्रथमसमावृत्ते आदित्ये कंसं वा मणिं वा परिमृज्य प्रतिस्वरे यत्र शुष्कगोमयम् असंस्पर्शयन् धारयति तत् प्रदीप्यते । सोऽयमेव संपद्यते**

आतां आदित्यापासून ( पार्थिवाग्नि कसा जन्मतो तें पाहूं ); सूर्य उत्तरेला ( उदीचि ) पहिल्यांदा परत येतो तेव्हां काशाचें भांडें किंवा सूर्यकांतमणि कढत होईपर्यंत घासून ( परिमृज्य ) त्याच्या कवडाश्यांत ( प्रतिस्वरे ) जेव्हां वाळलेल्या गवरीला न शिवतां ती गवरी कोणी धरतो तेव्हां ती पेटते; (गवरींत उत्पन्न झालेला) तो हा ( म्हणजे पार्थिवाग्नि ) होतो. उत्तरायणाच्या आरंभींच हें कृत्य कां करावें लागतें तें समजत नाहीं; कदाचित् रथसप्तमीसारखा हा एखादा सण असेल; आप-

त्याकडे दूध तापवून उतूं जाऊं देतात; यास्क ज्या देशांत रहात होता तेथें उत्तरायणाच्या आरंभीं वर सांगितल्याप्रमाणें गवरी पेटवीत असतील. उन्हांत काच धरून तें ऊन कापसावर पाडल्यास कापूस पेटतो हें सर्वांस माहीत आहे. गवरीला कां स्पर्श करावयाचा नाहीं तें कळत नाहीं. कंस = काश्याचें भांडें कीं काय ? प्रतिस्वर = प्रत्युपताप = कवडासा.

**अथापि आह ' वैश्वानरो यतते सूर्येण ' ( १।९८।१ ) इति**

शिवाय वैश्वानर सूर्याशीं संगम पावतो असें मंत्रद्रष्टा म्हणतो; ( २२ व्या खंडांतील ऋचेचा हा चवथा चरण होय).

**न च पुनर् आत्मना आत्मा संयतते । अन्येनैव अन्यः संयतते**

स्वतः स्वतःशीं कोणीही संगम पावत नाहीं; तर एक दुसऱ्याशींच संगम पावतो. महाराष्ट्रपाठ आत्माबद्दल आत्मानं आहे; तो अशुद्ध होय.

**इतः इमम् आदधाति**

ह्यापासून ( इतः ) म्हणजे पृथिवीलोकापासून म्हणजे पृथिवीवरील ओषधि, गवत, झाडें ह्यांपासून मनुष्य ह्या अग्नीला उत्पन्न करतो. अग्नीचें आधान करणें म्हणजे दोन अरणी किंवा दोन लाकडें घासून ठिणग्या उत्पन्न करणें व त्या गवत वगैरेवर पाडणें.

**अमुतः अमुष्य रश्मयः प्रादुर्भवन्ति । इतः अस्य अर्चिषः**

अमुतः व इतः, अमुष्य व अस्य ह्या जोड्यांत विरोध आहे. त्याचे म्हणजे सूर्याचे किरण तेथून म्हणजे द्युलोकांतून प्रकट होतात; ह्याच्या म्हणजे अग्नीच्या ज्वाला एथून म्हणजे पृथिवीलोकांतून ( प्रकट होतात ). दोघांच्या प्रकाशाची भिन्न उत्पत्ति आहे. इतः इमम् आदधाति हें वाक्य कां घातलें हें समजत नाहीं; तें गाळलें असतां चालेल.

**तयोः भासोः संसङ्गं दृष्ट्वा एवम् अवक्ष्यत्**

त्यांच्या प्रकाशांचा संगम पाहून मंत्रदृक् ( वैश्वानरो यतते सूर्येण ) असें म्हणाला. अवक्ष्यत् हें वच्चें लृङ्रूप आहे; यास्ककालीं तें भूतकाल दर्शविण्याकरितां वापरीत असावेत; तसा प्रयोग पाणिनीव्याकरणाविरुद्ध आहे. अवक्षत् असा गुर्जरपाठ आहे; तो अशुद्ध आहे; तो अवक्ष्यत् ह्याचा चुकीचा उच्चार असावा.

**अथ यानि एतानि औत्तमिकानि सूक्तानि भागानि वा सावित्राणि वा पाष्णानि वा वैष्णवानि वा तेषु वैश्वानरीयाः प्रवादाः अभविष्यन्**

शिवाय उत्तमस्थानीय देवांची म्हणजे भग किंवा सवितृ किंवा पूषन् किंवा विष्णु ह्यांचीं जीं हीं सूक्तें त्यांत वैश्वानर हें विशेषण ह्या सर्व देवांना लाविलें गेलें असतें ( जर सूर्य हा वैश्वानर असता तर ). भग, सवितृ, पूषन् व विष्णु हीं सर्व सूर्याचीं निरनिराळ्या कारणांमुळें पडलेलीं नांवें; ( अग्निवैश्वानरप्रमाणें ) भग वैश्वानर, सवितृ वैश्वानर, पूषन् वैश्वानर व विष्णु वैश्वानर असे प्रयोग आढळले असते; तसे प्रयोग नाहींत म्हणून वैश्वानर म्हणजे सूर्य नव्हे. उत्तमानां ( देवानां ) इमानि औत्त-

मिकानि; औत्तमिकानि हा महाराष्ट्रपाठ आहे; गुर्जरपाठ व दुर्गवृत्तींतला पाठ औत्तमकानि असा आहे; उत्तमाः एव उत्तमकाः । तेषाम् इमानि औत्तमकानि; उत्तम ह्याला स्वार्थी कप्रत्यय लावून तद्धितानें औत्तमक सिद्ध होईल; औत्तमिक व औत्तमक हीं रूपें पाणिनिसूत्रांनीं साधतां येत नाहींत. अशीं सूक्तें कोणतीं? भागानि वगैरे. भागानि वगैरे अशा सूक्तांचीं उदाहरणें होत. महाराष्ट्रपाठांत सावित्राणि ह्याच्यानंतर सौर्याणि वा व वैष्णवानि ह्याच्यानंतर वैश्वदेव्यानि वा असे अधिक शब्द आहेत; ते प्रक्षिप्त होत; आदित्य ( = सूर्य ) हा वैश्वानर असें एक मत आहे; सूर्याचींच भग वगैरे नांवें; तेव्हां सौर्याणि ह्यानें सूर्य हें भगासारखें सूर्याचें एक नांव असें म्हटल्यासारखें होईल; विश्वेदेव हे उत्तमस्थानीय देव; तथापि ते सूर्यच होत असें कोणी म्हणणार नाहीं.

**आदित्यकर्मणा च एनम् अस्तोष्यन् । इति उदेषि इति अस्तम् एषि इति विपर्येषि इति**

वैश्वानर हा जर सूर्य असता तर वैश्वानराचें वर्णन करतांना त्याला सूर्याच्या क्रिया – तूं उगवतोस, तूं अस्तास जातोस, तूं परत येतोस – लावलेल्या आढळल्या असत्या; पण वैश्वानरा, तूं उगवतोस वगैरे कोठेंही म्हटलें नाहीं. इति म्हणजे एवं असा दुर्ग अर्थ करतो; तूं असा उगवतोस, असा मावळतोस, असा परत येतोस; एथें इति ( असा ) ह्या शब्दाचें प्रयोजन कळत नाहीं. यास्ककालीं वाक्यारंभीं इति घालण्याची रीत असेल.

**आग्नेयेषु एव हि सूक्तेषु वैश्वानरीयाः प्रवादाः भवन्ति । अग्निकर्मणा च एनं स्तौति । इति दहसि इति वहसि इति पचसि इति**

पण अग्निसूक्तांतच वैश्वानर शब्द आढळतो; अग्नीचीं जाळणें, हवि वाहणें, शिजविणें हीं जीं कृत्यें तींच वैश्वानरसंबंधानें वर्णन करतांना येतात. जसें तूं जाळतोस, वाहतोस, शिजवितोस. एथें स्तौति असा एकवचनी प्रयोग आहे; तेव्हां वर आलेला अस्तोष्यन् हा शब्द मूळचा अस्तोष्यत् असा असेल.

**यथो एतत् वर्षकर्मणा हि एनं स्तौति इति । अस्मिन् अपि एतत् उपपद्यते**

आतां हें जें उलटपक्षाचें म्हणणें कीं वैश्वानर पाऊस पाडतो असें मंत्रद्रष्टा म्हणतो ( खंड २२ ) त्याला उत्तरः–– पाऊस पाडणें हें कृत्य ह्याच्या म्हणजे अग्नीच्या ठायींही जुळतें.

**समानमेतदुदकमुच्चैत्यव चाहभिः । भूमिं पर्जन्या जिन्वन्ति दिवं जिन्वन्त्यग्नयः ( ऋ० सं० १।१६४।५१ ) इति । सा निगदव्याख्याता**

ह्या ऋचेचें विवरण तींतील शब्दांनींच (म्हणजे शब्द वाचतांच) होतें. एकच ( समानं ) हें जल कांहीं दिवस वर ( उत् ) जातें ( एति ) व कांहीं दिवस खालीं ( अव ) येतें; पर्जन्य भूमीला जल देऊन तृप्त करतात; अग्नि द्युलोकाला ( बाष्परूपानें जल देऊन ) तृप्त करतात.

## खंड २४ वा.

**कृष्णं नियानं हरयः सुपर्णा अपो वसाना दिवमुत्पतन्ति।**
**त आववृत्रन् सदनादृतस्यादित् घृतेन पृथिवी व्युद्यते ( १।१६४।४७ )**
**कृष्णं निरयणं रात्रिः आदित्यस्य**

नियानं = नि + यानं = निरयणम्; निरयणं = मार्ग; हा काळा मार्ग किंवा काळी गति म्हणजे दक्षिणायन. हें सूर्याचें दक्षिणेकडे जाणें म्हणजे त्याची रात्र. सूर्य ६ महिने निजतो व ६ महिने जागा असतो; हे सहासहा महिने सूर्याचे दिवस व रात्र होत. आदित्यस्य यत् कृष्णं निरयणं सा तस्य रात्रिः

**हरयः सुपर्णाः। हरणाः आदित्यरश्मयः**

हरयः = हरणाः = रस हरण करणारे. सुपर्णाः = आदित्यरश्मयः; सूर्यकिरणांना पक्षी म्हटलें आहे.

**ते यदा अमुतः अर्वाञ्चः पर्यावर्तन्ते सहस्थानात् उदकस्य आदित्यात्**

आ = अर्वाञ्चः = खालीं जाणारे. ववृत्रन् = पर्यावर्तन्ते = परत येतात; वृत् अभ्यासानें ववृत्; ववृत् + रन् = ववृत्रन्. सदनात् = उदकस्य सहस्थानात् = आदित्यात् = पाण्याचें एकत्र राहण्याचें ठिकाण म्हणजे आदित्य त्यापासून. ऋतस्य = उदकस्य. यदा अमुतः हे शब्द अध्याहृत आहेत. ते किरण जेव्हां तेथून ( म्हणजे द्युलोकांतून ) खालीं परत येतात. पाणी जेथें एकत्र वास करतें तेथून म्हणजे सूर्यापासून; कारण किरण पृथिवीवरील पाणी नेऊन तें सूर्यमंडलांत ठेवतात.

**अथ घृतेन उदकेन पृथिवी व्युद्यते**

आत् = अथ. इत् निरर्थक. तेव्हां पाण्यानें पृथिवी चिंब भिजते. घृतेन = उदकेन.

**घृतम् इति उदकनाम ( निघं० १।१२।१० ) जिघर्तेः सिञ्चतिकर्मणः**

घृ = सेक म्हणजे वर्षाव करणें किंवा वर्षणें; घृतं = पाणी. घृ सेचने ( धा० ३।१७ ). यास्कानें सगळ्या ऋचेचें विवरण केलें नाहीं. त्यानें बहुतेक सारांश दिला आहे. दुर्गानें दिलेला अर्थः— काळा मार्ग म्हणजे दक्षिणायन; उत्तरायणापासून रस हरण करणारे सूर्याचे किरण पृथिवीवरील पाणी ( अपः ) पांघरून ( वसानाः ) म्हणजे बरोबर घेऊन प्रकाशमान जो सूर्य ( दिवं ) त्याच्याकडे ( दक्षिणायनांत ) उडून जातात; ते किरण जलाचें सहस्थान जो सूर्य त्याच्यापासून खालीं येतात; लगेच पृथिवी पाण्यानें भिजते. ह्या ऋचेंत अग्नीचें नांव नाहीं इतकेंच नव्हे तर कोणतेंही अग्निस्वरूप किंवा कोणतीही अग्निक्रिया सांगितली नाहीं; तथापि मैत्रायणीसंहितेंत ( २।४। ७ व ४।१२।५ ) अग्नीला आदित्य मानून त्याचें ह्या ऋचेनें वर्णन केलें आहे; म्हणून अग्नि पाऊस पाडतो असें शाकपूणि म्हणतो. शाकपूणि व यास्क हे मैत्रायणीशाखेचे ब्राह्मण होते असें दिसतें. नियानं शब्द ऋग्वेदांत एकंदर तीन वेळां आला आहे; त्याचा अर्थ लक्षांत येत नाहीं. कृष्णम् अपः = काळें वस्त्र; तेव्हां नियानं म्हणजे वस्त्र

असा अर्थ असेल. पंखवाले घोडे काळी झूल पांघरून द्युलोकाप्रत उडतात; उदकाचें ठिकाण जो द्युलोक तेथून ते खालीं येतात; त्याबरोबर पृथिवी पाण्यानें चिंब भिजते. हे घोडे कोणाचे ? हरि हे इंद्राचे घोडे; हरित् सूर्याचे; तथापि हरि म्हणजे घोडा असा अर्थ असेल. हे पंखाचे घोडे मेघच असतील. वाफ हें काळें वस्त्र किंवा काळी झूल; मेघ बाष्परूप झूल पांघरतात. ऋचेंत मेघांचें वर्णन असावें.

**अथापि ब्राह्मणं भवति । अग्निर्वा इतो वृष्टिं समीरयति । धामच्छद् दिवि भूत्वा वर्षति । मरुतः सृष्टां वृष्टिं नयन्ति । यदासावादित्योऽग्निं रश्मिभिः पर्यावर्ततेऽथ वर्षति इति**

शिवाय ब्राह्मणवचनही आहे; तें असें ( इति ); अग्नि एथून म्हणजे पृथिवीलोकांतून वृष्टि उत्पन्न करतो; द्युलोकीं धामच्छद् होऊन तो वर्षतो; ही उत्पन्न केलेली वृष्टि मरुत् नेतात; जेव्हां तो आदित्य किरणांनीं अग्नीकडे खालीं येतो तेव्हां तो वर्षतो. पृथिवीवर धूर तयार होतो; तो अग्नीमुळें; ह्या धुरानें अग्नि सूर्यप्रकाश झांकतो; म्हणजे द्युलोकीं काळे ढग पसरतात. वायूचें काम ढगांतून पडणारा पाऊस जिकडे तिकडे पसरणें. सूर्याचे किरण जर अग्नीवर पडले नाहींत म्हणजे हवा जर उष्ण नसेल तर अग्नि पेटणार नाहीं व धूर तयार होणार नाहीं. अशा रीतीनें पाऊस पाडणें हें तिघांचें काम आहे. अग्नि धूर तयार करतो व सूर्य वाफ तयार करतो; पण धूमज्योतिः सलिलमरुतां संनिपातः मेघः असें कालिदास म्हणतो; तेव्हां खरा पाऊस उत्पन्न करणारा अग्नि; अग्नीला साहाय्य सूर्याचें; मरुत् हे अग्नीनें निर्माण केलेली वृष्टि खालीं आणतात. यास्कानें हें वचन कोणत्या ब्राह्मणांतून घेतलें तें समजण्याला मार्ग नाहीं. काठकसंहिता व तैत्तिरीयसंहिता ह्यांत वरील वचन अपभ्रष्टरूपांत आढळतें; त्या संहिता रचणारांना तें वचन कळलें नसावें व म्हणूनच त्यांनीं फरक केला असावा. अग्निर्वा इतो वृष्टिमुदीरयति । धामच्छदिव भूत्वा वर्षति । मरुतः सृष्टां वृष्टिं नयन्ति । यदासा आदित्यः अर्वाङ् रश्मिभिः पर्यावर्तते अथ वर्षति । एता वै देवता वर्षस्येशते ( काठक सं० ११।१० ). ह्या उताऱ्यांत समीरयति बद्दल उदीरयति, दिवि बद्दल इव व अग्निं बद्दल अर्वाङ् असे पाठ आहेत. उदीरयति = वर नेतो. इव कां घातला तें कळत नाहीं. धामच्छद् इव = धामच्छदाप्रमाणें; पण धामच्छद् कोण ? सूर्य ? सूर्य प्रकाशानें सर्व जग झांकतो; तेव्हां अग्नि सूर्य बनतो; पण सूर्य पाऊस पाडतो असें ब्राह्मणकारांस म्हणावयाचेंच नाहीं; अग्नि द्युलोकीं जाऊन पाऊस पाडतो असें म्हणावयाचें आहे. अर्वाङ् = खालीं. पण सूर्याचा अग्नीशीं संबंध दाखवावयास पाहिजे. अग्निर्वा इतो वृष्टिमुदीरयति । मरुतः सृष्टां नयन्ति । यदा खलु वा असौ आदित्यः न्यङ् रश्मिभिः पर्यावर्तते अथ वर्षति । धामच्छदिव खलु वै भूत्वा वर्षति । एता वै देवता वृष्ट्या ईशते ( तै० सं० २।४।१० ) = अग्नींत टाकलेली आहुति एथून ( इतः ) आदित्याकडे जाते; आदित्याच्याद्वारें अग्नि वृष्टि उत्पन्न करतो ( उदीरयति ); उत्पन्न केलेली ( सृष्टां ) वृष्टि मरुत् इकडे तिकडे नेतात; जेव्हां तो आदित्य

खालीं गेलेल्या आपल्या किरणांनीं सर्वत्र जातो (पर्यावर्तते) म्हणजे कडक ऊन पाडतो तेव्हां तो पर्जन्यद्वारां वर्षतो; वर्षत असतांना घरें वगैरे जणूं काय झांकून टाकणारा तो, पुष्कळ मेघांनीं युक्त असा, वर्षतो; अशा रीतीनें अग्नि, मरुत् व आदित्य ह्या देवता पर्जन्यावर सत्ता चालवूं शकतात; यामुळें कारीरी नांवाच्या इष्टींत तिघांना हवि द्यावयाचा असतो; असा सायणाचार्य अर्थ करतात. ब्राह्मणवाक्यांत व आच्छादयन्निव ह्या सायणाचार्यांनीं दिलेल्या अर्थांत इवचें प्रयोजन दिसत नाहीं; इतकेंच नव्हे तर खरोखर झांकीत नाहीं असा अर्थ निघतो.' अग्नये धामच्छदे पुरोडाशमष्टाकपालं निर्वपेत। मारुतं सप्तकपालं सौर्यमेककपालं' ह्या विधींत अग्नये धामच्छदे असे स्पष्ट शब्द असतांना ब्राह्मणवाक्यांत धामच्छद् हें आदित्याचें विशेषण केलें आहे; इतर शाखांहून आपली शाखा भिन्न हें दाखविण्याकरितां ब्राह्मणवचनांतील वाक्यांची थोडीशी उलटापालट केली आहे; काठकसंहितेंतील वृष्टिं शब्द गाळला आहे व अर्वाङ् बद्दल न्यङ् घातला आहे; खलु वै ज्यास्त घातलें आहे; ह्या सर्व गोष्टींवरून तैत्तिरीयसंहिता ही सर्व संहितांपेक्षां अर्वाचीन असावी असें वाटतें; ह्या संहितेमुळें महाराष्ट्रपाठही बिघडला आहे; धामच्छदिव खलु वै भूत्वा व यदा खलु वा असावादित्यो न्यङ् असा महाराष्ट्रपाठ आहे. अग्निर्वा इतो वृष्टिमीट्टे। मरुतोऽमुतः च्यावयन्ति। तां सूर्यो रश्मिभिर्वर्षति । एते वै वृष्टयाः प्रदातारः (मैत्रा० सं० २।४।८). ईट्टे? मूळ ईर्ते असा पाठ असेल; ईर्ते = पाठवितो. अग्नि एथून वृष्टि वर पाठवितो; ती वृष्टि मरुत् तेथून खालीं पाडतात; किरणांनीं सूर्य ती वृष्टि वर्षतो; हे वृष्टीचे दाते. अग्नये धामच्छदे वगैरे विधिवाक्य तैत्तिरीय संहितेंतल्या वाक्यासारखेंच आहे; तथापि ब्राह्मणवचनांत धामच्छद् शब्द कोठेंही नाहीं. यास्क बहुतेक ब्राह्मणवचनें मैत्रायणी-संहितेंतून घेतो; तेव्हां हल्लींच्या मैत्रायणीसंहितेंतून दिलेलें वचन मूळचें नसून यास्कोद्धृतवचन मूळचें असावें असें वाटतें. हल्लींच्या मैत्रायणीसंहितेंत तैत्तिरीयसंहितानुरोधानें कोठें कोठें बदल होत गेले आहेत.

**यथो एतत्। रोहात् प्रत्यवरोहः चिकीर्षितः इति। आम्नायवचनात् एतत् भवति**

यथो एतत् ह्यानंतर याज्ञिकांचीं विधानें जीं दिलीं आहेत त्यांचें विवरण (खंड २३ त) पहावें. तुमचें म्हणणें कीं चढल्यानंतर उतरणें इष्ट आहे वगैरे त्याला उत्तर वेद म्हणतो म्हणून. यज्ञायज्ञीय शस्त्राच्या ऐवजीं वैश्वानरीय शस्त्र म्हणावयाचें असतें; पण दोहींतही अग्नीच देवता आहे; एका शस्त्राबद्दल दुसरें शस्त्र घातल्यामुळें स्वर्गावरोहण होत नाहीं; तें कार्य वेद म्हणतो म्हणून होतें.

**यथो एतत्। वैश्वानरीयः द्वादशकपालः भवति इति। अनिर्वचनं कपालानि भवन्ति**

निर्वचन = स्पष्ट करणें, सिद्ध करणें; कपालानि कपालसंख्या वैश्वानरः आदित्यः इति निर्वक्तुं साधयितुं न समर्थो हेतुः = वैश्वानर म्हणजे आदित्य हें सिद्ध

**करण्यास** कपालांची संख्या मुळींच कारणीभूत होत नाहीं; कारण

**अस्ति हि सौर्यः एककपालः पञ्चकपालश्च**

सूर्य म्हणजे वैश्वानर; त्यास द्यावयाचा पुरोडाश एका कपालावर भाजावा **असेंही** आढळतें; पांच कपालांवर भाजावा असेंही आढळतें. अग्नये धामच्छदे० ह्यावर दिलेल्या विधिवचनांत सौर्यपुरोडाश एककपाल सांगितला आहे (पान ५७९ ओळ ८); पञ्चकपालासंबंधीं ब्राह्मणवचन मला सांपडलें नाहीं.

**यथो एतत्। ब्राह्मणं भवति इति। बहुभक्तिवादीनि हि ब्राह्मणानि भवन्ति**

ब्राह्मणवचनांत गौण किंवा लक्ष्य अर्थी वापरलेले पुष्कळ वाक्प्रयोग आढळतात. **बह्व्या** भक्त्या गौणत्वेन लक्षणया वदन्ति = ब्राह्मणग्रंथ लक्ष्यार्थानें पुष्कळदां बोलतात. जसें

**पृथिवी वैश्वानरः। संवत्सरः वैश्वानरः। ब्राह्मणः वैश्वानरः इति**

इयं वै अग्निर्वैश्वानरः। संवत्सरो वै अग्निर्वैश्वानरः ( मै० सं० २।१।२ ); वैश्वानरः प्रविशत्यतिथिर्ब्राह्मणो गृहम् ( कठोपनिषद् १।१।७ ); ह्या उताऱ्यांत पृथिवी, संवत्सर व नचिकेतस् ह्यांना वैश्वानर म्हटलें आहे; तें केवळ लक्षणेनें; वैश्वानर अग्नीचे गुण म्हणजे कांहीं लक्षणें त्यांच्यांत आहेत म्हणून त्यांस वैश्वानर म्हटलें आहे.

**यथो एतत्। निविद् सौर्यवैश्वानरी भवति इति। अस्यैव सा भवति। यो विड्भ्यो मानुषीभ्यो दीदेत् इति। एष हि विड्भ्यो मानुषीभ्यो दीप्यते**

ती ( निविद् ) ह्याचीच ( अग्नीचीच ) होय; कारण निविद्च्या चौथ्या पदांत जो मनुष्यांसाठीं प्रकाशतो असें ( म्हटलें ) आहे; हा ( अग्नि ) मनुष्यांसाठीं प्रकाशतो. गुर्जरपाठ दीप्यते बद्दल दीदयति असा आहे; पण दीदयति असें रूप अर्वाचीन संस्कृतांत नसावेंसें वाटतें.

**यथो एतत्। छान्दोमिकं सूक्तं सौर्यवैश्वानरं भवति इति। अस्यैव तत् भवति। जमदग्निभिराहुतः ( आश्व० श्रौ० सू० ८।९ ) इति**

तें ( सूक्त ) ह्याचेंच होय; कारण त्यांत जमदग्नींनीं आहुति दिलेला म्हणजे आहुति देऊन पेटविलेला असे शब्द आहेत. सूर्याला आहुति देण्याची आज्ञा कोठेंहि **नाहीं** व सूर्याला आहुति देणें संभवतही नाहीं.

**जमदग्नयः प्रजमिताग्नयः वा। प्रज्वलिताग्नयः वा। तैः अभिहुतः भवति**

जमन्ति अग्निं ये ते जमदग्नयः; जमन्ति = प्रजमन्ति = अदन्ति = खातात. जमु अदने ( धा० १।४७२ ). जमदग्नि नांवाचे ऋषि अग्नि भक्षीत; किंवा ते अग्नि प्रज्वलित करीत. जम् किंवा ज्वल् पासून जमत्. जमदग्नि ह्या नांवावरूनच वैश्वानर म्हणजे अग्नि असें सिद्ध होतें; ते अग्नीला आहुति देतात पण सूर्याला आहुति कदापि देणार नाहींत. आहुतः बद्दल आहूतः व अभिहुतः बद्दल अभिहूतः असे गुर्जरपाठ आहेत; ते बरोबर नव्हत; आहूत व अभिहूत म्हणजे बोलाविलेला.

**यथो एतत्। हविष्पान्तीयं सूक्तं सौर्यवैश्वानरं भवति इति। अस्यैव तत् भवति**

तें ( सूक्त ) ह्याचेंच होय.

## खंड २५ वा.

**हविष्पान्तमजरं स्वर्विदि दिविस्पृश्याहुतं जुष्टमग्नौ।**
**तस्य भर्मणे भुवनाय देवा धर्मणे कं स्वधया पप्रथन्त ( १०।८८।१ )**
**हविः यत् पानीयम् अजरं सूर्यविदि दिविस्पृशि अभिहुतं जुष्टम् अग्नौ**

यत् अध्याहृत. पान्तं = पानीयं = पिण्याजोगें; पानीयं दुर्गवृत्तींत नाहीं. स्वर्विदि = सूर्यविदि = सूर्य जो जाणतो त्याच्यांत; किंवा सूर्याला जो हवि देतो त्याच्यांत ( दुर्ग ). दिविस्पृशि = आदित्याकडे हवि नेण्याकरितां दररोज जो द्युलोकीं जातो त्याच्यांत ( दुर्ग ). आहुतं = ( अग्नींत ) टाकलेला. जुष्टं = देवांना प्रिय.

**तस्य भरणाय च भावनाय च धारणाय च एतेभ्यः सर्वेभ्यः कर्मभ्यः इमम् अग्निम् अन्नेन अपप्रथन्त इति**

भर्मणे = भरणाय = ( देवांचें पोट भरेल इतका ) तो (हवि) पुष्कळ करण्याकरितां; हवि अल्प असला तरी अग्नि तो देवांना पुरेल इतका करील ह्या हेतूनें ( दुर्ग ). भुवनाय = भावनाय = तो हवि देवांना तृप्त करील ह्याकरितां ( दुर्ग ). धर्मणे = धारणाय = हा हवि देवांना नेहमीं कसा पोंचेल ह्याकरितां ( दुर्ग ). कं निरर्थक म्हणून गाळलें आहे. तीनदां घातलेला च अध्याहृत होय. एतेभ्यः०=ह्या सर्व कृत्यांकरितां. दुर्गवृत्तींत सर्वेभ्यः नाहीं. स्वधया = अन्नेन. पप्रथन्त = अपप्रथन्त = अवर्धयन्त ( दुर्ग ). ह्या अग्नीला देव अन्नानें वाढविते झाले; अग्नीचें अन्न म्हणजे आज्य व पुरोडाश. महाराष्ट्र-पाठांत इमंच्या आधीं देवाः असा ज्यास्त शब्द आहे. यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला अर्थः— सूर्याला जाणणारा, सूर्याला हवि देणारा, सूर्याला हवि देण्याकरितां नित्य द्युलोकीं जाणारा जो अग्नि त्याच्यांत पिण्याजोगा, ज्याचा विपरिणाम ( जरा ) म्हणजे पक्वपणा ज्यास्त झाला नसेल म्हणजे योग्य प्रमाणांत भाजलेला व शिजविलेला, गोड असा जो हवि टाकला जातो तो देवांना पुरेल इतका पुष्कळ करावा, देव तृप्त होतील असा त्यानें तयार करावा व देवांकडे बिनचूक दररोज पोंचवावा म्हणून देवांनीं ह्या अग्नीला अन्न देऊन वाढविलें. पान्त म्हणजे पानीय किंवा पानयोग्य असा यास्क व दुर्ग अर्थ करतात; पण तो शब्द कसा झाला तें कोणीही सांगत नाहीं. पान्तः, पान्तं व पान्ता अशीं तीन रूपें ऋग्वेदांत आहेत. पा + अन्त = पान्त; पा = अन्त = धन. पा धनम्। तेन युक्तः अन्तः धनं यस्मिन् तत् ( हविः ) अशी व्युत्पत्ति असेल. पान्तं = अजरं= आहुतं = जुष्टं = धनानें खच्चून भरलेलें. अजर शब्दाची व्युत्पत्ति मला अजून सुचली नाहीं. हु = देणें; आ = हु = धन; आहु + तं = धनानें भरलेलें. जु + स्तं ह्याचा तोच अर्थ. स्वर् धनं वेत्ति ददाति असौ स्वर्विद्. दिवि धने धनं स्पृशति अर्पयति असौ दिविस्पृक्. अग्नि धन देतो व धनांत भर टाकतो. त्याच्यांत धन ( हवि ) खच्चून भरलें आहे. भृ = भू = धृ = देणें; भर्मणे = भुवनाय = धर्मणे = देण्याकरितां. स्व = धा = धन. प्रथ् = देणें. कं = धन. तें धन त्याला सतत देतां यावें म्हणून धनयुक्त धन देव त्याला देते झाले. ऋग्वेदांतील बऱ्याच ऋचा धनवाचक शब्दांनीं

भरल्या आहेत. अपप्रथन्त इति ह्यांतील इति ह्यानें ऋचा अग्निपर त्यामुळें सूक्तही अग्निपर हें सहज सिद्ध होतें असें दर्शविलें जातें.

**अथापि आह**

मंत्रद्रष्टा आणखी म्हणतो.

## खंड २६ वा.

**अपामुपस्थे महिषा अगृभ्णत विशो राजानमुप तस्थुर्ऋग्मियम्। आ दूतो अग्निमभरद्विवस्वतो वैश्वानरं मातरिश्वा परावतः ( ऋ० सं० ६।८।४ )**

**अपाम् उपस्थे उपस्थाने महति अन्तरिक्षलोके आसीनाः। महान्तः इति वा**

उपस्थे = उपस्थाने; उप + स्थः = उपस्थः; यत्र उप उपगम्य आपः स्थ तिष्ठन्ति सोऽन्तरिक्षलोकः उपस्थः ( दुर्ग ) = जेथें पाणी जाऊन थांबतें असा उपस्थ म्हणजे अंतरिक्षलोक. महिषाः = महि + साः; महि = महति ( अन्तरिक्षलोके ); साः = आसीनाः; महिषाः = विस्तीर्ण अंतरिक्षांत बसणारे. दुर्गवृत्तींत आसीनाः बद्दल सन्नाः आहे. किंवा महिषाः = महान्तः = मोठे. महिष हा एक प्रचंड पशु; तत्समान ते महिष म्हणजे पराक्रमी.

**अगृह्णत माध्यमिकाः देवगणाः**

अगृभ्णत = अगृह्णत = घेते झाले. महिष कोण ? माध्यमिकाः देवगणाः = मध्यमलोकीं म्हणजे अंतरिक्षांत असणारे देवगण. गुर्जरपाठ माध्यमकाः असा आहे. माध्यमिकाः देवगणाः हे शब्द अध्याहृत होत.

**विशः इव राजानम् उपतस्थुः ऋग्मियम्। ऋग्मन्तम् इति वा। अर्चनीयम् इति वा**

इव अध्याहृत. ऋग्मियं = ऋग्मन्तं = ऋक् म्हणजे स्तुति; त्यांनीं युक्त अशाला म्हणजे स्तुत्य अशाला; किंवा ऋग्मियं = अर्चनीयं = पूज्य अशाला. ऋक् शब्द अर्च् पासून ( निरु० १।८ ). मनुष्यप्रजा जशी राजाभोंवतीं जमून त्याची स्तुति करते तसे स्तुत्य किंवा पूज्य जो अग्नि त्याची देवगण स्तुति करते झाले.

**आहरत् यं दूतः देवानां विवस्वतः आदित्यात्। विवस्वान् विवासनवान्**

आ + अभरत् = आहरत् = आणता झाला. कोण ? दूत. कोणाचा ? देवांचा. देवानां अध्याहृत. विवस्वान् = विवासनवान् = ( अंधकाराची ) हकालपट्टी करणारा. यं अध्याहृत.

**प्रेरितवतः परागताद्वा**

परावतः = प्रेरितवतः = प्रेरणा ज्याच्यापाशीं आहे अशा आदित्यापासून; आदित्य सर्व प्राणिमात्रांना प्रेरणा देतो. किंवा परावतः = परागतात् = दूर गेलेल्या आदित्यापासून. प = प्र; र = ईर् ; परा = प्रेरित; किंवा ईर् = जाणें; सूर्य वेगानें जातो. उपसर्गात् छन्दसि धात्वर्थे ( पा० ५।१।११८ ) = विशिष्ट धात्वर्थी जेव्हां उपसर्ग असतो तेव्हां त्या उपसर्गाला वत् प्रत्यय वेदांत लावलेला असतो; जसें उद्वतः

= उद्गतात्; निवतः = निर्गतात्. उत् (= उद्गत) व नि (= निर्गत) ह्यांना विशेषणें करण्यासाठीं वत् प्रत्यय लावलेला असतो.

**अस्य अग्नेः वैश्वानरस्य मातरिश्वानम् आहर्तारम् आह। मातरिश्वा वायुः। मातरि अन्तरिक्षे श्वसिति। मातरि आशु अनिति इति वा**

हा जो वैश्वानर अग्नि त्याला पृथिवीवर आणणारा मातरिश्वा असें मंत्रद्रष्टा म्हणतो. मातरिश्वा म्हणजे वायु; वायूला मातरिश्वा म्हणण्याचें कारण तो अंतरिक्षांत जोरानें जातो; मातरि = अन्तरिक्षे = अंतरिक्षांत; श्वा = श्वसिति; किंवा श्वन् = शु + अन्; शु = आशु; अन् = अनिति. श्वस प्राणने (धा० २।५९)। अन च (धा० २।६०); श्वस् = अन् = श्वास टाकणें; पण जाणें असा अर्थ दुर्ग देतो. वायु श्वास टाकतो असें म्हणण्यास काय हरकत? यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला ऋचेचा अर्थः— ज्या वैश्वानर अग्नीला देवांचा दूत जो मातरिश्वा तो अंधकार हाकलून देणारा किंवा अती दूर असणारा असा जो आदित्य त्याच्यापासून आणता झाला; त्याला अंतरिक्षांत असणारे किंवा महान् देव पाण्याचे राहण्याचें स्थान जें अंतरिक्ष तेथें पकडते झाले; आणि प्रजा जशी राजाची स्तुति करते तसे ज्याच्यासंबंधी पुष्कळ ऋचा आहेत किंवा जो पूज्य आहे अशा अग्नीची ते स्तुति करूं लागले. महिषो मृगाणां = हिंस्र पशूंमधील जो अति हिंस्र तो महिष; म्हणून महिषाः = अती मोठे. अति महान् जे देव ते जलदेवतांच्या मांडीवर (उपस्थे) पहुडलेला जो अग्नि त्याला तेथून उचलते झाले; अतीशय धनवान् (ऋग्मियं) जो अग्नि राजा त्याच्याभोंवतीं देवलोक (विशः) गराडा घालते झाले; यजमानांचा किंवा मनूचा (विवस्वतः) दूत मातरिश्वा स्वर्गांतून (परावतः) वैश्वानर अग्नि आणता झाला. परावत् म्हणजे द्युलोक. ग्रीक लोकांत प्रोमीथिअसनें द्युलोकांतून अग्नि चोरून आणला अशी आख्यायिका होती; ऋग्वेदांत मातरिश्वानें तें काम केलें असें म्हटलें आहे.

**अथ एनम् एताभ्यां सर्वाणि स्थानानि अभ्यापादं स्तौति**

ह्या अग्नीला सर्व लोकीं ठेवून मंत्रद्रष्टा त्याची स्तुति म्हणजे वर्णन पुढील दोन ऋचांत करतो. अभि + आपाद्य; अभ्यापाद्य अभ्यापाद्य अभ्यापादम्; आभीक्ष्ण्ये णमुल् (पा० ३।४।२२) ह्यानें पद् + अम् = पादं; पुन्हापुन्हा कृति करणें अशा अर्थीं णमुल् प्रत्यय लागतो; जसें स्मारंस्मारं नमति शिवम्; पण एथें अभ्यापादं एकदांच घातलें आहे. पृथिवी, अंतरिक्ष व द्युलोक ह्या प्रत्येक ठिकाणीं अग्नीचा संबंध आणणें हें आभीक्ष्ण्य म्हणजे पौनःपुन्य असेल.

## खंड २७ वा.

**मूर्धा भुवो भवति नक्तमग्निस्ततः सूर्यो जायते प्रातरुद्यन्।**
**मायामू तु यज्ञियानामेतामपो यत्तूर्णिश्चरति प्रजानन् (ऋ० सं० १०।८८।६)**
**मूर्धा। मूर्तम् अस्मिन् धीयते**

मूर्धा = मूर् + धा; मूर् = मूर्त = जड पदार्थ; धा = धीयते = ठेविलें जातें. अग्नीला मूर्धा म्हणण्याचें कारण सर्व वस्तु त्याच्यावर अवलंबून आहेत. शीर तोडलें असतां जसा प्राणी मरतोच मरतो तसें अग्नि नसल्यास सर्व प्राणिमात्र मरतीलच मरतील असें दुर्ग म्हणतो; म्हणून अग्नि हा मूर्धा; हीच व्युत्पत्ति प्राण्यांच्या मूर्ध प्रदेशाला लागू पडेल; मेंदु वगैरे त्यांच्या डोक्यांतील जड पदार्थ. यास्क अग्निवाचक मूर्धन् शब्दाची व्युत्पत्ति देतो; प्राणिमात्राच्या मूर्धन्‌ची त्यानें कोणती व्युत्पत्ति दिली असती तें सांगतां येत नाहीं; कदाचित हीच व्युत्पत्ति त्यानें दिली असती; त्यांच्या डोक्यांत ठेविलेला जड पदार्थ मेंदू वगैरे. मुह्यति अस्मिन् आहृते ( उणादि १।१५६ ); मुर् = मुह् = बेशुद्ध होणें; डोक्याला ( अस्मिन् ) जोराचा तडाखा बसल्यास किंवा डोकें फुटल्यास मनुष्य मूर्च्छित होतो.

**मूर्धा यः सर्वेषां भूतानां भवति नक्तम् अग्निः**

यः अध्याहृत. भुवः = सर्वेषां भूतानां = सगळया प्राणिमात्रांचा. दुर्गवृत्तींत यः नसून भुवः भूलोकस्य असें आहे.

**ततः सूर्यः जायते प्रातर् उद्यन् सः एव। प्रज्ञां तु एतां मन्यन्ते यज्ञियानां देवानां यज्ञसंपादिनाम्**

सः एव अध्याहृत. माया = प्रज्ञा ( निघं० ३।९।२ ) = अचाट बुद्धि; प्रज्ञां दुर्गवृत्तींत नाहीं. ऊ निरर्थक म्हणून गाळलें आहे. मन्यन्ते व देवानां अध्याहृत. यज्ञियानां = यज्ञसंपादिनां = यज्ञ पूर्ण करणाऱ्यांची.

**अपः यत् कर्म चरति प्रजानन्। सर्वाणि स्थानानि अनुसंचरते त्वरमाणः**

अपः = कर्म ( निघं० २।१।१ ). चरति = सर्वाणि स्थानानि अनुसंचरते = सर्व लोकीं संचार करतो. तूर्णिः = त्वरमाणः. अपः शब्द भाष्यांत घालण्याचें कारण काय ? यास्ककृत अर्थः– जो अग्नि रात्रीं सर्व प्राणिमात्रांचें मूर्धस्थान होतो तोच तदनंतर सकाळीं उगवणारा सूर्य होतो; तत्त्वज्ञ यज्ञ पूर्ण करणाऱ्या देवांची ही अचाट बुद्धि समजतात कीं आपलें कर्तव्य ( अपः ) जाणणारा ( प्रजानन् ) तो सर्व लोकीं संचार करतो. रात्रीं भूमीचा मुख्य देव होऊन दिवसा द्युलोकीं तो सूर्य होतो म्हणजे दोन स्थानांचा एथें निर्देश केला आहे असें दुर्ग म्हणतो; तें म्हणणें बरोबर दिसतें. भुवः = सर्वेषां भूतानां असा अर्थ करण्याचें कांहीं कारण नाहीं; यास्कानें सर्वेषां भूतानां असे शब्द न घालतां भुवः हाच शब्द जशाचा तसाच ठेवला असावा. यास्कानें केलेला अर्थ बरोबर नाहीं. अयमग्निः सहस्रिणो वाजस्य शतिनस्पतिः। मूर्धा कवी रयीणाम् ( ८।७५।४ ) = हा अग्नि अमूप ( सहस्रिणः = शतिनः ) धनाचा ( वाजस्य = रयीणां ) दाता आहे ( पतिः = मूर्धा = कविः ); ह्या ऋचेंत मूर्धा म्हणजे शीर नसून तो दाता अशा अर्थी घातला आहे. मूर्धन् म्हणजे शीर असा अर्थ कांहीं थोड्या ऋचांत निःसंशय आहे; पण दाता हा अर्थ बहुतेक ठिकाणीं आहे. मूर्धन्‌चा दाता हा अर्थ कसा झाला हें सांगतां येत नाहीं. रात्रीं अग्नि धनाचा ( भुवः ) दाता

( मूर्धा ) असतो; नंतर सकाळीं उगवून सूर्य धन देतो ( जायते ); ज्याअर्थीं दाता ( तूर्णिः ), धन ( अपः ) देतांना ( प्रजानन् ), धनवान् ( यज्ञियानां ) जे देव त्यांनाच अमूप ( एतां ) धन ( मायां ) देतो ( चरति ). असें धन दाता कोठून देतो ? अग्नि व सूर्य धनाचा त्याला सतत पुरवठा करतात त्यांतून. मूर्धन्, माया, जायते, यज्ञिय, अपस्, चरति व प्रजानन् ह्यांचे अर्थ ऋग्वेदांत फार निराळे आहेत; प्रत्येकाचा अर्थ ठरविणें हें एथें योग्य होणार नाहीं.

**तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय**

( अग्नि भिन्न भिन्न लोकीं असतो ) ह्याचें जास्त स्पष्टीकरणाकरितां पुढील ऋचा होय.

## खंड २८ वा.

**स्तोमेन हि दिवि देवासो अग्निमजीजनञ् शक्तिभी रोदसिप्राम्। तमू अकृण्वन् त्रेधा भुवे कं स ओषधीः पचति विश्वरूपाः ( ऋ० सं० १०।८८।१० )**

**स्तोमेन हि यं दिवि देवाः अग्निम् अजनयन् कर्मभिः द्यावापृथिव्योः आपूरणम्**

यं अध्याहृत. देवासः = देवाः. अजीजनन् = अजनयन्. शक्तिभिः = कर्मभिः ( निघं० २।१।२५ ). रोदसिप्रां = द्यावापृथिव्योः आपूरणं = द्युलोक व पृथिवी ह्यांना भरून टाकणाऱ्याला. महाराष्ट्रपाठांत यं हि, देवासः व शक्तिभिः कर्मभिः असें आहे; गुर्जरपाठांत आपूरणं बद्दल पूरणं आहे.

**तम् अकुर्वन् त्रेधाभावाय। पृथिव्याम् अन्तरिक्षे दिवि इति शाकपूणिः**

अकृण्वन् = अकुर्वन्. भुवे = भावाय. कं अनर्थक म्हणून गाळलें आहे. हा त्रेधाभाव कोणता ? ( अग्नि ) पृथिवी, अंतरिक्ष व द्युलोक ह्या तीन ठिकाणीं (असतो) असें शाकपूणि म्हणतो. वैश्वानर म्हणजे अग्नि असें शाकपूणि खंड २३ पासून सिद्ध करीत आहे व अध्यायाच्या शेवटपर्यंत त्याचेंच म्हणणें यास्क देत आहे; तेव्हां एथें इति शाकपूणिः म्हणण्याचें काय कारण ? यास्काच्या म्हणण्याला शाकपूणीचा पुरावा आहे हें सांगण्याकरितां इति शाकपूणिः हे शब्द घातले आहेत असें दुर्ग म्हणतो; परंतु त्या शब्दांनीं यास्काचें मत निराळें असावें असा भास होतो; कदाचित् ते शब्द प्रक्षिप्त असतील.

**यदस्य दिवि तृतीयं तदसावादित्यः इति ब्राह्मणम्**

ह्याचें ( अग्नीचें ) जें द्युलोकीं असणारें तिसरें ( तेज ) तो हा आदित्य असें ब्राह्मणवचन आहे.महाराष्ट्रपाठ इति हि ब्राह्मणम् असा आहे. हें वचन कोणत्या ब्राह्मणांत आहे तें कळत नाहीं. देवाश्च वा असुराश्च संयत्ता आसन्। सोऽग्निर्विजयमुपयन्त्सु त्रेधा तन्वो विन्यधत्त पशुषु तृतीयमप्सु तृतीयममुष्मिन्नादित्ये तृतीयं ( काठ० सं० ८।८ ) = देव व असुर हे लढत होते; तेव्हां अग्नि विजय देणाऱ्या अशा तीन ठिकाणीं आपलीं

तीन शरीरें ठेवता झाला; तिसरें शरीर पशूंमध्यें, तिसरें जलांत, आणि तिसरें त्या आदित्यांत. तिसरें = तिहींपैकीं एक

तत् अग्नीकृत्य स्तौति

द्युलोकीं असणाऱ्या तृतीय भागाला अग्नि कल्पून मंत्रद्रष्टा त्याचें वर्णन करतो. हविष्यान्तं ह्या सूक्तांतील सर्व ऋचांत त्या तिसऱ्या शरीराचें (म्हणजे आदित्याचें) अग्निरूपानें वर्णन केलें आहे. हें म्हणणें बरोबर दिसत नाहीं. ब्राह्मणवचनांत अग्नीचा द्युलोकीं असणारा तृतीय भाग तो आदित्य असें म्हटलें आहे; ज्योतीचा तृतीय भाग असें म्हटलें नाहीं; ज्योतीचा पृथिवीवर असणारा एक भाग अग्नि, अंतरिक्षांत असणारा विद्युत् व द्युलोकीं असणारा आदित्य असें म्हटल्यानें अग्नि हाच आदित्य असें मुळींच सिद्ध होत नाहीं. तत् म्हणजे द्युलोकीं असणारा तृतीय भाग; तो अग्निच असें ठरवून मग मंत्रद्रष्टा त्याचें वर्णन करतो असाच अर्थ असावा.

अथ एनम् एतया आदित्यीकृत्य स्तौति

आतां पुढील ऋचेंत अग्नीला आदित्य समजून त्याचें वर्णन करतो. अग्नीकृत्य व आदित्यीकृत्य ह्या शब्दांनीं अग्नि व आदित्य हे खरोखरचे अग्नि व आदित्य नव्हत असा समज उत्पन्न होतो; आदित्य हा अग्निच हें म्हणणें योग्य होईल; पण अग्नि हा आदित्यच हें म्हणणें बरोबर होणार नाहीं. अग्नीकृत्य = आदित्यरूप घेतलेल्या अग्नीला मूळचा अग्नि समजून; आदित्यीकृत्य = अग्नीला आदित्य समजून; असे ह्या शब्दांचे भिन्न अर्थ केले पाहिजेत. यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला ऋचेचा अर्थः— देव म्हणजे हवि देणारे यजमान त्यांनीं स्तुतींनीं (स्तोमेन) व आहुति वगैरेंनीं (शक्तिभिः) द्यावापृथिवींना व्यापून टाकणाऱ्या ज्या अग्नीला द्युलोकीं (आदित्यरूपानें) उत्पन्न केलें त्यालाच तीन ठिकाणीं किंवा तीन स्थितींत राहण्याकरितां त्यांनीं उत्पन्न केलें; तो सर्व प्रकारच्या ओषधि पिकवितो. भाष्यांत देवाः एवढाच शब्द आहे; 'देवो दानाद्वा' ही व्युत्पत्ति निरुक्त ७।१५ त दिली आहे; तिला अनुसरून देवाः हविषां दातारः असा दुर्ग अर्थ करतो. स्तु = देणें; स्तु + मः = स्तोमः = धन. शक् देणें; शक्तिः = दान, धन. रुद् देणें; रोदस् = दान, धन; रोदसी धनयुक्ते द्यावापृथिव्यौ प्राति ददाति असौ रोदसिप्राः = धनानें भरलेल्या द्यावापृथिवी देतो म्हणजे त्यांत असलेलें धन देतो तो. स यज्ञियो अभवो रोदसिप्राः (१०।८८।५) = धनवान तो तूं धनदाता झालास. रोदसिप्राः = यज्ञियः = धनदाता. रोदसी ह्याला प्रा लावल्यानें उच्चाराकरितां रोदसिप्रा असा शब्द बनला असेल. आ नः कृणुष्व सुविताय रोदसी (२।२।६) = हे अग्नि, आमच्या कल्याणाकरितां आम्हांस रोदसी दे; रोदसी = रोदस्यौ = द्यावापृथिवींत असलेलें धन. रोदसिप्राः = द्यावापृथिवी तलें धन देणारा. देवांनीं अतीशय धन देणारा (रोदसिप्रां) जो अग्नि त्याला अतीशय धनासह (स्तोमेन = शक्तिभिः) द्युलोकीं उत्पन्न केलें. ऊ = कं = धनं = धनवन्तम्. त्रेधा = अतीशय. भुवे = धन देण्यासाठीं. देवांनीं लोकांना धन देण्यासाठें

त्याला अती धनवान् केलें. ऋ० सं० १०।९७ त ओषधि ह्याचा रोगनिवारक वनस्पति असा अर्थ आहे; कांहीं ठिकाणीं झाड; असा अर्थ आहे; कदाचित् लहान झाड, लता असाही अर्थ असेल (ऋ० सं० १०।८५।२; १०।१४५।१); पण कांहीं ठिकाणीं त्याचा धन अर्थ असावासें वाटतें. पृष्टो विश्वा ओषधीरा विवेश (१।९८।२) = धनवान् (पृ + स्तः = पृष्टः) अग्नि धनयुक्त म्हणजे अतीशय (विश्वाः) धन (ओषधीः) देता झाला (आ विवेश). विश् = देणें; विश् + वः = विश्वः = धनवान्. तदोषधीभिरभिरातिषाचो भगः पुरंधिर्जिन्वतु प्र राये (६।४९।१४) = धन देणारे देव (रातिषाचः) व धनवान् (पुरंधिः) भग धनासह (ओषधीभिः) धन (तत् = प्र) आम्ही धनवान् व्हावें म्हणून (राये) देवोत (जिन्वतु). यस्य व्रते ओषधीर्विश्वरूपाः सः नः पर्जन्यो महि शर्म यच्छ (५।८३।५) = ज्या तुझ्या (यस्य) भांडारांत (व्रते) अतीशय (विश्वरूपाः) धन (ओषधीः) भरलें आहे तो तूं हे पर्जन्या पुष्कळ (मही) धन (शर्म) दे. ह्या तीन व इतर ऋचांत ओषधि म्हणजे धन हा लक्ष्यार्थ आहे किंवा व्युत्पत्तीनें तो अर्थ निघतो तें सांगतां येत नाहीं. विश्वानि रूपाणि यासु ताः विश्वरूपाः; विश्व = धनयुक्त; रूप = धन. पच् = शिजविणें; पण लक्षणेनें देणें असा अर्थ निघणें शक्य आहे. चनो दधिष्व पचतोत सोमं (१०।११६।८) = हे इंद्रा, धनयुक्त (पचत = पचतं) म्हणजे अतीशय धन (चनः = सोमं) दे (दधिष्व); सु = देणें; सु + मः = सोमः = धन. तो (अग्नि) भरपूर (विश्वरूपाः) धन (ओषधी :) देतो (पचति); असा चौथ्या पादाचा अर्थ.

## खंड २९ वा.

**यदेदेनमदधुर्यज्ञियासो दिवि देवाः सूर्यमादितेयम्।**
**यदा चरिष्णू मिथुनावभूतामादित्प्रापश्यन् भुवनानि विश्वा (१०।८८।११)**
**यदा एनम् अदधुः यज्ञियाः सर्वे दिवि देवाः सूर्यम् अदितेः पुत्रम्**

इत् अनर्थक म्हणून गाळला आहे. यज्ञियासः = यज्ञ संपादन करणारे यजमान किंवा रश्मि. सर्वे हा ज्याचा अर्थ असा शब्द ऋचेंत नाहीं; सर्वे दुर्गवृत्तींत नाहीं; तो प्रक्षिप्त होय. यजमानांना देव म्हणण्याचें कारण यजमान आहुति देतात; आहुतींचा हा परिणाम कीं यजमान सूर्याला द्युलोकीं ठेऊं शकतात; आहुति न दिल्यास सूर्य उगवणार नाहीं (पान ५८६ ओळी १९ व २० पहा). रश्मींना देव म्हणण्याचें कारण ते प्रकाशतात; किरण सूर्याला वर उचलून धरतात; देवो दीपनाद्वा द्योतनाद्वा (निरु० ७।१५) ह्या व्युत्पत्तीच्या आधारावर दुर्गानें हा अर्थ केला आहे. आदितेयं = अदितेः पुत्रम् = अदितीच्या पुत्रास. महाराष्ट्रपाठांत सूर्यम् आदितेयम् अदितेः पुत्रं असा पाठ आहे; पण आदितेयं शब्द भाष्यांत घालण्याचें कारण नाहीं.

**यदा चरिष्णू मिथुनौ प्रादुरभूतां सर्वदा सहचारिणौ उषाश्च आदित्यश्च**

चरिष्णू = सर्वदा सहचारिणौ = सदा एकत्र संचार करणारे; उषा व आदित्य हे दोघे चरिष्णू मिथूनौ. अभूतां = प्रादुरभूतां = प्रकट झाले.

**मिथुनौ कस्मात्। मिनोतिः श्रयतिकर्मा। थु इति नामकरणः। थकारो वा। नयतिः परः। वनिः वा**

मिथुन शब्द कशापासून ? मिथुन = मि + थु + न; किंवा मि + थ + उन. मि = आश्रय करणें; थु हा नाम बनविणारा प्रत्यय; नी नेणें ह्यापासून न. थ नामकरण प्रत्यय मानल्यास वन धातु; वन्चें संप्रसारणानें उन होतें; मि + थ + उन = मिथुन; संप्रसारण उ पुढें आल्यामुळें थ मधील अ लुप्त होतो. परः = शेवटचा; शेवटीं नी पासून न किंवा वन् पासून उन.

**समाश्रितौ अन्योन्यं नयतः। वनुतः वा**

एकमेकाचा आश्रय करणारे ( उषा व सूर्य ) एकमेकाला नेतात. उषा सूर्याला आपल्याकडे ओढते; सूर्य उषेला आपल्याकडे ओढतो; किंवा दोघेजण कालाला नेतात म्हणजे दिवस, मास, वर्ष वगैरे काल उत्पन्न करतात; किंवा एकमेकाचा आश्रय करणारे ते एकमेकाला भोगतात; वन संभक्तौ ( धा० १।४६४ ); वन् = भोगणें. एथें सूर्य व उषा ह्यांचा नवराबायकोसारखा संबंध कीं काय ? पण तो तर निरुक्तकारांना पसंत नाहीं; तेव्हां वनुतः = संचार करतात असा अर्थ असेल.

**मनुष्यमिथुनौ अपि एतस्मादेव। मेथन्तौ अन्योन्यं वनुतः इति वा**

मनुष्यमिथुन म्हणजे नवराबायको एकमेकांचा आश्रय करून एकमेकाला आपल्याकडे ओढतात किंवा संसारयात्रा चालवितात ( नयतः ); किंवा एकमेकाचा उपभोग घेतात (वनुतः); किंवा एकमेकाला शिवीगाळ करीत (मेथन्तौ) ते संसारयात्रा चालवितात. मेथतिः आक्रोशकर्मा ( निरुक्त ४।२ ). मेथ् व मिथ् धातुपाठांत नाहींत. वन् चा यास्ककालीं काय अर्थ होता तें कळत नाहीं. मिथ् + उन (उणादि ३।५५). मिथृ मेथृ संगमने। मेथते संगच्छते इति मिथुनम् ( अमर २।५।३९ क्षीर० ). मिथुन शब्द नपुंसक आहे. यास्क मनुष्यमिथुनौ असें लिहितो; तेव्हां त्याच्यावेळीं मिथुनौ म्हणजे जुळें असा अर्थ असेल. दोन जुळीं मुलें भांडतात तथापि एकमेकावर त्यांचें प्रेम असतें ( वनुतः ). पहिल्या दोन व्युत्पत्ति लाविल्यास एकमेकावर अवलंबून असणारीं जुळीं मुलें आपणांला एकमेकाकडे ओढून नेतात ( नयतः ) किंवा एकमेकावर प्रेम करतात ( वनुतः ). मिथुनौ म्हणजे स्त्रीपुंसौ असा अर्थ असल्यास तिसऱ्या व्युत्पत्तीचा अर्थ पहिल्यांदा दिलाच आहे ( समाश्रितौ अन्योन्यं नयतः ). ह्या व्युत्पत्ति काल्पनिक आहेत हें सांगणें नको. नामकरणप्रत्यय थु किंवा थ नामाच्या अंतीं न येतां मध्येंच घातला आहे; ही निरुक्तकारांची नवी शक्कल होय. मिनथुः असा शब्द बनला पाहिजे असें दुर्ग म्हणतो; पण जेव्हां वनिः परः असेल तेव्हां कसें रूप व्हावयास पाहिजे होतें ? मि + वन् + थः = मिवन्थः किंवा म्युन्थः ? मिथुना, मिथुनौ, मिथुनाः, मिथुनासः व मिथुनानि अशीं मिथुन शब्दाचीं रूपें ऋग्वेदांत आढळतात; मिथुनानि ह्या नपुंसक रूपावरून मिथुन शब्द विशेषण असावा. मिथ् = ( १ ) देणें, ( २ ) पीडा देणें, इजा करणें. मिथुना या किमीदिना (७।१०४।२३॥१०।८७।२४) =

पीडा देणारे, इजा करणारे जे चेटकें. इतरत्र मिथुन = धनवान्. भरते मर्यो मिथुना यजत्रः ( १।१७३।२ ) = धनवान् ( मर्यः = यजत्रः ) इंद्र धनयुक्त ( मिथुना ) द्यावा-पृथिवी देतो ( भरते ) म्हणजे त्यांत असणारें सर्व धन देतो; एथें मिथुना स्त्रीलिंगी. अभूतं गोपा मिथुना शुभस्पती ( १०।४०।१२ ) = हे अश्विनांनो, तुम्ही धनदाते झालांत; गोपा = मिथुना = शुभस्पती = धनदाते; एथें पुल्लिंगी. उत स्वसारा युवती भवन्ती आदु ब्रुवाते मिथुनानि नाम ( ३।५४।७ ) = द्यावापृथिवी ह्या बहिणी, धनदात्या असल्यामुळें, खूप धन ( मिथुनानि = नाम = नामानि = धनानि ) देतात ( ब्रुवाते ); एथें नपुंसक. सप्ती चिद्घा मदच्युता मिथुना वहतो रथम् ( ८।३३।१८ ) = धनवान् ( मदच्युता = मिथुना ) घोडे ( सप्ती ) रथ ओढून नेतात; मिथुना हें सप्तीचें विशेषण. बृहद् वयो बृहते तुभ्यमग्ने धियाजुरो मिथुनासः सचन्त ( ५।४३।१५ ) = हे अग्नि, धनद ( धियाजुरः = मिथुनासः ) देव धनवान् जो तूं त्या तुला ( बृहते तुभ्यं ) खूप ( बृहत् ) धन ( वयः ) देते झाले (सचन्त); एथें मिथुनासः हें देवाः अध्याहृत ह्याचें विशेषण. मिथस्तुरा विचरन्ती पावके मन्म श्रुतं नक्षत ऋच्यमाने ( ६।४९।३ ) = दात्या ( मिथस्तुरा = विचरन्ती = पावके = ऋच्यमाने ) उषा व रात्र खूप ( श्रुतं ) धन ( मन्म ) देतात ( नक्षतः ); चर् = देणें. यास्कानें ‘ आदित् प्रापश्यन् भुवनानि विश्वा ’ हा चौथा पाद सोडून दिला आहे. ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थः—जेव्हां हवि देणारे ( देवाः ) व यज्ञ संपादन करणारे ( यज्ञियासः ) यजमान अदितीच्या ह्या पुत्राला—सूर्याला—द्युलोकीं पाठविते झाले व जेव्हां सतत गमन करणारे ( चरिष्णू ), एकमेकाचा आश्रय करून एकमेकाला नेणारे किंवा एकमेकाला भजणारे उषा व सूर्य जेव्हां प्रकट झाले तेव्हां देव सर्व प्राणी संपूर्णपणें ( प्र ) पाहते झाले. सायणाचार्य एनं हें अग्निं चें विशेषण करून ( सूर्यम् एनम् अग्निं च ) मिथुनौ सूर्यवैश्वानरौ असा अर्थ करतात; ह्याच्या उलट दुर्ग म्हणजे यास्क एनं हें सूर्यं ह्याचें विशेषण करतो; त्यामुळें अग्नि हा शब्द त्यानें सायणाचार्यांप्रमाणें अध्याहृत घेतला नाहीं. सायणा-चार्यांचा अर्थ योग्य वाटतो. जेव्हां धनवान् देव हा (एनं) अग्नि (भूलोकीं) व अदि-तीचा पुत्र जो सूर्य तो द्युलोकीं ( दिवि ) ठेविते झाले व जेव्हां हे धनद ( चरिष्णू = मिथुनौ ) धन ( अ ) देऊं लागले ( भूतां ) तेव्हां देव अमूप ( विश्वा = विश्वानि = धनयुक्त ) धन ( भुवनानि = प्र ) देते झाले ( अपश्यन् ). यज्ञ = धन; यज्ञिय =धन-वान्. देव = धनवान् देव. यज्ञियासः = देवाः = धनवान्. विदि=धनदानासाठीं असा अर्थ होणें शक्य आहे. धन देण्यासाठीं देवांनीं अग्नि व सूर्य ह्या दोघांना उत्पन्न केलें व हे दोघेजण धनवान् असल्यामुळें धन देऊं लागले; तेव्हां देव अमूप धन देण्यास समर्थ झाले. चर् व पश्य् ह्यांचा देणें अर्थ कांहीं ठिकाणीं सांपडतो. ( देवाः ) अस्मे रायो दिवेदिवे सं चरन्तु पुरुस्पृहः । अस्मे वाजास ईरताम् ( ४।८।७ ) = हे अग्नि, खूप ( पुरुस्पृहः ) धन ( रायः = सं ) सतत ऐश्वर्यासाठीं ( दिवेदिवे ) दिलें जावो ( चरन्तु ); आम्हांला धन ( वाजासः = वाजाः ) दिलें जावो ( ईरतां ). सं या

दानूनि येमथुर्दिव्याः पार्थिवीरिषः । नभस्वतीरा वां चरन्तु वृष्टयः ( ८।२५।६ ) = हे मित्रावरुणांनो, जे तुम्ही द्युलोकीं व पृथिवीवर असणारें धन ( सं = दानूनि = इषः ) देतां ( येमथुः ) त्या तुमचें अमूप ( नभस्वतीः ) धन ( वृष्टयः ) दिलें जावो ( चरन्तु). वि षू चर स्वधा अनु ( ८।३२।१९ ) = धन ( वि = सु = स्वधाः = अनु ) दे ( चर ). अग्ने वि पश्य बृहताभि राया इषां नो नेता भवतादनु द्यून् ( ३।२३।२ ) = हे अग्नि, तुझ्या मोठ्या ( बृहता ) धनांतून ( राया ) आम्हांस धन ( वि = अभि = अनु = द्यून् ) दे ( पश्य ); आमच्याकडे ( नः ) धन ( इषां ) आणणारा ( नेता ) हो ( भवतात् ). अतो विश्वानि अद्भुता चिकित्वाँ अभि पश्यति ( १।२५।११ ) = ह्या धनांतून ( अतः ) दाता ( चिकित्वान् ) वरुण अतीशय ( विश्वानि = अद्भुता ) धन ( अभि ) देतो ( पश्यति ). दभ्रं पश्यद्भ्य उर्विया विचक्षे उषा अजीगर्भुवनानि विश्वा ( १।११३।५ ) = थोडकें ( दभ्रं ) देणाऱ्यांना ( पश्यद्भ्यः ), त्यांना पुष्कळ ( उर्विया ) धन ( वि ) देतां यावें म्हणून ( चक्षे ), उषा अतीशय ( विश्वानि ) धन ( भुवनानि ) देते ( अजीगः ). ऋग्वेदांत धनवाचक व दानवाचक अनेक शब्द आहेत; त्यांपैकीं यज्ञ, भुवन, विश्व, चर् ( चरिष्णू ), पश्य् ( पश्यन् ) व भू ( अभूतां) हे शब्द होत; धन व देणें ह्या अर्थीं हे शब्द कां व कसे वापरले गेले हें एक कूट आहे.

## खंड ३० वा.

**यत्रा वदेते अवरः परश्च यज्ञन्योः कतरो नौ वि वेद । आ शेकुरित्सधमादं सखायो नक्षन्त यज्ञं क इदं वि वोचत् ( १०।८८।१७ )**

**यत्र विवदेते दैव्यौ होतारौ अयं च अग्निः असौ च मध्यमः**

यत्रा = यत्र. वेद ह्याच्या आधींचा वि हा उपसर्ग वदेते ह्याला यास्क जोडतो; पण सायणाचार्य तसें करीत नाहींत; ते विवाद करतात हा अर्थ वदेते ह्याचा करतात. अवरः = अयम् अग्निः = पृथिवीवरील अग्नि; परः च = असौ च मध्यमः = अंतरिक्षांतील वायु. दैव्यौ होतारौ = ( अग्नि व वायू हे ) देवांचे होते म्हणजे देवांना हवि पोचविणारे.

**कतरः नौ यज्ञे भूयो वेद इति**

यज्ञे अध्याहृत. यज्ञन्योः शब्द किंवा त्याचें विवरण यास्कानें दिलें नाहीं; यज्ञे हा शब्द यज्ञन्योः बद्दल खात्रीनें नसावा. वि=भूयः = ज्यास्त. यास्कानें वदेते ह्याला वि जोडला कीं वदेते ह्याचाच अर्थ विवदेते असा करून वि ह्याचा भूयः असा अर्थ केला ? यज्ञनीः यज्ञन्यौ यज्ञन्यः वगैरे; यज्ञन्योः = यज्ञ शेवटास नेणाऱ्या आपणा दोघांमध्यें ( नौ = आवयोः ). प्रश्न संपला असें ' इति ' दाखवितो.

**आशक्नुवन्ति तत् सहमदनं समानख्यानाः ऋत्विजः**

आ शेकुः = अशक्नुवन्ति = समर्थ नसतात असा दुर्ग अर्थ करतो; पण कर्तृ

शक्नुवन्ति = यज्ञ करण्याला समर्थ होतात असा सायणाचार्य अर्थ करतात. इत् अनर्थक म्हणून गाळला आहे. तत् अध्याहृत; महाराष्ट्रपाठ सत्. तत् = तो वाद; सत्? सधमादं = सहमदनं = एकमेकाशीं चालविलेली विवादरूपी झटापट. सधमादं म्हणजे यज्ञं ( सायण ). सखायः = समानख्यानाः = सारख्या नांवाचे; तें सगळ्यांना लागू पडणारें नांव म्हणजे ऋत्विजः. समानाख्यानाः असा महाराष्ट्रपाठ आहे; समानम् आख्यानं येषां ते; पण आख्यान शब्द एथें योग्य नाहीं. स = समान; खा = ख्यान = नांव; आख्यान = कथा.

**तेषां यज्ञं समश्नुवानानाम् । कः नः इदं विवक्ष्यति इति**

यज्ञं नक्षन्त = यज्ञं समश्नुवते = यज्ञानुष्ठान करतात; यास्क ह्या वाक्याचा अर्थ न करतां त्याचा सारांश इदं विवोचत् ह्याच्याशीं जोडतो; तेषां यज्ञं समश्नुवानानाम् = ( जे यज्ञ करण्यास समर्थ असतात व ) यज्ञ शेवटास नेतात त्यांमध्यें. नः अध्याहृत. वि वोचत्=विवक्ष्यति. इति ह्यानें प्रश्नसमाप्ति दर्शविली आहे. दुर्गानें केलेला अर्थः—ज्या यज्ञकर्मांत खालील व वरील म्हणजे अग्नि व वायु हे देवांचे होते यज्ञ शेवटास नेणाऱ्या आपणा दोघांत यज्ञाचें ज्यास्त ज्ञान कोणांत आहे असा वाद चालवितात तेव्हां ह्या दोघांत चाललेला वाद तोडण्यास यज्ञ चालविणारे ऋत्विज् समर्थ होत नाहींत; ते यज्ञ शेवटास नेतात; पण वादाचें खरें उत्तर आम्हांस कोण सांगेल असें म्हणतात.

**तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय**

ह्याचा अर्थ मागील पुष्कळ खंडांत दिला आहे.

## खंड ३१ वा.

**यावन्मात्रमुषसो न प्रतीकं सुपर्ण्यो न वसते मातरिश्वः ।**
**तावद्दधात्युप यज्ञमायन् ब्राह्मणो होतुरवरो नि षीदन् ( १०।८८।१९ )**
**यावन्मात्रम् उषसः प्रत्यक्तं भवति । प्रतिदर्शनम् इति वा**

प्रतीकं = प्रत्यक्तम्; प्रतीकं = प्रति + अकम्; अकं अञ्चू जाणें ह्यापासून; अकं = अक्तं = गेलेलें. भवति दुर्गाच्या वृत्तींत नाहीं; तो प्रतीकं हें वसते ह्याचें कर्म करतो; भवति शब्द नको आहे. किंवा प्रतीकं = प्रतिदर्शनम्; अञ्च् दिसणें हा अर्थ धातुपाठांत नाहीं. अञ्चु गतौ याचने च ( धा० १।८८७ ). प्रतिदर्शनम् इति वा हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत.

**अस्ति उपमानस्य संप्रत्यर्थे प्रयोगः । इहेव निधेहि इति यथा**

उपमान म्हणजे उपमादर्शक इव, न, यथा असे शब्द; अशा शब्दांचा संप्रति म्हणजे आतां ह्या अर्थीं भाषेंत उपयोग केलेला आढळतो; जसें ( यथा ) आतां किंवा अत्ताच्या अत्तां ( इव ) एथें ( इह ) ठेव ( निधेहि ). प्रस्तुत ऋचेंत न म्हणजे

आतां. अर्वाचीन संस्कृतांत इव चा हा दुसरा अर्थ होत नाहीं. गुर्जरपाठ इव बद्दल एव आहे; तो चुकीचा आहे.

**सुपर्ण्यः सुपतनाः एताः रात्रयः वसते मातरिश्वन् ज्योतिः वर्णस्य**

सुपर्ण्यः = सुपतनाः = भराभर उडणाऱ्या, जाणाऱ्या; त्या कोण ? एताः रात्रयः. मातरिश्वः = मातरिश्वन्. ज्योतिः हा प्रतीकं ह्याचा अर्थ असावा; पण वर्णस्य कशाला ? ज्योतिर्वर्णस्य हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत; वृत्तींत प्रकाशस्य यावन्मात्रं असा अन्वय दिला आहे; तेव्हां वर्णस्य = प्रकाशस्य असा दुर्गानें अर्थ केला असेल; यावन्मात्रं ज्योतिः ह्याचा वसते व तावत् ह्या शब्दांशीं संबंध असल्यामुळें भवति शब्द प्रक्षिप्त असावा व तो दुर्गवृत्तींत नाहीं असें वर म्हटलेंच आहे. यावन्मात्रं ज्योतिः = जितका प्रकाश.

**तावत् उपदधाति यज्ञम् आगच्छन् ब्राह्मणः होता अस्य अग्नेः होतुः अवरः निषीदन्**

आयन् = आगच्छन्. दुर्ग दधाति ह्याला उप न जोडतां आयन् ह्यालाच जोडतो; दधाति ह्याला उप जोडण्याचें कांहीं कारण नाहीं. ब्राह्मणः = ब्राह्मण होता. होतुः = अस्य अग्नेः होतुः. ऋचेचा अर्थः–हे मातरिश्व्या, ह्या पळणाऱ्या रात्री आतां उषेचा जितका प्रकाश पांघरतात किंवा दाखवितात तितकें ज्ञान यज्ञाला येणारा म्हणजे यज्ञ चालविणारा व होता जो अग्नि त्याच्या खालीं बसणारा ब्राह्मण होता धारण करतो. मातरिश्व्यानें कोणा एकाला विचारिलें कीं देवांचा होता जो अग्नि त्याच्याइतकें ज्ञान मनुष्यहोत्यास असतें काय ? उत्तरः– त्याचें ज्ञान अग्नीच्या ज्ञानाहून फार कमी असतें; किती कमी किंवा थोडें ? काळयाकुट्ट रात्रीं उषेचा जितका प्रकाश असतो तितकें; रात्रीं उषेचा प्रकाश अल्प असतो; अशी प्रस्तावना दुर्ग जोडतो. ऋचेचा अर्थ मला कळला नाहीं.

**होतृजपः तु अनग्निवैश्वानरीयः भवति । देव सवितर् एतं त्वा वृणते अग्निं होत्राय सह पित्रा वैश्वानरेण ( आश्व० श्रौ० १।३ )**

पण होत्याला जो जप म्हणावयाचा असतो तो मात्र अग्निवैश्वानरीय नाहीं; तो जप असाः–हे सवितृ देवा, हा जो तूं अग्नि त्या तुला तुझा पिता जो वैश्वानर त्याच्यासह होतृकर्माकरितां हे निवडीत आहेत.

**इमम् एव अग्निं सवितारम् आह सर्वस्य प्रसवितारम् । मध्यमं वा उत्तमं वा पितरम्**

मंत्रद्रष्टा ह्या अग्नीलाच सविता म्हणजे सर्व वस्तूंचा प्रसविता--उत्पन्न करणारा-असें व अंतरिक्षांतील किंवा द्युलोकांतील जो देव त्याला अग्नीचा पिता असें म्हणतो. यावरून अग्नि व वैश्वानर ह्या भिन्न व्यक्ति होत. अनाग्निर्वैश्वानरीयः ( अनग्निः वैश्वानरीयः ) असा गुर्जर व महाराष्ट्रपाठ आहे; तो चुकीचा आहे; दुर्गवृत्तीच्या एका उत्तम पोथींत मात्र अनग्निवैश्वानरीयः असा शुद्ध पाठ आढळतो. अग्निरेव वैश्वानरः अग्निवैश्वानरः ।

अग्निवैश्वानरशब्दः यस्मिन् सः अग्निवैश्वानरीयः; मतौ छः सूक्तसाम्नोः (पा० ५। २।५९) ह्या सूत्रानें ईय प्रत्यय लागून अग्निवैश्वानरीय शब्द झाला आहे; न अग्नि-वैश्वानरीयः अनग्निवैश्वानरीयः म्हणजे ज्यांत अग्नि हा वैश्वानर नाहीं असा जप; जप सूक्त नाहीं किंवा सामही नाहीं; तथापि अग्निवैश्वानर ह्या शब्दाला ईय प्रत्यय लावला गेला. यजमान अमक्या ब्राह्मणाला होता म्हणून नेमतो; ह्या वेळेला तो 'अग्निर्मे होता। स मे होता। होतारं त्वां वृणे' (आश्व० गृह्यसूत्र १।२३।७)= अग्नि माझा होता; तो माझा होता; तुला मी होता म्हणून निवडतों. त्यानंतर निव-डलेला ब्राह्मण म्हणतोः—अग्निष्टे होता। स ते होता। होताहं ते मानुषः (आश्व० गृ० १।२३।१०)=अग्नि तुझा होता; तो तुझा होता; मी तुझा मनुष्यहोता (असें म्हणून मग तो वर दिलेला जप म्हणतो). ब्राह्मणाला होता करणें म्हणजे वास्त-विक अग्नीलाच होता करणें होय.

**यस्तु सूक्तं भजते यस्मै हविर्निरुप्यते अयमेव सोऽग्निर्वैश्वानरः। निपातमेव एते उत्तरे ज्योतिषी एतेन नामधेयेन भजेते भजेते**

खंड १८ व २० पहा. भजेते भजेते ही द्विरुक्ति अध्यायसमाप्तीचें द्योतक. वैश्वानर शब्द ऋग्वेदांत ५१ वेळां आला असून ५० ठिकाणीं तो अग्नीला लाविला आहे; एका ठिकाणीं म्हणजे (८।३०।४ ह्यांत) वैश्वानराः हें देवासः ह्याचें विशे-षण आहे; सर्वत्र त्या शब्दाचा धनवाचक शब्दाशीं संबंध येतो. विश्वानर शब्द ४ वेळां आला असून १।१८६।७ व ७।७६।१ ह्यांत विश्वानरः सविता, १०। ५०।१ ह्यांत विश्वानराय इन्द्राय व ८।६८।४ ह्यांत विश्वानरस्य वः पतिं असे शब्द आहेत; दोन ठिकाणीं सविता व एके ठिकाणीं इंद्र ह्यांचें तें विशेषण आहे; ८।६८। ४ ह्यांत विश्वानरस्य शवसः चर्षणीनां रथानां पतिं असें इंद्राला म्हटलें आहे; 'पतिं' च्या आधींचे तीन शब्द कधीं कधीं धनार्थी वापरले जातात; तेव्हां विश्वानर ह्याचाही धन असा अर्थ होईल. विश्वानराचा मुलगा वैश्वानर असें ऋग्वेदांत कोठेंही म्हटलें नाहीं. दोन्ही शब्दांचा मूळचा अमूप धन असा अर्थ असून ते धनवान् ह्याअर्थी वापरले गेले. विश्वानरः एव वैश्वानरः; विश्वानर शब्दाची वृद्धि केली आहे एवढेंच; वृद्धिकारक प्रत्यय केवळ स्वार्थी होय म्हणजे दोहोंचाही अर्थ एकच; किंवा वृद्धीनें धनाचा अतिशय दाखविला असेल.

---

*

# अध्याय ८ वा.

## खंड १ ला.

**द्राविणोदाः ( निघं० ५।२।१ ) कस्मात्। धनं द्रविणम् उच्यते। यत् एनत् अभिद्रवन्ति।**

**बलं वा द्रविणम्। यत् एनेन अभिद्रवन्ति। तस्य दाता द्रविणोदाः**

द्रविणोदस् कशापासून ? धनाला द्रविण म्हणतात; ( तसें म्हणण्याचें कारण ) ज्याअर्थी ( यत् ) ह्याच्याकडे ( एनत् अभि ) लोक धांवतात ( द्रवन्ति ); म्हणजे द्रु धांवणें ह्यापासून द्रविण. किंवा बलाला द्रविण म्हणतात; ( तसें म्हणण्याचें कारण ) ज्याअर्थी बलामुळें ( एनेन ) बलवान् लोक शत्रूंवर हल्ला करण्यासाठीं धांवत सुटतात. तें ( धन किंवा बळ ) देणारा तो द्रविणोदाः. पण द्रविण म्हणजे धन हाच अर्थ सर्वत्र आहे; बल असा अर्थ कोठेंही नाहीं. द्रविण व द्रविणस् असे दोन निराळे शब्द आहेत; द्रु = देणें. अश्विनांना द्रवत्पाणी असें विशेषण लाविलें आहे ( १।३।१ ) व ( ८।५।३३ ) त द्रवत्पाणिभिः अश्वैः असें आहे; द्रवत्पाणि हा विदद्वसु ह्यासारखा समास आहे; विदत् वेत्ति ददाति वसु असौ विदद्वसुः; द्रवत् द्रवति ददाति पाणिं धनम् असौ द्रवत्पाणिः. द्रु पासून द्रवि ( म्हणजे धन ) हें नाम; द्रवि + नं = द्रविणम्; द्रवि + नस् = द्रविणस्; दोहोंचा अर्थ अतीशय धन. दस् = देणें; दस्र व दस्म ह्यांत दस् धातु आहे; दस्र = दस्म = दाता.

**तस्य एषा भवति**

त्याची म्हणजे द्रविणोदाः ह्यासंबंधाची पुढील ऋचा होय.

## खंड २ रा.

**द्रविणोदा द्रविणसो ग्रावहस्तासो अध्वरे। यज्ञेषु देवमीळते ( १।१५।७ )**

**द्रविणोदाः यः त्वम्। द्रविणसः इति द्रविणसादिनः इति वा। द्रविणसानिनः इति वा। द्रविणसः तस्मात् पिबतु इति वा**

यः त्वं अध्याहृत. दुर्गवृत्तींत त्वं नाहीं; त्वं पिबतु हें जुळत नाहीं; तेव्हां त्वं नको आहे. द्रविणसः = द्रविण + सः; सः = सादिनः; किंवा सः = सानिनः. द्रविणसादिनः = द्रविण म्हणजे धन आपणांस मिळेल ह्या इच्छेनें जे यज्ञांत बसतात व यज्ञकर्म चालवितात ते; मिळणारें द्रव्य उपभोगणारे ते द्रविणसानिनः. किंवा द्रविणस् म्हणजे सोम; त्यांतला आपला भाग पिवो असा तिसरा अर्थ. पहिल्या दोन अर्थी द्रविणसः हें ऋत्विजः (अध्याहृत) ह्याचें विशेषण. यः द्रविणोदाः सः द्रविणसः सोमात् स्वम् अंशं पिबतु असा तिसऱ्या अर्थी अन्वय.

**यज्ञेषु देवम् ईळते याचन्ति स्तुवन्ति वर्धयन्ति पूजयन्ति इति वा**

ईळते = याचन्ति = याचना करतात; किंवा स्तुवन्ति = स्तवितात; किंवा वर्धयन्ति = हवींनीं पुष्ट करतात; किंवा पूजयन्ति = पूजितात. ईळे याचामि । ईळिः अध्येषणाकर्मा पूजाकर्मा वा (निरुक्त १।१५); स्तवणें व पुष्ट करणें हें नवीन अर्थ कां घातले? यास्ककृत ऋचेचा अर्थः—धन मिळविण्याकरितां यज्ञांत बसणारे म्हणजे यज्ञकर्म चालविणारे ऋत्विज् किंवा धन भोगूं इच्छिणारे ऋत्विज् धन देणारा जो देव त्याला यज्ञांत ( अध्वरे = यज्ञेषु ) स्तवितात किंवा त्याची याचना करितात. यस्त्वं असा पाठ स्वीकारल्यास धन देणारा जो तूं त्या तुझी याचना करितात वगैरे; त्वं गाळल्यास धन देणारा जो देव तो सोमांतून आपला भाग पिवो; ऋत्विज् त्याची याचना करतात वगैरे. द्रविणोदाः शब्द एथें बहुवचनी आहे; इतर सर्वत्र तो एकवचनी आढळतो; एथेंही तो एकवचनीच अशी समज झाल्यानें भलता अर्थ केला गेला. उच्चा दिवि दक्षिणावन्तो अस्थुर्ये अश्वदाः सह ते सूर्येण । हिरण्यदा अमृतत्वं भजन्ते वासोदाः सोम प्र तिरन्त आयुः (१०।१०७।२); एथें अश्वदाः, हिरण्यदाः व वासोदाः हे शब्द अनेकवचनी आहेत; प्रस्तुत ऋचेंत द्रविणोदाः अनेकवचनीच आहे. द्रवि धनं तेन युक्तं नस् धनं येषां ते द्रविणसः । अथवा । द्रवि धनं नसन्ते ते द्रविणसः. द्रविणोदाः = धन देणारे. नरो द्रविणसो गृणानाः (४।३४।५); नरः = द्रविणसः = गृणानाः = धन देणारे; हे तीनही शब्द वाजाः या शब्दाचीं विशेषणें होत. ग्रावाणः हस्तेषु येषां ते. ग्रावन् म्हणजे सोम ठेंचून रस काढणारा दगड असा अर्थ घेतल्यानें ऋत्विजः शब्द अध्याहृत घ्यावा लागतो; पण ऋग्वेदांत समासाच्या अंतीं जेथें जेथें हस्त शब्द आला आहे तेथें तेथें पूर्वपद धनवाचक आहे; जसें:—हिरण्यहस्त, सुहस्त, ऋजुहस्त; तेव्हां ग्रावन् शब्दाचाही तोच अर्थ असावा; गृ + आ + वन् = ग्रावन्; गृ = देणें, धन; वन् = देणें, धन; आ=धन. अतीशय धन आहे ज्यांच्या हातांत ते देव ग्रावहस्तासः. द्रविणोदाः= द्रविणसः = ग्रावहस्तासः. अध्वरे = यज्ञेषु = धनभांडारांत. देवं = धनवान् अग्नीला. ईळते = धनयुक्त करतात. धनवान् व धनदाते देव अग्नीला यज्ञभांडारानें युक्त करतात.

**तत् को द्रविणोदाः । इन्द्रः इति क्रौष्टुकिः । स बलधनयोः दातृतमः । तस्य च सर्वा बलकृतिः । ओजसो जातमुत मन्य एनम् ( १०।७३।१० ) इति च**

आतां द्रविणोदस् हें कोणत्या देवाचें नांव? द्रविणोदस् म्हणजे इंद्र असें क्रौष्टुकि म्हणतो; बल व धन देणाऱ्यांत तो श्रेष्ठ; द्रविण म्हणजे धन किंवा बल ( ८। १ ); बलधनयोः एथें धन शब्द अप्रस्तुत दिसतो; कारण सर्व विधानें बलासंबंधीं आहेत. बलाच्या सर्व कृति इंद्राच्या. या च का च बलकृतिः इन्द्रकर्मैव तत् (निरु० ७।१०). ( कोणी म्हणतात हा अश्वापासून निघाला ); पण मला वाटतें तो ओजस्पासून झाला; (तो मन्युपासून निघाला; कोठून निघाला तें इंद्रालाच माहित) असें मंत्रद्रष्टा म्हणतो.

अश्व, ओजस् व मन्यू ह्यांचे दोन अर्थ असावेत; ते दोन अर्थ म्हणजे बल व धन; क्रोष्टुकि बल एवढाच अर्थ घेतो.

**अथापि अग्निं द्राविणोदसम् आह। एष पुनर् एतस्मात् जायते। यो अश्मनोरन्तरग्निं जजान ( २।१२।३ ) इत्यपि निगमो भवति**

शिवाय मंत्रद्रष्टा अग्नीला द्राविणोदस म्हणजे द्रविणोदस्चा मुलगा असें म्हणतो (द्रविणोदसः अपत्यं द्राविणोदसः). अग्नीला ज्यांत द्राविणोदस म्हटलें आहे असा मंत्र शोधला पाहिजे; द्रविणोदाः पिबतु द्राविणोदसः ( २।३७।४ ) हा तो मंत्र असें कित्येक म्हणतात असें दुर्ग म्हणतो; त्या शब्दांचा अर्थ पुढें दिला जाईल. शिवाय हा ( अग्नि ) त्याच्यापासून ( इंद्रापासून ) जन्मतो ( खंड ७।२३ पहा ); विजेपासून अग्नि उत्पन्न होतो; वीज म्हणजे इंद्र. जो ( इंद्र ) व्यापक ज्या द्यावापृथिवी त्यांच्यांत ( अश्मनोः अंतर् ) अग्नि उत्पन्न करता झाला असा मंत्रही आहे. एष पुनर्० वगैरे शब्दांनीं लौकिक प्रमाण सांगितलें; ऋचा वैदिक प्रमाण देते.

**अथापि ऋतुयाजेषु द्राविणोदसाः प्रवादाः भवन्ति**

ज्या मंत्रांनीं ऋतूंना हवि दिला जातो ते मंत्र ऋतुयाज; ऋतवः यैः मन्त्रैः इज्यन्ते ते ऋतुयाजाः मन्त्राः; अशा मंत्रांत द्रविणोदस् शब्दयुक्त वाक्यें आहेत; द्रविणोदः शब्दः वर्तते येषु ते द्राविणोदसाः प्रवादाः प्रयोगाः वाक्यानि. हवि अग्नींत अर्पण करण्याच्या आधीं अध्वर्यु होत्याला विशिष्ट मंत्र म्हणावयास आज्ञा करतो; त्या आज्ञेस प्रैष म्हणतात; होत्र, पोत्र व नेष्ट्र अशीं पात्रांचीं नांवें आहेत; त्यांतला सोम द्रविणोदस् प्यायला. तुरीयं पात्रम् अमृक्तम् अमर्त्यम् इन्द्रपानं देवो द्रविणोदाः द्राविणोदसः० ऋतुभिः सोमस्य पिबतु। अच्छावाक यज ( प्रैष ५१ ); अध्वर्यु आपल्या हाताखालचा जो मैत्रावरुण ऋत्विज् त्याला ऋतुभिः प्रेष्य म्हणजे ऋतुयाज म्हणण्यास सांग अशी आज्ञा करतो; मैत्रावरुण होत्याच्या हाताखालचा जो अच्छावाक त्याला ऋतुयाज मंत्र म्हणावयास सांगतो; म्हणून प्रैषाच्या शेवटीं अच्छावाक यज असे शब्द आहेत. चौथें शुद्ध व देवांना योग्य असें इंद्रपान नांवाचें पात्र आहे; त्यांतला सोम ऋतूंसह द्रविणोदस् देव पिवो असा प्रैषाचा अर्थ. ह्या प्रैषाचें मूळ ऋ० सं० २।३७। ४ हें आहे; ह्या सूक्ताच्या पहिल्या तीन ऋचांच्या शेवटीं सोमं द्रविणोदः पिब ऋतुभिः असे शब्द आहेत; परंतु चौथ्या ऋचेच्या शेवटीं वरील शब्दांऐवजीं द्रविणोदाः पिबतु द्राविणोदसः असे शब्द आहेत; ह्या ऋचेंत इन्द्रपानं शब्द नाहीं; तो प्रैषांत आला आहे.

**तेषां पुनः पात्रस्य इन्द्रपानम् इति भवति**

भवति बद्दल दुर्गवृत्तींत समाख्या शब्द आहे व तसा शब्द अवश्य आहे. त्या ऋतुयाज हवींचें जें पात्र त्याला इंद्रपान म्हणतात. पात्र जर इंद्रपान तर त्या पात्रांतून पिणारा जो द्रविणोदस् तो इंद्रच असला पाहिजे; ह्या अनुमानाला ऋचेचा आधार नसून प्रैषाचा आधार आहे. पुनः = शिवाय.

**अथापि एनं सोमपानेन स्तौति**

शिवाय हा ( इंद्र ) सोम पितो असें मंत्रद्रष्टा ( वारंवार ) वर्णन करतो. सोम पिण्याबद्दल इंद्राची जशी ख्याति आहे तशी इतर कोणत्याही देवाची नाहीं.

**अथापि आह द्रविणोदाः पिबतु द्राविणोदसः ( २।३७।४ ) इति**

शिवाय द्राविणोदस जो द्रविणोदस् तो पिवो असें मंत्रद्रष्टा म्हणतो. यस्य द्रविणोदसः अग्निः अपत्यं स द्राविणोदसः असा तद्धिताचा विग्रह दुर्ग करतो; हा विग्रह चमत्कारिक असून त्याला कोणत्याही पाणिनिसूत्राचा आधार नाहीं.

**अयमेव अग्निः द्रविणोदाः इति शाकपूणिः । आग्नेयेषु एव हि सूक्तेषु द्राविणोदसाः प्रवादाः भवन्ति**

हा अग्नीच द्रविणोदस् असें शाकपूणि म्हणतो; कारण अग्निसूक्तांमध्येंच द्रविणोदस् शब्दाचे प्रयोग आहेत. द्रविणोदसः इमे द्राविणोदसाः. द्रविणोदस् हें मूलतः विशेषण; पण तें कालांतरानें अग्निवाचक झालें. या राधसश्चोदितारा मतीनां या वाजस्य द्रविणोदा (५।४३।९); एथें पूषन् आणि वायु ह्यांना द्रविणोदौ (द्रविणोदा) म्हटलें आहे; द्रविणोदा = चोदितारा = देणारे. सूक्त १।१५ त अग्निखेरीज इंद्र, मरुत्, अश्विन व मित्रा-वरुण आले आहेत; ह्यांतील द्रविणोदस् शब्दाच्या चार (७ते१०) ऋचांत अग्नीचें नांव नाहीं; तेव्हां द्रविणोदस् कोण असा प्रश्न उत्पन्न होतो. १।९६ सूक्तांत देवा अग्निं धारयन् द्रविणोदां असा ( शेवटली ऋचा खेरीज करून ) प्रत्येक ऋचेचा चौथा पाद आहे. २।३७ च्या पहिल्या तीन ऋचांत द्रविणोदः पिब व चौथींत द्रविणोदाः पिबतु असे शब्द आहेत. त्वमग्ने द्रविणोदाः ( २।१।७ ). ५।४६।४ त इतर देवांबरोबर द्रविणोदाः आहे; पण ह्या देवसमूहांत अग्नि नाहीं व इंद्रही नाहीं. ७।१६।११ त देवो द्रविणोदाः आहे पण अग्नि शब्द नाहीं; सूक्त आग्नेय आहे. अग्निः स द्रविणोदाः ( ८।३९।६ ). द्रविणोदाः अग्निः (१०।२।२). देवस्त्वष्टा द्रविणोदाः (१०।९२।११); ह्या ऋचेंत इतर देव आहेत अग्नि नाहीं. यक्षि द्रविणोदः ( १०।७०।९ ); एथें त्वष्टा आहे अग्नि नाहीं. ह्या उताऱ्यावरून आग्नेय सूक्तांतच द्रविणस् शब्द येतो असें सिद्ध होत नाहीं; द्रविणोदस् इंद्र ठरत नाहीं खास; द्रविणोदस् एखादा निराळा देव असावा अशी शंका येते.

**देवा अग्निं धारयन् द्रविणोदाम् ( १।९६।१-७ ) इत्यपि निगमो भवति**

देवांनीं धनदाता जो अग्नि त्याला ( मनुष्यांच्या उपयोगाकरितां ) दिलें. यापुढें यास्क क्रौष्टुकीचीं विधानें खोडतो; त्या विधानांचा अर्थ वर दिलाच आहे.

**यथो एतत् । स बलधनयोः दातृतमः इति । सर्वासु देवतासु ऐश्वर्यं विद्यते**

धनपतित्व व बलपतित्व हीं सर्व देवतांत असतात. बलस्य धनस्य च यः ईष्टे स ईश्वरः । ईश्वरस्य भावः ऐश्वर्यम्.

**यथो एतत् । ओजसो जातमुत मन्य एनम् इति च आह इति । अयमपि अग्निः ओजसा बलेन मथ्यमानः जायते । तस्मात् एनम् आह सहसः पुत्रं सहसः सूनुं सहसो यहुं**

ओजसा = बलेन. हा अग्नि सुद्धां जोरानें अरणि घासल्यानें उत्पन्न होतो; म्हणून तो बलाचाच पुत्र. (हें उत्तर कांहींतरी आहे). म्हणूनच ह्याला बलाचा पुत्र असें मंत्रद्रष्टा म्हणतो. पुत्रं = सूनुं = यह्वम्. सहसः पुत्रः ( २।७।६ ); सहसः सूनो ( ८।७५।३ ); सहसो यहो ( १।७९।४ ); सहस् = धन व बल.

**यथो एतत्। अग्निं द्राविणोदसम् आह इति। ऋत्विजः अत्र द्रविणोदसः उच्यन्ते हविषः दातारः। ते च एनं जनयन्ति**

द्रविणस् हविः। द्रविणसः हविषः दाः दातारः। तेषाम् अपत्यं द्राविणोदसः; द्रविणस् म्हणजे हवि; हवि देणारे ते द्रविणोदस्; त्यांचा पुत्र द्राविणोदस; कारण ( हि ) अग्नींत घृत टाकून ऋत्विज् ( ते ) अग्नि ( एनं ) उत्पन्न करतात ( जनयन्ति ).

**ऋषीणां पुत्रो अधिराज एषः ( मैत्रा० सं० १।२।७ ) इत्यपि निगमः भवति**

अतीशय दीप्तिमान् ( अधिराजः ) हा ऋषींचा म्हणजे ऋत्विजांचा पुत्र अशी ऋचाही आहे. ऋत्विज् मंथनानें अग्नि उत्पन्न करतात. द्राविणोदसः हा कठीण शब्द आहे; विश्वानर पासून वैश्वानर ह्यासारखी पान ५९३ ओळी २५ ते २७ द्रविणोदस् पासून द्राविणोदस ही स्वार्थी वृद्धि झाली असावी; कदाचित् द्राविणोदसः = अतिशय द्रव्य देणारा असाही अर्थ होईल.

**यथो एतत्। तेषां पुनः पात्रस्य इन्द्रपानम् इति भवति इति। भक्तिमात्रं तत् भवति। यथा वायव्यानि इति सर्वेषां सोमपात्राणाम्**

दुर्गवृत्तींत समाख्या भवति असें आहे. पात्राला इन्द्रपान हें नांव लक्षणेनें पडलें आहे; जसें इतर देवांना दिल्या जाणाऱ्या सोमपात्रांना वायव्य असें नांव पडलें आहे. भक्तिः एव भक्तिमात्रं = केवळ लक्षणा. देव सोम मारावयाला बसले असतांना वायु म्हणजे प्राण मध्यें येऊन अडथळा करूं लागला म्हणून रस निघेना; देव त्याला म्हणाले आमचेकडे ये; मला भाग पाहिजे असें त्यानें उत्तर दिलें; भाग असें ते म्हणाले; सर्व पात्रांना माझें नांव असावें; तें त्यांनीं मान्य केलें; म्हणून सर्व पात्रांना वायव्य संज्ञा आहे; रस काढल्यावर त्याला दुर्गंध सुटला; वायु म्हणाला पहिला ग्रह जर मला द्याल तर हा सोम मी स्वादिष्ट करीन; देव कबूल झाले ( मैत्रा० सं० ४।५।८ ). वायव्य ग्रह पहिला; त्यावरून इतर देवांच्या पात्रांनाहीं वायव्य संज्ञा पडली असेल. अशीच कथा तैत्तिरीय संहिता ( ६।४।७ व ८ ) शतपथब्राह्मण ( ४।७।३ व ४ ) व कापिष्ठल संहिता ( ४२।३ व ४ ) ह्यांत दिली आहे.

**यथो एतत्। सोमपानेन एनं स्तौति इति। अस्मिन्नपि एतत् उपपद्यते। सोमं पिब मन्दसानो गणश्रिभिः ( ५।६०।८ ) इति**

सोमपान अग्नीलाही लागू आहे; हे अग्नि, समूहानें जे तुझा आश्रय करतात त्या मरुतांसह हर्षयुक्त असा तूं सोम पी. ह्यावरून अग्नि सोम पितो हें सिद्ध झालें.

**यथो एतत्। द्रविणोदाः पिबतु द्राविणोदसः इति। अस्यैव तत् भवति**

द्राविणोदसः हें विशेषण ह्याचेंच ( अग्नीचेंच ) आहे. अर्थ वर दिला आहे.

## खंड ३ रा.

**मेद्यन्तु ते वन्हयो येभिरीयसेऽरिषण्यन् वीळयस्वा वनस्पते ।**
**आयूया धृष्णो अभिगूर्या त्वं नेष्ट्रात्सोमं द्रविणोदः पिब ऋतुभिः ( २।३७।३ )**
**मेद्यन्तु ते वह्नयः वोढारः यैः यासि । अरिष्यन् दृढीभव**

वह्नयः = वोढारः = ( गाडी ) ओढणारे ( घोडे ). वह्नयः शब्द भाष्यांत घालण्याचें कारण नाहीं. येभिः = यैः. ईयसे = यासि. अरिषण्यन् = अरिष्यन्. वीळयस्व = दृढीभव.

**आयूय धृष्णो अभिगूर्य त्वं नेष्टीयात् धिष्ण्यात् । धिष्ण्यः धिषण्यः धिषणाभवः । धिषणा वाक् धिषेः दधात्यर्थे । धीसादिनी इति वा । धीसानिनी इति वा**

नेष्ट्रात् = नेष्टीयात् धिष्ण्यात् = नेष्ट्याच्या पात्रांतून. धिष्ण्यः = धिषण्यः = धिषणाभवः. धिषणाभवः दुर्गवृत्तींत नाहीं व त्याची आवश्यकता नाहीं. गुर्जरप्रतींत वाक् नाहीं. धिषणा = वाक् = वाणी. धिष् = धारण करणें; धिष् + अना = धिषणा = ( अर्थ ) धारण करणारी. बुद्धिर्मनीषा धिषणा ( अमर १।२५।१ ); धिषणा = बुद्धि; धिष् शब्दे ( धा० ३।२१ ); दिधेष्टि धिषणा ( क्षीरस्वामी ). धातुपाठ व यास्क ह्यांचा धिषणाशब्दासंबंधानें फरक आहे. होत्याचें शस्त्र ऐकण्याकरितां नेष्टा त्याच्यापुढें बसतो; तो जेथें बसतो तें स्थान धिष्ण्य;पण ऋत्विजांच्या सर्व स्थानांना धिष्ण्य म्हणतात. किंवा धिषणा = धि+सना; धि = धी; सना = सादिनी. किंवा सना = सनोति = संभजते. धी = बुद्धि; वाणी बुद्धींत बसते किंवा बुद्धीवर अवलंबून असते म्हणून वाचेला धिषणा म्हटलें आहे; धी = कर्म, बुद्धि; वाणी बुद्धि व कर्म ह्या दोहोंत असते किंवा दोहोंच्या उपयोगी पडते.

**वनस्पते इति एनम् आह । एष हि वनानां पाता वा पालयिता वा । वनं वनोतेः । पिब ऋतुभिः कालैः**

द्रविणोदस्‌ला मंत्रद्रष्टा वनस्पते म्हणतो. वनस्पतिः = वन + पतिः; पति = पालक; पा किंवा पाल् ह्यापासून पति शब्द. अग्नि वनाचें रक्षण करतो; झाडांत अग्नि असतो; पण तो त्यांना जाळीत नाहीं; हेंच झाडांचें रक्षण. वन् भजणें,उपयोगी पडणें; झाडें लाकडांकरितां उपयोगी पडतात म्हणून लोक त्यांची सेवा, पालन वगैरे करतात. ऋतुभिः = कालैः; ऋतूंसह सोम पी. ह्या प्रमाणें द्रविणोदस् सूक्तभाक् व हविर्भाक् आहे; सूक्त १।९६ हें 'द्रविणोदस्'चें आहे. निपातमेतत् मध्यमं ज्योतिरेतेन नामधेयेन भजते असें दुर्गवृत्तींत शेवटीं आहे; तेव्हां त्याच्या प्रतींत हें वाक्य असावेंसें वाटतें; त्याच्यापूर्वी यस्तु सूक्तं भजते यस्मै हविर्निरुप्यते अयमेव सोऽग्निर्द्रविणोदाः हेंही असेल. यास्क व दुर्ग ह्यांनीं केलेला अर्थ :— हे वनस्पति द्रविणोदस्, ज्या घोड्यांसह तूं जातोस म्हणजे संचार करतोस ते तुझे घोडे तुळतुळीत धष्टपुष्ट होवोत; ज्या तुझी कोणीही हिंसा करीत नाहीं असा तूं ( आम्हीं दिलेला सोम पिण्यासाठीं ) स्वतःला बळकट कर; बोटानें ढवळून व पात्र वर उचलून हे शत्रूंना दटावणाऱ्या ( धृष्णो )

देवा, नेष्टनामक ऋत्विजानें पुढें केलेल्या पात्रांतून सोम ऋतूंसह पी. धिष्ण्य ह्याचा अर्थ दुर्ग देत नाहीं; पण अमरांत त्याचा ग्रह म्हणजे सोमपात्र असा अर्थ आहे. वन् = देणें; वनस् = धन; वनस्पतिः = धन देणारा. धृ = देणें; धृ + स्नुः = धृष्णुः = धन देणारा. त्रिमिदा स्नेहने (धा० ४।१३७); हा अर्थ दुर्गानें घेतला आहे; पण एथें मेद्यन्तु = देवोत. मेदतां वेदता वसो (१०।९३।११) = हे धनवन्ता इंद्रा (वसो), धन (वेदता) दिलें जावो (मेदतां). यूयं गावो मेदयथा कृशं चिदश्रीरं चित्कृणुथा सुप्रतीकम् (६।२८।६) = हे गाईनो, गरीबाला (कृशं = अश्रीरं) तुम्ही धनवंत करतां (मेदयथ = सुप्रतीकं कृणुथ). स्याम ते जयतः शक्र मेदिनो यथा वयमुश्मसि तद्वसो कृधि (१०।३८।२) = हे धनवंता इंद्रा (शक्र = वसो), धन देणाऱ्या (जयतः) तुझ्यामुळें आम्ही धनवंत (मेदिनः) होऊं; आमच्या इच्छे-प्रमाणें धन दे. वन्द्वयः = दातारः मरुतः. मरुद्भिरग्न आ गहि (१।१९) ह्यावरून अग्नि व मरुत् ह्यांचें सख्य होतें. अ + रि + सन् = अतीशय धन; अरिषण्यन् = अतीशय धन देणारा. वीळ् = दृढ, खंबीर करणें असा अर्थ बहुतेक ऋचांत आहे; तथापि कांहीं ठिकाणीं धन देणें असा अर्थ असावा असा संशय येतो; वीळयस्व = वी + ळयस्व; ळयस्व = दयस्व; वी = दय् = देणें; वी व दय् ह्या दोन संयुक्त धातूंना 'स्व' प्रत्यय लाविला आहे; वीळयस्व = देच दे. रध्रचोदः श्नथनो वीळित-स्पृथुरिन्द्रः सुयज्ञः (२।२१।४); रध्रचोदः = गरिबांना धन देणारा; पृथुः = सुयज्ञः = धनवान्; श्नथनः = हिंसा करणारा, (शत्रूला मारून त्याचें धन हरण करणारा); वीळि = धन; वीळितः = धन दाता. हें केवळ अनुमान आहे. खात्रीचें उदाहरण नाहीं. आयूय = अभिगूर्य = देऊन; यु = देणें; नियुत् (= दान) ह्यांत यु धातु आहे; गृ = देणें. नेष्टुः इदं नेष्ट्रं; पण नेष्ट्र शब्द कसा झाला ? नी धातूला लेट् चा स् लागून नीष् किंवा नेष् होईल. नेष् + तृ = नेष्टृ; नेष् = धनाकडे नेणें; नेष्टा = धनाप्रत नेणारा; नेष्ट्रं = धन. होत्र, पोत्र, नेष्ट्र सर्व तुझें असें अग्नीला म्हटलें आहे (२।१।२); हु + त्रं = होत्रम्; पु + त्रं = पोत्रम्; हु = पु = देणें; होत्रं = पोत्रं = नेष्ट्रं = धन. २।५।५ त अस्य नेष्टुः असें अग्नीविषयीं म्हटलें आहे; नेष्टृ नांवाचा ऋत्विज् असा कोठेंही अर्थ नाहीं; नेष्ट्रात् = धनात्. सु = देणें, धन; सु + मः = सोमः = धनयुक्त धन, अतीशय धन. ऋ = देणें; ऋ + तुः = ऋतुः = धन. पा चा अर्थ धन देणें होतो; तसा पिब्चाही होणें शक्य आहे. हे धनदात्या (वनस्पते = धृष्णो = द्रविणोदः), ज्या मरुतांसह तूं संचार करतोस ते धन देवोत; अति धन देणारा (अरिषण्यन्) तूं खूप धन दे (वीळयस्व); सारखा देत देत (आयूय = अभिगूर्य) धन (सोमं) आपल्या धनांतून (ऋतुभिः = नेष्ट्रात्) दे (पिब). धन व देणें ह्या अर्थाचे जितके शब्द एका ऋचेंत घालतां येतील तितके घालणें म्हणजे मोठें कौशल आहे असें ऋचा रचणारे समजत असावेत; अशी अर्थपुनरुक्ति हवी तितकी ऋग्वेदांत सांपडते.

## खंड ४ वा.

**अथ अतः आप्रियः । आप्रियः कस्मात् । आप्नोतेः । प्रीणातेर्वा । आप्रीभिराप्रीणाति इति च ब्राह्मणम् ( ऐ० ब्रा० ६।४ )**

आतां ह्याच्यापुढें आप्रीसूक्तें घेऊं. आप्री शब्द कशापासून? आप् = मिळविणें; आप् + रीः = आप्रीः = देवता मिळविणारी ऋचा. किंवा आ + प्री = आप्रीः; प्री = तृप्त करणें; 'आप्रींनीं तृप्त करतो' असें ब्राह्मणवचन आहे; आप्रीऋचा देवतांना संतुष्ट करतात. आप्रीसूक्तांत येणाऱ्या देवतांनासुद्धां आप्री नांव आहे; तथापि व्युत्पत्ति तीच; ऋचांनीं देवता मिळविल्या जातात किंवा संतुष्ट केल्या जातात म्हणून त्याही आप्री. आप्रीः आप्रियौ आप्रियः वगैरे; ह्यांपैकीं कोणतेंही रूप ऋग्वेदांत नाहीं. आप्री शब्द कसा झाला तें सांगतां येत नाहीं. आप्रीभिराप्नुवन् । तदाप्रीणामाप्रीत्वम् ( तै० ब्रा० २।२।८ ) । प्रजापतिराप्रीभिरात्मानमाप्रीणीत । यज्ञमेवैताभिर्यजमान आप्रीणीते( मै० सं० ३।९।६; ३।४।६ ह्यांत यज्ञं बद्दल अग्निं आहे; आप्रीणाति ( शत० ब्रा० ६।१। ४।२८). यास्कानें हे उतारे कां दिले नाहींत? आप् पासून आप्री झाला तै० ब्रा० तलें वचन द्यावयास पाहिजे होते; तें दिलें नाहीं ह्यावरून आप्नोतेः हें व प्रीणातेः नंतरचा वा प्रक्षिप्त असावा.

**तासाम् इध्मः प्रथमागामी भवति ( निघंटु ५।२ ) । इध्मः समिन्धनात् । तस्य एषा भवति**

त्या आप्रीदेवतांमध्यें इध्म पहिला आहे; सम् + इन्ध् पासून इध्म म्हणजे समिधा; त्याची ही पुढील ऋचा होय. दुर्गवृत्तींत इध्मः समिन्धनात् नाहीं.

## खंड ५ वा.

**समिद्धो अद्य मनुषो दुरोणे देवो देवान् यजसि जातवेदः ।**
**आ च वह मित्रमहश्चिकित्वान् त्वं दूतः कविरसि प्रचेताः ( १०।११०।१ )**
**समिद्धः अद्य मनुष्यस्य मनुष्यस्य गृहे देवः देवान् यजसि जातवेदः**

मनुषः = मनुष्यस्य मनुष्यस्य. दुरोणे = गृहे; दुर्गवृत्तींत यज्ञगृहे.

**आ च वह मित्रमहः चिकित्वान् चेतनावान् । त्वं दूतः कविः असि प्रचेताः प्रवृद्ध चेताः**

चिकित्वान् = चेतनावान् = जाणणारा. आ च वह ह्याचे आवह च कां केले नाहीं? प्रचेताः = प्रवृद्धचेताः; प्र = प्रवृद्ध. चेतनावान् व प्रवृद्धचेताः हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. यास्क ही ऋचा अग्निपर आहे असें म्हणतो आणि वास्तविक तशीच ती आहे.अग्निपर अर्थः- हे जातवेद अग्नि देवा, आज सर्व मनुष्यांच्या घरीं प्रज्वलित केलेला तूं देवांना हवि दे; आणि यजमान जे तुझे मित्र त्यांच्यावर उपकार करणाऱ्या (मित्रमहः) हे अग्नि,तूं ज्ञाता असल्यामुळें देवांना घेऊन ये; कारण तूं यजमानांचा दूत आहेस; तुला अतींद्रिय ज्ञान आहे (कविः); तुझें ज्ञान अतिशय आहे (प्रचेताः). इध्मपर अर्थ करतांना इध्म हा अग्नीचा आधार असल्यामुळें अग्नीचीं विशेषणें व अग्नीच्या क्रिया इध्मावर आरोपित केल्या आहेत

असें समजावयाचें. देवः = हवि देणारा किंवा प्रकाशणारा. दुरोणं ( १ ) = घर; जसें इदं हि वां प्रदिवि स्थानमोक इमा गृहा अश्विनेदं दुरोणम् ( ५।७६।४ ); स्थानं =ओकः = गृहाः = दुरोणं = घर. यातमश्विना सुकृतो दुरोणम् ( ४।१३।१ ); दुरोणं = घर. दुरोणं ( २ ) = धन; जसें गृहपतिर्महाँ असि दिवस्पायुर्दुरोणयुः ( ८।६०।१९ ); गृहपतिः = महान् = दिवः पायुः = दुरोणयुः = धनदाता. प्रस्तुत ऋचेंत दुरोण म्हणजे घर कीं धन ? अगन्म महा नमसा यविष्ठं यो दीदाय समिद्धः स्वे दुरोणे ( ७।१२। १ ) = जो अग्नि प्रज्वलित झाल्यामुळें आपल्या घरीं प्रकाशतो त्या व सर्व देवांत तरुण अशा अग्नीकडे मोठा हवि घेऊन आम्ही गेलों; व जो अग्नि, धनवान् ( समिद्धः ) असल्यामुळें धनभांडारांत ( स्वे = दुरोणे ) आपल्या मोठ्या धनांतून ( महा नमसा ) धन देतो ( दीदाय ) त्या दातृतम ( यविष्ठं ) अग्नीकडे आम्हीं गेलों; असें दोन्ही अर्थ संभवतात. इध्मशब्दावरून इध् देणें असा अर्थ होतो. सम् = धन; इद्धः = धनयुक्त; समिद्धः = अति धनानें युक्त. देव, जातवेदस्, मित्र, महस् हे शब्द धनवाचक आहेत. देवः = समिद्धः= धनवान् . हे अति धनवंता ( जातवेदः ), तूं धनवान् ( समिद्धः = देवः ) असल्यामुळें मनुष्याच्या धनभांडारांत ( मनुषः दुरोणे ) धन ( देवान् ) आजच्याआज ( अद्य ) टाक ( यजसि ); तूं धनवान् ( दूतः = कविः = प्रचेताः ) आहेस; दाता ( चिकित्वान् ) तूं पुष्कळ धन ( मित्रमहः ) आणच आण (आ च वह). कित् = देणें; चिकित्वान् = दाता. मित्रं धनम् । तेन युक्तं महः धनं मित्रमहः = पुष्कळ धन. दू = देणें, धन; दू + तः = धनवान्. प्रकृष्टं चेतः धनं यस्य स प्रचेताः. कु = देणें; कु + इः = कविः = दाता. ह्या ऋचेचा देव कोण ?

**यज्ञेध्मः इति कात्थक्यः**

यज्ञांत जो इध्म ( म्हणजे समिधा ) अग्नींत टाकतात तो असे कत्यकाचा मुलगा म्हणतो; गुर्जरप्रतींत कात्छक्यः असें आहे. कोणी म्हणेल कीं, ऋचेंत इध्म शब्द नाहीं इतकेंच नव्हे तर इध्मसंबंधाचें एकही चिन्ह किंवा दर्शक शब्द नाहीं; उत्तरः— नाहीं खरें; पण प्रैषांत समिद्भ्यः प्रेष्या ( मान० श्रौ० १।८।३।१७ ) अशी आज्ञा आहे. समिधा कशाला ? अग्नींत अर्पण करण्याला; समिधो यज (मान० श्रौ० १।३।२। ३ ) ह्यावरूनही समिधा अग्नींत टाकावयाच्या असतात. जळणाऱ्या समिधा त्या इध्म. समिद्धः ह्या शब्दांतच इध्म आहे; म्हणून हा देव हें दुर्गानें केलेलें कात्थक्यमताचें विवरण फोल आहे. धन ह्या अर्थी ५ वेळां व जळण ह्या अर्थी ६ वेळां असा इध्म शब्द ऋग्वेदांत ११ वेळां आला आहे. समिद्धः वगैरे शब्दांतून इध्म शब्द काढण्यापेक्षां इध्म शब्द जींत आहे अशी ऋचा देण्यास कोणती हरकत होती ?

**अग्निः इति शाकपूणिः**

ऋचेची देवता अग्नि असें शाकपूणि म्हणतो. सर्व विशेषणें व सर्व क्रिया अग्नीला उद्देशून आहेत; अग्नीला अनुकूल असा साक्षात् पुरावा टाकून प्रैषिक मंत्राचा आधार घेऊन देवता इध्म असें प्रतिपादणें हा कोणता न्याय ?

**तनूनपात् (३) आज्यं भवति । नपात् इति अनन्तरायाः प्रजायाः नामधेयम् । निर्णततमा भवति**

तनूनपात् नांवाचें आज्य म्हणजे घृत आहे. आज्यं भवति हे शब्द गुर्जरप्रतींत नाहींत. दुर्गवृत्तींत तनूनपात् आज्यम् इति कात्थक्यः । अग्निः इति शाकपूणिः असें आहे. तनूनपात् हें आज्य कसें हें सिद्ध केल्यावर अग्निः इति शाकपूणिः हे शब्द प्रस्तुत पाठांत येतात. मी स्विकारलेला पाठ बरोबर असावा. न विद्यते अन्तरं यस्याः सा अनन्तरा । न अनन्तरा अननन्तरा; बाप व मुलगा ह्यांच्यामध्यें दुसरें कांहीं येत नाहीं म्हणून मुलगा हा अनन्तरा प्रजा; बाप व नातू ह्यांच्यांत पुत्र अन्तर म्हणजे मध्यें येतो म्हणून नातू अननन्तरा प्रजा. नपात् = नातू. नपात् हें अननन्तरा जी प्रजा म्हणजे नातू त्याचें नांव होय. नात्वाला नपात् हें नांव कां? पुत्ररूपी प्रजा हा बापाहून खालीं (निः = नीचैः) नमलेली (नत) असते; नातू ही प्रजा त्याहून अधिक खालीं नमलेली (निर्णततमा) असते. ही नपात् शब्दाची व्युत्पत्ति असावी; न = नीचैः; पात् = पतिता = नता; किंवा नपात् = न + (पा) त् = नत् = नत; निः व तमा हे मागून जोडावयाचे.

**तनूः अत्र गौः उच्यते । तताः अस्यां भोगाः । तस्याः पयः जायते । पयसः आज्यं जायते**

(आज्य जेव्हां अर्थ असेल) तेव्हां तनू म्हणजे गाय. गाईला तनू म्हणण्याचें कारण गाईच्या ठिकाणीं भोग्यवस्तु (म्हणजे दूध, दही, घृत वगैरे) पसरलेल्या (तताः) असतात; तन् = पसरणें; तन् + ऊः = तनूः; तिच्यापासून म्हणजे गाईपासून दूध जन्मतें; दूधापासून आज्य जन्मतें; तनू म्हणजे गाय; तिचा पुत्र दूध व नातू आज्य.

**अग्निः इति शाकपूणिः । आपः अत्र तन्वः उच्यन्ते । तताः अन्तरिक्षे । ताभ्यः ओषधिवनस्पतयः जायन्ते । ओषधिवनस्पतिभ्यः एष जायते**

तनूनपात् म्हणजे अग्नि असें शाकपूणि म्हणतो. (अग्नि हा अर्थ असेल) तेव्हां तनू म्हणजे जल; जलाला तनू म्हणण्याचें कारण जल अंतरिक्षांत पसरलेलें असतें; जलापासून ओषधिवनस्पति जन्मतात; ओषधिवनस्पतींपासून हा (अग्नि) जन्मतो; म्हणून अग्नि हा जलाचा नातू; ओषधिवनस्पति हे जलाचे पुत्र. तनूं शरीरं न पातयति इति तनूनपात् = प्राण शरीरांत असल्यामुळें तो शरीराला पडूं देत नाहीं; तेव्हां तनूनपात् म्हणजे प्राण अशी व्युत्पत्ति सायणाचार्य देतात (ऐ० ब्रा० ६।४); पाणिनीही हीच व्युत्पत्ति देतो. तनूनपात् म्हणजे आज्य कीं अग्नि कीं प्राण? तनूनपात् म्हणजे आज्य हा अर्थ तानूनप्त्र ह्यानें सुचला असेल. देव असुरांशीं लढत असतां आपापसांत तंटे करूं लागले; हें बरोबर नाहीं अशी खात्री झाल्यानें त्यांचे सेनाधिपति वेगवेगळे बसून विचार करूं लागले; शेवटीं सगळ्यांना एक विचार सुचला; तो असा; आपलीं शरीरें म्हणजे आपले पुत्र वगैरे वरुणाच्या घरीं ठेवावे व आपण निर्धास्तपणें लढावें; तनूनां पुत्रपौत्रादिशरीराणां नप्त्रं न तपतं तानूनप्त्रं = पुत्र-

पौत्रादिकांना ताप होणार नाहीं असें कर्म; तें देवांनीं केलें; तसें यजमान व १६ ऋत्विज् आपसांत तंटे होऊं नये म्हणून तानूनप्त्र करतात; तानूनप्त्रं म्हणजे एका प्रकारचें आज्य; तें चार चार पांच पांच वेळां बोटांना लावल्यानें कलह टळतो (ऐ० ब्रा० ४।८) नपात् = अपत्य (निघंटु २।२।१३); नातू अर्थ कोठेंही नाहीं. तनूः= शरीर, धन. तनूष्टे वाजिन् तन्वं नयन्ती वाममस्मभ्यं धातु (१०।५६।२) = हे लूट आणणाऱ्या घोड्या (वाजिन्), धन (तन्वं) आणणारें (नयन्ती) तुझें शरीर (ते तनूः) आम्हांला धन (वामं) देवो (धातु); तन्वं हें तनू शब्दाचें द्वितीयेचें एक-वचन. यूयं हि ष्ठा रथ्यो नस्तनूनाम् (६।५१।६) = तुम्ही आम्हांला (नः) धनाचे (तनूनां) दाते (रथ्यः) आहांत (स्थ). तोकस्य साता तनूनां (९।६६।१८); तोकस्य = तनूनां = धनाचे; साता = सातौ = दानें. अधि श्रवांसि धेहि नस्तनूषु (३।१९।५) = आमच्या (नः) धनभांडारांत (तनूषु) धन (श्रवांसि) ठेव (अधि+ धेहि). तनूकृत् बोधि प्रमतिश्च कारवे (१।३१।९) = स्तोत्याला (कारवे) धन देणारा (तनूकृत् = प्रमतिः) हो (बोधि). ता वां विश्वको हवते तनूकृथे (८। ८६।१) = त्या तुम्हांला विश्वक धन देण्यासाठीं (तनूकृथे) बोलावितो (हवते). नपात्, नपाता, नपातः, नपातं इतकींच रूपें ऋग्वेदांत सांपडतात. नप्त्रा, नप्तृभिः, नप्त्रे व नप्तुः अशीं दुसरीं रूपें आढळतात; पण तीं नपात् शब्दाचीं नसून नप्तृ शब्दाचीं होत. नप्तीः, नप्तीभिः, नप्त्योः, नप्त्यं, नप्त्या असेही शब्द आहेत. नप् + तृ = नप्तृ; पण नप् != देणें ? नप् + ती = नप्ती; नप्त्याः इदं नप्त्यम्. नप् पासून नपात् शब्द कसा झाला ? अग्नीला अपां नपात्, ऊर्जो नपात् व तनूनपात्; अश्विनांना दिवो नपाता, मित्रावरुणांना शवसो नपाता, ऋभूंना शवसो नपातः, सवित्याला अपां नपात्, इंद्राला गोषणो नपात्, पूषन्‌ला विमुचो नपात् असें ऋग्वेदांत म्हटलें आहे; अपां = ऊर्जः = तनूनां = गोषणः = विमुचः = दिवः = शवसः = धनाचा किंवा धनाचे; नपात् = दाता. भुवो अपां नपात् जातवेदः (१०।८।५) = हे धनवंता (जात-वेदः) अग्नि, तूं धनाचा (अपां) दाता (नपात्) आहेस. अधि पुत्रोपमश्रवो नपान्मित्रातिथेरिहि (१०।३३।७); पुत्र = नपात् = मित्रा = हे दात्या; उपमश्रवः= हे अतिधनवंताः. अतिथेः = धनस्य. ऊर्जोनपात् सहसावन् (१०।११५।८), ऊर्जो-नपात् जातवेदः (१०।१४०।३) ह्यांतील सहसावन् व जातवेदः ह्या शब्दांवरून नपात् म्हणजे दाता किंवा (धनाचा) पति असा अर्थ असावा. नप्तृ ह्याचाही अर्थ दाता; द्वे नप्तुर्देववतः शते गोर्द्वा रथा वधूमन्ता सुदासः (७।१८।२२) = धनवान् (देववतः) जो सुदास् (सुदासः) त्या दात्याच्या (नप्तुः) दोनशें गाई व स्त्रियांनीं भरलेले दोन रथ मला मिळाले. नप्तृ म्हणजे देणगी असाही अर्थ आहे; यं त्वं प्रजात ऋतजात राया सजोषा नप्त्रापां हिनोषि (६।१३।३); प्रजात = ऋतजात = अति धनवंता; अपां नप्त्रा = राया = धनासह; हे अति धनवंता अग्नि, ज्या मनुष्याला (यं) तूं धनयुक्त (राया = अपां नप्त्रा) करतोस (हिनोषि). नपात् ह्याचाही

धन असा अर्थ होतो; यस्ते शृङ्गवृषो नपात् प्रणपात् कुण्डपाय्यः ( ८।१७।१३ )= तुजजवळ जें खूप धन आहे; प्र धनम् । तेन युक्तः नपात् धनम्; कुण्डपाय्यः कुण्डैः पाय्यः देयः = हंडेच्याहंडे भरून देण्याजोगें; शृङ्गवृषः ? ऊर्जो नपातं सुभगं सुदीदितिं ( ८।१९।४ ) व अपां नपातं सुभगं सुदीदितिं ( ३।९।१ ); ऊर्जो नपातं = सुभगं = सुदीदितिं; ह्या सर्व शब्दांचा अर्थ धनदात्याला किंवा धनवंताला. ह्या सर्व उताऱ्यांवरून तनूनपात् म्हणजे धनदाता किंवा अत्यंत धनवान्. नपात् शब्द कसा झाला तें सांगतां येत नाहीं. तनूनपादुच्यते गर्भ आसुरो नराशंसो भवति यद्विजायते । मातरिश्वा यदमिमीत मातरि वातस्य सर्गो अभवत्सरीमणि ( ३।२९।११ ) = जेव्हां अरणीच्या पोटांत गर्भरूपानें असतो तेव्हां अग्नीला तनूनपात् म्हणतात; असुरांना मारणारा ( आसुरः ) जेव्हां वीज निर्माण करतो तेव्हां तो मातरिश्वा होतो; अग्नि जोरानें सरू लागला म्हणजे वारा उत्पन्न होतो असा सायणाचार्य अर्थ करतात. अ + सु + रः = अतीशय धन; आसुरः गर्भः = अतीशय धनानें भरलेला सांठा; असा जेव्हां अग्नि असतो तेव्हां त्याला तनूनपात् म्हणतात; जेव्हां तो धन ( वि ) देतो (जायते) तेव्हां त्याला नराशंस म्हणतात; ऋचेचा दुसरा अर्ध लागत नाहीं; तनूनपात् = अतीशय धन; नरा धनेन शंसः दानं येन = जो धन देतो तो नराशंस; ह्या विवरणानें मी केलेल्या तनूनपात् शब्दाच्या अर्थाला पुष्टि मिळते. प्राण यजमानांचीं शरीरें पडूं देत नाहीं म्हणून किंवा जलदेवतांचा नातू म्हणून तनूनपात् अशी व्युत्पत्ति सायणाचार्य देतात.

## खंड ६ वा.

**तनूनपात्पथ ऋतस्य यानान् मध्वा समञ्जन् स्वदया सुजिह्व ।**

**मन्मानि धीभिरुत यज्ञमृन्धन् देवत्रा च कृणुह्यध्वरं नः ( १०।११०।२ )**

**तनूनपात् पथः ऋतस्य यानान् यज्ञस्य यानान् मधुना समञ्जन् स्वदय कल्याणजिह्व**

ऋतस्य यानान् = यज्ञस्य यानान्; ऋतस्य यानान् हे ऋचेंतले शब्द भाष्यांत कां घातले ? मध्वा = मधुना; मध्वा = मधुरेण स्वादेन ( दुर्ग ); दुर्गाच्या प्रतींत मधुना शब्द नसून मध्वा शब्दच जशाचा तसा होता; मधु जर नाम असेल तर मधुना असें पाणिनीय रूप केलेंच पाहिजे; विशेषण असल्यास मध्वा हें मधुना सारखें शुद्धच; तृतीयादिषु भाषितपुंस्कं पुंवद्गालवस्य ( पा० ७।१।७४ ) ह्या सूत्रानें. पण मधु एथें नाम आहे; म्हणून भाष्यांत ' मधुना ' च पाहिजे. स्वदया = स्वदय. सुजिव्ह = कल्याणजिव्ह. दुर्गवृत्तींत कल्याणजिव्ह नसून जिव्हयाहित किंवा जिव्हायां हित असें आहे; जिव्हयाहित = जिभेनें स्वतःवर ठेवलेला; जिव्हायां हित = जिभेवर ठेवलेला.

**मननानि च नः धीभिः यज्ञं च समर्धय**

मन्मानि = मननानि. दुर्गवृत्तींत मननानि शब्द नसून ' यानि वयं मन्यामहे अर्थवस्तूनि ध्रुवाणि एतानि न स्युः इति ' ( = ज्या वस्तु आमचेपाशीं कायमच्या राह-

णार नाहींत असें आम्हांस वाटतें त्या ) असें आहे. च नः अध्याहृत. उत = च. ऋन्धन् = समर्धय = फलयुक्त कर. ऋन्धन् = संसाधयन् स्वैः गुणैः उपकुर्वन् समर्धय ( दुर्ग ); ऋन्धन् चे असे दोन अर्थ दुर्ग देतो; किंवा संसाधयन् असा अर्थ देऊन समर्धय अध्याहृत घेतो. त्याच्या प्रतींत समर्धय इतकाच शब्द असावा; बाकीचे त्यानें दिलेले शब्द विवरणार्थ होत.

**देवान् नः यज्ञं गमय**

देवत्रा = देवान्. देवत्रानंतरचा 'च' कदाचित् तिसऱ्या पादांतील यज्ञं च्या नंतर घेतला असेल किंवा निरर्थक म्हणून गाळला असेल. अध्वरं = यज्ञं. कृणुहि = गमय. आज्यपर अर्थ :— जिभेनें स्वीकारलेल्या हे आज्या, यज्ञाचे मार्ग म्हणजे हवि मधानें चोपडून गोड कर; आपल्या अभिघारण, अलंकरण, उपस्तरण वगैरे कर्मांनीं म्हणजे ह्या क्रिया स्वतःच्या ठिकाणीं घालून आमच्या इष्ट वस्तु व आमचा यज्ञ सफल कर; आमचा यज्ञ देवांकडे ने. अग्निपर अर्थ :– सुजिव्ह = स्वर्चिः = उत्तम ज्वाला आहेत ज्याला अशा; किंवा सुवाक् = गोड बोलणाऱ्या. हे तनूनपात् अग्नि, आमचे हवि चांगले भाजून गोड कर. बाकीचें वरीलप्रमाणें. उद्दिष्ट अर्थ :– हे धन देणाऱ्या (तनूनपात् = सुजिव्ह ) अग्नि, धन ( सं ) देणारा ( अञ्जन् ) तूं धनाच्या (पथः = ऋतस्य) देणग्या ( यानान् ) धनयुक्त करून ( मध्वा ) दे (स्वदय); धन (मन्मानि=यज्ञं) धनानें ( धीभिः ) समृद्ध करणारा ( ऋन्धन् ) तूं आमच्या ( नः ) धनांत ( देवत्रा ) धन ( अध्वरं ) टाक ( कृणुहि ). हा अर्थ सिद्ध करण्याकरितां प्रत्येक शब्दाचा अर्थ ऋचा देऊन सिद्ध करावा लागेल व त्यामुळें ग्रंथ वाढेल; तेव्हां तसला विचार तूर्त बाजूस ठेविला पाहिजे.

**नराशंसः ( ४ ) यज्ञः इति कात्थक्यः। नराः अस्मिन् आसीनाः शंसन्ति। अग्निः इति शाकपूणिः। नरैः प्रशस्यः भवति। तस्य एषा भवति**

नराशंस म्हणजे यज्ञ असें कात्थक्य म्हणतो; ( यज्ञाला नराशंस म्हणण्याचें कारण ) लोक ( नराः ) त्यांत म्हणजे यज्ञांत (अस्मिन् ) बसलेले असतांना (आसीनाः) स्तुति करतात ( शंसन्ति ); नर + आ + शंस; नर = नराः; आ = आसीनाः; शंस= शंसन्ति. नराशंस म्हणजे अग्नि असें शाकपूणि म्हणतो; कारण तो मनुष्यांनीं स्तुति करण्याला योग्य आहे; नर + आशंस; नर = नरैः; आशंसः = प्रशस्यः = स्तुत्य. नराशंस हें विशेषण सविता ( २।३८।१० ) व पूषा ( १।१०६।४ ) ह्यांना लाविलें आहे. नराशंस हा इतर देवांप्रमाणें एक स्वतंत्र देवही होता असें दिसतें (१०।९२।२); आप्रीसूक्तांत नराशंस ६ ऋचांत वर्णिला आहे; तो अग्नि असावा असें वाटतें. जेव्हां अग्नि जन्मतो तेव्हां त्याला नराशंस म्हणतात असें ३।२९।११ त म्हटलें आहे. १।१७३।१० ह्यांत नरां शंसैः ( = धनाच्या दानांनीं ) असे शब्द आले आहेत; नरांशस ( = धन देणारा ) हें प्रथम विशेषण असून नंतर तें एका देवाचें नांव झालें असावें व कालांतरानें तो शब्द अग्निवाचक झाला असावा. नरा = धनांतून किंवा नरा = नराम्; शंसः = दाता; अशी व्युत्पत्ति असेल.

## खंड ७ वा.

**नराशंसस्य महिमानमेषामुप स्तोषाम यजतस्य यज्ञैः।**
**ये सुक्रतवः शुचयो धियंधाः स्वदन्ति देवा उभयानि हव्या ( ७।२।२ )**
**नराशंसस्य महिमानम् एषाम् उपस्तुमः यज्ञियस्य यज्ञैः**

स्तोषाम=स्तुमः. स्तु + स् ( लेट्चा ) = स्तोष्; स्तोषाणि स्तोषाव स्तोषाम हीं आज्ञार्थाचीं रूपें; स्तोषाम = स्तवाम = स्तोष्यामः = स्तवूं. यजतस्य = **यज्ञियस्य; यज्ञिय** = हवि घेण्याला योग्य.

**ये सुकर्माणः शुचयः धियं धारयितारः स्वदयन्तु देवाः उभयानि हवींषि**

सुक्रतवः = **सुकर्माणः** = चांगलीं कृत्यें करणारे; क्रतु = कर्म ( निघं० २।१। १० ). धियंधाः = धियं धारयितारः = स्तुति किंवा हवि धारण करणारे. स्वदन्ति = स्वदयन्तु = खावोत; वर्तमान काळाच्या ऐवजीं आज्ञार्थ आशीर्वादाकरितां. हव्या = हवींषि.

**सोमं च इतराणि च इति वा। तान्त्राणि च आवापिकानि च इति वा**

ते उभय म्हणजे दोन प्रकारचे; हवि म्हणजे सोम व तदितर द्रव्यें; अग्निष्टोमांत सोमरस, यज्ञपशूचें मांस, पुरोडाश व भाजलेले चणे असे हवि असतात. किंवा प्रकृतियागांतून आलेले ( तान्त्राणि ) व विशिष्ट देवतांना अर्पण करावयाचे हवि ( आवापिकानि ) असेही दोन प्रकारचे हवि असतील. प्रकृतियाग व विकृतियाग असे याग दोन प्रकारचे; दर्शपूर्णमास हा प्रकृतियाग; काम्येष्टि, पशु व चातुर्मास्य ह्या त्याच्या विकृति. प्रकृतियागांत सांगितलेले हवि विकृतियागांत आपोआप येतात; ते हवि तयार करण्याचा व अर्पण करण्याचा प्रकार पुन्हा सांगत नाहींत; कारण त्यांचें तंत्र म्हणजे प्रकार प्रकृतियागांत सांगितलेलाच असतो; म्हणून ते हवि तांत्र; (तांत्राणि सर्वेषां प्रकृतिविकृतियागानां साधारणानि।यथा स्विष्टकृत् प्रयाजाः अज्ञस्पाः);अशा हवींचीं नांवें स्विष्टकृत्, प्रयाज व आज्यभाग अशीं होत; हे हवि प्रकृति व विकृति ह्या दोहोंना साधारण होत. आवापः हविर्धानात् मुष्ट्यां व्रीहिग्रहणम्। इमाः व्रीहि-मुष्टयः विशिष्टदेवतार्थं गृह्यन्ते। आवापिकाः आवापोद्धारयोग्याः प्रधानदेवताः (आश्व० श्रौ० सू० १।३ ) = हविर्धान म्हणजे ज्यांत हवींकरितां धान्य ठेविलें असतें अशी टोपली, सूप वगैरे; त्यांतून मुठींत धान्य घेणें ह्याला आवाप म्हणतात; अशा धान्याच्या मुठी विशिष्ट देवतांना उद्देशून घेतल्या असतात; अशा धान्यग्रहणाला योग्य ज्या प्रधानदेवता त्या आवापिक देवता; अशा देवतांना अर्पण करावयाचे हविही आवा-पिक. प्रधानयागांत सांगितलेल्या देवतांखेरीज विकृतियागाच्या विशिष्ट देवता असतात. **ऋचेचा दुर्गकृत अर्थः**—ह्या (यज्ञ करणाऱ्या)लोकांना इष्ट फल देणारा व यज्ञ शेवटास नेणारा ( यजतस्य ) जो नराशंस अग्नि त्याच्या मोठेपणाची याज्ञिक कर्में करून आम्ही स्तुति करतों; उत्तम कर्में करणारे म्हणजे जगाच्या कल्याणाकरितां प्रवृत्त

झालेले ( सुकृतवः ), पापापासून अगदीं अलिप्त ( शुचयः ) व आपापल्या अधिकारांतलीं कर्मे करणारे ( धियंधाः ) किंवा प्रचंड बुद्धि धारण करणारे ( धियंधाः ) जे देव ते आमचे दोन्ही प्रकारचे हवि खावोत. सायणाचार्यकृत अर्थः—उत्तम कर्मे करणारे किंवा बुद्धिमान् ( सुकृतवः ), दीप्तिमान् (शुचयः) व कर्मे करणारे (धियंधाः) असे जे देव ते आमचे दोन्ही प्रकारचे हवि खातात; त्यांच्यामध्यें स्तोत्रांनीं किंवा हवींनीं पूजा करण्यास योग्य ( यजतस्य ) व लोकांनीं प्रशंसा करण्यास योग्य (नराशंसस्य ) अशा अग्नीचा मोठेपणा आम्ही स्तवितों. ह्या विवरणांत स्वदन्ति = खदयन्तु असा आज्ञार्थ सायणाचार्यांनीं स्वीकारला नाहीं; दुर्गानें तो यास्कभाष्याला धरून स्वीकारला; त्यामुळें त्याला दोन स्वतंत्र वाक्यें करावीं लागलीं; यास्कानेंही दोन वाक्यें केलीं आहेत असें स्वदयन्तु ह्या क्रियारूपावरून दिसतें. भाष्यांत स्वदयन्तु हें रूप घालण्याचें कारण प्रत्येक ऋचेंतून आशीर्वाद काढणें हा होय; देव हवि खावोत व धन देऊन आमचें कल्याण करोत अशा प्रकारचा आशीर्वाद म्हणजे आशा होय. एषाम् ह्याचा इतर शब्दांशीं अन्वय लावतां येत नाहीं; जे देव आमचे हवि खातात त्यांचा महिमा व यज्ञार्ह जो नराशंस त्याचा महिमा आपण स्तवूं या; असा अर्थ असल्यास ‘ एषाम् ’ नंतर ‘ च ’ हा निपात पाहिजे होता; तो नसल्यामुळें दुर्गाला एषाम् नंतर नराणाम् हा शब्द अध्याहृत घ्यावा लागला व ऋचेचीं दोन वाक्यें करावीं लागलीं; त्यानें नराणाम् ह्याचा यज्ञ करणाऱ्यांना इष्ट फल देणारा असा त्या शब्दाचा नराशंस अग्नीशीं संबंध जोडला आहे; सायणाचार्यांनीं एषाम् नंतर मध्यें शब्द अध्याहृत घेतला आहे.

**इळः ( ५ ) ईट्टेः स्तुतिकर्मणः । इन्धतेः वा । तस्य एषा भवति**

इळः = अग्नि; अग्नीची जेव्हां स्तुति करावयाची असते तेव्हां त्याला इळ म्हणतात; तेव्हां ईड् स्तुति करणें ह्यापासून इळ; किंवा इन्ध्पासून; कारण अग्नि पेटविला जातो. इळसंबधीं पुढील ऋचा होय.

## खंड ८ वा.

**आजुह्वान ईड्यो वन्द्यश्चा याह्यग्ने वसुभिः सजोषाः ।**
**त्वं देवानामसि यह्व होता स एनान् यक्षीषितो यजीयान् ( १०।११०।३ )**
**आहूयमानः ईळितव्यः वन्दितव्यश्च आयाहि अग्ने वसुभिः सहजोषणः**

आजुह्वानः = आहूयमानः. ईड्यः = ईळितव्यः = सेवितव्यः. वन्द्यः = वन्दितव्यः. ईड्य व वन्द्य हीं रूपें अर्वाचीन संस्कृतांतही आहेत; तेव्हां त्यांच्याबद्दल दुसरीं रूपें घालण्याचें कारण दिसत नाहीं. सजोषाः = सहजोषणः = सहप्रीतिः = ( वसूंच्या ) सह सुख भोगणारा. पण ऋग्वेदांत सजोषाः = सह एवढाच अर्थ आहे. जुषी प्रीतिसेवनयोः ( धा० ६।८ ) असा जुषचा अर्वाचीन अर्थ असल्यामुळें सहजो-

षणः असा सजोषाः ह्याचा अर्थ करावा लागला. सजोषाः हें क्रियाविशेषण व नामही आहे; नामाचीं रूपें सजोषौ सजोषसौ सजोषसा ( = सजोषसौ ) व सजोषसः अशीं आढळतात.

**त्वं देवानामसि यह्व होता। यह्वः इति महतः नामधेयम्। यातश्च हूतश्च भवति**

यह्व म्हणजे मोठा; महत्बद्दल यह्व शब्द वापरतात; यह्वः = य + ह्वः; य = यातः = जवळ गेलेला, जो जवळ येऊं देतो तो; ह्वः = हूतः = बोलावलेला. यह्व = पुत्र असा ऋग्वेदांत अर्थ आहे; सहसो यहो प्रमाणें सहसो यह्व = हे बलपुत्र; यह्वी = मुलगी.

**स एनान् यक्षि इषितः यजीयान्। इषितः प्रेषितः इति वा। अधीष्टः इति वा। यजीयान् यष्टृतरः**

एनान् = देवान्; देवानां हा शब्द आधीं आला आहे म्हणून देवान् किंवा एतान् न म्हणतां एनान्. यक्षि ( = यज ) शब्द तसाच कां ठेवला? तें रूप अर्वाचीन संस्कृतांत नाहीं. इषितः = प्रेषितः = पाठविलेला; किंवा इषितः = अधीष्टः; अधि + इष्टः = अतिशय इष्ट असा; म्हणजे इषित व इष्ट एकच; प्र + इषितः = प्रेषितः. यजीयान् = यष्टृतरः = ( मनुष्य होत्याहून ) श्रेष्ठ होता; हवि देण्याचें काम अग्नि मनुष्यहोत्याहून अधिक चांगलें करतो. अग्नीला यजिष्ठ असेंही विशेषण लावलेलें आढळतें. ऋचेचा अर्थ :— ( आमच्याकडून ) बोलावलेला, सेव्य, वंद्य असा व वसूंबरोबर आनंद भोगणारा तूं त्यांच्यासह ये; हे महान् अग्नि, तूं देवांना बोलावणारा आहेस ( म्हणून ) व ( मनुष्यहोत्याहून ) हवि देण्याचें काम तूं अधिक चांगलें करतोस म्हणून त्यांना तूं हवि दे. वसुभिः = देवैः. ह्या ऋचेंत इळ शब्द नाहीं; तथापि तो ईडय ह्यांतून घ्यावयाचा. दुर्ग म्हणतोः—एथें इडः ( =इळः ) हें एकवचन आहे. कारण अग्ने हाही शब्द एकवचनी आहे; परंतु इडो अग्न आज्यस्य व्यन्तु ( आश्व० श्रौ० १।५ ) एथें इडः बहुवचनी आहे; त्याचा अर्थ अन्नें; अन्न पृथिवीवर उगवणाऱ्या ओषधींपासून; ओषधिवनस्पतींत अग्नि असतो; यमग्निम् ओषधिवनस्पतिषु अप्सु च उन्निन्यथुः असें निरुक्तांत म्हटलें आहे ( ६।३६ ); असा इडः म्हणजे इळः हा शब्द एकवचनी व बहुवचनी अशा दोन्ही वचनी आहे. वास्तविक ईड्यः हा शब्द इळ शब्दाहून अगदीं भिन्न आहे. इळा ही अग्नीची बायको ( निरुक्त ७।८ ); तेव्हां अग्नि हा इळ असा तर्क केला गेला असावा; पण इळः म्हणजे अग्नि असा प्रयोग कोठेंही नाहीं; ऋग्वेदांत असणारा इळः हा शब्द इळा ( = पृथिवी ) ह्याचें षष्ठीचें एकवचन होय.

**बर्हिः ( ९ ) परिबर्हणात्। तस्य एषा भवति**

बृह् म्हणजे बृह् वाढणें ह्यापासून बर्हिः ( = दर्भ ); परि + बृह् = वाढणें; परिबर्हण हें नाम. अवेस्तांत बरेझिस् ( = चटई ). बर्हिसंबंधी पुढील ऋचा होय.

## खंड ९ वा.

**प्राचीनं बर्हिः प्रदिशा पृथिव्या वस्तोरस्या वृज्यते अग्रे अह्नाम्।**
**व्यु प्रथते वितरं वरीयो देवेभ्यो अदितये स्योनम् ( ऋ० सं० १०।११०।४ )**
**प्राचीनं बर्हिः प्रदिशा पृथिव्याः वसनाय अस्याः प्रवृज्यते अग्रे अह्नां बर्हिः पूर्वाण्हे**

प्रदिशा = विधिवाक्येन; प्रागुदग्वाबर्हिश्छिनत्ति असें विधिवाक्य दुर्ग देतो; पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे त्यांचीं टोकें करून ऋत्विज् दर्भ कापतो; ( हें विधि वाक्य मला सांपडलें नाहीं ); किंवा प्रदिशा = मंत्रेण; तो मंत्र असाः — देवस्य त्वा सवितुः प्रसवे० बर्हिर्देवसदनं दामि ( मैत्रा० सं० १।१।२ ) = सवितृदेवाच्या आज्ञेनें देवांना बसण्यासाठीं, हे दर्भा, मी तुला कापतों ( दामि ); असे प्रदिशा याचे दोन अर्थ दुर्ग देतो. प्रवृज्यते ह्याचा पसरलें जातें असा अर्थ केल्यास प्राचीनं बर्हिः स्तृणाति हें विधिवाक्य होईल; हें विधिवाक्यही मला सांपडलें नाहीं. वस्तोः = वसनाय = आच्छादण्याकरितां. वस् ( = आच्छादणें ) + तुः = वस्तुः = आच्छादनक्रिया; वस्तोः हा शब्द वस्तु शब्दाचे षष्ठीचें एक वचन होय; असा षष्ठयंत शब्द तुमुन् याअर्थीं असतो; वस्तोः = वस्तुं = आच्छादयितुम्. वृज्यते = प्रवृज्यते; प्र + वृज् = कापणें; वृज्यते = प्रस्तीर्यते असाही अर्थ दुर्ग देतो; दर्भ कापून काय करावयाचें? आसनासाठीं ते पसरावयाचे; हा दुसरा अर्थ पहिल्या अर्थांतून काढावयाचा. अग्रे अह्नाम् = अह्नाम् अग्रे = पूर्वाण्हे = मध्यान्हाच्या पूर्वकालीं.

**तत् विप्रथते । वितरं वितीर्णतरम् इति वा । विस्तीर्णतरम् इति वा**

तत् अध्याहृतः. व्यु प्रथते = वि + उ + प्रथते; उ निरर्थक म्हणून गाळल्यानें विप्रथते असें रूप शिल्लक राहतें; विप्रथते = पसरतें. वितरम् = वितीर्णतरम्; वि = वितीर्ण; उपसर्गात छंदसि धात्वर्थे ( पा० ५।१।११८ ) हें सूत्र जरी वत् प्रत्ययासंबंधानें आहे तरी तें इतर प्रत्ययांना सुद्धां लागू करावयाचें; बितीर्ण ह्याअर्थी जो वि त्याला तर प्रत्यय लाऊन वितर शब्द बनतो; किंवा वि = विस्तीर्ण; वितीर्ण = तरलेलें म्हणजे विस्तृत जागेला ओलांडून गेलेलें; वितीर्ण व विस्तीर्ण ह्यांचा अर्थ एकच. दुर्गवृत्तींत वितरं विस्तीर्णतरम् एवढेंच आहे; वृत्तींत वितीर्णतरम् हा शब्द नाहीं व त्याचा अर्थ ही त्यानें दिला नाहीं.

**वरीयः वरतरम् । उरुतरं वा**

वरीयः = वरतरम् = ( यज्ञांतील इतर अंगांपेक्षां ) अधिक चांगलें; कारण हवि दर्भांवर ठेवावयाचें असतात; वरं, वरीयः, वरिष्ठम्; वर + ईयस् = वरीयः; किंवा उरु, वरीयस्, वरिष्ठम्; उरु + ईयस् = वरीयः = अधिक रुंद; उरुतरम् = बहुतरम् ( दुर्ग ) = पुष्कळसें.

**देवेभ्यः च अदितये च स्योनम् । स्योनम् इति सुखनाम ( निघं० ३।६।१५ ) स्यतेः । अवस्यन्ति एतत् । सेवितव्यं भवति इति वा**

स्योनम् = सुख; सुखाला स्योन म्हणण्याचें कारण मनुष्यांच्या सर्व इच्छा सुखांमध्यें संपतात ( अवस्यंति ); षोऽन्तकर्मणि ( धा० ४।४१ ); सो = शेवटास जाणें. किंवा सुख सेवावयाचें असतें ( सेवितव्यं ). यास्काच्या धातुपाठांत सो हा धातु सेवनार्थी होता कीं काय? सो पासून स्योनम् हा शब्द कसा उत्पन्न होतो तें समजत नाहीं. देवराजः— दोरे पसरणें ह्या अर्थी जो सिव् धातु त्याला न प्रत्यय लाविल्यानें इकाराचा ओकार होतो व स् च्या नंतर य् असें अधिक अक्षर येतें; स् + य् + ओ + नम् = स्योनम्. स्कंदस्वामीच्यामतें स्योन शब्द सो किंवा सेव् ह्या धातुपासून झाला असावा. अवस्यन्ति एतत् = हें ( एतत् ) सुख लोक विणतात म्हणजे मिळवितात असा देवराजानें अर्थ केला असावा. सिव् यांतील इ चा जसा ओ केला तसा सेव् ह्यांतील ए चा ओ केल्यानें सेव पासून स्योन शब्द बनतो व दोन्ही ठिकाणीं व चा लोप होतो. ऋचेचा अर्थः-ही जी पृथिवी तिला झांकण्याकरतां पूर्वेकडे ज्यांचीं अग्रें आहेत असे दर्भ पूर्वाण्हकालीं कापले जातात किंवा पसरले जातात; हे दर्भ ज्यास्त ज्यास्त पसरले जातात व यज्ञांतील इतर अंगापेक्षां ते श्रेष्ठ असून पुष्कळ असतात; हे दर्भ देवांना व अदितीला सुखावह होवोत. अदिति म्हणजे पृथिवी असा दुर्ग अर्थ करतो; पण अदितिर्देवमाता असें पूर्वीं ( निरु० ४।२२ ) म्हटलें आहे; तोच अर्थ येथें असावा. भाष्यांत यास्क बर्हिः = अग्नि असें म्हणत नाहीं; बर्हिः शब्दानें अग्नि सूचित होतो येवढेंच; ऋचा अग्निपर नाहीं; तथापि कित्येक बर्हिः म्हणजे अग्नि असा अर्थ करतात. प्राचीनम् = प्राक् ऽच्यते प्रणीयते = पूर्वेकडे नेला जातो असा अग्नि. बर्हिः = आहवनीयाख्यं ज्योतिः = आहवनीय नांवाचा अग्नि. प्रवृज्यते = प्रणीयते = नेला जातो. प्रदिशा = प्राञ्चम् उद्धरन्ति इति विधिवाक्येन = पूर्वेकडे नेतात या विधिवाक्यानें; हें विधिवाक्य सांपडलें नाहीं. पृथिव्याः वस्तोः वसनाय = पृथिवीला म्हणजे वेदीला झांकण्याकरितां; अग्निप्रणयनाच्या अगोदर वेदी नागडी असते; तिच्यावर अग्नि ठेवल्यावर ती अनग्निका बनते; अशा रीतीनें अग्नि वेदीला आच्छादून टाकतो. तत् विप्रथते = तो ( आहवनीय अग्नि त्याच्यांत समिधा टाकल्यावर व त्यांत आज्य म्हणजे घृत सोडल्यावर ) इकडेतिकडे पसरतो. वरीयः = इतर अग्नींहून श्रेष्ठ. उरुतरम् = महत्तरम् = अधिक मोठा. देवेभ्यः = यजमानादिकांकरितां. अदितये = पृथिवीला. स्योनम् = ( यजमान वगैरेंना व पृथिवीला ) सुखकर होइल ( अशा रीतीनें पसरतो ). अशा रीतीनें हे विवरणकार ऋचेंतील शब्दांचे ओढाताणीचे अर्थ करितात; हा अर्थ अगदीं अस्वभाविक आहे हें उघड आहे.

**द्वारः ( ७ ) जवतेः वा । द्रवतेः वा । वारयतेः वा । तासाम् एषा भवति**

द्वार् शब्द जु किंवा द्रु ( = सताड उघडें होणें ) ह्यापासून झाला असेल; कडी व अडसर काढल्याबरोबर दाराच्या फळ्या पट्कन बाजूकडे धांवतात. द्वार् = ज्वार् = जु + आर् ; जु धातूला आर् प्रत्यय लाविल्यानें द्वार् शब्द बनतो; किंवा द्वार् = द् + व + अ + र् ; व = उ; द् + र् + उ = द्रु; किंवा द्वार् = द् + वार् = वार् ; ज्यांचें निवारण करावयाचें असतें तें दार लाविल्याबरोबर घराबाहेर राहतात; अशा रीतीनें त्यांचें निवारण होतें. द्वार् शब्दासारखे ग्रीक थुर, इंग्लिश डोअर्, जुने इंग्लिश दुरु, जर्मन थुरे व लॅटिन् फोरेस् असे शब्द आहेत. पुढील ऋचा द्वारांसंबंधी होय.

## खंड १० वा.

**व्यचस्वतीरुर्विया वि श्रयन्तां पतिभ्यो न जनयः शुम्भमानाः**

**देवीर्द्वारो बृहतीर्विश्वमिन्वा देवेभ्यो भवत सुप्रायणाः ( १०।११०।५ )**

**व्यञ्चनवत्यः उरुत्वेन विश्रयन्तां पतिभ्यः इव जायाः ऊरू मैथुने धर्मे शुशोभिषमाणाः । वरतमम् अङ्गम् ऊरू**

व्यचस्वतीः = व्यञ्चनवत्यः = नाना प्रकारच्या हालचाली किंवा गति आहेत ज्यांच्यांत अशा; विविधानि अञ्चनानि व्यञ्चनानि । तानि विद्यन्ते आसाम् ताः व्यञ्चनवत्यः; व्यचस्वतीः ह्यांतील व्यचस् शब्द वि + अञ्च् ह्यापासून झाला आहे. पण ऋग्वेदांत व्यचस् = विस्तार किंवा विस्तृत असा अर्थ आहे; व्यचस्वतीः = विस्ताराच्या, फार रुंद. उर्विया = उरुत्वेन = विस्तारानें; उरु + इया = उर्विया; विशेषणांना या किंवा इया प्रत्यय लावल्यानें क्रियाविशेषणें बनतात; जसें आशु + या = आशुया = त्वरेनें. उरु सारखा अवेस्तांत उरु, वोओरु; ग्रीक यूरस् ( eurus ). न = इव. जनयः = जायाः = लग्नाच्या बायका. ऊरू मैथुने धर्मे हे शब्द अध्याहृत आहेत. शुंभमानाः = शुशोभिषमाणाः = सुंदर दिसण्याची इच्छा करणाऱ्या; पण शुंभमानाः म्हणजे शोभणाऱ्या म्हणजे सौंदर्यानें व वस्त्रालंकारांनीं शोभणाऱ्या असा अर्थ आहे. मांड्यांना ऊरू म्हणण्याचें कारण त्या शरिराच्या सर्व अवयवांपैकीं श्रेष्ठ अवयव होत; म्हणजे ऊरू शब्द वर ह्यापासून म्हणजे वृ धातूपासून झाला आहे; वृ = पसंत करणें; पुरुष स्त्रियांचा हा भाग पसंत करतात; वृ = व् + ऋ; व् = उ = ऊ; ऋ = रु; ऊ + रुः = ऊरुः = मांडी; ऊरू हें द्विवचन; ऊर्वति ऊरुः ( अमर २।६।७३ क्षीरस्वामी ); उर्व् = हिंसा करणें ( धा० १।५७० ).

**देव्यः द्वारः बृहत्यः महत्यः विश्वमिन्वाः । विश्वम् आभिः एति यज्ञे । गृहद्वारः इति कात्थक्यः । अग्निः इति शाकपूणिः**

देवीः = देव्यः = दानाक्रियाहेतुभूताः ( दुर्ग ) = दानाची जी क्रिया तिला कारण झालेल्या. बृहत्यः = महत्यः = मोठ्या. विश्वमिन्वाः = विश्वम् + इन्वाः; विश्वम् आभिः इन्वति एति यज्ञे = सर्व जग ह्या द्वारांनीं यज्ञांत म्हणजे यज्ञभूमींत येतें; हीं दारें इतकीं प्रशस्त असतात कीं त्यांतून सर्व जगांतल्या माणसांना एकदम आंत येतां

येते; असें दारांचें अतिशयोक्तिपूर्ण वर्णन केलें आहे; इन्व् धातु धातुपाठांत नाहीं; इन्व् = जाणें असा यास्कानें अर्थ केला आहे. विश्वम् इन्वंति प्रेरयन्ति = हीं यज्ञद्वारें सर्वांना यज्ञभूमींत येण्याला प्रेरणा करतात; किंवा विश्वम् धनम् इन्वन्ति ददति ताः = धन देतात अशा. विश्वमिन्व ह्या शब्दांत इन्व् किंवा मिन्व् यांपैकीं कोणता धातु असावा हें सांगतां येत नाहीं; ऋग्वेदांत इन्व् असा धातु आहे व मिन्वन् असें मिन्व् ह्याचें एकच रूप आहे. मिन्व् = टेका देणें, उचलून धरणें. विश्वमिन्व हा शब्द अग्नि वगैरे देवतांचें विशेषण आहे; रोदसी विश्वमिन्वे व द्यावापृथिवी विश्वमिन्वे ह्यांचा अर्थ धन देणाऱ्या द्यावापृथिवी असा असावा; तेव्हां विश्वमिन्वाः ह्याचाही तोच अर्थ असेल. यास्कानें देवेभ्यो भवत सुप्रायणाः ह्याचें भाष्य दिलें नाहीं; सुप्रायणाः = सु + प्र + अयनाः; सु सुष्टु प्र प्रशस्तम् अयनं याभिः ताः = ज्यांच्यांतून अयन म्हणजे जाणें सुलभ व उत्तम असतें अशा; हीं दारें इतकीं मोठीं असतात कीं त्यांतून आंत जाणें अति सुलभ असतें. द्वारः म्हणजे यज्ञाचीं दारें असें कात्थक्य म्हणतो; ( पण ) द्वारः म्हणजे अग्नि असें शाकपूणि म्हणतो. जेव्हां द्वार म्हणजे यज्ञाचीं द्वारें असा अर्थ असतो तेव्हां ऋचेचा अर्थः— अलंकारांनीं सुशोभित झालेल्या स्त्रिया नवऱ्यांच्याकरितां जशा मैथुनसमयीं आपल्या मांड्या रुंदावतात ( म्हणजे मांड्या मांड्यामध्यें पुष्कळ जागा सोडतात ) तशा विस्तृत द्वारदेवी विस्तृतपणें उघडोत ( म्हणजे दारांच्या फळ्या पार उघडल्यामुळें जाण्याला येण्याला प्रशस्त जागा मिळो ); ज्यांच्यामधून सर्व जग आंत येऊं शकतें अशा प्रशस्त द्वारदेवी हो, देवांना सहज रीतीनें आंत येतां येईल (सुप्रायणाः) अशा व्हा. जेव्हां द्वार म्हणजे अग्नि तेव्हां ऋचेंतील शब्दांचा अर्थः— द्वारः = अर्चिषः = ज्वाला; ज्वालांना द्वार म्हणण्याचें कारण ज्वाला वेगानें पसरतात ( जवन्ति = द्रवन्ति ); किंवा ज्यांचें निवारण केलें पाहिजे अशांचें निवारण करतात ( वारयन्ति ); किंवा द्वारः = हवि; हवि देवांकडे त्वरेनें जातात व आड येणाऱ्यांना दूर करतात. व्यचस्वतीः = नाना प्रकारच्या गतींनीं युक्त म्हणजे जिकडे तिकडे पसरणाऱ्या. उर्विया विश्रयंताम् = विस्तृतपणें पसरोत; कशा ? जशा मैथुनधर्मांत वगैरे पहिल्या विवरणाप्रमाणें. हे ज्वालानो, ज्या तुमच्यामुळें देवांना हवि पोंचतो त्या तुम्ही भराभर देवांकडे जाणाऱ्या व्हा. हा दुसरा अर्थ अगदीं अस्वाभाविक आहे. विश्रयंतामुर्विया हूयमाना द्वारो देवीः सुप्रायणाः नमोभिः। व्यचस्वतीर्वि प्रथन्तामजुर्या वर्णं पुनाना यशसं सुवीरम् ( २।३।५ ) ही ऋचा व प्रस्तुत ऋचा सारख्याच आहेत; प्रस्तुत ऋचेंत उपमा जास्त आहे येवढेंच.

**उषासानक्ता ( ८ ) उषाः च नक्ता च । उषाः व्याख्याता (२।१८) । नक्ता इति रात्रिनाम । अनक्ति भूतानि अवश्यायेन । अपि वा । नक्ता अव्यक्तवर्णा । तयोः एषा भवति**

उषासानक्ता = उषा व नक्ता; उषस् शब्दाची व्युत्पत्ति पूर्वीं दिलीच आहे. नक्ता = रात्र; रात्रीला नक्ता म्हणण्याचें कारण रात्र सर्व वस्तू दवानें भिंपते; न =

न् + अ; क्ता = क्ति; अ + न् + क्ति = अनक्ति = लेप देते; कशाचा लेप देते? देवाचा; कुणाला? वस्तूंना. किंवा नक्ता = न + क्ता; क्ता = ( वि + ) अक्ता = व्यक्ता; न = अ; अ + व्यक्ता = अव्यक्ता; रात्रीच्या वेळीं वस्तूंचे वर्ण म्हणजे रंग अस्पष्ट असतात; दोन्हीं व्युत्पत्तींत अञ्ज् हाच धातु आहे; अंजूचें लिंपणें व स्पष्ट करणें किंवा स्पष्ट दाखविणें असे दोन्ही अर्थ आहेत. नक्ता — सारखें अवेस्ता नक्तु; लॅटिन नॉक्स् ( Nox ), नॉक्टिस् ( Noctis ); ग्रीक नक्स् ( Nux ) नक्तॉस् ( Nuctos ); जुनें इंग्लिश निग्त ( Nigt ); अर्वाचीन इंग्लिश नाइट् ( Night ); जर्मन नक्त ( Nacht ) असे शब्द आहेत. ऋग्वेदांत नक् ( ७।७१।१ ), नक्ती ( २।२।२ ), नक्त, नक्ता अशीं रात्रिवाचक रूपें आढळतात; ह्या सर्व शब्दांत न् हा पहिला अवयव असून त्याचा नाहीं असा अर्थ असावा; दुसरा अवयव अक्, अक्त, अक्ता, अक्ती, अक्तु, ऑक्स्, ऑक्तिस्, अक्स्, अक्तॉस् व इक्त असा असून त्याचा अर्थ सूर्यकिरण असा असावा; जिच्यांत सूर्यकिरण नाहीं ती नक् नक्ता वगैरे. नक्त हें नपुंसकलिंगी आहे; हा शब्द ऋग्वेदांत ३१ वेळां आला असून बहुतेक सर्व ठिकाणीं तो क्रियाविशेषण असा आढळतो. नक्ता हा शब्द नक्तया ( ४।२।१ ) रूप वगळून समासांतच सांपडतो; नक्तया ( = रात्रीं ) हें नक्ता याचें तृतीयेचें एक वचन आहे. उषासोपसः ( पा० ६।३।३१ ) = दोन देवतानामांच्या द्वंद्व समासांत उषः हें पूर्वपद असल्यास त्याचें जागीं उषासा असा आदेश होतो; उषाश्च नक्ताच उषासा नक्ता; पण नक्तोषासा असा समास ऋग्वेदांत पांच वेळां आला आहे; पदकार उषासानक्ता व नक्तोषासा ह्यांबद्दल पदपाठांत उषसानक्ता व नक्तोषसा अशीं पदें घालतो; त्यानें उषसानक्ता ह्या समासाचा विग्रह कसा केला असेल? उषः ह्याच्या जागीं उषसा असा आदेश होतो अशी त्याची कल्पना असावी; पण पाणिनी त्याच्याविरुद्ध उषासा असा आदेश होतो असें म्हणतो; नक्तोषासा येथेंही त्यानें असेंच म्हणावयास पाहिजे होतें; पदकाराच्या वेळीं अर्वाचीन संस्कृत बोललें व लिहिलें जात असावें; कारण जेथें जेथें उषासौ, उषासः, उषासम्, उषासा असे शब्द ऋचांत येतात तेथें तेथें पदपाठांत षा च्या ऐवजीं पदकारानें ष घातला आहे. ह्या ऱ्हस्व ष व दीर्घ षा वरून ऋग्वेदांत उषस् व उषास् असे दोन शब्द असावेत; पहिला शब्द ( प्रथमा विभक्ति ) उषसा किंवा उषसौ व उषसः; ( द्वि० ) उषसम्, उषसः; ( तृ० ) उषसा, उषद्भिः; ( च० ) उषसे; ( ष० ) उषसः, उषसाम्; ( स० ) उषसि असा चालतो; दुसऱ्याची उषासा किंवा उषासौ व उषासः; उषासम्, उषासः; उषासा अशीं रूपें आढळतात; उषाः हें दोहोंचेंही प्रथमेचें एकवचन होईल. उषस् सारखा उषास् शब्द असावा ह्याला पुरावा उषासानक्ता व नक्तोषासा हा आहेच; पण त्याखेरीज पुढें दिलेलाही पुरावा आहे. सुरुक्मे हि सुपेशसाधि श्रिया विराजतः। उषासावेह सीदताम् ( १।१८८।६ ) ( = अलंकृत रात्र व उषा सौंदर्यानें शोभतात; त्या येथें बसोत ) येथें उषासौ ह्याच्याबद्दल उषसौ असें

घालण्यास हरकत नव्हती कारण उषासावेहसीदताम् व उषसावेह-सीदताम् या दोहोंत मात्रेचा जरी फरक असला तरी दोन्ही उच्चार कानाला चांगले व शुद्ध वाटतात. जर कोणी म्हणेल कीं छंदा करतांच उषस् यांतील ष पुष्कळ ठिकाणीं लांबविला आहे तर तो येथें लांबविण्याचें काय कारण? समिद्धो अग्नि-र्दिवि शोचिरश्रेत् प्रत्यङ् उषसम् उर्विया विभाति (५।२८।१) व देवीमुषसं स्वरावहन्ती प्रति विप्रासो मतिभिर्जरन्ते (५।८०।१); येथें उषसं बद्दल उषासम् घालणें योग्य होतें; कारण अ हा कानाला बरोबर लागत नाहीं; प्रत्यङ् उषासम् व देवीम् उषासम् असें म्हणावयास पाहिजे होतें; तेव्हां कर्ण माधुर्या-करतांच ष चा षा करीत होतें असें नसून उषास् हा एक निराळाच शब्द असून त्याची उषासः, उषासम् वगैरे रूपें योजिलीं जात असत. द्रवतां त उषसा वाजयन्ती अग्ने वातस्य पथ्याभिरच्छ। यत्सीमंजन्ति पूर्व्यं हविर्भिरा वंधुरेव तस्थतुर्दुरोणे (३।१४।३) = हे अग्नि, तुझी उषा वाताच्या मार्गांनीं आमच्याकडे धांवत येवो; जेव्हां ह्या श्रेष्ठ अग्नीला देव हवीकरितां प्रेरणा करतात म्हणजे पृथिवीवरील यज्ञांकडे जा असें सांगतात तेव्हां उषा व अग्नि पृथिवीवर जाण्यासाठीं रथांत बसतात; येथें उषसा हें सायणा-चार्य म्हणतात त्याप्रमाणें उषासानक्ता ह्याबद्दल नसून उषा ह्या अर्थींच आहे; ह्या उदाहरणावरून असें सिद्ध होतें कीं उषासा प्रमाणें उषसा असाही शब्द होता; आ भंदमाने उषसा उपाके (३।४।६) येथें उषसा हें नक्तोषसा ह्याबद्दल किंवा उषसानक्ता ह्याबद्दल असेल; उषसा = उषसासह असा सायणाचार्य अर्थ करतात; पण विरूपे हें विशेषण रात्र व उषा ह्यांनाच लाविलेले असते; जसें:— यदीं सुवाते उषसा विरूपे (५।१।४); द्यावापृथिवींना विरूपे म्हट-ल्याचें एकही उदाहरण नाहीं. जसें उषासावेह सीदताम् (१।१८८।६) येथें उषासौ म्हणजे नक्तोषासौ किंवा उषासानक्ता तसें वरील दोन उदाहरणांतील उषसा = नक्तोषसा किंवा उषसानक्ता. नक्ता च चक्रुरुषसा विरूपे (१।७३।७) येथें नक्तोषसा ह्या समासाचे सोयींकरतां दोन तुकडे केले आहेत. नक्ता बर्हिः सदतामुषासा (७।४२।५) एथें नक्तोषासा ह्याचेंही तुकडे केले आहेत; ह्या उदाहरणावरूनही उषासा असाच शब्द असावा; उषासानक्ता ह्या समासाचे म्हणजे नक्ता आधीं व उषासा नंतर असे तुकडे पाडून त्यांची उलटापालट केली असण्याचा संभव दिसत नाहीं. नक्तोषसा असाही समास असून तो पांच वेळां आला आहे. उषस्, उषास्, उषसा व उषासा ह्यांखेरीज उषा (उषां १।८१।९) असाही शब्द आहे. रात्र व उषा ह्यासंबंधी पुढील ऋचा होय.

## खंड ११ वा.

**आ सुष्वयन्ती यजते उपाके उषासानक्ता सदतां नि योनौ।**
**दिव्ये योषणे बृहती सुरुक्मे अधि श्रियं शुक्रपिशं दधाने (१०।११०।६)**

**सेष्मीयमाणे इति वा । सुष्वापयन्त्यौ इति वा । आसीदताम् इति वा । न्यासीदताम् इति वा**

सुष्वयन्ती = सेष्मीयमाणे = सारख्या किंवा वारंवार स्मित करणाऱ्या; स्मि = स्मितकरणें; स्मि चे यङन्तानें सेष्मि; सेष्मीय् = वारंवार स्मित करणें; उषा व रात्र सारख्या किंवा वारंवार स्मित करीत असतात; पण उषेसारखी रात्र तेजस्वी नसल्यामुळें ती स्मित करतें असें कसें म्हणतां येईल? रात्र अंधकारमय असल्यामुळें ती व तिचें स्मित कोणाला दिसेल? तेव्हां हा अर्थ बरोबर नाहीं; म्हणून पुढील अर्थ. सुष्वयन्ती = सुष्वापयन्त्यौ = प्राणिमात्रांना चांगली झोंप आणणाऱ्या; पण लोक रात्रीं निजतात, दिवसां निजत नाहींत; तेव्हां सुष्वापयन्ती हें विशेषण उषेला लागू पडणार नाहीं. स्वप् ह्याचें प्रयोजकरूप स्वापय्; सु + स्वापय् = चांगली झोंप आणणें. ह्या दोन व्युत्पत्ति नसून सुष्वयन्ती ह्याचे अर्थ असावेत; कारण त्या शब्दांत स्मि किंवा स्वप् धातु दिसत नाहीं; कदाचित् स्वि किंवा स्वय् = स्मि किंवा स्वप् असे त्या धातूचे यास्कानें अर्थ केले असतील. स्वि = सोमरस काढणें; स्वयति = सोमरस काढतो किंवा काढते; यापासून देते हा सामान्य अर्थ. सुष्वि ह्याचें सुष्वयन्त (७।३६।६) व सुष्वि असें नामरूप आढळतें; सुष्विं, सुष्वये, सुष्वेः, असुष्वीन् अशीं सुष्वि ह्याचीं रूपें आढळतात; स्वयम् हाही शब्द स्वि ह्यापासून झाला असावा असें वाटतें; कारण स्वयं म्हणजे दान किंवा धन असा अर्थ बरेच ठिकाणीं आहे असें माझें मत झालें आहे. कर्ता वीराय सुष्वये उ लोकं दाता वसु स्तुवते कीरये चित् (६।२३।३); एथें वीराय = सुष्वये = स्तुवते = कीरये = स्तवन करणाऱ्याला व हवि देणाऱ्याला असे अर्थ असावेत; कर्ता = दाता; उ लोकं = चित् = धन. इंद्रः० ब्रह्मण्यते सुष्वये वरिवो धात् (४।२४।२) = इंद्र स्तवन करणाऱ्याला व हवि देणाऱ्याला धन देतो. यः शश्वतो अदाशुषो गयस्य प्रयंतासि सुष्वितराय वेदः (७।१९।१) = हवि न देणाऱ्या (अदाशुषः) धनवानाचें (शश्वतः) धन (गयस्य) हवि देणाऱ्याला (सुष्वितराय) देणारा (प्रयन्ता) जो तूं आहेस; एथें अदाश्वान् ह्याच्या उलट सुष्वितर शब्द आहे; हवि देणारा व निर्धनांस धन देणारा असे दाश्वान् ह्याचे दोन्ही अर्थ होतात; तेव्हां सुष्वि शब्दाचेही तेच दोन अर्थ असावेत. सुष्वि ह्याच्या उलट असुष्वि; असुष्वि ह्याचें असुष्वीन् असें एकच रूप आढळतें; इंद्र० जह्यसुष्वीन् प्र वृहापृणतः (६।४४।११)= इंद्रा, हवि व धन न देणाऱ्यांना ठार कर; असुष्वीन् = अपृणतः = हवि व धन न देणाऱ्यांना; प्रवृह = जहि = ठार कर. सोमः वि पपृच्यात् असुष्वीन् (४।२४।५)=सोम, हवि व धन न देणाऱ्यांना धनापासून वेगळे करो (वि + पपृच्यात्). सुष्वये वरिवोविदः । स्वयं स्तोत्रे वयस्कृतः (९।२१।२) = हवि व धन देणाऱ्याला व स्तुति करणाऱ्याला सोम धन देतो; सुष्वये = स्तोत्रे; वरिवोविदः = वयस्कृतः = धन देणारे; वरिवः = वयः = स्वयम् = धन; स्वयम् ह्याला जोडण्याला कृतः हा शब्द पाहिजे; तो वयस्कृतः ह्यांतून घ्यावयाचा; स्वयम् हें स्वि पासून नाम असावें असें वर

म्हटलेंच आहे. याः सुष्वयंत सुदुघाः सुधारा अभि स्वेन पयसा पीप्यानाः (७।३६।६)= स्वतःच्या जलानें फुगलेल्या ज्या नद्या पुष्कळ जल देतात; येथें सुदुघाः, सुधाराः व पयसा ह्यांचे दोन अर्थ आहेत; गाई दुधानें फुगून धारांनीं पुष्कळ दूध देतात; नद्या पाण्यानें फुगतात, त्यांचा प्रवाह जोरानें चालतो ( सुधाराः ) व त्या धान्य प्रसवतात ( सुदुघाः ); अशा गुणांनीं युक्त असल्यामुळें त्यांना सुष्वयन्त हें क्रियापद लाविलें आहे; सुष्वयंत = चांगल्या वस्तु म्हणजे जल, धान्य, दूध व धन देतात. स्वयं खेरीज-करून बाकींच्या नामरूपांना व स्वयन्त ह्या धातुरूपाला सु हा उपसर्ग जोडला आहे; तेव्हां प्रस्तुत ऋचेंत सुष्वयंती = धन देणाऱ्या असा अर्थ असावा; कदाचित् हवि दिलेल्या व स्तवन केलेल्या असा कर्मणि अर्थही असेल; कारण स्वि याचे तीन अर्थ होतात असें वर म्हटलें आहे. सेष्मीयमाणे व सुष्वापयन्त्यौ ह्या सुष्वयन्ती ह्याच्या व्युत्पत्ति नसून त्याचे अर्थ असावेत असें वर म्हटलें आहे; पण असेंही वाटतें कीं सुष्वयंती हें सुष्मयन्ती ( सु + स्मयन्ती ) किंवा सुष्वपन्ती ( सु + स्वपन्ती ) ह्याचा अपभ्रंश असावा असें कदाचित् निरुक्तकारांचें व यास्काचें मत असेल; जे वैदिक शब्द अर्वाचीन संस्कृतांत नाहींत ते कोणत्यातरी अर्वाचीन संस्कृत शब्दांचे अपभ्रंश होत असें त्यांनीं केलेल्या व्युत्पत्तींवरून अनुमान सहज निघतें; सुष्वयन्ती = सु + स्मयन्ती = सेष्मीयमाणे; किंवा सु + स्वयन्ती = सु + स्वपन्ती = सुष्वापयन्त्यौ; पहिल्या व्युत्पत्तींत स्म बद्दल स्व व दुसरींत प बद्दल य हीं अक्षरें उच्चारलीं गेलीं; हा तर्क ज्यास्त संभवनीय दिसतो; कारण अर्थापेक्षां व्युत्पत्ति देणें हें निरुक्तकारांचें आद्य कर्तव्य होतें. सायणाचार्य या शब्दाचे पुढीलप्रमाणें विवरण करतात :— सुष्वयन्ती = सु + सु + अयन्ती; अय् = जाणें; उत्तमोत्तम ( सु + सु ) म्हणजे अत्युत्तम रीतीनें जाणाऱ्या ( अयन्ती = अयन्त्यौ ); किंवा स्वप् याचें प्रयोजक रूप स्वापय्; स्वा चा स्व केल्यानें व प गाळल्यानें शिल्लक स्वय् राहतें; सु + स्वयन्ती = सुष्वापयन्त्यौ. सेष्मीयमाणे ही व्युत्पत्ति किंवा हा अर्थ सायणाचार्य देत नाहींत. आ + सदतां =आसीदताम् ; किंवा नि + आ + सदताम् = न्यासीदताम् ; सदताम् या पदानंतर जो नि उपसर्ग आहे तो आ या उपसर्गाच्या आधीं जोडावयाला यास्क हरकत घेतो म्हणून तो आसीदताम् येवढेंच क्रियारूप प्रथम देतो; ह्याचें कारण सदताम् नंतर आलेला उपसर्ग त्या क्रियापदाला जोडणें त्याला योग्य वाटलें नसावें; पण वैदिक व्याकरणाची त्याला तसें करण्याला हरकत नसल्यामुळें तो नाखुषीनें आसीदताम् याला नि जोडतो असें वाटतें; वास्तविक उपसर्ग कोठेंही असला तरी तो क्रियारूपाला जोडलाच पाहिजे. आसीदताम् ह्याला जर नि जोडला नाहीं तर नि हें पदपूरण ठरतें; किंवा नियोनौ असें एक पद करावें लागतें; तसें केल्यास नियोनौ ह्याचा त्यानें काय अर्थ केला असावा तें समजत नाहीं.

**यज्ञिये । उपक्रांते । दिव्ये योषणे । बृहत्यौ महत्यौ**

यजते = यज्ञिये = यज्ञ शेवटास नेणाऱ्या ( दुर्ग ); पण हविरर्ह म्हणजे हवि घेण्याला योग्य असा अर्थ आहे; अवेस्तांत यझत = पूज्य. उपाके = उपक्रान्ते = उपगम्य इतरेतरं क्रान्ते ( दुर्ग ) = एकमेकीच्या जवळ जाऊन क्रमण म्हणजे गमन करणाऱ्या, एकमेकीच्या पाठोपाठ जाणाऱ्या; उपाके = प्रशस्ते = प्रशस्त असाही दुर्ग अर्थ देतो; पण प्रशस्त म्हणजे स्तुत्य असा त्याच्या मनांत अर्थ असेल किंवा दुसरा कांहीं असेल तें समजत नाहीं. उपाके = उप + आ + के; के = क्रान्ते; म्हणजे क्रम् या धातूंतील फक्त क् हें अक्षर उपाक या शब्दांत आहे. उपक्रान्त ह्यांत आ अक्षर कां घेतलें नाहीं ? वास्तविक उपाक्रान्ते असा शब्द पाहिजे होता. अपाक, अभीक, उपाक, निरेक, पराक, समीक असे शब्द आहेत; आक ह्याला निरनिराळे उपसर्ग जोडून हे शब्द बनले आहेत. आके व आके-निपासः असे दोन शब्द ऋग्वेदांत आहेत; आके हें आकचें सप्तमीचें एक-वचन होय; त्याचा निश्चित अर्थ करतां येत नाहीं; पण दोन्ही ठिकाणीं आके म्हणजे द्रव्यनिधींत असा अर्थ असावा. उपाक हें विशेषण व नाम असें आढळतें; उपाकचक्षस्, उपाकयोः हस्तयोः, उपाके नक्तोषासा येथें उपाक हें विशेषण आहे; नक्तोषासा ह्याला उपाके हें विशेषण तीनदां लाविलें आहे; व तेथें त्याचा अर्थ एकमेकींजवळ असणाऱ्या असा असावा; त्याचा गूढ अर्थ धनवान् असाही असेल; रात्र व उषा या एकमेकींजवळ असतात व धनवान् असल्यामुळें धन देतात. उपाकयोः हस्तयोः = प्रशस्त हातांत; उपाके आ ही जोडी तीन वेळां आली आहे; नुसता उपाके हा सात वेळां आला आहे; दहाही ठिकाणीं समीपस्थानीं असा अर्थ असावा. बृहती = बृहत्यौ = महत्यौ = मोठ्या.

**सुरुक्मे सुरोचने। अधिदधाने शुक्रपेशसं श्रियम्। शुक्रं शोचतेः ज्वलति-कर्मणः। पेशः इति रूपनाम ( निघं० ३।७।११ )। पिंशतेः। विपिशितं भवति**

सुरुक्मे = सुरोचने; रुक्म = रोचन = दीप्ति, प्रकाश; ज्यांच्यापाशीं दीप्ति आहे अशा, प्रकाशणाऱ्या. रुक्म = रुच् ( = प्रकाशणें ) + म = प्रकाश; रोचन शब्दाचाही तोच अर्थ. रुक्म = ( १ ) सूर्य, ( २ ) सूर्यासारखा तेजस्वी अलंकार; सुरुक्मे = झळकणारे अलंकार घालणाऱ्या. मरुत् छातीवर व दंडावर रुक्म घालीत असत; येथें रुक्म म्हणजे सूर्यासारखें तेजस्वी सोन्याचे चांद; ऋग्वेदकालीन स्त्रिया असे चांद घालीत होत्या म्हणून उषा व रात्र ह्यांना सुरुक्मे हें विशेषण लावलें असावें. शुक्रपिशम् = शुक्रपेशसम् = देदीप्यमान रूप म्हणजे रंग आहे जींत अशी ( श्रियम् = शोभा ). अधिदधाने = धारण करणाऱ्या. पेशः = रूप; रूपाला पेशस् नांव पडण्याचें कारण तें जणूं काय जळत असतें म्हणजे अतीशय झळकतें; पेशस् शब्द पिश् जळणें ह्यापासून; पिश अवयवे ( धा० ६।१५६ ); पिश् = वस्तूचे अवयव म्हणजे अती सूक्ष्म भाग करणें येवढाच अर्थ धातुपाठांत आहे; आपटे यांचें कोशांत अलंकार घालणें असाही अर्थ दिला

आहे; ऋग्वेदांत ( १ ) अलंकृत करणें, ( २ ) पसरणें व ( ३ ) मिसळणें असे पिश् चे तीन अर्थ आहेत; ( १ ) अरुषस्य दुहितरा विरूपे स्तृभिरन्या पिपिशे सूरो अन्या ( ६।४९।३ ) = सूच्या दोन मुली भिन्नभिन्न वर्णाच्या असून एक म्हणजे रात्र ताऱ्यांनीं अलंकृत असते तर दुसरी सूर्यानें अलंकृत असते; ( २ ) श्रिरधि तनूषु पिपिशे ( ५।५७।६ ) = ह्यांच्या शरीरावर शोभा पसरली आहे; पुरुत्रा वाचं पिपिशुर्वदन्तः ( ७।१०३।६ ) = ओरडतांना हे बेडूक भिन्नभिन्न प्रकारचे आवाज पसरतात; ( ३ ) अंशुर्यवेन पिपिशे ( ९।६८।४ ) = सोम यवानें मिश्रित होतो. पिश् ह्याचीं पिशानाः, पिपिशे आणि पिपिशुः अशीं क्रियारूपें व पिश्, पिशा, पेशस् आणि पेशन अशीं नामरूपेंही आहेत. पिशा गिरो मघवन् गोभिरश्वैः त्वायतः शिशीहि राये अस्मान् ( ७।१८।२ ) = हे इंद्रा, आमच्याजवळ धन असावें म्हणून आम्ही जे तुझे भक्त त्यांना सोनें ( पिशा ), गाई ( गोभिः ), घोडे ( अश्वैः ) ह्यांनीं युक्त कर ( शिशीहि ); पिशा हें पिश्चें तृतीयेचें एकवचन. पिशा इव सुपिशो विश्व वेदसः ( १।६४।८ ) = धनाढ्य लोकांप्रमाणें ( पिशाः इव ) हे मरुत् अतीशय धनवान् आहेत; सुपिशः = विश्ववेदसः = अति धनवान; पिश् = धन. पिश् शब्द विश्वपिशः, विश्वपिशा, शुक्रपिशम्, सुपिशः अशा चार समासांतही आढळतो. सतु वस्त्राण्यध पेशनानि वसानः ( १०।१।६ ) = वस्त्रें व अलंकार ( पेशनानि ) अंगावर घालणारा ( वसानः ) अग्नि. अधि पेशांसि वपते नृतूरिव उषाः ( १।९२।४ ) = नर्तकीप्रमाणें उषा अंगावर अलंकार ( पेशांसि ) घालते. पेशस् शब्द नृपेशसः, सुपेशाः, पुरुपेशसम्, अश्व-पेशसम्, वाजपेशसम्, विश्वपेशसम्, शुचिपेशसम्, हिरण्यपेशसम्, अपेशसे, ऋतपेशसे, वीरपेशाः व पुरुपेशासु असा बारा समासांत आढळतो; ह्यांपैकीं बऱ्याच समासांत त्याचा धन व बाकीच्यांत रूप असा अर्थ असावा. शुक्रपिशं = शुक्रं पिश् यस्याः ताम् ( श्रियम् ) = देदीप्यमान रूप आहे जिच्यांत अशी शोभा किंवा झळकणाऱ्या अलंकारांनीं युक्त असें सौंदर्य हा एक अर्थ; व दुसरा ज्यांत देदीप्यमान् सोनें आहे असें धन. पिश् व पेशस् ह्यांचें तेज, रूप व धन असे तीन अर्थ असावेत. शुक्रपिशम् येथें पेशस् नसून पिश् असतांना पेशः इति रूपनाम असें यास्क म्हणतो; त्याचें कारण निघंटूंत पिश् शब्द दिला नाहीं. शुक्र शब्द शुच् जळणें ह्यापासून झाला आहे; शुच् + रम् = शुक्रम् = जळणारें, देदीप्यमान्; शुक्र हा शब्द उषा, सूर्य,मरुतांच्या आईचा गर्भाशय आणि बैल यांस व अग्नि आणि त्याच्या ज्वाला यांस विशेषण म्हणून लाविलेला आढळतो; तेव्हां जळणारा यापेक्षां ज्वलद्दीप्तिमान् असा अर्थ जास्त योग्य दिसतो; शुच् ह्याचें जळणें व ज्वलद्दीप्तीमान् असणें असे दोन्ही अर्थ आहेत. विपिशितं भवति विकसितं भवति यावदाश्रयभावित्वात् । विनिहितं भवति इति केचित् ( दुर्ग ) = रूप विपिशित म्हणजे विकसित होतें; जोपर्यंत शरीरासारख्या आश्रयावर रूप असतें तोंपर्यंत तें फुलतें; कित्येक म्हणतात कीं विपि-

शित याचा अर्थ विनिहित म्हणजे ( शरिरादिकांवर ) ठेविलेले. पिंश् हा धातु धातुपाठांत व आपटे यांचे कोशांत नाहीं; पिंश्चें अपिंशत् असें एकच रूप ऋग्वेदांत आढळतें; खंड १४ त पान ६२३ ल्या धातूचीं सर्व उदाहरणें दिलीं आहेत; पिंश् = ( १ ) सजविणें, ( २ ) करणें किंवा तयार करणें असे दोन अर्थ सिद्ध केले आहेत. पेशस् हा पिंश् धातूपासून निघाला आहे येवढेंच यास्क म्हणतो; पण तो पिंश्चा अर्थ देत नाहीं; कदाचित् दुर्ग म्हणतो त्याप्रमाणें विकसित होणें किंवा इतर टीकाकार म्हणतात त्याप्रमाणें अंगावर घालणें असा अर्थ त्याच्या मनांत असेल; पण पिश् व पेशस् हे पिंश् धातूपासून निघाले नसून पिश् ( = अलंकृत करणें ) यापासून झाले आहेत. ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थः— एकमेकींकडे पाहून स्मित करणाऱ्या किंवा सर्व प्राण्यांना निजविणाऱ्या ( सुष्वयन्ती ), यज्ञसंपादन करणाऱ्या ( यजते ), एकमेकींजवळ जाऊन मार्ग चालणाऱ्या ( उपाके ), दीप्तिमान् ( सुरुक्मे ) व द्युलोकीं शुभ्र कान्ती पसरणाऱ्या अशा एकमेकींशीं मिश्र झालेल्या ( योषणे ) द्युच्या मुली ( दिव्ये ) ह्या आसनावर ( योनौ ) बसोत ( नि + आ + सदताम् ). ह्या ऋचेंतील बहुतेक शब्दांचे खरे अर्थ वर दिले आहेत. ऋचेचा खरा अर्थः— स्तविलेल्या ( सुष्वयंती ), हवि घेण्याला योग्य, एकमेकींजवळ असणाऱ्या ( उपाके ), अलंकार घातलेल्या ( सुरुक्मे ), देदीप्यमान् अलंकारांनीं युक्त ( शुक्रपिशम् ) सौंदर्य ( श्रियम् ) धारण करणाऱ्या ( अधिदधाने ), द्यु लोकांतील ( दिव्ये ) सुंदर स्त्रिया ( योषणे ) उषा व रात्र आसनावर बसोत. ऋचेचा ध्वनित अर्थ ह्या धनवान् स्त्रिया आमच्या धन भांडारांत धन देवोत असा आहे. आ = नि = सु = रुक्म = पिश् = श्री = धन. स्वि = यज् = सद् = देणें. दिव्ये योनौ = धनांनीं भरलेल्या भांडारांत. यु ( = देणें ) ह्यापासून यो; सन् ( = देणें ) ह्यापासून सन; यो + सने = अतीशय धनांनीं युक्त अशा दोन दात्या स्त्रिया.

**दैव्या होतारो ( ९ ) दैव्यौ होतारौ । अयं च अग्निः असौ च मध्यमः । तयोः एषा भवति**

दैव्या = दैव्यौ = देवांचे; होतारा = होतारौ = दोन होते. ते कोण ? हा अग्नि व तो मध्यम; म्हणजे पृथिवीवरील अग्नि व अंतरिक्षांतील वायु हे देवांचे होते होत. तत्संबंधीं पुढील ऋचा होय.

## खंड १२ वा.

**दैव्या होतारा प्रथमा सुवाचा मिमाना यज्ञं मनुषो यजध्यै ।**

**प्रचोदयन्ता विदथेषु कारू प्राचीनं ज्योतिः प्रदिशा दिशन्ता ( ऋ० सं० १०।११०।७ )**

**दैव्यौ होतारौ प्रथमौ सुवाचौ निर्मिमानौ यज्ञं मनुष्यस्य मनुष्यस्य यजनाय प्रचोदयमानौ यज्ञेषु कर्तारौ पूर्वस्यां दिशि यष्टव्यम् इति प्रदिशन्तौ**

दैव्या होतारा = दैव्यौ होतारौ = देवांमधील होते किंवा स्वतः देवच; ह्या होत्यांना दैव्यौ हें विशेषण लावण्याचें कारण होता व मैत्रावरुण हे मनुष्यांचे होते हे; मनुष्यांचे होते होता व मैत्रावरुण; पण देवांचे होते अग्नि व वायु; म्हणून हे दोघे देवांमधील किंवा देवच असा दुर्ग अर्थ करतो. प्रथमा = प्रथमौ = मुख्य; मनुष्यांचे होते मुख्य नव्हत. सुवाचा = सुवाचौ म्हणजे ज्यांची स्तुति चांगली म्हणजे प्रशस्त रीतीनें केली असते असे. मिमाना = निर्मिमानौ = यज्ञ निर्माण करणारे; निर्मिमानौ बद्दल निर्मिमाणौ पाहिजे; मिमाना = यज्ञ निर्मातारौ (दुर्ग); दुर्गवृत्तींत निर्मिमानौ किंवा निर्मिमाणौ नाहीं. मनुषः = मनुष्यस्य मनुष्यस्य = सगळ्या लोकांचे; दुर्गवृत्तींत मनुष्यस्य एकदांच आहे. यजध्यै = यजनाय = यज्ञ करण्याकरितां. प्रचोदयन्ता = प्रचोदयमानौ. विदथेषु = यज्ञेषु = यज्ञांत. कारू = कर्तारौ = यज्ञ करणारे ऋत्विज्. प्राचीनं = पूर्वस्यां दिशि = पूर्व दिशेकडील (ज्योतिः = अग्नि); दुर्ग-वृत्तींत पूर्वस्यां बद्दल प्राच्यां आहे. दिशन्ता = यष्टव्यम् इति प्रदिशन्तौ = अशा रीतीनें यज्ञ करावा असें विधिवाक्यनें आज्ञा करणारे. प्रदिशा हा शब्द यास्कानें भाष्यांत घातला नाहीं व त्याचें विवरणही केलें नाहीं; प्रदिशा = विधिवाक्येन = विधिवाक्यानें; प्राचीमनु प्रदिशि प्रेहि (मान० श्रौ० १।५।४।७) = पूर्वदिशेकडे जा असें विधिवाक्य असेल किंवा उद्धराहवनीयमित्युक्त्वा गार्हपत्यादाहवनीयं ज्वलन्तम् (मान० श्रौ० १।६।१।१) हें विधीवाक्य असेल; किंवा प्राञ्चम् उद्धरंति = अग्नीला पूर्वेकडे उचलून नेतात असें असेल; गार्हपत्यांतून पूर्वेकडील असलेल्या आहवनीय स्थानाकडे अग्नि विधिवाक्यानें नेतात; अशा कृत्याला अग्निप्रणयन म्हणतात. ऋचेचा अर्थः—मनुष्यहोत्याहून श्रेष्ठ (प्रथमा), उत्तम भाषा रीतीनें स्तविलेले (सुवाचा), देवांना हवि देण्याकरितां (यजध्यै) मनुष्यांचे (मनुषः) यज्ञ निर्माण करणारे (मिमाना), यज्ञांत (विदथेषु) विधिरूप आज्ञा करणारे (प्रचोदयन्ता), अशा रीतीनें यज्ञ करणारे (कारू) म्हणजे मनुष्यांच्या हातून यज्ञ करविणारे व अशा विधिवाक्यानें (प्रदिशा) अग्नि (ज्योतिः) पूर्वेकडे (प्राचीनं) नेऊन यज्ञ करावा असें सांगणारे (दिशन्ता) असे देवांमधील होते (अग्नि व वायु मलाही यज्ञ करण्याची रीत दाखवोत).

**तिस्रो देवीः (१०) तिस्रः देव्यः। तासाम् एषा भवति**

तिस्रो देवीः = तिस्रः देव्यः = तीन देवी; तत् संबंधी पुढील ऋचा होय.

## खंड १३ वा.

**आ नो यज्ञं भारती तूयमेत्विळा मनुष्वदिह चेतयन्ती। तिस्रो देवीर्बर्हिरेदं स्योनं सरस्वती स्वपसः सदन्तु (ऋ० सं० १०।११०।८)**

**ऐतु नः यज्ञं भारती क्षिप्रम्। भरतः आदित्यः। तस्य भाः**

आ + एतु = ऐतु = येवो. भारती = भरतः आदित्यः । तस्य भाः = भरत म्हणजे आदित्य; त्याची प्रभा ती भारती. भरतः आदित्यः । सर्वभूतानि उदकेन बिभर्ति इति ( दुर्ग ) = आदित्याला भरत म्हणण्याचें कारण तो जलानें सर्व प्राण्यांचें पोषण करतो; बिभर्ति भारती ( अमर १।५।१ क्षीरस्वामी ). तूयं = क्षिप्रं = त्वरित.

**इडा च मनुष्यवत् इह चेतयमाना । तिस्रः देव्यः बर्हिः इदं सुखं सरस्वती च सुकर्माणः आसीदन्तु**

इळा = इडा; इळा च पृथिवीस्थाना । 'इहैवेळया वसुमत्या' ( मैत्रा० सं० ४।१३।८ ) इति अनुयाजेषु उन्नीतसामर्थ्यात् पार्थिवत्वं ( दुर्ग ) = अनुयाज नांवाच्या मंत्रांत 'धनवान् इळेसह एथेंच' असे शब्द आहेत; ह्या शब्दांवरून इळा ही पृथिवीवरची असें सहज सिद्ध होतें; इळा ही पृथिवीवरील देवता होय. मनुष्वत् = मनुष्यवत् = मनुष्यांच्याप्रमाणें; एका मनुष्यानें दुसऱ्या मनुष्याला भोजनाला बोलाविलें असतां तो जसा त्वरित येतो तशा ( दुर्ग ). मनुष्वत् = मनुष् + वत्; मनुष् किंवा मनु हा मानवजातीचा उत्पादक; त्याच्या यज्ञांत जशा ह्या तीन देवता त्वरित येत असत तशा त्या माझ्या यज्ञांत येवोत असा खरा अर्थ आहे. इह = ह्या यज्ञकर्मांत. चेतयन्ती = चेतयमाना = ( माझ्या ह्या यज्ञांत हवि खावयाचा आहे असे ) जाणणारी; दुर्गवृत्तींत चेतयमाना असा शब्द नाहीं. स्योनं = सुखं = सुखकर, मऊ व प्रशस्त. स्वपसः = सुकर्माणः = उत्तम कर्में करणाऱ्या; अपस् = कर्म ( निघं० २।१।१ ). बर्हिरेदं = बर्हिः + आ + इदं. आ + सदन्तु = आसीदन्तु = बसोत. चेतयन्ती हें विशेषण इळा ह्या शब्दाला लाविलें आहे असें दिसतें; वास्तविक भारती, इळा व सरस्वती ह्या सर्वांना तें विशेषण लाविलें पाहिजे. ऋचेचा अर्थः– आमच्या ह्या यज्ञांत हवि खावयाचा आहे असें जाणणाऱ्या ( चेतयन्ती ) भारती, इळा व सरस्वती ह्या उत्तम कर्में करणाऱ्या ( स्वपसः ) तीन देवी आमच्या यज्ञाला त्वरित येवोत व ह्या सुखकर दर्भासनावर बसोत. आ = यज्ञ = बर्हिः = सु = अपस् = धन. तूयं = स्योनं = इदं = धनानें भरलेलें. इ = चित् = सद् = देणें. इह = ह्या धनभांडारांत. देवीः = धनदात्या. असे ह्या शब्दांचे दुसरेही अर्थ आहेत; त्यामुळें भारती, इळा व सरस्वती ह्या नांवाच्या कोणी तीन राज्ञी होत्या असा अर्थ करण्यास हरकत नाहीं. धनयुक्त व धनदात्या असणाऱ्या ह्या दानशूर स्त्रिया आम्हांला अपरंपार धन देवोत असा ध्वनित अर्थ असावा.

**त्वष्टा ( ११ ) तूर्णम् अश्नुते इति नैरुक्ताः । त्विषेः वा स्यात् दीप्तिकर्मणः । त्वक्षतेः वा स्यात् करोतिकर्मणः । तस्य एषा भवति**

त्वष्टा = तू + अष्टा; तू = तूर्ण = त्वरित; अष्टा = अश् + ता = ( त्याला जें व्यापावयाचें असतें तें ) व्यापणारा; अशू व्याप्तौ संघाते च ( धा० ५।१८ ); तू + अष्टृ ह्यापासून त्वष्टृ शब्द झाला आहे असें निरुक्तकार म्हणतात; इति नैरुक्ताः हें दुर्गवृत्तींत नाहीं. किंवा त्वष्टा = त्विष्टा = त्विष् + ता = झळकणारा; त्विष दीप्तौ ( धा०

१।१०२६ ); दीप्तिकर्मणः ह्याबद्दल दुर्गवृत्तींत वृद्धयर्थस्य असें आहे; वृद्धः एव नित्यम् असौ देवतात्वात् ( दुर्ग ) = देव असल्यामुळें त्वष्टा हा नेहमीं धनसमृद्ध असतो. त्विषेः देवतायाम् । अकारश्च उपधायाः = त्विषेः देवतायां तृन् वक्तव्यः अकारश्च उपधायाः वक्तव्यः ( महाभाष्य ३।२।१३५।५ ) = त्वष्टा जेव्हां देवता असतो तेव्हां त्विष् ह्यांतील इकाराचा अकार करून त्वष् ह्याला तृ लावल्यानें त्वष्टृ शब्द बनतो. किंवा त्वष्टा = त्वक्ष् + ता = ( सुताराचें ) काम करणारा; त्वष्टा हा देवांमधील सुतार होता. दुर्ग म्हणतोः– त्वक्ष् म्हणजे सुतार काम करणें असा जरी त्या धातूचा विशिष्ट अर्थ आहे तरी एथें सामान्य अर्थ घ्यावयाचा म्हणजे त्वक्ष् = करणें; त्वष्टा नुसतें सुतार काम करतो इतकेंच नाहीं तर तो इतर कामें व कधीं कधीं अद्भुत कामेंही करतो. त्वक्षति तनूकरोति दारु (अमर २।१०।९ क्षी०). गुर्जरपाठ तक्षतेः असा आहे; पण तो त्वक्षतेः असाच पाहिजे. तक्ष् त्वक्ष् तनूकरणें ( धा० १।६५६–५७ ); ग्रीक भाषेंत टॅक्सिडो ( taxido ) = रचणें, टेक्टॉन् ( tekton ) = गवंडी, सुतार, टुको ( tuko ) = तयार करणें, बनविणें. तत्संबंधीं पुढील ऋचा होय.

## खंड १४ वा.

**य इमे द्यावापृथिवी जनित्री रूपैरपिंशद्भुवनानि विश्वा।**
**तमद्य होतरिषितो यजीयान्देवं त्वष्टारमिह यक्षि विद्वान्(ऋ० सं० १०।११०।९)**
**यः इमे द्यावापृथिव्यौ जनयित्र्यौ रूपैः अकरोत् भूतानि च सर्वाणि**

द्यावापृथिवी = द्यावापृथिव्यौ. जनित्री = जनयित्र्यौ = सर्व प्राण्यांना जन्म देणाऱ्या किंवा उत्पन्न करणाऱ्या. अपिंशत् = अकरोत्. नक्षत्रेभिः पितरो द्यामपिंशन् ( १०।६८।११ ) = पितर द्युला ताऱ्यांनीं चित्रित करते झाले किंवा सजविते झाले. याभिः शचीभिः चमसान् अपिंशत ( ३।६०।२ ) = ज्या अद्भुत शक्तींनीं ऋभु एका चमसाचे चार चमस करते झाले. निश्चर्मणः ऋभवो गामपिंशत ( १।११०।८ ) = नुसतें चामडें घेऊन ऋभु त्याची गाय बनविते झाले. सजविणें व करणें असे पिंश्चे दोन अर्थ आहेत; प्रस्तुत ऋचेंत सजविणें हा अर्थ योग्य दिसतो. भुवनानि विश्वा = सर्वाणि भूतानि.

**तम् अद्य होतर् इषितः यजीयान् देवं त्वष्टारम् इह यज विद्वान्**

यक्षि = यज = हवि दे किंवा हवि देऊन तृप्त कर; यक्षि = यज् + सि; सि हा ऋग्वेदांत आज्ञार्थ दाखविण्याकरितां धातूंना बऱ्याच ठिकाणीं लावलेला आढळतो. ऋचेचा अर्थः– जो ह्या द्युला, पृथिवीला व सर्व प्राणिमात्रांना निरनिराळ्या रूपांनीं युक्त करितां झाला किंवा तें तें रूप घेऊन द्यु वगैरेंना निर्माण करिता झाला त्या त्वष्ट्याला, हे होत्या ( अग्नि ), सर्वांहून हवि देण्यांत कुशल असणारा ( यजीयान् ), सर्व देवांना जाणणारा ( विद्वान् ) व हवि देण्याकरितां देवांकडे पाठविलेला ( इषितः ) तूं हवि दे.

**माध्यमिकः त्वष्टा इति आहुः। मध्यमे च स्थाने समाम्नातः। अग्निः इति शाकपूणिः। तस्य एषा अपरा भवति**

कित्येक म्हणतात कीं ज्या अर्थी निघंटूंत अन्तरिक्षदेवतांमध्यें त्वष्टा गणला गेला आहे त्याअर्थी तो मध्यमस्थानांतलाच देव असला पाहिजे; तो अग्नि नव्हे हें सिद्ध करण्याला हे अग्नि, तूं त्वष्टयाला हवि दे हे शब्द पुरे आहेत; तथापि त्वष्टा म्हणजे अग्नि असे शाकपूणि म्हणतो; तत्संबंधी पुढील ऋचा होय. दुर्ग म्हणतो :– अग्नि जरी एक असला तरी त्याला दोन रूपें घेतां येतील; अग्निमग्न आवह ( तैत्ति० ब्रा० ३।५।४ ) = हे अग्नि, तूं अग्नीला घेऊन ये; अग्नि दोन ठिकाणीं असूं शकतो; तेव्हां एक ठिकाणचा अग्नि दुसऱ्या ठिकाणच्या अग्नीला बोलावूं शकेल; त्याप्रमाणें त्वष्टृरूप अग्नीला पृथिवीवरील अग्नि हवि देतो यांत आश्चर्य नाहीं; कार्याकरितां एका देवाचे दोन देव होतील; शिवाय अग्नि हा अन्तरिक्ष देवगणांतही गणला गेला आहे; त्वष्टा हा देवांचा कारागीर आहे म्हणून तो अग्नीहून भिन्न असला पाहिजे असें जर कोणी म्हणत असेल तर त्याला उत्तर :– अग्नीमध्ये नानाविध व विलक्षण कौशल आहे; तेव्हां तो शिल्पकाराचेंही काम करूं शकेल; निरनिराळीं कामें करण्याकरितां एक देव अनेक रूपें घेतो हें त्या देवाचें अद्भुत सामर्थ्य दर्शवितें. दुर्गानें केलेलें शाकपूणीचें हें समर्थन लंगडें आहे; शाकपूणि हा पूर्व आचार्य तेव्हां तो म्हणेल तें खरें असलेंच पाहिजे अशी दुर्गाची ठाम समजूत होती.

## खंड १५ वा.

**आविष्ट्यो वर्धते चारुरासु जिह्मानामूर्ध्वः स्वयशा उपस्थे। उभे त्वष्टुर्बिभ्यतुर्जायमानात्प्रतीची सिंहं प्रति जोषयेते ( ऋ० सं० १।९५।५ )**

**आविः आवेदनात्। तत्यः। वर्धते चारुः आसु। चारु चरतेः**

आविः हा शब्द आ + विद् ह्यापासून ( आवेदनात् ); आवेदनं = सर्वस्य प्रकाशनं ( दुर्ग ) = सर्व वस्तु प्रकाशानें प्रकट करणें; आविष्ट्यः = आविः + त्यः; तत्यः = तत् + त्यः; तत् म्हणजे आविः; तत्संबंधी म्हणजे सर्व वस्तु प्रकट करणारा; तत्यः = तस्य प्रकाशनस्य तनिता = आविष्ट्यः = तत् म्हणजे प्रकाशन म्हणजे प्रकाश; तो प्रकाश पसरणारा ( दुर्ग ); दुर्ग त्यप् ह्याचा तनिता म्हणजे पसरणारा असा अर्थ करतो. ऋग्वेदांत आविः ह्याचा अर्थ गुहा किंवा गुह्यं ह्या शब्दांच्या अर्थाच्या उलट आहे; गुहाहितं = गुह्यं = गुहेंत लपलेला, गूढ किंवा अदृश्य असलेला; आविष्ट्यः = प्रकाशांत आलेला; तेव्हां आविः म्हणजे प्रकाश किंवा उघड जागा असा अर्थ असावा; आविः शब्दाची व्युत्पत्ति देतां येत नाहीं. चारु शब्द चर् धातूपासून; चारुः = चरणशीलः ( दुर्ग ) = चालणारा म्हणजे पसरणारा. चरति मनः अस्मिन् ( अमर ३।१।५२ क्षीरस्वामी ) = जिच्यावर मन जातें म्हणजें बसतें ती वस्तु चारु म्हणजे रमणीय सोमः चारुर्मदाय पीतये (४।४९।२), मदस्य चारुणः ( ८।५।१४ ), अमृतस्य चारुणः

(९।७०।२), पिबा त्वस्य सुषुतस्य चारोः (३।५०।२) एथें चारु हें सोम याचें विशेषण आहे; तेव्हां त्याचा अर्थ गोड असाच असला पाहिजे. जेव्हां चारु अग्नीचें विशेषण असतें तेव्हां प्रिय असा अर्थ. इंद्र० पितेव चारुः सुहवो वयोधाः (३।४९।३); इंद्र बापाप्रमाणें चारु; एथें व इतरत्र कांहीं ठिकाणीं चारु शब्दाचे प्रिय व धनदाता असे दोन अर्थ असावेत. चारु शब्दाची व्युत्पत्ति देणें अशक्य आहे. ग्रीक खारेस् (Khareis) = गोड, रमणीय; Latin कार्मेन् (Carmen) = गान.

**जिह्मं जिहीतेः । ऊर्ध्वः उच्छ्रितो भवति । स्वयशाः आत्मयशाः । उपस्थे उपस्थाने**

'हा' जाणें या धातूपासून जिह्म; जिहीते जहाति वा जिह्मं (अमर ३।१।७१ क्षीरस्वामी); जिह्म शब्दाची व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. जिह्मानां कुटिलचेतसाम् अपि मनुष्याणाम् अवैषम्येण ऊर्ध्वमेवज्वलति। कुटिलानाम् अपि इन्धनानां कुटिलः इति केचित् (दुर्ग) = मनुष्य कितीहि दुष्ट असला तरी अग्नि भेदभाव न करितां वरचेवरच ज्वाला उभारतो, त्या खालीं करीत नाहीं म्हणजे अग्नि विझत नाहीं; कित्येकांच्या मतें जिह्म म्हणजे वांकडींतिकडीं लाकडें; तीं जाळण्याकरितां अग्नीचीही वांकडींतिकडी गति होते. जिह्म = कुटिल (अमर ३।१।७१). अपां नपादा ह्यस्थादुपस्थं जिह्मानामूर्ध्वो विद्युतं वसानः। तस्य ज्येष्ठं महिमानं वहन्तीर्हिरण्यवर्णाः परि यन्ति यह्वीः (२।३५।९) = विद्युत प्रकाश पांघरणारा, जलदेवतांचा (अपां = जिह्मानां) पुत्र त्यांच्या मांडीवर बसला; त्याचा श्रेष्ठ महिमा म्हणजे अतीशय तेज आपल्याबरोबर वाहून नेणाऱ्या व सोन्यासारख्या प्रकाशणाऱ्या सूच्या मुली म्हणजे जलदेवता भराभर समुद्राकडे गमन करितात; येथें जिह्मानां हें अपांचें विशेषण असेल किंवा तदर्थक पर्याय असेल. परावतं नासत्यानुदेथामुच्चाबुध्नं चक्रथुर्जिह्मबारम्। क्षरन्नापो न पायनाय राये सहस्राय तृष्यते गोतमस्य (१।११६।९) = हे नासत्यानो, द्युलोकाकडे तुम्हीं मेघाला ढकललेंत व त्याचा तळ वर केलात (म्हणजे मेघाचें तोंड खालीं केलेंत; त्याबरोबर) ताहनेनें व्याकूळ झालेल्या गौतमाला पाणी पाजण्याकरितां जलदेवता विलंब न करता वाहूं लागल्या; जिह्मम् उदकं वारयति असौ जिह्मबारः = पाणी अडविणारा मेघ. जिह्मं नुनुद्रेऽवतं तया दिशासिञ्चन्नुत्सं गोतमाय तृष्णजे। आ गच्छन्तीमवसा चित्रभानवः कामं विप्रस्य तर्पयन्त धामभिः (१।८५।११) = मरुत् मेघाला त्या दिशेनें म्हणजे वरती ढकलिते झाले व तृष्णेनें व्याकूळ झालेल्या गौतमाकरितां त्यांनीं जल खालीं सोडलें; त्या विप्राच्या इच्छा आपल्या शक्तींनीं तृप्त करणाऱ्या व विलक्षण तेजानें युक्त अशा जलदेवता रक्षण करणारें पाणी घेऊन त्याच्याकडे जातात; एथें जिह्मं = अवतं = उत्सं = जलानें डुबडुबलेला मेघ. जिह्मश्ये चरितवे मघोनि आभोगय इष्टये राय उ त्वं (१।११३।५) = हे उषे गौतमाला धनदानासाठीं समर्थ करण्याकरितां तूं धन दिलेस; जिह्मश्ये = चरितवे = धनं दातुं = धन देण्यासाठीं.

जिह्मश्ये हें जिह्मशी ह्याचें चतुर्थीचें एकवचन; जिह्मं वक्रं शयानाय पुरुषाय चरितव चरितुं शयनात् उत्थाय स्वापेक्षितं प्रति गंतुं व्युच्छंती भवति (सायण) = अंथरुणावर वांकडे तिकडे निजलेल्या गोतमाला इष्ट देशाकडे जाण्यास समर्थ करण्याकरितां उगवणारी उषा वगैरे. शी हें उत्तर पद स्योनशी व तल्पशीवरी ह्यांतही आहे; वयोधाः० स्योनशीः अतिथिः (१।७३।१); यदा वीरस्य रेवतो दुरोणे स्योनशीरतिथिराचिकेतत्। सुप्रीतो अग्निः सुधितो दम आ स विशे दाति वार्यमियत्यै (७।४२।४) = जेव्हां श्रीमंत भक्ताच्या घरीं धनदाता अग्नि धन टाकतो तेव्हां तो विपुल धन देतो; वयोधाः = स्योनशीः = धन देणारा; वयः = स्योन = धन; धा = शी = देणें; जिह्मशीः = वयोधाः = स्योनशीः = धनदाता. शी देणें ह्याची शिशीते, शिशीत, शिशीतं, शिशीतां, शिशीहि अशीं रुपें ऋग्वेदांत आढळतात; शी देणें हा अर्थ पुष्कळ ऋचांत असतो; निजणें व धार देणें असेही त्याचे अर्थ आहेत. वरील सर्व उदाहरणांवरून जिह्म ह्याचा अर्थ धन असा असावा; गोतमाला खरोखर पाण्याची तहान लागली नसून धनाची तहान लागली होती; तथापि जिह्म म्हणजे जल असा मुख्य अर्थ असावा. उर्ध्वः = उ + उ + र् + ध् + वः; उ + उ = उत्; र् + ध् = श्रि; वः = तः; उर्ध्व शब्द उत् + श्रि (वर जाणें किंवा असणें) ह्यापासून. उर्ध्व शब्द अमरांत नाहीं. स्वयशाः = आत्मयशाः = ज्याचें यश स्वतःवर अवलंबून असतें असा, आपल्या सामर्थ्यानें यश संपादन करणारा; पण यशस् ह्याचा अर्थ बल असाही आहे तेव्हां स्वयशाः = बलयुक्त, बलिष्ठ. उपस्थे = उपस्थाने = समीप; पण उपस्थ = (१) मांडी (२) योनि (३) गर्भाशय असे खरोखर अर्थ आहेत.

**उभे त्वष्टुः बिभ्यतुः जायमानात्। प्रतीची सिंहं प्रति जोषयेते। द्यावापृथिव्यौ इति वा। अहोरात्रे इति वा। अरणी इति वा। प्रत्यक्ते सिंहं सहनं प्रत्यासेवेते**

उभे = दोघीजणी; ह्या दोघीजणी कोण? द्यू व पृथिवी असतील; हा अग्नि आपणाला जाळून टाकील म्हणून द्यू व पृथिवी भितात; किंवा उभे म्हणजे दिवस व रात्र; एकदां अग्नि पेटला व पुन्हा विझला नाहीं म्हणजे त्याचा प्रकाश पसरला तर दिवस आणि रात्र हा भेद राहणारच नाहीं; आपण मरणार, नाहींशा होणार अशी दिवस व रात्र ह्यांना भीति वाटते; किंवा उभे म्हणजे दोन अरणी; अरणी घासून अग्नि उत्पन्न होतो; पण अग्नीची ज्वाला इतकी प्रखर असते कीं आपल्याला तो जाळून टाकील अशी त्यांना भीति वाटते. अह्ना सहिता रात्रिः अहारोत्रः असा हा शब्द पुल्लिंगी आहे; अहोरात्रौ इमौ पुण्यौ व ते अहोरात्राः पचदश अशीं पुल्लिंगाचीं उदाहरणें क्षीरस्वामी देतो; रात्राह्नाहाः पुंसि (पा० २।४।२९) ह्या सूत्रानें रात्र शब्द द्वन्द्व व तत्पुरुष ह्या समासांच्या शेवटीं असल्यास सर्व समास पुल्लिंगी असतो; यास्ककालीं अहोरात्रा किंवा अहोरात्रं असा समास असून त्याचें अहोरात्रे हें

द्विवचन असेल; एथें द्यावापृथिवी व अरणी हे शब्द स्त्रीलिंगी असल्यामुळें अहोरात्रे हाही स्त्रीलिंगी असेल. प्रतीची = प्रत्यक्ते = प्रति + अक्ते = ( अग्नी ) कडे गेलेल्या; हा आपल्याला जाळून टाकणारच, सुटका करून घेण्याचा दुसरा मार्ग नाहीं असें जाणून त्या त्याच्याकडे आसरा मागण्यासाठीं जातात. दुर्ग प्रतीची प्रत्यञ्चिते असें म्हणतो; प्रत्यक्ते असें म्हणत नाहीं; कारण अक्त ह्याचा अर्थ तूप, तेल वगैरेंनीं लड-बडलेले असा अर्वाचीन संस्कृतांत आहे; गेलेलें ह्या अर्थी अञ्चितच पाहिजे. प्रतीची हे प्रत्यच् ह्याचें स्त्रीलिंग; अच् म्हणजे अञ्च् = जाणें; पूर्वीच्या उपसर्गाच्या अंतीं जो स्वर असेल तो अञ्च् ह्यांतील अ च्या जागीं येतो; जसेः— प्रतीची, अनूची. जोष-येते = आसेवेते = पूर्णपणें सेवा करतात; कोणाची सेवा करितात ? सिंव्हं = सिंव्हा-सारखा भयंकर जो अग्नि त्याची. सिंव्हं = स् + इ + न् + ह +म् ; इ =अ; न् = न; स + ह + न + म्; सिंह शब्द सह् ( = तुटून पडणें, पराजय करणें ) ह्यापासून. अग्नीला सिंह दुसरें ठिकाणींही म्हटलें आहे; जसे :- अप्सु सिंहमिव श्रितं ( ३।९।४ ); एथें दडून बसलेल्या सिंहाची उपमा पाण्यांत दडून बसलेल्या अग्नीला दिली आहे. ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थः— गमन करणारा ( चारुः ) व प्रकाश पसरणारा ( आविष्ट्यः ) अग्नि त्या त्या यज्ञक्रियांत किंवा लोकांत ( आसु ) वाढतो ( वर्धते ); मनुष्य कितीही कुटिल असला ( जिह्मानां ) तरी इतरांच्या प्रमाणें त्यांच्याही समीप ( उपस्थे ) तो वर जातो ( उर्ध्वः भवति ); किंवा जळण कितीही वांकडें तिकडें असलें तरी तो त्याच्यावर असतो म्हणजे तें ज्वालांनीं जाळून टाकतो; ही त्याची कृति पाहून दोघीही ( उभे ) जन्म पावणाऱ्या ( जायमाना ) त्वष्ट्याला ( त्वष्टुः ) भितात ( बिभ्यतुः ) व त्याच्याकडे तोंडें करून ( प्रतीची ) त्या सिंहाकडे ( सिंहं प्रति ) सेवा करण्यास जातात ( जोषयेते ). ह्या ऋचेच्या आधींच्या ऋचेंत अग्नि हा जलदेवतांच्या उदरांत गर्भरूपानें असतो असें म्हटलें आहे; तेव्हां एथें आसु = अप्सु; सुंदर किंवा रमणीय (चारुः) प्रकट होऊन (आविष्ट्यः) त्या जलदेवतांच्या उदरांत तो वाढतो व नंतर त्या जलदेवतांच्या ( जिह्मानां ) मांडीवर ( उपस्थे ) उठून बसलेला असतो ( उर्ध्वो भवति ); दोन्ही आया ( उभे ) जन्मणाऱ्या ( जायमानात् ) त्वष्टा म्हणजे अग्नि ह्याला भितात (बिभ्यतुः); (कारण अग्नि त्यांच्यावर सारखा जळत राहतो); त्या तेजानें दीप्तिमान झालेल्या ( प्रतीची )त्या सिंव्हाला खूप करितात ( प्रति जोषयेते ) असा अर्थ असावा. अग्नीला द्विमाता ( १।३१।२ आणि ३।५५।६ व ७ ) असें म्हटलें आहे; माता, नद्या वगैरे दोन असल्या तरी त्यांचा बहुवचनानें निर्देश केला जातो; ३।३३ ह्या सूक्तांत विपाट् व शुतुद्री ह्या नद्या दोनच असूनही त्यांना स्वसारः असें म्हटलें आहे व अशा वेळीं बहुवचनीं क्रियारूप वापरलें आहे. अग्नीला जशी नाना ऋत्विजांचीं नांवें दिलीं असतात तसें त्याला त्वष्टा असेंही म्हटलें आहे; तें केवळ रूपक होय; तेवढ्यानें त्वष्टा म्हणजे अग्नि असें सिद्ध होत नाहीं.

## खंड १६ वा.

**वनस्पतिः ( १२ ) व्याख्यातः ( निरु० ८।३ )। तस्य एषा भवति**

## खंड १७ वा.

**उपावसृज त्मन्या समञ्जन्देवानां पाथ ऋतुथा हवींषि।**
**वनस्पतिः शमिता देवो अग्निः स्वदन्तु हव्यं मधुना घृतेन ( ऋ० सं० १०।११०। १० ).**

**उपावसृज आत्मना आत्मानं समञ्जन् देवानाम् अन्नम् ऋतौ ऋतौ हवींषि काले काले**

त्मन्या ( = त्मना ) = आत्मना. आत्मानं अध्याहृत. पाथः = अन्नं; पा ( = पिणें ) + थस् ( निरु० ६।७ ); हें अन्न म्हणजे सोमरस; ऋतुथ: = ऋतौ ऋतौ = काले काले = सर्व ऋतूंत, सर्व काळीं.

**वनस्पतिः शमिता देवः अग्निः इति एते त्रयः स्वदयन्तु हव्यं मधुना च घृतेन च**

दोन च व इति त्रयः अध्याहृत.

**तत् कः वनस्पतिः। यूपः इति कात्थक्यः। अग्निः इति शाकपूणिः। तस्य एषा अपरा भवति**

आतां वनस्पती कोण? कात्थक्याच्या मतें यूप; शाकपूणीच्या मतें अग्नि. दुर्गवृत्तींत अग्निः इति शाकपूणिः नाहीं. यद्यपि एतस्य आत्मना आविष्कृतः अग्नेः विशेषः आप्रियां तथापि इयम् अपरा यूपाञ्जनीया ऋक् या संनिपत्य यूपाञ्जने यूपम् अभिधानेन संस्करोति (दुर्ग) = जरी आप्रीसूक्तांत प्रत्येक देवता ही अग्नीचेंच एक विशेष रूप होय तथापि यूपाला घृत लावण्याचा जो विधि त्यांत वनस्पति म्हणजे यूप यालाच उद्देशून पुढील ऋचा होय; तेव्हां प्रस्तुत ऋचेंतही वनस्पति म्हणजे यूप. दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थ :— हे यूपा ( वनस्पते ), पशुरूप अन्न कवटाळून ( उप = उपाश्लिष्य ) व स्वतः ( आत्मना ) ह्या पशूंच्या आत्म्याला ( आत्मानं ) योग्य संस्कारानें प्रकट करून ( समञ्जन् ) योग्य योग्य कालीं ( ऋतुथ: ) तें देवांचे ( देवानां ) पशुरूप अन्न ( पाथः ) व आज्यादि हवि ( हवींषि ) देवांना दे ( अवसृज ); वनस्पति, शमिता व देव अग्नि हे तिघे ( इति त्रयः ) हें अन्न ( हव्यं ) जलप्रोक्षण करून ( मधुना ) व घृतानें संस्कृत करून मधुर करोत.

मधु व घृत हे वेगळे पदार्थ नसून एकच होत; एतद्वै देवानां मधु यत्घृतम् ( मैत्रा० सं० ३।९।३ ) = देवांचा मध म्हणजे घृतच; मधुना दैव्येन ( खंड १८ ) = देवांच्या मधानें म्हणजे घृतानें; देवस्त्वा सविता मध्वा अनक्तु इति अनक्ति ( मैत्रा० सं० ३।९।३ ) = सविता देव तुला मधानें म्हणजे घृतानें लिंपन करो असें म्हणून यूपाला घृत लावतो.

## खंड १८ वा.

**अञ्जन्ति त्वामध्वरे देवयन्तो वनस्पते मधुना दैव्येन।**

**यदूर्ध्वस्तिष्ठा द्रविणेह धत्ताद्यद्वा क्षयो मातुरस्या उपस्थे ( मैत्रा० सं० ३।८।१ )**

**अञ्जन्ति त्वाम् अध्वरे देवान् कामयमानाः वनस्पते मधुना दैव्येन च घृतेन च**

देवयन्तः = देवान् कामयमानाः = देवांची इच्छा करणारे, देवांचे भक्त. मधुना दैव्येन=मधुना दैव्येन च घृतेन च=देवांच्या मधानें व घृतानें; मधुना दैव्येन = संस्कृतेन घृतेन ( दुर्ग ) = मंत्रानें संस्कृत केलेल्या घृतानें; दोन्ही च अध्याहृत आहेत पण त्यांची जरूरी नाहीं; कारण मधु व घृत एकच ( पान ६२८ ओळ३० ) तेव्हां दोन्ही च प्रक्षिप्त होत.

**यत् ऊर्ध्वः स्थास्यसि द्रविणानि च नः दास्यसि। यद्वा ते कृतः क्षयः मातुः अस्याः उपस्थे उपस्थाने**

तिष्ठाः = स्थास्यसि = उभा राहशील. द्रविणा = द्रविणानि = धन. च व नः अध्याहृत. इह कां गाळलें तें समजत नाहीं. धत्तात् = दास्यसि = देशील. उपस्थे = उपस्थाने = जवळ; दुर्गवृत्तींत उपस्थाने नाहीं. उपस्थे = उपरी = वर असें तो म्हणतो; उपस्थे = उपस्थाने असें यास्क नेहमीं म्हणतो; पण जवळ हा अर्थ एथें कसा लागेल ? ह्या आईच्या म्हणजे पृथिवीच्या जवळ यूप उभारीत नाहींत; तो पृथिवीवरच उभारला पाहिजे व उभारतात; दुर्गाच्या निरुक्तपाठांत उपस्थाने हा शब्द असेल पण तो एथें लागू पडत नाहीं म्हणून त्यानें तो शब्द वृत्तींत गाळला असेल. यद्वा = यस्मात् च ( दुर्ग ); तो म्हणतोः— यस्मात् च ते क्षयः मातुः अस्याः पृथिव्याः उपस्थे उपरि। क्षयो निवासः स्थैर्यार्थम् अवटः तस्मात् अवश्यम् ऊर्ध्वः स्थास्यसि = ( घृताचा लेप दिल्यावर तूं उभा राहशील म्हणजे ऋत्विज् तुला उभा करतील हें क्रमप्राप्तच आहे; तथापि ) ज्या अर्थी ह्या मातेच्या वर म्हणजे भुईंत खणलेल्या खडयांत तूं स्थिर उभा राहावा म्हणून तुझा क्षय म्हणजे निवास आहे त्या अर्थी तूं उभा राहिलाच पाहिजेस; असें विवरण करण्याचें कारण दुर्गाला यूप उभा करण्याचीं दोन कारणें दाखवावयाचीं होतीं; एक घृतांजन झाल्यावर यूप उभा केलाच पाहिजे हें व दुसरें त्यानें डळमळूं नये म्हणून त्याचा खालचा कांहीं भाग गाडला पाहिजे हें; पण अशीं दोन कारणें ऋचेंत व यास्कभाष्यांत नाहींत; जेव्हां तूं वर उभा राहशील किंवा जेव्हां तुझा निवास पृथिवीच्या उपस्थांत होईल तेंव्हा आम्हांला धन दे असा शब्दांवरून ऋचेचा अर्थ दिसतो. खडयांत घातल्याशिवाय यूप कसा उभा राहील ? उभा राहणें ह्यांतच कांहीं भाग खडयांत पुरलाच पाहिजे हें गृहीत; त्याचा निराळा निर्देश करावयास नको; वास्तविक वा शब्द कां घातला हें कळत नाहीं; वा = च असा अर्थ दुर्ग करतो त्याचें कारण एथें विकल्पाची जरूरी नाहीं हें; जर यूप खड्यांत जाईल म्हणजे त्याचा

खालचा भाग खड्ड्यांत पुरला असेल तरच तो स्थिर उभा राहील. तूं उभा राहशील व तूं आपल्या आईच्या मांडीवर निवास करशील ह्या दोहोंचाही अर्थ एकच असेल; आईच्या मांडीवर असल्याखेरीज यूप उभा राहणारच नाहीं; उभें राहणें तें पृथिवीतलावरच; वा शब्दानें विकल्प दाखविला नसून दोन्ही क्रिया एकच असें दर्शविलें असावें; कारण यूप जर सबंधच्या सबंध पृथिवीच्या उदरांत (उपस्थे) वास करूं लागला म्हणजे गाडला गेला तर यज्ञाची समाप्ति कशी होणार ? पण वा शब्द सार्थक असावा असेंही वाटतें. यास्कानें क्षयः = ते कृतः क्षयः = तूं केलेला निवास असा अर्थ केला आहे; पण तिष्ठाः प्रमाणें क्षयः हेंही क्रियापद असावें; क्षयः = क्षेस्यसि = राहशील. जेव्हां तूं उभा राहशील किंवा जेव्हां तूं आईच्या मांडीवर असशील तेव्हां म्हणजे तूं कोणत्याही स्थितींत असलास तरी आम्हांस धन दे; घृताञ्जनाचे वेळीं यूप जमिनीवर पडलेला असतो; असें पडणें भूमातेच्या मांडीवरच पडून राहणें होय; ही झाली पहिली स्थिति; नंतर यूप उभा केला जातो ही दुसरी स्थिति. धत्तात् = धेहि; तुह्योस्तातङ्ङाशिष्यन्यतरस्याम् (पा० ७।१।३५) = आज्ञार्थी तु व हि ह्या प्रत्ययांच्या बद्दल तात् हा प्रत्यय विकल्पानें लावला असतो. क्षयः हें नाम जरी धरलें तरी अर्थ हाच.

**अग्निः इति शाकपूणिः। तस्य एषा अपरा भवति**

वनस्पति म्हणजे अग्नि असें शाकपूणि म्हणतो; तसें म्हणण्याचें कारण उपावसृज (= दे) हें क्रियापद; देवांकडे हवि नेऊन देणें हें अग्नीचें काम; तें वनस्पति म्हणजे यूप कसा करील ? ऋचेचा अग्निपर अर्थः—हे वनस्पति अग्नि, जेव्हां तूं आपल्या ज्वालांनीं उभा राहशील म्हणजे आपल्या ज्वाला वर वर फेकशील व उत्तरवेदीवर ज्यावेळीं तूं वसति करशील त्यावेळीं आमच्या यज्ञाची सिद्धि करून आम्हांला धन देशीलच देशील; म्हणून देवभक्त घृतानें आधार करून व हवि देऊन तुला मदवितात; हा अर्थ ओढाताणींचा आहे हें स्पष्ट आहे.

## खंड १९ वा.

**देवेभ्यो वनस्पते हवींषि हिरण्यपर्ण प्रदिवस्ते अर्थम्।**

**प्रदक्षिणिद्रशनया नियूय ऋतस्य वक्षि पथिभी रजिष्ठैः (मैत्रा० सं० ४।१३।७)**

**देवेभ्यः वनस्पते हवींषि हिरण्यपर्ण ऋतपर्ण। अपि वा उपमार्थे स्यात्। हिरण्यवर्णपर्ण**

हिरण्यपर्ण = ऋतपर्ण = यज्ञ म्हणजे यज्ञाचीं सर्व अंगें हीं पर्ण म्हणजे पानें आहेत ज्याची अशा (हे यूपा); यूप हा वृक्ष; यज्ञांत अथ पासून इति पर्यंत जें जें कांहीं केलें जातें तें सर्व ह्या यूप वृक्षाचें पान; सर्व कर्मांगरूपपर्णांनीं यूपवृक्ष आच्छादित असतो; ऋत (= यज्ञ) हा अर्थ हिरण्य शब्दांतून कसा निघतो तें समजत नाहीं.

किंवा हिरण्यपर्ण = हिरण्यवर्णपर्ण = सोन्याच्या रंगाचीं पानें आहेत ज्याला अशा; हिरण्यपर्ण ह्यांत रूपक नसून उपमा असेल. दुर्गवृत्तींत हिरण्यपर्ण ऋतपर्ण० हिरण्यवर्णपर्ण नाहीं; हिरण्योपमपर्णज्वलित (= सोन्याच्या रंगाच्या पानांनीं प्रज्वलित झालेल्या ) एवढेंच आहे.

**प्रदिवः ते अर्थम् । पुराणः ते सः अर्थः यं ते प्रब्रूमः**

प्रदिवः = पुराणः = पुरातन कालापासून चालत आलेला. अर्थं = अर्थः = काम. कोणतें काम ? जें तुला आम्ही सांगणार आहों तें. यं ते प्रब्रूमः हे शब्द अध्याहृत आहेत व ते दुर्गवृत्तींत नाहींत; पण चिरंतनमेव ते अर्थ हविर्वहनाधिकारलक्षणं विद्मः (=देवांकडे हवि नेणें हें पुरातनकालापासून चालत आलेलें तुझें काम आहे असें मंत्रावरून आम्ही जाणतों ) असें आहे; कदाचित् प्रब्रूमः बद्दल विद्मः असा दुर्गाचा पाठ असेल; यं ते विद्मः हा निरुक्तपाठ न देतां त्याचा त्यानें विस्तृतपणें वर लिहिलेला अर्थ दिला असेल. प्रदिवः हें ऋग्वेदांत क्रियाविशेषण आहे; प्रदिवः = नेहमीं. अर्थ शब्द एक दोन अपवाद खेरीजकरून ऋग्वेदांत नपुसकलिंगी असून त्याचा अर्थ जाण्याचें ठिकाण असा आहे. प्रदिवः ते अर्थं=नेहमीं तूं जाण्याचें जें ठिकाण तिकडे.

**यज्ञस्य वह पथिभिः रजिष्ठैः ऋजुतमैः । रजस्वलतमैः । प्रपिष्टतमैः इति वा । तस्य एषा अपरा भवति**

ऋतस्य = यज्ञस्य. वक्षि = वह. पथिभी रजिष्ठैः = पथिभिः रजिष्ठैः; रजिष्ठैः = ऋजुतमैः = अतीशय सरळ अशांनीं; ऋजु, रजीयस्, रजिष्ठ; किंवा रजिष्ठैः = रजस्वलतमैः = प्रपिष्टतमैः = सारखे तुडविल्यामुळें पिठानें म्हणजे धुळीनें अतीशय भरले त्यांनीं; ज्या रस्त्यावर वाहतुक अतीशय असते तेथें धूळ अतोनात सांचते; असे रस्ते सुरक्षित असतात तेव्हां रजिष्ठैः = अतिशय सुरक्षित अशांनीं. धूळ असा रजस् शब्दाचा अर्वाचीन अर्थ आहे; पण तो ऋग्वेदांत नसावा असें वाटतें; रजस् = धुळीनें भरलेला; रजस्, रजीयस्, रजिष्ठ. रजस्वलतमैः अत्यर्थं उदकवद्भिः । ते हि पथिकानां सुखाः । प्रपिष्टतमैः इति सुरूपतमैः प्रहततमरकैः यैः असंमोहः स्यात् गच्छतः तैः (दुर्ग)=रजस् म्हणजे पाणी; पाण्यानें अतिशय युक्त म्हणजे माणसांना व गुरांना जेथें वारंवार पाणी प्यावयास मिळतें अशा मार्गांनीं; किंवा रजिष्ठ म्हणजे प्रपिष्टतम म्हणजे अतिशय सुरेख; अशा सुरेख मार्गांत तम म्हणजे अंधकार नसल्यामुळें प्रवास करणारांचा गोंधळ होत नाहीं; प्रपिष्ट शब्द अमर किंवा आपटयांचा कोश यांत नाहीं; खंड २० ह्यांत पिष्टतमया ह्याला सुरूपतमया असा पर्याय भाष्यांत आहे; त्यावरून पिष्ट=सुरूप; पण यास्काला हा अर्थ कोठें सांपडला असेल तो असो. ऋचेचा यास्कानें केलेला अर्थः–हिरण्य म्हणजे यज्ञ; यज्ञांगें हीं पानें आहेत ज्याची अशा किंवा सोन्यासारखीं झळकणारीं पानें आहेत ज्याची अशा हे वनस्पति, डावीकडून उजवीकडे रशनेनें स्वतःला बांधून म्हणजे एकही हवि गळून पडणार नाहीं अशा काळजीनें यज्ञाच्या अतिशय सरळ अशा मार्गांनीं देवां-

कडे हवि ने; कारण हविर्वहनाचें काम हें पुरातन कालापासून तुझें आहे. ओझें वाहणारा दोरीनें ओझें आपल्या पाठीवर बांधतो त्याप्रमाणें अग्नि हवींचें ओझें दोरीनें घट्ट बांधून आपल्या पाठीवर घेतो कीं काय ? रशनेचे यूपाभोवतीं तीन विळखे डावीकडून उजवीकडे घातलेले असतात; व त्यांचा उपयोग पशूला यूपाशीं घट्ट बांधून ठेवणें हा असतो; तसा अर्थ असल्यास वनस्पति म्हणजे यूप; पण देवांकडे हवि नेण्याचें काम अग्नीचें असतें; लक्षणेनें कदाचित् त्याचा आरोप यूपावर केला जाईल. वनस्पति म्हणजे अग्नि असें दुर्ग म्हणतो; प्रस्तुत ऋचा अग्नीपर आहे असें तो १८ व्या खंडाच्या शेवटीं म्हणतो; परंतु वनस्पति म्हणजे यूप हा अर्थ सिद्ध करण्याकरितां १८ व १९ यांतील ऋचा यास्क देतो असें वाटतें. वनस्पति म्हणजे यूप अशा अर्थी पुढील आणखी एक ऋचा होय.

## खंड २० वा.

**वनस्पते रशनया नियूय पिष्टतमया वयुनानि विद्वान्।**

**वह देवत्रा दधिषो हवींषि प्र च दातारममृतेषु वोचः ( मैत्रा० सं० ४।१३।७ )**

**वनस्पते रशनया नियूय सुरूपतमया वयुनानि विद्वान् प्रज्ञानानि प्रजानन् वह देवान् यज्ञे दातुः हवींषि। प्रब्रूहि च दातारम् अमृतेषु देवेषु**

पिष्टतमया = सुरूपतमया = अतिशय सुरेख अशा ( दोरीनें ); पिश् = सजविणें; पिष्टा = सजविलेली; सुरूपतमया = अत्यर्थं दृढया ( दुर्ग ) = अतीशय मजबूत अशा ( दोरीनें ). वयुनानि = प्रज्ञानानि = आपल्या अधिकाराचें म्हणजे कर्तव्याचें ज्ञान; आपल्याला जें जें कांहीं करावयाचें तें. विद्वान् = प्रजानन् = पुरें जाणणारा; दुर्गवृत्तींत विद्वान् = जानानः. देवत्रा = देवान्. दधिषो हवींषि = यज्ञे दातुः हवींषि = यज्ञांत हवि देणाऱ्याचे हवि; दधिषः = दातुः; दुर्गवृत्तींत दधिषो बद्दल दधिषोः असें आहे; हल्लीं छापलेल्या मैत्रायणी संहितेंत दधिषो असाच पाठ आहे; तै० ब्रा० (३।६।१२।१ ) व काठ० सं० ( १८।२१ ) ह्यांत दधिषो असाच पाठ आहे व सायणाचार्य दधिषो = धारण कुशल = हवि धारण करण्याला कुशल असा अर्थ करितात; परंतु ज्याअर्थी भाष्यांत दातुः असा शब्द आहे त्याअर्थी यास्काचा दधिषोः असाच पाठ असावा; दधिषोः हें दधिषु ह्याचें षष्ठीचें एकवचन; धि ( = देणें ) ह्याचें अभ्यासानें दधि; दधि ह्याला सनन्त नामकारण प्रत्यय सु लाविल्यानें दधिषुः ( = देण्याची इच्छा करणारा ) असा शब्द बनला असावा; दधिषो हें त्या शब्दाचें संबुद्धीचें एकवचन; दधिषो = हे दात्या; दधिषः असा शब्द असल्यास तो कसा बनला असेल ? दधिषः हा पाठ चुकीचा आहे; दधिषो किंवा दधिषोः असा पाठ पाहिजे; मूळ पाठ दधिषोः; कालान्तरानें दधिषो असें त्याचें रूपांतर झालें असावें. प्र वोचः = प्रब्रूहि = मोठ्यानें सांग. अमृतेषु = देवेषु = देवांमध्यें म्हणजे देवांना; अमृतेषु हा शब्द भाष्यांत

घालण्याचें कांहीं कारण नाहीं. ऋग्वेद १०।७०।१० ह्यांत प्रस्तुत ऋचेंतील वनस्पते रशनया नियूय व विद्वान् एवढेंच शब्द आहेत; हे शब्द घेऊन मैत्रायणी संहितेनें त्यांच्या भरतीस इतर शब्द घालून नवीन ऋचा बनविली; काठक संहिता व तैत्तरीय ब्राह्मण ह्यांनीं ह्या नवीन बनविलेल्या ऋचेंतील नियूय शब्दाच्या ऐवजीं अभिधाय असा शब्द घातला. ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थ :-- हे वनस्पति अग्नि, आपल्या अधिकारांतले सर्व ज्ञान ( वयुनानि ) जाणणारा तूं आपल्या हातून हवि गळूं नयेत म्हणून स्वतःला पिळदार किंवा सुरेख अशा दोरीनें बांधून हवि देणाऱ्याचे ( दधिषोः ) यज्ञांतले हवि देवांना ( देवत्रा ) नेऊन पोचव व हवि देणाऱ्याचें नांव देवांमध्ये मोठ्यानें प्रसिद्ध कर. दधिषो असा पाठ घेतल्यास दधिषो = हे हवि देणाऱ्या असा अर्थ. दुर्ग म्हणतोः– यूपाला घृतानें लेप देतात असें ज्या ऋचेंत म्हटलें आहे त्या ऋचेवरून वनस्पति म्हणजे यूप असा अर्थ होतो असें मागें ( निरु० ८।१७ ) म्हटलें आहे; तथापि अग्नि हाच यूपावस्था धारण करतो; तेव्हां सरतेशेवटीं वनस्पति म्हणजे यूप म्हणजे अग्निच; ह्यास्तवच अग्नीला वनाचा रक्षक निरु० ८।३ मध्यें म्हटलें आहे. कात्थक्य म्हणतो त्याप्रमाणें वनस्पति जर यूप असेल तर अर्थ पुढीलप्रमाणें: — हे यूपा, पिळदार अशा दोरीचे आपल्या भोंवतीं तीन विळखे घेऊन देवांकडे हवि पोचव वगैरे वरीलप्रमाणेंच. मैत्रायणी संहितेंत ( ४।८।८ ) आहुति यूपामुळेंच स्वर्गलोकाकडे जातात असें म्हटलें आहे; यूप जर उभा केला नाहीं तर यज्ञपशु त्याला बांधला जाणार नाहीं व देवांना हवि मिळणार नाहींत; तेव्हां देवांना हवि पोहोचविण्यांत यूपाचेंही अंग आहेच.

वनस्पति म्हणजे यूप कीं अग्नि असा वाद पूर्वकाळीं जोरानें चालला असावा. ऋग्वेदांतील नऊ ऋचा व मैत्रायणी संहितेंतील तीन ऋचा अशा बारा ऋचांत वनस्पति शब्द आला आहे. ह्यांपैकीं ऋ० सं० १०।११०।१० व मैत्रा० सं० तील तीन ऋचा ह्या अध्यायांतील १७ ते २० खंडांत दिल्या आहेत; बाकीच्या पुढील प्रमाणें :— अव सृजा वनस्पते देव देवेभ्यो हविः। प्र दातुरस्तु चेतनम् ( १।१३।११ ) = हे देव वनस्पति, देवांना हवि नेऊन दे; हवि देणाऱ्याला धन मिळो. देवांना हवि देण्याचें काम अग्नीचें; तेव्हां वनस्पति म्हणजे अग्नि. अवसृजन्नुप त्मना देवान् यक्षि वनस्पते। अग्निर्हव्या सुषूदति देवो देवेषु मेधिरः ( १।१४२।११ ) = हे वनस्पति, स्वतः ( त्मना ) देवांकडे ( देवान् उप ) जाऊन त्यांना हवि दे ( यक्षि ); हवींनीं युक्त ( मेधिरः ) देव अग्नि देवांमध्ये म्हणजे देवांना देण्यासाठीं हवि गोड करतो. एथेंही वनस्पति म्हणजे अग्नि. उप त्मन्या वनस्पते पाथो देवेभ्यः सृज। अग्निर्हव्यानि सिष्वदत् (१।१८८।१०) = हे वनस्पति, स्वतः होऊन (त्मन्या) देवांना हवि ( पाथः ) दे ( उपसृज ); अग्नीनें हवि गोड केले आहेत. एथें वनस्पति व अग्नि हे एकच कीं भिन्न? हवि अग्नि गोड करतो असें म्हटलें आहे व तोच देवांना हवि नेऊन देतो; वाक्यभेदामुळें वनस्पति व हवि भिन्न असावेत असें वाटतें; पण त्याच्या विरुद्ध हवि

गोड करणें व ते देवांना नेऊन देणें हें होय; तेव्हां वनस्पति म्हणजे अग्नि असावा. वनस्पतिरवसृजन्नुप स्थादग्निर्हविः सूदयाति प्र धीभिः। त्रिधा समक्तं नयतु प्रजानन्देवेभ्यो दैव्यः शमितोप हव्यं ( २।३।१० ) = हवि नेणारा ( अवसृजन् ) वनस्पति देवांकडे ( उप ) जातो ( स्थात् ); अग्नि आपल्या कृतींनीं ( धीभिः ) हवि ( हविः ) अति ( प्र ) गोड करतो ( सूदयाति ); ज्ञाता ( प्रजानन् ) देवांचा ( दैव्यः ) शमिता तीनदां ( त्रिधा ) घृतानें सभोंवार लपटलेला ( समक्तं ) हवि ( हव्यं ) देवांकडे ( देवेभ्यः ) नेवो ( नयतु ). एथें वनस्पति देवांकडे हवि घेऊन जातो, अग्नि तो हवि गोड करतो व शमिता तो हवि देवांकडे नेतो असें म्हटलें आहे; तेव्हां हे तिघे भिन्न व्यक्ति होत असें वाटतें; पण हवि गोड करून देवांकडे नेणें हें अग्नीचेंच काम म्हणून वनस्पति, शमिता व अग्नि हे एकच. वनस्पतेऽव सृजोप देवानग्निर्हविः शमिता सूदयाति। सेदु होता सत्यतरो यजाति यथा देवानां जनिमानि वेद ( ३।४।१० व ७।२।१० ) = हे वनस्पति, देवांकडे ( देवान् उप ) हवि ने ( अव + सृज ); शमिता जो अग्नि तो हवि गोड करतो. एथें शमिता व अग्नि हे एकच; देवांकडे हवि नेणें अग्नीचेंच काम; तेव्हां वनस्पति व शमिता हीं अग्नीचींच नांवें. यत्र वेत्थ वनस्पते देवानां गुहा नामानि। तत्र हव्यानि गामय ( ५।५।१० )=हे वनस्पति, जेथें ( यत्र ) लपून असलेले ( गुहा ) देवांचे संघ ( देवानां नामानि ) तूं जाणतोस ( वेत्थ ) तेथें ( तत्र ) आमचे हवि ( हव्यानि ) जातील असें कर ( गायम ). इतर वनस्पति संबंधाच्या ऋचांहून ही ऋचा भाषेनें जरी भिन्न दिसते तरी तिचा अर्थ भिन्न नाहीं; देवांना जाणणें व त्यांच्याकडे हवि नेणें हें अग्नीचेंच काम; म्हणून वनस्पति म्हणजे अग्नि. वनस्पतिं पवमान मध्वा समङ्‌ग्धि धारया। सहस्र वल्शं हरितं भ्राजमानं हिरण्ययम् ( ९।५।१० ) = हे सोमा, सुवर्णमय ( हरितं = हिरण्ययं ) प्रकाशणाऱ्या ( भ्राजमानं ) हजारों वल्श ( वल्श = गांठी किंवा शाखा ? ) आहेत ज्याला अशा वनस्पतीला घृतानें ( मध्वा ) म्हणजे तुझ्या धारेनें ( धारया ) म्हणजे रसानें लेप दे ( समङ्‌ग्धि ). एथें वनस्पति म्हणजे यूप. वनस्पते रशनया नियूया देवानां पाथ उप वक्षि विद्वान्। स्वदाति देवः कृणवत् हवींषि अवतां द्यावापृथिवी हवं मे ( १०।७०।१० ) = हे वनस्पति, रशनेनें बांधून ( नियूय ) ज्ञाता ( विद्वान् ) तूं देवांचें अन्न त्यांना नेऊन दे ( उप वक्षि ); देव हवि गोड करतो ( स्वदाति ) व ते देवांना नेऊन देतो ( कृणवत् ); अहो द्यावापृथिवींनो, माझा हवि देवांना नेऊन द्या. एथें वनस्पति, देव व द्यावापृथिवी अशीं नांवें आहेत. हवि गोड करून ते देवांकडे नेणें हें अग्नीचें काम; पशूला दोरीनें यूपाशीं कोण बांधतो ? स्वतः यूप कीं अग्नि ? अग्नि बांधतो हें सयुक्तिक दिसतें; तेव्हां वनस्पति म्हणजे अग्नि. वनस्पति म्हणजे यूप; यूपाला पशु बांधतात; शमिता पशु मारतो; पशूचें भिन्न भिन्न अवयव हवि म्हणून अग्नींत टाकले जातात. परंतु अग्नि हाच शमिता असें एका ऋचेंत म्हटलें आहे; तेथें तें नांव लक्षणेनें दिलें असावें; शमित्याची ठार मारण्याची क्रिया अग्नि शेवटास नेतो. मूलतः ह्या तीन भिन्न व्यक्ति होत्या; परंतु कालान्तरानें कांहीं

ऋच्यांत त्या एकवटल्या गेल्या असाव्यात; कांहीं ऋचांत यूप व अग्नि ह्यांचे धर्म एकत्र केलेले आढळतात व त्यामुळें वनस्पति हा यूपही होऊं शकतो व अग्निही होऊं शकतो. ऋ० सं० १०।११०।१० ह्यांत वनस्पति, शमिता व अग्नि ह्या तीन भिन्न व्यक्ति आहेत; २।३।१० ह्यांत हीं तीनही नांवें आलीं आहेत व तेथेंही त्या तीन भिन्न व्यक्ति असाव्यात. ऋचा ३।४।१० त अग्नीला शमिता म्हटलें आहे व वनस्पति अग्नीहून भिन्न आहे. शमिता म्हणजे यज्ञपशु मारणारा.

**स्वाहा कृतयः (१३)। स्वाहा इति एतत् सु आह इति वा। स्वा वाक् आह इति वा। स्वं प्राह इति वा। सु आहुतं हविः जुहोति इति वा। तासाम् एषा भवति**

स्वाहाकृतिः = स्वाहा + कृतिः. स्वाहा = सु + आह; स्वाहा हें सु + आह असें असेल; ऋत्विज् घृत घेऊन ‘किंचित् आज्यस्य’ या मंत्रानें हें तुझें अस म्हणून प्रत्येक देवाला घृत अर्पण करतो; हें तो चांगलें (सु) म्हणतो (आह); किंचित् आज्यस्य = घृताचा थोडासा भाग. किंवा स्वाहा = स्वा + आह; स्वा = स्वा वाक्; तं स्वा वागभ्यवदत् जुहुधि इति तत् स्वाहाकारस्य जन्म (मै० सं० १।८।१) = प्रजापति हवि देऊं लागला तेव्हां त्याची वाणी हवि दे असें त्याला म्हणाली; हें स्वाहाकाराच्या जन्माचें कारण; (जर प्रजापतीची वाणी हवि दे असें म्हणाली नसती तर स्वाहाकार जन्मास आलाच नसता). किंवा स्वाहा = स्व + आह; स्व = स्वम्; आह = प्र + आह; याच्या आधींच्या व्युत्पत्तींत स्वा हा शब्द आह याचा कर्ता; पण प्रस्तुत व्युत्पत्तींत स्व हें आह याचें कर्म; व जोर किंवा उंच स्वर दाखविण्याकरतां आह ह्याला प्र (= प्रकर्षेण) हा उपसर्ग लाविला आहे; हवि देच असें प्रजापति स्वतःला उच्च स्वरानें किंवा जोरानें बोलला. किंवा स्वाहा = सु + आह; आह = आहुतम्; हविर्जुहोति हें अध्याहृत; जेव्हां ऋत्विज् हवि अर्पण करतो तेव्हां तो हवि स्वाहाकारामुळें उत्तम अर्पिलेला होतो. होता यक्षत् अग्निं स्वाहा आज्यस्य स्वाहा मेदसः स्वाहा स्तोकानां स्वाहा स्वाहाकृतीनां स्वाहा हव्यसूक्तीनाम्। स्वाहा देवान् आज्यपान् स्वाहा अग्निम्। होत्रात् जुषाणाः अग्ने आज्यस्य वियन्तु होतर्यज (तै० ब्रा० ३।६।२) = होता अग्नीला स्वाहाकारानें आज्यभाग, स्वाहाकारानें मेद, स्वाहाकारानें चरबीचे थेंब, स्वाहाकारानें स्वाहाकृति, स्वाहाकारानें हव्यस्तुति, स्वाहाकारानें घृत पिणाऱ्या देवांना, स्वाहाकारानें अग्नीला देऊन होता अग्नीचें यजन करो; हे अग्नि, होत्र नांवाच्या पात्रांतून दिल्या जाणाऱ्या आहुति देव खावोत; हे होत्या याज्या म्हण. अशा गद्य मंत्राला प्रैष म्हणतात; असे प्रैष म्हणजे आज्ञा मैत्रावरुण नांवाचा ऋत्विज् होत्याला करतो; प्रैष म्हटल्यानंतर होता सद्यो जातः वगैरे मंत्र म्हणतो; मैत्रावरुणानें आज्ञा केल्यावर म्हणणें येवढेंच होत्याचें काम; हवि देणें हें अध्वर्यूचें. प्रत्येक हवि देतांना व देवाचें नांव उच्चारतांना स्वाहा शब्द प्रस्तुत प्रैषांत घातला आहे. त्या स्वाहाकृतींसंबंधानें पुढील ऋचा होय. स्वाहा शब्दाच्या वर दिलेल्या व्युत्पत्ति कोणत्या ब्राह्मणांतून घेतल्या तें समजत नाहीं; मैत्रायणी संहिता १।८।१ व तै० ब्रा २।१।२ ह्यांत आह बद्दल अभ्यवदत् आहे व काठक

संहितेंत (६।१) ऐष्ट आहे. स्वाहा शब्दाच्या वर दिलेल्या व्युत्पत्ति केवळ काल्पनिक होत; खरी व्युत्पत्ति देणें कठीण किंबहुना अशक्य आहे. स्वाहा शब्दाचा अर्थ ठरवावयास पाहिजे. यांश्च देवा वावृधुर्ये च देवान् स्वाहान्ये स्वधयान्ये मदन्ति (१०।१४।३) = ज्यांना देव द्युलोकचें पेय देऊन आनंदित करतात व जे देवांना पृथिवीवरील पेय देऊन आनंदित करतात त्यांपैकीं पृथिवीवर असणारे स्वाहेनें आनंदित होतात; पण द्युलोकीं असणारे स्वधेनें आनंदित होतात; येथें स्वाहा व स्वधा हीं भिन्न पेयें होत; स्वाहा = सोमरस; स्वधा = अमृत. स्वधया हें जसें स्वधा याचें तृतीयेचें एकवचन तसें स्वाहा हें स्वाहया याबद्दल वापरलें असून तेंही तृतीयेचें एकवचन होय. स्वधा हें पात्र होतें असें पुढील ऋचांवरून दिसतें. इंद्र पिब स्वधया चित् सुतस्य अग्नेर्वा पाहि जिव्हया यजत्र (३।३५।१०) = इंद्रा, स्वधेनेंच सोम पी किंवा अग्नीच्या जिव्हेनें पी; एथें स्वधया म्हणजे जिव्हया नसून पात्रानें असा त्याचा अर्थ असावा. स्वधाभिर्या पिबतः सोम्यं मधु (८।१०।४) = जे तुम्ही मधासारखा गोड सोम भांड्यांनीं म्हणजे भांड्यामागून भांड्यानें पितां. यादि मे रारणः सुत० आरादुप स्वधा गहि (८।३२।६) = जर तुला मी काढलेल्या सोमरसांत म्हणजे सोमरस पिण्यांत आनंद वाटत असेल तर किती दूर असलास तरी आपलें पात्र घेऊन (स्वधा = स्वधया) इकडे ये (उप + आ + गहि). ह्या सर्व ऋचांत स्वधा म्हणजे पिण्याचें भांडें; तसें स्वाहा हेंही एक पात्र असावें. स्वधा शब्दाचा मूळ अर्थ स्वर्गांत पिण्याचें एक पेय; तें अमृत असेल. यदिंद्राग्नी उदिता सूर्यस्य मध्ये दिवः स्वधया मादयेथे। अतः परि वृषणावा हि यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य (१।१०८।१२) = हे इंद्राग्नि, जरी तुम्ही सूर्योदयाचे वेळीं द्युलोकीं अमृत पिऊन आनंदित झाला असाल तरी, हे बलिष्ठानो, तेथून खालीं या व आम्ही काढलेला सोमरस प्या. सोम स्वधेहून भिन्न असून तो स्वधेपेक्षां कमी मधुर आहे तरी तें पेय सोडून आमचा सोम पिण्यास या असें कवि म्हणतो. उभा राजाना स्वधया मदन्ता यमं पश्यामि वरुणं च देवम् (१०।१४।७) = हे मृता, राजे वरुण व यम या दोघां देवांना द्युलोकीं स्वधा पिऊन हृष्ट झालेले पाहशील; (पृथिवीवर सोमरस प्यावयास मिळतो; पण स्वर्गांत देव अमृत पितात; तें तुला पिण्यास सांपडेल). स्वधा च यत्र तृप्तिश्च तत्र माममृतं कृधि (९।११३।१०) = जेथें अमृत असतें व तें पिऊन पूर्ण समाधान होतें अशा त्या ठिकाणीं, हे सोमा, मला अमर कर; (देव द्युलोकीं अमृत पिऊन अमर होतात तेव्हां अमृत पिण्यानें मीही अमर होईन). स्वधा हें मूळचें अमृत; नंतर ज्या भांड्यांतून अमृत पितात तें भांडेंही स्वधा; स्वधा = अमृतानें भरलेलें भांडें. स्वाहा हें सोमरसाचें नांव असावें व ज्यांतून तो प्यायला जाई त्या पात्रालाही स्वाहा म्हणत असावेत. स्वाहा देवा अमृता मादयन्ताम् (३।४।११) = अमर देव स्वाहेनें म्हणजे सोमरसानें आनंदित होवोत. इंद्र स्वाहा ररिमा ते मदाय (३।३५।१) = हे इंद्रा, स्वाहेनें आम्ही सोम तुला आनंद व्हावा म्हणून देतों. इंद्र स्वाहा पिबतु यस्य सोमः (३।५०।१) = सोम हा ज्याचा एक-

त्याचाच तो इंद्र स्वाहेनें सोम पिवो; ह्या ऋचेंत स्वाहा हें एक पात्र असावें असें वाटतें; तेव्हां इतरत्रही पात्र असाच त्याचा अर्थ असावा. स्वाहाग्नये वरुणाय स्वाहेन्द्राय मरुद्भ्यः। स्वाहा देवेभ्यो हविः (५।५।११) = अग्नि, वरुण, इंद्र व मरुत् ह्या देवांना स्वाहेनें हवि दे. आ नो यातं० अश्विना सोमपीतये। स्वाहा (८।८।५) = हे अश्विनांनों, स्वाहेनें सोम पिण्यास या. स्वाहा यज्ञं कृणोतन इंद्राय (१।१३।१२), स्वाहा० हव्यम् इंद्राय कर्तन (१।१४२।१२), स्वाहा वयं कृणवामा हवींषि (१०।२।२) ह्या तीन ऋचांत कृ म्हणजे देणें; स्वाहेनें हवि (यज्ञम् = हव्यम् = हवींषि) द्या (कृणोतन = कर्तन); कृणवाम = आम्ही देतों. विश्वेदेवाः स्वाहाकृतिं पवमानस्य आगत (९।५।११) = अहो विश्वेदेवांनो, स्वाहेनें सोमाच्या देणगीला या; पवमानस्य सोमस्य स्वाहया स्वाहा पात्रेण कृतिम् अर्पणम् = स्वाहापात्रानें सोम अर्पण करणें. स्वाहाकृतं हव्यम् (२।३।२), स्वाहाकृतं हविः (१०।११०।११), स्वाहाकृतानि हव्यानि (१।१४२।१३) ह्या सर्व ठिकाणीं स्वाहापात्रानें अर्पण केलेला (हवि). स्वाहा, स्वाहाकृति आणि स्वाहाकृत या शब्दांचें विवरण सायणाचार्य पुढीलप्रमाणें करतातः—१ स्वाहा० हव्यमिंद्राय कर्तन (१।४२।१२); स्वाहाकारं कुरुत। स्वाहाशब्दः हविःप्रदानवाची सन् एतन्नामकमग्निविशेषं लक्षयति। स्वाहा = अग्निसंपादितं (= अग्नीनें संपादन केलेला); असा हवि इंद्राला द्या; स्वाहा = हविर्दान; पण येथें स्वाहानामक विशिष्ट अग्नि; म्हणून स्वाहा हें यज्ञ चें विशेषण. २ स्वाहा प्रहुतं सोमम् (२।३६।१); स्वाहा = स्वाहाकारेण = स्वाहा या शब्दानें; अग्नि वगैरेंना जेव्हां हवि द्यावयाचा असतो तेव्हां अग्नयेस्वाहा (= अग्नीला हा हवि दिला आहे) असें म्हणतात. ३ स्वाहा देवा अमृता मादयन्ताम् (३।४।११); स्वाहा = स्वाहाकारेण युक्ताः; स्वाहा हें देवाः ह्याचें विशेषण; ज्यांच्या नांवापुढें स्वाहा शब्द घालतात असे देव; जसें:— अग्नयेस्वाहा; इंद्रायस्वाहा. ४ स्वाहा० कलशः (३।३२।१५) = स्वाहाकृतः कलशः = स्वाहाकारानें अर्पिलेला कलशांतील सोम; येथें स्वाहा हें कलशः ह्याचें विशेषण. ५ इंद्र स्वाहा ररिमा ते मदाय (३।३५।१); स्वाहा = स्वाहाकृतम् (सोमम्); ररिम = दद्मः = आम्ही देतों. ६ इंद्रः स्वाहा पिबतु (३।५०।१); स्वाहा वरीलप्रमाणें. ७ स्वाहा देवेभ्यो हविः (५।५।११); स्वाहा = स्वाहा करोमि = स्वाहुतं करोमि; येथें स्वाहा हें हविः याचें विशेषण; स्वाहा म्हणजे स्वाहाकृतिः म्हणजे स्तुति असेंही म्हटलें आहे; पण भाष्यांत स्वाहा म्हणजे स्तुति ह्याचा वाक्याशी काय संबंध तो सांगितला नाहीं. ८ स्वाहा अग्नये दाशेम (७।३।७); स्वाहा = स्वाहुतम् (हविः); येथें स्वाहा शब्द सु + आ + हु यापासून झाला आहे. ९ सोम्ये मधौ० स्वाहा मादयाध्वै (७।५९।६); स्वाहा = स्वाहाकारेण; पण स्वाहाकारेण ह्याचा अमक्या शब्दाशीं संबंध असें भाष्यांत सांगितलें नाहीं; स्वाहाकारेण दत्ते सोम्ये मधौ असा अन्वय करावयाचा असेल; म्हणजे स्वाहा हें मधौ याचें विशेषण. १० आ नो यातमश्विना अस्य सोमस्य पीतये। स्वाहा

( ८।८।५ ); स्वाहा = स्वाहाकारेण युक्तौ ( अश्विनौ ); स्वाहा हे अश्विनौ ह्याचें विशेषण. ११ आ याहि० स्वाहा सोमस्य पीतये ( ८।३४।१० ) ; पीतये तव पानार्थं सोमस्य सोमं स्वाहा करोमि; येथें आ याहि याचें स्वतंत्र वाक्य बनविलें आहे; त्यामुळें स्वाहा =स्वाहा करोमि असा अर्थ करावा लागला; १० मध्यें स्वाहा हें अश्विनौ याचें विशेषण केलें आहे व आयातम् याचें स्वतंत्र वाक्य केलें नाहीं; ह्यावरून १० व ११ ह्यांवरील भाष्यें भिन्न व्यक्तींनीं लिहिलीं असावींत. १२ आदू नु ते अनु क्रतुं स्वाहा वरस्य यज्यवः। अनूषत इंद्र गोत्रस्य दावने ( ८।६३।५ ); स्वाहा स्वाहादेव्याः वरस्य पतेः अग्नेः यज्यवः यष्टारः । त्वदर्थम् अग्नौ यागं कुर्वन्तः इत्यर्थः । त्वाम् अनूषत स्तुवन्ति गोत्रस्य धनस्य दावने दानाय = स्वाहा म्हणजे स्वाहादेवी; तिचा वर म्हणजे पति जो अग्नि त्याच्यांत तुझ्याकरितां हवि टाकणारे ऋत्विज् धनाकरतां तुझी स्तुति करतात; स्वाहा= स्वाहा नांवाची देवी; अग्नायी स्वाहा च हुतभुक्प्रिया ( अमर २।७।२१ ) = अग्नीच्या अग्नायी व स्वाहा अशा दोन बायका; ह्या आधारावर स्वाहा म्हणजे स्वाहा देवी असा अर्थ केला आहे; ऋचेंतील कांहीं शब्दांचा अन्वय व अर्थ करणें अशक्य आहे. वरील बारा उताऱ्यांपैकीं १२ व्यात स्वाहा=स्वाहादेवी; ११ व्यात स्वाहा=स्वाहा करोमि; बाकीच्यांत स्वाहा हें विशेषण. यास्क व सायण यांनीं स्वाहा शब्दाचे अर्थ ब्राह्मणग्रंथ, कोश व यज्ञांतील प्रयोग ह्यांवरून केले आहेत. स्वाहाकृति ह्याचा ऋग्वेदांतील अर्थ वर दिलाच आहे. ऋग्वेदांत स्वाहाकृति ह्या देवता नाहींत; स्वाहाकृतीर्यजति ऐत० ब्रा० ६।४ येथें स्वाहाकृतींना देवता मानल्या आहेत. अध्वर्युः संप्रेष्यति स्वाहाकृतिभ्यः प्रेष्य स्वाहाकृतिभ्य प्रेष्य इति ( आपस्तंब श्रौ० सू० ७।२०।४ ) = अध्वर्यु होत्याला स्वाहाकृतींसंबंधाची याज्या म्हणण्यास सांग अशी मैत्रावरुणाला आज्ञा करतो व मैत्रावरुण होत्याला याज्या म्हण म्हणून सांगतो; तेव्हां होता स्वाहाकृतींची ( स्वाहाकृतीः ) याज्या म्हणतो ( यजति ); ती याज्या म्हणजे पुढील खंडांतील सद्यो जातो ही ऋचा. स्वाहाकृति ह्या वास्तविक आहुति असून देवता मानल्या गेल्या.

## खंड २१ वा.

**सद्यो जातो व्यमिमीत यज्ञमग्निर्देवानामभवत्पुरोगाः।**
**अस्य होतुः प्रदिश्यृतस्य वाचि स्वाहाकृतं हविरदन्तु देवाः ( १०-११०-११ )**
**सद्यः जायमानः निरमिमीत यज्ञम् । अग्निः देवानाम् अभवत् पुरोगामी ।**
**अस्य होतुः प्रदिशि ऋतस्य वाचि आस्ये स्वाहाकृतं हविः अदन्तु देवाः**

जातः= जायमानः= जन्मत असतांनाच. व्यमिमीत = निरमिमीत = निर्माण करता झाला; वि = निर्. पुरोगाः= पुरोगामी = प्रधानदेव म्हणून देवांच्या आघाडीं जाणारा; अग्नि हा देवांचा सेनापति होता; पण अग्नि देवांना हवि भक्षणासाठीं द्युलोकांतून खालीं आणतो तेव्हां तो त्यांचा वाटाड्या असतो; हा अर्थ अधिक सयुक्तिक

दिसतो. प्रदिशि = प्र + दिशि; प्र = प्राच्याम्; प्रदिशि = प्रकृष्टायां पूर्वस्यां दिशि (सायण). ऋतस्य = गतस्य = पूर्वेकडे असलेल्या उत्तरवेदीकडे गेलेल्याच्या म्हणजे ऋत्विजांनीं त्या वेदीवर स्थापन केलेल्या अग्नीच्या; ऋ = जाणें; ऋतः= गतः; ऋतस्य = यज्ञसंपादकस्य अस्य होतुः अग्नेः (सायण); ऋत = यज्ञ = यज्ञसंपादक. वाचि = आस्ये = तोंडांत. ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थः— जो अग्नि जन्मल्याबरोबर यज्ञ निर्माण करता झाला व देवांचा सेनानायक झाला त्या देवांना बोलावणाऱ्या व पूर्वेकडे असलेल्या उत्तरवेदीकडे नेलेल्या अग्नीच्या तोंडांत स्वाहाकारानें अर्पण केलेला हवि स्वाहाकृति नांवाचे देव खावोत. प्रदिशि = प्रदिशा = विधिवाक्येन = विधिवाक्यानें. ऋतस्य वाचि = यज्ञस्य आस्ये = अग्नौ = यज्ञाचें मुख जो अग्नि त्यांत; असें प्रदिशि, ऋतस्य आणि वाचि या तीन शब्दांचे अर्थ असावेत. एथें स्वाहाकृतं शब्द आहे त्यांतूनच स्वाहाकृति शब्द काढावयाचा; जसा ईड्यः (खंड८पान६०९पहा) ह्यांतून इळ शब्द काढला त्याप्रमाणें.

**इतीमाः आप्रीदेवताः अनुक्रान्ताः**

ह्याप्रमाणें ह्या आप्रीदेवतांचें क्रमानें ऋचांच्या द्वारें व्याख्यान केलें.

**अथ किंदेवताः प्रयाजानुयाजाः। आग्नेयाः इत्येके**

आतां प्रयाज व अनुयाज ह्यांच्या देवता कोण? अग्नि असें कांहीं जण म्हणतात. प्रयाज हे पुष्कळ प्रकारचे आहेत; आप्री ह्या विशिष्ट प्रकारच्या याज्या म्हणजे प्रयाज होत; ह्या प्रयाजांचा विनियोग पशुइष्टीमध्ये होतो. देवता कोण हा प्रश्न आप्रीप्रयाजाबद्दलच नसून सर्व प्रयाजांच्याबद्दलचा आहे. निरनिराळ्या यज्ञांत निरनिराळे प्रयाज असतात; त्या सर्वांची देवता कोण असा विस्तृत प्रश्न आहे. दुर्गवृत्तींत किन्देवताः प्रयाजाः एवढेंच आहे व तोच पाठ बरोबर आहे.

## खंड २२ वा.

**प्रयाजान्मे अनुयाजांश्च केवलानूर्जस्वन्तं हविषो दत्त भागम्।**
**घृतं चापां पुरुषं चौषधीनामग्नेश्च दीर्घमायुरस्तु देवाः (१०।५१।८)॥**
**तव प्रयाजा अनुयाजाश्च केवला उर्जस्वन्तो हविषः सन्तु भागाः। तवाग्ने यज्ञोऽयमस्तु सर्वस्तुभ्यं नमन्तां प्रदिशश्चतस्रः (१०।५१)**

हे देवांनो, प्रयाज व अनुयाज हे सबंध (केवलान्) हवि, सर्व हवींचा पोषक (उर्जस्वन्तम्) भाग, पाण्यापासून निघालेलें घृत व ओषधींपासून निर्माण झालेला पुरुष मला द्या; मला दीर्घ आयुष्य असो (अशी मागणी अग्नि देवांजवळ करतो; त्याला ते पुढील उत्तर देतात); हे अग्नि, सबंध प्रयाज व अनुयाज हवि व सर्व हवींचे पोषक भाग तुला मिळतीलच; (इतकेंच नव्हे तर) हा सर्व यज्ञ तुझाच असेल; तुला चारही दिशा नमतील (म्हणजे सर्व दिशांतले प्राणी भक्ष्य म्हणून तुझे होतील). अग्नीचे तीन वडील भाऊ देवांकडे हवि नेण्याचें काम करीत असतांना

वषट्कारानें त्यांना कापून टाकलें; तेव्हां भीतीनें अग्नि कोठें तरी नाहिंसा झाला; त्यामुळें देवांना हवि मिळेनासा झाला; देव त्याच्या शोधार्थ गेले; त्यांनीं त्याला हुडकून काढले व आमच्याबरोबर चल असें ते त्याला म्हणाले; रुकार देण्याचें आधीं त्यानें पहिल्या ऋचेंत सांगितलेली मागणी केली; ती देवांनीं मान्य केली. ही कथा आधींच्या ऋचेंत सुरू होऊन नवव्या ऋचेंत ती संपविली आहे. अपां घृतम् = पाण्याचें घृत; गाई वगैरे पाणी पितात; पाणी दुधांत असतें; ह्या मिश्रणापासून दहि व दह्यापासून घृत. पुरुषम् ओषधीनाम् = ओषधींचा पुरुष; पुरुष व स्त्रिया ओषधि वगैरे अन्न खातात; अन्नापासून रेत उत्पन्न होतें; रेतापासून मनुष्य उत्पन्न होतो. पुरोडाश हा मनुष्यमांस भक्षणाचें एक स्मारक होय; पुरोडाशाचा आकार मनुष्याच्या डोकें, तोंड वगैरे सारखा असतो; माणसें खाण्याची चाल बंद पडून पिठाचा माणूस म्हणजे माणसाचें शिर खाण्याची चाल अस्तित्वांत आली. वरील दोन ऋचांवरून प्रयाज व अनुयाज ह्यांची देवता अग्नि हें सिद्ध होतें. त्रयो वै पूर्वे अग्नयः प्राधन्वन् हव्यं देवेभ्यो वहन्तः। वषट्कारः प्रावृश्चत्। अथ योऽयमिदानीं स भीषा अपाद्रवत्। ईदृक् सः आरिष्यति इति। तं देवाः अपाशासुः। उप नः आवर्तस्व इति। सोऽब्रवीत् भागो मे अस्तु इति। वृणीष्व इति अब्रुवन्। सोऽब्रवीत्। त्रयो मे पूर्वे भ्रातरः प्राधन्वन् हव्यं देवेभ्यो वहन्तः। वषट्कारः प्रावृश्चत्। तेषां भागः अस्तु इति। वृणीष्व इति अब्रुवन्। सोऽब्रवीत्। यदेव किंच आहुतं बहिष्परिधि स्कंदेत् तदेव तेषां भागधेयम् असत् इति। तेषां वै एतत् भागधेयम्। अथ उपावर्त्स्यामि इति। ते वै अन्वायन् (मैत्रा० सं० ३।८।६) = देवांकडे हवि नेणारे पूर्व काळचे तीन अग्नि दमले; वषट्कार त्यांना कापून टाकता झाला; आतां जो एक उरला तो असाच मी मारला जाईन अशा भीतीनें पळूं लागला; आमच्याकडे परत ये असें देव त्याला म्हणाले; मला यज्ञाचा भाग मिळावा असें तो म्हणाला; माग असें ते म्हणाले; तो म्हणाला देवांकडे हवि नेणारे माझे तीन भाऊ थकले; वषट्कार त्यांना कापून टाकतां झाला; त्यांना भाग मिळो, माग असें ते म्हणाले; तो म्हणाला परिधीच्या बाहेर आहुतींचा जो भाग गळेल तो त्यांना मिळो; तो त्यांचा भाग; असें कराल तर मी परत येईन. वषट्कारेण वृक्णेषु भ्रातृषु। अपचक्राम देवेभ्यः सौचीकोऽग्निरिति श्रुतिः। स ऋतुषु अप्सु वनस्पतिषु निलीनः अभवत्। अग्न्यभावे असुराः प्रादुर्बभूवुः। असुरान् हत्वा देवाः अग्निम् अन्ववैक्षन्त। हविर्वह इति ते तम् ऊचुः। स वरान् अवृणोत्। आयुरस्तु च मे दीर्घं हवींषि विविधानि च। अरिष्टिः पूर्वजानां च भ्रातॄणाम् अध्वरेऽध्वरे। प्रयाजाश्चानुयाजाश्च घृतं सोमे च यः पशुः। मद्देवत्यानि वै सन्तु यज्ञो मद्देवतोऽस्तु च (बृहद्दे० ७।६१-७४) = वषट्कारानें भाऊ कापून टाकल्यावर सौचीक अग्नि देवांतून नाहिंसा झाला असें श्रुतिवचन आहे; तो ऋतु, जल व वनस्पति यांत लपून राहिला; अग्नि नसल्यामुळें जिकडे तिकडे असुर दिसूं लागले; असुरांना मारून देवांनीं अग्नीला हुडकून काढलें; हवि आमचेकडे आण असें ते त्याला म्हणाले;

त्यानें वर मागितले; मला दीर्घ आयुष्य व सर्व प्रकारचे हवि मिळावेत आणि माझ्या भावांची हिंसेपासून मुक्तता व्हावी म्हणजे ते जिवंत होवोत; प्रत्येक यज्ञांत प्रयाज व अनुयाज हे हवि, घृत, सोमयागांतील पशु हे, त्यांची देवता मी म्हणून, मला मिळावेत; त्याप्रमाणें सर्व यज्ञ, मी देवता म्हणून, मला उद्देशून व्हावा. बृहद्देवतेंतील ही माहिती या खंडांतील प्रारंभीं दिलेल्या दोन ऋचांतून काढली आहे.

**आग्नेयाः वै प्रयाजाः आग्नेयाः अनुयाजाः इति च ब्राह्मणम्**

प्रयाज व अनुयाज ह्यांची देवता अग्नि असें ब्राह्मण वचनही आहे. ह्या खंडांतील बरींचशीं ब्राह्मण वचनें सांपडत नाहींत.

**छंदोदेवताः इति अपरम्। छंदांसि वै प्रयाजाः छंदांसि अनुयाजाः इति च ब्राह्मणम्**

प्रयाज व अनुयाज यांची देवता छंद असें दुसरें मत आहे व छंद हेच प्रयाज व छंद हेच अनुयाज असें ब्राह्मण वचनही आहे.

**ऋतुदेवताः इति अपरम्। ऋतवो वै प्रयाजाः पशवोऽनुयाजाः इति च ब्राह्मणम्**

ऋतु हे देवता इत्यादि; ऋतु हे प्रयाज व पशु हे अनुयाज इत्यादि.

**प्राणदेवताः इति अपरम्। प्राणाः वै प्रयाजाः अपाना अनुयाजाः इति च ब्राह्मणम्** ( शत० ब्रा० ११।२।६।२७ )

प्राण हे देवता इत्यादि; प्राण हे प्रयाज व अपान हे अनुयाज इत्यादि.

**आत्मदेवता इति अपरम्। आत्मा वै प्रयाजाः प्रजाः अनुयाजाः इति च ब्राह्मणम्** ( तै० सं० ६।१।५ ).

आत्मा ही देवता इत्यादि; आत्मा हा प्रयाज व प्रजा अनुयाज इत्यादि.

**आग्नेयाः इति तु स्थितिः। भक्तिमात्रम् इतरत्**

परंतु देवता अग्निच असा निश्चित सिद्धांत आहे ( स्थितिः = निश्चयः ); छंद, प्राण वगैरेंना देवता लक्षणेनें किंवा गौणत्वानें म्हटलें आहे; खरी देवता अग्निच; इतरांवर कांहीं हेतूस्तव तो नुसता आरोप केला आहे. भक्तिः एव भक्तिमात्रं = केवळ भक्ति म्हणजे गौणत्व; इतर सर्व देवता गौण होत.

**किमर्थं पुनर् इदम् उच्यते। यस्यै देवतायै हविर्गृहीतं स्यात् तां मनसा ध्यायेत् वषट् करिष्यन् इति ह विज्ञायते** ( ऐत० ब्रा० ११।८ )

परंतु हें सर्व कशाकरितां सांगितलें आहे ? हवि देणें हें कर्तव्य; देवता कोणती कां असेना ? तिच्याशीं आपल्याला काय करावयाचें आहे ? असें जर कोणी म्हणेल तर त्याला पुढील उत्तरः—ज्या देवतेला उद्देशून अध्वर्यूनें हवि घेतला असेल ती देवता, वषट् म्हणून, होत्यानें मनांत आणावी असें ब्राह्मण वचन आहे. विशिष्ट देवता जर मनांत आणली नाहीं तर तिला हवि पोचणार नाहींत; म्हणून देवता-निर्णय केला पाहिजे. ओ श्रावया इति अध्वर्युः ब्रवीति। एतत् आश्रावणम्। अस्तु

श्रौषट् इति अग्नीध्रः। एतत् प्रत्याश्रावणम्। तदनंतरं प्रयाजयाज्याः। ततः प्रयाज नाम्न्यः आहुतयः। अन्ते यजमानकृतं ध्यानम् (सत्याषाढ श्रौ० सू० ६।८) = हा हवि तुला दिला जात आहे असें विशिष्ट देवतेला ऐकीव असें अध्वर्यु म्हणतो; ह्या त्याच्या आज्ञेला आश्रावण म्हणतात; तें ऐकलें जावो म्हणजे विशिष्ट देवतेला ऐकवितो असें अग्नीध्र उत्तर देतो; ह्या उत्तराला प्रत्याश्रावण म्हणतात; तदनंतर होता प्रयाज नांवाच्या याज्या म्हणतो; नंतर प्रयाज नांवाच्या आहुति दिल्या जातात; शेवटीं यजमान त्या देवतेचें ध्यान करतो. आज्यस्य व्यन्तु ३ वौ ३ षट्। अथवा। आज्यस्य वेतु ३ वौ ३ षट्। एवं प्रयाजानाम् अन्ते वषट्कारः (आश्व० श्रौ० सू० १।५)= देवतांच्या संख्येप्रमाणें वेतु (= हवि एक देवता खावो) किंवा व्यन्तु (= हवि पुष्कळ देवता खावोत) असें म्हणून वौषट् हा शब्द होता उच्चारितो; ह्याला वषट्कार म्हणतात; व वौषट् म्हणतांनाच तो देवतेचें किंवा देवतांचें ध्यान करतो. सत्याषाढाप्रमाणें यजमान ध्यान करतो पण आश्वलायनाप्रमाणें होता ध्यान करतो असें आहे. यस्यै देवतायै० वषट् करिष्यन्। साक्षात् एव तत् देवतां प्रीणाति। प्रत्यक्षात् देवतां यजति (ऐत० ब्रा० ११।८); ह्यावरील भाष्यांच्या शेवटीं सायणाचार्य म्हणतातः—होत्यानें देवता मनांत आणावी व मग वौषट् म्हणावें असें केल्यानें त्याला देवता साक्षात् दिसते व त्यामुळें तो देवतेला तृप्त करतो.

**तानि एतानि एकादश आप्रीसूक्तानि। तेषां वासिष्ठम् आत्रेयं वाध्र्यश्वं गार्त्समदम् इति नाराशंसवन्ति। मैधातिथं दैर्घतमसं प्रैषिकम् इति उभयवन्ति। अतः अन्यानि तनूनपात्वन्ति तनूनपात्वन्ति**

तीं हीं आप्रीसूक्तें अकरा आहेत. तानि एतानि ह्याबद्दल दुर्गवृत्तींत इति इमानि असे शब्द आहेत; इति इमानि० = अशीं हीं अकरा आप्रीसूक्तें आहेत; दोन्हीं पाठांचा अर्थ एकच; पण दुर्ग अनुक्रान्तानि असा वाक्याचा शेवट करतो; तसा मूळचा शब्द असल्यास ह्याप्रमाणें ह्या ११ आप्रीसूक्तांचें अनुक्रमानें विवरण केलें असा अर्थ होईल; पण तसें ११ सूक्तांचें विवरण केलें नाहीं; ह्यावरून अनुक्रांतानि हा शब्द त्यानें आपल्या पदरचा घातला असावा. त्यांपैकीं चार आप्रीसूक्तांत नराशंस ह्या देवतेची ऋचा आहे; तीं चार सूक्तें वसिष्ठ, अत्रि, वाध्र्यश्व व गृत्समद ह्यांचीं होत म्हणजे ह्या ऋषींना तीं सूक्तें दिसलीं. वसिष्ठेन दृष्टं वासिष्ठम् (ऋ० सं० ७।२); अत्रिणा दृष्टं आत्रेयम् (ऋ० सं० ५।५); वाध्र्यश्वेन दृष्टं वाध्र्यश्वं (१०।७०); गृत्समदेन दृष्टं गार्त्समदम् (२।३); किंवा वसिष्ठस्य इदम्, अत्रेः इदम्, वाध्र्यश्वस्य इदम्, गृत्समदस्य इदम् असा 'तस्य इदम्' (पा.४।३।१२०) ह्या सूत्रानें तद्धिताचा विग्रह करावा; पहिल्या विग्रहाला पाणिनी सूत्राचा आधार नाहीं; ऋषींना सूक्तें दिसलीं, तीं त्यांनीं रचिलीं नाहींत अशी श्रद्धा असल्यामुळें दुर्गानें पहिला विग्रह केला आहे. नाराशंसवन्ति हा शब्द बरोबर नसून तो नराशंसवन्ति असा पाहिजे; नराशंस असें

नांव आहे, नाराशंस असें नाहीं. मेधातिथि व दीर्घतमस् ह्यांना दिसलेलीं आप्रीसूक्तें व प्रैषाध्यायांतलें आप्रीसूक्त ह्यांमध्यें नराशंस व तनूनपात् ह्या दोन्ही देवता आहेत. मेधातिथिना दृष्टं मैधातिथम् (१।१३); दीर्घतमसा दृष्टं दैर्घतमसम् (१।१४२); प्रैषाध्याये दृष्टं प्रैषिकम्. ऋग्वेदाच्या शेवटीं कुंतापाध्याय नांवाची एक पुरवणी आहे; ह्या पुरवणीच्या एका भागाला प्रैषाध्याय अशी संज्ञा आहे; प्रैष म्हणजे आज्ञा; अध्वर्यु होत्याला अमकी एक याज्या म्हणण्याला सांग अशी मैत्रावरुणाला आज्ञा करतो व मैत्रावरुण विशिष्ट प्रैष मंत्र म्हणतो; असे प्रैष ५१ आहेत; ह्यांत आप्री संबंधाचे बारा प्रैष आहेत; ह्या बारांना आप्रीसूक्त अशी संज्ञा आहे; बाकीच्या राहिलेल्या चार सूक्तांत नराशंस ह्याबद्दल तनूनपात् अशी आप्रीदेवता आहे. अगस्तिना दृष्टम् ( १।१८८ ), विश्वामित्रेण दृष्टम् ( ३।४ ), कश्यपेन दृष्टम् ( ९।५ ), जमदग्निना रामेण वा दृष्टम् ( १०।११० ) अशीं हीं चार सूक्तें होत. नराशंसः विद्यते एषु तानि नराशंसवन्ति; तनूनपात् विद्यते एषु तानि तनूनपात्वन्ति । उभयौ ( नराशंसतनूनपातौ ) विद्येते एषु तानि उभयवन्ति. तनूनपात्वन्ति ह्या शब्दाची द्विरुक्ति अध्याय संपला हें दाखविण्याकरितां. आप्रीभिः आप्रीणाति । समिधो यजति । तनूनपातं यजति । नराशंसं यजति । इळो यजति । बर्हिर्यजति । दुरो यजति । उषासानक्ता यजति । दैव्या होतारा यजति - तिस्रो देवीर्यजति । त्वष्टारं यजति । वनस्पतिं यजति । स्वाहाकृतीर्यजति । ताभिः यथऋषि आप्रीणीयात् । यत् यथऋषि आप्रीणाति यजमानमेव तत् बन्धुताया नोत्सृजति ( ऐत० ब्रा० ६।४ ) = आप्रींनीं म्हणजे आप्रीयाज्यांनीं आप्रीदेवतांना तृप्त करतो; तो क्रमानें समिध्, तनूनपात्, नराशंस, इळ, बर्हिः, यज्ञद्वारें, उषा व रात्र, देवांचे दोन होते, तीन देवी, त्वष्टा, वनस्पति आणि स्वाहाकृति ह्यांच्या याज्या म्हणतो; अशा त्या आप्रीसूक्तांनीं आप्रीदेवतांना तृप्त करावें; जेव्हां होता यजमानाच्या गोत्राप्रमाणें याज्या म्हणून आप्रीदेवता तृप्त करतो तेव्हां तो यजमानाला त्या गोत्रसंबंधांतून वेगळा करीत नाहीं ( म्हणजे त्या त्या गोत्राला योग्य अशीं आप्रीसूक्तें होता म्हणतो; त्यामुळें यजमानाचा स्वगोत्राशीं संबंध कायम राहतो ). आ + प्री = याज्या म्हणणें एवढाच अर्थ असेल; तृप्त करणें हा अर्थ असेल कीं नसेल हें सांगतां येत नाहीं. ह्या ऐ० ब्रा० वचनावरून यास्क म्हणतो त्याप्रमाणें आप्रीसूक्तांचे तीन वर्ग पडतात. प्रैषिकसूक्त ऋग्वेदांत नाहीं तेव्हां त्याचा ऋषि कोण हें ठरवितां येत नाहीं. ऐतरेय ब्रा० रचणाऱ्याच्या मनांत प्रैषिक आप्रीसूक्त होतें कीं नव्हतें तें सांगतां येत नाहीं. तनूनपादग्न आज्यस्य वेतु इति द्वितीयः अन्यत्र वसिष्ठशुनकात्रिवाध्र्यश्वराजन्येभ्यः । नराशंसो अग्न आज्यस्य वेतु इति तेषाम् ( आश्व० श्रौ० १।५ ) = वसिष्ठादिक खेरीजकरून बाकीच्यांना दिसलेल्या सूक्तांत तनूनपात् हा दुसरा आप्रीदेव व वसिष्ठादिकांना दिसलेल्या सूक्तांत नराशंस हा दुसरा आप्रीदेव. वसिष्ठशुनकात्रिवाध्र्यश्वराजन्यानां नराशंसो द्वितीयः । अन्येषां तनूनपात् द्वितीयः ( सायण ) = वसिष्ठ, शुनक,

अत्रि, वाध्र्यश्व व राजन्य ह्यांना दिसलेल्या सूक्तांच्या दुसऱ्या ऋचेंत आप्रीदेवता नराशंस होय; राहिलेल्या सूक्तांच्या दुसऱ्या ऋचेंत आप्रीदेवता तनूनपात् होय. ह्याप्रमाणें सायणाचार्य आप्रीसूक्तांचे दोनच वर्ग करतात. गृत्समद ह्याचें गोत्र शुनक; यास्कानें शुनक ह्याबद्दल गृत्समद हें नांव घातलें आहे; राजन्य म्हणजे विश्वामित्र कीं दुसरा कोणी ? समिद्धो अग्निः ( ऋ० सं० २।३ ) इति शुनकानाम् । जुषस्व नः समिधम् ( ७।२ ) इति वसिष्ठानाम् । समिद्धो अद्य ( १०।११० ) इति सर्वेषाम् । यथऋषि वा ( आश्व० श्रौ० ३।२ ) = शुनकगोत्रांतील लोकांचें आप्रीसूक्त समिद्धो अग्निः (२।३) हें होय; वसिष्ठगोत्रांतील लोकांचे आप्रीसूक्त जुषस्व नः समिधम् ( ७।२ ) हें होय; समिद्धो अद्य ( १०।११० ) हें सर्वांचें आप्रीसूक्त होय म्हणजे गोत्र कोणतेंही असलें तरी सर्वांनीं ह्या आप्रीसूक्ताचा उपयोग केल्यास हरकत नाहीं असा ह्या शब्दांचा अर्थ दिसतो; परंतु टीकाकार नारायणभट्ट म्हणतात कीं शुनक व वसिष्ठ गोत्रें वगळून बाकीच्या गोत्रांचें आप्रीसूक्त समिद्धो अद्य हें होय; ह्या वर्गीकरणावरून यज्ञांत तीनच आप्रीसूक्तांचा उपयोग होत होता असें दिसतें; ह्याला आधार द्यावयास पाहिजे होता; पण ऐ० ब्रा० वचनाप्रमाणें आपआपल्या ऋषीप्रमाणें म्हणजे गोत्राप्रमाणें त्या त्या आप्रीसूक्ताचा उपयोग करावा असाही प्रघात असेल; तीं आप्रीसूक्तें पुढीलप्रमाणें:— ( १ ) प्रथमं कण्वानाम् । सुसमिद्धो न आवह ( १।१३ ) इति । ( २ ) द्वितीयं तद्वर्जानाम् अङ्गिरसाम् ( कण्व वगळून बाकीच्या अङ्गिरसांचे ) । समिद्धो अग्न आवह ( १। १४२ ) इति । ( ३ ) तृतीयम् अगस्तीनाम् । समिद्धो अद्य राजसि (१।१८८) इति । ( ४ ) चतुर्थं शुनकानाम् । समिद्धो अग्निर्निहितः पृथिव्याम् ( २।३ ) इति । ( ५ ) पञ्चमं विश्वामित्राणाम् । समित्समित्सुमनाः ( ३।४ ) इति । ( ६ ) षष्ठम् अत्रीणाम् । सुसमिद्धाय शोचिषे ( ५।५ ) इति । ( ७ ) सप्तमं वसिष्ठानाम् । जुषस्व नः समिधम् अग्ने अद्य ( ७।२ ) इति । ( ८ ) अष्टमं कश्यपानाम् । समिद्धो विश्वतस्पतिः ( ९।५ ) इति । ( ९ ) नवमं वाध्र्यश्वानाम् । इमां मे अग्ने समिधं जुषस्वेळः ( १०।७० ) इति । ( १० ) शुनकवाध्र्यश्ववर्जितानां भृगूणां दशमम् । समिद्धो अद्य मनुषो दुरोणे ( १०। ११० ) इति । ह्यांपैकीं ४, ६, ७ व ९ ह्यांत आप्री देव नराशंस; ३, ५, ८ व १० ह्यांत तनूनपात्; १ आणि २ ह्यांत नराशंस व तनूनपात् असे दोन्ही. ऋग्वेदांत १० आप्रीसूक्तें असतांना यास्क १०।११० ह्या सूक्ताचेंच विवरण कां करतो ? ह्याला उत्तर:— मैत्रायणीसंहितेंत तें सूक्त विनियोगासाठीं घेतलें आहे व त्यांत नराशंस ही आप्रीदेवता नसल्यामुळें नराशंसस्य महिमानमेषां ( ऋ० सं० ७।२।२ ) ही ऋचा घातली आहे; ह्यावरून त्यालाही समिद्धो अद्य इति सर्वेषां हें आश्वलायन श्रौत सूत्रांतील वर दिलेलें मत ग्राह्य होतें हें स्पष्ट दिसतें; असें असूनही तो आप्रीसूक्तांचे तीन वर्ग करतो; ह्याचें कारण ऐ० ब्रा० होय. आप्रीसूक्तांचा विनियोग दाखविण्यासाठीं यजुःसंहितांत ११ किंवा १२ प्रैष घात-

केले आढळतात; स्वाहाकृतींसंबंधाचा १२ वा प्रैष मैत्रायणी संहितेत नाहीं; तो काठकादि इतर संहितांत मागाहून घातला गेला हें स्पष्ट आहे. ह्या प्रैषांत आप्रीसूक्तांतले बरेचसे शब्द व बरीचशीं विधानें आढळतात; इतर देवतांना लावलेले ऋग्वेदांतील शब्द ह्या प्रैषांत कांहीं कारण नसतांना घातले आहेत; अर्वाचीन संस्कृतांतीलही शब्द त्यांत आढळतात; कांहीं शब्द ऋग्वेदांत किंवा अर्वाचीन संस्कृतांतही आढळत नाहींत; २।३ शब्द कसे बनले व त्यांचा काय अर्थ हेंही कळत नाहीं; नराशंस प्रैषांतील कल्पना आप्रीसूक्तांत नाहींत. तिस्रो देवीः ह्या प्रैषांत त्या तीन देवतांचीं नांवेंही दिलीं नाहींत इतकेंच नव्हे तर दर्भासनावर बसा असें म्हणण्याच्या ऐवजीं त्यांना हविर्वहनाचें काम दिलें आहे. एकंदरीनें हे प्रैष बनावट असून ते यज्ञाकरितां कोणीतरी रचले ह्यांत संशय नाहीं. ह्या प्रैषांना आप्रीसूक्त कां म्हटलें तें समजत नाहीं. आप्रीसूक्तांच्या विनियोगाच्या वेळीं नराशंस संबंधाचा प्रैष कांहीं गोत्रांतील लोक घेत असतील तर इतर गोत्रांतील लोक तनूनपात् ह्याचा घेत असतील; १।१३ व १।१४२ ह्या आप्रीसूक्तांचा उपयोग करतांना दोन्ही प्रैष घेतले जात असावेत. ज्यांत पशु मारावयाचा असतो अशा यागांत आप्रीसूक्तांचा विनियोग केला जातो; निरूढपशु किंवा निरूढपशुबंध ह्या मुख्य पशुयाग होय; अग्निष्टोम अग्निचिति वगैरे पशुयाग ह्या मुख्य यागाच्या विकृति होत; सर्व पशुयागांत गोत्राप्रमाणें आप्रीसूक्त वापरावयाचें असतें पण तो निर्बंध अग्निचितियागांत नाहीं; ह्याचें कारण तै० ब्रा० १९।४ ह्यांत असें दिलें आहे कीं अग्निचितीमध्ये जो जामदग्न्यपशु मारला जातो त्याला सर्व पशूंचीं रूपें असतात; त्यामुळें विशिष्ट आप्रीसूक्त वापरण्याची आवश्यकता नाहीं; हें कारण समाधानकारक नाहीं हें स्पष्ट आहे; कारण कांहीं निराळेंच असेल. यास्कानें सांगितलेल्या अकरा आप्रीसूक्तांहून आणखीं पांच आप्रीसूक्तें आहेत; सौत्रामणीयागांत तीन आणि अग्निचिति व अश्वमेध ह्या प्रत्येकांत एक एक अशीं तीं पांच सूक्तें होत; त्यांचा निर्देश यास्कानें केला नाहीं याचें कारण दुर्ग पुढीलप्रमाणें देतो:— ऋग्वेदांतील १० आप्रीसूक्तें व प्रैषिक आप्रीसूक्त ह्यांत अग्नि हा देव आहे; सौत्रामणींतील तीन सूक्तांना आप्री हें नांव देणें बरोबर नाहीं; कारण त्यांत अग्नि हा गौण असून इतर देवता प्रधान होत; शिवाय प्रैषाध्यायामध्ये त्यांचा निर्देश नाहीं; जेथें पशु मारावयाचा नसतो अशा यागांतही राहिलेल्या दोन आप्रीसूक्तांचा उपयोग केलेला आढळतो. कदाचित् हीं पांच सूक्तें ऋग्वेद बाह्य आहेत म्हणून तीं यास्कानें घेतली नसतील.

अथातः आप्रियः ( खंड ८।४ ) असा आरंभ करून यास्क इति इमाः आप्रीदेवताः अनुक्रान्ताः ( ८।२१ ) असा शेवट करतो; ह्यावरून आप्री ह्या देवता असें तो मानतो; आप्री म्हणजे विशिष्ट प्रकारच्या याज्या असें तो म्हणत नाहीं; ठिकठिकाणीं तो कात्थक्य व शाकपूणी ह्यांचीं मतें देतो; आप्री म्हणजे विशिष्ट प्रकारचे

प्रयाज असें जर त्याला म्हणावयाचें होतें तर तें त्यानें कोठेंतरी प्रदर्शित केलें असतें; तसें त्यानें केलें नाहीं ह्यावरून प्रयाज व अनुयाज ह्यांच्या देवता कोण असा प्रश्न तो एकदम कसा करील व त्या वादांत तो कशाला पडेल? त्याचा विषय अनुक्रान्ताः एथेंच संपतो; पुढचा विषय कोणी तरी मागाहून घुसडला असावा. यजुःसंहितांत दिलेल्या ऋग्वेदांतील १०।११० ह्या आप्रीसूक्ताचें तो विवरण करतो; तेव्हां समिद्धो अग्न इति सर्वेषां हें आश्वलायनाचें मत त्याला ग्राह्य होतें असें स्पष्ट दिसतें; आप्रीसूक्तांचे तीन वर्ग आहेत असें म्हणणें यास्कानें स्वीकारलेल्या आश्वलायन मताशीं विसंगत आहे; अथ किंदेवताः एथपासून तनूपात्वन्ति एथपर्यंतचा सर्व विषय प्रक्षिप्त होय.

---

# अध्याय ९ वा.

## खंड १ ला.

**अथ यानि पृथिव्यायतनानि सत्त्वानि स्तुतिं लभन्ते तानि अतः अनुक्रमिष्यामः**

अथ ह्यानें विषयाला आरंभ होतो. पृथिवी हें राहण्याचें ठिकाण आहे ज्यांचें अशा ज्या वस्तूंची ऋग्वेदांत स्तुति केली आहे त्या वस्तूंचें म्हणजे त्या वस्तूंच्या नांवांचें यापुढें आपण क्रमानें व्याख्यान करूं. स्तुतिं लभन्ते = स्तुति मिळवितात = ज्यांचें वर्णन केलें आहे.

**तेषाम् अश्वः प्रथमागामी भवति । अश्वः व्याख्यातः । तस्य एषा भवति**

त्यांमध्यें अश्व ( निघंटु ५।३।१ ) हा पहिला येतो. अश्व शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे ( निरुक्त २।२७ ). तत्संबंधी म्हणजे अश्वासंबंधी पुढील ऋचा होय. अश्वाला पहिलें स्थान देण्याचें कारण ह्याचा जन्म पुरुषानंतर झाला असें मैत्रायणीसंहितेंत म्हटलें आहे ( १।८।१ ) असें दुर्ग म्हणतो; पण ८ व्या अध्यायांत देवांची स्तुति आहे; पुरुषाची म्हणजे मनुष्याची नाहीं.

## खंड २ रा.

**अश्वो वोह्ळा सुखं रथं हसनामुपमन्त्रिणः । शेपो रोमण्वन्तौ भेदौ वारिन्मण्डूक इच्छतीन्द्रायेन्दो परि स्रव ( ऋ० सं० ९।११२।४ )**

**अश्वः वोह्ळा। सुखं वोह्ळा। रथं वोह्ळा। सुखम् इति कल्याणनाम। कल्याणं पुण्यम्। सुहितं भवति। सुहितं गम्यति इति वा। हसैता वा। पाता वा पालयिता वा। शेपम् ऋच्छति इति। वारि वारयति। मा नो व्याख्यातः। तस्यैषा भवति**

हा खंड दुर्गवृत्तींत नाहीं. गुर्जरपाठांत सर्वत्र वोह्ला असून 'रथं वोह्ळा' व 'सुहितं गम्यति० वारि वारयति' हे शब्द नाहींत. ऋचेवरील सर्व भाष्य महाराष्ट्रपाठांतील आहे. वोह्ळा हा शब्द अश्वः, सुखं व रथं ह्या तीन शब्दांना जोडला आहे; घोडा ओढणारा; सुखानें म्हणजे कष्टाशिवाय ओढणारा; रथाला ओढणारा. सुखं हा कल्याणवाचक शब्द आहे; कल्याण म्हणजे पुण्य; कल्याणाला किंवा पुण्याला सुख म्हणण्याचें कारण कल्याण किंवा पुण्य हें चांगलें ठेवलेलें ( सु + हितं ) किंवा चांगल्या ठिकाणीं म्हणजे साधुजनांच्या ठिकाणीं ठेवलेलें असतें ( भवति ) किंवा ह्या दोन अर्थी तें जाणलें जातें ( गम्यति ); सुखं = सुहं = सुहितं अशी सुख शब्दाची व्युत्पत्ति. हसैताः हें हसनां ह्याचें विवरण असेल; एताः हस = ह्यांना हस ? 'वा' कशास ? हसनां शब्दाचा पहिला अर्थ दिला असला पाहिजे. पाता वा पालयिता वा हें कोणत्या शब्दाचें विवरण ? ऋचेंत पिता शब्द नाहीं. शेपम्

ऋच्छति इति = पुरुषाचें लिंग जातें; ऋचेंत शेपः आहे. वारि शब्द वारय् ( = वारणें, निवारण करणें ) ह्यापासून; ऋचेंत वार् आहे. ' मा नो० ' ह्या ऋचेचें विवरण पुढील खंडांत केलें आहे; तस्य एषा भवति हें वाक्य पहिल्या खंडाच्या शेवटीं आलें आहे; तें ह्या खंडाच्या शेवटीं कशास? मा नो व्याख्यातः असें म्हटल्या-वर हे शब्द नको आहेत. हा सर्व खंड प्रक्षिप्त आहे; ह्यांतील भाष्य फार त्रोटक आहे; सुख शब्दाची व्युत्पत्ति निरुक्त ३।१३ त सुहितं खेभ्यः अशी दिली आहे. गम्यति हें अशुद्ध आहे; गम्यते पाहिजे. ऋचेचा सायणाचार्यांनीं केलेला अर्थः—इष्ट देशाला वाहून नेणारा ( वोह्ळा ) घोडा सुखकारक रथाची ( रथं ) इच्छा करतो ( इच्छति ); खुषमस्करे ( उपमन्त्रिणः ) हास्य उत्पन्न करणाऱ्या ( हसनां ) वाचेची इच्छा करतात; पुरुषाचें लिंग ( शेपः ) लवेनें भरलेल्या ( रोमण्वन्तौ ) योनीच्या बाजूच्या दोन तटांची ( भेदौ ) इच्छा करतो; बेडूक पाण्याचीच ( वार् + इत् ) इच्छा करतो; मी तुझ्या गाळण्यांतून गळण्याची इच्छा करतों; तेव्हां, हे सोमा, इंद्रासाठीं गाळण्यांतून ( परि ) कलशांत वाहत जा ( स्रव ). यथा वोह्ळा अश्वः सुखं रथम् इच्छति तथा सोमरूपः अश्वः ग्रावरूपं हस्तरूपं वा सुखं रथम् इच्छति । यथा शेपः रोमण्वन्तौ भेदौ इच्छति तथा सोमः । यथा मण्डूकः वार् वारि एव इच्छति तथा सोमः कलशे स्थितं वारि इच्छति = जशी रथ ओढणाऱ्या घोड्याला सुरळित चाल-णाऱ्या रथाची उत्कंठा असते तशी सोमाला ग्राव्याची किंवा हाताची उत्कंठा असते; जसा हरिण किंवा बैल किंवा दुसरा एखादा पशु ( शेपः ? ) हरळीनें भरलेल्या ( रोमण्वन्तौ ) नदीच्या दोन्ही तीरांची ( भेदौ ) इच्छा करतो तसा सोम मेंढ्यांच्या रोमांच्या( रोमण्वन्तौ ) दोन गाळण्यांची ( भेदौ ) इच्छा करतो. जसा बेडूक पाण्या-चीच इच्छा करतो तसा सोम कलशांतील पाण्याचीच इच्छा करतो असा अन्वय व अर्थ असावा. दशावनिभ्यो दशयोक्त्रेभ्यो० ( १०।९४।७ ) ह्या ऋचेंत अंगुली व ग्रावे ह्यांच्यावर निरनिराळीं रूपकें केलीं आहेत त्याप्रमाणें एथेंही रूपक आहे; ग्राव किंवा हात हा रथ; सोम हा अश्व; कोणत्याही घोड्याला सुरळित चालणाराच रथ आवडतो व त्याचीच तो सदा इच्छा करीत असतो; असा रथ ओढण्याला तो उतावळा होतो; त्याप्रमाणें ग्राव्याशीं किंवा हाताशीं आपला केव्हां संबंध येईल अशी इच्छा जणूं काय सोम करीत असतो; आपला रस केव्हां निघेल अशी जणूं काय त्याला उता-वीळ झालेली असते. ज्या नदीच्या दोन्ही तीरावर हिरवें गवत उगवलें असेल तेथें चरण्याला हरिण बैल वगैरे उतावळे होणारच; त्याप्रमाणें गाळण्यांतून आपण केंव्हा गळूं अशी उतावीळ सोमाला होते. [ हरी यस्य सुयुजा विव्रता वेरर्वन्तानु शेपा ( १०। १०५।२ ) एथें शेपा ( = शेपौ ) हा शब्द हरी (=इंद्राचे दोन घोडे ) ह्यास लाविला आहे; शेप म्हणजे पुरुषाचें लिंग असा अर्थ एथें नसावा; हरी, अर्वन्ता ( = अर्वन्तौ ) आणि शेपा (= शेपौ ) हे शब्द एकाच अर्थाचे असावेत; प्रस्तुत ऋचेंत शेप म्हणजे घोडा किंवा दुसरा एखादा पशु असेल]. बेडूक जसा पावसाची सारखी वाट पहात असतो

व पाण्यांत डुंबण्याला आपणाला केव्हां मिळेल असें त्यास होतें त्याप्रमाणें सोमाचीही स्थिति होते. सोमाचा रस काढणें, तो गाळण्यांतून गाळणें व त्याचा कलशांतील जलांत स्राव होणें ह्या तीन क्रियावर ह्या तीन कोट्या होत. राहिली एक क्रिया ती म्हणजे सोमरसांत दूध मिसळणें; हसनामुपमंत्रिणः ह्या शब्दांत तो अर्थ असेल; दुधांत मिसळल्यामुळें सोमाचा मूळचा वाईट रंग जाऊन त्याला चांगला पांढरा सफेत रंग येतो व त्यामुळें तो जणू काय हसतो; हसनाम् इच्छति = हसण्याची इच्छा करतो म्हणजे दुधाशीं आपण केव्हां मिसळूं असें त्याला होतें; पण उपमंत्रिणः येथें तर्क खुंटतो.

तिसऱ्या खंडांत वाजिनः असा शब्द आहे; म्हणून ती अश्वासंबंधाची ऋचा होत नाहीं अशा समजुतीनें प्रक्षेपकानें अश्वो वोह्ळा ही ऋचा घुसडली असावी. यास्कानें जींत अश्व शब्द आहे अशीच ऋचा घ्यावयास पाहिजे होती; तशी न घेतल्यानें प्रक्षेपकाला दुसरा खंड निरुक्तांत घालावा लागला. अश्व ज्यांत आहे अशा ऋचा ऋग्वेदांत हव्या तितक्या आहेत व तशी एक ऋचा यास्कानें ४।२७ त दिली आहे.

## खंड ३ रा.

**मा नो मित्रो वरुणो अर्यमायुरिन्द्र ऋभुक्षा मरुतः परि ख्यन् ।**
**यद्वाजिनो देवजातस्य सप्तेः प्रवक्ष्यामो विदथे वीर्याणि ( ऋ० सं० १।१६२।१ )**
**यत् वाजिनः देवैः जातस्य सप्तेः सरणस्य प्रवक्ष्यामः यज्ञे वीर्याणि**

यास्कानें आपल्या नेहमींच्या पद्धतीच्या विरुद्ध दुसऱ्या अर्धाचें भाष्य प्रथम दिलें आहे. देवजातस्य = देवैः जातस्य; जातस्य बद्दल दुर्गपाठ जनितस्य आहे व तोच बरोबर आहे; देवांनीं उत्पन्न केलेल्याचें; देवैः जातस्य ह्याचा देवांपासून जन्मलेल्याचे असा वेडावाकडा अर्थ करावा लागेल. वसूंनीं सूर्यापासून म्हणजे सूर्याला तासून घोडा निर्माण केला असें वेदवचन ( ऋ० सं० १।१६३।२ ) आहे. सप्तेः = सरणस्य; घोडा धांवतो म्हणून त्याला सप्ति म्हणतात; म्हणजे सप्ति शब्द सृ धांवणें ह्यापासून झाला आहे. विदथे = यज्ञे = यज्ञांत.

**मा नः त्वं मित्रश्च वरुणश्च अर्यमा च आयुश्च वायुः । अयनः । इन्द्रश्च उरुक्षयणः । ऋभूणां राजा इति वा । मरुतश्च परिख्यन्**

त्वं शब्द दुर्गवृत्तींत नाहीं व त्याची जरुरही नाहीं; तो भाष्यांत कसा आला हें समजत नाहीं. यास्कानें प्रत्येक देवाच्या नांवानंतर च घातला आहे. आयुः=वायुः; वायूला आयु म्हणण्याचें कारण वारा जातो(अयनः)म्हणजे वाहतो; अय् किंवा इ(=जाणें)ह्यापासून आयु; याच आयु शब्दाला व जोडल्यानें वायु शब्द तयार होतो. आयु शब्द ऋग्वेदांत ९० वेळां आला आहे; आयु नांवाची एक जात होती; तिचा मुख्य देव आयु; हा आयु अग्नि असावा. ऋभुक्षाः = उरुक्षयणः; ऋभु = रुहु = रुउ = उरु; क्ष = क्षयणं = राहणें; उरु जें अंतरिक्ष त्यांत क्षयणं म्हणजे वास आहे ज्याचा तो; किंवा ऋभूणां राजा = ऋभूंचा राजा; क्ष = क्षेति = राजा भवति. ऋभूणां देवांना निवास-

भूतः प्रजापतिः = ऋभु म्हणजे देव; त्यांचें निवासस्थान म्हणजे प्रजापति; प्रजापतींत सर्व देवांचा समावेश होतो; किंवा निघंटूंत ऋभुक्षाः = महान्; ऋभुक्षाः इन्द्रः = महान् इन्द्रः; असे दोन अर्थ सायणाचार्य देतात. ऋभुक्षाः हें इन्द्रः ह्याचें किंवा मरुतः ह्याचें विशेषण होईल. कदाचित् तें ऋभूंचें नांव असेल. तसें असण्याचा ज्यास्त संभव आहे; कारण ऋचेंतील कोणत्याही इतर देवाला विशेषण नाहीं. आम्ही यज्ञांत देवांनीं उत्पन्न केलेल्या लढाऊ घोड्याचीं वीरकृत्यें सांगणार आहोंत; यामुळें मित्रादि देवांनीं आम्हांस निंदूं नये ( घोड्याची स्तुति कशाला करतात म्हणून आमची निर्भ-त्सना करूं नये ). यत् = यानि व वीर्याणि = गुणान्; जे गुण आम्ही वर्णन करणार आहोंत त्यांकडे देवांनीं दुर्लक्ष करूं नये असा दुर्ग अर्थ करतो. पण यास्कानें यत् शब्द जशाचा तसाच ठेविला आहे; यत् म्हणजे म्हणून असाच अर्थ बरोबर दिसतो.

**शकुनिः ( २ ) शक्नोति उन्नेतुम् आत्मानम्। शक्नोति नदितुम् इति वा। शक्नोति तकितुम् इति वा। सर्वतः शंकरः अस्तु इति वा। शक्नोतेर्वा। तस्य एषा भवति**

शकुनिः = शक् + उनिः; शक् = शक्नोति; उनिः = उन्नीः = उन्नेतुम्; स्वतःला वर नेण्यास समर्थ असतो. किंवा शकु = शक्नोति; नि = नदितुम्; आवाज करण्याला समर्थ असतो. किंवा नि = ति = तकितुं = नाश करण्याला. किंवा श = शम्; कु = करः; नि व्यर्थ; पक्षी कल्याणकारक असो. पक्षी कोणत्या गोष्टी करतो? आकाशांत जातो, आवाज करतो, किड्यांना मारतो; कांहीं पांखरें अपशकुनी असतात; त्यांच्यापासून क्षेम इच्छिणें स्वाभाविक होय; अर्थाप्रमाणें व्युत्पत्ति ह्याचें हें नमुनेदार उदाहरण होय. किंवा शक्पासून शकुनि एवढें म्हणणें पुरें; उनि हा नामकारक प्रत्यय; क्षीरस्वामी हीच व्युत्पत्ति देतो ( अमर० २।५।३३ ). पक्षासंबंधी पुढील ऋचा होय.

## खंड ४ था.

**कनिक्रदज्जनुषं प्रब्रुवाण इयर्ति वाचमरितेव नावम्। सुमङ्गलश्च शकुने भवासि मा त्वा का चिदभिभा विश्व्या विदत् ( ऋ० सं० २।४२।१ )**

**न्यक्रन्दीत् जन्म प्रब्रुवाणः। यथा अस्य शब्दः तथा नाम**

कनिक्रदत् = न्यक्रन्दीत् = ओरडला, ओरडत आहे; कनिक्रदत् = पुनः पुनः शब्दायमानः ( सायण ) = पुनः पुनः ओरडणारा. जनुषं = जन्म = जात; जनुषं जनिष्यमाणम् अर्थम् = पुढें घडणारी बरी वाईट गोष्ट ( सायण ). यथा अस्य शब्दः तथा नाम = जसा ह्याचा ( पक्षाचा ) शब्द तसें नांव; हें सामान्य विधान आहे ( निरुक्त ३।१८ ). दुर्गवृत्तींत नामेति असें आहे; जसा ह्याचा म्हणजे माझा शब्द तसें माझें नांव असें सांगत ( प्रब्रुवाणः ) असा दुर्ग अर्थ करतो.

**ईरयति वाचम् ईरयिता इव नावम्**

इयर्ति = ईरयति = ढकलतो, उच्चारतो; ईरयसि ( दुर्ग ) = उच्चारतोस. अरिता = ईरयिता = ढकलणारा, वल्हें मारणारा. अरित्रं = वल्हें; ग्रीक एरेटमस् = वल्हें; एरेटेस् = वल्हेवाला.

**सुमङ्गलश्च शकुने भव। कल्याणमङ्गलः। मङ्गलं गिरतेः गृणात्यर्थे। गिरति अनर्थान् इति वा**

सुमङ्गलः=कल्याणमङ्गलः; सु=कल्याण; कल्याणमङ्गलः दुर्गवृत्तींत नाहीं. भवासि = भव = हो. मङ्गलं=मं + गलम्; गल् = गर् = गिर्; गिर् = गृ = स्तुति करणें; मं = मां; जें मंगल तें माझी ( मां ) म्हणजे मनुष्याची स्तुति करतें ( गिरति ), त्याला खूष करतें; एथें गिरति हा गृणाति = स्तुति करतो ह्या अर्थी आहे. किंवा गिरति = गिळति =गिळून टाकतें; मंगल वस्तु अनर्थांना गिळून टाकते; मं = मे = माझे ( अनर्थ ).

**अङ्गलम् अङ्गवत्। मज्जयति पापकम् इति नैरुक्ताः मां गच्छतु इति वा**

मङ्गलं = म् + अङ्गलम्; अङ्गलं = अङ्गवत्; ल म्हणजे र हा मत्वर्थी प्रत्यय; अङ्गवत् हें पापकं ह्याचें विशेषण; म् = मज्जयति = बुडवून टाकते; मंगल वस्तु सवंध ( अङ्गवत् ) पाप बुडवून टाकते असें नैरुक्त म्हणतात. तस्कर ( ३।१४ ) व तायु ( ४।३८ ) ह्यांच्या नैरुक्तांनीं केलेल्या व्युत्पत्ति पहा. अङ्गलम् अङ्गवत् ही स्वतंत्र व्युत्पत्ति आहे असें दुर्ग मानतो; मंगलकार्याचीं अंगें दहीं, मध, अक्षता वगैरे असतात म्हणजे मंगलकार्यांत ह्या वस्तूंचा उपयोग करतात; खरा शब्द अङ्गल; त्याला म् उगाच जोडला आहे. ही स्वतंत्र व्युत्पत्ति असल्यास मङ्गल ह्यांतील मङ्ग = मज्ज् व लं = पापकं अशी विभागणी करावी लागेल. जिवानंद विद्यासागर ह्यांच्या पुस्तकांत मङ्गलम् अङ्गवत् असा पाठ आहे; तो पाठ त्यांना कोठें मिळाला तें कळत नाहीं. किंवा मङ्गलं = मं + गलं; मं = माम्; गलं = गम् = गच्छतु; मंगल वस्तु माझ्याकडे जावो म्हणजे येवो असें प्रत्येक जण इच्छितो. मङ्ग्यते गम्यते ( अमर १।३।२५ क्षीरस्वामी ) = ज्याच्याकडे मनुष्य जातो तें मंगल.

**मा च त्वा काचित् अभिभूतिः सर्वतः विदत्**

अभिभा = अभिभूतिः = उपद्रव. विश्व्या = सर्वतः = सर्व बाजूंकडून ( येणारी ). विश्व्या = सर्वप्रकारा सर्वतो वा ( दुर्ग ); सर्वप्रकारा = सर्व प्रकारची. आभभा व विश्व्या हे शब्द येथेंच आले आहेत; त्यांचा खरा अर्थ कळत नाहीं. 'च' अध्याहृत. यास्ककृत ऋचेचा अर्थः—पक्षी ओरडत आहे; वल्हें मारणारा जसा नांव पुढें ढकलतो तसा ( त्या ओरडण्यानें ) आपली जात सांगणारा हा पक्षी वाणी ढकलीत आहे म्हणजे वारंवार ओरडत आहे; हे पक्षा, आम्हांस कल्याणसूचक हो; तुला कोठूनही व कोणताही उपद्रव न पकडो म्हणजे न होवो. मा विदत् = न पकडो. वारंवार ओरडणारा ( कनिक्रदत् ) व होणारी गोष्ट मोठ्यानें सांगणारा असे कनिक्रदत् व जनुषं प्रबुवाणः ह्यांचे अर्थ सायणाचार्य करतात; कनिक्रदत् हें क्रियापदही होईल व वर्तमानकालवाचक विशेषणही होईल.

**गृत्समदम् अर्थम् अभ्युत्थितं कपिञ्जलः अभिववाशे। तदभिवादिनी एषा ऋक् भवति**

जवळ आलेली म्हणजे लवकरच घडून येणारी ( अभ्युत्थितं ) गोष्ट ( अर्थं ) कपिंजलानें गृत्समदाला ओरडून कळविली ( अभिववाशे ); तद्वाचक ही ऋचा होय. हें पुढील ऋचेचें निदान होय. त्या ऋचेचा ऋषि गृत्समद आहे.

## खंड ५ वा.

**भद्रं वद दक्षिणतो भद्रमुत्तरतो वद। भद्रं पुरस्तान्नो वद भद्रं पश्चात्कपिञ्जल ( खैलिकं सूक्तं ३।१ ) ॥ इति सा निगदव्याख्याता**

हे कपिंजला, दक्षिणेकडून, उत्तरेकडून, पूर्वेकडून, ( पुरस्तात् ) पश्चिमेकडून ( पश्चात् ) मंगलवाचक शब्द उच्चार. इति सा निगद व्याख्याता ( पान ५७६ शेवट पहा ). ऋग्वेदांत घुसडलेली खिल नांवाचीं सूक्तें आहेत; तीं ऋषींना दिसलीं नसून लोकांनीं रचलीं म्हणून त्यांना ऋग्वेदांत स्थान नाहीं; त्यांची भाषा अर्वाचीन आहे.

**गृत्समदः गृत्सः मदनः। गृत्सः ( निघं० ३।१५।३ ) इति मेधाविनाम। गृणातेः स्तुतिकर्मणः**

गृत्समदः = गृत्सः मदनः; गृत्स = मेधावी = बुद्धिमान्; गृ = स्तुति करणें ह्यापासून गृत्स; त्स हा नामकरण प्रत्यय; ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. गृत्सःमदनः = आनंद देणारा बुद्धिमान ( ऋषि ). महाराष्ट्रपाठ गृत्समदनः असा आहे; गृत्सानां मदनः = बुद्धिवानांना आनंद देणारा. शकुनी संबंधानें कनिक्रदत् जनुषं० ही ऋचा दिल्यावर भद्रं वद० ही ऋचा देण्याचें कांहीं कारण नाहीं; कारण शकुनिः ह्या नंतर निघंटूत मण्डूकाः हा शब्द आहे कपिंजल हा शब्द नाहीं; तेव्हां गृत्समदम् अर्थम् अभ्युत्थितं एथ पासन गृणातेः स्तुति कर्मणः हा सर्व मजकूर प्रक्षिप्त असावा.

**मण्डूकाः ( ३ ) मज्जूकाः। मज्जनात्। मदतेर्वा मोदति कर्मणः। मन्दतेर्वा तृप्तिकर्मणः। मण्डयतेः इति वैयाकरणाः। मण्डः एषाम् ओकः इति वा। मण्डः मदेः वा मुदेः वा। तेषाम् एषा भवति**

मण्डूकाः = मज्जूकाः; मंडूक हा शब्द मूळचा मज्जूक; मज्जनात् = मस्ज् बुड्या मारणें ह्या धातूपासून मज्जूक; बेडूक पाण्यांत बुड्या मारतात. किंवा मण्डूक शब्द मद् = हर्ष पावणें ह्यापासून; किंवा मन्द् = तृप्त होणें ह्यापासून; मद् = मन्द् = मण्ड्; मण्ड् + ऊकः = मण्डूकः; बेडकांना पाण्यामुळें हर्ष होतो; बेडूक पाणी पिऊन तृप्त होतात. मद तृप्तियोगे ( १०।१७२ )। मादयते। मदि स्तुतिमोदमदस्वप्नकांतिगतिषु ( १।१३ ) असे दोन धातु धातुपाठांत आहेत; यास्ककालीं मद् हर्ष पावणें व मदि तृप्त होणें असे धातू होते असें दिसतें. वैयाकरण म्हणतात कीं

मण्ड् = भूषविणें ह्यापासून; मडि भूषायां धा० १०५४; बेडकांचे अंग नाना प्रकाच्या रंगांनीं व ठिपक्यांनीं भूषित असतें (ऋ० सं० ७।१०३). किंवा मण्ड आहे वसतिस्थान (ओकः) ह्यांचें म्हणून ते मण्डूक; मण्ड = भाजी वगैरेचा रस; पानें आंत पडून कडवट झालेलें पाणी; ऊकः = ओकः = निवासस्थान; बेडूक गढूळ पाण्यांत राहतात; मण्डशब्द मद् हर्षे (धा० ११।१३) किंवा मुद् (धा० ११।१६) पासून; गढूळ पाणी बेडकांना आनंद देतें; मुद् = मद् = मण्ड. मण्डति मण्डते वा मण्डूकः (अमर १।९।२४ क्षीरस्वामी). बेडकासंबंधीं पुढील ऋचा.

## खंड ६ वा.

**संवत्सरं शशयाना ब्राह्मणा व्रतचारिणः । वाचं पर्जन्यजिन्वितां प्र मण्डूका अवादिषुः (ऋ० सं० ७।१०३।१)**

**संवत्सरं शिश्यानाः ब्राह्मणाः व्रतचारिणः ब्रुवाणाः**

शशयानाः = शिश्यानाः = झोपलेले; शय् (= निजणें) अभ्यासानें शशय्; ऋग्वेदांत शय् धातु असावा. गुर्जरपाठ शिश्यानाः नसून शयानाः आहे. शिश्यानाः हें द्वितीय भूतकाळचें विशेषण; शयानाः हें वर्तमानकाळचे विशेषण. ब्रुवाणाः(अध्याहृत) =बोलूं लागणारे; संवत्सर सत्रांत यजमान वर्षभर मुके राहतात व वर्ष संपल्यावर बोलूं लागतात; व्रत=न बोलण्याचें व्रत. भाष्यांतील व्रतचारिणो ब्रुवाणाः हे शब्द व्रतचारिणः ब्रुवाणाः किंवा व्रतचारिणः अब्रुवाणाः असें तोडतां येतील; अब्रुवाणाः = (व्रतामुळें) न बोलणारे; हा अर्थ जास्त योग्य दिसतो.

**अपि वा उपमार्थे स्यात् । ब्राह्मणाः इव व्रतचारिणः इति**

किंवा ब्राह्मणाः हा शब्द उपमार्थी असेल; जसें ब्राह्मणांप्रमाणें व्रतस्थ होऊन मूकवृत्ति धारण करणारे. बेडकांना ब्राह्मण म्हणणें हें ब्राह्मणांचा अपमान करणें होय; पण उपमेंत अपमान नाहीं काय? निघंटु ३।१३ त इदमिव । इदं यथा । अग्निर्न ये । चतुरश्चिद्दमानात् । ब्राह्मणा व्रतचारिणः असा क्रम आहे; यास्कानें चतुरश्चिद्दमानात् (निरुक्त ३।१६) ह्यानंतर ब्राह्मणा व्रतचरिणः ह्याचें विवरण केलें नाहीं; कारण तें विवरण प्रस्तुत खंडांत द्यावयाचें होतें.

**वाचं पर्जन्यप्रीतां प्रावादिषुः मण्डूकाः**

पर्जन्यजिन्वितां = पर्जन्यप्रीतां = पर्जन्यानें तृप्त झालेली; बेडूक तृप्त म्हणून त्यांची वाणीही तृप्त; दुर्गवृत्तींत पर्जन्येन तर्पितां असें आहे; तार्पितां = तृप्तां? जिवि प्रीणने (धा० १।५९५). पण जिन्वितां = प्रेरितां; पर्जन्यानें प्रेरित अशी वाचा. वर्षभर निजणारे, व्रत आचरणारे ब्राह्मण, किंवा ब्राह्मणांप्रमाणें मूकव्रत धारण करणारे बेडूक मोठ्यानें पर्जन्यानें प्रेरित असे शब्द उच्चारूं लागले.

**वसिष्ठः वर्षकामः पर्जन्यं तुष्टाव । तं मण्डूकाः अन्वमोदन्त । स मण्डूकान् अनुमोदमानान् दृष्ट्वा तुष्टाव । तदभिवादिनी एषा ऋक् भवति**

पावसाची इच्छा करणारा वसिष्ठ पर्जन्याची स्तुति करता झाला; बेडकांनीं

त्याला अनुमोदन दिलें; ते अनुमोदन देत आहेत असें पाहून तो त्यांची स्तुति करता झाला; तदर्थवाचक ही ( पुढील ) ऋचा होय.

## खंड ७ वा.

**उप प्रवद मण्डूकि वर्षं मा वद तादुरि। मध्ये ह्रदस्य प्लवस्व विगृह्य चतुरः पदः ( स्वैलिकं सूक्तं १६ ) ॥ इति सा निगदव्याख्याता**

गुर्जर पाठ प्रवद आहे. हे बेडके, जवळ ( उप ) जाऊन पावसाला मोठ्यानें (प्र=प्र) बोल (वद); आसपास (आ) ऐकूं जाईल इतकें मोठ्यानें बोल (वद); चार पाय पसरून (विगृह्य) डोहाच्या मध्यें पोह. इति सा निगदव्याख्याता (पान ५७६ शेवट पहा). इतर शब्द स्पष्ट असले तरी तादुरि? तादुरि तरणशीले। अथवा। तावदुदरि। यावच्छरीरं तावदेव उदरम् अस्याः (दुर्ग); तादुरि=तरणशीले=पाण्यावर तरंगणें असा स्वभाव आहे जीचा अशा हे बेडके; किंवा तादुरि = तावदुदरि; जेवढें शरीर तेवढें तिचें पोट असतें; तादुरि = ता + दु + रि; ता + रि = तरणं; दु = शीलम्; किंवा तात् + उ + रि; तात् = तावत्; उरि = उदरि. पाहिजे तो अर्थ व अर्थाप्रमाणें व्युत्पत्ति! आदुरि (४।३१।२४) व यादुरी (१।१२६।६) असे आणखी शब्द ऋग्वेदांत आहेत; आदुरि, तादुरि व यादुरी ह्यांचा अर्थ काय?

**अक्षाः ( ४ )। अश्नुवते एनान् इति वा। अभ्यश्नुवते एभिः इति वा तेषामेषा भवति**

अश् + स = अक्ष; जुवेबाज ह्यांना ( एनान् ) व्यापतात ( अश्नुवते ) म्हणजे हातांत धरतात; किंवा ह्यांच्या साह्याय्यानें ( एभिः ) दुसऱ्याचें धन भोगतात ( अभ्यश्नुवते ). अश् = व्यापणें ( धा० ५।१८ ); अभि + अश् = खाणें, भोगणें, हा अर्थ धातुपाठांत नाहीं. अक्ष्णोति व्याप्नोति अक्षः ( अमर २।४।५९ क्षीरस्वामी ); अक्षू व्याप्तौ ( १।६५५ ); अक्षति किंवा अक्ष्णोति.

## खंड ८ वा.

**प्रावेपा मा बृहतो मादयन्ति प्रवातेजा इरिणे वर्वृतानाः।**
**सोमस्येव मौजवतस्य भक्षो विभीदको जागृविर्मह्यमच्छान् ( १०।३४।१ )**
**प्रवेपिणः मा महतः विभीदकस्य फलानि मादयन्ति। प्रवातेजाः प्रवणेजाः**

प्रावेपाः = प्रवेपिणः = जोरानें हलणाऱ्याचीं; प्रावेपाः शब्द एथेंच आला आहे; त्यांत वेप् ( = कांपणें, हलणें ) हा धातु असल्यास प्र व आ हे उपसर्ग असतील; प्र वेगेन आ आसमन्तात् वेपन्ते ते प्रावेपाः; प्रावेपाः हा शब्द षष्ठ्यंत दिसत नाहीं. बृहतः = महतः; प्रवेपिणः व बृहतः हे शब्द विभीदकस्य ह्या अध्याहृत शब्दाचीं विशेषणें; दुसऱ्या अर्धांत विभीदकः आहे; तो विभीदकस्य ह्या रूपानें अध्याहृत घेतला आहे. 'फलानि' अध्याहृत. जोरानें हलणाऱ्या मोठ्या विभीदकाचीं फळें मला मत्त म्हणजे वेडा करीत आहेत. बिभीतक = अक्ष = धाटिंग किंवा बेहडा.

वेदकालीं फासे कशाचे करीत होते तें सांगणें अशक्य. प्रस्तुत ऋचेंत बृहतः प्रावेपाः =बृहत् नांवाच्या झाडाचीं फळें असा अर्थ असेल. प्रवातेजाः=प्रवणेजाः=डोंगराच्या उतरणीवर जन्मलेले, वाढलेले.प्रवातेजाः=पुष्कळ पाण्यांत जन्मलेले किंवा मोठ्या वाऱ्याच्या ठिकाणीं जन्मलेले ( दुर्ग ). पण प्रवातेजाः कशाचें विशेषण? फलानि हें नपुंसकलिंगी आहे; अक्षाः ( अध्याहृत ) ह्याचें विशेषण असेल. प्रवणेजाः = उदकबहुलदेशे जातः हें विभीदकः ( अध्याहृत ) ह्याचें तें विशेषण करावें; पुष्कळ पाण्यांत उगवणारा जो विभीदक वृक्ष त्याचीं फळें असाही अन्वय होईल असें दुर्ग म्हणतो.

**इरिणे वर्तमानाः । इरिणं निर्ऋणम् । ऋणातेः । अपार्णं भवति । अपरताः अस्मात् ओषधयः इति वा**

वर्वृतानाः = वर्तमानाः = असणारे. इरिणं = इर्रिणं = निर्ऋणम्; इर् = निर्; रिणं = ऋणम्; द्यूतकार ऋण ठेवीत नाहींत व ठेऊं देत नाहींत; द्यूतांत मारलेली पैज तेव्हांच्या तेव्हां सफल केली पाहिजे असा द्यूतकारांचा नियम होय. अपार्णं भवति = द्यूताची जागा ऋणमुक्त असते ( अपगतम् ऋणं यस्मात् ). ऋण शब्द किंवा रिण शब्द ऋ जाणें ह्यापासून. दुर्गवृत्तींत भवति नसून 'वा' आहे; तो म्हणतो निर्ऋणं व अपार्णं ह्यांचा अर्थ एकच; उपसर्ग भिन्न एवढेंच; पण तो 'अपगतोदकं' असाही अर्थ देतो; तेव्हां त्यानें अपार्णं हा शब्द 'अपरताः अस्मात् ओषधयः इति वा' ह्याच्याशीं जोडला असावा; जेथून ओषधि निघून गेल्या आहेत म्हणजे जेथें झाडझूड वाढत नाहीं अशी जागा; इरिणे वर्वृतानाः = निर्जल स्थानीं असणारे; पण प्रवणेजाः = पुष्कळ उदकाच्या जागीं जन्मलेलें असें त्यानें आधीं म्हटलें आहे त्याची वाट काय? 'इरिणं निरिणं रिणातेः' असा गुर्जरपाठ आहे; ऋ बदल रि उच्चारलें गेलें असावें. दुर्गवृत्तींत ऋणातेः नाहीं. इरिणे वर्तमानाः = ( १ ) द्यूतस्थानीं असणारे फासे; ( २ ) निर्जलप्रदेशांत असणारीं फळें ( अक्षाः ) असा दुहेरी अर्थ यास्काच्या मनांत होता कीं काय? दुसरा अर्थ विसंगत नसावा म्हणून प्रवणेजाः = उतरणीवर वाढलेले असा अर्थ केला पाहिजे. इरिणं = आस्फुरकस्थानं किंवा आस्फारकस्थानं = फांसे टाकण्याची जागा असाही दुर्ग अर्थ देतो व तोच योग्य वाटतो. वर्वृतानाः = वारंवार किंवा जोरानें गरगर पडणारे; वृत् = गरगर फिरणें; वर्वृत् = वारंवार किंवा जोरानें गरगर फिरणें; पण फासे गरगर कसे फिरतील? तेव्हां फाश्या ऐवजीं कवड्यांसारखें कांहीं तरी असेल; इरिणे वर्वृतानाः = द्यूतपटावर किंवा चौरंगावर गरगर फिरणारीं फळें; हीं बृहत् नांवाच्या झाडाचीं फळें ( प्रावेपाः ) असतील. प्रवातेजाः ह्याचा अर्थ करतां येत नाहीं. इरिण शब्द ऋग्वेदांत ६ वेळां आला आहे; त्यांपैकीं ३ ठिकाणीं त्याचा अर्थ पाण्याचा झरा किंवा डबकें असा आहे. एके ठिकाणीं ( १।१८६।९ ) त्याचा अर्थ कळत नाहीं. नीचा वर्तन्ते उपरि स्फुरन्ति अहस्तासो हस्तवन्तं सहन्ते। दिव्या अङ्गारा इरिणे न्युप्ताः शीताः सन्तो हृदयं निर्दहन्ति ( १०।३४।९ ) = ( फासे ) खालीं असतात किंवा पडतात ( तथापि ) वर उडतात किंवा लाथा मारतात; हात

नसूनहि ते हात आहेत ज्याला अशा मनुष्याचा पराभव करतात; आकाशांतून पड-लेले जळते कोळसे पाण्याच्या डबक्यांत पडून व थंड होऊनहि ते मनुष्याच्या हृद-याला पार जाळून टाकतात; येथें इरिण ह्याचे पाण्याचें डबकें व फांस टाकण्याची जागा असे दोन्हीहि अर्थ संभवतात; पहिला अर्थ वर दिला आहेच; 'दिव्या अङ्गारा इरिणे न्युप्ताः शीताः सन्तो हृदयं निर्दहन्ति' ह्याचा दुसरा अर्थः— जुगा-रींतील ( दिव्याः ) हे जळते कोळसेच आहेत; फासे टाकण्याच्या जागेवर ( इरिणे ) टाकले असतां ( न्युप्ताः ) थंड ( शीताः ) असूनहि ते हृदय पार जाळून टाकतात; हे दोन अर्थ प्रस्तुत ऋचेंतहि लागू पडतात; इरिणे वर्वृतानाः = ( १ ) पाण्यांत सतत असणारे; ( २ ) फासे टाकण्याच्या जागेवर वारंवार पडणारे. प्रवातेजाः = पुष्कळ वाऱ्याचें ठिकाणीं वाढलेलें; फाशांचीं झाडें वाऱ्याच्या ठिकाणीं व पाण्यांत अस-ल्यामुळें अतिशय थंड असलींच पाहिजेत;तथापि त्यांचीं फळें खेळणाऱ्याला मद आणतात ( मादयन्ति ). वर दिलेल्या ९ व्या ऋचेंत अङ्गाराः असा शब्द आहे; त्यावरून हीं खेळण्याचीं फळें लाल असावींत; तेव्हां अक्ष हें कोणतें झाड असावें ?

**सोमस्येव मौजवतस्य भक्षः। मौजवतः मूजवति जातः। मूजवान् पर्वतः। मुञ्जवान्। मुञ्जः विमुच्यते इषीकया।**

मौजवतः = मूजवान् पर्वतावर जन्मलेला; मूजवान् हें एका पर्वताचें नांव आहे; ह्या पर्वताला मूजवान् म्हणण्याचें कारण त्याच्यावर मुञ्ज नांवाचें गवत उग-वतें; मुञ्ज शब्द मुच् ह्या धातुपासून झाला आहे; हें गवत इषीकेनें सोडलें जाते ( विमुच्यते ) म्हणजे त्यांतून लहान लहान सळया ( इषीका ) बाहेर निघतात. उप-निषदांत मुञ्जादिवेषीकम् असे शब्द येतात; इषीकम् = सळई.

**इषीका इषतेः गतिकर्मणः। इयमपि इतरा इषीका एतस्मादेव। विभीदकः विभेदनात्। जागृविः जागरणात्। मह्यम् अचच्छदत्**

इष् = जाणें ह्यापासून इषीका. सळई ह्या अर्थाचा लौकिक शब्द जो इषीका तो ह्याच धातुपासून झाला आहे; इषीका सोनाराची सळई; गवताची सळई (इषीका) ही गवताच्या कांड्यांतून बाहेर जाते ( पडते ); सोनाराची सळई वितळलेल्या सोन्या-रुप्यांत पारख करण्याकरितां जाते. वि + भिद् ह्यापासून विभीदक; विभीदक फळ विभीदक नांवाचें झाड फोडून बाहेर येते. अर्वाचीन संस्कृतांत बिभीतक; बिभेति अस्मात् बिभीतकः ( अमर २।४।५८ क्षी० ). जागृ = जागे होणें ह्यापासून जागृवि; अग्नि, इंद्र, सोम, दक्षिणा व स्तुति ह्यांना जागृवि शब्द लावलेला आढळतो; तेथें त्याचा अर्थ दाता असा असावा; प्रस्तुत ऋचेंत जागृवि म्हणजे सतत जागे ठेवणारा व दाता असे दोन्हीहि अर्थ असतील; जुगारीमुळें मनुष्याचें मन केव्हांहि शांत नसते; डोक्यांत सदा पैजा जिंकण्याचे विचार येतात; कधीं कधीं जुगार धनहि देते. दुर्ग म्हणतोः— पैज जिंकणारा हर्षामुळें जागा असतो तर गमविणारा रात्र दुःखांत घालवितो. अच्छान् = अचच्छदत्. छन्द् =(१) खूष करणें (२) देणें

ह्या पासून अच्छान्. गावो भगो गाव इंद्रो मे अच्छान् गावः सोमस्य प्रथमस्य भक्षः (६।२८।५) = भगानें, इंद्रानें व उत्तम सोमाच्या भक्षानें मला गाई दिल्या आहेत; येथें अच्छान् = दिल्या आहेत. जसा अक्रान् ह्यांत क्रंद् धातु आहे तसा अच्छान् ह्यांत छंद् धातू असावा; ह्या धातूचीं छदयत्, छदयति, छदयथः, छदयंति, छदयाथ, छंत्सत्, छंत्सि वगैरे रूपें ऋग्वेदांत येतात; सर्वांचा चतुर्थ्यंत नामांशीं संबंध आढळतो. दुर्गानें ऋचेचा केलेला अर्थः– मूजवत् पर्वतावरील सोमाच्या रसाचें भक्षण जसें यजमानाला हर्षवितें, तृप्त करतें तसें वायुमय प्रदेशांत जन्मलेली (प्रवातेजाः), पुष्कळ पाण्यांत असणारी (इरिणे वर्वृतानाः), इतस्ततः जोरानें हालणाऱ्या (प्रावेपाः) मोठ्या वृक्षाचीं (बृहतः) फळें मला हर्षवितात किंवा तृप्त करतात (मादयन्ति); विभीदक मला सतत जागें ठेवून (जागृविः) मला (मह्यं) झांकून टाकतो (अच्छान्), म्हणजे विभीदक वृक्ष आपल्या फळांच्या शब्दानें म्हणजे फाशांच्या आवाजानें माझें मन झांकून टाकून म्हणजे गुंग करून माझ्या ठायीं द्यूताविषयीं उत्साह उत्पन्न करतो. एथें दुर्ग छद् किंवा छन्द् ह्याचा झांकून टाकणें असा अर्थ करतो; पण तसा अर्थ असल्यास मह्यं बद्दल मां पाहिजे होतें. अचच्छदत् हें १० व्या गणांतील छद् याचें तृतीयभूतकालीन रूप आहे; यास्काच्या मनांत अचच्छदत् ह्याचा काय अर्थ होता तो कळण्यास मार्ग नाहीं. मला समजलेला अर्थः–पुष्कळ वारा वाहतो आहे अशा प्रदेशांत जन्मलेली (प्रवातेजाः) व सतत पाण्यांत असणारी (इरिणे वर्वृतानाः) बृहत् वृक्षाचीं फळें (प्रावेपाः) मला मद आणतात; मूजवत् पर्वतावरील सोमाचा भक्ष जसा मद उत्पन्न करतो तसा फासा मला सतत जागें ठेवून (जागृविः) मद उत्पन्न करतो (अच्छान्). इरिणे वर्वृतानाः = द्यूतफलकावर गरगर फिरून आवाज करणारे (फासे) असाहि अर्थ होईल. दुसऱ्या अर्धाचा धनपरही अर्थ होईल; तो असाः–– देवांना दिलेला मूजवत् पर्वतावरील सोमाचा रस जसा यजमानाला धन देतो तसा दाता (जागृविः) जो फासा (विभीदकः) त्यानें मला (मह्यं) आजपर्यंत पुष्कळ धन दिलें आहे (अच्छान्).

**प्रशंसति एनान् प्रथमया। निंदति उत्तराभिः। ऋषेः अक्षपरिद्यूनस्य एतत् आर्षं वेदयन्ते**

ऋषि (१०।३४) ह्या सूक्ताच्या १ ल्या ऋचेंत ह्यांची (एनान्) म्हणजे फाशांची स्तुति करतो व पुढील ऋच्यांत त्यांची निंदा करतो; (ह्या सूक्तांत जुगारीची फार निंदा केली आहे व जुगारीपासून होणारे तोटे स्पष्ट दाखविले आहेत; थोडीशी स्तुति जी आहे ती पहिल्या ऋचेंतच आहे); जुगार खेळण्यानें वीट येऊन (अक्षपरिद्यूनस्य) ऋषीला हें सूक्त दिसलें असें निदानकार कळवितात (वेदयन्ते). अक्षैः किंवा अक्षेभ्यः परिद्यूनः = फाशांना कंटाळलेला. दिवोऽविजिगीषायाम् (पा० ८।२।४९) = जेंव्हा जुगार जिंकण्याची आशा नसते म्हणजे मनुष्य जुगार हरतो तेंव्हा दिव् (= द्यूत खेळणें) ह्याचें भूतभूतकाळचें विशेषण द्यून असें होतें; (पण जिंक-

ण्याची जेव्हां इच्छा असते तेव्हां द्यूत असें रूप होतें ). आर्षम् = ऋषीनें रचलेलें किंवा ऋषीला दिसलेलें सूक्त.

**ग्रावाणः (५) हन्तेर्वा। गृणातेर्वा। गृह्णातेर्वा। तेषामेषा भवति**

ग्रावन् शब्द हन् = आघात करणें ह्यापासून; कारण ग्रावे सोमावर आघात करतात म्हणजे सोम ठेचतात; ग्रावन् ह्यांत हन् मधील फक्त न् आहे; ह बद्दल ग्रा घातलें आहे असें देवराज म्हणतो. किंवा गृ = आवाज करणें किंवा स्तुति करणें ह्यापासून; सोम ठेचतांना ग्रावे आवाज करतात किंवा ग्राव्यांची स्तुति केली जाते. किंवा ग्रह् = हातांत घेणें ह्यापासून; कारण सोम ठेचण्याकरितां ग्रावे हातांत धरतात. १०।९४ ह्या सूक्तांत ग्रावे बोलतात असें म्हटलें आहे; तेव्हां ग्रावन् मध्ये वद् धातू असेल; गृ = बोलणें; गृ + आ = ग्रा; वन् = वद्; ग्रावन् = मोठ्यानें बोलणारा; किंवा वन् भोगणें; गृ + आ + वन् = सोम गिळणारा आणि भोगणारा; अशा आणखीही व्युत्पत्ति देतां येतील. ग्रावन् म्हणजे मेघ ह्या अर्थी हन्यते मेघः इन्द्रेण अशी व्युत्पत्ति; किंवा गृ = गिळणें; गिरति उदकं वर्षितुम् = पाऊस पाडण्याकरितां मेघ पाणी गिळतो; किंवा समुद्गिरति जलं वृष्टिसमये = मेघ पावसाळ्यांत पाणी ओकतो; अन्तरिक्षेण गृणाति गर्जितलक्षणं शब्दं करोति = मेघ अंतरिक्षांत गर्जना करतो; गृ = शब्द करणें; किंवा स्तूयते वर्षार्थिभिः = पावसाची इच्छा करणाऱ्या लोकांकडून मेघ स्तविला जातो; गृ = स्तुति करणें. जेव्हां ग्रावा म्हणजे पर्वत तेव्हां पर्वतः हन्यते इन्द्रेण पक्षच्छेदसमये = जेव्हां पर्वतांचे पंख इन्द्रानें तोडले तेव्हां त्याला पर्वतांवर आघात करावे लागले; किंवा गिरति मेघैः अभिवृष्टं = मेघांनीं वर्षिलेलें पाणी पर्वत गिळतो; किंवा निर्झरजलम् उद्गिरति = झऱ्याच्या रूपानें पर्वत पाणी ओकतो; किंवा गुहादिगतसिंहादिशब्देन शब्दकारी = गुहेंत असणाऱ्या सिंहासारख्या हिंस्र प्राण्यांच्या शब्दामुळें तोही शब्द म्हणजे प्रतिध्वनि करतो; स्तूयते च पदार्थबाहुल्यात् प्राणिभिः = पर्वतांवर मुबलक वस्तु असल्यामुळें प्राणी पर्वतांची स्तुति करतात; अशा व्युत्पत्ति देवराज देतो; गृह्णातेर्वा ही व्युत्पत्ति तो देत नाहीं. त्या ग्राव्यांविषयीं पुढील ऋचा होय.

## खंड ९ वा.

**प्रैते वदन्तु प्र वयं वदाम ग्रावभ्यो वाचं वदता वदद्भ्यः।**

**यदद्रयः पर्वताः साकमाशवः श्लोकं घोषं भरथेन्द्राय सोमिनः ( ऋ० सं० १०।९४।१ )**

**प्रवदन्तु एते। प्रवदाम वयम्। ग्रावभ्यः वाचं वदत वदद्भ्यः**

हे ग्रावे मोठ्यानें बोलोत; आम्ही त्यांच्याशीं मोठ्यानें बोलूं; वाचा बोलणाऱ्या ग्राव्यांना तुम्ही बोला.

**यत् अद्रयः पर्वताः। अदरणीयाः। सहसोमम्। आशवः क्षिप्रकारिणः। श्लोकः शृणोतेः। घोषः घुष्यतेः। सोमिनः यूयं स्थ इति वा। सोमिनः गृहेषु इति वा**

अद्रयः = पर्वताः; अद्रि शब्द अ + दृ ह्यापासून; दृ = फोडणें; पर्वत फोडतां येत नाहींत (अ + दरणीयाः) म्हणून ते अद्रि. दुर्गानें आदरणीयाः असा पाठ घेतला आहे; आदरणीयाः = आदरणार्हाः = आदरास पात्रः पर्वत आदराला पात्र आहेत. निघंटूंत (१।१०) अद्रि = मेघ एवढाच अर्थ दिला आहे; मेघाला अद्रि म्हणण्याचें कारण तो सूर्य-किरणांनीं वर नेलेलें पाणी खातो; अद्+रिः=अद्रिः; पण अद्रि = पर्वत असा जेव्हां अर्थ असतो तेव्हां तो शब्द अ + दृ ह्यापासून. अशा अद्रि शब्दाच्या दोन व्युत्पत्ति देवराज देतो. साकम् = सहसोमं. आशवः = क्षिप्रकारिणः = भराभर काम करणारे. परंतु आशु = घोडा असा निराळाच अर्थ आहे. श्लोक शब्द श्रु ऐकणें ह्यापासून; श्लोक = श्रोक = श्रो + क; श्रु याला गुण होऊन श्रो; क हा नामकरण प्रत्यय. श्लोक = घोष; घुष् = आवाज करणें ह्यापासून घोष. सोमिनः = सोमिनः यूयं स्थ = ( हे ग्राव्यानो ) तुम्ही सोमवंत आहांत; म्हणजे तुम्हास सोम पिण्यास मिळतो; किंवा सोमिनः = सोमिनः गृहेषु = जो सोमरस काढतो अशा यजमानाच्या घरीं. गृहाः पुंसि च भूम्न्येव ( अमर २।२।५ ) = घरें जेव्हां पुष्कळ असतात तेंव्हाच गृहाः असें पुलिंगी बहुवचनी रूप होतें; पण यास्ककालीं घर एक असूनही गृह शब्द पुलिंगी बहुवचनी होता असें दिसतें. यास्कानें केलेला ऋचेचा अर्थः— हे ग्रावे मोठ्यानें बोलोत; आम्ही मोठ्यानें बोलूं; उंच वाणीनें बोलणाऱ्या या ग्राव्यांना तुम्ही बोला; कारण हे अद्रींनो, हे पर्वतांनो, जलद काम करणारे तुम्ही सोम पिऊन किंवा सोमरस काढणाऱ्या यजमानाच्या घरीं सोमासह ( साकं = सहसोमं ) स्तुति अर्पण करा. पहिल्या अर्धांत ग्रावे हे तृतीयपुरुषी तर दुसऱ्यांत द्वितीयपुरुषी आहेत. दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थः— यस्मात् ते अद्रयः आदरणीयाः आदरणार्हाः पर्ववन्तः साकम् आशवः सहभूताः सोमम् अश्नीथ अभिषुणुथ । तं च अभिषुण्वन्तः इन्द्राय श्लोकं श्रवणीयं हृद्यं घोषं शब्दं भरथ धारयथ निर्वर्तयथ । ये ते यूयम् अमुना प्रकारेण यस्मात् सोमिनः भवथ। अथवा। सोमिनः सोमेन तद्वतः यजमानस्य गृहेषु एवं कुरुध्वे तस्मात् युष्मान् अधिकृत्य ब्रवीमि । प्रैते वदन्तु युष्मदर्थं स्तुतीः उद्गातारः । प्रवदाम वयं होतारः । अध्वर्यून् अपि च ब्रूमहे । एभ्यः ग्रावभ्यः वाचं वदद्भ्यः वदत वाचं या वक्तव्या एतान् प्रति इति = हे ग्राव्यांनो, ज्याअर्थीं आदराला पात्र (अद्रयः) व पेऱ्यांनीं युक्त (पर्वताः) तुम्ही एकजुटीनें ( साकम् ) सोम खातां ( आशवः ) म्हणजे सोमाचा रस काढतां व सोमरस काढीत असतांना श्रवणीय ( श्लोकं ) म्हणजे हृदयंगम अशी स्तुति ( घोषं ) इंद्राला अर्पण करतां ( भरथ ) व जे तुम्ही अशा रीतीनें सोमयुक्त होतां किंवा यजमानाच्या घरीं सोमरस काढतां आणि इंद्राची स्तुति करतां त्या तुम्हाला उद्देशून मी म्हणतों कीं हे उद्गाते, तुमची स्तुति उच्चारोत; आम्ही होतेही तुमची स्तुति उच्चारूं; आणखी आम्ही अध्वर्यूंना म्हणतों कीं ह्या ग्राव्यांना जी स्तुति अर्पण करावयाची असते ती स्तुति तुम्ही उच्चारा. असा भिन्न अर्थ दुर्ग करतो; आशवः म्हणजे

तुम्ही खातां हा अर्थ विलक्षण आहे; यत् शब्दामुळें त्यानें ऋचेचे दोन अर्ध अशा रीतीनें जोडले आहेत; श्लोक व घोष ह्या शब्दांच्या व्युत्पत्ति त्यानें दिल्या नाहींत. ग्राव्यांना पर्वत व घोडे असें अतिशयोक्तीनें म्हटलें आहे; घोडे खेंकाळतात त्याप्रमाणें ग्रावे मोठ्यानें आवाज करतात; पर्वतही पर्जन्यवृष्टी होत असतांना मोठा आवाज करितात. एते ग्रावाणः प्र उच्चैः वदन्तु। वयमपि वदद्भ्यः ग्रावभ्यः प्र उच्चैः वदाम वदिष्यामः। यूयमपि तेभ्यः वदता आवदत उच्चैः वदत। यत् हे अद्रयः हे पर्वताः हे आशवः यूयं साकं सोमिनः यजमानस्य श्लोकं घोषम् इंद्राय भरथ भरत इति = ह्या ग्राव्यांना मोठ्यानें बोलूं द्या; मोठ्यानें बोलणाऱ्या ह्या ग्राव्यांना आम्ही मोठ्यानें बोलूं व तुम्हीही मोठ्यानें बोला कीं (यत्) हे अद्रींनो, हे पर्वतांनो, हे अश्वांनो, तुम्ही एकत्र होऊन (साकं) सोमरस ज्यानें तयार केला आहे (सोमिनः) अशा यजमानाचें पाचारण (श्लोकं = घोषं) इंद्राकडे न्या. एथें यत् = कीं. सोम ठेचतांना जो आवाज होतो तें ग्राव्यांचें बोलणें; जणूं काय ग्रावे बोलत आहेत; म्हणून ऋत्विज् व यजमान ग्राव्यांना म्हणतात कीं तुमचें बोलणें चालवा व आम्ही सोमरस तयार केला आहे अशी वर्दी इंद्राकडे पोचवा. असा खरा अर्थ दिसतो. कदाचित् वदता (= वदतानि) हें वदद्भ्यः ह्याचें कर्म असेल; भाषण (वदता) बोलणाऱ्या (वदद्भ्यः) ग्राव्यांना आम्ही असा संदेश (वाचं) सांगतों कीं तुम्ही आमचें बोलावणें इंद्राकडे पोचवा.

**येन नराः प्रशस्यन्ते स नाराशंसः (९) मन्त्रः। तस्यैषा भवति**

ज्यानें माणसांची स्तुति केली असते तो मंत्र नाराशंस. दुर्ग म्हणतोः — वास्तविक मंत्राची स्तुति करावयाची नाहीं; स्तुति करावयाची ती सर्व माणसांची किंवा सर्व राजांची नसून विशिष्ट राजाची आहे; मन्त्र शब्द येथें लक्षणेनें योजिला आहे; मन्त्र म्हणजे मन्त्रांत सांगितलेला राजा. देवराज म्हणतो जसा प्रज्ञ आणि प्राज्ञ यांच्यांत भेद नाहीं तसा नराशंस आणि नाराशंस ह्यांतही नाहीं.

## खंड १० वा.

**अमन्दान्स्तोमान्प्र भरे मनीषा सिन्धावधि क्षियतो भाव्यस्य।**
**यो मे सहस्रममिमीत सवानतूर्तो राजा श्रव इच्छमानः (ऋ० सं० १।१२६।१)**
**अमन्दान् स्तोमान्। अबालिशान्। अनल्पान् वा**

मन्द = बालिश = पोरकट; अमन्दान् = पोरकट नसणारे, गंभीर अर्थाचे; किंवा अमन्दान् = अनल्पान् = अल्प नसणारे, पुष्कळ; मन्द = अल्प.

**बालः बलभर्ता। भर्तव्यः भवति। अम्बा अस्मै अलं भवति इति वा। अम्बा अस्मै बलं भवति इति वा। बलः वा प्रतिषेधव्यवहितः**

बालः = बलभर्ता; बल पासून तद्धित रूप बाल; बलं बिभर्ति असौ बलभर्ता = जो बळ धारण करतो तो; बलवर्तीप्रमाणें बलभर्ता शब्द बनवा-

नयाचा; परंतु बलवर्ती ह्याच्यांत वृत् धातू आहे व बलभर्ती ह्याच्यांत भृ धातू आहे; तेव्हां बलभर्ता हें रूप कसें सिद्ध होईल? महाराष्ट्रपाठ बलवर्ती असा आहे; बले वर्तते असौ बालः = जो लोकांच्या बलावर अवलंबून असतो तो बाल. किंवा बालः भर्तव्यः भवति; बालः = भारः; ब = भ; ल = र; लहान मूल हें एक ओझेंच आहे; त्याला दुसऱ्यानें वाहून न्यावें लागतें; भर्तव्यो भवति हें बलभर्ती ह्याचें विवरण असेल किंवा ती निराळीच व्युत्पत्ति असेल. किंवा बालः = बा + अलः; बा = अम्बा; अलः = अलम्; ह्याला म्हणजे मुलाला त्याची आईच पुरी असते; त्याला दुसरें कोणतेंही माणूस खपत नाहीं. किंवा बालः = बा + अलः; बा = अम्बा; अलः = बलः = बलम्; आई हीच त्याची शक्ति; त्याची शक्ति म्हणजे आईची शक्ति. किंवा प्रतिषेधेन व्यवहितः; अ हा प्रतिषेधार्थी म्हणजे नकारार्थी आहे; बल यांतील ब व ल ह्यामध्यें अ हें व्यवधान आलें आहे; म्हणजे त्या दोन अक्षरांची ताटातूट केली आहे; बालः = ब + अ + लः = अबलः = बलहीन. बालिशः शब्द निरुक्त ४।२० त आला आहे; बालः इव शेते अशी दुर्ग त्याची व्युत्पत्ति करतो; बाल शब्दाची व्युत्पत्ति तेथेंच द्यावयास पाहिजे होती; ज्याअर्थी दुर्गवृत्तांत बाल शब्दाची व्युत्पत्ति नाहीं त्याअर्थी केवळ गम्मत करण्याकरितां कुणीतरी हा मजकूर प्रस्तुत खंडांत घुसडला असावा. बलति प्राणिति बालः (अमर २।६।४२ क्षीरस्वामी). मूल जेव्हां बोलावयाला लागतें तेव्हां त्याचें तोंडांतून बा असें अक्षर निघतें; त्या अक्षरापासूनच अम्बा, बाबा, बाल, इंग्लिश बेबी व बॅबल् हे शब्द निघाले असावेत.

**प्रभरे मनीषया मनसः ईषया। स्तुत्या। प्रज्ञया वा**

मनीषा = मनीषया = मनसः इषया = मनाच्या गतीनें; मनाची गति स्तुतिरूप असेल म्हणजे मनांत स्तुति रचली गेली असेल; किंवा ती गति बुद्धिची हालचाल असेल; मनीषया = स्तुतीनें किंवा बुद्धीनें. भृ भरणें (धा० १। ९२३); भृ = अर्पण करणें; प्रभरे = मी अर्पण करतों. प्रभरे = उच्चारये (दुर्ग) = मी उच्चारितों.

**सिन्धौ अधिनिवसतः भावयव्यस्य राज्ञः**

क्षियतः = निवसतः = रहाणाऱ्याचें. भाव्यस्य = भावयव्यस्य राज्ञः = भावयव्य राजाचें. भावेन एव असौ आर्जवेनैव सर्वार्थान् यवयति मिश्रयति अनुतिष्ठति इति भावयव्यः (दुर्ग); भावयव्य = भाव + यव्य; भावेन = आर्जवेन = नम्रपणानें; यवयति असौ यव्यः; यवयति = मिश्रयति = अनुतिष्ठति = मिसळतो म्हणजे करतो; ह्या राजाला भावयव्य नांव पडण्याचें कारण तो सर्व गोष्टी नम्रपणानें म्हणजे भक्तीनें करतो असा दुर्ग अर्थ करतो.

**यः मे सहस्रं निरमिमीत सवान्। अतूर्तः राजा। अतूर्णः इति वा। अत्वरमाणः इति वा। प्रशंसाम् इच्छमानः**

अमिमीत = निरमिमीत = निर्माण करता झाला= देता झाला. अतूर्तः = अतूर्णः = त्वरा न करणारा, धिम्मा; किंवा अतूर्तः = अत्वरमाणः; अर्थ तोच; तुर् किंवा तॄ = त्वरा करणें; ह्याचें भूतभूतकाळचें विशेषण तूर्त; किंवा त्वर् = ( संप्रसारणानें ) तुर्; तुर् + तः = तूर्तः. श्रवः = प्रशंसाम् = कीर्ति. दुर्गानें केलेला अर्थः-- घाई न करणारा म्हणजे धिम्मा, कीर्तीची इच्छा करणारा व सिंधूनदावर राहणारा असा जो राजा मला हजार यज्ञांना पुरण्याजोगें धन निर्माण करिता झाला म्हणजे देता झाला त्या भावयव्य राजाला आपल्या स्तुतींचा किंवा बुद्धीचा उपयोग करून, पोरकट नसणाऱ्या म्हणजे गंभीर ( अबालिशान् ) किंवा पुष्कळ ( अनल्पान् ) स्तुति मी अर्पण करतों. ऋचेंत भाव्य शब्द आहे, भावयव्य नाहीं; भाव्य हें एका राजाचें नांव होतें; भव्य नांवाच्या राजाचा तो मुलगा असेल; भव्य असें एकाद्या राजाचें नांव ऋग्वेदांत नाहीं; भव्य म्हणजे धनयुक्त अशा अर्थी हा शब्द ऋग्वेदांत दोनदां आला आहे. भाव्य शब्द प्रस्तृत ऋचेंतच आढळतो. स्तोम याचा अर्थ कधीं कधीं धन असा होतो; अमन्दान् स्तोमान् = पुष्कळ धन. प्र = धन. भरे = देतों. भाव्य राजाला मी पुष्कळ धन देतों; कारण तो राजा पुढें आपल्याला पुष्कळ धन मिळावें म्हणून हजारांनीं मोजण्याइतकें धन मला देता झाला. सव = धन. मा = देणें; अमिमीत = देता झाला. अतूर्तः याचा अर्थ कळत नाहीं. वृत्रतूः = वृत्राची हिंसा करणारा, वृत्राला ठार मारणारा; तुर् ह्याचें भूतभूतकालचें विशेषण तूर्त. जसें देवांना व राजांना अदब्ध हें विशेषण लाविलें असतें तसें अतूर्त हें विशेषण भाव्यराजाला लावलें असावें; अतूर्तः = अदब्धः = अहिंसितः = ज्याला कोणीही उपद्रव देऊं शकत नाहीं असा.

## खंड ११ वा.

**यज्ञसंयोगात् राजा स्तुतिं लभेत राजसंयोगात् युद्धोपकरणानि। तेषां रथः ( ७ ) प्रथमागामी भवति। रथः रंहतेः गतिकर्मणः। स्थिरतेर्वा स्यात् विपरीतस्य। रममाणः अस्मिन् तिष्ठति इति वा। रपतेर्वा। रसतेर्वा। तस्यैषा भवति**

राजांचा यज्ञाशीं संबंध असतो म्हणून त्यांची स्तुति केली जाते; ( भाव्यराजानें हजार यज्ञांना पुरेल इतकें धन मला दिलें म्हणून त्याची मी स्तुति करतों असें मागील खंडांत म्हटलें आहे ); युद्धाच्या उपकरणांचा राजांशीं संबंध असतो म्हणून त्या उपकारणांची स्तुति केली जाते; युद्धोपकरणानि स्तुतिं लभंते असा अन्वय. ह्या युद्धसामुग्रींत रथ पहिला आहे. रंह् = जाणें ( धा० १।७३३ ) ह्यापासून रथ; रथ = रह; ही पहिली व्युत्पत्ति रथ जातो ह्या क्रियेवरून. किंवा स्थिर् = स्थिर असणें, न लटपटणें; रथ इतका जड असतो कीं तो हलतांना कधींहि लटपटत नाहीं; तो सदा स्थिर असतो; स्थिर यांतील अक्षरांची उलटा पालट केल्यानें ( विपरीतस्य ) रस्थि व नंतर रथि व नंतर रथ शब्द झाला; स्थिर् असा धातू धातुपाठांत नाहीं. ही व्युत्पत्ति दुर्गाच्या आधीं केव्हां तरी व कोणीतरी निरुक्तांत घुसडली असावी. किंवा

रथः = र + थः; र = रममाणः = मजा मारीत; थ = तिष्ठति = बसतो; रथाला रथ म्हणण्याचें कारण त्यांत बसणारा आनंदांत असतो. किंवा रप् = शब्द करणें ( १०।४०२ ) ह्यापासून; रप् = रथ्; रथ हलतांनां आवाज करतो. महाराष्ट्रपाठांत रपतेर्वा ह्यानंतर रसतेर्वा असें जास्त आहे; रस् = शब्द करणें ( धातुपाठ १०।७१४ ) ह्यापासून; रस् = रथ्. स्थिरतेर्वा स्यात् विपरीतस्य ह्यानंतरची कोणतीही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. रमन्ते अस्मिन् रथः ( अमर २।४।३० क्षीरस्वामी ). ग्रीक एथ्रेक्ष. ( ethreksba ) धांवणें.

## खंड १२ वा.

**वनस्पते वीड्वङ्गो हि भूया अस्मत्सखा प्रतरणः सुवीरः।**

**गोभिः संनद्धो असि वीळयस्वास्थाता ते जयतु जेत्वानि (ऋ०सं० ६।४७।२६)**

**वनस्पते दृढाङ्गः हि भव । अस्मत्सखा। प्रतरणः। सुवीरः कल्याण वीरः। गोभिः संनद्धः असि। वीळयस्व इति संस्तम्भस्व। आस्थाता ते जयतु जेतव्यानि**

वीड्वङ्गः = दृढाङ्गः = ज्याचे अवयव बळकट असतात असा; वीडु = वीळु = दृढ = बळकट. भूयाः = भव. सुवीरः = कल्याण वीरः = ज्यांत बसलेला वीर सुखी असतो; म्हणजे ज्यांत बसल्यानें बसणाराला कोणतीही इजा होत नाहीं असा. वीळयस्व = संस्तम्भस्व = बळकट हो, तुझे तुकडे न पडोत; इति = म्हणजे; इति शब्द दुर्गवृत्तींत नाहीं व त्याची जरूरीही नाहीं; संस्तम्भस्व ह्याच्याबद्दल दुर्गवृत्तींत संस्तम्नुहि आहे. जेत्वानि = जेतव्यानि = जिंकावयाच्या वस्तु; जसें कर्त्वानि = कर्तव्यानि; त्व = तव्य. ऋचेचा अर्थ :— हे वनाच्या राजा, तुझे अवयव दृढ असोत; आमचा तूं मित्र हो; आम्हाला धोक्यांतून पार पाड ( प्रतरणः); आंत बसणाऱ्या वीरांचें कल्याण होवो ( सुवीरः ); गाईच्या चामड्यांनीं व चरबीनें चहूंबाजूंनीं तूं बांधला गेला आहेस ( संनद्धः असि ) म्हणून तूं बळकट हो; तुझ्यांत बसणारा ( आस्थाता ) जिंकावयाच्या वस्तु जिंको. रथाला वनस्पति म्हणण्याचें कारण रानांतील शिशवीसारख्या बळकट झाडाच्या लाकडापासून तो बनविला असेल.

**दुन्दुभिः ( ८ ) इति शब्दानुकरणम्। द्रुमः भिन्नः इति वा। दुन्दुभ्यतेर्वा स्यात् शब्दकर्मणः। तस्यैषा भवति**

दुन्दुभि शब्दांत नगाऱ्याच्या आवाजाचें अनुकरण आहे; नगारा वाजविला म्हणजे दुम्दुम् आवाज निघतो. किंवा दुन्दुभिः = दुन्दु + भिः; दुन्दु = द्रुमः = झाड; भिः = भिन्नः; फोडलेलें झाड तें दुन्दुभि; झाड फोडून त्याच्या लाकडापासून दुन्दुभिसारख्या वस्तु बनवितात. पोकळ झाड पाहून व तें तोडून किंवा झाड पोखरून त्याचा दुन्दुभि करतात. किंवा दुन्दुभ् = आवाज करणें ह्यापासून; दुन्दुभ् धातु

धातुपाठांत व आपटे यांच्या कोशांत नाहीं. शब्दकर्मणः याच्याबद्दल गुर्जरपाठ वधकर्मणः असा आहे; वध् = तडाखे देणें; नगाऱ्यावर हातानें तडाखे मारतात. दुर्गवृत्तींत दुन्दुभ्यतेर्वा स्यात् शब्दकर्मणः किंवा वधकर्मणः ही व्युत्पत्ति नाहीं. दुन्दुशब्देन भाति भाययति वा दुन्दुभिः ( अमर १।६।६ क्षीरस्वामी ) = दुम्दुम् शब्द करणारा ( नगारा ) सुन्दर दिसतो किंवा भिवविती म्हणून दुन्दुभि; भि = भाति = प्रकाशतो; किंवा भि = भाययति = भिवविती. दुन्दुभीसंबंधाचीं पुढील ऋचा होय.

## खंड १२ वा.

**उप श्वासय पृथिवीमुत द्यां पुरुत्रा ते मनुतां विष्ठितं जगत्।**
**स दुन्दुभे सजूरिन्द्रेण देवैर्दूराद्दवीयो अप सेध शत्रून् ( ऋ० सं० ६।४७।२९ )**
**उपश्वासय पृथिवीं च दिवं च। बहुधा ते घोषं मन्यतां विष्ठितं स्थावरं जङ्गमं च**

उत = च. द्याम् = दिवम्; दिवं नंतरचा च अध्याहृत आहे. पुरुत्रा = बहुधा = पुष्कळ प्रकारांनीं किंवा पुष्कळ ठिकाणीं. ते = ते घोषं = तुझ्या आवाजाला. मनु अवबोधने ( धा० ८।९ ); मनु = जाणणें; रुकार देणें; मनुतां = मन्यताम् = रुकार देवो. विष्ठितं = वि + स्थितम् = स्थावरम् = स्थिर असणारें, न हालणारें. विष्ठितं शब्द भाष्यांत कां घातला ? जगत् = जङ्गमं = हलणारें.

**यत् स दुन्दुभे सहजोषणः इन्द्रेण च देवैश्च दूरात् दूरतरम् अपसेध शत्रून्**

यत् हें अध्याहृत आहे. सजूः = सहजोषणः; स = सह; जूः = जोषणः; जुष् पासून जूः; सजूः सजुषौ सजुषः वगैरे; सहजोषणः = प्रीतियुक्त अथवा प्रेमानें; पण सजूः = सह असा अर्थ आहे. दवीयः = दूरात् दूरतरम् = खूप दूर; दूरं दवीयः दविष्ठम्; दवीयः = अधिक दूर. यास्कानें केलेला ऋचेचा अर्थः— हे दुंदुभि, पृथिवीला व स्वर्गाला आपल्या आवाजानें दुमदमून टाक ( उपश्वासय; हें जें स्थावर व जंगम जग आहे तें तुझ्या आवाजाला पुष्कळ ठिकाणांहून किंवा पुष्कळ प्रकारांनीं रुकार देवो ( म्हणजे तुझ्या आवाजाचा प्रतिध्वनि ठिकठिकाणांहून येवो किंवा तो प्रतिध्वनि नानाविध असो ); आमच्यावर प्रेम करणारा तूं इन्द्र व देव यांच्यासह शत्रूला अगदीं पार दूर फेकून दे. श्वस् = शब्द करणें; श्वासय = शब्द कर किंवा प्रतिध्वनि करावयाला लाव. ते मनुताम् = तुझ्याकडे लक्ष देवो; जिकडच्या तिकडच्या स्थिर व चल वस्तु तुझा आवाज ऐकोत. सः = असा प्रताप गाजविणारा.

**इषुधिः ( ९ ) इषूणां निधानम्। तस्यैषा भवति**

इषुधिः = इषु + धिः; = बाण ठेवण्याची जागा, भाता; धि = निधानम् = ठिकाण. इषवः धीयन्ते अत्र ( अमर २।८।८९ क्षीरस्वामी ). इषुधीसंबंधाची पुढील ऋचा होय.

## खंड १४ वा.

**बह्वीनां पिता बहुरस्य पुत्रश्चिश्चा कृणोति समनावगत्य।**
**इषुधिः सङ्काः पृतनाश्च सर्वाः पृष्ठे निनद्धो जयति प्रसूतः (ऋ० सं० ६।७५।५)**
**बह्वीनां पिता। बहुः अस्य पुत्रः। इति इषून् अभिप्रेत्य। प्रस्मयते इव अपाव्रियमाणः। शब्दानुकरणं वा**

बह्वीनां पिता = (तो) पुष्कळ मुलींचा बाप (आहे). बहुः अस्य पुत्रः = ह्याचे पुष्कळ मुलगे आहेत. इति इषून् अभिप्रेत्य = (मुली व मुलगे) हे शब्द बाणांसंबंधानें (ऋषीनें घातले आहेत). ऋग्वेदांत व अमरकोशांत इषु शब्द दोन्ही लिंगी आहे; इषुर्द्वयोः (अमर २।८।८८); असा तो दोन्ही लिंगी असल्यामुळें बह्वीनां व बहुः पुत्रः असे शब्द ऋचेंत घातले आहेत (शिवाय खंड १९ पहा); बहुः पुत्रः हे शब्द समुदायवाचक आहेत. बह्वीनां = बह्वीनां दुहितॄणाम्. महाराष्ट्रपाठ बह्वीनाम् नसून बह्वनाम् असा आहे; दुर्गानें तोच पाठ घेतला आहे. इति इषून् अभिप्रेत्य हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. चिश्चा कृणोति = प्रस्मयते इव = जणूं काय हंसत आहे; अपाव्रियमाणः = उघडला जात असतांना; अपाव्रियमाणः बद्दल गुर्जरपाठ अवध्रियमाणः असा आहे; अवध्रियमाणः = पाठीवर धारण केला असतांना म्हणजे पाठीवर लोंबत असतांना. इषुधीचें झांकण काढल्याबरोबर किंवा पाठीवर लोंबत असतांनाच तो जणूं काय खदखदां हंसतो. शब्दानुकरणं वा = अथवा चिश्चा हा ध्वनि भात्यांतून बाण काढले जात असतांना त्या बाणांचा असेल किंवा भात्याचा स्वतःचा असेल. चिश्चा शब्द येथेंच आला आहे. कृणोति = करोति; काय करतो? चिश्चा असा आवाज करतो. दुर्ग म्हणतोः– 'भात्याचें झांकण काढल्याबरोबर त्यांतील बाणांना लाविलेलीं चित्रविचित्र पिसें दृष्टीस पडतात; हीं चित्रविचित्र पिसें म्हणजे भात्याचें एक प्रकारचें हंसणें; किंवा ह्या पिसांची जी शोभा, जें तेज तें हास्य होईल; शोभा देणें ह्या अर्थी चिश्चा धातु धातुपाठांत नसतांनाही कल्पिला पाहिजे.' पण तसा धातु कल्पण्याची आवश्यकता दिसत नाहीं; चिश्चा कृणोति म्हणजे मोठ्यानें हंसतो; असा अर्थ केल्यावर कशामुळें हंसतो एवढेंच सांगणें उरतें.

**सङ्काः सचतेः। संपूर्वात् वा किरतेः। पृष्ठे निनद्धः जयति प्रसूतः इति व्याख्यातम्**

सच् ह्या धातूपासून सङ्काः; सच् = संच् = संक्; सङ्क् + आः = सङ्काः; किंवा संकाः = सं + काः; काः हे कॄ (= पसरणें) ह्यापासून; सङ्काः संकटान् संपृक्तान् वा संग्रामान् (दुर्ग); = सङ्काः म्हणजे संकटें किंवा ज्यांत सैन्यें एकमेकांत मिसळतात असे संग्राम. यास्क सङ्काः याचा अर्थ देत नाहीं; त्या शब्दाच्या व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहींत. सङ्काः सजतेः गतिकर्मणः। यद्वा। संपूर्वात् किरतेः। कृन्ततेर्वा। संकीर्यन्ते योद्धारः। सम्यक् कृत्यन्ते वा आयुधैः (निघं० २।१७।१४ देवराज) = सच् जाणें यापासून सङ्काः; किंवा सं + क ह्यापासून; किंवा सं + कृन्त् ह्यापासून; योद्धे हल्ला

करण्याकरितां परस्परांकडे जातात; किंवा ते इकडे तिकडे फेकले जातात; किंवा शस्त्रास्त्रांनीं कापले जातात; अशा देवराज तीन व्युत्पत्ति देतो; पण दुर्ग ह्यांपैकीं एकही व्युत्पत्ति देत नाहीं. सङ्काः = लढाई (निघण्टु २।१७।१४); या शब्दाचा खरा अर्थ कळत नाहीं. सङ्काः = लहान सैन्यें व पृतनाः = मोठीं सैन्यें असे अर्थ असतील. इति व्याख्यातम् (पृष्ठे निनद्धः जयति प्रसूतः) या चार शब्दांचा अर्थ स्पष्ट आहे. समनावगत्य हे शब्द किंवा त्यांचे पर्याय भाष्यांत नाहींत. समनावगत्य = सग्रामम् अवगत्य प्राप्य = संग्रामांत आल्यावरोबर (दुर्ग). ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थः— पुष्कळ बाण (बह्वीनाम्) राखणारा (पिता) व ज्यांतील (अस्य) बाणसमुदाय (बहुः) पुष्कळ संकटापासून रक्षण करतो (पुत्रः) असा भाता रणांगणाला (समना) पोचतांच (अवगत्य) त्याचें झांकण उघडल्यामुळें जणूं काय खदखदां हंसतो किंवा चिश्चा असा आवाज करतो; तो हा पाठीवर बांधलेला भाता धनुर्धाऱ्यानें फेकतांच (प्रसूतः = क्षिप्तः) म्हणजे त्यांतील बाण फेकतांच सर्व संकटें (संकाः) व सर्व भयंकर लढाया (पृतनाः) जिंकतो. याः स्पर्धमानैः इषवः एव केवलम् अभिलक्ष्य क्षिप्यन्ते पताकार्थं असें पृतनाश्च सर्वाः ह्याचें दुर्ग विवरण करतो; परंतु तें विवरण समजत नाहीं; याः केवलम् अभिलक्ष्य स्पर्धमानैः योधैः पताकार्थं विजयार्थम् इषवः क्षिप्यन्ते = ज्यानांच उद्देशून लढवय्ये विजयासाठीं बाण फेकतात अशा सेना असा अन्वयार्थ असेल. सायणाचार्यांनीं केलेला अर्थ :— इषु हा शब्द उभयलिंगी आहे म्हणून बह्वीनां हें पद घातलें आहे; भात्यांत पुष्कळ इषु असतात म्हणून त्याला पुष्कळ इषूंचा (बह्वीनां) पिता असें म्हटलें आहे; त्याचप्रमाणें त्याच्यांत पुष्कळ बाण ठेविले असतात म्हणून त्याचे पुष्कळ पुत्र असतात असें म्हटलें आहे; भात्याच्या बाहेर बाण काढले जात असतांना भाता चिश्चा असा ध्वनि करतो; धनुर्धारी राजाच्या पाठीला बांधलेला तो हा भाता रणांगणावर (समना) येतांच (अवगत्य) इषु फेकून (प्रसूतः) जुटीनें जय शब्द उच्चारणाऱ्या (संकाः) सर्व सेना जिंकतो. सह कायंति शब्दायन्ते इति संकाः अशी व्युत्पत्ति देऊन सायणाचार्य तो शब्द पृतनाः ह्याचें विशेषण करतात; पण पृतनाः यानंतरचा च हा निपात् त्यांनीं भाष्यांत घेतला नाहीं. मी केलेला अर्थः— बहुः अस्य पुत्रः असा एकेरी प्रयोग बहुतकरून तुच्छता दर्शविण्याकरितां घातला असावा; एकोणिसाव्या खंडांत इषु शब्द स्त्रीलिंगी आहे हें अस्याः व प्रसूता ह्या शब्दांवरून स्पष्ट आहे; तेव्हां पुल्लिंगी इषु शब्द व स्त्रीलिंगी इषु शब्द ह्यांचे अर्थ थोडेसे भिन्न असावेत; पुल्लिंगी इषु हा लहान बाण असावा व स्त्रीलिंगी इषु त्याच्यापेक्षां आकारानें मोठा असून फार तीक्ष्ण असावा; असे स्त्रीलिंगी बाण फेकले असतां योद्ध्यांची तारांबळ होते म्हणून योद्धे प्राणरक्षणाची याचना तशा इषूंपाशीं करतात (खंड १९ पहा). समन शब्दाचे (१) पति, (२) स्त्री व (३) तोच, तीच, तेच असे अर्थ आहेत (निरुक्त ७।१७ पहा). समना अवगत्य = त्याच स्त्रीलिंगी इषूंना मिळविल्यामुळें; एथें समना ह्याचे स्त्री व त्याच असे दोन अर्थ असा-

वेत. चिश्चा कृणोति = वाहवा वाहवा शब्द उच्चारतो. इषुधीला पुष्कळ पुत्र असतील पण त्यांच्याबद्दल त्याला मुळींच धन्यता वाटत नाहीं; मी मुलींचा बाप आहें अशा-बद्दल त्याला अभिमान वाटतो व तशा मुली मिळाल्यामुळें तो वाहवा वाहवा असे शब्द उच्चारतो; इषुधि आपल्याबरोबर अशा मुली घेऊन जातो; जणूं काय त्यानें मुलींनाच जन्म दिला आहे ( प्रसूतः ) असा हा इषुधि पाठीवर बांधला असतांनाही पुष्कळ स्त्री-इषु प्रसवून म्हणजे फेकून सर्व लहान सेना (संकाः) व मोठ्या सेना (पृतनाः) जिंकतो. अस्य बह्वः पुत्रः समाना अवगत्य चिश्चा करोति = ह्याचे पुष्कळसे पुत्र त्या स्त्रियांना ( समना ) म्हणजे बहिणींना कमी लेखून ( अवगत्य ) तिरस्कारवाचक चिश्चा शब्द उच्चारतात असाही अर्थ होईल. ऋचेचा खरा अर्थ समजणें बहुतेक अशक्य आहे. बहुरस्य ह्याची बह्वः अस्य अशीं पदें कां पाडावयाचीं? तें एक पद नसेल कशावरून? ऋग्वेदांत बहुर असा शब्द नाहीं; पण तत्सदृश बहुल असा शब्द आहे; बहुल = ( १ ) विस्तृत, अपार; ( २ ) संख्येनें पुष्कळ; द्रुहो० बहुला अदेवीः (३।३१।१९), तानि इत् अहानि बहुलानि आसन् ( ७।७६।३ ) ह्या दोन ऋचांत बहुल = संख्येनें पुष्कळ. भाता कशाचा करीत होते हा प्रश्न; त्याला बहुराचा मुलगा असें कशावरून म्हटलें नसेल? बहुर हें एखादा झाडाचें नांव असल्यास त्याच्या लाकडापासून भाता बनवीत असतील; तसें असल्यास बहुर ह्या शब्दावर श्लेष असेल; बहुर = बहुल = ज्याला पुष्कळ मुलगे आहेत असा. संहोत्रं स्म पुरा नारी समनं वाव गच्छति ( १०।८६।१० ) = पूर्वकाळीं तरुणी ( नारी ) श्रीमंत ( संहोत्रं ) अशा नवऱ्याशींच ( समनं वै ) लग्न करीत असे ( अवगच्छति स्म ); समनावगत्य = समनम् अवगत्य = आपल्या सारख्याच नवऱ्याशीं लग्न करून; इषुधि हा बहुपुत्रवंताचा मुलगा; त्यानें बहुपुत्रवंताच्या मुलाशीं लग्न केलें; इच्छा ही कीं अशा संयोगानें आपल्याला पुत्र व्हावेत; पण झाले उलट! मुलांच्या ऐवजीं सारख्या मुलीच होत गेल्या; त्यामुळें तो तिरस्कारानें छीः छीः असे शब्द उच्चारूं लागला. ह्या कारट्यांची रवानगी एकदां कशी करीन असें त्याला झालें; पाठीवर ठेवला असतां तो एकसारखा मुलींनाच जन्म देत होता; त्यांची रवानगी करावयाची म्हणून त्यानें मुलीपाठीमागून मुली संका व पृतना ह्या बायांवर हल्ला करण्याकरितां पाठविल्या व त्यांत त्याला जय आला. बहीप्रमाणें इषु, संका व पृतना हे शब्द स्त्रीलिंगी आहेत; पुत्र समन व इषुधि हे पुलिंगी आहेत; इषुधिः = इषु नांवाच्या मुली पोटांत धारण करणारा; भाता हा बहुराचा मुलगा म्हणजे बहुरा-पासून केलेलें नळकांडें; त्याला झांकण बहुराचेंच; झांकण घातल्यामुळें दोघांचें जणुं काय लग्न होऊन मैथुन सुरूं होतें; ती क्रिया सुरूं होतांच भात्याच्या पोटांत मुलीच मुली तयार होतात; हा भात्याचा गर्भ; झांकण काढल्यावर ह्या मुली बाहेर येतात; तो त्यांचा जन्म; इषुधीला आपल्या पोटांत मुली आहेत ह्याचा खेद वाटून तो संतापानें त्या इषु भराभर बाहेर फेकून देतो व असें करून इतर स्त्रियांशीं त्यांना भांडवून आपलें कार्य साधून घेतो म्हणजे ह्या नकोशा झालेल्या मुलींपासून मुक्त होतो; पुरुषांशीं

लग्न केलें म्हणून मुली झाल्या; आतां प्रत्येक लढाईंत आपण संका व पृथना जिंकूं व त्यांच्याशींच लग्न करूं; मग पाहूं मुलगे होतात कीं नाहीं. भात्यांतल्या बाणांना खळ पडत नाहीं; ते सारखे बाहेरच येत असतात; असे बाण सोडून धनुर्धारी शत्रूला जिंकतो ह्यावर कोटी केली आहे. आईबापांना; निदान बापाला मुली नको असतात. तसें भात्याला जणूं काय त्या इषु नकोशा होतात. ह्या ऋचेंत व इतरत्र लिंगभेदामुळें ह्या कोट्या करतां आल्या; बहुतेक हाच अर्थ असावा असें वाटतें. पृतनाश्च सर्वाः ह्याहून संकाः निराळ्या असाव्यात; त्या शत्रूच्या ध्वजा असतील; योद्धा त्या ध्वजा पटकावतो व शत्रूच्या सर्व सेनेची दाणादाण उडवितो. ऋचा रचणारे हे विद्वान होते व मार्मिकही होते हें नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे; ६।७५ ह्या सूक्तांत हा मार्मिकपणा पुष्कळ ठिकाणीं दिसून येतो; पण ही विद्वत्ता व हा मार्मिकपणा बरोबर समजण्याच्या आड कांहीं शब्दांची अडचण येते ह्याचें प्रस्तुत ऋचा हें उदाहरण होय.

**हस्तघ्नः ( १० ) हस्ते हन्यते । तस्य एषा भवति**

हस्तघ्नः = हस्त + घ्नः = हस्ते हन्यते; हातावर म्हणजे दंडावर बांधला असतांना ज्याच्यावर प्रत्यंचेचे तडाखे बसतात तो. कलापी पट्टकः गोधा इति च यमाहुः सः हस्तघ्नः ( दुर्ग ) = प्रत्यंचेचा आघात होऊं नये म्हणून दण्डाभोंवतीं गुंडाळावयाचा चामड्याचा जाड पट्टा; ह्याला कलापी, पट्टक व गोध अशीं नांवें आहेत. गोधे तले ज्याघातवारणे ( अमर २।८।८४ ).

## खंड १५ वा.

**अहिरिव भोगैः पर्येति बाहुं ज्याया हेतिं परिबाधमानः।**

**हस्तघ्नो विश्वा वयुनानि विद्वान् पुमान् पुमांसं परि पातु विश्वतः ( ऋ० सं० ६।७५।१४ )**

**अहिः इव भोगैः परिवेष्टयति बाहुं ज्यायाः वधात् परित्रायमाणः**

पर्येति = परि + एति = परिवेष्टयति = भोंवतीं वेष्टन करतो. ज्यायाः हेतिं = ज्यायाः वधात् = प्रत्यंचेच्या तडाख्यापासून. परिबाधमानः = परित्रायमाणः = रक्षण करणारा.

**हस्तघ्नः सर्वाणि प्रज्ञानानि प्रजानन्। पुंमान् पुरुमनाः भवति। पुंसतेर्वा**

विश्वा = विश्वानि = सर्वाणि. वयुनानि = प्रज्ञानानि = कौशल्याचीं कृत्यें. विद्वान् = प्रजानन् = पूर्णपणें जाणणारा. पुमान् = पु + मान्; पु = पुरु; मान् = मनः; पुष्कळ ठिकाणीं ( पुरु ) मन ( मान् ) आहे ज्याचें असा सर्वज्ञ हस्तघ्न असतो म्हणून तो पुमान्; किंवा पुंस् = पौरुष करणें ह्यापासून; योद्धा पौरुष करतो म्हणून तो पुमान्; पुंस अभिवर्धने (धा० १०।१०४); पाति पुमान् (अमर २।५।१ क्षी०). पुमान् = शूर; योद्धा शूर तसा हस्तघ्नही शूर. यास्कानें केलेला अर्थः— तो सापाप्रमाणें दंडाभोंवतीं वेटाळी ( भोगैः ) घालतो व असे करून प्रत्यंचेचे तडाखे दंडावर येऊं देत

नाहीं; कौशल्याचीं सर्व कृत्यें पूर्णपणें जाणणारा व सर्वत्र लक्ष आहे ज्याचें असा ( पुरुमनाः ) किंवा शूर असा हा पट्टा योद्धयाचें चोहींकडून रक्षण करो. सः अयम् एवंधर्मा हस्तघ्नः पुमान् इव पुरुमनाः इव कश्चित् आप्तः प्रज्ञाबहुलः पुमांसम् एतं धनुष्मन्तं परिपातु विश्वतः। स्त्रियम् अपेक्ष्य अमनस्कां पुरुषे बहुतरं मनः(दुर्ग)=एखाद्या हुशार आप्ताप्रमाणें हा अशा गुणांचा हस्तघ्न धनुर्धाऱ्याचें चोहींकडून रक्षण करो;आपल्या-कडे एखाद्या स्त्रीचें मन नसूनही तिच्यावर ज्याचे मन अतिशय बसतें म्हणजे जो तिच्यावर आसक्त होतो असा अर्थ देऊन पुरुमनाः ही व्युत्पत्ति दुर्गानें पुमांसं ह्या शब्दालाहि लाविली आहे; पुरु = बहु = बहुतरं; पुरु बहुतरं मनः यस्य सः पुरुमनाः; ह्या विवरणांतील पहिल्या वाक्यांत पुमान् ह्याची व्युत्पत्ति आहे व दुसऱ्यांत पुमांसं ह्याची आहे;पुमान् शब्दाचा पहिला अर्थ पुमांसं ह्यांत नसावा; कारण योद्धयाचें लक्ष जर सर्वत्र असेल तर हस्तघ्नाचें लक्ष सर्व ठिकाणीं आहे असें म्हणण्यांत कांहीं प्रयोजन नाहीं; लढत असतांना योद्धयाचें लक्ष सर्व ठिकाणीं असणें अशक्य आहे म्हणून सर्वत्र लक्ष ठेवणारा असा मदतनीस त्याला पाहिजे; तो मदतनीस म्हणजे हस्तघ्न. पुमान् व पुमांसं ह्याचे यास्कानें केलेले अर्थ नसावेत; हस्तघ्न व बाहु हे शब्द पुलिंगी असल्यामुळें ते दोन पुरुष; ज्या व हेति हे स्त्रिलिंगी असल्यामुळें त्या दोन स्त्रिया. ज्या(=ज्याया=तरुणी) ही चतुर व कावेबाज स्त्री; ती कामिकुरंग जो बाहु त्याला आपल्या पाशांत अडकविण्याकरितां हेति नांवाच्या आपल्या दूतीला त्याजकडे पाठविते; पण हस्तघ्न हा बाहूचा रक्षक असल्यामुळे तिला तो हाकलून देतो अशी कल्पना कवीच्या मनांत होती असें वाटतें. हेति शब्द ऋग्वेदांत एकंदर १७ वेळां आला आहे व त्याचा संबंध अस् ( = फेकणें ), वध् ( = हाणणें ), मुच् ( = सुटणें ), परिवृज् (= टाळणें ), दभ् ( = इजा करणें ), आरे + कृ ( = दूर करणें ), यम् ( = वेगानें जाणें ) ह्या धातूंशीं येतो. १०।१६५।२ व ३ ह्या ऋचांत हेति शब्दाला पक्षिणी हें विशेषण लाविलें आहे; ह्या विशेषणावरून व आधीं दिलेल्या धातूंवरून हेति हें बाणासारखें फेकण्याचें अस्त्र असावें. अग्निर्न शुष्कं वनमिंद्र हेती रक्षो नि धक्षि अशनिर्न भीमा ( ६।१८।१० ) = हे इंद्रा, जसा अग्नि आपल्या भराभर पसरणाऱ्या ज्वालांनीं वाळलेलें वन खाक करून टाकतो तसा तूं आपल्या भयंकर वज्रानें (हेती) चेटक्यांना खाक करून टाक; एथें भराभर पसरणारा जाळ म्हणजे एक प्रकारचें अस्त्रच होय;हेती=हेत्या=अस्त्रानें.प्र० असिन्वा ते वर्ततामिंद्र हेतिः(१०।८९।१२) = हे इंद्रा, तुझें वज्र अडथळा न येतां आकशांतून गरगर फिरत जोरानें येवो; एथें हेति हें वज्रासारखें फेकण्याचें अस्त्र. शतानीका हेतयो अस्य दुष्टरा इंद्रस्य ( ८।५०।२ ) = ह्या इंद्राचीं १०० पेऱ्यांचीं वज्रें चुकविणें कठीण. मा ते हेतिं तविषीं चुक्रुधाम ( १०।१४२।३ ) = हे अग्नि, आम्ही ( भलतें कृत्य करून ) तुझ्या जोरदार ज्वालेला प्रवृत्त करूं नये. मा नो हेतिर्विवस्वतः आदित्याः कृत्रिमा शरुः। पुरा नु जरसो वधीत् ( ८।६७।२० ) = हे आदित्यांनो, म्हातारपण येण्याच्या आगोदरच विवस्वताचें अस्त्र आम्हांला ठार न करो; हेतिः = शरुः = भयंकर अस्त्र. हेति शब्दांत हि =

वेगानें जाणें किंवा सोडणें हा धातु आहे; अस्त्रें शत्रूंवर सोडावयाचीं असतात. अत्या हियाना न हेतृभिः ( ९।१३।६ ) = सोडणाऱ्याकडून सोडल्या जाणाऱ्या घोड्यांप्रमाणें ( सोम धांवत सुटतो ); हिन्वानो हेतृभिः ( ९।६४।२९ ) = धांवण्यास लावणाऱ्यां-कडून धांवण्यास लाविलेला; ह्या दोन ऋचांतील हेतृ, हियानाः व हिन्वानः ह्यांत हि ( = पळावयास लावणें ) हाच धातु आहे. हन् पासून हेति ( निरु० ६।३ ) अशी व्युत्पत्ति यास्क देतो; त्याचें कारण हेति = आघात, हिंसा, वध असे तो त्या शब्दाचे अर्थ करतो हें; पण ती व्युत्पत्ति चुकली आहे. वर जी हेति शब्दाची चिकित्सा केली तिच्यावरून हेति = ( १ ) शर, ( २ ) वज्र, ( ३ ) वज्रासारखी जाळून टाकणारी ज्वाला असे अर्थ निश्चित होतात. प्रस्तुत ऋचेंत शर ह्या अर्थाखेरीज हेति म्हणजे दूती असाही अर्थ असावा; हि = पाठविणें; हेतिः = दूती; कामिनी कामुकाकडे दूती पाठविते. प्रत्यंचेवर लावावयाचा बाण धनुर्धारी जर सावध नसेल तर त्याच्या हाताला कोठें तरी बोंचेल व जखम करील; बाणाच्या अग्राला विष लावीत असत हें सर्वश्रुत आहे; तेव्हां हाताभोंवतीं पट्टा नसल्यास तें अग्राचें विष हातांत शिरून धनुर्धारी घायाळ होईल; ही आपत्ति हस्तघ्न टाळतो; कारण त्याचीं वेटाळीं हाताच्या पंजा-भोंवतीं असतात; बाणाचें अग्र शिरलेंच तर ह्या पट्ट्यांत शिरेल ही मूळ कल्पना; तिच्यावर कामिनी कामुकाला आपल्या ताब्यांत आणण्याकरितां दूतीला पाठविते पण तिचा सर्व प्रयत्न हस्तघ्नाच्या दक्षतेमुळें व्यर्थ होतो हें रूपक श्लेषानें बसविलें आहे. बाध् = हाकलून देणें हा अर्थ बऱ्याच ऋचांत येतो; आरे अस्मत् अमतिं बाधमानः ( ३।८।२ ) = आमच्यापासून दारि-द्र्याला दूरदूर हाकलून देणारा. विश्वा इत् अस्मात् ध्वरसो वि बाधसे यं सुगोपा रक्षसि ब्रह्मणस्पते ( २।२३।५ ) = हे ब्रह्मणस्पति, उत्तम रक्षक असा तूं ज्याचें रक्षण कर-तोस त्याच्यापासून सर्व आपत्ति तूं हाकलून देतोस. ज्यायाः हेतिं परिबाधमानः = प्रत्यंचेच्या शराला ( हातापासून ) हाकलून देणारा हस्तघ्न शराला हाताजवळ येऊं देत नाहीं हा एक अर्थ. कावेबाज कामिनीच्या दूतीला हाकलून देणारा हा दुसरा. विश्वा वयुनानि विद्वान् = सर्व प्रकारच्या आपत्ति जाणणारा म्हणजे हाताला शर कोठें बोंचेल हें पूर्णपणें जाणणारा हा एक अर्थ; कामिनीचे सर्व डावपेच जाणणारा हा दुसरा. ऋचेचा मी केलेला अर्थः— नाग जसा एखाद्या माणसाच्या हाताला विळखे घालतो तसा हस्तघ्न योद्ध्याच्या हाताच्या पंजाला वेटाळीं घालतो म्हणजे तो पंजाभोंवतीं गुंडाळलेला असतो; हाताला बाण बोंचूं नये म्हणून तो हातापासून बाण दूर ठेवतो; कारण शरापासून होणाऱ्या सर्व पीडा त्याला माहीत असतात; अशा रीतीनें हस्तघ्न ( पुमान् ) बाहूचे ( पुमांसं ) सर्व आपत्तीपासून रक्षण करतो म्हणजे हाताच्या कोण-त्याही भागाला बाणापासून इजा होऊं देत नाहीं. ह्यावर कोटी पुढीलप्रमाणें:— चतुर मित्र आपल्या तरुण व कामुक मित्राभोंवतीं सारखा पाहरा ठेवीत असतो; तो त्याच्याभोंवतीं जणूं काय सारख्या घिरट्या घालीत असतो; कारण त्याला सारखी भीती असते कीं

हा भोळा एखाद्या छबिलीच्या तावडींत सांपडेल व तेणेंकरून त्याचा नाश होईल; छबिल्या आपल्या दूती पाठवून अशा भोळ्या कामुकांना कामवश करण्याचे सारखे प्रयत्न करीत असतात; त्यांच्या सर्व लबाड्या माहित असल्यामुळें चतुर मित्र त्या दूतींची हाकालपट्टी करीत असतो व अशा रीतीनें तो मित्र (पुमान्) आपल्या भोळ्या मित्राला (पुमांसं) सर्वदा बचावीत असतो. एथें परि हा उपसर्ग तीनदां आला आहे; परि + एति = भोंवतीं जातो; परि + बाधमानः = परत फिरविणारा; परि पातु = पूर्णपणें रक्षण करो. विश्वतः ह्यांतील विश्व ह्याचा संबंध विश्वा वयुनानि ह्यान्याशीं आहे; विश्वतः = विश्वेभ्यः वयुनेभ्यः. वय् (= विणणें) + उन = विणलेली, तयार केलेली वस्तु; बाण आपत्ति तयार करतो; लबाड लोक फसवणुकी तयार करितात. हस्तघ्न ह्या शब्दाची व्युत्पत्ति मला देतां येत नाहीं. हस्ते हन्यते (यास्क), हस्ते हस्त समीपे स्थितः हन्यते जया (देवराज) व हस्ते हस्त समीपे वर्तिनि प्रकोष्ठे स्थितः सन् ज्यया हन्यते (सायण) ह्या व्युत्पत्ति मला मान्य नाहींत. हस्त व बाहु ह्यांचा अर्थ एकच; बाहु म्हणजे दण्ड नव्हे.

**अभीशवः (११) व्याख्याताः। तेषामेषा भवति**

अभीशु शब्दाची व्युत्पत्ति निरु० ३।९त दिली आहे.तत्संबंधीं पुढील ऋचा होय.

## खंड १६ वा.

**रथे तिष्ठन्नयति वाजिनः पुरो यत्रयत्र कामयते सुषारथिः।**

**अभीशूनां महिमानं पनायत मनः पश्चादनु यच्छन्ति रश्मयः (ऋ० सं० ६।७५।६)**

**रथे तिष्ठन् नयति वाजिनः पुरस्तात् सतः। यत्र यत्र कामयते सुषारथिः कल्याण सारथिः। अभीशूनां महिमानं पूजयामि। मनः पश्चात् सन्तः अनुयच्छन्ति रश्मयः**

पुरः = पुरस्तात् = पुढें; सतः अध्याहृत; पुरस्तात् सतः = (रथाच्या) अग्रभागीं असणाऱ्या (घोड्यांना). सुषारथिः = सु + सारथिः = कल्याणसारथिः = कुशल आहे सारथि ज्याचा असा योद्धा; पण दुर्ग कुशलः सारथिः असा अर्थ देतो; वास्तविक योद्ध्याच्या इच्छेप्रमाणें रथ हाकलावयाचा असतो; सारथि हा केवळ ताबेदार; त्याच्या इच्छेला कोण जुमानणार? कदाचित् योद्ध्याची इच्छा सारथ्यावर आरोपित केली असेल. पनायत = पूजयामि; दुर्ग म्हणतो पनायत हें आज्ञार्थी द्वितीय पुरुषी बहुवचन आहे; तथापि ज्यांना आज्ञा द्यावयाची असे प्रस्तुत ऋचेंत कोणीही नसल्यामुळें पूजयत ह्याबद्दल पूजयामि असें यास्कानें घातलें आहे. परंतु हें म्हणणें बरोबर नाहीं; प्रेक्षकांना उद्देशून हें म्हटलें आहे; गुर्जरपाठ पूजयत असा आहे. पन स्तुतौ (धा० १।४४१); पन् = स्तुति करणें, वाखाणणें; पनायत = वाखाणणी करा; यास्ककालीं पन् धातूचा पूजा करणें हा अर्थ होता असें दिसतें; पाणि शब्दाची

व्युत्पत्ति पहा ( २।२६ पान १४७ ). पश्चात् = पश्चात् संतः = मागे असणारे; पश्चात् संतः हे रश्मयः ह्याचें विशेषण; रश्मि म्हणजे लगाम हा सारथ्याच्या हातांत असतो व सारथि हा घोड्यांच्या पाठीमागें बसलेला असतो म्हणून लगामही घोड्यांच्या पाठीमागेंच असतो. गुर्जरपाठ सतः असा आहे; पश्चात् सतः = पाठीमागें असणाऱ्या ( सारथ्याचे ); पश्चात् संतः असा पाठ घेतल्यास मन घोड्याचें असलें पाहिजे; मागें असणारे रश्मि घोड्यांचें मन दाबांत ठेवतात म्हणजे त्यांना तें हवे तिकडे धावूं देत नाहींत; पश्चात् सतः असा पाठ असल्यास मन सारथ्याचें किंवा योद्धयाचें; पाठीमागें बसलेल्या सारथ्याच्या म्हणजे योद्धाच्या मना पाठीमागून ( मनः अनु ) रश्मि जातात ( यच्छन्ति ) म्हणजे लगामाची हालचाल सारथ्याच्या म्हणजे यजमानाच्या मनाप्रमाणें होत असते. कवि लगामाचा महिमा वर्णन करीत आहे; तो महिमा घोड्यांना आवरून धरण्यांत असेल किंवा योद्धयाच्या मनाप्रमाणें घोड्यांना इकडे तिकडे नेण्यांत असेल. ऋग्वेदांत यम् = ( १ ) नियंत्रण करणें, ( २ ) जाणें व ( ३ ) देणें असे तीन अर्थ आहेत; अनुयच्छन्ति = अनुगच्छन्ति = पाठीमागून जातात; कशाच्या पाठीमागून ? सारथि किंवा योद्धा ह्यांच्या मना पाठीमागून; म्हणजे त्यांच्या इच्छेप्रमाणें रश्मि आपली हालचाल करतात; हेंच त्यांचें कौशल्य; वास्तविक घोड्यांना हवे तिकडे नेणें हें सारथ्याचेंच कौशल्य होय; पण त्या कौशल्याचा कवीनें रश्मीवर आरोप केला आहे. ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थः— रथांत बसून कुशल सारथि जेथें जेथें रथ नेण्याची त्याची इच्छा असतें तेथें तेथें रथाच्या अग्रभागीं असणाऱ्या घोड्यांना तो पुढें नेतो; रश्मींच्या ( अभीशूनां ) गुणांची ( महिमानं ) वाखाणणी मी करतों; कारण मागें असूनही हे रश्मि पुढें धांवणाऱ्या घोड्यांच्या मनाला आवरून धरतात. सारथ्यानें लगामाला किंचितही ओढले असतां जर तो सहज ओढला जाईल तरच त्या लगामाचा सुबकपणा; लगाम जर सुबक नसेल तर तो ओढण्याला सारथ्याला अतिशय श्रम करावे लागतील; तसें श्रम सारथ्याला पडत नाहींत ह्यांतच लगामाची खुबी. पश्चात् = पश्चात् सतः अथवा पश्चात् संतः; एथें सतः किंवा संतः हा शब्द गाळल्यानें अर्थ अधिक चांगला होईल; लगाम जरी घोडे भरधांव हाकीत नेतो तरी तो घोड्यांना बेफाम होऊं देत नाहीं; घोड्यांच्या मनाला म्हणजे घोड्यांना तो मागेंही ओढूं शकतो. पुरः व पश्चात् हे शब्द सार्थ आहेत; ऋचेंत सारथि व अभीशु ह्यांच्यांत तुलना केली आहे व अभीशूंची कामगिरी अधिक स्तुत्य आहे हें दाखविलें आहे. सारथि कितीही कुशल असला तरी तो रथांत बसून घोड्यांना जिकडे जावयाचें असेल तिकडे पुढें पुढें (पुरः) पिटाळतो; पण अभीशु किंवा रश्मि घोडयांच्या मनाला मागें सारखें ओढून धरतात; सारथ्याचा घोड्यांच्या फक्त शरीरावर ताबा; चाबुकानें भय घालून त्यांना पुढें नेणें एवढेंच त्याचें काम; त्यांना आवरून धरण्याचें व वाटेल तेथें थांबविण्याचें काम अभीशूंचेंच; म्हणून वाहवा किंवा स्तुति करावयाची ती अभीशूंचीच असें अतिशयोक्तीनें म्हटलें आहे. वास्तविक सारथ्याच्या हातांत

चाबूक असल्यामुळें तो घोड्यांना पुढें हांकलीत जातो व वाटेल तेव्हां लगाम ओढून त्यांना तो आवरतो म्हणजे त्यांचा वेग कमी करतो किंवा त्यांना अजीबात थांबवितो; पण कवीनें सारथि व अभीशु ह्यांच्यामध्ये कामाची वाटणी काव्याकरितां केली आहे. ऋचेचा विषय अभीशूंची कामगिरी; तेव्हा सारथ्याला गौणत्व देऊन अभीशूंची स्तुति केली आहे. हाच खरा अर्थ आहे. ओढून धरणें किंवा ओढून आणणें असे यच्छ् ह्याचे ऋग्वेदांत अर्थ आढळतात.

**धनुः ( १२ ) धन्वतेः गतिकर्मणः । वधकर्मणो वा । धन्वन्ति अस्मात् इषवः । तस्य एषा भवति**

धनुस् शब्द धन्व् जाणें किंवा हिंसा करणें ह्यापासून; बाण ह्यापासून म्हणजे धनुष्यापासून जातात म्हणून त्याला धनुस् हें नांव; रिवि रवि धवि गत्यर्थाः ( धा० १।५९६-५९८ ); धवि याचा गति एवढाच अर्थ धातुपाठांत आहे; धवि याचें धन्वति हें वर्तमानकालाचें तृतीय पुरुषाचें एकवचन; धन्व् ह्यांतील व् ला संप्रसारण होऊन व नंतर धनु ह्याला नामकरण स् प्रत्यय लावून धनुस् शब्द तयार झाला आहे. धन्वन्ति अस्मात् इषवः हें दुर्गवृत्तींत नाहीं; तेव्हां ते शब्द प्रक्षिप्त असावेत. वधकर्मणो वा हे शब्द जरी दुर्गवृत्तींत आहेत तरी तेही प्रक्षिप्त असतील; कारण हिंसा करणें हा धवि याचा अर्थ नाहीं; कदाचित् यास्ककालीं तो अर्थ त्या धातूचा असेल. ऋग्वेदांत धन्वन् आणि धनुस् असे दोन्ही शब्द आहेत; पण निघंटूंत धन्वन् हा शब्द न देता धनुस् हा शब्द दिला आहे; त्याचें कारण धन्वन् हा शब्द अर्वाचीन संस्कृतांत बहुव्रीही समासाच्याच अंतीं येतो म्हणजे बहुव्रीही समासांत धनुस् ह्याच्या ऐवजीं धन्वन् हा आदेश होतो; ह्यावरून निघंटुकाराचा अर्वाचीन संस्कृताशीं परिचय होता असें स्पष्ट दिसतें. ऋग्वेदांत धनुस् पेक्षां धन्वन् शब्द अधिक वेळां आला आहे. अवेस्तांत धनुष्य या अर्थीं थन्वन व थन्वर असे शब्द आहेत. धन्विन् ह्या शब्दांतही धन्वन् आहे; धन्व अस्य अस्ति असौ धन्वी ( अमर २।८।७० क्षी० ). धनुष्य ह्या अर्थीं धन्व शब्द प्रचारांतून गेला ह्याचें कारण धन्वन् = मरुप्रदेश = वाळवंट असाही त्या शब्दाचा अर्थ असल्यामुळें धनुस् हाच शब्द वापरण्यांत आला म्हणजे धन्वन् व धनुस् ह्यांच्यामध्यें दोन अर्थांची वाटणी केली गेली; ऋग्वेदांत वाळवंट असाही त्या शब्दाचा अर्थ आहे. पाणिनीनें बहुव्रीही समासाच्या अन्तींच धनुस् ला धन्वन् हा आदेश होतो ( पाणिनी ५।४।१३२ ) असें म्हटलें आहे; तेव्हां धन्विन् शब्द त्यानंतर प्रचारांत आला असेल किंवा तो त्याच्या लक्ष्यांत आला नसेल.

## खंड १७ वा.

**धन्वना गा धन्वनाजिं जयेम धन्वना तीव्राः समदो जयेम ।**
**धनुः शत्रोरपकामं कृणोति धन्वना सर्वाः प्रदिशो जयेम** ( ऋ० सं० ६।७५।२ )
**इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा ).

धनुष्याच्या साहाय्यानें गायी जिंकूं, बाण मारण्याच्या शर्यती जिंकूं, अतिशय कठीण ( तीव्राः ) अशा लढाया ( समदः ) जिंकूं; धनुष्य शत्रूच्या कामनांचा नाश करतें; धनुष्याच्या साहाय्यानें सर्व दिशा जिंकूं. धनुः शत्रोरपकामं कृणोति = धनुः । शत्रोः । अपऽकामं । कृणोति (पदपाठ); धनुः शत्रोः अपकामं कामस्य अपायं कृणोति करोतु ( सायण ) = धनुष्य शत्रूच्या कामनेला अपाय करतो म्हणजे करो असा आज्ञार्थी अर्थ केला आहे; पण तसा अर्थ करण्याची मुळींच आवश्यकता नाहीं; कवीची इतकी खात्री झाली आहे कीं धनुष्य शत्रूंच्या कामनांचा नाश करतो व त्यामुळेंच आम्ही गाई जिंकूं, लढाया जिंकूं वगैरे विधानें तो निक्षून करतो; कामनांचा नाश करो अशी प्रार्थना केल्यानें आम्ही जिंकूंच जिंकूं ही खात्री नाहींशी होते; एथें धनुष्याचा गौरव करावयाचा आहे; सर्व कांहीं धनुष्यच करतें; तेव्हां त्याच्या साहाय्यानें आम्हीं काय करणार नाहीं अशी जोराची भाषा आहे. अपकामं हें एक पद कां केलें तें समजत नाहीं; अप व कामं अशींच तीं पदें पाहिजेत; शत्रोः कामम् अपकृणोति= शत्रूच्या कामना दूर फेकून देतें म्हणजे झुगारून देतें; धनुष्य शत्रूंवर बाण फेकतें व तसें करून शत्रूच्या सर्व कामना झुगारून देतें. धन्वन् जरी नपूंसक आहे तरी केवढा त्याचा महिमा पहा! आ + कृ = जवळ करणें; ह्याच्या उलट अप + कृ = दूर करणें. पदकाराच्या आधीं स्वरकार होऊन गेले असावेत म्हणजे स्वरयुक्त अशाच ऋचा पदकाराच्या हातीं आल्या; त्यामुळें पदकाराला स्वरांचे नियम पाळण्याकरितां अपकामं असें एक पद करावें लागलें असेल.

**समदः सम् अदः वा । अत्तेः । संमदः वा । मदतेः**

समदः = सम् + अदः; समद् हा शब्द अद् खाणें यापासून; योद्धे लोक जणूं काय एकमेकाला खाऊन टाकण्यास झटतात; किंवा समदः = सं + मदः; सं + मद् ( = हर्ष पावणें ) ह्यापासून; योद्धे मोठ्या हर्षानें एकमेकावर तुटून पडतात; म्हणून युद्धाला समत् म्हटलें आहे. मदति असें रूप पाणिनीय संस्कृतांत नाहीं; कदाचित् यास्कानें मदयतेः असें रूप घातलें असेल. समद् स्त्रीलिंगी आहे हें तीव्राः या विशेषणावरून स्पष्ट आहे. दुर्गवृत्तींत अत्तेः व मदतेः नाहीं.

**ज्या ( १६ ) जयतेर्वा । जिनातेर्वा । प्रजावयति इषून् इति वा । तस्याः एषा भवति**

ज्या शब्द जि ( = जिंकणें ) ह्यापासून; किंवा ज्या वयोहानौ ( धा०९।२७ ) म्हणजे ज्या ( = म्हातारे होणें ) ह्यापासून; प्रत्यंचा वारंवार ओढली जात असल्या-मुळें जीर्ण होते; किंवा बाणांना वेगानें धाडते; ही शेवटची व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं; जु ( = जाणें ) ह्यापासून जव असें क्षीरस्वामी म्हणतो ( अमर० १।१।६४ ); जवते = जातो; जावयति = जाववितो; प्रजावयति = ( प्रत्यंचा ) वेगानें बाणांना जाववितें. ज्या संबंधाची पुढील ऋचा होय.

## खंड १८ वा.

**वक्ष्यन्तीवेदा गनीगन्ति कर्णं प्रियं सखायं परिषस्वजाना ।**
**योषेव शिङ्क्ते वितताधि धन्वन् ज्या इयं समने पारयन्ती (ऋ०सं० ६।७५।३)**
**वक्ष्यन्ती इव आगच्छति कर्णम् । प्रियम् इव सखायम् इषुं परिष्वजमाना**

वक्ष्यन्ती वेदा = वक्ष्यन्ती + इव + इत् + आ; इत् अनर्थक म्हणून गाळला आहे. आ + गनीगन्ति = आगच्छति; गन् ( = जाणें ) ह्याचें चर्करीतरूप गनीगन्; गनीगन् + ति = गनीगन्ति = वेगानें किंवा पुन्हा पुन्हा जाते. प्रियं सखायम् = प्रियम् इव सखायम्; इषुं अध्याहृत. परिषस्वजाना=परिष्वजमाना = कवटाळणारी; स्वज् ह्याचें अभ्यासानें सस्वज्.

**योषा इव शिङ्क्ते । शब्दं करोति । वितता अधि धनुषि ज्या इयम् । समने संग्रामे पारयन्ती पारं नयन्ती**

शिङ्क्ते = शब्दं करोति; शिजि अव्यक्ते शब्दे ( धा० २।१७ ); शिङ्क्ते = अव्यक्त शब्द करते; पण प्रत्यंचा ओढून सोडली असतां मोठा आवाज होतो हें लक्षांत घेऊन यास्कानें शिङ्क्ते याचा शब्दं करोति असा अर्थ केला असावा. धन्वन् = धन्वनि = धनुषि; धन्वन् + अधि = धनुष्यावर म्हणजे धनुष्याच्या कमानीच्या दोन टोकांवर. ऋचेंत ज्या इयम् ह्या दोन शब्दांचा ज्येयम् असा संधि कां केला नाहीं ? समने = संग्रामे. पारयन्ती = पारं नयन्ती=संग्रामाच्या पलीकडल्या टोंकाला नेणारी; पारं नयन्ती हे शब्द गुर्जरपाठांत नाहींत. पारं नयन्ती = पारम् अन्तं नयन्ती अस्तु शत्रूणां (दुर्ग) = ( प्रत्यंचा ) बाणाला शत्रूंच्या आरपार नेणारी असो म्हणजे शत्रूंचीं शरीरें भोंसकून पलीकडे जावो. दुर्गानें केलेला अर्थः— आपल्या प्रियसख्याला कवटाळणारी जशी एकादी तरुणी गुजगोष्टी सांगण्याकरितां त्याच्या कानाकडे जाते म्हणजे त्याच्या कानाकडे तोंड करते व नवऱ्यानें कवटाळलें असतां अव्यक्त मधुर शब्द तोंडांतून काढते तशीही प्रत्यंचा योध्याच्या कानापाशीं जाते, ती प्रिय सखा जो इषु त्याला कवटाळते व धनुष्यावर चढविली असतां बाणाला संग्रामाच्या अगदीं शेवटास नेणारी अशी ती आवाज करते. इयं ज्या समने संग्रामे धन्वन् धन्वनि अधि वितता विस्तृता पारयंती पारं नयंती प्रियं प्रियकरं वाक्यं वक्ष्यन्ती इव कर्णं धन्विनः राज्ञः कर्णप्रदेशम् आगनीगंति आगच्छति । योषा नारी सखायं पतिम् इव परिषस्वजाना इषुं परिष्वजमाना शिङ्क्ते शब्दायते च ( सायण ) = संग्रामांत धनुष्यावर ताणलेली व बाणाला संग्रामाच्या शेवटाला नेणारी ही प्रत्यंचा जणूं काय तिला गोड गुजगोष्ट सांगावयाची आहे म्हणून धनुर्धारी जो राजा त्याच्या कानाकडे जाते; जशी तरुणी पतीला कवटाळते तशी इषूला कवटाळणारी ती शब्द करते. ऋचेचा मी केलेला अन्वयार्थः—प्रियं सखायं परिषस्वजाना ज्या वक्ष्यन्ती योषा इव इदा कर्णं गनीगन्ति । समने पारयन्ती योषा इव धन्वन् अधि वितता इयं ज्या शिङ्क्ते = प्रियसख्याला कवटाळणारी व त्यांच्याशीं गुजगोष्टी करणारी स्त्री जशी त्याच्या कानाकडे सारखी जाते तशी प्रिय-

सख्याला कवटाळणारी ही प्रत्यंचा त्याच्या कर्णाकडे जात आहे पहा; पुरुषाच्या अंगावर सपशेल पडलेली स्त्री जशी कण्हते तशी धनुष्यावर ताणलेली ही प्रत्यंचा कण्हल्यासारखा शब्द काढीत आहे. समने पारयन्ती याचा अर्थ करणें कठीण आहे. समन = (१) तोच, तीच, तेच, (२) पुरुष, (३) स्त्री ( नि० ७।१७ ); समने = त्याच्याचवर म्हणजे धनुष्याच्या दोन टोंकांवर; प्रत्यंचा धनुष्यावर चढविली जाते या कृत्यावर सर्व कल्पना बसविल्या आहेत. त्याच्या आंगावर पडून ती त्याला भरपूर कवटाळते; अशा रीतीनें त्याच्या अंगावर पडलेली असतांना व पुरुषायित चाललें असतांना ती थोडीशी कण्हते; कोणासारखी ? योषा म्हणजे विश्वयोषिता तिच्यासारखी. विश्वयोषितांचा परपुरुषाशीं सारखा संबंध येत असतो; तरी नव्यानें येणाऱ्या तरुणाला खूष करण्याकरितां त्या कण्हण्याचें ढोंग करतात; प्रत्यञ्चेवरून किती तरी बाण सोडले जातात तथापि प्रत्येक बाण सोडतांना प्रत्यञ्चेचा आवाज होतच असतो; किती लबाड ह्या परयोषिता असा गूढार्थ आहे. शिञ्ज् = कण्हणें; ८।५।२५ व १०।४०।७ ह्यांत अत्रि आणि उशना ह्यांना शिञ्जारं हें विशेषण लाविलें आहे; अत्रीला त्याच्या शत्रूंनीं नानाप्रकारें छळलें व वेदना असह्य झाल्यामुळें तो अश्विनांचा धांवा करतां झाला; वेदनांमुळें तो कण्हत असलाच पाहिजे. शिङ्क्ते हें रूप आणखी एकदां ( १।१६४।२९ ) आलें आहे; तेथेंही त्याचा अर्थ कण्हतो असाच आहे. तोच अर्थ प्रस्तुत ऋचेंत बरोबर लागू पडतो. प्रत्यञ्चा ही धनुष्याच्या एका टोकाला सतत बांधलेली असते व जेंव्हा धनुष्याचा उपयोग करावयाचा असतो तेंव्हा प्रत्यंचेचा मोकळा शेवट धनुष्याचा दुसऱ्या टोकावर अडकविला जातो; ह्या दुसऱ्या टोकाला कर्ण असें विशिष्ट नांव असेल; तसें असल्यास कर्ण ह्याचे दोन अर्थ; प्रियसख्याला कवटाळणारी योषा गुजगोष्टी सांगण्याकरितां त्याच्या कानाकडे वळते व पुरुषायित चाललें असतांना कण्हते; जणूं काय प्रत्यंचेला गुजगोष्ट सांगावयाची आहे म्हणून तीही धनुष्याच्या कर्णाकडे जाते, धनुष्याला कवटाळते व त्याच्यावर पसरली असतांना आणि इषु तिच्यावर लावला असतांना ती कण्हण्यासारखा आवाज करते. इदा हा इत् + आ असा नसावा; इदा = इदानीं = ह्याच क्षणीं; प्रेक्षक किंवा कवि म्हणतो पहा ही आतां धनुष्याच्या कानाकडे त्याला गुजगोष्टी सांगण्याकरितां तोंड करीत आहे. गनीगन्ति = त्वरेनें जात आहे. प्रियसखा कोण ? इषु कीं धनुष्य ? प्रत्यंचेला बाणाचा मागला भाग टेकला असतो ह्याला कवटाळणें म्हणतां येणार नाहीं; धनुष्याची कमान हें धनुष्याचें शरीर; त्याच्यावर प्रत्यंचा ताणली असते; तेंव्हां धनुष्य हा प्रियसखा असावा; समने पत्यौ पतिलिंगे पारयन्ती = पतीच्या म्हणजे त्याच्या लिंगावर आपल्या योनिप्रदेशानें आरपार पडलेली; असा ध्वनित अर्थ असावा. ज्या ह्या शब्दावर जाया असाही श्लेष असेल; ज्या ही धनुष्याची जाया म्हणजे लग्नाची बायको असून एखाद्या विश्वयोषितेसारखी कण्हते बघा ! या च इयं योषा इव शिङ्क्ते योषित् इव विदग्धा काचित् कामिना पुरुषेण आत्मानं प्रति आकृष्यमाणा उपजायमान-

परितोषा कामिनः पुरुषस्य हर्षम् उत्पादयन्ती शिङ्क्ते सुकुमारम् अव्यक्तशब्दं करोति ( दुर्ग ) = जशी एखादी चतुर स्त्री तिला कामी पुरुषानें आपल्याकडे ओढली असतांना आपल्याला फार आनंद झाला आहे असें दाखविण्याकरितां व त्याच्या मनांत हर्ष उत्पन्न करण्याकरितां सुकुमार म्हणजे बारीक व त्यालाच ऐकूं येणारा असा ध्वनि करते तशी ही प्रत्यंचा वगैरे. विदग्धा ही स्त्रियांची एक जात आहे; अशा स्त्रिया पुरुषाला खूष कसें करावें ह्या कलेंत निष्णात असतात; ह्यावरून दुर्गाच्या मनांत कवीचा उद्दिष्ट अर्थ थोडासा आला असावा असें दिसतें. कवीचें सबंध रहस्य मीं वर दिलें आहेच; त्यांत पुरुषायिताचा ध्वनि आहे हें स्पष्ट आहे. सूक्तें रचणारे मनुष्यच होते; त्यांच्या मनांत शृंगारपूर्ण कल्पना आल्या असल्यास नवल नाहीं.

**इषुः ( १४ ) इषतेः गतिकर्मणः । वधकर्मणो वा । तस्यैषा भवति**

इष् = जाणें किंवा ठार मारणें ह्यापासून इषु. अवेस्तांत इषु व ग्रीक भाषेंत इऑस्. तत्संबंधी पुढील ऋचा होय. ह्या पुढील ऋचेंत इषु शब्द स्त्रीलिंगी आहे; तेव्हां तस्य बद्दल तस्याः शब्द पाहिजे होता; तो शब्द यास्कानें घातला नाहीं याचें कारण व्यावहारिक संस्कृतांत इषु शब्द पुल्लिंगीच होता व आहे.

## खंड १९ वा.

**सुपर्णं वस्ते मृगो अस्या दन्तो गोभिः संनद्धा पतति प्रसूता ।**
**यत्रा नरः सं च वि च द्रवन्ति तत्रास्मभ्यमिषवः शर्म यंसन् ( ऋ० सं० ६।७५।११ )**

**सुपर्णं वस्ते इति वाजान् अभिप्रेत्य**

बाणांना पक्षांचे पंख ( वाजान् ) लावले असतात ही गोष्ट लक्षांत घेऊन सुपर्णं वस्ते = गिधाड वगैरे पक्षांचें पंख ( सुपर्ण ) इषु अंगावर घालते ( वस्ते ) ( असें ऋषि म्हणतो ); पक्षो वाजः ( अमरः २।८।८८ ).सुपर्णः = पक्षी = पक्षाचा पंख.

**मृगमयः अस्याः दन्तः । मृगयतेर्वा**

मृगः=मृगमयः = मृगाचा ( दांत ); मृगाचा दांत तो इषूचा ( अस्याः ) दांत. येथें मृग म्हणजे हरिण नाहीं; ऋग्वेदांत मृग म्हणजे वाघ, सिंह, हत्ती वगैरे पशु; हत्तीच्या दांताच्या लहानशा तुकड्याला धार देऊन तो बाणाच्या अग्रभागीं लावीत असावेत. अस्याः हे स्त्रीलिंग घालण्याचें कारण इषु शब्द स्त्रीलिंगीही आहे ( खंड ९।१४ पहा ). मृग शब्द मृगय् = पारध करणें ह्यापासून.

**गोभिः संनद्धा पतति प्रसूता इति व्याख्यातम्**

गोभिः० प्रसूता हे शब्द स्पष्ट आहेत; किंवा ह्यांचा अर्थ निरुक्त २।५ त दिला आहे. इति व्याख्यातम् दुर्गवृत्तींत नाहीं. गाईंनीं म्हणजे गाईंच्या चामड्यांनीं व स्नायूंनीं बळकट गुंडाळलेली ( संनद्धा ) इषु सोडली असतांना ( प्रसूता ) पांखरासारखी उडत जाते ( पतति ).

**यत्र नराः संद्रवन्ति च विद्रवन्ति च तत्र अस्मभ्यम् इषवः शर्म यच्छन्तु शरणं संग्रामेषु**

यत्रा = यत्र = जेथें. नरः = नराः. सं च वि च द्रवन्ति = संद्रवन्ति च विद्रवन्ति च. शर्म = शरणं = संरक्षण. यंसन् = यच्छन्तु; यम् (= देणें) + स् (लेट्चा) = यंस्. संग्रामेषु अध्याहृत; दुर्गवृत्तींत संग्रामे. यास्कानें केलेला अर्थः — इषु अंगावर पिसें घालते; तिचा दांत हस्तिदंती असतो; गाईच्या चामडयानें व स्नायूंनीं वेष्टिलेली अशी ती शत्रूंवर सोडली असतां पांखरासारखी उडत जाते; जेथें मारण्याकरितां योद्धे एकमेकाकडे धांवत येतात व (भयानें) एकमेकापासून पळत सुटतात (म्हणजे जेथें हमरीतुमरी चालते) अशा लढायांत ह्या इषु आम्हांला संरक्षण देवोत. दुर्गानें केलेला अर्थः— ये एते सुपर्णं वस्ते वसते गार्ध्रम् । वाजाः इषवः । येषां च एतेषां मृगमयः दन्तः । यदि मार्गाणि फलानि । अमार्गेषु तु व्यधनस्वभावात् मार्गयन्ति इव । किं नु तत् यत् वेद्धव्यं स्यात् यत् अहं विध्येयम् इति । ये च इमे गोभिः संनद्धाः गव्येन स्नाव्ना श्लेष्मणा च समन्ततः नद्धाः पतन्ति गच्छन्ति धनुष्मता प्रसूताः क्षिप्ताः । ते एवमादिगुणयुक्ताः इषवः यत्र यस्मिन् संग्रामे नराः मनुष्याः संद्रवन्ति गच्छन्ति च विद्रवन्ति च पुनर् विगच्छन्ति तत्र अस्मभ्यं शर्म शरणं सुखं जयनिमित्तं यंसन् यच्छन्तु ददतु = जे हे बाण गिधाडाचे पंख अंगावर घालतात, ज्यांचा दांत म्हणजे हरणाचें शिंग व जे गाईच्या चामडयानें आणि चरबीनें सभोंवतीं गुंडाळले असून धनुर्धाऱ्यानें सोडल्याबरोबर शत्रूवर जातात ते हे बाण जेथें लढाईत मनुष्य एके ठिकाणीं जमतात व वेगळे होतात तेथें आम्हांला सुरक्षितता व जयापासून होणारें सुख देवोत. यदि मार्गाणि फलानि = बाणांचें फळ म्हणजे अग्रभाग जर हरणाच्या शिंगाचा असेल तर मृगः = मृगमयः; पण तसा जर नसेल तर अशी कोणती जखम करण्याजोगी वस्तु आहे कीं तिला जखम करावी अशा स्फुरणानें बाण त्या वस्तूच्या शोधार्थ जातात. मृगयतेर्वा हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत तथापि व्यधन स्वभावात् मार्गयन्ति इव = टोकांचा टोचणें हा धर्म असल्यामुळें तीं जणूं काय भक्षाचा पाठलाग करितात असें तो मृगयतेर्वा याचें विवरण करतो. दुसऱ्या अर्धातील इषवः ह्या बहुवचनी शब्दामुळें पहिला अर्ध एकवचनी असतांना त्याचें बहुवचनांत दुर्गानें रूपान्तर केलें आहे; इषवः हा शब्द एथें स्त्रिलिंगी असतांना तो पुल्लिंगी आहे अशा समजुतीनें अस्याः = एतेषां असा त्यानें बदल केला आहे; पत् व द्रु ह्या धातूंचा तो जाणें असा अर्थ करतो; इति वाजान् अभिप्रेत्य हे शब्द त्याच्या वृत्तींत नाहींत; तथापि वाजाः = इषवः असें तो म्हणतो व तो शब्द वसते ह्या क्रियापदाचा कर्ता करतो; भाष्यांत नराः शब्द असल्यामुळें मनुष्याः असा तो पर्याय देतो; परंतु नृ शब्द योद्धा ह्या अर्थी ऋग्वेदांत अनेक वेळां आला आहे. अर्वाचीन संस्कृताशीं निकट संबंध असल्यामुळें त्यानें ऋचेचा भलता अर्थ केला आहे. सुपर्णं = शोभनं वाजं = सुंदर पंख; मृगः मृगावयवः शृंगं = हरिणाचें शिंग म्हणजे त्या शिंगापासून बनविलेला बाणाचा अग्रभाग; किंवा मृगः

शत्रून् मृगयमाणः = शत्रूंचा शोध करणारा; गोभिः = गोविकारैः स्नायुभिः; किंवा गोभिः संनद्धा = प्रत्यंचेशीं संबंध असलेली ( बाणाचा प्रत्यंचेशीं नेहमीं संबंध असतो ); शर्म = सुख; असे सायणाचार्य अर्थ करतात; पहिल्या अर्धांतील स्त्रीलिंग व एकवचन त्यांनीं तसेंच ठेवलें आहे. सुपर्ण, मृग व गो हे अनुक्रमे पक्षाचे, मृगाचे व गाईचे अवयव दर्शवितात; असे शब्द घालण्यांत कांहींसा विनोद असावा; ही बाई गिधाड अंगावर घालते; हत्ती हा तिचा दांत; गाईनीं ती मढविली असते; इतकी जड असूनही ती पांखरासारखी उडते; हें अशक्य म्हणून त्या प्राण्यांचे अवयवच घेतले आहेत. कमरेभोंवतीं पिसें घालणारी, तोंडाबाहेर एक लांब सुळका दांत आलेली व अंगाभोंवतीं गाईची चामडीच्या चामडी वेष्टन करणारी काय ही भयंकर राक्षसीण ! हिच्या तावडींतून सुटेल कोण ! सुटलाच तर हिच्या केवळ दयेनें ! असे योद्धे गांगरून तिच्या तावडींतून सुटण्याकरितां कधीं घोळक्यानें पळत सुटतात तर कधीं तसें करण्यांत धोका आहे असें पाहून वेगवेगळे पळत सुटतात. असा इषूंचा महिमा वर्णन केला आहे.

**अश्वाजनीं ( १५ ) कशा इति आहुः । कशा प्रकाशयति भयम् अश्वाय । कृष्यतेर्वा अणूभावात् । वाक् पुनः प्रकाशयति अर्थान् । खशया । क्रोशतेर्वा । अश्वकशायाः एषा भवति**

अश्वाजनी म्हणजे कशा ( = चाबूक ) असें म्हणतात; पण कोण म्हणतात ? पूर्वाचार्य, कोशकार किंवा इतर कोणी ? अश्वाजनी = अश्व + अजनी; अज् = चालावयास लावणें; घोड्याला चालावयास लावणारी ती अश्वजनी. चाबकाला कशा म्हणण्याचें कारण चाबूक घोडयाला भय दाखवितो म्हणजे कशा शब्द काश् = प्रकाशणें (धा० १।६४८) ह्यापासून; प्रकाशय् = प्रकाशांत आणणें; किंवा कृष् = ओढून काढणें (धा०१।१०१५)ह्यापासून तो शब्द झाला असेल; कारण मोठ्या चामडयापासून बारीक व लांब अशी वादी ओढली म्हणजे फाडली जाते; अणूभाव = ( फाडल्यामुळें ) बारीकपणा; कृष् = कृश् = कश् ; कश् + आ = कशा. कशति कशा ( अमर० २।१०।३१ क्षी० ); कशति = ( चाबूक ) आवाज करतो. पण ( पुनः ) वाचा या अर्थी जो कशा शब्द तो काश्=प्रकाशणें ह्यापासून. वाणीला कशा म्हणण्याचें कारण ती मनांतला अर्थ प्रकाशांत आणते म्हणजे प्रकट करते; किंवा कशा = खशा = खशया; ख = आकाश = अवकाश = मोकळी जागा = पोकळी; वाणी तोंडाच्या पोकळींत निजते म्हणून ती कशा. खशया ह्यानंतर वा शब्द पाहिजे व तो दुर्गाच्या प्रतींत होता; किंवा क्रुश् = आरडणें, उच्चारणें (धातु० १।८८१) यापासून; वाणी ओरडली जाते म्हणजे उच्चारली जाते; क्रुश् = कुश् = कश् ; कश् + आ = कशा. वाणी हा अर्थ ऋग्वेदांत, अमरकोशांत किंवा आपल्यांच्या कोशांत नाहीं; ऋग्वेदांत कशा = ( १ ) चाबूक, ( २ ) भांडार ( ! ). पुढील ऋचा अश्वकशा ( = घोडयाचा चाबूक ) ह्यासंबंधी आहे.

## खंड २० वा.

आ जङ्घन्ति सान्वेषां जघनाँ उप जिघ्नते।
अश्वाजनि प्रचेतसोऽश्वान्त्समत्सु चोदय ( ऋ० सं० ६।७५।१३ )

**आघ्नति सानूनि एषाम्। सरणानि। सक्थीनि। सक्थि सचतेः। आसक्तः अस्मिन् कायः**

घन् ह्याचें चर्करीतवृत्तानें जङ्घन्; जङ्घन्चें वर्तमानकालीन विशेषण पुलिंगी जङ्घन् व स्त्रीलिंगी जङ्घन्ती; जङ्घन्ति हें संबोधनाचें एकवचन; आजङ्घन्ति = आघ्नति = हे तडाखे देणारी ( अश्वाजनी ). महाराष्ट्रपाठ आघ्नन्ति आहे. सानु = सानूनि = सरणानि = सक्थीनि = कटिप्रदेश; सानु शब्द सृ (= हलणें ) ह्यापासून; कटिप्रदेश हलतो म्हणून तो सर्ण म्हणजे सानु; सरणानि ही सानु शब्दाची व्युत्पत्ति व सक्थीनि हा त्याचा अर्थ. सच् ( = चिकटणें ) ह्यापासून सक्थि; थि हा नामकरण प्रत्यय; कटिप्रदेशाला सक्थि म्हणण्याचें कारण त्याच्यावर ( अस्मिन् ) शरीर ( कायः ) चिकटविलेलें ( आसक्तः ) असतें. जेंव्हा सानु म्हणजे पर्वताचें शिखर तेंव्हां समुच्छ्रितं भवति ही व्युत्पत्ति ( नि० २।२४ पान १४० ); गुर्जरपाठ सक्थिः असा चुकीचा आहे; दुर्गवृत्तींत सक्थिः असेंच आहे. सजति सक्थि ( अमर २।६।६३ क्षीरस्वामी ).

**जघनानि च उपघ्नति। जघनं जङ्घन्यतेः**

जघनान् = जघनानि = मांड्या; ऋग्वेदांत जघन शब्द पुल्लिंगी आहे; पण अर्वाचिन संस्कृतांत तो नपूंसक आहे. जघन = ज + घन = जं + घन; घन् ह्याचें चर्करीतवृत्त जङ्घन्; मांड्यांना जघन म्हणण्याचें कारण त्यांच्यावर सारखे तडाखे बसत असतात; ही व्युत्पत्ति जनावरांच्या मांडयांना कदाचित् लागू होईल; पण माणसांच्या टेंग्या बडविल्या जात नाहींत; तेंव्हा माणसांचें जें जघन त्याची काय व्युत्पत्ति? येथें अश्वांचें जघन म्हणून जङ्घन्यतेः ही व्युत्पत्ति यास्कानें दिली आहे. उप + जिघ्नते = उपघ्नति; आघ्नति व उपघ्नति ह्यांचा अर्थ एकच; उपजिघ्नते हेंही संबोधनाचें एकवचन!

**अश्वाजनि प्रचेतसः। प्रवृद्धचेतसः। अश्वान् समत्सु समरणेषु संग्रामेषु चोदय**

प्रचेतसः = प्रवृद्धचेतसः = ज्यांचें मन वृद्धिंगत झालें आहे असे, हुषार; प्र = प्रवृद्ध. समत्सु = समरणेषु = संग्रामेषु; समरणेषु हा पर्याय देण्याचें कांहीं कारण नाहीं; कारण समरण हा शब्द अर्वाचीन संस्कृतांत नाहीं; तो वैदिक आहे. आजङ्घन्ति व उपजिघ्नते हीं वर्तमानकालीन विशेषणें असें दुर्गही म्हणतो! उपजिघ्नते = उपजिघ्नति; ह्यावरून दुर्गाच्या प्रतींत उपघ्नति ह्याच्याबद्दल उपजिघ्नति असा पाठ असावा; आजङ्घन्ति ह्याचा आघ्नति हा पर्याय तो देत नाहीं. सरणानि व समुच्छ्रितानि अशा सानूनि याच्या दोन व्युत्पत्ति तो देतो. ऋचेचा यास्क व दुर्ग यांनीं केलेला अर्थः—ह्या घोडयांच्या कटिप्रदेशांवर व मांडयांवर तडाखे देणारी हे अश्वाजनि, तूं ह्या हुषार घोडयांना समरांगणांत हाकलून

ने. रथाला चार घोडे असून दोन पुढें व दोन मागें असे ते जोडले असतात; पुढें असणाऱ्या घोड्यांच्या कटिप्रदेशांवर व मागें असणाऱ्यांच्या मांड्यांवर चाबुकाचे तडाखे बसतात असें दुर्ग म्हणतो. सायणः— अश्वाजनि अश्वानां क्षेप्त्रि कशे यया त्वया प्रचेतसः प्रकृष्टज्ञानाः सादिनः सारथयो वा एषाम् अश्वानां सानु सानूनि सक्थीनि आजङ्घन्ति आघ्नन्ति। जघनान् जघनानि उपजिघ्नते उपजिघ्नति। सा त्वं समत्सु संग्रामेषु अश्वान् चोदय। प्रेरय। तथा च यास्कः। आघ्नन्ति० जघनानि च उपघ्नन्ति इत्यादि = अश्वांना पळावयास लावणारी (हे अश्वाजनि) ज्या तुझ्या साहाय्यानें ज्ञाते घोडेस्वार(सादिनः)किंवा सारथि(सारथयः)ह्या घोड्यांच्या कटिप्रदेशांवर व मांड्यांवर आघात करतात ती तूं घोड्यांना रणांगणांत हाकलून ने. सायणाचार्यांनीं आघ्नति बद्दल आघ्नन्ति हा पाठ घेतला आहे; उपजिघ्नते = उपजिघ्नति; परंतु त्यांनीं दिलेल्या यास्काच्या उताऱ्यांत उपघ्नन्ति असा शब्द आहे; तेव्हां भाष्यांत उपजिघ्नति हा शब्द चुकीनें लिहिला गेला असावा; उपघ्नन्ति असेंच त्यांना म्हणावयाचें होतें. चित्रावशास्त्रीः— हे प्रतोदा, ज्या तुझ्या साहाय्यानें ज्ञाते सारथि ह्या घोड्यांच्या मांड्यांवर (सक्थीनि) आणि ढुंगणांवर (जघनानि) तडाखे लगावतात त्यानें तूं घोड्यांना पिटाळ. श्रुतिबोधकारः— ह्या चाबकांचा (एषाम्) अग्रभाग (सानु=जघनानि) तीव्र मारा करतात (आजङ्घन्ति). (अहो पण) हे चाबूक पळणाऱ्या घोड्यांना हळूच मारतात (उपजिघ्नते). हे घोड्याला (अधिकाधिक) पळविण्यास लावणाऱ्या चाबका (अश्वाजनि), ह्या महाबुद्धिमान् घोड्यांना (प्रचेतसः) घनघोर लढायांमध्यें (समत्सु) शिरण्याची प्रेरणा कर (चोदय). लुड्विग् (Ludwig):— He strikes on their back; he strikes on their thighs; O driving stick of the horse, drive the skilled horses in the battles = तो त्यांच्या (एषाम्) पाठीवर (सानु) तडाखे मारतो (आ + जङ्घन्ति); तो त्यांच्या मांड्यांवर (जघनान्) तडाखे देतो (उप + जिघ्नते); हे घोड्याला पुढें ढकलणाऱ्या यष्टे (अश्वाजनि), कुशल (प्रचेतसः) घोड्यांना (अश्वान्) लढायांत हांक. ग्रासमान् (Grassmann):— On their back she whips; whips freely on their hind (-legs); O whip, drive in the battles horses who are intelligent = ती त्यांच्या पाठीवर चाबकाचे तडाखे मारते व हवी तशी (उप) त्यांच्या पाठीमागल्या पायांवर (जघनान्) तडाखे मारते; हे कशे, संग्रामांत बुद्धिमान् घोड्यांना हांक. ऋचेचा खरा अर्थ कळण्याकरितां तींतील कांहीं शब्दांचे अर्थ निश्चित केले पाहिजेत. ऋग्वेदांत हन्सारखा घन् धातु आहे; त्याची जङ्घन्ति, जङ्घनः, जङ्घनत्, जङ्घनन्त, जंघनानि, जंघनाव, जङ्घ्नतः, जिघ्नते, जिघ्नसे, जिघ्नन्ते, जिघ्नमानः व घनिघ्नत् अशीं क्रियारूपें आणि घन व घनाघन अशीं नामरूपें आढळतात. तमांसि सोम योद्धया। तानि० जंघनः (९।९।७) = हे सोमा, तूं अंधकाराशीं लढून त्याला ठार केलेस. अग्निर्वृत्राणि जङ्घनत् (६।१६।३४) = अग्नीनें शत्रूंना ठार केलें. पृथिव्याः सानौ जंघनन्त पाणिभिः (१।८८।२) = आपल्या हातांनीं पृथिवीच्या उंच भागावर

म्हणजे पर्वतांवर मरुत् आघात करते झाले. पृथिवीमहं जंघनानि इह वा इह ( १०। ११९।१० ) = मी पृथिवीला एथें ठोकूं कीं एथें ठोकूं ? अधा वृत्राणि जङ्घनाव भूरि ( ८।१००।२ ) = आपण दोघेजण पुष्कळ शत्रूंना मारूं या. पवमानस्य जंघ्नतः हरेः चंद्राः असृक्षत ( ९।६६।२५ ) = ठेचल्या जाणाऱ्या सोमाचे तेजस्वी प्रवाह वाहूं लागले. जंघन्मि, जंघन्वः, जंघन्मः, जंघंसि, जंघंति, जंघनन्ति, अजंघनः, अजंघनत्, अजंघनन्त, जंघनानि, जंघनाव, जंघनाम असा तो धातु चालत असावा. घन् अभ्यासानें जंघन्; जंघन् + ति =जंघन्ति; हें रूप एकवचनीच आहे. जिघ्ने, जिघ्नावहे, जिघ्नामहे, जिघ्नसे, जिघ्नते व जिघ्नन्ते अशीं त्याचीं आत्मनेपदीं रूपें; जंघ्नतः व जिघ्नमानः हीं वर्तमानकालीन विशेषणें. जिघ्नसे प्रमाणें जिघ्नते हेंही एकवचनच. इंद्रः वृत्रस्य सानुं वज्रेण० अव जिघ्नते ( १।८०।५ ) = इंद्र वृत्राचें डोकें ( सानुं ) वज्रानें फोडतो. उज्जिघ्नन्ते० पर्वतान् ( ३।३०।४ ) = मरुत् पर्वतांवर आघात करून त्यांना उडवून देतात. ह्या शेवटल्या उदाहरणावरून कोणाचीही खात्री होईल कीं जिघ्नते हें एकवचनीच; ग्रासमान् व लुड्विग् ह्यांची तशी खात्री झाली म्हणून त्यांनीं जंघन्ति व जिघ्नते ह्यांचें एकवचनीच भाषांतर केलें; यास्क व दुर्ग तीं संबोधनें आहेत असें मानतात; सायणाचार्यांना तीं बहुवचनें क्रियारूपें वाटलीं. जिघ्नते हें वर्तमानकालीन विशेषण आहे असें यास्कास कां वाटलें तें कळत नाहीं. ह्नते, घ्नाते व घ्नते ह्या रूपांमुळें व आघ्नन्ति आणि उपघ्नन्ति ह्या पाठांतरामुळें सायणाचार्य फसले गेले; अशी त्यांची फसगत झाल्यामुळें दुसऱ्या अर्धांतील अश्वान् ह्याचें प्रचेतसः हें विशेषण त्यांनीं पहिल्या अर्धांत घेऊन तो शब्द ह्या क्रियापदांचा कर्ता केला. सानु = ( १ ) डोकें, ( २ ) पर्वताचें डोकें म्हणजे शिखर; ह्या दोन अर्थांखेरीज तिसरा कोणताही अर्थ ऋग्वेदांत नाहीं; तो शब्द पुल्लिंगी व नपुंसकलिंगीही आहे ( अमर २।३।५ ). जघन शब्द जघना ( = जघनौ ), जघनान्, जघने अशा तीन रूपांत आणि पृथुजाघने ह्या समासांत असा एकंदर चार वेळां आढळतो; जघन = नितंब = टेरी. अश्वाजनी हा शब्द स्त्रीलिंगी आहे व तोच जंघन्ति व जिघ्नते ह्यांचा कर्ता; अश्वाजनि हें त्याचें संबोधनाचें एकवचन; ह्या संबोधनी रूपावरून अश्वाजनी हा कर्ता अध्याहृत घ्यावयाचा; तो शब्द स्त्रीलिंगी आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे; तो प्रस्तुत ऋचेंतच आढळतो; त्याचा प्रतोद, चाबूक किंवा छडी असा अर्थ केल्यानें ऋचेचें स्वारस्य जातें; भाषांतरांत अश्वाजनी हाच शब्द ठेविला पाहिजे. अश्वाजनी ( = कशा = चाबूक ) काय करते ? एषां म्हणजे ह्या घोड्यांच्या डोक्यांच्या कांहींसे वरती व टेऱ्यांच्या जवळ मारल्याचा आवाज करते; त्यांच्या कोणत्याही अंगाला ती स्पर्श करीत नाहीं; आ = वरती; उप = जवळ; जर घोडयांना सारथि झोडील किंवा चाबुकाचा एकाददुसरा फटकारा देईल तर तो सारथि ह्या नांवाला योग्य होणार नाहीं; घोडे समजुतदार, हुषार ( प्रचेतसः ) आहेत; त्यांना नुसता इषारा पाहिजे व तो इषारा चाबकाच्या नुसत्या आवाजानें त्यांना मिळेल; शिवाय अश्वाजनी ही स्त्री

आहे; अश्वाच्या अंगाला चाबूक लावणें हें स्त्रीस्वभावाच्या विरुद्ध; फटकारे लगावण्याचा तर प्रश्नच नको. कवि प्रेक्षकाची भूमिका घेतो व म्हणतो: —पहा, ही अश्वाजनी घोडयांच्या डोक्यांवरती व टेऱ्यांजवळ त्या भागांना न शिवतां नुसता आवाज करीत आहे; किती हुषारी! किती नाजुकपणा! असें तो मनांत म्हणतो किंवा इतरांजवळ तसे उद्गार काढतो; नंतर तो आपल्याला अतिशय आनंद झाला आहे हें दाखविण्याकरितां अश्वाजनीला प्रत्यक्ष संबोधितो; वाहवा वाहवा हे अश्वाजनी, तूं फार चतुर व घोडे समजुतदार; तेंव्हा अशा घोडयांना नुसता आवाज करून रणांगणांत इकडे तिकडे ने. चाबकाचा जो आवाज होतो त्याचा उद्देश अश्वाजनीनें दिलेल्या शिक्षणापासून घोड्यांना पूर्णपणें कळला आहे; नुसता इषारा मिळाल्याबरोबर काय करावयाचें हें ते समजतात; सर्कशींतील घोडे चाबकाच्या आवाजानें कवाईत कशी करतात हें सर्वांनीं पाहिलेंच आहे; तेंव्हा अश्वाजनीला अशा तरबेज झालेल्या घोडयांना समरांगणांत पाहिजे तिकडे नेण्यास कांहींच श्रम पडणार नाहींत. खरोखर अश्वाजनी हें काम करीत नाहीं; तें काम कुशल सारथिच करतो; तथापि अश्वाजनीची स्तुति करावयाची असल्यामुळें कवि सारथ्याला अजीबात विसरतो. सूक्तें रचणारे विद्वान् व मार्मिक होते असें पुनः पुनः सांगितले पाहिजे; ही गोष्ट विसरल्यास व शब्दांचे अर्थ निश्चित न केल्यास ऋच्यांचे भलते अर्थ होतात हें यास्क वगैरेंच्या विवरणांवरून स्पष्ट होतें. प्रत्येकानें आपली स्वतःची बुद्धि खर्चिली पाहिजे; विवरणकार आचार्यपदाला जरी पोहोचले असले ( मग ते प्राचीन असोत किंवा अर्वाचीन असोत ) तरी त्यांना प्रमाण मानतां उपयोगी नाहीं.

**उलूखलम् ( १६ ) उरुकरं वा। ऊर्ध्वखं वा। ' उरु मे कुरु इति अब्रवीत् तत् उलूखलम् अभवत्। उरुकरं वा एतत्। तत् उलूखलम् इति आचक्षते परोक्षेण ' ( शत० ब्रा० ७।५।१।२२ ) इति च ब्राह्मणम्। तस्य एषा भवति**

उलूखलं = उलू + खलं; उलू = उरु = विस्तृत, पुष्कळ; खलं = करं; उरुकरं = पुष्कळ करणारे; उखळांत धान्य कुटल्यामुळें पसरतें व पुष्कळ दिसतें म्हणून पुष्कळ धान्य करणारें तें उलूखल; किंवा उरुकरं = उरुकृतं = ( ज्याचें भोंक मुद्दाम) मोठें केलें असतें तें. दुर्गवृत्तींत ह्यानंतर ऊर्करं वा अशी आणखी एक व्युत्पत्ति दिली आहे; महाराष्ट्रपाठांत उर्करं वा हे उर्ध्वखं वा ह्याच्या आधीं आहे; उलूखलं = उरुकरं = ऊर्करं = ऊर्क् + करं = जें अन्न ( ऊर्क् ) तयार करतें तें; धान्य जर कुटलें नाहीं तर त्यापासून चांगलें अन्न होणार नाहीं. किंवा उलू = उर्ध्वम्; खलं = खं; ज्याचें भोंक वर आलें आहे तें; उखळीचें भोंक जमिनीपासून उंच असतें. " उखळ म्हणालें कीं माझें ( मे ) भोंक विस्तृत ( उरु ) कर; मूळचा शब्द उरुकर असा असतां त्याचें उलूखल असें रूपांतर झालें; हें उरुकर होतें पण त्याला उलूखल असें परोक्षरीतीनें लोक किंवा देव म्हणूं लागले. " हल्लीं छापलेल्या शतपथब्राह्मणांत "उरु मे करदिति तस्मादुरुकरम्। उरुकरं ह वै तदुलूखलमित्याचक्षते परोक्षम्" असें शब्द

आहेत; ते वर दिलेल्या ब्राह्मणवाक्याहून जरासे भिन्न आहेत; कारण कुरु बद्दल करत्, या एतत् बद्दल ह वै तत् व परोक्षेण बद्दल परोक्षं असे शब्द असून अब्रवीत् तत् उलूखलमभवत् हे शब्द नाहींत. दुर्गाच्या मतें उरु मे कुरु० अभवत् हे यास्काचे विवरणात्मक शब्द होत व उरुकरं० परोक्षेण एवढेंच अवतरण आहे; पण शत०ब्रा०च्या छापील प्रतीवरून सर्वच अवतरण असावेंसें वाटतें. ब्राह्मणांत परोक्षेण ह्या नंतर परोक्षप्रियाः इव देवाः प्रत्यक्षद्विषः ( = देवांना प्रत्यक्ष म्हणजे उघड आहे अर्थ ज्यांचा अशा नांवांचा तिटकारा असतो; त्यांना परोक्ष म्हणजे ज्या नांवांत फेरफार झाला आहे अशीं नांवें आवडतात ) असे शब्द येतात; माणसांच्या तोंडीं हवे तसे अपभ्रष्ट शब्द बनतात त्याचें हें समर्थन होय; शिवाय शब्दांच्या हव्या तश्या व्युत्पत्ति देणें ह्याचेंही हें समर्थन होय. स्यादुदूखलमुलूखलम् ( अमर २।९।२५ ) = उखळ या अर्थी उदूखल व उलूखल असे दोन शब्द आहेत; उखळ उंचावर ( ऊर्ध्वे )भोंक ( खं ) घेतें ( लाति ) म्हणून तें उदूखल किंवा उलूखल; उदू किंवा उलू =ऊर्ध्वे; ख = खं; लं = लाति ( क्षीर० ). त्या उलूखलाविषयीं पुढील ऋचा होय.

## खंड २१ वा.

**यच्चिद्धि त्वं गृहेगृह उलूखलक युज्यसे ।**
**इह द्युमत्तमं वद जयतामिव दुन्दुभिः** (१।२८।५) ॥
**इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा ).

दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थः—हे उलूखला, जरी (यत् चित् हि) अन्न शुद्ध करण्यासाठीं तुझा घरोघर उपयोग केला जातो तथापि एथें आमच्या घरीं जय मिळविणाऱ्यांचा दुन्दुभि जसा दीप्तिमान् म्हणजे जोराचा शब्द बोलतो त्याप्रमाणें जोराचा शब्द बोल. ह्या विवरणांत ऋचेंतील दोन अर्धांचा परस्पर संबंध कोणता तें कळत नाहीं; कदाचित् घरोघर तूं मोठा आवाज काढीत असशील परंतु आमच्या एथें त्याहूनही मोठा आवाज काढ असें म्हणावयाचें असेल. उलूखल संबंधाचा उहापोह खंड ३६ यांत पहा. ऋचेचे दोन अर्थ असावेत असें वाटतें; घरोघर सोमरस काढतांना उलूखलाचा आवाज होतच असेल; पण आमच्या ह्या घरीं द्यूलोकाला पोहोंचेल असा मोठा आवाज काढ असें उलूखलाला विनोदानें म्हटलें आहे; ज्यांना लढाईत जय मिळतो त्यांच्या दुंदुभीचा आवाज स्वर्गाला जाऊन पोहोंचतो म्हणजे त्या आवाजानें सर्व आकाश दणदणून जाते त्याप्रमाणें उलूखलाच्या आवाजानेंही आकाश दुमदुमून जावो असें अतिशयोक्तीनें म्हटलें आहे; द्युमत्तमं ह्या शब्दांत दुमदुम ह्या आवाजाची अनुकृति असेल. दुसरा अर्थ पुढीलप्रमाणें:—हे उलूखला, तूं लोकांच्या खजिन्यांत(गृहेगृहे) धन टाकीत असतोस ( युज्यसे ) म्हणून आमच्या ह्या खजिन्यांत अतिशय धन टाक. द्यु = (१) स्वर्ग, (२) धन; द्युमत्तमं = अतिशय धनानें युक्त असें धन; वद = दे; असा ध्वनित अर्थ येथें

आहे; उलूखलक ह्याचाही दुसरा अर्थ असेल पण त्याविषयीं तर्क करतां येत नाहीं; उलूखलक एखाद्या राजाचें नांव असेल व तो राजा अतीशय दानशूर असल्यामुळें कवीनें त्याला विनवणी केली असावी; जयतामिव दुन्दुभिः = हे इव ( तव ) दुन्दुभिः जयताम् = हे दात्या ( इव ), दुन्दुभीयुक्त तुझी सेना धन मिळवो. उलूखल ह्याला क हा प्रत्यय आदर किंवा प्रेम दाखविण्यासाठीं लावला असावा.

## खंड २२ वा.

**वृषभः (१७) प्रजां वर्षति इति वा। अतिवृहति रेतः इति वा। तद्वृषकर्मा वर्षणात् वृषभः। तस्य एषा भवति**

प्रजा वर्षतो म्हणजे रेतस्सेकानें प्रजा निर्माण करतो म्हणून वृषभ; वृष् वर्षणें ह्याला भ प्रत्यय लावून बैल ह्या अर्थी वृषभ शब्द झाला आहे; किंवा वृह् उंच करणें ह्यापासून वृषभ; घोडा रेतस्सेकाकरितां घोडीवर चढतो (अतिवृहति = अति उंच होतो); पहिल्या व्युत्पत्तींत भ हा प्रत्यय व दुसरींत ष; दुर्गाच्यामतें वृष् म्हणजे वृह् असून भ हाच प्रत्यय आहे; पण पहिल्या व्युत्पत्तींत भ हा प्रत्यय नसेल असें वाटून वृभ् म्हणजे वृह् असा धातु असावा व ष हा प्रत्यय मध्यें घातला असावा अशी यास्कानें दुसरी व्युत्पत्ति दिली असावी. रेतः अतिबृहति = उंच होऊन रेत पाडतो. त्याचे ( तत् ) म्हणजे घोड्याचें रेतस्सेक ( वृष ) हें कर्म ( कर्मा ) बैलांत असतें म्हणजे बैल रेतस्सेक करतो म्हणून तो वृषभ; वृष् = रेतस्सेक करणें; वृष + भः = वृषभः = घोड्याप्रमाणें रेतस्सेक करणारा बैल असें ह्या खंडाचें दुर्ग विवरण करतो; तें मला कळलें नाहीं. दुर्गवृत्तींत वर्षणात् ह्याबद्दल वृषणात् असा शब्द आहे. देवराज म्हणतो वृष् सिंचन करणें ह्याला अभ प्रत्यय लागून वृषभ शब्द झाला असेल; किंवा अभ प्रत्यय लागण्याच्या आधीं वृहूचें वृष् होऊन मग वृषभ शब्द बनला असेल. वृहू उद्यमने। बृहू इति अन्ये ( धा० ६।६६ ); वृह् किंवा बृह् = उंच होणें; अतिवृहति किंवा अतिबृहति = अतीशय उंच होतो.

## खंड २३ वा.

**न्यक्रन्दयन्नुपयन्त एनममेहयन् वृषभं मध्य आजेः।**
**तेन सूभर्वं शतवत्सहस्रं गवां मुद्गलः प्रधने जिगाय ( ऋ० सं० १०।१०२।५ )**
**न्यक्रन्दयन् उपयन्तः एनम् इति व्याख्यातम्। अमेहयन् वृषभं मध्ये आजेः आजयनस्य। आजवनस्य इति वा**

न्यक्रन्दयन् उपयन्तः एनम् हें स्पष्ट आहे; त्याचा अर्थ द्यावयास नको; जवळ जाणाऱ्यांनीं ( उपयन्तः ) ह्याला डुरकण्या फोडावयास लाविलें व शर्यतीच्या ( आजेः ) मधोमध (मध्ये) त्याला मुतावयास लाविलें ( अमेहयन् ). दुर्ग म्हणतो ह्यांतील पहिले तीन शब्द अगदीं स्पष्ट आहेत; तथापि सर्व ऋचेचा एकंदर अर्थ दिला पाहिजे; तो

पुढीलप्रमाणें:—यम् एतम् आजेः शरपथस्य मध्ये वर्तमानं वृषभं न्यक्रन्दयन् उपयन्ति न्यक्रन्दयन्तः एनं हे जनाः युक्ताः रयन्त युक्ताः रयन्त इति उपयन्ति उपगच्छन्ति परिवृण्वन्ति । अमेहयन्तश्च तं मुहूर्तं स्थीयतां यावत् अयं सकृत् मूत्रं करोति ततः लघु सुखं भविष्यति इति । स हि गोमिनाम् आजिसृतां स्वभावः; ह्या विवरणांत उपयन्तः ह्याबद्दल उपयन्ति असें आहे व न्यक्रदयन् = न्यक्रन्दयन्तः आणि अमेहयन् हा जरी शब्द घातला नाहीं तरी त्याच्याबद्दल अमेहयन्तः असा पर्याय घातला आहे; न्यक्रन्दयन्तः = ओरडूं न देणारे व अमेहयन्तः = मुतूं न देणारे असा अर्थ होईल; पण पुढें जें विवरण दुर्ग देतो त्याच्या उलट हे अर्थ आहेत; तेंव्हा मूलवृत्तींत निक्रन्दयन्तः व मेहयन्तः असे शब्द असावेत व ते शब्द भाष्यांत जरी नाहींत तरी विवरणासाठीं त्यानें तें घेतले असावेत. न्यक्रन्दयन् उपयन्तः = निक्रन्दयन्तः उपयन्ति = अहो लोकहो, सावधगिरीनें जा, सावधगिरीनें जा असें ओरडत त्या बैलाच्याभोंवतीं जमा होतात. अमेहयन् = मेहयन्तः = मुतविणारे. क्षणभर थांबा, याला मुतूं द्या; मग पळणें ह्याला सुलभ होईल; बैलवाले जेंव्हां शर्यतींत बैल सोडतात तेंव्हां शर्यतीच्यामध्येंच त्यांना मुतवितात. रयन्त ( = रयत = जा ) हें अशुद्ध रूप आहे. न्यक्रन्दयन्तः व रयन्त असे अशुद्ध शब्द असल्याकारणानें हें विवरण दुर्गाचें नसावें असें वाटतें. आजेः = आजयनस्य; आ + जि ह्यापासून आजि; जेथें पूर्ण ( आ ) जय ( जयनं ) मिळतो असें ठिकाण म्हणजे शर्यत किंवा लढाई; शर्यतींत किंवा लढाईंत गुंतलेले लोक परस्परांचा पुरा पाडाव करून जय मिळविण्याची इच्छा करितात; किंवा आजेः= आजवनस्य; आ + जव् किंवा जु ह्यापासून आजि; शर्यतींत किंवा लढाईंत अतीशय चपळाई दाखवावी लागते. आ अज्यन्ते क्षिप्यन्ते अत्र आजिः । अथवा अज्यते अत्र आजिः ( अमर २।८।१०७ क्षी० ) = जेथें सर्वत्र बाण फेकले जातात किंवा जेथें सैनिक एकमेकाला फेकून देतात तो आजि.

**तेन तं सूभर्वं राजानम् । भर्वतिः अत्तिकर्मा । तत् वा सूभर्वम् सहस्रं गवां मुद्गलः प्रधने जिगाय । प्रधनः इति संग्रामनाम । प्रकीर्णानि अस्मिन् धनानि भवन्ति**

सूभर्वं = सूभर्वं राजानम् = सूभर्व नांवाच्या राजाला; सू ( = सु ) शोभनं भर्वं भोगः यस्य सः सूभर्वः = चांगले भोग त्याला मिळत होते म्हणून तो राजा सूभर्व; भर्वति = अत्ति = खातो; भर्वं = खाद्य; किंवा सूभर्वं हें गवां सहस्रं ह्याचें विशेषण असेल; खाऊन पिऊन धष्टपुष्ट झालेला गाईंचा कळप. भर्व = खाणें हा वैदिक अर्थ होय; भर्व हिंसायाम् ( धातु पा० १।५८२ ); भर्व धातु आपट्यांच्या कोशांत नाहीं. प्रधने = संग्रामे; संग्रामाला प्रधन म्हणण्याचें कारण संग्रामांत धन जिकडे तिकडे पसरलें असतें; म्हणजे लढाईंत हव्या त्या ठिकाणीं लूट मिळते. प्र = प्रकीर्णानि = जिकडे तिकडे फेकलेली. ऋचेचा अर्थः—रणांगणामध्यें जवळ जाणाऱ्यांनीं त्या बैलाला डुरकण्या फोडावयास लाविलें व मुतावयास लाविलें; त्याच बैलाच्यामुळें मुद्गल हा सूभर्व राजाच्या एक लाख गाई किंवा धष्टपुष्ट झालेल्या ( सूभर्वं ) एक लाख गाई

लढाईत जिंकता झाला. ऋचेच्या दोन अर्धांचा संबंध लक्षांत येत नाहीं; या बैलाला मुतूं द्या व तोंपर्यंत थांबा असें लढाईत कोणी म्हणणार नाहीं; कदाचित् पहिल्या अर्धाचा पुढीलप्रमाणें अर्थ असेल:- चोहोंबाजूंनीं जवळ जाऊन तडाखे लगावणाऱ्या लोकांनीं त्या बैलाला इतकें पिटलें व धांवविलें कीं तो बैल खूप तयार झाला व असा तयार झालेला बैल मुद्गलाला मिळाला. सायणाचार्यांच्या भाष्यांत शत्रूंनीं भिऊन पळून जावें म्हणून जवळ जाणाऱ्या लोकांनीं त्या बैलाला मोठ्यानें डुरकण्या फोडण्यास लाविलें व नंतर विश्रांतीसाठीं त्याला मुतूं हागूं दिलें असें म्हटलें आहे; हा अर्थ हास्यास्पद असून त्याचा दुसऱ्या अर्धाच्या अर्थाशीं कोणताही संबंध दिसत नाहीं. सायणाचार्य सूभर्व नांवाचा राजा होता असें म्हणत नाहींत.

**द्रुघणः ( १८ ) द्रुममयः घनः । तत्र इतिहासम् आचक्षते । मुद्गलः भार्म्यश्वः ऋषिः वृषभं च द्रुघणं च युक्त्वा संग्रामे व्यवहृत्य आजिं जिगाय । तदभिवादिनी एषा ऋक् भवति**

द्रुघणः = द्रु + घनः = द्रुममयः + घनः = लाकडी घण; द्रु=द्रुम. त्या द्रुघणासंबंधीं पुढील गोष्ट सांगतात; भृम्यश्वाचा मुलगा मुद्गल ऋषि रथाला बैल व द्रुघण जोडून व संग्रामांत त्या दोघांना इकडे तिकडे धावडवून संग्राम जिंकता झाला; ती कथा सांगणारी पुढील ऋचा होय. दुर्गवृत्तींत द्रुममयः याच्या बद्दल द्रुमयः असा शब्द आहे व तोच शब्द बरोबर असावा; कारण द्रुम प्रमाणें द्रु शब्दही अर्वाचीन संस्कृतांत आहे. द्रुघण म्हणजे मोठा घण किंवा मुद्गर किंवा तालिमबाज लोकांचा मुद्गल; मुद्गल ऋषीला दुसरा बैल न मिळाल्यामुळें बैलाच्या जोडीला त्यानें मुद्गल जुंपला व रथ हांकून त्यानें लढाई जिंकली अशी गोष्ट दुर्ग देतो; परंतु द्रुघणं शयानं ह्या पुढील ऋचेंतील शब्दांवरून द्रु + घन म्हणजे मुद्गल असा अर्थ संभवत नाहीं; कारण शर्यतीच्यामध्यें द्रुघण निजला किंवा पडला होता असें तेथें म्हटलें आहे; कदाचित् द्रुघण एखादा वाघासारखा किंवा सिंहासारखा हिंस्र पशु असेल. आरे अघा को न्वित्था ददर्श यं युञ्जन्ति तम्वा स्थापयन्ति । नास्मै तृणं नोदकमा भरन्ति उत्तरो धुरो वहति प्रदेदिशत् ( १०।१०२।१० ) = अशी गोष्ट कोणी पाहिली आहे ? ज्याला जोडतात त्यालाच तेथें ठेवतात; त्याला गवत किंवा पाणी देत नाहींत; परंतु उंच होऊन तो जूं मानेवर घेतो. ह्या ऋचेवरून द्रुघण एखादें जनावर होतें असें दिसत नाहीं पण तें काय होतें ह्याचाही तर्क करतां येत नाहीं.

## खंड २४ वा.

**इमं तं पश्य वृषभस्य युञ्जं काष्ठाया मध्ये द्रुघणं शयानम् ।**
**येन जिगाय शतवत्सहस्रं गवां मुद्गलः पृतनाज्येषु ( १०।१०२।९ )**

**इमं तं पश्य वृषभस्य सहयुजं काष्ठायाः मध्ये द्रुघणं शयानम् । येन जिगाय शतवत् सहस्रं गवां मुद्गलःपृतनाज्येषु । पृतनाज्यम् ( निघण्टु २।१७।९ ) इति संग्रा-**

**मनाम । पृतनानाम् अजनात् वा । जयनात् वा । मुद्गलः मुद्गवान् । मुद्गगिलः वा । मदनं गिलति इति वा । मदंगिलः वा । मुदंगिलः वा**

युञ्जं = सहयुजं = जोडीदार. पृतनाज्यं = संग्राम; संग्रामाला पृतनाज्य म्हणण्याचें कारण संग्राम पृतनांना म्हणजे सैन्यांना पुढें ढकलतो; संग्रामांत दोन्हीकडच्या सेना परस्परावर चाल करून जातात ( अजनात् ); किंवा एक सेना दुसरीला जिंकते ( जयनात् ). पृतनाजाः अत्याः ( ९।८७।५ ) व पृतनाजम् आशुं ( १०।१७८।१ ) एथें घोड्याला पृतनाज म्हणजे लढाई जिंकणारा म्हटलें आहे; पृतनाजानां कर्म पृतनाज्यं म्हणजे रणजेत्यांचा संग्राम. मुद्गलः = मुद्ग + लः = मुद्ग + वान् = मूगवाला. किंवा मुद्गलः = मुद्ग + गलः ; गलः = गिलः; जो मूग गिळतो तो म्हणजे मुगावर उपजीविका करणारा किंवा गुपचूप बसणारा. किंवा मुद्गलः = मुद् + गलः; मुद् = मदनम् ; गलः = गिलः; जो मदनाला गिळतो म्हणजे शंकरासारखा कामवासनेला जिंकतो तो किंवा मदनाला गिळून टाकतो म्हणजे मदनाहूनही सुंदर. किंवा मुद् = मदं; जो मद गिळतो तो म्हणजे निगर्वी. किंवा मुद् = मुदं; जो हर्ष गिळतो तो म्हणजे विरक्त. मुद् गले यस्य = ज्याच्या गळ्यांत आनंद आहे असा म्हणजे सदा आनंदी; किंवा मुद् गलति अस्य = ज्याचा आनंद किंवा मद ( मुद् = मद ) गळत असतो असा; अशाही व्युत्पत्ति देणें शक्य आहे.

**भार्म्यश्वः भृम्यश्वस्य पुत्रः । भृम्यश्वः भृमयः अस्य अश्वाः । अश्वभरणात् वा**

मागील खंडांत मुद्गलः भार्म्यश्वः असें म्हटलें आहे; भार्म्यश्व म्हणजे भृम्यश्वाचा मुलगा; ह्याचे ( अस्य ) घोडे भ्रमण करणारे होते म्हणजे ते सारखे दवडत असत म्हणून तो ऋषि भृम्यश्व; किंवा तो अश्वांचें भरण म्हणजे पोषण करी; किंवा तो घोडयांना आपल्या खांद्यावर वाहून नेई म्हणून तो भृम्यश्व; भृम्यश्व = भृमि + अश्व; भृ + मिः = भृमिः = भरणं = पोसणें किंवा वाहून नेणें; अश्वानां भृमिः येन सः भृम्यश्वः = ज्याच्याकडून घोडयांचें पोषण किंवा घोड्यांना खांद्यावर वाहून नेण्याची क्रिया घडते तो भृम्यश्व. ऋचेचा अर्थः—ज्याच्यामुळें मुद्गल संग्रामांत एक लक्ष गाई जिंकता झाला तो बैलाचा जोडीदार द्रुघण शर्यतीच्यामध्यें निजलेला हा पहा. मागील खंडांतील ऋचेंत बैलाच्यामुळें मुद्गलाला जय मिळाला असें म्हटलें आहे; तें खोडून टाकण्याकरितां बैलाच्यामुळें नव्हे तर द्रुघणाच्यामुळें मुद्गलाला जय मिळाला असें म्हटलें असावेंसें वाटतें. सूक्ताच्या आरंभीं सायणाचार्य म्हणतातः— अत्र आहुः । मुद्गलस्य हृता गावः चोरैः त्यक्त्वा जरद्गवम् । स शिष्टं शकटे कृत्वा गत्वैक ऋजुराहवम् । द्रुघणं युयुजेऽन्यत्र चोरमार्गानुसारकः । द्रुघणं चाग्रतः क्षिप्त्वा चोरेभ्यो जगृहे स्वगाः इति = अशी एक गोष्ट सांगतात कीं मुद्गलाच्या गाई चोरांनीं नेल्यावर एक म्हातारा बैल टाकून देऊन व जें कांहीं जवळ होतें तें गाडींत घालून मुद्गल थेट एका आहवाकडे गेला व गाडीला घण जोडून चोरांची वाट काढीत गेला;

चोरांवर तो घण फेकून त्यानें आपल्या गाई परत मिळविल्या. ही गोष्ट कोठून मिळाली तें सायणाचार्य सांगत नाहींत.

**पितुः ( १९ ) इति अन्ननाम ( निघण्टु २।७।६ ) । पातेः वा । पिबतेः वा । प्यायतेः वा । तस्य एषा भवति**

पितुः = अन्न; तो शब्द पा द्वितीय गण ( = रक्षण करणें ) किंवा पा पिब् प्रथम गण (= पिणें) किंवा प्याय् (= वाढणें) ह्यापासून; प्यायी वृद्धौ (धा० १।४८९). अन्न रक्षण करतें, प्यायलें जातें व पोषण करतें. ऋग्वेदांत पि धातु आहे; पि + तुः = पितुः; अवेस्तांत पितु; लॅटिन् पॅस्टस् = गुरांचें अन्न. तत्संबंधी पुढील ऋचा होय. १।१८७ ह्या सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत स्वादो पितो वयं त्वा ववृमहे, चवथींत तव ते पितो रसा रजांसि अनुविष्ठिताः, सहावींत त्वे पितो महानां देवानां मनो हितम् व नववींत यत्ते सोम गवाशिरो यवाशिरो भजामहे असे शब्द आहेत; पितु गोड असून त्याचे रस स्वर्गलोकीं जिकडे तिकडे पसरले आहेत; पितूवर देवांचें मन बसलें आहे; शिवाय त्याला सोम असें म्हटलें आहे; तेव्हां पितु म्हणजे नुसतें अन्न नव्हे.

## खंड २५ वा.

**पितुं नु स्तोषं महो धर्माणं तविषीम् ।**

**यस्य त्रितो व्योजसा वृत्रं विपर्वमर्दयत् ( ऋ० सं० १।१८७।१ )**

**तं पितुं स्तौमि महतः धारयितारं बलस्य । तविषी ( निघण्टु २।९।१० ) इति बलनाम । तवतेः वृद्धिकर्मणः । यस्य त्रितः ओजसा बलेन । त्रितः त्रिस्थानः इन्द्रः। वृत्रं विपर्वाणं व्यर्दयति**

यस्य ह्या संबंधीसर्वनामाकरितां तं अध्याहृत. स्तोषं = स्तौमि; स्तु + स् ( लेट्‌चा ) = स्तोष्; स्तोष् + अम् = स्तोषं = अस्तोषम् = अस्तवम् = मीं स्तविलें. नु निरर्थक म्हणून गाळला आहे. महः = महतः. धर्माणं = धारयितारम्; धृ + मन् = धर्मन्; धर्मा धर्माणौ वगैरे; धर्माणं हें पितुं ह्याचें विशेषण. तविषीं = बलस्य; वास्तविक बलं पाहिजे; पण महः = महतः असा अर्थ केल्यानें बलस्य अशी षष्ठी करावी लागली; महः तविषीं = महतीं तविषीं = महत् बलम्. तु वाढणें ह्यापासून तविषी. महाराष्ट्रपाठ तवतेः वा वृद्धिकर्मणः असा आहे; पण व्युत्पत्ति एकच असल्यामुळें वा नको आहे; सिद्धांत कौमुदींत यु, रु, तु व नु अशा क्रमानें चार धातु दिले आहेत; पण धातुपाठांत तु नाहीं; तु जाणें, वाढणें व हिंसा करणें ह्या अर्थीं असून तो सौत्र धातु आहे म्हणजे कांहीं कारणाकरितां तो कल्पिलेला धातु आहे असें भट्टोजी दीक्षित म्हणतात; पण सौत्र धातु कां व तो जर सौत्र धातु असेल तर त्याचे तीनही अर्थ कल्पितच कीं काय तें समजत नाहीं; तु हा सौत्र धातु असल्याकारणानें तवतेः वृद्धि-कर्मणः ही व्युत्पत्ति व्याकरणाला मान्य नाहीं म्हणून महाराष्ट्रपाठांत तिला गौणस्थान दिलें असावें; पण खरी व्युत्पत्ति कोणती तें आधीं सांगावयास पाहिजे होतें; कदाचित्

तव् ह्यापासून तविषी असें म्हणावयाचें असेल. देवराजः- तविः सौत्रः धातुः वृद्ध्यर्थः। तवेः टिषन् प्रत्ययः ( निघं. २।९।१० ) = वाढणें याअर्थी तवि हा सौत्र धातु आहे; तवि + सी = तविषी. तु धातु ऋग्वेदांत अनेक वेळां आला आहे; त्याची तूतोः, तूतोत्, तूताव व तवीति अशीं क्रियारूपें असून तवस्, तविष, तविषी वगैरें नाम-रूपेंही आहेत. व्योजसा = वि + ओजसा; ओजसा = बलेन. त्रितः = त्रि + तः = त्रिस्थानः = तीन ठिकाणीं असणारा ( इंद्र ); त्रि + तः = तीन चा = तीन स्थानांचा. विपर्व = विपर्वाणं = शरीराचीं पेरें म्हणजे सांधे नाहींसे झाले आहेत ज्याचे अशाला. वि + अर्दयत् = व्यर्दयति = ठोकून काढतो. स्तौमि व व्यर्दयति हे वर्तमानकाळ इंद्राचा पराक्रम प्रत्यक्ष दिसत आहे हें दाखविण्याकरितां. ऋचेचा यास्कानें केलेला अर्थः—ज्याच्या जोरानें किंवा स्फूर्तीनें ( ओजसा ) त्रित म्हणजे इंद्र वृत्राला त्याचे सांधे नाहींसे होतील अशा रीतीनें ठेचतो त्या अतीशय बल देणाऱ्या अन्नाची मी स्तुति करतों. नु निरर्थक नसून तो सार्थ आहे; मी स्तुति केलीच आहे असा निश्चय दाखविण्याकरितां त्याचा उपयोग केला आहे; ज्याच्या बलानें इंद्रानें वृत्राला ठेचून ठेचून त्याच्या शरीराचे सांधे अगदीं नाहींसे करून टाकले त्या अतीशय बल उत्पन्न करणाऱ्या सोमाची मी स्तुति केलीच आहे व केलीच पाहिजे आणि आतांही करतों असा सूक्ताचा प्रारंभ झाला आहे. महः पितुं पपिवान् चारु ( १।६१।७ ) एथें महः हें पितुं ह्याचें विशेषण आहे; तसें एथेंही तें पितुंचेंच विशेषण असावें; महः पितुं = महान्तं पितुम्. त्रित हा मूळचा इंद्र नसून एक मोठा शूर योद्धा होऊन गेला असावा; त्यानें केलेलीं कृत्यें इंद्राला शोभणारीं अशीं होतीं; त्यामुळें इंद्राला त्रित हें नांव पडलें असावें.

**नद्यः ( २० ) व्याख्याताः। तासाम् एषा भवति**

नदी शब्दाची व्युत्पत्ति दिलीच आहे ( नि० २।२४ ); तत्संबंधीं पुढील ऋचा होय.

## खंड २६ वा.

**इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि स्तोमं सचता परुष्ण्या।**
**असिक्न्या मरुद्वृधे वितस्तयार्जीकीये शृणुह्या सुषोमया ( ऋ० सं०१०।७५।५ )**

**इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि परुष्णि स्तोमम् आसेवध्वम्। असिक्न्या च सह मरुद्वृधे वितस्तया च आर्जीकीये आशृणुहि सुषोमया च। इति समस्तार्थः**

परुष्ण्या = परुष्णि + आ. आ + सचत = आसेवध्वं = स्वीकार करा. परुष्ण्या हें एक पद कीं दोन पदें? एक पद असल्यास परुष्णी ह्याचें तें तृतीयेचें एकवचन असेल व तें तसें असावें असें असिक्न्या, वितस्तया आणि सुषोमया ह्या तीन तृतीयांत शब्दांवरून वाटतें व दुर्गही तें एकच पद मानतो तेव्हां त्याचा निरुक्तपाठ

परुष्णि आ असा नसून परुष्ण्या असाच होता; पण परुष्णि आ असा पदपाठ आहे व सायणाचार्य आपल्या भाष्यांत त्याच पाठाचें विवरण करतात; यास्क व दुर्ग यांनीं पदपाठ बाजूला ठेवला कीं काय किंवा एकट्या दुर्गानेंच तें धाडस केलें ? सचता = सचत + आ; आ परुष्ण्या हें आ सुषोमया ह्यासारखें आहे व त्याचा अन्वय शृणुहि ह्या क्रियारूपाशीं करावयाचा आहे. आ परुष्ण्या = परुष्ण्या + आ = परुष्णीसह. पहिलें वाक्य सचत एथें संपतें; हे गंगे, यमुने, सरस्वति व शुतुद्रि, माझें हें स्तोत्र गृहण करा. यास्कानें तीन च व सह अध्याहृत घेतले आहेत; परंतु आ परुष्ण्या व आ सुषोमया ह्यांतील आ ह्याचा च किंवा सह अर्थ असावा. असिक्न्या व वितस्तया ह्या तृतीयान्त शब्दांच्या शेवटींही आ असावा; असिक्न्या = असिक्न्या + आ; वितस्तया = वितस्तया + आ; आ = सह. हे मरुद्वृधे, परुष्णी आणि असिक्नी ह्यांसह व हे आर्जीकीये, वितस्ता आणि सुषोमा ह्यांसह माझें स्तोत्र ऐक; परुष्णी आणि असिक्नी ह्या मरुद्वृधेला मिळत असतील व वितस्ता आणि सुषोमा ह्या आर्जीकीयेला मिळत असतील; म्हणून हे चार नदीवाचक शब्द तृतीयान्त आहेत. इति समस्तार्थः = असा सबंध ऋचेचा अर्थ आहे. भाष्यांत शृणुहि ह्याबद्दल शृणु असें म्हणावयास पाहिजे होतें.

**अथ एकपदनिरुक्तम् । गङ्गा गमनात् । यमुना प्रयुवती गच्छति इति वा । प्रवियुतं गच्छति इति वा । सरस्वती । सरः ( निघं० १।१२।३८ ) इति उदकनाम । सर्तेः । तद्वती । शुतुद्री शुद्राविणी क्षिप्रद्राविणी । आशु तुन्ना इव द्रवति इति वा । इरावतीं परुष्णी इति आहुः । पर्ववती । कुटिलगामिनी**

आतां प्रत्येक पदाचें निरुक्त म्हणजे व्युत्पत्ति दिली जाईल. इति समस्तार्थः । अथ एकपदनिरुक्तं असें यास्कानें पूर्वीं कोठेंही म्हटलें नाहीं; तेव्हां भाष्याचा कोणी तरी अशा रीतीनें विभाग केला असावा असा संशय येतो; अर्थाच्या व अन्वयाच्या भानगडींत यास्क पडत नाहीं; वैदिक शब्दांचे पर्याय देतां देतां त्या शब्दांची व्युत्पत्ति द्यावयाची; व्युत्पत्ति देण्याचा मोह त्याला इतका अनिवार होतो कीं ऋचेकडे त्याचें दुर्लक्ष होतें व केव्हां केव्हां विवरण अपुरें राहतें. दुर्गवृत्तींत मात्र कोठें कोठें अशी विभागणी केलेली आढळते; ती विभागणी दुर्ग वाचकाच्या सोईकरितां करितो; यास्क वाचकाच्या सोईकडे पाहात नाहीं. गम् धातूपासून गंगा; गङ्गा = गम् + गा; गा हा नामकरण प्रत्यय. दुर्गः—सा हि विशिष्टं स्थानं गच्छति । गमयति वा प्राणिनो विशिष्टं स्थानम् इति गङ्गा = विशिष्ट स्थानाकडे म्हणजे समुद्राकडे जाते म्हणून किंवा विशिष्ट स्थानाला म्हणजे स्वर्गाला प्राण्यांना नेते म्हणून गंगा हें नांव; विशिष्ट देश हा अर्थ गं चा कीं गा चा ? गं गमनीयं गाति गच्छति गमयति वा असा गंगा शब्दाचा विग्रह दुर्गानें केला कीं काय ? गां गाते गच्छति गङ्गा । अगं गच्छति वा ( अमर १।९।३१ क्षीरस्वामी ) = स्वर्गांतून पृथिवीकडे जाते किंवा स्वर्गांतून पर्वताकडे म्हणजे हिमालयाकडे जाते म्हणून गंगा हें नांव; गं = गां = पृथिवी-

कडे; किंवा गं = अगं = पर्वताकडे; गा = गाते = जाते. प्रयुवती = प्र + युवती; प्र = प्रकर्षेण = जोरानें; युवती = मिश्रयन्ती = मिसळणारी; यमुना आपलें पाणी दुसऱ्या नद्यांच्या पाण्याशीं जोरानें मिसळते; किंवा प्रवियुतं = प्र + वि + युतं; प्र = अगदीं, सर्वस्वीं; वि = वेगळे; वियुतं = न मिसळणारें; प्रवियुतं = अगदीं मिसळणार नाहीं अशा रीतीनें; दोन्ही व्युत्पत्तींत यु हा धातु; पण यमुना ह्या शब्दांत यु धातूचें कोणतें रूप आहे? प्रयागास गंगा व यमुना यांचा संगम होतो ह्या आधारावर पहिली व्युत्पत्ति; संगम होण्याच्या आधीं यमुनेचें पाणी गंगा वगैरे नद्यांच्या पाण्याशीं मिसळलेलें नसतें ह्या आधारावर दुसरी व्युत्पत्ति; प्रवियुतं स्तिमितम् इव तरङ्गैः गच्छति (दुर्ग) = जणूं काय अचल अशा रीतीनें (प्रवियुतं = स्तिमितं) लाटा घेऊन जाते; गंगेला मिळण्याच्या आधीं यमुनेला जोर नसतो. यमेन यमजा यमुना यमी च (अमर १।९।३२ क्षीरस्वामी) = यम व यमुना किंवा यमी हीं सूर्याचीं जुळीं मुलें (यमजा) होतीं; यमुना = यमजा = जुळ्यांत जन्मलेली. सृ गतौ (धा० पा० १।९६०); सृ (= हलणें) ह्यापासून सरस् म्हणजे उदक; तद्वती = उदकवती; जिच्यांत अतिशय पाणी आहे ती सरस्वती. सरांसि सन्ति अस्यां सरस्वती (अमर १।९।३४ क्षीरस्वामी). शुतुद्री = शु + तु + द्री; शु = क्षिप्र; तु हें अक्षर व्यर्थ; द्री = द्राविणी = धांवणारी; त्वरित धांवणारी (क्षिप्रद्राविणी) ती शुतुद्री; किंवा शु = आशु = क्षिप्र; तु = तुन्ना = टोंचलेली; मधें अडथळे आल्यामुळें प्रवाहाचे तुकडे तुकडे होऊन जी त्वरेनें धांवते ती शुतुद्री. शु पूजितम् आशु वा तुदति शुतुद्रिः। एतत् अबुध्यमानाः शितद्रुः सितद्रुः वा इति आहुः। वसिष्ठशापभयात् शतधा द्रुता शतद्रुः (अमर १।९।३३ क्षीरस्वामी) = शु = सु = उत्तम तऱ्हेनें; किंवा शु = आशु = त्वरित; तुदति = फोडते; हें मूळचें नांव न जाणून लोक शुतुद्रीला शितद्रु किंवा सितद्रु असें म्हणतात; वसिष्ठाच्या शापाला भिऊन निरनिराळ्या शंभर प्रवाहांनीं धांवणारी ती शुतुद्री अशी पौराणिक कथा आहे. सा तमग्निसमं विप्रमनुचिन्त्य सरिद्वरा। शतधा विद्रुता यस्मात् शतद्रुरिति विश्रुता (महा० आदि० अ० १७९।९) = (वसिष्ठानें नदींत उडी टाकली तेव्हां) अग्नीसारख्या त्या तेजस्वी ब्राह्मणाला पाहून भीतीनें त्या नदीच्या प्रवाहाचे निरनिराळे शंभर प्रवाह होऊन ती धूम धांवत सुटली म्हणून तिला शतद्रु म्हणतात. जसा उच्चार तशी व्युत्पत्ति ह्याचें हें ठळक उदाहरण होय. शुतु = शतु = शतधा; द्री = द्रुता; कदाचित् शितद्रु किंवा सितद्रु ह्याप्रमाणें शतद्रु असेंही ह्या नदीला लौकिक नांव पडलें असेल व त्यावरच ह्या पौराणिक कथेची उभारणी केली असावी. इरावतीला परुष्णी म्हणतात; परुष्णी = परु + ष्णी = पर्ववती; परु = पर्व = पेरें; ष्णी=वती; ह्या नदीचा प्रवाह सरळ नसून वांकडा वांकडा आहे (कुटिलगामिनी) त्यामुळें तिच्या प्रवाहाला जणूं काय बोटासारखीं पेरें आहेत. महाराष्ट्रपाठ पर्ववती भास्वती कुटिलगामिनी असा आहे; भास्वती हा शब्द व्यर्थ आहे कारण कुटिलगामिनी हा

अर्थ पर्ववती ह्याचा आहे; भास्वती ह्याचा नाहीं; कुटिलगामिनीनंतर भास्वती वा असें म्हटलें असतें तर कदाचित् चाललें असतें; पर्ववती ह्याचा अर्थ कुटिलगामिनी असा होईल किंवा भास्वती असाही होईल; परंतु त्या पाठाचें हें कसलें तरी समर्थन होईल; निरुक्त २।६ ह्यांत परुषे हें गवि ह्याचें विशेषण असून त्याचा अर्थ पर्ववति भास्वति असा यास्कानें केला आहे; प्रक्षेपकानें तेच शब्द एथें घेतले आहेत; पर्ववति = भास्वति हा अर्थ तेथें योग्य आहे; एथें त्याचें प्रयोजन नाहीं.

**असिक्नी अशुक्ला। असिता। सितम् इति वर्णनाम। तत्प्रतिषेधः असितम् मरुद्वृधाः सर्वाः नद्यः। मरुतः एनाः वर्धयन्ति। वितस्ता अविदग्धा। विवृद्धा। महाकूला**

असिक्नी = अ + सिक्नी = अशुक्ला = असिता = जिचें पाणी पांढरें नाहीं अशी एक नदी; अशुक्ला ह्या शब्दाची जरूरी नाहीं; कारण सिक्नी = सिता असे यास्कास म्हणावयाचें आहे; सित हे एका रंगाचें म्हणजे पांढऱ्या रंगाचें नांव; त्याच्या उलट जो रंग तो असित म्हणजे काळा; ह्या नदीचें पाणी नेहमीं काळें असतें. मरुद्वृधे हें यास्क व दुर्ग प्रत्येक संबोधिलेल्या नदीचें विशेषण मानतात; जसें हे मरुद्वृधे गंगे हे मरुद्वृधे यमुने वगैरे; सर्व नद्या मरुद्वृध होत कारण वारे त्यांना वाढवितात म्हणजे वाऱ्यानें सर्व नद्यांचें पाणी वर उसळतें; पण मरुद्वृधा ही एक नदी असावी व परुष्णी व असिक्नी ह्या तिला मिळत असाव्यात; मरुद्वृधः हा गुर्जरपाठ अशुद्ध आहे; कारण मरुद्वृधे हे मरुद्वृधा ह्याचें संबोधनाचें एकवचन होय; ते मरुद्वृध् ह्याचें नाहीं. वितस्ता = अविदग्धा = न दग्ध झालेली; शतपथ ब्राह्मणांत वैदेहक नांवाच्या अग्नीनें सर्व नद्या जाळल्या परंतु त्याला ही नदी जाळता आली नाहीं; म्हणून हिला सदानीरा म्हणतात अशी कथा आहे (शत० ब्रा० १।४।३।१० ते १४); म्हणजे उन्हाळा कितीही कडक असला तरी तिचें पाणी कधींही आटत नाहीं; तसु उपक्षये (धा० पा० ४।१०६); तस्ता = उपक्षीणा; वितस्ता = अत्यंतम् उपक्षीणा; अवितस्ता = अनुपक्षीणा = अविदग्धा = विवृद्धा; पाणी क्षीण होत नाहीं एवढेंच नाहीं तर तें सदा वाढतच असतें; त्या नदीचें पात्र फार प्रशस्त असल्यामुळें तिचे दोन्ही तीर एकमेकापासून फार दूर आहेत (महाकूला).

**आर्जीकीयां विपाट् इति आहुः। ऋजीकप्रभवा वा। ऋजुगामिनी वा। विपाट् विपाटनात् वा। विपाशनात् वा। विप्रापणात् वा। पाशा अस्यां व्यपाश्यन्त वसिष्ठस्य मुमूर्षतः। तस्मात् विपाट् उच्यते पूर्वमासीदुरुंजिरा॥ सुषोमा सिन्धुः। यत् एनाम् अभिप्रस्रवन्ति नद्यः। सिन्धुः स्यन्दनात्। आपः (२१) आप्नोतेः। तासाम् एषा भवति**

आर्जीकीया नदीला विपाट् म्हणतात; आर्जीकीया = ऋजीकप्रभवा = ऋजीक पर्वतापासून उत्पत्ति आहे जिची अशी; ऋजीकात् प्रभवः यस्याः सा ऋजीकप्रभवा; प्रभव ह्याअर्थीं ऋजीक ह्याला तद्धित प्रत्यय ईया लागून अर्जीकीया शब्द बनला आहे; महा-

रा पाठ ऋजूकप्रभवा असा आहे; किंवा ऋजु गच्छति असौ ऋजुगामिनी; ऋजु ह्याला जाते ह्या अर्थी ईकीया हा तद्धित प्रत्यय लागून आर्जीकीया शब्द बनला आहे; ह्या व्युत्पत्तींत ईकीया हा प्रत्यय लागण्याच्या आधीं ऋजु ह्यांतील उ लुप्त होतो; ही दुसरी व्युत्पत्ति प्रक्षिप्त असावी; कारण ईकीया असा तद्धित प्रत्यय नाहीं. विपाट् हें नांव वि + पाट् ( = फोडीत जाणें ) ह्यापासून; ही नदी आपलें पात्र फोडीत जाते; किंवा विपाट् = विपाश् ; नदीला विपाश् हें नांव पडण्याचें कारण पुढीलप्रमाणें:— (वसिष्ठाचे शंभर पुत्र विश्वामित्रानें मारल्यामुळें जिवाला कंटाळून ) मरणाच्या इच्छेनें आपल्याला दोरखंडांनीं बांधून त्यानें नदींत उडी टाकली; परंतु पाण्याचा स्पर्श होतांच दोरखंड ( पाशाः ) तटातट तुटले ( वि + अपाश्यन्त ) व तिच्यांत पडले; म्हणून ह्या नदीला विपाट् म्हणतात; पूर्वीं ती उरुंजिरा नांवाची नदी होती; पाशा अस्यां० उरुंजिरा हा श्लोक असावा; उच्यते ह्याच्यानंतर सा घातल्यानें श्लोकार्ध बरोबर बनतो तो असाः-तस्माद्विपाडुच्यते सा पूर्वमासीदुरुंजिरा; हा श्लोक कोठून घेतला ते समजत नाहीं. उरुंजिरा = उरुजला = दूरवर पसरलेल्या पाण्याची ( नदी ). अथ छित्वा नदी पाशांस्तस्यारिबलसूदन । स्थलस्थं तमृषिं कृत्वा विपाशं समवासृजत् ॥ उत्ततार ततः पाशैर्विमुक्तः स महानृषिः । विपाशेति च नामास्या नद्याश्चक्रे महानृषिः ( महा० आदि० अ० १७९ श्लोक ५ व ७) =त्याचे पाश तोडून व त्याला बंधमुक्त करून नदी त्याला तीरावर ठेवती झाली; म्हणून ऋषीनें तिला विपाशा असें नांव दिलें. किंवा विपाट् =विप्राट्=विप्राप् ; वि + प्र + आप् पासून ( विप्रापणात् ) विपाट् ; ही नदी लोकांना पुष्कळ पाणी ( वि ) प्राप्त करून देते. सुषोमा = सिन्धुः; सिंधूला सुषोमा म्हणण्याचें कारण ( यत् ) पुष्कळ नद्या हिला ( एनाम् ) जन्म देतात ( अभिप्रसुवन्ति ); सिन्धमध्यें शिरतांना सात नद्या एकवटतात व त्यामुळें सिन्धुनदी जन्माला येते; सु + सोम; सु= वत् ; सू = जन्म देणें; सू + म = सोम = जन्म देणारा; सोमा = जन्म देणारी; सोमाः विद्यन्ते अस्याः सा सुषोमा = जिला पुष्कळ जन्मदात्या नद्या आहेत ती सुषोमा. सिन्धु हें नांव स्यन्द् = धांवणें ह्यापासून; अवेस्तांत हप्त हिंदु. पाण्याला अप् म्हणण्याचें कारण पाणी लोकांना मिळतें; म्हणजे अप् हा शब्द आप् ( = मिळणें ) ह्यापासून; अवेस्तांत अप्. अप् संबंधीं पुढील ऋचा होय.

## खंड २७ वा.

**आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन ।**

**महे रणाय चक्षसे ( ऋ० सं० १०।९।१ )**

**आपः हि स्थ सुखभुवः । ताः नः अन्नाय धत्त । महते च नः रणाय रमणीयाय दर्शनाय**

हि ष्ठा = हि स्थ. मयोभुवः = सुखभुवः = सुख उत्पन्न करणाऱ्या. मयोभुवः मयोभावयित्र्यः सुखभावयित्र्यः ( दुर्ग ). ऊर्जे = अन्नाय. दधातन = धत्त = ठेवा. महे

महते. च अध्याहृत. रणाय = रमणीयाय. चक्षसे = दर्शनाय. महाराष्ट्रपाठांत रमणीयाय नंतर च आहे तो नको आहे. ऋचेचा अर्थ:-- हे जलदेवतांनो, तुम्ही खरोखर (हि) सुख देणाऱ्या आहांत; ह्या सुख देणाऱ्या तुम्ही अन्नासाठीं व मोठ्या म्हणजे टिकाऊ अशा रमणीय दर्शनासाठीं म्हणजे फार दिवस आम्हीं जगावें म्हणून आम्हांस धारण करा म्हणजे राखून ठेवा (आमचें असें रक्षण करा कीं आम्ही फार दिवस जगूं व सुखानें भोजन करूं). दुर्गवृत्तींत सुखभुवः व धत्त नाहीं. आपः = आपयित्र्यः (दुर्ग) = सुख मिळवून देणाऱ्या; म्हणजे दुर्ग आपः ह्याचे पुढीलप्रमाणें दोन अर्थ करतो:—हे अब्देवीहो (आपः), तुम्ही सुख मिळवून देणाऱ्या (आपः) आहांत; सुख प्राप्त करून देणाऱ्या (मयोभावयित्र्यः) ज्या तुम्ही त्या तुम्ही वगैरे. मयस् = (१) आरोग्य, (२) बल, (३) धन. (१) तन्नो वातो मयोभु वातु भेषजम् (१।८९।४) = वात आम्हांला आरोग्यदायक (मयोभु) औषध (भेषजं) वाहून आणो (आ + वातु); मयः= आरोग्य. वात आ वातु भेषजं शंभु मयोभु नो हृदे (१०।१८६।१); शंभु = मयोभु. या वो भेषजा मरुतः शुचीनि या शन्तमा वृषणो या मयोभु (२।३३।१३); शुचीनि = शंतमानि = मयोभूनि = आरोग्यदायक.(३) अग्नीषोमा० भवतं दाशुषे मयः (१।९३।१)= हे अग्नि व सोम, तुम्ही हवि देणाऱ्याला (दाशुषे) धन (मयः) द्या (भवतं); भू = देणें; मयोभुवः = धन देणाऱ्या. (२ व ३) मयो नो भूतोतिभिर्मयोभुवः (८।२०।२४) = हे बलद (मयोभुवः) देवहो, तुमच्या बलांतून (ऊतिभिः) आम्हांस बल द्या; हे धनद (मयोभुवः) देवहो, तुमच्या धनांतून (ऊतिभिः) आम्हांस धन (मयः) द्या (भूत). उर्ज् = (१) अन्न, (२) धन, (३) बल. (१) युवमत्रयेऽवनीताय तप्तमूर्जमोमानमश्विनावधत्तम् (१।११८।७) = हे अश्विनांनों, भुयारांत नेलेल्या (अवनीताय) अत्रीला तुम्ही प्राणरक्षक (ओमानं) ऊन ऊन (तप्तं) अन्न (उर्जं) दिलें (अधत्तम्). (२) इषमूर्जं सुक्षितिं सुम्नमश्युः (२।१९।८) = ते धन (इषं = ऊर्जं = सु = क्षितिं = सुम्नं) मिळवितील (अश्युः); ऊर्जं = धन. (३) उर्जा देवां अवस्योजसा (८।३६।३) = हे इंद्रा, तूं बलानें (उर्जा = ओजसा) देवांचें रक्षण करतोस (अवसि). रण = (१) उपभोग्य वस्तु, (२) लढाई, (३) धन. (१) कल्याणीर्जाया सुरणं गृहे ते (३।५३।६) = सुख देणारी बायको व उपभोग्य वस्तु (सुरणं) तुझ्या घरीं आहेत; आ यस्मिन् तस्थौ सुरणानि बिभ्रती सचा मरुत्सु रोदसी (५।५६।८) = ज्या रथांत मरुतांच्यामध्यें उपभोग्य वस्तु (सुरणानि) घेऊन (बिभ्रती) रोदसी बसते (आ + तस्थौ); प्रारोचयन्मनवे केतुमन्हामविंदज्ज्योतिर्बृहते रणाय (३।३४।४) = दिवसांची पताका (अह्नां केतुं) जो सूर्य त्याला इंद्र मनूकरितां प्रकाशमान करता झाला व सतत (बृहते) सुखासाठीं (रणाय) सूर्य (ज्योतिः) देता झाला (अविन्दत्). (२) महे यत्वा पुरूरवो रणायावर्धयन्दस्युहत्याय देवाः (१०।९५।७) = हे पुरूरव्या, मोठ्या संग्रामाकरितां (महेरणाय = दस्युहत्याय) देव तुला वाढविते झाले. (३) विभुमद्भ्यो

भुवनेभ्यो रणं धाः ( ८।९६।१६ ) = हे इन्द्रा, आमच्याजवळ अपार संपत्ति व्हावी म्हणून तूं धन ( रणं ) दिलेस ( धाः ). ( २ व ३ ) रणंकृधि रणकृत्सत्यशुष्माभक्ते चिदा भजा राये अस्मान् ( १०।११२।१० ) = हे लढवय्या ( रणकृत् ), लढाई ( रणं ) कर ( कृधि ) व आम्हांस न वाटलेल्या ( अभक्ते ) धनांत भागीदार कर; रणं कृधि रणकृत् ह्याचा हे धनदा ( रणकृत् ), धन ( रणं ) दे ( कृधि ) असा दुसराही अर्थ आहे. चक्षस् = ( १ ) तेज, ( २ ) पाहाणें, ( ३ ) डोळा, ( ४ ) धन. ( १ ) इन्द्रो दीर्घाय चक्षसे आ सूर्यं रोहयद्दिवि (१।७।३) = लोकांस सतत ( दीर्घाय ) प्रकाश मिळावा ( चक्षसे ) म्हणून इंद्र सूर्याला स्वर्गलोकीं चढविता झाला. ( २ ) प्रान्धं श्रोणं चक्षसे एतवे कृथः ( १।११२।८ ) = हे अश्विनांनों, तुम्ही आंधळ्याला पाहावयाला ( चक्षसे ) व पांगळ्याला ( श्रोणं ) चालण्याला ( एतवे ) समर्थ करतां (प्र + कृथः). (३) नमो मित्रस्य वरुणस्य चक्षसे महो देवाय० सूर्याय (१०।३७।१) = मित्र व वरुण यांचा डोळा जो मोठा देव सूर्य त्याला नमस्कार असो. ( १ व ४ ) तं त्वा सहस्रचक्षसमथो सहस्रभर्णसम्। अति वारमपाविषुः ( ९।६०।२); एथें चक्षस् = तेज व धन; सोम अतिशय तेजस्वी व अतिशय धनवान् आहे. चक्षस् शब्द पुष्कळ समासांच्या अन्तीं येतो; तेथें त्याचे डोळा, तेज व धन असे अर्थ होतात; म्हणून तिसऱ्या विवरणांत चक्षस् म्हणजे धन असा अर्थ केला आहे. स्वति नः पुत्रकृथेषु योनिषु स्वति राये मरुतो दधातन ( १०।६३।१५ ) = हे मरुतांनों, आम्हांस धनभांडारांत ( पुत्रकृथेषु = योनिषु = राये ) ठेवा; एथें राये हा शब्द चतुर्थ्यंत असूनही सप्तम्यर्थीं वापरला आहे. प्रस्तुत ऋचेचे तीन अर्थ होतात. ( १ ) हे जलदेवतांनो, तुम्ही आरोग्यदायक आहांत; तेव्हां आम्ही फार दिवस जगावें म्हणून आम्हांस आरोग्यांत ठेवा; ऊर्जे चतुर्थ्यंत असूनही तो सप्तम्यर्थीं आहे; महे रणाय चक्षसे = महान्तं रणं रमणीयं सूर्यं चक्षसे द्रष्टुम्. आपः पृणीत भेषजं वरूथं तन्वे मम। ज्योक् च सूर्यं दृशे ( १।२३।२१ ) = हे जलदेवतांनो, मी दीर्घकाल ( ज्योक् ) सूर्य पाहावा म्हणून ( दृशे ) माझ्या शरीराला रोगनिवारक ( वरूथं ) औषध ( भेषजं ) द्या ( पृणीत ); ह्या सारखीच प्रस्तुत ऋचा होय; चक्षसे = चष्टुं = द्रष्टुं; किंवा चक्षसे = सूर्याय. ( २ ) हे जलदेवतांनो, तुम्ही बलदात्या आहांत; तेव्हां मोठा रणसंग्राम पाहण्यासाठीं आम्हांला बलांत ठेवा म्हणजे बल द्या. ( ३ ) हे जलदेवतांनो, तुम्ही धनदात्या आहांत; तेव्हां आमच्या जवळ अपार धन असावें म्हणून ( महे = रणाय = चक्षसे ) आम्हांला धनांत ठेवा.

**ओषधयः (२२) ओषत् धयन्ति इति वा। ओषति एनाः धयन्ति इति वा। दोषं धयन्ति इति वा। तासाम् एषा भवति**

ओषधयः = ओष + धयः; ओष = ओषत् = जळणारें; धयः = धयन्ति = चोखून किंवा शोषून घेतात; शरीराला जाळणारें, त्रास देणारें जें कांहीं असेल तें त्या शोषून टाकतात. किंवा ओष = ओषति ( सति )= शरीर किंवा शरीराचा भाग जळत

असतांना; एनाः = ओषधीः; ओषधयः शब्द आधीं आल्यामुळें एनाः; जेव्हां शरीर किंवा शरीराचा एखादा भाग रोगानें सारखा जळत असतो तेव्हां रोगी ओषधि म्हणजे त्यांचा रस चोखतात ( धयन्ति ). किंवा ओषं = दोषं; ओषधि त्रिदोष शोषून टाकतात. ओषं रुजं धयति ओषधिः ( अमर २।३।६ क्षी० ) = ओषधि रोग शोषून घेते. ओषधयः असा जर मूळ शब्द असेल तर धे धय् हा धातु संभवेल; पण मूळ शब्द ओषधि आहे; धि = धे = धय् असें रूप बनवावयाचें कीं काय? ओषधींसंबंधीं पुढील ऋचा होय.

## खंड २८ वा.

**या ओषधीः पूर्वा जाता देवेभ्यस्त्रियुगं पुरा ।**
**मनै नु बभ्रूणामहं शतं धामानि सप्त च ( ऋ० सं० १०।९७।१ )**

**याः ओषधयः पूर्वाः जाताः देवेभ्यः त्रीणि युगानि पुरा । मन्ये नु तत् बभ्रूणाम् अहम् । बभ्रुवर्णानाम् । हरणानाम् । भरणानाम् इति वा । शतं धामानि सप्त च । धामानि त्रयाणि भवन्ति । स्थानानि नामानि जन्मानि इति । जन्मानि अत्र अभिप्रेतानि । सप्तशतं पुरुषस्य मर्मणाम् । तेषु एनाः दधति इति वा**

ओषधीः = ओषधयः. त्रियुगम् = त्रीणि युगानि=कलि, द्वापर आणि त्रेता (दुर्ग); त्रियुगं पुरा = तीन युगांच्यापूर्वीं म्हणजे कृतयुगांत. याः एताः ओषधयः पूर्वाः प्रथमजाताः देवेभ्यः। न तावत् देवाः उत्पद्यन्ते। अथ एताः एव पूर्वम् उत्पद्यन्ते। देवानाम् अपि हि अन्नम् अनपेक्ष्य जीवनहेतु स्थितिः न अस्ति इति पूर्वम् अन्नम् उत्पद्यते पश्चात् देवाः (दुर्ग) = देवांपासून पहिल्याप्रथम ज्या ह्या ओषधि जन्मल्या; देव कांहीं जन्मत नाहींत; पण पहिल्याप्रथम याच जन्माला येतात; जीव रक्षण करणारें अन्न नसेल तर देवतांचें जीवन चालणार नाहीं म्हणजे त्यांचें पोषण होणार नाहीं म्हणून अन्न प्रथम उत्पन्न होतें व देव मागून उत्पन्न होतात; म्हणजे देवांचा जन्म हा खरोखरचा नसून काल्पनिक आहे. देवेभ्यः पुरा जाताः=देवांच्या आधीं जन्मलेल्या. ब्राह्मणग्रंथांत एकेकाळीं देव मनुष्यांप्रमाणें पृथिवीवर रहात होते व मरतही असत; परंतु चांगलीं कर्मे केल्यामुळें ते स्वर्गाला गेले व तेथें अमर झाले असें म्हटलें आहे; तेव्हां ओषधि देवांच्या आधीं जन्मल्या असें म्हणण्यास हरकत नाहीं. येथें ओषधींचा महिमा वर्णन करावयाचा आहे; तेव्हां त्या देवांच्या आधीं जन्मास आल्या असें अतिशयोक्तीनें म्हटलें आहे. मनै = मन्ये = मी मानतों. तत् ( अध्याहृत ) दुर्गवृत्तींत नाहीं व त्याची आवश्यकताही नाहीं; कदाचित् तत् = तस्मात् = म्हणून असा अर्थ असेल; ज्याअर्थीं ओषधि देवांच्या आधीं जन्मल्या त्या अर्थीं त्यांचा महिमा मोठा असें मी मानतों;परंतु शतं धामानि सप्त च हें मनै ह्याचें कर्म आहे म्हणून तत् शब्द व्यर्थ. बभ्रूणाम् = बभ्रुवर्णानाम् = कपिल किंवा पिवळ्या रंगाच्या; ओषधि म्हणजे धान्य; तें पिकलें म्हणजे त्याचा रंग पिवळा होतो. किंवा बभ्रूणाम्=हरणानाम्; हरणं=क्षुधा नाहींशी

करणें; धान्य क्षुधा नाहिंशी करतें; बभ्रू = बभृ; भृ = हृ = हरण करणें. किंवा बभ्रूणाम् = भरणानाम्; भरणम् = पोषण करणें; धान्य सर्व प्राण्यांचें पोषण करतें; भृ अभ्यासानें बभृ; बभृ = बभ्रू. धामानि त्रयाणि भवन्ति = धामें तीन होत; धामानि = (१) स्थानानि, (२) नामानि, (३) जन्मानि = स्थानें, नामें व जन्म; ह्या ऋचेंत धाम म्हणजे जन्म असा अर्थ अभिप्रेत आहे. येथें त्रयाणिबद्दल त्रीणि असा शब्द पाहिजे; त्रय म्हणजे तीन वस्तूंचा संघ; जसें लोकत्रय; पण येथें तिघांचा संघ असा अर्थ नाहीं; धामे तीन आहेत म्हणजे त्या शब्दाचे तीन अर्थ आहेत असा अर्थ आहे. विद्मा ते अग्ने त्रेधा त्रयाणि विद्मा ते धाम विभृता पुरुत्रा ( १०।४५।२ ) ह्या ऋचेंतच त्रयाणि हा शब्द आला आहे व तेथें त्रयाणि धाम धामानि = तीन ठिकाणें असा अर्थ असेल; त्रयाणि धामानि हे शब्द भाष्यांत घालतांना यास्काच्या मनांत ही ऋचा असेल. सप्तशतम् ओषधिजातयः एतस्मिन्मन्त्रे अभिप्रेताः (दुर्ग) = ह्या ऋचेंत ओषधींच्या एकशेसात जाति अभिप्रेत आहेत; म्हणजे ओषधि एकशेसात प्रकारच्या असतात; जन्मानि = जाति. किंवा मनुष्याच्या (पुरुषस्य) मर्मस्थानांची (मर्मणां) संख्या एकशेसात आहे व ओषधि उपचाराकरितां त्या मर्मस्थानांत वैद्य लोक घालतात म्हणून ऋचेंत शतं धामानि सप्त च असें म्हटलें आहे. येथें धाम म्हणजे स्थान. सप्तशतं म्हणजे १०७ कीं ७०० ? शतं वो अम्ब धामानि सहस्रमुत वो रुहः ( १०।९७।२ ) = अहो मातांनो, तुमचीं स्थानें शंभर म्हणजे शेकडों आहेत व तुमच्या वाढी हजार म्हणजे हजारों आहेत; येथें शतं आणि सहस्रं ह्यांचा अर्थ असंख्य; त्याप्रमाणें शतं + सप्त ह्याचाही असंख्य असाच अर्थ असावा; ओषधि हजारों ठिकाणीं असतात; त्या हव्या तेथें उगवतात असा अर्थ. सप्तशतं पुरुषस्य मर्मणाम् ( १३।७ ) = मर्मस्थानें सप्तशत आहेत; म्हणून ओषधि सप्तशत आहेत; पण जितकी मर्मांची संख्या तितकी ओषधींचीं संख्या असा अर्थ नाहीं व धाम म्हणजे जात असाही अर्थ नाहीं. सप्तशतं पुरुषस्य० दधति ही कदाचित् धाम या शब्दाची व्युत्पत्ति असेल; धाम यांत धा ( = ठेवणें ) हा धातु आहे; दधति = ठेवतात; तेव्हां जेथें ओषधि ठेवतात म्हणजे लावतात तीं धामें म्हणजे स्थानें; म्हणून स्थान असाही अर्थ येथें असेल असें यास्क म्हणतो. ऋग्वेदांत धाम शब्दाचे स्थान, देव, शक्ति, तेज वगैरे अर्थ आहेत; येथें ओषधींच्या गुणांचें वर्णन केलें आहे; तुमच्या शक्ति म्हणजे तुमचे गुण असंख्य आहेत. दुर्गानें केलेला अर्थः— कलि, त्रेता, द्वापर अशा तीन युगांच्या आधीं म्हणजे कृतयुगांत देवांपासून ज्या ओषधि उत्पन्न झाल्या त्या पिवळ्या रंगाच्या किंवा क्षुधा, रोग वगैरे हरण करणाऱ्या किंवा प्राणिमात्रांचें पोषण करणाऱ्या ओषधींच्या सातशें जाति किंवा स्थानें आहेत असें मी खात्रीनें म्हणतों. देवांच्या किती तरी आधीं ओषधि जन्मास आल्या व त्या अनेक ठिकाणीं उगवतात किंवा त्यांचें अनेक गुण आहेत असें कवीला म्हणावयाचें आहे. मनै हा आज्ञार्थ आहे, वर्तमानकालीन स्वार्थ नाहीं; मनै नु = मी स्तुति करणारच; मी ओषधींच्या गुणांची स्तुति केलीच पाहिजे व करणारच;

प्राणिमात्रांना ओषधींपासून गुण येत असतो तेव्हां त्यांची स्तुति न करणें ही कृतघ्नता होईल.

**रात्रिः (२३) व्याख्याता ( २।१८ )। तस्या एषा भवति**

ऋग्वेदांत रात्री असा ईकारान्त शब्द आहे; इकारान्त रात्रि हा शब्द अर्वाचीन आहे; ह्यावरून निघंटुकाराचा अर्वाचीन संस्कृताशीं विशेष परिचय होता हें स्पष्ट आहे; खंड सोळांतील धनुः ह्या शब्दावरून हेंच सिद्ध होतें (पान ६७३ पहा).

## खंड २९ वा.

**आ रात्रि पार्थिवं रजः पितुरप्रायि धामभिः।**
**दिवः सदांसि बृहती वि तिष्ठस आ त्वेषं वर्तते तमः ( खैलिकं सूक्तं २५ )**

**आपूपुरः त्वं रात्रि पार्थिवं रजः स्थानैः मध्यमस्य। दिवः सदांसि। बृहती महती। वितिष्ठसे। आवर्तते त्वेषं तमः रजः**

आ + अप्रायि = आ + अपूपुरः = आपूपुरः; पृ ( = भरून टाकणें, व्यापणें ) ह्याच्या तृतीयभूतकालाचें द्वितीयपुरुषी एकवचन आपूपुरः. त्वं अध्याहृत. पितुः=मध्यमस्य. धामभिः = स्थानैः. पिता म्हणजे मध्यलोक म्हणजे अंतरिक्ष; त्यांतील सर्व ठिकाणांसह म्हणजे त्यांतील कोणताही भाग न सोडतां. पार्थिवं(=पृथिवीचा) रजस्(=लोक) = पृथिवीलोक. बृहती = महती; भाष्यांत बृहती शब्द घालण्याचें कारण नाहीं. त्वेषं तमः रजः आवर्तते = प्रचंड ( त्वेषं ) अंधकार सर्व लोक म्हणजे त्रैलोक्यही ( रजः ) व्यापून टाकतो (आवर्तते). आपूपुरः हें कर्तरि रूप; ह्यांत धातु पृ. ऋग्वेदांत प्रा (= भरून टाकणें ) हा धातु बरेच वेळां आला आहे. आ यः पप्रौ० उर्वी दूरेदृशा भासा ( ६।१०।४ ) = जो अग्नि आपल्या दूर दिसणाऱ्या तेजानें द्यावापृथिवी भरून टाकता झाला ( आ + पप्रौ ). विश्वमाप्रा अन्तरिक्षं महित्वा ( १।५३।१३ ) = तूं आपल्या मोठेपणानें सर्व व्यापून टाकलें आहेस ( आ + अप्राः ). अप्रायि हें कर्मणि रूप आहे व त्याचा कर्ता रजः हा शब्द आहे; हें न समजल्यामुळें यास्क व दुर्ग ह्यांनीं ऋचेचा भलता अर्थ केला आहे. दुर्गानें केलेला अर्थः—हे रात्री, ज्या तूं सर्व अंतरिक्षासह ( पितुः धामभिः ) पृथिवीलोक ( पार्थिवं रजः ) व्यापून टाकिला आहेस ( आ + अप्रायि ) व जी तूं फार मोठी ( बृहती ) असल्यामुळें स्वर्गाचींही स्थानें अंधकारानें भरून राहतेस ( वितिष्ठसे ) व ज्या तुझा हा स्वर्गाला व्यापून टाकून शिल्लक राहिलेला प्रचंड ( त्वेषं ) अंधकार ( तमः ) पृथिवीलोकाकडे ( रजः ) परत येत आहे ( आवर्तते ) ती तूं आम्हांला कल्याणप्रद हो. या हें संबोधन घालून दुर्गानें तूं आम्हांला सुखप्रद हो हे शब्द केवळ आशीर्वादाकरितां पदरचे घातले आहेत; पण यास्कानें ऋचेंत असलेलीं तीन वाक्यें भाष्यांत तशींच ठेविलीं आहेत. हे रात्री, अंतरिक्षाच्या स्थानांसह पृथिवीलोकाला तूं भरून टाकलें आहेस; द्युलोकाचींही स्थानें तूं फार प्रचंड असल्यामुळें वेढिलीं आहेस ( वि +

तिष्ठसे ); तुझा प्रचंड अंधकार तिन्ही लोकांत जिकडे तिकडे ( आ ) आहे; अशीं तीं तीन वाक्यें होत. उषा व रात्र ह्या द्यूच्या मुली; तेव्हां पिता अंतरिक्षलोक नसून द्युलोक आहे. धाम = तेज, प्रकाश; पितुः धामभिः = द्यु जो तुझा पिता त्याच्या प्रकाशानें. पार्थिवं रजः ह्याचा ऋग्वेदांत पृथिवीलोक किंवा द्युलोक असे दोन्ही अर्थ होतात; येथें द्युलोक. ऋचेचा खरा अर्थः—हे रात्री, द्युलोक तुझ्या बापाच्या प्रकाशांनीं ( धामभिः ) सर्वत्र ( आ ) भरून गेला होता ( अप्रायि ); पण महाशक्तिमान् ( बृहती ) तूं द्यूचीं ( दिवः ) सर्व स्थानें ( सदांसि ) वेढून टाकीत आहेस ( वितिष्ठसे ); तुझा प्रचंड ( त्वेषं ) अंधकार सर्वत्र ( आ ) पसरत आहे. ऋचेंतील पितुरप्रायि ह्याबद्दल महाराष्ट्रपाठ पितुरः प्रायु असा आहे; तो अगदीं चुकीचा असून त्याचा कांहीं एक अर्थ होत नाहीं. निघंटूंत रात्रिः असा शब्द आहे; तशा इकारान्त शब्दाचें यास्कानें उदाहरण द्यावयास पाहिजे होतें; तसें उदाहरण पुढील होयः—द्यौरासीत् पूर्वचित्तिः० रात्रिरासीत् पिशङ्गिला ( वाज० सं० २३।१२ ) = द्यु ही पूर्वचित्ति व रात्र ही पिशंगिला ( म्हणजे सर्व रूपें गिळून टाकणारी ) होती. प्रस्तुत खंडांतील ऋचा जरी खैलिक आहे तरी तिची भाषा ऋग्वेदांतील भाषेसारखीच आहे.

**अरण्यानी ( २४ ) अरण्यस्य पत्नी। अरण्यम् अपार्णं ग्रामात्। अरमणं भवति इति वा। तस्याः एषा भवति**

अरण्यानी = अरण्यस्य पत्नी = अरण्याचें पालन करणारी देवता. इन्द्रवरुण० हिमारण्य० आनुक् ( पा० ४।१।४९ ) ह्या सूत्रानें अरण्य शब्दाचें स्त्रीलिंग अरण्यानी; महारण्यम् अरण्यानी ( अमर २।४।१ ) = अरण्यानी म्हणजे मोठें अरण्य. अरण्यम् = अ + रण्यम्; अ = अप; रण्यं = ऋण्यं = ऋणम्; अप + ऋणं = अपार्णम्; ऋ ( = जाणें ) ह्याचें भूतभूतकालचें विशेषण ऋण; अपार्ण = दूर गेलेलें; कशापासून दूर गेलेलें ? गांवापासून; रान गांवापासून दूर गेलेलें असतें म्हणून रानाला अरण्य हें नांव; किंवा अरण्यं = अ + रण्यम्; रण्यं = रण् + यं = रमण् + यं = रमणम्; रमण् + यं = रमणीयं असें वास्तविक म्हणावयास पाहिजे होतें; अ = नाहीं; अरमणीयं = ज्यांत कांहीं एक रमणीय नाहीं तें ( अरण्य ); अरमणं = ज्यांत रमण म्हणजे सुख नाहीं तें. इयुरति भ्राम्यन्ति अत्र अरण्यं ( अमर २।४।१ क्षीरस्वामी ); इयृ = जाणें. अर्यते गम्यते शेषे वयसि अत्र = राहिलेल्या वयांत म्हणजे वृद्धापकाळीं जेथें जावयाचें असतें तें अरण्य ( आपट्यांचा कोश ).

## खंड ३० वा.

**अरण्यान्यरण्यान्यसौ या प्रेव नश्यसि।**

**कथा ग्रामं न पृच्छसि न त्वा भीरिव विन्दतीँ३( ऋ० सं १०।१४६।१ )**

**अरण्यानि इति एनाम् आमन्त्रयते। या असौ अरण्यानि वनानि पराचो इव नश्यसि। कथं ग्रामं न पृच्छसि। न त्वा भीः विन्दति इव। इति इवः परिभयार्थे वा**

अरण्यानि ह्या संबुद्धीच्या एकवचनानें ऋषि अरण्यदेवतेला हांक मारतो; जरी दुर्गवृत्तींत अर० मन्त्रयते नाहीं तरी त्या शब्दांचा अर्थ दिला आहे. अरण्यानि = वनानि. प्रेव = प्र + इव; प्र = पराची = पाठीमागें जाणारी, पराङ्मुख; प्रेव = पराची एव = पराङ्मुखा एव = अनावर्तमाना ( दुर्ग ) = पाठीमागेंच जाणारी म्हणजे पराङ्मुखच असणारी म्हणजे परत न येणारी; इव = एव. या असौ = जी तूं ( नाहींशी होतेस ); असौ = असौ असौ इति दृश्यमाना इव ( दुर्ग ) = ही ही ह्या शब्दानें ती जणूं काय ऋषीला दिसत आहे; हे अरण्याधिदेवते, तूं दिसतां दिसतां नाहींशी होत आहेस; दुर्गवृत्तींत या नाहीं. कथा = कथं = किमिति ( दुर्ग ) = कां ? यथा व तथा प्रमाणें कथा; ऋग्वेदांत कथा अठ्ठावीस वेळां आला आहे पण कथं दोनदांच; कथं शेक कथा यय ( ५।६१।२ ); कथं रसायाः अतरः पयांसि ( १०।१०८।१ ); कथं हा शब्द प्रचारांत येऊं लागला होता असें दिसतें. हीच गोष्ट इत्थं बद्दल आहे; हा शब्द एकदांच ( ८।७०।१४ ) आला आहे; पण इत्था कितीतरी वेळां आला आहे; इत्थं व कथं हे शब्द प्रचारांत येण्याचें कारण लक्षांत येत नाहीं. न त्वा भीः विन्दति इव = न त्वा भीः माम् इव विन्दति ( दुर्ग ) = माझ्याप्रमाणें तुला भीति पकडीत नाहीं; यास्क भीःनंतरचा इव विन्दति ह्याला जोडतो; पण दुर्ग तो मां ह्या अध्याहृत पदाशीं जोडतो. इति इवः परिभयार्थे वा = अथवा इवः परिभयार्थे । न त्वम् ईषत् अपि बिभेषि इति । परिःईषदर्थः । तत् यथा । परिमधुरं पर्याप्तम् इति ( दुर्ग )= किंवा इव शब्द परिभय म्हणजे थोडेंसें भय ह्या अर्थी असेल; तूं थोडीसुद्धां भीत नाहींस ! परि = थोडें; परिमधुर व पर्याप्त ह्यांत परि ह्याचा अर्थ थोडा असा आहे; तसा तो परिभय ह्यांतही आहे. भाष्यांत इति आरंभीं आहे; तो दुर्गवृत्तींत नाहीं; कदाचित् दुर्गानें बिभेषिनंतर तो घेतला असेल; भाष्यांतील इति शब्दाच्या आधीं न त्वम् इषत् अपि बिभेषि असे शब्द असावेत; तसे नसल्यास इति हा शब्द प्रक्षिप्त आहे असें समजलें पाहिजे. भाष्यांतील विन्दति नंतरचा इव ह्याचा अर्थ जणूं काय असा असेल; जणूं काय तुला भीति वाटतच नाहीं; पण वाटलीच तर ती भीति अगदीं थोडीच असली पाहिजे असा यास्काच्या मनांतील अर्थ असेल; दुर्गानें अथवा वगैरे जो अर्थ दिला आहे त्यांत मां शब्दाचें प्रयोजन दिसत नाहीं व तो शब्द ह्या दुसऱ्या अर्थांत् कोठेंही नाहीं. पर्याप्त=पूर्णपणें (परि) मिळविलेलें, पुरेसें; येथें परि म्हणजे थोडें नाहीं; परिमधुर शब्द अमरांत किंवा आपट्यांच्या कोशांत नाहीं. यास्क व दुर्ग ह्यांनीं विन्दति शब्द जशाचातसाच ठेविला आहे; तेव्हां विन्दति = मिळविते असाच त्यांनीं अर्थ केला असावा; भय तुला मिळवीत नाहीं म्हणजे पकडीत नाहीं. यास्कानें केलेला अर्थः—हे अरण्यपालिके ( अरण्यानि ), जी तूं अरण्यामागून अरण्याकडे मागें मागेंच जाऊन म्हणजे एका रानांतून दुसऱ्या रानांत जाऊन नाहींशी होत आहेस ती तूं गांवाची चौकशी कशी करीत नाहींस म्हणजे इतर वाटसरूंप्रमाणें गांव कोठें आहे असें कां विचारीत नाहींस ? जणूं काय तुला भीति

वाटतच नाहीं; वाटलीच तर ती अगदीं थोडीच असली पाहिजे. दुर्गानें केलेला अर्थः— ह्या भयंकर रानांत कोणीकडे जावें याची भूल पडून व त्यामुळें भ्यायला जाऊन ऋषि अरण्यदेवतेला म्हणतो; मी तर ह्या भयंकर अरण्यांत अगदीं भिवून गेलों आहे; तूं कशी भीत नाहींस असें म्हणून जणूं काय तो तिला भेवडावीत आहे; हे अरण्यानि, ही ही तूं रानामागून रानामागें पाठमोरीच सारखी कशी जात आहेस? गांवाची चौकशी कशी करीत नाहींस? माझ्यासारखी तुला भीति वाटत नाहीं खास; भीति वाटतच असेल तर ती अगदीं थोडी असली पाहिजे. सायणः— हे अरण्यानि अरण्यस्य पालयित्री । काचित् अधिदेवता अरण्यानी इति नैरुक्ताः । वैय्याकरणास्तु हिमारण्ययोः महत्वे ( पा० ४।१।४९ ) । अरण्याधिदेवते अरण्यानि कांताराणि प्रति या असौ त्वं प्रेव नश्यसि । इवः संप्रत्यर्थे । नश्यतिः प्राप्तिकर्मा । संप्रति रक्षणाय प्राप्नोषि । यद्वा । निर्जने देशे वर्तमानत्वात् नष्टा इव प्रतीयसे । सा त्वं कथा कथं ग्रामं न पृच्छसि । निर्जने अरण्ये कथं रमसे । नूनं त्वा त्वां भीः भयं न विन्दति न लभते किम् । वितर्के प्लुतः । इवः संप्रत्यर्थे परिभयार्थे वा = नैरुक्तांच्या मतें अरण्याचें पालनकरणारी अरण्यानी नांवाची एक देवता होय; पण वैय्याकरणांच्या मतें अरण्यानी म्हणजे मोठें अरण्य; हे अरण्यदेवते, जी तूं आतां अरण्यांचें संरक्षण करण्याकरितां त्यांच्याकडे जात आहेस किंवा निर्जन प्रदेशांत तूं रहात असल्यामुळें तूं नाहींशी झालीस असें आम्हांला वाटतें ती तूं गांवाची चौकशी कशी करीत नाहींस म्हणजे या निर्जन वनांत तुला सुख कसें वाटतें? तुला खरोखर भय वाटत नाहीं. विन्दति याच्या पुढचा जो प्लुत आहे तो ऋषि विचार करीत आहे हें दाखविण्याकरितां. भीः नंतरचा जो इव त्याचा आतां अर्थ असेल किंवा थोडेसें भय वाटतें हें दाखविण्याकरितां तो शब्द घातला असेल. ऋग्वेदांत अरण्ये व अरण्येषु अशीं अरण्य शब्दाची दोनच रूपें आहेत; अमा च एनम् अरण्ये पाहि रिषः ( ६।२४।१० ) = हें इंद्रा, ह्याचें संग्रामांत शत्रूपासून रक्षण कर; पहिल्या अर्धांतील अमीके व दुसऱ्या अर्धांतील अरण्ये ह्या दोन शब्दांचा संग्रामांत असा अर्थ असावा. १।१६३।११ ही ऋचा समजत नाहीं; त्यामुळें तींतील अरण्येषु हा शब्दही समजत नाहीं; कदाचित् तेथें अरण्य म्हणजे रान असा अर्थ असेल. १०।१४६ ह्या सूक्तांत अरण्यानि, अरण्यानिः, अरण्यानिं व अरण्यान्यां अशीं चार रूपें आहेत; अरण्यानि ह्याचें संबुद्धीचें एकवचन अरण्याने व्हावयास पाहिजे; अरण्यानि ही संबुद्धि अरण्यानी ह्या दीर्घ ईकारान्त शब्दाची असली पाहिजे; अरण्यान्यां ही सप्तमी अरण्यानि व अरण्यानी दोहोंचीही होईल; कदाचित् दोन्हीही शब्द ऋग्वेदकालीं प्रचारांत असतील. ऋचा सहा हींत अरण्यानीला हिंस्रपशूंची आई म्हटली आहे व तिच्यांत शेतकी नसतानांही नानाप्रकारचें अन्न म्हणजे खाद्य आहे असें म्हटलें आहे. ऋचा पांचः— जे लोक धाडसानें अरण्यांतील फळें खात बसतात त्यानांच अरण्यानि ठार मारते. ऋचा चार व तीनः— ज्याला अरण्यांत रात्र काढावयाची असते त्याला कोठें गाई चरत आहेत, कोणी

ओरडत आहे, कोठें घरासारखें कांहीं दिसत आहे असे भास होत असतात. ऋचा दोनः– एक हिंस्र पशु गर्जना करून गर्जना करणाऱ्या दुसऱ्या पशूला पळावयास लावतो; तेव्हां वाटसरूला अरण्यानीचीच विनवणी करावी लागते. ह्या पांच ऋचांत अरण्यानि म्हणजे अफाट, भयंकर वन असा अर्थ असावा; पण पहिल्या ऋचेंत अरण्यानी याचा अर्थ रान कीं रानांत राहणारी कोणी एखादी बाई हें सांगतां येत नाहीं. हे अरण्यानि, हे अरण्यानि, जी ही तूं अजीबात (प्र+इव) नाहींशी होतेस ती तूं गांवाची चौकशी कशी करीत नाहींस? तुला म्हणजे तुझ्या मनाला भीतीसारखी (भीरिव) कोणतीही भावना पकडीत नाहीं (विंदति). येथें अरण्यानी म्हणजे रान नसून रानांत वास करणारी एखादी स्त्री असावी. इतकें भयंकर रान! हिंस्र पशूंची मारामारी! नानाप्रकारच्या भयंकर आरोळ्या! नशिबानें एखाद्याला रानांत रात्र काढावयाची झाल्यास कोण त्याची त्रेधा! बहुतकरून अरण्यानिः=अफाट, भयंकर रान व अरण्यानी = अशा रानांत रहाणारी कातकरणीसारखी एखादी स्त्री असे भिन्न अर्थ असतील. ऋग्वेदांत इव हा निपात अधि + इव (८।७।१४), अपि + इव (३।३८।८), उप + इव (८।३।२१) असा उपसर्गानंतर घातलेला आढळतो; तेथें त्याचा अर्थ अगदीं; अधि + इव = अगदीं वर; अपि + इव=अगदीं चिकटून; उप + इव=अगदीं जवळ; इह नंतरही इव येतो (१।३७।३); इह + इव = अगदीं येथें; ह्या सर्व ठिकाणीं इव = एव. प्रस्तुत ऋचेंत प्र + इव = अगदीं; प्रेव नश्यसि=अगदीं नाहींशी होतेस, कोठें जातेस ह्याचा मागमूसही लागत नाहीं. साधारण मनुष्य भयानें गांगरून जातो पण तुला भयानें घाबरणें हें माहीतच नाहीं; त्यामुळें आमच्यासारखी तूं गांवाबिवाची चौकशी करीत नाहींस यांत काय नवल! असा अर्थ असावा. भीः + इव = भीतीच. ऋचेच्या शेवटीं विंदतीँ३ असें आहे; विचार्यमाणानां (पाणिनी ८।२।९७) = विचार म्हणजे प्रमाणानें वस्तूचें स्वरूप ठरविणें; असा विचार ज्या वाक्यानें करावयाचा असतो त्या वाक्यांतील शेवटल्या शब्दाचा अंत प्लुत होतो म्हणजे त्यांतील शेवटला स्वर दीर्घापेक्षांही अधिक दीर्घ उच्चारावा लागतो; तुला भीतीबीती वाटत नाहीं कां वाटत आहे हा प्रश्न ह्या वाक्यांत विचारला गेला आहे. विंदतीँ३ असा शब्द मूळ ऋचेंतच होता किंवा संहिताकारानें तो अर्थासाठीं घातला?

**श्रद्धा (२५) श्रद्धानात्। तस्या एषा भवति**

श्रद्धा = श्रत् + धा; श्रद्धा हा शब्द धा (= ठेवणें) ह्या धातूच्या पाठीमागें श्रत् लावून झाला आहे. श्रत् सत्यम्। तत् सत्यम् अस्यां धीयते इति सा श्रद्धा (दुर्ग) = जिच्यांत सत्य ठेविलें असतें ती श्रद्धा. धर्मार्थकाममोक्षेषु अविपर्ययेण एवम् एतत् इति या बुद्धिः उत्पद्यते तदधिदेवता भावाख्या श्रद्धा इति उच्यते (दुर्ग) = धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्यांच्या ठिकाणीं ढळ न पावतां हें असेंच आहे अशी जी बुद्धि उत्पन्न होते तिची अधिदेवता श्रद्धा होय; तिला भाव (= भक्ति) असेंही म्हण-

तात. श्रद्धा = संप्रत्ययः = भक्त्यतिशयः ( अमर ३।३।१०२ श्लो० ) = श्रद्धा म्हणजे भक्तीचा अतिशय, अमर्याद भक्ति.

## खंड ३१ वा.

**श्रद्धयाग्निः समिध्यते श्रद्धया हूयते हविः।**
**श्रद्धां भगस्य मूर्धनि वचसा वेदयामसि ( ऋ० सं० १०।१५१।१ )**

**श्रद्धया अग्निः साधु समिध्यते। श्रद्धया हविः साधु हूयते। श्रद्धां भगस्य भागधेयस्य मूर्धनि प्रधानाङ्गे वचनेन आवेदयामः**

साधु शब्द अध्याहृत. भगस्य = भागधेयस्य = धर्मस्य ( दुर्ग ). मूर्धनि = प्रधानाङ्गे = मुख्य अंगावर. सर्व धर्मांचें मुख्य अंग श्रद्धा ही होय. वचसा = वचनेन = मन्त्रांतील शब्दांनीं; वचसा = वचसा + आ; हा आ वेदयामसि ह्याला जोडल्यानें आवेदयामसि = आवेदयामः = मोठ्यानें सांगतों. ऋचेचा यास्क व दुर्ग यांनीं केलेला अर्थः– श्रद्धेनें प्रज्वलित केलेला असाच अग्नि चांगला म्हणजे फल देणारा असा प्रज्वलित केलेला असतो; श्रद्धेनें अर्पण केलेला असाच हवि चांगला म्हणजे फल देणारा असाच अग्नींत अर्पण केला जातो; वेदवचनानें श्रद्धा सर्व धर्मांच्या शिरोभागीं आहे असें आम्ही उच्चरवानें कळवितों म्हणजे सर्व धर्मांत श्रद्धा श्रेष्ठ आहे असें मोठ्यानें सर्वांस सांगतों. सायणः–पुरुषगतः अभिलाषविशेषः श्रद्धा। तया श्रद्धया अग्निः गार्हपत्यादिः समिध्यते। संदीप्यते। यदा हि पुरुषे श्रद्धा अग्निगोचरः आदरातिशयः जायते तदा एव पुरुषः अग्नीन् प्रज्वालयति न अन्यदा। श्रद्धया एव हविः पुरोडाशादि हविश्च हूयते। आहवनीये प्रक्षिप्यते। यद्वा। अस्य सूक्तस्य द्रष्ट्या श्रद्धाख्यया अग्निः समिध्यते। श्रद्धाम् उक्तलक्षणायाः श्रद्धायाः अभिमानिदेवतां भगस्य भजनीयस्य धनस्य मूर्धनि प्रधानभूते स्थाने अवस्थितां वचसा वचनेन स्तोत्रेण आवेदयामसि अभितः प्रख्यापयामः = श्रद्धा म्हणजे मनुष्याचा विशिष्ट अभिलाष म्हणजे अमुक एक इच्छा; त्या श्रद्धेनें गार्हपत्य वगैरे तीन अग्नि प्रज्वलित केले जातात; जेव्हां यजमानाच्या मनांत अग्नीसंबंधानें अतिशय आदर असतो तेव्हांच तो अग्नींना प्रज्वलित करतो; तसा आदर नसल्यास तो अग्नि प्रज्वलित करूं शकत नाहीं; त्याचप्रमाणें श्रद्धेनें अर्पिलेलाच हवि आहवनीय अग्नींत टाकला जातो; किंवा ह्या सूक्ताला पाहणारी श्रद्धा नांवाची देवता अग्नीला प्रज्वलित करते; श्रद्धेची अधिष्ठात्री जी श्रद्धादेवता ती धनाच्या मुख्य स्थानीं म्हणजे शिरोभागीं राहत असते ( म्हणजे श्रद्धेनेंच धन मिळतें ) असें आम्ही सर्वत्र मोठ्यानें सांगत आहों. श्रत् = ( १ ) स्तुति, ( २ ) धन, (३) बल, (४) हवि, (५) सोम असे अर्थ ऋग्वेदांत आहेत.(१)अधा चन श्रत् दधति त्विषीमते इंद्राय वज्रं निघनिघ्नते वधम् ( १।५५।५ ) = शत्रूवर वज्र जोरानें हाणणाऱ्या इंद्राला सर्व लोक स्तुति देतात म्हणजे अर्पितात; श्रत् इंद्रस्य धत्तन वीर्याय (१।१०३।५)=इंद्राच्या वीर्याला स्तुति अर्पण करा; ता वां नु नव्यौ अवसे करामहे अयं नासत्या श्रत् अरिः यथा

दधत् ( १०।३९।५ ) = ज्याअर्थी ह्या भक्तानें ( अरिः ) तुम्हांला स्तुति अर्पण केली आहे त्या अर्थी, हे स्तुत्य अश्विनांनो, आम्ही त्या तुम्हांला आमच्या कल्याणासाठीं बोलावीत आहोंत; श्रत् ते दधामि प्रथमाय मन्यवे ( १०।१४७।१ ) = श्रेष्ठ व बलवान् असा जो तूं त्या तुला मी स्तुति अर्पण करतों; ऋतवाकेन सत्येन श्रद्धया तपसा सुत इंद्राय इन्दो परि स्रव ( ९।११३।२ ) = स्तुतीनें ज्या तुझा आम्ही रस काढिला आहे अशा हे सोमा, इंद्राकरितां गाळण्यांतून कलशांत पड. (२) अधा मन्ये श्रत् ते अस्मा अधायि वृषा चोदस्व महते धनाय (१०। १०४।७)=मला खात्रीनें माहीत आहे कीं तुला देवांनीं अतिशय धन (श्रत्)दिलें आहे; म्हणून, हे दात्या, आम्हांस पुष्कळ धन दे; श्रत् विश्वा वार्या कृधि ( ८।७५।२ ) = आम्हांस पुष्कळ धन दे; श्रत्=वार्य=धन.(३) स० श्रत दधानः ओजः पुरो विभिन्दन् अचरत् वि दासीः ( १।१०३।३ ) = बल धारण करणारा इंद्र शत्रूचे किल्ले फोडून त्यांत कोंडून ठेविलेल्या दासींना म्हणजे जलाला बाहेर वाहावयास लाविता झाला; श्रत् = ओजस् = बल; आ० अश्वान्० श्रद्धया अहं रथे रुहम् ( ८।१।३१ ) =बलानें घोड्यांना रथाला जोडून त्यांत मी चढलों.(४व५)श्रद्धा इत् ते मघवन् पार्ये दिवि वाजी वाजं सिषासति ( ७।३२।१४ ) = हे इंद्रा, तुला स्तुति किंवा हवि अर्पण करणारा ( श्रत् + धाः ) धनवान् ( वाजी ) होऊन आपल्या धनभांडारांत ( पार्ये दिवि ) धन टाकीत असतो; श्रत् स्तुतिं हविः वा दधाति असौ श्रद्धाः = स्तुति किंवा हवि अर्पण करणारा; श्रद्धाः इत् अशीं मूळचीं पदें असून पदकार श्रद्धाः ह्याचा विसर्ग गाळतो; त्यामुळें श्रद्धा = श्रद्धया युक्तः असा सायणाचार्य अर्थ करितात. हे मघवन् ते तव श्रत् धनं पार्ये दिवि धाः देहि इत् एव = हे इंद्रा, आमच्या धनभांडारांत ( पार्ये दिवि ) तुझें धन देच दे; आम्हांला तुझें धन मिळाल्यानें आमचें भांडार धनानें भरून जाईल असें आम्ही म्हणतों त्याचें कारण धनवान् (वाजी) धन ( वाजं ) देतच असतो ( सिषासति ); हाच अर्थ असावा असें वाटतें. (५) त्वं श्रद्धाभिः मंदसानः सोमैः दभीतये चुमुरिम् इंद्र सिष्वप् ( ६।२६।६ ) = सोमपानानें (श्रद्धाभिः =सोमैः) स्फुरण पावणारा तूं, हे इंद्रा, दभीतीकरितां चुमुरीला निजविलेस म्हणजे जमीन दोस्त केलेस. तां सत्यां श्रद्धाम् अभ्या हि यातम् अथा सोमस्य पिबतं सुतस्य ( १।१०८।६ ) = हे इंद्राग्नींनो, तुम्हांला माहीत असलेल्या अशा आमच्या सोमाकडे या व तो प्या. देवानां यः पितरम् आविवासति श्रद्धामनाः हविषा ब्रह्मणस्पतिम् ( २।२६।३ ) = श्रद्धा आहे मनांत ज्याच्या असा जो मनुष्य देवांचा पिता जो ब्रह्मणस्पति त्याला हवि देवून तृप्त करतो ( तो पुष्कळ धन मिळवितो ); श्रद्धा मनसि यस्य सः श्रद्धामनाः = ज्याच्या मनांत श्रद्धा आहे असा; एथें श्रद्धा म्हणजे स्तुति कीं अतिशय भक्ति ? श्रत् हितं ते महते इंद्रियाय ( १।१०४।६ ) = हे इंद्रा, मोठीं शौर्याचीं कृत्यें करण्याकरितां तुला बल दिलें आहे; श्रत् = बलम्; हितं = दिलेलें; ते तव महते प्रभूताय इंद्रियाय बलाय श्रद्धितम् अस्माभिः श्रद्धानं कृतम्।

त्वदीयं बलं बहुमानपूर्वकं स्तुमः ( सायण ) = तुझ्या प्रचंड बलावर आमची श्रद्धा आहे म्हणजे त्या बलाची आम्ही स्तुति करतों; श्रद्धितं = श्रद्धानं कृतं = श्रद्धा केली म्हणजे ठेविली आहे; श्रद्धा = दृढ विश्वास कीं स्तुति ? स्तुमः या शब्दावरून स्तुति असा अर्थ असेल; पदकारानें श्रद्धितं असें एकपद केल्याकारणानें सायणाचार्यांना असा अर्थ करावा लागला. न्यक्रतून् ग्रथिनः मृध्रवाचः पणीन् अश्रद्धान् अवृधान् अयज्ञान् । प्रप्र तान् दस्यून् अग्निः विवाय पूर्वः चकार अपरान् अयज्यून् ( ७।६।३ ) = जे हवि किंवा धन देत नाहींत अशा शत्रूंना अग्नि धनरहित तावडतोब करिता झाला; श्रेष्ठ असा तो जे धनानें श्रेष्ठ होते त्यांना निर्धन करता झाला; क्रतु = श्रत् = वृध = यज्ञ = हवि किंवा धन. यज्यु = हवि किंवा धन देणारा; अयज्यु = हवि किंवा धन न देणारा. हवि न देणाऱ्यांना व गरिबास धन न देणाऱ्यांना अग्नि निर्धन करतो; पणि हवि देत नाहींत व धनही देत नाहींत; असा दुहेरी अर्थ येथें आहे. प्रियं श्रद्धे ददतः प्रियं श्रद्धे दिदासतः । प्रियं भोजेषु यज्वसु इदं मे उदितं कृधि ( १०।१५१।२ ) = हे अग्ने श्रद्धे प्रियं ददतः श्रद्धे प्रियं दिदासतः मे मम इदम् उदितं प्रियं भोजेषु यज्वसु कृधि = हवि देणाऱ्याला ( श्रद्धे ) धन देणारा (ददतः) व धन देऊं इच्छिणारा (दिदासतः) जो मी त्या माझे अमूप (इदं) तेजस्वी (उदितं) धन ( प्रियं ) उदार ( भोजेषु ) यजमानांना ( यज्वसु ) दे ( कृधि ); श्रत् हविः दधाति तस्मै श्रद्धे = जो हवि देतो त्याला; भोज = उदार; यज्वन् = हवि किंवा धन देणारा; इदं = हें म्हणजे पुष्कळ, अपार; उदितं = तेजस्वी, सोन्यारुप्यासारखें लखलखणारें. यथा देवा असुरेषु श्रद्धामुग्रेषु चक्रिरे । एवं भोजेषु यज्वसु अस्माकम् उदितं कृधि ( १०।१५१।३ ) = जसे देव दात्या ( उग्रेषु ) धनवंतांना ( असुरेषु ) धन ( श्रद्धां ) देते झाले ( चक्रिरे ) तसा तूं, हे अग्नि, आमच्या ( अस्माकं ) उदार ( भोजेषु ) हवि किंवा धन देणाऱ्यांना ( यज्वसु ) तेजस्वी ( उदितं ) धन दे; असुर ह्याचा मूळ अर्थ धन देणारा; इंद्रादिदेवांना असुर हें विशेषण लाविलेलें आढळतें; उग्र = उज् + र; उज् = देणें; उग्र = ( धन ) देणारा, दाता. श्रत् = धा = धन; श्रद्धा = अपार धन; देवांनीं आजपर्यंत उदारांना धन दिलें आहे; तेव्हां तूं ही आमच्यामधील जे उदार त्यांना धन दे. श्रद्धां देवा यजमाना वायुगोपा उपासते । श्रद्धां हृदय्ययाकूत्या श्रद्धया विन्दते वसु ( १०।१५१।४ ) = दाते ( यजमानाः = वायुगोपाः ) देव अमूप धन ( श्रद्धां ) देतात ( उपासते ); हवीनें म्हणजे हवि देण्यानें ( श्रद्धया ) हवि देणारा धन ( वसु ) मिळवितो ( विन्दते ); वायु = धन; गोपाः = दाते; हृदय्यया आकूत्या = अमूप धनांतून असा अर्थ असेल. श्रद्धां प्रातर्हवामहे श्रद्धां मध्यंदिनं परि । श्रद्धां सूर्यस्य निम्रुचि श्रद्धे श्रद्धापयेह नः ( १०।१५१।५ ) = आम्ही सकाळीं, दुपारीं व सूर्य मावळतां धन ( श्रद्धां ) देतों ( हवामहे ); हे अग्नि, हवि देणाऱ्याला ( श्रद्धे ) आम्हांला ( नः ) धन ( श्रत् ) देण्यास लाव ( धापय ). आवेदय् = बोलावणें; जसें:— तान् ऊ नु अस्य सवनस्य पीतये आ वो वाजा

ऋभवो वेदयामसि ( ४।३६।२ ) = ( ज्या तुम्ही असा उत्तम प्रकारचा रथ तयार केला ) त्या तुम्हांला, हे वाजानो, हे ऋभूंनो, हा सोम पिण्याकरितां आम्ही बोलावीत आहोंत ( आवेदयामसि ). तान् व एना ब्रह्मणा वेदयामसि ( ४।३६।७ ) = ( तुम्हांला देवांनी अमूप धन दिलें आहे; तुम्ही धनदाते आहांत; ह्या बोलावण्याचा स्वीकार करा ); ह्या स्तुतीनें आम्हीं तुम्हांला बोलावीत आहोंत ( आवेदयामसि ). प्रस्तुत ऋचेचे दोन अर्थ होतील :— ( १ ) हवि देणाऱ्याकडून ( श्रद्धया ) अग्नि प्रज्वलित केला जातो ( समिध्यते ); त्याच्याकडूनच हवि दिला जातो ( हूयते ); देवांना हवि देणारा जो अग्नि ( श्रद्धां ) तो माहाभाग्याच्या ( भगस्य ) शिखरावर ( मूर्धनि ) असल्यामुळें त्याला आम्ही स्तुतीनें ( वचसा ) बोलावीत आहोंत. ( २ ) धन देणाऱ्याकडून ( श्रद्धया ) धन ( अग्निः = हविः ) दिलें जातें ( समिध्यते = हूयते ); धनदाता ( श्रद्धां ) धनाच्या ( भगस्य ) शिखरावर ( मूर्धनि ) आहे असें उच्चरवानें ( वचसा ) आम्ही सर्वांस कळवितों ( आवेदयामसि ).

पृथिवी ( २६ ) व्याख्याता । तस्या एषा भवति

पृथिवी शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे ( १।१४ ).

## खंड ३२ वा.

**स्योना पृथिवि भवानृक्षरा निवेशनी ।**
**यच्छा नः शर्म सप्रथः ( ऋ० सं० १।२२।१५ )**

**सुखा नः पृथिवि भव अनृक्षरा निवेशनी । ऋक्षरः कण्टकः । ऋच्छतेः । कण्टकः कंतपः वा । कण्टतेर्वा स्यात् गतिकर्मणः । उद्गततमः भवति । यच्छ नः शर्म । यच्छन्तु शरणं सर्वतः पृथु**

स्योना = सुखा = सुखकर. अनृक्षरा = अन् + ऋक्षरा = जिच्यांत ऋक्षर म्हणजे कांटे नाहींत अशी; ऋक्षरः = कण्टकः; ऋच्छ् ( = जाणें ) ह्यापासून ऋच्छर म्हणजे ऋक्षर; कांटा पाय वगैरेंत शिरतो म्हणून तो ऋक्षर; ऋ = ऋच्छ् = जाणें; ऋच्छ् + सर = ऋक् + पर; सर हा नामकरण प्रत्यय; पण ऋ व सृ ह्या दोन्ही धातूंपासून ऋक्षर शब्द झाला आहे असें कां म्हटलें नाहीं ? ऋच्छति = पाय वगैरेंत जातो; सरति = हलतो व हलून त्रास देतो. कंटकः = कं + टकः = कं + तपः = कम् अहं तापयामि इत्येवमर्थम् उद्गतः (दुर्ग) = मी कोणाला ताप देऊं अशा हेतूनें झाडांतून बाहेर आलेला. दुर्गवृत्तींत कन्तपः वा हे शब्द नाहींत; तथापि त्याचें विवरण आहे. ह्या व्युत्पत्तीनंतर महाराष्ट्रपाठांत कृन्ततेः वा ही आणखी एक व्युत्पत्ति आहे; कण्टकः = कुण्टकः = कृन्तकः = बोंचणारा; कांटा पाय वगैरेला बोंचतो. किंवा कण्ट् ( = जाणें ) ह्यापासून कण्टक; कांटा झाडांतून खूप बाहेर आलेला असतो ( उद्गततमः भवति ) म्हणून तो कण्टक; स्यात् गतिकर्मणः हें दुर्गवृत्तींत नाहीं. निवेशनी = निवासयोग्या ( दुर्ग ) = राहण्यास योग्य. यच्छन्तु हा शब्द विनाकारण

घातला आहे. शर्म = शरणं = सुखं ( दुर्ग ). सप्रथः = स + प्रथः; स = सर्वतः; प्रथः = पृथु; सप्रथः = सर्व बाजूंनीं विस्तृत. दुर्गानें केलेला अर्थः– हे पृथिवी, तूं आम्हांला सुखकर, कण्टकरहित व राहण्याला योग्य अशी हो; आम्हांला सर्व प्रकारांनीं विस्तृत असें सुख दे. स्योन हें विशेषण बर्हि ( १०।७०।८ ), नवोढा ( १०।८५।४४ ), पथः ( १०।७२।७ ), उलोकं ( ५।४।११ ) ह्यांना लाविलेलें आढळतें. बर्हि म्हणजे दर्भासन हें मऊ असलें पाहिजे. पथ मऊ म्हणजे सपाट असून पायाला न बोचणारे असले पाहिजेत म्हणजे त्यांत खडे नसले पाहिजेत. तूं सगळ्यांना सुखदात्री हो; मनुष्य असो कीं जनावर असो कोणालाही त्रास देऊं नको, शब्दांनीं बोचूं नको, मारूं नको असा नवोढेला उपदेश केला आहे ( १०।८५।४४ ). पृथिवीला स्योना हो म्हणजे मऊ हो,तुझ्यावर निजणाऱ्याला बोचूं नको अशी विनवणी केली आहे. सुगः पन्थाः अनृक्षरः ( १।४१।४ ), सुगो हि नो ० पन्था अनृक्षरः० साधुः अस्ति (२।२७।६) व अनृक्षराः ऋजवः सन्तु पन्थाः (१०।८५।२३) अशा आणखी तीन ठिकाणीं अनृक्षर शब्द आला आहे व सर्व ठिकाणीं मऊ असा त्याचा अर्थ आहे. भूयात् कुशेशयरजोमृदुरेणुरस्याः० पन्थाः ( शाकुन्तल ४।११ ) = ज्याच्यांत कमलाच्या रजाप्रमाणें धूळ मऊ आहे असा शकुंतलेचा मार्ग होवो; तेव्हां अनृक्षर म्हणजे मऊ; सुगः म्हणजे जाण्याला सुलभ; साधु म्हणजे चांगला; ऋजु म्हणजे सरळ; येथें पृथिवी अनृक्षर म्हणजे मऊ. ऋक्षर शब्द ऋग्वेदांत नाहीं; त्याचा अर्थ बारीक किंवा मोटा खडा असा असावा; जेथें पायाला खडे बोचत नाहींत तो मार्ग व ती जागा अनृक्षर. नि + विश् = निजणें, विश्रांति घेणें; नि + वेशय् = निजविणें, विश्रांति देणें; जसें:–यस्मिन्वृक्षे मध्वदः सुपर्णाः निविशन्ते सुवते चाधि विश्वे (१। १६४।२२ ) = ज्या वृक्षामध्यें मधु खाणारे सगळे पक्षी निजतात (निविशन्ते) व जागे होतात ( सुवते ). निवेशयन् अमृतं मर्त्यम् ( १।३५।१२ ) = मर्त्य व अमर ह्यांना निजविणारा ( सूर्य ). ह्वयामि रात्रीं जगतो निवेशनीं ( १।३५।१ ) = जगाला निजविणारी जी रात्र तिला मी पाचारण करतों. प्रस्तुत ऋचेंत पृथिवीला निवेशनी म्हणजे निजविणारी असें म्हटलें आहे. जमीन मऊ असली म्हणजे तिच्यावर झोप चटकन् येते. प्रथस् = विस्तार; प्राक्तुभ्य इन्द्रः प्र वृधो अहभ्यः प्र अन्तरिक्षात् प्र समुद्रस्य धासेः। प्र वातस्य प्रथसः प्र ज्मो अन्तात् प्र सिन्धुभ्यो रिरिचे प्र क्षितिभ्यः ( १०। ८९।११ ) = रात्री, दिवस, अन्तरिक्ष, समुद्राचा विस्तार, वाऱ्याचा विस्तार, पृथिवीचे अन्त, नद्या व पृथिवीवरील राहणारे सर्व लोक ह्या सर्वांहूनही इंद्र अधिक विस्तृत आहे; प्रथसः = विस्ताराहून. प्रथसा सहितं सप्रथः = विस्तारयुक्त, विस्तृत; सप्रथः शर्म = विस्तृत रक्षण. हे पृथिवी, तूं मृदु व विश्रांति देणारी हो; आम्हांला विस्तृत रक्षण दे. ह्या ऋचेचा दुसराही अर्थ आहे. स्योनं = धन; स्योनं शिशीते असौ स्योनशीः; वयोधाः सुप्रणीतिः० स्योनशीः ( १।७३।१ ); हीं तीन विशेषणें अग्नीला लाविलीं आहेत; तिहींचा अर्थ धन देणारा; वयः = सु = प्र = स्योन = धन;

धा = नी = शी = देणें. अ = नृ = क्ष = र = धन; अनृक्षरा = अनृक्षराणि = धनानें युक्त, अतीशय; अनृक्षराणि स्योनानि = असंख्य धन. निवेशनी = धनदात्री. भव = दे; शंभुः = धन देणारा; भू धातूचा देणें हा अर्थ ऋग्वेदांत पुष्कळ वेळां आला आहे; शंभुः = धन देणारा. पृथिवी = धनवती, धन देणारी अशी एखादी उदार स्त्री. ऋचेचा दुसरा अर्थः—हे धनवती उदार स्त्री ( पृथिवि ), आम्हांला अमूप ( अनृक्षराणि ) धन ( स्योनानि ) दे ( भव ); आम्हांला धनानें पूर्ण ( सप्रथः ) म्हणजे अतीशय धन ( शर्म ) दे ( यच्छ ).

अप्वा ( २७ ) व्याख्याता ( निरु० ६।१२ ) । तस्या एषा भवति

अप्वा ह्याची व्युत्पत्ति मागें दिली आहे ( पान ४६५ ).

## खंड ३३ वा.

**अमीषां चित्तं प्रतिलोभयन्ती गृहाणाङ्गान्यप्वे परेहि ।**

**अभि प्रेहि निर्दह हृत्सु शोकैरन्धेनामित्रास्तमसा सचन्ताम् ( ऋ० सं १०। १०३।१२ )**

**अमीषां चित्तानि प्रतिलोभयमाना गृहाण अङ्गानि अप्वे । परेहि । अभिप्रेहि । निर्दह एषां हृदयानि शोकैः । अन्धेन अमित्राः तमसा संसेव्यन्ताम्**

चित्तं = चित्तानि = मनें; चित्तं ह्याचें चित्तानि असें बहुवचन करण्याचें कारण अमीषां हें बहुवचन; महाराष्ट्रपाठांत चित्तानि नंतर प्रज्ञानानि आहे; प्रज्ञानानि = बुद्धि. प्रतिलोभयन्ती = प्रतिलोभयमाना; प्रतिलोभयमाना असें आत्मनेपदी रूपांतर करण्याचें काय कारण ? दुर्गवृत्तींत हें रूपान्तर नाहीं; प्रतिलोभयन्ती = प्रत्येकं लोभयन्ती ( दुर्ग ) = प्रत्येकाला लुब्ध करणारी, मोहून टाकणारी. गृहाणाङ्गांन्यप्वे = गृहाण + अङ्गानि + अप्वे. हृत्सु = एषां हृदयानि = ह्यांचीं हृदयें; परंतु हृत्सु हा शब्द हृत् ह्याची सप्तमी आहे; ह्यांना हृदयांत म्हणजे मर्मस्थानीं जाळ असा अर्थ आहे. शोकैः = ज्वालांनीं. सचंतां = संसेव्यन्तां = युक्त असोत. दुर्गानें केलेला अर्थः— हे अप्वे, ह्या शत्रूंपैकीं प्रत्येकाच्या मनाला भूल पाडणारी तूं त्यांच्या शरीरांचे अवयव पकड; त्यांच्याकडे परत जा ( परा + इहि ); जोंपर्यंत ते विरोध करण्याला उभे राहिले आहेत तितक्यांतच त्यांच्याकडे जा ( अभिप्रेहि ) व जाऊन त्यांचीं अन्तः-करणें आपल्या ज्वालांनीं खाक करून टाक; अशा रीतीनें जाळले गेलेले हे शत्रु अन्धतमसांत म्हणजे काळाकुट्ट अंधकार आहे जेथें अशा नरकांत गुरफटले जावोत. यास्क अप्वा म्हणजे व्याधि किंवा भय असा अर्थ करतो ( पान ४६५ ); परंतु त्याचा खरा अर्थ कळत नाहीं. अप्वे हा शब्द प्रस्तुत ऋचेंतच आला आहे; ते अप्वा किंवा अप्वि ह्याचें संबोधन असेल; त्या शब्दाचा अर्थ एखादें ज्वालामय अस्त्र असेल; शत्रूंवर सोडल्याबरोबर तें त्यांचीं मनें गांगरून टाकीत असेल; आपल्यावर तें अस्त्र येत आहे असें पाहतांच घाबरून जाऊन आतां पुढें काय करावें हें त्यांना सुचत नसेल;

तें अस्त्र त्यांचीं शरीरें भस्म करून टाकीत असेल व त्यांना अंधकारनें भरलेल्या नरकाची वाट दाखवीत असेल. शत्रूवर जय मिळविणें हा सूक्ताचा विषय; प्रस्तुत ऋचेच्या आधींच्या ऋचेंत आमच्या ह्या इषु जय मिळवोत असें म्हटलें आहे; तेव्हां प्रस्तुत ऋचेंत एखाद्या अस्त्राचाच निर्देश केला असावा; कदाचित् तें अस्त्र इषु हेंच असेल; इषूच्या अग्राला विष लावल्यामुळें तें अंगांत शिरतांच सर्वांगाचा दाह होऊन योद्धा मरून पडत असेल. लुभ् ह्याचें प्रतिलोभयंती हें एकच रूप ऋग्वेदांत आहे; प्रति हा उपसर्ग विरोध दाखवितो; लोभयंती = लुब्ध करणारी, आपल्याकडे ओढून घेणारी; प्रतिलोभयंती = तिटकारा उत्पन्न करणारी, भिवविणारी. अप्वा किंवा इषु प्रतियोध्याच्या मनांत अतीशय भय उत्पन्न करते; ती त्याच्या अंगाला पकडते म्हणजे अंगांत शिरते व शिरून आरपार जाते; हृदयांत दाह उत्पन्न करते व अशा रीतीनें त्यांना ठार मारते; मेल्यावर ते निबिड अंधकारांत सतत पडून असतात; दीर्घं तम आशयत् इन्द्रशत्रुः ( १।३२।१० ) = इन्द्राचा शत्रु जो वृत्र तो सतत टिकणाऱ्या अंधकारांत निजता झाला; तीच अवस्था इषूंमुळें शत्रूची होते. परेहि = परा + इहि; परा = आरपार. सचन्तां = ( निबिड अंधकारानें ) चिकटले जावोत;सच् = चिकटणें.

**अग्नायी (२८) अग्नेः पत्नी । तस्याः एषा भवति**

अग्नीची पत्नी ती अग्नायी. वृषाकप्यग्निकुसितकुसिदानामुदात्तः ( पाणि० ४।१।३७ ) ह्या सूत्रानें वृषाकपायी, अग्नायी वगैरे. अग्नायी स्वाहा च हुतभुक्प्रिया (अमर २।७।२१ ).

## खंड ३४ वा.

**इहेन्द्राणीमुप ह्वये वरुणानीं स्वस्तये।**
**अग्नायीं सोमपीतये ( ऋ० सं० १।२२।१२ ) ॥ इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा ).

कल्याण व्हावें म्हणून ( स्वस्तये ) ह्या यज्ञांत ( इह ) सोम पिण्याला मी इन्द्राणी, वरुणानी व अग्नायी ह्यांना बोलावीत आहें.

## खंड ३५ वा.

**अथ अतः अष्टौ द्वन्द्वानि । उलूखलमुसले । उलूखलं व्याख्यातम् । मुसलं मुहुः सरम् । तयोः एषा भवति**

आतां यापुढें आठ द्विवचनी नामें येतील; त्यांपैकीं उद्धखलमुसले हें पहिलें. उद्धखल शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे ( पान६८३-८४ ) उषासानक्ता, दैव्या होतारा, मित्रावरुणौ वगैरे द्विवचनी नामें या गणांत कां घातलीं नाहींत ? या प्रश्नाचें उत्तर दुर्गानें दिलें आहे; पण तें बरोबर नाहीं; या आठ द्वंद्वांत उद्धखलमुसले, हविर्धानें व आर्त्नी हे पदार्थ; विपाट्छुतुद्री या नद्या; राहिलेल्या चार देवता; अशी

येथें भेसळ आहे; अशी भेसळ करण्याचें कारण ध्यानांत येत नाहीं. मुसल, शुतुद्री व सीर हे शब्द समासाखेरीज स्वतंत्र असे ऋग्वेदांत कोठेंही नाहींत; हविर्धाने, आर्त्नी, देवीजोष्ट्री व देवीऊर्जाहुती हे शब्द नेहमीं द्विवचनीच असतात; त्यांचें एकवचन कोठेंही नाहीं; त्यामुळें हे सर्व शब्द ह्या द्वन्द्व प्रकरणांत घातले आहेत असें कदाचित् कोणी म्हणेल; पण द्यौ व पृथिवी हे शब्द स्वतंत्र असें ऋग्वेदांत येतात तेव्हां हें ही समर्थन बरोबर नाहीं. मुसलं = मु + सलम्; मु = मुहुः; सलं = सरम्; मुसळ वारंवार सरतें म्हणजे धान्य वगैरे कुटतांना तें वर खालीं करावें लागतें. मुस्यते खण्ड्यते अनेन ( अमर २।९।२५ क्षीरस्वामी ) = ज्यानें धान्य कुटलें जातें तें मुसल; मुस खण्डने ( धा० ४।११४ ).

## खंड ३६ वा.

**आयजी वाजसातमा ता ह्युच्चा विजर्भृतः ।**
**हरी इवान्धांसि बप्सता ( ऋ० सं० १।२८।७ )**
**आयष्टव्ये अन्नानां संभक्ततमे ते हि उच्चैः विह्रियेते हरी इव अन्नानि भुञ्जाने**

आयजी = आयष्टव्ये = आभिमुख्येन मर्यादया वा यष्टव्ये पूज्ये ( दुर्ग ); आ = आभिमुख्येन = सामोरे जाऊन, मोठ्या आदरानें; मर्यादया = शालीनतेनें; यष्टव्ये = पूजा करण्यास योग्य. वाजसातमा = वाजसातमे = वाजानां सातमे = अन्नानां संभक्ततमे; षण संभक्तौ ( धा० पा० १।४६५ ); वाजं सनति असौ वाजसाः = अन्न खाणारा; षणु दाने ( धा० पा० ८।२ ); वाजं सनोति ददाति असौ वाजसाः = धन देणारा. अन्नानां संभक्ततमे याचा अर्थ कळत नाहीं; संभक्त = भोगिलेलें; संभक्ततम = अतिशय भोगलेलें; पण अन्नांचें अतिशय भोगलेलें याचा अर्थ काय? कदाचित् अन्नानां संभक्तृतमे ( = सगळ्या देवांपेक्षां अन्न खाणाऱ्या ) असा पाठ ता = ते = उखळ व मुसळ हीं. ह्युच्चा = हि + उच्चा; उचा = उच्चैः. विजर्भृतः = विह्रियेते = विहार करतात. उलूखलम् उच्छ्रीयते। अवहननाय मुसलम् उद्यम्यते। एतद् उच्चैः विहरणं ( दुर्ग ) = उखळ उंचावर गेलेलें असतें म्हणजे उखळीचें तोंड जमिनीपासून उंचावर असतें; धान्य कुटण्याला मुसळ वर केलें जातें; हा त्या दोघांचा विहार म्हणजे क्रीडा. अन्धांसि = अन्नानि. बप्सता = भुञ्जाने = खाणारीं. दुर्गानें केलेला अर्थः—आदरानें किंवा शालीनतेनें पूजा करण्यास योग्य व अन्नानें उत्तम तऱ्हेनें पोषण केलेली ( संभक्ततमे ) उखळ व मुसळ हीं अन्न खाणाऱ्या इंद्राच्या घोड्यांप्रमाणें उंचावर क्रीडा करतात. हे उलूखलमुसले आयजी सर्वतो यज्ञसाधने वाजसातमा अतिशयेन अन्नप्रदे ता हि ते खलु उच्चा प्रौढध्वनिः यथा भवति तथा विजर्भृतः विशेषेण पुनःपुनः विहारं कुरुतः। तत्र दृष्टान्तः। अंधांसि अन्नानि चणकादीनि खाद्यानि बप्सतौ भक्षयन्तौ हरी इव इन्द्रस्य अश्वौ इव ( सायण ) = सर्वतोपरी यज्ञाचीं साधनें असून ( आयजी ) पुष्कळ अन्न देणारी (वाजसातमा) उखळ व

मुसळ हीं अन्न खाणाऱ्या इंद्राच्या घोड्यांप्रमाणें उंच ध्वनि करून विहार करतात. ऋग्वेदांत मुसल शब्द नाहीं. प्रस्तुत ऋचेंत व तिच्यापुढील ऋचेंत दोन कोणते तरी पदार्थ आहेत; ते पुल्लिंगी असावेत. ता नो अद्य वनस्पती ऋष्वावृष्वेभिः सोतृभिः। इन्द्राय मधुमत् सुतं (ऋचा ८) = हे मोठे (ऋष्वौ) वनस्पतीहो, आज ते तुम्ही सोमरस काढणाऱ्या (सोतृभिः) मोठ्या (ऋष्वेभिः) ग्राव्यांच्या साहाय्यानें इंद्राला पिण्याकरितां गोड सोमरस काढा (सुतं); हे दोन वनस्पति कोण? आ + यज् = हवि किंवा धन देणें. उशना काव्यः त्वां नि होतारम् असादयत्। आयजिं त्वा मनवे जातवेदसं (८।२३।१७) = हे अग्नि, हवि व धन देणारा (होतारं = आयजिं) जो तूं त्या धनवन्ताला (जातवेदसं) तुला उशना मनूला (मनवे) देता झाला (नि+असादयत्). अग्नि धनवान् असून हवि व धन देणारा आहे; उशना अशा अग्नीला मनुष्याच्या स्वाधीन करता झाला. यो ब्रह्मणे सुमतिमायजाते वाजस्य सातौ परमस्य रायः (७।६०।११) = अतिशय धन देण्याच्या वेळीं जो स्तोत्याला धन (सुमतिं) देतो (आयजाते). यस्मै त्वम् आयजसे स साधति अनर्वा क्षेति दधते सुवीर्यम्। स तूताव (१।९४।२) = हे अग्नि, ज्याला तूं धन देतोस तो धनसमृद्ध होतो. आयजिः = धन देणारा; आयजी = धन देणारे दोघे; ऋग्वेदांत आयजिं व आयजी हीं दोनच रूपें आहेत. वाजं धनं साति असौ वाजसाः = धन देणारा; वाजसातमः = धन देणाऱ्यांत श्रेष्ठ, अतीशय धन देणारा. गोषा इन्द्रः नृषा असि अश्वसा वाजसा उत (९।२।१०) = इंद्रा, तूं गाई, मनुष्य, अश्व व धन देणारा आहेस. प्र वाजम् इन्दुः इष्यति सिषासन् वाजसाः ऋषिः (९।३५।४) = धन देणारा (सिषासन् = वाजसाः) सोम धन देतो. धनसाः, शतसाः, सहस्रसाः अशा शब्दांचा अर्थ धन देणारा. भृ (= देणें, अर्पण करणें) अभ्यासानें जर्भृ; जर्भर्ति, जर्भृतः, जर्भ्रति; ह्यांपैकीं ऋग्वेदांत जर्भृतः येवढेंच रूप आहे; विजर्भृतः = खूप धन देतात. उच्चा = उंचावर असणारे, श्रेष्ठ; अस्माकं द्युम्नम् अधि पञ्च कृष्टिषु उच्चा स्वर्ण शुशुचीत दुष्टरं (२।२।१०) = सर्व लोकांत उंचावर असणारे व कोणाला नेतां येणार नाहीं असें आमचें धन सूर्याप्रमाणें प्रकाशो. वाजेव उच्चा वयसा (१०। १०६।५) = अश्विन हे वाजांप्रमाणें (वाजौ इव) धनानें (वयसा) श्रेष्ठ (उच्चा). उच्चा विजर्भृतः = उंचावर असणारें म्हणजे श्रेष्ठ असें धन वारंवार देतात. इव ह्यानें छंदोभंग होत आहे; आयजी वाजसातमा व ता हि उच्चा विजर्भृतः ह्यांत प्रत्येकीं आठ अक्षरें आहेत; त्याप्रमाणें हरी अंधांसि बप्सता असा आठ अक्षरी चरण पाहिजे; तुसता छंदोभंग होतो एवढेंच नाहीं तर अर्थाला जोरही येत नाहीं. भस् = चावून टाकणें; प्र तान् अग्निः बभसत् तिग्मजम्भः (४।५।४) = सुळक्या दाढांचा अग्नि त्या शत्रूंना अगदीं चावून चावून टाको (प्र + बभसत्). भसदश्वो न० आसा (६। ३।४) = घोड्याप्रमाणें अग्नि तोंडानें म्हणजे दाढांनीं चावून टाको. भस् अभ्यासानें बभस् व भ यांतील अ गेल्यानें बभ्स् व नंतर बप्स्; बप्स्=वारंवार चावणें, चावून चावून

कूट करणें. अद्रयस्त्वा बप्सति गोरधि त्वचि ( ९।७९।४ ) = ग्रावे तुला गोचर्मावर कुटतात. हनू ० बप्सती भूरि अत्तः ( १०।७९।१ ) = चावणाऱ्या दाढा पुष्कळ अन्न खातात. उप स्रक्वेषु बप्सतः ( ७।५५।२ ) = दाढांनीं चावणाऱ्या कुत्र्याचे. अंधांसि = सोम. ऋचेचा अर्थः—सोम ( अंधांसि ) चावून चावून खाणारे म्हणजे ठेचणारे ( बप्सता = बप्सतौ ) व पुष्कळ धन देणारे ( आयजी = वाजसातमा ) असे ते ( ता = तौ ) दोन घोडे ( हरी ) अतीशय (उच्चा) धन देतात ( विजर्भृतः); हरी=इन्द्राचे दोन घोडे; किंवा हरि=हिरण्य, ज्याच्याजवळ सोनें आहे असा; हरी=दोन श्रीमान्. कोणत्या दोन पदार्थांना हरी म्हटलें आहे ? ऋग्वेद १।२८ या सूक्तांतील ऋचांचा क्रमानें अर्थः— ( १ ) ज्यांत रुंद तळाचा ग्रावा सोमरस काढण्याकरितां उंच होतो त्या उलूखलांत काढलेला सोमरस, हे इन्द्रा, तूं पीच पीं; येथें उलूखल म्हणजे ज्यांत सोमरस काढतात असें पात्र; सोमरस काढणारा मनुष्य ग्रावा वर करून त्याचे आघात सोमावर करितो व अशा रीतीनें ठेंचून ठेंचून सोमरस काढतो. ( २ ) जेथें अधिषवणी दोन मांड्यांसारखे पदार्थ करते तेथें वगैरे; याचा अर्थ समजत नाहीं; जघना = जघनौ = दोन मांड्या; पण अधिषवणी म्हणजे काय ? व तिला मांड्यांसारखे कोणते अवयव असतात ? अधिपवणी = सोमरस काढण्याचें भांडें; तिच्या दोन मांड्या म्हणजे दोन लांकडी ग्रावे किंवा मुसळें; हीं मुसळें एकामागून एक सोमावर आघात करतात असा अर्थ कदाचित् असेल. ( ३ ) ज्यांत एक स्त्री पाळीपाळीनें मुसळ वर उचलते व दुसरी मुसळाचा आघात करते त्या उखळांत वगैरे; पोहे कांडतांना जशा दोन बाया पाळीपाळीनें उखळांत असलेल्या धान्यावर मुसळाचे आघात करतात तशा दोन स्त्रिया सोम ठेचीत असतील. ( ४ ) ज्यांत जणूं काय दोऱ्यांप्रमाणें बांधण्याकरितां मंथन दंड बांधतात; याचा अर्थ कळत नाहीं.(५) जरी हे उलूखला, तुला घरोघर कामाला लावतात ( व त्यामुळें तुझा आवाज होत असतो ) तरी आमच्या येथें सर्वांच्यापेक्षां मोठा आवाज कर; उखळांत मुसळांचे आवाज होत असतात. ( ६ ) हे वनस्पति उलूखला, वारा तुझें अग्रच हालवितो; म्हणून इन्द्राला पिण्याकरितां तूं सोमरस काढ; येथें उलूखल सोमरस काढतो; उलूखल हा वनस्पति असून त्याचें अग्र वाऱ्यानें हलतें असें म्हटलें आहे; पण उखळाचें अग्र कोणतें ? ( ७ ) प्रस्तुत ऋचा. ( ८ ) अहो आमच्या प्रशस्त वनस्पतींनो, इन्द्राला पिण्याकरितां प्रशस्त अशा सोम काढणाऱ्यांच्या सहाय्यानें सोमरस काढा; हे दोन वनस्पति ऋष्व म्हणजे पृथुबुध्न ( ऋचा १ ) म्हणजे प्रशस्त किंवा विस्तृत तळाचे असावेत; त्यांचा खालचा भाग बराच रुंद असून वरचा भाग निमुळता होत गेला असावा; म्हणजे हे लांकडाचे दोन ग्रावे म्हणजे मुसळें असावींत. (९) सोमाला गोचर्मावर ठेव, त्याचा रस गाळण्यांत घाल व तसा तो शिल्लक राहिलेला दोन कलशांत भर; येथें वनस्पतींचा निर्देश नाहीं. ह्या सर्व विवरणावरून उलूखल म्हणजे उखळ व हरी म्हणजे दोन मुसळें असावींत.

हविर्धाने (३०) हविषां निधाने। तयोः एषा भवति

हविर्धाने = हविः + धाने = हविषां निधाने = हवि ठेवण्याचीं दोन ठिकाणें; सोमाः तयोः निधीयन्ते (दुर्ग) = ह्या हविर्धानांत सोम ठेवतात म्हणजे सोमहवि ज्यांत ठेवतात असे दोन शकट; हविः सोमरूपं धत्तः धारयतः इति हविर्धाने द्वे शकटे (ऐ० ब्रा० १।२९ सायण भाष्य).

## खंड ३७ वा.

**आ वामुपस्थमद्रुहा देवाः सीदन्तु यज्ञियाः। इहाद्य सोमपीतये (ऋ० सं० २।४१।२१)**

**आसीदन्तु वाम् उपस्थम् उपस्थानम् अद्रोग्धव्ये यज्ञियाः देवाः। यज्ञसंपादिनः। इह अद्य सोमपानाय**

आ + सीदन्तु = आसीदन्तु. उपस्थं = उपस्थानम्; यत्र युवाम् उपगम्य स्थिते तत् वाम् उपस्थानं (दुर्ग) = जेथें येऊन तुम्ही बसतां तें तुमचें उपस्थान म्हणजे आसन. अद्रुहा = अद्रुहौ = अद्रोग्धव्ये = ज्यांचा द्रोह कोणी करूं शकत नाहीं अशा; अद्रोग्धव्ये हा शब्द गुर्जरपाठांत नाहीं. महाराष्ट्रपाठ अद्रोग्धव्ये इति वा असा आहे; तेव्हां अद्रुहा याचा दुसरा कांहींतरी अर्थ आधीं दिला असला पाहिजे; पण तसा अर्थ दिला नाहीं; कदाचित् अद्रोग्धव्याः असा अद्रुहा याचा अर्थ केला असेल व तो शब्द देवाः याचें विशेषण मानिलें असेल; परन्तु तें विशेषण अद्रुहः असें पाहिजे. यज्ञियाः = यज्ञसंपादिनः = यज्ञ शेवटास नेणारे किंवा यज्ञ फलसंपन्न करणारे; ऋचेंत देवाः ह्याच्यानंतर यज्ञियाः शब्द घातला आहे; तो भाष्यांत देवाः याच्या आधीं घातला आहे; पण यज्ञसंपादिनः या अर्थावरून भाष्यांत तो देवाः याच्यानंतरच घातला असावा. सोमपीतये = सोमपानाय = सोम पिण्याकरितां. ऋचेचा यास्कानें केलेला अर्थः- ज्या तुमचा कोणीही द्रोह करूं शकत नाहीं अशा हविर्धानदेवताहो, तुम्ही तयार केलेल्या आसनावर आज येथें सोम पिण्याकरितां यज्ञ फलसंपन्न करणारे देव येऊन बसोत. या ऋचेंत हविर्धाने किंवा तत्सूचक शब्द नाहीं; याच्या आधींची म्हणजे २० वी ऋचा पुढील खंडांत दिली आहे; त्या ऋचेंत द्यावापृथिवी हा शब्द आला आहे; तेव्हां या ऋचेच्या देवता द्यावापृथिवी याच होत. प्रेतां यज्ञस्य शंभुवा (ऋ० सं० २।४१।१९–२१) इति तृचं द्यावापृथिवीयम् अन्वाह। तदाहुः। यत् हविर्धानाभ्यां प्रोह्यमाणाभ्याम् अनु वाचा आह अथ कस्मात् तृचं द्यावापृथिवीयम् अन्वाह इति। द्यावापृथिवी वै देवानां हविर्धाने आस्ताम्। ते उ अद्यापि हविर्धाने। ते हि इदम् अन्तरेण सर्वं हविः यत् इदं किंच। तस्मात् तृचं द्यावापृथिवीयम् अन्वाह (ऐ० ब्रा० १।२९) = (हविर्धानशकट आतां पुढें ढकलावयाचे आहेत; तेव्हां, हे होत्या, त्या कर्माला योग्य असें तीन मंत्र म्हण असें अध्वर्यु होत्याला म्हणतो व) होता प्रेतां यज्ञस्य शंभुवा हे तीन मंत्र म्हणतो; कित्येक म्हणतात कीं

ह्या तीन मंत्रांच्या देवता द्यावापृथिवी ह्या आहेत; तेव्हां हविर्धानशकट ढकलण्याला हे मंत्र योग्य कसे होतील ? ह्याला उत्तरः— देव जेव्हां यज्ञ करीत होते तेव्हां द्यावापृथिवी ह्यांनाच हविर्धानशकट त्यांनीं केलें होतें; हल्लींही त्याच हविर्धानशकट होत; त्यांना हविर्धानें ही संज्ञा देण्याचें कारण सर्व हविर्द्रव्य द्यौ व पृथिवी ह्यांच्यामध्येंच सांपडतें; म्हणून हें द्यावापृथिवीपर मंत्र प्रस्तुत कर्माला योग्य होत. उपस्थं = मांडी; उपस्थम् आसीदन्तु = तुमच्या मांडीवर येऊन बसोत; द्यावापृथिवी ह्या स्त्रिया; त्यांच्या मांडीवर देव सोम पिण्याकरितां बसतात; हविर्धानें हे देवांना बसण्याकरितां आसन कसे तयार करतील ? हविर्धानांत सोम किंवा धान्य ठेविलेलें असतें; ते आसन तयार करितात याला आधार काय ? अद्रुहा = द्रोह न करणाऱ्या; या दोन देवता कोणालाही द्रोह म्हणजे त्रास देत नाहींत; त्यांचा कोणी द्रोह करीत नाहीं असा अर्थ नाहीं. हविर्धानासंबंधीं याज्ञिकांना मंत्र पाहिजे होता; तो मंत्र प्रस्तुत ऋचा होय अशी त्यांनीं आपली समजूत करून घेतली; त्यामुळें यास्क वगैरेंना तदनुकूल असा अर्थ करावा लागला; हा परंपरेचा परिणाम होय.

**द्यावापृथिव्यौ ( ३१ ) व्याख्याते । तयोः एषा भवति**

द्यु व पृथिवी यांच्या व्युत्पत्ति आधीं दिल्या आहेत; प्रथनात् पृथिवी ( १।१४ ); द्युः० द्योततेः ( १।६ ).

## खंड ३८ वा.

**द्यावा नः पृथिवी इमं सिध्रमद्य दिविस्पृशम् ।**
**यज्ञं देवेषु यच्छताम् ( ऋ० सं० २।४१।२० )**
**द्यावापृथिव्यौ नः इमं साधनम् अद्य दिविस्पृशं यज्ञं देवेषु नियच्छताम्**

इंद्रा युवं वरुणा(४।४१।४),इंद्रा नु अग्नी (५।४५।४),इंद्रा नु पूषणा(६।५७।१) ह्या ऋचांत इंद्रावरुणा, इंद्राग्नी व इंद्रापूषणा ह्यांचे छन्दाकरितां तुकडे पाडले आहेत तसे प्रस्तुत ऋचेंत द्यावापृथिवी ह्या समासाचे तुकडे पाडले आहेत. द्यावापृथिवी=द्यावापृथिव्यौ. सिध्रं = साधनं; हें यज्ञं याचें विशेषण; यः अयम् अस्मान् साधयति ( दुर्ग ) = जो ( यज्ञ ) आम्हांस फलसंपन्न करतो असा; साधयति ? यच्छतां = नियच्छताम्; नि हा उपसर्ग लावण्याचें काय कारण ? कदाचित् नि + यम् = नियमित करणें; आमचा यज्ञ देवांमध्येंच नियत करोत म्हणजे तो यज्ञ देवांनाच देवोत असा अर्थ यास्कानें केला आहे कीं काय ? नियच्छतां = दत्तं ( दुर्ग ). दुर्गानें केलेला अर्थः— हे द्यावापृथिवींनो, फलसंपादक ( सिध्रं ) व द्युलोकाला भरून टाकणारा म्हणजे द्युलोकांतील सर्व देवांना पुरणारा (दिविस्पृशं) हा आमचा यज्ञ आज देवांमध्यें नेऊन द्या. अग्नेः स्तोमं मनामहे सिध्रमद्य दिविस्पृशः । देवस्य द्रविणस्यवः ( ५।१३।२ ) = धनाची इच्छा करणारे आम्ही धनानें द्युलोक भरून टाकणाऱ्या अग्नीचें अमूप धन मागत आहोंत; सिध् = दान = धन; सिध् + रं = धनपूर्ण, अतिशय; स्तोमं = धन.

सिध्रा अग्ने धियो अस्मे सनुत्रीः यं त्रायसे ( १०।७।४ ) = हे अग्नि, ज्याचें तूं रक्षण करतोस त्याला अमूप ( सिध्रा. ) धन ( धियः ) मिळतें. निष्षिधः, निष्षिधं, निष्षिधां, निष्षिध्वरीः यांतील सिध् = धन; निः + सिध् = अतिशय धन. प्रस्तुत ऋचेचे दोन अर्थ असावेत; पहिल्याप्रथम लक्षांत येणारा अर्थ दुर्गानें दिला आहे; दुसरा अर्थ पुढीलप्रमाणें:— द्यावापृथिवी आमच्या ( नः ) धनभाण्डारांत ( देवेषु ) अमूप ( इमं = सिध्रं = दिविस्पृशं ) धन ( यज्ञं ) आज देवोत.

**विपाट्छुतुद्र्यौ ( ३२ ) व्याख्याते ( निरु० ९।२६ )। तयोः एषा भवति**

व्याख्याते = व्युत्पत्ति दिली आहे ( पान ६९२ व ६९४ ).

## खंड ३९ वा.

**प्र पर्वतानामुशती उपस्थादश्वे इव विषिते हासमाने।**

**गावेव शुभ्रे मातरा रिहाणे विपाट्छुतुद्री पयसा जवेते ( ऋ० सं० ३।३३।१ )**

**पर्वतानाम् उपस्थात् उपस्थानात् उशत्यौ कामयमाने अश्वे इव विमुक्ते इति वा। विषण्णे इति वा। हासमाने। हासतिः स्पर्धायाम्। हर्षमाणे वा। गावौ इव शुभ्रे शोभने मातरौ संरिहाणे विपाट्छुतुद्र्यौ पयसा प्रजवेते**

उपस्थात् = उपस्थानात्; उपस्थात् शब्द भाष्यांत कां ? उशती = उशत्यौ = कामयमाने; उशत्यौ कामयमाने हे शब्द पर्वतानां ह्याच्या नंतर पाहिजेत. विषिते = विमुक्ते; सि = बांधणें; वि + सि = मोकळें करणें; किंवा विषिते = विषण्णे = वेगळ्या बसलेल्या म्हणजे निराळ्या होऊन वाहणाऱ्या. सि = बसणें असा अर्थ नाहीं; हा दुसरा अर्थ यास्कानें दिला नसून तो प्रक्षिप्त असावा. हांसमाने = स्पर्धमाने = एकमेकींशीं वेगासंबंधानें स्पर्धा करणाऱ्या; हास् = स्पर्धा करणें; ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं; तो हासमाने स्पर्धमाने एवढेंच म्हणतो; किंवा हासमाने = हर्षमाणे = हृष्यमाणे = हंसणाऱ्या म्हणजे खिंकाळणाऱ्या. शुभ्रे = शोभने = शोभणाऱ्या. मातरा = मातरौ. रिहाणे = संरिहाणे. रिह् = लिह् = चाटणें; रिह् + आन = रिहाण; रिहाणा हें स्त्रीलिंग, भाष्यांत संलिहाने असें पाहिजे; कारण अर्वाचीन संस्कृतांत लिह् असा धातु आहे. दुर्गानें केलेलें विवरणः—(१) विश्वामित्रो ब्रवीति = विश्वामित्र म्हणतो. (२) ये एते विपाट्शुतुद्र्यौ पयसा उदकेन पूर्णे प्रजवेते प्रकृष्टेन जवेन गच्छतः = ज्या ह्या विपाट् व शुतुद्री नद्या पाण्यानें तुडुंब भरलेल्या असून खूप वेगानें जात आहेत. ( ३ ) पर्वतानाम् उपस्थात् निर्झरात् मेघानां वा= पर्वतांच्या किंवा मेघांच्या पोटांतून म्हणजे झऱ्यांतून; पण ह्याचा अन्वय कशाशी ? ( ४ ) उशती उशत्यौ कामयमाने परस्परं समागमं समुद्रं वा = परस्परांचा समागम इच्छिणाऱ्या किंवा समुद्राची इच्छा करणाऱ्या. (५) कथं प्रजवेते = कशा म्हणजे कोणासारख्या खूप वेगानें धांवतात ? ( ६ ) अश्वे इव विषिते विमुक्ते मन्दुरातः सादिभ्यो वा = तबेल्यांतून किंवा स्वारांच्या तडाक्यांतून सुटलेल्या दोन घोड्यांप्रमाणें. (७) विषण्णे इति वा विभागे वा एकस्मिन् युक्ते कस्मिंश्चित्

युक्ते युगादौ वा = किंवा विषण्णे म्हणजे कोणत्यातरी ठिकाणीं किंवा एकाद्या युगाच्या आरंभीं एकमेकीला मिळालेल्या. (८) हासमाने स्पर्धमाने परस्परेण वा हर्षमाणे हृष्य-माणे = एकमेकीशीं स्पर्धा करणाऱ्या किंवा हर्ष पावणाऱ्या. (९) विपाट्छुतुद्र्यौ विमुक्ते गावौ इव शुभ्रे शोभने कल्याण्यौ मातरौ संरिहाणे वत्समेकं प्रलेढुम् इच्छन्त्यौ = एका वासराला जोरानें चाटण्याच्या इच्छेनें सुटलेल्या दोन कल्याणप्रद गाईप्रमाणें विपाट्छुतुद्री नद्या. (१०) ये एवम् एते प्रजवेते ते अस्माकं गाधे भवतः इति एतद् आशास्महे=ज्या ह्या अशा रीतीनें खूप वेगानें जात आहेत त्या आमच्याकरितां उथळ होतात म्हणजे होतील अशी आम्ही आशा करतों. अशा रीतीनें विवरणाच्या तुकड्यांचें भाषान्तर करण्याचें कारण ऋचेचा दुर्गानें केलेला अन्वय लक्षांत येत नाहीं हें. तुकडा तीन याचा अन्वय तुकडा दोन ह्याच्याशीं; कोठून वेगानें वाहात जातात याला उत्तर पर्वताच्या पोटांतून वगैरे. चौथ्याचाही दुसऱ्याशीं अन्वय. साहा व नऊ यांचा दुसऱ्याशींच. सात व आठ हीं विपाट् व शुतुद्री यांचीं विशेषणें; पण आठव्याचा अर्थ लक्षांत येत नाहीं; विमुक्ते गावौ याचा काय अर्थ ? तुकडे १ व १० हे दुर्गाच्या पदरचे आहेत. तबेल्यांतून सुटलेल्या दोन घोड्यांप्रमाणें एका वत्साला चाटण्याकरितां धूम धांवत सुटणाऱ्या दोन गाईप्रमाणें, एकमेकींच्या किंवा समुद्राच्या समागमाची इच्छा करणाऱ्या, एकमेकींशीं स्पर्धा करणाऱ्या किंवा हर्ष पावणाऱ्या, पर्वतांच्या पोटांतून किंवा मेघांतून पडलेल्या उदकानें तुडुंब भरलेल्या ज्या ह्या विपाट्छुतुद्री नद्या खूप जोरानें जात आहेत त्या आमच्याकरितां उथळ होतात असा हा असमाधानकारक अन्वयार्थ आहे. यास्क अन्वयार्थाच्या भानगडींत कधीं पडत नाहीं. ऋचेंतील बहुतेक शब्दांचा अर्थ जरी स्पष्ट आहे तरी त्यांचा अन्वय लावणें कठीण आहे. सायणः— पर्वतानां गिरीणां शैलानाम् उपस्थात् उत्संगात् निर्गत्य उशती समुद्रगमनं कामयमाने । गमने दृष्टान्तः । अश्वे इव । यथा विषिते मन्दुरातः विमुक्ते हासमाने अन्योन्यजवेन स्पर्धमाने । यद्वा । हृष्यन्त्यौ अश्वे इव वडवे इव त्वरया गच्छन्त्यौ पर-स्परं हृष्यन्त्यौ । तथा गावेव शुभ्रे । यथा द्वौ गावौ शोभमानौ वर्तेते तद्वत् शुभ्रे शोभ-माने । किंच । मातरा यथा मातरौ धेनू रिहाणे । अन्तर्णीतसनर्थो लिहिः । वत्सं जिह्वया लेढुम् इच्छन्त्यौ शीघ्रं गच्छतः तद्वत् समुद्रं गंतुं जवात् गच्छन्त्यौ पयसा संयुक्ते विपाट्छुतुद्री एतन्नामके नद्यौ प्रजवेते समुद्रं प्रति शीघ्रं गच्छतः = पर्वतांच्या मांड्यां-वरून निघून समुद्राकडे जाण्याची इच्छा करणाऱ्या आणि त्याकरितां वेगानें जाणाऱ्या व पाण्यानें भरलेल्या विपाट् आणि शुतुद्री ह्या नद्या समुद्राकडे झपाट्यानें जातात; कशा जातात ? तबेल्यांतून सुटलेल्या, पुढें कोण जातें यासंबंधानें एकमेकीशीं स्पर्धा कर-णाऱ्या किंवा तबेल्यांतून सुटल्यामुळें हर्ष पावलेल्या दोन घोड्यांप्रमाणें त्या हर्षयुक्त होऊन धांवत सुटतात; दोन गाया एका वत्साला चाटण्याकरितां जशा पळत सुट-तात तशा ह्या पळत सुटतात; दोन सुरेख बैलांप्रमाणें ह्या सुरेख दिसतात. येथें

गावेव शुभ्रे मातरा रिहाणे या शब्दांतून दोन दृष्टान्त काढले आहेत; पण नद्यांना सुरेख बैलांची उपमा कशी शोभेल ?

उशती = कामातुर; जसें:—या न ऊरू उशती विश्रयाते यस्यामुशन्तः प्रहराम शेपम् ( १०।८५।३७ ) = कामातुर होऊन आमच्याकरितां जी आपल्या मांड्या दूर करते व कामातुर असे आम्ही जिच्यांत आमचें लिंग खुपसतों; एथें नवराबायको दोन्हीही कामातुर. पतिं न पत्नीरुशतीरुशन्तं स्पृशन्ति त्वा शवसावन् मनीषाः ( १।६२।११ ) = हे उदार इन्द्रा, जशा कामातुर पत्नी कामातुर नवऱ्याला कवटाळतात तशा माझ्या स्तुति तुला कवटाळोत; इन्द्राकडे केव्हां जाऊं असें स्तुतींना होतें व स्तुति माझ्याकडे केव्हां येतील असें इंद्राला होतें; दोघेही कामातुर. प्रस्तुत ऋचेंत विपाट् व शुतुद्री या कामातुर तरुणी; समुद्र हा कामातुर तरुण. उपस्थ = (१) मांडी, (२) पोट, (३) योनि; प्रस्तुत ऋचेंत पोट किंवा कोठडी. ता भुज्युं विभिः अद्भ्यः समुद्रात्० ऊहथुः । अर्णसो निरुपस्थात् ( ६।६२।६ ) = अहो अश्विनहो, तुम्ही समुद्रांतून, पाण्याच्या पोटांतून पक्ष्यांच्या साहाय्यानें भुज्यूला वर काढलेंत. पर्वतांच्या पोटांत ( पर्वतानाम् उपस्थात् ) अडकलेल्या नद्या तेथून बाहेर निसटण्याची धडपड करितात.हास्=स्पर्धा करणें;एष सूर्येण हासते पवमानो अधि द्यवि (९।२७।५)=हा तेजस्वी झालेला सोम आकाशांत असलेल्या सूर्याशीं स्पर्धा करतो; जल व दूध मिसळल्यानें सोम तेजस्वी होतो; इतका कीं तो सूर्यासारखा तेजस्वी दिसतो. नावाजिनं वाजिना हासयन्ति न गर्दभं पुरो अश्वात् नयन्ति(३।५३।२३)=ज्यानें कधीं लढाई पाहिली नाहीं अशाला लढाई ज्याला माहीत आहे अशा घोड्याशीं लोक स्पर्धा करण्यास लावीत नाहींत; ते गर्दभाला घोड्याच्यापुढें नेत नाहींत. नद्यांमध्यें कोण पुढें जाते अशी जणूं काय स्पर्धा चालली असते; दोन्ही कामातुर; आपल्यांपैकीं समुद्राकडे कोण आधीं जाईल असें त्यांना होतें. कामुक स्त्रिया कामातुर पुरुषाकडे जाण्याला धडपड करतात; त्यांना स्वतःच्या नवऱ्याचें वा बापाचें घर तुरुंगासारखें वाटतें; विपाट् व शुतुद्री पर्वत जे त्यांचे बाप त्यांच्या घरीं फार दिवस कोंडून राहिल्या; हें कोंडून राहणें त्यांना सहन न होऊन त्या कशातरी बापाच्या घरांतून निसटल्या व कामातुर जो समुद्र त्याच्याकडे जाण्यासाठीं धांवत सुटल्या. दोन घोड्या तबेल्यांत फार दिवस अडकून राहिल्यानें त्यांना बाहेर केव्हां जाऊं असें होतें; बाहेर पडतांच त्या स्पर्धेनें धांवूं लागतात; नद्या व घोड्या ह्यांच्यामध्यें सुटून जाऊन ( विषिते ) भराभर पळणें ( हांसमाने ) एवढाच सामान्य धर्म; ही पहिली उपमा. प्रस्तुत ऋचेंत नद्या ह्या एका दृष्टीनें कामातुर स्त्रिया (उशती) पण दुसऱ्या दृष्टीनें माता (मातरा). शुभ्र = (१) तेजस्वी, सजलेला; ( २ ) पांढरा; ( ३ ) दानशूर. नप्तीभिः यो विवस्वतः शुभ्रः न मामृजे युवा । गाः कृण्वानो न निर्णिजम् ( ९।१४।५ ) = गाई ( गाः ) म्हणजे गाईचें दूध हा पोषाख ( निर्णिजम् ); तो अंगावर घातल्याबरोबर ( कृण्वानः न ) तरुण सोमाला ( युवा ) सूर्याच्या ( विवस्वतः ) मुली ( नप्तीभिः ) ताबडतोब ( न ) स्नान

घालतात ( मामृजे ); पाणी व दूध हे पदार्थ सोमरसांत पडल्याबरोबर सोमाचा रंग पालटतो व तो पांढरा दिसूं लागतो. शृण्वन्तु आपः पुरो न शुभ्राः (५।४१।१२) = शुभ्र ( पांढऱ्या ) नद्या आमच्या स्तुति ताबडतोब ऐकोत. नद्या पांढऱ्या गाईसारख्या पांढऱ्या आहेत म्हणजे त्या दोन नद्यांचें पाणी पांढरें आहे. गाईंच्यासारख्या त्या आया आहेत; गाईंच्याप्रमाणें त्या वत्साला चाटतात म्हणजे गोंजारतात; याप्रमाणें शुभ्रे, मातरा व रिहाणे हे शब्द गाई व नद्या या दोघींनाही लागू आहेत. पयसा याचें दुधानें व जलानें असें दोन अर्थ आहेत; वत्साला चाटणाऱ्या गाई त्याच्याकडे कांस दुधानें भरून त्याला पाजण्याकरितां जातात; नद्या समुद्राला पाजण्याकरितां आपली कांस पाण्यानें भरून त्याच्याकडे धांवत जातात. वासराला चाटणें हा गाईचा स्वभाव आहे; वासरूं जवळ असलें कीं गाय त्याला चाटूं लागते; समुद्राला पोचतांच नद्याही जणूं काय त्याला चाटतात किंवा गोंजारतात. गावः मातरः हे शब्द १।९२।१ व ९।१२।२ यांत आले आहेत; आणि माता गौः हे ८।९४।१ यांत आले आहेत. वत्समिव मातरा संरिहाणे समानं योनिम् अनु सञ्चरन्ती (३।३३।३) = जशा (इव) दोन माता ( मातरा ) वत्साला एकजुटीनें (सं) चाटतात ( रिहाणे ) तशा एकाच ठिकाणाकडे जुटीनें जाणाऱ्या विपाट् व शुतुद्री या नद्या तेथें पोंचल्या-बरोबर समुद्ररूपी वत्साला चाटतात; या उदाहरणावरून मातरा रिहाणे हे शब्द गावौ यालाच लागू आहेत; सायणाचार्य या शब्दांत तिसरी उपमा आहे असें म्हण-तात पण ती त्यांची चूक आहे. पर्वतांच्या पोटांमधून पाण्याचा लोंढा घेऊन या दोन नद्या समुद्राकडे वेगानें जातात; ही वस्तुस्थिति; त्यावर ह्या दोन उपमा केल्या आहेत; त्या दोन उपमांचा अर्थ वर दिलाच आहे. एकदां कामुक तरुणी व लगेच आई अशा परस्परविरुद्ध कल्पना ऋग्वेदांत इतरत्रही सांपडतात; उत न ईं मतयो अश्वयोगाः शिशुं न गावस्तरुणं रिहन्ति। तमीं गिरो जनयो न पत्नीः सुरभिष्टमं नरां नसन्त (१।१८६। ७) = लहान वत्साला गाई जशा चाटतात तशा आमच्या स्तुति इंद्राला चाटतात; जशा स्त्रिया पतीला कवटाळतात तशा आमच्या स्तुति इंद्राला कवटाळतात; येथें स्तुति ( मतयः = गिरः ) या तरुण स्त्रिया व इन्द्र हा त्यांचा नवरा; पहिल्या अर्धांत स्तुति या आया व इन्द्र हा त्यांचा मुलगा. हें उदाहरण तंतोतंत प्रस्तुत ऋचेसारखें आहे. शिवाय पुढील खण्ड व अध्याय २।२७ (पान १४८-४९) पहा. शब्दांचे अर्थ ठरविणें व सारख्या ऋचा एकमेकींशीं ताडणें हें किती आवश्यक आहे हें प्रस्तुत ऋचा स्पष्ट करून दाखवीत आहे.

**आर्त्नी ( ३३ ) अर्तन्यौ वा। रण्यौ वा। रिषण्यौ वा। तयोः एषा भवति**

आर्त्नी शब्द द्विवचनी असल्यामुळें तो ह्या द्वंद्वसमूहांत घातला गेला; वास्त-विक ज्या शब्दानंतरच तो घालावयास पाहिजे होता; कारण आर्त्नीचा प्रत्यंचेशीं निकट संबंध आहे. आर्त्नी = अर्तन्यौ; आर्त्नी = आर्तनी = अर्तनी; ऋति = जाणें; नी प्रत्ययामुळें ऋति ह्याला गुण होऊन अर्तिनी; नंतर अर्तनी; अर्तन्यौ हें द्विवचन;

ऋति हा सौत्र धातु असून त्याचें जुगुप्सा करणें किंवा कृपा करणें असे अर्थ आहेत असें भट्टोजी दीक्षित म्हणतात; ऋति धातुपाठांत नाहीं; तथापि अदादि गणाच्या आरंभीं तो त्यांनीं घेतला आहे; ऋति धातु यास्ककालीं होता कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं. आर्त्नी = रण्यौ= रणाला योग्य; रणी याचें द्विवचन रण्यौ; पण रणी काय व रणी ह्याचें आर्त्नी हें रुपान्तर कसें होईल? कदाचित् आर्त्नी = अरण्यौ असें यास्कास म्हणावयाचें असेल; आर्त्नी = आर्तनी = अरनी = अरणी; ऋ (= जाणें) यापासून अर; अर = जाणारा बाण; अर + नी = अरणी = बाणाला नेणारी म्हणजे जिच्यावर बाण ठेवतात ती. रण्यौ बद्दल अरण्यौ असावें असें वाटतें. किंवा आर्त्नी = रिषण्यौ = हिंसा करणाऱ्या, ठार मारणाऱ्या; रिष् = हिंसा करणें (धा० १।६९५); रिष् + अ + नी = रिषणी; पण आर्त्नी व रिषणी यांत र् व नी एवढींच सारखी अक्षरें आहेत; कदाचित् आरिषण्यौ असा शब्द असेल; आ+ रिष् = हिंसा करणें; आ + रिष् + अ + नी = आरिषणी = आरषणी = आर्षणी = आर्तनी = आर्त्नी. आर्त्नी अर्तेः रिषतेर्वा । निप्रत्ययः धातोः आर्तभावश्च। गते ज्यया ऋष्यमाणे संगच्छेते हिंसासाधने वा भवतः (देवराज) = आर्त्नी शब्द ऋ किंवा रिष् यांपासून; ऋ + त = ऋत; आ + ऋत = आर्त; आर्त + नी = आर्तनी = आर्त्नी; प्रत्यंचेशीं (ज्यया) एकवटतात म्हणजे प्रत्यंचेशीं ज्यांचा निकट संबंध असतो अशा; धनुष्कोटींचा प्रत्यंचेशीं निकट संबंध असतो; किंवा रिषण्यौ = हिंसासाधनें म्हणजे हिंसेचीं साधनें. रण्यौ वा ही व्युत्पत्ति देवराज देत नाहीं. ही व्युत्पत्तीची खटपट व्यर्थ होय. आर्त्नी हें आर्त्नि याचें द्विवचन असेल किंवा आर्त्न्यौ याच्याबद्दल आर्त्नी हें रूप घातलें असेल; मूळ शब्द आर्त्नि किंवा आर्त्नी हें कोण ठरवणार व त्या शब्दाचा धनुष्कोटी ह्या अर्थाला काय आधार? तो शब्द अर्वाचीन संस्कृतांत नाहीं. आर्त्नी गच्छन्त्यौ (सायण); ऋ चें आर्त होऊन त्याला नि म्हणजे नी हा प्रत्यय लावल्यानें आर्त्नी शब्द बनतो; आर्त्नी म्हणजे धनुष्कोटी असें ते म्हणत नाहींत; त्या शब्दाची ते एवढीच व्युत्पत्ति देतात आणि जाणाऱ्या असा त्याचा अर्थ करितात.

## खंड ४० वा.

**ते आचरन्ती समनेव योषा मातेव पुत्रं बिभृतामुपस्थे।**

**अप शत्रून् विध्यतां संविदाने आर्त्नी इमे विष्फुरन्ती अमित्रान्** (ऋ० सं० ६।७५।४)

**ते आचरन्त्यौ समनसौ इव योषे माता इव पुत्रं बिभृताम् उपस्थे उपस्थाने**

आचरन्ती = आचरन्त्यौ = आनमन्त्यौ (दुर्ग) = नमून असणाऱ्या. समनेव = समना + इव; समना = समनसौ = एका मनाच्या, जुटीनें वागणाऱ्या, न भांडणाऱ्या. योषा = योषे = दोन बायका. उपस्थे = उपस्थाने = समीप; उपस्थाने दुर्गवृत्तींत

नाहीं; मातेव पुत्रं उपस्थे रक्षणार्थं = माता जशी मुलाला रक्षणासाठीं आपल्या मांडीवर घेते असा दुर्ग अर्थ करतो.

**अपविध्यतां शत्रून् संविदाने आर्त्न्यौ इमे विघ्नत्यौ अमित्रान्**

आर्त्नी = आर्त्न्यौ. विष्फुरन्ती = विष्फुरन्त्यौ = विघ्नत्यौ = ठार मारणाऱ्या; वि + घ्नती याचें द्विवचन विघ्नत्यौ; इमे विघ्नत्यौ हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थः— एक मनाच्या दोन स्त्रिया जशा आपल्या एका पतीला आलिंगन देण्यासाठीं एकमतानें आचरण करितात त्याप्रमाणें धनुर्धाऱ्याच्या संबंधानें ज्या नित्य नम्र असतात व माता जशी मुलाला रक्षणासाठीं आपल्यापाशीं ओढते तशा ज्या धनुर्धाऱ्याला आपल्याकडे रक्षणासाठीं ओढतात व ज्या शत्रूंना टणत्कारानें नेहमीं भेवडावितात त्या ह्या एकमेकींशी बोलणाऱ्या ( संविदाने ) धनुष्कोटी शत्रूंना ठार करोत. ते धनुःकोट्यौ समनेव समनस्का इव योषा पतिसमीपं न त्यजति तद्वत् आचरन्ती अभितः चरन्त्यौ । उपस्थे उपस्थाने माता इव पुत्रं धारयति तद्वत् बिभृतां राजानं धारयेताम् । किंच इमे धनुःकोट्यौ संविदाने संजानाने विसंवादरहिते आर्त्नी गच्छन्त्यौ अस्य राज्ञः अमित्रान् विष्फुरन्ती विहिंसंत्यौ शत्रून् च अपविध्यतां ( सायण ) = जशी पतिव्रत (समनस्का) स्त्री पतीचें सांनिध्य सोडीत नाहीं त्याप्रमाणें राजाच्या समीप असणाऱ्या धनुष्कोटी माती जशी पुत्राला आपल्यापाशीं ठेवते तशा राजाला आपल्यापाशीं ठेवोत; आणि न भांडणाऱ्या (संविदाने) एकजुटीनें जाणाऱ्या ( आर्त्नी ) व राजाच्या शत्रूंची हिंसा करणाऱ्या त्या शत्रूंना ठार करोत. समन शब्दाचे ( १ ) पुरुष, ( २ ) स्त्री व ( ३ ) तोच, तीच, तेंच असे तीन अर्थ होतात; समनेव योषा = समनम् इव योषा. उपस्थ याचे ( १ ) मांडी व ( २ ) योनि असे दोन अर्थ येथें आहेत. आर्त्नी म्हणजे काय ? माझ्या मतें त्या धनुष्कोटी नसून प्रत्यंचे-वर मधोमध व आडव्या बांधलेल्या धातूच्या दोन पट्ट्या असाव्यात; त्यांच्यामधली जागा बाण ठेवण्यापुरतीच असली पाहिजे; ह्या मधल्या जागेला योनि व मांडी असें विनोदानें म्हणतां येईल; योनि असल्यास आर्त्नी या दोन तरुणी व बाण हा समन म्हणजे पति म्हणजे पतिचें लिंग; पण मांडी हा जेव्हां अर्थ असेल तेव्हां आर्त्नी या दोन माता व बाण हा पुत्र; ते आर्त्नी योषा इव समनम् उपस्थे बिभृतां माता इव पुत्रम् उपस्थे बिभृताम् =त्या आर्त्नी योषेप्रमाणें उपस्थावर समन घेवोत व मातेप्रमाणें पुत्र घेवोत; हा समन म्हणजे पुरुष म्हणजे पुरुषाचें लिंग; उपस्थ म्हणजे योनि; इषु हा पुत्र; उपस्थ = मांडी. अत्रैव वोऽपि नह्यामि उभे आर्त्नी इव ज्यया ( १०। १६६।३ ) = जसा धनुर्धारी दोन्हीही आर्त्नींना प्रत्यंचेनें एकत्र बांधतो तसा मी याच ठिकाणीं तुम्हाला गच्च बांधतों असें राजा आपल्या सपत्नांना म्हणतो; राजाला सपत्न नको आहेत; त्यांनीं आपल्याला कधींही त्रास देऊं नये म्हणून त्यांना तो कोठें-तरी एके ठिकाणीं दोरीनें गच्च बांधून टाकतो; त्याप्रमाणें प्रत्यंचेनें दोन्ही आर्त्नी एके ठिकाणीं बांधल्या असतात; जर आर्त्नी म्हणजे धनुष्कोटी असा अर्थ असेल तर

एका ठिकाणींच (अत्रैव) या शब्दांचा कांहींच अर्थ होणार नाहीं. आचरन्ती हें द्विवचन नसून एकवचनच आहे व तें योषा या शब्दाचें विशेषण आहे; आचरन्ती = अभिसरणं कुर्वती। अभिसारिकावत् जारस्य समीपं गच्छन्ती = अभिसारिकेसारखी जाराच्याकडे जाणारी; ( उषाः ) अहरहर् निष्कृतम् आचरन्ती ( १।१२३।९ ) = सूर्याला भेटण्याकरितां ठरलेल्या स्थळीं ( निष्कृतं ) कामेच्छा पूर्ण करण्याकरितां जाणारी उषा; सूर्य हा जार; उषा ही अभिसारिका. जार इवाचरन्ती उषो ददृक्षे पुनर्यतीव ( ७।७६।३ ) = जाराकडे पुनः पुनः जाणाऱ्या स्त्रीप्रमाणें, हे उषे, तूं दिसतेस; जारिणीला जाराची संगत कधींही सोडतां येत नाहीं; ती त्याच्याकडे पुनः पुनः जाणारच; त्याप्रमाणें उषा सूर्याकडे जाते. या उताऱ्यांवरून आचरन्ती = जाराकडे जाणारी. जशी तरुणी ( योषा ) जाराकडे ( समनं ) जाते व त्याला उपस्थावर घेते. आचरन्ती हें पदकारानें द्विवचन केल्यामुळें त्या शब्दाचा भलता अर्थ केला गेला आहे. जखम करणें व फेंकून देणें या दोन अर्थीं विध् धातु ऋग्वेदांत आहे; येथें दुसरा अर्थ. अवविद्धं तौग्र्यम् अप्सु अन्तर् अनारम्भणे तमसि प्रविद्धम् ( १।१८२।६ ) = पाण्यांत टाकलेल्या, अतिशय खोल अशा अंधकारांत फेंकलेल्या तुग्राच्या मुलाला ( अश्विनांनीं बाहेर काढलें ). युवं भुज्युम् अवविद्धं समुद्रे० उदूहथुः ( ७।९६।७ ); याचाही अर्थ वरीलप्रमाणें; ७।१०४।३ मध्यें अहो इन्द्रासोमांनो, शत्रूंना जोरानें ( प्र ) इतक्या खोल खड्ड्यांत फेंकून द्या (विध्यतं ) कीं त्यांपैकीं एकही वर येऊं शकणार नाहीं. अर्वाचीन संस्कृतांत स्फुर् धातूचे लवणें ( जशी वीज किंवा डोळा ), स्फुरण पावणें, जोरानें हलणें वगैरे अनेक अर्थ आहेत; पण ऋग्वेदांत याचा अर्थ लाथ मारणें असा आहे; हा अर्थ अर्वाचीन संस्कृतांत नाहीं. गाई दूध काढतांना लाथ झाडतात, एक दुसऱ्याला लाथ मारतो, वाटेंत अडचण आलेली लाथेनें उडवून देतो अशा अर्थीं हा धातु ऋग्वेदांत आला आहे. एक ऋचाखेरीज करून 'स्फुरणें' हा अर्थ इतरत्र कोठेंही सांपडत नाहीं व त्या ऋचेंतही तो अर्थ असेलच असें म्हणतां येत नाहीं; कदा मर्तमराधसं पदा क्षुम्पमिव स्फुरत् (१।८४।८) = जो मनुष्य ( मर्तं ) कधीं हवि देत नाहीं ( अराधसं ) किंवा जो धनचुंबक आहे त्याला एकाद्या ढेंकळाप्रमाणें इंद्र लाथेनें ( पदा ) केव्हां उडवून देईल ? सुदुघा अनपस्फुरः ( ८।६९।१० ) = दुधाळ व लाथ न झाडणाऱ्या गाई; तां धेनुमिन्द्रावरुणा युवं नो विश्वाहा धत्तम् अनपस्फुरन्तीम् ( ४।४२।१० ) = हे इन्द्रावरुणांनो, लाथ न मारणारी अशी धेनु आम्हांला नेहमीं देत जा. संविदाने हा शब्द येथें व नाना चक्राते सदनं यथा वेः समानेन क्रतुना संविदाने ( ३।५४।६ ) येथें आला आहे; या ऋचेचा पुढील प्रमाणें अर्थः— सारख्या ( समानेन ) द्रव्यानें ( क्रतुना ) युक्त असलेल्या ( संविदाने ) दोन धनाढ्य स्त्रिया ( नाना ) पक्ष्याच्या घरट्यासारखें ( वेः सदनं यथा ) घरटें ( सदनं ) करतात ( चक्राते ); द्यावापृथिवी या त्या दोन धनाढ्य स्त्रिया; प्रत्येकीपाशीं अतिशय धन आहे व दोघींचें धन सारखें आहे; तें राखून ठेवण्याकरितां त्या एक सुरक्षित घर

बांधतात. प्रस्तुत ऋचेंतही संविदाने म्हणजे धनाढ्य असा अर्थ असावा; आर्त्नींच्या मधली जागा हें एक घर; त्यांत जणूंकाय धन ठेवलें आहे व तें धन हरण करण्यासाठीं चोर शिरले आहेत; हे चोर कोण? बाण; तेव्हां अशा चोरांना लाथाडून लांब फेंकून दिलें पाहिजे. याप्रमाणें आर्त्नींच्यामधील जागा योनि किंवा मांडी किंवा घर; बाण हें जार, पुत्र व शत्रु; बाण व आर्त्नी यांच्याकडे निरनिराळ्या दृष्टीनें पहावयाचें आहे; जोंपर्यंत ते या मधल्या जागेंत असतात तोंपर्यंत ते जणूंकाय जार व पुत्र; पण जेव्हां बाण शत्रूंवर फेंकावयाचे असतात तेव्हां ते शत्रु होत; धन चोरावयाला आले तर ते मित्र नसून शत्रूच असले पाहिजेत अशी ही तिसरी कोटी; या ऋचेंत कवीचा मार्मिकपणा परम कोटीला गेला आहे यांत संशय नाहीं. पुढील आकृतीवरून मी केलेला अर्थ स्पष्ट होईल. पट्यांचे कमानीकडचे भाग हे आर्त्नींचे पाय;

या पायांनीं जणूं काय त्या घरांत शिरलेल्या चोरांना लाथाडून दूर फेंकून देतात. या सूक्तांत समन शब्द समने पारयन्ती ( ऋचा ३ ); समनेव योषा ( ऋचा ४ ) व समनावगत्य ( ऋचा ५ ) असा तीनदां आला आहे; तीनही ठिकाणीं समन = पुरुष किंवा पुरुषाचें लिंग. समन म्हणजे पुरुष हा अर्थ पुढें दिलेल्या ऋचांवरून स्पष्ट होईल. संप्रेरते अनु वातस्य विष्टा ऐनं गच्छन्ति समनं न योषाः । ताभिः सयुक् सरथं देव ईयते ( १०।१६८।२ ) = वाताच्या मुली म्हणजे वाऱ्यासारख्या धांवणाऱ्या घोड्या भराभर पळत सुटतात व तरुणी ( योषाः ) जशा ( न ) पतीकडे ( एनं ) येतात ( आगच्छन्ति ) त्याप्रमाणें त्या घोड्या याच्याकडे म्हणजे सवित्याकडे येतात; त्या घोड्यांनीं युक्त होऊन व रथांत बसून सवितादेव प्रवासाला निघतो; विष्टाः म्हणजे घोड्या; त्यांची तरुणींशीं व सवित्याची पतिशीं तुलना केली आहे. संहोत्रं स्म पुरा नारी समनं वाव गच्छति ( १०।८६।१० ) = पूर्वकालीं नारी धनवान् ( संहोत्रं ) अशाच पुरुषाकडे ( समनं ) जात असे. समनेव योषाः ( ७।१७ खंड पहा ). समना = तरुणी; जसें:— एषा दिवो दुहिता प्रत्यदर्शि ज्योतिर्वसाना समना पुरस्तात् ( १।१२४।३ ) = द्यूची मुलगी उषा—तरुणी प्रकाश पांघरलेली पुढें दिसत आहे पहा; वि समना भूमिरप्रथिष्टारंस्त पर्वतश्चित्सरिष्यन् ( २।११।७ ) = ( इंद्राला पाहतांच ) पृथिवी—तरुणी पसरली व पळणारा पर्वत थांबला.

**शुनासीरौ (३४)। शुनः वायुः। शु एति अन्तरिक्षे। सीरः आदित्यः। सरणः। तयोः एषा भवति**

शुनः = वायुः; शुन = शु + न् + अ = शु + अन्; शु = क्षिप्रं = वेगानें; अन् = अन्तरिक्षे; वायु अंतरिक्षांत वेगानें जातो म्हणून तो शुन. सीरः = आदित्यः; आदित्याला सीर नांव पडण्याचें कारण तो आकाशांत सरतो (सरणः) म्हणजे चालतो; सृ = चालणें; सृ = स् + ऋ; ऋ = ईर; स् + ईर = सीर. द्युदेवः शुनदेवता इति शौनकः। अतः शुनः इन्द्रः। सीरः वायुः (सायण) = द्युलोकचा राजा हा शुन असें शौनक म्हणतो; तेव्हां शुन म्हणजे इंद्र व सीर म्हणजे वायु असें शौनकाचें मत देऊन यास्काचेंही मत सायणाचार्य देतात. शुनःच सीरःच शुनासीरौ; देवताद्वन्द्वे च (पा० ६।३।२६) ह्या सूत्रानें शुन शब्दाला दीर्घत्व आलें. शुनासीरौ हा शब्द पुढील खंडांतील ऋचेंत व ४।५७।८ ह्यांत आला आहे; शुनासीरौ शुनमस्मासु धत्तम् = हे शुनासीरांनो, आमच्याठायीं शुन ठेवा; शुनमस्मभ्यमूतये० शर्म यच्छन्तु (१०।१२६।७); शुनं = शर्म = धन; ह्या दोन ऋचांत शुन हें नाम आहे. शुनं० उषासम् (४।३।११); त्वां० शुनम् (६।१६।४); ह्या दोन ठिकाणीं शुनं हें विशेषण आहे; शुन = धनवान्. उषा व अग्नि यांच्याजवळ अतिशय धन आहे. शुनं नः फाला वि कृषन्तु भूमिम् (४।५७।८) = आमच्या नांगरांचे फाळ जमिनीला उत्तम रीतीनें उकरोत; येथें शुनं हें क्रियाविशेषण आहे व तसा तो ह्या सूक्तांत बऱ्याच वेळां आला आहे. शुनासीरौ या समासाखेरीज विशिष्ट देवतावाचक शुन शब्द ऋग्वेदांत कोठेंही आढळत नाहीं; सीर असा शब्द ऋग्वेदांत नाहीं; सीरा (= नांगरानें शेतांत पाडलेले चर) तीनदां आला आहे. ह्या दोन देवतांचा संबंध शेत व पर्जन्य यांच्याशीं आहे; हे दोघे बहुतकरून स्वतंत्र देव असतील. क्षेत्रस्य पते मधुमंतमूर्मिं० अस्मासु धुक्ष्व (४।५७।२); क्षेत्रस्य पतिर्मधुमान्नो अस्तु (४।५७।३); पांचवी ऋचा पुढील खंडांत दिली आहे; तींत हे शुनासीरांनो, पावसानें भूमि चिंब भिजवा असें म्हटलें आहे. इन्द्रः सीतां नि गृह्णातु तां पूषानु यच्छतु। सा नः पयस्वती दुहामुत्तरामुत्तरां समाम् (४।५७।७); सीता लाङ्गलपद्धतिः (अमर २।९।१४); सीता म्हणजे नांगरानें पाडलेला चर; पण तो अर्थ या ऋचेंत नसावा; कारण इन्द्र सीतेला हातानें धरो व पूषा तिला सारखी दाबांत ठेवो असें म्हटलें आहे; तेव्हां सीता म्हणजे नांगरच असेल; ती सीता आम्हांस येणाऱ्या प्रत्येक वर्षी पाऊस देवो कारण ती पयस्वती आहे. गोदारणं च सीरः (अमर २।९।१४); गोदारणं = जमीन फोडणारा नांगर; सीर याचाही तोच अर्थ. तेव्हां शुन म्हणजे धान्यदेवता व सीर म्हणजे शेत नांगरणारी देवता असे अर्थ असतील; शेत व नांगर यांना पावसाची केव्हांही जरूरी असणारच व त्यांचा पृथिवीशीं संबंध असतो; म्हणून भाविक लोकांनीं त्या दोघांना देव मानिले असेल; क्षेत्रस्य पति हाच शुन असेल.

## खंड ४१ वा.

**शुनासीराविमां वाचं जुषेथां यद्दिवि चक्रथुः पयः।**
**तेनेमामुप सिञ्चतम् ( ऋ० सं० ४।५७।५ )॥ इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा )

हे शुनासीरांनो, ह्या विनंतीचा स्वीकार करा; जे जल तुम्ही द्युलोकीं निर्माण करतां त्यानें हिला म्हणजे पृथिवीला चिंब (उप) भिजवा ह्या ऋचेंतील पांच अक्षरें गळलीं असावींत असें वाटतें; कारण इतर ऋचा अनुष्टुभ्छंदांत आहेत; तशी हीही असावी; शुनासीरा विमां वाचं, यद्दिवि चक्रथुः पयः व तेनेमामुप सिञ्चतं ह्या तीनही पादांत प्रत्येकी आठ आठ अक्षरें आहेत; म्हणून जुषेथां ह्याच्या भरतीला पांच अक्षरें पाहिजेत; तीं पांच अक्षरें 'यां वदामसि' किंवा 'सुभगा नरा' किंवा दुसरीं कोणतीं तरी असतील; अक्षरें गळलीं हें खास; ज्यानें ऋचेला स्वर दिले त्याच्या आधींच हीं अक्षरें गळलीं असलीं पाहिजेत; तसें गळण्याचें कारण विस्मरण हें असेल; म्हणजे ऋचा म्हणणाऱ्याला तीं अक्षरें आठवत नसतील किंवा ऋचा जर लिहिल्या गेल्या असतील तर एवढींच पांच अक्षरें फाटून नाहींशीं झालीं असतील.

**देवी जोष्ट्री ( ३'१ ) देव्यौ ज्योषयित्र्यौ। द्यावापृथिव्यौ इति वा। अहोरात्रे इति वा। सस्यं च समा च इति कात्थक्यः। तयोः एषः संप्रैषः भवति**

देवी = देव्यौ. जोष्ट्री = जोषयित्र्यौ; जुष् + तृ = जोष्टृ; जोष्ट्री हें स्त्रीलिंग; जोषयित्र्यौ = सर्वस्य तर्पयित्र्यौ (दुर्ग) = सर्वांना तृप्त करणाऱ्या. या दोन देवता द्यावापृथिवी असतील किंवा दिवस व रात्र असतील; कात्थक्याच्या मतें त्या दोन देवता धान्य व वर्ष होत. त्यांच्यासंबंधीं पुढील संप्रैष म्हणजे प्रैष होय. प्रैष म्हणजे काय हें ८।२२ यांत सांगितलें आहे ( पान ६४३).

## खंड ४२ वा.

**देवी जोष्ट्री वसुधिती ययोरन्याघा द्वेषांसि यूयवदन्यावक्षद्वसु वार्याणि यजमानाय वसुवने वसुधेयस्य वीतां यज (मैत्रा० सं० ४।१३।८॥ तै० ब्रा० ३।६।१३) देवी जोष्ट्री देव्यौ जोषयित्र्यौ वसुधान्यौ। ययोः अन्या अघानि द्वेषांसि अवयावयति। आवहति अन्या वसूनि वरणीयानि यजमानाय वसुवननाय च वसुधानाय। च वीतां पिबेताम्। कामयेतां वा। यज इति संप्रैषः**

देवी जोष्ट्री हे शब्द भाष्यांत घालण्याचें कारण नाहीं; देव्यौ जोषयित्र्यौ ह्यांचा अर्थ मागील खंडांत दिला आहे. वसुधिती = वसुधान्यौ = वसूनां निधानभूते ( दुर्ग )= धनाचे साठे झालेल्या; सुखप्राप्तिभूते (सायण)=सुखाची प्राप्ति हाच स्वभाव आहे ज्यांचा. धिति हा शब्द धि देणें ह्यापासून; म्हणून धनाच्या दात्या असा वसुधिती ह्याचा अर्थ असावा. वसुधानी ह्याचें द्विवचन वसुधान्यौ; धानी = धारण करणारी; वसुधानी = धन धारण करणारी; धानी शब्द आपट्यांच्या कोशांत नाहीं; तो ऋग्वेदांतील निधानी

ह्या शब्दांत आहे. अघा = द्वेषांसि = ज्यांचा आम्ही द्वेष करतो अशा वाईट गोष्टी म्हणजे दारिद्र्य वगैरे·(दुर्ग). अघा = अघानि = पापानि=पापें; द्वेषांसि = रक्षःप्रभृतीनि = राक्षस वगैरे ( सायण ). यूयवत् = अवयावयति = निराळें करते, दूर करते, नष्ट करते; महाराष्ट्रपाठ युयवत् आहे. आवक्षत् = आवहति = आणते; वह् + स् (लेट् चा)= वक्ष्. यूयवत् = वेगळें करो व आवक्षत् = आणो असे आज्ञार्थी अर्थ असावेत. वार्याणि = वरणीयानि = मागण्याजोगी, याचना करण्याजोगी; धन याचना करण्याजोगें आहे; वरणीयानि ह्याच्याबद्दल गुर्जरपाठ वननीयानि ( = भोगण्याजोगी ) आहे; पण वार्य ह्यांत वन् धातु नाहीं. यजमानाय अध्याहृत. वसुवने = वसुवननाय = धन भोगण्याकरितां. वसुधेयस्य = वसुधानाय = अवभुक्तातिशिष्टस्य विधानाय ( दुर्ग ) = भोगून राहिलेल्या धनाचे दान करण्यासाठीं. दोन्ही च अध्याहृत. वसुधेयस्य धनप्रदातुर्देवस्य वसुवने धनदानाय ( सायण ) = धन देणाऱ्या देवाच्या म्हणजे देवाकडून धन देण्यासाठीं. वसुधेय ह्याचा वसुदेय प्रमाणें धनदान असा अर्थ असावा; वसुधेयस्य = वसुधेयं = धनदान. वीतां = पिबेताम् = पिवोत; किंवा वीतां = कामयेतां = इच्छा करोत. ते देव्यौ जोषयित्र्यौ अस्य पृषदाज्यस्य स्वम् अंशं वीतां पिबेतां कामयेतां वा ( दुर्ग ) = ह्या देवी पृषदाज्याचा आपापला भाग पिवोत किंवा त्याची इच्छा करोत. पण वीतां = दत्तां = देवोत असा अर्थ असावा; वसुधेयस्य हें वीतां ह्यांचें कर्म; वसुवने वसुधेयस्य वीतां = धन भोगण्यासाठीं किंवा धनाच्या साठ्यांत धनदान देवोत. यज = याज्या म्हण; असा प्रैप म्हणजे आज्ञा अध्वर्यूच्या सांगण्यावरून मैत्रावरुण हा होत्याला देतो व नंतर होता विशिष्ट मंत्र म्हणतो. दुर्गानें केलेला अर्थः— ज्यांपैकीं एक द्वेष्य पापें म्हणजे आम्हांला अप्रिय अशा वस्तु आमच्यापासून दूर करते व दुसरी जें धन भोगावयाचें असतें आणि भोगून राहिलेलें दान घेण्याला योग्य अशांना द्यावयाचें असतें असें धन यजमानाला देते; सर्वांना तृप्त करणाऱ्या व आपल्या जवळ धनाचा सांठा ठेवणाऱ्या त्या देवी पृषदाज्याचा आपापला भाग पिवोत किंवा त्याची इच्छा करोत. मी केलेला अर्थः— ज्यांपैकीं एक द्वेष्य अशा वस्तु यजमानापासून दूर करते व दुसरी भोगावयाचें धन यजमानाला आणून देते त्या धनदात्या देवी यजमानाच्या भांडारांत ( वसुवने ) धन ( वसुधेयस्य ) देवोत.

**देवी ऊर्जाहुती (३९) देव्यौ ऊर्जाह्वान्यौ। द्यावापृथिव्यौ इति वा। अहोरात्रे इति वा। सस्यं च समा च इति कात्थक्यः। तयोः एषः संप्रैषः भवति**

देवी = देव्यौ. ऊर्जाहुती = ऊर्जाह्वान्यौ=ऊर्जस्य अन्नस्य निष्पादयित्र्यौ (दुर्ग) = ऊर्ज म्हणजे अन्न; त्याची निष्पत्ति करणाऱ्या म्हणजे अन्न उत्पन्न करणाऱ्या; ऊर्जाहुती = ऊर्ज + आहुती; आहुती = आह्वान्यौ; अह्वान्यौ हें आह्वानी ह्याचें द्विवचन; आह्वानी = आ + ह्वानी; ह्वे ( = बोलावणें ) ह्यापासून ह्वानी; तेव्हां आह्वानी = बोलावणारी; ऊर्जस्य आह्वानी = अन्नाला बोलावणारी = अन्न उत्पन्न करणारी; आहुति=

आ + हुति; ह्वे+ति = हुति; ह्वेचा हु संप्रसरणानें. पण ऊर्क् आहुतिः ययोः = ज्यांचा म्हणजे ज्यांना देण्याचा हवि अन्न असतें म्हणजे ज्यांना अन्न द्यावयाचें असतें अशा; असा अर्थ दिसतो. ह्या दोन देवी कोण? द्यावापृथिवी वगैरे (मागील खंडाचा शेवट पहा). दुर्गवृत्ति यजेति संप्रैषः येथपर्यंतच आहे; तींत देवी ऊर्जाहुती वगैरे नाहीं; द्यावापृथिव्यौ ऊर्जाह्वान्यौ उच्येते एवढेंच ४३ व्या खंडावरील वृत्तीच्या प्रारंभीं आहे.

## खंड ४३ वा.

**देवी उर्जाहुती इषमूर्जमन्यावक्षत्सग्धिं सपीतिमन्या ।**

**नवेन पूर्वं दयमानाः स्याम पुराणेन नवम् । तामूर्जमूर्जाहुती ऊर्जयमाने अधातां वसुवने वसुधेयस्य वीतां यज ( मैत्रा० सं० ४।१३।८ ॥ तै० ब्रा० ३।६।१३ )**

**देवी ऊर्जाहुती देव्यौ ऊर्जाह्वान्यौ । अन्नं च रसं च आवहति अन्या । सहजग्धिं च सहपीतिं च अन्या । नवेन पूर्वं दयमानाः स्याम । पुराणेन नवम् । ताम् ऊर्जम् ऊर्जाहुती ऊर्जयमाने अधातां वसुवननाय वसुधानाय च । वीतां पिबेताम् । कामयेतां वा । यज इति संप्रैषः । यज इति संप्रैषः**

देवी ऊर्जाहुती = देव्यौ ऊर्जाह्वान्यौ; देवी ऊर्जाहुती हें भाष्यांत घालण्याचें कारण नाहीं. इषं = अन्नम्; इषं = अन्नादि (दुर्ग). ऊर्जं = रसं = तदुपसेचनं क्षीरादि (दुर्ग) = अन्नांत घालावयाचें दूध वगैरे. आवक्षत् = आवहति; महाराष्ट्रपाठ आवहति आवहति असा आहे. सग्धिं = सहजग्धिं = (अमक्याच्या) सह खाणें; सग्धिं = स + ग्धिं; स = सह; ग्धिं = जग्धिम्; घस् ( = खाणें) + धिः = ग्धिः. सपीतिं = सहपीतिम्. सहजग्धिं बद्दल सहसग्धिं व सहपीतिं बद्दल सहसपीतिं असे गुर्जरपाठ आहेत; पण ते चुकीचे आहेत; दुर्गवृत्तींत सहजग्धिं व सहपीतिं हे शब्द नाहींत. एका उपनामितस्यान्नस्य सगुणस्य सग्धिं सपीतिम् अन्या सहभोजनं बन्धुभिः इति आवक्षत् (दुर्ग) = एक देवी क्षीर वगैरे ज्यांत घातलें आहे, अशा वाढलेल्या अन्नाचें संबंध्यांसह भोजन आणते व दुसरी त्याच्याबरोबर सहपान आणते; येथें दुर्गानें कांहींसा घोटाळा केला आहे; ह्या दोघींपैकीं एक अन्न व अन्नावर घालण्याकरितां दूध वगैरे आणून देते व दुसरी त्या अन्नाचें बंधूसह भोजन आणि त्या रसाचें बंधूसह पान आणते असा अर्थ आहे. तथा च बह्वन्नमस्तु यथा नवेन पूर्वं पुराणं दयमानाः रक्षन्तः स्याम (दुर्ग) = इतकें पुष्कळ धान्य असो कीं नव्या धान्यानें जुन्या धान्याचें आम्ही रक्षण करूं; जुनें धान्य पेरल्यानें नवें धान्य उत्पन्न होतें; तें पुष्कळ असावें अशी इच्छा. पुराणेन नवं = पुराणेन च नवं (दुर्ग) = व जुन्यापासून नवें (धान्य आम्ही रक्षण करूं म्हणजे मिळवूं); जुनें धान्य नसेल तर नवें धान्य कोठून येणार? जुन्यापासूनच नव्याची उत्पत्ति. ऊर्जयमानं = बलवतीम् ऊर्जतां कुर्वाणे (दुर्ग) = पुष्कळ धान्यसमृद्धि करणाऱ्या. वसुवने वसुधेयस्य वीतां यज (खंड ४२ पहा). यज इति संप्रैषः ह्याची द्विरुक्ति अध्याय संपला

हें दाखविण्याकरितां. यास्कानें केलेला अर्थः— धान्य उत्पन्न करणाऱ्या ह्या दोन देवतांपैकीं एक अन्न व त्यावर घालण्याचा क्षीरादि रस आणून देते व दुसरी संबं-ध्यांसह त्या क्षीरादियुक्त अन्नाचें भोजन व पान आणून देते; नव्या धान्यानें जुन्याचें व जुन्यानें नव्याचें रक्षण करणारे आम्ही होऊं; पुष्कळ धान्यसमृद्धि करणाऱ्या त्या ऊर्जाहुतीदेवता आम्हांस पुष्कळ अन्न देवोत. वसुवननाय० यज इति संप्रैषः ह्याचें भाषांतर ४२ व्या खंडांत दिलें आहे. इष् = ऊर्ज् = धन; ऊर्जाहुती = उर्जयमाने = धन देणाऱ्या; ऊर्जः धनस्य आहुतिः दानं याभ्यां क्रियते ते ऊर्जाहुती. ताम् उर्जं = उपचीयमानबहुविधनवपुराणधान्यपूर्णां = वाढणाऱ्या, नानाप्रकारच्या जुन्या व नव्या धान्यानें भरलेलें म्हणजे युक्त असें अन्न; उर्जयमाने = संपादयन्त्यौ = संपादन करणाऱ्या; असें ताम् ऊर्जम् उर्जयमाने ह्याचें सायणाचार्य विवरण करतात.

# अध्याय १० वा.

## खंड १ ला.

**अथ अतः मध्यस्थानाः देवताः। तासां वायुः प्रथमागामी भवति। वायुः वातेः। वेतेः वा स्यात् गतिकर्मणः। एतेः इति स्थौलाष्ठीविः। अनर्थकः वकारः। तस्य एषा भवति**

आतां यापुढें मध्यम म्हणजे अन्तरिक्ष त्यांतील देवता येणार आहेत; त्यांपैकीं वायु हा पहिला येतो म्हणजे आहे. वायु हा शब्द वा ( = वाहाणें ) यापासून; वा + युः = वायुः = वाहणारा; यु हा नामकरण प्रत्यय; किंवा वी ( = जाणें ) यापासून तो झाला असेल; वी + उः = वै + उः = वाय् + उः = वायुः = जाणारा; वायु शब्द इ ( = जाणें ) यापासून झाला आहे असें स्थौलाष्ठीवि म्हणतो; एति असौ आयुः; आयु ह्याला व हें निरर्थक अक्षर आरंभीं जोडलें आहे; व+आयुः = वायुः; आयु (=वायु) ह्याची व्युत्पत्ति पहा ( ९।३ पान ६४९ ). दुर्ग म्हणतोः—पाऊस पाडणें हें इन्द्राचें काम; तो अन्त रिक्षांतील पहिला देव; तेव्हां अन्तरिक्षांतील देवांमध्यें इन्द्र पहिला असें म्हणावयास पाहिजे होतें असें जर कोणी म्हणेल तर वायूनें जर पृथिवीवरून वाफेच्या रुपानें वर आलेलें पाणी धरून ठेविलें नाहीं व तसें करून जर तो वाहूं लागला नाहीं तर पाऊस कसा पडेल? तेव्हां वर्षकर्म हें सुद्धां वायूवर अवलंबून आहे म्हणून वायु हा पहिला; त्यालाच वरुण, रुद्र, इन्द्र व पर्जन्य अशीं नांवें दिलीं गेलीं आहेत; वायु जेव्हां मेघांनीं आकाश आच्छादून टाकतो तेव्हां तो वरुण; जेव्हां तो पाऊस पाडतांना गडगडतो तेव्हां तो रुद्र; जेव्हां तो धान्य देतो तेव्हां तो इन्द्र व जेव्हां तो सर्व प्रकारचे रस उत्पन्न करतो तेव्हां तो पर्जन्य; अशी विद्वत्ता दुर्गानें प्रदर्शित केली आहे. अध्याय ७ खंड ५ यांत वायुः वा इन्द्रः वा अन्तरिक्षस्थानः असें म्हटलें आहे; पण येथें वायूलाच प्रथमस्थान कां दिलें आहे त्याचें कारण समजत नाहीं; कदाचित् मेघ जमविणें हें दुर्ग म्हणतो त्याप्रमाणें वायूचें काम असल्यामुळें त्यालाच अग्रस्थान दिलें असेल.

## खंड २ रा.

**वायवा याहि दर्शत इमे सोमा अरंकृताः।**
**तेषां पाहि श्रुधी हवम् ( ऋ० सं० १।२।१ )**

**वायो आयाहि दर्शनीय। इमे सोमाः अरंकृताः अलंकृताः। तेषां पिब। शृणु नः ह्वानम् इति**

वायवा याहि = वायो + आ + याहि = वायो आयाहि. दर्शत = दर्शनीय = पाहण्यास योग्य म्हणजे सुंदर. अरंकृताः=अलंकृताः; अलंकृताः पर्याप्ताः अरंकृताः पातुं संस्कृताः ( दुर्ग ) = अरंकृत म्हणजे पुरेसे तयार केलेले ( पर्याप्ताः ) व पिण्याला बरो-

वर तयार केलेले ( अलंकृताः ); अलं = पुरेसा; अलंकृत = पाणी व दूध ह्यांनीं सजविलेला; सोमरसाचा काळा रंग पाणी व दूध हे पदार्थ मिसळल्यानें नाहींसा होतो आणि त्याच्या जागीं पांढरा शुभ्र रंग येतो व अशारीतीनें सोम सजविला जातो; यास्काच्या मनांत ह्यांपैकीं कोणता अर्थ होता किंवा दोन्हीही होते हें कळत नाहीं. पाहि = पिब. श्रुधी = श्रुधि = शृणु. हवं = ह्वानं = बोलावणें, निमंत्रण. नः अध्याहृत. शेवटीं इति कां घातला? दुर्गानें केलेला अर्थः—हे सुंदर वायु, ये; हे सोम पुरेसे व पाणी आणि दूध ह्यांनीं सजविलेले असे तयार केले आहेत; त्यांतून आपला भाग पी; आमचें निमन्त्रण ऐक.

**कम् अन्यं मध्यमात् एवम् अवक्ष्यत्**

ऋषीनें ह्या ऋचेंत अंतरिक्षांतील जो मुख्य देव त्याच्याहून कोणता भिन्न देव अशा रीतीनें वर्णिला असेल? दुर्ग म्हणतोः—वायु सर्वत्र म्हणजे तिन्ही लोकीं आहे; पण एथें अंतरिक्षांतील वायु म्हणजे इंद्र घ्यावयाचा; कारण सोम हा नेहमीं इंद्राकरितांच तयार केला जातो; वायु म्हणजे इंद्र हें पुढील खंडांतील ऋचेवरून स्पष्ट होतें. पण दुर्गाचें हें म्हणणें कांहींसें विसंगत वाटतें; कारण वायूलाच निरनिराळ्या कार्यांमुळें वरुण,रुद्र,इंद्र व पर्जन्य अशीं नांवें दिलीं जातात असें ह्याच्या आधींच्या खंडांत(पान७२९) तो म्हणतो; कदाचित् अंतरिक्षांतील वायूला इंद्र म्हणतात असें त्याचें मत असेल. वायूला दर्शत म्हणजे सुंदर म्हटलें आहे; पण वायु हा अदृश्य; तेव्हां तो सुंदर आहे असें कसें म्हणतां येईल?ही शंका लक्षांत घेऊन वायु म्हणजे इंद्र असा दुर्गानें अर्थ केला असावा. दर्शत हें विशेषण अग्नि, उषा, सूर्य व सोम यांना लाविलेलें आढळतें; हे सर्व तेजस्वी आहेत. रुशन्तम् अग्निं दर्शतम् ( ६।१।३ ), दर्शतश्रीः अग्निः ( १०।९१।२ ), उषाः दर्शता ( ५।८०।२ ), दर्शतायाः उषसः ( ७।७५।३ ), सूर्यासो न दर्शतासः ( ९।१०१।१२ ), सोमः दर्शतः। सं सूर्येण रोचते ( ९।२।६ ) या उताऱ्यांत दर्शत म्हणजे तेजस्वी; पण वायूला तेजस्वी असें कसें म्हणतां येईल? ध्राजिः एकस्य ददृशे न रूपम् ( १।१६४।४४ ) = एकाचा म्हणजे वायूचा जोराचा वेग कळतो; पण त्याचें रूप दिसत नाहीं. वायूला दर्शत म्हणणें बरोबर नाहीं; याला कवि उत्तर देतो; तुम्हांला ऋचेचा अर्थ कळला नाहीं; तो मी सांगतो. वा ( = देणें ) + युः = दाता; वायो = हे दात्या. आ=धन. या=देणें; याहि=दे. हे दात्या (वायो), धन (आ) दे (याहि). दर्शत = (१) तेजस्वी, (२) धनानें युक्त; दर्श=(१) झळझळीत, (२) लखलखणारें सोन्यारुप्यासारखें धन; तें आहे ज्याच्याजवळ किंवा तें जो देतो तो दर्शत; दर्शत वायो = हे धनवंता दात्या. श्रेष्ठं वः पेशो अधि धायि दर्शतम् ( ४।३६।७ ) = हे रुहूंनो, तुम्हांला अत्युत्तम व सुंदर असें रूप दिलें आहे; हा वरचा अर्थ; रुहूंची ख्याति रूपाबद्दल नसून धनाबद्दल आहे; हे रुहूंनो, तुम्हांला अतिशय ( श्रेष्ठं = दर्शतं ) धन ( पेशः ) दिलें आहे ( अधि धायि ). चित्रा रूपाणि दर्श्या ( ५।५२।११ ); चित् = रूप = दर्श = धन; चित्रा = चित्राणि = धनयुक्त; रूपाणि = धनानि; दर्श्या = दर्श्यानि=दर्शयुक्तानि=धनयुक्तानि; अतिशय धन असा या तीनही शब्दांचा

अर्थ. सु ( = देणें ) + मः = सोमः = दान, धन. अग्ने युक्ष्वा हि ये तवाश्वासो देव साधवः । अरं वहन्ति मन्यवे ( ६।१६।४३ ) = हे देव अग्नि, तुझे जे उत्तम घोडे आहेत ते रथाला जोड; ते सोम पिण्याकरितां ( मन्यवे ) जिकडे तुला जावयाचें असेल तेथपर्यंत ( अरं ) तुला नेतात; हा वरचा अर्थ; अग्नीसारख्या तेजस्वी ( अग्ने ) हे दात्या ( देव ), धन ( हि ) दे ( युक्ष्व ); धनवंत ( अश्वासः = साधवः ) लोक तुझ्या ( तव ) खजिन्यांत ( मन्यवे ) अतिशय धन ( अरं ) देतात ( वहन्ति ); अरं=अतिशय धन. अरंकृताः = अतिशय धनानें युक्त = अतिशय; इमे सोमाः अरंकृताः = किती तरी धन तुजजवळ आहे ! पा = देणें; पाहि = दे; तेषां सोमानां धनानां तानि धनानि पाहि देहि = तें सर्व धन आम्हांला दे. श्रु = देणें; श्रुधि = दे. हु = देणें; हव = दान, धन. हवं श्रुधि = धन दे. असा गूढ अर्थ आहे. ऋचेंतील प्रत्येक शब्द द्व्यर्थी आहे.

**तस्य एषा अपरा भवति**

वायु म्हणजे इंद्र या अर्थाची पुढील ऋचा होय.

## खंड ३ रा.

**आसस्राणासः शवसानमच्छेन्द्रं सुचक्रे रथ्यासो अश्वाः ।**

**अभि श्रव ऋज्यन्तो वहेयुर्नू चिन्नु वायोरमृतं विदस्येत् ( ऋ० सं० ६।३७।३)**

**आससृवांसः अभिबलायमानम् इन्द्रं कल्याणचक्रे रथे योगाय रथ्याः अश्वाः । रथस्य वोढारः । ऋज्यन्तः ऋजुगामिनः अन्नम् अभिवहेयुः । नवं च पुराणं च । श्रवः इति अन्ननाम । श्रूयते इति सतः**

आसस्राणासः = आससृवांसः = जवळ जाणारे; सृ अभ्यासानें ससृ; ससृ + आन = सस्राण = हलणारा; आ = जवळ. शवसानम् अच्छ = अभिबलायमानं = अधिकबलम् आत्मानं मन्यमानं ( दुर्ग ) = आपल्याला शत्रूपेक्षां जास्त बल आहे असें मानणाऱ्याला. शवसान, मन्दसान, गृणसान, ऋञ्जसान वगैरे शब्द धातूला सान हा प्रत्यय लावून झाले आहेत; शव् ( =बलाचीं कृत्यें करणें ) + अ + स् + आन = शवसान. अच्छा = अभि = अधिक (दुर्ग). सुचक्रे = कल्याणचक्रे = ज्याचीं चाकें चांगलीं आहेत अशा रथांत. रथे अध्याहृत. रथ्यासः = रथ्याः = रथस्य वोढारः = रथ ओढणारे. अश्वाः = घोडे. योगाय (अध्याहृत) = रथाला जोडून घेण्याकरितां; इन्द्रानें आपल्याला रथाला जोडावें म्हणून त्याच्याकडे जाणारे ( आससृवांसः ). ऋज्यन्तः = ऋजुगामिनः = सरळ जाणारे; ऋज् = सरळ जाणें; ऋज्यन् = सरळ जाणारा. अभिवहेयुः= अन्नाकडे नेवोत. नू = नवं = अगदीं नवीन; चित् = पुराणं = जुनें; नू चित् पुराणनवयोः ( ४।१७ ); नवें ( नू ) व जुनें ( चित् ) अन्न. श्रवः = अन्नम् (निघण्टु २।७।४ ); जेव्हां अन्नाची ख्याति होते ( श्रूयते ) तेव्हां ( इति सतः ) त्याला श्रवः असें नांव पडतें.

**वायोः च अस्य यथा भक्षः न विदस्येत् इति**

नु वायोः अमृतं विदस्येत् = वायोः च अस्य यथा भक्षः न विदस्येत् इति = या वायूचा भक्ष (अमृतं) जेणेंकरून क्षीण होणार नाहीं म्हणजे कमी होणार नाहीं (नु विदस्येत्) म्हणून (इति) हे घोडे इंद्राला आमच्याकडे घेऊन येवोत. अमृतं = भक्ष; नु = न. च, अस्य व यथा हे शब्द अध्याहृत; दुर्गवृत्तींत च नाहीं व तो निपात नको आहे; कारण वायु म्हणजे इन्द्र असें यास्काला दाखवावयाचे आहे; या वायूचा म्हणजे इन्द्राचा भक्ष बिघडूं नये म्हणून घोडे त्याला लौकर घेऊन येवोत. यास्क व दुर्ग यांनीं केलेला अर्थः– आपल्याला इन्द्रानें रथाला जोडावें म्हणून (योगाय) त्याच्याकडे जाणारे (आसस्राणासः), रथ ओढणारे (रथ्यासः) व सरळ जाणारे (ऋज्यन्तः) घोडे (अश्वाः) आपण बलानें अतिश्रेष्ठ आहों असें मानणाऱ्या (अभिबलायमानं) इन्द्राला चांगल्या चाकांच्या रथांत (सुचक्रे) घालून आमच्या या नव्या (नू) व जुन्या (चित्) अन्नाकडे (श्रवः अभि) घेऊन येवोत (वहेयुः); तें इतक्या लगबगीनें कीं या (अस्य) वायूचा (वायोः) म्हणजे इन्द्राचा भक्ष (अमृतं) विलंब लागल्यामुळें कमी होऊं नये (नु विदस्येत्).

**इन्द्रप्रधाना इति एके। नैघण्टुकं वायुकर्म। उभयप्रधाना इति अपरम्**

या ऋचेची मुख्य देवता इन्द्र आहे व वायूसंबंधानें जें कांहीं म्हटलें आहे (वायुकर्म) तें गौण (नैघण्टुकं) आहे असें कांहींजण म्हणतात; पण इन्द्र व वायु या दोन्हीही मुख्य देवता आहेत असें दुसरें मत आहे; दुर्गवृत्तींत अपरंबद्दल अपरे आहे व तोच शब्द योग्य दिसतो; कारण एके असा आधीं शब्द आला आहे. जर ऋचेच्या देवता इन्द्र व वायु ह्या दोन्हीही असतील तर वायोः च अस्य असे शब्द योग्य होतील; वायोः च अस्य = इन्द्राचा व या वायुचा; सोमभक्ष दोघांनाही द्याव-याचा आहे म्हणून दोघेही मुख्य. सृ गतौ (धातुपाठ १।९६० ) हा अर्थ अर्वाचीन आहे. ऋग्वेदांत सृ = (१) वाहाणें, (२) धांवणें, (३) देणें असे अर्थ आहेत. (१) अवासृजः सर्तवे सप्त सिंधून् (१।३२।१२) = हे इंद्रा, वाहण्यासाठीं (सर्तवे) तूं सात सिंधूंना मोकळें केलेस; त्वं वृथा नद्य इंद्र सर्तवे अच्छा समुद्रमसृजो रथान् इव वाजयतः (२।१२।१२) = लुट आणणाऱ्या रथांना जसा कोणी जोरानें हांकलीत नेतो त्याप्रमाणें, हे इन्द्रा, समुद्राकडे जाण्याकरितां तूं नद्यांना वहावयास लाविलेंस. (२) सद्यो जंघाम् आयसीं विश्पलायै धने हिते सर्तवे प्रत्यधत्तम् (१।११६।१५) = हे अश्विनांनो, शर्यतींत विश्पलेची जेव्हां तंगडी तुटली तेव्हां तिला पळतां यावें म्हणून तुम्ही तिला लोखण्डी तंगडी दिलीत; ससार सीं परावतः (४।३०।११) = (जेव्हां इंद्रानें उषेचा रथ चुरडून टाकला तेव्हां) ती स्वर्गाकडे पळत गेली; (१ व २) अत्यान् इव प्रासृजः सर्तवाजौ (५।२९।२) = जसा कोणी शर्यतींत पळण्यासाठीं घोडे सोडतो त्याप्रमाणें तूं नद्यांना वहाण्यासाठीं सोडलेंस. (३) दस्रा ह यद्रेक्ण औचथ्यो वां प्र यत्सस्राथे अकवाभिरूती (१।१५८।१) = हे

दात्या अश्विनांनो, तुम्ही आपल्या अपार धनांतून ( अकवाभिः ऊति ) जें ( यत् ) धन ( रेक्णः ) दिलेंत ( प्र + ससाथे ) तें औचथ्य घेता झाला; वाजे वाजे सरी भव ( १।१३८।३ ) = हे पूषा, लढाईच्या प्रत्येक लुटींत तूं दाता ( सरी ) हो; उतो त्वस्मै तन्वं वि सस्रे जायेव पत्ये उशती सुवासाः ( १०।७१।४ ) = सुंदर वस्त्रें नेसलेलीं, कामोत्सुक ( उशती ) तरुणी जशी नवऱ्याला स्वतःला देते म्हणजे अर्पण करते त्याप्रमाणें विद्या स्वतःला विद्वानालाच देते म्हणजे ती त्याची सर्वस्वी होते. सस्राणासः = ( १ ) पळणारे, ( २ ) धन देणारे. रथ्यासः = ( १ ) रथाला जुंपलेले, ( २ ) रथ म्हणजे धन त्यानें युक्त, धनवान्. अश्वाः = ( १ ) घोडे, ( २ ) दाते; अश् ( = देणें ) + वः = अश्वः = दाता किंवा धन. अभि = ( १ ) कडे, (२) अ = भि = धन; अभि = धनयुक्त, धनानें पूर्ण. श्रवः = ( १ ) हवि, ( २ ) धन. ऋज् = ( १ ) धांवणें, ( २ ) धन देणें किंवा धन; अभि द्विजन्मा त्रिवृत् अन्नम् ऋज्यते ( १।१४०।२ ) = अग्नि ( द्विजन्मा ) पोषक ( त्रिवृत् ) अशा अन्नाकडे ( अन्नम् अभि ) धांवत जातो ( ऋज्यते ). ऋज् धनं यच्छति असौ ऋज्यन्; ऋज्यन्, ऋज्यन्तौ, ऋज्यन्तः; ऋज्यन्तः = ( १ ) धांवणारे, ( २ ) धन देणारे. शवसानं = ( १ ) बलयुक्त अशाला, ( २ ) धनयुक्त अशाला; वज्रेणान्यः शवसा हन्ति वृत्रं = त्यांपैकीं एक म्हणजे इंद्र बलानें वृत्रावर वज्र हाणून त्याला ठार करतो; शवसा = बलानें; शवसानाय० नरे विश्रुताय ( १।६२।१ ) = बलिष्ठ ( शवसानाय ) व प्रख्यात ( विश्रुताय ) अशा योद्ध्याला ( नरे ). ता सानसी शवसाना हि भूतं साकंवृधा शवसा शूशुवांसा = हे इंद्राग्नि, धनयुक्त ( साकंवृधा = शवसाशूशुवांसा ) असे तुम्ही धनदाते ( सानसी = शवसाना ) व्हा; शूशुवांसा = शूशुवांसौ = समृद्ध झालेले; कशानें ? शवसा = धनानें; शवस् = ( १ ) बल, ( २ ) धन; शवस् + आन = शवसान. सुचक्रे = (१) चांगल्या चक्रांनीं युक्त अशा रथांत, (२) सु = धन; क्र = देणें; चक्र = दान किंवा धन; सुचक्रे=पुष्कळ धनांत म्हणजे धनभांडारांत. इन्द्र =(१) इंद्र, (२) इन्द् (=देणें)+रः=इंद्र = दाता किंवा धन. वह् = (१) नेणें, (२) देणें; वहेयुः=(१) नेवोत, (२) देवोत. अच्छा=अभि = कडे (५।२८); ह्या अर्थाखेरीज चांगल्या रीतीनें, ताबडतोब व खालीं असें आणखी अर्थ अच्छ ह्याचे आहेत; वद्, वच्, वगैरे धातूंना अच्छ हा निपात लाविल्यास त्याचा चांगले, चांगल्या रीतीनें असा अर्थ होतो; (१) अच्छा वदा० गिरा० ब्रह्मणस्पतिम् ( १।३८।१३ )= ब्रह्मणस्पतीला स्तुतीनें चांगल्यारीतीनें बोल म्हणजे त्याची स्तुति कर किंवा त्याची विनवणी कर; अच्छा विवक्मि रोदसी ( ३।५७।४ ) = द्यावापृथिवींना मी विनंति करतों; प्र सिन्धुमच्छा बृहती मनीषा अवस्युः अह्वे कुशिकस्य सूनुः ( ३।३३।५ ) = मी कुशिकाचा मुलगा मोठ्या ( बृहती ) स्तुतीनें ( मनीषा ) सिन्धूला उच्चरवानें ( प्र ) विनंती करतों ( अच्छा अह्वे ). (२) अच्छा मे इंद्र मतयः ० उशतीरनूषत ( १०।४३।१ ) = कामोत्सुक ( उशतीः ) अशा माझ्या स्तुति इंद्राला लगबगीनें ( अच्छा ) कवटाळतात

( अनूषत ). (३) अत आ याहि अध्वरं नो अच्छा ( १।१०१।८ ) = हे इंद्रा, तेथून म्हणजे द्युलोकांतून आमच्या यज्ञाप्रत खालीं ( अच्छा ) ये ( आयाहि ); एथें लगबगीनें असाही अर्थ होईल; अच्छा सुम्नाय ववृतीय देवान् ( १।१८६।१० ) = माझें स्तोत्र ऐकण्याकरितां देवांना मी खालीं ( अच्छ ) वळवून आणीन ( आ ववृतीय ); गंता यज्ञं परावतश्चिदच्छा ( ६।४४।१५ ) = माझ्या यज्ञाला द्युलोकांतूनही ( परावतः चित् ) म्हणजे किती दूर असलां तरी खालीं किंवा लगबगीनें या ( आगन्त ). प्रस्तुत ऋचेंत लगबगीनें असा अर्थ असावा. ऋचेचा अर्थः—रथाला जुंपलेले ( रथ्यासः ), धांवत सुटलेले ( सस्राणासः = ऋज्यन्तः ) घोडे ( अश्वाः ) चांगल्या रथांत ( सुचक्रे ) बसलेल्या बलिष्ठ ( शवसानं ) इंद्राला ( इंद्रं ) आमच्या हवीकडे ( श्रवः अभि ) लगबगीनें ( अच्छ ) आणोत ( आवहेयुः ). नू चित् = न एव = नाहींच नाहीं, कधींही नाहीं; नू चित् याचे एकाहून अधिक अर्थ आहेत; ते उदाहरणें देऊन स्पष्ट रीतीनें सांगितलें आहेत ( ४।१७ ). यं रक्षन्ति प्रचेतसो वरुणो मित्रो अर्यमा। नू चित् स दभ्यते जनः ( १।४१।१ ) = वरुण, मित्र व अर्यमन् हे सर्वज्ञ देव ज्याचें रक्षण करितात त्या मनुष्याला उपद्रव कधींही होत नाहीं किंवा व्हावयाचाच नाहीं; अथैनोः क्षत्रं न कुतश्चनाधृषे देवत्वं नू चिदाधृषे ( १।१३६।१ ) = मित्र व वरुण यांच्या बलावर किंवा धनावर कधींही व कोठूनही हल्ला होत नाहीं. नू चिन्नु वायोः अमृतं विदस्येत् = हवि ( अमृतम् ) वाऱ्यामुळें ( वायोः ) म्हणजे वारा किंवा हवा लागून कमी होणार नाहींच नाहीं ( म्हणजे हवेनें तो वाळून जाणार नाहीं ); घोड्यांनीं इन्द्राला आमच्या हवीकडे लगबगीनें आणल्यास तो हवि त्याला अगदीं ताजा ताजा मिळेल; त्याच्यांत कोणत्याही प्रकारचा बिघाड होणार नाहीं. दस् = कमी होणें, बिघडणें; जसें:—पूर्वीः इन्द्रस्य रातयः न वि दस्यन्ति ऊतयः ( १।११।३ ) = इन्द्रानें दिलेलें अमूप ( पूर्वीः ) धन ( रातयः = ऊतयः ) कमी होत नाहीं ( वि दस्यन्ति ); सनादेव तव रायो गभस्तौ न क्षीयन्ते नोप दस्यन्ति दस्म ( १।६२।१२ ) = हे दात्या ( दस्म ), तुझ्या हातांत ( गभस्तौ ) नेहमींच ( सनादेव ) धन ( रायः ) असतें; तें कधींही कमी होत नाहीं ( क्षीयन्ते = उपदस्यन्ति ); तत्ते सहस्व ईमहे दात्रं यन्नोपदस्यति ( ८।४३।३३ ) = हे धनवन्ता ( सहस्वः ), आम्ही तुजपाशीं तें दान ( दात्रं ) मागतों ( ईमहे ) कीं जें कधींही कमी होत नाहीं. ऋचेचा दुसरा अर्थः—धन देणारे ( सस्राणासः = ऋज्यन्तः ) धनवान् ( रथ्यासः ) दाते ( अश्वाः ) आमच्या धनभांडारांत ( सुचक्रे ) अमूप ( शवसानं = अच्छेन्द्रं = अभि ) धन ( श्रवः ) देवोत ( आ वहेयुः ) इतकें कीं तें दात्याचें ( वायोः ) म्हणजे दात्यानें दिलेलें धन ( अमृतं ) कधींही कमी होणार नाहींच नाहीं. नू चित् = कधींही नाहीं; नु = खात्रीनें; विदस्येत् = कमी होईल. स नः पृथु श्रवाय्यम् अच्छा देव विवाससि। बृहत् अग्ने सुवीर्यम् ( ६।१६।१२ ) = हे देव अग्नि, तो तूं आम्हांस पुष्कळ धन देतोस ( वासासि ); पृथु = बृहत् = पुष्कळ; श्रवः धनं

तेन युक्तं श्रवाय्यं = धनानें भरलेलें; सु धनं तेन युक्तं वीर्यं धनं = पुष्कळ धन; वि = धन; अद् = शा = देणें किंवा दान किंवा धन; अद् + शा = अच्छा = पुष्कळ धन; अच्छा = अच्छया = पुष्कळ धनांतून; अग्नि हा धनवान् ( देव ) असल्यामुळें भक्तांना पुष्कळ धन देतो. प्रस्तुत ऋचेंत अच्छेंद्रं = अद् + शा + इंद्रं = अतिशय धनानें भरलेलें; अच्छेंद्रं हें श्रवः ह्याचें विशेषण. त्वमग्ने द्युभिः त्वमाशुशुक्षणिः ( २।१।१ ); यास्क व सायण द्युभिः = दिवसांनीं असा अर्थ करतात व जायसे हें क्रियापद अध्याहृत घेतात; परंतु हे अग्ने त्वं द्युभिः असि । त्वम् आशुशुक्षणिः असि असा अन्वय असून द्युभिः आणि आशुशुक्षणिः हीं त्वं ह्याचीं विशेषणें आहेत; दोहोंचा अर्थ धनवान्; द्यु = भि = धन; द्युभिः = अतीशय धनवान्. प्रस्तुत ऋचेंत अभि = अतिशय धनानें युक्त असा अर्थ आहे; अ = भि = धन. ऋचेचे दोन अर्थ आहेत यांत संशय नाहीं; दुसरा अर्थ हाच कवीच्या मनांतला खरा अर्थ.

वरुणः ( २ ) वृणोति इति सतः । तस्य एषा भवति

वृ ( = आच्छादणें ) यापासून वरुण; वृ + उनः = वरुणः; जसें धृ + उनः = धरुणः; वय् + उनं = वयुनम्. वृणोति इति सतः वरुणस्य वरुणः इति संज्ञा भवति=जेव्हां वरुण आकाशाला मेघांनीं झांकून टाकतो तेव्हां त्याला वरुण म्हणतात

## खंड ४ था.

**नीचीनबारं वरुणः कवन्धं प्र ससर्ज रोदसी अन्तरिक्षम् । तेन विश्वस्य भुवनस्य राजा यवं न वृष्टिर्व्युनत्ति भूम ( ऋ० सं० ५।८५।३ )**

**नीचीनद्वारं वरुणः कवन्धं मेघम् । कवनम् उदकं भवति । तत् अस्मिन् धीयते । उदकम् अपि कबन्धम् उच्यते । बन्धिः अनिभृतत्वे । कम् अनिभृतं च**

नीचीनबारं = नीचीन + बारम्; बारं = द्वारम्; द्वारं यांतील द् जाऊन वारं रहातें व वारं मधील व् चा ब् होतो; जसें द्वे याचें रूपान्तर बे किंवा द्वा याचें बा तसें द्वार याचें रूपान्तर बार; द्वाविंशतिः = बावीस; कित्येक लोक बेवीस असेंही म्हणतात. खालीं ( नीचीन ) आहे द्वार ( बारं ) ज्याचें तो नीचीनबार मेघ; नीचीनाः स्थुः उपरि बुध्न एषाम् ( १।२४।७ ) = हे मेघ म्हणजे या मेघांचीं तोंडें खालीं असतात व त्यांचा तळ म्हणजे अधोभाग वर असतो; बुधल्यांतील तेल ओतावयाचें असतें तेव्हां त्याचें तोंड खालीं करावें लागतें व बूड वरतीं करावयाचें असतें; मेघ हा एकप्रकारचा बुधला; पाऊस पडण्याच्या वेळीं मेघाचें तोंड खालीं होतें अशी कल्पना. कवंधं = मेघम्; कवंधं = कवन् + धम्; कवन् = कवनं = उदकम्; धं = धीयते; ज्यांत पाणी ठेविलें असतें तो कवंध म्हणजे मेघ. कुङ् शब्दे ( धा० १।९७६ ); पाणी वाहतांना आवाज करतें म्हणून तें कवन; कु जाणें ह्यापासून कवन असें दुर्ग म्हणतो. कवन शब्द अमरांत नाहीं पण तो आपटयांच्या कोशांत दिला आहे;

कोणत्या ग्रंथांत तो शब्द आढळतो तें कोशकारांनीं सांगावयास पाहिजे होतें; बहुत-करून निरुक्तांतूनच तो घेतला असावा. तत् अस्मिन् धीयते=तें (पाणी) ह्याच्यांत (मेघांत) ठेविलें असतें म्हणून मेघाला कवन्ध नांव पडलें. गुर्जरपाठांत तत् बद्दल कं (=पाणी) असा शब्द आहे; परंतु यास्क कवनम् उदकं असें म्हणतो, कम् उदकं असें म्हणत नाहीं. उदकालासुद्धां कबंध म्हणतात; कबन्धं = क + बन्धम्; क =कं = उदक; बन्धिः म्हणजे बन्ध् धातु; त्याचा अर्थ अनिभृत; निभृत = अचपल, स्थिर; अनिभृत = चपल, चंचल; कं = सुखं = सुख देणारें; बन्ध = अनवस्थायि (दुर्ग) = स्थिर नसणारें म्हणजे वाहणारें; पाणी सुख देतें व वाहतें. कमनीयञ्च तत् बन्धं च । यद्वा । कं सुखं बध्नाति स्नानपानादिना । बवयोः अविशेषात् बकारस्य वकारः (देवराज) = सुखकर (कं) व चंचल (बंधं = अनिभृतं) असें कबन्ध म्हणजे उदक; किंवा स्नानपान वगैरेनें जें सुख बांधतें म्हणजे देतें तें कबंध; बकार व वकार ह्यांची अदलाबदल होते म्हणून येथें ब च्या जागीं व येऊन कवंध शब्द झाला. दुर्गाच्या लेखी प्रतींत कवन्ध व कबध्न असा दोन्ही तऱ्हेनें तो शब्द लिहिला आहे; गुर्जरपाठ बहुतेक कबंध व महाराष्ट्रपाठ कवन्ध असा आहे. निघंटूंत कवंध म्हणजे उदक एवढाच अर्थ आहे; यास्कानें मेघ असा अर्थ प्रथम देऊन नंतर निघंटूला अनुसरून उदक असा अर्थ दिला आहे. बन्ध बन्धने (धा० ९।३६) ह्यावरून बंध म्हणजे स्थिर असा अर्थ असला पाहिजे. बन्ध म्हणजे चंचल याला आधार काय?

**प्रसृजति द्यावापृथिव्यौ च अन्तरिक्षं च महत्त्वेन। तेन सर्वस्य भुवनस्य राजा यवम् इव वृष्टिः व्युनत्ति भूमिम्। तस्य एषा अपरा भवति**

प्रससर्ज = प्रसृजति = वेगानें सोडतो, वेगानें पाण्याचा वर्षाव करतो; दुसऱ्या अर्धांत व्युनत्ति हा वर्तमानकाळ असल्यामुळें प्रससर्ज याचा पर्याय म्हणून प्रसृजति हें वर्तमानकाळचें रूप घातलें आहे; प्रसृजति याचा अर्थ दुर्ग देत नाहीं रोदसी = द्यावापृथिव्यौ. दोन च व महत्त्वेन अध्याहृत. उदकं प्रसृजति महत्त्वेन। द्यावापृथिव्यौ च अन्तरिक्षं च महत्त्वेन सर्वम् आपूरयिष्यन् इव (दुर्ग) = द्यावापृथिवी व अंतरिक्ष या सर्वांना भरून टाकण्याच्या मोठ्या इच्छेनें वरुण पाणी खालीं सोडतो; सर्व सृष्टि पाण्यानें भरून टाकण्याचें महत्त्व म्हणजे सामर्थ्य वरुणांत आहे. तेन = अशा खालीं सोडलेल्या पाण्यानें. विश्वस्य = सर्वस्य. न = इव. भूम = भूमिम्. ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थः– मेघाला (कवन्धं) अधोमुख (नीचीनबारं) करून अन्तरिक्षांतील मध्य देव जो वरुण तो द्यावापृथिवी व अन्तरिक्ष यांना डबडबून टाकण्याच्या महेच्छेनें मेघांतील पाणी खालीं सोडतो; जसा शेतकरी (वृष्टिः) थोडेसें धान्य मोटेच्या पाण्यानें भिजवितो तसा सर्व भुवनाचा राजा वरुण भूमीला ह्या पावसाच्या पाण्यानें चिंब भिजवितो (वि + उनत्ति). सायणः– वरुण मेघाला किंवा त्यांतील पाण्याला तें द्यावापृथिवी व अन्तरिक्ष यांच्यांत पडावें म्हणून अधोमुख करता झाला

( प्रससर्ज ); वृष्टि म्हणजे पाणी शिंपडणारा शेतकरी धान्य उगवावें म्हणून जसा सर्व शेतभर पाणी पसरतो तसा सर्व प्राणिमात्रांचा राजा वरुण द्यावापृथिवी व अन्तरिक्ष ह्यांत सोडलेल्या पाण्यानें भूमीला भिजवून टाकितो; किंवा वृष्टि म्हणजे वरुण; कारण वरुण पर्जन्याचें रूप धारण करून पाऊस पाडतो; असा वृष्टि शब्दाचा अर्थ घेतल्यास पुरुष किंवा शेतकरी असा शब्द अध्याहृत घ्यावा; जसा ( न ) शेतकरी धान्याला ( यवं ) चिंब भिजवितो तसा वरुण भूमीला भिजवितो. प्रससर्ज = कृतवान् अथवा चकार = कर्ता झाला व वृष्टिः ह्याचे शेतकरी किंवा पाऊस पाडणारा वरुण असे ह्या शब्दांचे अर्थ सायणाचार्य करतात. न्यक् किंवा न्यच् ह्यापासून नीचीन; बार हा शब्द नीचीनबार व जिह्मबार या समासांतच आढळतो. सिञ्चन्ति० अवतम् उच्चाचक्रं० नीचीनबारम् ( ८।७२।१० ) = नीचीनबार व ज्याचा तळ वर आहे असा हौद ( अवतं ) म्हणजे हौदांतलें पाणी खालीं सोडतात; येथें मेघाला हौद म्हटलें आहे. सारघेव गवि नीचीनबारे ( १०।१०६।१० ); एथें नीचीनबारे हें गवि ह्याचें विशेषण; पण सारघौ ह्याचा अर्थ कळत नाहीं म्हणून नीचीनबारे गवि ह्याचाही अर्थ कळत नाहीं. परावतं नासत्यानुदेथाम् उच्चाबुध्नं चक्रथुः जिह्मबारम्। क्षरन्नापो न पायनाय राये सहस्राय तृष्यते गोतमस्य ( १।११६।९ ); सप्तबुध्नम् अर्णवं जिह्मबारम् अपोर्णुते इंद्र ईशान ओजसा ( ८।४०।५ ); नासत्यांनीं मेघाला स्वर्गाकडे ढकलून दिलें व जिह्मबार अशा त्या मेघाचा तळ त्यांनीं वर केला त्यामुळें त्यांतून पाणी भराभर पडूं लागलें व गोतमाची तहान भागली असा पहिल्या उताऱ्याचा अर्थ; ज्याला सात तळ आहेत अशा जिह्मबार अर्णवाला म्हणजे मेघाला बलवान् इंद्र जोरानें उघडता झाला असा दुसऱ्याचा अर्थ; दोन्ही ठिकाणीं बार म्हणजे द्वार असा अर्थ दिसत नाहीं; जिह्म म्हणजे उदक त्याला जो अडवून ठेवतो तो जिह्मबार; बार = वार; वृ (=अडविणें) ह्यापासून वार; तेव्हां नीचीनाः अपः वारयति असौ नीचीनवारः = खालीं जाणाऱ्या म्हणजे वाहणाऱ्या पाण्याला जो अडवून धरतो तो नीचीनवार किंवा नीचीनबार. न्यग्वातो अववाति न्यक्तपति सूर्यः। नीचीनम् अघ्न्या दुहे न्यक् भवतु ते रपः ( १०।६०।११ ) = वारा खालीं खालीं वाहत जातो; सूर्याचा ताप खालीं येतो; अंतरिक्षरूपी गाय खालीं वाहणारें दूध ( नीचीनं ) देते; हे रोग्या, तुझा रोग खालीं खालीं जावो; एथें नीचीनं = खालीं जाणारें उदक; तेव्हां नीचीनबारं ह्यांतही नीचीन ह्याचा तोच अर्थ असावा; वृत्र पाणी अडकवून ठेवतो असें पुष्कळ ठिकाणीं ऋग्वेदांत म्हटलें आहे; मेघ हाच वृत्र; तो पाण्याला अडवून ठेवतो. कवन्ध हा शब्द ऋग्वेदांत एकंदर तीनदां आला आहे व तीनही ठिकाणीं त्याचा मेघ असा अर्थ आहे. उत्सं कवन्धम् उद्रिणम् ( ८।७।१० ); कवन्धम् अव दर्षत् उद्रिणम् ( ९।७४।७ ); उद्रिणं हें कवन्धं व उत्सं ह्याचें विशेषण; उद्रिन् हें उत्स व अवत ह्यांना विशेषण म्हणून लावलेलें आढळतें; त्याचीं उद्री व उद्रिणं अशीं दोनच रूपें ऋग्वेदांत आहेत; उद्री = उदकानें भरलेला. नीचीनबारं = उद्रि-

णं असा अर्थ असण्याचा बराच संभव आहे. वार् = उदक; जसें:— अवतात् आ नीचात् उच्चा चक्रथुः पातवे वाः ( १।११६।२२ ) = खोल असलेल्या विहरींतून पिण्याकरितां उंचावर तुम्ही पाणी आणलेंत. दुहे यदेनी दिव्यं घृतं वाः ( १०।१२।३ ) व ईरते घृतं वाः ( १०।९९।४ ); घृतं = वार् = पाणी. नीचीनं वार् यस्मिन् सः नीचीनवाः; नीचीनवाः ह्याचें द्वितीयेचें एकवचन नीचीनवारम्; नीचीनवारं कवन्धं = खालीं वाहणारें पाणी आहे ज्यांत अशा मेघाला; वरुणानें अशा मेघांतील पाण्याला मोकळें केलें ( ससर्ज ). मूळचा उच्चार नीचीनवारम्; पण वारं याचा अर्थ न कळल्यानें बारं असा उच्चार केला गेला असेल; त्यामुळें द्वारं ह्याचा अपभ्रंश बारं अशी समजूत झाली असेल. सृज् = खालीं सोडणें, ओतणें, वहावयास लावणें, पळावयास लावणें, अस्त्र सोडणें, मोकळें सोडणें, बंध सोडणें व देणें असे अर्थ ऋग्वेदांत आहेत; करणें हा अर्थ कोठेंही नाहीं. प्रस्तुत ऋचेंत खालीं सोडणें, वहावयाला लावणें असा अर्थ आहे. सृजा मरुत्वतीरव जीवधन्या इमा अपः ( १।८०।४ ) = हे इंद्रा, पाणी ( अपः ) खालीं सोड ( अवसृज ). अपां प्रसर्गे यदमन्दिशाताम् ( ७।१०३।४ ) = जेव्हां दोन बेडूक पाऊस ( अपां ) पडत असतांना ( प्रसर्गे ) आनंद पावतात ( अमन्दिषातां ). वि पर्जन्यं सृजन्ति रोदसी अनु धन्वना यन्ति वृष्टयः ( ५।५३।६ ) = मरुत् रोदसीमध्यें ( रोदसी अनु ) पाऊस ( पर्जन्यं ) सोडतात ( विसृजन्ति ); वृष्टि अन्तरिक्षांतून धांवते. प्रस्तुत ऋचेंत वरुणः हा कर्ता; प्रससर्ज हें सकर्मक क्रियापद; त्याचें कवन्धं हें कर्म; या वाक्याशीं रोदसी अन्तरिक्षं या शब्दांचा अन्वय कसा करावयाचा तें लक्षांत येत नाहीं; दुर्ग द्यावापृथिव्यौ च अन्तरिक्षं च आपूरयिष्यन् इव असा अन्वय शेवटले दोन शब्द अध्याहृत घेऊन करतो; सायणाचार्य प्रति हा शब्द अध्याहृत घेतात. बहुतकरून प्र = मधून असा अर्थ असेल; रोदसी व अन्तरिक्ष यांच्यामधून वरुण मेघानें अडविलेलें पाणी खालीं सोडतो व तशा पाण्यानें सर्व पृथिवी भिजवून टाकितो; याला वृष्टि जशी धान्य भिजविते हा दृष्टांत; शेतांतलें भातासारखें धान्य पाण्यांत बुडलेलें असतें त्याप्रमाणें वरुण जो पाऊस पाडतो त्या पावसांत पृथिवी अगदीं बुडून गेलेली असते एवढा वरुणाचा महिमा. यवो वृष्टीव मोदते ( २।५।६ ) = जसें ( इव ) धान्य (यवः) भरपूर पाण्यांत (वृष्टी=वृष्ट्या) आनंद पावतें; यवं न वृष्टिः ( १०।४३।७ ) = जसा पाऊस धान्य वाढवितो; ह्या दोन उताऱ्यांवरून यवाला भरपूर पाऊस लागतो हें स्पष्ट आहे; तोच दृष्टांत येथें आहे व तो योग्य आहे. ऋचेचा दुसराही अर्थ आहे. पुष्कळ ऋचांत अर्थश्लेष व शब्दश्लेष असतो; त्याप्रमाणें याही ऋचेंत तसा द्विविध श्लेष आहे. वरुण = ( १ ) वरुणदेव, ( २ ) वृ ( = देणें ) + उनः = वरुणः = दाता. प्र = (१) प्र हा उपसर्ग, (२) धन. सृज् = ( १ ) वहावयास लावणें, ( २ ) देणें. राजा = ( १ ) राजा, ( २ ) दाता. न = ( १ ) इव, ( २ ) धन. भूम = ( १ ) पृथिवी, ( २ ) धनानें युक्त. या सहांत अर्थश्लेष आहे. नीचीनवारं = नी + चि + ई + न + वारं; नी = धनाप्रत नेणें, धन;

चि = जमा करणें, जमा केलेलें धन; ई = मागणें, मागितलेलें धन; न = वारं = धन; नीचीनबारं = अतिशय धनानें युक्त. कवंध = क + वन् + ध; प्रत्येक तुकड्याचा अर्थ धन. रोदसी = ( १ ) द्यावापृथिव्यौ, ( २ ) रोदसी = रोदसि + ई; रुद् = देणें; रोदस् = धन; रोदसि = धनांत, धनभांडारांत; ई = धन. अन्तरिक्षं = ( १ ) अंतरिक्ष, ( २ ) अन्तरिक्षं = अन्त + रि + क्षं ; प्रत्येक तुकड्याचा अर्थ धन. विश्वस्य = ( १ ) सगळ्याचा, ( २ ) विश्वस्य = विश्वः + स्यः; विश् ( = देणें ) + वः = दाता; सेति ददाति असौ स्यः = दाता. भुवनस्य = ( १ ) भुवनाचा, ( २ ) भुवनस्य = भुवनः + स्यः; भुवन = भु + वन; प्रत्येक तुकड्याचा अर्थ धन; स्यः = सः. यवं = ( १ ) धान्य, ( २ ) यूयते दीयते तत् यवं धनम्. वृष्टि = ( १ ) पाऊस, ( २ ) वृष्टिः = वृ + स्तिः; वृ = मागणें, मागितलेलें धन; स्ति = धन; अभिष्टि, गविष्टि, दिविष्टि व श्रुष्टि या चारही शब्दांत स्ति आहे; तोच स्ति वृष्टि या शब्दांत आहे. व्युनत्ति = ( १ ) अतिशय भिजवून टाकतो, ( २ ) व्युनत्ति = वी + उन् + अत्ति; वी=अद् = देणें; वन् ( = देणें ) ह्याचें संप्रसारणानें उन्; हे तीन धातु एकत्र केल्यानें व्युनद् होतें; व्युनद् + ति = व्युनत्ति = सतत देत असतो. या श्लेषांपैकीं बऱ्याच श्लेषांसंबंधीं खात्री आहे; कांहींबद्दल खात्री नाहीं. ऋचेचा उद्दिष्ट अर्थः— दात्या ईश्वरानें ( वरुणः ) या राजाच्या भांडारांत ( रोदसि ) अतिशय ( नीचीनवारं = कवन्धं = अन्तरिक्षं ) धन ( प्र = ई ) दिलें आहे ( ससर्ज ); त्या धनांतून ( तेन ) तो ( स्यः ) धनाढ्य ( भुवनः = वृष्टिः ) दाता ( विश्वः = स्यः = राजा ) अतिशय ( भूम ) धन ( यवं = न ) सारखा देत असतो ( व्युनत्ति).

## खंड ५ वा.

**तमू षु समना गिरा पितॄणां च मन्मभिः ।**

**नाभाकस्य प्रशस्तिभिर्यः सिन्धूनामुपोदये सप्तस्वसा स मध्यमो नभन्ताम-न्यके समे ( ऋ० सं० ८।४१।२ )**

**तं सु अभिष्टौमि समानया गिरा । गीत्या स्तुत्या । पितॄणां च मननीयैः स्तोमैः । नाभाकस्य प्रशस्तिभिः । ऋषिः नाभाकः बभूव**

तमू = तम् + ऊ; ऊ अनर्थक म्हणून गाळला आहे. अभिष्टौमि ( अध्याहृत ) = मी स्तुति करतों. समना = समानया = त्याच्यासारख्या म्हणजे त्याला योग्य अशा ( स्तुतिनें ); गुर्जरपाठ समान्या असा आहे; समान्या हें समानी याचें तृतीयेचें एक-वचन; गिरा = गीत्या = स्तुत्या; दुर्गवृत्तींत गीत्या नाहीं; तो शब्द प्रक्षिप्त असावा; तो भाष्यांत मूळचा असल्यास गै ( = गाणें ) या धातूपासून गिर् झाला असें यास्कास म्हणावयाचें असेल. मन्मभिः = मननीयैः स्तोमैः = मनन करण्याजोग्या स्तुतींनीं; पित-रांनीं रचिलेल्या स्तुति उत्तम असणारच; त्यांचें सर्वांनीं मनन केलेंच पाहिजे; मन्

( = स्तुति करणें ) + मन् = मन्मन् = स्तुति. नाभाक नांवाचा ऋषि होऊन गेला.

**यः स्यन्दमानानाम् आसाम् अपाम् उपोदये । सप्तस्वसारम् एनम् आह वाग्भिः । स मध्यमः इति निरुच्यते । अथ एषः एव भवति**

सिंधूनां = स्यन्दमानानाम् आसाम् अपां = या वाहणाऱ्या पाण्यांचा; दुर्गवृत्तींत आसां नाहीं; सिन्धुः स्यन्दनात् (९।२६); म्हणून सिन्धूनां = स्यन्दमानानाम्; आसाम् अपां हे शब्द अध्याहृत; उपोदये =उपोद्गमे (दुर्ग)=जेव्हां त्यांचें पाणी वर येतें म्हणजे त्यांना महापूर येतो तेव्हां. कवि वरुणाला सप्तस्वसा म्हणतो; त्या सप्तस्वसा म्हणजे अंबा, बुला, नितत्नी, स्तनयन्ती, अभ्रयन्ती, मेघयन्ती व चुपुणिका अशा होत; दुर्गवृत्तींत अंबा बद्दल अश्वा आहे; यांना वाचा (वाग्भिः ) म्हटलें आहे; पाऊस पडावयाचे वेळेस आकाशांत नानाप्रकारचे आवाज होतात; त्या आवाजांचे सात वर्ग कल्पिले असतील. सप्त स्वसारः यस्य सः सप्तस्वसा; सप्तस्वसा हें सप्तस्वसृ याचें प्रथमेचें एकवचन जसा कर्ता हें कर्तृ शब्दाचें; ६।६१।१० त सरस्वतीला सप्तस्वसा म्हटलें आहे; सरस्वतीच्या सात बहिणी कोण? पाणिनीच्या नियमानें सप्तस्वसृकः व सप्तस्वसृका असे शब्द पाहिजेत. स मध्यमः = स मध्यमः इति निरुच्यते=हा सप्तस्वसा देव म्हणजे अन्तरिक्षांतीलच असला पाहिजे; कारण हे सात आवाज आकाशांतच होतात; तो ( सः ) आकाशांतील देव म्हणजे हा ( एषः ) वरुण होय (भवति); म्हणजे ज्याविषयीं आपण बोलत आहों तो; निरुच्यते = (सप्तस्वसा या विशेषणानें तो वरुण ) स्पष्ट रीतीनें सांगितला आहे.

**नभन्ताम् अन्यके समे । मा भूवन् अन्यके सर्वे ये नः द्विषन्ति दुर्धियः पापधियः पापसंकल्पाः**

नभन्तां = न + भन्ताम्; न = मा; भन्तां = भूवन्; मा भूवन् = अस्तित्वांत नसोत म्हणजे नाहींसे होवोत. समे = सर्वे. हे सगळे कोण? जे ( ये ) आमचा द्वेष करतात ( द्विषन्ति ); ते कां द्वेष करतात ? कारण ते दुर्बुद्धि आहेत; दुर्धियः = पापधियः = पापसंकल्पाः = ज्यांचे विचार दुष्ट आहेत असे; ये नो द्विषन्ति० पापसंकल्पाः हे शब्द विवरणाकरितां घातले आहेत; ऋचेंतील कोणत्याही शब्दाचे ते पर्याय नव्हत. ५।२३ यांत दूढ्यः दुर्धियः पापधियः असे शब्द आहेत; तेथील ऋचा सम शब्दासंबंधानें असल्यानें व प्रस्तुत ऋचेंतही समे हा शब्द असल्यानें कोणीतरी दुर्धियः पापधियः हे तेथील शब्द प्रस्तुत ऋचेच्या भाष्यांत घातले व पापधियः याचा पर्याय म्हणून पापसंकल्पाः हाही शब्द घातला. दुर्गानें केलेला अर्थः— योग्य अशा स्तुतीनें, पितरांच्या मननीय अशा स्तुतींनीं व मी जो नाभाक त्या माझ्या स्तुतींनीं मी त्याची स्तुति करतों; वहाणाऱ्या जलाला पूर आला असतांना ज्याला सप्तस्वसा हें नांव प्राप्त होतें तोच अंतरिक्षांतील वरुण होय असें सात प्रकारच्या वाचा स्पष्टरीतीनें सांगतात; त्याच्या अनुग्रहानें आमचे सर्व शत्रु नाहींसे होवोत.

सायणः— तम् उ तम् एव वरुणं समना समानया गिरा स्तुत्या

सु अभिष्टौमि। पितॄणां मन्मभिः स्तोमैःच अभिष्टौमि। नाभाकस्य ऋषेः प्रशस्तिभिः स्तोत्रैःच अभिष्टौमि। सिंधूनां स्यंदमानानां नदीनाम् उप समीपे यः उदये उद्गच्छति यःच सप्तस्वसा सः मध्यमः इति वाग्भिः निरुच्यते। अन्यके दुर्धियः शत्रवः समे सर्वे नभन्तां मा भूवन् = त्या वरुणालाच योग्य अशा स्तुतीनें, पितरांच्या म्हणजे पितरांनीं रचिलेल्या स्तोमांनीं व नाभाकऋषीनें रचिलेल्या स्तोत्रांनीं मी चांगल्या रीतीनें स्तवितों; जो वाहणाऱ्या नद्यांच्या समीप उदय पावतो त्याला वाचा तो मध्यम आहे असें स्पष्ट रीतीनें म्हणतात; दुसरे म्हणजे दुष्टबुद्धि शत्रू नाहींसे होवोत. दुर्ग 'मी जो नाभाक त्या माझ्या स्तुतींनीं' असें विवरण करतो; पण सायणाचार्य नाभाक नांवाच्या ऋषीच्या स्तुतींनीं एवढेंच म्हणतात. उपोदये हें दुर्गवृत्तींत नाम आहे; पण सायणभाष्यांत उप म्हणजे समीप व उदये म्हणजे उद्गच्छति असें विवरण केलें आहे; पण हें विवरण बरोबर नाहीं; अये हें प्रथम पुरुषाचें एकवचन आहे, तृतीय पुरुषाचें नाहीं; तृतीय पुरुषाचें एकवचन अयते असें पाहिजे. ऊ षु ही जोडी पुष्कळ ऋचांत येते; बऱ्याच ऋचांत ते शब्द एव या अर्थीं घातले असतात; तम् ऊ षु = त्यालाच, त्याचीच. समना हाही शब्द त्याच अर्थीं असावा. तस्मा उ अद्य समना सुतं भरा ( ८।६६।७ ) = त्यालाच सोमरस द्या; उ = समना = एव; तस्मै उ समना = त्यालाच म्हणजे दुसऱ्या कोणालाही न देतां, फक्त त्या एकट्यालाच. तमू षु समना = त्या एकट्या वरुणालाच किंवा वरुणाचीच; स्तुति कर या अर्थाचें क्रियापद अध्याहृत घेतलें पाहिजे. कदाचित् समना हेंच क्रियापद असेल; मन् = स्तुति करणें; स + मन् = चांगली स्तुति करणें; समना = समन = चांगली स्तुति कर. त्या एकट्या वरुणाचीच तूं स्वतः रचलेल्या स्तुतींनीं, पितरांनीं रचिलेल्या स्तुतींनीं व नाभाक नांवाचा जो प्रसिद्ध स्तुति रचणारा त्याच्या स्तुतींनीं स्तुति कर. नाभाक हा शब्द येथेंच आला आहे; ते एकाद्या स्तोत्र रचणाऱ्याचें नांव असेल. सिन्धु म्हणजे नुसतें पाणी किंवा नुसत्या नद्या नव्हत; सिंधु म्हणते सप्तसिंधु; पंजाबांतील पांच नद्या, सिंध देशांतील सिंधु व सरस्वतीसारखी एकादी नदी अशा त्या सात नद्या असतील व या सात नद्या वरुणाच्या बहिणी मानल्या गेल्या असतील. जोराच्या पुराच्या वेळीं ( उपोदये = उपोद्गमे ) त्याला सात बहिणींचा भाऊ असें नांव मिळतें ( सप्तस्वसा भवति ). यः या संबंधींसर्वनामाचा तम् याच्याशीं संबंध आहे; ज्याच्यामुळें सात नद्यांना महापूर येतो अशा त्या एकट्याचीच स्तुति करा असें कवि म्हणतो. स मध्यमः या शब्दांचा अर्थ कळत नाहीं; तो सगळ्यांत अतिशय पुरातन देव असें कदाचित् म्हणावयाचें असेल. ये मध्यमास उत नूतनासः ( ६।२१।५ ) आणि यः स्तोमेभिः वावृधे पूर्व्येभिः यो मध्यमेभिः उत नूतनेभिः ( ३।३२।१३ ) या दोन ऋचांत नूतनाच्या उलट मध्यम; नूतन = अगदीं नवें; मध्यम = जुनें, पुरातन. नूतन शब्दाच्या उलट पूर्व, पुराण, प्रथम, प्रत्न, पूर्व्य, पुरा असे शब्द येतात; त्या सर्वांचा अर्थ पुरातन; त्याप्रमाणें मध्यम याचाही तोच

अर्थ. वरुण हा सर्व देवांत पुरातन व श्रेष्ठ म्हणून त्याची स्तुति करावयाची. नभन्तां हें नभ् धातूचें एकच रूप ऋग्वेदांत असून तें फक्त दोन वाक्यांत आलें आहे. नभन्ताम् अन्य-केषां ज्याका अधि धन्वसु ( १०।१३३।१-६ ); क हा प्रत्यय तुच्छता दाखविण्या-करितां अन्य व ज्या ह्या शब्दांना लाविला आहे; अन्यकेषां = तुच्छ जे दुसरे देव त्यांच्या; ज्याकाः = तुच्छ प्रत्यञ्चा; तुच्छ जे इतर देव त्यांच्या धनुष्यावर असलेल्या फुकट कामाच्या प्रत्यञ्चा नसोत म्हणजे आम्हांला नकोत; नभ् = फुकट जाणें, व्यर्थ असणें, कुच कामाच्या असणें असा अर्थ असेल; त्याप्रमाणें नभन्ताम् अन्यके समे = दुसरे तुच्छ ( अन्यके ) सर्व ( समे ) देव नसोत म्हणजे कुच कामाचे म्हणून ते आम्हांस नकोत; वरुण काय तो खरा उपयोगी श्रेष्ठ देव; इतर कुच कामाचे. नभन्ताम् अन्यके समे हे शब्द ८।३९ सूक्ताच्या सर्व ऋचा, ८।४० पैकीं शेवटली वगळून बाकीच्या, ८।४१ च्या सर्व व ८।४२ च्या ४,५,६ ह्यांच्या शेवटीं येतात. १०।१३३ ह्यांतील सहाही ऋचांच्या शेवटीं अन्यकेषां ज्याका अधि धन्वसु हे शब्द येतात; ह्या सूक्तांत इन्द्राचें महत्त्व वर्णिलें आहे; ८।४१ त वरुणाचें महत्त्व वर्णन केलें आहे. चित्र इत् राजा राजकाः इत् अन्यके । पर्जन्य इव ततनद्धि वृष्ट्या सहस्रमयुता ददत् (८।२१।१८) = पर्जन्य जसा सतत वृष्टि करतो त्याप्रमाणें चित्र राजा मला असंख्य धन देत आला आहे; म्हणून चित्र हाच काय तो खरा राजा म्हणजे दाता; इतर ( अन्यके ) नुसते नांवाचे राजे ( राजकाः ); येथें अन्य व राज यांना क प्रत्यय तुच्छता दाखविण्याकरितां लाविला आहे. नभन्तां = नमन्तां = लाजेनें माना खालीं घालोत असा कदाचित् अर्थ असेल.

**रुद्रः ( ३ ) रौति इति सतः । रोरूयमाणः द्रवति इति वा । रोदयतेर्वा । यदरुदत्तद्रुद्रस्य रुद्रत्वम् इति काठकम् । यदरोदीत्तदुद्रस्य रुद्रत्वम् इति हारि-द्रविकम् । तस्य एषा भवति**

रुद्रः = रु + द्रः; रु = रौति = ओरडतो; द्रः हा नामकरण प्रत्यय; जेव्हां रुद्र ओरडला तेव्हां त्याला रुद्र हें नांव पडलें; किंवा रु = रोरूयमाणः = सारखा ओरडत; द्रः = द्रवति = पळत सुटतो; सारखा ओरडत पळत सुटला म्हणून रुद्राला रुद्र हें नांव पडलें; किंवा रुद्रः = रुद् + रः; रुद् ( = रडणें ) ह्यापासून रुद्र; र हा नामकरण प्रत्यय. ज्याअर्थीं ( यत् ) रुद्र रडला ( अरुदत् ) त्याअर्थीं रुद्राला रुद्र नांव पडलें असें काठक संहितेंत म्हटलें आहे. हारिद्रविक संहितेंत असेंच म्हटलें आहे. तेथें अरुदत् ह्याच्याबद्दल अरोदीत् आहे. मैत्रायणी संहितेची हारिद्रव नांवाची एक पोटशाखा आहे असें दुर्ग म्हणतो; तिचा सध्या मागमूस नाहीं. देवांनीं एक प्रकारची इषु ( बाण ) तयार केली व आपल्यांपैकीं जो कोणी बलिष्ठ असेल तो ही इषु सोडील असें ते म्हणाले; रुद्रा, तूं आमच्या सर्वांत बलिष्ठ आहेस तेव्हां शत्रूवर तूं ही इषु सोड असें ते रुद्राला म्हणाले; मी जें मागेन तें जर मला द्याल तर मी इषु सोडीन असें रुद्रानें उत्तर दिलें व त्याची मागणी त्यांनीं मान्य केली; मीं सर्व पशूंचा स्वामी

असावें अशी त्यानें मागणी केली व तूं सात दिवसच त्यांचा स्वामी होशील असें ते म्हणाले; सात दिवसानंतर राक्षस पशूंना त्रास देऊं लागले; तेव्हां तिनें म्हणजे इषूनें म्हणजे इषु सोडून रुद्रानें राक्षसांचीं नगरें ( पुरः ) अगदीं ( सं ) मोडून टाकलीं ( अरुजत् ); ह्या कृतीमुळें रुद्राला रुद्र हें नांव पडलें अशी कथा काठक संहितेंत आहे; तया पुरः समरुजत्। यत् समरुजत् तत् रुद्रस्य रुद्रत्वम् (काठकसं० २५।१); ह्या वाक्यांत अरुदत् असा शब्द नसून समरुजत् असा आहे; पण रुद्र शब्दांत रुज् धातु नसून रुद् धातु स्पष्ट दिसतो. शतपथ ब्राह्मणांत (१।७।४) पुढील कथा आहे:—प्रजापतीचें मन आपल्या मुलीवर गेलें व त्यानें आपली कामवासना तृप्त केली; ह्यानें मोठें पाप केलें असें देव म्हणाले व बाणानें ह्याला जखम कर अशी त्यांनीं रुद्राला आज्ञा केली; आज्ञे-प्रमाणें रुद्रानें प्रजापतीवर बाण सोडला; आपण प्रजापतीला जखम करीत आहोंत ह्याबद्दल त्याला दुःख वाटून तो ओरडूं लागला; त्या ओरडण्यामुळें त्याला रुद्र हें नांव पडलें. देवांना असुरांशीं लढावें लागलें; लढण्याच्या आधीं त्यांच्या जवळ जें कांहीं होतें तें त्यांनीं अग्नीच्या स्वाधीन केलें व आम्ही परत आल्यावर आमचें आम्हांस दे असें ते त्याला म्हणाले; देव लढाईवर गेले असें पाहून अग्नि तें द्रव्य घेऊन पळून गेला; असुरांवर जय मिळवून देव परत येतात तों अग्नि पळून गेला असें त्यांना कळलें; तेव्हां अग्नीचा पाठलाग करून आपलें धन त्यांनीं परत मिळविलें; आपल्या हातचें धन गेलें असें पाहून अग्नि ओरडूं लागला; त्यामुळें अग्नीला रुद्र हें नांव पडलें; सोऽरोदीत् तत् रुद्रस्य रुद्रत्वम् ( तैति० सं० १।५।१ ); किंवा रोदय् ह्यापासून ( रोदयतेः ) रुद्र; ह्याला पुढील गोष्ट आधार :— कतमे रुद्राः इति । दश इमे पुरुषे प्राणाः आत्मा एकादश । ते यदा अस्मात् शरीरात् मर्त्यात् उत्क्रामन्ति अथ रोदयन्ति। तत् यत् रोदयन्ति तस्मात् रुद्राः ( बृहदा० उप० ३।९।४ ) = रुद्र किती ? माण-सांत हे दहा प्राण व अकरावा आत्मा असे अकरा रुद्र असतात; जेव्हां मर्त्य शरी-रांतून हे अकरा बाहेर पडतात तेव्हां ते मृताच्या संबंध्यांना रडावयास लावतात; म्हणून त्यांना रुद्र हें नांव पडलें.

## खंड ६ वा.

**इमा रुद्राय स्थिरधन्वने गिरः क्षिप्रेषवे देवाय स्वधाव्ने । अषाह्ळाय सह-मानाय वेधसे तिग्मायुधाय भरता शृणोतु नः ( ऋ० सं० ७।४६।१ )**

**इमाः रुद्राय दृढधन्वने गिरः क्षिप्रेषवे देवाय अन्नवते अषाढाय अन्यैः सह-मानाय विधात्रे तिग्मायुधाय भरत । शृणोतु नः**

स्थिरधन्वने = दृढधन्वने = स्थिर म्हणजे दृढ म्हणजे न मोडणारें धनुष्य आहे ज्याचें अशाला; दुर्गवृत्तींत दृढधन्वने याचे ऐवजीं दृढ धनुषे आहे. स्वधाव्ने = अन्नवते = अन्न आहे ज्याच्याजवळ अशाला; स्वधा = अन्नं ( निघं० २।७।१७ ). अषाह्ळाय = अषाढाय अन्यैः = दुसऱ्यांकडून ज्याचा पराभव होत नाहीं अशाला; दुर्गवृत्तींत अषा-

ह्ळाय = अनभिभूताय केनचित्; सहिवहोरोदवर्णस्य ( पाणिनी ६।३।११२ ) या सूत्रानें सह्चें सोढ असें भूतभूतकालीन रूप झालें पाहिजे; असाढाय हा शब्द दुर्गवृत्तींत नसल्यामुळें प्रक्षिप्त असावा. गुर्जरपाठ असाढाय बद्दल असाह्ळाय आहे. स्रष्टा प्रजापति-र्वेधा विधाता विश्वसृट् विधिः ( अमर १।१।१७ ); ह्यामुळें वेधसे = विधात्रे = सृष्टि उत्पन्न करणाऱ्याला. भरता = भरत = अर्पण करा. दुर्गानें केलेला अर्थ :— हे स्तोत्यांनो, ज्याचें धनुष्य कधीं मोडत नाहीं, ज्याचे बाण त्वरेनें जातात, ज्याच्याजवळ अन्न आहे, ज्याचा कोणीही पराभव करूं शकत नाहीं व जो शत्रूंचा नेहमीं पराभव करतो, ज्याचीं आयुधें तीक्ष्ण आहेत व जो सृष्टि निर्माण करतो अशा दानादि गुणांनीं युक्त ( देवाय ) रुद्राला ह्या स्तुति अर्पण करा; तो आमच्या स्तुति श्रवण करो. इमाः = ( १ ) ज्या आम्ही अर्पण करीत आहोंत त्या, ( २ ) ह्या म्हणजे इतक्या म्हणजे पुष्कळ. गिरः = ( १ ) स्तुति, ( २ ) धन; गिर्वणस्, गिर्वणस्युः व गिर्वाहस् ह्यांत असणारा गिर् = धन; गिर्वणाः = गिर्वणस्युः = गिर्वाहाः = धन देणारा. रुद्र = ( १ ) रुद्र नांवाचा देव, ( २ ) दाता; आ रुद्रासः इन्द्रवन्तः सजोषसो हिरण्यरथाः सुविताय गन्तन ( ५।५७।१ ) = ( १ ) हे मरुतांनो ( रुद्रासः ), इंद्राला घेऊन ( इंद्रवन्तः ) व सोन्याच्या रथांत बसून ( हिरण्यरथाः ) आमचा हवि भक्षण करण्याकरितां ( सुविताय ) या ( आगन्तन ); ( २ ) हे धनवंत ( इन्द्रवंतः = हिरण्यरथाः ) दात्यांनो ( रुद्रासः ), आम्ही संपत्तिमान व्हावें म्हणून ( सुविताय ) धन ( आ ) द्या ( गन्तन ); आ नो रत्नानि बिभ्रतौ अश्विना गच्छतं युवम् । रुद्रा हिरण्यवर्तनी जुषाणा वाजिनीवसू ( ५।७५।३ ) = हे धनवन्त ( हिरण्यवर्तनी = वाजिनीवसू ) दात्यांनो (रुद्रा=रुद्रौ), आपल्याबरोबर धन आणणारे (रत्नानि बिभ्रतौ) व धन देणारे (जुषाणा= जुषाणौ) तुम्ही (युवं) आमच्याकडे या; वसू रुद्रा पुरुमन्तू० दस्रा (१।१५८।१); वसू = रुद्रा = पुरुमन्तू = दस्रा = धनवंत व दाते; किंवा वसू = पुरुमन्तू = धनवन्त; रुद्रा = दस्रा = दाते. मित्रावरुण ( ५।७०।२ ) व अग्नि ( ४।३।१) ह्यांना दाता ह्या अर्थी रुद्र शब्द लाविला आहे. स्थिर = ( १ ) टिकाऊ, मजबूत; ( २ ) धनवान् व धन-दाता; ( १ ) परा ह यत् स्थिरं हथ ( १।३९।३ ) = स्थिर वस्तूलाही तुम्ही झुगारून देतां; ( २ ) नू ष्ठिरं मरुतो वीरवन्तम् ऋतीषाहं रयिमस्मासु धत्त । सहस्रिणं शतिनं शूशुवांसम् ( १।६४।१५ ) = हे मरुतांनो, आम्हाला अमूप धन अत्ताच्या अत्ता ( नु ) द्या; स्थिरं = वीरवन्तं = ऋतीषाहं = सहस्रिणं = शतिनं = शूशुवांसं = अमूप; एथें स्थिरं = धनानें युक्त, अमूप; हाच अर्थ प्रस्तुत ऋचेंत आहे. ( १ व २ ) कर्मणि कर्मणि स्थिरः ( १।१०१।४ ) = ( १ ) सर्व शौर्याच्या कृत्यांत स्थिर असणारा म्हणजे कधींही न डगमगणारा; ( २ ) प्रत्येक धनभांडारांत धन देणारा; कर्मन् = ( १ ) शौर्याचें कृत्य, ( २ ) दान किंवा धन; एवा हि असि वीरयुः एवा शूरः उत स्थिरः ( ८।९२।२८ ) = ( १ ) हे इंद्रा, तुला वीर हवे असून तूं शूर व कधींही न डगमगणारा आहेस; ( २ ) हे धनवन्ता तूं नेहमीं धनद आहेस; वीरयुः = शूरः =

स्थिरः = धनद. धन्वन् = ( १ ) धनुष्य; ( २ ) धन् = वन् = देणें किंवा दान म्हणजे धन; स्थिरं धन् वन् यस्य सः स्थिरधन्वा = ज्याच्याजवळ अतीशय धन आहे असा. क्षिप्राः = ( १ ) क्षिप् ( = फेकणें, फेकून देणे ) + राः = शत्रूला फेकून देणाऱ्या; क्षिप्राः इषवः यस्य सः = ज्याच्या इषु शत्रूला फेकून देतात, ज्याचे बाण इतक्या जोरानें जातात कीं ते लागल्यावरोबर शत्रु कांहीं अंतरावर फेकला जातो. इषुः = ( १ ) बाण, ( २ ) क्षि + प्र + ई + सु = धन; क्षिप्रेषुः = ज्याच्याजवळ अतीशय धन आहे असा; क्षि = ई = सु = देणें, दान किंवा धन. तमु ष्टुहि यः स्विषुः सुधन्वा यो विश्वस्य क्षयति भेषजस्य । यक्ष्वा महे सौमनसाय रुद्रं नमोभिर्देवम् असुरं दुवस्य ( ५।४२।११ ) = ( १ ) ज्याच्या इषु व धनुष्य मजबूत आहेत व ज्याची सर्व औषधींवर सत्ता आहे त्या रुद्राचीच स्तुति कर; त्याची अतिशय मर्जी संपादन करण्याकरितां ( सौमनसाय ) त्याला हवि दे; बलवान् देव जो रुद्र त्याला हवि देऊन व स्तुति करून खूप कर; ( २ ) ज्या धनाची सत्ता बाकीच्या सर्व धनावर चालेल असेच अमूप धन दे;स्तुहि=दे; स्विषुः=सु+इ+सु;तिहींचा अर्थ धन; सु=धन्=वन्=धन; वि = श्व = धन; भेषज = भ + इ + स + ज; चारींचा अर्थ धन; क्षयति = ( १ ) धनी होतो, ( २ ) देतो; यक्ष्व = ( १ ) हवि दे, ( २ ) धन दे; महे सौमनसाय = ( १ ) मोठी मर्जी संपादन करण्याकरितां, ( २ ) अमूप धन मिळावें म्हणून; मनस्= मागणें, मागितलेलें धन; रुद्र = धन; नमोभिः = ( १ ) हवींनीं, ( २ ) धनांतून; देव = धन; असुर = ( १ ) बलवान्, ( २ ) अ = सु = र = धन; असुर = धनानें पूर्ण; दुवस्य = ( १ ) सेवा कर, ( २ ) दुवः धनं स्य देहि; दुवस्य = दे. देव = ( १ ) देव, ( २ ) दि ( = देणें ) + व = देव = देणारा किंवा दान किंवा धन; देवाय रुद्राय = धनानें पूर्ण अशा दात्याला. स्वधा = ( १ ) सामर्थ्य, बल; रुद्र जनावरांना व माणसांना त्रास देतो; त्याचे सामर्थ्य इतकें आहे कीं सर्व लोक त्याला भितात; मा नो महान्तमुत मा नो अर्भकं० मा नो वधीः पितरं मोत मातरं मा नः प्रियास्तन्वो रुद्र रीरिषः ( १।११४।७ ) = हे रुद्रा, मोठा असो, लहान असो, बाप असो, आई असो ह्यांपैकीं कोणालाही पीडा देऊं नको. मा नस्तोके तनये मा न आयौ मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः । वीरान्मा नो रुद्र भामितो वधीः(१।११४।८) = हे रुद्रा, आमच्या मुलाबाळांना, गाईंना, घोड्यांना पीडा करूं नकोस. ये वा भद्रं दूषयन्ति स्वधाभिः ( ७।१०४।९ ) = जे दुष्ट लोक आपल्या दुष्ट कृत्यानें (स्वधाभिः) लोकांच्या सुखाचा नाश करतात; स्वधा = दुष्ट कृत्यें किंवा पीडा करण्याचें सामर्थ्य किंवा पीडा. प्र तन्मे वोचो दूळभ स्वधावः (७।८६।४) = हे सामर्थ्यवान् (स्वधावः) वरुणा, ज्या तुला कोणीही फसवूं शकत नाहीं ( दूळभ ) तो तूं मीं केलेलें पाप मला लौकर सांग; पापी लोकांना शासन करण्याचें सामर्थ्य वरुणांत आहे. ( २ ) स्वधा = धन; रायस्पूर्धि स्वधावः ( १।३६।१२ ) = हे धनवन्ता ( स्वधावः ) अग्नि, धन ( रायः ) दे ( पूर्धि ). रत्ना च यद्विभजासि स्वधावो भागं नो अत्र वसुमन्तं वीतात्

( १०।११।८ ) = हे धनवन्ता अग्ने, जेव्हां तूं धन वाटशील तेव्हां धनाचा भाग आम्हांस दे. वर्षिष्ठं रत्नम् अकृत स्वधाभिः ( ३।२६।८ ) = अग्नि आपल्या धनांतून ( स्वधाभिः ) अतिशय ( वर्षिष्ठं ) धन ( रत्नं ) देता झाला ( अकृत ). स्वधाव्ने रुद्राय = ( १ ) सामर्थ्यवान् रुद्राला, ( २ ) धनवंत दात्याला. स्वाहा देवहविर्दाने श्रौषट् वौषट् वषट् स्वधा ( अमर ३ । ४ । ९ ) = देवांना हवि देतांना स्वाहा, श्रौषट्, वौषट्, वषट् व स्वधा हे शब्द उच्चारतात; जसें अग्नये स्वाहा; पितृभ्यः स्वधा असा प्रयोग श्राद्धांत येतो; ह्या प्रयोगावरून स्वधा म्हणजे अन्न असा अर्थ केला गेला असावा; पण स्वधा शब्दाचा अन्न हा अर्थ ऋग्वेदांत नाहीं; स्वधा व स्वाहा या शब्दांचे विवेचन पत्रें ६३४–६३८ येथें केलें आहे. सह् = ( १ ) जिंकणें, पराभव करणें; सह् + त = साह् + ळ = साह्ळ; जेव्हां हकारान्त धातूंना त व तृ हे प्रत्यय लावावयाचे असतात तेव्हां त्यांचा उपान्त्य स्वर दीर्घ होतो व त ला ळ हा आदेश होतो; मिह् + त = मीह्ळ; सह् + तृ = साह्ळृ ; पण दृह् + त = दृह्ळ; येथें ऋ दीर्घ होत नाहीं; साह्ळ = पराजित झालेला; सह = ( २ ) वरचढ करणें; अषाह्ळ = धनाच्या बाबतींत ज्याच्यावर कोणी वरचढ करूं शकत नाहीं असा म्हणजे अत्यंत धनवान्; सहमानः = धनानें वरचढ करणारा, सर्वांहून धनाढ्य. अषाह्ळं सहः तन्वि श्रुतो दधे ( = १।५५।८ ) = ( १ ) प्रख्यात ( श्रुतः ) इन्द्र शरीरांत ( तन्वि ) ज्याचा कधीं पराभव करतां येणार नाहीं असें ( अषाह्ळं ) बळ ( सहः ) धारण करता झाला ( दधे ); ( २ ) श्रीमान् ( श्रुतः ) दाता आपल्या धनांत (तन्वि) ज्याच्यापेक्षां जास्ती धन कुणाजवळ नाहीं असें अपरंपार ( अषाह्ळं ) धन ( सहः ) देता झाला म्हणजे टाकता झाला ( दधे ). अग्ने सहन्तमा भर द्युम्नस्य प्रासहा रयिम् । विश्वा यश्चर्षणीरभि आसा वाजेषु सासहत् ( ५।२३।१ ) = हे अग्नि, जें धन पंच जनांच्या धनावर वरचढ करील ( सासहत् ) असें वरचढ करणारें ( सहन्तं ) धन ( रयिं ) आम्हांस दे. वेधस् = ( १ ) हवि देणारा, स्तवन करणारा; विध् (= हवि देणें, स्तवन करणें) यापासून वेधस्; दिवश्चित्पूर्वो न्यसादि होता पृच्छ्यो विश्पतिर्विक्षु वेधाः ( १।६०।२ ) = द्यू च्या आधीं हवि देणारा ( होता=वेधाः ) अग्नि लोकांमध्यें (विक्षु) दिला गेला ( न्यसादि ); पण वेधा म्हणजे होता हा अर्थ प्रस्तुत ऋचेंत नाहीं; (२) अभिभुवे आभिभङ्गाय वन्वते अषाह्ळाय सहमानाय वेधसे । तुविग्रये वह्वये दुष्टरीतवे सत्रासाहे नम इन्द्राय वोचत ( २।२१।२ ) = जो पराभव करतो ( अभिभुवे = अभिभङ्गाय = सहमानाय = वन्वते = वेधसे = सत्रासाहे ) व ज्याचा कोणी पराभव करूं शकत नाहीं ( अषाह्ळाय = दुष्टरीतवे ) अशा इन्द्राला स्तुति ( नमः ) अर्पण करा ( वोचत ); वेधसे = पराभव करणाऱ्याला; रुद्राची सत्ता सर्वांवर चालते; त्याला न जुमानणारा असा कोणीही नाहीं; ( ३ ) वेधसे = दात्याला; स नो नियुद्भिः पुरुहूत वेधो विश्ववाराभिः आ गहि प्रयज्यो ( ६।२२।११ ) = हे धनवन्ता ( पुरुहूत ), हे दात्या ( वेधः = प्रयज्यो ), अतिशय ( विश्ववाराभिः ) धनांतून

( नियुद्भिः ) धन ( आ ) दे ( गहि ); स नो वेधो मरुतां चिकित्वान् सुम्ना वनुष्व तव हि प्रेष्ठा ( १।१६९।१ ) = हे धनदात्या ( वेधः ), धन ( मरुतां ) देणारा ( चिकित्वान् ) तूं तुझ्याजवळचें ( तव ) अत्यंत ( प्रेष्ठा ) धन ( सुम्ना ) दे ( वनुष्व ). रुद्राय = वेधसे = धनदात्याला; क्रत्व इत्पूर्णमुदरं तुरस्यास्ति विधतः ( ८।७८।७ ) = धन देणाऱ्या ( विधतः ) दात्याचें ( तुरस्य ) भांडार ( उदरं ) धनानें ( क्रत्वः ) भरलेलें ( पूर्णं ) असतेंच ( अस्ति इत् ); विध् ( = देणें ) ह्यापासून वेधस् ( = दाता ). तिग् ( = धार देणें ) + म = धार दिलेलें; तिग्मम् आयुधं यस्य सः = ज्याचें आयुध धार दिलेलें असतें असा; द्रुहं जिघांसन्० ततिक्ते तिग्मा तुजसे अनीका (४।२३।७) = शत्रूला मारण्याच्या इच्छेनें इन्द्र आपल्या तीक्ष्ण अस्त्रांना पुन्हां धार देतो (ततिक्ते); तिग्पासून तिगित ( = धारेचें अस्त्र ) हा शब्द झाला आहे; ( २ ) तिग्म = चकचकीत; धार दिलेलें अस्त्र प्रकाश पाडतें किंवा चकाकतें. आयुध = आ + यु + ध; तिहींचा अर्थ धन; तेजस्वी ( तिग्म ) धन ( आयुध ) आहे ज्याच्याजवळ तो तिग्मायुध. तिग्ममेको बिभर्ति हस्त आयुधम् ( ८।२९।५ ) = ( १ ) एक देव म्हणजे रुद्र हातांत धारेचें अस्त्र धारण करतो; ( २ ) धनवान् ( एकः ) दाता धनभांडारांत ( हस्ते ) तेजस्वी ( तिग्मं ) धन ( आयुधं ) देतो म्हणजे टाकतो ( बिभर्ति ); एकः = आ + ई + कः; तिहींचा अर्थ धन; एकः = अतिशय धनवान् असा दाता; भृ = ( १ ) धारण करणें, ( २ ) देणें; हस्त = ( १ ) हात; ( २ ) ह = स्त = धन; हस्ते = धनभाण्डारांत. वृषा ते वज्रः उत ते वृषा रथो वृषणा हरी वृषभाणि आयुधा। वृष्णो मदस्य वृषभ त्वमीशिषे इन्द्र सोमस्य वृषभस्य तृप्णुहि ( २।१६।६ ) = हे बैला इन्द्रा, तुझें वज्र, तुझा रथ, तुझे दोन घोडे, तुझीं आयुधें हीं सर्व बैल आहेत; बैल जो सोम त्याच्यावर तुझी सत्ता आहे; बैल जो सोम तो तूं पी ( तृप्णुहि ); इन्द्राला व त्याच्या संबंधींच्या सर्व वस्तूंना बैल म्हणणें हें कोणालाही खपणार नाहीं; म्हणून ऋचेचा दुसरा अर्थ असावा; वृ = सन् = देणें; वृषा = धनदाता; तूं व तुझ्यासंबंधींच्या सर्व वस्तु धन देणाऱ्या आहेत; इन्द्र = धनवान् दाता; वाज या शब्दांत वज् ( = देणें ) हा धातु आहे; वज् = रः = धन; र = थ = धन; हरिशिप्र यांतील हरि = सोनें; मद = धन; सु ( = देणें ) + म = सोम = धन; तृप्णुहि = तृप् + नुहि; तृप् = नु = देणें; हे दात्या, तुजजवळ अपार धन आहे म्हणून तूं धन दे; वृषभ = वृ + स् + भ; तिहींचा अर्थ धन; असे या ऋचेचे दोन अर्थ आहेत. स्वायुधस्य ते सतो भुवनस्य पते वयम् । इन्दो सखित्वमुश्मसि ( ९।३१।६ ) = ( १ ) हे भुवनाच्या ( भुवनस्य ) अधीशा ( पते ) सोमा, तुझ्याजवळ आयुधें असल्यामुळें ( स्वायुधस्य ) व तूं बलवान् असल्यामुळें ( सतः ) तुझ्या मैत्रीची आम्हीं इच्छा करतों; पण सोमाजवळ आयुधें कोठलीं ? व तो बलवान् कसा ? या प्रश्नाला उत्तर पुढीलप्रमाणें:—हे धनदात्या ( इन्दो = भुवनस्य पते ), ज्याअर्थीं तुजजवळ धन आहे त्याअर्थीं तुजपासून आम्ही धनाची ( सखित्वं ) इच्छा करतों. अभि अर्ष स्वायुध

सोम द्विबर्हसं रयिम् । अथा नो वस्यसः कृधि (९।४।७) = हे धनवान् (सु + आयुध) दात्या (सोम) तूं पुष्कळ (अभि = द्विबर्हसं) धनाकडे (रयिं) जा (अर्ष) व मग आम्हांला धनवान् (वस्यसः) कर (कृधि); हा गूढार्थ; हातांत आयुधें घेणाऱ्या हे सोमा, अतिशय धनाकडे जोरानें जा व तसें करून आम्हांला धनवान् कर; हा वरवरचा अर्थ; सोमाला आयुधें काय करावयाचीं आहेत व तो शत्रूंवर हल्ला कसा करणार? या प्रश्नाला गूढार्थ हें उत्तर. तिग्मेन नस्तेजसा सं शिशाधि (६।१५।१९)= (१) हे अग्नि, धारदार सुरीनें (तेजसा) आम्हांला (नः) चांगल्या रीतीनें (सु) तासून काढ (शिशाधि); (२) हे दात्या, आपल्या तेजस्वी (तिग्मेन) धनांतून (तेजसा) आम्हांला (नः) धन दे (शिशाधि). शृ = नु = देणें; शर्म व शरण यांत शृ (= देणें) हा धातु आहे; शृ + नु = शृणु असा हा संयुक्त धातु आहे; शृणोतु = देवो, देईलच. परीणस् यांतील नस् = धन; नोधाः = नस् + धाः = धन देणारा; इन्द्राला नोधाः असें म्हटलें आहे. प्रस्तुत ऋचेचे दोन अर्थ आहेत. यास्क व दुर्ग यांनीं केलेला एक अर्थ; त्या अर्थांत क्षिप्र, स्वधा व वेधस् यांचे अर्थ चुकले आहेत. दुसरा अर्थ पुढील प्रमाणें:—हे देवांनो, या धनवान् (स्थिरधन्वने = क्षिप्रेषवे = देवाय = स्वधाव्ने = अपाहळाय = सहमानाय = तिग्मायुधाय) अशा या दात्याला (रुद्राय = वेधसे) अतिशय (इमाः) धन (गिरः) द्या (आभरत); त्याला पुष्कळ धन मिळेल तेव्हां तो आपोआपच आम्हांस धन (नस्) देईलच (श्रुणोतु).

**तिग्मं तेजतः उत्साहकर्मणः । आयुधम् आयोधनात् । तस्य एषा अपरा भवति**

तिग्म व आयुध यांच्या व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहींत; म्हणून त्या प्रक्षिप्त होत. तिज निशाने (धा० १।९९६ ॥ १०।११९); तिज् = तीक्ष्ण करणें; उत्साह हा अर्थ धातुपाठांत नाहीं; उत्साह म्हणजे पराभव करणें असा अर्थ कीं काय? आयुध हा शब्द आ + युध् पासून. वरुणासंबंधीं आणखी एक पुढील ऋचा होय.

## खंड ७ वा.

**या ते दिद्युदवसृष्टा दिवस्परि क्ष्मया चरति परि सा वृणक्तु नः । सहस्रं ते स्वपिवात भेषजा मा नस्तोकेषु तनयेषु रीरिषः (ऋ० सं० ७।४६।३)**

**या ते दिद्युत् अवसृष्टा दिवः परि दिवः अधि । दिद्युत् द्यतेः वा । द्युतेः वा क्ष्मया चरति । क्ष्मा पृथिवी । तस्यां चरति । तया चरति । विक्ष्मापयन्ती चरति इति वा । परिवृणक्तु नः सा**

दिवः परि हे शब्द भाष्यांत घालण्याची जरूर नाहीं; परि = अधि = पासून. दिद्युत् शब्द दो फोडणें यापासून; दो अवखण्डने (धा० ४।४२); द्यति हें दो चें तृतीय पुरुषाचें एकवचन; द्यति ह्यांतील द्यत् ला अभ्यास करून दिद्यत् व नंतर दिद्यत् ह्याचें दिद्युत् असें रूपांतर झालें; अशी व्युत्पत्ति देण्याचें कारण वज्र (दिद्युत्) पर्वतांना फोडून टाकतें; किंवा द्युत् (= प्रकाशणें) ह्यापासून; द्युत दीप्तौ (धा०

१।७४२ ); वज्र द्युलोकांतून खालीं पडतांना झळकतें; द्युत् अभ्यासानें दिद्युत् ; ह्यानंतर द्योततेर्वा असें महाराष्ट्रपाठांत अधिक आहे; पण द्युतेः आणि द्योततेः ह्यांमध्यें मुळींच फरक नाहीं; द्युति म्हणजे द्युत् हा धातु व द्योतति हें त्या धातूचें वर्तमानकाळचें तृतीय पुरुषाचें एकवचन. अस्त्र ह्या अर्थी दिद्यु व दिद्युत् असे दोन शब्द आहेत; दिद्यु हा द्यु प्रकाशणें ह्यापासून व दिद्युत् हा द्युत् पासून; दिद्युत् ह्याला तिग्मा हें विशेषण लावलें आहे ( ५।८६।३ ); तेव्हां त्याला धार असावी व आकाशांतून पडतांना तें झळकत असावें. क्ष्मा = पृथिवी; क्ष्मया चरति = तस्यां ( पृथिव्यां ) चरति = ती पृथिवीवर फिरकते किंवा संचार करते; तया चरति = तिच्यासह म्हणजे पृथिवीसह जाते. क्ष्मया पृथिव्या व्रीह्यादिभावम् उपगतया। तस्यां वा व्रीह्यादिभावम् उपगतायां पृथिव्याम् अनुप्रविश्य चरति अन्नपानसमुद्भूता तत्प्रभवत्वात् सर्वरोगाणाम्। तदुक्तम्। नमोऽस्तु रुद्रेभ्यो ये के च पृथिव्यां येषाम् अन्नम् इषवः ( य० वा० सं० १६। ६६ ) इति ( दुर्ग ) = पृथिवीवर धान्य उगवतें म्हणजे पृथिवीला धान्याचें स्वरूप येतें; त्या धान्याबरोबर दिद्युत् आपली हालचाल चालविते; किंवा ती पृथिवीवर म्हणजे पृथिवीवर उगवलेल्या धान्यांत आपली हालचाल चालविते; सर्व रोग अन्नापासून उत्पन्न होतात; म्हणूनच वेदांत म्हटलें आहे कीं जे रुद्र पृथिवीवर संचार करतात व ज्यांचें अन्न हेच बाण त्या रुद्रांना नमस्कार असो; तया चरति = अन्नाच्या सहाय्यानें संचार करते म्हणजे आपला प्रभाव दाखविते; तस्यां चरति = धान्यांत आपला प्रभाव दाखविते; दोहोंचा अर्थ एकच; प्राणी अन्न खातात, अन्नामुळें रोग उत्पन्न होतात व रोग हें रुद्राचें अस्त्र असा दुर्ग अर्थ करतो; यास्काच्या मनांत तोच अर्थ असावा. किंवा क्ष्मया = विक्ष्मापयन्ती = हिंसन्ती ( दुर्ग ) = नाश करणारी; क्ष्मायी विधूनने ( धातुपाठ १।४८७ ); क्ष्माय् = हलणें, कांपणें; क्ष्माय् चे कारित रूप क्ष्मापय्; क्ष्मया = क्ष्म + या; क्ष्म = क्ष्मापय्; क्ष्मया = ( वि ) क्ष्मापयन्ती; दुर्गानें विक्ष्मापयन्ती हा क्ष्मया ह्याचा अर्थ दिद्युत शब्दाच्या व्युत्पत्तीनंतर तेथें त्याचा कांहीं संबंध नसतांनाही दिला आहे; पण तो अर्थ तस्यां चरति। तया चरति ह्याच्यानंतर द्यावयास पाहिजे होता; ह्यावरून तो त्याच्या वृत्तींत मागाहून कोणीतरी घुसडला असावा; क्ष्मया ह्याची विक्ष्मापयन्ती ही व्युत्पत्ति व हा अर्थ बरीच ओढाताण केल्याशिवाय निघत नाहीं; तो खात्रीनें प्रक्षिप्त असावा. दिवा यान्ति मरुतो भूम्याग्निः अयं वातो अन्तरिक्षेण याति। अद्भिर्याति वरुणः समुद्रैः ( १।१६१।१४ ) = मरुत् द्युलोकीं संचार करितात, अग्नि भूमीवर संचार करतो, वारा अन्तरिक्षांत संचार करतो, वरुण समुद्रांत संचार करतो; ह्या ऋचेंत दिवा वगैरे शब्द तृतियान्त आहेत तथापि त्यांचा अर्थ सप्तमी सारखा होतो; त्याप्रमाणें क्ष्मया चरति = पृथिवीवर संचार करतो असा अर्थ आहे; रुद्राचें अस्त्र द्युलोक सोडून पृथिवीवर प्राण्यांना त्रास देण्याकरितां संचार करतें.

**सहस्रं ते स्वात्पवचन भेषज्यानि। मा नः त्वं पुत्रेषु च पौत्रेषु च रीरिषः।**

तोकं ( निघं० २।२।२ ) तुद्यतेः। तनयं ( निघं० २।२।३ ) तनोतेः

स्वपिवात = ( सु + अपि + वात ); अपि = आप्त; वात = वचन; स्वाप्तवचन कस्यचिदपि अनतिक्रमणीयाज्ञ ( दुर्ग ) = ज्याची आज्ञा कोणालाही उल्लंघन करतां येत नाहीं अशा; आप्तः अविसंवादिवाक् (अमर २।८।१३ क्षी०); आप्त = ज्याच्या बोलण्यांत विसंगती किंवा विरोध नसतो असा, एकवचनी, श्रद्धेय; रुद्राच्या बोलण्यांत निश्चय असतो, संदेह कधींही नसतो; रुद्राजवळ म्हणजे रुद्राचें बोलणें नेहमीं श्रद्धेय असतें; सु = वत्; स्वपिवात = हे श्रद्धेय वचन. स्वपिवात शब्द ह्याच ऋचेंत आला आहे; स्वपिवात = सु + अपिवात; वत् ( = देणें ) या धातूला अपि हा उपसर्ग पुढील ऋचांत लावला आहे. अपि क्रतुं सुचेतसं वतन्तः तिरश्चिदंहः सुपथा नयन्ति ( ७।६०।६ ) = पुष्कळ ( सुचेतसं ) धन ( क्रतुं ) खच्चून देणारे ( अपिवतन्तः ) असे हे देव चांगल्या मार्गानें दारिद्र्याच्या ( अंहः ) पलीकडे ( तिरः ) नेतात. एता नो अग्ने सौभगा दिदीहि अपि क्रतुं सुचेतसं वतेम ( ७।३।१० ) = हे अग्नि, आम्हांला पुष्कळ ( एता = एतानि ) धन ( सौभगा = सौभगानि ) दे ( दिदीहि ); मग आम्ही पुष्कळ ( सुचेतसं ) धन ( क्रतुं ) खच्चून देऊं ( अपिवतेम ). मन्मानि चित्रा अपिवातयन्तः एषां भूत नवेदा मे ऋतानाम् ( १।१६५।१३ ) = हे मरुतांनो, धन ( मन्मानि ) खच्चून देणारे ( अपिवातयन्तः ) धनवान् ( चित्राः ) तुम्ही मला ( मे ) अतिशय ( एषां ) धनाचें ( ऋतानां ) दाते ( नवेदाः ) व्हा ( भूत ). भद्रं नो अपिवातय मनो दक्षम् उत क्रतुम् ( १०।२५।१ ) = हे सोमा, आम्हांला ( नः ) पुष्कळ धन ( भद्रं = मनः = दक्षं = क्रतुं ) खच्चून दे ( अपिवातय ). वत्यते दीयते तत् वातं धनम्; वात शब्द अवात, देववात, मनोवात अशा शब्दांत येतो; अपिवात यांतही तोच शब्द आहे; सु अपिवत्यते दीयते येन सः स्वपिवातः; स्वपिवात = आरोग्यरूपी किंवा धनरूपी कल्याण (सु) ज्याच्याकडून खच्चून दिलें जातें [अशा रुद्रा]; किंवा सु अपिवातयति ददाति असौ स्वपिवातः असाहि विग्रह होईल. भेषजा = भेषजानि = भैषज्यानि; दुर्गवृत्तींत भैषज्यानि याबद्दल भेषजानि आहे; अनन्त-आवसथ-इतिह-भेषजात्-ञ्यः ( पाणिनी ५।४।२३ ) = अनन्त, आवसथ, इतिह व भेषज यांना स्वार्थी ञ्य प्रत्यय लागतो म्हणजे अर्थ न बदलतां त्यांच्या बद्दल आनन्त्य, आवसथ्य, ऐतिह्य व भैषज्य हे शब्द वापरले जातात; यास्काच्या भाष्यांत भेषजानि हाच शब्द होता असें वाटतें. तोकेषु = पुत्रेषु. तनयेषु = पौत्रेषु. दोन च अध्याहृत. दुर्ग म्हणतो कीं जरी निघण्टूंत ( २।२ ) तोक व तनय या दोहोंचाही अपत्य असा अर्थ आहे तरी पुनरुक्ति टाळण्याकरितां तोक म्हणजे पुत्र व तनय म्हणजे पौत्र असे त्या शब्दांचे अर्थ केले पाहिजेत; पण दुर्गाच्या या म्हणण्याला एकच उत्तर पुरें आहे; तें हें कीं ऋग्वेदांत पुनरुक्ति अतिशय आहे. तोक शब्द तुद् ( = टोंचणें ) यापासून; मुलाला चांगले आचारविचार शिकवितांना बापाला त्याला शब्दांनीं वारंवार टोंचावें लागतें; तुद्यतेः ह्याबद्दल तुदतेः असें पाहिजे; कारण तुद् हा ४ थ्या गणांतील धातू-

नसून ६ व्या गणांतील आहे. तनय शब्द तन् ( = ताणणें ) यापासून; नातू आजापासून बराच ताणला गेलेला म्हणजे दूर असतो; पुत्र बापाला अगदीं जवळ; पण पौत्र कांहींसा किंवा बराच दूर वाटतो. या कांहींतरी व्युत्पत्ति होत. तुदते अनेन माता गर्भवासकाले तुद्यते व्याध्यादिभिः इति वा। यद्वा। ष्टुच स्तुतौ। ऋणमस्मिन् संनयति अमृतत्वं च गच्छति (ऐ० ब्रा० ७।३।१) इत्यादिभिः गाथाभिः हरिश्चंद्रोपाख्याने प्रशस्यते पुत्रः। यद्वा। तु इति सौत्रः धातुः वृद्धयर्थः। वर्धते हि तत्। वर्ध्यते वा मातापितृभ्याम् ( देवराज ) = तुद् ( व्यथा भोगणें किंवा व्यथा देणें ) यापासून तोक; गर्भवासांत पुत्रामुळें मातेला व्यथा होते; किंवा व्याधि वगैरेंनीं पुत्राला त्रास होतो; अशी एक व्युत्पत्ति; किंवा स्तु (= स्तुति करणें ) यापासून तोक; पुत्रामुळें पिता आपलें पाप नाहींसें करतो व अमर होतो असे श्लोक ऐतरेय ब्राह्मणांतील हरिश्चंद्राख्यानांत दिले आहेत व त्या श्लोकांत पुत्राची अशा रीतीनें प्रशंसा केली आहे; किंवा तु ( = वाढणें किंवा वाढविणें) या धातूपासून तोक; मूल वाढतें किंवा आईबापांकडून वाढविलें जातें; तुद् ह्यांतील उकाराला गुण होऊन द् च्या जागीं क येतो; स्तु ह्यांतील स् जाऊन तु ह्याला त्याचप्रमाणें तु ( = वाढणें किंवा वाढविणें ) ह्याला क प्रत्यय लाविल्यानें उ चा गुण होऊन तोक शब्द बनतो; यांपैकीं यास्क व दुर्ग पहिलीच व्युत्पत्ति देतात. कुलं तनोति विस्तारयति इति तनयः (देवराज). स्तूयते तोकं (अमर २।६।८ क्षी०); तनोति कुलं तनयः ( अमर २।६।२७ क्षी० ) रिष् ( = हिंसा करणें ) अभ्यासानें रीरिष्. भाष्यांत रीरिषः ह्या वैदिक रूपाबद्दल हिंसीः असा पर्याय द्यावयास पाहिजे होता. दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थः— हे रुद्रा, ज्वर अतिसार यांसारखें जें तुझें अस्त्र द्युलोकांतून खालीं टाकिलें असतांना धान्याच्या द्वारें किंवा धान्यांतच संचार करतें तें अस्त्र आम्हांस टाळो; ज्या तुझी आज्ञा कोणीही मोडूं शकत नाहीं ( स्वपिवात ) अशा हे रुद्रा, रोगनिवारणाचीं हजारों औषधें तुजजवळ आहेत; आमच्या पुत्रपौत्रांना तूं इजा करूं नकोस (मा रीरिषः=मा हिंसीः). क्षमया व स्वपिवात यांचे खरे अर्थ वर दिलेच आहेत. तनय शब्द पुल्लिंगी असतांना तनयः ह्याच्या ऐवजीं तनयं असें नपूंसक रूप भाष्यांत कां घातले? अपत्यं तोकं तयोः समे ( अमर २।६।२८ ) = अपत्य व तोक हे शब्द नपूंसकलिंगी असून त्यांचे मुलगा व मुलगी असे दोन्ही अर्थ होतात; तनय शब्द अर्वाचीन संस्कृतांत पुल्लिंगीच आहे; पण तो शब्द ऋग्वेदांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी असा दोन्ही लिंगी आढळतो. स्यात् नः सूनुः तनयः विजावा अग्ने सा ते सुमतिर्भूतु अस्मे ( ३।१।२३ ) = ( १ ) हे अग्नि, आम्हांला धनवान् ( विजावा ) मुलगा ( सूनुः = तनयः ) मिळो; अशी तुझी आमच्या बद्दल सुमति होवो; (२) हे दात्या (अग्ने), आमच्या जवळ पुष्कळ धन ( सूनुः=तनयः =विजावा) असो; आम्हांला खूप ( सा ) धन ( सुमतिः ) तुजपासून ( ते ) मिळो (भूतु). सेदग्निरग्नीन् अत्यस्तु अन्यान् यत्र वाजी तनयः वीळुपाणिः। सहस्रपाथाः अक्षरा समेति ( ७।१।१४ )=(१) तोच ( सः इत् ) अग्नि (अग्निः ) दुसऱ्या ( अन्यान् ) अग्नींवर

( अग्नीन् ) अशी ताण करो ( अति + अस्तु ) कीं ज्याच्यामुळें ( यत्र ) अतिशय धनवान् ( वाजी = सहस्रपाथाः ) मुलगा ( तनयः ), त्याचे हात बळकट असल्याकारणानें ( वीळुपाणिः ), पुष्कळ धनानें ( अक्षरा = अक्षरेण ) युक्त होतो ( सम् + एति ); (२) ज्याच्याजवळ ( यत्र ) अतिशय धन ( वाजी = तनयः = वीळुपाणिः = सहस्रपाथाः ) असल्यामुळें लोकांना जो आपल्या धनांतून ( अक्षरा ) धन ( सं ) देतो ( एति ) तोच ( सः इत् ) दाता ( अग्निः ) इतर ( अन्यान् ) दात्यांना ( अग्नीन् ) मागें टाको ( अति + अस्तु ). सनात्सुजाता तनया धृतव्रता ( ८।२५।२ ) = (१) मित्रावरुण हे अदितीचे मुलगे ( तनया = तनयौ ) असून त्यांचा जन्म चांगला असल्यामुळें ( सुजाता = सुजातौ ) नेहमीं ( सनात् ) अदितीचें व्रत म्हणजे तिची आज्ञा पाळतात ( धृतव्रता = धृतव्रतौ ); (२) हे दोन दाते धनवान् ( सुजाता = तनया ) असून आपल्या धनांतून ( सनात् ) धन देत असतात ( धृतव्रता ). रक्षा णो अग्ने तनयानि तोका ( १०।४।७ ) = ( १ ) हे अग्नि, आमचीं मुलें रक्षणकर; एथें तनयानि हें नपुंसक आहे; त्याचा अर्थ मुलें असा कदाचित् होईल; तनयानि = तोकानि = मुलें; ( २ ) हे दात्या ( अग्ने ), आम्हांस ( नः ) धन ( तनयानि = तोकानि ) दे ( रक्ष ); याहून ज्या इतर ऋचा आहेत त्यांत तनय शब्द पुल्लिंगी कीं नपुंसकलिंगी हें ठरवितां येत नाहीं; कारण तनयाय, तनयस्य व तनये हीं रूपें पुल्लिंगी व नपुंसकलिंगी दोन्हीहीं होतील. विदत् सरमा तनयाय धासिम् ( १।६२।३ ) = ( १ ) सरमा नांवाची कुत्री आपल्या पुत्राला ( तनयाय ) अन्न ( धासिं ) मिळविती झाली ( विदत् ); ( २ ) उषा ( सरमा ) भक्तांनीं धनवान् व्हावें म्हणून ( तनयाय ) पुष्कळ धन ( धासिं ) देते ( विदत् ). उषस्तच्चित्रमा भर अस्मभ्यं वाजिनीवति। येन तोकं च तनयं च धामहे ( १।९२।१३ ) = हे धनवती ( वाजिनीवति ) उषे, आम्हांला तें ( तत् ) म्हणजे अतिशय धन ( चित्रं ) दे ( आभर ) कीं ज्याच्यांतून ( येन ) आम्हांला लोकांना पुष्कळ धन ( तोकं = तनयं ) देतां येईल ( धामहे ); येथें तोकं व तनयं यांचा धन हा एकच अर्थ असावा असें वाटतें; ज्या धनामुळें आम्हीं मुलें धारण करूं म्हणजे आम्हांला पुष्कळ मुलें होतील असा अर्थ करणें हास्यास्पद होईल. सुदासः तोकं तोकाय श्रवसे वहन्ति ( ७।१८।२३ ) = दानशूर पुरुष ( सुदासः ) लोकांजवळ संपत्ति असावी म्हणून ( तोकाय = श्रवसे ) त्यांना धन ( तोकं ) देतात ( वहन्ति ); येथेंही मूल ( तोकं ) मुलाकरितां ( तोकाय ) देतात असा अर्थ करतां येत नाहीं. धत्त विश्वं तनयं तोकमस्मे ( ७।५६।२० ) = हे मरुतांनो, आम्हांलां ( अस्मे ) पुष्कळ ( विश्वं ) धन ( तोकं = तनयं ) द्या ( धत्त ). अपां तोकस्य तनयस्य जेषे मरुत्वान्नो भवतु इन्द्र ऊती ( १।१००।११ ) = धन ( अपां = तोकस्य = तनयस्य ) जिंकण्याच्या वेळीं ( जेषे ) म्हणजे संग्रामांत मरुतांसह ( मरुत्वान् ) इन्द्र आमच्या रक्षणासाठीं ( ऊती ) हजर असो ( भवतु ); तोकस्य तनयस्य जेषे = मुलें जिंकण्याच्या वेळीं

असा अर्थ बरोबर दिसत नाहीं. मा नस्तोके तनये मा न आयौ मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः । वीरान् मा नो रुद्र भामितो वधीः ( १।११४।८ ) = हे रुद्रा, आमच्या मुलाबाळांना ( तोके = तनये ), आमच्या जीवाला ( आयौ ), आमच्या गाईना व आमच्या घोड्यांना इजा करूं नकोस ( मा रीरिषः ); आमच्या वीरांना ( वीरान् ) म्हणजे पुत्रांना बलवान् असा तूं ( भामितः ) मारूं नकोस ( मा वधीः ); एथें तोक व तनय यांचा मुलेंबाळें असा अर्थ कदाचित् होईल; पण तोक तनय वगैरे शब्दांचा संग्राम असा अर्थ असावा; संग्राम जिंकल्यानें गाई, घोडे व संपत्ति मिळते म्हणून हे सर्व शब्द संग्रामवाचक होत; आम्हांला संग्रामांत इजा करूं नकोस; आमच्या वीरांना मारूं नकोस असा खरा अर्थ आहे; प्रस्तुत ऋचेंतील मा नस्तोकेषु तनयेषु रीरिषः या शब्दांचाही तोच अर्थ आहे; तोकेषु = तनयेषु = संग्रामांत. प्राव नः तोके तनये समत्सु आ ( ८।२३।१२ ) = ( १ ) हे अग्नि, संग्रामांत ( तोके = तनये = समत्सु ) आम्हांस ( नः ) रक्षण करच ( प्र + अव ); ( २ ) हे दात्या, आमच्या भांडारांत ( तोके = तनये ) धन ( प्र = नस् = सं = अद् = सु ) दे ( अव ). प्रस्तुत ऋचेचेही दोन अर्थ असावेत; कारण स्वपिवात याचे दोन अर्थ वर दिलेच आहेत; व तोक व तनय यांचा धन अर्थ होतो हेंही वर दिलेल्या उताऱ्यांवरून सिद्ध होतें; परंतु मा व रीरिषः यांचे दुसरे अर्थ लक्ष्यांत येत नाहींत; म्हणून ऋचेचा दुसरा अर्थ देण्याची मी खटपट करीत नाहीं; धनपर अर्थ आहे अशी माझी खात्री आहे. तोकसारखा तुक असाही शब्द आहे; पण तो सुतुक या समासांतच आढळतो; सुतुक याचा पुत्रासहित असा अर्थ करितात पण धनवन्त असा त्या शब्दाचा अर्थ असावा असें मला वाटतें [ पान २८५ खंड १८ चा शेवट ].

**अग्निः अपि रुद्रः उच्यते । तस्य एषा भवति**

अग्निलाही रुद्र म्हटलें आहे; तत्संबंधीं पुढील ऋचा होय.

## खंड ८ वा.

**जराबोध तद्विविड्ढि विशेविशे यज्ञियाय । स्तोमं रुद्राय दृशीकम्** (ऋ० सं० १।२७।१० )

**जरा स्तुतिः । जरतेः स्तुतिकर्मणः । तां बोध । तया बोधयितर् इति वा । तत् विविड्ढि । तत् कुरु । मनुष्यस्य मनुष्यस्य यजनाय स्तोमं रुद्राय दर्शनीयम्**

जराबोध = जरा + बोध; जरा = स्तुतिः; जरा शब्द जॄ (= स्तुति करणें) यापासून; जॄ वयोहानौ ( धा० १०।२८१ ); जारयति जरति; जॄ = म्हातारा होणें एवढाच अर्थ धातुपाठांत आहे; १।८ पान २१ येथें जरिता गरिता असें यास्क म्हणतो; तेथें त्यानें जरतेः स्तुतिकर्मणः अशी व्युत्पत्ति दिली नाहीं; याचें कारण जरिता ( = स्तोता ) हा वैदिक शब्द आहे; म्हणूनच त्यानें गरिता हा पर्याय दिला आहे; यावरून ही व्युत्पत्ति प्रक्षिप्त होय. जराबोध = जरां बोध = स्तुति जाण म्हणजे

ऐक. किंवा तया बोधयितर् = तिनें म्हणजे स्तुतीनें यजमानाची इच्छा देवांना कळविणाऱ्या (हे अग्नि;); स हि जरया स्तुत्या होतृत्वे वर्तमानः अभिमतम् अर्थं यजमानानां संपादयन् देवान् बोधयति ( दुर्ग ) = यजमानांची इच्छा संपादन करणारा अग्नि होता होऊन ती इच्छा देवांना कळवितो. विविड्ढि = कुरु; विष् अभ्यासानें विविष्; विविष् + हि = विविड्ढि; विष्लृ व्याप्तौ (धा० ३।१३ ); विष् = व्यापणें; करणें असा अर्थ धातुपाटांत नाहीं. विशेविशे = मनुष्यस्य मनुष्यस्य. यज्ञियाय = यजनाय. विशेविशे यज्ञियाय = प्रत्येक मनुष्याचा यज्ञ करण्याकरितां; विशेविशे मनुष्याय यज्ञियाय यज्ञसंपादिने जनाय ( दुर्ग ) = यज्ञसंपादन करणाऱ्या मनुष्याला. दृशीकं = दर्शनीयं = सुंदर, रमणीय. दुर्गानें केलेला अर्थः— हे रुद्रा अग्नि, आमची स्तुति जाण; किंवा यजमानांच्या इच्छा देवांना कळविणाऱ्या हे अग्नि, यज्ञसंपादन करणाऱ्या मनुष्याकरितां जें कांहीं करावयाचें असेल तें कर; नंतर देवांचा स्तोता जो तूं त्या तुला ( रुद्राय ) तो यजमान सुंदर म्हणजे ऐकण्याला योग्य अशी स्तुति उच्चारील. सायणः— हे जराबोध जरया स्तुत्या बोधमान अग्ने विशेविशे तत्तद्यजमानरूपप्रजानुग्रहार्थं यज्ञियाय यज्ञसंबंध्यनुष्ठानसिद्ध्यर्थं तदेव यजनं विविड्ढि । प्रविश । यजमानोपि रुद्राय क्रूराय अग्नये तुभ्यं दृशीकं दर्शनीयं समीचीनं स्तोमं स्तोत्रं करोति इति शेषः । जरया स्तुत्या बोधः यस्य असौ जराबोधः । यद्वा । जरया बोध्यते इति जराबोधः । विविड्ढि । विश प्रवेशने । लोटः हि । यद्वा । विष्लृ व्याप्तौ = स्तुतीनें देवांना जागें करणाऱ्या हे अग्नि, यजनमानरूपी प्रजेवर अनुग्रह करण्याच्या हेतूनें ( विशेविशे ) यज्ञानुष्ठान सिद्धीस नेण्याकरितां ( यज्ञियाय ) त्या यज्ञांत ( तत् ) तूं शीर ( विविड्ढि ); क्रूर ( रुद्राय ) असा जो तूं त्या तुला यजमानही योग्य स्तोत्र अर्पण करतोच म्हणजे करीलच; स्तुतीनें ज्याला बोध होतो तो जराबोध; किंवा स्तुतीनें जो जागा केला जातो तो जराबोध; विश् ( = शिरणें ) याला अभ्यास होऊन विविश्; विविश् + हि = विविड्ढि; किंवा विष् व्यापणें यापासून विविड्ढि; सायणाचार्य व्याकरणप्रक्रियेमध्यें जराबोध या शब्दाचें भाष्यांत दिलेल्या विग्रहाहून दोन निराळे विग्रह करितात; म्हणजे जराबोध याचे ते तीन विग्रह करितात; त्याप्रमाणें विविड्ढि याचेही त्यांनीं दोन अर्थ केले आहेत; ऋचेचा अर्थ देतांना शब्दांचें निराळे अर्थ व व्याकरणप्रक्रियेंत निराळे अर्थ यांचीं आणखीही उदाहरणें देतां येतील. विष् = हवि देणें; विष्ट्वी० वाघतः मर्तासः सन्तो अमृतत्वमानशुः ( १।११०। ४ ) = हवि देणारे ( वाघतः ) ऋभू मर्त्य असूनही देवांना हवि देऊन ( विष्ट्वी ) अमर झाले. विष्ट्वी शमीभिः अमृतत्वमेरिरे ( ३।६०।३ ) = ( सुधन्व्याचे मुलगे ) देवांना हवि देऊन ( शमीभिः विष्ट्वी ) अमरत्वाप्रत ( अमृतत्वम् ) गेले ( एरिरे ). तत् विविड्ढि = हवि दे. विविड्ढि हें क्रियारूप आणखी एकदां पुढील ऋचेंत आलें आहेः—तत् विविड्ढि यत् इन्द्रो जुजोषत् स्तुहि सुष्टुतिं नमसा

विवास । उप भूष जरितर् ( ८।९६।१२ ) = हे स्तोत्या ( जरितर् ), जी ( यत् ) तुझी ( ते ) स्तुति इन्द्राला आवडते ( जुजोषत् ) ती ( तत् ) त्याला अर्पण कर; चांगली स्तुति ( सुष्टुतिं ) म्हण ( स्तुहि ); स्तुतीनें ( नमसा ) त्याची सेवा कर ( विवास ); स्तुतीनें त्याच्याजवळ ( उप ) हो ( भूष ); या ऋचेसारखी कांहींशी प्रस्तुत ऋचा होय; जराबोध = जरितर् = हे स्तुति करणाऱ्या. जरा = स्तुति; जॄ = स्तुति करणें किंवा हवि देणें असा अर्थ ऋग्वेदांत पुष्कळ ऋचांत होतो; वामबोधि प्रति स्तोमैर्जरमाणो वसिष्ठः ( ७।७३।३ ) = हे अश्विनांनो, स्तुति करणारा ( जरमाणः ) वसिष्ठ तुम्हांला ( वाम् ) स्तुतींनीं ( स्तोमैः ) उठवीत आहे किंवा संतुष्ट करीत आहे. बुध् = जागें करणें, संतुष्ट करणें; अबोधि होता यजथाय देवान् ( ५-१।२ ) = होता अग्नि देवांना हवि देण्याकरितां उठवीत आहे ( अबोधि ). समिधाग्निं दुवस्यत घृतैर्बोधयतातिथिम् ( ८।४४।१ ) = हवींनीं ( समिधा = घृतैः ) अग्नीला संतुष्ट करा ( दुवस्यत = बोधयत ). बोधामसि त्वा हर्यश्व यज्ञैः ( ७।२१।१ ) = हे इन्द्रा (हर्यश्व), तुला आम्ही हवींनीं ( यज्ञैः ) संतुष्ट करतों. जरया बोधति असौ जराबोधः = जो स्तुतीनें देवांना उठवितो किंवा हवीनें संतुष्ट करतो तो जराबोध. येथें जराबोध म्हणजे अग्नि नसावा. विशेविशे = प्रत्येक देवाला; विश् दोन प्रकारच्या म्हणजे दैवी व मानुषी; येथें दैवी. तत् = तें = हवि किंवा स्तुति. यज्ञियाय = यज्ञार्हाय = हवि घेण्याला योग्य जो त्याला; हा शब्द रुद्राय याचें विशेषण; यज्ञार्ह जो रुद्र त्याला स्तुति ( स्तोमं ) अर्पण कर ( विविड्ढि ). दृशीकं = रूप; इन्द्रे भुजं शशमानास आशत सूरो दृशीके वृषणश्च पौंस्ये ( १०।९२।७ ) = सूरः सूर्यस्य दृशीके रूपे रूपवति वृषणः पौंस्ये बले बलवति इन्द्रे शशमानासः हविषां दातारः भुजं हविः आशत ददति = सूर्यासारखा तेजस्वी व बैलासारखा बळकट असा जो इन्द्र त्याला हवि देणारे हवि अर्पण करितात. दृशीकं स्तोमं = रूपवन्तं स्तोमं = सुंदर स्तुति. रुद्र अतिशय भयंकर असल्याकारणानें त्याला उत्तम स्तुतीनें अळविलें पाहिजे; इतर देवांची साधारण स्तुति ( तत् ) केलेली चालते पण रुद्राची उत्तमच स्तुति केली पाहिजे. १।२७ या सूक्ताची देवता अग्नि; आतांच जें विवरण केलें आहे त्यांत अग्नीचें नांव कोठेंही नाहीं; कदाचित् रुद्राय = अग्नये असें असेल; कारण अग्नीही रुद्रासारखा भयंकर आहे. कदाचित् जराबोध म्हणजे अग्नि होईल; कारण तो देवांना मनुष्यांच्या स्तुति व विशेषेंकरून त्यांचे हवि नेऊन देतो; अग्निः० मर्ताय देवान् सचा बोधाति मनसा 'यजाति ( १।७७।२ ) = साहाय्यकारी ( सचा ) अग्नि मर्त्यांकरितां देवांना हवि देऊन ( मनसा ) संतुष्ट करतो ( बोधाति = यजाति ). अतः कदग्ने रुद्राय नृघ्ने ( ४।३।६ ) = हे अग्नि, माणसांना मारणारा ( नृघ्ने ) जो रुद्र त्याला तूं आमच्यासंबंधानें काय ( कत् ) बोललास ? आमच्यासंबंधानें त्याच्याशीं रदबदली केलीस कीं नाहीं ? तेव्हां जराबोध हें अग्नीलाच म्हटलें असेल. ऋचेचा दुसराही अर्थ आहे. जॄ = देणें; पुरुणीथा जातवेदो जरस्व (७।९।६)=हे धनवंता अग्नि, पुष्कळ धन (पुरुणीथा) दे (जरस्व). धत्तं रत्नानि

जरतं च सूरीन् (७।६७।१०) = हे अश्विनांनो, धन (रत्नानि = सूरीन्) द्या (धत्तं = जरतं). जरा = दान, धन; अच्छा वदा तना गिरा जरायै ब्रह्मणस्पतिम् (३।३८।१३) = धनाकरितां (जरायै) ब्रह्मणस्पतीची चांगल्या शब्दांनीं (गिरा) स्तुति कर (अच्छा वद). अस्मभ्यं सु मघवन् बोधि गोदाः (३।३०।२१) = हे धनवन्ता (मघवन्), धन देणारा (गोदाः) तूं आम्हांला (अस्मभ्यम्) धन (सु) दे (बोधि). जरां धनं बोधति ददाति असौ जराबोधः. तत् = धन; प्रतद्वसू व कृतद्वसू यांतील तत् = धन. विष् = देणें; कुवित्सु नो गविष्टये अग्ने संवेषिषो रयिम् । उरुकृत् उरु णः कृधि (८।७५।११) = हे अग्नि, आम्हांला (नः) पुष्कळ (कुवित्) धन (सु = रयिं = सं) आम्ही धनवान् व्हावें म्हणून (गविष्टये) दे (विवेषः); धन देणारा तूं (उरुकृत्) पुष्कळ (उरु) धन (नस्) दे (कृधि). विश् = धन; भवा पायुर्विशो अस्याः (४।४।३) = (१) या प्रजेचा (विशः) त्राता (पायुः) हो (भव); (२) अतिशय (अस्याः) धन (विशः) देणारा (पायुः) तूं धन (आ) दे (भव). धेनूर्जिन्वतमुत जिन्वतं विशः (८।३५।१८) = धन (धेनूः = विशः) द्या (जिन्वतं). सुप्रीतो अग्निः सुधितो दम आ स विशे दाति वार्यमियत्यै (७।४२।४) = संतुष्ट झालेला (सुप्रीतः = सुधितः) अग्नि भक्तांना त्यांनीं अतिशय धनवान् व्हावें म्हणून (इयत्यै विशे) धन (वार्यं) देतो (दाति). विशेविशे = अतिशय धनाकरितां, भक्तांनीं अतिशय धनवान् व्हावें म्हणून. यज् = देणें; यज्ञ = दान, धन; यज्ञिय = धनानें पूर्ण, अतिशय. रुद्राय = धनाय. स्तु = देणें; स्तोम = दान, धन. दृशीकम् = तेजस्वी धन, सुवर्ण. हे दात्या (जराबोध), आम्ही अतिशय श्रीमान् व्हावें म्हणून (विशेविशे = यज्ञियाय रुद्राय) आम्हांस अतिशय धन (तत् = स्तोमं = दृशीकं) दे (विविड्ढि).

**इन्द्रः (४) इरां दृणाति इति वा । इरां ददाति इति वा । इरां दधाति इति वा । इरां दारयते इति वा । इरां धारयते इति वा**

इन्द्र = इ + न् + द् + र् + अ; इ = इरां = धान्य; न् = ण् = णा; र् = ऋ; द् + ऋ = दृ; दृ + णा = दृणा = दृणाति; इरां दृणाति = बीं फोडून धान्य बाहेर काढतो; इन्द्र शेतांत पेरलेल्या बियाणामधून अन्न उत्पन्न करतो. किंवा इन्द्र = इ + न् + द् + र् + अ; इ + र् + न् = इराम्; द् + अ = द = ददाति; इन्द्र अन्न देतो; किंवा द = दधाति = देतो; किंवा इ + न् = इराम्; द् = दा; दा + र = दारयते; अर्थ दृणाति सारखा; किंवा द् = ध् = धा; धा + र = धारयते; अन्न धारण करतो म्हणजे आपल्या ताब्यांत ठेवतो म्हणून तो इन्द्र. इरां धारयते इति वा हें दुर्गवृत्तींत नाहीं.

**इन्दवे द्रवति इति वा । इन्दौ रमते इति वा**

इन्द्र = इन्द् + द्र; इन्द् = इन्दुः = इन्दवे = सोमासाठीं म्हणजे सोम पिण्यासाठीं; द्र = द्रवति = धांवत सुटतो; सोम पिण्यासाठीं धांवत सुटतो; गुर्जरपाठ

द्रवते असा आहे. किंवा इन्द्र = इन्दू + र; इन्दू = इन्दौ; र = रमते; सोम पिण्यांत रमून जातो.

**इन्धे भूतानि इति वा। तत् यत् एनं प्राणैः समैन्धत तत् इन्द्रस्य इन्द्रत्वम् ( छा० उ० ५।१।१३) इति विज्ञायते**

इन्द्रः = इन्दू + र + अः; इन्दू + अः = इन्ध् + अः = इन्धः; र् गाळावयाचा; सर्व भूतमात्रांत प्राण घालून तो त्यांना जणूं काय पेटवितो; स योऽयं मध्ये प्राणः एष एव इन्द्रः। तान् एषः प्राणान् मध्यतः इन्द्रियेण इन्द्धे। यत् ऐन्द्ध तस्मात् इन्धः। इन्धो ह वै तम् इन्द्रः इति आचक्षते परोक्षं (शत० ब्रा० ६।१।१।२) = प्राण हे ऋषि; त्यांच्या मधोमध असणारा जो प्राण तो इन्द्र; मधोमध असणारा तो प्राण सभोंवतीं असलेल्या प्राणांना प्रज्वलित करता झाला; ज्याअर्थीं त्यानें त्यांना प्रज्वलित केलें त्याअर्थीं खरोखर तो इन्धच; तथापि इन्ध असतांना त्याला लोक इन्द्र म्हणतात. इन्धो वै नाम एषः योऽयं दक्षिणे अक्षन् पुरुषः। तं वै एतम् इन्धं सन्तम् इन्द्रः इति आचक्षते (शत० ब्रा० १४।६।११।२) = उजव्या डोळ्यांत जो हा पुरुष दिसतो तो इन्ध असून लोक त्याला इन्द्र म्हणतात. इन्धे भूतानि हें किंवा ह्याच्यासारखें वाक्य हल्लीं उपलब्ध असलेल्या उपनिषदांत किंवा ब्राह्मणग्रंथांत सांपडत नाहीं; इन्धे भूतानि ह्या व्युत्पत्तीला आधार म्हणून उपनिषद्वाक्य देणें जरूर होतें; छांदोग्योपनिषदांतील दिलेलें वाक्य इन्धे भूतानि ह्याला आधारभूत नाहीं; कारण त्या वाक्यांत इन्द्राला प्रज्वलित केलें असें आहे, इन्द्र प्रज्वलित करतो असें नाहीं. यत् एनं मध्यतः अवस्थितं शरीरस्य प्राणभावेन विष्टभ्य इतरान् प्राणान् वागादीन् इतरप्राणवृत्तिमाहाभाग्यसंप्रदानेन प्राणाधिदेवताः समैन्धत समदीपयन् संतानार्थं तत् इन्द्रस्य इन्द्रत्वम् ( दुर्ग ) = शरीराच्या मध्यभागीं असलेल्या प्राणाला तुझ्यामुळें आम्ही जिवन्त आहोंत असें म्हणणारे वागादि प्राण आपापलें बल देऊन प्रज्वलित करते झाले म्हणून मध्यप्राणाला इन्द्र म्हणूं लागले; ह्या विवरणांत प्राणाधिदेवताः असा शब्द आहे; त्यावरून प्राणाः समैन्धत असा दुर्गाचा पाठ असावा व तोच पाठ बरोबर दिसतो. इति विज्ञायते या शब्दावरून हें उपनिषद् वाक्य असावें असें वाटतें; परंतु तसें वाक्य हल्लीं उपलब्ध असलेल्या उपनिषदांत आढळत नाहीं; कदाचित् छन्दोग्योपनिषदांतील एका प्रकरणाचा (५।१) हा सारांश असेल; आपल्यांपैकीं श्रेष्ठ कोण याचा निर्णय लावून घेण्याकरितां सर्व प्राण प्रजापतीकडे गेले; तेव्हां तुमच्यांपैकीं ज्याच्या बाहेर पडण्यानें शरीर निर्जीव होईल तो श्रेष्ठ असें तो म्हणाला; वाचा, डोळे, कान व मन असे क्रमाक्रमानें एक वर्षभर शरीराला सोडून गेले; तथापि शरीर जिवन्त राहिलेंच; फरक एवढाच कीं वाचा निघून गेल्यावर शरीरास बोलतां येईना, डोळे गेले तेव्हां पाहातां येईना, कान गेले तेव्हां ऐकतां येईना व मन गेलें तेव्हां विचार करतां येईना; पण जेव्हां मुख्य प्राण शरीरांतून बाहेर जाऊं लागला तेव्हां वाक् वगैरेंचे सर्व व्यापार एकदम थांबले; त्यामुळें तूं आमच्यांपैकीं श्रेष्ठ असें

सर्वजण म्हणाले व त्यांनीं आपल्या सर्व शक्ति या मुख्य प्राणांत घातल्या. या दोन व्युत्पत्ति यास्कानें स्वतः दिल्या किंवा दुसऱ्या कोणी घुसडल्या हा प्रश्न आहे; यास्काच्या निरुक्तांत मूळच्या त्या असल्यास त्यांत पुष्कळसा फरक केला गेला असावा; किंवा तत्संबंधीं कांहीं मजकूर गळाला असावा; छांदोग्योपनिषदांतील एका प्रकरणाचा यास्क सारांश देऊन इति विज्ञायते असे शब्द घालील असें वाटत नाहीं.

**इदं करणात् इति आग्रायणः। इदं दर्शनात् इति औपमन्यवः। इन्दतेः वा ऐश्वर्यकर्मणः। इन्। शत्रूणां दारयिता वा। द्रावयिता वा। आदरयिता च यज्वनाम्। तस्य एषा भवति**

इन्द्र = इ + न् + द् + र; इ + द् + न् = इदम्; र = करणम्; हें (इदं) सर्व जग त्यानें केलें (करणात्) म्हणून तो इन्द्र असें आग्रायण म्हणतो. इन्द्र = इ + न् + द् + द् + र् + अ; इ + द् + न् = इदम्; द् + अ = द; द + र् = दर्शनम्; त्यानें हें सर्व उत्पन्न केलेलें जग पाहिलें म्हणून तो इन्द्र असें औपमन्यव म्हणतो. ऐतरेय उपनिषद् (३।१४) व ऐतरेय आरण्यक (२।४।३) ह्यांत इदन्द्र हा मूळचा शब्द असून त्या शब्दाचें इन्द्र असें रूपान्तर केलें गेलें अशी व्युत्पत्ति दिली आहे; इदं दर्शनात् इदन्द्रः = आत्म्यानें हें सगळें पाहिलें म्हणून तो इदन्द्र म्हणजे इन्द्र; ही व्युत्पत्तीही यास्कानें द्यावयास पाहिजे होती. इन्द् = सत्ता चालविणें; इन्द् + रः = इन्द्रः = जो सत्ता चालवितो तो; इन्दु व इन्द्र यांत इन्द् हाच धातु असावा व हीच काय ती इन्द्र शब्दाची खरी व्युत्पत्ति; इदि परमैश्वर्ये (धा० १।६३); इन्दति = अतीशय सत्ता चालवितो, राज्य करतो. इन्द्रः = इन् + द्रः; इन् = इनः = ईश्वरः = समर्थ; द्रः = दारयिता; शत्रूंना फोडून टाकणारा तो इन्द्र; किंवा द्रः = द्रावयिता; जो शत्रूंना पळावयास लावतो तो; किंवा द्रः=आदरयिता=(द्रव्य देऊन) आदर दाखविणारा; हवि देणाऱ्यांना (यज्वनां) द्रव्य देऊन जो आदर किंवा विशेष काळजी दाखवितो तो;द्र=द्द=आद्द=आदर दाखविणें. इन् च असौ द्रश्च इन्द्रः. इन्देः पूर्वपदं द्रवतेः दारयतेः वा उत्तरपदम्। किम् असौ द्रवति दारयति वा इति। शत्रूणां दारयिता द्रावयिता वा। ईश्वरः च असौ द्रावयिता च शत्रूणाम्। अथवा। ईश्वरः च असौ दारयिता च शत्रूणाम् इति इन्द्रः। अथवा। ईश्वरः च असौ आदरयिता च यज्वनाम्। आदरकर्ता यज्वनाम् उपरि (दुर्ग) = इन्द्र शब्दांत इन्द् हें पूर्वपद व द्रु किंवा द्द हें उत्तरपद; तो कोणाला पळावयास लावतो? किंवा फोडून टाकतो? समर्थ असल्यामुळें तो शत्रूंना पळावयास लावतो किंवा फोडून टाकतो; किंवा समर्थ असल्यामुळें हवि देणाऱ्यांचा तो विशेष गौरव करतो; याप्रमाणें इन्द्र = इन्द् + द्र असें तुकडे पाडून दुर्ग वर दिलेले तीन अर्थ करतो; त्याच्या वृत्तींत इन् हा शब्द नाहीं; ज्यानें हा इन् शब्द दुर्गानंतर घातला त्यानें तो इनः असा कदाचित् लिहिला असावा; इनः = ईश्वरः; कदाचित् इन्दति असौ इन् असा तो शब्द उत्पन्न केला असेल किंवा इन् (= सत्ता चालविणें) हा स्वतंत्र धातु मानला

असेल; इनोति असौ इन् अथवा इनः = जो सत्ता चालवितो किंवा धन देतो तो इन् किंवा इन; दुर्गानें इन् किंवा इनः असा शब्द वृत्तींत न घालतां समर्थः असा त्याचा अर्थ दिला असेल. आदरयिता च यज्वनां एथेंच आहे; तेव्हां समर्थ असल्यामुळें शत्रूंना पळावयास लावणारा असून किंवा त्यांना फोडणारा असून हवि देणाऱ्यांना आदर दाखविणारा आहे; आदरयिता च यज्वनां ह्याचा द्रावयिता व दारयिता ह्या दोन्ही व्युत्पत्तींशीं अन्वय करावयाचा. इन्द्र शब्दाच्या ह्या सर्व व्युत्पत्ति यास्कानें आपल्या निरुक्तांत स्वतः होऊन दिल्या किंवा त्यांपैकीं कांहीं मागाहून घुसडल्या गेल्या हें सांगणें अशक्य आहे. शब्दांचीं खरीं रूपें बदलून त्यांचीं कठिण रूपान्तरें केलीं गेलीं; अशा कठिण शब्दांच्या व्युत्पत्ति देणें हीच खरी विद्वत्ता; त्या शब्दांत भरलेला खोल अर्थ उकलून काढणें हेंच विद्वानांचें कर्तव्य होय असें दुर्ग म्हणतो व यास्कानें दिलेल्या इन्द्र शब्दाच्या व्युत्पत्तीमुळें त्याला अत्यानंद होतो. आ यो विवाय सचथाय दैव्यः इन्द्राय विष्णुः सुकृते सुकृत्तरः ( ऋ० सं० १।१५६।५ ) येथें इन्द्र म्हणजे यजमान असा अर्थ करून त्याची सायणाचार्य पुढीलप्रमाणें व्युत्पत्ति देतात; इरां हविर्लक्षणान्नं द्रावयति इति इन्द्रः यजमानः = हवि देवांकडे वाहून नेतो म्हणून यजमानाला इन्द्र म्हटलें आहे; पण येथें इन्द्र म्हणजे यजमान कशावरून? विष्णु इन्द्राला साहाय्य करतो असें आणखी एक दोन ऋचांत म्हटलें आहे; तेव्हां तोच अर्थ येथें कां नसावा? अर्थानुरोधानें शब्दांच्या व्युत्पत्ति करणें हें खोटें शास्त्र होय; जेथें शब्दांच्या अर्थाविषयीं बळकट शंका तेथें व्युत्पत्तीनें काय निष्पन्न होणार?

## खंड ९ वा.

**अदर्दरुत्समसृजो वि खानि त्वमर्णवान् बद्बधानाँ अरम्णाः।**

**महान्तमिन्द्र पर्वतं वि यद्वः सृजो वि धारा अव दानवं हन्** ( ऋ० सं० ५।३२।१ )

**अद्दणाः उत्सम्। उत्सः उत्सदनात् वा। उत्स्यन्दनात् वा। उनत्तेः वा। व्यसृजः अस्य खानि। त्वम् अर्णवान् अर्णस्वतः एतान् माध्यमिकान् संस्त्यायान् बाबध्यमानान् अरम्णाः। रम्णातिः संयमनकर्मा। विसर्जनकर्मा वा**

अदर्दः = अद्दणाः = फोडून टाकलास; दृ अभ्यासानें दर्दृ; अ + दर्दृ + स् = अदर्दर् = अदर्दः; अद्दणाः याबद्दल दुर्गवृत्तींत दारितवान् असि असें आहे. उत्सः = उत् + सः; स = सद् = बसणें; मेघ वर ( उत् ) बसलेला असतो; किंवा सः = स्यन्द् = वाहाणें; स्यन्दू प्रस्रवणे ( धा० १।७६२ ); मेघ वरून ( उत् ) खालीं वाहात येतो. उत्सदनात् वा याच्या आधीं उत्सरणात् वा अशी आणखी एक व्युत्पत्ति महाराष्ट्रपाठांत आहे; स = सृ = हलणें; मेघ वर म्हणजे आकाशांत हालतो. किंवा उत्सः = उन्दः = भिजविणारा; मेघ पृथिवीला भिजवितो; उनत्तेः याबद्दल गुर्जरपाठ

उन्नयनात् असा आहे; उत्सः = उन्नः = उन्नीयमानः = वर म्हणजे आकाशांत वाऱ्यानें नेलेला; किंवा उद् = उदक; न = नयति; मेघ पाणी नेतो. अस्य व त्वं अध्याहृत. अर्णवान् = अर्णस्वतः = उदक आहे ज्यांत अशांना; ऋग्वेदांत अर्ण व अर्णस् असे दोन्ही शब्द आहेत; अर्वाचीन संस्कृतांत फक्त अर्णस्. ज्यांत उदक आहे असे कोण? माध्यमिकान् संस्त्यायान् = मध्यम लोकीं म्हणजे अन्तरिक्षांत असणारे जलाचे संघ म्हणजे मेघ अशांना; संस्त्याय = संघात = जमाव. माध्यमकान् हा गुर्जरपाठ अशुद्ध आहे. बद्बधानान् = बाबध्यमानान्; बाबध्यमानान् याबद्दल दुर्गवृत्तींत बाध्यमानान् असें आहे; बद्बधानान् = उदकभारेण अतिगुरुणा बाध्यमानान् ( दुर्ग ) = अतिशय जड अशा उदकभारानें ज्यांना पीडा होत आहे अशा मेघांना. बध बन्धने ( धा० १।९९८ ) व बध संयमने ( धा० १०।१४ ) असे दोन धातु धातुपाठांत आहेत; दोहींचे चर्करीतरूप बाबध् असें होईल; बाबध्यमान = पाण्याला बांधून टाकणारा किंवा अडकवून ठेवणारा. रम् = संयमन करणें, अडकवून ठेवणें किंवा सोडणें; दुर्ग म्हणतो कीं रम् च्या या दोन अर्थांपैकीं येथें सोडणें हाच अर्थ आहे; कारण इन्द्र मेघ फोडतो असें म्हटलें आहे; तेव्हां फोडलेल्या मेघांतून पाणी बाहेर पडलें पाहिजेच; पण यास्क रम् चे दोन्हीही अर्थ येथें देतो; इन्द्र मेघांना थांबवून ठेवतो किंवा त्यांतलें पाणी खालीं सोडतो असे ते दोन अर्थ होत. धातुपाठांत व आपट्यांच्या कोशांत रम् पहिल्या गणांतच दिला आहे व त्याचा अर्थ रमणें, खेळणें असा आहे; ऋग्वेदांत रम् = थांबविणें.

**महान्तम् इन्द्र पर्वतं मेघं यत् व्यवृणोः व्यसृजः अस्य धाराः अवहन् एनं दानवं दानकर्माणम्। तस्य एषा अपरा भवति**

पर्वतं=मेघम्. वि + वः = वि+अवृणोः=उघडता झालास; वृ = झांकणें; त्याचें भूतकालचें द्वितीय पुरुषाचें एकवचन अवर्; वि + वृ = उघडणें. वि + सृजः = वि + असृजः = सोडून दिल्यास. धाराः = अस्य धाराः = त्या मेघाच्या धारा म्हणजे त्या मेघांतील पाण्याच्या सरी. अव + हन् = अवहन्; गुर्जरपाठ अवाहन् असा आहे. दानवं = एनं दानवं दानकर्माणं = पाणी देण्याचें काम आहे ज्याचें अशा ह्या मेघाला; दुर्गवृत्तींत दानकर्माणं नाहीं; दानवं=उदकदातारं मेघं (दुर्ग). दुर्गानें केलेला अर्थः—हे इन्द्रा, तूं मेघाला फोडलेंस व त्याचीं पाणी वाहण्याचीं भोकें मोकळीं केलींस; अशा ह्या पाण्यांनीं डबडबलेल्या मेघांतून पाणी खालीं सोडलेंस; हे इन्द्रा, तूं प्रचंड मेघाला उघडलेंस व पाणी देणाऱ्याला त्याला हाणून त्याच्या धारा खालीं सोडल्यास. सायणाचार्य बहुतेक दुर्गाप्रमाणेंच अर्थ करितात; यत् = यः = जो तूं; दानवं = दनोः पुत्रं वृत्रम् असुरं यद्वा उदकस्य दातारं मेघम्; अव + हन् = अभिहतवान् असि; असे थोडेसे भिन्न अर्थ ते करतात. ख = ( १ ) धनभांडार, ( २ ) भोंक; अहन् अहिम् अरिणात् सप्त सिन्धून् अपावृणोत् अपिहितेव खानि ( ४।२८।१ ) = इन्द्र अहीला मारता झाला; सात सिंधूंना देता झाला व गुप्त ठेवलेल्या ( अपिहितानि ) धनभांडारांप्रमाणें ( खानि

इव ) त्या नद्या उघडता झाला ( अपावृणोत् ); मेघांत असलेलें पाणी हेंच धनभांडार; इन्द्र मेघ फोडतो व त्यांतील जलरूपी धन बाहेर काढतो. वज्रेण खानि अतृणत् नदीनाम्। वृथा असृजत् ( २।१५।३ ) = इन्द्र वज्रानें पाण्याचें धनभांडार फोडता झाला व तें जोरानें वहावयास लावता झाला. प्रस्तुत ऋचेंतहि खानि व्यसृजः = जलरूपी धनभांडार मोकळें करून वहावयास लाविता झाला. अर्णव = प्रवाह = पूर; यस्याः अनन्तः ० त्वेषः चरिष्णुरर्णवः। अमश्चरति रोरुवत् ( ६।६१।८ ) = ज्या सरस्वति नदीचा अनन्त प्रवाह गर्जना करीत जोरानें जातो; इन्द्र० अहन् वृत्रं निरपामौब्जो अर्णवम् ( १।५६।५ ) = हे इंद्रा, तूं वृत्राला ठार केलेंस व जलाचा प्रवाह बाहेर सोडलास. बध् = ( १ ) व्यापणें, ( २ ) गच्च भरून टाकणें, ( ३ ) पीडा देणें; वां रथो रोदसी बद्बधानः ( ७।६९।१ ) = द्यावापृथिवींना व्यापून टाकणारा म्हणजे जिकडे तिकडे जाणारा तुमचा रथ; वृत्रस्य यद्बद्बधानस्य रोदसी० शवसाभिनच्छिरः ( १।५२।१० ) = हे इन्द्रा, द्यावापृथिवींना पीडा करणाऱ्या वृत्राचें डोकें तूं जोरानें फोडलेंस; परिष्ठिता अतृणद्बद्बधानाः सीरा इन्द्रः स्रवितवे पृथिव्या ( ४।१९।८ ) = अहीनें वेढून टाकलेल्या व पीडिलेल्या नद्या त्यांनीं पृथिवीवर वहावें म्हणून इन्द्र फोडता झाला; बद्बधानाः = पीडिलेल्या; यत्सीमनु प्र मुचो बद्बधानाः० स्यन्दयध्यै ( ४।२२।७ ) = वृत्रानें पीडिलेल्या नद्या वाहण्याकरितां तूं मोकळ्या केल्यास; त्वमुत्सान् ऋतुभिः बद्बधानान् अरंह ऊधः पर्वतस्य वज्रिन् ( ५।३२।२ ) = हे वज्रवंता इन्द्रा, तूं पर्वताचें पोट म्हणजे त्यांतील पाण्यानें डबडबलेल्या नद्या वहावयास लाविल्यास; आ पप्रौ पार्थिवं रजः बद्बधे रोचना दिवि ( १।८१।५ ) = इन्द्र पृथिवीलोकाला आपल्या बलानें व्यापून टाकता झाला व द्युलोकाच्या एकावर एक असणाऱ्या तीन भागांना पीडा करिता झाला किंवा द्युलोकांत एकावर एक असे तीन रोचन कायमचे बांधिता झाला; अहिमिन्द्र जिघांसतो दिवि ते बद्बधे शवः ( १।८०।१३ ) = हे इन्द्रा, तूं अहीला मारीत असतांना तुझें बल द्युलोकाला गच्च भरून टाकतें झालें; शुष्मो रोदसी बद्बधे महित्वा ( ७।६१।४ ) = बलवान् देव आपल्या पराक्रमानें द्यावापृथिवींना गच्च भरून टाकता झाला; न ते अन्तः शवसो० वि तु बाबधे रोदसी महित्वा ( ६।२९।५ ) = हे इन्द्रा, तुझ्या बलाला सीमा नाहीं; तें बल इतकें मोठें आहे कीं ते द्यावापृथिवींना गच्च भरून टाकतें किंवा पीडा देतें. बध् अभ्यासानें बद्बध् किंवा बाबध्. रम् = ( १ ) थांबणें किंवा थोपविणें, ( २ ) रमणें किंवा रमविणें; एवढे दोनच अर्थ ऋग्वेदांत आहेत; पर्वतान् प्रकुपितान् अरम्णात् ( २।१२।२ ) = भीतीनें पळणाऱ्या पर्वतांना इंद्र थोपविता झाला; अरंस्त चित् पर्वतः सरिष्यन् ( २।११।७ ) = धांवणारा पर्वतसुद्धां थांबला; सविता यन्त्रैः पृथिवीम् अरम्णात् ( १०।१४९।१ ) = सविता रज्जूंनीं पृथिवीला थोपविता झाला; अरममाणः अत्येति गा अधि ( ९।७२।३ ) = सोम न थांबता ( अ + रममाणः ) गाळण्यांतून ( अति ) कलशांतील दुधाकडे त्वरेनें जातो; आपश्चिदस्मा अरमंत देवीः

पृथक् व्रजन्तीः ( ३।५६।४ ) = जोरानें (पृथक्) जाणाऱ्या (व्रजन्तीः) नद्या ( आपः ) सुद्धां ( चित् ) ह्याच्या आज्ञेनें ( अस्मै ) थांबल्या; अयं चिद्वातो रमते परिज्मन् ( २।३८।२ ) = जोरानें वाहणारा ( परिज्मन् ? ) हा वारासुद्धां थांबतो; इन्द्र मा त्वा यजमानासो अन्ये नि रीरमन् ( १०।१६०।१ ) = इन्द्रा, दुसरे यजमान तुला थांबवून न ठेवोत; अक्षैर्मा दीव्यः कृषिमित् कृषस्व वित्ते रमस्व ( १०।३४।१३ ) = फांशांनीं खेळूं नकोस; शेतकीच कर व जें मिळेल त्यांतच आनंद मान. त्वम् अर्णवान् बद्बधानान् अरम्णाः = जिकडे तिकडे पसरणारे व पसरून पीडा करणारे पाण्याचे प्रवाह तूं थांबविलेस. पर्वत म्हणजे मेघ नव्हे; त्वं तमिन्द्र पर्वतं महामुरुं वज्रेण वज्रिन् पर्वशश्चकर्तिथ। अवासृजो निवृताः सर्तवा अपः ( १।५७।६ ) = त्या मोठ्या व विस्तृत पर्वताला, हे वज्रवंता इन्द्रा, तूं आपल्या वज्रानें प्रत्येक सांध्याच्या ठिकाणीं कापून काढलेंस व त्यांत अडकून राहिलेलें पाणी वहावयास लाविलेंस; प्र वक्षणा अभिनत् पर्वतानाम् ( ४।१९।४ ) = इन्द्र पर्वतांमधून पाणी वाहण्याचे मार्ग फोडून काढता झाला; अहन्नहिं पर्वते शिश्रियाणम् (१।३२।२) = पर्वतावर आसरा घेतलेल्या वृत्राला इन्द्र मारता झाला. दानव = दानूचा पुत्र; दानोः पुत्रः दानवः; वृत्रपुत्रा० दानुः शये सहवत्सा न धेनुः ( १।३२।९ ) = गाय जशी वासराला घेऊन निजते तशी दानु आपला पुत्र जो वृत्र त्याला घेऊन निजली; वृत्रालाही दानु म्हटलें आहे; अहिं जघान दानुं शयानम् ( २।१२।११ ) = निजलेल्या दानूला म्हणजे वृत्राला इन्द्र मारिता झाला. ऋचेचा अर्थः— इन्द्रा, तूं मेघाला फोडलेंस व त्यांतील जलरूपी धन बाहेर वहावयास लाविलेंस; सर्वत्र पसरणारे व पीडा देणारे ( बद्बधानान् ) पाण्याचे प्रवाह ( अर्णवान् ) तूं थोपविलेस ( अरम्णाः ); दानूच्या पुत्राला ( दानवं ) मारून ( अव + हन् ) जेव्हां ( यत् ) त्या मोठ्या पर्वताला तूं उघडलेंस ( वि + वः ) तेव्हां त्यांतील जलधारा तूं बाहेर सोडल्यास.

## खंड १० वा.

**यो जात एव प्रथमो मनस्वान् देवो देवान् क्रतुना पर्यभूषत्।**
**यस्य शुष्माद्रोदसी अभ्यसेतां नृम्णस्य मह्ना स जनास इन्द्रः ( ऋ० सं० २।१२।१ )**

**यः जातः एव प्रथमः मनस्वी देवः देवान् क्रतुना कर्मणा पर्यभवत्। पर्यगृह्णात्। पर्यरक्षत्। अत्यक्रामत् इति वा। यस्य बलात् द्यावापृथिव्यौ अपि अबिभीतां नृम्णस्य मह्ना बलस्य महत्त्वेन। स जनासः इन्द्रः। इति**

जातः एव = जन्मल्याबरोबर; महाराष्ट्रपाठ जायमानः असा आहे; जायमानः एव = जन्मत असतानांच; पण जन्मत असतानांच इन्द्र शौर्याचीं कृत्यें कशीं करील? मनस्वान् = मनस्वी = मेधावी ( दुर्ग ) = बुद्धिमान. क्रतुना = कर्मणा = शूर कृत्यानें.

पर्यभूषत् = पर्यभवत् = पराभव करिता झाला; दुर्गवृत्तींत पर्यभवत् नाहीं व तो पर्याय देण्याचें कारण नाहीं; कारण अत्यक्रामत् या अर्थांतच पर्यभवत् हा अर्थ येतो; जो देवांना पराक्रमानें मागें टाकतो ( अत्यक्रामत् ) त्याला देवांचा पराभव करण्याची ( पर्यभवत् ) जरूरीच नाहीं; भू + स् ( लेट्चा ) = भूष्; अभूषत् = अभवत्. किंवा पर्यभूषत् = पर्यगृह्णात् = सर्व बाजूंनीं ( आपल्या सत्तेखालीं ) घेता झाला; सर्व देव इन्द्राच्या सत्तेखालीं आले. किंवा पर्यरक्षत् = ( इन्द्र देवांचें ) सर्व बाजूंनीं ( परि ) रक्षण करता झाला; जो सर्वांच्या भोंवतीं असतो तो त्यांचें रक्षण करतोच; परि + भू = सभोंवतीं असणें. किंवा अत्यक्रामत् = पलीकडे जातासा झाला; इन्द्र पराक्रमानें देवांच्या पलीकडे गेला म्हणजे पराक्रमाच्या बाबतींत त्यानें त्यांच्यावर ताण केली; परि = अति = पलीकडे; परि + भू = पलीकडे होणें म्हणजे जाणें. शुष्मात् = बलात्. रोदसी = द्याव्यापृथिव्यौ; अपि अध्याहृत. अभ्यसेतां = अबिभीताम्. नृम्णस्य = बलस्य; क्रतुना व नृम्णस्य हे शब्द भाष्यांत घालण्याची जरूर नाहीं. मह्ना = महत्त्वेन. जनासः याबद्दल जनाः हा शब्द घालणें जरूर होतें. दुर्गानें केलेला अर्थः— इंद्रानें वर दिल्यामुळें गृत्समदाला इंद्राचें रूप प्राप्त झालें; हा इन्द्र आहे व याच्या भोंवतीं मरुत् नाहींत तेव्हां याला मारावें अशा बुद्धीनें त्यांनीं त्याच्याभोंवतीं गरडा दिला; तेव्हां भिऊन त्यानें इंद्राची स्तुति आरंभिली व मी ब्राह्मण आहें, इन्द्र नाहीं असें तो असुरांना म्हणाला; अहो असुरलोकहो ( जनासः ), जो जन्मल्याबरोबर सर्व देवांत अग्रगण्य ( प्रथमः ) झाला, ज्यानें आपल्या बुद्धीचा प्रभाव ताबडतोब दाखविला ( मनस्वान् ), ज्या देवानें आपल्या कृतीनें ( क्रतुना ) इतर देवांना आपल्या सत्तेखालीं आणिलें ( प्रत्यगृह्णात् ) किंवा त्यांचें रक्षण केलें ( पर्यरक्षत् ) किंवा आपल्या प्रभावानें त्यांच्यावर ताण केली ( अत्यक्रामत् ) व ज्याच्या बलाला ( शुष्मात् ) पाहून याचें बल प्रचण्ड आहे (नृम्णस्य मह्ना) अशी त्यांना जाणीव झाल्यामुळें द्यावापृथिवी बलानें मोठ्या असूनही भ्यायल्या तो इन्द्र; मी ब्राह्मण असून त्याच्याच कृपेनें मला त्याचें रूप प्राप्त झालें आहे. सायणाचार्य बहुतेक वरीलप्रमाणेंच अर्थ करितात; कांहीं शब्दांचे ते पुढीलप्रमाणें अर्थ देतात; जातः = ज्यायमानः; पर्यभूषत् = रक्षकत्वेन पर्यग्रहीत् = रक्षक म्हणून (इतर देवांना) त्यानें आपल्या छत्राखालीं घेतलें; किंवा पर्यभूषत् = पर्यभवत् = अत्यक्रामत्; अभ्यसेतां = अबिभीताम् अवेपेतां वा = भ्यायल्या किंवा थरथर कांपूं लागल्या; नृम्णस्य सेनालक्षणस्य बलस्य मह्ना महत्त्वेन युक्तः=सेनारूपी बलानें युक्त (असा इन्द्र). सायणाचार्य पुढील तीन कथा देतातः—संयुज्य तपसात्मानम् ऐन्द्रं बिभ्रत् महत् वपुः। अदृश्यत मुहूर्तेन दिवि च व्योम्नि चेह च। तमिन्द्र इति मत्वा तु दैत्यौ भीमपराक्रमौ। धुनिश्च चुमुरिश्चोभौ सायुधौ अभिपेततुः। विदित्वा स तयोर्भावम् ऋषिः पापं चिकीर्षतोः। यो जात इति सूक्तेन कर्माण्यैंद्राण्यकीर्तयत्॥ अन्ये तु अन्यथा वर्णयन्ति। पुरा किल इंद्रादयः वैन्ययज्ञं समाजग्मुः। गृत्समदोपि तत्र आगत्य सदसि आसीत्। दैत्याश्च इंद्रजिघांसया तत्र समागमन्। तान् दृष्ट्वा निर्जगामेन्द्रो यज्ञात् गृत्समदाकृतिः।

स च गृत्समदो वैन्येन पूजितः यज्ञवाटात् निरगच्छत् । निर्गच्छंतं तम् ऋषिं दृष्ट्वा अयमेव इंद्रः इति मन्यमानाः तम् असुराः परिवव्रुः । नाहमिन्द्रः तुच्छः किं तु एवंगुणोपेतः सः इति अनेन सूक्तेन प्रत्युवाच । अपरेतु एवं कथयंति । गृत्समदस्य यज्ञे प्रविष्टम् एकाकिनम् इन्द्रं ज्ञात्वा असुराः परिवव्रुः । सः इन्द्रः गृत्समदरूपेण यज्ञवाटात् निर्गत्य स्वर्गं जगाम । ततः असुराः इन्द्रः विलंबितः इति अंतःप्रविश्य गृत्समदं दृष्ट्वा पूर्वमेव गृत्समदः गतः अयं तु इन्द्रः अस्मद्भयात् गृत्समदरूपेण आस्ते इति तं जगृहुः । स तान् नाहम् इन्द्रः अयम् इति अनेन सूक्तेन प्रत्युवाच । अयम् एव अर्थः महाभारते प्रपञ्चितः = कडक तपानें इन्द्राचें रूप मिळवून एका क्षणांत गृत्समद स्वर्गांत, अन्तरिक्षांत व इहलोकीं दिसूं लागला; हाच इन्द्र असें समजून धुनि व चुमुरि या नांवाचे दोन पराक्रमी दैत्य आयुधें घेऊन त्याच्याकडे धांवत गेले; आपल्याला मारण्याकरितां ते येत आहेत असें जाणून त्या ऋषीनें 'यो जात एव' या सूक्तानें इन्द्राचीं मोठीं कृत्यें वर्णन केलीं. कांहीं लोक निराळ्या प्रकारची कथा सांगतात; ती अशीः—एकेकाळीं इन्द्र वगैरे देव वैन्याच्या यज्ञांत हविर्भाग मिळविण्याकरितां गेले; तेथें गृत्समदही सभेमध्यें बसला होता; इन्द्राला मारण्याकरितां दैत्य तेथें आले; तेव्हां गृत्समदाचा वेष घेऊन इन्द्र तेथून निघून गेला; वैन्यानें गृत्समदाची पूजा केल्यावर तोही यज्ञगृहांतून जाऊं लागला; हाच इन्द्र असें समजून दैत्यांनीं त्याला वेढा दिला; मी तुच्छ मनुष्य, इंद्र नव्हे; इन्द्र अशा प्रकारचा पराक्रमी देव आहे अशी त्यानें या सूक्तानें त्यांची खात्री पटविली. याहूनही तिसरी निराळी कथा सांगतात ती अशीः—गृत्समदाच्या यज्ञांत गेलेला इन्द्र एकटाच आहे असें पाहून असुरांनीं त्याला गराडा दिला; इन्द्र गृत्समदाचें रूप घेऊन यज्ञगृह सोडून स्वर्गाला गेला; इन्द्राला बाहेर येण्यास कां वेळ लागला हें जाणण्याकरितां दैत्य आंत शिरले व गृत्समदाला पाहून, गृत्समद तर पूर्वींच निघून गेला तेव्हां आमच्या भयानें गृत्समदाचें इन्द्रानें सोंग घेतलें आहे असें समजून त्याला त्यांनीं पकडलें; मी इन्द्र नाहीं, इन्द्र अशा प्रकारचा आहे असें त्यानें ह्या सूक्तानें इन्द्राचें वर्णन केलें; हीच कथा महाभारतांत विस्तारानें सांगितली आहे. वीतहव्यो महाराज ब्रह्मवादित्वमेव च । तस्य गृत्समदः पुत्रो रूपेणेन्द्र इवापरः ॥ शक्रस्त्वमिति यो दैत्यैर्निगृहीतः किलाभवत् । ऋग्वेदे वर्तते चाग्र्या श्रुतिर्यस्य महात्मनः (महा० अनुशासनपर्व अ० ३० श्लो० ५८।५९) = हे धर्मराजा, ब्रह्मवादी झालेला वीतहव्य नांवाचा एक ऋषि होऊन गेला; त्याचा इंद्रासारखा सुंदर असा गृत्समद नांवाचा पुत्र होता; तूं इंद्र आहेस असें म्हणून त्याला दैत्यांनीं पकडलें; त्याच्यासंबंधाचें एक उत्तम सूक्त ऋग्वेदांत आहे. ही कथा अगदींच अल्प आहे; गृत्समदाच्या कथेचा विस्तार महाभारतांत दुसरीकडे असल्यास ती विस्तृत कथा मला सांपडली नाहीं. या तीन कथा या सूक्ताचें निदान होत. येथें जनासः म्हणजे पंचजन; हे पंचजन इन्द्राला मानीत नव्हते; परंतु इन्द्र व त्याचे अनुयायी यांनीं पंचजनांचा पराभव केला त्यामुळें त्यांना इन्द्राचें महत्त्व कबूल करणें भाग पडलें. ऋचेचे

दोन अर्थ आहेत. जातः = ( १ ) जन्मलेला; ( २ ) जा = धन; जातः = धनवान्. जातः एव = ( १ ) जन्मताच; ( २ ) जातः = एवः = धनवान्; इ ( = देणें ) + व = एव = धन किंवा धनवान्. प्रथमः = ( १ ) पहिला, सर्वांत श्रेष्ठ; ( २ ) प्रथ = धन (पान ७०९); प्रथ + मः = धनवान्. मनः = ( १ ) धैर्य किंवा शौर्य, ( २ ) धन. देवः = ( १ ) देव, ( २ ) दि ( = देणें ) + वः = धनवान् किंवा धन. क्रतुः = ( १ ) बल, ( २ ) धन. पर्यभूषत् = ( १ ) पराभव करता झाला किंवा सत्ता चालविता झाला, ( २ ) भू = देणें; अभूषत् = देता झाला; परि = पूर्णपणें. शुष्म = ( १ ) बल, ( २ ) धन; द्युमन्तं शुष्मं मघवत् सु धत्तन ( १।६४।१४ ) = अतिशय ( द्युमन्तं = मघवत् ) धन ( शुष्मं = सु ) द्या ( धत्तन ). रोदसी = ( १ ) द्यावापृथिवी; ( २ ) रुद् = देणें; रोद = धन; सि = देणें; रोदसिः = धन देणारा किंवा धन देणारी; रोदसी हें रोदसि याचें द्विवचन. अभ्यसेताम् = ( १ ) भ्यायल्या; ( २ ) अभि + असेताम्; अभि = अ + भि; अ = भि = धन; सि = देणें; उत नो गोमतीरिष उत सातीः अहर्विदा । वि पथः सातये सितम् ( ८।५।९ ) = हे अश्विनांनो, आम्ही धनवान् व्हावें म्हणून (सातये) आम्हांला अतिशय ( गोमतीः ) धन ( इषः = सातीः = पथः ) द्या ( वि + सितं ); किंवा सा = देणें; धा याचीं जशीं धेतन, धेथे अशीं रूपें होतात तसें सा याचें असेतां असें रूप होईल. नृम्ण = ( १ ) बल, ( २ ) धन; नृम्ण, द्युम्न व सुम्न यांतील नृ, द्यु व सु यांचा अर्थ धन; म्न हा प्रत्यय; नृम्णस्य मह्ना = ( १ ) अतिशय बलानें, ( २ ) धनाच्या परमावधीनें. जनासः = ( १ ) पंचजन, ( २ ) श्रीमन्त लोक. इन्द्र = ( १ ) इंद्र, ( २ ) इन्द् (= देणें) + रः = दाता. ( १ ) जो देव जन्मल्याबरोबर श्रेष्ठ व शूर असल्यामुळें इतर देवांना आपल्या बलानें पादाक्रांत करता झाला किंवा आपल्या सत्तेखालीं आणता झाला व ज्याचें बल पाहून द्यावापृथिवी थरथर कांपूं लागल्या तो, हे पंचजनांनो, आपल्या बलाच्या परमावधीनें इन्द्र या नांवाला पात्र झाला आहे; ( २ ) धनवान् असून ( जातः = एवः = प्रथमः = मनस्वान् = देवः ) जो आपल्या धनांतून अतिशय ( परि ) धन ( देवान् ) देत असतो ( अभूषत् ) व ज्याच्या धनांतून त्याच्या दात्या राण्या पुष्कळ धन (अभि) देत असतात ( असेतां ) त्याला, हे श्रीमन्तांनो, त्या परमावधि धनामुळें दाता म्हणावें.

**ऋषेः दृष्टार्थस्य प्रीतिः भवति आख्यानसंयुक्ता**

इंद्रानें केलेलीं कृत्यें दिव्य दृष्टीनें पाहून गृत्समदऋषीला हर्ष होतो व तो हर्ष आख्यानाला म्हणजे वर्णनाला तो जोडतो म्हणजे पाहिलेल्या गोष्टींचे तो ह्या सूक्तांत वर्णन करतो; आख्यानेन संयुक्ता प्रीतिः = वर्णनाला जोडलेला हर्ष म्हणजे ज्याचे पर्यवसान वर्णन करण्यांत होतें असा हर्ष; इंद्राचीं कृत्यें पाहून ऋषीला इतका हर्ष झाला कीं वर्णन रूपानें तो प्रकट केल्याशिवाय त्याला राहवेना.

**पर्जन्यः ( ५ ) तृपेः आद्यन्तविपरीतस्य । तर्पयिता जन्यः । परः । जेता वा ।**

**जनयिता वा। प्रार्जयिता वा रसानाम्। तस्य एषा भवति**

पर्जन्यः = पर्ज् + जन्यः=पर्त्+जन्यः; तृप तृप्तौ. ( धा० ६।२७); तृप् = तृप्त करणें, या धातूचे आदि व अन्त ह्यांची उलटा पालट करून पृऋत् अशीं अक्षरें होतात; ऋ=अर्; प् + अर् + त् = पर्त्; जन्यः =जनेभ्यः साधुः=लोकांना उपयुक्त; पाऊस लोकांना तृप्त करतो ( तर्पयिता ) व उपयोगी पडतो ( जन्यः ); अथवा पर् = परः = उत्कृष्ट; जन्यः = जेता = जिंकणारा; पाऊस सर्व संकटें जिंकण्यांत श्रेष्ठ म्हणून तो पर्जन्य; जि ( = जिंकणें ) पासून जन्य; किंवा जन्यः = जनयिता = उत्पन्न करणारा; सर्व सुखसाधनें उत्पन्न करणाऱ्यांत जो श्रेष्ठ तो पर्जन्य; किंवा पर्जन्यः = प् + अ + र् + र् + ज + न् + यः = प् + र् + अ+र्+ज+य=प्रर्जय = प्रार्जय = प्रार्जयिता = संपादन करणारा; जल (रसानां) संपादन करणारा तो पर्जन्य. पिपर्ति जनं पर्जन्यः। परः अम्भः पुरः जन्यते अनेन इति वा ( अमर ३।३। १४६ क्षीरस्वामी ) = लोकांना उपयुक्त ( जन्यं ) धान्य वगैरे जो पुरवितो ( पिपर्ति ) तो पर्जन्य; किंवा पर = पाण्याचा पूर ज्याच्याकडून निर्माण केला जातो तो पर्जन्य. पर्जन्यसंबंधीं पुढील ऋचा होय.

## खंड ११ वा.

**वि वृक्षान् हन्त्युत हन्ति रक्षसो विश्वं बिभाय भुवनं महावधात्।**
**उतानागा ईषते वृष्ण्यावतो यत्पर्जन्यः स्तनयन् हन्ति दुष्कृतः ( ऋ० सं० ५।८३।२ )**

**विहन्ति वृक्षान्। विहन्ति च रक्षांसि। सर्वाणि च अस्मात् भूतानि बिभ्यति महावधात्। महान् हि अस्य वधः**

उत=च. रक्षसः=रक्षांसि=राक्षस; ऋग्वेदांत रक्षस् शब्द नपुंसकलिंगी व पुलिंगी असा दोन्हीं लिंगी आहे; पण अर्वाचीन संस्कृतांत तो पुल्लिंगी नाहीं. विश्वं=सर्वाणि. भूवनं= भूतानि. बिभाय=बिभ्यति. हे तीन शब्द ऋचेंत एकवचनी आहेत;पण अर्थाकरितां भाष्यांत त्यांचें बहुवचन केलें आहे. अस्मात् अध्याहृत. महावधात् = ज्याचा तडाखा ( वधः ) मोठा म्हणजे भयंकर आहे अशा पर्जन्यापासून; यास्क बहुव्रीहि समासाच्या विग्रहांत यस्य वगैरे संबंधीसर्वनामें घालीत नाहीं. ऋग्वेदांत वध म्हणजे वज्र; पर्जन्याचें वज्र फार प्रचंड असतें.

**अपि अनपराधः भीतः पलायते वर्षकर्मवतः। यत् पर्जन्यः स्तनयन् हन्ति दुष्कृतः पापकृतः**

उत = अपि. अनागाः = अनपराधः; आगस् = अपराध. भीतः अध्याहृत. ईषते = पलायते. वृष्ण्यावतः = वर्षकर्मवतः = स्तनयित्नुशब्दैः अशनिं मुंचतः ( दुर्ग ) = गडगडाट करून वज्र खालीं सोडणाऱ्यापासून. दुष्कृतः = पापकृतः = पापें करणाऱ्यांना; दुष्कृतः हा शब्द भाष्यांत नको आहे. दुर्गानें केलेला अर्थः— जेव्हां ( यत् ) ओषधि पिकवून व त्यामुळें सुबत्ता उत्पन्न करून गडगडणारा पर्जन्य दुष्काळांत वाव-

रणारे चोर वगैरे पापाचरणी लोकांना ठार करतो तेव्हां तो झाडें वज्र फेंकून मोडून टाकतो व राक्षसासारखे दुष्कर्मी लोक ठार करतो; त्याच्या भयंकर वज्रामुळें सर्व प्राणी त्याला भितात; त्याची भीति इतकी विलक्षण असते कीं तो पाऊस पाडावयास लागला व पृथिवीवर वज्र फेंकूं लागला कीं अनपराधी मनुष्यसुद्धां त्याला भितो. वृषन् = बैल; वृष्णः इदं वृष्ण्यं = बैलाचें बळ; पौंस्य, क्षत्र, शवस्, शुष्म, वीर्य हे शब्द वृष्ण्य शब्दासहित ऋचांतून येतात; त्या सर्वांचा अर्थ बल, शौर्य किंवा शूर कृत्यें; वृष्ण्यवान् = बलवान्, शौर्याचीं कृत्यें करणारा. पर्जन्य आपलें बळ दाखवूं लागला, कडकडाट करून विजा पाडूं लागला कीं नुसते पापी लोकच भितात असें नाहीं तर निष्पाप मनुष्यही भिऊन थरथर कांपूं लागतो.

**बृहस्पतिः ( ६ ) बृहतः पाता वा पालयिता वा । तस्य एषा भवति**

बृहस्पतिः = बृहत् + पतिः; पतिः = पाता वा पालयिता वा = रक्षण करणारा. बृहतः महतः अस्य जगतः उदकस्य वा पाता रक्षिता । पालयिता अपि रक्षिता एव ( दुर्ग ) = हें जें मोठें जग त्याचें किंवा उदकाचें रक्षण करणारा तो बृहस्पति. तद्-बृहतोः करपत्योः (पा० ६।१।१५७ ह्या सूत्रावरील वार्तिक) यानें तत् व बृहत् यांतील त् जाऊन त्याच्या जागीं स् येतो; बृहत् + पतिः=बृहस् + पतिः; बृहत् = धन; पतिः =दाता; बृहस्पतिः = धनदाता.

## खंड १२ वा.

**आश्नापिनद्धं मधु पर्यपश्यन्मत्स्यं न दीन उदनि क्षियन्तम् ।**
**निष्टज्जभार चमसं न वृक्षाद्बृहस्पतिर्विरवेणा विकृत्य ( ऋ० सं० १०।६८।८ )**
**अशनवता मेघेन अपिनद्धं मधु पर्यपश्यत् । मत्स्यम् इव दीने उदके निवसन्तम्**

अश्ना = अशनवता = व्यापनवता ( दुर्ग ) = व्यापून टाकणाऱ्याकडून. मेघेन अध्याहृत. अशू व्याप्तौ ( ५।१८ ); अश् + न = अश्न = व्यापणारा. अपि-नद्धं = सर्व बाजूंनीं बांधलेलें किंवा अडविलेलें. न = इव. उदनि = उदकें; उदन् = उदक. क्षियन्तं = निवसन्तं = राहणाऱ्या.

**निर्जहार तत् चमसम् इव वृक्षात् । चमसः कस्मात् । चमन्ति अस्मिन् इति । बृहस्पतिः विरवेण शब्देन विकृत्य**

निष्टज्जभार = निः + तत् + जभार; निः + जभार = निर्जहार = बाहेर काढता झाला; निर्जहार या बद्दल दुर्गवृत्तींत निर्हृतवान् असें आहे. चमस हा शब्द कशापासून ? चम् ( = भक्षण करणें ) ह्यापासून; ज्यांतून ( अस्मिन् ) सोमहवि भक्षण करतात ( चमन्ति ) तो चमस. विरवेण = शब्देन=गर्जनेनें; विरवेण हा शब्द भाष्यांत नको. दुर्गानें केलेला अर्थः— जसा कोळी थोडक्या ( दीने ) पाण्यांत ( उदनि ) असणाऱ्या ( क्षियन्तं ) माशाला पाहतो तसा व्यापणाऱ्या ( अश्ना ) म्हणजे चोहोंबाजूंनीं गुरफटून टाकणाऱ्या मेघामें आपल्या आंत अडकवून ठेवलेले ( अपि-

नद्धं ) पाणी ( मधु ) बृहस्पति पाहता झाला ( पर्यपश्यत् ); जसा एखादा कुशल कारागीर झाडांतून चमस बाहेर काढतो तसा भयंकर आवाजानें ( विरवेण ) मेघाला खिळखिळा करून (विकृत्य) किंवा कापून काढून बृहस्पति त्यांतील पाणी बाहेर काढता झाला ( निर्जभार ). अश्नाति भक्षयति असौ अश्नः = जो खातो तो अश्न; अश्न नांवाचा एक इन्द्राचा शत्रु होता; इन्द्रानें अश्न, शुष्ण, व्यंस, प्रिप्रु, नमुचि व रुधिक्रा यांना ठार मारलें ( २।१४।५ ). आदर्दतम् अपिहितानि अश्ना ( ४।२८।५ ) = हे इंद्रासोमांनो, तुम्ही अश्नानें झांकून टाकलेलें पाणी त्याला फोडून बाहेर काढलेंत; अश्ना = अश्नेन. अपिनद्धं = अपिहितं = पार लपविलेलें. परि = मधून. दीन म्हणजे थोडकें असा अर्थ नाहीं; क्रत्वः दीनता ( ७।८९।३ ) = धनाचा मुबलकपणा; दीनैः दक्षैः ( ४।५४।३ ) = अमूप धनामुळें; दीनदक्षाः मर्त्यासः = ज्यांच्याजवळ अतिशय धन आहे असे मनुष्य; दीने उदनि = खोल पाण्यांत. इंद्रो वलं रक्षितारं दुघानां करेणेव वि चकर्ता रवेण ( १०।६७।६ ) = गाई ( दुघानां ) कोंडवाड्यांत ठेवणारा ( रक्षितारं ) जो वल त्याला मोठ्यानें ओरडून (आ रवेण) जणूंकाय करवतीनें (करेण) कापून काढता झाला ( वि चकर्त ). ऋचेचा अर्थः— खोल ( दीने ) पाण्यांत ( उदनि ) राहाणाऱ्या ( क्षियन्तं ) माशाला ( मत्स्यं ) जसा कोळी सहज पाहातो तसा बृहस्पति अश्नानें चहूं बाजूंनीं झांकून टाकलेलें गोड पाणी (मधु) अश्नाच्या शरीरामधून (परि) बृहस्पति पाहाता झाला; जसा एकादा कुशल कारागीर करवतीनें झाड बरोबर कापून त्यांतून ( वृक्षात् ) पिण्याचें पात्र ( चमसं ) बाहेर काढतो त्याप्रमाणें मोठ्यानें ओरडून ( वि रवेण = आ रवेण ) बृहस्पति अश्नानें अडविलेलें तें पाणी ( तत् ) बाहेर काढता झाला ( निर्जभार ). बृहस्पतीला अश्नाच्या शरीरांतून त्यानें अडविलेलें पाणी स्वच्छ दिसलें; रवेणा = रवेण + आ; वि व आ हे उपसर्ग रवेण याला जोडावयाचे; वि रवेण = आ रवेण = मोठ्यानें ओरडून; बृहस्पति ओरडल्याबरोबर अश्नाचें म्हणजे मेघाचें शरीर पार फाटून जातें. विकृत्य यांत कृत् ( = कांपणें ) हा धातु आहे; विकृत्य = कांपून काढून.

**ब्रह्मणस्पतिः ( ७ ) ब्रह्मणः पाता वा पालयिता वा। तस्य एषा भवति**

ब्रह्म म्हणजे अन्न किंवा वेद ( दुर्ग ); त्यांचा पालनकर्ता; पण ब्रह्म = धन; ब्रह्मणस्पतिः = धनाचा दाता.

## खंड १३ वा.

**अश्मास्यमवतं ब्रह्मणस्पतिर्मधुधारमभि यमोजसातृणत्।**
**तमेव विश्वे पपिरे स्वर्दृशो बहु साकं सिसिचुरुत्समुद्रिणम् (ऋ०सं०२।२४।४)**

**अशनवन्तम् आस्यन्दनवन्तम् अवातितं ब्रह्मणस्पतिः मधुधारम् अभि यम् ओजसा बलेन अभ्यतृणत् तम् एव सर्वे पिबन्ति रश्मयः सूर्यदृशः। बहु एनं सह सिञ्चन्ति उत्सम् उद्रिणम् उदकवन्तम्**

अश्मास्यं = अश्म + आस्यम्; अश्म = अशनवन्तम्; आस्यं = आस्यन्दनवन्तम्; अश्मशब्दात् अशनवन्तम् इति आस्यशब्दात् आस्यन्दनवन्तम् इति भाष्यकारश्चकार। तथा सामर्थ्यम् अपेक्ष्य। उदकव्यापनक्रियया तद्वन्तम् आस्यन्दनक्रियया च उदकप्रक्षरण क्रियया तद्वन्तम् ( दुर्ग ) = अश्म म्हणजे उदकानें व्यापून टाकणारा व आस्य म्हणजे उदक खालीं सोडणारा असे भाष्यकार अश्मास्यं या शब्दाचे दोन तुकडे करतो; कारण त्या शब्दांत ते दोन्हीही अर्थ आहेत हें त्याच्या लक्षांत आलें; अश् = व्यापणें; अश् + मन् = अश्मन् = व्यापणारा; स्यन्द् = वाहणें; आस्यन्दति असौ आस्यः = वाहाणारा; मेघ आकाश व्यापून टाकतो व नंतर पाणी वाहावयास लावतो. अवतं = अवातितं = अवाक् अतितं भूमिम् उदकभावेन गतं ( दुर्ग ) = उदकाच्या रूपानें भूमीवर खालीं गेलेला; अवतं = अव् + अतं; अव् = अव = अवाक् = खालीं; अतं = अतितं = गतं = गेलेला; अत् = जाणें. अभि हा उपसर्ग भाष्यांत दोनदां आला आहे; पण पहिला अभि दुर्गवृत्तींत नाहीं व त्याची आवश्यकताही नाहीं. ओजसा = बलेन; ओजसा शब्द भाष्यांत नको. विश्वे = सर्व. पपिरे = पिबन्ति, स्वर्दशः = सूर्यदशः = सूर्यस्य रश्मयः; स्वर् इव ये दृश्यन्ते ते सूर्यसमानदर्शनाः। स्वर्भावेन वा सूर्यभावेन ये मण्डलीभूताः दृश्यन्ते ( दुर्ग ) = जे सूर्यासारखे दिसतात; किंवा जे स्वर् म्हणजे द्युलोक त्याचें रूप घेऊन किंवा सूर्याचें रूप घेऊन मंडलाकार झालेले दिसतात; असे सूर्याचे किरण हेच द्युलोक किंवा सूर्य; रश्मयः अधाहृत. साकं = सह. सिसिचुः = सिञ्चन्ति. उत्सं = एनम् उत्सम्. उद्रिणं = उदकवन्तम्. मधुधारं = उदकं धारयितारं ( दुर्ग ); मधु = उदक; धारं = धारयितारम्. दुर्गानें केलेला अर्थः—उदकानें द्युलोक व्यापणारा ( अश्म ), उदक वर्षाव करणारा ( आस्यं ), उदक धारण करणारा व भूमीकडे खालीं जाणारा अशा ज्या मेघाला ( अवतं ) बृहस्पति जोरानें ( ओजसा ) चहूंबाजूंनीं ( अभि ) फोडता झाला ( अतृणत् ) त्यालाच ( तम् एव ) सूर्याचे सर्व किरण पिऊन टाकतात व उदकानें भरलेला ( उद्रिणं ) त्या ( एनम् ) मेघाला ( उत्सं ) एकजुटीनें ( साकं ) आणि भरपूरपणें ( बहु ) ओततात ( सिसिचुः ); म्हणजे किरण उदक आकर्षण करून तें पृथिवीवर पावसाच्या रूपानें सोडतात. सायणः—ब्रह्मणः मंत्रस्य पतिः पालयिता = मंत्राचें रक्षण करणारा; अश्मास्यं = अश्मवत् दृढतरास्यं = ज्याचें तोंड दगडासारखें मजबूत आहे अशाला; मधुधारं = मादयित्री धारा यस्य तं = ज्याच्या धारा आनंद उत्पन्न करतात अशाला; अवतं = अवरतात् ततं विस्तृतं = खालीं पसरलेल्या मेघाला; स्वर्दशः = स्वर् आदित्यः। तस्य संबंधिनः द्रष्टारः रश्मयः = पाहणारे सूर्याचे किरण; बहु सिसिचुः = घर्मकाले यत् पीतं ततः अपि बहुतरं सहस्र गुणितं सिंचन्ति = उन्हाळ्यांत जें पाणी ते पितात म्हणजे आकर्षण करून घेतात त्यापेक्षां हजारों पटीनें अधिक अशा उदकाचा ते वर्षाव करितात. अश्मा आस्यं यस्य = ज्याचें तोंड दगड आहे म्हणजे दगडासारखें टिकाऊ आहे असा ( हौद ); हौदाला जें

झांकण असतें तें दगडासारखें खंबीर असतें; किंवा अश्मा आस्ये यस्य = ज्याच्या तोंडांत दगड बसविला आहे असा; १०।१०१।७ यांत अश्मचक्र हें अवतं याचें विशेषण आहे; चक्र म्हणजे चाकासारखें वाटोळें झांकण; हें झांकण म्हणजे एक मोठा वाटोळा दगड. अवत याचे ( १ ) द्रव्य ज्यांत पुरलें आहे असा खड्डा, ( २ ) विहीर किंवा हौद, ( ३ ) डबकें किंवा तळें, ( ४ ) मेघ, (५) सांठा किंवा भांडार असे अर्थ असावेत; मूळ अर्थ खड्डा; त्याच्यांतून इतर अर्थ निघाले असावेत. मधु-मधुराः धाराः यस्मात् = ज्याच्यापासून मधासारख्या गोड धारा पडतात. स्वर् = सूर्य; जो सूर्य पाहातो म्हणजे फार दिवस जगतो तो स्वर्दृक्; हें विशेषण देवांनांही लाव-लेलें आढळतें; कदाचित् त्या विशेषणाचा अर्थ सूर्याला नेहमीं पाहाणारे म्हणजे अमर असा असेल. बहु = ( १ ) पुष्कळ, ( २ ) सर्व. ऋचेचा अर्थः— ज्याचें झांकण दगडाचें आहे व ज्यांतून मधासारख्या गोड धारा पडतात अशा ज्या हौदाला ब्रह्मण-स्पति जोरानें फोडता झाला तोच हौद म्हणजे त्यांतील मधुर जल सर्व देव पिते झाले; जलानें भरलेला ( उद्रिणं ) तो हौद ( उत्सं ) त्यांनीं सगळयांनीं मिळून (साकं) अगदीं ( बहु ) ओतून टाकला म्हणजे रिकामा केला ( सिसिचुः ).

## खंड १४ वा.

**क्षेत्रस्य पतिः ( ८ )। क्षेत्रं क्षियतेः निवासकर्मणः ।**
**तस्य पाता वा पालयिता वा । तस्य एषा भवति**

क्षि (=वसति करणें) ह्यापासून क्षेत्र; क्षि+त्रं=क्षेत्रं; तदपाश्रयेण हि ग्रामे क्षियन्ति कुटुंबिनः (दुर्ग) = शेताच्या आश्रयानेंच म्हणजे शेतांत पिकलेल्या धान्यामुळें कुटुंबी लोक गांवांत राहतात; क्षि क्षये (धा० १।२३६). क्षेत्राचा पालन करणारा तो क्षेत्रस्य पतिः. रुद्रं क्षेत्रपतिं प्राहुः केचिदग्निमथापरे । स्वतंत्र एव वा कश्चित् क्षेत्रस्य पतिरुच्यते ( सायण ) = कित्येक क्षेत्रपति म्हणजे रुद्र समजतात तर दुसरे तो अग्नि असें म्हण-तात; क्षेत्रपति हा याहून निराळा म्हणजे स्वतंत्रच देव आहे असेंही म्हणतात.

## खंड १५ वा.

**क्षेत्रस्य पतिना वयं हितेनेव जयामसि ।**
**गामश्वं पोषयित्न्वा स नो मृळातीदृशे ( ऋ० सं० ४।५७।१ )**

**क्षेत्रस्य पतिना वयं सुहितेन इव जयामः । गाम् अश्वं पुष्टं पोषयितृ च आहर इति । स नः मृळाति ईदृशे । बलेन वा धनेन वा । मृळतिः दानकर्मा । तस्य एषा अपरा भवति**

हितेन = सुहितेन; हितेन केनचित् आप्तेन मित्रेण संयुक्ताः ( दुर्ग ) = हित म्हणजे विश्वासू असा एखादा मित्र त्याच्या साहाय्यानें; दुर्ग इव शब्द गाळतो. जयामसि = जयामः. पोषयित्नु = पुष्टं पोषयितृ च = गाईघोड्यांसारखे धष्टपुष्ट व

पोषण करणारें ( धन ); गवाश्वादीनि धनानि पुष्टानि बलवन्ति पोषयितॄणि पोषणाय समर्थानि ( दुर्ग ); पोषयित्नु या एकवचनाचें दुर्ग बहुवचनानें याप्रमाणें विवरण करितो. आ = आहर = आणून दे; उपनामितद्रव्याणां चास्माकं क्षेत्रस्य पतिना तत्प्रसादादेव तानि भोक्तुं शक्तिरस्तु । कथमिति । उपजातशक्तयो वयम् एवम् आज्ञापयन्तः परिचारकान् इदम् आहरत इति ( दुर्ग ) = क्षेत्रपतीच्या कृपेनें असें बहुविध धन मिळाल्यावर त्याच्याच कृपेनें तें भोगण्याचें सामर्थ्य आम्हांला असो; म्हणजे हें आणून द्या, तें आणून द्या अशी नोकरांना आज्ञा करण्याइतकें सामर्थ्य आम्हांस येवो; आहर इति याचें इतकें विस्तृत विवरण दुर्ग करितो. बलेन वा धनेन वा हे अध्याहृत शब्द दुर्गवृत्तींत नाहींत; त्यांचा अन्वय स नो मृळाति ईदृशे ह्याच्याशीं असावा असें वाटतें; आपलें बल खर्चून किंवा आपल्या धनांतून क्षेत्रपति आम्हांला दान देवो. मृळ् = देणें; मृळाति = मृडतु ( दुर्ग ); यथा अश्नुवीमहि तथा क्षेत्रस्य पतिः अस्मान् मृडतु । ईदृशे धनलाभाय भोगाय च अस्मान् ददातु धारयतु ( दुर्ग ) = क्षेत्रपति आम्हांला इतकें धन देवो व तें धन भोगण्याला इतकें समर्थ करो कीं तें सर्व प्रकारचें धन आम्हांला भोगतां येईल. सायणः — हितेनेव । इवशब्दः एवार्थे । सर्वप्राणिहितेन एव तेन । अथवा मित्रेण एव । यथा सख्युः साहाय्ये सन् स्वकार्यं साधयति तद्वत् । जयामः क्षेत्रम् । स देवो गाम् अश्वं च पोषयित्नु पोषयितृ गवाश्वलक्षणं धनम् आ हरतु इति शेषः । स एव देवः नः अस्मान् ईदृशे उक्तलक्षणे धने दातव्ये सति मृळाति सुखयति = इव याचा अर्थ एव; जसा एखादा मनुष्य मित्राचें साहाय्य मिळाल्यामुळें आपलें कार्य साधतो तसे आम्ही सर्व प्राण्यांचें हित करणारा असा जो क्षेत्रपति त्याच्या साहाय्यानें क्षेत्र मिळवूं; तो आम्हांला गाईघोड्यांसारखें पोषण करणारें धन देवो; तो देव असें धन देऊन आम्हांला सुखी करो; असा कांहींसा भिन्न अर्थ सायणाचार्य करतात; आहर याबद्दल ते आहरतु असा शब्द घालतात; त्यांचा निरुक्तपाठ कोणता होता तें समजण्यास मार्ग नाहीं. आ = च; पोषयित्नु आ = संपन्न करणारें असें इतर धन. क्षेत्रपति हा आमचा जणूं काय हितकर मित्रच आहे; त्याच्या साहाय्यानें गाई, घोडे व संपन्न करणारें इतर धन आम्ही मिळवितों; तो असें धन मिळविण्याकरितां ( ईदृशे ) आम्हांस साहाय्य करतो.

## खंड १६ वा.

**क्षेत्रस्य पते मधुमन्तमूर्मिं धेनुरिव पयो अस्मासु धुक्ष्व ।**
**मधुश्चुतं घृतमिव सुपूतमृतस्य नः पतयो मृळयन्तु ( ऋ० सं० ४।५७।२ )**

**क्षेत्रस्य पते मधुमन्तम् ऊर्मिं धेनुः इव पयः अस्मासु धुक्ष्व । इति । मधुश्चुतं घृतम् इव उदकं सुपूतम् ऋतस्य नः पातारः वा पालयितारः वा मृळयन्तु । मृळयतिः उपदयाकर्मा । पूजाकर्मा वा**

दुर्गवृत्तींत धुक्ष्व नंतर इति नाहीं. घृतं = उदकम्. ऋतस्य = उदकस्य

( दुर्ग ). पतयः = पातारः किंवा पालयितारः; दोहोंचाही अर्थ पालन करणारे; दुर्गवृत्तींत पातारः एवढेंच आहे; ऋतस्य उदकस्य पतयः पातारः माध्यमिकाः देवाः क्षेत्रस्य पतिप्रमुखाः मृळयन्तु । नित्यमस्मान् रक्षन्तु पूजयन्तु वा ( दुर्ग ) = क्षेत्रपतीसारखे उदक देणारे अन्तरिक्षांतील देव आमच्यावर दया करोत, रक्षण करोत किंवा आमची पूजा करोत; मृळ् = दया किंवा क्षमा करणें, पूजा करणें; पण देव मनुष्यांची पूजा कशी करतील ? मृळ् याचे यास्कानें दिलेले अर्थ धातुपाठांत नाहींत; मृड सुखने ( धा० ६।४६ ); मृड् = सुख देणें; मृडति = सुख देतो; मृड क्षोदे सुखेऽपि ( धा० ९।४४ ); मृड् = चूर्ण करणें, सुख देणें; मृड्णाति = चूर्ण करतो किंवा सुख देतो. मृळ् = देणें ( १०।१५ ) हाही अर्थ धातुपाठांत नाहीं. दुर्गानें केलेला ऋचेचा अर्थः— हे क्षेत्रपति, गाय जशी दूध देते तसा तूं मधुर रुचीचा उदकसंघात ( ऊर्मि ) आम्हांला ( अस्मासु ) दे ( धुक्ष्व ) म्हणजे आकाशांतून पाण्याचा वर्षाव कर; मधासारखें टिपकणारें ( मधुश्चुतं ) व घृतासारखें अतिशुद्ध ( सुपूतं ) असें उदक उदकदाते जे क्षेत्रपतीसारखे अन्तरिक्षांतील देव ते आम्हांस देवोत. सायणाचार्य कांहीं शब्दांचे पुढीलप्रमाणें अर्थ करतातः— मधुश्चुतम् = मधुस्रावि = मधाचा स्राव करणारें; ऋतस्य = उदकस्य यज्ञस्य वा; पतयः = स्वामिनः = धनी; मृळयन्तु = सुखयन्तु = सुख देवोत; किंवा ऋतस्य ऋतं मृळयन्तु प्रयच्छन्तु = उदक देवोत; मधुमन्तम् ऊर्मि = मध आहे ज्याच्यांत म्हणजे मधासारखा गोड असा पाण्याचा प्रवाह; मधुश्चुतं = मधाचा स्राव करणारें; मेघांतून पडणारें पाणी जणूं काय मधाचा वर्षाव करतें म्हणजे मेघांतून पडणारें पाणी मधासारखें गोड असतें.

घृतं = उदक; न = आतांच्या आतां; सुपूतं = अतिशय शुद्ध; ऋतस्य पतयः = उदकदाते; मृळयन्तु = देवोत; असे या शब्दांचे अर्थ आहेत. या व इतर ऋचांवरून क्षेत्रस्यपति हा पाऊस पाडून शेतें पिकविणारा देव असावा.

**तत् यत् समान्याम् ऋचि समानाभिव्याहारं भवति तत् जामि भवति इत्येकम् । मधुमन्तं मधुश्चुतम् इति यथा । यदेव समाने पादे समानाभिव्याहारं भवति तत् जामि भवति इत्यपरम् । हिरण्यरूपः स हिरण्यसंदृक् ( ऋ० सं० २।३५।१० ) इति यथा । यथाकथाच विशेषः अजामि भवति इत्यपरम् । मण्डूका इवोदकान्मडूका उदकादिव ( ऋ० सं० १०।१६६।५ ) इति यथा**

तत् यानें विषयाला आरंभ केला आहे. जामि म्हणजे पुनरुक्त. समानः अभिव्याहारः यस्मिन् तत् = ज्यांत शब्द किंवा भाषा सारखीच असते तें ( जामि ). एकाच ( समान्यां ) ऋचेंत जे सारखे म्हणजे समानार्थक शब्द येतात ते पुनरुक्त होत असें एक मत आहे; जसें प्रस्तुत ऋचेंत मधुमन्तं व मधुश्चुतम्; ज्यांत मध आहे तें मधाचा स्राव करीलच म्हणून या दोन शब्दांपैकीं एक गाळावयास पाहिजे. ऋचेच्या एका पादांत जर सारखे किंवा समानार्थक शब्द आले तरच ते पुनरुक्त होतात असें दुसरें मत आहे; जसें हिरण्यरूपः स हिरण्यसंदृक्; हा ऋचेचा पाद

आहे व त्यांत हिरण्यरूपः व हिरण्यसंदृक् हे समानार्थक शब्द आहेत; परन्तु मधुमन्तं हा शब्द पूर्वार्धांत असून मधुश्चुतं हा उत्तरार्धांत आहे; तेव्हां येथें पुनरुक्तीचा दोष नाहीं. कसेंही करून (यथाकथाच) थोडकासा जर भेद दाखवितां आला (विशेषः) तर तेथें हा दोष नाहीं असें आणखी एक मत आहे; जसें मण्डूकाः इव उदकात् व मण्डूकाः उदकात् इव यांत शब्दांचा तोच क्रम नाहीं; पहिल्यांत मण्डूकाः ह्यानन्तर इव आहे; परंतु दुसऱ्यांत उदकात् ह्यानंतर तो घातला आहे; हा क्षुल्लक कां भेद असेना पण तो भेद आहेच म्हणून एथेंही पुनरुक्तीचा दोष नाहीं. योगक्षेमं व अदाय अहं भूयांसम् उत्तमः आ वो मूर्धानमक्रमीम्। अधस्पदात् मे उद्वदत मण्डूका इवोदकात् मण्डूका उदकात् इव (१०।१६६।५) = हे सपत्नांनो, तुमचा योगक्षेम हिरावून घेऊन मी श्रेष्ठ होणार व तुमच्या डोक्यावर पाय देणार; जसे बेडूक पाण्यांतून डरांव डरांव करतात त्याप्रमाणें माझ्या पायाखालीं राहून वरवशा जो मी त्या माझ्याशीं तुम्ही नम्रपणें बोला. येथें पुनरुक्ति सार्थ आहे; पाण्यांतून बेडकांप्रमाणें ही द्विरुक्ति शत्रूला किंवा सपत्नांना अगदीं तुडवून टाकलें आहे, ते अगदीं तुच्छ आहेत असा अर्थ प्रदर्शित करते. ऋग्वेदांत पुनरुक्ति फार आहे; परन्तु बहुतेक ठिकाणीं तिचें समर्थन करतां येतें. अर्वाचीन संस्कृतांत समान याचें स्त्रीलिंग समाना असें होतें; पण यास्ककालीं समानी असें स्त्रीलिंग होत असावें; समानी हें स्त्रीलिंग ऋग्वेदांत आढळतें. जामिः स्वसृकुलस्त्रियोः (अमर ३।३।१४२); जामि = (१) बहीण, (२) कुलस्त्री; जामि शब्दाचे एवढेच दोन अर्थ अमरांत दिले आहेत; आपट्यांच्या कोशांत पुनरुक्ति असा अर्थ दिलेला आहे. जामि अतिरेक नाम (४।२० पान २९३); जामि म्हणजे जास्त किंवा पुनरुक्त. मृळ् किंवा मृळय् = (१) क्षमा करणें किंवा दया करणें, (२) साहाय्य करणें, (३) बरें करणें, (४) धन देणें, (५) हवि देणें. (१) मृळा जरित्रे रुद्र स्तवानः अन्यं ते अस्मत् निवपन्तु सेनाः (२।३३।११)=हे रुद्रा, ज्या तुझी आम्ही याचना किंवा स्तुति करीत आहोंत तो तूं स्तुति करणाऱ्या आम्हांवर दया कर किंवा आम्हांला क्षमा कर; तुझीं अस्त्रें (सेनाः) आमच्याहून भिन्न व्यक्तीचा नाश करोत; यत् सीम् आगः चकृमा० तत्सु मृळ (७।९३।७) = हे अग्नि, ह्या देवांचा जो आम्हीं केला असेल त्याबद्दल तूं आम्हांस क्षमा कर; अदिते मित्र वरुणोत मृळ यद्वो वयं चकृमा कच्चिदागः (२।२७।१४)= हे देवांनो, जो कांहीं आम्हीं तुमचा अपराध केला असेल त्याबद्दल आम्हांस क्षमा करा. (२) इन्द्रश्च मृळयाति नो न नः पश्चादघं नशत्। भद्रं भवाति नः पुरः (२।४१।११) = इन्द्र आम्हांला साहाय्य करणार आहे तेव्हां आम्हांला पाठीमागून इजा होणार नाहीं व आमचें पुढें कल्याण होईल; त्वामिद्वृत्रहन्तम सुतावन्तो हवामहे। यदिन्द्र मृळयासि नः (८।९३।३०) = हे इंद्रा, ज्याअर्थी तूं आम्हांस साहाय्य करीत आहेस त्या अर्थीं सोमरस तयार करून आम्ही तुलाच बोलावीत आहोंत; को मृळाति कतम आगमिष्ठो देवानामु कतमः शम्भविष्ठः (४।४३।२) =

आम्हांला कोण साहाय्य करील? देवांपैकीं अतिशय त्वरेनें आमच्या साहाय्यासाठीं कोण येईल व आमचें अत्युत्तम कल्याण कोण करील?(३) यस्य ते द्युम्नवत्पयः पवमानाभृतं दिवः तेन नो मृळ जीवसे ( ९।६७।३० ) = हे सोमा, द्युलोकांतून जो तेजस्वी रस तुला मिळाला आहे त्यानें आम्ही फार दिवस जगावें म्हणून आम्हांला बरें कर; क्व स्य ते रुद्र मृळयाकुः हस्तो यो अस्ति भेषजः ( २।३३।७ ) = हे रुद्रा, रोग बरा करणारा तुझा हात कोठें आहे?(४) त्वं वाजस्य श्रुत्यस्य राजसि स नो मृळ महान् असि ( १।३६।१२ ) = हे अग्नि, तुझी सत्ता अपार धनावर आहे म्हणून तूं आम्हांस धन दे; तूं अति धनवान आहेस; हये नरो मरुतो मृळता नः तुवीमघासो अमृता ऋतज्ञाः ( ५।५७।८ ) = हे धनवन्त ( तुवीमघासः = अमृताः ) दात्यांनो ( नरः = ऋतज्ञाः ) मरुतांनो, आम्हांला धन द्या; दशस्यन्तो नो मरुतो मृळन्तु वरिवस्यन्तो रोदसी सुमेके ( ७।५६।१० ) = धनदाते ( दशस्यन्तः = वरिवस्यन्तः ) मरुत् धनवान् ( सुमेके ) ज्या द्यावापृथिवी ( रोदसी ) त्यांतील सर्व धन आम्हांस देवोत. ( ५ ) अग्निं वसिष्ठो हवते पुरोहितो मृळीकाय पुरोहितः ( १०।१५०।५ ) = पुरोहित वसिष्ठ अग्निला हवि देण्याकरितां बोलावीत आहे; अग्ने देवान् आ वह नः प्रियव्रतान् मृळीकाय ( १०।१५०।३ ) = हे अग्नि, ज्यांना हवि आवडतो ( प्रियव्रतान् ) अशा देवांना हवीसाठीं खालीं घेऊन ये. स नो मृळाति ईदृशे ( खंड १५ ) = क्षेत्रपति आम्ही धनसंपन्न व्हावें म्हणून ( ईदृशे ) आम्हांस धन देतो; ऋतस्य नो पतयः मृळयन्तु ( प्रस्तुत खंड ) = धनदाते आम्हांस धन देवोत. मृळ् = पूजा करणें हा अर्थ कोठेंही नाहीं.

**वास्तोष्पतिः ( ९ ) । वास्तु वसतेः निवासकर्मणः । तस्य पाता वा पालयिता वा । तस्य एषा भवति**

वस् ( = राहणें ) यापासून वास्तु; वास्तूचा पालन करणारा तो वास्तोष्पति; दुर्गवृत्तींत वास्तुः असें चुकीनें पडलें आहे; कारण तो शब्द ऋग्वेदांत नपुंसकलिंगी आहे; वेश्मभूः वास्तुः अस्त्रियाम् ( अमर २।२।१९ ) = वास्तु शब्द पुल्लिंगी व नपुंसकलिंगी असून त्याचा अर्थ घराखालची जागा असा आहे; पण ऋग्वेदांत त्याचा अर्थ घर असा आहे. दुर्ग म्हणतोः— वास्तोष्पति हा रुद्रच कारण रुद्र हा गृहाधिपति होय.

## खंड १७ वा.

**अमीवहा वास्तोष्पते विश्वा रूपाण्याविशन् ।**
**सखा सुशेव एधि नः ( ऋ० सं० ७।५५।१ )**

**अभ्यमनहा वास्तोष्पते सर्वाणि रूपाणि आविशन् सखा नः सुसुखः भव । शेवः इति सुखनाम ( निघं० ३।६।१७ ) । शिष्यतेः । वकारः नामकरणः अन्तस्थान्तरोपलिङ्गी विभाषितगुणः । शिवम् ( निघं० ३।६।१८ ) इति अपि अस्य भवति ।**

**यत् यत् रूपं कामयते तत् तत् देवता भवति। रूपंरूपं मघवा बोभवीति ( ऋ० सं० ३।५३।८ ) इत्यपि निगमो भवति**

अमीवहा = अमीव + हा = अभ्यमन + हा = अमीवा रोगः। तस्य हन्ता ( दुर्ग ) = रोगाचा नाश करणारा; दुर्गवृत्तींत अभ्यमनहा नाहीं; अमरकोशांत ( २।६।५८ ) अभ्यमित म्हणजे रोगी असा शब्द आहे; रोग ह्याअर्थी अभ्यमन शब्द आपल्यांच्या कोशांत सांपडतो. विश्वा = विश्वानि = सर्वाणि. नः ऋचेच्या शेवटीं असतांना आपली नेहमीची पद्धत सोडून यास्कानें अन्वयासाठीं तो शब्द सखा यानंतर घातला आहे. सुशेवः = सुसुखः; सुशेवः = सुष्टु सुखः ( दुर्ग ) = चांगलें सुख देणारा; शेव शब्द शिष् यापासून. शेपति हिनस्ति क्लेशं। शेषयति विशेषयति वा स्वाश्रयम् ( देवराज ) = सुख क्लेश नाहींसे करतें किंवा ज्याच्या ठिकाणीं सुख असतें त्याला तें इतरांपेक्षां विशेष स्थान देतें; म्हणजे जितकें सुख जास्ती तितकी लोकांत श्रेष्ठता; शिष हिंसार्थः ( धा० १।६८८ ); शिष विपूर्वः अतिशये ( धा० १०। २८४ ) = शिष् याला वि उपसर्ग लावल्यानें त्याचा अर्थ इतरांहून जास्त असणें असा होतो. व हा नामकरण प्रत्यय अन्तस्थान्तरोपलिंगी आहे; अन्तस्थान्तरोपलिङ्गी = अन्तीं असरणारें ( अंतस्थ ) अक्षर 'ष्' याच्या जागीं ( अन्तरं ) वकार हा प्रत्यय येतो ( उपलिङ्गी ); शिष् + वः = शि + वः; शि मधील इ ह्या स्वराला गुण विकल्पानें होतो ( विभाषितगुणः ); अन्तस्थान्तरोपलिङ्गी ह्या समासांत अन्तस्थ शब्द आहे, अंतस्था नाहीं; अंतस्था ही य र ल व ह्या अक्षरांची संज्ञा होय; अन्तर = अवकाश = जागा. उपलिंङ्गी = उपलिङ्गयति = उपगच्छति; असा दुर्ग अर्थ करतो. शिव शब्द सुद्धां याच धातूपासून; गुण विकल्पानें होत असल्यामुळें शि + वः = शिवः. विभाषितः गुणः यस्मिन् सः = ज्या प्रत्ययानें स्वराला विकल्पानें गुण होतो असा व हा नामकरण प्रत्यय आहे. शी ( = निजणें ) ह्याला व प्रत्यय लागतांना दीर्घ ई ह्रस्व होऊन त्याला गुण होतो व अशा रितीनें शेव शब्द बनतो; अशी व्युत्पत्ति देऊन देवराज निरुक्तांत ही व्युत्पत्ति देतो; शेवम् इति सुखनाम भाष्ये असें तो म्हणतो; तेव्हां त्याच्या निरुक्तपाठांत शेवं असें नपुंसकलिंगी रूप होतें. सर्वाणि रूपाणि आविशन् = यस्य अस्मद्दुःखहेतोः यः प्रतिपक्षः सर्पादेः नकुलादिः तस्य रूपम् आविशन् ( दुर्ग ) = आम्हांला पीडा देणारे सर्प वगैरे प्राणी त्यांचे शत्रु जे नकुल वगैरे त्यांचें रूप घेणारा म्हणजे आमच्या सर्व उपद्रवांचा तें तें रूप घेऊन नाश करणारा; सर्प जर त्रास देत असेल तर नकुलाचें रूप घेणें, वाघासारखे हिंस्र पशू जर त्रास देत असतील तर पारध्याचें रूप घेणें, चोर जर त्रास देत असतील तर चोरांना पकडणारे जे ग्रामरक्षक म्हणजे शिपाई त्यांचें रूप घेणें; वास्तोष्पति अशीं निरनिराळीं रूपें घेतो व मनुष्यांची त्या त्या उपद्रवांपासून सुटका करतो. देवता ज्या ज्या रूपाची इच्छा करते ( कायमते ) म्हणजे उपद्रव नाहींसा करण्याकरितां जें जें होण्याची इच्छा करिते तें तें रूप ती होते म्हणजे देवतेचें सामर्थ्य

इतकें आहे कीं तिला पाहिजे तें होतां येतें; देवता म्हणजे देव. इन्द्र ( मघवा ) हवें तें रूप ( रूपं रूपं ) हवे तितक्या वेळां होतो ( बोभवीति ) म्हणजे घेतो असें एका ऋचेंत म्हटलें आहे; असंख्य यजमान जरी हवि घेण्यासाठीं इन्द्राला एके वेळीं बोलावूं लागले तरी प्रत्येकाच्या घरीं तो निरनिराळा इन्द्र होऊन हवि घेण्यासाठीं जातो असें ऋग्वेदांत म्हटलें आहे; वास्तोष्पति देव असल्याकारणानें त्यालाही हवें तें रूप घेतां येतें. दुर्गानें केलेला अर्थः— हे वास्तोष्पति, सर्व रूपें घेऊन त्या त्या रोगादि उपद्रवांचा नाश करणारा ( अमीवहा ) तूं आमचा अतिशय सुख देणारा मित्र हो. सायणाचार्यांनीं आपल्या भाष्यांत घेतलेल्या उताऱ्यांत कामयते बद्दल कामयन्ते व देवता भवति याबद्दल देवाः विशन्ति असे शब्द आहेत. अमीवन् (पुं०) व अमीवा (स्त्री०) या दोहोंचा मूळ अर्थ पीडा करणारी वस्तु; ही पीडा करणारी वस्तु रोग, दारिद्र्य, वियोग, अन्धकार, उणीव व शत्रु यांपैकीं कोणतीही असेल. ( १ ) यस्ते गर्भममीवा दुर्णामा योनिमाशये । अग्निष्टं ब्रह्मणा सह निष्क्रव्यादम् अनीनशत् ( १०।१६२।२ ) = ज्याचें नांव तिटकारा उत्पन्न करतें असा जो रोग तुझ्या योनींत शिरला आहे त्या मांस खाणाऱ्याला ( क्रव्यादं ) अग्निनें आमच्या मंत्राच्या साहाय्यानें पार नाहींसा करून टाकिला आहे; आप इद्वा उ भेषजीरापो अमीवचातनीः । आपः सर्वस्य भेषजीः तास्ते कृण्वन्तु भेषजम् ( १०।१३७।६ ) = जल हेंच रोगनाशक ( अमीवचातनीः ) व आरोग्य देणारें ( भेषजीः ) आहे; जल तुला आरोग्य देवो; यत्रौषधीः समग्मत राजानः समिताविव । विप्रः स उच्यते भिषक् रक्षोहामीवचातनः ( १०।९७।६ ) = राजे जसे लढाईंत एकत्र होतात तशा सर्व औषधि ज्याच्यांत एकत्र जमा होतात अशा शहाण्या मनुष्याला आरोग्य देणारा व रोग नाहींसा करणारा म्हणतात. ( २ ) अप त्या अस्थुरनीरा अमीवाः ( ८।४८।११ ) = ज्यांत अन्नसुद्धां मिळत नाहीं ( अनीराः ) असें तें दारिद्र्य आमच्यापासून दूर राहो. ( ३ ) अनश्रवः अनमीवाः जनयो ( १०।१८।७ ) = अश्रु पुसणाऱ्या व वियोगदुःखांतून मुक्त होणाऱ्या ( अन-मीवाः ) स्त्रिया. (४) अपामीवां बाधते वेति सूर्यम् ( १।३५।९ ) सविता अन्धकार घालवितो व प्रकाश देतो; ( ४ ) अनमीवा उषस आ चरन्तु ( १० ।३५।६ ) अन्ध-कार घालविणाऱ्या उषा द्युलोकीं संचार करोत. ( ५ ) अस्मे धेहि द्युमतीं वाचमासन् बृहस्पते अनमीवामिषिराम् ( १०।९८।३ ) = हे बृहस्पति, आमच्या मुखांत दोषरहित ( अनमीवां ), जोरदार व तेजस्वी वाणी घाल; अनमीवां = जींत कोणत्याही प्रका-रची उणीव नाहीं अशी स्पष्ट ( वाणी ). ( ६ ) अपामीवामप स्रिधम् अप सेधत दुर्मतिम् । आदित्यासो युयोतना नो अंहसः ( ८।१८।१० ) = हे आदित्यांनो, शत्रूला ( अमीवां = स्त्रिधं = दुर्मतिं ) घालवून द्या; आमच्यापासून शत्रु ( द्वेषः ) दूर ठेवा; येथें दारिद्र्य, संकट अशासारखा शत्रू असेल; जम्भयन्तो अहिं वृकं रक्षांसि सनेमि अस्मत् युयवन् अमीवाः ( ७।३८।७ ) = शत्रूचा ( अहिं = वृकं = रक्षांसि ) नाश करणारे ( जंभयन्तः ) देव आमच्यापासून शत्रु दूर

ठेवोत; येथेंही शत्रु म्हणजे दारिद्र्य किंवा संकट. वास्तु = ( १ ) घर, ( २ ) धन. ( १ ) ता वां वास्तूनि उश्मसि गमध्यै ( १।१५४।६ ) = आम्ही तुमच्या त्या घराकडे जाण्याची इच्छा करतों. ( २ ) नपाता शवसो महः सूनू दक्षस्य सुक्रतू । सृप्रदानू इषो वास्तु अधि क्षितः ( ८।२५।६ ) = दक्षाचे मुलगे मित्रावरुण धनवन्त ( सुक्रतू ) व धन देणारे ( शवसः नपाता = सृप्रदानू ) असून त्यांची सत्ता धनावर आहे; इषः = वास्तु = धन; अधिक्षितः = सत्ता चालवितात. रूप = ( १ ) रूप, ( २ ) पशु, ( ३ ) धन, ( ४ ) सूर्य किंवा सूर्यरूपी दिवा, ( ५ ) अलंकार. ( १ ) ध्राजिरेकस्य ददृशे न रूपम् ( १।१६४।४४ ) = एकाची म्हणजे वायूची धडाडी म्हणजे जोराची गति दिसते म्हणजे शरीराला भासते; परंतु त्याचें रूप दिसत नाहीं; घोषा इदस्य शृण्विरे न रूपम् ( १०।१६८।४ ) = ह्याचा म्हणजे वायूचा आवाज ऐकू येतो पण त्याचें रूप दिसत नाहीं. रूप हा अर्थ अनेक ऋचांत आढळतो. ( २ ) त्वष्टा रूपाणि हि प्रभुः पशून् विश्वान् समानजे । तेषां नः स्फातिमा यज ( १।१८८।९ ) = त्वष्टा सर्व ( विश्वान् ) पशु ( पशून् = रूपाणि ) एकत्र हाकलून आणतो ( समानजे ); हे त्वष्ट्या, त्या पशूंची संख्येनें वाढ ( स्फातिं ) आम्हांस दे; येथें रूपाणि ह्याचा पशु असा अर्थ असावा; दिवो वराहम् अरुषं कपर्दिनं त्वेषं रूपं नमसा नि ह्वयामहे ( १।११४।५ ) = द्युलोकाचा तेजस्वी ( अरुषं ) वराह, तेजस्वी ( त्वेषं ) पशु ( रूपं ) आम्ही ह्या स्तुतीनें (नमसा) बोलावीत आहोंत; रूपं = वराहम्. ( ३ ) अरं क्षयाय नो महे विश्वा रूपाणि आ विशन् । इन्द्रं जैत्राय हर्षया शचीपतिम् (८।१५।१३) = ( १ ) सर्वप्रकारची ( विश्वा ) रूपें ( रूपाणि ) धारण करणारा ( आविशन् ) असा तूं, हे सोमा, धनाचा पति ( शचीपतिं ) जो इन्द्र त्याला आम्हांला पुष्कळ ( अरं = महे ) धन देण्यासाठीं ( क्षयाय = जैत्राय ) स्फुरण आण ( हर्षय ); ( २ ) हे धनवन्ता, सर्व प्रकारचें ( विश्वा ) धन ( रूपाणि ) देणारा ( आविशन् ) तूं आम्ही धनवंत व्हावें म्हणून ( महे = क्षयाय = जैत्राय ) आम्हांला अतिशय ( अरं = शचीपतिं ) धन दे ( हर्षय ); धनाला रूप म्हणण्याचें कारण धन तेजस्वी असतें. ( ४ ) कविः कवित्वा दिवि रूपमासजत् अप्रभूती वरुणो निरपः सृजत् । क्षेमं कृण्वानाः जनयो न सिन्धवः ता अस्य वर्णं शुचयो भरिभ्रति (१०।१२४।७) = अद्भुत कलावान् (कविः) वरुण आपल्या अद्भुत कलेनें ( कवित्वा ) द्युलोकीं सूर्य ( रूपं ) किंवा सूर्यासारखा तेजस्वी दिवा टांगता झाला ( आसजत् ) व पाणी वाहावयास लाविता झाला; त्यामुळें जशा तरुणी अलंकार घालून तेजस्वी दिसतात त्याप्रमाणें वाहणाऱ्या नद्या या सूर्यरूपी दिव्याचें तेज आपल्याबरोबर नेतात; एथें रूप म्हणजे सूर्य किंवा सूर्यासारखा दिवा असा अर्थ असावा. ( ५ ) य इमे द्यावापृथिवी जनित्री रूपैरपिंशत् भुवनानि विश्वा। तमद्य होतर् इषितो यजीयान् देवं त्वष्टारम् इह यक्षि विद्वान्(१०।११०।९) = ज्या त्वष्ट्यानें देवांच्या आया ज्या द्यावापृथिवी त्यांना व सर्व भुवनांना अलंकारांनीं ( रूपैः ) भूषित केलें ( अपिंशत् ) त्या त्वष्ट्याला, हे होत्या अग्नि, एथें घेऊन ये; तूं

देवांना जाणतोस ( विद्वान् ) व हवि देतोस ( यजीयान् ); त्वष्ट्याला आणण्याकरितां आम्ही तुला पाठविला आहे ( इषितः ). सखा = ( १ ) मित्र, ( २ ) स = ख = धन; अतिशय धन आहे ज्याच्याजवळ तो सखा; सखा याचे हे दोन अर्थ बऱ्याच ठिकाणीं आहेत. शेव शब्दाचे ( १ ) हवासा किंवा प्रिय, ( २ ) धन, ( ३ ) साहाय्यकारी, ( ४ ) उपयुक्त वगैरे अर्थ आहेत. (१) मित्रं न शेवम् (१।५८।६) = मित्रासारखा प्रिय किंवा हवासा अशा तुला; शं नो भव हृद आ पीत इन्दो पितेव सोम सूनवे सुशेवः ( ८।४८।४ ) = जसा बाप मुलाला अतिशय प्रिय असतो तसा, हे सोमा, प्यायल्या-बरोबर अतिशय प्रिय असा तूं आमच्या मनाला सुखकारक हो; प्रति मे स्तोमम् अदि-तिर्जगृभ्यात् सूनुं न माता हृद्यं सुशेवम् ( ५।४२।२ ) = आई जशी आपल्या अति-शय प्रिय ( हृद्यं = सुशेवं ) अशा मुलाला घेते तशी अदिति माझ्या या स्तोमाला घेवो. ( २ ) स शेवधिं नि दधिषे विवस्वति ( २।१३।६ ) = तो तूं, हे इन्द्रा, यजमा-नाच्या ठायीं ( विवस्वति ) धनाचा सांठा ( शेवधिं ) ठेवतोस ( नि दधिषे ); असुरः सुशेवः रायः धर्ता धरुणो वस्वो अग्निः ( ५।१५।१ ) = अग्नि हा धनवान् ( असुरः = सुशेवः ) असून धनदाता ( रायो धर्ता = धरुणो वस्वः ) आहे. (२ व ३) उरुष्या णो अभिशस्तेः सोम नि पाहि अंहसः । सखा सुशेव एधि नः ( १।९१।१५ ) = (१) हे सोमा, संकटापासून (अभिशस्तेः = अंहसः) आमचें रक्षण कर (उरुष्य = नि पाहि ); तूं आमचा साहाय्यकारी ( सुशेवः ) मित्र हो; ( २ ) हे दात्या ( सोम ), तूं आपल्या धनांतून ( अभिशस्तेः = अंहसः ) आम्हांस धन ( नि ) दे ( उरुष्य = पाहि ); धनवान् ( सखा = सुशेवः ) तूं आम्हांस धन ( नः ) दे ( एधि ). प्रस्तुत ऋचेंत हे सर्व अर्थ आहेत. शिव याचेही अनेक अर्थ होतात. इ व या यांचा देणें असाही अर्थ होतो; इ + धि = एधि = दे; एधि = हो हाही नेहमींचा अर्थ आहे. ऋचेचे दोन अर्थः—(१) हे गृहपालका (वास्तोष्पते ), सर्व पशूंत ( विश्वा रूपाणि ) शिरून ( आविशन् ) त्यांचे रोग नाहींसा करणारा ( अमीवहा ) तूं आमचा अतिशय प्रिय मित्र किंवा अतिशय साहाय्यकारी मित्र हो; ( २ ) हे धनदात्या ( वास्तोः पते ), अतिशय ( विश्वा ) धन ( रूपाणि ) देऊन ( आविशन् ) दारिद्र्याचा नाश करणारा (अमीवहा) तूं अतिशय धनवान् असल्यामुळें (सखा = सुशेवः) धन (नः ) दे (एधि).

**वाचस्पतिः ( १० ) वाचः पाता वा पालयिता वा । तस्य एषा भवति**

वाचेचें पालन करणारा तो वाचस्पति.

## खंड १८ वा.

**पुनरेहि वाचस्पते देवेन मनसा सह ।**

**वसोष्पते निरामय मय्येव तन्वं मम ॥ इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा ).

दुर्गानें केलेला अर्थः— ( आपला प्राण बहुतेक गेला आहे असें समजून एक पापी पापाबद्दल प्रायश्चित्त करून व त्यांतून मुक्त होऊन प्राणाला म्हणतो ) हे

प्राणा (वाचस्पते), सर्व इंद्रियांचीं कामें चालू ठेवणारें (देवेन = सर्वेन्द्रियवृत्तिदीपकेन) जें मन त्याच्यासह मजकडे पुन्हां ये; हे धन किंवा अन्न यांचें पालन करणाऱ्या (वसोः पते), माझ्या आत्म्याला (तन्वं) माझ्या ठिकाणींच रमविण्यास लाव (निरामय). ही ऋचा अथर्ववेदाच्या हल्लीं उपलब्ध नसलेल्या कोणत्या तरी शाखेंतून घेतली आहे; हल्लीं उपलब्ध असलेल्या अथर्वसंहितेंत दुसरा अर्ध पुढीलप्रमाणें आहेः— वसोष्पते निरमय मय्ये- वास्तु मयि श्रुतम् ( १।१।२ ) = हे धनपति, माझें धन ( श्रुतं ) किंवा माझें ज्ञान माझ्याच ठिकाणीं ठेव. रम् = थांबणें किंवा थांबविणें असा अर्थ ऋग्वेदांत बऱ्याच ठिकाणीं आहे; रम् = देणें असाही अर्थ आहे; तेव्हां प्रस्तुत ऋचेच्या दुसऱ्या अर्धाचा पुढील प्रमाणें अर्थ होईलः— हे धनपति (वसोः पते), माझें धन ( तन्वं ) माझ्याच ठिकाणीं थांबव ( निरामय ); मी मेल्यावर माझें धन माझे वारस किंवा नातलग घेऊन जातील; तसें न व्हावें म्हणून माझा प्राण राहूं दे; मी वांचलों म्हणजे माझें धन माझ्याजवळ राहील. प्राणाला वाचस्पति म्हणण्याचें कारण वाचा, श्रवण वगैरे सर्व इन्द्रियें प्राणावर अवलंबून असतात; प्राण जातांच त्यांचीं कामें बंद पडतात. वाचस्पति शब्द ऋग्वेदांत वाचस्पते निषेधेमान् यथा मत् अधरं वदान् ( १०।१६६।३ ) एथेंच आला आहे; हे वाचस्पति, ह्या सपत्नांना इतकें दडपून टाक कीं ते माझ्याशीं खालू- नच बोलत राहतील असा या शब्दांचा अर्थ आहे; वाचस्पति म्हणजे कोणती देवता हें सांगतां येत नाहीं. वाचस्पते = वाचः शब्दस्य पालयितर् ( सायण ).

**अपां नपात् ( ११ ) तनूनप्त्रा व्याख्यातः। तस्य एषा भवति**

तनूनपात् याची जी व्युत्पत्ति ( ८।५ पान ६०३ ) तीच अपां नपात् याची; तनू व अप् ह्यांचा अर्थ एकच म्हणजे जल.

## खंड १९ वा.

**यो अनिध्मो दीदयदप्स्वन्तर्यं विप्रास ईळते अध्वरेषु।**
**अपां नपान्मधुमतीरपो दा याभिरिन्द्रो वावृधे वीर्याय** ( ऋ० सं० १०।३०।४ )

**यः अनिध्मः दीप्यते अभ्यन्तरम् अप्सु। यं मेधाविनः स्तुवन्ति यज्ञेषु। सः अपां नपात् मधुमतीः अपः देहि अभिषवाय। याभिः इन्द्रः वर्धते वीर्याय वीरकर्मणे**

अनिध्मः = अनिन्धनः (दुर्ग) = ज्याच्यांत इन्धन नाहीं असा म्हणजे इन्धना- वाचून जळणारा. दीदयत् = दीप्यते = प्रज्वलित राहतो; दीप्यतेबद्दल दुर्गवृत्तींत दीप्यसे आहे; तसें रूप घालण्याचें कारण दाः (=देहि) असें पुढें म्हटलें आहे. अन्तर् = अभ्यन्तरं = मध्यें; अप्सु अन्तर् असा क्रम ऋचेंत असून भाष्यांत अभ्यन्तरं शब्द अप्सु ह्याच्या आधीं कां घातला? विप्रासः = मेधाविनः = बुद्धिमान् लोक. ईळते = स्तुवन्ति. अध्वरेषु = यज्ञेषु. सः अध्याहृत. दाः = देहि; देहि ह्या आज्ञार्थामुळें दीदयत् = दीप्यसे असा अर्थ दुर्गानें केला आहे; परंतु ऋचेच्या एका अर्धांत एक पुरुष तर दुसऱ्या अर्धांत दुसरा पुरुष ह्याचीं उदाहरणें ऋग्वेदांत पुष्कळ आहेत. वावृधे=वर्धते

=बलिष्ठ होतो.वीर्याय=वीरकर्मणे;वीर्याय शब्द भाष्यांत नको. दुर्गानें केलेला अर्थः—हे अपां नपात्, जो तूं इन्धनावाचून पाण्यामध्यें प्रज्वलित होतोस व ज्या तुझी बुद्धिमान् लोक यज्ञांत स्तुति करतात तो तूं ज्या मधुर पाण्यानें इंद्र वीर्याचीं कृत्यें करण्याकरितां बलिष्ठ होतो असें मधुर पाणी सोमरसांत मिसळण्याकरितां आम्हांस दे. अप्सु अंतर् = अपां मध्ये = मेघस्थाने; दीदयत् = भवान् दीप्यते; ईळते = भवन्तं स्तुवन्ति; याभिः = सोमेन मिश्रिताभिः याभिः असे दुर्गाप्रमाणें सायणाचार्य अर्थ करतात. इध्म शब्द इंधन या अर्थी ६ वेळां व धन या अर्थीं ११ वेळां आला आहे; अनिध्मः = ( १ ) ज्यांत इंधन नाहीं असा, ( २ ) अन् = इध्म = धन; अनिध्मः = अत्यंत धनवान्. दि = ( १ ) ज्वलित होणें, ( २ ) देणें. दि धातूचीं दीदयः, दीदयत्, दीदयतं, दीदयति, दीदयसि, दीदाय, दीदियुः वगैरे पुष्कळ रूपें ऋग्वेदांत आहेत. कित्येक ऋचांत दि याचे दोन्ही अर्थ स्पष्ट दिसतात. दीदाय शोचिः आहुतस्य वृष्णः ( ७।३।५ ) = ( १ ) ज्याच्यांत हवि टाकला आहे ( आहुतस्य ) व जो बलिष्ठ आहे ( वृष्णः ) त्या अग्नीची ज्वाला ( शोचिः ) प्रकाशती झाली ( दीदाय ); ( २ ) धनवान् ( आहुतस्य ) दात्याला ( वृष्णः ) तेजस्वी धन ( शोचिः) देता झाला ( दीदाय ). गोपा ऋतस्य दीदिहि स्वे दमे ( ३।१०।२ ) = ( १ ) यज्ञाचा ( ऋतस्य ) पालन करणारा ( गोपाः ) असा तूं, हे अग्नि, आपल्या घरीं ( स्वे दमे ) म्हणजे आमच्या ह्या यज्ञगृहीं प्रकाश; ( २ ) धनाचा ( ऋतस्य ) दाता ( गोपाः ) तूं आमच्या धनभाण्डारांत ( स्वे = दमे ) धन दे ( दीदिहि ). अप् = ( १ ) जल, ( २ ) धन. विप्र = ( १ ) हवि देणारा किंवा स्तुति करणारा, ( २ ) दाता. ईळते = ( १ ) स्तवितात, ( २ ) ईळते = ईलते = ईरते = देतात. अध्वर = ( १ ) यज्ञ, ( २ ) अध् = वर = धन; अध्वरेषु = धनभाण्डारांत. अपां नपात् = ( १ ) जलदेवतांचा मुलगा, ( २ ) धनाचा दाता ( पानें ६०४–६०५ पहा ). मधु = ( १ ) सोम, ( २ ) धन. मधुमतीः अपः = ( १ ) सोममिश्रित जल, ( २ ) धनयुक्त धन म्हणजे अतिशय धन. वृध् = ( १ ) वाढणें किंवा बलिष्ठ होणें, ( २ ) देणें. वीर = ( १ ) योद्धा, ( २ ) धन; वीर्य = ( १ ) शौर्य, ( २ ) धन. यः = ( १ ) जो, ( २ ) धनवान् किंवा धन. याभिः = या + भिः; या = भि = धन. ऋचेचे दोन अर्थः— ( १ ) दुर्गानें केलेला; या अर्थांत मधु शब्द सोम या अर्थीं आहे; ( २ ) धनवान् ( यः = अनिध्मः ) धनभांण्डारांत ( अप्सु अन्तर् ) सारखा धन देत असतो ( दीदयत् ); दाते ( विप्रासः ) धनभाण्डारांत ( अध्वरेषु ) धन ( यं ) देतात ( ईळते ); हे धनदात्या ( अपां नपात् ), अतिशय ( मधुमतीः ) धन ( अपः ) दे; अतिशय धनवान् ( याभिः ) दाता ( इन्द्रः ) धन वाढावें म्हणून ( वीर्याय ) धन देत असतो. स शुक्रेभिः शिकभी रेवदस्मे दीदाय अनिध्मो घृतनिर्णिगप्सु ( २।३५।४ ) = ( १ ) घृतारूप वस्त्र पांघरून ( घृतनिर्णिक् ), इन्धन नसतांनाही ( अनिध्मः ) तो ( अपां नपात् ) आपल्या प्रज्वलित ( शुक्रेभिः ) अवयवांनीं ( शिकभिः ) जलामध्यें

आमच्यासाठीं हिरण्यासारखा ( रेवत् ) प्रकाशतो ( दीदाय ); ( २ ) अत्यंत धनवान् ( घृतनिर्णिक् = अनिध्मः ) असा प्रख्यात ( सः ) धनदाता ( अपां नपात् ) आपल्या धनांतून ( शुक्रेभिः = शिक्वभिः ) आमच्या ( अस्मे ) धनांत ( अप्सु ) पुष्कळ धन ( रेवत् ) देतो ( दीदाय ); ही ऋचा प्रस्तुत ऋचेसारखीच आहे. अपां नपातम-वसे सवितारमुप स्तुहि ( १।२२।७ ); येथें सवित्याला अपां नपात् म्हटलें आहे; सूर्य मावळतांना समुद्रांत उडी टाकतो व उगवतांना समुद्रांतून वर येतो अशी लौकिक समजूत असल्यामुळें तो जलदेवतांचा मुलगा अशी कल्पना केली गेली असावी. बहुतेक ठिकाणीं अपां नपात् असें अग्नीला म्हटलें आहे; २।३५ ह्या सूक्ताची देवता अपां नपात् असून शेवटल्या ऋचेंत अग्नि संबोधिला आहे; सूक्तांतल्या सर्व ऋचांवरून अग्नि हाच अपां नपात् असावा. भुवो अपां नपात् जातवेदो भुवो दूतो यस्य हव्यं जुजोषः ( १०।८।५ ); एथें अग्नि ( जातवेदस् ) हा अपां नपात्. प्र० धीतिमग्नये० भरे। अपां नपात् यो वसुभिः सह प्रियो होता पृथिव्यां न्यसीदत् ऋत्वियः ( १।१४३।१ ) एथेंही अग्नि हाच अपां नपात्. विश्वेदेवसूक्तांत अपां नपात् बरेच वेळां आला आहे; तेथें तो एक स्वतंत्र देव कीं अग्नि तें ठरवितां येत नाहीं. अपां नपात्चा धनाशीं निकट संबंध आहे हें पुढील ऋचेवरून स्पष्ट दिसतें; हिरण्यरूपः स हिरण्यसन्दृक् अपां नपात् सेदु हिरण्यवर्णः। हिरण्ययात् परि योनेर्निषद्या हिरण्यदा ददति अन्नमस्मै ( २।३५।१० ) = ( १ ) अपां नपात् हा सोन्याच्या रंगाचा ( हिरण्यरूपः = हिरण्यसन्दृक् = हिरण्यवर्णः ) आहे; तो सुवर्णदाता ( हिरण्यदाः ) आपल्या सुवर्णमय ( हिरण्ययात् ) स्थानांतून ( योनेः परि ), तेथें बसला असतांनाच ( निषद्य ), आम्हांस अन्न देवो; ( २ ) अतिशय धनवान् ( हिरण्यरूपः = हिरण्यसन्दृक् = हिरण्यवर्णः ) असा हा धनदाता ( अपां नपात् ) आहे; तो हिरण्यदाता आपल्या सोन्यानें भरलेल्या ( हिरण्ययात् ) खजिन्यांतून (योनेः) धन काढून ( आ निपद्य ) आमच्या धनभांडारांत धन ( अन्नं ) सारखें देत असतो.

**यमः ( १२ ) यच्छति इति सतः। तस्य एषा भवति**

यच्छति उपरमयति जीवितात् सर्वभूतग्रामम् इति यमः ( दुर्ग ) = सर्व प्राण्यांना प्राणापासून थांबवितो ( यच्छति = उपरमयति ) म्हणून यमाला यम हें नांव. सर्व प्राण्यांचा जीवितापहार करण्याला बल लागतें म्हणून यम हा अन्तरिक्षांतील देव; अन्तरिक्षांतील मुख्य देव इंद्र; तो बलाचीं सर्व कामें करितो ( ७।१० पान ५५० ); इंद्र बलिष्ठ तेव्हां अन्तरिक्षांतील इतर देवही बलिष्ठच ( दुर्ग ). यमयति इति यमः ( अमर १।१।५८ क्षीरस्वामी ); यम् = दाबांत ठेवणें; यम प्राण्यांना त्यांनीं पाप करूं नये म्हणून दाबांत ठेवतो. अवेस्तांत यिम.

## खंड २० वा.

**परेयिवांसं प्रवतो महीरनु बहुभ्यः पन्थामनुपस्पशानम्। वैवस्वतं संगमनं जनानां यमं राजानं हविषा दुवस्य ( ऋ० सं० १०।१४।१ )**

**परेयिवांसं पर्यागतवन्तम्। प्रवतः उद्वतः निवतः इति। अवतिः गतिकर्मा। बहुभ्यः पन्थानम् अनुपस्पाशयमानम्। वैवस्वतं संगमनं जनानां यमं राजानं हविषा दुवस्य। इति। दुवस्यतिः ( निघण्टु ३।५।५ ) राध्नोतिकर्मा**

परेयिवांसं = परा + ईयिवांसं = परि + आगतवन्तं = सर्वतः प्राप्तवन्तं ( दुर्ग ) = प्राण्यांभोंवतीं सर्वबाजूंनीं येणाऱ्याला; यम सर्व प्राण्यांच्या भोंवतीं गराडा घालतो; तो आपल्या तडाक्यांतून कोणालाही सुटूं देत नाहीं; परा = परि = सर्वबाजूंनीं. प्रवतः = प्रवतः उद्वतः निवतः इति; ऋचेंत प्रवतः एवढेंच आहे; उद्वतः निवतः हे शब्द अध्याहृत. प्रवतः मनुष्याः। उद्वतः देवाः। निवतः तिर्यञ्चः ( दुर्ग ) = प्रवतः म्हणजे मनुष्यें, उद्वतः म्हणजे देव व निवतः म्हणजे मनुष्येतर प्राणी, जनावरें वगैरे; अशा सर्व भूतसंघांना यम गराडा घालतो. हे तिन्ही शब्द अव् ( = जाणें ) ह्यापासून; प्र + अवतः = प्रवतः; प्र, उत् व नि ह्यांना अव् हा धातु लावतांना त्या धातूचा अ नाहींसा होतो. ह्या व्युत्पत्तीबद्दल दुर्गाला अतीशय आश्चर्य वाटतें; तथापि यास्क हा आचार्य म्हणून तो त्याच्या म्हणण्याला कशीबशी अनुमति देतो. पन्थां = पन्थानम्. अनुपस्पशानं = अनुपस्पाशयमानं = अन् + उप + स्पाशयमानम्; स्पाशय् ह्याला अभ्यास होत नसल्याकारणानें ही केलेली फोड बरोबर असावी; पण अर्थ काय ? बहुभ्यः पुण्यकृद्भ्यः पापकृद्भ्यःच पन्थानम् अनुपस्पाशयमानम्। अमुना मार्गेण अयं प्राणी जीवनात् उत्सर्पति। तम् एव तस्य स्पाशयित्वा बद्ध्वा तस्करः इव तत्रैव सर्पज्वरादिरूपो भूत्वा जीवितात् उपयंस्यामि इति एवम् अनुपस्पाशयमानं ( दुर्ग ) = पुण्यवान् व पापी यांचा मार्ग जो अडवून धरतो त्याला; प्राण सोडल्यावर हा अमक्या मार्गानें स्वर्गाकडे जाणार आहे असें आधींच जाणून व तो त्याचा मार्ग चोराप्रमाणें अडवून मरणाचीं अनेक कारणें जीं सर्पदंश, ताप वगैरे त्यांपैकीं कोणाचेंतरी रूप घेऊन त्याचा मी प्राणापहार करीन अशा उद्देशानें स्वर्गाकडे जाणारा मार्ग रोखून धरणारा. पापी जनांचा स्वर्गाकडे जाण्याचा मार्ग अडविणें हें योग्य आहे; पण पुण्यवानांचा स्वर्गाला जाण्याचा मार्ग अडविणें हें योग्य कसें होईल ? कदाचित् स्वर्गाकडे जाणाऱ्या मार्गावर उभा राहून यम पुण्यवानांना त्या मार्गानें जाऊं देतो पण पापी जनांना तो त्या मार्गानें जाऊं देत नाहीं असें दुर्गास म्हणावयाचें असेल. स्पश् = बांधणें म्हणजे अडविणें असा अर्थ येथें केला आहे; पण स्पशः स्पाशयितारः कृताकृतानां कर्मणां चिह्नयितारः ( ५।२ ) = केलेलीं व न केलेलीं अशीं जीं सर्व कर्मे त्यांना चिन्ह करणारे म्हणजे चित्रगुप्ताप्रमाणें लिहून ठेवणारे; ग्रहान् अध्वर्युः स्पाशयेत ( काठ० सं० ३५।१७ ) = अध्वर्यूनें सोमपात्रांना चिह्नें करावींत; स्पाशय् = चिह्न करणें; ही व्युत्पत्ति आहनः ह्या संबंधाच्या न तिष्ठन्ति न निमिषन्ति ( १०।१०।८ ) ह्या ऋचेचें विवरण करतांना दुर्ग देतो. स्पश बाधनस्पर्शनयोः। स्पर्शनं ग्रन्थनम् (धा० १।९१२); स्पश् = बाधा करणें, गुंफणें; स्पश ग्रहणसंश्लेषणयोः ( धा० १०।१४७ ); स्पश् = घेणें, आलिंगन देणें; दुर्गानें दिलेले अर्थ धातुपाठांत

नाहींत. संगमनं जनानां = समम् एव चक्षुः कृत्वा यः अस्मात् लोकात् अमुं लोकं यथाकृतकर्मफलोपभोगवशेन जनान् गमयति तं ( दुर्ग ) = सगळीकडे सारखी नजर टाकून केलेल्या कर्मांचीं फळें भोगण्याकरितां प्राण्यांना इहलोकांतून परलोकास नेणारा. राजानं=ईश्वरं सर्वप्राणभृतां (दुर्ग)=सर्व प्राण्यांच्या अधिपतीला. दुवस्य=राध्नुहि=संतुष्ट किंवा प्रसन्न कर. राध संसिद्धौ ( धा० ५।१६ ); राध् = साधणें; राध् = प्रसन्न करणें ( आपट्यांचा कोश ). दुर्गानें केलेला अर्थः—मनुष्य, देव व पशुपक्षादि प्राणी यांच्या मोठ्या संघांभोंवतीं ( महीः परि ) सतत गराडा घालणारा, पापी लोकांचा स्वर्गाकडे जाणारा मार्ग आडविणारा, सर्व लोकांवर सारखी नजर ठेवून त्या सर्वांना केलेल्या कर्मांचीं फळें भोगण्यासाठीं परलोकाकडे नेणारा विवस्वताचा पुत्र व सर्व प्राणिमात्रांचा राजा जो यम त्याला हवि देऊन प्रसन्न कर. सायणः—हे मदीय अन्तरात्मन् यजमान वा त्वं राजानं पितृणां स्वामिनं यमं हविषा पुरोडाशादिना दुवस्य परिचर । कीदृशम् । प्रवतः प्रकृष्टकर्मवतः भूलोकवर्तिभोगसाधनं पुण्यम् अनुष्ठितवतः पुरुषान् महीः तत्तद्भोगोचितभूप्रदेशविशेषान् अनु परेयिवांसं क्रमेण मरणात् ऊर्ध्वं प्रापितवंतम् । तथा बहुभ्यः स्वर्गार्थिभ्यः पुण्यकृद्भ्यः पुण्यकृतार्थे पंथां स्वर्गस्य उचितं मार्गम् अनुपस्पशानम् अबोधमानम् । पापिनः एव पुरुषान् स्वर्गमार्गबाधेन नरकं प्रापयति न तु पुण्यकृतः इत्यर्थः । वैवस्वतं विवस्वतः सूर्यस्य पुत्रं जनानां पापिनां संगमनं गन्तव्यस्थानरूपम् = उत्तमकर्में करणारे ( प्रवतः ) म्हणजे पृथिवीवर सुखोपभोगाचीं जीं साधनभूत कर्में तीं करणारे जे पुरुष त्यांना मरणानंतर पृथिवीवरील विशिष्ट प्रदेशांकडे ( महीः ) क्रमानें पोंचविणारा ( परेयिवांसं ), त्याप्रमाणें स्वर्गाची इच्छा करणारे जे पुण्यवान् लोक त्यांनीं पुण्यकर्में केलीं म्हणून त्यांना स्वर्गाला जाण्याचा जो योग्य मार्ग तो पापी लोकांना न दाखविणारा ( अनुपस्पशानं = अबोधमानं ), पापी लोकांना ( जनानां ) जेथें एकत्र जावयाचें असतें ( संगमनं ) असें स्थान झालेला म्हणजे त्यांना नरकाकडे नेणारा असा विवस्वताचा पुत्र व पितरांचा स्वामी जो यम त्याची, हे माझ्या अंतरात्म्या किंवा यजमाना, पुरोडाशादि हवि देऊन सेवा कर. स्वर्गाकडे जाणारा मार्ग अडवून यम पापी जे पुरुष त्यांना नरकाकडे नेतो, पुण्यवानांना नेत नाहीं असा बहुभ्यः पन्थाम् अनुपस्पशानं याचा सायणाचार्य अर्थ करतात; अनुपस्पशानं = अबोधमानं असा अर्थ कसा होतो तें समजत नाहीं; कदाचित् उप + स्पश् = जवळ जाऊन पहाणें किंवा पूर्णपणें जाणणें याचें प्रयोजक रूप उप + स्पाशय् = जवळ जाऊन पहावयास लावणें किंवा पूर्णपणें ओळखणें; अन् + उप + स्पाशय् = पूर्णपणें म्हणजे मुळींच न जाणविणें असा अर्थ त्या शब्दाचा केला असेल. उपसर्गात् छन्दसि धात्वर्थे ( पा० ५।१।११८ ) = धातूंचा अर्थ ज्यांत आहे अशा उपसर्गांना वेदांत वत् प्रत्यय स्वार्थीं लागतो; जसें:— प्र, परा, उत् व नि ह्यांचे धात्वर्थ प्रगत, परागत, उद्गत व निर्गत असे होतात; त्यांना वत् प्रत्यय अर्थ न बदलतां वेदांत लाविलेला आढळतो; प्रवतः = प्रगतात्

किंवा प्रगतान्; परावतः = परागतात् किंवा परागतान्; उद्वतः = उद्गतात् किंवा उद्गतान्; निवतः = निर्गतात् किंवा निर्गतान्; यास्क व सायणाचार्य ह्यांनीं ह्या सूत्राला अनुसरून प्रवतः ह्याचा अर्थ केला आहे. मही म्हणजे पृथिवी हा अर्वाचीन अर्थ सायणाचार्यांनीं ह्या ऋचेंत केला आहे व दुर्गानें त्याचा मोठे संघ असा केला आहे; पण महीः हें प्रवतः ह्याचें विशेषण आहे. प्र, परा, उत्, नि वगैरे उपसर्गांना 'वत्' लावल्यावर जे शब्द बनतात ते स्त्रीलिंगी नामें होत; परावत् हा शब्द स्त्रीलिंगी असून त्याचा अर्थ स्वर्ग असा आहे; त्याप्रमाणें प्रवत् म्हणजे जोरानें वाहणारी नदी किंवा जोराचा प्रवाह असा अर्थ आहे. याः प्रवतो निवत उद्वत उदन्वतीरनुदकाश्च याः। ता अस्मभ्यं पयसा पिन्वमानाः शिवा देवीरशिपदा भवन्तु सर्वा नद्यो अशिमिदा भवन्तु (७।५०।४) = ज्या जोरानें वाहतात ( प्रवतः ), उंचावर वाहतात ( उद्वतः ), खोल प्रदेशांत वाहतात ( निवतः ), ज्या पाण्यानें भरलेल्या आहेत व ज्यांत पाणी मुळींच नाहीं त्या नद्या पाण्यानें पुष्ट होऊन आम्हांला सुख देवोत. यदासामग्रं प्रवतामिनक्षसि ( १०।७५।४) = हे सिन्धुनदा, जेव्हां तूं या जोरानें वाहाणाऱ्या नद्यांच्या अग्रभागीं असतोस.त्वया वयं प्रवतः शश्वतीरपो अति शूर तरामसि(७।३२।२७)=हे शूरा, तुझ्या साहाय्यानें सर्व ( शश्वतीः ) जोरानें वाहणाऱ्या नद्या ( प्रवतः = अपः ) आम्ही तरून पलीकडे जाऊं ( अतितरामसि ). प्रवतः पूर्वीः ( ४।२२।४ ) = सर्व जोरानें वाहाणाऱ्या नद्या. तिसृषु प्रवत्सु (६।४७।४) =जोरानें वाहागाऱ्या तीन नद्यांत.या सर्व ऋचांत प्रवतः हा शब्द स्त्रीलिंगी आहे. सप्त प्रवतः (९।५४।२)=सात जोरानें वाहाणाऱ्या नद्या. ह्या सात नद्या प्रचंड ( महीः ) आहेत. महीः हे अवनीः (५।११।५ ), अपः (६।५७।४),आपः सिन्धवः(९।२।४)ह्यांचें विशेषण आहे. सृजः महीः इन्द्र या अपिन्वः परिष्ठिता अहिना शूर पूर्वीः (२।११।२)=हे शूर इन्द्रा, वृत्रानें अडविलेल्या प्रचंड नद्या पाण्यानें तूं फुगवल्यास व वहावयास लाविल्यास; एथें महीः = प्रचंड नद्या. बहुभ्यः = सर्वांना; खंड १०।१३ पान ७७० यांत बहु म्हणजे सर्व असा मी अर्थ केला आहे. यास्क, दुर्ग व सायण हे पर्येयिवांसं हे यमम् याचें विशेषण मानतात; पण तो शब्द पन्थाम् याचें विशेषण आहे; जोरानें वाहाणाऱ्या मोठ्या ( महीः ) ज्या सात नद्या त्यांच्या मधून परावताकडे (परा) गेलेला (ईयिवांसं) मार्ग ( पन्थां ); परा = परावतं = स्वर्गाकडे; अनु = ओळीनें म्हणजे एक नदी गेल्यावर लगेच दुसऱ्या नदींतून; स्वर्गाकडे जाणारा मार्ग सात नद्या ओलांडून गेला आहे. परा हि मे विमन्यवः पतन्ति ( १।२५।५ ) व परा मे यन्ति धीतयः ( १।२५।१६ ) ह्या दोहोंचा अर्थ माझ्या स्तुति परावताकडे म्हणजे स्वर्गाकडे जातात असा आहे; तोच अर्थ प्रस्तुत ऋचेंत आहे. स्पश् = पाहणें, दाखविणें; यस्य विश्वानि हस्तयोः पञ्च क्षीतीनां वसु। स्पाशयस्व यो अस्मध्रुक् दिव्येवाशनिर्जहि ( १।१७६।३ ) = ज्याच्या दोन्ही हातांत पंचजनांचें सर्व धन आहे तो तूं जो आमचा द्वेष करतो ( अस्मध्रुक् ) त्याला निरखून काढ ( स्पाशयस्व ) व आकाशांतून पडणाऱ्या वज्राप्र-

माणें त्याला ठार कर. विश्वा जातानि पस्पशे (१।१२८।४) = अग्नि सर्व प्राण्यांना पाहातो. याच धातूपासून निरखून पहाणारा, हेर या अर्थीं स्पश् हें एकवचनी नाम आहे. तं सूर्यं हरितः सप्त यह्वीः स्पशं विश्वस्य जगतो वहन्ति (४।१३।३) = सर्व जगाला निरखून पाहाणारा (स्पशं) जो सूर्य त्याला सात घोड्या रथांत वाहून नेतात; सूर्य जगांतील सर्व चांगलेंवाईट पहात जातो; तो एकप्रकारचा हेरच आहे. न तिष्ठन्ति न निमिषन्ति एते देवानां स्पशः इह ये चरन्ति (१०।१०।८) = देवांचे निरखून पाहाणारे हेर या पृथिवीवर जिकडे तिकडे हिंडतात; ते कधीं थांबत नाहींत व क्षणभरही डोळे मिटीत नाहींत. सन्ति स्पशो अदब्धासो अमूराः (६।६७।५) = जे कधीं फसले जात नाहींत, जे मूढ नाहींत असे मित्रावरुणांचे निरखून पहाणारे हेर आहेत. लॅटिन स्पेशियो (specio = मी पाहतों) या सारखा स्पश् हा धातु आहे. अनुपस्पशानम् याचा सतत दाखविणारा असा प्रयोजक अर्थ आहे. वैवस्वत = सूर्याचा मुलगा; सूर्य सर्व जगत् निरखून पहातो; तेव्हां त्याचा मुलगाही निरखून पाहाणाराच असला पाहिजे. यमस्यमाता॰ महो जाया विवस्वतः (१०।१७।१) = यमाची आई व मोठा जो विवस्वत् त्याची बायको; तेव्हां यम हा विवस्वताचा मुलगा. रायो बुध्नः संगमनो वसूनाम् (१।९६।६) = अग्नि हा धनाचा समागम म्हणजे सांठा आहे; सर्व धन अग्नींत आहे. अहं राष्ट्री संगमनी वसूनाम् (१०।१२६।३) = मी सत्ताधीश असून माझ्यांत म्हणजे माझ्यापाशीं सर्व धन आहे. संगमनं ह्याचा तोच अर्थ प्रस्तुत ऋचेंत आहे; संगमनं जनानाम् = ज्याच्यामध्यें सर्व लोकांचा मेल्यानंतर समागम होतो असा; मेल्यानंतर सर्व लोक यमलोकीं जातात व तेथें एकत्र होतात. ऋचेचा अर्थः— एकीमागून एक अशा सात प्रचंड नद्या ओलांडून स्वर्गाकडे जाणारा मार्ग सर्व मृतांना सतत दाखविणारा, ज्याच्यांत सर्व मृतांचा समागम होतो व जो सर्वांचा राजा यम त्या सूर्याच्या पुत्राला हवि देऊन प्रसन्न कर.

**अग्निः अपि यमः उच्यते। तम् एताः ऋचः अनुप्रवदन्ति**

अग्नीला सुद्धां यम म्हटलें आहे; ह्यापुढील ऋचा क्रमानें त्या अग्निरूप यमाविषयीं बोलतात म्हणजे त्याचें वर्णन करतात. पुढील खंडांत यम शब्दासंबंधी दिलेल्या उताऱ्यांत इंद्रालाही यम म्हटलें आहे; तेव्हां इंद्रः अपि यमः उच्यते असेंही म्हणावयास पाहिजे.

## खंड २१ वा.

**सेनेव सृष्टामं दधात्यस्तुर्न दिद्युत्त्वेषप्रतीका। यमो ह जातो यमो जनित्वं जारः कनीनां पतिर्जनीनाम् (ऋ॰ सं॰ १।६६।४)॥ तं वश्चराथा वयं वसत्यास्तं न गावो नक्षन्त इद्धम् (ऋ॰ सं॰ १।६६।५)**

**इति द्विपदाः। सेना इव सृष्टा। भयं वा बलं वा। दधाति। अस्तुः इव दिद्युत् त्वेषप्रतीका। भयप्रतीका। महाप्रतीका। दीप्तप्रतीका वा**

इति द्विपदाः = अशा या तीन द्विपदा आहेत; ज्या ऋचेंत दोनच पाद असतात ती द्विपदा; पहिल्या द्विपदेचे दोन पाद दधाति व प्रतीका एथें, दुसरीचे जनित्वं व जनीनां एथें व तिसरीचे वसल्या व इद्धं एथें संपतात. सेनेव सृष्टा । अमं दधाति । अस्तुर्न दिद्युत् । त्वेषप्रतीका असे प्रत्येक द्विपदेचे चार तुकडे असून प्रत्येक तुकड्यांत पांच पांच अक्षरें आहेत; तेव्हां प्रत्येक पांच अक्षरांचा तुकडा हा एक पाद असें म्हणावयास कोणती हरकत? अशा चार तुकड्यांस द्विपदा म्हणण्याच्या ऐवजीं चतुष्पदा म्हणावें. पहिल्या मंडळांतील ६५ ते ७१ या सूक्तांत अशा प्रकारच्या ऋचा आहेत. अमं = भयं वा बलं वा = भय किंवा बल; भय शत्रूला व बल म्हणजे उत्साह सेनेंतील योद्ध्यांना. न = इव. त्वेषप्रतीका = भयप्रतीका = भयंकर आहे दर्शन जीचें अशी; जी दृष्टीस पडल्याबरोबर भय उत्पन्न करते अशी; किंवा त्वेषप्रतीका = महाप्रतीका = महत् प्रतीकं दर्शनं यस्याः सा = प्रचंड दिसणारी; किंवा त्वेषप्रतीका = दीप्तप्रतीका = दीप्तं दर्शनं यस्याः सा = जी प्रज्वलित किंवा पेटलेली दिसते अशी. दुर्गवृत्तींत महाप्रतीका हें भयप्रतीका याच्या आधीं आहे; भयप्रतीका । बलप्रतीका । यशःप्रतीका । महाप्रतीका । दीप्तप्रतीका असा महाराष्ट्रपाठांतील क्रम आहे; बलप्रतीका व यशःप्रतीका यांचा अर्थ कळत नाहीं; कदाचित् जिचें दर्शन योद्ध्यांच्या मनांत बल म्हणजे जोर किंवा यशाची इच्छा उत्पन्न करते ती असा अर्थ असेल. प्रतीकं = प्रतिदर्शनं (पान ५९१). भाष्यांतील दधाति बद्दल महाराष्ट्रपाठ ददाति आहे.

**यमः ह जातः । इन्द्रेण सह संगतः । यमाविहेह मातरौ ( ऋ० सं० ६।५९।२ ) इत्यपि निगमो भवति । यमः इव जातः । यमः जनिष्यमाणः**

यमः ह जातः = इन्द्रेण सह संगतः = इंद्राच्या सह असणारा म्हणजे इंद्राबरोबर जन्मलेला; ह = सह (?); जातः = संगतः; इंद्रेण अध्याहृत. अग्नि व इंद्र हे सूर्याचे जुळे पुत्र होते अशा अर्थाची ऋचाही आहे; यमा विहेह मातरौ असे त्या ऋचेंत शब्द आहेत; अहो इंद्राग्नि, तुमचा महिमा खरोखर अतिशय स्तुत्य आहे; तुमचा दोघांचा बाप एकच म्हणजे सूर्य; त्यामुळें तुम्ही दोघे जुळे ( यमौ ) भाऊ आहांत; तुमच्यांपैकीं एक म्हणजे अग्नि पृथिवीवर ( इह ) व दुसरा म्हणजे इंद्र अंतरिक्षांत ( इह ) असून तुम्ही तेथील राहणारे सर्व लोक निर्माण करता ( मातरौ = निर्मातारौ ) असा त्या ऋचेचा दुर्गानें अर्थ केला आहे. दुर्गवृत्तींत इंद्रेण सह संगतः हे शब्द नाहींत. जातः = जातं ( दुर्ग ); जें कांहीं जन्मलेलें आहे व जन्माला येणार आहे ( जनित्वं = जनिष्यमाणं ) तें सर्व यम म्हणजे अग्नि आहे; एथें यम म्हणजे अग्निच हें सिद्ध करण्यासाठीं यमाविहेह मातरौ इत्यपि निगमो भवति असें भाष्यकारानें म्हटलें आहे. इंद्रेण सह संगतः हे शब्द प्रक्षिप्त असावेत; त्यांचा अर्थ इंद्राबरोबर जन्मलेला असा होत नाहीं. यमाविहेह मातरौ यांतील मातरौ शब्दाचा अर्थ कळत नाहीं; कदाचित् तुमच्या दोघांच्या आया एथेंच आहेत असा अर्थ असेल;

पण जर दोघांच्या आया निराळ्या तर त्यांना जुळे भाऊ कसें म्हणतां येईल ? बहुत-करून इहेहमातरौ असा समास असावा; इह इह माता ययोः तौ इहेह मातरौ = ज्यांची आई एथेंच एथेंच आहे; पण एथेंच एथेंच म्हणजे कोठें ? कदाचित् इहेह म्हणजे द्यु आहे माता ज्यांची ते इहेह मातरौ असा अर्थ असल्यास अग्नि व इंद्र हे जुळे भाऊ होतील. इहेह ही जोडी सात ऋचांत आली आहे; त्यांपैकी एकींत इहेह जाता (१।१८१।४) हें अश्विनांबद्दल म्हटलें आहे. इहेह जाते यम्या सबन्धू (५।४७।५) = उषा व रात्र या जुळ्या बहिणी असून (यम्या = यम्यौ) त्या सबन्धू होत म्हणजे त्यांचा बाप एक आहे व त्या इहेह येथें जन्मल्या; पण इहेह काय ? अश्विन, उषा आणि रात्र हीं द्युलोकीं जन्मलीं; द्यु शब्द पुल्लिंगी व स्त्रीलिंगी असा दोन्ही लिङ्गी आहे; तेव्हां द्यु हा बाप व द्यु ही आई; त्याप्रमाणें इन्द्र व अग्नि यांचा द्यु हा बाप व द्यु ही आई असा कदाचित् अर्थ असेल. यमः इ जातः = यमः इव जातः = यमासारखा जन्मलेला; यमः जनित्वं = यमः जनिष्यमाणः = जन्माला येणारा यम; एथें यमः इव जनिष्यमाणः असें कां म्हटलें नाहीं ? यमासारखा जन्मलेला ह्याप्रमाणें यमासारखा जन्मास येणारा असें म्हणावयास पाहिजे; पण अग्नि यमासारखा जन्मलेला व जन्मास येणारा याचा अर्थ काय ? इव शब्द दुर्गवृत्तींत नाहीं. यमः जातः जातं जनित्वं जनिष्यमाणं हे दुर्गवृत्तींतले शब्द यमाविहेह मातरौ याच्या आधीं आलेले आहेत व तेथेंच ते योग्य आहेत; भाष्यांत आहेत त्या ठिकाणीं त्यांचा कांहीं-एक संबंध नाहीं; ते प्रक्षिप्त असावेत.

**जारः कनीनाम् । जरयिता कन्यानाम् । पतिः जनीनाम् । पालयिता जायानाम् । तत्प्रधानाः हि यज्ञसंयोगेन भवन्ति । तृतीयो अग्निष्टे पतिः ( ऋ० सं० १०।८५।४० ) इत्यपि निगमः भवति**

जारः कनीनां = जरयिता कन्यानाम्; दुर्गवृत्तींत कन्यानां बद्दल कन्याभावस्य आहे; जरयिता कन्याभावस्य । यदा हि अग्निसंनिधौ ऊढाः भवन्ति अथ तासां कन्याभावः जीर्णः भवति ( दुर्ग ) = कुमारिकेची स्थिति नाहींशी करणारा; जेव्हां कुमारी अग्नीच्या समक्ष विवाहित होतात तेव्हां त्यांचें कुमारपण नाहींसें होतें. पतिः जनीनां= पालयिता जायानां = जायांचें रक्षण करणारा. तत्प्रधानाः हि यज्ञसंयोगेन भवन्ति = विवाहयज्ञसंयोगेन स्त्रियः तत्प्रधानाः भवन्ति संपद्यन्ते = कारण यज्ञाच्या संयोगानें म्हणजे विवाहहोम अग्नींत होतो ह्यामुळें स्त्रिया अग्निप्रधान होतात; अग्नौ व्रतोपगमनात् आव्रतविमोकात् अग्निपारतन्त्र्यात् ( दुर्ग ) = विवाहव्रत आरंभापासून समाप्तिपर्यंत अग्नींत होत असतें; तेव्हां विवाह हा अग्नीवर अवलंबून असल्याकारणानें स्त्रियांचें पालन अग्नि करतो असें म्हटलें आहे; सः प्रधानं यासां ताः तत्प्रधानाः = तो ( म्हणजे अग्नि ) विवाहव्रतांत मुख्य असतो म्हणून स्त्रिया विवाहव्रतांत अग्नीवर अवलंबून असतात. दुर्गवृत्तींत तत्प्रधानाः हि यज्ञसंयोगेन भवन्ति ह्याच्याबद्दल तत्प्रधानाः संपद्यन्ते एवढेंच आहे. यज्ञ म्हणजे विवाहहोम. स्त्रियांचा मुख्य अग्नि असतो ह्याला

वैदिक आधार आहे; तो असाः—तृतीयो अग्निष्टे पतिः = तृतीयः अग्निः ते पतिः = (हे कन्ये, बाल्यावस्थेंत तूं सोमाच्या स्वाधीन होतीस, कुमारपणांत गंधर्वाच्या स्वाधीन होतीस), अग्नि हा तुझा तिसरा पालनकर्ता (व मनुष्य हा चौथा पालनकर्ता) असा संबंध ऋचेचा अर्थ आहे. दुर्गवृत्तींत इत्यपि निगमः भवति हे शब्द क्वचितच घातलेले असतात; पण ते ह्या खंडांत दोनदां आले आहेत. दुर्ग म्हणतो तृतीयो अग्निष्टे पतिः ह्याच्या ऐवजीं कित्येक टीकाकार पुढील ऋचा देतातः—सोमो ददद् गन्धर्वाय गन्धर्वो ददग्नये। रयिं च पुत्रांश्चादाद् अग्निर्मह्यमथो इमाम् (ऋ०सं० १०।८५।४१) = सोम हिला गन्धर्वाला देता झाला, गन्धर्व अग्नीला देता झाला व अग्नि धन आणि पुत्र ह्यांसह हिला मला देता झाला; मला देण्याच्या अगोदर ही अग्नीच्या ताब्यांत होती म्हणजे अग्नीवर अवलंबून होती.

**तं वः चराथा। चरन्त्या पश्वाहुत्या। वसत्या च निवसन्त्या औषधाहुत्या। अस्तं यथा गावः आप्नुवन्ति तथा आप्नुयाम। इद्धं समिद्धं भोगैः**

वः निरर्थक. चराथा=चरथा=चरथया=चरन्त्या; चरन्त्या पश्वाहुत्या=चालणाऱ्या पशुरूप आहुतीनें; यज्ञांत मारले जाणारे पशु जिवंतपणीं इकडे तिकडे फिरत असतात. वसत्या = निवसन्त्या औषधाहुत्या = एके ठिकाणीं राहणाऱ्या वनस्पतिरूप आहुतीनें; वनस्पति पशूंप्रमाणें इकडे तिकडे फिरत नाहींत; ते एके ठिकाणींच असतात. च अध्याहृत. न = यथा. नक्षन्ते = आप्नुवन्ति = मिळवितात म्हणजे जातात. तथा आप्नुयाम (अध्याहृत) = त्याप्रमाणें आम्हीं मिळवूं. इद्धं = समिद्धं भोगैः = सर्वभोगानाम् ईश्वरं प्रदातारम् (दुर्ग) = सर्व भोगांनीं समिद्ध म्हणजे युक्त म्हणजे सर्व भोग देणाऱ्याला. समिद्धं बद्दल महाराष्ट्रपाठ समृद्धं आहे; भोगैः समृद्धं = सर्व भोग्य वस्तूंनीं युक्त म्हणजे सर्व भोग्य वस्तु देणाऱ्याला. दुर्गानें केलेला अर्थः— जशी मनाचा निर्धार केलेली (सृष्टा = निश्चिता) सेना किंवा सेनापतीनें पाठविलेली (सृष्टा= विसृष्टा = प्रेरिता) सेना शत्रूंत भय उत्पन्न करते व आपल्या लोकांत जोर उत्पन्न करते किंवा अनपेक्षित अशी (अतर्किता) शत्रूंत भय उत्पन्न करते व पुढारी जो सेनापति त्याच्या मनांत उत्साह किंवा जोर उत्पन्न करते व जसें धनुर्धाऱ्यानें (अस्तुः) सोडलेलें अस्त्र (दिद्युत्) शत्रूंत भय व मित्रांत बल उत्पन्न करतें तशी दिसण्याला प्रचंड किंवा जिचें दर्शन भय उत्पन्न करतें अशी किंवा जिचें दर्शन डोळ्यांना दिपवितें अशी अग्नीची ज्वाला राक्षसांत भय उत्पन्न करते व स्वकीय जनांत म्हणजे भक्तांत बल उत्पन्न करते; ज्याची अशा प्रकारची ज्वाला तो यम म्हणजे अग्नि जें कांहीं जन्मलेलें आहे व जें जन्मास येणार आहे तें सर्व तोच (म्हणजे सृष्टींतल्या सर्व वस्तु अग्नीच); विवाहप्रसंगीं कुमारिकांचा (कनीनाम्) कुमारपणा घालविणारा (जारः) व विवाहित स्त्रियांना (जायानां) विवाहव्रतांत आरंभापासून समाप्तीपर्यंत आपल्या ताब्यांत ठेवणारा तोच; सर्व भोगांनीं (भोगैः) युक्त (इद्धं = समिद्धं) आणि चालणारी पशुरूप आहुति व स्थिर ओषधिरूप आहुति ह्यांनीं युक्त अशा

त्या ( तं ) अग्नीकडे गाई जशा घराकडे (अस्तं) जातात ( नक्षन्ते ) तसे आपण ( वयं ) जाऊं.

सायणः—स्वामीसह असणारी सेना लढाईला पाठविली असतां जशी शत्रूंत भय उत्पन्न करते तसा अग्नि शत्रूंत भय उत्पन्न करतो; किंवा ती सेना जशी बल धारण करते तसा अग्नीही बल धारण करतो; दिद्युत् शब्दाचा मूळ अर्थ वज्र पण एथें इषु; प्रज्वलित मुखाची धनुर्धाऱ्यानें सोडलेली इषु जशी भीति उत्पन्न करते तसा अग्नि राक्षसादिकांच्या मनांत भिति उत्पन्न करतो; स्तोत्यांना त्यांच्या इच्छा देतो म्हणून यम म्हणजे अग्नि; किंवा इन्द्र व अग्नि हे एका वेळीं जुळे असे उत्पन्न झाले म्हणून यम म्हणजे अग्नि; उत्पन्न झालेला व उत्पन्न होणारा सर्व भूतसंघ यम म्हणजे अग्नीच; सर्व वस्तु आहुति म्हणून अग्नींत दिल्या जातात म्हणून सर्व वस्तु अग्नीच; जेव्हां विवाहसमयीं अग्नींत लाजाहोम होतो तेव्हां मुलींची कुमारिका अवस्था संपते म्हणून कुमारीभाव नाहींसा करणारा अग्नि; विवाहित स्त्रियांचा अग्नि पति होतो; यत्किंचित्-सुद्धां कामवासना जेव्हां मुलीच्या मनांत नसते तेव्हां ती सोमाच्या अधीन असते; तशी इच्छा थोडी उत्पन्न झाल्यावर ती विश्वावसुगन्धर्वाच्या अधीन होते; विश्वावसु हा विवाहाच्या वेळीं मुलीला अग्नीच्या स्वाधीन करतो व नंतर अग्नि तिला मनुष्याला देतो अशी ऋचा आहे ( ऋ० सं० १०।८५।४१ ) म्हणून अग्नि हा विवाहित स्त्रियांचा पति; किंवा विवाहित स्त्रियांचा तो पालक आहे कारण निरनिराळ्या साधनांनीं तो त्यांना त्यांनीं इच्छिलेलें फल देतो; चरथ म्हणजे पशु; पशूचे हृदय वगैरे जें अवयव ते आहुति म्हणून अग्नींत दिले जातात म्हणून चरथ म्हणजे पशुरूप आहुति; ओषधि म्हणजे धान्य जमिनींत स्थिर असतें म्हणून वसति म्हणजे पुरोडाषादि आहुति; अशा दोन्ही तऱ्हेच्या आहुतींनीं प्रज्वलित केलेल्या त्या तुजकडे, हे अग्नि, आम्ही जाण्याची इच्छा करतों; याला दृष्टान्त गाई जशा घराकडे जाण्याची इच्छा करतात तसे. इन = स्वामी = सेनापति; सेनापतीसह असणारी ती सेना; दधाति = धारण करतो; अंगं प्रतीकः अवयवः ( अमर २।६।७० ); प्रतीक = अवयव; एथें मुख; त्वेषप्रतीका = दीप्तमुखा; यच्छति कामान् स्तोतृभ्यः इति यमः अग्निः; वः = युष्मान्; पण एथें वः = त्वाम्; चरति इति चरथः पशुः; वसति निवसति इति स्थावरः व्रीह्यादिः वसतिः असे सायणाचार्य अर्थ करितात. यमोह जातः ह्यानंतरचे इन्द्रेण सह संगतः हे शब्द प्रक्षिप्त आहेत असें मीं पूर्वीं म्हटलें; तथापि सायणाचार्यांच्या भाष्यांतल्या निरुक्तांतील उताऱ्यांत ते आहेत; इत्यपि निगमः भवति ह्याच्यानंतरचे यमः इव जातः यमः जनिष्यमाणः हे निरुक्तांतील शब्द सायणाचार्यांच्या भाष्यांत दिले नाहींत; तेव्हां ते प्रक्षिप्त असावेत. सेना = ( १ ) सेना, ( २ ) अस्त्र, ( ३ ) साहाय्य, (४) धन. पहिला अर्थ शतं सेना अजयत्साकमिन्द्रः (१०।१०३।१) अशा ऋचांत सांपडतो. ( २ ) सेनेव सृष्टा प्रसितिष्ट एति ( ७।३।४ ) = हे अग्नि, तुझी ज्वाला ( प्रसितिः ) सोडलेल्या ( सृष्टा ) अस्त्राप्रमाणें ( सेना इव ) वेगानें जाते (एति ); न यो वराय मरुतामिव स्वनः सेनेव सृष्टा दिव्या यथाशनिः (१।१४३।५)=

ज्याला कोणीही अडवूं (वराय) शकत नाहीं, ज्याचा आवाज मरुतांच्या आवाजा-सारखा प्रचंड, सोडलेल्या अस्त्राप्रमाणें किंवा आकाशांतून पडणाऱ्या वज्राप्रमाणें (यथा अशनिः) ज्याची ज्वाला असते (असा अग्नि); मृळा जरित्रे रुद्र स्तवानः अन्यं ते अस्मत् नि वपन्तु सेनाः (२।३३।११) = हे रुद्रा, स्तुति केला जाणारा तूं स्तुति करणाऱ्यावर (जरित्रे) दया कर (मृळ); तुझीं अस्त्रें (सेनाः) आमच्याहून (अस्मत्) निराळ्या माणसाला (अन्यत्) ठार करोत (नि वपन्तु). (३) यया गा आकरामहे सेनयाग्ने तवोत्या। तां नो हिन्व मघत्तये (१०।१५६।२) = हे अग्नि, ज्या तुझ्या सहाय्यानें (सेनया = ऊत्या) आम्हांला गाई (गाः) मिळवितां येतील (आकरामहे) तें साहाय्य आम्ही धनवान् व्हावें म्हणून (मघत्तये) आमच्या-कडे पाठीव (हिन्व). (४) वि सेनाभिर्दयमानो वि राधसा (१०।२३।१) = आपल्या धनांतून (सेनाभिः = राधसा) धन (वि) देणारा (दयमानः) इन्द्र. सृज् = अस्त्र सोडणें. अम = (१) वेग, (२) बल, (३) ज्वाला, (४) गडगडाट, (५) सत्ता, (६) धन. (१) वि यत् अहेः अध त्विषो विश्वे देवासो अक्रमुः। विदत् मृगस्य तान् अमः (८।९३।१४)=जेव्हां वृत्राच्या (अहेः) बलाला भिऊन (त्विषः) सर्व देव पळूं लागले (वि+अक्रमुः) तेव्हां त्यांना हरिणाच्या (मृगस्य) वेगानें (अमः) पकडले (विदत्) म्हणजे ते हरणासारखे पळूं लागले; त्वेषासो अग्नेः अमवन्तः अर्चयो भीमासः न प्रती-तये (१।३६।२०) = अग्नीच्या ज्वाला (अर्चयः) प्रखर (त्वेषासः), वेगवान् (अमवन्तः) व भयंकर (भीमासः) असल्यामुळें त्यांच्यासमोर (प्रति) जाणें (इतये) शक्य नाहीं (न); अमादेषां भियसा भूमिरेजति (५।५९।२) = ह्यांच्या म्हणजे मरुतांच्या वेगाला (अमात्) भिऊन (भियसा) पृथिवी थरथर कांपते (एजति); अमाय वो मरुतः यातवे द्यौः जिहीत (८।२०।६) = हे मरुतांनो, तुमच्या वेगयुक्त (अमाय) गमनामुळें (यातवे) द्यु पळूं लागली (जिहीत). ह्यावर दिलेल्या सर्व उताऱ्यांत अम म्हणजे वेग. (२ व ६) एवा राजेव क्रतुमान् अमेन विश्वा घनिघ्नत् दुरिता पवस्व (९।२०।६) = (१) ह्याप्रमाणें राजासारखा बलवान् (क्रतुमान्) तूं, हे सोमा, बलानें (अमेन) सर्व संकटें (दुरिता = दुरितानि) हाणून पाडून (घनिघ्नत्) शुद्ध हो (पवस्व); (२) धनवान् (क्रतुमान्) राजाप्रमाणें धनानें (एवा = अमेन) सर्व दारिद्र्य (दुरिता) नाहींसें करणारा (घनिघ्नत्) तूं धन दे (पवस्व);तयोः इत् अमवत् शवः तिग्मा दिद्युत् मघोनोः (५।८६।३) = (१) बलवान् (मघोनोः) अशा इन्द्र व अग्नि ह्यांचे (तयोः) बल (शवः) बलवान् (अमवत्) म्हणजे तीव्र आहे व त्यांचें अस्त्र (दिद्युत्) तीक्ष्ण आहे (तिग्मा); (२) ह्या दोन धनवान् (मघोनोः) दात्यांचें धन (शवः) धनयुक्त (अमवत्) म्हणजे अतीशय आहे; त्यांच्याजवळ प्रकाशमान (तिग्मा=दिद्युत्) धन आहे; अग्ने० वर्धा नो अमवत् शवः (८।७५।१२) = (१) हे अग्नि, आमचें बलयुक्त (अमवत्) बल (शवः) वाढीव (वर्ध); (२) हे दात्या (अग्ने), आम्हांला धनयुक्त (अमवत्) म्हणजे अतीशय धन (शवः) दे

( वर्धं ). ( ३ ) तपन्ति शत्रुं स्वर्णभूमा महासेनासो अमेभिरेषाम् ( ७।३४।१९ ) = सूर्य (स्वर्) जसा (न) आपल्या प्रखर उन्हानें पृथिवीला ( भूमा ) तापवितो तसे ज्यांची सेना मोठी आहे (महासेनासः) असे हे मरुत् आपल्या प्रखर ज्वालांनीं (अमेभिः) शत्रूला जाळून टाकतात. ( ४ ) सत्यं त्वेषा अमवन्तो धन्वन् चिदा रुद्रियासः । मिहं कृण्वन्ति अवाताम् ( १।३८।७ ) = प्रखर तेजानें युक्त (त्वेषाः) गडगडाट करणारे (अमवन्तः) हे रुद्राचे मुलगे ( रुद्रियासः ) वालुमय प्रदेशांत ( धन्वन् ) सुद्धां ( चित् ) वाऱ्याचा प्रतिबंध नसणारी ( अवाताम् ) वृष्टि ( मिहं ) करतात; एथें अमवन्तः = वेगवान् किंवा बलिष्ठ असाही अर्थ होईल. (५) त्वमध प्रथमं जायमानः अमे विश्वा अधिथा इन्द्र कृष्टीः ( ४।१७।७ ) = हे इन्द्रा, जन्मल्याबरोबर ( जायमानः ) तूं पहिल्याप्रथम ( प्रथमं ) सर्व पंचजन ( कृष्टीः ) आपल्या सत्तेखालीं ( अमे ) ठेविलेस ( अधिथाः ). (६) इषं दधानो वहमानो अश्वैः आ स द्युमान् अमवान् भूषति द्यून् ( १०।११।७)=हे अग्नि, ज्याच्यावर तुझी कृपा असते तो धनवान् ( द्युमान् = अमवान् ) होऊन, घोड्यांनीं ( अश्वैः ) रथांत वाहून नेलेला ( वहमानः ), धन (इषं) देणारा (दधानः), नेहमीं धन ( द्युन् = आ ) देत असतो भूषति; इन्द्राविष्णू नृवत् उ षु स्तवाना शर्म नो यन्तम् अमवत् वरूथम् ( ४।५५।४ ) = हे इन्द्राविष्णूंनो, स्तविले जाणारे ( स्तवाना ) तुम्ही आम्हांला धनयुक्त ( नृवत् = अमवत् ) म्हणजे पुष्कळ व दारिद्र्याचें निवारण करणारें ( वरूथं ) असें धन ( शर्म ) द्या ( यन्तं ); शर्म = धन; पण शर्म म्हणजे संरक्षण असा अर्थ केल्यास नृवत् शर्म = मनुष्यांनीं भरलेलें संरक्षण याचा अर्थ काय ? शर्म म्हणजे घर असा अर्थ केल्यास ऋचेचा पुढीलप्रमाणें अर्थ होईलः— हे इन्द्राविष्णूंनो, मनुष्यांनीं भरलेलें ( नृवत् ) शत्रूंचें निवारण करणारें ( वरूथम् ) असें मजबूत किंवा धनानें भरलेलें ( अमवत् ) घर ( शर्म ) आम्हांस द्या; ऋचेचे दोन्हीही अर्थ होणें शक्य आहे. प्रतीक = ( १ ) तेज किंवा प्रकाश, ( २ ) ज्वाला, ( ३ ) धन. ( १ ) जीमूतस्येव भवति प्रतीकं यत् वर्मी याति समदाम् उपस्थे ( ६।७५।१ ) = जेव्हां कवच घातलेला ( वर्मी ) योद्धा संग्रामांच्या ( समदाम् ) मध्यें ( उपस्थे ) शिरतो तेव्हां त्याचें तेज (प्रतीकं) सूर्याच्या ( जीमूतस्य ) तेजासारखें असतें; सुसन्दृक् ते स्वनीक प्रतीकं वि यद्रुक्मो न रोचसे उपाके ( ७।३।६ ) = हे अग्नि, ज्याअर्थी तूं सूर्यासारखा ( रुक्मः न ) शोभिवन्त दिसतोस ( विरोचसे ) त्याअर्थी तुझें तेज किंवा प्रकाश ( प्रतीकं ) अतिशय सुंदर ( सुसन्दृक् ) दिसतो; स्वनीक = तेजोयुक्त; उपाके = जवळ. यो विश्वतः सुप्रतीकः सदृङ् असि दूरे चित् सन् तळिदिवाति रोचसे (१।५४।७)=हे अग्नि, सर्वत्र प्रकाशमान ( सुप्रतीकः ) असा तूं सुन्दर ( सदृङ् ) दिसतोस व दूर असूनही तूं विजेसारखा लखलखतोस. ( २ ) स त्वम् अग्ने प्रतीकेन प्रत्योष यातुधान्यः । उरु क्षयेषु दीद्यत् ( १०।११८।८ ) = हे अग्नि, आमच्या घरांत ( क्षयेषु ) सर्वत्र ( उरु ) प्रकाशणारा ( दीद्यत् ) तूं आपल्या ज्वालेनें ( प्रतीकेन ) चेटक्यांना ( यातुधान्यः )

जाळून टाक ( प्रति + ओष ). ( ३ ) सुप्रतीके वयोवृधा यह्वी ऋतस्य मातरा । दोषामुषासमीमहे ( ५।५।६ ) = धनवन्त ( सुप्रतीके ) व धनदात्या ( वयोवृधा=वयोवृधौ ) द्युच्या मुली (यह्वी) व धनाच्या (ऋतस्य) माता (मातरौ) अशा रात्र व उषा यांची आम्ही धनाकरितां याचना करितों. त्वेष = (१) तेजस्वी किंवा दिपविणारें, (२) प्रचण्ड, (३) बलिष्ठ, ( ४ ) भयप्रद, ( ५ ) धनवान्. ( १ ) त्वेषस्ते धूमः ऋण्वति दिवि सन् शुक्रः आततः । सूरो न हि द्युता त्वं कृपा पावक रोचसे ( ६।२।६ ) = हे अग्नि, तुझा तेजस्वी ( त्वेषः = शुक्रः ) धूर ( धूमः ) स्वर्गांत पसरला आहे ( आततः ); तूं आपल्या ज्वालेनें ( द्युता = कृपा ) प्रकाशतोस; त्वेषं रूपं कृणुते वर्णो अस्य ( ९।७१।८ ) = याचा म्हणजे सोमाचा रंग ( वर्णः ) दिपविणारें ( त्वेषं ) रूप धारण करितो; पाणी व दूध यांत मिसळल्यानें सोमाचा रंग इतका पांढरा होतो कीं तो पाहणाऱ्याचे डोळे दिपवितो. ( १ व ४ ) भयन्ते विश्वा भुवना मरुद्भ्यो राजानः इव त्वेषसन्दृशः नरः ( १।८५।८ ) = मरुतांना सर्व प्राणी भितात; राजांच्यासारखे या शूरांचें दर्शन दिपविणारें किंवा भयंकर आहे. ( १, २ व ४ ) त्वेषासो अग्नेः अर्चयश्चरन्ति ( ४।६।१० ) = अग्नीच्या दिपविणाऱ्या भयंकर व प्रचंड ( त्वेषासः ) ज्वाला पसरत आहेत ( चरन्ति ). ( ३ व ५ ) त्वेषं वयं रुद्रं यज्ञसाधं० अवसे नि ह्वयामहे ( १।११४।४ ) = ( १ ) बलिष्ठ ( त्वेषम् ) व यज्ञ शेवटास नेणारा जो रुद्र त्याला आम्ही रक्षणाकरितां ( अवसे ) बोलावीत आहोंत ( निह्वयामहे ); ( २ ) आम्ही धनवान् व्हावें म्हणून ( अवसे ) धनयुक्त ( त्वेषं = यज्ञसाधं ) म्हणजे पुष्कळ धन ( रुद्रं = नि ) मागत आहों ( ह्वयामहे ). ( ४ ) परि णो हेतिः रुद्रस्य वृज्याः परि त्वेषस्य दुर्मतिर्मही गात् ( २।३३।१४ ) = भयंकर ( त्वेषस्य ) रुद्राचें अस्त्र ( हेतिः ) आम्हांस टाळो ( परिवृज्याः ); त्याचा प्रचंड (मही) क्रोध (दुर्मतिः) आम्हांला टाळो ( परिगात् ); एथें त्वेष म्हणजे रागावलेला असाही अर्थ होईल. ( ५ ) वन्दस्व मारुतं गणं त्वेषम् ( १।३८।१५ ) = धनवान् ( त्वेषं ) जो मरुतांचा संघ त्याला सोमपानानें आनंदित कर; एथें त्वेषं याचे धनवान्, बलिष्ठ, भयंकर व तेजस्वी असे सर्व अर्थ लागूं पडतील; स्थूरं राधः शताश्वं कुरुङ्गस्य दिविष्टिषु । राज्ञस्त्वेषस्य सुभगस्य रातिषु अमन्महि ( ८।४।१९ ) = धनवान् ( त्वेषस्य = सुभगस्य ) राजा कुरुंग यानें केलेल्या दानांत ( दिविष्टिषु = रातिषु ) आम्ही अतिशय ( स्थूरं ) शंभर घोड्यांनीं युक्त ( शताश्वं ) असें धन ( राधः ) मागितलें ( अमन्महि ). त्वेषं प्रतीकं यस्याः सा = जिचें तेज दिपविणारें किंवा भयंकर किंवा प्रचण्ड आहे अशी ( अग्निची ज्वाला ). यम = ( १ ) यम, ( २ ) यमीचा भाऊ, ( ३ ) जुळें, ( ४ ) दान, ( ५ ) दाता, ( ६ ) वेसण. (१)यम म्हणजे मृत्यु हा शब्द पुष्कळ ऋचांत आला आहे; १०।२० यांतील ऋचा यम संबंधीं आहे.(२)१०।१० यांत यम व यमी ह्या जुळ्या भावंडांचा संवाद दिला आहे. (३) जुळे या अर्थी यम शब्द प्रस्तुत खंडात दिलेल्या यमाविहेह मातरौ या ऋचेंत आला आहे. (४)एता ते अग्न उचथानि वेधो जुष्टानि सन्तु मनसे हृदे च। शकेम रायः सुधुरो यमं ते

अधि श्रवो देवभक्तं दधानाः (१।७३।१०) = हे दात्या (वेधः) अग्नि, या आमच्या स्तुति (उचथानि) तुझ्या मनाला (मनसे = हृदे) प्रिय (जुष्टानि) होवोत; तूं दिलेलें (देवभक्तं) धन (श्रवः) धारण करणारे (अधि दधानाः) आम्ही त्या पुष्कळ (सुधुरः) धनांतून (रायः) दान (यमं) देऊं (शकेम). (५) प्रेष्ठम् उ प्रियाणां स्तुहि आसाव अतिथिम्। अग्निं रथानां यमम् (८।१०३।१०) = हे [illegible] देणाऱ्या (आसाव) यजमाना, प्रिय असे जे देव (प्रियाणां) त्यांमध्ये जो अतिशय प्रिय (प्रेष्ठं) व रथांत भरलेलें धन (रथानां) देणारा (यमं) अतिथि जो अग्नि त्याची स्तुति कर; स्तुहि इन्द्रं० वाजिनं यमम्। अर्यो गयं मंहमानं वि दाशुषे (८।२४।२२) = धनवान् (वाजिनं) व शत्रूचें (अर्यः) धन (गयं) हवि देणाऱ्याला (दाशुषे) देणारा (मंहमानं) जो दाता (यमं) इन्द्र त्याची स्तुति कर. (६) पृष्ठे सदो नसोर्यमः (५।६१।२) = या घोड्यांच्या पाठीवर बैठक (सदः) म्हणजे जीन आहे व त्यांच्या नाकपुड्यांत (नसोः) वेसण आहे (यमः). यम् = (१) देणें, (२) नियंत्रण करणें, दाबांत ठेवणें; या अर्थांतून वर दिलेले यम शब्दाचे २ व ३ हे अर्थ वगळून बाकीचे अर्थ निघाले आहेत; जुळे या अर्थीं जो यम शब्द त्याची व्युत्पत्ति कळत नाहीं. जास्पतिः व जास्पत्यं यांतील जा म्हणजे धन; जा + तः = धनवान्. गव्यन्त इन्द्रं सख्याय विप्रा अश्वायन्तो वृषणं वाजयन्तः। जनीयन्तो जनिदामक्षितोतिमा च्यावयामोऽवते न कोशम् (४।१७।१६) = धनदाता (वृषणं = जनिदां) व ज्याचें धन कधीं क्षय पावत नाहीं (अक्षितोतिं) असा जो इन्द्र त्याला जसा कोणी पोहऱ्यांतलें पाणी (कोशं) हौदांत (अवते) ओततो तसें धनाची इच्छा करणारे (गव्यन्तः = अश्वायन्तः = वाजयन्तः = जनीयन्तः) आम्ही स्तोते (विप्राः) ह्यानें आमच्या धनभांडारांत धन ओतावें म्हणून खालीं आणूं (आच्यावयामः); एथें जनि = धन; जनित्वं = धनाचा सांठा. अग्नीची ज्वाला सोडलेल्या (सृष्टा) अस्त्राप्रमाणें (सेना इव) वेग (अमं) धारण करते (दधाति) म्हणजे अतिशय वेगानें जाते; आकाशांतून सोडणाऱ्या (अस्तुः) रुद्राचें अस्त्र (दिद्युत्) जसें अतिशय देदीप्यमान असतें तशी अग्नीची ज्वाला देदीप्यमान आहे; एथें दिद्युत् व ज्वाला या दोन्हीही अतिशय तेजस्वी, दिपविणाऱ्या, प्रचंड व भयंकर होत; त्वेष याचे हे चारी अर्थ एथें योग्य दिसतात. दाता जो अग्नि (यमः) तो धनवान् (जातः) व धनाचा सांठा (जनित्वं) आहे; हा गूढ अर्थ; प्राथमिक अर्थ यम जन्मलेला व जन्माला येणारा असा आहे. अग्नीला मुलींचा जार म्हणणें व विवाहित स्त्रियांचा पति म्हणणें बरोबर नाहीं; तेव्हां गूढार्थ निराळा असावा; तो असाः— जॄ = देणें; जारः = दाता. क = धन. नी = धनाप्रत नेणें, धन; क + नी = अतिशय धन. पतिः = दाता. अग्नि हा अतिशय धन देणारा आहे (कनीनां जारः = जनीनां पतिः). वः = यूयम्; प्र वो महे महि नमो भरध्वम् (१।६२।२) = तुम्ही (वः) मोठा जो इन्द्र (महे) त्याला हवि किंवा

स्तुति ( नमः ) अर्पण करा ( प्र भरध्वं ); यूयं या अर्थी वः शब्द पुष्कळ ऋचांत येतो. चराथा=चरथ + आ = परिचरण किंवा सेवा करा; वः यूयं तम् आचरथ=तुम्ही त्या अग्नीची स्तुति करा; किंवा तुम्ही त्याच्याकडे (तम् आ) जा ( चराथ ); आम्हीही ( वयं ) त्याची स्तुति करूं. न यथा गावः अस्तं गृहं वसत्या वसत्यै नक्षन्ते गच्छन्ति तथा वयं वसत्यै इद्धं तम् अग्निं नक्षामः । वः यूयं तम् इद्धम् अग्निम् आ चराथ आचरथ = जशा गाई वसतीसाठीं रानांतून घरीं जातात तसे आम्ही प्रज्वलित केलेल्या अग्नीकडे वसतीकरितां म्हणजे धनप्राप्तीसाठीं जातो; तुम्ही धनप्राप्तीकरितां त्याच्याकडे जा; असा ह्या तिसऱ्या द्विपदेचा अर्थ असेलसा वाटतो. नक्ष् = ( १ ) व्यापणें, (२) जाणें, ( ३ ) पोंचणें, ( ४ ) स्तुति करणें, ( ५ ) हवि देणें, ( ६ ) धन देणें, (७) पुष्ट करणें असे ह्या धातूचे अर्थ आहेत; त्यांपैकीं कांहींविषयीं संशय नाहीं. ह्या तीन द्विपदांचा परस्परांशीं कांहीं एक संबंध दिसत नाहीं; अर्थासंबंधानें त्या स्वतंत्र होत; यास्कानें यम म्हणजे अग्नि हे सिद्ध करण्याकरितां ह्या तीन द्विपदा एकत्र दिल्या; त्याचें कारण पहिलीचा व तिसरीचा अग्नि हा विषय असल्याकारणानें दुसरीचाही अग्नि हाच विषय होय हे.

**मित्रः ( १३ ) प्रमीतेः त्रायते । संमिन्वानः द्रवति इति वा । मेदयतेर्वा । तस्य एषा भवति**

मित्रः = मि + त्रः; मि = प्रमीतेः = मरणापासून; त्र = त्रायते; पाऊस पाडून मित्र सर्व लोकांना जिवन्तमरणापासून वांचवितो म्हणून त्याला मित्र हें नांव. परासुः प्राप्तपंचत्वः परेतप्रेतसंस्थिताः । मृतप्रमीतौ ( अमर २।८।११८–११९ ); प्रमीतः = मृतः; प्रमीति शब्द अमरकोशांत नाहीं; प्रमीति = मरण, नाश, रोग ( आपट्यांचा कोश ); मि = मी ( धा० ९।४ ) = हिंसा करणें; पण मि = फेंकून देणें ( धा० ६।४ ) हा धातु कां दिला नाहीं ? मित्र जोरानें पाऊस पाडतो ( मिनाति = प्रक्षिपति ) व लोकांचे प्राण वांचवितो; या व्युत्पत्तीला कोणती हरकत ? मित्र = मि + त्र; मि = संमिन्वानः; त्र = द्र = द्रवति = धांवत जातो; समन्ततः मिन्वानः उदकेन द्रवति अन्तरिक्षलोके ( दुर्ग ) = मित्र पाण्यानें भिजवीत अन्तरिक्षांत धांवत जातो; पण भिजविणें या अर्थी मि धातु धातुपाठांत नाहीं; कदाचित् संमिन्वानः = चांगल्या रीतीनें ( सं ) मोजीत ( मिन्वानः ) असा अर्थ असेल. किंवा मित्र = मिद्र = मिद् + र ; मेदयति = सर्वं हि असौ उदकेन स्नेहयति ( दुर्ग ) = सर्व भूमि पाण्यानें स्निग्ध म्हणजे ओली करतो म्हणून तो मित्र; मिदि स्नेहने ( धा० १०।८ ); मिद् = स्निग्ध म्हणजे ओलें करणें; पण १० व्या गणाचे मिद् याचें मिन्दयति असें रूप होतें; मिद् ( धा० १।७४४ ) याचें मेदते व ( धा० ४।१३७ ) याचें मेद्यति अशीं रूपें होतात. सूर्य या अर्थी मित्र शब्दांत मिद् धातु भिजविणें (अमर १।२।३१ क्षी०) व स्नेही या अर्थी मिद् स्नेह करणें ( अमर २।८।१२ क्षी० ).

## खंड २२ वा.

**मित्रो जनान् यातयति ब्रुवाणो मित्रो दाधार पृथिवीमुत द्याम् ।**

**मित्रः कृष्टीरनीमिषाभिचष्टे मित्राय हव्यं घृतवज्जुहोत ( ऋ० सं० ३।५९।१ )**

**मित्रः जनान् आयातयति प्रब्रुवाणः। शब्दं कुर्वन्। मित्रः एव धारयति पृथिवीं च दिवं च। मित्रः कृष्टीः अनिमिषन् अभिविपश्यति। इति। कृष्टयः ( निघण्टु २।३।७ ) इति मनुष्यनाम। कर्मवन्तः भवन्ति। विकृष्टदेहाः वा। मित्राय हव्यं घृतवत् जुहोत इति व्याख्यातम्। जुहोतिः दानकर्मा**

यातयति = आयातयति = कृष्यादिषु प्रवर्तयति ( दुर्ग ) = ( लोकांना ) शेतकीला व दुसऱ्या कामाला प्रवृत्त करतो. मित्रानें पाऊस पाडल्यावर लोक शेतकी वगैरे कामें करूं लागतात. आयातन म्हणजे आरंभ ( दुर्ग ); आयातन शब्द अमरांत व आपट्यांच्या कोशांतही नाहीं. ब्रुवाणः = प्रब्रुवाणः = शब्दं कुर्वन् = मेघगर्जना किंवा गडगडाट करून म्हणजे पाऊस पाडून; शब्दं बद्दल दुर्गवृत्तींत स्तनयित्नुं आहे. मित्रः = मित्रः एव = मित्रच. दाधार = धारयति = टेका देतो. उत = च; दुसरा च अध्याहृत. द्यां = दिवम्; दुर्गवृत्तींत दिवं नाहीं; द्यां हें अर्वाचीन संस्कृतांत असल्यामुळें दिवं हा पर्याय देण्याचें कारण नाहीं. अनिमिषा = अनिमिषन् = डोळे न मिटतां, सतत पहात. अभिचष्टे = अभिविपश्यति = सर्व बाजूंनीं पाहतो; अभिविपश्यति उपकारद्वारेण । यः हि यस्मै उपकरोति स तेन सम्यक् दृष्टो भवति (दुर्ग)= जो ज्याच्यावर उपकार करतो तो त्याच्याकडून चांगला पाहिला जातो म्हणजे उपकार करणाऱ्याला उपकृत लोक चांगला म्हणतात; पण मित्र लोकांना पाहतो असें ऋचेंत म्हटलें आहे; लोक मित्राला पाहतात असें म्हटलें नाहीं. इति ( अध्याहृत ) = ( मित्र सर्वांवर कृपादृष्टि ठेवतो ) यास्काव. कृष्टीः म्हणजे मनुष्यें; कृष्टयः = कृ + स्तयः = कर्मवन्तः; कृ याला स्ति हा नामकरण प्रत्यय लाविला आहे; मनुष्यें कामें करतात म्हणून त्यांना कृष्टि हें नांव; किंवा कृष्टयः = विकृष्टदेहाः = ज्यांचे देह लांबट आहेत असे म्हणजे जे उभे राहतात ते; कृष् ( = ओढणें, लांब करणें ) + तिः = कृष्टिः = देह लांबट करणारा; मनुष्येतर प्राणी देह ताणूं शकत नाहींत. पण मनुष्यें ताणूं शकतात म्हणून त्यांना कृष्टि हें नांव असें दुर्ग म्हणतो ! कुत्रे देह हवा तितका ताणतात हें सर्वांनीं पाहिलें आहे; देह ताणण्याच्या बाबतींत कुत्रीं, मांजरें वगैरे मनुष्यावर ताण करतात. कृष्टयः असें बहुवचन घालण्याचें कारण तसें बहुवचन निघंटूंत दिलें आहे ( २।३।७ ). देवराजः— कृष् = खरवडणें; पण कृष्टि या शब्दांतील कृष् ह्याचा तो विशिष्ट अर्थ न घेतां करणें हा सामान्य अर्थ घ्यावयाचा; कृष् + त = कृष्ट = कर्म; कृष्ट आहे ज्याच्या जवळ तो कृष्टि म्हणजे कर्म करणारा; किंवा कृष् = विकृष् = नानाप्रकारांनीं ताणणें; विकृष्ट = नानाप्रकारांनीं ताणलेला; असा देह आहे ज्याच्याजवळ तो कृष्टि; देह शब्द अध्याहृत; कृषन्ति प्रान्तं पदाभ्याम् इति माधवः = पायांनीं भुई ( जणूं काय ) नांगरतात अशी व्युत्पत्ति माधव देतो; कर्षन्ति वशीकुर्वन्ति इति भट्टभास्क-

रश्मिश्रः = इतर प्राण्यांना वश करतात अशी व्युत्पत्ति भट्टभास्कर देतो. कृष्टि शब्दांत जर कोणता धातु असेल तर तो कृष् ( = नांगरणें ) हा असावा. जुहोत = जुहुत = हवि द्या; हु = देणें. इति व्याख्यातं = ( ४ थ्या पादाचा ) अर्थ स्पष्ट आहे. दुर्गानें केलेला अर्थः—मित्र मेघगर्जना करून ( ब्रुवाणः ) म्हणजे पाऊस पाडून लोकांना शेतकी वगैरे कामें करावयास लावतो व धान्य उत्पन्न करून तो पृथिवीलोक व द्युलोक ह्यांचें पोषण करतो म्हणजे पृथिवीवरील लोकांना अन्नसामुग्री देऊन त्यांना देवांना हवि देण्यास समर्थ करतो; अशा रीतीनें डोळ्याचें पातें क्षणभरसुद्धां लवूं न देतां तो मनुष्यांना सर्व बाजूंनीं पाहतो म्हणजे त्यांची सर्व तऱ्हेनें काळजी वाहतो; अशा उपकार करणाऱ्या मित्राला घृतानें भरलेला हवि द्या.

सायणः— ब्रुवाणः = स्तूयमानः शब्दं कुर्वाणः वा; प्रकर्षेण सर्वैः मीयते तथा सर्वान्वृष्टिप्रदानेन त्रायते इति वा मित्रः सूर्यः = सर्वांकडून चांगला मोजला जातो व पाऊस पाडून सर्वांचें रक्षण करतो म्हणून सूर्य हा मित्र; मि = मीयते = मोजला जातो; यातयति = प्रयत्नं कारयति = कृषि वगैरे कामांत प्रयत्न करावयास लावतो; अनिमिषा = अनिमिषेण = अनुग्रहदृष्ट्या = कृपादृष्टीनें; अभिचष्टे = सर्वतः पश्यति = सर्व बाजूंनीं पाहतो म्हणजे काळजी घेतो. यातयज्जन हें विशेषण मित्र, वरुण व अर्यमन् ( १।१३६।३ ), मित्र ( ३।५९।५ ॥ ८।१०२।१२ ) व मित्र आणि वरुण ( ५।७२।२ ) यांना लाविलें आहे. जनं च मित्रो यतति ब्रुवाणः ( ७।३६।२ ) = स्तविलेला किंवा याचना केलेला मित्र पंचजनांना धन देऊन साहाय्य करतो; यत् = धन देऊन साहाय्य करणें असा अर्थ असावा. पृरिष्कृण्वन् अनिष्कृतं जनाय यातयन्निषः । वृष्टिं दिवः परि स्रव ( ९।३९।२ ) = ज्याच्याजवळ धन नाहीं अशाला (अनिष्कृतं ) धनानें युक्त करणारा ( परिष्कृण्वन् ), पंचजनांना ( जनाय ) धन ( इषः ) देणारा ( यातयन् ) तूं, हे सोमा, आकाशांतून ( दिवः परि ) वृष्टि सोड ( स्रव ); किंवा धनांतून ( दिवः परि ) पुष्कळ धन ( वृष्टिं = वृ + स्तिं ) दे ( स्रव ). एवा हि त्वामृतुथा यातयन्तं मघा विप्रेभ्यो ददतं शृणोमि (५।३२।१२) = वेळोंवेळीं ( ऋतुथा ) किंवा धनांतून ( एवा = ऋतुथा ) धन ( मघा = मघानि ) तूं देतोस ( यातायन्तं = ददतं ) असें मीं ऐकलें आहे. कदा चिकित्वो अभि चक्षसे नः अग्ने कदा ऋतचित् यातयासे (५।३।९) = हे धनदात्या ( चिकित्वः = ऋतचित् ) अग्नि, आम्हांला (नः) धन केव्हां देशील ( चक्षसे = यातयासे ) ? हतं च शत्रून् यततं च मित्रिणः प्रजां च धत्त द्रविणं च धत्तम् ( ८।३५।१२ ) = हे अश्विनांनो, आमच्या शत्रूला ठार करा व मित्रांना साहाय्य करा ( यततं ); आम्हांला धन द्या. अनु जनान् यतते पञ्च धीरः ( ९।९२।३ ) = धनवान् ( धीरः ) सोम पञ्चजनांना सतत ( अनु ) द्रव्यसाहाय्य करतो ( यतते ). युवं मित्रा इमं जनं यतथः सं च नयथः ( ५।६५।६ ) = हे मित्रावरुणांनो ( मित्रा ), तुम्ही पंचजनांना द्रव्यसाहाय्य करतां ( यतथः = सं नयथः ); इमं जनं = पुष्कळ धन असाही अर्थ होईल; तुम्ही पुष्कळ धन देतां ( यतथः =

मयथः). यातयत् यातयति जनान् सः यातयज्जनः = जो पंचजनांना द्रव्यसाहाय्य करतो तो; किंवा यातयत् यातयति ददाति जनं धनम् असौ यातज्जनः = धन देणारा. प्रस्तुत ऋचेंत मित्रः जनान् यातयति ब्रुवाणः = याचना केलेला मित्र पंचजनांना द्रव्यसाहाय्य करतो किंवा पुष्कळ धन देतो. जनान् = कृष्टीः = पंचजनांना; मित्र व वरुण हे पंचजनांचे देव होते व ते त्यांना सारखे द्रव्यसाहाय्य करीत असत. निमिष् = डोळे मिटणें, डोळ्याचें पातें लवणें; अनिमिष् = डोळ्याचें पातें न लवणें; अनिमिषा ही तृतीया; अनिमिषा = डोळ्याचें पातें क्षणभरसुद्धां लवूं न देतां म्हणजे सतत; मित्र पंचजनांना सदैव कृपादृष्टीनें पाहतो म्हणजे त्यांची तो सदा काळजी घेत असतो.

**कः (१४) कमनो वा। क्रमणो वा। सुखो वा। तस्य एषा भवति**

कः = क मनः = इच्छा करणाऱ्यांच्या इच्छा पुऱ्या करणारा; कम् (इच्छा पुऱ्या करणें) यापासून क; किंवा कः = क् + रमणः = क्रमणः = संचार करणारा किंवा क्रमणाचें म्हणजे संचार करण्याचें साधन; त्याच्यामुळें प्राणिमात्र इकडे तिकडे संचार करतात; किंवा कः = सुख देणारा; कं = सुखम् (निघण्टु ३।७।२०); कं सुखं ददाति असौ कः. क म्हणजे महान् आत्मा म्हणजे सर्वत्र असणारें ब्रह्म; सर्वत्र असणारा आत्मा अन्तरिक्षांतील देव कसा होईल? क संबंधींच्या सूक्तांत (१०।१२१) अग्नीला उत्पन्न करणाऱ्या नद्या वाहूं लागल्या असें म्हटलें आहे (ऋचा ७) म्हणून नद्यांशीं क चा संबंध असल्यानें तो अन्तरिक्षांतील देव होय; शिवाय प्रजापतिर्वै कः (तै० ब्रा० २।२।५) असें म्हटलें आहे; प्रजापति हा अन्तरिक्षांतील देव असल्यानें क हाही अन्तरिक्षांतील देव; अशा रीतीनें कचें अन्तरिक्षस्थान दुर्ग सिद्ध करतो. कस्मै। अत्र किंशब्दः अनिर्ज्ञातस्वरूपत्वात् प्रजापतौ वर्तते। यद्वा। सृष्ट्यर्थं कामयते इति कः। यद्वा। कं सुखम्। तद्रूपत्वात् कः इत्युच्यते। अथवा इन्द्रेण पृष्टः प्रजापतिः मदीयं महत्त्वं तुभ्यं प्रदाय अहं कः कीदृशः स्याम् इति उक्तवान्। स इन्द्रः प्रत्यूचे यदीदं ब्रवीषि अहं कः स्याम् इति तदेव त्वं भवेति। अतः कारणात् कः इति प्रजापतिः आख्यायते (सायणभाष्य १०।१२१।१) = पुढील खण्डांत दिलेल्या ऋचेंत कस्मै देवाय हविषा विधेम असे शब्द आहेत; कस्मै हें किं शब्दाचें चतुर्थीचें एकवचन; त्याचें पुरें ज्ञान होत नाहीं असें कस्मै शब्दानें सुचविलें जातें; प्रजापतीचें सर्व रूप कोणालाही कळत नाहीं म्हणून कः म्हणजे प्रजापति; किंवा सृष्टि निर्माण करण्याची इच्छा प्रजापतीला झाली म्हणून क म्हणजे प्रजापति; या व्युत्पत्तींत कम् चा म् नाहींसा होतो; किंवा क म्हणजे सुख; प्रजापति हा सुखमय किंवा आनंदमय असल्यानें क म्हणजे प्रजापति; किंवा माझें महत्त्व तूं मागतोस त्याप्रमाणें तें मीं तुला दिल्यास मी कोणत्या प्रकारचा सत्ताधीश होईन म्हणजे महत्त्व घालविल्यावर मला ईश्वर कोण मानील असें प्रजापति इन्द्राला म्हणाला; इन्द्रानें उत्तर दिलें कीं तूं म्हणतोस कीं माझें महत्त्व गेल्यावर मी काय (कः) होणार? त्यावर मी म्हणतों कीं तूं क होणार म्हणून क म्हणजे प्रजापति. ही शेवटली कोटी

तैत्तिरीयब्राह्मणांत आहे. क्रमणः ही यास्कानें दिलेली व्युत्पत्ति सायणाचार्य देत नाहींत; तेव्हां त्यांना ती प्रक्षिप्त वाटली असावी.

## खंड २३ वा.

**हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ।**

**स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम(ऋ० सं० १०।१२१।१)**

**हिरण्यगर्भः हिरण्यमयः गर्भः । हिरण्यमयः गर्भः अस्य इति वा । गर्भः गृभेः गृणात्यर्थे । गिरति अनर्थान् इति वा । यदा हि स्त्री गुणान् गृह्णाति गुणाश्चास्याः गृह्यन्ते अथ गर्भो भवति । समभवत् अग्रे । भूतस्य जातः पतिः एकः बभूव । स धारयति पृथिवीं च दिवं च । कस्मै देवाय हविषा विधेम इति व्याख्यातम् । विधतिः दानकर्मा**

हिरण्यगर्भः = हिरण्यमयः गर्भः; क हा हिरण्यानें भरलेला गर्भ होय; हिरण्यमयः = विज्ञानमयः ( दुर्ग ); क हा विज्ञानमय गर्भ आहे म्हणजे तो ज्ञानस्वरूप आहे; शिवाय सर्व प्राणिमात्रांत तो ज्ञानरूप प्रकाश घालतो म्हणून तो हिरण्यमय म्हणजे विज्ञानमय; किंवा ज्याचा गर्भ हिरण्यमय आहे असा; हिरण्य = सर्व विशेष हरण करणारा; विज्ञानात्म्यामध्यें सर्व विशेष म्हणजे विशिष्ट ज्ञानें नाहींशीं होतात असा दुर्ग अर्थ करतो. या दोन व्युत्पत्तीला कांहीं तरी पौराणिक आधार यास्काच्या मनांत असला पाहिजे; तसला पौराणिक आधार मला सांपडला नाहीं. प्रारंभीं जिकडे तिकडे तम पसरलें होतें; नंतर स्वयंभू भगवान् त्या तमांतून ही सृष्टि व्यक्त करता झाला; त्यानें पहिल्याप्रथम जल निर्माण करून त्यांत आपलें बीज म्हणजे रेत टाकलें; त्या रेताचें सूर्यासारखें तेजस्वी असें सोन्याचें अडें झालें; सर्व लोकांचा पितामह जो ब्रह्मा तो त्या अड्यांत उत्पन्न झाला; अशी कथा मनुस्मृतींत ( अध्याय १ श्लोक ५ ते ९ ) व विष्णुपुराणांत आहे. गर्भ शब्द गृभ् स्तुति करणें यापासून; गृभ् = गृ = स्तुति करणें. क रूपी गर्भ स्तुत्य आहे; किंवा गॄ = गिळणें, नाहींसें करणें; हा क रूपी गर्भ सर्व अनर्थ नाहींसे करतो; गिरति = नाशयति. अर्वाचीन जो गर्भ शब्द तो गृभ् म्हणजे गृह् = ग्रह् = घेणें यापासून; जेव्हां स्त्री पुरुषाचे गुण घेते व जेव्हां पुरुष तिचें गुण घेतो तेव्हां अशा एकवटलेल्या प्रेमापासून गर्भोत्पत्ति होते; स्त्री व पुरुष यांचें जर एकमेकांवर प्रेम नसेल तर चांगली प्रजा निर्माण होणार नाहीं; किंवा जेव्हां स्त्री शुक्राचे गुण घेते म्हणजे आपल्या शोणितांत पुरुषापासून अस्थि, स्नायु व मज्जा घेते व जेव्हां तिच्या रक्तांत असलेले त्वचा, मांस व शोणित हे गुण पुरुषाचें शुक्र घेतें तेव्हां रेत व शोणित यांच्या मिश्रणापासून गर्भ उत्पन्न होतो. समवर्तत = समभवत् = होता. आसीत् = बभूव. दाधार = धारयति. द्यां = दिवम् (खंड २२ पान ७९५ पहा). उत = च; दुसरा च अध्याहृत. इति व्याख्यातम् = (कस्मै ...विधेम) याचा अर्थ स्पष्ट आहे. कस्मै = काय ( दुर्ग ) = प्रजापतीला. दुर्गानें केलेला अर्थः—या स्थावर जंगमात्मक जगाच्या आधीं हिरण्यगर्भ उत्पन्न झाला; जन्मल्यावर उत्पन्न झालेल्या या सर्व ब्रह्मां-

डाचा तो स्वामी झाला; स्वामी या नात्यानें अन्तरिक्ष ( पृथिवीं ) द्युलोक ( द्यां ) व ही पृथिवी ( इमां ) यांचा तो आधार झाला व अजूनही आहे; त्या क ला म्हणजे प्रजापतीला आम्ही हवि देतों.

**सायण**:—हिरण्यगर्भः = हिरण्मयस्य अंडस्य गर्भभूतः प्रजापतिः = सोन्याच्या अंड्यांत गर्भरूपानें असलेला प्रजापति हा हिरण्यगर्भ; किंवा हिरण्मयः अंडः गर्भवत् यस्य उदरे वर्तते सः असौ सूत्रात्मा हिरण्यगर्भः = ज्याच्या पोटांत सोन्याचें अंडें गर्भासारखें असतें तो सूत्रात्मा हिरण्यगर्भ; तो हिरण्यगर्भ सृष्टि निर्माण होण्याच्या आधीं मायेचा अध्यक्ष व सृष्टि निर्माण करूं इच्छिणारा जो परमात्मा त्याच्यापासून जन्मास आला; जन्मल्याबरोबर एक म्हणजे अद्वितीय असा तो सर्व ब्रह्मांडाचा पति झाला; तो पृथिवी व द्युलोक यांना किंवा अन्तरिक्ष ( पृथिवीं ) द्युलोक व पृथिवी ( इमाम् ) या सगळ्यांना आधार देता झाला; त्या हिरण्यगर्भ प्रजापतीला आम्ही हवि देऊन त्याची सेवा करूं. कस्मै हें किं या सर्वनामाचें रूप असल्याकारणानें त्याच्याबद्दल काय असें रूप पाहिजे; कस्मै हें व्याकरणशुद्ध रूप नाहीं; काय = प्रजापतये.

या सूक्तांतील १० ऋचांपैकीं शेवटली वगळून बाकींच्या प्रत्येकीच्या शेवटीं कस्मै देवाय हविषा विधेम हे शब्द आहेत; प्रत्येक ऋचेंत एका विशिष्ट देवाचें वर्णन केलें आहे; तेव्हां कस्मै बद्दल तस्मै असावें अशी अपेक्षा असणें स्वाभाविक आहे; जो देव विशिष्ट गुणांनीं युक्त त्या देवाला आम्ही हवि देऊं असें म्हणणें बरोबर दिसतें; विशिष्ट देवाचें वर्णन केल्यावर आम्ही कोणत्या देवाला हवि देऊं असा प्रश्न कसा विचारतां येईल? शेवटल्या ऋचेंत प्रजापतीशिवाय दुसरा देवच नाहीं असें म्हटलें आहे; त्यामुळें क म्हणजे प्रजापति असा अर्थ केला गेला; कस्मै अन्यस्मै देवाय हविषा विधेम ( = ज्याचें आम्ही वर्णन करीत आहोंत त्याला वगळून कोणत्या दुसऱ्या देवाला हवि देऊं ? ) असें म्हणण्याचा ऋषीचा उद्देश असेल.

**सरस्वान् ( १५ ) व्याख्यातः ( ९।२६ ) तस्य एषा भवति**

सरस्वान् शब्दाची व्युत्पत्ति दिलीच आहे; सरस्वती शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ६९१ ).

## खंड २४ वा.

**ये ते सरस्व ऊर्मयो मधुमन्तो घृतश्चुतः ।**
**तेभिर्नोऽविता भव ( ऋ० सं० ७।९६।५ )**
**इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा ).

दुर्गानें केलेला **अर्थ**:— हे सरस्वान् नदा, उदकानें भरलेल्या ( मधुमन्तः ) व उदक खालीं सोडणाऱ्या ( घृतश्चुतः ) ज्या तुझ्या ऊर्मि त्या ऊर्मींनीं आम्हांला सन्तुष्ट कर; अविता = तर्पयिता = संतुष्ट करणारा. सायणः— मधुमन्तः = रसवन्तः = मधुर; घृतश्चुतः = घृतस्य वृष्ट्युदकस्य क्षारिणः = पावसाचें पाणी खालीं सोड-

णारे; अविता = रक्षिता. दुर्ग व सायणाचार्य यांनीं केलेल्या विवरणावरून ऊर्मयः म्हणजे मेघ असा त्यांनीं अर्थ केला असावा; ते ऊर्मयः यैः ऊर्णोषि नभः मेघैः छादयसि ( दुर्ग ) = ज्या मेघांनीं तूं आकाश आच्छादून टाकतोस ते ऊर्मि म्हणजे मेघ; ऊर्मि शब्द ऊर्णु (=आच्छादणें) यापासून; परंतु ऊर्मि म्हणजे लाटाच; या लाटा जणूं काय मधानें भरलेल्या व घृतसिंचन करणाऱ्या होत; अशा लाटांनीं आमचें कल्याण कर असा अर्थ असावा.

## खंड २५ वा.

**विश्वकर्मा ( १६ ) सर्वस्य कर्ता । तस्यैषा भवति**

विश्वकर्मा = सर्वस्य कर्ता = सर्व जगाचा कर्ता; विश्वस्य सर्वस्य कर्मा कर्ता; कृ + मन् = कर्मन् ; कर्मा कर्माणौ कर्माणः असा हा शब्द चालतो. दुर्ग म्हणतोः– सर्व कृति वायूच्या आधीन असल्यानें विश्वकर्मा हाही अन्तरिक्षांतील देव होय; कारण त्याच्याही कृति वायूवर अवलंबून असल्याच पाहिजेत; पृथिवी व जल हे धातु तेजानें परिपक्व होत असतां वायु त्यांना घेऊन संचार करतो व तसें करून सर्व जग निर्माण करतो; तेव्हां विश्वकर्मा हा वायुस्वरूप होय. वास्तविक विश्वानि सर्वाणि कर्माणि यस्य सः विश्वकर्मा = सर्व कृत्यें ज्याचीं म्हणजे जें कांहीं केलें जातें तें ज्याचें म्हणजे ज्यामुळें तो विश्वकर्मा; जें कांहीं सर्व घडतें तें विश्वकर्मा करतो.

## खंड २६ वा.

विश्वकर्मा विमना आद्विहाया धाता विधाता परमोत संदृक् । तेषामिष्टानि समिषा मदन्ति यत्रा सप्तऋषीन् पर एकमाहुः ( ऋ० सं० १०।८२।२ )

**विश्वकर्मा विभूतमनाः व्याप्ता धाता च विधाता च परमश्च संद्रष्टा भूतानाम्**

विमनाः = विभूतमनाः = विभूतप्रज्ञानः = ज्याचें ज्ञान सर्व वस्तूंत अप्रतिबद्ध असतें म्हणजे ज्याच्या ज्ञानाचा सर्वत्र संचार आहे असा; अशी वस्तु नाहीं कीं त्याला ती माहीत नाहीं. आत् निरर्थक म्हणून गाळला आहे; परंतु आत् = अपि च ( दुर्ग ) = शिवाय, आणखी. विहायाः = व्याप्ता = आत्मना विहायाः । आत्मना अपि सर्वप्रकारं महान् । महत्वाच्च व्याप्ता = सर्व प्रकारें मोठा व मोठा असल्यानें सर्वव्यापक. धाता = उत्पादयिता सर्वभूतानां = सर्व प्राणी उत्पन्न करणारा. विधाता = विधाता च जीवनस्य = उत्पन्न केलेल्या प्राण्यांना जीवनाचें साधन देणारा. दोन च अध्याहृत. उत = च. परमा संदृक् = परमः संद्रष्टा भूतानां = जीवतां च साध्वसाधुषु कर्मसु प्रवर्तमानानां परमः प्रकृष्टः अव्यवधानेन संद्रष्टा सम्यक् प्रविभागेन द्रष्टा = चांगल्यावाईट कामांत प्रवृत्त होणाऱ्या प्राण्यांना श्रेष्ठ व साक्षात् पाहणारा; सर्व प्राणी जे कांहीं करतात तें हा प्रत्यक्षपणें पाहतो; असें पाहण्याचें काम करण्यांत त्याच्याहून इतर कोणताही देव श्रेष्ठ नाहीं.

**तेषाम् इष्टानि वा । कान्तानि वा । क्रान्तानि वा । गतानि वा । मतानि वा। नतानि वा । अद्भिः सह संमोदन्ते**

तेषाम् = साध्वसाधुप्रविभागदृष्टानां तेषां भूतानां = चांगल्यावाईट अशा निरनिराळ्या दिसलेल्या पंचमहाभूतांचा; हें दुर्गाचें विवरण समजत नाहीं. इष्टानि = विश्वकर्म्याला प्रिय अशी प्राण्यांनीं केलेलीं उत्तम कृत्यें. किंवा इष्टानि = कान्तानि = विश्वकर्म्यानें इच्छिलेलीं; इष्टानि व कान्तानि यांचा अर्थ एकच दिसतो; बहुतकरून इष्टानि नंतरचा वा प्रक्षिप्त असावा; इष्टानि = कान्तानि; किंवा यज् पासून इष्ट; इष्टानि = विश्वकर्म्याला अर्पण केलेलीं. क्रान्तानि वा गतानि वा हें दुर्गवृत्तींत नाहीं; इष् = जाणें; इष्टानि = क्रान्तानि = गतानि = केलीं गेलेलीं (कर्मे). किंवा इष्टानि = मतानि = विश्वकर्म्याला अभिमत अशी; इष् = इच्छिणें, मान्य असणें; कान्तानि व मतानि यांचा अर्थ एकच. किंवा इष्टानि = नतानि = विश्वकर्म्याला नम्र असणारीं म्हणजे नम्रपणें अर्पण केलेलीं; इष्टानि यापासून नतानि हा अर्थ कसा निघतो? इषा = अद्भिः सह = पाण्यानें किंवा पाण्यासह. सं + मदन्ति = संमोदन्ते = हर्ष पावतात.

**यत्र एतानि सप्त ऋषीणानि ज्योतींषि । तेभ्यः परः आदित्यः । तानि एतस्मिन् एकं भवन्ति । इति अधिदैवतम्**

यत्रा सप्त ऋषीन् पर एकमाहुः याचा यास्कानें शब्दशः अर्थ दिला नाहीं; यत्र एतानि सप्त ऋषीणानि० भवन्ति हा त्या शब्दांचा गोळाबेरीज अर्थ आहे; यत्र एतानि सप्त ऋषीणानि रसानाम् आकर्षणानि द्रष्टृणि वा रश्मीन् (रश्मयः?) ज्योतींषि एकं भवन्ति अविभागम् उपगच्छन्ति । मण्डले हि एतेषाम् अविभागः । यत्र परे एकम् आहुः। एकमेव यमाहुः देवतासतत्त्वविदः = जेथें पाणी आकर्षण करणारे किंवा सर्व वस्तु पाहणारे सात म्हणजे अनेक रश्मि सूर्यमंडलांत एक होतात म्हणजे सूर्याशीं एकजीव होतात म्हणजे सूर्य व त्याचे रश्मि यांमध्यें कोणताही भेदभाव रहात नाहीं; त्या सूर्याला तो काय तो एक देव असें तत्त्ववेत्ते म्हणतात. ऋषी गतौ (धा० ६।७); जाणें एवढाच अर्थ ऋष् धातूचा धातुपाठांत आहे; ऋष् = आकर्षणें किंवा पाहणें हे अर्थ आपल्यांच्या कोशांत नाहींत. ऋषिः दर्शनात् (२।११ पानें १०९--११०). असा हा देवतापर अर्थ आहे. दैवतम् अधिकृत्य कृतं व्याख्यानम् अधिदैवतम्. वर दिलेलें सर्व विवेचन दुर्गवृत्तीला अनुसरून केलें आहे. दुर्गानें केलेला अर्थः-- सर्वज्ञ (विमनाः), सर्वांहून मोठा व त्यामुळें सर्वव्यापक (विहायाः), प्राणिमात्रांना उत्पन्न करणारा (धाता) आणि त्यांच्या जीवनाची सोय करणारा (विधाता) व त्यांनीं केलेलीं सर्व कृत्यें इतर देवांहून उत्तम प्रकारें पाहणारा (परमा संदृक्) असा हा विश्वकर्मा आहे; जेथें पाणी आकर्षणारे किंवा वस्तु पाहणारे सात किरण सूर्याशीं एकवटतात अशा त्या सूर्यमंडलांत प्राण्यांनीं केलेलीं (तेषां) व विश्वकर्म्याला अर्पिलेलीं (इष्टानि) किंवा त्याला

प्रिय असणारीं (कान्तानि=मतानि) किंवा त्याला नमून असणारीं (नतानि) अशीं सर्व कृत्यें तेथें पाण्यानें ( इषा ) आनंद पावतात; असा देवतापर अर्थ; म्हणजे विश्वकर्मा हा देव असें समजून केलेला अर्थ. प्राण्यांनीं केलेलीं कर्मे पाण्यानें किंवा पाण्यासह आनन्द पावतात म्हणजे काय ? व तेषाम् इष्टानि ह्यांतील तेषां म्हणजे कोणाचीं ? तेषां ह्यानें जर पंचमहाभूतांचा निर्देश असेल तर विश्वकर्म्याला इष्ट अशीं त्यांचीं कर्मे कोणतीं ?

**अथ अध्यात्मम्। विश्वकर्मा विभूतमनाः व्याप्ता धाता च विधाता च परमश्च संदर्शयिता इन्द्रियाणाम्। एषाम् इष्टानि वा। कान्तानि वा। क्रान्तानि वा। गतानि वा। मतानि वा। नतानि वा। अन्नेन सह संमोदन्ते। यत्र इमानि सप्त ऋषीणानि इन्द्रियाणि। एभ्यः परः आत्मा। तानि अस्मिन् एकं भवन्ति। इति आत्मगतिम् आचष्टे**

अथ अध्यात्मं = आतां ऋचेचें आत्मपर विवरण करूं; आत्मानम् अधिकृत्य कृतं व्याख्यानम् अध्यात्मं = आत्म्यासंबंधानें ऋचेचें विवरण. विश्वकर्मा = सर्वांचा कर्ता परमात्मा. विमनाः = विभूतमनाः = सर्वांनीं आपआपल्या बुद्धीनें जाणलेला. विहायाः = व्याप्ता; दुर्गवृत्तींत व्याप्ता नाहीं; विहायाः म्हणजे महान् आत्मा असा तो अर्थ करतो; विहायाः = महान् ( निघं० ३।३।१२ ). धाता = स्रष्टा स्वशक्तिविक्षेपस्य = आपल्या शक्तीचा विक्षेप करणारा म्हणजे सर्वांठायीं आपली शक्ति घालणारा. विधाता च तद्योग्यानां विषयाणां = इंद्रियांना योग्य अशा विषयांचा कर्ता; प्रत्येक इंद्रियाचा विषय निर्माण करणारा. परमा = परमः; संदृक् = संदर्शयिता; परमः संदर्शयिता = इन्द्रियांना आपआपला विषय उत्कृष्ट रीतीनें दाखविणारा. हीं सगळीं आत्म्याचीं विशेषणें. तेषां = एषां = ज्या जीवात्म्यांत परमात्म्यानें आपली शक्ति घातली आहे अशांच्या. इष्टानि० नतानि यांचा अर्थ अधिदैवत विवरणांत दिल्याप्रमाणें. इषा = अन्नेन; अन्नेन सह संमोदन्ते = अन्नासह म्हणजे अन्न मिळाल्यामुळें आनंद पावतात. सप्त ऋषीन् = इमानि सप्त ऋषीणानि इन्द्रियाणि द्रष्टृणि इन्द्रियाणि = आपआपल्या विषयांना आकर्षण करणारीं किंवा आपआपले विषय पाहणारीं इन्द्रियें; या इंद्रियांना ज्योतींषि असें म्हणण्याचें कारण तीं आत्म्याच्या साहाय्यानें आपआपल्या विषयावर प्रकाश पाडतात म्हणजे त्यांना आपआपले विषय दिसतात. एभ्यः परः आत्मा = या इन्द्रियांहून आत्मा श्रेष्ठ आहे; एषां व एभ्यः हे शब्द घालण्याचें कारण इंद्रियें शरीरांत असतात. परे एकम् आहुः = हीं इन्द्रियें आत्म्यांत एक होतात असें ब्रह्मज्ञ म्हणतात. अस्मिन् बद्दल महाराष्ट्रपाठ एतस्मिन् आहे. इति आत्मगतिम् आचष्टे = याप्रमाणें ऋषि आत्म्याची हालचाल सांगतो; आत्मा काय आहे व तो काय करतो हें ऋषि या ऋचेंत स्पष्ट सांगतो. दुर्गानें केलेला आत्मपर अर्थः— सर्वांनीं आपआपल्या बुद्धीनें जाणलेला ( विमनाः ), महान् आत्मा ( विहायाः ), निरनिराळ्या शरीरांत आपली शक्ति उत्पन्न करणारा ( धाता ) व त्या शक्तीला योग्य असे विषय उत्पन्न करणारा ( विधाता ), इंद्रियांना

उत्कृष्ट रीतीनें आपआपले विषय दाखविणारा (परमा संदृक्) असा हा क्षेत्रज्ञ म्हणून प्रत्येक शरीरांत असणारा विश्वकर्मा म्हणजे परमात्मा आहे; जेथें आपआपले विषय पाहणारीं इंद्रियें बुद्धीमध्यें एक होतात म्हणजे इंद्रियें व इंद्रियगोचर असें कांहींच राहत नाहीं व जेथें परमात्म्याच्या ठिकाणीं सर्व जीवात्मे एक होतात अशा ठिकाणीं प्रत्येक शरीरांत असणाऱ्या त्या त्या जीवात्म्याचीं इष्ट कृत्यें अन्नप्राप्तीनें आनंद पावतात म्हणजे त्यांची नेहमींची तहानभूक जाऊन ज्ञानरूप अन्न मिळाल्यामुळें त्यांचें कायमचें समाधान होतें. ह्या विवरणांत यास्कभाष्यांतील एषां व एभ्यः हे शब्द दुर्गानें घेतले नाहींत; त्यानें तेषां हाच शब्द वृत्तींत घेऊन त्याचा अर्थ दिला आहे. अधिदैवत व अध्यात्म अशा यास्काच्या दोन्ही तऱ्हेच्या भाष्यांत इष्टानि० संमोदन्ते असें म्हटलें आहे; पण त्याचा अर्थ दुर्गानें स्पष्ट केला नाहीं; त्या शब्दांचा अर्थ मला कळत नाहीं.

**सायण:**—प्रथम देवतापर अर्थ; विश्वकर्मा म्हणजे आदित्य; आदित्य पाऊस पाडणें वगैरे कामें करतो म्हणून तो विश्वकर्मा; विमनाः = विभूतमनाः; आत् हा शब्द अनर्थक किंवा आत् = सर्वत्र; विहायाः = विविधम् आप्ता। महान् इत्यर्थः = सर्व प्रकारच्या वस्तु मिळविणारा म्हणजे मोठा; धाता = वृष्टिवगैरे कामें करणारा; विधाता = जग उत्पन्न करणारा; परमा संदृक् = प्राणिमात्रांना इतर देवांहून उत्कृष्ट रीतीनें पाहणारा; तेषां = तेषां सप्तर्षीणां ज्योतिषां रश्मीनां = त्या सप्तर्षींचीं म्हणजे किरणांचीं; इष्टानि = स्थानानि शरीराणि वा = त्यांचीं इष्ट अशीं स्थानें किंवा शरीरें; इषा उदकेन संमोदन्ते = (हीं स्थानें किंवा शरीरें) उदकानें आनंद पावतात म्हणजे सूर्यकिरणांना पाणी मिळाल्यामुळें हर्ष होतो; यत्र यस्मिन् आदित्ये तं देवं सप्तर्षीन्। सप्तर्षिभ्यः परः परस्तात् एकम् एव आदित्यम् आहुः मंत्रविदः = ज्या आदित्यमंडलांत असणाऱ्या त्या देवाला म्हणजे आदित्याला सप्तऋषींच्या पलीकडे तो एकटाच आहे असें मंत्रवेत्ते म्हणतात म्हणजे सप्तर्षींच्या पलीकडे असणारा एक आदित्यच; दुसरा कोणताही देव त्याच्यापलीकडे नाहीं; आतां आत्मपर अर्थ; प्राण व प्रकाश यांनीं युक्त असून पुष्कळ कामें जो करतो तो परमात्मा विश्वकर्मा; विमनाः = विभूतमनाः = सर्वज्ञ; विहायाः = मोठा व चांगल्यावाईट कर्मांचीं फळें प्राप्त करून देणारा; धाता च विधाता च याचें विवरण दिलें नाहीं; परमा संदृक् = इंद्रियांना उत्कृष्ट रीतीनें पाहणारा; तेषां = त्या सप्तऋषींना म्हणजे पाहणाऱ्या इंद्रियांना; इष्टानि = इंद्रियांना इष्ट अशीं स्वरूपें म्हणजे तीं तीं इन्द्रियें; इषा सं मदंति = हीं इन्द्रियें आपआपलें विषयरूपी अन्न मिळाल्यामुळें हर्ष पावतात; शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे विषय मिळाल्यामुळें त्या त्या इन्द्रियाला हर्ष होतो; यत्रा सप्तऋषीन् पर एकमाहुः = ज्या आत्म्याला तत्त्ववेत्ते आपआपल्या विषयांकडे जाणाऱ्या सात इन्द्रियांच्या पलीकडे असणारा तो एकच आहे असें म्हणतात; असा तो परमात्मा आहे. हें विवरण दुर्गाच्या विवरणापेक्षां बरेंच स्पष्ट आहे; सायणाचार्य या ऋचेवरील यास्काचें सर्व

भाष्य न देतां अत्र विश्वकर्मा विभूतमना व्याप्ता इति निरुक्तम् अनुसंधेयं एवढेंच म्हणतात व आपल्या भाष्यांत इष्टानि एवढयाचाच अर्थ देतात; तेव्हां त्यांच्या निरुक्त प्रतींत वा कान्तानि० नतानि वा हे शब्द नव्हते की काय ?

**तत्र इतिहासमाचक्षते। विश्वकर्मा भौवनः सर्वमेधे सर्वाणि भूतानि जुहवांचकार। स आत्मानमपि अन्तता जुहवांचकार। तदभिवादिनी एषा ऋक् भवति। य इमा विश्वा भुवनानि जुह्वत् ( ऋ० सं० १०।८१।१ ) इति। तस्योत्तरा भूयसे निर्वचनाय**

विश्वकर्मा म्हणजे परमात्मा या अर्थासंबंधानें आत्मवेत्ते पुढील इतिहास सांगतात; सर्व भुवनांशीं म्हणजे ब्रह्मांडांतील यच्चयावत् वस्तूंशीं तादात्म्य पावलेला म्हणजे कोणत्याही प्रकारचा भेदभाव न मानणारा विश्वकर्मा नांवाचा यजमान सर्वमेध नांवाच्या यज्ञांत सर्व भूतांचा हवि अग्नींत देता झाला व शेवटीं स्वतःचीही आहुति त्यानें दिली. दुर्ग म्हणतोः—अग्निहोत्रासारखें कोणतेंही कर्म असेना त्यांत जर यजमान सर्व होण्याच्या इच्छेनें म्हणजे सर्व वस्तूंशीं तादात्म्य पाण्याच्या इच्छेनें प्रेरित होऊन सर्व देवतांना सर्वफलासाठीं सर्वरूपी यज्ञांत सर्व वस्तूंचा व स्वतःचा हवि देईल तर तो सर्वमेधयज्ञ होईल; अशा रीतीनें सर्वहुत्यज्ञ करणारा विद्वान् सर्वफल मिळवितो म्हणजे त्याचें सर्व वस्तूंशीं तादात्म्य होतें; एथें सर्वमेध हा विशिष्ट मेध नसून सामान्य मेध होय; तीन अश्वमेध, पांच पुरुषमेध, वाजपेय व शेवटीं आप्तोर्याम यांचा जो गट त्यालाही सर्वमेध म्हणतात; पण त्यांत आत्मयाग सांगितला नाहीं; सामान्य सर्वमेध करणाऱ्या संबंधानें शत० ब्रा० त आत्मयाग करणारा श्रेष्ठ कीं देवयाग करणारा श्रेष्ठ असा प्रश्न विचारला असतांना आत्मयाग करणारा श्रेष्ठ असें उत्तर दिलें आहे. तदभिवादिनी एषा ऋक् भवति = ह्या अर्थाची पुढील ऋचा होय; य इमा विश्वा भुवनानि जुह्वत् ऋषिर्होता न्यसीदत् पिता नः। स आशिषा द्रविणमिच्छमानः प्रथमच्छद् अवरान् आ विवेश ( १०।८१।१ ) = आमचा पिता म्हणजे पालन करणारा व द्रव्य, गुण, कर्म आणि देवता ह्यांचें खरें स्वरूप पाहणारा ( ऋषिः ) व ह्या सर्व भूतांची आहुति देणारा (जुह्वत्) असा जो विश्वकर्मा सर्वमेधयज्ञांत होता म्हणून बसला म्हणजे होता झाला तो सर्व कांहीं मी होणार ( द्रविणम् इच्छमानः ) अशा इच्छेनें ( आशिषा ) प्रेरित झालेला सर्वप्राप्तीकरतां सर्वमेध ह्या यज्ञाचा प्रयोग करता झाला व सर्व देवांत अग्रज जो प्रजापति त्यालाही ह्या सर्वप्राप्तीनें झांकून टाकून ( प्रथमच्छद् ) म्हणजे प्रजापति वगैरे सर्व देव माझ्यांत आहेत असें मानून त्याच्यानंतर जन्मास आलेले जे आमच्यासारखे लोक ( अवरान् ) त्यांच्यामध्येंही भेदभाव न मानतां शिरला ( आ विवेश ) म्हणजे त्यांच्याशीं एकरूप झाला; असा अर्थ दुर्ग करतो. प्रत्येक यज्ञांत विशिष्ट प्रकारचें द्रव्य, विशिष्ट प्रकारचीं यज्ञांगें, विशिष्ट प्रकारच्या क्रिया व विशिष्ट प्रकारच्या देवता असतात; पण खरा ज्ञाता हे सर्व विशिष्ट प्रकार बाजूला ठेवतो व त्यांचें सामान्य तत्त्व म्हणजे खरें स्वरूप पाहतो; त्याला सर्व यज्ञ सर्व देवता

सारख्याच; असा मनुष्य खरा ऋषि म्हणजे खरा द्रष्टा; इतर नांवाचे ऋषि. आशीः = सर्व भूतांशीं एकरूप होण्याची इच्छा; द्रविणम् इच्छमानः = सर्व यागांचें विशिष्ट फल बाजूला ठेवून सामान्य फल म्हणजे सर्व वस्तूंशीं तादात्म्य इच्छिणारा; असा मनुष्य इतर यजमानांत असलेली मला हें पाहिजे मला तें पाहिजे अशी कोती दृष्टि झुगारून देतो; असे अनपेक्षित अर्थ दुर्ग करतो. १०।८२ हें सूक्त बहुतेक दुर्बोध आहे. विश्वकर्मा भौवन हा त्या सूक्ताचा द्रष्टा असें म्हटलें आहे. ऋचा १ लीः— सूर्याच्या कुशल पित्यानें आपल्या मनांतून द्यावापृथिवी उत्पन्न केल्या; जेव्हां द्यावापृथिवीचे अंत दृढ झाले त्या क्षणींच त्या दोघी विस्तृत झाल्या. ऋचा ३ रीः— जो आमचा उत्पादक सगळीं भुवनें देता झाला म्हणजे उत्पन्न करता झाला व ज्यानें देवांना निरनिराळीं नांवें दिलीं तो एकच होय; त्याच्यामध्येंच इतर सर्व भुवनें समाविष्ट होतात. ऋचा ४ थीः— ज्या पूर्वींच्या ऋषींनीं सर्व प्राणी एकत्र केले त्यांनीं त्याला हवि दिला. ऋचा ५ वीः— द्युलोकाच्या, या पृथिवीच्या व बलिष्ठ देवांच्या पलीकडे जें आहे तें काय असेल ? ज्या गर्भांत सर्व देव एकत्र दिसले तो कोणता गर्भ जलदेवता प्रथम धारणकर्त्या झाल्या ? ऋचा ६ वीः— ज्या गर्भांत सर्व देव एकत्र झाले त्याचाच गर्भ जलदेवता प्रथम धारण करत्या झाल्या म्हणजे ज्यानें सर्व देव उत्पन्न केले तो एक देव जलदेवतांच्या पोटीं जन्मास आला. ऋचा ७ वीः— ज्यांनीं हीं भुवनें उत्पन्न केलीं तो तुम्हांला कधींही ज्ञात होणार नाहीं. याप्रमाणें या सूक्तांत सर्व देवांचा व सर्व भुवनांचा कर्ता एक असून त्याला जलदेवतांनीं जन्म दिला असें म्हटलें आहे; तेव्हां प्रस्तुत ऋचेंतही त्याचेंच वर्णन असावें. विश्वकर्मा = सर्व देव व सर्व भुवनें उत्पन्न करणारा. विमनाः = विलक्षण बुद्धीचा; ज्यानें केवळ आपल्या मनांतून सर्व उत्पन्न केलें त्याची बुद्धि विलक्षण असलीच पाहिजे. आत् हें अ चें पंचमीचें एकवचन; आत् = नंतर म्हणजे आणि. विहायस् हें विशेषण उषा ( १।१२३।१ ), अग्नि ( १।१२८।६ ॥ ६।१३।६ ॥ ८।२३।१९ ॥ ८।२३।२४ ॥ १०।९२।१५ ), इन्द्र ( ३।३६।२ ), शूर योद्धा ( ४।११।४ ), सोम ( ८।४८।११ ), मद ( ९।७५।५ ) यांना लाविलें आहे. त्वाद्वाजी वाजंभरो विहाया अभिष्टिकृज्जायते सत्यशुष्मः ० अग्ने ( ४।११।४ ) = हे अग्नि, तुझ्यापासूनच धनवान् ( वाजी = सत्यशुष्मः ) व धनदाता ( वाजंभरः = विहायाः = अभिष्टिकृत् ) असा पुरुष जन्मास येतो; वह्मा सूनो सहसो नो विहाया अग्ने तोकं तनयं वाजिनो दाः ( ६।१३।६ ) = हे धनपुत्रा अग्नि, ज्या अर्थीं तूं धनदाता आहेस ( वह्मा = विहायाः ) त्याअर्थीं आम्हांला धन ( तोकं = तनयं ) दे; या दोन उदाहरणांवरून विहायस् म्हणजे दाता असा अर्थ असावा; पण अद्‌भुतकर्में करणारा असाही त्या शब्दाचा अर्थ असेल; एथें अद्‌भुत कर्में करणारा. धा = देणें; धाता = विधाता = दाता. संदृक् = प्रकाश, रूप, सोन्यासारखें तेजस्वी धन; हा शब्द स्त्रीलिंगी आहे. मा नः सूर्यस्य सन्दृशो युयोथाः ( २।३३।१ ) = मला सूर्याच्या प्रकाशापासून दूर ठेवूं नकोस म्हणजे मला नेहमीं सूर्याचा प्रकाश

दिसो. अस्य श्रेष्ठा सुभगस्य संदृक् देवस्य चित्रतमा मर्त्येषु ( ४।१।६ ) = या धनवान् ( सुभगस्य ) अग्नीचें मर्त्यांना दिलेलें धन ( सन्दृक् ) अतिशय ( श्रेष्ठा = चित्रतमा ) आहे. परमा सन्दृक् = या एक देवाचा प्रकाश अत्युत्कृष्ट आहे किंवा याच्याजवळ अतिशय धन आहे. तेषां म्हणजे कोणाचे? पहिल्या अर्थात विश्वकर्मा हा एकच आहे. राया वयं ससवांसो मदेम हव्येन देवा यवसेन गावः ( ४।४२।१० ) = देव जसे हवीनें व गाई जशा गवताने हर्ष पावतात त्याप्रमाणें हवि देणारे आम्ही धनानें हर्ष पावूं; दिवस्पृथिव्योरवसा मदेम ( ५।४९।५ = द्युलोक व पृथिवी यांतील धन मिळाल्यास आम्हाला अत्यानंद होईल; इषा मदेम सह देवगोपाः ( ७।६४।३ ) देवांनीं रक्षिलेले आम्ही धनानें अत्यानंद पावूं. समिषामदन्ति = इषा सं सह मदन्ति = धनानें अत्यानंद पावतात; पण असे अत्यानंद पावणारे कोण? इष्टानि म्हणजे काय? तेषामिष्टानि विहितानि धामशः स्थात्रे रेजन्ते विकृतानि रूपशः ( १।१६४।१५ ); एथें तेषाम् इष्टानि हे शब्द आले आहेत; पण त्यांचा किंवा सर्व ऋचेचा अर्थ कळत नाहीं. इष्टं वीतम् अभिगूर्तं वषट्कृतं तं देवासः प्रतिगृभ्णन्ति अश्वम् ( १।१६२।१५ ) = यज्ञांत आहुति म्हणून अर्पिलेल्या अश्वाला देव घेतात; इष्ट = हवि म्हणून दिलेला. इष्टस्य मध्ये अदितिर्निधातु ( १०।११।२ ) = अदिति आम्हांला धनाच्यामध्यें ठेवो. यज् = हवि देणें, धन देणें; एथें इष्टानि = हवि असा अर्थ असेल; तेपाम् इष्टानि म्हणजे अंगिरस नांवाच्या सात ऋषींनीं दिलेले हवि असा अर्थ असेल. सप्तऋषीन् म्हणजे ध्रुवाशेजारचीं सात नक्षत्रें नसून अंगिरस कुलांतले सात प्रमुख स्तोते होते; त्यांनीं आपल्या स्तुतींनीं व हवींनीं स्वर्ग मिळविला व ते देवांत मिसळून गेले. सप्तर्षि म्हणजे ध्रुवाजवळचे सात तारे; त्यांना इंग्रजींत मोठा अस्वल व धाकटा अस्वल असें म्हणतात; हा अर्थ अर्वाचीन आहे; ऋग्वेदांत या ताऱ्यांना ऋक्ष ( अस्वल ) असें नांव दिलें आहे. अस्माकमत्र पितरस्त आसन् सप्त ऋषयः ( ४।४२।८ ) एथें सप्तर्षींना पितर म्हणजे पूर्वज म्हटलें आहे. ऋषयः सप्त दैव्याः ( १०।१३७।७ ) = देवांमध्यें वास करणारे सात ऋषि. ऋषीणां सप्त धीतिभिः ( ९।६२।१७ ) = सप्त ऋषींच्या स्तुतींनीं ( सोमाला रथाला जोडतात म्हणजे सोमरस वहावयाला लावतात ). अभिवाणीर्ऋषीणाम् सप्त नूषत ( ९।१०३।३ ) = सप्त ऋषींच्या स्तुति सोमाची स्तुति करत्या झाल्या. ऋषीन् तपस्वतो यम तपोजान् अपि गच्छतात् ( १०।१५४।५ ) = हे यमा, स्वर्गांत तप करीत असलेल्या सप्तर्षींकडे हा मृत जावो. देवा एतस्यामवदन्त पूर्वे सप्त ऋषयस्तपसे ये निषेदुः ( १०।१०९।४) = जे सात ऋषि तप करीत बसले होते त्यांनीं या ब्राह्मणाच्या स्त्रीबद्दल ती शुद्ध आहे असा निकाल दिला आहे. ऋग्वेदांत ऋषि म्हणजे स्तोता एवढाच अर्थ आहे; वरील उताऱ्यांतील सप्त ऋषि हे प्रसिद्ध स्तुति रचणारे होते; त्यांचे वंशज या स्तुति नेहमीं म्हणत; प्रत्येकाला मेल्यानंतर आपण सप्तर्षींकडे जाऊं अशी आशा स्वाभाविकपणें वाटे; त्याच सप्तर्षींचा प्रस्तुत

ऋचेंत उल्लेख आहे. यत्र सप्त ऋषीन् परे एकमाहुः = जेथें देव (परे) सप्तर्षींना म्हणजे अंगिरस कुलांतील सात प्रमुख स्तोत्यांना एक म्हणजे आपल्यासारखेच देव म्हणूं लागले (आहुः); अशा स्वर्गलोकीं त्या ऋषींनीं (तेषां) पृथिवीवर दिलेले हवि (इष्टानि) धनप्राप्तीमुळें (सम् + इषा) हर्ष पावतात (मदन्ति) म्हणजे हवि दिल्यामुळें अंगिरसांना अतिशय धन मिळतें व त्या धनामुळें तें अत्यानंद पावतात. अंगिरस हे आमचे पितर देवलोकीं आहेत व त्यांच्याजवळ अतिशय धन आहे म्हणून ते आम्हांला धन देवोत असें कांहीं ऋचांत म्हटलें आहे; तेव्हां तेषाम् इष्टानि समिषा मदन्ति = यानि इष्टानि हवींषि अङ्गिरसः देवेभ्यः पृथिव्यां दत्तवन्तः तेषां हविषां दानेन ते सप्त ऋषयः स्वर्गे लोके इषा धनेन मदन्ति असा अर्थ असेल; पण ऋचेच्या पहिल्या अर्धांत विश्वकर्म्याजवळ अतिशय धन असून तो धन देतो असें म्हटलें आहे; त्याचा दुसऱ्या अर्धाचा जो मी अर्थ केला आहे त्याच्याशीं काय संबंध? कदाचित् त्यानें अंगिरसांना अतिशय धन दिलें असेल. ऋचा दुर्बोध आहे किंबहुना सर्व सूक्त दुर्बोध आहे असें मीं आधीं म्हटलेंच आहे.

## खंड २७ वा.

**विश्वकर्मन् हविषा वावृधानः स्वयं यजस्व पृथिवीमुत द्याम्।**
**मुह्यन्त्वन्ये अभितो जनास इहास्माकं मघवा सूरिरस्तु (ऋ० सं० १०।८१।६)**

**विश्वकर्मन् हविषा वर्धयमानः स्वयं यजस्व पृथिवीं च दिवं च। मुह्यन्तु अन्ये अभितः जनाः सपत्नाः। इह अस्माकं मघवा सूरिः अस्तु**

वावृधानः = वर्धयमानः = वाढविणारा; दुर्गवृत्तींत वर्धमानः असें आहे. उत = च. द्यां = दिवम्. दुसरा च अध्याहृत. हे विश्वकर्मन् प्रयोगावस्थित त्वम् उच्यसे। अनेन हविषा सर्वमेधसंपदादियुक्तेन त्वं वर्धमानः विश्वकर्मत्वम् आपद्यमानः तत्फलविपरिणामकाले स्वयं यजस्व स्वयं संगच्छस्व व्याप्नुहि पृथिवीं च दिवं च। सर्वव्यापी भव (दुर्ग) = सर्वमेधयज्ञाचा प्रयोग करणाऱ्या हे विश्वकर्म्या, तुला मी सांगतों; ज्याच्यामुळें तूं सर्व वस्तूंशीं एकवटशील अशा हवीनें वाढणारा म्हणजे खरोखरीचा विश्वकर्मा होणारा तूं सर्वमेधाच्या फलप्राप्तीच्या वेळीं पृथिवी व द्युलोक यांच्याशीं एकवटलेला हो म्हणजे त्यांना व्यापून टाक; सध्यां तूं नांवाचा विश्वकर्मा आहेस पण सर्वमेधयज्ञानें तूं सर्व वस्तूंशीं तादात्म्य पावशील व तेव्हांच तुला विश्वकर्मा हें नांव शोभेल. वर्धयमानः असा खरा पाठ असल्यास देवांना हवि देऊन संतुष्ट करणारा असा हविषा वावृधानः या शब्दांचा अर्थ होईल; पण दुर्गाच्या मतें तो अर्थ बरोबर नाहीं. जनासः = जनाः सपत्नाः = ये त्वदुपासनापराङ्मुखाः तव सपत्नाः समानं पतित्वम् इच्छन्ति (दुर्ग) = तुझ्यासारखा सर्वमेध न करतां तुझ्या ऐश्वर्याची इच्छा करणारे; असे सर्वत्र (अभितः) असणारे त्वदितर (अन्ये) जन मोह पावोत म्हणजे ते त्या मूढावस्थेंतच असोत म्हणजे त्यांची फसवणूक होवो; आपण सर्वमेध कर-

णाऱ्या विश्वकर्म्याप्रमाणें ऐश्वर्यवान् आहों अशा घमेंडींतच ते राहोत. तुझ्या सर्वमेध यागांत ( इह ) असणारे जे आम्ही त्यांचा सर्व धनावर ज्याची सत्ता आहे ( मघवा ) व जो सर्वज्ञ आहे असा विश्वकर्मा आमचा होवो. असा दुर्गानें अर्थ केला आहे.

सायण:—हे विश्वकर्मन् विश्वविषयकर्मन् एतन्नामक परमेश्वर हविषा हविर्भूतेन मय विश्वकर्मणा मया दत्तेन वा हविषा वर्धमानः स्वयमेव पृथिवीं च दिवं च स्वसृष्टे द्यावापृथिव्यौ स्वयं प्रवृद्धः सन् यजस्व पूजय। मत्तः अन्ये जनाः अयष्टारः अस्मद्याग-विरोधिनः वा मुग्धाः भवन्तु अभितः सर्वतः। इह अस्मिन् यागे अस्माकं मघवा अस्म-त्प्रत्तेन हविर्लक्षणेन धनेन धनवान् स सूरिः स्वर्गादिफलस्य प्रेरकः अस्तु = सर्व सृष्टि निर्माण करणाऱ्या ( विश्वकर्मन् ), हे परमेश्वरा, मी स्वतः हवि होऊन त्या हवीनें वाढणारा किंवा विश्वकर्मा जो मी त्यानें दिलेल्या हवीनें वाढणारा तूं स्वतः उत्पन्न केलेल्या द्यावापृथिवींची हवि देऊन पूजा कर; जे यज्ञ करीत नाहींत किंवा जे आमच्या यागाला विरोध करतात असे सर्वत्र असणारे व माझ्याहून भिन्न असे जन अज्ञानरूपी मूढावस्थेंत असोत; या यज्ञांत आम्ही दिलेल्या हविरूप धनानें धनवान होणारा ( मघवा ) व यज्ञांचे स्वर्गादिफल देणारा ( सूरिः ) असा विश्वकर्मा नांवाचा परमेश्वर आमचा होवो. दुर्ग व सायण प्रस्तुत ऋचेचे असे भिन्न अर्थ करतात; ते अर्थ ऋचेंतून कसे निघतात तें समजत नाहीं. १०।८१ या सूक्तांत विश्वकर्मा द्यावापृथिवी वगैरे सर्व लोक निर्माण करतो व तो सर्वत्र आहे असें म्हटलें आहे; प्रस्तुत ऋचेचा पुढीलप्रमाणें अर्थ असेल:—हे विश्वकर्म्या, आमच्या हवींनीं संतुष्ट होणारा तूं स्वतः होऊन आम्हांला पृथिवी व द्युलोक म्हणजे त्यांतील धन दे ( यजस्व ); आमच्या-भोंवतीं असणारे इतर जन खोट्या देवांच्या मागें लागोत ( मुह्यन्तु ); एथें ( इह ) धनवान् (मघवा) व दाता (सूरिः) असा विश्वकर्मा आमचा देव असो म्हणजे आम्ही विश्वकर्म्या-चीच पूजा करणार; इतर देव खोटे देव होत. मुह् धातूचे मुह्यन्तु एवढेंच रूप व तें एकदांच ऋग्वेदांत आलें आहे; त्यामुळें त्याचा अर्थ ठरवितां येत नाहीं. मोघ शब्द मुह् धातुपासून निघाला असावा; मोघं वा देवान् अप्यूहे अग्ने ( ७।१०४।१४ ) = जर मी खोटेपणानें ( श्रद्धा नसून ) देवांची पूजा करीत असेन. यो मा मोघं यातुधानेति आह ( ७।१०४।१५ ) = हे चेटक्या असें जो मला खोटेपणानें म्हणतो. यच्चिकेत सत्यमित् तन्न मोघं वसु स्पार्हम् उत जेतोत दाता ( १०।५५।६ ) = जेता व दाता इंद्र जें अमूप ( स्पार्ह ) धन देतो तें खरोखरचेंच धन असतें, कधींही खोटें नसतें. मोघमन्नं विन्दते अप्रचेताः ( १०।११७।६ ) = कृपण ( अप्रचेताः ) खोटें धन मिळवितो. यदुलूको वदति मोघमेतत् ( १०।१६५।४ ) = ( यमाचा दूत ) घुबड ( उलूकः ) जें बोलत आहे तें खोटें आहे. या सर्व ठिकाणीं मोघ म्हणजे खोटें. मूरदेवाः यांतील मूर शब्द मुह् पासून झाला असावा; मूर = मूढ = खोटे; ज्यांचे देव खोटे आहेत ते मूरदेव. हें विवेचन बरोबर असल्यास मुह्यन्तु म्हणजे खोट्या देवांच्या पाठीमागें लागोत असा अर्थ होईल. इन्द्राला ( ८।९८।२ ) व सूर्याला

( १०।१७०।४ ) विश्वकर्मा हें विशेषण लाविलें आहे; सर्व कर्में करणारा व अतिशय धन आहे ज्याच्याजवळ असा असे त्याचे दोन अर्थ होतात. १०।८१ या सूक्ताची देवता विश्वकर्मा; या सूक्तांतील पहिल्या ऋचेचा कांहीं भाग मागील खंडांत यास्कानें उद्धृत केला आहे व सहाव्या ऋचेचें भाष्य प्रस्तुत खंडांत दिलें आहे. ऋचा २ रीः— जेथून म्हणजे जेथें बसून व ज्याचा आसरा धरून विश्वकर्म्यानें भूमीला उत्पन्न केलें व द्यौला अंधारांतून प्रगट केलें अशी बसावयाची जागा कोठें व कशी होती ? ऋचा ३ रीः— विश्वकर्म्याला सर्व बाजूंनीं डोळे, तोंडें, हात व पाय आहेत; हा एक असून त्यानें द्यौ व पृथिवी उत्पन्न केल्या. ऋचा ४ थीः— तें अरण्य कोणतें व त्यांतील कोणतें झाड तासून त्यानें द्यावापृथिवी निर्माण केल्या ? अहो प्राज्ञहो, ज्यावर बसून त्यानें सर्व भुवनें हातांत धरिलीं असें ठिकाण कोणतें होतें हा प्रश्न आपल्या मनाला विचारा. ऋचा ५ वीः— हे धनवंता विश्वकर्म्या, द्युलोकांत, पृथिवीवर व अंतरिक्षांत असलेलें तुझें धन तुझ्या भक्तांना दे. ऋचा ६ वीः— हिचा अर्थ वर दिलाच आहे. ऋचा ७ वीः— धन देणारा ( वाचस्पतिं = मनोजुवं ) असा जो विश्वकर्मा त्याला आज या संग्रामांत धनप्राप्तीसाठीं बोलावूं; विश्वाचें कल्याण करणारा व साधुकृत्यें करणारा असा तो आम्हीं दिलेल्या हवींचा आमच्या कल्याणार्थ स्वीकार करो. या सात ऋचांत कोठेंही विश्वकर्म्यानें सर्वमेधयज्ञांत सर्वप्राप्तीसाठीं आत्मयज्ञ केला असा अर्थ दिसत नाहीं. प्रस्तुत ऋचेंत मघवा सूरिः असे शब्द आहेत; तेव्हां इन्द्रालाच विश्वकर्मा असें म्हटलें असेल.

**तार्क्ष्यः ( १७ ) त्वष्ट्रा व्याख्यातः ( निरु० ८।१३ ) । तीर्णे अन्तरिक्षे क्षियति । तूर्णम् अर्थं रक्षति । अश्नोतेर्वा । तस्यैषा भवति**

त्वष्टृ शब्दाची जी व्युत्पत्ति ( पानें ६२२–६२३ ) तीच तार्क्ष्य शब्दाची; तार्क्ष्यः = तार् + क्ष्यः; तार् = तूर्णम् ; क्ष्यः = शः = अश्नुते; किंवा तार्क्ष्यः = त्वार्क्ष्यः = त्विर्क्ष्यः=त्विक्ष्यः=त्विष्यः=दीप्तिमान् ; किंवा तार्क्ष्यः = त्वार्क्ष्यः=त्वक्ष्यः=त्वक्षा=अद्भुत कर्में करणारा; किंवा तार्क्ष्यः = तार्क्ष्यः = तक्षा = अद्भुत कामें करणारा; अशा व्युत्पत्ति असतील; किंवा तार्क्ष्यः = तीर्क्ष्यः = तीर् + क्ष्यः; तीर् = तीर्णे; क्ष्यः = क्षियति; तीर्ण म्हणजे विस्तीर्ण अशा अन्तरिक्षांत जो राहतो तो तार्क्ष्य; किंवा तार्क्ष्यः = तूर्क्ष्यः = तूर् + रक्ष्यः; तूर् = तूर्णम् ; रक्ष्यः = रक्षति; किंवा क्ष्यः = श्यः = अश्नुते; तूर्णम् उदकाख्यं रक्षति अश्नुते वा ( दुर्ग ) = उदक नांवाचा पदार्थ जो त्वरेनें रक्षण करतो किंवा व्यापतो तो तार्क्ष्य; दुर्गवृत्तींत अर्थं हा शब्द नाहीं; तथापि उदकाख्यं हें विशेषण असल्याकारणानें अर्थं सारखें विशेष्य पाहिजे. तृक्ष्यस्य अपत्यं तार्क्ष्यः ( अमर १।१।२९ क्षीरस्वामी ); पण तृक्ष शब्द अमरांत नाहीं; तृक्ष कोण होता ? व्याख्यातः ह्यानंतर दिलेल्या तार्क्ष्य शब्दाच्या व्युत्पत्ति प्रक्षिप्त असाव्यात; कारण व्याख्यातः असें म्हटल्यावर यास्क आणखी व्युत्पत्ति देत नसतो.

## खंड २८ वा.

**त्यमू षु वाजिनं देवजूतं सहावानं तरुतारं रथानाम्।**

**अरिष्टनेमिं पृतनाजमाशुं स्वस्तये तार्क्ष्यमिहा हुवेम (ऋ० सं० १०।१७८।१)**

**तं भृशम् अन्नवन्तम्। जूतिः गतिः। प्रीतिर्वा। देवजूतम्। देवगतम्। देवप्रीतं वा। सहस्वन्तं तारयितारं रथानाम् अरिष्टनेमिं पृतनाजितम् आशुं स्वस्तये तार्क्ष्यम् इह व्हयेम। इति**

त्यमू = त्यम् + ऊ; त्यं = तम्; ऊ अनर्थक म्हणून गाळला आहे. सु = भृशं = उत्साहानें. वाजिनं = अन्नवन्तं = अन्नानें युक्त अशाला; वाजी वेजनवान् भयदाता परेभ्यः बलवान् वा (दुर्ग) = वाजी म्हणजे शत्रूला भय दाखविणारा किंवा बलवान्; वाजी = विजी; ओविजी भयचलनयोः (धा० ६।९); विज् = भय दाखविणें किंवा हालणें; अन्नवान् असा अर्थ दुर्ग देत नाहीं. जूतिः = गतिः; किंवा जूतिः = प्रीतिः. भृशम् अन्नवन्तम्। जूतिः गतिः। प्रीतिर्वा हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. देवजूतं = देवगतं = देवैः गतं परत्वेन ज्ञातम्। परः अयम् अस्माकम् इति (दुर्ग) = गत म्हणजे ज्ञात; आमच्यामध्यें हा श्रेष्ठ असें देवांनीं जाणलेला तो देवजूत; किंवा देवजूतं = देवप्रीतं = देवैः सामानप्रीतं (दुर्ग); पण सामानप्रीतं म्हणजे काय? देवप्रीतं = देवांचें प्रेम आहे ज्याच्यावर अशाला; जू = जाणें, मन वळणें (आपट्यांचा कोश). सहावानं = सहस्वन्तं = बलानें युक्त अशाला; सहस् = बल. तरुतारं = तारयितारं = तारण करणाऱ्याला; किंवा तरून नेणाऱ्याला. रथानां = रंहितॄणां भूतानाम् (दुर्ग); रथानां तरुतारं = गतिमान् प्राण्यांना बल देऊन चालविणाऱ्याला; प्राण्यांची गति त्यांच्या बलावर अवलंबून असते व ही गति त्यांना तार्क्ष्य देतो (दुर्ग). अरिष्टनेमिं = केनचित् अपि अप्रतिहतवज्रं (दुर्ग) = ज्याच्या वज्राला कोणीही अडवूं शकला नाहीं अशाला; नेमिः = वज्र (निघं० २।२०।२); रिष् = हिंसा करणें; ज्याच्या वज्राला आजपर्यंत कोणीं हिंसा केली नाहीं तो अरिष्टनेमि. पृतनाजं = पृतनाजितं = सैन्यांना जिंकणाऱ्याला. आशुं = शीघ्रं (दुर्ग). स्वस्तये = सुखानें जाण्याकरितां म्हणजे आपण संसारांत सुखानें रहावें यासाठीं. हुवेम = व्हयेम. दुर्गानें केलेला अर्थः– शत्रूला भय दाखविणारा किंवा स्वतः बलवान् (वाजिनं), आपल्यामध्यें हा श्रेष्ठ आहे असा देवांनीं जाणलेला किंवा ज्याच्यावर देवांचें प्रेम सारखें आहे असा (देवजूतं), बलवान् (सहावानं), गतिमान् प्राण्यांना (रथानां), गति देणारा (तरुतारं), शीघ्र जाणारा (आशुं) अशा त्या प्रख्यात (त्यं) तार्क्ष्याला आम्ही वारंवार किंवा उत्साहानें (सु) आमच्या कल्याणासाठीं (स्वस्तये) ह्या यज्ञांत (इह) बोलावूं (हुवेम).

सायणः– तार्क्ष्यं = तृक्षपुत्रं सुपर्णं=तृक्षाचा मुलगा जो गरुड त्याला; वाजिनं = बलवन्तम् अन्नवन्तं वा; देवजूतं=देवैः सोमाहरणार्थं प्रेरितं=सोम आणण्याकरितां देवांनीं पाठविलेल्याला; किंवा देवैः प्रीयमाणं तर्प्यमाणं=देवांनीं सोम देऊन ज्याला तृप्त केलें आहे अशाला; सहावानं = बलवान् किंवा शत्रूचा पराभव करणारा अशाला; तरुतारं रथानां =

शत्रूंच्या रथांना जिंकणाऱ्याला; किंवा रथ म्हणजे भ्रमण करणारे द्युलोक वगैरे; त्यांच्यांतून सोम आणण्याकरितां तरून जाणाऱ्याला म्हणजे त्यांना ओलांडून जाणाऱ्याला; अरिष्टनेमिं = अहिंसितरथम्। यद्वा। नेमिः नमनशीलम् आयुधम्। अहिंसितायुधं = ज्याच्या रथाला किंवा आयुधाला कोणी हिंसा करूं शकत नाहीं अशाला; नेमि म्हणजे ज्याला वांकवितां येतें असें धनुष्यासारखें आयुध; किंवा अरिष्टनेमि जो मी त्या मला उत्पन्न करणाऱ्याला म्हणजे त्याची स्तुति करण्याकरतां मला स्फूर्ति देणाऱ्याला; पृतनाजं = शत्रुसेनानां प्राजितारं प्रगमयितारं जेतारं वा = शत्रुसेनांना पळवून लावणाऱ्याला किंवा जिंकणाऱ्याला; आशुं = शीघ्रगामिनम्.

**कम् अन्यं मध्यमात् एवम् अवक्ष्यत्। तस्य एषा अपरा भवति**

तार्क्ष्य हा बलवान् ( सहावानं ) व बलाचीं कृत्यें करणारा असल्यामुळें तो अंतरिक्षांतीलच देव असला पाहिजे; ऋषीनें तार्क्ष्य ह्या नांवानें अंतरिक्षांतील देवांशिवाय कोणत्या इतर देवाची अशा रीतीनें स्तुति केली असेल? कोणी म्हणेल कीं तार्क्ष्य म्हणजे गरुडच; कारण गरुडही बलवान् असून बलाचीं कृत्यें करतो; ह्या आक्षेपाला उत्तर म्हणून पुढील ऋचा दिली आहे; त्या ऋचेंत तार्क्ष्य पाऊस पाडतो असें म्हटलें आहे; गरूड कधींही पाऊस पाडूं शकत नाहीं तेव्हां तार्क्ष्य म्हणजे गरूड नव्हे असें दुर्ग म्हणतो. वाज म्हणजे लूट; ती जो आणतो तो वाजी; वाजी हें विशेषण देवांना, मनुष्यांना व घोड्यांना लाविलेलें आढळतें; एथें वाजिनं हें आशुं याचें विशेषण; आशु म्हणजे घोडा; वाजी आशुः = लूट आणणारा म्हणजे शूर घोडा. देवजूतः = देवः वातः तेन जूतः प्रेरितः किंवा देवः वातः इव जूतः = वाऱ्यानें प्रेरित किंवा वाऱ्यासारखा वेगवान्. सह म्हणजे बल; सहावान् = बलवान्. तरु = ( १ ) नाश करणें, पराभव करणें; ( २ ) देणें. विदत् हि अर्यः अभिभूति पौंस्यं महो राये चित् तरुते यदर्वतः ( १०।७६।२ ) = जेव्हां इन्द्र पुष्कळ धन देण्याकरितां ( राये ) शत्रूचा ( अर्वतः ) नाश करतो ( तरुते ) तेव्हां तो शत्रूचें (अर्यः) धन ( अभिभूति = पौंस्यं ) देतो ( विदत् ). इंद्रेण युजा तरुषेम वृत्रम् ( ७।४८।२ ) = ( १ ) इन्द्र साहाय्य करणारा असल्यामुळें वृत्राला आम्ही ठार मारूं; ( २ ) पुष्कळ धन ( इन्द्रेण = युजा ) असल्यास आम्हीं दारिद्र्याचा ( वृत्रं ) नाश करूं. रथ = ( १ ) रथ किंवा रथांत बसलेला वीर, ( २ ) धन. उत् रथानां जयतां यन्तु घोषाः ( १०।१०३।१० ) = जय पावणाऱ्या वीरांचे जयघोष आकाशांत ( उत् ) जावोत. प्रेष्ठमु प्रियाणां स्तुहि आसाव अतिथिम्। अग्निं रथानां यमम् ( ८।१०३।१० ) ह्याचा अर्थ पान ७९३ वर दिला आहे. तरु + तृ = तरुतृ = ( १ ) नाश करणारा, ( २ ) देणारा; युवं पेदवे पुरुवारमश्विना स्पृधां श्वेतं तरुतारं दुवस्यथः ( १।११९।१० ) = हे अश्विनांनो, सगळ्यांना हवा असा ( पुरुवारं ) व शत्रूंचा ( स्पृधां ) नाश करणारा ( तरुतारं ) असा पांढरा घोडा ( श्वेतं ) तुम्ही पेदूला देतां ( दुवस्यथः ) म्हणजे दिलात. यः शूरैः स्वः सनिता यो विप्रैर्वाजं तरुता ( १।१२९।२ ) = जो

शूरांना ( शूरैः ) व स्तोत्यांना ( विप्रैः ) धन देणारा ( सनिता = तरुता ) आहे. नास्य वर्ता न तरुता महाधने नार्भे अस्ति वज्रिणः ( १।४०।८ ) = इन्द्राला (वज्रिणः) मोठ्या लढाईंत ( महाधने ) किंवा छोट्या लढाईंत ( अर्भे ) परत फिरविणारा ( वर्ता ) किंवा पराभव करणारा ( तरुता ) कोणी नाहीं. विश्वासां तरुता पृतनानां ( ८।७०। १ ) = सर्व सेनांचा नाश करणारा किंवा पराभव करणारा ( तरुता ). इन्द्रः सुशिप्रो मघवा तरुत्रः ( ३।३०।३ ) = धनवान् ( सुशिप्रः = मघवा ) इन्द्र धनदाता (तरुत्रः) आहे. अरिष्टनेमि हें रथाचें विशेषण आहे; तं वां रथं वयमद्या हुवेम अरिष्टनेमिं ( १। १८०।१० ) = हे अश्विनांनो, ज्याची धांव कधीं मोडत नाहीं अशा तुमच्या रथाला आम्ही बोलावूं; अरिष्टनेमे अभि नः सचस्व ( ३।५३।१७ ) = ज्या तुझी धांव कधीं मोडणार नाहीं अशा हे रथा, आमची चांगली सेवा कर. स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः । स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ( १।८९।६ ) = धनवान् इन्द्र, पूषा, तार्क्ष्य व बृहस्पति आम्हांस धन ( स्वस्ति ) देवोत; वृद्धश्रवाः = विश्ववेदाः = अरिष्टनेमिः = अतिशय धनवान्; वृद्धं श्रवः यस्य सः वृद्धश्रवाः; विश्वं वेदः यस्य सः विश्ववेदाः; अरिष्टः नेमिः यस्य सः अरिष्टनेमिः; श्रवस् = वेदस् = नेमिः = धन; वृद्ध = वाढलेलें; विश्व = सर्व; अरिष्ट = ज्याला कोणी चोरी वगैरेसारखा उपद्रव देऊं शकत नाहीं असें. आशवः० नेमिं नि वावृतुः ( ८।४६।२३ ) = ( १ ) घोडे चाकाची धांव फिरवितात ( नि वावृतुः ); ( २ ) दाते ( आशवः ) धन ( नेमिं = नि ) देतात ( वावृतुः ). पृतनाम् अजति असौ पृतनाज् = सैन्याला रणांगणांतून हांकलून देणारा; पृतनाजं व पृतनाजः अशीं दोनच रूपें ऋग्वेदांत आहेत. पवित्रेभिः पवमाना असृग्रन् श्रवस्यवो न पृतनाजो अत्याः ( ९।८७।५ ) = शत्रुसेनांना रणांतून हांकलून देणारे म्हणजे त्यांची दाणादाण करणारे ( पृतनाजः ) घोडे जसे जोरानें धांवत सुटतात तसे धन देणारे ( श्रवस्यवः ) सोम गाळण्यांतून ( पवित्रेभिः ) जोरानें धांवत आहेत म्हणजे वहात आहेत. पान ६८८ वर पृतनाज = लढाई जिंकणारा हा मी दिलेला अर्थ बरोबर नाहीं. पृ = देणें, दान किंवा धन. तना = धन; पृतनाज् = अतिशय धन देणारा. एवा नः स्पृधः समजा समत्सु इन्द्र रारन्धि मिथतीः अदेवीः ( ६।२५।९ ) = हे इन्द्रा, याप्रमाणें आमच्या शत्रूंना संग्रामांत हांकलून दे किंवा ताब्यांत आण. अशत्रु अर्यः समजाति वेदः ( ५।२।१२ ) = जो अग्नि ज्याला शत्रु नाहीं असें शत्रूचें धन ( वेदः ) देतो (समजाति). आशु = (१) घोडा, (२)आ + शा = देणें; आशा + उः = आशुः = दाता. स्वस्ति = (१) संरक्षण, (२) स्व = स्ति = धन. तार्क्ष्य शब्द प्रस्तुत ऋचेंत व वर दिलेल्या स्वति नो इन्द्रः ( १।१८९।६ ) या ऋचेंत असा दोनदांच आला आहे; तें एका देवाचें नांव असावें असें वाटतें; तृ = देणें, दान किंवा धन; तृ = क्ष = धन; तृक्षम् एव तार्क्ष्यम्; तार्क्ष्य = अतिशय धन. ऋचेचे दोन अर्थ आहेतः— ( १ ) लूट आणणारा, वाऱ्यासारखा वेगवान्, बलवान्, शत्रूच्या रथांचा नाश करणारा,

आपल्या रथाच्या धांवा न मोडणारा, शत्रूला रणांगणांतून हांकलून देणारा असा घोडा जो तार्क्ष्य त्यालाच स्वसंरक्षणासाठीं आज आम्ही बोलावूं ; ( २ ) धनवान् ( वाजिनं = देवजूतं = सहावानं = अरिष्टनेमिं = तार्क्ष्यं ) असा जो धनदाता ( तरुतारं रथानां = आशुं ) त्याची आज त्यानें आपणाला धन द्यावें म्हणून आपण याचना करूं या. तार्क्ष्य म्हणजे गरुड हा अर्थ अर्वाचीन आहे; तो अर्थ प्रस्तुत ऋचेंत आहे कीं नाहीं हें ठरविणें अशक्य आहे.

## खंड २९ वा.

**सद्यश्चिद्यः शवसा पञ्च कृष्टीः सूर्य इव ज्योतिषापस्ततान ।**

**सहस्रसाः शतसा अस्य रंहिर्न स्मा वरन्ते युवतिं न शर्याम्** ( ऋ० सं० १०।१७८।३ )

**सद्यः अपि यः शवसा बलेन तनोति अपः सूर्यः इव ज्योतिषा पञ्च मनुष्यजातानि । सहस्रसानिनी शतसानिनी अस्य सा गतिः । न स्म एनां वारयन्ति प्रयुवतीम् इव शरमयीम् इषुम्**

चित् = अपि. शवसा = बलेन; शवसा शब्द भाष्यांत नको. ततान = तनोति. सूर्य इव ज्योतिषापः ततान एथें अपः ततान हे शब्द शेवटीं असून ते बलेन यानंतर तनोति अपः असा बद्दल करून घातले आहेत; तार्क्ष्यः बलेन तनोति अपः वर्षभावेन पञ्च कृष्टीः पञ्च मनुष्यजातानि प्रति ब्राह्मणप्रमुखान् निषादपञ्चमान् वर्णान् प्रति । तदनुग्रहपूर्वकत्वात् सर्वलोकानुग्रहस्य । कथम् । सूर्य इव ज्योतिषा । यथा सूर्यः ज्योतिः प्रकाशं लोकानुग्रहाय तनोति तथा तार्क्ष्यः अपः तनोति । अत्र उपमानोपमेयकारकसंबन्धावैधुर्याय ज्योतिः इति नम्यते ( दुर्ग ) = जसा सूर्य लोकांवर अनुग्रह करण्याकरितां आपला प्रकाश सर्वत्र पसरतो त्याप्रमाणें पांच मनुष्य संघांवर व तद्वारें इतर मनुष्यांवर अनुग्रह करण्याकरितां पावसाच्या रूपानें तार्क्ष्य जल सर्वत्र पसरतो; उपमान व उपमेय यांतील सादृश्य पूर्णपणें स्पष्ट करण्याकरितां ज्योतिषा या तृतीयेचें ज्योतिः असें रूपांतर करणें जरूर आहे; यावरून दुर्गाच्या निरुक्तप्रतींत ज्योतिषा याबद्दल ज्योतिः असा शब्द असला पाहिजे व यास्कानें ज्योतिः असेंच रूपांतर केलें असलें पाहिजे; तसें त्यानें रूपांतर केलें नसतें तर त्यानें शब्दांचा ऋचेंतील क्रम ठेवण्याची आपली नेहमींची पद्धति मोडली नसती. पंच कृष्टीः = पंच मनुष्यजातानि = ब्राह्मणप्रमुखान् निषादपञ्चमान् वर्णान् ( दुर्ग ) = ब्राह्मण हे पहिले व निषाद पांचवे असे पांच वर्ण; चत्वारः वर्णाः निषादः पञ्चमः ( ३।८ पान १७२ ). सहस्रसाः = सहस्रसानिनी = हजार प्रकार भजणारी. शतसाः = शतसानिनी = शंभर प्रकार भजणारी. सहस्रसाः शतसाः अस्य रंहिः बहूंश्च बहुतरांश्च प्रकारान् मेघविदारणाय भजते अस्य तार्क्ष्यस्य रंहिः गतिः ( दुर्ग ) = तार्क्ष्याची गति मेघ फोडून टाकण्याकरितां असंख्य प्रकारांचा अवलंब करते; म्हणजे तार्क्ष्य हवी ती युक्ति करून मेघ फोडून

टाकतो; त्याच्याजवळ हजारों किंवा असंख्य युक्त्या आहेत. अस्य रंहिः = अस्य सा गतिः = त्याची सर्वप्रसिद्ध गति; दुर्गवृत्तींत सा नाहीं. वरन्ते = वारयन्ति = अड-वितात. एनं अध्याहृत. न स्मा वरन्ते नैव एताम् अस्य असह्यां गतिं वारयन्ति न प्रति-बन्द्धुं शक्नुवन्ति ( दुर्ग ) = त्याची गति इतकी असह्य आहे कीं तिला कोणीही अडवूं शकत नाहीं; दुर्गवृत्तींत एनां बद्दल एतां आहे. युवतिं = प्रयुवतीम्. न = इव. शर्यां = शरमयीम् इषुम्. अतिबलवता धनुष्मता मुक्तां शरमयीम् इषुम् अन्येन वा अन्येन वा आकाशप्रदेशेन प्रतिमिश्रयन्तीम् आत्मानम् ( दुर्ग ) = अतिबलवान् अशा धनुर्धाऱ्यानें सोडलेली शरपंक्ति जशी आतां इकडे नंतर तिकडे अशा हव्या त्या रीतीनें संचार करीत असतांना ( जसा कोणी तिला अडवूं शकत नाहीं तसा ताक्ष्र्याच्या असह्य गतीला कोणी अडवूं शकत नाहीं ); प्रयुवतीं असा शब्द दुर्गवृत्तींत नाहीं; त्या शब्दाबद्दल तो प्रतिमिश्रयन्तीं असा शब्द घालतो; यु मिश्रणे अमिश्रणे च ( धा० २।२३ ); यु ( = मिसळणें ) यापासून युवति. दुर्गानें केलेला अर्थः— सूर्य जसा आपला प्रकाश सर्वत्र पसरतो तसा जो ताक्ष्र्य पांच वर्णांवर अनुग्रह करण्याकरितां बलानें, पावसाच्या रूपानें जल सदासर्वदा सर्वत्र पसरतो त्याची गति मेघ फोडण्याक-रितां असंख्य प्रकारांचें अवलंबन करते; अतिबलवान् धनुर्धाऱ्यानें सोडलेल्या शरपं-क्तीला ती हव्या त्या दिशेनें वावरत असतांना जसा कोणीही अडवूं शकत नाहीं तसा ताक्ष्र्याच्या या असह्य गतीला कोणीही अडवूं शकत नाहीं.

**सायणः—** जसा सूर्य आपल्या तेजानें ( ज्योतिषा ) पावसाळ्यांत पाणी पसरतो त्याप्रमाणें जो ताक्ष्र्य आपल्या बलानें एका क्षणांत (सद्यः) किंवा त्वरेनें पांच वर्णांमध्यें पाऊस पसरतो त्याची गति असंख्य धन देते किंवा भोगते; जसा धनुर्धाऱ्यानें धनुष्या-पासून सोडलेला बाण निशाणाकडे जाऊन त्याच्याशीं एकजीव होत असतांना त्याला कोणी अडवूं शकत नाहीं त्याप्रमाणें, हे ताक्ष्र्या, तुझ्या गतीला कोणी अडवूं शकत नाहीं; युवतिं = लक्ष्येण मिश्रीभवन्तीं = ज्याच्यावर बाण सोडला असेल त्याच्यांत अगदीं मिसळून जाणारी म्हणजे त्याला भेदून टाकणारी अशा इषूला; शर्यां = शरकाण्डमयीं = शरकाण्डापासून बनविलेली इषु.

पञ्चकृष्टीः म्हणजे इन्द्राला विरोध करणाऱ्या पांच आर्य जाति; त्या इन्द्राला जुमानीत नसत पण इन्द्रानें त्यांची दाणादाण करून त्यांना वठणीवर आणलें. इव यथा सूर्यः ज्योतिषा अपः तनोति एवं यः सद्यः चित् एव एक-स्मिन्नेव क्षणे शवसा पञ्च कृष्टीः पञ्च जनान् तनोति = जसा सूर्य आपल्या प्रकाशानें रात्रीनें विणलेलें अन्धकाररूपी कापड ( अपः ) फाडून टाकून तें अगदीं नाहींसें करतो त्याप्रमाणें जो आपल्या वज्रानें एका क्षणांत पञ्चजनांचे तुकडे तुकडे उडवितो; सूर्य उगवल्याबरोबर अंधकाराचे कणासारखे तुकडे होतात व तो एकदम नाहींसा होतो त्याप्रमाणें पञ्चजन इतक्या जुटीनें लढणारे असूनही ताक्ष्र्य त्यांची एका क्षणांत छकलें छकलें उडवितो व त्यांचा समूळ नाश करतो. ताक्ष्र्य व सूर्य, वज्र व प्रकाश,

पञ्चजन व अंधकार यांमध्यें सादृश्य असून सद्यः चित् ततान ही क्रिया उपमान व उपमेय या दोघांनाही लाविली आहे. अपस् म्हणजे विणलेलें कापड. सीव्यत्वपः सूच्याच्छिद्यमानया (२।३२।४) = राकादेवी न मोडणाऱ्या (अच्छिद्यमानया) सुईनें (सूच्या) वस्त्र (अपः) शिवो (सीव्यतु). शवसा ह्याचा बलानें असा अर्थ पुष्कळ ठिकाणीं आहे; पण कांहीं ठिकाणीं वज्रानें असा त्याचा अर्थ होतो; वृत्रं यदिन्द्र शवसावधीः (१।५१।४), शवसाभिनच्छिरः (१।५२।१०), अहिं वज्रेण शवसा विवेषीः (४।२२।५) ह्या उताऱ्यांत इन्द्र वज्रानें वृत्राला ठार मारतो, त्याचें डोकें वज्रानें उडवितो असा अर्थ आहे. रंह् = वेगानें जाणें; रंहिः = वेगानें जाणारा प्रवाह; पवते हर्यतो हरिः अति ह्वरांसि रंह्या (९।१०६।१३) = सोम गाळण्यांतून (ह्वरांसि अति) जोरदार प्रवाहानें शुद्ध होतो. प्र ते धारा अत्यण्वानि मेष्यः पुनानस्य संयतो यन्ति रंहयः (९।८६।४७) = हे सोमा, मेंढीच्या केसांतून म्हणजे गाळण्यांतून तुझे जोरदार प्रवाह वेगानें वाहतात. प्रवाह ह्याखेरीज रंहि ह्याचा वेगानें जाणारें अस्त्र असाही अर्थ असावा; इषुर्न श्रिये इषुधेरसना गोपाः शतसा न रंहिः (१०।९५।३) = धनुष्यापासून (इषुधेः) जसा (न) बाण (इषुः = असना = रंहिः) वेगानें जातो (तशी उर्वशी पुरूरव्याला सोडून वेगानें जाते). सहस्रसाः० रंहिः (प्रस्तुत ऋचा) = ह्याचें (अस्य) अस्त्र (रंहिः) पंचजनांना मारून असंख्य धन देतें (सहस्रसाः = शतसाः). शर्या = अस्त्र; आदस्य वातो अनुवाति शोचिः अस्तुर्न शर्याम् असनाम् (१।१४८।४) = धनुर्धाऱ्यानें (अस्तुः) सोडलेल्या बाणापाठीमागून (शर्या = असना) जसा वारा जोरानें जातो तसा तो अग्नीच्या (अस्य) ज्वालेच्या (शोचिः) पाठीमागून (अनु) वहात जातो (वाति); ज्वालेचा व बाणाचा वेग इतका मोठा आहे कीं वारासुद्धां त्यांच्यापुढें न जातां त्यांच्या मागून वाहतो. वरन्ते = अडवितात. न त्वा बृहन्तो अद्रयो वरन्ते इन्द्र वीळवः (८।८८।३) = हे इन्द्रा, पर्वत अतिशय दृढ व प्रचंड असूनहि तुला अडवीत नाहींत. युवति हा शब्द उषेला पुष्कळ ठिकाणीं लाविला आहे; युवतिः = तेजस्वी, देदीप्यमान तरुणी; विद्युत् आकाशांतून पडतांना झळकते असें कांहीं ऋचांत म्हटलें आहे. न स्मा वरन्ते युवतिं न शर्याम् = तरुणीप्रमाणें झळकणाऱ्या अस्त्राला पञ्चजन मुळींच अडवूं शकत नाहींत; किंवा एखादी नटलेली वारांगना अंगाला भिडली असतांना तिच्यापासून सुटका करून घेणें जसें अशक्य असतें तसें इंद्रानें सोडलेलें वज्र एकदां पंचजनांच्या अंगाला भिडलें म्हणजे त्याच्यापासून त्यांची सुटका होत नसे; इतका त्या वज्राचा जोर; एकदां अंगांत घुसलें कीं घुसलेंच. प्रस्तुत ऋचेंत इंद्राच्या वज्राचा प्रभाव वर्णिला आहे; त्या वज्राबद्दल शवसा, रंहिः व शर्या हे शब्द घातले आहेत.

**मन्युः (१८) मन्यतेः दीप्तिकर्मणः। क्रोधकर्मणो वा। मन्युन्ति अस्मात् इषवः। तस्य एषा भवति**

मन् ( = प्रकाशणें किंवा रागावणें ) ह्यापासून मन्यु; प्रकाशणें व रागावणें ह्या क्रिया अंतरिक्षांतील देवतांत असतात म्हणून मन्यु हा अन्तरिक्षांतील देव असे दुर्ग म्हणतो. मन ज्ञाने ( धा० ४।७० ); मन् = जाणणें; मनु अवबोधने ( धा० ८।९ ); मनु = जाणणें; मनुते = जाणतो; मन् ह्याचे यास्कानें दिलेले अर्थ धातुपाठांत नाहींत. मन् पासून मन्यु; मन्युर्दैन्ये क्रतौ क्रुधि ( अमर ३।३।१५३ ); मन्यु = ( १ ) दैन्य, ( २ ) यज्ञ, ( ३ ) क्रोध; मन्यते मन्युः ( क्षी० ); दैन्य व राग हे मनांत येतात; पण यज्ञ मनांत येतो म्हणजे काय? यज्ञ मनानें मानला जातो असा अर्थ असेल. मन्युन्ति अस्मात् इषवः = ज्याच्यापासून बाण सुटतात तो मन्यु; क्रोधाविष्ट झालेला पुरुष बाण सोडतो; महाराष्ट्रपाठ मन्यन्ति आहे, मन्यन्ति हें परस्मैपद रूप अशुद्ध आहे; मन्युन्ति हें रूप कोणीं कधींहि ऐकिलें नाहीं; ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं; ती प्रक्षिप्त आहे हें सांगावयास नको.

## खंड ३० वा.

**त्वया मन्यो सरथमारुजन्तो हर्षमाणासोऽधृषिता मरुत्वः। तिग्मेषव आयुधा संशिशाना अभि प्र यन्तु नरो अग्निरूपाः ( ऋ० सं० १०।८४।१ )**

**त्वया मन्यो सरथम् आरुह्य रुजन्तः हर्षमाणासः अधृषिताः मरुत्वः तिग्मेषवः आयुधानि संशिश्यमानाः अभिप्रयन्तु नरः अग्निरूपाः अग्निकर्माणः। संनद्धाः कवचिनः इति वा**

आरुजन्तः = आ + रुजन्तः; आ = आरुह्य; सरथम् आरुजन्तः = एकमेव रथं समारुह्य रुजन्तः परान् अभिभवन्तः (दुर्ग) = एकाच रथांत चढून शत्रूवर हल्ला करणारे; दुर्गाच्या निरुक्तपाठांत आरुह्य बद्दल समारुह्य व सरथं बद्दल समानं रथं असे शब्द असावेत. हर्षमाणासः ह्याच्याबद्दल हर्षमाणाः असा शब्द घालावयास पाहिजे होता; हर्षमाणासः = तुझा आश्रय मिळाल्याकारणानें हर्ष पावणारे (दुर्ग). मरुत्वः ह्याच्याबद्दल मरुत्वन् पाहिजे. अधृषिताः = ज्यांना लढण्याकरितां कोणी आव्हान करीत नाहीं असे म्हणजे अजिंक्य. आयुधा = आयुधानि. संशिशानाः = संशिश्यमानाः = बाण व आयुधें ह्यांचा उपयोग करणारे म्हणजे बाणांनीं भेदणारे व आयुधांनीं कापणारे (दुर्ग). अग्निरूपाः = अग्निकर्माणः = अग्नीचें काम करणारे म्हणजे शत्रूचा पुरा पराभव करणारे; किंवा अग्निरूपाः = संनद्धाः कवचिनः = संनाह म्हणजे कवच धारण करणारे; संनद्धाः व कवचिनः ह्यांचा अर्थ एकच; संनद्धाः कवचिनः इति वा हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. दुर्गानें केलेला अर्थः—हे मरुतांच्या अधिपति ( मरुत्वः ) मन्यु, तुझ्यासह एका रथांत बसून शत्रूवर हल्ला करणारे, तुझा आश्रय मिळाल्यामुळें हर्ष पावणारे, ज्यांना कोणी लढण्याकरितां आव्हान करीत नाहीं असे, आपल्यापाशीं तीक्ष्ण बाण ठेवणारे, बाणांचा व आयुधांचा योग्य उपयोग करणारे व तसें करून अग्नीचें कार्य करणारे, म्हणजे शत्रूचा फन्ना उडविणारे योद्धे त्वरेनें रणांगणावर जावोत.

सायणः— आरुजन्तः = गच्छन्तः ; संशिशानाः = सम्यक् निश्यन्तः = उत्कृष्ट रीतीनें पाजविणारे; नरः = युद्धस्य नेतारः इन्द्रादयः देवाः त्वदनुचराः वा = युद्धाचे नेते म्हणजे इन्द्र वगैरे योद्धे किंवा तुझे अनुयायी योद्धे; अग्निरूपाः = अग्निवत् तीक्ष्णदाहादिकर्माणः । यद्वा । संनद्धाः कवचिनः.

मन्यु=(१)वज्र,(२)वज्रयुक्त,(३)बल,(४) क्रोध,(५)धन,(६)दाता. (१व२) यस्ते मन्योऽविधत् वज्र सायक सह ओजः पुष्यति विश्वमानुषक् । साह्याम दासमार्यं त्वया युजा सहस्कृतेन सहसा सहस्वता ( १०।८३।१ ) = हे वज्रवन्ता ( मन्यो=वज्र=सायक ), जो तुला हवि देतो तो आपलें बल सारखें वाढवीत असतो; बलवान् जो तूं तो तूं सहाय असल्यास आम्ही शत्रूला जिंकूं; एथें मन्यु, वज्र व सायक हे वज्रवाचक शब्द असून त्या तिहींचाही अर्थ वज्रानें युक्त असा होतो. ( ६ ) मन्युरिन्द्रो मन्युरेवास देवो मन्युर्होता वरुणो जातवेदाः । मन्युं विश ईळते मानुषीर्याः पाहि नो मन्यो तपसा सजोषाः ( १०।८३।२ ) = इन्द्र, वरुण, अग्नि वगैरे देव दाते आहेत; मनुष्य दात्याची स्तुति करतात; हे दात्या, आमचें रक्षण कर; पहिल्या अर्धांत मन्यु म्हणजे दाता; पण दुसऱ्यांत मन्यु हा एक देव आहे; तो इन्द्र असेल. प्रस्तुत ऋचेचा अर्थ करण्याकरितां हे दोन उतारे पुरे आहेत. सरथं हें क्रियाविशेषण असून त्याचा अर्थ एका रथांत बसलेले असा होतो; समानं चित् रथमा तस्थिवांसा ( २।१२।८ ) = एकाच रथांत बसलेले ( दोन वीर ); हाच अर्थ सरथं याचा आहे. वायविन्द्रश्च० सरथं० आयातं सोमपीतये ( ४।४७।३ ) = हे वायु, हे इन्द्रा, एका रथांत बसून सोम पिण्याकरितां या. पण सरथं याचा सह असाही अर्थ होतो; आ याहि अग्ने० इन्द्रेण देवैः सरथं तुरेभिः ( ३।४।११ ) = हे अग्नि, इन्द्र व इतर दाते देव यांसह ये. इन्द्रेण देवैः सरथं स बर्हिषि सीदत् नि होता यजथाय सुक्रतुः ( ५।११।२ ) = हवींनीं युक्त ( सुक्रतुः ) असा होता अग्नि देवांना हवि देण्यासाठीं ( यजथाय ) त्यांच्यासह दर्भासनावर बसतो; एथें सरथम् म्हणजे सह असाच अर्थ केला पाहिजे. प्रस्तुत ऋचेंत त्वया सरथं = त्वया सह = त्वया युजा. विद्मा हि त्वा धनञ्जयमिन्द्र दृह्ळा चिदारुजम् ( ८।४५।१३ ) = हे लढाया जिंकणाऱ्या ( धनञ्जय ) इन्द्रा, कितीहि कठीण पर्वत वगैरे असले तरी त्यांना तूं फोडणारा ( आरुजं ) आहेस असें आम्हीं जाणतों. वीळु चिदारुजत्नुभिः० वह्निभिः ( १।६।५ ) = अतिशय बळकट अशा पर्वतांना फोडणारे घोडे किंवा मरुत् यांना घेऊन ( इन्द्रानें गाई बाहेर काढल्या). हर्षस्व हन्तवे शूर शत्रून् ( १०।११२।१ ) = हे शूरा, शत्रूंना मारण्याकरितां तुला स्फुरण येवो. अग्मन् उक्थानि पौंस्या इन्द्रं जैत्राय हर्षयन् ( ९।१११।३ ) = उत्तेजक ( पौंस्या = पौंस्यानि ) स्तुति ( उक्थानि ) इन्द्राकडे गेल्या व लढाई जिंकण्याकरितां ( जैत्राय ) त्यांनीं त्याला स्फुरण आणिलें. सं + शा = धार देणें; हा अर्थ पुष्कळ ऋचांत येतो व सायणाचार्यही संशिशानाः म्हणजे धार देणारे असा प्रस्तुत ऋचेवरील भाष्यांत अर्थ करितात. नरः = योद्धे. अग्निरूपाः = अग्नीसारखे तेजस्वी किंवा

दिपविणारे. मरुतांना बरोबर घेऊन जाणाऱ्या ( मरुत्वः ) हे वज्रवन्ता ( मन्यो ), बळकट किल्ले फोडणारे ( आरुजन्तः ), स्फुरण पावणारे ( हर्षमाणासः ), लढाई-करितां ज्यांना कोणीं आह्वान देत नाहीं असे आजिंक्य ( अधृषिताः ), तिखट बाण बाळगणारे ( तिग्मेषवः ), आयुधांना धार देणारे ( संशिशानाः ) व अग्नीसारखे तेजस्वी ( अग्निरूपाः ) असे योद्धे ( नरः ) तुझ्यासह ( त्वया सरथं ) संग्रामाकडे ( अभि ) त्वरेनें ( प्र ) जावोत ( यन्तु ). नरः = दाते; यम् = देणें; अभि = धनयुक्त; प्र = धन; याप्रमाणें ऋचेंतील इतर शब्दांचाही धनपर अर्थ आहे; पण तो सिद्ध करण्याकरितां फार उतारे द्यावे लागतील; म्हणून ऋचेचा दुसरा अर्थ एथें दिला नाहीं.

**दधिक्राः ( १९ ) व्याख्यातः ( नि० २।२७ )। तस्य एषा भवति**

दधिक्रा शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे ( पान १४९-१५० ). दधिक्रा हा एक घोडा व विशिष्ट देव अशी दोन्ही तऱ्हेचीं वर्णनें ऋचांतून येतात; २।२७ एथें दधिक्रा हा अश्व असें वर्णन आहे; पण पुढील खंडांतील ऋचेंत तो देव आहे असें वर्णन आहे.

## खंड ३१ वा.

**आ दधिक्राः शवसा पञ्च कृष्टीः सूर्यः इव ज्योतिषापस्ततान। सहस्रसाः शतसा वाज्यर्वा पृणक्तु मध्वा समिमा वचांसि ( ऋ० सं० ४।३८।१० )**

**आतनोति दधिक्राः शवसा बलेन अपः सूर्यः इव ज्योतिषा पञ्च मनुष्य-जातानि। सहस्रसाः शतसाः वाजी वेजनवान् अर्वा ईरणवान् संपृणक्तु नः मधुना उदकेन वचनानि इमानि। इति। मधु धमतेः विपरीतस्य**

आततान = आतनोति = सर्वत्र पसरतो. शवसा = बलेन. कृष्टीः = मनुष्य-जातानि. सहस्रसाः शतसाः = बहूनां बहुतराणां च उदकानां संभक्ता ( दुर्ग ) = अतिशय उदक भोगणारा. वाजी = वेजनवान्; ओविजी भयचलनयोः (धा० ६।९ ); विज् ( = भय दाखविणें, हालणें ) ह्यापासून वाजी; शत्रूला भय दाखविणारा व आपल्या अनुयायांना हलविणारा म्हणजे रणांगणांत नेणारा तो वाजी; एथें मेघाला हलविणारा किंवा भय दाखविणारा. अर्वा = ईरणवान् = उदकेरणक्रियायोगी ( दुर्ग ) = उदकाला गति ( ईरण ) देणारा म्हणजे पाऊस पाडणारा; ईर् ( = जाणें ) ह्या-पासून अर्वा; अर्वा = ईर्वा = ईरणवान्. मध्वा = मधुना = उदकेन. नः अध्याहृत. वचांसि = वचनानि = स्तुति. इमा = इमानि. इमा वचांसि ह्या ऋचेंतील क्रमाप्रमाणें इमानि वचनानि असा क्रम भाष्यांत नेहमींप्रमाणें पाहिजे होता. दुर्गानें केलेला अर्थः—जसा सूर्य आपल्या प्रकाशानें पाणी सर्वत्र पसरतो तसा दधिक्रा आपल्या बलानें पांच मनुष्य संघांत पाणी परसतो; अतिशय जल बाळगणारा ( सहस्रसाः शतसाः ),मेघाला भय दाखवून गदगदा हलविणारा (वाजी) व उदकाचा वर्षाव करणारा

( अर्वा ) दधिक्रा आमच्या ह्या स्तुति उदकानें युक्त करो म्हणजे आमच्या ह्या स्तुति ऐकून पर्जन्यवृष्टि करो ध्मा=धम् (=जाणें) ह्या धातूपासून मधु; धम् ह्यांतील अक्षरांची उलटा पालट केल्यानें मध् असें रूप बनतें; धम् = ध् + अ + म् = म् + अ + ध् = मध्; मध् + उ = मधु; अशी व्युत्पत्ति देण्याचें कारण मधु म्हणजे उदक हा अर्थ; उदक हालतें म्हणजे वाहतें; पण जेव्हां मधु म्हणजे सोम तेव्हां मद् हा धातु ( ४।८ पान २५२ ). सायाणः–सूर्य जसा सर्व जग आपल्या प्रकाशानें आच्छादून टाकतो तसा दधिक्रा पंचकृष्टींमध्यें म्हणजे देव, मनुष्य, असुर, राक्षस व पितर ह्यांच्यामध्यें किंवा निषाद सहित पांच वर्णांमध्यें आपल्या बलानें जल पसरतो; असंख्य धन देणारा ( सहस्रसाः = शतसाः ), शत्रूला भय दाखविणारा व रणकुशल ( अर्वा ) असा तो देव आमच्या ह्या स्तुति मधुर फलानें ( मध्वा ) युक्त करो. ह्या ऋचेंतील बरेच शब्द १०।२९ ह्या खंडांतील ऋचेंत आले आहेत; सहस्रसाः व शतसाः ह्यांचे तेथें दिलेले अर्थ ह्या खंडांत न देतां ते शब्द भाष्यांत तसेच ठेविलें आहेत; पण तसें करण्याचें कारण समजत नाहीं; ह्या शब्दांचे त्या खंडांत दिलेले अर्थ जर ह्या खंडांत घ्यावयाचे असतील तर शवसा वगैरे शब्दांचे अर्थ तेथें दिले असतांना एथें कां दिले ? त्या खंडांतील ऋचेचा मी केलेला अर्थ एथेंही योग्य दिसतो. प्रस्तुत ऋचेंत कांहीं शब्द निराळे आहेत; त्यांचा पुढीलप्रमाणें अर्थः–वाजी = लूट आणणारा म्हणजे शूर; अर्वा = घोडा; दधिक्रादेवाला वाजी अर्वा म्हणण्याचें कारण तो बलवान् व शूर असून धन देणारा आहे; मध्वा = मधासारख्या प्रिय अशा धनानें; दधिक्रा देव धनवान् असल्यामुळें आमच्या ह्या स्तुति ऐकून आम्हांला धनयुक्त करो ( मध्वा संपृणक्तु ). बल व वर्षकर्म ह्या दोन्हीं गोष्टी दधिक्रा ह्या देवांत असल्यामुळें तो अन्तरिक्षांतील देव होय असें दुर्ग म्हणतो. ऋग्वेदांत दधिक्रा व दधिक्रावन् अशीं एकाच देवाचीं दोन नांवें आहेत; दधिक्राः हें रूप ११ वेळां व दधिक्रावन् १० वेळां आलें आहे; सुतपा व सुतपावन् आणि सोमपा व सोमपावन् या जोडींचा जसा एकच अर्थ तसा दधिक्रा व दधिक्रावन् यांचाही अर्थ एकच आहे. दधिक्रा हा देव शूर, धनाढ्य व धन देणारा असें म्हटलें आहे; इन्द्राप्रमाणें त्याला पंचजनांशीं झगडावें लागलें व पुष्कळ झटापटी झाल्यावर त्यांना त्याचें वर्चस्व कबूल करावें लागलें; तथापि त्याच्याविषयीं त्यांच्या मनांत असलेला द्वेष व तिटकारा कायम राहिला व जेव्हां तेव्हां ते त्याचा उपहास करीत राहिले; त्याला ते चोर व गिधाड म्हणण्यास चुकले नाहींत; त्यांनीं त्याला घोडा बनवून त्याच्या वेगाचें निरनिराळ्या शब्दांनीं वर्णन केलें आहे. हा देव मूळचा कोणत्या लोकांचा तें समजण्यास मार्ग नाहीं.

**सविता ( २० ) सर्वस्य प्रसविता । तस्य एषा भवति**

सविता = सर्वस्य प्रसविता = सर्व वस्तु प्रसवणारा म्हणजे उत्पन्न करणारा; प्र + सु (=प्रसवणें, उत्पन्न करणें ) यापासून सविता; सविता व्याख्यातः असें दुर्ग म्हणतो; तेव्हां प्रस्तुत व्युत्पत्ति त्याच्या निरुक्तप्रतींत नसावी; इमम् एव अग्निं सवि-

तारम् आह सर्वस्य प्रसवितारम् (पान ५९२) या शब्दांनीं सवितृ शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे.

## खंड ३२ वा.

**सविता यन्त्रैः पृथिवीमरम्णादस्कम्भने सविता द्यामदृंहत्।**
**अश्वमिवाधुक्षद्धुनिमन्तरिक्षमतूर्ते बद्धं सविता समुद्रम् (ऋ० सं० १०।१४९।१)**

**सविता यन्त्रैः पृथिवीम् अरमयत्। अनारम्भणे अन्तरिक्षे सविता द्याम् अदृंहत्। अश्वम् इव अधुक्षत् धुनिम् अन्तरिक्षे मेघम्। बद्धम् अतूर्ते। बद्धम् अतूर्णे इति वा। अत्वरमाणे इति वा। सविता समुदितारम्। इति**

यम् (= दाबांत ठेवणें) + त्रं = यन्त्रं = ज्यानें वस्तु दाबांत ठेवली जाते असें दोरीसारखें बंधन. अरम्णात् = अरमयत् = नियंत्रित करता झाला; रम्णातिः संयमनकर्मा (नि० १०।९ पान ७५९). अस्कम्भने = अनारम्भणे अन्तरिक्षे (दुर्ग) = ज्यांत कोणत्याही प्रकारची जड वस्तु नाहीं अशा अन्तरिक्षांत; स्कम्भन = टेका देणारा खांब; आरम्भण = ज्याला हातानें पकडतां येईल अशी वस्तु; आकाशांत पकडण्यासारखें, टेका देण्यासारखें, आश्रय घेण्यासारखें असें कांहीं नाहीं; अन्तरिक्ष ही नुसती पोकळी होय. अदृंहत् = दृढ किंवा स्थिर करिता झाला. धुनिं = मेघम्. अन्तरिक्षं = अन्तरिक्षे. धुनिमन्तरिक्षमतूर्ते बद्धं हा ऋचेंतील क्रम भाष्यांत यास्कानें ठेविला नाहीं. अतूर्ते=अतूर्णे=त्वरा ज्यांत नाहीं अशा अन्तरिक्षांत;तुर्=त्वरा करणें; तुर त्वरणे (धा० ३।२०); तूर्+त=तुर्त; अर्वाचीन संस्कृतांत तूर्ण. किंवा अतूर्ते=अत्वरमाणे;अर्थ तोच;त्वर् याला संप्रसारण होऊन तुर्;तूर्त ह्यांत तुर् किंवा त्वर् हा धातु.दुर्गवृत्तींत अतूर्णे नाहीं; तो त्या शब्दाचा अहिंसिते असा अर्थ करतो; अहिंसित=निराकार असल्यामुळें ज्याला कोणी हिंसा करूं शकत नाहीं असें; अन्तरिक्ष सर्व ठिकाणीं असल्याकारणानें त्याला इकडून तिकडे त्वरेनें जाण्याची आवश्यकताच नाहीं (दुर्ग); किंवा संचार करण्याला अयोग्य म्हणजे ज्याला हालचाल करतां येत नाहीं असें;आकाश हें स्थिर आहे. समुद्रं=समुदितारं = (आकाशांत) वर येणाऱ्याला; समुदिता समुद्रः मेघः (दुर्ग) = एकत्र होऊन (सं) वर येणारा (उदिता) तो समुद्र म्हणजे मेघ; पण उदिता हें अशुद्ध रूप होय; उदेता असें पाहिजे. अश्वम् इव अधुक्षत्=यथा अश्वबंधः अश्वं धूनुयात् उपावृत्तम् अनायासेन रजः तस्मात् अपनेष्यन् एवं धुनिं समुद्रम् उदकबंधितारं मेघम् अधुक्षत् सविता अधुनोत् अकम्पयत् उदकप्रक्षरणाय (दुर्ग)=जसा मोतद्दार घोड्याच्या अंगावरील धूळ श्रमाशिवाय काढण्याच्या इच्छेनें त्याला खालीं पाडून गदगदां हलवितो तसा सविता उदक अडविणाऱ्या मेघाला त्याच्यांतून जल खालीं पडावें म्हणून गदगदां हालवितो; अधुक्षत् = अधुनोत्; पण अधुक्षत् यांत धु धातु कोठें आहे व धु धातूचें अधुक्षत् रूप कसें बनेल? समुद्रं = सम् + उद्रं = उदकबन्धितारं = आपल्यांत पाणी अडकवून ठेवणाऱ्याला; पण समुदिता समुद्रः मेघः असेंही दुर्ग म्हणतो.

दुर्गानें केलेला अर्थः—सविता रज्जूंनीं पृथिवीला थोपविता झाला, जेथें कोणत्याही प्रकारचा आधार नाहीं अशा आकाशांत सुवर्णमय व त्यामुळें जड असा जो द्युलोक त्याला तो स्थिर करता झाला व जसा मोतद्दार घोड्याच्या अंगावरील धूळ घालविण्याकरितां त्याला खालीं पाडून गदगदां हलवितो तसा ज्याला कोणी हिंसा करूं शकत नाहीं किंवा ज्यांत कोणत्याही प्रकारची त्वरा नाहीं अशा आकाशांत बांधून ठेविलेल्या व उदक अडविणाऱ्या मेघाला त्यांतून वर्षाव व्हावा म्हणून सविता गदगदां हलवितो.

सायणः – सविता = सर्वस्य प्रसविता प्रेरकः = सर्व वस्तूंना प्रेरणा देणारा; यन्त्रैः = यमनसाधनैः वृष्टिप्रदानादिभिः उपायैः वायवीयैः पाशैः वा = पाऊस पाडणें वगैरे साधनें म्हणजे यन्त्रें किंवा वायूंनीं घातलेले पाश म्हणजे दोऱ्या त्यांनीं; यमनसाधनैः यांतील यमन शब्दाचा काय अर्थ ? पतनप्रतिबंधकम् आलंभनं स्कंभनं = खालीं पडण्याला प्रतिबंध करणारा असा जो आधार त्याचें नांव स्कंभन; धुनिं = कंपयितव्यं कंपयितारं वा = ज्याला थरथरा कांपावयास लावावयाचें आहे किंवा जें थरथरा कांपावयास लावतें असें ( अन्तरिक्ष ); सविता किंवा मेघ आकाशाला थरथर कांपावयास लावतात किंवा आकाश मेघांना थरथर कांपावयास लावतें; अतूर्ते = केनापि अहिंसिते अत्वरमाणे वा; वायवीयैः पाशैः बद्धं समुद्रं मेघं = वायूच्या पाशांनीं बांधलेल्या मेघाला; अधुक्षत् = उदकानि दोग्धि = ( मेघांतून ) उदकाचें दोहन करतो म्हणजे पाऊस पाडतो; किंवा अंतरिक्षं = अन्तरिक्षे; समुद्रं = समुदितारं मेघम्; धुनिं = कम्पनीयं मेघम्; अश्वमिव अधुक्षत् = अश्वमिव क्लेशयति = जसा घोडेस्वार घोड्याला पळावयाला लावून त्रास देतो तसा सविता मेघाला त्रास देतो.

**कम् अन्यं मध्यमात् एवम् अवक्ष्यत्**

पृथिवीला रज्जूंनीं बांधणें, द्युलोकाला स्थिर करणें व मेघाला गदगदां हलवून त्यांतून पाऊस पाडणें हीं बलाचीं कामें होत; तेव्हां एथें सविता म्हणजे अन्तरिक्षांतील इंद्र होय.

ते अद्रयो दशयन्त्रासः सुतस्य सोमस्य अन्धसः अंशोः पीयूषं० भेजिरे ( १०।९४।८ ) = दहा बोटांनीं धरलेले ग्रावे सोमरस सर्वांच्या आधीं भोगते झाले; दश यन्त्राणि येषां ते दशयन्त्राः = दहा रज्जू आहेत ज्यांच्या भोंवतीं असे ग्रावे; दहा बोटें या दहा रज्जू; या रज्जूंनीं जणूं काय सोम बांधला जातो. प्रस्तुत ऋचेंत यन्त्रैः = बांधणाऱ्या रज्जूंनीं; या रज्जू म्हणजे सूर्यकिरण; सविता आपल्या किरणांनीं भयानें पळून जाणाऱ्या पृथिवीला एके जागीं बांधून ठेवितो. यः पृथिवीं व्यथमानाम् अदृंहत्यः पर्वतान् प्रकुपिताम् अरम्णात् ( २।१२।२ ) = भयानें कांपणाऱ्या ( व्यथमानां ) पृथिवीला जो स्थिर करतां झाला व भयानें पळून जाणाऱ्या (प्रकुपितान्) पर्वतांना थोपविता झाला; या ऋचेंत अरम्णात् याच्या ऐवजीं अदृंहत् असें क्रियारूप सकारण घातलें आहे; कारण भयानें पृथिवी गदगदां हलते; तसें तिनें करूं नये म्हणून इन्द्र तिला स्थिर करतो. स्कम्भन म्हणजे खांब. अयं महान् महता स्कम्भनेन

उत् द्यामस्तभ्नात् वृषभो मरुत्वान् ( ६।४७।५ ) = बलवान् इन्द्र द्यूला मोठ्या खांबानें वरचेवर उचलून धरता झाला. द्यां० चास्कम्भ चित् स्कम्भनेन स्कभीयान् ( १०।१११।५ ) = वर उचलून धरणारा ( स्कभीयान् ) इन्द्र खांबाचा टेंका देऊन द्यूला वर उचलून धरता झाला. या व आणखी कांहीं ऋचांत द्यूला वर उचलून धरण्याकरितां खांबांचा उपयोग देव करतात; पण प्रस्तुत ऋचेंत खांबाचा उपयोग न करतां ( अस्कम्भने ) सविता द्यूला वर उचलून धरतो. अवंशे द्याम् अस्तभायत् बृहन्तम् ( २।१५।२ ) वाशाचा टेका न देतां इन्द्र प्रचण्ड द्यूला वर उचलून धरता झाला; अवंशे = अस्कम्भने. दुह् = दूध काढणें, वर्षाव करावयास लावणें. इन्द्र धुनि नांवाच्या एका शत्रूला ठार करतो असें कित्येक ऋचांत म्हटलें आहे; पण एथें ऋचेंत तो अर्थ नसावा. ( १ ) हिरण्यकेशो रजसो विसारे अहिर्धुनिर्वात इव ध्रजीमान् ( १।७९।१ ) = सोन्याचे केस आहेत ज्याला असा अग्नि वाऱ्याप्रमाणें द्युलोकीं ( रजसो विसारे ) धडाडीनें जातो; एथें अग्निला अहि व धुनि म्हटलें आहे; धुनि = वेगानें जाणारा. ( २ ) त्वं धुनिरिन्द्र धुनिमतीॠणोरपः ( १।१७४।९ ) = हे इन्द्रा, धुनि ज्याच्यांत आहे अशा जलाला तूं मोकळें केलेंस ( ऋणोः ); धुनि = (१) वेगानें जाणारा, (२) वेग. (३) जिनाति वा इत् अमुया हन्ति वा धुनिः आ देवयुं भजति गोमति व्रजे ( ५।३४।५ ) = धुनि इन्द्र सोम न देणाऱ्याला जिंकतो म्हणजे त्याचें धन हिरावून घेतो किंवा त्याला ठार करतो व भक्ताला ( देवयुं ) गाईच्या कळपांतला वांटा देतो; धुनि=(१) शूर, (२) दाता. (४)धुनिः शिमीवान् शरुमान् ऋजीषी (१०। ८९।५) हीं चारीं इन्द्राचीं विशेषणें होत; शरु एका प्रकारचें आयुध; शिमीवान् = ऋजीषी = शौर्याचीं कृत्यें करणारा; धुनि याचाही शूर कृत्यें करणारा असा अर्थ असेल. (५) ते क्रीळयो धुनयो भ्राजदृष्टयः ( १।८७।३ ); हीं तीन मरुतांचीं विशेषणें होत; भ्राजत् + ऋष्टयः = ज्यांचीं आयुधें झळकतात असे किंवा ज्यांच्या जवळ अतिशय धन आहे असे; तेव्हां धुनयः = (१) शूर, (२) दाते. (६) दिवेदिवे धुनयो यन्ति अर्थम् ( २।३०।२ ) = ( १ ) मरुत् ( धुनयः ) जाण्याच्या ठिकाणाकडे ( अर्थं ) रोजच्या रोज ( दिवे दिवे ) जातात ( यन्ति ) ; (२) दाते ( धुनयः ) प्रत्येक धनभांडारांत (दिवे-दिवे ) धन ( अर्थं ) देतात ( यन्ति ). (७) ते मन्दसाना धुनयो रिशादसो वामं धत्त यजमानाय सुन्वते ( ५।६०।७ ) = हे मरुतांनो, दाते तुम्ही सोमहवि देणाऱ्याला धन ( वामं ) द्या ( धत्त ); मन्दसानाः = धुनयः = रिशादसः = धनदाते. (८) त्वामग्ने हरितो वावशाना गिरः सचन्ते धुनयो घृताचीः ( ७।५।५ ) = हे अग्नि, हरित् नांवाच्या घोड्या, स्तुति व घृतासारखें झळकणारें धन ( धुनयः ) हीं सर्व तुझी सेवा करतात; धुनयः = धन ? (९) वातासो न ये धुनयो जिगत्नवः ( १०।७८।३ ) = जे मरुत् वाऱ्यासारखे वेगानें जातात; धुनयः = जिगत्नवः = वेगानें जाणारे. यांशिवाय आणखी तीनचार ऋचा आहेत; पण त्यांचा अर्थ कळत नाहीं म्हणून त्या एथें दिल्या नाहींत. प्रस्तुत ऋचेंत धुनिं हें अश्वं, अन्तरिक्षं व समुद्रं यांचें विशेषण असेल; पण

अन्तरिक्ष वेगानें जातें म्हणजे काय? कदाचित् अन्तरिक्ष म्हणजे मेघ असा अर्थ असेल. यो मे सहस्रममिमीत सवान् अतूर्तो राजा श्रव इच्छमानः ( १।१२६।१ ) = धनाचा शोध करणारा म्हणजे चहूंकडून धन आणणारा राजा मला सहस्रावधि धन देता झाला; एथें राजाला अतूर्तः म्हटलें आहे. आशुं जेतारं हेतारं रथीतमम् अतूर्तं तुग्र्यावृधम् ( ८।९९।७ ) हीं सर्व इन्द्राचीं विशेषणें होत; आशु = शूर घोडा; जेतृ = जिंकणारा; हेतृ = अस्त्र फेंकणारा; रथीतम = सगळ्यांत मोठा; तुग्र्यावृध = तुग्र्याला साहाय्य करणारा, लढवय्या; हा एक अर्थ; आशुं = जेतारं = हेतारं = रथीतमं = तुग्र्यावृधं = धन देणाऱ्याला हा दुसरा अर्थ; ( १ ) अतूर्त = ज्याला कोणी इजा करूं शकत नाहीं असा; ( २ ) अतूर्तः = अ + तूर्तः; अ = धन; तुर् ( = देणें ) यापासून तुर = दाता; अ + तुर् + त = धनानें युक्त व धनदाता. अग्निः तुविश्रवस्तमं तुविब्रह्माणमुत्तमम् । अतूर्तं श्रावयत्पतिं पुत्रं ददाति दाशुषे ( ५।२५।५ ) = अग्नि हवि देणाऱ्याला धनवान् पुत्र देतो; तुविश्रवस्तमं = तुविब्रह्माणं = उत्तमं = श्रावयत्पतिं = धनवंत; तेव्हां अतूर्त याचाही तोच अर्थ असावा. अतूर्तदक्षा वृषणा वृषण्वसू (८।२६।१); हीं आश्विनांचीं विशेषणें; वृषणौ = वृषण्वसू = धन देणारे; अतूर्तदक्षौ = त्यांच्याजवळ अतिशय धन आहेत असे. पण प्रस्तुत ऋचेंत अतूर्ते हें कशाचें विशेषण? अन्तरिक्षं = अन्तरिक्षे असा यास्क व सायणाचार्य अर्थ करतात; कदाचित् अन्तरिक्षे असेंच रूप मूळचें असेल; तसें असल्यास अतूर्ते अन्तरिक्षे = ज्याला कोणी हिंसा करूं शकत नाहीं अशा अन्तरिक्षांत; पण अन्तरिक्षाला हिंसा कोण करील? बध् = व्यापून टाकणें, यापासून बद्बधे, बाबधे वगैरे क्रियारूपें ऋचांतून आढळतात; बध् याचा अर्थ व उतारे ( १०।९ पान ७६१ ) यांत दिले आहेत. बद्धं = व्यापून टाकणारें. समुद्रं = सम् + उद्रं = उदकपूर्ण मेघ; हा मेघ घोड्यासारखा वेगानें जाणारा असून सर्व आकाशभर पसरलेला असतो; त्याला सविता पाऊस पाडावयास लावतो; असा अर्थ असावा. अश्वमिव यांतील इव छन्दाच्या दृष्टीनें प्रक्षिप्त असावा; कारण एक, दोन व चार या प्रत्येक पादांत अकरा अक्षरें आहेत; पण तिसऱ्या पादांत बारा अक्षरें होतात; इव गाळल्यास अश्वम् अधुक्षत् धुनिमन्तरिक्षं हीं अकरा अक्षरें होतील; मेघालाच त्याच्या वेगामुळें अश्व असें म्हटलें असेल. सविता = धनदाता; सु = देणें. यं (=देणें)+त्रं = दान, धन. पृथिवीं व द्यां = पृथिवींतील व द्युलोकांतील धन. रम् याचा देणें असाही अर्थ होतो. वर दिलेल्या धुनि शब्दांच्या उताऱ्यांपैकीं एकांत धुनि म्हणजे धन असा अर्थ केला आहे. अश् ( = देणें ) + वं = धन. दुह् = देणें; १०।१६ पान ७७२ यांतील धुक्ष्व याचा अर्थ पहा. अतूर्ते याचा धनपर अर्थ वर दिला आहे. पण ऋचेंतील बाकींच्या शब्दांचा धनपर अर्थ मला करतां येत नाहीं.

**आदित्यः अपि सविता उच्यते । तथा च हैरण्यस्तूपे स्तुतः। अर्चन् हिरण्यस्तूपः ऋषिः इदं सूक्तं प्रोवाच । तदभिवादिनी एषा ऋक् भवति**

आदित्यालासुद्धां सविता म्हणतात; आदित्य हा सविता या नांवानें हिरण्य-

स्तूपानें रचिलेल्या सूक्तांत स्तविला आहे; अर्चन् हिरण्यस्तूप या नांवाचा ऋषि हें सूक्त म्हणता झाला; पुढील ऋचा आदित्य हा सविता असें सांगते. दुर्गवृत्तींत स्तुतः बद्दल स्तवः असा पाठ आहे. हिरण्यस्तूप हें एका ऋषिकुलाचें नांव; त्या कुलांतील एका हिरण्यस्तूपाचें अर्चन् असें नांव होतें. तदभिवादिनी एषा ऋक् भवति या शब्दांचा संबंध आदित्यः अपि सविता उच्यते याच्याशीं आहे; तेव्हां तथा च० प्रोवाच हे शब्द प्रक्षिप्त असावेत. आदित्य ह्याचा सूर्य असा लौकिक अर्थ एथें आहे. पुढील ऋचेंत नुसता सवितर् शब्द आहे; ऋचेंतल्या इतर शब्दांवरून सविता म्हणजे सूर्य असें मानण्यास कांहीं आधार नाहीं; अंधकार घालविणें, निजलेल्यास उठविणें, चांगल्या वाईटांचीं कृत्यें निरखून पाहणें वगैरे गोष्टींचा सूर्याशीं निकट संबंध आहे; त्यांपैकीं तेथें एकही गोष्ट नाहीं. ऋग्वेदांत सवितृ म्हणजे सूर्य ह्या अर्थाचीं पुष्कळ सूक्तें आहेत; त्यांतून यास्कानें एखादी ऋचा द्यावयास पाहिजे होती; १।३५ ह्या सूक्तांतील २ ते ११ ह्या ऋचांत सविता म्हणजे सूर्य ह्याचें जें वर्णन द्यावयास पाहिजे तें दिलें आहे. सविता हें नांव सूर्याशिवाय इतर देवानांही लाविलेलें आढळतें; एवढेंच नाहीं तर तें एकदोन ठिकाणीं हवि देणाऱ्या यजमानालाही लाविलें आहे; सु = देणें ह्यापासून सविता; सविता धन देत असेल किंवा हवि देत असेल. देवो न अत्र सविता दमूना अनागसो वोचति सूर्याय ( १।१२३।३ ) व त्वं देवः सविता रत्नधा असि (२।१।७) ह्या दोन ऋचांत अग्नि हा सविता. भगः सविता दाति वार्यम् ( ५।४८।५ ) एथें वरुण हा सविता. आगच्छत सवितुर्दाशुषो गृहम् ( १।११०।२ ) = हे ऋभूंनो, हवि देणाऱ्याच्या ( सवितुः = दाशुषः ) घरीं या. घृतवन्तं सवित्रे यज्ञं नय यजमानाय साधु (६।१५।१६) = हे अग्नि, हवि देणाऱ्या यजमानाच्याकरितां घृतयुक्त हवि देवांना चांगल्या रीतीनें नेऊन दे. सवितृ सूक्तांत सु धातूचीं निरनिराळीं रूपें येतात; त्यांवरून सु पासूनच सविता शब्द निघाला आहे असें सिद्ध होतें; सु = ( १ ) देणें, (२) जागें करणें; सूर्य धन देतो व निजलेल्यांना जागें करतो. प्रस्तुत खंडांतील ऋचा नुसत्या बलकृतीवरून इन्द्रपर आहे असें अनुमानानें सिद्ध करण्यापेक्षां इन्द्रोऽस्मान् अरदत् वज्रबाहुः अपाहन् वृत्रं परिधिं नदीनाम्। देवोऽनयत् सविता सुपाणिः तस्य वयं प्रसवे याम उर्वीः ( ३।३३।६ ) अशासारखी ऋचा द्यावयास पाहिजे होती; कारण इन्द्र हा सविता ( म्हणजे नद्यांना वहावयास लावणारा ) असें स्पष्ट म्हटलें आहे; वर दिलेल्या दोन अर्थांखेरीज प्रेरणा करणें, वहावयास लावणें असेही आणखी अर्थ सु धातूचे आहेत.

## खंड ३३ वा.

हिरण्यस्तूपः सवितर्यथा त्वाङ्गिरसो जुह्वे वाजे अस्मिन्।

एवा त्वार्चन्नवसे वन्दमानः सोमस्येवांशुं प्रति जागराहम्(ऋ०सं०१०।१४९।५)

**हिरण्यस्तूपः हिरण्मयः स्तूपः । हिरण्मयः स्तूपः अस्य इति वा। स्तूपः स्त्यायतेः । संघातः । सवितर् यथा त्वा आङ्गिरसः जुह्वे वाजे अन्ने अस्मिन्। एवं त्वा अर्चन् अवनाय वन्दमानः सोमस्य इव अंशुं प्रति जागर्मि अहम्**

हिरण्यस्तूपः = हिरण्मयः स्तूपः = सोन्याचा खांब; हिरण्यस्तूप जणूंकाय सोन्याचा खांब होता; किंवा ज्याच्याजवळ ( अस्य ) सोन्याचा ( हिरण्मयः ) खांब (स्तूपः) आहे तो हिरण्यस्तूप; हिरण्यगर्भ शब्दाची व्युत्पत्ति पहा (१०।२३ पान ७९८). स्त्यै शब्दसंघातयोः ( धा० १।९३५ ); स्त्यै (= गोळा होणें ) ह्या शब्दापासून स्तूप; कारण स्तूप हा कशाचा तरी संघात म्हणजे जमाव असतो; स्त्यै ह्याला संप्रसारण होऊन स्ति; स्ति = स्तू ; प हा नामकरण प्रत्यय. वाजे = अन्ने = संस्कृते हविषि (दुर्ग) = तयार केलेल्या हवींत. एवा = एवम्. अवसे = अवनाय = रक्षणाकरितां. सोमस्य इव अंशुं = सोमम् इव क्रीत्वा ( दुर्ग ) = सोमाप्रमाणें विकत घेऊन; सोमयागांत गाय, सुवर्ण वगैरे देऊन सोम विकत घ्यावयाचा असतो. जागर =जागर्मि. दुर्गानें केलेला अर्थः—हे सवित्या, पूर्वकल्पांतील हिरण्यस्तूपानें जसें हवि देण्याकरितां तुला पाचारण केलें होतें तसा ह्या कल्पांतील मीही अर्चन् नांवांचा हिरण्यस्तूप हा तयार केलेला हवि देण्याकरितां सोम विकत घेतांना जितका आदर दाखविला जातो तितक्या आदरानें तुला बोलावून व स्तवन करून (वन्दमानः) याग संपेतोंपर्यंत एकचित्तानें जागत राहतों म्हणजे तुझी सतत उपासना करीत राहतों. दुर्गानें आंगिरसः ह्याचा अर्थ दिला नाहीं व तें पदहि त्याच्या वृत्तींत नाहीं.

सायणः— सवितः = हे प्रेरक; आंगिरसः = अंगिरसः पुत्रः हिरण्यस्तूपः मम-पिता = अंगिरसाचा मुलगा व माझा बाप हिरण्यस्तूप; सोमस्येव अंशुं = यथा सोमलतां प्रति ( यजमानाः जाग्रति यागपर्यंतं तद्रक्षणे प्रबुद्धाः वर्तन्ते ) = याग संपेपर्यंत जसे यजमान सोमलतेचें रक्षण करण्याकरितां जागत राहतात; तथा अहं त्वत्परिचर्यां प्रति जागर जागर्मि = तसा तुझी परिचर्या करतांना मी जागत रहात आहें. सोमस्य इव अंशुं ह्याचा अर्थ दुर्ग व सायणाचार्य ह्यांनीं स्पष्ट केला नाहीं; कदाचित् अंशुं म्हणजे लता असा सायणाचार्यांनीं अर्थ केला असेल.

स्तूप शब्द ऋग्वेदांत चार वेळां आला आहे; अबुध्ने राजा वरुणो वनस्य ऊर्ध्वं स्तूपं ददते पूतदक्षः ( १।२४।७ ) = अद्भुत कृत्यें करणारा ( पूतदक्षः ) राजा वरुण अन्तरिक्षांत ( वनस्य ) जेथें कांहीं आधार नाहीं अशा ठिकाणीं ( अबुध्ने ) खांब ठेवतो म्हणजे उभा करतो. जुषस्व नः समिधमग्ने अद्य शोचा बृहद्यजतं धूममृण्वन्। उप स्पृश दिव्यं सानु स्तूपैः सं रश्मिभिः ततनः सूर्यस्य (७।२।१) = हे अग्नि, आमच्या आहुतींचा स्वीकार कर; धुराला घालवून देऊन प्रज्वलित हो; आपल्या ज्वालांनीं द्यूच्या डोक्याला स्पर्श कर म्हणजे द्यूच्या उंच प्रदेशाला जाऊन भीड व सूर्याच्या किरणांबरोबर सर्वत्र पसरत जा. अरुषस्तूपः इळायास्पुत्रो वयुनेऽजनिष्ट ( ३।२९।३ ) = तेजस्वी ज्वालांनीं युक्त असा ( अरुषस्तूपः ) हवींचा पुत्र अग्नि यज्ञांत जन्मास येतो; तेव्हां सोन्यासारख्या ज्वाला आहेत ज्याच्या असा अग्नि असा अर्थ हिरण्यस्तूपः याचा असावा. अग्नि देवांना हवि देण्यासाठीं बोलावितो असें अनेक ऋचांत म्हटलें आहे; तेव्हां प्रस्तुत ऋचेंतही तोच प्रज्वलित होऊन सवित्याला बोलावितो. अग्नीला

अङ्गिरस् असें सोळा वेळां संबोधिलें आहे; अङ्गिरस्तम हें अग्नीचें विशेषण सहा वेळां आलें आहे. १।३१।१ ह्यांत त्याला प्रथमो अङ्गिरा ऋषिः व ५।४५।७ त अङ्गिराः म्हटलें आहे. १।३१।२ त त्वमग्ने प्रथमो अङ्गिरस्तमः असें आढळतें. अङ्गिरसांशीं इतका निकट संबंध दुसऱ्या कोणत्याही देवाचा किंवा देवतेचा दिसत नाहीं. बृहस्पतीला एकदां ( २।२३।१८ ) व इंद्राला एकदां ( ३।३१।७ ) अङ्गिरस् म्हटलें असून उषेला अङ्गिरस्तमा दोनदां ( ७।७५।१ ॥ ७।७९।३ ), इंद्राला अङ्गि-रस्तमः दोनदां ( १।१००।४ ॥ १।१३०।३ ) व सोमाला एकदां ( ९।१०७।६ ) म्हटलें आहे. खरा अङ्गिरस् किंवा अंगिरस्तम अग्नीच. अग्नि जन्माला कसा आला हें मन्वादिक ऋषींना माहित होतें; ह्या ऋषींच्या नामावलींत ( १।१३९।९ ) पूर्वो अङ्गिराः हें नांव आलें आहे; हाच अङ्गिरस् जन्मल्यापासून अग्नीची स्तुति करीत होता ( १०।९२।१५ ) असें म्हटले आहे. अग्नीचा अङ्गिरस् कुलाशीं इतका निकट संबंध असल्यामुळें त्याला प्रस्तुत ऋचेत आंगिरस म्हटलें असावें. आंगिरस हें विशेषण बृहस्पतीला चारदां ( ४।४०।१॥६।७३।१४॥१०।४३।६॥१०।६८।२ ) व इंद्राला एकदां (१०।१६४।४) लाविलें आहे. आंगिरसान् ब्रह्मणा विप्र जिन्व ( ६।३५।५ )= हे दात्या ( विप्र ) इंद्रा, आंगिरसांना म्हणजे अङ्गिरस् कुलांतील ब्राह्मणांना धनानें ( ब्रह्मणा ) संतुष्ट कर ( जिन्व ). अङ्गिरस् कुलाशीं इतर देवांपेक्षां अधिक संबंध असतांनाही अग्नीला आंगिरस हें विशेषण एकदांच म्हणजे प्रस्तुत ऋचेंतच लाविलें आहे हें चमत्कारिक दिसतें व तेथेंही तें विशेषण अग्नीला लाविलें आहे असें नुसतें अनुमानानें म्हणतां येतें. जुहे = बोलावितो. वाजे अस्मिन् = या यज्ञांत. अर्चन् = वन्दमानः = स्तुति करणारा. अंशु = ( १ ) सोम, ( २ ) सोमरस. अंशुः यवेन पिपिशे ( ९।६८।४ ) = सोमरस यवानें मिश्रित केला आहे; तसें केल्यानें यवाशिर तयार होतें. मध्वो अंशुः पवत इन्द्रियाय ( ९।८९।८ ) = इन्द्राला बल आणण्या-करितां सोमाचा रस शुद्ध होत आहे. अध्वर्यवः अरुणं दुग्धम् अंशुं जुहोतन वृषभाय क्षितीनाम् ( ७।९८।१ ) = हे हवि देणाऱ्यांनो, पंचजनांचा म्होरक्या जो इन्द्र त्याला लाल रंगाचा सोमरस अर्पण करा. प्रस्तुत ऋचेत सोमस्य अंशुं = सोमाचा रस. गृ = ( १ ) स्तुति करणें, ( २ ) देणें. सं जागृवद्भिर्जरमाण इध्यते ( १०।९१।१ ) = स्तुति करणाऱ्यांकडून ( जागृवद्भिः ) स्तविलेला ( जरमाणः ) अग्नि प्रज्वलित केला जातो; गृ = हवि देणें; जागृवद्भिः = हवि देणाऱ्यांकडून असाही अर्थ होईल. दिवे-दिवे ईड्यो जागृवद्भिः हविष्मद्भिः मनुष्येभिः अग्निः ( ३।२९।२ ) = अग्नि दररोज स्तुति करणाऱ्या व हवि देणाऱ्या मनुष्यांकडून स्तविला जातो. तेन सत्येन जागृत-मधि प्रचेतुने पदे । इन्द्राग्नी शर्म यच्छतम् ( १।२१।६ ) = हे इन्द्राग्नींनो, आमचें धनभांडार धनानें पूर्ण व्हावें म्हणून ( प्रचेतुने पदे ) आपल्या त्या अमूप ( तेन ) धनांतून ( सत्येन ) धन द्या; जागृतं = शर्म यच्छतं = धन द्या. प्रस्तुत ऋचेंत जागर = मी स्तुति अर्पण करीत आहें. हे सवित्या, ज्या अर्थी प्रज्वलित केलेला

(हिरण्यस्तूपः) व अङ्गिरस्कुलांतील अग्नि या यज्ञांत तुला बोलावीत आहे त्याअर्थी (एवा) स्तुति करणारा (अर्चन् = वन्दमानः) मी तुला माझ्या कल्याणासाठीं (अवसे) सोमरसाप्रमाणें स्तुतीही अर्पण करीत आहें (म्हणजे तुला मी सोमाहुति देऊन तुझी स्तुति करीत आहें).

त्वष्टा (२१) व्याख्यातः (८।१३)। तस्यैषा भवति

त्वष्टृ शब्दाची व्युत्पत्ति पहा (पानें ६२२-६२३ पाहणें).

## खंड ३४ वा.

**देवस्त्वष्टा सविता विश्वरूपः पुपोष प्रजाः पुरुधा जजान।**

**इमा च विश्वा भुवनान्यस्य महद्देवानामसुरत्वमेकम् (ऋ० सं० ३।५५।१९)**

**देवः त्वष्टा सविता सर्वरूपः पोषति प्रजाः रसानुप्रदानेन। बहुधा च इमाः जनयति। इमानि च सर्वाणि भूतानि उदकानि अस्य। महत् च अस्मै देवानाम् असुरत्वम् एकम्। प्रज्ञावत्त्वं वा। अनवत्त्वं वा। अपि वा। असुः इति प्रज्ञानाम (निघण्टु ३।९।६)। अस्यति अनर्थान्। अस्ताश्च अस्याम् अर्थाः। असुरत्वम् आदिलुप्तम्**

सविता = पर्जन्यवृष्टि करून सर्व प्राण्यांना उत्पन्न करणारा (दुर्ग). विश्वरूपः = सर्वरूपः; दुर्गवृत्तींत सर्वरूपः किंवा विश्वरूपः नाहीं व त्याचा अर्थही दिला नाहीं. पुपोष=पोषति; दुर्गवृत्तींत पोषति बद्दल पुष्णाति आहे; पुष पुष्टौ(धा०१।७०१॥ ९।५७). रसानुप्रदानेन = पाऊस देऊन म्हणजे पाडून. पुरुधा = बहुधा = पुष्कळ प्रकारांनीं. इमाः अध्याहृत; इमाः बद्दल दुर्गवृत्तींत एनाः आहे; इमां हा गुर्जरपाठ चुकीचा आहे. जजान = जनयति = वर्धयति (दुर्ग). इमा = इमानि; च अध्याहृत; दुर्गवृत्तींत च नाहीं. विश्वा = विश्वानि = सर्वाणि. भुवनानि = भूतानि = उदकानि; दुर्गवृत्तींत भूतानि नाहीं. इमानि च सर्वाणि भूतानि उदकानि अस्य=आणि याच्यापाशीं हें सर्व जल आहे असा यास्क अर्थ करतो;पण इमानि विश्वानि भुवनानि उदकानि अस्य यतः स्वतायां वर्तन्ते तस्माज्जनयति पुष्णाति वर्धयति च=ज्या अर्थीं याच्या ताब्यांत हें सर्व जल आहे त्याअर्थीं त्या जलानें तो प्रजा उत्पन्न करितो व वाढवितो असा दुर्ग अर्थ करितो. महत् नंतरचे च अस्मै हे शब्द अध्याहृत; हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत व त्यांची आवश्यकताही नाहीं. असुरत्वं = प्रज्ञावत्वं वा अनवत्वं वा; प्रज्ञावत्वं = बुद्धिमत्ता; महत्या प्रज्ञया उदकेन साधनेन सर्वमिदं जनयति पुष्णाति वर्धयति च (दुर्ग) = अशा प्रचंड बुद्धिमत्तेमुळें उदकाच्या साहाय्यानें त्वष्टा प्रजा उत्पन्न करितो व वाढवितो. अनवत्वं = प्राणवत्त्वं; त्वष्ट्याच्या अंगांत प्राण म्हणजे बल आहे त्यामुळें तो हें सर्व करूं शकतो; दुर्ग म्हणतो कीं अनवत्वं बद्दल कित्येक अन्नवत्वं असा पाठ घेतात; अन्न म्हणजे अन्न उत्पन्न करणारें उदक; देवांपाशीं उदक आहे. असुः = प्रज्ञा (निघण्टु ३।९।६); अस् (= फेंकणें) + उः=असुः; बुद्धि अनर्थ म्हणजे संकटें फेंकून देते म्हणजे नाहींशीं करते व बुद्धींत सर्व प्रकारच्या वस्तु भरलेल्या असतात;

अशी कोणतीही गोष्ट नाहीं कीं ती बुद्धिवंतांच्या बुद्धीच्या बाहेरची आहे. गुर्जरपाठ अनर्थाः असा आहे; सर्व संकटें ज्या बुद्धींत टाकलीं जातात म्हणजे तीं निराकरण करण्याकरितां बुद्धीच्या पुढें ठेविलीं जातात असा त्या पाठाचा कांहींसा अर्थ होईल. असुः इति प्राणनाम (३।८ पानें १७०--१७१). अपि वा हे शब्द असुरत्वं आदि-लुप्तं ह्याच्या आधीं पाहिजेत; कारण असुः इति प्रज्ञानाम० अर्थाः ह्यांचा त्या शब्दांशीं कांहीं एक संबंध नाहीं. दुर्गवृत्तींत असुः इति प्रज्ञानाम हें प्रज्ञावत्त्वं यानंतर असून असुः इति प्राणनाम हें अनवत्त्वं वा यानंतर आहे; पण असुः इति प्राणनाम हें भाष्यांत नाहीं. अस् (= असणें) + उः = असुः = अस्तित्वाचें साधन; हें साधन प्राण किंवा अन्न; उदकानें प्राणाचें रक्षण होतें म्हणजे मनुष्य श्वासोच्छ्वास करूं शकतो व उदकानेंच त्याला अन्न मिळतें; ही व्युत्पत्ति माझ्या पदरची आहे. असुरत्वं = वसुरत्वं = वसुमत्वं = धनवत्ता; वसुरत्वं यांतील व् याचा लोप होऊन असुरत्व शब्द झाला असेल; वसुरत्वं यांतील र = मत्; वसु = उदक (दुर्ग). दुर्गवृत्तींत आदिलुप्तं नाहीं; वकार लोपः एवढेंच आहे; आदिः लुप्तः यस्य तत् आदिलुप्तम्; पण लुप्तः आदिः यस्य तत् लुप्तादि असा समास पाहिजे. दुर्गानें केलेला अर्थ:— सर्व रूपें धारण करणारा व पाऊस पाडून प्रजा उत्पन्न करणारा (सविता) त्वष्टा देव त्या प्रजेला पावसानें पोसतो व नाना प्रकारांनीं तिला वाढवितो; कारण त्याच्या स्वाधीन सर्व उदक आहे; देवांच्यापाशीं अशी अद्वितीय (एकं) प्रज्ञाशक्ति किंवा प्राण-शक्ति किंवा उदकोत्पादन आहे. दुर्गानें केलेलें विवरण व यास्कभाष्य यांतील भेद वर दाखविलाच आहे.

**सायणः**—सविता = अन्तर्यामितया सर्वस्य प्रेरकः = सर्व वस्तूंच्या अन्तर्यामीं असल्यामुळें त्यांना प्रेरणा करणारा; प्रजाः पुरुधा बहुधा जजान। जनयति। ताश्च पुपोष पोषयति = सर्व प्रकारची प्रजा निर्माण करतो व तिला पोसतो; भुवनानि = भूतजातानि = सर्व प्राणी; तत् इदं देवानाम् एकं मुख्यम् असुरत्वम्। अस्यति क्षिपति सर्वान् इति असुरः प्रबलः। तस्य भावः असुरत्वं प्राबल्यं महत् ऐश्वर्यम् = असें हें देवांचें मुख्य व मोठें ऐश्वर्य आहे; सर्वांना फेंकून देतो तो असुर; असुरत्व म्हणजे त्याचें तें प्राबल्य म्हणजे ऐश्वर्य. ३।५५ यांतील प्रत्येक ऋचेचा चौथा पाद महद्देवा-नामसुरत्वमेकम् असा आहे; त्यांतील बावीस ऋचांपैकीं पांच सहा ऋचा वगळून बाकींच्या कूटांसारख्या आहेत; या बावीस ऋचांत अग्नि, इन्द्र, वरुण, उषस्, सूर्य वगैरेंचें माहात्म्य वर्णिलें आहे व त्यांची अद्वितीय अद्भुत शक्ति केवढी व कशी आहे हें दाखविलें आहे. विश्वरूप = (१) अनेक रंगाचा किंवा अतिशय तेजस्वी, (२) नाना प्रकारचा, (३) अतिशय धनवान्, (४) सर्व प्राण्यांना उत्पन्न करणारा. (१) त्रिपाजस्यो वृषभो विश्वरूपः (३।५६।३); विश्वरूपः = अनेक रंगांचा किंवा अति-शय तेजस्वी; अभीवृतं कृशनैर्विश्वरूपं० आस्थाद्रथं सविता (१।३५।४) = सोन्यानें (कृशनैः) मढविलेला (अभीवृतं) व अतिशय तेजस्वी (विश्वरूपं) अशा रथांत सविता

बसला. ( २ ) ओषधीः विश्वरूपाः ( ५।८३।५ ) व देवीं वाचमजनयन्त देवाः तां विश्वरूपाः पशवो वदन्ति ( ८।१००।११ ) या दोन ऋचांत विश्वरूप म्हणजे नाना प्रकारच्या किंवा नाना प्रकारचे. ( ३ ) वाजम् असनद्विश्वरूपम् ( १०।६७।१० ) = अतिशय ( विश्वरूपं ) धन देता झाला; एथें विश्वरूपं म्हणजे नानाप्रकारचें असाही अर्थ होईल; वृषभं चर्षणीनां विश्वरूपम् अदाभ्यं बृहस्पतिं वरेण्यम् ( ३।६२।६ ); बृहस्पति विश्वरूप म्हणजे अतिशय धनवान आहे. ( ४ ) गर्भे नु नो जनिता दम्पती कर् देवस्त्वष्टा सविता विश्वरूपः ( १०।१०।५) = सर्व प्राण्यांना उत्पन्न करणारा त्वष्टा देव आपणां दोघांना आपण मातेच्या पोटांत असतांना नवराबायको करता झाला कारण आपण दोघे जुळे असे जन्माला आलों; जनिता = सविता = उत्पन्न करणारा. इह त्वष्टारम् अग्रियं विश्वरूपं उप ह्वये अस्माकमस्तु केवलः ( १।१३।१० ) = या यज्ञांत श्रेष्ठ ( अग्रियं ) व विश्वरूप जो त्वष्टा त्याला मी बोलावीत आहें; तो सर्वस्वीं आमचा असो; एथें विश्वरूप हें त्वष्टयाचें नेहमींचें विशेषण असून त्याचा अतिशय धनवान् असाही अर्थ आहे. असुरत्व = ( १ ) अद्‌भुत कृत्यें करण्याचें सामर्थ्य; ( २ ) अ = सु = र = त्व = धन. एक = (१) अद्वितीय, ( २ ) इ = देणें, दान किंवा धन; आ = इ = क = धन. प्रस्तुत ऋचेचे दोन अर्थ असावेतः—(१)सर्व प्राण्यांना उत्पन्न करणारा ( सविता = विश्वरूपः ) त्वष्टादेव नाना प्रकारच्या (पुरुधाः) प्रजा उत्पन्न करतो ( जजान ) व त्या पोसतो ( पुपोष ); हीं सर्व भुवनें त्याचींच होत; देवांची माया ( असुरत्वं ) अशी मोठी व अद्वितीय आहे; ( २ ) अतिशय धनवान् ( देवः = विश्वरूपः ) दाता ( त्वष्टा = सविता=पुरुधाः ) धन ( प्रजाः ) देतो (पुपोष= जजान ); कारण त्याच्याजवळ अतिशय ( इमानि = विश्वानि ) धन (भुवनानि) आहे; दात्यांजवळ ( देवानां ) अतिशय ( महत् = एकं ) धन ( असुरत्वं ) असतें.

**वातः ( २२ ) वाति इति सतः । तस्य एषा भवति**

जेव्हां वारा वाहतो तेव्हां त्याला वात अशी संज्ञा; वारा जर दुसरी कांहीं क्रिया करीत असेल तर त्याला दुसरें निराळें नांव असेल; वा = वाहणें; त हा नामकरण प्रत्यय; वा गतिगन्धनयोः ( धा० २।४० ).

## खंड ३५ वा.

**वात आ वातु भेषजं शंभु मयोभु नो हृदे ।**
**प्र ण आयूंषि तारिषत् ( ऋ० सं० १०।१८६।१ )**
**वातः आवातु भैषज्यानि शंभु मयोभु च नः हृदयाय । प्रवर्धय च नः आयुः**

भेषजं = भैषज्यानि ( १०।७ पान ७५० पहा ); दुर्गवृत्तींत भेषजं असेंच आहे व तोच शब्द बरोबर आहे; कारण शंभु व मयोभु हीं त्याचीं विशेषणें होत; भैषज्यानि अशा पाठास शंभूनि व मयोभूनि अशीं विशेषणें पाहिजेत; पण तशीं विशेषणें भाष्यांत नाहींत. शंभु = मयोभु = सुखकर; शंभु = घेतांना सुखकर व मयोभु = परिणामीं

सुखकर असे दुर्ग अर्थ करतो. हृदे = हृदयाय. प्र तारिषत् = प्रवर्धय. आयूंषि = आयुः; दुर्गवृत्तींत आयूंषि एवढेंच आहे. प्र तारिषत् = प्रवर्धयतु असा आज्ञार्थी तृतीय पुरुषच आहे; द्वितीय पुरुष भाष्यांत आशीर्वादाकरितां घातला असावा; दुर्गही त्याच कारणाकरितां प्रवर्धय असाच पर्याय देतो. दुर्गानें केलेला अर्थः— आमच्या हृदयाला घेतांना सुखकर व परिणामीं सुखकर असें औषध वात वाहून आणो; हे वाता, आमचें आयुष्य वाढीव.

**सायणः**—भेषजं = औषधम् उदकं वा; शंभु = रोगशमनस्य भावयितृ = रोग शमविणारें; मयोभु = सुखस्य भावयितृ = सुख देणारें; प्र तारिषत् = प्रवर्धयतु.

**अग्निः ( २३ ) व्याख्यातः ( ७।१४ ) । तस्य एषा भवति**

अग्नि शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पानें ५५९-५६० ).

## खंड ३६ वा.

**प्रति त्यं चारुमध्वरं गोपीथाय प्र हूयसे ।**
**मरुद्भिरग्न आ गहि ( ऋ० सं० १।१९।१ )**

**तं प्रति चारुम् अध्वरं सोमपानाय प्रहूयसे । सः अग्ने मरुद्भिः सह आगच्छ । इति । कम् अन्यं मध्यमात् एवम् अवक्ष्यत् । तस्य एषा अपरा भवति**

प्रति त्यं = तं प्रति; त्यं = अंगवैकल्यरहितं ( दुर्ग ) = सर्वांगपूर्ण. गोपीथाय = सोमपानाय; पी ( = पिणें ) + थं = पीथं = पान; गो = सोम. सः व सह अध्याहृत. आ गहि = आगच्छ. ऋचेचा अर्थः—हे अग्नि, सोम पिण्याकरितां ह्या प्रिय यज्ञाप्रत तूं बोलाविला जात आहेस; तो तूं मरुतांसह ये. मरुत् हे अन्तरिक्षांतील देव तेव्हां त्यांना घेऊन येणारा अग्नि अंतरिक्षांतीलच; पण पृथिवीवरच्या अग्नीला अंतरिक्षांत जातां येत नाहीं कीं काय ? तो देवांना आणण्याकरितां हवा तेथें जाईल. अंतरिक्षांतील अग्नीसंबंधानें पुढील दिलेली आणखी एक ऋचा होय. गोपीथाय शब्दानें सोमपान स्पष्ट होत नाहीं; कारण गोपीथाय म्हणजे दूध पिणें असा प्राथमिक अर्थ दिसतो; सोमपान स्पष्ट व्हावें म्हणून पुढील ऋचा दिली आहे असें दुर्ग म्हणतो. यं देवासो अवथ वाजसातौ त्रायध्वे यं पिपृथ अत्यंहः । यो वो गोपीथे न भयस्य वेद ते स्याम देववीतये तुरासः ( १०।३५।१४ ) = हे देवांनो, ज्याचें तुम्ही संग्रमांत रक्षण करतां, ज्याला संकटांतून पार पाडतां, ज्याला तुमच्या रक्षणाखालीं भय वाटत नाहीं त्यासारखे होण्याची आम्हीं इच्छा करतों; एथें गोपीथ म्हणजे सोमपान नाहीं. रेवत् स वयो दधते सुवीरं स देवानाम् अपि गोपीथे अस्तु ( १०।७७।७ ) = ( जो देवांना हवि देतो ) तो अतिशय धन धारण करतो; तो देवांच्या अगदीं निकट रक्षणाखालीं असो. मा मघोनः परिख्यतं मो अस्माकम् ऋषीणां गोपीथे न उरुष्यतम् ( ५।६५।६ ) ह्याचा अर्थ मला कळत नाहीं. गोपीथ म्हणजे सोमपान असा अर्थ करण्याला वरील दिलेल्या तीन ऋचांचा आधार आहे असें दिसत नाहीं. ये नः पूर्वे पितरः सोम्यासो अनूहिरे

सोमपीथं वसिष्ठाः ( १०।१५।८ ) = वसिष्ठ जे आमचे पूर्वज देवांना सतत ( अनु ) सोमपान अर्पण करिते झाले ( ऊहिरे ); ह्या उदाहरणावरून गोपीथ म्हणजे सोमपान असा कदाचित् अर्थ करतां येईल; सोमरसांत दूध मिसळलें असतें म्हणून गो म्हणजे सोमरस.

## खंड ३७ वा.

**अभि त्वा पूर्वपीतये सृजामि सोम्यं मधु ।**
**मरुद्भिरग्न आ गहि ( ऋ० सं० १।१९।९ )**

**अभिसृजामि त्वा पूर्वपीतये पूर्वपानाय सोम्यं मधु । सोममयम् । सः अग्ने मरुद्भिः सह आगच्छ । इति**

अभि + सृजामि = वदे ( दुर्ग ) = मी म्हणतों; पण अभि + सृज् = अर्पण करणें असा अर्थ आहे. पूर्वपीतये = पूर्वपानाय; पूर्वपीतये शब्द भाष्यांत नको. पूर्वपीतये = पूर्वकाले प्रवृत्ताय पानाय ( दुर्ग ) = दिवसाचे पूर्वभागीं म्हणजे अगदीं सकाळीं सुरू केलेल्या पानाकरितां; सायणाचार्यहि असाच अर्थ करितात. सोम्यं मधु = सोममयं तत् मधु ( दुर्ग ) = सोमपूर्ण मध; मधु = गोड पेय; सोम्यं मधु = सोम-संबंधिनं मधु मधुरसं ( सायण ) = गोड सोमरस. अभिसृजामि = सर्वतः संपादयामि ( सायण ) = पूर्णपणें संपादित म्हणजे तयार करतों. ह्या ऋचेंत सोम्यं मधु व पूर्व-पीतये ह्या शब्दांनीं सोमपान स्पष्ट निर्दिष्ट आहे. मधु ह्याचा पहिला अर्थ मध; मधौ न मक्ष आसते ( ७।३२।२ )= माशा जशा मधावर बसतात; मध ह्या अर्थापासून मधासारखें गोड पेय किंवा रस असा दुसरा अर्थ; सोम्यं = सोमाचा; सोम्यं मधु = सोमरस. आ त्वा जुवो रारहाणा अभि प्रयो वायो वहन्तु पूर्वपीतये सोमस्य पूर्वपीतये (१।१३४।१) = हे वायु, धांवत सुटणारे घोडे (जुवः) सर्वांच्या आधीं सोमरस पिण्या-करितां तुला आमच्या सोमाकडे आणोत. तुभ्यं हि पूर्वपीतये देवा देवाय येमिरे ( १।१३५।१ ) = हे वायु, तूं सर्वांच्या आधीं सोमरस प्यावा म्हणून सर्व देव तुला सोमरस देते झाले. ह्या दोन उदाहरणांवरून पूर्वपीतये म्हणजे सर्वांच्या आधीं पिण्या-करितां असा एथें अर्थ आहे. ऋचेचा अर्थः- हे अग्नि, तूं सर्व देवांच्या आधीं सोमरस प्यावा म्हणून तुला मी सोमरस अर्पण करीत आहें; तेव्हां मरुतांना घेऊन ये. दुर्ग व सायणाचार्य ह्यांनीं पूर्वपीतये ह्याचा केलेला अर्थ वर दिला आहे.

## खंड ३८ वा.

**वेनः (२८) वेनतेः कान्तिकर्मणः । तस्यैषा भवति**

वेन् = प्रिय असणें; ह्यापासून वेन; सर्व लोकांवर उपकार करतो म्हणून वेन हा सर्व लोकांना प्रिय असे दुर्ग म्हणतो. वेणृ गतिज्ञानचिन्तानिशामनवादित्रग्रहणेषु ( धा० १।९०२ ); वेण् = बरोबर जाणें, जाणणें, विचार करणें, ऐकणें, वाजविणें, व घेणें; ह्याखेरीज स्तुति करणें व पूजा करणें असे आणखी अर्थ आपट्यांच्या कोशांत

दिले आहेत; वेन् व वेण् हे दोन्ही एकच असें त्या कोशांत म्हटलें आहे; पण प्रिय असणें असा अर्थ धातुपाठांत किंवा आपट्यांच्या कोशांत दिला नाहीं.

## खंड ३९ वा.

**अयं वेनश्चोदयत्पृश्निगर्भा ज्योतिर्जरायू रजसो विमाने ।**
**इममपां संगमे सूर्यस्य शिशुं न विप्रा मतिभी रिहन्ति (ऋ०सं० १०।१२३।१ )**

**अयं वेनः चोदयत् पृश्निगर्भाः । प्राष्टवर्णगर्भाः आपः इति वा । ज्योतिर्जरायुः । ज्योतिः अस्य जरायुस्थानीयं भवति । जरायुः जरया गर्भस्य । जरया यूयते इति वा । इमम् अपां च संगमने सूर्यस्य च शिशुम् इव विप्राः मतिभिः रिहन्ति । रिहन्ति लिहन्ति । वर्धयन्ति । पूजयन्ति इति वा । शिशुः शंसनीयः भवति । शिशीतेर्वा स्यात् दानकर्मणः । चिरलब्धो गर्भः इति**

चोदयत् = चोदयति; भाष्यांत चोदयत् बद्दल चोदयति पाहिजे होतें. पृश्नेः गर्भाः पृश्निगर्भाः = पृश्नि म्हणजे अंतरिक्ष; त्याच्या पोटांत असलेलें ( जल ). किंवा पृश्निगर्भाः = प्राष्टवर्णगर्भाः ; प्राष्टः प्रकर्षेण अष्टः वर्णः येन सः प्राष्टवर्णः आदित्यः । तस्य गर्भाः गर्भभूताः = ज्यानें रंग मिळविला आहे तो आदित्य; त्याच्या पोटांत असलेलें; आपः ( = जल ) अध्याहृत; सूर्य आपल्या किरणांनीं वाफेच्या रूपानें पाणी आपल्या ठिकाणीं सांठवितो. पृश्निः आदित्यः भवति । प्राश्नुते एनं वर्णः इति नैरुक्ताः ( २।१४ पान ११७ ); पृश्नि शब्द प्र + अश् ह्यापासून; प्र + अश् + त = प्राष्ट = मिळविलेला किंवा व्यापिलेला. प्राष्टवर्ण हा सामासिक शब्द प्राश्नुते एनं वर्णः ह्याच्याबद्दल घातला आहे; पण दोहोंच्या अर्थांत फरक आहे; वर्ण म्हणजे तेज सूर्याकडून व्यापिलें किंवा मिळविलें जातें असा सामासिक शब्दाचा अर्थ; पण वर्ण म्हणजे तेज सूर्याला व्यापते असा वाक्याचा अर्थ. दुर्गवृत्तींत इति वा नाहीं; तेव्हां पृश्निगर्भाः ह्याचा पहिला दिलेला अर्थ दुर्गाच्या मनांत नव्हता व यास्काच्याही मनांत नव्हता; कारण यास्कानें पृश्न शब्दाची एकच व्युत्पत्ति दिली आहे. इति वा हे शब्द प्रक्षिप्त असावेत. अयं वेनः चोदयत् पृश्निगर्भाः = आठ महिने किरणांनीं जमा केलेलें पाणी वेन पावसाळ्यांत पृथिवीवर पाडतो; जल हे जणूं काय गायी; ह्या गायींना वेन गोठ्याबाहेर हांकलून नेतो ( चोदयत् ). ज्योतिर्जरायुः हा बहुव्रीहिसमास असून तो वेनः ह्याचें विशेषण आहे;यास्क नेहमींच्या पद्धतीनें यस्य बद्दल अस्य घालतो; ज्योतिर्जरायुः = ज्योतिः अस्य जरायुस्थानीयं भवति = ज्योति म्हणजे वीज; ती ह्याच्या म्हणजे वेनाच्या गर्भवेष्टनासारखी असते; जरायु = गर्भाभोंवतीं असणारा कोशेटा; वीज ही मेघांभोंवतीं आकाशांत चमकते म्हणून ती जरायु. ह्या कोशेट्याला जरायु म्हणण्याचें कारण गर्भाच्या ( गर्भस्य ) वाढीनें ( जरया ) तो अस्तित्वांत येतो; जसा गर्भ वाढतो तसा कोशेटा वाढत जातो; जरायुः = जरा + युः = जरा वृद्धिः विद्यते अस्य सः ; किंवा जरा जरया यु यूयते असौ जरायुः ; जरा म्हणजे वार. ह्या वारेशीं जें मिसळलेलें म्हणजे चिकटलेलें असतें तें जरायु. जराम् एति जरायुः ( अमर २।६।३८ क्षीर-

स्वामी). रजसः विमाने हे शब्द किंवा ह्यांचे पर्याय भाष्यांत दिले नाहींत. रजसः विमाने =रजः उदकम्। तद् यत्र निर्मीयते तत्र (दुर्ग)=जेथें पाणी निर्माण होतें अशा अंतरिक्षांत. अपां संगमे सूर्यस्य = अपां च संगमने सूर्यस्य च = पाणी व सूर्य म्हणजे सूर्याचे किरण ह्यांच्या संगमानें; दोन च अध्याहृत; दुर्गवृत्तींत संगमने नसून संगमे असें आहे व तोच शब्द बरोबर आहे; जेथें पाणी व सूर्यकिरण ह्यांचा संगम होतो अशा अंतरिक्षांत. न = इव. रिहन्ति = लिहन्ति = वर्धयन्ति पूजयन्ति इति वा = चाटतात म्हणजे स्तुति करतात किंवा पूजा करतात. शिशुः = शशुः = शंसुः; शंस् = स्तुति करणें; ह्यापासून शिशु; आयाबाया लहान मुलाची सारखी स्तुति करीत असतात; किंवा शी = देणें ह्या धातूपासून शिशु; शिशी + उः = शिशुः; पुरुष स्त्रीला गर्भरूपानें मूल देतो; चिरलब्धः गर्भः इति=फार दिवसांनीं गर्भ मिळाला म्हणजे राहिला असें गर्भार स्त्रीविषयीं बायका बोलतात; फार दिवसांनीं कां होईना पण एकदांची ही गर्भार राहिली असें बायका आपापसांत बोलतात; अचिरलब्धः असा दुर्गवृत्तींत शब्द आहे; लग्नानंतर लौकरच नवऱ्यानें मला गर्भ दिला म्हणजे मी गरोदर राहिलें अशा गर्भार राहिलेल्या तरुण स्त्रिया बढाया मारतात; चिरलब्धः किंवा अचिरलब्धः इति वा हें शिशु शब्दाच्या दुसऱ्या व्युत्पत्तीचें विस्तारानें केलेले वर्णन होय. दुर्गानें केलेला अर्थः— वीज ही कोशेट्यासारखी ज्याच्याभोंवतीं असते असा व अंतरिक्षांत ( रजसः विमाने ) असलेला वेन किरणांनीं वर ओढून आपल्या ठिकाणीं ठेवलेलें पाणी ( पृश्निगर्भाः ) बाहेर ढकलून देतो म्हणजे पृथिवीवर तें जल पावसाच्या रूपानें पाडतो; जेथें जल व सूर्यकिरण एकवटतात अशा अंतरिक्षांत ह्या सूर्याला जशा आया मुलाची स्तुति करतात म्हणजे लाडानें त्याचे गोडवे गातात तसे बुद्धिमान् लोक स्तुतींनीं स्तवितात.

**सायण**:—वेनः = कान्तः एतद् संज्ञः मध्यस्थानः देवः=वेन (= कान्त ) ह्या नांवांचा अंतरिक्षांतील देव; ज्योतिः = द्योतमानः मेघः; असा मेघ जरायूसारखा ज्याच्याभोंवतीं असतो असा ( म्हणजे मेघांत गर्भासारखा असलेला ) वेन; पृश्निः आदित्यः तस्य गर्भभूताः = सूर्याच्या पोटांत असलेलें ( जल ); यद्वा पृश्नयः सप्त उज्वलवर्णाः सूर्यरश्मयः । तेषां गर्भभूताः = पृश्नि म्हणजे सूर्याचे सात उज्वल किरण; त्यांच्यांत असणारें ( जल ); रिहन्ति = अर्चन्ति पूजयन्ति स्तुवन्ति = स्तुति किंवा पूजा करतात.

सोम (९।४३।९), सूर्य (१।८३।५), बृहस्पति (१।१३९।१०), इंद्र (८।३।१८), अग्नि ( ८।६३।१ ) ह्यांना वेन म्हटलें आहे. स त्वं नो मघवन् इंद्र गिर्वणो वेनो न शृणुधी हवम् ( ८।३।१८ ) = हे धनवन्ता ( मघवन् ) व धनदात्या ( गिर्वणः ) इन्द्रा, दाता ( वेनः ) असा तूं आमची याचना ऐक किंवा आम्हांस धन दे. क्रतूयन्ति क्रतवो हृत्सु धीतयो वेनन्ति वेनाः पतयन्ति आदिशः । न मर्डिता विद्यते अन्य एभ्यो देवेषु मे अधि कामा अयंसत ( १०।६४।२ ) = दाते ( क्रतवः = धीतयः = वेनाः =

आदिशः ) धनभांडारांत ( हत्सु ) धन देतात ( क्रतूयन्ति = वेनन्ति = पतयन्ति ); माझ्या सर्व कामना देवांच्या ठायीं गेल्या आहेत ( अयंसत ); त्यांच्याशिवाय साहाय्य करणारा ( मर्डिता ) दुसरा कोणी नाहीं; वेन् ( = देणें ) ह्यापासून वेन शब्द झाला आहे हें ह्या ऋचेवरून स्पष्ट आहे. वेन = हवि देणारा असाही अर्थ आहे; वेना दुहन्ति उक्षणं गिरिष्ठाम् (९।८५।१०) = हवि देणारे ऋत्विज् पर्वतावर असणाऱ्या बैलाचें म्हणजे सोमाचें दोहन करतात. त्रिधा हितं पणिभिर्गुह्यमानं गवि देवासो घृतमन्वविन्दन् । इंद्र एकं सूर्य एकं जजान वेनादेकं स्वधया निष्टतक्षुः ( ४।५८।४ ) = पणींनीं गायींत तीन प्रकारचें घृत लपविलेलें देवांना आढळलें; त्यांपैकीं एक प्रकार इंद्र व दुसरा सूर्य उत्पन्न करता झाला; तिसरा प्रकार देव वेनापासून तासून काढते झाले; एथें वेन हे एका विशिष्ट देवाचें नांव दिसतें; पण तो कोणता देव तें समजत नाहीं; कदाचित् वेन म्हणजे सोम असेल; ह्या ऋचेखेरीज जींत वेन म्हणजे एक विशिष्ट देव असें म्हणावें लागतें अशी दुसरी ऋचा नाहीं. बहुतेक ऋचांत वेन म्हणजे धन देणारा किंवा हवि देणारा असा अर्थ आहे; प्रस्तुत ऋचेंत वेन हा सोम असावा. पृश्नि = तांबुस रंगाचे हा मूळ अर्थ; मरुतांच्या आईला पृश्नि हें नांव पडण्याचें कारण तिच्यांत विशेष प्रकारचा तांबुस रंग होता हें; कांहीं विशिष्ट प्रकारच्या गायींनाही पृश्नि म्हटलें आहे; अग्नि ( ४।३।१० ), बेडूक ( ७। १०३।४, ६ व १० ), सोम ( ८।७।१० ॥ ९।८३।३ ) व सूर्य ( १०-१८९।१ ) ह्यांना पृश्नि म्हटलें आहे. ताः ध्वान्तात् उदरन्त गर्भाः ( १०।७३।२ ) = अन्धकाराच्या ( ध्वान्तात् ) पोटांत असलेल्या ( गर्भाः ) त्या ( ताः ) गायी म्हणजे उषा बाहेर ( उत् ) आल्या ( अरन्त ). अग्नीला अपां गर्भः म्हणजे पाण्याच्या पोटांत असलेला असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे. प्रस्तुत ऋचेंत पृश्नेः गर्भाः = गायीच्या पोटांत असलेल्या दुधाच्या धारा. जरायु शब्द फक्त तीन वेळां ऋग्वेदांत आला आहे; १०।१०६।६ ही ऋचा अगदीं दुर्बोध असल्यामुळें जरायु शब्दाचा अर्थ ठरवितां येत नाहीं. एवा त्वं दशमास्य सहावेहि जरायुणा ( ५।७८।८ ) = त्याप्रमाणें, हे दहा महिन्याच्या गर्भा, जरायूसह तूं मातेच्या उदरांतून खालीं ये. ज्योतिः जरायु यस्य सः ज्योतिर्जरायुः = ज्याच्याभोंवतीं प्रकाशाचें आवरण आहे असा; सोमरस सूर्यासारखा प्रकाशतो असें नवव्या मंडळांत कांहीं ठिकाणीं म्हटलें आहे. सहस्रोतिः शतामघो विमानो रजसः कविः । इंद्राय पवते मदः ( ९।६२।१४ ) = अतिशय धनवान् (सहस्रोतिः = शतामघः व धनाचा ( रजसः ) दाता ( विमानः = कविः ) सोम ( मदः ) इंद्रासाठीं शुद्ध होत आहे. रजसो विमानं सप्तचक्रं रथं० पञ्चरश्मिम् ( २।४०।३ ); एथें रथाला रजसो विमानं म्हणजे द्युलोक मोजणारा म्हणजे द्युलोकाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकाला जाणारा असें म्हटलें आहे. अन्तरिक्षप्रां रजसो विमानीं० उर्वशीम् ( १०।९५।१७ ); एथें उर्वशीला द्युलोक व्यापणारी असें म्हटलें आहे. अग्नि ( ३।२६।७ ), वरुण ( ७।८७।६ ), हिरण्यगर्भ ( १०।१२१।५ ), विश्वावसु ( १०

१३९।५ ) ह्यांनाही रजसो विमानः हें विशेषण लावलें आहे; त्याचा अर्थ धन देणारा किंवा प्रकाश देणारा असा असेल. रजसो विमाने ह्याचा कांहींही अर्थ होत नाहीं; कारण ऋचेंतील कोणत्याही शब्दाचें विमाने हें विशेषण होत नाहीं; तेव्हां रजसो विमानः असाच मूळ पाठ असावा व त्याचा अर्थ प्रकाश देणारा असा होईल; ज्योतिर्जरायुः = रजसो विमानः ; कदाचित् धन देणारा किंवा द्युलोकीं संचार करणारा असाही अर्थ असेल. पहिल्या अर्धाचा अर्थः—अति प्रकाशमान् ( ज्योतिर्जरायुः = रजसो विमानः ) असा हा ( अयं ) सोम (वेनः) गायींच्या पोटांत असलेल्या ( पृश्निगर्भाः ) दुधाच्या धारा बाहेर हाकलून आणतो ( चोदयत् ) म्हणजे आपल्या रसांत मिसळण्यासाठीं गायींचें दूध काढतो. सूर्यस्य शिशु असें सोमाला म्हटलें असावें;कारण सोमरस पाण्यांत मिसळण्यानें ( अपां संगमे ) व त्यांत दूध घातल्यानें सूर्यासारखा प्रकाशतो. गायी जशा वासराला जिभेनें चाटतात तसे स्तोते ( विप्राः ) स्तुतिरूप जिभांनीं ( मतिभिः ) ह्या सोमाला ( इमं ) चाटतात ( रिहन्ति ) म्हणजे त्याची नानाप्रकारें स्तुति करतात. सूर्यस्य ह्या शब्दाचा संगमे ह्याच्यांशीं अन्वय केल्यास सोमाचा सूर्याशीं समागम होतो असा अर्थ होईल; सोमरसांत पाणी घालतात ही गोष्ट निर्विवाद आहे; पण त्यांत सूर्य घालतात असें इतरत्र कोणत्याही ऋचेंत आढळत नाहीं; कदाचित् सूर्यासारखें तेज घातल्यानें असा सूर्यस्य संगमे ह्याचा अर्थ होईल; सोमरसांत दूध व पाणी मिसळणें म्हणजे त्यांत सूर्यप्रकाशच जणूं काय घालणें असें कवीस म्हणावयाचें असेल. उत न ईं मतयो अश्वयोगाः शिशुं न गावः तरुणं रिहन्ति ( १।१८६।७ ), शिशुं रिहन्ति मतयः ( ९।८५।११ ) व अंशुं रिहन्ति मतयः ( ९।८६।४६ ) ह्या तीन उताऱ्यांत स्तुति चाटतात असें म्हटलें आहे; पण प्रस्तुत ऋचेंत स्तोते स्तुतींनीं चाटतात असा विलक्षण वाक्यप्रयोग केला आहे. न ह्याचा आणि किंवा तावडतोब असा अर्थ केल्यास दुसऱ्या अर्धाचा पुढीलप्रमाणें अर्थ होईलः—आणि ( न ) पाणी मिसळल्याबरोबर ( अपां संगमे ) हा सूर्यपुत्र जो सोम त्याला स्तोते स्तुतींनीं चाटतात म्हणजे त्याची भरपूर स्तुति करतात; न म्हणजे आणि असा अर्थ न केल्यास पाण्यांत मिसळण्यानें सूर्यासारख्या प्रकाशणाऱ्या सोमरसाची तावडतोब ( न ) स्तुति करतात असा अर्थ होईल.

**असुनीतिः ( २५ ) असून् नयति । तस्य एषा भवति**

प्राणांना ( असून् ) नेतो ( नयति ) म्हणून तो असुनीति. दुर्ग म्हणतोः—हा प्राण घेऊन जाणारा इंद्र म्हणजे मुख्य प्राण; जेव्हां हा मुख्य प्राण शरीरांतून बाहेर जातो तेव्हां तो आपल्याबरोबर इतर प्राणानांही घेऊन जातो; बृहदारण्यकोपनिषदांत् ( ४।४।२ ) प्राणम् अनूत्क्रामन्तं सर्वे प्राणाः अनूत्क्रामन्ति म्हणजे मुख्य प्राण बाहेर जाऊं लागला कीं इतर प्राणहि त्याच्या पाठीमागून बाहेर जातात.

## खंड ४० वा.

**असुनीते मनो अस्मासु धारय जीवातवे सु प्र तिरा न आयुः।**
**रारन्धि नः सूर्यस्य संदृशि घृतेन त्वं तन्वं वर्धयस्व ( ऋ० सं० १०।५९।५ )**
**असुनीते मनः अस्मासु धारय। चिरंजीवनाय प्रवर्धय च नः आयुः। रन्धय च नः सूर्यस्य संदर्शनाय। रध्यतिः वशगमने अपि दृश्यते। मा रधाम द्विषते सोम राजन् ( ऋ० सं० १०।१२८।५ ) इत्यपि निगमः भवति। घृतेन त्वम् आत्मानं तन्वं वर्धयस्व**

जीवातवे = चिरंजीवनाय. सु निरर्थक; सु = सुष्टु (दुर्ग). प्र तिरा = प्र तिर + आ; प्रतिर = प्रवर्धय; आ = च. रारन्धि = रन्धय; रारन्धि = संसाधय ( दुर्ग ) = ( आम्हांला ) सिद्ध म्हणजे समर्थ कर; रध हिंसासंराद्ध्योः ( धा० ४।८७ ); रध् = (१) हिंसा करणें, (२) निष्पन्न करणें; संराद्धि = निष्पत्ति. दुर्गवृत्तींत रन्धय नाहीं; तें रूप पाणिनीसूत्रानें सिद्ध होत नाहीं. च अध्याहृत. संदृशि = संदर्शनाय; जेणें करून आम्ही सूर्यदर्शन घेण्यास समर्थ होऊं तशा रीतीनें आम्हांवर अनुग्रह कर ( दुर्ग ). तन्वं = आत्मानं = स्वतःला; तूं स्वतःला उदकानें वाढीव; असुनीतीला हवि द्यावयाचा नसतो म्हणून त्याला उदकानें संतुष्ट करावयाचे असें दुर्ग म्हणतो. रध् याचा वश जाणें असाही अर्थ आहे; मा रधाम द्विषते सोम राजन् = हे सोम राजा, आम्ही शत्रूला वश जाणार नाहीं असें कर; एथें रध् = वश जाणें. दुर्गानें केलेला अर्थः— हे असुनीति, आम्ही फार दिवस जगावें म्हणून मन वगैरे सर्व प्राण आमच्यांत स्थिर ठेव व आमचें आयुष्य अतिशय वाढीव; सूर्यदर्शनासाठीं आम्हांला शरीरानें समर्थ कर; तूं आपल्या स्वतःला उदकानें वाढीव.

**सायण**:— असुनीते = मनुष्याणाम् असूनां नेत्रि देवि = मनुष्यांचे प्राण नेणारी हे देवि; रारन्धि = स्थापय = ठेव; सूर्यस्य संदृशि = सूर्यस्य चिरसंदर्शने; घृतेन अस्मद्दत्तेन = आम्हीं दिलेल्या घृतानें; घृत म्हणजे उदक असें एथें म्हटलें नाहीं; जीवातवे ह्याचा अन्वय दुर्ग धारय ह्याच्याशीं करतो पण सायणाचार्य त्याचा अन्वय प्र तिरा न आयुः ह्याच्याशीं करतात. असुनीति हा पुल्लिंगी शब्द समजून मुख्य प्राण असा त्याचा अर्थ दुर्ग करतो; पण तो शब्द सायणाचार्य म्हणतात त्याप्रमाणें स्त्रीलिंगी आहे; असुनीतिम् एताम् ( १०।१५।१४॥१०।१६।२ ) एथें असुनीति स्त्रीलिंगी आहे. अर्चामि वां वर्धायापो घृतस्नू द्यावाभूमी शृणुतं रोदसी मे। अहा यत् द्यावो असुनीतिम् अयन् मध्वा नो अत्र पितरा शिशीताम् ( १०।१२।४ ) = हे उदकदात्या किंवा धनदात्या ( घृतस्नू ) द्यावापृथिवींनो, धनसमृद्ध व्हावें म्हणून ( वर्धाय ) मी तुम्हांला स्तुति ( अपः ) किंवा हवि अर्पण करीत आहे; माझी याचना ऐका; ज्याअर्थीं ( यत् ) दिवस ( अहा = द्यावः ) असुनीतीप्रत गेले आहेत त्याअर्थीं मातापिता द्यावापृथिवी आम्हांस धनानें युक्त करोत; अहा यद्याव: असुनीतिम् अयन् याचा अर्थ कळत नाहीं; पण चवथ्या चरणांत धनयाचना केली असल्या-

मुळें असुनीति याचा धनदान असा अर्थ असेल. ये अग्निदग्धा ये अनग्निदग्धा मध्ये दिवः स्वधया मादयन्ते । तेभिः स्वराळ् असुनीतिमेतां यथावशं तन्वं कल्पयस्व ( १०।१५।१४ ) = ज्यांचा मृतदेह अग्नींत दग्ध झाला आहे व ज्यांचा तसा झाला नाहीं असे जे पितर् द्युलोकीं धनानें ( स्वधया ) आनंद पावत आहेत म्हणजे धन-समृद्ध झाले आहेत त्यांच्यासह, हे मृता, धनाधीश ( स्वराळ् ) तूं अतिशय ( एतां ) धन ( असुनीतिं = तन्वं ) दे ( कल्पयस्व ). शृतं यदा करसि जातवेदो अथेमेनं परि दत्तात् पितृभ्यः । यदा गच्छात्यसुनीतिमेताम् अथा देवानां वशनीर्भवाति (१०।१६।२)= हे अग्नि, जेव्हां तूं या मृताला भाजून टाकशील तेव्हां तूं त्याला पितरांना देवून टाक; जेव्हां हा अतिशय (एतां) धनाप्रत (असुनीतिं) जाईल तेव्हां तो पितरांचे (देवानां) धन देणारा (वशनीः) होईल. असुनीते पुनरस्मासु चक्षुः पुनः प्राणमिह नो धेहि भोगम्। ज्योक् पश्येम सूर्यम् उच्चरन्तम् अनुमते मृळया नः स्वस्ति ( १०।५९।६ ) = हे असुनीति, आमच्याठायीं पुन्हां एकदां चक्षु, प्राण व भोग ठेव; तसें झाल्यास आम्ही द्युलोकीं (उत्) प्रवास करणाऱ्या (चरन्तं) सूर्याला (सूर्यं) पुष्कळ काल (ज्योक्) पाहूं; हे अनुमति, आम्हांला धन (स्वस्ति) दे. प्रस्तुत खंडांतील ऋचा व हे दिलेले चार उतारे अशा पांच ठिकाणींच असुनीति शब्द आला आहे; असु म्हणजे जीव; जीवाप्रत जी नेते ती असुनीति; धन हें मनुष्याचें जीवितच आहे; तेव्हां प्रधानाप्रत नेणारी ती असुनीति म्हणजे धन देणारी देवता; धन मिळालें म्हणजे डोळे, प्राण वगैरे सर्व मिळाल्यासारखें होतें; पाहिजे ती भोग्य वस्तु संपादन करतां येते; माणसाचें आयुष्य वाढतें. द्युलोकीं गेलेले पितर् धनानें समृद्ध होतात व तें धन ते आपल्या वंशजांना देतात असें ऋग्वेदांत म्हटलें आहे; जो मृत मनुष्य पितरांना जाऊन मिळतो तोही धनवान् होतो. प्रणीति, वर्पनीति, वामनीति, शर्धनीति, सहस्रनीति, सुनीति ह्या सर्वांचा अर्थ धनाप्रत नेणें; प्र = वर्प = वाम = शर्ध = सहस्र = सु = धन. प्रस्तुत ऋचेचा अर्थः —हे असुनीति, आमच्याठायीं मन म्हणजे जीव ठेव; आम्हीं फार दिवस जगावें म्हणून आमचें आयुष्य अतिशय वाढीव; सूर्याच्या प्रकाशांत (सन्दृशि) आम्हांस कायमचे ठेव (रारन्धि); आमचें शरीर घृतानें बळकट कर; एथें असु, मनस्, आयुः, जीवातु, घृत व तनु ह्यांचा गूढार्थ धन. रारन्धि ह्यांत रम् (= थांबविणें, कायम ठेवणें) हा धातू आहे; रम् अभ्यासानें रारम्; रारम् + धि = रारन्धि = थोपवून किंवा थांबवून ठेव; ज्योक् पश्येम सूर्यम् उच्चरन्तं व रारन्धि नो सूर्यस्य संदृशि ह्यांचा अर्थ एकच. १०।५९ या सूक्ताच्या पहिल्या चार ऋचांच्या शेवटीं परातरं सु निर्ऋतिर्जिहीतां हे शब्द आहेत; त्या शब्दांचा निर्ऋति अगदीं दूर दूर पळून जावो असा अर्थ आहे; निर्ऋति म्हणजे नरक, मृत्यु, दारिद्य किंवा सुखाचा अभाव; ह्या ऋचांत दाता आम्हांस धन देवो, आमचें धन दिवसेंदिवस वाढो, हे सोमा, आम्हांला मृत्यूच्या ताब्यांत देवूं नको असें म्हटलें आहे. निर्ऋति ही कष्टदायक देवता आहे; तिच्या उलट असुनीति होय. उत् ईर्ध्वं जीवो असुर्न आगात्

अप प्रागात् तम आ ज्योतिरेति। आरैक् पन्थां यातवे सूर्याय अगन्म यत्र प्रतिरन्त आयुः (१।११३।१६) = हे उषांनो, वर या म्हणजे उगवा; आमचा जीव आमच्याकडे आला आहे; तम निघून गेलें आहे; प्रकाश येत आहे; रात्र सूर्याला प्रवासाकरितां मार्ग रिकामा करून देत आहे; जेथें उषा आयुष्य वाढवितात अशा ठिकाणीं आम्ही गेलो आहो. रात्रीं जणूं काय मनुष्य मृत असतो; पण उषा उगवतांच जीव परत येतो. रात्रीं मृतवत् झालेल्या मनुष्यांना उषा जीवाकडे नेते म्हणून उषा ही असुनीति; तेव्हां प्रस्तुत ऋचेचा प्राथमिक अर्थ पुढीलप्रमाणेः-हे जीवाकडे नेणारे उषे, रात्रीं जो आमचा जीव निघून गेला आहे तो जीव (मनः) आमच्याठायीं प्रस्थापित कर; आम्ही फार दिवस जगावें म्हणून आमचें आयुष्य वाढीव; सूर्याच्या प्रकाशांत आम्हांस कायमचे ठेव; घृतानें आमचें शरीर पुष्ट कर. गूढार्थ वर दिलाच आहे. असुनीति ही स्वतंत्र देवता नसून उषाच असावी.

**ऋतः (२६) व्याख्यातः (२।२५)। तस्य एषा भवति**

ऋत शब्दाची व्युत्पत्ति पहा (पान १४४).

ऋतं म्हणजे उदक असें तेथें म्हटलें आहे; ऋतः = उदक आहे ज्याच्याजवळ असा अन्तरिक्षांतील ऋत नांवाचा देव. त्वमित् सप्रथा असि अग्ने त्रातर् ऋतः कविः (८।६०।५) व पवमान ऋतः कविः सोमः पवित्रमासदत्। दधत् स्तोत्रे सुवीर्यम् (९।६२।३०) असा ऋतः हा शब्द फक्त दोन ऋचांत आला असून पहिलींत तो अग्नि व दुसरीत सोम ह्याचें विशेषण आहे; ऋत हा अन्तरिक्षांतील विशिष्ट देव असें मानण्यास पुरावा नाहीं. ऋतेन ऋताय ऋतस्य वगैरे सविभक्तिक रूपें नपुंसकलिंगी ऋतं ह्याचींही होतील; पुल्लिंगी ऋत ह्याचीं तीं रूपें आहेत असें म्हणण्यास काय आधार आहे?

## खंड ४१ वा.

**ऋतस्य हि शुरुधः सन्ति पूर्वीर्ऋतस्य धीतिर्वृजिनानि हन्ति।**

**ऋतस्य श्लोको बधिरा ततर्द कर्णा बुधानः शुचमान आयोः(ऋ० सं० ४।२३।८)**

**ऋतस्य हि शुरुधः सन्ति पूर्वीः। ऋतस्य प्रज्ञा वर्जनीयानि हन्ति। ऋतस्य श्लोकः बधिरस्यापि कर्णौ आतृणत्ति। बधिरः बद्धश्रोत्रः। कर्णौ बोधयन् दीप्यमानश्च आयोः अयनस्य मनुष्यस्य। ज्योतिषो वा। उदकस्य वा**

शुरुधः=जल. पूर्वीः=अनेककाल सम्भृताः(दुर्ग)=दीर्घ काल जमा झालेलें (जल). धीतिः=प्रज्ञा. वृजिनानि=वर्जनीयानि=वर्ज करण्याजोगीं दुष्कृत्यें. दुर्ग म्हणतोः—ऋतदेव उदकानें समृद्ध असल्यामुळें दुष्काळ येऊं देत नाहीं; त्याची बुद्धि इतकी विलक्षण असते कीं दुर्भिक्षांत क्षुधेनें गांजलेले लोक वाईट कृत्यें करतात तीं त्यांनीं करूं नयेत म्हणून तो योग्य वेळीं पाऊस पाडून धान्य उत्पन्न करतो. श्लोकः=गडगडाट (दुर्ग). बधिरा= बधिरस्यापि. आततर्द = आतृणत्ति = आभिनत्ति ( दुर्ग ) = पूर्णपणें फोडतो म्हणजे

ऐकावयास लावतो. बधिरः = बद्धश्रोत्रः = ज्याचे कान जन्मापासून बांधले आहेत म्हणजे ज्याला ऐकूं येत नाहीं असा मनुष्य; बद्धौ कर्णौ अस्य बधिरः ( अमर २।६।४८ क्षीरस्वामी ); बध् = बद्ध; इर हा नामकर्ण प्रत्यय; श्रोत्र किंवा कर्ण अध्याहृत. भाष्यांत कर्णौ दोनदां आहे; एकाचा अन्वय आतृणत्ति ह्याच्याशीं व दुसऱ्याचा बोधयन ह्याच्याशीं. पण बधिरौ हे कर्णौ ह्याचें विशेषण आहे; बधिरौ कर्णौ = बहिरे कान. बुधानः = बोधयन् = जागे करून. शुचमानः = दीप्यमानः; च अध्याहृत. आयोः = अयनस्य; मनुष्यस्य अध्याहृत; मनुष्याला आयु म्हणण्याचें कारण तो गमनशील आहे. किंवा ज्योतिषः = प्रकाशाचे; प्रकाशही आयु म्हणजे गतिमान आहे; किंवा उदकस्य = उदकाचे; कारण उदकही गतिमान आहे. आयोः ह्याचा ज्योतिषः किंवा उदकस्य असा अर्थ केल्यास त्याचा अन्वय श्लोकः ह्याच्याशीं करावयाचा; ज्योतिषः श्लोकः = विजेचा कडकडाट; उदकस्य श्लोकः = पावसाचा आवाज; मुसळधार पाऊस पडतांना कानठळ्या बसतील असा आवाज होतो. दुर्गानें केलेला अर्थः—ऋतदेवाजवळ फार दिवस संचित केलेले ( पूर्वीः ) जल ( शुरुधः ) आहे; ऋत देवाची बुद्धि योग्य वेळीं पाऊस पाडून व धान्य उत्पन्न करून दुर्भिक्षांत वाईट कृत्यांकडे होणारी मनुष्याची प्रवृत्ति किंवा त्याच्या हातून घडणारीं वाईट कृत्यें नाहींशीं करते म्हणजे तीं तो घडूं देत नाहीं; ऋतदेवाचा दीप्तियुक्त गडगडाट मनुष्य किती जरी बहिरा असला तरी त्याचे कान फोडून टाकतो म्हणजे त्यालाही तो गडगडाट ऐकूं येतो; अशा रीतीनें तो गडगडाट बहिऱ्याचेही कान जागे करतो ( बुधानः = बोधयति ); आयोः = ज्योतिषः किंवा उदकस्य असा अर्थ केल्यास ऋतदेव ज्या विजा उत्पन्न करतो किंवा जो पाऊस पडतो त्याचा आवाज इतका प्रचंड असतो कीं तो जन्मापासून बहिरा असलेल्या मनुष्यालाही ऐकूं येतो.

सायण:—ऋत म्हणजे इंद्र किंवा आदित्य किंवा सत्य किंवा यज्ञ; शुरुधः = आपः; पूर्वीः = पुष्कळ; धीतिः = प्रज्ञा तद्विषया स्तुतिर्वा = ऋतदेवाची बुद्धि किंवा स्तुति; वृजिनानि = वर्जनीयानि पापानि; श्लोकः = स्तुतिरूपा वाक्; आयोः = गन्तुः मनुष्यस्य; बधिरा = बधिरौ; बुधानः = बुध्यमानः = जाणलेला.

(१) विद्वान् अग्ने वयुनानि क्षितीनां व्यानुषक् शुरुधो जीवसेधाः(१।७२।७)=पंचजनांचे ( क्षितीनां) धन (वयुनानि) देणारा (विद्वान्) तू, हे अग्नि, आम्हीं धनवान् व्हावें म्हणून (जीवसे) आम्हांस सारखें ( आनुषक् ) धन ( शुरुधः ) दे ( वि + धाः ). (२) त्वं मानेभ्यः इंद्र विश्वजन्या रदा मरुद्भिः शुरुधो गोअग्राः ( १।१६९।८ ) = हे इंद्रा, मरुतांसह असणारा तूं स्तोत्यांना ( मानेभ्यः ) पंचजनांचें ( विश्वजन्याः ) गायींनीं भरलेलें ( गोअग्राः ) धन ( शुरुधः ) दे ( रद ). ( ३ ) इमा अस्य शुरुधः सन्ति पूर्वीः ( ३।३८।५ ) = ह्याच्यापाशीं म्हणजे इंद्रापाशी अतिशय ( इमाः = पूर्वीः ) धन ( शुरुधः ) आहे. ( ४ ) स नो रासत् शुरुधः चंद्राग्राः धियंधियं सीषधाति प्र पूषा ( ६।४९।८ ) = पूषा हिरण्यानें भरलेलें ( चन्द्राग्राः ) धन ( शुरुधः ) आम्हांस देवो

(रासत्); तो अतिशय धन (धियंधियं) देत असतो (सीषधाति). (५) वि नः सहस्रं शुरुधो रदन्तु ऋतावानो वरुणो मित्रो अग्निः (७।६२।३) = धनवान् (ऋतावानः) मित्र, वरुण आणि अग्नि आम्हांस हजारांनीं मोजण्याजोगें धन देवोत (वि रदन्तु). (६) स रासते शुरुधो विश्वधायसो अग्निर्होता गृहपतिः सुवीर्यम् (१०।१२२।१) = होता, गृहपति जो अग्नि तो आम्हांस पुष्कळ (विश्वधायसः) धन (शुरुधः = सुवीर्यं) देतो (रासते). (७) अयामि घोषः इंद्र देवजामिः इरज्यन्त यत् शुरुधः विवाचि (७।२३।२) = हे इंद्रा ज्याअर्थी (यत्) स्तोत्याला (विवाचि) धन (शुरुधः) दिलें जात आहे (इरज्यन्ते) त्याअर्थी तुला आवडणारी (देवजामिः?) स्तुति (घोषः) तुला अर्पण केली जात आहे (अयामि). (८) वृषा शुष्मेण बाधते वि दुर्मतीः आदेदिशानः शर्यहेव शुरुधः (९।७०।५) = अस्त्रानें मारणारा (शर्यहा) धनुर्धारी जसा (इव) शत्रू नाहींसे करतो तसा धन (शुरुधः) देणारा (आदेदिशानः) बलवान् (वृषा) सोम बलानें (शुष्मेण) शत्रूंना (दुर्मतीः) किंवा दारिद्र्याला पार (वि) नाहींसे करतो (बाधते). (९) सूरो न यस्य दृशतिररेपा भीमा यदेति शुचतस्य आ धीः। हेषस्वतः शुरुधो नायमक्तोः कुत्रा चिद्रण्वो वसतिर्वनेजाः (६।३।३) = हे अग्नि, प्रज्वलित झालेल्या (शुचतः) तुझी भयंकर (भीष्मा) ज्वाला (धीः?) जेव्हां (यत्) येते (आ एति) तेव्हां तुझें रूप (दृशतिः) सूर्याच्या रूपासारखेंच निर्दोष असतें; ऋचेचा दुसरा अर्थ दुर्बोध असल्याकारणानें शुरुधः ह्याचा अर्थ करतां येत नाहीं. ह्या नऊ उताऱ्यांत शुरुधः म्हणजे जल असा अर्थ नाहीं (पान४७६पहा). ऋत = (१) उदक, (२) धन, (३) यज्ञ; हे अर्थ बरेच ठिकाणीं आहेत; ह्या तीन अर्थांहूनही अधिक अर्थ असण्याचा संभव आहे; पण अजून ते अर्थ मीं ठरविले नाहींत; ऋत म्हणजे धनवान् किंवा दाता असा प्रस्तुत ऋचेंत अर्थ असावा; धनदात्याजवळ (ऋतस्य) खात्रीनें (हि) पुष्कळ (पूर्वीः) धन (शुरुधः) असतें; धनदात्यानें (ऋतस्य) केलेलें दान (धीतिः) दारिद्र्यासारख्या सर्व टाळण्याजोग्या गोष्टी (वृजि-नानि) दूर करते (हन्ति); धनदात्याची (ऋतस्य = आयोः) देदीप्यमान (शुचमानः) व सर्व लोकांस जागे करणारी (बुधानः) कीर्ति (श्लोकः) बहिर (बधिरा) कान (कर्णा) फोडून आंत शिरते (आततर्द). आ = धन; यु = देणें; आयुः = धन देणारा.

इंदुः (२७) इन्धेः। उनत्तेर्वा। तस्य एषा भवति

इन्ध् (= प्रज्वलित होणें) ह्यापासून किंवा उन्द् (= भिजविणें) ह्यापासून इंदु; सोमरस अग्नीसारखा देदीप्यमान दिसतो व तो पिणाऱ्याचा अन्तरात्मा ओला करतो. इंद्र व इंदु ह्यांत इन्द् (= सत्ता चालविणें) हाच धातु असावा असें मीं पान ७५८ वर म्हटलें आहे.

## खंड ४२ वा.

**प्र तद्वोचेयं भव्यायेन्दवे हव्यो न य इषवान् मन्म रेजति रक्षोहा मन्म रेजति। स्वयं सो अस्मदानिदो वधैरजेत दुर्मतिम्। अव स्रवेदघशंसोऽवतरमव क्षुद्रमिव स्रवेत्** ( ऋ० सं० १।१२९।६ )

**प्रब्रवीमि तत् भव्याय इन्दवे। हवनार्हः इव यः इषवान्। अन्नवान्। कामवान् वा। मननानि च नः रेजयति। रक्षोहा च बलेन रेजयति। स्वयं सः अस्मदभिनिन्दितारं वधैः अजेत दुर्मतिम्। अवस्रवेत् अघशंसः। ततश्च अवतरं क्षुद्रम् इव अवस्रवेत्**

प्र वोचेयम् = प्रब्रवीमि. भव्यः भवनार्हः आत्मवान्। अभिप्रेतानां पात्रभूतः। भव्यः भावनार्हः इव। यो हविषा भावनम् अर्हति न च भाव्यते अहविर्भाक्त्वात् (दुर्ग)= भव्य म्हणजे अस्तित्वाला योग्य म्हणजे स्वतंत्र किंवा स्वावलंबी; सर्व हेतूंचें किंवा इच्छांचें स्थान; सर्व कामना सोमांत वास करतात म्हणजे सोमाच्या साहाय्यानें त्या सफल होतात; किंवा हवि देण्यास सोम जरी पात्र आहे तरी त्याला हवि देत नाहींत म्हणून तो भव्य म्हणजे हवि घेण्याला योग्य; असे भव्य ह्याचे दोन अर्थ दुर्ग करतो. हव्यः न = हवनार्हः इव = इतर देवांप्रमाणें हवि घेण्याला योग्य; तथापि त्याला हवि देत नाहींत. इषवान् = अन्नवान् कामवान् वा = अन्न किंवा इच्छा ज्याच्याजवळ आहेत असा. मन्म = मननानि = प्रज्ञानानि ( दुर्ग ) = बुद्धि. च व नः दोन्ही अध्याहृत. रेजति = रेजयति = आकम्पयति( दुर्ग ) = ( आमच्या बुद्धींना ) कम्प म्हणजे चलन देतो; आम्ही त्याची नित्य स्तुति करावी अशा हेतूनें उपकारकर्ता सोम आमचीं मनें नित्य कम्पित करतो म्हणजे त्याच्या स्तुति आमच्या मनांत नित्य घोळत असतात; किंवा त्याची योग्य स्तुति कशी करतां येईल ही विवंचना मनाला नेहमीं डवचते असा दुर्ग अर्थ करतो. रक्षोहा ह्यानंतरचे च व बलेन हे शब्द अध्याहृत. रेजति = रेजयति. अस्मदानिदः = अस्मद् + आ + निदः = अस्मदभिनिंदितारं = आमची निंदा करणाऱ्याला, आमच्यावर खोटे आरोप करणाऱ्याला. अस्मदानिदः हा शब्द जरी बहुवचन किंवा षष्ठीचें एकवचन आहे असें वाटतें तरी त्याचा दुर्मतिं ह्यामुळें एकवचनी पर्याय दिला आहे. वधैः = वज्रप्रहारैः ( दुर्ग ). अजेत = जयेत् क्षिपेत् वा ( दुर्ग ). अघशंसः = आम्हीं केलेले बारिकसारिकसुद्धां प्रमाद लोकांमध्यें पुकारणारा. अवस्रवेत् = अधोगतीला जावो ( दुर्ग ). अवतरं = ततश्च अवतरं = त्याहूनही खालीं. अव क्षुद्रम् इव स्रवेत् = क्षुद्रम् इव अवस्रवेत्. दुर्गानें केलेला अर्थः—हवि घेण्याला योग्य, स्वसामर्थ्यानें राक्षसांना मारणारा, ज्याच्याजवळ अन्नाची किंवा कामनांची समृद्धि आहे असा जो इंदु आमचीं मनें स्तुति रचण्याकरितां नेहमीं अस्थिर करतो अशा त्या हवि घेण्याला योग्य इंदूला मी सर्व प्रकारच्या इच्छा (तत्) मोठ्यानें प्रकट करतों; स्वतः होऊन तो दुष्टबुद्धि असा जो आमचा निंदक त्याला वज्रप्रहारांनीं जिंको किंवा फेंकून देवो; तो खालीं घसरो इतकेंच नव्हे तर एकाद्या क्षुद्र वस्तूप्रमाणें तो अधिकाधिक खालीं घसरो.

सायण:--भव्याय = दररोज कले कलेनें वाढणाऱ्याला; इन्दवे = अमृताचा वर्षाव करून सर्वांना जो भिजवतो त्या चंद्राला; तत् = पुढें सांगण्यांत येणारें कर्म किंवा स्तुति; प्रवोचेयं = मोठ्यानें कथन करण्यास मी समर्थ होईन; इषवान् = एषणवान् = इच्छांनीं पूर्ण म्हणजे ज्याच्यांत इच्छा आहेत असा; मन्म = मनन करण्याजोगी महत्त्वाची स्तुति किंवा महत्त्वाचें कर्म; रेजति = गच्छति = ( स्तुति ऐकण्याकरितां किंवा महत्त्वाचें काम करण्याकरितां ) जातो; हव्य: न = इंद्राप्रमाणें यज्ञांत हवि घेण्याकरितां बोलावण्याला योग्य; रक्षोहा = यज्ञविघातक राक्षसांना मारणारा; मन्म = अशा राक्षसांना मारण्याचें काम; रेजति = गच्छति । चालयति नाशयति; जातो किंवा नाश करतो असे दोन्ही अर्थ दुसऱ्या रेजति ह्याचे केले आहेत; निद: = अस्मान्निन्दितु: वैरिण: = आमची निंदा करणाऱ्या शत्रूची; अस्मदा = अस्मत् + आ= आमच्यापासून; दुर्मतिं = दुष्ट वासना; अजेत = (आमच्यापासून त्याच्या दुष्ट वासना) दूर फेंकून देवो; अघशंसा = पापांचे म्हणजे घाणेरड्या गोष्टींचें कथन करणारा चोर म्हणजे पाजी मनुष्य; क्षुद्रं = क्षेप्तुं शक्यम् उदकादिकं = पाण्यासारखी फेंकून देण्याजोगी वस्तु; अवतरम् अवस्रवेत् = आपल्या ठिकाणापासून अधोमुख होऊन अतिशय निकृष्ट दशेप्रत जावो म्हणजे त्याचा अध:पात होवो. इंदु म्हणजे चंद्र असा यास्क व सायणाचार्य अर्थ करतात; पण ऋग्वेदांत इंदु म्हणजे सोम असाच अर्थ आहे.

येन भूतं जनयो येन भव्यम् (१०।५५।२), यत्ते भूतं च भव्यं च (१०।५८।१२), यद्भूतं यच्च भव्यम् ( १०।९०।२ ) अशा तीन ठिकाणींच भव्यं हा शब्द आला आहे; भूतं = अस्तित्वांत असलेलें; भव्यं = अस्तित्वांत येणारें; पण भव्याय इन्दवे = अस्तित्वांत येणाऱ्या इन्दूला असा अर्थ बरोबर दिसत नाहीं; कदाचित् अस्तित्वांत येणाऱ्या सोमरसाला म्हणजे सोमापासून काढल्या जाणाऱ्या रसाला असा अर्थ होईल; जेव्हां सोमरस अस्तित्वांत येईल तेव्हां त्याची स्तुति ( तत् ) मी मोठ्यानें उच्चारणार आहें. भूचा कधीं कधीं देणें असा अर्थ होतो; तेव्हां भव = दिलेलें धन; भव्य = धनानें युक्त असा अर्थ योग्य दिसतो. हव्य: = (१) बोलावण्यास योग्य किंवा बोलावला जाणारा; (२) हव = धन; हव्य = धनयुक्त; भगो न हव्य: ( १।१४४।३॥ ३।४९।३॥५।३३।५ ) व भगं न हव्यम् ( १०।३९।१० ) अशी उपमा चार ठिकाणीं आली आहे; भग हा धनवान् देव आहे; तेव्हां इंदु म्हणजे सोम हा धनवान् असल्यामुळें हव्य जो भग त्याच्याशीं त्याची तुलना केली असावी; हव्य: भग: न इव य: इंदु: इषवान् धनवान् = भगाप्रमाणें जो सोम धनवान् आहे. रेज् ह्याचा थरथर कांपणें हा अर्थ बहुतेक ऋचांत आहे; पण तम् उस्राम् इन्द्रं न रेजमानमग्निं गीर्भिर्नमोभिरा कृणुध्वम् ( १०।६।५ ) = इन्द्रासारख्या दात्या ( रेजमानं ) अग्नीला स्तुतींनीं जवळ करा; एथें रेज् म्हणजे थरथर कांपणारा किंवा कांपविणारा असा अर्थ दिसत नाहीं; रेज् = देणें असा अर्थ एथें व प्रस्तुत ऋचेंत असावा; पण ह्या तर्काला

आधार पाहिजे तसा नाहीं. मन्म = (१) स्तुति, (२) धन. रक्षोहा= (१) राक्षसांना ठार करणारा, (२) दारिद्र्य हाकलून देणारा. सोम भगासारखा अतिशय श्रीमान् असल्यामुळें तो धन देतो व दारिद्र्य घालवितो म्हणून त्याची मोठ्यानें स्तुति करावयाची. निदः व निदे अशीं दोनच रूपें निद् शब्दाचीं आहेत; निद् = ( १ ) शत्रु, (२) दारिद्र्य. अग्निर्हि विद्मना निदो देवो मर्तम् उरुष्यति ( ६।१४।५ ) = (१) देवअग्नि आपल्या बुद्धीनें मनुष्याचें शत्रूपासून ( निदः ) रक्षण करतो; (२) धनवान् ( देवः ) दाता ( अग्निः ) धन देऊन ( विद्मना ) दरिद्र्याला ( मर्त ) दारिद्र्यापासून ( निदः ) दूर ठेवतो ( उरुष्यति ). युवं० विश्वा तमांस्यहतं निदश्च ( ६। ७२।१ ) = तुम्हीं सर्व अन्धःकार व शत्रू म्हणजे दारिद्र्य ठार केलें आहेत; तमांसि =निदः=शत्रू म्हणजे दारिद्र्य. आ नो विश्वानि अश्विना धत्तं राधांसि अह्रया। कृतं न ऋत्वियावतो मा नो रीरधतं निदे (८।८।१३) = हे अश्विनांनो, क्षय न पावणारे ( अह्रया ) असें अतिशय ( विश्वानि ) धन ( राधांसि ) आम्हांस द्या; आम्हांस धनवन्त करा; आम्हांला शत्रूच्या म्हणजे दारिद्र्याच्या ताब्यांत देऊं नका. प्रस्तुत ऋचेंत निदः = दुर्मतिं = ( १ ) शत्रूला, ( २ ) दारिद्र्याला; तो सोम स्वतः होऊन ( स्वयं ) आमच्यापासून ( अस्मद् आ ) वज्राच्या प्रहारांनीं ( वधैः ) शत्रु ( निदः = दुर्मतिं ) हाकलून देईल ( अजेत ). स हि ष्मा दानमिन्वति वसूनां च मज्मना। स नः त्रासते दुरितात् अभिह्रुतः शंसात् अघात् अभिह्रुतः (१।१२८।५) = तो म्हणजे अग्नि आपल्या अतिशय धनांतून ( वसूनां मज्मना ) धन ( दानं ) देतो ( इन्वति ) व आमचें दारिद्र्यापासून रक्षण करतो; दुरितात् = अभिह्रुतः=अघात् = शंसात् = दारिद्र्यापासून. मा नो अग्ने अवसृजः अघायाविष्यवे रिपवे दुच्छुनायै (१।१८९।५)=हे अग्नि, आम्हांला चोरांच्या ताब्यांत देऊं नकोस; अघाय = अविष्यवे = रिपवे = दुच्छुनायै = शत्रूला किंवा दारिद्र्याला. अव क्रन्द दक्षिणतो गृहाणां सुमंगलो भद्रवादी शकुन्ते। मा नः स्तेन ईशत माघशंसो ( २।४२।३ ) = हे पक्ष्या, मंगलदायक व चांगले बोलणारा तूं आमच्या घरांच्या उजव्या बाजूला ओरड; शत्रूला आमच्यावर सत्ता चालवूं देऊं नकोस; रिपुः = अघशंसः = शत्रु किंवा चोऱ्या करून दारिद्र्य आणणारा. अघं दारिद्र्यं शंसति = जो दारिद्र्य पुकारतो तो. क्षुद् = वाहणें; ह्यापासून क्षुद्र व क्षोदस्; दोहोंचा अर्थ जल; यत्प्रायासिष्ट पृषतीभिरश्वैर्वीळुपविभिर्मरुतो रथेभिः। क्षोदंत आपो रिणते वनानि० वृषभः क्रंदतु द्यौः ( ५।५८।६ ) = हे मरुतांनो, तुम्हीं जेव्हां लाल घोड्या व घोडे ह्या निशीं व ज्याच्यामध्यें वज्र ठेवलें आहे अशा रथानिशीं बाहेर जातां तेव्हां नद्या ( आपः ) भराभर वाहूं लागतात ( क्षोदन्ते ), अरण्ये ( वनानि ) पळूं लागतात ( रिणते ) व द्यु एवढा बळकट असूनहि ( वृषभः ) ओरडावयाला लागतो. आम्हांला त्रास देणारा शत्रु ( अघशंसः ) खालीं खालीं ( अव ) घसरत जावो (स्रवेत्); पाण्याप्रमाणें (क्षुद्रम् इव) तो अगदीं खालीं खालीं (अव अवतरम्) घसरत जावो म्हणजे त्याचा सर्वस्वीं नाश होवो.

**अभ्यासे भूयांसम् अर्थं मन्यन्ते। यथा। अहो दर्शनीय अहो दर्शनीय। इति। तत् परुच्छेपस्य शीलम्। परुच्छेपः ऋषिः। पर्ववत् शेपः। परुषि परुषि शेपः अस्य इति वा। इति इमानि सप्तविंशतिः देवतानामधेयानि अनुक्रान्तानि। सूक्तभाञ्जि हविर्भाञ्जि। तेषाम् एतानि अहविर्भाञ्जि। वेनः असुनीतिः ऋतः इंदुः**

त्याच शब्दाची किंवा शब्दांची पुनरुक्ति केली असतां ( अभ्यासे ) अधिक ( भूयांसं ) अर्थ उत्पन्न होतो असे ज्ञाते म्हणतात; जसें अहो दर्शनीय अहो दर्शनीय ह्या दिरुक्तीनें सौंदर्याची अतिशय वाखाणणी केली जाते; किती सुंदर किती सुंदर असें म्हटल्यानें सौंदर्याविषयीचें आश्चर्य द्विगुणित होतें. प्रस्तुत ऋचेंत रेजते व अवस्रवेत् ह्यांची द्विरुक्ति आहे; रेजते रेजते = देतोच देतो; अवस्रवेत् अवस्रवेत् = खालीं जाणारच जाणार; असा द्विरुक्तीनें अर्थाला जोर येतो. सोळाव्या खंडांत जामि म्हणजे पुनरुक्ति ह्या विषयीचीं तीन मतें दिलीं आहेत ( पान ७७२ ); तेथें हा विचार करावयास पाहिजे होता; कारण तेथेंही मण्डूका इवोदकात् मण्डूका उदकादिव अशी शब्दांचीच पुनरुक्ति आहे. अशी द्विरुक्ति परुच्छेप ऋषीनें पाहिलेल्या म्हणजे रचिलेल्या ऋचांत नेहमीं दिसून येते; तें त्याच्या लिहिण्याचें शील म्हणजे विशेष होय. पहिल्या मंडळांतील १२७ ते १३९ हीं सूक्तें परुच्छेपाचीं होत; त्यांत हा विशेष स्पष्ट दिसून येतो. वाक्यादेः आमन्त्रितस्य असूया - संमति - कोप - कुत्सन - भर्त्सनेषु ( पा० ८।१।८ ) ह्या सूत्रानें संबोधनाची द्विरुक्ति केल्यानें असूया, आदर, कोप, हेटाळणी व निर्भर्त्सना ह्या भावना प्रकट केल्या जातात असें सांगितलें आहे; यास्कानें ह्यांपैकीं एकच भावना निर्दिष्ट केली आहे. संबोधनाखेरीज वाक्यांतील इतर शब्दांचीही द्विरुक्ति निरनिराळ्या भावना दाखविण्याकरितां केली असते; द्विरुक्ति करण्यांत कोणता उद्देश असतो, मनांत कोणती भावना असते तें त्या त्या प्रसंगावर अवलंबून असतें. परुच्छेप हा एक ऋषी होऊन गेला. परुच्छेपः = परुत् + शेपः; परुत् = पर्व; ज्याच्या शेपाला म्हणजे लिंगाला पेरी आहेत तो; पर्ववान् महान् शेपः ( दुर्ग ) = मोठें किंवा प्रचंड लिंग; किंवा ज्याच्या प्रत्येक पेऱ्यांत (परुषि परुषि) लिंग आहे तो परुच्छेप; योगाभ्यासानें त्यानें सहजरीत्या आपल्या शरीराच्या प्रत्येक सांध्यांत लिंग उत्पन्न केलें असें म्हणतात ( दुर्ग ). परुच्छेप या नांवाच्या अशा व्युत्पत्ति करण्यांत किती आचरटपणा आहे हें यास्क व दुर्ग यांच्या लक्षांत आलें नसावें. अमरांत परुत् शब्दाचा पर्व असा अर्थ नाहीं. इति इमानि० अनुक्रान्तानि = ह्याप्रमाणें सत्तावीस देवतांच्या नांवांचें क्रमानें विवरण केलें आहे; त्यांपैकीं कांहीं सूक्तभाक् व हविर्भाक् आहेत म्हणजे त्या नांवांनीं निर्दिष्ट केलेल्या देवता सबंध सूक्ताच्या देवता असून प्रत्येकीला हवीही दिला जातो; सूक्तभाञ्जि हविर्भाञ्जि हीं देवतानामधेयानि ह्या शब्दाचीं विशेषणें आहेत असें प्रथम दर्शनीं वाटतें; म्हणजे ह्या सर्व सत्तावीस देवतांपैकीं प्रत्येकीला सबंध सूक्त दिलें असून हवीही दिला जातो असा अर्थ होतो; पण तसा अर्थ नाहीं; कारण त्यांपैकीं वेन, असुनीति, ऋत व इंदु ह्यांना हवि दिला

जात नाहीं असें म्हटलें आहे; तेव्हां बाकीच्या तेवीसांना हवि मिळतो असा अर्थ निष्पन्न होतो; वाचस्पति हा ऋग्वेदांतील कोणत्याही सूक्ताचा देव नाहीं. ७।९६ ह्यांतील पहिल्या तीन ऋचांची देवता सरस्वती व शेवटल्या तिहींची सरस्वान् आहे; तेव्हां सरस्वान् हा सूक्तभाक् आहे असें कसें म्हणतां येईल? १०।१७८ ह्यांत तार्क्ष्य हें नांव एकदांच आलें आहे; तथापि तार्क्ष्य हा सर्व सूक्ताची देवता असें म्हटलें आहे. १०।५९ ह्यांतील १–३ ह्या ऋचांची देवता निर्ऋति, चवथ्या ऋचेची निर्ऋति व सोम, ५ व ६ ह्यांची असुनीति, सातव्या ऋचेची लिंगोक्त देवता, ८ व ९ ह्या ऋचेंची द्यावापृथिवी व दहाव्या ऋचेची देवता द्यावापृथिवी व इंद्र असें म्हटलें आहे; तेव्हां असुनीति ही सूक्तभाक् देवता असें म्हणतां येत नाहीं.

**प्रजापतिः ( २८ ) प्रजानां पाता वा पालयिता वा । तस्य एषा भवति**

## खंड ४३ वा.

**प्रजापते न त्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परि ता बभूव ।**
**यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणाम् (ऋ० सं० १०।१२१।१०)**
**प्रजापते न हि त्वत् एतानि अन्यः सर्वाणि जातानि तानि परिबभूव। यत्कामाः ते जुहुमः तत् नः अस्तु । वयं स्याम पतयः रयीणाम् । इति आशीः**

हि अध्याहृत; दुर्गवृत्तींत हि नाहीं. विश्वा = विश्वानि = सर्वाणि. ता = तानि. दुर्गवृत्तींत जातानि नाहीं. दुर्गानें केलेला अर्थः–हे प्रजापति, तुझ्याहून दुसरा कोणी-ही ह्या सर्व देवतारूपांचें परिग्रहण करूं शकत नाहीं ( म्हणजे त्यांना आपल्या सत्तेखालीं आणूं शकत नाहीं; तूंच सर्वत्र आम्हांस दिसतोस; कारण तुझ्या सत्ते-खालीं सर्व देवता आहेत म्हणून आम्हीं म्हणतो कीं ) ज्या धनाच्या इच्छेनें प्रेरित होऊन तुला आम्हीं हवि देत आहोंत तें धन आम्हांस मिळो; आम्ही धनाचे स्वामी होऊं इच्छितों. इति आशीः = अशी आम्हांस आशा आहे. ज्या धनाच्या इच्छेनें वगैरे शब्दांनीं पहिली आशा निर्दिष्ट केली आहे; इति आशीः ह्यानें दुसरी केली आहे असें दुर्ग म्हणतो; पण दोन्ही आशांमध्यें कोणताही भेद नाहीं; दोन्ही एकच; तेव्हां इति आशीः हे शब्द सबंध दुसऱ्या अर्धाला उद्देशून आहेत.

**सायणः**—जातानि = भूतजातानि = प्राणिमात्र; परि बभूव = परि गृह्णाति = व्याप्नोति; ह्या सर्व प्राण्यांना तूंच उत्पन्न करूं शकतोस. १०।१२१ ह्या सूक्तांतील नऊ ऋचांच्या शेवटीं कस्मै देवाय हविषा विधेम असा प्रश्न केला आहे; प्रस्तुत ऋचा त्या प्रश्नाचें उत्तर होय. ( सविता ) भुवनस्य प्रजापतिः ( ४।५।२ ) व पवमानः प्रजापतिः ( ९।५।९ ) एथें प्रजापति म्हणजे धनदाता; सविता व सोम हे धनदाते होत. आ नः प्रजां जनयतु प्रजापतिः ( १०।८५।४३ ) व आ सिञ्चतु प्रजापतिः धाता गर्भं दधातु ते ( १०।१८४।१ ) ह्या दोन ऋचांत प्रजापति हा विशिष्ट देव होय; हाच प्रजापति पौराणिक कालीं त्रिमूर्तींपैकीं एक देव होऊन बसला.

**अहिः ( २९ ) व्याख्यातः ( ३।१७ ) । तस्य एषा भवति**

अहि शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे ( पान १२७ ).

## खंड ४४ वा.

**अब्जामुक्थैरहिं गृणीषे बुध्ने नदीनां रजःसु षीदन् ( ऋ० सं० ७।३४।१६ )**

**अप्सुजम् उक्थैः अहिं गृणीषे बुध्ने नदीनां रजःसु उदकेषु सीदन् । बुध्नम् अन्तरिक्षम् । बद्धाः अस्मिन् धृताः आपः । इदमपि इतरत् बुध्नम् एतस्मादेव । बद्धाः अस्मिन् धृताः प्राणाः इति**

**अब्जां** = अप्सुजं = उदकांत जन्मलेल्यास. **गृणीषे** = स्तौषि ( दुर्ग ) = स्तुति करतोस म्हणजे स्तुति कर. रजःसु = उदकेषु; उदकेषु लब्धव्येषु निमित्तभूतेषु ( दुर्ग ) = उदक मिळावें ह्या हेतूनें; गुर्जर प्रतींत उदकेषु नाहीं. सीदन् = एतस्मिन् कर्मणि अङ्गभावम् उपगच्छन् ( दुर्ग ) = ह्या यज्ञकर्मांत होता असणारा ( तूं ). बुध्नं = अन्तरिक्षम्; अन्तरिक्षाला बुध्न म्हणण्याचें कारण त्याच्यांत ( अस्मिन् ) जल ( आपः ) बांधलेलें ( बद्धाः ) म्हणजे अन्तरिक्षानें धारण केलेलें ( धृताः ) असतें; बुध्नं = बध्नं = बध् + नम्; बध् = बद्धाः; महाराष्ट्रपाठ आपः इति वा असा आहे; पण एथें एकच व्युत्पत्ति असल्याकारणानें वा शब्द प्रक्षिप्त होय. हा जो दुसरा बुध्न शब्द म्हणजे शरीरवाची लौकिक बुध्न शब्द त्याचीही हीच व्युत्पत्ति; कारण त्याच्यांत ( अस्मिन् ) म्हणजे शरीरांत प्राण ( प्राणाः ) बांधलेले ( बद्धाः ) म्हणजे धारण केलेले ( धृताः ) असतात. अप्सुजां, षीदन् व बद्धाः बद्दल बुद्धाः हे गुर्जर-पाठ अशुद्ध आहेत. दुर्गानें केलेला अर्थः–हे स्तोत्या, उदक मिळावें ह्या हेतूनें ( रजःसु ) यज्ञकर्मांत भाग घेणारा ( सीदन् ) तूं पाण्यांत जन्मलेला ( अब्जां ) व अन्तरिक्षांत असलेला ( बुध्ने नदीनां ) जो अहि त्याची स्तुतींनीं ( उक्थैः ) स्तुति करतोस ( गृणीषे ) म्हणजे स्तुति कर.

**सायणः**––अहिं = मेघानाम् आहंतारम् अग्निम्; बुध्ने = स्थाने; रजःसु सीदन् = उदकेषु सीदंतं = उदकांत बसलेल्या ( अहीला ); सायणभाष्यांत गृणीषे ह्याचा पर्याय दिला नाहीं; तेव्हां दुर्गाप्रमाणें गृणीषे म्हणजे स्तुति करतोस असा सायणाचार्यांनीं अर्थ केला असावा.

**यः अहिः स बुध्न्यः । बुध्नम् अन्तरिक्षम् । तन्निवासात् । तस्य एषा भवति**

पुढील खण्डांतील ऋचेंत बुध्न्य शब्द आहे; बुध्न म्हणजे अन्तरिक्ष; तेथें त्याचा निवास असल्याकारणानें अहि हा बुध्न्य. उरु ते ज्रयः पर्येति बुध्नं विरोचमानं महिषस्य धाम (१।९५।९) = हे अग्नि, तुझा विस्तृत ( उरु ) प्रकाश ( ज्रयः ) प्रकाश-णाऱ्या ( विरोचमानं ) द्युस्थानाच्या (बुध्नं= महिषस्य धाम) भोंवतीं ( परि ) किंवा मधून जात आहे ( एति ) म्हणजे अग्नीचा प्रकाश द्युलोकांत सर्वत्र पसरत आहे व त्यामुळें द्युलोक प्रकाशमान झाला आहे. तं देवा बुध्ने रजसः सुदंससं दिवस्पृथिव्योररतिं न्येरिरे ( २।२।३ ) = द्युलोक व पृथिवी ह्यांचा स्वामी ( अरतिं ) व अद्भुत कर्में

करणारा ( सुदंससं ) जो अग्नि त्याला देव द्युलोकीं ( रजसः बुध्ने ) स्थापित करते झाले ( नि + एरिरे ). स जायत प्रथमः पस्त्यासु महो बुध्ने रजसो अस्य योनौ ( ४।१।११ ) = श्रेष्ठ अग्नि द्युलोकीं ( रजसः बुध्ने = अस्य योनौ = पस्त्यासु ) जन्मला. अक्षोदयच्छवसा क्षाम बुध्नं वार्ण वातः तविषीभिरिंद्रः ( ४।१९।४ ) = वारा जसा पाण्याला वेगानें वहावयास लावतो तसा इंद्र स्वबलानें ( शवसा = तविषीभिः ) पृथिवीला ( क्षाम ) व द्यूला ( बुध्नं ) वहावयास म्हणजे पळावयास लाविता झाला ( अक्षोदयत् ). अपो वृत्वी रजसो बुध्नमाशयत् ( १।५२।६ ) = पाण्याला गराडा घालून वृत्र द्युलोक ( रजसः बुध्नं ) व्यापता झाला ( आशयत् ). आ देवो ददे बुध्न्या वसूनि वैश्वानर उदिता सूर्यस्य ( ७।६।७ ) = सूर्य उगवतांच ( सूर्यस्य उदितौ ) वैश्वानर देव द्युलोकचे ( बुध्न्या ) धन ( वसूनि ) घेता झाला ( आददे ). ह्या सर्व उताऱ्यांवरून बुध्नं किंवा रजसो बुध्नं म्हणजे द्युलोक. अहिः बुध्न्यः = द्युलोकीं जन्मलेला अहि; अग्नि हा द्युलोकीं जन्मला व देव त्याला द्युलोकीं स्थापित करते झाले असे वरील दोन उताऱ्यांत म्हटलें आहे; तेव्हां अहि म्हणजे अग्नि असा अर्थ असावा. हिरण्यकेशो रजसो विसारे अहिर्धुनिर्वात इव ध्रजीमान् ( १।७९।१ ) = सुवर्णकेशाचा अहि म्हणजे अग्नि विस्तृत द्युलोकीं (रजसः विसारे) वाऱ्याप्रमाणें (वातः इव ) वेगवान् होऊन ( धुनिः = ध्रजीमान् ) संचार करता झाला. अग्निजिह्वाः ( १।४४।१४ ), अग्निश्रियः ( ३।२६।५ ), अग्निरुपाः ( १०।८४।१ ) हीं विशेषणें मरुतांना लावलीं आहेत; त्याप्रमाणें अहिभानवः ( १।१७२।१ ) हेंही विशेषण त्यांना लाविलें आहे; त्यावरूनही अहि म्हणजे अग्नीच असावा. विश्वेदेवसूक्तांत अहिर्बुध्न्य हें नांव ज्या ऋचांत आलें आहे त्यांत अग्नि हें नांव आलें नाहीं; त्यावरूनही अहिर्बुध्न म्हणजे अग्नि असावा. प्रस्तुत ऋचेंत अब्जाम् अहिं असे शब्द आहेत; जलदेवता ह्या अग्नीच्या माता असें वारंवार ऋग्वेदांत म्हटलें आहे; तेव्हां अब्जाम् अहिं = पाण्यांत जन्मलेल्या अहीला म्हणजे अग्नीला. स्तुषे नरा दिवो अस्य प्रसन्ता अश्विना हुवे जरमाणो अर्कैः ( ६।६२।१ ) = हे दात्या ( नरा ) अश्विनांनो, स्तवन करणारा मी ( जरमाणः ) स्तुतींनीं ( अर्कैः ) तुम्हांला बोलावीत आहें ( हुवे ) व तुमची स्तुति करीत आहें ( स्तुषे ); एथें हुवे सारखें स्तुषे हें प्रथमपुरुषी एकवचनी क्रियारूप आहे; त्याप्रमाणें गृणीषे हेंही प्रथमपुरुषी एकवचनी क्रियारूप होय; गृ + ना + स् ( लेट् चा ) + ए = गृणीषे = मी स्तुति करतों. पाण्यांत जन्मलेला जो अहि त्याची मी स्तुतींनीं ( उक्थैः ) स्तुति करतों ( गृणीषे ). बुध्ने नदीनां रजस्सु सीदन् ह्या शब्दांचा आधींच्या शब्दांशीं अन्वय करणें कठीण आहे; यः अहिः नदीनां बुध्ने रजस्सु सीदन् अस्ति तम् अहिं असा अन्वय केल्यास जो अहि द्युलोकीं ( नदीनां बुध्ने = रजस्सु ) बसलेला असतो त्या अहीला असा त्या शब्दांचा अर्थ होईल; देवांनीं अग्नीला द्युलोकीं स्थापित केलें असें बुध्नसंबंधीं वर दिलेल्या एका उताऱ्यांत ( २।२।३ ) म्हटलें आहे; तोच अर्थ एथें असावा.

## खंड ४५ वा.

**मा नोऽहिर्बुध्न्यो रिषे धान्मा यज्ञो अस्य स्रिधदृतायोः ( ऋ० सं० ७।३४।१७)**
**मा च नः अहिः बुध्न्यः रेषणाय धात्। मा अस्य यज्ञोखा च स्रिधत् यज्ञकामस्य**

च अध्याहृत; दुर्गवृत्तींत च नाहीं व त्याची आवश्यकता नाहीं; कारण मागील खंडांतील ऋचेंत अहि अमुक एक गोष्ट करो असें म्हटलें नाहीं; तींत अहीची मी स्तुति करतों असें म्हटलें आहे व प्रस्तुत ऋचेंत त्यानें अमकें करूं नये अशी विनंति केली आहे. रिषे = रेषणाय = हिंसेला. यज्ञः = यज्ञोखा = अग्निचिति यज्ञांतील उखा; उखा हें फुटूं नये म्हणून चांगलें भाजलेलें मातीचें भांडें अग्निचिति नामक यज्ञांत वापरतात; मित्र एताम् उखां पच। एषा मा भेदि ( तै० सं० ४।१।६ ) = मित्रा, ही उखा फुटूं नये म्हणून हिला चांगली भाजून पक्की कर; मित्र एतां ते उखां परिददामि अभित्त्यै। एषा मा भेदि। इति मित्राय एव एतां परिददाति अभित्त्यै। यदि मित्राय अपरित्ता भिद्येत ( मै० सं० ३।१।८ ) = मित्रा, ही उखा फुटूं नये म्हणून तिला मी तुझ्या स्वाधीन करतों असें म्हणून ती फुटूं नये म्हणून ऋत्विक् उखा मित्राच्या स्वाधीन करतो; मित्राच्या स्वाधीन न केल्यास ती खात्रीनें फुटणार. दुर्गवृत्तींत यज्ञोखा नसून यज्ञः असेंच आहे; यज्ञ कसा फुटेल ही शंका मनांत येऊन प्रक्षेपकानें यज्ञ ह्याच्याबद्दल यज्ञोखा असा शब्द घातला. पण ऋषीच्या मनांत देवतेच्या क्रोधानें यज्ञ पूर्ण होणार नाहीं, तो मध्येंच सोडून द्यावा लागेल अशी शंका आल्यामुळें तो देवतेला प्रार्थना करतो. मा स्रिधत् = मा सुस्रवत्। नित्यम् अविनाशेन वर्तताम् ( दुर्ग ) = वाहून जाऊं नये म्हणजे त्याचा कधींही नाश होऊं नये. स्रिध् = पीडा किंवा नाश होणें ( आपटयांचा कोश ). ऋचेंत यज्ञो अस्य असा क्रम आहे; पण भाष्यांत अस्य हा शब्द यज्ञोखा त्याच्या आधीं घातला आहे. ऋतायोः = यज्ञकामस्य = यज्ञ शेवटास नेण्याची इच्छा करणाऱ्या यजमानाचा. च अध्याहृत. दुर्गानें केलेला अर्थः—अहिर्बुध्न्य आम्हांला हिंसेला न देवो ( म्हणजे कोणीही आम्हांला हिंसा किंवा उपद्रव करणार नाहीं असें करो ); यज्ञकाम जो यजमान त्याचा यज्ञ नाश न पावो.

**सायणः**—बुध्ने अंतरिक्षे भवः बुध्न्यः; अहिश्च असौ बुध्न्यश्च अहिर्बुध्न्यः अग्निः; रिषे = हिंसकाय = हिंसकाच्या स्वाधीन; मा स्रिधत् = न क्षीयेत = क्षय म्हणजे नाश न पावो; अस्य ऋतायोः = अस्य यज्ञकामस्य यजमानस्य; किंवा अस्य अहिर्बुध्न्यस्य इमम् अहिर्बुध्न्यम् उद्दिश्य = ह्या अहिर्बुध्न्याला उद्देशून ( केलेला यजमानाचा यज्ञ नाश न पावो ). यो नो मरुतो वृकताति मर्त्यो रिपुर्दधे वसवो रक्षता रिषः ( २।३४।९ ) = हे धनवान् मरुतांनो, जो शत्रु ( रिपुः ) आम्हांस पीडा ( वृकताति ) देतो त्या शत्रूपासून ( रिषः ) आमचें रक्षण करा. द्यौश्च न पृथिवी च प्रचेतसा ऋतावरी रक्षतामंहसो रिषः ( १०।३६।२ ) = धनवान् ( प्रचेतसा =

ऋतावरी ) दारिद्र्यापासून ( अंहसः = रिपः ) आमचें रक्षण करोत. रिषे = दारिद्र्याला, दारिद्र्याच्या स्वाधीन. ऋतायोः = धनकामस्य. न स जीयते मरुतो न हन्यते न स्रेधति न व्यथते न रिष्यति ( ५।५४।७ ); स्रेधति = रिष्यति = नाश पावतो, दारिद्र्यानें पीडित होतो. ऋचेचा अर्थः—अहिर्बुध्न्य आम्हांस दारिद्र्याच्या स्वाधीन न करो; ह्या धनेच्छु ( ऋतायोः ) यजमानाचा यज्ञ नाश न पावो ( म्हणजे धनप्राप्तीनें त्याचा यज्ञ सफल होवो; त्याला केव्हांही दारिद्र्य न येवो ).

**सुपर्णः ( ३१ ) व्याख्यातः ( ३।१२॥४।३ )। तस्यैषा भवति**

सुपर्ण शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे ( पानें १८८ व २३९ ).

## खंड ४६ वा.

**एकः सुपर्णः स समुद्रमा विवेश स इदं विश्वं भुवनं वि चष्टे।**

**तं पाकेन मनसापश्यमन्तितस्तं माता रेळ्हि स उ रेळ्हि मातरम् (ऋ० सं० १०।११४।४ )**

**एकः सुपर्णः। स समुद्रम् आविशति। स इमानि सर्वाणि भूतानि अभिविपश्यति। तं पाकेन मनसा अपश्यम् अन्तितः। इति ऋषेः दृष्टार्थस्य प्रीतिःभवति आख्यानसंयुक्ता। तं माता रेळ्हि। वाक् एषा माध्यमिका। स उ मातरं रेळ्हि**

एकः = अद्वितीयः ( दुर्ग ) = उडण्यांत ज्याची कोणी बरोबरी करूं शकत नाहीं असा. सुपर्णः = सुपतनः वायुः ( दुर्ग ) = जलदीनें उडणारा म्हणजे वाहणारा वायु. समुद्रं = अन्तरिक्षं ( दुर्ग ). आविवेश = आविशति. इदं विश्वं भुवनं = इमानि सर्वाणि भूतानि. विचष्टे = अभिविपश्यति. पाकेन = विपक्व प्रज्ञानेन = ज्यामधील ज्ञान फार पक्व झालें आहे अशा ( मनानें ). इति ऋषेः० आख्यानसंयुक्ता ( पान ७६५ पहा ); ह्या वाक्याबद्दल दुर्गवृत्तींत पुढील शब्द आहेतः— ऋषिः दृष्टदेवतासतत्त्वः कस्मैचित् आचक्षाणः ब्रवीति = देवतेचें खरें स्वरूप पाहून ऋषि कोणाला तरी सांगण्याच्या इच्छेनें म्हणतो; ह्या दोन्ही वाक्यांचा संबंध तं पाकेन मनसा अपश्यम् अन्तितः ( = त्याला परिपक्व मनानें मी अगदीं जवळून पाहिलें ) ह्याच्याशीं आहे; दुर्गवृत्तींत अन्तितः बद्दल आन्तिकं आहे. माता = माध्यमिका वाक्; अंतरिक्षांतील वाणी वायूला चाटते व वायु तिला चाटतो म्हणजे वाणी व वायु हीं दोघें परस्परांवर अवलंबून असतात; वायूशिवाय शब्द नाहीं व शब्दाशिवाय वायु नाहीं; दोहोंचें तादात्म्य आहे असा दुर्ग अर्थ करतो. रेळ्हि मातरंबद्दल मातरं रेळ्हि असा भाष्यांत क्रम आहे. दुर्गानें केलेला अर्थः— एक म्हणजे अद्वितीय असा वेगानें वाहणारा वायु अन्तरिक्षांत शिरतो व हीं सर्व पंच महाभूतें सर्व बाजूंनीं पाहतो; अतिशय पक्व अशा मनानें मीं त्याला अगदीं जवळून पाहिलें; त्याला त्याची आई चाटीत होती व तो तिला चाटीत होता.

सायण:-एक:=सर्व कार्येषु असहाय:=सर्व कृत्यें करण्यांत ज्याला कोणी सहाय नाहीं असा म्हणजे एकटा सर्व कार्यें करणारा; सुपर्ण:=मध्यमस्थान: देव: वायु:; भुवनं= भूतजातम्; विचष्टे=अनुग्राह्यतया पश्यति=त्यांच्यावर अनुग्रह करण्याच्या बुद्धीनें त्यांच्या कडे पाहतो; पाकेन = परिपक्केन; माता = उदकांना निर्मात्री माध्यमिका वाक्; रेह्ळि= आस्वादयति = त्याचा स्वाद घेते म्हणजे त्याच्यावर ती अवलंबून असते; उ = खलु; ऋचेचा अध्यात्मपरही अर्थ आहे; निराधार अशा ठिकाणीं संचार करणारा परमात्मा आपण निर्माण केलेल्या प्रपंचांत शिरतो; तो सर्व लोक दृष्टोत्पत्तीस आणतो म्हणजे परमात्म्यामुळें जीवात्मे जग विख्यात करतात म्हणजे लोकयात्रा चालवितात; त्या परमात्म्याला परिपक्क झालेल्या मनानें मी जवळ म्हणजे आपल्या हृदयांत पाहिलें; वाणी प्राणाला चाटते म्हणजे प्राणावर अवलंबून असते; झोपेंत वाग्व्यापार बंद झाला तरी प्राणव्यापार चालतो. हा अध्यात्मपर अर्थ ओढाताणीचा असून कांहीं ठिकाणीं सुबोधही नाहीं. एथें सुपर्ण म्हणजे सूर्य असावा; तो सूर्यरूपीं पक्षी समुद्रांत शिरतो म्हणजे अस्तास जातो; दुसऱ्या दिवशीं सकाळीं समुद्रांतून तो पूर्व दिशेला येतो व सर्व जग पहात जातो; माझें मन जरि अपक्क आहे तरी त्याला मीं प्रात:काळीं अगदीं जवळून पाहिलें; त्या वेळेला त्याची माता जी उषा ती त्याला चाटीत होती व तो तिला चाटीत होता. पाक = अपक्क, अज्ञानी; पाक: पृच्छामि (१।१६४।५) = अज्ञानी म्हणून मी विचारतों. स्वयं यजस्व दिवि देव देवान् किं ते पाक: कृणवत् अप्रचेता: (१०।७।६) = हे अग्नि, तूं स्वत: द्युलोकीं देवांना हवि दे; माझ्यासारखा अज्ञानी (पाक: = अप्रचेता:) तुझें काम करील काय? यो मा पाकेन मनसा चरन्तम् अभिचष्टे अनृतेभि: वचोभि: (७।१०४।८) = भोळ्या (पाकेन) मनानें मी इकडे तिकडे हिंडत असतांना मला जो खोट्या गोष्टी सांगून फसवितो. रिह् = लिह्; रिह् + ति = रेढि = रेह्ळि = लेढि.

**पुरूरवा: (३२) बहुधा रोरूयते। तस्यैषा भवति**

पुरूरवा: = पुरु + रवा:; पुरु = बहुधा; रवा: = रोरुयते; जो नाना प्रकारांनीं गर्जना करतो तो पुरूरव म्हणजे अन्तरिक्षांतील एक देव.

## खंड ४७ वा.

**समस्मिन् जायमान आसत ग्ना उतेमवर्धन् नद्य: स्वगूर्ता:।**
**महे यत्त्वा पुरूरवो रणायावर्धयन् दस्युहत्याय देवा: (ऋ० सं० १०।९५।७)**

**समासत अस्मिन् जायमाने ग्ना:। गमनात् आप:। देवपत्न्यो वा। अपि च। एनम् अवर्धयन् नद्य:। स्वगूर्ता: स्वयंगामिन्य:। महते च यत् त्वा पुरूरव: रणाय रमणीयाय संग्रामाय अवर्धयन्। दस्युहत्याय च। देवा: देवा:**

सम् + आसत = समासत. ग्ना: = आप:; जलाला ग्ना म्हणण्याचें कारण जल जातें (गमनात्); ग्ना: = ग्मा: = गमना:; गम् पासून ग्ना; ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत

नाहीं. किंवा ग्नाः = देवपत्न्यः = देवांच्या पत्नी. उत = अपि च. ईम् = एनम्. अवर्धन् = अवर्धयन्; दुर्गवृत्तींत वर्धयन्ति असें आहे. नद्यः = नदनाः आपः = वाहतांना आवाज करणाऱ्या नद्या; किंवा नद्यः = नदनाः = स्तुतिपराः = पुरूरव्याची स्तुति करणाऱ्या. स्वगूर्ताः = स्वयंगामिन्यः = स्वतः होऊन वाहण्यास लागणाऱ्या; स्व = स्वयं; गूर्ताः = गामिन्यः; गुरी उद्यमने ( धा० ६।११५ ); गुर् = उद्युक्त होणें; गुर् + ताः = गूर्ताः = ( वाहण्यास ) उद्युक्त झालेल्या; गामिन्यः हा गूर्ताः ह्याचा अर्थ आहे, व्युत्पत्ति नव्हे. महे = महते. च अध्याहृत; दुर्गवृत्तींत च नाहीं. रणाय = रमणीयाय; रण्=रमणें; संग्रामाय अध्याहृत; रणाय भाष्यांत नको. दस्युहत्याय नंतरचा च अध्याहृत. दुर्गानें केलेले ऋचेचे दोन अर्थः—( १ ) हा पुरूरवस् म्हणजे पावसाळा; तो जन्मास येत असतांना स्वतः होऊन गमन करणाऱ्या ( स्वगूर्ताः ) जलदेवता ( ग्नाः ) त्याच्या भोंवतीं बसल्या ( समासत ) व त्याला वाढविल्या झाल्या ( म्हणजे पावसाळ्यांत पाण्याची समृद्धि हवी तितकी झाली ); हे पुरूरव्या, ज्याअर्थी मेघाशीं उत्तम तऱ्हेचा व प्रचंड ( महते ) संग्राम करण्याकरितां ( रणाय ) व शत्रु जो मेघ त्याला ठार मारण्याकरितां ( दस्युहत्याय ) अन्तरिक्षांतील देव तुला वाढविते झाले ( म्हणूनच तूं जन्मत असतांना जलदेवता तुझ्याभोंवतीं जमल्या ); ( २ ) हा पुरूरव राजा जन्मास येत असतांना देवांच्या पत्नी ( ग्नाः ) स्वयंस्फूर्तीनें प्रेरित झालेल्या ( स्वगूर्ताः ) त्याच्याभोंवतीं जमल्या व त्याची स्तुति करणाऱ्या त्या ( नद्यः ) त्याला वाढविल्या झाल्या; कारण, हे पुरूरव्या, तूं असुरांशीं उत्तम तऱ्हेचा प्रचंड संग्राम करावा म्हणून व त्या शत्रूंना तूं ठार मारावें म्हणून देव तुला वाढविते झाले म्हणजे संग्रामांत तुला पुढें करते झाले. देवाः देवाः ही द्विरुक्ति अध्याय संपला हें दाखविते.

**सायणः**—उर्वशी म्हणते; हा पुरूरव जन्मत असतांना अप्सरा म्हणजे देवांच्या वेश्या त्याच्याभोंवतीं जमल्या व स्वतः अप्सरांच्या स्वाधीन असलेल्या स्वतः होऊन वाहणाऱ्या नद्या त्याला वाढवित्या झाल्या; ज्याअर्थी, हे पुरूरव्या, मोठा व उत्तम तऱ्हेचा संग्राम करण्याकरितां व शत्रूला ठार मारण्याकरितां तुला देव वाढविते झाले; ग्नाः म्हणजे देवपत्नी असा अर्थ केल्यास यज्ञासाठीं पुरूरव वाढत असतांना देवपत्नी त्याच्याभोंवतीं जमल्या; हा दुसरा अर्थ मला कळला नाहीं; नद्या पुरूरव्याला वाढविल्या झाल्या म्हणजे काय? १०।९५ या सूक्तांत उर्वशी व पुरूरवस् ह्यांचा संवाद आहे; त्या संवादाशीं त्या सूक्तांतील कांहीं ऋचांचा संबंध दिसत नाहीं; त्यांपैकीं प्रस्तुत ऋचा होय. स्वगूर्ताः ह्याचा अर्थ लक्षांत येत नाहीं. पुरोळाशं पचत्यं जुषस्वेन्द्रा गुरस्व च। तुभ्यं हव्यानि सिस्रते (३।५२।२) =हे इन्द्रा, भाजलेला पुरोडाश घे (जुषस्व=आगुरस्व); तुझ्यासाठीं सोमहवि वहात आहे. श्रवत् साम गीयमानम्। अभि राधसा जुगुरत् (८।८१।५) = गायिले जाणारे साम ऐको व हवींतून (राधसा) आपला भाग घेवो (अभिजुगुरत्). अभी नो अग्न उक्थमिज्जुगुर्याः द्यावाक्षामा सिंधवश्च स्वगूर्ताः ( १।१४०।१३ ) = हे अग्नि, तूं आमच्या स्तोत्राचा स्वीकार कर ( अभिजुगुर्याः ); द्यावापृथिवी व सिंधु नद्या

स्तुतीनें तृप्त होवोत ( स्वगूर्ताः ). ह्या तीन उताऱ्यांत अभि + गुर् = स्वीकार करणें असा अर्थ असावा; द्यावाक्षामा सिन्धवश्च अभिजुगुर्युः असा अन्वय केल्यास स्वगूर्ताः ह्याचा अर्थ काय करावयाचा? स्वेन गूर्ताः = स्वतःची स्तुति स्वीकृत केली आहे ज्यांनीं अशा असा कदाचित् अर्थ होईल. यथायथा वृष्ण्यानि स्वगूर्ता अपांसि राजन् नर्या विवेषीः (४।१९।१०) = हे राजा इन्द्रा, तूं जसजसा शौर्याचीं कृत्यें (वृष्ण्यानि= अपांसि = नर्याणि ) करतोस; स्वगूर्ता = स्वगूर्तानि; ह्याचा अर्थ स्वतः केलेली असा असेल; पण स्वगूर्त शब्दाचा निश्चित अर्थ कांहीच करतां येत नाहीं. गुर् = हवि देणें, स्तुति करणें असेही अर्थ असावेत पण तेही अर्थ स्वगूर्त शब्दांत दिसत नाहींत. देव पुरूरव्याला प्रचंड रणसंग्राम करण्याकरितां बलिष्ठ करणार होते; तो जन्मत असतांनाच देवांच्या बायका त्याच्या भोंवतीं जमल्या व नद्या त्याला पाजून वाढवित्या झाल्या अशी एकादी कथा असेल.

---

# अध्याय ११ वा.

## खंड १ ला.

श्येनः ( निघण्टु ५।५।१ ) व्याख्यातः ( ४।२४ )। तस्यैषा भवति
श्येन शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ३०२ ).

## खंड २ रा.

**आदाय श्येनो अभरत्सोमं सहस्रं सवाँ अयुतं च साकम्।**
**अत्रा पुरन्धिरजहादरातीर्मदे सोमस्य मूरा अमूरः (ऋ० स० ४।२६।७)**

**आदाय श्येनः अहरत् सोमम्। सहस्रं सवान् अयुतं च सह। सहस्रं सहस्रसाव्यम् अभिप्रेत्य। तत्र अयुतं सोमभक्षाः। तत्संबंधेन अयुतं दक्षिणाः इति वा तत्र पुरन्धिः अजहात् अमित्रान्। अदानान् ति वा। मदे सोमस्य मूराः अमूरः। इति**

श्येनः = इंद्रः ( दुर्ग ). अभरत् = अहरत् ; अभरत् बद्दल दुर्गवृत्तींत अपिबत् आहे. साकं = सह; सहस्रं सवान् अयुतं च सह = हजार व दहाहजार सोमरस ह्यां-सह; श्येन सोम घेऊन आल्यावर त्यानें हजार व दहाहजार सोमरस त्याबरोबर आणिले म्हणजे ज्याच्यापासून कित्येक काल सोमरस मिळेल इतका सोम तो घेऊन आला असा पहिला अर्थ यास्कानें केला असावा. सहस्रं सहस्रसाव्यम् अभिप्रेत्य। तत्र अयुतं सोमभक्षाः। तत्संबंधेन अयुतं दक्षिणा इति वा = किंवा सहस्र शब्दाने सहस्रसाव्य नांवाच्या यज्ञाचा निर्देश अभिप्रेत असेल; त्या यज्ञांत दहाहजार वेळां सोमपान करावयाचें असतें; जितके सोमभक्ष तितक्या दक्षिणा. अतिरात्र नांवाचे याग असतात; अशा दोन अतिरात्रांमध्यें सहस्रसाव्य नांवाचा यज्ञ करावयाचा असतो; त्याला हजार दिवस लागतात; प्रत्येक दिवशीं दहा चमस इतका सोमरस काढून प्यावयाचा असतो. सहस्रं सावाः विद्यन्ते यस्मिन् सः सहस्रसाव्यः = ज्याच्यामध्यें हजार वेळां सोमरस काढावयाचा असतो असा सहस्रसाव्य नांवाचा यज्ञ ( दुर्ग ). सहस्रं सवान् सहस्रं सुत्यानां यत्र कुर्वन्ति अयुतं च दक्षिणाः प्राप्नुवन्ति नतु दीयन्ते सत्रत्वात्। पृष्ठय शमनाभिप्रायं वा दक्षिणा-दानं स्यात् सहस्रसाव्ये सत्रे ( दुर्ग )= सत्रांत हजार सुत्या करावयाच्या असतात म्हणजे हजार वेळां सोमरस काढावयाचा असतो व जितक्यानदां सोमरस काढावयाचा असतो तितक्या दक्षिणा बाजूला काढून ठेवावयाच्या असतात; सत्रांत ऋत्विज् नसतात सगळे यजमानच असतात; ऋत्विज् नसल्यामुळें दक्षिणा देण्याचें कारणच नसतें; रीतीप्रमाणें त्या बाजूला काढून ठेवावयाच्या असतात एवढेंच; किंवा सहस्रसाव्य

नांवाच्या यज्ञांत सोमरस यजमान पितात; मर्त्य असतांना सोमरस पिणें हें पाप होय; कारण सोमरस देवांनींच प्यावयाचा असतो; सोम पिण्यानें उत्पन्न झालेल्या पापाचें क्षालन करण्याकरितां दक्षिणा द्यावयाच्या असतात. पृष्ठय = प्यावयाचा किंवा प्यायलेला सोम; पृष्ठयशमन = मनुष्यांनीं प्यायलेल्या सोमापासून होणाऱ्या पापाचें शमन. यास्क व दुर्ग ह्यांनीं सहस्रं सवान् अयुतं च साकं ह्याचे असे भिन्न अर्थ केले आहेत. दुर्ग म्हणतोः–इति वा ह्यानें विकल्प दर्शविला जातो; विकल्प दोन किंवा अधिक गोष्टींविषयीं असतो तेव्हां सहस्रसाव्य हें विशिष्ट सत्र यास्कानें पहिल्याप्रथम घेतलें नसावें; ज्याच्यांत सहस्र म्हणजे अनेक वेळां सोमरस काढला जातो असा कोणताही यज्ञ होईल व तो यज्ञ सत्र नसल्यामुळें त्याच्यांत हजारों दक्षिणा देण्यास शास्त्राची कोणतीही हरकत नाहीं; सहस्रसाव्य हा शब्द सामान्य यज्ञवाची असेल किंवा विशिष्ट सत्रवाची असेल; असेंही निराळें विवरण दुर्ग करतो. अत्रा = तत्र; अत्रा = अत्र = अस्मिन् सहस्रसाव्ये सत्रे. पुरन्धिः = बहुनः धनस्य दाता ( दुर्ग ); पुरं = पुरु; धि = दाता. अरातीः = अमित्रान् = असुरान् ( दुर्ग ); किंवा अरातीः = अदानान् = हवि किंवा धन न देणाऱ्यांना; रातिः = दान. मदे = तृप्तौ ( दुर्ग ) = सोमरसानें तृप्ति झाल्यावर म्हणजे सोमरस पुष्कळ प्यायल्यानें उल्हसित झाल्यावर. मूराः = मूढाः = मूढान् = अप्रतिपत्तिकान् ( दुर्ग ) = काय करावें हें ज्यांना सुचलें नाहीं अशा मूढावस्थेंत म्हणजे गोंधळलेल्या स्थितींत असलेल्या ( शत्रूंना ). अमूरः = अमूढः = निःसाध्वसः ( दुर्ग ) = ( शत्रु गोंधळून गेल्यामुळें ) निर्भय झालेला. यास्कानें केलेला अर्थः— श्येन सोम घेऊन आला तेव्हां सोमाबरोबर अगणित काळ पुरेल इतका सोमरस तो घेऊन आला; किंवा सहस्रसाव्यसत्राला पुरेल इतका सोम घेऊन आला; सोम घेऊन येतांना अतिशय बुद्धिमान् ( पुरन्धिः ) व शुद्धीवर असलेला म्हणजे गांगारून न गेलेला ( अमूरः ) असा तो श्येन सोम मिळाल्यामुळें हर्ष पावून ( सोमस्य मदे ) गोंधळलेल्या ( मूराः ) अशा शत्रूंना किंवा सोम न देणाऱ्या शत्रूंना ( अरातीः ) मागें टाकता झाला. दुर्गानें केलेला अर्थः—ऋत्विजांनीं सामान्यसहस्रसाव्ययज्ञांत किंवा विशिष्टसहस्रसाव्यसत्रांत दिलेला सोम ( सोमं ) घेऊन ( आदाय ) इंद्र ( श्येनः ) तो पिता झाला ( अभरत् ); अशा सहस्रसाव्ययज्ञांत सोम पिऊन उल्हसित झाल्यावर ( सोमस्य मदे ) पुष्कळ धन देणारा (पुरन्धिः) इंद्र शत्रूंना ( अरातीः ) गोंधळून टाकता झाला ( मूराः ) व तसें करून तो निर्भय झाला ( अमूरः ); किंवा पुष्कळ धन देणारा तो धन न देणाऱ्यांना ( अरातीः ) मागें टाकता झाला ( अजहात् ) म्हणजे अकृपण होऊन कृपणांवर तो ताण करता झाला.

**सायणः**—प्रशंसनीय गति आहे ज्याची असा श्येन पक्षी हजार किंवा दहाहजार म्हणजे अपरिमित यज्ञांना ( सत्रान् ) लागणारें सोमरूपी अन्न घेऊन (आदाय) तें खालीं आणता झाला; असा सोम श्येनानें आणल्यावर अनेक शूर कृत्यें करणारा

(पुरंधिः = बहुकर्मा) व बुद्धिमान् (अमूरः) इंद्र सोमरस प्यायल्यानें हर्ष पावून (सोमस्य मदे) गोंधळलेल्या (मूराः) शत्रूंना (अरातीः) टाकून देता झाला म्हणजे ठार करता झाला. ४।२६ या सूक्तांतील शेवटल्या चार ऋचांत सगळ्या पक्षांत श्रेष्ठ असा श्येन देवांना प्रिय असा सोम मनु करतां म्हणजे मनुष्याकरितां घेऊन आला व त्यानें तो स्वर्गातून चोरून आणला असें म्हटलें आहे. इन्द्र पिब वृषधूतस्य वृष्ण आ यं ते श्येन उशते जभार (३।४३।७); एथें श्येनानें इंद्राकरितां सोम आणला असें म्हटलें आहे. श्येनाभृत म्हणजे श्येनानें आणलेला हें विशेषण सोमाला लावलें आहे (८।९५।३). ४।२७ ह्यांत सोम गुप्त ठिकाणीं लपवून ठेवला होता व तो कोणीं नेऊं नये म्हणून पहारेकरी सतत जागत बसले होते; असें असूनही श्येन पक्षी त्याला चोरून नेता झाला व पाठलाग करणाऱ्यांच्या हातून निसटून गेला; त्यांनीं त्याच्यावर बाण सोडले, त्याचे एकदोन पंखही गळून पडले, तथापि त्यानें सोम हरण केलाच व तो सोम इन्द्राला प्यावयाला मिळाला असें वर्णन आहे; हाच अर्थ प्रस्तुत ऋचेंत आहे. आदाय श्येनो अभरत्सोमं = स्वर्गांत असलेला सोम घेऊन श्येन तो सोम इंद्राला किंवा मनुष्यांना देता झाला. सव = सोमाचा काढलेला रस; सहस्र व अयुत ह्यांचा अर्थ असंख्य, अगणित; श्येन सोम घेऊन आला तेव्हां त्याच्याबरोबर त्यानें अगणित सोमरस आणला; श्येनानें सोम किती आणिला? ह्याला उत्तर अगणित आणला. पुरन्धिः ह्याचा अर्थ किल्ला (पुरं) देणारा (धिः) असा असावा; शतं मा पुर आयसीः अरक्षन् (४।२७।१) = शंभर लोखंडी किल्ले मला रक्षण करीत होते असें सोम म्हणतो; अशा मजबूत व गुप्त ठिकाणीं ठेवलेल्या सोमाचें श्येन हरण करतो व तेथून आणलेला तो सोम मनुष्यांना देतो म्हणून तो पुरन्धि. अशा सोम-प्राप्तीनें हर्ष पावून (सोमस्य मदे) हुषार (अमूरः) असा तो श्येन सावध नसलेल्या (मूराः) रखवालदारांना (अरातीः) ह्या पाठलागांत (अत्रा) फार मागें टाकता झाला (अजहात्); त्यानें इतक्या वेगानें पळ काढला कीं पाठलाग करणारे पाठीमागेंच राहिले.

**ऐन्द्रे च सूक्ते सोमपानेन च स्तुतः। तस्मात् इन्द्रं मन्यन्ते**

ज्या सूक्तांत ही ऋचा आहे त्या सूक्ताची देवता इंद्र; ह्या ऋचेंत श्येन सोम पिऊन तृप्त झाला (सोमस्य मदे) असें म्हटलें आहे (स्तुतः); श्येन सोम पिऊन हृष्ट होतो असें कोठेंही म्हटलें नाहीं; तेव्हां श्येन म्हणजे इंद्र असाच अर्थ असला पाहिजे. हें वाक्य किंवा त्याचें विवरण दुर्गवृत्तींत नाहीं; तेव्हां श्येन म्हणजे इंद्र असें यास्काचें मत होतें असें निश्चित ठरवितां येत नाहीं; सहस्रसाव्यम् अभिप्रेत्य ह्या शब्दांनीं श्येन म्हणजे इंद्र असें कदाचित् म्हणतां येईल.

**ओषधिः सोमः (२) सुनोतेः। यत् एनम् अभिषुण्वन्ति। बहुलम् अस्य नैघण्टुकं वृत्तम्। आश्चर्यम् इव प्राधान्येन। तस्य पावमानीषु निदर्शनाय उदाहरिष्यामः**

विशिष्ट ओषधि ह्याअर्थीं असणारा सोम सु धातूपासून झाला आहे; कारण ( यत् ) त्याचा ( एनं ) लोक रस काढतात ( अभिषुण्वन्ति ); षुञ अभिषवे ( धा० ५।१ ); अभिषव = सोमाचा रस काढणें; सु + महः = सोमः. ओषधि जो सोम त्याचें वर्णन ( वृत्तं ) पुष्कळ ठिकाणीं ( बहुलं ) गौण असतें; प्रधानदेवता म्हणून ( प्राधान्येन ) सोमाचें वर्णन बहुतेक ( इव ) आश्चर्य म्हणजे अगदीं थोडें, क्वचित् येणारें, असें आहे; सबंध नवव्या मंडळाची देवता जरी पवमानसोम आहे तथापि सोमाचें वर्णन किंवा स्तुति त्याच्या स्वतःकरितां नसून इंद्रादि देवांकरितां आहे; सोम म्हणजे सोमरस हा हवि; तो ज्यांना द्यावयाचा असतो ते प्रधान; हवि हा नेहमीं गौण. बहुलं० प्राधान्येन ( पान १४२ पहा ). आश्चर्यमिव ह्यांतील इव शब्दानें प्रधान देवता म्हणून सोमाचें वर्णन एकाद दुसऱ्या ठिकाणीं आलें असेल असें दर्शविलें जातें. सबंध नववें मंडल सोमाचें असून तो त्यांतील सर्व सूक्तांत गौण आहे हें म्हणणें बरोबर दिसत नाहीं; अग्नि देवांना हवि देतो व मनुष्यांना धन देतो; किंवा मनुष्यांकरितां इंद्र वृत्राला मारतो व पाऊस पाडतो म्हणून अग्नि व इंद्र गौण असें कधींही म्हणतां येणार नाहीं; सोमाची स्तुति करा असें पुष्कळ ऋचांत म्हटलें आहे; तेव्हां सोम हा मुख्य देव असलाच पाहिजे. पवमानसंबंधीच्या ऋचांतल्यांपैकीं कांहीं ऋचा त्या सोमाचें स्वरूप स्पष्ट दाखविण्याकरितां ( निदर्शनाय ) आम्ही आतां देणार आहोंत; असलें वाक्य यास्क कधींही घालीत नाहीं; तस्य एषा भवति हे त्याचे नेहमींचे शब्द; तस्य निदर्शनाय ह्या शब्दांचा संबंध ओषधिः सोमः ह्याच्याशीं आहे; सोमाचा रस काढणें, सोमरस शुद्ध करणें वगैरे पुढील खंडांतील ऋचेंत आलें आहे व तशी ती एकच ऋचा यास्कानें उदाहृत केली आहे; म्हणून तस्य एषा भवति हेच शब्द योग्य होत; तस्य० उदाहरिष्यामः हे शब्द प्रक्षिप्त होत.

## खंड ३ रा.

**स्वादिष्ठया मदिष्ठया पवस्व सोम धारया।**
**इन्द्राय पातवे सुतः ( ऋ० सं० ९।१।१ )**

**इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा )। **अथ एषा अपरा भवति। चंद्रमसो वा। एतस्य वा**

ऋचेचा अर्थः—हे सोम, अतिशय मधुर ( स्वादिष्ठया ) व अतिशय आनंद देणाऱ्या ( मदिष्ठया ) धारेनें गाळण्यांतून गळून शुद्ध हो; इंद्राला पिण्याकरितां ( पातवे = पानाय ) तुझा रस काढला आहे. सोमासंबंधीं पुढील आणखी एक ऋचा होय; ती चन्द्रासंबंधीं असेल किंवा ह्याच्यासंबंधानें म्हणजे ओषधिसोमासंबंधानें असेल.

## खंड ४ था.

**सोमं मन्यते पपिवान् यत्संपिषन्त्योषधिम्।**
**सोमं यं ब्रह्माणो विदुर्न तस्याश्नाति कश्चन ( ऋ० सं० १०।८५।३ )**

**सोमं मन्यते पपिवान् यत् संपिंषन्ति ओषधिम्। इति वृथासुतम् असोमम् आह। सोमं यं ब्रह्माणः विदुः। इति। न तस्य अश्नाति कश्चन अयज्वा। इति अधियज्ञम्**

मन्यते = मन्यन्ते व पपिवान् = पपिवांसः अशीं बहुवचनी रूपें दुर्ग आपल्या वृत्तींत घालतो; त्याचें कारण संपिंषन्ति हें बहुवचनी रूप होय. वृथासुतं = व्यर्थ काढलेला; रसायनकर्ते सोमाचा रसायनाकरितां रस काढतात (संपिंषन्ति); तो रस जो कोणी पितो (पपिवान्) तो सोमरस आहे असें तो समजतो; पण औषधाकरितां काढलेला सोमरस सोम नव्हे; तसा काढलेला रस व्यर्थ व तो असोम म्हणजे सोम नव्हे असें ऋषि म्हणतो. संपिंषन्ति = संचूर्णयन्ति = अभिषुत्य पिबन्ति (दुर्ग) = कुटतात म्हणजे सोमरस काढून तो पितात. ब्राह्मणांना (ब्रह्माणः) जो सोम माहीत आहे त्या सोमाचा रस (तस्य) जो यज्ञ करीत नाहीं (अयज्वा) असा कोणताही मनुष्य पीत नाहीं (अश्नाति); सोमरस पिण्याचा अधिकार यज्ञ करणाऱ्यांनाच आहे. असा ऋचेचा यज्ञपर अर्थ आहे; यज्ञम् अधिकृत्य कृतं व्याख्यानम् अधियज्ञम्.

**अथ अधिदैवतम्। सोमं मन्यते पपिवान् यत् संपिषन्ति ओषधिम्। इति यजुःसुतम् असोमम् आह। सोमं यं ब्रह्माणः विदुः चन्द्रमसम्। न तस्य अश्नाति कश्चन अदेवः इति**

जेव्हां सोम म्हणजे चंद्रमा तेव्हां यज्ञांत यजुर्वेदीय मंत्रांनीं काढलेला (यजुःसुतं) सोमरस सोम नव्हे (असोमं) असें ऋषि म्हणतो; यजमान सोम कुटून जो रस काढतात तो रस पिणारा मी सोम म्हणजे चंद्र प्यायलों असें समजतो; पण तो खरा सोम म्हणजे चंद्र नव्हे; जो सोम म्हणजे चंद्र ब्राह्मणांना माहीत आहे त्याची कला (तस्य) देवाखेरीज इतर (अदेवः) कोणीही पीत नाहीं. सोमः नूनम् एषः। तत् देवानाम् अन्नम् इति विज्ञायते (दुर्ग) = हा जो सोम म्हणजे चंद्र तो देवांचें अन्न असें ब्राह्मणग्रंथांत म्हटलें आहे; हें ब्राह्मणवचन मला सांपडलें नाहीं. इति = असें (अधिदैवत विवरण आहे).

**अथ एषा अपरा भवति चंद्रमसः वा। एतस्य वा**

पुढील आणखी एक ऋचा चंद्र किंवा सोम याविषयीं आहे. दिवि सोमो अधि श्रितः (१०।८५।१) = सोम म्हणजे चंद्र हा द्युलोकीं असतो. सोमेनादित्या बलिनः सोमेन पृथिवी मही। अथो नक्षत्राणामेषामुपस्थे सोम आहितः (१०।८५।२) = अदितीचे पुत्र सोमानें बलवान् होत; पृथिवीसुद्धां सोमानेंच मोठी आहे आणि म्हणूनच ह्या सर्व नक्षत्रांच्या मांडीवर किंवा समीप सोम ठेविला आहे; सोमानें म्हणजे चंद्रानें आदित्यांना बळ कसें येतें तें समजत नाहीं; पृथिवी चंद्रप्रकाशांत (सोमेन) मोठी म्हणजे विस्तृत दिसेल. अमरकोशांत (१।२।१५) चंद्राला सोम व नक्षत्रेश म्हटलें आहे; तेव्हां ह्या दुसऱ्या ऋचेंत सोम म्हणजे चंद्र असावा; सोम हा नक्षत्रांच्या मांडीवर ठेवला आहे म्हणजे तो त्यांना अतिशय प्रिय आहे असें

ऋषीला म्हणावयाचें असेल; एकेकाळीं चंद्र सूर्यापेक्षांही दूर व मोठा आहे असें मानीत असत; तेव्हां आदित्य म्हणजे १२ महिन्याचे बारा सूर्य चंद्रामुळें बलिष्ठ होतात असें ऋषीस म्हणावयाचें असेल. प्रस्तुत ऋचेच्या पहिल्या अर्धातला सोम म्हणजे ज्याचा रस काढतात तो; जेव्हां ओषधिसोमाला ऋत्विज् कुटतात व त्याचा रस काढतात तेव्हां तसा काढलेला सोमरस पिणारा मनुष्य सोमाची स्तुति करतो ( मन्यते ); सोमरस प्यायल्यानें त्याला अतिशय हर्ष होतो; दुसऱ्या अर्धातील सोम म्हणजे चंद्र; त्याचा रस कोणी काढीतही नाहीं व पीतही नाहीं.

## खंड ५ वा.

**यत्वा देव प्रपिबन्ति तत आप्यायसे पुनः ।**

**वायुः सोमस्य रक्षिता समानां मास आकृतिः ( ऋ० सं० १०।८५।५ )**

**यत् त्वा देव प्रपिबन्ति ततः आप्यायसे पुनः । इति नाराशंसान् अभिप्रेत्य । पूर्वपक्षापरपक्षौ इति वा**

हे देव सोमा, जेव्हां ऋत्विज् व यजमान तुला पिऊन टाकतात तेव्हां तूं लगेच ( ततः ) पाण्यानें पूर्वीसारखा भरलेला असतोस; असें ऋषि नाराशंस नांवाच्या पात्रांसंबंधानें म्हणतो ( इति नाराशंसान् अभिप्रेत्य ); आप्यायितान् चमसान् सादयन्ति ते नाराशंसाः भवन्ति (आश्व० श्रौ० ५।६) । आप्यायनम् उदकसेकः ( आश्व० श्रौ० ५।१३ ) = आप्यायन म्हणजे भांड्यांत पाणी ओतणें; ज्यांत पाणी ओतलें आहे अशा चमसांना नाराशंस म्हणतात; असें चमस ऋत्विज् व यजमान पाण्यानें भरून ठेवतात. ऋत्विज् व यजमान चमसांतील सोमरसाचा कांहीं भाग प्यायल्यावर ते चमस पुन्हां पाण्यानें भरतात व अशा रीतीनें पुन्हां सोमरस तयार होतो. हा अर्थ ओषधि जो सोम त्यासंबंधीं आहे. पण जेव्हां सोम म्हणजे चंद्र तेव्हां देव चंद्रकला कृष्णपक्षांत पितात व शुक्लपक्षांत चंद्र कलाकलांनीं पूर्ण होत जातो; एथें आप्यायन म्हणजे वृद्धि; पूर्वपक्षांत म्हणजे शुक्लपक्षांत चंद्रकला वाढावयाच्या व अपरपक्षांत त्या कमी व्हावयाच्या असा क्रम सारखा चाललेला असतो. सोमलतेला दररोज एकेक पान ह्याप्रमाणें शुक्लपक्षांत प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत एकंदर पंधरा पानें येतात व कृष्णपक्षांत एक एक पान झडून जाऊन शेवटीं एकही पान रहात नाहीं असा क्रम सारखा चाललेला असतो. सगळ्या सोमलतांना पंधराच पानें असतात; शुक्लपक्षांत दररोज एकेक पान ह्याप्रमाणें पौर्णिमेला पुरी पंधरा पानें होतात व कृष्णपक्षांत एकेक पान जाऊन अमावास्येला सोमलतेवर एकही पान रहात नाहीं असें सुश्रुत नांवाच्या वैद्यकग्रंथांत म्हटलें आहे (अध्याय २९ श्लोक २०-२२). सोमलतेच्या पानांची वाढ व नाश चंद्राच्या कला वाढणें व कमी होणें ह्याच्यावर अवलंबून असतात.

**वायुः सोमस्य रक्षिता । वायुम् अस्य रक्षितारम् आह । साहचर्यात् । रसहरणाद्वा । समानां संवत्सराणां मासः आकृतिः सोमः रूपविशेषैः ओषधिः । चंद्रमाः वा**

वायव्य नांवाच्या पात्रांत सोमरस पिण्यासाठीं ठेवला जातो व त्या पात्रांतून तो सर्व देवांना दिला जातो ( पान ५९८ ); वायु व सोम यांचें असें साहचर्य असल्याकारणानें म्हणजे वायव्यपात्रांतूनच सोमरस देवांना दिल्याकारणानें ( साहचर्यात् ) किंवा वायु म्हणजे वायव्यपात्रें सोमरस हरण करतात म्हणून ( रसहरणात् ) म्हणजे वायव्य पात्रांत सोम ठेविला जातो ह्यामुळें वायु हा सोमाचा रक्षक असें मंत्रदृष्टा म्हणतो. भरवाऱ्यांत सोमलता वाढते, वाऱ्याखेरीज सोमलता जगत नाहीं व वायु सोमलतेचा रस हरण करतो तथापि तिला तो रसहीन करीत नाहीं व वाळूं देत नाहीं म्हणून वायु हा सोमाचा रक्षक असें दुर्ग म्हणतो. सोमाचा म्हणजे चंद्राचाही वायु हा रक्षक; वायु सूर्याचा सुषुम्न नांवाचा रश्मि चंद्राकडे आणून त्याला प्रकाशमय करतो किंवा सुषुम्न नांवाचा रश्मि सूर्याकडे परत नेवून चंद्राला रसहीन म्हणजे प्रकाशहीन करतो; अशा द्विविध कार्यानें वायु सोमाचें म्हणजे चंद्राचें रक्षण करतो; रसहरणात् ह्याचा चंद्रसंबंधीं अर्थ दुर्ग देत नाहीं; पण मी ओढाताणीनें त्याचा अर्थ केला आहे; तो फार समाधानकारक नाहीं. समानां = संवत्सराणाम्; मासः = माता = निर्माता ( दुर्ग ); ओषधिसोम वर्षे निर्माण करतो; चंद्राच्या कलांप्रमाणें सोमलतेचीं पानें वाढतात व कमी होतात; चंद्र जसा महिना मोजतो तसा सोमही महिना मोजतो व असे १२ महिने मोजून दोघेही वर्षे मोजतात. आकृतिः = कर्ता ( दुर्ग ); सोम हा चंद्राप्रमाणें संवत्सरांना निर्माण करणारा ( मासः ) व उत्पन्न करणारा ( आकृतिः ). सूर्यामासौ असा ऋग्वेदांत सामासिक शब्द आहे; त्याचा अर्थ सूर्याचंद्रमसौ; तेव्हां मासः = चंद्रमाः; पण मासः म्हणजे महिना असा अर्थ योग्य दिसतो. रूपविशेषैः = विशेष रूपांनीं; सोमलतेचीं पानें वाढत जातात व कमी होत जातात त्याप्रमाणें चंद्राच्या कला वाढत जातात व कमी होत जातात; त्यामुळें दररोज सोमलतेला व चंद्राला विशिष्ट रूप येत असते; पौर्णिमेचा चंद्र व चंद्रकोर ह्यांत अतिशय ठळक भेद आहे; त्याप्रमाणें एक पानाची सोमलता व पंधरा पानांची सोमलता ह्यांच्यामध्येंही तसाच ठळक भेद आहे; दोघांचीं रूपें दररोज पालटत जातात. ११।३ या खंडांतील स्वादिष्ठया मदिष्ठया ह्या ऋचेचेंही कांहीं विवरणकार चंद्रपर विवरण करतात असें दुर्ग म्हणतो; तें विवरण असें:- हे भगवन् सोम चंद्र स्वादिष्ठया अतिशयेन स्वादुतमया मदिष्ठया अतिशयेन मदयितृतमया पवस्व प्रक्षर धारया प्रत्यहम् एकैकया कलया इन्द्राय सूर्याय पातवे सुतः आपूरितः सुषुम्नेन रश्मिना = हे भगवान् सोमा म्हणजे चन्द्रा, सुषुम्न नांवाच्या किरणानें भरलेला तूं ( सुतः ) इंद्राला म्हणजे सूर्याला पिण्यासाठीं दररोज अतिशय मधुर व अतिशय हर्षदायक अशा धारेचा म्हणजे कलेतून पडणाऱ्या अमृताचा वर्षाव कर. हा अर्थ ओढाताणीचा आहे हें स्पष्ट आहे. प्रस्तुत ऋचेचा पहिला अर्ध चंद्रपरच असावा; तो असाः—हे देव चंद्रा, जेव्हां ( यत् ) देव तुला पिऊन टाकतात ( प्रपिबन्ति ) तेव्हां तूं पुन्हां आपल्या कलांनीं वृधिंगत होतोस ( आप्यायसे ); ह्या अर्थाशीं दुसऱ्या अर्धाचा

काय संबंध आहे तें लक्षांत येत नाहीं. वायु सोमाचें किंवा चंद्राचें रक्षण करतो म्हणजे काय? समा म्हणजे संवत्सर हा अर्थ अर्वाचिन आहे (अमर १।३।२०). सा नः पयस्वती दुहामुत्तरामुत्तरां समाम् (४।५७।७) = दुधानें भरलेली ती आम्हांस एकामागून एक समा देवो; समा = धन? बह्वीः समाः अकरमन्तरस्मिन् (१०।१२४।४) = ह्याच्यांत (अस्मिन् अन्तर्) मी पुष्कळ (बह्वीः) धन (समाः) घातलें आहे (अकरं). अक्षो वश्चक्रा समया वि वावृते (१।१६६।९) = हे मरुतांनो, तुमच्या रथाचा आस (अक्षः) चाकें (चक्रा) एका क्षणांत किंवा वेगानें (समया) गरगर फिरवितो (वि वावृते); समया विश्वमा रजः। सप्त स्वसारः सुविताय सूर्यं वहन्ति हरितो रथे (७।६६।१५) = बहिणी बहिणी अशा सात घोड्या रथांत बसलेल्या सूर्याला सर्व द्युलोकभर (रजः) एका क्षणांत किंवा वेगानें (समया) आमच्या कल्याणाकरितां वाहून नेतात. रोमाणि अव्या समया वि धावति (९।७५।४) = सोमाचा प्रवाह गाळण्यांतून एका क्षणांत किंवा वेगानें धांवत जातो म्हणजे पडतो. प्रस्तुत ऋचेंत समा याचा धन, क्षण व वेग ह्यांपैकीं कोणता अर्थ? मास् ह्याचें बहुवचन मासः; जसें सहस्रं मासः (४।१८।४) व दश मासः (५।४५।७ व ११); पण दश मासान् (५।७८।९) ह्या प्रयोगावरून मास असा अकारान्तही शब्द आहे. आ कृ = जवळ किंवा एकत्र करणें; ह्याच्या उलट अप + आ + कृ = दूर करणें; आकृतिः = जमाव, समूह. महिना (मासः) हा समांचा (समानां) समूह म्हणजे काय? वायुः = दाता; सोमस्य = धनस्य; रक्षिता = दाता; समानां = मासः = धनाचा; आकृतिः = समूह किंवा सांठा. धन (सोमस्य) देणारा (रक्षिता) दाता (वायुः) धनाचा (सोमानां = मासः) सांठा (आकृतिः) आहे; असें चंद्राविषयीं म्हणावयाचें असेल.

**चंद्रमाः (३) चायन् द्रमति। चन्द्रः माता। चान्द्रं मानम् अस्य इति वा। चन्द्रः चन्दतेः कान्तिकर्मणः। चन्दनम् इत्यपि अस्य भवति। चारु द्रमति। चिरं द्रमति। चमेर्वा पूर्वम्। चारु रुचेः विपरीतस्य। तस्य एषा भवति**

चंद्रमाः = चन् + द्रमाः; चन् = चायन् = पाहणारा, पहात; द्रमाः = द्रमति = जातो; आकाशांत असलेला तो सर्व प्राण्यांना पहात जातो; द्रम गतौ (धा० पा० १।४६७). किंवा चन्द्रमाः = चंद्र + माः = माता = मोजणारा; चन्द्र आकाश मोजीत जातो; चन्द्र सर्व निर्माण करतो (माता = निर्माता) असे दुर्ग म्हणतो; किंवा चंद्र = चान्द्रं व माः = मानम्; ह्याच्यामुळें वर्षाचें मान चान्द्र म्हणून तो चंद्रमस्; वर्ष सौर किंवा चांद्र असतें; चान्द्रमान हे चंद्राच्या गतीवर अवलम्बून असतें; चान्द्र शब्द चंद्र शब्दाला तद्धित प्रत्यय लागून झाला आहे; चान्द्रं मानम् अस्य हा विग्रह संवत्सराला योग होईल; संवत्सराला चन्द्रमस् ही संज्ञा कोठेंही दिली नाहीं; चांद्रं मानम् अस्य हा विग्रह वेडावांकडा आहे. चन्द् = शोभणें; चन्द्+रः=चन्द्रः

= शोभणारा; चदि आल्हादे (धा० पा० ११६८); चद् = हर्ष पावणें; शोभणें हा अर्थ धातुपाठांत नाहीं. चन्दन शब्दही ह्याच धातूपासून झाला आहे; चन्दन हा शोभिवंत दिसतो. चन्द्र व चन्दन दोन्ही आल्हाद देतात असें म्हणण्यास काय हरकत आहे? चन्द्रः = चन् + द्रः; चन् = चारु; द्रः = द्रमति; किंवा चन् = चिरम्; किंवा चन् = चम् = पिणें; सुन्दर रीतीनें किंवा शोभेनें (चन् = चारु), किंवा दीर्घकाल (चन् = चिरं) तो आकाशांत संचार करतो; किंवा देवांनीं प्यायला जाणारा (चन् = चं) तो आकाशांत संचार करतो; देव चंद्रकला पितात हें प्रसिद्ध आहे; या शेवटल्या व्युत्पत्तींत चं हें चन्द्र शब्दांतील पूर्वपद होय. रुच् ह्यांतील अक्षरांची उलटापालट केल्यानें चारु शब्द बनतो; रुच् (= शोभणें) = र् + उ + च् = च् + र् + उ = चा + रु = चारु. क्षीरस्वामीः-आल्हादनात् चन्द्रः। असौ मिमीते कालम्। मस्यति परिणमते वा माः = चन्द्र आल्हाद देतो म्हणून त्याला चन्द्र हें नांव; तो काल मोजतो किंवा तो स्वतः रूप बदलतो म्हणून माः; चन्द्रः च असौ माः च चन्द्रमाः; किंवा सत्यभामेला जसे भामा म्हणतात त्याप्रमाणें चंद्रमस् ह्यालाही मास् म्हणतात (अमर १।२।१४). चरति मनः अस्मिन् चारु (अमर ३।१।५२ क्षी०). चन्द्रं चन्दमानं माः निर्माणम् आत्मनः अस्य कर्मणां वा सः चंद्रमाः = ज्याची उत्पत्ति किंवा ज्याची करणी आल्हाददायक आहे तो चन्दमाः; अशी आणखी एक व्युत्पत्ति देवराज देतो; चान्द्रं मानम् अस्य इति चान्द्रमाः। चान्द्रमाः सन् ऱ्हस्वत्वेन चंद्रमाः; मूळ शब्द चांद्रमाः परन्तु चा ह्याचा च होऊन मग चंद्रमस् शब्द बनला असें तो म्हणतो; त्याच्या विवरणांत द्रमतिबद्दल द्रवति आहे. चंद्र शब्द पुष्कळ ठिकाणीं विशेषण व कांहीं थोड्या ठिकाणीं नाम असा वापरलेला आढळतो; अग्नि, उषा, मरुत्, रथ, धन, वीरपुरुष वगैरेंना चंद्र हें विशेषण लाविलें आहे. गोमत् अश्वावत् रथवत् सुवीरं चंद्रवत् राधः मरुतो ददा नः (५।५७।७) = हे मरुतांनो, आम्हांला गायी, घोडे, रथ, वीर व चंद्र म्हणजे हिरण्य ह्यांनीं भरलेलें धन द्या. चन्द्रेव भानुं विदधे पुरुत्रा (३।६१।७) = अग्नि चंद्राप्रमाणें म्हणजे सूर्याप्रमाणें प्रकाश सर्वत्र पसरतो. चन्द्र ह्याचा मूळचा अर्थ झळकणारें असा असून नंतर तो सुवर्ण, सूर्य, अग्नि ह्या झळकणाऱ्या वस्तूंचें नांव म्हणून योजिला गेला असावा. चन्द्रमस् ह्यांतील चन्द्र शब्द विशेषण कीं नाम हें सांगतां येत नाहीं; कारण मस् ह्याचा अर्थ कळत नाहीं. मास् = (१) चंद्र, (२) महिना; महिना ह्या अर्थीं मास् ह्या शब्दाचे उतारे वर दिलेच आहेत. सूर्ये ज्योतिः अदधुः मासि अक्तून् (१०।१२ ७) = देव सूर्यांत व चंद्रांत प्रकाश घालते झाले. सूर्यामासा चंद्रमसा (१०।६४।३); सूर्यामासा = सूर्यामासौ = सूर्य व चंद्र; पण चंद्रमस् ह्यांत मस् आहे, मास् नाहीं; मस् = मत् असा प्रत्यय असल्यास चन्द्रमस् = प्रकाश आहे त्याच्याजवळ असा; सूर्यामासौ चंद्रमसौ = प्रकाशयुक्त सूर्य व चंद्र असा अर्थ असावा; कालान्तरानें चन्द्रमस् शब्द चंद्राला लावला गेला असेल.

## खंड ६ वा.

**नवोनवो भवति जायमानोऽह्नां केतुरुषसामेत्यग्रम्। भागं देवेभ्यो वि दधात्यायन् प्र चन्द्रमास्तिरते दीर्घमायुः (ऋ० सं० १०।८५।१९)**

**नवः नवः भवति जायमानः। इति पूर्वपक्षादिम् अभिप्रेत्य। अह्नां केतुः उषसाम् एति अग्रम्। इति अपरपक्षान्तम् अभिप्रेत्य। आदित्यदैवतो द्वितीयः पादः इत्येके। भागं देवेभ्यः विदधाति आयन्। इति अर्धमासेज्याम् अभिप्रेत्य। प्रवर्धयते चन्द्रमाः दीर्घम् आयुः**

इति पूर्वपक्षादिम् अभिप्रेत्य = पूर्वपक्षाच्या म्हणजे शुक्लपक्षाच्या आरंभासंबंधानें म्हणजे पहिल्या एकदोन तिथींसंबंधानें ( चंद्रमा नवा नवा जन्माला येतो असें म्हटलें आहे ); प्रत्येक महिन्याच्या शेवटीं कलाहीन झाल्यावर सुरू होणाऱ्या शुक्लपक्षांत कलाप्राप्तीनें महिन्या महिन्याला चंद्रमा नवा नवा जन्मास येतो. अह्नां केतुः = कृष्णपक्षाच्या शेवटीं कलाहीन होऊन नंतर पुन्हां शुक्लपक्षांत एकेक कला मिळून तो चंद्रमा दिवसांचा कर्ता होतो म्हणजे त्याच्या कलांच्या वृद्धीनें व क्षयानें प्रतिपदा वगैरे तिथि अस्तित्वांत येतात; अशा रीतीनें चंद्रमा दिवसांच्या आरंभाचें चिन्ह होय; उषेचा प्रकाश पडण्यापूर्वीं निस्तेज असा चंद्र दृष्टीस पडतो म्हणून तोच दिवसाचा आरंभ करतो. उषसाम् एति अग्रम् = उषेचा प्रकाश संपल्यावर उगवणाऱ्या सूर्याच्या अग्रभागीं चन्द्रमा दिसतो; सूर्यप्रकाशाला प्रारंभ होत आहे अशा आरंभाच्या कालांत कांहीं वेळ चंद्र दिसत असतो. इति अपरपक्षान्तम् अभिप्रेत्य = हें कृष्णपक्षाच्या शेवटल्या दिवसाला अनुलक्षून म्हटलें आहे. अह्नां केतुः वगैरे आदित्यासंबंधानें म्हटलें आहे असें कित्येक म्हणतात; दुर्गाच्या वृत्तींत ऋचेचें चन्द्रपर विवरण झाल्यावर ह्या वाक्याचा अर्थ दिला आहे. पाळीपाळीनें शुक्लपक्ष व कृष्णपक्ष ह्यांत पूर्वेला व पश्चिमेला येऊन तो देवांना कलारूपी भाग देतो म्हणजे शुक्लपक्ष व कृष्णपक्ष ह्यांतील तिथि कलावृद्धीनें व कलाक्षयानें देवांस अर्पण करतो. शुक्लपक्ष व कृष्णपक्ष हे चंद्रावर अवलंबून असल्याकारणानें त्यांतील दिवसही चंद्रावर अवलंबून असतात; असे दोन्ही प्रकारचे दिवस देवांना भोगावयास मिळतात; असा हा चंद्रमा आपल्या भिन्न भिन्न गतीनें आमचें आयुष्य वाढवितो ( प्रतिरते ). दुसऱ्या पादाची देवता आदित्य असें जें म्हणतात त्यांनीं केलेला ऋचेचा अर्थ पुढील प्रमाणें:—जो चंद्र महिन्या महिन्याला नवा नवा जन्मत असतो, जो पश्चिमेला व पूर्वेला येऊन देवांना त्यांचा त्यांचा भाग देतो व जो आमचें आयुष्य वाढवितो तो आमचें कल्याण करो; जो उषांच्या अग्रभागीं असतो तो दिवसांचा कर्ता सूर्य पुढें दिसत आहे पहा. सूर्य उगवण्याच्या आधींचा जो प्रकाश तो उषा; तेव्हां सूर्य उषेला जन्म देतो म्हणून तो उषांच्या अग्रभागीं जातो म्हणजे त्यांचा मुख्य होतो. वरील सर्व विवरण दुर्गवृत्तीला धरून केलें आहे.

**सायण**: —एकेक कलेनें जन्माला येणारा म्हणजे कलेकलेनें वाढणारा चन्द्रमा दररोज नवा नवा होतो म्हणजे दिसतो; हें विधान शुक्लपक्षांतील पहिल्या पहिल्या दिवसांना अनुलक्षून आहे म्हणजे शुक्लपक्षांतील पहिल्या २।४ दिवस चन्द्र नवीन नवीन दिसतो; अह्नां केतुः = प्रतिपद् वगैरे तिथि चंद्राच्या वाढीवर व ऱ्हासावर अवलंबून असल्याकारणानें चन्द्रमा दिवसांचा केतु म्हणजे प्रज्ञापक होतो म्हणजे प्रत्येक दिवशीं कोणती तीथ आहे हें सांगतो; असा हा चंद्रमा कृष्णपक्षांत उगवणाऱ्या उषांच्या अग्रभागीं जातो म्हणजे असतो; हें विधान कृष्णपक्षांतील शेवटल्या दिवसांना अनुलक्षून केलें आहे; म्हणजे चतुर्दशी व अमावास्या ह्या दिवशीं बारीक बारीक झालेला तो अगदीं निस्तेज होत जातो; दुसरा पाद आदित्यपर आहे असें कित्येक म्हणतात; तसें असल्यास आदित्य हा दिवसांचा केतु म्हणजे दिवसांचा आरंभ करतो व उषा सूर्याच्या अग्रभागीं असते या गोष्टीं सर्वांना माहीत आहेत; कलावृद्धि व कलाक्षय ह्यानें शुक्लपक्षांत वाढत जाऊन व कृष्णपक्षांत कमी कमी होत जाऊन चंद्रमा त्यांना हविर्भाग देत असतो म्हणजे देवांना चंद्रकला खावयास मिळतात; हें दर्श व पूर्णमास ह्या इष्टींना अनुलक्षून म्हटलें आहे; म्हणजे ह्या दोन इष्टींत देवांना हवि दिले जातात; असा हा चंद्रमा आयुष्य वाढवितो. यास्क, दुर्ग व सायण ह्यांनीं केलेले अर्थ समाधानकारक नाहींत. प्रस्तुत ऋचेच्या आधींच्या ऋचेंत सूर्य व चंद्र हीं बालकें खेळत खेळत जातात; त्यांपैकीं एक म्हणजे सूर्य सगळे जग पहात जातो व दुसरा म्हणजे चंद्रमा ऋतूंना उत्पन्न करीत पुन्हां पुन्हां जन्माला येतो असें म्हटलें आहे; प्रस्तुत ऋचेंत चन्द्राचेंच वर्णन असावें असें वाटतें; परंतु तसें मानल्यानें अर्थ बरोबर होत नाहीं. सूर्यामासा चन्द्रमसा (१०।६४।३) एथें चंद्रमसा हें सूर्यामासाचें विशेषण आहे; चन्द्रमाः = प्रकाशमान हें अग्नीचें विशेषण मानल्यास ऋचेचा पुढीलप्रमाणें अर्थ होईल:–दररोज जन्मास येणारा अग्नि नवीन नवीन होतो म्हणजे दिसतो; दररोज प्रज्वलित केलेला अग्नि अगदीं नवीन दिसणारच; त्वामग्ने हरितो वावशानाः गिरः सचन्ते धुनयो घृताचीः। पतिं कृष्टीनां रथ्यं रयीनां वैश्वानरमुषसां केतुमह्नाम् (७।५।५) = हे अग्नि, पंचजनांचा पति, रथांना नेणारा व उषा आणि दिवस ह्यांचा ध्वज असा जो तूं त्या तुझी लखलखणाऱ्या घोड्या व स्तुति सेवा करतात. विश्वस्मा अग्निं भुवनाय देवा वैश्वानरं केतुमह्नामकृण्वन् (१०।८८।१२) = सगळ्या भुवनांकरितां देव वैश्वानरअग्नीला दिवसांचा ध्वज करते झाले. अचेति केतुः उषसः पुरस्तात् श्रिये दिवो दुहितुर्जायमानः (७।६७।२) = जन्माला येणारा, द्युची मुलगी जी उषा तिचा ध्वज म्हणजे अग्नि हा प्रकाश देण्याकरितां पुढें प्रज्वलित झाला आहे. अभूदु केतुः उषसः पुरस्तात् (७।७६।२) = उषेचा ध्वज पुढें दिसत आहे. ह्या उताऱ्यांत अग्नीला दिवसांचा व उषांचा ध्वज म्हटलें आहे. उषसाम् एति अग्रम् = (तो अग्निरूप ध्वज) उषांच्या पुढें जात आहे म्हणजे उषा उगवण्याच्या आधीं अग्नि प्रज्वलित झालेला दिसत आहे; उषर्भुत् म्हणजे उषेला

उठविणारा ( १।६५।५॥६।४।२ ) असें अग्नीला म्हटलें आहे. अस्तित्वांत येणारा ( आयन् ) अग्नि देवांना हविर्भाग देतो; देवांना हवि देण्याचें काम अग्नीचें आहे; असा हा प्रकाशमान अग्नि ( चंद्रमाः ) आम्हांस दीर्घ आयुष्य देवो. ऋचा १८ हींत सूर्य आणि चंद्र ह्यांचें वर्णन आहे; तथापि प्रस्तुत ऋचेंत अग्नीचें वर्णन येण्यास कांहीं हरकत नाहीं. चंद्रमाः हा शब्द व दूणाशे चान्द्रमसे चरौ विनियोगः ( आश्व० श्रौ० ९।८) आणि राजयक्ष्म गृहीतेष्टौ च (मान० श्रौ०२।२।७) हे विधि ऋचेचा चंद्रपर अर्थ करण्याला कारणभूत होत; दूणाश नांवाच्या यज्ञांत चांद्रमसचरूचा हवि द्यावयाचा असतो व ज्याला क्षयानें पकडलें आहे त्याचा क्षय घालविण्याकरितां जी इष्टि करावयाची असते त्या इष्टींत चान्द्रमसहवि द्यावयाचा असतो. मैत्रायणी संहितेंत ( २।२।७॥४।१२।२ ) ह्या ऋचेच्या देवता सूर्य व चंद्र आहेत असें म्हटलें आहे; त्यामुळेंही प्रस्तुत ऋचेचा चंद्रपर अर्थ केला गेला.

**मृत्युः (४) मारयति इति सतः। मृतं च्यावयति इति वा शतबलाक्षः मौद्गल्यः। तस्य एषा भवति**

मृत्युः = मृ + त्युः; त्युः हा नामकरण प्रत्यय; मृ (=मरणें) ह्याचें प्रयोजक रूप मारय्; मृत्यु जेव्हां मारतो तेव्हां त्याला मृत्यु म्हणतात. दुर्ग म्हणतोः--मृत्यु हा मध्यम म्हणजे मुख्य प्राण; शरीरांतून मुख्य प्राण जाऊं लागतांच इतर प्राण त्याच्याबरोबरच शरीरांतून बाहेर पडतात व अशा तऱ्हेनें तो इतर प्राणांना मारतो म्हणजे त्यांच्या क्रिया बंद पाडतो असें बृहदारण्यकोपनिषदांत ( ४।४।२ ) म्हटलें आहे. किंवा मृत्युः = मृच्च्युः = मृत + च्युः; मृत् = मृतम्; च्युः = च्यावयति; ज्याचें आयुष्य क्षीण झालें आहे म्हणजे ज्याची क्रियाशक्ति क्षीण झाली आहे अशाला ( मृतं ) मृत्यु जवळ जाऊन खालीं पाडतो म्हणून त्याला मृत्यु हें नांव ( दुर्ग ); मृतं म्हणजे मेलेला असा अर्थ नसून मरावयाला टेकलेला असा दुर्ग अर्थ करतो. प्राकृत भाषांत मृत्यु शब्दाचा मिच्च्यु असा अपभ्रंश यास्काच्या वेळीं होता असें मानण्यास बळकट पुरावा पाहिजे. ही दुसरी व्युत्पत्ति मुद्गलाचा शतबलाक्ष नांवाचा पुत्र देतो; शतबलानि बहुबलानि अक्षाणि इन्द्रियाणि यस्य सः ( दुर्ग ) = ज्याचीं इंद्रियें अतिशय बळकट आहेत असा; अक्षाणिबद्दल अक्षिणी हा शब्द घातल्यास ज्याचे डोळे अतिशय बळकट ( शतबले ) म्हणजे तीक्ष्ण होते असा अर्थ होईल. मारयति प्राणिनः मृतं च्यावयति इति वा। मृतम् आसन्नमृत्युं चरमोच्छ्वासकाले शरीरात् च्यावयति। अथवा मृतः क्षीणायुःसंस्कारः उच्यते। तं मृतं मध्यमः प्राणः शरीरात् च्यावयति इति मृत्युः ( देवराज ) = प्राणांना मारतो किंवा मृताला खालीं पाडतो म्हणून तो मृत्यु; एथें मृत म्हणजे ज्याचें मरण जवळ ठेपलें आहे असा; अशा जीवाला शेवटल्या श्वासाच्या वेळीं शरीरांतून खालीं पाडतो म्हणून तो मृत्यु; किंवा मृत म्हणजे ज्याचें आयुष्य क्षीण झालें आहे असा; अशा जीवाला मध्यम प्राण शरीरांतून खालीं पाडतो.

## खंड ७ वा.

**परं मृत्यो अनु परेहि पन्थां यस्ते स्व इतरो देवयानात् ।**
**चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि मा नः प्रजां रीरिषो मोत वीरान् ( ऋ० सं० १०।१८।१ )**

**परं मृत्यो ध्रुवं मृत्यो ध्रुवं परेहि मृत्यो । कथितं तेन मृत्यो । मृतं च्यावयते । भवति मृत्यो । मदेर्वा । मुदेर्वा । तेषामेषा भवति**

हें भाष्य यास्काचें नसावें; दुर्गाची वृत्ति त्याचें विवरण करीत नाहीं; भाष्यांत ऋचेंत नसलेले असे भलतेच शब्द आले आहेत; ते कोठून व कसे आले हें सांगतां येत नाहीं. मदेर्वा मुदेर्वा तेषामेषा भवति हे शब्द ९।५ ह्याच्या शेवटीं (पान ६५२) आले आहेत; ते शब्द एथें विनाकारण घातले आहेत. मृतं च्यावयते ही मृत्यु शब्दाची व्युत्पत्ति होय ( पान ८६४ ). बहुतकरून यास्काने भाष्य न देतां इति सा निगदव्याख्याता हे शब्द घातले असावेत; कारण ऋचा अगदीं सोपी आहे. दुर्गानें केलेला अर्थः—हे मृत्यु, देवयानाहून वेगळा असा जो तुझा मार्ग आहे त्या दुसऱ्या मार्गाकडे तूं जा; ( स्वर्गाकडे जाणाऱ्या मार्गांत आम्ही आहोंत; तुझा मार्ग पितृलोकांकडे जाणारा; त्याच्याशीं आम्हांला कांहीं करावयाचें नाहीं ); ज्या तुला डोळे आहेत व ऐकण्याला कान आहेत त्या तुला मी विनवून म्हणतों कीं आमच्या मुलाबाळांना व आमचे आश्रित जे इतर लोक ( वीरान् ) त्यांना हिंसा करूं नकोस.

**सायणः**—मृत्यो = सर्वेषां मारक; अनु = आनुपूर्व्येण = एकसारखा; परा = पराङ्मुखः यजमानात् = यजमानाकडे तोंड न करता म्हणजे यजमानाला सोडून; देवाः अनेन मार्गेण गच्छंति इति देवयानः देवमार्गः; प्रजां = दुहितृदौहित्रात्मिका = मुली व मुलींचीं मुलें ह्यांना; वीरान् = पुत्रपौत्रादीन्. प्रजा व वीर ह्यांचे असे भिन्न अर्थ करण्याचें कारण प्रजा स्त्रीलिंगी व वीर पुल्लिंगी हें होय.

देवयानं० अश्वम् (१।१६२।४), यजुः० देवयानम् (१०।१८१।३), पन्थाः देवयानाः (७।७६।२), अध्वनः देवयानान् (१।७२।७), पथः देवयानात् (१०।५१।५), पथिभिः देवयानैः (१।१८३।६), समिधः देवयानीः (१०।५१।२) ह्या सर्व ठिकाणीं देवयान हा शब्द विशेषण आहे; देवयानी हें त्या शब्दाचें स्त्रीलिंग; देवयान = देवांकडे जाणारा. पन्थां० पितृयाणं (१०।२।७) एथें पितृयाणं हे पन्थां चें विशेषण. प्रस्तुत ऋचेंत देवयानात् पथः असा अन्वय आहे; त्याच्या उलट पितृयाणपथ नसून मृत्यूचा पथ आहे, मृत्यु ही टाळावयाची वस्तु आहे. मो षु णः सोम मृत्यवे परा दाः पश्येम नु सूर्यमुच्चरन्तम् (१०।५९।४)= हे सोमा, आम्हांला मृत्यूला देऊन टाकूं नकोस; फार फार काळ आकाशांत सूर्य संचार करीत असतांना आम्हांला पाहूं दे. यस्य दूतः प्रहितः एष एतत् तस्मै यमाय नमो अस्तु मृत्यवे (१०।१६५।४)= ज्या यमाचा, ज्या मृत्यूचा दूत म्हणून हा घुबड व हा कपोत आमच्याकडे पाठविला आहे त्या यमाला, त्या मृत्यूला नमस्कार

असो; ह्याच सूक्ताच्या पहिल्या ऋचेंत ( १०।१६५।१ ) कपोताला निर्ऋतीचा दूत म्हटलें आहे; निर्ऋति ही कोणासही नको. इमं जीवेभ्यः परिधिं दधामि मैषां नु गादपरो अर्थमेतम् । शतं जीवन्तु शरदः पुरूचीरन्तर्मृत्युं दधतां पर्वतेन ( १०।१८।४ )= मृत्यूच्या ठिकाणाला ह्या जिवंत प्राण्यांपैकीं कोणीही जाऊं नये म्हणून जिवंत प्राण्यांभोंवतीं मी ही तटबंदी करीत आहें; पुरीं शंभर वर्षे जगावें म्हणून त्यांनीं मृत्यूला पर्वतानें अडवावें; इतका मृत्यूविषयीं तिटकारा असणें स्वाभाविक आहे. परेहि = परा + इहि= परावतम् इहि; मृत्यूची राहण्याची जागा परावत्; म्हणूनच उर्वशी आपल्याला सोडून जात आहे ह्या दुःखानें उद्विग्न झालेला पुरूरवस् मी आतां परावताकडे जातों व निर्ऋतीच्या मांडीवर जाऊन निजतों असें उर्वशीला भय घालण्याकरितां म्हणतो. परा शब्दाचा अर्थ पहा ( १०।२१ पान ७८४ ). हे मृत्यु, देवांकडे जाणाऱ्या ( देवयानात् ) मार्गाहून भिन्न जो तुझा स्वतःचा मार्ग त्या वर जाणाऱ्या ( परं ) मार्गानें ( पन्थां ) थेट ( अनु ) परावताकडे जा; आमच्याकडे येऊं नकोस; असा पहिल्या अर्धाचा अर्थ आहे. प्रजा व वीर यांचा अर्थ एकच.

## खंड ८ वा.

**त्वेषमित्था समरणं शिमीवतोरिन्द्राविष्णू सुतपा वामुरुष्यति ।**
**या मर्त्याय प्रतिधीयमानमित्कृशानोरस्तुरसनामुरुष्यथः** (ऋ० सं० १।१५५।२)
**इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा ).

ही ऋचा इतकी कठीण आहे कीं तिचें विवरण करणें बरेंच प्रयासाचें काम आहे; ही ऋचा देण्याचें कारण काय असावें तें कळत नाहीं. मृत्युः ( ४ ) ह्या शब्दानंतर विश्वानरः ( ५ ) हा शब्द येतो व तत्संबंधीं ऋचा नवव्या खंडांत दिली आहे. प्रस्तुत ऋचेवर दुर्गाची वृत्ति नाहीं; तेव्हां दुर्गानंतर ती निरुक्तांत घुसडली गेली असावी; पण तशी घुसडण्याचें कोणतेंही कारण दिसत नाहीं; इति सा निगदव्याख्याता हे शब्द मागील खंडांतील ऋचेस लागू आहेत असें तेथें सांगितलें आहे ( पान ८६५ ).

**सायणः**—हे इन्द्राविष्णू शिमीवतोः इष्टप्रदानादिकर्मवतोः वां युवयोः इत्था इत्थं त्वेषं प्रदीप्तं समरणं सम्यक् यागदेशगमनं सुतपाः हुतशिष्टसोमपीतयजमानः उरुष्यति रक्षति यागेन पूजयति । यद्वा । शिमीवतोः प्रहरणादिकर्मवतोः वां युवयोः त्वेषं दीप्तं शौर्योपेतं समरणं सम्यक् परस्परगमनोपेतं वृष्टिप्रदानाय मेघविदारणरूपं यजमानः उरुष्यति रक्षति स्तौति = हे इन्द्राविष्णूंनो, तुम्हांला देऊन उरलेला सोम पिणारा ( सोमपाः ) यजमान त्याला इच्छिलेली वस्तु देणारे ( शिमीवतोः ) जे तुम्ही त्या तुमच्या यज्ञभूमीकडे झळकणाऱ्या ( त्वेषं ) गमनाची ( समरणं ) हवि देऊन पूजा करतो; किंवा हे इन्द्राविष्णूंनो, प्रहरणक्रिया करणाऱ्या ( शिमीवतोः ) तुमच्या पाऊस पाडण्याकरितां मेघ फोडण्याच्या शौर्याच्या कृत्याची यजमान स्तुति करतो; यौ इन्द्रा-

विष्णू मर्त्याय मनुष्याय हविर्दात्रे यजमानाय प्रतिधीयमानम् इत् प्रतिधातव्यं फलरूपम् असनाम् असनं चलनशीलं प्रदानशीलम् अन्नादिकम् अस्तुः अभिमत क्षेप्तुः निरसितुः वा शत्रूणां कृशानोः अग्नेः सकाशात् उरुष्यथः अविच्छेदेन प्रवर्तयथः। वह्नौ हुतं हविः स्वीकृत्य तन्मुखात् एव फलमपि दास्यथः इत्यर्थः = जे तुम्ही, हे इन्द्राविष्णूंनो, हवि देणाऱ्या यजमानाला अभिमत फल देणारा किंवा शत्रूला हांकून लावणारा ( अस्तुः ) जो अग्नि त्याच्यापासून ( कृशानोः ) जें द्यावयाचें असतें असें (प्रतिधीयमानं ) फलरूपी अन्न ( असनां ) सतत देतां ( उरुष्यथः ); अग्नींत टाकलेला हवि घेऊन अग्नीच्याच द्वारें यजमानाला तुम्ही फल देतां. शिमी = कर्म ( निघण्टु २।२।२३ ) व कृशानु = अग्नि ( अमर १।१।५४ ) असे अर्थ सायणाचार्यांनीं केले आहेत. समरणं = संग्राम; जसे मा नः समरणे वधीः ( १।१७०।२ ), मा वृताः समरणे हवन्ते ( ४।४२।५ ), अदेवयून् समरणे जघन्वान् ( १०।२७।३ ).

सायणाचार्य शिम्या व शिमीवत् ह्यांचे पुढीलप्रमाणें अर्थ करतातः-(१।१५१।१) शिम्या = प्रकाशवृष्ट्युत्पादनादिकर्मणा. ( १।१५१।३ ) शिम्या = हविःप्रदानादिकर्मणा. (१।८४।१६) शिमीवतः = वीर्यकार्मोपेतान्. (१।१००।१३ ) शिमीवान् = लोकानुग्राहकेन कर्मणा युक्तः. ( १।१४१।१३ ) शिमीवद्भिः अर्कैः = हविःप्रदानादिकर्मवद्भिः मन्त्रैः. ( १।१५५।२ ) शिमीवतोः = इष्टप्रदानादिकर्मवतोः यद्वा प्रहरणादि कर्मवतोः ( २।२५।३ ) शिमीवान् = परिचरणात्मना कर्मणा युक्तः. ( ५।५६।३॥१०।८९।५ ) शिमीवान् = कर्मवान्. ( ८।२०।३ ) शिमीवतां = कर्मवतां. ( १०।८।२ ) शिमीवान् = हविर्वहनदेवाह्वानादिकर्मवान्. ( १०।३८।३ ) शिमीवति = परस्परप्रहारलक्षणादिकर्मवति. ( १०।७८।३ ) शिमीवंतः =शौर्यकर्मवन्तः. शिमी म्हणजे कर्म असा निघंटूत दिलेला अर्थ घेऊन कर्म शब्दाला दुसऱ्या निरनिराळ्या शब्दांची सायणाचार्यांनीं जोड दिली आहे; तीन ठिकाणीं त्यांनीं कर्म हाच शब्द ठेविला आहे; जे जोडशब्द दिले आहेत तेच वास्तविक शिमी शब्दाचे अर्थ होत. शिमी = ( १ ) हवि, ( २ ) धन, ( ३ ) बल व ( ४ ) अस्त्र, वज्र असे अर्थ असावेत; प्रस्तुत ऋचेंत शिमीवतोः=अस्त्रवतोः=वज्रवतोः असा अर्थ दिसतो. त्वेषम् इत्था समरणं शिमीवतोः = वज्रयुक्त जे इंद्र व विष्णु त्यांनीं शत्रूंशीं केलेला संग्राम एवढा प्रचंड आहे. सुतपाः हे विशेषण इन्द्राला लावलेलें आढळतें; सुतं पाति असौ सुतपाः = सोमरस पिणारा; सुतपा= सुतपौ = सोमरस पिणारे ( इंद्र व विष्णु ). उरुष्य् ह्याचा ऋग्वेदांतील नेहमींचा अर्थ रक्षण करणें; पण एथें तो अर्थ लागू पडत नाहीं; पित्वो भिक्षेत वयुनानि विद्वान् आसा विवासन् अदितिम् उरुष्येत् ( १।१५२।६ ) = हवि ( वयुनानि ) देणारा ( विद्वान् ) अग्नि स्वमुखानें ( आसा ) सोमाचा (पित्वः) भाग घेवो ( भिक्षेत ) व तसें करून अदितीला तृप्त करो; उरुष्येत् = तृप्त किंवा संतुष्ट करो असा अर्थ असावा. हे सोम पिणारे इंद्रविष्णूहो, तुम्हांला ( वां ) कोणी तरी संतुष्ट करतो; कोणी तरी म्हणण्याचें कारण उरुष्यति ह्या क्रियापदाचा कर्ता दिला नाहीं हें; कदाचित्

दुसऱ्या अर्धांतून तो काढतां येईल. कृशानु म्हणजे अग्नि नव्हे; सृजत् यदस्मा अव ह क्षिपत् ज्यां कृशानुरस्ता ( ४।२७।३ ) = कृशानु नांवाचा बाण फेकणारा ( अस्ता ) धनुर्धारी ह्याच्यावर ( अस्मा = अस्मै ) धनुष्याची दोरी ( ज्यां ) फेकता झाला ( अवसृजत् = अवक्षिपत् ); श्येन द्युलोकांतून सोम चोरून घेऊन येत होता; तेव्हां त्याला पकडण्याकरितां कृशानूनें धनुष्याची दोरी त्याचे अंगावर टाकली. स मध्व आ युवते वेविजान इत् कृशानोः अस्तुः मनसा ह बिभ्युषा ( ९।७७।२ ) = धनुर्धारी कृशानु हा आपल्यावर बाण सोडतो आहे ह्यामुळें मनांत भिऊन कांपणारा (वेविजानः ) श्येन सोम ( मध्वः ) देतो ( आयुवते ). प्रस्तुत ऋचेंतही कृशानु हें त्या धनुर्धाऱ्याचें नांव. असना = सोडलेला इषु. प्रतिधीयमानम् हा शब्द स्त्रीलिंगी नसल्यामुळे त्याचा अन्वय असनां ह्या स्त्रीलिंगी शब्दाशीं करतां येत नाहीं व त्यामुळें त्याचा अर्थही करतां येत नाहीं; प्रतिधीयमानां असें रूप घेतल्यास श्येनावर टाकलेला (इषु) असा अर्थ होईल. उरुष्यथः = उरु दूरं स्यथः प्रक्षिपथः = दूर फेंकून देता म्हणजे अंगावर येऊं देत नाहीं असा अर्थ केला पाहिजे पण तसा अर्थ करण्यास आधार नाहीं. कदाचित् दुसऱ्या अर्धाचा पुढील प्रमाणें अन्वय व अर्थ होईलः—या यौ युवां हे इन्द्राविष्णू अस्तुः कृशानोः असनां प्रतिधीयमानम् अन्नं मर्त्याय मनुष्याय उरुष्यथः दत्थः = धनुर्धारी जो कृशानु त्याच्या इषूला आडविणारें ( प्रतिधीयमानं ) असें साधन जें तुम्ही मनुष्याला देता (उरुष्यथः). श्येनानें मनूकरितां द्युलोकांतून सोम आणला ( ४।२६।४ ) असें म्हटलें आहे; तसें तो करीत असतांना कृशानूनें त्याच्यावर बाण सोडला त्यामुळें तो थरथर कांपूं लागला; तथापि कृशानूच्या तावडींतून तो सुटला; ह्या गोष्टीचा अनुवाद प्रस्तुत ऋचेच्या दुसऱ्या अर्धांत केला आहे; पण प्रतिधीयमानम् व उरुष्यथः ह्यांचे तेथें असणारे अर्थ ठरवितां येत नसल्यामुळे ऋचेचा अर्थ स्पष्ट करतां येत नाहीं. उरुष्यति ह्याचा कर्ता मर्त्यः ( अध्याहृत ); मनुष्याकरितां श्येनाच्या साहाय्यानें इंद्र व विष्णु ह्यांनीं द्युलोकांतून सोम आणिला म्हणून मनुष्य इन्द्राविष्णूंना सोम हवि देऊन संतुष्ट करतो ( उरुष्यति ).

**विश्वानरः ( ५ ) व्याख्यातः ( निरु० ७।२१ ) । तस्य एषा भवति**

विश्वानर शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ५६९ ).

## खंड ९ वा.

**प्र वो महे मन्दमानायान्धसोऽर्चा विश्वानराय विश्वाभुवे । इन्द्रस्य यस्य सुमखं सहो महि श्रवो नृम्णं च रोदसी सपर्यतः ( ऋ० सं० १०।५०।१ )**

**प्रार्चत स्तुतिं महते । अन्धसः अन्नस्य दात्रे । मन्दमानाय मोदमानाय । स्तूयमानाय । शब्दाय्यमानाय इति वा । विश्वानराय सर्वं विभूताय । इन्द्रस्य यस्य प्रीतौ सुमहत् बलं महच्च श्रवणीयं यशः नृम्णं च बलम् । नृन् नतम् । द्यावापृथिव्यौ वः परिचरतः । इति**

प्र + अर्चा = प्रार्चत = प्रोच्चारयत स्तुतिम् उच्चार्यमाणां च अन्यैः प्रपूजयत ( दुर्ग ) = स्तुति मोठ्यानें उच्चारा व दुसऱ्यांनीं उच्चारल्या जाणाऱ्या स्तुतीची पूजा करा; स्तुतिं अध्याहृत. वः = तुम्ही; महे = महते. अन्धसः = अन्नस्य; दात्रे अध्याहृत. मन्दमानाय = मोदमानाय स्तूयमानाय शब्दाय्यमानाय इति वा = हर्ष पावणाऱ्याला ( मोदमानाय ) किंवा स्तविल्या जाणाऱ्याला ( स्तूयमानाय ) किंवा हांक मारल्या जाणाऱ्याला ( शब्दाय्यमानाय ); मदि स्तुतिमोदमदस्वप्नकान्तिगतिषु ( धा० १।१३ ); मद् = ( १ ) स्तुति करणें, ( २ ) हर्ष पावणें वगैरे; मद तृप्तियोगे ( धा० १०। १७२ ); मदी हर्षग्लेपनयोः ( धा० १।८१७ ); मदी हर्षे ( धा० ४।१०२ ); हांक मारणें हा अर्थ धातुपाठांत नाहीं; कदाचित् शब्दाय्यमानाय हा स्तूयमानाय ह्याचा पर्याय असेल. मन्दमानाय = हृष्यमाणाय । अथवा । शब्दाय्यमानाय स्तोतृभिः असें दुर्गवृत्तींत आहे; त्यावरून त्याच्या निरुक्तपाठांत स्तूयमानाय हा शब्द नसावा. विश्वाभुवे = सर्वविभूताय; विश्वाभुवे = सर्वप्रकारविभूतियुक्ताय ( दुर्ग ) = सर्व प्रकारच्या विभूतींनीं युक्त अशाला. प्रीतौ अध्याहृत; इन्द्रस्य प्रीतौ=इन्द्राची प्रीति संपादन केल्यावर; दुर्गवृत्तींत प्रीतौ नाहीं. सुमखं = सुमहत् = अतिशय मोठें; मख = मह = महत्. सहः = बलम्. महि = महत्. श्रवः = श्रवणीयं = प्रख्यात; यशः अध्याहृत; यश सर्वांच्या कानीं गेलेलें असतें म्हणून त्याला श्रवः हें नांव; यशः = बलम् आयतिः महती ( दुर्ग ); आयतिः महती ? नृम्णं = बलम्; नृम्णं = नॄन् नतम्; नॄन् मनुष्यान् प्रति यद्विशेषतः नतं बलं ( दुर्ग ) = मनुष्यांना नमून असलेलें म्हणजे मनुष्यांत असलेलें बळ ( दुर्ग ); नृम्णं = नृ + म्णम्; नृ = नॄन्; म्णं = म्नं = मनं = नमं = नतं. रोदसी = द्यावापृथिव्यौ. वः अध्याहृत; वः = तुमची स्तुति. सपर्यतः = परिचरतः = पूजयतः अभिनन्दतः ( दुर्ग ) = पूजा करतात किंवा अभिनन्दन करतात. इति = असें आम्ही म्हणतों. दुर्गानें केलेला अर्थः— ज्या समर्थ ( इन्द्रस्य ) विश्वानराचें अतीशय मोठें ( सुमखं = महि ) बल ( सहः = श्रवः = नृम्णं ) आहे व ज्याची स्तुति द्यावापृथिवी पूजितात किंवा त्या स्तुतीचें अभिनन्दन करतात ( सपर्यतः ) त्या हर्ष पावणाऱ्या किंवा स्तविल्या जाणाऱ्या ( मन्दमानाय ), सर्वप्रकारच्या विभूतींनीं युक्त ( विश्वाभुवे ) अशा अन्नदात्या ( अन्धसः = अन्नस्य दात्रे ) व मोठ्या ( महे ) विश्वानराला म्हणजे विश्वानराची मोठ्यानें ( प्र ) स्तुति उच्चारा ( अर्चत ). प्रीतौ हा खरा पाठ असल्यास दुसऱ्या अर्धाचा पुढीलप्रमाणें अर्थ होईलः— ज्याची = ज्या इन्द्राची प्रीति संपादन केली असतां बल मिळतें. यशः ह्याचा यश किंवा बल ह्यांपैकीं कोणता अर्थ यास्काच्या मनांत होता तें सांगतां येत नाहीं.

सायणः—हे स्तोतः वः त्वं महे महते अंधसः अंधसा सोमेन मंदमानाय मोदमानाय विश्वानराय सर्वस्य नेत्रे विश्वाभुवे सर्वस्य भावयित्रे मह्यम् इंद्राय प्रार्च प्रोच्चारय । यस्य मम इंद्रस्य सुमखं सुष्टु मंहनीयं सहः बलं महि महत् श्रवः अन्नं नृम्णं सुखं च रोदसी द्यावापृथिव्यौ सपर्यतः पूजयतः = ज्या माझ्या अतिशय पूज्य (सुमखं) बळ ( सहः ),

अन्न ( यशः ) व सुख ( नृम्णं ) ह्यांची द्यावापृथिवी पूजा करतात त्या मोठ्या ( महे ), सोमानें ( अन्धसः ) आनंद पावणाऱ्या ( मन्दमानाय ), सर्वांना नेणाऱ्या ( विश्वानराय) व सर्वांना आस्तित्वांत आणणाऱ्या ( विश्वाभुवे ) इन्द्राला मला म्हणजे माझी स्तुति मोठ्यानें उच्चारा. वः म्हणजे तूं असाच अर्थ केला पाहिजे व तसा अर्थ कांहीं ऋचांत करावयाचा असतो. अन्धसः = ( १ ) सोमांतून म्हणजे सोमाचा भाग; ( २ ) अन् = धस् = धन; अन्धसः = धनांतून म्हणजे धन. मन्दमानाय = (१) स्तविला जाणाऱ्याला, ( २ ) देणाऱ्याला. विश्वानर शब्दाची चिकित्सा पहा ( पान ५९३ ). ( १ ) विश्वम् आ नरति जयति असौ विश्वानरः = सर्व जग जिंकणारा; ( २ ) विश्वम् आ धनं नरति ददाति असौ विश्वानरः = सर्व धन देणारा. ( १ ) विश्वम् आ भवति असौ विश्वाभूः = सर्व व्यापणारा; ( २ ) विश्वम् आ धनं भवति ददाति असौ विश्वाभूः = अतिशय धन देणारा. विश्वानराय व विश्वाभुवे ही इन्द्राय ह्या अध्याहृत शब्दाचीं विशेषणें. मख म्हणजे यज्ञ (निघण्टु ३।१७।११ ) हा अर्वाचीन अर्थ आहे; मख = ( १ ) बल, ( २ ) धन; सं यन्मिथः पस्पृधानासो अग्मत शुभे मखा अमिता जायवो रणे ( १।११९।३ ) = परस्पराशीं ( मिथः ) लढणारे ( पस्पृधानासः ), बलवान् ( मखाः ), जयेच्छु ( जायवः ) सूर्या मिळविण्याकरितां ( शुभे ) रणांत जमले ( समग्मत ); रेजते पृथिवी मखेभ्यः ( ६।६६।९ ) = बलवान् मरुतांना पाहून पृथिवी थरथर कांपते. नियुत्वता रथेना याहि दावने वायो मखस्य दावने ( ११।१३४।१ ) = हे वायु, धन ( मखस्य ) देण्याकरितां ( दावने ) नियुत नांवाच्या घोड्यांनीं युक्त ( नियुत्वता ) अशा रथांत बसून ( रथेन ) ये; आ नो मखस्य दावने० देवास उप गन्तन ( ८।७।२७ ) = हे देवांनो, धन देण्याकरितां या. सुमखं=(१)बलयुक्त, (२) धनासहित, अतीशय. महि= अतीशय. सहः = यशः = नृम्णं = बल किंवा धन. पूजा नमस्यापचितिः सपर्यार्चार्हणाः ( अमर २।७।३४ ) ; सपर्या म्हणजे पूजा ह्या अर्थावरून सपर्यतः = पूजयतः असा अर्थ केला गेला; पण सपर्या म्हणजे पूजा हा अर्थ अर्वाचीन आहे. सपर् असा स्वतंत्र शब्द ऋग्वेदांत नाहीं; तो सपर्य् ह्या धातूंतच आहे; त्याचा अर्थ हवि असा असावा; सबर्धुक् ह्यांतील सबर् व सपर्य् यांतील सपर् ह्या दोहोंचाही पहिला अर्थ दूध असा असेल. सबर्दुघायाः पय उस्रियायाः ( १।१२१।५ ) = सबर् दोहन करणाऱ्या गायीचें दूध; सबर् = पयः = दूध; सोमाचा रस हेहीं एक प्रकारचें दूधच. सपर्य् = ( १ ) सोमरस देणें, ( २ ) सोमरसानें तृप्त करणें, ( ३ ) सोमरस इच्छिणें, ( ४ ) सोमरसानें पुष्ट करणें. ( १ व २ ) तं त्वा० सपर्येम सपर्यवः ( २।६।३ ) = त्या तुला सोमहवि देणारे आम्ही ( सपर्यवः ) सोमहवि देऊन तृप्त करूं ( सपर्येम ). देवान् देवापे हविषा सपर्य ( १०।९८।४ ) = हे देवापि, देवांना हवि देऊन तृप्त कर. ( ३ ) देवाः सपर्यावो मादयन्ते ( ३।५४।२ ) = सोमरस इच्छिणारे ( सपर्यवः ) देव सोमरस पिऊन आनंदित होतात; आ ते सपर्यू अवसे युनज्मि ( ३।५०।२ ) = हे इंद्रा, सोमरसाची इच्छा करणारे ( सपर्यू ) तुझे हे दोन घोडे माझ्या

स्वतःच्या कल्याणाकरितां ( अवसे ) मी रथाला स्तुतीनें जोडतों. ( ४ ) अधा ते अप्रतिष्कुतं देवी शुष्मं सपर्यतः। उभे सुशिप्र रोदसी ( ८।९३।१२ ) = हे शिप्रवन्ता ( सुशिप्र ) इन्द्रा, द्यावापृथिवी ह्या दोघी देवी ज्याला कोणी विरोध करूं शकत नाहीं ( अप्रतिष्कुतं ) असें तुझें बल सोमरसानें पुष्ट करतात म्हणजे वाढवितात; तिस्रो यदग्ने शरदः त्वामित् शुचिं घृतेन शुचयः सपर्यान् ( १।७२।३ ) = हे अग्नि, तेजस्वी ( शुचयः ) तीन शरदृतु प्रज्वलित जो तूं त्या तुला घृत पाजून पुष्ट करते झाले. प्रस्तुत ऋचेंत सोमरसानें पुष्ट करतात हा अर्थ. ऋचेचे दोन अर्थः—( १ ) ज्या इन्द्राचें मोठें ( सुमखं = महि ) बल ( सहः = श्रवः = नृम्णं ) द्यावापृथिवी सोमरसानें पुष्ट करतात म्हणजे वाढवितात त्या स्तविल्या जाणाऱ्या ( मन्दमानाय ), सर्व जिंकणाऱ्या ( विश्वानराय ) व सर्व व्यापून टाकणाऱ्या ( विश्वाभुवे ) इंन्द्राला मोठा सोमहवि ( अन्धसः ) लवकर ( प्र ) दे ( अर्च ); ( २ ) ज्या दात्याचें ( इन्द्रस्य ) अतीशय ( सुमखं = महि ) धन ( सहः = श्रवः = नृम्णं ) द्यावापृथिवीसुद्धां इच्छितात ( सपर्यतः ) त्या मोठ्या ( महे ) धनदात्याला ( विश्वानराय = विश्वाभुवे ) आपल्या धनांतून (अन्धसः), हे देवांनो, तुम्हीं ( वः ) धन ( प्र ) द्या ( अर्च ).

**कम् अन्यं मध्यमात् एवम् अवक्ष्यत्। तस्य एषा अपरा भवति**

कम्० अवक्ष्यत् हें दुर्गवृत्तींत नाहीं; तें त्याच्या पुढील खंडावरील वृत्तींत आहे. दुर्ग म्हणतोः— विश्वानर हा द्युलोकचाही देव आहे; पुढील खंडांत विश्वानर हा सूर्याला द्युलोकीं ठेवतो असें म्हटलें आहे; सूर्य द्युलोकांतला; तेव्हां विश्वानर हा भिन्न लोकांतला म्हणजे अन्तरिक्षांतला असला पाहिजे. प्रस्तुत ऋचेंत बलवाचक तीन शब्द आहेत; बल हा अन्तरिक्षांतील देवांचा विशिष्ट गुण; त्यामुळें विश्वानर हाही बलवान् असल्याकारणानें अन्तरिक्षांतीलच देव असला पाहिजे.

## खंड १० वा.

**उदु ज्योतिरमृतं विश्वजन्यं विश्वानरः सविता देवो अश्रेत् (ऋ०सं०७।७६।१) उदशिश्रयत् ज्योतिः अमृतं सर्वजन्यं विश्वानरः सविता देवः। इति**

उत् + अश्रेत् = उत् + अशिश्रयत् = वरती आश्रय दिला आहे; उदशिश्रियत् हा महाराष्ट्रपाठ अशुद्ध आहे; उत् + अश्रेत् = उत् श्रयति = ऊर्ध्वम् उपनयति ( दुर्ग ). विश्वजन्यं = सर्वजन्यं = सर्व जनांना हितकर असे. विश्वानरः = मध्यमः वायुः ( दुर्ग ); विश्वानर म्हणजे वायु असें म्हणण्याचें कारण सर्वांची म्हणजे सूर्याचीही गति वायूवर अवलंबून असते. ज्योतिः = सूर्याख्यं ज्योतिः. दुर्ग म्हणतोः— विश्वानर म्हणजे वायु सूर्याला वर ठेवतो; एथें विश्वानर व सूर्य हे भिन्न होत; विश्वानर वायु असल्याकारणानें तो अन्तरिक्षांतील देव होय आणि म्हणूनच कम् अन्यं मध्यमात् एवम् अवक्षत् हें वाक्य भाष्यांत घातलें आहे; ह्यावरून हें वाक्य दुर्गाच्या निरुक्तप्रतींत प्रस्तुत खंडांत दिलें असावें ( ओळी १५ व १६ ). दुर्गानें केलेला

अर्थः–सर्वांना प्रेरणा करणारा ( सविता ) देव विश्वानर म्हणजे अन्तरिक्षांतील वायु सर्व लोकांना हितकर ( विश्वजन्यं ) असा हा मरणाच्या अधीन नसणारा ( अमृतं ) सूर्य नांवाचा ज्योति वर उचलून धरतो म्हणजे वायूमुळें सूर्य आकाशांत संचार करतो. ऋचेचा दुसरा अर्ध उषेसंबंधीं असल्याकारणानें भाष्यकारानें तो एथें दिला नाहीं असें दुर्ग म्हणतो.

सायणः––अमृतं = अमृतत्वसाधकं अविनाशि वा = अमरत्व देणारें किंवा ज्याचा विनाश होत नाहीं असें; विश्वानरः = सर्वेषां नेता; सर्वांचा नेता देव सविता जो अमरत्व देतो किंवा ज्याचा विनाश होत नाहीं व जो सर्वजनांना हितकर असतो असा उषेचा प्रकाश ( ज्योतिः ) आकाशात ठेवतो म्हणजे उषेच्या उदयाला सूर्य कारण होतो. सायणाचार्यांनीं केलेला हा अर्थ बरोबर आहे. विश्वानरः हा स्वतंत्र देव नसून तो शब्द सविता ह्या शब्दाचें विशेषण होय. श्रि = पसरणें; उत् + अश्रेत् = द्युलोकीं पसरीत आहे; अमृतं ज्योतिः = विनाश न पावणारी उषा; सविता उषेचा प्रकाश वर म्हणजे द्युलोकीं किंवा पूर्वेकडे पसरीत आहे. ऋचेच्या दुसऱ्या अर्धांत उषेला देवांचा डोळा म्हटलें आहे; अद्भुत चमत्कारानें ( क्रत्वा ) देवांचा डोळा ( देवांना चक्षुः ) जन्मास आला आहे (अजनिष्ट); उषा सर्व जग प्रकाशांत आणीत आहे; ह्याप्रमाणें सर्व ऋचा उषेसंबंधानें आहे; उषेला पूर्व दिशेला आणणें एवढेंच सवित्याचें काम.

**धाता ( ६ ) सर्वस्य विधाता । तस्य एषा भवति**

सर्व उत्पन्न करणारा तो धाता.

## खंड ११ वा.

**धाता ददातु दाशुषे प्राचीं जीवातुमक्षिताम् ।**
**वयं देवस्य धीमहि सुमतिं सत्यधर्मणः ( मैत्रा० सं० ४।१२।६ )**

**धाता ददातु दत्तवते प्रवृद्धां जीविकाम् अनुपक्षीणाम् । वयं देवस्य धीमहि सुमतिं कल्याणीं मतिं सत्यधर्मणः**

दाशुषे = दत्तवते. प्राचीं = प्रवृद्धाम्. जीवातुं = जीविकाम्. अक्षितां=अनुपक्षीणाम्. सुमतिं = कल्याणीं मतिम्. दुर्गवृत्तींत ददातुबद्दल ददाति व अनुपक्षीणांबद्दल अक्षीणां आहे. दुर्गानें केलेला अर्थः–जो हवि देतो अशा यजमानाला धाता वाढणारें व कधीं क्षय न पावणारें असें जीवनाचें साधन देतो; म्हणून ज्याच्या हातून नेहमीं सत्य घडतें ( सत्यधर्मणः ) म्हणजे जो असत्य गोष्ट कधींही करीत नाहीं अशा त्या देव धात्याचा कल्याणकारक अनुग्रह (सुमतिं) आम्हीं धारण करतों म्हणजे भोगतों. हल्लीं उपलब्ध असलेल्या मैत्रायणी संहितेंत दाशुषेबद्दल नो रयिं आहे. तैत्तिरीय संहितेंत ( ३।३।११ ) दाशुषेबद्दल नो रयिं असून सत्यधर्मणः बद्दल सत्यराधसः आहे. अथर्वसंहितेंत ( ७।१७।२ ) ददातु बद्दल दधातु व सत्यधर्मणः बद्दल विश्वराधसः आहे.आश्वलायन श्रोतसूत्रांत (६।१४।१४ ) सत्यधर्मणः बद्दल वाजिनीवतः आहे.

**विधाता (७) धात्रा व्याख्यातः। तस्य एष निपातः भवति बहुदेवतायाम् ऋचि**

धाता याची जी व्युत्पत्ति (खंड १० पान ८७२) तीच विधाता याची; पुढील खंडांत दिलेल्या ऋचेंत पुष्कळ देवता आहेत; त्यांपैकीं विधाता हा एक होय; म्हणून तेथें तो गौण होय; निपातः = गौणत्वानें असणें.

## खंड १२ वा.

**सोमस्य राज्ञो वरुणस्य धर्मणि बृहस्पतेरनुमत्या उ शर्मणि।**
**तवाहमद्य मघवन्नुपस्तुतौ धातर्विधातः कलशाँ अभक्षयम्** (ऋ० सं० १०। १६७।३)

**इति एताभिः देवताभिः अभिप्रसूतः सोमकलशान् अभक्षयम्। इति। कलशः कस्मात्। कलाः अस्मिन् शेरते। मात्राः। कलिश्च कलाश्च किरतेः। विकीर्णाः मात्राः**

ह्याप्रमाणें ह्या देवतांनीं आज्ञा केलेला (अभिप्रसूतः) मीं सोमकलश भक्षण केले आहेत. दुर्गानें केलेला अर्थः-ज्या यज्ञांत (धर्मणि) सोमहवि दिला जातो त्या यज्ञांत राजा सोम व राजा वरुण ह्यांच्या स्तुतींत असणारा (उपस्तुतौ) म्हणजे त्यांची स्तुति करणारा, बृहस्पति व अनुमति ह्यांच्या आश्रयाखालीं असणारा (शर्मणि), त्याप्रमाणें, हे इन्द्रा, हे धात्या, हे विधात्या, तुमची स्तुति करणारा मी तुम्हीं आज्ञा केल्यावरून सोमकलश भक्षण करीत आहें म्हणजे कलशांतील सोम पीत आहें.

**सायणः**—प्रकाशणाऱ्या (राज्ञः = राजमानस्य) सोमाच्या व वरुणाच्या यज्ञांत (धर्मणि = यज्ञे), त्याप्रमाणें बृहस्पति व अनुमति ह्यांच्या यज्ञगृहांत (शर्मणि = शरणे = यज्ञगृहे) असणारा मी, हे इंद्रा, तुझी स्तुति करण्याला (उपस्तुतौ = स्तोत्रे) आतां उद्युक्त झालों आहें; हे धातृ नांवाच्या देवा व हे विधातृ नांवाच्या देवा, तुमच्या दोघांच्या अनुज्ञेनें देवांना देऊन राहिलेला कलशांतला सोम मीं भक्षण केला आहे.

धर्मणि=शर्मणि=उपस्तुतौ=धनांत किंवा धनामुळें; धृ=शृ=स्तु=देणें. उपस्तुतिः औचथ्यम् उरुष्येत् (१।१५८।४) = धनदान (उपस्तुतिः) औचथ्याचें दारिद्र्यापासून रक्षण करील. भद्रा रुद्राणां मरुताम् उपस्तुतिः (१।६४।११)=दात्या (रुद्राणां) मरुतांनीं (मरुतां) दिलेलें दान (उपस्तुतिः) धनानें पूर्ण (भद्रा) असतें. उपस्तुति या शब्दाचा बहुतेक ठिकाणीं अर्थ योग्य स्तुति किंवा योग्य याचना असा आहे; पण कांहीं थोड्या ठिकाणीं धनदान असा त्या शब्दाचा अर्थ असावा. भज्=वाटणें, देणें; भज् + स् (लेट्चा) = भक्ष् = वांटणें, देणें. कलश शब्द सोमासंबंधानें पुष्कळ वेळां आला आहे; तेथें त्याचा अर्थ सोमरस ठेवण्याचें पात्र असा आहे; कांहीं ठिकाणीं द्रव्याचा हंडा असा त्याचा अर्थ होतो; जसें:— हिरण्यस्येव कलशं निखातम् उदूपथुः दशमे अश्विनाहन् (१।११७।१२) = हे अश्विनांनो, जमिनींत पुरलेला (निखातं) हिरण्यानें

भरलेला हंडा ( हिरण्यस्य कलशं ) जसा कोणी वर काढतो तसें तुम्हीं भुज्यूला दहाव्या दिवशीं समुद्रांतून बाहेर काढलें. दश ते कलशांना हिरण्यानामधीमहि । भूरिदा असि वृत्रहन् ( ४।३२।१९ ) = वृत्राला म्हणजे दारिद्र्याला हाणून पाडणाऱ्या हे इन्द्रा ( वृत्रहन् ), तूं पुष्कळ धन देत असतोस ( भूरिदाः असि ); म्हणूनच आम्ही तुजपाशीं सोन्यानें भरलेले दहा हंडे मागत आहों. ऋचेचा अर्थः— सोम, राजा वरुण, बृहस्पति व अनुमति ह्यांनीं दिलेल्या धनामुळें ( धर्मणि = शर्मणि ) आणि आज ( अद्य ) तूं दिलेल्या धनामुळें ( उपस्तुतौ ), हे धनवन्ता ( मघवन् ), हे धनदात्या ( धातर् = विधातर् ), मीं सोन्यानें भरलेले हंडे ( कलशान् ) वांटून टाकले आहेत ( अभक्षयं ). कलशः = कल + शः; कल = कलाः = मात्राः = सोमाचे तुकडे; सोम विकत घेतांना अंशूंनीं म्हणजे लहान लहान भागांनीं तो मोजून घ्यावयाचा असतो; कांहीं अंशूंचा रस काढल्यावर क्रमानें दुसऱ्या अंशूंचा रस काढावयाचा असतो; म्हणून ह्या अंशूंना कला किंवा मात्रा असें एथें म्हटलें आहे; श = शेरते = निजतात म्हणजे भांड्यांत रसरूपानें पडलेले असतात; ज्या भांड्यांत सोमाचे अंशु रसरूपानें पडलेले असतात त्या भांड्याला कलश म्हणतात. कलश शब्दांतील कल यानें कलि व कला हे शब्द लक्षांत येतात; हे दोन्ही शब्द कॄ ( = फेकणें ) ह्यापासून; कॄ विक्षेपे ( धा० ६।१२८ ); कलि म्हणजे भांडण; भांडणांत शिव्या वगैरे एकमेकांवर फेकल्या जातात; कलिः = करिः. समूहांतून घेतलेल्या कला म्हणजे समूहांतले अवयव हेही समूहांतून बाहेर फेकले जातात म्हणजे काढले जातात; विकीर्णाः मात्राः = फेकलेले भाग; हा अर्थ कलाः ह्याचा असावा; कलाः = कराः = किराः = फेकलेले अवयव. क्षीरस्वामीः— कं लाति कलयति वा कलशः ( अमर २।९।३१ ); कलयति सङ्ख्याति कला ( अमर १।२।१६ ); कलयति कालं कला ( अमर १।३।११ ). केन जलेन लशति लसति कलशः कलसः वा ( आपट्यांचा कोश ).

## खंड १३ वा.

**अथ अतः मध्यस्थानाः देवगणाः । तेषां मरुतः ( ८ ) प्रथमागामिनः भवन्ति । मरुतः मितराविणो वा । मितरोचिनो वा । महत् रवन्ति इति वा । तेषाम् एषा भवति**

आतां ह्यापुढें अन्तरिक्षांतील देवसंघांचें वर्णन करावयाचें आहे; त्या देवसंघांमध्यें मरुत् हे पहिले येतात म्हणजे आहेत. मरुतः = मितराविणः; मरुतः = म + रुतः; म = मित; रु = शब्द करणें; रौति असौ रुत् = शब्द करणारा; रुतः हें बहुवचन; रुतः = राविणः = शब्द करणारे; मोजक्या रीतीनें म्हणजे प्रमाणबद्ध ( मित ) जे शब्द करतात ते मरुत्; किंवा रुतः = रुचः = रोचिनः; जे प्रमाणानें म्हणजे योग्य रीतीनें प्रकाशतात ते मरुत्. मरुतोमितराविणो वामितरोचिनो वा असा पाठ वाचल्यास मरुतः अमितराविणः वा अमितरोचिनः वा असे वेगळे शब्द होतील;

अमित = ज्याला मोजमाप नाहीं अशा रीतीनें. किंवा म = महत्; रुतः = रवन्ति; रवन्ति हें अशुद्ध रूप होय; रुवन्ति असें रूप पाहिजे; रुङ् गतिरेषणयोः (धा० १। ९८४); रु ( = जाणें, हिंसा करणें ) ह्याचें रवन्ते असें रूप होतें; रुवन्ति असाच पाठ असला पाहिजे. सायणाचार्यांचा पाठ व महाराराष्ट्रपाठ महत् द्रवन्ति (= मोठ्यानें धांवतात ) असा आहे. मितं निमितम् अन्तरिक्षं प्राप्य रुवन्ति शब्दं कुर्वन्ति इति मरुतः। यद्वा। अमितं भृशं शब्दकारिणः। अथवा। मितं स्वैर्निर्मितं मेघं प्राप्य विद्युदात्मना रोचमानाः। अथवा। महति अन्तरिक्षे द्रवंति इति मरुतः अशा मरुत् शब्दाच्या व्युत्पत्ति सायणाचार्य देतात ( ऋ० सं० १।८८।१ ). म्रियन्ते अनेन इति मरुत् ( अमर १।१।६२ )। म्रियते अनेन इति मरुत् ( अमर ३।३।५९ ).

## खंड १४ वा.

**आ विद्युन्मद्भिर्मरुतः स्वर्कै रथेभिर्यात ऋष्टिमद्भिरश्वपर्णैः। आ वर्षिष्ठया न इषा वयो न पप्तता सुमायाः ( ऋ० सं० १।८८।१ )**

**विद्युन्मद्भिः मरुतः स्वर्कैः। स्वञ्चनैः इति वा। स्वर्चनैः इति वा। स्वर्चिभिः इति वा। रथैः आयात। ऋष्टिमद्भिः। अश्वपर्णैः अश्वपतनैः। वर्षिष्ठेन च नः अन्नेन वयः इव आपतत। सुमायाः कल्याणकर्माणः वा। कल्याणप्रज्ञाः वा**

स्वर्कैः = स्वञ्चनैः = सुगमनैः ( दुर्ग ); सुगमन = उत्तम रीतीनें चालणारा; किंवा स्वर्कैः = स्वर्चनैः; स्वर्चन = पूजा करण्यास योग्य; किंवा स्वर्कैः = स्वर्चिभिः; अर्चिः = ज्वाला किंवा प्रकाश; ऋ = जाणें; ऋ + कः = अर्कः = अञ्चनं = गति; कदाचित् अञ्च ( = जाणें ) ह्यापासून अर्क असें यास्कास म्हणावयाचें असेल; किंवा अर्च् ( = पूजा करणें ) ह्यापासून अर्क; किंवा अर्क=अर्च = अर्चिः; अशा अर्क शब्दाच्या व्युत्पत्ति असतील. अश्वपर्णैः = अश्वपतनैः; अश्वपर्णैः = अशन पतनैः ( दुर्ग ) = ज्यांचें पतन म्हणजे गमन अन्तरिक्षाला व्यापून टाकतें अशांनीं; अश् ( = व्यापणें ) + वं = अश्वं = अशनं = व्यापणारें; पर्ण = पतनं = गमन; पत् ( = जाणें ) ह्यापासून पर्ण. रथेभिः रंहणैर्मेघैः। ऋष्टिमद्भिः रेषणवद्भिः अनाकालस्य नाशनैः। अशन पतनैः। व्याप्नुवन्तः ये अन्तरिक्षे मेघाः पतन्ति तैः ( दुर्ग ) = रथ म्हणजे गमन करणारे मेघ; ऋष्टि म्हणजे नाश; अनाकाल म्हणजे अनावृष्टि किंवा दुर्भिक्ष; त्याचा नाश करणारे ते ऋष्टिमत् मेघ; अश्वपर्णैः म्हणजे अशनपतनैः; आकाश व्यापून (अशन) जे तेथें धांवतात असे मेघ; किंवा ऋष्टि, रथ व अश्वपर्ण ह्या भिन्न वस्तु मानल्यास पुढीलप्रमाणें अर्थ होईल असें दुर्ग म्हणतो; ऋष्टि म्हणजे एक प्रकारचीं आयुधें; अश्वपर्ण म्हणजे घोडे; ज्यांत ऋष्टि नांवाचीं आयुधें ठेवलीं आहेत व ज्यांना अश्वपर्ण म्हणजे घोडे जोडले आहेत अशा रथांत ( बसून या ). वर्षिष्ठया इषा = वर्षिष्ठेन अन्नेन = अतीशय अन्नासह. वयो न = वयः इव = पक्ष्यांप्रमाणें. सुमायाः = सुकर्माणः = चांगलीं कामें करणारे; किंवा सुमायाः = सुप्रज्ञाः = बुद्धिमान्; माया =

प्रज्ञा ( निघण्टु ३।९।९ ); कर्म हा अर्थ निघण्टूंत नाहीं; भाष्यांतला कल्याण शब्द दुर्गवृत्तींत नाहीं. आपप्तत = आपतत = या. दुर्गानें केलेला **अर्थः**— हे मरुतांनो, ज्यांच्या भोंवतीं विजा चमकत आहेत, ज्यांची गति उत्तम आहे किंवा जे पूजनीय आहेत किंवा जे ज्वालायुक्त आहेत ( स्वर्कैः ), दुर्भिक्षाचा जे नाश करतात ( ऋष्टिमद्भिः ) व सर्व आकाश व्यापून पाण्याचा वर्षाव करतात ( अश्वपर्णैः ) अशा मेघांसह ( रथेभिः ) किंवा ज्यांत विजेसारखी ऋष्टि नांवाचीं आयुधें भरलीं आहेत, ज्यांची गति उत्तम आहे किंवा जे पूजनीय आहेत किंवा जे प्रकाशयुक्त आहेत व ज्यांना घोडे जोडले आहेत अशा रथांत बसून या; चांगलीं कर्मे करणारे किंवा बुद्धिमान् असे तुम्ही पुष्कळ अन्न घेऊन आमच्याकडे पक्ष्यांप्रमाणें वेगानें उडत या.

**सायणः**—विन्द्युमद्भिः = विशिष्टदीप्तियुक्तैः; स्वर्कैः = स्वर्चनैः शोभन गमन युक्तैः । यद्वा । शोभनम् अर्कः अर्चनं स्तुतिः येषाम् अस्ति तादृशैः । अथवा शोभन-दीप्तियुक्तैः; ऋष्टयः = शक्तिरूपाणि आयुधानि । स्थूणाः इत्यन्ये = ऋष्टि म्हणजे शक्ति नामक आयुधासारखीं आयुधें किंवा दुसरे टीकाकार म्हणतात त्याप्रमाणें खांब; अश्वपर्णैः = अश्वानां पतनं गमनं येषाम् अस्ति तादृशैः = घोड्यांच्या गतीमुळें जे गतिमान् आहेत अशा ( रथांत ); यद्वा । रंहणशीलाः मेघाः रथाः = किंवा रथ म्हणजे गतिमान् मेघ; विद्युन्मद्भिः = विद्युत् तडित् । तद्वद्भिः; स्वर्कैः = शोभनगमनैः; ऋष्टि-मद्भिः = अर्षणं गमनम् । तत्स्वभावनारयुक्तैः = गतियुक्तः जल आहे ज्यांच्यांत अशा ( मेघांसह ); अश्वपर्णैः = अश्वं व्याप्तं पर्णं पतनं येषाम् अन्तरिक्षं व्याप्य वर्तमानैः; माया = कर्म किंवा प्रज्ञा; वर्षिष्ठया = प्रवृद्धतरया; इषा = अन्नेन.

अर्कः = वज्र (निघण्टु २।२।१० निरुक्त पान ३४८ ); इन्द्रः पूर्भिद् आतिरत् दासमर्कैः ( ऋ० सं० ३।३४।१ ) = किल्ले फोडणारा ( पूर्भिद् ) इन्द्र दासाला वज्रांनीं ( अर्कैः ) मारता झाला (आतिरत्); अर्क म्हणजे धन असाही अर्थ होतो; शं नो भवन्तु मरुतः स्वर्काः ( ७।३५।९ ) व शं नो भवन्तु वाजिनो हवेषु देवताता मितद्रवः स्वर्काः (७।३८।७ ) ह्या दोन ठिकाणीं स्वर्काः = धनयुक्त. अश्वपर्णैः हा शब्द अश्वैः असा छंदा-करितां पाहिजे; आ विद्युन्मद्भिः मरुतः सुअर्कैः । रथेभिर्यात ऋष्टिमद्भिरश्वैः; पहिल्या चरणाप्रमाणें दुसऱ्या चरणांत अकरा अक्षरें पाहिजेत पण तीं तेरा होतात. समश्व-पर्णाश्चरन्ति नो नरः अस्माकमिन्द्र रथिनो जयन्तु ( ६।४७।३१ ) = आमचे योद्धे ( नरः ) इकडे तिकडे संचार करीत आहेत; हे इंद्रा, रथांत बसलेले आमचे योद्धे जय मिळवोत; एथें अश्वपर्णाः हें नरः ह्याचें विशेषण आहे; अश्वाः पर्णानि येषां ते अश्वपर्णाः; पर्ण म्हणजे पंख; पंख पक्षाला वाहून नेतो म्हणून पर्ण म्हणजे वाहन असा अर्थ होईल; घोडे आहेत वाहन ज्यांचें ( अश्वपर्णाः ) असे योद्धे; त्याप्रमाणें घोडे ज्यांना ओढून नेतात असे रथ असा प्रस्तुत ऋचेंत अश्वपर्ण ह्याचा अर्थ होईल; पण अश्वपर्णैः ह्यानें छंदोभंग होतो असें आतांच म्हटलें आहे; रथांत बसून व घोड्यावर

बसून या असा अर्थ करण्यास हरकत नाहीं; मरुत् घोड्यावर बसतात असें ऋग्वेदांत म्हटलें आहे; यत्प्रायासिष्ट पृषतीभिः अश्वैः वीळुपविभिः मरुतो रथेभिः (५।५८।६)= हे मरुतांनो, जेव्हां लाल पृषतींवर, घोड्यांवर व ज्यांत मजबूत वज्र ठेविले आहेत (विळुपविभिः) अशा रथांत बसून तुम्ही जातां; पृषती = एक प्रकारची लाल घोडी. इषा= धनानें, धन घेऊन. माया = (१) अद्भुत शक्ति किंवा कृति, (२) धन, (३) कपट किंवा कपटाचें कृत्य. (१) अस्तभ्नात् मायया द्याम् अवस्रसः (२।१७।५) = द्युलोक खालीं घसरूं नये म्हणून (अवस्रसः) इंद्र आपल्या अद्भुत शक्तीनें त्याला वर उचलून धरता झाला; अस्वापयत् दभीतये सहस्रा त्रिशतं हथैः। दासानामिन्द्रो मायया (४।३०। २१) = दभीतीकरितां इन्द्रानें आपल्या अद्भुत शक्तीनें हजारों दासांना वज्रप्रहारांनीं निजविलें; माया वां मित्रावरुणा दिवि श्रिता सूर्यो ज्योतिश्चरति (५।६३।४) = हे मित्रावरुणांनो, तुमची अद्भुत कृति द्युलोकीं दिसत आहे; सूर्य तुमच्या कृतीनें द्युलोकीं संचार करीत आहे. (२) विश्वा हि माया अवसि स्वधावो भद्रा ते पूषन्निह रातिरस्तु (६।५८।२) = हे धनवन्ता (स्वधावः) पूषा, तूं अतिशय धन (मायाः) देतोस (अवसि); म्हणून तुझें धनदान आमच्या ठिकाणीं असो. (३) कपट किंवा कपटाची कृति असा माया शब्दाचा अर्थ पुष्कळ ऋचांत आढळतो.

ऋचेचा अर्थः—हे मरुतांनो, ज्यांच्याभोंवतीं विजा चमकत आहेत, ज्यांच्यांत वज्र ठेविले आहेत व ज्यांच्यांत ऋष्टि नांवांचीं आयुधें ठेवलीं आहेत अशा रथांत व घोड्यांवर बसून या; आमच्याकरितां पुष्कळ धन घेऊन अतिशय धनवान् असे तुम्ही पक्ष्यांप्रमाणें खालीं वेगानें या.

रुद्राः (९) व्याख्याताः (नि० १०।५)। तेषाम् एषा भवति

रुद्र शब्दाची व्युत्पत्ति पहा (पान ७४२).

## खंड १५ वा.

**आ रुद्रास इन्द्रवन्तः सजोषसो हिरण्यरथाः सुविताय गन्तन। इयं वो अस्मत्प्रति हर्यते मतिस्तृष्णजे न दिव उत्सा उदन्यवे (ऋ० सं० ५।५७।१)**

**आगच्छत रुद्राः इन्द्रेण सहजोषणाः सुविताय कर्मणे। इयं वः अस्मत् अपि प्रतिकामयते मतिः। तृष्णजे इव दिवः उत्साः उदन्यवे। इति। तृष्णक् तृष्यतेः। उदन्युः उदन्यतेः**

आ + गन्तन = आगच्छत. रुद्रासः = रुद्राः. इन्द्रवन्तः = इन्द्रेण; इन्द्रवन्तः सजोषसः = परमैश्वर्येण नित्यम् आसेविताः = परम ऐश्वर्यानें सेविलेले म्हणजे ज्यांच्याजवळ परम ऐश्वर्य आहे असे; इदि परमैश्वर्ये (धा० १।६३); इन्द् + रं = इन्द्रं = परमैश्वर्यम्; पण जर रुद्र व इंद्र भिन्न असतील तर इन्द्रवन्तः सजोषसः = इन्द्रेण सह प्रीयमाणाः = इंद्रासह हवि दिल्यानें तृप्त झालेले; असे दुर्ग दोन अर्थ करतो. सजोषसः = सहजोषणाः; स = सह; जोषस् = जोषणं = तृप्ति; जुषी प्रीतिसेवनयोः

( धा० ६।८ ); जुष् = ( १ ) तृप्त होणें, ( २ ) सेवा करणें; दुर्गानें हे दोन्ही अर्थ दिले आहेत. हिरण्यरथाः हा शब्द भाष्यांत नाहीं; हिरण्यरथाः = उदकहरणार्थे रंहणाः ( दुर्ग )= उदक आणण्यासाठीं जाणारे; पण जर हिरण्यरथ हे रुद्रांहून भिन्न असतील तर हिरण्यरथाः = हिरण्यविकृतरथाः ( दुर्ग ) = सोन्याचे रथ आहेत ज्यांचे असे. सुविताय = कर्मणे = सुष्ठु सगुणाय यथाशास्त्रं क्रियमाणाय प्राप्त्यर्थं ( दुर्ग )= यथाशास्त्र केलें जाणारें कर्म सफल व्हावें म्हणून. अस्मत् अपि एथें अपि शब्द अध्याहृत. प्रतिहर्यते = प्रतिकामयते = (तुमच्या येण्याची) इच्छा करते; तुम्ही न आल्यास आमचें यज्ञकर्म विगुण होईल म्हणून आम्ही केलेली स्तुति तुमच्या येण्याची इच्छा करीत आहे; ब्राह्मण जसे भोजनाच्या आमंत्रणाची वाट पाहतात त्याप्रमाणें देवही हवींचा स्वीकार करण्याच्या आधीं आमंत्रणाची वाट पाहतात असें दुर्ग म्हणतो. न = इव. तृट् उपजायते यस्मिन् विशेषतः काले स तृडुपजः कालः घर्मान्तः ( दुर्ग ) = ज्या काळीं तहान विशेषकरून उत्पन्न होते तो ग्रीष्माचा मध्यकाळ होय; तृष्णजः = तृडुपजः = ज्यांत तहान उत्पन्न होते तो काल; तृष्णजः = तृष्ण + जः = तृष्णा + जः = तृष्णा जायते यस्मिन् सः; तृष्णजे ( = उन्हाळ्यांत ) हें सप्तमीचें एकवचन. उन्हाळ्यांत पाण्याची इच्छा करणाऱ्या मनुष्यांकरितां द्युलोकांतून ( दिवः ) मेघांतलें पाणी ( उत्साः ) जसें पृथिवीवर येतें तसे आमच्या स्तुतीनें बोलाविलेले तुम्ही आमच्याकडे या. उदन्यु म्हणजे चातक असा कित्येक अर्थ करतात ( दुर्ग ). इति = असा अर्थ आहे. उदन्य् ( = उदकाची इच्छा करणें ) ह्यापासून उदन्यु; उदन्य् + उः = उदन्युः; तृष्णक् तृष्यतेः। उदन्युः उदन्यतेः हें दुर्गवृत्तींत नाहीं. दुर्गानें केलेला अर्थः—हे रुद्रांनो, परमैश्वर्यानें युक्त किंवा इंद्रासह, आमच्यावर प्रेम करणारे व उदक आणण्यासाठीं जाणारे किंवा सोन्याच्या रथांत बसलेले असे तुम्ही आमचें यज्ञकर्म सफल व्हावें म्हणून या; आमची स्तुति तुमच्या येण्याची फार इच्छा करीत आहे; उन्हाळ्यांत उदकाची इच्छा करणाऱ्या मनुष्याकरितां किंवा चातकाकरितां मेघांतलें पाणी द्युलोकांतून खालीं येतें ( तसे तुम्ही आमचें कर्म सफल करण्याकरितां खालीं या ).

**सायणः**— रुद्रासः = रुद्र पुत्राः; इद्रवन्तः = इन्द्रेण युष्मत्स्वामिना तद्वन्तः = तुमचा स्वामी जो इंद्र त्यासह; सजोषसः = परस्परं समानप्रीतयः = एकमेकावर सारखी प्रीति करणारे; हिरण्यरथाः = हिरण्यमयरथाः; सुविताय = सुगमनाय तत्-साधनाय सुष्ठु सर्वैः गन्तव्याय यज्ञाय = ज्याच्याकडे सर्वांनीं गेलेच पाहिजे अशा यज्ञाकडे; इयं ० मतिः = आमची स्तुति तुमच्या येण्याची इच्छा करीत आहे म्हणून या; उदन्यवे उदकेच्छवे तृष्णजे गोतमाय दिवः उत्साः उदकनिष्यंदाः यथा युष्माभिः प्रेरिताः तद्वत् अस्मदर्थमपि आगत्य अभिमतं ददत = तहानेनें पीडिलेल्या व पाण्याची इच्छा करणाऱ्या गोतमाकरितां जशा पावसाच्या धारा द्युलोकांतून खालीं येऊन त्याची तहान भागवित्या झाल्या त्याप्रमाणें तुम्हीही खालीं येऊन आमच्या कामना आम्हांस द्या.

मरुतांनाच रुद्र म्हटलें आहे; त्याचें कारण ते रुद्राचे पुत्र होत. ते सदा इंद्रा-

बरोबर असावयाचे म्हणून त्यांना इंद्रवन्तः म्हटलें आहे. सजोषसः बरोबर एकत्र असणारे; मरुत् कधींही एकमेकापासून विलग होत नाहींत; सदासर्वदा ते जुटीनें संचार करितात. इंद्रं विश्वे सजोषसो देवासो दधिरे पुरः ( १।१३१।१ ) = सर्व देव एकत्र होऊन म्हणजे एकमतानें ( सजोषसः ) इंद्राला संग्रामाच्या अग्रभागीं ठेविते झाले. त्वां विश्वे सजोषसो देवासो दूतमक्रत ( ५।२१।३ ) = हे अग्नि, सर्व देव एकत्र होऊन म्हणजे एकमतानें तुला आपला दूत करते झाले. उभा यातं नासत्या सजोषसा प्रति हव्यानि वीतये ( ८।१०१।७ ) = हे अश्विनांनो, हविभक्षणार्थ तुम्ही दोघेजण एकमेकांबरोबर या. त्वमिंद्र सजोषसम् अर्कं बिभर्षि बाह्वोः । वज्रं शिशान ओजसा ( १०।१५३।३ ) = हे इंद्रा, तुझ्याबरोबर नेहमीं असणारें ( सजोषसं ) वज्र जोरानें पाजवून तूं तें आपल्या दोन हातांत धरतोस. स० सुगेभिर्याति अध्वनः । अर्यमा मित्रो वरुणः सरातयो यं त्रायन्ते सजोषसः ( ८।२७।१७ ) = धनदान करणारे (सरातयः) व धनवान् ( सजोषसः ) असे अर्यमा, मित्र व वरुण ज्याचें रक्षण करतात तो चांगल्या चालणाऱ्या घोड्यावर बसून ( सुगेभिः ) आपल्या मार्गाच्या शेवटास पोंचतो म्हणजे ह्या देवांनीं दिलेल्या धनानें त्याला इहलोक सुखकर होतो. सजोषस् = एकत्र असणारा, बरोबर असणारा हा पहिला अर्थ; धनवान् हा दुसरा अर्थ; जुष् = स्वीकार करणें; ज्योष किंवा ज्योषस् = स्वीकारलेला हवि किंवा स्वीकारलेलें धन; देव एकत्र होऊन म्हणजे जमावानें यजमानापासून हवि घेतात ह्या अर्थावरून एकत्र असणारा किंवा बरोबर असणारा हा अर्थ निघाला असेल. सजोषस् प्रमाणें सजोष असा अकारान्तही त्याच अर्थाचा शब्द आहे. सुवित = कल्याण, धनदान ( पानें २७८ व २७९ ). तृष्, धृष् व स्वप् ह्यांना नज् प्रत्यय लागून तृष्णज्, धृष्णज् व स्वप्नज् अशीं रूपें होतात; स्वपितृषोः नजिङ् (पा० ३।२।१७२ )। धृषेश्च ( काशिका ). तृष् = तहान. ज्याला तहान लागली आहे तो तृष्णज्. सिञ्चन् उत्सं गोतमाय तृष्णजे ( १।८५।११ ) = तृष्णेनें व्याकुल झालेल्या गोतमाकरितां मरुतांनीं मेघांतल्या पाण्याचा वर्षाव केला. उदन् ( = उदक ) + युः ( = इच्छिणारा ) = उदन्युः. ऋचेचा अर्थः—द्युलोकांतून मेघांतलें पाणी ( उत्साः ) जसें तहानेनें व्याकुळ झालेल्या ( तृष्णजे ) व पाण्याची इच्छा करणाऱ्या गोतमाकडे आले तसे, हे रुद्रपुत्र मरुत् हो, एकत्र असे इंद्रासह सोन्याच्या रथांत बसून आमच्या कल्याणाकरितां या; ही आमची स्तुति तुमच्या येण्याची इच्छा करीत आहे.

**ऋभवः ( १० ) उरु भान्ति इति वा । ऋतेन भान्ति इति वा । ऋतेन भवन्ति इति वा । तेषामेषा भवति**

ऋभवः = ऋ + भवः; ऋ = उरु; भवः = भान्ति; जे विस्तीर्णपणें प्रकाशतात ते ऋभु; किंवा ऋ = ऋतेन = यज्ञेन सत्येन वा; जे यज्ञानें म्हणजे हवीनें किंवा सत्यानें प्रकाशतात ते; किंवा भवः = भवन्ति; ज्यांच्यापाशीं हवि किंवा सत्य आहे असे. मूळ शब्द ऋभु; ऋभु = ऋ + भु; भा + उ = भु; किंवा भु = भू = असणें.

## खंड १६ वा.

**विष्ट्वी शमी तरणित्वेन वाघतो मर्तासः सन्तो अमृतत्वमानशुः।**

**सौधन्वना ऋभवः सूरचक्षसः संवत्सरे समपृच्यन्त धीतिभिः** ( ऋ० सं० १।११०।४ )

**कृत्वा कर्माणि क्षिप्रत्वेन वोढारः मेधाविनः वा। मर्तासः सन्तः अमृतत्वम् आनशिरे सौधन्वनाः ऋभवः। सूरख्यानाः वा। सूरप्रज्ञाः वा। संवत्सरे समपृच्यन्त धीतिभिः कर्मभिः**

विष्ट्वी=कृत्वा. शमी=कर्माणि. निघण्टूंत ( २।१ ) विष्ट्वी व शमी ह्या दोहोंचाही अर्थ कर्म असा आहे; पण पुनरुक्ति टाळण्याकरितां यास्कानें विष्ट्वी = कृत्वा असा अर्थ केला आहे ( दुर्ग ). तरणित्वेन = क्षिप्रत्वेन; तरणि=क्षिप्र (निघण्टु २।१५।२५ ). वाघतः = वोढारः = यज्ञस्य अनुष्ठातारः ( दुर्ग )=यज्ञानुष्ठान करणारे; वह् ह्या धातूपासून वाघत् ; वह् + अत् = वघ् + अत् = वाघ् + अत् = हवि देणारा; वाघतः = ऋत्विजः (निघण्टु ३।१८।३); किंवा वाघतः = मेधाविनः ( नि० ३।१५।२४ ). मर्तासः बद्दल मर्ताः असें पाहिजे. आनशुः = आनशिरे; अशू व्याप्तौ संघाते च ( धा० ५।१८ ); अश् = व्यापणें, प्राप्त करून घेणें; हा धातु अर्वाचिन संस्कृतांत आत्मनेपदी आहे. सूरचक्षसः = सूरख्यानाः; चक्षिङः ख्याञ् ( पा० २।४।५४ ); दुसऱ्या भूतकालांत चक्ष् धातूला ख्या असा विकल्पानें आदेश होतो; हा नियम यास्कानें चक्षस् = ख्यानं एथेंही लागूं केला आहे असें दिसतें; सूरख्यानाः असें दुर्गवृत्तींत नाहीं; सूरचक्षसः = सूर्यविख्याताः सूर्यसमानदर्शनाः (दुर्ग) = सूर्यासारखे विख्यात किंवा दिसण्यांत सूर्यासारखे; पाणिनी-सूत्रानें सूर्यसमानदर्शनाः असा एकच अर्थ दुर्गानें द्यावयास पाहिजे होता; कारण चक्ष् = ख्या = पाहणें, दिसणें असा अर्थ आहे; सूरस्य इव चक्षः ख्यानं येषां ते सूर-चक्षसः अथवा सूरख्यानाः; किंवा सूरचक्षसः = सूरप्रज्ञाः = सूर्यासारखी ज्यांची बुद्धि आहे असे; चक्षस् म्हणजे अन्तःचक्षु; सूरचक्षसः = सूर्यसमानप्रज्ञाः ( दुर्ग ). धीतिभिः = कर्मभिः = यजमानानीं दिलेल्या हवींनीं. दुर्गानें केलेला अर्थः— भराभर ( तरणित्वेन ) अद्भुत कृत्यें ( शमी ) केल्यावर ( विष्ट्वी ) यज्ञ करणारे ( वाघतः ) किंवा बुद्धिमान् असें सुधन्व्याचे मुलगे मर्त्य ( मर्तासः ) असूनही अमरत्वाला पोंचले ( आनशिरे ); सूर्यासारखे दिसणारे किंवा सूर्यासारखे बुद्धिमान् असे ते एका वर्षांत यजमानाच्या कर्मांनीं म्हणजे हवींनीं युक्त झाले ( म्हणजे वर्षाच्या आंतच देवांच्यासारखे त्यांना हवि मिळूं लागले ).

**सायणः**— वाघतः = ऋत्विज् ; पण एथें ऋत्विजांनि युक्त असे ऋभु; शमी = यागदानादिकर्माणि = याग, दान वगैरे कर्में; सूरचक्षसः = सूर्यसमानप्रकाशाः सूर्य-सदृशज्ञानाः वा; समपृच्यन्त धीतिभिः = अग्निष्टोमादिकर्मभिः संयुक्ताः अभवन् = हवि-र्भागार्हाः बभूवुः = अग्निष्टोम वगैरे यागांत हवि घेण्यास पात्र झाले; बाकीच्या शब्दांचे अर्थ यास्कानें दिल्याप्रमाणें.

सौधन्वनासो अमृतत्वमेरिरे विष्ट्वी शमीभिः सुकृतः सुकृत्यया (३।६०।३) = हवि देऊन (विष्ट्वी = शमीभिः = सुकृत्यया) हवि देणारे (सुकृतः) सुधन्व्याचे मुलगे अमरत्वाप्रत गेले. विष्ट्वी ग्रावाणः सुकृतः सुकृत्यया होतुश्चित्पूर्वे हविरद्यमाशत (१०।९४।२) = हवि देऊन (विष्ट्वी = सुकृत्यया) हवि देणारे (सुकृतः) ग्रावे होत्याच्या म्हणजे अग्नीच्या आधींच खावयाचा (अद्यं) हवि भक्षण करते झाले. विष्ट्वी शब्द असा एकंदर तीनदां आला आहे; त्वी हा प्रत्यय त्वा ह्या प्रत्ययासारखा असून तो कृत्वी, गत्वी, विष्ट्वी, हित्वी वगैरे रूपांत आढळतो; विष्ट्वी = विष्ट्वा = हवि देऊन. यो भूयिष्ठं नासत्याभ्यां विवेष चनिष्ठं पित्वः (५।७७।४) = जो अश्विनांना सोमरसाचा (पित्वः) अतीशय गोड (चनिष्ठं) व सर्वांत मोठा भाग (भूयिष्ठं) हवि म्हणून देतो (विवेष); विष् = हवि देणें. शमी = शम्या = हवीनें; ईजे यज्ञेभिः शशमे शमीभिः (६।३।२); शशमे = ईजे = देता झाला किंवा हवि देऊन तृप्त करता झाला; शमीभिः = यज्ञेभिः = हवींनीं. यत् निक्तहस्तः तरणिर्विचक्षणः सोमं सुषाव मधुमन्तमद्रिभिः (४।४५।५) = ज्या स्वादिष्ठ (मधुमन्तं) सोमाचा रस ग्राव्यांनीं हवि देणारा (तरणिः) हात स्वच्छ धुवून (निक्तहस्तः) काढतो (सुषाव). तरणित्वा ये पितुरस्य सश्चिरे ऋभवो वाजम् अरुहन् दिवो रजः (१।११०।६) = ह्या (अस्य) पित्याला (पितुः) म्हणजे यूला हवि देऊन (तरणित्वा = तरणित्वेन) ऋभु धनयुक्त (वाजं) अशा द्युलोकाप्रत (दिवः रजः) गेले (अरुहन्). शमी शम्या तरणित्वेन विष्ट्वी विष्ट्वा = हवि देऊन. वाघत् शब्द एकवीस ठिकाणीं आला आहे; तेरा ठिकाणीं त्याचा अर्थ हविर्दाता, तीन ठिकाणीं धन देणारा व चार ठिकाणीं धन असा आहे; एके ठिकाणीं (६।१६।१२) त्याचा अर्थ कळत नाहीं. त्वमग्ने वाघते सुप्रणीतिः सुतसोमाय विधते यविष्ठ रत्नं भर शशमानाय (४।२।१३); वाघते = सुतसोमाय = विधते = शशमानाय = हवि देणाऱ्याला; सुप्रणीतिः = पुष्कळ धन देणारा; यविष्ठ = हे मोठ्या दात्या. सूरचक्षसः = सूर्यासारखे तेजस्वी. धीति = हवि. ऋभूंना एका वर्षाच्या आंतच हवि मिळूं लागले. अभि प्रयांसि सुधिता वसो गहि मंदस्व धीतिभिः (८।६०।४) = हे अग्नि, आमच्या अर्पिलेल्या (सुधिता = सुधितानि) हवींकडे (प्रयांसि अभि) ये व त्या हवींनीं (धीतिभिः) हर्ष पाव. अग्ने घृतस्य धीतिभिः तेपानो देव शोचिषा। आ देवान् वक्षि यक्षि च (८।१०२।१६) = हे अग्नि, घृताच्या आहुतींनीं ज्वालायुक्त झालेला (तेपानः) तूं देवांना घेऊन ये व त्यांना हवि दे. धीति ह्याचा अद्भुत शक्ति असाही अर्थ आहे; जसें:— एकं वि चक्र चमसं चतुर्वयं निश्चर्मणो गामरिणीत धीतिभिः। अथा देवेषुअमृतत्वमानश (४।३६।४) = हे ऋभूंनो, तुम्हीं आपल्या अद्भुत शक्तीनें (धीतिभिः) एका चमसाचें चार चमस केलेत व नुसत्या कातड्यापासून गाय निर्माण केलीत; त्यामुळें देवांमध्यें तुम्हांला अमरत्व प्राप्त झालें आहे. संवत्सरे समपृच्यन्त धीतिभिः = एका वर्षांत तुम्ही अद्भुत शक्तींनीं युक्त झालांत असा अर्थ असण्याचा संभव आहे.

ऋभुः विभ्वा वाजः इति सुधन्वनः आंगिरसस्य त्रयः पुत्राः बभूवुः। **तेषां प्रथमोत्तमाभ्यां बहुवत् निगमाः भवन्ति। न मध्यमेन। तत् एतत् ऋभोश्च बहुवचनेन चमसस्य च संस्तवेन बहूनि दशतयीषु सूक्तानि भवन्ति**

ऋभु, विभ्वन् व वाज असे अंगिरस्कुलांतील सुधन्व्याचे तीन मुलगे होते. सुधन्वन् हा शब्द ऋग्वेदांत दोनदां आला असून एकदां तो रुद्र (५।४२।११) व एकदां मरुत् (५।५७।२) ह्यांचें विशेषण आहे; अंगिरस् कुलांत सुधन्वा नांवाचा पुरुष होऊन गेला ह्या म्हणण्याला ऋग्वेदांत कांहीं आधार नाहीं. ह्या तिघांपैकीं पहिला म्हणजे ऋभु व शेवटला म्हणजे वाज ह्यांसंबंधानें ऋग्वेदांत बहुवचनी प्रयोग (निगमाः) आहेत म्हणजे ऋभवः व वाजाः असे बहुवचनी शब्द वापरलेले आढळतात; पण मधला जो विभ्वन् त्याच्यासंबंधानें असे बहुवचनी प्रयोग ऋग्वेदांत नाहींत. तत् एतत्० सूक्तानि भवन्ति ह्या वाक्याचें विवरण जरी दुर्गानें केलें आहे तरी तें वाक्य प्रक्षिप्त दिसतें; ऋभु हें नांव नेहेमीं बहुवचनी असतें असें म्हटल्यावर ह्या वाक्याची आवश्यकता दिसत नाहीं; शिवाय एका चमसाचे चार चमस केले ह्या खेरीज ऋभूंनीं आणखींही कित्येक अद्भुत कृत्यें केलीं त्यांचाही निर्देश प्रस्तुत वाक्यांत करावयास पाहिजे होता; चमसाचें वर्णन संबंध सूक्तांत केलें नसून तें आठ ऋचांतच आढळतें. तदेतत् = जसें; तदेतत् या शब्दानें ऋभु व वाज ह्यांच्या बहुवचनी प्रयोगाचें उदाहरण द्यावयाचें आहे असें सूचित होतें; पण उदाहरणाऐवजीं ज्यांत ऋभु हें नांव बहुवचनी आहे व चमसाचें वर्णन केलें आहे अशी पुष्कळ सूक्तें ऋग्वेदांत आहेत एवढेंच म्हटलें आहे; ह्या वाक्यांत वाजांचा निर्देश कां केला नाहीं?

इन्द्रो हरी युयुजे अश्विना रथं बृहस्पतिः विश्वरूपामुपाजत्। ऋभुर्विभ्वा वाजो देवान् अगच्छत स्वपसो यज्ञियं भागमैतन (१।१६१।६) = ऋभूंच्या कुशलतेमुळें इन्द्र चांगले घोडे रथाला जोडतां झाला, अश्विनांना अप्रतिम रथ मिळाला व बृहस्पति नानारूपें धारण करणारी गाय घेऊन गेला; अशीं अद्भुत कृत्यें करणारें हे ऋभु, विभ्वन् व वाजहो, तुम्ही देव समाजांत गेलांत व अमर झालांत. पुनर्ये चक्रुः पितरा युवाना० जरणा शयाना। ते वाजो विभ्वां ऋभुरिन्द्रवन्तो० नोऽवन्तु यज्ञम् (४।३३।३) = जरठपणाने अंथरुणाला खिळलेल्या आईबापांना ज्यांनीं तरुण केलें असे ऋभु, विभ्वन् व वाज इन्द्रासह आमचा हवि घेवोत. अपो हि एषाम् अजुषन्त देवाः अभि क्रत्वा मनसा दीध्यानाः। वाजो देवानामभवत् सुकर्मा इन्द्रस्य ऋभुक्षा वरुणस्य विभ्वा (४।३३।९) = आपल्या धनांतून सतत धन देणाऱ्या; देवांनीं त्यांच्या धनाचा स्वीकार केला; वाज देवांना, ऋभु इन्द्राला व विभ्वन् वरुणाला धन देत असत. ऋभुर्विभ्वा वाज इन्द्रो नो अच्छेमं यज्ञं रत्नधेयोप यात (४।३४।१) = हे ऋभु, विभ्वन्, वाज व इन्द्र, आम्हांस देण्यासाठीं धन घेऊन आमच्या ह्या यज्ञाकडे या. स रायस्पोषं स सुवीर्यं दधे यं वाजो विभ्वां ऋभवो यमाविषुः (४।३६।६) = ज्याच्यावर वाज, विभ्वन् व ऋभु अनुग्रह करतात

त्याला अतिशय धन मिळतें; एथें ऋभुः ह्याबद्दल ऋभवः घातलें आहे; त्यावरुन असें अनुमान काढतां येईल कीं ह्या तिन्ही भावांचा अन्तर्भाव ऋभवः ह्या शब्दांत होतो. ऋभु शब्दाचें बहुवचन पुष्कळ ऋचांत आलें आहे; त्याचा अर्थ एकटा ऋभु नसून त्यानें तीनही भावांचा निर्देश केला असतो. बहुवचनी ऋभु शब्दाला बहुवचनी वाज शब्दाची जोड नऊ वेळां दिली आहे. पांच पांच वेळां ऋभवः-बद्दल ऋभुक्षाः व ऋभुक्षणः असे शब्द घातले आहेत; ह्या सर्व १९ ठिकाणीं वाजाः हें वाज ह्या विशेषनामाचें बहुवचन नसून ऋभवः किंवा ऋभुक्षाः किंवा ऋभुक्षणः ह्या शब्दाचें तें विशेषण असावें; वाजरत्नाः हें विशेषण ऋभूंना दोनदां (४।३४।२॥४।३५।५) लाविलें आहे; तेव्हां वाजाः हेंही ऋभवः ह्याचें विशेषण असावें; वाजाः = धनवन्त; ऋभूंची धनाबद्दल ख्याति होती; त्यांनीं देवांनाही धन दिलें असें वरील एका ऋचेंत (४।३३।९) म्हटलें आहे. वर जे ऋभु, विभ्वन् व वाज ह्यांच्या संबंधाचे उतारे आहेत त्यांत ऋभूंचीं चारच कृत्यें सांगितलीं आहेत. पोरक्या वासराकरितां गाय निर्माण करणें व एका चमसाचें चार चमस करणें हींही अद्भुत कृत्यें ऋभूंनीं केलीं; ह्या सहाही कृत्यांचें वर्णन सहासहा आठआठ वेळां आलें आहे. एका ऋचेंत सगळ्यांत थोरला चमसाचे दोन तुकडे करूं असें म्हणतो, मधला तीन तर सगळ्यांत कनिष्ठ चार करुं असें म्हणतो (४।३३।५); ऋभु, विभ्वन् व वाज ह्यांचा क्रम वर दिलेल्या ऋचांत एकच नसल्यामुळें त्यांतला ज्येष्ठ कनिष्ठ व मध्यम कोण हें ठरवितां येत नाहीं; तथापि ऋभु या नांवांत सर्व भावांचा अन्तर्भाव झाल्याकारणानें तोच ज्येष्ठ असेल. हा चमस काय वस्तु होती हे मुळींच सांगतां येत नाहीं; ज्या चमसाचे ऋभूंनीं चार तुकडे केले तो कशाचा केला होता (किंमयः) असें ऋषि स्वतः विचारतो (४।३५।४).

**आदित्यरश्मयः अपि ऋभवः उच्यन्ते। अगोह्यस्य यदसस्तना गृहे तदद्येद-मृभवो नानु गच्छथ (ऋ० सं० १।१६१।११)। अगोह्यः आदित्यः। अगूहनीयः। तस्य यत् अस्वपथ गृहे। यावत् तत्र भवथ न तावत् इह भवथ। इति**

सूर्यकिरणांनाही ऋभु म्हटलें आहे. उद्वत्सुअस्मा अकृणोतना तृणं निवत्सु अपः स्वपस्यया नरः। अगोह्यस्य यदसस्तना गृहे तदद्येदमृभवो नानु गच्छथ (१।१६१।११) = जेथें पाण्याचा थेंब नाहीं अशा उंचवट्यावर, हे आदित्य किरणांनो, तुम्ही पाऊस पाडून ह्या जगावर उपकार करण्याकरितां गवत उत्पन्न केलेंत व खोलगट जागेंत उपकार करण्याच्या हेतूनें प्रवृत्त होऊन तुम्ही पाऊस पाडलांत; ज्याअर्थी जो कधीं लपला जाणार नाहीं अशा सूर्याच्या (अगोह्यस्य) घरीं तुम्ही निजलां होतां (असस्तन) म्हणजे सूर्यमंडळांत रात्रीं लपून राहिला होतां त्याअर्थी आज तुम्ही एथें आला नाहींत असा दुर्ग अर्थ करतो. अगोह्यः = अगूहनीयः आदित्यः = जो कधीं लपला जाणार नाहीं असा सूर्य; असस्तन = अस्वपथ; अस्वपथ हें रूप अशुद्ध आहे तें स्वपिथ किंवा अस्वपित पाहिजे. जोंपर्यंत तुम्ही तेथें असतां तोंपर्यंत तुम्ही एथें नसतां

हा यास्कानें उध्दृत केलेल्या ऋगर्धाचा सारांश आहे. इति = असा अर्थ आहे. सायणाचार्य दुर्गाप्रमाणेंच ह्या ऋचेचा अर्थ करतात; कांहीं शब्दांचा व वाक्यांचा ते पुढील प्रमाणें अर्थ करतातः–उरु प्रभूतं भासमानाः । ऋतेन आदित्येन भासमानाः वा । ऋतेन-उदकेन उदकार्थम् उत्पनाः वा = सूर्यकिरण विस्तृत प्रदेशावर प्रकाशतात; किंवा ऋत म्हणजे आदित्य; ऋतामुळें म्हणजे आदित्यामुळें तें प्रकाशतात; किंवा ऋता· करितां म्हणजे जलाकरितां ते उत्पन्न होतात; अशा ऋभु शब्दाच्या तीन व्युत्पत्ति; अगोह्यः=अग्राह्यः= ज्याला कोणी धरूं शकत नाहीं असा सूर्य; किंवा अगोह्यः = लपविण्याला अशक्य असा; दुसऱ्या ऋगर्धाचा विकल्पानें पुढीलप्रमाणें अर्थ; जोंपर्यंत अन्तरिक्षांत तुम्ही निजलां असतां तोंपर्यंत पावसाळा असूनही पाऊस पाडण्याचें काम तुम्ही करीत नाहीं.

अगोह्य म्हणजे सूर्य असा अर्थ केल्यामुळें ऋभु म्हणजे सूर्यकिरण असा अर्थ केला गेला; पण अगोह्य म्हणजे सूर्य ह्या अर्थाला व्युत्पत्तीखेरीज दुसरा पुरावा पाहिजे. अगोह्य शब्द सहा वेळां आला आहे. (१) एन्द्र नो गधि प्रियः सत्राजित् अगोह्यः । गिरिर्न विश्वतस्पृथुः पतिर्दिवः ( ८।६८।४ ) = हे इन्द्रा, धन जिंकणारा ( सत्राजित् ), पर्वताप्रमाणें सर्व बाजूंनीं विस्तृत, द्यूचा पति असा तूं आमच्याकडे ये; एथें इन्द्राला अगोह्य म्हटलें आहे; गोह्य = लपविलेलें धन; अगोह्य = ज्याचें धन लपविलेलें नाहीं असा. ( २ ) नरा वा शंसं पूषणम् अगोह्यम् अग्निं देवेद्धम् अर्चसे गिरा ( १०।६४।३ ) = नराशंस, पूषा व देवांनीं प्रज्वलित केलेला अग्नि ह्यांची स्तुति कर; एथें अगोह्यम् हें पूषणं ह्याचें विशेषण असावें; किंवा अगोह्य हें एकाद्या देवाचें नांव असेल तर तो देव कदाचित् इन्द्र असेल. ( ३ ) तत्सविता वो अमृतत्वमासुवत् अगोह्यं यत् श्रवयन्त एतन ( १।११०।३ ) = हे ऋभूंनो, जेव्हां धन देणारे (श्रवयन्तः) तुम्ही अगोह्याकडे गेलांत तेव्हां सविता तुम्हांला अमृतत्व देता झाला; अमृतत्व म्हणजे अमरत्व किंवा अतीशय धन; एथें सविता हा अगोह्य; ह्या ऋचेच्या आधींच्या ऋचेंत सौधन्वनासश्चरितस्य भूमना अगच्छत सवितुर्दाशुषो गृहम् = हे सुधन्व्याचे मुलांनो, हवि देणारा ( दाशुषः ) जो सविता त्याच्या घरीं पुष्कळ धन घेऊन तुम्ही गेलांत असें म्हटलें आहे; तेथें सविता हा देव कीं हवि देणारा एकादा यजमान हें ठरवितां येत नाहीं; बहुतकरून हवि देणारा यजमानच असेल. ( ४ ) द्वादश द्यून् यत् अगोह्यस्य आतिथ्ये रणन् ऋभवः ससन्तः । सुक्षेत्राकृणवन् अनयन्त सिन्धून् धन्वातिष्ठन् ओषधीर्निम्नमापः ( ४।३३।७ ) = ऋभु जेव्हां बारा दिवस अगोह्याच्या घरीं निजून त्याच्या आतिथ्याचा उपभोग घेत राहिले त्या मुदतींत त्यांनीं शेतें सुपीक केलीं, वालुकामय प्रदेशांतून नद्यांचें पाणी नेलें व अशामुळें तेथें पाण्याचा संचय होऊन झाडें वाढलीं.(५) सुषुप्वांसः ऋभवः तत् अपृच्छत अगोह्य क इदं नो अबूबुधत् । श्वानं बस्तो बोधयितारमब्रवीत् संवत्सरे इदमद्या व्यख्यत ( १।१६१।१३ ) = झोपीं गेलेले ऋभु विचारूं लागले कीं, हे अगोह्या, आम्हांला असें कोणीं जागें

केलें? तेव्हां बस्त (?) तुम्हांला जागें करणारा कुत्रा असें म्हणाला; तुम्हीं आज एक वर्षभर एथें पाहिलेंत. (६) उद्वत्स्वस्मा अकृणोतना तृणं निवत्स्वपः स्वपस्यया नरः। अगोह्यस्य यदसस्तना गृहे तदद्येदमृभवो नानु गच्छथ (१।१६१।११) = हे दात्या ऋभूंनो, त्या बैलाकरितां (अस्मै) तुम्हीं उंच प्रदेशावर गवत उत्पन्न केलें व खोलगटांत पाणी तयार केलें; अगोह्याच्या घरीं तुम्ही निजलां आहांत त्यामुळें तुम्ही आज एथें येत नाहीं. अगोह्य हें मूळचें विशेषण असून तें इन्द्राला, पूषाला व सवित्याला लाविलें आहे; सविता हा हवि देणारा यजमान असावा व त्याच्याच घरीं बारा दिवस झोपून ऋभूंनीं अद्भुत कृत्यें केलीं असतील.

**अङ्गिरसः (११) व्याख्याताः (निरु० ३।१७)। तेषाम् एषा भवति**

अंगिरस् शब्दाची व्युत्पत्ति पहा (पान २०८).

## खंड १७ वा.

**विरूपास इदृषयस्त इद्गम्भीरवेपसः। ते अङ्गिरसः सूनवस्ते अग्नेः परि जज्ञिरे (ऋ० सं० १०।६२।५)**

**बहुरूपाः ऋषयः ते गम्भीरकर्माणः वा गम्भीरप्रज्ञाः वा। ते अङ्गिरसः पुत्राः। ते अग्नेः अधि जज्ञिरे। इति अग्निजन्म**

विरूपासः= विरूपाः=बहुरूपाः; बहुरूपाः बद्दल दुर्गवृत्तींत नानारूपाः आहे. इत् निरर्थक म्हणून गाळला आहे. ऋषयः = अवितथस्य ब्रह्मणः द्रष्टारः = सत्यब्रह्माला पाहणारे. गम्भीरवेपसः = गम्भीरकर्माणः वा गम्भीरप्रज्ञाः वा = गूढ म्हणजे अचाट कृत्यें करणारे किंवा गम्भीर म्हणजे खोल बुद्धीचे. दुर्गवृत्तींत गम्भीरकर्माणः ह्या बद्दल अप्रमेयकर्माणः व गम्भीरप्रज्ञाः ह्या बद्दल अप्रमेयबुद्धयः असें आहे; वेपस् = कर्म एवढाच अर्थ निघण्टूंत दिला आहे (२।१।५). सूनवः ह्याचा पुत्राः असा पर्याय देणें जरूर नाहीं. परिजज्ञिरे = अधिजज्ञिरे. अंगिरसाला अग्नीचें रूप प्राप्त झाल्यावर त्याच्यापासून त्याचे पुत्र जन्मास आले असें दुर्ग म्हणतो. इति अग्निजन्म = अंगिरसाचा अग्नीपासून जन्म अशाप्रकारचा होय म्हणजे ते साक्षात् अग्नीपासून जन्मले नव्हते; इति अग्निजन्म हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. दुर्गानें केलेला अर्थः— नानारुपें धारण करणारे अंगिरस् हे सत्यब्रह्म पाहणारे असून अचाट कृत्यें करणारे किंवा अचाट बुद्धीचे होते; ते अंगिरसाचे पुत्र असून अग्नीपासून जन्मले म्हणजे अंगिरसाला अग्नीचें रूप प्राप्त झाल्यावर ते त्याच्यापासून जन्मले.

**सायणः**–विरूपासः = अन्योन्यं वर्णतः रूपतश्च नानारूपाः = वर्णानें व रूपानें एकमेकापासून भिन्न; इत् = एव; गम्भीरवेपसः = गम्भीरकर्माणः; त इमे अंगिरसः सूनवः पुत्राः खलु। तदेव आह। त इमे अंगिरसः अग्नेः परि जज्ञिरे = ते हे खरोखर अंगिरसाचेच पुत्र म्हणजे ते अंगिरस् म्हणजे अग्नि ह्याच्यापासून जन्मले; परिजज्ञिरे = सर्वतः जाताः प्रादुर्भूताः = ते सर्वत्र प्रसिद्धीस आले.

अग्नीचा अंगिरसांशीं अत्यंत निकट संबंध असल्यामुळें ते अग्नीपासून जन्मले असें अतिशयोक्तीनें म्हटलें आहे (पान ८२६); अंगिरस् कुलांत एक विरूप नांवाचा पुरुष होऊन गेला; हे विरूपा, अग्नीला उत्तम स्तुति अर्पण कर (८।७५।६) असें म्हटलें आहे; त्याच्याच वंशजांना विरूप ही संज्ञा दिली गेली असावी. (१) प्र जिह्वया भरते वेपो अग्निः प्र वयुनानि चेतसा पृथिव्याः (१०।४६।८)=अग्नि आपल्या धनांतून (जिह्वया = चेतसा) पृथ्वीला धन ( वेपः = वयुनानि) देतो (प्रभरते). (२) न वेपसा न तन्यता इंद्रं वृत्रो वि बीभयत् ( १।८०।१२ ) = लखलखाटानें (वेपसा) किंवा गडगडाटानें ( तन्यता ) वृत्र इन्द्राला भेवडावूं शकला नाहीं. ( ३ ) वि पाहि अग्ने गृणते मनीषां खं वेपसा तुविजात स्तवानः ( ४।११।२ ) = हे धनवन्ता ( तुविजात ) अग्नि, याचना केलेला ( स्तवानः ) तूं याचना करणाऱ्याला ( गृणते ) आपल्या धनांतून ( वेपसा ) धन (वि = मनीषां = खं) दे ( साहि ). ( ४ ) वेपिष्ठो अंगिरसां यद्ध विप्रो मधु छन्दो भनति रेभ इष्टौ ( ६।११।३ ) = अंगिरसांमध्यें अतिशय स्तुति करणारा ( वेपिष्ठः ) स्तोता ( विप्रः = रेभः ) जेव्हां गोड ( मधु ) स्तुति ( छंदः ) यज्ञांत म्हणतो ( भनति ). १ व ३ ह्यांत वेपस् म्हणजे धन; दुसरींत वेपस् म्हणजे लखलखाट; चवथींत वेपस् म्हणजे स्तुति असे मीं अर्थ केले आहेत; प्रस्तुत ऋचेंत स्तुति हा अर्थ असावा; गम्भीराणि वेपांसि येषां ते गम्भीरवेपसः = ज्यांच्या स्तुति गम्भीर म्हणजे गूढार्थानें भरल्या आहेत असे किंवा वेपस् म्हणजे लखलखाट असा अर्थ असेल कारण ते अग्नीपासून जन्मले असें दुसऱ्या अर्धांत म्हटलें आहे. ऋचेचा अर्थः– विरूप हेच स्तोते; त्यांचें तेज अतीशय आहे; त्यामुळें ते अंगिरसाचे पुत्र असूनही ते अग्नीपासून जन्मले ( असें लोक म्हणतात ). अंगिरसः हें षष्ठीचें एकवचन आहे; अंगिरसः सूनवः = अंगिरसः ( म्हणजे अंगिरसाचे मुलगे ते अंगिरसच ) असें यास्कास म्हणावयाचें असेल; वास्तविक अंगिरसः हें बहुवचन ज्या ऋचेंत आहे अशी ऋचा द्यावयास पाहिजे होती. १०।६२ ह्या सूक्ताच्या पहिल्या चार ऋचांत अंगिरसः असें बहुवचनीं रूप आहे; ऋचा १ लीः— हे अंगिरसांनो, ज्या तुम्ही यज्ञानें इंद्राचें सख्य मिळविलें आहे त्या तुमचें कल्याण असो. ऋचा २ रीः— ज्या तुम्ही गोरूप धन कोंडवाड्यांतून बाहेर काढलें त्या तुम्हांला दीर्घायुष्य असो; ह्या ऋचेंत अंगिरसांना पितरः म्हटलें आहे. ऋचा ३ रीः— ज्या तुम्हीं सूर्याला द्युलोकीं चढविलें व पृथिवी विस्तृत केली त्या तुम्हाला पुष्कळ प्रजेचा लाभ होवो. ऋचा ४ थीः— हे देवपुत्रांनो, तुमच्या घरीं स्तोता गोड स्तुति गात आहे ती तुम्ही ऐका; हे अंगिरसांनो, तुम्हाला पुष्कळ धन मिळो. असें ह्या चार ऋचांत अंगिरसांचें माहात्म्य वर्णन केलें आहे; दुसऱ्या ऋचेंत त्यांनीं कोंडवाड्यांतून गायी बाहेर काढल्या असें म्हटलें आहे; त्यांच्या स्तुतीचा परिणाम इतका विलक्षण असे कीं स्तुति उच्चारल्या बरोबर कोंडवाडे आपोआप उघडत; त्यांनीं आपल्या उच्च स्वरांनीं वलाचा कोंडवाडा फोडून टाकला असें कांहीं ऋचांत म्हटलें आहे; तेव्हां प्रस्तुत ऋचेंत गम्भीरवेपसः ह्याचा ज्यांच्या

स्तुति गम्भीर होत्या असा अर्थ करणें अधिक योग्य दिसतें; त्यांच्या स्तुतींत इतकी जादू भरली होती कीं कोंडवाडे आपोआप फुटून त्यांतून गायीं बाहेर पडत.

**पितरः ( १२ ) व्याख्याताः ( निरु० ४।२१ )। तेषाम् एषा भवति**

पितृ शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान २९५ ).

## खंड १८ वा.

**उदीरतामवर उत्परास उन्मध्यमाः पितरः सोम्यासः। असुं य ईयुरवृका ऋतज्ञास्ते नोऽवन्तु पितरो हवेषु ( ऋ० सं० १०।१५।१ )**

**उदीरताम् अवरे। उदीरतां परे। उदीरतां मध्यमाः पितरः सोम्याः। सोमसंपादिनः ते। असुं ये प्राणम् अन्वीयुः। अवृकाः अनमित्राः। सत्यज्ञाः वा। यज्ञज्ञाः वा। ते नः आगच्छन्तु पितरः ह्वानेषु**

अवरे = पृथिवीवर असणारे ( दुर्ग ). उत् = उत् + ईरताम्. परासः = परे = द्युलोकांत असलेले ( दुर्ग ). मध्यमाः = मध्यमस्थानीं असणारे ( दुर्ग ). उदीरतां = वर म्हणजे द्युलोकीं जावोत; पृथिवीवर व अंतरिक्षांत असलेले पितर् द्युलोकाप्रत जावोत अशी आशा योग्य आहे; पण द्युलोकीं असणारे वर जावोत ह्याचा अर्थ काय? त्यांचा अधिकार म्हणजे त्यांनीं केलेल्या पुण्याचें फल संपल्यावर ते इहलोकीं न येवोत किंवा संसारपाशापासून अगदीं मुक्त होवोत असा दुर्ग अर्थ करतो. सोम्यासः = सोम्याः = सोमसंपादिनः = जे यज्ञांत हवि देण्याकरितां सोमरस काढतात ते. असुं= प्राणम्. ईयुः = अनु + ईयुः; दुर्गवृत्तींत अनु नाहीं. असुं ये ईयुः = प्राणमात्रमूर्तयः अस्थूलविग्रहाः ( दुर्ग ) = ज्यांच्यांत केवळ प्राण आहे म्हणजे ज्यांनीं स्थूलदेह टाकून सूक्ष्मदेह म्हणजे कारणदेह स्वीकारला आहे असे. अवृकाः = अनमित्राः = ज्यांना शत्रू नाहीं असे म्हणजे ब्रह्माशीं साम्य पावलेले म्हणजे ब्रह्मरूप झालेले (दुर्ग). ऋतज्ञाः = सत्यज्ञाः वा यज्ञज्ञाः वा = सत्य किंवा यज्ञ योग्य रीतीनें जाणणारे; ऋत= सत्य किंवा यज्ञ (पान २९२ ). अवन्तु = आगच्छन्तु; अव् = जाणें ( धा० पा० १। ६०१ ). हवेषु = ह्वानेषु; दुर्गवृत्तींत आह्वानेषु आहे; ह्वान = आह्वान = बोलावणें. दुर्गानें केलेला अर्थः—इहलोकीं असणारे, परलोकीं असणारे व मध्यमलोकीं असणारे असे सोमहवि देणारें आमचे पितर् स्वर्गाप्रत जावोत; जे केवळ प्राणस्थितीप्रत गेले आहेत, ज्यांना कोणी शत्रु नाहीं व जे सत्य किंवा यज्ञ जाणतात ते आमचे पितर् आमचें बोलावणें ऐकून आमच्याकडे येवोत.

**सायण:**—पितर् तीन प्रकारचें; जे श्रौतकर्म करतात ते उत्तम; स्मार्त कर्म करणारे ते मध्यम; ज्यांना सोळा संस्कारांपैकीं कोणताही संस्कार झाला नाहीं ते अधम; या तिघां पितरांना उत्तम हवि मिळो ( उदीरिताम् ); ते सर्व आमच्या संबंधानें सोम्य म्हणजे अनुग्रह करणारे असोत ; जे लांडग्याप्रमाणें आमची हिंसा करीत नाहींत, जे आम्ही केलेले यज्ञ जाणतात व जे आमच्या प्राणाप्रत जातात म्हणजे

आमच्या प्राणाचें रक्षण करतात ते पितर् आम्ही जेव्हां जेव्हां त्यांना बोलावूं तेव्हां तेव्हां आमचें रक्षण करोत.

उदीरतां सूनृता उत्पुरन्धीरुदग्नयः शुशुचानासो अस्थुः ( १।१२३।६ ) = ( १ ) उषा ( सूनृताः = पुरन्धीः ) उठोत ( उदीरतां ) म्हणजे उदय पावोत; प्रकाशणारे अग्नि आधींच उठले आहेत ( उत् + अस्थुः ); ( २ ) धन ( सूनृताः = पुरन्धीः ) नेहमीं दिले जावो ( उदीरतां ); धनवन्त ( शुशुचानासः ) दाते ( अग्नयः ) आजपर्यंत धन ( उत् ) देत आले आहेत ( अस्थुः ). अस्मे रायो दिवे-दिवे संचरन्तु पुरुस्पृहः । अस्मे वाजास ईरताम् ( ४।८।७ ) = अतिशय (पुरुस्पृहः) धन ( रायः ) आमच्याकडे ( अस्मे ) येवो ( संचरन्तु ); आम्हांला धन ( वाजासः ) दिलें जावो ( ईरतां ). इदं पितृभ्यो नमो अस्तु अद्य ये पूर्वासो य उपरास ईयुः । ये पार्थिवे रजसि आ निषत्ता ये वा नूनं सुवृजना सु विक्षु ( १०।१५।२ ) = जे पितर् यमलोकाला आधीं गेले आहेत ( पूर्वासः ईयुः ), जे मागून गेले आहेत ( उपरासः), किंवा जे अजून पृथिवीलोकांतच आहेत किंवा जे लोकांना (विक्षु) धन देत आहेत त्या सर्व पितरांना हा ( इदं ) हवि ( नमः ) दिला जावो. प्रस्तुत ऋचेंत अवरे, परासः व मध्यमाः हे शब्द पृथिवीवर असणारे, द्युलोकीं असणारे व मध्यमलोकीं असणारे अशा अर्थी वापरले आहेत. सु = देणें; सु + म = सोम = धन; सोम्य = धन-वन्त. पितर् स्वर्गांत असोत, अन्तरिक्षांत असोत किंवा एथें खालीं म्हणजे पृथिवीवर असोत, धनवान् ( सोम्यासः ) ते आम्हांस धन ( उत् ) देवोत ( ईरतां ). १०।४० ह्यांत असुनीति शब्दाचा अर्थ ठरविला आहे ( पान ८३८ ); असुं ये ईयुः = जे पितर् धनाप्रत जातात; पितरांजवळ अतिशय धन असतें व तें धन ते आपल्या वंशजांना देत असतात असें कांहीं ऋचांत म्हटलेलें आढळतें. आसीनासो अरुणीनामुपस्थे रयिं धत्त दाशुषे मर्त्याय । पुत्रेभ्यः पितरः तस्य वस्वः प्रयच्छत त इहोर्जं दधात ( १०।१५।७ ) = उषांच्या ( अरुणीनां ) मांडीवर ( उपस्थे ) बसलेले ( आसीनासः ) म्हणजे स्वर्गांत असणारे तुम्ही हवि देणाऱ्या मनुष्याला धन द्या; हे पितरांनो, पुत्रांना आपल्या धनांतून धन द्या. ते आ गत अवसा शन्तमेन अथा नः शंयोररपो दधात ( १०।१५।४ ) = हे पितरांनो, तुम्ही पुष्कळ ( शंतमेन ) धनासह ( अवसा ) या ( आगत ) व आम्हांस ज्यांत कोणताही दोष नाहीं असें ( अरपः ) धन ( शंयोः ) द्या. मा हिंसिष्ट पितरः केनचिन्नो यद्व आगः पुरुषता कराम ( १०।१५।६ ) = हे पितरांनो, तुमचा जो कांहीं अपराध आम्हीं मनुष्य असल्यामुळें (पुरुषता ) केला असेल त्या कोणत्याही अपराधाबद्दल आम्हांला उपद्रव करूं नका. मो षु णो अत्र जुहुरन्त देवा मा पूर्वे अग्ने पितरः पदज्ञाः ( ३।५५।२ ) = हे अग्नि, देव व धन देणारे ( पदज्ञाः ) आमचे पूर्वज ( पूर्वे पितरः ) आम्हांला एथें ( अत्र ) त्रास न देवोत ( मा जुहुरन्त ). प्रस्तुत ऋचेंत अवृकाः = त्रास न देणारे व ऋतज्ञाः = धन देणारे; ऋत म्हणजे धन हा अर्थ पुष्कळ ऋचांत आहे. अव् = धन देऊन रक्षण

करणें. हु = देणें; हव = धन. दुसऱ्या अर्धाचा अर्थः—जे पितर् स्वर्गलोकीं धनवान् झाले आहेत ते आम्हांस कोणत्याही प्रकारचा उपद्रव न देतां आमच्या धनांत (हवेषु) धन घालोत ( अवन्तु ); कारण ते धन देणारे आहेत ( ऋतज्ञाः ). अंगिरस् हेच पितर्; प्रत्येक मृत ह्या पितरांकडे जातो व धनवान् होऊन आपल्या वंशजांना धन देत असतो.

**माध्यमिको यमः इत्याहुः । तस्मात् माध्यमिकान् पितॄन् मन्यन्ते**

यम मध्यमलोकीं असतो असें विद्वान् म्हणतात व त्यामुळें पितरही तेथेंच असतात असें त्यांचें मत आहे. अथा पितॄन् सुविदत्रान् उपेहि यमेन ये सधमादं मदन्ति ( १०।१४।१० ) = हे मृता, जे पितर् यमासह अमृतपान करून आनंदांत आहेत अशा त्या धनवन्त पितरांकडे तूं जा. १०।२० ह्यांत सर्व मृत यमलोकीं एकत्र होतात असें म्हटलें आहे; संगमनं जनानां ह्याचा अर्थ पहा ( पान ७८५ ).

**अङ्गिरसः ( ११ ) व्याख्याताः ( निरु० ३।१७ ) । पितरः ( १२ ) व्याख्याताः ( निरु० ४।२१ ) । भृगवः ( १४ ) व्याख्याताः ( निरु० ३।१७ ) । अथर्वाणः ( १३ ) अथनवन्तः । थर्वतिः चरतिकर्मा । तत्प्रतिषेधः**

अंगिरस् व भृगु ( पान २०८ ) व पितृ ( पान २९५ ) ह्यांची व्युत्पत्ति पहा. अथर्वाणः = अथनवन्तः; अथन = अ + थन; थर्व = जाणें; थर्वति असौ थर्वा = जाणारा; न थर्वति असौ अथर्वा = न जाणारा; तस्य थर्वतेः प्रतिषेधः यस्मिन् सः अथर्वा; अथर्व नांवाचे ऋषि कोठेंही जात नाहींत म्हणजे ते स्थिर स्वभावाचे असतात. पण थर्व् ह्याचा अथन मधील थन ह्याच्याशीं काय संबंध ? अथनवन्तः ह्याच्या ऐवजीं अथर्ववन्तः असा मूळ पाठ असेल. अथन किंवा थन असा शब्द कोणत्याही कोशांत नाहीं; कदाचित् अथन म्हणजे अतन असा शब्द घ्यावयाचा असेल; अतन = जाणें; अतनवन्तः = जाणारे. ही एक व्युत्पत्ति असल्यास पुढील व्युत्पत्ति निराळी आहे हें दाखविण्याकरितां वा शब्दाची आवश्यकता आहे; पण यास्क पुष्कळदां वा गाळतो. अथर्वन् ह्यांत वन् हा प्रत्यय असून तो अथर् ह्या शब्दाला लावला आहे; अथर् हा शब्द अथर्वन् ह्याखेरीज अथर्यः, अथर्यु व अथर्य्य ह्यांत आढळतो. याभिः विश्पलां धनसाम् अथर्व्यं सहस्रमीह्ळे आजौ अजिन्वतम् ( १।११२।१० ) = हे अश्विनांनो, ज्या साधनांनीं तुम्हीं संग्रामांत ( सहस्रमीह्ळे = आजौ ) विश्पलेला जिंकलेंत ( अजिन्वतं ); धनसां व अथर्व्यं हीं विश्पलां ह्या शब्दाचीं विशेषणें; धनं साति ददाति असौ धनसाः = धन देणारी; अथर्व्यं हें अथर्वी ह्या शब्दाचें द्वितीयेचें एकवचन; अथर् वेति ददाति असौ अथर्वीः; धनसा व अथर्वी ह्यांचा अर्थ एकच. अग्निं० गृहपतिम् अथर्युम् (७।१।१); अथर्युः = धन देणारा; अग्नि धन देतो हें प्रसिद्ध आहे. तेव्हां अथर्वन् ह्यांतील अथर् ह्याचा धन असा अर्थ असेल. अथर्वा हा एक मोठा कुलस्थापक होऊन गेला. मन्थन करून अग्नि उत्पन्न करण्यांत त्याची फार ख्याति होती ( ६।१६।१३ ) व त्याच्याप्रमाणें अग्नि प्रज्वलित करण्यांत पुष्कळांना अभिमान वाटे ( ६।१५।१७ ). अथ-

ज्यांच्या वंशजानाही अथर्वन् हें नांव होतें; पण त्यांची ऋग्वेदांत फारशी ख्याति नाहीं; त्यांचें नांव ऋग्वेदांत पांच सहा वेळां आलें असेल. अवेस्तांत जो ऋत्विज् अग्नीचें रक्षण करतो त्याला आथ्रवन् म्हणतात; आथ्रो = अग्नि.

**तेषाम् एषा साधारणा भवति**

पुढील ऋचा त्यांच्या संबंधाची म्हणजे अंगिरस्, पितर्, भृगु व अथर्वन् ह्या सर्वांजणांची आहे. पण ज्यांत अथर्वणांचेंच वर्णन केलें आहे अशी ऋचा यास्कानें कां दिली नाहीं ? पुढील ऋचा तशी होय; अभि ते मधुना पयो अथर्वाणो अशिश्रयुः । देवं देवाय देवयु ( ९।११।२ ).

## खंड १९ वा.

**अङ्गिरसो नः पितरो नवग्वा अथर्वाणो भृगवः सोम्यासः । तेषां वयं सुमतौ यज्ञियानामपि भद्रे सौमनसे स्याम** ( ऋ० सं० १०।१४।६ )

**अङ्गिरसः नः पितरः नवगतयः । नवनीतगतयः वा । अथर्वाणः भृगवः सोम्याः । सोमसंपादिनः । तेषां वयं सुमतौ कल्याण्यां मतौ यज्ञियानाम् । अपि च । एषां भद्रे भन्दनीये । भाजनवति वा । कल्याणे मनसि स्याम । इति**

नवग्वाः = नव + ग्वाः = नवगतयः = प्रत्येक महिन्यांत होणाऱ्या पितृयज्ञांप्रत येणाऱ्या ज्यांची नवीन नवीन गति असते म्हणजे जे महिन्या महिन्याला पितृयज्ञांतील पिंड घेण्याकरितां येतात ते; ग्वा = गु + आ = आ + गु = आगु = येणें; गा ( = जाणें ) + उ = गु = जाणें; किंवा नव = नवनीत = ताजें लोणी; ग्वाचा अर्थ वरीलप्रमाणें; ज्यांचें मन नवीन काढलेल्या लोण्याकडे जातें ते नवग्व; स्वयं विलीनं पितृणाम् ( मैत्रा० सं० ३।६।२ ) = जें लोणी आपोआप म्हणजे उन केल्याशिवाय वितळतें तें पितरांना आवडतें असें म्हटलें आहे; अशा लोण्याकडे पितरांचें मन धांव घेतें. सोम्यासः = सोम्याः = सोमसंपादिनः. सुमतौ = कल्याण्यां मतौ = अनुग्रहाखालीं; भाष्यांत सुमतौ शब्द नको. यज्ञियानां = यज्ञसंपादिनां ( दुर्ग ). अपि = अपि च. एषां अध्याहृत. भद्रे = भन्दनीये = स्तुत्ये ( दुर्ग ); किंवा भद्रे = भाजनवति = स्तोत्यांना इष्ट धनाचें भाजन म्हणजे पात्र ज्यानें होतां येईल म्हणजे ज्यानें स्तोत्यांना इच्छिलेलें धन मिळेल अशा मनांत म्हणजे ह्या ऋषींच्या अनुग्रहांत; भद्र शब्दाची उत्पत्ति पहा ( पा० २५४ ); भद्र शब्दाच्या तेथें दिलेल्या व्युत्पत्तींपैकीं एथें दोनच दिल्या आहेत. सौमनसे = कल्याणे मनसि. इति = असा अर्थ आहे. दुर्गानें केलेला अर्थः— अंगिरस्, पितृयज्ञाला नव्या नव्या उमेदीनें प्रत्येक महिन्याला येणारे किंवा ताज्या लोण्याकडे ज्यांचें मन धांव घेतें असे आमचे पितर्, अथर्व नांवाचे व भृगु नांवाचे ऋषि हे जे यज्ञकर्मांत सोमहवि घेण्याकरितां येतात त्या यज्ञ सफल करणाऱ्या ऋषींच्या अनुग्रहाखालीं असण्याची आम्ही इच्छा करतों व त्यांचें स्तुत्य व कल्याणकारक मन आमच्याकडे वळो अशीहि आशा करतों.

**सायण**:--अंगिरस्, अथर्वन् व भृगु ह्या नांवाचे आमचे पितर्; **नवग्वाः** = अभिनवगमनयुक्ताः। यद्वा। नूतनवत् प्रीतिजनकाः = नवीन गतीनें युक्त किंवा नव्या येणाऱ्या मनुष्यांप्रमाणें प्रेम उत्पन्न करणारे म्हणजे ज्यांच्याविषयीं कंटाळा वाटत नाहीं असे; सोमम् अर्हन्ति इति सोम्याः; यज्ञियानां = यज्ञार्हाणाम्; **सुमतौ** = अनुग्रहयुक्तायां बुद्धौ; अपि = अपि च; सौमनसे भद्रे = सौमनस्यकारणे कल्याणे फले = ज्यानें मन सुप्रसन्न होईल अशा कल्याणकारक यज्ञफलांत; अनुग्रहाशिवाय ज्यानें मन सुप्रसन्न होईल असें यज्ञफलही त्यांच्यापासून आम्हांला मिळावें म्हणून आम्ही इच्छा करतों.

अंगिरस् हेच पितर् असें मागील दोन खंडांत म्हटलें आहे. सोम्याः = यज्ञियाः = धनवान्. सु = मतिः = धन; सुमतौ = अतिशय धनांत. सु = मनस् = धन; सुमनः एव सौमनसं = अतिशय धन. भद्र = धन; अपिभद्रे = अतिशय धनांत. अपि हा उपसर्ग अगदीं, पुरेसा, आंत ह्या अर्थी वापरलेला आढळतो; अपिहितं = अगदीं लपविलेलें. ( १ ) आ मा पूषन्नुप द्रव शंसिषं नु ते अपिकर्ण आघृणे ( ६।४८।१६ ) = हे दीप्तिमान् पूषा, मजकडे धांवत ये; मी तुझ्या कानांत कांहीं सांगणार आहें; अपिकर्णे = अगदीं कानांच्या आंत, कोणाला न कळेल असें. ( २ ) यो अस्मै हविषाविधत् न तं पूषापि मृष्यते ( ६।५४।४ ) = जो पूषाला हवि देतो त्याला तो कधींहीं विसरत नाहीं; न अपि मृष्यते = कधींही विसरत नाहीं. ( ३ ) वनुष्यतामपि शीर्षा ववृक्तम् ( ६।६२।१० ) = हे अश्विनांनो, हिंसा करणाऱ्यांचीं डोकीं पार तोडून टाका; अपि + वृज् = पार तोडून टाकणें. ( ४ ) मो वस्तस्यामपि भूम ( ७।५७।४ ) = ( हे मरुतांनो, आम्हीं अपराध केला असला तरी तुमचें अस्त्र आमच्यापासून दूर राहो ); त्या अस्त्राच्या तडाख्यांत आम्हीं सापडूं नये असें करा; अपि + भू = आंत असणें. ( ५ ) वसुर्वसुपतिर्हि कम् असि अग्ने विभावसुः। स्याम ते सुमतावपि ( ८।४४।२४ ) = हे अग्नि, तूं अतिशय धनवान् आहेस; त्या धनाच्या आंत असण्याची आम्ही इच्छा करतों. ( ६ ) तस्य वयं सुमतौ यज्ञियस्यापि भद्रे सौमनसे स्याम ( ३।१।२१ ) = त्या धनवान् अग्नीच्या अतिशय धनांत असण्याची आम्ही इच्छा करतों; एथें अपिभद्रे असा एक शब्द आहे; सुमतौ = अपिभद्रे = सौमनसे = अत्यंत धनांत. ही शेवटली ऋचा प्रस्तुत ऋचेच्या दुसऱ्या अर्धासारखी आहे. ऋग्वेदांत नवग्व, दशग्व, अतिथिग्व व शतग्विन् असे शब्द आहेत; ग्व = गव = गाय; पूर्वकालीं पुष्कळ गायीं बाळगणें हें एक संपत्तीचें चिन्ह होतें; ज्याच्याजवळ नऊ गायीं असतील तो नवग्व; ज्याच्याजवळ दहा असतील तो दशग्व; ज्याच्याजवळ शंभर गायीं असतील तो शतग्वी व ज्याच्याजवळ असंख्य गायी असतील तो अतिथिग्व. नवग्व व दशग्व हीं विशेषणें अंगिरसांना जोडलेलीं आढळतात. तमु नः पूर्वे पितरो नवग्वाः सप्त विप्रासो अभि वाजयन्तः ( ६।२२।२ ) = धन इच्छिणारे ( वाजयन्तः ) सात स्तोते जे नवग्व नांवाचे

आमचे पितर् ते त्या इंद्राचीच ( तम् + उ ) स्तुति करते झाले ( अभि ); एथें नवग्वांना पितर् म्हटलें आहे. नवग्व व दशग्व सोमरस अर्पण करून इन्द्राला तृप्त करते झाले; लपवून ठेवलेला गायींचा कळप त्यांनीं आपल्या स्तुतींच्या साहाय्यानें बाहेर काढला ( ५।२९।१२ ). अंगिरसांनीं आपल्या स्तुतींनीं कोंडवाडे फोडून त्यांतून गायी बाहेर काढल्या असें पुष्कळ ऋचांत म्हटलें आहे. हे इन्द्रा, तूं नवग्व व दशग्व ह्यांनीं उच्चारलेल्या स्तुतींनीं वलाचा कोंडवाडा फोडता झालास ( १।६२।४ ).

**माध्यमिको देवगणः इति नैरुक्ताः । पितरः इति आख्यानम् । अथापि ऋषयः स्तूयन्ते**

ऋभु, अंगिरस्, भृगु व अथर्वन् हे अन्तरिक्षांतील देवगण होत असे नैरुक्तांचें मत आहे; हे सर्व पितर् होत असें इतिहास सांगतो; देवगणांची स्तुति करणें हें साहजिक आहे पण पितरांची स्तुति कशाकरितां करावयाची असें कोणी विचारल्यास त्याला उत्तर ऋग्वेदांत ऋषींचीही स्तुति केलेली आढळते हें. स्तुति ही देवांचीच करावयाची असते म्हणून ऋभू वगैरे देवच असें नैरुक्तांचें मत खोडण्याकरितां ऋषींचीही स्तुति केली असते असें म्हटलें आहे; ऋभु वगैरे ऋषिगणांतच मोडतात; तेव्हां त्यांची स्तुति करणें असाहजिक नाहीं.

## खंड २० वा.

**सूर्यस्येव वक्षथो ज्योतिरेषां समुद्रस्येव महिमा गभीरः। वातस्येव प्रजवो नान्येन स्तोमो वसिष्ठा अन्वेतवे वः ( ऋ० सं० ७।३३।८ ) इति यथा**

इति यथा = ( मागील खंडांत ऋषींची सुद्धां स्तुति केली आहे असें म्हटलें आहे ) जशी; प्रस्तुत ऋचेंत वसिष्ठ नांवाच्या ऋषींची स्तुति केली आहे. यास्क ह्या ऋचेचें भाष्य देत नाहीं. दुर्गानें केलेला अर्थः— जसा ( इव ) सूर्याचा प्रकाश ( ज्योतिः ) वस्तु दृष्टीसमोर आणतो त्याप्रमाणें ह्या वसिष्ठांच्या स्तुतींची दीप्ति ( वक्षथः ) त्यांतील शब्दांचा अर्थ स्पष्ट करते; समुद्राच्या महिम्याप्रमाणें त्यांच्या स्तुतीचा महिमा गम्भीर आहे म्हणजे समुद्रांतलें पाणी जसें मोजतां येत नाहीं त्याप्रमाणें त्यांच्या स्तुतींत भरलेला अर्थ खोल असल्यामुळें तो स्पष्ट करणें फार कठीण असतें; जरी त्यांच्या स्तुतींचा अर्थ खोल असतो तरी त्या स्तुति रचण्यांत त्यांना कधींही विलंब लागत नाहीं; त्यांच्या स्तुतींचा वेग वाऱ्याच्या वेगाप्रमाणें असतो म्हणजे ते खोल अर्थानें भरलेल्या स्तुति भराभर तयार करतात; अहो वसिष्ठांनो, अशा प्रकारच्या तुमच्या स्तुतींच्या पाठीमागून जाणें ( अनु + एतवे ) शक्य नाहीं म्हणजे कोणालाही तुमच्यासारख्या स्तुति रचतां येत नाहींत असें इंद्र वसिष्ठांना म्हणतो. दुर्ग म्हणतो कीं कित्येक पुढीलप्रमाणें अर्थ करतातः— हे वसिष्ठ सूर्यासारखे तेजस्वी आहेत; त्यांचा स्वभाव समुद्राप्रमाणें गम्भीर आहे; त्यांचा वेग वाऱ्यासारखा असल्यामुळें त्यांना कोणी अडवूं शकत नाहीं; दुसऱ्या कोणाचीही गति त्यांच्या गतीसारखी नाहीं.

सायणः—हे वसिष्ठांनो, तुमचा स्तोम किंवा तुमचा महिमा सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें ( ज्योतिः इव ) प्रकाशमान ( वक्षथः = प्रकाशः ) आहे; तुमचा महिमा किंवा तुमचा स्तोम समुद्राप्रमाणें खोल आहे; वाऱ्याच्या वेगाच्या पाठीमागून जसा कोणी जाऊं शकत नाहीं म्हणजे त्याचें अनुकरण करूं शकत नाहीं तसें तुम्हीं रचलेल्या ऋग्समूहाचें किंवा महिम्याचें अनुकरण कोणीही करूं शकत नाहीं. सायणाचार्य वक्षथः हें विशेषण समजतात.

वक्षथ शब्द ऋग्वेदांत आणखी तीनदां आला आहे.(१) चित्र इत् शिशोः तरुणस्य वक्षथः ( १०।११५।१ ) = शिशु जो अग्नि त्याचा प्रकाश ( वक्षथः ) खरोखर ( इत् ) प्रखर (चित्रः) आहे. (२) बृहद्भाः । अनूनेन बृहता वक्षथेन उपस्तभायत् ( ४।५।१ ) = ज्याचा प्रकाश प्रचंड आहे ( बृहद्भाः ) असा अग्नि आपल्या मोठ्या ( अनूनेन = बृहता ) ज्वालेनें ( वक्षथेन ) द्यु उचलून धरतो ( उपस्तभायत् ). (३) एवा महो असुर वक्षथाय वम्रकः पड्भिरुप सर्पदिन्द्रम् ( १०।९९।१२ ) = ह्याप्रमाणें पुष्कळ ( महः ) प्रकाशमान् धनाकरितां ( वक्षथाय ) वम्रक हवि घेऊन ( पड्भिः ) धनवान् ( असुरं ) इन्द्राकडे गेला ( उपसर्पत् ). प्रकाश किंवा ज्वाला हा अर्थ वक्षथ शब्दाचा कसा होतो तें सांगतां येत नाहीं. ह्या वसिष्ठांचा ( एषां ) प्रकाश (ज्योतिः) सूर्याच्या प्रकाशासारखा (वक्षथः इव) आहे. ह्या सूक्ताच्या पहिल्या ऋचेंत वसिष्ठांना श्वित्यञ्चः हें विशेषण लावलें आहे; श्विती श्वित्या प्रकाशेन अञ्चन्ति प्रकाशन्ते ते श्वित्यञ्चः = सूर्याच्या प्रकाशानें जे प्रकाशतात ते; श्वित् = प्रकाशणें. उषसां न केतवः० अञ्जिभिः व्यश्वितन् (१०।७८।७) = अलंकारामुळें (अञ्जिभिः) मरुत् उषेच्या किरणांप्रमाणें झळकूं लागले ( वि + अश्वितन् ). उषा व्यश्वैत् ( १।११३।१५ ) = उषा झळकूं लागली. महिमा ह्याचा विस्तार असा अर्थ अनेक ठिकाणीं आढळतो. गभीर ह्याचाही अर्थ कधीं कधीं विस्तृत असा होतो; उर्वी गभीरे रजसी (४।४२।३) = द्यावापृथिवी ( रजसी ) विस्तृत आहेत ( उर्वी = गभीरे ). ह्या वसिष्ठांचा महिमा म्हणजे विस्तार समुद्राच्या विस्तारासारखा विस्तृत ( गभीरः ) आहे. वसिष्ठांची संख्या अतिशय असल्यामुळें ते लढाईंत जिकडे तिकडे दिसत होते व सुदास् राजा ह्यांच्या साहाय्यानें सिन्धु तरून गेला; ह्यांच्या साहाय्यानें त्यानें भेदाला जिंकलें; हें वसिष्ठांनो, तुमच्या स्तुतीनें दहा राजांच्या बरोबर झालेल्या लढाईंत इन्द्र सुदास राजाचें रक्षण करता झाला (७।३३।३). वाऱ्याच्या वेगाचें जसें कोणाला अनुकरण करतां येत नाहीं तसें, हे वसिष्ठांनों, तुमच्या स्तोमांचें कोणालाही अनुकरण करतां येत नाहीं. तुमच्या स्तोमांचा महिमा इतका विलक्षण आहे कीं त्या स्तोमांनीं इन्द्राला बळ येतें व लढाया जिंकल्या जातात.

**आप्त्याः ( १५ ) आप्नोतेः । तेषाम् एष निपातः भवति ऐन्द्र्याम् ऋचि**

आप् ( = मिळविणें ) ह्यापासून आप्त्य; आप्त्य हें एका ऋषिसमूहाचें नांव आहे; त्या समूहाला आप्त्य हें नांव पडण्याचें कारण त्यांनीं आपल्या स्तुतींनीं स्तुत्य जे

देव त्यांना मिळविलें म्हणजे स्तुतींनीं त्यांनीं त्यांचा अनुग्रह संपादन केला. एकत, द्वित व त्रित ह्या नांवाचे तीन ऋषि इन्द्राबरोबर नेहमीं असत ( शत० ब्रा० १।२।३।२ ); त्यांचेंच नांव आप्त्य; जसे ऋभु वगैरे ऋषि मध्यम लोकांतले होते तसे आप्त्यही मधम लोकांतलेच ( दुर्ग ). पुढील खंडांतील ऋचेचा देव इन्द्र; त्या ऋचेंत आप्त्य हे गौणत्वानें आहेत म्हणजे इंद्र हा प्रधान देव व आप्त्य हे गौण. इंद्रस्य इयम् ऐन्द्री. निपातः म्हणजे गौणत्वानें असणें.

## खंड २१ वा.

**स्तुषेय्यं पुरुवर्पसमृभ्वमिनतममाप्त्यमाप्त्यानाम्।**

**आ दर्षते शवसा सप्त दानून् प्र साक्षते प्रतिमानानि भूरि (ऋ०सं० १०।१२०।६)**

**स्तोतव्यं बहुरूपम् उरुभूतम् ईश्वरतमम् आप्तव्यम् आप्तव्यानाम्। आदृणाति यः शवसा बलेन सप्त दातॄन् इति वा। सप्त दानवान् इति वा। प्रसाक्षते प्रतिमानानि बहूनि। साक्षतिः आप्नोतिकर्मा**

स्तुषेय्यं = स्तोतव्यं; स्तु + स् ( लेट्‌चा ) + एय्यं=स्तुषेय्यम्. पुरुवर्पसं=बहुरूपम्; वर्पस् = रूप. ऋभ्वं = ऋ + भ्वम्; ऋ = उरु; भ्वं = भवं = भूतम्; उरुभूतं = सर्वत्र असलेल्याला. इनतमं = ईश्वरतमम्; इनः = ईश्वरः. आप्त्यं = आप्तव्यम्; आप्त्यानां = आप्तव्यानाम्. हीं सर्व इन्द्रं ( अध्याहृत ) ह्याचीं विशेषणें; अहं स्तौमि इन्द्रं असे अध्याहृत शब्द घेऊन दुर्ग ऋचेचा पहिला अर्ध पुरा करतो.

आदर्षते = आदृणाति = फोडतो; दृ + स् ( लेट्‌चा ) = दर्ष्. यः अध्याहृत.

शवसा = बलेन; शवसा शब्द भाष्यांत नको आहे. दानून् = दातॄन् = मेघान् ( दुर्ग ); किंवा दानून् = दानवान् = नमुचिप्रभृतीन् असुरान् ( दुर्ग ). साक्ष् = मिळविणें; सच् ( = मिळवणें ) + स् ( लेट्‌चा ) = साक्ष्. प्रसाक्षते = आप्नोति = अभिभवति ( दुर्ग ).

दुर्गानें केलेला अर्थ :— स्तवन करण्याला योग्य, पुष्कळ रूपें धारण करणारा, सर्वत्र असणारा, सत्ताधिशांचा सत्ताधीश व जे स्तुतीनें प्रसन्न करून घ्यावयाचे असतात ( आप्त्यानां ) अशा देवांतला स्तुतीनें प्रसन्न करण्याजोगा जो इंद्र, जो बलानें जल देणाऱ्या सात म्हणजे असंख्य मेघांना किंवा नमुची वगैरे सात असुरांना फोडून टाकतो व जो कित्येक प्रतिस्पर्ध्यांचा पराभव करतो अशा इंद्राची मी स्तुति करतों.

**सायण** :— ऋभ्वं = उरुभासनम् उरुभूतं वा; उरुभासनं = सर्वत्र प्रकाशणाऱ्याला; प्रतिमानानि = असुराणां प्रतिरूपाणि (?) = असुरबलानि = असुरांचीं प्रतिरूपेंच कीं काय म्हणजे असुरांचीं सैन्यें; प्र साक्षते = प्रसहते = जिंकतो; बाकीचे अर्थ यास्काप्रमाणें.

(१) अमी ये सप्त रश्मयः तत्रा मे नाभिरातता। त्रितस्तद्वेद आप्त्यः (१।१०५।९) = जेथें हे सात रश्मी आहेत तेथें म्हणजे सूर्यमंडळांत माझें धन पसरलें आहे; त्रित ती गोष्ट जाणतो किंवा तें देतो; एथें आप्त्यः हें त्रितः ह्याचें विशेषण. (२) पनित

आप्त्यो यजतः सदा नो वर्धान्नः शंसं नर्यो अभिष्टौ ( ५।४१।९ ) = स्तविलेला, धन देणारा ( यजतः ), धनवान् ( नर्यः ) अग्नि (?) आमच्या धनभाण्डारांत ( अभिष्टौ ) धन ( शंसं ) नेहमीं ( सदा ) घालो ( वर्धात् ); एथें अग्नीला आप्त्यः म्हटलें असावें. ( ३ ) स पित्र्याणि आयुधानि विद्वान् इन्द्रेषित आप्त्यो अभ्ययुद्धयत् । त्रिशीर्षाणं सप्तरश्मि जघन्वान् त्वाष्ट्रस्य चित् निः ससृजे त्रितो गाः ( १०।८।८ ) = इन्द्रानें पाठविलेला व बापाचीं शस्त्रें कशीं वापरावीं हें जाणणारा तो त्रित त्वष्टृपुत्रांशीं लढला; त्वष्टयाच्या तीन डोक्यांच्या व सात रश्मींच्या मुलाला ठार मारून त्याच्या गायी बाहेर काढता झाला;एथें त्रित हा आप्त्य. (४) यच्च० गोषु दुष्वप्न्यं यच्चास्मे दुहितर्दिवः । त्रिताय तद्विभावरि आप्त्याय परा वह(८।४७।१४)=हे प्रकाशणारी द्यूच्या मुली उषे, आमच्या गायींना व आम्हांस जो उपद्रव (दुष्वप्न्यं) होत आहे तो त्रित जो आप्त्य त्याच्याकडे पाठव. (५) यत्सोमामिन्द्र विष्णवि यद्वा घ त्रित आप्त्ये । यद्वा मरुत्सु मन्दसे समिन्दुभिः(८।१२।१६) = हे इन्द्रा, विष्णूच्या घरीं ( विष्णवि ) किंवा त्रित आप्त्याच्या घरीं तूं सोम पीत असशील किंवा मरुतांबरोबर सोम पिऊन मजा मारीत असशील ( कोठेंही असलास तरी आमच्याकडे ये). (६) यत् आविर् यत् अपीच्यं देवासो अस्ति दुष्कृतम् । त्रिते तद्विश्वमाप्त्ये आरे अस्मद्दधातन (८।४७।१३) = हे देवांनो, उघडपणें किंवा गुप्तपणें जें कांहीं तुमच्यापाशीं उपद्रवकारक साधन असेल तें सर्व आमच्याहून वेगळा असणारा जो त्रित आप्त्य त्याच्यावर घाला म्हणजे त्याला सर्व वाईट भोगूं द्या. (७) त्रिते दुष्वप्न्यं सर्वम् आप्त्ये परि दद्मसि ( ८।४७।१५ ) = त्रित आप्त्याकडे आम्हीं सर्व वाईट पाठवून देतों. ( ८ ) एवा दुष्वप्न्यं सर्वम् आप्त्ये सं नयामः ( ८।४७।१७ ) = आम्ही ह्याप्रमाणें सर्व वाईट आप्त्याकडे नेतों. ( ९ ) आप्त्यम् आप्त्यानाम् ( प्रस्तुत ऋचा ); आप्त्यं हें इंद्राचें विशेषण; आप्त्यानाम् हें बहुवचन प्रस्तुत ऋचेंतच आहे; हे आप्त्य कोण ? २ व ९ खेरीज करून त्रित हा आप्त्य; २ मध्यें बहुतकरून अग्नि हा आप्त्य; ९ मध्यें इन्द्र; ४, ६ व ७ ह्यांत त्रित आप्त्य हा कोणी तरी शत्रु किंवा उपद्रव देणारा आहे; ३ व ५ ह्यांत त्रित आप्त्य हा इन्द्राचा मित्र किंवा भक्त असावा; ह्या सर्व ठिकाणीं आप्त्य हें विशेषण आहे; तें कोणत्याही देवाचें किंवा ऋषीचें नांव नाहीं; प्रस्तुत ऋचेंत आप्त्यानां देवानाम् आप्त्यम् आप्त्यतमम् इन्द्रं असा अन्वय दिसतो; इनतमं = इनानाम् इनतमम् ; त्याप्रमाणें सर्व आप्त्यांत आप्त्यतम; पण आप्त्य म्हणजे काय ? आप्यते इति आप् धनम्; वृष्टिद्यावा रीत्यापा इषस्पती दानुमत्याः । बृहन्तं गर्तं आशाते ( ५।६८।५ ) = धनवान् ( वृष्टिद्यावा = रीत्यापा ) व अतीशय ( दानुमत्याः ) धनाचे ( इषः ) पति जे मित्र आणि वरुण ते पुष्कळ ( बृहन्तं ) धन ( गर्तं ) देतात ( आशाते ); वृष्टिः द्यौः ययोः तौ = ज्यांचेपाशीं पावसासारखें धन आहे असे; रीतिः आप् ययोः तौ रीत्यापौ = ज्यांच्यापाशीं प्रवाहासारखें धन आहे असे; रीति = प्रवाह. आप् = धन; आप् + त्यः = आप्त्यः = धनवान्; धनवान् देवांमध्यें ( आप्त्यानां ) इन्द्र अतिशय धनवान् ( आप्त्यः )

आहे. ऋग्वेदांत एकतः व द्वितः हे शब्द नाहींत; त्रितः म्हणजे तिसरा असा अर्थ करून ब्राह्मणग्रंथांनीं एकत, द्वित व त्रित अशा तीन भावांची गोष्ट रचली व हे तिघे आप्त्य नांवाचे देव आहेत अशी श्रद्धा अस्तित्वांत आली. स्तुषेय्य = याचना करण्याला योग्य. पुरूणि वर्पांसि धनानि यस्य सः पुरुवर्पाः; पुरू वर्पांसि अश्विना दधाना नि पेदवे ऊहथुः आशुमश्वम् ( १।११७।९ ) = हे आश्विनांनो, पुष्कळ ( पुरू ) धन ( वर्पांसि ) देणारे ( दधाना ) तुम्ही पेदूला चपळ ( आशुं ) घोडा ( अश्वं ) आणून दिलांत ( नि ऊहथुः ); आ + शा + उः = आशुः = धनयुक्त व अश्व = धन असाही दुसरा अर्थ आहे. अस्य मदे पुरु वर्पांसि विद्वान् इन्द्रो वृत्राण्यप्रती जघान ( ६।४४।१२ ) = पुष्कळ धन देणारा ( विद्वान् ) इन्द्र ह्या सोमानें उत्पन्न केलेल्या स्फुरणानें ( मदे ) वृत्राला पुन्हा त्यानें विरोध करूं नये म्हणून ( अप्रति ) ठार केलें; वर्पस् ह्याचा बल असाही अर्थ होतो. ऋभ्व शब्द प्रस्तुत ऋचेखेरीज आणखी एकदां आला आहे; प्रथमभाजं यशसं वयोधां सुपाणिं देवं सुगभास्तिमृभ्वम्। होता यक्षद्यजतं पस्त्यानाम् अग्निस्त्वष्टारं सुहवं विभावा ( ६।४९।९ ); प्रथमभाजं = वयोधां = देवं = यजतं = धन देणाऱ्याला; ऋभ् + वः = ऋभ्वः; ऋभ् + उः = ऋभुः; ऋभ् + वस् = ऋभ्वस्; ऋभ् + वन् = ऋभ्वन्; हीं सर्व विशेषणें इन्द्राला लाविलेलीं आढळतात; ऋभ् = धन; व हा प्रत्यय; ज्याच्याजवळ धन आहे तो ऋभ्व; जो धन देतो तो ऋभ्वन्; ऋभु = ऋभ्वस् = धनवान्. इन = दाता (पान १८९). शवस् = वज्र ( पान ८१५ ). दानु = दानूचा मुलगा व इन्द्राचा शत्रु ( पान ७६२ ). प्र + सह् = पराभव करणें; सह् + स ( लेट्चा ) = साक्ष्. ऋचेचा अर्थः—याचना करण्याला योग्य, अतिशय धनवान् ( पुरुवर्पसं = ऋभ्वं ), धनाढ्यांत ( आप्त्यानां ) धनाढ्य ( आप्त्यं ), दात्यांत दाता ( इनतमम् ) जो इन्द्र त्याची स्तुति करा; तो वज्रानें ( शवसा ) सात म्हणजे असंख्य दानूंना फोडून टाकतो (आदर्शते); असंख्य ( भूरि ) प्रतिस्पर्ध्यांना किंवा शत्रूंना ( प्रतिमानानि ) पार ( प्र ) जिंकून टाकतो ( साक्षते ).

## खंड २२ वा.

**अथातो मध्यस्थानाः स्त्रियः। तासाम् अदितिः (१६) प्रथमागामिनी भवति अदितिः व्याख्याता ( नि० ४।२२ )। तस्याः एषा भवति**

आतां ह्यापुढें अन्तरिक्षांतील देवता येतील; त्यांमध्यें अदिति ही पहिली; अदिति शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पानें २९९–३०० )

## खंड २३ वा.

**दक्षस्य वादिते जन्मनि व्रते राजाना मित्रावरुणा विवाससि।**
**अतूर्तपन्थाः पुरुरथो अर्यमा सप्तहोता विषुरूपेषु जन्मसु (ऋ० सं० १०।६४।५)**

**दक्षस्य वा अदिते जन्मनि व्रते कर्माणि राजानौ मित्रावरुणौ परिचरसि । विवासतिः परिचर्यायाम् । हविष्मान् आ विवासति (ऋ० सं० १।१२।९) इति । आशास्तेर्वा । अतूर्तपन्थाः अत्वरमाणपन्थाः । बहुरथः अर्यमा आदित्यः । अरीन् नियच्छति । सप्तहोता । सप्त अस्मै रश्मयः रसान् अभिसंनामयन्ति । सप्त एनम् ऋषयः स्तुवन्ति इति वा । विषमरूपेषु जन्मसु कर्मसु उदयेषु**

व्रते = कर्माणि. राजाना = राजानौ. मित्रावरुणा = मित्रावरुणौ. आविवासिस = परिचरसि; वि + वास् = परिचरण करणें; हा अर्थ हविष्मान् आ विवासति ह्या ऋचेंत आहे; इति नंतर अपि निगमः भवति असें म्हणावयास पाहिजे. हविष्मान् आ विवासति = हवि देणारा अग्नीची परिचर्या करतो. किंवा वि + वास् = आ + शास् = आशा करणें; आशास्तेः बद्दल आशास्तौ पाहिजे; कारण आधीं परिचर्यायां असा शब्द आहे; विवास् म्हणजे परिचरण करणें किंवा आशा करणें. अतूर्तपन्थाः = अत्वरमाणपन्थाः; अतूर्त शब्दाचे अर्थ पहा (१०।३२ पान ८२३). पुरुरथः = बहुरथः, अर्यमा = आदित्यः; आदित्याला अर्यमा म्हणण्याचें कारण तो शत्रूंचें नियमन करतो; अर्यमा = अर् + यमा; अर् = अरीन्; यमा = नियच्छति; यम उपरमे (धा० १।१००९); उपरम् = थांबविणें, दाबांत ठेवणें. आदित्याला सप्तहोता म्हणण्याचें कारण सात रश्मी ह्याला (अस्मै) म्हणजे आदित्याला जलादिरस (रसान्) वाफेच्या रूपानें आणून देतात (अभिसंनामयन्ति = त्याच्याकडे नमवितात म्हणजे आणतात); सप्तहोता या शब्दाचें हें विवरण सप्तनामा ह्या शब्दाला लागू आहे (पानें ३२१-३२२). किंवा त्याला (एनम्) सात ऋषि स्तवितात म्हणून तो सप्तहोता; दुर्गवृत्तींत स्तुवन्ति बद्दल आह्वयन्ति आहे; सप्त ऋषयः होतारः आह्वातारः यस्य सः सप्तहोता; आह्वयन्ति = नमन्ति स्तुवन्ति; बोलावतात ह्यापासून नमन्ति किंवा स्तुवन्ति असा अर्थ कसा तरि काढावयाचा. विषुरूपेषु=विषमरूपेषु.जन्मसु=कर्मसु=उदयेषु. ह्याचा उदय निरनिराळ्या प्रकारचा असतो म्हणजे दक्षिणायनांत व उत्तरायणांत सूर्य आकाशांत भिन्नभिन्न ठिकाणीं उगवतो (दुर्ग).

दुर्गानें केलेलें विवरणः-- मित्र म्हणजे दिवस व वरुण म्हणजे रात्र (ऐ० ब्रा० अध्याय १७।४); रात्र व दिवस ह्यांचा मधला जो संधिकाल त्याचें नांव अदिति; या संधिकालांत दंव पडतें; असें दंव पाडणारी जी अदिति तिच्यासंबंधानें प्रस्तुत ऋचा होय; तुझ्यापासून आदित्य जन्माला येतो किंवा तूं त्याच्यापासून जन्माला येतेस असा वा शब्दानें विकल्प दर्शविला जातो. सन्धिकालानंतर आदित्याचा जो जन्म म्हणजे उदय तेंच त्याचें व्रत म्हणजे कर्म; दक्ष म्हणजे आदित्य; त्याचा जन्म म्हणजे उदय झाल्यावर, हे अदिति, तूं मित्र व वरुण म्हणजे दिवस व रात्र ह्यांची सेवा करतेस म्हणजे त्यांना व्यापून टाकतेस म्हणजे अर्ध्या भागानें मित्राला म्हणजे दिवसाला व्यापतेस व अर्ध्या भागानें वरुणाला म्हणजे रात्रीला व्यापतेस; सन्धिकालाचा रात्रीशीं

व दिवसाशीं संबंध असल्यामुळें सन्धिकाल दोघानांही व्यापून टाकतो असें म्हटलें आहे. मित्रावरुण म्हणजे दिवस व रात्र ह्यांना राजे (राजानौ) म्हणण्याचें कारण जें जें कांहीं करावयाचें असतें तें त्यांच्या अधीन असतें; दिवस व रात्र ह्यांना सोडून कोणतेंही कर्तव्य करतां येणें अशक्य आहे. अतूर्तपन्थाः = अत्वरमाणपन्थाः = दक्षाचा म्हणजे आदित्याचा मार्ग नेहेमीं नियमित असतो; तो योग्य वेळीं काम करीत असल्यामुळें त्याला केव्हांही त्वरा करावी लागत नाहीं. पुरुरथः = बहुरंहणः = पुष्कळ गति आहे ज्याची म्हणजे सदा आकाशांत संचार करणारा. अर्यमा = अरीणां तमसां नियन्ता=अन्धकाररूपी शत्रूचें नियमन करणारा. आदित्य सप्तहोता आहे कारण सात रश्मी त्याच्याकडे जल वाफेच्या रूपानें नेतात किंवा सप्तऋषि त्याला बोलावतात म्हणजे त्याचें स्तवन करतात. सूर्य उत्तरायणांत व दक्षिणायनांत आकाशांत भिन्नभिन्न ठिकाणीं उगवतो म्हणून त्याचा जन्म म्हणजे उदय विषुरूप म्हणजे विषमरूप आहे. दक्ष म्हणजे सूर्य व अदिति म्हणजे सन्धिवेला असा अर्थ न करतां जर दक्ष व अदिति ह्या दोन ऐतिहासिक व्यक्ति मानल्या तर पुढीलप्रमाणें अर्थः–हे अदिति, जेव्हां निरनिराळया ठिकाणीं उगवणारा, सर्वत्र संचार करणारा व नियमितपणें मार्ग आक्रमण करणारा सूर्य आपल्या कामास लागतो तेव्हां तुझ्यापासून जन्मलेला दक्ष जसा आपल्या कामांत (व्रते) गर्क होतो तसे मित्र व वरुण हेही आपल्या कामांत गर्क व्हावेत अशी तूं आशा करतेस (आविवासासि = आशास्से); भाष्यांत विवासतिः परिचर्यायाम् आशास्तेः वा असा विकल्प असल्याकारणानें दुर्गाला हें दुसरें विवरण करावें लागलें; पण तें विवरण मूळ संस्कृतांत थोडकें असून बरेंच दुर्बोध आहे व त्याचा मीं कसातरी अर्थ केला आहे. आशास्तेर्वा हें प्रक्षिप्त असावें; कारण आशा करणें हा अर्थ एथें मुळींच लागू पडत नाहीं.

**सायणः**—हे पृथिवी (अदिते), तूं जशी (वा) वेदी होऊन समर्थ अशा (राजानौ) मित्र व वरुण ह्यांची परिचर्या प्रत्येक यज्ञांत आजपर्यंत करीत आली आहेस तशी सूर्य (दक्षस्य) उगवतांच (जन्मनि) आमच्या ह्या यज्ञांत (व्रते) त्या मित्रावरुणांची परिचर्या कर; अंधकाराचा नाश करणारा (अर्यमा), नानाप्रकारचे (विषुरूपेषु) यज्ञ (जन्मसु) चालावेत म्हणून दररोज वेळीं उगवणारा व कधीं त्वरा न करणारा (अतूर्तपन्थाः) असा हा सूर्य सदा संचार करीत असतो (पुरुरथः) असा एक अर्थ; दुसरा दुर्गानें केलेला; राजानौ = दीप्यमानौ; अहर् वै मित्रः रात्रिः वरुणः (ऐत० ब्रा० १७।४); व्हे = स्तुति करणें; ह्यापासून होता; भरद्वाजादिक सात ऋषि आदित्याची स्तुति करतात म्हणून तो सप्तहोता; किंवा सात ऋतु ज्याची स्तुति करतात तो; असा सायणाचार्यांनीं केलेला दुसरा अर्थ व दुर्गानें केलेलें विवरण ह्यांच्या मुळाशीं अहर् वै मित्रः रात्रिः वरुणः हें ऐतरेय ब्राह्मणांतील वचन होय; ऋचा फार कठीण असल्यामुळें व दोन अर्धांमध्यें संबंध नसल्यामुळें त्यांना ऐतरेय ब्राह्मणाचा आधार घेऊन असा अस्वाभाविक अर्थ करावा लागला.

आदित्यः दक्षः इति आहुः। आदित्यमध्ये च स्तुतः । अदितिः दाक्षायणी । अदितेर्दक्षो अजायत दक्षाद्वदितिः परि ( ऋ० सं० १०।७२।४ ) इति । तत् कथम् उपपद्येत । समानजन्मानौ स्याताम् इति । अपि वा । देवधर्मेण इतरेतरजन्मानौ स्याताम् । इतरेतरप्रकृती

दक्ष हा अदितीचा मुलगा असें इतिहासकार म्हणतात व ( च ) त्याचें नांव अदितीच्या मुलांच्यामध्यें घातलेलें एका ऋचेंत आढळतें; त्या ऋचेचा अर्थः—अदितीच्या मुलांना ह्या स्तुति मी अर्पण करीत आहें; मित्र, अर्यमा, भग, वरुण, दक्ष व अंश हे अदितीचे पुत्र आमच्या स्तुति ऐकोत ( २।२७।१ ); ह्या ऋचेंत दक्ष हा आदित्य म्हणजे अदितीचा पुत्र असें म्हटलें आहे. आदित्यानाम् अदितेः पुत्राणां मित्रादीनां मध्ये दक्षः स्तुतः; च = यस्मात् ( दुर्ग ); परन्तु च म्हणजे आणि असाच अर्थ आहे; नुसते लोक म्हणतात एवढेंच नाहीं तर तसें म्हणण्याला वेदाचा आधार आहे असें च ह्या निपातानें दर्शविलें आहे. दक्षस्य अदिते जन्मनि ( = हे अदिति, तुझ्यापासून दक्षाचा जन्म झाल्यावर ) ह्या शब्दांनीं दक्ष अदितीचा मुलगा असें सिद्ध होतें; पण अदिति ही दक्षाची मुलगी ( दाक्षायणी ) असेंही इतिहासकार म्हणतात व तसें एका ऋचेंतही म्हटलें आहे; अदितीपासून दक्ष जन्मला व दक्षापासून अदिति जन्मली अशी ती ऋचा होय. ह्या विरुद्ध विधानाचें समर्थन त्या दोघांचा जन्म समान म्हणजे एकाकालीं झाला असेल हें; पण हें समर्थन समाधानकारक नाहीं; कारण एकाकालीं जन्मले म्हणून ते एकमेकांपासून जन्मले असें कसें म्हणतां येईल ? दुर्ग समान ह्याचा समनन्तर असा अर्थ करतो; अदिति म्हणजे संधिकाल; हे सन्धिकाल दोन; एक सूर्य मावळल्यानंतरचा व दुसरा सूर्योदयाच्या आधींचा; संध्याकाळचा संधिकाल सूर्यानंतर उत्पन्न होतो; सकाळच्या सन्धिकालानंतर सूर्य उगवतो; म्हणून ते एकमेकामागून जन्मास येतात असें दुर्ग म्हणतो; पण सूर्यापासून संध्याकाळचा सन्धिकाल जन्मतो व सकाळच्या सन्धिकालापासून सूर्य जन्मतो असें म्हणण्यास काय हरकत आहे ? हें एक समर्थन होईल. किंवा दोघेंही देवता असल्याकारणानें तीं एकमेकापासून जन्मलीं असतील; एकमेकांपासून जन्मणें हा देवतांचा धर्म म्हणजे विशेष गुण होय; देवांना अशक्य असें कांहीं नाहीं; इतरेतर जन्मानौ = इतरेतर प्रकृती ( पान ५४० ). अदिति ही मित्र, वरुण व अर्यमन् ह्यांची माता होय. अदितिः माता मित्रस्य रेवतो अर्यम्णो वरुणस्य च ( ८।४७।९ ); ह्या तिघांखेरीज तिला भग, दक्ष व अंश हेही मुलगे होते; शृणोतु मित्रो अर्यमा भगो नः तुविजातो वरुणो दक्षो अंशः ( २।२७।१ ); हे सर्व मुलगे धनवान् होते. जन्म = ( १ ) जन्म, ( २ ) धन, ( ३ ) संघ, ( ४ ) स्थान. ( २ ) आ दैव्यानि व्रता चिकित्वाना मानुषस्य जनस्य जन्म ( १।७०।१ ) = मनूपासून उत्पन्न झालेल्या ( मानुषस्य ) लोकांना ( जनस्य ) द्युलोकीं असणारें ( दैव्यानि ) धन ( व्रता = व्रतानि = जन्म = जन्मानि ) देणारा ( आ चिकित्वान् ) अग्नि. ( १ व २ ) अग्निरस्मि जन्मना जात-

वेदाः ( ३।२६।७ ) = ( १ ) मी जन्मानें जातवेद अग्नि आहें; ( २ ) मी धनानें (जन्मना) धनवान् (जातवेदाः) अग्नि आहें. व्रत = (१) आज्ञा, (२) धन किंवा दान. ( १ ) आपश्चिदस्य व्रत आ निमृग्राः अयं चिद्वातो रमते परिज्मन् ( २।३८।२ ) = सवित्याच्या ( अस्य ) आज्ञेनें ( व्रते ) जोरानें वाहाणाऱ्या नद्यासुद्धां ( आपः चित् ) व सर्वत्र हिंडणारा ( परिज्मन् ) वारासुद्धां ( वातः ) एकदम थांबतो ( रमते ). ( २ ) तस्य व्रतं रक्षतं पातमंहसो विशे जनाय महि शर्म यच्छतम् ( १।९३।८ ) = त्याला ( तस्य ) त्यानें धनवान् व्हावें म्हणून ( विशे=जनाय ) पुष्कळ ( महि ) धन ( व्रतं= शर्म ) द्या ( रक्षतं = यच्छतं ) आणि असें करून त्याचें दारिद्र्यापासून ( अंहसः ) रक्षण करा ( पातं ); दीर्घं वो दात्रम् अदितेरिव व्रतम् ( १।१६६।१२ ) = हे मरुतांनो, अदितीनें दिलेल्या दानाप्रमाणें ( व्रतम् इव ) तुमचें दान ( दात्रं ) दीर्घ काल टिकतें ( दीर्घं ). विषुरूप = अतिशय धनवान्; रूप = धन (पान ७७७). सु = धन; वि + सुरूप = ज्याच्या जवळ अतिशय धन आहे असा. वयोवयो जरसे यद्दधानः परि त्मना विषुरूपो जिगासि ( ५।१५।४ ) = हे अग्नि, लोकांनीं धनवान् व्हावें म्हणून ( जरसे ) आपल्या धनांतून ( त्मना ) अतिशय धन ( वयःवयः ) देणारा ( दधानः ) अतिधनवान् ( विषुरूपः ) तूं सर्वत्र ( परि ) संचार करतोस ( जिगासि ). जन्मनि व्रते = व्रतयुक्ते जन्मनि = धनयुक्ते धने = अतिशय धनांत. विषुरूपेषु जन्मसु = अतीशय धनांत. पृषद्योनिः पञ्चहोता शृणोतु अतूर्तपन्था असुरो मयोभुः ( ५।४२।१ ) = धनवान् ( पृषद्योनिः = अतूर्तपन्थाः = असुरः ), धनदाता ( मयोभुः ) व पञ्चजनांना धन देणारा ( पञ्चहोता ) आमची स्तुति ऐको किंवा आम्हांस धन ( नस् ) देवो ( शृणोतु ); ह्या ऋचेच्या पहिल्या अर्धांत वरुण, मित्र, भग व अदिति हीं नांवें आलीं आहेत; तेव्हां दुसऱ्या अर्धांत अर्यमालाच विनंति केली असावी. अतूर्त शब्दाची चिकित्सा पहा ( पान ८२३ ). पन्थ शब्दाचाही लक्षणेनें धन असा अर्थ होतो; सदा सुगः पितुमान् अस्तु पंथाः ( ३।५४।२१ ) = अहो देवांनो, आमचा मार्ग जाण्याला सुलभ ( सुगः ) व धनानें भरलेला ( पितुमान् ) असो. यथा नो मित्रो अर्यमा वरुणः सन्ति गोपाः। सुगा ऋतस्य पंथाः ( ८।३१।१३ ) = ज्या अर्थीं मित्र, अर्यमा व वरुण हे आमचे रक्षक आहेत त्या अर्थीं आमचे मार्ग जाण्याला सुलभ असणारच. वि अर्यमा वरुणः चेति पन्थाम् इषस्पतिः सुवितं गातुमग्निः ( ४।५५।४ ) = धनाचे पति ( इषस्पतिः ) अर्यमा, वरुण व अग्नि ह्यांनीं आम्हांला कल्याणदायक ( सुवितं ) मार्ग ( पन्थां = गातुं ) दिला आहे (विचेति). प्र नो राया परीणसा रत्सि वाजाय पन्थाम् (५।१०।१) = हे अग्नि, आम्हीं धनवान् व्हावें म्हणून ( वाजाय ) आम्हांला अतिशय धनानें भरलेला ( राया परीणसा ) मार्ग ( पन्थां ) लवकर ( प्र ) तयार करून दे ( रत्सि ). ह्या सर्व उताऱ्यांत पथ पायानें जाण्याचा नसून धनाचा आहे. अतूर्तपन्थाः = उपद्रवरहित ( अतूर्त ) मार्ग आहे ज्याचा म्हणजे धनानें भरलेला पथ आहे ज्याचा

असा अर्यमा. दक्षाय्यो अर्यमेवासि सोम (१।९१।३) = हे सोमा, तूं अर्यमाप्रमाणें धनवान् आहेस. रथ = (१) रथ, (२) रथांत वाहून आणलेलें धन. पुरवः रथाः यस्य सः = (१) ज्याच्या जवळ पुष्कळ रथ आहेत असा; (२) ज्याच्याजवळ पुष्कळ धन आहे असा. सप्तहोता = सप्तानाम् ऋषीणाम् अंगिरसां होता धनदाता = सप्तर्षींना म्हणजे अंगिरसांना धन पुरविणारा. आ विवास् = (१) स्तविणें किंवा तृप्त करणें, (२) याचना करणें, (३) बोलावणें, (४) देणें किंवा धनानें युक्त करणें. (१) तान् आ विवास नमसा सुवृक्तिभिः महो आदित्यान् अदितिं स्वस्तये (१०।६३।५) = त्या महान् आदित्यांना व अदितीला स्वकल्याणासाठीं स्तुतींनीं खूष कर; उप वो गीर्भिर् अमृतं विवासत (६।१६।६) = अमर अग्नीला स्तुतींनीं तृप्त करा. (२) आ विवासेयं रुद्रस्य सुम्नम् (२।३३।६) = मी रुद्राचें धन मागणार आहें; (१ व २) त्वां विप्रासः समिधान दीदिव आ विवासन्ति वेधसः (८।६०।५) = (१) हवींनीं प्रज्वलित केलेल्या (समिधान) व प्रकाशणाऱ्या (दीदिवः) हे अग्नि, स्तुति करणारे (विप्रासः = वेधसः) तुला स्तवितात; (२) हे दात्या (समिधान = दीदिवः), स्तोते तुझी याचना करतात. (३) यच्छक्रासि परावति यदर्वावति वृत्रहन्! अतस्त्वा० सुतावान् आविवासति (८।९७।४) = हे इन्द्रा, तूं स्वर्गांत आस किंवा एथें खालीं आस, कोठें असलास तरी तेथून इकडे येण्याला तुला हवि देणारा बोलावीत आहे; महामुग्रमवसे विप्र नूनमा विवासेम वृत्रतूर्येषु (६।३८।५) = हे विप्रा, स्वसंरक्षणासाठीं (अवसे) मोठ्या व बलिष्ठ इन्द्राला ह्या लढायांत आत्ताच्या आत्तां बोलावूं. (४) उत द्युमत् सुवीर्यं बृहत् अग्ने विवाससि। देवेभ्यो देव दाशुषे (१।७४।९) = हे देव अग्नि, देवांपासून पुष्कळ (द्युमत् = बृहत्) धन (सुवीर्यं) हवि देणाऱ्याला तूं देतोस; स नः पृथु श्रवाय्यम् अच्छा देव विवाससि। बृहदग्ने सुवीर्यम् (६।१६।१२) = हे अग्नि, तूं आम्हांस पुष्कळ (पृथु = श्रवाय्यं = बृहत्) धन (सुवीर्यं) देतोस. प्रस्तुत ऋचेंत आ विवाससि = धनानें युक्त करतेस. ऋचेचा अर्थः— हे अदिति, दात्या (राजाना = राजानौ) मित्रा वरुणांना तूं दक्षाच्या अतिशय धनांत म्हणजे धनानें युक्त करतेस किंवा धनवान् (अतूर्तपन्थाः = पुरुरथः) व सप्तर्षींना धन देणारा (सप्तहोता) जो अर्यमा त्याच्या अतिशय (विषुरूपेषु) धनानें (जन्मसु) युक्त करतेस; दक्षाजवळ पुष्कळ धन आहे परंतु अर्यमाजवळ त्याच्याहीपेक्षां अधिक धन आहे; असें पुष्कळ धन तूं मित्रावरुणांना देतेस. अतूर्तपन्थाः पुरुरथः सप्तहोता यः अर्यमा तस्य विषुरुपेषु जन्मसु राजानौ मित्रावरुणौ आविवाससि असा दुसऱ्या अर्धाचा अन्वय करावा; किंवा अतूर्तपन्थाः पुरुरथः सप्तहोता अर्यमा वा राजानौ मित्रावरुणौ विषुरूपेषु जन्मसु आविवासति = किंवा धनवान् अर्यमा दात्या मित्रावरुणांना आपल्या अतिशय धनानें युक्त करतो असा अन्वयार्थ करावा; हा दुसरा अन्वयार्थ पहिल्याहून अधिक योग्य दिसतो; मित्रावरुण इतके धनवान् असण्याचें कारण तूं त्यांना दक्षाचें धन देत असशील किंवा तुझा

मुलगा अर्यमा आपलें अमूप धन त्यांना देत असेल.

**अग्निः अपि अदितिः उच्यते । तस्य एषा भवति**

अग्नीला सुद्धां अदिति पुढील खंडांतील ऋचेंत म्हटलें आहे.

## खंड २४ वा.

**यस्मै त्वं सुद्रविणो ददाशोऽनागास्त्वमदिते सर्वताता ।**

**यं भद्रेण शवसा चोदयासि प्रजावता राधसा ते स्याम (ऋ० सं० १।९४।१५)**

**यस्मै त्वं सुद्रविणः ददासि अनागास्त्वम् अनपराधत्वम् अदिते सर्वासु कर्मततिषु । आगः आङ्पूर्वात् गमेः । एनः एतेः । किल्बिषं किल्भिदम् । सुकृतकर्मणः भयम् । कीर्तिम् अस्य भिनत्ति इति वा । यं भद्रेण शवसा बलेन चोदयसि । प्रजावता च राधसा धनेन । ते वयम् इह स्याम । इति**

ददाशः = ददासि; दाश् = देणें; पण दाश हिंसायाम् (धा० ५।३४). अनागास्त्वं = अनपराधत्वं = अपराधापासून सुटका, अपराध न घडेल अशी स्थिति; आगः = अपराध. सर्वताता = सर्वासु कर्मततिषु = इष्टि, पशु व सोमयाग अशा कृत्यांत; अशा यज्ञांत आमच्या हातून कोणताही अपराध घडणार नाहीं म्हणजे त्यांत कोणत्याही प्रकारचें वैगुण्य राहणार नाहीं अशी तूं दक्षता ठेवतोस. सर्वताता = सर्व + ताता; ताता = तातौ = परंपरेंत; सर्वतातौ = कर्मांच्या परंपरेंत. आगस् = आ + गस्; गस् = गम्; दुष्टकृत्यें करणाऱ्याकडे पाप अवश्य जातें म्हणून पापाला आगस् हें नांव; आगस् ह्या शब्दानें एनस् व किल्बिष हे शब्द मनांत येतात; एनस् = आ + इ + नस्; आ + इ = येणें; नस् हा नामकरण प्रत्यय; व्युत्पत्तीचा अर्थ आगस् प्रमाणें. किल्बिषं = किल् + बिषं; किल् = कीर्तिम्; बिषं = भिदम्; पाप चांगलीं कृत्यें करणाऱ्याची ( सुकृतकर्मणः ) कीर्ति फोडतें म्हणजे चांगल्या मनुष्यानें जर एकादें वाईट कृत्य केलें तर त्यांची कीर्ति नाहींशी होते; दुर्गवृत्तींत भयम् अस्य व इति वा हें शब्द नाहींत म्हणजे दुर्ग एकच व्युत्पत्ति देतो; किल्बिषं = किल् + बिषम्; किल् = कृत = सुकृतकर्मण; बिषं = भशं = भयम्; चांगलीं कृत्यें करणाऱ्याला पाप भयप्रद असतें म्हणजे चांगलीं कृत्यें करणारा पापाला भितो; ही व्युत्पत्ति प्रक्षिप्त होय. क्षीरस्वामीः–अगति कुटिलं गच्छति इति आगः (अमर २।८।२७); आगच्छति इति आगः ( अमर ३।३।२३१ ); एति एनः ( अमर १।३।२३ ); केलयति किल्बिशं ( अमर १।३।२३ ); केलयति = उत्तेजन देतें ( आपट्यांचा कोश ). यास्कानें किंवा प्रक्षेपकानें कल्मष व कलुष ह्यांच्याही व्युत्पत्ति द्यावयास पाहिजे होत्या; कारण आगस् शब्दानें हेही शब्द सूचित होतात. शवसा=बलेन; यास्क भाष्यांत शवसा शब्द नेहमीं कां घालतो तें समजत नाहीं. चोदयासि=चोदयसि=अनुगृण्हासि (दुर्ग). राधसा= धनेन; राधसा भाष्यांत नको. च व इह अध्याहृत. दुर्गानें केलेला अर्थः–हे धनवन्ता (सुद्राविणः) अग्नि (अदिते), ज्याला तूं सर्व यागांत अवैगुण्य (अनागास्त्वं) देतोस (ददाशः) म्हणजे ज्याच्या यज्ञांत तूं एवढेसें सुद्धां वैगुण्य ठेवीत नाहींस व कल्याणकारक (भद्रेण)

बल ( शवसा ) व प्रजायुक्त ( प्रजावता ) धन ( राधसा ) देऊन ज्याच्यावर तूं अनुग्रह करतोस त्याच्यासारखे ( ते ) आम्ही यज्ञांत ( इह ) किंवा इहलोकीं होऊं इच्छितों ( स्याम ).

**सायण:—** अदिते = अखंडनीय = ज्याची आज्ञा मोडतां येत नाहीं अशा हे अग्नि; सर्वताता = सर्वासु कर्मततिषु । यद्वा । सर्वेषु यज्ञेषु ( वर्तमानाय यजमानाय ); अनागास्त्वं = अपापत्वं = पापराहित्येन कर्मार्हतां = निष्पाप असल्यामुळे याज्ञिक कर्मे करण्याची पात्रता; स यजमानः समृद्धः भवति ह्या शब्दांनीं पहिला अर्ध पुरा केला आहे; भद्रेण = कल्याणेन; चोदयासि = संयोजयसि; सोऽपि समृद्धो भवति ह्यानें यं चोदयासि ह्या वाक्याची पूर्तता केली आहे; प्रजावता प्रजाभिः पुत्रपौत्रैर्युक्तेन ते राधसा त्वया दत्तेन धनेन युक्ताः स्याम; ह्याप्रमाणें भाष्यांत तीन स्वतंत्र वाक्यें केलीं आहेत. आगस् = ( १ ) अपराध, ( २ ) दारिद्र्य, ( ३ ) पीडा. धृतव्रता आदित्या इषिरा आरे मत् कर्त आगः ( २।२९।१ ) = अहो धनवन्त ( इषिराः ) व धन देणारे (धृतव्रताः) देवांनो, माझ्यापासून ( मत् ) दारिद्र्यरूपी अपराध (आगः ) दूर ( आरे ) ठेवा. अजैष्म अद्य असनाम च अभूम अनागसो वयम् ( ८।४७।१८ ) = आज आम्हीं धन जिंकलें आहे ( अजयिष्म ) व धन मिळविलें आहे ( असनाम ); दारिद्र्यापासून आम्ही मुक्त ( अनागसः ) झालों आहों. विश्वाहा त्वा सुमनसः सुचक्षसः प्रजावन्तो अनमीवा अनागसः । ज्योक् जीवाः प्रतिपश्येम सूर्य ( १०।३७।७ ) = हे सूर्या, चांगल्या मनानें ( सुमनसः ), चांगल्या डोळ्यांनीं ( सुचक्षसः ), पीडारहित ( अनमीवाः ) व पापरहित ( अनागसः ) असे जिवन्त असणारे ( जीवाः ) आम्ही तुला पुष्कळ दिवस (विश्वाहा=विश्वाहानि), दीर्घ काल ( ज्योक् ) पाहूं; सुमनसः = सुचक्षसः = धनयुक्त व अनमीवाः = अनागसः = दारिद्र्यापासून मुक्त असाही दुसरा अर्थ आहे. अनागास्त्वं सूर्यमुपसमीमहे भद्रं सोमः सुवानो अद्या कृणोतु नः (१०।३५।२) = सूर्य व उषा ह्यांच्यापाशीं आम्ही दारिद्र्यापासून मुक्तता ( अनागास्त्वं ) मागत आहों ( ईमहे ); रस काढला जाणारा ( सुवानः ) सोम आम्हांला आज धन ( भद्रं ) देवो ( कृणोतु ). अनागास्त्वेन हरिकेश सूर्य अन्हा अन्हा नो वस्यसावस्यसा उदिहि ( १०।३७।९) = हे सुवर्णकेशा ( हरिकेश ) सूर्या, रोजच्या रोज अतिशय ( वस्यसावस्यसा ) धनासह ( अनागास्त्वेन ) उदय पाव. शिवः कपोत इषितो नो अस्तु अनागा देवाः शकुनो गृहेषु ( १०।१६५।२ ) = अहो देवांनो, हा आमच्याकडे पाठविलेला ( इषितः ) कपोत पक्षी आमच्या घरांत कल्याणप्रद ( शिवः ) व पीडा न करणारा ( अनागाः ) होवो. आदित्यानामवसा नूतनेन सक्षीमहि शर्मणा शन्तमेन । अनागास्त्वे अदितित्वे तुरास इमं यज्ञं दधतु श्रोषमाणाः ( ७।२१।४ ) = आदित्यांच्या अतिशय ( नूतनेन = शंतमेन ) धनानें ( अवसा = शर्मणा ) आम्ही युक्त होऊं ( सक्षीमहि ); धन देणारे ( श्रोषमाणाः ) ते दाते ( तुरासः ) आमच्याजवळ अतिशय धन व्हावें म्हणून ( अनागास्त्वे = अदितित्वे ) आम्हांस पुष्कळ ( इमं )

धन ( यज्ञं ) देवोत ( दधतु ); एथें अनागास्त्व व अदितित्व ह्यांचा अर्थ एकच; दो = बांधणें; दित = बांधलेला; दिति = दारिद्यरूपी बंधन; अदिति = दारिद्यरूपी बंधनाचा अभाव म्हणजे धनसमृद्धि; दारिद्यरूपी बंधन काढणारी किंवा काढणारा ती किंवा तो अदिति. अनागास्त्वं ह्याच्याबद्दल अनागस्त्वं पाहिजे; तसें कां नाहीं तें समजत नाहीं अदिति ही एकेकाळीं सर्व देवतांमध्यें श्रेष्ठ देवता होऊन गेली; तिला यत्किंचित् सुद्धां अपराध खपत नसे; तिच्या भक्तांना आमच्याकरितां अदितीपाशीं रदबदली करा अशी मित्र, वरुण, अग्नि वगैरे देवांना विनवणी करावी लागे; ती रागावली कीं दारिद्र्य यावयाचेंच. अदिति हें नांव निरनिराळ्या देवांना लाविलें आहे. प्रस्तुत ऋचेंत अदिते हें संबोधन अग्नीला लावलें आहे. त्वमग्ने अदितिर्देव दाशुषे त्वं होत्रा भारती वर्धसे गिरा । त्वमिळा शतहिमासि दक्षसे त्वं वृत्रहा वसुपते सरस्वती ( २।१।११ ); ह्या ऋचेंत अग्नीला अदिति, भारती, इळा, इन्द्र व सरस्वती म्हटलें आहे; ह्या सर्व देवता व अग्नि धनदाते असल्यामुळें कवीनें हीं नांवें अग्नीला दिलीं आहेत; त्वमग्ने अदितिर्देव दाशुषे = हे देव अग्नि, हवि देणाऱ्याला तूं अदिति आहेस म्हणजे अदितीसारखें धन देतोस. त्वष्टा ( १०।९२।१४ ), सोम ( ८।४८। २ ), मित्र ( १०।१२।८ ), अर्यमन् ( ७।६०।१ ), आदित्य ( ६।५१।५ ), अश्विन ( १०।३९।११ ), द्यु ( ५।५९।८॥१०।६३।३ ), द्यावापृथिवी ( ४।५५।२ ॥७।६२।४ ), गाय ( ७।१८।८॥८।१०१।१५ ) व नाव ( १०।६३।१० ), ह्यांनाही आदिति म्हटलें आहे; तसें म्हणण्याचें कारण हे देव धनदाते होत; गाय ही दूध वगैरेंच्या द्वारें धन देते; नावेला आदिति म्हणण्याचें कारण तिनें उपद्रव देऊं नये हें. न तं राजानौ अदिते कुतश्चन नांहो अश्नोति दुरितं नकिर्भयम् । यमश्विना सुहवा रुद्रवर्तनी पुरोरथं कृणुथः पत्न्या सह ( १०।३९।११ ) = हे आश्विनांनो, धनवान् तुम्ही सूर्येला बरोबर घेऊन ज्याला धनवान् करतां त्याच्यावर दारिद्य रूपी संकट कधींही येत नाहीं; एथें आश्विनांना राजानौ व अदिते असें संबोधिलें आहे; राजानौ असें मित्रावरुणांना म्हटलेलें असतें; तेव्हां अश्विन हे मित्रावरुण व अदिति यांच्यासारखें धनवान् असून धनदाते आहेत असें सूचित होतें. राये च नः स्वपत्याय देव दितिं च रास्व अदितिम् उरुष्य ( ४।२।११ ) = हे अग्नि, आम्हीं धनवान् व्हावें म्हणून ( राये ) आम्हांला धन ( दितिं = अदितिं ) दे; ( रास्व = उरुष्य ); एथें दिति व अदिति ह्या दोहोंचाही अर्थ धन; दि = देणें; दिति = दान, धन; दिति = दारिद्यरूप बंधन; अदिति = ज्यांत हें बंधन नाहीं असें धन; अदिति शब्दाचा धन हा अर्थ असल्याकारणानें तो शब्द पाहिजे त्या देवाला व कांहीं वस्तूनांही लावितां येईल. सविता नः सुवतु सर्वतातिं सविता नो रासतां दीर्घमायुः ( १०। ३६।१४ ) = सविता आम्हांस धन ( सर्वतातिं ) देवो ( सुवतु ); सविता आम्हांस दीर्घायुष्य देवो ( रासतां ). आ सर्वतातिम् अदितिं वृणीमहे ( १०।१००।१ ) = अदितीपाशीं आम्ही धन ( सर्वतातिं ) मागत आहोंत ( आवृणीमहे ). अजीतये अह-

तये पवस्व स्वस्तये सर्वतातये बृहते ( ९।९६।४ ) = आम्हांला कोणीं जिंकूं नये म्हणून ( अजीतये ), आमचा कोणी नाश करूं नये म्हणून ( अहृतये ), आम्हांला पुष्कळ धन मिळावें म्हणून ( स्वस्तये = सर्वतातये = बृहते ), हे सोमा, आम्हांस धन दे ( पवस्व ). सृ = देणें; सर्व = दान, धन. देवताति, सर्वताति, वृकताति व उपरताति ह्यांच्या शेवटीं ताति आहे; ता + तिः = तातिः; पण ता काय? ताति म्हणजे समुदाय, संचय असा अर्थ असेल. सर्वताता = सर्वतातौ = धनसंचयांत, धनभांडारांत; पण वृकताति ह्यांत ताति ह्याचा समुदाय किंवा संचय असा अर्थ दिसत नाहीं; यो नो मरुतो वृकताति मर्त्यो रिपुर्दधे वसवो रक्षता रिषः ( २।३४।९ ) = हे धनवान् ( वसवः ) मरुतांनो, जो शत्रु आम्हांस सारखा उपद्रव ( वृकताति ) देतो ( दधे ) त्या शत्रूपासून ( रिषः ) आमचें रक्षण करा; वृक = लांडगा, लांडग्यानें केलेला उपद्रव; ताति = सातत्य; वृकताति = सतत उपद्रव. सर्वताति = देवताति = सतत राहणारें धन असा बहुतकरून अर्थ असेल. सर्वदेवात् तातिल् ( पा० ४।४।१४२ ) = सर्व व देव ह्या शब्दांना ताति हा प्रत्यय ऋग्वेदांत लावलेला आहे; पण त्या प्रत्ययानें सर्व व देव ह्यांच्या अर्थांत फरक होत नाहीं; सर्वतातिं = सर्वान्; देवतातिं = देवान्; पण असा अर्थ नसावा असें वाटतें. चोदय् = उत्तेजन देणें, साहाय्य करणें. शु = देणें; शवस् = धन. ऋचेचा अर्थः— हे धनवंता ( सुद्रविणः ) व धनदात्या ( अदिते ) अग्नि, त्यानें धनसंचय करावा म्हणून ( सर्वताता ), ज्याला तूं जें दिल्यानें दारिद्र्य कधींही येणार नाहीं असें धन ( अनागास्त्वं ) देत असतोस ( ददाशः ) व ज्याला पुष्कळ धनानें ( भद्रेण = शवसा = प्रजावता राधसा ) तूं उत्तेजन देतोस किंवा साहाय्य करतोस ( चोदयासि ) त्यासारखे ( ते ) आम्ही होण्याची इच्छा करतों ( स्याम ).

**सरमा ( १७ ) सरणात्। तस्याः एषा भवति**

सृ = सरणें, चालणें; सृ + अमा = सरमा; अमा हा नामकरणप्रत्यय. सरमा ही देवांची कुत्री होती असें इतिहासकार म्हणतात; पण ती अन्तरिक्षांतील वाणी होय असें नैरुक्त म्हणतात (दुर्ग).

## खंड २५ वा.

**किमिच्छन्ती सरमा प्रेदमानड् दूरे ह्यध्वा जगुरिः पराचैः।**

**कास्मेहितिः का परितक्म्यासीत् कथं रसाया अतरः पयांसि ( ऋ० सं० १०।१०८।१ )**

**किम् इच्छन्ती सरमा इदं प्रानट्। दूरे हि अध्वा। जगुरिः जङ्गम्यतेः। पराञ्चैः अंचितः। का ते अस्मासु अर्थहितिः आसीत्। किं परितकनम्। परितक्म्या रात्रिः। परितः एनां तक्म। तक्म इति उष्णनाम। तकते इति सतः। कथं रसायाः अतरः पयांसि इति। रसा नदी। रसतेः शब्दकर्मणः। कथंरसानि तानि उदकानि इति वा**

प्रेदमानट् = प्र+इदं+आनट् = इदं+प्रानट् ; इदं=आमच्या वसतीकडे; प्रानट् = प्राप्तवती (दुर्ग) = आली आहे; अश् ह्या धातूला आन् लागून (पा० ७।४।७२) आनश् ; आनश् ह्याचें तृतीय पुरुषाचें एकवचन आनट् ; अशू व्याप्तौ (धा०५।१८); अश्=पोंचणें. जगुरिः=यः एव जगुरिः स्यात् भृशं गन्ता स एव शक्तः आगन्तुं (दुर्ग)=ज्याला चालण्याची संवय आहे तोच हा लांब मार्ग आक्रमूं शकेल; दुर्गानें जगुरिः ह्याचें एक स्वतंत्र वाक्यच बनविलें आहे. जगुरि शब्द गम् (=जाणें) ह्यापासून; गम् अभ्यासानें जङ्गम् ; पण जङ्गम् पासून जगुरि शब्द कसा बनतो तें लक्षांत येत नाहीं. ही व्युत्पत्ति दुर्ग-वृत्तींत नाहीं; जगुरिः = भृशं गन्ता. पराचैः = परा + अचैः; अचैः = अञ्चनैः; अचितः अध्याहृत; पराचैः पराञ्चनैः पराङ्मुखैः अञ्चनैः गमनैः अचितः गतः विप्रकृष्टः देवनिवासात् ( दुर्ग ) = सोडलेल्या ठिकाणाकडे तोंड न करतां तसेंच पुढें पुढें जाण्यानें आक्रमिलेला म्हणजे स्वर्गापासून अति लांब गेलेला (मार्ग); तो मार्ग इतका लांब आहे कीं मागें पहाणें किंवा थांबणें प्रवाशाला सुचत नाहीं; मार्ग केव्हां संपेल असें त्याला होतें. अस्मेहितिः=अस्मासु अर्थहितिः; अर्थहितिः= अर्थस्य आधानम् (दुर्ग); आमच्यापासून कोणता अर्थलाभ मिळविण्याच्या हेतूनें तूं इतकी लांब आली आहेस असा दुर्ग अर्थ करतो; परंतु का ते अस्मासु अर्थहितिः आसीत् असें भाष्य आहे; आमच्यापाशीं तुला कोणती गोष्ट ठेवावयाची होती, तूं कोणता निरोप किंवा कोणती वस्तु आम्हांला पोचवावयाची होती ( म्हणून तुला पाठविली आहे ) असा भाष्याचा अर्थ दिसतो. का परितक्म्या=किं परितकनम् ; अमरांत किंवा आपटयांच्या कोशांत तकन किंवा परितकन शब्द नाहीं. तक हसने (धा० १।११७); तकि कृच्छ्रजीवने (धा० १।११८); परितकन=त्रास सोसणें असा अर्थ असेल; का परितक्म्या=वाटेंत किती त्रास झाला? परितक्म्या=रात्रिः (निघण्टु ४।१।२७); परितक्म्या=परि + तक्म्या; परि = परितः = सभोंवतीं; तक्मन् = उष्णता; तक्मन् शब्द अमरांत किंवा आपटयांच्या कोशांत नाहीं; जिच्या भोंवतीं उष्णता असते ती परितक्म्या; तक् ( = जाणें ) ह्यापासून तक्मन् ; उष्णता सर्व ठिकाणीं जाते म्हणून तिला तक्मन् हें नांव; उष्णता रात्रीच्या आंत नसते, ती रात्रीच्या आधीं किंवा मागून असते. तकते इति सतः ह्याच्याबद्दल तकतेः गत्यर्थस्य असें दुर्गवृत्तींत आहे; तकते इति सतः = जेव्हां उष्णता संचार करते तेव्हां उष्णतेला तक्मन् म्हणतात. परितक्म्या शब्दाचे असे दोन अर्थ केले आहेत; पण दुसऱ्या अर्थाच्यानंतर वा शब्द घालावयास पाहिजे होता. रसा हें एका नदीचें नांव आहे; त्या नदीला रसा हें नांव देण्याचें कारण तिचें पाणी वाहतांना आवाज करतें; रस शब्दे (धा० १।७१४). रसा नदीचें पात्र दीड योजन लांबीचें आहे (दुर्ग); इतकें विस्तृत पात्र तूं ओलांडून कशी आलीस? इति = असें पणि सरमेला विचारतात. कथंरसा पर्यासि=कथं रसानि तानि उदकानि=त्या पाण्याची चव कशी काय होती? वाटेंत तुला पाणी प्यावें लागलें असेल; तें पाणी कसें होतें? या अतरः

= यानि अतरः (= जें पाणी तूं ओलांडून आलीस) असा अर्थ यास्क व दुर्ग यांनीं द्यावयास पाहिजे होता; जें पाणी तूं ओलांडून आलीस त्याची चव कशी काय होती?

दुर्गानें केलेला अर्थः—कोणत्या गोष्टीचा शोध करीत (इच्छन्ती) सरमा आमच्या ह्या दूर देशाकडे आली आहे? हा मार्ग खरोखर अतिशय लांब आहे; ज्याला वारंवार जाण्याची संवय आहे तोच हा मार्ग आक्रमूं शकेल; सोडलेल्या देशाकडे तोंड न करतां म्हणजे त्याजकडे क्षणभरही न पाहतां सतत पुढें पुढें जाऊनच तो मार्ग क्रमण्यासारखा आहे इतका तो स्वर्गापासून दूर आहे; आमच्यापासून तुला काय प्राप्त करून घ्यावयाचें आहे? तुला वाटेंत किती कष्ट भोगावे लागले किंवा तुला किती रात्री काढाव्या लागल्या? रसानदीचें पाणी तूं कशी ओलांडून आलीस किंवा जें पाणी ओलांडून आलीस त्याची चव कशी काय होती?

**देवशुनी इन्द्रेण प्रहिता पणिभिः असुरैः समूदे इति आख्यानम्**

ह्या सूक्तांत इन्द्रानें पाठविलेली देवांची कुत्री सरमा पणि नांवाच्या असुराशीं संवाद करती झाली असा इतिहास आहे; समूदे हें सं + वद् ह्याचें द्वितीय भूतकालाचें तृतीय पुरुषाचें एकवचन होय; आख्यानम् = कथा, इतिहास. माध्यमिका वाक् असा जेव्हां सरमा शब्दाचा अर्थ घ्यावयाचा तेव्हां दुर्ग ऋचेचा पुढीलप्रमाणें अर्थ करतोः—पावसाळा संपून कित्येक महिने गेल्यावर अकस्मात् विजेचा कटकडाट ऐकून विस्मयानें कोणीएक म्हणतो; ही अन्तरिक्षांतील वाणी कोणत्या उद्देशानें (किम् इच्छन्ती) आमच्या कानीं पडत आहे? लांबच्या रस्त्यानें पुन्हा परत गेले पाहिजे म्हणजे हिला ऐकल्याला किती तरी काळ होऊन गेला; मागें ऐकलेल्या कडकडाटाचें स्मरण ज्याची स्मृति चांगली आहे त्यालाच होईल; फार फार मागें गेल्यावर त्या कडकडाटाचें स्वरूप लक्षांत येईल; हे वाणी, तुला आम्हांस काय सांगावयाचें आहे? असें काय काय घडलें आहे कीं ज्यामुळें तूं पुन्हा आली आहेस? फार दिवस निघून गेलेल्या तुला काय त्रास झाला असावा? अन्तरिक्ष नदीचें पाणी तरून तूं कशी आलीस म्हणजे किती पाण्यांत खळबळ उडवून देऊन तूं अस्तित्वांत आलीस? हें दुर्गानें केलेलें विवरण फार दुर्बोध, ओढाताणीचें व अगदीं अस्वाभाविक आहे; त्याचा मीं अनुवाद कसातरी केला आहे; असें विवरण करण्याचें कारण वाक् वै सरमा (मैत्रा० सं० ४।६।४) हें वाक्य होय.

**सायणः**—नश् = व्यापणें, पोसणें; ह्यापासून आनट्; पराचैः जगुरिः पराङ्मुखानि आवृत्तिवर्जितानि यानि गमनानि तैः उद्गूर्णः। महता प्रयत्नेन अपि गंतुं न शक्यते इत्यर्थः = परत फिरतां येत नाहीं अशा गमनानें ओकलेला म्हणजे पुढें पसरलेला मार्ग; अतिशय प्रयत्न करूनही जो संपत नाहीं असा; दूरे हि अध्वा = असा हा मार्ग खरोखर फारच दूरचा आहे; किंवा पराचैः जगुरिः हे शब्द अध्वा ह्याच्याशीं न घेतां त्यांचा अन्वय सरमा शब्दाशीं करावा; पराचैः जगुरिः = पराञ्चनैः जगुरिः अत्यर्थं गन्त्री पार्ष्णिभागम् अनालोकमाना = पुढें पुढें जोरानें जाणारी व

पाठीमागें न पाहणारी ( सरमा ); कास्मेहितिः = तुला पाहिजे अशी कोणची वस्तु आमच्याजवळ आहे? कास्मेहितिः = अस्मासु कः अर्थः गतः = आमच्यापाशीं तुमची कोणती वस्तु आली आहे (कीं ती आणण्यासाठीं तुला इकडे पाठविली आहे)? का परितक्म्या आसीत् = येतांना तुला रात्र कशी गेली किंवा तुला किती भटकावें लागलें ? शंभर योजनें विस्तीर्ण अशा गर्जना करणाऱ्या अन्तरिक्ष नदीचें पाणी तरून तूं कशी आलीस ?

( १ ) बाधस्व दूरे निर्ऋतिं पराचैः ( १।२४।९ ) = हे वरुणा, निर्ऋतीला अगदीं ( पराचैः ) दूर हांकलून दे. ( २ ) यद्ध शूर वृषमणः पराचैः वि दस्यून् योनौ अकृतो वृथाषाट् ( १।६३।४ ) = जेव्हां, हे शूरा, दस्यूंना जोरानें ( वृथा ) मारणारा ( षाट् ) तूं त्यांना पार दूर ( पराचैः ) अशा त्यांच्या ठिकाणीं ( योनौ ) ठार केलेंस ( वि + अकृत ). ( ३ ) तत्त इन्द्रियं परमं पराचैः अधारयन्त कवयः पुरेदम् ( १।१०३।१ ) = हे इन्द्रा, अद्भुत कृत्यें करणारे ( कवयः ) देव पूर्वकाळीं ( पुरा ) तुला अतिशय ( पराचैः परमं ) बल ( इन्द्रियं ) देते झाले ( अधारयन्त ); पराचैः परमं = अत्यंत श्रेष्ठ. ( ४ ) आरे बाधेथां निर्ऋतिं पराचैः ( ६।७४।२ ) = निर्ऋतीला पार ( पराचैः ) दूर ( आरे ) हाकलून द्या. ( ५ ) दूरे तन्नाम गुह्यं पराचैः ( १०।५५।१ ) = तें लपविलेलें धन पार दूर होतें. ह्या सर्व उताऱ्यांत पराचैः = पूर्णपणें असा अर्थ आहे. प्रस्तुत ऋचेंत अध्वा पराचैः दूरे हि= मार्ग खरोखर पूर्णपणें म्हणजे अतिशय दूर आहे. जगुरिः हा शब्द एथेंच आला आहे; तो ततुरि व पपुरि ह्यांसारखा दिसतो; तृ ह्यापासून ततुरि व पृ पासून पपुरि त्याप्रमाणें गॄ पासून जगुरि; गॄ = गिळणें; जगुरिः = गिळून टाकणारा, धैर्य खचविणारा; पराचैः हें दूरे किंवा जगुरिः ह्याचें विशेषण असेल; पराचैः जगुरिः = धैर्य पार खचून टाकणारा; मार्ग इतका दूरचा आहे कीं प्रवाशाचें मन अगदीं खचलेंच पाहिजे. का अस्मेहितिः = आम्हांला काय संदेश आहे ? हि = पाठविणें; हितिः = पाठविलेला संदेश; का अस्मेहितिः = ज्यानें तुला पाठविली त्यानें तुझ्याबरोबर कोणता संदेश आमच्याकडे पाठविला आहे ? ( १ ) औच्छत् सा रात्री परितक्म्या यां ऋणञ्चये राजनि रुशमानाम् । अत्यो न वाजी रघुरज्यमानो बभ्रुश्चत्वारि असनत्सहस्रा ( ५।३०।१४ ) = ज्या रात्रीं ( यां ) रुशमांचा राजा जो ऋणंचय त्याच्यापासून भरधांव धांवणारा शूर घोडा चार हजार म्हणजे असंख्य गायीं मला देता झाला अशी ती रात्र उजाडली; एथें परितक्म्या हें रात्री या शब्दाचें विशेषण आहे; परितक्म्या रात्री = लढाईची रात्र. ( २ ) सुपेशसं माव सृजन्त्यस्तं गवां सहस्रैरुशमासो अग्ने । तीव्रा इन्द्रमममन्दुः सुतासो अक्तोर्व्युष्टौ परितक्म्यायाः ( ५।३०।१३ ) = रुशम राजे मला हजारों गायींनीं धनवान् ( सुपेशसं ) करून घरीं ( अस्तं ) पाठविते झाले (अवसृजन्); लढाईची (परितक्म्यायाः) रात्र (अक्तोः) उजाडतांच( व्युष्टौ ) तीव्र सोमरस इन्द्राला हृष्ट करता झाला; पिवून स्फुरण पावलेला इन्द्र रुशमांच्या बाजूनें लढला व त्यामुळें

रुशमांच्या राजानें मला हजारों गायी दिल्या; एथें परितक्म्यायाः हें अक्तोः ह्याचें विशेषण. ( ३ ) चरित्रं हि वेरिवाच्छेदि पर्णमाजा खेलस्य परितक्म्यायाम् । सद्यो जङ्घामायसीं विश्पलायै धने हिते सर्तवे प्रत्यधत्तम् ( १।११६।१५ ) = खेलाच्या लढाईंत ( आजौ = परितक्म्यायां ) विश्पलेची तंगडी ( चरित्रं ) पक्षाच्या ( वेः ) पंखाप्रमाणें ( पर्णम् इव ) तोडली गेली ( अच्छेदि ); तेव्हां, हे अश्विनांनो, तिला रणांगणांत ( धने हिते ) धांवतां यावे ( सर्तवे ) म्हणून तुम्हीं त्या ठिकाणीं पोलादी ( आयसीं ) तंगडी ( जङ्घां ) बसविलीत ( प्रति + अधत्त ); आजौ = परितक्म्यायां = धने हिते = सग्रामांत. ( ४ ) इन्द्रा नो अत्र वरुणा स्यातामवोभिर्दस्मा परितक्म्यायाम् ( ४।४१।६ ) = हे धनदाते ( दस्मा ) इन्द्रवरुणहो, ह्या लढाईंत आमच्याकडे (नः) धनासह ( अवोभिः ) असा ( स्यातां ) म्हणजे आम्हांला धन द्या. ( ५ ) मक्षू हि ष्मा गच्छथ ईवतो द्यून् इन्द्रो न शक्तिं परितक्म्यायाम् ( ४।४३।३ ) = हे अश्विनांनो, इन्द्र जसा लढाईंत धन ( शक्तिं ) देतो त्याप्रमाणें तुम्हीं त्वरेनें ( मक्षू ) अतिशय ( ईवतः ) धन ( द्यून् ) देतां ( गच्छथः ). ( ६ ) सूरश्चिद्रथं परितक्म्यायां पूर्वं करदुपरं जूजुर्वांसम् ( ५।३१।११ ) = प्रवासांत सूर्याचें चाक वेगानें पुढें पुढें ( पूर्वम् ) जात असतां ( जूजुवांसं ) इन्द्र त्या चाकाला मागें ( उपरं ) टाकता झाला; इन्द्र व सूर्य यांच्यामधे स्पर्धा असून इन्द्र सूर्याचा पराभव करता झाला असें कांहीं ऋचांत म्हटलें आहे. ( ७ ) स्था ऊ षु ऊर्ध्व ऊती अरिषण्यन् अक्तोर्व्युष्टौ परितक्म्यायाम् ( ६।२४।९ ) = हे इन्द्रा, लढाईची रात्र उजाडली आहे तेव्हां धनांतून (ऊती) आम्हांला धन दे ( स्थाः ). ( ८ ) युवोः श्रियं परि योषावृणीत सूरो दुहिता परितक्म्यायाम् ( ७।६९।४ ) = तुमची बायको ( योषा ) व सूर्याची मुलगी सूर्या तुमचें तेज ( श्रियं ) अंगाभोंवतीं घालती झाली ( परि + अवृणीत ); परितक्म्यायां = प्रवासांत; अश्विन जेव्हां प्रवासाला निघतात तेव्हां ते सूर्येला बरोबर घेऊन जातात; परितक्म्या म्हणजे लढाई असा अर्थ एथें नाहीं. ( ९ ) यः शूरसाता परितक्म्ये धने दभ्रेभिश्चित् समृता हंसि भूयसः ( १।३१।६ ) = हे इन्द्रा, तूं लढाईंत ( शूरसातौ = परितक्म्ये धने=समृतौ) थोडक्या वीरांसह (दभ्रेभिः) पुष्कळांना (भूयसः) ठार करतोस ( हंसि ). तिसऱ्या उताऱ्यांत परितक्म्या म्हणजे लढाई असा अर्थ निःसंशय दिसतो; त्याप्रमाणें नवव्या उताऱ्यांत परितक्म्ये धने ह्याचाही तोच अर्थ होय. ६ व ८ ह्यांत परितक्म्या म्हणजे प्रवास; बाकीच्यांत लढाई हा अर्थ नसेल. तक्म, तक्म्य व तक्म्या ह्यांपैकीं कोणताही शब्द ऋग्वेदांत नाहीं; तथापि त्यांचा अर्थ धन असावा; परि परितः तक्म्यं धनं यस्मिन् यस्यां वा = ज्यांत जिकडे तिकडे धन पसरलें आहे असा संग्राम; ( १ ) औच्छत्सा रात्री परितक्म्या, ( २ ) अक्तोः व्युष्टौ परितक्म्यायाः व ( ३ ) अक्तोर्व्युष्टौ परितक्म्यायां या तीन ठिकाणीं धनानें भरलेली रात्र उगवल्यावर म्हणजे रात्र होतांच असा अर्थ होईल. परितक्म्या म्हणजे रात्र असा अर्थ ठरविण्यास आधार दिसत नाहीं; प्रस्तुत ऋचेंत प्रवास असा त्या शब्दाचा अर्थ असावा;

का परितक्म्या आसीत् = तुझा प्रवास कसा काय झाला ? ऋचेचा अर्थः—कशाचा शोध करीत ( इच्छन्ती ) सरमा इतक्या दूर प्रदेशाला ( प्र + इदं ) आली आहे ( आनट् ) ? मार्ग अतिशय ( पराचैः ) दूरचा ( दूरे ) असून धीर खचविणारा आहे ( जगुरिः ); आम्हांला कोणता सन्देश ( हितिः ) तुला द्यावयाचा आहे ? तुझा प्रवास कसा काय झाला ? रसा नदीचें पाणी ओलांडून तूं कशी आलीस ?

**सरस्वती ( १८ ) व्याख्याता ( निरु ९।२६ )। तस्याः एषा भवति**

सरस्वती शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ६९१ ).

## खंड २६ वा.

**पावका नः सरस्वती वाजेभिर्वाजिनीवती। यज्ञं वष्टु धियावसुः ( ऋ० सं० १।३।१० )**

**पावका नः सरस्वती। अन्नैः अन्नवती। यज्ञं वष्टु। धियावसुः कर्मवसुः। तस्याः एषा अपरा भवति**

वाजेभिः = अन्नैः; वाजिनीवती = अन्नवती. धियावसुः = कर्मवसुः; धियावसुः = कर्मधना ( दुर्ग ); कर्मवसुः = कर्मधना = कृति हें धन आहे जिचें अशी म्हणजे सतत वाहणारी; धीः = कर्म ( निघण्टु. २।१।२१ ). दुर्गानें केलेला अर्थः— शुद्ध करणारी ( पावका ), अन्नानें म्हणजे हवीनें युक्त ( वाजेभिः वाजिनीवती ) व कर्म हेंच धन आहे जिचें अशी सरस्वती नदी आमच्या हवींची इच्छा करो. सरस्वती म्हणजे माध्यमिका वाक्; ती पृथिवीवर पाऊस पाडते ( पावका ) व उदकानें युक्त असते ( वाजेभिः वाजिनीवती ) असाही अर्थ दुर्ग करतो; ऋचेंतील बाकीचे शब्द सरस्वती नदी व माध्यमिका वाक् ह्या दोहोंनाही एकाच अर्थी लागूं होत; हा दुसरा अर्थ ओढाताणीचा व अस्वाभाविक आहे.

**सायण:**— वाजेभिः = हविर्लक्षणैः अन्नैः निमित्तभूतैः = हविरूप अन्न मिळावें ह्या हेतूनें; किंवा वाजेभिः = यजमानेभ्यः दातव्यैः अन्नैः निमित्तभूतैः = यजमानांना अन्न द्यावयाचें आहे ह्या हेतूनें म्हणजे यजमानांना अन्न देण्याकरितां; ती आमच्या यज्ञाची इच्छा करो म्हणजे आमचा यज्ञ देवांकडे वाहून नेवो. पावका = शोधयित्री; वाजिनीवती = अन्नवत्क्रियावती = अन्नोत्पादनक्रिया करणारी; धियावसुः = कर्मप्राप्यधननिमित्तभूता = यज्ञकर्मानें जें धन प्राप्त होतें तें आणून देणारी; जेव्हां सरस्वती माध्यमिका वाक् तेव्हांही ऋचेचा हाच अर्थ.

पावका = (१) उदकानें शुद्ध करणारी, (२) धनदात्री; पृ (=देणें) ह्यापासून पावक. सरस्वती = (१) सरस्वती नदी, (२) धनवती. सृ = देणें; सरस् = दान, धन. वाज व वाजिनी ह्यांचा अर्थ हवि व धन. यज्ञ = ( १ ) हवि, ( २ ) धन. वश् = ( १ ) इच्छा करणे, ( २ ) देणे. धियावसुः = धिया धनेन युक्तं वसु यस्याः सा = जिच्याजवळ अतिशय धन आहे अशी. नः = ( १ ) आमचा, ( २ ) आम्हांला. ऋचेचे

दोन अर्थः— ( १ ) उदकानें शुद्ध करणारी व हवींनीं युक्त ( वाजेभिः वाजिनीवती = धियावसुः ) सरस्वती आमच्या हवींची इच्छा करो म्हणजे आमचा हवि घेवो; ( २ ) ही अत्यंत श्रीमान् ( सरस्वती = वाजिनीवती = धियावसुः ) धनदात्री (पावका) आम्हांला आपल्या धनांतून ( वाजेभिः ) धन ( यज्ञं ) देवो ( वष्टु ). सरस्वतीसंबंधानें पुढील आणखी एक ऋचा होय. ही दुसरी ऋचा देण्याचें कारण तींत उदकवाची शब्द स्पष्ट आहे असें दुर्ग म्हणतो; प्रस्तुत ऋचेंत वाज म्हणजे उदक असा अर्थ करावा लागतो.

## खंड २७ वा.

**महो अर्णः सरस्वती प्र चेतयति केतुना । धियो विश्वा वि राजति (ऋ०सं० १।३।१२)**

**महत् अर्णः सरस्वती प्रचेतयति । प्रज्ञापयति । केतुना कर्मणा । प्रज्ञया वा । इमानि च सर्वाणि प्रज्ञानानि अभिविराजति**

महः = महत् = पुष्कळ. प्रचेतयति = प्रज्ञापयति = आविःकरोति वर्षभावेन ( दुर्ग ) = पावसाच्या रूपानें प्रकट करते. केतुना = कर्मणा = आपल्या कृतीनें म्हणजे पाऊस पाडून; किंवा केतुना = प्रज्ञया = बुद्धिसामर्थ्यानें; तिच्यांत जर बुद्धि नसेल व बल नसेल तर ती हें पाऊस पाडण्याचें काम कसें करील? तेव्हां तिच्यांत बुद्धि व बल हीं असलींच पाहिजेत ( दुर्ग ). निघण्टूंत ( ३।९।२ ) केतुः = प्रज्ञा ( १।२७ ) एवढाच अर्थ आहे. धियः विश्वाः = इमानि च सर्वाणि प्रज्ञानानि = व ह्या सर्व बुद्धि; दुर्गवृत्तींत च नाहीं; धीः = प्रज्ञा ( निघण्टु ३।९।७ ). विराजति = अभिविराजति. सरस्वती पाऊस पाडून अन्न देते; अन्न खाल्यानें बुद्धि काम करूं लागते; तेव्हां सर्वांच्या बुद्धीवर सरस्वती आपली सत्ता चालविते हें स्पष्ट आहे ( दुर्ग ). सरस्वती म्हणजे माध्यमिका वाक् ( दुर्ग ). दुर्गानें केलेला अर्थः— माध्यमिका वाक् ( सरस्वती ) पाऊस पाडण्याच्या कृतीनें किंवा आपल्या बुद्धिमत्तेनें ( केतुना ) पुष्कळ ( महः ) उदक ( अर्णः ) प्रकट करते ( प्रचेतयति ) व सर्वांच्या बुद्धीवर सत्ता चालविते.

**सायणः**— सरस्वती शरीर धारण करणारी देवता; तिचें वर्णन प्रस्तुत ऋचेच्या आधींच्या दोन ऋच्यांत आलें आहे; प्रस्तुत ऋचेंत सरस्वती म्हणजे एक विशिष्ट नदी; केतुना = कर्मणा प्रवाहरूपेण = प्रवाहरूपी कृतीनें; महो अर्णः = प्रभूतम् उदकम्; प्रचेतयति प्रकर्षेण ज्ञापयति; धियो विश्वा विराजति = स्वकीयेन देवतारूपेण सर्वाणि अनुष्ठातृप्रज्ञानानि विशेषेण दीपयति । अनुष्ठानविषयबुद्धीः सर्वदा उत्पादयति = आपल्या देवतारूपानें यज्ञानुष्ठान करणाऱ्यांच्या बुद्धीला तजेला देते म्हणजे त्यांच्यांत यज्ञ करण्याची बुद्धि सदोदित उत्पन्न करते. ऋचेचा पहिला अर्ध नदीपर व दुसरा देवतापर असा सायणाचार्यांनीं विभाग केला आहे.

अर्णः = उदक; हा अर्थ बहुतेक ऋचांत आहे; तथापि एखाद दुसऱ्या ऋचेंत त्याचा धन असा अर्थ होतो; जसें:— अयं विदत् चित्रदृशीकमर्णः शुक्रसद्मनामुषसामनीके ( ६।४७।५ ) = ज्यांच्यापाशीं तेजस्वी धन आहे अशा ( शुक्रसद्मनां ) उषांच्या धनांत ( अनीके ) हा सोम अतिशय ( चित्रदृशीकं ) धन ( अर्णः ) देतो ( विदत् ) म्हणजे घालतो. वर्धन्तां द्यावो गिरश्चन्द्राग्राः उदा वर्धन्ताम् अभिषाता अर्णाः ( ५।४१।१४ ) = द्यु हिरण्यानें भरलेलें ( चन्द्राग्राः ) धन ( गिरः = अर्णाः ) ह्या धनांच्या वांटणींत ( अभिषाता = अभिषातौ) देवो (वर्धन्तां). एकाचेतत् सरस्वती नदीनां शुचिर्यती गिरिभ्य आ समुद्रात् । रायश्चेतन्ती भुवनस्य भूरेः घृतं पयो दुदुहे नाहुषाय ( ७।९५।२ ) = पर्वतांपासून समुद्राकडे वहात जाणारी ( यती ) व प्रकाशणारी ( शुचिः ) अशी सर्व नद्यांमधील एकच नदी सरस्वती धन देते ( अचेतत् ); पुष्कळ (भूरेः) धन (रायः = भुवनस्य) देणारी ( चेतंती ) मनुष्याला उदकाचें दोहन करती झाली म्हणजे उदक देती झाली. चोदयित्री सूनृतानां चेतन्ती सुमतीनां । यज्ञं दधे सरस्वती ( १।३।११ ) = धन ( सूनृतानां = सुमतीनां ) देणारी ( चोदयित्री = चेतन्ती ) सरस्वती धन ( यज्ञं ) देती झाली ( दधे ). विश्वस्य हि प्रचेतसा वरुण मित्र राजथः । ईशाना पिप्यतं धियः ( ५।७१।२ ) = हे मित्रावरुणांनो, धनवान् ( प्रचेतसा = प्रचेतसौ ) तुम्हीं पुष्कळ धन ( विश्वस्य ) देतां ( राजथः ); हे दात्यांनो ( ईशाना = ईशानौ ) धन ( धियः ) द्या ( पिप्यतं ). पुरु त्वमग्ने पुरुरूपो विशे विशे वयो दधासि प्रत्नथा पुरुष्टुत । पुरूण्यन्ना सहसा वि राजसि ( ५।८।५ ) = सर्वांनीं स्तविलेला ( पुरुष्टुत ) हे अग्नि, धनवान् ( पुरुरूपः ) तूं पूर्वीपासून ( प्रत्नथा ) सर्व लोकांना ( विशे विशे ) पुष्कळ ( पुरु ) धन ( वयः ) देत असतोस ( दधासि ); आपल्या धनांतून ( सहसा ) पुष्कळ ( पुरूणि ) धन ( अन्नानि ) दे ( विराजसि ). नि केतुना जनानां चिकेथे पूतदक्षसा ( ५।६६।४ ) = हे मित्रा वरुणांनो, धन देणारे ( पूतदक्षसा = पूतदक्षसौ ) तुम्ही आपल्या धनांतून ( केतुना) लोकांना ( जनानां ) धन ( नि ) देत असतां (चिकेथे); कि = देणें; कि + तुः = केतुः = धन; चिकेथे = देतां. ऋचेचा अर्थः— सरस्वती आपल्या धनांतून ( केतुना ) पुष्कळ ( महः ) धन ( अर्णः ) देते ( प्रचेतयति ); ती पुष्कळ ( विश्वाः ) धन ( धियः ) देते ( विराजति ).

**वाक् अर्थेषु विधीयते । तस्मात् माध्यमिकां वाचं मन्यन्ते**

माध्यमिक वाचेनें ( वाक् ) उदकासारखे निरनिराळे पदार्थ ( अर्थेषु ) द्यावे अशी तिला आज्ञा केली आहे ( विधीयते ); सरस्वती उदक वगैरे पदार्थ देते; म्हणून तिला नैरुक्त माध्यमिका वाक् समजतात म्हणजे म्हणतात.

**वाक् ( १९ ) व्याख्याता ( निरु० २।२३ ) । तस्याः एषा भवति**

**वाक् शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान १३९ ).**

## खंड २८ वा.

**यद्वाग्वदन्त्यविचेतनानि राष्ट्री देवानां निषसाद मन्द्रा। चतस्र ऊर्जं दुदुहे पयांसि क्व स्विदस्याः परमं जगाम ( ऋ० सं० ८।१००।१० )**

**यत् वाक् वदन्ती अविचेतनानि। अविज्ञातानि। राष्ट्री देवानां निषसाद मन्द्रा। मदना। चतस्रः अनु दिशः ऊर्जं दुदुहे पयांसि। क्व स्वित् अस्याः परमं जगाम। इति। यत् पृथिवीं गच्छति इति वा। यत् आदित्यरश्मयः हरन्ति इति वा**

अविचेतनानि = अविज्ञातानि = ज्यांचा अर्थ कळत नाहीं असे ( गडगडाटासारखे शब्द ) राष्ट्री देवानां = ईश्वरा माध्यमिकानां देवतानां ( दुर्ग ) = अंतरिक्षांतील देवतांवर सत्ता चालविणारी. निषसाद = निषीदति = व्याप्नोति आत्मानं वर्षकर्मणि ( दुर्ग ) = बसते म्हणजे पाऊस पाडण्याच्या कामांत स्वतःला गुंतविते. मन्द्रा = मदना = हर्ष देणारी किंवा लोकांना उदक देऊन तृप्त करणारी ( दुर्ग ). चतस्रः = चतस्रः दिशःअनु = चार दिशांमध्यें; चतस्रः = चतस्रो दिशः प्रति अनुदिशश्च ( दुर्ग ) = चार मुख्य दिशा व चार अवांतर दिशा ह्यांच्याकडे; महाराष्ट्रपाठांत अनुदिशः असा एक शब्द आहे. ऊर्जं = अन्न. पयांसि = जल. दुदुहे = दुग्धे = प्रक्षरति ( दुर्ग ) = वहावयास लावते. क्व स्वित् अस्याः परमं जगाम = ह्या वाचेचे ( अस्याः ) परम तत्त्व ( परमं ) कोठें बरें ( क्व स्वित् ) जातें ( जगाम )? हें जल झाडें वगैरे उत्पन्न करून कोठें जातें व पुन्हां दरवर्षी तें कुठून येतें हें कोण जाणतो असा दुर्ग अर्थ करतो; परमं जगाम = ( ह्या वाचेच्या ) तत्त्वाला कोण गेला आहे म्हणजे तें तत्त्व कोण जाणतो ( दुर्ग )? यत् पृथिवीं गच्छति इति वा। यत् आदित्यरश्मयः हरन्ति इति वा = जें जल पृथिवीकडे जातें किंवा जें सूर्याचे किरण घेऊन जातात तें किती असेल? तें फारच थोडें असणार; माध्यमिका वाचेजवळ असणारें जल कधींही क्षीण होत नाहीं ( दुर्ग ); यत् पृथिवीं वगैरे शब्द वृत्तींत न देतां दुर्ग त्यांचा अर्थ देतो. दुर्गानें केलेला अर्थः— ज्यांचा अर्थ कळत नाहीं असे गडगडाटासारखे शब्द स्पष्टपणें बोलणारी ( वदन्ती ), अन्तरिक्षांतील देवांवर सत्ता चालविणारी ( राष्ट्री ), लोकांना हर्ष देणारी किंवा त्यांना तृप्त करणारी ( मंद्रा ) अशी माध्यमिका वाक् जेव्हां पाऊस पाडण्याच्या कामांत गुंतते ( निषसाद ) तेव्हां ती चार मुख्य व चार अवान्तर दिशांत अन्न ( उर्जं ) व जल दोहन करते म्हणजे सर्वत्र जल वर्षून अन्न उत्पन्न करते; हिच्या परमतत्वाकडे कोण बरें आजपर्यंत गेला आहे म्हणजे तें कोणाला कळलें आहे? पृथिवीवर जल किती राहतें किंवा सूर्यकिरण वाफेच्या रूपानें किती घेऊन जातात हें कोण सांगूं शकेल?

**सायणः—** देवांवर सत्ता चालविणारी ( राष्ट्री ), हर्षयुक्त किंवा देवांना हर्षविणारी (मंद्रा) व न समजण्याजोग्या गोष्टी (अविचेतनानि) ज्ञात करणारी (वदन्ती = प्रज्ञापयन्ती) अशी माध्यमिका वाक् जेव्हां यज्ञांत येऊन बसते तेव्हां ती चार दिशां-

कडे ( चतस्रः ) अन्न ( ऊर्जं ) व अन्नोत्पदनाला लागणारें जल ( पयांसि ) दोहन करते म्हणजे वर्षते; ह्या ( अस्याः ) माध्यमिका वाचेचें जें श्रेष्ठ स्वरूप ( परमं ) तें कोठें जातें ? म्हणजे तें दिसत नाहीं. हा अर्थ स्पष्ट नाहीं.

प्रस्तुत ऋचा व तिच्यानंतरची ऋचा ह्या दोन ८।१०० ह्या सूक्तांत अ-प्रस्तुत होत; कारण १ ते ९ व शेवटली १२ ह्यांत इंद्राचें, त्याच्या वज्राचें व त्याला साहाय्य करणाऱ्या विष्णूचें वर्णन आलें आहे; ह्या वर्णनाशीं १० व ११ ह्या ऋचांचा कांहीं एक संबंध नाहीं. देव वाग्देवीला उत्पन्न करते झाले; नानाप्रकारचे पशु ती वाक् बोलतात; धनदात्री ( मंद्रा ) व दोहन करणारी ती वाग्धेनु स्तविली असतांना आमच्याकडे येवो असा अकराव्या ऋचेचा अर्थ आहे. ही वाग्देवी कोण, ती पशु बोलतात म्हणजे काय व ती धन कशी देईल ? प्रस्तुत ऋचा ह्या वाग्देवीसंबंधानेंच आहे. ऋचेचा अर्थः— जेव्हां अतिशय धन देणारी ( अविचेतनानि वदन्ती = देवानां राष्ट्री = मंद्रा ) वाग्देवी धन ( नि ) देते ( ससाद ) तेव्हां ती चार प्रकाऱच्या वाचा ( चतस्रः ), धन ( ऊर्जं ) व जल ( पयांसि ) देते ( दुदुहे ); पण तिचें जें उत्तम धन ( परमं ) तें कोठें बरें ( क स्वित् ) गेलें आहे ( जगाम ) ? तिनें दिलेलें नेहमींचें धन सर्वत्र पाहण्यांत येतें; पण वाचेचें खरें खरें धन कोणाला मिळालें आहे ? ऋचेंतील शब्द गूढ नाहींत; तथापि ऋचेचा खरा अर्थ कळत नाहीं. १।१६४।४५ ह्या ऋचेंत वाचेनें मोजलेलीं चार पदें आहेत म्हणजे वाचा चार प्रकारची आहे; हे चार प्रकार बुद्धिवान् ब्राह्मणच जाणतात; त्यांपैकीं गूढ असलेले तीन प्रकार कोणाला कळत नाहींत; चवथा प्रकार मनुष्य बोलतात असें म्हटलें आहे ( निरु० १३।९ ); ह्या सारखीच प्रस्तुत ऋचा गूढ होय.

**तस्याः एषा अपरा भवति**

वाक् संबंधानें पुढील आणखी एक ऋचा होय. सर्व प्राण्यांच्या ठायीं असलेली ही वाणी सर्व अर्थ प्रकाशित करते ह्यामुळें तिची महती मोठी आहे हें दाखविण्या-करितां पुढील ऋचा यास्क देतो असें दुर्ग म्हणतो.

## खंड २९ वा.

**देवीं वाचमजनयन्त देवास्तां विश्वरूपाः पशवो वदन्ति । सा नो मन्द्रेषमूर्जं दुहाना धेनुर्वागस्मानुप सुष्टुतैतु ( ऋ० सं० ८।१००।११ )**

**देवीं वाचम् अजनयन्त देवाः । तां सर्वरूपाः पशवः वदन्ति । व्यक्तवाचश्च अव्यक्तवाचश्च । सा नः मदना अन्नं च रसं च दुहाना धेनुः वाक् अस्मान् उपैतु सुष्टुता**

विश्वरूपाः = सर्वरूपाः = सर्व प्रकारचे. ह्या सर्व प्रकारच्या पशूंपैकीं कांहीं स्पष्ट वाचा बोलणारे आहेत ( व्यक्तवाचः ) व इतर अस्पष्ट वाचा बोलणारे आहेत; स्पष्ट वाचा बोलणारे मनुष्यासारखे प्राणी व अस्पष्ट वाचा बोलणारे गाईसारखे प्राणी

( दुर्ग ). मन्द्रा = मदना ( पान ९१३ ). इषं = अन्नम्; उर्जं = रसम् ( पान ७२७ ); इषं व उर्जं ह्याचे अर्थ दुर्ग देत नाहीं. उप सुष्टुता एतु = सुष्टुता उपैतु. दुहाना = प्रक्षरन्ती (दुर्ग)=वर्षाव करणारी. धेनुः=तर्पयित्री (दुर्ग)=तृप्त करणारी; धिवि प्रीणने (धा० १।५९४). दुर्गानें केलेला अर्थः—उदक देणाऱ्या (देवीं=दात्रीं) ज्या वाचेला अन्तरिक्षांतील देव निर्माण करते झाले ती इष्टार्थ प्रकट करणारी वाचा स्पष्ट बोलणारे व अस्पष्ट बोलणारे असे दोन्ही प्रकारचे पशु बोलतात; हर्षविणारी किंवा पाऊस पाडून तृप्ति देणारी, अन्न व दूध वगैरे दोहन करणारी आणि तसें करून सर्वांचें समाधान करणारी व आमच्याकडून स्तविली जाणारी ती वाचा आमच्याकडे येवो.

**सायणः—** सर्व प्राण्यांमध्यें असलेली माध्यमिका वाक् धर्माचा उपदेश करते अशी तिची महत्ता प्रस्तुत ऋचेंत वर्णिली आहे; प्रकाशणाऱ्या ( देवीं = द्योतमानां ) ज्या वाचेला अन्तरिक्षांतील देव निर्माण करते झाले ती वाचा स्पष्ट बोलणारे व अस्पष्ट बोलणारे असे दोन्ही प्रकारचे पशु बोलतात; सर्व प्राण्यांमधील वाचेला प्रेरणा माध्यमिका वाक् देते; स्तुत्य किंवा पाऊस पाडून हर्षविणारी ( मन्द्रा ), आम्हांला अन्न व दूधतूप वगैरे रस दोहन करणारी (दुहाना=क्षरन्ती) व आम्हांकडून स्तविली जाणारी ती धेनुरूप धारण करणारी वाग्देवी आमच्याकडे येवो. ऋचेचा अर्थः — देव दैवी वाचेला उत्पन्न करते झाले; नानाप्रकारचे पशु म्हणजे प्राणी ती वाचा बोलतात; धनदात्री ती वाग्रूपी कामधेनु स्तविली असतांना आमच्याकडे येवो. ऋचेचा धनपर अर्थ असावा; कारण ऋचेंतील बरेच शब्द तदर्थक आहेत; जसें:— देवीं = धनयुक्त, अतिशय; वाचं = धनाला; अजनयन्त = देते झाले; देवाः = धन देणारे; विश्वरूपाः = अति धनवान्; रूप = धन ( पान ७७७ ); पशवः = पशुरूप धन बाळगणारे धनिक; वदन्ति = देतात; मन्द्रा = देणारी; इषं = ऊर्जं = धन; दुहाना = दोहन करणारी म्हणजे देणारी; धेनुः = कामधेनु = सर्व इच्छा पुरविणारी; असे अर्थ असूनही ऋचेचा धनपर अर्थ स्पष्ट रीतीनें सांगणें कठीण आहे म्हणून तो मी देत नाहीं.

**अनुमतिः राका इति देवपत्न्यौ इति नैरुक्ताः। पौर्णमास्यौ इति याज्ञिकाः। या पूर्वा पौर्णमासी सा अनुमतिः। या उत्तरा सा राका ( मै० सं० ४।३।५॥ ऐत० ब्रा० ३२।९ ) इति विज्ञायते। अनुमतिः ( २० ) अनुमननात्। तस्याः एषा भवति**

अनुमति व राका या देवांच्या पत्नी होत असें नैरुक्तांचें मत आहे; पण त्या दोन प्रकारच्या पौर्णिमा आहेत असे याज्ञिक म्हणतात; जी पूर्व पौर्णिमा ती अनुमति व जी उत्तर पौर्णिमा ती राका असें मैत्रायणी संहितेंत म्हटलें आहे. पौर्णमासी तु पूर्णिमा ॥ कलाहीने सानुमतिः पूर्णे राका निशाकरे (अमर १।३।७ व ८) = शुक्लपक्षांतील चतुर्दशीला चंद्राच्या कला पूर्णिमेच्या कलांपेक्षां एकानें कमी असतात; असा कलाहीन चंद्र असतांना म्हणजे चतुर्दशीच्या दिवशीं जी पूर्णिमा येते ती अनुमति व चंद्रकला पूर्ण असतांना जी पूर्णिमा येते ती राका; पूर्वा म्हणजे चतुर्दशीला धरून

म्हणजे चतुर्दशीला व पूर्णिमेला अशा दोन्ही दिवशीं येणारी; उत्तरा म्हणजे चतुर्दशीच्या नंतर दुसऱ्या दिवशीं येणारी. अनुमति व राका ह्यांचा जो ज्योतिषांतला अर्थ तोच याज्ञिक घेतात. अग्निहोत्र्याला इष्टीच्या आदल्या दिवशीं उपोषण करावयाचें असतें; चतुर्दशीच्या दिवशीं जर पूर्णिमा असेल तर त्यानें त्या दिवशीं उपोषण करून दुसऱ्या दिवशीं म्हणजे पूर्णिमेला इष्टि करावी; पण पूर्णिमेलाच जर पूर्णिमा असेल तर त्या दिवशीं उपोषण करून दुसऱ्या दिवशीं इष्टि करावी असा नियम आहे; हा नियम बरोबर पाळला जावा म्हणून पूर्णिमा केव्हां आहे हें निश्चितपणें ठरविणें जरूर असतें. अनु + मन् ह्याच्यापासून अनुमति; जेव्हां शुक्लपक्ष चौदा दिवसांचाच असतो तेव्हां चतुर्दशीला पूर्णिमा म्हणा अशी ऋषि व देव आपली अनुमति देतात ( दुर्ग ).

## खंड ३० वा.

**अन्विदनुमते त्वं मन्यासै शं च नस्कृधि । इषं तोकाय नो दधः प्र ण आयूंषि तारिषः ( काठक सं० १३।१६ )**

**अनुमन्यस्व अनुमते त्वम् । सुखं च नः कुरु । अन्नं च नः अपत्याय धेहि । प्रवर्धय च नः आयुः**

अन्विदं = अनु + इदम्; अनु + मन्यासै = अनुमन्यस्व; अनुमन्यस्व अस्माकं यत् अनुमन्तव्यं त्वया ( दुर्ग ) = ज्याला तूं अनुमति दिली पाहिजेस त्याला तूं अनुमति दे म्हणजे जें तुला द्यावयाचें असेल तें दे. शं = सुखम्. कृधि=कुरु. इषं =अन्नम्. च अध्याहृत. तोकाय = अपत्याय. दधः=धेहि. प्रतारिषः=प्रवर्धय. आयूंषि= आयुः. आयूंषि प्रतारिषः = आयूंषि प्रतीर्णानि कुरु (दुर्ग) = आयुष्यें वाढलेलीं कर. च अध्याहृत. दुर्गानें केलेला अर्थः— हे अनुमति, ज्याला तूं अनुमति देणें इष्ट आहे त्याला तूं अनुमति दे म्हणजे आम्हांला जें तूं द्यावयाचें आहे तें दे; आम्हांला सुख दे; आमच्या मुलांना अन्न दे; आमचें आयुष्य वाढीव. महाराष्ट्र व गुर्जर ह्या दोन्ही पाठांत इषं तोकाय नो दधः ह्याच्याबद्दल क्रत्वे दक्षाय नो हिनु असा तिसरा पाद् आहे; पण यास्कभाष्य व दुर्गवृत्ति ह्यांच्यांत इषं तोकाय नो दधः ह्याचेंच विवरण केलें आहे. क्रत्वे दक्षाय नो हिनु असा तिसरा पाद् मैत्रायणी संहितेंत ( ३।१६।४ ), तैत्तिरीय संहितेंत ( ३।३।११।३ ) व वाजसनेयि संहितेंत (३४। ८) आहे; त्याचा सायणाचार्य पुढीलप्रमाणें अर्थ करतातः—नः अस्माकं दक्षाय क्रत्वे दक्षक्रतौ समृद्धयागे हिनु प्रीतियुक्ता भव = आमच्या दक्षक्रतूंत म्हणजे समृद्धयागांत प्रीतियुक्त हो म्हणजे अनुग्रह कर. मैत्रायणी संहितेंत तैत्तिरीय संहितेंतले पाठ कांहीं ठिकाणीं घेतले आहेत; त्याचेंच प्रस्तुत ऋचा हें उदाहरण होय. ज्यानें मैत्रायणी संहितेंतील हा तिसरा पाद् प्रस्तुत ऋचेंतील तिसऱ्या पादाबद्दल घातला त्यानें यास्कभाष्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं हें स्पष्ट आहे; तो पाठ दुर्गानंतर घातला गेला

असावा. क्रत्वे = दक्षाय = धनाकरितां; आम्हांला धनाकडे पाठीव ( हिनु ) म्हणजे आम्हांला धन दे असा खरा अर्थ आहे. अनुमति म्हणजे पूर्णिमा असा अर्थ करण्याला प्रस्तुत ऋचेंतील कोणत्याही शब्दाचा किंवा वाक्याचा आधार नाहीं. १०।५९।६ हींत असुनीतीला अनुमते असें संबोधिलें आहे; १०।१६७।३ हींत अनुमत्याः असा षष्ठयंत शब्द आहे आणि सोम, वरुण, बृहस्पति, अनुमति व इंद्र हीं नांवें आलीं आहेत; तेथेंही अनुमति ही असुनीति असावी; ह्या दोन्ही शब्दांचा अर्थ धन देणारी.

**राका ( २१ ) रातेः दानकर्मणः । तस्याः एषा भवति**

राका = रा + का; रा = देणें; का नामकरण प्रत्यय.

## खंड ३१ वा.

**राकामहं सुहवां सुष्टुती हुवे शृणोतु नः सुभगा बोधतु त्मना । सीव्यत्वपः सूच्याच्छिद्यमानया ददातु वीरं शतदायमुक्थ्यम् ( ऋ० सं० २।३२।४ )**

**राकाम् अहं सुह्वानां सुष्टुत्या आह्वये । शृणोतु नः सुभगा । बोधतु आत्मना । सीव्यतु अपः । प्रजननकर्म । सूच्या अच्छिद्यमानया । सूची सीव्यतेः । ददातु वीरं शतप्रदम् । उक्थ्यं वक्तव्यप्रशंसम्**

सुहवां = सुह्वानाम्; हवः = ह्वानं = बोलावणें; सुहवां = स्वाह्वानां = यस्याः शोभनम् आह्वानं तां ( दुर्ग ) = जिला बोलावणें योग्य आहे अशीला. सुष्टुती = सुष्टुत्या. हुवे = आह्वये. शुभगा = सुधना ( दुर्ग ). बोधतु = कर्तव्यतया तत् अवगच्छतु ( दुर्ग ) = करावयाचें म्हणून तें जाणो म्हणजे भक्ताकरतां अमकी एक गोष्ट करावयाची आहे हें तिला कळो. त्मना = आत्मना = स्वतः होऊन; जें आम्हीं सांगत नाहीं तें सुद्धां तिला न सांगतां कळो ( दुर्ग ). अपः = प्रजननकर्म = प्रजोत्पत्तीचें काम. सीव्यतु = संतनोतु ( दुर्ग ) = सतत चालवो. सूच्या अच्छिद्यमानया = अविच्छिन्नेन प्रजासंतानेन = जिचा विच्छेद होत नाहीं म्हणजे जिच्यांत खळ पडत नाहीं अशा सतत चाललेल्या प्रजोत्पत्तीनें. सीव् = शिवणें; षिवु तन्तुसन्ताने ( धा० ४।२ ); सूची शब्द सिव् धातूपासून झाला आहे; सिव् = सीव् = सूव् = सूच्; सूच् + ई = सूची; सूची शब्दाची व्युत्पत्ति दुर्ग देत नाहीं. सूच् = भोसकणें ( आपट्यांचा कोश ); ह्यापासून सूची. शतदायं = शतप्रदम्. उक्थ्यं = वक्तव्यप्रशंसं = ज्याची प्रशंसा बोलली पाहिजे म्हणजे केली पाहिजे अशाला; वक्तव्या प्रशंसा यस्य तम्; वच् संप्रसारणानें उच्; उच् + थं = उक्थं = स्तुति; उक्थम् अर्हति असौ उक्थ्यः = स्तुत्य. दुर्गानें केलेला अर्थः— जिला बोलावणें योग्य आहे अशा धनवन्त राकेला मी चांगली स्तुति करून बोलावितों; ती आमचें बोलावणें ऐको; जें करावयाचें तें स्वतः होऊन म्हणजे आम्हीं न सांगतां तिला कळो; ज्यांत विच्छेद नाहीं म्हणजे खळ पडत नाहीं अशा प्रजोत्पादनानें ती आमच्या प्रजोत्पादनाचें काम सारखें

चालूं ठेवो; पुष्कळ धन आणणारा व ज्याची स्तुति केलीच पाहिजे असा पुत्र ती आम्हांस देवो.

**सायणः**— सुहवां = स्वाह्वानां = आह्वानप्रयोजनकारिणीं = बोलावण्याचें कारण उत्पन्न करणारीला म्हणजे ती धन वगैरे देते म्हणून जिला बोलाविलें पाहिजे अशीला; अपः = पुत्रोत्पादनलक्षणं कर्म; सूच्या = सूचीस्थानीयया अनुग्रहबुध्या = सुईसारखें काम करणाऱ्या अनुग्रहबुद्धीनें; जसें सुईनें शिवलेलें कापड फार दिवस टिकतें तशी आमची प्रजा तिच्या अनुग्रहानें फार दिवस टिको; शतदायं = बहुधनं बहुप्रदं वा; उक्थ्यं = प्रशस्यम्; वीरं = विक्रांतं पुत्रम्; बाकीच्या शब्दांचे अर्थ दुर्गानें दिल्याप्रमाणें.

यास्ते राके सुमतयः सुपेशसो याभिर्ददासि दाशुषे वसूनि । ताभिर्नो अद्य सुमना उपागहि सहस्रपोषं सुभगे रराणा ( ऋ० सं० २।३२।५ ) = हे राके, जें पुष्कळ धन तुजजवळ आहे व ज्यांतून हवि देणाऱ्याला तूं धन देतेस त्या धनासह अतिशय धन देणारी तूं आमच्याकडे ये. वृष्णः पत्नीः । सरस्वती बृहद्दिवोत राका दशस्यन्तीः वरिवस्यन्तु शुभ्राः ( ५।४२।१२ ) = धनवती (बृहद्दिवा) सरस्वती, राका व धन देणाऱ्या ( दशस्यन्तीः = शुभ्राः ) त्वष्ट्याच्या बायका धन देवोत. या गुंगूर्या सिनीवाली या राका या सरस्वती । इन्द्राणीमह्व ऊतये वरुणानीं स्वस्तये ( २।३२।८ ); ह्या ऋचेंत पांच देवींपैकीं राका ही एक देवी होय. राका म्हणजे पौर्णमासी असा अर्थ करण्याला ऋग्वेदांत कांहीं आधार नाहीं. सुहवा = ( १ ) बोलावण्यानें जी सहज येते अशी; ( २ ) हू = देणें; हवः = दान, धन; सुहवा = सुभगा = धनयुक्त. सुष्टुती =( १ ) सुष्टुत्या = चांगल्या स्तुतीनें; सुष्टुती =( २ ) सुष्टुत्यै = पुष्कळ धन देण्याकरितां. श्रृणोतु = ( १ ) ऐको; ( २ ) देवो. नः = ( १ ) आमचें बोलावणें; ( २ ) नस् = धन. बोध् = ( १ ) होणें, हजर राहणें; ( २ ) देणें. ( १ ) स त्वं नो अग्ने अवितेह बोधि अधि श्रवांसि धेहि नस्तनूषु ( ३।१९।५ ) = हे अग्नि, आमचा रक्षक तूं ह्या स्थळीं आस म्हणजे हजर रहा व आमच्या धनभाण्डारांत ( तनूषु ) धन ( श्रवांसि ) घाल ( धेहि ). ( १ व २ ) अस्मभ्यं सु मघवन् बोधि गोदाः ( ३।३०।१९ ) = ( १ ) हे इंद्रा ( मघवन् ), आम्हांला तूं गायीं देणारा ( गोदाः ) हो; ( २ ) हे धनवन्ता ( मघवन् ), गायी देणारा तूं ( गोदाः ) आम्हांला धन (सु) दे ( बोधि ). ( २ ) महे नो अद्य सुविताय बोधि उषो महे सौभगाय प्र यन्धि ( ७।७५।२ ) = हे उषे, आम्हीं अतिशय ( महे ) धनवान् व्हावें म्हणून ( सुविताय = सौभगाय ) धन ( प्र ) दे ( बोधि = यन्धि ); यदिन्द्र राधो अस्ति ते माघोनं मघवत्तम । तेन नो बोधि सधमाद्यो वृधे भगो दानाय वृत्रहन् ( ८।५४।५ ) = हे धनवत्तमा ( मघवत्तम ) इन्द्रा, तुजजवळ जें अतिशय ( माघोनं ) धन ( राधः ) आहे त्यांतून ( तेन ) धनवंत ( सधमाद्यः = भगः ) तूं आम्हीं धनवान् व्हावें म्हणून ( वृधे ) आम्हांस धन दे ( बोधि ). त्मना = धनासह,

धनांतून. आ स्तुतासो मरुतो विश्व ऊती अच्छा सूरीन् सर्वताता जिगात। ये नस्त्मना शतिनो वर्धयन्ति (७।५७।७); = हे स्तविलेले मरुत् हो, जे श्रीमान् (शतिनः) धनदाते आम्हांस धनानें (त्मना) धनवान् करतात (वर्धयन्ति) त्या धनदात्यांकडे (सूरीन् अच्छा) धन घेऊन (ऊती = ऊत्या) धनवान् (विश्वे) तुम्ही या (आजिगात). छर्दिर्येन दाशुषे यच्छति त्मना तन्नो महान् उदयान् देवो अक्तुभिः (४।५३।१) = ज्या (येन) धनांतून (त्मना) सविता हवि देणाऱ्याला (दाशुषे) धन (छर्दिः) देतो तें धन धनवान् (महान् = देवः) सविता आपल्या धनांतून (अक्तुभिः) आम्हांस देवो (उदयात्?). बोधतु त्मना = (१) स्वतः एथें हजर राहो; (२) आपल्या धनांतून धन देवो. अपस् = विणलेलें कापड. ततं मे अपः तदु तायते पुनः (१।११०।१) = माझें ताणलेलें कापड पुन्हा ताणलें जात आहे. सीव्यतु अपः सूच्या अच्छिद्यमानया = न मोडल्या जाणाऱ्या म्हणजे भक्कम सुईनें धनरूपी कापड शिवो म्हणजे सतत धन देवो. कृधि वाजां अपो धियः = धन (वाजान् = अपः = धियः) दे (कृधि). वीर = (१) शूर पुत्र; शूरपुत्र हा अर्थ पुष्कळ ठिकाणीं आहे; (२) धन. (२) तस्मै रयिम् ऋभवः सर्ववीरम् आ तक्षत (४।३५।६) = हे ऋभूंनो, (जो तुम्हांला हवि देतो) त्याला अतिशय (सर्ववीरं) धन (रयिं) द्या (आ तक्षत); सर्ववीरं = ज्यांत अतिशय धन आहे असें. शतदायः = (१) शंभर म्हणजे असंख्य धन देणारा, (२) ज्यांत अतिशय धन भरलें आहे असें; दाय शब्द समासांतच व तो प्रस्तुत ऋचेंतील शतदायं ह्याच्यांतच आढळतो. उक्थ्य = (१) स्तुतीला पात्र, (२) धनानें भरलेलें. (२) सास्मासु धा गोमत् अश्वावत् उक्थ्यम् उषो वाजं सुवीर्यम् (१।४८।१२) = हे उषे, ती तूं आम्हांस अतिशय धन दे; गोमत् = अश्वावत् = उक्थ्यं = सुवीर्यं = धनानें भरलेलें. ददातु वीरं शतदायमुक्थ्यं = (१) असंख्य धन देणारा व स्तुतीला पात्र असा वीरपुत्र आम्हांस देवो; (२) आम्हांस अतिशय धन (वीरं) देवो. शतदायं = उक्थ्यं = धनानें भरलेलें.

**सिनीवाली कुहूः इति देवपत्न्यौ इति नैरुक्ताः। अमावास्ये इति याज्ञिकाः या पूर्वा अमावास्या सा सिनीवाली। या उत्तरा सा कुहूः (मैत्रा० सं० ४।३।५॥ ऐ० ब्रा० ३२।९) इति विज्ञायते। सिनीवाली (२२)। सिनम् अन्नं भवति। सिनाति भूतानि। वालं पर्व। वृणोतेः। तस्मिन् अन्नवती। वालिनी वा। वालेन इव अस्याम् अणुत्वात् चन्द्रमाः सेतव्यो भवति इति वा। तस्याः एषा भवति**

सिनीवाली व कुहू या देवपत्नी होत असें नैरुक्त म्हणतात; पण त्या दोन प्रकारच्या अमावास्या होत असें याज्ञिक म्हणतात. कृष्णपक्षांतील चतुर्दशीला चंद्राचा अगदीं थोडा भाग दिसतो; त्या वेळेस जर अमावस्या सुरू झाली तर तिला सिनीवाली हें नांव; पण तशी सुरू न झाल्यास तिला कुहू हें नांव; पूर्वा = अमावास्येच्या आदल्या दिवशीं म्हणजे चतुर्दशीला सुरू झालेली; उत्तरा = चतुर्दशीच्या दुसऱ्या

दिवशीं सुरू झालेली; सा दृष्टेन्दुः सिनीवाली सा नष्टेन्दुकला कुहूः (अमर १।३।९). अमावास्येला केल्या जाणाऱ्या इष्टीला दर्श म्हणतात; दर्शाच्या आदल्या दिवशीं उपोषण करावें लागतें; तें उपोषण कोणत्या दिवशीं करावें हें ठरविण्याकरितां अमावास्या कोणत्या दिवशीं सुरू झाली हें पाहणें आवश्यक असतें. सिनीवाली = सिनी + वाली; सिनी = सिनवती = अन्नवती; सिनं = अन्नम्; अन्नाला सिन म्हणण्याचें कारण तें प्राण्यांना बांधतें ( सिनाति ) म्हणजे त्यांना पुष्ट करतें; सिन शब्द वैदिक आहे; तो कोणत्या धातूपासून झाला हें सांगतां येत नाहीं. सिनं विद्यते अस्य सः सिनी; त्याचें स्त्रीलिंग सिनिनी असें झालें पाहिजे. वालं = पर्व; हा अर्थ अमरांत व आपट्यांच्या कोशांत नाहीं. पर्वाला वाल म्हणण्याचें कारण देव पर्वकाळीं हवि पसंत करतात; वाल = वार; वृ (= पसंत करणें ) ह्यापासून वार म्हणजे वाल; तस्मिन् = वाले = पर्वणि; पर्वांत जिच्या जवळ अन्न असतें अशी म्हणजे पर्वकाळीं जिला अन्न मिळतें ती; सिनीवाली = वाली + सिनी; वाली = वाले; सिनी = अन्नवती; किंवा वाली = वालिनी = वारिणी; वाल = वार = केस; सिनी = सिनवान् = सेतव्यः = बांधण्याजोगा; सि = बांधणें; सिन = बन्धन; ज्याच्याभोंवतीं बंधन आहे तो सिनी; ज्याच्याभोंवतीं वाल म्हणजे केस आहेत तो वाली; अमावास्येला ( अस्यां ) चंद्र इतका बारीक असतो ( अणुत्वात् ) कीं तो जणू काय ( इव ) एखाद्या लहानशा केसानें ( वालेन ) सहज बांधतां येईल ( सेतव्यः ) म्हणून अमावास्येला सिनीवाली म्हणतात; सिनिनी च असौ वालिनी च सिनीवाली; वालैः तद्वती वालिनी ( दुर्ग ) = जिच्यांत केस आहेत अशी; दर्शांत पिंडांवर केस टाकतात म्हणून अमावास्या वालिनी; किंवा वालिनी ह्यांत उत्प्रेक्षा असेल; अमावास्येला चंद्रमा जणूं काय केसानें बांधतां येईल अशी उत्प्रेक्षा; ह्याप्रमाणें वालिनी शब्दाचे दुर्ग दोन अर्थ करतो; पण वालिनी वा ह्याचेंच वालेन इव० सेतव्यः भवति हें विवरण असावें. सेतव्यः बद्दल सेवितव्यः हा महाराष्ट्रपाठ अशुद्ध आहे. सिनी सिता बाला कला अस्याम् ( अमर १।३।९ क्षीरस्वामी ) = जिच्यांत एक शुभ्र कला असते अशी.

## खंड ३२ वा.

**सिनीवालि पृथुष्टुके या देवानामसि स्वसा । जुषस्व हव्यमाहुतं प्रजां देवि दिदिड्ढि नः ( ऋ० सं० २।३२।६ )**

**सिनीवालि पृथुजघने । स्तुकः स्त्यायतेः । संघातः । पृथुकेशस्तुके । पृथुष्टुते वा । या त्वं देवानाम् असि स्वसा । स्वसा सु असा । स्वेषु सीदति इति वा । जुषस्व हव्यम् आहुतम् । प्रजां च देवि दिश नः**

पृथुष्टुके = पृथु + स्तुके = पृथुजघने; स्तुक = जघन; स्तुक शब्द स्त्यै धातूपासून; स्तुक हा एक मांसाचा गोळा असतो ( संघातः ); स्त्यै शब्दसंघातयोः ( धा० १।९।३५ ); स्त्यै संप्रसारणानें स्ति; स्ति = स्तु; क हा नामकरण प्रत्यय;

ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. अथवा पृथुष्टुके = पृथु + स्तुके = पृथुकेशस्तुके = पृथुकेशकलापे ( दुर्ग ) = जिचा बुचडा मोठा आहे अशी; स्तुक म्हणजे केसांचा संघात; किंवा पृथुष्टुके = पृथु + स्तुके = पृथु + स्तुते = जिची फार स्तुति केली आहे अशी. पृथुष्टुतेबद्दल पृथुष्टुके हा महाराष्ट्रपाठ चुकीचा आहे; गुर्जरपाठ पृथुकेशस्तुका व पृथुष्टुतिः असे आहेत; पण त्या शब्दांची संबोधनेंच आवश्यक आहेत. त्वं अध्याहृत. स्वसा = सु + असा; बहीण ही भावांना सुखकर (सु) असते (असा=अस्ति); किंवा स्वसा = स्व + सा; स्व = स्वेषु; सा = सीदति; बहीण आपल्या माहेरच्या माणसांमध्यें येऊन बसते म्हणजे त्यांच्यामध्यें बसण्याची तिला आवड असते; ह्या दोन व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहींत. दिदिड्ढि = दिश = दे. च अध्याहृत. दुर्गानें केलेला अर्थः— जिचे जघन लठ्ठ आहेत किंवा जिचा बुचडा मोठा आहे किंवा जिची अतिशय स्तुति केली जाते अशी हे सिनीवाली, जी तूं अन्तरिक्षांतील देवांची बहीण आहेस ती तूं आम्ही दिलेला हवि ग्रहण कर व आम्हांला प्रजा दे.

सायणः— पृथुष्टुके = पृथुजघने पृथुसंहते वा; पृथुसंहता = खच्चून जाड झालेली म्हणजे अतिशय लठ्ठ; स्वसा = स्वयंसंचारिणी भगिनी वा; स्वयंसंचारिणी = देवांमध्यें स्वयंस्फूर्तीनें संचार करणारी; दिदिड्ढि हें रूप दिह उपचये ( धा० २।५ ) ह्याचें किंवा दिश अतिसर्जने ( धा० ६।३ ) ह्याचें; उपचय = वाढ; अतिसर्जन = दान; प्रजां दिदिड्ढि = प्रजा वाढीव किंवा दे.

किं सुबाहो स्वङ्गुरे पृथुष्टो पृथुजाघने ( १०।८६।८ ) असें इंद्राणीला ह्या चार विशेषणांनीं संबोधिलें आहे; तिचे बाहु व अंगुलि हीं सुबक आहेत; तिचे जघन(जाघन) प्रशस्त (पृथु) आहेत; तेव्हां पृथुष्टो ह्यांतील स्तु ह्याचा जघन हा अर्थ नसावा; पृथुष्टो = पृथुकेश संघाते (सायण). प्रणीतिभिष्टे हर्यश्व सुष्टोः सुषुम्नस्य पुरुरुचो जनासः । मंहिष्ठामूर्ति वितिरे दधानाः स्तोतार इन्द्र तव सूनृताभिः ( १०।१०४।५ ); सुष्टोः = सुषुम्नस्य = पुरुरुचः = ज्याच्याजवळ अतिशय धन आहे अशाचे; स्तु = याचिलेलें धन. प्रस्तुत ऋचेंत सिनीवालीच्या अवयवांचें वर्णन केलें नाहीं; आमचा हवि घे व आमची प्रजा वाढीव असें तिला म्हटलें आहे; तेव्हां पृथुष्टुका ह्याचा अतिशय धनसंपन्न असा अर्थ होईल; पृथुष्टुः एव पृथुष्टुका. या देवानाम् असि स्वसा = धनवान् जे देव त्यांची तूं बहीण आहेस म्हणजे त्यांच्याप्रमाणें तुजजवळही धन आहे. प्रजा = प्र + जा = प्रकृष्टं धनं = अतिशय धन. दिश् = देणें; अभ्यासानें दिदिश्; दिदिश् + धि = दिदिड्ढि = दे; दिश् ह्याची दिदिष्ट, दिदिष्टन व दिदेष्टु अशीं आणखीं रूपें आहेत. गर्भं धेहि सिनीवालि गर्भं धेहि सरस्वति । गर्भं ते अश्विनौ देवौ आधत्तां पुष्करस्रजा ( १०।१८४।२ ) एथें सिनीवाली, सरस्वती व अश्विन ह्यांना गर्भ म्हणजे धन देण्याची विनंति केली आहे. याः सुबाहुः स्वङ्गुरिः सुषूमा बहुसूवरी । तस्यै विश्पत्न्यै हविः सिनीवाल्यै जुहोतन ( २।३२।७ ) = जिचे हात व अंगुली सुंदर आहेत, जी धनवती आहे ( सुषूमा ) व जी पुष्कळ धन देते ( बहुसूवरी ) त्या

धनदात्र्या ( विश्पत्न्यै ) सिनीवालीला हवि द्या. २।३२।८ ही ऋचा मागील खंडांत ( पान ९१८ ) दिलीच आहे. ह्या सर्व ऋचांत सिनीवाली म्हणजे अमावास्या असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं.

**कुहूः ( ३३ ) गूहतेः । क अभूत् इति वा । क सती हूयते इति वा । क आहुतं हविः जुहोति इति वा । तस्याः एषा भवति**

कुहूः = गुहूः = लपविणारी; अमावास्या चंद्राला लपविते म्हणजे चंद्राचा यत्किंचित् भागही दिसूं देत नाहीं; गुह् = ( लपविणें ) ह्यापासून कुहू; किंवा कुहू = कु + हू; कु = क; हू = भू; चंद्र कोठें आहे असा प्रश्न अमावास्येला लोक करतात? किंवा हू = हूयते = बोलावली जाते; ही कोठें असतांना लोक तिला बोलावतात; ती कोठें आहे ह्याविषयीं लोक तर्क करूं लागतात; हूयते = हवि दिला जातो असा अर्थ केल्यास कुहू = क आहुतं हविः जुहोति = यजमान अमावास्येला कोठे हवि देतो असा अर्थ; ही शेवटली व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं व तिचा अर्थही चांगलासा कळत नाहीं. कुहूः विस्मापिका इत्यर्थः । कुं हन्ति तमसा वा ( अमर १।३।९ क्षीरस्वामी ) = अमावास्या चंद्र कोठें गेला ( कुहू = कोठें हो गेला ) असा विस्मय उत्पन्न करते; किंवा कु म्हणजे पृथिवी; अन्धःकारानें अमावास्या पृथिवीला मारते ( हू = हन्ति ).

## खंड ३३ वा.

**कुहूमहं सुकृतं विद्मनापसमस्मिन् यज्ञे सुहवां जोहवीमि। सा नो ददातु श्रवणं पितॄणां तस्यै ते देवि हविषा विधेम ( मैत्रा० सं० ४।१२।६ )**

**कुहूम् अहं सुकृतं विदितकर्माणम् अस्मिन् यज्ञे सुह्वानाम् आव्हये । सा नः ददातु श्रवणं पितॄणाम् । पित्र्यं धनम् इति वा । पित्र्यं यशः इति वा । तस्यै ते देवि हविषा विधेम इति व्याख्यातम्**

ऋचेंतील सुकृतं बद्दल महाराष्ट्रपाठ सुवृतं आहे; पण भाष्यांत सुकृतं असा शब्द घातला आहे. सुकृतं = शोभनानां कर्मणां कर्त्रीम् (दुर्ग). विद्मनापसं = विद्मना + अपसं = विदितकर्माणं = सर्वत्र प्रत्यक्ष कर्माणम् ( दुर्ग ) = जिनें केलेलीं कर्में सर्वत्र प्रत्यक्ष आहेत अशीला; दुर्गवृत्तींत विदितकर्माणं नाहीं. सुहवां = सुह्वानाम् (खंड ३१ पान ९१७). जोहवीमि = आह्वये; दुर्गवृत्तींत आह्वयामि आहे. श्रवणं पितॄणाम् = पित्र्यं धनम् इति वा पित्र्यं यशः इति वा = पितरांनीं मिळविलेलें धन किंवा यश. इति व्याख्यातं = ( चवथ्या पादाचा ) अर्थ स्पष्ट आहे. दुर्गानें केलेला अर्थः— जी बोलाविली असतां एकदम येते अशीला, चांगलीं कर्में करणारीला ( सुकृतं ) व जिचीं कर्में सर्वत्र प्रसिद्ध आहेत अशा कुहूला मी ह्या यज्ञांत बोलावीत आहें; ती आम्हांला पितरांनीं मिळविलेलें धन किंवा यश देवो; हे देवि, तुला आम्ही हवि देऊं.

सु धनम् करोति ददाति असौ सुकृत्. विद् = देणें; विद्मन् = धन; अपस्

= धन; विघ्नना धनेन युक्तं अप: धनं यस्या: तां = जिच्याजवळ अतिशय धन आहे अशीला. श्रु = देणें; श्रवणं = धन.

**यमी ( २४ ) व्याख्याता ( निरु० १०।१९ ) । तस्याः एषा भवति**

यम शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ७८१ ).

## खंड ३४ वा.

**अन्यमू षु त्वं यम्यन्य उ त्वां परि ष्वजाते लिबुजेव वृक्षम् । तस्य वा त्वं मन इच्छा स वा तवाधा कृणुष्व संविदं सुभद्राम् ( ऋ० सं० १०।१०।१४ )**

**अन्यम् एव हि त्वं यमि । अन्यः त्वां परिष्वङ्क्ष्यते । लिबुजा इव वृक्षम् । तस्य वा त्वं मनः इच्छ । स वा तव । अध अनेन कुरुष्व संविदम् । सुभद्रां कल्याण भद्राम्**

ऊ = एव. सु = हि; दुर्गवृत्तींत हि नाहीं. परि ष्वजाते = परिष्वङ्क्ष्यते = कवटाळील; परिष्वजाते = परिष्वजतां ( दुर्ग ). मनः इच्छा = मनः प्रवेष्टुम् इच्छ ( दुर्ग ). अधा = अध; अधा = अथ ( दुर्ग ). अनेन अध्याहृत. कृणुष्व = कुरुष्व. संविदं = संकल्पादिमैथुनकार्यं (दुर्ग) = कामवासनेनें आवश्यक झालेलें मैथुनकर्म. सुभद्रां = कल्याणभद्राम्; सु = कल्याण; ज्यांत कल्याण आहे असें मैथुनकर्म; कल्याणभद्रां यांतील भद्र शब्दाचा अर्थ कळत नाहीं; कल्याणभद्रां = उभयलोकाविरोधिनी ( दुर्ग ) = इहलोक व परलोक यांच्या विरुद्ध नसणारें ( मैथुनकर्म ). दुर्गानें केलेला अर्थः— हे यमी, जशी लता ( लिबुजा ) वृक्षाला कवटाळते तशी मैथुनेच्छा तृप्त करण्याकरितां माझ्याहून निराळ्याच पुरुषाला तूं कवटाळ व दुसराही पुरुष त्याच हेतूनें तुला कवटाळो; तूं त्याच्या मनांत शिरण्याची इच्छा कर किंवा तो तुझ्या मनांत शिरण्याची इच्छा करो; नंतर त्याच्या बरोबर कल्याणप्रद मैथुनाचा विचार कर. तूं माझ्याहून निराळ्या पुरुषालाच कवटाळशील व तो तुला कवटाळील ( अशी माझी खात्री आहे ) असा अर्थ यास्क करतो; हा अर्थ दुर्गानें केलेल्या अर्थाहून जरा भिन्न आहे. दुर्ग ऋचेचा दुसराहि अर्थ करतो तो असाः—यम = इन्द्र; यमी = उषा; वृक्ष = द्युलोक; मनः = प्रकाश; संविद् = प्रकाश; इन्द्र उषेला म्हणतो; हे उषे, आपण एकमेकाला कवटाळण्याचा काळ निघून गेला आहे; कारण पहाट झाली आहे; तेव्हां लिबुजेप्रमाणें द्युलोक कवटाळण्याची इच्छा कर; त्या द्यूच्या प्रकाशांत शिरण्याची इच्छा कर व तोही तुझ्या प्रकाशांत शिरो अशा रीतीनें एकमेकांत शिरून सर्वत्र प्रकाश पसर; हा अर्थ अगदीं अस्वाभाविक व त्याज्य आहे; असा अर्थ करण्याचें कारण यमी ही अन्तरिक्षांतील देवांमध्यें गणिली गेली हें; यमाप्रमाणें त्याची बहीण यमी ही अंतरिक्षांतील देवता असलीच पाहिजे; पण एथें यम म्हणजे मृत्यु कशावरून ?

**सायणः—** सु = सुष्टु = चांगल्या रीतीनें, कडकडून; अन्यः उ = अन्यः अपि; वा = च; इच्छ = कामय = ( त्याचें मन आपल्यावर बसेल अशी ) इच्छा

कर; तूं त्याला वश हो व तो तुला वश होवो; सुभद्रां = सुकल्याणीं = अतिशय कल्याणप्रद; संविदं = परस्परसंभोगसुखसंवित्तिं = एकमेकाचा उपभोग घेतल्यानें होणाऱ्या सुखाचें ज्ञान किंवा सुखाची भावना ( तुम्हां दोघांना होवो ); दुर्गाप्रमाणें तूं त्याला कवटाळ व तो तुला कवटाळो असा सायणाचार्य अर्थ करतात.

तुझें मन, तुझें हृदय मला कधींही पकडतां येणार नाहीं म्हणजे माझ्यावर तुझें मन कधींही बसणार नाहीं; दुसऱ्या कोणत्यातरी स्त्रीवर तुझें मन बसेल व मग जशी लता झाडाला गुरफटते तशी ती तुला खास गुरफटून टाकील; तिच्या तावडींतून तूं खास सुटणार नाहींस असा यमी यमाला टोमणा देते ( १०।१०।१३ ); ( पानें ५०९–५१० पहा ). ह्या टोमण्याला प्रस्तुत ऋचा उत्तर होय; लता जशी वृक्षाला गुरफटते तशी तूंच माझ्याहून निराळ्याच पुरुषालाच गुरफटशील समजलीस व तोही तुला गुरफटील; तूं त्याच्या मनांतला भाव जाणण्याची खटपट कर किंवा त्याला तुझ्या मनांतला भाव जाणण्याची खटपट करूं दे; अशा रीतीनें त्याच्याशीं तूं कल्याणप्रद ( सुभद्रां ) संगनमत ( संविदं ) कर; माझ्याशीं तुझें संगनमत कधींही होणार नाहीं; कारण तशा संगनमतापासून अकल्याणच होईल; म्हणून माझें मन पकडण्याची खटपट करूं नकोस. संविदं व सुभद्रां हे शब्द ह्याच ऋचेंत आले आहेत; त्यामुळें संविदं ह्याच्या मीं केलेल्या अर्थाला अधिक पुरावा पाहिजे तो नाहीं.

**यमी यमं चकमे । तां प्रत्याचचक्ष । इति आख्यानम्**

यमी यमावर प्रेम करती झाली त्यामुळें तो तिला झिडकारता झाला अशी गोष्ट सांगतात. यमी किल यमं चकमे भ्रातरम् । तां किल यमः प्रत्याचचक्षे असें दुर्गवृत्तींत आहे.

## खंड ३५ वा.

**उर्वशी ( २१ ) व्याख्याता ( निरु ५।१३ ) । तस्याः एषा भवति**

उर्वशी शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ३७७ ).

## खंड ३६ वा.

**विद्युन्न या पतन्ती दविद्योत् भरन्ती मे अप्या काम्यानि। जनिष्टो अपो नर्यः सुजातः प्रोर्वशी तिरत दीर्घमायुः ( ऋ० सं० १०।९५।१० )**

**विद्युत् इव या पतन्ती अद्योतत हरन्ती मे अप्या काम्यानि । उदकानि अन्तरिक्षलोकस्य । यदा । नूनम् अयं जायेत अद्भ्यः अध्यपः इति । नर्यः मनुष्यः नृभ्यः हितः । नरापत्यम् इति वा । सुजातः सुजाततरः । अथ उर्वशी प्रवर्धयते दीर्घम् आयुः**

न = इव; न म्हणजे आतांच असाही अर्थ होईल असें दुर्ग म्हणतो. दविद्योत् = अद्योतत; दविद्योत् = पुनः पुनः द्योतते ( दुर्ग ) = वारंवार झळकते; द्युत् अभ्यासानें दविद्युत्. भरन्ती = हरन्ती. अप्या काम्यानि = उदकानि अन्तरिक्ष-

लोकस्य; अप्या = अप्यानि = अन्तरिक्षलोकांतील; काम्यानि = इच्छिलेलें उदक; अप्या = अन्तरिक्षरमाणानि । अन्तरिक्षलोकस्य अधिपत्नी ( दुर्ग ) = अन्तरिक्षांतून वाहणारें किंवा अन्तरिक्षाची अधिपत्नी; अन्तरिक्षरमाणानि हा शब्द कदाचित् अन्तरिक्षक्षरमाणानि ( अन्तरिक्षांत वाहणारें किंवा अन्तरिक्षांतून खालीं पडणारें ) असा असेल; अप्या ह्याचे दुर्ग असे दोन अर्थ करतो; तथापि त्यानें वा सारखा विकल्पदर्शक शब्द घातला नाहीं. जनिष्टो = जायते. यदा नूनम् अयं हे शब्द अध्याहृत. अपः = अधि + अपः = अद्भ्यः = जलांतून; दुर्गवृत्तींत अद्भ्यः नाहीं; अध्यपः= अधिकः उदकोर्मिः ( दुर्ग ) = पाण्याचा जास्त प्रवाह. नर्यः = मनुष्यः; हा अर्थ दुर्गवृत्तींत नाहीं; नर्यः = नृभ्यो हितः = धान्यसमृद्धीनें मनुष्यांना हितकर; किंवा नर्यः = नरापत्यं = मनुष्याचा मुलगा. सुजातः = सुजाततरः = शोभनात् अपि शोभनतरः (दुर्ग). अथ अध्याहृत. प्रतिरते = प्रवर्धयते. दुर्गानें केलेला अर्थः—अन्तरिक्ष लोकाची अधिपत्नी ( अप्या ) जी ( या ) उर्वशी ती जेव्हां माझें ( मे ) अन्तरिक्षांत असणारें ( अप्या ) उदक ( काम्यानि ) हरण करून ( भरन्ती ) व मेघांतून खालीं पडून ( पतन्ती ) विजेसारखी ( विद्युत् न ) किंवा वीज होऊन ( विद्युत् ) चमकते तेव्हां अतिशय सुंदर ( सुजातः ) व धान्यसमृद्धि केल्यानें लोकांना हितकर ( नर्यः ) असा जलाचा अतिशय प्रवाह ( अपः ) अस्तित्वांत येतो ( जनिष्टो ); अशा मोठ्या वर्षावानें धान्य उत्पन्न करून उर्वशी म्हणजे वीज लोकांचें आयुष्य ( आयुः ) दीर्घ होईल ( दीर्घं ) असें वाढविते ( प्रतिरते ); असा ऋचेचा अन्वय व अर्थ दुर्ग करतो व तसें करण्यांत त्याला पुष्कळ ओढाताण करावी लागली आहे. विद्युत् न अप्या ह्याचे त्यानें वर दिलेले दोन अर्थ केले आहेत व यदा तदा हे शब्द अध्याहृत घेतले आहेत. पुरुरवस् हा मध्यम म्हणजे अन्तरिक्षांतील देव म्हणजे पर्जन्य; वीज व गडगडाट हीं जरी पर्जन्याहून भिन्न नाहींत तरी तीं भिन्न समजून पर्जन्य उर्वशीला म्हणजे विजेला म्हणतो अशी प्रस्तावना ऋचेचें विवरण करण्यापूर्वीं दुर्ग करतो. ऋचेचा इतिहासपरही अर्थ दुर्ग देतो तो असाः— इलेचा मुलगा पुरूरवस् उर्वशीच्या वियोगानें दुःखित होऊन म्हणतो; सर्व प्रकारचें हावभाव ( काम्यानि ) धारण करणारी ( भरन्ती ) व मी आपल्याजवळ नेहेमीं बाळगण्याला योग्य ( अप्या = आप्तव्या ) जी उर्वशी अतिशय सौंदर्यामुळें विजेसारखी चमकत होती ती गरोदर असल्यामुळें तिच्यापासून माझ्याहून आधिक शूर कृत्यें करणारा ( अपः = अध्यपः ), लोकांना हितकर (नर्यः) म्हणजे लोकांचें पालन करणारा किंवा मी जो नर त्या माझा मुलगा ( नर्यः ) व उर्वशीचा माझ्याशीं समागम झाल्यामुळें माझ्याहूनही उत्तम असा जन्मलेला (सुजातः) असा पुत्र जन्मेल ( जनिष्टो ) आणि अशा जन्मलेल्या पुत्राचें ती सर्वप्रकारें आयुष्य वाढवील; येथेंही अतिशय ओढाताण झाली आहे व कसातरी अन्वय करावा लागला आहे.

सायणः—अपः = अन्तरिक्ष; अप्या = अप्यानि = अंतरिक्षांतील; किंवा

अप्या = आप्या = आप्यानि = व्याप्तानि = सर्वत्र पसरलेले; काम्यानि = अस्मद-भिमतानि उदकानि = आम्हांला पाहिजे असें उदक; मे भरन्ती = मह्यं संपादयन्ती; अपः = व्याप्तः कर्मसु = कामें करण्यांत गुंतलेला; नर्यः = नरेभ्यो हितः; सुजातः = सुजननः पुत्रः; जनिष्टो = अजनिष्ट = उत्पद्यते; अन्तरिक्षांतील (अप्या) किंवा व्यापक (अप्या) व इष्ट असलेलें जल (काम्यानि) मला (मे) आणून देणारी (भरन्ती) जी उर्वशी आकाशांत संचार करणारी (पतन्ती) विजेसारखी चमकत आहे तिच्यापासून कामें करण्यांत सदा गुंतलेला (अपः), लोकांचें हित करणारा (नर्यः) व चांगला जन्मलेला (सुजातः) पुत्र जन्मास येईल (जनिष्टो) तेव्हां ती माझें दीर्घायुष्य वाढवील. हाही अर्थ समाधानकारक नाहीं. अप्या = (१) पाण्यांतली, (२) अप्या=अप्यानि = धनयुक्त; अप् शब्दाचे जल व धन असे दोन अर्थ ऋग्वेदांत आहेत. (१) अप्या च योषा (१०।१०।४), अप्या च योषणा (१०।११।२), योषणाः अप्याः (३।५६।५), शं नो दिव्याः पार्थिवाः शं नो अप्याः (७।३५।११), एथें अप्या ह्या शब्दाचा पहिला अर्थ. (२) यात् राध्यं वरुणो योनिमप्यम् (२।३८।८) = वरुण धनानें भरलेलें (राध्यं = अप्यं) स्थान (योनिं) देवो (यात्). प्रस्तुत ऋचेंत अप्या हें या ह्या संबंधी सर्वनामाचें किंवा काम्यानि ह्याचें विशेषण होईल; उर्वशी ही पाण्यांत जन्मलेली म्हणून अप्या; पण अप्यानि (=धनानें भरलेले) हा अर्थ अधिक योग्य दिसतो. दाता राधः स्तुवते काम्यं वसु (१।२२।३), त्वया दत्तं काम्यं राध आ गात् (२।३८।११), यः सुन्वते स्तुवते काम्यं वसु सहस्रेणेव मंहते (८।५०।१), सोमो अस्मभ्यं काम्यं बृहन्तं रयिं ददातु (९।९७।२१) ह्या सर्व ठिकाणीं काम्यं = धनानें भरलेले, अतिशय. काम्य ह्याचा इष्ट असाही अर्थ आहे; पण तो प्रस्तुत ऋचेंत नाहीं. मला (मे) अतिशय (अप्या = अप्यानि = काम्यानि) धन देणारी (भरन्ती) जी (या) उर्वशी आकाशांत उड्डाण करून (पतन्ती) विजेसारखी (विद्युत् न) चमकत होती (दविद्योत्) असा पहिल्या अर्धाचा अर्थ; पण या ह्या सर्वनामाला दुसऱ्या अर्धांत कोणतेंही दर्शक सर्वनाम नाहीं. जनिष्टो असें पद पदकारानें केलें आहे; पण जनिष्ट + उ अशीं दोन पदें असावींत. जन् = (१) जन्मणें, (२) देणें; जनिष्ठः असा पाठ घेतल्यास त्याचा अर्थ सर्वांहून अधिक देणारा; गमिष्ठ, देष्ठ, येष्ठ वगैरे शब्दांत इष्ठ हा प्रत्यय आहे. अपः = (१) जल, (२) धन, (३) कर्म; अपसाम् अपस्तमः = काम करणाऱ्यांत अतिशय काम करणारा किंवा धनवंतामध्यें अतिशय धनवान्. नृ = (१) शौर्याचीं कृत्यें करणें, (२) देणें; नर = धन; नर्यः = धनवान्. सु = जा = धन; सुजातः = अतिधनवान्. पण अतिधनवान् कोण? पहिल्या अर्धांत व चवथ्या पादांत या व उर्वशी हे स्त्रीलिंगी शब्द आहेत; पण तिसऱ्या पादांत जनिष्ठः ह्याचा कोणीतरी पुरुष कर्ता होय; पण तो कोण तें सांगतां येत नाहीं; हा तिसरा पाद ऋचेंत कां घातला हेंच समजत नाहीं; नर्यः सुजातः ह्याबद्दल नर्या सुजाता असा पाठ घेतल्यास उर्वशी

मला सर्वाहून आधिक धन (अपः) देत होतीच असा अर्थ होईल; जनिष्ठो = जनिष्ठ + उ अशीं दोन पदें केलीं पाहिजेत; जनिष्ठ = अजनिष्ठ; उ = खलु. उर्वशी मला धन देत होती इतकेंच नाहीं (जनिष्ठ = अजनिष्ठ) तर अजूनही सर्वांपेक्षां अधिक धन देऊन ती माझें आयुष्य (आयुः) दीर्घ होईल असें वाढवीत आहे. या ह्या संबंधी सर्वनामाचा उर्वशी ह्याच्याशीं संबंध असावा.

**पृथिवी (२६) व्याख्याता (निरु० १।१३)। तस्याः एषा भवति**

पृथिवी शब्दाची व्युत्पति पहा (पान ३७).

## खंड ३७ वा.

**बळित्था पर्वतानां खिद्रं बिभर्षि पृथिवि। प्र या भूमिं प्रवत्वति मह्ना जिनोषि महिनि (ऋ० सं० ५।८४।१)**

**सत्यं त्वं पर्वतानां मेघानां खेदनम्। छेदनम्। बलम् अमुत्र धारयसि पृथिवि। प्रजिन्वसि या भूमिम्। प्रवणवति। महत्त्वेन। महति इति। उदकवति इति वा**

बट् = सत्यम् (निघण्टु ३।१०।१); बट् बद्दल दुर्गवृत्तींत बल् आहे. इत्था = अमुत्र = अन्तरिक्षलोकांत (दुर्ग). त्वं अध्याहृत. पर्वतानां = मेघानाम्. खिद्रं = खेदनम्; खेदनं = छेदनं बलं = (मेघांना) ज्यानें फोडतां येईल असें बल. बिभर्षि= धारयसि. प्र जिनोषि = प्रजिन्वसि = तृप्त करतेस. प्रवत्वति = प्रवणवति= गमनवति (दुर्ग). मह्ना = महत्त्वेन. महिनि = महति; किंवा महिनि = उदकवति. दुर्गानें केलेला अर्थः— हे गमन करणारी (प्रवत्वति) व मोठी किंवा उदक जवळ बाळगणारी (महिनि) अन्तरिक्षांतील पृथिवी, जी तूं आपल्या मोठ्या वर्षावानें (मह्ना) भूमीला तृप्त करतेस (प्रजिनोषि) ती तूं मेघांना (पर्वतानां) फोडणारें बल (खिद्रं) खात्रीनें (बट्) अन्तरिक्षांत (इत्था) धारण करतेस (बिभर्षि). दुर्ग म्हणतोः— मैत्रायणी संहितेंत (२।२।७॥४।१२।२) हिरण्याचा नाश झाला असतांना जी इष्टि करावयाची असते त्या इष्टींत ही ऋचा याज्या मानिली आहे; त्या इष्टींत भौमः एककपालः म्हणजे भूमीला देण्याकरितां एका कपालावर भाजलेला पुरोडाश द्यावयाचा असतो; तेव्हां भूमी प्रस्तुत ऋचेंत प्रधान देवता असली पाहिजे व तशी ती मैत्रायणी संहितेंत मानिली आहे पण ऋचेंत पृथिवि व भूमिं असे भिन्न शब्द आहेत; त्यामुळें भूमिं हें गौण पद होतें; मैत्रायणी संहितेंत भूमी ही प्रधान देवता पण यास्कानें केलेल्या विवरणांत ती गौण देवता असा विरोध आहे; तो विरोध कोण दूर करील तो करो! मैत्रायणी संहितेंत ही ऋचा याज्या म्हणून कां घातली हाच प्रश्न आहे.

सायणः— पृथिवीचे दोन अर्थ; एक जिच्यावर आपण रहातों ती व दुसरा देवता; प्रस्तुत ऋचेंत पृथिवी म्हणजे अंतरिक्षांतील देवता; इत्था = इत्थं = अशा-

प्रकारें; किंवा इत्था = अमुत्र = अन्तरिक्षे; बट् = सत्यम् ; पर्वतानाम् = पर्वतांचें किंवा मेघांचें; खिद्रं=खेदनं=भेदनम् ; महिनि = महति; प्रवत्वति=प्रकर्षवति = जिच्यांत प्रकर्ष म्हणजे मोठेपणा आहे अशी; किंवा प्रवत्वति = प्रवणोदकवति = जिचें उदक उतारावरून वाहतें अशी; अन्तरिक्षांतून पडणारें उदक पर्वतांच्या उतारांवरून वाहतें; भूमिं = प्रत्यक्षां पृथिवीं = ह्या प्रत्यक्ष दिसणाऱ्या पृथिवीला; मह्ना = महत्त्वेन महता उदकेन वा = आपल्या महत्त्वानें म्हणजे आपल्या मोठ्या कृतीनें किंवा पुष्कळ उदकानें; प्रजिनोषि = प्रकर्षेण प्रीणयसि.

बट् ह्याच्या पुढें स्वर आला असतांना ट् चा ळ् होतो; बट् ह्यानें खात्री किंवा आश्चर्य दर्शविलें जातें; त्या शब्दाचा सहज रीतीनें, प्रयासावांचून किंवा एकदम असाही अर्थ होतो. सद्यः काव्यानि बळधत्त विश्वा (१।९६।१) = अग्नि एका क्षणांत (सद्यः), तावडतोब (बट्) पुष्कळ धन (काव्यानि) देता झाला. बळित्था देवा निष्कृतम् आदित्या यजतं बृहत् । क्षत्रम् आशाथे (५।६७।१)=हे अदितीच्या मुलांनो मित्रावरुणांनो, दाते (देवौ) तुम्ही आपल्या धनांतून (इत्था) एकदम (बट्) पुष्कळ (यजतं = बृहत्) धन (निष्कृतं = क्षत्रं) देतां (आशाथे). बण्महान् असि सूर्य बळादित्य महान् असि । अद्धा देव महान् असि (८।१०१।११); बट् = अद्धा = खरोखर. इत्था = अशारीतीनें, खिद् = दडपणें, भंगकरणें, मोडणें; त्वा युजा निखिदत् सूर्यस्य इन्द्रश्चक्रं सहसा सद्य इन्दो (४।२८।२)=हे सोमा, तुझ्या साहाय्यानें (त्वा युजा) इंद्र सूर्याचें चाक खालीं दडपता झाला (निखिदत्). आस्य वेदः खिदति हन्ति नग्नम् (४।२५।७) = इंद्र हवि न देणाऱ्याचें (अस्य) धन (वेदः) नाहींसें करून टाकतो (आखिदति) व त्याला ठार करतो. सम् इत् तान् वृत्रहाखिदत् खे अरान् इव खेदया (८।७७।३) = जसा कोणीं आंसाच्या भोकांत(खे) अरा जोरानें खुपसतो तसा इन्द्र वज्रानें (खेदया) दस्यूंना (तान्) तावडतोब (इत्) दडपता झाला (सम् + अखिदत्). मरुतः० यात ईम् अखिद्रयामभिः (१।३८।११) = हे मरुतांनो, ज्यांची गति अडविली जात नाहीं अशा घोड्यांवर किंवा रथांत बसून इकडे (ईम्) या; अविद्यमानं खिद्रं यस्मिन् तत् अखिद्रम् । अखिद्रं याम येषां तैः अखिद्रयामभिः = जींत अडवणूक किंवा थांबणें नाहीं अशी गति आहे ज्यांची अशा घोड्यांनीं किंवा रथांनीं. ह्याप्रमाणें खिद् धातूचे दडपून टाकणें, थांबविणें, नाश करणें असे अर्थ दिसतात; खिद् + रम् = खिद्रं = दडपून टाकणारें ओझें. हे पृथिवी, पर्वतांचें दडपून टाकणारें ओझें तूं ह्याप्रमाणें प्रयासावांचून धारण करीत आहेस. प्रवत् = (१) जोरानें वाहणारी नदी (पान ७८४); प्रवत्वती = जिच्यांत जोरानें वाहणाऱ्या पुष्कळ नद्या आहेत अशी. प्रवत् = (२) धन; सनितासि प्रवतो दाशुषे चित् याभिः विवेषो हर्यश्व धीभिः (७।३७।५) = हे इंद्रा (हर्यश्व), ज्या (याभिः) धनांतून (धीभिः) तूं धन देत आला आहेस (विवेषः) तेंच धन (प्रवतः = चित्) हवि देणाऱ्याला (दाशुषे) तूं देत असतोस (सनिता असि). तमिद्विप्राः अवस्यवः प्रवत्वतीभिरूतिभिः । इन्द्रं क्षोणीः अव-

र्धयन् ( ८।१३।१७ ) = धनदात्या ( विप्राः ) देवांनीं ( क्षोणीः ) त्याच ( तम् इत् ) इंद्राला भरपूर ( प्रवत्वतीभिः ) धनानें ( ऊतिभिः ) समृद्ध केलें ( अवर्धयन् ). महिनि हें महिनी ह्याचें संबोधन; महिनी हें महिन याचें स्त्रीलिंग; वयं ते अस्यामिन्द्र द्युम्नहूतौ सखाय स्याम महिन प्रेष्ठाः ( ६।२६।८ ) = ( १ ) हे महान् ( महिन ) इंद्रा, ह्या संग्रामांत ( द्युम्नहूतौ ) तुझे आम्ही अतिशय प्रिय मित्र होऊं इच्छितों; ( २ ) हे धनवंता ( महिन ) दात्या ( इन्द्र ), तूं केलेल्या धनाच्या ह्या वाटणींत ( द्युम्नहूतौ ) आम्ही अतीशय धनवान् ( प्रेष्ठाः = सखायः ) होऊं इच्छितों; उरुव्यचसा महिनी ( १। १६०।२ ); उरुव्यचसा = उरुव्यचसौ = अति विस्तृत; महिनी = महिन्यौ = मोठ्या म्हणजे अति विस्तृत; हे दोन शब्द द्यावापृथिवींचीं विशेषणें होत. ते नो गृणाने महिनी महि श्रवः क्षत्रं द्यावापृथिवी धासतो बृहत् ( १।१६०।५ ) = पुष्कळ ( महि ) धन ( श्रवः ) देणाऱ्या ( गृणाने ) त्या द्यावापृथिवी आम्हांस पुष्कळ ( बृहत् ) धन ( क्षत्रं ) देतात. महिनी = ( १ ) अति विस्तृत, ( २ ) धनवान्. मह्ना = ( १ ) विस्तारानें, शक्तीनें; ( २ ) धनांतून. भूमि = ( १ ) पृथिवी, ( २ ) भू = मि = देणें, दान; भूमि = अतिशय धन. जिनोषि = ( १ ) जिंकतेस, ( २ ) देतेस. ऋचेचा प्राथमिक अर्थः— हे नद्यांनीं भरलेली ( प्रवत्वति ), अत्यंत विस्तृत ( महिनि ) पृथिवी, जी तूं आपल्या शक्तीनें पृथिवीला ( भूमिं ) जोरानें ( प्र ) जिंकतेस ( जिनोषि ) ती तूं खरोखर ( बट् ) पर्वतांचें दडपून टाकणारें ओझें ( खिद्रं ) अशा रीतीनें ( इत्था ) धारण करतेस ( बिभर्षि ). पृथिवी पृथिवीला जिंकते हा विरोध ह्या प्राथमिक अर्थांत आहे; पुढें दिलेल्या दुसऱ्या अर्थानें तो विरोध आभासरूप ठरतो. ( २ ) हें धनवती ( पृथिवि = प्रवत्वति = महिनि ), धनवान् ( या ) तूं आपल्या धनांतून ( इत्था ) पर्वतासारख्या धनाचा ढीग ( खिद्रं = भूमिं ) देतेस ( बिभर्षि = जिनोषि ). या = देणें; या = धनवती.

**इन्द्राणी ( २७ ) इन्द्रस्य पत्नी । तस्याः एषा भवति**

इन्द्राणी म्हणजे इन्द्राची बायको ( पा० ४।१।४९ ).

## खंड ३८ वा.

**इन्द्राणीमासु नारिषु सुभगामहमश्रवम् । न ह्यस्या अपरं चन जरसा मरते पतिर्विश्वस्मादिन्द्र उत्तरः** (ऋ० सं० १०।८६।११).

**इन्द्राणीम् आसु नारिषु सुभगाम् अहं अशृणवम् । न हि अस्याः अपराम् अपि समां जरया म्रियते पतिः । सर्वस्मात् यः इन्द्रः उत्तरः तम् एतत् ब्रूमः । तस्याः एषा अपरा भवति**

अश्रवं = अशृण्वम्. अपरं = अपरां समां = आणखी एक वर्ष. चन = अपि. जरसा = जरया. मरते = म्रियते. विश्वस्मात् = सर्वस्मात्. यः व तम् एतत् ब्रूमः अध्याहृत; दुर्गवृत्तींत एतत्बद्दल एतं आहे; एतत् ब्रूमः = हें आम्ही म्हणतों; हें

म्हणजे इंद्राणी भाग्यवान् आहे वगैरे. एतं = ह्याला. दुर्गानें केलेला अर्थः— ह्या सर्व स्त्रियांमध्यें इंद्राणीच सौभाग्यलक्षणांनीं युक्त आहे असें मीं ऐकिलें आहे; कारण ( हि ) हिचा पति इतर स्त्रियांच्या नवऱ्यांप्रमाणें आणखी एक वर्षभर सुद्धां म्हणजे कधींही म्हातारा होणार नाहीं व मरणार नाहीं; जो इंद्र सगळ्यांहून श्रेष्ठ आहे त्या ह्या इंद्राला आम्ही म्हणतों ( कीं इन्द्राणी ही भाग्यवान् आहे व तिचा नवरा कधीं म्हातारा होणार नाहीं व मरणार नाहीं ).

सायणः— इंद्र इंद्राणीची स्तुति करितो; सौभाग्यलक्षणांनीं युक्त अशा प्रसिद्ध नारींमध्यें इंद्राणी ही अतिशय सौभाग्यवान् आहे असें मीं ऐकिलें आहे; ह्या इंद्राणीचा पालक व सर्वांहून श्रेष्ठ असा जो इंद्र इतर प्राण्यांप्रमाणें म्हातारपणानें मरणार नाहीं; बोलणारा वृषाकपि असल्यास अहं म्हणजे मी वृषाकपि; बाकीचा अर्थ तसाच; पतिः = पालकः; अपरं चन = अन्यत् भूतजातम् इव. यास्क, दुर्ग व सायणाचार्य ह्यांनीं अपरंचन ह्याचे केलेले अर्थ ओढाताणीचे आहेत; यास्कानें केलेला अर्थ तर हास्यास्पदच आहे; त्यामुळें अपरां समां म्हणजे कधींही नाहीं असा दुर्गाला अर्थ करावा लागला.

सु = भग = धन; सुभगा = अतिशय धनवान्. नृ = देणें; नर = दाता; नारि = दात्री. चन = च. मरते = मारयति. जरसा = वार्धक्यानें; हें वार्धक्य दारिद्य्ररूपी असावें. विश्वस्मात् इन्द्र उत्तरः हे शब्द ह्या सूक्तांतील प्रत्येक ऋचेच्या शेवटीं आहेत; त्यांचा ऋचांच्या अर्थाशीं निकट संबंध आहेच असें म्हणतां येत नाहीं; एखाद्या ठिकाणीं तसा संबंध असेल.

ऋचेचा अर्थः— ह्या सर्व धनवान् व दात्या स्त्रियांमध्यें इंद्राणी ही अति धनवान् आहे असें मीं ऐकिलें आहे; तिचा पति दुसऱ्याला ( अपरं) दारिद्र्यानें (जरसा) कधींही मारीत नाहीं; कारण इंद्र हा सर्वांहून धनानें श्रेष्ठ आहे. इंद्राणीसंबंधानें पुढील आणखी एक ऋचा होय. नैरुक्तांच्या मतें वृषाकपि म्हणजे आदित्य; हा त्या शब्दाचा अर्थ सिद्ध करण्याकरितां पुढील ऋचा उदाहृत केली आहे असें दुर्ग म्हणतो.

## खंड ३९ वा.

**नाहमिन्द्राणि रारण सख्युर्वृषाकपेर्ऋते । यस्येदमप्यं हविः प्रियं देवेषु गच्छति विश्वस्मादिन्द्र उत्तरः ( ऋ० सं० १०।८६।१२ )**

**न अहम् इन्द्राणि रमे सख्युः वृषाकपेः ऋते । यस्य इदम् अप्यं हविः । अप्सु शृतम् । अद्भिः संस्कृतम् इति वा । प्रियं देवेषु निगच्छति । सर्वस्मात् यः इन्द्रः उत्तरः तम् एतत् ब्रूमः**

रारण = रमे. अप्यं = अप्सु शृतं = पाण्यांत शिजविलेला; किंवा अप्यं = अद्भिः संस्कृतं = पाण्यानें तयार केलेला; सोमरसांत पाणी मिसळावें लागतें हें सर्वश्रुत आहे. एथें वृषाकपि हा लोकांत प्रसिद्ध असलेला ऋषि नव्हे; कारण त्याला देवां-

मध्यें स्थान असून सोमहवि दिला जातो; तेव्हां तो आदित्यच असावा असें दुर्ग म्हणतो. गच्छति = निगच्छति = आंत जातो म्हणजे देवांमध्यें वाटला जातो. विश्वस्मात् = सर्वस्मात्. यः अध्याहृत. तम् एतत् ब्रूमः ह्याबद्दल दुर्गवृत्तींत सः अपि एवं ब्रवीमि असें आहे; ऋचेंत जर इंद्र बोलणारा आहे तर तम् एतत् ब्रूमः एथें तम् कोण? जो मी सर्व जगांहून श्रेष्ठ आहें तो मीही वृषाकपीविषयीं असें म्हणतों असे शब्द इंद्राच्या तोंडीं योग्य होत; तेव्हां दुर्गवृत्तींतलाच पाठ बरोबर दिसतो. दुर्गानें केलेला अर्थः— हे इंद्राणी, ज्याच्याकडे जलरूप हवि किंवा पाण्यांत शिजविलेला किंवा तयार केलेला प्रिय चरुपुरोडाशादिहवि जातो त्या माझ्या देवांत श्रेष्ठ असणाऱ्या वृषाकपि मित्राशिवाय मला कोठेंही आनंद होत नाहीं म्हणजे माझें मन कोठेंही रमत नाहीं; सर्व जगांहून श्रेष्ठ जो मी तो मी तुला हें सांगत आहें. जलरूप हवि आदित्याकडेच जातो; आदित्याचें व इंद्राचें सख्य म्हणून इंद्राला आदित्याशिवाय करमत नाहीं असा दुर्गानें केलेल्या विवरणाचा सारांश.

सायणः— हे इंद्राणी, सर्व देवांत ज्या माझ्याकडे त्याचा पाण्यांत उत्तम रीतीनें तयार केलेला हा हवि नेहमीं जात असतो व जो मी सर्व जगांहून श्रेष्ठ आहें त्या मला वृषाकपि मित्राशिवाय करमत नाहीं असें इंद्र इंद्राणीला म्हणतो; किंवा बोलणारा वृषाकपि असल्यास पुढील प्रमाणें अर्थ; वृषाकपेः सख्युः इन्द्रात् ऋते अहं वृषाकपिः न रारण = वृषाकपीचा मित्र जो इंद्र त्या इंद्राशिवाय मला वृषाकपीला कोठेंही करमत नाहीं; अन्यत् समानं असें म्हणून बाकीच्या शब्दांचा अर्थ सायणाचार्यांनीं दिला नाहीं; सर्व देवांत ज्या इंद्राकडे माझा हा पाण्यांत उत्तम रीतीनें तयार केलेला हवि जात असतो व जो सर्व जगांहून श्रेष्ठ अशा त्या इंद्राखेरीज मला वृषाकपीला कोठेंही करमत नाहीं. हा दुसरा अर्थ अगदीं कृत्रिम आहे.

रण् = रमणें; अभ्यासानें रारण्; रारण् + अ = रारण = रमलों आहें; दुसऱ्या कोणाच्याही संगतींत मी आजपर्यंत रमलों नाहीं. अप्यं हविः = पाण्यांत मिसळलेल्या हा सोमरसाचा हवि. ज्या वृषाकपीचा सोमहवि देवांमध्यें नेहमीं वाटला जातो त्या वृषाकपि मित्राशिवाय मला करमत नाहीं असें इंद्र इंद्राणीला म्हणतो. विश्वस्मात् इन्द्र उत्तरः ह्या शब्दांचा एथें कांहींएक अर्थ नाहीं.

**गौरीः ( २८ ) रोचतेः ज्वलतिकर्मणः । अयमपि इतरः गौरः वर्णः एतस्मात् एव । प्रशस्यः भवति । तस्याः एषा भवति**

गौरीः=माध्यमिका वाक् म्हणजे वीज व गडगडाट ह्यांचें मिश्रण; वीज दिपविते म्हणून पुढीलप्रमाणें व्युत्पत्ति; रुच्=जळणें, किंवा दिपविणें ह्यापासून गौरी; रुच् ह्याची उलटापालट केल्यानें चुर्; चुर् + ई = चौर् + ई = गौर् + ई = गौरी. गौरवर्ण ह्यांतील गौर शब्दही रुच् धातूपासूनच; कारण तो रंग जाळतो म्हणजे इतर रंगांना दिपवून टाकतो; म्हणूनच गौरवर्णाची इतकी प्रशंसा करतात. रुच् धातूपासून गौर किंवा गौरी शब्द तयार करणें ही खरोखर विलक्षण कसरत होय! अयमपि इतरः०

प्रशस्यः भवति हे शब्द प्रक्षिप्त असावेत; कारण तस्याः एषा भवति ह्याचा संबंध गौरीः ह्याच्याशीं आहे. गौरीः = गरणशीला माध्यमिका वाक् ( सायण १।१६४।४१ ); गरणशीला = उदक गिळणें म्हणजे सांठवून ठेवणें हा स्वभाव आहे जिचा ती; माध्यमिका वाक् अन्तरिक्षांत जल सांठवून ठेवते; गॄ (= गिळणें) ह्याच्यापासून गौरी; गॄ निगरणें ( धा० ६।१२९ ); गॄ ह्याचें गुर् होऊन व त्याला ई प्रत्यय लाऊन गौरी शब्द झाला असें सायणाचार्यांस म्हणावयाचें असेल; पण गॄ चें गिर् होईल; गुर् होतें ह्या म्हणण्याला आधार काय? ह्याला उत्तर निरुक्तांत हवें तें होतें हें!

## खंड ४० वा.

**गौरीर्मिमाय सलिलानि तक्षत्येकपदी द्विपदी सा चतुष्पदी। अष्टापदी नवपदी बभूवुषी सहस्राक्षरा परमे व्योमन् ( ऋ० सं० १।१६४।४१ )**

**गौरीः निर्मिमाय। सलिलानि तक्षती कुर्वती। एकपदी मध्यमेन। द्विपदी मध्यमेन च आदित्येन च। चतुष्पदी दिग्भिः। अष्टापदी दिग्भिश्च अवान्तरदिग्भिश्च। नवपदी दिग्भिश्च अवान्तर दिग्भिश्च आदित्येन च। सहस्राक्षरा बहूदका। परमे व्यवने। तस्याः एषा अपरा भवति**

मिमाय = निर्मिमाय; मिमाय = निर्मिमीते ( दुर्ग ). तक्षती = कुर्वती; जग निर्माण करण्याच्या अगोदर गौरी जल निर्माण करती झाली ( दुर्ग ). एकपदी मध्यमेन = मध्यम जो इंद्र त्याच्यामुळें एकपदी म्हणजे त्याच्याशीं एक झालेली. इंद्र व आदित्य ह्यांच्यामुळें द्विपदी. चार दिशांमुळें चतुष्पदी; एथें इंद्र व आदित्य हे घ्यावयाचे नाहींत; त्यांच्यावांचून ती चतुष्पदी होते. भाष्यांत चतुष्पदी शब्दाच्या आधींचा सा शब्द गाळला आहे. चार मुख्य दिशा व चार मधल्या दिशा ह्यामुळें अष्टापदी; एथेंही इंद्र व आदित्य घ्यावयाचे नाहींत. आठ दिशा व आदित्य ह्यांच्यामुळें नवपदी; एथें इंद्र घ्यावयाचा नाहीं. सहस्राक्षरा = बहूदका. व्योमन् = व्योमनि = वि + ओमनि; वि + अवने = व्यवने; अव् ह्याला संप्रसारण होऊन ओ ( अ + उ ); ओ + मन् = ओमन् = अवनम्; परमे व्यवने = विभक्तानां भूतानां यत् परमम् अवनम् एकं सर्वभावानाम् अविभक्तः एकः आत्मा तस्मिन् ( दुर्ग ) = निरनिराळ्या वस्तूंचें रक्षण करणारें जें एक परमतत्त्व म्हणजे एक आत्मा त्याच्यांत ( एकवटलेली ). दुर्गानें केलेला अर्थः— इंद्रामुळें एकपदी, इंद्र व आदित्य ह्यांमुळें द्विपदी, चार मुख्य दिशांमुळें चतुष्पदी, चार मुख्य व चार अवांतर अशा आठ दिशांमुळें अष्टापदी व आठ दिशा आणि आदित्य ह्यांमुळें नवपदी झालेली बभूवुषी, जिच्यापाशीं पुष्कळ जल आहे अशी ( सहस्राक्षरा ), परमात्म्यामध्यें ( परमे व्योमन् ) तादात्म्य पावलेली माध्यमिका वाक् जल ( सलिलानि ) निर्माण करून ( तक्षती ) मग सर्व जग निर्माण करते ( मिमाय ).

**सायणः—** गौरीः = गरणशीला माध्यमिका वाक्; मिमाय = शब्दयति =

हंबरते; सलिलानि = वृष्ट्युदकानि; एकपदी = एकपादोपेता एकाधिष्ठाना मेघे वर्तमाना गमनसाधनेन वा वायुना = एक पायाची म्हणजे एका ठिकाणीं म्हणजे मेघांत असणारीं किंवा गतीचें साधन जो वायु त्याच्यामुळें एकपदी; वायु हा जणूं काय तिचा एक पाय; द्विपदी = मेघान्तरिक्षाख्यद्व्यधिष्ठाना = मेघ व अंतरिक्ष ह्या दोन ठिकाणीं असणारी; किंवा ( वायु हा एक पाय असून ) आदित्य हा तिचा दुसरा पाय; चतुष्पदी = चार दिशांत असणारी; अष्टापदी = चार मुख्य व चार अवांतर दिशा ह्यांत असणारी; नवपदी = आठ दिशा व सूर्य ह्यांच्यांत असणारी; बभूवुषी = एवंभूता = अशी निरनिराळ्या ठिकाणीं असलेली; सहस्राक्षरा = अपरिमितव्याप्तियुक्ता = बहुव्यापनशीलोदकवती = जिच्या व्याप्तीला मर्यादा नाहीं म्हणजे सर्वत्र असणारी; तिचें उदक सर्व ब्रह्मांड व्यापून टाकतें; परमे व्योमन् = उदकाश्रयत्वेन उत्कृष्टे अंतरिक्षे = ज्यांत उदक आहे अशा उंच अंतरिक्षांत; अंतरिक्षांत असणारी, उदकानें सर्व व्यापून टाकणारी व निरनिराळ्या अवस्थांत असणारी अशी ही माध्यमिका वाक् वर्षाव करीत असतांना ओरडते किंवा हंबरते हा एक अर्थ; कित्येक ऋचेचा दुसराही अर्थ करतात तो पुढीलप्रमाणें; गौरीः = शब्दब्रह्मात्मिका वाक्; मिमाय = मिमाति = स्थापन करते; सलिलानि तक्षती = प्रतिष्ठितानि घटादिद्रव्याणि तत्तद्वाचकत्वेन निष्पादयंती = स्थापन म्हणजे उत्पन्न केलेल्या घटादि पदार्थांना तदर्थक नांवें देणारी; निरनिराळ्या वस्तु उत्पन्न करून शब्दब्रह्म त्यांना सार्थ नांवें देतें; एकपदी = सृष्टि निर्माण करण्याच्या अगोदर आत्म्याशीं एकवटलेली; जेव्हां ती सृष्टि निर्माण करते तेव्हां ती आत्म्यापासून विलग होते; सुबन्त व तिङन्त ह्या भेदानें वाक् द्विपदी होते; नाम, आख्यात, उपसर्ग व निपात ह्यांनीं ती चतुष्पदी होते; आमंत्रितसहिताष्टभेदेन अष्टपदी = संबोधनासहित ( आमंत्रितं = संबोधनं ) सात विभक्तींनीं युक्त म्हणून ती अष्टपदी; आठ विभक्ति ह्या आठ पदें; साव्ययैः उक्तैः अष्टभिः नवपदी = आतां सांगितलेलीं आठ पदें व अव्यय मिळून नवपदी; किंवा छाती, कंठ, डोकें, जिव्हामूल, दांत, नाक, ओठ, तालु व नाभि अशा नऊ ठिकाणीं उत्पन्न झालेली म्हणून नवपदी; अशी उत्पन्न झालेली वाक् असंख्य शब्दांनीं असंख्य अर्थ व्यक्त करते; परमे व्योमन् = उत्कृष्टे हृदयाकाशे मूलाधारे = हृदयाकाशांत म्हणजे मूळाधारांत म्हणजे हृदयांतील एका गूढ स्थानीं; सहस्राक्षरा अनेकाकारेण व्याप्ता अनेकध्वनिप्रकारा भवति = वाक् नानारूपें धारण करते म्हणजे वाचेपासून असंख्य निरनिराळे ध्वनि उत्पन्न होतात. असे दोन अर्थ सायणाचार्य देतात; त्यांनीं यास्काचें भाष्य शेवटीं दिलें आहे पण वर दिलेले दोन्ही अर्थ यास्कभाष्याला सोडून आहेत.

गौरी शब्दाची गौरीः, गौर्यः व गौर्यै अशीं तीनच रूपें ऋग्वेदांत आहेत व तींही एकेकदांच आलीं आहेत. गौरी गायीसारखें एक जनावर असावें; गौर तहानेनें व्याकुळ होऊन पाणी पिण्याकरितां झऱ्याकडे किंवा तळ्याकडे जातो असें ( १।२ ) ऋचांत म्हटलें आहे व इंद्र, अश्विन वगैरे देवांना तृषाक्रांत गौर जसा तहान भाग-

पिण्याकरितां पाण्याकडे धांव घेतो तसे तुम्ही सोम पिण्याकरितां धांवत या असें म्हटलें आहे. गौर बहुतकरून हरिण असावा व गौरी हे त्या शब्दाचें स्त्रिलिंग असावें; तसें असल्यास गौरी म्हणजे हरिणी होईल. गाय असो कीं हरिणी असो गौरी हें एक जनावर असावें. एथें विजेला लक्षणेनें गौरी म्हटलें असावें. ती आकाशांत पाणी तयार करते ( सलिलानि तक्षती ) व तसें करतांना ओरडत असते ( मिमाय ); ह्या विजेला कधीं एक फाटा तर कधीं दोन चार असे अनेक फाटे फुटतात; एकाचे दोन, दोहोंचे चार, चाराचे आठ असे फाटे वाढत जातात. अक्षर = ( १ ) जल, ( २ ) अक्षर, ( ३ ) धन. (१) पुढील खंडांत दिलेल्या ऋचेंत अक्षर म्हणजे जल असा अर्थ आहे. (२) गायत्रेण प्रति मिमीते अर्कमर्केण साम त्रैष्टुभेन वाकम् । वाकेन वाकं द्विपदा चतुष्पदा अक्षरेण मिमते सप्त वाणीः ( १।१६४।२४ ); एथें गायत्र, अर्क, साम, त्रिष्टुभ्, वाक, द्विपदा व चतुष्पदा हीं नांवें निरनिराळ्या ऋक्छंदांचीं असावींत; अक्षराच्या साहाय्यानें ( अक्षरेण ) वाणी निरनिराळे छंद उत्पन्न करिते (३) उप त्वा सातये नरो विप्रासो यन्ति धीतिभिः । उपाक्षरा सहस्रिणी ( ७।१५।९ ) = हे अग्नि, दाते ( नरः = विप्रासः ) देव धन घेऊन ( धीतिभिः ) धन देण्याकरितां ( सातये ) तुझ्याकडे जातात; त्याप्रमाणें धनवान् ( अक्षरा = सहस्रिणी ) दात्री उषा त्याच कामाकरितां तुझ्याकडे जाते. व्योमन् = ( १ ) स्वर्ग, ( २ ) उच्च स्थिति, ( ३ ) धनाचा सांठा. ( १ ) स जायमानः परमे व्योमनि आविरग्निरभवत् मातरिश्वने ( १। १४३।२ ) = द्युलोकीं जन्मलेला अग्नि मातरिश्वयाला दिसला. ( १ व ३ ) ऋतस्य गोपौ अधि तिष्ठथो रथं सत्यधर्माणा परमे व्योमनि । यमत्र मित्रावरुणावथो युवं तस्मै वृष्टिर्मधुमत्पिन्वते दिवः ( ५।६३।१ ) = ( १ ) हे मित्रावरुणांनो, उदकाचे (ऋतस्य) रक्षक ( गोपौ ) तुम्ही द्युलोकीं रथांत बसतां; ज्याच्यावर तुम्ही अनुग्रह करतां त्याच्याकरितां द्युलोकांतून पर्जन्यवृष्टि होते; ( २ ) हे मित्रावरुणांनो, धनाचे ( ऋतस्य ) दाते ( गोपौ ) तुम्ही धनभांडारांत ( परमे व्योमनि ) रथांतलें धन ( रथं ) घालतां ( तिष्ठथः ); ज्याला तुम्ही धन देतां त्याच्यासाठीं धनाचा पाऊस पडतो. (२) पृच्छामि वाचः परमं व्योम (१।१६४।३४)=वाचेचें उत्तम स्थान, उत्तम दशा कोणती तें मी विचारतों; त्याला उत्तरः–ब्रह्मायं वाचः परमं व्योम ( १।१६४।३५) = वाचेचें उत्तम स्थान, उत्तम दशा ब्रह्म होय. मिमाय = ( १ ) हंबरते, ( २ ) उच्चारते, ( ३ ) देते. (१ ) अन्यस्या वत्सं रिहती मिमाय (३।५५।१३) = दुसऱ्या गाईच्या वत्साला चाटीत असतां ती हंबारव करते. ( २ ) मि = हंबारव करणें; ह्या अर्थापासून उच्चारणें हा अर्थ निघेल; गौरी म्हणजे वाक् निरनिराळे छंद उच्चारते. ( ३ ) ससर्परीरमतिं बाधमाना बृहन्मिमाय जमदग्निदत्ता । आ सूर्यस्य दुहिता ततान श्रवो देवेषु अमृतम् अजुर्यम् ( ३।५३।१५ ) = धन देणारी ( ससर्परीः ) व दारिद्र्य ( अमतिं ) घालविणारी ( बाधमाना ) आणि प्रज्वलित धनानें युक्त (जमदग्निदत्ता) सूर्याची मुलगी उषा पुष्कळ धन ( बृहत् ) देते ( मिमाय ); ती देवांमध्यें अतिशय धन ( श्रवः = अमृतं ) देते

( आततान ); इन्द्रो मन्युं मन्युम्यो मिमाय ( ७।१८।१६ ) = इंद्र धनदात्याला ( मन्युम्यः ) धन ( मन्युं ) देता झाला ( मिमाय ); मन्युं धनं मिमीते असौ मन्युमीः । तस्य मन्युम्यः; मन्युमीः = धन देणारा; मन्युम्यः = धन देणाऱ्याचें म्हणजे धन देणाऱ्याला. ऋचेचे तीन अर्थ असावेतः— ( १ ) जल निर्माण करणारी विद्युत्‌रूपी गाय निरनिराळ्या पायांची होऊन म्हणजे तिला एक दोन असे अनेक फाटे फुटून अगणित जलानें युक्त ( सहस्राक्षरा ) झालेली ( बभूवुषी ) ती द्युलोकी हंबारव करते; ( २ ) वाक्प्रवाह ( सलिलानि ) निर्माण करणारी ( तक्षती ) वाक् ( गौरीः ) निरनिराळ्या छंदांचें रूप घेऊन व शेवटीं सहस्राक्षरांचा छंद होऊन उच्च स्थितींत (परमे व्योमनि) बोलावयास लागते; छंद एक, दोन, चार, आठ व नऊ चरणांचाही असतो व कधीं कधीं एका छंदांत हजार अक्षरेंही असतात; ही वाणीची परमसीमा झाली; कवींची कृति ही परमसीमा कधीं कधीं दाखविते; ( ३ ) धनप्रवाह तयार करणारी व थोडक्यापासून असंख्य धन देणारी ( सहस्राक्षरा ), उषा ( गौरीः ) लोकांच्या धनभांडारांत ( परमे व्योमन् ) धन देते ( मिमाय ). १।१६४ ह्या सूक्तांतल्या बहुतेक ऋचा कूटासारख्या आहेत व त्यांपैकीं बहुतेक कूटें कठीण आहेत; प्रस्तुत ऋचा अशा कठीण कूटांपैकीं होय.

## खंड ४१ वा.

**तस्याः समुद्रा अधि वि क्षरन्ति तेन जीवन्ति प्रदिशश्चतस्रः । ततः क्षरत्यक्षरं तद्विश्वमुप जीवति ( ऋ० सं० १।१६४।४२ )**

**तस्याः समुद्राः अधिविक्षरन्ति । वर्षन्ति मेघाः । तेन जीवन्ति दिगाश्रयाणि भूतानि । ततः क्षरति अक्षरम् उदकम् । तत् सर्वाणि भूतानि उपजीवन्ति**

समुद्राः = मेघाः. अधिविक्षरन्ति = वर्षन्ति. प्रदिशः चतस्रः = दिगाश्रयाणि भूतानि = दिक्प्रतिदिग्वासीनि भूतानि ( दुर्ग ) = चार मुख्य दिशा व चार अवांतर दिशा ह्यांत राहणारे प्राणी. अक्षरं = उदकम्. विश्वम् उपजीवति = सर्वाणि भूतानि उपजीवन्ति; विश्व = भूतजातं ( दुर्ग ). दुर्गानें केलेला अर्थः— तिच्यापासून म्हणजे माध्यमिक वाचेपासून मेघ वर्षाव करतात; त्या वर्षिलेल्या उदकावर चार मुख्य दिशा व चार अवांतर दिशा ह्यांत राहणारे प्राणी आपली उपजीविका करतात; तिच्यापासून मेघांच्या द्वारें प्रत्येक वर्षीं उदक वर्षत असतें व ह्या वर्षिलेल्या उदकावर सर्व प्राणिमात्र आपली उपजीविका करतात.

सायणः— समुद्राः = वृष्ट्युदकसमुन्दनाधिकरणभूताः मेघाः = वर्षावाच्या पाण्यानें पृथिवी भिजविण्याचें जें कार्य त्याचें स्थान झालेले मेघ म्हणजे पृथिवी भिजविण्याकरितां आपल्या उदरांत जल सांठविणारे मेघ; समुन्दन ही समुद्र शब्दाची व्युत्पत्ति होय; अधि = अधिकं प्रभूतम् उदकम्; विक्षरन्ति = विविधं क्षरन्ति = नानाप्रकारांनीं वर्षाव करतात; प्रदिशः = विदिशः चतस्रः दिशश्च = चार अवांतर

व चार मुख्य दिशा; किंवा प्रदिशः = प्रकृष्टाः दिशः मुख्याः = मुख्य दिशा; तत्स्थाः पुरुषाः जीवन्ति = त्या आठ दिशांत असणारीं मनुष्यें आपली उपजीविका करतात; ततः क्षरति अक्षरं = पश्चात् तत् अक्षरम् उदकं क्षरति = सस्यादिकमुत्पादयति = नंतर पाणी पडतें म्हणजे तें पडणारें पाणी धान्य वगैरे उत्पन्न करतें; अशा उत्पन्न झालेल्या धान्य वगैरेवर सर्व जग आपली उपजीविका करतें.

तस्याः अधि = त्या गौरीपासून म्हणजे माध्यमिक वाचेपासून. समुद्राः = उदकाचे प्रवाह. ऋचेचा अर्थः--- माध्यमिक वाचेपासून उदकाचे प्रवाह आकाशांत सर्वत्र पसरतात व त्यावर चार दिशा आपली उपजीविका करतात; ह्या चार दिशांतून उदक पृथिवीवर पडतें व त्यावर सर्व जग आपली उपजीविका करतें.

**गौः ( २९ ) व्याख्याता ( निरु० २।५ )। तस्याः एषा भवति**

गो शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ९२ ).

## खंड ४२ वा.

**गौरमीमेदनु वत्सं मिषन्तं मूर्धानं हिङ्ङकृणोन्मातवा उ। सृक्काणं घर्ममभि वावशाना मिमाति मायुं पयते पयोभिः ( ऋ० सं० १।१६४।२८ )**

**गौः अन्वमीमेत् वत्सं निमिषन्तम्। अनिमिषन्तम् आदित्यम् इति वा। मूर्धानम् अस्य अभिहिङ्ङकरोत् मननाय। सरणं सृक्काणं घर्मं हरणम्। अभिवावशाना मिमाति मायुम्। प्प्यायते पयोभिः। मायुम् इव आदित्यम् इति वा। वाक् एषा माध्यमिका। घर्मधुक् इति याज्ञिकाः**

अमीमेत् अनु = अन्वमीमेत्. मिषन्तं = निमिषन्तम्; मिषन्तं = उन्मुखं पश्यन्तं ( दुर्ग ) = तोंड वरती करून तिच्याकडे पाहणाऱ्याला; मिष् = डोळे उघडणें, डोळे मिचकाविणें, पाहणें ( आपट्यांचा कोश ); पण हा अर्थ धातुपाठांत नाहीं; मिष स्पर्धायाम् ( धा० ६।७१ ). किंवा मिषन्तं = अनिमिषन्तं ( आदित्यं ) = कधींही डोळे न मिटणाऱ्या म्हणजे सदोदित दिसणाऱ्या किंवा पाहणाऱ्या ( सूर्याला ). हिङ्ङकृणोत् = हिङ् अकृणोत्; अकृणोत् = अकरोत्; हिङ्ङकृणोत् = हिंकारेण उपशब्दयति ( दुर्ग ) = हिं असा ध्वनि करून त्याला हाक मारते. मूर्धानं ह्या नंतरचा अस्य अध्याहृत; मूर्धानं शिरोरश्मीन् ( रश्मि ? ) अस्य मध्यस्थानप्राप्तं प्राप्य (दुर्ग)=अन्तरिक्षांत त्याचे आलेले किरण मिळवून म्हणजे अन्तरिक्षांत आलेला सूर्याचा प्रकाश अनुभवून ( ती समाधान दर्शविणारा हिं असा ध्वनि करते ). मातवा उ = मातवै उ; उ निरर्थक म्हणून गाळला आहे; मातवे = मननाय = सर्वलोकज्ञानाय ( दुर्ग ) = सर्व जगाचें ज्ञान व्हावें म्हणून. सृक्काणं = सरणं = अन्तरिक्षांत संचार करणाऱ्याला; सृक्काणं = सृ + क्काणम्; क्काण हा नामकरण प्रत्यय; सृक्काणं भाष्यांत नको. घर्मं = हरणं = जल हरण करणाऱ्याला; घर्मं = घर् + मम्; घर् = हर्; हृ पासून हर् व नंतर घर्; म हा नामकरणप्रत्यय. अभिवावशाना = पुनः पुनः वाश्यमाना ( दुर्ग )

= वारंवार ओरडणारी म्हणजे हंबरणारी; वाश् शब्दे (धा० ४।५७); वाश् ह्याचें वश् होऊन नंतर आभ्यासानें वावश्. मिमाति मायुं = दरवर्षी शब्द करते. पयते = प्रप्यायते = वाढते, फुगते; प्यायते ह्याचें पयते हें रूपांतर आहे असें यास्काचें मत असावें. मायुम् इव आदित्यम् इति वा। वाक् एषा माध्यमिका हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत; ते शब्द २।९ पान १०४ येथें आहेत; त्या शब्दांचें एथें प्रयोजन नाहीं. वासरूं जसें गायीचें दूध पितें तसा सूर्य माध्यमिक वाचेचें उदक पितो म्हणजे हरण करतो म्हणून तो तिचा वत्स ( दुर्ग ).

दुर्गानें केलेला अर्थः— कधीं डोळे न मिटणारा म्हणजे सदोदित दिसणारा वत्स जो सूर्य त्याला पाहून माध्यमिका वाक् गडगडाट करते; सर्व जगाचें ज्ञान व्हावें म्हणून ( मातवै ) अंतरिक्षांत त्यानें पसरलेले किरण पाहून ती हिं असा ध्वनि करून त्याची प्रशंसा करते; आकाशांत संचार करणारा ( सृक्काणं ) व जल हरण करणारा ( घर्मं ) अशा त्याला उद्देशून वारंवार ओरडणारी ती प्रतिवर्षीं गडगडाट करते व जलानें फुगते; हा एक अर्थ; गौः म्हणजे ऊन ऊन दूध देणारी गाय ( घर्मधुक् ) असें याज्ञिक म्हणतात; जेव्हां गौः म्हणजे गाय तेव्हां पुढील प्रमाणें अर्थ :— वर तोंड करून आपल्याकडे पाहणाऱ्या ( मिषन्तं ) वत्साला पाहून गाय हंबरते; मी ह्याची आई आहें हें त्याला कळावें म्हणून ( मातवै ) ती त्याच्या डोक्याचें आघ्राण करून हिङ् असा शब्द करते; तिच्याकडे जाणाऱ्या ( सृक्वाणं ) व तिचें दूध हरण करणाऱ्या ( घर्मं ) वासराला पाहून ती दररोज असाच शब्द करते व वासराला दुधानें लठ्ठ करते.

सायणः—( १ ) गाय डोळे मिटलेल्या ( मिषन्तं ) वासराकडे येऊन ( अनु= अनुप्राप्य ) हंबरते किंवा वासराकडे धांवत जाते; त्याचें मस्तक निर्माण करण्याकरितांच ( मातवै उ ) म्हणजे चाटून चाटून स्वच्छ करण्याकरितांच ती हिं असा ध्वनि करते; आपलें तोंड फेसाळ करणारें (सृक्वाणं) व दूध हरण करणारें (घर्मं) वासरूं आपल्याकडे केव्हां येईल अशी आतुर झालेली ( अभिवावशाना ) ती हंबारव करते ( मिमाति मायुं ) व दुधानें फुगून त्याला धष्टपुष्ट करते ( पयते ); ( २ ) पुष्कळ काळ पाऊस न पडल्यामुळें निराशेनें डोळे झांकून बसलेल्या ( मिषन्तं ) जग हेंच कोणी एक वासरुं त्याला अनुलक्षून मेघरूपी गाय हंबरते म्हणजे पाऊस लवकरच पडेल असें सांगण्याकरितां गडगडते; डोक्याच्या ठिकाणीं असणारी ( मूर्धानं ) जी पृथिवी तिला निर्माण करण्याकरितां म्हणजे धान्य वगैरेनें युक्त करण्याकरितां ती गडगडाट करते; फल उत्पन्न करणाऱ्या ( सृक्वाणं = फलस्य स्रष्टारं ) व तापलेल्या ( घर्मं=दीप्तं ) अशा पुत्राकडे जाण्याची इच्छा करणारी (अभिवावशाना) ती हंबरते व पाण्यानें फुगते म्हणजे पृथिवीला जलसमृद्ध करते; हें दुसरें विवरण बरेंच ओढाताणीचें आहे; सृक्काणं = फलस्य स्रष्टारं = पाऊस पडल्यावर धान्य उत्पन्न करणाऱ्या लोकांना; पाऊस न पडल्या-मुळें लोक तापलेले असतात ( घर्मं ) व पाऊस केव्हां पडेल व आपण धान्य केव्हां

उत्पन्न करूं असें त्यांना होतें. मिञ प्रक्षेपणे ( धा० ५।४ ); अमीमेत् = आत्मानं प्रक्षिपति असा अर्थ पहिल्या विवरणांत विकल्पानें केला आहे.

मिषन्तं ह्यांत मिष् धातु नसून मि ( = हंबरणें ) हा धातु आहे; मि + स् ( लेट्चा ) = मिष्. वासरूं ( वत्सं ) हंबरल्यानंतर ( मिषन्तम् अनु ) गाय लगेच हंबरली ( अमीमेत् ). मि अभ्यासानें मीमि; अ + मीमि + त् = अमीमेत् = हंबरली. मूर्धन् = ( १ ) डोकें, ( २ ) दाता, ( ३ ) पति, ( ४ ) धन. ( १ ) नि यद वृणक्षि० मूर्धनि शुष्णस्य (१।५४।५); पान ३८६ पहा; मूर्धनि = डोक्यावर. (२) अयमग्निः सहस्रिणो वाजस्य शतिनस्पतिः । मूर्धा कवी रयीणाम् ( ८।७५।४ ); मूर्धा = पतिः = दाता. ( ३ ) मूर्धानं दिवः अरतिं पृथिव्याः० अग्निं ( ६।७।१ ); एथें अग्नि हा द्यु व पृथिवी ह्यांचा पति ( मूर्धानं = अरतिं ). ( ४ ) भग भक्तस्य ते वयं उदशेम तवावसा । मूर्धानं राय आरभे ( १।२४।५ ) = धनाचा ( रायः ) सांठा ( मूर्धानं ) पकडण्याकरितां ( आरभे ), हे भगा, तूं वाटलेल्या धनांतून ( भक्तस्य = अवसा ) आम्ही धन मिळवूं ( उत् + अशेम ). दिवि मूर्धानं दधिषे स्वर्षाम् ( १०।८।६ ) = ( १ ) हे अग्नि, सूर्याला पोचणारें ( स्वर्षां ) डोकें ( मूर्धानं ) द्युलोकीं ( दिवि ) तूं नेतोस ( दधिषे ) म्हणजे अग्नीच्या ज्वाळा द्युलोकाला पोचतात; ( २ ) हे दात्या, आमच्या धनभांडारांत ( दिवि ) तूं अतिशय ( स्वर्षां ) धन ( मूर्धानं ) देतोस ( दधिषे ). मूर्धानं हिङ् अकृणोत् मातवै उ = धन ( मूर्धानं ) देण्याकरितां (मातवै ) संमतिदर्शक हिं असा शब्द दात्री उच्चारते किंवा धन ( हिं ) देते; हि = देणें, धन. सृक्वाणं घर्मं अभि वावशाना = वाहणारें ( सृक्वाणं ), धनानें भरलेलें ( अभि ) तेजस्वी धन ( घर्मं ) देणारी ( वावशाना ). मिमाति मायुं= धन देते. पयते पयोभिः = धनानें समृद्ध करते; पि ( = देणें ) पासून पयः. मा = ( १ ) मोजणें, ( २ ) देणें; ( १ ) मानेनेव तस्थिवां अन्तरिक्षे वि यो ममे पृथिवीं सूर्येण ( ५।८५।५ ) = अंतरिक्षांत उभा राहून जो वरुण सूर्य हाच कोणी मोजण्याचा दंड त्यानें ( मानेन ) पृथिवीला मोजता झाला; परि यो रश्मिना दिवो अन्तान् ममे पृथिव्याः ( ८।२५।१३ ) = जो दोरीनें ( रश्मिना ) द्यु व पृथिवी ह्यांचे अंत पूर्णपणें मोजता झाला. ( २ ) नू नो रयिं उप मास्व ( ९।९३।५ ) व त्वमिंद्रास्मभ्यम् उपमाहि वाजान् ( ४।२२।१० ); उप मास्व = उप माहि = दे; रयिं = वाजान् = धन. मा याचें मातवै असें रूप प्रस्तुत ऋचेंतच आहे; मूर्धानं मातवै = डोकें मोजण्याकरितां म्हणजे चाटण्याकरितां; गाय वासराचें डोकें जिभेनें मोजण्याकरितां म्हणजे चाटण्याकरितां हिं हिं असा आवाज करते. सृज् = वाहणें; सृज् + वन् = सृक्वन् = वाहणारा; सृक्वन्चें सृक्वाणं हें एकच रूप ऋग्वेदांत आहे. घर्म = ऊनऊन दूध; अतापि घर्मो मनुषो दुरोणे ( ७।७०।२ ) = मनुष्याच्या घरीं दूध तापविलें आहे; अयं वां घर्मो अश्विना ० परि षिच्यते ( ८।९।४ ) = हे अश्विनांनो, हें दूध तुमच्याकरितां भांड्यांत ओतलें जात आहे. वश् = ( १ ) इच्छिणें, ( २ ) कामातुर होणें,

( ३ ) तृषित होणें, ( ४ ) ओरडणें, ( ५ ) देणें. ( १ ) भूरीणि हि कृणवामा शविष्ठ इन्द्र क्रत्वा मरुतो यद्वशाम ( १।१६५।७ ) = हे धनवन्त ( शविष्ठ ) इंद्रा व हे मरुतांनो, जेव्हां ( यत् ) आम्ही इच्छितों ( वशाम ) तेव्हां आम्ही आपल्या धनांतून ( क्रत्वा ) पुष्कळ ( भूरीणि ) धन ( आ ) देतों ( कृणवाम ). ( २ ) सोमं यन्ति मतयो वावशानाः ( ९।९७।३४ ) = कामातुर स्तुतिरूप स्त्रिया ( मतयः ) सोमरूपी नवऱ्याकडे जातात; आदीमायन् वरमा वावशाना जुष्टं पतिं कलशे गाव इन्दुम् ( ९। ९७।२२ ) = श्रेष्ठ ( वरं ) पति जो कलशांतला सोम त्याच्याकडे कामातुर झालेल्या गायी जात आहेत ( आयन् ). ( ३ ) स वावशानः इह पाहि सोमं ( ३।५१।८ ) = तृषाक्रान्त झालेला तो तूं एथें सोम पी; आ यत् तृपन् मरुतो वावशानाः ( ७।५६। १० ) = तृषाक्रान्त झालेले मरुत् जेव्हां सोम प्यायले ( आतृपन् ). ( ४ ) स्वाधीभिः ऋक्वभिः वावशानः उदुस्रियाणामसृजत् निदानम् ( ६।६२।२ ) = ओरडणारा तो आपल्या स्तुतींनीं ( स्वाधीभिः = ऋक्वभिः ) गायींचें ( उस्रियाणाम् ) बंधन (निदानं) म्हणजे कोंडवाडे मोकळे करता झाला ( उत् + असृजत् ). (५) एता वो वश्मि उद्यता यजत्राः ( २।३१।७ ) = हे यज्ञार्ह देवांनो, मी तुम्हाला हे हवि ( उद्यता = उद्यतानि हवींषि ) देत आहें ( वश्मि ); स नो देवेभिः पवमान रदेन्दो रयिमश्विनं वावशानः ( ९।९३।४ ) = हे सोमा, दाता ( वावशानः ) तूं आपल्या धनांतून ( देवेभिः ) पुष्कळ ( अश्विनं ) धन ( रयिं ) दे ( रद ). सृक्काणं घर्मम् अभिवावशाना = कासेंतून वाहणारे गरम दूध ( वासराला ) देणारी. मिमाति मायुं = हंबरते. पि = ( १ ) पाजणें किंवा पिववणें, ( २ ) देणें, ( ३ ) वाढणें. ( १ ) पूर्वीरेको अधयत् पीप्यानाः ( ३।१।१० ) = अग्नि एक असून पाजणाऱ्या ( पीप्यानाः ) अनेक (पूर्वीः) आयांचें दूध चोखता झाला ( अधयत् ); वयमेनमिदा ह्यो अपीपेमेह वज्रिणम् । तस्मा उ अद्य ० भरा ( ८।६६।७ ) = ह्या इंद्राला आम्ही कालच सोम पाजला आहे; आजही त्याला सोम दे. ( २ ) आविः सूर्यं कृणुहि पीपिहीषो जहि शत्रून् ( ६।१७।३ ) = सूर्याला प्रकट कर, धन दे, शत्रूंना ठार कर; इषं जरित्रे नद्यो न पीपेः ( ४।१६।२१ ) = नदीसारखें म्हणजे अतिशय धन स्तोत्याला दे. ( ३ ) पीपाय स श्रवसा मर्त्येषु यो अग्नये ददाश विप्र उक्थैः ( ६।१०।३ ) = जो स्तोता अग्नीला स्तुति अर्पण करतो तो लोकांत धनानें ( श्रवसा ) वाढतो (पीपाय). पयते पयोभिः = दुधानें म्हणजे दूध ( वासराला ) पाजते. ऋचेचा अर्थः— वासरूं हंबरतांच गाय हंबारली; त्याचें डोकें चाटण्याकरितां ती हिं असा आवाज करती झाली; वाहणारें ऊन ऊन दूध देणारी ती हंबरते व वासराला पुष्कळ दूध पाजते. हा प्राथमिक अर्थ आहे. ऋचेचा दुसराही अर्थ असावा पण तो निश्चित करणें कठीण आहे; कारण गौः आणि वत्सं ह्यांचे लक्षार्थ ध्यानांत येत नाहींत. गौः = कामधेनु= सर्व कामना पुरविणारा दाता; जो याचना करतो तो वत्स. मि = हंबरणें, याचना करणें; मिषन्तं वत्सं = याचना करणाऱ्या याचकाला. याचकाची याचना ऐकल्या-

बरोबर कामधेनूसारखा दाता उत्तरादाखल धन देतो (अमीमेत्); मित्र शब्दांत मि (= देणें) हा धातु आहे; शं नो भवन्तु वाजिनो हवेषु देवताता मितद्रवः स्वर्काः (७।३८।७) = धनवंत (वाजिनः=स्वर्काः) व धन देणारे (मितद्रवः) आमच्या धनभांडारांत (हवेषु = देवतातौ) धन देवोत. अमीमेत् = देते.

**धेनुः (३०) धयतेर्वा। धिनोतेर्वा। तस्याः एषा भवति**

धेट् पाने (धा० १।९२७); धे + नुः = धेनुः; जिचें दूध वासरुं पितें ती धेनु; किंवा जी दुधानें किंवा उदकानें तृप्त करते ती धेनु; धिवि प्रीणने (धा० १।५९४); धि + नुः = धेनुः.

## खंड ४३ वा.

**उप ह्वये सुदुघां धेनुमेतां सुहस्तो गोधुगुत दोहदेनाम्।**
**श्रेष्ठं सवं सविता साविषन्नोऽभीद्धो घर्मस्तदु षु प्र वोचम्** (ऋ० सं० १।१६४।२६)

**उपह्वये सुदोहनां धेनुम् एताम्। कल्याणहस्तः गोधुक् अपि च दोग्धु एनाम्। श्रेष्ठं सवं सविता सुनोतु नः। इति। एष हि श्रेष्ठः सर्वेषां सवानां यत् उदकम्। यद्वा। पयः यजुष्मत्। अभीद्धः घर्मः। तं सु प्रब्रवीमि। वाक् एषा माध्यमिका। घर्मधुक् इति याज्ञिकाः**

उपह्वये = उपगम्य मनसा आह्वये (दुर्ग) = मनानें जवळ जाऊन बोलावितों. सुदुघां = सुदोहनां = जिचें दोहन करणें सुलभ आहे अशा (धेनूला); सुदुघां = कल्याणम् उदकं या दुग्धे ताम् (दुर्ग); सु = कल्याण. धेनुं = तर्पयित्रीं सर्वलोकस्य एतां माध्यमिकां वाचम् (दुर्ग). सुहस्तः = कल्याणहस्तः = ज्याचे हात चांगले आहेत म्हणजे इजा करीत नाहींत असा. गोधुक् = गायीचें दूध काढणारा इंद्र (दुर्ग). दोहत् = दोग्धु = प्रक्षारयतु उदकानि (दुर्ग). उत = अपि च. श्रेष्ठं सवं = अतिशय स्तुत्य असें उदक (दुर्ग). साविषत् = सुनोतु = ददातु (दुर्ग). एष हि० उदकम् = ज्याला आपण उदक म्हणतो तें सर्व सवांत श्रेष्ठ होय; सव = काढलेला रस; सर्व रसांत जल हा अत्युत्तम रस होय; हें ब्राह्मणवाक्य असावें; किंवा सवं = पयः; यजुष्मत् = यजुर्मंत्रांनीं काढलेलें (दूध). अभीद्धः घर्मः = मध्यस्थानः विद्युदाख्यः (दुर्ग)=अंतरिक्षांतील वीज. तत् उ सु प्रवोचं= तं सु प्रब्रवीमि; तत् उ सु प्रवोचं=तं सुष्टु प्रब्रूमः (दुर्ग). जेव्हां धेनु म्हणजे यज्ञांत उपयोगी पडणारी गाय (घर्मधुक्) तेव्हां कांहीं शब्दांचे पुढीलप्रमाणें अर्थ दुर्ग करतोः—सुदुघां=सुदोहां=जिचें दूध सहज म्हणजे कष्टाशिवाय काढतां येतें अशा (गायीला); एतां = ह्या यज्ञकर्मांत उपयोगी पडणाऱ्या; गोधुक् = अध्वर्युः; साविषत् = सुनोतु=अभ्यनुजानातु=परवानगी देवो; ज्या कर्माला सविता परवानगी देतो तेंच कर्म बरोबर केलेलें असतें. अभीद्धः = एष रुचितः महावीरः = हें झळकणारें महा वीर पात्र; प्रवर्ग्य नांवाच्या यज्ञांत महावीर नांवाच्या पात्रांत दूध ठेवतात; तदु षु प्र वोचं=तम् अधिकृत्य प्रब्रूमः आहर एतस्मिन् पयः आसे-

चनाय = अग्नींत हवीच्या रूपानें ओतण्याकरितां ह्या महावीर पात्रांत दूध घाल असें आम्हीं म्हणतों. दुर्गानें केलेले ऋचेचे अर्थः—( १ ) जी कल्याणकारक उदक देते ( सुदुघां ) व तसें करून जी जगाला तृप्त करते ( धेनुं ) अशा माध्यमिक वाचेला मी मनापासून म्हणजे चांगली स्तुति करून जवळ बोलावतों; ज्याचे हात कल्याण-कारक आहेत असा गोदोहन करणारा इंद्र मी जवळ बोलाविलेल्या ह्या वाचेचें उदक पृथिवीवर वहावयास लावो; विद्युद् नांवाचा अंतरिक्षांतील देव ( अभीद्धः घर्मः ) अशा प्रकारें उदकरूपी श्रेष्ठ रस ( सवं ) आम्हांला देवो ( साविषत् ) असें आम्हीं त्या अंतरिक्षांतील विद्युद्देवाला मोठ्यानें सांगतों; ( २ ) होता म्हणतोः—जी कष्टावांचून दूध देते त्या यज्ञांतल्या गाईला मी जवळ बोलावितों; कुशल हाताचा अध्वर्यु हिचें दूध काढो; हा उत्तम रस (म्हणजे दूध) काढण्याला सविता आम्हांला अनुमति देवो (साविषत्); हें महावीर पात्र भाजून अगदीं लाल झालें आहे ( अभीद्धः घर्मः ); त्या महा-वीर पात्रासंबंधानें मी म्हणतों कीं, हे अध्वर्यु, ह्या पात्रांत दूध ओत. सायणाचार्यही वरीलप्रमाणें ऋचेचे दोन अर्थ करतात; त्यांनीं केलेले कांहीं शब्दांचे अर्थ पुढील प्रमाणेंः— धेनुं = क्षीरेण प्रीणयित्रीं गां प्रवर्ग्यार्थी = दुधानें तृप्त करणाऱ्या व प्रवर्ग्य-यज्ञांत उपयोगीं पडणाऱ्या गायीला; सुहस्तः = शोभन हस्तः = दोहनकुशलः; दोहत् = दोग्धि; कुशल हाताचा अध्वर्यु ज्याअर्थी दूध काढणार आहे त्याअर्थी त्या गायीला मी जवळ जाऊन बोलावीत आहें; सवं = सोमयागं क्षीरं वा; सविता = सर्वस्य अनुज्ञाता परमेश्वरः; अभीद्धः = अभिदीप्तः = प्रज्वलित झालेला; ज्याअर्थीं महावीर पात्र प्रज्वलित झाले आहे त्याअर्थीं मी होता अध्वर्यूला दूध वगैरे काढ म्हणतों; किंवा एतां धेनुं = उदकवर्षण करून जगाला तृप्त करणाऱ्या व पुढें दिसणाऱ्या ह्या मेघरूप गायीला; उपह्वये = पाऊस पाडण्याकरितां मी बोलावीत आहें; गोधुक् = गोदोग्धा आदित्यः वा वायुः = उदक दोहन करणारा आदित्य किंवा वायु; कारण वृष्टि वायूवर अवलंबून असते; सविता = प्रेरकः परमेश्वरः; साविषत् = अनुज्ञा देवो म्हणजे प्रतिबंध न करो; घर्मः = ग्रीष्मः अवर्षणजनितः सस्यशोषः = अवर्षणानें धान्य सुकविणारा उन्हाळा; अभीद्धः = प्रवृद्धः = कडक; ज्याअर्थी पाऊस न पड-ल्यानें उन्हाळा कडक झाला आहे त्याअर्थीं मी वरीलप्रमाणें म्हणतो कीं वायु दूध काढो वगैरे.

घर्म = अग्नि; युवं रेभं परिषूतेरुरुष्यथो हिमेन घर्मं परितप्तमत्रये (१।११९।६) = स्तोता जो अत्रि त्याचे तुम्ही सभोवतीं पसरलेल्या नाशापासून ( परिषूतेः ) रक्षण करतां; बर्फाचा वर्षाव करून पेटलेली आग अत्रीसाठीं विझवितां. उपस्तृणीतमत्रये हिमेन घर्ममश्विना ( ८।७३।३ ) = हे अश्विनांनो, अत्रीचा जीव वांचविण्याकरितां तुम्ही बर्फानें आग झाकून टाकतां. प्रस्तुत ऋचेंत घर्मः = अग्नि. धेनु म्हणजे माध्यमिका वाक् किंवा यज्ञांतली गाय असा अर्थ न करतां नुसती गाय असा अर्थ केल्यास ऋचेचा पुढीलप्रमाणें अर्थ होईलः—जी दूध कष्टाशिवाय देते अशा ह्या गायीला मी जवळ

बोलावीत आहें; हलक्या हाताचा गवळी तिचें दूध काढील; दूध देणारा ( सविता ) म्हणजे दूध काढणारा आम्हांस उत्तम ( श्रेष्ठं ) दूध (सवं ) देईल ( साविषत् ); अग्नि ( घर्मः ) समोंवार म्हणजे चांगला पेटला आहे ( इद्धः ); तें दूध मी अग्नींत अर्पण करीनच करीन. पण हा वरचा अर्थ आहे; गूढार्थ कोणता ते निश्चयानें सांगतां येत नाहीं; तथापि धेनु म्हणजे परमेश्वराची कृपा असा अर्थ केल्यास ऋचेचा पुढील-प्रमाणें अर्थ होईल:—कष्टाशिवाय फल देणाऱ्या ( सदुघां ) ईशकृपारूप धेनूला मी बोलावीत आहें; चांगल्या स्तुतींनीं दोहन करणारा स्तोता तिचें दूध काढील म्हणजे ईशकृपा संपादून सुख प्राप्त करून घेईल; दाता परमेश्वर ( सविता ) आम्हांला उत्तम कृपारस ( सवं ) देईल ( साविषत् ); कारण त्याची कृपा सदा जागृत असते म्हणून ती कृपा मी मागत आहें. कदाचित् धेनु म्हणजे एकादा दानशूर पुरुष असेल; अशा पुरुषापाशीं याचना केल्यास धन सहज मिळेल; त्या दानशूराची स्तुति करण्यांत जो कुशल असेल तो धनरुपी दूध त्याच्यापासून खात्रीनें काढील; असा दाता आम्हांस अतीशय ( श्रेष्ठं ) दान ( सवं ) देईल ( साविषत् ); कारण तो दाता ( घर्मः = अग्निः ) धनानें खच्चून भरला आहे ( अभि + इद्धः ); म्हणूनच ( उ ) मी धन ( तत् = सु = प्र ) मागेन ( वोचं ); पहिल्यापेक्षां हा दुसरा गूढार्थ आधिक सरस दिसतो.

**अघ्न्या ( ३१ ) अहन्तव्या भवति । अघघ्नी इति वा । तस्याः एषा भवति**

अघ्न्या = अ + घ्न्या; घ्न्या = घन्या = हन्या = हन्तव्या; जिला ठार मारूं नये अशी गाय अघ्न्या; किंवा अघ् + घ्न्या; अघ् = अघं = पाप किंवा दारिद्र्य; घ्न्या = घन्ति = हन्ति; दूध देऊन जी दारिद्र्य नाहींसें करते ती अघ्न्या. अघ्न्य ह्याचें स्त्रीलींग अघ्न्या; प्र शंसा गोषु अघ्न्यं क्रीळं यच्छर्धो मारुतम् ( १।३७।५ ) = मरुत्संघाची ( मारुतं शर्धः ) स्तुति कर; क्रीळं = क्रीडा करणाऱ्या, स्पर्धेनें धांवणाऱ्या मरुत्गणाला अघ्न्यं हें विशेषण लाविलें आहे; गोषु अघ्न्यं=गायी म्हणजे धन; ते देणाऱ्याला असा अर्थ असावा. नि अघ्न्यस्य मूर्धनि रथं चक्रस्य येमथुः (१।३०।१९) = हे अश्विनहो, तुम्ही आपल्या रथाचें एक चाक अघ्न्याच्या डोक्यावर स्थिर केलें; अघ्न्य कोण ? इषा तं वर्ध अघ्न्या पयोभिः (७।६८।९) = समृद्ध गाय जशी वासराला दुधानें वाढविते तशी तूं, हे उषे, त्याला धनानें वाढीव; एथें उषा ही अघ्न्या. अघ्न्य व अघ्न्या हीं मूळचीं विशेषणें असून पुढें तीं नामें झालीं असावींत; त्या शब्दांचा मूळ अर्थ दाता व दात्री असा असेल; गाय दूध देते म्हणून ती अघ्न्या; अघ्न्य किंवा अघ्न्या ह्याची व्युत्पत्ति देतां येत नाहीं.

## खंड ४४ वा.

**सुयवसाद् भगवती हि भूया अथो वयं भगवन्तः स्याम । अद्धि तृणमघ्न्ये विश्वदानीं पिब शुद्धमुदकमाचरन्ती ( ऋ० सं० १।१६४।४० )**

**सुयवसादिनी भगवती हि भव । अथ इदानीं वयं भगवन्तः स्याम । अद्धि तृणम् अघ्न्ये सर्वदा । पिब च शुद्धम् उदकम् आचरन्ती । तस्याः एषा अपरा भवति**

सुयवसाद् = सुयवसादिनी; सु + यवस + अद् = चांगलें गवत खाणारी; शोभनं यवसम् उदकम् अध्यात्मीकृत्य सूर्यात् ( दुर्ग ) = सूर्यापासून मिळविलेलें उत्तम उदक आत्मसात् करून; दुर्गवृत्तींत सुयवसाद् किंवा सुयवसादिनी व हि नाहीं. भूयाः = भव. भगवती = धनवती = उदकेन उदकवती ( दुर्ग ) = उदकानें म्हणजे धनानें युक्त. अथो = अथ. इदानीं अध्याहृत. विश्वदानीं = सर्वदा. तृणं = मेघं; तृद्यते इति तृणः मेघः = मेघाला तृण म्हणण्याचें कारण इंद्राकडून तो हिंसा केला गेला जातो ( दुर्ग ). अद्धि = संचूर्णय. पिब = पिब च = आणि सूर्यरश्मींनीं आणिलेलें पाणी पी (दुर्ग). आचरन्ती = आसेवन्ती अथवा सर्वतो मध्यस्थाने चरन्ती (दुर्ग). दुर्गानें केलेला अर्थः— ( १ ) हे माध्यमिक वाचे, सूर्यापासून मिळविलेल्या उदकानें तूं उदकवती हो व तूं वर्षिलेल्या उदकानें आम्ही लगेच उदकवंत होऊं; ती तूं प्रत्येक वर्षीं मेघांचें चूर्ण कर व सूर्यकिरणांनीं आणलेलें पाणी आकाशांत इतस्ततः संचार करीत असतांना किंवा त्याचें सेवन करीत करीत नेहमीं पी; ( २ ) गवत खाऊन दुधानें भरलेली हो; आम्हीही तूं दिलेल्या धनानें धनवंत होऊं; अशी आमच्यावर उपकार करणारी तूं नेहमीं गवत खा व अरण्यांत संचार करीत असतांना किंवा पाण्याची चव घेत घेत शुद्ध पाणी पी.

**सायण**:— सायणाचार्य दुर्गानें दिलेला दुसरा अर्थ देतात; हिः पूरणः प्रसिद्धौ वा = हि हा निपात पादपूरण असेल किंवा ही गोष्ट सर्वश्रुत आहे असें दर्शवीत असेल; अथो = अनंतरमेव; आचरंती = सर्वतः निर्गच्छंती = सर्वत्र हिंडणारी.

ऋचेचे दोन अर्थ आहेत; एक सायणाचार्यांनीं दिलेला; दुसरा पुढीलप्रमाणें; सुयवसाद् = सु + यव + साद्; यु = देणें; ह्यापासून यव = धन; सद् = देणें; सु = यव = धन; सुयवसाद् = अतिशय धन देणारी. भग = धन. भू = देणें. अद् = देणें; अद्धि = दे. तृ ( = देणें ) + नं = तृणं = धन. पा व पिब् ह्यांचा देणें असा अर्थ होतो. उदक ह्याचा लक्ष्यार्थ वाहणारें म्हणजे अतिशय धन. अघ्न्या = कामधेनु = धनदात्री. हे धनदात्री ( अघ्न्ये ), धनवती ( भगवती ) तूं अतिशय धन देणारी हो; तशानें आम्हीही धनवान् होऊं; धन देणारी ( आचरंती ) तूं नेहमीं ( विश्वदानीं ) पुष्कळ ( शुद्धं ) धन ( तृणं = उदकं ) देत जा ( अद्धि = पिब ).

## खंड ४५ वा.

**हिंकृण्वती वसुपत्नी वसूनां वत्समिच्छन्ती मनसाभ्यागात् । दुहामश्विभ्यां पयो अघ्न्येयं सा वर्धतां महते सौभगाय ( ऋ० सं० १।१६४।२७ )**

**इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा ).

दुर्गः— हिं कृण्वती = गडगडाट करणारी. वसुपत्नी वसुनां = उदकानाम् ईश्वरा वसूनां वा आदित्यरश्मीनां मरुतां वा = उदकाची किंवा सूर्यकिरणांची किंवा मरुतांची स्वामिनी. वत्सः = आदित्यः । मध्यस्थानो वा रसहरणात् = आदित्य किंवा उदक हरण करणारा अंतरिक्षांतील देव म्हणजे इंद्र. अश्विभ्यां = द्यावापृथिवीभ्याम् । सूर्याचंद्राभ्यां वा. दुहां = दुग्धां = प्रक्षरताम्. पयः = उदकम्. अघ्न्येयं = अघ्न्या + इयम्. दुर्गानें केलेला अर्थः— गडगडाट करणारी व वासराला शोधणारी वसूंची स्वामिनी वत्साकडे उत्साहानें ( मनसा ) येते ( आगात् ); ही अघ्न्या द्यावापृथिवी किंवा सूर्य आणि चंद्र ह्यांच्याकरितां जलाचा वर्षाव करो; आम्हांला अतिशय (महते) धन मिळावें म्हणून ( सौभगाय ) ती प्रतिवर्षीं ह्याचप्रमाणें उदकानें वाढो म्हणजे उदकपूर्ण होवो.

सायणः— ( १ ) बोलावली असतांना वासराला उद्देशून हंबारव करणारी, वासराकडे जाण्याची इच्छा मनांत धरणारी व दूध दही घृत ( वसूनां = क्षीरदध्याज्यादिबहुधनानां ) नेहमीं स्वतःपाशीं राखणारी गाय वासराकडे आली आहे; ही ती आलेली गाय ( अघ्न्या = अहननीया गौः ) आश्विनांकरितां दूध देवो; आमच्या सुखाकरितां ती नेहमीं अशीच वाढो किंवा दूध देवो ( वर्धतां ); ( २ ) पाऊस पाडण्याच्या उद्देशानें गडगडाट करणारी, गायी धान्य वगैरेंचे ( वसूनां ) पालन करणारी, वासरासारखें पालन करण्याजोग्या लोकांना ( वत्सं ) संतुष्ट करण्याची इच्छा मनांत बाळगणारी ही मेघरूप गाय आली आहे; स्तुत्य ( अघ्न्या ) अशी ती सर्वत्र असणाऱ्या ( अश्विभ्यां ) स्थावर जंगम वस्तूंच्याकरितां जल वर्षो ( दुहां ); किंवा वायु आणि सूर्य ह्यांच्यापासून ( अश्विभ्यां ) जल घेऊन तें जल पृथिवीवर वर्षो; सा वर्धतां महते सौभगाय ह्याचा अर्थ पहिल्या विवरणांत दिला आहे.

वसुपत्नी वसूनां=धनदात्री;दक्षाणां दक्षपतिः,रयिणाम् रयिपतिः व वसूनां वसुपतिः एथें दक्षपतिः=रयिपतिः=वसुपतिः=दाता; दक्षाणां = रयीणां = वसूनां = धनाचा. अघ्न्या ही धनदात्री आहे. अश्विभ्यां हें रूप ऋग्वेदांत सहा वेळां आलें असून तीन ठिकाणीं त्याचा अर्थ अश्विनांसह, एके ठिकाणीं आश्विनांकडून व दुसऱ्या एका ठिकाणीं आश्विनांना असा आहे; पण प्रस्तुत ऋचेंत त्या शब्दाचा कोणता अर्थ तें सांगतां येत नाहीं. अघ्न्या अश्विनांना दूध दोहन करो म्हणजे काय ? वसुपतिः वसूनां किंवा वसूपत्नी वसूनां हें एकाद्या देवाविषयीं किंवा देवतेविषयीं म्हणतां येईल; पण अघ्न्या ही वसुपत्नी वसूनां म्हणजे काय ? अश्विनांनीं एका गायीला ( अघ्न्यां ) धष्ट पुष्ट केलें असें म्हटलें आहे ( ७।६८।८ ); तेव्हां दुहाम् अश्विभ्यां पयः इयम् = ( ज्या अर्थी हिला आश्विनांनीं धष्ट पुष्ट केली आहे त्या अर्थी ) त्यांना म्हणजे त्यांनीं पाळलेल्या पोरक्या पोराला ही दूध देवो असा अर्थ असेल. अघ्न्या ही कामधेनु म्हणजे एकादी धनदात्री असा अर्थ केल्यास ती वसुपत्नी वसूनां असणारच. हिंकृण्वती = ( १ ) हंबरणारी, ( २ ) हि = देणें, दान; हिं धनं कृण्वती ददती = धन देणारी. वसुपत्नी वसूनां = ( १ ) वसूंची

म्हणजे वासरांची स्वामिनी ? ( २ ) धनदात्री. वत्सं = ( १ ) वासरूं, ( २ ) वत्सा-समान दरिद्री याचक. इच्छन्ती = शोधणारी; गाय वासराचा व धनदात्री दरिद्री याचकाचा शोध करीत असते. मनसा = ( १ ) मनापासून, आतुरतेनें; गाय वासराच्या शोधाला आतुरतेनें जाते; ( २ ) धनांतून. अभि आ गात् = ( १ ) ( वासरा ) कडे येते; ( २ ) अभि = अ + भि = अतिशय; आ = धन; गात् = देते. दुहां = ( १ ) दूध देवो, ( २ ) धन देवो. अश्विभ्यां = ( १ ) अश्विनांनीं पाळलेल्या पोरक्या पोराला; ( २ ) अश्वं = धन; अश्वी = धनवान्; अश्विभ्यां = धनवंत दात्या नवराबायकोला. पयः = ( १ ) दूध, ( २ ) धन; पि = देणें; पयस् = दिलेलें धन. वर्धतां = ( १ ) धष्टपुष्ट होवो, ( २ ) धन देवो. महते सौभगाय = ( १ ) तो मोठा भाग्यवान् व्हावा म्हणून; (२) आम्ही अतिशय धनवान् व्हावें म्हणून. ऋचेचे दोन अर्थः—( १ ) हंबरणारी, आतुरतेनें वासराचा शोध करणारी, पुष्कळ वासरांची आई त्याच्याकडे जाते; ती आश्विनांनीं पाळलेल्या पोरक्या पोराला दूध देवो व तो पुढें मोठा भाग्यवान् व्हावा म्हणून त्याचें दुधानें वर्धन करो; ( २ ) धन देणारी ( हिंकृण्वती = वसूनां वसुपत्नी ), दरिद्री याचकाचा शोध करणारी अशी ही अघ्न्या म्हणजे उषा आपल्या धनांतून ( मनसा ) पुष्कळ धन देते; ती ह्या धनवान् उदार नवराबायकोला धन देवो; आम्हीं धनवान् व्हावें म्हणून ती आम्हांला धन देवो. असे मीं दोन अर्थ केले आहेत; पण ते समाधानकारक नाहींत.

**पथ्या ( ३२ ) स्वस्तिः ( ३३ )। पन्थाः अन्तरिक्षम्। तन्निवासात्। तस्याः एषा भवति**

पंथाः = अंतरिक्षम्; अंतरिक्षांत राहण्यामुळें ( तन्निवासात् ) पथ्या. स्वस्ति शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान २३१ ).

## खंड ४६ वा.

**स्वस्तिरिद्धि प्रपथे श्रेष्ठा रेक्णस्वत्यभि या वाममेति।**

**सा नो अमा सो अरणे नि पातु स्वावेशा भवतु देवगोपा (ऋ० सं० १०।६३।१६)**

**स्वस्तिः एव हि प्रपथे श्रेष्ठा। रेक्णस्वती धनवती। अभ्येति या वसूनि वननीयानि। सा नः अमा गृहे। सा निरमणे। सा निर्गमने। पातु। स्वावेशा भवतु। देवी गोप्त्री। देवान् गोपायतु इति। देवाः एनां गोपायन्तु इति वा**

इत्=एव. प्रपथे=अंतरिक्षे (दुर्ग). श्रेष्ठा=प्रशस्या सर्वदेवताभ्यः (दुर्ग)=सर्व देवतांपेक्षां स्तुत्य. रेक्णस्वती = धनवती; रेक्णस्वती = धनवती उदकेन ( दुर्ग ); रेक्णस्वती भाष्यांत नको. वामं = वसूनि वननीयानि=भोगावयाचें धन; वामं = वननीयानि उदकानि ( दुर्ग ); वन संभक्तौ ( धा० १।४६४ ); वन् (= भोगणें ) ह्यापासून वाम. अमा= गृहे ( निघं० ३।४।११ ). सो = सा + उ; उ निरर्थक म्हणून गाळला आहे. नि = निरमणे कीं अरणे = निरमणे ? अरणे = अ + रणे; रणे = रमणे; अरमणे =

निरमणे; असें कदाचित् यास्कास म्हणावयाचें असेल; अरण्यांत मन रंजविणारें कांहीं नसतें म्हणून तें निरमण; नि निर्गतं रमणं यस्मात् तत् निरमणम्; अरणे = निर्गमने; अरणे = अरण्ये निर्गमने बहिर्गृहात् (दुर्ग); निः = गृहात् बहिः; घराच्या बाहेर गमन आहे ज्याचें तें अरण म्हणजे अरण्य; अर् = जाणें; अरणं = गमनं; घराबाहेर गेलेलें म्हणून अरण्याला अरण हें नांव; अरण्य गांवापासून दूर गेलेलें असतें; निरमणे दुर्गवृत्तींत नाहीं. स्वावेशा = सूपचरणा ( दुर्ग ) = चांगलें साहाय्य करणारी. देवगोपा = देवी गोप्त्री = रक्षण करणारी देवी; किंवा देव = देवान्; गोपा = गोपायतु; ती देवांचे म्हणजे हवि देणाऱ्यांचें रक्षण करो ( दुर्ग ); किंवा देव = देवाः; एनां अध्याहृत; गोपा = गोपायन्तु; माध्यमिक देव किंवा द्युलोकांतलें सूर्यकिरण हिचें रक्षण करोत; ह्या दोन इच्छा ऋषीच्या मनांत असल्यामुळें तो पथ्या स्वस्ति हिला देवगोपा म्हणतो. दुर्गानें केलेला अर्थः—अंतरिक्षांतील देवतांमध्यें अति स्तुत्य व धनवान् अशी जी स्वस्ति म्हणजे माध्यमिका वाक् संभोग्य ( वामं ) उदकाकडे जाते म्हणजे अंतरिक्षांत तें जल सांठविते तीच माध्यमिका वाक् आमच्या घरीं, तीच रानांत किंवा परदेशांत आमचें रक्षण करो; ती पालन करणारी देवी आमच्याकडून उत्तम रीतीनें सेविली जावो; किंवा देवगोपा = ती माध्यमिका वाक् हवि देणाऱ्यांचें रक्षण करो किंवा अंतरिक्षांतील देव तिचें रक्षण करोत.

**सायणः**—जी पृथिवी ( या ) बाहेर जायाला निघालेल्या लोकांच्या मार्गाला ( प्रपथे ) सुखकरच ( स्वस्तिः इत् ) होते व जी अतिशय स्तुत्य ( श्रेष्ठा ) व धनवंत (रेक्णस्वती) असून उत्तरवेदीचें रूप घेऊन भोग्य (वामं) यज्ञाकडे जाते (अभि + एति ) ती आमच्या घराचे ( अमा ) रक्षण करो ( नि पातु ) व जेथें आम्हांला जावयाचें आहे अशा देशांत(अरणे)किंवा जेथें कांहीं रमणीय नाहीं अशा अरण्यांत (अरमणे ) आमचें रक्षण करो; देव जिचें रक्षण करतात अशी ती पृथिवी राहण्याकरितां सुखकर ( स्वावेशा ) होवो. प्रपथे = प्रकृष्टाय मार्गाय = लांब जाणाऱ्या मार्गाला; स्वस्तिः = क्षेमकारिणी; श्रेष्ठा = प्रशस्यतमा; वामं = वननीयं यज्ञम्; सो = सा + उ = सा एव; अरणे = गंतव्ये देशे। अरमणे अरण्यादिके देशे वा; स्वावेशा = शोभन निवासा.

स्वस्ति = स्व + स्ति; स्व = स्ति = धन; धन देणारी देवता ती स्वस्ति. यूयं नो० स्वस्तिं दधात ( २।२९।३ ) = हे मित्रादि देवांनो, आम्हांस पुष्कळ धन द्या. आ ते स्वस्तिमीमहे आरेअघामुपावसुम् ( ६।५६।६ ) = हे पूषा, जिच्यापासून दारिद्र्य दूर असेल ( आरेअघां ) व जिच्यांत धन भरलें असेल ( उपावसुं ) अशी धनसमृद्धि ( स्वस्तिं ) तुजपासून ( ते ) आम्ही मागत आहों ( ईमहे ). स इयानः करति स्वस्तिमस्मा इषमूर्जं सुक्षितिं विश्वमाभाः ( १०।७।१२ ) = याचना केलेला (इयानः) तो त्याला धन ( स्वस्तिं = इषं = ऊर्जं = सुक्षितिं ) देतो ( करति = आभाः ). अर्कैः स्वस्तिमीळे सख्याय देवीम् ( ४।५५।३ ) = धनवान् व्हावें म्हणून ( सख्याय ) मी

स्तुतींनीं ( अर्कैः ) स्वस्तिदेवीला याचना करतों ( इळे ). श्रेष्ठा = ( १ ) सर्व देवांत अत्युत्तम; ( २ ) अतिशय; श्रेयान् व श्रेष्ठ ह्यांत मूळ शब्द श्र दिसतो पण तसा शब्द ऋग्वेदांत नाहीं; श्री ह्यांत श्र शब्द असावा; श्र = धन; श्रीः = धनवान् लक्ष्मी; श्रेष्ठा = धनानें भरलेली; वामं = ( १ ) धन, ( २ ) हवि; वाम शब्दाचा धन हा अर्थ बहुतेक ठिकाणीं आहे; तो शब्द वम् पासून झाला आहे ह्यांत संशय नाहीं; वम् = धन किंवा हवि देणें; वम्+रः = वम्रः; स्तवानो वम्रः विजघान संदिहः (१। ५२।९); एथें इंद्राला वम्र म्हणजे धनदाता म्हटलें आहे. वम्रं० उपस्तुतं ( १। ११२।१५ ) = हवि देणाऱ्या स्तोत्याला. वम्रकः पद्भिः उप सर्पदिंद्रम् (१०।९९। १२ ) = हवि देणारा हवींसह इंद्राकडे गेला. वन् पासून वाम असें यास्क म्हणतो त्याचें कारण धातुपाठांत वम् = ओकणें असा अर्थ आहे; ओकण्याचा धनाशीं किंवा उदकाशीं कांहीं एक संबंध नाहीं म्हणून वन् = भोगणें हा धातु. एक ऋचा खेरीज करून रेक्णस् = धन असा अर्थ सर्वत्र आहे; शुचि यत्ते रेक्णः आयजन्त सबर्दुघायाः पय उस्रियायाः (१।१२१।५)=जेव्हां देव तुला गायीचें झळकणारें दूध (रेक्णः=पयः) देते झाले (आयजन्त); रेक्णस्वती=(१)जिच्याजवळ दूध आहे अशी, (२) धनवती. प्रपथ= (१) लांबची वाट किंवा प्रवास, (२) प्र=पथ = धन; प्रपथे = धनभांडारांत. (१) आयुः विश्वायुः परि पासति त्वा पूषा त्वा पातु प्रपथे पुरस्तात् ( १०।१७।४ ) = हे मृता, ज्याच्या स्वाधीन सर्व प्राण्यांचें आयुष्य आहे ( विश्वायुः ) असा अग्नि ( आयुः ) तुझें रक्षण सर्वतोपरी करीतच आहे; पुढच्या ( पुरस्तात् ) लांबच्या प्रवासांत ( प्रपथे ) पूषा तुझें रक्षण करो. याहि प्रपथिन् अवसोप मद्रिक् ( ६।३१।५ ) = हे धनवंता ( प्रपथिन् ) इंद्रा, मजकडे ( उप मद्रिक् ) धनासहित ( अवसा ) ये. अमा = (१) घरीं, स्वदेशीं किंवा स्वतःच्या गांवीं; ( २ ) अम = धन ( पान ७९० ); अमा = अमेन = धनानें. ( १ ) न हि तेषाम् अमा चन नाध्वसु वारणेषु । ईषे रिपुः अघशंसः ( १०।१८५।२ ) = त्यांच्यावर स्वतःच्या गांवीं किंवा प्रवासांत किंवा परदेशांत ( अरणेषु ) दुष्ट ( अघशंसः ) शत्रु आपली सत्ता चालवूं शकत नाहीं. अमा ह्याच्या उलट अरणे. अरणे = ( १ ) परदेशीं, ( २ ) अरणे = अ + रणे; रण = मनोरंजक वस्तु, धन; अरणे = धनाच्या अभावीं म्हणजे दारिद्र्यांत. नि पातु = ( १ ) रक्षण करो, ( २ ) नि = धन; पातु = ददातु. स्वावेशा = ( १ ) विश्रांतियुक्त म्हणजे विश्रांति किंवा स्वास्थ्य देणारी; ( २ ) सु धनम् आविशति ददाति असौ स्वावेशा = धन देणारी; पवमान० विश्वा वसूनि आ विश ( ९।६५।२ ) = हे सोमा, अतिशय धन दे. वास्तोष्पते० स्वावेशो अनमीवो भवा नः ( ७।५४।१ ) = ( १ ) हे वास्तोष्पति, आम्हांला विश्रांति देणारा ( स्वावेशः ) व रोगराई घालविणारा ( अनमीवः ) हो; ( २ ) हे धनदात्या ( वास्तोष्पते ), धनवान् ( स्वावेशः ) व दारिद्र्य घालविणारा ( अनमीवः ) तूं धन ( नस् ) दे ( भव ). देवगोपा = ( १ ) देवांचें रक्षण करणारी; ( २ ) धन ( देव ) देणारी ( गोपा ). ऋचेचे दोन अर्थः—

स्वतःपाशीं दूध बाळगणारी ( रेक्णस्वती ) व त्या दुधानें लांबच्या प्रवासांत रक्षण करणारी अशी स्वस्तिदेवी हीच सर्व देवांत श्रेष्ठ आहे; जी ( या ) आमचा हवि घेण्यासाठीं ( वामं ) येते ( अभि एति ) ती आमच्या गांवीं ( अमा ) आमचें रक्षण करो; तीच ( सा + उ ) आमचें परदेशीं रक्षण करो; देवांचें रक्षण करणारी ती आम्हांस स्वास्थ्य देणारी (स्वावेशा) होवो; ( २ ) धनवती ( श्रेष्ठा = रेक्णस्वती ) जी धनदात्री ( स्वस्तिः ) आमच्या धनभांडारांत ( प्रपथे ) अतिशय ( अभि ) धन ( इत् = हि = वामं ) देते (एति ) ती आपल्या धनांतून (अमा ) आम्हांला धन ( नि ) देवो (पातु); तीच आम्हांस दारिद्र्यांत ( अरणे ) धन देवो; ती आम्हांस धन देणारी ( स्वावेशा= देवगोपा ) होवो. प्रस्तुत ऋचेंत पथ्या शब्द नाहीं; तो प्रपथे या शब्दांतून घ्यावयाचा असेल. निघंटुकारानें सोमयागांतील पथ्या स्वस्तिः हे शब्द निघंटूंत घातले असावेत. सोमयागांत आरंभीं प्रायणीय नांवाची इष्टि व शेवटीं उदयनीय नांवाची इष्टि करावयाची असते. यज्ञपुरुष नाहींसा झाल्यामुळें देव गोंधळले, त्यांना कांहीं करतां येईना व तो कोठें गेला हें समजेना; तुझ्या साहाय्यानें तो कोठें गेला आहे हें आम्हांला कळेल असें ते अदितीला म्हणाले; तेव्हां सोमयाग सुरू करतांना व तो याग संपतांना जर तुम्ही मला चरु दिलांत तर मी तुम्हांला यज्ञपुरुष कोठें गेला आहे तें सांगेन; तें त्यांनीं कबूल केलें; तिनें दुसरा वर मागितला; तुम्हांला दिशाभूल झाली आहे; माझ्या साहाय्यानें पूर्व, अग्नीच्या साहाय्यानें दक्षिण, सोमाच्या साहाय्यानें पश्चिम व सवित्याच्या साहाय्यानें उत्तर दिशा तुम्ही जाणाल; म्हणून आम्हां चौघांना तुम्ही चरु दिला पाहिजे. अदिति हीच पथ्या; ह्या पथ्येला हवि दिल्यानें सूर्य पूर्वेस उगवून पश्चिमेस अस्त पावतो. पथ्यां यजति ह्याबद्दल पथ्यां स्वस्तिं यजति असें म्हणावयास पाहिजे; तथापि भीमसेनाला जसे नुसते भीम म्हणतात तसें पथ्यास्वस्तीला नुसते पथ्या म्हटलें आहे. ही कथा ऐतरेय ब्राह्मणांत सांगितली आहे ( २।१ ). दिशाभूल संबंधानें अशीच एक कथा तैत्ति० सं० ( ६।१।५।१ ) व काठक सं० ( २३।८ ) ह्यांत आहे; पथ्यां स्वस्तिम् अयजन् । प्राचीमेव तया दिशं प्राजानन् ( तैत्ति० सं० ६।१।५।२ ) = देवांनीं पथ्या स्वस्तीला हवि दिला व तिच्या साहाय्यानें पूर्वदिशा कोणती तें त्यांना कळलें. पथ्या एव इतः स्वस्त्या प्रयन्ति पथ्यां स्वस्तिम् अभ्युद्यन्ति ( ऐत० ब्रा० १।११ ) = प्रायणीय इष्टींत पथ्या स्वस्तीला चरु देऊन सोमयागाला आरंभ करतात व उदयनीयांत तिलाच चरु देऊन सोमयागाची समाप्ति करतात. स्वस्ति नः पथ्यासु धन्वसु ( १०।६३।१५ ) ही अनुवाक्या व प्रस्तुत ऋचा ही याज्या या दोन्ही ऋचांत पथ्या स्वस्तिः असे शब्द नाहींत. यास्कानें अथैभ्यः पथ्या स्वस्तिः प्रारोचत । ताम् अयजन्त । वाक् वैपथ्या स्वस्तिः वाक् यज्ञः ( शत० ब्रा० ३।२।३।८ ), वाक् पथ्या स्वस्तिः यत् पथ्यां स्वस्तिं यजति वाचम् एव तत् संभरयति ( काठक सं० २३।८ ) असा एकादा यजुर्वेदांतील मंत्र द्यावयास पाहिजे होता.

पुनर्नः पूषा पथ्यां या स्वस्ति ( १०।५९।७ ) ह्या ऋचेंत पथ्यां व स्वस्तिः हे शब्द आहेत; अशी ऋचा देण्यांत कोणती हरकत होती ?

**उषाः ( ३४ ) व्याख्याता ( निरु० २।१८ )। तस्याः एषा भवति**

उषस् शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान १२९ ).

## खंड ४७ वा.

**अपोषा अनसः सरत्संपिष्टादह बिभ्युषी। नि यत्सीं शिश्नथद्वृषा ( ऋ० सं० ४।३०।१० )**

**अपासरत् उषाः अनसः संपिष्टात् मेघात् बिभ्युषी। अनः वायुः। अनितेः। अपि वा। उपमार्थे स्यात्। अनसः इव। शकटात् इव। अनः शकटम्। आनद्धम् अस्मिन् चीवरम्। अनितेर्वा जीवनकर्मणः। उपजीवन्ति एनत्। मेघः अपि अनः एतस्मादेव। यत् निरशिश्नथत् वृषा। वर्षिता मध्यमः। तस्याः एषा अपरा भवति**

अप + सरत् = अपासरत् = अपासर्पत् ( दुर्ग ). संपिष्टात् = संपिष्टात् मेघात् = चुराडा केलेल्या मेघापासून; संपिष्टात् बिभ्युषी हे शब्द वृत्तींत न घालतां त्यांचा अर्थ दुर्ग देतो. अनः = वायुः; वायूला अनस् म्हणण्याचें कारण तो श्वासोच्छ्वास करतो ( अनिति ) म्हणजे वाहतो; अनिति = श्वासोच्छ्वास करतो; अनिति हें क्रियारूप नाम समजून अनितेः ही त्याची पंचमी केली आहे. किंवा अनसः = अनसः इव अशी उपमा ( उपमार्थे ) असेल; अनसः इव = शकटात् इव = जसा (मोडलेल्या) शकटापासून मनुष्य दूर होतो तशी ( मेघावर बसलेली उषा मेघाचा चुराडा झाल्याबरोबर दूर सरली ). अनः = शकटम्; अनस् = अ + नस्; अ = आ; नस् = नद्धम्; शकटाला अनस् म्हणण्याचें कारण त्याच्यावर कपडा ( चीवरं ) तट्यासारखा बांधला असतो; किंवा गाडीवाले त्याच्यावर ( एनत् ) आपली उपजीविका करतात ( उपजीवन्ति ); अन प्राणने ( धा० २।६० ); उपजीविका करणें ह्या अर्थ प्राणन ह्यापासून काढला असेल. मेघ ह्या अर्थी अनस् शब्द ह्याच धातूपासून म्हणजे अन् ( = उपजीविका करणें ) ह्यापासून; मेघाला अनस् म्हणण्याचें कारण त्यांतील उदकावर सर्व प्राणी आपली उपजीविका करतात. अनः वायुः अनितेः एवढीच व्युत्पत्ति दुर्ग देतो. नि + शिश्नथत् = निरशिश्नथत् = निर्जघान = निर्हन्ति ( दुर्ग ). अह व सीं अनर्थक म्हणून गाळले आहेत. वृषा = वर्षिता मध्यमः; मध्यमः बद्दल दुर्गवृत्तींत वायुः आहे. दुर्गानें केलेला अर्थः— जेव्हां ( यत् ) पाऊस पाडणारा वायु ( वृषा ) मेघाला ठार करतो तेव्हां वायूनें ( अनसः ) चुराडा केलेल्या ( संपिष्टात् ) मेघापासून उषा भ्यालेली ( बिभ्युषी ) दूर सरते.

**सायणः**— वृषा = कामानां वर्षिता इंद्रः; सीं = एतत उषःसंबंधि शकटं = ह्या उषेची गाडी; बिभ्युषी = इंद्रसकाशात् भीता = इंद्राला भ्यायलेली; संपिष्टात् अनसः = इंद्रानें चुराडा केलेल्या गाडीपासून; अपसरत् = अपजगाम = दूर गेली.

सायणाचार्यांनीं केलेला अर्थ बरोबर आहे; ह्या ऋचेच्या आधींच्या ऋचेंत उषासमिंद्र सं पिणक् ( = हे इंद्रा, तूं उषेला चुरडून टाकलेस ) असें म्हटलें आहे; तेव्हां सीं = उषेला असा अर्थ असावा असें प्रथमदर्शनीं वाटतें; पण सीं म्हणजे शकट असा अर्थ करण्यास हरकत नाहीं. श्नथ् = ठोकणें. अप श्वानं श्नथिष्टन सखायो दीर्घजिह्वयम् (९।१०१।१) = हे मित्रांनो, ह्या लांब जिभेच्या कुत्र्याला ठोकून हाकून लावा. नि दुर्गे इंद्र श्नथिहि अमित्रान् (७।२५।२) = हे इंद्रा, दुर्गम्य प्रदेशांत असलेल्या शत्रूंना ठोकून चीत कर. प्रस्तुत ऋचेंत निशिश्नथत् = ठोकून (गाडीचा) चुराडा केला असा अर्थ योग्य दिसतो. वृषा = बैलासारखा दांडगा. जेव्हां बैलासारख्या दांडग्या इंद्रानें गाडीचा चुराडा करून टाकला तेव्हां भ्यायलेली उषा त्या चुराडा केलेल्या गाडीपासून दूर पळून गेली.

## खंड ४८ वा.

**एतदस्या अनः शये सुसंपिष्टं विपाश्या ।**
**ससार सीं परावतः ( ऋ० सं० ४।३०।११ )**

**एतत् अस्याः अनः आशेते सुसंपिष्टम् इतरत् इव । विपाशि विमुक्तपाशि । ससार उषाः परावतः । प्रेरितवतः । परागताद्वा**

आ + शये = आशेते = आतत्य पृथिव्यां शेते = पृथिवीवर पसरून निजतें म्हणजे पडलें आहे. अनः = मेघः (दुर्ग). सुसंपिष्टं = पार चुराडा केलेला. इतरत् इव (अध्याहृत) = एखाद्या गाडीप्रमाणें; विपाश्या = विपाशि + आ (शये); विपाशि = विमुक्तपाशि; विपाशि = छिन्नसर्वपाशबंधनम् (दुर्ग) = ज्याचीं दोऱ्यांसारखीं सर्व बंधनें तुटलीं आहेत असा; विगताः पाशाः विद्यंते अस्य तत् विपाशि = तुटून गेलेलीं बंधनें आहेत ज्याचीं असें अनस्; यास्क व दुर्ग विपाशिन् असा मूळ शब्द घेऊन विपाशि हें त्याचें प्रथमेचें एकवचन मानतात. सीं = उषाः. परावतः = प्रेरितवतः = हांकलून देणाऱ्या इंद्रापासून; प्र + ईर् = हांकलून देणें; प्रेरितवान् = हांकलून देणारा (इंद्र); किंवा परावतः = परागतात् = दूर गेलेल्या मेघापासून; उषा म्हणजे माध्यमिका वाक् इंद्रानें हांकून दिल्यामुळें दूर जाते किंवा चुराडा झालेल्या मेघापासून दूर होते. दुर्गवृत्तींत प्रेरितवतः परागताद्वा नाहीं; परावतः = दूरात् दूरतरं (दुर्ग) = पार दूर. दुर्गानें केलेला अर्थः—ज्याचीं बंधनें तुटलीं आहेत असा ह्या माध्यमिक वाचेचा (अस्याः) मेघरूपी गाडा हा (एतत्) पहा पृथिवीवर शुष्क होऊन पडला आहे व ती (सीं) अगदीं दूर गेली आहे म्हणजे नाहीशीं झाली आहे.

**सायणः**—अनः = शकटम्; विपाशि = विपाश नांवाच्या नदींत म्हणजे त्या नदीच्या तीरावर; आशये = आसमंतात् शेते; परावतः = दूर देशात् = दूर देशांकडे.

परावतः = तीन स्वर्गांकडे; प्रवत् परावत् हे शब्द पहा (पानें ७८३–७८४). आपली गाडी पार चुरडून जाऊन विपाश नदींत पडल्यामुळें आपल्याला

मार बसेल ह्या भीतीनें उषा स्वर्गाकडे पळ काढते. सूर्य व इंद्र ह्यांच्यामध्यें म्हणजे त्यांच्या अनुयायांमध्यें एकेकाळीं मोठें वैर होतें; इंद्र सूर्याच्या रथाचें चाक थांबवितो किंवा मोडून टाकतो असें कांहीं ऋचांत म्हटलें आहे; उषा हें सूर्याचेंच एक रूप असल्यामुळें सूर्याप्रमाणें इंद्र उषेवरही आपला राग चालवितो. ४।३० ह्या सूक्ताच्या पहिल्या सात ऋचांत इंद्रानें देवांशीं लढाया करून त्यांना जिंकलें व सूर्याचा नाश केला असें सांगून आठव्या ऋचेंत हे इंद्रा, केवढें तुझें शौर्य! द्यूच्या मुलीला तूं ठोकलेस ना! असा इंद्राचा उपहास केला आहे. ९, १० व ११ ह्या ऋचांत ह्याच पराक्रमाचें वर्णन केलें आहे. नंतर १२ ते २४ ह्यांत पुन्हां गंभीरपणें इंद्राची शूर कृत्यें वर्णिलीं आहेत. तेव्हां आठ ते बारा ह्या ऋचा त्या सूक्तांत कोणीं तरी उपहासाकरितां घुसडल्या असाव्यात असा संशय येतो.

**इळा ( ३५ ) व्याख्याता ( निरु० ८।७ ) । तस्याः एषा भवति**

इळः ह्याची व्युत्पत्ति पहा ( पान ६०८ ).

## खंड ४९ वा.

**अभि न इळा यूथस्य माता स्मन्नदीभिरुर्वशी वा गृणातु ।**
**उर्वशी वा बृहद्दिवा गृणानाभ्यूर्ण्वाना प्रभृथस्यायोः ( ऋ० सं० ५।४१।१९ )॥**
**सिषक्तु न ऊर्जव्यस्य पुष्टेः ( ऋ० सं० ५।४१।२० )**

**अभिगृणातु नः इळा। यूथस्य माता। स्मत् अभि नदीभिः उर्वशी वा गृणातु। उर्वशी वा। बृहत् दिवा। महत् दिवा। गृणाना। अभ्यूर्ण्वाना। प्रभृथस्य प्रभृतस्य। आयोः अयनस्य। ज्योतिषो वा। उदकस्य वा। सेवतां नः अन्नस्य पुष्टेः**

अभि + गृणातु = अभिगृणातु = अभिशब्दयतु (दुर्ग). यूथस्य माता=मेघयूथस्य निर्मात्री मध्यमा (दुर्ग)=मेघसमूह निर्माण करणारी माध्यमिका वाक्; महाराष्ट्रपाठांत यूथस्य माता ह्याच्यानंतर सर्वस्य माता हे शब्द आहेत; यूथस्य = सर्वस्य. स्मत् = अभि; नदीभिः = नदनाभिः अद्भिः ( दुर्ग ). स्मत् गृणातु = अभिस्तनयतु ( दुर्ग ). दुसऱ्या अर्धातील उर्वशी वा = उर्वशी इव. बृहत् दिवा = महत् दिवा; उर्वशी इव बृहत् महत् गृणातु दिवा द्योतनवता विद्युत्साहितेन उदकसमूहेन ( दुर्ग ) = उर्वशीप्रमाणें विजेसहित असणाऱ्या उदकसमूहानें मोठ्यानें गडगडाट करो; बृहद्दिवा हा शब्द यास्कानें समास मानला होता किंवा बृहत् दिवा अशीं त्यानें वेगळीं पदें केलीं होतीं तें सांगतां येत नाहीं; कदाचित् बृहद्दिवा महद्दिवा ह्या शब्दांवरून बृहद्दिवा हा त्यानें समास मानिला असेल; दुर्ग बृहत् दिवा अशीं दोन पदें करतो; पदपाठ बृहत्ऽदिवा असा आहे म्हणजे तो शब्द समास आहे. गृणाना = गृणातु (दुर्ग). अभ्यूर्ण्वाना = अभि + ऊर्ण्वाना = सर्वम् इदम् अभिप्रच्छादयन्ती. प्रभृथस्य = प्रभृतस्य; प्रभृथस्य = प्रकर्षेण संभृतस्य ( दुर्ग ). आयोः = अयनस्य = गमन शीलस्य उदकस्य

समूहेन (दुर्ग); दुर्गवृत्तींत ज्योतिषो वा व उदकस्य ह्याच्या नंतरचा या नाहीं. १०।४१ ह्यांत आयोः अयनस्य मनुष्यस्य। ज्योतिषो वा। उदकस्य वा (पान ८३८) हें शब्द आहेत; ते प्रक्षेपकार्ने मनुष्यस्य हा शब्द वगळून भाष्यांत घातले; अयनस्य बद्दल महाराष्ट्रपाठ मनुष्यस्य असा आहे. सिषक्तु = सेवताम्. उर्जव्यस्य = अन्नस्य; उर्जव्यस्य पुष्टेः = यवादेः अन्नस्य पोषणाय (दुर्ग) = यव वगैरे धान्य वाढविण्याकरितां. दुर्गानें केलेला अर्थः—जिला इळा किंवा उर्वशी म्हणतात अशी मेघसमूह (यूथस्य) निर्माण करणारी (माता) माध्यमिका वाक् आवाज करणाऱ्या पावसाच्या पाण्यानें (नदीभिः) गडगडाट करो (अभिगृणातु); उर्वशीप्रमाणें (उर्वशी वा) विजेनें भरलेल्या उदकसमूहानें (दिवा) सर्व झांकून टाकणारी (अभ्यूर्ण्वाना) ती मोठ्यानें (बृहत्) गडगडाट करो (गृणाना); जोरानें आणलेल्या (प्रभृतस्य) वर्षणाऱ्या उदक समूहानें (आयोः) ती आमचें धान्य (उर्जव्यस्य) वाढावें म्हणून (पुष्टेः) आम्हांस साहाय्य करो (सिषक्तु).

**सायण**:—गाईंचे कळप निर्माण करणारी भूमि किंवा गोरूप धारण करणारी मनूची मुलगी किंवा मरुतांना निर्माण करणारी माध्यमिका वाक् (इळा) अथवा (वा) माध्यमिका वाक् (उर्वशी) गंगा वगैरे नद्यांसह (नदीभिः) आमची म्हणजे आमच्या यज्ञाची योग्य (स्मत् = प्रशस्तं) स्तुति करो (अभिगृणातु); किंवा (वा) अतिशय प्रकाशणारी (बृहद्दिवा = प्रभूतदीप्तिः), आमच्या यज्ञाची प्रशंसा करणारी (गृणाना) व पुष्कळ प्रकाश किंवा उदक घेऊन (प्रभृथस्य = तेजसः वा उदकस्य वा दानेन) यजमानाला (आयोः = आयुं) आच्छादन करणारी (अभ्यूर्ण्वाना) म्हणजे रक्षण करणारी किंवा हवींनीं युक्त (प्रभृथस्य = प्रभरणवतः) यजमानाचा (आयोः) यज्ञ आच्छादणारी म्हणजे सफल करणारी उर्वशी प्रजा पोषण करणाऱ्या (पुष्टेः = पोषकस्य) उर्जव्य नांवाच्या राजाच्या आश्रितांना आम्हांला साहाय्य करो (सिषक्तु). प्रत्येक आप्रीसूक्तांतील एका ऋचेंत इळा, सरस्वती व भारती अशा तीन देवींची स्तुति केली असते; त्याच तीन देवी प्रस्तुत ऋचेंत असाव्यात. इळा = (१) गाय, (२) हवि, (३) सोम, (४) धन, (५) पाऊस, (६) भूमि; गाय ह्या अर्थापासून बाकीचे पांच अर्थ निघाले असावेत; गायीपासून निघालेल्या दुधाचा व घृताचा हवि दिला जातो म्हणून इळा = हवि; गायींचें दूध सोमरसांत मिसळतात म्हणून इळा = सोम हवि; गाय हें धनाचें एक चिन्ह म्हणून इळा = धन; गायीच्या कासेंतून जसें दूध तसा द्यूपासून पाऊस (इळा) म्हणून इळा = पाऊस; पृथिवी ही लक्षणेनें गाय; इळादेवी पहिल्या प्रथम गाय असेल म्हणूनच तिला यूथस्य माता (= गायींची किंवा बैलांची आई) असें म्हटलें आहे. यूथस्य माता इळा नः अस्मभ्यम् अभिगृणातु = गायींच्या कळपाची आई जी इळा ती आम्हांस धन देवो. उर्वशी हा मूलतः स्त्रीवाचक शब्द असून नंतर तो विशेषनाम बनला असावा;उतासि मैत्रावरुणो वसिष्ठ उर्वश्यां ब्रह्मन् मनसोऽधि जातः(७।३३।११);

एथें वसिष्ठ उर्वशीपासून जन्मला असें म्हटलें आहे; ही पुरूरव्याच्या उर्वशीहून भिन्न असावी; प्रस्तुत ऋचेंत सरस्वती ही उर्वशी. स्मन्नदीभिः उर्वशी वा गृणातु हा पाद छंदाच्या दृष्टीनें स्मन्नदी उर्वशी वा गृणातु असा दहा अक्षरांचा पाहिजे; कारण पहिल्या पादांत दहाच अक्षरें आहेत; उर्वशी म्हणजे सरस्वती ही नदी; स्मन्नदी हा समास आहे; स्मत् = प्रशस्त, मोठी, अतिशय; स्मन्नदी = प्रशस्त नदी. स्मदूभ्नीः ( १।७३। ६ ) = ज्यांची कास मोठी आहे अशा ( गायी ); स्मदभीशू ( ८।२५।१४ ) = ज्यांचे लगाम उत्तम आहेत असे ( दोन घोडे ); स्मद्रातिषाचः ( ८।२८।२ ) = अती· शय ( स्मत् ) धन ( राति ) देणारे ( साचः ). स्मन्नदी उर्वशी वा अभिगृणातु = किंवा प्रशस्त नदी जी सरस्वती ती आम्हांस धन देवो. दुसऱ्या अर्थांतील उर्वशी ही भारती. बृहन् द्यौः यस्याः सा बृहद्दिवा = जिच्याजवळ अतीशय धन आहे अशी; बृहद्दिवा० रोदसी ( २।३१।४ ) = अत्यंत धनवान् तरुणी; सरस्वती बृहद्दिवा ( ५। ४२।१२ ) = अत्यंत धनवान् सरस्वती; भेजानासो बृहद्दिवस्य रायः आकाय्यस्य दावने पुरुक्षोः ( ४।२९।५) = अतीशय (बृहद्दिवस्य = आकाय्यस्य = पुरुक्षोः ) धनाच्या ( रायः ) दानसमर्थी ( दावने ) धन वाटून घेणारे ( भेजानासः ). ऊर्णु = आच्छादणें; अभि + ऊर्णु = ( धनानें ) सर्व बाजूंनीं आच्छादणें; अभि + उर्ण्वाना = धनानें सर्व बाजूंनीं आच्छादून टाकणारी म्हणजे अतिशय धन देणारी. भृ = देणें; भृ + थ = भृथ = दान, धन; प्र + भृथ = अतिशय धन; विश्वे सन्वन्तु प्रभृथेषु वाजं ( १।१२२।१२ ) = विश्वेदेव ( विश्वे ) आमच्या धनभांडारांत ( प्रभृथेषु ) धन ( वाजं ) देवोत ( सन्वन्तु ). यु = देणें, दान, धन. तं नो अग्ने मघवद्भ्यः पुरुक्षुं रयिं नि वाजं श्रुत्यं युवस्व ( ७।५।९ ) = हे अग्नि, अतीशय ( तं = पुरुक्षुं = श्रुत्यं ) धन ( रयिं = वाजं ) हवि देणाऱ्यांना ( मघवद्भ्यः ) दे ( नि युवस्व ). शं योः ही जोडी पुष्कळ ऋचांत येते; योः ही यु शब्दाची पंचमी किंवा षष्ठी असून त्या शब्दाचा अर्थ धनांतून किंवा धन असा आहे. आ+यु=पुष्कळ धन. ऊर्जव्य शब्द वसव्य शब्दासारखा आहे; बहु ते वसव्यं ( २।१३।१३ ) = तुजजवळ पुष्कळ धन आहे; अग्निरीशे वसव्यस्य अग्निर्महः सौभगस्य ( ४।५५।८ ); एथें वसव्य = सौभग = अतिशय धन. अश्व्यस्य त्मना रथस्य पुष्टेः नित्यस्य रायः पतयः स्याम (४। ४१।१० ); रथस्य = पुष्टेः = रायः = धनाचे. स एषु द्युम्नं पीपयत् स वाजं स पुष्टिं याति जोषमा चिकित्वान् ( १।७७।५ ) = दाता ( चिकित्वान् ) अग्नि त्या गोत- मांना ( एषु ) धन ( द्युम्नं = वाजं = पुष्टिं = जोषं ) देतो ( पीपयत् = याति ). प्रभृथस्य = आयोः = ऊर्जव्यस्य = पुष्टेः = धन; ऋग्वेदांत कधीं कधीं षष्ठी द्विती- यार्थी असते. सच् = देणें; यो रेवान् यो अमीवहा वसुवित् पुष्टिवर्धनः । स नः सिषक्तु यस्तुरः ( १।१८।२ ) = जो धनवान् असून दारिद्र्य घालविणारा ( अमीवहा ) दाता ( वसुवित् = पुष्टिवर्धनः = तुरः ) आहे तो आम्हांस धन देवो ( सिषक्तु ). उर्वशी वा बृहद्दिवा० ऊर्जव्यस्य पुष्टेः = अथवा अतीशय धनवान् ( बृहद्दिवा ) व

दावी ( गृणाना = अभ्यूर्वाना ) भारती ( उर्वशी ) आम्हांस ( नः ) अतीशय धन देवो.

**रोदसी ( ३९ ) रुद्रस्य पत्नी । तस्याः एषा भवति**

रोदसी = रुद्रस्य पत्नी. रोदसी = रुद्रस्य पत्नी मरुतां माता । यद्वा । रुद्रः वायुः । तत्पत्नी माध्यमिका देवी ( सायण ).

## खंड ५० वा.

**रथं नु मारुतं वयं श्रवस्युमा हुवामहे ।**

**आ यस्मिन् तस्थौ सुरणानि बिभ्रती सचा मरुत्सु रोदसी ( ऋ० सं० ५। ५६।८ )**

**रथं क्षिप्रं मारुतं वयं श्रवणीयम् आह्वयामहे ।**

**आ यस्मिन् तस्थौ सुरमणीयानि उदकानि बिभ्रती सचा मरुद्भिः सह रोदसी रोदसी**

नु=क्षिप्रम्. श्रवस्युं=श्रवणीयं = यशस्वी किंवा प्रख्यात. मारुतं=मरुतांनीं युक्त (दुर्ग); महाराष्ट्रपाठांत मारुतं नंतर मेघं आहे. आ हुवामहे=आह्वयामहे. सुरणानि=सुरमणीयानि उदकानि. सचा मरुत्सु = मरुभ्दिः सह. भाष्यांत आ हा उपसर्ग तस्थौ याला जोडावयास पाहिजे होता. रोदसी रोदसी ही द्विरुक्ति अध्याय संपला हें दाखविण्याकरितां. दुर्गानें केलेला अर्थ :— ज्या गतिमान् रथांत म्हणजे मेघांत अतिशय रमणीय उदक धारण करणारी रोदसी मरुतांसह बसते अशा त्या प्रख्यात रथाला म्हणजे मेघाला उदक वर्षण करण्याकरितां आम्ही बोलावीत आहोंत. जरी दुर्ग रोदसी म्हणजे माध्यमिका वाक् असें म्हणत नाहीं तथापि त्याच्या मनांत तो अर्थ असावा.

**सायण**:— वयं = अत्रिकुलांतले आम्ही; रथं = गतिमान् ( मेघ ); श्रवस्युं = अन्नेच्छुं = अन्नाची इच्छा करणारा ( मेघ ); मेघ अन्नाची म्हणजे उदकाची इच्छा करतो.

ऋतावरी दिवो अर्कैरबोधि आ रेवती रोदसी चित्रमस्थात् ( ३।६१।६ ) = धनवती उषा द्यूच्या ( दिवः ) भाटांनीं ( अर्कैः ) जागी केली आहे; ती तरुणी धनानें भरलेल्या ( चित्रं ) रथांत बसली आहे; ऋतावरी = रेवती = धनवंत; उषा ही तरुणी ( रोदसी ). आ रोदसी वरुणानी श्रुणोतु (५।४६।८॥७।३४।२२)= वरुणाची ( वरुणानी ) तरुण बायको ( रोदसी ) धन ( आ ) देवो ( श्रुणोतु ). द्यावाभूमी श्रुणुतं रोदसी मे ( १०।१२।४); रोदसी = रोदस्यौ = दोन तरुणी; द्यावापृथिवी ह्या त्या दोन तरुणी होत; रोदसी म्हणजे द्यावापृथिवी हा अर्थ कालांतरानें झाला. प्रस्तुत ऋचेंत रोदसी ही मरुतांची तरुण बायको. सूर्याची मुलगी मिळविण्याकरितां देवांमध्यें झगडा चालू झाला; शेवटीं अश्विनांनीं तिला मिळविली व इतर देवांप्रमाणें मरुतांची निराशा झाली; तथापि मरुतांच्या रथांत एक सूर्येसारखी तरुणी झळकूं

लागली; कया शुभा० समान्या मरुतः सं मिमिक्षुः ( १।१६५।१ ) = ह्या कोणत्या तरुणीची मरुतांना संगत मिळाली आहे म्हणजे सर्वांनीं मिळून कोणत्या एका तरुणीला आपली बायको केली आहे असें लोक विचारूं लागले; शुभ् = सुंदरी; समानी = सर्वांना साधारण, सर्वांची. संमिमिक्षुः = तिच्याशीं मिसळले. जोषद्यदीमसुर्या सचध्यै विषितस्तुका रोदसी नृमणाः। आ सूर्येव विधतो रथं गात् त्वेषप्रतीका (१।१६७।५ ) = धनवती ( असुर्या = विषितस्तुका = नृमणाः ) तरुणी ( रोदसी ) जेव्हां ( यत् ) ह्यांच्यांशीं ( ईम् ) सहवास करूं लागली ( जोषत् ) तेव्हां सूर्येप्रमाणें झळकणारी ( त्वेषप्रतीका ) ती रथांत बसली ( आ गात् ). मिम्यक्ष येषु रोदसी नु देवी ( ६।५०।५ ) = ज्या मरुतांमध्यें ही धनवान् ( देवी ) तरुणी मिसळली ( मिम्यक्ष ). प्रस्तुत ऋचेंत रोदसी ही मरुतांची साधारण स्त्री. सुरणानि = मनोरंजन करणाऱ्या खाण्यापिण्याच्या वस्त्रालंकाराच्या वस्तु. कल्याणीर्जाया सुरणं गृहे ते ( ३।५३।६ ) = हे इंद्रा, तुझी बायको सुंदर आहे व तुझ्या घरांत सर्व मनोरंजक वस्तु भरल्या आहेत; सुरणं म्हणजे धन असाही अर्थ होईल.

ऋचेचा अर्थः— स्वतःबरोबर धन ( सुरणानि ) घेणारी ( बिभ्रती ) तरुणी मरुतांच्यामध्यें ज्या रथांत बसली आहे त्या धन देणाऱ्या (श्रवस्युं) मरुतांच्या (मारुतं) रथाला ताबडतोब ( नु ) आम्ही बोलावीत आहों.

---

# अध्याय १२ वा.

## खंड १ ला.

**अथ अतः द्युस्थानाः देवताः। तासाम् अश्विनौ ( निघण्टु ५।६।१ ) प्रथमागामिनौ भवतः। अश्विनौ यत् व्यश्नुवाते सर्वम्। रसेन अन्यः। ज्योतिषा अन्यः। अश्वैः अश्विनौ इति और्णवाभः। तत् कौ अश्विनौ। द्यावापृथिव्यौ इत्येके। अहोरात्रौ इत्येके। सूर्याचन्द्रमसौ इत्येके। राजानौ पुण्यकृतौ इति ऐतिहासिकाः। तयोः कालः ऊर्ध्वम् अर्धरात्रात्। प्रकाशीभावस्य अनुविष्टम्भम् अनु। तमोभागो हि मध्यमः। ज्योतिर्भागः आदित्यः। तयोः एषा भवति**

आतां ह्या पुढें द्युलोकांतील देवतांचें विवरण करूं. त्यांमध्यें आश्विन हे पहिले होत. अश्विनांना अश्विन म्हणण्याचें कारण ते सर्व व्यापतात; अशू व्याप्तौ ( धा० ५।१८ ); अश् + वं = अश्वं = व्यापनम्; अश्वं विद्यते ययोः तौ अश्विनौ; त्यांपैकीं एक अश्वी सर्व जग उदकानें व्यापतो व दुसरा प्रकाशानें व्यापतो. दुर्ग म्हणतोः— जो उदकानें व्यापतो तो अंतरिक्षांतला देव असला पाहिजे; तेव्हां त्याची गणना मध्यस्थानदेवतांमध्येंच करावयास पाहिजे होती असें जर कोणी म्हणेल तर त्याला उत्तर हें कीं सर्वत्र अश्विन ह्या जोडीची स्तुति केली आहे व एका अश्वीची स्तुति कोठेंही केली नाहीं; शिवाय जो मध्यम लोकांतील अश्वी त्याचें रूप कमी कमी होत गेलेलें असतें व दुसऱ्याचें वाढत जातें त्यामुळें मध्यमस्थानांतील अश्वी हा द्युस्थानाच्या अश्वीमध्यें लपून जातो. प्रातःकाल होण्याच्या आधीं आश्विनशस्त्र म्हणावयाचें असतें व तदनंतर इतर शस्त्रें कालानुक्रमानें येतात म्हणून द्युस्थानदेवतांत अश्विनांना कालानुक्रमानें पहिलें स्थान दिलें आहे. अश्विनांजवळ घोडे होते म्हणून त्यांना अश्विनौ हें नांव दिलें गेलें असें और्णवाभ म्हणतो. आतां ( तत् ) अश्विन हे कोण होते ह्या प्रश्नाचा विचार करावयाचा आहे. कोणी म्हणतात कीं द्यावापृथिवी ह्या अश्विन; तौ यौ प्रत्यक्षदैवतम् अश्विनौ इमे एव ते द्यावापृथिव्यौ हें ब्राह्मणवचन दुर्ग आपल्या वृत्तींत देतो; पण तें कोणत्या ब्राह्मणांतून घेतलें आहे तें समजत नाहीं; प्रत्यक्ष दिसणाऱ्या ह्या द्यावापृथिवीच अश्विन असा त्या ब्राह्मणवचनाचा अर्थ असावा. दुसरे म्हणतात कीं अश्विन म्हणजे दिवस व रात्र. अश्विन म्हणजे सूर्य व चंद्र असें आणखी कांहीं लोक म्हणतात. पुण्य करणारे दोन राजे होऊन गेले असें इतिहासकार म्हणतात; पण हें कोणत्या इतिहासांत म्हणजे महाभारतादी ग्रंथांत कोठें म्हटलें आहे तें मला अजून सांपडलें नाहीं. और्णवाभानें दिलेल्या व्युत्पत्तीला पुराणांतरीं कांहीं आधार असावा. अश्विनांचा काल मध्यरात्रीच्या नंतरचा म्हणजे जेव्हां अंधःकारांत थोडासा प्रकाश शिरावयाला लागतो तो काल; विष्टम्भ = थांबविणें; प्रकाशीभावस्य विष्टम्भम् अनु = जेव्हां प्रकाश अंधःकाराला थोपवितो किंवा अडवावयास लागतो

( तेव्हांपासूनचा अश्विनांचा काल ). भाष्यांत दोन अनु आहेत पण दुर्गवृत्तींत एकच आहे व एकाचीच आवश्यकता आहे. अंधकार व प्रकाश ह्यांच्या मिश्रणांतला जो तमोभाग तो मध्यम देव व जो प्रकाशाचा भाग तो आदित्य म्हणूनच एक अश्वी मध्यम लोकांतला व दुसरा द्युलोकांतला असें वर म्हटलें आहे. अंतरिक्षांत मेघ असतात व मेघामुळें अंधकार पडतो म्हणून अंधकार अंतरिक्षांतील; मध्यम म्हणजे इंद्र किंवा वायु मेघामुळें अंधकार उत्पन्न करतो. परदेशीय विद्वानांच्या मतें अश्विन म्हणजे संधिकाल व शुक्राची चांदणी; आश्विन म्हणजे कॅस्टर ( Castor ) व पॉलक्स ( Pollux ) हे तारे होत असे प्रो. मॅक्डॉनेल् म्हणतात.

## खंड २ रा.

**वसातिषु स्म चरथोऽसितौ पेत्वाविव।**

**कदेदमश्विना युवमभि देवाँ अगच्छतम्॥ इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा ).

**तयोः समानकालयोः समानकर्मणोः संस्तुतप्राययोः असंस्तवेन एषः अर्धर्चः भवति। वासात्यो अन्य उच्यत उषः पुत्रस्तवान्यः। इति। तयोः एषा अपरा भवति**

वसातिषु = रात्रिषु; रात्रीला वसाति म्हणण्याचें कारण रात्रीं प्राणी एकेजागीं राहतात. असितौ पेत्वौ = कृष्णौ मेषौ; सित = पांढरा; असित = काळा. इदं = अस्मत्कर्म. असे दुर्ग अर्थ करतो. दुर्गानें केलेला अर्थः— देवतांना पाहण्याचें सामर्थ्य उत्पन्न झाल्यामुळें मंत्रद्रष्टा रात्र संपतांच रात्रिपर्याय नावांचे मंत्र म्हटल्यावर व उषा उगवतांच अश्विनांना अनपेक्षित पाहून म्हणतो; हे अश्विनांनो, दोन काळ्या मेषांप्रमाणें तुम्ही रात्रीं हिंडत आहां व आतां उषःकालीं तुम्ही मला दिसत आहां; आमच्या यज्ञकर्माप्रत इतर देव आले आहेत त्यांच्याकडे तुम्हीं कधीं येतां ? म्हणजे तुम्ही इतर देवांप्रमाणें आमच्या यज्ञाला कधीं येत नाहीं. कित्येक म्हणतात कीं वसाति नांवाचा एक प्रसिद्ध देश आहे; तेथील दोन पुण्यवान् व अश्वयुक्त राजांना उद्देशून ही ऋचा रचिली असेल; ते राजे एका यज्ञांत हजर असलेल्या देवांकडे आलेले पाहून कोणी एक त्यांना म्हणतो; जे तुम्ही समान वेष धारण करणारे ( असितौ पेत्वौ ) ह्या वसाति देशांत नित्य हिंडत असतां ते तुम्ही ह्या देवळांत ( इदं ) जे देव आहेत त्यांच्याकडे ( देवान् ) कधीं येतां ? हा अर्थ बरोबर नाहीं हें दाखविण्याकरितां वासात्यो अन्यः० तवान्यः हा ऋगर्ध यास्क देतो; त्याचा अर्थः— एकाला रात्रीचा पुत्र ( वासात्यः ) म्हटलें आहे व दुसरा, हे उषे, तुझा पुत्र आहे. उषेचा पुत्र सूर्य व रात्रीचा पुत्र मध्यम म्हणजे इंद्र किंवा वायु; तेव्हां रात्रीं हिंडणारे ते राजे नसून कोणीतरी देव असले पाहिजेत; ते देव अश्विन होत. इति सा निगद व्याख्याता व तयोः समानकालयोः ह्यांमध्यें महाराष्ट्रपाठांत पुढील शब्द आहेतः- वसातिषु स्म चरथः। वसा-

तयः रातयः। वसन्ते स्मा इतरेतरा तयोः। वक्तेर्वा वहतेर्वा। असितौ पेत्वाविव। अपेत्वा वृत्रहणम्। सुरातयोः; हें ऋचेचें विवरण दिसतें; परंतु तें पहिल्या अर्धाचें असून बहुतेक अशुद्ध आहे; वसाति = दान; सुरातयोः = दान देणाऱ्यांचे; वक्तेर्वा वहतेर्वा ही कोणत्या शब्दाची व्युत्पत्ति तें समजत नाहीं; बाकींच्या शब्दांचा अर्थ व अन्वय करतां येत नाहीं. ही ऋचा सोपी आहे असें जरी यास्क म्हणतो तरी तींतील वसातिषु व पेत्वौ हे शब्द दुर्बोध आहेत. वसातिषु = जेथें मनुष्यवस्ति आहे अशा ठिकाणीं असा अर्थ कदाचित् असेल; पण पेत्वौ म्हणजे काय? तुम्ही काळ्या (असितौ) पेत्वांप्रमाणें लोकांच्या वसतींत हिण्डतां; पण तुम्ही देवांकडे म्हणजे देवदर्शन घेण्याला कधीं आला अहांत काय असा ऋचेचा अर्थ दिसतो; पण ऋचा कोणत्याही संहितेंत नसल्यामुळें व संदर्भ माहीत नसल्यामुळें तिचा बरोबर अर्थ करणें कठीण आहे. विषयोदेशे ( पा० ४।२।५२ ) ह्या सूत्रावरील वार्तिकाचें विवरण करतांना महाभाष्यांत वासातः व वसातयः अशीं एकाच देशाचीं दोन नांवें दिलीं आहेत; वसातिषु = वसाति नांवाच्या देशांत; वासात्यः = वासात देशांतला. परंतु हे अर्थ प्रस्तुत ऋचेंत व वासात्यः अन्यः उच्यते या ऋगर्धांत लागू पडतात कीं नाहीं हें ठरविणें अशक्य आहे. त्यांचा म्हणजे अश्विनांचा काल एक असतो ( समानकालयोः ); त्यांना उद्देशून केलेलें याज्ञिककर्महि एक असते ( समानकर्मणोः ) व बहुतेक ठिकाणीं त्यांची स्तुति केलेली असते ( संस्तुतप्राययोः ); तथापि स्तुति नाहीं असा पुढील ऋगर्ध होय; त्या ऋगर्धाचा अर्थ वर दिला आहे. प्रस्तुत ऋचेंत अश्विनाचीच स्तुति केली आहे हें सिद्ध करण्याकरितां वासात्यो अन्यो उच्यते हा ऋगर्ध दिला आहे असें दुर्ग म्हणतो; परंतु अश्विनांची ज्यांत स्तुति केली नाहीं असा हा ऋगर्ध आहे असें यास्क म्हणतो; दुर्गानें या ऋगर्धाचा जो अर्थ केला आहे त्यावरून प्रस्तुत ऋचेंत अश्विनच देव आहेत हें सिद्ध होत नाहीं; कारण वासात्यः हें विशेषण दोन्ही आश्विनांना लाविलें नसून एकालाच लाविलें आहे व उषेचा पुत्र सूर्य असें म्हटलें आहे; उषेचा पुत्र दुसरा अश्विन असा यास्काच्या मनांत अर्थ होता कीं काय? वसातौ भवः वासात्यः असें तद्धितरूप होईल पण तें एकाचेंच विशेषण असलें पाहिजे.

## खंड ३ रा.

**इहेह जाता समवावशीतामरेपसा तन्वा नामभिः स्वैः।**
**जिष्णुर्वामन्यः सुमखस्य सूरिर्दिवो अन्यः सुभगः पुत्र ऊहे(ऋ०सं० १।१८१।४)**

**इह च इह च जातौ संस्तूयेते। पापेन अलिप्यमानया तन्वा। नामभिश्च स्वैः। जिष्णुः वाम् अन्यः सुमहतः बलस्य ईरयिता मध्यमः। दिवः अन्यः सुभगः पुत्रः उह्यते आदित्यः। तयोः एषा अपरा भवति**

इहेह = इह च इह च = इह च मध्यस्थाने इह च द्युस्थानें ( दुर्ग ); अश्विनांपैकीं एक मध्यमलोकीं जन्मला व दुसरा द्युलोकीं जन्मला; पहिल्या खंडांत तमो-

भागो हि मध्यमः ज्योतिर्भागः आदित्यः असें म्हटलें आहे ( पान९५६). जाता=जातौ. समवावशीतां = संस्तूयेते; दुर्गवृत्तींत संस्तूयेथे आहे; वाशृ शब्दे ( धा० ४।५७ ); वाश् = वश् = बोलणें, स्तुति करणें; वश् अभ्यासानें वावश्; ईताम् हा प्रत्यय. अरेपसा = पापेन अलिप्यमानया = पापानें लिप्त न झालेल्या ( तनूनें ); रिप् = लिप्; रेपस् हें त्या धातूपासून नाम; रेपस् = लेप; अरेपसा = अलिप्यमानया; अरेपसा = अपापया ( दुर्ग ); रपो रिप्रम् इति पापनामनी भवतः ( पान २९८ ); रिप्र मधील रिप् पासून रेपस्. नामभिः स्वैः = नामभिः च स्वैः; स्वैः = परम् अनाश्रित्य यानि स्वनिमित्तानि तैः ( दुर्ग ) = दुसऱ्यावर अवलंबून नसून स्वतंत्र अशांनीं. सुमखस्य = सुमहतः बलस्य. सूरिः = ईरयिता मध्यमः; षू प्रेरणे ( धा० ६।१२७ ); सू = प्रेरणा करणें; रि हा नामकरण प्रत्यय. सुमखस्य सूरिः = शत्रूवर अतिशय बळ पाठविणारा; बलामुळें तो मध्यमच असला पाहिजे ( दुर्ग ). ऊहे = उह्यते = वायूनें नेहमीं वाहून नेला जातो; आदित्यः अध्याहृत; आदित्य म्हणजे सूर्य वायूच्या साहाय्यानें द्युलोकीं संचार करतो ( दुर्ग ). सुभगः = सुधनः ( दुर्ग ). दुर्गानें केलेला अर्थः– हे अश्विनांनो, मध्यमलोकीं व द्युलोकीं जन्मलेले, पापांनीं अलिप्त अशा तनूनें व स्वतंत्र अशा नांवांनीं युक्त असे तुम्हीं स्तविले जात आहां; तुमच्यापैकीं एक शत्रूवर अतिशय बळ चालविणारा नेहमीं जय पावतो व दुसरा धनवान् असून द्युलोकांतून वाऱ्यानें वाहून नेला जातो.

**सायण**:—समवावशीतां = सम् + अवावशीतां = सम्यक् वा पुनः पुनः स्तूयेथे कामयेथां वा यज्ञं = पुनः पुनः उत्तम रीतीनें तुम्ही स्तविले जातां किंवा पुनः पुनः आमच्या हवीची इच्छा करा; अवावशीतां हें वाशृ शब्दे ( धा० ४।५७ ) किंवा वश कान्तौ (धा० २।७०) ह्याचें रूप; इहेह ह्या शब्दांनीं मध्यम व उत्तम लोकांचा निर्देश केला आहे; मध्यमलोकीं जन्मणारा चंद्र व द्युलोकीं जन्मणारा सूर्य; अरेपसा = अरेपसौ अपापौ = अथर्व्याचा बाप जो दध्यङ् त्याचें अश्विनांनीं शिर कापलें; त्या कृत्यापासून उत्पन्न झालेल्या पापानें अलिप्त; तन्वा = शरीरेण = शरीरसौंदर्येण निमित्तेन = शरीराच्या सौंदर्याकरितां; स्वैः नामभिः = अश्विन, नासत्य वगैरे महत्वयुक्त स्वतःच्या नांवांनीं; आश्विनांची स्तुति त्यांच्या शरीरसौंदर्याबद्दल महत्वदर्शक निरनिराळ्या नांवांनीं केली जाते; किंवा अरेपसा हें तन्वा याचें विशेषण; ज्याला शिरश्छेदाचें पाप चिटकलें नाहीं अशा शरीरानें; तुमच्यापैकीं एक म्हणजे अंतरिक्षाचा मुलगा जो चंद्र तो जय मिळविणारा ( जिष्णुः ) व चांगल्या यज्ञाचा ( सुमखस्य ) प्रेरक ( सूरिः ) असून सर्व जगाचा भार धारण करतो ( ऊहे ); चंद्ररूपी अश्वी जेव्हां उदय पावतो तेव्हां ओषधि व वनस्पति वाढतात व त्यामुळें जगाचें पोषण होतें; दुसरा म्हणजे द्युलोकाचा पुत्र जो आदित्य तो रश्मिरूप धनानें युक्त असलेला जगाचा भार धारण करतो; अशा निरनिराळ्या रीतींनीं जगाचें रक्षण करणारे महाप्रतापी तुम्हीं स्तविले जातां.

इह = ( १ ) ह्या ठिकाणीं, ( २ ) ह्या धनभांडारांत. स नो देवाँ एह वह पुरुक्षो = ( १ ) हे अग्नि ( पुरुक्षो ), आमच्याकरितां देवांना येथें घेऊन ये; ( २ ) हे धनवन्ता ( पुरुक्षो ), आमच्या ( नः ) धनभांडारांत ( इह ) धन ( देवान् ) घाल ( आ वह ). इन्द्र० इह मादयस्व = ( १ ) हे इंद्रा, एथें सोम पिऊन हृष्ट हो; ( २ ) हें धनवंता ( इन्द्र ), ह्या धनभांडारांत ( इह ) धन ( माः ) दे ( दयस्व ). इह प्रजामिह रयिं रराणा इह श्रवो वीरवत् तक्षता नः । येन वयं चितयेमाति अन्यान् तं वाजं चित्रम् ऋभवो ददा नः ( ४।३६।९ ) = हे ऋभूंनो, दाते ( रराणाः ) तुम्ही आमच्या ( नः ) ह्याच धनभांडारांत ( इह = इह = इह ) अतिशय ( वीरवत् ) धन ( प्रजां = रयिं = श्रवः ) द्या ( आ तक्षत ); ज्यानें आम्ही इतरांना पार दिपवून टाकूं ( अति चितयेम ) असें झळकणारें ( चित्रं ) धन ( वाजं ) आम्हांला द्या ( दद ). पूषन्निह क्रतुं विदः ( १।४२।७ ) = हे पूषा, ह्या धनभांडारांत धन ( क्रतुं ) दे ( विदः ). जाता = जातौ = धनवान्; जा = धन; जा + तः = धनवान्. वश् = देणें; वावशानाः शब्दाचा अर्थ पहा (खंड ११।४२ पान ९३८); अत्रावशीतां=देते झाले. सं=धन. किंवा समवावशीतां=युक्त करते झाले; समुस्त्रियाभिः वावशन्त नरः ( १।६२।३ ) = हविर्दाते ( नरः ) गायींनीं ( उस्त्रियाभिः ) युक्त झाले ( सं वावशन्त ). सं मातृभिर्न शिशुर्वावशानो वृषा दधन्वे पुरुवारो अद्भिः ( ९।९३।२ ) = जसें वासरूं ( शिशुः ) मातेनें युक्त असतें म्हणजे मातेबरोबर असतें तसा अतिधनवान् ( पुरुवारः ) सोम ( वृषा ) जलानें युक्त होऊन ( संवावशानः ) कलशाकडे धांवत आहे ( दधन्वे ). सं सिन्धुभिः कलशे वावशानः समुस्त्रियाभिः ( ९।९६।१४ ) = कलशांत नद्या व गाई ह्यांच्याशीं युक्त होणारा म्हणजे जलांत व दुधांत मिसळणारा ( सोम ). भद्रा ते अग्ने स्वनीक सन्दृक् घोरस्य सतो विषुणस्य चारुः । न यत्ते शोचिस्तमसा वरन्त न ध्वस्मानः तन्वि रेप आ धुः ( ४।६।६ ) = हे तेजस्वी ( स्वनीक ) अग्नि, तूं अतिशय भयंकर ( घोरस्य = विषुणस्य ) असूनहि ( सतः ) तुझें रूप ( सन्दृक् ) अतिशय रमणीय आहे ( भद्रा = चारुः ); कारण ( यत् ) शत्रु ( ध्वस्मानः ) तुझ्या ज्वालेला ( शोचिः ) अंधःकारानें ( तमसा ) म्हणजे धुरानें झाकून टाकीत नाहींत ( वरन्त ) व तुझ्या शरीरावर ( तन्वी ) कालिमा ( रेपः ) घालीत नाहींत ( आ धुः ); ज्यांत कालिमा नाहीं तें अरेपस्. सूरो न यस्य दृशतिः अरेपाः ( ६।३।३ ) = ज्या अग्नीचें रूप ( दृशतिः ) सूर्याच्या ( सूरः ) रूपाप्रमाणें कालिमा रहित आहे. अरेपसः सूर्यस्येव रश्मयः ( १।९१।४ ) = सूर्याच्या किरणांप्रमाणें अग्नीच्या ज्वाला कालिमा रहित आहेत. मरुतांना अरेपसः हें विशेषण पांच सहा वेळां लावलें आहे; ते अग्नीसारखे झळकतात त्यामुळें त्यांच्यांत थोडासा सुद्धां कालिमा नसतो. तें विशेषण सोमालाही लाविलें आहे ( ९।१०१।१० ); जल व दूध ह्यांत मिसळल्यानें सोमाचा मूळचा काळा रंग अगदीं नाहींसा होऊन तो सूर्यासारखा झळकतो. शुचिः पुनानः

तन्वम् अरेपसम् ( ९।७०।८ ) = जीत थोडासा सुद्धां कालिमा राहणार नाहीं अशी तनू शुद्ध करणारा सोम. उषेच्या तनूला अरेपसा हें विशेषण लाविलें आहे (१।१२४। ६ ). अत्रीला अश्विन जें ऊन दूध ( घर्म ) देतात त्यांत कोणत्याही प्रकारचा कालिमा नव्हता ( अरेपसं ) म्हणजे तें अगदीं स्वच्छ होतें ( ५।७३।६ ). अरेपसा तन्वा = ( १ ) कालिमारहित म्हणजे सुंदर किंवा तेजस्वी शरीरानें. तनू = ( १ ) शरीर, ( २ ) धन; शरीर हा अर्थ पुष्कळ ऋचांत आहे. ( २ ) तस्य ते शर्मन् उपदद्यमाने राया मदेम तन्वा तना च ( ६।४९।१३ ) = तूं दिलेल्या आश्रयाखालीं आम्हीं धनानें ( राया = तन्वा = तना ) आनंदित होऊं; ददी रेक्णस्तन्वे ददिर्वसु ददिर्वाजेषु पुरुहूत वाजिनं ( ८।४६।१५ ) = हे इंद्रा, आमच्या धनभांडारांत ( तन्वि = वाजेषु ) तूं पुष्कळ ( वाजिनं ) धन ( रेक्णः = वसु ) देतोस ( ददिः ); अधि श्रवांसि धेहि नस्तनूषु ( ३।१९।५ ) = हे अग्नि, आमच्या धनभांडारांत ( तनूषु अधि ) धन ( श्रवांसि ) दे ( धेहि ). अरेपसा तन्वा = ( २ ) कालिमा-रहित म्हणजे वैगुण्यरहित धनानें; धनांत कोणत्याही प्रकारची उणीव नसणें हें इष्ट आहे. नाम = ( १ ) नांव, ( २ ) धन. ( २ ) त्वमेतानि पप्रिषे वि नामा ईशान इन्द्र दधिषे गभस्तौ ( १०।७३।८ ) = हे इंद्रा, सत्ताधीश ( ईशानः ) तूं पुष्कळ ( एतानि ) धन ( नामा = नामानि ) हातांत ( गभस्तौ ) धारण करतोस ( दधिषे ) व देतोस ( वि पप्रिषे ). ( १ व २ ) भद्रा नाम वहमाना उषासः ( १।१२३।१२ ) = मंगल नांवें धारण करणाऱ्या उषा; ( २ ) अतीशय ( भद्रा = भद्राणि ) धन ( नामा = नामानि ) देणाऱ्या ( वहमानाः ) उषा. तवायं विश्वः पुरुहूत पार्थिवः अवस्युः नाम भिक्षते ( ७।३२।१७ ) = धन इच्छिणारें (अवस्युः) सर्व ( विश्वः ) पृथिवीवरील लोक ( पार्थिवः ) तूं दिलेलें धन ( नाम ) भोगीत आहेत ( भिक्षते ). पुनाने तन्वा मिथः स्वेन दक्षेण राजथः । ऊह्याथे सनादृतम् ( ४।५६।६ ) = दात्या ( पुनाने ) द्यावा-पृथिवी एकत्र होऊन ( मिथः ) आपल्या धनांतून ( तन्वा = स्वेन = क्रतुना = सनात् ) धन ( ऋतं ) देतात ( राजथः = ऊह्याथे ); ते सत्येन मनसा दीध्यानाः स्वेन युक्तासः क्रतुना वहन्ति ( ७।९०।५ ) = ते दाते ( दीध्यानाः ) धनानें ( सत्येन = मनसा = स्वेन = क्रतुना ) युक्त असल्यामुळें धन देतात ( वहन्ति ). स्व म्हणजे स्वतःचे असाही अर्थ पुष्कळ ऋचांत आहे. सुमखस्य = पुष्कळ धनाचा; सुमखं पहा ( पान ८७० ). सूरिः = दाता. स बोधि सूरिर्मघवा वसुपते वसुदावन् ( २।६।४ ) = हे धन-दात्या ( वसुपते = वसुदावन् ), धनदाता ( मघवा ) तूं धन देणारा ( सूरिः ) हो ( बोधि ). उत सूरिरिन्द्रो रायो विश्ववारस्य दाता ( ६।२३।१० ) = पुष्कळ ( पुरुवारस्य ) धनाचा ( रायः ) दाता ( सूरिः = दाता ) इंद्र. ऋचेचा अर्थ :— धनवान् ( जाता = जातौ ) अश्विन प्रत्येक धनभांडारांत ( इह इह ) आपल्या अतिशय ( अरेपसा ) धनांतून ( तन्वा = नामभिः = स्वैः ) धन ( सं ) देत आले आहेत ( अवावशीतां ); हे अश्विनानो, तुमच्यापैकीं एक जेता ( जिष्णुः ) असून धनाचा ( सुमखस्य )

दाता ( सूरिः ) आहे व दुसरा द्यूचा पुत्र असून धनवान् ( सुभगः ) असल्यामुळें धन देतो ( ऊहे ).

## खंड ४ था.

**प्रातर्युजा वि बोधयाश्विनावेह गच्छताम् ।**

**अस्य सोमस्य पीतये ( ऋ० सं० १।२२।१ )**

**प्रातर्योगिनौ विबोधय अश्विनौ । इह आगच्छताम् अस्य सोमस्य पानाय तयोः एषा अपरा भवति**

प्रातर्युजौ = प्रातर्योगिनौ = सकाळीं हवि व स्तुति ह्यांच्याशीं योग म्हणजे संबंध आहे ज्यांचा ते; प्रातर्युजौ = यौ एतौ प्रातर्युज्येते हविषा स्तुत्या च ( दुर्ग ) =ज्यांना सकाळीं हवि व स्तुति मिळते असे. विबोधय = विस्पष्टाभिः स्तुतिभिः अस्मदर्थे विबोधय ( दुर्ग ). अश्विनावेह = अश्विनौ + आ + इह; आ + गच्छताम्. पीतये = पानाय.

दुर्गानें केलेला अर्थ :—हे स्तोत्या, ज्यांचा हवीशीं व स्तुतीशीं सकाळीं योग असतो अशा अश्विनांना स्पष्ट स्तुतींनीं जागें कर; असे जागे केलेले ते हा सोम पिण्याला येवोत.

**सायण** :— होता अध्वर्यूला म्हणतो; हे अध्वर्यु, ज्यांना प्रातःसवनांत सोमग्रह म्हणजे सोमहवि मिळतो ( प्रातर्युजौ ) त्या अश्विनांना सर्वांच्या आधीं जागें कर ( विशेषण बोधय ); बाकीचा अर्थ दुर्गाप्रमाणें; प्रातर् युंजाते गृह्यमाणेन ग्रहेण सह इति प्रातर्युजौ = सकाळीं सोमकलशांतून घेतलेल्या सोमग्रहानें जे आपल्याला युक्त करतात ते.

प्रातः रथं यौ युञ्जाते तौ प्रातर्युजौ = सकाळीं रथाला घोडे जुंपणारे. प्रातर्युजं नासत्याधि तिष्ठथः प्रातर्यावाणं मधुवाहनं रथम् (१०।४१।२) = हे अश्विनांनो, सकाळीं जोडलेल्या, सकाळीं संचार करणाऱ्या व धन घेऊन जाणाऱ्या रथांत तुम्ही बसतां. आयुक्षातामश्विना यातवे रथम् ( १।१५७।१ ), यद्युञ्जाथे वृषणम् अश्विना रथम् ( १।१५७।२ ) व कमच्छा युञ्जाथे रथम् ( ५।७४।३ ) एथें अश्विन रथ जोडतात हें स्पष्ट आहे. प्रातः रथं यौ युञ्जाते तौ प्रातर्युजौ. प्रबोधय उषो अश्विना ( ८।९।१७ ) = हे उषे, अश्विनांना जागें कर. तान् उशतो वि बोधय यदग्ने यासि दूत्यम् (१।१२।४) = हे अग्नि, जेव्हां तूं आपलें दूतकर्म करण्याकरितां जातोस तेव्हां हवि इच्छिणाऱ्या ( उशतः ) देवांना जागे कर. प्र बोधय जरितर्जारमिन्द्रम् ( १०।४२।२ ) = हे स्तोत्या, जार जो इंद्र त्याला जागे कर. प्रस्तुत ऋचेंत उषा, अग्नि व स्तोता ह्यांच्यापैकीं अश्विनांना जागें कोण करतो तें सांगतां येत नाहीं.

## खंड ५ वा.

**प्रातर्यजध्वमश्विना हिनोत न सायमस्ति देवया अजुष्टम् ।**
**उतान्यो अस्मद्यजते वि चावः पूर्वः पूर्वो यजमानो वनीयान् ( ऋ० सं० ( ५।७७।२ )**

**प्रातः यजध्वम् अश्विनौ । प्रहिणुत । न सायम् अस्ति देवेज्या । अजुष्टम् एतत् । अपि अन्यः अस्मत् यजते । वि च आवः । पूर्वः पूर्वः यजमानः वनीयान् । वनयितृतमः । तयोः कालः सूर्योदयपर्यन्तः । तस्मिन् अन्याः देवताः ओप्यन्ते**

अश्विना = अश्विनौ. हिनोत = प्रहिणुत = अश्विनांकडे त्वरेनें स्तुति व हवि पाठवा ( दुर्ग ); प्रहिणुत बद्दल प्रहिणोत असें दुर्गवृत्तींत आहे. देवया: = देवेज्या; अनयोर्देवयोः न सायम् अस्ति इज्या ( दुर्ग ) = ह्या देवांना सायंकाळीं हवि दिला जात नाहीं; दुर्गवृत्तींत देवेज्या शब्द नाहीं; देवयोः इज्या असे शब्द आहेत. अजुष्टं = अजुष्टम् एतत् = (सायंकाळीं दिलेला) हवि (त्यांच्याकडून) सेविला जात नाहीं; दुर्गवृत्तींत एतत् नाहीं; अजुष्टं = ज्याचें कोणीं आधीं सेवन केलें नाहीं असा हवि अश्विनांना लागतो म्हणून त्यांना सगळ्यांच्या आधीं सकाळींच हवि दिला जातो ( दुर्ग ); यास्क व दुर्ग ह्याप्रमाणें अजुष्टं हें निराळें वाक्य समजतात. उत = अपि. उतान्यो अस्मत् यजते = अपि च अनादृते त्वयि अन्यः अस्मत्तः एतौ अश्विनौ यजते (दुर्ग) = तुझा अनादर झाल्यास आमच्याहून भिन्न मनुष्य ह्या अश्विनांना हवि देतो; हें दुर्गानें केलेलें विवरण समजत नाहीं. वि चावः = वि च आवः = व्यावयति च तर्पयति हविर्भिः ( दुर्ग ) = हवींनीं तृप्त करतो; वि + आवः = वि + आवयति; अव् धातूचा तृप्त होणें असाही अर्थ आहे ( धा० १।६०१ ); अव्चें प्रयोजक रूप आवय् = तृप्त करणें. वनीयान् = वनयितृमः; पूर्वः पूर्वः यजमानः प्रथमः प्रथमः यजमानः वनीयान् वनयितृतमः संभक्तृतमः आदृतत्वात् ( दुर्ग ) = पहिला पहिला यजमान म्हणजे सगळ्यांच्या आधीं अश्विनांना हवि देणारा तोच सगळ्यांत जास्त सुख भोगतो ( सभक्तृतमः ) कारण त्याच्याविषयीं अश्विनांच्या मनांत आदर असतो.

अश्विनांचा (तयोः) काल सूर्योदयापर्यंत असतो; त्या कालाचा प्रारंभ जेव्हां प्रकाश अंधकाराला थोपवितो किंवा अडवावयास लागतो तेव्हां होतो ( पानें ९५६--९५७ ) ह्यावेळीं आश्विनशस्त्र म्हटलें जातें म्हणजे अश्विनांची स्तुति केली जाते व त्याच वेळीं दुसऱ्या देवतांचीही स्तुति केली जाते ( ओप्यन्ते ); नंतर अश्विनांना हवि दिला जातो त्यावेळीं ह्या इतर देवतांनाही हवि दिला जातो; अशा देवतांपैकीं उषा ही पहिली होय; आवाप = हविर्दान कीं स्तुति कीं दोन्ही ?

दुर्गानें केलेला अर्थ :— हे स्तोत्यांनो, अश्विनांना सकाळींच हवि द्या; त्यांच्याकडे त्वरेनें स्तुति व हवि पाठवा; कारण ह्या देवांना सायंकाळीं हवि द्यावयाचा नसतो; कोणीही आधीं न सेविलेला हवि अश्विनांना दिला पाहिजे; हा नियम मोडल्यास आमच्याहून दुसराच कोणी त्यांना हवि देईल व संतुष्ट करील; सगळ्यांच्या आधीं पहिल्या

प्रथम जो अश्विनांना हवि देतो तोच प्रथम हवि देणारा यजमान सगळ्यापेक्षां अधिक सुख भोगतो; कारण त्याच्याविषयीं अश्विनांच्या मनांत आदर असतो.

**सायण**:—यजध्वं = पूजयध्वं = स्तुध्वं = पूजा किंवा स्तुति करा; देवयाः = देवगामि; सायं सायंकाले देवयाः देवगामि हविः नास्ति = देवांकडे संध्याकाळीं हवि जात नाहीं म्हणजे देव संध्याकाळीं दिलेला हवि घेत नाहींत; अजुष्टम् असेव्यं तत् भवति = तो हवि सेवन केला जात नाहीं; देवांना पूर्वकाळीं हवि द्यावा अशी श्रुति आहे; शिवाय आमच्याहून भिन्न यजमानही त्यांना हवि देत असेल व तृप्त करीत असेल; हवि देणारे ते असोत कीं आम्ही असूं, जो कोणी सर्वांच्या आधीं हवि देतो तोच त्यांना संभजनीय ( वनीयान् ) म्हणजे आदरणीय होतो.

हि = हवींनीं संतुष्ट करणें; तमिन्द्रं सोमस्य भृथे हिनोत ( २।१४।४ ) = त्या इंद्राला सोमाचा हवि देऊन संतुष्ट करा. हिनोति यद्वां विदथे सपर्यन् ( १।१५१।२ ) = ज्या अर्थी यज्ञांत हवि देऊन ( सपर्यन् ) तो तुम्हाला संतुष्ट करीत आहे. प्रातर् यजध्वम् अश्विना हिनोत = प्रातःकालीं अश्विनांना हवि द्या व तसें करून त्यांना संतुष्ट करा. देवयाः हा शब्द प्रस्तुत ऋचा वगळून आणखी पांच वेळां आला आहे; त्यांपैकीं तीन ठिकाणीं तो एकवचनी व दोन ठिकाणीं बहुवचनी आहे. अयं यज्ञः देवयाः ( १।१७७।४ ) = देवाकडे म्हणजे इंद्राकडे जाणारा हा हवि. देवयाः विप्रः ( ३।८।५ ) = देवांकडे जाणारा अग्नि. देवयाः अद्रिः ( ७।६८।४ ) = देवांना खालीं येण्याची विनंति करणारा ग्रावा. देवयाः ( १।१६८।१ ) = धन देणारे मरुत्. देवयाः वाचः ( ५।७६।१ ) = देवांकडे जाणाऱ्या स्तुति. प्रस्तुत ऋचेंत देवयाः = देवांना (अश्विनांना) खालीं या म्हणून विनंती करणारे हविर्दाते; देवयाः= हे हविदात्यांनो. पहिल्या अर्धाचा अन्वय पुढीलप्रमाणें केला पाहिजे :— हे देवयाः अश्विनौ प्रातर् एव यजध्वं प्रातरेव हिनोत । सायं न । यस्मात् सायं हविः अजुष्टम् अस्ति = हे हविर्दात्यांनो, अश्विनांना प्रातःकाळींच हवि द्या ( यजध्वं ) व तसें करून त्यांना तृप्त करा ( हिनोत ); संध्याकाळीं हवि देऊं नका कारण संध्याकाळचा हवि त्यांना अप्रिय असतो. देवयाः बद्दल देवयोः असा शब्द घेतल्यास देवयोः अजुष्टम् अस्ति = ह्या देवांना म्हणजे अश्विनांना सायंकाळचा हवि अप्रिय असतो असा अर्थ होईल. अजुष्टं = अप्रिय, द्वेष्य; तमः० अजुष्टम् ( ७।७५।१॥७।७८।३ ) व तमांसि० अजुष्टा ( २।४०।२ ) एथें अंधकार द्वेष्य आहे; दुष्कृतानि अजुष्टानि ( १०।१६४।३ ) = द्वेष्य दुष्कृत्यें; अजुष्टान् ० अव्रतान् ( ९।७३।८ ) = नियम मोडणाऱ्या द्वेष्य लोकांना; रक्षसः अजुष्टात् ( ७।१।१३ ) = द्वेष्य राक्षसापासून. अस्मत् अन्यः अस्मत् पूर्वः पूर्वः अस्मत् वनीयान् यजमानः यजते हविर्भिः च वि आवः विवृणोति प्रकाशयति = आमच्याहून दुसरा, आमच्या फार फार आधीं ( पूर्वःपूर्वः ), आमच्यापेक्षां लवकर हवि देणारा ( वनीयान् ) असा हविर्दाता ( यजमानः ) हवि देतो ( यजते ) व आपले हवि अश्विनांच्या समोर प्रकट करतो ( वि + आवः ); आमच्या आधीं इतरांनीं अश्विनांना हवि द्यावेत व

आम्हीं संध्याकाळीं हवि द्यावेत हें योग्य नाहीं; कारण पहिल्या अर्धांत म्हटल्याप्रमाणें अश्विनांना संध्याकाळीं दिलेला हवि अप्रिय असतो. आ + वृ = आच्छादणें; वि + आ + वृ = आच्छादन काढणें, प्रकाशांत आणणें, देणें. वन् = धन किंवा हवि देणें; वनीयान् = इतरांपेक्षां आधीं हवि देणारा. अन्यः, पूर्वः पूर्वः व वनीयान् असे एकाच अर्थाचे शब्द घालण्याचें कारण अश्विनांना अगदीं पहाटेस हवि दिला पाहिजे व तसा दिलेला हवि त्यांना आवडतो हें ऋषींस सांगावयाचें आहे हें; यजते व व्यावः एथेंहीं पुनरुक्ति त्याच कारणाकरितां आहे.

**उषाः ( २ ) वष्टेः कान्तिकर्मणः। उच्छतेः इतरा माध्यमिका। तस्याः एषा भवति**

वश कान्तौ ( धा० २।७० ); वश् ( = इच्छिणें ) यापासून उषस्; वश् ह्याला संप्रसारण होऊन उश् व श् बद्दल ष् घातल्यानें उष्; उष् + अस् = उषस्; उषा केव्हां उगवेल अशी सर्वांना उत्कंठा असते; ही एक व्युत्पत्ति; किंवा उच्छ् = हाकलून देणें ह्यापासून; उषा अंधकार हांकलून देते; द्युस्थानांतील उषेच्या अशा दोन व्युत्पत्ति; पण अंतरिक्षांतील उषेची उच्छति ही एकच व्युत्पत्ति ( पान १२९ ); माध्यमिका वाक् ( उषा ) इंद्राच्या साहाय्यानें मेघांना हाकलून देते म्हणजे पाऊस पाडते असें दुर्ग म्हणतो. पण २।१८ ह्या खंडांत ( पान १२९ ) उषा अंतरिक्षांतली असें म्हटलें नाहीं. अंतरिक्षांतील उषा व द्युलोकांतील उषा असा विभाग कां केला गेला तें समजत नाहीं. सर्वत्र उषा एकच दिसते व ती द्युलोकांतीलच.

## खंड ६ वा.

**उषस्तच्चित्रमा भरास्मभ्यं वाजिनीवति।**
**येन तोकं च तनयं च धामहे ( ऋ० सं० १।९२।१३ )**

**उषः तत् चित्रं चायनीयं धनम् आहर अस्मभ्यम् अन्नवति। येन पुत्रांश्च पौत्रांश्च दधीमहि। तस्याः एषा अपरा भवति**

चित्रं = चायनीयं = पूज्य म्हणजे अतीशय; चित्र शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान २४३ ). आभर = आहर. वाजिनीवति = अन्नवति. तोकं = पुत्रान्. तनयं = पौत्रान्. धामहे = दधीमहि = धारण करूं म्हणजे मिळवूं.

दुर्गानें केलेला अर्थः— हे अन्नवती उषे, ज्या धनानें आम्ही पुत्रांना व नातवांना नेहमीं तृप्त असलेले असे धारण करूं म्हणजे संतुष्ट झालेले पाहूं असें अतीशय धन आम्हांला दे. ह्या विवरणांत अविच्छेदेन तृप्तान् ( = नेहमीं संतुष्ट असलेले ) हे शब्द दुर्ग अध्याहृत घेतो.

सायणः— वाजः हविर्लक्षणम् अन्नम्। तद्युक्ता क्रिया वाजिनी। तया क्रियया

युक्त। वाजिनीवती = वाज म्हणजे हवि; वाजिनी म्हणजे हवीनें युक्त क्रिया म्हणजे यज्ञ; यज्ञांत जिला हवि मिळतो ती वाजिनीवती; चित्रं = चायनीयम्; तोकं = पुत्रम्; तनयं = तत्पुत्रम्; धामहे = दध्महे = धारयामः.

चित् = देणें; चित् + रं = चित्रं = धन. वाज व वाजिनी यांचा अर्थ धन. धा = देणें. तोकं=तनयं = धन. प्रस्तुत ऋचेचा मी केलेला अर्थ पहा (पान ७५२).

## खंड ७ वा.

**एता उ त्या उषसः केतुमक्रत पूर्वे अर्धे रजसो भानुमञ्जते। निष्कृण्वाना आयुधानीव धृष्णवः प्रति गावोऽरुषीर्यन्ति मातरः ( ऋ० सं० १।९२।१ )**

**एताः ताः उषसः केतुम् अकृपत। प्रज्ञानम्। एकस्याः एव पूजनार्थे बहुवचनं स्यात्। पूर्वे अर्धे अन्तरिक्षलोकस्य समञ्जते भानुना। निष्कृण्वाना आयुधानीव धृष्णवः। निः इति एषः सम् इति एतस्य स्थाने। एमीदेषां निष्कृतं जारिणीव ( ऋ० सं० १०।३४।५ ) इत्यपि निगमः भवति। प्रतियन्ति गावः। गमनात्। अरुषीः। आरोचनात्। मातरः भासः निर्मात्र्यः**

उ निरर्थक म्हणून गाळला आहे. त्याः = ताः. केतुं = प्रज्ञानम्. अक्रत = अकृषत = करत्या झाल्या. उषा एक असून उषसः असें बहुवचन ऋचेंत घालण्याचें कारण उषेविषयीं अत्यादर दाखवावयाचा ( पूजनार्थे ) असेल हें. रजसः = अन्तरिक्षलोकस्य. भानुम् अञ्जते = भानुना समञ्जते = भानुना स्वेन भासा तमोमलम् अपनीय निर्मलानि प्रज्ञानानि लोकस्य उषसः संस्कुर्वन्ति ( दुर्ग ) = आपल्या प्रकाशानें तमोरुपी मल दूर करून लोकांच्या बुद्धि तीक्ष्ण करतात; उषेच्या प्रकाशानें सर्वांची बुद्धि मंदपणा टाकून तरतरीत होते. निष्कृण्वानाः ह्यांतील निः हा ( एषः ) सं ह्याच्या जागीं ( एतस्य स्थाने ) कधीं कधीं घातला असतो; निः = सम्. निष्कृण्वानाः आयुधानि इव धृष्णवः = यथा संस्कुर्वाणाः नित्यं निर्मृजन्तः आयुधानि निर्मलानि कृण्वन्ति धृष्णवः धर्षयितारः ( दुर्ग ) = शत्रूवर हल्ला करणारे योद्धे ( धृष्णवः ) जसे रोजच्या रोज आयुधें धुवून स्वच्छ ठेवतात ( त्याप्रमाणें तम नाहींसें करून उषा सर्वांच्या बुद्धि तरतरीत करतात ). धृष्णवः म्हणजे आयुधें तयार करण्याचें काम करणारे असा दुर्ग अर्थ करतो; तेव्हां धृष्णवः = धर्षयितारः = घांसून स्वच्छ ठेवणारे असा त्यानें अर्थ केला असावा. गावः म्हणजे उषा; उषांना गावः म्हणण्याचें कारण त्या जातात (गमनात्); गो शब्दाची व्युत्पत्ति पहा (पान ९२). अरुषीः = आरुषीः = आरोचनाः= प्रकाशणाऱ्या; अरुषी शब्द आ + रुच् ( = प्रकाशणें ) ह्यापासून. मातरः = भासः निर्मात्र्यः = प्रकाश निर्माण करणाऱ्या. भासः निर्मात्र्यः दुर्गवृत्तींत नाहीं. ह्या तीन व्युत्पत्तींपैकीं कोणतीही दुर्गवृत्तींत नाहीं.

दुर्गानें केलेला अर्थः— ज्या ह्या उषा अंतरिक्षाच्या पूर्वभागीं प्रकाशानें स्वतःला व्यक्त करतात त्या जसें आयुधें तयार करणारे लोक तीं आयुधें रोजच्या रोज धुवून

स्वच्छ ठेवतात त्याप्रमाणें लोकांच्या बुद्धि ( केतुं ) स्वच्छ म्हणजे तरतरीत करतात ( अक्रत ); ह्या मातृभूत प्रकाशणाऱ्या गायी सूर्याकडे जातात म्हणजे त्यांचा प्रकाश सूर्याच्या प्रकाशांत नाहींसा होतो. उषा म्हणजे सूर्यच; सूर्य उगवण्याच्या अगोदर त्याचा प्रकाश जो पूर्वेस दिसतो तो उषा. सम् ह्याच्या जागीं कधीं कधीं निः हा उपसर्ग येतो हें सिद्ध करण्याकरितां यास्क एमीदेषां हें उदाहरण देतो; त्याचा अर्थ पुढील प्रमाणें; एमीदेषां निष्कृतं जारिणीव = एमि इत् एषां निष्कृतं जारिणी इव = ( ह्या फाशांनीं मी द्यूत खेळणार नाहीं असा जरी मी निश्चय करतों व द्यूत खेळण्यास येणाऱ्या मित्रांपासून दूर जातों तरी दानाकरितां द्यूतकारांनीं टाकलेले फांसे आवाज करूं लागले कीं ) एकाद्या जारिणीप्रमाणें मी ह्या लोकांच्या खेळण्याच्या स्वच्छ केलेल्या जागीं जातोंच जातों; एथें निष्कृतं=संस्कृतम् अक्षस्थानं=स्वच्छ केलेल्या द्यूतस्थलाकडे.

**सायण**:— उ निरर्थक; केतुं = अंधकारावृतस्य सर्वस्य जगतः प्रज्ञापकं प्रकाशं = अंधकारानें आच्छादलेल्या सर्व जगाचें ज्ञान करून देणारा प्रकाश; अक्रत = करत्या झाल्या; भानुम् अञ्जते = प्रकाश व्यक्त करतात; रजसः पूर्वे अर्धे = अंतरिक्षाच्या पूर्वभागीं म्हणजे पूर्वेस; धृष्णवः = शत्रूवर हल्ला करणारे योद्धे; जसे योद्धे आपलीं आयुधें स्वच्छ करतात त्याप्रमाणें आपल्या तेजांनीं जग स्वच्छ करणाऱ्या उषा; गावः = गमनस्वभावाः; अरुषीः = आरोचमानाः; मातरः = सूर्यप्रकाशस्य निर्मात्र्यः जगज्जनन्यः वा; प्रतियन्ति = प्रतिदिवसं गच्छन्ति = दररोज प्रवास करतात.

केतु = ध्वज ( पान ८६३ ); केतुम् अक्रत = प्रकाशरूपी ध्वज उभारीत आहेत. भानुम् अञ्जते = प्रकाश पसरतात. व्यञ्जते दिवो अन्तेषु अक्तून्० उषसः (७।७९।२) = उषा द्युलोकाच्या कांठावर म्हणजे क्षितिजावर आपले किरण पसरतात. निष्कृण्वानाः = म्यानांतून बाहेर काढणारे. धृष्णवः = योद्धे. गावः मातरः हे शब्द लक्षणेनें उषांना लाविले आहेत; अरुषीः मातरः गावः = झळकणाऱ्या मातेसारख्या गायी म्हणजे उषा; प्रतियन्ति = अंधकारावर चाल करून जात आहेत. ऋचेचा अर्थ:— ह्यांच ( एताः उ ) त्या नेहमीच्या उषा आपला ध्वज उभारीत आहेत व आपला प्रकाश ( भानुं ) द्युलोकाच्या ( रजसः ) पूर्वभागांत ( पूर्वे अर्धे ) पसरीत आहेत ( अञ्जते ); म्यानांतून आयुधें बाहेर काढणारे ( निष्कृण्वानाः ) योद्धे ( धृष्णवः ) जसे शत्रुवर चाल करून जातात ( प्रतियन्ति ) तशा झळकणाऱ्या ( अरुषीः ) मातेसमान ( मातरः ) गायी म्हणजे उषा अंधकारावर चाल करून जात आहेत. निष्कृतं = घर. वायविन्द्रश्च सुन्वतः आयातमुप निष्कृतम् ( १।२।६ ) = हे वायु व इंद्रहो, सोमरस काढणाऱ्याच्या घरीं ( निष्कृतं ) या. शुद्धो देवानामुपयाति निष्कृतम् ( ९।७८।१ ) = शुद्ध केलेला सोम देवांच्या घरीं जातो. निष्कृतं जारिणीव = जारिणी जशी जाराच्या घरीं जाते. न दविषाणि एभिः ( १०।३४।५ ) ह्यांतील एभिः = ह्या फांशानें असा दुर्गानें अर्थ केला आहे; पण एभिः = ह्या द्यूतकारांबरोबर असा अर्थ आहे.

**सूर्या (१) सूर्यस्य पत्नी। एषा एव अभिसृष्टकालतमा। तस्याः एषा भवति**

सूर्या = सूर्यस्य पत्नी; अभिसृष्टः कालः येषां ते अभिसृष्टकालाः तेषु श्रेष्ठा अभिसृष्टकालतमा = जे देव सूर्याचीं निरनिराळीं रूपें असून सूर्याकडेच ओढले जातात म्हणजे ज्यांचा सूर्यांत अंतर्भाव होतो अशांमध्यें उषा ही सूर्याच्या अतीशय जवळ गेलेली असते; अभिसृष्ट = कडे म्हणजे सूर्याच्या जवळ गेलेला. सूर्या ही दुसरी कोणी नसून उषाच होय.

## खंड ८ वा.

**सुकिंशुकं शल्मलिं विश्वरूपं हिरण्यवर्णं सुवृतं सुचक्रम्। आ रोह सूर्ये अमृतस्य लोकं स्योनं पत्ये वहतुं कृणुष्व (ऋ० सं० १०।८५।२०)**

**सुकाशनं शन्नमलं सर्वरूपम्। अपि वा। उपमार्थे स्यात्। सुकिंशुकम् इव शल्मलिम् इति। किंशुकं क्रंशतेः प्रकाशयतिकर्मणः। शल्मलिः सुशरः भवति। शरवान् वा। आरोह सूर्ये अमृतस्य लोकम्। उदकस्य। सुखं पत्ये वहतुं कुरुष्व**

सुकिंशुकं = सुकाशनं = सुष्टु काशनं दीपनं लोकानां (दुर्ग) = द्युलोक वगैरेंना उत्तम रीतीनें प्रकाशित करणारा; किंशुकं हा शब्द काश् (=प्रकाशणें) ह्यापासून; दुर्गवृत्तींत सुकाशनं नाहीं. किंश् = काश्; उकं हा नामकरण प्रत्यय. शल्मलिं = शन्नमलं = व्यपगतमलं (दुर्ग); शद् = कापणें; शद् + त = शन्न = कापलेलें; शल्मलिं = शल् + मलिम्; शल् = शन्न; मलिं = मलम्. विश्वरूपं = सर्वरूपम्. किंवा (अपि वा) सुकिंशुकं शल्मलिं हीं विशेषणें नसून त्यांत उपमा असेल; सुकिंशुकम् इव शल्मलिं = उत्तम लाल फुलांनीं भरलेल्या शल्मलिवृक्षाप्रमाणें; शल्मलि = सावरीचें झाड (आपट्यांचा कोश). क्रंश् = प्रकाशित करणें (पानें १४५-१४६) ह्यापासून किंशुक; सावरीचीं फुलें लाल असल्यामुळें सभोंवतीं प्रकाश पसरतात; किंशुकं = क्रंशुकं = प्रकाश पसरणारें. किंचित् शुकः नीलः किंशुकः (अमर २।४।२९ क्षीरस्वामी); किंशुक = पळस; किंचित् शुकः इव शुकतुण्डसदृशः पुष्पत्वात् (आपट्यांचा कोश); पळसाच्या फुलाचा आकार पोपटाच्या चोंचीसारखा असतो; पळसाचें झाड व पळसाचीं फुलें असे किंशुक शब्दाचे दोन अर्थ आहेत. शल्मलिः = शल् + मलिः; शल् = शर; मलिः = मयः; शरमयः = सुशरः = सुहिंस्यः (दुर्ग) = सावरीचें झाड मऊ असल्याकारणानें त्याला सहज इजा करतां येते; किंवा शरमयः = शारवान् = काटयांनीं भरलेला; शॄ हिंसायाम् (धा० ९।१६); शॄ (= हिंसा करणें) ह्यापासून शर् म्हणजे शल्. भाष्यात हिरण्यवर्णं सुवृतं सुचक्रं हे शब्द किंवा त्यांचे पर्याय दिले नाहींत. हिरण्यवर्णं = हिरण्योपमवर्णं हिरण्यम् इव वरणीयं (दुर्ग) = सोन्यासारखा रंग आहे ज्याचा असें किंवा सोन्याप्रमाणें मागण्याजोगें. सुवृतं = सुवर्तनं शोभनैर्वा रश्मिभिः वृतं (दुर्ग) = गरगर फिरणारें किंवा शोभिवंत किरणांनीं आच्छादलेलें. सुचक्रं = सुचकनं सुदीप्तं (दुर्ग) = चांगले जाणारे किंवा प्रकाश-

वान्. रथं = सूर्याचें मंडळ ( दुर्ग ). अमृतस्य = उदकस्य. स्योनं = सुखम्. पत्ये = एतस्मै मण्डलाधिष्ठात्रे ( दुर्ग ) = ह्या मंडलावर बसणाऱ्याला. कृणुष्व = कुरूष्व.

दुर्गानें केलेला अर्थ:— हे सूर्ये, उत्तम प्रकाशणारें ( सुकिंशुकं ), ज्याच्या-पासून सर्व प्रकारचा मळ नाहींसा झाला आहे असें ( शल्मलिं ), सोन्यासारखें दिसणारें किंवा सोन्यासारखें घेण्याला योग्य ( हिरण्यवर्णं ), पृथिवीभोंवतीं हिंडणारें किंवा किरणांनीं आच्छादलेलें ( सुवृतं ), चांगलें जाणारें किंवा दीप्तिमान् ( सुचक्रं ) असें जें जलाचें ( अमृतस्य ) स्थान ( लोकं ) म्हणजे सूर्यमंडळ त्यावर चढ व मंडलाधिष्ठाता जो सूर्य त्याला ( पत्ये ) सुखकारक ( स्योनं ) जलरूपी हुंडा ( वहतुं ) दे. सूर्या म्हणजे उषा ही सूर्याची पत्नी असल्याकारणानें तीही पृथिवीवरील जल वाफेच्या रूपानें सूर्याकडे नेते व सूर्य उगवल्यावर त्याच्यांत ती अंतर्भूत होते; सुकिं-शुकं शल्मलिं ही उपमा घेतल्यास लाल फुलांनीं फुललेल्या सावरीच्या झाडाप्रमाणें दिसणारें सूर्यमंडल असा अर्थ.

सायण:— सुकिंशुकं = शोभनकिंशुकवृक्षनिर्मितं = सुंदर पळसाच्या झाडाचा केलेला; शल्मलिं = शल्मलिवृक्षनिर्मितं = सावरीच्या झाडाचा केलेला; विश्व-रूपं=नानारूपम्; हिरण्यवर्णं = हितरमणीयवर्णं = ज्याचा रंग हितकर असून रमणीय आहे अशा; यास्क हिरण्य शब्दाची हितरमणीय अशी व्युत्पत्ति व अर्थ देतो ( पान १०६ ); तो अर्थ एथें दिला आहे; किंवा हिरण्यवर्णं = हिरण्यालंकारयुक्तम्; सुवृतं = सुष्टुवर्तनं = भराभर चालणारा; सुचक्रं = शोभनचक्रोपेतम्; अशा रथांत, हे सूर्ये, चढ; अमृतलोकाप्रत तुझें स्वतःचें जाणें ( वहतुं ) तुझा पति जो सोम त्याला सुखकर ( स्योनं ) कर.

अमृत = धन; दधाते ये अमृतं सुप्रतीके ( १।१८५।६ ) = धनवान् ( सुप्र-तीके ) ज्या द्यावापृथिवी धन ( अमृतं ) देतात ( दधाते ). अग्निः भुवद्रयिपती रयीणां सत्रा चक्राणो अमृतानि विश्वा ( १।७२।१ ) = अतीशय ( सत्रा = विश्वा ) धन ( अमृतानि ) देणारा ( चक्राणः ) अग्नि धनाचा ( रयीणां ) स्वामी ( रयिपतिः ) झाला ( भुवत् ). लोक किंवा उलोक ह्याचा ऐसपैस जागा असा अर्थ पुष्कळ ऋचांत आहे; द्यौर्देहि लोकं वज्राय विष्कभे ( ८।१००।१२ ) = हे द्यु, वज्राला आधार म्हणून ( विष्कभे ) म्हणजे ठेवावयाला विस्तृत जागा ( लोकं ) दे; ममान्तरिक्षं उरुलोकमस्तु ( १०।१२८।२ ) = ज्यांत विस्तृत जागा आहे ( उरुलोकं ) असें अंतरिक्ष माझें असो. अमृतस्य लोकं = धनाचें विस्तृत स्थल म्हणजे रथ; रथांत धन ठेवावयाचें असतें; अश्विन वगैरे देव रथांत धन घालून स्तोत्याकडे येतात. सुचक्रं = ज्याचीं चाकें उत्तम आहेत अशा रथांत. सवृत् हें सर्वत्र रथ ह्याचें विशेषण असतें; ज्या रथाचीं चाकें गरगर फिरतात तो रथ सुवृत्. हिरण्यवर्णं = ज्याचा वर्ण सोन्याचा आहे म्हणजे जो रथ सोन्याचा केला आहे. सुकिंशुकं हा शब्द फक्त एथेंच आला आहे; नुसता किंशुक शब्द ऋग्वेदांत नाहीं. शल्मलिं व शम्मलौ अशीं दोनच रूपें व तींही एकेक-

दांच आलीं आहेत. यच्छल्मलौ भवति यन्नदीषु यदोषधीभ्यः परि जायते विषम् ( ७।५०।३ ) = जें विष शल्मलींत व नद्यांत असतें व जें ओषधींपासून उत्पन्न होतें; एथें शल्मलि शब्दाचा अर्थ कळत नाहीं. स्योनं म्हणजे धन ( पानें ७०८–७०९ ). वहतुः = हुंडा, अंदण; जाया पतिं वहति वग्नुना सुमत् पुंसे इत् भद्रो वहतुः परिष्कृतः ( १०।३२।३ ) = ज्याया सुंदर रथांतून ( वग्नुना ) धन ( सुमत् ) नवऱ्याकडे नेते ( वहति ); त्या नवऱ्यालाच ( पुंसे इत् ) देण्याकरितां धनानें भरलेला ( भद्रः ) हुंडा किंवा नजराणा ( वहतुः ) तयार केला आहे ( परिष्कृतः ). सूर्याया वहतुः प्रागात् सविता यम् अवासृजत् ( १०।८५।१३ ) = जो नजराणा ( वहतुः ) सवित्यानें सूर्येच्या नवऱ्याला दिला ( अवासृजत् ) तो पुढें गेला आहे ( प्रागात् ). नासत्या वहतुं सूर्यायाः ( १।१८४।३ ) = अश्विन सूर्येचा हुंडा ( रथांत घेऊन जातात ). कन्या इव वहतुम् एतवा उ अञ्जि अञ्जानाः अभि चाकशीमि ( ४।५८।९ ) = नवऱ्याला हुंडा ( वहतुं ) नेऊन देण्याकरितां ( एतवै ) अंगावर अलंकार ( अञ्जि ) घालणाऱ्या ( अञ्जानाः ) कुमारिकांसारख्या ( कन्या इव ) ह्या घृताच्या धारा मला दिसत आहेत. त्वष्टा दुहित्रे वहतुं कृणोति ( १०।१७।१ ) = त्वष्टा आपल्या मुलीकरितां हुंडा तयार करतो. यदश्विना० अयातं त्रिचक्रेण वहतुं सूर्यायाः (१०।८५।१४) = हे अश्विनांनो, जेव्हां आपल्या तीन चाकांच्या रथांतला सूर्येचा हुंडा दिलांत. ये वध्वश्चंद्रं वहतुं यक्ष्मा यन्ति ( १०।८५।३१ ) = जे दाते ( यक्ष्माः ) वधूचा सोन्यानें भरलेला ( चन्द्रं ) हुंडा देतात ( यन्ति ). तुभ्यमग्ने पर्यवहन् सूर्यां वहतुना सह ( १०।८५।३८ ) = हे अग्नि, हुंड्यासह ( वहतुना सह ) सूर्येला तुला देते झाले. कन्या स्वतः हुंडा घेऊन पतीकडे जात असे किंवा तिचे संबंधीं हुंड्यासह तिला पतीला देत असतील; प्रस्तुत ऋचेंत सूर्या पतीला हुंडा नेऊन देते. ऋचेचा अर्थ :— हे सूर्ये, सोन्याच्या रंगाच्या, ज्याचीं चाकें उत्तम असून गरगर फिरतात अशा धनानें भरलेल्या ( अमृतस्य ) जागेंत ( लोकं ) म्हणजे रथांत चढ व धनानें भरलेला ( स्योनं ) हुंडा ( वहतुं ) पतीला दे ( कृणुष्व ).

**सविता सूर्यां प्रायच्छत् सोमाय राज्ञे प्रजापतये वा इति च ब्राह्मणम्**

सविता सोमराजाला किंवा प्रजापतीला सूर्येला देता झाला असें ब्राह्मणवचन आहे; हें ब्राह्मणवचन सांपडलें नाहीं. सविता म्हणजे सूर्य सोमाला किंवा प्रजापतीला सूर्या देतो हें वचन सूर्या म्हणजे सूर्याची पत्नी ( पान ९६७ ) ह्याच्या विरुद्ध आहे; तेव्हां हें ब्राह्मणवचन यास्कानें दिलें नसावें. दुर्ग म्हणतो :— नैरुक्तांच्या मतें सविता चंद्राला ज्योत्स्ना ( सूर्यां ) देतो; कारण चंद्राला आदित्यापासून प्रकाश मिळतो असें म्हटलें आहे ( पान ९८ ); किंवा सूर्य उषेला ( सूर्यां ) मध्यमलोकांतील जो प्रजापति त्याला देतो. जेव्हां लग्नासाठीं आतुर झालेल्या उषेला सविता नवरा पाहूं लागला तेव्हां त्या वधूला वरण्याला सोम पुढें आला व दोघे अश्विन् त्याचे साहाय्यकारी झाले ( १०।८५।९ ); असें साहाय्य करण्याबद्दल देवांनीं अश्विनांची वाहवा

केली ( १०।८५।१ ). ह्यावरून सोम हा सूर्येचा पति. पती भवथः सूर्यायाः ( ४। ४३।६ ); एथें अश्विन हे सूर्येचे दोन पति. ती अश्विनांच्या रथांत बसते असें ( ४। ४४।१॥५।७३।५ ) म्हटलें आहे. देवांनीं पूषाला सूर्या दिली अशीही एक ऋचा आहे ( ६।५८।४ ). ह्यावरून सूर्येच्या संबंधानें निरनिराळ्या दंतकथा अस्तित्वांत असाव्यात.

**वृषाकपायी (४) वृषाकपेः पत्नी। एषा एव अभिसृष्टकालतमा। तस्याः एषा भवति**

वृषाकपि म्हणजे आदित्य; त्याची पत्नी ती वृषाकपायी; वृषाकपायी ही एक सूर्याची विभूति म्हणजे रूप होय; ही विभूति दंवाचा वर्षाव करते ( वृषा ) व त्या दंवाला कंप देते ( कपायी ); ही विभूति म्हणजे उषाच. अभिसृष्टकालतमा ह्याचा अर्थ पहा ( १२।७ ).

## खंड ९ वा.

**वृषाकपायि रेवति सुपुत्र आदु सुस्नुषे।**

**घसत्त इन्द्र उक्षणः प्रियं काचित्करं हविर्विश्वस्मादिन्द्र उत्तरः ( ऋ० सं० १०।८६।१३ )**

**वृषाकपायि रेवति। सुपुत्रे मध्यमेन। सुस्नुषे माध्यमिकया वाचा। स्नुषा साधुसादिनी इति वा। साधुसानिनी इति वा। सु अपत्यम्। तत् सनोति इति वा। प्राश्नातु ते इन्द्रः उक्षणः। एतान् माध्यमिकान् संस्त्यायान्। उक्षणः उक्षतेः वृद्धिकर्मणः। उक्षन्ति उदकेन इति वा। प्रियं कुरुष्व सुखाचयकरं हविः। सर्व-स्मात् यः इन्द्रः उत्तरः तम् एतत् ब्रूमः आदित्यम्**

रेवति = रयिमति = धनवति ( दुर्ग ). सुपुत्रे = सुपुत्रे मध्यमेन = मध्यम जो इंद्र तोच पुत्र आहे जिचा अशी; उषा व इंद्र पृथिवीवरचें जल वाफेच्या रूपानें वर नेतात किंवा दोघेजण एका ठिकाणीं असतात म्हणून इंद्र हा उषेचा मुलगा. आदु = आत् + उ; हे दोन्ही शब्द निरर्थक म्हणून गाळले आहेत. सुस्नुषे = सुस्नुषे माध्य-मिकया वाचा = अंतरिक्षांतील वाक् ही जिची सून आहे अशी; ही वाक् म्हणजे गडगडाट; इंद्र व ही वाक् एके ठिकाणीं असतात म्हणून वाक् ही इंद्राची बायको व उषेची सून; मिथुनसामान्यात् ( दुर्ग ) = जसे नवरा आणि बायको ही मिथुन तसे इंद्र व वाक् हींही मिथुन. स्नुषा = स्नु + सा; स्नु = सु + नु = साधु; सा = सादिनी; साधुसादिनी = साधुनि कर्मणि सीदति असौ = प्रजोत्पत्तीचें जें उत्तम काम त्या कामाला बसलेली; किंवा सा=सनोति; प्रजोत्पत्ति हें उत्तम काम; प्रजोत्पत्ति देणारी ती साधुसानिनी; किंवा स्नुषा = सुषा = सु + सा; सु = अपत्यम्; सू = प्रसवणें; ह्या धातूपासून सु; सासऱ्याच्या पुत्राला ( सु ) जी भजते ( सा = सनोति ) ती स्नुषा म्हणजे सासऱ्याच्या मुलाची बायको; असे ह्या तीन व्युत्पत्तींचे अर्थ

दुर्ग देतो. स्नौति स्नुषा (अमर २।६।९ क्षीरस्वामी) = जिला ऋतु प्राप्त होतो ती स्नुषा; स्नु प्रस्रवणे (धा० २।२८). स्नुं सूनुं साति ददाति असौ स्नुषा (= पुत्र देणारी) अशीही व्युत्पत्ति देतां येईल. घसत् = प्राश्नातु = भक्षण करो; अद् (= खाणें) ह्याला घस् हा आदेश होतो; घस् + अत् = घसत्. उक्षणः = एतान् माध्यमिकान् संस्त्यायान्; ते उक्षणः = तव स्वभूतान् एतान् माध्यमिकान् अवश्याय-संस्त्यायान् (दुर्ग) = तुझे अंतरिक्षांत असणारे हे दंवाचे म्हणजे जलाचे समुदाय; इंद्र म्हणजे आदित्य हे जलसमुदाय भक्षण करो म्हणजे वाफेच्या रूपानें तें जल वर नेवो. उक्ष् = वाढणें ह्यापासून उक्षन्; उदकसमुदाय वाढत जातो किंवा उदकसमुदाय ओषधि वाढवितात म्हणून तो उक्षन्; किंवा उक्ष् = भिजविणें; ते उदक-समुदाय उदकानें (उदकेन) सर्व भिजवितात (उक्षन्ति). प्रियं काचित्करं हविः = प्रियं कुरुष्व सुखाचयकरं हविः; प्रियं = इष्टम्; क=कं=सुख; आचितं=आचयनम्; हविः = उदकम्; सुखाचा संचय करणारे गोड उदक दे (कुरुष्व) असा दुर्ग अर्थ करतो; काचित्करं=क+आचित् +करम्; क=सुख; आचित्=आचय. विश्वस्मात्=सर्व-स्मात्. यः व तम् एतत् ब्रूमः आदित्यं हे शब्द अध्याहृत. सर्वस्मात् यः इन्द्रः उत्तरः तम् एतत् ब्रूमः आदित्यं (= सर्वांहून श्रेष्ठ जो इंद्र म्हणजे आदित्य त्याला आम्ही हें म्हणतों) हे भाष्यांतील शब्द एथें अप्रस्तुत होत; कारण ऋचेंत आदित्य संबो-धिला नसून वृषाकपायी संबोधिली आहे; तेव्हां विश्वस्मात् यः एषः इन्द्रः आदित्यः उत्तरः तदर्थम् हे दुर्गवृत्तींतले शब्द योग्य दिसतात; सर्वस्मात् य इन्द्रः उत्तरः तद-र्थम् हा मूळ पाठ असेल; सर्वांहून श्रेष्ठ जो इंद्र म्हणजे आदित्य त्याच्याकरितां (इष्ट व सुखकर जल दे) असा त्या शब्दांचा अर्थ.

दुर्गानें केलेला अर्थः—हे धनवती, पुत्रवती व स्नुषावती वृषाकपायी, तूं सांचविलेले उदकसमुदाय इंद्र म्हणजे आदित्य भक्षण करो; सर्वांहून श्रेष्ठ जो आदित्य त्याच्याकारितां इष्ट व सुखकर असा जलरूपी हवि दे.

**सायणः**— कामानां वर्षकत्वात् अभीष्टदेशगमनात् च इंद्रः वृषाकपिः = इच्छा पुरवितो व इष्ट देशाकडे जातो म्हणून वृषाकपि म्हणजे इंद्र; वृषाकपिः = वृषा + कपिः; वृषा = कामानां वर्षिता; कपिः ? वृषाकपीची बायको ती वृषाकपायी; किंवा वृषाकपायि = वृषाकपेः मम मातर् = वृषाकपि जो मी त्या माझ्या हे आई; रेवति = धनवति; सुपुत्रे = शोभनपुत्रे; सुस्नुषे = शोभनस्नुषे; उक्षणः = सेचन-समर्थान् पशून् = रेतस्सिंचन करणाऱ्या म्हणजे जोमांत आलेल्या पशूंना; घसत् = प्राश्नातु; आत् उ = अनंतरम् एव; कं सुखम्। तस्य आचित् संचः। तत् करं = सुखसमृद्धि करणारें; प्रियं = इष्टम्; कुरु (अध्याहृत) = दे; धनवान्, पुत्रवती व जिला सून आहे अशी हे इंद्राणी, इंद्र तुझे हे जोमांत आलेले पशु खावो; त्याला अतिशय सुख देणारा इष्ट असा हवि दे; तुझा पति इंद्र सर्वांहून श्रेष्ठ आहे.

वृषाकपि हा इंद्राचा मित्र होता(पान९३१);त्याची बायको वृषाकपायी;ती धनवान्

असून तिला मुलगे व सुनाही होत्या; तिला उद्देशून प्रस्तुत ऋचा रचिली आहे. उक्षणः हे खरोखरचे बैल; इंद्राला तहान भागविण्याकरितां सोमानें भरलेली तळीं व भुकेकरितां बैल व रेडे लागत असें कांहीं ऋचांत विनोदानें म्हटलें आहे. उक्ष्णो हि मे पञ्चदश साकं पचन्ति विंशतिम्। उताहमद्मि पीव इत् उभा कुक्षी पृणन्ति मे (१०।८६।१४) = माझ्याकरितां देव पंधरावीस बैल एका वेळीं शिजवितात; मी त्या बैलांचे मांस खातों; अशा रीतीनें देव माझ्या दोन्ही कुशी मांसानें खच्चून भरतात. घसत् ते इन्द्र उक्षणः= हे वृषाकपायी, इंद्रानें तुझे कित्येक बैल खावून टाकले आहेत; हे बैल त्याचा प्रिय हवि होत; ह्या बैलांशिवाय त्याला इतर कोणताहि हवि आवडत नाहीं. काचित्करं हा शब्द एथेंच आला आहे; त्याचा अर्थ करतां येत नाहीं. खजंकरः, सत्राकरः, सुकरं, इष्करं ह्या सर्वांचा अर्थ धन देणारा; काचित् = क + आ + चित्; ह्या तिन्ही शब्दांचा धन असा अर्थ होतो; काचित्करं हविः = पुष्कळ धन देणारा हवि; इंद्राला हवि दिल्यानें पुष्कळ धन मिळतें असा अर्थ असेल. विश्वस्मादिन्द्र उत्तरः हे शब्द सूक्तांतील प्रत्येक ऋचेच्या शेवटीं येतात.

**सरण्यूः (५) सरणात्। तस्याः एषा भवति**

सृ (= हलणें, जाणें) ह्यापासून सरण्यू; सरति असौ सरण्यूः; हीच उषा जेव्हां सूर्याकडे जाते व दोघांमध्यें कोणताहि भेद रहात नाहीं तेव्हां तिला सरण्यू म्हणतात. सरण्यू घोडीचें रूप घेऊन विवस्वतापासून पळून गेली म्हणून तिला सरण्यू नांव पडलें असेंही सरण्यू शब्दाचें विवरण करतां येईल.

## खंड १० वा.

**अपागूहन्नमृतां मर्त्येभ्यः कृत्वी सवर्णामददुर्विवस्वते। उताश्विनावभरद्यत्तदासीदजहादु द्वा मिथुना सरण्यूः (ऋ० सं० १०।१७।२)**

**अपागूहन् अमृतां मर्त्येभ्यः। कृत्वी सवर्णाम् अददुः विवस्वते। अपि अश्विनौ अभरत्। यत् तत् आसीत्। अजहात् द्वौ मिथुनौ सरण्यूः। मध्यमं च माध्यमिकां च वाचम् इति नैरुक्ताः**

अपागूहन् बद्दल महाराष्ट्रपाठ अप्यगूहन् आहे; अपि + अगूहन् = पार लपविते झाले. भाष्यांत कृत्वी बद्दल कृत्वा शब्द कां घातला नाहीं? उत = अपि; दुर्गवृत्तींत अपि नाहीं. द्वा मिथुना = द्वौ मिथुनौ = दोन जोडया; ह्या दोन जोडया म्हणजे इंद्र (मध्यमं) व माध्यमिका वाक् असें नैरुक्त म्हणतात.

दुर्गानें केलेला अर्थः— सूर्यकिरण मनुष्यांपासून वृषाकपायीअवस्थेंत असलेल्या उषेला लपविते झाले व तिला सूर्यासारखी (सवर्णाम्) करून मग ते तिला विवस्वताला म्हणजे सूर्याला देते झाले; ती उषा अश्विनांचा तो स्तुतिकाल असल्यामुळें त्यांना स्तुतींनीं युक्त करती झाली किंवा तो त्यांना हवि देण्याचा काल असल्याकारणानें ती त्यांना हवींनीं युक्त करती झाली; उषेचें किंवा सरण्यूचें जें रूप होतें तें रूप

म्हणजे इंद्र व माध्यमिका वाक् ह्यांचें रूप उषा टाकून देती झाली; म्हणजे जोंपर्यंत उषा अंतरिक्षांत होती तोंपर्यंत तिचीं इंद्र व माध्यमिका वाक् अशीं दोन रूपें होतीं; सूर्यमंडलांत गेल्याबरोबर तिचीं तीं दोन रूपें नाहींशीं झालीं. असा अस्वाभाविक अर्थ दुर्ग करतो.

**यमं च यमीं च इति ऐतिहासिकाः। तत्र इतिहासम् आचक्षते। त्वाष्ट्री सरण्यूः विवस्वतः आदित्यात् यमौ मिथुनौ जनयांचकार। सा सवर्णाम् अन्यां प्रतिनिधाय आश्वं रूपं कृत्वा प्रदुद्राव। स विवस्वान् आदित्यः आश्वम् एव रूपं कृत्वा ताम् अनुसृत्य संबभूव। ततः अश्विनौ जज्ञाते। सवर्णायां मनुः। तदभिवादिनी एषा ऋक् भवति**

हीं दोन जुळीं यम व यमी होत असें इतिहासकार म्हणतात; यमं व यमीं हे द्वितीयांत शब्द अजहात् ह्याचें कर्म. इतिहासकार तत्संबंधीं इतिहास सांगतात तो असा; त्वष्ट्याची मुलगी सरण्यू सूर्यापासून ( विवस्वतः ) यम व यमी ह्यांना जन्म देती झाली; आपल्यासारखीच दुसरी एक स्त्री घरीं ठेवून व स्वतः घोडीचें रूप घेऊन ती दूर पळून गेली; सूर्यहि घोडयाचें रूप घेऊन व तिच्या पाठोपाठ जाऊन तिच्याशीं संभोग करता झाला; त्या समागमापासून अश्विन जन्मास आले; आपल्या सारखीच जी स्त्री सरण्यूनें घरीं ठेविली होती तिच्यापासून मनु जन्मास आला. हा इतिहास सांगणारी ( तदभिवादिनी ) पुढील ऋचा होय. या इतिहासाला अनुलक्षून दुर्गानें ऋचेचा केलेला अर्थः— लोकहितार्थ पुढें होणारा अश्विनांचा जन्म लक्षांत घेऊन ( पहिल्या विवरणांत सांगितलेले ) सूर्यकिरण प्राणस्वरूप होऊन त्वष्ट्याच्या मुलीला म्हणजे सरण्यूला घोडीचें रूप देते झाले व अमर अशा तिला मनुष्यांपासून लपविते झाले म्हणजे तिला ते उत्तरकुरूंकडे घेऊन गेले; नंतर तिच्या सारखीच एक स्त्री उत्पन्न करून ते ती सूर्याला देते झाले. नंतर जें ( यत् ) घोडीचें रूप होतें ( आसीत् ) त्याच स्वरूपानें ती उत्तरकुरूंत अश्विनांना जन्म देऊन त्यांना पोसती झाली; सूर्यापासून यम व यमी यांना जन्म देऊन व नंतर त्यांना टाकून देऊन ती नाहींशी झाली. हें यास्काच्या भाष्याचें विवरण होय; परंतु दुर्गापुढें असलेलें यास्कभाष्य प्रस्तुत खंडांत दिलेल्या भाष्याहून कांहींसें निराळें असावें असें वाटतें; कारण प्रस्तुत भाष्यांत उत्तरकुरूंचा निर्देश नाहीं व दुर्गानें दिलेल्या विवरणांत सवर्णेपासून मनु जन्मला ही कथा नाहीं.

**सायणः**—अमर असलेल्या सरण्यूला देव मनुष्यांपासून लपविते झाले व तिच्या सारखीच एक स्त्री निर्माण करून विवस्वताला म्हणजे सूर्याला ती देते झाले; नंतर ती घोडीचें रूप घेऊन आपल्या उदरांत गर्भरूपानें अश्विनांना धारण करती झाली; जेव्हां ( यत् ) तिचा घोड्याशीं समागम झाला तेव्हां जें रेतस्खलन ( तत् ) झालें ( आसीत् ) त्याच्यापासून तिनें अश्विनांना जन्म दिला; त्याचप्रमाणें ती सरण्यू दोन जुळीं म्हणजे यम व यमी ह्यांना उदरांतून बाहेर टाकती झाली म्हणजे जन्म देती झाली; किंवा सरण्यू म्हणजे अंतरिक्षांतील त्या नांवाची देवता; ती अंत-

रिक्षांतील अग्नि व माध्यमिका वाक् ह्यांना उत्पन्न करती झाली. हा दुसरा अर्थ शेवटल्या चरणाचा होय; पण पहिल्या तीन चरणांचें ऐतिहासिक विवरण केलें आहे; तेव्हां पहिले तीन चरण व चवथा चरण ह्यांच्या अर्थांची संगति कशी लावावयाची? देव मनुष्यांपासून त्यांना उत्पन्न करण्याकरितां (तदुत्पत्त्यर्थं) सरण्यूला लपविते झाले असा पहिल्या चरणाचा अर्थ केला आहे; पण मनुष्यें उत्पन्न व्हावयाच्या आधींच त्यांच्यापासून सरण्यू लपविली गेली असें म्हणणें चमत्कारिक दिसतें.

बृहद्देवतेंत पुढील कथा दिली आहे:—अभवन्मिथुनं त्वष्टुः सरण्यूस्त्रिशिराः सह। स वै सरण्यूं प्रायच्छत्स्वयमेव विवस्वते॥ ततः सरण्य्वां जाते ते यमयम्यौ विवस्वतः। तावप्युभौ यमावेव ह्यास्तां यम्या च वै यमः॥ सृष्ट्वा भर्तुः परोक्षं तु सरण्यूः सदृशीं स्त्रियम्। निक्षिप्य मिथुनं तस्यामश्वा भूत्वा प्रचक्रमे॥ अविज्ञानाद्विवस्वांस्तु तस्यामजनयन्मनुम्। राजर्षिरासीत्स मनुर्विवस्वान् इव तेजसा॥ स विज्ञाय अपक्रान्तां सरण्यूमश्वरूपिणीम्। त्वाष्ट्रीं प्रतिजगामाशु वाजी भूत्वा सलक्षणः॥ सरण्यूस्तु विवस्वन्तं विज्ञाय हयरूपिणम्। मैथुनायोपचक्राम तां च तत्रारुरोह सः॥ ततस्तयोस्तु वेगेन शुक्रं तदपतद्भुवि। उपाजिघ्रच्च सा त्वश्वा तच्छुक्रं गर्भकाम्यया॥ आघ्रातमात्रात् छुक्रात्तु कुमारौ संबभूवतुः। नासत्यश्चैव दस्रश्च यौ स्तुतावश्विनाविति (बृहद्देवता ६।१६२–१६३॥७।१–६)॥

## खंड ११ वा.

**त्वष्टा दुहित्रे वहतुं कृणोतीतीदं विश्वं भुवनं समेति। यमस्य माता पर्युह्यमाना महो जाया विवस्वतो ननाश (ऋ० सं० १०।१७।१)**

**त्वष्टा दुहितुः वहनं करोति। इमानि च सर्वाणि भूतानि अभिसमागच्छन्ति। यमस्य माता पर्युह्यमाना महतः जाया विवस्वतः ननाश। रात्रिः आदित्यस्य। आदित्योदये अन्तर्धीयते**

दुहित्रे = दुहितुः. वहतुं = वहनं = विवाहं (दुर्ग). कृणोति = करोति. इति शब्द भाष्यांत कां गाळला तें समजत नाहीं. इदं विश्वं भुवनं समेति = इमानि च सर्वाणि भूतानि अभिसमागच्छन्ति; इति इदं विश्वं भुवनं भूतजातं विवाहदर्शनप्रेप्सया समेति (दुर्ग). = म्हणून विवाह पाहण्याच्या इच्छेनें सर्व प्राणी एकत्र होऊन जातात. महः = महतः. यम जरी पुढें विवाहानंतर जन्माला आला तरी विवाहाच्या अगोदरच विवस्वतेच्या बायकोला यमाची आई म्हटलें आहे (दुर्ग). पर्युह्यमाना = परि + उह्यमाना = पर्यूढा (दुर्ग) = लग्न झालेली. लग्न झाल्यावर यम व यमी ह्यांना जन्म देऊन ती त्यांना टाकून देती झाली व नंतर घोडीचें रूप घेऊन नाहींशी झाली (दुर्ग). दुर्गानें केलेला अर्थ:— त्वष्टा आपल्या मुलीचें लग्न करतो आहे असें ऐकून विवाहसमारंभ पाहण्याच्या इच्छेनें सर्व प्राणिमात्र एकत्र होऊन लग्नाला जातात; यमाची आई व महान् विवस्वताची बायको लग्न झाल्यावर यम व यमी ह्यांना जन्म देऊन त्यांना टाकून देती झाली व घोडीचें रूप घेऊन नाहींशी

झाली. नैरुक्तांच्या मतें ज्याया विवस्वतः = रात्रिः आदित्यस्य; रात्र सूर्य उगवतांच अंतर्धान पावते. रात्र म्हणजे उषा; उषा ही सूर्याची बायको; सूर्य उगवतांच ती नाहींशी होते ( दुर्ग ). नैरुक्तांच्या मताला अनुसरून दुर्गानें केलेला अर्थः— त्वष्टा म्हणजे इंद्र; तमोभाग ही उषा; ती दुहिता म्हणजे दूर ठेविलेली असते म्हणजे तमोरूपी उषा मध्यम लोकीं राहते; जेव्हां ती प्रकाशरूप होते तेव्हां तिला इंद्र विवस्वताकडे पाठवितो; पहाट झाल्याबरोबर सर्व प्राणी आपापलीं कामें करावयास लागतात; यमस्य माता म्हणजे मध्यम जो इंद्र त्याची आई म्हणजे इंद्राची आई उषा असें म्हणण्यांत कांहींही आश्चर्य नाहीं; कारण अशा गोष्टी देवांमध्यें पुष्कळ वेळीं घडून येतात; किंवा द्युलोकींचा जो सूर्य त्याची ( यमस्य ) आई; उषा सूर्याला जन्म देते; ज्यायेला ज्याया म्हणण्याचें कारण पति पुत्ररूपानें तिच्यापासून जन्मतो म्हणून उषा ही सूर्याची ज्याया; उषा महान् सूर्याच्या प्रकाशानें दूर दूर सारलेली शेवटीं नाहींशी होते. शब्दांचे वेडेवांकडे अर्थ करून दुर्गानें नैरुक्तांचें मत विशद करण्याकरितां असा अर्थ केला आहे.

**सायणः**— त्वष्टा नांवाचा देव आपल्या मुलीचा विवाह करीत आहे म्हणून सर्व प्राणिमात्र त्या विवाहाला गेले; जिचें विवस्वताशीं लग्न व्हायचें होतें ( पर्युह्यमाना = विवस्वता उद्वोढव्या ) अशी यम व यमी ह्यांची आई व महान् विवस्वताची सरण्यू नांवाची बायको नाहींशी झाली म्हणजे उत्तरकरूंकडे गेली.

वहतुः=आंदण (पान ९७०). त्वष्टा आपल्या सरण्यू नांवाच्या मुलीकरितां (दुहित्रे) मोठ्या अंदणाची तयारी करीत आहे असें ऐकून हें सर्व जग तें आंदण पाहण्याकरितां तेथें जमतें; यमाची होवूं घातलेली आई व महान् विवस्वताची होवूं घातलेली बायको विवाह चालला असतांनाच ( परि + उह्यमाना ) नाहींशी झाली. ती कशी नाहींशी झाली तें मागील खंडांतील ऋचेंत सांगितलें आहे; त्या ऋचेचा अर्थः— विवाहसमारंभ पाहण्यासाठीं जे मर्त्यलोक जमा झाले होते त्यांच्यापासून ( मर्त्येभ्यः ) देव अमर सरण्यूला ( अमृतां ) अगदीं दूर लपवून ठेविते झाले ( अप + अगूहन् ); तिच्या सारखीच ( सवर्णां ) एक स्त्री निर्माण करून ते ती विवस्वताला देते झाले; ऋचेचा दुसरा अर्ध कठीण आहे; यत् तत् आसीत् ह्या शब्दांचा तेथें असलेला संबंध कळत नाहीं; द्वा मिथुना म्हणजे दोन जुळे मुलगे; हे दोन जुळे मुलगे अश्विन कीं दुसरे कोणी ? अभरत् म्हणजे देती झाली कीं गर्भरूपानें धारण करती झाली ? सरण्यू दोन जुळयांना टाकून देती झाली म्हणजे काय ? सरण्यू हीच अश्विनांची आई कीं देवांनीं तिच्यासारखी बनविलेली स्त्री ती त्यांची आई ? ही ऋचा व प्रस्तुत खंडांतील ऋचा ह्या सूक्तांत आलेल्या पुढील सर्व ऋचांहून अगदीं विलग आहेत; त्यांचा सूक्तांतील इतर ऋचांशीं कोणताही संबंध नाहीं; त्यामुळें ह्या दोन ऋचांत सांगितलेला वृत्तांत अगदीं त्रोटक असून बराच गूढ आहे. इतिहासकारांनीं ही कथा वाढविली आहे; पण तसें करण्याला ऋग्वेदांत मुळींच आधार आढळत नाहीं.

## खंड १२ वा.

**सविता (७) व्याख्यातः ( निरु० ७।३१॥१०।३१)। तस्य कालः यदा द्यौः अपहततमस्का आकीर्णरश्मिः भवति। तस्य एषा भवति**

सविता शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पानें ५९२–५९३ व ८१९–८२० ). सविता = सूर्य; जेव्हां द्युलोकांतून तम नाहींसें होऊन तेथें किरण पसरतात तो सूर्याचा काल; अशा वेळेला आदित्याला सविता म्हणतात. अपहतं तमः यस्याः सा अपहततमस्का. आकीर्णाः रश्मयः यस्यां सा आकीर्णरश्मिः.

## खंड १३ वा.

**विश्वा रूपाणि प्रति मुञ्चते कविः प्रासावीद्भद्रं द्विपदे चतुष्पदे। वि नाकमख्यत्सविता वरेण्योऽनु प्रयाणमुषसो वि राजति ( ऋ० सं० ५।८१।२ )**

**सर्वाणि प्रज्ञानानि प्रतिमुञ्चते मेधावी। कविः क्रान्तदर्शनः भवति। कवतेर्वा। प्रसुवति भद्रं द्विपाद्भ्यश्च चतुष्पाद्भ्यश्च। व्यचिख्यपत् नाकं सविता वरणीयः। प्रयाणम् अनु उषसः विराजति**

विश्वा = विश्वानि=सर्वाणि. रूपा = रूपाणि = प्रज्ञानानि; दुर्गवृत्तींत प्रज्ञानानि नसून रूपाणि आहे. कविः = मेधावी = बुद्धिमान्; बुद्धिमानांना कवि म्हणण्याचें कारण त्यांची दृष्टि वस्तूंच्या पलीकडे गेलेली असते ( क्रान्तदर्शनः ) म्हणजे त्यांना अतींद्रिय ज्ञान असतें; क्रान्तं = विषयान् अतिक्रान्तं = पदार्थांच्या पलीकडे गेलेली; दर्शनं = दृष्टि; क्रम् (=जाणें) ह्यापासून कवि; क्रम् व कवि ह्यांत क् एवढेंच सामान्य अक्षर; किंवा कु ह्या धातूपासून कवि; कवते गच्छति असौ कविः; सूर्य आकाशांत संचार करतो म्हणून तो कवि. कुङ् शब्दे ( धा० १।९७६ ) एवढाच अर्थ धातुपाठांत आहे. प्रासावीत् = प्रसुवति = जनयति अभ्यनुजानाति च ( दुर्ग )=उत्पन्न करतो व संमति देतो; षुप्रसवैश्वर्ययोः ( धा० १।९६६॥२।३१ ); प्रसव = अभ्यनुज्ञानं = संमति किंवा परवानगी; षु धातूचीं सवति व सौति अशीं रूपें होतात; षूङ् प्राणिगर्भविमोचने ( धा० ६।१२७ ); ह्याचें प्रसुवति हें रूप; प्रसुवति ह्याचा अभ्यनुजानाति हा अर्थ दुर्गानें कसा केला ! द्विपदे चतुष्पदे = द्विपाद्भ्यश्च चतुष्पाद्भ्यश्च. व्यख्यत् = वि + अख्यत् = वि + अचिख्यपत्; ख्या = दिसणें; ख्यापय् = दाखविणें; अचिख्यपत् हें तृतीय भूतकालाचें तृतीय पुरुषाचें एकवचन; चक्ष् ( = पाहणें ) ह्याला ख्या हा आदेश होतो. वि नाकम् अख्यत् = द्युलोकाला दाखवितो म्हणजे दृष्टीच्या टप्यांत आणतो; द्युलोक दिसूं लागतो; कारण द्युलोकांत सूर्यकिरण त्यावेळीं पसरलेले असतात. वरेण्यः = वरणीयः = याचना करण्यास योग्य; दुर्गवृत्तींत वरेण्यः किंवा वरणीयः नाहीं.

दुर्गानें केलेला अर्थः— अतींद्रिय द्रष्टा किंवा द्युलोकीं सतत संचार करणारा ( कविः ) सविता सर्व वस्तूंमध्यें रूपें बांधतो ( प्रतिमुञ्चते ) म्हणजे घालतो; ( रात्रीं

वस्तूंचीं रूपें दिसत नाहींत; तीं सूर्योदय झाल्यावर दिसूं लागतात ); तो मनुष्यांसारख्या दोन पायांच्या प्राण्यांना व गायींसारख्या चार पायांच्या प्राण्यांना सुख ( भद्रं ) देतो ( प्रासावीत् ); तो द्युलोक दृष्टिपंथात आणतो; उषा निघून गेल्यावर ( प्रयाणम् अनु ) तो अधिक प्रकाशूं लागतो ( विराजति ). यास्क रूपाणि ह्याचा प्रज्ञानानि असा अर्थ करतो; तेव्हां सविता सर्व म्हणजे सर्वांच्या बुद्धि त्यांच्या मनांत घालतो म्हणजे सर्वांच्या बुद्धि जागृत करतो असा त्याच्या मनांतला अर्थ असावा.

**सायण:**— अतिबुद्धिमान् ( कविः ) सविता सर्व रूपें स्वतःच्या ठिकाणीं बांधतो ( प्रतिमुञ्चते ) म्हणजे धारण करतो; मनुष्यांना व चतुष्पाद् प्राण्यांना सर्वत्र हिंडण्याचें सुख ( भद्रं ) म्हणजे सर्वत्र हिंडण्याची शक्ति तो देतो ( प्रासावीत् ); याचना करण्यास योग्य ( वरेण्यः ) सविता यजमानाला द्युलोक ( नाकं ) दाखवितो ( वि + अख्यत् ); उषा गेल्यानंतर तो प्रकाशूं लागतो. दुर्ग व सायणाचार्य प्रतिमुञ्चते याचा बध्नाति असा अर्थ करतात; प्रतिमुच् = बांधणें असा अर्थ आपट्यांच्या कोशांत सांपडतो; पण मुचि धारणोच्छ्रायपूजनेषु ( धा० १।१७३ ) एथें बंधन हा अर्थ दिला नाहीं.

रूप = धन ( पान ७७७ ). मुच् किंवा मुञ्च् ह्याचा अर्थ कोणत्यातरी आपत्तींतून सोडणें असा आहे; पण प्रस्तुत ऋचेंत व आणखी एका ठिकाणीं प्रतिमुञ्चते ह्याचा अर्थ अंगावर घालतो असा आहे; दिवो धर्ता भुवनस्य प्रजापतिः पिशंगं द्रापिं प्रति मुञ्चते कविः ( ४।५३।२ ) = द्युलोकाचा आधार, भुवनाचा प्रजापति व अद्भुत कृत्यें करणारा ( कविः ) सविता आपल्या अंगावर लाल (पिशङ्गं) झगा ( द्रापिं ) घालतो ( प्रतिमुञ्चते ). एकें ठिकाणीं मुच् ह्याचा देणें असा अर्थ आहे; नियुत्वाना नियुतः स्पार्हवीराः इंद्रवायू सरथं यातमर्वाक् । इदं हि वां प्रभृतं मध्वो अग्रम् अध प्रीणाना वि मुमुक्तमस्मे ( ७।९१।५ ) = हे इंद्रवायूहो, अतीशय धनानें युक्त ( स्पार्हवीराः ) असें धन ( नियुतः ) देणारे ( नियुत्वानौ ) तुम्हीं रथांत बसून ( सरथं ) खालीं या; हा उत्तम ( अग्रं ) सोम तुम्हांला अर्पण केला जात आहे ( प्रभृतं ); त्यानें संतुष्ट होऊन ( प्रीणानौ ) आम्हांला ( अस्मे ) धन द्या (वि मुमुक्तं). अद्भुत कृत्यें करणारा ( कविः ) सविता सर्व प्रकारचीं ( विश्वानि ) रूपें ( रूपाणि ) धारण करतो (प्रतिमुञ्चते ). भद्रं=(१) कल्याण, (२) धन;(१व२) भद्रं सोमः सुवानः अद्या कृणोतु नः ( १०।३५।२ ) = ( १ ) रस काढला जाणारा ( सुवानः ) सोम आज आम्हांला आरोग्य ( भद्रं ) देवो ( कृणोतु ); ( २ ) देणारा ( सुवानः ) दाता ( सोमः ) आज आम्हांला धन ( भद्रं ) देवो. ( १ ) तेभ्यो भद्रं अंगिरसो वो अस्तु ( १०।६२।१ ) = हे अंगिरसांनो, त्या तुमचें कल्याण होवो; दक्षं ते भद्रम् आभार्षं परा यक्ष्मं सुवामि ते ( १०।१३७।४ ) = तुला मी बळ ( दक्षं ) व आरोग्य ( भद्रं ) आणून दिलें आहे ( आभार्षं ); तुझा क्षय ( यक्ष्मं ) मी दूर घालवून देतों ( परासुवामि ). ( २ ) भद्रंभद्रं व आ भर इषमूर्जं शतक्रतो ( १०।१२३।१३ ) = हे धन-

वंता इंद्रा, आम्हांला पुष्कळ धन ( भद्रंभद्रं = इषं = ऊर्जं ) दे ( आभर ). प्रासावीत् भद्रं द्विपदे चतुष्पदे = तो दोन पायांच्या व चार पायांच्या प्राण्यांना आयुरारोग्य देत असतो. शं नो अस्तु द्विपदे शं चतुष्पदे ( १०।१६५।१ ); एथें जो शं चा अर्थ तोच भद्रं याचा म्हणजे आयुरारोग्य. वि + अख्यत् = (१) प्रकाशित करता झाला, ( २ ) धन देता झाला. ( १ ) अष्टौ व्यख्यत् ककुभः पृथिव्याः ( १।३५।८ ) = सूर्य पृथिवीच्या आठही बाजूंना किंवा प्रांतांना प्रकाशित करता झाला. पतिर्विश्वस्य भूमनो व्यख्यत् रोदसी उभे ( ९।१०।१७ ) = ( १ ) सर्व भूमीचा ( भूमनः ) पति जो सोम तो दोन्ही रोदसींना म्हणजे द्यावापृथिवींना प्रकाशित करता झाला; ( २ ) सर्व धनाचा ( भूमनः ) दाता ( पतिः ) दोन्ही द्यावापृथिवींतले धन देता झाला. सविता = ( १ ) सूर्य, ( २ ) दाता. वरेण्यः = ( १ ) श्रेष्ठ, ( २ ) धनवान्. ( १ ) वृत्रं जघन्वान् अभवत् वरेण्यः ( १०।११३।२ ) = वृत्राला मारणारा इंद्र सगळ्या देवांत श्रेष्ठ झाला. ( २ ) अग्ने रायो दिदीहि नः सुवृक्तिभिर्वरेण्य ( ५।२५।३ ) = हे धनवान् ( वरेण्य ) अग्नि, तूं आपल्या धनांतून ( सुवृक्तिभिः ) आम्हांला धन ( रायः ) दे ( दिदीहि ). ( १ व २ ) वज्रं शिशाति धिषणा वरेण्यम् ( ८।१५।७ ) = ( १ ) इंद्राची आई धिषणा त्याचें श्रेष्ठ वज्र पाजविते; ( २ ) धनदात्री ( धिषणा ) अतिशय ( वरेण्यं ) धन ( वज्रं ) देते ( शिशाति ). वि नाकमख्यत्सविता वरेण्यः = सर्व देवांत श्रेष्ठ सूर्य द्युलोकाला प्रकाशित करता झाला. अनुप्रयाणमुषसो विराजति = उषेनें प्रयाण केल्यावर तो प्रकाशतो. ऋचेचा धनपरही अर्थ असावा; पण त्या अर्थाच्या विरुद्ध द्विपदे व चतुष्पदे हे शब्द येतात; द्विपद व चतुष्पद हे अकारान्त शब्द मानल्यास द्विपदे व चतुष्पदे हे शब्द सप्तम्यंत होतील; द्वि व चतुर् ह्यांचा अर्थ असंख्य; पद = धन; द्विपदे = चतुष्पदे = धन भांडारांत. नाक = ( १ ) द्युलोक, ( २ ) द्युलोकांतील धन.

ऋचेचा धनपर अर्थः— दाता ( कविः ) अतिशय ( विश्वानि ) धन (रूपाणि) देतो ( प्रतिमुञ्चते ); तो धनभांडारांत ( द्विपदे = चतुष्पदे ) धन ( भद्रं = प्र ) देत असतो ( असावीत् ); धनवान् ( वरेण्यः ) दाता ( सविता ) द्युलोकांतलें धन (नाकं) देत असतो ( वि + अख्यत् ); उषेसारख्या तेजस्वी धनांतून ( उषसः ) तो अतिशय ( प्रयाणं ) धन ( वि ) सतत ( अनु ) देतो ( राजति ). या = देणें; यानं = दान, धन; प्रयाणं = अतिशय धन. अनु = सतत.

**अधोरामः सावित्रः ( काठक सं० ५।८।१॥ तै० सं० ५।५।२२॥ वाज० सं० २९। ५८ ) इति पशुसमाम्नाये विज्ञायते। कस्मात् सामान्यात् इति। अधस्तात् तद्वेलायां तमो भवति। एतस्मात् सामान्यात्। अधस्तात् रामः अधस्तात् कृष्णः। कस्मात् सामान्यात् इति। अग्निं चित्वा न रामामुपेयात् ( काठक सं० २१।७ )। रामा रमणाय उपेयते न धर्माय ( वासिष्ठधर्मशास्त्रं १८।१६ )। कृष्णजातीया। एतस्मात् सामान्यात्। कृकवाकुः सावित्रः ( मैत्रा० सं० ३।१४।१५॥ काठक सं० ५।**

७।८ ) इति पशुसमाम्नाये विज्ञायते । कस्मात् सामान्यात् इति । कालानुवादं परीत्य । कृकवाकोः पूर्वं शब्दानुकरणम् । वचेः उत्तरम्

यजुर्वेदांत पशुसंघ सांगितला आहे म्हणजे निरनिराळ्या पशूंचीं नांवें दिलीं आहेत; त्या नामावलींत ( पशुसमाम्नाये ) कोंबडा ( अधोरामः ) सवित्याचा (सावित्रः) असें म्हटलें आहे ( विज्ञायते ); अधोरामः सावित्रः ह्या शब्दांवरून सूर्योदयाचा कोणता काळ तें ठरवितां येतें; कोंबडा आरवतो तो सूर्योदयाचा काल; प्रस्तुत ऋचेंतील वि नाकम् अख्यत् सविता ह्या शब्दांवरून तो काळ ठरवितां येतो; पृथिवीवर अंधकार पण द्युलोकांत तमोनाश व सूर्यकिरणांचा प्रसार ज्यावेळीं होतो तो सूर्योदयाचा काल; त्यावेळीं कोंबडे आरवतात. कोंबडा व सूर्योदयाचा काल ह्या दोहोंत कोणता सामान्य धर्म आहे कीं ज्यामुळें कोंबडा सवित्याचा अशी भाषा अस्तित्वांत आली? त्यावेळीं खालीं म्हणजे पृथिवीवर ( अधः ) काळोख ( रामः ) असतो व द्युलोकीं उजेड असतो; कोंबडयाचाही खालचा भाग काळा असतो व डोकें लाल असतें; ह्या सामान्य धर्मा-मुळें कोंबडा सवित्याचा असें म्हटलें गेलें. अधोरामः = अधः + रामः; अधः = अध-स्तात्; रामः = कृष्णः. काळ्या रंगाला राम म्हटलें आहे तें कोणत्या सामान्य धर्मा-मुळें? म्हणजे त्या दोहोंत सामान्य धर्म कोणता? अग्निचिति नांवाच्या यज्ञांत अग्नि प्रज्वलित केल्यावर (चित्वा) मैथुनासाठीं रामेकडे म्हणजे काळ्या रंगाच्या स्त्रीकडे जाऊं नये ( न उपेयात् ) असें म्हटलें आहे. काळ्या रंगाच्या स्त्रीकडे ( रामा ) रतिसुख भोगण्या-साठीं ( रमणाय ) लोक जातात ( उपेयते ), धर्मकृत्यासाठीं ( धर्माय ) जात नाहींत; धर्मकृत्यें लग्नाच्या बायकोबरोबरच केलीं पाहिजेत; वाटल्यास रतिसुख कृष्णवर्णे स्त्रीशीं म्हणजे जिच्याशीं आपलें लग्न झालें नाहीं अशा काळ्या रंगाच्या स्त्रीशीं करावें; ती धर्मचारिणी नसण्याचें कारण ती काळ्या जातींतील होय असें वसिष्ठस्मृतींत सांगितलें आहे. आधुनिक कालांत जो काळागोरा असा वर्णविरोध जारीनें सुरू आहे तोच पूर्वकालींही जारीनें सुरू होता; आर्य हे गौरवर्ण व अनार्य हे कृष्णवर्ण; दोहोंत लग्नसंबंध होणें अशक्य; काळ्या गोऱ्यांचा संबंध लग्नाचा नसून रतिसुखोप-भोगाचा असतो. रतिसुखासाठीं जिच्याशीं समागम करावयाचा ती रामा; ही रामा काळ्या जातींतल्या लोकांपैकीं म्हणून रामा म्हणजे काळी असा राम व कृष्ण ह्या दोन शब्दांमधील संबंध; एथें सामान्य शब्दाचा अर्थ सादृश्य नसून संबंध असा आहे. राम म्हणजे काळा हें सिद्ध करण्याकरितां वरील ब्राह्मणवचन घेतलें आहे. अग्निं चित्वा प्रथमं चित्वा न रामामुपेयात् । द्वितीयं चित्वा नान्येषां स्त्रियः । तृतीयं चित्वा न कांचन ( काठक सं० २१।७ ) = पहिला अग्निचिति याग केल्यावर रतिसुखा-साठीं रामेकडे जाऊं नये; दुसरा केल्यावर दुसऱ्यांच्या बायकांकडे जाऊं नये; तिसरा केल्यावर कोणत्याही स्त्रीकडे जाऊं नये. अग्निं चित्वा प्रथमं चित्वा न रामामुपेयात् यांतील प्रथमं चित्वा हे शब्द गाळून यास्कानें ब्राह्मणवचन उदाहृत केलें असेल. नाग्निं चित्वा रामामुपेयात् । कृष्णवर्णा या रामा रमणायैव न धर्माय ( वसिष्ठस्मृतिः

१८।१५-१६ ); यास्काच्या वेळची वसिष्ठस्मृति भिन्न असली पाहिजे; अग्निं चित्वा० न धर्माय हे शब्द यास्कानें कदाचित् वसिष्ठस्मृतींतूनच घेतले असतील. अधोभागे रामः शुक्लः, दृष्टितर्पकत्वात् तस्य रामत्वम्; बोकडाला अधोराम म्हणतात ह्याचें कारण त्याच्या अंगाचा खालचा भाग पांढरा असतो; पांढरा रंग दृष्टीला चांगला वाटतो म्हणून पांढऱ्या रंगाला राम हें नांव अशी अधोराम ह्याची व्युत्पत्ति व अर्थ आपटयांच्या कोशांत दिला आहे; तेथें कोंबडा हा अर्थ दिला नाहीं. अधोदेशे श्वेतः अधोरामः ( वाज० सं० २९।५८ महीधर ); पण असा प्राणी कोण तें सांगितलें नाहीं. कृकवाकुः सावित्रः असें वचन यजुर्वेदांत आहे; पशुसमाम्नाये विज्ञायते ह्याचा अर्थ वर दिला आहे; कृकवाकु व सविता किंवा सूर्योदय ह्यांत कोणता संबंध आहे कीं ज्यामुळें कृकवाकुः सावित्रः असें म्हटलें गेलें? कालः सूर्योदयः। तस्य अनुवादः। कृकवाकुः सूर्योदयम् अनुवदति = कोंबडा सूर्य उगवला असें प्रसिद्ध करतो. कालानुवादं परीत्य = सवितुः कालम् असौ वक्ति इत्येवं परीत्य परिज्ञाय ( दुर्ग ) = सूर्योदयाचा काल कोंबडा सांगतो हें जाणून म्हणजे लक्षांत घेऊन कृकवाकुः सावित्रः असें म्हटलें आहे. कृकवाकुः = कृक + वाकुः; कृक हें कुकुकू ह्या कोंबडयाच्या ओरडण्याचें अनुकरण आहे; वाकु शब्द वच् ह्यापासून; वच् + उः = वाच् + उः = वाक् + उः = वाकुः; जो कुकुकू असा आवाज उच्चारतो तो कृकवाकु. कृकेण शिरोग्रीवेण वक्ति कृकवाकुः ( अमर २।५।१८ क्षीरस्वामी ) = जो डोकें व गळा ह्यांच्या साहाय्यानें बोलतो तो कृकवाकु; कृक शब्द अमरांत नाहीं; तथापि कृकलास ह्या शब्दाची व्युत्पत्ति कृकं शिरोग्रीवं लासयति अशी क्षीरस्वामी देतो ( अमर २।५।१३ ); कृक = गळा ( आपटयांचा कोश ). अधोरामः सावित्रः म्हटल्यावर कृकवाकुः सावित्रः असें म्हणण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं; कदाचित् सूर्योदयाचा काल ठरविण्याकरितां जो एक पुरावा दिला आहे त्याला बळकटी आणण्याकरितां कृकवाकुः सावित्रः हा दुसरा पुरावा दिला असेल.

**भगः ( ८ ) व्याख्यातः ( निरु० ३।१६ )। तस्य कालः प्राक् उत्सर्पणात्। तस्य एषा भवति**

भग शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पानें २२ व २०३ ). भगाचा काल सूर्य प्रवासाला निघण्याच्या आधींचा ( उत्सर्पणात् प्राक् ); दुर्गवृत्तींत प्राक् उत्सर्पणात् नाहीं; सूर्योदयानंतर भग अस्तित्वांत येतो असें दुर्ग म्हणतो.

## खंड १४ वा.

**प्रातर्जितं भगमुग्रं हुवेम वयं पुत्रमदितेर्यो विधर्ता। आध्रश्चिद्यं मन्यमानस्तुरश्चिद्राजा चिद्यं भगं भक्षीत्याह ( ऋ० सं० ७।४१।२ )**

**प्रातर्जितं भगम् उग्रं ह्वयेम वयं पुत्रम् अदितेः। यः विधारयिता सर्वस्य। आध्रः चित् यं मन्यमानः। आढ्यालुः दरिद्रः। तुरः चित्। तुरः इति यमनाम। तरतेर्वा। त्वरतेर्वा। त्वरया तूर्णगतिः यमः। राजा चित्। यं भगं भक्षि इति आह**

प्रातः प्रातः तमांसि यो जयति स भवति प्रातर्जित् ( दुर्ग ) = दररोज सकाळीं जो अंधकार जिंकतो तो प्रतिर्जित्. भगं = सूर्य ( दुर्ग ). उग्रं = उद्गूर्णं = अभ्युद्यतम् उदयाय ( दुर्ग ) = उगवण्याला उद्युक्त झालेल्याला; उग्रं = उ + ग्रम्; उ = उत्; ग्रं = गूर्णम्; उद्गूर्णं = समुद्रांतून वर आलेल्याला. हुवेम = ह्वयेम; दुर्गवृत्तींत आह्वयामहे आहे. विधर्ता = विधारयिता सर्वस्य = अनुग्रहानें सर्व जगाला धारण करणारा म्हणजे आश्रय देणारा. आध्रः = आढ्यालुः = दरिद्रः; आढ्यालुः = आढ्यानां स्पृहयिता दरिद्रः ( दुर्ग ) = श्रीमंत लोकांची इच्छा करणारा म्हणजे श्रीमंत लोक आपल्याला केव्हां भेटतील व द्रव्यसाहाय्य करतील अशी मनांत सतत इच्छा बाळगणारा जो दरिद्री तो आध्र; आध्रः = आढ्यः = आढ्यानां स्पृहयिता; आढ्यालु शब्द अमरांत किंवा आपटयांच्या कोशांत नाहीं. मन्यमानः = पूजयन् ( दुर्ग ); सूर्य केव्हां उगवेल व धन मिळविण्यासाठीं मी बाहेर केव्हां पडेन अशा आकांक्षेनें दररोज भगाला पूजणारा दरिद्री ( दुर्ग ). तुर हें यमाचें नांव; तो शब्द तृ किंवा त्वर् ( = त्वरा करणें ) ह्यापासून. त्वरेमुळें यमाची गति त्वरित असते ( तूर्णगतिः ) म्हणजे प्राण्यांचा संहार करण्याला मी केव्हां लागेन असें यमाला होतें; सूर्य उगवल्याबरोबर मी प्राण्यांचा संहार करण्याला लागेन म्हणून यम सूर्याची पूजा करीत असतो ( मन्यमानः ); मन्यमानः हें विशेषण दुर्ग आध्रः व तुरः ह्या दोहोंनांही लावतो; दुर्गवृत्तींत तरतेर्वा त्वरतेर्वा त्वरया हे शब्द नाहींत. भक्षि = उदयं भज ( दुर्ग ) = उदयाला ये; लोकांचीं कामें करण्याच्या इच्छेनें राजासुद्धां ज्या भगाला उगव असें म्हणतो ( दुर्ग ). दुर्गानें केलेला अर्थः— जो सर्व जग उपकारबुद्धीनें धारण करतो, ज्याला श्रीमंत लोकांच्या साहाय्याची इच्छा करणारा व सूर्याची पूजा करणारा गरीबही, हे भगा, लवकर उगव असें म्हणतो, ज्याला प्राण्यांचा संहार करण्याकरितां त्वरेनें संचार करणारा यमही त्याची पूजा करून ( मन्यमानः ), हे भगा, लवकर उगव म्हणून म्हणतो व ज्याला प्रजाजनांचीं कामें करण्याच्या इच्छेनें राजासुद्धां, हे भगा, उगव असें म्हणतो त्या दररोज सकाळीं अंधकाराला जिंकणाऱ्या, उगवण्याकरितां समुद्रांतून बाहेर येणाऱ्या अदितीच्या मुलाला म्हणजे भगाला आम्ही बोलावीत आहोंत.

**सायणः**— जो सर्व जग धारण करतो, ज्याला दरिद्रीसुद्धां ( आध्रः चित् ) स्तुति करून ( मन्यमानः ) मला धन ( भगं ) दे ( भक्षि ) असें म्हणतो व ज्याला धन मिळविलेला ( तुरः ) समर्थ ( राजा ) मनुष्यसुद्धां ( चित् ) मला धन दे असें म्हणतो त्या नेहमीं जय मिळविणाऱ्या ( जितं ) समुद्रांतून बाहेर आलेल्या ( उग्रं = उद्गूर्णं ) अदितीच्या पुत्राला म्हणजे भगाला आम्ही प्रातःकाळीं बोलावीत आहोंत. तुरः । तुरतिः गतिकर्मा । प्राप्तधनः; तुर् = जाणें; ह्यापासून तुर; तुरः = ज्यानें धन मिळविलें आहे तो; तुरः व राजा ही अध्याहृत जनं ह्याचीं विशेषणें केलीं आहेत. पदपाठांत प्रातर्जितं हा समास असून भाष्यांत प्रातर् व जितं अशीं दोन पदें केलीं आहेत.

प्रातर्जितं = प्रातःकालाला जिंकणाऱ्याला; पण भग प्रातःकालाला जिंकतो म्हणजे काय? तृ = देणें; जें दिलें जातें तें तर्; प्रातर् = प्र + आ + तर्; तिहींचा अर्थ धन; जो अतिशय धन जिंकतो व देतो तो प्रातर्जित्. भग = (१) धन, (२) धनाधिपति भग. सनितः सुसनितर् उग्र चित्र चेतिष्ठ सूनृत (८।४६।२०); हे सहा शब्द इंद्राचीं विशेषणें होत; सर्वांचा अर्थ हे धनदात्या. उज् = देणें; उज् + रः = उग्रः = देणारा; उज्पासून ओजस्; ओजस् = (१) बल, (२) धन. धृ = देणें; विधर्ता = धनदाता. धनदाता (प्रातर्जित् = उग्रः = विधर्ता) धनाधिपति जो भग (भगं) त्या अदितीच्या पुत्राला धन देण्यासाठीं आम्ही बोलावितों. आध्रः = निर्धन. तुरः = धनाढ्य; यो रेवान् यो अमीवहा वसुविद् पुष्टिवर्धनः। स नः सिषक्तु यः तुरः (१।१८।२) = जो धनवान् असून (रेवान् = तुरः) धन देऊन (वसुविद् = पुष्टिवर्धनः) दारिद्र्याचा नाश करतो (अमीवहा) तो आम्हांस द्रव्य-साहाय्य करो (सिषक्तु). भज् = वांटून देणें; भज् + सि = भक्षि = दे. न हि त्वा शूरो न तुरो न धृष्णुर्न त्वां योधो मन्यमानो युयोध (६।२५।५) = हे इंद्रा, कितीही शूर असला तरी कोणीही योद्धा तुझ्याशीं युद्ध करीत नाहीं; शूरः = तुरः = धृष्णुः = योधः; मन्यमानः = अभिमानी; हा शब्द शूरः, तुरः, धृष्णुः व योधः ह्यांचें विशेषण होय. मन्यमानः तुरः = धनाचा गर्व आहे ज्याला असा धनाढ्य. राजा सर्व धनाढ्यांहून धनाढ्य असतो. दरिद्री असो, अभिमानानें भरलेला धनाढ्य असो किंवा राजा असो हे सर्वजण आम्हांला धन दे (भक्षि) असें भगाला म्हणतात; भग इतका धनवान् आहे.

**अन्धो भगः (कौषी० ब्रा० ६।१३॥ शत० ब्रा० १।७।४।६) इति आहुः। अनुत्सृप्तः न दृश्यते। प्राशित्रम् अस्य अक्षिणी निर्जघान (कौषी० ब्रा० ६।१३) इति च ब्राह्मणम्। जनं भगो गच्छति (मैत्रा० सं० १।६।१२) इति वा। जनं गच्छति आदित्यः उदयेन**

भग अंध आहे असें म्हणतात; पण भग जर सूर्य आहे तर तो अंध कसा असेल? भग अंध आहे ह्या म्हणण्याचा अर्थ भगाला दिसत नाहीं असा नसून त्याच्याकडे पाहणाऱ्यांचे डोळे दिपतात व कांहीं वेळ त्यांना कांहीं दिसत नाहीं; ही स्थिति सूर्य प्रवासाला निघण्याच्या आधींची; त्या स्थितींत सूर्य हा एक लाल गोळा असतो व त्या लाल गोळ्याकडे टक लावल्यावर टक लावणाऱ्याला कांहीं वेळ कांहीं दिसत नाहीं. भग आंधळा झाला ह्याविषयीं ब्राह्मणग्रंथांत एक गोष्ट दिली आहे; प्राशित्र हा पुरोडाशाचा एक तुकडा असून तो ब्रह्मा नांवाच्या ऋत्विजाकरितां राखून ठेवला असतो; त्याच्याकडे सूर्याच्या आज्ञेशिवाय पहावयाचें नसतें; भगानें सूर्याला न विचारतां त्याच्याकडे पाहिलें म्हणून तो लगेच आंधळा झाला; प्राशित्रानें भगाचे डोळे नाहींसे केले असें ब्राह्मणवचन आहे. इति च ब्राह्मणं ह्यांतील च बद्दल तु पाहिजे; कारण अन्धो भगः ह्याचें जें पहिलें विवरण केलें आहे त्याच्या उलट प्रस्तुत ब्राह्मण-

वचन होय. ह्या ब्राह्मणवचनाच्या उलट दुसरें ब्राह्मणवचन आहे; भग ( भगः ) लोकांकडे ( जनं ) जातो ( गच्छति ); जनं भगः गच्छति = जनं गच्छति आदित्यः उदयेन; जर तो अंध असेल तर तो लोकांकडे कसा जाईल? लोकांकडे जातो ह्यावरूनच तो आंधळा नाहीं असें सिद्ध होतें. गच्छति ह्याच्यानंतरचा वा दुर्गवृत्तींत नाहीं व तो नको आहे; कारण पहिलें ब्राह्मणवचन व हें वचन हीं दोन्हीं विरुद्ध आहेत; ह्या दुसऱ्या ब्राह्मणवचनानें अंधो भगः ह्याच्या पहिल्या विवरणाला पुष्टि मिळते; कदाचित् पहिलें ब्राह्मणवचन तें विवरण खोडून टाकण्याकरितां घातलें असेल व दुसरें त्या विवरणाचें समर्थन करण्याकरितां घातलें असेल.

**सूर्यः (९) सर्तेर्वा । सुवतेर्वा । स्वीर्यतेर्वा । तस्य एषा भवति**

सृ ( = हलणें ) ह्यापासून सूर्य; सूर्यः = सर्यः; सरति असौ सर्यः; जेव्हां आदित्य भगस्थिति सोडून प्रवासाला निघतो ( सरति ) तेव्हां त्याला सूर्य असें म्हणतात; किंवा सूर्य = सू + र्य; सू = सुवते = उत्पन्न करतो; रात्रीच्या अंधःकारांत मृतवत् झालेलें जग तो आपल्या तेजानें उत्पन्न करतो म्हणजे नवीन करतो; र्य हा नामकरण प्रत्यय; किंवा सूर्यः = सु + ऊर्यः; ऊर्यः = ईर्यः = ईर्यते; सूर्य वायूकडून उत्तम रीतीनें ( सु ) पुढें ढकलला जातो ( ईर्यते ). राजसूयसूर्य० ( पा० ३।१।११४ ) ह्या सूत्रांतील सूर्य शब्दाची व्युत्पत्ति भट्टोजी दीक्षित पुढीलप्रमाणें देतातः– सरति आकाशे सूर्यः; सर्य ह्याचें सूर्य असें रूपांतर झालें; किंवा सु = प्रेरणा करणें; सु = सुवति = कर्मणि लोकं प्रेरयति = लोकांना कामें करण्याची प्रेरणा करतो; मूळ शब्द सूय त्यांत रेफार कोठून तरी आला व त्यामुळें सूर्य शब्द बनला. सूयते इति सूर्यः ( अमर १।२।२९ क्षीर० ). ऋग्वेदांत सूर्य ह्या अर्थीं सूर शब्द आहे; त्याचेंच सूर्य हें रूपांतर असावें; पुरातनइजिप्तलोकांच्या भाषेंत सूर्याचें नांव होरस् होतें; होरस् हाच सूर. ऋग्वेदांत स्वर् ( सूर्य ) असाही शब्द आहे; अवेस्तांत त्याच्यासारखा व्हर् आहे.

## खंड १५ वा.

**उदु त्यं जातवेदसं देवं वहन्ति केतवः । दृशे विश्वाय सूर्यम् ( ऋ० सं० १।५०।१ )**

**उद्वहन्ति तं जातवेदसं रश्मयः केतवः सर्वेषां भूतानां दर्शनाय सूर्यम् । इति । तस्य एषा अपरा भवति**

उदु = उत् + उ; उत् + वहन्ति = उद्वहन्ति = उदयम् उपनयन्ति (दुर्ग); उ निरर्थक म्हणून गाळला आहे. त्यं = तम्. भाष्यांत देवं शब्द घेतला नाहीं. केतवः = रश्मयः; भाष्यांत केतवः नको; केतवः = रश्मयः अश्वाः वा ( दुर्ग ). दृशे विश्वाय = सर्वेषां भूतानां दर्शनाय; इति = (त्यानें सर्व प्राणिमात्र पहावे) म्हणून. इति नंतर महाराष्ट्रपाठांत कम् अन्यम् आदित्यात् एवम् अवक्ष्यत् असें आहे; पण त्याची

एथें कांहींएक आवश्यकता नाहीं; कारण ऋचेंत सूर्याहून निराळाच कोणी देव आहे असें कोणताही आक्षेपक म्हणणार नाहीं. दुर्गानें केलेला अर्थ:— किरण किंवा घोडे त्या जातवेदस् सूर्याला त्यानें सर्व प्राणिमात्र पहावे म्हणून उदयाला आणतात.

**सायण:**— सर्व लोकांनीं त्याला पहावें म्हणून सूर्याचे घोडे किंवा किरण जो सर्व प्राण्यांना जाणतो किंवा जो बुद्धिमान् आहे किंवा ज्याच्याजवळ धन आहे अशा सर्व प्राण्यांना प्रेरणा देणाऱ्या व प्रकाशणाऱ्या विख्यात सूर्याला द्युलोकीं वाहून नेतात. केतवः = प्रज्ञापकाः सूर्याश्वाः यद्वा सूर्यरश्मयः; सूर्यं = सर्वस्य प्रेरकम् आदित्यम्; उत् = ऊर्ध्वम्; उ पादपूरण; त्यं = प्रसिद्धम्; जातवेदसं = जातानां वेदितारं जातप्रज्ञं जातधनं वा; देवं = द्योतमानम्; विश्वाय दृशे = विश्वस्मै भुवनाय द्रष्टुं = यथा सर्वे जनाः सूर्यं पश्यन्ति तथा.

कित् = (१) प्रकाशणें, (२) देणें. (१) तव श्रियो वर्षस्येव विद्युतः चित्राश्चिकित्रे उषसां न केतवः (१०।९१।५) = हे अग्नि, तुझा प्रकाश (श्रियः) वर्षाकालच्या विजेप्रमाणें किंवा उषेच्या झळकणाऱ्या (चित्राः) किरणांप्रमाणें प्रकाशतो (चिकित्रे); चिकित्रे ह्यांत कित् (= प्रकाशणें) हा धातु; केतवः = किरण; कित् + उः = केतुः = किरण. केतु शब्दाचे प्रकाश, किरण, ज्वाला असे अर्थ आहेत. (१) अदृश्रमस्य केतवो वि रश्मयो जनान् अनु। भ्राजन्तो अग्नयो यथा (१।५०।३) = अग्नीप्रमाणें झळकणारे ह्या सूर्याचे किरण (केतवः = रश्मयः) पंचजनांमध्यें (जनान् अनु) पसरलेले दिसत आहेत (वि + अदृश्रम्). चिकित्वान् ह्यांत कित् (= देणें) हा धातु असून त्या शब्दाचा देणारा असा अर्थ ऋग्वेदांत आहे; कित् + उः = केतुः = दान, धन, दाता. (२) महो अर्णः सरस्वती प्र चेतयति केतुना (१।३।१२) = सरस्वती आपल्या धनांतून (केतुना) पुष्कळ (महः) धन (अर्णः = प्र) देते (चेतयति). (१ व २) चित्रं केतुं कृणुते चेकिताना (१।११३।१५) = प्रकाशणारी (चेकिताना) उषा देदीप्यमान (चित्रं) प्रकाश (केतुं) करते; (२) दात्री (चेकिताना) पुष्कळ (चित्रं) धन (केतुं) देते (कृणुते). त्यं = तं = (१) त्याला, (२) अतिशय. जातवेदस् = (१) धनवान्, (२) धनानें पूर्ण, अतिशय. देव = (१) देव, (२) धनानें पूर्ण, अतिशय; दि (= देणें) + व = देव = दान, धन, दाता. उद्वहन्ति = (१) वर ओढून घेतात, (२) धन (उत्) देतात. केतवः = (१) किरण, (२) दाते. वृत्राय हन्तवे = वृत्रं हन्तुम्; त्याप्रमाणें विश्वाय दृशे = विश्वं दृष्टुम्; हा पहिला अर्थ; (२) दृश् = सुंदर, तेजस्वी धन; विश्व = धन; दृशे विश्वाय = अतिशय धन मिळावें म्हणून. सूर्य = (१) सूर्य, (२) सूर्यासारखे तेजस्वी धन. ह्याप्रमाणें ऋचेचे दोन अर्थ होतातः— (१) समुद्रांत बुडालेल्या सूर्याला, त्यानें जगांत काय चाललें आहे तें पहावें म्हणून, रज्जूंसारखे किरण वर ओढून काढतात; (२) दाते, लोकांनीं धनवान् व्हावें म्हणून, त्यांस अतिशय धन देतात.

## खंड १६ वा.

**चित्रं देवानामुदगादनीकं चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः। आप्रा द्यावापृथिवी अन्तरिक्षं सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ( ऋ० सं० १।११५।१ )**

**चायनीयं देवानाम् उदगमत् अनीकम्। ख्यानं मित्रस्य वरुणस्य अग्नेश्च। आपूपुरत् द्यावापृथिव्यौ च अन्तरिक्षं च। महत्त्वेन सूर्यः आत्मा जंगमस्य च स्थावरस्य च**

चित्रं = चायनीयं ( पान २४३ ) = पूजनीयं ( दुर्ग ). देवानां = रश्मीनां ( दुर्ग ). उदगात् = उत् + अगात् = उत् + अगमत्; दुर्गवृत्तींत उदगमत् नाहीं. अनीकं = समूहः ( दुर्ग ). चक्षुः = ख्यानम्; चक्ष् ह्याला ख्या आदेश होतो असें तेराव्या खंडांत सांगितलें आहे (पान९७७). आप्राः=आपूपुरत्; आप्राः ह्यांत आ + पृ धातु आहे असें यास्काचें मत असावें; आ + पृ ह्याला त् हा प्रत्यय लावून आप्राः असें रूप कसें बनेल ? अप्रायि याच्यावरील टिप्पणी पहा ( पान ६९९ ). द्यावा-पृथिवी = द्यावापृथिव्यौ. महत्वेन अध्याहृत. जगतः = जङ्गमस्य. तस्थुषः = स्थावरस्य. भाष्यांतील सर्व च अध्याहृत.

दुर्गानें केलेला अर्थः— हा जो किरणांचा ( देवानां ) पूज्य ( चित्रं ) गोळा ( अनीकं ) वर आला आहे ( उदगात् ) व जो जंगम ( जगतः ) व स्थावर (तस्थुषः) वस्तूत शिरतो तो द्यावापृथिवींना व अंतरिक्षाला आपल्या महत्वानें म्हणजे तेजानें भरून टाकीत आहे; त्या किरणांच्या गोळ्यांत मित्र, वरुण व अग्नि ह्यांचें दर्शन ( चक्षुः ) होतें; मित्र वगैरे सर्व देव सूर्याचींच रूपें होत असें जो मनानें पाहतो तोच खरा पाहणारा असा ऋचेचा अर्थ आहे.

**सायणः**— किरणांचें किंवा देवांचें तेजःसमूहरूपी, आश्चर्यजनक हें जें सूर्यमंडल तें उदयाचलावर आलें आहे; मित्र, वरुण व अग्नि ह्यांनीं उपलक्षित जो जगत्समूह त्याला तें सूर्यमंडल प्रकाशित करतें ( चक्षुः ); किंवा तें सूर्यमंडळ मित्र, वरुण व अग्नि ह्यांचा डोळा होय; उदय पावून तें सूर्यमंडल द्यावापृथिवी व अंतरिक्ष ह्यांना तेजानें भरून टाकतें; त्या मंडलामध्यें असणारा सूर्य म्हणजे परमात्मा सर्व जंगम व स्थावर ह्यांच्या अंतर्यामीं असल्यामुळें व त्यांना तो प्रेरणा देतो म्हणून त्यांचा तो आत्मा होय. दीव्यन्ति द्योतन्ते इति देवाः रश्मयः। यद्वा। देवाः एव; अनीकं = तेजःसमूहः; चित्रं = आश्चर्यकरम्; उदगात् = उदयाचलावर आला आहे.

अनीक शब्दाचे तेज, ज्वाला, शस्त्र, समूह असे अर्थ असून ध्वज असाही अर्थ आहे; विश्वेषां हि अध्वराणामनीकं चित्रं केतुं जनिता त्वा जजान ( १०।२।६ ) = हे अग्नि, सगळ्या यज्ञांचा प्रज्वलित ( चित्रं ) ध्वज ( अनीकं = केतुं ) जो तूं त्या तुला जनिता उत्पन्न करता झाला. चित् ( = जळणें, प्रकाशणें ) + रः = प्रज्वलित, प्रकाशणारा. चक्षुः = डोळा; उदु त्यच्चक्षुर्महि मित्रयोरां एति प्रियं वरुणयोः ( ६। ५१।१ ) = मित्रावरुणांचा मोठा व प्रिय डोळा वर येत आहे. उद्वां चक्षुः वरुण

सुप्रतीकं देवयोरेति ( ७।६१।१ ); अर्थ तोच; सुप्रतीकं = तेजस्वी. देवानां चक्षुः सुभगा वहन्ती ( ७।७७।३ ) = देवांचा डोळा जो सूर्य त्या सूर्याला द्युलोकीं आणणारी उषा. आत्मा = जीव; आत्मा ते वातो ( ७।८७।२ ) = हे वरुणा, वारा हा तुझा प्राण आहे. तस्मिन्नात्मा जगतस्तस्थुषश्च ( ७।१०१।६ ) = जंगम व स्थिर वस्तूंचा जीव पर्जन्यावर अवलंबून आहे. आत्मा यज्ञस्य ( ९।२।१० ) = सोम हा यज्ञाचा प्राण. आत्मा इन्द्रस्य भवसि ( ९।८५।३ ) = हे सोमा, तूं इंद्राचा प्राण आहेस. आत्मा यक्ष्मस्य नश्यति ( १०।९०।११ ) = ( ह्या ओषधींनीं ) क्षयाचा प्राण नाहींसा होतो. आत्मा देवानाम् ( १०।१६८।४ ) = वायु हा देवांचा प्राण. सूर्यं चक्षुः गच्छतु वातम् आत्मा ( १०।१६।३ ) = हे मृता, तुझा डोळा सूर्याकडे व प्राण वाऱ्याकडे जावो.

ऋचेचा अर्थः— देवांचा झळकणारा ध्वज आणि मित्र, वरुण, अग्नि ह्यांचा डोळा वर येत आहे; त्यानें आपल्या तेजानें द्यावापृथिवी व अंतरिक्ष भरून टाकलें आहे; सूर्य हा जंगम व स्थावर वस्तूंचा प्राण आहे.

**अथ यत् रश्मिपोषं पुष्यति तत् पूषा ( १० ) भवति । तस्य एषा भवति**

जेव्हां ( अथ यत् ) सूर्य किरणांची पूर्ण वाढ करतो तेव्हां ( तत् ) तो पूषा होतो म्हणजे त्याला पूषा म्हणतात.

## खंड १७ वा.

**शुक्रं ते अन्यद्यजतं ते अन्यद्विषुरूपे अहनी द्यौरिवासि ।**
**विश्वा हि माया अवसि स्वधावो भद्रा ते पूषन्निह रातिरस्तु ( ऋ० सं० ६।५८।१ )**

**शुक्रं ते अन्यत् । लोहितं ते अन्यत् । यजतं ते अन्यत् । यज्ञियं ते अन्यत् । विषमरूपे ते अहनी कर्म । द्यौः इव च असि । सर्वाणि प्रज्ञानानि अवसि अन्नवन् । भाजनवती ते पूषन् इह दत्तिः अस्तु । तस्य एषा अपरा भवति**

शुक्रं ते अन्यत् = तुझें एक रूप पांढरें आहे म्हणून लोहितं ते अन्यत् = तुझें दुसरें रूप तांबडें आहे; लोहितं ते अन्यत् हे शब्द अनुमानानें शुक्रं ते अन्यत् ह्या शब्दांपासून यास्कानें काढले आहेत; पूषन्चें एक रूप जर पांढरें तर दुसरें तांबडें असलेंच पाहिजे हें अनुमान. यजतं ते अन्यत् = यज्ञियं ते अन्यत् = तुझें एकरूप हवि घेण्याला योग्य आहे तेव्हां तुझें दुसरें रूप हवि घेण्याला अयोग्य ठरतें (दुर्ग); हें दुसरें अनुमान यास्कभाष्यांत नाहीं; 'अयज्ञियम् अयज्ञार्हम् अन्यत्' हे शब्द दुर्गवृत्तींत आहेत; कदाचित् अयज्ञियम् अन्यत् असे शब्द दुर्गाच्या निरुक्तप्रतींत असतील व तसे शब्द भाष्यांत पाहिजेत असें लोहितं ते अन्यत् ह्या शब्दांवरून वाटतें. भग व अंश ह्यांना यज्ञांत हवि दिला जात नाहीं असें म्हटलें आहे ( मैत्रा० सं० १।६।१६ ); पूषन्ची म्हणजे सूर्याची भग व अंश हीं जीं रूपें त्या रूपांनीं पूषन्ला हवि देत नाहींत ( दुर्ग ).

विषुरूपे = विषमरूपे = भिन्न रूपांचीं; दुर्गवृत्तींत विषमरूपे नाहीं. अहनी = अहोरात्रे (दुर्ग). ते कर्म (अध्याहृत) हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत; कर्मणा उदयेन शुक्लम् अहः करोषि अस्तमयेन कृष्णं (दुर्ग) = तूं उदय पावून पांढरा दिवस करतोस व अस्ताला जाऊन काळा दिवस करतोस. द्यौः इव च असि एथील च अध्याहृत; दुर्गवृत्तींत च नाहीं; द्यौः इव असि = द्युप्रमाणें तूं सर्व व्यापून असतोस (दुर्ग). विश्वा = विश्वानि = सर्वाणि. भाष्यांत हि गाळला आहे. मायाः = प्रज्ञानानि. स्वधावः = अन्नवन्. दुर्गवृत्तींत सर्वाणि प्रज्ञानानि ह्याबद्दल सर्वाः प्रज्ञाः असें आहे व स्वधावः ह्याचा अन्नवन् हा पर्याय नाहीं. अवसि = पालयसि (दुर्ग). भद्रा = भाजनवती = योग्य पात्रीं देण्याजोगें (दान); दुर्गवृत्तींत भाजनवती बद्दल भन्दनीया आहे; भन्दनीया = स्तुत्या (दुर्ग) = स्तुति करण्यास योग्य म्हणजे अतिशय; भद्र शब्दाची व्युत्पत्ति पहा (पानें २५४-२५५). रातिः = दत्तिः; रातिः = दानं (दुर्ग).

दुर्गानें केलेला अर्थः—हे पूषन्, तुझें एक रूप पांढरें आहे व दुसरें काळें आहे; एक यज्ञार्ह आहे तर दुसरें अयज्ञार्ह आहे; निरनिराळ्या रूपांचे दिवस व रात्र हे काल अस्तित्वांत आणणें हें तुझें काम; द्युप्रमाणें तूं सर्व व्यापून असतोस; हे स्वधायुक्त पूषन्, बुद्धिवंतांच्या सर्व बुद्धींचें तूं पालन करतोस; अशा गुणांनीं युक्त ज्या तुला आम्हीं पहात आहों त्या तुझें दान ह्या यज्ञांत आमचेकडे येवो.

**सायणः**— हे पूषन्, एक दिवस म्हणजे पांढरा दिवस तुझाच असतो व ज्याला प्रकाशाची जोड द्यावयाची असते (यजतं) म्हणजे ज्यांत मूलतः प्रकाश नसतो असा रात्रि नांवाचा दिवसही तुझाच; ह्याप्रमाणें तुझ्या महिम्यानें नानारंगांचे म्हणजे पांढरे व काळे दिवस उत्पन्न होतात; किंवा हे पूषन्, तुझें एक म्हणजे शुक्र रूप दिवस निर्माण करतें व ज्याला नुसता हवि द्यावयाचा असतो (यजतं) म्हणजे जें प्रकाश उत्पन्न करीत नाहीं असें तुझें दुसरें रूप रात्रि नांवाचा दिवस उत्पन्न करतें त्यामुळेंच दिवस व रात्र ह्यांचीं भिन्न रूपें असतात; हे अन्नवंता पूषन्, ज्याअर्थीं (हि) तूं आदित्याप्रमाणें सर्व बुद्धींचें रक्षण करतोस त्याअर्थीं तूं आदित्यासारखाच (द्यौः इव) आहेस; अशा गुणांनीं युक्त जो तूं त्या तझें कल्याणप्रद दान आमच्याकडे (इह) येवो.

अप अन्यत् एति अभि एति अन्यत् विषुरूपे अहनी संचरेते (१।१२३।७); एथें अहनी शब्द रात्र व उषा ह्यांबद्दल आहे; त्या दोहोंचीं रूपें परस्पराहून भिन्न आहेत; त्यांपैकीं एक म्हणजे रात्र जाते व एक म्हणजे उषा येते. कतरा पूर्वा कतरापरायोः० विवर्तेते अहनी चक्रियेव (१।१८५।१) = जणूं काय चाकावर बसून रात्र व उषा एकमेकींच्या पाठीमागून फिरतात; त्यांपैकीं आधीं कोण व मागाहून कोण तें सांगतां येत नाहीं. उभे यथा नो अहनी नि पातः उषासानक्ता (४।५५।३) = ज्या अर्थी उषा व रात्र आम्हांला धन देत असतात. अहश्च कृष्णम् अहरर्जुनं च विवर्तेते (६।९।१) = काळा दिवस म्हणजे रात्र व पांढरा दिवस म्हणजे उषा एकमेकींच्या पाठोपाठ हिंडतात. उभे यथा नो अहनी सचाभुवा सदः सदो वरिवस्यात उद्भिदा (१०।७६।१)

= जशा नेहमीं एकत्र असणाऱ्या द्यावापृथिवी आम्हांला आपल्या धनांतून ( उद्भिदा ) पुष्कळ धन ( सदःसदः ) देतात ( वरिवस्यातः ); एथें द्यावापृथिवींना अहनी कां म्हटलें तें समजत नाहीं. प्रस्तुत ऋचेंत अहनी म्हणजे रात्र व उषा; त्या भिन्नभिन्न रूपाच्या होत ( विषुरूपे ); त्यांना विरूपे हेंही विशेषण लाविलें आहे; अरुषस्य दुहितरा विरूपे स्तृभिरन्या पिपिशे सूरो अन्या ( ६।४९।३ ) = अरुष म्हणजे द्यु; त्याच्या भिन्नभिन्न रूपाच्या दोन मुली; त्यांपैकीं एक ताऱ्यांनीं व दुसरी सूर्यानें सजली असते. नक्ता च चक्रुः उषसा विरूपे कृष्णं च वर्णम् अरुणं च सं धुः ( १।७३।७ ) = देवांनीं भिन्न रूपाच्या रात्र व उषा निर्माण केल्या; एकींत त्यांनीं काळा रंग व दुसरींत लाल रंग घातला. शुक्र = प्रज्वलित; ह्या दोन अहनी-पैकीं एक ( अन्यत् ) प्रज्वलित ( शुक्रं ) असते व दुसरी ( अन्यत् ) यजत असते; यजत ह्याचा काळा असा अर्थ कोठेंहीं नाहीं; तथापि एथें काळा अर्थ घ्यावा लागतो. पूषन्चा रात्र व उषा ह्यांच्याशीं कोणताही संबंध नाहीं; पूषन्ला तूं द्यूसारखा आहेस असें म्हटलें आहे; द्यूला भिन्न रंगांच्या दोन मुली होत्या; पण पूषन्ला तशा दोन मुली होत्या असें ऐकिवांतसुद्धां नाहीं; तेव्हां पूषन् म्हणजे एक विशिष्ट देव नसून त्याचा दाता असा अर्थ आहे. शग्धि पूर्धि प्र यंसि च शिशीहि प्रासि उत् अरम् । पूषन् इह क्रतुं विदः ( १।४२।९ ); शग्धि = पूर्धि = यंसि = शिशीहि = प्रासि = विदः = दे; प्र = उत् = अरं = क्रतुं = धन; ह्या ऋचेंत पूषन् देवही होईल व दाताही होईल. अयं पूषा रयिर्भगः सोमः ( ९।१०१।७ ); एथें सोमाला धन म्हणजे धनवान् म्हटलें आहे; पूषा = रयिः = भगः=धन म्हणजे धनवान् किंवा धनदाता. कोणीएक जण पूषन्ला म्हणतो कीं, हे पूषन्, तुला भिन्न वर्णाच्या दोन मुली आहेत; त्यांपैकीं एक गोरी आहे व दुसरी काळी आहे; तेव्हां तूं द्यूसारखाच आहेस; हें जर पूषन् नांवाच्या देवाला म्हटलें असेल तर त्याला इतिहासाची साक्ष नाहीं. शुक्र, यजत व विषुरूपे ह्यांचे दुसरेही अर्थ आहेत; अग्नि, सूर्य, उषा व सोम ह्यांना शुक्र हें विशेषण लाविलें असतें; त्या शब्दाचा अर्थ झळकणारा; सोनें झळकतें म्हणून तें शुक्र. विश्वायुं विश्ववेदसं होतारं यजतं कविम् ( १।१२८।८ ) असें अग्नीला म्हटलें आहे; विश्वायुं = विश्ववेदसं = ज्याच्या जवळ पुष्कळ धन आहे अशाला; होतारं = यजतं = कविं = धन देणाऱ्याला. निष्कं यजतं विश्वरूपम् ( २।३३।१० ) = धनानें भरलेलें अतिशय ( यजतं = विश्वरूपं ) धन ( निष्कं ). यजतं बृहत्० वर्षिष्ठं क्षत्रमाशाथे ( ५।६७।१ ) = मित्र आणि वरुण पुष्कळ ( यजतं = बृहत् = वर्षिष्ठं ) धन ( क्षत्रं ) देतात ( आशाथे ). विषुरूपे = पुष्कळ धनानें भरलेले; वि = सु = रूप = धन. हे दात्या ( पूषन् ) तुझा दिवस सोन्यानें भरलेला आहे ( शुक्रं ); तुझी रातही धनानें भरलेली आहे ( यजतं ); ह्या प्रमाणें तुझे अहोरात्र (अहनी) धनानें खच्चून भरले आहेत (विशुरूपे). द्यु हाही धन-वान् आहे. इ = देणें; इ + व = इव = हे दात्या; हे दात्या (इव), धनाच्या बाबतींत

तूं शूच आहेस; ह्या दुसऱ्या अर्थानें पहिल्या अर्थाचा इतिहासाशीं दिसणारा विरोध नाहींसा होतो. कवीनें एथें शब्दश्लेष व अर्थश्लेष ह्यांचा उपयोग केला आहे. हे धनवंता (स्वधावः) दात्या ( पूषन् ), ज्या अर्थी (हि) तूं अतिशय (विश्वाः) धन ( मायाः ) देत असतोस ( अवसि ) त्या अर्थी आमच्या घरांतही धनानें भरलेली ( भद्रा ) तुझी देणगी असो म्हणजे येवो. स्वधा ( पानें ७४५–७४६ ) व माया ( पान ८७७ ) ह्यांचा धन असा अर्थ होतो.

## खंड १८ वा.

**पथस्पथः परिपतिं वचस्या कामेन कृतो अभ्यानळर्कम्। स नो रासच्छुरुधश्चन्द्राग्रा धियंधियं सीषधाति प्र पूषा ( ऋ० सं० ६।४९।८ )**

**पथस्पथः अधिपतिं वचनेन कामेन कृतः अभ्यानट् अर्कम्। अभ्यापन्नः अर्कम् इति वा। स नः ददातु चायनीयाग्राणि धनानि। कर्म कर्म च नः प्रसाधयतु पूषा। इति**

पथः पथः = सर्वमार्गाणाम् ( दुर्ग ). परिपतिं = अधिपतिम्. वचस्या = वचनेन = स्तुत्या (दुर्ग). कामेन = कामेन स्वेन पूषणं प्रत्यभिमुखीकृत्य (दुर्ग)=इच्छा सफल करण्याकरितां पूषन्ला वळवून. कृतः व अर्क ह्यांचे अर्थ दुर्गानें दिले नाहींत. अभ्यानट् = अभिव्याप्नोमि ( दुर्ग ); अशू व्याप्तौ ( धा० ५।१८ ). अर्क = देवं ( पानें ३४७–३४८ ). अभ्यापन्नः अर्कम् इति वा हें दुर्गवृत्तींत नाहीं; अभ्यापन्नः अर्कं हा अभ्यानट् अर्कं ह्याचा अर्थ असावा; अभ्यानट् अर्कं = अभ्यापन्नः अर्कं = मी देवाकडे ( अर्कम् अभि ) गेलों आहें ( आनट् = आपन्नः ). इति वा हे शब्द नको आहेत. रासत् = ददातु. शुरुधः = धनानि; शुरुधः = शुचं संरुन्धन्ति यानि धनानि ( दुर्ग ) = दारिद्र्याचें दुःख जें निवारण करतें असें धन. चंद्राग्राः = चायनीयाग्राणि = अभिपूजितागमानि। धर्म्यः आगमः येषां ( दुर्ग ) = ज्याची प्राप्ति अभिपूजित म्हणजे धर्माला धरून असते म्हणजे चांगल्या रीतीनें जें मिळविलें असतें तें; चंद्राग्राः = चन्द्र + अग्राः; चन्द्र = चन् + द्र; चन् = चायनीय; चायृ पूजानिशामनयोः ( धा० १।९०५ ); चाय् ( = पूजा करणें ) ह्या पासून चन्; द्र हा नामकरण प्रत्यय; चन्द्रमस् व चन्द्र ह्या शब्दांची व्युत्पत्ति पहा ( पानें ८६०–८६१ ); अग्र = आगम ( दुर्ग ) = प्राप्ति. धियंधियं = कर्म कर्म = इष्टिपशुसोमादिलक्षणं ( दुर्ग ) = इष्टि, पशु, सोमयाग वगैरे कर्मे; च व नः अध्याहृत. प्र सीषधाति = प्रसाधयतु; सीषधाति = साधयति = प्रसाधयतु ( दुर्ग ).

दुर्गानें केलेला अर्थः— सर्व मार्गांचा अधिपति देव ( अर्क ) जो पूषा त्याला मी स्वतःच्या कामना पूर्ण करण्याकरितां स्तुतीनें व्यापून टाकीत आहें म्हणजे त्याचें मन वळवीत आहें; अशा रीतीनें मन वळविलेला तो ज्याची प्राप्ति धर्माला अनुसरून आहे ( चन्द्राग्राः ) असें धन ( शुरुधः ) आम्हांला देवो व त्या धनानें आमचीं इष्टि, पशु, सोमयाग वगैरे सर्व कर्में तो पूषा सफल करो.

**सायण**:— पथः पथः = सर्वस्य मार्गस्य; परिपतिं = अधिपतिम्; अर्कम् = अर्चनीयं पूषणम्; कामेन कृतः = काम्यमानेन फलेन कृतः वशीकृतः स्तोता = इष्ट फलाच्या स्वाधीन झालेला म्हणजे इष्टफलेच्छेनें प्रेरित झालेला स्तोता; वचस्या=स्तुत्या; अभ्यानट्=अभ्यश्नुतां = प्राप्नोतु; फलाच्या इच्छेनें प्रेरित झालेला स्तोता स्तुति करून पूषन्ला मिळवो म्हणजे त्याला प्रसन्न करो; शुरुधः = शुचः रोधयित्र्यः गाः = दारिद्र्यदुःखाचें निवारण करणाऱ्या गायी; चन्द्राग्राः = हिरण्यप्रमुखाः। यद्वा। स्वर्ण-शृंगाः = ज्यांच्याबरोबर सोनें प्रामुख्यानें पाठविलें असतें अशा किंवा ज्यांचीं शिंगें सोन्याचीं आहेत अशा; धियंधियं = सर्वम् अस्मदीयं कर्म; प्रसीषधाति = प्रसाधयतु.

पथः = ( १ ) मार्ग, ( २ ) धन; हा दुसरा अर्थ लक्षणेनें होतो; सुगान् पथः कृणुहि (१०।५९।५) = (१) आमचे मार्ग सुरळीत कर; (२) आम्हांला पुष्कळ धन दे; हा दुसरा लक्षार्थ होय. विश्वान् अनु स्वधया चेतथः पथः (४।४५।६) = हे अश्वि-नांनो, तुम्ही आपल्या धनांतून ( स्वधया ) पुष्कळ ( विश्वान् ) धन ( पथः ) सारखे ( अनु ) देत असतां ( चेतथः ). वि पथो वाजसातये चिनुहि वि मृधो जहि। साध-न्तामुग्र नो धियः ( ६।५३।४ ) = हे पूषन्, आम्हीं धन द्यावें म्हणून ( वाजसातये ) आम्हांला धन दे ( विचिनुहि ); दारिद्र्यरूपी शत्रु ( मृधः ) ठार कर; हे धनवंता ( उग्र ), आम्हांला धन ( धियः ) दिलें जावो ( साधन्तां ); धन मिळविण्यासाठीं आमच्याकरतां चांगले मार्ग शोधून काढ असा प्राथमिक अर्थ असावा. पथ एक पीपाय तस्करो यथा एष वेद निधीनाम् ( ८।२९।६ ) = एक म्हणजे पूषा धन ( पथः ) देतो ( पीपाय ); चोरासारखा धन कोठें आहे हें हाही जाणतो; धन मिळविण्याचे मार्ग पूषा दाखवितो हा प्राथमिक अर्थ. वयमु त्वा पथस्पते रथं न वाजसातये। धिये पूषन् अयुज्महि ( ६।५३।१ ) = जसा कोणी धन आणण्याकरितां रथ जोडतो तसे आम्ही धनासाठीं, हे धनपति, तुझी योजना करतों. पूषन्चा पथाशीं निगडित संबंध आहे; तो ब्रह्मांडांतले सर्व मार्ग जाणतो; त्याच्यापासून गुप्त असें कांहीं रहात नाहीं; तेव्हां धनाकडे कोणता मार्ग जातो हें त्याला ठाऊक असणारच; मार्ग दाखवून तो धन मिळवून देतो म्हणून तो पथस्पतिः. पथः पथः = अतिशय धनाचा. परिपतिं हा शब्द एथेंच आला आहे; बहुतकरून परि व पतिं अशीं दोन पदें असावींत; पथः पथः पतिं = सर्व धनाच्या पतीला किंवा दात्याला; परि ह्याचा संबंध आनट् ह्याच्याशीं आहे; परि = पूर्णपणें, पुरेसें. पूषन्ला कामेन कृतः ( ६।५८।३ ) व कामेन कृतं ( ६।५८।४ ) हे शब्द लाविले आहेत; ताभिर्यासि दूत्यां सूर्यस्य कामेन कृतः श्रवः इच्छमानः ( ६।५८।३ ) = हे पूषन्, त्या नावांत बसून ( ताभिः ) सूर्येला मिळवि-ण्याच्या इच्छेनें ( कामेन ) प्रेरित झालेला ( कृतः ) व धनाचा ( श्रवः ) शोध कर-णारा ( इच्छमानः ) तूं सूर्यानें सांगितलेली कामगिरी ( दूत्यां ) करण्यास जातोस. यं देवासो अददुः सूर्यायै कामेन कृतं तवसं स्वञ्चम् ( ६।५८।४ ) = सूर्येला मिळ-

विण्याच्या इच्छेनें ( कामेन ) प्रेरित झालेला ( कृतं ), बलवान् ( तवसं ) व तेजस्वी ( स्वञ्चं ) असा जो पूषा त्याला देव सूर्येला देते झाले; तेव्हां प्रस्तुत ऋचेंत कामेन कृतः हें पूषन्‌चेंच विशेषण असलें पाहिजे; पण त्याच्या विरुद्ध पतिं हा द्वितीयांत शब्द येतो; प्रस्तुत ऋचेंत एकाददुसरा शब्द अशुद्ध असावा असें वाटतें; पतिः असा पाठ घेतल्यास कामेन कृतः हें त्याचें विशेषण होईल; कामवासनेनें प्रेरित झालेला पूषा धन शोधून शोधून अतिशय धनाचा ( पथः पथः ) स्वामी ( पतिः ) झाला; असा धनवान् झालेला पूषा आपल्या धनांतून ( वचस्या = वचस्यया ) धन ( अर्कं ) पूर्णपणें ( परि = अभि ) देत असतो ( आनट् ); सूर्येला देण्याकरितां त्यानें इतकें धन सांठविलें आहे कीं मागेल त्याला धन देण्याला तो मागेपुढें पहात नाहीं; म्हणूनच दुसऱ्या अर्धांत तो आम्हांस पुष्कळ धन देवो अशी त्याला विनंति केली आहे. रयिर्विभूतिः ईयते वचस्या ( ६।२१।१ ) = अतिशय धन ( रयिः = विभूतिः = वचस्या ) इंद्राकडे जाते म्हणजे इंद्राला धन सतत मिळत असतें. स वाजी अर्वा स ऋषिः वचस्यया स शूरो अस्ता पृतनासु दुष्टरः । स रायस्पोषं स सुवीर्यं दधे यं वाजो विभ्वाँ ऋभवो यमाविषुः ( ४।३६।६ ) = वाज, विभ्वन् व ऋभु ज्याला धन देतात तो शूर होतो ( वाजी = अर्वा = शूरः = अस्ता ) व लढाईत ( पृतनासु ) त्याचा कोणीही पराभव करूं शकत नाहीं ( दुष्टरः ); तो दाता ( ऋषिः ) आपल्या धनांतून ( वचस्यया ) पुष्कळ धन ( रायः = पोषं = सुवीर्यं ) देतो ( दधे ). इषं स्तोतृभ्यो मघवद्भ्य आनट् ( ७।७।७ ) = अग्नि स्तोत्यांना व हवि देणाऱ्यांना धन देत असतो ( आनट् ). ब्रह्मणस्पतिः द्रविणं व्यानट् ( १०।६७।७ ) = ब्रह्मणस्पति धन देता झाला. अर्क = धन ( पान ८७६ ). पतिं असाच पाठ घेतल्यास ऋचेच्या पूर्वार्धाचा कांहीं तरी अर्थ करावा लागतो. शुरुधः = दान, धन ( पानें ८३९–८४० ). चंद्र = हिरण्य ( निघंटु १।२।२ ); चन्द्रम् अग्रे यासां ताः चन्द्राग्राः = ज्यांच्या अग्रभागीं सोनें आहे अशा देणग्या म्हणजे सोन्यानें भरलेल्या देणग्या. धियंधियं = अतिशय धन. सीषधाति = देतो. इमं च नो गवेषणं सातये सीषधो गणम् ( ६।५६।५ ) = हे पूषन्, आम्हीं धनवान् व्हावें म्हणून (सातये) आम्हांला पुष्कळ ( इमं ) धन ( गवेषणं = गणं ) दे ( सीषधः ). साध् हें सध् ह्याचेंच रूपांतर आहे; इळामग्ने पुरुदंसं सनिं गोः शश्वत्तमं हवमानाय साध ( ३।१।२३ ) = हे अग्नि, हवि देणाऱ्याला पुष्कळ ( शश्वत्तमं = पुरुदंसं ) धन ( इळां = सनिं गोः ) दे ( साध ). दुसऱ्या अर्धाचा अर्थः— तो आम्हांला सोन्यानें भरलेल्या देणग्या देवो; पूषा अतिशय धन ( धियंधियं = प्र ) देत असतो ( सीषधाति ).

**अथ यत् विषितः भवति तत् विष्णुः ( ११ ) भवति । विशतेर्वा । व्यश्नोतेर्वा । तस्य एषा भवति**

विष्लृ व्याप्तौ (धा० ३।१३); विष् (= व्यापणें ) + नुः = विष्णुः = व्यापणारा; जेव्हां ( अथ यत् ) हा आदित्य रश्मींनीं व्याप्त ( विषितः ) होतो तेव्हां त्याला

विष्णु हें नांव मिळतें; किंवा विष् = विश्; जेव्हां तो रश्मींनीं शिरलेला असतो म्हणजे त्याच्यांत रश्मि शिरतात तेव्हां तो विष्णु होतो; किंवा विष्णुः = वि + अश्नुः; अशू व्याप्तौ ( धा० ५।१८ ); जेव्हां तो सर्व बाजूंनीं पूर्णपणें ( वि ) रश्मींनीं व्याप्त होतो किंवा सर्व जग किरणांनीं व्यापून टाकतो तेव्हां तो विष्णु होतो. सायणभाष्यांतील निरुक्तपाठांत विशतेर्वा व्यश्नोतेर्वा एवढेंच आहे. प्रोफेसर ब्लूम्फील्डः— विष्णुः = वि + स्नुः; स्नुः = सानुः = पाठ किंवा पृष्ठभाग; यतो विष्णुर्वि चक्रमे पृथिव्या अधि सानवि ( सामवेद २।१०२४ ) = पृथिवीच्या पृष्ठावर ( सानवि अधि ) जेव्हां ( यतः ) विष्णु संचार करूं लागला ( विचक्रमे ); पृथिवीच्या पृष्ठभागावर ( स्नु = सानवि ) संचार करतो ( = विचक्रमे ) म्हणून तो विष्णु; ही व्युत्पत्ति निरुक्त पद्धतीलाच अनुसरून आहे. विश्वं विवेष्टि द्रविणम् उप क्षु ( १०।६१।१२ ) = अग्नि पुष्कळ ( विश्वं ) धन ( द्रविणं = क्षु ) देतो ( उपविवेष्टि ); विष् ( = देणें ) + नुः = विष्णुः = दाता; ह्या व्युत्पत्तीला कोणती हरकत? शब्दांच्या व्युत्पत्ति देणें हा व्यर्थ खटाटोप होय.

## खंड १९ वा.

**इदं विष्णुर्वि चक्रमे त्रेधा नि दधे पदम्।**
**समूह्ळमस्य पांसुरे** ( ऋ० सं० १।२२।१७ )

**यत् इदं किंच तत् विक्रमते विष्णुः। त्रिधा निधत्ते पदम्। पृथिव्याम् अन्तरिक्षे दिवि इति शाकपूणिः। समारोहणे विष्णुपदे गयशिरसि इति और्णवाभः। समूह्ळम् अस्य प्यायने अन्तरिक्षे पदं न दृश्यते। अपि वा। उपमार्थे स्यात्। समूह्ळम् अस्य पांसुले इव पदं न दृश्यते। इति। पांसवः पादैः सूयन्ते इति वा। पन्नाः शेरते इति वा। पिंशनीयाः भवन्ति इति वा**

इदं = यत् इदं किंच = जें हें ( दिसत आहे ) तें सर्व; इदं = यत् इदं किंचित् विभागेन अवस्थितं (दुर्ग) = जें कांहीं वेगळेंवेगळें असें आहे (म्हणजे जे पदार्थ विभक्तविभक्त दिसत आहेत) तें सर्व. तत् अध्याहृत. विचक्रमे = विक्रमते. विष्णुः= आदित्यः ( दुर्ग ). त्रेधा = त्रिधा; त्रेधा शब्द अर्वाचीन संस्कृतांत आहे म्हणून त्रिधा हा पर्याय देण्याचें कारण नाहीं. निदधे = निधत्ते. पदं नंतर महाराष्ट्रपाठांत त्रेधाभावाय असा अधिक शब्द आहे; त्रेधाभावाय = तीन ठिकाणीं असण्याकरितां. तीन ठिकाणीं ( त्रेधा ) म्हणजे पृथिवीवर, अंतरिक्षांत व द्युलोकीं असें शाकपूणि म्हणतो; पृथिवीवर अग्निरूपानें, अंतरिक्षांत विद्युत्रूपानें व द्युलोकीं सूर्यरूपानें विष्णु संचार करतो ( दुर्ग ). तीन ठिकाणीं म्हणजे समारोहण, विष्णुपद व गयशिरस् ह्यांत असें और्णवाभ म्हणतो; उगवतांना उदयगिरीवर ( समारोहणे = उदयगिरौ ), मध्याह्न काळीं अंतरिक्षांत ( विष्णुपदे = अन्तरिक्षे ) व अस्ताचलावर ( गयशिरसि = अस्तंगिरौ ) विष्णु एकेक पाऊल टाकतो ( दुर्ग ); गयेंत विष्णुपद ( विष्णूचा पाय ) म्हणून

एक स्थान आहे; त्या विष्णुपदाची यात्रेकरू पूजा करितात; पण तो अर्थ और्णवाभाच्या मनांत होता कीं नव्हता तें सांगतां येत नाहीं; कदाचित् गयेंतच समारोहण, विष्णुपद व गयशिरस् हीं तीन ठिकाणें पूर्वकाळीं असतील. पांसुरे = प्यायने = अंतरिक्षे; अंतरिक्ष उदकानें सर्व प्राण्यांची वाढ करतें म्हणून तें प्यायन म्हणजे पांसुर; प्यायी वृद्धौ ( १।४८९ ); प्यायन हा पांसुर शब्दाचा अर्थ कीं व्युत्पत्ति ? समूह्ळं = अन्तर्हितं ( दुर्ग ) = लपलेलें; पदं न दृश्यते हें समूह्ळं ह्याचें विवरण होय; दुर्गवृत्तींत हे शब्द नाहींत. विद्युत्रूपी जे मध्याह्नकालचें पद तें नेहमीं दिसत नाहीं ( दुर्ग ); वीज पावसाळ्यांतच दिसते किंवा ( अपि वा ) एथें उपमा असेल; जसें ( इव ) धुळीनें भरलेल्या ठिकाणीं ( पांसुरे = पांसुले ) टाकलेलें पाऊल बाहेर काढतांच त्याचा ठसा दिसत नाहीं ( कारण पायानें केलेला खळगा पाय बाहेर काढतांच धुळीनें भरून जातो ) तसें ह्याचें विद्युद्रूपी पाऊल दिसतें न दिसतें तोंच नाहींसें होतें ( दुर्ग ). पांसुरे = पांसु + रे; र = मत्. धुळीला पांसु म्हणण्याचें कारण धूळ पायांनीं ( पादैः ) उत्पन्न केली जाते ( सूयन्ते ); पांसु = पा + म् + सु; पा = पादैः; म् गाळावयाचा; सु = सू = जन्म देणें; किंवा पांसवः = पां + सवः; पां = पन्नाः = गेलेले म्हणजे पडलेले; सवः = शयाः = शेरते = निजतात; धूळ जमिनीवर पडून तेथें निजते म्हणजे सारखी पडलेली असते; ह्या व्युत्पत्तीचें विवरण दुर्ग करीत नाहीं; किंवा पांसवः = पिंसवः = पिंशवः = पिंशनीयाः; पांसवः = पिंशनीयाः = ध्वंसनीयाः ध्वसनार्हाः ( दुर्ग ); धुळीचा नाश केलाच पाहिजे, कारण ती धूळ अंगावर पडल्यानें मनुष्य घाणेरडा दिसतो; त्याच्याकडे कोणालाही पहावेंसें वाटत नाहीं ( दुर्ग ); ही व्युत्पत्ति धुळवडीच्या दिवशीं सार्थ असते. पिश् ह्याचा ध्वंस करणें असा अर्थ धातुपाठांत किंवा आपट्यांच्या कोशांत नाहीं.

दुर्गानें केलेला अर्थः—जें कांहीं विभक्त असें पसरलें आहे त्यामधून आदित्य संचार करतो; तो तीन ठिकाणीं आपलें पाऊल टाकतो; पण अंतरिक्षांत ( पांसुरे ) टाकलेलें पाऊल लपलें असतें ( समूह्ळं ) म्हणजे विद्युद्रूप जें पाऊल तें क्षणभर टिकत असल्याकारणानें फार वेळ दिसत नाहीं. तीं तीन ठिकाणें कोणतीं तें वर सांगितलें आहे.

**सायण:**— त्रिविक्रमाचा अवतार धारण करणारा विष्णु ह्या दिसणाऱ्या जगाच्याकरितां ( इदं = इदं प्रतीयमानं सर्वं जगत् उद्दिश्य ) द्युलोकीं संचार करीत आहे ( विचक्रमे = विशेषेण क्रमणं करोति ); तेव्हां तीन निराळ्या प्रकारांनीं (त्रेधा) तो आपलें पाऊल टाकतो; धुळीनें भरलेल्या ह्याच्या पाय ठेवण्याच्या जागीं ( पांसुरे = धूलियुक्ते पादस्थाने ) हें सगळें जग अंतर्भूत झालें आहे (समूह्ळं = अंतर्भूतं ).

समूह्ळं व पांसुरे हे शब्द प्रस्तुत ऋचेंतच आले आहेत त्यामुळें त्यांचा अर्थ ठरविणें कठीण आहे. ता योधिष्टम् अभि गा इंद्र नूनम् अपः स्वर् उषसो अग्न ऊह्ळाः (६।६०।२)=हे इंद्राग्नींनो, ते तुम्ही (ता=तौ) गायी, जल, सूर्य व उषा देतां (अभि + योधिष्टं ); एथें ऊह्ळाः हें उषसः ह्याचें विशेषण असावें; वह्चें ऊह्ळ म्हणजे ऊढ

हें भूतभूतकालचें विशेषण असल्यामुळें त्याचा अर्थ ( अंधकारांतून ) आणलेल्या असा होईल; उषा रात्रीं अधकारांत लपून ठेवलेल्या असतात; इंद्र व अग्नि प्रातःकाळीं त्यांना अंधकारांतून बाहेर काढतात. पण ऊह्ळ ह्याचा हा अर्थ एथें नाहीं. समूह्ळं हें पदं ह्याचें विशेषण. अस्य = स्वस्य; अस्य पदं = स्वतःचें पाऊल; हें पाऊल विष्णु तीन ठिकाणीं ठेवतो; कोठें ? पांसुरे; कसलें पाऊल ? समूह्ळं = प्रकाशणारें, देदीप्यमान् ? पांसुरे = द्युलोकांत ? विष्णु द्युलोकीं ( इदं ) प्रवास करतो ( विचक्रमे ); तो आपलें ( अस्य ) देदीप्यमान् ( समूह्ळं ) पाऊल ( पदं ) द्युलोकीं ( पांसुरे ) तीन ठिकाणीं ( त्रेधा ) ठेवतो ( निदधे ). त्रीणि पदा वि चक्रमे विष्णुः ( १।२२।१८ ) = विष्णु तीन पावलें टाकतो म्हणजे चालतो. हीं तीन पावलें म्हणजे सूर्योदय, दुपार व अस्तमय अशीं असावींत.

## खंड २० वा.

**विश्वानरः ( १२ ) व्याख्यातः ( निरु० ७।२१ )। तस्य एष निपातो भवति ऐन्द्र्याम् ऋचि**

विश्वानर शब्दाची व्युत्पति पहा (पान ५६९). पुढील खंडांतील इंद्रपर ऋचेंत त्याचा गौणत्वानें निर्देश केला आहे. विश्वानरस्य पतिं एथें इंद्र हा पति; त्यामुळें विश्वानर हा गौण.

## खंड २१ वा.

**विश्वानरस्य वस्पतिमनानतस्य शवसः।**

**एवैश्च चर्षणीनामूती हुवे रथानाम् ( ऋ० सं० ८।६८।४)**

**विश्वानरस्य आदित्यस्य। अनानतस्य शवसः। महतः बलस्य। एवैश्च कामैः। अयनैः। अवनैर्वा। चर्षणीनां मनुष्याणाम्। ऊत्या च पथा रथानाम्। इन्द्रम् अस्मिन् यज्ञे ह्वयामि**

विश्वानरस्य = आदित्यस्य. अनानतस्य = महतः. शवसः = बलस्य. जें बल वाकविलें जात नाहीं तें मोठें असलेंच पाहिजे. अनानतस्य शवसः = अनानतज्योतिर्बलस्य अनभिभूतप्रकाशस्य अन्यैः ज्योतिर्भिः ( दुर्ग ) = ज्याचा प्रकाश दुसऱ्या प्रकाशांनीं पराभूत होत नाहीं अशा आदित्याच्या; आदित्याचें बल म्हणजे प्रकाश; ह्या प्रकाशापुढें ग्रहनक्षत्रादिकांचें कांहीं चालत नाहीं; त्याच्या प्रकाशांत ग्रहनक्षत्रादि दिसतसुद्धां नाहींत; तेव्हां त्यांच्या प्रकाशानें सूर्याचा प्रकाश कधींही नाहींसा म्हणजे अदृश्य होणार नाहीं; दुर्गानें अनानतस्य शवसः हें विश्वानरस्य ह्याचें विशेषण केलें आहे. पतिं = पातारम् इन्द्रम् ( दुर्ग ). एवैः = कामैः; किंवा एवैः = अयनैः; किंवा एवैः = अवनैः; अयनैः = अवनैः = गतींनीं; २।२५ ह्यांत एवैः = अयनैः अवनैः वा ( पान १४४ ) एवढेंच आहे. चर्षणीनां = मनुष्याणां ( निघं० २।३।८ ). ऊत्या = पथा; च अध्याहृत. रथानां पथा = ज्या मार्गानें गमन करणारे रश्मि जातात त्या मार्गानें ( दुर्ग ); सूर्यकिरण स्वर्गांतून पृथिवीवर येतात;

तेव्हां स्वर्गातून पृथिवीवर येणाऱ्या मार्गानें; रथाः = रंहणाः रश्मयः ( दुर्ग ); रथानां ह्या शब्द वृत्तींत न घालतां दुर्ग त्याचें फक्त वरीलप्रमाणें विवरण करतो. हुवे = इन्द्रम् अस्मिन् यज्ञे ह्वयामि; हुवे = आह्वयामि ( दुर्ग ). वः = भवतां ( दुर्ग ) = तुमच्या इंद्राला; वः शब्द किंवा त्याचा पर्याय भाष्यांत दिला नाहीं.

दुर्गानें केलेला अर्थः—ज्याचा प्रकाश दुसऱ्या कोणत्याही प्रकाशानें मावळत नाहीं अशा आदित्याचें पालन करणाऱ्या ( पतिं ) तुमच्या इंद्राला मनुष्यांच्या ( चर्षणीनां ) कामना पूर्ण व्हाव्या म्हणून ( एवैः = कामैः ) किंवा त्यांना इकडे तिकडे जातां यावें म्हणून ( अयनैः = अवनैः ) ज्या मार्गानें ( ऊत्या ) सूर्यकिरण खालीं येतात त्याच मार्गानें खालीं येण्यास मी बोलावीत आहें. विश्वानरस्य अनानतस्य शवसः पतिं = आदित्याचा पालक व त्याच्या न नमणाऱ्या बलाचा पालक; किंवा आदित्याचा पति व स्वतःचें जें अनानतबल त्याचा पति; ह्या दोहोंपैकीं यास्काच्या मनांत कोणता अर्थ होता तें सांगतां येत नाहीं.

सायणः— विश्वानरस्य = विश्वान् शत्रून् प्रति ऋतस्य; अनानतस्य = शत्रूणाम् अप्रह्वस्य; शवसः = बलस्य; पतिं = स्वामिनम्; शत्रूवर हल्ला करणाऱ्या व शत्रूला न नमणाऱ्या बलाचा पति म्हणजे स्वामी जो इंद्र त्याला; किंवा हे मरुतांनो, तुमच्या ( वः ) स्वामीला; जरी मरुद्वाचक शब्द ऋचेंत नाहीं तरी वः या शब्दामुळें मरुतच लक्षांत येतात; वः चर्षणीनाम् एवैः = युष्माकम् इंद्रस्य सेनारूपाणां गमनैः = इंद्राचे सैनिक जे तुम्ही त्या तुमच्या गतींसह; रथानाम् ऊत्या = तुमच्या रथांच्या गतीसह; हुवे = आह्वयामि; हे मरुतांनो, शत्रूवर हल्ला करणाऱ्या व शत्रूपुढें न नमणाऱ्या बलाचा पति किंवा तुमचा पति जो इंद्र त्याला तुम्ही जे त्याचे सैनिक त्या तुमच्या गतींसह व तुमच्या रथांच्या गतीसह मी बोलावीत आहें म्हणजे भराभर धांवणारें मरुत् व भराभर धांवणारे त्यांचे रथ ह्यांनीं जो युक्त इंद्र त्याला मी बोलावीत आहें; किंवा हे यजमानांनो, जेव्हां रथासह म्हणजे रथांत बसून तुमचे सैनिक लढण्याकरितां रणांगणांत शिरतात तेव्हां तुमच्या सैनिकांना साहाय्य करण्याकरितां इंद्राला मी बोलावितों.

( १ ) वि दृह्ळानि चिदद्रिवो जनानां शचीपते । वृह माया अनानत ( ६।४५।९ ) = ज्याला कोणी नमवीत नाहीं ( अनानत ) अशा बलपति ( शचीपते ) व वज्र हातांत घेणाऱ्या ( अद्रिवः ) हे इंद्रा, पंचजनांचे अतिशय बळकट असलेले किल्ले व त्यांच्या माया ह्यांचा नाश कर ( वि + वृह ); ( २ ) हे धनवंता ( शचीपते = अद्रिवः ), पंचजनांचे अगदीं गुप्त असलेले ( दृह्ळानि ) धन ( चित् = मायाः ) आणून दे. क स्य वृषभो युवा तुविग्रीवो अनानतः ( ८।६४।७ ) = ( १ ) नरम न केलेला ( अनानतः ), जाड्या मानेचा ( तुविग्रीवः ), ज्वानींत असलेला ( युवा ) तो बैल कोठें आहे असें इंद्राविषयीं म्हटलें आहे; ( २ ) तो धनपति व धनदाता कोठें आहे ? वृ = स = भ = धन; यु = देणें; युवा

= दाता; तुवि = पुष्कळ; ग्रीवा = धन ? ज्याच्याजवळ पुष्कळ धन आहे तो तुविग्रीव; अनानत = धनानें भरलेला. त्वं हि सत्यो मघवन्ननानतो वृत्रा भूरि नि ऋञ्जसे। स त्वं यविष्ठ वज्रहस्त दाशुषे अर्वाञ्चं रयिमा कृधि ( ८।९०।४ ) = ( १ ) हे इंद्रा, न नमविलेला तूं बलवान् असल्याकारणानें ( सत्यः ) कित्येक ( भूरि ) शत्रूंना (वृत्रा = वृत्राणि) खालीं ( नि ) पाडतोस (ऋञ्जसे); हे वज्रहस्त व सगळ्या देवांत तरुण (यविष्ठ) इंद्रा, तो तूं हवि देणाऱ्याकरितां धन स्वर्गांतून खालीं (अर्वाक्) आण; (२) सत्यः = धनवान्; मघवन् = हे धनवंता; वृ = देणें; वृत्राणि = धन; हि = नि = धन; ऋञ्जसे = देतोस; सः = असा प्रसिद्ध धनवान्; यविष्ठ = सगळ्या दात्यांत श्रेष्ठ; वज् = देणें; वज्र = धन; वज्रहस्त = हे धनवंता; हे धनवंता, तूं पुष्कळ धन देत असतोस म्हणून आम्हांला पुष्कळ धन दे. प्रत्वक्षसः प्रतवसो विरप्शिनो अनानता अविथुरा ऋजीषिणः। जुष्टतमासो नृतमासो अञ्जिभिः व्यानज्रे के चिदुस्रा: इव स्तृभिः ( १।८७।१ ) = ( १ ) रात्री ( उस्राः ) जशा ( इव ) नक्षत्रांनीं ( स्तृभिः ) नटतात तसे बलवान् ( प्रत्वक्षसः = प्रतवसः ), कधीं न नमविलेले ( अनानताः ), कधींही न थकणारे ( अविथुराः ), सोम पिणारे ( विरप्शिनः = जुष्टतमासः ) प्रचंड वीर ( नृतमासः ) म्हणजे मरुत् अलंकारांनीं ( अञ्जिभिः ) नटतात; ( २ ) सगळ्या विशेषणांचा अर्थ धनवान् असा आहे; तो अर्थ सिद्ध करण्याला फारच खटाटोप करावा लागेल; धनवान् आपल्या धनांतून ( अञ्जिभिः ) धन ( वि ) देतात (आनज्रे). ह्या पांचही उताऱ्यांत अनानत ह्याचे दोन अर्थ आहेत; न नमला जाणारा हा अर्थ स्पष्ट आहे; अन्येषां धनैः न आनतः अथवा न आनतं = दुसऱ्यांच्या धनामुळें ज्याला नमावें लागत नाहीं असा इंद्र किंवा असें धन असा अनानत शब्दाचा दुसरा अर्थ असावा. प्रस्तुत ऋचेचेही दोन अर्थ आहेत. विश्वानरः = ( १ ) विश्वे नरः यस्य सः = ज्याच्या स्वाधीन सर्व पंचजन आहेत असें बल; ( २ ) ज्यामध्यें अतिशय धन ( विश्व = आ = नर ) आहे असें धन. बल ह्याशिवाय शवस् ह्याचा धन असाही अर्थ आहे; नह्यङ्ग नृतो त्वदन्यं विन्दामि राधसे। राये द्युम्नाय शवसे च गिर्वणः ( ८।२४।१२ ) = हे दात्या ( नृतो = गिर्वणः ), धन देण्याच्या बाबतींत ( राधसे = राये = द्युम्नाय = शवसे ) तुझ्याशिवाय खरोखर ( अङ्ग ) दुसरा कोणी मला आढळत नाहीं. ( १ ) इंद्राचें बल पंचजनांना आपल्या स्वाधीन करतें व त्या बलाला कधींही नमावें लागत नाहीं; अशा बलाचा इंद्र पति आहे; ( २ ) अतिशय धनाचा दाता (पतिः) इंद्र आहे. एवैः = (१) घोड्यांसह; (२) धनांसह. ( १ ) विरूपे पुनर्भुवा युवती स्वेभिरेवैः। कृष्णेभिर् अक्ता उषा रुशद्भिः आ चरतः अन्या अन्या (१। ६२।८) = पुन्हापुन्हा जन्मास येणाऱ्या ( पुनर्भुवौ ) तरुणी ( युवत्यौ ), भिन्नभिन्न रंगाच्या ( विरूपे ) रात्र ( अक्ता ) व उषा आपआपल्या घोड्यावर बसून ( एवैः ) एकमेकींच्या मागून हिंडतात; रात्रीचे घोडे काळे तर उषेचे शुभ्र असतात. ( १ व २ ) रमध्वं मे वचसे सोम्याय ऋतावरीः उप मुहूर्तमेवैः( ३।३३।५ ) = ( १ ) हे नद्यांनो

( ऋतावरीः ), माझी स्तुति व माझा सोमहवि घेण्यासाठीं ( वचसे सोम्याय ) आपल्या घोडयांसह ( एवैः ) क्षणभर ( मुहूर्तं ) थांबा ( रमध्वं ); ( २ ) हे धनवंत स्त्रियांनो ( ऋतावरीः ), मला पुष्कळ (सोम्याय) धन मिळावें म्हणून ( वचसे ) तुम्ही आपल्या धनांतून ( एवैः ) पुष्कळ ( मुहूर्तं ) धन ( उप ) द्या ( रमध्वं ). ( २ ) कीरिं चित् हि अवथ स्वेभिरेवैः (१०। ६७।११) = हे दात्यांनो, आपल्या अगणित धनांतून ( स्वेभिः = एवैः ) स्तोत्याला ( कीरिं ) धनयुक्त करा (अवथ). चर्षणीनाम् एवैः = (१) पंचजनांच्या घोडयांनीं; (२) धनाच्या दानांनीं; चर् = सनिः = धन; चर्षणिः = अतिशय धन; धर्तारा चर्षणीनां यन्तं सुम्नं रिशादसा (५।६७।२) = हे मित्रावरुणांनो, धन देणारे ( धर्तारौ चर्षणीनां = रिशादसौ ) धन ( सुम्नं ) द्या ( यन्तं ); ईशाना वार्याणां क्षयन्तीश्चर्षणीनां ( १०।९।५ ) = धनावर ( वार्याणां = चर्षणीनां ) सत्ता चालविणाऱ्या ( ईशानाः = क्षयन्तीः ). रथ = ( १ ) रथ, ( २ ) धन. ( २ ) प्र वायुम् अच्छा बृहती मनीषा बृहद्रयिं विश्ववारं रथप्राम् ( ६।४९।४ ) = अतिशय धनवान् ( बृहद्रयिं = विश्ववारं ) व धन देणारा ( रथप्रां ) जो वायु त्याच्याकडे ( अच्छा ) ही मोठी स्तुति वेगानें जात आहे ( प्र ). ( १ व २ ) अस्माकं बोधि अविता रथानाम् अस्माकं शूर नृणाम् ( ७।३२।११ ) = ( १ ) हे शूरा, आमच्या रथांचा व योद्ध्यांचा रक्षक हो ( बोधि ); ( २ ) हे दात्या ( शूर ), आम्हांला (अस्माकं) पुष्कळ धन (रथानां=नृणां) देणारा (अविता) हो (बोधि). स्तुहि अतिथिम्। अग्निं रथानां यमम् ( ८।१०३।१० ) = धनदात्या ( रथानां यमं ) अग्नीची स्तुति कर. ऊतिः = ( १ ) रक्षण, ( २ ) दान. ( १ ) त्रितः कूपे अवहितो देवान् हवत ऊतये ( १।१०५।१७ ) = विहिरींत फेकून दिलेला (अवहितः) त्रित स्वसंरक्षणासाठीं (ऊतये) देवांना हाक मारीत आहे. ( १ व २ ) ह्वयामि देवं सवितारमूतये ( १।३५।१ ) = ( १ ) सवितृदेवाला रक्षण करण्यासाठीं मी बोलावीत आहें; ( २ ) धनवंत ( देवं ) दात्याची ( सवितारं ) धन देण्यासाठीं ( ऊतये ) मी याचना करीत आहें.

ऋचेचे दोन अर्थ :— ( १ ) बलाचा पति जो इंद्र त्याला तुमच्या ( वः ) व पंचजनांच्या ( चर्षणीनां ) घोडयांसह (एवैः ) रथांच्या रक्षणासाठीं ( ऊती=ऊतये ) मीं बोलावीत आहें; (२) धनाचा पति जो इंद्र त्याची आपल्या धनांतून ( एवैः ) तुम्हांला ( वः ) अतिशय धन ( चर्षणीनां=रथानां ) देण्यासाठीं ( ऊती = ऊतये ) मी याचना करीत आहें ( हुवे ); ह्या दुसऱ्या अर्थांत च ह्या निपाताचा अन्वयार्थ करतां येत नाहीं.

**वरुणः ( १३ ) व्याख्यातः ( निरु० १०।३ )। तस्य एषा भवति**

वरुण शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ७३५ ).

## खंड २२ वा.

**येना पावक चक्षसा भुरण्यन्तं जनाँ अनु ।**

**त्वं वरुण पश्यसि ( ऋ० सं० १।५०।६ )**

**भुरण्युः ( निघण्टु २।१५।१४ ) इति क्षिप्रनाम । भुरण्युः शकुनिः । भूरिम् अध्वानं नयति । स्वर्गस्य लोकस्य अपि वोहळा । तत्संपाती भुरण्युः । अनेन पावक ख्यानेन । भुरण्यन्तं जनाँ अनु । त्वं वरुण पश्यसि । तत् ते वयं स्तुमः इति वाक्यशेषः**

भुरण्यु ह्याचा अर्थ क्षिप्र; पक्षी लवकर जातो म्हणून तो भुरण्यु. भुरण्युः = भुर + नी + उः; भुर = भूरिम् अध्वानम्; नी = नयति; उ हा नामकरण प्रत्यय; जो लांब (भूरिं) मार्गानें (अध्वानं) नेतो तो भुरण्यु. स्वर्गस्य लोकस्य अपि वोहळा (= स्वर्गलोकही आणून देणारा किंवा स्वर्गलोकाकडेहि नेणारा) हा ऋचेंतील कोणत्या शब्दाचा किंवा शब्दांचा अर्थ ? कदाचित् स्वर्गस्य लोकस्य वोहळा हा अग्नि असेल; तत्संपाती भुरण्युः = त्या ( तत् ) अग्नीबरोबर ( सं ) जो स्वर्गाकडे उडून जातो ( पाती ) तो भुरण्यु. दुर्गवृत्तींत भूरिम् अध्वानं ० लोकस्य वोहळा हे शब्द नाहींत. भुरण्यु म्हणजे भरकन् जाणारा पक्षी; स्वर्गलोकाकडे जाण्याकरितां अग्निचितींत अग्नि प्रज्वलित केला जातो असें ब्राह्मणवचन आहे म्हणून प्रस्तुत ऋचेंत अग्नि हा भरकन् जाणारा पक्षी; त्याच्याबरोबर उडून जाणारा ( तत्संपाती ) अग्निचयन करणारा यजमान; अग्निचितियज्ञ केल्याबरोबर त्या यज्ञापासून होणारें पुण्य घेऊन यजमान स्वर्गाकडे ताबडतोब जातो ( भुरण्यति ) म्हणून तो यजमानही भुरण्यु ( दुर्ग ). भुरण्यन्तं = अग्नीबरोबर स्वर्गलोकाला ताबडतोब जाणाऱ्याला. पावक = पावयितर् ( दुर्ग ). चक्षसा = ख्यानेन = दर्शनेन अनुग्राहकेण ( दुर्ग ) = अनुग्रह करणाऱ्या दृष्टीनें म्हणजे कृपादृष्टीनें; चक्ष् ह्याला ख्या आदेश होतो ( पान ९७७ ). भुरण्यन्तं जनां अनु = पुण्यकृतः जनान् अनु पूर्वेषां पुण्यकृतां मार्गेण देवयानेन क्षिप्रं गच्छन्तं (दुर्ग) = पुण्य करणाऱ्या पूर्वीच्या लोकांच्या देवयानमार्गानें भराभर जाणाऱ्याला. तत् ते वयं स्तुमः हे शब्द अध्याहृत घेतले आहेत; अध्याहृत शब्द न घेतल्यास येन० पश्यसि हें वाक्य अपुरें राहतें.

दुर्गानें केलेला अर्थः—हे पावन करणाऱ्या वरुणा, पूर्वीच्या पुण्य करणाऱ्या लोकांच्या देवयानमार्गानें अग्निचितियज्ञ करून जो भराभर स्वर्गलोकाकडे जातो त्याजकडे ज्या कृपादृष्टीनें तूं पाहतोस त्या तुझ्या कृपादृष्टीची आम्ही स्तुति करतों.

**सायणः**—सर्वांना शुद्ध करणाऱ्या ( पावक ) व सर्व अनिष्टांचें निवारण करणाऱ्या ( वरुण ) हे सूर्या, जन्मलेल्या प्राण्यांना ( जनान् = जातान् प्राणिनः ) धारण करणाऱ्या किंवा पोसणाऱ्या ( भुरण्यन्तं = धारयन्तं पोषयन्तं वा ) ह्या जगाला ज्या प्रकाशानें सारखा ( अनु ) तूं पहात असतोस म्हणजे त्या एकट्यालाच सारखा प्रकाश देत असतोस त्या प्रकाशाची आम्ही स्तुति करतों.

अपि वा उत्तरस्याम्

किंवा तत् ते वयं स्तुमः ह्या शब्दांनीं वाक्यसमाप्ति न करतां पुढील ऋचेंत ती वाक्यसमाप्ति करावी. चक्षस् ह्याचा प्रकाश असा अर्थ असून डोळा असाही अर्थ आहे. पश्यन् गृध्रस्य चक्षसा ( १०।१२३।८ ) = गृध्राच्या डोळ्यानें पाहणारा. पश्यन् मन्ये मनसा चक्षसा तान् ( १०।१३०।६ ) = मनानें व डोळ्यानें मी त्यांना पहात आहें असें वाटतें. आ चष्ट आसां पाथो नदीनां वरुण उग्रः सहस्रचक्षाः ( ७।३४।१० ) = हजार डोळ्यांचा कडक वरुण ह्या नद्यांचा मार्ग पहात असतो. येन चक्षसा हे वरुण त्वं पश्यसि = हे वरुणा, ज्या डोळ्यानें तूं पाहतोस. वरुण कुणाला पाहतो ? भुरण्यन्तम्. भुरण्य् = ( सोमरस, दूध वगैरे ) पिणें हा अर्थ तीन चार ऋचांत स्पष्ट आहे; अग्नि (१।६८।१॥१०।४६।७), द्यावापृथिवी (१।१२१।५), अश्विन ( १।११७।१॥६।६२।७ ) ह्यांना भुरण्यु हें विशेषण लाविलें आहे; अश्विन हे भुरण्यू म्हणजे दाते; द्यावापृथिवी व अग्नि हेही दाते होत; सूर्याला शकुनिं भुरण्युं ( १०।१२३।६ ) म्हटलें आहे; पक्षी उडतो म्हणून भुरण्यु म्हणजे उडणारा असा अर्थ होईल; पण सूर्य हा धनदाता असल्यामुळें त्याला भुरण्युं हें विशेषण लाविलें असेल. भुरण्य् = धन किंवा हवि देणें असा अर्थ केल्यास भुरण्यन्तं = हवि देणाऱ्यास असा अर्थ होईल. जनान् अनु = जनांमध्यें; अनु हा शब्द पुष्कळ ठिकाणीं सप्तम्यर्थीं घातला असतो; जनां अनु ( पान ९८५ ) पहा. यमस्य दूतौ चरतो जनान् अनु ( १०।१४।१२ ) = यमाचे दूत लोकांमध्यें हिंडतात.

ऋचेचा अर्थः—हे वरुणा, ज्या डोळ्यानें म्हणजे कृपादृष्टीनें पंचजनांमध्यें जो हवि देतो त्याला ( भुरण्यन्तं ) तूं पाहतोस ( त्याच दृष्टीनें आम्हांला तूं पहा ). एथें वरुण म्हणजे वरुण कीं सूर्य ? सूक्ताची देवता सूर्य आहे; तेव्हां वरुण हा सूर्य. पावक = शुद्ध करणारा; वरुण = अंधकाराला अडविणारा; अंधकार घालवून सूर्य स्वप्रकाशानें जग शुद्ध म्हणजे स्वच्छ करतो; सूर्य हा धनदाता आहे; त्याची कृपादृष्टि ज्याच्याकडे वळते तो धनवान् होतो.

## खंड २३ वा.

**येना पावक चक्षसा भुरण्यन्तं जनाँ अनु । त्वं वरुण पश्यसि ( ऋ० सं० १।५०।६ ) ॥ वि द्यामेषि रजस्पृथ्वहा मिमानो अक्तुभिः । पश्यन् जन्मानि सूर्य (ऋ० सं० १।५०।७ )**

**व्येषि द्यां रजश्च पृथु । महान्तं लोकम् । अहानि च मिमानः अक्तुभिः रात्रिभिः सह । पश्यन् जन्मानि जातानि सूर्य**

वि द्याम् एषि = व्येषि द्याम्; व्येषि = विविधम् एषि । अतिशयेन वा एषि (दुर्ग) = नानाप्रकारानें म्हणजे नानारूपें घेऊन जातोस किंवा वेगानें जातोस. रजः = लोकम्; पृथु = महान्तम्; च अध्याहृत; रजः पृथु = अन्तरिक्षं ( दुर्ग ). अहा =

अहानि; च अध्याहृत. मिमानः = कुर्वन् ( दुर्ग ). अक्तुभिः = रात्रिभिः सह. जन्मानि = जातानि = सर्व भूतानि ( दुर्ग ). दुर्गानें केलेला अर्थः— हे वरुणा सूर्या, ज्या कृपादृष्टीनें तूं स्वर्गाकडे जाणाऱ्या यजमानाला पाहतोस त्याच दृष्टीनें सर्व प्राणिजातांना पाहणारा व रात्रीसह दिवस निर्माण करणारा तूं द्युलोकांत व विस्तृत अंतरिक्षांत नानाप्रकारचीं रूपें घेऊन किंवा अतिशय वेगानें जातोस.

सायणः— रजः पृथु = विस्तीर्ण लोक; हा विस्तीर्ण लोक द्युलोक म्हणजे अंतरिक्ष; व्येषि = विशेषेण गच्छसि = वेगानें जातोस; मिमानः = उत्पादयन्; जन्मानि = जननवन्ति भूतजातानि; पश्यन् = प्रकाशयन्; हे सूर्या, रात्रींसह दिवस उत्पन्न करणारा व जन्मलेल्या सर्व प्राणिमात्रांना प्रकाश देणारा तूं द्युलोकांत म्हणजे विस्तीर्ण अंतरिक्षांत वेगानें जातोस.

**अपि वा पूर्वस्याम्**

किंवा आधींच्या ऋचेशीं (अन्वय करावा). वि हा उपसर्ग मिमानः ह्याला जोडला पाहिजे; वि + मा = ( १ ) मोजणें, ( २ ) निर्माण करणें, ( ३ ) देणें. ( १ ) मानेनेव तस्थिवान् अन्तरिक्षे वि यो ममे पृथिवीं सूर्येण ( ५।८५।५ ) = सूर्य हाच जणूं काय मोजण्याचा दंड; त्या दंडानें जो पृथिवीला अंतरिक्षांत उभा राहून मोजता झाला. ( २ ) वि यो ममे रजसी सुक्रतूयया अजरेभिः स्कम्भनेभिः समानृचे ( १। १६०।४ ) = जो कौशल्यानें ( सुक्रतूयया ) द्यावापृथिवी निर्माण करता झाला व न मोडणाऱ्या खांबांनीं त्यांना टेका देता झाला. ( ३ ) विमानो अह्नां ( ९।८६।४५ ) = दिवस देणारा; अन्तरिक्षे रजसो विमानः ( १०।१२१।५ ) = अंतरिक्षांत प्रकाशाचा दाता. अक्तु ह्याचे रात्र, प्रवाह, धन असे अर्थ असून किरण किंवा तेज असाही अर्थ आहे; अस्य चरन्ति जन्तवो द्विपच्च यदुत चतुष्पद् अक्तुभिः (१।९४।५)=ह्याच्या तेजानें द्विपाद् व चतुष्पाद् प्राणी हिंडूं लागतात. महान् उदयान् देवो अक्तुभिः(४।५३।१) = महान् सवितादेव किरणांसह उगवला आहे (उत्+अयात् ?). यस्य ते विश्वा भुवनानि केतुना प्र चेरते अक्तुभिः ( १०।३७।९ ) = हे सूर्या, ज्या तुझ्या तेजानें ( केतुना = अक्तुभिः ) सर्व प्राणी हिंडूं लागतात. व्यञ्जते दिवो अन्तेषु अक्तून् ( ७।७९।२ ) = उषा द्युलोकाच्या प्रांतभागीं प्रकाश व्यक्त करतात. अह्ना मिमानो अक्तुभिः = तेजानें दिवस निर्माण करणारा. जन्मानि सविता व्याकः ( २।३८।८ ) = सविता देवांचे संघ व्यक्त करतो. अग्निर्जन्मानि देव आ वि विद्वान् द्रवत् दूतो देवयावा ( ७। १०।२ ) = देवांना ( जन्मानि ) जाणणारा ( विद्वान् ) व देवांकडे जाणारा ( देवयावा ) दूत ( अग्नि ) त्यांच्याकडे धांवत जात आहे ( आ + द्रवत् ).

ऋचेचा अर्थः—हे सूर्या, आपल्या तेजानें दिवस निर्माण करणारा व सर्व प्राणिमात्र किंवा देवसंघ पहात जाणारा तूं विस्तीर्ण ( पृथु ) द्युलोकाकडे ( द्यां = रजः ) जातोस.

## खंड २४ वा.

**येना पावक चक्षसा भुरण्यन्तं जनाँ अनु । त्वं वरुण पश्यसि ( ऋ० सं० १।५०।६) । प्रत्यङ् देवानां विशः प्रत्यङ् उदेषि मानुषान् । प्रत्यङ् विश्वं स्वर्दृशे (ऋ० सं० १।५०।५ )**

**प्रत्यङ् इदं सर्वम् उदेषि । प्रत्यङ् इदं सर्वम् अभिविपश्यसि । इति**

विश्वं = इदं सर्वम्. दृशे = अभिविपश्यसि. यास्क ऋचेंतील सर्व शब्दांचे पर्याय न देतां ऋचेचा सारांश देतो तो सारांश असा:— ह्या सर्व जगाकरितां तूं उगवतोस ( उदेषि ) व त्याकडे मुख करून तें सर्वबाजूंनीं पाहतोस. प्रत्यङ् = प्रति + अङ् = कडे जाणारा म्हणजे वळणारा असा यास्कानें अर्थ केला असावा. महाराष्ट्र-पाठांत प्रत्यङ् इदं ज्योतिः उच्यते हे शब्द उदेषि व प्रत्यङ् इदं सर्वं ह्या दोहोंच्यामध्यें अधिक आहेत; ते एथें अप्रस्तुत होत; त्यांतील इदं ज्योतिः उच्यते हे शब्द १२।२६ ( पान १००५ ) ह्यांतून घेतले असावेत.

दुर्गानें केलेला अर्थ:— हे सूर्या, ( ज्या अनुग्रहबुद्धीनें तूं यजमानाला पाहतोस त्याच बुद्धीनें तूं देवांना ( देवानां विशः ) व मनुष्यांना आपल्यासमोर ठेवून ( प्रत्यङ् कृत्वा ) त्यांच्यापुढें उगवतोस; इतकेंच नव्हे तर सर्व जगही आपल्यासमोर ठेवून तूं त्याला सर्व बाजूंनीं पाहतोस.

**सायण:**— देवानां विशः = मरुत् नांवाच्या देवांना; प्रत्यङ् उदेषि = तान् देवान् प्रतिगच्छन् उदयं प्राप्नोषि = मरुतांकडे जाऊन म्हणजे त्यांच्यासमोर उगवतोस; मनुष्यांच्या समोरही तूं तसाच उगवतोस त्यामुळें आमच्यासमोर सूर्य उगवत आहे असें त्यांना वाटतें; विश्वं स्वर् दृशे = व्याप्तं स्वर् लोकं द्रष्टुं = प्रकाशानें व्यापलेल्या स्वर्गाला पाहण्याकरितांही ( तूं त्याच्यासमोर उगवतोस ); अंतरिक्षांतील मरुतांना, पृथिवीवरील मनुष्यांना व स्वर्गांतील देवांना ह्या प्रत्येकांना आमच्यासमोर म्हणजे आमच्याकरितां सूर्य उगवत आहे असें वाटतें.

प्रत्यङ् प्रत्यञ्चौ प्रत्यञ्चः असा प्रत्यङ् शब्द चालतो; त्याचें स्त्रीलिङ्ग प्रतीची; प्रत्यङ् = प्रति + अङ् = प्रति + अञ्च्; अञ्च् = प्रकाशणें; अञ्च् म्हणजे जाणें असाही अर्थ आहे; प्रत्यङ् = प्रकाशणारा; प्रतीची = प्रकाशणारी. यो विश्वतः प्रत्यङ् असि दर्शतः ( १।१४४।७ ) = हे अग्नि, जो तूं सर्वत्र ( विश्वतः ) प्रकाशमान् ( प्रत्यङ् = दर्शतः ) आहेस. समिद्धो अग्निः दिवि शोचिरश्रेत् प्रत्यङ् उषसम् उर्विया वि भाति ( ५।२८।१ ) = प्रज्वलित केलेला अग्नि आपला प्रकाश द्युलोकीं पसरीत आहे; प्रकाशणारा तो उषेला विस्तृत प्रदेशावर ( उर्विया ) प्रकाशावयाला लावतो ( विभाति ). आ विश्वतः प्रत्यञ्चं जिघर्मि ( २।१०।५ ) = सर्वत्र प्रकाशणाऱ्या अग्नीला मी हवि देतों. एषा प्रतीची दुहिता दिवः (५।८०।६ ) = ही द्यूची प्रकाशणारी मुलगी.

**ऋचेचा अन्वयार्थः—** हे स्वर् प्रत्यङ् त्वं देवानां विशः मानुषान् विश्वं दृषे दृष्टुम् उदेषि = हे सूर्या, प्रकाशणारा तूं देवांना ( देवानां विशः ), मनुष्यांना व सर्व जगाला ( विश्वं ) पाहण्याला ( दृशे ) उगवतोस ( उदेषि ). विशः = लोक; दैवीर्विशः = देवलोक; मानुषीर्विशः = मनुष्यलोक. दृश् ह्याला तुम् ह्याबद्दल ए हा प्रत्यय लाविला आहे; दृशे = द्रष्टुम्.

**अपि वा एतस्यामेव**

किंवा ऋचेचा अन्वय ऋचेंतच आहे.

## खंड २५ वा.

**येना पावक चक्षसा भुरण्यन्तं जनाँ अनु । त्वं वरुण पश्यसि ( ऋ० सं० १।५०।६ )**

**तेन नः जनान् अभिविपश्यसि**

हे पावक वरुण येन चक्षसा भुरण्यन्तम् अनुपश्यसि तेन नः जनान् अभिविपश्यसि असा अन्वय करावयाचा; ऋचेंतील पश्यसि ह्याची पुनरुक्ति करून व जनान् शब्द हलवून कर्म म्हणून तो अभिविपश्यसि ह्या क्रियापदाला जोडावयाचा. हे वरुणा, ज्या अनुग्रहबुद्धीनें स्वर्गाला जाणाऱ्या यजमानाला तूं पाहतोस त्याच बुद्धीनें आमच्या लोकांना पाहतोस. इति = असा अन्वयार्थ आहे. दुर्गवृत्तींत अभिविपश्य ( = पहा ) असा पाठ आहे. दुर्ग ऋचेंतील जनान् हा शब्द वेगळा करीत नाहीं; तेन नः जनान् अभिविपश्य हें आशीर्वादार्थक वचन असून तें अध्याहृत आहे; बाविसाव्या खंडांत तत्ते वयं स्तुमः अशी स्तुतीनें वाक्यसमाप्ति केली आहे पण एथें ती आशीर्वादानें केली आहे असा भेद आहे असें तो म्हणतो; परंतु तें त्याचें म्हणणें बरोबर दिसत नाहीं; अध्याहृत शब्द न घेतां ऋचेंतच वाक्यसमाप्ति झाली आहे असें यास्कास म्हणावयाचें आहे; तेव्हां ऋचेंतून जनान् हा शब्द वेगळा करून व पश्यसि ह्या शब्दाची पुनरुक्ति करून तेन नः जनान् अभिविपश्यसि अशी वाक्यसमाप्ति ऋचेंतलेच शब्द घेऊन केली आहे; दुर्गवृत्तींत जरी अभिविपश्य असा पाठ आहे तरी यास्काच्या मनांत अभिविपश्यसि असा शब्द होता. ऋग्वेदांत संबंधीसर्वनामयुक्त वाक्यांचा दर्शक सर्वनामयुक्त वाक्यांशीं संबंध न करतां तीं वाक्यें कधीं कधीं अपुरीं ठेवलेलीं असतात; तशा वाक्यांचा दुहेरी अर्थ असतो; पहिल्या अपुऱ्या वाक्याचा अर्थ अपूर्ण असल्यानें त्याचा दुसरा अर्थ करावा लागतो व त्याच उद्देशानें अशा ऋचा रचल्या असतात; तशा सारखी प्रस्तुत ऋचा होय. पावक व वरुण ह्यांचा दुसरा अर्थ दाता. यत् ह्याचा धनपूर्ण असा अर्थ होतो; तो कसा होतो तें सांगणें कठीण आहे. येन चक्षसा= पुष्कळ धनांतून. आपो हि ष्ठा मयोभुवः ता न ऊर्जे दधातन । महे रणाय चक्षसे ( १०।९।१ ) या ऋचेचा धनपर म्हणजे तिसरा अर्थ पहा ( पान ६९६ ). अश्विनांना भुरणौ ( १०।२९।१ ) व भुरणा ( १।११७।११॥७।६७।८ ) असें संबो-

धिलें आहे; अश्विना गृणाना वाजं विप्राय भुरणा रदन्ता ( १।११७।११ ) = हे दाते ( भुरणौ ) अश्विनांनो, स्तविले जाणारे ( गृणानौ ) तुम्ही स्तोत्याला ( विप्राय ) धन ( वाजं ) देणारे ( रदन्तौ ) अहांत. भुरण्य् = देणें (पान १०००); ऋग्वेदांत भुरण् असा जरि धातु नाहीं तरी त्यालाच य् लागून भुरण्य् धातु झाला असावा; भुरण = धन; भुरण्यन्तं ह्याचीं भुरण्यं व तं अशीं दोन पदें करावयाचीं; भुरण्यं = धनानें भरलेलें; तं = अतिशय. पश्य् = देणें ( पान ५९० ). ऋचेचा गूढार्थः—हे दात्या ( पावक=वरुण ), अतिशय ( येन ) धनांतून ( चक्षसा ) तूं पुष्कळ धन ( भुरण्यं = तं ) लोकांमध्यें ( जनान् अनु ) म्हणजे लोकांना देतोस ( पश्यसि ).

**केशी ( १४ )। केशाः रश्मयः। तैः तद्वान् भवति। काशनाद्वा। तस्य एषा भवति**

केशाः = रश्मयः = किरण; किरण आहेत ज्याला तो केशी. मध्याह्नीं सूर्य किरणांनीं भरलेला असतो ( दुर्ग ). किंवा प्रकाशतो म्हणून ( काशनात् ) तो केशी; केशी = काशी = काशते = प्रकाशतो. महाराष्ट्रपाठांत काशनात् वा ह्याच्यानंतर प्रकाशनात् वा आहे; पण काशन व प्रकाशन ह्यांचा अर्थ एकच असल्याकारणानें प्रकाशनाद्वा ह्याची जरूरी नाहीं. रश्मयः अपि केशाः काशनात् एव हे वृत्तींतले शब्द बहुतकरून दुर्गाच्या निरुक्तप्रतींत असावेत; रश्मी प्रकाशतात म्हणून तेही केश; म्हणजे रश्मिवाचक केशशब्द काश् ( = प्रकाशणें ) ह्यापासून. केशी = सूर्य ( दुर्ग ). केशाः केशस्थानीयाः रश्मयः। तद्वन्तः केशिनः अग्निः वायुः सूर्यश्च ( सायणभाष्य १०।१३६।१ ). केश शब्द समासांत व तद्धितरूपांतच आढळतो; इंद्राच्या घोड्यांना केशिना सहा वेळां, केशिभिः दोन वेळां व केशवन्ता असें एकदां ( १०।१०५।५ ) म्हटलें आहे; अग्नीच्याही घोड्यांना एकदां केशिना म्हटलें आहे ( ३।६।६ ). घोडयाचे केस म्हणजे त्याची आयाळ किंवा शेपूट असेल. गिरयः वृक्षकेशाः ( ५।४१।११ ) = झाडें आहेत केस ज्यांचे असे पर्वत. सूर्याला ( १०। ३७।९ ), सवित्याला ( १०।१३९।१ ) व इंद्राला ( १०।९६।५॥१०।९६।८ ) हरिकेश, अग्नीला ( ३।२।१३ ) हरिकेश, ( १।७९।१ ) हिरण्यकेश व ( ८।६०।२ ) घृतकेश आणि इंद्राच्या घोड्यांना ( ८।३२।२९ ) हरिकेश्या हीं विशेषणें लाविलीं आहेत; हरि व हिरण्य म्हणजे सोनें; सोनें व घृत ह्यांचा रंग पिवळा तेव्हां ज्याचे केस पिवळे आहेत तो हरिकेश किंवा हिरण्यकेश किंवा घृतकेश किंवा हरिकेश्य; ह्या सर्व ठिकाणीं केश म्हणजे केस हा अर्थ स्पष्ट आहे. ककर्दवे वृषभः युक्त आसीत् अवावचीत् सारथिः अस्य केशी ( १०।१०२।६ ); एथें वृषभाला केशी न म्हणतां सारथ्याला केशी म्हटलें आहे. वायुरस्मा उपामन्थत् पिनष्टि स्मा कुनन्नमा। केशी विषस्य पात्रेण यद्रुद्रेणापिबत् सह (१०।१३६।७) = जेव्हां रुद्राबरोबर केशी विषाच्या पात्रांतून सोम पिता झाला त्यावेळीं त्याच्याकरितां वायु सोम कुटता झाला व कुनन्नमा

ठेचलेला सोमरस पिळती झाली. अप्सरसां गंधर्वाणां मृगाणां चरणे चरन्। केशी केतस्य विद्वान् सखा स्वादुर्मदिन्तमः ( १०।१३६।६ ) = गंधर्व, अप्सरा व मृग ह्यांच्या पायाखालीं असणारा मधुर ( स्वादुः ), अतिशय आनंद देणारा ( मदिन्तमः ) मित्र ( सखा ) केत ( केतस्य ? ) देणारा (विद्वान्) असा केशी आहे; एथें सोमाला केशी म्हटलें असावें. तमग्रुवः केशिनीः सं हि रेभिरे ( १।१४०।८ ) = तरुणी ( अग्रुवः ) त्याला म्हणजे अग्नीला गच्च धरत्या झाल्या ( संरेभिरे ); एथें केशिनीः हें अग्रुवः ह्याचें विशेषण; केशिनीः = ज्यांना केस आहेत अशा; दहा तरूण बहिणी अग्नि जन्मतांच त्याला गच्च धरून बसल्या ( ३।२९।१३ ) असें म्हटलें आहे; ह्या दहा बहिणी म्हणजे दहा अंगुलि; त्या केशिंनी म्हणजे काय ? केशिनी म्हणजे केस आहेत जिला अशी; ह्या अर्थावरून केशिनी म्हणजे स्त्री असा अर्थ आहे कीं काय ? आ वाम् ऋताय केशिनीरनूषत मित्र यत्र वरुण गातुमर्चथः। अव त्मना सृजतं पिन्वतं धियो युवं विप्रस्य मन्मनामिरज्यथः ( १।१५१।६ ) = हे मित्रावरुणांनो, जेव्हां तुम्ही धन देतां तेव्हां धन देण्याकरितां स्तुति तुम्हांला स्तवितात; आपल्या धनांतून ( त्मना ) स्तोत्याला ( विप्रस्य ) धन ( धियः ) द्या ( अवसृजतं = पिन्वतं ); धनावर (मन्मनां) तुमची सत्ता आहे ( इरज्यथः ); स्तुति ह्या स्त्रीलिंगी म्हणून त्यांना केशिनीः म्हणजे स्त्रिया म्हटलें असावें. ह्या सर्व उताऱ्यांत केश म्हणजे केस हा प्राथमिक अर्थ आहे; पण त्याचा दुसराही अर्थ असावा; केश = क + ईश; क = धन; ईश् = धनावर सत्ता चालविणें, धन देणें; ईश = धन; क + ईश = केश = अतिशय धन; केशी= अतिशय धनवान्. ह्या अर्थानें पाहिजे त्याला किंवा तिला केशी किंवा केशिनी म्हणतां येईल.

## खंड २६ वा.

**केश्यग्निं केशी विषं केशी बिभर्ति रोदसी।**
**केशी विश्वं स्वर्दृशे केशीदं ज्योतिरुच्यते ( ऋ० सं० १०।१३६।१ )**

**केशी अग्निं च विषं च। विषम् ( निघण्टु १।१२।१५ ) इति उदकनाम। विष्णातेः। विपूर्वस्य स्नातेः शुद्ध्यर्थस्य। विपूर्वस्य वा सचतेः। द्यावापृथिव्यौ च धारयति। केशी इदं सर्वम् इदम् अभिविपश्यति। केशी इदं ज्योतिः उच्यते। इति आदित्यम् आह**

विषं = उदक; विषं = वि + सं; स्ना = शुद्ध करणें; स्ना = स् + न + अ + अ; ह्यांतील न व अ गाळल्यानें स् + अ = स उत्पन्न होतो; पाण्यानें स्नान केल्यानें मनुष्य अगदीं शुद्ध म्हणजे निर्मल होतो म्हणून उदकाला विष म्हणतात; किंवा स = सच् = चिकटणें; उदक सर्वत्र अतिशय चिकट-लेलें असतें म्हणजे सर्व जमीन उदकानें भरून गेली असते म्हणून उदकाला विष म्हटलें असेल. गुर्जरपाठांत विपूर्वस्य स्नातेः शुद्ध्यर्थस्य नाहीं. विष्लृ व्याप्तौ ( धा०

३।१३ ); विष् = व्यापणें; ह्यापासून विष ( अमर ३।३।२२४ ). रोदसी = द्यावा-पृथिव्यौ. विश्वं = इदं सर्वम्. दुसरा इदं स्वर् ह्या शब्दाचा अर्थ कीं तो प्रक्षिप्त आहे तें सांगतां येत नाहीं; दुर्गवृत्तींत दुसरा इदं नाहीं. स्वर् = आदित्यः ( दुर्ग ). दृशे = अभिविपश्यति; चोविसाव्या खंडांत दृशे = अभिविपश्यसि असें आहे. इति आदित्य-माह = केशी म्हणजे आदित्य असें ऋषि म्हणतो. दुर्गवृत्तींत इति आदित्यम् आह नाहीं. भाष्यांत अग्नि, विश्वं व द्यावापृथिव्यौ ह्यांच्यानंतरचे तीन च अध्याहृत.

दुर्गानें केलेलें विवरणः— वर्षाकालच्या उदकानें झाडें उत्पन्न करून सूर्य अग्नीचें पोषण करतो; आहुतींच्या द्वारें सूर्य जल आपल्या किरणांत धारण करतो; सूर्य द्यावापृथिवींचे म्हणजे त्यांत राहणाऱ्या प्राण्यांचें पोषण करतो; सूर्य ( स्वर् ) योग्य रीतीनें हें सर्व जग पाहतो म्हणजे त्याचें काळजीपूर्वक पोषण करतो; ( सूर्या-कडे बोट करून ऋषि म्हणतो कीं ) आकाशांत दिसणारा हा जो ज्योति त्यालाच केशी म्हणतात.

सायणः—रश्मिनीं युक्त किंवा प्रकाशणारा सूर्य हवींनीं अग्नीचें पोषण करतो किंवा त्याचें धारण करतो; अग्नीला दिवसाच्या विशिष्ट वेळीं हवि द्यावयाचा असतो; सर्व काल सूर्यगतीवर अवलंबून असल्याकारणानें सूर्यच अग्नीला पोसतो किंवा धारण करतो असें म्हटलें आहे; उन्हाळ्यांत किरणांनीं वर नेलेलें पाणी पुन्हा पृथिवीवर वर्षण्या-करितां तो धारण करतो; द्यावापृथिवींचेंही तो धारण करतो; किरणांनीं व्याप्त ( विश्वं = व्याप्तं ) हें सर्व जग ( स्वर् ) तो आपल्या रश्मींनीं दृष्टिपथांत ( दृशे ) आणतो म्हणजे त्याच्यावर प्रकाश पाडतो; (असा हा महात्मा कोण असें कोणीं विचारल्यास) हा जो मंडलाधिपति केशी तोच तो ( हें त्याला उत्तर ).

केशी इदं ज्योतिः उच्यते ह्या शब्दांवरून सूर्य हा केशी असावा; सूर्याला हरिकेश म्हटलें आहे ( पान १००४ पहा ). केशी हरिकेशः सूर्यः अग्निं रोदसी विश्वं च स्वर्दृशे बिभर्ति = प्रकाशणारा सूर्य देवांना व मनु-ष्यांना ( स्वर्दृशे ) अग्नि, द्यावापृथिवी व सर्व ब्रह्मांड देतो ( बिभर्ति ); स्वर्दृक् = सूर्याला पाहणारा; सूर्याला पाहणारा देव किंवा मनुष्य असेल; अग्नि = तेजस्वी धन; रोदसी = द्यावापृथिवींतलें धन; विश्वं = धन; तेव्हां धनवान् ( केशी ) हवें तितकें धन ( अग्नि = रोदसी = विश्वं ) मनुष्याला ( स्वर्दृशे ) देतो ( बिभर्ति ). विष् = ( १ ) हवि देणें ( पानें ७५४ व ८८१ ); ( २ ) धन देणें ( पान ७५६ ); विष् = ( १ ) हवि; ( २ ) धन; विट् विषौ विषः । विषं विषौ विषः वगैरे; विषं = धन. धनवान् दाता मनुष्याला धन ( विषं ) देतो. विषं ह्याचा धन हा दुसरा अर्थ आहे; पण त्याचा प्राथमिक अर्थ कोणता ? विष म्हणजे जहर हा अर्थ ऋग्वेदांत बऱ्याच ठिकाणीं आहे; सूक्त १।१९१ पहा; पण तो अर्थ प्रस्तुत ऋचेंत नाहीं. विषं हें उषसं बद्दल असेल; वेष्टि असौ विष् = प्रकाश देणारी. हा केवळ तर्क आहे; ह्या तर्काला आधार कांहीं नाहीं; ऋचेचा अर्थ मला कळला नाहीं.

**अथापि एते इतरे ज्योतिषी केशिनी (१५) उच्येते । धूमेन अग्निः । रजसा च मध्यमः । तयोः एषा साधारणा भवति**

शिवाय (सूर्याहून) हे जे इतर दोन ज्योति त्यांनाही केशिन् म्हणतात; केशि केशिनी केशीनि असा केशिन् शब्द नपूंसकलिंगी चालतो; ज्योतिषी हें नपूंसक असल्यामुळें केशिनी हेंही नपूंसकच. त्यांपैकीं अग्नि हा एक पृथिवीवरील ज्योति; त्याला केशिन् म्हणण्याचें कारण त्याच्यापासून निघणारा धूर हेच त्याचे केस; धूमेन अग्निः केशी = धुरानें अग्नि केशी म्हणजे केशयुक्त; पेट घेण्याच्या आधीं अग्नि धुमसत असतो म्हणजे त्यांच्यातून धूर निघत असतो; तेव्हां अग्नि प्रकाशित व्हावयास धुराची आवश्यकता असते (दुर्ग). ह्यावरून अग्नीला केशी ही संज्ञा पेट घेण्याच्या आधीं योग्य दिसते; पेट घेतल्यानंतर त्याला केशी म्हणणें योग्य होणार नाहीं. मध्यम म्हणजे वायु; तो कधीं दिसत नाहीं; पण वाहतांना त्याच्याबरोबर धूळ जाते त्यामुळें तो केशी; म्हणजे धूळ ही वायूचे केस; रजसा मध्यमः केशी = धुळीनें वायु केशी म्हणजे केशयुक्त; स्वतः प्रकाशरहित तरी धुळीमुळें वायु प्रकाशयुक्त होतो (दुर्ग). एर्वेही वायु नेहमीं केशी नसून जेव्हां धूळ उडते तेव्हां तो केशी होतो. पुढील ऋचा एकटया अग्नीची अगर एकटया वायूची नसून दोघांची आहे (साधारणा). गुर्जरपाठांत साधारणा शब्द नाहीं; तयोः बद्दल तासां हा गुर्जरपाठ चुकीचा आहे. उदकेन च वैद्युतः । तेषां त्रयाणामपि केशिनाम् एषा साधारण्येन प्रधानस्तुतिः भवति (दुर्ग); दुर्गाच्या निरुक्तप्रतींत रजसा मध्यमः ह्याच्यानंतर उदकेन च वैद्युतः । तेषामेषा साधारणा भवति असा पाठ होता कीं काय? इतरे ज्योतिषी ह्या शब्दांमुळें तयोः हा शब्द बरोबर दिसतो; पण पुढील ऋचेंतील त्रयः केशिनः ह्या शब्दांमुळें तेषां हाही पाठ बरोबर दिसतो; कदाचित् यास्काला सूर्य, पृथिवीवरील अग्नि व अंतरिक्षांतील वायु ह्यांच्यासंबंधानें पुढील ऋचा होय असें म्हणावयाचें असेल; कारण ऋग्वेदांत अग्नि व वायु ह्यांना जींत केशी म्हटलें आहे अशी ऋचा नाहीं. उदकेन च वैद्युतः हे शब्द असंबद्ध होत; कारण वैद्युत अग्नि हाही मध्यम म्हणजे अंतरिक्षांतीलच. उदकेन च वैद्युतः हे शब्द दुर्गाच्या निरुक्तप्रतींत होते किंवा त्यानें ते आपल्या वृत्तींत घातले किंवा दुसऱ्या कोणीं तींत ते घुसडले तें सांगतां येत नाहीं; बहुतकरून ते घुसडले असावेत; कारण पुढील खंडावरील वृत्तींत केशिनः = अग्निवायुसूर्याः असें आहे.

## खंड २७ वा.

**त्रयः केशिन ऋतुथा वि चक्षते संवत्सरे वपत एक एषाम् ।**

**विश्वमेको अभि चष्टे शचीभिर्ध्राजिरेकस्य ददृशे न रूपम् (ऋ०सं०१।१६४।४४)**

**त्रयः केशिनः ऋतुथा विचक्षते । काले काले अभिविपश्यन्ति । संवत्सरे वपते एकः एषाम् । इति अग्निः पृथिवीं दहति । सर्वम् एकः अभिविपश्यति**

कर्मभिः आदित्यः । गतिः एकस्य दृश्यते । न रूपम् । मध्यमस्य

ऋतुथा = काले काले विचक्षते = अभिविपश्यन्ति; काले काले विचक्षते = पर्वकालम् अभिविपश्यन्ति ( दुर्ग ) = आपआपल्या पर्वकालाची म्हणजे काम करण्याच्या कालाची काळजी घेतात म्हणजे योग्य कालीं आपआपलें काम करून लोकांवर अनुग्रह करतात. संवत्सरे वपते एकः एषां ह्या शब्दांचा अग्नि पृथिवीला जाळतो (दहति) असा अर्थ आहे ( इति ); एकः = अग्निः; जमीन जाळण्यानें ती सुपीक होते ( दुर्ग ). विश्वं = सर्वम्. एकः = आदित्यः. अभिचष्टे = अभिविपश्यति. शचीभिः = कर्मभिः. ध्राजिः = गतिः. एकस्य = मध्यमस्य = वायूची. ददृशे = दृश्यते. वायूची गति धुळीमुळें किंवा उदकामुळें दिसते; मागील खंडांत रजसा उद्भूतेन एवढेच शब्द वृत्तींत आहेत पण एथें रजसा उद्भूतेन पार्थिवेन उदकेन वा असे शब्द आहेत.

दुर्गानें केलेला अर्थः— तीन केशी आपआपल्या कालाला अनुसरून लोकांवर अनुग्रह करतात; त्यांपैकीं एक म्हणजे अग्नि संवत्सरांत म्हणजे पाऊस पडण्याच्या आधीं पृथिवी जाळतो व तेणेंकरून तिला सुपीक करतो; सूर्य आपलीं कामें करून म्हणजे किरणांनीं पाणी वाफेच्या रूपानें आकर्षण करून व नंतर तें पावसाच्या रूपानें खालीं सोडून सर्व लोकांवर अनुग्रह करतो; धुळीमुळें किंवा उदकामुळें एकाची म्हणजे वायूची गति दिसते पण त्याचें रूप दिसत नाहीं.

सायणः— विचक्षते = विविधलक्षणां भूमिं पश्यन्ति = नानाप्रकारच्या भूमीला पाहतात; संवत्सरे वपते = संवत्सरे अतीते संवत्सरं ( पृथिवीं ? ) वपते = दाहेन केशस्थानीयौषधिवनस्पत्यादिकच्छेदनेन नापितकार्यं करोति = संवत्सर हा पृथिवीचा नवरा; तो गतप्राण झाल्यावर अग्नि पृथिवीचें केशवपन करतो म्हणजे ओषधि, वनस्पति वगैरे जाळून न्हाव्याचें काम करतो; शचीभिः = प्रकाशवृष्टयादि कर्मभि; अभिचष्टे = सर्वतः पश्यति; सूर्य प्रकाश वृष्टि वगैरेनीं सर्व जग पाहतो म्हणजे सर्व जगाचें रक्षण करतो; वायूची गति स्पर्शानें, कंपानें म्हणजे झाडें वगैरे हालविण्यानें, ध्वनीनें व वेगामुळें दिसते; पण त्याचें रूप दिसत नाहीं. दुर्ग व सायणाचार्य ह्यांनीं केलेल्या विवरणांत वायूची गति दिसते, रूप दिसत नाहीं असें म्हटलें आहे; पण वायु अग्नि व सूर्य यांच्याप्रमाणें कोणता उपकार करतो तें सांगितलें नाहीं.

ऋतुथा = (१) सोमपात्रानें, (२) योग्यवेळीं, (३) धनांतून, (४) तुकड्यांनीं, (५) व्यक्तिशः. (१) अध प्राशान ऋतुथा हवींषि (१।१७०।५)= हे इंद्रा, सोमपात्रानें सोमहवि पी; य ईं राजानौ ऋतुथा विदधत् = जो मित्रावरुणांना सोमहवि देतो; इन्द्र सोमं पिब ऋतुना त्वा विशन्तु इन्दवः (१।१५।१) = हे इंद्रा, पात्रांतून (ऋतुना) सोम पी; तुझ्या शरीरांत सोम शिरो; ऋतुथा=ऋतुना. (२) वयो वदन्त ऋतुथा शकुन्तयः ( २।४३।१ ) = पक्षी ( वयः = शकुन्तयः ) योग्य वेळीं किलबिल करतात. ( ३ ) एवा हि त्वां ऋतुथा यातयन्तं मघा विप्रेभ्यो ददतं शृणोमि (५।३२।१२) = स्तोत्यांना आपल्या धनांतून तूं धन देतोस असें मीं ऐकिलें आहे; एवा = एवेन = ऋतुथा =

धनांतून; यातयन्तं = ददतम्. ( ४ ) या ते गात्राणाम् ऋतुथा कृणोमि ताता पिण्डानां प्र जुहोमि अग्नौ ( १।१६२।१९ ) = हे अश्वा, तुझ्या अवयवांचे जे मी तुकडे करीत आहें (ऋतुथा कृणोमि) ते तुकडे मी अग्नींत अर्पण करीत आहें. ( ५ ) त्वं नो विद्वान् ऋतुथा वि वोचः ( १०।२८।५ ) = हे इंद्रा, ज्ञाता तूं आमच्याशीं व्यक्तिशः बोल; नि षीद होत्रम् ऋतुथा यजस्व देवान्देवापे हविषा सपर्य ( १०।९८।४ ) = हे देवापि, होत्याचें काम कर ( होत्रं निषीद ), देवांना व्यक्तिशः हवि दे व त्यांना हवींनीं युक्त कर. वि + चक्ष् = (१) पाहणें, (२) देणें. (२) तया पवस्व धारया यया पीतो वि चक्षसे। इन्दो स्तोत्रे सुवीर्यम् ( ९।४५।६ ) = हे सोमा, ज्या धारेनें स्तोत्याला तूं धन ( सुवीर्यं ) देतोस ( विचक्षसे ) त्या धारेनें शुद्ध हो. त्रयः केशिनः ऋतुथा विचक्षते = तीन केशी म्हणजे तीन देव व्यक्तिशः जगाकडे पाहतात म्हणजे जगाची काळजी वाहतात. वप् = ( १ ) पेरणें, ( २ ) देणें, ( ३ ) अंगावर घालणें, ( ४ ) जाळणें, ( ५ ) नाश करणें, ( ६ ) ठार करणें. ( १ ) कृते योनौ वपतेह बीजम् ( १०।१०१।३ ) = ह्या तयार केलेल्या ठिकाणीं बी पेरा; यस्यां बीजं मनुष्या वपन्ति ( १०।८५।३७ ) = जिच्यांत मनुष्य बी टाकतात. ( २ ) यः पुरुसम्भृतं वसु उत् इत् वपति दाशुषे ( ८।६६।४ ) = जो हवि देणाऱ्याला पुष्कळ धन देतो ( उद्वपति ). संवत्सरे वपत एक एषाम् = ह्या तिघांपैकीं एक वर्षभर धान्य पेरतो. हा देव कोण? अग्नि धान्य पेरतो असें ऋग्वेदांत म्हटलेलें स्मरत नाहीं. शचीभिः = ( १ ) अद्भूत सामर्थ्यानें, ( २ ) युक्तीनें, ( ३ ) धनांतून. ( १ ) हन्ता वृत्रं० महान् महीभिः शचीभिः ( ८।२।३२ ) = आपल्या मोठ्या सामर्थ्यानें वृत्राला ठार मारणारा महान् इंद्र; अहन्नहिं० शचीभिः ( १।१०३।२ ) = इंद्र आपल्या अद्भुत शक्तीनें अहीला ठार करता झाला. ( २ ) याभिः शचीभिः चमसान् अपिंशत ( ३।६०।२ ) = हे ऋभूंनो, ज्या युक्तीनें तुम्हीं एका चमसाचे चार चमस केले; वृकस्य चिद् वर्तिकाम् अन्तरास्यात् युवं शचीभिः ग्रसिताम् अमुञ्चतम् ( १०।३९।१३ ) = गिळून टाकलेल्या ( ग्रसितां ) वर्तिकेला लांडग्याच्या तोंडांतून तुम्हीं अजब युक्तीनें बाहेर काढलेंत. ( ३ ) शिक्षा शचीवः तव नः शचीभिः ( १।६२।१२ ) = हे धनवंता, तुझ्या धनांतून आम्हांला धन दे ( शिक्ष ); रायो बुध्नः संगमनो वसूनां विश्वा रुपा अभि चष्टे शचीभिः ( १०।१३९।३ ) = धनाचा सांठा ( रायः बुध्नः = संङ्गमनो वसूनां ) सविता आपल्या धनांतून पुष्कळ ( विश्वाणि ) धन ( रूपाणि ) देतो ( अभि चष्टे ). विश्वमेको अभिचष्टे शचीभिः = एक म्हणजे सविता आपल्या सामर्थ्यानें सर्व जग पाहतो. ध्राजिरेकस्य ददृशे न रूपम् = एकाची म्हणजे वायूची धडाडी किंवा वाहण्याचा जोर दिसतो पण त्याचें रूप दिसत नाहीं. पहिल्या तीन पादांत धनपर अर्थ आहे; पण चवथ्यांतून तो अर्थ काढतां येत नाहीं.

**अथ यत् रश्मिभिः अभिप्रकम्पयन् एति तत् वृषाकपिः ( १६ ) भवति। वृषाकम्पनः। तस्य एषा भवति**

जेव्हां ( अथ यत् ) किरणांनीं ( रश्मिभिः ) सर्व जग कांपवीत ( अभिप्रकम्पयन् ) सूर्य येतो तेव्हां ( तत् ) तो वृषाकपि होतो म्हणजे त्याला वृषाकपि म्हणतात; वृषाकपिः = वृष + आकपिः; वृष = वृषभिः = रश्मिभिः; आकपिः = अभिप्रकम्पयन्. दुर्ग म्हणतोः—वृषाकपिः = वृषा + कपिः; वृषा = दंवाचा वर्षाव करणारा; कपिः = कम्पनः = प्राण्यांना कांपविणारा; भगवान् सूर्य अदृश्य झाला कीं सर्व जग भयानें कांपूं लागतें. ही खरोखर दुसरी व्युत्पत्ति आहे; तथापि भाष्यांत किंवा दुर्गवृत्तींत विकल्पदर्शक वा नाहीं.

## खंड २८ वा.

**पुनरेहि वृषाकपे सुविता कल्पयावहै । य एष स्वप्ननंशनोऽस्तमेषि पथा पुनर्विश्वस्मादिन्द्र उत्तरः ( ऋ० सं० १०।८६।२१ )**

**पुनर् एहि वृषाकपे । सुप्रसूतानि वः कर्माणि कल्पयावहै । यः एषः स्वप्ननंशनः । स्वप्नान् नाशयसि आदित्यः उदयेन । सः अस्तम् एषि पथा पुनः । सर्वस्मात् यः इन्द्रः उत्तरः तम् एतत् ब्रूमः आदित्यम्**

सुविता = सुवितानि = सुप्रसूतानि वः कर्माणि; दुर्गवृत्तींत वः नाहीं व तो शब्द नको आहे; सुप्रसूतानि = सुप्रवृत्तानि = शोभनम् अर्थम् उद्दिश्य जगतो अनुग्रहम् एतानि शोभनानि कर्माणि प्रवृत्तानि ( दुर्ग ) = चांगला उद्देश म्हणजे जगांवर करावयाचा उपकार लक्षांत घेऊन आरंभिलेलीं हीं कर्मे. सुवित शब्द सू (= प्रसवणें) ह्यापासून ( पान २७८ ); सुवित = सूत = प्रसूत. कल्पयावहै = सगुणानि कुर्वः त्वम् उदयेन अहम् अनुष्ठानेन ( दुर्ग ) = तूं आपल्या उदयानें व मी अनुष्ठानानें हीं आरंभलेलीं कर्मे आपण सगुण म्हणजे वैगुण्यरहित करूं या; ह्या कर्मांत कोणताही दोष रहाणार नाहीं अशी काळजी घेऊं या. यः स्वप्ननंशनः = स्वप्नान् नाशयसि यः आदित्यः उदयेन = उदय पावून जो तूं आदित्य स्वप्ने नाहींशीं करतोस तो तूं; दुर्गवृत्तींत आदित्यः नाहीं व स्वप्ननंशनः बद्दल स्वप्ननाशनः आहे आणि तोच शब्द भाष्यांत घालावयास पाहिजे होता; कदाचित् दुर्गाच्या निरुक्तप्रतींत तो असावा; नंशन हा शब्द अमरांत किंवा आपट्यांच्या कोशांत नाहीं; मस्जिनशोर्झलि ( पा० ७।१।६० ) ह्या सूत्रानें नंशन शब्द सिद्ध होत नाहीं. विश्वस्मात् = सर्वस्मात्. यः अध्याहृत. तम् एतत् ब्रूमः आदित्यं ( अध्याहृत ) = त्या आदित्याला तुला आम्ही हें म्हणतों; दुर्गवृत्तींत तम् एतत् ब्रूमः आदित्यं नाहीं; जो तूं ईश्वर ( इन्द्रः ) असून सर्व जगाहून ( सर्वस्मात् ) उंच आहेस ( उत्तरः = उद्गततरः ) तो तूं पुन्हा उदय पाव अशी दुर्ग वाक्यसमाप्ति करतो; पुनर् एहि = स त्वं पुनर् एव हि उदयं प्राप्नुहि ( दुर्ग ). दुर्गानें केलेला अर्थः—हे सूर्या (वृषाकपे), जो हा तूं उदय पावून स्वप्नांचा नाश करतोस तो तूं पुन्हा अस्ताला जातोस; जो तूं ईश्वर असून सर्व जगांहून उंच आहेस तो तूं पुन्हा उदय पाव; नंतर तूं आपल्या उदयानें व मी आपल्या अनुष्ठानानें

लोकांवर अनुग्रह करण्याच्या बुद्धीनें आरंभलेलीं हीं कर्में आपण दोघे वैगुण्यरहित करूं.

सायण:—येऊन परत जाण्याऱ्या वृषाकपीला इंद्र म्हणतो; हे वृषाकपि, आमच्याकडे परत ये; तूं परत आल्यावर ज्यांनीं तुला आनंद होईल अशीं कामें इंद्राणी व मी पूर्ण विचार करून तुझ्याकरितां करूं; आदित्य जो तूं उदय पाऊन सर्व प्राण्यांचीं स्वप्नें नाहींशीं करतोस तो तूं ह्याच मार्गानें पुन्हा आपल्या घरीं परत जातोस; ज्याअर्थीं मी इंद्र सर्वांहून श्रेष्ठ आहे. हें विवरण विसंगत आहे; कारण वृषाकपि हा इंद्राचा मित्र; तो रागावून परत जातो म्हणून इंद्र त्याला परत बोलावितो व तुला आम्ही पाहिजे तें करून संतुष्ट करूं असें म्हणतो; नंतर तूं आदित्य आहेस, उगवून लोकांचीं स्वप्नें नाहींशीं करतोस व पुन्हा आपल्या मार्गानें घरीं परत जातोस असें म्हटलें आहे; मी इंद्र सर्वांहून श्रेष्ठ ह्याचा कशाशींच संबंध नाहीं.

स्वप्नंशन: ह्यांतील नंशन शब्द एथेंच आला आहे; नश् पासून नंशन शब्द झाला असल्यास त्याचा नाश करणारा असा अर्थ होईल; पण ऋग्वेदांत नश् ह्याचे हवि देणें व उपभोगणें असेही अर्थ आहेत; यस्त आहुतिं निशितिं मर्त्यो नशत् (६।२।५) = जो मर्त्य तुला हवि (आहुतिं = निशितिं) देतो (नशत्). रयिं नशते (५।४।११) = धन उपभोगतो. स्वप्न = (१) झोंप किंवा स्वप्न, (२) सु + अप् + न = धन; स्वप्नंशन:=अतिशय धन भोगणारा. वृषाकपायि रेवति (१२।९पान९७१) एथें वृषाकपीच्या बायकोला रेवति (= धनवति) असें संबोधिलें आहे; तेव्हां वृषाकपि हाही धनवान् असलाच पाहिजे. इंद्र वृषाकपीला म्हणतो कीं धन भोगणारा जो तूं पुन्हां घरीं लांब मार्गानें (पथा) जात आहेस तो तूं एथेंच ये व एथेंच आपण दोघेजण पुष्कळ धन (सुविता = सुवितानि) तयार करूं (कल्पयावहै). या ऋचेच्या आधींच्या ऋचेंत तुझें घर किती तरी योजनें लांब आहे तेव्हां या आमच्या जवळच्याच घरीं ये (नेदीयसो वृषाकपे अस्तमेहि गृहान् उप) असें इंद्र वृषाकपीला म्हणतो. इंद्र व वृषाकपि पारध वगैरे करण्याकरितां गेले असावेत; तें काम संपल्यावर वृषाकपि घरीं जावयाला निघतो पण इंद्र जवळच माझें घर आहे तेथें ये असें त्याला म्हणतो. सुवित = धन (पान २७९). स्वप्नंशन: ह्याचा स्वप्नांचा किंवा झोंपेचा नाश करणारा असा अर्थ केल्यानें वृषाकपि म्हणजे आदित्य असा अर्थ करावा लागला; पण वृषाकपि हा इंद्राचा मित्र होता (पान ९३१).

**यमः (१७) व्याख्यातः (निरु० १०।१९)। तस्य एषा भवति**

यम शब्दाची व्युत्पत्ति पहा (पान ७८१).

## खंड २९ वा.

**यस्मिन् वृक्षे सुपलाशे देवैः संपिबते यमः। अत्रा नो विश्पतिः पिता पुराणाँ अनु वेनति (ऋ० सं० १०।१३५।१)**

**यस्मिन् वृक्षे सुपलाशे स्थाने। वृतः क्षये वा। अपि वा। उपमार्थे स्यात्। वृक्षे इव सुपलाशे इति। वृक्षो व्रश्चनात्। पलाशं पलाशनात्। देवैः संगच्छते यमः। रश्मिभिः आदित्यः। तत्र नः सर्वस्य पाता वा पालयिता वा पुराणान् अनु कामयेत**

वृक्षे = स्थाने; वृक्षे = वृ + क्षे; वृ = वृतः = पसंत केलेला; क्षे = क्षये; पुण्यवानांनीं राहाण्याकरितां पसंत केलेला असा वृक्ष म्हणजे स्थान; वृतः क्षये ह्याच्या नंतर वा आहे; तेव्हां वृक्ष ह्याची पहिली एखादी व्युत्पत्ति द्यावयास पाहिजे. वृक्षे = आदित्ये; आदित्याला वृक्ष म्हणण्याचें कारण तो आपल्या गतीनें काल घालवीत सर्व प्राण्यांचें आयुष्य क्षीण म्हणजे कमी कमी करीत जातो; वृश्चति इति वृक्षः = ( सर्व प्राण्यांचें आयुष्य ) कापतो म्हणून आदित्य हा वृक्ष ( दुर्ग ); ह्या दुर्गाच्या विवरणावरून त्याचा निरुक्तपाठ वृक्षे आदित्ये। वृक्षः व्रश्चनात्। वृतः क्षये वा असा असावा व तोच योग्य दिसतो. किंवा वृक्षे = वृक्षे इव अशी उपमा असेल. वृक्ष व्रश्च् (=कापणें) ह्यापासून ( पान ९५ ); ही व्युत्पत्ति एथें देण्याची जरूरी नाहीं; वर दिलेला दुर्गाचा निरुक्तपाठ पहा. पलाश शब्द पलाश् ह्यापासून; धातुपाठांत पलाश् नाहीं; ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. अपलश्यते शात्यते पलाशम् ( अमर० २।४।१४ क्षी० ) = पान झाडापासून कापलें जातें ( अपलश्यते = शात्यते ) म्हणून पानाला पलाश हें नांव; पण पलाश म्हणजे पळसाचें झाड असा जेव्हां अर्थ असतो तेव्हां प्रशस्तानि पलाशानि सन्ति अस्य पलाशः। पलम् अश्नुते रक्तपुष्पत्वात् वा ( अमर २।४।२९ क्षी० ); पलं=मांस. सुपलाशे = सुष्टुपराशीर्णमले (दुर्ग)=ज्याचा मळ अगदीं निघून गेला आहे अशा ( आदित्यांत ); सूर्यमंडलांत एवढासासुद्धां मळ नाहीं; सु = सुष्टु; पलाशे= पराशे = पराशीर्णे = पराशीर्णमले; ही व्युत्पत्ति दुर्गाला स्वतःला सुचली किंवा त्याला ती दुसरीकडून कोठून मिळाली तें सांगतां येत नाहीं. जेव्हां वृक्ष म्हणजे झाड तेव्हां सुपलाश म्हणजे ज्याला पुष्कळ पानें आहेत असा वृक्ष. संपिबते = संगच्छते. देवैः = रश्मिभिः; रश्मींना देव म्हणण्याचें कारण ते प्रकाशतात; देवः द्योतनात् (पान५६१). यमः = आदित्यः. आदित्य ज्या आपल्या स्वच्छ मंडलांत किरणांशीं एकवटतो. अत्र= तत्र; दुर्गवृत्तींत तत्र नाहीं. विष्पतिः = विश् + पतिः; विश् = सर्वस्य; पतिः = पाता वा पालयिता वा; विश्पतिः व त्याचें हें विवरण दुर्गवृत्तींत नाहीं. पुराणान् = पुण्येन कर्मणा विद्यया च तत्प्रापिकया गतात्मनः पुराणान् इव ( दुर्ग ) = पुण्यकर्मांनीं व जिनें आदित्यमंडल मिळेल अशा विद्येनें आमच्या आधीं गेलेल्या पूर्वजांप्रमाणें. अनु वेनति = अनुकामयेत; अनुवेनतु = कामयतु । संप्रीणयताम् ( दुर्ग ) = इच्छा करो म्हणजे संतुष्ट होवो.

दुर्गानें केलेला अर्थः—ज्या मलरहित म्हणजे स्वच्छ आदित्यमंडलांत सूर्य रश्मींनीं युक्त होतो तेथें सर्वांचें पालन करणारा सूर्य आमच्या आधीं गेलेल्या पूर्वजांवर ( पुराणान् ) जसें प्रेम करतो तसें आमच्यावर प्रेम करो असा सूर्यपर अर्थ; पण

इतिहासदृष्ट्या अर्थ पुढीलप्रमाणें; पर्णयुक्त वृक्षाप्रमाणें सुंदर अशा सुपलाशवृक्ष नांवाच्या ज्या आपल्या स्थानीं राजा यम आपल्या अनुयायांसह सुख भोगीत असतो त्याठिकाणीं सर्वांचा पालनकर्ता तो पूर्वींच्या लोकांवर जसें प्रेम करतो तसें तो तेथें गेलेल्या आम्हां-वर प्रेम करो.

**सायण:**—वृक्षे सुपलाशे = वृक्षवत् सुपलाशे शोभनपलाशोपेते शोभनोद्यान-सहिते = वृक्षाप्रमाणें सुंदर पर्णांनीं युक्त म्हणजे सुंदर बागांनीं युक्त अशा (स्थानीं); किंवा सुंदर पर्णांनीं भरलेल्या झाडाचा तळ जसा उन्हानें उत्पन्न झालेल्या श्रमाचें निवारण करून सुखकर होतो तशा (स्थानीं); अशा ज्या ठिकाणीं यम आपल्या परिजनांसह सुख भोगतो; विश्पतिः = प्रजापालक; नः पिता = मी जो नचिकेतस् त्या माझा बाप वाजश्रवस तो पूर्वजांबरोबर ह्या यमलोकीं राहो अशी मजपाशीं यमानें इच्छा दर्शविली आहे. कठोपनिषदांत वाजश्रवस राजानें संतापून जाऊन नचिकेतस् नांवाच्या आपल्या मुलाला यमलोकीं घालवून दिलें; तेथें यमाला प्रसन्न करून व त्याच्यापासून वर मिळवून नचिकेतस् पुन्हां इहलोकीं आला असें वर्णन आहे; मला यमलोकीं घालवून दिल्यामुळें यम कदाचित् माझ्या बापावर रागावेल म्हणून नचि-केत्यानें यमाला सुप्रसन्न केलें व माझा बाप इतरांप्रमाणें तुझ्या घरीं सुखानें राहो अशी इच्छा प्रदर्शित केली असा एक अर्थ. सुंदर पर्णांनीं युक्त अशा वृक्षाप्रमाणें ज्या सुंदर स्थानीं आदित्य (यमः) रश्मींनीं युक्त होतो त्या ठिकाणीं प्रकाश, पर्जन्य वगैरेंनीं प्रजापालन करणारा व प्राण ह्या नात्यानें सर्वांचा जनक म्हणजे सर्वांमध्यें अस-णारा तो आदित्य पुरातन कालापासून स्तुति करणाऱ्या (पुराणान्) आम्हांवर अनु-ग्रह व प्रेम करतो किंवा तेथें असलेल्या आमच्या पूर्वजांवर सारखें प्रेम करीत असतो.

**ऋचेचा अर्थ:**—पर्णांनीं भरलेल्या म्हणजे गर्द छायेच्या ज्या वृक्षामध्यें यम देवांसह सोम पीत असतो त्याच वृक्षामध्यें आमचा पिता व पंचजनांचा स्वामी जो मनु तो ह्या पुरातन देवांमध्यें संचार करीत आहे म्हणजे रहात आहे. नः पिता असें ऋग्वेदांत मनूसंबंधानें बऱ्याच ठिकाणीं म्हटलें आहे; मनु हा सर्वांचा पिता; तो विश्पति म्हणजे पंचजनांचा स्वामी. पुराणान् अनु = पुराण म्हणजे पुरातन जे देव त्यांच्यामध्यें. पुराणान् अनु वेनन्तं चरन्तम् (१०।१३५।२) = पुरातन देवांमध्यें संचार करणा-ऱ्याला (वेनन्तं = चरन्तं) म्हणजे राहणाऱ्याला.

**अजः एकपात् (१८)। अजनः एकः पादः। एकेन पादेन पाति इति वा। एकेन पादेन पिबति इति वा। एकः अस्य पादः इति वा। एकं पादं नोत्खिदति (अथर्व सं० ११।४।२१) इत्यपि निगमः भवति। तस्य एष निपातः भवति वैश्व-देव्याम् ऋचि**

अजः = अजनः = जाणारा; सूर्य आकाशांत सारखा जात असतो म्हणून तो अज; अज् = जाणें; अज् + अः = जाणारा. एकपाद् = एकः पादः; सूर्य हा ब्रह्माचा एक पाद होय; अग्निः पादः वायुः पादः आदित्यः पादः दिशः पादः (छान्दो० उ०

३।१८।२ ) = अग्नि, वायु, सूर्य व दिशा असे ब्रह्माचे चार पाद होत. किंवा एक-पाद् = एकेन पादेन पाति = एका अंशानें म्हणजे प्राणरूपानें ह्या सर्व जगांत शिरून झोंपेंत प्राण्यांच्या शरीरांतील अन्न पचवून त्याचें रक्षण करतो म्हणून सूर्य एकपाद् (दुर्ग); एकपाद् = एकपात् = एक + पात्; एक = एकेन अंशेन; पाति इति पात् = रक्षण करणारा. किंवा एकपाद् = एकेन पादेन पिबति इति वा=एका अंशानें म्हणजे किरणानें जगांतील सर्व उदक पितो ( दुर्ग ); पाति इति पात् = पिणारा. किंवा एकपाद् = एकः अस्य पादः; अजः = जाणारा; जीवात्मरूपानें ब्रह्माचा एक पाद म्हणजे अंश सर्व जगांत गेला म्हणजे शिरला आहे; अशा अर्थाची ऋचाही आहे; एकं पादं नोत्खिदति सलिलात् हंस उच्चरन्। स चेत् तम् उद्धरेत् अङ्ग न मृत्युर्नामृतं भवेत् ( अथर्व सं० ११।४।२१ ) = मोठ्या अंधकाराचा नाश करणारा किंवा मोठ्या मार्गाचा नाश करणारा म्हणजे मार्ग आटपणारा ( हंसः ) व दररोज उगवणारा आदित्य सद्रूपब्रह्माच्या ठिकाणीं असलेल्या जगांतून ( सलिलात् ) आपला एक पाद म्हणजे अंश वर काढीत नाहीं; जर तो जगांत असलेला जीवात्मरूप पाद म्हणजे अंश वर उचलून घेईल तर एकदम ( अङ्ग ) मृत्यु किंवा अमरत्व नाहींसें होईल म्हणजे सगळें जग सद्रूप होईल असा वरपर अर्थ दुर्ग करतो; पण शब्दशः अर्थ पुढीलप्रमाणें:—वर उडणारा ( उच्चरन् ) हंस जलांतून आपला एक पाय वर काढीत नाहीं; जर तो पाण्यांत असलेला एक पाय वर काढील तर खात्रीनें मृत्यु किंवा अमरत्व ह्यांपैकीं कांहींही राहणार नाहीं म्हणजे सर्व जगाचा आत्यंतिक नाश होईल; आदित्याला हंस रूपकानें म्हटलें असावें. श्लोकाचा गूढार्थ कळत नाहीं. कदाचित् हंस म्हणजे ब्रह्म असेल; जोंपर्यंत ब्रह्म जगांत आहे तोंपर्यंत प्राणी मृत्युवश किंवा अमर होतात; पण ब्रह्मच जर जगांतून नाहींसें झालें तर सर्व जगच नाहींसें होईल व मृत्य आणि अमरत्व हे केवळ शब्द राहतील; कारण जग नष्ट झाल्यावर मरणार कोण व अमर होणार कोण ? जगाचें अस्तित्व ब्रह्मावर अवलंबून आहे. हल्लीं उपलब्ध असलेल्या अथर्वसंहितेंत दुसरा अर्ध पुढीलप्रमाणें आहे:—यदङ्ग स तमुत्खिदेत् नैवाद्य न श्वः स्यात् न रात्री नाहः स्यात् न व्युच्छेत् कदाचन=जर तो कधीं पाय वर काढील तर आज उद्यां, रात्र दिवस असें कांहींही राहणार नाहीं; उषा कधींही उगवणार नाहीं. ज्या ऋचेची देवता विश्वेदेव आहे म्हणजे जींत पुष्कळ देव आले आहेत अशा पुढील खंडांतील ऋचेंत अज एकपाद् गौणत्वानें आला आहे. अज एकपात् हा कोणत्याही ऋचेची प्रधान देवता नाहीं; अहिर्बुध्न्य, त्रित, ऋभुक्षा, सविता, अपांनपात्, पृथिवी, समुद्र, विश्वेदेव, पृश्नि, बृहस्पति, सिंधु, अंतरिक्ष ह्यांच्यासह अज एकपाद् हें नांव आलें आहे; तो कोणता देव तें ठरवितां येत नाहीं; सविता ह्या नांवाबरोबर अज एकपाद् आल्यामुळें अज एकपाद् सूर्य नाहीं हें स्पष्ट आहे. (अग्निः) अजो न क्षां दाधार (१।६७।३) व (वरुणः) अजो न द्यामधारयत् (८।४१।१०) ह्या दोन

ऋचांवरून अज हें एका मोठ्या देवाचें नांव असावें; तोच अज एकपाद् असें ठरविण्याला कांहींही आधार नाहीं.

## खंड ३० वा.

पावीरवी तन्यतुरेकपादजो दिवो धर्ता सिन्धुरापः समुद्रियः । विश्वे देवासः शृणवन् वचांसि मे सरस्वती सह धीभिः पुरन्ध्या ( ऋ० सं० १०।६५।१३ )

**पविः ( निघ० २।२०।५ ) शल्यः भवति । यत् विपुनाति कायम् । तद्वत् पवीरम् आयुधम् । तद्वान् इन्द्रः पवीरवान् । अतितस्थौ पवीरवान् ( ऋ० सं० १०।६०।३ ) इत्यपि निगमः भवति । तद्देवता वाक् पावीरवी । पावीरवी च दिव्या वाक् । तन्यतुः तनित्री वाचः अन्यस्याः । अजश्च एकपाद् । दिवः धारयिता च । सिन्धुः । आपश्च समुद्रियाश्च । सर्वे च देवाः । सरस्वती च सह पुरन्ध्या । स्तुत्या प्रयुक्तानि । धीभिः कर्मभिः युक्तानि । शृण्वन्तु वचनानि इमानि । इति**

भाष्यांतील **सर्व च** अध्याहृत. पविः = शल्यः = बाणाचें अग्र; बाणाच्या अग्राला पवि म्हणण्याचें कारण तें अग्र शरीर विदीर्ण करतें; यत् यस्मात् शल्यः कायं विपुनाति विदारयति (दुर्ग); वि + पू (= विदारणें ) ह्यापासून पवि; वि + पू हा धातु आपट्यांच्या कोशांत नाहीं. पुनाति पविः । हीरकस्य पविसंज्ञया प्रसिद्धत्वात् (अमर १।१।४७ क्षीर०)= पू ( = शुद्ध करणें ) ह्यापासून पवि; हिऱ्याला पवि म्हणतात हें प्रसिद्ध आहे. पू = शुद्ध करणें; वि + पू = अशुद्ध शुद्ध करणें म्हणजे शरीरांतलें अशुद्ध रक्त बाहेर काढणें असा यास्कानें अर्थ केला असावा. तद्वत् = पविवत्; पवि आहे ज्याला असें आयुध पवीर; र = मत्; पवि + रं = पवीरं = ज्याला टोंक आहे असें आयुध. तद्वान् = पवीरवान् इन्द्रः = ज्याच्यापाशीं पवीर आयुध आहे असा इंद्र. जींत पवीरवान् शब्द आहे अशी ऋचाही आहे; अतितस्थौ पवीरवान् = पवीर आयुध आहे ज्याच्यापाशीं असा इंद्र शत्रूंना जिंकता झाला. तद्देवता = सः पवीरवान् इन्द्रः देवता यस्याः सा तद्देवता = पवीरवान् इंद्र जिची देवता आहे ती पावीरवी माध्यमिका वाक्; माध्यमिका वाक् इंद्राच्या वज्रापासून उत्पन्न होते म्हणून ती पावीरवी. पण पवीरवत् ह्याच्यापासून पावीरवी हें तद्धित रूप कसें सिद्ध होईल ? पवीरोः इयं पावीरवी असा तद्धिताचा विग्रह केल्यास पवीरु शब्द मूळ असला पाहिजे; किंवा पवीरवस्य इयं असाही तद्धित विग्रह होईल; पवीरवत् ह्यांतील व् ला संप्रसारण करून उव् उत्पन्न होईल; व् च्या आधींचा अ व नंतरचा अत् गाळल्यानें पवीर् + उ = पवीरु असा शब्द द्राविडीप्राणायामानें तयार करतां येईल. पावीरवी च दिव्या वाक् = इंद्राची अंतरिक्षांतील दिव्य वाणी. तन्यतुः = तनित्री वाचः अन्यस्याः = दुसऱ्या वाचेला ताणणारी म्हणजे उत्पन्न करणारी; अंतरिक्षांतील वाचेमुळें सर्व प्राण्यांना वाचा फुटते. धर्ता=धारयिता; अज एकपाद् हा द्युलोक धारण करणारा आहे; दिवो धर्ता ह्या शब्दांनीं अज एकपाद् हा द्यु लोकांतील देव होय ( दुर्ग ). भाष्यांत अजश्च एकपाद् । दिवः धारयिता च असे शब्द आहेत; त्यावरून दिवः धारयिता हा अजः एकपाद् याहून

भिन्न देव असावा असें वाटतें; तो देव कोण? सिंधु कीं काय? सिंधुः ह्या नंतर च नाहीं; त्यावरून द्युलोक धारण करणारा सिंधु होईल; पण सिंधु द्युलोक कसा धारण करील? धारयिता नंतरचा च सिंधुः ह्यानंतर पाहिजे. अजश्च एकपाद् दिवो धारयिता हा दुर्गाचा निरुक्तपाठ योग्य दिसतो; कारण सूर्य हा द्युलोक धारण करतो असें म्हणण्यास ऋग्वेदांत आधार आहे. हा धारयिता नंतरचा च नको आहे. आपश्च समुद्रियाश्च ह्यांतील एक च नको आहे. समुद्रियः = समुद्रियाः = समुद्रांतील (पाणी). विश्वेदेवासः = सर्वे देवाः. शृणवन् = शृण्वन्तु. वचांसि = वचनानि इमानि. पुरन्ध्या = स्तुत्या. धीभिः = कर्मभिः. प्रयुक्तानि व युक्तानि ( अध्याहृत ) हीं वचांसि ह्याचीं विशेषणें; स्तुतीनें प्रवृत्त झालेलीं व कर्मांनीं युक्त अशीं वचनें. वचनानि स्तुतिलक्षणानि। सह धीभिः कर्मभिः हविर्दानयुक्तैः सहितानि ( दुर्ग ) = हविर्दान युक्त कर्मांसह आमच्या स्तुति ( हे देव व देवता ऐकोत ); हें दुर्गानें केलेलें विवरण यास्कभाष्याहून निराळें आहे. सरस्वती सह पुरंध्या = सरस्वती च सह पुरन्ध्या = सरस्वती च पुरन्ध्या सह बहुधात्र्या माध्यमिकया वाचा ( दुर्ग ) = पुरन्धी म्हणजे पुष्कळ धन देणारी माध्यमिका वाक्; तिच्यासह सरस्वती ( ऐको ). भाष्यांत पुरन्ध्या शब्दानंतर स्तुत्या प्रयुक्तानि असे शब्द आहेत; त्यामुळें त्यांचा संबंध वचनानि ह्याच्याशीं आहे हें उघड दिसतें; पण स्तुतीनें प्रयुक्त स्तुति ( वचनानि ) म्हणजे काय? भाष्यांत प्रक्षिप्त शब्दांनीं बराच घोटाळा झाला आहे; दुर्गाचा निरुक्तपाठ सुबोध आहे.

दुर्गानें केलेला अर्थः—इंद्राच्या वज्रापासून उत्पन्न झालेली ( पावीरवी ) व सर्व प्राण्यांची वाचा उत्पन्न करणारी ( तन्यतुः ) अशी गडगडाट करणारी माध्यमिका वाक्, द्युलोक धारण करणारा अज एकपाद्, सिंधु नद, समुद्रांतील ( समुद्रियः ) जल ( आपः ), सर्व देव व माध्यमिक वाचेसह ( सह पुरन्ध्या ) सरस्वती हवींनीं युक्त ( धीभिः ) माझ्या स्तुति ( वचांसि ) ऐकोत. ह्या दुर्गाच्या विवरणांत पावीरवी तन्यतुः व पुरंधि ह्या दोहोंचाही माध्यमिका वाक् असा अर्थ केला आहे पण हा त्या विवरणांत दोष आहे.

**सायणः**—पावीरवी = आयुधवती = वज्रयुक्त ( वाणी ); तन्यतुः = स्तनयित्री वाक् माध्यमिका = गडगडाट करणारी अंतरिक्षांतील वाणी; दिवः धर्ता = द्युलोकस्य धारयिता; एकः एव पद्यते गच्छति इति एकपाद् = अंतरिक्षांत एकटाच जो जातो तो एकपाद्; अजः = ज्याला जन्म नाहीं असा; द्युलोक धारण करणारा, अंतरिक्षांत एकटाच जाणारा व ज्याला जन्म नाहीं असा अज एकपाद् नांवाचा देव; आपः समुद्रियः = समुद्रम् अन्तरिक्षम्। तत्र भवाः आपः = अंतरिक्षांतील जल; धीभिः सह = कर्मभिः युक्ताः = कर्मांनीं युक्त म्हणजे निरनिराळीं कामें करणारे ( विश्वेदेव ); पुरंध्यासह = बहुविधया प्रज्ञया सहिता = नाना प्रकारच्या बुद्धींनीं युक्त अशी सरस्वती; वचांसि=वक्तव्यानि स्तोत्राणि=म्हणण्याला योग्य अशीं स्तोत्रें; शृणवन्=शृण्वन्तु;

पावीरवी कन्या चित्रायुः सरस्वती वीरपत्नी धियं धात्। ग्नाभिः अच्छिद्रं शरणं

सजोषा दुराधर्षं गृणते शर्म यंसत् ( ६।४९।७ ) = पवीरवाची किंवा पवीरूची ( पावीरवी ) मुलगी ( कन्या ) व वीराची पत्नी ( वीरपत्नी ) सरस्वती धनयुक्त असल्यामुळें ( चित्रायुः ) धन देवो व देवपत्नींसह ( ग्नाभिः ) स्तोत्याला पूर्ण ( अच्छिद्रं ) व जे कोणी घेऊन जाणार नाहीं असें ( दुराधर्षं ) धन ( शर्म ) ती देवो. पवरिव हा शब्द ऋग्वेदांत एकदांच आला आहे ( १।१७४।४ ); तेथें पवीरवस्य म्हणजे धनाचा किंवा धनवंताचा असा अर्थ असेल; पवीरव हा द्यु असेल व समुद्र हा वीर असेल; आ नो दिवो बृहतः पर्वतात् आ सरस्वती यजता गंतु यज्ञम् (५।४३।११) = मोठ्या द्यूपासून व पर्वतापासून निघून सरस्वती आमच्या यज्ञाकडे येवो; सरस्वती द्युलोकांतून निघून पर्वतावर पडते व पर्वतावरून वहात जाऊन समुद्राला मिळते; तेव्हां द्यु हा सरस्वतीचा बाप होईल व समुद्र नवरा होईल. तिरश्चिदर्ये रुशमे पवीरवि तुभ्येत्सो अज्यते रयिः ( ८।५१।९ ); एथें अर्ये रुशमे पवीरवि हे शब्द सप्तम्यंत आहेत; पवीरु ह्याचें सप्तमीचें एकवचन पवीरवि; पवीरोः इयं पावीरवी असा तद्धिताचा विग्रह केल्यास पवीरु हें नांव होईल. तन्यतुः = ( १ ) वीज, ( २ ) गडगडाट, ( ३ ) वज्र. ( १ ) स श्वितानः तन्यतुः रोचनस्थाः ( ६।६।२ ) = द्युलोकांतील ( रोचनस्थाः ) विजेप्रमाणें ( तन्यतुः ) झळकणारा ( श्वितानः ) अग्नि; दिवो न ते तन्यतुरेति शुष्मः ( ७।३।६ ) = द्यूच्या विजेप्रमाणें तुझें तेज ( शुष्मः ) पसरतें ( एति ); पवमानो अजीजनत् दिवः चित्रं न तन्युतम्। ज्योतिर्वैश्वानरं बृहत् ( ९।६१।१६ ) = शुद्ध केला जाणारा सोम द्यूच्या विजेसारखा व अग्नीच्या ( वैश्वानरं ) प्रकाशासारखा प्रचंड प्रकाश उत्पन्न करतो. ( २ ) नास्मै विद्युन्न तन्यतुः सिषेध ( १।३२।१३ ) = वृत्र जी वीज किंवा जो गडगडाट ( तन्यतुः ) उत्पन्न करतो तो इंद्राला हांकलून देत नाहीं म्हणजे पळावयास लावीत नाहीं; इंद्र विजेला किंवा गडगडाटाला भीत नाहीं. (१ व २ ) तद्वां नरा० आविष्कृणोमि तन्यतुर्न वृष्टिम् ( १।११६।१२ ) = हे अश्विनांनो, वीज किंवा गडगडाट जसा पावसाला प्रकट करतो तसा मी तुमचें अद्भुत कृत्य प्रकट करीत आहें. ( ३ ) वृत्रस्य० निजघन्थ हन्वोः इंद्र तन्यतुम् ( १।५२।६ ) = हे इंद्रा, वृत्राच्या दोन दाढांवर तूं वज्र हाणलेंस. पावीरवी तन्यतुः = द्युलोकांतील वीज. इंद्र ( ३।४९।४ ), सविता (४।५३।३॥१०।१४९।४) व सोम ( ९।७६।१॥ ९।१०९।६ ) ह्यांना धर्ता दिवः किंवा दिवो धर्ता असें म्हटलें आहे; प्रस्तुत ऋचेंत दिवो धर्ता कोण तें ठरवितां येत नाहीं. समुद्रिय हा शब्द विशेषण असल्याकारणानें त्याचें बहुवचन समुद्रियाः असें झालें पाहिजे; समुद्रियाः अपः ( ८।७६।३॥९।६२।२६ ) व समुद्रियाः अप्सरसः ( ९।७८।३ ) एथें समुद्रियाः असें बहुवचन आहे; पण वेद नावः समुद्रियः ( १।२५।७ ) आणि नद्यः समुद्रियः ( १।५५।२ ) एथें व प्रस्तुत ऋचेंत समुद्रियः हा शब्द घातला आहे; तो वास्तविक समुद्रियाः असा पाहिजे; कदाचित् सिंधुः समुद्रियः असा एथें अन्वय करतां येईल; समुद्रार्थाः० आपः ( ७।४९।२ ) = समुद्र हा जाण्याचें ठिकाण आहे

ज्यांचें अशा नद्या; आपः समुद्रियः ह्याचा तोच अर्थ. शं सरस्वती सह धीभिः अस्तु ( ७।३५।११ ) = धियांसह सरस्वती आम्हांस कल्याणप्रद होवो. पावीरवी कन्या ह्या वर दिलेल्या ऋचेंत ग्नाभिः० सजोषाः ( = देवपत्नींसह ) असें सरस्वतीसंबंधानें म्हटलें आहे; तेव्हां प्रस्तुत ऋचेंत धीभिः सह = ग्नाभिः सजोषाः = देवपत्नींसह असा अर्थ असावा. विश्वेदेवाः सह धीभिः पुरन्ध्या० ब्रह्म सूक्तं जुषेरस (१०।६५।१४)= देवपत्नी (धीभिः) व पुरन्धि ह्यांसह विश्वेदेव आमची स्तुति ऐकोत. ऋग्वेदांत पुरन्धि शब्द पुल्लिंगी व स्त्रीलिंगी अशा दोन्हीं लिंगी आहे; पुरंधेति असौ पुरंधिः = किल्ला किंवा किल्ल्यांतलें धन जो देतो तो किंवा जी देते ती पुरंधि; नंतर स्त्रीलिंगी पुरंधि शब्द स्त्री या अर्थी वापरला गेला असें वाटतें. ददाति० अग्निर्नारीं वीरकुक्षिं पुरन्धिम् ( १०।८०।१ ) = जिच्या पोटीं वीरपुत्र जन्मास येणार आहेत अशी बायको (पुरंधिं= नारीं ) अग्नि देतो. कक्षीवते अरदतं पुरन्धिम् (१।११६।७) = हे अश्विनांनो, तुम्हीं कक्षीवताला बायको दिलीत. वध्रिमती ( १०।३९।७ ) व करा ( १।११७।१३ ) ह्यांना पुरंधि म्हणजे लग्नाची बायको असें म्हटलें आहे. पुरंधिः अश्विनौ अधा पती ( २।३१।४ ) = सूर्या बायको ( पुरन्धिः ) व अश्विन तिचे नवरे. उषेलाही पुरंधि म्हटलें आहे; पुराणी देवी युवतिः पुरंधिः ( ३।६१।१ ) व उदीरतां सूनृताः उत्पुरन्धिः ( १।१२३।६ ) एथें उषा ही पुरन्धि. सरस्वती सह धीभिः पुरन्ध्या = देवपत्नी (धीभिः ) व उषा ( पुरन्ध्या ) ह्यांसह सरस्वती ( माझी स्तुति ऐको ). इंद्र हा पवीरवान् हें सिद्ध करण्याकरितां यास्क अतितस्थौ पवीरवान् हे शब्द भाष्यांत घालतो; सर्व ऋचा पुढीलप्रमाणें; यो जनान् महिषान् इव अतितस्थौ पवीरवान्। उतापवीरवान् युधा ( १०।६०।३ ) = जो इंद्र, हातांत आयुध असो किंवा नसो, युद्धांत कितीही प्रचंड ( महिषान् इव ) असुर लोक ( जनान् ) असले तरी त्यांचा पराजय करून ( अति = अतीत्य ) शांत उभा राहिला ( तस्थौ ); इव = अपि; महिषान् = अतिमहतः; जनान् = असुरजनान्; पवीरवान् = हातांत आयुध घेतलेला; अपवीरवान् = हातांत आयुध न घेतलेला; असा दुर्ग अर्थ करतो.

**सायण**:—हातांत खड्ग असो ( पवीरवान् ) वा नसो ( अपवीरवान् ) जो समातिनांवाचा राजा युद्धांत सिंहासारख्या प्रचंड शत्रूंचा पराजय करतो ( अतितस्थौ ); जनान् = आपल्या विरुद्ध असलेल्या लोकांना; अतितस्थौ = पराजय करून राहतो म्हणजे पराजय करतो; महिषान् इव = सिंहासारख्या ( शत्रूंना ); पवीरवान्= हातांत खड्ग घेतलेला; अपवीरवान् = हातांत खड्ग न घेतलेला.

महिष = रेडा; अग्नि इंद्रासाठीं तीनशें रेडे शिजविता झाला ( ५।२९।७॥६।१७।११), विष्णु इंद्राला शंभर रेडे देता झाला (८।७७।१० ), इंद्र स्वतः तीनशें रेडे मारतो (५।२९।८); यदि प्रवृद्ध सत्पते सहस्रं महिषां अघः। आदित्त इन्द्रियं महि प्र वावृधे (८।१२।८)=हे लठ्ठभारती (प्रवृद्ध ), लठ्ठ लोकांचा पति (सत्पते) इंद्रा, जेव्हां (यदि) तूं हजार रेडे मारलेस तेव्हांच ( आत् इत् ) तुझें बल (इंद्रियं) अतिशय ( महि ) वाढलें

( वावृधे ); असें इंद्राच्या खादाडपणाचें विनोदानें वर्णन केलें आहे. इव यथा इंद्रः महिषान् अतितस्थौ तथा जनान् युधा अतितस्थौ = जसा इंद्र रेड्यांवर जय मिळविता झाला म्हणजे त्यांना ठार करता झाला तसा तो पंचजनांना ( जनान् ) युद्धांत जिंकता झाला ( अतितस्थौ ). पवीरवान् व अपवीरवान् हे शब्द यः ह्याचीं विशेषणें आहेत कीं नाहींत हा प्रश्न आहे. पवीर शब्द ऋग्वेदांत कोठेंही नाहीं; पवीरवान् हें बहुतकरून पवीरव ह्या शब्दाचें बहुवचन असावें व त्याचा अर्थ धनवान् असा असावा; पृ = देणें; पवि = धन; रु = ओरडणें, ओरडून धन मिळविणें; बृहस्पति, अंगिरस् वगैरे मोठ्यानें ओरडून दस्यूंचे कोंडवाडे फोडीत व त्यांतल्या गायी हांकलून नेत; ह्या गायी हें एक प्रकारचें धन; रवः = गोधन; इ = देणें, दान, धन; पवि = इ = रव = धन; पवीरव = अतिशय धन किंवा ज्याच्याजवळ अतिशय धन आहे असा; पंचजनांजवळ अतिशय धन होतें म्हणून ते पवीरव; अशा धनाढ्य पंचजनांना इंद्र जिंकता झाला; पंचजनांचें व इंद्राचें वैर होतें म्हणून इंद्र सांपडेल तेव्हां त्यांना ठोकी व जेरीस आणी; नुसत्या धनाकरितांच तो त्यांच्याशीं भांडत नसे; ते धनवान् असोत कीं नसोत तो त्यांना जेव्हां तेव्हां हाणीत असे असा ऋचेचा अर्थ दिसतो.

**पृथिवी ( १९ ) व्याख्याता ( निरु० १।१४ )। तस्याः एष निपातः भवति ऐन्द्राग्न्याम् ऋचि**

पृथिवी शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ४३ ). इंद्र व अग्नि जिच्या देवता आहेत अशा पुढील खंडांतील ऋचेंत पृथिवीचा गौणत्वानें निर्देश आहे.

## खंड ३१ वा.

**यदिन्द्राग्नी परमस्यां पृथिव्यां मध्यमस्यामवमस्यामुत स्थः। अतः परि वृषणावा हि यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य ( ऋ० सं० १।१०८।१० )**

**इति सा निगदव्याख्याता** ( पान ५७६ शेवट पहा ).

दुर्गानें केलेला अर्थः—हे इंद्राग्नि, जरी तुम्ही उंच पृथिवीवर म्हणजे द्युलोकांत किंवा मध्यम पृथिवीवर म्हणजे अंतरिक्षांत किंवा खालच्या पृथिवीवर म्हणजे इहलोकीं असाल, कोठेंही असलांत तरी तेथून (अतः परि) आमच्याकडे या व आम्ही काढलेला सोमरस प्या. वृषणौ शब्द किंवा त्याचा अर्थ दुर्गवृत्तींत नाहीं. सायणाचार्य दुर्गाप्रमाणेंच अर्थ करतात; पृथिवी शब्दाचा अर्थ लोक; वृषणौ ह्याचा अर्थ दिला नाहीं. वृषणौ = कामानां वर्षितारौ असा अर्थ सयाणाचार्य नेहेमीं करतात.

प्रस्तुत ऋचेंत पृथिवी म्हणजे पृथु किंवा विस्तीर्ण प्रदेश; तो शब्द परावत् ह्या अर्थीं असावा; तिस्रः परावतः ( १।३४।७॥८।५।८ ) = एकावर एक असणारे असे तीन स्वर्ग. परमा परावत् ( ४।५०।३ ), परमां परावतं ( १०।९५।१४ ), परमस्याः परावतः ( ५।६१।१ ), परां परावतं ( १०।१४५।४ ), परावतः० परस्याः

( १०।१८०।२॥१०।१८७।२ ) ह्यांत सगळ्यांत उंच जो स्वर्ग त्याचा निर्देश केला आहे; एकदां पराः हें विशेषण तिन्ही परावतांना लावलें आहे ( १०।५८।११ ). इहि तिस्रः परावतः० अति ( ८।३२।२२ ) = हे इंद्रा, तीनही स्वर्ग ओलांडून ये. तेव्हां प्रस्तुत ऋचेंत ह्या तीन स्वर्गांचा उल्लेख असावा.

ऋचेचा अर्थः—हे बलवान् ( वृषणौ ) इंद्राग्नि, तुम्ही अगदीं वरच्या स्वर्गांत, मधल्या स्वर्गांत किंवा खालच्या स्वर्गांत कोठेंहीं असलांत तरी तेथून खालीं या व हा सोमरस घ्या.

**समुद्रः ( २० ) व्याख्यातः ( निरु० २।१० )। तस्य एष निपातः भवति पावमान्याम् ऋचि**

समुद्र शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान १०७ ). पुढील खंडातील सोमसंबंधी ऋचेंत समुद्र गौणत्वानें आला आहे.

## खंड ३२ वा.

**पवित्रवन्तः परि वाचमासते पितैषां प्रत्नो अभि रक्षति व्रतम्। महः समुद्रं वरुणस्तिरो दधे धीरा इच्छेकुर्धरुणेष्वारभम् ( ऋ० सं० ९।७३।३ )**

**पवित्रवन्तः रश्मिवन्तः । माध्यमिकाः देवगणाः । पर्यासते माध्यमिकां वाचम्। पिता एषां प्रत्नः पुराणः अभिरक्षति व्रतं कर्म । महः समुद्रं वरुणः तिरः अन्तः दधाति । अथ धीराः शक्नुवन्ति धरुणेषु उदकेषु कर्मणः आरम्भम् आरब्धुम्**

पवित्रवन्तः = रश्मिवन्तः = रश्मींनीं युक्त; असे रश्मियुक्त माध्यमिक देव होत. आदित्यमंडलांतून निघून सूर्यकिरण अंतरिक्षांत असलेल्या मरुतांच्यासारख्या देवगणांशीं युक्त होतात; ह्या संयोगानें माध्यमिक देव पवित्रवंतः म्हणजे रश्मियुक्त होतात ( दुर्ग ). वाचं = माध्यमिकां वाचम्. हे देवगण त्या वाणीच्या म्हणजे विजेच्या भोंवतीं बसतात. प्रत्नः = पुराणः. व्रतं = कर्म. पिता = रक्षण करणारा ( दुर्ग ). त्या देवगणांचा ( एषां ) पालन करणारा ( पिता ) पुरातन जो वरुण तो त्यांनीं आपल्या अधिकारांत केलेलीं कामें रक्षण करतो. महः हा शब्द जशाच्या तसा न ठेवतां त्याचा पर्याय द्यावयास पाहिजे होता. महः = महान् वरुणः मध्यमः ! महान्तं वा समुद्रं ( दुर्ग ) = अंतरिक्षांतील महान् वरुण किंवा महान् समुद्र; महः हें वरुणः ह्याचें विशेषण किंवा समुद्रं ह्याचें. तिरः = अन्तर्. दधे = दधाति. समुद्रं = आदित्यं ( दुर्ग ). अंतरिक्षांतील वरुण मेघांनीं आदित्याला झाकून टाकतो व तसें करून वनस्पतींवर पाऊस पाडतो ( दुर्ग ). अथ अध्याहृत. इत् निरर्थक म्हणून गाळला आहे. शेकुः = शुक्नुवन्ति. धरुणेषु = उदकेषु; भाष्यांत धरुणेषु शब्द नको. आरभं = कर्मणः आरम्भम् आरब्धुं = कर्माचा आरंभ करण्याला; दुर्गवृत्तींत आरब्धुं नाहीं; पण तसा शब्द पाहिजे. धीराः = धीमन्तः ( दुर्ग ). कर्मणः

आरभं = कृष्यादेः वैदिकस्य वा ( दुर्ग ) = कृषि वगैरे कर्मांचा किंवा वैदिक कर्मांचा आरंभ.

दुर्गानें केलेला अर्थः—सूर्यकिरणांनीं युक्त असे अंतरिक्षांतील देवगण माध्यमिक वाचेच्या म्हणजे विजेच्या भोंवतीं बसतात; त्यांचें रक्षण करणारा पुरातन वरुण त्यांनीं आपल्या अधिकारांत केलेल्या कर्मांचें रक्षण करतो; महान् वरुण आदित्याला मेघजलांनीं झाकून टाकून वनस्पतींवर पाऊस पाडतो; तदनंतर बुद्धिमान् लोक कृषि वगैरे कामांचा किंवा वैदिक कर्मांचा आरंभ करूं शकतात.

**सायण**:—पवित्रवन्तः = पवित्रेण शोधकेन सामर्थ्येन युक्ताः सोमस्य रश्मयः = शुद्ध करण्याच्या सामर्थ्यानें युक्त असे सोमाचे किरण; सोम आपल्या अंगचा कालिमा काढून टाकण्यास समर्थ असतो व तो कालिमा काढून तो शुद्ध होतो; असें केल्यानें तो सूर्यासारखा प्रकाशतो; वाचं = सोमस्थितां माध्यमिकां वाचं = सोमांत असलेला अंतरिक्षांतील गडगडाट; सोम अंतरिक्षांत होता असें ऐतरेय ब्राह्मणांत ( १।२७ ) म्हटलें आहे; त्यामुळें त्याच्यांत अंतरिक्षांतील गडगडाट असणें स्वाभाविक आहे; परि + आसते = ( सोमरसाच्या ) भोंवतीं बसतात म्हणजे सोमरस किरणांनीं भरून जातो; ह्या रश्मींचा ( एषां ) पुरातन पिता जो सोम तो सर्व जग प्रकाशित करण्याचें काम ( व्रतं ) आपल्या अधिकारांत राखून ठेवतो म्हणजे जग प्रकाशित करतो; सर्व जग आपल्या प्रकाशानें आच्छादून टाकणारा ( वरुणः ) सोम मोठ्या ( महः ) अंतरिक्षाला ( समुद्रं ) आपल्या किरणांनीं लपवून टाकतो ( तिरोदधे ); त्या सोमाला प्राज्ञ ( धीराः ) म्हणजे कर्मकुशल असे ऋत्विजच ( इत् ) वसतीवर्यनांवाच्या जलांत किंवा नुसत्या जलांत ( धरुणेषु ) सोडण्याला ( आरभं = आरब्धुं ) समर्थ होतात ( शेकुः ) म्हणजे सोमाला पाण्यांत मिसळतात.

रश्मयः पवित्रम् उच्यन्ते ( पान ३५७ ); पवित्र ह्याचा रश्मी हा अर्थ यास्क, दुर्ग व सायणाचार्य ह्यांनीं एथें केला आहे; परंतु पवित्र ह्याचा गाळणें हा अर्थ बऱ्याच ठिकाणीं आहे; सुतासः० सोमा इन्द्राय० पवित्रवन्तो अक्षरन् ( ९।१०१।४ )= रस काढलेले व गाळण्यांतून गळलेले ( पवित्रवन्तः ) सोम इंद्राकरितां कलशांत पडत आहेत ( अक्षरन् ); हाच अर्थ प्रस्तुत ऋचेंत असावा. परि = पवित्रं परि = गाळण्यांतून. प्रसवे ते उदीरते तिस्रो वाचो मखस्युवः । यदव्य एषि सानवि (९।५०।२)= हे सोमा, जेव्हां तूं गाळण्यांत ( अव्ये सानवि ) जातोस तेव्हां गाळण्यांतून तूं खालच्या भांड्यांत गळत असतांना ( प्रसवे ) तीन प्रकारच्या वाचा वर निघतात. सहस्रधारः पवते समुद्रो वाचमीङ्खयः ( ९।१०१।६ ) = सोम हा समुद्र; तो हजार धारांनीं गाळण्यांतून गळत असतांना शब्द उच्चारतो ( वाचमीङ्खयः ). मदिंतमासः परि कोशमासते ( ९।८६।१ ) = अत्यानंद भोगणारे सोम गाळण्यांतून गळून ( परि ) भांड्यांत ( कोशं ) बसतात ( आसते ). पवित्रवन्तः परि वाचम् आसते = गाळण्यांतून गळत असतांना सोम वाचा उच्चारतात किंवा ध्वनि करणाऱ्या भांड्यांत

( वाचं ) बसतात; सोमरस भांड्यांत पडत असतांना भांड्याचा आवाज होतो. एषां = ह्या सोमांचा. पि = पिणें; पिता = पिणारा; एषां प्रत्नः पिता = पुरातन कालापासून सोमरस पिणारा इंद्र. व्रतम् अभि रक्षति = सोम पिण्याचें काम चालू ठेवतो. सोमाला समुद्र पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे. पवस्व सोम महान् समुद्रः ( ९।१०९।४ ) = हे सोमा, महान् समुद्र तूं शुद्ध हो. समुद्रः अप्सु मामृजे ( ९।२।५ ) = सोमरूपी समुद्र पाण्यांत स्नान करतो म्हणजे सोमरस पाण्यांत मिसळतो. पण प्रस्तुत ऋचेंत समुद्र कोण ? सोमरस कीं कलशांतलें पाणी ? पवते० रसो महान्० वरुणः ( ९।७७।५ ); एथें सोमाला वरुण म्हटलें आहे; वरुण हा जलाचा अधिपति; सोम हा पाण्यांत मिसळला जातो म्हणजे तोही जलाचा अधिपति; किंवा वरुण म्हणजे कलशांतलें जल असा अर्थ असेल. महः समुद्रं वरुणः तिरो दधे = सोमरुपी जलाधिपति मोठ्या समुद्रांत अंतर्भूत होतो किंवा वरुण म्हणजे कलशांतलें पाणी मोठ्या समुद्राला म्हणजे सोमरसाला झांकून टाकतें; दोहोंचा अर्थ सोमरस पाण्यांत पूर्णपणें मिसळतो. धरुणेषु तस्थौ ( १०।५।६ ) = अग्नि जलांत बसतो. धीराः इत् शेकुः धरुणेषु आरभं = कुशल लोकच ( धीराः इत् ) जलांत ( धरुणेषु ) असलेल्या सोमाला पकडण्याला ( आरभं ) समर्थ होतात ( शेकुः ). पिता एषां प्रत्नः अभि रक्षति व्रतं ह्याचा अर्थ मला मुळींच करतां येत नाहीं; बाकीच्या तीन पादांचा कसातरी अर्थ मीं केला आहे. तस्य व्रतं रक्षतं पातमंहसः ( १।९३।८ ) = हे देवांनो, ( जो तुम्हांला हवि देतो ) त्याच्या धनाचें रक्षण करा किंवा त्याला धन द्या आणि दारिद्र्यापासून त्याचें रक्षण करा. तम् अर्यमा अभि रक्षति ऋजूयन्तम् अनु व्रतम् ( १।१३६।५ ) = सरळ मार्गानें जाणाऱ्या त्याला अर्यमा धनांत ( अनुव्रतं ) म्हणजे धन देऊन त्याचें रक्षण करतो. यस्य व्रतं न मीयते ( २।८।३ ) = ज्याची आज्ञा ( व्रतं ) मोडली जात नाहीं. अनु व्रतं चरसि ( ३।६१।१ ) = हे उषे, आज्ञे-प्रमाणें किंवा घालून दिलेल्या नियमाप्रमाणें तूं संचार करतेस. विश्वस्य हि प्रेषितो रक्षसि व्रतम् ( १०।३७।५ ) = हे सूर्या, देवांनीं द्युलोकीं संचार करण्यास पाठविलेला ( प्रेषितः ) तूं सर्व जगाच्या व्रताचें रक्षण करतोस म्हणजे सर्वांना कामें करण्यास लावतोस. ह्याप्रमाणें आज्ञा, नियम, कर्तव्य व धन असे व्रत शब्दाचे अर्थ आहेत; पण ह्यांपैकीं एथें अर्थ कोणता तें पिता कोण तें समजत नसल्याकारणानें ठरवितां येत नाहीं.

**अजः एकपाद् ( १८ ) व्याख्यातः ( निरु० १२।२९ )। पृथिवी (१९) व्याख्याता ( निरु० १।१४ )। समुद्रः ( २० ) व्याख्यातः ( निरु० २।१० )। तेषामेष निपातः भवति अपरस्यां बहुदेवतायाम् ऋचि**

अज एकपाद् ( पान १०१३ ), पृथिवी (पान ४३), समुद्र ( पान १०७ ) यांच्या व्युत्पत्ति पहा. जिच्यांत पुष्कळ देवता आहेत अशा पुढील ( अपरस्यां ) खंडां-तील ऋचेंत ह्यांचा गौणत्वानें निर्देश केला आहे. पण अज एकपाद् हा एथें द्युलोकां-तील देव होय ( इह तु उत्तमः ) असें दुर्ग म्हणतो; ह्यावरून १२।२९ व १२।३० ह्यांतील अज एकपाद् हा उत्तम स्थानचा देव नसावा असें त्याचें मत दिसतें; परंतु तेथेंही तो

उत्तमच म्हणजे द्यूलोकांतीलच असला पाहिजे; कारण अज एकपाद् ह्याचा आदित्य असा अर्थ केला आहे. पृथिवी व समुद्र ह्यांची पुनरुक्ति कां केली त्याचें कारण दुर्ग देत नाहीं.

## खंड ३३ वा.

**उत नोऽहिर्बुध्न्यः शृणोत्वज एकपात्पृथिवी समुद्रः। विश्वे देवा ऋतावृधो हुवानाः स्तुता मन्त्राः कविशस्ता अवन्तु ( ऋ० सं० ६।५०।१४ )**

**अपि च नः अहिर्बुध्न्यः शृणोतु । अजः च एकपात् । पृथिवी च । समुद्रश्च । सर्वे च देवाः । सत्यवृधः वा । यज्ञवृधः वा । हूयमानाः मन्त्रैः स्तुताः मन्त्राः कविशस्ताः अवन्तु । मेधाविशस्ताः**

उत = अपि च; दुर्गवृत्तींत च नाहीं. विश्वे =सर्वे. ऋतावृधः = सत्यवृधः वा यज्ञवृधः वा = सत्य किंवा यज्ञ वाढविणारे; ऋतं = सत्यं वा यज्ञं वा ( पान २९२ ); ह्यानंतर दुर्गवृत्तींत उदकवृधः वा असा आणखी एक अर्थ दिला आहे. तो त्याच्या निरुक्तप्रतींत असावा. हुवानाः = हुयमानाः; हुवानाः = आहूयमानाः ( दुर्ग ). मन्त्राः = मन्त्रैः; यथार्थं विभक्तीः संनमयेत् ह्याचा अर्थ पहा ( पान ७६ ); भाष्यांत मन्त्राः शब्द घालावयास नको होता कारण त्यानें घोटाळा झाला आहे. कविशस्ताः = मेधाविशस्ताः = बुद्धिमानांनीं स्तविलेले. मन्त्राः=मन्त्रैः यजुर्मयैः स्तुताः आणि स्तुताः= स्तोत्रैः सामभिः स्तुताः असा दुर्ग अर्थ करतो असें वाटतें; कारण मन्त्रैः यजुर्मयैः स्तुताश्च स्तोत्रैः सामभिः असे त्याचे शब्द आहेत. कविशस्ताः = कविभिश्च नैघण्टुकत्वेन मेधाविभिः शस्त्रैः च शस्ताः स्तुताः ( दुर्ग ) = बुद्धिमानांनीं गौणत्वानें शस्त्रें म्हणून स्तविलेले; ह्या ऋचेंत सर्व देव गौण आहेत. भाष्यांतले सर्वे च अध्याहृत.

दुर्गानें केलेला अर्थः—अहिर्बुध्न्य, अज एकपाद्, पृथिवी व समुद्र आमच्या स्तुति ऐकोत; सत्य किंवा यज्ञ किंवा उदक वाढविणारे, यजुर्मन्त्र स्तोत्र साम ह्यांनीं स्तविलेले व बुद्धिमानांनीं शस्त्रांनीं स्तविलेले असे सर्व देव आमचें रक्षण करोत.

**सायणः**—नः = अस्माकं स्तोत्रम्; ऋतावृधः=यज्ञस्य सत्यस्य वा वर्धयितारः; स्तुताः = पूर्वैः ऋषिभिः स्तोत्रैः स्तुताः; मन्त्राः = मंत्रणीयाः गुप्तं भाषितव्याः मंत्रप्रतिपाद्याः वा = ज्यांच्याशीं गुप्त गोष्ट करावयाची आहे असे किंवा ज्यांचे मंत्रांनीं प्रतिपादन म्हणजे वर्णन केलें आहे असे; कविशस्ताः = कविभिः मेधाविभिः ऋषिभिः शस्त्रैः शंसिताः; अवन्तु = रक्षन्तु.

मंत्राः हा शब्द अहिर्बुध्न्य वगैरे शब्दांसारखा देववाचक नसल्यामुळें एथें त्याचा अर्थ करतां येत नाहीं. आ त्वा मन्त्राः कविशस्ताः वहन्तु एना राजन् हविषा मादयस्व ( १०।१४।४ ) = हे राजा यमा, कवींनीं म्हटलेले हे मंत्र तुला इकडे आणोत; ह्या हवीनें तूं हृष्ट हो; एथें मंत्राः कविशस्ताः हे शब्द सार्थ आहेत. एतच्चन त्वो वि चिकेतदेषां सत्यो मंत्रः कविशस्तः ऋघावान् ( १।१५२।२ ); एथें मंत्रः,

सत्यः, कविशस्तः व ऋघावान् हीं इंद्राचीं विशेषणें आहेत; मन् = देणें, मन् + त्रः = मन्त्रः = देणारा. प्रस्तुत ऋचेंत मन्त्राः = धन देणारे; देव धन देणारे आहेत म्हणून त्यांना ऋचेंत ऋतावृधः असेंही म्हटलें आहे; ऋतावृधः = धन देणारे. धन देणारे ( ऋतावृधः = मन्त्राः ), स्तोत्यांनीं स्तविलेले ( कविशस्ताः ) व बोलावलेले ( हुवानाः ) हे सर्व देव आम्हांला ( नः ) धनयुक्त करोत ( अवन्तु ).

**दध्यङ् ( २१ ) प्रत्यक्तः ध्यानम् इति वा । प्रत्यक्तम् अस्मिन् ध्यानम् इति वा । अथर्वा ( २२ ) व्याख्यातः ( निरु० ११।१८ ) । मनुः ( २३ ) मननात् । तेषाम् एष निपातः भवति ऐन्द्र्याम् ऋचि**

दध्यङ् = दधि + अङ्; दधि = ध्यानम्; अङ् = प्रति + अक्तः; ध्यानं प्रत्यक्तः = ध्यानाप्रत गेलेला म्हणजे ध्यान करणारा; दध्यङ् हा ध्यानस्थ असून आपल्या अधिकारांतलीं कामें करतो ( दुर्ग ); किंवा अङ् = प्रति + अक्तं; ह्याच्यांत ( अस्मिन् ) म्हणजे दध्यङ् ऋषींत ध्यान पूर्ण गेलें आहे ( प्रत्यक्तं ) म्हणजे तो पूर्णपणें ध्यानस्त असतो; त्याच्यामध्यें ध्यान सफल होतें असा दुर्ग अर्थ करतो. धि = देणें; दधि = दान, धन; अञ्च् = देणें; जो धन ( दधि ) देतो ( अञ्चति ) तो दध्यङ्. अथर्वा शब्दाची व्युत्पत्ति पहा (पान ८८९); न हि अयं स्वस्मात् अधिकारात् थर्वति । न कदाचित् स्वमधिकारं मुञ्चति ( दुर्ग ) = आपल्या अधिकारापासून ढळत नाहीं म्हणजे अधिकारांतलीं कामें टाकून देत नाहीं म्हणून त्याला अथर्वा हें नांव; हें विवरण दुर्गानें ११।१८ ह्यांत द्यावयास पाहिजे होतें. मन् ( = विचार करणें ) + उः = मनुः = विचार करणारा; अशी गोष्ट नाहीं कीं जिचा हा विचार करीत नाहीं ( दुर्ग ); तो सर्व गोष्टींचा विचार करतो म्हणून त्याचें नांव मनु. पुढील खंडांतील ऋचा इंद्रपर आहे; तिच्यांत ह्या तिघांचा गौणत्वानें निर्देश आहे.

दुर्ग म्हणतोः—ज्या अर्थीं दध्यङ्, अथर्वन् व मनु हीं नांवें द्युवर्गांत आलीं आहेत त्या अर्थीं ते आदित्यच होत; किंवा द्युलोकांतील आदित्याबरोबर असणारे हे ऋषि असतील.

## खंड ३४ वा.

**यामथर्वा मनुष्पिता दध्यङ् धियमत्नत । तस्मिन् ब्रह्माणि पूर्वथेन्द्र उक्था समग्मतार्चन्ननु स्वराज्यम्** ( ऋ० सं० १।८०।१६ )

**याम् अथर्वा च मनुश्च पिता मानवानां दध्यङ् च धियम् अतनिषत तस्मिन् ब्रह्माणि कर्माणि इन्द्रे उक्थानि च संगच्छन्ताम् । अर्चन् यः अनूपास्ते स्वाराज्यम्**

पिता = पिता मानवानां = मनुष्यांचा जनक ( मनु ). तिन्ही च अध्याहृत. अत्नत = अतनिषत. तस्मिन् = एतद्गुणविशिष्टः यः आदित्यः ततकर्म अहोनिर्वृत्यादिलक्षणं तनोति तस्मिन् सति ( दुर्ग ) = अशा गुणांनीं युक्त जो आदित्य दिवसाला सकाळपासून संध्याकाळपर्यंत नेण्याचें आपलें कर्म करीत असतो म्हणजे उदयापासून

अस्तमयापर्यंत आकाशांत संचार करीत असतो तो आदित्य प्रकाशत असतांना. ब्रह्माणि = कर्माणि; ब्रह्माणि = अन्नानि ( दुर्ग ). भाष्यांत पूर्वथा शब्द किंवा त्याचा पर्याय दिला नाहीं. इंद्रे ह्याबद्दल महाराष्ट्रपाठ पूर्वेन्द्रे असा आहे; तो पूर्वथेन्द्रे असा पाहिजे. पूर्वथा = पूर्ववत् ( दुर्ग ). उक्था = उक्थानि = शस्त्राणि (दुर्ग) = उक्थनांवाचीं शस्त्रें; च अध्याहृत. समग्मत = सम् + अग्मत = संगच्छन्ताम्; समग्मत = समागच्छन्ति यज्ञेषु (दुर्ग). अर्चन् अनु स्वराज्यं = अर्चन् यः अनूपास्ते स्वाराज्यं = अर्चन् यः इंद्रम् अभिपूजयते स्वाराज्यम् अनु उपास्ते। यथाशास्त्रम् अनुतिष्ठति (दुर्ग)=जो यजमान इंद्राची योग्य पूजा करतो व जो त्याच्या सत्तेची उपासना करतो म्हणजे इंद्राकरितां यज्ञकर्म शास्त्राप्रमाणें करतो; हें विवरण असंबद्ध दिसतें कारण किंलक्षणे इन्द्रे असा दुर्ग प्रश्न करतो; तेव्हां यः = यः इन्द्रः असा अर्थ करावयास पाहिजे; पण यः म्हणजे जो यजमान असा अर्थ त्यानें केला आहे. ऋचेंत यां ( धियं ) ह्या संबंधी-सर्वनामाला स्त्रीलिंगी दर्शकसर्वनाम पाहिजे; तस्मिन् हें पुल्लिंगी किंवा नपुंसकलिंगी असल्याकारणानें त्याचा यां धियं याच्याशीं संबंध जोडतां येत नाहीं; दुर्गानें यां० अत्नत हें वाक्य कोणत्याही दर्शकसर्वनामाला न जोडतां तसेंच ठेवलें आहे.

**सायणः**—यां धियम् अत्नत = यत् कर्म अतन्वत = ( ह्यांनीं ) जें कर्म केलें; तस्मिन् = त्या कर्मांत; याप्रमाणें धियं चा कर्म असा अर्थ करून यत् कर्म ह्याच्याशीं तस्मिन् शब्द जोडला आहे; ब्रह्माणि = हविरूप अन्न; उक्था = उक्थानि= शस्त्रनामक स्तुति; समग्मत = समगच्छंत; अर्चन् अनु स्वराज्यं = यः इन्द्रः स्वराज्यं स्वस्य राज्यत्वम् अनु अर्चन् अनुपूजयन् वृत्रवधादिरूपेण कर्मणा स्वकीयम् अधिपतित्वं प्रकटयन् = वृत्रवधासारख्या कर्मांनीं जो इंद्र आपल्या अधिपतित्वाची पूजा करतो म्हणजे तें अधिपतित्व प्रकट करतो ( त्या इंद्रांत ); अथर्वन्, सर्वांचा जनक मनु व अथर्वन्‌चा मुलगा दध्यङ् ह्यांनीं जें यज्ञकर्म चालविलें त्या यज्ञकर्मांत जे जे हवि दिले गेले व ज्या ज्या स्तुति म्हटल्या गेल्या ते सर्व हवि व त्या सर्व स्तुति पूर्वींच्या वसिष्ठादिक ऋषींच्या हवींप्रमाणें व स्तुतींप्रमाणें जो इंद्र वृत्रवधासारखीं कर्मे करून आपलें अधिपतित्व गाजवितो त्या इंद्राच्या ठिकाणीं एकवटल्या.

तस्मिन् इन्द्रे ब्रह्माणि उक्था उक्थानि च पूर्वथा पूर्ववत् समग्मत = पूर्वींप्रमाणें आतांही त्या इंद्राच्या ठिकाणीं स्तुति ( ब्रह्माणि = उक्थानि ) एकत्र झाल्या आहेत; असा दुसऱ्या अर्धाचा अन्वयार्थ आहे. यां धियं = यानि ब्रह्माणि उक्थानि च; ज्या स्तुति अथर्वन्, मनु व दध्यङ् रचिते झाले त्या स्तुति जशा पूर्वकालीं इंद्राच्या ठिकाणीं एकत्र होत होत्या तशा आतांही त्या होत आहेत; यां धियम् एते ऋषयः अत्नत सा धीः पूर्वस्मिन् काले इन्द्रे समगच्छत असा पूर्वार्धाचा अर्थ केला पाहिजे व तसें केल्यानेंच दोन्ही अर्धांचा संबंध लक्षांत येतो. नास्मै विद्युत् न तन्यतुः सिषेध न यां मिहम् अकिरत् ह्रादुनिं च ( १।३२।१३ ) = अस्मै विद्युत् न सिषेध। तन्यतुः न सिषेध। यां मिहं यां च ह्रादुनिं वृत्रः अकिरत् ते अपि अस्मै न सिषिधतुः; एथें ते हें सर्वनाम

अध्याहृत आहे; त्याचप्रमाणें प्रस्तुत ऋचेंत सा धीः अध्याहृत होय; सा धीः ह्याचे तानि ब्रह्माणि उक्थानि च असे पर्याय घेऊन दोन अर्थ जोडले पाहिजेत. अर्चन् अनु स्वराज्यं हें ह्या सूक्तांतील प्रत्येक ऋचेच्या शेवटीं आलें आहे; त्याचा ऋचेच्या अर्थाशीं पुष्कळ वेळां कांहींही संबंध नसतो. स्वं धनं राजति ददाति असौ स्वराज् = धनदाता; किंवा स्वस्य बलस्य राजति असौ स्वराज् = बलाधीश; किंवा स्वं = राज् = धन; स्वराज् = अतिशय धन. अग्नि ( १।३६।७ ), वायु ( ८।४६।२८ ), पर्जन्य ( ७।१०१।५ ), यम ( १०।१५।१४ ), सोम ( ८।६१।२ ), आदित्य (२।२८।१), मरुत् ( ५।५८।१ ) ह्यांना स्वराज् म्हटलें आहे; इंद्राला स्वराज् पुष्कळ ऋचांत म्हटलें आहे (१।६१।९ वगैरे); इंद्र हा बलाधीश असून धनदाताही आहे; स्वराजः० व्रतस्य ये महो राजान ईशते ( ७।६६।६ ) = ज्यांची पुष्कळ ( स्वराजः = महः ) धनावर ( व्रतस्य ) सत्ता आहे ( ईशते ). स्वराज् एव स्वराज्यं = अतिशय धन. स्वराज्यम् अनु = धनभांडारांत. अर्चन् = अर्चन् अस्तु = देणारा असो. अर्चन् अनु स्वराज्यं = तो इंद्र आमच्या धनभांडारांत (स्वराज्यम् अनु) धन देणारा (अर्चन्) असो; असा ह्या शब्दांचा अर्थ दिसतो.

## खंड ३५ वा.

**अथातः द्युस्थानाः देवगणाः। तेषाम् आदित्याः (२४) प्रथमागामिनः भवन्ति। आदित्याः व्याख्याताः ( निरु० २।१३ )। तेषामेषा भवति**

आतां ह्यापुढें द्युलोकांतील देवगणांचें विवरण करण्यांत येईल; त्या देवगणांत आदित्य हे पहिले आहेत. आदित्य शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ११४ ).

## खंड ३६ वा.

**इमा गिर आदित्येभ्यो घृतस्नूः सनाद्राजभ्यो जुह्वा जुहोमि। शृणोतु मित्रो अर्यमा भगो नस्तुविजातो वरुणो दक्षो अंशः ( ऋ० सं० २।२७।१ )**

**घृतस्नूः घृतप्रस्नाविन्यः। घृतप्रस्राविण्यः। घृतसानिन्यः। घृतसारिण्यः इति वा। आहुतीः आदित्येभ्यः चिरं जुह्वा जुहोमि। चिरं राजभ्यः इति वा। शृणोतु नः इमाः गिरः मित्रश्च अर्यमा च भगश्च बहुजातश्च धाता दक्षः वरुणः अंशश्च। अंशः अंशुना व्याख्यातः (निरु० २।५)**

घृतस्नूः = घृतप्रस्नाविन्यः; घृतम् आहुतिलक्षणं याः प्रस्नुवन्ति प्रक्षरन्ति ताः घृतस्नूः ( दुर्ग ) = घृताची धारा सोडणाऱ्या; ष्णु प्रस्नवणे ( धा० २।२८ ). किंवा घृतस्नूः = घृतस्रूः = घृतप्रस्राविण्यः; अर्थ तोच; स्रु गतौ ( धा० १।९६५ ); स्रु = स्रवणें ( आपट्यांचा कोश ). किंवा घृतस्नूः = घृतसानिन्यः = घृतं देवान् प्रति सानयन्ति संभाजयन्ति ताः ( दुर्ग ) = देवांना घृताचा उपभोग देणाऱ्या; षण संभक्तौ ( धा० १।४६५ ); सानयन्ति = संभाजयन्ति = भोगावयास म्हणजे भक्षण कर-

ण्यास लावतात; स्नूः = सनूः = सानिन्यः. किंवा घृतस्नूः = घृतस्नूः = घृतसृः = घृतसारिण्यः = देवान् प्रति घृतं याः सारयन्ति गमयन्ति ताः ( दुर्ग ) = देवांकडे घृत पाठविणाऱ्या; सृ गतौ ( धा० १।९६० ). दुर्गवृत्तींत घृतप्रस्राविण्यः व घृतसारिण्यः ह्या प्रत्येकानंतर वा आहे. आहुतीः अध्याहृत; दुर्गवृत्तींत आहुतीः शब्द नाहीं. सनात्=चिरम्; सनात् = यावदायुषं ( दुर्ग ) = यावज्जीव. किंवा सनाद्राजभ्यः = चिरंराजभ्यः; सनाद्राजभ्यः = चिरंतनेभ्यः सर्वलोकराजभ्यः ( दुर्ग ) = सर्व लोकांच्या चिरंतन राजांना; दुर्गवृत्तींत ह्या दोन अर्थांची उलटापालट केली आहे. पहिल्या अर्धांतील इमाः गिरः ह्यांचा शृणोतु ह्याच्याशीं यास्क व दुर्ग अन्वय करतात. मित्रः, अर्यमा, भगः व अंशः ह्या प्रत्येकानंतरचा च अध्याहृत. तुविजातः = बहुजातश्च धाता = धाता म्हणजे प्रजापति सर्व वस्तु उत्पन्न करतो म्हणून तो सर्व वस्तूंत जन्मणारा; प्रत्येक वस्तु म्हणजे धाताच. वरुणः व दक्षः ह्या प्रत्येकानंतर च कां नाहीं? दक्षः हें अंशः ह्याचें विशेषण कीं काय? दक्षः = धनसमृद्ध? दुर्गवृत्तींत भगः, बहुजातः व अंशः इतक्यांच्या नंतरच च आहे. अंशु शब्दाच्या ज्या व्युत्पत्ति (पान ९४) त्याच अंश शब्दाच्या.

दुर्गानें केलेला अर्थः— घृताचा स्राव करणाऱ्या किंवा देवांना घृतप्राशन करण्यास लावणाऱ्या किंवा देवांकडे घृत पाठविणाऱ्या ह्या ज्या आमच्या स्तुति त्या स्तुतींनीं मी यावज्जीव जुहूनांवाच्या पात्रांतून आदित्यांना हवि अर्पण करीत आहें; किंवा चिरंतन आदित्यांना हवि अर्पण करीत आहें; ह्या आमच्या स्तुति मित्र, अर्यमा, भग, सर्व वस्तूंत असणारा धाता, वरुण व धनवान् अंश ऐकोत.

**सायण** :— राजभ्यः = राजमानेभ्यः ईश्वरेभ्यः वा = प्रकाशणाऱ्यांना किंवा सत्ताधीशांना; घृतस्नूः = घृतप्रस्राविणीः = घृतं क्षरंतीः = घृताच्या धारा सोडणाऱ्या; गिरः = स्तुतिलक्षणाः वाचः; सनात् = सर्वदा; जुह्वा = वागिन्द्रियेण = मुखानें; जुहोमि = प्रयच्छामि = करोमि; मी मुखानें स्तुति करतों; किंवा जुहूस्थानीयेन घृतं क्षरंति वाग्रूपाणि हवींषि जुहोमि = मुख हेंच जुहूनांवाचें पात्र; त्यानें घृताचा स्राव करणारे वाग्रूपी हवि मी अर्पण करतों; मंत्र म्हटल्याशिवाय दूध घृत वगैरे हवि अग्नींत दिले जात नाहींत म्हणून वाचा हीच घृताचा स्राव करते असें तैत्तिरीय संहितेंत म्हटलें आहे; मित्र, वरुण, धाता, अर्यमा, अंशु, भग, इंद्र व विवस्वान् हे अदितीचे आठ पुत्र असें तैत्तिरीय संहितेंत म्हटलें आहे; ह्या आठ पुत्रांना मी वाग्रूपी हवि अर्पण करतों; तुविजातः वरुणः = बहुषु देवेषु अनुग्रहार्थं प्रादुर्भूतः वरुणः = लोकांवर अनुग्रह करण्याकरितां पुष्कळ देवांत प्रादुर्भूत झालेला वरुण म्हणजे लोकोपकाराकरितां निरनिराळ्या देवांचीं रूपें घेणारा वरुण; दक्षः अंशः = समर्थः अंशः. अदितीच्या आठ पुत्रांपैकीं प्रस्तुत ऋचेंत पांचच पुत्रांचा म्हणजे मित्र, अर्यमा, भग, वरुण व अंश ह्यांचा निर्देश केला आहे असें ह्या भाष्यावरून दिसतें.

गिर् ह्याचा स्तुति ह्याशिवाय हवि असाही अर्थ आहे. असृग्रम् इंद्र ते गिरः

प्रति त्वाम् उदहासत ( १।९।४ ) = हे इंद्रा, आमचे हवि ( गिरः ) तुझ्याकरितां ( ते ) वहात आहेत ( असृग्रं ); ते तुजकडे ( त्वां प्रति ) धांवत आहेत. त्वां गिरः सिन्धुमिवावनीर्महीः आ पृणन्ति शवसा वर्धयन्ति च ( ५।११।५ ) = हे इंद्रा, जशा मोठ्या ( महीः ) नद्या ( अवनीः ) समुद्र भरून टाकतात त्याप्रमाणें आमचे हवि तुला भरून टाकीत आहेत ( आपृणन्ति ) व बलानें ( शवसा ) वाढवीत आहेत. घृतस्नु हें पुल्लिंग व घृतस्नू स्त्रीलिंग; पुंल्लिंगाचीं घृतस्नुः, घृतस्नू, घृतस्नुना व घृतस्नो आणि स्त्रीलिंगाचीं घृतस्नूः, घृतस्नू, घृतस्नुवा व घृतस्नुवः अशीं रूपें ऋग्वेदांत आहेत; हिरण्यत्वक् मधुवर्णः घृतस्नुः पृक्षो वहन् आ रथो वर्तते वाम् ( ५।७७।३ ) = हे अश्विनांनो, ज्याची त्वचा सोन्याची आहे, ज्याचा रंग मधासारखा आहे असा धन ( पृक्षः ) आणणारा तुमचा घृतस्नु रथ आमचेकडे येत आहे; घृतस्नुः रथः = घृताप्रमाणें झळझळीत रथ; हिरण्य, मधु व घृत ह्यांचा रंग पिवळा; त्वक् = वर्ण = स्नु = रंग. हरिः घृतस्नुः ( ९।८६।४५ ); हरिः व घृतस्नुः हीं सोमाचीं विशेषणें आहेत; दोहींचा अर्थ पिवळा. अग्नीला घृतस्नुः व दीद्यत् हीं विशेषणें लाविलीं आहेत ( १०।१२२।६ ); दीद्यत् = झळकणारा; घृतस्नुः = घृताच्या रंगाचा. तं त्वा घृतस्नवीमहे चित्रभानो स्वर्दृशम् ( ५।२६।२ ) = हे झळकणाऱ्या ( घृतस्नो = चित्रभानो ) अग्नि, सूर्यासारखा प्रकाशणारा ( स्वर्दृशं ) जो तूं त्या तुझी आम्ही याचना करीत आहों; घृतस्नुः = चित्रभानुः = स्वर्दृश्. यो वो देवा घृतस्नुना हव्येन प्रतिभूषति । तं विश्वे उप गच्छथ ( ६।५२।८ ) = हे देवांनो, जो तुमची झळकणाऱ्या हवीनें सेवा करितो त्याच्याकडे तुम्ही जातां; घृतस्नुना हव्येन = घृतरूप हवीनें; एथें घृत हेंच हवि असेल. इंद्राच्या घोड्यांना केशिना व घृतस्नू म्हटलें आहे (३।४१।६). अग्नीचे घोडे ( रोहिता = रोहितौ ) घृतस्नू आहेत ( ४।२।३ ). १।१५३।१ ह्यांत मित्रावरुण हे घृतस्नू. १०।१२।४ ह्यांत द्यावाभूमी ह्या घृतस्नू. घृतस्नुवा रोहिता धुरि धिष्व ( ३।६।६ ) = हे अग्नि, झळकणाऱ्या ( घृतस्नुवा = घृतस्नुवौ ) घोडया ( रोहिता = रोहितौ ) जुंप ( धुरि धिष्व ). इमा धानाः घृतस्नुवः ( १।१६।२ ); धानाः = हरभरे; ते जाळ्या पिवळे म्हणून किंवा घृतानें माखलेले म्हणून घृतस्नू. तव ते अग्ने हरितो घृतस्ना रोहितासः ( ४।६।९ ); घृतस्नाः = झळकणारे; हाच अर्थ घृतस्नू ह्याचा; स्नु शब्द स्नुना, स्नुभिः व स्नोः ह्या रूपांत आढळतो; त्याचा मूळ अर्थ झळकणारें रूप असा असावा. इमाः गिरः घृतस्नूः = हे घृतानें डबडबलेले व त्यामुळें झळकणारे हवि. सनात् = सदोदित; हा अर्थ बहुतेक ऋचांत आहे; सनाद्राजभ्यः असा समास करण्याचें कारण नाहीं. आदित्य हे राजे म्हणजे धनाधीश व धनदाते आहेत; अशा धनदात्यांना मी नेहमीं जुहूपात्रांतून घृताहुति देत असतों. तुविजात हें विशेषण अग्नि, इंद्र, मित्र, वरुण, बृहस्पति, मरुत्, विश्वेदेव व एका ऋचेंत मनुष्य ह्यांना लाविलें आहे; त्याचा संदर्भाप्रमाणें बलवान् किंवा धनवान् असा अर्थ होतो; जात शब्दाचे बल व धन असे अर्थ आहेत. प्रस्तुत ऋचेंत तुवि-

जातः हें वरुणः ह्याचें विशेषण; तें मित्र, अर्यमन् वगैरेनांही लावितां येईल; कारण ऋचेंतले हे सर्व देव धनवान् होत. तुवि शब्द समासांत बळवाचक व धनवाचक अशा शब्दांना जोडलेला असतो; तुव्योजस्, तुविनृम्ण, तुविशुष्म ह्यांचा अर्थ अतिबलवान्; तुविमघ, तुविराधस्, तुविवाज ह्यांचा अर्थ अति धनवान्. यजुःसंहितांत अदितीच्या आठ पुत्रांचीं नांवें दिलीं आहेत; त्यामुळें यास्क, दुर्ग व सायणाचार्य ह्यांना तुविजातः हें धाता ( अध्याहृत ) ह्याचें विशेषण करावें लागलें. दक्ष हाही आदित्य म्हणजे अदितीचा पुत्र होय; अदितेर्दक्षो अजायत ( पान ८९९ ).

**सप्तऋषयः ( २५ ) व्याख्याताः ( निरु० ४।२६॥२।११ ) । तेषामेषा भवति**

ऋषि ( पानें १०९-११० ) व सप्त ( पान ३१९ ) ह्यांच्या व्युत्पत्ति पहा. सप्तऋषि म्हणजे सात सूर्यकिरण किंवा सात इंद्रियें ( दुर्ग ); सप्तऋषीन् ह्याचे अर्थ पहा ( पानें ८०१ व ८०२ ).

## खंड २७ वा.

**सप्त ऋषयः प्रतिहिताः शरीरे सप्त रक्षन्ति सदमप्रमादम् । सप्तापः स्वपतो लोकमीयुस्तत्र जागृतो अस्वप्नजौ सत्रसदौ च देवौ ( वा० सं० ३४।५५ )**

**सप्त ऋषयः प्रतिहिताः शरीरे । रश्मयः आदित्ये । सप्त रक्षन्ति सदमप्रमादम् । संवत्सरम् अप्रमाद्यन्तः । सप्त आपनाः ते एव स्वपतः लोकम् अस्तम् इतम् आदित्यं यन्ति । तत्र जागृतः अस्वप्नजौ सत्रसदौ च देवौ । वाय्वादित्यौ । इति अधिदैवतम्**

ऋषयः = रश्मयः. शरीरे = आदित्यें; शृणाति सर्वम् इदम् इति शरीरम् आदित्यः ( दुर्ग ) = आदित्याला शरीर म्हणण्याचें कारण तो ह्या सर्व जगाचा नाश करतो; शॄ हिंसायां (धा० ९।१६); सर्वम् इदम् अस्मिन् आश्रितम् इति ( दुर्ग ) = त्याच्यांत सर्व जगाला आश्रय मिळतो म्हणून आदित्याला शरीर म्हटलें असेल; शरीर शब्द शॄ किंवा आ + श्रि ह्यापासून; शॄ ला गुण होऊन शर्; ईर हा नामकरण प्रत्यय; किंवा श्रि = श् + रि = श + रि; ईर हा नामकरण प्रत्यय. सदं = संवत्सरं = वर्षभर; सदं = सदैव ( दुर्ग ). अप्रमादम् = अप्रमाद्यन्तः = प्रमाद किंवा हयगय न करणारे; अप्रमाद्यन्तः अनुत्सर्गेण स्वस्य कर्मणः = प्रमाद न करणारे म्हणजे आपलें नेमून दिलेलें काम टाकून न देणारे. आपः = आपनाः = सर्व लोक व्यापून टाकणारे ( दुर्ग ). सप्त = सृप्ताः ( दुर्ग ) = गमन करणारे. ते एव अध्याहृत. स्वपतः लोकं = अस्तम् इतम् आदित्यं = झोपल्या जाणाऱ्या आदित्याच्या लोकाकडे म्हणजे अस्ताला गेलेल्या आदित्याकडे; स्वपतः हें आदित्यस्य ( अध्याहृत ) ह्याचें विशेषण; स्वपतः अस्तम् उपगच्छतः अस्य आदित्यस्य एव तं लोकं ( दुर्ग ). ईयुः = यन्ति = गच्छन्ति = बाह्यं मण्डलं प्रविशन्ति ( दुर्ग ). देवौ = वाय्वादित्यौ. अस्वप्नजौ सत्रसदौ

ह्यांचा अर्थ दुर्ग देत नाहीं; अस्वप्नजौ = न निजणारे; सत्रसदौ = सत्रांत म्हणजे आदित्यांत (?) बसणारे; च अध्याहृत. अधिदैवतं = देवतापर विवरण.

दुर्गानें केलेला देवतापर अर्थः—शरीरांत म्हणजे आदित्यांत सात ऋषि म्हणजे रश्मि ठेविले आहेत; आदित्यानें प्रज्वलित केलेले, सर्व दिशांतून पाणी आणणारे व तें काम करतांना एवढीशी सुद्धां हयगय न करणारे ते सात रश्मि सर्वदा आदित्याचें रक्षण करतात म्हणजे त्याच्याकडे वाफेच्या रूपानें जल नेतात; सर्वत्र पसरलेले (सप्त = सृप्ताः) व सर्व व्यापून टाकणारे (आपः = आपनाः) ते रश्मि सूर्य अस्ताला गेल्यावर त्याच्या बाह्य मंडलाकडे परत जातात; तेथें ते रश्मि झोंपले असतांना कधीं न झोंप घेणारे व तेथेंच सदोदित राहणारे वायु व आदित्य नेहमीं जागत बसतात.

**अथ अध्यात्मम्। सप्त ऋषयः प्रतिहिताः शरीरे। षट् इंद्रियाणि विद्या सप्तमी। आत्मनि। सप्त रक्षन्ति सदमप्रमादम्। शरीरम् अप्रमाद्यन्ति। सप्त आपनानि इमानि एव स्वपतः लोकम् अस्तम् इतम् आत्मानं यन्ति। तत्र जागृतः अस्वप्नजौ सत्रसदौ च देवौ। प्राज्ञश्च आत्मा तैजसश्च। इति आत्मगतिम् आचष्टे**

सप्त ऋषयः = षट् इन्द्रियाणि विद्या च सप्तमी = पांच ज्ञानेंद्रियें, मन व विद्या म्हणजे बुद्धि; पांच इंद्रियांच्या द्वारें विषयांचें ज्ञान मनांत शिरतें; मन हें संशयग्रस्त असल्याकारणानें त्या ज्ञानाचें खरें स्वरूप बुद्धि दाखविते; षट् इन्द्रियाणि विद्या च सप्तमी हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. शरीर म्हणजे आत्मा असें दुर्ग म्हणत नाहीं. प्रतिहिताः = प्रतिहितानि. शरीरे = आत्मनि. सदं = शरीरम्; सदं = नित्यं (दुर्ग). अप्रमादं = अप्रमाद्यन्ति = विषयज्ञान करून देण्यांत कधीं हयगय न करणारीं. आपः = आपनानि = व्यापनानि विषयाणां शरीरस्य वा (दुर्ग) = विषय किंवा शरीर व्यापून टाकणारीं. इमानि एव अध्याहृत; इमानि बद्दल दुर्गवृत्तींत तानि आहे. स्वपतः लोकं = अस्तम् इतम् आत्मानम्; स्वपतः अस्य जीवस्य सुखदुःखभोक्तुः लोकं शरीरमेव प्रति अस्तम् इतम् (दुर्ग) = सुखदुःख भोगणाऱ्या व झोपीं जाणाऱ्या ह्या जीवाच्या लोकाकडे म्हणजे झोंपलेल्या शरीराकडे. ईयुः = यन्ति. भाष्यांत आत्मानं आहे पण दुर्गवृत्तींत शरीरं आहे; या दोहोंचा मेळ कसा घालावयाचा? शरीर निजतें तेव्हां इंद्रियेंही निजतात; जीवात्मा निजतो म्हणजे तो ज्ञान संपादन करण्याचें काम थांबवितो; तेव्हां ज्ञान आणून देणारीं इंद्रियेंही निजतात म्हणजे आपलें काम थांबवितात; आत्मानं हा पाठ खरा कीं शरीरं हा पाठ खरा? कोणताही पाठ घेतला तरी अर्थ एकच. एथेंही अस्वप्नजौ सत्रसदौ ह्यांचा अर्थ दुर्ग देत नाहीं; च अध्याहृत. देवौ = प्राज्ञश्च आत्मा तैजसश्च; प्राज्ञश्च आत्मा परमात्मा चिन्मात्रेण यः शरीरं व्याप्य वर्तते। तैजसश्च प्राणः अन्नपानपचनव्यूहस्वरसान्तर्भूतं तेजः वायुवृत्ति (दुर्ग) = चैतन्यरूपानें जो सर्व शरीर व्यापून असतो असा परमात्मा हा एक देव; अन्नपान पचविण्याच्या खटपटींत सदैव असणारें वायुरूप तेज हा दुसरा देव; निद्रेंतही शरीरांतली

पचनक्रिया चालू असतेच व चैतन्यरूप परमात्मा शरीरांत जागा असतोच. इति आत्मगतिमाचष्टे (= ह्या प्रमाणें ऋषि आत्म्याच्या हालचालीचें वर्णन करतो) हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत व अथ अध्यात्मं असा आरंभ केल्यावर त्या शब्दांची आवश्यकता नाहीं.

दुर्गानें केलेला आत्मपर अर्थः—शरीरांत ठेवलेलीं सात इंद्रियें हयगय न करतां आपआपलीं कामें करून शरीराचें सदैव रक्षण करतात; सुखदुःख भोगणाऱ्या जीवात्म्याचें शरीर जेव्हां झोपीं जातें तेव्हां विषय किंवा शरीर व्यापणारीं इंद्रियेंही त्या झोंपलेल्या शरीराकडे जातात; तेथें न निजणारे व त्या ठिकाणीं सदोदित असणारे परमात्मा व तेजोरूपी प्राण हे दोघेजण जागत असतात.

महीधरभाष्यः—सप्त ऋषयः=प्राणाः त्वक्चक्षुःश्रवणरसनाघ्राणमनोबुद्धिलक्षणाः अप्रमादं सावधानं स्वपतः नरस्य लोकम् आत्मानम् ईयुः प्राप्नुवन्ति । लोकशब्देन विज्ञानात्मा हृदयाकाशप्रतिष्ठः उच्यते=लोक म्हणजे हृदयाकाशांत असणारा जो विज्ञानात्मा त्याच्याकडे मनुष्य निजला असतांना हे सात प्राण कधींही न चुकतां जातात; आपः = आपनाः = देह व्यापून टाकणारे (प्राण); देवौ = दीप्यमानौ प्राणापानौ = प्रज्वलित असलेले प्राण व अपान; सत्रसदौ = सतां जीवानां त्राणं रक्षणं सत्रम् । तत्र सीदतः = सत्र म्हणजे जीवांचें रक्षण; असें रक्षण करणारे (प्राण व अपान). महीधर व उवट ह्या ऋचेचा आदित्यपर अर्थ देत नाहींत. सप्तापः स्वपतो लोकमीयुः एथें सप्तापः ह्यानंतरचा विसर्ग नको आहे; सप्ताप = सप्त + अप; स्वपतः नरस्य सप्त ऋषयः लोकम् अप ईयुः = निजणाऱ्याचीं सात इंद्रियें निद्रावस्थेंत जगभर हिंडतात असा अन्वयार्थ असावा; हे सात जण जर बाहेर निघून गेले तर मग शरीरांत काय राहतें? कधीं न निजणारे व जीवनरूप सत्र म्हणजे यज्ञ सदोदित करीत राहणारे दोनच त्या शरीरांत असतात; ते दोन म्हणजे आत्मा व प्राण असा अर्थ असेल.

## खंड ३८ वा.

**तिर्यग्बिलश्चमस ऊर्ध्वबुध्नो यस्मिन्यशो निहितं विश्वरूपम् । अत्रासत ऋषयः सप्त साकं ये अस्य गोपा महतो बभूवुः** (अथ० सं० १०।८।९)

**तिर्यग्बिलः चमसः ऊर्ध्वबन्धनः । ऊर्ध्वबोधनः वा । यस्मिन् यशः निहितं सर्वरूपम् । अत्र आसते ऋषयः सप्त सह । आदित्यरश्मयः । ये अस्य गोपाः महतः बभूवुः । इति अधिदैवतम्**

तिर्यग्बिलः = तिर्यञ्चि अस्य मंडलस्य मधुपूर्णस्य इव रश्मिच्छिद्राणि (दुर्ग) = मधानें भरलेल्या पोवळ्याचीं भोकें जशीं तिरकस असतात तशीं सूर्याच्या रश्मिकिरणांचीं भोकें तिरकस असतात म्हणून सूर्य तिर्यग्बिल; पण रश्मींचीं छिद्रें म्हणजे काय? रश्मिरश्मींतील अंतरें कीं काय? चमनम् उदकम् एष सनोति इति चमसः

( दुर्ग ) = पृथिवीवरील उदक आदित्य भोगतो म्हणून तो चमस; चम = चमनं = प्यायलेलें उदक; स = सनोति = उपभोगतो. ऊर्ध्वबुध्नः = ऊर्ध्वबंधनः; ऊर्ध्वं च एतत् बद्धम् आभूतसम्प्लवात् न निपद्यते इति ऊर्ध्वबुध्नः ( दुर्ग ) = आकाशाला बांधलेलें हें सूर्यमंडल प्रलयापर्यंत खालीं पडत नाहीं म्हणून आदित्य हा ऊर्ध्वबुध्न; बुध्न = बध्न = बन्धन किंवा बद्ध. किंवा बुध्नः = बोधनः; ऊर्ध्वबुध्नः = ऊर्ध्वबोधनः = आकाशांत असलेला आदित्य आपल्या प्रकाशानें सर्वांना जागें करतो म्हणून तो ऊर्ध्वबुध्न. यशः = उदकं ( दुर्ग ). विश्वरूपं = सर्वरूपं = नानाप्रकारचें किंवा नाना-रूपांचें ( दुर्ग ). दुर्गवृत्तींत यस्मिन् बद्दल तस्मिन् आहे; पण पुढील अध्यात्मविवरणांत यस्मिन् हाच शब्द आहे. साकं = सह; साकं = एकीभूताः ( दुर्ग ). ऋषयः = आदित्यरश्मयः.

यास्कानें केलेला अर्थः— ज्याच्यांत सर्व रंगांचें जल ठेविलेलें असतें तें आदित्य-मंडल एक प्रकारचें चमस पात्र आहे; त्याचें भोंक खालीं असून तें वर बांधलें आहे किंवा वर टांगलेलें असून सर्वांस तें जागें करतें; ह्या महान् आदित्याचे जे रक्षक आहेत ते आदित्यरश्मि ह्या मंडलांत एकत्र असतात.

दुर्गानें केलेला अर्थः— ज्याचीं भोकें तिरकस आहेत, जो उदक उपभोगतो (चमसः) व जो आकाशाला बांधला आहे किंवा जो वर असून आपल्या प्रकाशानें सर्व प्राणिमात्रांना जागे करतो असा हा आदित्य आहे; त्या आदित्यांत सर्व रूपांचें जल ठेविलेलें असतें; ह्या महान् जगाचे किंवा स्वतःचे रक्षक ( गोपाः ) जे हे रश्मि आहेत ते सर्वत्र पसरलेले ( सप्त = सृप्ताः ) धर्मद्रष्टे ( ऋषयः ) रश्मि एकत्र होऊन ( साकं ) ह्या सूर्यमंडलांत ( अत्र ) असतात.

**अथ अध्यात्मम् । तिर्यग्बिलः चमसः ऊर्ध्वबंधनः । ऊर्ध्वबोधनः वा । यस्मिन् यशः निहितं सर्वरूपम् । अत्र आसते ऋषयः सप्त सह । इन्द्रियाणि । यानि अस्य गोप्तृणि महतः बभूवुः । इति आत्मगतिम् आचष्टे**

तिर्यक्छिद्रम् इदमेव शिरः चमसः । चम्यन्ते हि अनेन रसाः इति ( दुर्ग ) = शिर हेंच एक चमसपात्र; शिराला चमस म्हणण्याचें कारण तें नानाप्रकारचे रस पितें; ह्या शिरोरूप चमसाचें तोंड तिरकस असतें. शरीरावरतीं असलेलें हें मुंडकें शरीराला बांधून ठेवतें; मुंडकें गेलें कीं शरीर विस्कळित होतें म्हणून मुंडकें ऊर्ध्वबुध्न ( दुर्ग ). ऊर्ध्वबोधनो वा ह्याचा अर्थ दुर्ग देत नाहीं; ऊर्ध्वबोधनः = वर असलेलें हें मुंडकें ज्ञानेंद्रियांच्या साहाय्यानें सर्व जाणतें; बोधति असौ बोधनः; ऊर्ध्वः = शरीरा-वर असलेला. यशः = इंद्रियाननुभूतं रसाख्यं ज्ञानाख्यं वा ( दुर्ग ) = इंद्रियांना ज्याचा कधीं अनुभव मिळाला नाहीं असा रसरूप किंवा ज्ञानरूप परमात्मा. ऋषयः = इंद्रि-याणि; हा अर्थ दुर्ग देत नाहीं. साकं = सह. ये = यानि. गोपाः = गोप्तृणि. तस्य चमसस्य ये विधातारः तद्द्वारेण अस्य शरीरस्य महतो गोप्तारः तत्रैव चमसान्तरम् अनु-प्रविष्टाः साकं सह तद्यशः उपजीवन्तः आसते ( दुर्ग ) = त्या चमसाचे म्हणजे मुंड-

क्याचे कर्ते व त्या मुंडक्याच्या द्वारें ह्या मोठ्या शरीराचें रक्षण करणारे व मुंडक्यांत शिरून यशावर आपली उपजीविका करणारे तेथें एकत्र बसतात. पण ते कोण तें दुर्ग सांगत नाहीं; येथें दुर्गाची वृत्ति भाष्यांतील शब्दांना अनुसरून नाहीं. शरीर-रक्षण करणारे प्राण असतील; प्राणांमुळें शरीर धारणा होते व डोक्याचें ज्ञानविषयक कर्म चालतें; प्राण आत्म्यावर अवलंबून आहेत; आत्म्याचा आधार सुटल्यास प्राणांना अस्तित्व नाहीं. इति आत्मगतिमाचष्टे हे शब्द दुर्गवृत्तींत आहेत; पण त्यांचा तो अर्थ देत नाहीं; त्यांचा अर्थ मागील खंडांत दिला आहे ( पान१०३१). हल्लीं उपलब्ध असलेल्या अथर्व संहितेंत यस्मिन् बद्दल तस्मिन् व अत्रासते बद्दल तदासते आहे. ऋचेचा आदित्यपर अर्थ ओढाताणीचा आहे. अर्वाग्बिलश्चमस ऊर्ध्वबुध्नस्तस्मिन्यशो निहितं विश्वरूपम् । तस्यासत ऋषयः सप्त तीरे वागष्टमी ब्रह्मणा संविदाना ( बृह० उप० २।२।३ ) = हें डोकें चमसाच्या आकाराचें आहे म्हणून त्याला चमस म्हटलें आहे; डोक्याचा थापट भाग वरती असतो म्हणून चमस ऊर्ध्वबुध्न व तोंड खालीं असतें म्हणून तो अर्वाग्बिल; जसा सोमरस चमसांत ठेविलेला असतो तसे हे नानाविध ( विश्वरूपं ) प्राण ( यशः ) डोक्यांत ठेविलेले असतात; त्या चमसाच्या तीरावर सात ऋषि म्हणजे सात प्राण व ब्रह्मसहित आठवी वाक् असते. हे सात प्राण म्हणजे पंचेंद्रियें, वायु व मरुत् होत. बृहदारण्यकांतील ह्या ऋचेचा दुसरा अर्ध प्रस्तुत ऋचेच्या दुसऱ्या अर्धाहून अगदीं निराळा आहे. ऋचेंतील शब्द नेहमींच्या संस्कृतांत येणारे आहेत; परंतु त्यांचा गूढार्थ उकलणें कठीण आहे. मागील खंडांतील ऋचा व प्रस्तुत ऋचा ह्या अर्वाचीन होत; दोहोंचा आत्मपर अर्थ आहे.

**देवाः ( २६ ) व्याख्याताः ( निरु० ७।१५ ) । तेषामेषा भवति**

देव शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ५६१ ).

## खंड ३९ वा.

**देवानां भद्रा सुमतिर्ऋजूयतां देवानां रातिरभि नो नि वर्तताम् । देवानां सख्यमुप सेदिमा वयं देवा न आयुः प्र तिरन्तु जीवसे ( ऋ० सं० १।८९।२ )**

**देवानां वयं कल्याण्यां मतौ ऋजुगामिनाम् । ऋतुगामिनाम् इति वा । देवानां दानम् अभि नः निवर्तताम् । देवानां सख्यम् उपसीदेम वयम् । देवाः नः आयुः प्रवर्धयन्तु चिरं जीवनाय**

सुमतिः = कल्याण्यां मतौ; कल्याण्यां मतौ ह्याच्याबद्दल कल्याणी मतिः असें पाहिजे; कोणीतरी अजाण माणसानें हा बदल केला असावा. भाष्यांत व दुर्गवृत्तींत भद्रा शब्द किंवा त्याचा पर्याय दिला नाहीं. ऋजूयतां=ऋजु + यताम् ; यतां=गामिनाम् ; सूर्य-किरण ( देवाः ) सरळ जातात; दुर्ग ऋजूयतां हा शब्द न देतां त्याचा अर्थ देतो. किंवा ऋजु = ऋतु; सूर्यकिरण योग्य वेळीं सर्वत्र जातात. देवाः = सूर्यकिरण (दुर्ग); सूर्यकिरण प्रकाशतात म्हणून ते देव; देवः दीपनात् (पान ५६१). निवर्ततां = निय-

मेन वर्तताम् ( दुर्ग ) = नियमानें येवो. रातिः = दानम्; रातिः = धनलाभः ( दुर्ग ). सख्यं = समानख्यानतां याज्ञे कर्मणि समानम् अङ्गभावं ( दुर्ग ) = सारख्या नांवाला म्हणजे ऋत्विज् ह्या संज्ञेला; ऋत्विज् यज्ञाचें एक अंग होत; प्रत्येकाला मी देवांचा हविर्दाता व्हावें अशी उत्कट इच्छा असते; सख्यं = स + ख्यम्; स = समान; ख्यं= ख्यानम्, उपसेदिम = उपसीदेम; उपसेदिम = गच्छेम (दुर्ग). प्र तिरन्तु = प्रवर्धयन्तु. जीवसे = चिरं जीवनाय.

दुर्गानें केलेला अर्थः—सरळ जाणाऱ्या किंवा योग्य कालीं जाणाऱ्या सूर्य-किरणांची अनुग्रहबुद्धि आमच्याकडे नियमानें येवो; त्यांच्याकडून धनलाभ आमच्या-कडे नियमानें येवो; देवांकरितां केलेल्या यज्ञांत ऋत्विज् ह्या समान संज्ञेप्रत जाण्याची आम्ही इच्छा करतों; आम्ही फार दिवस जगावें म्हणून देव आमचें आयुष्य वाढवोत. देव म्हणजे रश्मि हा अर्थ यास्काच्या मनांत होता कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं; ऋचेच्या दुसऱ्या अर्धांत देव म्हणजे रश्मि असें दुर्ग म्हणत नाहीं.

**सायणः**—भद्रा = सुखयित्री भजनीया वा = सुखदायक किंवा उपभोगण्यास योग्य; सुमतिः = शोभना मतिः = अनुग्रहात्मिका बुद्धिः; अस्माकम् अस्तु ह्या शब्दांनीं पहिलें वाक्य पुरें केलें आहे; ऋजूयतां = ऋजुम् आर्जवयुक्तं सम्यक् अनुष्ठातारं यज-मानम् आत्मनः इच्छतां = नम्र व योग्यरीतीनें यज्ञानुष्ठान करणारा यजमान आप-ल्याला मिळो अशी इच्छा करणाऱ्यांची; अभि = आभिमुख्येन = मुख्यत्वेंकरून; निव-र्तताम् = नितरां वर्ततां = खात्रीनें येवो; सख्यं = सखित्वं = मैत्री; किंवा सख्युः कर्म = मित्रानें करावयाचें काम म्हणजे साहाय्य; उपसेदिम = प्राप्नुयाम; आम्ही देवांची मैत्री किंवा साहाय्य मिळवूं; जीवसे जीवितुं = जगावें म्हणून.

देव = ( १ ) देव, ( २ ) धनवान् व धनदाते. भद्रा = ( १ ) कल्याणकारक, ( २ ) धनयुक्त, अतिशय. सुमतिः = ( १ ) प्रसन्नता, ( २ ) अतिशय धन. ऋजूयतां, ऋजूयेतां, ऋजुयन्तां अशीं आज्ञार्थाचीं रूपें; ऋजूयमानः (१०।८८।९) हें वर्तमानकालचें धातुसाधित विशेषण आहे; तेव्हां प्रस्तुत ऋचेंत ऋजूयतां हें निवर्ततां ह्यासारखें क्रिया-रूप असावें. ऋजूयतां = सरळ किंवा थेट येवो; ऋजु = सरळ हा अर्थ प्राथमिक आहे; ऋ व जु ह्यांचा अर्थ देणें किंवा दान; ऋ + जु = धन; सिषक्तु माता मही० नः स्मत्सूरिभिः ऋजुहस्त ऋजुवनिः (५।४१।१५); ऋजु धनं हस्ते यस्याः सा ऋजुहस्ता; ऋजु धनं वनुते असौ ऋजुवनिः; धनवान् ( मही = ऋजुहस्ता ) व धन-दात्री ( ऋजुवनिः ) माता आपल्या पुष्कळ धनांतून ( स्मत्सूरिभिः ) धन ( नस् ) देवो (सिषक्तु). ऋजूयतां = ( २ ) धन देवो. देवानां भद्रा सुमतिः ऋजूयतां = ( १ ) देवांची कल्याणकारक सुप्रसन्नता थेट आमच्याकडे येवो; ( २ ) धनदात्यांचें अतिशय धन म्हणजे धनभांडार आम्हांला धन देवो. रातिः = ( १ ) मित्र, मैत्री, साहाय्य; ( २ ) दान, धन; ससन्तु ते अरातयो बोधन्तु शूर रातयः ( १।२९।४ ) = हे शूर इंद्रा, शत्रु ( अरातयः ) निजलेले राहोत व मित्र ( रातयः ) उठोत. त्वावतो हि इन्द्र

क्रत्वे अस्मि त्वावतो अवितुः शूर रातौ। विश्वेदहानि तविषीव उग्रँ ओकः कृणुष्व हरिवो न मर्धीः ( ७।२५।४ ) = हे बलवंता ( तविषीवः = उग्र ) इंद्रा, तुझ्या सारख्याच्या ( त्वावतः ) आश्रयाखालीं ( क्रत्वे = रातौ ) मी आहें; हे इंद्रा ( हरिवः ), सर्व ( विश्वानि ) दिवस ( अहानि ) म्हणजे सर्व आयुष्यभर मला घर म्हणजे आसरा ( ओकः ) दे ( कृणुष्व ); माझा त्याग करूं नकोस ( मा मर्धीः ). इन्द्रस्येव रातिमा जोहुवानाः स्वस्तये नावमिवा रुहेम ( १०।१७८।२ ) = स्वकल्याणासाठीं ( स्वस्तये ) इंद्रासारख्याचें साहाय्य किंवा आसरा ( रातिं ) मागणारे ( आ जोहुवानाः ) आम्ही जणूं काय सुरक्षित नावेंत चढत आहोंत. स्यामहं ते सदमिद्रातौ तव स्यामग्ने अवसा सुवीरः ( ६।५०।९ ) = हे अग्नि, तुझ्या आसऱ्याखालीं मी सदैव राहण्याची इच्छा करतों; तुझ्या साहाय्यानें ( अवसा ) मी धनवान् ( सुवीरः ) होईन. देवानां रातिः अभि नो नि वर्तताम् = ( १ ) देवांचा आसरा आमच्याकडे येवो; ( २ ) धनदात्यांचें धनदान आम्हांला ( नः ) पुष्कळ ( अभि ) धन (नि) देवो ( वर्तताम् ). सख्यं = (१) मैत्री, ( २ ) अतिशय धन; सखा शब्द पहा ( पान ७७८ ). उप + सद् = ( १ ) जवळ बसणें, संपादन करणें; ( २ ) सद् = देणें. वयं = (१ ) आम्ही, ( २ ) धन; वी = देणें; वयं = दान, धन. देवानां सख्यम् उप सेदिमा वयं = ( १ ) आम्हीं देवांचें सख्य पूर्णपणें ( आ ) मिळविलें आहें ( उपसेदिम ); ( २ ) दात्यांनीं दिलेलें धन ( सख्यं = वयं = आ ) आम्हीं देत आलों आहोंत. आयुः=( १ ) आयुष्य, ( २ ) धन; यु = देणें, दान; आ = यु = धन; आयुः = अतिशय धन. जीवसे = ( १ ) पुष्कळ दिवस जगावें म्हणून, ( २ ) आम्हीं धनवान् व्हावें म्हणून; पहिला अर्थ पुष्कळ ऋचांत आहे. ( २ ) रयिं विश्वायुपोषसम् । मार्डीकं धेहि जीवसे (१।७९।९)= आम्हीं धनवान् व्हावें म्हणून ( जीवसे ) आम्हांला पुष्कळ ( विश्वायुपोषसं ) धन ( रयिं = मार्डीकं ) दे. ( १ व २ ) दक्षं दधासि जीवसे ( १।९१।७ ) = ( १ ) हे सोमा, आम्हीं फार दिवस जगावें म्हणून तूं आम्हांला बल ( दक्षं ) देतोस; ( २ ) हे धनवंता ( सोम ), आम्हीं धनवान् व्हावें म्हणून आम्हांस धन ( दक्षं ) देतोस. सगळ्याच शब्दांचा समाधानकारक अर्थ करतां आला नाहीं तरी ऋचेचे दोन अर्थ आहेत ह्यांत संशय नाहीं.

**विश्वेदेवाः ( २७ ) सर्वे देवाः । तेषामेषा भवति**

विश्वे = सर्वे.

## खंड ४० वा.

**ओमासश्चर्षणीधृतो विश्वे देवास आ गत । दाश्वांसो दाशुषः सुतम्** ( ऋ० सं० १।३।७ )

**अवितारः वा । अवनीयाः वा । मनुष्यधृतः सर्वे च देवाः इह आगच्छत । दत्तवन्तः दत्तवतः सुतम् । इति**

ओमासः = ओमाः = अवितारः वा अवनीयाः वा = रक्षण करणारे किंवा तृप्त करण्यास योग्य; अव् = ( १ ) रक्षण करणें, ( २ ) तृप्त करणें; अव् ह्यांतील व् ला संप्रसारण होऊन अ + उ = ओ असें होतें; ओ + माः = ओमाः; म हा नामकरण प्रत्यय. चर्षणीधृतः = मनुष्यधृतः; हे दोन्ही शब्द दुर्गवृत्तींत नाहींत; अवितारः रक्षितारः चर्षणीनां मनुष्याणां स्वेन उपकारेण अवनीयाः वा तर्पणार्हाः धारयितारः च स्थितिकर्तारः ( दुर्ग ) = मनुष्यांचें रक्षण करणारे किंवा मनुष्यांनीं हवि देऊन तृप्त करण्यास योग्य व मनुष्यांची धारणा करणारे म्हणजे त्यांचा आयुष्यक्रम चालविणारे. विश्वे = सर्वे; दुर्गवृत्तींत सर्वे नाहीं. च अध्याहृत; दुर्गवृत्तींत च नाहीं व त्याची आवश्यकता नाहीं. देवासः = देवाः. इह अध्याहृत. आगत = आगच्छत; दुर्गवृत्तींत इह व आगच्छत नाहीं. दाश्वांसः = दत्तवन्तः = ह्या हवि देणाऱ्याला अमकी एक वस्तु द्यावयाची आहे असा संकल्प करणारे ( दुर्ग ). दाशुषः = दत्तवतः = हवि देणाऱ्याचा. इति शब्दाचें प्रयोजन ध्यानांत येत नाहीं व तो शब्द दुर्गवृत्तींत नाहीं.

दुर्गानें केलेला अर्थः— हे विश्वेदेवांनो, मनुष्यांचें रक्षण करणारे किंवा मनुष्यांनीं हवि देऊन तृप्त करण्यास योग्य, मनुष्यांचा जन्मापासून मरेपर्यंत चरितार्थ चालविणारे व हवि देणाऱ्याला अमकी एक वस्तु द्यावयाची आहे असा संकल्प करणारे तुम्ही हवि देणाऱ्याचा सोम पिण्यास या.

**सायण** :— विश्वेदेवासः = विश्वेदेवनांवाचे देव; ओमासः = रक्षकाः; चर्षणीधृतः = मनुष्याणां धारकाः; चर्षणयः मनुष्याः । तान् वृष्टिदानादिना धारयन्ति इति चर्षणीधृतः = वृष्टि वगैरे देऊन मनुष्यांचा चरितार्थ चालविणारे; दाश्वांसः = फलस्य दातारः.

ओमासः हा शब्द एथेंच आला आहे. ऋग्वेदांत ओमन् असा शब्द असून जीव वाचविण्याचें साधन, पेय व धन असे त्याचे तीन अर्थ आहेत; अत्रीचा जीव वाचविण्याकरितां अश्विनांनीं त्याला ऊनऊन पेय नेऊन दिलें ( १।११८।७ ). धन ( ओमानं = शंयोः ) द्या असें जलदेवतांना म्हटलें आहे ( ६।५०।७ ). ओमासः ह्यांत आ + ऊमासः अशीं दोन पदें असावींत; ऊम शब्द ऋग्वेदांत बारा वेळां आला आहे; एका ठिकाणीं त्याचा अर्थ देव अगर विश्वेदेव असा आहे. शेवटल्या ठिकाणीं असणाऱ्या ऊमैः ( १।१६९।७ ) ह्याचा अर्थ अजून ठरविला नाहीं. ऊम व ऊति हे शब्द ऊ पासून झाले आहेत; ऊति = रक्षणाचें साधन किंवा धन; सु + मः = सोमः = धनवान्; त्याप्रमाणें ऊ + माः = ऊमाः = धनवान्. ऊ शब्द ऋग्वेदांत पुष्कळ वेळां आला आहे व तो निरर्थक असा मानला जातो; पण त्याचा अर्थ धन असा असावा; पुष्कळ ठिकाणीं ऊ षु अशी जोडी आढळते; ऊ व सु ह्या दोहोंचाही अर्थ धन असावा असें वाटतें; ( १।१६६।३ ) एथें ऊमासः हें रूप आलें आहे; तेंच प्रस्तुत ऋचेंत असावें. आ + गत = आगत; आ ची द्विरुक्ति केली आहे.

चर्षणी = ( १ ) पंचजन, ( २ ) पंचजनांचें धन; धृतः = (१) धारण म्हणजे रक्षण करणारे, ( २ ) धन देणारे. सु = देणें, धन; सु + त = धनपूर्ण, अतिशय. ऋचेचे दोन अर्थः— ( १ ) हे विश्वेदेवांनो, पंचजनांचे रक्षक ( ऊमासः = चर्षणीधृतः ) व त्यांना धन देणारे ( दाश्वांसः ) तुम्ही हवि देणाऱ्याचा सोम पिण्यास या; ( २ ) हे धनवंत ( विश्वे = ऊमासः ) धनदात्यांनो ( चर्षणीधृतः = दाश्वांसः ), धनदात्याला ( दाशुषः = दाशुषे ) पुष्कळ धन ( आ ) द्या ( गत ).

**तदेतत् एकमेव वैश्वदेवं गायत्रं तृचं दशतयीषु विद्यते । यत्तु किंचित् बहुदैवतं तत् वैश्वदेवानां स्थाने युज्यते । यदेव विश्वलिङ्गम् इति शाकपूणिः । अनत्यन्तगतः तु एष उद्देशः भवति । भूतांशः काश्यपः आश्विनम् एकलिङ्गम् । अभितष्टीयं सूक्तम् एकलिङ्गम् । बभ्रुरेक इति दश द्विपदाः अलिङ्गाः**

प्रस्तुत ऋचा व त्याच्या पुढल्या दोन ऋचा मिळून एक तृच; हा तृच गायत्रीछंदांत आहे; देवता विश्वेदेव; संबंध ऋग्वेदांत गायत्रीछंदांतला हा एकच वैश्वदेवतृच आहे. एकमेव ह्याच्या बद्दल गुर्जरपाठ एकमिव आहे; त्याचा अर्थ पहा ( पान ५६८ ). दशतयीषु बद्दल दुर्गवृत्तींत दाशतयीषु आहे. यज्ञांत वैश्वदेवतृचा पुष्कळ लागतात; पण वैश्वदेवतृच एकच असल्यामुळें गायत्रीछंदांत असलेल्या ज्या तृचेच्या देवता पुष्कळ असतात ( बहुदेवताकं ) असा जो तृच सापडेल त्याचा यज्ञांत उपयोग केला जातो ( पान ५६८ ); विश्व म्हणजे पुष्कळ असा अर्थ करून ज्या ऋचांत पुष्कळ देवता असतात त्यांचा उपयोग करावा असें याज्ञिकांनीं ठरविलें आहे. पण शाकपूणि म्हणतो कीं ज्या तृचेंत विश्व शब्द आहे ( विश्वलिंङ्ग ) अशाच गायत्रीछंदांतल्या तृचेचा उपयोग केला पाहिजे. यास्काचें मत शाकपूणीच्या ह्या मताहून भिन्न आहे; तो म्हणतोः— परंतु ( तु ) शाकपूणीनें घातलेला हा निर्बंध ( उद्देशः ) सर्वत्र लागू पडणारा नाहीं; अत्यंत गतः = अत्यंतगतः = सर्व ठिकाणीं लागूं पडणारा; त्याच्या उलट अनत्यंतगतः म्हणजे सर्वत्र लागू न पडणारा; विश्वशब्दांनीं युक्त व गायत्रीछंदांतला असा एकादा तृच असेल नसेल; वैश्वदेवतृचा तर यज्ञांत वारंवार पाहिजे असतात; तेव्हां गायत्रीछंदातल्या बहुदेवताक तृचांचाच उपयोग करणें योग्य होय. जींत देवतेचें नांव आहे तीच तद्देवताक होय असें घेऊन चालल्यास आपत्ति उद्भवेल; म्हणून शाकपूणीनें घातलेला हा नियम सर्वत्र लागूं पडणार नाहीं. कश्यपाचा मुलगा ( काश्यपः ) भूतांश ह्याला ज्या सूक्तांतील एकाच ऋचेंत अश्विनांचें नांव आहे असें सूक्त दिसलें; तथापि त्या सर्व सूक्ताची देवता अश्विन असें मानलें जातें. एकलिंङ्ग = एकस्याम् ऋचि लिंङ्गं देवतालिंङ्गं यस्य तत् = ज्या सूक्ताच्या एकाच ऋचेंत देवतेचें नांव आहे असें सूक्त. १०।१०६ ह्यांतील अकराव्या ऋचेंतच अश्विनांचें नांव आलें आहे; भूतांशो अश्विनोः काममप्राः हे अकराव्या ऋचेंतील शेवटले शब्द; शाकपूणीच्या निर्बंधानें ही एकच ऋचा अश्विनपर होईल; पण बाकीच्या सर्व ऋचांत अश्विनांचें नांव नसलें तरी त्यांचेंच वर्णन आहे असें त्या ऋचांतील शब्दांवरून स्पष्ट होतें; यास्तव सर्व सूक्त

अग्निदेवताक आहे असें म्हटलेंच पाहिजे. ३।३८ ह्या सूक्ताचा प्रारंभ अभि तष्टा ह्या शब्दांनीं होतो म्हणून तें सूक्त अभितष्टीय; मतौ छः सूक्तसाम्नोः (५।२।५९) = सूक्त किंवा साम ह्यांतील एक किंवा दोन शब्दांना ईय (छः) प्रत्यय लावून उत्पन्न झालेल्या तद्धितानें सर्व सूक्त किंवा साम निर्दिष्ट केलें जातें म्हणून हें सूक्त अभितष्टीय; ह्या सूक्ताच्या दहाव्या ऋचेंतच इंद्र हा शब्द आला आहे; असें हें सूक्त एकलिंङ्ग असूनही इंद्रदेवताक मानिलें जातें; एथेंही शाकपूणीचा निर्बंध लागू पडत नाहीं; कारण सर्वत्र इंद्राचेंच वर्णन आहे असें त्यांतील शब्दांवरून स्पष्ट दिसतें. बभ्रुरेकः हे शब्द ८।२९ ह्या सूक्ताच्या पहिल्या ऋचेच्या प्रारंभीं आहेत; ह्यांतील सर्व ऋचा द्विपदा आहेत; द्विपदा याचा अर्थ पहा (पान ७८६). ह्या सूक्तांतील कोणत्याही ऋचेंत देवतेचें नांव नाहीं; तथापि प्रत्येक ऋचेची देवता कोण हें सहज ओळखतां येतें; म्हणून शाकपूणीनें घातलेला नियम अग्राह्य होय. महाराष्ट्रपाठांत बभ्रुरेकः इति दश द्विपदाः अलिङ्गाः। भूतांशः काश्यपः आश्विनमेकलिङ्गम्। अभितष्टीयं सूक्तमेकलिङ्गं असा क्रम आहे. बभ्रुरेकः इति दश द्विपदाः अलिङ्गाः हे गुर्जरपाठांत व दुर्गवृत्तींत नाहीं.

साध्याः देवाः (२८) साधनात्। तेषामेषा भवति

साध् = साध्य करणें ह्यापासून साध्य; जें कोणालाही साधतां येत नाहीं तें हे साध्य साधतात; हे साध्य म्हणजे प्राण; ह्या प्राणरूप ऋषींनीं हजार वर्षांचें यज्ञसत्र करून ही सृष्टि निर्माण केली; हा अध्यात्म अर्थ; देवतापर अर्थांत साध्य म्हणजे सूर्य किरण (दुर्ग).

## खंड ४१ वा.

**यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन्। ते ह नाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः (ऋ० सं० १।१६४।५०॥१०।९०।१६)**

**यज्ञेन यज्ञम् अयजन्त देवाः। अग्निना अग्निम् अयजन्त देवाः। अग्निः पशुः आसीत्। तम् आलभन्त। तेन अयजन्त इति च ब्राह्मणम्। तानि धर्माणि प्रथमानि आसन्। ते ह नाकं महिमानः समसेवन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः। साधनात्**

यज्ञेन यज्ञम् अयजन्त देवाः हे शब्द भाष्यांत घालण्याचें कारण नाहीं. यज्ञेन = अग्निना. यज्ञं = अग्निम्. अग्निना = स्थावरजंगमभावम् आपन्नेन हविर्भूतेन (दुर्ग) = स्थावर व जंगम वस्तु होऊन हवींचें रूप धारण करणाऱ्या; स्थावर व जंगम सर्व जग अग्नीच आहे; काष्टें, दूध, घृत वगैरे द्रव्यांचा हवि दिला जातो; हा हवि मूलतः अग्नीच होय. अग्निं = सर्वदेवताभूतम् आदित्यादिप्रणालिकया महान्तम् आत्मानं (दुर्ग) = अग्नि म्हणजे महान् आत्मा; आदित्य वगैरे सर्व देवतांचें रूप महान् आत्मा धारण करतो; अशा महान् आत्म्याला. देवाः = देवभाविनः पूर्वे ज्ञानकर्म-

समुच्चयकारिणः यजमानभावम् आपन्नाः ( दुर्ग ) = यज्ञादि कर्मे करणारे व ज्ञान प्राप्त करून घेणारे असे पूर्वकालीन यजमान स्वर्गांत जाऊन देव झालेले; पूर्वकालीन यज्ञानुष्ठान करणाऱ्यांनीं ज्ञान संपादन केलें व ज्ञान आणि कर्म ह्यांच्या साहाय्यानें ते देव झाले; अशा पुरुषांनीं महान् आत्म्याला निरनिराळे हवि देऊन तृप्त केलें (अयजन्त). अग्निः पशुः आसीत् । तम् आलभन्त । तेन अयजन्त इति च ब्राह्मणं = अग्नि हा पशु होता; त्या पशूला ऋत्विजांनीं कापलें व त्याचा हवि दिला असें ब्राह्मणवचन आहे. काठकसंहिता (५।५।४), वाज० सं० (२३।१७), शतपथ ब्रा० (१३।२।७।१३) ह्यांत तम् आलभन्त नाहीं. अग्निः पशुः आसीत् । तेन अयजन्त । स एतं लोकम् अजयत् ( तै० सं० ५।७।२६ ) = हे अश्वा, अग्नि हा तुझ्यासारखाच एकेकाळीं अश्वमेधांतला पशु होता; अश्वमेधांत यजमानांनीं त्याचा हवि दिला त्यामुळें तो स्वर्गलोक जिंकता झाला तसा प्रस्तुत अश्वमेधांत तुझा हवि दिल्यानें तूं ही स्वर्ग जिंकशील ( सायण-भाष्य ). तानि धर्माणि प्रथमानि आसन् = तानि कर्माणि तथाविधज्ञानयुक्तानि प्रथमानि मुख्यानि महदात्मभावापत्तये आसन् ( दुर्ग ) = महान् आत्माची स्थिति प्राप्त करून घेण्याकरितां ज्ञानयुक्त कर्मे मुख्य साधनें होतीं; नुसतीं कर्मे करून मनुष्य ब्रह्म होत नाहीं; कर्मांना ज्ञानाची जोड दिली तरच कार्य करणारा ब्रह्मस्थितीला पोचतो. सचन्त = समसेवन्त = भोगते झाले; सचन्त = असचन्त = आपेदिरे ( दुर्ग ) = प्राप्त करून घेते झाले; समसेवन्त बद्दल संसेव्यंत हा गुर्जरपाठ चुकीचा आहे. नाकं महिमानः सचन्त = ते च तानि कृत्वा नियमेन एव अनन्य भावित्वात् तत्फलस्य महिमानः तदानुपूर्व्येण जातमहदात्मभावाः सन्तः तम् एव नाकं महान्तम् आत्मानम् एकान्तसुखम् असचन्त । तद्भावमेव ते आपेदिरे ( दुर्ग ) = ज्ञानयुक्त कर्मे करून महान् आत्मस्थितीला गेलेले ते महदात्म्याप्रत म्हणजे एकांतसुखाप्रत पोचले; कारण ज्ञानयुक्त कर्माचें अशा प्रकारचें फल नियमानें मिळावयाचेंच; जो ज्ञान-युक्त कर्म करतो तो महदात्मस्थितीला पोंचलाच पाहिजे. यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः = अत्र पूर्वे पूर्वतरे च ज्ञानकर्मसमुच्चयकारिणः आसते ( दुर्ग ) = ह्या महदात्म्याच्या ठिकाणीं ज्ञानयुक्त कर्म करणारे पूर्वीचे व त्यांच्याही पूर्वीचे लोक तद्रूप म्हणजे ज्ञानस्वरूप झाले आहेत. असें ह्या ऋचेचें अध्यात्मिक विवरण दुर्ग करतो. साधनात् ही साध्याः ह्याची व्युत्पत्ति मागील खंडांत दिली आहे ती एथें देण्याचें कांहीं कारण नाहीं; दुर्गवृत्तींत साधनात् नाहीं. कदाचित् यत्र साधनात् पूर्वे साध्याः देवाः सन्ति = जेथें यज्ञसाधनानें साध्यनांवाचें पूर्वीचे देव राहतात असा अर्थ असेल; साधनात् = यज्ञ केल्यामुळें.

**सायणः**— हवि देणारे यजमान ( देवाः ) मंथनानें अग्नि उत्पन्न करून ( यज्ञेन ) आहवनीय अग्नि ( यज्ञं ) पूजिते झाले म्हणजे यज्ञाकरितां त्यांनीं आहवनीय अग्नि उत्पन्न केला; अग्नि उत्पन्न करण्याची साधनभूत तीं कर्मे ( धर्माणि ) फलप्राप्तीला उत्तम ( प्रथमानि ) होतीं; ज्या दुःखरहित स्वर्गांत यज्ञसाधनसंपन्न पूर्व-

कालीन यजमान रहात आहेत अशा स्वर्गाप्रत ( नाकं ) ते महात्मे ( महिमानः = माहात्म्ययुक्ताः ) गेले; तेव्हां हल्लींच्याही मनुष्यांनीं स्वर्गप्राप्तीकरितां तशीं यज्ञकर्में करावींत; किंवा हल्लीं देवस्थितीप्रत गेलेले असे पुरुष पृथिवीवर असतांना पशु झालेल्या अग्नीनें अग्नीची पूजा करते झाले म्हणजे त्या पशूचें आलंभन करून तो पशुरूप हवि ते अग्नींत देते झाले. अग्निः पशुरासीत् । तमालभन्त । तेनायजन्त अशी श्रुतींही आहे; बाकीचा अर्थ वरच्याप्रमाणें; किंवा ते ज्ञानयज्ञानें विष्णूची ( विष्णुं ) पूजा करतात; ते महात्मे विष्णुलोकाप्रत ( नाकं ) जातात.

यत्पुरुषेण हविषा देवा यज्ञमतन्वत ( १०।९०।६ ), तं यज्ञं बर्हिषि प्रौक्षन् पुरुषं जातमग्रतः। तेन देवाः अयजन्त साध्या ऋषयश्च ये ( १०।९०।७ ), देवा यद्यज्ञं तन्वाना अबध्नन् पुरुषं पशुम् ( १०।९०।१५ ) पुरुषसूक्तांतील ह्या ऋचांत देवांनीं नरयज्ञ केला असें आहे; त्या नराला त्यांनीं दर्भावर ठेवून त्याच्यावर प्रोक्षण केलें व त्याचा हवि देव, साध्य व ऋषि ह्यांना देते झाले; प्रस्तुत ऋचेंत यज्ञेन = पुरुषेण हविषा व यज्ञम् अयजन्त = यज्ञम् अतन्वत; देव पुरुषहवीनें यज्ञ करते झाले; तसे यज्ञ करण्याचे प्रकार ( धर्माणि ) पहिल्या काळचे ( प्रथमानि ) म्हणजे अगदीं पुरातन काळीं होते; जेथें पूर्वकालचे साध्यदेव आहेत अशा स्वर्गाप्रत नरयज्ञ करणारे ते गेले; साध्यनांवाच्या देवांनीं नरयज्ञ करून स्वर्ग प्राप्त करून घेतला; त्यांच्यानंतर इतर देवांनींही नरयज्ञ केले व तेही स्वर्गाप्रत गेले.

**द्युस्थानः देवगणः इति नैरुक्ताः। पूर्वं देवयुगम् इति आख्यानम्**

साध्य हे द्युलोकांतील एक देवगण होत असें नैरुक्त म्हणतात; ( हल्लीं जसें पृथिवीवर मनुष्ययुग आहे तसें ) पूर्वकाळीं पृथिवीवर देवयुग होतें असें पुराण सांगतें; पृथिवीवर मनुष्य जन्मण्याच्या आधीं देवांची वसति होती; मनुष्य जन्मल्यावर देव स्वर्गांत राहूं लागले. तस्य यत् निखातं तेन पितृलोकं जयति। अथ यदूर्ध्वं निखातात् आ रशनायै तेन मनुष्यलोकं जयति। अथ यदूर्ध्वं रशनायाः आ चषलात् तेन देवलोकं जयति। अथ यदूर्ध्वं चषालाद् द्व्यङ्गुलं वा त्र्यङ्गुलं वा साध्या इति देवास्तेन तेषां लोकं जयति ( शत० ब्रा० ३।७।१।२५ ) = जमिनींत पुरलेला यूपाचा भाग पितृलोक, जमिनीवरचा पण यूपाला जी दोरी बांधली असते तिच्या खालचा जो भाग तो मनुष्यलोक, दोरीच्या वरचा व यूपाचा चषाल म्हणजे अग्रभाग ह्यांच्या मधला भाग देवलोक, चषालाच्या वरचा दोन बोटाचा किंवा तीन बोटाचा जो भाग तो साध्यदेवांचा प्रदेश; असा यूप उभारल्यानें यज्ञ करणारा क्रमाक्रमानें पितृलोक, मनुष्यलोक, देवलोक व साध्यलोक जिंकतो म्हणजे प्राप्त करून घेतो. ह्यावरून देवांच्याही वरचे साध्य होते असें दिसतें. दुर्गवृत्तींत द्युस्थानो० आख्यानम् हे शब्द किंवा त्यांचें विवरण नाहीं.

**वसवः ( २९ ) यत् विवसते सर्वम्। अग्निः वसुभिः वासवः इति समाख्या। तस्मात् पृथिवीस्थानाः। इन्द्रः वसुभिः वासवः इति समाख्या। तस्मात् मध्यस्थानाः। वसवः आदित्यरश्मयः विवासनात्। तस्मात् द्युस्थानाः। तेषामेषा भवति**

वसूंना वसु म्हणण्याचें कारण ते सर्व आच्छादितात् ( विवसते = आच्छादयन्ति ); दुर्ग विवसते हा शब्द न देतां त्याचा अर्थ देतो; समाख्या = सह ( सं ) सांगणें ( आख्या ); अग्नि वसूंसह असतो म्हणून तो वासव; इंद्र वसूंसह असतो म्हणून तोही वासव; अग्नि पृथिवीवरचा व इंद्र अंतरिक्षांतला त्यामुळें त्यांच्याबरोबर असणारे वसु पृथिवीवरचे व अंतरिक्षांतले. सूर्याचे किरण हेही वसु; त्यामुळें ते द्युलोकांतले; सूर्यकिरणांना वसु म्हणण्याचें कारण ते अंधकार हाकलून देतात ( विवासनात् ). ह्याप्रमाणें वसु तिन्ही लोकांत आहेत. अग्निः वसुभिः वासवः व इंद्रः वसुभिः वासवः हे शब्द यास्काचे स्वतःचे किंवा एकाद्या ब्राह्मणग्रंथांतले तें सांगतां येत नाहीं. वासव शब्द ऋग्वेदांत नाहीं. पुष्कळ ऋचांत अग्नीला वसु म्हटलें आहे; कांहीं थोडक्या ऋचांत इंद्र व अश्विन ह्यांनाही वसु म्हटलें आहे; रुद्र, ऋभु व त्रसदस्यु ह्यांना वसु एकेकदां म्हटलें आहे; मरुतांना व देवांना वसवः हें विशेषण लाविलें आहे; देवव्यक्ति व सर्व देव धनवान् असल्यामुळें त्यांना वसु हें विशेषण योग्य दिसतें. कांहीं ऋचांत आदित्य, रुद्र व वसु ही त्रयी येते त्यावरून हे देवांचे तीन वर्ग होते असें दिसतें. वसु म्हणजे सूर्यकिरण असा अर्थ असेल असें वाटत नाहीं.

## खंड ४२ वा.

**सुगा वो देवाः सुपथा अकर्म य आजग्मुः सवनमिदं जुषाणाः। जक्षिवांसः पपिवांसश्च विश्वेऽस्मे धत्त वसवो वसूनि**

**स्वागमनानि वो देवाः सुपथानि अकर्म ये आगच्छत सवनानि इमानि जुषाणाः । खादितवन्तः पीतवन्तश्च सर्वे अस्मासु धत्त वसवो वसूनि । तेषामेषा अपरा भवति**

सुगा = सुगानि = सु + आगमनानि. सुपथा = सुपथानि. भाष्यांत अकर्म हें वैदिक रूप असल्याकारणानें त्याचें अकुर्म हें अर्वाचीन रूप द्यावयास पाहिजे होतें. स्वागमनानि शोभनानि आगमनानि पुनः पुनः अस्मद्यज्ञेषु एवमेव सुपथानि सुमार्गाणि सन्तु ( दुर्ग ) = ज्यांतील मार्ग सोपे आहेत अशी तुमची उत्तम आगमनें आमच्या यज्ञांत पुन्हा पुन्हा होवोत; दुर्गाचा पाठ सुगा वो देवाः सुपथानि सन्तु असा होता; दुर्ग सुपथानि हे सुगा ह्याचें विशेषण करतो व यास्कानेंही सुपथानि हें विशेषण मानलें असावें; कारण अर्वाचीन संस्कृतांत शोभनाः पन्थानः ह्यापासून कर्मधारय समास सुपथाः असा व्हावयास पाहिजे. पण ऋचेंत सुपथा ( = सुपथानि ) हें नाम असावें व सुगा हें त्याचें विशेषण असावें. आदित्यः सुपथा करत् ( १।२५।१२ ); सुपथा = सुपथानि = चांगले मार्ग. कृणोति विश्वा सुपथा सुगानि ( ६।६४।१ ) = उषा सर्व मार्ग जाण्यास योग्य करते. सुगानो सुगा नः सुपथा कृणु ( १।४२।७ ) = आमचे मार्ग जाण्यास सोपे कर. सुगा नो विश्वा सुपथानि सन्तु ( ७।६२।६ ) = आमचे सर्व मार्ग जाण्यास सुलभ होवोत. ह्या सर्व ठिकाणीं सुपथ हें नाम आहे;

यास्कानें आपल्या भाष्यांत स्वागमनान् सुपथान् असे शब्द कां घातले नाहींत तें समजत नाहीं. आजग्मुः = आगच्छत. सवनम् इदं = सवनानि इमानि; सवनम् इदं = इमं यज्ञं (दुर्ग). जुषाणाः = प्रीयमाणाः (दुर्ग). जक्षिवांसः = खादितवन्तः; घस् (= खाणें) ह्यापासून जक्षिवांसः. पपिवांसः = पीतवन्तः. विश्वे = सर्वे. अस्मे = अस्मासु. ही ऋचा यास्कानें कोठून घेतली तें समजत नाहीं. (१) सुगा वो देवाः सदना कृणोमि य आजग्मेदं सवनं जुषाणाः (मै० सं० १।३।८); (२) सुगा वो देवा सदनेदमस्तु य आजग्म सवनेदं जुषाणाः (काठ० सं० ४।१२); (३) सुगा वो देवाः सदनेदमस्तु य आजग्मुः सवनेदं जुषाणाः (कापिष्ठल सं० ३।१०); (४) स्वगा वो देवाः सदनमकर्म य आजग्म सदनेदं जुषाणाः (तैत्ति० सं० १।४।४४); (५) सुगा वो देवाः सदना अकर्म य आजग्मेदं सवनं जुषाणाः। भरमाणा वहमाना हवींषि अस्मे धत्त वसवो वसूनि (वाज० सं० ८।१८); (६) सुगा वो देवाः सदना अकर्म य आजग्म सवनेमा जुषाणाः। वहमाना भरमाणाः स्वा वसूनि वसुं घर्मं दिवमा रोहतानु (अथर्व सं० ९।९७।४). पहिल्या चार ऋचांचा दुसरा अर्ध प्रस्तुत ऋचेच्या दुसऱ्या अर्धासारखाच असल्याकारणानें दिला नाहीं. ह्या सहा उताऱ्यांपैकीं एकांतही सुपथा किंवा सुपथानि नसून सदना किंवा सदनं असे शब्द आहेत. यास्काच्या भाष्यावरून पहिला ऋगर्ध पुढीलप्रमाणें असावाः— सुगा वो देवाः सुपथान्यकर्म य आजग्म सवनेमा जुषाणाः. सुगा वो देवाः सुपथानि सन्तु य आजग्म सवनेदं जुषाणाः असा दुर्ग स्वीकृत पाठ असावा. वसवः ज्यांत देवता आहेत अशा ऋचा ऋग्वेदांत असतांना यास्कानें कोणत्यातरी इतर संहितेतून ऋचा कां घेतली तें समजत नाहीं; पुढील खंडांतील ऋचा ऋग्वेदांतलीच आहे; तिच्याशिवाय दुसऱ्या एकाद्या संहितेंतील ऋचा देण्याचें कांहीं एक कारण नव्हतें; ह्या इतर संहितांतील वर दिलेल्या ऋचा बनावट आहेत व एकमेकांशीं स्पर्धा करण्याच्या हेतूनें रचल्या आहेत; त्यामुळें त्यांत हवे ते शब्द व हवी तीं अशुद्ध रूपें घातलीं गेलीं आहेत.

ऋचेचा अर्थः—हे देवांनो, ह्या सवनावर प्रेम करणारे जे तुम्ही आलां अहांत त्या तुमचीं आगमनें चांगल्या मार्गांनीं युक्त म्हणजे सुलभ अशीं आम्हीं केलीं आहेत; हे वसूंनो, आम्ही दिलेले हवि खाऊन व पिऊन तुम्ही सर्वजण आम्हांला धन द्या.

## खंड ४३ वा.

**ज्मया अत्र वसवो रन्त देवा उरावन्तरिक्षे मर्जयन्त शुभ्राः। अर्वाक्पथ उरुज्रयः कृणुध्वं श्रोता दूतस्य जग्मुषो नो अस्य (ऋ० सं० ७।३९।३)**

**ज्मयाः अत्र वसवः अरमन्त देवाः। ज्मा पृथिवी। तस्यां भवाः। उरौ च अन्तरिक्षे। मर्जयन्त गमयन्त रमयन्त। शुभ्राः शोभमानाः। अर्वाचः एनान् पथः बहुजवाः कुरुध्वम्। शृणुत दूतस्य जग्मुषः नः अस्य अग्नेः**

रन्त = अरन्त = अरमन्त; दुर्गवृत्तींत रमन्त आहे; तें अरमन्त असेंच पाहिजे. ज्मा = पृथिवी; तस्यां भवाः = तिच्यावर असणारे; दुर्गवृत्तींत भवाः बद्दल भवन्ति आहे; ज्मयाः = पृथिवीवर असणारे. अत्र = ह्या यज्ञकर्मांत किंवा ह्या पृथिवीवर ( दुर्ग ). उरौ नंतरचा च अध्याहृत. मर्जयन्त=गमयन्त=रमयन्त; दुर्गवृत्तींत रमयन्त नाहीं; गमयन्त व रमयन्त हीं रूपें अशुद्ध होत; गमयन्त यद्यत् तेषां गमयितव्यम् । अथवा । वर्तमानाः ( दुर्ग ) = जें जें जाण्याला लावयाचें असेल तें जावयास लावतात म्हणजे त्यांना गति देतात; किंवा मर्जयन्त = वर्तमानाः = ( अंतरिक्षांत ) असणारे. रमयन्त = रमावयाला लावतात. शुभ्राः = शोभमानाः. अर्वाक् = अर्वाचः; अर्वाक्=अस्मान् आभिमुख्येन ( दुर्ग ) = आमच्याकडे तोंड करून म्हणजे आमच्याचकडे. एतान् अध्याहृत. उरुज्रयः = बहुजवाः = बहुप्रकारगतयः ( दुर्ग ). कृणुध्वं = कुरुध्वम्. श्रोता = शृणुत. अग्नेः अध्याहृत.

दुर्गानें केलेला अर्थः—हे वसूंनो ( वसवः ) देवांनो ( देवाः ), पृथिवीवर असणारे ( ज्मयाः ) जे तुम्ही ह्या यज्ञकर्मांत किंवा ह्या पृथिवीवर रमत अहांत व शोभमान असे ( शुभ्राः ) विस्तीर्ण अंतरिक्षांत उदक वगैरेंना गति देत अहांत किंवा तेथें रहात अहांत ते नानाप्रकारच्या गतींनीं युक्त असे तुम्ही द्युलोकांतून आपले मार्ग आमच्याकडे करा व आमचा हा दूत जो अग्नि तुमच्याकडे गेला आहे त्याचें म्हणजे त्यानें दिलेलें निमंत्रण ऐका. वास्तविक पृथिवी व अंतरिक्ष ह्यांतीलच देवांना बोलाविलें आहे; पण दुर्ग त्यांना द्युलोकीं नेतो व तेथून तुम्ही आमच्याकडे या असें म्हणतो.

सायणः— अत्र = अस्मिन् यज्ञे; ज्मयाः = पृथिव्यां भवाः; रंत = रमयंतां= रमोत; पृथिवीवर असणारे वसुनांवाचे देव ह्या यज्ञांत रमोत; शुभ्राः = दीप्यमानाः मरुतः; मर्जयन्त = परिचर्यन्ते; विस्तीर्ण अंतरिक्षांत असलेल्या देदीप्यमान मरुतांची पूजा केली जात आहे; उरुज्रयः = प्रभूतगमनाः; हे वेगानें जाणारे वसु व मरुत् हो, तुम्ही आपले मार्ग आमच्याकडे करा व तुमच्याकडे गेलेल्या आमच्या दूताचें म्हणजे अग्नीचें निमंत्रण ऐका.

ज्मना यान्ति ते ज्मयाः = द्युलोकीं संचार करणारे; दिवा यान्ति मरुतः ( १।१६१।१४ ) = मरुत् द्युलोकांत संचार करतात. अभि क्रत्वा इंद्र भूः अध ज्मन् न ते विव्यङ् महिमानं रजांसि ( ७।२१।६ ) = हे इंद्रा, तूं आपल्या बलानें ( क्रत्वा ) सर्वांना जिंकले आहेस ( अभि भूः ); द्यु ( ज्मन् ) तुझा महिमा व्यापूं शकत नाहीं ( विव्यङ् ); इतकेंच नव्हे तर ब्रह्मांडांतील सर्व जगही तो महिमा व्यापूं शकत नाहींत. उदेति सूर्यो अभि ज्मन् (७।६०।२) = सूर्य द्युलोकांत उगवतो. वयो न पप्तुः रघुया परिज्मन् ( २।३८।४ ) = पक्षी जसे अंतरिक्षांत ( परिज्मन् ) वेगानें ( रघुया ) उडतात. अयं चिद्वातो रमते परिज्मन् ( २।३८।२ ) = हा वातही अंतरिक्षांत(परिज्मन्)थांबतो. परिज्मानो न विद्युतः (५।१०।५)=विजांप्रमाणें द्युलोकीं किंवा

अंतरिक्षांत संचार करणाऱ्या अग्नीच्या ज्वाला. अश्विनांच्या व उषेच्या रथाला परिज्मा म्हणजे द्युलोकांत संचार करणारा असें म्हटलें आहे. रन्त व मर्जयन्त हीं रूपें तृतीयपुरुषाचीं बहुवचनें होत. अस्येदु त्वेषसः रन्त सिन्धवः ( १।६१।११ ) = ह्या इंद्राच्याच बलानें नद्या एकदम थांबतात. आ वातस्य ध्रजतो रन्त इत्याः ( १।३६।३ ) = सर्वत्र ( आ ) जोरानें वाहणाऱ्या ( ध्रजतः ) वाताच्या घोड्या ( इत्याः ) थांबतात. रम् = थांबणें; रन्त = थांबतात. रम् चा रमणें असाही अर्थ आहे ( पान ७६१ ) व तो अर्थ प्रस्तुत ऋचेंत असावा. मृज् व मर्जय् = धुणें, स्नान घालणें, धुवून किंवा स्नान घालून स्वच्छ किंवा तेजस्वी करणें, प्रज्वलित करणें; तमिद्दोषा तमुषसि यविष्ठमग्निमत्यं न मर्जयन्त नरः ( ७।३।५ ) = जसे घोडेवाले घोड्याला स्नान घालून स्वच्छ व तेजस्वी करतात त्याप्रमाणें हवि देणारे ( नरः ) अग्नीला संध्याकाळीं व सकाळीं हवींनीं स्नान घालून स्वच्छ करतात म्हणजे प्रज्वलित करतात. तं मर्जयन्त नदीषु आ ( ९।६८।८ ) = सोमरस काढणारे सोमाला पाण्यांत स्नान घालते झाले म्हणजे पाण्यांत मिसळून व त्याचा काळा रंग घालवून त्याला तेजस्वी करते झाले. शुभ्राः हें बहुवचनीं विशेषण सोम, उषा व जलदेवता ह्यांना एकदोन वेळां लाविलें असून मरुतांना पुष्कळ वेळां लाविलेलें आढळतें. गोमातरो यत् शुभयन्ते अञ्जिभिः तनूषु शुभ्राः दधिरे (१।८५।२) = पृश्निचे मुलगे ( गोमातरः ) देदीप्यमान ( शुभ्राः ) मरुत् अलंकारांनीं झळकतात; ते अंगावर (तनूषु) अलंकार घालतात. आ नो विश्वे सजोषसो देवासो गन्तनोप नः। वसवो रुद्रा अवसे न आ गमन् शृण्वन्तु मरुतो हवम् ( ८।५४।३ ); एथें मरुतांना विश्वेदेव, वसु व रुद्र म्हटलें आहे. प्रस्तुत ऋचेंत शुभ्राः ह्या विशेषणावरून वसवः देवाः हे मरुतच असले पाहिजेत; हे मरुत् विस्तीर्ण ( उरौ ) द्युलोकांत ( अन्तरिक्षे ) झळकतात ( मर्जयन्त ). ज्मयाः अत्र वसवो रन्त देवाः = द्युलोकीं संचार करणारे (ज्मयाः) मरुत् ( वसवः देवाः ) द्युलोकींच ( अत्र ) रमत आहेत. अशा द्युलोकीं रमणाऱ्या व तेथें अलंकारांनीं झळकणाऱ्या मरुतांना स्तोता खालीं या म्हणून विनवितो. ऋग्वेदांत ज्रय व ज्रयस् असे दोन शब्द आहेत; दोहोंचाही अर्थ वेग, बल, प्रकाश व द्युलोक असे आहेत. ओषा अप्रा उरु ज्रयः ( ४।५२।५ ) = उषेनें आपल्या तेजानें विस्तीर्ण ( उरु ) द्युलोक ( ज्रयः ) भरून टाकला आहे ( आ + अप्राः ). ज्रयांसि पार्थिवा वि तिष्ठते ( ५।८।७ ) = हे अग्नि, तूं आपल्या तेजानें विस्तीर्ण ( पार्थिवानि ) द्युलोक ( ज्रयांसि ) व्यापून टाकतोस ( वितिष्ठसे ). उरु ते ज्रयः पर्येति बुध्नं विरोचमानं महिषस्य धाम ( १।९५।९ ) = हे अग्नि, तुझा विस्तृत प्रकाश ( ज्रयः ) प्रकाशणाऱ्या ( विरोचमानं ) द्युलोकांत ( बुध्नं = महिषस्य धाम ) पसरतो ( परि + एति ). इमे चिदस्य ज्रयसो नु देवी इंद्रस्यौजसो भियसा जिहाते ( ५।३२।९ ) = ह्या द्यावापृथिवी इंद्राच्या बलाला ( ज्रयसः = ओजसः ) भिऊन ( भियसा ) पळूं लागतात ( जिहाते ). भूमिं पिन्वन्ति पयसा परिज्रयः ( १।६४।५ ) = अति वेगवान् ( परिज्रयः ) मरुत् उदकानें भूमी भरून टाकतात ( पिन्वन्ति ); परिज्रयः हें मरुतः ह्याचें

विशेषण आहे; तेव्हां तो शब्द परिज्रयाः असा पाहिजे. परिज्रि असा मूळ शब्द घेतल्यास परिज्रयः हें त्याचें बहुवचन होईल; पण ज्रि शब्द ऋग्वेदांत नाहीं; कदाचित् ज्रयति हें क्रियारूप व ज्रयसान हें वर्तमानकालीन विशेषण हीं ज्रि ह्या धातूपासून झालीं असतील; त्याच धातूपासून ज्रय व ज्रयस् हीं नामें झालीं असतील; ज्रि हा धातु व त्यापासूनच ज्रि हें नाम मानल्यास परिज्रयः व प्रस्तुत ऋचेंतील उरुज्रयः हीं बहुवचनें होतील. अर्वाक्पथः उरुज्रयः कृणुध्वं = हे अति वेगवान् मरुतहो, तुमचे मार्ग खालीं म्हणजे आमच्याकडे करा. चवथ्या पादाचा अर्थ दुर्गानें दिल्याप्रमाणें.

**वाजिनः ( ३० ) व्याख्याताः ( निरु० २।८ ) । तेषाम् एषा भवति**

वाजिन् शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान १५० ).

## खंड ४४ वा.

**शं नो भवन्तु वाजिनो हवेषु देवताता मितद्रवः स्वर्काः । जम्भयन्तोऽहिं वृकं रक्षांसि सनेम्यस्मद्युयवन्नमीवाः ( ऋ० सं० ७।३८।७ )**

**सुखाः नः भवन्तु वाजिनः ह्वानेषु देवतातौ यज्ञे । मितद्रवः सुमितद्रवः । स्वर्काः स्वञ्चनाः इति वा । स्वर्चनाः इति वा । स्वर्चिषः इति वा । जम्भयन्तः अहिं च वृकं च रक्षांसि च क्षिप्रम् अस्मत् यावयन्तु अमीवाः । देवाश्वाः इति वा**

शं = सुखाः = सुखकर. हवेषु = ह्वानेषु; हवेषु = आह्वानेषु ( दुर्ग ). देवताता = देवतातौ = यज्ञे. मितद्रवः = सुमितद्रवः = उत्तम रीतीनें व प्रमाणशीर पद्धतीनें ( मित ) धांवणारे; मितद्रवः = सुश्लिष्टं शोभनं ये द्रवन्ति ते (दुर्ग) = प्रमाणबद्ध व उत्तम रीतीनें जे धांवतात ते. स्वर्काः = स्वञ्चनाः इति वा । स्वर्चनाः इति वा । स्वर्चिषः इति वा; स्वर्कैः पहा (पान ८७५). अहिं, वृकं व रक्षांसि ह्या प्रत्येकानंतरचा च अध्याहृत यश्च अस्मान् आहन्ति । यश्च वृकः तस्करः मुष्णाति । ये अस्मान् रहसि क्षिण्वन्ति तान् ( दुर्ग ); ह्याप्रमाणें अहि ( पान १२७ ) व रक्षस् ( पान २८४ ) ह्यांच्या यास्कानें पूर्वी दिलेल्या व्युत्पत्ति व वृक शब्दाचा अर्थ दुर्ग एथें देतो. जम्भयन्तः = हिंसन्तः ( दुर्ग ). सनेमि = क्षिप्रम्; निघंटूंत ( ३।२७।४ ) सनेमि ह्याचा पुरातन असा अर्थ आहे; पण संदर्भामुळें प्रस्तुत ऋचेंत त्याचा अर्थ क्षिप्र ( दुर्ग ). युयवन् = यावयन्तु; युयवन् = अपयावयन्तु = अपमिश्रयन्तु ( दुर्ग ) = समाजांत मिसळलेले पार बाहेर हाकलून देवोत; यु मिश्रणे अवमिश्रणे च ( धा० २।२३ ); यु चा मिसळणें हा अर्थ घेतल्यानें दुर्गास अप हा उपसर्ग अध्याहृत घ्यावा लागला; पण यु चा न मिसळूं देणें, वेगळें करणें हा अर्थ यास्काच्या मनांत होता. गुर्जरपाठ यावयन् हा चुकीचा आहे. वाजिनः = देवाश्वाः वा = वाजीनः हे देव असतील किंवा देवांचे घोडे असतील; अर्वाचीन संस्कृतांत वाजी म्हणजे घोडा; दुर्गवृत्तींत देवाश्वाः वा नाहीं. अमीवाः किंवा त्याचा अर्थ दुर्गवृत्तींत नाहीं.

दुर्गानें केलेला अर्थः— आम्हीं यज्ञांत बोलाविले असतांना ( हवेषु ) हे वाजी आम्हांस सुखकर होवोत; प्रमाणबद्ध व उत्तम रीतीनें धांवणारे ( मितद्रवः ) व ज्यांची गति किंवा ज्यांची स्तुति किंवा ज्यांची दीप्ति सुंदर आहे ( स्वर्काः ) असे ते वाजी आमच्या या यज्ञांत येवोत; आम्हांला मारणारा ( अहिं ), आमची चोरी करणारा ( वृकं ), आम्हांला गुप्त रीतीनें जखमा करणारे ( रक्षांसि ) ह्यांना हिंसा करणारे ते वाजी आमच्यापासून ( अस्मत् ) सर्व उपद्रव ( अमीवाः ) दूर करोत ( यूयवन् ).

**सायण:**— वाजीनांवाचे देव ( वाजिनः ) आमच्या यज्ञांत ( देवताता = देवतातौ = यज्ञे ) आम्हीं केलेल्या स्तुतींनीं ( हवेषु = स्तोत्रेषु ) आम्हांला सुखकर ( शं = सुखाय ) होवोत; ज्यांची गति व मार्ग मोजलेला म्हणजे आखून ठेवला आहे असे ( मितद्रवः = मितद्रवणाः = मितमार्गाः ) व ज्यांच्याजवळ अन्न आहे (स्वर्काः) असे ते आमच्याकडे येऊन आम्हांला मारणाऱ्याला ( अहिं = आगत्य हन्तारं ), आमचें द्रव्य हरण करणाऱ्या चोराला ( वृकं = वसूनाम् आदातारं चोरं ) व राक्षसांना हिंसा करणारे ( जम्भयन्तः = हिंसन्तः ) ते आमच्यापासून ( अस्मत् = अस्मत्तः ) रोग ( अमीवाः = रोगान् ) दूर करोत ( युयवन् = पृथक्कुर्वन्तु ).

शं = (१) सुखकर, (२) धन. भवन्तु = (१) होवोत, (२) देवोत. वाजिनः (१) योद्धे. (२) धनदाते. हवेषु = (१) संग्रामांत, (२) धनभांडारांत. देवतातौ = (१) संग्रामांत, ( २ ) धनभांडारांत; संग्रामांत धनसंचय मिळतो म्हणून संग्रामाला देवताति हें नांव; देव = धन; ताति = समूह, संचय. ( १ ) द्रु शब्दाचा मूळ अर्थ झाड; अग्नीला द्रवन्नः ( २।७।६॥ ६।१२।४ ) म्हटलें आहे; द्रु अन्नं यस्य सः = ज्याचें अन्न झाड किंवा लाकूड आहे असा; ( २ ) द्रु = लाकडाचें मुद्गलासारखें वजनदार आयुध; प्रति द्रुणा गभस्त्योः गवां वृत्रघ्न एषते ( ५।८६।३ ) = दोन्ही हातांत ( गभस्त्योः ) मुद्गल घेतलेला ( द्रुणा ) गायी ( गवां ) चोरून नेणाऱ्याकडे ( वृत्रघ्ने ) धांवत जातो ( आ + ईषते ); मितानि द्रूणि यैः ते मितद्रवः = जे हातांनीं मुद्गल पेलतात ते; ( ३ ) द्रु = लाकडाचें भांडें. आ तू षिञ्च हरिमीं द्रोरुपस्थे ( १०।१०१।१० ) = हा सोमरस लाकडाच्या भाड्यांत ( द्रोः उपस्थे ) ओतच; ( ४ ) द्रु = द्रव्य, धन; अग्ने भ्रातर् द्रुणः इत् भूतिमूदिम ( १।१६१।१ ) = हे भ्रात्या अग्नि, तुझ्या द्रव्याचेंच ( द्रुणः इत् ) दान ( भूतिं ) आम्ही मागत आहोंत ( ऊदिम ); द्रविण व द्रविणस् हे शब्द द्रु ह्यापासूनच झाले आहेत; मितं दत्तं द्रु धनं यैः ते मितद्रवः. अर्कः = ( १ ) वज्र, ( २ ) धन; स्वर्कः शब्द पहा (पान ८७६). जम्भ = सुळका दांत किंवा दाढ; जम्भय् = सुळक्या दातांनीं किंवा दाढांनीं चूर करणें; हा प्राथमिक अर्थ; नाहींसें करणें हा दुसरा अर्थ. सर्प ( अहिं ), लांडगे ( वृकं ) व राक्षस ( रक्षांसि ) ह्यांना आपल्या सुळक्या दातांनीं चुरून टाकणारे; लक्षणेनें ह्या तिन्ही शब्दांचा अर्थ छळणारें दारिद्र्य; अशा दारिद्र्याला पार नाहींसे

करणारे. अमीवाः ह्याचा अर्थ पहा ( पान ७७६ ); अमीवा = ( १ ) शत्रु, ( २ ) दारिद्र्य. नेमि = चाकाची धांव; सनेमि चक्रम् अजरं वि वावृते ( १।१६४।१४ ) = ज्याला धाव घातली आहे ( सनेमि ) असें न कुजणारें ( अजरं ) चाक गरगर फिरत आहे ( वि वावृते ); सनेमि = धावेसहित; ह्यापासून यच्चयावत्, कांहींही शिल्लक न ठेवतां, सबंद हा दुसरा अर्थ. सनेमि द्वेषो अग्ने इनोषि मर्तात् (४।१०।७) = हे अग्नि, मनुष्यापासून तूं रोगराईसारखा उपद्रव पूर्णपणें ( सनेमि ) हाकलून देतोस ( इनोषि ). सनेमि अस्मत् युयोत दिद्युं ( ७।५६।९ ) = हे मरुत हो, आमच्यापासून तुमचें आयुध ( दिद्युं ) अगदीं ( सनेमि ) दूर करा ( युयोत ). यु ( = दूर करणें ) ह्याचीं युयोत, युयोतन, युयोतं, युयोति वगैरे कित्येक रूपें ऋग्वेदांत आहे; प्रस्तुत ऋचेंत युयवन् = दूर करोत.

ऋचेचे दोन अर्थः—( १ ) मुद्गल पेलणारे ( मितद्रवः ) व वज्र धारण करणारे ( स्वर्काः ) योद्धे ( वाजिनः ) मरुत् संग्रामांत ( हवेषु = देवतातौ ) आम्हांला सुखकर ( शं ) किंवा साहाय्यकारी होवोत; सर्प, लांडगे व राक्षस ह्यांचें आपल्या दाढांनीं चूर्ण करणारे ते आमच्यापासून आमचे शत्रु अगदीं दूर घालवून देवोत; ( २ ) धनवंत ( वाजिनः = स्वर्काः ) व धन देणारे ( मितद्रवः ) आमच्या ( नः ) धनभांडारांत ( हवेषु = देवतातौ ) धन ( शं ) देवोत ( भवन्तु ); दारिद्र्याचा नाश करणारे धनवंत आमच्यापासून दारिद्र्य अगदीं दूर करोत.

**देवपत्न्यः ( ३१ ) देवानां पत्न्यः । तासाम् एषा भवति**

पति शब्दाची जी व्युत्पत्ति तीच पत्नीची; पाता वा पालयिता वा अशी पति शब्दाची व्युत्पत्ति यास्क नेहमीं देतो. देवपत्न्यः = देवानां पत्न्यः पालयित्र्यः पालनीयाः वा ( दुर्ग ) = देवांचें पालन करणाऱ्या किंवा देवांनीं पालन करण्यास योग्य. पत्नीसंयाजनांवाच्या यागांत देवपत्नींना हवि दिला जातो; पत्नीसंयजांचा तृतीयसवनाशीं संबंध आहे व तृतीयसवनाचा आदित्यांशीं संबंध आहे म्हणून देवपत्नी या द्युलोकांतील होत असें दुर्ग म्हणतो. पुढील खंडांतील ऋचेंत देवानां पत्नीः असे शब्द आहेत; ती ऋचा देण्याचें कारण तींत त्या देवता प्रधान आहेत; देवपत्नीः हा समास दोन ऋचांत आहे; एकींत इंद्र हा प्रधान असून देवपत्नी ह्या गौण आहेत ( १।६१।८ ); दुसरींत देवपत्नींच्या समवेत इंद्राणी, अग्नायी वगैरे देवतांचा निर्देश केला आहे म्हणजे तींत त्या प्रधान देवता नाहींत.

## खंड ४५ वा.

**देवानां पत्नीरुशतीरवन्तु नः प्रावन्तु नस्तुजये वाजसातये । याः पार्थिवासो या अपामपि व्रते ता नो देवीः सुहवाः शर्म यच्छत ( ऋ० सं० ५।४६।७ )**

**देवानां पत्न्यः उशत्यः अवन्तु नः । प्रावन्तु नः तुजये अपत्यजननाय च अन्नसंसननाय च । याः पार्थिवासः याः अपाम् अपि व्रते कर्माणि ताः नः देव्यः सुहवाः शर्म यच्छन्तु शरणम् । तासाम् एषा अपरा भवति**

पत्नीः = पत्न्यः. उशतीः = उशत्यः; उशत्यः हें रूप न देतां दुर्ग याः नित्यम् अस्मत्तः हविः उशन्ति कामयन्ते ताः ( = ज्या आमच्यापासून हवींची नित्य इच्छा करतात त्या ) असा त्या शब्दाचा अर्थ देतो. अवन्तु = आम्हीं दिलेला हवि उप-भोगून आम्हांला धनानें तृप्त करोत ( दुर्ग ). तुजये = अपत्यजननाय = मुलें उत्पन्न करण्याकरितां. वाजसातये = अन्नसंसननाय; वाजसातये = अन्नसंभजनाय ( दुर्ग ); षण संभक्तौ ( धा० १।४६५ ); सन् ( = उपभोगणें ) ह्यापासून साति व सनन हे शब्द उत्पन्न झाले आहेत; अन्नसंसननाय हा शब्द न देतां त्याचा अन्नसंभजनाय हा अर्थ दुर्गानें दिला असावा. दोन्ही च अध्याहृत. पार्थिवासः ह्याबद्दल भाष्यांत पार्थिवाः असें पाहिजे. व्रते = कर्मणि = वर्षोत्सर्गे ( दुर्ग ) = पाऊस पाडण्याच्या कामांत. देवीः = देव्यः. शर्म = शरणं = घर, सुख किंवा रक्षण ( दुर्ग ). सुहवाः = स्वाह्वानाः ( दुर्ग ). यच्छत = यच्छन्तु.

दुर्गानें केलेला अर्थः—ज्या ह्या देवांच्या पत्नी आमच्यापासून हवींची नित्य इच्छा करितात त्या आमचे हवि भोगून आम्हांला धनानें तृप्त करोत; प्रजा उत्पन्न करण्याकरितां व अन्नाचा उपभोग घेण्याकरितां त्या आमचें फार काळजीनें ( प्र = प्रकर्षेण ) रक्षण करोत ( अवन्तु ); ज्या पृथिवीवर असतात व ज्या पाऊस पाड-ण्याच्या कामांत गुंतलेल्या असतात त्या बोलावल्या असतांना सहज येणाऱ्या देवपत्नी आम्हांस घर किंवा सुख किंवा रक्षण देवोत.

सायणः—आमच्या स्तुतीची किंवा हवींची इच्छा करणाऱ्या ( उशतीः = उशत्यः ) इंद्रादि देवांच्या बायका आमचें रक्षण करोत ( अवन्तु ); त्याचप्रमाणें आम्हांला बलवान् पुत्र व्हावा म्हणून ( तुजये = बलवते पुत्राय ) व अन्नलाभ व्हावा म्हणून ( वाजसातये=अन्नलाभाय ) त्या देवी आमच्याकडे वेगानें येवोत किंवा आमचें जोरानें रक्षण करोत ( अवन्तु = रक्षन्तु गच्छन्तु वा ); ज्या देवी पृथिवीवर असतात व ज्या जेथें जल उत्पन्न करण्याचें काम चाललें असतें ( व्रते = कर्मणि ) अशा अंतरिक्षांत असतात व ज्यांना बोलावणें योग्य आहे ( सुहवाः = शोभनाह्वानाः ) अशा हे देवींनो, आम्हांला रक्षण द्या म्हणजे आमचें रक्षण करा.

तुजये ह्याचा अपत्यजननाय असा यास्क अर्थ करतो व बलवते पुत्राय असा सायणाचार्य अर्थ करतात. तोकाय तुजे शुशुचान शं कृधि ( ४।१।३ ) = हे ज्वालायुक्त अग्नि, आमच्या मुलांचें कल्याण कर; तुजे = तोकाय; तुज् ह्या शब्दावरून तुजि ह्याचा अपत्य किंवा पुत्र असा त्यांनीं अर्थ केला असावा. तुज् = देणें, दान, धन; चोदः कुवित् तुतुज्यात् सातये धियः ( १।१४३।६ ) = आम्हीं लोकांस धन द्यावें म्हणून ( सातये ) दाता ( चोदः ) अग्नि आम्हांस पुष्कळ ( कुवित् ) धन देवो ( तुतुज्यात् ). आ नस्तुजं रयिं भर ( ३।४५।४ ) = आम्हांस धन ( तुजं = रयिं ) दे ( आ भर ). स शक्र शिक्ष पुरुहूत नो धिया तुजे राये ( ८।४।१५ ) = हे इंद्रा, आम्हीं धनवान् व्हावें म्हणून ( तुजे = राये ) आम्हांस धनानें ( धिया ) युक्त कर

( शिक्ष ). प्रावत् तोके तनये तूतुजानः ( ७।८४।५ ) = दाता ( तूतुजानः ) आमच्या धनभांडारांत ( तोके = तनये ) धन (प्र) घालो ( आवत् ). त्वं तुर्जि गृणन्तम् इन्द्र तूतोः ( ६।२६।४ ) = हे इंद्रा, दात्याला ( तुर्जि = गृणन्तं ) तूं धनसमृद्ध करतोस ( तूतोः ). अतूतुजि चित् तूतुजिः अशिश्नत् ( ७।२८।३ ) = दाता इंद्र ( तूतुजिः ) धन न देणाऱ्याला (अतूतुजिं) छळतो (अशिश्नत्). प्रस्तुत ऋचेंत तुजये=वाजसातये= धन देतां यावें म्हणून; तुजिः = धनदान. उशतीः = दात्या; स देवेभिः पवमान रदेन्दो रयिमश्विनं वावशानः । रथिरायतामुशती पुरन्धिः अस्मद्र्यगा दावने वसूनाम् ( ९।९३।४ ) = हे सोमा ( पवमान = इन्दो ), धन देणारा ( वावशानः ) तूं देवांच्या साहाय्यानें ( देवेभिः ) किंवा आपल्या धनांतून अतिशय ( अश्विनं ) धन ( रयिं ) दे ( रद ); त्याचप्रमाणें धन देणारी ( उशती ) धनवानांची ( रथिरायतां ) दानशूरता (पुरन्धिः) धन देण्याकरितां ( दावने वसूनां ) आमच्याकडे ( अस्मद्र्यक् ) येवो ( आ = ऐतु ); एथें वावशानः = देणारा व उशती = देणारी. पृथु = विस्तीर्ण अंतरिक्ष किंवा द्युलोक; अशा ठिकाणीं असणाऱ्या त्या पार्थिव; हा एक अर्थ; पृथु = विस्तीर्ण किंवा अतीशय धन; ज्यांच्या जवळ अतीशय धन आहे त्या पार्थिव; प्रस्तुत ऋचेंत हा दुसरा अर्थ असावा. अप् ह्याचा उदक ह्याशिवाय धन असाही अर्थ आहे (पान ७८०); अप्तुरः = धन देणारे ( १।३।८।।२।२१।५ ); अप्तुरं = धन देणाऱ्याला ( ३।५१।२ ); अपाम् अपिव्रते = धनाच्या भांडारांत; अपि ( पान ८९१ ) व व्रत ( पान ९०० ) शब्द पहा. सुहवाः = धनवान्. शर्म = धन.

ऋचेचा अर्थः—दात्या ( उशतीः ) देवांच्या पत्नी धन ( नस् ) देवोत ( अवन्तु ); आम्हीं लोकांना धन द्यावें म्हणून ( तुजये = वाजसातये ) त्या आम्हांस (नः) पुष्कळ धन देवोत; ज्या तुम्हीं धनभांडारांत सारख्या बसल्या अहांत ( पार्थिवासः = अपाम् अपिव्रते ) त्या धनवंत ( सुहवाः ) देवींनो, आम्हांस धन ( शर्म ) द्या.

## खंड ४६ वा.

**उत ग्ना व्यन्तु देवपत्नीरिन्द्राण्यग्नाय्यश्विनी राट् । आ रोदसी वरुणानी शृणोतु व्यन्तु देवीर्य ऋतुर्जनीनाम् ( ऋ० सं० ५।४६।८ )**

**अपि च ग्नाः व्यन्तु देवपत्न्यः । इन्द्राणी इन्द्रस्य पत्नी । अग्नायी अग्नेः पत्नी अश्विनी अश्विनोः पत्नी । राट् राजतेः । रोदसी रुद्रस्य पत्नी । वरुणानी च वरुणस्य पत्नी । व्यन्तु देव्यः कामयन्ताम् । यः ऋतुः कालः जायानां यः ऋतुः कालः जायानाम्**

उत = अपि च; दुर्गवृत्तींत च नाहीं. देवपत्नीः = देवपत्न्यः. व्यन्तु = पिबन्तु ( दुर्ग ). अग्नि वगैरेनीं प्यायल्यावर बाकी राहिलेला हवि देवपत्नी पिवोत. इन्द्राणी = इंद्रस्य पत्नी. अग्नायी = अग्नेः पत्नी. अश्विनी = अश्विनोः पत्नी. राट् शब्द राज् ( = प्रकाशणें ) ह्या पासून; ह्या सर्व स्त्रिया प्रकाशमान आहेत. दुर्गवृत्तींत इन्द्राणी,

अग्नायी व अश्विनी ह्यांचे वर दिलेले अर्थ व राट् शब्दाचा अर्थ व त्याची व्युत्पत्ति नाहीं. रोदसी = रुद्रस्य पत्नी. वरुणानी = वरुणस्य पत्नी; च अध्याहृत. भाष्यांत आशृणोतु हें क्रियारूप घालावयास पाहिजे होतें; आशृणोतु = आभिमुख्येन च स्थित्वा शृणोतु ( दुर्ग ) = आमच्याकडे तोंड करून ऐको. व्यन्तु = कामयन्ताम्; व्यन्तु = पिबन्तु ( दुर्ग ); वी गतिव्याप्तिप्रजनकान्त्यसनखादनेषु ( धा० २।३८ ); भाष्यांत कान्ति हा अर्थ दिला आहे पण दुर्ग पिणें हा अर्थ देतो; परंतु पिणें हा अर्थ धातु-पाठांत नाहीं. देवीः = देव्यः. ऋतुः = कालः. यः ऋतुः जनीनां = पुरुष जेवल्या-नंतरचा स्त्रियांचा जो भोजनकाल (त्या कालीं दिलेला हवि ह्या देवी पिवोत); हें विवरण दुर्गानें हिंदुस्थानांतील चालीरीतीला अनुसरून केलें आहे. यः ऋतुः जनीनां ह्याची द्विरुक्ति अध्याय संपला हें दाखविण्याकरितां.

दुर्गानें केलेला अर्थः—इंद्र, अग्नि, अश्विन, रुद्र व वरुण ह्या देवांच्या देदी-प्यमान ( राट् ) स्त्रिया ( ग्नाः = देवपत्नीः ) इंद्र वगैरेंनीं प्यायल्यावर राहिलेला हवि स्त्रियांची जी भोजनाची वेळ त्या वेळीं पिवोत.

**सायण** :—ग्नाः = स्त्रियः; देवपत्नीः = देवपत्न्यः देवाः पतयः यासां ताः = देवांच्या बायका किंवा देव आहेत पति ज्यांचे त्या; व्यन्तु = हविः भक्षयन्तु; राट् = राजमाना; राट् हे अश्विनी ह्या शब्दाचें विशेषण केलें असावें; व्यन्तु = खादन्तु हविः; यः ऋतुः जनीनां = यः देवजायानां कालः तदभिमानाः देव्यः अपि शृण्वन्तु व्यन्तु च = देवपत्नींच्या कालाच्या अभिमानिनी देवता आमचें बोलावणें ऐकोत व हवि भक्षण करोत. रोदसी शब्द ऋग्वेदांत द्विवचनी आहे; तथापि पदकारशाकल्यानें तो कांहीं ठिकाणीं एकवचनी असा मानला आहे; त्यामुळें भाष्यकार रोदसी हें एक-वचन मानतो व सायणाचार्यही शाकल्याला अनुसरून तो शब्द एकवचनी आहे असें मानतात; दुर्ग व सायणाचार्य ही गोष्ट विशेष रीतीनें सांगतात.

ग्ना = स्त्री; आ ग्ना अग्न इहावसे होत्रां यविष्ठ भारतीम् । वरुत्रीं धिषणां वह ( १।२२।१० ); एथें होत्रा, भारती व धिषणा ह्या ग्नाः म्हणजे स्त्रिया होत. अस्मा इदु ग्नाश्चिद्देवपत्नीरिन्द्राय अर्कम् अहिहत्य ऊवुः ( १।६१।८ ) = इंद्रानें अहीला मारावें म्हणून स्त्रिया म्हणजे देवांच्या पत्नी त्याच्याकरितां कवच ( अर्क ) तयार करत्या झाल्या ( ऊवुः ); ग्नाः म्हणजे सामान्य स्त्रिया नसून त्या देवांच्या पत्नी होत; त्यांनीं इंद्राचें कवच तयार केलें. प्रस्तुत ऋचेंतही ग्नाः म्हणजे देवांच्या बायका. त्यांचीं नांवें इंद्राणी अग्नायी वगैरे; अग्नायी, अश्विनी व वरुणानी हीं नांवें एथेंच आलीं आहेत. रोदसी ही सर्व मरुतांची बायको ( पान ९५४ ). अग्नीला राट् म्हटलें आहे (६।१२।१॥ ६।१२।५ ); पण एथें राट् कोण ? राट् = दाता किंवा दात्री; इंद्राणी वगैरे प्रत्येक देवता राट् किंवा अश्विनी ही एकटीच राट् ? कदाचित् उषा ही राट् असेल; कारण दानाबद्दल उषेची ख्याति आहे. वी = ( १ ) भक्षणें, ( २ ) पिणें, ( ३ ) देणें ( १ ) अग्ने वीहि पुरोळाशम् ( ३।२८।३ ) = हे अग्नि, पुरोडाश भक्षण कर. ( २

वीतं पातं पयस उस्रियायाः ( १।९३।७ ) = हे मित्रावरुणांनो, गायीचें दूध प्या ( वीतं = पातं ). ( ३ ) वीहि स्वस्तिं सुक्षितिम् ( ६।२।११ ) = धन ( स्वस्तिं = सुक्षितिं ) दे. ते नो व्यन्तु वार्यम् ( ३।८।७ ) = ते आम्हांला धन देवोत. ऋतु चे सोम किंवा सोमपात्र व धन असे अर्थ आहेत ( पान १००८ ); ( १ व २ ) उत ऋतुभिः ऋतुपाः पाहि सोमम् ( ३।४७।३ ) = (१) हे इंद्रा, सोम पिणारा (ऋतुपाः) तूं सोमपात्रांतून ( ऋतुभिः ) सोम पी; ( २ ) हे दात्या, धन देणारा ( ऋतुपाः ) तूं आपल्या धनांतून ( ऋतुभिः ) धन ( सोमं ) दे ( पाहि ). जनि = ( १ ) बायको, ( २ ) धन ( पान ७९३ ).

ऋचेचे दोन अर्थः— ( १ ) स्त्रिया म्हणजे देवांच्या पत्नी आमचा सोम पिवोत ( व्यन्तु ); इंद्राणी, अग्नायी, अश्विनी, उषा ( राट् ), मरुतांची बायको रोदसी व वरुणानी ह्यांपैकीं प्रत्येकजण आमचें बोलावणें ऐको ( श्रृणोतु ); स्त्रियांकरितां ( जनीनां ) जो सोम ( ऋतुः ) राखून ठेवला असतो तो सोम ह्या देवी पिवोत; ( २ ) देवांच्या बायका धन देवोत ( व्यन्तु ); इंद्राणी वगैरे प्रत्येकजण आम्हांस धन ( आ ) देवो ( श्रृणोतु ); ह्या दात्या ( देवीः ) त्यांचा जो धनाचा ( जनीनां ) सांठा ( ऋतुः ) आहे तो आम्हांला देवोत ( व्यन्तु ).

---

# अध्याय १३ वा.

## खंड १ ला.

**अथ इमाः अतिस्तुतयः इति आचक्षते । अपि वा संप्रत्ययः एव स्यात् । माहाभाग्यात् देवतायाः । सः अग्निम् एव प्रथमम् आह । त्वमग्ने द्युभिस्त्वमाशुशुक्षणिः ( ऋ० सं० २।१।१ ) इति यथा एतस्मिन् सूक्ते । न हि त्वदारे निमिषश्चनेशे ( ऋ० सं० २।२८।६ ) इति वरुणस्य । अथ एषा इन्द्रस्य**

आतां (अथ) पुढील (इमाः) अतिस्तुति होत असें आचार्य म्हणतात. ऐकपादिकम इति आचक्षते (४।१ पान२३५) व दैवतमिति आचक्षते (७।१ पान५३०) एथें ऐकपादिक व दैवत ह्यांचीं लक्षणें देऊन मग पूर्वाचार्यांनीं प्रकरणांना हीं नांवें दिलीं आहेत असें यास्क म्हणतो; पण एथें अतिस्तुतयः ह्याचें लक्षण दिलें नाहीं. अतिशयेन युक्ताः स्तुतयः अतिस्तुतयः = प्रमाणाच्या बाहेर गेलेल्या म्हणजे अतिशयोक्तीनें भरलेल्या स्तुति. सातव्या अध्यायापासून बारावा अध्याय संपेपर्यंत देवतांच्या केलेल्या स्तुति त्यांच्या त्यांच्या अधिकारांना व कृत्यांना अनुरूप आहेत म्हणजे त्या स्तुतींत अतिशयोक्ति मुळींच नाहीं; पण तेराव्या व चवदाव्या अध्यायांत येणाऱ्या स्तुति देवतांनीं केलेलीं कृत्यें किंवा त्यांचे अधिकार ह्यांसंबंधानें नसून निव्वळ गुणवर्णनपर आहेत म्हणून त्या अतिस्तुति होत असें दुर्ग म्हणतो. अपि वा संप्रत्ययः एव स्यात् = अथवा अशा केलेल्या स्तुति अतिस्तुति नसून त्या योग्य आहेत अशी स्तोत्यांची पुरी समजूत ( संप्रत्ययः ) असेल; देवतेविषयीं जें जें मी म्हणतों तें सर्व त्या देवतेंत आहेच अशी माझी ठाम समजूत आहे असें स्तोता म्हणेल; अतिस्तुति हा शब्द देवतांना लागूंच नाहीं कारण त्यांचें ऐश्वर्य म्हणजे सत्ता प्रचंड आहे (माहाभाग्यात् देवतायाः); माहाभाग्यात् देवतायाः ( पान ५३९ ) याचा अर्थ पहा. तो अग्नीविषयींच पहिल्याप्रथम बोलतो; एथें सः कोण ? आधींच्या वाक्यांत कोणाचेंही नांव नाहीं; ही लिहिण्याची पद्धत यास्काची नव्हे; सः म्हणजे स्तोता असौ आचार्यः असें दुर्ग म्हणतो; आचार्य म्हणजे यास्क; यास्क अग्नीविषयींच पहिल्याप्रथम बोलतो असें कोण म्हणतो ? असें म्हणणारा यास्काहून भिन्नच असला पाहिजे; तेव्हां हा अध्याय यास्कानें लिहिला नाहीं हें सिद्ध होतें. ह्या अतिस्तुतिप्रकरणांत पहिल्याप्रथम अग्नीच कां घेतला असें कोणीं विचारल्यास दैवतकांडांतील आरंभीची देवता अग्नि आहे हेंच ( दुर्ग ). त्वमग्ने द्युभिः त्वमाशुशुक्षणिः ह्या शब्दानें दुसऱ्या मंडलांतील पहिल्या सूक्ताचा प्रारंभ होतो; देवांना आणणें व त्यांना हवि देणें हा अग्नीचा अधिकार व हें त्याचें काम; पण २।१ ह्या सूक्तांत ह्या अधिकाराचें किंवा अग्नीनें नेहेमीं करावयाच्या कामाचें वर्णन नाहीं; सर्व ऋत्विज् तूं, सर्व देव तूं असें ह्या सूक्तांतील कांहीं ऋचांत अग्नीला म्हटलें आहे;

अग्नि सर्व ऋत्विज् किंवा सर्व देव कसा होईल ? तेव्हां अग्नीची ही स्तुति अतिस्तुति होय. इति यथा एतस्मिन्सूक्ते ह्यांतील यथा शब्द व्यर्थ आहे; कारण इति एतस्मिन्सूक्ते ह्याचा आह ह्याच्याशीं संबंध आहे. त्वमग्ने द्युभिः ही ऋचा यास्कानें ६।१ एथें दिली आहे; तेथेंच त्यानें ह्या ऋचेंत अतिस्तुति आहे असें म्हटलें असतें; ह्यावरूनही हा अध्याय यास्कानें रचिला नसावा. न हि त्वदारे निमिषश्चनेशे इति वरुणस्य (अतिस्तुतिः); पण वरतीं इति अग्नेः असें म्हटलें नाहीं. ह्या अध्यायाच्या कर्त्याला सुसंबद्ध भाषा वापरतां येत नाहीं; इति वरुणमाह असें म्हणावयास पाहिजे. न हि त्वत् आरे निमिषः चन ईशे = तुझ्यापासून दूर असलेला मनुष्य आपल्या डोळ्यांच्या लवण्यावरसुद्धां सत्ता चालवूं शकत नाहीं. त्वदन्तिके अपि वर्तमानस्य दूरे अपि च यः कश्चित् तस्यापि त्वत् अन्यो न ईशे ( दुर्ग ) = तुझ्याजवळ असो किंवा तुजपासून दूर असो तुझ्याहून दुसरा कोणीही देव अशा मनुष्यावर सत्ता चालवूं शकत नाहीं. त्वत्तः अन्यः कश्चित् निमिषः चन निमेषस्य अपि अक्षिपक्ष्मचलनस्य अपि नहि ईशे । त्वमेवेश्वरः इत्यर्थः (सायण)= तुझ्याशिवाय इतर कोणीही डोळ्याच्या लवण्यावर सत्ता चालवूं शकत नाहीं; तूं ईश्वर आहेस. असा दुर्ग व सायणाचार्य अर्थ करतात; पण हे अर्थ बरोबर नाहींत; मनुष्य डोळ्याचें पातें हलवितो तें त्याच्या स्वतःच्या सामर्थ्यामुळें होत नसून तुझ्या सामर्थ्यानें होतें; तुझ्याशिवाय मनुष्य कांहीं करूं शकत नाहीं असें ऋषीस म्हणावयाचें आहे. ईशे= इष्टे ( पान ५३१ ). अथ एषा इन्द्रस्य ( अतिस्तुतिः ) = पुढील ऋचा इंद्राची अतिस्तुति होय म्हणजे पुढील ऋचेंत इंद्राची अतिस्तुति केली आहे.

## खंड २ रा.

**यत् द्याव इन्द्र ते शतं शतं भूमीरुत स्युः । न त्वा वज्रिन् सहस्रं सूर्या अनु न जातमष्ट रोदसी ( ऋ० सं० ८।७०।५ )**

**यदि ते इन्द्र शतं दिवः शतं भूमयः प्रतिमानानि स्युः न त्वा वज्रिन् सहस्रम् अपि सूर्याः न द्यावापृथिव्यौ अपि अभ्यश्नुवीताम् इति । अथ एषा आदित्यस्य**

यत् = यदि. ऋचेंत ते हा शब्द इंद्र ह्याच्यानंतर आहे पण भाष्यांत यदि ह्यानंतर तो घातला आहे. द्यावः = दिवः; दिव् ह्याचीं द्यौः दिवौ दिवः व द्यो ह्याचीं द्यौः द्यावौ द्यावः अशीं रूपें होतात; तेव्हां द्यावः ह्याचा दिवः पर्याय देण्याचें कारण नाहीं. द्यावः ह्याच्यानंतरचा शतं शब्द दिवः ह्याच्या आधीं घातला आहे. भूमीः = भूमयः. उत चा पर्याय कां दिला नाहीं ? प्रतिमानानि अध्याहृत; प्रतिमानानि = उपमानानि ( दुर्ग ). सहस्रं = सहस्रम् अपि; दुर्गवृत्तींत अपि नाहीं. भाष्यांत जातं हा शब्द किंवा त्याचा पर्याय दिला नाहीं; जातं = जातमात्रम् अपि ( दुर्ग ). रोदसी = द्यावापृथिव्यौ; अपि अध्याहृत; शंभर द्यु व शंभर पृथिवी असे शब्द पूर्वीं आले आहेत तेव्हां रोदसी ( = द्यावापृथिव्यौ ) हा शब्द घालण्याचें कारण नाहीं; पण द्यावापृथिव्यौ समाने म्हणजे द्यौ व पृथिवी ह्या दोघी मिळून असा अर्थ आहे असें दुर्ग

म्हणतो; पण शंभर द्यु व शंभर पृथिवी असें म्हटल्यावर द्यु व पृथिवी ह्या दोघीजणींची काय किंमत? रोदसी म्हणजे द्यावापृथिवी असल्यास कवीच्या स्फूर्तीचा पतत्प्रकर्ष म्हणजे अधःपात होईल. अनु + अष्ट = अभ्यश्नुवीतां = व्यापतील; अनु + अष्ट = अभ्यश्नुवीरन् ( दुर्ग ). कांहीं ठिकाणीं दुर्गवृत्ति भाष्याला धरून नाहीं.

दुर्गानें केलेला अर्थः— हे इंद्रा, शंभर द्यु, शंभर पृथिवी, सहस्र सूर्य व द्यावा-पृथिवी ह्या दोघीजणी हीं जरी तुझीं उपमानें झालीं म्हणजे तुझी बरोबरी करूं लागली तरी तूं जन्मलास तेव्हां सुद्धां हीं सगळीं तुला कधींही व्यापूं शकलीं नाहींत; उलट तूं त्यांना व्यापून टाकतोस.

**सायण**:— हे इंद्र ते तव प्रतिमानार्थं यत् यदि द्यावः द्युलोकाः स्युः तथापि नाश्नुवंति = हे इंद्रा, तुला मोजण्याकरितां जरी शंभर द्यु अस्तित्वांत असल्या तरीही त्या तुला व्यापीत नाहींत कारण तुझा विस्तार शंभर द्यूंच्या विस्ताराहूनही मोठा आहे; भूमीः भूमयः तव मूर्तिप्रतिबिंबाय शतं स्युः तथापि नाश्नुवंति = तुझ्या मूर्तीचें प्रतिबिंब घेण्याकरितां जरी शंभर पृथिवी अस्तित्वांत असल्या तरी त्यांनाही तुला व्यापतां येत नाहीं; एवढें तुझ्या शरीराचें प्रतिबिंब विस्तृत आहे; त्वां सहस्रं सूर्याः अगणिताः अपि सूर्याः नानुभवन्ति = हजार म्हणजे अगणित सूर्यही तुझा अनुभव घेऊं शकत नाहींत म्हणजे तुझ्यावर पूर्ण प्रकाश पाडूं शकत नाहींत; जातं पूर्वम् उत्पन्नं किंचन न अष्ट नाश्नुते = आजपर्यंत उत्पन्न झालेली कोणतीही वस्तु तुला व्यापूं शकत नाहीं; रोदसी द्यावापृथिव्यौ न अश्नुवाते = द्यावापृथिवीही तुला व्यापूं शकत नाहींत; तूं सर्वांहून इतका विस्तृत आहेस.

अष्ट हें एकवचनीं क्रियारूप आहे; इयमिन्द्रं वरुणमष्ट मे गीः ( ७। ८५।५ ) = ही माझी स्तुति इंद्र व वरुण ह्यांना गाठीत आहे. न तमंहो न दुरितं देवासो अष्ट मर्त्यम् ( १०।१२६।१ ) = हे देवांनो, त्या माणसाला संकट गांठीत नाहीं. तेव्हां प्रस्तुत ऋचेंत अष्ट हें एकवचनींच असलें पाहिजे; पण ह्या क्रियापदाचा कर्ता कोण? यो जातमस्य महतो महि ब्रवत् ( १।१५६।२ ) = ह्या महान् विष्णूच्या मोठ्या ( महि ) बलाची ( जातं ) स्तुति करतो ( ब्रवत् ). उपस्तुत्यं महि जातं ते अर्वन् ( १।१६३।१ ) = हे अश्वा, तुझें मोठें बल स्तुतीला पात्र आहे. यद्ध शुष्णस्य दम्भयो जातं विश्वं सयावभिः ( १०।२२।११ ) = हे इंद्रा, ज्या अर्थी तूं मरुतांना बरोबर घेऊन ( सयावभिः ) शुष्णाच्या सर्व बलाचा नाश केला आहेस. न जातम् अष्ट रोदसी = तुझें बल ( जातं ) द्यावापृथिवींना ( रोदसी ) व्यापीत नाहीं ( अष्ट न ).

ऋचेचा अर्थः— हे इंद्रा, जरि तुझ्या स्वाधीन (ते) शंभर द्यु व शंभर पृथिवी असतील तरी तुझ्या स्वाधीन ( त्वा अनु ) हजार सूर्य नाहींत; ( इतकेंच नव्हे तर ) तुझें बल द्यावापृथिवींनाही व्यापीत नाहीं; असें कोणीएक विनोदानें म्हणतो; तूं सर्वांहून श्रेष्ठ आहेस असें लोक म्हणतात पण त्यांत तथ्य नाहीं; तें खरें असतें तर तूं द्यावापृथिवीलाच व्यापून राहिला असतास इतकेंच नाहीं तर हजारों सूर्यांनाहीं तूं आपल्या

स्वाधीन ठेवले असतेस; लोक तुझ्या बळाची उगीच स्तुति करतात. पुढील ऋचेंत आदित्याची अतिस्तुति आहे.

## खंड ३ रा.

**यदुदञ्चो वृषाकपे गृहमिन्द्रा जगन्तन। क्व स्य पुल्वघो मृगः कमगन् जनयोपनो विश्वस्मादिन्द्र उत्तरः ( ऋ० सं० १०।८६।२२ )**

**यत् उदञ्चः वृषाकपे गृहम् इन्द्र अजगमत। क्व स्यः पुल्वघः मृगः। क्व सः बह्वादी मृगः। मृगः मार्ष्टेः गतिकर्मणः। कम् अगमत् देशं जनयोपनः। सर्वस्मात् यः इन्द्रः उत्तरः तम् एतत् ब्रूमः आदित्यम्। अथ एषा आदित्यरश्मीनाम्**

उदञ्चः = उदङ् एव वर्तमानः प्रदक्षिणं भुवनानि परिगच्छन् ( दुर्ग ) = वर म्हणजे द्युलोकीं असून सर्व भुवनांना प्रदक्षिणा घालणारा. अजगन्तन = अजगमत; दुर्गवृत्तींत अजगमत नाहीं; तें रूप कसें सिद्ध होतें तें सांगतां येत नाहीं; गम् ह्याचें प्रयोजक गमय्; गमय् ह्याचें तृतीयभूतकालाचें तृतीयपुरुषीं एकवचन अजीगमत् असें झालें पाहिजे; शिवाय गम् ह्याचें प्रयोजक रूप करण्याचें कारण नाहीं; कारण इंद्र स्वतः घरीं जातो, घरीं जाण्याला तो कोणाला लावीत नाहीं. अजगन्तन ह्या शब्दाचा अर्थ दुर्ग देत नाहीं; तो म्हणतोः— मनुष्य घरांत शिरल्यावर दिसत नाहीं त्याप्रमाणें अस्ताला गेलेला सूर्यही दिसत नाहीं म्हणून हे आदित्य, तूं घरीं गेलास असें म्हटलें आहे. क्व स्य पुल्वघो मृगः हे शब्द भाष्यांत घालण्याचें कारण दिसत नाहीं. स्यः = सः. पुल्वघः = बह्वादी; बह्वादी बद्दल बह्वदी पाहिजे; बह्व अत्ति असौ बह्वदी. पुल्वघः ह्यांत पुरु हें पूर्वपद व घस् हें उत्तरपद ( दुर्ग ); पुरु + घस् = पुरुघः किंवा पुलुघः असें व्हावयास पाहिजे; पुल्वघः असें होणार नाहीं; पुरु + अघः अशीच फोड केली पाहिजे. बहु असौ अत्ति सर्वप्राणिषु अवस्थितः ( दुर्ग ) = सर्व प्राण्यांत असलेला सूर्य त्या प्राण्यांत असलेलें सर्व अन्न खाऊन टाकतो; कारण सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ( १।११५।१ ) असें म्हटलें आहे. मृज् = जाणें ह्यापासून मृग; मृज् चा जाणें हा अर्थ धातुपाठांत व आपट्यांच्या कोशांत नाहीं. आदित्य सारखा जात असतो म्हणून तो मृग. अगन् = अगमत्. अस्तानंतर आदित्य कोणत्या देशाला गेला आहे असें विस्मयानें लोक एकमेकाला विचारतात. जनयोपनः = जनमोहनः ( दुर्ग ) = अस्तानंतर आदित्य कोठें गेला हें समजत नसल्याकारणानें लोकांना गोंधळविणारा; युप विमोहने ( धा० ४।१२९ ); जनान् योपयति असौ जनयोपनः. विश्वस्मात् = सर्वस्मात्. यः व तम् एतत् ब्रूमः आदित्यं हे शब्द अध्याहृत.

दुर्गानें केलेला अर्थः— हे वृषाकपि इंद्रा म्हणजे आदित्या, जेव्हां ( यत् ) द्युलोकीं असणारा तूं सर्व भुवनांभोंवतीं हिंडून ( उदञ्चः ) घरीं म्हणजे अस्ताला जातोस तेव्हां लोक विस्मयानें विचारतात कीं सर्व प्राण्यांत असणारा व त्याच्यांत अस-

लेलें अन्न खाणारा (पुल्वघः) व लोकांना गोंधळविणारा (जनयोपनः) गतिमान् (मृगः) तो आदित्य कोणत्या देशाला गेला आहे? सर्वांहून श्रेष्ठ जो इंद्र म्हणजे आदित्य त्याला आम्हीं म्हणतो (कीं तूं अस्तास गेलास म्हणजे सर्व लोक गोंधळतात व आदित्य कोठें गेला म्हणून विस्मयानें एकमेकाला विचारावयाला लागतात).

सायणः— घरीं जाऊन परत आलेल्या वृषाकपीला इंद्र विचारतो; हे परमैश्वर्यवान् (इंद्र) वृषाकपि, तुम्ही बाहेर गेले असतांना (उदञ्चः = उद्गामिनः) माझ्या घरीं आला आहांत; वृषाकपीसंबंधानें तुम्ही आलांत हा बहुवचनीं प्रयोग त्याच्याविषयीं आदर दाखविण्याकरितां आहे; तुमचा संबंधी व पृथिवीवरील जलादिरस खाणारा तो मृग म्हणजे आदित्य कोठें आहे? लोकांना गोंधळविणारा (जनयोपनः = जनानां मोहयिता) तो कोणत्या देशाला गेला आहे? तो मी इंद्र सर्वांहून श्रेष्ठ आहें; पण इंद्राणी ही बोलणारी असल्यास ऋचेचा अर्थ यास्कानें केल्याप्रमाणें.

उदङ् = उत्तरेकडचा; सोदञ्चं सिन्धुम् अरिणात् महित्वा (२।१५।६) = इंद्र उत्तरेकडील नदीला स्वबलानें मोकळी करता झाला. अप प्राचः इन्द्र विश्वान् अमित्रान् अपापाचो अभिभूते नुदस्व। अपोदीचो अप शूराधराचः (१०।१३१।१); प्राचः = पूर्वेकडच्या; अपाचः = पश्चिमेकडच्या; उदीचः = उत्तेरेकडच्या; अधराचः = दक्षिणेकडच्या. गन् अभ्यासानें जगन्; अ + जगन् + त किंवा तन = अजगन्त किंवा अजगन्तन. त्री यच्छता महिषाणाम् अघः (५।२९।८) व सहस्रं महिषान् अघः (८।१२।८) एथें अघः = तूं मारले आहेस. पुरुन् पुरून् अघः पुल्वघः = ज्यानें पुष्कळ पशु मारले आहेत असा. मृगः = वाघ सिंह ह्यांच्या सारखा हिंस्र पशु. नकिर्देवा मिनीमसि नकिरा योपयामसि (१०।१३४।७) = हे देवांनो, आम्ही कधींही तुमची आज्ञा मोडीत नाहीं; मिनीमसि = आयोपयामसि = मोडतों. अचित्ती यत्तव धर्मा युयोपिम (७।८९।५) = हे वरुणा, ज्या अर्थीं तुझे धर्म आम्ही अविचारानें मोडीत आहोंत. संयोपयन्तो दुरितानि विश्वा (१०।१६५।५)= सर्व संकटें नाहींशीं करणारे. जनान् योपयति असौ जनयोपनः = पंचजनांचा नाश करणारा; इंद्राला जनभक्षः जनंसहः (२।२१।३) असें म्हटलें आहे; पंचजन हे इंद्राचे शत्रु होते; ते त्याच्याशीं व त्याच्या अनुयायांशीं शेवटपर्यंत लढले व शेवटीं हार गेले. वृषाकपि हाच मृग म्हणजे सिंह किंवा वाघ; त्यानें आजपर्यंत पुष्कळांना ठार केलें आहे म्हणून तो पुल्वघः. वृषाकपीला हरितो मृगः (१०।८६।३) म्हटलें आहे. क स्य पुल्वघो मृगः = ज्या हिंस्रपशूनें पुष्कळ जनावरांना मारलें आहे तो वृषाकपि कोठें आहे? कम् अगन् जनयोपनः = पंचजनांचा बीमोड करणारा इंद्र कोणत्या यजमानाकडे गेला आहे? कदाचित् उत्तरेकडील लोक वृषाकपि व इंद्र ह्या दोघांच्या शोधाला आले असतील; हे वृषाकपि, हे इंद्रा, ज्या अर्थीं उत्तरेकडचे लोक (उदञ्चः) तुमच्या घरीं आले आहेत (अजगन्तन) त्या अर्थीं त्यांचें स्वागत करण्याकरितां बाहेर

या; पण दोघांपैकीं एकही बाहेर येत नाहीं असें पाहून वृषाकपि कोठें आहे व इंद्र कोठें गेला आहे असें विस्मयानें लोक म्हणाले असतील.

पुढील ऋचेंत सूर्यकिरणांची अतिस्तुति आहे.

## खंड ४ था.

**वि हि सोतोरसृक्षत नेन्द्रं देवममंसत। यत्रामदद्वृषाकपिरर्यः पुष्टेषु मत्सखा विश्वस्मादिन्द्र उत्तरः ( ऋ० सं० १०।८६।१ )**

**व्यसृक्षत हि प्रसवाय। न च इन्द्रं देवम् अमंसत। यत्र अमाद्यत् वृषाकपिः अर्यः ईश्वरः पुष्टेषु पोषेषु। मत्सखा मम सखा। मदनसखा। ये नः सखायः तैः सह इति वा। सर्वस्मात् यः इन्द्रः उत्तरः तम् एतत् ब्रूमः आदित्यम्**

सोतोः = प्रसवाय; सोतोः = सर्वभूतप्रसवाय = अभ्यनुज्ञानाय तत्प्रकाशित-लोकस्य सर्वकर्मोपपत्तेः ( दुर्ग ) = सर्व लोकांना आपआपलीं कामें करण्याची परवानगी देण्याकरितां; सूर्यानें जग प्रकाशित केल्यावर सर्व कर्मे अस्तित्वांत येतात; षु प्रसवैश्वर्ययोः ( धा० २।३१ ); प्रसवः = अभ्यनुज्ञानं = परवानगी. न नंतरचा च अध्याहृत. अमदत् = अमाद्यत् ; अर्यः = ईश्वरः; हे चारही शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. पुष्टेषु = पोषेषु; पुष्टेषु = रश्मिपोषं पुष्यति पुष्टेषु एकीभूतेषु ( दुर्ग ) = मध्याह्न-काळीं जेव्हां सूर्य आपल्या सर्व किरणांची वृद्धि करतो त्या वेळीं सर्व किरण पुष्ट म्हणजे एकत्र झाले असतांना; भरदुपारीं सूर्याचे सर्व किरण एकाला एक लागून प्रकाशतात; भाष्यांत पुष्टेषु शब्द नको. मत्सखा = मम सखा = मी जो मंत्रदृष्टा त्या माझा मित्र आदित्य; किंवा आदित्य माझा मित्र माझा मित्र असें सर्वजण समजतात म्हणून आदित्य मत्सखा; किंवा मत्सखा = मदनसखा = हर्षसखा ( दुर्ग ) = हर्ष आहे मित्र ज्याचा म्हणजे सर्वांना हर्षविणारा; किंवा मत्सखा = ये नः सखायः तैः सह = आमचे मित्र जे किरण त्यांसह असणारा. विश्वस्मात् वगैरे (पान १०५५).

दुर्गानें केलेला अर्थः—सर्वांना आपआपलीं कामें करण्याची परवानगी देण्याकरितां ( सोतोः ) आदित्य आपले किरण सर्वत्र पाठविता झाला ( वि + असृक्षत ); तथापि ज्यानें त्यांना प्रकाशित केले ते किरणच आम्ही स्वयंप्रकाश आहोंत अशा अभिमानानें त्या आदित्यदेवाला जुमानीत नाहींसे झाले ( न अमंसत ); सर्वसत्ताधीश ( अर्यः ), माझा मित्र किंवा सर्वांचा मित्र किंवा सदा आनंद देणारा किंवा किरण आहेत मित्र ज्याचे असा ( मत्सखा ) आदित्य ( वृषाकपिः ) त्याचे सर्व रश्मि पुष्ट म्हणजे प्रकाशमान झाले असतांना हर्षयुक्त जेव्हां झाला ( त्यावेळीं किरण त्याला जुमानीत नाहींसे झाले ).

**सायणः—**सोतोः व्यसृक्षत = सोमाभिषवं कर्तुं यागं प्रति मया विसृष्टाः अनुज्ञाताः स्तोतारः वृषाकपेः यष्टारः = वृषाकपीनें नेमलेल्या स्तोत्यांना व याजकांना

सोमरस काढण्याकरितां यज्ञगृहाकडे मीं पाठविलें असें इंद्र म्हणतो; हि निरर्थक; न इन्द्रं देवम् अमंसत = स्तुति करा म्हणून मीं सांगितलें असतांनाही मी जो इंद्रदेव त्या माझी स्तुति त्यांनीं केली नाहीं; उलट माझा मुलगा जो वृषाकपि त्याचीच त्यांनीं स्तुति केली; यत्र येषु पुष्टेषु सोमेन प्रवृद्धेषु यागेषु अर्यः स्वामी वृषाकपिः मम पुत्रः मत्सखा मम सखीभूतः सन् अमदत् सोमपानेन हृष्टः अभूत् = सोमरसानें पुष्ट म्हणजे ज्यांत भरपूर सोमरस आहे अशा यागांत माझा पुत्र, माझा मित्र, सत्ताधीश वृषाकपि सोम पिऊन हृष्ट झाला.

त इद्वेदिं सुभग त आहुतिं ते सोतुं चक्रिरे दिवि ( ८।१९।१८ ) = हे अग्नि, (जे तुझ्यावर आपल्या सर्व इच्छांचा भार टाकतात) तेच द्युलोकांतील देवांना (दिवि) सोमहवि ( वेदिं = आहुतिं = सोतुं ) देतात ( चक्रिरे ); सु = सोमरस काढणें; सु + तुः = सोमरस. सोतुः = सोतोः धाराः = सोमरसाच्या धारा; अशा धारा गाळण्यांतून ( वि ) वाहूं लागल्या ( असृक्षत ); सोमरस देवांना पिण्याकरितां गाळण्यांतून सारखा वहात होता. मधोर्धाराः असृक्षत (९।१०६।१४)=मधुर सोमाच्या धारा वहात आहेत ( असृक्षत ). पवमानस्य० सर्गाः असृक्षत (९।६६।१०)=सोमाचे प्रवाह ( सर्गाः ) वहात आहेत. पुष्ट = ( १ ) शक्ति, ( २ ) धष्टपुष्ट किंवा निरोगी, ( ३ ) धष्टपुष्ट जनावर, ( ४ ) उत्कृष्ट भाग, सार. ( १ ) तदस्येदं पश्यता भूरि पुष्टं श्रदिंद्रस्य धत्तन वीर्याय ( १।१०३।५ ) = ह्या इंद्राचे मोठे ( भूरि ) बल ( पुष्टं ) पहा; त्याला त्याच्या वीर्याबद्दल हवि द्या; पुष्टं = बल. ( २ ) यथा शम् असत् द्विपदे चतुष्पदे विश्वं पुष्टं ग्रामे अस्मिन् अनातुरम् ( १।११४।१ ) = (रुद्राची स्तुति करा) जेणेंकरून ह्या गावांतील द्विपाद् व चतुष्पाद् प्राण्यांना आरोग्य ( शं ) लाभेल ( असत् ) व सर्वजण रोगरहित (अनातुरं) व धष्टपुष्ट (पुष्टं) होतील. (३) यो जिगीवान् लक्षमादत् अर्यः पुष्टानि ( २।१२।४ ) = शत्रूला जिंकणारा जो इंद्र शत्रूची ( अर्यः ) धष्टपुष्ट (पुष्टानि) जनावरें खाता झाला ( आदत् ). ( ४ ) यवंयवं नो अन्धसा पुष्टम्पुष्टं परि स्रव ( ९।५५।१ ) = हे सोमा, गाळण्यांतून ( परि ) सोमरसाचा ( अन्धसा ) उत्कृष्ट भाग ( यवंयवं = पुष्टम्पुष्टं ) खालीं सोड ( स्रव ). पुष्टेषु = उत्कृष्ट सोमरसामध्यें. अमदत् = पीत होता; संवर्ते अमदो यथा कृशे एवास्मे इंद्र मत्स्व ( ८।५४।२ ) = हे इंद्रा, संवर्त व कृश ह्यांच्या एथें तूं जसा सोम पीत होतास तसा ( एवा ) आमच्या एथें ( अस्मे) सोम पी ( मत्स्व ).

ऋचेचा अर्थ :— गाळण्यांतून सोमाचे ( सोतोः ) प्रवाह वहात होते; तथापि जेथें समर्थ असा ( अर्यः ) माझा मित्र ( मत्सखा ) वृषा कपि उत्कृष्ट सोमरसानें भरलेल्या भांड्यांच्यामध्यें ( पुष्टेषु ) बसून सोम पीत होता ( अमदत् ) त्या ठिकाणीं मी जो सगळ्यांत मोठा देव त्या मला इंद्राला कोणीही मान दिला नाहीं ( न अमंसत ). सर्वांनीं माझ्याकडे दुर्लक्ष केल्यामुळें मला सोम प्यावयास मिळाला नाहीं म्हणून मी रागानें वरीं निघून आलों आहें असें इंद्र इंद्राणीला

म्हणतो. हा अर्थ ह्िच्या पुढच्या ऋचेवरून स्पष्ट होतो; ती ऋचा अशीः— परा हि इंद्र धावसि वृषाकपेः अति व्यथिः। नो अह: प्र विन्दसि अन्यत्र सोमपीतये ( १०।८६।२ ) = हे इंद्रा, वृषाकपीच्या एथून ( वृषाकपे: ) अतिश्रांत ( अति व्यथिः ) असा तूं परत धांवत धांवत येत आहेस; दुसऱ्या ठिकाणीं सोम पिण्याला तुला एकादा दिवसही मिळत नाहीं; सदोदित तूं वृषाकपिच्याच घरीं सोम पीत असतोस; पण आज बरी झाली तुझी निराशा असें इंद्राणी इंद्राला विनोदानें म्हणते.

**अथ एषा अश्विनोः**

पुढील ऋचेंत अश्विनांची अतिस्तुति आहे. अथ एषा अश्विनोः बद्दल दुर्गवृत्तींत अथ एषा वाचः प्रवह्लितेव असे शब्द आहेत; हल्लींच्या निरुक्तांत अथ एषा वाचः प्रवह्लितेव हे शब्द आठव्या खंडाच्या शेवटीं आहेत; खंड ५ ते ८ ह्यांवर दुर्गवृत्ति नाहीं; ते चारही खंड प्रक्षिप्त होत.

## खंड ५ वा.

**सृण्येव जर्भरी तुर्फरीतू नैतोशेव तुर्फरी पर्फरीका। उदन्यजेव जेमना मदेरू ता मे जराय्वजरं मरायु ( ऋ० सं० १०।१०६।६ )**

**सृण्येव इति। द्विविधा सृणिः भवति। भर्ता च हन्ता च। तथा अश्विनौ च अपि भर्तारौ। जर्भरी भर्तारौ इत्यर्थः। तुर्फरीतू हन्तारौ। नैतोशेव तुर्फरी पर्फरीका। नितोशस्य अपत्यं नैतोशम्। नैतोशा इव तुर्फरी क्षिप्रहन्तारौ। उदन्यजेव जेमना मदेरू। उदन्यजा इव इति उदकजे इव रत्ने। सामुद्रे चान्द्रमसे वा। जेमने जयमने जेमना। मदेरू। ता मे जराय्वजरं मरायु। एतत् जरायुजं शरीरं शारदम् अजीर्णम्**

भाष्यांत सृण्येव ह्याच्याबद्दल सृण्यौ असें पाहिजे. सृणि दोन प्रकारची असते; एक पोषण करणारी ( भर्ता ) व दुसरी मारणारी ( हन्ता ); सृणि शब्द स्त्रीलिङ्गी असल्याकारणानें भर्त्री व हन्त्री अशीं रूपें पाहिजेत; भर्त्री = उभें धान्य कापणारी ? हन्त्री = मस्त झालेल्या हत्तीला टोचणारी; अशा दोन अंकुशांप्रमाणें अश्विन पोषण करतात. जर्भरी = भर्तारौ = पोषण करणारे. तुर्फरीतू = हन्तारौ. नितोशाचें अपत्य नैतोश; नैतोशं बद्दल नैतोशः पाहिजे; तुर्फरी = क्षिप्रहन्तारौ. उदन्यजेव = उदन्यजा इव = उदकजे इव रत्ने; हीं दोन रत्नें समुद्रांतील असतील ( सामुद्रे ) किंवा चंद्रांतील असतील ( चांद्रमसे ); चंद्रमसि भवं चांद्रमसम्; किंवा जें रत्न चंद्रकिरणांच्या स्पर्शानें पाझरतें तें रत्न चांद्रमस. जेमने = जयमने; जयमने हें जयमनसौ असें पाहिजे; ह्यानंतर जेमना शब्द कां घातला ? जरायु = जरायुजं शरीरम्. शारदं हा कशाचा पर्याय ? अजरं = अजीर्णं = जीर्ण न झालेलें. द्विविधा सृणिर्भवति। भर्ता च हन्ता च। तथा अश्विनौ च अपि भर्तारौ। जर्भरी भर्तारौ इत्यर्थः। तुर्फरीतू हन्तारौ एवढेंच यास्कभाष्य सायणाचार्य देतात.

सायणः— सृण्येव = सृण्यौ इव; सृणि म्हणजे अंकुश; सृण्यौ अंकुशार्हौ मत्तगजौ = ज्यांच्या गंडस्थळांना अंकुशानें टोचलें पाहिजे असे मत्त झालेले दोन हत्ती; जर्भरी = गात्रविनामं कुर्वन्तौ = बसणाऱ्याकरितां शरीर नमविणारे; जृभि गात्रविनामे ( धा० १।३८८ ); किंवा सृणि दोन प्रकारची असते; एक मत्त गजाला जागच्याजागीं थांबवून ठेवणारी व दुसरी त्याला जागें करणारी; अशा दोन अंकुशांप्रमाणें ( सृण्यौ इव ); जर्भरी = एकत्र एव अवस्थापकौ = एकाच ठिकाणीं थोपवून ठेवणारे; तुर्फरीतू = तर्फितारौ = शत्रूणां हन्तारौ; तृफ तृंफ हिंसायाम्; जो ठार मारतो ( नितोशयति ) तो नितोश; नितोशाचा मुलगा नैतोश; अशा दोन पुत्रांप्रमाणें शत्रूंना मारणारे ( तुर्फरी ); पर्फरीका = पर्फरीकौ = शत्रूणां विदारयितारौ; किंवा स्तोतृजनानां धनादिदानेन पूरयितारौ; पॄ पालनपूरणयोः ( धा० ३।४ ) ह्यापासून किंवा फर्व ( = पूर्ण करणें ) ह्यापासून पर्फरीका; उदकांत असणारें तें उदन्य; उदन्यांत जन्मलेलें रत्न तें उदन्यज; अशा दोन रत्नांप्रमाणें ( उदन्यजे इव ) निर्मल म्हणजे कांतियुक्त; जेमना = जयशीलौ = नेहमीं जिंकणारे; मदेरू = बलातिशयेन मत्तौ स्तुत्यौ वा; अशा गुणांनीं युक्त अश्विनहो, तुम्ही जरायूपासून उत्पन्न झालेले ( जरायु = जरायुजं ) आणि म्हणूनच मृत्युवश (मरायु = मरणशीलं) असें माझें शरीर जरारहित ( अजरं ) व मरणरहित करा.

तन्त्रवार्तिकः—म्हातारपण व मरण आपणास न यावें म्हणून भूतांशनांवाचा ऋषि प्रस्तुत सूक्तांत अश्विनांची स्तुति करता झाला; अंकुश हत्तीला हलविण्यास म्हणजे चालवयास लावतो म्हणून ( सरणसाधनत्वात् ) तो सृणि; ज्यांच्यावर अंकुशांचा प्रयोग करावा लागतो ते सृण्यौ म्हणजे दोन हत्ती; जर्भरी=जृम्भमाणौ=शरीर ताणणारे म्हणजे अष्टांगप्रहरणव्यापृतौ = आपल्या आठ अंगांनीं किल्यांच्या तटावर प्रहार करणारे; हत्ती किल्याचे दरवाजे, तट वगैरे आपल्या शरीराच्या भारानें पाडून टाकतात; तुर्फरीतू = हिंसन्तौ; नैतोशौ = ठार मारणारे योद्धे; नितोश् = ठार मारणें; तुर्फरी = त्वरमाणौ हिंसकौ वा; पर्फरीका = शोभायुक्तौ; उदन्य् = तृषाक्रांत होणें; उदन्यजौ = तृषाक्रांत दोन चातक; जेमनौ = उदकवन्तौ; उदक मिळाल्यानें चातक जसे हर्षयुक्त होतात (मदेरू) त्याप्रमाणें हर्षयुक्त झालेले अश्विन; जरायु = जरेला पात्र; मरायु = मरणाला पात्र; ते अश्विन माझें शरीर अजर म्हणजे अमर करोत; ऋचेचा अर्थः—जसे अंकुशानें टोचलेले पुढें जाणारे दोन हत्ती जिकडे तिकडे जाऊन शत्रूचा नाश करतात व हिंसा करण्यांत गुंततात त्याप्रमाणें अश्विनही अशा कृति करतात व तशा कृतींनीं शोभिवंत दिसतात ( पर्फरीका ); उदक मिळाल्यानें चातक जसे हर्ष पावतात तसे अश्विन सोम मिळाल्यानें हर्ष पावतात ( मदेरू ); जरा व मरण ह्यांच्यावर संतापलेले किंवा अजरत्व आणि अमरत्व ह्यांच्यावर प्रेम करणारे ( जरायु मरायु ) ते अश्विन माझें शरीर अजर म्हणजे अमर करोत.

२।३९ व १०।१०६ ह्या सूक्तांत अश्विन हे दोन असल्यामुळें त्यांची हव्या

त्या दोन वस्तूंशीं अनेकदां तुलना केली आहे; ह्या दोन सूक्तांपैकीं पहिलींतल्या उपमा बऱ्याच सुबोध आहेत; पण दुसरींतल्या उपमांचा अर्थ करणें अगदीं अशक्य आहे. प्रस्तुत ऋचेंत बहुतेक शब्द दुर्बोध आहेत; त्यांचा अर्थ ठरवितां येत नसल्यामुळें ऋचेचा अर्थ करणें ही व्यर्थ खटपट होय. सृणिः = अंकुशः ( अमर २।८।४२ ); त्याचा सृण्य ह्याच्याशीं संबंध आहे कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं. वि यो ररप्शे ऋषिभिः नवेभिः वृक्षो न पक्वः सृण्यो न जेता (४।२०।५); एथें इंद्राची पक्व वृक्ष व सृण्य जेता ह्यांच्याशीं तुलना केली आहे; सृण्यः ह्याचा आयुधवान् असा कीं धनवान् असा अर्थ ? योध्याच्या हातांत आयुध असतें व जेता धन जिंकतो; जसे लोक पिकलेल्या फळांकरितां वृक्षाकडे किंवा धनाकरितां धनवान् जेत्याकडे जातात तसे स्तोते इंद्राकडे धनासाठींच जात असतील; सृ = नी = देणें; सृणीः = अतिशय धन; सृण्यः = अतिशय धनवान्. भृ ह्याचीं अभ्यासानें जभृ व जर्भृ अशीं दोन रूपें होतात; जर्भरिः = सारखा देणारा; अश्विन हे दोन जेत्यांप्रमाणें ( सृण्यौ इव ) अतिशय धन देणारे ( जर्भरी ) आहेत. तुर्फरीतू, तुर्फरी, पर्फरीका व आठव्या ऋचेंतला फारिवारं ह्या शब्दांत फृ किंवा फर् असा धातु असावा; पण तसा धातु ऋग्वेदांत नाहीं; भृ धातूचें फृ हें रूपांतर समजल्यास फारि = देण्याजोगें असा अर्थ होईल. फर् किंवा फृ अभ्यासानें पर्फर् किंवा पर्फृ; पर्फर् + ईकः = पर्फरीकः = देणारा; पर्फरीका = पर्फरीकौ. गातु, क्रतु ह्या शब्दांप्रमाणें फरीतु असें फर् पासून नाम होईल; तुर् = फर् = देणें; तुर्पासून तुर ( = दाता ) हा शब्द दाता ह्या अर्थी ऋग्वेदांत आहे; तुर्फरीतू = दाते. तोश् किंवा नि + तोश् = देणें; पवमान नि तोशसे रयिं सोम श्रवाय्यम् (९।६३।२६) = हे सोमा, तूं पुष्कळ ( श्रवाय्यं ) धन देतोस (नि तोशसे). इंदुरिन्द्राय तोषते (९।१०९।२२) = सोम इंद्राला दिला जातो. तोश् ह्या धातूपासून तोश व नितोशन अशीं नामें ऋग्वेदांत आहेत. जें दिलें जातें तें नितोश; नितोश आहे ज्यांच्याजवळ ते नैतोश; नैतोशेव = नैतोशौ इव = दोन दात्यांप्रमाणें. उदन् यजति असौ उदन्यजः = ( १ ) उदक देणारा, ( २ ) धन देणारा; उदन्यजौ इव = दोन धनदात्यांप्रमाणें; उदन् ह्याचा लक्ष्यार्थ धन. मनं = धन; आ नो भर व्यञ्जनं गामश्वमभ्यञ्जनम्। सचा मना हिरण्यया ( ८।७८।२ ) = हे इंद्रा, दाता ( सचा ) तूं आपल्या सुवर्णमय ( हिरण्यया = हिरण्ययेन ) धनांतून ( मना = मनेन ) आम्हांला धन ( व्यञ्जनं = गां = अश्वं = अभ्यञ्जनं ) दे ( आ भर ). जि = जिंकणें, जिंकून धन मिळविणें; जि ह्याला गुण होऊन जे = धन; जे धने मनं धनं यस्य सः जेमनः = धनवान्; जेमना = जेमनौ. मदे धने रुवति ददाति असौ मदेरुः; मदेरू = धनदाते. एहि स्तोमान् अभि स्वर अभि गृणीहि आ रुव ( १।१०।४ ) = ( १ ) हे इंद्रा, ये ( एहि ); आमच्या स्तोमांचा स्वीकार कर ( अभि स्वर = अभि गृणीहि = आ रुव ); ( २ ) हे धनवंता, आम्हांस धन दे; अभि स्वर = अभि गृणीहि = आ रुव = दे; गृ धातूचा दे हा अर्थ ऋग्वेदांत आहे तेव्हां स्वृ व रु ह्यांचाही दे असा

अर्थ असावा. अश्विन हे दोन प्रसिद्ध दात्यांप्रमाणें (उदन्यजौ इव) धनवान् (जेमना = जेमनौ) असून धनदाते आहेत (मदेरू). जरा = धन (पान ७५५). यु = देणें, दान, धन; जरया युक्तं यु धनं यस्मिन् तत् जरायु = धनानें भरलेलें. यस्येक्ष्वाकुरुप व्रते रेवान् मरायी एधते (१०।६०।४) = ज्याच्या आज्ञेंत (व्रते) असणारा इक्ष्वाकु धनवान् (रेवान्) व धनदाता (मरायी) होतो (उप + एधते); मरायते असौ मरायी = धनदाता; मरा याचा धन असा अर्थ असावा. मरायु = जरायु = अतिशय. न जरा विद्यते अस्य तत् अजरं = कधींही क्षीण न होणारे. असे ते तुम्ही (ता = तौ) आम्हांला (नः) अतिशय (जरायु = मरायु = अजरं) धन द्या.

ही ऋचा व ह्याच सूक्तांतील इतर ऋचा कूटासारख्या आहेत; त्या तशा मुद्दाम रचल्या असाव्यात; त्या ज्या काळीं रचल्या त्या काळीं त्यांचा अर्थ विद्वानांना कळला असेल; नंतर बराच काळ गेल्यावर त्या अगदीं दुर्बोध झाल्या असल्याच पाहिजेत; त्यांचा अर्थ करण्याची कितीही खटपट केली तरी यश कदापि येणार नाहीं व खरा अर्थ कधींही कळणार नाहीं.

## खंड ६ वा.

**तरत्स मन्दी धावति धारा सुतस्यान्धसः । तरत्स मन्दी धावति (ऋ० सं० ९।५८।१)**

**तरति स पापं सर्वं मन्दी यः स्तौति । धावति गच्छति उर्ध्वां गतिम् । धारा सुतस्यान्धसः । धारया अभिषुतस्य अन्धसः । धारया अभिषुतस्य सोमस्य मन्त्रपूतस्य वाचा स्तुतस्य । अथ एषा यज्ञस्य**

तरत् = तरति सः पापं सर्वं = तो सर्व पापें तरून जातो; तो कोण ? मन्दी; मन्दी = यः स्तौति = जो स्तुति करतो तो; जो स्तुति करतो तो सर्व पापें तरून जातो. मदि स्तुतौ (धा० १।१३). धावति = गच्छति उर्ध्वां गतिं = ऊर्ध्वगतीला जातो म्हणजे मोक्ष पावतो. धारा सुतस्यान्धसः = धारया अभिषुतस्य अन्धसः = धारया अभिषुतस्य सोमस्य = धारेनें काढलेल्या सोमाचो म्हणजे सोमरसानें मिळवून दिलेली. मन्त्रपूतस्य वाचा स्तुतस्य हे शब्द अध्याहृत असावेत; मंत्रांनीं शुद्ध केलेल्या व स्तुतींनें स्तविलेल्या असा त्या शब्दांचा अर्थ. धारेनें काढलेला सोमरस मंत्रांनीं शुद्ध होतो व स्तुतींनीं त्याची स्तुति केली जाते; असा सोम देवांना दिल्यानें स्तोता एकदम पापमुक्त होऊन मोक्ष मिळवितो.

**सायण:—** देवांना हर्ष देणारा (मन्दी) सोम स्तोत्यांना पापापासून तारून (तरत् = तारयन्) शुद्ध होत आहे (धावति = पवते); देवांचें अन्न जो सोमरस त्याची (सुतस्य अन्धसः) धारा शुद्ध होत आहे; तरत् स मन्दी धावति ही पुनरुक्ति सोमाविषयीं अत्यादर दाखविते; हा अर्थ किंवा यास्कानें दिलेला अर्थ घ्यावा असें म्हणून यास्कभाष्य दिलें आहे.

मन्दति मादयति असौ मन्दी = प्यायल्यानें मद किंवा उत्साह उत्पन्न करणारा; मन्दन्तु त्वा मन्दिनो वायविन्दवः ( १।१३४।२ ) = हे वायु, मद किंवा उत्साह उत्पन्न करणारा हा सोम तुझ्यांत मद किंवा उत्साह उत्पन्न करो. मन्दन्तु त्वा मघवन् इन्द्र इंदवो राधोदेयाय सुन्वते ( ८।४।४ ) = हे इंद्रा, सोमहवि देणाऱ्याला धन देण्याकरितां ( राधोदेयाय ) हा सोमरस तुझ्यांत उत्साह उत्पन्न करो. तरत् समुद्रं पवमान ऊर्मिणा ( ९।१०७।१५ ) = शुद्ध होणारा सोम आपल्या प्रवाहानें समुद्र तरतो म्हणजे सोमरस पाण्यांत मिसळला जातो. ऋचेचा अर्थः— उत्साह उत्पन्न करणारा तो सोम गाळणें तरून जात आहे; सोमरसाची धारा धांवत आहे. कदाचित् धारा = धारया असा अर्थ असेल; काढलेल्या रसाच्या धारेनें उत्साह उत्पन्न करणारा हा सोम गाळणें तरून जात आहे व प्रवाहानें ( धारा = धारया ) धांवत आहे म्हणजे वहात आहे; तरत्स मन्दी धावति या पुनरुक्तीनें सोम तयार झाला आहे, सोम तयार झाला आहे, क्षणाचा विलंब न करितां सोम प्यावयाला या असा देवांना आग्रह केला आहे. अथ एषा यज्ञस्य = आतां पुढील ऋचेंत यज्ञाची अतिस्तुति आहे.

## खंड ७ वा.

**चत्वारि शृङ्गा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य । त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्याँ आ विवेश ( ऋ० सं० ४।५८।३ )**

**चत्वारि शृङ्गेति वेदाः वै एते उक्ताः । त्रयः अस्य पादाः इति सवनानि त्रीणि । द्वे शीर्षे प्रायणीयोदयनीये । सप्त हस्तासः सप्त छन्दांसि । त्रिधा बद्धः त्रेधा बद्धः मन्त्रब्राह्मणकल्पैः । वृषभो रोरवीति । रोरवणम् अस्य सवनक्रमेण ऋग्भिः यजुर्भिः सामभिः । यत् एनम् ऋग्भिः शंसन्ति यजुर्भिः यजन्ति सामभिः स्तुवन्ति । महो देव इति । एष हि महान् देवः यत् यज्ञः । मर्त्याँ आ विवेश इति । एष हि मनुष्यान् आविशति यजनाय । तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय**

चार ( चत्वारि ) शिंगें ( शृङ्गा ) ह्या शब्दांनीं चार वेद उक्त होत; यज्ञांत चारही वेदांचा उपयोग करावा लागतो. ह्याचे तीन पाय म्हणजे यज्ञांतील प्रातःसवन, माध्यंदिन व तृतीयसवन अशीं तीन सवनें. प्रायणीय व उदयनीय हीं दोन डोकीं; सोमयागाला प्रायणीयानें आरंभ होऊन उदयनीयानें त्याची समाप्ति होते. सात हात म्हणजे सात छंद होत; यज्ञांत सात छंदांतील ऋचा म्हणावयाच्या असतात. त्रिधा = त्रेधा; त्रिधा ह्याचा त्रेधा पर्याय देण्याचें कारण दिसत नाहीं. मंत्र, ब्राह्मण व कल्पसूत्रें ह्यांनीं यज्ञ बद्ध असतो; यज्ञांत मंत्र, ब्राह्मणें व कल्पसूत्रें ह्यांचा वारंवार उपयोग करावा लागतो; कल्पसूत्रें यज्ञ कोणत्या क्रमानें करावा तें सांगतात; ब्राह्मणवाक्यांशिवाय मंत्रांची पूर्तता होत नाहीं. वृषभः रोरवीति = यज्ञरूपी वृषभ डुरकण्या फोडतो; हें डुरकणें ( रोरवणं ) सवनांच्या क्रमानें ऋचांनीं, यजुर्मंत्रांनीं व सामांनीं होतें; प्रातःसवनांत ऋचांचा उपयोग करावा लागतो, माध्यंदिनांत यजुर्मंत्रांचा व

तृतीयसवनांत सामांचा; कारण होते ऋचांनीं शस्त्रें म्हणतात (शंसन्ति), अध्वर्यु यजुर्मंत्रांनीं हवि देतात व उद्गाते सामांनीं यज्ञाची स्तुति करतात. महः= महान्; ज्याला यज्ञ म्हणतात तो महान् देव असून मनुष्यांमध्यें त्यांच्याकडून यज्ञ करविण्याकरितां शिरतो. हें विवरण कोणत्यातरी ब्राह्मणांतून घेतलें असावें; कारण त्यांतील भाषा व विवरण-पद्धति ब्राह्मणग्रंथांतल्या भाषेसारखी व पद्धतीसारखी आहे.

तैत्तिरीय आरण्यक(१०।१०)वरील सायणभाष्यः- शृङ्गा प्रणवस्य यानि अकारादीनि तानि चत्वारि=ओ३म् ह्या प्रणवाचीं अ,उ,अ व म् हीं जीं शिंगें(म्हणजे अवयव)तीं चार होत; प्रणवरूप ब्रह्माचे पाय तीन; पद्यते गम्यते ब्रह्मतत्वम् एभिः इति पादाः=प्रणवाच्या अवयवांना पाद म्हणण्याचें कारण त्या अवयवांच्या साहाय्यानें मनुष्य ब्रह्मतत्त्वाकडे जातो (पद्यते = गम्यते); अध्यात्मं विश्वतैजसप्राज्ञाः = आत्मपर विवरणांत विश्वात्मा, तैजस आत्मा व प्राज्ञात्मा असे ते तीन पाद होत; अधिदैवं विराड्हिरण्यगर्भाव्याकृतानि = देवतापर विवरणांत विराट्, हिरण्यगर्भ व अव्याकृत असे तीन पाद; अध्यात्म व अधिदैव ह्यांतील तीन पादांचा अर्थ कळत नाहीं; चित् व अचित् ह्या दोन शक्ति म्हणजे प्रणवब्रह्माचीं दोन डोकीं; सात लोक प्रणवब्रह्माचे सात हात; त्रिधा बद्धः म्हणजे अ, उ व म् ह्यांत असणारा विश्वात्मा, तैजस आत्मा व प्राज्ञात्मा ह्यांनीं किंवा विराट्, हिरण्यगर्भ व अव्याकृत ह्यांनीं बांधलेला; वृषभ म्हणजे महस्तेजोरूप ब्रह्मतत्व; रोरवीति = अतिशयेन प्रतिपादयति = तें ब्रह्मतत्त्व स्वतःचें रूप स्पष्टपणें प्रतिपादन करतें; हा महान् देव मर्त्यांत् शिरतो म्हणजे मनुष्य हा नखशिखांत ब्रह्मतत्त्वानें भरून गेला आहे असें ह्या ऋचेंत स्पष्ट प्रतिपादन केलें आहे. ह्या विवरणांतील बराचसा भाग चांगला कळत नाहीं.

**सायणः**— ह्या सूक्ताची अग्नि, सूर्य, जलदेवता, गायी, घृत ह्यांपैकीं कोणतीही एक देवता असेल; तथापि एथें ऋचेचें अग्निपर व सूर्यपर विवरण आम्ही करणार आहों; अग्नि म्हणजे यज्ञ; त्याचीं चार शिंगें म्हणजे चार वेद; तीन पाय म्हणजे तीन सवनें; पाय जसे चालण्याला उपयोगी पडतात त्याप्रमाणें तीन सवनें यज्ञ आरंभापासून समाप्तीप्रत नेण्याला उपयोगी पडतात म्हणून सवनें हे पाय; दोन डोकीं म्हणजे ब्रह्मौदन व प्रवर्ग्य; सात हात म्हणजे सात छंद; यज्ञाला जसे हात आवश्यक तसे देवतांना तृप्त करण्याला छंद आवश्यक म्हणून छंद हे हात; मंत्र, कल्प व ब्राह्मण ह्यांनीं यज्ञ बांधला असतो म्हणजे त्यांच्या साहाय्यानें तो अथपासून इतिपर्यंत अस्तित्वांत येतो; यज्ञ हा वृषभ म्हणजे कामनांचा वर्षाव करणारा; होता, अध्वर्यु व उद्गाता हे अनुक्रमें ऋचा, यजुर्मंत्र व सामें म्हणतात; हे जे तीन ध्वनि त्यांच्या तोंडांतून निघतात तेच यज्ञाचे ध्वनि; असा महान् यज्ञ मर्त्यांत शिरतो म्हणजे यजमानांकडून केला जातो; असा अग्निपर अर्थ; आतां सूर्यपर अर्थ; चार दिशा ह्या सूर्याचीं चार शिंगें; सूर्य ह्या दिशांचा आश्रय करतो (श्रयणार्थत्वात्) म्हणून दिशांना शृंग म्हटलें आहे; शृंग शब्दाची व्युत्पत्ति पहा (पान ९९); तीन वेदांच्या साहा-

ज्यानें सूर्य आकाशांत संचार करतो म्हणून ते त्याचे पाय; ऋग्भिः पूर्वाह्णे दिवि देव ईयते इति उपक्रम्य वेदैः अशून्यः त्रिभिः एति सूर्यः इति वेदत्रयेण गतिः आम्नाता ( तैत्ति० ब्रा० ३।१२।९।२ )= पूर्वाह्णकालीं ऋचांच्या साहाय्यानें द्युलोकीं देव संचार करतो असा आरंभ करून तीन वेदांनीं अशून्य म्हणजे सततयुक्त असा सूर्य प्रवास करतो अशी सूर्याची गति तीन वेदांवर अवलंबून आहे असें म्हटलें आहे; दिवस व रात्र हीं त्याचीं दोन डोकीं; सात किरण म्हणजे सात हात; किंवा सहा निरनिराळे ऋतु व सहा मिळून एक ऋतु असे सात हात असतील; पृथिवीवर अग्नि, अंतरिक्षांत वायु व द्युलोकीं सूर्य अशा तीन रूपांनीं बद्ध म्हणजे संबद्ध; किंवा ग्रीष्म, वर्षाकाल व हेमंत ह्या तीन ऋतूंनीं बांधलेला; पाऊस पाडणारा ( वृषभः ) सूर्य पाऊस पाडीत असतांना गर्जना करतो ( रोरवीति ); मनुष्यांच्या हालचालीचा नियंता सूर्य असल्याकारणानें तो त्यांच्यांत शिरतो असें म्हटलें आहे व सूर्य आत्मा जगतः तस्थुषश्च ( १।११५।१ ) अशी ऋचाही आहे; ऋचेचा व्याकरणपरही अर्थ करतात असें शेवटीं म्हटलें आहे; सूक्ताच्या इतर तीन देवता जलदेवता, गायी व घृत ह्यांच्यासंबंधानें ऋचेचें विवरण सायणाचार्यांनीं केलें असतें तर बरें झालें असतें.

महाभाष्यः— नामें, आख्यातें, उपसर्ग व निपात हीं चार शिंगें; भूतकाळ, भविष्यकाळ व वर्तमानकाळ हे तीन पाय; नित्य शब्द व उच्चारलेले म्हणजे कृत्रिम शब्द हीं दोन डोकीं; सात विभक्ति हे सात हात; तीन ठिकाणीं म्हणजे छातींत, कंठांत व शिरोभागीं बांधलेला म्हणजे ह्या तीन ठिकाणीं शब्दाची व्युत्पत्ति होते; शब्दब्रह्म हें वृषभ म्हणजे अर्थाचा वर्षाव करणारें; असें शब्दब्रह्म शब्द उच्चारतें ( रोरवीति ); शब्द हा महान् देव मनुष्यांमध्यें असतो.

शाबरभाष्य (१।२।४६) :– चतस्रः होत्राः शृङ्गाणि इव अस्य = चार आहुति (होत्राः?) ह्या यज्ञाचीं चार शृंगें;तीन पाय म्हणजे तीन सवनें;दोन डोकीं म्हणजे यजमान व त्याची पत्नी; सात छंद हे सात हात; त्रिधा बद्धः=त्रिभिः वेदैः बद्धः; वृषभः कामान् वर्षति इति = यज्ञ कामनांचा वर्षाव करतो म्हणून तो वृषभ; रोरवीति = शब्दं करोति; महो देवो मर्त्यान् आविवेश ह्या शब्दांनीं यज्ञ करण्याचा अधिकार मनुष्यांकडे आहे हें दर्शविलें जातें.

तन्त्रवार्तिक ( १।३।४६ ):— ह्या ऋचेंत आदित्य ह्या नांवानें अग्नीची स्तुति केली आहे; चार शिंगें म्हणजे दिवसाचे चार प्रहर; हिवाळा, उन्हाळा व पावसाळा हे तीन पाय; दक्षिणायन व उत्तरायण हीं दोन डोकीं; सप्त हस्ताः इति अश्वस्तुतिः=सात हात ह्यांनीं घोड्याचें वर्णन केलें आहे; अश्वमेधांतला घोडा सात हात लांब असला पाहिजे; तिहींनीं म्हणजे तीन सवनांनीं यज्ञ बांधला असतो; आदित्याला वृषभ म्हणण्याचें कारण तो पाऊस पाडतो ( वर्षहेतुत्वेन ); रोरवीति = मेघगर्जना करतो; आदित्य हा सर्व मनुष्यांत शिरून त्यांच्यांत उत्साह उत्पन्न करतो; अशी यागाची स्तुति रूपकानें ह्या ऋचेंत केली आहे व त्या रूपकानें यज्ञ करणाऱ्याला उत्साह येतो; अग्नि-

स्तुतिः ह्याबद्दल यज्ञस्तुतिः असा शब्द पाहिजे कारण ह्या विवरणांत अग्नीचा संबंध कोठेंही आला नाहीं. हीं सर्व विवरणें एक प्रकारच्या कोड्याच आहेत. ऋग्वेद हा पहिला वेद; त्याच्यांतून यजुर्वेद व सामवेद हे निर्माण केले गेले व फार काळ गेल्यावर अथर्ववेद अस्तित्वांत आला; ब्राह्मणें व कल्पसूत्रें हीं अगदीं अर्वाचीन होत; तेव्हां चार शिंगें म्हणजे चार वेद वगैरे कल्पना सूक्त रचणाऱ्याच्या मनांत नसाव्यात. चार शिंगांचा, तीन पायांचा, दोन डोक्यांचा, सात हातांचा व तीन ठिकाणीं बांधलेला असा बैल ओरडतो व माणसांत शिरतो ह्याचा कांहींतरी गूढार्थ निःसंशय असावा; पण त्या गूढार्थाचा तर्कसुद्धां करतां येत नाहीं. चार शिंगें, तीन पाय, दोन डोकीं व सात हात असें ज्वालांबद्दल म्हटलें असेल; ज्वाला शिंगांसारख्या, पायांसारख्या, डोक्यांसारख्या व हातांसारख्या दिसतील; ज्वाला दोन चार वगैरे हव्या तितक्या असतील; अग्नि रानांत भडकला म्हणजे कडकडाट करतो; असा अग्नि मर्त्यांत शिरतो म्हणजे मातरिश्व्यानें मनुष्यांना दिलेला अग्नि मनुष्य प्रज्वलित करतात; असा अग्नि त्रिधा बद्धः म्हणजे तीन लोकांत म्हणजे द्युलोकीं, अंतरिक्षांत व पृथिवीवर असणारा असा असेल. रुवति भीमो वृषभः तविष्यया शृङ्गे शिशानो हरिणी विचक्षणः ( ९।७०।७ ) = सोनेरी ( हरिणी ) शिंगें ( शृंगे ) जोरानें ( तविष्यया ) पाजविणारा ( शिशानः ) सर्वत्र नजर टाकणारा ( विचक्षणः ) भयंकर ( भीमः ) बैल ( वृषभः ) डुरकण्या फोडीत आहे ( रुवति ) असें सोमाविषयीं म्हटलें आहे; तेव्हां प्रस्तुत ऋचेंत वृषभ म्हणजे सोम असेल. इंद्रांत शीर असें सोमाला अनेक वेळां म्हटलें आहे; इंद्रमिन्दो वृषा विश ( १।१७६।१ ) = ( १ ) हे सोमा, बैल ( वृषा ) तूं इंद्रांत शीर ( आ विश ); ( २ ) हे दात्या ( इन्दो ), धन देणारा ( वृषा ) तूं धन (इन्द्रं) दे ( आ विश ). इन्द्रमा विश बृहता रवेण ( ९।९७।६ ) = ( १ ) हे सोमा, मोठी ( बृहता ) गर्जना करून ( रवेण ) इंद्राच्या पोटांत शीर; ( २ ) हे दात्या, तूं आपल्या पुष्कळ ( बृहता ) धनांतून ( रवेण ) धन ( इन्द्रं ) दे ( आ विश ). सोम मनुष्यांतही शिरतो; सोम गीर्भिष्ट्वा वयं वर्धयामो वचोविदः। सुमृळीको न आ विश ( १।९१।२१ ) = ( १ ) हे सोमा, स्तुति अर्पण करणारे ( वचोविदः ) आम्ही तुला स्तुतींनीं ( गीर्भिः ) पुष्ट करीत आहोंत ( वर्धयामः ); दयावंत ( सुमृळीकः ) तूं आमच्यांत शीर; ( २ ) हे दात्या (सोम), कराच्या रूपानें धन देणारे ( वचोविदः ) आम्ही तुला धनानें ( गीर्भिः ) वाढवीत असतों ( वर्धयामः ); आमच्यामुळें धनवान् झालेला तूं ( सुमृळीकः ) आम्हांस धन दे ( आ विश ). विश्वा वसूनि आ विश ( ९।६५।२ ) = हे सोमा, अतिशय ( विश्वानि ) धन ( वसूनि ) दे ( आ विश ); आ विश म्हणजे दे असा अर्थ वरील उताऱ्यांच्या भाषांतरांत मीं केला आहे व तो अर्थ अनेक ऋचांत आढळतो. वृषन् व वृषभ ह्यांचा बैल हा प्राथमिक अर्थ असून दाता हा गूढ अर्थ आहे. वृषभः रोरवीति = ( १ ) बैल डुरकण्या फोडतो; ( २ ) दाता धन देतो. दाता (देवः) मनुष्यांना ( मर्त्यान् आ ) पुष्कळ धन ( महः ) देत असतो ( विवेश ). शृङ्ग = (१)

शिंग, ( २ ) धन; हा दुसरा अर्थ कसा उत्पन्न होतो तें सांगतां येत नाहीं. पवमानः श‍ृङ्गे शिशानो अर्षति ( ९।५।२ ); एथें सोम हा बैल; तो आपलीं दोन शिंगें पाजवितो व धांवत सुटतो असें म्हटलें आहे; परंतु दाता ( पवमानः = शिशानः ) धनांत ( श‍ृङ्गे ) धन देतो ( अर्षति ) असा गूढ अर्थ आहे. सोमाला चार शिंगें, तीन पाय, दोन डोकीं व सात हात असतात व तो तीन ठिकाणीं बांधला असतो ह्याचा अर्थ समजत नाहीं; गूढार्थ धनपर असावा असें वाटतें पण तो सिद्ध करणें बहुतेक अशक्य आहे.

## खंड ८ वा.

**स्वर्यन्तो नापेक्षन्त आ द्यां रोहन्ति रोदसी । यज्ञं ये विश्वतोधारं सुविद्वांसो वितेनिरे ( मैत्रा० सं० २।१०।६॥ काठ० सं० १८।४ ॥ वाज० सं० १७।६८ )**

**स्वर् गच्छन्तः ईजानाः वा न ईक्षन्ते । ते अमुम् एव लोकं गतवन्तः ईक्षन्ते इति । आ द्यां रोहन्ति रोदसी । यज्ञं ये विश्वतोधारं सर्वतोधारं सुविद्वांसः वितेनिरे इति**

यन्तः = गच्छन्तः ईजानाः वा = जाणारे किंवा यज्ञकरणारे. न अपेक्षन्ते = न ईक्षन्ते । ते अमुम् एव लोकं गतवन्तः ईक्षन्ते इति = त्या लोकालाच म्हणजे स्वर्ग लोकालाच गेलेले स्वर्गाला पाहतात; पृथिवीवर संचार करणारे ( यन्तः ) किंवा नुसते यज्ञ करणारे ( ईजानाः ) स्वर्ग ( स्वर् ) पहात नाहींत ( न ईक्षन्ते ). स्वर्गाला गेल्याशिवाय स्वर्ग कसा दिसेल ? यज्ञ केल्यानें स्वर्गाला जाण्याला मनुष्य पात्र होतो; पण स्वर्ग पृथिवीलोक सोडल्यावरच दिसतो. आ द्यां रोहन्ति रोदसी = द्यां रोदसी च आरोहन्ति असें भाष्य पाहिजे; ज्यानें ही ऋचा रचली त्याला रोदसी शब्दाचा अर्थ माहीत नसावा; रोदसी = द्यावापृथिव्यौ; रोदसी ह्या शब्दामध्यें द्यां ह्याचा अर्थ येतोच. विश्वतोधारं = सर्वतोधारं = ज्यांत सोमरसाच्या धारा सर्वत्र आहेत असा यज्ञ.

ऋचेचा अर्थः—पृथिवीलोकावर संचार करणारे किंवा नुसता यज्ञ करणारे स्वर्ग पाहूं शकत नाहींत; स्वर्गाला गेल्यावरच ते स्वर्ग पाहतात; जे उत्तम विद्वान् ( सुविद्वांसः ) सोमरसानें भरलेला ( विश्वतोधारं ) यज्ञ करतात ( वितेनिरे ) ते द्युलोकाला व द्यावापृथिवींना चढून जातात.

महीधरः—सुविद्वांसः = ज्ञानकर्मसमुच्चयकारिणः = ज्ञान व कर्म ह्यांचा समुच्चय करणारे म्हणजे केवळ यज्ञकर्मावर किंवा ज्ञानावर भिस्त न ठेवणारे; वितेनिरे = करतात; विश्वतोधारं = विश्वतः धारा यस्य तम् । आहुतिदक्षिणान्नानि यज्ञस्य धाराः । वैश्वानरमारुतपूर्णाहुतिवसोर्धारावाजप्रसवीयानि वा = ज्याला सर्वत्र धारा आहेत असा यज्ञ; अग्नींत दिलेल्या आहुति व ब्राह्मणांना दिलेली दक्षणा आणि अन्न ह्या यज्ञाच्या धारा होत; किंवा वैश्वानर, मारुत, पूर्णाहुति, वसोर्धारा व वाजप्रसवीय

ह्या यज्ञाच्या धारा असतील; वैश्वानर वगैरे निरनिराळ्या हवींचीं नांवें असावींत; किंवा विश्वतोधारं = विश्वस्य जगतः धारयितारम्; सर्व जगाची धारणा यज्ञ करतो; असे स्वर्गाला जाणारे लोक कृतकृत्य झाल्यामुळें त्यांना पुत्र पशु वगैरे कशाची अपेक्षा नसते ( न अपेक्षन्ते ); रोदसी हें द्यां ह्याचें विशेषण; रोदसी = रोधसीं = जरा मृत्यु शोक वगैरेंना निरोध करणारीला; जरा मृत्यु शोक वगैरेंना स्वर्गांत शिरकाव मिळत नाहीं; किंवा यज्ञाचा विधि उत्तम प्रकारें जाणणारे ( सुविद्वांसः ) जे जगताची धारणा करणारा यज्ञ चांगल्या रितीनें करतात ( वितेनिरे ) ते अंतरिक्षांत व द्यावा-पृथिवीवर चढून जातात; स्वर्गांतील आदित्यमंडलाकडे ( स्वर् ) जाणारे ( यन्तः ) ते आदित्यमंडलाकडे गेल्यावर दुसऱ्या कोणत्याही स्थानाची अपेक्षा करीत नाहींत ( न अपेक्षन्ते ).

**अथ एषा वाचः प्रवह्लितेव**

पुढील ऋचेंतील आदित्याची कांहींशी ( इव ) गूढ ( प्रवह्लिता ) अतिस्तुति होय. प्रवह्लिता = अनभिव्यक्तिविशिष्टः वाक्यार्थः ( दुर्ग ) = ज्यांत स्पष्टता नाहीं असा वाक्यार्थ; प्रवह्लित शब्द पहा ( पान ५५१ ).

## खंड ९ वा.

**चत्वारि वाक्परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः। गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ( ऋ० सं० १।१६४।४५ )**

**चत्वारि वाचः परिमितानि पदानि। तानि विदुः ब्राह्मणाः ये मेधाविनः। गुहायां त्रीणि निहितानि न अर्थं वेदयन्ते। गुहा गूहतेः। तुरीयं त्वरतेः**

वाक्परिमिता = वाचः परिमितानि. मनीषिणः = मेधाविनः; मनीषा = बुद्धिः ( अमर १।३।१ ); मनीषिणः = मेधाविनः ( अमर २।७।५ ). गुहा = गुहायाम्. निहिता = निहितानि. इङ्गयन्ति = अर्थं वेदयन्ते; वेदयन्ते = प्रख्यापयन्ते = प्रसिद्ध करतात. गुह् ( = लपविणें ) ह्यापासून गुहा; ही व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं. त्वर् ह्यापासून तुरीय; चार ही संख्या तीन संख्येपेक्षां अधिक त्वरा करते.

दुर्गानें केलेला अर्थः—वाचेचीं मोजकीं ( परिमिता ) चार पदें म्हणजे प्रकार आहेत; जे ब्राह्मण बुद्धिवान् आहेत ते तीं चार पदें जाणतात; त्यांपैकीं गुहेंत ठेवलेल्या तीन पदांचा अर्थ ते प्रसिद्ध करीत नाहीं; मनुष्य वाचेचा चवथा प्रकार बोलतात. सायणाचार्य ऋचेचा वरील प्रमाणेंच अर्थ करतात; वाक् = वाचः कृत्स्नायाः = सबंद वाचेचीं; लोकांमध्यें जी वाचा आहे ती चार प्रकारची आहे; ब्राह्मणाः = वेदविदः; न इङ्गयन्ति = न चेष्टन्ते = न प्रकाशन्ते; गुहेंत असलेले तीन प्रकार हालचाल करीत नाहींत म्हणजे ते कोणाला माहीत नाहींत; अज्ञ व ज्ञाते लोक वाचेचा चवथा प्रकार स्पष्टपणें बोलतात; इगि गतौ ( धा० १।१५३ ). इङ्गितं = चेष्टितं ( अमर ३।२।१५ क्षी० ).

पदपाठांत वाक् व परिमिता अशीं भिन्न पदें आहेत; तेव्हां परिमिता परिमितानि चत्वारि पदानि वाक् भवन्ति ( = वाक् म्हणजे चार मोजकीं म्हणजे चारच मोजकीं पदें ) असा अन्वय केला पाहिजे; वाक्परिमिता असा समास घेतल्यास वाचा परिमितानि पदानि चत्वारि = वाचेनें टाकलेलीं पाउलें चारच म्हणजे वाचा चार प्रकारचीच असते. हे वाचेचे चार प्रकार बुद्धिमान् लोकांनाच ठाऊक असतात. इङ्ग् धातूची इङ्गय व इङ्गयन्ति अशीं दोनच रूपें ऋग्वेदांत आहेत; त्यांपैकीं इङ्गय हें एकदांच आलें असून इङ्गयन्ति हें दोनदां आलें आहे; यथा वातः पुष्करिणीं समिङ्गयति सर्वतः । एवा ते गर्भ एजतु निरैतु दशमास्यः ( ५।७८।७ ) = जसा वारा पुष्करिणींतलें पाणी सर्व बाजूंनीं हलवितो ( समिङ्गयति ) त्याप्रमाणें तुझा दहा महिन्याचा गर्भ भराभर हालो व बाहेर येवो. शुनम् अष्ट्राम् उदिङ्गय ( ४।५७।४ ) = अष्ट्रेला चांगल्या रीतीनें वर हालव. गुहा हा शब्द ऋग्वेदांत क्रियाविशेषणासारखा वापरलेला आहे; त्याचा अर्थ गुहायां म्हणजे गुहेंत असा नसून गूढ, गूढस्थळीं, अदृश्य असा आहे. यानि आविः या च गुहा वसूनि ( १०।५४।५ ) = दिसणारें व न दिसणारें द्रव्य. गुहा चरन्ती मनुषो न योषा ( १।१६७।३ ) = पुरुषाच्या कुणाला न दिसतां म्हणजे बुरखा घालून जाणाऱ्या स्त्रीप्रमाणें; परपुरुषानें आपल्याकडे पाहूं नये म्हणून स्त्रिया बुरखा घालीत असत. न वो गुहा चकृम भूरि दुष्कृतम् नाविष्टयम् ( १०।१००।७ ) = आम्हीं तुमचे गुप्तपणें किंवा उघडपणें फारसे अपराध केले नाहींत. विद्मा ते नाम परमं गुहा यत् ( १०।४५।२ ) = तुझें जें अतीशय गूढ नांव तें आम्ही जाणतों. युवं ह रेभं वृषणा गुहा हितम् उदैरयतं ममृवांसमश्विना ( १०।३९।९ ) = गूढस्थलीं लपविलेल्या व मरावयाला टेकलेल्या स्तोत्याला तुम्हीं वर आणलेंत. कुमारं माता० गुहा बिभर्ति न ददाति पित्रे ( ५।२।१ ) = आई मुलाला लपवून ठेवते; त्याला ती त्याच्या बापाला देत नाहीं. गुहा० नेङ्गयन्ति = गूढ असलेले वाचेचे तीन प्रकार बुद्धिमान् लोक बाहेर काढीत नाहींत म्हणजे सामान्य जनांना माहीत करून देत नाहींत; मनुष्यांना ते चवथा प्रकारच देतात व मनुष्य तो चवथा प्रकार बोलतात. तुरीयं = तुरीयं पदम्.

**कतमानि तानि चत्वारि पदानि । ओंकारः महाव्याहृतयश्च इति आर्षम्**

तीं चार पदें कोणतीं? ओंकार व तीन महाव्याहृति हीं तीं चार पदें होत असें ऋषींचें मत आहे. वेद म्हणण्याच्या अगोदर ॐ भूर्भुवः स्वर् असे चार शब्द उच्चारावे लागतात; ॐ हा प्रणव; भूः भुवः स्वर् ह्या महाव्याहृति; व्याहृति = उच्चार, बोलणें; महाव्याहृति = महान् शब्द; ह्या तीन शब्दांपेक्षां जगांत अधिक महत्वाचे शब्द कोणतेही नाहींत. प्रजापतिः लोकान् अभ्यतपत् । तेभ्यः अभितप्तेभ्यः त्रयी विद्या संप्रास्रवत् । ताम् अभ्यतपत् । तस्याः अभितप्तायाः एतानि अक्षराणि संप्रास्रवन्त भूर्भुवः स्वर् इति । तानि अभ्यतपत् तेभ्यः अभितप्तेभ्यः ओंकारः संप्रास्रवत् (छा०उप०२।२३। २–३ ) = प्रजापति तीन लोकांना तापविता झाला; त्या तापलेल्या तीन लोकांपासून

तीन वेद बाहेर वाहूं लागले; तो त्या तीन वेदांना तापविता झाला; तापलेल्या त्या तीन वेदांतून भूः भुवः स्वर् अशीं हीं तीन अक्षरें वाहूं लागलीं; तो त्यांना तापविता झाला; तापविलेल्या त्यांच्यापासून ओंकार वाहूं लागला. ओंकारः ० आर्ष हें दुर्गवृत्तींत नाहीं.

सायण :— सर्व वेदांचें सार तीन व्याहृति व प्रणव ह्यांत आहे; प्रणव व तीन महाव्याहृति ह्यांत सर्व वाचा अंतर्भूत झाल्या आहेत असें ऋषि म्हणजे वेदवादी म्हणतात.

**नामाख्याते च उपसर्गनिपाताश्च इति वैयाकरणाः**

नामें, आख्यातें, उपसर्ग व निपात अशीं तीं चार पदें होत असें वैयाकरण म्हणतात; ह्या चार पदांत सर्व वाचेचा अंतर्भाव झाला आहे असें त्यांचें मत आहे. दुर्ग म्हणतो :— आख्यात, उपसर्ग व निपात ह्यांच्या अंगीं स्वतःचा अर्थ कळविण्याचें सामर्थ्य नाहीं; म्हणजे ते अर्थ नामांच्या अर्थांपेक्षां अप्रसिद्ध होत; नामांचे अर्थ प्रसिद्ध आहेत; त्यांच्या साहाय्यानें ह्या तीन अप्रसिद्ध पदांचा अर्थ कळतो. हें विवरण ऋचेंतील गुहा त्रीणि नेङ्गयन्ति ह्या शब्दांना अनुसरून केलें आहे; पण तें कृत्रिम असून चुकीचें आहे; कारण आख्याताखेरीज नाम वगैरेंना अस्तित्वच नाहीं असें वैयाकरणांचें व नैरुक्तांचें मत आहे; सर्व शब्द आख्यातापासून निघतात असा सर्वांचा सिद्धांत आहे. ऋचेंतील चत्वारि पदांनीं ह्याचा व्याकरणपर अर्थ केल्यास मनीषिणः म्हणजे व्याकरणशास्त्र जाणणारे ( सायण ).

महाभाष्य :— चत्वारि वाक् परिमिता पदानि चत्वारि पदजातानि नामाख्यातोपसर्गनिपाताश्च । तानि विदुः ब्राह्मणा ये मनीषिणः । मनसः ईषिणः मनीषिणः । गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति । गुहायां त्रीणि निहितानि नेङ्गयन्ति न चेष्टन्ते । न निमिषन्ति इत्यर्थः । तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति । तुरीयं ह वै एतत् वाचो यन्मनुष्येषु वर्तते । चतुर्थम् इत्यर्थः. इङ्गयन्ति = चेष्टन्ते = निमिषन्ति = हालचाल करतात? महाभाष्यांतील मनसः ईषिणः व चेष्टन्ते हे शब्द सायणाचार्यांनीं आपल्या भाष्यांत घेतले आहेत.

तन्त्रवार्तिक ( १।३।१८ ):— प्रत्यक्षानुमानोपमानार्थापत्त्याख्यानि प्रमाणानि = प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व अर्थापत्ति अशीं वाचेचीं चार पदें होत.

**मन्त्रः कल्पः ब्राह्मणं चतुर्थी व्यावहारिकी इति याज्ञिकाः । ऋचः यजुंषि सामानि चतुर्थी व्यावहारिकी इति नैरुक्ताः**

चार वेदांतले मंत्र, त्यांचे अर्थ करणारीं ब्राह्मणें व त्यांचा विनियोग सांगणारीं कल्पसूत्रें हे तीन प्रकार असून व्यवहारांत वापरली जाणारी भाषा हा चवथा प्रकार असें याज्ञिक म्हणतात. मंत्र, ब्राह्मण व कल्प ह्यांच्याबद्दल नैरुक्त ऋक्, यजुस् व साम हे शब्द घालतात. मंत्र, ब्राह्मण व कल्प किंवा ऋचा, यजुस् व साम ह्यांचा अर्थ गूढ आहे; व्यवहारांतल्या भाषेचा अर्थ सहज कळतो तसा त्यांचा अर्थ कळत नाहीं (दुर्ग).

**सर्पाणां वाक् वयसां क्षुद्रस्य सरीसृपस्य चतुर्थी व्यावहारिकी इति एके**

सर्प, पक्षी, सरपटणारे क्षुद्र प्राणी ह्या प्रत्येकाची वाचा मिळून तीन व व्यवहारांतली असे वाचेचे चार प्रकार आहेत असें कांहींजण म्हणतात. असें म्हणणारे इतिहासकार ( सायण ). साप, पक्षी व सरपटणारे क्षुद्र प्राणी यांची भाषा कळत नाहीं ( दुर्ग ).

**पशुषु तूणवेषु मृगेषु आत्मनि च इति आत्मप्रवादाः**

पशूंत, तूणवांत, मृगांत व आत्म्यांत असे वाचेचे चार प्रकार आहेत असें आत्मवादी म्हणतात. पशूंत मृगांचा अंतर्भाव कां केला नाहीं? दुर्ग व सायणाचार्य ह्या मताचें व त्यांतील शब्दांचें विवरण करीत नाहींत. तूणव शब्द अमरांत किंवा आपटयांच्या कोशांत नाहीं; पशुषु व मृगेषु ह्यांच्यामध्यें तूणवेषु शब्द असल्यामुळें तूणव हें एकाद्या पशूचें नांव असावें; तेव्हां पशु तूणव व मृग ह्यांत एकच प्रकारची वाचा असली पाहिजे. आत्मा स्वतःशीं ज्या वाचेनें बोलतो ती आत्म्याची वाचा; ही वाचा सर्व वाचांहून निराळी असलीच पाहिजे; कारण आत्म्याचे विचार अलौकिक असतात.

**अथापि ब्राह्मणं भवति। सा वै वाक् सृष्टा चतुर्धा व्यभवत्। एषु एव लोकेषु त्रीणि। पशुषु तुरीयम्। या पृथिव्यां सा अग्नौ सा रथन्तरे। या अन्तरिक्षे सा वायौ सा वामदेव्ये। या दिवि सा आदित्ये सा बृहति सा स्तनयित्नौ। अथ पशुषु। ततो या वाक् अत्यरिच्यत तां ब्राह्मणे न्यदधुः। तस्मात् ब्राह्मणाः उभयीं वाचं वदन्ति या च देवानां या च मनुष्याणाम् ( मैत्रा० सं० १।११।५ ) इति**

अशा अर्थाचें ब्राह्मण वचनही आहे; उत्पन्न केलेली ती वाचा चार प्रकारांनीं ( चतुर्धा ) विभागली गेली ( वि + अभवत् ); ह्या तीन लोकांत म्हणजे पृथिवी, अंतरिक्ष व स्वर्ग ह्या प्रत्येकांत एक एक अशा तीन व पशूंमध्यें चवथी ( अशी ती विभागली गेली ); पृथिवीवरची वाचा अग्नींत व रथंतरसामांत आहे; अंतरिक्षांतील वाचा वायूंत व वामदेव्यसामांत आहे; द्युलोकांतील वाचा आदित्यांत, बृहत्सामांत व मेघगर्जनेंत आहे; चवथी वाचा पशूंत आहे; ह्याशिवाय जी वाचा बाकी राहिली ( अति + अरिच्यत ) ती वाचा देव ब्राह्मणांच्या ठिकाणीं ठेविते झाले; म्हणूनच ब्राह्मण दोन प्रकारची वाचा बोलतात; देवांची म्हणजे वैदिक व मनुष्यांची म्हणजे लौकिक अशी ती दोन प्रकारची वाचा होय. ह्या ब्राह्मणवचनांत तूणवेषु, मृगेषु व आत्मनि हे शब्द नाहींत; तेव्हां आत्मप्रवाद्यांच्या मताला हें ब्राह्मणवचन आधारभूत आहे असें म्हणतां येत नाहीं; शिवाय ह्यांतील वाचेची विभागणी निराळीच आहे. हल्लीं उपलब्ध असलेल्या मैत्रायणी संहितेंत एषु एव लोकेषु ह्यांतील एव, सादित्ये व या च देवानां या च मनुष्याणां हे शब्द नाहींत; त्रीणि ह्यानंतर तुरीयाणि हा अधिक शब्द आहे पण तो तेथें चुकीनें पडला आहे; ब्राह्मणाः वदन्ति ह्याबद्दल ब्राह्मणः वदति व वायौ बद्दल वाते असे शब्द आहेत. काठक संहिता ( १४।५ ):— सा वाक् दृष्टा चतुर्धा व्यभवदेषु लोकेषु त्रीणि तुरीयाणि पशुषु तुरीयं या दिवि सा बृहति सा

स्तनयित्नौ यान्तरिक्षे सा वाते सा वामदेव्ये या पृथिव्यां साग्नौ सा रथन्तरे या पशुषु तस्या यदरिच्यत तां ब्राह्मणे न्यदधुः तस्मात् ब्राह्मण उभे वाचौ वदति दैवीं च मानुषीं च. ह्या पाठांत द्यु, अंतरिक्ष व पृथिवी असा क्रम आहे; सृष्टा बद्दल दृष्टा असा शब्द आहे; मैत्रायणी संहितेप्रमाणें ह्यांतही एव व सादित्ये हे शब्द नाहींत; वायौ बद्दल वाते, ब्राह्मणाः वदन्ति ह्याच्याबद्दल ब्राह्मणः वदति व या च देवानां या च मनुष्याणां ह्याबद्दल दैवीं च मानुषीं च असें आहे.

**सायणः**— कित्येक वाचेचे परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी असे चार प्रकार देतात; तदनुरूप ऋचेचा पुढीलप्रमाणें अर्थ; वाचेचे परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी असे चार प्रकार आहेत; मनाचें नियंत्रण करणारे ( मनीषिणः ) योगी हे चारही प्रकार जाणतात; त्यांपैकीं परा, पश्यन्ती व मध्यमा हे प्रकार हृदयांत असल्यामुळें फार गूढ आहेत; सर्व मनुष्य वैखरी हा जो चौथा प्रकार तो बोलतात.

**अथ एषा अक्षरस्य**

पुढील खंडांतील ऋचेंत अक्षराची अतिस्तुति असून ती बरीचशी गूढ आहे.

## खंड १० वा.

**ऋचो अक्षरे परमे व्योमन् यस्मिन् देवा अधि विश्वे निषेदुः। यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत्तद्विदुस्त इमे समासते ( ऋ० सं० १।१६४।३९ )**

**ऋचः अक्षरे परमे व्यवने यस्मिन् देवाः अधिनिषण्णाः सर्वे। यः तत् न वेद किं सः ऋचा करिष्यति। ये इत् तत् विदुः ते इमे समासते इति विदुषः उपदिशति**

व्योमनि = व्यवने ( पान ९३२ ); व्योम = विविधम् अस्मिन् शब्दजातम् ओतं ( दुर्ग ) = ज्याच्यांत नानाप्रकारचा शब्दसंग्रह विणला आहे; व्योमन् = वि + ओमन्; वि = विविधम्; वे = विणणें; वे चें भूतभूतकाळाचें विशेषण उत; आ + उतं = ओतम्; वे धातूला संप्रसारण होऊन उ; आ + उ = ओ; ओ + मन् = ओमन् = विणलेलें काम; सर्व शब्दांचा संग्रह हें विणलेलें काम; तें काम अक्षर करतें. अधि निषेदुः = अधिनिषण्णाः. विश्वे = सर्वे. किम् सः ऋचा करिष्यति एथें सः अध्याहृत.

**कतमत् तत् एतत् अक्षरम्। ओ३म् इति एषा वाक् इति शाकपूणिः। ऋचश्च हि अक्षरे परमे व्यवने धीयन्ते। नानादेवतेषु च मन्त्रेषु। 'एतद्ध वै एतदक्षरं यत्सर्वां त्रयीं विद्यां प्रति प्रति' ( कौषी० ब्रा० ६।१२ ) इति च ब्राह्मणम्**

ऋचेंत सांगितलेलें हें अक्षर कोणतें? जगांतील ही जी वाक् ती ओ३म् होय असें शाकपूणि म्हणतो; जगांत असा कोणताही शब्द किंवा ध्वनि नाहीं कीं जो ओ३म् ह्यांत नाहीं; ओ३म् हेंच परम व्यवन म्हणजे उत्कृष्ट वीणकाम; ह्या उत्कृष्ट वीणकामांत ऋचा ठेविल्या आहेत ( ऋचः च अक्षरे परमे व्यवने धीयन्ते ). नाना-

देवतेषु च मन्त्रेषु ह्याचा मागच्यापुढच्याशीं कांहींही संबंध दिसत नाहीं. तीन वेदांकडे जें सतत तोंड करून असतें (प्रति प्रति म्हणजे जें म्हटल्याशिवाय वेदपठनाला आरंभ होतच नाहीं) तें हें अक्षर होय असें कौषीतकिब्राह्मणांत म्हटलें आहे; हें ब्राह्मणवचन ऋचश्च हि अक्षरे परमे व्यवने धीयन्ते ह्याला आधार म्हणून दिलें आहे; तेव्हां नानादेवतेषु च मन्त्रेषु हे शब्द असंबद्ध होत म्हणून ते प्रक्षिप्त असावेत. इति शाकपूणिः ह्यानंतरचें भाष्य किंवा त्याचें विवरण दुर्गवृत्तींत नाहीं.

दुर्ग :— तें हें अक्षर कोणतें म्हणजे त्याचा अर्थ कोणता? जगांतली ही सर्व वाक् ओ३म् होय असें शाकपूणि म्हणतो; ओंकारानें आरंभ केल्याशिवाय ऋचांनीं देवांची पूजा करीत नाहींत; वाचेचें परम व्योम अक्षर होय; कारण ओ३म् ह्या अक्षरांत सर्व प्रकारचा शब्दसंग्रह विणला आहे म्हणजे ओ३म् ह्यांत यच्चयावत् शब्द अंतर्भूत होतात. ओ३म् = अ + उ + अम्; ओ३म् ह्यांतून अ, उ व अम् काढून घेतल्यावर बाकी जें राहतें तें परम व्योम; ब्रह्म हें अपर असल्यामुळें व्योम हें परम म्हणजे पर; ह्या परमव्योमांत सर्व देव बसलेले आहेत. विशिष्ट शब्दांचा समुदाय म्हणजे ऋक्; सर्व शब्द अक्षरापासून निघतात; तेव्हां ऋचांच्या ज्या देवता त्या अक्षरांत बसल्या आहेत असें ऋषि म्हणतो. पृथिवी, अग्नि, ऋग्वेद व पृथिवीवर राहणारे लोक हे ओ३म् ह्यांतील अ ह्यांत असतात; अंतरिक्ष, वायु, यजुर्वेद व अंतरिक्षांत राहणारे लोक उ ह्यांत असतात; द्युलोक, आदित्य, सामें व द्युलोकांत असणारे लोक अम् ह्यांत असतात; ह्याप्रमाणें सर्व देव ओ३म् ह्यांत आहेत. विज्ञायतेहि ओंकारः इदं सर्वं = हें सर्व ओंकार आहे असें ब्राह्मणवचन आहे. ज्याला अक्षराचें हें वैभव माहीत नाहीं तो ऋचा म्हणून काय करणार आहे! त्याला ऋचेचें खरें मर्म कळणारच नाहीं; अक्षराचें हें वैभव जे जाणतात ते हे विद्वान् त्या अक्षरांत एकत्र बसतात; अक्षर पूर्णपणें जाणल्यानें विद्वान् लोक तद्रूप होऊन प्रणवरूप म्हणजे ओंकाररूप जो आत्मा त्याच्यांत शिरतात व तत्सम होतात म्हणजे त्यांचें व्यक्तित्व नाहींसें होतें असें विद्वानांकडे बोट करून (विदुषः) ऋषि म्हणतो (उपदिशति). अ ह्यांत अग्नि, उ ह्यांत वायु व अम् ह्यांत आदित्य असें म्हटल्यानें अक्षरांत तीनच देव बसले आहेत असें कोणी म्हणेल; पण अग्नि, वायु व आदित्य हे जरी तीनच देव आहेत तरी त्यांच्यांत इतर सर्व देवांचा अंतर्भाव होतो किंवा हे तीन देव विशिष्ट कार्याकरितां निरनिराळीं नांवें घेतात; म्हणून अक्षरांत सर्व देव बसले आहेत असें ऋषि म्हणतो. हें विवरण यज्ञपर आहे असें दुर्ग म्हणतो पण त्यांत यज्ञ-संबंधीं एकही चिन्ह नाहीं; कदाचित् ऋचा यज्ञांत वापरतात म्हणून हें विवरण यज्ञ-पर असें म्हणावयाचें असेल; आधियज्ञ बद्दल अधिवेदं म्हणणें योग्य दिसतें; कारण ओंकाराचा म्हणजे वेदांचाच महिमा वर्णन केला आहे.

## खंड ११ वा.

**आदित्यः इति पुत्रः शाकपूणेः। एष ऋक् भवति यत् एनम् अर्चन्ति। प्रत्यृचः सर्वाणि भूतानि। तस्य यत् अन्यत् मात्रेभ्यः तत् अक्षरं भवति। रश्मयः अत्र देवाः उच्यन्ते ये एतस्मिन् अधिनिषण्णाः इति अधिदैवतम्**

अक्षर म्हणजे आदित्य असे शाकपूर्णीचा मुलगा म्हणतो. एषर्ग्भवति असा निरुक्तपाठ आहे; एषर्ग्भवति=एषा ऋक् भवति असा संधिविग्रह होईल; पण एषः ऋक् भवति असें यास्कास म्हणावयाचें आहे; तेव्हां एष ऋग्भवति असा निरुक्तपाठ पाहिजे. हा म्हणजे आदित्य ऋक् आहे; आदित्याला ऋक् म्हणण्याचें कारण लोक त्याची पूजा करतात; ऋक् शब्दाची व्युत्पत्ति पहा (पान २५). प्रत्यृचः सर्वाणि भूतानि=सर्व प्राणिमात्र त्या ऋचेचे म्हणजे आदित्याचे अवयव होत. प्रत्यृचः हा शब्द प्रत्यवयव ह्यासारखा आहे; अवयवांचे जे भाग ते प्रत्यवयव त्याप्रमाणें ऋचेचे जे भाग ते प्रत्यृचः. प्रत्यृचः सर्वाणि भूतानि हे शब्द दुर्गवृत्तींत नाहींत. सूर्याच्या ( तस्य ) म्हणजे सूर्यमंडलाच्या अवयवांहून ( मात्रेभ्यः ) जें कांहीं निराळें आहे ( यत् अन्यत् ) तें अक्षर होय. ह्या आदित्यपर अर्थांत देव म्हणजे सूर्यकिरण; सूर्यकिरणांना देव म्हणण्याचें कारण ते प्रकाशतात; हे देव म्हणजे सूर्यकिरण आदित्यमंडळांत एकत्र बसतात म्हणजे तेथें असतात असा हा आदित्यपर अर्थ आहे. मात्रेभ्यः हें मात्रं ह्याचें पंचमीचें बहुवचन; मात्र शब्द स्वतंत्र असा अर्वाचीन संस्कृतांत नाहीं; तो नेहेमीं समासाच्या शेवटीं येतो. दुर्गानें केलेला आदित्यपर अर्थः– आदित्याचें (ऋचः) म्हणजे आदित्यमंडलाचें जें अक्षर म्हणजे तेथें असणारा जो आदित्य तो परम व्यवन होय म्हणजे त्याच्यांत सर्व वस्तु विणल्या आहेत म्हणजे ओतप्रोत भरल्या आहेत; त्या आदित्यमंडलांत सर्व किरण (देवाः) बसले आहेत म्हणजे एकवटले आहेत; आदित्याचें अक्षररूप जो जाणत नाहीं तो आदित्याशीं (ऋचा) काय करणार? म्हणजे त्याला आदित्यापासून खरा लाभ मिळणार नाहीं; जे आदित्याचें खरें रूप जाणतात तेच आदित्यामध्यें एकत्र बसतात म्हणजे तद्रूप होतात.

**अथ अध्यात्मम्। शरीरम् अत्र ऋक् उच्यते यत् एनेन अर्चन्ति। प्रत्यृचः सर्वाणि इन्द्रियाणि। तस्य यत् अविनाशिधर्म तत् अक्षरं भवति। इन्द्रियाणि अत्र देवाः उच्यन्ते यानि अस्मिन् आत्मनि एकं भवन्ति इति आत्मप्रवादाः**

आतां ऋचेचें आत्मपर ( अध्यात्मं ) विवरण पुढीलप्रमाणें; एथें शरीराला ऋक् म्हटलें आहे; शरीराला ऋक् म्हणण्याचें कारण त्यानें म्हणजे शरीरानें म्हणजे शरीराच्या हात व मुख या अवयवांनीं लोक पूजा करतात. सर्व इंद्रियें शरीराचे अवयव होत ( प्रत्यृचः ). अविनाशि धर्म यस्य तत् अविनाशि-धर्म=विनाश न पावणें हा जिचा धर्म आहे अशी आत्म्यासारखी वस्तु; अविनाशि ह्याबद्दल अविनाश असा शब्द पाहिजे; कारण अविनाश हा आत्म्याचा धर्म म्हणजे

गुण आहे; ज्याचा गुण अविनाशि आहे ह्याचा कांहीं अर्थ होत नाहीं. शरीरांत अविनाशि असें जें कांहीं आहे तें अक्षर होय; अ=नाहीं; क्षर=नाश. देव म्हणजे इंद्रियें; हीं इंद्रियें ह्या अविनाशिवस्तूंत एकवटतात म्हणजे अध्यात्मज्ञानानें इंद्रियें निष्क्रिय होतात. अथ अध्यात्मं बद्दल दुर्गवृत्तींत आत्मेत्यात्मप्रवादाः असें आहे; अक्षर म्हणजे आत्मा असें आत्मवादी म्हणतात. दुर्गः—अयम् ऋक् भवति शरीरं = हा आत्मा ऋक् म्हणजे शरीर होतो; एथें इंद्रियें हीं देव; इंद्रियांना देव म्हणण्याचें कारण तीं वस्तूंत प्रकाशतात; द्युत् (=प्रकाशणें) ह्यापासून देव(पान५६१). तस्य यत् अविनाशिधर्म चेतनासतत्वमात्रविज्ञानं तत् परम् अक्षरं व्यवनं = अनश्वर जें चित्तत्व तें अक्षर होय व त्यांत सर्व वस्तु ओतप्रोत भरल्या आहेत (व्यवनं). अविनाशिधर्मि हा शब्द अविनाशधर्मि असा पाहिजे; अविनाशः धर्मः अविनाशधर्मः । अविनाशधर्मः विद्यते अस्य तत् अविनाशधर्मि; वास्तविक अविनाशधर्म असा शब्द पाहिजे; अविनाशिधर्मि ह्याचा कांहीं एक अर्थ होत नाहीं. ज्याला हें अक्षर माहीत नाहीं तो शरीराचा काय उपयोग करणार आहे? त्याला शरीराचा खरा उपयोग करतांच येणार नाहीं; जे अक्षर जाणतात ते हे ज्ञानी त्या अक्षराशीं तादात्म्य पावतात. मागील खंडांत व ह्या खंडांत दिलेलें भाष्य दुर्गानें स्वीकृत केलेल्या भाष्याहून वेगळें आहे.

**सायण:**—ह्या ऋचेंत जीवात्म्याचें खरें स्वरूप सांगितलें आहे; ऋचः म्हणजे अंगसहित चार वेदांचें; ऋचेचें म्हणजे ह्या चार वेदांचें अक्षर म्हणजे ब्रह्म; चार वेद ब्रह्म निरूपण करतात; हें ब्रह्म अदृश्य, नाशरहित, नित्य व सर्वव्यापक असें आहे; उपनिषदांत अक्षर म्हणजे ब्रह्म असें सांगितलें आहे; हें अक्षर व्योम आहे म्हणजे आकाशासारखें लेपरहित, रूपरहित व व्यापक असून सर्वांहून श्रेष्ठ आहे (परमे); किंवा व्योम म्हणजे सर्वांचे रक्षक; ब्रह्म हें सर्व वस्तूंचें अधिष्ठान असल्यामुळें तें त्या वस्तूंचें रक्षण करतें; ह्या ब्रह्मांत सर्व वस्तु आहेत; ह्या परमात्म्याचा आश्रय धरून सर्व देव बसतात; किंवा देव म्हणजे वेद; ह्या अक्षररूप ब्रह्मांत अंगसहित सर्व वेदांचें पर्यवसान आहे म्हणजे अक्षर हेंच सर्व वेदांचें तात्पर्य; वेदांचें हें परमतत्त्व जो मर्त्य जाणत नाहीं त्याला वेदांतील शब्दजालापासून काय उपयोग होणार आहे? वेदांचा खरा अर्थ न कळल्यास वेदपठण विफल होय; वेदांचें परमतत्त्व जाणल्याशिवाय जो केवळ कर्में करीत राहतो त्यानें केलेलीं कर्में व्यर्थ; तीं कर्मेंच होत नाहींत; जे वेदांचें हें परमतत्त्व जाणतात ते या परमतत्त्वाशीं एक होतात; किंवा जे केवळ ज्ञानप्राप्ति करून घेतात व कर्में करीत नाहींत त्यांना यच्चयावत् वैदिककर्मांचें फळ मिळतें. कित्येकांनीं ऋचेचे आदित्यपर, ओंकारपर व आत्मपर अर्थ केले आहेत; ते सायणाचार्य देतात; ते बहुतेक वर दिलेल्या अर्थासारखेच आहेत.

यस्मिन् परमे व्योमन् व्योमनि अक्षरे आधि विश्वे देवाः निषेदुः तस्मिन् ऋचः वर्तन्ते = वाचेच्या उच्च स्थितींत म्हणजे अक्षरांत सर्व देव बसले आहेत; त्याच अक्ष-

रांत ऋचा आहेत. ऋचा ह्या वाचेच्या परमावधि होत; ऋचांहून वाचेचें श्रेष्ठ स्वरूप इतरत्र कोठेंही नाहीं; अशा ह्या ऋचांत देवांचें वर्णन केलें आहे; ही वाचेची खरी स्थिति जो जाणत नाहीं त्याला ऋचांशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं; तो ऋचांचें पठन व्यर्थ करतो; हे ते पहा ( इमे ) खरा वेदार्थ जाणणारे ( ये विदुः ); तेच योग्य रीतीनें वाचेंत बसतात (समासते); ह्यानांच वाचेचें खरें स्वरूप कळलें आहे. असा ऋचेचा अर्थ असावा; १०।४१ ह्यांतील ऋचेचे मी तीन अर्थ केले आहेत; त्यांपैकीं पहिला अर्थ पहावा ( पान ९३२ ). दुर्ग वगैरेंनीं केलेले अर्थ ओढाताणीचे आहेत.

## खंड १२ वा.

**अक्षरं न क्षरति । न क्षीयते वा । अक्षयं भवति । वाचः अक्षः इति वा । अक्षः यानस्य अञ्जनात् । तत्प्रकृति इतरत् वर्तनसामान्यात्**

अक्षरं = अ + क्षरम् ; जें क्षर म्हणजे क्षय किंवा रूपांतर पावत नाहीं तें अक्षर; किंवा अक्षरम् अक्षयं भवति; अक्षरं = अक्षयम् ; क्षर = क्षय; अविद्यमानः क्षरः क्षयः यस्य तत् अक्षरम् ; अक्षर क्षय पावत नाहीं ( न क्षीयते ). किंवा अक्षरं= अक्षः = आस; वाचः अक्षः = ( चाकाचा जसा आस तसा ) वाचेचा अक्षर हा आस होय; चाक जसें आसावर अवलंबून असतें तशी सर्व वाचा अक्षरावर अवलंबून असते. वाहनाचा ( यानस्य ) जो अक्ष तो अञ्ज् ( = तेलानें माखणें किंवा वंगण लावणें ) ह्यापासून; आसाला म्हणजे आसाच्या तुंब्याला वंगण लावावें लागतें; दुर्ग-वृत्तींत अञ्जनात् बद्दल समञ्जनात् आहे; अञ्ज् + सः = अक्षः. ह्या अक्षापासूनच लक्षणेनें वापरलेला अक्ष शब्द भाषेत वापरला जातो; सः अक्षः प्रकृतिः यस्य तत् = इतर प्रसंगीं भाषेंत वापरलेला जो अक्ष शब्द त्याचें मूळ ह्या प्राथमिक अक्ष शब्दांत होय. पृथिवी आपल्या आंसाभोंवतीं फिरते असें आपण म्हणतों; एथें अक्ष म्हणजे खरा आस नसून एक काल्पनिक आस होय; ह्या काल्पनिक आसाच्याभोंवतीं पृथिवी फिरते. अक्ष ह्याच्या मुख्यार्थांत व लक्ष्यार्थांत वाटोळें फिरणें हा सामान्य धर्म होय ( वर्तनसामान्यात् ). वाचः अक्षः इति वा । अक्षरः (अक्षरं ?) हि अक्षः इव अनुप्रविश्य व्यञ्जनानि धारयति ( दुर्ग ) = आस चाकांत शिरून जसे त्यांना धारण करतो त्या-प्रमाणें अक्षर म्हणजे स्वर व्यंजनांत शिरून त्यांना धारण करतो; अक्षर म्हणजे स्वर (स्वरोऽक्षरं) असें ऋक्प्रातिशाख्यांत म्हटलें आहे (पटल १८।१७); स्वरांशिवाय व्यंज-नांचा स्पष्ट उच्चार होत नाहीं म्हणून व्यंजनें स्वरांवर अवलंबून असतात. तत्प्रकृति इतरत् स्वराख्यम् अक्षरं वर्तनसामान्यात् । स्वरम् अधिरूढानि व्यञ्जनानि वर्तन्ते (दुर्ग) = चाकें जशीं आसांभोंवतीं असतात तशीं व्यंजनें स्वरांभोंवतीं असतात; भोंवतीं असणें ह्या सामान्य धर्मामुळें ( वर्तनसामान्यात् ) स्वर ( अक्षरं ) हा अक्ष होय; ह्या दुसऱ्या अर्थाचें मूळ अक्ष शब्दाचा पहिला अर्थ होय; वर्तन म्हणजे असणें असा दुर्ग अर्थ करतो. वाचः अक्षः ह्याच्या आधीं दुर्गवृत्तींत वाक्क्षयो भवति असे अधिक शब्द

आहेत; वाक्क्षयः = वाचेचें निवासस्थान; अक्षर हें वाचेचें निवासस्थान होय; अक्षयं ह्या शब्दाचा हा दुसरा अर्थ दुर्गानें केला असावा; अ = अक्षर; क्षय = निवास.

**इति अयं मन्त्रार्थचिन्ताभ्यूहः अभ्यूढः। अपि श्रुतितः अपि तर्कतः। न तु पृथक्त्वेन मन्त्राः निर्वक्तव्याः। प्रकरणशः एव तु निर्वक्तव्याः। न हि एषु प्रत्यक्षम् अस्ति अनृषेः अतपसो वा। पारोवर्यवित्सु तु खलु वेदितृषु भूयोविद्यः प्रशस्यः भवति इति उक्तं पुरस्तात् (निरु० १।१६)। मनुष्याः वै ऋषिषु उत्क्रामत्सु देवान् अब्रुवन् को नः ऋषिः भविष्यति इति। तेभ्यः एतं तर्कम् ऋषिं प्रायच्छन् मन्त्रार्थचिन्ताभ्यूहम् अभ्युढम्। तस्मात् यत् एव किंच अनूचानः अभ्यूहति आर्षं तत् भवति**

ह्याप्रमाणें (इति) हा मंत्रांच्या अर्थांचा विचार करण्याची पद्धत किंवा शास्त्र (मन्त्रार्थचिन्ताभ्यूहः) श्रुतीच्या साहाय्यानें (श्रुतितः) व तर्काच्या साहाय्यानें (तर्कतः) पूर्ण केला आहे (अभ्यूढः); मन्त्राणाम् अर्थानां चिन्तायाः अभ्यूहः = मंत्रांच्या अर्थांच्या विचाराची पद्धत किंवा शास्त्र. अभि + वह् = पूर्ण करणें; अभि + ऊढः = पूर्ण केला आहे; अभ्यूढः = अभ्यूहितः असा अर्थ केल्यास तर्कानें ठरविलेले किंवा तर्कावर आधारलेले असा अर्थ होईल; निरुक्तशास्त्र (मन्त्रार्थचिन्ताभ्यूहः) तर्कावर पूर्णपणें आधारलेलें आहे. मंत्रांचा अर्थ केवळ श्रुतीचा किंवा केवळ तर्काचा अवलंब करून होत नाहीं; मंत्रांचा अर्थ करण्याला दोघांचेंही साहाय्य पाहिजे. अपि ह्या निपातानें समुच्चय दर्शविला जातो (पा० १।४।९६). यास्कभाष्यांत शब्दांच्या व्युत्पत्तींनीं मंत्रांचे अर्थ केले आहेत; शब्दांच्या व्युत्पत्ति तर्कानें म्हणजे संदर्भानें केल्या पाहिजेत असें नैरुक्त व यास्क म्हणतात; पण हें त्यांचें मत निराधार होय; हें त्यांनीं अथपासून इतिपर्यंत केलेल्या शब्दांच्या व्युत्पत्तींवरून स्पष्ट होतें. शब्दांची पाहिजे ती व्युत्पत्ति करणें हें अशास्त्रीय होय. दुर्ग इति अयं मन्त्रार्थचिन्ताभ्यूहः ह्यांतील इति ह्याचा पुढीलप्रमाणें अर्थ करतो; परिसमाप्त्यर्थः इतिकरणः = विषय संपला हें दाखविण्याकरितां इति हा निपात घातला आहे; त्यानंतरचे उपप्रदर्शनार्थः वा अन्तस्य हे शब्द निरर्थक आहेत; कारण परिसमाप्त्यर्थः इतिकरणः व उपप्रदर्शनार्थः अन्तस्य ह्या दोहोंचाही अर्थ एकच. दुर्गः-अभ्यूढः = वितर्कितः = तर्कानें निश्चित केला आहे; अभ्यूह, तर्क व लक्षणन्याय (?) ह्यांचा अर्थ एकच; मंत्र व ब्राह्मणें (श्रुतितः) आणि ज्यांचा अर्थ तर्कानें ठरविला आहे असे निघंटूत सांगितलेल्या शब्दांखेरीज वेदांत येणारे इतर शब्द ह्यांच्या साहाय्यानें (तर्कतः) वेदवाक्यांचा अर्थ केला आहे. पण निघंटूंतील शब्दांचा अर्थ ठरविण्याकरितां निघंटूच्या बाहेरील शब्दांचें साहाय्य घेतल्याचीं उदाहरणें बहुतेक नाहींतच असें म्हणणें भाग पडतें. अभ्यूह म्हणजे तर्क असा दुर्गानें अर्थ केला आहे; अभ्यूहः अभ्यूढः = तर्कः वितर्कितः म्हणजे काय? अभ्यूह ह्याचा पद्धत किंवा शास्त्र असा अर्थ केला पाहिजे. न तु पृथक्त्वेन मन्त्राः निर्वक्तव्याः। प्रकरणशः एव तु निर्वक्तव्याः = ज्या प्रकरणांत मंत्र आले असतील त्या

प्रकरणाला अनुसरून ऋचांचे अर्थ केले पाहिजेत; एकेकटा मंत्र घेऊन कधींही अर्थ करूं नये; न तु = न कदापि. मंत्र अमक्या एक यज्ञांतला असेल, अमक्या देवतेसंबंधीं असेल, आत्मपर असेल किंवा ऐतिहासिक असेल; ह्या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन मंत्रांचा अर्थ केला पाहिजे ( दुर्ग ). जो ऋषि नाहीं ( अनृषेः ) किंवा ज्यानें तप केलें नाहीं ( अतपसः ) अशा मनुष्याला ऋचांचें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं म्हणजे त्याला मंत्राचा अर्थ मंत्र म्हटल्याबरोबर कळत नाहीं; म्हणून त्यानें प्रकरणाचें साहाय्य घेतलें पाहिजे. ऋषि हा द्रष्टा असल्यामुळें त्याला सर्व गोष्टी प्रत्यक्ष असतात; तपानें ज्याचीं पापें अगदीं नाहींशीं झालीं आहेत अशा निर्मल मनुष्यालाही ऋचांचा अर्थ प्रत्यक्षपणें दिसतो; पण इतर जनांची तशी गोष्ट नाहीं; माणसामाणसांत बुद्धि व ज्ञान कमीजास्त असेल; कितीही बुद्धिमान् व ज्ञानसंपन्न मनुष्य असला तरी तो ऋषि किंवा तपस्वी नसल्यामुळें त्यानें प्रकरणाचें साहाय्य घेतलेंच पाहिजे. नैकपदानि निर्ब्रूयात् ( पान ८९ ) व तपस्विने वा ( पान ९० ) ह्यांचा अर्थ पहा. पारोवर्यवित्सु० इति उक्तं पुरस्तात् ( पान ५३ ); वेदविद्येंत जो अतिशय प्रवीण असतो त्याची लोक प्रशंसा करतात ह्याचें कारण तर्कानें वेदाचा अर्थ करणें त्याला सुलभ जातें. मनुष्याः वै ऋषिषु० अभ्यूढं = मंत्रद्रष्टे इहलोक सोडून परलोकास जावयाला निघाले असतांना लोक देवांना म्हणाले कीं आतां ह्यापुढें आमच्याकरितां ऋषि कोण होईल म्हणजे मंत्रांचा खरा अर्थ आम्हांला कोण सांगेल ? तेव्हां देवांनीं लोकांना तर्करूप ऋषि दिला म्हणजे तर्कानें तुम्ही मंत्रांचा अर्थ करा असें देवांनीं त्यांना सांगितलें; हा तर्क म्हणजे निरुक्तांत पूर्णपणें सांगितलेलें मंत्रांचें अर्थ करण्याचें शास्त्र ( मन्त्रार्थचिन्ताभ्यूहः ). निरुक्तशास्त्राचें महत्त्व सांगण्याकरितां हा अर्थवाद म्हणजे ही गोष्ट सांगितली आहे. वेदस्य अनुवचनं कृतवान् अनूचानः (पा० ३।२।१०९ भट्टोजी दीक्षित ) = योग्य रीतीनें वेद म्हणणारा; असा मनुष्य उत्तम रीतीनें वेद शिकवितो व वेदाचा अर्थ करतो; म्हणून ( तस्मात् ) उत्तम रीतीनें साङ्गवेदपठण केलेला ( अनूचानः ) म्हणजे वेदांत तन्मय झालेला मनुष्य वेदाचा जो अर्थ तर्कानें ठरवितो ( अभ्यूहति ) तो अर्थ मंत्रद्रष्ट्यांनीं पाहिलेल्या ( आर्षं ) अर्थाच्या बरोबरीचा होतो; खऱ्या तर्काची महती एवढी आहे; निरुक्तशास्त्र अशा तर्कावर रचलें असल्यामुळें त्याचीही महती फार आहे.

## खंड १३ वा.

**हृदा तष्टेषु मनसो जवेषु यद्ब्राह्मणाः संयजन्ते सखायः ।**

**अत्राह त्वं वि जहुर्वेद्याभिरोहब्रह्माणो वि चरन्त्यु त्वे ( ऋ० सं० १०।७१।८ )**

हृदा तष्टेषु मनसां प्रजवेषु यत् ब्राह्मणाः संयजन्ते समानख्यानाः ऋत्विजः अत्र अह त्वं विजहुः वेद्याभिः वेदितव्याभिः प्रवृत्तिभिः । ओहब्रह्माणः ऊहब्रह्माणः । ऊहः एषां ब्रह्म इति वा ।

हृदा हृदयेन बुद्ध्या तष्टेषु सूक्ष्मताम् आपादितेषु अचिन्त्याध्यात्मादिषु विद्वद्भिः ( दुर्ग ) = ( जसा सुतार फळी तासून तासून अगदीं पातळ करतो तशी ) विद्वानांची बुद्धि अचिंत्य असे जे आध्यात्मिक विषय त्यांना तासून तासून ते विषय पातळ करते म्हणजे ते समजतील असें त्यांचें विवरण करते; आध्यात्मिक विषय आरंभीं बुद्धीच्या बाहेरचे दिसतात; पण बुद्धिमानांची बुद्धि त्यांत शिरून ते विषय स्पष्ट करून दाखविते. मनसः जवेषु = मनसां प्रजवेषु ( पान २७ ); मनसः जवेषु = मनसां येषु प्रजवाः प्रगमाः न साक्षात् ते दृश्यन्ते तेषु अर्थेषु स्वर्गापूर्वदेवतादिषु ( दुर्ग ) = स्वर्ग, कर्मांचें फल ( अपूर्व ), देवता वगैरे कोणालाही प्रत्यक्ष दिसत नाहींत; त्यांच्यांत मनच वेगानें शिरलें पाहिजे कारण मनानेंच त्यांचें खरें स्वरूप कळतें; अशा विषयांत. दुर्गानें मनसः जवेषु हें हृदा तष्टेषु ह्याचें विशेषण केलें असावें; ब्राह्मणाः = मंत्रांचा अर्थ ज्यांना कळला आहे असे व मंत्रांच्या अर्थात तत्त्व आहे कीं नाहीं ह्याचा खल करणारे ( दुर्ग ). संयजन्ते = परस्परेण संपूजयन्ति = एकमेकासह म्हणजे सर्वजण मिळून वेदांतील देवांची पूजा करतात म्हणजे ऋचांचा खरा अर्थ केल्यावरच त्यांतील देवता त्यांना पूज्य वाटतात; देवतांचें खरें स्वरूप कळल्याशिवाय त्यांची योग्य पूजा होत नाहीं; यज देवपूजासङ्गतिकरणदानेषु (धा० १।१०२७). सखायः = समानख्यानाः ऋत्विजः ( पान ५९१ ओळ ४व५ ). अत्राह = अत्र + अह; अत्र = तत्र = तेषु अर्थेषु सूक्ष्मेषु (दुर्ग). त्वं ह्याबद्दल एक घालावयास पाहिजे. वेद्याभिः=वेदितव्याभिः प्रवृत्तिभिः= अविद्वानांना ज्या कळत नाहींत व ज्या त्यांनीं जाणल्या पाहिजेत अशा मनःप्रवृत्तींनीं ( दुर्ग ). ओहब्रह्माणः = ऊहब्रह्माणः = इदं निरुक्तशास्त्रम् ऊहः ब्रह्म एषाम् अस्ति ते । न्यायसंकटेषु अप्रतिबध्यमानाः ( दुर्ग ) = निरुक्तशास्त्र ( ऊहः ) हेंच ब्रह्म आहे ज्यांचें असे; ज्यांना निरुक्तशास्त्रांत सर्व वेद भरला आहे असें वाटतें ते; विषय कितीही कठीण असला तरी ज्यांची बुद्धि कुंठित होत नाहीं असे. ऊहः एषां ब्रह्म इति वा एथें वा नको आहे कारण ऊहब्रह्माणः ह्या समासाचा ऊहः एषां ब्रह्म हा विग्रह आहे. विचरन्ति = अतिक्रम्य अविद्वांसं विशेषतः सर्वत्र प्रतिपूज्यमानाः चरन्ति ( दुर्ग ) = विद्वान् जो नाहीं अशाला मागें टाकून अत्यादराला पात्र असे ते सर्वत्र संचार करतात. त्वे = एके ( दुर्ग ).

दुर्गानें केलेला अर्थः—ऋत्विज् हें समान नांव धारण करणारे (सखायः) व ज्यांना मंत्रांचा खरा अर्थ कळला आहे असे ब्राह्मण (ब्राह्मणाः) जे विषय समजण्याकरितां मनानें खटपट केली पाहिजे ( मनसः जवेषु ) व ज्यांचा सूक्ष्म अर्थ विद्वान् आपल्या बुद्धीनें प्रकट करतात अशा आध्यात्मिक विषयांत प्रावीण्य मिळवून ऋचांतील देवतांची एकत्र होऊन किंवा ऐकमत्यानें पूजा करतात; अशा विषयांत ( अत्र ) पारंगत झाल्यामुळें ज्याला अर्थ कळत नाहीं अशा अज्ञ मनुष्याला ( त्वं ) आपल्या अचाट ज्ञानानें किंवा अचाट बुद्धीनें ( वेद्याभिः ) ते पार मागें टाकतात; तर्क म्हणजे निरुक्तशास्त्र हेंच ज्यांनीं ब्रह्म केलें आहे ( ओहब्रह्माणः ) म्हणजे जे निरुक्तशास्त्राला शिरसावंद्य

मानतात असे ते अविद्वानाला मागें टाकणारे व सर्वत्र पूज्य झालेले हवा तसा ( वि ) संचार करतात ( चरन्ति ).

**सायण** :— जेव्हां ( यत् ) ब्राह्मण हे समान नांव धारण करणारे ( सखायः ) विद्वान् पूर्वींच्या विद्वानांनीं स्वबुद्धीनें ठरविलेल्या किंवा कल्पिलेल्या वेदाच्या अर्थांत ( मनसः जवेषु ) गुण व दोष काय आहेत हें जाणण्याच्या इच्छेनें एकत्र होऊन काम करतात ( संयजन्ते ) तेव्हां अशा ब्राह्मणसंघांत ( अत्र ) असणारे ते कमी ज्ञानाच्या व अपुऱ्या बुद्धीच्या मनुष्याला ( त्वं ) आपल्या विद्येनें किंवा मनःप्रवृत्तींनीं ( वेद्याभिः ) खात्रीनें ( अह ) पार ( वि ) मागें टाकून जातात ( जहुः ); ज्यांच्या ज्ञानाचें व बुद्धीचें इतरांना आकलन होत नाहीं ( ओहब्रह्माणः ) असे कांहींजण ( त्वे ) वेदाचा अर्थ करण्याच्या बाबतींत स्वेच्छेनें प्रवृत्त होऊन तेथें हवा तसा संचार करतात ( वि चरन्ति ); हृदा बुद्धिमतां हृदयेन तष्टेषु निश्चितेषु परिकल्पितेषु = बुद्धिवंतांच्या हृदयांनीं निश्चित केलेल्या किंवा कल्पिलेल्या ( वेदार्थांत ); वेद्याभिः = वेदितव्याभिः विद्याभिः प्रवृत्तिभिः वा = सामान्य लोकांना कळत नाहींत अशा विद्यांनीं किंवा मनः प्रवृत्तींनीं; ओहब्रह्माणः = ऊह्यमानं ब्रह्म विद्याश्रुतिमतिबुद्धिलक्षणं येषां ते = ज्यांच्या विद्येची, वेदज्ञानाची व बुद्धीची कल्पना करावी लागते म्हणजे ज्यांचें ज्ञान अगाध व बुद्धीही अगाध आहे असे.

**सा इयं विद्या श्रुतिमतिबुद्धिः। तस्याः तपसा पारम् ईप्सितव्यम्। तदिदम् आयुः इच्छता न निर्वक्तव्यम्। तस्मात् छन्दःसुः शेषाः उपेक्षितव्याः। अथो आगमः। यां यां देवतां निराह तस्याः तस्याः ताद्भाव्यम् अनुभवति अनुभवति**

ह्या ऋचेंत ऊह म्हणजे अभ्यूह ह्याला ब्रह्म म्हणजे वेद म्हटलें आहे; ऊह म्हणजे निरुक्तशास्त्र; तेव्हां पर्यायानें निरुक्तशास्त्राला वेद म्हटलें आहे; एवढा ह्या शास्त्राचा महिमा आहे ( दुर्ग ). श्रुतिमतिबुद्धिः असा समास होणार नाहीं; कारण श्रुतिश्च मतिश्च बुद्धिश्च ह्यांचा समाहारद्वंद्व होत नाहीं; कदाचित् झाल्यास तो नपुंसक होईल; तेव्हां श्रुतिमति बुद्धिः असे दोन शब्द असतील; श्रुतिमति बुद्धिः = ज्यानें वेदाध्ययन केलें आहे अशा मनुष्यांतील बुद्धि; सा इयं विद्या श्रुतिमति बुद्धिः = ही विद्या म्हणजे हें निरुक्तशास्त्र ज्यानें वेदाध्यन केलें आहे अशा मनुष्याची बुद्धि होय; असाच मनुष्य आपल्या बुद्धिकौशल्यानें निरुक्तशास्त्र तयार करतो किंवा निरुक्तपद्धतीचा अवलंब करतो. वर दिलेल्या सायणभाष्यांत ऊह्यमानं ब्रह्म विद्याश्रुतिमतिबुद्धिलक्षणं येषां ते असा ओहब्रह्माणः ह्याचा विग्रह केला आहे; त्यावरून श्रुति, मति व बुद्धि असे तीन निराळे शब्द सायणाचार्यांनीं घेतले आहेत; पण मति आणि बुद्धि ह्यांत कोणता भेद आहे तें ध्यानांत येत नाहीं; १४।१४ ह्यांतील विद्यामतिबुद्धिमतां ह्यांत विद्या, मति व बुद्धि असे वेगळे शब्द आहेत; तेथेंही मति व बुद्धि ह्यांतला भेद कळत नाहीं; कदाचित् श्रुतीनां मत्यै मननाय बुद्धिः = मंत्रांचें मनन करण्याकरितां म्हणजे त्यांचा अर्थ पूर्णपणें काढण्याकरितां लागणारी बुद्धि असा समासविग्रह व अर्थ

असेल; श्रुतीचा खरा अर्थ कळण्याला उत्तम प्रकारची तर्कबुद्धि पाहिजे; अभ्यूह म्हणजे निरुक्तपद्धति; हीच ती तर्कबुद्धि, हीच ती विद्या होय. तस्याः तपसा पारम् ईप्सितव्यं गन्तुमिति वाक्यशेषः ( दुर्ग ) = तपानेंच म्हणजे कडक ब्रह्मचर्यानेंच ह्या विद्येच्या शेवटाला जाण्याची इच्छा धरावी. कडक ब्रह्मचर्य नसेल तर निरुक्तशास्त्राच्या अंताला कोणीही जाणार नाहीं; इतकें हें निरुक्तशास्त्र गहन आहे. तदिदम् आयुः इच्छता न निर्वक्तव्यं = ज्याला कडक ब्रह्मचर्य पाळतां येत नाहीं व ज्याला दीर्घायु होण्याची इच्छा आहे त्यानें संबंध निरुक्तशास्त्राचा अभ्यास करूं नये; कारण तसें केल्यानें बुद्धीवर ताण पडून त्याचें आयुष्य कमी होईल. तस्मात् छन्दःसु शेषाः उपेक्षितव्याः = म्हणूनच म्हणजे आयुष्य खुंटेल ह्या भीतीनें वेदांचा अर्थ करतांना पुष्कळ बाकी ( शेषाः ) ठेवण्याची खबरदारी घ्यावी म्हणजे सबंध वेदाचा अर्थ करण्याचें साहस करूं नये. ब्रह्मचार्यानें सुद्धां असें साहस करूं नये असें दुर्ग म्हणतो. तपस्विनापि च निर्ब्रुवता तस्मात् छन्दःसु शाखान्तरेषु निगमोदाहरणानाम् आकाङ्क्षित्वनिराकांक्षायै वाक्यशेषाः पादार्धर्चादिलक्षणाः उपेक्षितव्याः ( दुर्ग ) = शब्दांचें निर्वचन करणाऱ्या तपस्व्यानें म्हणजे कडक ब्रह्मचर्यव्रत पाळणाऱ्यानें सुद्धां वेदाच्या सगळ्या शाखांतील ऋचांचा अर्थ जाणण्याची इच्छा पुरी करण्याकरितां ऋक्पाद, ऋगर्ध व सबंध ऋचा ह्या सर्वांच्याकडे लक्ष दिलें पाहिजे; ऋचेचा यत्किंचितही भाग वगळतां उपयोगी नाहीं. उप + ईक्ष् ह्याचा जवळ जाऊन पाहणें, पूर्णपणें लक्षांत घेणें असा अर्थ निरुक्तांत सर्वत्र आहे; व तोच अर्थ दुर्गानें एथें घेतला आहे; पण वर ( ओळ आठ ) उपेक्षा करणें, सोडून देणें असा अर्थ आहे. देवतांच्या नांवांचें निर्वचन करण्याची इतकी खटपट कशाकरितां करावयाची असें कोणी विचारल्यास त्याला आगमच पुढीलप्रमाणें उत्तर देतो; व्युत्पत्ति करणारा ज्या ज्या देवतेच्या नांवाची पूर्णपणें व्युत्पत्ति करतो ( निराह ) त्या त्या देवतेची तो तद्रूपता ( ताद्भाव्यं ) अनुभवतो. देवतेचें खरें स्वरूप तिच्या नांवांतला खरा अर्थ कळल्याशिवाय समजणार नाहीं; स्वरूप न समजल्यामुळें देवतेपासून मनुष्य नेहमीं दूर राहील; तेव्हां तद्रूप होण्यास देवतांच्या नांवाचा निरुक्तशास्त्राच्या आधारानें पूर्ण खल झालाच पाहिजे. अनुभवति ह्याची द्विरुक्ति अध्याय संपला हें दाखविण्याकरितां. यां यां देवतां० अनुभवति हें वचन कोणत्या ब्राह्मणांत आहे तें कळत नाहीं.

तक्ष् = तासणें, तासून तयार करणें; तक्ष् + तः = तष्टः=तासून तयार केलेला, रचलेला, नवीन उत्पन्न केलेला. एष वः स्तोमो मरुतो नमस्वान् हृदा तष्टो मनसा धायि देवाः ( १।१७१।२ ) = हे मरुदेवांनो, आमच्या मनानें ( हृदा = मनसा ) तयार केलेला ( तष्टः ) हवीसह ( नमस्वान् ) हा स्तोम तुम्हांला दिला जात आहे. आ ते अग्न ऋचा हविः हृदा तष्टं भरामसि ( ६।१६।४७ ) = हे अग्नि, मनापासून ( हृदा ) तयार केलेला हवि स्तुतीसह ( ऋचा ) आम्ही तुला अर्पण करीत आहों. हृदा यत् तष्टान् मन्त्रान् अशंसन् ( १।६७।२ ) = हृदयांतून तयार झालेले

मंत्र स्तोते म्हणते झाले. इमा ब्रह्माणि वर्धना अश्विभ्यां सन्तु शन्तमा । या तक्षाम रथान् इव अवोचाम बृहन्नमः (५।७३।१०)=रथांसारख्या ज्या ह्या स्तुति आम्हीं रचल्या आहेत व ज्या आम्ही म्हणत आहोंत त्या ह्या स्तुति अश्विनांना संतुष्ट करोत. अक्षण्वन्तः कर्णवन्तः सखायो मनोजवेषु असमा बभूवुः (१०।७१।७) ह्याचा अर्थ पहा (पान २७). मनोजवेषु = मनाच्या वेगांत, मनानें झटकन् रचिलेल्या प्रबंधांत किंवा वाङ्मयकृतींत; हृदा तष्टेषु मनसः जवेषु = अंतःकरणानें रचिलेल्या काव्यकृतींत. ब्रह्म = स्तुति; स्तुति रचणारे ते ब्राह्मण. यजन्ते हा यतन्ते ह्याचा अपभ्रष्ट उच्चार असावा; यत् = स्पर्धा करणें. वैश्वानरो यतते सूर्येण ( १।९८।१ ) = वैश्वानर अग्नि प्रकाशाच्या बाबतींत सूर्याशीं स्पर्धा करतो. सं भानुना यतते सूर्यस्य ( ५।३७।१ ) = अग्नि सूर्याच्या प्रकाशाशीं स्पर्धा करतो. हंसा इव श्रेणिशो यतन्ते ( १।१६३।१० ) = एका रांगेत असलेले घोडे धांवण्याच्या बाबतींत हंसांप्रमाणें एकमेकांशीं स्पर्धा करतात. अह = अत्र (पान ३०६ ). विद् = जाणणें; वेद्या = ज्ञान, ज्ञानकृति, कौशल. अहश्च कृष्णम् अहरर्जुनं च वि वर्तेते रजसी वेद्याभिः ( ६।९।१ ) = रात्र ( अहर् कृष्णं ) व उषा ( अहर् अर्जुनं ) आपल्या कुशलतेनें ( वेद्याभिः ) द्यावापृथिवीभोंवतीं ( रजसी ) हिंडतात ( वि वर्तेते ). वेद्या ह्याचा धन असाही अर्थ होतो ( पान १३५ ). हर्मि स्तोमम् ओहमिन्द्राय ब्रह्माणि ( १।६१।१ ) = ह्या इंद्राला स्तुति ( स्तोमं = ओहं = ब्रह्माणि ) मी अर्पण करतों ( हर्मि ). ओहाश्च ब्रह्माणि च येषां ते ओहब्रह्माणः = ज्यांच्याजवळ अतिशय स्तुति आहेत असे म्हणजे भराभर असंख्य ऋचा रचणारे.

ऋचेचा अर्थः—जेव्हां ( यत् ) स्तुति रचणारे ( ब्राह्मणाः ) मित्र (सखायः) स्तुति रचण्याच्या कामांत एकमेकांशीं स्पर्धा करतात तेव्हां त्या कामांत ( अत्र = अह ) असंख्यस्तुति रचणारे ( ओहब्रह्माणः ) ज्याला तितक्या स्तुति रचतां येत नाहींत अशाला ( त्वं ) मागें टाकतात ( विजहुः ) व अडकाठीवाचून काव्यप्रदेशांत हवा तसा संचार करतात.

# अध्याय १४ वा.

## खंड १ ला.

( टीप:—गुर्जरप्रतींत चवदावा अध्याय हा निराळा नसून तेराव्याचाच भाग आहे; त्यामुळें तींतील खंडांचे आंकडे १३ च्या पुढचे म्हणजे १४, १५ वगैरे आहेत ).

**व्याख्यातं दैवतम् । यज्ञाङ्गं च । अथातः ऊर्ध्वमार्गगतिं व्याख्यास्यामः । सूर्य आत्मा (ऋ० सं० १।११५।१) इति उदितस्य हि कर्मद्रष्टा । अथ एतत् अनुप्रवदति । अथ एतं महान्तम् आत्मानम् एष ऋग्गणः प्रवदति । इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुः (ऋ० सं० १।१६४।४६) इति । अथ एष महानात्मा आत्मजिज्ञासया आत्मानं प्रोवाच। अग्निरस्मि जन्मना जातवेदाः ( ऋ० सं० ३।२६।७ ) अहमस्मि प्रथमजाः इत्येताभ्याम्**

दैवतकांड १३ व्याच्या शेवटीं संपलें; यज्ञाचें अंगही संपलें. यज्ञाचें अंग कोणतें व तें निरुक्तांत कोठें सांगितलें आहे ? दैवतकांडांत यज्ञाचा उल्लेख कांहीं थोड्या ठिकाणीं आला आहे; यज्ञांग हें दैवतांत येत असल्याकारणानें त्याचा वेगळा निर्देश करावयास नको; कदाचित् देवता ह्या यज्ञाचें विशिष्ट अंग होत. कारण देवतेशिवाय यज्ञ होणें अशक्य आहे; असा अर्थ असल्यास च गाळावयास पाहिजे. आतां ह्याच्या-पुढें ( अतः ) पृथिवीवरून वर म्हणजे स्वर्गाकडे जो मार्ग जातो त्या मार्गानें गमन कसें करावें त्याचें विवरण करणार आहोंत; ऊर्ध्वेन मार्गेण गतिः गमनं = वर जाणाऱ्या मार्गानें जाणें; एथें मार्ग शब्द व्यर्थ आहे; ऊर्ध्वगतिः = वर म्हणजे स्वर्गाकडे गमन. उदितस्य हि कर्मद्रष्टा ह्याचा अर्थ कळत नाहीं; उदित कोण व कर्मद्रष्टा कोण ? सूर्य आत्मा ही ऋचा १२।१६ (पान ९८६) ह्यांत दिली आहे; तींत सूर्य उगवत आहे असें म्हटलें आहे; तेव्हां उदितस्य हा शब्द उदितः सः ह्याचा अपभ्रंश असावा; उगवलेला तो सर्व कर्मे पाहतो ( कर्मद्रष्टा ); आ सूर्यो बृहतः तिष्ठदज्रान् ऋजु मर्तेषु वृजिना च पश्यन् ( ४।१।१७ ) = मनुष्यांनीं केलेलीं चांगलीं व वाईट कृत्यें पाह-णारा सूर्य उंच पर्वतावर उभा राहिला आहे; तेव्हां उदितः सः असाच पाठ असावा असें स्पष्ट होतें. जो चांगलीं कर्में करतो तो वर म्हणजे सूर्याकडे म्हणजे महान् आत्म्याकडे जातो हें सिद्ध करण्याकरितां ही ऋचा दिली असावी. अथ एतत् अनुप्रवदति ह्या वाक्यांतील प्रवदति ह्याचा कर्ता कोण व तो कर्ता हें सांगतो म्हणजे काय सांगतो व तें कोठें सांगितलें आहे ? अथ एतं महान्तम् आत्मानम् एष ऋग्गणः प्रवदति = ह्या अध्यायांतील ऋचांचा समुदाय ह्या महान् आत्म्याविषयीं बोलतो म्हणजे चवदाव्या अध्यायांतल्या सर्व ऋचा आत्मपर आहेत. मागील वाक्यांत अनुप्रवदति ह्याचा कर्ता एष ऋग्गणः असा असेल; एतत् बदल एनं पाहिजे; अथ एनं एषः

ऋग्गणः अनुप्रवदति हें वाक्य गाळलें असतां चालेल; कारण पुढील वाक्याचा तोच अर्थ आहे. अनुप्रवदति व पुढील वाक्यांतील प्रवदति ह्यांच्याबद्दल अनुक्रमानें अनुप्रवदन्ति व प्रवदन्ति असे अशुद्ध पाठ महाराष्ट्रप्रतींत आहेत. एषर्ग्गणः असा मूळ निरुक्तांत संधि केला आहे; परंतु एषः ऋग्गणः ह्याचा एषर्ग्गणः असा संधि कधींही होणार नाहीं. इन्द्रं०अग्निमाहुः ह्याचा अर्थ पहा ( पान ५६५–५६६ ); इंद्र वगैरे नांवें महान् आत्म्याचींच होत असें त्या ऋचेंत म्हटलें आहे. अथ एष महानात्मा आत्मजिज्ञासया आत्मानं प्रोवाच = हा महान् आत्मा आत्म्याला जाणण्याच्या इच्छेनें आत्म्याविषयीं बोलतो. पण आत्मजिज्ञासा कोणाची ? महान् आत्म्याला आत्मजिज्ञासा कशी असेल ? लोकानाम् आत्मजिज्ञासातृप्त्यर्थं असा आत्मजिज्ञासया ह्याचा अर्थ दिसतो. अग्निरस्मि जन्मना जातवेदाः व अहमस्मि प्रथमजाः ह्या ऋचा पुढील खंडांत दिल्या आहेत; इति एताभ्यां = ह्या दोन ऋचांत महान् आत्मा आत्म्याविषयीं म्हणजे स्वतःविषयीं बोलतो.

## खंड २ रा.

**अग्निरस्मि जन्मना जातवेदा घृतं मे चक्षुरमृतं म आसन्। अर्कस्त्रिधातू रजसो विमानोऽजस्रो घर्मो हविरस्मि नाम ( ऋ० सं० ३।२६।७ )**

**सायणः—** परमतत्त्वाचा साक्षात्कार होऊन अग्नि त्याला झालेला सर्वात्मकत्वाचा अनुभव ह्या व ह्याच्या पुढील ऋचेंत सांगत आहे; अग्निरस्मि जन्मना जातवेदाः = श्रवणमननादिसाधननिरपेक्षेण स्वभावतः एव साक्षात्कृतपरतत्वस्वरूपः = अग्नीला मला जन्मापासूनच श्रुति, श्रुतीचें मनन वगैरे साधनांशिवाय आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला आहे; सर्व ब्रह्मांडाला प्रकाशित करणारा हा जो माझा प्रकाशरूप डोळा (चक्षुः) तो अत्यंत दीप्तिमान् आहे ( घृतं = दीप्तं ); घृ क्षरणदीप्त्योः ( धा० ३।१४ ); घृ ( = दीप्त होणें ) + तं = घृतं = दीप्तम्; सर्व भोक्त्यांचा मी प्रतिनिधि असल्याकारणानें स्वर्गीय व पृथिवीवरील भोग्यवस्तूंचा उपभोग देणारें अमृत म्हणजे केलेल्या यज्ञादिकर्मांचें फल माझ्या तोंडांत आहे ( आसन् = आस्ये ); ह्याप्रमाणें दुसऱ्या पादांत अग्नीनें आपल्या पृथिवीवरील स्वरूपाचें वर्णन केलें आहे; अर्क म्हणजे जग निर्माण करणारा प्राण; मी तो प्राण असून त्याचे तीन भाग करून वायुरूपानें अंतरिक्षाचा ( रजसः ) मी अधिष्ठाता ( विमानः ) आहें; त्याप्रमाणें कधींही क्षय किंवा ऱ्हास न पावणारा ( अजस्रः ) प्रकाशात्मा ( घर्मः ) द्युलोकीं असणारा आदित्य मी आहें; अशा प्रकारचें तीन ठिकाणचें आपलें भोक्तृस्वरूप सांगून आपलें भोग्यस्वरूप अग्नि कथन करतो; हवि म्हणून जें कांहीं आहे तें मीच आहें; ह्याप्रमाणें भोक्तृ व भोग्य सर्व मी आहें; किंवा ऋचेचा पुढीलप्रमाणें अर्थ असेल; मी देवांना घृतानें माखलेला हवि देणारा आहें ( अग्निः = हविःप्रापणात् अङ्गनादिगुणयुक्तः ); जन्मापासून मला ज्ञान झालें आहे ( जातवेदाः ); किंवा सर्व वस्तु जाणणारा ( जातवेदाः ) म्हणजे

मी सर्वात्मक आहें; हें जें सर्वांना माहीत असलेलें घृत तो माझा डोळा; जसा डोळा वस्तूंवर प्रकाश पाडतो त्याप्रमाणें माझ्यांत टाकलेलें घृत ज्वाला उत्पन्न करून मला प्रकाशित करतें; कधीं नाश न पावणारा ( अमृतं ) माझा प्रकाश माझ्या तोंडांत आहे; प्राण, अपान व व्यान असा तीन प्रकारचा (त्रिधातुः) पूज्य ( अर्कः ) प्राण तो मी आहें; त्याप्रमाणें अंतरिक्षाला मोजणारा ( विमानः = माता = परिच्छेत्ता ) मी आहें; उन्हानें सतत ( अजस्रः ) भाजणारा ( घर्मः ) मी सूर्य आहें; इतकेंच नाहीं तर आज्य पुरोडाश वगैरे जो हवि आहे तो सर्व मी; सर्व वस्तु अग्नि आहेत म्हणजे अग्नि हा परब्रह्म आहे असें त्या ऋचेंत सांगितलें आहे.

३।२६ या सूक्तांतल्या एक ते तीन ऋचा अग्निपर, चार ते सहा मरुत्पर व सात अग्निपर अशा आहेत; आठ व नऊ ह्या सोमपर असव्यात असें वाटतें. सातव्या ऋचेंत अग्नि हा वक्ता असावा असें वाटत नाहीं; १०।४८ व १०।४९ ह्या सूक्तांत जसा कोणी एक मी इंद्र आहें व इंद्राचीं सर्व कृत्यें मीं केलीं आहेत असें म्हणतो त्याप्रमाणें प्रस्तुत ऋचेंत कोणी एकजण विनोदानें म्हणतो कीं मी जातवेदस् अग्नि आहें, घृत हा माझा डोळा आहे, अमृत माझ्या तोंडात आहे, मी मजबूत वज्र आहें, द्यु मोजणारा आहें, मी अजस्र आहें, घर्म आहें, हवि आहें व नामही आहें; पण ह्या त्याच्या म्हणण्यांत गूढार्थ आहे. ( १ ) अग्नीला जातवेदस् पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे व जातवेदस् शब्द अग्निवाचक झाला आहे; अग्नि हा जन्मापासून जातवेदस् आहे; ( २ ) अग्नि = दाता; जातवेदाः = धनवान् ( पान ५६६ ). घृत हा अग्नीचा डोळा असें जरी ऋग्वेदांत इतरत्र कोठें म्हटलें नाहीं तथापि इतर देवांपेक्षां अग्नीचा घृताशीं अत्यंत निकट संबंध आहे. घृतं मिमिक्षे घृतमस्य योनिः घृते श्रितो घृतम् उ अस्य धाम ( २।३।११ ) = अग्नि घृताचा वर्षाव करतो, त्याचा जन्म घृतापासून, तो घृतांत बसलेला असतो, त्याचें घर घृतच. घृतमग्नेः वध्र्यश्वस्य वर्धनं घृतमन्नं घृतम् उ अस्य मेदनम्। घृतेनाहुत उर्विया वि पप्रथे सूर्य इव रोचते सर्पिरासुतिः ( १०।६९।२ ) = घृत अग्नीला वाढवितें, त्याचें अन्न घृत आहे, त्याचें मांस घृत, घृताच्या आहुतीनें तो विस्तार पावतो व घृतानें तो सूर्यासारखा प्रकाशतो. तेव्हां घृत हा अग्नीचा डोळा असें म्हणण्यास कोणताही प्रत्यवाय नसावा; डोळा जसा तेजस्वी तसा घृतामुळें अग्नीही तेजस्वी. ( २ ) घृतं = घृतासारखें झळकणारें धन. चक्षुः = तेजस्वी धन. चक्षुः ह्याचा प्रकाश असा अर्थ होतो; माझा प्रकाश घृत आहे म्हणजे हिरण्य आहे; हिरण्य-निर्णिक् प्रमाणें घृतनिर्णिक् असा त्याच अर्थी शब्द आहे; घृत म्हणजे हिरण्य हा पोषाख आहे ज्याचा तो घृतनिर्णिक्. अमृतं = ( १ ) हवि, ( २ ) धन. (१ व २) नू चिन्नु वायोरमृतं वि दस्येत् ( पान ७३४ ). ( २ ) अत्रा दधे अमृतं जातवेदाः ( ३।२३।१ ) = धनवान् अग्नि एथें धन ( अमृतं ) देतो ( दधे ). आसन् = (१) तोंडांत, ( २ ) सन् = देणें, दान, धन; आ = सन् = धन; आसन् = अतिशय; अमृतं मे आसन् = ( १ ) माझ्या तोंडांत हवि आहे; अग्नीच्या तोंडांतला हवि देव

खातात असें म्हटलें आहे; ( २ ) मजजवळ अतीशय धन आहे. अर्क = वज्र व धन (पान ८७६). त्रिधातुः = (१) लोखंड वगैरे तीन धातूंचा बनविलेला, बळकट; (२) धा = देणें; धा + तुः = धन; त्रिधातुः = अमित धनानें भरलेला. ( १) यस्मा अर्क सप्तशीर्षाणमानृचुः त्रिधातुम् उत्तमे पदे ( ८।५१।४ ) = ज्या इंद्राकरितां देव सात डोक्याचें, बळकट ( त्रिधातुं ) वज्र ( अर्कं ) स्वर्गलोकीं ( उत्तमे पदे ) तयार करते झाले ( आनृचुः ). ( २ ) त्रिधातु राय आ सुवा वसूनि ( ३।५६।६ ) = हे सवित्या, पुष्कळ (त्रिधातु = त्रिधातूनि) धन (रायः = वसूनि) दे (आसुव). (१) अर्कः त्रिधातुः = ( १ ) अतीशय बळकट वज्र, ( २ ) धनानें भरलेले म्हणजे अतिशय धन. अग्नीला वज्र असें ऋग्वेदांत कोठेंही म्हटलें नाहीं; तथापि अर्क म्हणजे वज्र असा एथें प्राथमिक अर्थ असावा. रजस् = ( १ ) द्युलोक, ( २ ) धन. ( १ ) रथः त्रिचक्रः परि वर्तते रजः ( ४।३६।१ ) = अश्विनांचा तीन चाकी रथ द्यूलोकाभोंवतीं ( रजः परि ) हिंडतो. ( १ व २ ) वि यो रजांसि अमिमीत सुक्रतुः वैश्वानरो वि दिवो रोचना कविः ( ६।७।७ ) = ( १ ) अद्भुत कृत्यें करणारा ( कविः=सुक्रतुः ) जो वैश्वानर अग्नि तो तिन्ही स्वर्गलोक ( रजांसि = रोचनानि ) मोजता झाला ( वि + अमिमीत ); ( २ ) धनवान् ( यः = वैश्वानरः=सुक्रतुः) दाता ( कविः ) अतीशय धन ( रजांसि = रोचनानि ) देता झाला ( वि + अमिमीत ). रजसः विमानः = ( १ ) द्युलोक मोजणारा, ( २ ) धन देणारा. अग्नीला पांच ठिकाणीं ( २।३५।८॥३।१।२१॥ ३।५४।१॥७।१।१८ ॥ १०।६।२ ) अजस्रः म्हणजे देदीप्यमान म्हटलें आहे. घर्म = ( १ ) अग्नि ( पान ९४१ ), ( २ ) अग्नीसारखे देदीप्यमान धन; किंवा ( १ ) ऊन दूध ( पान ५२१ ), ( २ ) दुधासारखें तेजस्वी धन. अजस्रः घर्मः = देदीप्यमान धन. अग्नि देवांचा हवि आहे. हविः = धन; त्रेधा हविष्कृतम् ( १।३४।८ ) = हे आश्विनांनो, तीन ठिकाणचें ( त्रेधा ) धन ( हविः ) द्या ( कृतं ); हविष्कृणुष्व सुभगो यथाससि ब्रह्मणस्पतेरव आ वृणीमहे ( २।२६।२ ) = हे ब्रह्मणस्पति, ज्या अर्थीं तूं धनवान् ( सुभगः ) आहेस ( अससि ) त्या अर्थीं धन ( हविः ) दे ( कृणुष्व ); तुजपाशीं धन ( अवः ) आम्हीं मागत आहोंत (आ वृणीमहे ). नाम = ( १ ) हवि, ( २ ) धन; त्वमेतानि पप्रिषे वि नामेशान इन्द्र दधिषे गभस्तौ ( १०।७३।८ ) = हे इंद्रा, धनाधीश (ईशानः ) तूं आपल्या हातांत ( गभस्तौ ) पुष्कळ ( एतानि ) धन ( नाम = नामानि ) धारण करतोस ( वि + दधिषे ) व देतोस ( पप्रिषे ); तवायं विश्वः पुरुहूत पार्थिवः अवस्युर्नाम भिक्षते ( ७।३२।१७ ) = हे इंद्रा ( पुरुहूत ), पृथिवीवरील ( पार्थिवः ) हे सर्व ( विश्वः ) धनवान् ( अवस्युः ) लोक तुझें धन ( नाम ) वांटून घेतात ( भिक्षते ). ऋचेंतील शब्दांचा प्राथमिक अर्थ वर दिलाच आहे; पण खरा म्हणजे गूढार्थ धनपर आहे; तो मार्मिकांकरितां आहे; आत्मपर केलेला अर्थ ओढाताणीचा दिसतो.

**अहमस्मि प्रथमजा ऋतस्य पूर्वं देवेभ्यो अमृतस्य नाम। यो मा ददाति स इदेव मावत् अहमन्नमन्नमदन्तमद्मि ॥**

तैत्तिरीय ब्राह्मणांत (२।८।८) नाम बद्दल नाभिः व आवत् बद्दल आवाः आणि तैत्तिरियोपनिषदांत (३।१०।६) नाभायि व आवाः असे पाठ आहेत; महाराष्ट्रपाठ नाभिः व मा वा असे आहेत. नाम व आवत् हे पाठ कोणत्याही उपनिषदांत किंवा ब्राह्मणांत आढळत नाहींत. प्रजापतिः प्रथमजा ऋतस्यात्मनात्मानमभि संबभूव (महानारायणोपनिषद् २।७) = ऋतापासून प्रथम जन्मलेला प्रजापति स्वतःकडून स्वतःला उत्पन्न करता झाला. हा श्लोक प्रस्तुत ऋचेसारखाच आहे.

शांकरभाष्यः— अहमस्मि = प्रागुक्तम् उपास्यम् अहं भवामि = आत्तांच सांगितलेलें उपास्यब्रम्ह मी आहें; प्रथमजाः = पुरश्चरणोपासनायाः प्रथमोत्पन्नः = पुरश्चरणयुक्त उपासनेपासून प्रथम उत्पन्न झालेला; ऋतस्य = सत्यमूर्तामूर्तस्य जगतः= मूर्त व अमूर्त असें जें सत्यजगत् त्याच्या; पूर्वं स्यां देवेभ्यः अमृतस्य क्षीरस्य नाभायि नाभ्यां =देवांच्या आधीं क्षीराच्या नाभींत मी उत्पन्न झालों; पुरश्चरणयुक्त उपासनेपासून पहिल्याप्रथम उत्पन्न झालेला मी आतां सांगितलेलें उपास्यब्रम्ह झालों आहें; मूर्त व अमूर्त सत्यजगताच्या व देवांच्याही आधीं मी अमृताच्या म्हणजे क्षीराच्या नाभींत होतों; असा प्रथमार्धाचा अर्थ असावा; तो अर्थ मला चांगलासा कळला नाहीं; यो मा ददाति स्वीकरोति धारयति वा स इत् एव इत्थम् एव मा माम् आवाः रक्षितवान् = जो माझा स्वीकार करतो किंवा मला आसरा देतो त्यानेंच आजपर्यंत अशा रीतीनें माझें रक्षण केलें आहे; अहम् अन्नं क्षीरम् उपास्याधारम् अहम् एव भवामि = उपास्यब्रह्माचा आधार जें क्षीर तें मीच आहें; अन्नम् अदन् वा यो अत्ति तम् अन्नम् अदन्तं देवब्राह्मणेभ्यः अन्नम् अदातारम् अहम् अद्मि अहं भक्षयामि = देवांना व ब्राह्मणांना न देतां जो अन्न भक्षण करतो त्याला मी खाऊन टाकतों; यद्वा। अन्नम् अदन्तम् अन्नादनकर्तारं जीवभावं पञ्चाङ्गोपासनातः अद्मि भक्षयामि। संसाररूपं विनाशयामि इत्यर्थः = किंवा अन्न भक्षण करणारा जो जीव त्या जीवाची स्थिति मी पंचांग उपासनेनें खाऊन टाकतों म्हणजे जीवात्म्याच्या संसाररूपाचा मी नाश करतों म्हणजे जीवात्मभाव टाकून देतों. ऋचेच्या दोन अर्धांमधील संबंध लक्षांत येत नाहीं.

**सायण** :— अहम् अन्नस्वामी देवः ऋतस्य यज्ञस्य प्रथमजाः प्रथमं जनयिता अस्मि। यज्ञस्य हविर्जन्यत्वात्। हविषः अन्नरूपत्वात् = अन्नस्वामी मी यज्ञाचा पहिला जनक आहें; यज्ञ हवींनीं उत्पन्न होतो व हवि अन्न आहे; म्हणून अन्नाचा स्वामी म्हणजे अन्न उत्पन्न करणारा यज्ञ उत्पन्न करतो; तादृशः अहमन्नस्वामी पूर्वं पुरा देवेभ्यः देवार्थम् अमृतस्य नाभिः बन्धकः अस्मि। बध्नाति नह्यति अमृतम् इति नाभिः। देवा हि अमृतम् उपजीवन्ति। अमृतं च अन्नविशेषः। तस्मात् अहमेव अमृतस्य संपादकः = यज्ञ उत्पन्न करणारा अन्नस्वामी मी पुरातन काळीं देवांकरितां अमृताचा नाभि म्हणजे बंधनकर्ता होतों; जो अमृत बांधतो ( नह्यति = बध्नाति ) तो नाभि;

देव अमृतावर आपली उपजीविका करतात; अमृत हें विशिष्ट प्रकारचें अन्न होय; म्हणून मी अमृताचा संपादक आहें; यः श्रद्धालुः पुमान् मा माम् अन्नरूपं ददाति ब्राह्मणादिभ्यः प्रयच्छति स इत् एव दाता स्वयमेव मा माम् अन्नदेवम् आवाः आवृणोति। स्वीकरोति इत्यर्थः। द्वौ हि लोके पुरुषौ दाता च अदाता च। तत्र आद्यः कालान्तरे भोक्तुं मां संगृह्णाति। यावदन्नमिदानीं दीयते तावदेव कालान्तरे शतधा सहस्रधा वर्धते। तस्मात् दाता एवं मां संगृह्णाति = जो श्रद्धाळू मनुष्य अन्नरूप जो मी त्या मला ब्राह्मण वगैरेंना देतो तोच दाता अन्नदेव जो मी त्या मला पसंत करतो म्हणजे माझा स्वीकार करतो; जगांत दाता व अदाता अशीं दोन प्रकारचीं माणसें असतात; त्यांपैकीं पहिला म्हणजे दाता भविष्यकाळीं उपभोग घेण्यासाठीं माझा संग्रह करतो; जितकें तो ब्राह्मणादिकांना अन्न देतो त्याच्या शतपट किंवा सहस्रपट तें दिलेलें अन्न वाढतें; अशारीतीनें दाता माझा संग्रह करतो; यस्तु अन्तिमो माम् अदत्वा एव स्वयमेव अत्ति अहमेव अन्नम् अद्मि इति मन्यते तत् अन्नम् अदत्ताभिमानिनम् अन्नदेवः अहम् अद्मि। तं विनाशयामि। अदातुः कालान्तरे अन्नाभावात् = मीच एकटा अन्न खाणार अशा अभिमानानें अन्नरूप जो मी त्या मला दुसऱ्याला न देतां जो आपण एकटाच खातो त्या अदात्याला अन्नदेव मी खाऊन टाकतों म्हणजे त्याचा नाश करतों; म्हणजे भविष्यकाळीं अदात्याला अन्न मिळत नाहीं. शंकराचार्य ऋचेचा आत्मपर अर्थ करतात पण सायणाचार्यांनीं तिचा अन्नपर अर्थ केला आहे.

अहमस्मि प्रथमजाः ऋतस्य पूर्वं देवेभ्यः = देवांच्याही आधीं ऋतापासून मी पहिल्या प्रथम जन्मलों आहें म्हणजे जीवात्मा हा परमात्म्याचेंच रूप आहे. अमृतस्य नाम अहम् अस्मि = अमृताचें मी नाम आहें म्हणजे अमृत जें ब्रह्म तेंच माझें नांव; खरें पाहतां मी ब्रह्म आहें. यो मा ददाति स इदेव मा आवत् = ब्रह्म जो मी त्या मला जो देतो तोच माझें रक्षण करतो; मी ब्रह्म आहें असें जो लोकांना कथन करतो तोच माझें खरोखर रक्षण करतो; अन्नानें मनुष्याचें खरें रक्षण होत नाहीं; तें ब्रह्मभावनेनेंच होतें. अहम् अन्नं = मीच अन्न आहें, माझ्याहून अन्न भिन्न नाहीं; सर्व वस्तूंचा ब्रह्मांत अंतर्भाव होतो. अन्नम् अदन्तम् अद्मि = अन्न खाणाऱ्याला मी खाऊन टाकतों म्हणजे अन्न खाणारा जो जीव त्याला मी खाऊन टाकतों; ब्रह्मांत जीवभाव नष्ट होतो असा ऋचेचा ब्रह्मपर अर्थ असावा असें वाटतें.

**इति। स ह ज्ञात्वा प्रादुर्बभूव। एवं तं व्याजहार। यं तमात्मानम् अध्यात्मजम् अन्तिकम् अन्यस्मै आचचक्ष्वेति**

ह्याप्रमाणें (इति) स्वतःला वस्तुतः जाणून (ज्ञात्वा) तो महान् आत्मा प्रकट झाला व अध्यात्म्यापासून उत्पन्न झालेला आत्मा कोण आहे तें दुसऱ्याला जवळ जाऊन सांग असें म्हणाला. कोणापुढें तो प्रकट झाला? यं हें संबंधीसर्वनाम वाक्यांत नको. अध्यात्मजम् आत्मानं म्हणजे काय? आचचक्ष्व ह्याबद्दल आचक्ष्व पाहिजे; यं० आचचक्ष्व हें अशुद्ध संस्कृत होय. व्याजहारायतमात्मानमध्यात्मजं हा महाराष्ट्रपाठ

अशुद्ध व दुर्बोध आहे. पहिल्या खंडांत महान् आत्म्याला आत्मा जाणण्याची इच्छा झाली असें म्हटलें आहे; प्रस्तुत खंडांत तो आत्म्याला जाणतो व दुसऱ्याला आत्मा कथन कर असें कोणाला तरी सांगतो असें आहे; पण महान् आत्म्याला स्वतःला जाणण्याची इच्छा कशी होईल? कदाचित् महान् आत्मा म्हणजे बुद्धीचें साहाय्य घेणारा जीवात्मा असेल; तो जीवात्मा परात्म्याला जाणल्यावर हा परात्मा काय आहे हें दुसऱ्यांना मुद्दाम जाऊन सांग असें कोणाला तरी म्हणतो. स ह परम् आत्मानं ज्ञात्वा शिष्याय प्रादुर्बभूव तं च व्याजहार इमं परम् आत्मानम् अन्यस्मै आचक्ष्व इति अशा तऱ्हेचे संस्कृत पाहिजे.

## खंड ३ रा.

**अपश्यं गोपामनिपद्यमानमा च परा च पथिभिश्चरन्तम् । स सध्रीचीः स विषूचीर्वसान आ वरीवर्ति भुवनेष्वन्तः ( ऋ० सं० १।१६४।३१ )**

**आ वरीवर्ति भुवनेषु अन्तः इति**

ऋचेचें भाष्य न देतां आ वरीवर्ति भुवनेषु अन्तः एवढेच ऋचेंतले शब्द कां घातले तें समजत नाहीं; कदाचित् ऋचेचा सारांश त्या शब्दांत आला आहे असें म्हणावयाचें असेल.

**सायण** :— गोपां = सर्वस्य लोकस्य वृष्टिप्रकाशादिना गोपायितारं = पाऊस प्रकाश वगैरे देऊन सर्व लोकांचें रक्षण करणाऱ्याला; अनिपद्यमानं = कदाचिदपि अविषण्णं = कधींही खिन्न नसणाऱ्याला म्हणजे जो सदोदित आनंदी असतो अशाला; पथिभिः = विचित्रैः मार्गैः अन्तरिक्षरूपैः = अंतरिक्षरूप विचित्र मार्गांनीं; आ चरन्तं = उदयप्रभृति आमध्याह्नम् आगच्छन्तं = सकाळपासून दुपारपर्यंत आकाशांत वर येणाऱ्याला; परा चरन्तं = मध्याह्नप्रभृति आसायं पराङ्गमुखं गच्छन्तं = दुपारपासून संध्याकाळपर्यंत पराङ्गमुख होऊन जाणाऱ्याला; सूर्य उदयापासून दुपारपर्यंत आपलें तोंड मनुष्यांकडे करतो परंतु दुपार झाल्यावर सायंकाळपर्यंत तो आपलें तोंड मनुष्यांपासून फिरवून अस्ताचलाकडे जात असतो; अशा प्रकारच्या महानुभाव आदित्याला मीं पाहिलें; म्हणजे त्याचें खरें स्वरूप मी पाहीन ( अपश्यं = याथात्म्येन पश्येयं ); सध्रीचीः = सह अञ्चन्तीः = त्याच्याबरोबर जाणाऱ्या ( दीप्ति ); सहस्य सध्रिः ( पा० ६।३।९५ ) = सह शब्दाला अञ्च् चें रूप जोडल्यास त्याला सध्रि हा आदेश होतो; सध्रि + अञ्च् = सध्र्यञ्च्; सध्रीची हें त्याचें स्त्रीलिंग; विषूचीः = विष्वक् अञ्चन्तीः = रात्रौ अपि चंद्रभौमादित्यानां प्रकाशयित्रीः त्विषः = रात्रीं सुद्धां चंद्र, मंगळ व आदित्य ह्यांना प्रकाशित करणारी दीप्ति; वसानः = आच्छादयन् = पांघरणारा; भुवनेषु = भुवनैकदेशेषु लंकादिप्रदेशेषु = जगाच्या कांहीं प्रदेशांत म्हणजे लंका वगैरे देशांत; आ वरीवर्ति = उदयास्तमयं कुर्वन् पुनः पुनः आवर्तते = उदय व अस्तमय करणारा सूर्य पुनः पुन्हा येतो; त्याच्याबरोबर सदोदित असणारी

व चंद्र, मंगळ व आदित्य ह्या सर्वांना प्रकाशित करणारी दीप्ति पांघरणारा तो जगाच्या कोणत्यातरी प्रदेशांत उदय व अस्तमय करीत येतो; तो जगाचा कोणताही भाग प्रकाशित करीत नाहीं अशी स्थिति कधींही नसते; कोठें उदय तर कोठें अस्त असा प्रकार सदोदित चालू असतो.

उवट:— गोपां = गोप्तारम्; अनिपद्यमानं = जेथें आधार नाहीं अशा अंतरिक्षांत जात असतांना जो खालीं पडत नाहीं अशा ( सूर्याला ); आ चरन्तं = आगच्छन्तं = लोकांकडे येणाऱ्याला; परा चरन्तं = परत जाणाऱ्याला; पथिभिः = देवैः सह; सूर्य देवांबरोबर येतो व देवांबरोबर परत जातो; सध्रीचीः = सहाञ्चनाः दिशः रश्मीन् वा सहस्रं = त्याच्याबरोबर जाणाऱ्या दिशा किंवा सहस्र किरण; विषूचीः = नानाञ्चनाः दिशः नानाञ्चनान् वा रश्मीन् = ज्यांना नानाप्रकारच्या गति आहेत अशा दिशा किंवा किरण; वसानः = आच्छादून टाकणारा किंवा पांघरणारा; सूर्य आपल्या किरणांनीं दिशा झांकतो किंवा तो रश्मि पांघरतो म्हणजे किरणांनीं आच्छादला असतो; आ वरीवर्ति = पुनः पुन्हा येतो; भुवनेषु अन्तर् = त्रिषु लोकेषु मध्ये व्यवस्थितः = तिन्ही लोकांत असणारा. महीधर वरील प्रमाणेंच विवरण करतो. पण पथिभिः ह्याचा देवमार्गैः ( = देव ज्या मार्गांनीं येतात जातात त्या मार्गांनीं ) असा अर्थ त्यानें केला आहे ( वाज० सं० ३७।१७ ).

अनिपद्यमानः = खालीं न पडणारा; अनायतो अनिबद्धः कथायं न्यङ् उत्तानो अव पद्यते न ( ४।१३।५ ) = दोरीवगैरेनें न बांधलेला ( अनायतः = अनिबद्धः ) असा हा सूर्य आकाशांत वर असणारा ( उत्तानः ) खालीं ( न्यङ् = अव ) कसा पडत नाहीं ( न पद्यते ) ? आ चरन्तं = खालीं येणाऱ्याला; परा चरन्तं = परावताकडे म्हणजे स्वर्गाकडे जाणाऱ्याला; सूर्य स्वर्गांतून खालीं येतो तेव्हां तो उगवतो व जेव्हां तो स्वर्गाकडे जातो तेव्हां तो अस्त पावतो; स्वर्गांतून खालीं येतांना व स्वर्गाकडे परत जातांना अशा दोन्ही स्थितींत मीं सूर्याला पाहिलें आहे; तो कधीं खालीं पडत नाहीं; तो सर्वांचें रक्षण करतो ( गोपां ). सध्रीचीः ह्याच्या उलट विषूचीः; सध्रीचीः = सरळ जाणाऱ्या, अनुकूल; विषूचीः = उलट जाणाऱ्या, प्रतिकूल. सध्र्यञ्च् = सध्रि + अञ्च्; सध्रि = सरळ; सध्रीमा यन्ति परि बिभ्रतीः पयः ( २।१३।२ ) = पाणी ( पयः ) वाहून नेणाऱ्या ( बिभ्रतीः ) नद्या मेघांतून ( परि ) इंद्राकडे ( ईं ) सरळ ( सध्रि ) येतात ( आयन्ति ). यत्क्रीळथ मरुत ऋष्टिमन्त आप इव सध्र्यञ्चो धवध्वे ( ५।६०।३ ) = हे मरुतांनो, जेव्हां आयुधें धारण करणारे ( ऋष्टिमन्तः ) तुम्ही शर्यत धावतां ( क्रीळथ ) तेव्हां नद्यांप्रमाणें ( आपः न ) सरळ जाणारे ( सध्र्यञ्चः ) तुम्ही धांवत सुटतां ( धवध्वे ). सध्रीचीः सिन्धुम् उशतीरिवायन् ( १०।११।१० ) = सरळ वाहणाऱ्या ( सध्रीचीः ) नद्या कामातुर स्त्रियांप्रमाणें ( उशतीः इव ) समुद्राकडे (सिंधुं) धांवत गेल्या ( आयन् ). अच्छा म इन्द्रं मतयः स्वर्विदः सध्रीचीः विश्वा उशतीरनूषत ( १०।४३।१ ) = प्रेम

करणाऱ्या ( सध्रीचीः = उशतीः ) व धन देणाऱ्या ( स्वर्विदः ) ह्या माझ्या सर्व स्तुति ( मतयः ) इंद्राला विनवीत आहेत ( अच्छा + अनूषत ). वि अस्मत् वेषो वितरं वि अंहो वि अमीवाः चातयस्वा विषूचीः ( २।३३।२ ) = हे रुद्रा, आमच्यापासून ( अस्मत् ) सर्व शत्रु ( द्वेषः = अंहः = अमीवाः ) पार ( वितरं ) हाकलून दे ( वि चातयस्व ); विषूचीः अमीवाः = प्रतिकूल, दुष्ट शत्रु. आभिर्विश्वा अभियुजो विषूचीः आर्याय विशो अव तारीः दासीः ( ६।२५।२ ) = हे इंद्रा, तूं आपल्या बलानें सर्व दुष्ट शत्रु आर्यांकरितां खालीं ओढ ( अव तारीः ) व त्यांना दास कर. युवं तान् इन्द्रावरुणौ अमित्रान् हतं० शर्वा विषूचः ( ७।८५।२ ) = हे इंद्रावरुणांनो, तुम्ही आपल्या आयुधानें ( शर्वा ) दुष्ट शत्रूंना ठार करा. प्रस्तुत ऋचेंत सध्रीचीः व विषूचीः हीं विशः (अध्याहृत) ह्याचीं विशेषणें असावींत; सध्रीचीः विशः = सद्वर्तनी लोक; विषूचीः विषः = दुर्वर्तनी लोक. वसानः ह्याचा ऋग्वेदांत सर्व ठिकाणीं पांघरणारा असा अर्थ आहे; परंतु तो अर्थ एथें लागू पडत नाहीं; वसानः म्हणजे प्रकाशानें आच्छादणारा असा अर्थ असावा; सूर्य चांगल्या वाईट अशा दोन्ही तऱ्हेच्या लोकांवर आपला प्रकाश पाडतो. वृत् = अडथळ्याशिवाय भराभर जाणें; रथाला सुवृत् ( अडथळ्याशिवाय भराभर जाणारा ) असें ऋग्वेदांत म्हटलें आहे; वरीवर्ति = सारखा जात असतो. चांगल्यावर त्याचप्रमाणें वाईटावर प्रकाश पाडणारा सूर्य तिन्हीं भुवनांत सारखा फिरत असतो.

**अथ एष महान् आत्मा सत्त्वलक्षणः। तत् परम्। तत् ब्रह्म। तत् सत्यम्। तत् सलिलम्। तत् अव्यक्तम्। तत् अस्पर्शम्। तत् अरूपम्। तत् अरसम्। तत् अगन्धम्। तत् अमृतम्। तत् शुक्रम्**

एथपर्यंत महान् आत्म्याविषयींच्या ऋचा दिल्या; आतां त्या महान् आत्म्याचें स्वरूप सांगावयाचें आहे. सत्त्व हें महान् आत्म्याचें मुख्य चिन्ह होय; त्याला रजस् व तमस् ह्यांचा कधींही स्पर्श होत नाहीं; नित्यसत्त्वस्थः असें आत्म्याला भगवद्गीतेंत म्हटलें आहे ( २।४५ ). तो आत्मा पर आहे, ब्रह्म आहे, सत्य आहे; सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ( तैत्ति० उप० २।१।१ ). तत् परं सः आत्मा हे शब्द उपनिषदांत अनेकवेळां आले आहेत. तो सलिलासारखा स्वच्छ आहे; सलिले एको द्रष्टा अद्वैतो भवति (बृह० उप० ४।३।३२); आपो ह वा इदम् आसन् सलिलमेव (नृसिंह० उप० १।१). आत्मा अव्यक्त म्हणजे अतींद्रिय आहे (भग० २।२५). त्याच्यांत स्पर्श, रूप, रस व गंध नाहींत; अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथारसं नित्यमगन्धवच्च यत् ( काठ० उप० ३।१५ ). तो अमृत आहे; तत् ब्रह्म तदमृतं स आत्मा ( छा० उप० ८।१४।१ ). तो शुक्र आहे; तच्छुक्रं पुरुषम् अलिङ्गम् ( मैत्री० उप० ६।३५ ).

**तन्निष्ठः भूतात्मा। सा एषा भूतप्रकृतिः इत्येके। तत् क्षेत्रम्। तज्ज्ञानात् क्षेत्रज्ञमनुप्राप्य निरात्मकम्**

भूतात्मा म्हणजे जीवात्मा हा तन्निष्ठ म्हणजे महान् आत्म्यावर अवलंबून असतो;

सः महान् आत्मा निष्ठा आश्रयः यस्य सः तन्निष्ठः. भूतात्मा = पञ्चभिः भूतैः परिवेष्टितः आत्मा = पंच भूतांनीं बनविलेल्या शरीरांत राहणारा आत्मा. भूतात्मा हा शब्द मैत्रायणीउपनिषदांत पुष्कळदां आला आहे पण तो दशोपनिषदांत एकदांही आढळत नाहीं. हा महान् आत्मा पंच महाभूतांची प्रकृति होय म्हणजे पंच महाभूतें ह्याच्यांतून उत्पन्न होतात; भूतप्रकृतिः ह्या स्त्रीलिंगी विधेयामुळें सः एषः ह्याचें सा एषा असें रूपांतर झालें. तत् क्षेत्रं = हा महान् आत्माच शरीर होय; कारण शरीर पंच महाभूतांचें बनलें असतें व पंच महाभूतें महान् आत्म्यापासून उत्पन्न होतात. तज्ज्ञानात् क्षेत्रज्ञम् अनुप्राप्य निरात्मकं ह्याचा अर्थ करतां येत नाहीं; तज्ज्ञानात् क्षेत्रज्ञः भवति। क्षेत्रज्ञम् अप्राप्य अथवा अननुप्राप्य क्षेत्रं निरात्मकं भवति असे त्या शब्दांचें रूपांतर केल्यास क्षेत्र जाणल्यानें ( तज्ज्ञानात् = तस्य क्षेत्रस्य ज्ञानात् ) क्षेत्रज्ञ होतो; क्षेत्राला जर क्षेत्रज्ञाची प्राप्ति झाली नाहीं तर तें क्षेत्र निरात्मक झालेंच पाहिजे असा अर्थ होईल; महान् आत्मा क्षेत्रांत राहतो तेव्हां तो क्षेत्रज्ञ होतो; महान् आत्मा जर क्षेत्रांत नसेल तर क्षेत्राला अस्तित्वच राहणार नाहीं; एतत् यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ( भगवद्गीता १३।१ ). महाराष्ट्रपाठ तदज्ञानात् आहे; तदज्ञानात् क्षेत्रज्ञम् अप्राप्य अथवा अननुप्राप्य क्षेत्रं निरात्मकं भवति = शरीर पंच महाभूतांचें व पंच महाभूतें महान् आत्म्यापासून हें ज्ञान जर नसेल तर क्षेत्राला क्षेत्रज्ञाची प्राप्ति न झाल्यामुळें तें निरात्मक होईल असा महाराष्ट्रपाठाचा अर्थ होईल.

**अथ एष महानात्मा त्रिविधः भवति । सत्त्वं रजः तमः इति । सत्त्वं तु मध्ये विशुद्धं तिष्ठति । अभितो रजस्तमसी । रजः इति कामद्वेषः । तमः इति अविज्ञातस्य विशुध्यतः विभूतिं कुर्वतः क्षेत्रज्ञपृथक्त्वाय कल्पते । प्रतिभातिलिङ्गो महान् आत्मा तमोलिङ्गः । विद्याप्रकाशलिङ्गः तमः । अपि निश्चयलिङ्गः आकाशः**

हा महान् आत्मा तीन प्रकारचा होतो; सत्त्व, रजस् व तमस् ह्या तीन गुणांनीं तो त्रिविध होतो; अथ एष महान् आत्मा सत्त्वरजस्तमोभिः त्रिविधः भवति असें वाक्य पाहिजे. महान् आत्मा मूलतः सत्त्वलक्षण आहे; परंतु महानात्मा जेव्हां शरीरस्थ होतो तेव्हां त्याच्यांत रजस् व तमस् हे दोन अधिक गुण येतात; तथापि ( तु ) सत्त्वाला त्या दोन गुणांची बाधा होत नाहीं; कारण सत्त्व दोहोंच्यामध्यें असल्यानें अगदीं शुद्ध ( विशुद्धं ) राहतें; रजस् व तमस् हीं त्याच्या दोन बाजूला असतात म्हणजे ते गुण सत्त्वाला स्पर्श करीत नाहींत. त्रिविधः बद्दल त्रिगुणः असा शब्द पाहिजे; कारण सत्त्व, रजस् व तमस् ह्यांनीं महान् आत्मा त्रिगुण होतो; त्या तीन गुणांनीं तो तीन प्रकारचा कसा होईल ? रजस् म्हणजे काम व द्वेष; कामद्वेषः बद्दल कामद्वेषौ पाहिजे; काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ( भगवद्गीता ३।३७ ). तमः इति अविज्ञातस्य विशुध्यतः विभूतिं कुर्वतः क्षेत्रज्ञपृथक्त्वाय कल्पते = नेहमीं शुद्ध राहणारा ( विशुध्यतः ) व जगांतल्या सर्व विभूति उत्पन्न करणारा ( विभूतिं कुर्वतः ) महान् आत्मा न जाणल्यामुळें ( अविज्ञातस्य ) तम हा ( इति ) गुण पृथक् पृथक् क्षेत्रज्ञाची कल्पना

उत्पन्न करतो; क्षेत्रज्ञ म्हणजे महानात्मा हा एकच; तथापि ज्यांना हें ज्ञान नसतें ते त्या अज्ञानामुळें म्हणजे त्यांच्यांत तमोगुण अतीशय असल्यामुळें सर्व प्राणी भिन्न भिन्न आहेत अशी त्यांची ठाम समजूत होते. विशुध्यतः ह्याच्याबद्दल विशुद्धस्य असें पाहिजे; विभूतिं कुर्वन् विशुद्धः महान् आत्मा एकः एव । यदा एतादृशः महान् आत्मा अविज्ञातः भवति तदा तमः इति गुणः क्षेत्रज्ञपृथक्त्वाय कल्पते अशा तऱ्हेचें वाक्य पाहिजे. प्रतिभाति लिंङ्गं यस्य सः प्रतिभातिलिङ्गः = प्रकाशतो हें लक्षण आहे ज्याचें तो; आत्मा स्वयंप्रकाश आहे. तमः लिंङ्गं यस्य सः तमोलिङ्गः; महान् आत्मा स्वयंप्रकाश असूनही शरीरांत शिरल्यानें तमोलिङ्ग होतो; पण हें म्हणणें सत्वाला तमस् व रजस् ह्यांचा स्पर्श होत नाहीं असें वर म्हटलें आहे त्याच्या विरुद्ध जातें. पुढील पानांत महानात्मा प्रतिभा ( ओळी ८–९ ) असें आहे; तेव्हां प्रतिभातिलिङ्गः हा शब्द प्रतिभालिङ्गः असा असला पाहिजे; प्रतिभा = स्वयंप्रकाश. विद्यारूपः प्रकाशः लिङ्गं यस्य सः विद्याप्रकाशलिङ्गः; तमः नपुंसक असल्याकारणानें विद्याप्रकाशलिङ्गं असें रूप पाहिजे; पण तमोगुण विद्या व प्रकाश ह्यांच्या उलट आहे; कारण तो अंधकार असून अज्ञानरूप आहे; तमोलिङ्गः व तमः हे शब्द गाळले पाहिजेत; तसें केल्यानें महान् आत्मा प्रतिभालिङ्गः विद्याप्रकाशलिङ्गः असें सार्थ वाक्य होईल; प्रतिभालिङ्गः = विद्याप्रकाशलिङ्गः; प्रतिभा म्हणजे विद्यारूप प्रकाश. निश्चयः लिंङ्गं यस्य सः निश्चयलिङ्गः; महान् आत्म्याचें ज्ञान निश्चित असतें; पण हेंहीं म्हणणें बरोबर नाहीं; कारण आत्मा ज्ञानरूप आहे; त्याला ज्ञान मिळवावयाचें नसतें व निश्चित करावयाचेंही नसतें. महानात्मा म्हणजे बुद्धि असा अर्थ केल्यास बुद्धि निश्चयलिंग होईल; निश्चय किंवा अध्यवसाय हें बुद्धीचें लक्षण होय ( अध्यवसायात्मिका बुद्धिः ). महान् आत्मा आकाश आहे म्हणजे तो आकाशासारखा निर्मल, निराकार, निरवयव व सर्वव्यापी आहे; उपनिषदांत महान् आत्म्याला आकाश अनेकदां म्हटलें आहे; पण पुढील खंडांतील आकाश व प्रस्तुत आकाश ह्यांचे अर्थ अगदीं भिन्न आहेत. ह्या खंडांतील संस्कृत बरेंच अशुद्ध किंवा अपभ्रष्ट आहे.

## खंड ४ था.

**आकाशगुणः शब्दः । आकाशात् वायुः द्विगुणः स्पर्शेन । वायोः ज्योतिः त्रिगुणं रूपेण । ज्योतिषः आपः चतुर्गुणाः रसेन । अद्भ्यः पृथिवी पञ्चगुणा गन्धेन । पृथिव्याः भूतग्रामस्थावरजङ्गमाः**

शब्द हा आकाशाचा गुण आहे. आकाशापासून वायु उत्पन्न झाल्यानें त्यांत आकाशाचा शब्दगुण येतो व स्वतःच्या स्पर्शगुणानें त्याच्यांत दोन गुण असतात. ज्योति म्हणजे अग्नि; हा वायूपासून उत्पन्न होतो; वायूचे दोन गुण व त्याचा स्वतःचा रूपगुण ह्यानें तो त्रिगुण होतो. ज्योतीपासून जल; जलाचा स्वतःचा गुण रस; ज्योतीचे तीन गुण व रस ह्यांनीं जल चतुर्गुण. जलापासून पृथिवी; पृथिवीचा गुण

गंध; जलाचे चार गुण व गंध ह्यामुळें पृथिवी पंचगुण. असें हें सांख्य मत आहे. वैशेषिकांच्या मतें शब्द हा आकाशाचाच गुण आहे; वायूचा स्पर्श हा एकच गुण; अग्नीचे गुण स्पर्श व रूप; जलाचे स्पर्श, रूप व रस; पृथिवीचे स्पर्श, रूप, रस व गंध. भूतग्रामाः स्थावरजङ्गमाः असें पाहिजे; भूतानां ग्रामाः = वस्तूंचे संघ; हे संघ जंगम व स्थावर असतात; ते पृथिवीपासून उत्पन्न होतात.

**तदेतत् अहर्युगसहस्रं जागर्ति । तस्यान्ते सुषुप्स्यन् अङ्गानि प्रत्याहरति । भूतग्रामाः पृथिवीम् अपियन्ति । पृथिवी अपः । आपः ज्योतिषम् । ज्योतिः वायुम् । वायुः आकाशम् । आकाशः मनः । मनः विद्याम् । विद्या महान्तमात्मानम् । महान् आत्मा प्रतिभाम् । प्रतिभा प्रकृतिम् । सा स्वपिति युगसहस्रं रात्रिः । तौ एतौ अहोरात्रौ अजस्रं परिवर्तेते । स कालः तदेतत् अहर् भवति । युगसहस्रपर्यन्तम् अहर्यत् ब्रह्मणो विदुः । रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ( भगवद्गीता ८।१७ ) ॥ इति**

असें उत्क्रांत झालेलें जग ब्रह्मदेवाचा जो सहस्रयुगपरिमित दिवस त्या दिवसभर जागतें म्हणजे जग हजार युगें टिकतें; अहर्युगसहस्रं ह्याच्याबद्दल युगसहस्रम् अहर् असें पाहिजे. त्या दिवसाच्या शेवटीं म्हणजे सहस्र युगांच्या शेवटीं निजण्याच्या इच्छेनें ( सुषुप्स्यन् ) जग आपले अवयव आकुंचित करतें. निजतांना मनुष्य आपले हातपाय पोटाशीं नेतो त्याप्रमाणें जगाचे पसरलेले अवयवही प्रलयकालीं आकुंचित म्हणजे एकत्र होतात; सुषुप्स्यन् बद्दल सुषुप्सत् पाहिजे कारण तदेतत् हें नपुंसक आहे; सुषुप्सत् = निजण्याची इच्छा करणारें; सुषुप्स्यन् ह्या भविष्यकालीन विशेषणाचा कांहीं अर्थ होत नाहीं. यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ( भगवद्गीता २।५८ ). जग आपले अवयव आकुंचित करतें म्हणजे प्रलयाला प्रारंभ होतो; प्रलयाचा क्रम पुढील प्रमाणें:—वस्तूंचे स्थावरजंगमात्मक संघ पृथिवींत, पृथिवी जलांत, जल ज्योतींत, ज्योति वायूंत, वायु आकाशांत, आकाश मनांत, मन विद्येंत, विद्या महानात्म्यांत, महानात्मा प्रतिभेंत व प्रतिभा प्रकृतींत जाते. अपि + इ = आंत जाणें; अपि + एति = आंत जातें; अपि यन्ति=आंत जातात; उत्क्रांतीच्या उलट अपीति; उत्क्रांति=बाहेर येणें; अपीति (अपि + इति ) = आंत जाणें. आपः ज्योतिषं ह्यांतील ज्योतिषं हे ज्योतिः पाहिजे कारण ज्योतिस् शब्द पुल्लिंगी नसून नपुंसक आहे. सा स्वपिति युगसहस्रं रात्रिः = ती म्हणजे प्रकृति रात्रभर म्हणजे सहस्रयुगें संपेपर्यंत निजते; रात्रिः बद्दल रात्रिं पाहिजे. तौ एतौ अहोरात्रौ अजस्रं परिवर्तेते = अशा प्रकारचे हे दिवस व रात्र सतत एकामागून एक येतात. अहश्च रात्रिश्च अहोरात्रः; रात्राह्नाहाः पुंसि ( पा० २।४।२९ ) ह्या सूत्रावरून अहोरात्र हा पुल्लिंगी एकवचनी शब्द असून त्याचा अर्थ दिवस व रात्र मिळून साठ घटिकांचा काल; अहोरात्रौ = साठ घटकांचे दोन काल असा अर्थ होईल; पण लिहिणाऱ्याच्या मनांत तो अर्थ नव्हता. स कालः तदेतत् अहर् भवति = हा जो अहोरात्र काल तो ब्रह्मदेवाचा दिवस होतो; पण हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ब्रह्मदेवाचा दिवस व त्याची रात्र हे भिन्न काल होत; त्या दोहोंना अहर् ही संज्ञा देणें

बरोबर नाहीं; हें वाक्य गाळलेच पाहिजे. युगसहस्रपर्यन्तं० तेऽहोरात्रविदो जनाः = जे ब्रह्मदेवाचा दिवस सहस्रयुगांचा असतो व त्याची रात्र सहस्रयुगांची असते असें जाणतात ते अहोरात्र जाणणारे लोक होत; एथें यत् बद्दल ये पाहिजे. प्रकृतेर्महान् ततः अहंकारः तस्माद्गुणश्च षोडशकः। तस्मादपि षोडशकात् पञ्चभ्यः पञ्चभूतानि (सांख्य-तत्त्वकौमुदी २२) = प्रकृतीपासून महानात्मा, महानात्म्यापासून अहंकार, अहंकारा-पासून सोळा गुण, त्या सोळा गुणांपासून पंच तन्मात्रे व पंच तन्मात्रांपासून पंच महा-भूतें; हा उत्क्रांतिक्रम; ह्याच्या उलट अपीतिक्रम म्हणजे पंच महाभूतें पंच तन्मात्रांत, पंच तन्मात्रा सोळा गुणांत, सोळा गुण अहंकारांत, अहंकार महान् आत्म्यांत, महान् आत्मा प्रकृतींत प्रलय पावतो. हा सांख्यशास्त्रांतील क्रम वरील क्रमाहून बराच भिन्न आहे. वर जी उत्क्रांति सांगितली आहे ती आकाशापासून सुरू होते; वायूच्या आधींची उत्क्रांति सांगावयास पाहिजे होती; ती अशी; प्रकृतीपासून प्रतिभा, प्रतिभेपासून महान् आत्मा, महान् आत्म्यापासून विद्या, विद्येपासून मन व मनापासून आकाश; कदाचित् आकाशः मनः० प्रतिभा प्रकृतिम् हें कोणी तरी मागाहून घातलें असेल.

## खंड ५ वा.

**तं परिवर्तमानम् अन्यः अनुप्रवर्तते**

हा अहोरात्रकाल फिरत असतांना म्हणजे दिवसाच्या पाठीमागून रात्र व रात्रीच्या पाठीमागून दिवस असें भ्रमण चालत असतांना त्या भ्रमणाला अनुसरून (अनु) हा दुसरा भ्रमण करतो म्हणजे दिवसां तो जागा असतो व रात्रीं निजतो. उत्क्रांत झालेलें जग हजार युगें अस्तित्वांत असतें व प्रलयकालीं तें प्रकृतींत हजार युगें निजतें. अन्यः कोण? ब्रह्मदेव कीं जीवात्मा कीं दोन्हीं? बहुतकरून अन्य म्हणजे ब्रह्मदेव असावा कारण जीवात्मा हजार युगें संसारयात्रा चालवीत नाहीं व हजार युगें निजत नाहीं; कदाचित् अन्यः म्हणजे जीवात्म्यांची परंपरा असेल.

**स्रष्टा द्रष्टा विभक्ता अतिमात्रः अहम् इति गम्यते**

ब्रह्मदेव जग निर्माण करणारा, जगाचा साक्षी, जगाचे निरनिराळे विभाग पाडणारा असून मात्रा म्हणजे माप ह्याच्या पलिकडचा आहे व तोच अहं असा समजला जातो. तो सगळ्यांना मापतो पण त्याला कोणीही मापूं शकत नाहीं (अतिमात्रः) कारण त्याचें काम हजार युगें चालत असतें; मनुष्याची आयुर्मर्यादा त्या मानानें अगदींच अल्प असते. विभक्तातिमात्रः असा समास घेतल्यास विभक्तेभ्यः प्राणिभ्यः अतिमात्रः = पृथक् पृथक् जे प्राणी त्यांच्याहून किती तरी मोठा असा अर्थ होईल. आपल्याला अहं म्हणणारा ब्रह्मदेव हा पहिला व नंतर जीवात्मा.

**स मिथ्यादर्शनेदं पावकं महाभूतेषु**

ह्या शब्दांचा अर्थ करतां येत नाहीं; स मिथ्यादर्शनेन इदं पापकं शरीरं महाभूतेषु लब्धवान् = तो जीवात्मा अविद्येमुळें पंचमहाभूतांनीं बनविलेलें हें पापी

शरीर मिळवितो म्हणजे अविद्येमुळें जीवात्म्याला शरीरस्थिति भोगावी लागते. सः म्हणजे जीवात्मा असा अर्थ असल्यास वरील वाक्यांतील अन्यः व स्रष्टा द्रष्टा वगैरे जीवात्मा होईल; पण जीवात्म्याला स्रष्टा द्रष्टा वगैरे कसें म्हणतां येईल ?

**चिरोणु आकाशात् । वायोः प्राणम् । चक्षुश्च वक्तारं च तेजसः । अद्भ्यः स्नेहम् । पृथिव्याः मूर्तिः**

जीवात्मा शरीराचे अवयव पुढीलप्रमाणें मिळवितोः-चिरोणु हा शब्द कोठेंही सांपडत नाहीं व त्याचा अर्थ कळत नाहीं; शरीरांत जी पोकळी असते किंवा जे पोकळ भाग असतात ते आकाशानें भरलेले असतात तेव्हां चिरोणु म्हणजे पोकळी असा अर्थ असेल. जीवात्मा वायूपासून प्राण मिळवितो; प्राणं बद्दल प्राणः हा महाराष्ट्रपाठ अशुद्ध आहे. तो तेजापासून डोळा व जिह्वा म्हणजे वागिंद्रिय मिळवितो. अग्निमुखा वै देवाः=अग्नि हा देवांचें मुख आहे; वाचेला आग्नेयी म्हटलें आहे; अग्निर्वाक् भूत्वा मुखं प्राविशत् ( ऐत० उप० २।४ ) = अग्नि वाक् होऊन तोंडांत शिरला; तेव्हां वक्ता म्हणजे वागिंद्रिय. कदाचित् वक्तारं हा शब्द पक्तारं असेल; पक्तारं = अन्नपाचक म्हणजे कोठ्यांतला अग्नि; कोठ्यांतला अग्नि तेजापासूनच उत्पन्न झाला असला पाहिजे. जलापासून ( अद्भ्यः ) तो शरीरांतला रक्तादि द्रव मिळवितो. पृथिवीपासून तो स्थूल देह मिळवितो; मूर्तिः बद्दल मूर्तिम् पाहिजे. ह्या सर्व वाक्यांत लेभे किंवा लब्धवान् अध्याहृत. अस्मिन् पञ्चात्मके शरीरे । तत्र यत् कठिनं सा पृथिवी । यत् द्रवं ताः आपः । यत् उष्णं तत् तेजः । यत् संचरति स वायुः । यत् सुषिरं तत् आकाशम् इति (गर्भोपनिषत् २ ); यत् कठिनं सा पृथिवी (गर्भ०) = पृथिव्याः मूर्तिः (भाष्य); यत् द्रवं ताः आपः (गर्भ०) = अद्भ्यः स्नेहम् ( भाष्य ); यत् उष्णं तत् तेजः (गर्भ०) हें चक्षुश्च वक्तारं च तेजसः ( भाष्य ) ह्याच्याशीं जुळत नाहीं; यत् संचरति स वायुः (गर्भ०)= वायोः प्राणः (भाष्य); यत् सुषिरं तत् आकाशं (गर्भ०) = चिरोणु आकाशात् (भाष्य).

**पार्थिवान् तु अष्टौ गुणान् विद्यात् त्रीन् मातृतः त्रीन् पितृतः । अस्थिस्नायुमज्जानः पितृतः । त्वङ्मांसशोणितानि मातृतः । अन्नं पानम् इति अष्टौ**

शरीरांतले जे आठ पार्थिव गुण किंवा पार्थिव द्रव्यें तीं तो पुढीलप्रमाणें मिळवितोः—अस्थि, स्नायु व मज्जा हीं बापापासून; त्वचा, मांस व रक्त हीं आईपासून; ह्यांखेरीज अन्न व पान हीं तो स्वतः मिळवितो; अशीं तीं आठ द्रव्यें होत. अस्थि स्नायुश्च मज्जा च जानीमः पितृतो द्विज । त्वङ्मांसशोणितश्चेति मातृजान्यपि शुश्रुम (महाभा० शांति० ३०५।५–६); ह्या श्लोकांत अन्न व पान नाहींत. गर्भस्य केशश्मश्रुलोमास्थिनखदन्तसिरास्नायुधमनीरेतःप्रभृतीनि स्थिराणि पितृजानि । मांसशोणितमेदोमज्जहृन्नाभियकृत्प्लीहान्त्रगुदप्रभृतीनि मृदूनि मातृजानि ( सुश्रुतसंहिता ); ह्या यादींत मज्जा आईपासून मिळते असें म्हटलें आहे.

**सः अयं पुरुषः सर्वमयः सर्वज्ञानोऽपि क्लृप्तः**

ह्याप्रमाणें हा पुरुष सर्व पंच महाभूतांचा बनविला असून ( सर्वमयः ) सर्व

ज्ञानानेंही भरलेला असा केला आहे (क्लृप्तः). पंच महाभूतांपासून जें जग निर्माण झालें आहे तें सर्व मनुष्याच्या शरीरांत आहे म्हणजे मनुष्य हा एक लहानसें जगच आहे; मूलतः जीवात्मा हा महानात्मा असल्याकारणानें तो सर्वज्ञ आहेच; तथापि तो त्याची सर्वज्ञता मी शरीरी आहें ह्या मिथ्याभासानें लुप्त झालेली असते. सर्वज्ञानः अपि हे शब्द एथें आवश्यक नाहींत; कारण शरीर कसें बनतें एवढेंच ह्या प्रकरणांत सांगितलें आहे.

## खंड ६ वा.

**स यदि अनुरुध्यते तत् भवति । यदि धर्मः अनुरुध्यते तत् देवः भवति । यदि ज्ञानम् अनुरुध्यते तत् अमृतः भवति । यदि कामम् अनुरुध्यते संच्यवते । इमां योनिं संदध्यात्**

यदि = यत्; मनुष्य ज्याची इच्छा करतो तें तो होतो; अनो रुध कामे (धा० ४।६८); अनु + रुध् = इच्छा करणें. त्याला धर्माची इच्छा असेल म्हणजे जर तो धर्माकडे लक्ष देईल तर तो देव होईल; धर्मः बद्दल धर्मं पाहिजे. जर तो ज्ञानाच्या पाठीमागें लागेल तर तो अमर होईल; पण जर कामवासनेच्या पाठीमागे लागेल तर तो पूर्णपणें पतित होईल; असा पतित झालेला मनुष्य स्त्रीयोनीचा आश्रय करील म्हणजे पुढील सांगितलेलें गर्भरूप ( योनिं ) धारण करील.

**तत् इदम् अत्र मतम् । श्लेष्मा रेतसः संभवति । श्लेष्मणः रसः । रसात् शोणितम् । शोणितात् मांसम् । मांसात् मेदः । मेदसः स्नावा । स्नाव्नः अस्थीनि । अस्थिभ्यः मज्जा । मज्जातः रेतः**

गर्भासंबंधानें पुढीलप्रमाणें मत आहे. रेतापासून श्लेष्म, श्लेष्मापासून रस, रसापासून रक्त, रक्तापासून मांस, मांसापासून मेद, मेदापासून स्नायु, स्नायूपासून अस्थि, अस्थींपासून मज्जा व मज्जेपासून रेत उत्पन्न होतें. गर्भोपनिषदांत श्लेष्मा रेतसः संभवति । श्लेष्मणो रसः नाहीं. श्लेष्मा रस वगैरे शब्द एथें पारिभाषिक होत; एथें त्यांचा नेहमींचा अर्थ नसून आयुर्वेदीय अर्थ आहे.

**तत् इदं योनौ रेतः सिक्तं पुरुषः संभवति । शुक्रातिरेके पुमान् भवति । शोणितातिरेके स्त्री भवति । द्वाभ्यां समेन नपुंसकः भवति । शुक्रेण भिन्नेन यमः भवति शुक्रशोणितसंयोगात् मातृपितृसंयोगाच्च**

हें रेत योनींत पडल्यानें पुरुष म्हणजे मनुष्य उत्पन्न होतो; पुरुषाचें शुक्र जर स्त्रीशोणितापेक्षां जास्त असेल तर पुरुष जन्मास येतो; स्त्रीशोणित जास्त असेल तर स्त्री; दोन्हीं सारखीं असतील तर नपुंसक; एथें समेन बद्दल समाभ्यां पाहिजे. शुक्राचे दोन भाग झाल्यास जुळीं होतात; शुक्रभिन्नेन हा महाराष्ट्रपाठ अशुद्ध आहे. शुक्र व शोणित ह्यांचा संयोग झाल्यानें म्हणजे माता व पिता ह्यांचा संयोग झाल्यानें ( मनुष्य जन्मास येतो ); ह्या शब्दांचा आधींच्या वाक्यांशीं कांहीं संबंध दिसत नाहीं; शुक्र-

शोणितसंयोगात् म्हटल्यावर मातृपितृसंयोगात् हें घालण्याची आवश्यकता नाहीं: च नको आहे; शुक्रशोणितसंयोगात् पुरुषः संभवति किंवा मातृपितृसंयोगात् पुरुषः संभवति असें एकच वाक्य घातलें असतां चालेल; पण त्याचीही आवश्यकता नाहीं. शुक्रातिरेके पुमान् भवति ( भाष्य ) = पितू रेतोतिरिक्तात् पुरुषो भवति (गर्भ०). शोणितातिरेके स्त्री भवति (भाष्य)= मातू रेतोतिरिक्तात् स्त्रियो भवन्ति (गर्भ०). द्वाभ्यां समेन नपुंसकः भवति (भाष्य) = उभयोर्बीजतुल्यत्वात् नपुंसको भवति (गर्भ०). शुक्रेण भिन्नेन यमः भवति ( भाष्य ) = अन्योन्यवायुपरिपीडितानां शुक्रद्वैधे स्त्रिया योन्या युग्मा जायन्ते ( गर्भ० ).

**तत् कथम् इदं शरीरं परं संयम्यते। सौम्यः भवति। एकरात्रोषितं कललं भवति। पञ्चरात्रात् बुद्बुदाः। सप्तरात्रात् पेशी। द्विसप्तरात्रात् अर्बुदः। पञ्चविंशतिरात्रस्वस्थितः घनः भवति। मासमात्रात् कठिनः भवति। द्विमासाभ्यन्तरे शिरः संपद्यते। मासत्रयेण ग्रीवाव्यादेशः। मासचतुष्केण त्वग्व्यादेशः। पञ्चमे मासे नखरोमव्यादेशः। षष्ठे मुखनासिकाक्षि श्रोत्रं च संभवति। सप्तमे चलनसमर्थः भवति। अष्टमे बुध्या अध्यवस्यति। नवमे सर्वाङ्गसंपूर्णः भवति**

हें शरीर अतिशय ( परं ) कसें एकत्र होतें म्हणजे बनतें ? शुक्र व शोणित पातळ असतांना त्यांच्यापासून घट्ट देह कसा निर्माण होतो ? सौम्यः बद्दल आग्नेयः सौम्यश्च असें पाहिजे कारण गर्भ नुसता सौम्य नाहीं असें सुश्रुत म्हणतो; सुश्रुतः— स्त्रीपुंसयोः संयोगे वायुः शरीरात् तेजः उदीरयति। ततः तेजोऽनिलसंनिपातात् शुक्रं च्युतं सत् योनिम् अभिप्रतिपद्यते। संसृज्यते च आर्तवेन। ततः अग्निसोमसंयोगात् संसृज्यमाने गर्भाशयम् अनुप्रतिपद्येते = स्त्री व पुरुष ह्यांचा संयोग झाला असतांना वायु शरीरांतलें तेज वर उचलतो; नंतर तेज वायूशीं मिसळल्यावर शुक्र होऊन योनींत पडतें व लगेंच आर्तवाशीं म्हणजे स्त्रीशोणिताशीं एकजीव होतें; ह्याप्रमाणें अग्नि व सोम ह्यांच्या संयोगानें एकत्र झालेलीं शुक्र व शोणित गर्भाशयांत जातात. अग्नीपासून पुरुषाचें रेत व सोमापासून म्हणजे चंद्रापासून स्त्रीचें शोणित उत्पन्न होतें असें सुश्रुताचें मत असावें. सौम्यः भवति हे शब्द मातृपितृसंयोगात् ह्याच्यानंतर पाहिजेत. हें मिश्रण एक रात्रभर तसेंच राहिल्यानें कलल बनतें; पांच रात्रीनंतर त्याचे बुद्बुद म्हणजे बुडबुडे होतात; सात रात्रीनंतर पेशी बनते; चौदा रात्रीनंतर अर्बुद होतो. पंचविंशतिरात्रः हा महाराष्ट्रपाठ अशुद्ध आहे; पंचविंशतिरात्रं स्वस्थितः पञ्चविंशतिरात्रस्वास्थितः; स्त्रीच्या उदरांत पंचवीस रात्र राहिलेल्या रेताला पिंडावस्था प्राप्त होते. कललं त्वेकरात्रेण पञ्चरात्रेण बुद्बुदम् ( कपिलगीता ८।२ ). महिन्यानें गर्भ कठीण होतो; दोन महिन्यांच्या आंत डोकें तयार होतें; तीन महिन्यांनीं मानेचा व्यादेश तयार होतो; व्यादेश शब्द आपल्यांच्या कोशांत नाहीं; व्यादेश = परिणति ? दोन महिन्यांनीं डोकें तयार होतें असें म्हटलें आहे; तेव्हां मानेसहित डोकें तयार झालें पाहिजे; कदाचित् डोक्याचा खालचा भाग लांबट होऊन

त्याची मान बनते असें म्हणावयाचें असेल. चार महिन्यांनीं गर्भावर त्वचा तयार होते; पांच महिन्यांनीं नखें व लव तयार होतात; सहाव्या महिन्यांत तोंड, नाक, डोळे व कान तयार होतात; सातव्या महिन्यांत गर्भ हलण्याला समर्थ होतो; आठव्या महिन्यांत बुद्धीच्या सामर्थ्यानें तो निश्चय करूं लागतो व नवव्यांत सर्व अवयवांनीं पूर्ण होतो.

एकरात्रोषितं कललं भवति (भाष्य)=एक रात्रोषितं कलिलं भवति (गर्भ०). पञ्चरात्रात् बुद्बुदाः ( भाष्य ) । सप्तरात्रोषितं बुदबुदम् ( गर्भ० ). सप्तरात्रात् पेशी । द्विसप्तरात्रात् अर्बुदः ( भाष्य ); हा मजकूर गर्भोपनिषदांत नाहीं. पञ्चविंशतिरात्रस्वस्थितः घनःभवति (भाष्य) । अर्धमासाभ्यन्तरे पिण्डः भवति (गर्भ०). मासमात्रात् कठिनः भवति ( भाष्य ) । मासाभ्यंतरेण कठिनः भवति ( गर्भ० ). द्विमासाभ्यंतरे शिरः संपद्यते ( भाष्य ) । मासद्वयेन शिरः कुरुते ( गर्भ० ). मासत्रयेण ग्रीवाव्यादेशः ( भाष्य ) । मासत्रयेण पादप्रदेशो भवति ( गर्भ० ). मासचतुष्केण त्वग्व्यादेशः ( भाष्य ) । अथ चतुर्थे मासे अङ्गुल्यजठरकटिप्रदेशो भवति (गर्भ०). पञ्चमे मासे नखरोमव्यादेशः (भाष्य) । पञ्चमे मासे पृष्ठवंशः भवति ( गर्भ० ). षष्ठे मुखनासिकाक्षि श्रोत्रं च संभवति (भाष्य) । षष्ठमासे नासाक्षिणी श्रोत्राणि भवन्ति (गर्भ०). सप्तमे चलनसमर्थः भवति (भाष्य) = सप्तमे मासे जीवनसंयुक्तः भवति (गर्भ०). अष्टमे बुध्या अध्यवस्यति । नवमे सर्वाङ्गसंपूर्णः भवति ( भाष्य ) । अष्टमे मासे सर्व संपूर्णो भवति ( गर्भ० ); पण सात आठ वाक्यानंतर नवमे मासि सर्वलक्षणसंपूर्णो भवति । पूर्वजातीः स्मरति । कृताकृतं च कर्म भवति । शुभाशुभं च कर्म विन्दति (=नवव्या महिन्यांत मनुष्य सर्व ज्ञानलक्षणांनीं युक्त होतो; पूर्वींच्या सर्व जन्मांचें, केलेल्या व न केलेल्या कर्मांचें व चांगल्या वाईट कृत्यांचें स्मरण होतें) असें आहे; कृताकृतं च कर्म भवति । शुभाशुभं च कर्म विन्दति ह्याचा अर्थ कळत नाहीं; कदाचित् मी केलेलाच अर्थ असेल. भाष्यांत व गर्भोपनिषदांत थोडेसें साम्य व बराचसा फरक आहे हें वरील तुलनेवरून स्पष्ट होतें.

**मृतश्चाहं पुनर्जातो जातश्चाहं पुनर्मृतः । नानायोनिसहस्राणि मयोषितानि यानि वै ॥ आहारा विविधा भुक्ताः पीता नानाविधाः स्तनाः । मातरो विविधा दृष्टाः पितरः सुहृदस्तथा ॥ अवाङ्मुखः पीडयमानो जन्तुश्चैव समन्वितः । सांख्यं योगं समभ्यस्येत् पुरुषं वा पञ्चविंशकम् ॥ इति**

मेलेला मी पुन्हां जन्मतों व जन्मलेला पुन्हां मरतों; हजारों योनींत मीं वास केला आहे; मीं नानाप्रकारचे आहार भोगिले आहेत व नानाप्रकारचे स्तन चोखले आहेत; पुष्कळ आया पाहिल्या आहेत; त्याप्रमाणें पुष्कळ बाप व मित्रही पाहिले आहेत; योनींतून बाहेर पडतांना खालीं डोकें असलेला व त्यामुळें अतिशय पीडिलेला प्राणी ( जन्तुः ) जन्मभर दुःखानें युक्त असतो ( समन्वितः ); म्हणून त्यानें सांख्य व योग ह्यांचा अभ्यास करावा; त्याप्रमाणें सांख्य व योग ह्यांतील पुरुषनांवाचें जें पंचविसावें तत्त्व त्याचा अभ्यास करावा. दुसऱ्या ओळींतील यानि वै व चवथींतील सुहृदस्तथा हे शब्द अक्षर-

पूर्तीसाठीं घातले आहेत; वा ( ओळ सहा ) ह्यानें छंदोभंग झाला आहे. मूलप्रकृतिरविकृतिः महदाद्याः प्रकृतिविकृतयः सप्त। षोडशकश्च विकारो न विकृतिः न प्रकृतिः पुरुषः = प्रकृति, महत्, अहंकार, पंच तन्मात्रा, पंच महाभूतें, दहा इंद्रियें, मन व पुरुष अशी सांख्य व योग ह्या शास्त्रांत २५ तत्त्वें आहेत. द्विर्द्वादशेभ्यः तत्त्वेभ्यः ख्यातः यः पञ्चविंशकः। पुरुषो निष्क्रियश्चैव ज्ञानदृश्यश्च कथ्यते ( महाभा० शान्ति० ३३९। २४ ) व अहं हि पुरुषो ज्ञेयः निष्क्रियः पञ्चविंशकः ( ४३ ) ह्या श्लोकांत चोवीस तत्त्वांहून भिन्न जो पुरुष त्याला पंचविसावा म्हटलें आहे. गर्भोपनिषत्:— नानायोनिसहस्राणि दृष्ट्वा चैव ततो मया। आहारा विविधा भुक्ताः पीताश्च विविधाः स्तनाः॥ जातस्यैव मृतस्यैव जन्म चैव पुनः पुनः। अहो दुःखोदधौ मग्नो न पश्यामि प्रतिक्रियाम्॥ यदि योन्यां प्रमुञ्चामि सांख्यं योगं वा समाश्रये। ह्या श्लोकांतील ओळींचा क्रम भाष्यांतील ओळींच्या क्रमाहून भिन्न आहे व पुरुषं पञ्चविंशकं समभ्यस्येत् ह्याबद्दल तं प्रपद्ये नारायणं भगवन्तं नारायणं देवं असे शब्द आहेत.

**ततश्च दशमे मासे प्रजायते। जातश्च वायुना स्पृष्टः न स्मरति जन्ममरणे। अन्ते च शुभाशुभं कर्म। एतत् शरीरस्य प्रामाण्यम्**

नंतर तो दहाव्या महिन्यांत जन्मतो. ततश्च दशमे मासे प्रजायते हे शब्द नवमे सर्वाङ्गसंपूर्णो भवति ( पान १०९९ ओळ १७ ) ह्यानंतर घालावयास पाहिजेत. जन्मलेल्याला ( म्हणजे योनींतून बाहेर पडलेल्याला ) त्याला वायूचा स्पर्श होतांच जन्म व मरण ह्यांचें स्मरण रहात नाहीं; म्हणजे आपण अनेकदां जन्मलों व अनेकदां मेलों ह्याचें त्याला भान रहात नाहीं; शेवटीं (अन्ते) तो चांगलींवाईट केलेलीं कर्मेंही विसरतो; मातेच्या उदरांत असतांना त्याला हें सर्व ज्ञान व स्मरण होतें असें नवमे मासि सर्वलक्षणसंपूर्णो भवति वगैरे गर्भोपनिषदांतील शब्दांत म्हटलें आहे. जन्तुः स्त्रीयोनिशतं योनिद्वारि संप्राप्ते यन्त्रेणापीड्यमानो महता दुःखेन जातमात्रस्तु वैष्णवेन वायुना संस्पृश्य तदा न स्मरति जन्ममरणं न च कर्म शुभाशुभम् ( गर्भोपनिषत् ); योनिद्वारि संप्राप्ते यन्त्रेणापीड्यमानः व भाष्यांतील अवाङ्मुखः पीड्यमानः ह्यांचा अर्थ एकच; जन्तु जेव्हां योनीच्या द्वाराशीं येतो तेव्हां तो यंत्रांत सांपडल्यासारखा होऊन त्याला अतीशय वेदना होतात; भाष्यांतील वायुना बद्दल उपनिषदांत् वैष्णवेन वायुना असे शब्द आहेत. वर जे गर्भोपनिषदांतील उतारे दिले आहेत त्यांचा भाष्याशीं बराच निकट संबंध दिसतो; तथापि दोहोंत बराच भेद आहे; भाष्य एकाद्या पुरातन गर्भोपनिषदासारख्या ग्रंथावर आधारलेलें असावें; कदाचित् भाष्यासारखें अगदीं पुरातन असें गर्भोपनिषत् असेल; त्यांत अपभ्रंश व नानाप्रकारचे बदल होऊन हल्लींचें गर्भोपनिषत् अस्तित्वांत आलें असेल; हल्लींच्या गर्भोपनिषदाची भाषा फार अशुद्ध असून रचनाही वेडीवांकडी आहे; वैद्यकशास्त्राच्या दृष्टीनें त्यांत जे फरक दिसतात ते नवीन वैद्यकग्रंथांना अनुसरून केले असतील. एतत् शरीरस्य प्रामाण्यं = शरीराचें वजन, माप वगैरे हें आहे म्हणजे तें पुढील खंडांत दिलें आहे; एथें प्रामाण्य ह्याचा अर्थ प्रमाणांनीं सिद्ध करणें असा नसून वजन,

माप, संख्या असा आहे; पुढील खंडांत शरीरांतील भागांचें वजन व संख्या दिली आहे. हें प्रकरण सांख्यं योगं समभ्यस्येत् पुरुषं वा पञ्चविंशकं ह्यानंतर अप्रस्तुत होय; कारण यापुढें शरीराचा विचार करावयाचा नसून मनुष्य जन्ममरणाच्या अधीन कां होतो हें सांगितलें पाहिजे व तें तं विद्याकर्मणी समन्वारभेते एथपासून सांगितलें आहे ( पान ११०२ ओळ ८ ). ह्या शरीरसंबंधीं प्रकरणाला कोणतें स्थल योग्य तें सांगतां येत नाहीं; मातेच्या उदरांत गर्भ वाढतो व नंतर मनुष्य जन्मतो; ह्यानंतरही तें घालतां येत नाहीं; तेव्हां तें गाळावयास पाहिजे; गाळल्यानें कोणत्याही प्रकारची अर्थ-हानि होणार नाहीं; उलट संदर्भ सुसंगत होईल.

## खंड ७ वा.

**अष्टोत्तरं संधिशतम् । अष्टाकपालं शिरः संपद्यते । षोडश वपा पलानि । नव स्नायुशतानि । सप्तशतं पुरुषस्य मर्मणाम् । अर्धचतस्रः रोमाणि कोटयः । हृदयं हि अष्ट कपालानि । द्वादश कपालानि जिह्वा । वृषणौ हि अष्ट सुवर्णौ । तथा उपस्थगुदपायु । एतत् मूत्रपुरीषं कस्मात् । आहारपानसिक्तत्वात् । अनुपचितक-र्माणौ अन्योन्यं जायेते इति**

अष्टोत्तरं संधिशतं = शरीरांतील सांध्यांची संख्या शंभर अधिक आठ म्हणजे १०८ आहे; पण ती गर्भोपनिषदांत् १८० ( साशीतिकं संधिशतं ), चरकांत २०० ( द्वे सन्धिशते ) व सुश्रुतांत २१० ( द्वे दशोत्तरे ) अशी सांगितली आहे. अष्टा-कपालं शिरः संपद्यते = डोक्याच्या कवट्या आठ असतात; चतुष्कपालं शिरः (गर्भ०). षोडश वपा पलानि = शरीरांतील चरबी ( वपा = मांसजन्यस्नेहः ) सोळा पलें म्हणजे चौसष्ट तोळे वजनाची असते; पलं कर्षचतुष्टयं ( अमर २।९।८६ ) = पल म्हणजे चार तोळे. नव स्नायुशतानि = स्नायु ९००; सनवकं स्नायुशतं ( गर्भ० ) = स्नायु १०९ आहेत. सप्तशतं पुरुषस्य मर्मणां = मनुष्याचीं मर्मस्थानें ७०० आहेत; सप्तो-त्तरं मर्मशतं ( गर्भ० ) = मर्मस्थानें १०७. अर्धचतस्रः रोमाणि कोट्यः = लवांची संख्या साडेचार कोट. हृदयं हि अष्ट कपालानि येथें पलानिबद्दल कपालानि चुकीनें लिहिलें आहे; हृदयं पलानि अष्टौ ( गर्भ० ) = हृदयाचें वजन आठ पलें म्हणजे बत्तीस तोळे. द्वादश कपालानि जिह्वा येथेंही पलानिबद्दल कपालानि चुकीनें लिहिलें आहे; द्वादश पला जिह्वा ( गर्भ० ) = जिभेचें वजन बारा पले म्हणजे अठ्ठेचाळीस तोळे. वृषणौ हि अष्ट सुवर्णौ = अंडकुल्यांचें वजन आठ तोळे; प्रत्येक अंडकुलीचें कीं दोन्हींचें ? सुवर्णौ बद्दल सुपर्णौ हा महाराष्ट्रपाठ अशुद्ध आहे. तथा उपस्थगुदपायु = तितक्याच वजनाचें उपस्थ म्हणजे पुरुषाचें लिङ्ग व गुदस्थान; उपस्थ = पुल्लिंग व स्त्रीलिंग; गुद व पायु एकच ( अमर २।९।७३ ); भाष्याच्या वेळीं गुद व पायु हीं निराळ्या अवयवांचीं नांवें होतीं कीं काय ? उपस्थं च गुदं च पायुश्च उपस्थगुदपायु असा समाहारद्वंद्व केला आहे; स्त्रीयोनि व गुदस्थान ह्यांचें वजन कसें करतां येईल ?

एतत् मूत्रपुरीषं कस्मात् = मूत व गू हीं कशीं उत्पन्न होतात? मूत्रं च पुरीषं च मूत्र-पुरीषम्. आहारपानसिक्तत्वात् = आहारस्य पानेन सिक्तत्वात् = अन्न पाण्यानें भिज-विल्यानें; जेवतांना किंवा जेवल्यावर मनुष्य पाणी पितो त्यामुळें गू व मूत तयार होतें; मूत्रपुरीषम् आहारपरिमाणात् (गर्भ० ) = खाण्याच्या परिमाणावर मूत व गू ह्यांचें परि-माण अवलंबून असतें. अनुपचितकर्माणौ अन्योन्यं जायेते इति = ज्यांचें कर्म वाढ-लेलें नसतें असे दोघेजण जन्मास येतात म्हणून; अन्योन्यं? पण हे दोघेजण कोण? हें वाक्य एथें असंबद्ध आहे.

**तं विद्याकर्मणी समन्वारभेते पूर्वप्रज्ञा च** (बृह०उप०४।४।२)। **महति अज्ञान-तमसि मग्नो जरामरणक्षुत्पिपासाशोकक्रोधलोभमोहमदभयमत्सरहर्षविषादेर्ष्या-सूयात्मकैः द्वन्द्वैः अभिभूयमानः सः अस्मदार्जवं जर्वाभावानां तन्निर्मुच्यते। सः अस्मात् पापात् महाभूमिकावत् शरीरात् निमेषमात्रैः प्रक्रम्य प्रकृतिरधिपरीत्य तैजसं शरीरं कृत्वा कर्मणः अनुरूपं फलम् अनुभूय तस्य संक्षये लोकं प्रतिपद्यते**

मरणसमयीं शरीरांतून बाहेर पडणाऱ्या त्याच्या (तं) म्हणजे आत्म्याच्या पाठो-पाठ विद्या व कर्म हीं दोन्ही एकत्र होऊन जातात (सम् + अनु + आरभेते) व पूर्वप्रज्ञाही त्याच्या पाठोपाठ जाते. एथें विद्या ब्रह्मविद्या नसून इहलोकचें ज्ञान असा त्या शब्दाचा अर्थ आहे; सुरेश्वराचार्यः— विज्ञानं संशयज्ञानं मिथ्याज्ञानमथापि वा। प्रमा-णतोऽप्रमाणाद्वा सर्वं विद्येति भण्यते (४।४।११२)॥ संसारकारणध्वंसि यत्तु ज्ञानं परात्मगम्। तदत्र न परिग्राह्यं सर्वापत्कारणापनुत् (११३)॥ वाङ्मनःकायसाध्यं च शास्त्रतो यदि वान्यतः। दृष्टादृष्टार्थरूपं यत् तच्च कर्मेति गृह्यते (११४)॥ कर्मणः क्रियमाणस्य संस्कारो यो हृदि स्थितः। तत्फलस्य च भुक्तस्य पूर्वप्रज्ञेति सोच्यते (११८) = विशिष्ट वस्तूंचें ज्ञान (विज्ञानं), संशययुक्त ज्ञान, खोटें ज्ञान, प्रत्यक्षादि प्रमाणांनीं मिळविलेलें ज्ञान व तसें न मिळविलेलें अशा प्रकारच्या सर्व ज्ञानाला एथें विद्या म्हटली आहे (११२); संसाराचें कारण जी अविद्या तिचें ध्वंस करणारें व सर्व आप-त्तींचा नाश करणारें जें ब्रह्मज्ञान तें ज्ञान असा विद्या शब्दाचा एथें अर्थ नाहीं (११३); वाचा, मन व शरीर ह्यांनीं केलेल्या, शास्त्राला धरून केलेल्या किंवा शास्त्र सोडून केलेल्या, ज्याचें फल इहलोकीं मिळतें व ज्याचें तसें मिळत नाहीं म्हणजे पर-लोकीं मिळतें अशा सर्व व्यापाराला कर्म म्हणतात (११४); केल्या जाणाऱ्या कर्माचा व त्याच्या फलाचा अंतःकरणावर जो संस्कार होतो त्याला पूर्वप्रज्ञा म्हण-तात (११८). ह्या श्लोकांवरून विद्या = संसारसंबंधी ज्ञान; कर्म = इहलोकीं जें केलें जातें तें; पूर्वप्रज्ञा = संसारासंबंधी ज्ञानाचा आणि इहलोकीं केल्या जाणाऱ्या कर्मांचा व फलांचा अंतःकरणावर होणारा संस्कार. एक देह सोडून दुसऱ्या देहा-कडे जाणाऱ्या आत्म्याला ह्या तीन गोष्टी चिकटलेल्या असतात. अज्ञानरूपी महान् अंधकारांत बुडालेला, जरा, मरण, भूक, तहान्, शोक, क्रोध, लोभ, मोह, मद, भय, मत्सर, हर्ष, विषाद, ईर्ष्या व असूया अशा द्वंद्वांनीं म्हणजे पीडा करणाऱ्या

अवस्था व भावना ह्यांनीं सतत पीडिलेला ( अभिभूयमानः ) तो एका शरीरांतून सुटतो ( निर्मुच्यते ). मन्नो बद्दल मन्नौ हा महाराष्ट्रपाठ अशुद्ध आहे. अस्मत् आर्जवं जवीभावानां तत् ह्याचा कांहीं अर्थ होत नाहीं; ते शब्द प्रक्षिप्त होत. ह्या पापी शरीरांतून क्षणांत ( निमेषमात्रैः ) बाहेर पडून ( प्रक्रम्य ) म्हणजे मूलप्रकृतीला ( प्रकृतिं ) जाऊन ( अधिपरीत्य ) व तसें केल्यानें तैजसरूप म्हणजे लिङ्गदेह धारण करून, केलेल्या कर्माचें योग्य फल अनुभवून तें फल संपल्यावर तो पुन्हां इह-लोकीं परत येतो. भूमिका = नटानें घेतलेलें सोंग; महाभूमिका म्हणजे राजा वगैरे-सारख्या मोठ्या पुरुषाचें सोंग; महाभूमिकावत् = जसा नट एका क्षणांत राजाचें सोंग टाकून देऊन दुसरें एकादें सोंग घेतो त्याप्रमाणें; नट जसा निरनिराळीं सोंगें घेतो त्याप्रमाणें आत्मा एकापाठीमागून एक अशीं निरनिराळीं शरीरें धारण करतो; त्यांपैकीं कांहीं राजादिकांचीं शरीरें असतात. आयुष्य कितीही दीर्घ असलें तरी तें क्षणमात्रासारखेंच होय म्हणून निमेषमात्रैः हा शब्द घातला आहे. प्रक्रम्य = भराभर बाहेर पडून. प्रकृतिः अधिपरीत्य हें प्रकृतिम् अधिपरीत्य असें पाहिजे; प्रकृति = शरी-राची मूलावस्था; अधिपरीत्य ?

## खंड ८ वा.

**अथ ये हिंसाम् आश्रित्य विद्याम् उत्सृज्य महत् तपः तेपिरे चिरेण वेदोक्तानि वा कर्माणि कुर्वन्ति ते धूमम् अभिसंभवन्ति। धूमात् रात्रिम्। रात्रेः अपक्षीयमाणपक्षम्। अपक्षीयमाणपक्षात् दक्षिणायनम्। दक्षिणायनात् पितृलोकम्। पितृलोकात् चन्द्रमसम्। चन्द्रमसः वायुम्। वायोः वृष्टिम्। वृष्टेः ओषधयश्च। एतत् भूत्वा तस्य संक्षये पुनरेव इमं लोकं प्रतिपद्यते**

जे हिंसेचा आश्रय करून व ब्रह्मज्ञान टाकून कडक ( महत् ) तप आचरण करतात ( तेपिरे ) किंवा वेदांत सांगितलेलीं कर्में चिरकाल करीत राहतात ते धूमाकडे जातात. याज्ञिककर्मांत पशुहिंसा होते व कडक तप करतांना देहाला एका प्रकारची हिंसाच होते; अविद्येमुळें हिंसा होते. तेपिरे ह्याबद्दल तपन्ति असें रूप पाहिजे. ते धूमांतून रात्रीकडे, रात्रींतून कृष्णपक्षाकडे ( आपक्षीयमाणपक्षं ), कृष्णपक्षांतून दक्षिणायनाकडे, दक्षिणायनांतून पितृलोकाकडे, पितृलोकांतून चंद्राकडे, चंद्र सोडून वायूकडे, वायूला सोडून वृष्टीकडे व वृष्टि सोडून ओषधींकडे जातात. ओषधयः बद्दल ओषधीः पाहिजे. एतत् भूत्वा तस्य संक्षये पुनरेव इमं लोकं प्रतिपद्यते = केलेल्या कर्माच्या फलोपभोगाचा ( तस्य ) क्षय झाल्यावर म्हणजे केलेल्या कर्माचें फल संपल्यावर कर्म करणारा होऊन ( एतत् भूत्वा ) पुन्हां इहलोकाप्रत येतो. गुर्जरप्रतींत तस्य संक्षये हे शब्द नाहींत व ते प्रस्तुत ठिकाणीं असंबद्ध दिसतात. वृष्टेः ओषधयः ह्यानंतर ओषधि खाल्यानंतर रेत उत्पन्न होतें व रेतापासून प्राणी पुन्हां जन्माला येतो असें अधिक पाहिजे; प्रतिपद्यते बद्दल प्रतिपद्यन्ते पाहिजे; कारण

आधींच्या सर्व वाक्यांत बहुवचनी क्रियारूपें आहेत. अथ ये यज्ञेन दानेन तपसा लोकान् जयन्ति ते धूममभिसंभवन्ति । धूमात् रात्रिम् । रात्रेः अपक्षीयमाणपक्षम् । अपक्षीयमाणपक्षात् यान् षण्मासान् दक्षिणा आदित्य एति । मासेभ्यः पितृलोकम् । पितृलोकात् चन्द्रम् । ते चन्द्रं प्राप्य अन्नं भवन्ति । तान् तत्र देवा यथा सोमं राजानम् आप्यायस्व अपक्षीयस्व इत्येवम् एनान् तत्र भक्षयन्ति । तेषां यदा तत्पर्यवैति अथ इममेव आकाशम् अभिनिष्पद्यन्ते । आकाशात् वायुम् । वायोः वृष्टिम् । वृष्टेः पृथिवीम् । ते पृथिवीं प्राप्य अन्नं भवन्ति । ते पुनः पुरुषाग्नौ हूयन्ते । ततो योषाग्नौ जायन्ते । लोकान् प्रत्युत्थायिनस्ते एवमेव अनुपरिवर्तन्ते (बृह० उप० ६।२।१६) = जे यज्ञ, दान व तप करून स्वर्गलोक जिंकतात ते धूम होतात; धूमांतून रात्रीकडे, रात्रींतून कृष्णपक्षाकडे, कृष्णपक्षांतून ज्या सहा महिने आदित्य दक्षिणेकडे जातो त्या सहा महिन्यांकडे, षण्मासांतून पितृलोकाकडे, पितृलोकांतून चंद्राकडे ते जातात; चंद्र लोकांत जाऊन ते अन्न होतात; ज्याप्रमाणें देव वाढत्या व क्षय पावणाऱ्या चंद्राला खातात त्याप्रमाणें ह्यांनाही ते खातात; त्यांनीं केलेल्या अग्निहोत्रादि कर्मांचें फल जेव्हां संपतें तेव्हां ते ह्याच आकाशाकडे येतात; आकाशांतून वायूकडे, वायूंतून वृष्टीकडे, वृष्टिद्वारें पृथिवीकडे व पृथिवीवर येऊन ते अन्न होतात; नंतर अन्न झालेल्या त्यांचा पुरुषाग्नींत हवि दिला जातो म्हणजे पुरुष तें अन्न खातात; असें खाल्लेलें अन्न रेत होऊन स्त्रीच्या अग्नींत म्हणजे स्त्रीयोनींत पडतें व तेथें तें जन्मतें म्हणजे यज्ञदानतप करणारे लोक पुन्हा जन्मास येतात व अशा रीतीनें इहलोकीं जन्मून पुन्हां यज्ञदानतप करूं लागतात. अथ ये इमे ग्रामे इष्टापूर्ते दत्तमित्युपासते ते धूममभिसम्भवन्ति । धूमात् रात्रिम् । रात्रेः अपरपक्षम् । अपरपक्षात् यान् षट् दक्षिणा एति मासान् तान् न एते संवत्सरम् अभिप्राप्नुवन्ति । मासेभ्यः पितृलोकम् । पितृलोकात् आकाशम् । आकाशात् चन्द्रमसम् । एष सोमो राजा । तद्देवानाम् अन्नम् । तं देवा भक्षयन्ति । तस्मिन् यावत्संपातम् उषित्वा अथ एतमेव अध्वानं पुनर् निवर्तन्ते यथेतम् आकाशम् । आकाशात् वायुम् । वायुर्भूत्वा धूमो भवति । धूमो भूत्वा अभ्रं भवति । अभ्रं भूत्वा मेघो भवति । मेघो भूत्वा प्रवर्षति । ते इह व्रीहियवाः ओषधिवनस्पतयः तिलमाषाः इति जायन्ते । अतो वै खलु दुर्निष्प्रतरम् । यो यो ह्यन्नमत्ति यो रेतः सिञ्चति तद्भूय एव भवति (छा० उप० ५।१०।३-६) = पण गावांत म्हणजे लोकवस्तींत राहून जे गृहस्थ अग्निहोत्रादि वैदिक कर्मे (इष्टं), लोकांच्याकरितां विहिरी तळीं बागा वगैरे सोयी करणें (पूर्तं) व पूज्य लोकांना द्रव्यसाहाय्य करणें (दत्तं) अशा प्रकारची उपासना करतात त्यांना खरें ज्ञान झालें नसल्यामुळें मरणानंतर ते धूम होतात; धूमांतून ते रात्रींत, रात्रींतून कृष्णपक्षाकडे, कृष्णपक्षांतून ज्या सहा महिने सूर्य दक्षिणेकडे जातो त्या सहा महिन्यांकडे जातात; पण पूर्ण संवत्सराकडे म्हणजे उत्तरायणांतील सहा महिन्यांकडे ते जात नाहींत (कारण ते महिने ब्रह्मवेत्त्यांकरितांच राखून ठेवले असतात); दक्षिणायनांतून पितृलोकांकडे, पितृलोकांतून आका-

आकाशाकडे, आकाशांतून चंद्राकडे ते जातात; चंद्र हा देवांचें अन्न; तें अन्न देव खातात; तेथें ( चंद्रमंडलांत ) कर्मफल संपेपर्यंत राहून ते पुन्हां पूर्वींच्याच मार्गानें परत येतात; ( चंद्रमंडलांतून ) आकाशाकडे व आकाशांतून वायूकडे जातात; नंतर क्रमानें धूम अभ्र व मेघ होऊन पाऊस पाडतात; पाऊस पाडल्यावर ते व्रीहि यव ओषधि वनस्पति तीळ उडीद वगैरेंचीं रूपें घेऊन जन्मतात;अशा जन्मापासून सुटका होणें अशक्य असतें; जो कोणी हें अन्न खातो व रेताचा स्राव करतो त्याला अन्नाचेंच रूप प्राप्त होतें. धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् । तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ( भग० गी० ८।२५ ) = धूम रात्रि कृष्णपक्ष दक्षिणायनाचे सहा महिने व चंद्रलोक ह्यांकडे योगी क्रमाक्रमानें जाऊन तेथून परत येतो. ( १ ) महत्तपः तेपिरे ( भाष्य ) । तपसा ( बृह० ). ( २ ) वेदोक्तानि वा कर्माणि कुर्वन्ति ( भाष्य ) । यज्ञेन ( बृह० ). ( ३ ) दानेन ( बृह० ) । ये ग्रामे इष्टापूर्ते दत्तम् इति उपासते ( छांदो० ). ( ४ ) ते धूमम् अभिसंभवन्ति । धूमात् रात्रिम् ( तिन्हींमध्यें ). (५) रात्रेः अपक्षीयमाणपक्षम् ( भाष्य व बृह० ) । रात्रेः अपरपक्षम् ( छांदो० ). ( ६ ) अपक्षीयमाणपक्षात् दक्षिणायनम् (भाष्य) । अपक्षीयमाणपक्षात् यान् षण्मासान् दक्षिणा आदित्यः एति ( बृह० ) । अपरपक्षात् यान् षट् दक्षिणा एति मासान् तान् न एते संवत्सरम् अभिप्राप्नुवन्ति ( छांदो० ). ( ७ ) दक्षिणायनात् पितृलोकम् ( भाष्य ) । मासेभ्यः पितृलोकम् ( बृह० व छांदो० ). ( ८ ) पितृलोकात् चन्द्रमसम् (भाष्य) । पितृलोकात् चन्द्रं० ते आकाशम् अभिनिष्पद्यन्ते ( बृह० ) । पितृलोकात् आकाशम् । आकाशात् चन्द्रमसं० यथेतम् आकाशम् ( छांदो० ). ( ९ ) चन्द्रमसो वायुम् ( भाष्य ) । आकाशात् वायुम् ( बृह० व छांदो० ). ( १० ) वायोः वृष्टिम् ( भाष्य व बृह० ) । वायुर्भूत्वा धूमो भवति० मेघो भूत्वा प्रवर्षति ( छांदो० ). ( ११ ) वृष्टेः ओषधयः ( भाष्य ) । वृष्टेः पृथिवीं० जायन्ते ( बृह० ) । ते इह० जायन्ते ( छांदो० ). ( १२ ) एतद्भूत्वा पुनरिमं लोकं प्रतिपद्यते ( भाष्य ) । लोकान् प्रत्युत्थायिनः ते एवमेव अनुपरिवर्तन्ते ( बृह० ) । यो यो हि अन्नमत्ति यो रेतः सिञ्चति तद्भूय एव भवति ( छांदो० ). ह्या तुलनेवरून प्रस्तुत खंडांतील अवतरण अगदीं पहिलें, बृहदारण्यकांतलें नंतरचें व छांदोग्यांतील त्याच्याही नंतरचें असावें; बृहदारण्यकांत व छांदोग्यांत जास्त माहिती दिली आहे; ती कांहींशीं असंबद्ध वाटते. ते चंद्राकडे जाऊन अन्न होतात; ज्याप्रमाणें राजा चंद्राला तूं वाढत जा व कमी होत जा असें म्हणून देव त्याच्या कला वाढवितात व भक्षण करतात ह्याप्रमाणें ह्यांनाही ते भक्षण करतात; कारण ते चंद्राशीं एकवटलेले असतात; खाल्यानंतर जें अवशिष्ट राहतें तें ह्या आकाशांत येऊन मिळतें; बृहदारण्यकांतला हा मजकूर जास्त आहे. पितृलोकांतून आकाशांत व आकाशांतून चंद्रांत ते जातात; हा सोम राजा म्हणजे चंद्र देवांचें अन्न होतो; तें अन्न देव खातात; तेथें कर्मफलाचा क्षय होईपर्यंत राहून नंतर खालील मार्गानें ते आकाशाकडे येतात व

वायूचा धूम, धूमाचा अभ्र व अभ्राचा मेघ होऊन मेघांतून पाऊस पडतो; असें छांदोग्यांत आहे. पर्जन्यांतून ते पृथिवीकडे येतात; पृथिवीवर येऊन ते अन्न होतात व त्यांचा पुरुषाग्नींत हवि दिला जातो आणि नंतर स्त्रीरूप अग्नींत ते जन्माला येतात असें बृहदारण्यकांत आहे. प्रस्तुत खंड कोणत्या उपनिषदांतून घेतला तें सांगतां येत नाहीं; त्याच्यामध्यें व बृहदारण्यकांतील वर दिलेल्या उताऱ्यांत बरेंच साम्य आहे; छांदोग्योपनिषदांतील उतारा दोहोंहूनही बराच भिन्न आहे.

## खंड ९ वा.

**अथ ये हिंसामुत्सृज्य विद्यामाश्रित्य महत्तपस्तेपिरे ज्ञानोक्तानि वा कर्माणि कुर्वन्ति ते अर्चिः अभिसंभवन्ति । अर्चिषः अहः । अह्नः आपूर्यमाणपक्षम् । आपूर्यमाणपक्षात् उदगयनम् । उदगयनात् देवलोकम् । देवलोकात् आदित्यम् । आदित्यात् वैद्युतम् । वैद्युतात् मानसम् । मानसः पुरुषः भूत्वा ब्रह्मलोकमभिसंभवन्ति । ते न पुनरावर्तन्ते**

जे हिंसा टाकून व ब्रह्मविद्येचा आश्रय करून मोठे तप आचरण करतात किंवा उपनिषदांत सांगितलेलीं कर्में करतात ते ज्वालेकडे जातात; ज्वालेंतून ते दिवसाकडे, दिवसांतून वाढत्या म्हणजे शुक्ल पक्षाकडे, शुक्लपक्षांतून उत्तरायणाकडे, उत्तरायणांतून देवलोकाकडे, देवलोकांतून आदित्यमंडळाकडे, आदित्यमंडलांतून विद्युत्लोकाकडे, विद्युत्लोकांतून मानसलोकाकडे जातात; मानसपुरुष होऊन ते ब्रह्मलोकाप्रत जातात; तेथून ते इहलोकीं परत येत नाहींत. न ते पुनरावर्तन्ते ह्याबद्दल गुर्जरपाठ न तेन पुनरावर्तन्ते असा आहे; तेन = ब्रह्मलोकांतून. महत्तपः तेपिरे हे पूर्वीच्या खंडांतले शब्द प्रस्तुत खंडांतही घातले आहेत; पण एथें ते गाळले पाहिजेत; कारण ब्रह्मवेत्त्याला तप करण्याची आवश्यकताच नसते; कदाचित् हें मानसतप असेल; तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व तपो ब्रह्म इति ( तैत्ति० उप० ३।२।१ ) व सत्येन लभ्यस्तपसा हि एष आत्मा इति ( मुण्डकोप० ३।१।५ ) ह्या वचनांवरून ब्रह्मवेत्त्याचें तप शारीरिक नसून ज्ञानरूप असतें. मानसः पुरुषः = ज्ञानमय पुरुष; ब्रह्मवेत्त्याचा मार्ग जास्त जास्त प्रकाशमय होतो व शेवटीं तो ज्ञानरूप होऊन ब्रह्मलोकीं कायमचा राहतो. अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् । तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ( भग० ८।२४ ) = अग्नि ज्योति दिवस शुक्लपक्ष उत्तरायणाचे सहा महिने अशा मार्गानें ब्रह्मवेत्ते ब्रह्माप्रत जातात. ये चामी अरण्ये श्रद्धां सत्यमुपासते ते अर्चिः अभिसंभवन्ति । अर्चिषो अहः । अह्नः आपूर्यमाणपक्षम् । आपूर्यमाणपक्षात् यान् षण्मासान् उदङ् आदित्य एति । मासेभ्यः देवलोकम् । देवलोकात् आदित्यम् । आदित्यात् वैद्युतम् । तान् वैद्युतान् पुरुषो मानस एत्य ब्रह्मलोकान् गमयति । तेषु ब्रह्मलोकेषु पराः परावतो वसन्ति । तेषां न पुनरावृत्तिः ( बृह० उप० ६।२।१५ ) = जे हे अरण्यांत राहणारे श्रद्धा व सत्य ह्यांची उपासना करतात ते ज्वालेकडे जातात;

ज्वालेंतून दिवसाकडे, दिवसांतून शुक्लपक्षाकडे, शुक्लपक्षांतून ज्या सहा महिने सूर्य उत्तरेकडे जातो (त्या मासांकडे), षण्मासांतून देवलोकाकडे, देवलोकांतून आदित्यमंडलाकडे, आदित्यमंडलांतून विद्युत्लोकाकडे जातात; विद्युत्लोकीं राहणाऱ्या त्यांच्याकडे ब्रह्मलोकीं राहणारा पुरुष ( मानसः ) येऊन त्यांना ब्रह्मलोकाकडे घेऊन जातो व ब्रह्मलोकीं ते अनंत ( पराः ) संवत्सरे ( परावतः ) राहतात; तेथून त्यांना परत यावें लागत नाहीं. ये च इमे अरण्ये श्रद्धां तप इत्युपासते ते अर्चिषम् अभिसंभवन्ति । अर्चिषो अहः । अह्नः आपूर्यमाणपक्षम् । आपूर्यमाणपक्षात् यान् षट् उदङ् एति मासान् तान् ( छान्दो० उप० ५।१०।१ ) मासेभ्यः संवत्सरम् । संवत्सरात् आदित्यम् । आदित्यात् चन्द्रमसम् । चन्द्रमसो विद्युतम् । तत्पुरुषो मानवः । स एनान् ब्रह्म गमयति । एष देवयानः पन्थाः इति (छान्दो०उप० ५।१०।२ ) = जे हे अरण्यांत राहून श्रद्धा व तप अशा रूपाची उपासना करतात ते ज्वालेकडे जातात; ज्वालेंतून दिवसाकडे, दिवसांतून शुक्लपक्षाकडे, शुक्लपक्षांतून ज्या सहा महिन्यांत सूर्य उत्तरेकडे जातो त्या षण्मासांकडे, षण्मासांतून संवत्सराकडे, संवत्सरांतून आदित्यलोकाकडे, आदित्यलोकांतून चन्द्रलोकाकडे, चन्द्रलोकांतून विद्युत्लोकाकडे जातात; तेथें एक मानव पुरुष असतो तो ह्यांना ब्रह्मलोकाकडे घेऊन जातो; हाच देवयान मार्ग होय. (१) अथ ये हिंसामुत्सृज्य० कर्माणि कुर्वन्ति (भाष्य)। ये चामी अरण्ये श्रद्धां सत्यमुपासते ( बृह० ) । ये च इमे अरण्ये श्रद्धां तप इति उपासते ( छांदो० ). ( २ ) ते अर्चिः अभिसंभवन्ति (भाष्य व बृह०) । ते अर्चिषम्-अभिसंभवन्ति ( छांदो० ). ( ३ ) अर्चिषः अहः । अह्नः आपूर्यमाणपक्षम् ( तिन्ही मध्यें ). ( ४ ) आपूर्यमाणपक्षात् उदगयनम् ( भाष्य ) । आपूर्यमाणपक्षात् यान् षण्मासान् उदङ् आदित्य एति ( बृह० ) । आपूर्यमाणपक्षात् यान् षट् उदङ् एति मासान् तान् (छांदो०). (५) उदगयनात् देवलोकम् । देवलोकात् आदित्यम् ( भाष्य ) । मासेभ्यः देवलोकम् । देवलोकात् आदित्यम् ( बृह० ) । मासेभ्यः संवत्सरम् । संवत्सरात् आदित्यम् ( छांदो० ). ( ६ ) आदित्यात् वैद्युतम् ( भाष्य व बृह० ) । आदित्यात् चन्द्रमसम् । चन्द्रमसो विद्युतम् ( छांदो० ). ( ७ ) मानसः पुरुषः भूत्वा ब्रह्मलोकम् अभिसंभवन्ति ( भाष्य ) । तान् वैद्युतान् पुरुषो मानस एत्य ब्रह्मलोकान् गमयति (बृह०) । तत् पुरुषो मानवः । स एनान् ब्रह्म गमयति । एष देवयानः पन्थाः इति ( छांदो० ). ( ८ ) ते न पुनरावर्तन्ते ( भाष्य ) । तेषु ब्रह्मलोकेषु पराः परावतो वसन्ति । तेषां न पुनरावृत्तिः ( बृह० ). ह्या तुलनेवरूनही भाष्य पहिलें ठरतें. आदित्यात् चन्द्रमसम् ! चन्द्रमसो विद्युतम् ( छांदो० ) असें म्हणणें बरोबर नाहीं; कारण चंद्र वाढणारा व क्षय पावणारा असल्याकारणानें त्याचा निर्देश मागील खंडांत केला आहे व तेथेंच तो योग्य आहे; जे अग्निहोत्रादि कर्में करतात तेच क्रमानें चंद्रलोकाकडे जातात व तेथें अन्न झालेल्या त्यांना देव खातात; जेव्हां त्यांचें कर्मफल संपतें तेव्हां ते पृथिवीवर येतात; म्हणून आदित्यात् विद्युतं असेंच पाहिजे. मानसः पुरुषः बद्दल मानवः पुरुषः

( छांदो० ) हेंही अज्ञानानें लिहिलें गेलें असावें. भाष्यांतील व बृहदारण्यकांतील आठव्या आंकड्यांतील मजकूर छांदोग्यांत नसावा हें आश्चर्यकारक आहे; कदाचित् एष देवयानः पन्थाः इति ह्यांतच आठव्यांतला अर्थ आला असेल.

**शिष्टाः दन्दशूकाः यतः इदं न जानन्ति। तस्मात् इदं वेदितव्यम्। अथापि आह।**

अग्निहोत्रादि कर्मे करणारे व ब्रह्मवेत्ते ह्यांच्याहून वेगळे असणारे(शिष्टाः) लोक दंश करणारे प्राणी होतात; कारण त्यांना ह्या कर्ममार्ग व ज्ञानमार्ग कळत नाहीं; तशी स्थिति होऊं नये म्हणून ब्रह्म ( इदं ) जाणलेंच पाहिजे व तसें ऋषि पुढील खंडांत म्हणतो. अथ ये एतौ पन्थानौ न विदुः ते कीटाः पतङ्गाः यदिदं दन्दशूकम् ( बृह० उप० ६।२।१६ ) = ज्यांना हे दोन मार्ग समजत नाहींत ते कीटक, पतंग व दंश करणारे सापासारखे प्राणी होतात. अथ एतयोः पथोः न कतरेणचन तानि इमानि क्षुद्राणि असकृदावर्तीनि भूतानि भवन्ति। जायस्व म्रियस्व इति एतत् तृतीयं स्थानम् ( छांदो० उप० ५।१०।८ ) = या दोन मार्गांपैकीं कोणत्याही मार्गानें जे जात नाहींत ते इहलोकीं असणारे व पुनः पुनः जन्मास येणारे क्षुद्रप्राणी होतात; जन्माला ये, मर हा तिसरा मार्ग अशांचा सारखा चालू असतो. पण कर्ममार्ग्यालाही पुनर्जन्म व पुनर्मरण भोगावयाचें असतें; फरक एवढाच कीं कर्ममार्ग्यांचें जन्ममरणादि रहाटगाडगें कर्मफल संपल्यावर कायमचें थांबतें; इतरांचें तें कधींही थांबत नाहीं. आठ व नऊ ह्या खंडांतील मजकूर जसाच्या तसा हल्लीं उपलब्ध असलेल्या कोणत्याही उपनिषदांत सांपडत नाहीं; बृहदारण्यकांतील दिलेले उतारे बरेचसे भाष्यासारखे आहेत; तेव्हां अगदीं पुरातन अशा बृहदारण्यक उपनिषदांतून ह्या खंडांतील मजकूर घेतला असावा; छांदोग्योपनिषदांतील उतारे अगदीं अर्वाचीन असावेत. ह्या खंडांतील मजकुराचा बृहदारण्यकांत थोडा पण छांदोग्यांत जास्त विस्तार केला गेला आहे. उपनिषदांत नवव्यांतला मजकूर आठव्यांतल्या मजकुराच्या आधीं येतो; तुम्ही जर हे दोन मार्ग सोडून इतर मार्गाचा स्वीकार कराल तर तुम्हांला नीच योनि प्राप्त होईल इतकेंच नव्हे तर जन्ममरणाच्या फेऱ्यांतून तुमची कधींही सुटका होणार नाहीं म्हणून ब्रह्म जाणण्याची खटपट करा असा उपदेश मनावर ठसविण्याकरितां भाष्यांत तो क्रम बदलला असावा.

## खंड १० वा.

**न तं विदाथ य इमा जजानान्यद्युष्माकमन्तरं बभूव। नीहारेण प्रावृता जल्प्या चासुतृप उक्थशासश्चरन्ति ( ऋ० सं० १०।८२।७ )**

**न तं विद्यया विदुषः यम् एवं विद्वांसः वदन्ति अक्षरं ब्रह्मणस्पतिम्। अन्यत् युष्माकम् अन्तरम्। अन्यत् एषाम् अन्तरं बभूव इति। नीहारेण प्रावृताः तमसा। जल्प्या च। असुतृपः उक्थशासः प्राणं सूर्यं यत्पथगामिनः चरन्ति**

ऋचेवरील भाष्य फारच दुर्बोध आहे. न तं विद्यया विदुषः हें वाक्य अपूर्ण आहे; विदाथ = वित्थ असें क्रियापद पाहिजे; विदुषः वित्थ तं न वित्थ = तुम्ही ब्रह्मविदाच्या

( विदुषः ) विद्येनें त्याला जाणत नाहीं म्हणजे विश्वकर्म्याविषयींचें तुमचें भलतेंच ज्ञान आहे. यम् एवं विद्वांसः वदन्ति अक्षरं ब्रह्मणस्पतिं = ज्या ब्रह्मणस्पतीविषयीं म्हणजे अक्षर-ब्रह्माविषयीं विद्वान् म्हणजे ब्रह्मवेत्ते असें बोलतात त्याविषयीं तुमची कल्पना भलतीच आहे; एथें ब्रह्मणस्पतिं हा शब्द नको आहे कारण अक्षरं ब्रह्म हे शब्द आधींच आले आहेत; शिवाय सूक्त विश्वकर्म्यासंबंधीं आहे. अन्यत् युष्माकम् अन्तरम् । अन्यत् एषां अन्तरं बभूव इति = ज्या अर्थीं ( इति ) तुमचें अंतःकरण निराळें आहे व ह्यांचें म्हणजे ब्रह्मवेत्त्यांचें अंतःकरण निराळें आहे. नीहारेण = तमसा = अविद्येनें; नीहारेण प्रावृताः = अविद्येनें गुरफटलेले. जल्प्या ह्याचा अर्थ दिला नाहीं; जल्प्या च प्रावृताः= आणि वाचालतेनें गुरफटलेलें म्हणजे उगाच बडबड करणारे. असुतृपः उक्थशासः प्राणं सूर्यं यत्पथगामिनः चरन्ति = ज्या सूर्याच्या मार्गानें असे लोक जातात ते प्राणाला म्हणजे सूर्याला संतुष्ट करतात व त्याची स्तुतींनीं स्तुति करतात असा कांहींतरी अर्थ असावा; असुं प्राणं सूर्यं तर्पयन्ति ते असुतृपः. उक्थैः शासति शंसन्ति ते उक्थशासः. यस्य पथा गामिनः = यत्पथगामिनः = ज्या सूर्याच्या मार्गानें जाणारे. सूर्य हेंच ब्रह्म असें समजून त्या ब्रह्माची असे लोक उपासना करतात तेव्हां त्यांना सत्य कसें कळेल ?

**अविद्वांसः क्षेत्रज्ञम् अनुप्रवदन्ति । अथ अहो विद्वांसः । क्षेत्रज्ञः अनुकल्पते । तस्य तपसा सह अप्रमादम् एति । अथ आप्तव्यः भवति । तेन असंततम् इच्छेत् । तेन सख्यम् इच्छेत् । एष हि सखा श्रेष्ठः संजानाति भूतं भवत् भविष्यत् इति । ज्ञाता कस्मात् । जायतेः । सखा कस्मात् । सख्यतेः । सह भूतेन्द्रियैः खे शेते । महाभूतानि सेन्द्रियाणि प्रज्ञया कर्म कारयति इति वा । तस्य तदा आपः प्रतिष्ठा । शीलम् उपशमः । आत्मा ब्रह्म । इति स ब्रह्मभूतः भवति । साक्षिमात्रः व्यवतिष्ठते । अबन्धः ज्ञानकृतः । अथ आत्मनः महतः प्रथमं भूतनामधेयानि अनुक्रमिष्यामः**

अविद्वांसः क्षेत्रज्ञम् अनुप्रवदन्ति = अज्ञ लोक क्षेत्रज्ञाविषयीं म्हणजे जीवात्म्याविषयींच सारखें ( अनु ) वाचाळपणानें ( प्र ) बोलत असतात. हा सगळ्या ऋचेचा सारांश आहे. अथ अहो विद्वांसः= आतां त्यांच्या उलट ब्रम्हवेत्ते कसे आहेत तें पाहूं. अहो इति विस्मये ( अमर ३।४।१० ); अहो यानें विस्मय म्हणजे आश्चर्य दर्शविलें जातें; अज्ञ लोकांना खरें ब्रह्म कळत नाहीं पण विद्वान् पहा ब्रह्माची कशी कल्पना करतात ते ! क्षेत्रज्ञः अनुकल्पते हे शब्द एथें असंबद्ध आहेत कारण क्षेत्रज्ञाचा विचार आधींच संपून गेला आहे. तस्य तपसा सह अप्रमादमेति = स्वतपोबलानें ( तस्य तपसा सह ) विद्वान् बिनचूक ( अप्रमादं ) ब्रह्माकडे जातो ( एति ). विद्वांसः हा कर्ता बहुवचनी आहे पण एति एकवचनी आहे; तस्य बद्दल स्वस्य पाहिजे व सह शब्द नको आहे. अथ आप्तव्यः भवति = म्हणूनच असा विद्वान् मिळविला पाहिजे म्हणजे त्याचीच मैत्री संपादन केली पाहिजे. तेन असंततम् इच्छेत् हें वाक्य समजत नाहीं; असंततं बद्दल संगतं शब्द घातल्यास तेन संगतम् इच्छेत् = तेन सख्यम् इच्छेत् = त्याच्या म्हणजे अशा विद्वानाच्या मैत्रीची इच्छा करावी. एषहि

सखा श्रेष्ठः संजानाति भूतं भवत् भविष्यत् इति = त्याच्याशीं सख्य करण्याचें कारण (इति) तो खरोखर (एषहि) सर्व मित्रांत श्रेष्ठ मित्र असून भूत, वर्तमान व भविष्य उत्तमपणें जाणतो. ज्ञाता कस्मात् । जायतेः = ज्ञाता शब्द कसा झाला ? ज्ञाता शब्द जन् (= उत्पन्न होणें) ह्यापासून; गुर्जरपाठ जानतेः असा आहे; तो जानातेः असा पाहिजे; ज्ञा (= जाणणें) ह्यापासून ज्ञाता; जायतेः ही व्युत्पत्ति खोटी आहे. भाष्यांत किंवा ऋचेंत ज्ञाता शब्द नाहीं; कदाचित् जानाति ह्या क्रियारूपांतून तो काढावयाचा असेल. सख्य् ह्यापासून सखा; सख्य् असा धातु संस्कृतांत नाहीं. सह भूतेन्द्रियैः खे शेते = कारण तो पंच महाभूतें व इंद्रियें ह्यांच्यासह आकाशांत म्हणजे ब्रह्मांत निजतो म्हणजे लीन होतो; ब्रह्मज्ञ ब्रह्माशीं एकवटल्यानें त्याचें पंच महाभूतांपासून उत्पन्न झालेलें शरीर व इंद्रियें आभासमय होत. ही सखा शब्दाची व्युत्पत्ति होय; सखा = स + खा; स = सः; खा = खे. महाभूतानि सेन्द्रियाणि प्रज्ञया कर्म कारयति इति वा = किंवा सखा इंद्रियांसहित पंच महाभूतांकडून कामें करवून घेतो. तो स्वतः कांहीं करीत नाहीं; त्यामुळें तो कर्मापासून अलिप्त असतो. ही सखा शब्दाची दुसरी व्युत्पत्ति; स = सह; खा = खानि = इन्द्रियाणि; सखा = सखानि = सेन्द्रियाणि (महाभूतानि). तस्य तदा आपः प्रतिष्ठा । शीलम् उपशमः । आत्मा ब्रह्म । इति स ब्रह्मभूतः भवति । साक्षिमात्रः व्यवतिष्ठते = त्याचें म्हणजे ब्रह्मज्ञाचें जल म्हणजे ब्रह्म हें कायमचें राहण्याचें ठिकाण (प्रतिष्ठा); शांति (उपशमः) हें त्याचें शील म्हणजे स्वभाव; त्याचा आत्मा ब्रह्म; ह्याप्रमाणें तो ब्रह्म झालेला असतो; त्यामुळें ब्रह्मासारखा तो केवळ साक्षी होऊन जगांत राहतो; महाभूतें व इंद्रियें काय करतात हें तो तटस्थपणें पाहत असतो. अबन्धः ज्ञानकृतः = ही संसारबंधनापासून मुक्तता (अबन्धः) ज्ञानानें उत्पन्न केली असते. आतां ह्यापुढें (अथ) महान् आत्म्याचीं नांवें क्रमानें सांगूं. हीं नांवें मूळचीं भूतांचीं म्हणजे पंच महाभूतें व त्यापासून उत्पन्न झालेल्या सर्व सजीव व निर्जीव अशा वस्तूंचीं होत; कारण महान् आत्मा वर्णनातीत असल्यामुळें त्याला कोणतेंच नांव नाहीं म्हणजे त्याचें वर्णन कोणत्याही नांवानें करतां येत नाहीं.

**सायण:—** न तं विदाथ यः इमाजजान = हे मनुष्यांनो, जो हे सर्व प्राणी निर्माण करता झाला त्या विश्वकर्म्याला तुम्ही जाणत नाहीं; अन्यत् युष्माकम् अन्तरं बभूव = देवदत्त मी, यज्ञदत्त मी असे अहंपदयुक्त वाक्प्रयोग करणारे आम्ही विश्वकर्म्याला जाणतो असें जर तुम्ही म्हणाल तर तें खोटें आहे; कारण अहं ह्यानें जीवात्मा निर्दिष्ट होतो म्हणून तो विश्वकर्मा नव्हे; अहं हा शब्द ज्या तुम्हां जीवांना लाविला जातो त्या तुमच्या अंतरात्म्यामध्यें (युष्माकम् अन्तरं) जीवात्म्याहून अगदीं वेगळें व ज्याचें ज्ञान वेदांताच्या अभ्यासानेंच मिळतें असें विश्वकर्मन् नांवाचें परमतत्त्व आहे; तुम्ही विश्वकर्मा नसून तुमच्या अंतरात्म्यांत विश्वकर्मा आहे; जीवात्मा जसा आम्हांस माहित आहे तसा विश्वकर्मा आम्हांला कां माहित नसावा असें जर तुम्ही

विचाराल तर ऐका; सध्यां तुम्ही धुक्यासारख्या अज्ञानानें ( नीहारेण ) आच्छादलेले आहांत ( प्रावृताः ); धुकें जसें कांहीं वेळ दृष्टीचा व्यापार चालूं देत नाहीं त्याप्रमाणें अज्ञान हें कांहीं वेळ परमतत्त्व जाणूं देत नाहीं; धुकें नाहींसें झाल्यावर जसे दृष्टीला सर्व पदार्थ दिसतात त्याप्रमाणें अज्ञान नाहींसें झाल्यावर तुम्हांला परमतत्त्व ज्ञात होईल; जल्प्या = मी देव आहें, मनुष्य आहें अशा खोट्या जल्पनेनें म्हणजे वल्गनांनीं तुम्ही आच्छादलेले अहांत; तुम्ही कसे तरी आपल्या असूंना किंवा प्राणांना तृप्त करणारे ( असुतृपः ) अहांत म्हणजे केवळ पोट भरणारे अहांत; त्यामुळें तुम्ही परमेश्वरतत्त्वाचा कधींहीं विचार केला नाहीं; शिवाय यज्ञांत प्रउग निष्केवल्य वगैरे शस्त्रें म्हणणारे तुम्हीं अहांत ( उक्थशासः ); म्हणजे तुम्ही ऐहिक व आमुष्मिक भोगांच्या पाठीमागें लागला अहांत; अशा रीतीनें तुम्ही कालक्रमणा करतां ( चरन्ति = वर्तध्वे ); म्हणूनच तुम्हांला विश्वकर्म्याचें ज्ञान होत नाहीं.

अन्तर = जवळचा; त्याच्या उलट पर = दूरचा. न यत् परो नान्तर आ दधर्षत् वृषण्वसू । दुःशंसो मर्त्यो रिपुः ( २।४१।८ )=हे अश्विनांनो ( वृषण्वसू ), दूरचा ( परः ) किंवा जवळचा ( अन्तरः ) दुष्ट ( दुःशंसः ) शत्रु ( रिपुः ) आम्हांला त्रास देणार नाहीं ( न आदधर्षत् ) असें करा; रिषो न यत्परो नान्तरः तुतुर्यात् ( ६।६३।२ ) = जेणेंकरून ( यत् ) दूरचा किंवा जवळचा शत्रु ( रिषः ) आम्हांला त्रास देणार नाहीं; अर्यः परस्य अन्तरस्य ( ६।१५।३ ) = दूरच्या किंवा जवळच्या शत्रूचें; इन्द्र स्तोममिमं मम कृष्वा युजश्चिदन्तरम् ( १।१०।९ ) = हे इंद्रा, ही माझी स्तुति जवळ कर म्हणजे तिचा स्वीकार कर; अन्तरं कृ=जवळ करणें म्हणजे स्वीकार करणें; इदं वचः पर्जन्याय हृदो अस्तु अन्तरम् (७।१०१।५)=ही स्तुति पर्जन्यदेवाच्या हृदयाच्या अंतर्भागीं असो. पहिल्या अर्धाचा अर्थः– ज्यानें हीं सर्व भुवनें उत्पन्न केलीं त्याला तुम्ही जाणत नाहीं; विश्वकर्म्याहून दुसरेंच कांहीं ( अन्यत् ) तुमच्या ( युष्माकं ) अंतःकरणात् ( अन्तरं ) वास करीत आहे. ज्या अर्थी दुसऱ्याच्या म्हणजे धनादिकाच्या पाठीमागें तुम्हीं लागले अहांत त्या अर्थी तुम्हांला विश्वकर्मा कधींही ज्ञात होणार नाहीं. नीहार शब्द फक्त एथेंच आला आहे म्हणून त्याचा अर्थ करतां येत नाहीं. त्रातारो देवा अधि वोचता नो मा नो निद्रा ईशत मोत जल्पिः ( ८।४८।१० ) = हे रक्षण करणारे देवांनो, आमचें रक्षण करा ( अधि वोचत ); निद्रा किंवा जल्पि आमच्यावर सत्ता न चालवो. जल्पि ह्याचा निद्रेसारखाच कांहींतरी अर्थ असावा; कदाचित् जल्पि म्हणजे धनाची धुंदी असा अर्थ असेल व नीहार ह्याचाही तसाच अर्थ असेल. नीहारेण जल्प्या च प्रावृताः = धनाच्या धुंदीनें आच्छादलेले म्हणजे धनाच्या गुंगींत असलेले. असु = धन; असुनीति पहा ( पान ८३७ ). तृप् = पोटभर पिणें; त्वम् अस्य ब्राह्मणात् आतृपत् पिब (१।१३०।५) = हे इंद्रा, ह्या ब्राह्मणनांवाच्या पात्रानें पोट भरेपर्यंत ( आ तृपत् ) सोम पी; पिबतं च तृप्णुतं च ( ८।३५।७ ) = हे अश्विनांनो, प्या, पोटभर प्या; अस्य वि पीतिं तृप्तिमश्नुहि ( ८।८२।६ ) = हे इंद्रा, सोमपान पोट

भर कर. असुं धनं तृपन्ति ते असुतृपः = पोटभर धन पिणारे म्हणजे अतिशय धन मिळविणारे. उक्थशासः = स्तुति करणारे; येथें देखाव्याकरितां देवांची स्तुति करणारे. दुसऱ्या अर्धाचा अर्थः—— वरवर देवांची स्तुति करणारे पण अतिशय धन मिळविणारे व धनाच्या गुंगींत असणारे असे लोक ह्या जगांत संचार करीत असतात (तसे तुम्हीही धनाच्या धुंदींत अहांत; तेव्हां विश्वकर्मा तुम्हाला कसा माहीत असणार ?) असा अर्थ असेल; ऋचा दुर्बोध आहे हें सांगणें नको.

## खंड ११ वा.

**हंसः ( १ ) । घर्मः ( २ ) । यज्ञः ( ३ ) । वेनः ( ४ ) । मेधः ( ५ ) । कृमिः ( ६ ) । भूमिः ( ७ ) । विभुः ( ८ ) । प्रभुः ( ९ ) । शंभुः ( १० ) । राभुः ( ११ )**

हंसाः ( १ ):-सलिलात् हंस उच्चरन् (पान १०१४ ओळ ९); एष हि खलु आत्मा हंसः (मैत्रा० उप० ६।८ ); हंसो लेलायते बहिः ( श्वेतोप० ३।१८ ). घर्मः ( २ ):--उपनिषदांत आत्म्याला घर्म म्हटलें नाहीं; अजस्रो घर्मः ( खंड १४।२ पान १०८४ ). यज्ञः ( ३ ):–त्वं ब्रह्म त्वं यज्ञः त्वं लोकः (बृह० उप० १।५।१७). वेनः ( ४ ):–वेनस्तत्पश्यन् विश्वा भुवनानि विद्वान् ( महानारा० २।३ ). कृमिः (६):– आत्म्याला कृमि कसें म्हणतां येईल ? भूमिः ( ७ ):–भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च । अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ( भग० गी० ७।४ ). विभुः (८):– आदिदेवमजं विभूम् ( भग० गी० १०।१२ ). प्रभुः ( ९ ):–लोकस्य सृजति प्रभुः (भग० गी० १।१४ ); महान् प्रभुर्वै पुरुषः (श्वेतोप० ३।१२). उपनिषदांत आत्म्याला विभु आणि प्रभु अनेकदां म्हटलें आहे. शंभुः ( १० ):–एष हि खलु आत्मा शंभुः ( मैत्रा० उप० ६।८ ). राभुः ( ११ ) शब्द कोठेंही सांपडत नाहीं; कदाचित् शंभुः व आभुः ह्यांचा शंभुराभुः असा संधि असेल; तुच्छेन आभु अपिहितं यदासीत् (ऋ० सं० ११।१२९।३); आ सर्वत्र भवतीति आभुः = व्यापक.

**वधकर्मा ( १२ ) । सोमः ( १३ ) । भूतम् ( १४ ) । भुवनम् ( १५ ) । भविष्यत् ( १६ ) । आपः ( १७ ) । महत् ( १८ ) । व्योम ( १९ ) । यशः ( २० ) । महः ( २१ )**

वधकर्मा ( १२ ) = मारणें हा अर्थ आहे ज्याचा असा; पण आत्मा वधकर्मा म्हणजे काय ? सोमः ( १३ ):–यान् ते सोम प्राणान् जुहोमि । ये ब्राह्मणाः त्रिसुपर्णं पठन्ति ते सोमं प्राप्नुवन्ति ( महानारा० १७।६ ); यश्च सोमस्तस्मै वो नमोनमः ( नृसिंह० उप० ४।३।२९ ). भूतं ( १४ ) भुवनम् ( १५ ):–विश्वं भूतं भुवनम् (महानारा० २४); पुरुष एवेदं सर्वं यद् भूतं यच्च भाव्यम् ( ऋ० सं० १०।९०।२ ). आपः ( १७ ):–एष ब्रह्मा० आपो ज्योतिंषि (ऐत० उप० ५।३ ). महत् ( १८ ):– अस्य महतो भूतस्य निःश्वसितम् ( बृह० २।४।११ ); उपनिषदांत आत्म्याला महत् पुष्कळवेळां म्हटलें आहे. व्योम ( १९ ):–तदक्षरे परमे व्योमन् (महानारा० १।१).

यशः ( २० ):–यशोऽहं भवामि ब्राह्मणानाम् ( छांदो० उप० ८।१४।१ ); स ज्ञानं० यश इति । सर्वाण्येतानि प्रज्ञानस्य नामधेयानि भवन्ति ( ऐत० उप० ५।१२ ). महः ( २१ ):–महः इति ब्रह्म ( तैत्ति० उप० १।५।३ ).

**स्वर्णीकम् ( २२ )। स्मृतीकम् ( २३ )। स्वृतीकम् ( २४ )। सतीकम् (२५)। सतीनम् ( २६ )**

पहिले चार शब्द कोठेंही सांपडत नाहींत. सतीनकः = वाटाणा ( अमर २।९।१६);आपट्यांच्या कोशांत सतीनक बद्दल सतीन आहे. आत्म्याला सतीनः (२६) कोठें म्हटलें आहे ?

**गहनम् ( २७ )। गभीरम् ( २८ )। गह्वरम् ( २९ )। कम् ( ३० )। अन्नम् (३१)। हविः ( ३२ )। सद्म ( ३३ )। सदनम् ( ३४ )**

गहनम् (२७)। गभीरं (२८):—अचिन्त्योऽमूर्तो गभीरो गुप्तोऽनवद्यो घनो गहनो निर्गुणः ( मैत्री उप० ७।१). गह्वरं (२९):– गुहाहितं गह्वरेष्ठं पुराणम् ( कठोप० १।१० ); एथें आत्म्याला गव्हरेष्ठ म्हटलें आहे; आत्म्याला गह्वर म्हटलेलें कोठेंही सांपडत नाहीं. कं (३१):–कं ब्रह्म । कं० न विजानामि ( छांदो० ४।१०।५ ); प्रत्नो हि कमीड्यः ( महानारा० उप० ६।७ ). अन्नं ( ३१ ):– अहमन्नम् ( तैत्ति० ब्रा० १।८।८ पान १०८७ ). हविः ( ३२ ):–हविरस्मि नाम ( पान१०८४ ). सद्म ( ३३ ):– विवृतं सद्म नचिकेतसं मन्ये ( कठोप० २।१३ ).

**ऋतम् (३५)। योनिः ( ३६ )। ऋतस्य योनिः ( ३७ )। सत्यम् ( ३८ )। नीरम् ( ३९ )। हविः ( ४० )। रयिः ( ४१ )। सत् ( ४२ )। पूर्णम् ( ४३ )। सर्वम् ( ४४ )। अक्षितम् ( ४५ )**

ऋतं (३२):–ऋतं सत्यं परं ब्रह्म (महानारा० उप० ५।६); अहमस्मि प्रथमजा ऋतस्य (तैत्ति०ब्रा० २।८।८ पान १०८७). योनिः (३६):–मम योनिर्महत् ब्रह्म (भगवद्गीता १४।३); शिवं प्रशान्तं ब्रह्म योनिम् ( कैवल्योपनिषत् ). ऋतस्य योनिः(३७) असें अग्नि व सोम ह्यांच्याविषयीं ऋग्वेदांत म्हटलें आहे; पण तें आत्म्याविषयीं म्हटलेलें आढळलें नाहीं. सत्यं (३८):–तत् सत्यं स आत्मा (छांदो० उप० ६।८।७); सत्यं तु एव विजिज्ञासितव्यम् ( छांदो० उप० ७।१६।१ ); ब्रह्मणो नाम सत्यम् ( छांदो० उप० ८।३।१४ ); सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ( तैत्ति० उप० २।९।१ ). हविः ( ४० ) दुसऱ्यांदा घालण्याचें कारण नाहीं; गुर्जरप्रतींत हविः नाहीं. रयिः ( ४१ ):– एष वै रयिः आत्मा ( छांदो० उप० ५।१६।१ ). सत् (४२):– द्वे वाव ब्रह्मणो रूपे सच्च त्यच्च । न विदुः सति संपद्यामहे ( बृह० उप०२।३।१ ). पूर्णम् ( ४३ ):– ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते । पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ( ईशोपनिषत् ). सर्वम् ( ४३ ):–सर्वाय स्वाहा ( बृह० उप० २।३।१ ); सर्वः कश्चित् प्रभुः साक्षी ( मैत्री उप० ६।१६ ); यो वै नृसिंहः यच्च सर्वं तस्मै

नमोनमः ( नृसिंह० उप० ९ ). अक्षितं ( ४५ ):—अक्षितमसि अच्युतमसि ( छांदो० उप० ३।१७।६ ).

**बर्हिः ( ४६ ) । नाम ( ४७ ) । सर्पिः ( ४८ ) । अपः ( ४९ ) । पवित्रम् ( ५० ) । अमृतम् ( ५१ ) । इन्दुः ( ५२ ) । हेम ( ५३ ) । स्वः ( ५४ ) । सर्गाः ( ५५ ) । शम्बरम् ( ५६ ) । अम्बरम् ( ५७ ) । वियत् ( ५८ )**

नाम (४७):—नाम वा ऋग्वेदः० नामै वैतत् । नामोपास्व ( छान्दो० उप० ७।१।४ ). पवित्रम् (५०):—पवित्रं परमं भवान् ( भगवद्गीता १०।१२ ); पवित्रमहम् (अथर्वशिरस्). अमृतम् (५१):—एतदमृतम् अभयम् एतत् ब्रह्म (छांदो० उप० ४।१५). इन्दुः (५२):—एष हि खलु आत्मा इन्दुः (मैत्री उप० ६।८ ). खः (५४):—कं ब्रह्म खं ब्रह्मेति कं च तु खं च न विजानामि यद्वाव कं तदेव खं यदेव खं तदेव कं इति ( छांदो० उप० ४।१०।५ ); ह्या उताऱ्यांत खं नपुंसकलिंगी आहे; आत्म्याला खः म्हटलेलें आढळत नाहीं.

**व्योम ( ५९ ) । बर्हिः ( ६० ) । धन्व ( ६१ ) । अन्तरिक्षम् ( ६२ ) । आकाशम् ( ६३ ) । आपः ( ६४ ) । पृथिवी ( ६५ ) । भूः ( ६६ ) । स्वयम्भूः ( ६७ ) । अध्वा ( ६८ ) । पुष्करम् ( ६९ ) । सगरः ( ७० ) । समुद्रः ( ७१ ) । तपः ( ७२ ) । तेजः ( ७३ )**

व्योम ( ५९ ), बर्हिः ( ६० ) व आपः ( ६४ ):— आंकडे १९, ४६ व १७ पहा. आकाशं (६३):— इमानि भूतानि आकाशात् एव समुत्पद्यन्ते ( छान्दो० उप० १।९।१ ); आकाशं आत्मा ( तैत्ति० उप० १।७।१ ); उपनिषदांत आत्म्याला आकाश पुष्कळ वेळां म्हटलें आहे. पृथिवी ( ६५ ):— पृथिवी वायुः ( ऐत० उप० ५।३ ). स्वयंभूः ( ६७ ):— पराञ्चि खानि व्यतृणत् स्वयंभूः (कठोप० ४।१ ); परिभूः स्वयंभूः ( ईशोपनिषत् ८ ). पुष्करं ( ६९ ):— क्षरमहं पुष्करमहं पवित्रमहम् ( अथर्वशिरस् ). समुद्रः (७१):—अपरिमितानन्दसमुद्रः० स तत्पदार्थः परमात्मा परं ब्रह्म ( सर्वोप० ४ ). तपः ( ७२ ):—तपो ब्रह्म ( तैत्ति० उप० ३।२।१ ). यद्धि परं तपः तत् दुर्धर्षं० तस्मात् तपसि रमन्ते (महानारा० उप० २१।२). तेजः (७३):—अयम् अशरीरः० ब्रह्मैव तेज एव ( बृह० उप० ४।४।७ ); यस्तेजो ब्रह्मेत्युपास्ते ( छान्दो० उप० ७।११।२ ); तेजसा हि तदा संपन्नो भवति ( छान्दो० उप० ८।६।३ ).

**सिन्धुः ( ७४ ) । अर्णवः ( ७५ ) । नाभिः ( ७६ ) । वृक्षः ( ७७ ) । ऊर्ध्वः ( ७८ ) । तत् ( ७९ ) । यत् ( ८० ) । किम् ( ८१ ) । ब्रह्म ( ८२ ) । वरेण्यम् ( ८३ ) । हंसः ( ८४ ) । आत्मा ( ८५ )**

नाभिः ( ७६ ):— अमृतस्य नाभिः ( तैत्ति० उप० २।८।८ पान १०८७ ); वृक्षः ( ७७ ):— वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकः ( महानारा० उप० १०।४ श्वेताश्व० उप० ३।९ ); एथें आत्मा वृक्षासारखा असें म्हटलें आहे; आत्म्याला वृक्ष

कोणत्या उपनिषदांत म्हटलें आहे? तत् ( ७९ ):— तत् त्वम् असि श्वेतकेतो ( छांदो० उप० ६।८।७ ). ब्रह्म ( ८२ )। आत्मा ( ८५ ):— ब्रह्मन् व आत्मन् हे शब्द उपनिषदांत जेथें तेथें आले आहेत. वरेण्यम् ( ८३ ):— एतज्जानथ सदसत् वरेण्यम् ( मुण्डकोप० २।२।१ ). हंसः ( ८४ ):—आंकडा १ पहा.

**भवति ( ८६ )। वधन्त्यध्वानम् ( ८७ )। यद्वाहिष्या ( ८८ )। शरीराणि ( ८९ )। अव्ययं च संस्कुरुते ( ९० )। यज्ञः ( ९१ )। आत्मा ( ९२ )। भवति ( ९३ )। यदेनं तन्वते ( ९४ )**

भवति ( ८६ ) हें क्रियारूप असल्याकारणानें आत्म्याचें नांव कसें होईल? आधींचा आत्मा शब्द भवति ह्यासह घेतल्यास आत्मा भवति असें वाक्य होईल; पण आत्मा काय होतो ह्या प्रश्नाचें उत्तर काय? कदाचित् हंसः आत्मा भवति असें वाक्य असेल; परंतु हंसः शब्द खंडाच्या प्रारंभींच आला आहे; तेव्हां हंस आत्मा आहे असें एथें म्हणण्याचें कांहींएक कारण नाहीं. वधन्ति अध्वानं ( ८७ ) एथें वधन्ति हें क्रियारूप अशुद्ध आहे; वधन्ति असें क्रियारूप व्हावयाचेंच नाहीं कारण हन् ह्याला वध् हा आदेश तृतीयभूतकालीं व आशिषि लिङ् ह्यांतच होतो; अर्वाचीन संस्कृतांत वध् असा स्वतंत्र धातु नाहीं. वधन्ति ह्याचा कर्ता कोण? हंसाः वधन्ति अध्वानं असें वाक्य असल्यास वधन्ति अध्वानं ही हंस शब्दाची व्युत्पत्ति होईल; तसें असल्यास वधन्ति बद्दल घ्नन्ति पाहिजे ( पान २६५ ); पण हंस शब्दाची व्युत्पत्ति एथें देण्याचें कांहींएक कारण नाहीं. यद्वाहिष्या ( ८८ ) ह्यांतील वाहिष्या शब्दाचा अर्थ मुळींच कळत नाहीं. आत्म्याला शरीराणि ( ८९ ) कसें म्हणतां येईल? अशरीरं शरीरेषु ( कठोप० २।२२ ), अन्तः शरीरे ज्योतिर्मयः (मुण्डकोप० ३।१।५), सूक्ष्मो भूत्वा शरीराणि अधितिष्ठति ( अथर्वशिरस् ४ ), तथा शरीराणि विहाय जीर्णानि ( भग० गी० २।२२ ) ह्या व अशा इतर वाक्यांवरून आत्मा हा शरीर नव्हे हें स्पष्ट आहे. यद्वाहिष्या शरीराणि ह्याच्याबद्दल यत् हित्वा शरीराणि असे शब्द घेतल्यास जेव्हां शरीरें सोडून असा त्यांचा अर्थ होईल. अव्ययं संस्कुरुते ( ९० ):— उपनिषदांत आत्म्याला अव्यय अनेकदां म्हटलें आहे; परंतु अव्ययं संस्कुरुते असें वाक्य कोणत्याही उपनिषदांत नाहीं; यत् हित्वा शरीराणि अव्ययं च संस्कुरुते असें वाक्य असल्यास त्याचा शरीरें टाकून देऊन मनुष्य अव्यय जो आत्मा त्याला संस्कुरुत करतो म्हणजे संसाराच्या दोषांपासून त्याला मुक्त करतो असा अर्थ होईल. यज्ञः ( ९१ ) । आत्मा ( ९२ )। भवति ( ९३ ):– आंकडे ( ३ ), ( ८५ ) व ( ९२ ) पहा. यदेनं तन्वते ( ९४ ) = जेव्हां ह्याला ताणतात; पण कोण ताणतात व कशाकरितां ताणतात? मेधः ( ५ ), कृमिः ( ६ ), वधकर्मा ( १२ ), भविष्यत् ( १६ ), स्वर्णीकं ( २२ ), स्मृतीकं ( २३ ), स्वृतीकं ( २४ ), सतीकं ( २५ ), सतीनं ( २६ ), गह्वरं ( २९ ), सदनं ( ३४ ), ऋतस्य योनिः ( ३७ ), नीरं ( ३९ ), बर्हिः ( ४६ ), सर्पिः ( ४८ ), अपः ( ४९ ), हेम ( ५३ ), खः

( ५४ ), सर्गाः ( ५५ ), शम्बरं ( ५६ ), अम्बरं ( ५७ ), वियत् ( ५८ ), धन्व ( ६१ ), अन्तरिक्षं ( ६२ ), पृथिवी ( ६५ ), भूः ( ६६ ), अध्वा ( ६८ ), सगरः ( ७० ), सिन्धुः ( ७४ ), अर्णवः ( ७५ ), वृक्षः ( ७७ ), ऊर्ध्वः ( ७८ ), यत् ( ८० ), किं ( ८१ ), भवति ( ८६ ) व शरीराणि ( ८९ ) हे शब्द आत्म्याला लावलेले आढळत नाहींत. आपः, व्योम व समुद्रः हे ह्या खंडांतील शब्द आत्म्याला लाविले आहेत; तेव्हां आपः ह्याचा पर्याय नीरं, व्योम ह्याचे पर्याय अम्बरं, वियत्, धन्व व अन्तरिक्षं आणि समुद्रः ह्याचे सगरः, सिन्धुः व अर्णवः हे पर्याय ब्रह्मवाचक म्हणून कोणीतरी ह्या खंडांत घातले असावेत. कांहीं शब्दांची उगाच पुनरुक्ति केली आहे; कांहीं कोणत्याही कोशांत सांपडत नाहींत; खंडाच्या शेवटचीं वाक्यें अशुद्ध व अपुरीं असल्याकारणानें दुर्बोध झालीं आहेत. ब्रह्मसंबंधानें आणखीही नांवें ह्या यादींत घालतां येतील; चित्, आनन्दः, अच्युतं वगैरे नांवें घालावयास पाहिजे होतीं; तिसऱ्या खंडांत ब्रह्मवाचक कांहीं नांवें आलीं आहेत; त्यांचाही निर्देश करावयास पाहिजे होता.

**अथ एतं महान्तम् आत्मानम् एतानि सूक्तानि एताः ऋचः अनुप्रवदन्ति**

पुढें दिलेलीं सूक्तें व पुढें दिलेल्या ऋचा ह्या महान् आत्म्याविषयीं क्रमानें बोलतात म्हणजे त्याचें वर्णन करतात. पण पुढें दिलेल्या ऋचा आहेत सूक्तें नाहींत.

## खंड १२ वा.

**सोमः पवते जनिता मतीनां जनिता दिवो जनिता पृथिव्याः। जनिताग्नेर्जनिता सूर्यस्य जनितेन्द्रस्य जनितोत विष्णोः ( ऋ० सं० ९.९६.५ )**

**सोमः पवते। सोमः सूर्यः प्रसवनात्। जनिता मतीनां प्रकाशकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। दिवः द्योतनकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। पृथिव्याः प्रथनकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। अग्नेः गतिकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। सूर्यस्य स्वीकरणकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। इन्द्रस्य ऐश्वर्यकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। विष्णोः व्याप्तिकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। इति अधिदैवतम्**

सोमः = सूर्यः; सूर्याला सोम म्हणण्याचें कारण तो लोकांना जन्म देतो म्हणजे उठवितो (प्रसवनात्); षूङ् प्राणिगर्भविमोचने (धा० २।२१). जनिता बद्दल जनयिता पाहिजे; जनिता मन्त्रे (पा० ६।४।५३) = जनिता हें रूप वेदांतच असतें. मतीनां = प्रकाशकर्मणाम् आदित्यरश्मीनां = प्रकाशित म्हणजे ज्ञात करणाऱ्या सूर्यकिरणांचा; मन ज्ञाने (धा० ४।७०); मनु अवबोधने ( धा० ८।९ ). दिवः = द्योतनकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्; द्युत् (=प्रकाशणें) ह्यापासून द्यु. पृथिव्याः=प्रथनकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्; प्रथ् पासून पृथिवी. अग्नेः=गतिकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्; अग कुटिलायां गतौ (धा० १।७९४), अगि गतौ (धा० १।१४६). सूर्यस्य=स्वीकरणकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्; सूर्य शब्दाच्या व्युत्पत्ति पहा ( खंड १२।१४ पान ९८४ ); त्यांत सू = स्वी-

कार करणें अशा अर्थाची व्युत्पत्ति नाहीं व धातुपाठांतही तो अर्थ नाहीं. इन्द्रस्य = ऐश्वर्यकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्; इदि परमैश्वर्ये ( धा० १।६३ ). विष्णोः=व्याप्ति-कर्मणाम् आदित्यरश्मीनाम्; विष्लृ व्याप्तौ (धा० ३।१३ ). भाष्यांत उत किंवा त्याचा अर्थ दिला नाहीं. सर्व वस्तु प्रकाशित करणाऱ्या, सर्व वस्तूंचा विस्तार करणाऱ्या, सर्व वस्तूंकडे जाणाऱ्या, जलाचा स्वीकार करणाऱ्या, सर्व वस्तूंवर सत्ता चालविणाऱ्या व सर्व वस्तु व्यापणाऱ्या सूर्यकिरणांचा उत्पादक सोम शुद्ध होत आहे असा देवतापर अर्थ आहे.

**अथ अध्यात्मम् । सोमः आत्मा अपि एतस्मात् एव । इन्द्रियाणां जनिता इत्यर्थः**

आतां आत्मपर अर्थ. सोम=आत्मा; आत्मन् ह्याअर्थी सोम शब्द ह्याच धातू-पासून म्हणजे सू (=जन्म देणें) ह्यापासून; आत्मा इंद्रियांना जन्म देतो असा अर्थ आहे. देवतापर विवरणांत आदित्यरश्मीनां असा शब्द आहे; त्याच्याबद्दल ह्या विवरणांत इंद्रियाणां हा शब्द घालावा. इंद्रियें वस्तु ज्ञात करतात ( प्रकाशकर्मणां = द्योतन-कर्मणां ); तीं वस्तूंचा विस्तार करतात (प्रथनकर्मणां ) म्हणजे अंधारांत न दिसणाऱ्या वस्तु संपूर्ण दिसूं लागतात; तीं विषयांकडे जातात ( गतिकर्मणां ) व त्या वस्तूंचा स्वीकार करतात (स्वीकरणकर्मणां); वस्तूंवर त्यांची सत्ता चालते ( ऐश्वर्यकर्मणां ) व तीं सर्व वस्तु व्यापतात ( व्याप्तिकर्मणां ).

**अपि वा सर्वाभिः विभूतिभिः विभूततः आत्मा । इति आत्मगतिम् आचष्टे**

(वरीलप्रमाणें अर्थ करावा) किंवा सर्व विभूतींनीं आत्मा प्रभावशाली आहे असा अर्थ करावा. यद्यत् विभूतिमत् सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम् (भग० गी० १०।४१); सर्व लोक व सर्व देव ह्या आत्म्याच्या विभूति होत. विभूततः ह्याचा कांहीं अर्थ होत नाहीं; एका गुर्जरपोथींत विभूततमः असा पाठ आहे व तोच शब्द योग्य दिसतो; विभूततमः = सर्व विभूति त्याच्यांत असल्या-कारणानें तो सर्वांत श्रेष्ठ आहे; विभूतः = विभूतियुक्तः = विभूततमः = विभूतियुक्त देवांत श्रेष्ठ. आत्म्यांत सर्व विभूति असल्याकारणानें तो सर्वांत श्रेष्ठ आहे. ह्याप्रमाणें ऋषि आत्मा काय आहे व तो काय करतो तें सांगतो.

**सायण**:—सोमः = ज्याचा रस काढला जातो असा सोम; पवते = पात्रेषु क्षरति; मतीनां = बुद्धीनां यद्वा मननीयानां स्तुतीनाम्; जनिता = जनयिता; द्युलोक व पृथिवीलोक उत्पन्न करणारा म्हणजे प्रकट करणारा; अग्नीला उत्पन्न करणारा म्हणजे प्रकाशित करणारा; सूर्यस्य = सर्वस्य प्रेरकस्य आदित्यस्य = सर्वांना प्रेरणा देणाऱ्या आदित्याला ( प्रकट करणारा ); सोमरसपानानें इंद्राला उत्पन्न करणारा म्हणजे स्फूर्ति आणणारा; व्यापक जो विष्णु त्याला उत्पन्न करणारा म्हणजे आकाशांत संचार करण्याचें काम करण्यास लावणारा.

ह्या ऋचेंत सोमाचें अतिशयोक्तीनें वर्णन केलें आहे; सोम स्तोत्यांच्या मनांत

स्तुति उत्पन्न करतो एवढेंच नाहीं तर द्युलोक, पृथिवी, अग्नि, सूर्य, इंद्र व विष्णु ह्या सर्वांना उत्पन्न करतो; अशी अद्भुत कृति करणारा सोम गाळण्यांतून शुद्ध होतो; असा प्राथमिक अर्थ आहे; सोमः = धनदाता; पवते = देतो; जनिता = दाता; मति, द्यु वगैरेंचा अर्थ धन; धनदाता धन देतो हा गूढार्थ.

## खंड १२ वा.

**ब्रह्मा देवानां पदवीः कवीनामृषिर्विप्राणां महिषो मृगाणाम्। श्येनो गृध्राणां स्वधितिर्वनानां सोमः पवित्रमत्येति रेभन् ( ऋ० सं० ९।९६।६ )**

**ब्रह्मा देवानाम् इति। एष हि ब्रह्मा भवति देवानां देवनकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। पदवीः कवीनाम् इति। एष हि पदं वेत्ति कवीनां कवीयमानानाम् आदित्यरश्मीनाम्। ऋषिः विप्राणाम् इति। एष हि ऋषिणः भवति विप्राणां व्यापनकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। महिषः मृगाणाम् इति। एष हि महान् भवति मृगाणां मार्गणकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। श्येनः गृध्राणाम् इति। श्येनः आदित्यः भवति श्यायतेः गतिकर्मणः। गृध्रः आदित्यः भवति गृध्यतेः स्थानकर्मणः। यतः एतस्मिन् तिष्ठति। स्वधितिः वनानाम् इति। एष हि स्वयं कर्माणि आदित्यः धत्ते वनानां वननकर्मणाम् आदित्यरश्मीनाम्। सोमः पवित्रम् अत्येति रेभन् इति। एष हि पवित्रं रश्मीनाम् अत्येति स्तूयमानः। एषः एव एतत् सर्वम् अक्षरम्। इति अधिदैवतम्**

देवानां = देवनकर्मणाम् आदित्यरश्मीनां = प्रकाश देणाऱ्या सूर्यकिरणांचा. सूर्य हा प्रकाश देणाऱ्या सूर्यकिरणांचा ब्रह्मा म्हणजे पोषक किंवा वर्धक आहे; बृह वृद्धौ ( धा० १।७३६ ); सूर्य आपले किरण पुष्ट करतो. पदवीः = पदं वेत्ति = पाऊल जाणतो; विद् = जाणणें ह्यापासून वी. कवीनां = कवीयमानानाम् आदित्यरश्मीनां = जिकडेतिकडे जाणाऱ्या सूर्यकिरणांचें; कवीय् ( = जाणें ) ह्यापासून कवि. हा सूर्य जिकडेतिकडे जाणाऱ्या आपल्या किरणांचें पाऊल जाणतो म्हणजे किरण कोठें जातात हें त्याला कळतें. ऋषिः = ऋषिणः = पाहणारा; पान ८०२ एथें ऋषीण असें आहे; ऋष् = पाहणें; ऋषि शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान १०९-११० ). विप्राणां = व्यापनकर्मणाम् आदित्यरश्मीनां = सर्व जग व्यापणाऱ्या सूर्यकिरणांचा. सूर्य सर्व जग व्यापणारे आपले किरण पाहतो. महिषः = महान्. मृगाणां = मार्गणकर्मणाम् आदित्यरश्मीनां = हुडकून काढणाऱ्या सूर्यकिरणांचा; सूर्यकिरण सर्व कांहीं हुडकून काढतात; त्यांच्यापासून कांहींही लपविलें जात नाहीं. सर्व वस्तु हुडकून काढणाऱ्या सूर्यकिरणांहून हा मोठा म्हणजे श्रेष्ठ आहे. श्येन म्हणजे आदित्य; आदित्याला श्येन म्हणण्याचें कारण तो द्युलोकीं सारखा जात असतो; श्यैङ् गतौ (धा० १।९८८); श्यै (=जाणें) ह्यापासून श्येन; पण शंसनीयं गच्छति अशी श्येन शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे(पान२०२).गृध्रः आदित्यः; सूर्याला गृध्र म्हणण्याचें कारण (यतः) तो ह्यांत (एतस्मिन्) म्हणजे आदित्यांत म्हणजे आदित्यमंडलांत राहतो(तिष्ठति); सूर्य हा

मंडलाधिष्ठाता आहे. गृध् = राहणें ( स्थानकर्मणः ); गृधु अभिकाङ्क्षायां ( धा० ४।१४० ); गृध् = लोभ धरणें एवढाच अर्थ धातुपाठांत दिला आहे. गृध्र म्हणजे आदित्य असा अर्थ असल्यास श्येनः गृध्राणां = आदित्यः आदित्यानां असा अर्थ होईल; तेव्हां गृध्राणां = गन्तॄणाम् आदित्यरश्मीनां असें भाष्य पाहिजे; सूर्य गतिमान् किरणांहून अधिक गतिमान् आहे असें म्हटलें पाहिजे. श्येनः गृध्राणाम् इति ह्यानंतर एष हि गतिमान् भवति गर्धनकर्मणाम् आदित्यरश्मीनां ( = गतिमान् किरणांपेक्षां हा अधिक गतिमान् आहे ) असें म्हटलें नाहीं; ह्यावरून आदित्य हाच श्येन व गृध्र म्हणजे जाणारा असा अर्थ भाष्यकाराच्या मनांत असावा; यथार्थ विभक्तीः संनमयेत् ( पान ७६ ) ह्या अनुज्ञेनें गृध्राणां = गृध्रः असा बदल केला असावा. स्वधितिः = आदित्यः; स्वधितिः = स्व + धितिः; स्व = स्वयम्; धितिः = कर्माणि धत्ते = कर्में लादतो; धा ( = धारण करणें ) ह्यापासून धिति; सूर्य स्वतः होऊन किरणांवर कर्में लादतो म्हणून तो स्वधिति. वनानां = वननकर्मणाम् आदित्यरश्मीनां = उदक भोगणाऱ्या सूर्यकिरणांचा; वन संभक्तौ ( धा० १।४६४ ); वन् ( = भोगणें ) ह्यापासून वन. उदक संभोगणाऱ्या आदित्यकिरणांवर सूर्य स्वतः होऊन कर्में लादतो म्हणजे त्यांना सर्व प्रकारचीं कामें करावयास लावतो; पुढील आत्मपर अर्थांत स्वयं आत्मनि धत्ते असे शब्द आहेत; आत्मनि शब्द एथें घेतल्यास किरणांनीं केलेलीं कामें सूर्य आपल्या ठिकाणीं धारण करतो म्हणजे किरणांनीं आणलेलें पाणी आपल्या ठिकाणीं सांठवितो असा अर्थ होईल. पवित्रं = पवित्रं रश्मीनां = रश्मींचें गाळणें म्हणजे रश्मिजाल. रेभन् = स्तूयमानः. सूर्य रश्मिजालाच्या बाहेर जातो ( अत्येति ); म्हणजे सूर्य उदयाच्या अगोदर व अस्तमयाच्या नंतर किरणांच्या पलीकडे जातो म्हणजे तो किरणांहून अगदीं निराळा आहे व किरण त्याचे कामकरी होत; सूर्य रश्मिहीन असतो. रश्मीनां बद्दल रश्मीन् पाहिजे; कारण आत्मपर अर्थांत पवित्रं = इन्द्रियाणि असें आहे. एष एव एतत् सर्वम् अक्षरं = सूर्य हा सर्व अक्षर आहे; पण अक्षर शब्दाचा अर्थ काय व हें वाक्य एथें घालण्याचें काय कारण? असा देवतापर अर्थ आहे.

**अथ अध्यात्मम्। ब्रह्मा देवानाम् इति। अयम् अपि ब्रह्मा भवति देवानां देवनकर्मणाम् इन्द्रियाणाम्। पदवीः कवीनाम् इति। अयं अपि पदं वेत्ति कवीनां कवीयमानानाम् इन्द्रियाणाम्। ऋषिर्विप्राणाम् इति। अयम् अपि ऋषिणः भवति विप्राणां व्यापनकर्मणाम् इन्द्रियाणाम्। महिषः मृगाणाम् इति। अयम् अपि महान् भवति मृगाणां मार्गणकर्मणाम् इन्द्रियाणाम्। श्येनः गृध्राणाम् इति। श्येनः आत्मा भवति श्यायतेः ज्ञानकर्मणः। गृध्राणि इन्द्रियाणि गृध्यतेः ज्ञानकर्मणः। यतः एतस्मिन् तिष्ठति। स्वधितिः वनानाम् इति। अयम् अपि स्वयं कर्माणि आत्मनि धत्ते वनानां वननकर्मणाम् इन्द्रियाणाम्। सोमः पवित्रम् अत्येति रेभन् इति। अयम् अपि पवित्रम् इन्द्रियाणि अत्येति। स्तूयमानः अयम् एव एतत् सर्वम् अनुभवति। आत्मगतिम् आचष्टे**

ह्या विवरणांत आदित्यरश्मीं बद्दल इंद्रियें घातलीं आहेत व एषः बद्दल अयं आहे; अयं ह्यानें अगदीं जवळची वस्तु तर एषः ह्यानें दूरची वस्तु दर्शविली जाते; अयं = हा अगदीं जवळ असणारा आत्मा; एषः = हा वर दिसणारा आदित्य. आतां आत्मपर अर्थः—हा आत्मा विषयांवर प्रकाश पाडणाऱ्या इंद्रियांचा पोषक आहे म्हणजे विषयज्ञान मिळविण्याकरितां तो इंद्रियांना उत्तेजन देतो. विषयांकडे जाणाऱ्या इंद्रियांचें पाऊल हा आत्मा जाणतो. विषय व्यापणाऱ्या इंद्रियांचा हा द्रष्टा असतो म्हणजे इंद्रियें काय काय करीत आहेत तें तो पाहतो. हा महान् आत्मा विषय शोधणाऱ्या इंद्रियांहून मोठा आहे म्हणजे सर्व इंद्रियें ह्याच्या ताब्यांत आहेत. श्येनः = आत्मा; आत्म्याला श्येन म्हणण्याचें कारण तो ज्ञाता आहे. श्यै = जाणणें; ह्यापासून श्येन; श्यै धातूचा जाणणें हा अर्थ धातुपाठांत नाहीं. गृध्राणि = इंद्रियाणि; इंद्रियांना गृध्र म्हणण्याचें कारण तीं विषय जाणतात; गृध् = जाणणें; हाही अर्थ धातुपाठांत नाहीं. यतः एतस्मिन् तिष्ठति हें वाक्य ह्या विवरणांत अप्रस्तुत होय; आदित्यपर विवरणांत तें योग्य होतें; कारण गृध्यतेः स्थानकर्मणः ह्याचें तें विवरण आहे. श्येनः गृध्राणां = ज्ञाता आत्मा ज्ञातृणाम् इन्द्रियाणां = ज्ञात्या इंद्रियांवर सत्ता चालविणारा ज्ञाता आत्मा असा अर्थ असावा; श्येनः गृध्राणां ह्याचा भाष्यांत केलेला आदित्यपर व आत्मपर अर्थ समजत नाहीं. आत्मा विषय भोगणाऱ्या ( वनानां = वननकर्मणां ) इंद्रियांचीं कामें आपल्या ठिकाणीं ( आत्मनि ) धारण करतो म्हणजे इंद्रियांनीं मिळविलेलें ज्ञान आत्मसात् करतो. पवित्रं = इन्द्रियाणि; हाही इंद्रियांच्या पलीकडे जातो म्हणजे आत्मा अतींद्रिय आहे. अशा रीतीनें स्तविलेला आत्मा ह्या सर्व जगाचा अनुभव घेतो; एतत् सर्वम् अक्षरं हे आदित्यपर विवरणांतील शब्द एथें लागू पडतील; कारण उपनिषदांत आत्म्याला अक्षर म्हटलें आहे; सूर्याला अक्षर म्हटलें आहे कीं नाहीं तें माहीत नाहीं. आत्मगतिं ह्याच्या आधीं इति पाहिजे; ह्याप्रमाणें ऋषि आत्म्याची हालचाल सांगतो म्हणजे आत्मा काय करतो त्याचें वर्णन करतो.

तैत्तिरीयारण्यक(१०।१०)वरील सायणभाष्यः—देवानाम् अग्नीन्द्रादीनां मध्ये ब्रह्मा चतुर्मुखो भूत्वा परमेश्वरो नियामकत्वेन अवतिष्ठते। तथा कवीनां काव्यनाटकादिकर्तॄणां पुरुषाणां मध्ये पदवीः भूत्वा अवतिष्ठते। व्याकरणे निष्पन्नः सुशब्दविशेषः पदम्। तत् वेति गच्छतीति पदवीः शब्दसामर्थ्याभिज्ञो व्यासवाल्मीक्यादिरूपः इत्यर्थः । विप्राणां वैदिकमार्गवर्तिनां ब्राह्मणानां मध्ये ऋषिः तत्तद्गोत्रप्रवर्तको वसिष्ठादिरूपो बभूव । मृगाणां चतुष्पदां मध्ये शक्त्याधिक्येन युक्तो महिषो बभूव । गृध्रोपलक्षितानां सर्वेषां पक्षिणां मध्ये प्रबलः श्येनः बभूव । वनानां वृक्षसमूहरूपाणां मध्ये छेदनार्थः स्वधितिः परशुः बभूव । यागहेतुभूतवल्यात्मकः सोमो भूत्वा रेभन् मन्त्रशब्दयुक्तः सन् पवित्रं शुद्धिकारणं गंगाजलकुशदर्भादिद्रव्यजातं सर्वम् अत्येति = परमेश्वर इंद्र अग्नि वगैरे देवांमध्यें चतुर्मुख ब्रह्मा होऊन सृष्टीचें नियमन करीत राहतो; काव्यें नाटकें वगैरे रचणाऱ्या कवींमध्यें व्याकरणशुद्ध पदें जाणणारा व्यासवाल्मिकीवगैरेसारखा तो होतो म्हणजे

व्यासवाल्मिकीवगैरेंचा तो अवतार घेतो; वैदिक मार्गानें चालणारे जे ब्राह्मण त्यांचा गोत्रप्रवर्तक म्हणजे त्यांना गोत्रे देणाऱ्या वसिष्ठवगैरेंचा तो अवतार घेतो; चतुष्पाद् प्राण्यांमध्यें तो बलवान् महिष होतो; पक्ष्यांमध्यें तो ससाणा होतो; झाडांना कापण्याकरितां तो परशु होतो; यज्ञांमध्यें हवि देण्यासाठीं तो सोमलता होऊन मंत्रयुक्त असा गंगाजलकुशदर्भवगैरे शुद्धिकारक जे पदार्थ त्यांच्याही पलीकडे तो जातो म्हणजे तो अत्यंत शुद्ध आहे; अशा रीतीनें ह्या ऋचेंत परमेश्वराची श्रेष्ठता वर्णन केली आहे.

महानारायणोपनिषत् ( ९।१ ) वरील नारायणदीपिकाः— देवानाम् इंद्रादीनां मध्ये ब्रह्मा पारमेश्वरं रूपं = इंद्रादिदेवांमध्यें ब्रह्मा हें परमेश्वराचें रूप आहे; पदवीं दैत्याचार्याधिकारम् इच्छति पदवीयति इति पदवीः = दैत्यांचा आचार्य होण्याची जो इच्छा करतो तो पदवी म्हणजे शुक्र किंवा उशना; आचार्यांमध्यें ( कवीनां ) शुक्र ( पदवीः ); कवीनाम् उशना कविः ( भग० गीता १०।३७ ) = कवींतला श्रेष्ठ उशना; नित्यगामित्वात् सूर्यो वा पदवीः कवीनां ज्ञानिनां = ज्ञात्यांमध्यें सतत जाणारा सूर्य; यद्वा पदानि व्ययति संवृणोति सम्यक्पदप्रयोगकर्ता कवीनां श्रेष्ठः = कवींमध्यें शब्दांची उत्तम रीतीनें योजना करणारा असा श्रेष्ठ कवि; महिषः = पूज्यतमः सिंहः; पशूंत ( मृगाणां ) सिंह ( महिषः ); मृगाणां च मृगाधिपः अशी स्मृतीही आहे; स्वधितिः परशुः वनानां छेदहेतुत्वात् श्रेष्ठः = परशु झाडांना कापतो म्हणून तो श्रेष्ठ; वल्लीरूप सोम मी सर्वांत श्रेष्ठ आहें असें म्हणत सर्व पवित्र वस्तूंच्या पलीकडे जातो म्हणजे त्यांहून तो श्रेष्ठ आहे; पवित्रेषु सोमः वैष्णवं रूपम् इत्यर्थः = सर्व पवित्र वस्तूंत सोम हा विष्णूचाच अवतार आहे; रेभन् = अहम् उच्चैः इति निःशङ्कं भाषमाणः = मी श्रेष्ठ आहें असें निर्भीडपणें बोलणारा; ह्यानंतर प्रस्तुत खंडांतील भाष्य दिलें आहे; तें यास्काचें भाष्य होय असें म्हटलें आहे.

**सायणः**—सोम पुढील प्रकारचा आहे; सोम स्तुति करणाऱ्या ( देवानां ) ऋत्विजांचा ब्रह्मानांवाचा ऋत्विक् होतो; किंवा प्रकाशणाऱ्या इंद्रादिदेवांचा तो ब्रह्मा म्हणजे अधिपति होतो; कवीनां = क्रान्तप्रज्ञानां = ज्यांना अतींद्रियज्ञान आहे अशांचा; पदवीः = स्खलंति पदानि साधुत्वेन यः योजयति सः = अडखळणारीं पावलें जो बरोबर टाकवितो तो; पदवीः कवीनां = ज्यांचें ज्ञान अतींद्रिय आहे अशांचें पाऊल सोम ज्ञानमार्गावर योग्य ठिकाणीं टाकवितो म्हणजे ज्ञानाच्या बाबतींत तो त्यांना साहाय्य करतो; ऋषिः विप्राणां = मेधाविनां मध्ये ऋषिः भवति = बुद्धिमानांमध्यें तो ऋषि होतो म्हणजे अतींद्रियद्रष्टा होतो; बुद्धिमानांना इंद्रियगोचर वस्तु कळतात पण सोमाला अतींद्रिय वस्तु कळतात; महिषः मृगाणां = महिषाद्यः बलवान् राजा भवति = मृगांचा महिषनांवाचा बलवान् राजा होतो; गिधाडांचा ( गृध्राणां ) तो श्येन म्हणजे पक्षिराज होतो; वनानां हिंसकानां छेदकानां मध्ये स्वधितिः एतन्नामकः छेदकः असिः = कापणाऱ्या आयुधांत सोम स्वधितिनांवाचें कापणारें आयुध आहे; असा प्रभावयुक्त सोम आवाज करीत

( रेभन् = शब्दायमानः ) गाळण्यांतून ( पवित्रम् अति ) गाळला जातो. दिव् = प्रकाशणें, स्तुति करणें ( धा० ४।१ ); कविः = क्रान्तदर्शनः ( पान ९७७ ); वी = जाणें ( धा० २।३८ ); पदवीः = पदानि गमयति योजयति असौ; ऋषिः दर्शनात् (पान १०९-११०); विप्रः = मेधावी ( निघंटु ३।१५।१ ); वन हिंसायाम् ( धा० १।८०४ ); रेभृ शब्दे ( धा० १।३८५ ); अशा रीतीनें शब्दांच्या व्युत्पत्ति करून व निघंटूंतले शब्दांचे अर्थ घेऊन वरीलप्रमाणें सायणाचार्यांनीं ऋचेचें विवरण केलें आहे.

ब्रह्मा देवानां = देवांमधील ब्रह्मदेव म्हणजे सर्व देवांहून श्रेष्ठ; ब्रह्मदेव ह्या अर्थी ब्रह्मा शब्द एथेंच आला आहे. प्रत्यग्निः० अबोधि विप्रः पदवीः कवीनाम् ( ३।५।१ ); एथें अग्नीला अद्भुत कृत्यें करणाऱ्यांचा ( कवीनां ) पुढारी ( पदवीः ) म्हटलें आहे; अभीक आसां पदवीः अबोधि ( ३।५६।४ ) = ह्या उषांचा ( आसां ) पुढारी ( पदवीः ) अग्नि आमच्याजवळ ( अभीके ) जागा झाला आहे ( अबोधि ); इनो वामन्यः पदवीः ( ७।३६।२ ) = हे मित्रावरुणांनो, तुमच्यांपैकीं एक म्हणजे वरुण आमचा पुढारी ( इनः = पदवीः ) म्हणजे मार्गदर्शक आहे. सोमाला पदवीः कवीनां असें आणखी एकदां ( ९।९६।१८ ) म्हटलें आहे; पदवीः कवीनां = अद्भुत कृत्यें करणाऱ्यांचा पुढारी म्हणजे त्यांच्यांत श्रेष्ठ. ऋषि व विप्र ह्या दोहोंचाही अर्थ स्तुति करणारा; ऋषिः विप्राणां=स्तुति करणाऱ्यांमध्यें स्तुति करणारा म्हणजे त्यांमधील श्रेष्ठ; स्तोते देवांची स्तुति करतात पण सोम त्या स्तोत्यांहूनही देवांची उत्तम स्तुति करतो. मृगः = हिंस्र पशु; मृगो न भीमः ( १।१५४।२॥१।१९०।१ ), मृगो न हस्ती० सिंहो न भीमः ( ४।१६।१४ ), मृगो न वारणः ( ८।३३।८ ), सीदन् मृगो न महिषो वनेषु (९।९२।६), महिषं मृगं (८।६९।१५), मृगस्य महिषस्य (१०।१२३।४), मृगेव वारणा ( १०।४०।४ ), मृगा न भीमाः ( २।३४।१ ) ह्या सर्व उताऱ्यांत मृग म्हणजे हिंस्र पशु; असे पशु हत्ती महिष वगैरे; मृगाणां मातरम् अरण्यानिम् ( १०।१४६।६ ) = हिंस्र पशूंची आई जी अरण्यानि तिला; अरण्यांत नाना प्रकारचे हिंस्र पशु असतात. महिषो मृगाणां = हिंस्र पशूंमध्यें अतीशय हिंस्र असा महिष. वरील कांहीं उताऱ्यांत महिषाला मृग म्हटलें आहे; महिष म्हणजे रानटी रेडा किंवा दुसरा एखादा हिंस्र पशु असेल. सुपर्णयातुम् उत गृध्रयातुं ( ७।१०४।२२ ); एथें गृध्र म्हणजे गिधाड असेल. पण गृध्र म्हणजे पक्षी असाही अर्थ असावा; आ वां श्येनासो अश्विना वहन्तु रथे युक्तास आशवः पतङ्गाः। ये अप्तुरो दिव्यासो न गृध्रा अभि प्रयो नासत्या वहन्ति ( १।११८।४ ) एथें श्येनांची गृध्रांशीं तुलना केली आहे व गृध्रांना दिव्याः हें विशेषण लावलें आहे; तेव्हां गृध्र हे एथें गिधाड खास नसावेत; गृध्र म्हणजे उंच उडणारा पक्षी असावा; ह्या उंच उडणाऱ्या पक्षांत ( गृध्राणां ) श्येन हा अतीशय उंच उडणारा पक्षी होय. पश्यन् गृध्रस्य चक्षसा ( १०।१२३।८ )= गृध्राच्या डोळ्यानें पाहणारा; हा गृध्र चंडोल[१] किंवा गरूड ह्या सारखा एखादा उंच उडणारा पक्षी

असेल. गृध्रेव ( २।३९।१ ) एथें अश्विनांची गृध्रांशीं तुलना केली आहे; तेव्हां एथें गृध्र म्हणजे गिधाड खास नव्हत; ते चांगल्या जातीचे पक्षी असावेत. प्रस्तुत ऋचेंत गृध्र म्हणजे उंच उडणारा पक्षी. स्वधितिः = कुऱ्हाड; वृत्रं जघान स्वधितिर्वनेव ( १०।८९।७ ) = कुऱ्हाड जशी झाडांना हाणते तसा इंद्र वृत्राला हाणता झाला. हें रूपक आधींच्या रूपकांहून वेगळें आहे; त्यांत त्या त्या पदार्थाची श्रेष्ठता दाखविली आहे पण स्वधिति ह्यानें शत्रुत्व दर्शविलें जातें; तेंही एक प्रकारचें श्रेष्ठत्व आहे; ह्या रूपकानें सोमाची श्रेष्ठता दाखविली आहे. कदाचित् स्वधिति हें एका अतिशय बळकट झाडाचें नांव असेल; तसें असल्यास वृक्षांतला ( वनानां ) स्वधिति म्हणजे अतिशय श्रेष्ठ असा अर्थ होईल; आरंभीं कुऱ्हाड स्वधितिनांवाच्या लाकडाची केली गेली असेल म्हणून कुऱ्हाडीलाही स्वधिति हें नांव पडलें असेल. रेभ् =स्तुति करणें, गाणें; श्यावाश्वस्य रेभतः तथा श्रुणु यथाश्रुणोः अत्रेः (८।३७।७) = स्तुति करणाऱ्या अत्रीची याचना जशी तूं ऐकलीस तशी स्तुति करणाऱ्या श्यावाश्वाची याचना ऐक. कविः सन् सोमः पवित्रमत्येति रेभन् ( ९।९६।१७ ) = कवि असणारा सोम गात ( रेभन् ) गाळण्यांतून कलशांत पडतो. सोमाला रेभः तीनचार वेळां म्हटलें आहे; रेभः=गाणारा. सोमः पवित्रम् अत्येति रेभन् = सोम गात गात गाळण्यांतून कलशांत पडतो.

## खंड १४ वा.

**तिस्रो वाच ईरयति प्र वह्निर्ऋतस्य धीतिं ब्रह्मणो मनीषाम्। गावो यन्ति गोपतिं पृच्छमानाः सोमं यन्ति मतयो वावशानाः ( ऋ० सं० ९।९७।३४ )**

**वह्निः आदित्यः भवति। सः तिस्रः वाचः प्रेरयति ऋचः यजूंषि सामानि। ऋतस्य आदित्यस्य कर्माणि ब्रह्मणः मतानि। एषः एव एतत् सर्वम् अक्षरम्। इति अधिदैवतम्**

एथें वन्हि म्हणजे आदित्य; तो ( आदित्य ) तीन वाचा म्हणजे ऋचा, यजुमंत्र व सामें उच्चारतो ( प्र + ईरयति ). ऋतस्य = आदित्यस्य. धीतिं = कर्माणि ( पान १४१ ). मनीषां = मतानि = संमत. भाष्यांत ऋतस्य० मतानि ह्याचा संबंध आधींच्या शब्दाशीं दाखविला नाहीं व उत्तरार्धावर भाष्यही नाहीं. एषः एव एतत् सर्वम् अक्षरम् हे शब्द पान १११८ तील आदित्यपर विवरणांत आले आहेत; तेथें व एथें त्यांचा कांहींएक संबंध दिसत नाहीं. असा देवतापर अर्थ आहे.

**अथ अध्यात्मम्। वह्निः आत्मा भवति। सः तिस्रः वाचः ईरयति प्रेरयति विद्यामतिबुद्धिमताम्। ऋतस्य आत्मनः कर्माणि ब्रह्मणः मतानि। अयम् एव एतत् सर्वम् अनुभवति। आत्मगतिम् आचष्टे**

आतां आत्मपर अर्थ. वन्हि म्हणजे आत्मा; तो आत्मा विद्यावंत, मतिमंत व बुद्धिमंत ह्यांच्या तीन वाचांना प्रेरणा देतो. ईरयति भाष्यांत नको. विद्या=श्रुति; मति=वेदार्थाचें तर्कानें मनन; बुद्धि = वेदाच्या अर्थाचा निर्णय ( पान १०८० ). कांहीं लोक नुसतें पठण करतात; कांहीं श्रुतीचें मनन करतात पण त्यांना खात्रीनें कांहींएक सांगतां

येत नाहीं; कांहीं थोडे निश्चित अर्थ सांगतात; अशांच्या तीन प्रकारच्या वाचा आल्यामुळें अस्तित्वांत येतात. मनीषां = मतानि = संमत. ऋतस्य = आत्मनः. एथेंही भाष्यांत ऋतस्य० मतानि ह्याचा संबंध आधींच्या शब्दांशीं दाखविला नाहीं व दुसऱ्या अर्धावर भाष्य नाहीं; कदाचित् ऋचेचा पहिला अर्धच ह्या खंडांत घेतला असेल; कारण दुसऱ्या अर्धाचा आदित्यपर व आत्मपर अर्थाशीं कोणताही संबंध नाहीं. अयम् एव० आचष्टे हे शब्द मागील खंडांत (पान १११९) आले आहेत.

**सायण**:--वह्निः = वोढा = यजमानः = हविर्वहन करणारा होता; तो तीन वाचा म्हणजे ऋक्, यजुस् व सामन् अशा स्तुति मुखावाटें उच्चारतो (प्रेरयति); त्याचप्रमाणें यज्ञाचें (ऋतस्य = यज्ञस्य) धारण करणारी (धीतिं = धारयित्रीं) म्हणजे यज्ञाला आवश्यक अशी आणि मनाला प्रेरणा देणारी व कल्याणकारक अशी (मनीषां = मनसः ईशित्रीं कल्याणीं वाचं) सोमाची (ब्रह्मणः = परिवृढस्य सोमस्य) स्तुति तो उच्चारतो; ज्याप्रमाणें गायींच्या पतीकडे म्हणजे बैलाकडे गायी त्याचा शोध करीत करीत जातात त्याप्रमाणें गायींचा स्वामी जो सोम त्याच्याकडे शोध करीत गायीं जातात म्हणजे आपल्या दुधाशीं सोमरसाचें मिश्रण व्हावें म्हणून सोमरसाकडे जातात; त्याप्रमाणें धनेच्छु (वावशानाः = कामयमानाः) लोक (मतयः=स्तोतारः) सोमाकडे जातात म्हणजे त्याची स्तुति करण्याकरितां जातात.

तिस्रो वाचः उदीरते गावो मनन्ति धेनवः। हरिरेति कनिक्रदत् (९।३३।४) = वाचानांवाच्या तीन नवऱ्या (तिस्रः वाचः) नवऱ्याकडे जाण्याला घराबाहेर निघतात (उदीरते); गायीही (गावः धेनवः) कामातुर होतात (मनन्ति); अशा बायकांकडे हरि डुरकण्या फोडीत जातो. सोमरस दुधांत मिसळतात त्यावेळीं स्तोते स्तुति उच्चारतात; ह्याच्यावर कामातुर मुलींची व कामातुर पुरुषाची कोटी केली आहे. प्रसवे त उदीरते तिस्रो वाचो मखस्युवः। यदव्य एषि सानवि (९।५०।२) = हे सोमा, जेव्हां तूं गाळण्यांतून (अव्ये सानवि) धावतोस (एषि) तेव्हां तुझा प्रवाह (ते प्रसवे) वहात असतांना कामातुर (मखस्युवः) वाचानांवाच्या तीन मुली तुझ्याकडे जाण्याला निघतात (उदीरते). एथेंही वरीलप्रमाणेंच कोटी आहे. वह्नि व वहतु ह्यांत धातु वह्; वहतु = रथांतून वाहून नेला जाणारा हुंडा; असा मुलीसह हुंडा वाहून नेणारा तो वह्नि; तो आपल्या वाचानांवाच्या तीन मुली (तिस्रः वाचः), ऋताची धीति व ब्रह्म्याची मनीषा ह्यांना रथांत घालून विवाहासाठीं त्वरेनें (प्र) सोमाकडे पाठवितो (ईरयति). वह्नि व ऋत हे ब्रह्मन्प्रमाणें विशिष्ट प्रकारचे स्तोते असावेत; हे तिघे ज्या स्तुति उच्चारतात त्या जणूं काय त्यांच्या उपवर झालेल्या मुली; ऋताच्या मुलीचें नांव धीति व ब्रह्मयाच्या मुलीचें नांव मनीषा; वाक्, धीति व मनीषा ह्या विशिष्ट स्तोत्यांनीं रचिलेल्या विशिष्ट प्रकारच्या स्तुति असाव्यात. गावो यन्ति गोपतिं पृच्छमानाः = गायी आपल्या पतीकडे (गोपतिं) शोध करीत करीत (पृच्छमानाः) धावत जातात. गायीचें दूध सोमरसांत मिसळतात त्यावर ही

गायबैलाची कोटी आहे; सोमरस हा बैल व दूध ह्या गायी; गायींना जसा बैल हवा असतो तसा दुधाला सोमरस हवा असतो म्हणजे सोमरसांत मी केव्हां मिसळेन असें दुधाला होतें. सोमं यन्ति मतयो वावशानाः = कामातुर झालेल्या ( वावशानाः ) मतिनांवाच्या मुली ( मतयः ) सोमाकडे धांवत जातात ( यन्ति ). वरील दोन उताऱ्यांत व प्रस्तुत ऋचेंत विनोदपर कोट्या आहेत.

## खंड १५ वा.

**सोमं गावो धेनवो वावशानाः सोमं विप्रा मतिभिः पृच्छमानाः। सोमः सुतः पूयते अज्यमानः सोमे अर्कास्त्रिष्टुभः सं नवन्ते ( ऋ० सं० ९।९७।३५ )**

**एते एव सोमं गावः धेनवः रश्मयः वावश्यमानाः कामयमानाः आदित्यं यन्ति। एवमेव सोमं विप्राः रश्मयः मतिभिः पृच्छमानाः कामयमानाः आदित्यं यन्ति। एवमेव सोमः सुतः पूयते अज्यमानः। एतमेव अर्काश्च त्रिष्टुभश्च संनवन्ते। ते एतस्मिन् आदित्ये एकं भवन्ति। इति अधिदैवतम्**

गावः धेनवः = रश्मयः. सोमं = आदित्यम्. वावशानाः = वावश्यमानाः = कामयमानाः. इच्छेनें प्रेरित झालेले हेच किरण आदित्याकडे जातात. विप्राः = रश्मयः. पृच्छमानाः = कामयमानाः. ह्याचप्रमाणें ( एवमेव ) इच्छेनें प्रेरित झालेले किरण आदित्याकडे स्तुति घेऊन जातात. एवम् एव सोमः सुतः पूयते अज्यमानः = ह्याप्रमाणें प्रेरणा केलेला ( सुतः ) आदित्य ( सोमः ) द्युलोकीं रश्मींनीं पुढें पुढें ढकलला जाणारा ( अज्यमानः ) शुद्ध होत जातो ( पूयते ). आदित्य उदयाच्या वेळीं लाल गोळा दिसतो पण जसजसा तो वर येतो तसतसा त्याचा लाल रंग जाऊन तो शुभ्र दिसतो. ह्याच्याचकडे ( एतमेव ) अर्क व त्रिष्टुभ् नांवाचे छंद जातात म्हणजे ते आदित्यामध्यें एकवटतात ( एकं भवन्ति ). अर्क व त्रिष्टुभ् ह्या छंदांनीं आदित्याची स्तुति केली जाते.

**अथ अध्यात्मम्। एते एव सोमं गावः धेनवः इन्द्रियाणि वावश्यमानानि कामयमानानि आत्मानं यन्ति। एवमेव सोमं विप्राः इन्द्रियाणि मतिभिः पृच्छमानानि कामयमानानि आत्मानं यन्ति। एवमेव सोमः सुतः पूयते अज्यमानः। इमम् एव आत्मा च सप्त ऋषयश्च संनवन्ते। तानि इमानि एतस्मिन् आत्मनि एकं भवन्ति। इति आत्मगतिम् आचष्टे**

आतां आत्मपर अर्थ. गावः धेनवः = इन्द्रियाणि. वावशानाः = वावश्यमानानि = कामयमानानि. इच्छेनें प्रेरित झालेलीं इंद्रियें ह्याच आत्म्याकडे ऐहिक विषयांचें ज्ञान घेऊन जातात. सोमं = आत्मानम्. विप्राः = इन्द्रियाणि. पृच्छमानाः = पृच्छमानानि = कामयमानानि. ह्याचप्रमाणें इच्छेनें प्रेरित झालेलीं इन्द्रियें ज्ञान घेऊन ( मतिभिः ) आत्म्याकडे जातात. एवम् एव सोमः सुतः पूयते अज्यमानः = ह्याचप्रमाणें ज्ञानानें प्रेरित (सुतः) आत्मा (सोमः) इंद्रियांनीं पुढें पुढें ढकलला जाणारा (अज्यमानः) शुद्ध होतो. जीवात्म्याला इद्रियांच्या साहाय्यानें ऐहिक ज्ञान मिळत जातें पण नंतर त्या

ज्ञानाचा त्याला कंटाळा येऊन तो खरें ज्ञान मिळवूं लागतो व त्या खऱ्या ज्ञानानें शेवटीं शुद्ध होतो; असा अर्थ असेल. अर्काश्च त्रिष्टुभश्च = सप्तऋषयः = तानि इमानि ( इन्द्रियाणि ). ह्याच आत्म्यापुढें ( इमम् एव ) सप्त ऋषि ( अर्काश्च त्रिष्टुभश्च ) नमन करतात ( संनवन्ते ) म्हणजे तीं इंद्रियें ( तानि इमानि ) आत्म्यांत एकवटतात. ज्ञानस्थितींत इंद्रियांचा सर्व कारभार संपतो. आत्मा च हे शब्द अशुद्ध असावेत; त्यांबद्दल आत्मानं पाहिजे; सप्त ऋषयः नंतरचा च नको आहे; इममेव आत्मानं सप्त ऋषयः संनवन्ते असें भाष्य पाहिजे. इति आत्मगतिमाचष्टे ह्याचा अर्थ पहा (पान ११२० ).

**सायण:**— धेनवः = प्रीणयित्र्यः ; सुख देणाऱ्या ( धेनवः ) गाई ( गावः ) सोमाची इच्छा करतात ( वावशानाः = कामयमानाः ); बुद्धिमान् लोक ( विप्राः = मेधाविनः ) स्तुतींनीं ( मतिभिः ) सोमाचा शोध करतात ( पृच्छमानाः = पृच्छन्तः भवन्ति ); गाईच्या दुधांत मिसळलेला ( अज्यमानः ), रस काढलेला ( सुतः ) सोम ऋत्विजांकडून शुद्ध केला जातो; आम्ही रचिलेल्या त्रिष्टुप्छंदांतील ( त्रिष्टुभः = त्रिष्टुब्रूपाः ) स्तुति ( अर्काः ) सोमाकडे जातात ( संनवन्ते = संगच्छन्ते ).

सोम हा वत्स; त्याला पाजण्याला उत्कंठित होऊन पान्हवलेल्या गाई (गावः धेनवः) त्याजकडे जातात; म्हणजे गाईचें दूध सोमरसांत मिसळलें जातें. स्तोते ( विप्राः ) आपल्या स्तुतिरूप मुलींसह सोमाचा शोध करीत ( पृच्छमानाः ) जातात; स्तोते जणूं काय आपल्या स्तुतिरूप मुली तरुण सोमाला देतात म्हणजे ते सोमाची स्तुति करतात. रस काढलेला ( सुतः ) सोम गाळण्यांत ओतलेला ( अज्यमानः ) शुद्ध होतो. त्रिष्टुप्छंदांतील ( त्रिष्टुभः ) ऋचा ( अर्काः ) सोमाला ( सोमे ) आलिंगन देतात ( संनवन्ते ).

## खंड १६ वा.

**अक्रान् समुद्रः प्रथमे विधर्मन् जनयन् प्रजा भुवनस्य राजा । वृषा पवित्रे अधि सानो अव्ये बृहत्सोमो वावृधे सुवान इन्दुः ( ऋ० सं० ९।२७।४० )**

**अत्यक्रमीत् समुद्रः आदित्यः परमे व्यवने वर्षकर्मणा जनयन् प्रजाः भुवनस्य राजा सर्वस्य राजा । वृषा पवित्रे अधि सानो अव्ये बृहत्सोमः वावृधे सुवानः इन्दुः । इति अधिदैवतम्**

अक्रान् = अत्यक्रमीत् ; क्रम् = जाणें; अक्रान् हें क्रम् ह्याचें भूतकालचें तृतीय पुरुषाचें एकवचन. समुद्रः = आदित्यः. प्रथमे = परमे; विधर्मन् = व्यवने; व्योमन् = व्यवने असें १३।१० त (पान १०७० ) म्हटलें आहे; तेथले परमे व्यवने हे शब्द एथें घातले असावेत; व्यवने हा शब्द विधर्मन् ह्याची व्युत्पत्ति नसून त्या शब्दाचा तो अर्थ असावा. वर्षकर्मणा अध्याहृत. भुवनस्य = सर्वस्य. पाऊस पाडून प्रजा उत्पन्न करणारा म्हणजे प्रजा पोसणारा सर्व ब्रह्मांडाचा राजा आदित्य श्रेष्ठ द्युलोकीं संचार करीत आहे. इति अधिदैवतम्; पान १११९ पहा. ज्याअर्थीं एथें

व पुढील अध्यात्मविवरणांत उत्तरार्धाचें भाष्य नाहीं त्याअर्थी प्रथमार्धच उदाहृत केला असावा.

**अथ अध्यात्मम्। अत्यक्रमीत् समुद्रः आत्मा परमे व्यवने ज्ञानकर्मणा जनयन् प्रजाः भुवनस्य राजा सर्वस्य राजा। वृषा पवित्रे अधि सानो अव्ये बृहत् सोमः वावृधे सुवानः इन्दुः। इति आत्मगतिम् आचष्टे**

अथ अध्यात्मं = आतां आत्मपर विवरण. अक्रान् = अत्यक्रमीत्. समुद्रः = आत्मा. प्रथमे विधर्मन् = परमे व्यवने. ज्ञानकर्मणा अध्याहृत. भुवनस्य = सर्वस्य. ज्ञानानें प्रजा उत्पन्न करणारा सर्वांचा राजा आत्मा श्रेष्ठलोकीं संचार करीत आहे. हें नुसतें शब्दशः भाषांतर आहे; पण भाष्याचा खरा अर्थ कळत नाहीं. ह्याप्रमाणें एथें ऋषि आत्म्याची कृति सांगतो.

सायणः— यस्मात् आपः संद्रवन्ति स समुद्रः अपां वर्षकः; राजा=सोमः; प्रथमे= विस्तृते; भुवनस्य = उदकस्य; विधर्मन् = विधारके अंतरिक्षे; जनयन् = उत्पादयन्; अक्रान् = सर्वम् अतिक्रामति; वृषा = कामानां वर्षिता; सुवानः = अभिषूयमाणः; इन्दुः = दीप्तः; अधि = अधिकम्; सानो = सानौ = समुच्छ्रिते; अव्ये = अविमये पवित्रे = मेंढीच्या केसाच्या केलेल्या गाळण्यांत; बृहत् = प्रभूतम्; वावृधे = ववृधे = वर्धते.

अक्रान् ह्यांत क्रन्द् धातु आहे; क्रन्द् = ओरडणें; जसें स्यन्द् पासून अस्यान् तसें क्रन्द् पासून अक्रान्. प्रो स्य वह्निः पथ्याभिरस्यान् ( ९।८९।१ ) = हवि अर्पण करणारा ( वह्निः ) हा सोम मार्गांनीं वेगानें ( प्र ) धांवत आहे ( अस्यान् ). सं मातृभिः वावशानो अक्रान् ( २।११।८ ) = मातांशीं ( मातृभिः ) संगत झालेला ( सं- वावशानः ) म्हणजे मातांची भेट झाल्यामुळें तो आनंदानें ओरडत आहे. हिन्वानो वाचमिष्यासि पवमानो विधर्मणि। अक्रान् देवो न सूर्यः (९।६४।९) = कलशांत (विधर्मणि) सोडलेला (हिन्वानः) व सूर्याप्रमाणें प्रकाशमान सोम वाचा उच्चारीत आहे व आनंदानें ओरडत आहे. अव्ये वधूयुः पवते परि त्वचि श्रथ्नीते नप्तीरदितेः० हरिः अक्रान् (९। ६९।३) = स्त्रीची इच्छा करणारा (वधूयुः) सोम गाळण्यांतून (अव्ये त्वचि परि) शुद्ध होत आहे; अदितीच्या मुलींना तो आलिंगन देत आहे (श्रथ्नीते) व तसें करतांना आनंदानें ओरडत आहे. आनंदानें ओरडणें ह्याअर्थी क्रन्द् धातु सोमासंबंधानें आणखीही कांहीं ऋचांत आला आहे. असावि सोमो अरुषो वृषा हरिः अभि गा अचिक्रदत् ( ९।८२।१ ) = सोमाचा रस काढला आहे; सुवर्णाच्या रंगाचा ( हरिः ) दीप्तिमान् ( अरुषः ) बैल ( वृषा ) गायींच्याकडे ( गाः अभि ) डुरकण्या फोडीत जात आहे ( अचिक्रदत् ); एथें सोम हा बैल व दूध ह्या गायी. विधर्मन् = अंतरिक्ष किंवा द्युलोक; वीनां पक्षिणां धर्म = पक्ष्यांना धारण करणारें म्हणजे आसरा देणारें अंतरिक्ष; पांखरें अंतरिक्षांत उडतात म्हणून अंतरिक्ष त्यांचा आसरा; असा विधर्मन् ह्याचा अर्थ असावा. विधर्मणि देवासो अग्निं जनयन्त चित्तिभिः ( ३।२।३ ) = देव

अग्नीला द्युलोकीं ज्वालांसह ( चितिभिः ) निर्माण करते झाले. तिस्रो० परावतः ( १।३४।७ ), तिस्रः दिवः ( १।३४।८ ), तिस्रः द्यावः ( १।३५।६ ) ह्यावरून द्युलोक तीन होते; प्रथमे विधर्मन् = पहिल्या द्युलोकीं. विधर्मन् हा शब्द गाळण्याला व कलशाला लावलेला आढळतो; वर दिलेली हिन्वानो वाचमिष्यसि (९।६४।९) ऋचा पहा (पान ११२७). वं पवित्रे रजसो विधर्मणि देवेभ्यः सोम पवमान पूयसे (९।८६।३०) एथें विधर्मणि = पवित्रे = गाळण्यांत. कलशांतील जलांत व दुधांत मिसळल्यामुळें सोम आनंदानें ओरडतो असें कांहीं ऋचांत म्हटलें आहे; जसें:—स शुष्मी कलशेषु आ पुनानो अचिक्रदत् (९।१८।७), एष प्र कोशे मधुमान् अचिक्रदत् (९।७७।१), मृजानो वारे पवमानो अव्यये वृषाव चक्रदो वने ( ९।१०७।१२ ) व वनेषु अवचक्रदत् हरिः ( ९।८६।३१ ); वन व कोश ह्यांचा अर्थ कलश. सोमाला म्हणजे सोमरसाला समुद्र अतिशयोक्तीनें म्हटलें आहे. जनयन् प्रजाः = प्रजा निर्माण करणारा; सोम धन निर्माण करतो, स्तुति निर्माण करतो इतकेंच नव्हे तर तो द्युलोक व सूर्य ह्यानांही निर्माण करतो असें म्हटलें आहे. भुवनस्य राजा = तो ब्रह्मांडाचा राजा आहे. अव्ये पवित्रे=अवींच्या म्हणजे मेंढींच्या लोकरीच्या केलेल्या गाळण्यांत. सानो = सानौ; सानौ नंतर अव्ये शब्द आल्यास त्याचें सानो हें रूपांतर आठ ऋचांत आढळतें; हें रूपांतर बहुतकरून उच्चारासाठीं केलें गेलें असावें. सानु = डोकें; अधि सानौ नि जिघ्नते वज्रेण शतपर्वणा ( १।८०।६ ) = शंभर पेऱ्यांच्या वज्रानें इंद्र वृत्राला डोक्यावर हाणतो. पर्वताचें डोकेंही सानु; सानु हा पर्वतावरील सपाट भाग. सानौ देवासो बर्हिषः सदन्तु ( ७।४३।२ ) = देव दर्भांच्या सपाटीवर म्हणजे दर्भासनावर बसोत. गाळणें हें एक प्रकारचें सपाट आसनच; ह्या सपाट आसनावर सोम बसविला जातो म्हणजे त्यांतून तो गाळला जातो. दुसऱ्या अर्धाचा अर्थः—रस काढलेला ( सुवानः ) व गाळण्यांत ( पवित्रे = अव्ये सानौ अधि ) ओतलेला सोमरूपी बैल ( वृषा ) खूप ( बृहत् ) वाढतो ( वावृधे ) म्हणजे जोरांत येतो.

## खंड १७ वा.

**महत्तत्सोमो महिषश्चकारापां यद्गर्भोऽवृणीत देवान्। अदधादिन्द्रे पवमान ओजोऽजनयत्सूर्ये ज्योतिरिन्दुः ( ऋ० सं० ९।९७।४१ )**

**महत् तत् सोमः महिषः चकार अपां यत् गर्भः अवृणीत। देवानाम् आधिपत्यम् अदधात् इन्द्रे पवमानः। ओजः अजनयत् सूर्ये ज्योतिः इन्दुः आदित्यः। इन्दुः आत्मा**

देवान् = देवानाम् आधिपत्यम्. पवमान सोम देवांचें आधिपत्य इंद्राच्या ठायीं ठेवता झाला; असा अर्थ केल्यास अवृणीत ह्याला कर्म कोणतें? इन्दुः = आदित्यः. आदित्य सूर्यांत बल ( ओजः ) व प्रकाश ( ज्योतिः ) उत्पन्न करता झाला म्हणजे सूर्य सूर्यांत बल व प्रकाश उत्पन्न करता झाला असा अर्थ होईल. इन्दुः = आत्मा. इन्दुः

आदित्यः ह्या शब्दावरून ऋचेचा देवतापर म्हणजे आदित्यपर अर्थ होतो व इन्दुः आत्मा ह्या शब्दावरून आत्मपर अर्थ होतो असें म्हणावयाचें आहे; परंतु ऋचेवरील भाष्याची कोणीतरी छाटाछाट केली असावी व त्यामुळेंच आत्मपर अर्थ नष्ट झाला असावा; आत्मपर अर्थ कोणत्या प्रकारचा होता तें सांगतां येत नाहीं. ऋचेचा आदित्यपर अर्थः— जेव्हां जलदेवतांच्या पोटीं असलेल्या ( अपां गर्भः ) आदित्यानें मोठीं कामें पसंत केलीं ( अवृणीत ) तेव्हां त्या बलवान् ( महिषः ) आदित्यानें एक प्रचंड ( महत् ) काम केलें; त्यानें इंद्राच्या ठायीं देवांचें आधिपत्य स्थापित केलें व सूर्यांत बल आणि प्रकाश उत्पन्न केला.

सायणः— महिषः = महान् पूज्यः वा; महत् = प्रभूतं कर्म = मोठें काम; अपां गर्भः = उदकानां गर्भभूतः जनयितृत्वात् जन्यत्वात् च = सोम जल उत्पन्न करतो व जलापासून तो उत्पन्न होतो; त्याच्या पोटांत जल असतें म्हणजे तो जल उत्पन्न करतो असा एक अर्थ व तो जलांत मिसळतात म्हणून तो जलाचा गर्भ असा दुसरा अर्थ; तो सोम देवांची सेवा करतो ( अवृणीत = समभजत ) म्हणजे तो आपला रस देवांना पिण्यास देतो; ही त्या सोमाची मोठी कामगिरी; शुद्ध केला जाणारा ( पवमानः = पूयमानः ) सोम सोमपानानें उत्पन्न होणारें बल ( ओजः ) इंद्रांत निर्माण करता झाला ( अदधात् = व्यदधात् ); त्याप्रमाणें सोम ( इन्दुः ) सूर्यांत प्रकाश ( ज्योतिः ) उत्पन्न करता झाला.

महिषः = श्रेष्ठ (पान ११२२). अपां गर्भः = जलाच्या पोटांत असलेला म्हणजे भरपूर जलांत मिसळलेला. वृ = बोलावणें; युवामित् हि अवसे० वृणीमहे (४।४१।७), वृणीमहे सख्याय वृणीमहे युज्याय (९।६६।१८), युवामिदा वृणीमहे। अग्निं च हव्यवाहनं (२।४१।१९) एथें वृणीमहे=बोलावीत आहोंत. ऋचेचा अर्थः— जेव्हां ( यत् ) भरपूर जलांत मिसळलेला सोम देवांना ( देवान् ) बोलाविता झाला ( अवृणीत ) म्हणजे देवांना सोमरस प्यावयास हांक मारता झाला तेव्हां त्या श्रेष्ठ ( महिषः ) सोमानें मोठें ( महत् ) काम केलें ( चकार ); शुद्ध होणारा ( पवमानः ) सोम इंद्राच्या ठिकाणीं बल ( ओजः ) ठेविता झाला ( अदधात् ); सोम ( इन्दुः ) सूर्यांत प्रकाश उत्पन्न करता झाला.

## खंड १८ वा.

**विधुं दद्राणं समने बहूनां युवानं सन्तं पलितो जगार। देवस्य पश्य काव्यं महित्वा अद्या ममार स ह्यः समान ( ऋ० सं० १०।५५।५ )**

**विधुं विधमनशीलम्। दद्राणं दमनशीलम्। युवानं चन्द्रमसं पलितः आदित्यः गिरति। सद्यः म्रियते सः दिवा समुदिता। इति अधिदैवतम्**

विधुं = विधमनशीलं = जोरानें वाहण्याचा स्वभाव आहे ज्याचा अशाला; विधुः = वि + धुः; ध्मा ( = फुंकणें, वाहणें, आवाज करणें ) ह्यापासून धु. दद्राणं =

दमनशीलं = शत्रूंचें दमन करण्याचा स्वभाव आहे ज्याचा अशाला; दम् पासून द्रा. युवानं = चन्द्रमसम्. पलितः = आदित्यः. जगार = गिरति. अद्य = सद्यः = एकदम. ममार = म्रियते. ह्यः = दिवा = दिवसां. समान = समुदिता; समुदिता हें समुदित ह्याचें स्त्रीलिंग; पण ऋचेंत स्त्रीलिंगी शब्द नाहीं. समने बहूनां व देवस्य पश्य काव्यं महित्वा ह्याचें भाष्य दिलें नाहीं. ऋचेचा आदित्यपर अर्थः— जो वारा जोरानें वाहावयास लावतो व शत्रूंचें दमन करतो अशा चंद्राला आदित्य गिळून टाकतो; तो आज मरतो व दिवसां उगवतो असा देवतापर अर्थ आहे.

**अथ अध्यात्मम् । विधुं विधमनशीलम् । दद्राणं दमनशीलम् । युवानं महान्तं पलितः आत्मा गिरति । रात्रौ म्रियते । रात्रिः समुदिता । इति आत्मगतिम् आचष्टे**

विधमनशीलं = फुंकाऱ्यानें विझविणारीला. दमनशीलं = इंद्रियांचें दमन करणारीला. युवानं = महान्तं = बुद्धीला. पलितः = आत्मा. अद्य = रात्रौ. ह्यः = रात्रिः. समान = समुदिता. बुद्धि इंद्रियांना विझविते व अशा रीतीनें त्यांचें दमन करते; अशा बुद्धीलासुद्धां आत्मा गिळून टाकतो. आदित्यपर व आत्मपर अर्थ कळत नाहींत.

**सायणः—** ह्या ऋचेंत इंद्र हा काल म्हणजे मृत्यु असें समजून त्याची स्तुति केली आहे; विधुं = विधातारं = सर्वस्य युद्धादेः कर्तारम्; समने = अनः प्राणनम् । सम्यगननोपेते संग्रामे = जेथें श्वासोच्छ्वास उत्तम रीतीनें करतां येतो अशा युद्धांत; बहूनां दद्राणं = बहूनां शत्रूणां द्रावकम् ईदृक्सामर्थ्योपेतं = अनेक शत्रूंना पळावयास लावणाऱ्याला म्हणजे अशा रीतीचें सामर्थ्य आहे ज्यांत अशाला; युवानं सन्तं पुरुषं पलितः जरा जगार निगिरति इन्द्राज्ञया = इंद्राच्या आज्ञेनें अशा बलवान् पुरुषाला जरा ( पलितः ) गिळून टाकते ( जगार ); मृत्यु इतका सामर्थ्यवान् आहे कीं शूरानें कितीही लढाया मारल्या, अनेक शत्रूंना पळावयास लावलें आणि तो कितीही तरुण असला तरी त्याला जरा ग्रासतेच व मृत्यूच्या स्वाधीन करते; अशा मृत्युदेवाचें महत्त्वयुक्त ( महित्वा = महत्त्वेन उपेतं ) सामर्थ्य ( काव्यं ) पहा ( पश्य ); जरेनें ग्रासलेला हा पुरुष आज मरतो ( ममार = म्रियते ) व पुढें एखाद्या दिवशीं ( ह्यः ) तो श्वासोच्छ्वास करूं लागतो ( समान = चेष्टते ) म्हणजे मेल्यावर तो पुन्हां जन्मतो; पलितं जरसा शौक्ल्यं केशादौ विस्रसा जरा (अमर २।६।४१); पलितं=म्हातारपणामुळें केसाचा पांढरेपणा; पलित शब्द नपुंसक आहे व त्याचा अर्थ जरा नाहीं; तथापि सायणाचार्य पलितः = जरा असा अर्थ करतात; ह्यः = काल; पण एथें ह्यः = परेद्युः = पुढील एकाद्या दिवशीं असा अर्थ केला आहे.

विधु शब्द एथेंच आल्यानें त्याचा अर्थ करतां येत नाहीं. अप द्रान्तु अरातयः ( १०।८५।३४ ) = शत्रु पळून जावोत. द्रा अभ्यासानें दद्रा; दद्रा + आनः = दद्राणः = पळून जाणारा. पलितः = अग्नि ( पान ३१७ ). अग्नि ( पलितः ) पळून जाणाऱ्या ( दद्राणं ) अगदीं तरुण अशा ( युवानं सन्तं ) विधूला गिळून टाकीत आहे. पण विधु कोण ? समने बहूनां ह्याचा अर्थ कळत नाहीं. देवस्य पश्य काव्यं

महित्वा = देवाची म्हणजे अग्नीची महत्त्वयुक्त ( महित्वा ) कामगिरी ( काव्यं ) पहा ( पश्य ). विधूला गिळून टाकतो ही त्याची विलक्षण कामगिरी होय. त्वामिदा ह्यो नरो अपीप्यन् वज्रिन् भूर्णयः ( ८।९९।१ ) = हे इंद्रा, हवि देणारे ( भूर्णयः = नरः ) तुला आतांच ( इदा = ह्यः ) सोम पाजते झाले ( अपीप्यन् ). वयमेवमिदा ह्यो अपीपेमेह वज्रिणम् ( ८।६६।७ ) = आम्हीं ह्या इंद्राला आतांच ( इदा = ह्यः ) ह्या यज्ञांत ( इह ) सोम पाजला आहे ( अपीपेम ). सायणाचार्य इदा म्हणजे आज व ह्यः म्हणजे पुढें एखाद्या दिवशीं असा अर्थ करतात; पण इदा व ह्यः ह्यांचा अर्थ एकच असावा; इदा = ह्यः = नुकताच, आतांच. प्रस्तुत ऋचेंत ह्यः म्हणजे आतांच असा अर्थ केल्यास जो आतांच ( ह्यः ) श्वासोच्छ्वास करीत होता ( समान ) तो आतांच मेला असा अर्थ होईल; म्हणजे अद्य व ह्यः ह्यांचा अर्थ एकच. ह्यः एकंदर तीन वेळां ऋग्वेदांत आला आहे; त्याचा पुढें एखाद्या दिवशीं असा अर्थ होतो असें वाटत नाहीं. विधुं व समने बहूनां ह्या शब्दांचा अर्थ कळत नसल्यानें ऋचेचा खरा अर्थ काय आहे तें ठरवितां येत नाहीं.

## खंड १९ वा.

**साकंजानां सप्तथमाहुरेकजं षळिद्यमा ऋषयो देवजा इति । तेषामिष्टानि विहितानि धामशः स्थात्रे रेजन्ते विकृतानि रूपशः ( ऋ० सं० १।१६४।१५ )**

**सहजातानां षण्णाम् ऋषीणाम् आदित्यः सप्तमः । तेषाम् इष्टानि वा कान्तानि वा क्रान्तानि वा गतानि वा मतानि वा नतानि वा अद्भिः सह संमोदन्ते । यत्र एतानि सप्त ऋषीणानि ज्योतींषि तेभ्यः परः आदित्यः । तानि एतस्मिन् एकं भवन्ति । इति अधिदैवतम्**

साकंजानां = साकं + जानां = सहजातानाम्. षळिद्यमाः = षट् + इत् + यमाः. षण्णाम् ऋषीणां अध्याहृत. एकजः = आदित्यः. सप्तथः = सप्तमः. एकेवेळीं जन्मलेल्या सहा ऋषींमध्यें आदित्य सातवा आहे. तेषाम् इष्टानि० एकं भवन्ति हे शब्द १०।२६ ( पान ८२१ ) एथले ह्या ठिकाणीं घेतले आहेत; परंतु दुसऱ्या अर्धाच्या अर्थाशीं त्यांचा कांहींएक संबंध नाहीं; दोन्ही ठिकाणीं तेषाम् इष्टानि हे-शब्द दुसऱ्या अर्धाच्या आधीं आहेत त्यामुळें कोणीतरी तेथलें भाष्य एथें घातलें असावें.

अथ अध्यात्मम् । सहजातानाम् इन्द्रियाणाम् आत्मा सप्तमः । तेषाम् इष्टानि वा कान्तानि वा क्रान्तानि वा गतानि वा मतानि वा नतानि वा अन्नेन सह संमोदन्ते । यत्र इमानि सप्त ऋषीणानि इन्द्रियाणि एभ्यः परः आत्मा । तानि अस्मिन् एकं भवन्ति । इति आत्मगतिम् आचष्टे

इन्द्रियाणां अध्याहृत. एकजः = आत्मा. तेषाम् इष्टानि० एकं भवन्ति ( पान ८०२ ). सप्तथमाहुरेकजं = सप्तथं + आहुः + एकजम्. षळिद्यमाः = षट् + इत् + यमाः. एकेवेळीं जन्मलेल्या सहा इंद्रियांमध्यें आत्मा सातवा आहे. ऋचेवरील

भाष्याचा कांहीं भाग त्रोटक आहे व बाकीचा अप्रस्तुत आहे; हा अप्रस्तुत मजकूर मुळांतच होता किंवा कोणी तरी तो भाष्यांत घुसडला तें ठरवितां येत नाहीं.

**सायण**:— साकंजानां = एकस्मात् आदित्यात् सहोत्पन्नानां सप्तानाम् ऋतूनां मध्ये = एका आदित्यापासून एकत्र जन्मलेल्या सात ऋतूंमध्यें; सप्तथं = सप्तमम् ऋतुम्; एकजं = एकेन उत्पन्नम्; दोन दोन महिन्यांचा एक ऋतु ह्याप्रमाणें एका वर्षांत सहा ऋतु असतात; अधिकमास हा सातवा ऋतु; कालतत्त्ववेत्ते सात ऋतूंपैकीं अधिकमास हा सातवा ऋतु आहे असें म्हणतात; हा सातवा ऋतु एकटाच जन्मलेला म्हणजे एका महिन्याचाच असतो; इत् = एव; षट् इत् यमाः = ह्या सातांपैकीं सहाच ऋतु जुळे म्हणजे दोन दोन महिन्यांचे असतात; ऋषयः = गन्तारः; ऋषी गतौ ( धा० ६।७ ); हे सहा जुळे ऋतु एका पाठीमागून एक असे जात असतात; ते देवजाः म्हणजे आदित्यदेवापासून जन्मले आहेत असें कालतत्त्ववेत्ते म्हणतात; सातव्या ऋतूला म्हणजे अधिकमासाला देव नाहीं; अधिकमासांत लग्नमुंजी वगैरे धार्मिक कृत्यें होत नाहींत; निःसूर्यः अधिकमासः मंडलं तपते रवेः = सूर्य अधिकमासांत आपलें मंडळ सोडून कोठें तरी जातो व त्याचें कार्य अधिकमास करतो असें स्मृतींत म्हटलें आहे; तेषाम् ऋतूनां स्वरूपाणि इष्टानि सर्वलोकाभिमतानि धामशः तत् तत् स्थाने विहितानि पृथक् पृथक् स्थापितानि रूपशः रूपभेदेन विकृतानि विविधाकृतियुक्तानि स्थात्रे अधिष्ठात्रे तदर्थाय रेजन्ते चलन्ति । जगद्व्यवहाराय पुनः पुनः आवर्तन्ते = त्या त्या स्थलीं राहण्यास आज्ञा केलेलीं ( धामशः ), निरनिराळ्या रूपांमुळें ( रूपशः ) निरनिराळे आकार घेणारीं ( विकृतानि ), सर्व लोकांना इष्ट असलेलीं ( इष्टानि ) त्या त्या ऋतूंचीं ( तेषां ) स्वरूपें मंडलाधिष्ठाता जो आदित्य त्याच्याकरितां ( स्थात्रे ) म्हणजे त्याचें काम करण्याकरितां सारखीं चालत असतात म्हणजे जगाचा व्यवहार चालावा म्हणून तीं स्वरूपें एकामागून एक अशीं पुनः पुनः येतात; प्रत्येक ऋतूचें स्वरूप भिन्न असतें; हे ऋतु जगाच्या निरनिराळ्या भागांवर आपलें कार्य निरनिराळ्या स्वरूपांनीं करतात व अशा रीतीनें ऋतूंचें रहाटगाडगें जगाच्या व्यवहारासाठीं सारखें फिरत असतें.

षट् इत् यमाः ऋषयः देवजाः ह्या शब्दांचा सप्तऋषि असा अर्थ असावा; हे सप्तऋषि अंगिरस् कुलांतले असून सर्व मानवजातीचे पितर् होत. साकंजानां ह्या शब्दावरून हे सप्तऋषि एकदम जन्मास आले असें दिसतें; त्यांपैकीं सातवा ( सप्तथं ) .ऋज ( एकजं ) होता असें म्हणतात. विरूपासः इत् ऋषयः ते इत् गभीरवेपसः । ते अङ्गिरसः सूनवः ते अग्नेः परि जज्ञिरे ( १०।६२।५ ); एथें सप्तऋषि हे अंगिरसाचे मुलगे असून ते अग्नीपासून जन्मले असें म्हटलें आहे ( खंड ११।१७ पान ८८६ ). देवपुत्राः ऋषयः ( १०।६२।४ ) = सप्तऋषि हे देवाचे म्हणजे अग्नीचे पुत्र; त्यांपैकीं सहा एवढेच जुळे ( यमाः ) होते म्हणजे साहीजण मातेच्या उदरांतून एकदम जन्मास आले व सप्तऋषींपैकीं सातवा एकटाच जन्मास आला अशी कांहींतरी कथा

असावी; सगळे अग्नीपासून जन्मास आले ( देवजाः ). इष्टानि = हवि (पान ८०६ ); तेषाम् इष्टानि = त्यांनीं दिलेले हवि. विहितानि धामशः = प्रत्येक ठिकाणीं ( धामशः ) ठेवलेले म्हणजे प्रत्येक देवाला दिलेले. विकृतानि रूपशः व विहितानि धामशः ह्यांचा अर्थ एक असावा. स्थातृ = ( १ ) रथांत बसणारा, ( २ ) स्थावर वस्तु. स्थाता रथस्य ( ३।४५।२ ) = रथांत बसणारा ( इन्द्र ). सूर्यः० विश्वस्य स्थातुः जगतश्च गोपाः ( ७।६०।२ ) = सर्व स्थावर ( स्थातुः ) व जंगम ( जगतः ) वस्तूंचा रक्षण करणारा सूर्य. ऋचेंत स्थाता कोणीतरी देव असावा; त्याला सप्तऋषींचे हवि दिले जातात ( रेजन्ते ). रेज् = देणें असा क्वचित् अर्थ होतो असें मागें एकदां म्हटलें आहे ( पान ८४२ ). पहिल्या अर्धाचा कांहींतरी अर्थ करतां येतो पण दुसरा अर्ध बहुतेक दुर्बोध आहे.

## खंड २० वा.

**स्त्रियः सतीस्ताँ उ मे पुंस आहुः पश्यदक्षण्वान्न वि चेतदन्धः। कविर्यः पुत्रः स ईमा चिकेत यस्ता विजानात्स पितुष्पितासत् ( ऋ० सं० १।१६४।१६ )**

**स्त्रियः एव एताः शब्दस्पर्शरूपरसगन्धहारिण्यः । ताः अमुं पुंशब्देन निराहारः प्राणः इति पश्यन् कष्टात् न विजानाति अन्धः । कविः यः पुत्रः स इमा जानाति । यः स इमा जानाति सः पितुः पिता असत् । इति आत्मगतिम् आचष्टे**

स्त्रियः एव एताः शब्दस्पर्शरूपरसगन्धहारिण्यः = शब्द स्पर्श रूप रस व गंध हरण करणाऱ्या ह्या स्त्रियाच होत. एथें शब्द वगैरे कोण हरण करतात तें सांगितलें नाहीं; इंद्रियें विषयांपासून शब्द स्पर्श वगैरे हरण करतात म्हणजे मिळवितात; पण इंद्रिय शब्द नपुंसक आहे; इंद्रियार्थी मात्रा शब्द घेतल्यास तो स्त्रीलिंगी असल्यानें मात्रा शब्द वगैरे हरण करतात असा अर्थ होईल; मात्राः = मोजणाऱ्या, वस्तूंचें ज्ञान मापणाऱ्या; वस्तु काय आहे हें इंद्रियांच्या द्वारें कळतें; ह्या मात्रा स्त्रियाच होत. ताः अमुं पुंशब्देन निराहारः प्राणः हें ऋचेंतील कोणत्या शब्दांचें विवरण व त्याचा अर्थ काय तें समजत नाहीं. पश्यत् न विचेतत् अन्धः = इति पश्यन् कष्टात् न विजानाति अन्धः ? ईमाः = इमाः. कविः यः पुत्रः स इमाः जानाति = जो पुत्र ज्ञानी ( कविः ) असतो तो ह्या स्त्रियांना जाणतो. यः सः इमाः जानाति सः पितुः पिता असत् = जो ह्या स्त्रियांना जाणतो तो बापाचा बाप होतो. हें भाष्य बरेंच अशुद्ध असून अपूरें आहे; त्यामुळें त्याचा अर्थ नीट कळत नाहीं.

पश्यदक्षण्वान्न वि चेतदन्धः हा प्रस्तुत ऋचेचा दुसरा पाद अन्धः म्हणजे आंधळा ह्याचें उदाहरण म्हणून दिला आहे (पान ३३० ); तत्संबंधानें ऋचेचा अर्थ दुर्ग पुढील-प्रमाणें करतोः—त्रा = पालन करणें ह्यापासून स्त्री शब्दाची एथें व्युत्पत्ति केली पाहिजे; जगाच्या पालन करणाऱ्या म्हणजे पालन करणारे किरण नाडीच्या द्वारें शरीरांत शिरून अन्नाचें पाचन करतात; त्यामुळें शरीराचें धारण होतें; ते पाऊस पाडून

जगाचें रक्षण करतात म्हणून त्यांना स्त्रियः म्हणजे त्राते असें म्हटलें आहे; अशा ह्या किरणांना ( तान् ) ते माझे ( मे ) पुरुष आहेत म्हणजे हे किरण मला नाना प्रकारचें ज्ञान आणून देतात असें ब्रह्मवेत्ते म्हणतात; हे किरण अन्नपाचन वगैरे कृत्यांनीं जगावर उपकार करून जगाचें रक्षण करतात म्हणजे हे किरण बुद्धीला सर्व वस्तु प्रकट करावयाला लावून प्राणिमात्रांवर उपकार करतात असा सारांश आहे; आदित्यमंडलांतील पुरुष बुद्धीची अधिदेवता आहे म्हणजे तो बुद्धीला चालना देतो; रश्मि हे त्याचे अवयव होत म्हणून तेही बुद्धीला चालना देतात असें म्हटलें आहे; नाडीमध्यें शिरून ते आत्म्याला बाह्य वस्तूंचें ज्ञान आणून देतात; म्हणून त्यांना पुष्कळ ज्ञान आहे असें म्हणणें योग्य दिसतें; पुंसः = बहुप्रज्ञानान्; ज्याला डोळे आहेत ( अक्षण्वान् ) म्हणजे वेदांताचा अभ्यास करून ज्याला ज्ञान प्राप्त झालें आहे असाच मनुष्य किरणांचें हें द्विविध उपकारकत्व पाहतो ( पश्यत् ) म्हणजे जाणतो; किरण हे जगाचें रक्षण करतात व बुद्धीला चालना देतात हें रश्मींचें द्विविध कार्य त्यालाच समजतें; परंतु जो अंध आहे म्हणजे ज्याच्यांत आध्यात्मिक ज्ञानाचा अभाव आहे त्याला हें मुळींच कळत नाहीं ( न विचेतत् ); ज्याला हें ज्ञान असतें तो कवि म्हणजे अतींद्रियज्ञानवान् होय; त्याच्यामध्यें आध्यात्मिक ज्ञान ठाम झालें असतें त्यामुळें तो अनेक पापांपासून स्वतःचें रक्षण करतो ( पुत्रः ); पुत्रः = पु + त्रः; पु = पुरु = अनेक पापें; त्रः = त्राता; हाच ज्ञानवान् पुरुष रश्मींचें ( तान् ) खरें स्वरूप पूर्णपणें ( आ ) जाणतो ( चिकेत ); ज्याला असें ज्ञान झालें आहे तो आपल्या बापाचाही बाप होतो; ऋचेंतले उ व ई हे निपात निरर्थक होत. ह्या विवरणाचा प्रस्तुत ऋचेच्या भाष्याशीं कोणताही संबंध नाहीं; विवरणांत त्यांतील कोणत्याही शब्दाचा अर्थ दिला नाहीं; ह्यावरून चवदावा अध्याय दुर्गाच्या निरुक्तप्रतींत होता कीं नाहीं असा प्रश्न उत्पन्न होतो; चवदाव्या अध्यायावर दुर्गवृत्ति नाहीं ह्यावरून त्याच्या निरुक्तप्रतींत हा अध्याय नसावा असें अनुमान निघतें.

**सायणः**—मे मदीयाः याः दीधितयः स्त्रियः संस्त्यानवत्यः योषितः सतीः सत्यः। योषितवत् उदकरूपगर्भधारणात् स्त्रीत्वम्। एषां रश्मीनाम् आविष्टलिङ्गत्वात् स्त्रीलिङ्गता = माझ्या ह्या ज्या दीधितिनामक स्त्रिया; स्त्री शब्द स्त्यै शब्दसंघातयोः ( धा० १।९३५ ); स्त्यै ( = गोळा बनणें ) ह्यापासून स्त्री; बायका जशा गर्भ धारण करतात तसे किरण आपल्या पोटीं उदकरूप गर्भ धारण करतात म्हणून दीधिति ( म्हणजे रश्मि ) ह्या स्त्रिया होत; किरणवाची दीधिति शब्द स्त्रीलिंगी व रश्मि शब्द पुल्लिंगी आहे ( अमर १।३।३४ ); पुंसः = प्रभूतवृष्ट्युदकसेक्तॄन् पुरुषान् = पुरुष जसें रेतःसेक करतात तसे रश्मि पुष्कळ उदकाचा वर्षाव करतात म्हणून ते पुरुष; माझ्या दीधिति ( किरण ) स्त्रिया असूनही त्या पुरुष ( पुंसः ) आहेत असें लोक म्हणतात असें आदित्य म्हणतो; हा अत्यंत गूढ अर्थ डोळस ( अक्षण्वान् ) म्हणजे ज्याला ज्ञानचक्षु आहे असा मनुष्य पाहतो ( पश्यत् ) म्हणजे जाणतो; अन्ध (अन्धः)

म्हणजे स्थूल दृष्टीचा मनुष्य तो गूढार्थ जाणत नाहीं ( न विचेतत् = न विचेतयति= न जानाति ); कविः = क्रान्तदर्शी = ज्याला अतींद्रियज्ञान आहे असा; पुत्रः = स्त्रीपुरुषरूपाणां रश्मीनां पुत्रस्थानीयः पुरु जगतां त्राता वृष्ट्युदकलक्षणः = जे किरण स्त्रीलिंगी व पुल्लिंगीही आहेत त्या आईबापांचा पर्जन्यरूपी पुत्र; किरण जल सांठवितात म्हणून जल हा त्यांचा पुत्र; पुत्रः = पु + त्रः; पु = पुरु = सर्व जगतें; त्रः = त्राता; किरणांचा पर्जन्यरूप पुत्र सर्व जगतांचें रक्षण करतो; असे पुत्र शब्दाचे दोन अर्थ केले आहेत; तो ( सः ) ज्ञानदृष्टि पर्जन्यरूपी पुत्र हा गूढ अर्थ पूर्णपणें (आ) जाणतो ( चिकेत ); ईं ह्याचे एव व एनं असें दोन अर्थ केले आहेत; सः ईं = तोच म्हणजे दुसरा कोणीही नाहीं; किंवा ईं = हा ( गूढार्थ ); ता = तानि स्त्रीपुरुषपुत्ररूपाणि; विजानात् = जानीयात् ; पिता = वृष्ट्या जगत्पालकः रश्मिसमूहः; त्या रश्मींचाही आदित्य हा पिता; किरण हे आईबाप, पर्जन्य हा पुत्र अशी स्थिति जो जाणतो तो आदित्य किरणसमूहाचा पिता म्हणजे रक्षणकर्ता होय; किंवा पिता शब्दाचा लौकिक अर्थ घेतल्यास आदित्य आपल्या किरणांचा बाप होय असा अर्थ; किरण हे आईबाप ( पितुः ) व आदित्य हा त्यांचाही बाप असा आदित्यपर अर्थ आहे; आतां आत्मपर अर्थ; ज्यांना लोक स्त्रिया म्हणतात त्या स्त्रिया असूनही तत्त्ववेत्ते त्यांना पुरुष म्हणतात; देहोपाधीमुळें आत्मा पुल्लिंगी व स्त्रीलिंगी होतो; स्त्रीदेहांत असणारा स्त्री व पुरुषदेहांत असणारा पुरुष; त्वं स्त्री त्वं पुमान् असि त्वं कुमार उत वा कुमारी इत्यादि (श्वेतोप० ४।३) = तूं स्त्री आहेस, पुरुष आहेस, मुलगा आहेस, मुलगी आहेस असें आत्म्याविषयीं म्हटलें आहे; नैव स्त्री न पुमान् एषः नैव चायं नपुंसकः । यद्यत् शरीरमादत्ते तेन तेन स चोद्यते ( श्वेतोप० ५।१० ) असेंही श्रुतिवचन आहे; दुसऱ्या पादाचा अर्थ पहा (पानें ११३४-३५); वयानें लहान असूनही जो पुत्र अतींद्रियज्ञानी (कविः) असतो तो ह्या (ईं) गोष्टी पूर्णपणें (आ) जाणतो (चिकेत); जो अशा तऱ्हेचें परमात्म्याचें औपाधिक स्त्रीत्व, पुरुषत्व, नपुंसकत्व वगैरे (ता=तानि) जाणतो ( विजानात् ) तो आपल्या अज्ञानी बापाचाही ( पितुः ) बाप ( पिता ) होतो; अंगिरसाचा मुलगा सर्व मंत्रद्रष्ट्यांमध्यें श्रेष्ठ मंत्रद्रष्टा होऊन गेला; तो आपल्या वडिलांना बाळांनो असें संबोधितो; असा प्रारंभ करून हा पुत्र आम्हांला बाळांनो असें कां संबोधितो असें वडील माणसांनीं देवांना विचारिलें तेव्हां जो श्रेष्ठ मंत्रद्रष्टा तोच पिता होय असें देवांनीं उत्तर दिलें अशी कथा तांडकब्राह्मणांत आहे.

स्त्री अबला व पुरुष बलवान् असा विरोध ह्या दोन शब्दांत आहे; इंद्रियें ह्या स्त्रिया म्हणजे खरें ज्ञान मिळविण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नाहीं; तीं केवळ विषयांचें ज्ञान करून देतात; अतींद्रिय ज्ञान त्यांच्या सामर्थ्याच्या बाहेरचें आहे म्हणून इंद्रियें ह्या स्त्रिया; तथापि ह्या स्त्रिया पुरुष आहेत म्हणजे अतींद्रिय ज्ञान आणून देणारे आहेत असें अज्ञानी लोक मला सांगतात; पण असें सांगणारे खरोखर आंधळे होत; ज्याला खरोखरचे डोळे आहेत तो खरी वस्तुस्थिति जाणतो; आंधळा ती जाणत

नाहीं; जो पुत्र कवि आहे म्हणजे ज्याला वस्तूंच्या आंत शिरून त्यांतलें खरें मर्म कळतें तोच हें ( ई ) पूर्णपणें जाणतो; असा जाणणारा तो आपल्या बापाचाही बाप होतो म्हणजे वडील माणसें वयानें वृद्ध असतात पण हा अल्पवयी मनुष्य ज्ञानानें वृद्ध असतो म्हणून तो त्यांच्याहून श्रेष्ठ. स्त्रियः म्हणजे अज्ञानी लोक व पुंसः म्हणजे ज्ञानी असाही ह्या शब्दांचा अर्थ होईल; लोक अज्ञानी असून ज्ञानवंत आहेत असें पुष्कळ जण म्हणतात ( आहुः ); पण तें त्यांचें म्हणणें खोटें आहे; कारण अज्ञानी जनांना खरे डोळे म्हणजे ज्ञानचक्षु नसतात; ते चर्मचक्षूंच्या द्वारें व्यावहारिक ज्ञान मिळवितात; वस्तूंच्या आंतील तत्त्व त्यांना कधींही कळणार नाहीं.

## खंड २१ वा.

**सप्तार्धगर्भाः भुवनस्य रेतो विष्णोस्तिष्ठन्ति प्रदिशा विधर्मणि । ते धीतिभिर्मनसा ते विपश्चितः परिभुवः परि भवन्ति विश्वतः ( ऋ० सं० १।१६४।३६ )**

**सप्त एतान् आदित्यरश्मीन् अयम् आदित्यः गिरति मध्यस्थानोर्ध्वशब्दः । यानि अस्मिन् तिष्ठन्ति तानि धीतिभिश्च मनसा च विपर्ययन्ति । परिभुवः परिभवन्ति सर्वाणि कर्माणि वर्षकर्मणा । इति अधिदैवतम्**

सप्त अर्धगर्भाः = सप्त एतान् आदित्यरश्मीन् अयम् आदित्यः गिरति = ह्या सात आदित्यकिरणांना आदित्य गिळतो; सप्त = सप्त रश्मीन् ; अर्धगर्भाः ह्याचा अयम् आदित्यः गिरति असा अर्थ कसा होतो तें समजत नाहीं; कदाचित् गृ = (गिळणें) ह्यापासून गर्भ व अर्धः = वृद्धिकरः आदित्यः असे अर्थ केले असतील; अर्धः आदित्यः सप्त रश्मीन् गर्भाः गिरति असें सप्तार्थगर्भाः ह्यापासून वाक्य बनविलें असावें. मध्यस्थानश्च ऊर्ध्वशब्दश्च असौ मध्यस्थानोर्ध्वशब्दः हें आदित्यः ह्याचें विशेषण; आदित्य हा द्युलोकाच्या मध्यभागीं दुपारीं १२ वाजतां असतो म्हणून तो मध्यस्थान; तेथें वर असतांना ( ऊर्ध्व ) त्याची स्तुति ( शब्द ) केली जाते म्हणून तो ऊर्ध्वशब्द; असा कांहीं तरी अर्थ असेल; मध्यस्थानोर्ध्वशब्दः हें ऋचेंतील कोणत्याही शब्दाचें अगर शब्दांचें विवरण दिसत नाहीं. यानि अस्मिन् तिष्ठन्ति तानि धीतिभिश्च मनसा च विपर्ययन्ति ह्या भाष्यांत तिष्ठन्ति, धीतिभिः व मनसा एवढेच ऋचेंतले शब्द आहेत; बाकीचे शब्द अध्याहृत होत. पण यानि व तानि हीं सर्वनामें कोणत्या नामाबद्दल आहेत ? आदित्यरश्मींबद्दल असल्यास ये व ते अशीं रूपें पाहिजेत; जे रश्मि ह्या आदित्यांत आहेत ते धीतींनीं व मनानें गरगर फिरतात ( वि+परि+अयन्ति ) म्हणजे सर्वत्र संचार करतात. परिभुवः परिभवन्ति विश्वतः = परिभुवः परिभवन्ति सर्वाणि कर्माणि वर्षकर्मणा = सर्वत्र असणारे किरण पाऊस पाडून सर्व कर्में व्यापतात म्हणजे पावसामुळें जगांतील सर्व कामें सुरू होतात; असा आदित्यपर अर्थ आहे.

**अथ अध्यात्मम् । सप्त इमानि इन्द्रियाणि अयम् आत्मा गिरति मध्यस्थानोर्ध्वशब्दः । यानि अस्मिन् तिष्ठन्ति तानि धीतिभिश्च मनसा च विपर्ययन्ति । परिभूणि परिभवन्ति सर्वाणि कर्माणि ज्ञानकर्मणा । इति आत्मगतिम् आचष्टे**

सप्त = सप्त इमानि इन्द्रियाणि. अर्धगर्भाः = अयम् आत्मा गिरति = ( ह्या सात इंद्रियांना ) हा आत्मा गिळून टाकतो म्हणजे त्यांनीं मिळविलेलें ज्ञान आत्मा स्वीकारतो; अर्धगर्भाः ह्याचें विवरण आदित्यपर विवरणांत केलें आहे. आत्मा हा मध्यस्थान म्हणजे शरीराच्या मध्यभागीं म्हणजे अंतःकरणांत असतो व तेथें असल्या-मुळें ( ऊर्ध्व ) त्याची स्तुति ( शब्द ) केली जाते. जीं हीं इंद्रियें आत्माच्या ठिकाणीं असतात तीं धीतींनीं व मनानें सर्व वस्तूंत संचार करतात म्हणजे सर्व वस्तूंचें ज्ञान आत्म्याला आणून देतात. परिभुवः = परिभूणि ( इन्द्रियाणि ) = सर्वत्र असणारीं म्हणजे संचार करणारीं इंद्रियें; परिभूणि बद्दल परिभुवः हा महाराष्ट्रपाठ चुकीचा आहे. सर्वत्र जाणारीं हीं इंद्रियें ज्ञानानें ( ज्ञानकर्मणा ) सर्व कर्मे व्यापतात म्हणजे ब्रह्मांडां-तील सर्व कामें इंद्रियांनीं ज्ञान मिळविल्यामुळें होतात; असा आत्मपर अर्थ.

**सायणः**— सप्त = सर्पणस्वभावाः सप्तसंख्याः वा रश्मयः; अर्धगर्भाः = संवत्सरस्य अर्धे गर्भं गर्भस्थानीयं उदकं धारयमाणाः = संवत्सराच्या अर्ध्या भागांत म्हणजे सहा महिन्यांत स्वतःच्या ठिकाणीं गर्भ म्हणजे उदक धारण करणारे; उन्हाळ्यांत किरण वाफेच्या रूपानें आकाशांत पाणी नेतात; किंवा अर्धगर्भाः=ब्रह्माण्डस्य अर्धे मध्ये अन्तरिक्षे गर्भवत् वर्तमानाः = ब्रह्मांडाच्या मध्यें म्हणजे अंतरिक्षांत असणारे; भुवनस्य लोकस्य रेतः सारं वृष्टिप्रदत्वेन रेतोभूताः = हे किरण लोकांचें रेत होत म्हणजे पर्जन्याचें बीज होत; किरणांनीं वाफेच्यारूपानें उदक वर नेलें नाहीं तर पाऊस पडणार नाहीं म्हणून किरण भुवनाचें रेत होत; विष्णोः = व्यापकस्य आदित्यस्य; विधर्मणि = जगद्धारणव्यापारे; प्रदिशा = प्रदेशेन; तिष्ठन्ति = अशा प्रकारचे रश्मि जगताचें धारण करण्याच्या कामीं सर्वव्यापक आदित्याच्या आज्ञेनें गुंतलेले असतात; धीतिभिः = प्रज्ञाभिः; मनसा = जगदुपकारः कर्तव्यः इति बुध्या; परिभवन्ति = परितः भावयन्ति = कृत्स्नं जगत् व्याप्नुवन्ति; हे किरण आपल्या बुद्धिसामर्थ्यानें व जगावर उपकार करण्याच्या इच्छेनें सर्व जगभर पसरलेले असतात; म्हणूनच ते किरण बुद्धिमान् ( विपश्चितः = बुद्धियुक्ताः ) व सर्वव्यापक ( परिभुवः = सर्वव्याप्ताः ) होत; असा अर्थ होईल किंवा पुढीलप्रमाणें आत्मपर अर्थ होईल; सप्त = महत्, अहंकार व पांच सूक्ष्म भूतें असे सात जण; अर्धगर्भाः=अविकृतिरूपायाः विकाराश्रयायाःमूलप्रकृतेः प्रकृतिविकृतेः उदासीनस्य आत्मनश्च उत्पन्नत्वात् अर्धांशेन प्रपञ्चाकारेण परिणामात् अर्धगर्भाः = सर्व विकार मूळ प्रकृतीपासून उत्पन्न होतात; पुरुष हा प्रकृति किंवा विकृति नसून केवळ उदासीन आहे; ह्या सात वस्तूंचा प्रकृतीशीं व पुरुषाशीं संबंध असतो; ब्रह्मांड पुरुषापासून उत्पन्न न होतां प्रकृतीपासून म्हणजे ह्या सात तत्त्वांपासून उत्पन्न होतें म्हणून हीं सात तत्त्वें अर्धगर्भ होत; भुवनस्य रेतः = हीं सात तत्त्वें ब्रह्मांडाचें कारण होत; हीं सात तत्त्वें सर्वव्यापक जो पुरुष ( विष्णोः ) त्याच्या आज्ञेनें ( प्रदिशा ) ब्रह्मांड उत्पन्न करण्याच्या कामांत गुंतलेलीं असतात; राहिलेल्या शब्दांचा अर्थ वरीलप्रमाणें.

अर्धे = भाग; पूर्वे अर्धे रजसः ( १।९२।१॥१।१२४।५ ) = द्युलोकाच्या पूर्वभागीं; दिवः० परे अर्धे ( १।१६४।१२ ) = द्युलोकाच्या उच्चभागीं म्हणजे स्थानीं. गर्भ = पोटांत असलेले ( पान ८३४ ). अर्धगर्भाः = द्युलोकाच्या पोटीं असणारे म्हणजे द्युलोकीं राहणारे. हे द्युलोकीं राहणारे सात जण कोण व त्यांचा भुवनस्य रेतः ह्याच्याशीं काय संबंध ? सप्त = आंगिरसकुलांतले सात ऋषि; ते बुद्धिमान् असून स्तुति रचणारे ( विपश्चितः ) होते; ते आपल्या स्तुतींनीं ( धीतिभिः ) नानाप्रकारचीं अद्भुत कृत्यें करीत; त्यांचा संचार सर्वत्र असे म्हणून ते परिभुवः; असे ते सर्वत्र संचार करतात. अंगिरसाचें वर्णन पहा ( पान ८८६ ); तेथें अंगिरसांचा अग्नीशीं अत्यंत निकट संबंध होता असें म्हटलें आहे; पण प्रस्तुत ऋचेंत विष्णूच्या आज्ञेनें ( प्रदिशा ) ते द्युलोकीं ( विधर्मणि ) राहतात ( तिष्ठन्ति ) असें आहे. वरीलप्रमाणें मीं शब्दांचा अर्थ केला आहे; पण ऋचेचा अर्थ मला कळत नाहीं.

## खंड २२ वा.

**न वि जानामि यदि वेदमस्मि निण्यः संनद्धो मनसा चरामि । यदा मागन् प्रथमजा ऋतस्यादिद्वाचो अश्नुवे भागमस्याः ( ऋ० सं० १।१६४।३७ )**

**न विजानामि यदि वा इदम् अस्मि । निण्यः संनद्धः मनसा चरामि । न हि जानन् पुष्टिः पुत्रः परिवेदयन्ते । अयम् आदित्यः । अयम् आत्मा**

न हि जानन् पुष्टिः पुत्रः परिवेदयन्ते ह्या शब्दांचा कांहीं एक अर्थ होत नाहीं व ऋचेंतील कोणत्याही शब्दांचा ह्या वाक्यांत अर्थ नाहीं; हे शब्द एथें कसे आले तेंच समजत नाहीं; महाराष्ट्रपाठांत ऋचेचा पहिलाच अर्ध दिला आहे व त्यानंतर न हि विजानान् बुद्धिमतः पुत्रः परिवेदयन्ते अयम् आदित्यः अयम् आत्मा असे शब्द आहेत. अयम् आदित्यः व अयम् आत्मा ह्या शब्दांवरून ऋचेवर आदित्यपर व आत्मा-पर भाष्यें असलीं पाहिजेत.

अथापि परिदेवना कस्माच्चित् भावात् ( पान ५३५ ) ह्याचें न वि जानामि यदि वेदमस्मि हें उदाहरण दिलें आहे; त्याचा दुर्ग पुढीलप्रमाणें अर्थ करतोः—मी हें म्हणजे कारणब्रह्म आहें कीं हें म्हणजे कार्यद्वैत आहें हें मला स्पष्टपणें ( वि=विस्पष्टं ) कळत नाहीं; ह्या कारण व कार्य म्हणजे अद्वैत व द्वैत ह्यांमध्यें लपटून गेलेला ( निण्यः = अंतर्हितः ) व अविद्येनें म्हणजे अनेक संदेहांनीं बद्ध झालेला मी द्वैत व अद्वैत ह्या दोहोंतही मनानें भटकत आहें; आदित्याची ( ऋतस्य ) सर्व इंद्रियांच्या आधीं जन्मलेली( प्रथमजाः ) बुद्धि जेव्हां ( यदा ) माझ्याकडे ( मा ) येईल ( आगन्= आगच्छेत् ) तेव्हांच ( आत् इत् ) सर्व वेदांतवाचेचा ( वाचः ) भाग मला मिळेल ( अश्नुवे = आप्नुयां ); माझी बुद्धि संदेहांनीं भरून गेल्यामुळें मला निश्चित असें कांहींच कळत नाहीं पण आदित्याच्या बुद्धींत संदेह यत्किंचितही नसल्यामुळें ती बुद्धि जेव्हां माझ्या साहाय्याला येईल तेव्हांच मला वेदवचनांचा खरा अर्थ कळेल व नंतर मी अद्वैत आहें कीं द्वैत आहें ह्याचा उलगडा होईल.

सायणः—यत् इव = यत् अपि = सर्व कांहीं; इदं = विश्वम्; मी हें सर्व प्रपंचजात आहें म्हणजे परब्रह्माला टाकून देऊन प्रपंचांत मी सर्वस्वीं गुंतलों आहें म्हणजे सच्चिदानंद ब्रह्म मीच आहें हें मला कळत नाहीं; प्रपंच व परब्रह्म ह्यांतील भेद मला उकलतां येत नाहीं; ब्रह्म मी आहें हें ज्ञान शास्त्रानें माझ्यांत उत्पन्न केलें आहे; परंतु त्या ज्ञानाचा अनुभवरूपी परिणाम माझ्यांत झाला नाहीं; माझ्यांत शास्त्राची केवळ वटवट आहे त्याचा गूढ अर्थ मला कळला नाहीं; प्रपंच ब्रह्माहून वेगळा नाहीं असें उपनिषदांत वारंवार म्हटलें आहे व ब्रह्मसूत्रांनीं तें सिद्ध केलें आहे; तथापि व्यवहारांत ब्रह्म व प्रपंच ह्यांत मी भेद मानतों; वरीलप्रमाणें इव म्हणजे अपि असा अर्थ असेल किंवा इव म्हणजे सारखें असा असेल; हा दुसरा अर्थ असल्यास पारमार्थिक ज्ञानासारखें म्हणजे हें सर्व मी आहें अशासारखें ज्ञान मला झालें आहे पण तें अनुभवसिद्ध नाहीं; अनुभवांत उतरलेलें सर्व कांहीं आत्मा आहे हें ज्ञान मला झालें नाहीं; ह्याचें कारण मी मूढ बुद्धीचा आहें ( निण्यः = अन्तर्हितः = मूढचित्तः ) म्हणजे माझी बुद्धि आकुंचित आहे; मी अविवेकें उत्पन्न केलेल्या इच्छांनीं व कर्मांनीं बद्ध झालों आहें ( संनद्धः ); म्हणूनच ह्या बहिर्मुख चित्तानें ( मनसा ) मी संसारांत भटकत आहें किंवा मनानें बद्ध झाल्यामुळें म्हणजे इंद्रियवश असल्यामुळें मी संसारदुःख भोगित आहें; जेव्हां परब्रह्माचा ( ऋतस्य ) पहिला प्रकाश ( प्रथमजाः ) म्हणजे अनुभव मजकडे येईल ( आगन् = आगमिष्यति ) तेव्हांच ( आत् इत् ) अविवेकाचा पडदा दूर झाल्यामुळें सर्व कांहीं आत्मा आहे ह्या उपनिषद्वचनाचा मला भाग मिळेल; बहिर्मुख असलेलें चित्त जेव्हां अंतर्मुख होईल तेव्हां क्षणाचाही विलंब न लावतां सत्स्वरूप अनुभवास येईल.

निण्यः = निर्धास्त (पान १२५); मनसा संनद्धः=मनानें घट्ट बांधलेला म्हणजे खंबीर मनाचा. निण्यः संनद्धो मनसा चरामि=खंबीर मनाचा मी निर्धास्त हिंडत आहें. अग्निर्ह नः प्रथमजा ऋतस्य ( १०।५।७ ) व द्विजा अह प्रथमजा ऋतस्य ( १०।६१।१९ ); द्विजाः हें विशेषण अग्नीला लावलेलें असतें; तेव्हां प्रथमजाः ऋतस्य हा अग्नीच असावा. अपां सखा प्रथमजा ऋतावा ( १०।१६८।३ ); एथें वायूला प्रथमजाः म्हटलें आहे. ऋत ह्याचा धन हा अर्थ पुष्कळ ऋचांत आहे; ऋतस्य प्रथमजाः=धनापासून प्रथम जन्मलेला म्हणजे धनपति असा अर्थ असेल. दुसऱ्या अर्धाचा अर्थः—जेव्हां ( यदा ) धनपति ( प्रथमजाः ऋतस्य ) अग्नि माझ्याकडे ( मा ) आला ( आगन् ) त्याबरोबर ( आत् इत् ) अतीशय ( अस्याः ) धनाचा ( वाचः ) भाग ( भागं ) मी मिळविता झालों. न वि जानामि यदि वेदमस्मि एथील यदिवेदं ह्याची यत् इव इदं अशीं पदकारानें पदें पाडलीं आहेत; पण यदि वा इदं अशींही पदें पडतील; कोणतींही पदें घेतलीं तरी पहिल्या पादाचा अर्थ चांगलासा होत नाहीं; मला ठाऊक नाहीं कीं मी हें ( इदं ) आहें किंवा ( वा ); असें हें अपूरें वाक्य दिसतें; त्यामुळें ऋचेचा अर्थ करतां येत नाहीं. अतीशय धन मिळाल्यामुळें मी जगांत निर्धास्त वागत आहें असा

२,३ व ४ ह्या पादांचा अर्थ असावा; पण ह्या अर्थाशीं पहिल्या पादाचा कांहींच संबंध दिसत नाहीं. ऋचेंतून वेदांतपर अर्थ निघतो असें म्हणण्यास तींतील शब्द पुरावा देत नाहींत.

## खंड २३ वा.

**अपाङ् प्राङेति स्वधया गृभीतोऽमर्त्यो मर्त्येना सयोनिः।**

**ता शश्वन्ता विषूचीना वियन्ता न्यन्यं चिक्युर्न नि चिक्युरन्यम् ( ऋ० सं० १।१६४।३८ )**

**अपाङ् च एति प्राङ् च एति स्वधया गृभीतः अमर्त्यः आदित्यः मर्त्येन चन्द्रमसा सह। तौ शश्वद्गामिनौ विश्वगामिनौ बहुगामिनौ वा। पश्यति आदित्यं न चन्द्रमसम्। इति अधिदैवतम्**

एति ह्याच्या आधीचे दोन च अध्याहृत; कांहीं गुर्जरपोथ्यांत च एति बद्दल चयति असें आहे; पण तो उच्चाराचा दोष होय. महाराष्ट्रपाठ अपाञ्चयति प्राञ्चयति असा आहे; पण अञ्च् दहाव्या गणांत नाहीं; अञ्चु अचूवा अचिवा गमने ( धा० १।८८७ ). गृभीतः बद्दल गृहीतः पाहिजे. अमर्त्यः = आदित्यः. मर्त्येन = चन्द्रमसा. सयोनिः = सह. ता = तौ. शश्वन्ता = शश्वन्तौ = शश्वद्गामिनौ = सदोदित जाणारे. विषूचीना = विषूचीनौ = विश्वगामिनौ = सर्वत्र जाणारे. वियन्ता=वियन्तौ = बहुगामिनौ=पुष्कळ प्रवास करणारे; बहुगामिनौ ह्यानंतरचा वा नको आहे. अन्यं चिक्युः न नि चिक्युः अन्यं = पश्यति आदित्यं न चन्द्रमसम्; चिक्युः हें बहुवचन आहे; त्याचा पर्याय पश्यन्ति असा पाहिजे; महाराष्ट्रपाठांत न नाहीं. ऋचेचा आदित्यपर अर्थः—उदकानें ( स्वधया ? ) पकडलेला ( गृभीतः ) म्हणजे भरलेला आदित्य चंद्रासह दूर म्हणजे पश्चिमेकडे जातो व नंतर अलिकडे म्हणजे पूर्वेकडे येतो; ते दोघे सदोदित सर्वत्र जाणारे असून पुष्कळ प्रदेश आक्रमण करणारे आहेत; त्यांपैकीं लोक आदित्याला पाहतात; चंद्राला पहात नाहींत. आदित्याचा प्रकाश कधींही नाहींसा होत नाहीं म्हणून तो अमर्त्य; पण चंद्राला स्वतःचा प्रकाश नाहीं म्हणून तो मर्त्य.

**अथ अध्यात्मम्। अपाङ् च एति प्राङ् च एति स्वधया गृभीतः अमर्त्यः आत्मा मर्त्येन मनसा सह। तौ शश्वद्गामिनौ विश्वगामिनौ बहुगामिनौ वा। पश्यति आत्मानं न मनः। इति आत्मगतिम् आचष्टे**

अपाङ् च एति वगैरे पाठांचें विवेचन वर केलें आहे. अमर्त्यः = आत्मा. मर्त्येन = मनसा. सयोनिः = सह. तौ शश्वद्गामिनौ वगैरेचा अर्थ वरीलप्रमाणें. अन्यं चिक्युः न नि चिक्युः अन्यं = पश्यति आत्मानं न मनः; एथेंही पश्यति बद्दल पश्यन्ति पाहिजे. ऋचेचा आत्मपर अर्थः— अविद्येनें ( स्वधया ? ) पकडलेला आत्मा मनासह इहलोकांतून जातो व पुन्हां इहलोकीं येतो; ते दोघे सदोदित व सर्वत्र गतिमान् असून पुष्कळ प्रदेश आक्रमण करणारे आहेत; सामान्य जन एकाला म्हणजे मनाला पाहतात ( पण ) आत्म्याला पहात नाहींत.

**सायण**:—अमर ( अमर्त्यः ) मर्त्यदेहासह ( मर्त्येन ) समान म्हणजे एकाच स्थानीं असतो ( सयोनिः ); परिछिन्न अशा सर्व देहांत आत्मा असतो; किंवा सयोनिः= सहोत्पत्तिः; देह उत्पन्न होतो तेव्हां देहांत राहणारा आत्माही उत्पन्न होतो; म्हणजे देहाच्या उत्पत्तीचा आत्म्यावर आरोप केला आहे; स्वधा = अन्न; एथें उपभोग; उपभोगानें पकडलेला ( गृभीतः ) आत्मा अधोगतीला जातो ( अपाङ् एति ) किंवा स्वधा = अन्नमय देह; अशा देहानें पकडलेला म्हणजे कृष्णकर्में करणारा आत्मा अधोगतीला जातो ( अपाङ् एति ) पण चांगलीं कर्में केल्यास तो स्वर्गाला जातो ( प्राङ् एति ); सूक्ष्म शरीर धारण करणारा परमात्माच नाना-प्रकारचीं कर्में करून त्यांचीं फलें भोगण्याकरितां जीवाचें रूप घेऊन निरनिराळ्या लोकांत संचार करतो; कधीं स्थूल, कधीं सूक्ष्म, कधीं दोन्ही तऱ्हेच्या शरीरांत शिरून व सत्त्व, रजस् व तमस् ह्या तीन गुणांनीं युक्त होऊन तो लोकांमध्यें हिंडत असतो; ता = तौ = भूतात्मकर्त्रात्मानौ = देहधारी आत्मा व कर्में करणारा आत्मा; शश्वन्ता = शश्वन्तौ = सदैव एकत्र असणारे; किंवा परमात्म्यालाही सूक्ष्म देह असल्या-मुळें तो व त्याचा तो सूक्ष्म देह सर्वदा एकत्र असतात; स्थूल शरीर घेतलें तरी पर-मात्मा हा सत्वगुण असल्यानें व त्याचा स्थूल देह पंचतन्मात्रांपासून उत्पन्न झाला असल्यामुळें परंपरेनें स्थूल देह व तो एकत्र असतात; विषूचीना = विषूचीनौ = इह लोकीं सर्वत्र संचार करणारे; वियन्ता = वियन्तौ = तीं तीं कर्मफलें भोगण्या-करितां निरनिराळ्या लोकीं जाणारे; अशा गुणांनीं युक्त देहात्मा व कर्तृ-आत्मा एकत्र वावरतात; त्यांपैकीं सामान्य जन एकाला ( अन्यं ) म्हणजे भूतात्म्याला चांगले जाणतात ( नि + चिक्युः ) पण दुसऱ्याला ( अन्यं ) म्हणजे कर्तृ-आत्म्याला ते जाणत नाहींत ( न निचिक्युः ); देहाहून आत्मा भिन्न आहे हें पामरांना समजत नाहीं; कर्ता व भोक्ता आत्मा देहाहून भिन्न आहे असें कित्येक म्हणतात; पण आत्मा कर्ता भोक्ता कांहींही नाहीं म्हणजे तो अगदीं अलिप्त आहे असें कोणालाही कळत नाहीं; ह्यावरून आत्मज्ञान फार दुर्लभ आहे हें स्पष्ट होतें.

अमर्त्यः आत्मा मर्त्येन देहेन सयोनिः सहवर्तमानः अपाङ् सन् स्वधया गृभीतः गृहीतः प्राङ् एति = मर्त्यदेहासह असणारा व त्यामुळें भलतीकडे जाणारा ( अपाङ् ) अमर आत्मा जेव्हां अमृतानें ( स्वधया ) म्हणजे ज्ञानानें भरला जातो ( गृभीतः ) तेव्हां तो सरळ मार्गावर येतो ( प्राङ् एति ); अपाङ् = पश्चिमेकडे म्हणजे अस्ताला जाणारा; शरीरांत असणारा आत्मा अस्ताला जातो म्हणजे स्वतःला विस-रतो; प्राङ् = पूर्वेला जाणारा; तोच आत्मा ज्ञानाच्या साहाय्यानें पूर्वेकडे जातो म्हणजे त्याला स्वतःविषयीचें ज्ञान होतें. शश्वान् अपो विकृतं हित्वी आगात् अनु व्रतं सवितुः दैव्यस्य ( २।३८।६ ) = वाईट ( विकृतं ) काम ( अपः ) टाकून देऊन ( हित्वी ) मनुष्य ( शश्वान् ) सवित्याच्या मार्गाला ( अनु व्रतं ) येतो ( आगात् ). शश्वन्तं हि प्रचे-तसः प्रतियन्तं चिदेनसः । देवाः कृणुथ जीवसे ( ८।६१।१७ ) = अहो देवांनो, तुम-

ध्याकडे येणाऱ्या माणसाला ( शश्वन्तं ) त्यानें चांगलें आयुष्य घालवावें म्हणून ( जीवसे ) तुम्ही पापापासून ( एनसः ) दूर करतां ( कृणुथ ). तौ शश्वन्तौ = आत्मा व देह अशा दोन व्यक्ति. विषूचीनौ = वियन्तौ = भिन्नमार्गानें जाणारे; देह हा नश्वर असून आत्मा अमर आहे. त्यांपैकीं लोक देहालाच पाहतात ( चिक्युः ) आत्म्याला पहात नाहींत.

## खंड २४ वा.

**तदिदास भुवनेषु ज्येष्ठं यतो जज्ञ उग्रस्त्वेषनृम्णः। सद्यो जज्ञानो नि रिणाति शत्रूननु यं विश्वे मदन्त्यूमाः ( ऋ० सं० १०।१२०।१ )**

**तत् भवति भूतेषु भुवनेषु ज्येष्ठम् आदित्यं यतः जज्ञे उग्रः त्वेषनृम्णः दीप्तिनृम्णः। सद्यः जज्ञानः निरिणाति शत्रून्। इति। निरिणातिः प्रीतिकर्मा दीप्तिकर्मा वा। अनुमदन्ति यं विश्वे ऊमाः। इति अधिदैवतम्**

आस=भवति. भुवनेषु=भूतेषु; भुवनेषु भाष्यांत नको. ज्येष्ठं=आदित्यम् ; आदित्यं बद्दल आदित्यः पाहिजे. त्वेषनृम्णः=दीप्तिनृम्णः. सद्यः० निरिणाति० इति=ह्या वाक्यांतील निरिणाति ह्याचा तृप्त करतो किंवा दीप्तिमान् करतो असा अर्थ आहे. नि + रि = तृप्त करणें किंवा दीप्तिमान् करणें; पण शत्रूला तृप्त करतो किंवा दीप्तिमान् करतो ह्याचा अर्थ काय ? आदित्यापासून बलवान् कोण जन्मला ( जातः ) तें सांगितलें नाहीं; ऊमाः ह्याचा अर्थ दिला नाहीं व निरिणाति ह्याचा दिलेला अर्थ लागू पडत नाहीं म्हणून ऋचेचा अर्थ करतां येत नाहीं. यतः आदित्यः जज्ञे असा बदल केल्यास ऋचेचा पुढीलप्रमाणें अर्थ होईलः—अस्तित्वांत असणाऱ्यांत ( भुवनेषु = भूतेषु ) अशी एक अतिशय मोठी ( ज्येष्ठं ) वस्तु आहे कीं तिच्यापासून बलवान् सूर्य जन्मास आला; जन्मल्याबरोबर तो शत्रूंना ठार करता झाला; त्यामुळें सर्व देव (ऊमाः) आनंदित झाले ( अनुमदन्ति ).

**अथ अध्यात्मम्। तत् भवति भूतेषु भुवनेषु ज्येष्ठम् अव्यक्तं यतः जायते उग्रः त्वेषनृम्णः ज्ञाननृम्णः। सद्यः जज्ञानः निरिणाति शत्रून्। इति। निरिणातिः प्रीतिकर्मा दीप्तिकर्मा वा। अनुमदन्ति यं सर्वे ऊमाः। इति आत्मगतिम् आचष्टे**

ज्येष्ठं = अव्यक्तम्. जज्ञे = जायते. त्वेषनृम्णः = ज्ञाननृम्णः = ज्ञानवान्. ऋचेचा अर्थ करण्यास वरीलप्रमाणेंच अडचणी आहेत. अव्यक्तापासून कोण जन्मला व ऊमाः कोण ? ऋचेचा अर्थ करतां येत नाहीं.

सायणः—तत् = जगाचें कारण म्हणून सर्व वेदांतांत प्रसिद्ध असलेलें; इत् = एव; भुवनेषु = पृथिव्यादिषु लोकेषु मध्ये; ज्येष्ठं = प्रशस्ततमम्; सर्व वेदांतांत प्रसिद्ध असलेलें तेंच म्हणजे ब्रह्मतत्त्व पृथिव्यादिलोकांमध्यें अतिशय उत्तम असून त्यालाच खरें अस्तित्व आहे ( आस ); इतर वस्तूंना व्यवहारापुरतेंच अस्तित्व असतें म्हणून अस् धातूचीं रूपें खऱ्या अर्थानें त्यांना लावितां येत नाहींत; किंवा ज्येष्ठ म्हणजे

सर्वांत जुनें; आदिकारण सर्वांच्या आधींच अस्तित्वांत असतें; किंवा वृद्ध ( ज्येष्ठ ) म्हणजे सर्वांच्या आधीं असणारें तें ब्रह्म स्वतःच्या प्रकाशानें प्रकाशतें (आस=दिदीपे); अस गतिदीप्त्यादानेषु ( धा० १।९११ ); यतः = उपादानभूतात् यस्मात् ब्रह्मणः = उपादानकारण असलेल्या ज्या ब्रह्मापासून; उग्रः = उद्गूर्णः = समुद्रांतून वर म्हणजे आकाशांत आलेला; त्वेषनृम्णः = प्रदीप्तबलः; ज्या उपादानकारणब्रह्मापासून अतिशय प्रदीप्त व समुद्रांतून वर येणारा सूर्यरूपी इंद्र जन्मला; तो जन्मल्याबरोबर ( सद्यः जज्ञानः ) मन्देहादिक शत्रूंचा म्हणजे हिंसकांचा ( शत्रून् = शातयितॄन् ) नाश करतो ( नि रिणाति = निहिनस्ति ); किंवा तो उपासकांच्या पापांचा नाश करतो; री गतिरेषणयोः ( धा० ९।२८ ); ज्याला पाहून ( यम् अनु ) सर्व ( विश्वे ) प्राणी ( ऊमाः ) हा सूर्य माझ्याकरितां उगवला आहे अशा भावनेनें हृष्ट होतात ( मदन्ति ); अवन्ति रक्षन्ति ऊमाः प्राणिनः = प्राण्यांना ऊम म्हणण्याचें कारण ते स्वतःच्या प्राणांचें रक्षण करतात; मदी हर्षे ( धा० ११८१७ ); किंवा जो स्तुति हवि वगैरेंनीं हृष्ट झाल्यावर सर्व प्राणी अभीष्ट प्राप्तीनें हृष्ट होतात.

त्वेष = प्रचंड ( पान ७९२ ); त्वेषं नृम्णं यस्य सः त्वेषनृम्णः = ज्याचें बल प्रचंड आहे असा. उग्रः ह्याचा तोच अर्थ; किंवा उग्रः = भयंकर. ऊमाः = देव (पान १०३६). अनुमद् = स्तवणें; अनु एनं विप्राः ऋषयो मदन्ति ( १।१६२।७ )= अश्वमेधांतील ह्या घोड्याला स्तोते ( विप्राः = ऋषयः ) स्तवितात. ऋचेचा अर्थः— सर्व जगांत ( भुवनेषु ) ती ( तत् ) अतिशय प्रचंड शक्ति असली पाहिजे ( आस ) कीं जिच्यापासून (यतः) भयंकर ( उग्रः ) व प्रचंड बलाचा ( त्वेषनृम्णः ) इंद्र जन्मास आला; जन्मल्याबरोबर ( सद्यः जज्ञानः ) तो शत्रूंना ठार करता झाला व त्यामुळें सर्व देव त्याची स्तुति करूं लागले.

## खंड २५ वा.

**को अद्य युङ्क्ते धुरि गा ऋतस्य शिमीवतो भामिनो दुर्हृणायून्। आसन्निषून् हृत्स्वसो मयोभून् य एषां भृत्यामृणधत् स जीवात् ( ऋ० सं० १।८४।१६ )**

**कः आदित्यः धुरि गाः युङ्क्ते रश्मीन् कर्मवतः भानुमतः दुराधर्षान् असून् असुनवन्ति इषून् इषुणवन्ति मयोभूनि सुखभूनि। यः इमं संभृतं वेद कथं सः जीवति। इति अधिदैवतम्**

कः = आदित्यः. गाः = रश्मीन्. शिमीवतः = कर्मवतः = वाफेच्या रूपानें आकाशांत जल नेण्याचें काम करणाऱ्यांना. भामिनः = भानुमतः = प्रकाशयुक्त. दुर्हृणायून् = दुराधर्षान् = ज्यांच्यावर कोणी हल्ला करूं शकत नाहीं म्हणजे ज्यांच्याकडे पाहवत नाहीं अशा ( प्रखर किरणांना ). आसन् = असून् = असुनवन्ति; असून् बद्दल महाराष्ट्रपाठ असूनि आहे. गाः हा शब्द पुल्लिंगी असल्याकारणानें असुनवन्ति, इषुणवन्ति, मयोभूनि व सुखभूनि हीं नपुंसक रूपें त्या शब्दाचीं विशेषणें होणार

नाहींत; असुनवतः, इषुणवतः, मयोभून् व सुखभून् असे ते शब्द पाहिजेत. असुनवन्ति ह्यांतील असुन हा बहूतकरून असन व इषुणवन्ति ह्यांतील इषुण हा इषण असा असेल; असन=फेकण्याची क्रिया; असनवतः=स्वतःला जिकडे तिकडे फेकून देणाऱ्या म्हणजे सर्वत्र संचार करणाऱ्या किरणांना; इषण = गमन; इषणवतः = सर्वत्र गमन करणाऱ्यांना. एषां = इमं = ह्या आदित्याला. भृत्यां = संभृतं; पण संभृतं काय ? रश्मींनींपूर्ण भरलेला असा अर्थ असेल. ऋणधत् = वेद = जाणतो म्हणजे पाहतो. कथं अध्याहृत. जीवात् = जीवति. ऋचेचा आदित्यपर अर्थः—वाफेच्या रूपानें आकाशांत जलहरण करणारे ( शिमीवतः ), प्रकाशवान् ( भामिनः ), प्रखर ( दुर्हृणायून् ), स्वतःला सर्वत्र फेकणारे ( आसन् ), सर्वत्र गमन करणारे ( इषून् ) व सुख देणारे ( मयोभून् ) किरण ( गाः ) आदित्य ( कः ) आज आपल्या रथाच्या जुंवाला जुंपीत आहे; किरणांनीं पूर्ण भरलेल्या ( भृत्यां ) या आदित्याकडे जो पहातो ( ऋणधत् ) तो कसा जिवंत राहतो म्हणजे राहील ( जीवात् ) ? आंधळा होऊन तो मेलाच पाहिजे.

**अथ अध्यात्मम् । कः आत्मा धुरि गाः युङ्क्ते इन्द्रियाणि कर्मवन्ति भानुमन्ति दुराधर्षान् असून् असुनवन्ति इषून् इषुणवन्ति मयोभूनि सुखभूनि । यः इमानि संभृतानि वेद चिरं सः जीवति । इति आत्मगतिम् आचष्टे**

कः = आत्मा. गाः = इन्द्रियाणि. शिमीवतः = कर्मवन्ति = आपआपलीं कामें करणारीं ( इंद्रियें ). भामिनः = भानुमन्ति = आपआपल्या विषयांवर प्रकाश पाडणारीं म्हणजे आपआपले विषय जाणणारीं. कर्मवतः भानुमतः हा महाराष्ट्रपाठ अशुद्ध आहे. दुर्हृणायून् = दुराधर्षान्; दुराधर्षाणि पाहिजे; दुराधर्षाणि = ज्यांना कोणी अडवूं शकत नाहीं अशीं ( इंद्रियें ); इंद्रियें आपापल्या विषयांकडे जात असतां त्यांना सामान्य जनांना अडवितां येत नाहीं. आसन् = असून् = असुनवन्ति. असून् बद्दल महाराष्ट्र-पाठ असूनि आहे. इषून् = इषुणवन्ति. ह्या दोन शब्दांचे अर्थ वर केले आहेत; इंद्रियें स्वतःला सर्वत्र फेकून देतात व सर्वत्र संचार करतात म्हणजे इंद्रियगोचर जे जे विषय असतील त्या त्या सर्व विषयांकडे तीं धांव घेतात. मयोभुवः = मयोभूनि = सुखभूनि; विषयज्ञानानें इंद्रियें आत्म्याला सुख देतात. एषां = इमानि. भृत्यां = संभृतानि = इंद्रियगोचरविषयसंबंधाच्या ज्ञानानें भरलेलीं; महाराष्ट्रपाठ इमं सभृतं असा आहे. ऋणधत् = वेद = जाणतो. चिरं अध्याहृत. महाराष्ट्रपाठांत सः नाहीं. जीवात् = जीवति. ऋचेचा आत्मपर अर्थः—आपआपलीं कामें करणारीं, वस्तूंवर प्रकाश पाडणारीं, ज्यांच्या आड जातां येत नाहीं अशीं, सर्वत्र संचार करणारीं व सुख देणारीं इंद्रियें आत्मा संसारांत असतांना ( अद्य ) ऋताच्या म्हणजे ज्ञानाच्या जुंवाला जुंपतो; वैषयिक ज्ञानानें भरलेल्या ह्या इंद्रियांना जो जाणतो तो दीर्घकाल जगतो.

सायणः— अद्य = अस्मिन् कर्मणि; ऋतस्य = गच्छतः रथस्य; ऋ = जाणें; रथ जातो म्हणून तो ऋत; गाः = गतिमतः अश्वान्; गो शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान ९२ ); ह्या यज्ञांत ( अद्य ) इंद्राच्या रथाच्या जुंवाला ( धुरि ) घोडे ( गाः )

कोण जुंपतो ? कोणींही जुंपू शकत नाहीं; शिमीवतः = वीर्यकर्मोपेतान् = शूर कर्मे करणाऱ्यांना; शिमी = कर्म ( निघ० २।२।२४ ); भामिनः = तेजसा युक्तान्; दुर्हणायून् = परैः दुःसहेन क्रोधेन युक्तान् = शत्रूंना सहन होणार नाहीं अशा तऱ्हेच्या क्रोधानें युक्त; हृणीञ् रोषणे ( कण्वादिगण १९ ); दुर् = दुःसह; आसन्निषून् = ज्यांच्या तोंडांत ( आसन् = आसनि = आस्ये ) शत्रूवर टाकण्याकरितां बाण आहेत अशांना; हृत्स्वसः = शत्रूंच्या हृदयांवर ( हृत्सु ) जे आपले पाय दडपून टाकतात ( असः = अस्यन्ति ) अशांना; मयोभून् = आपल्या बाजूच्या लोकांना सुख ( मयः ) देणाऱ्यांना (भून्=भावयितॄन्); हे द्वितीयांत बहुवचनीं सहा शब्द गाः ह्याचीं विशेषणें; जो यजमान (यः ) ह्या घोड्यांची (एषां) रथवाहनक्रिया ( भृत्यां = भरणक्रियां = रथवाहनक्रियां) स्तवितो (ऋणधत्=समर्धयति=स्तौति) त्याला दीर्घायुष्य मिळेल (जीवात्=जीववान् भवेत्); किंवा प्रजापति(कः)यज्ञ (ऋतस्य=यज्ञस्य) आरंभापासून शेवटपर्यंत नेत असतांना ( धुरि=निर्वाहे ) आज विशिष्ट वेदवचनांचा ( गाः=वेदरूपान् वाग्विशेषान् ) उपयोग करीत आहे ( युङ्क्ते=संयोजयति ); शिमीवतः = प्रतिपाद्यैः कर्मभिः युक्तान् = त्यांनीं प्रतिपादन केलेल्या कर्मांनीं युक्त; विशिष्ट वेदवचनांत विशिष्ट कर्मांचा निर्देश असतो; भामिनः = उज्वलान् = अती स्पष्ट; दुर्हणायून् = हातुम् अशक्यान् = जीं कधीं टाकलीं म्हणजे विसरलीं जात नाहींत अशीं; वेदाभ्यास दररोज चालत असल्यामुळें वेदवचनांचा विसर पडत नाहीं; हणी = टाकणें; आसन्निषून् = आसनि आस्ये इषुः इषणं गमनम् उच्चारणं येषां ते = जीं तोंडांत गमन करतात म्हणजे उच्चारलीं जातात अशीं; हृत्स्वसः = हृत्सु हृदयेषु दीप्यमानान् = हृदयांत प्रकाशणारीं; अस दीप्तौ ( धा० १।९११ ); मयोभून् = वेदाध्ययनापासून होणारें सुखाचें साधन जें पुण्य तें उत्पन्न करणारीं; अध्ययनापासून पुण्यप्राप्ति व पुण्यप्राप्तीपासून सुख मिळतें; जो यजमान अशा वचनांचें धारण करतो म्हणजे तीं वचनें सारखीं हृदयांत सांठवित असतो तोच खरोखर जिवंत असतो.

शिमी = अस्त्र किंवा वज्र (पान ८६७). भाम = ( १ ) ज्वाला, ( २ ) अस्त्र, वज्र, ( ३ ) बल. ( १ ) वि ते विष्वक् वातजूतासो अग्ने भामासः शुचे शुचयश्चरन्ति० वना वनन्ति (६।३।३) = हे देदीप्यमान् ( शुचे ) अग्नि, वाऱ्यानें प्रेरित व देदीप्यमान् तुझ्या ज्वाला सर्वत्र पसरत आहेत व वनांचा नाश करीत आहेत; अस्य० अग्नेः० भामासो यामन् अक्तवः चिकित्रे ( १०।३।४ ) = ह्या अग्नीच्या ज्वाला ( भामासः = अक्तवः) मार्गांत पसरतांना दिसत आहेत. (२) वधीं वृत्रं मरुत इन्द्रियेण स्वेन भामेन ( १।१६५।८ ) = हे मरुतांनो, मी स्वतःच्या वज्रानें व स्वतःच्या बलानें (इन्द्रियेण) वृत्राला ठार मारलें; वीरान् मा नो रुद्र भामितो वधीः ( १।११४।८ ) = हे रुद्रा, अस्त्रवान् ( भामितः ) तूं आमच्या मुलांना मारूं नकोस. ( ३ ) वृषप्रभर्मा दानवस्य भामं वज्रेण वज्री नि जघान शुष्णम् ( ५।३२।४ ) = बैलासारखा दांडगा व वज्रयुक्त इंद्र आपल्या वज्रानें दानवाचा बलिष्ठ ( भामं ) मुलगा जो शुष्ण त्याला मारता झाला;

हे तिन्ही अर्थ प्रस्तुत ऋचेंत लागू पडतील; कारण मरुत् अग्नीसारखे झळकतात, त्यांच्यापाशीं नाना प्रकारचीं अस्त्रें असतात व ते बळवान् आहेत असे पुष्कळ ऋचांत म्हटलें आहे. आसन् इषून् = ज्यांच्या तोंडांत बाण आहेत अशांना; मरुतांच्या सर्व अंगावर आयुधें होतीं; श्रिये कं वो अधि तनूषु वाशीः ( १।८८।३ ) = हे मरुतांनो, शोभेसाठीं तुमच्या शरीरांवर अस्त्रें ( वाशीः ) आहेत. ते वाशीमन्तः इष्मिणः अभीरवः ( १।८७।६ ) = वाशी व इषु ह्यांनीं युक्त व कधीं न भिणारे असे मरुत्. हृणा = ( १ ) संतापणें, क्रुद्ध होणें, ( २ ) पीडा करणें, नाश करणें, ( ३ ) टाळणें. ( १ ) किमस्मभ्यं जातवेदो हृणीषे ( ७।१०४।१४ ) = हे अग्नि, आमच्यावर तूं कां क्रुद्ध होत आहेस ? अयं ह तुभ्यं वरुणो हृणीते ( ७।८६।३ ); हृणीते = क्रुद्ध झाला आहे. ( २ ) यथा देव न हृणीषे न हंसि । हवनश्रुत् नो रुद्रेह बोधि ( २।३३।१५ ) = हे रुद्रा, आमची हांक ऐकणारा तूं ( हवनश्रुत् ) आम्हांला पीडा करूं नयेस म्हणून एथें ( इह ) ये ( बोधि ); हृणीषे = हंसि; सुन्वद्भ्यो रन्धया कं चिदव्रतं हृणायन्तं चिदव्रतम् (१।१३२।४)=हे इंद्रा, सर्व (कंचित्) पीडा करणाऱ्यांना व तुझी आज्ञा न पाळणाऱ्यांना ( अव्रतं ) सोमरस काढणाऱ्यांच्या ताब्यांत दे ( रन्धय ). ( ३ ) ओ षु प्र याहि वाजेभिः मा हृणीथाः अभ्यस्मान् ( ८।२।१९ ) = हे इंद्रा, ताबडतोब धन घेऊन आमच्याकडे ये; आम्हांला टाळूं नकोस; मा नो हृणीतामतिथिः वसुरग्निः (८।१०३।१२) = धनवान् ( वसुः ) अग्नीनें आम्हांस टाळूं नये. हृणा = पीडा; दुर्हृणा = अतीशय पीडा किंवा दुष्टांना पीडा किंवा दुष्टांचा नाश; दुर्हृणायुः = अतीशय पीडा देणारा किंवा दुष्टांना पीडा देणारा किंवा दुष्टांचा नाश करणारा; यो नो मरुतो अभि दुर्हृणायुः० वसवो जिघांसति० तपिष्ठेन हन्मना हन्तना तम् ( ७।५९।८ ) = हे धनवंत मरुतांनो, जो पीडादायक ( दुर्हृणायुः ) आम्हांला पीडा करतो ( अभि-जिघांसति ) त्याला तुम्ही आपल्या जळत्या आयुधानें ठार करा. प्रस्तुत ऋचेंत दुर्हृणायून् = शत्रूला पीडा करणाऱ्यांना, शत्रूचा नाश करणाऱ्यांना. हृत्स्वसः = हृत्सु + असः = हृत्सु अस्यन्ति ते = शत्रूच्या हृदयांत बाण फेकणारे; तोंडांत धरलेले बाण मरुत् शत्रूच्या हृदयांत फेकून देतात. मयस् = धन ( पान ६९५ ); मयोभून् = धन देणाऱ्यांना; हे सहाही शब्द गाः ह्याचीं विशेषणें; गाः = बैल, बैलासारखे बलिष्ठ मरुत्. अशा मरुतांना ऋताच्या म्हणजे इंद्राच्या जुंवाला कोण जुंपतो ? ऋतस्य = धनस्य. भृत्या शब्दाचें भृत्यां हें एकच रूप ऋग्वेदांत असून तें एथेंच आलें आहे; त्याचा पोषक अन्न, खुराक असा अर्थ असावा; सोमाय वच उद्यतम् । भृतिं न भरा ( ९।१०३।१ ) = सोमाला अन्नाप्रमाणें ( भृतिं न ) स्तुति ( वचः ) अर्पण कर ( आ+भर ). वयं० ते० इन्द्र ब्रह्माणि० भृतिं न प्र भरामसि ( ८।६६।११ ) = हे इंद्रा, अन्नाप्रमाणें तुला आम्ही स्तुति अर्पण करीत आहोंत. ऋध् = देणें; ऋधद्यस्ते सुदानवे धिया मर्तः शशमते ( ६।२।४ ) = हे अग्नि, जो मनुष्य धन देणाऱ्या ( सुदानवे = शशमते ) तुला स्तुतीसह ( धिया ) हवि देतो ( ऋधत् ); आस्य हविः

तन्वः कामम् ऋध्याः ( ३।५०।१ ) = हा हवि ह्या इंद्राच्या शरीराची इच्छा पूर्ण करो ( आ + ऋध्याः ); आ = पूर्णपणें; ऋध्याः = देवो. ऋणधत् व जीवात् हीं भविष्यकालचीं रूपें होत. जो ( यः ) ह्या घोड्यांना ( एषां ) पोटभर अन्न ( भृत्यां ) देईल ( ऋणधत् ) तोच जिवंत राहील ( जीवात् ) म्हणजे त्याला अतिशय धन मिळेल. मरुतांना इंद्राचे घोडे असें एथें म्हटलें असावें. कदाचित् कः युङ्क्ते ह्या प्रश्नाचें इन्द्रः युङ्क्ते असें अपेक्षित उत्तर असेल;अशा दांडग्या घोड्यांना इंद्रच रथाला जुंपू शकतो; तें काम करण्याची दुसऱ्या कोणाची छाती नाहीं; असे ते घोडे इंद्राला रथांत घालून हवे तिकडे वाहून नेतात; ही वाहून नेण्याची क्रिया 'भृत्या' होय. जो इंद्र ह्या मरुत्नांवाच्या घोड्यांची रथांत वाहून नेण्याची क्रिया (भृत्यां) स्वीकारतो (ऋणधत्) म्हणजे मरुतांना आपला रथ ओढण्याला लावतो तोच इंद्र खरोखर जिवंत होय; कारण तोच हें अद्भुत काम करूं शकतो; असा कदाचित् अर्थ असेल.

## खंड २६ वा.

**क ईषते तुज्यते को बिभाय को मंसते सन्तमिन्द्रं को अन्ति। कस्तोकाय क इभायोत रायेऽधि ब्रवत्तन्वे को जनाय ( ऋ० सं० १।८४।१७ )**

**कः एव गच्छति। कः ददाति। कः बिभेति। कः मंसते सन्तम् इन्द्रम्। कः तोकाय अपत्याय महते च नः रणाय रमणीयाय दर्शनीयाय**

कः ईषते = कः एव गच्छति; ईषते = गच्छति ( निघंटु २।१४।७० ). तुज्यते = ददाति; गुर्जरपाठांत ददाति नंतर को दधाति अधिक आहे. बिभाय = बिभेति. तोकाय = अपत्याय. महते च नो रणाय रमणीयाय च दर्शनाय हें महे रणाय चक्षसे ( पान ६९४ ) ह्याचें भाष्य आहे; तें एथें कसें आलें तें सांगतां येत नाहीं; दर्शनाय बद्दल एथें दर्शनीयाय आहे. भाष्य फारच अपूरें आहे. ऋचेचें आदित्यपर व आत्मपर भाष्य दिलें नसल्याकारणानें ही ऋचा एथें प्रक्षिप्त असावी.

सायणः—अनुग्रह करणारा इंद्र आला असतांना शत्रूला भिऊन कोण निघून जातो ( ईषते = निर्गच्छति ) ? इंद्र समक्ष असतांना शत्रूचें भय कोणालाही वाटणार नाहीं व कोणींही पळून जाणार नाहीं; कोण हिंसा केला जातो (तुज्यते = हिंस्यते) ? इंद्रासमक्ष कोणालाही शत्रूपासून हिंसा होणार नाहीं; शत्रूला कोण भितो ( बिभाय = बिभेति ) ? को मंसते सन्तमिन्द्रं को अन्ति = अन्ति अन्तिके समीपे सन्तम् अस्माकं रक्षकत्वेन वर्तमानम् इन्द्रं कः पुरुषो मंसते जानाति। वयमेव जानीमः न अन्यः = आमचें रक्षण करणारा इंद्र आमच्यापाशीं आहे असें आमच्या शिवाय दुसरा कोण जाणतो ? ही गोष्ट आम्हीच जाणतों, दुसरा कोणीही जाणत नाहीं; मुलासाठीं, हत्तीसाठीं, धनासाठीं, स्वतःच्या शरीरासाठीं व परिजनांसाठीं इंद्राला कोणता यजमान विनाकारण बोलेल असा शब्दशः अर्थ; त्याचा पुढीलप्रमाणें विस्तार; युद्धांत साहाय्य करण्याकरितां इंद्र आला असतांना आमच्या मुलांचें रक्षण कर (तोकाय), आमच्या हत्तीचें रक्षण

कर ( इभाय ), शत्रू आमचें जें धन घेऊन जात आहे त्याचें रक्षण कर ( राये ), आमच्या शरीराचें रक्षण कर ( तन्वे ), आमच्या परिजनांचें रक्षण कर ( जनाय ) अशी व्यर्थ बडबड कोणता यजमान करील ( अधि ब्रवत् )! इंद्र साहाय्य करीत असतांना अशी विनवणी करण्याची जरुरीच नाहीं; स्तुतीनें संतुष्ट झालेला तो न सांगतां हें सर्व करीलच करील; अधिब्रवत् = अधिवचनं कुर्यात् = अधिक म्हणजे ज्यांची आवश्यकता नाहीं असे शब्द बोलेल.

ईषते = पळतो; ईष् = पळणें हा अर्थ पुष्कळ ऋचांत आहे ( पान २३७ ). तुज् = भयानें थरथर कांपणें; त्वां देवा अबिभ्युषः तुज्यमानास आविषुः (१।११।५) = न भिणाऱ्या ( अबिभ्युषः ) वृत्रापासून म्हणजे वृत्राला पाहून थरथर कांपणाऱ्या ( तुज्यमानासः ) देवांनीं तुझा आश्रय केला ( आविषुः ). कः ईषते = कोण पळून जात आहे ? तुज्यते कः = थरथर कोण कांपत आहे ? बिभाय कः = कोण भ्यायला आहे ? अन्ति इन्द्रं सन्तं=अन्तिके इन्द्रे सति= इंद्र जवळ असतांना असा सति सप्तमी सारखा एथें इन्द्रं सन्तं ह्याचा अर्थ असावा; इंद्र जवळ असतांना शत्रूला भिऊन कोण पळून जातो, कोण थरथर कांपतो, कोण भितो, दुसऱ्या देवाची कोण स्तुति करतो ( मंसते ), धनासाठीं ( तोकाय = इभाय = राये = तन्वे = जनाय ) दुसऱ्या देवाला कोण हांक मारतो ( अधि ब्रवत् )! साहाय्य करणारा इंद्र जवळ असतांना कशाचीही भीति नाहीं व इतर कोणत्याही देवापाशीं धनयाचना करण्याची आवश्यकता नाहीं. तोक = धन ( पान ७५२ ). इभ = धन ( पान ४६२–४६३ ). तनू = धन ( पान ९६१ ). जन् = देणें; जन = दान, धन. मन् = स्तुति करणें. ब्रू = बोलावणें, हांक मारणें. तं मेधेषु प्रथमं देवयन्तीः विश उप ब्रुवते ( १।७७।३ ) = लोक संग्रामांत ( मेधेषु ) किंवा यज्ञांत त्याला हांक मारतात; तं त्वा हविष्मतीर्विश उप ब्रुवत ऊतये ( ८।६।२७ ) = हे इंद्रा, हवि अर्पण करणारे ( हविष्मतीः ) लोक ( विशः ) धनांसाठीं ( ऊतये ) तुला बोलावितात ( उप ब्रुवते ).

## खंड २७ वा.

**को अग्निमीट्टे हविषा घृतेन स्रुचा यजाता ऋतुभिर्ध्रुवेभिः । कस्मै देवा आ वहानाशु होम को मंसते वीतिहोत्रः सुदेवः ( ऋ० सं० १।८४।१८ )**

**कः आदित्यं पूजयति हविषा च घृतेन च स्रुचा यजाते ऋतुभिः ध्रुवेभिः इति। कस्मै देवाः आवहान् आशु होमार्थान् । कः मंसते वीतिहोत्रः सुदेवः कल्याणदेवः । इति अधिदैवतम्**

अग्निं = आदित्यम् . ईट्टे = पूजयति; एथें व पुढील आत्मपर भाष्यांत महाराष्ट्र-पाठ पूजयति बद्दल पूरयति असा आहे. होम = होमार्थान् = होमाला लागणाऱ्या वस्तु. सुदेवः = कल्याणदेवः.

**अथ अध्यात्मम्। कः आत्मानं पूजयति हविषा च घृतेन च स्रुचा यजातै ऋतुभिः ध्रुवेभिः इति। कस्मै देवाः आवहान् आशु होमार्थान्। कः मंसते वीतिहोत्रः सुप्रज्ञः कल्याणप्रज्ञः। इति आत्मगतिम् आचष्टे**

अग्निं = आत्मानम्. ईट्टे व होम ह्यांचे पर्याय वर दिले आहेत. सुप्रज्ञः = कल्याणप्रज्ञः; पण ऋचेंत सुप्रज्ञः शब्द नसून सुदेवः आहे. अधिदैवत व अध्यात्म भाष्यांत ऋचेंतले बाकीचे शब्द जसेच्या तसे ठेविले आहेत.

**सायण**:-- कः अग्निम् ईट्टे = कः यजमानः इन्द्रार्थं हविः निरुप्य अग्निं स्तौति। इन्द्राय हविर्निवापोऽपि सम्यक्कर्तुं न शक्यते। इन्द्रस्य दुर्विज्ञानत्वात् = कोणता यजमान इंद्राकरितां हवि देण्याचें ठरवून नंतर अग्नीची स्तुति करतो? इंद्र कोणत्या प्रकारचा देव आहे हें समजत नसल्याकारणानें त्याला पुरेसा हवि देणें अशक्य असतें; त्याला हवींनीं कधींही संतुष्ट करतां येत नाहीं; को वा इन्द्रयागार्थम् अग्निं स्रुचा जुह्वा ध्रुवेभिः ध्रुवैः नित्यैः ऋतुभिः वसंतादिकालैः उपलक्षितेन घृतेन हविषा यजातै यजेत् = कोणता यजमान इंद्राला हवि देण्याकरितां जुहूपात्रांतून (स्रुचा = जुह्वा) नेहेमीं येणाऱ्या (ध्रुवेभिः = नित्यैः) वसंतादि ऋतूंनीं (ऋतुभिः) उपलक्षित हवीनें म्हणजे घृतानें अग्नीला हवी देईल? वसंतादि ऋतु दरवर्षीं नियमानें येतात; त्यांना उद्देशून इंद्रादिकांना हवि द्यावयाचा असतो; इंद्राला द्यावयाचा हवि अग्नीला कोण देईल? यद्वा। ऋतवः प्रयाजदेवताः। ताभिः ध्रुवैः प्रकृतौ विकृतौ च अनुष्ठेयतया निश्चलैः ऋतुभिः सह अग्निम् आज्यभागदेवतां घृतेन हविषा को यजेत्। न कोऽपि इत्यर्थः = किंवा पुढीलप्रमाणें अर्थ करावा; ऋतु म्हणजे प्रयाजनांवाच्या यागांच्या देवता; प्रकृतियाग व विकृतियाग ह्यांत ज्यांना नियमानें हवि द्यावयाचा असतो अशा ऋतुदेवतांसह आज्यभागदेवता जो अग्नि त्याला कोणता यजमान हवि देईल? कोणीही देणार नाहीं; होम = ह्वातव्यं प्रशस्यं धनं = देण्याजोगें पुष्कळ धन; ह्वे संप्रसारणानें हु; हु + मन् = होमन्; कस्मै यजमानाय होम ह्वातव्यं प्रशस्यं धनं आशु शीघ्रं देवाः आ वहान् आवहन्ति प्रयच्छन्ति। न कस्मै अपि इत्यर्थः = कोणत्या यजमानाला देव तावडतोब पुष्कळ धन देतात? कोणालाही नाहीं; इंद्र एकटाच धनदाता आहे; दुसरे देव किती धन देणार? वीतिहोत्रः प्राप्तयज्ञः सुदेवः शोभनदेवताकः कः यजमानः मंसते इन्द्रं सम्यक् जानाति। न कोऽपि इत्यर्थः = चांगल्या देवतांनीं युक्त व ज्यानें पुष्कळ यज्ञ केले आहेत असा कोणता यजमान इंद्राला उत्तम रीतीनें जाणतो? कोणताही नाहीं; यजमानानें कितीही यज्ञ करून देवतांना संतुष्ट केलें तरी इंद्राला संतुष्ट करणें त्याला अशक्य आहे; नानाप्रकारच्या स्तुतींनीं व फार दिवस उपासना केल्यानेंच इंद्र प्रत्यक्ष दिसतो; इंद्राचें खरें ज्ञान होण्यास यज्ञ वगैरे निष्फल.

ईट्टे = याचना करतो; प्र यत्स्तोता जरिता० उप गीर्भिरीट्टे (३।५२।५) = जेव्हां स्तोता स्तुतींनीं याचना करतो. गीर्भिः विप्रः प्रमतिमिच्छमानः ईट्टे रयिं यशसं पूर्वभाजम् (७।९३।४) = धन (प्रमतिं) इच्छिणारा (इच्छमानः) स्तोता स्तुतींनीं

पुष्कळ ( यशसं = पूर्वभाजं ) धन ( रयिं ) याचितो ( ईट्टे ). वीरेण्यः क्रतुरिन्द्रः सुशस्तिः उतापि धेना पुरुहूतमीट्टे ( १०।१०४।१० ) = इंद्र धनवान् आहे ( वीरेण्यः = क्रतुः = सुशस्तिः ) म्हणून वाणी ( धेना ) इंद्राला ( पुरुहूतं ) याचना करते. हविषा = घृतेन; यो अग्नीषोमा हविषा सपर्यात् देवद्रीचा मनसा यो घृतेन (१।९३।८) = हे अग्निसोमांनो, देवांकडे जाणाऱ्या ( देवद्रीचा ) मनानें म्हणजे भक्तीनें जो तुम्हांला हवीनें ( हविषा=घृतेन ) तृप्त करतो ( सपर्यात् ). अहावि अग्ने हविरास्ये ते स्रुचीव घृतं चम्वीव सोमः(१०।९१।१५)=हे अग्नि, पळीमध्यें ( स्रुचि ) जसें घृत किंवा कलशांत ( चम्वि ) जसा सोम तसा तुझ्या तोंडांत हवि ओतला आहे; एथें हवि, घृत व सोम ह्यांचा अर्थ हवि. को अग्निमीट्टे हविषा घृतेन = हवीनें म्हणजे हवि देऊन अग्नीला कोण याचितो ? स्रुक्, ऋतु व ध्रुव हीं विशिष्ट प्रकारचीं यज्ञपात्रें होत. ऋतु = यज्ञपात्र ( पान १००८ ). इममिन्द्रो अदीधरत् ध्रुवं ध्रुवेण हविषा ( १०।१७३।३ ) = ह्या राजाला इंद्र ध्रुवनांवाच्या हवीमुळें स्थिर करीत आहे ( ध्रुवम् अदीधरत् ); राजाकडून ध्रुव नांवाचा हवि इंद्राला मिळाल्यामुळें इंद्र त्याला राज्यावर ध्रुव म्हणजे स्थिर करतो. ध्रुवं ध्रुवेण हविषा अभि सोमं मृशामसि । अथो त इन्द्रः केवलीर्विशो बलिहृतस्करत् ( १०।१७३।६ )= ध्रुवनांवाच्या पात्रांतून आम्ही सोमहवि (ध्रुवं) इंद्राला अर्पण करीत आहोंत ( अभिमृशामसि ) म्हणूनच, हे राजा, कर देणाऱ्या ( बलिहृतः ) सर्व प्रजा ( विशः ) इंद्र केवळ तुझ्याच ( केवलीः ) करीत आहे ( करत् ). ह्या दोन ऋचांवरून ध्रुव हें पात्र असून तें हवीचेंही नांव असावें. स्रुचा यजाते ऋतुभिः ध्रुवेभिः = स्रुक्, ऋतु व ध्रुव ह्या पात्रांतून अग्नीला कोण हवि देतो ( यजातै )? हु = देणें; हु + मन् = होमन्; होम = ( १ ) हवि, ( २ ) दान, धन. वसोरिन्द्रं वसुपतिं गीर्भिर्गृणन्त ऋग्मियम् । होम गन्तारमूतये ( १।९।९ ) = हवीकडे ( होम ) जाणाऱ्या ( गन्तारं ) धनपति ( वसोः वसुपतिं ) व धनवान् ( ऋग्मियं ) इंद्राची धनदानासाठीं ( ऊतये ) स्तोते स्तुति करतात ( गृणन्ते ). शिवो अर्कस्य होमनि अस्मत्रा गन्तु अवसे (८।६३।४) = धन देणारा (शिवः) इंद्र धन देण्यासाठीं ( अवसे=अर्कस्य होमनि ) आमच्याकडे ( अस्मत्रा ) येवो ( आगन्तु ); अर्क = धन ( पान ८७६ ); अर्कस्य होमनि = धनदानांत, धन देण्यासाठीं. होम शब्द एकंदर चार वेळां आला असल्यामुळें जींत त्या शब्दाचा धन असा खात्रीनें अर्थ आहे अशी ऋचा देतां येत नाहीं. आ + शा = देणें; आशा + उः = आशुः = दाता; आशा + उ = आशु = धन; असदत्र सुवीर्यमुत त्यत् आशु अश्व्यम् ( ८।३१।१८ ) = एथें ( अत्र ) अतीशय ( सुवीर्यं = त्यत् = अश्व्यं ) धन ( आशु ) असो ( असत् ). कस्मै देवाः आवहान् आशु होम = देव कोणाला धन ( आशु = होम ) देतात ( आवहान् ) ? वीतये भक्षणाय होत्राणि हवींषि यस्य सः = ज्याचे हवि देवांनीं भक्षण करण्यासाठीं असतात असा म्हणजे देवांना जो भक्षण करण्यासाठीं हवि देतो तो. मन्=( १ ) स्तुति करणें, ( २ ) याचना करणें, मागणें; मन् + स् ( लेट्‌चा ) = मंस्. कः मंसते वीतिहोत्रः

स्वस्ति = जो देवांना भक्षण करण्यासाठीं हवि देत असतो असा कोण यजमान धन मागतो ? जो अग्नीला निरनिराळ्या प्रकारचे हवि देतो त्याला धनासाठीं अग्नीची प्रार्थना करावी लागत नाहीं; देव स्वतः होऊन त्याला धन देतात असा ह्या चार प्रश्नांचा अर्थ असावा; पण समाधानकारक अर्थ देतां येत नाहीं.

## खंड २८ वा.

**त्वमङ्ग प्र शंसिषो देवः शविष्ठ मर्त्यम्। न त्वदन्यो मघवन्नस्ति मर्डितेन्द्र ब्रवीमि ते वचः ( ऋ० सं० १।८४।१९ )**

**त्वम् अङ्ग प्रशंसीत् देवः शविष्ठ मर्त्यम्। न त्वत् अन्यः अस्ति मघवन् पाता वा पालयिता वा जेता वा सुखयिता वा। इन्द्र ब्रवीमि ते वचः स्तुतियुक्तम्**

प्रशंसिषः = प्रशंसीत्; प्रशंसिषः हा द्वितीय पुरुष आहे; त्याचा तृतीयपुरुष पर्याय अशुद्ध होय; कारण त्वं हाच कर्ता आहे व देवः हा शब्द त्वं शब्दाच्या विशेषणासारखा आहे; त्वं देवः = तूं देव असल्यामुळें असा अर्थ आहे; भाष्यकाराच्या मनांत प्रशंसिषः ह्याचा काय अर्थ होता तें कळत नाहीं; सुख देतोस असा कदाचित् अर्थ असेल. ऋचेंत मघवन् अस्ति असा क्रम आहे व यास्कानें आपल्या भाष्यांत तसाच क्रम ठेविला असता; पण एथें अस्ति मघवन् अशी उलटापालट केली आहे. पाता वा पालयिता वा हे शब्द प्रक्षिप्त होत; कारण यास्कभाष्यांत पति शब्दाचा ह्या शब्दांनीं अर्थ केला असतो; पण ऋचेंत पति शब्द नाहीं. मर्डिता = जेता वा सुखयिता वा. स्तुतियुक्तं अध्याहृत; गुर्जरपाठ वचः इति स्तुतिसंयुक्तं असा आहे. ऋचेचा भाष्यकारानें केलेला अर्थः— हे बलिष्ठ इंद्रा, देव असल्यामुळें तूंच मर्त्य मनुष्याला सुख देत असतोस; हे इंद्रा ( मघवन् ), तुझ्या खेरीज शत्रूंना जिंकणारा व भक्तांना सुख देणारा दुसरा कोणी नाहीं; हे इंद्रा, हें स्तुतियुक्त वचन तुला मी कथन करीत आहें. ऋचेचा आदित्यपर व आत्मपर अर्थ केला नाहीं; तेव्हां ह्या अध्यायांत ती कां घातली तें समजत नाहीं.

**सायणः**—अङ्ग इति अभिमुखीकरणे; अङ्ग शब्दानें कोणाला तरी आपल्या कडे अभिमुख करावयाचें असतें; अङ्ग = इकडे पहा असा अर्थ; शविष्ठ = बलवत्तम; देवः = द्योतमानः; प्रशंसिषः = सम्यक् अनेन स्तुतम् इति प्र शंस; मघवन् = धनवन्; मर्डिता = सुखयिता; हे बलिष्ठ इंद्रा, इकडे पहा; प्रकाशणारा तूं ( देवः ) जो मर्त्य स्तुति करतो त्याच्यासंबंधानें ह्यानें चांगली स्तुति केली असें म्हण; हे धनवंता, तुझ्याखेरीज सुख देणारा दुसरा कोणीही नाहीं; म्हणूनच हें स्तुतियुक्त वचन तुला मी सांगत आहें. एथें प्र शंसिषः ह्याचा पर्याय दिला नाहीं व मर्डिता ह्याचा सुखयिता एवढाच अर्थ दिला आहे.

य एक इत् वि दयते वसु मर्ताय दाशुषे। ईशानो अप्रतिष्कुत इन्द्रो अङ्ग (१।८४।७) = सत्ताधीश ( ईशानः ) व ज्याला कोणी पीडा करीत नाहीं ( अप्रति-

ष्कुतः ) असा जो एकच हवि देणाऱ्या मनुष्याला धन देतो ( विदयते ) तो इंद्र होय ( इन्द्रः अङ्ग ). त्वम् अङ्ग = तूंच. शंस् = धनयुक्त करणें; प्रशंसिषः = धनयुक्त करीत असतोस. आ तू न इन्द्र शंसय गोषु अश्वेषु शुभ्रिषु सहस्रेषु तुवीमघ ( १।२९। ५ ) = हे अतिधनवंता ( तुवीमघ ) इंद्रा, आम्हांला गायी वगैरे धनांनीं युक्त करच ( आशंसय तू ); महीरस्य प्रणीतयः पूर्वीरुत प्रशस्तयः । नास्य क्षीयन्त ऊतयः ( १। २६।९ ) = ह्या इंद्रानें केलेलें धनदान ( प्रणीतयः = प्रशस्तयः ) अतिशय ( महीः= पूर्वीः ) असतें; त्यानें दिलेलें धन ( ऊतयः ) कधींही कमी होत नाहीं ( न क्षीयन्ते ). पूर्वीष्ट इन्द्रोपमातयः पूर्वीरुत प्रशस्तयः ( ८।४०।९ ); उपमातयः = प्रशस्तयः = धनदान. तव क्रत्वा सनेयं तव रातिभिरग्ने तव प्रशस्तिभिः (८।१९।२९) = हे अग्नि, तूं दिलेल्या धनांतून ( क्रत्वा = रातिभिः = प्रशस्तिभिः ) मी धन देईन. देवः = धन-दाता. शविष्ठ = हे अतिधनवंता. मर्त्य = दरिद्री मनुष्य. प्रथमार्धाचा अर्थः—हे अति धनवंता ( शविष्ठ ), धनदाता ( देवः ) तूंच ( त्वम् अङ्ग ) दरिद्र्याला ( मर्त्यं ) धन-युक्त करीत असतोस ( प्र शंसिषः ). मर्डिता = द्रव्यसाहाय्य करणारा; वयं घा ते त्वे इद्विन्द्र विप्रा अपि ष्मसि । न हि त्वदन्यः पुरुहूत कश्चन मघवन्नस्ति मर्डिता ( ८। ६६।१३ ) = आम्ही स्तोते ( विप्राः ) तुझ्यावरच ( त्वे इत् उ ) खरोखरच ( घा ) अगदीं अवलंबून आहोंत ( अपि ष्मसि ); हे इंद्रा ( पुरुहूत ), तुझ्याशिवाय साहाय्य करणारा ( मर्डिता ) दुसरा कोणीही नाहीं. नह्यन्यं बळाकरं मर्डितारं शतक्रतो । त्वं न इन्द्र मृडय ( ८।८०।१ ) = हे धनवंता ( शतक्रतो ), तुझ्याशिवाय द्रव्यसाहाय्य करणारा ( बलाकरं = मर्डितारं ) मला माहीत नाहीं; हे इंद्रा, तूं आम्हांस साहाय्य कर ( मृडय ). उतो रयिः पृणतो नोप दस्यति उतापृणन् मर्डितारं न विन्दते ( १०। ११७।१ ) = जो धन देत असतो त्याचे ( पृणतः ) धन ( रयिः ) कधींही क्षीण होत नाहीं ( न उपदस्यति ); पण जो धन देत नाहीं त्याला ( अपृणन् ) साहाय्य-कर्ता कधींही मिळत नाहीं. दुसऱ्या अर्धाचा अर्थः—हे धनवंता ( मघवन् ), तुझ्या-शिवाय द्रव्यसाहाय्य करणारा कोणीही नाहीं; हे इंद्रा, हें सत्यसत्य वचन ( वचः ) मी तुला सांगत आहें.

## खंड २९ वा.

हंसः शुचिषद्वसुरन्तरिक्षसद्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत् । नृषद्वरसदृत-सद्व्योमसदब्जा गोजा ऋतजा अद्रिजा ऋतम् ( ऋ० सं० ४।४०।५ )

हंसः इति । हंसाः सूर्यरश्मयः । परमात्मा परं ज्योतिः । पृथिवी व्याप्ता इति । व्याप्तं सर्वं व्याप्तं वननकर्मणा अनभ्यासेन आदित्यमण्डलेन इति । त्ययति इति लोकः त्ययति इति । हंसयन् त्ययति इति । हंसाः परमहंसाः । परमात्मा सूर्य-रश्मिभिः प्रभूत गभीर वसति इति । त्रिभिः वसति इति वा । रश्मिः वसति इति वा । वह्निः वसति इति वा । सुवर्णरेताः पूषा गर्भो रिभेति रिभन्ता वनकुटिलानि कुटन्ता रिभन्तान्तरिक्षा चरत्पथान्तरिक्षा चरादिति दिवि भुवि गमनं वा सुभानुः

सुप्रभूतो होतादित्यस्य गता भवन्त्यतिथिर्दुरोणसत्सर्वे दुरोणसद्द्रवं सर्वे रसा विकर्षयति । रश्मिः विकर्षयति । वह्निः विकर्षयति । वननं भवति । अश्वगोजा अद्रिगोजा धरित्रिगोजाः सर्वे गोजा ऋतजा बहुशब्दा भवन्ति । निगमो निगमव्यति भवत्यृषे निर्वचनाय

भाष्याचा गुर्जरपाठः—

हंसेति हंसाः सूर्यरश्मयः परमात्मा परं ज्योतिः पृथिव्याप्तेति व्याप्तं सर्वे व्याप्तं वननकर्माभ्यासेनादित्यमंडलेन इति त्यजतीति लोकस्त्यजतीति हंसस्त्यजतीति हंसाः परमात्मा सूर्यरश्मिभिः प्रभूतगभीत वसतीति त्रिभिर्वसतीति वा वह्निर्वसतीति वा रश्मिर्वसतीति वा सुवर्णरताः पुरुषा गर्भाभिरिति रिफता चमकुटिलानि कुटन्ता रेफन्तान्तरिक्षं चरेदर्थेऽस्यन्तरिक्षं चरतीति दिवि भूमिर्गमनं वा स्वर्भानुः सुप्रसूतो होतादित्यस्य होता गताभवन्ति अतिथिर्दुरोणसद्द्रवन्ति सर्वे रसाश्चिकीर्षयन्तीति वावनतं भवतीत्यश्वगोजा अद्रिगोजा धनगोजाः सर्वगोजा ऋतगोजा सर्वगोजा ऋतगोजातिर्ऋच इति जो बहुजो शब्दो भवति निगमो निगमव्यो भवत्यृषि निर्वचनाय.

हंसः इति = हंस म्हणजे. हंसाः = सूर्यरश्मयः; सूर्यकिरणांना हंस म्हणण्याचें कारण ते मार्गानें जातात; हंस शब्दाची व्युत्पत्ति पहा ( पान २६५ ); हंसः इति म्हटल्यावर हंसः सूर्यः किंवा हंसः आदित्यः असें पाहिजे. हंसः = परमात्मा परं ज्योतिः. पुढील सर्व भाष्य अप्रस्तुत, अशुद्ध व दुर्बोध आहे; त्याचा अर्थ करीत बसणें हा व्यर्थ खटाटोप होय; त्यांत ऋचेंतील शब्दांचा मुळींच उलगडा केला नाहीं; कांहीं थोडीं वाक्यें व शब्द सुबोध आहेत पण त्यांचाही ऋचेशीं कांहीं संबंध नाहीं; तीं वाक्यें व ते शब्द पुढील होतः— हंसाः = परमहंसाः = उच्चपदाला पोचलेले वेदांती; परमात्मा सूर्यः रश्मिभिः प्रभूतगभीरे वसति इति = सूर्य हा परमात्मा; तो अतीशय खोल अशा वेदांत्यांच्या अंतःकरणांत वास करतो. त्रिभिः वसति इति वा = किंवा सूर्य तीन पावलांनीं द्युलोकीं वास करतो; रश्मिः वसति इति वा = किंवा द्युलोकीं किरण वास करतो; वन्हिः वसति इति वा = किंवा अग्नि वास करतो. महाराष्ट्रपाठ व गुर्जरपाठ ह्यांत बराच मेळ आहे; हें भाष्य मूळांत होतें कीं मागाहून कोणी घुसडलें तें सांगणें कठीण आहे.

सायणः— हंसः = सर्वत्र सर्वदा गन्ता = सर्वत्र व सदा संचार करणारा आदित्य; हन् ( = जाणें ) ह्यापासून हंस; हन हिंसागत्योः ( धा० २।२ ); शुचिषत् = शुचौ दीप्ते द्युलोके सीदति = तो आदित्य प्रकाशयुक्त द्युलोकांत बसतो; वसुः = सर्वस्य वासयिता वायुः = सर्वांना आपआपल्या ठिकाणीं रहावयास लावणारा वायु; अन्तरिक्षसत् = तो वायु अंतरिक्षांत बसतो म्हणजे संचार करतो; होता = देवानाम् आह्वाता होमनिष्पादकः वा = देवांना बोलावणारा किंवा हवि निष्पन्न करणारा अग्नि; वेदिषत् = गार्हपत्य, आहवनीय व दक्षिणाग्नि अशा रूपांनीं अग्नि वेदीमध्यें बसतो; अतिथिः = अतिथीप्रमाणें पूज्य अग्नि; दुरोणसत् = अग्नि घरांत

( दुरोणे ) अन्न शिजविणें वगैरें कामें करण्याकरितां बसतो; ह्याप्रमाणें परमात्माच आदित्य, वायु व अग्नि ह्यांचीं रूपें घेतो; नृषत् = माणसांत चैतन्यरूपानें बसणारा परमात्मा; चैतन्य म्हणजे परमात्माच; वरसत् = वरणीये मंडले सीदति = आदित्यरूप धारण करणारा परमात्मा श्रेष्ठ अशा आदित्यमंडलांत बसतो; ऋतसत् = ऋत म्हणजे सत्य किंवा ब्रह्म किंवा यज्ञ ह्यांत बसणारा अग्नि; व्योमसत् = वायु अंतरिक्षांत संचार करतो; वरसत्, ऋतसत् व व्योमसत् ह्या तीन शब्दांनीं परमात्म्याचीं तीन रूपें पुन्हां वर्णिलीं आहेत; अब्जाः = आदित्य समुद्रांत जन्मतो; किंवा अब्जाः = विद्युत्‌रूपानें किंवा वडवाग्निरूपानें पाण्यांत जन्मलेला; गोजाः = गोषु रश्मिषु जातः = रश्मींत म्हणजे रश्मियुक्त असा जन्मलेला; ऋतजाः = सर्वांना दिसेल असा सत्यपणें जन्मलेला म्हणजे प्रत्यक्षपणें जन्मलेला; ऋत = सत्य; इंद्र वगैरे देव दिसत नाहींत पण सूर्य दिसतो; अद्रिजाः = उदयाद्रीवर जन्मलेला; ऋतं = असा हा महान् आदित्य सत्यब्रह्म होय.

ऐतरेयब्राह्मणांत ( ४।२० ) ऋचेंतील कांहीं शब्दांचे पुढीलप्रमाणें अर्थ दिले आहेतः— वरसत् = वरं वै एतत् सद्मनां यस्मिन् एषः आसन्नः तपति = जेथें बसलेला हा सूर्य तपतो ते सर्व स्थानांमध्यें श्रेष्ठ स्थान होय; अशा स्थानीं बसणारा तो वरसत्; ऋतसत् = सत्यसत; व्योमसत् = व्योम वै एतत् सद्मनां यस्मिन् एषः आसन्नः तपति; ह्या शब्दाचा अर्थ वरसत् प्रमाणें; व्योम = गृहाद्यावरणशून्यम् आकाशं ( सायण ) = ज्याला घरासारख्या भिंती वगैरे नाहींत असे अमर्याद आकाश; अब्जाः = अद्भ्यः वै एष प्रातरुदेति अपः सायं प्रविशति = सकाळीं हा पाण्यांतून वर येतो व संध्याकाळीं पाण्यांत अस्त पावतो म्हणून हा अब्जाः; ऋतजाः = सत्यजाः; ऋतं = एष वै सत्यम्; ऋचेंतले सर्व शब्द आदित्याला लावले आहेत; पण फक्त वरील शब्दांचा अर्थ दिला आहे.

तैत्तिरीयारण्यक ( १०।१० ) सायणभाष्य :— हन्ति सर्वदा गच्छति इति हंसः आदित्यः। स च शुचौ शुद्धे मण्डले ज्योतिर्मये सीदति इति शुचिषत् = हंस म्हणजे मार्गानें जाणारा आदित्य; तो शुद्ध ज्योतिर्मय मंडलांत राहतो; वायुरूपानें ( वसुः ) तो अंतरिक्षांत वास करतो ( अन्तरिक्षसत् ); आवहनीयादि अग्नीचें रूप घेऊन ( होता ) हवि निष्पन्न करण्याकरितां सोमयागाला आवश्यक जी वेदी तिच्यावर तो बसतो ( वेदिषत् ); अमावास्या वगैरे वर्ज्य तिथींना न जुमानणारा असा अतिथि होऊन तो परकीयांच्या घरीं भोजनाकरितां जातो ( दुरोणसत् ); कर्म करणाऱ्या मनुष्यांमध्यें तो असतो ( नृषत् ); काशी, द्वारका वगैरे श्रेष्ठ क्षेत्रांत पूज्य देवतारूपानें तो असतो ( वरसत् ); ऋतांत म्हणजे वैदिक कर्मांत फलरूपानें तो वास करतो ( ऋतसत् ); म्हणजे वैदिक कर्में तो सफल करतो; नक्षत्र वगैरेंचें रूप घेऊन तो आकाशांत असतो ( व्योमसत् ); नदी, समुद्र वगैरेंच्या पाण्यांत शंख, मगर वगैरे रूपांनीं तो वास करतो ( अब्जाः ); क्षीर वगैरेच्या रूपानें तो गायीपासून जन्मतो

( गोजाः ); सत्यवचनापासून तो जन्मतो ( ऋतजाः ) म्हणजे तो कीर्तीचें रूप घेतो; वृक्ष वगैरेचें रूप घेऊन तो पर्वतांपासून जन्मतो ( अद्रिजाः ); असें आदित्य वगैरे रूपांनीं अस्तित्वांत असणारें सर्व जगत् सत्य ( ऋतं ) ब्रह्म ( बृहत् ) आहे.

कठोपनिषत् ( ५।२ ) शांकरभाष्यः— आदित्य जातो ( हन्ति =गच्छति ) म्हणून तो हंस; स्वर्गांत ( शुचौ = दिवि ) आदित्यरूपानें ( हंसः ) असणारा; वासयति सर्वान् इति वसुः वायुः; वायुरूपानें ( वसुः ) अंतरिक्षांत असणारा ( अन्तरिक्षसत् ); पृथिवीवर असणारा ( वेदिषत् ) होता म्हणजे अग्नि; कलशांत बसणारा ( दुरोणसत् ) सोम ( अतिथिः ); किंवा अतिथिरूपानें लोकांच्या घरीं वास करणारा ब्राह्मण; मनुष्यांमध्यें असणारा ( नृषत् ); देवांमध्यें असणारा ( वरसत् ); सत्यांत किंवा यज्ञांत असणारा ( ऋतसत् ); आकाशांत असणारा (व्योमसत्); शंख, शिंपल्या, मगर वगैरे रूपांनीं जलांत जन्मणारा ( अब्जाः ); धान्य वगैरे रूपांनीं पृथिवीवर जन्मणारा ( गोजाः ); यज्ञादिरूपानें जन्मणारा ( ऋतजाः ); नदीवगैरेंच्या रूपानें पर्वतांपासून जन्मणारा ( अद्रिजाः ); असा सर्वांठायीं व सर्वरूपांनीं असूनही आत्मा सदैव सत्यस्वरूप आहे ( ऋतं ); सर्वांचें कारण म्हणून सर्वांहून श्रेष्ठ ( बृहत् ); जरी मंत्राची देवता आदित्य आहे तरी आदित्य हें ब्रह्माचें एक रूप असल्याकारणानें ऋचेचें ब्रह्मपर विवरण केलें आहे. ऐतरेय ब्राह्मण, तैत्तिरीय आरण्यक व कठोपनिषत् ह्यांत ऋतं नंतर ऋचेंत नसलेला बृहत् शब्द आहे.

हंसः शुचिषत् ही ऋचा ४।४० ह्या सूक्तांतील शेवटली होय; आधींच्या चार ऋचा दधिक्रादेवासंबंधीं आहेत; त्यांच्याशीं प्रस्तुत ऋचेचा कांहींएक संबंध दिसत नाहीं. ऋचेंतील अब्जाः गोजाः ऋतजाः अद्रिजाः ह्या शब्दांनीं सोमाचें वर्णन केलें असावें असें वाटतें. अब्जाः = अप्सु जातः = पाण्यांत जन्मलेला म्हणजे मिसळलेला. गोजाः = गोषु जातः = गायींत म्हणजे गायींच्या दुधांत मिसळलेला. ऋतजाः = ऋताय हविषे जातः = देवांना हवि मिळावा म्हणून जन्मलेला. अद्रिजाः = अद्रिभ्यः जातः = ग्राव्यांपासून जन्मलेला; ग्रावे सोम ठेचून त्याचा रस काढतात. हंसः शुचिषत् = यथा हंसः शुचिषु अप्सु सीदति तथा सोमः = हंसाप्रमाणें सोम पाण्यांत बसतो म्हणजे पाण्यांत मिसळला जातो. वसुः अन्तरिक्षसत् = यथा वसुः वसुमान् सूर्यः अन्तरिक्षे सीदति तथा सोमः अन्तरिक्षसदृशेषु कलशेषु सीदति = सूर्य जसा अंतरिक्षांत तसा सोम कलशांत म्हणजे कलशांतील पाण्यांत बसतो. होता वेदिषत्= होता अग्नि वेदींत बसतो तसा सोम कलशांत बसतो. अतिथिर्दुरोणसत् = जसा अतिथि अग्नि यज्ञगृहांत बसतो तसा सोमही अतिथीप्रमाणें यज्ञगृहांत बसतो. नृषत् = जसा अग्नि ऋत्विजांच्यामध्यें बसतो तसा सोमही बसतो. वरसत् = वर म्हणजे श्रेष्ठ अशा पवित्रांत म्हणजे गाळण्यांत बसणारा. ऋतसत् = उदकांत बसणारा. व्योमसत्= अंतरिक्षांत बसणारा म्हणजे मुळचा द्युलोकीं असणारा. ऋचेंतील बरींच रूपकें व शब्द अग्नीलाही लागू होतील. श्वसित्यप्सु हंसो न सीदन् ( १।६५।५ ) = पाण्यांत बसणारा हंस जसा ओरडतो

तसा अग्नीही पाण्यांत बसून ओरडतो. अग्नीला वसु पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे; मूळचा तो अंतरिक्षांतील राहणारा ( अन्तरिक्षसत् ). होता वेदिषत् अतिथिर्दुरोणसत् हे शब्द अग्नीलाच लागतात. नृषत् = अग्नि ऋत्विजांच्यामध्यें बसतो. वरसत् = आरंभीं तो श्रेष्ठ द्युलोकीं होता व नंतर यज्ञांतील श्रेष्ठस्थानीं तो बसविला गेला. व्योमसत् = अन्तरिक्षसत्. अब्जाः = अप्सुजातः; अग्नि पाण्यांत जन्मला असें अनेक वेळां म्हटलें आहे. गोजाः हें विशेषण अग्नीला कसें लावितां येईल तें समजत नाहीं; कदाचित् गो विकाराय क्षीराय घृताय च जातः = गायीचें दूध व घृत आहुतिरूपानें घेण्याकरितां जन्मलेला असा अर्थ असेल. ऋतजाः = देवांना हवि देण्यासाठीं किंवा यजमानांना धन देण्यासाठीं जन्मलेला. अद्रिजाः हें विशेषण अग्नीला लावतां येणार नाहीं. ऋतं=हवि; हें विशेषण सोमाला लागू पडतें; अग्नीच्या जिव्हेनें देव हवि खातात म्हणून त्यालाही ऋतं म्हणतां येईल; हविरस्मि = मी हवि आहें ( १४।२ पान १०८४ ) असें अग्नि म्हणतो. ऋचेची देवता अग्नि कीं सोम हें ठरवितां येत नाहीं.

## खंड ३० वा.

**द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते। तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्यनश्नन्नन्यो अभि चाकशीति** ( ऋ० सं० १।१६४।२० )

**द्वौ द्वौ प्रतिष्ठितौ सुकृतौ धर्मकर्तारौ। दुष्कृतं पापं परिसारकमित्याचक्षते। सुपर्णा सयुजा सखाया इति आत्मानं परमात्मानं प्रति उत्तिष्ठति। शरीरे एव तज्जायते। वृक्षं वृक्षं शरीरं वृक्षं पक्षौ प्रतिष्ठापयति। तयोः अन्यत् भुक्त्वा अन्नम् अनश्नन् अन्यां सरूपतां सलोकताम् अश्नुते यः एवं वेद। अन्नम् अनश्नन् अन्यः अभिचाकशीति। इति आत्मगतिम् आचष्टे**

द्वा = द्वौ = द्वौ द्वौ प्रतिष्ठितौ सुकृतौ धर्मकर्तारौ = चांगलीं कृत्यें करणारे म्हणजे धर्माचरण करणारे दोन एकत्र असतात; पण हे दोघे कोण? एका शरीरांत दोन दोन आत्मे असतात असें म्हणावयाचें असेल; हे दोन आत्मे जीवात्मा व परमात्मा. परमात्मा चांगलीं कृत्यें करतो असें म्हणणें बरोबर होणार नाहीं; कारण परमात्मा कांहींच करीत नसतो. सुकृत ह्याच्या उलट दुष्कृत; वाईट कामें करणाऱ्याला पापी व परिसारक म्हणतात. आपट्यांच्या कोशांत परिसारक शब्द नाहीं. आत्मानं परमात्मानं प्रति उत्तिष्ठति प्रतिष्ठापयति ह्या शब्दांचा अर्थ करतां येत नाहीं; परमात्मानं बद्दल महाराष्ट्रपाठ दुरात्मानं आहे. तयोः अन्यत् अभिचाकशीति ह्याचा अर्थ कळत नाहीं.

**सायणः—** चांगले उडणारे ( सुपर्णा = सुपर्णौ=सुपतनौ = शोभनगमनौ ), एकत्र असणार ( सयुजा = सयुजौ = समानयोगौ ? ), पक्षी हें समान नांव धारण करणारे ( सखाया = सखायौ = समानख्यानौ ) दोन पक्षी एकाच वृक्षाचा आश्रय करतात ( परिषस्वजाते = आश्रयतः ); त्यांपैकीं एक पिकलेलें ( पिप्पलं ) व फार मधुर ( स्वादु = स्वादुतरं ) फळ खातो; दुसरा फळ न खातां चहूंकडे पहात रहातो ( अभिचाकशीति = अभिपश्यति ); हा दृष्टांत आहे; ह्या दृष्टांतानें ऋषि जीवात्मा व

परमात्मा ह्यांचें पुढीलप्रमाणें वर्णन करतो; एथें दोन पक्षी म्हणजे जीवात्मा व परमात्मा; त्या दोघांमध्यें तादात्म्य संबंध असतो; परमात्मा हाच कांहीं कारणानें जीवात्मा होतो म्हणजे वस्तुतः जीवात्मा व परमात्मा ह्यांच्यांत कोणताही भेद नाहीं; म्हणूनच जीवात्मा व परमात्मा हे नांवानें एकच म्हणजे दोघांचें आत्मा हेंच एक नांव; वृश्च्यते इति वृक्षः देहः = वृश्च् ( = कापणें ) ह्यापासून वृक्ष; वृक्षाप्रमाणें देहही कापला जातो म्हणजे तो नश्वर असतो म्हणून देहाला वृक्ष म्हटलें आहे; जीवात्मा देहांत असतो व परमात्मा हाच जीवात्मा असल्याकारणानें दोघेही जोंपर्यंत उपाधि आहे तोंपर्यंत देहांतच राहतात; त्यांपैकीं एक म्हणजे जीवात्मा केलेल्या कर्माचें फळ गोड मानून खात राहतो म्हणजे त्याला उपाधिअवस्थेंत संसार गोड वाटतो; दुसरा आप्तकाम असल्यानें त्याला कर्मफल भोगावयाचें नसतें; संसार उपाधिकृत आहे असें तो स्पष्टपणें पाहतो. हें विवरण शंकराचार्यांच्या मुण्डकोपनिषदांतील ह्या ऋचेच्या भाष्याला अनुसरून केलें आहे ( मुण्डकोपनिषत् ३।१।१ ).

युज् = बरोबर असणारा, साहाय्यकारी; युजं वज्रं वृषभश्चक्र इन्द्रः (१।३३।१०) = दांडगा इंद्र आपल्या बरोबर नेहमीं असणारें ( युजं ) वज्र घेता झाला. इषुः० यमिन्द्र चकृषे युजम् ( ८।७७।७ ) = हे इंद्रा, जो इषु तूं आपल्याबरोबर नेहमीं ठेवतोस. बृहस्पतिना युजा इन्द्र ससाहे (८।९६।१५) = साहाय्यकारी ( युजा ) बृहस्पतीला बरोबर घेऊन इंद्र शत्रूला जिंकता झाला. सयुज् = अमक्यासह किंवा अमक्याबरोबर असणारा; ताभिः सयुक् सरथं देव ईयते अस्य विश्वस्य भुवनस्य राजा ( १०।१६८।२ ) = ह्या सर्व भुवनाचा राजा वायु त्या घोड्यांच्यासह सर्वत्र संचार करतो. सयुजौ = एकमेकांबरोबर असणारे. हे दोन पक्षी मित्र असून सदैव एकमेकांबरोबर असतात व एकाच झाडाला पकडून असतात ( परिषस्वजाते ) म्हणजे एकाच झाडावर वसति करतात; त्यांपैकीं एक गोड फळें खात असतो व दुसरा फळें न खातां सर्वत्र बघत असतो. हा प्राथमिक अर्थ आहे पण ऋचेचा गूढार्थ असलाच पाहिजे; कारण आपला मित्र फळें खात असतांना आपण मात्र फळें खावयाचीं नाहींत असा निर्धार करणारा चमत्कारिक पक्षी कोणता असणार? तेव्हां दोन पक्षी म्हणजे जीवात्मा आणि परमात्मा हेच असावेत.

## खंड ३१ वा.

( हा खंड गुर्जरप्रतींत नाहीं ).

**आ याहीन्द्र पथिभिरीळितेभिर्यज्ञमिमं नो भागधेयं जुषस्व । तृप्तां जुहुर्मातुळस्येव योषा भागस्ते पैतृष्वसेयी वपामिव ( खैलिकसूक्त १४।६ )**

आगमिष्यन्ति शक्रः देवताः ताः त्रिभिः तीर्थेभिः शक्रप्रतरैः ईळितेभिः त्रिभिः तीर्थैः यज्ञम् इमं नः यज्ञभागम् अग्नीषोमभागौ इन्द्रः जुषस्व तृप्ताम् एवं मातुलयोगकन्याभागं सतृकेव सा या देवताः ताः तत्स्थाने शक्रं निदर्शनम्

हे इन्द्र नः इमं यज्ञं ईळितेभिः पथिभिः आयाहि । भागधेयं जुषस्व = हे इंद्रा,

पूज्य मार्गांनीं आमच्या ह्या यज्ञाला ये व तुझा हविर्भाग सेवन कर. ह्याप्रमाणें पहिला अर्ध अगदीं सोपा आहे; पण दुसरा अर्ध अगदीं दुर्बोध असून त्याचा पहिल्या अर्धाशीं कोणताही संबंध नाहीं; त्यावरील भाष्यही तितकेंच कठीण आहे. पहिल्या अर्धाच्या भाष्याचा कांहीं तरी अर्थ करतां येईल; पण त्यांत त्या अर्धांतील शब्दांचा अर्थ नाहीं. आयाहि = आगमिष्यन्ति व पथिभिः = त्रिभिः तीर्थेभिः शक्रप्रतरैः ईळितेभिः त्रिभिः तीर्थैः हे अर्थ कसे काढले गेले तें सांगणें कठीण आहे. ऋचेचा आत्मपर अर्थ होत नसल्यामुळें ती ह्या प्रकरणांत घालण्याचें कांहीं एक कारण दिसत नाहीं.

## खंड ३२ वा.

**विप्रं विप्रासो अवसे देवं मर्तास ऊतये। अग्निं गीर्भिर्हवामहे** ( ऋ० सं० ८।११।६ )

**विप्रं विप्रासः अवसे विदुः वेद विन्दतेः वेदितव्यं विमलशरीरेण वायुना। विप्रः तु हृत्पद्मनिलयस्थितम् अकारसंहितम् उकारं पूरयेत् मकारनिलयं गतं विप्रं प्राणेषु बिन्दुसिक्तं विकसितं वह्नितेजःप्रभं कनकपद्मेषु अमृतशरीरम् अमृतजातस्थितम् अमृतवाचा अमृतमुखे वदन्ति। अग्निं गीर्भिर्हवामहे। अग्निं संबोधयेत् अग्निः सर्वाः देवताः इति। तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय**

भाष्याचा गुर्जरपाठः—

**विप्रं विप्रासो अवसे विदुः विन्दतेः वेदितव्यं विमलं शरीरं वायुना विप्रस्तु पद्मनिलयं हृदिस्थितप्रकारसंहारितमुकारं पूरयन्मकारनिलयं गमयति विप्रं प्राणेषु बिन्दुः सिक्तं विकचितं वह्नितेजःप्रभुं कनकं परमेश्वरममृतशरीरममृतजातस्थितममृतं वाचा अमृतमुखा वदन्ति। अग्निं संबोधयेत् अग्निः सर्वाः देवताः इति। तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय**

भाष्य ऋचेचा अर्थ मुळींच देत नाहीं; ऋचेंतले कांहीं थोडे शब्द भाष्यांत घेतले आहेत; पण त्यांचाही अर्थ दिला नाहीं; ऋचेंत ॐ शब्द नाहीं; तथापि अ, उ व म् ह्या अवयवांचें विवरण केलें आहे. विदुः = वेद असा अशुद्ध पर्याय दिला आहे. महाराष्ट्रपाठ व गुर्जरपाठ ह्यांत थोडासा फरक आहे.

**सायणः**— बुद्धिमान् ( विप्रासः ) मर्त्य ( मर्तासः ) आम्ही बुद्धिमान् (विप्रं) देव अग्नीला हवींनीं तृप्त करण्याकरितां ( अवसे = हविर्भिः तर्पयितुं ) व स्वसंरक्षणासाठीं ( ऊतये ) स्तुतींनीं ( गीर्भिः ) बोलावीत आहोंत ( हवामहे ).

विप्र = ( १ ) स्तोता, ( २ ) याचक, ( ३ ) हविर्दाता, ( ४ ) दाता. (१) उद्विप्राणां देवया वाचो अस्थुः ( ५।७६।१ ) = स्तोत्यांच्या देवांकडे जाणाऱ्या ( देवयाः ) स्तुति ( वाचः ) वर जाण्यास निघाल्या आहेत ( उत् + अस्थुः ); यथा वाम् अत्रिरश्विना गीर्भिः विप्रो अजोहवीत् ( ८।४२।५ ) = हे अश्विनांनो, जेव्हां स्तोता अत्रि तुम्हांला स्तुतींनीं बोलाविता झाला. ( २ ) स नो वाजाय श्रवसे इषे च

राये धेहि द्युमते इन्द्र विप्रान् ( ६।१७।१४ ) = हे इंद्रा, धनवान् ( सः ) तूं आम्हा याचकांना पुष्कळ धनाप्रत ने. ( ३ ) आ वक्षि देवान् इह विप्र यक्षि च (२।३६।४) = हे हविर्दात्या ( विप्र ) अग्नि, देवांना इकडे आण व त्यांना हवि दे; विश्वान् देवान्० विप्रो होतेह वक्षति ( १।१४।७ ) = हविर्दाता ( विप्रः = होता ) सर्व देवांना एथें आणतो; मोषु त्वामत्र बहवो हि विप्रा नि रीरमन् यजमानासो अन्ये ( २।१८।३ ) = हे इंद्रा, इतर अनेक हविर्दाते तुला थांबवून न ठेवोत. ( ४ ) अश्विना विप्रा सुहवा हुवेम ( ७।४४।२ ) = धनदात्या ( विप्रौ ) अश्विनांना आम्ही बोलावीत आहोंत; ते बोलावण्याबरोबर येतात ( सुहवौ ). अवः = ( १ ) रक्षण, ( २ ) हवि, ( ३ ) धन. ( १ ) सुवीरं त्वा स्वायुधं सुवज्रम् आ ब्रह्म नव्यम् अवसे ववृत्यात् ( ६।१७।१३ ) = हे इंद्रा, उत्तम वीर, आयुधवान् व वज्रयुक्त जो तूं त्या तुला माझी ही नवी स्तुति इकडे आणो. (१व३) दुरिता तरेम० तवावसा (६।२।११) = (१) हे अग्नि, तूं केलेल्या रक्षणानें किंवा साहाय्यानें आम्हीं संकटें तरून जाऊं; ( ३ ) हे दात्या, तूं दिलेल्या धनानें आम्ही दारिद्र्यांतून पार पडूं. ( २ ) गन्तारा हि स्थो अवसे हवं विप्रस्य मावतः ( १।१७।२ ) = हे इंद्रावरुणांनो, हवि भक्षण करण्याकरितां ( अवसे ) मजसारख्या ( मावतः ) स्तोत्याचें ( विप्रस्य ) बोलावणें ( हवं ) ऐकून तुम्हीं येतां ( गन्तारौ स्थः ); या ते जिह्वा मधुमती सुमेधा अग्ने देवेषु उच्यते उरूची। तयेह विश्वान् अवसे यजत्रान् आ सादय पायया चा मधूनि ( ३।५७।५ ) = हे अग्नि, मधानें भरलेली ( मधुमती ) व हवींनीं युक्त ( सुमेधाः ) जी तुझी जीभ सर्व देवांना पोचणारी (उरूची) अशी वर्णिली आहे ( उच्यते ) त्या जिभेनें हवि भक्षणाऱ्या ( यजत्रान् ) सर्व देवांना हवि भक्षण करण्यासाठीं ( अवसे ) एथें बसव व त्यांना हवि पाज ( पायय ). ( २ व ३ ) आ न इन्द्रो हरिभिः यातु अच्छा ० अवसे राधसे च ( ४।२०।२ ) = ( २ ) हवि भक्षण करण्यासाठीं ( अवसे = राधसे ) इंद्र आपले घोडे घेऊन इकडे येवो; (३) धनवान् दाता ( इंद्रः ) आम्हीं धनवान् व्हावें म्हणून ( अवसे = राधसे ) आपल्या धनांतून ( हरिभिः ) आम्हांला ( नः ) धन ( आ ) देवो ( यातु ). (३) मघोनीर्वीरवत्पत्यमाना अवो धात विधते रत्नमद्य ( ६।६५।३ ) = हे उषांनो, धनवंत ( मघोनीः ) व धनदात्या ( पत्यमानाः ) तुम्ही आज पुष्कळ ( वीरवत् ) धन ( अवः = रत्नं ) हवि देणाऱ्याला ( विधते ) द्या ( धात ); तयोरिदवसा वयं सनेम नि च धीमहि। स्यादुत प्ररेचनम् ( १।१७।६ ) = त्यांनींच म्हणजे इंद्रावरुणांनींच दिलेल्या धनानें ( अवसा ) आम्ही धन भोगूं ( सनेम ) व लोकांनाही देऊं ( नि + धीमहि ); असें केल्यावर पुष्कळ शिल्लकही ( प्ररेचनं ) राहील ( स्यात् ); भगो विभक्ता शवसावसा गमत् ( ५।४६।६ ) = धन वांटून देणारा ( विभक्ता ) भग धन घेऊन ( शवसा = अवसा ) येवो ( आगमत् ); वाजयन्तः सु अवसे हुवेम ( ७।९०।७ ) = धन इच्छिणारे ( सु वाजयन्तः ) आम्ही धनप्राप्तीसाठीं ( अवसे ) इंद्र व वायु ह्यांना बोलावूं. ऊति = ( १ ) रक्षण, ( २ ) हवि, ( ३ ) धन. ( १ ) त्रितः कूपे अवहितः देवान्

हवत ऊतये ( १।१०५।१७ ) = विहिरींत फेकून दिलेला ( अवहितः ) त्रित जीवाचें रक्षण करण्यासाठीं म्हणजे जीव वाचविण्याकरितां देवांना हाक मारतो. ( २ ) ऋभुक्षणम् इन्द्रमा हुव ऊतये ऋभून् वाजान् मरुतः सोमपीतये ( १।१११।४ ) = सोम पिण्याकरितां ( ऊतये = सोमपीतये ) मी ऋभुक्षा, इंद्र, ऋभु, वाज व मरुत् ह्यांना बोलावीत आहें ( हुवे ); को वामद्या करते रातहव्य ऊतये वा सुतपेयाय वार्कैः ( ४।४४।३ ) = हे अश्विनांनो, सोम पिण्याकरितां ( ऊतये = सुतपेयाय ) आज आपल्या स्तुतींनीं ( अर्कैः ) हवि देणाऱ्या ( रातहव्यः ) कोणत्या यजमानानानें तुम्हांला जवळ केलें आहे ( आ + करते ) ? ( ३ ) एन्द्र ० रयिं ० ऊतये भर ( १८।१ ) = हे इंद्रा, आम्हीं धनवान् व्हावें म्हणून आम्हांस धन दे ( आ + भर ). मर्त = मनुष्य; संदर्भावरून मनुष्य दुष्ट, साधुवृत्तीचा, दरिद्री वगैरे ठरवितां येतो; एथें दरिद्री हा अर्थ योग्य दिसतो. ऋचेचे दोन अर्थः— ( १ ) आम्ही स्तोते (विप्रासः) मर्त्य स्तुतींनीं ( गीर्भिः ) देवांना हवि देणारा ( विप्र ) जो देव अग्नि त्याला हवि घेण्यासाठीं ( अवसे = ऊतये ) बोलावीत आहों ( हवामहे ); ( २ ) आम्ही दरिद्री (मर्तासः) याचक ( विप्रासः ) धनदात्याची ( विप्रं = देवं = अग्निं ) त्यानें आपल्या धनांतून ( गीर्भिः ) आम्हांस धन द्यावें म्हणून ( अवसे = ऊतये ) याचना करीत आहोंत ( हवामहे ).

## खंड ३३ वा.

**जातवेदसे सुनवाम सोममरातीयतो नि दहाति वेदः । स नः पर्षदति दुर्गाणि विश्वा नावेव सिन्धुं दुरितात्यग्निः ( ऋ० सं० १।९९।१ )**

**जातवेदसे इति । जातम् इदं सर्वं सचराचरं स्थित्युत्पत्तिप्रलयन्यायेनाच्छाय सुनवाम सोमम् इति प्रसवेन अभिषवाय सोमं राजानम् अमृतम् अरातीयतः यज्ञार्थम् इति स्मः निश्चयेन निदहाति दहति भस्मीकरोति सोमः ददत् इत्यर्थः । स नः पर्षदति दुर्गाणि दुर्गमनानि स्थानानि नावेव सिन्धुं यथा कश्चित् कर्णधारः नावेव सिन्धोः स्यन्दनात् नदीं जलदुर्गां महाकूलां तारयति दुरितात्यग्निः इति दुरितानि तारयति । तस्य एषा अपरा भवति**

महाराष्ट्रपाठ निश्चयेन बद्दल निश्चये व स्यन्दनात् बद्दल स्यन्दनां आहे; स्यन्दनां नदीं = वाहणाऱ्या नदीला. गुर्जरपाठांत न्यायेनाच्छाय ह्याबद्दल न्यायेन जातवेदस्या ( अथवा जातवेदस्यां ) इदं जातवेदसेर्चाय, प्रसवेन बद्दल प्रसवाय, यज्ञार्थम् इति स्मः निश्चयेन निदहाति दहति ह्याबद्दल यज्ञार्थमनिस्मो निदहाति निश्चयेन दहति, दुर्गमनानि ह्याबद्दल विश्वानि दुर्गमानि, नावेव सिन्धुं यथा ह्याबद्दल सिन्धुं नावा सिन्धुं यथा यः व नावेव सिन्धोः स्यन्दनात् बद्दल नावा सिन्धुः ( अथवा सिन्धोः) स्यन्दमानानां असें आहे. ७।१९ व ७।२० ह्यांच्यामध्यें गुर्जरपाठांत प्रस्तुत ऋचा दिली आहे; तेथील तिच्यावरील भाष्य पुढीलप्रमाणें:—जातवेदसे इति जातवेदस्यां वैवं जातवेदसे अर्चाय सुनवाम सोममिति प्रसवाय अभिषवाय सोमं राजानममृतमरातीयतो यज्ञार्थमनिस्मो निदहाति निश्चयेन दहति

भस्मीकरोति। सोमो ददिदित्यर्थः। स नः पर्षदति दुर्गाणि विश्वानि दुर्गमानि स्थानानि नावेव सिन्धुं नावा सिन्धुं सिन्धुं नावा नदीं जलदुर्गां महाकूलां तारयति दुरितात्यग्निः इति दुरितानि तारयति तस्यैषापरा भवति. हें भाष्य प्रस्तुत भाष्याहून कांहीं थोड्या ठिकाणीं भिन्न आहे. जातवेदाः = जातमिदं सर्वं सचराचरं स्थित्युत्पत्तिप्रलयन्यायेना-च्छाय; अच्छाय किंवा आच्छाय ह्याचा अर्थ कळत नाहीं; ह्या विवरणाच्या शेवटीं यः वेत्ति सः असे शब्द पाहिजेत; उत्पत्ति, स्थिति व प्रलय ह्या अवस्थांतून जाणारें हें सर्व चराचर जगत् जो जाणतो तो जातवेदस्. प्रसवेन अभिषवाय सोमं राजानं अमृतं ह्या वाक्यांत क्रियापद नाहीं; सुनवाम हें क्रियापद घेतल्यास अमृत जो सोम राजा त्याचा देवांना देण्याकरितां (अभिषवाय?) प्रवाहानें रस काढूं असा अर्थ होईल. यज्ञार्थम् इति स्मः हे शब्द सुनवाम सोमं ह्याच्याशीं जोडावयाचे असतील; यज्ञा-करितां म्हणजे हवि देण्यासाठीं आम्ही सोमरस काढूं; पण स्मः हें क्रियापद कोणत्या शब्दांना जोडावयाचें? निदहाति = निश्चयेन दहति भस्मीकरोति = शत्रूंना (अराती-यतः) पार जाळून टाकतो म्हणजे भस्म करतो. सोमः ददत् इत्यर्थः हा वेदः ह्याचा अर्थ कीं काय? दुर्गाणि = दुर्गमनानि स्थानानि. नावेव सिन्धुं - यथा कश्चित् कर्ण-धारः नावेव सिन्धोः स्यन्दनात् नदीं जलदुर्गां महाकूलां तारयति = जसा एकादा सुकाणूवाला तुडुंब भरलेल्या, जिचे तीर एकमेकांपासून अती दूर आहेत अशा (महा-कूलां) व जी ओघामुळें तरून जाण्याला कठीण अशा नदींतून मनुष्यांना पैलतीराला नेतो; सिन्धोः स्यन्दनात् एथें सिन्धोः बद्दल सिन्धुः पाहिजे (पान ६९३). सिन्धुं= नदीं. महाकूला शब्द पान ६९३ एथें दिला आहे. दुरितात्यग्निः = दुरिता + अति + अग्निः; दुरिता = दुरितानि; तारयति अध्याहृत.

तैत्तिरीयारण्यक १०।१ वरील सायणभाष्य :— वेदांसि वेदमानि ज्ञानानि तानि जातानि उत्पन्नानि यस्मादग्नेः सोऽयं जातवेदाः = ज्ञानें ज्यापासून उत्पन्न झालीं आहेत असा अग्नि; आधानेन संस्कृते अग्नौ पश्चात् तदातदा कर्तव्यविषयाणि ज्ञानानि उत्पद्यन्ते = अग्न्याधान केल्यावर तत्संबंधानें जीं कर्में त्या त्या वेळीं करावयाचीं असतात त्यांचें ज्ञान मागून उत्पन्न होतें; त्या अग्नीला देण्या-करितां यज्ञसमयीं लतारूप जो सोम त्याचा रस आम्ही काढूं; स्वयं सर्वं वेत्ति इति वेदः अग्निः = अग्नि स्वतः होऊन सर्व जाणतो म्हणून तो वेद; तो अग्नि (वेदः) आम-च्याशीं जे शत्रुत्व करतात त्यांना जाळतो म्हणजे त्यांचें भस्म करून टाकतो (दहति= भस्मीकरोति); त्या अग्नीनें आमच्या सर्व आपदा (दुर्गाणि = आपदः) पार नाहींशा करून टाकल्या आहेत (अति पर्षत् = अतिशयेन नाशितवान्); जसा नावाडी लोकांना नावेंतून समुद्रपार तरून नेतो त्याप्रमाणें अग्नि सर्व पापांतून लोकांना तारतो.

सायण (ऋग्वेदभाष्य):— जातवेदसे = सर्व उत्पन्न झालेल्या वस्तूंना (जातानाम् उत्पत्तिमतां सर्वेषां) जाणणाऱ्याला (वेदित्रे); किंवा जो सर्व प्राण्यांकडून जाणला जातो अशाला; किंवा ज्याच्याजवळ धन आहे अशाला; किंवा ज्याला प्रज्ञा

आहे अशाला; अशा अग्नीला देण्याकरितां सोमलतेचा रस आम्ही काढूं; तो अग्नि जो आम-च्याशीं शत्रुत्व करतो अशाचें (अरातीयतः = अरातिम् इवं अस्मान् आचरतः शत्रोः) धन ( वेदः ) अगदीं ( नि ) जाळून टाकतो ( दहाति ) म्हणजे जाळून टाको; जसा कोणी सुकाणूवाला मगर वगैरेंनीं भरलेल्या नदीच्या पार लोकांना नावेंत बस-वून नेतो त्याप्रमाणें सर्व असह्य दुःखांतून ( दुरिता ) तो आम्हांस पार नेवो ( पर्षत् = पारयतु ) म्हणजे दुःखमुक्त करो.

अरातीयतः निदहाति वेदः एथें दहाति याचा जाळतो म्हणजे जाळो असा सायणाचार्य अर्थ करतात; पण शत्रूचें धन जाळण्यानें कोणता लाभ? शत्रूचें धन देतो असें म्हणणें योग्य दिसतें. दह् ह्याचा जाळणें हा अर्थ बहुतेक ठिकाणीं आहे; पण शिक्षा स्तोतृभ्यो माति धक् ह्याचा स्तोत्यांना धन दे, त्यांना वगळून (अति) दुसऱ्यांना धन देऊं नको असा अर्थ आहे; मातिधक् = मा अस्मान् अतिहाय दाः (पान २२); एथें दहेः दानार्थस्य ( २।११।२१ ) असा सायणाचार्य अर्थ करतात. मा परि वर्क्तमुत माति धक्तम् (१।१८३।४) = हे अश्विनांनो, आम्हांला वगळूं नका; आम्हांला टाकून दुसऱ्याला देऊं नका; मा अति धक्तं = अस्मान् अतिक्रम्य अन्यस्मै मा दत्तं (सायण). दहाति = ददाति असाच अर्थ एथें आहे; कदाचित् ऋचेंत ददाति असाच मूळचा शब्द असेल. अग्नि आम्हांला शत्रूचें धन देतो त्यामुळें बिकट दारिद्र्यांतून तो आम्हांस पार पाडतो; बिकट दारिद्र्य ही एक अफाट नदीच; ती तरून जाण्याला धन हीच नौका. जातवेदसे हा शब्द सार्थ आहे कारण अग्नि हा धनवान् असल्यामुळें तो आपल्या भक्तांची धन देवून दारिद्र्यापासून मुक्तता करतो; म्हणून त्याला सोमहवि आम्ही दिलाच पाहिजे असें ऋषि म्हणतो. भाष्याच्या शेवटीं तस्य एषा अपरा भवति असे शब्द आहेत; पण पुढील खंडांतील ऋचेची जातवेदस् म्हणजे अग्नि ही देवता नाहीं; त्या ऋचेची देवता कोणतीतरी नदी होय. हे शब्द ७।१९ व ७।२० ह्यांमध्यें गुर्जरप्रतींत असलेल्या अधिक खंडांत योग्य होत; पण ते वर दिलेल्या कारणामुळें एथें गाळले पाहिजेत.

## खंड ३४ वा.

**इदं तेऽन्याभिरसमानमद्भिर्याः काश्च सिन्धं प्रवहन्ति नद्यः। सर्पो जीर्णामिव त्वचं जहाति पापं सशिरस्कोऽभ्युपेत्य**

**इदं ते अन्याभिः असमानाभिः याः काश्च सिन्धुं पतिं कृत्वा नद्यः वहन्ति। सर्पः जीर्णामिव सर्पः त्वचं त्यजति पापं त्यजन्ति। आपः आप्नोतेः। तासाम् एषा भवति**

असमानम् अद्भिः = असमानाभिः; पण असमानम् आद्भिः बद्दल असमानाभिः हें चुकीनें लिहिलें गेलें हें स्पष्ट आहे; हे नदि इदं तव कर्म अन्याभिः अद्भिः नदीभिः असमानं = हे नदी, पापमुक्त करण्याचें तुझें हें काम इतर नद्यांच्या कामाहून भिन्न आहे ( कारण त्या नद्या स्नान करणाऱ्यांना पापमुक्त करीत नाहींत ). ह्या सर्व नद्या

( याः काश्च ) समुद्राला ( सिन्धुं ) नवरा करून ( पतिं कृत्वा ) त्याच्याकडे जोरानें वाहत जातात; त्या पापमुक्त करण्याचें काम करीत नसून संभोगकर्म करीत असतात. सर्पः जीर्णामिव सर्पः एथें एक सर्पः शब्द गाळला पाहिजे. जहाति = त्यजति. जसा साप जीर्ण झालेली कात टाकून देतो त्याप्रमाणें तुझ्या पाण्यांत डोक्यावरून स्नान करणारा ( सशिरस्कः ) पाप टाकून देतो; त्यजन्ति ह्याच्याबद्दल त्यजति पाहिजे. सशिरस्कः अभ्युपेत्य = शिरसा सह नदीं अभि उपेत्य = डोक्यासह नदीमध्यें जाऊन म्हणजे नदींत डोक्यावरून स्नान करून. ही नदी कदाचित् गंगा असेल; गंगेच्या पाण्यांत जो डोक्यावरून स्नान करतो त्याचीं सर्व पापें नष्ट होतात. आपः आप्नोतेः। तासाम् एषा भवति हे शब्द खंड ९।२६ ह्याच्या शेवटीं असून (पान ६९३) तेथें ते प्रस्तुत होत; कारण पुढील खंडांत ( ९।२७ ) आपो हि ष्ठा ही ऋचा दिली आहे ( पान ६९४ ); ती किंवा तशी ऋचा पुढील म्हणजे ३५ व्या खंडांत नाहीं; म्हणून हे शब्द गाळले पाहिजेत. ही ऋचा खिलप्रकरणांतही सांपडत नाहीं.

## खंड ३५ वा.

[ गुर्जरप्रतींत हा खंड ३३ च्या आधीं आहे ]

**त्र्यम्बकं यजामहे सुगन्धिं पुष्टिवर्धनम्। उर्वारुकमिव बन्धनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ( ऋ० सं० ७।५९।१२ )**

**त्र्यम्बकः रुद्रः। तं त्र्यम्बकं यजामहे सुगन्धिम्। सुगन्धि सुष्ठुगंधिम्। पुष्टिवर्धनं पुष्टिकारकम् इव उर्वारुकम् इव फलं बन्धनात् आरोधनात् मृत्योः सकाशात् मुञ्चस्व माम्। कस्मात् इति। एषामितरेषापरा भवति**

त्र्यम्बकः = रुद्रः. सुगन्धि = सुष्ठुगंधिम्. पुष्टिवर्धनं = पुष्टिकारकम्; पुष्टिकारकं ह्यानंतरचा इव नको आहे. उर्वारुकम् इव फलं = काकडीच्या फळासारखें. बन्धनात् = आरोधनात् = फळ पडण्याला जें विरोध करतें अशा बंधनापासून म्हणजे देठापासून. मृत्योः मुक्षीय=मृत्योः सकाशात् मुञ्चस्व माम्. कस्मादिति हे शब्द मृत्योः सकाशात् ह्याच्या आधीं पाहिजेत; कशापासून सोडीव? मृत्यूपासून. एषामितरेषा ह्यांतील मितरेषा हीं अक्षरें गाळलीं पाहिजेत कारण एषा अपरा भवति असें वाक्य आहे; रोथच्या निरुक्तप्रतींत मितरेषा नाहीं व त्या अक्षरांचा कांहीं अर्थही होत नाहीं. एषा अपरा भवति = अमृतत्वासंबंधानें पुढील आणखी एक ऋचा होय. प्रस्तुत ऋचा तैत्तिरीय संहितेंत ( १।८।६।२ ) असून तिच्यावर पुढील भाष्य आहे; शोभनः शरीरगंधः पुण्यगंधः वा यस्य असौ सुगंधिः = ज्याच्या शरीराचा गंध उत्तम आहे असा; फुलांनीं भरलेल्या वृक्षाचा गंध दुरून वहात येतो त्याप्रमाणें पुण्यकर्माचाही गंध वहात येतो अशी श्रुति आहे ( तैत्ति० आ० १०।९ ); पुष्टिं शरीरधनादिविषयां वर्धयतीति पुष्टिवर्धनः = शरीर धन वगैरेची वृद्धि करणारा; अशा त्र्यंबकाची आम्ही पूजा करतों; जशीं काकडीचीं फळें देठांपासून आपोआप सुटतात त्याप्रमाणें त्र्यंब-

काच्या प्रसादानें मृत्यूपासून सुटण्याची मी इच्छा करतों (मुक्षीय = मोचनयुक्तः भूयासं); मा अमृतात् = अमृतात् चिरजीवितात् स्वर्गादेः वा मा मुक्षीय = (पण) अमरत्वापासून किंवा स्वर्गापासून मीं वेगळा होऊं नये.

महीधर (वाज० सं० ३।६०):— सुगन्धि = दिव्यगन्धोपेतं मर्त्यधर्महीनं = स्वर्गीय सुवासानें युक्त म्हणजे मर्त्यधर्मापासून मुक्त अशाला; पुष्टिवर्धनं = धनधान्य वगैरे वाढविणाऱ्याला; त्र्यम्बकं = तीन नेत्रांच्या रुद्राला; यजामहे = पूजयामः; नंतर रुद्राच्या प्रसादानें अपमृत्यूपासून व संकटरूप मृत्यूपासून मुक्त होण्याची मला आशा आहे; परंतु अमृत म्हणजे स्वर्ग किंवा मुक्ति ह्यांना मात्र मीं मुकूं नये; म्हणजे अभ्युदय व निःश्रेयस ह्या फळांना मीं मुकूं नये; काकडीचें फळ अतीशय पिकल्यामुळें जसें आपोपाप देठापासून सुटतें तसा रुद्राच्या प्रसादानें अपमृत्यु व संसार ह्यांच्यापासून सुटण्याची मी इच्छा करतों.

उर्वारुक हें कोणत्या फळाचें किंवा झाडाचें नांव तें सांगतां येत नाहीं; सुगन्धि व पुष्टिवर्धनं हीं उर्वारुकम् ह्याचीं विशेषणें असावींत; हें फळ पिकल्यावर त्याला घमघमाट वास येत असेल व तें पुष्टिवर्धक असेल; बागवाल्यानें हात लावतांच असें पिकलेलें हें फळ सहज हातांत येत असेल. मुक्षीय = मुञ्चस्व किंवा मोचय असा अर्थ होत नाहीं; कारण मुक्षीय हें आशीर्लिङ्चें रूप आहे; तें प्रथमपुरुषाचें एकवचन असून तृतीयपुरुषीं एकवचनाबद्दल वापरलें असावें असें वाटतें. ऋचेचा पुढीलप्रमाणें अन्वय असावा:— त्र्यम्बकं यजामहे यस्मात् सः मा मां मृत्योः मृतात् मोचयेत्। यथा मालाकारः सुगन्धि पुष्टिवर्धनम् उर्वारुकं बन्धनात् अल्पायासेन मोचयति तथा = आपण त्र्यंबकाला हवि देऊं; कारण जसा माळी अगदीं पिकलेलें, ज्याचा घमघमाट जिकडे तिकडे पसरला आहे व जें खाल्लें असतांना पुष्टि देतें असें उर्वारुकफल प्रयासाशिवाय देठापासून वेगळें करतो तसा त्र्यंबक मला मृत्यूपासून सहजरीत्या मोकळा करील. मा मृतात् ह्याचीं मा + अमृतात् अशीं दोन पदें करतात; पण मा मृतात् अशीं तीं दोन पदें असतील; मा = माम्; मृतात् = मृत्योः. त्र्यंबक हें नांव एथेंच आलें आहे; तें कोणत्या देवाचें नांव तें समजत नाहीं व त्या नांवांतील अंबक ह्याचा अर्थ कळत नसल्यामुळें त्र्यंबक नांवाविषयीं तर्कही करतां येत नाहीं. अम्बा किंवा अम्बका म्हणजे आई असा अर्थ असल्यास तिस्रः अम्बकाः यस्य सः = ज्याला तीन आया आहेत असा अर्थ होईल; पण असा देव कोण? मुक्षीय = मी सुटेन किंवा सुटण्याची इच्छा करतों असा अर्थ आहे; तो अर्थ घेतल्यास उर्वारुकं हें नपुंसकलिंगी होईल; त्यामुळें सुगन्धि हें त्याचें विशेषण होणार नाहीं; म्हणून वर दिलेला अर्थ मीं केला आहे; सुगन्धि व पुष्टिवर्धनं हीं त्र्यम्बकं ह्याचीं विशेषणें केल्यानें त्यांचा अस्वाभाविक अर्थ करावा लागतो.

## खंड ३६ वा.

**शतं जीव शरदो वर्धमानः शतं हेमन्ताञ्छतमु वसन्तान्। शतमिन्द्राग्नी सविता बृहस्पतिः शतायुषा हविषेमं पुनर्दुः ( ऋ० सं० १०।१६१।४ )**

**शतं जीव शरदो वर्धमान इति अपि निगमो भवति। शतमिति। शतं दीर्घम् आयुः। मरुतः एनाः वर्धयन्ति। शतम् एनम् एव शतात्मानं भवति। शतम् अनन्तं भवति। शतम् ऐश्वर्यं भवति। शतमिति। शतं दीर्घम् आयुः**

शतं जीव० इत्यपि निगमो भवति हे शब्द गाळले पाहिजेत; कारण आधींच्या खंडाच्या शेवटीं एषा अपरा भवति हे शब्द आहेत. शतम् इति। शतं दीर्घम् आयुः = ऋचेंतील शतं ह्या शब्दाचा ( इति ) दीर्घायुष्य असा अर्थ आहे; पण हा अर्थ चुकीचा आहे; कारण शतं हें शरदः, हेमन्तान् व वसन्तान् ह्यांचें विशेषण आहे. मरुतः एनाः वर्धयन्ति ह्या शब्दांनीं मरुद्वृधाः ह्याचा विग्रह केला आहे (पान ६९३ ); पण प्रस्तुत ऋचेंत मरुद्वृधाः शब्द नाहीं. शतम् एनम् एव शतात्मानं भवति हें वाक्य अशुद्ध असून त्यानें ऋचेंतील कोणत्याही शब्दाचें विवरण केलें नाहीं; भवति बद्दल करोति असा शब्द घातल्यास क्षयापासून मुक्त झालेल्या ह्याला शरद्, हेमंत व वसंत ह्या प्रत्येकाचा शेकडा शतात्मा म्हणजे शंभर वर्षे जगणारा करतो असा अर्थ होईल. शतं म्हणजे अनंत काल (अनंतं भवति). शतं म्हणजे दीर्घायुष्यरूपी ऐश्वर्य. शतम् इति। शतं दीर्घमायुः हे शब्द भाष्याच्या आरंभीं दिले आहेत; त्यांची पुनरुक्ति करण्याचें कारण दिसत नाहीं. शतं म्हणजे अनंत असा अर्थ केल्यानें ऋचा अमरत्वपर होते; पण तसा अर्थ ऋचेंतून निघत नाहीं.

**सायण:—** क्षयापासून मुक्त झालेल्या हे मनुष्या, दररोज शक्तीनें वाढत वाढत जाऊन शंभर शरदृतूंभर, शंभर हेमंतऋतूंभर व ( उ = च ) शंभर वसंतऋतूंभर जग; जो हवि दिल्यानें शंभर वर्षांचें आयुष्य लाभेल अशा ( शतायुषा ) हवीनें ( हविषा ) तृप्त झालेल्या इंद्र, अग्नि, सविता व बृहस्पति ह्या देवांनीं ह्याला आम्हांला परत दिला आहे; सविता = प्रेरकः देवः = जीवाला प्रेरणा देणारा देव; बृहस्पतिः = देवानां पालयिता देवः = देवांचें पालन करणारा देव. ह्या विवरणांत दुसऱ्या अर्धांतील शतं शब्द किंवा त्याचा अर्थ दिला नाहीं; शतं=शंभर वर्षे जगण्याकरितां ( ह्याला ह्या देवांनीं आमच्या स्वाधीन पुन्हां केलें आहे ).

## खंड ३७ वा.

**मा ते राधांसि मा त ऊतयो वसोऽस्मान् कदा चना दभन्। विश्वा च न उपमिमीहि मानुष वसूनि चर्षणिभ्य आ ( ऋ० सं० १।८४।२० )**

**मा च ते धनानि मा च ते कदा च नः सरिषुः। सर्वाणि प्रज्ञानानि उपमामय मनुष्यहितः। अयम् आदित्यः। अयम् आत्मा**

राधांसि = धनानि; धनानि बद्दल महाराष्ट्रपाठ धामानि आहे. दोन्ही च

अध्याहृत. ऊतिः = धन (पान ३३८ व ११५९). मा च ते कदा च नः सरिषुः एथें ते ह्या शब्दानंतरचा वसूनि शब्द गळला आहे; चना = च नः; पण चना = चन + आ अशीं दोन पदें आहेत. दभन् = सरिषुः; सरिषुः हें सृ धातूचें रूप असावें; पण तें अकार्षुः ह्यांतील कार्षुः प्रमाणें सार्षुः असें पाहिजे; मा च ते कदा नः सरिपुः = आणि तुझें धन आमच्यापासून हलूं नये; कदा च नः एथें च कशाला ? विश्वा = विश्वानि = सर्वाणि. वसूनि = प्रज्ञानानि. उपमिमीहि = उपनामय; सर्वाणि प्रज्ञानानि उपनामय = सर्व प्रज्ञानांना (आमच्याकडे) वाकवावयास लाव म्हणजे सर्व ज्ञान आम्हांस दे. उपनामय ह्याबद्दल महाराष्ट्रपाठ उपमानाय आहे. मानुष = मनुष्यहितः; मानुष संबोधन असल्याकारणानें मनुष्यहित असें संबोधन पाहिजे. अयम् आदित्यः अयम् आत्मा ह्या शब्दांवरून ऋचेचे आदित्यपर व आत्मपर असे दोन अर्थ होतात असें म्हणावयाचें आहे; पण तसे अर्थ दिले नाहींत.

सायणः—वसो = निवासयितर् = निवासस्थान देणाऱ्या; राधांसि = भूतानि; राध संसिद्धौ (धा० ५।१६); इंद्र पंच महाभूतांकडून आपलीं कामें सिद्ध करून घेतो (राध्नोति) म्हणून पंच महाभूतांना राधांसि म्हटलें आहे; मा दभन् = मा विनाशयन्तु; ऊतयः = गन्तारः; किंवा ऊतयः = धूतयः = कम्पयितारः; मरुत् सदासर्वदा जात असतात म्हणजे वहात असतात; ते कधीं थांबत नाहींत; किंवा ते आपल्या गतीनें वृक्ष वगैरेंना कांपावयास लावतात; धूतयः ह्यांतील ध् लुप्त होऊन ऊतयः राहतें; चर्षणिभ्यः = मन्त्रद्रष्टृभ्यः; आ = आहृत्य; उपमिमीहि = सर्वतः आहृत्य अस्मत् समीपे कुरु; आम्हांस निवासस्थान देणाऱ्या हे इंद्रा, तुझ्या ताब्यांत असलेलीं पंच महाभूतें व तुझे अनुयायी मरुत् आमचा नाश कदापि न करोत; हे मनुष्यांचे हित करणाऱ्या (मानुष) इंद्रा, सर्व ठिकाणचें धन आणून तें आम्ही जे मंत्रद्रष्टे त्या आमच्या समीप ठेव.

आ + दभ् = वगळणें, टाळणें; मा त्वा दभन् यातुधाना नृचक्षः (१०।८७।९) = ज्याचे डोळे शूराच्या डोळ्यांसारखें तीक्ष्ण आहेत म्हणजे ज्याला बारीक सारीक दूरचीहि वस्तु दिसते (नृचक्षः) अशा हे अग्नि, चेटकें (यातुधानाः) तुला कदापि न टाळोत, तुझी नजर कदापि न चुकवोत. प्रस्तुत ऋचेंत हाच अर्थ असावा; हे धनवंता (वसो), तुझें धन (राधांसि = ऊतयः) आम्हांस केव्हांहि (कदाचन) न (मा) वगळो (आ दभन्); मनूच्या वंशजांचें हित करणाऱ्या हे अग्नि (मानुष), पंचजनांना (चर्षणिभ्यः आ) म्हणजे आम्हांला अतिशय (विश्वानि) धन (वसूनि) दे (उपमिमीहि).

**अथ एतत् अनुप्रवदति। अथ एतं महान्तम् आत्मानम् एषर्गणः प्रवदति वैश्वकर्मणे। देवानां नु वयं जाना (ऋ० सं० १०।७२।१) नासदासीन्नो सदासीत्तदानीम् (ऋ० सं० १०।१२९।१) इति च। सा एषा आत्मजिज्ञासा। सा एषा सर्वभूतजिज्ञासा। ब्रह्मणः सार्ष्टिं सरूपतां सलोकतां गमयति यः एवं वेद। नमो ब्रह्मणे।**

नमो महते भूताय। नमः पारस्कराय। नमः यास्काय। ब्रह्म शुक्रमसीय। ब्रह्म शुक्रमसीय

अथ एतत्० प्रवदति हे शब्द पहिल्या खंडांत (पान १०८३) आले आहेत व तेथें ते प्रस्तुत होत; कारण पहिल्या खंडापासून प्रस्तुत खंडापर्यंत ज्या ऋचा दिल्या आहेत त्या आत्मपर आहेत; अशा ऋचांचा अथ यानें प्रारंभ केला आहे; तेव्हां अथ बद्दल एथें इति पाहिजे; ह्याप्रमाणें (इति) हा ऋक्समूह महान् आत्म्याविषयीं बोलतो असें म्हणावयाचें आहे. वैश्वकर्मणे हा शब्द कशाचें विशेषण व तो कोणत्या वाक्याशीं जोडावयाचा ? वैश्वकर्मणे सूक्ते असें म्हटल्यास ह्या अध्यायांतील १० व्या खंडांतील (पान ११०८) ऋचा वगळून बाकीच्या सर्व निरनिराळ्या सूक्तांतल्या आहेत; शिवाय विश्वकर्म्यासंबंधाचीं दोन सूक्तें (१०।८१ व १०।८२) आहेत; तेव्हां वैश्वकर्मणयोः सूक्तयोः असे शब्द पाहिजेत. विश्वकर्म्यासंबंधाच्या दोन सूक्तांतला हा ऋक्समूह महान् आत्म्याविषयीं बोलतो असें म्हणावयाचें असल्यास वैश्वकर्मणे सूक्ते ऋग्गणः महान्तमात्मानं प्रवदति असें वाक्य होईल. त्याप्रमाणें पुढील दोन ऋचाही महानात्म्याविषयीं बोलतात; देवानां नु वयं जाना प्र वोचाम विपन्यया व नासदासीन्नो सदासीत्तदानीं अशा त्या दोन ऋचा होत; जाना = जानानि = जन्मानि; १०।७२ ह्या सूक्तांत देवांच्या जन्मांची कथा सांगितली आहे व १०।१२९ ह्या सूक्तांत देवतागूढतत्त्वाची चिकित्सा केली आहे. सा एषा आत्मजिज्ञासा = ह्या सर्व ऋचांत आत्मा काय आहे हें जाणण्याची इच्छा स्पष्ट आहे. सर्वभूतजिज्ञासा = सर्व भूतें म्हणजे जगांत जें जें कांहीं आहे तें कोठून आलें हें जाणण्याची इच्छा. हें सर्व जो जाणतो (यः एवं वेद) तो ब्रह्माच्या (ब्रह्मणः) स्थितीप्रत पोचतो. रिष् = पीडा करणें; रिष्ट = पीडा; अरिष्टं = पीडेचा अभाव. अरिष्टं कोशं प्रपद्ये (छांदो० उप० ३।१५।३) = मी अरिष्ट कोशाप्रत जातों म्हणजे जींत कोणत्याही प्रकारची पीडा नाहीं अशा स्थितीला पोचतों; सारिष्टं = समानम् अरिष्टं = ब्रह्मासारख्या अरिष्ट स्थितीला. सरूपतां = समानरूपतां = ब्रह्मरूपतां = ब्रह्मरूपाप्रत. सलोकतां = समानलोकतां = ब्रह्मलोकाला. स य एवमेतद्राजानं देवतासु प्रोतं वेद एतासामेव देवतानां सलोकतां सार्ष्टितां सायुज्यं गच्छति सर्वमायुरेति ज्योक् जीवति (छांदो० उप० २।२०।२); सार्ष्टितां = समानर्द्धित्वं = समान ऋद्धीप्रत; सार्ष्टितां = स + अर्ष्टितां कीं स + आर्ष्टिताम् ? अर्ष्टिता किंवा आर्ष्टिता ह्यांचा अर्थ काय ? मूळ शब्द अरिष्टतां तर नसेल ? भाष्यांतील गमयति = (त्यानें मिळविलेलें ज्ञान त्याला ब्रह्मस्थितीप्रत) जाववितें म्हणजे नेतें; गमयति ह्याचें कर्म तं (अध्याहृत). महते भूताय = ब्रह्मणे; नमो महते भूताय = महद्भूत जें ब्रह्म त्याला नमस्कार असो. प्रस्तुत अध्याय पारस्करानें रचला असावा; पण ह्या पारस्कराविषयीं कांहीं माहिती नाहीं; गृह्यसूत्रें व एक स्मृति पारस्करानें रचिली असें चित्रावशास्त्रांच्या भारतवर्षीय प्राचीन कोशांत म्हटलें आहे. पारस्करप्रभृतीनि च संज्ञायाम् (पा० ६।१।१५७)

ह्या गणांत पारस्कर हें एका देशाचें नांव आहे. नमो यास्काय = यास्कानें निरुक्त रचलें व तसें करून वेदाचा अर्थ सुगम केला म्हणून त्याला नमस्कार; पारस्करानें निरुक्ताला आत्मज्ञानाची जोड दिली म्हणून त्यालाहि नमस्कार. असीय = भवेयम्; असीय बद्दल सीय पाहिजे; असीय असें रूप वैदिक व्याकरणानें होईल व तें गांभीर्याकरितां किंवा आत्मज्ञान अगदीं पुरातन किंवा अनादि आहे हें दर्शविण्याकरितां घातलें असेल; शुक्लं = शुद्धम्; ब्रह्म नित्य, शुद्ध व मुक्त आहे; शुद्ध ब्रह्म होण्याची मला अत्युत्कट इच्छा आहे ( असीय ). कदाचित् ब्रह्म शुक्लमसीय हें एखाद्या अनुपलब्ध-उपनिषदांतील वाक्य असेल. ब्रह्म शुक्लमसीय ह्याची पुनरुक्ति अध्याय संपला हें दाखविण्याकरितां.

# निघण्टुः

## प्रथमोऽध्यायः

गौः १। ग्मा २। ज्मा ३। क्ष्मा ४। क्षा ५। क्षमा ६। क्षोणिः ७। क्षितिः ८। अवनिः ९। उर्वी १०। पृथ्वी ११। मही १२। रिपः १३। अदितिः १४। इळा १५। निर्ऋतिः १६। भूः १७। भूमिः १८। पूषा १९। गातुः २०। गोत्रा २१ इति एकविंशतिः पृथिवीनामधेयानि ॥ १ ॥

हेम १। चन्द्रम् २। रुक्मम् ३। अयः ४। हिरण्यम् ५। पेशः ६। कृशनम् ७। लोहम् ८। कनकम् ९। काञ्चनम् १०। भर्म ११। अमृतम् १२। मरुत् १३। दत्रम् १४। जातरूपम् १५ इति पञ्चदश हिरण्यनामानि ॥ २ ॥

अम्बरम् १। वियत् २। व्योम ३। बर्हिः ४। धन्व ५। अन्तरिक्षम् ६। आकाशम् ७। आपः ८। पृथिवी ९। भूः १०। स्वयम्भूः ११। अध्वा १२। पुष्करम् १३। सगरः १४। समुद्रः १५। अध्वरम् १६ इति षोडश अन्तरिक्षनामानि ॥ ३ ॥

स्वः १। पृश्निः २। नाकः ३। गौः ४। विष्टप् ५। नभः ६ इति षट् साधारणानि ॥ ४ ॥

खेदयः १। किरणाः २। गावः ३। रश्मयः ४। अभीशवः ५। दीधितयः ६। गभस्तयः ७। वनम् ८। उस्राः ९। वसवः १०। मरीचिपाः ११। मयूखाः १२। सप्त ऋषयः १३। साध्याः १४। सुपर्णाः १५ इति पञ्चदश रश्मिनामानि ॥ ५ ॥

आताः १। आशाः २। उपराः ३। आष्ठाः ४। काष्ठाः ५। व्योम ६। ककुभः ७। हरितः ८ इति अष्टौ दिङ्नामानि ॥ ६ ॥

श्यावी १। क्षपा २। शर्वरी ३। अक्तुः ४। ऊर्म्या ५। राम्या ६। यम्या ७। नम्या ८। दोषा ९। नक्ता १०। तमः ११। रजः १२। असिक्नी १३। पयस्वती १४। तमस्वती १५। घृताची १६। शिरिणा १७। मोकी १८। शोकी १९। ऊधः २०। पयः २१। हिमा २२। वस्वी २३ इति त्रयोविंशतिः रात्रिनामानि ॥ ७ ॥

विभावरी १। सूनरी २। भास्वती ३। ओदती ४। चित्रामघा ५। अर्जुनी ६। वाजिनी ७। वाजिनीवती ८। सुम्नावरी ९। अहना १०। द्योतना ११। श्वेत्या १२। अरुषी १३। सूनृता १४। सूनृतावती १५। सूनृतावरी १६ इति षोडश उषोनामानि ॥ ८ ॥

वस्तोः १। द्युः २। भानुः ३। वासरम् ४। स्वसराणि ५। घ्रंसः ६। घर्मः ७। घृणः ८। दिनम् ९। दिवा १०। दिवेदिवे ११। द्यविद्यवि १२ इति द्वादश अहर्नामानि ॥ ९ ॥

अद्रिः १। ग्रावा २। गोत्रः ३। वलः ४। अश्नः ५। पुरुभोजाः ६। वलिशानः ७। अश्मा ८। पर्वतः ९। गिरिः १०। व्रजः ११। चरुः १२। वराहः १३। शम्बरः १४। रौहिणः १५। रैवतः १६। फलिगः १७। उपरः १८। उपलः १९। चमसः २०।

अहिः २१। अभ्रम् २२। वलाहकः २३। मेघः २४। दृतिः २५। ओदनः २६। वृषन्धिः २७। वृत्रः २८। असुरः २९। कोशः ३० इति त्रिंशत् मेघनामानि॥ १०॥

श्लोकः १। धारा २। इळा ३। गौः ४। गौरी ५। गान्धर्वी ६। गभीरा ७। गम्भीरा ८। मन्द्रा ९। मन्द्राजनी १०। वाशी ११। वाणी १२। वाणीची १३। वाणः १४। पविः १५। भारती १६। धमनिः १७। नाळीः १८। मेना १९। मेळिः २०। सूर्या २१। सरस्वती २२। निवित् २३। स्वाहा २४। वग्नुः २५। उपब्दिः २६। मायुः २७। काकुत् २८। जिह्वा २९। घोषः ३०। स्वरः ३१। शब्दः ३२। स्वनः ३३। ऋक् ३४। होत्रा ३५। गीः ३६। गाथा ३७। गणः ३८। धेना ३९। ग्नाः ४०। विपा ४१। नना ४२। कशा ४३। धिषणा ४४। नौः ४५। अक्षरम् ४६। मही ४७। अदितिः ४८। शची ४९। वाक् ५०। अनुष्टुप् ५१। धेनुः ५२। वल्गुः ५३। गल्दा ५४। सरः ५५। सुपर्णी ५६। बेकुरा ५७ इति सप्तपञ्चाशत् वाङ्नामानि॥ ११॥

अर्णः १। क्षोदः २। क्षद्म ३। नभः ४। अम्भः ५। कबन्धम् ६। सलिलम् ७। वाः ८। वनम् ९। घृतम् १०। मधु ११। पुरीषम् १२। पिप्पलम् १३। क्षीरम् १४। विषम् १५। रेतः १६। कशः १७। जन्म १८। बृबूकम् १९। बुसम् २०। तुग्र्या २१। बुर्बुरम् २२। सुक्षेम २३। धरुणम् २४। सिरा २५। अररिन्दानि २६। ध्वस्मन्वत् २७। जामि २८। आयुधानि २९। क्षपः ३०। अहिः ३१। अक्षरम् ३२। स्रोतः ३३। तृप्तिः ३४। रसः ३५। उदकम् ३६। पयः ३७। सरः ३८। भेषजम् ३९। सहः ४०। शवः ४१। यहः ४२। ओजः ४३। सुखम् ४४। क्षत्रम् ४५। आवयाः ४६। शुभम् ४७। यादुः ४८। भूतम् ४९। भुवनम् ५०। भविष्यत् ५१। महत् ५२। आपः ५३। व्योम ५४। यशः ५५। महः ५६। स्वर्णीकम् ५७। स्वृतीकम् ५८। सतीनम् ५९। गहनम् ६०। गभीरम् ६१। गम्भरम् ६२। ईम् ६३। अन्नम् ६४। हविः ६५। सद्म ६६। सदनम् ६७। ऋतम् ६८। योनिः ६९। ऋतस्य योनिः ७०। सत्यम् ७१। नीरम् ७२। रयिः ७३। सत् ७४। पूर्णम् ७५। सर्वम् ७६। अक्षितम् ७७। बर्हिः ७८। नाम ७९। सर्पिः ८०। अपः ८१। पवित्रम् ८२। अमृतम् ८३। इन्दुः ८४। हेम ८५। स्वः ८६। सर्गाः ८७। शम्बरम् ८८। अभ्वम् ८९। वपुः ९०। अम्बु ९१। तोयम् ९२। तूयम् ९३। कृपीटम् ९४। शुक्रम् ९५। तेजः ९६। स्वधा ९७। वारि ९८। जलम् ९९। जलाषम् १००। इदम् १०१ इति एकशतम् उदकनामानि॥ १२॥

अवनयः १। यह्व्यः २। खाः ३। सीराः ४। स्रोत्याः ५। एन्यः ६। धुनयः ७। रुजानाः ८। वक्षणाः ९। खादोअर्णाः १०। रोधचक्राः ११। हरितः १२। सरितः १३। अग्रुवः १४। नभन्वः १५। वध्वः १६। हिरण्यवर्णाः १७। रोहितः १८। सस्रुतः १९। अर्णाः २०। सिन्धवः २१। कुल्याः २२। वर्यः २३। उर्व्यः २४। इरावत्यः २५। पार्वत्यः २६। स्रवन्त्यः २७। ऊर्जस्वत्यः २८। पयस्वत्यः २९। सरस्वत्यः ३०। तरस्वत्यः ३१। हरस्वत्यः ३२। रोधस्वत्यः ३३। भास्वत्यः ३४। अजिराः ३५। मातरः ३६। नद्यः ३७ इति सप्तत्रिंशत् नदीनामानि॥ १३॥

अत्यः १। हयः २। अर्वा ३। वाजी ४। सप्तिः ५। वह्निः ६। दधिक्राः ७। दधिक्रावा ८। एतग्वः ९। एतशः १०। पैद्वः ११। दौर्गहः १२। औच्चैःश्रवसः १३।

तार्क्ष्यः १४ । आशुः १५ । ब्रध्नः १६ । अरुषः १७ । मांश्चत्वः १८ । अव्यथयः १९ । श्येनासः २० । सुपर्णाः २१ । पतङ्गाः २२ । नरः २३ । ह्वार्याणाम् २४ । हंसासः २५ । अश्वाः २६ इति षड्विंशतिः अश्वनामानि ॥ १४ ॥

हरी इन्द्रस्य १ । रोहितः अग्नेः २ । हरितः आदित्यस्य ३ । रासभौ अश्विनोः ४ । अजाः पूष्णः ५ । पृषत्यः मरुताम् ६ । अरुण्यः गावः उषसः ७ । श्यावाः सवितुः ८ । विश्वरूपा बृहस्पतेः ९ । नियुतः वायोः १० इति दश आदिष्टोपयोजनानि ॥ १५ ॥

भ्राजते १ । भ्राशते २ । भ्राश्यति ३ । दीदयति ४ । शोचति ५ । मन्दते ६ । भन्दते ७ । रोचते ८ । द्योतते ९ । ज्योतते १० । द्युमत् ११ इति एकादश ज्वलतिकर्माणः ॥ १६ ॥

जमत् १ । कल्मलीकिनम् २ । जञ्जणाभवन् ३ । मल्मलाभवन् ४ । अर्चिः ५ । शोचिः ६ । तपः ७ । तेजः ८ । हरः ९ । घृणिः १० । शृङ्गाणि शृङ्गाणि ११ इति एकादश ज्वलतो नामधेयानि ॥ १७ ॥

## द्वितियोऽध्यायः

अपः १ । अप्नः २ । दंसः ३ । वेषः ४ । वेपः ५ । विष्ट्वी ६ । व्रतम् ७ । कर्वरम् ८ । शकम ९ । क्रतुः १० । करणम् ११ । करणानि १२ । करांसि १३ । करन्ती १४ । करिक्रत् १५ । चक्रत् १६ । कर्त्वम् १७ । कर्तोः १८ । कर्तवै १९ । कृत्वी २० । धीः २१ । शची २२ । शमी २३ । शिमी २४ । शक्तिः २५ । शिल्पम् २६ इति षड्विंशतिः कर्मनामानि ॥ १ ॥

तुक् १ । तोकम् २ । तनयः ३ । तोक्म ४ । तक्म ५ । शेषः ६ । अप्नः ७ । गयः ८ । जाः ९ । अपत्यम् १० । यहुः ११ । सूनुः १२ । नपात् १३ । प्रजा १४ । बीजम् १५ इति पञ्चदश अपत्यनामानि ॥ २ ॥

मनुष्याः १ । नरः २ । धवाः ३ । जन्तवः ४ । विशः ५ । क्षितयः ६ । कृष्टयः ७ । चर्षणयः ८ । नहुषः ९ । हरयः १० । मर्याः ११ । मर्त्याः १२ । मर्ताः १३ । व्राताः १४ । तुर्वशाः १५ । द्रुह्यवः १६ । आयवः १७ । यदवः १८ । अनवः १९ । पूरवः २० । जगतः २१ । तस्थुषः २२ । पञ्चजनाः २३ । विवस्वन्तः २४ । पृतनाः २५ इति पञ्चविंशतिः मनुष्यनामानि ॥ ३ ॥

आयती १ । च्यवाना २ । अभीशू ३ । अप्नवाना ४ । विनङ्गृसौ ५ । गभस्ती ६ । करस्नौ ७ । बाहू ८ । भुरिजौ ९ । क्षिपस्ती १० । शक्वरी ११ । भरित्रे १२ इति द्वादश बाहुनामानि ॥ ४ ॥

अग्रुवः १ । अण्व्यः २ । विशः ३ । क्षिपः ४ । शर्याः ५ । रशनाः ६ । धीतयः ७ । अथर्यः ८ । विपः ९ । कक्ष्याः १० । अवनयः ११ । हरितः १२ । स्वसारः १३ । जामयः १४ । सनाभयः १५ । योक्त्राणि १६ । योजनानि १७ । धुरः १८ । शाखाः १९ । अभीशवः २० । दीधितयः २१ । गभस्तयः २२ इति द्वाविंशतिः अङ्गुलिनामानि ॥ ५ ॥

वश्मि १ । उश्मसि २ । वेति ३ । वेनति ४ । वेसति ५ । वाञ्छति ६ । वष्टि ७ । वनोति ८ । जुषते ९ । हर्यति १० । आचके ११ । उशिक् १२ । मन्यते १३ ।

छन्त्सत् १४। चाकनत् १५। चकमानः १६। कनति १७। कानिषत् १८ इति अष्टादश कान्तिकर्माणः ॥ ६ ॥

अन्धः १। वाजः २। पयः ३। प्रयः अथवा श्रवः ४। पृक्षः ५। पितुः ६। वयः ७। सिनम् ८। अवः ९। क्षु १०। धासिः ११। इरा १२। इळा १३। इषम् १४। ऊर्क् १५। रसः १६। स्वधा १७। अर्कः १८। क्षद्म १९। नेमः २०। ससम् २१। नमः २२। आयुः २३। सूनृता २४। ब्रह्म २५। वर्चः २६। कीलालम् २७। यशः २८ इति अष्टाविंशतिः अन्ननामानि ॥ ७ ॥

आवयति १। भर्वति २। बभस्ति ३। वेति ४। वेवेष्टि ५। अविष्यन् ६। बप्सति ७। भसथः ८। बब्धाम् ९। ह्वरति १० इति दश अत्तिकर्माणः ॥ ८ ॥

ओजः १। पाजः २। शवः ३। तरः ४। तवः ५। त्वक्षः ६। शर्धः ७। बाधः ८। नृम्णम् ९। तविषी १०। शुष्मम् ११। शुष्णम् १२। शूषम् १३। दक्षः १४। वीळु १५। च्यौत्नम् १६। सहः १७। यहः १८। वधः १९। वर्गः २०। वृजनम् २१। वृक् २२। मज्मना २३। पौंस्यानि २४। धर्णसिः २५। द्रविणम् २६। स्यन्द्रासः २७। शम्बरम् २८ इति अष्टाविंशतिः बलनामानि ॥ ९ ॥

मघम् १। रेक्णः २। रिक्थम् ३। वेदः ४। वरिवः ५। श्वात्रम् ६। रत्नम् ७। रयिः ८। क्षत्रम् ९। भगः १०। मीळ्हुम् ११। गयः १२। द्युम्नम् १३। इन्द्रियम् १४। वसु १५। रायः १६। राधः १७। भोजनम् १८। तना १९। नृम्णम् २०। बन्धुः २१। मेधा २२। यशः २३। ब्रह्म २४। द्रविणम् २५। श्रवः २६। वृत्रम् २७। वृतम् २८ इति अष्टाविंशतिरेव धननामानि ॥ १० ॥

अघ्न्या १। उस्रा २। उस्रिया ३। अही ४। मही ५। अदितिः ६। इळा ७। जगती ८। शक्वरी ९ इति नव गोनामानि ॥ ११ ॥

रेळते १। हेळते २। भामते ३। हृणीयते ४। भ्रीणाति ५। भ्रेपति ६। दोधति ७। वनुष्यति ८। कम्पते ९। भोजते १० इति दश क्रुध्यतिकर्माणः ॥ १२ ॥

हेळः १। हरः २। हृणिः ३। त्यजः ४। भामः ५। एहः ६। ह्वरः ७। तपुषी ८। जूर्णिः ९। मन्युः १०। व्यथिः ११ इति एकादश क्रोधनामानि ॥ १३ ॥

वर्तते १। अयते २। लोटते ३। लोठते ४। स्यन्दते ५। कसति ६। सर्पति ७। स्यमति ८। स्रवति ९। स्रंसते १०। अवति ११। श्चोतति १२। ध्वंसति १३। वेनति १४। मार्ष्टि १५। भुरण्यति १६। शवति १७। कालयति १८। पेलयति १९। कण्टति २०। पिस्यति २१। विस्यति २२। मिस्यति २३। प्रवते २४। प्लवते २५। च्यवते २६। कवते २७। गवते २८। नवते २९। क्षोदति ३०। नक्षति ३१। सक्षति ३२। म्यक्षति ३३। सचति ३४। ऋच्छति ३५। तुरीयति ३६। चतति ३७। अतति ३८। गाति ३९। इयक्षति ४०। सश्चति ४१। त्सरति ४२। रंहति ४३। यतते ४४। भ्रमति ४५। ध्रजति ४६। रजति ४७। लजति ४८। क्षियति ४९। धमति ५०। मिनाति ५१। ऋण्वति ५२। ऋणोति ५३। स्वरति ५४। सिसर्ति ५५। विविष्टि ५६। योषिष्टि ५७। रिणाति ५८। रीयते ५९। रेजति ६०। दध्यति ६१। दघ्नोति ६२। युध्यति ६३। धन्वति ६४। अरुषति ६५। आर्यति ६६। सीयते ६७। तकति ६८। दीयति ६९। ईषति ७०। फणति ७१। ह्वनति ७२। अर्दति ७३। मर्दति ७४। सर्स्रते ७५। नसते ७६। हर्यति ७७। इयर्ति ७८। ईर्ते ७९। ईङ्खते ८०। व्रयति ८१।

श्वात्रति ८२। गन्ति ८३। आगनीगन्ति ८४। जङ्गन्ति ८५। जिन्वति ८६। जसति ८७। गमति ८८। ध्रति ८९। ध्राति ९०। अयति ९१। वहते ९२। रथर्यति ९३। जेहते ९४। ष्वःकति ९५। क्षुम्पति ९६। प्साति ९७। वाति ९८। याति ९९। इषति १००। द्राति १०१। ह्वलति १०२। एजति १०३। जगाति १०४। जवति १०५। वञ्चति १०६। अनिति १०७। पवते १०८। हन्ति १०९। सेधति ११०। अगन् १११। अजगन् ११२। जिगाति ११३। पताति ११४। इन्वति ११५। द्रमति ११६। द्रवति ११७। वेति ११८। हन्तात् ११९। एति १२०। जगायात् १२१। अयथुः १२२ इति द्वाविंशशतं गतिकर्माणः ॥ १४ ॥

नु १। मक्षु २। द्रवत् ३। ओषम् ४। जीरा ५। जूर्णिः ६। शूर्ताः ७। शूघनासः ८। शीभम् ९। तृपु १०। तूयम् ११। तूर्णिः १२। अजिरम् १३। भुरण्युः १४। शु १५। आशु १६। प्राशुः १७। तूतुजिः १८। तूतुजानः १९। तुज्यमानासः २०। अज्राः २१। साचीवित् २२। द्युगत् २३। ताजत् २४। तरणिः २५। वातरंहाः २६ इति षड्विंशतिः क्षिप्रनामानि ॥ १५ ॥

तळित् १। आसात् २। अम्बरम् ३। तुर्वशे ४। अस्तमीके ५। आके ६। उपाके ७। अर्वाके ८। अन्तमानाम् ९। अवमे १०। उपमः ११ इति एकादश अन्तिकनामानि ॥ १६ ॥

रणः १। विवाक् २। विखादः ३। नदनुः ४। भरे ५। आक्रन्दे ६। आहवे ७। आजौ ८। पृतनाज्यम् ९। अभीके १०। समीके ११। ममसत्यम् १२। नेमधिता १३। सङ्काः १४। समितिः १५। समनम् १६। मीह्ळे १७। पृतनाः १८। स्पृधः १९। मृधः २०। पृत्सु २१। समत्सु २२। समर्ये २३। समरणे २४। समोहे २५। समिथे २६। सङ्ख्ये २७। सङ्गे २८। संयुगे २९। संगथे ३०। संगमे ३१। वृत्रतूर्ये ३२। पृक्षे ३३। आणौ ३४। शूरसातौ ३५। वाजसातौ ३६। समनीके ३७। खले ३८। खजे ३९। पौंस्ये ४०। महाधने ४१। वाजे ४२। अज्म ४३। सद्म ४४। संयत् ४५। संवतः ४६ इति षट्चत्वारिंशत् संग्रामनामानि ॥ १७ ॥

इन्वति १। नक्षति २। आक्षाणः ३। आनट् ४। आष्ट ५। आपानः ६। अशत् ७। नशत् ८। आनशे ९। अश्नुते १० इति दश व्याप्तिकर्माणः ॥ १८ ॥

दभ्नोति १। श्नथति २। ध्वरति ३। धूर्वति ४। वृणक्ति ५। वृश्चति ६। कृणवति ७। कृन्तति ८। श्वसिति ९। नमते १०। अर्दयति ११। स्तृणाति १२। स्नेहयति १३। यातयति १४। स्फुरति १५। स्फुलति १६। निवपन्तु १७। अवतिरति १८। वियातः १९। आतिरत् २०। तळित् २१। आखण्डल २२। दृणाति २३। श्मनाति २४। शृणाति २५। शम्नाति २६। तृणह्ळि २७। ताह्ळि २८। नितोशते २९। निवर्हयति ३०। मिनाति ३१। मिनोति ३२। धमति ३३ इति त्रयस्त्रिंशत् वधकर्माणः ॥ १९ ॥

दिद्युत् १। नेमिः २। हेतिः ३। नमः ४। पविः ५। सृकः ६। वृकः ७। वधः ८। वज्रः ९। अर्कः १०। कुत्सः ११। कुलिशः १२। तुञ्जः १३। तिग्मम् १४। मेनिः १५। स्वधितिः १६। सायकः १७। परशुः १८ इति अष्टादश वज्रनामानि ॥ २० ॥

इरज्यति १। पत्यते २। क्षयति ३। राजति ४ इति चत्वारः ऐश्वर्यकर्माणः ॥ २१ ॥

राष्ट्री १। अर्यः २। नियुत्वान् ३। इनः इनः ४ इति चत्वारि ईश्वरनामानि ॥ २२ ॥

## तृतीयोऽध्यायः

उरु १। तुवि २। पुरु ३। भूरि ४। शश्वत् ५। विश्वम् ६। परीणसा ७। व्यानशिः ८। शतम् ९। सहस्रम् १०। सलिलम् ११। कुवित् १२ इति द्वादश बहुनामानि ॥ १ ॥

ऋहन् १। ह्रस्वः २। निधृष्वः ३। मायुकः ४। प्रतिष्ठा ५। कृधु ६। वम्रकः ७। दभ्रम् ८। अर्भकः ९। क्षुल्लकः १०। अल्पः ११ इति एकादश ह्रस्वनामानि ॥ २ ॥

महत् १। ब्रध्नः २। ऋष्वः ३। बृहत् ४। उक्षितः ५। तवसः ६। तविषः ७। महिषः ८। अभ्वः ९। ऋभुक्षाः १०। उक्षा ११। विहायाः १२। यह्वः १३। ववक्षिथ १४। विवक्षसे १५। अम्भृणः १६। माहिनः १७। गभीरः १८। ककुहः १९। रभसः २०। बाधन् २१। विरप्शी २२। अद्भुतम् २३। बंहिष्ठः २४। बर्हिषत् २५ इति पञ्चविंशतिः महन्नामानि ॥ ३ ॥

गयः १। कृदरः २। गर्तः ३। हर्म्यम् ४। अस्तम् ५। पस्त्यम् ६। दुरोणे ७। नीळम् ८। दुर्याः ९। स्वसराणि १०। अमा ११। दमे १२। कृत्तिः १३। योनिः १४। सद्म १५। शरणम् १६। वरूथम् १७। छर्दिः १८। छदिः १९। छाया २०। शर्म २१। अज्म २२ इति द्वाविंशतिः गृहनामानि ॥ ४ ॥

इरज्यति १। विधेम २। सपर्यति ३। नमस्यति ४। दुवस्यति ५। ऋध्नोति ६। ऋणद्धि ७। ऋच्छति ८। सपति ९। विवासति १० इति दश परिचरणकर्माणः ॥ ५ ॥

शिम्बता १। शतरा २। शातपन्ता ३। शर्म ४। स्यूमकम् ५। शेवृधम् ६। मयः ७। सुग्म्यम् ८। सुदिनम् ९। शूषम् १०। शुनम् ११। शग्मम् १२। भेषजम् १३। जलाषम् १४। स्योनम् १५। सुम्नम् १६। शेवम् १७। शिवम् १८। शम् १९। कम् २० इति विंशतिः सुखनामानि ॥ ६ ॥

निर्णिक् १। वव्रिः २। वर्पः ३। वपुः ४। अमतिः ५। अप्सः ६। प्सुः ७। अप्नः ८। पिष्टम् ९। पेशः १०। कृशनम् ११। प्सरः १२। अर्जुनम् १३। ताम्रम् १४। अरुषम् १५। शिल्पम् १६ इति षोडश रूपनामानि ॥ ७ ॥

अस्रेमाः १। अनेमाः २। अनेद्यः ३। अनवद्यः ४। अनभिशस्ताः ५। उक्थ्यः ६। सुनीथः ७। पाकः ८। वामः ९। वयुनम् १०। इति दश प्रशस्यनामानि ॥ ८ ॥

केतः १। केतुः २। चेतः ३। चित्तम् ४। क्रतुः ५। असुः ६। धीः ७। शची ८। माया ९। वयुनम् १०। अभिख्या ११। इति एकादश प्रज्ञानामानि ॥ ९ ॥

बट् १। श्रत् २। सत्रा ३। अद्धा ४। इत्था ५। ऋतम् ६। इति षट् सत्यनामानि ॥ १० ॥

चिक्यत् १। चाकनत् २। आचक्ष्म ३। चष्टे ४। वि चष्टे ५। विचर्षणिः ६। विश्वचर्षणिः ७। अवचाकशत् ८। इति अष्टौ पश्यतिकर्माणः ॥ ११ ॥

हिकम् १। नुकम् २। सुकम् ३। आहिकम् ४। आकीम् ५। नकिः ६।

माकिः ७। नकीम् ८। आकृतम् ९ इति नव उत्तराणि पदानि सर्वपदसमाम्नानाय ॥ १२ ॥

इदमिव १। इदं यथा २। अग्निर्न ये ३। चतुरश्चिद्ददमानात् ४। ब्राह्मणा व्रतचारिणः ५। वृक्षस्य नु ते पुरुहूत वयाः ६। जार आ भगम् ७। मेषो भूतोऽभि यन्नयः ८। तद्रूपः ९। तद्वर्णः १०। तद्वत् ११। तथा १२ इति उपमाः ॥ १३ ॥

अर्चति १। गायति २। रेभति ३। स्तोभति ४। गूर्धयति ५। गृणाति ६। जरते ७। ह्वयते ८। नदति ९। पृच्छति १०। रिहति ११। धमति १२। कृपायति १३। कृपण्यति १४। पनस्यति १५। पनायते १६। वल्गूयति १७। मन्दते १८। भन्दते १९। छन्दति २०। छदयते २१। शशमानः २२। रञ्जयति २३। रजयति २४। शंसति २५। स्तौति २६। यौति २७। रौति २८। नौति २९। भनति ३०। पणायति ३१। पणते ३२। सपति ३३। पपृक्षाः ३४। महयति ३५। वाजयति ३६। पूजयति ३७। मन्यते ३८। मदति ३९। रसति ४०। स्वरति ४१। वेनति ४२। मन्द्रयते ४३। जल्पति ४४ इति चतुश्चत्वारिंशत् अर्चतिकर्माणः॥ १४ ॥

विप्रः १। विग्रः २। गृत्सः ३। धीरः ४। वेनः ५। वेधाः ६। कण्वः ७। ऋभुः ८। नवेदाः ९। कविः १०। मनीषी ११। मन्धाता १२। विधाता १३। विपः १४। मनश्चित् १५। विपश्चित् १६। विपन्यवः १७। आकेनिपः १८। उशिजः १९। कीस्तासः २०। अद्धातयः २१। मतयः २२। मतुथाः २३। वाघतः २४ इति चतुर्विंशतिः मेधाविनामानि ॥ १५ ॥

रेभः १। जरिता २। कारुः ३। नदः ४। स्तामुः ५। कीरिः ६। गौः ७। सूरिः ८। नादः ९। छन्दः १०। स्तुप् ११। रुद्रः १२। कृपण्युः १३ इति त्रयोदश स्तोतृनामानि ॥ १६ ॥

यज्ञः १। वेनः २। अध्वरः ३। मेधः ४। विदथः ५। नार्यः ६। सवनम् ७। होत्रा ८। इष्टिः ९। देवताता १०। मखः ११। विष्णुः १२। इन्दुः १३। प्रजापतिः १४। घर्मः १५ इति पञ्चदश यज्ञनामानि ॥ १७ ॥

भरता १। कुरवः २। वाघतः ३। वृक्तबर्हिषः ४। यतस्रुचः ५। मरुतः ६। सबाधः ७। देवयवः ८ इति अष्टौ ऋत्विङ्नामानि ॥ १८ ॥

ईमहे १। यामि २। मन्महे ३। दद्धि ४। शग्धि ५। पूर्धि ६। मिमिड्ढि ७। मिमीहि ८। रिरिड्ढि ९। रिरीहि १०। पीपरत् ११। यन्तारः १२। यन्धि १३। इषुध्यति १४। मदेमहि १५। मनामहे १६। मायते १७ इति सप्तदश याच्ञाकर्माणः ॥ १९ ॥

दाति १। दाशति २। दासति ३। राति ४। रासति ५। पृणक्षि ६। पृणाति ७। शिक्षति ८। तुञ्जति ९। मंहते १० इति दश दानकर्माणः ॥ २० ॥

परिस्रव १। पवस्व २। अभ्यर्ष ३। आशिषः ४ इति चत्वारः अध्येषणाकर्माणः ॥ २१ ॥

स्वपिति १। सस्ति २ इति द्वौ स्वपितिकर्माणौ ॥ २२ ॥

कूपः १। कातुः २। कर्तः ३। वव्रः ४। काटः ५। खातः ६। अवतः ७। क्रिविः ८। सूदः ९। उत्सः १०। ऋश्यदात् ११। कारोतरात् १२। कुशयः १३। केवटः १४ इति चतुर्दश कूपनामानि ॥ २३ ॥

तृपुः १। तक्वा २। रिभ्वा ३। रिपुः ४। रिक्वा ५। रिहायाः ६। तायुः ७। तस्करः ८। वनर्गुः ९। हुरश्चित् १०। मुषीवान् ११। मलिम्लुचः १२। अघशंसः १३। वृकः १४ इति चतुर्दश एव स्तेननामानि ॥ २४ ॥

निण्यम् १। सस्वः २। सनुतः ३। हिरुक् ४। प्रतीच्यम् ५। अपीच्यम् ६ इति षट् निर्णीतान्तर्हितनामधेयानि ॥ २५ ॥

आके १। पराके २। पराचैः ३। आरे ४। परावतः ५ इति पञ्च दूरनामानि ॥ २६ ॥

प्रत्नम् १। प्रदिवः २। प्रवयाः ३। सनेमि ४। पूर्व्यम् ५। अह्नाय ६ इति षट् पुराणनामानि ॥ २७ ॥

नवम् १। नूत्नम् २। नूतनम् ३। नव्यम् ४। इदा ५। इदानीम् ६ इति षट् एव नवनामानि ॥ २८ ॥

प्रपित्वे १। अभीके २। दभ्रम् ३। अर्भकम् ४। तिरः ५। सतः ६। त्वः ७। नेमः ८। ऋक्षाः ९। स्तृभिः १०। वम्रीभिः ११। उपजिह्विका १२। ऊर्दरम् १३। कृदरम् १४। रम्भः १५। पिनाकम् १६। मेना १७। ग्नाः १८। शेपः १९। वैतसः २०। अया २१। एना २२। सिषक्तु २३। सचते २४। भ्यसते २५। रेजते २६ इति षड्विंशतिः द्विश उत्तराणि नामानि ॥ २९ ॥

स्वधे १। पुरन्धी २। धिषणे ३। रोदसी ४। क्षोणी ५। अम्भसी ६। नभसी ७। रजसी ८। सदसी ९। सद्मनी १०। घृतवती ११। बहुले १२। गभीरे १३। गम्भीरे १४। ओण्यौ १५। चम्वौ १६। पार्थ्वौ १७। मही १८। उर्वी १९। पृथ्वी २०। अदिती २१। अह्नी २२। दूरेअन्ते २३। अपारे अपारे २४ इति चतुर्विंशतिः द्यावापृथिवीनामधेयानि ॥ ३० ॥

## चतुर्थोऽध्यायः

जहा १। निधा २। शिताम ३। मेहना ४। दमूनाः ५। मूषः ६। इषिरेण ७। कुरुतन ८। जठरे ९। तितउ १०। शिप्रे ११। मध्या १२। मन्दू १३। ईर्मान्तासः १४। कायमानः १५। लोधम् १६। शीरम् १७। विद्रधे १८। द्रुपदे १९। तुग्वनि २०। नंसन्ते २१। नसन्त २२। आहनसः २३। अश्नसत् २४। इष्मिणः २५। वाहः २६। परितक्म्या २७। सुविते २८। दयते २९। नूचित् ३०। नूच ३१। दावने ३२। अकूपारस्य ३३। शिशीते ३४। सुतुकः ३५। सुप्रायणाः ३६। अप्रायुवः ३७। च्यवनः ३८। रजः ३९। हरः ४०। जुहुरे ४१। व्यन्तः ४२। क्राणाः ४३। वाशी ४४। विषुणः ४५। जामिः ४६। पिता ४७। शंयोः ४८। अदितिः ४९। परिरे ५०। जसुरिः ५१। जरते ५२। मन्दिने ५३। गौः ५४। गातुः ५५। दंसयः ५६। तूताव ५७। चयसे ५८। वियुते ५९। ऋधक् ६०। अस्याः ६१। अस्य ६२ इति द्विषष्टिः पदानि ॥ १ ॥

सस्निम् १। वाहिष्ठः २। दूतः ३। वावशानः ४। वार्यम् ५। अन्धः ६। असश्चन्ती ७। वनुष्यति ८। तरुष्यति ९। भन्दना १०। आहनः ११। नदः १२। सोमो अक्षाः १३। श्वात्रम् १४। ऊतिः १५। हासमाने १६। पड्भिः १७। सुसम् १८।

ह्विता १९ । व्राः २० । वराहः २१ । स्वसराणि २२ । शर्याः २३ । अर्कः २४ । पविः २५ । वक्षः २६ । धन्व २७ । सिनम् २८ । इत्था २९ । सचा ३० । चित् ३१ । आ ३२ । द्युम्नम् ३३ । पवित्रम् ३४ । तोदः ३५ । स्वञ्चाः ३६ । शिपिविष्टः ३७ । विष्णुः ३८ । आघृणिः ३९ । पृथुज्रयाः ४० । अथर्युम् ४१ । काणुका ४२ । अध्रिगुः ४३ । आङ्गूषः ४४ । आपान्तमन्युः ४५ । श्मशा ४६ । उर्वशी ४७ । वयुनम् ४८ । वाजपस्त्यम् ४९ । वाजगन्ध्यम् ५० । गध्यम् ५१ । गधिता ५२ । कौरयाणः ५३ । तौरयाणः ५४ । अन्हयाणः ५५ । हरयाणः ५६ । आरितः ५७ । व्रन्दी ५८ । निष्षपी ५९ । तूर्णाशम् ६० । क्षुम्पम् ६१ । निचुम्पुणः ६२ । पदिम् ६३ । पादुः ६४ । वृकः ६५ । जोषवाकम् ६६ । कृत्तिः ६७ । श्वघ्नी ६८ । समस्य ६९ । कुटस्य ७० । चर्षणिः ७१ । शम्बः ७२ । केपयः ७३ । तूतुमाकृषे ७४ । अंसत्रम् ७५ । काकुदम् ७६ । वीरिटे ७७ । अच्छ ७८ । परि ७९ । ईम् ८० । सीम् ८१ । एनम् ८२ । एनाम् ८३ । सृणिः ८४ इति चतुरुत्तरम् अशीतिः पदानि ॥ २ ॥

आशुशुक्षणिः १ । आशाभ्यः २ । काशिः ३ । कुणारुम् ४ । अलातृणः ५ । सलल्लूकम् ६ । कत्पयम् ७ । विस्रुहः ८ । वीरुधः ९ । नक्षद्दाभम् १० । अस्कृधोयुः ११ । निश्रृम्भाः १२ । वृबदुक्थम् १३ । ऋदूदरः १४ । ऋदूपे १५ । पुलुकामः १६ । असिन्वती १७ । कपना १८ । भाऋजीकः १९ । रुजानाः २० । जूर्णिः २१ । ओमना २२ । उपलप्रक्षिणी २३ । उपसि २४ । प्रकलवित् २५ । अभ्यर्धयज्वा २६ । ईक्षे २७ । क्षोणस्य २८ । अस्मे २९ । पाथः ३० । सवीमनि ३१ । सप्रथाः ३२ । विदथानि ३३ । श्रायन्तः ३४ । आशीः ३५ । अजीगः ३६ । अमूरः ३७ । शशमानः ३८ । देवो देवाच्या कृपा ३९ । विजामातुः ४० । ओमासः ४१ । सोमानम् ४२ । अनवायम् ४३ । किमीदिने ४४ । अमवान् ४५ । अमीवा ४६ । दुरितम् ४७ । अप्वा ४८ । अमतिः ४९ । श्रुष्टी ५० । पुरंधिः ५१ । रुशत् ५२ । रिशादसः ५३ । सुदत्रः ५४ । सुविदत्रः ५५ । आनुषक् ५६ । तुर्वणिः ५७ । गिर्वणसे ५८ । असूर्ते सूर्ते ५९ । अम्यक् ६० । यादृश्मिन् ६१ । जारयायि ६२ । अग्रिया ६३ । चनः ६४ । पचता ६५ । शुरुधः ६६ । अमिनः ६७ । जज्झतीः ६८ । अप्रतिष्कुतः ६९ । शाशदानः ७० । सृप्रः ७१ । सुशिप्रः ७२ । रंसु ७३ । द्विबर्हाः ७४ । अक्रः ७५ । उराणः ७६ । स्तियानाम् ७७ । स्तिपाः ७८ । जबारु ७९ । जरूथम् ८० । कुलिशः ८१ । तुञ्जः ८२ । बर्हणा ८३ । ततनुष्टिम् ८४ । इलीबिशः ८५ । कियेधाः ८६ । भृमिः ८७ । विष्पितः ८८ । तुरीपम् ८९ । रास्पिनः ९० । ऋञ्जतिः ९१ । ऋजुनीती ९२ । प्रतद्वसू ९३ । हिनोत ९४ । चोष्कूयमाणः ९५ । चोष्कूयते ९६ । सुमत् ९७ । दिविष्टिषु ९८ । दूतः ९९ । जिन्वति १०० । अमत्रः १०१ । ऋचीषमः १०२ । अनर्शरातिम् १०३ । अनर्वा १०४ । असामि १०५ गल्दया १०६ । जह्नवः १०७ । बकुरः १०८ । बेकनाटान् १०९ । अभिधेतन ११० । अंहुरः १११ । बतः ११२ । वाताप्यम् ११३ । चाकन् ११४ । रथर्यति ११५ । असक्राम् ११६ । आधवः ११७ । अनवब्रवः ११८ । सदान्वे ११९ । शिरिम्बिठः १२० । पराशरः १२१ । क्रिविर्दती १२२ । करूळती १२३ । दनः १२४ । शरारुः १२५ ।

इदंयुः १२६ । कीकटेषु १२७ । बुन्दः १२८ । बृन्दम् १२९ । किः १३० । उल्बम् १३१ । ऋबीसम् ऋवीसम् १३२ इति द्वात्रिंशच्छतं पदानि ॥ ३ ॥

## पञ्चमोऽध्यायः

अग्निः १ । जातवेदाः २ । वैश्वानरः ३ इति त्रीणि पदानि ॥ १ ॥

द्रविणोदाः १ । इध्मः २ । तनूनपात् ३ । नराशंसः ४ । इळः ५ । बर्हिः ६ । द्वारः ७ । उषासानक्ता ८ । दैव्या होतारा ९ । तिस्रो देवीः १० । त्वष्टा ११ । वनस्पतिः १२ । स्वाहाकृतयः १३ इति त्रयोदश पदानि ॥ २ ॥

अश्वः १ । शकुनिः २ । मण्डूकाः ३ । अक्षाः ४ । ग्रावाणः ५ । नाराशंसः ६ । रथः ७ । दुन्दुभिः ८ । इषुधिः ९ । हस्तघ्नः १० । अभीशवः ११ । धनुः १२ । ज्या १३ । इषुः १४ । अश्वाजनी १५ । उलूखलम् १६ । वृषभः १७ । द्रुघणः १८ । पितुः १९ । नद्यः २० । आपः २१ । ओषधयः २२ । रात्रिः २३ । अरण्यानी २४ । श्रद्धा २५ । पृथिवी २६ । अप्वा २७ । अग्नायी २८ । उलूखलमुसले २९ । हविर्धाने ३० । द्यावापृथिवी ३१ । विपाट्छुतुद्री ३२ । आर्त्नी ३३ । शुनासीरौ ३४ । देवी जोष्ट्री ३५ । देवी ऊर्जाहुती ३६ इति षट्त्रिंशत् पदानि ॥ ३ ॥

वायुः १ । वरुणः २ । रुद्रः ३ । इन्द्रः ४ । पर्जन्यः ५ । बृहस्पतिः ६ । ब्रह्मणस्पतिः ७ । क्षेत्रस्य पतिः ८ । वास्तोष्पतिः ९ । वाचस्पतिः १० । अपां नपात् ११ । यमः १२ । मित्रः १३ । कः १४ । सरस्वान् १५ । विश्वकर्मा १६ । तार्क्ष्यः १७ । मन्युः १८ । दधिक्राः १९ । सविता २० । त्वष्टा २१ । वातः २२ । अग्निः २३ । वेनः २४ । असुनीतिः २५ । ऋतः २६ । इन्दुः २७ । प्रजापतिः २८ । अहिः २९ । अहिर्बुध्न्यः ३० । सुपर्णः ३१ । पुरूरवाः ३२ इति द्वात्रिंशत् पदानि ॥ ४ ॥

श्येनः १ । सोमः २ । चन्द्रमाः ३ । मृत्युः ४ । विश्वानरः ५ । धाता ६ । विधाता ७ । मरुतः ८ । रुद्राः ९ । ऋभवः १० । अङ्गिरसः ११ । पितरः १२ । अथर्वाणः १३ । भृगवः १४ । आप्त्याः १५ । अदितिः १६ । सरमा १७ । सरस्वती १८ । वाक् १९ । अनुमतिः २० । राका २१ । सिनीवाली २२ । कुहूः २३ । यमी २४ । उर्वशी २५ । पृथिवी २६ । इन्द्राणी २७ । गौरी २८ । गौः २९ । धेनुः ३० । अघ्न्या ३१ । पथ्या ३२ । स्वस्तिः ३३ । उषाः ३४ । इळा ३५ । रोदसी ३६ इति षट्त्रिंशत् पदानि ॥ ५ ॥

अश्विनौ १ । उषाः २ । सूर्या ३ । वृषाकपायी ४ । सरण्यूः ५ । त्वष्टा ६ । सविता ७ । भगः ८ । सूर्यः ९ । पूषा १० । विष्णुः ११ । विश्वानरः १२ । वरुणः १३ । केशी १४ । केशिनः १५ । वृषाकपिः १६ । यमः १७ । अज एकपात् १८ । पृथिवी १९ । समुद्रः २० । दध्यङ् २१ । अथर्वा २२ । मनुः २३ । आदित्याः २४ । सप्तऋषयः २५ । देवाः २६ । विश्वेदेवाः २७ । साध्याः २८ । वसवः २९ । वाजिनः ३० । देवपत्न्यो देवपत्न्यः ३१ इति एकत्रिंशत् पदानि ॥ ६ ॥

॥ इति निघण्टुः समाप्तः ॥

# निघण्टुपरीक्षण

## अध्याय पहिला

**खंड १ लाः**— गोत्रा ( २१ ) ह्याचा पृथिवी हा अर्थ नसून गोत्राणि म्हणजे कोंडवाडे असा अर्थ आहे. पूषा ( १९ ) चें पूषा त्वेतो नयतु हस्तगृह्या ( १०।८५।२६ ) हें उदाहरण देवराज देतो; पण पूषा म्हणजे पृथिवी असा अर्थ सायणाचार्य देत नाहींत व तो अर्थ खात्रीनें चुकला आहे. २ राः— लोहं ( ८ ), कनकं ( ९ ), काञ्चनं ( १० ) व जातरूपं ( १५ ) हे अर्वाचीन शब्द आहेत; ते ऋग्वेदांत अगर कोणत्याही इतर वेदांत नाहींत. हरिशिप्र व हिरिशिप्र ह्यांतील हरि व हिरि यांचा अर्थ सोनें; पण ते शब्द ह्या खंडांत घातले नाहींत. ५ वाः— किरणाः ( २ ) शब्दाचा किरण अर्थ नसून धूळ किंवा धुळीचे कण असा आहे. ७ वाः— नम्या ( ८ ) रात्रिवाचक नसून तें नमी ह्याचें तृतीयेचें एकवचन आहे; नमी हा इंद्राचा मित्र होता ( १।५३।७ ). घृताची ( १६ ) ह्याचा अर्थ झळकणारी असा असून तो उषेला व तेजस्वी पदार्थांना लाविलेला आढळतो; त्या शब्दाचा रात्र हा अर्थ कोठेंही नाहीं. खंडांत रात्रि किंवा रात्री नाहीं. ८ वाः — विभावरी, सूनरी, भास्वती, चित्रामघा, वाजिनी, वाजिनीवती, सुम्नावरी, अरुषी, सूनृता व सूनृतावरी हीं उषेचीं विशेषणें होत; त्यांचा अर्थ उषा नाहीं. उषेच्या ह्या नामावलींत रुशती व उषाः नाहींत. ९ वाः— अहर्नामांत दिवा, दिवेदिवे व द्यविद्यवि हीं द्युः किंवा द्यौः शब्दाचींच भिन्न विभक्तिरूपें असल्यामुळें तीं खंडांत देण्याचें कारण नाहीं. अहर् शब्द दिला नाहीं. १० वाः— मेघनामांत वलाहकः ( २३ ) हा अर्वाचीन शब्द आहे. आपः पृणीत भेषजं वरूथं तन्वे मम ( १।२३।२१ ) ह्यांतील भेषजं ( ३९ ) म्हणजे उदकं असा अर्थ आपः ( = नद्या ) ह्या शब्दामुळें निघंटुकारानें केला असावा. ऋग्वेदांत सुख शब्द नेहमीं रथाला लाविलेला आढळतो व सर्व ठिकाणीं त्याचा अर्थ धक्के हिसके वगैरे न देणारा, रस्त्यांत न अडखळणारा, कोणत्याही प्रकारचा त्रास न देतां भराभर चालणारा असा आहे; तथापि तो निघंटूत एकदांच आला असून उदकवाची शब्दांत घातला आहे ( ४४ ). हा अर्थ निघंटुकाराच्या मनांत सुखं रथं युयुजे सिन्धुरश्विनं ( १०।७५।९ पान ५४४ ओळ २७ ) ह्या ऋक्पादावरून आला असेल; सिंधु हा एक नद; त्याला रथाशीं काय करावयाचें आहे व त्याचा रथ कोणता ? उदक हीच कोणी एक घोड्याची ( अश्विनं ) गाडी ( रथं ); ती तो नद समुद्राकडे जाण्याकरितां जोडता झाला; म्हणून सुख म्हणजे उदक असा निघटुंकारानें तर्क केला असावा; पण सुख संबंधीं सर्व ऋचा जर त्यानें एकत्र केल्या असत्या तर

त्याची चूक त्याच्या ध्यानांत आली असती. एक ऋचा घेऊन शब्दाचा अर्थ ठरविणें हा मोठा अविचार होय; ह्या अविचारामुळें शब्दांचे भलते अर्थ केले आहेत. तसेंच पिप्पलं ( १३ ) ह्याचें तस्येदाहुः पिप्पलं स्वादु अग्रे ( १।१६४।२२ ) हा ऋक्पाद उदाहरण म्हणून देवराज देतो; पण त्यानें हें उदाहरण द्यावें हें नवल आहे ! पहिल्या ऋगर्धांत यस्मिन् वृक्षे शब्द आहेत; तेव्हां तस्य वृक्षस्य इत् एव पिप्पलम् अग्रे स्वादु आहुः = त्याच वृक्षाचें फळ श्रेष्ठ देव मधुर म्हणतात असा अर्थ आहे. निघंटुकाराच्या मनांत मयोभुवो वृष्टयः सन्तु अस्मे सुपिप्पला ओषधीर्देवगोपाः ( ७।१०१।५ ) हा ऋगर्ध असावा; आम्हांला सुखदायक वृष्टि व सुपिप्पला म्हणजे पुष्कळ पाण्यांत असलेल्या ओषधि म्हणजे भातासारखीं धान्यें असोत म्हणजे मिळोत असा निघंटुकारानें अर्थ केला असावा; कारण सूक्ताची देवता पर्जन्य आहे व ऋगर्धांत वृष्टयः शब्द आहे; पाऊस कशाला ? पिकासाठीं. भातासारखें पीक पाण्यांत एकसारखें डुंबत राहिलेंच पाहिजे असा तर्क त्यानें केला असावा; पण एथेंही पिप्पल म्हणजे फळच; फळझाडें, भातें व इतर धान्यें फळें कणसें व लोंब्या ह्यांनीं दाट भरलेलीं असोत अशी इच्छा दर्शविली आहे. इतर दोन ऋचांतही ( १।१६४।२० व ५।५४।१२ ) पिप्पल शब्दाचा हाच अर्थ आहे. १५ वाः— कदा योगो वाजिनो रासभस्य ( १।३४।९ ) एथें अश्विनाच्या रथाला जोडलेला रासभ एकच आहे; दोन रासभ जोडलेल्याचा वृत्तांत दुसऱ्या कोठून तरी घेतला असावा. इंद्राच्या रथालाही एकच रासभ जोडलेला असे ( १।१६२।२१ व ३।५३।५ ). अश्वनामांत रासभौ, अजाः, गावः व विश्वरूपा हे शब्द निघंटुकारानें घालावेत हा चमत्कार आहे !

## अध्याय दुसरा

**खंड १ लाः**— विष्ट्वी ( ६ ) म्हणजे कर्म असा निघटूंत अर्थ असतांना यास्कानें पुनरुक्ति टाळण्याकरितां विष्ट्वी याचा कृत्वा असा अर्थ केला असें दुर्ग म्हणतो (पान ८८० ओळ ९); पण ती त्याची चूक आहे; त्या चुकीचें कारण विष्ट्वी शब्द कर्मनामांत घातला आहे हें. विष्ट्वी हें हित्वी, गत्वी व कृत्वी सारखें अव्यय असल्यामुळें त्याचा कर्म अर्थ होणार नाहीं. करन्ति (१४), करिक्रत् (१५), कर्त्वं (१७), कर्तोः (१८), कर्तवै (१९), कृत्वी (२०) हीं नामें नसून कृ चींच रूपें आहेत. नामें व क्रियारूपें ह्यांचीं ह्या खंडांत भेसळ केली आहे. २ राः— बीजं ( १५ ) ह्याचें यस्यां बीजं मनुष्या वपन्ति ( १०।८५।३७ ) हें उदाहरण देवराज देतो; पण ह्या उदाहरणांत बीज म्हणजे मूळ असा अर्थ नाहीं. ३ राः— पञ्चजनाः ( २३ ), क्षितयः ( ६ ), कृष्टयः ( ७ ), चर्षणयः ( ८ ), तुर्वशाः ( १५ ), द्रुह्यवः ( १६ ), आयवः ( १७ ), यदवः ( १८ ), अनवः ( १९ ), पूरवः ( २० ) हे शब्द ऋग्वेदांत विशिष्टआर्यजातिवाचक होते; ब्राह्मणकालीं पञ्चजनाः ह्याचा अर्थ मनुष्य

असा केला गेला; निघंटुकारानें पञ्चजनशब्दाचा हा अर्थ कृष्टयः वगैरे शब्दांना लाविला. पृतनाः (२५) म्हणजे सेना व मर्याः (११) म्हणजे मर्द, जवान असे अर्थ आहेत. धवाः (३) ऋग्वेदांत नाहीं; तो अर्वाचीन आहे. ४ थाः— तद्यत् आभिः वृत्रम् अशकत् हन्तुं तत् शक्करीणां शक्करीत्वं (पान २५ ओळ २६-२८) = शक्करींना शक्करी हें नांव पडण्याचें कारण त्यांच्या साहाय्यानें (आभिः) इंद्र वृत्राला मारूं शकला. शक्करीनांवाच्या ऋचांच्या साहाय्यानें इंद्राला वृत्राला मारतां आलें असा खरा अर्थ आहे; पण इंद्र वृत्राला हातांनीं (आभिः) मारूं शकला असा ह्या ब्राह्मणवचनाचा निघंटुकारानें अर्थ केला. बाहुनामांत पाणि व हस्त नाहींत. ५ वाः— अवनयः (११), कक्षाः (१०), योक्त्राणि (१६), योजनानि (१७), अभीशवः (२०), धुरः (१८) हे शब्द अंगुलिवाचक नसून अंगुलीवर तीं रूपकें आहेत; अंगुलींना गाडा, झूल, जोत, दांडकीं, लगाम, जूं असें विनोदानें म्हटलें आहे; निघंटुकाराच्या लक्षांत ही गोष्ट यावयास पाहिजे होती; ती यास्क व सायण ह्यांच्याही लक्षांत आली नाहीं! ऋग्वेद जेव्हां अगदीं दुर्बोध झाला तेव्हां निघंटुग्रंथ रचला गेला ह्यांत संशय नाहीं. स्वसारः (१३), जामयः (१४), सनाभयः (१५) हे शब्द अंगुलींना लावले आहेत; हाताच्या अंगुलि एकत्र असतात म्हणून त्या बहिणी (स्वसारः = जामयः); त्या तळहातापासून पसरतात म्हणून सनाभयः. रशनाः (६) = दोऱ्या व हरितः (१२)=सोनेरी घोड्या हेही शब्द अंगुलींना रूपकानें लाविले आहेत. शर्याः = अंगुलि; शर्याभिर्न भरमाणो गभस्त्योः (९।११०।५) एथें निघंटुकारानें गभस्त्योः शर्याभिः असा अन्वय करून त्यांचा दोन्ही हातांच्या बोटांनीं असा अर्थ केला (खरा अर्थ पहा पान ३४७). अग्निं नरो दीधितिभिर् अरण्योः हस्तच्युती जनयन्त (७।१।१); एथें हस्त शब्दामुळें दीधितयः (२१) ह्याचा बोटें असा निघंटुकारानें अर्थ केला (खरा अर्थ पान ३६७). ६ वाः— वश्मि (१), उश्मसि (२) व वष्टि (७) हीं वश् धातूचींच रूपें आहेत; त्यांपैकीं वष्टि ह्या एकाच रूपानें वश् धातु सूचित झाला असता. चाकनत् (१५), कनति (१७) व कानिषत् (१८) हीं कन् धातूचीं रूपें होत; वष्टि प्रमाणें कन् धातूचें एकच रूप देणें जरूर होतें. ह्या वर्गांत उशिक् (१२) हें नाम घातलें आहे; त्याची वष्टेः कान्तिकर्मणः (पा. ४५८ ओळ ६) ही व्युत्पत्ति निघंटूच्या आधींच्या निरुक्तांत दिली असलीच पाहिजे; त्याशिवाय तो शब्द कांतिकर्मांत घातला गेला नसता. ७ वाः— क्षु (१०) अन्नवाचक नाहीं. ८ वाः— बप्सति (७), भसथः (८), बब्धां (९) हीं एकाच म्हणजे भस् धातूचीं रूपें होत. ९ वाः— वीळु हें नाम नसून विशेषण आहे. मज्मना बद्दल मज्म पाहिजे; मज्मना घालण्याचें कारण तेवढेंच रूप ऋग्वेदांत आहे. १४ वाः— स्रवति (९), स्रंसते (१०), श्चोतति (१२), भुरण्यति (१६), दीयति (६९), ईषति (७०), ईङ्खते (८०), एजति (१०३), जवति (१०५), पतति (११४) व द्रवति (११७) ह्या निरनिराळ्या प्रकारच्या गति होत; वाहणें, ढिलें पडणें, टप्--

टप् गळणें, भुरकन् उडणें, उडणें, धांवणें, नावेसारखें वर खालीं होणें, हलणें हे गतीचे निरनिराळे प्रकार असले तरी ते शब्द गतिवाचक क्रियारूपांत घालणें बरोबर होणार नाहीं. हन्ति ( १०९ ) चा जातो हा अर्थ अर्वाचीन आहे. गन्ति ( ८३ ), गनीगन्ति ( ८४ ), जङ्गन्ति ( ८५ ), अगन् ( १११ ) व अजगन् ( ११२ ) हीं गन् धातूचीं रूपें होत; ह्यांपैकीं जङ्गन्ति ऋग्वेदांत नाहीं; तो शब्द जंघन्ति ह्याचा अपभ्रंश असावा; पण जंघन्ति ह्याचा जातो असा अर्थ होत नाहीं. बिषिष्टि ( ५६ ) व योषिष्टि ( ५७ ) हीं क्रियारूपें कधींही कोणी ऐकलीं नाहींत. जाणें ह्या अर्थाचीं क्रियारूपें १२२ दिलीं आहेत; त्यांपैकीं कांहीं रूपें ऋग्वेदांत मुळींच आढळत नाहींत. शब्दांच्या व्युत्पत्ति देतांना निरुक्तकार धातु देतात; ते धातु निघंटुकारानें किंवा एखाद्या प्रक्षेपकानें निघंटूंत घातले असावेत. सिकता कस् पासून ( पान ७८ ओळ ३१ ) म्हणून कसति ( ६ ); सीमिकाः स्यमनात् ( पा. २२३ ओळ २९ ) म्हणून स्यमति ( ८ ); कालः कालयतेः ( पान १४५ ओळ १७ ) म्हणून कालयति ( १८ ); पिपीलिका पेलतेः गतिकर्मणः ( पान ५५६ ओळ ३० ) म्हणून पेलयति ( १९ ); कण्टकः कण्टतेः गतिकर्मणः ( पान ७०७ ओळ १८ ) म्हणून कण्टति ( २० ); बिसं बिस्यतेः ( पान १४० ओळ २२ ) म्हणून बिस्यति ( २२ ); पण बिस् धातुपाठांत नसल्याकारणानें बिसं पिस्यतेः असें कोणीतरी म्हटलें असेल म्हणून पिस्यति ( २१ ); किंवा बिसं मिस्यतेः असें कोणी म्हटलें असेल म्हणून मिस्यति (२३); च्यवनः च्यावयिता स्तोमानां (पा. २८६ ओ. २७) म्हणून च्यवते (२६); कविः कवतेः (पा. ९७७ ओ. ११) म्हणून कवते (२७); अभिप्रवन्त ( पा. ५६३ ओ.७) = अभिप्लवन्त (= कडे जातात) असें कोणी रूपांतर केलें असेल म्हणून प्लवते (२५); रजः रजतेः (पा. २८३ ओ. २३) म्हणून रजति (४७); तक्म तकतेः ( पा. ९०५ ओ. २२) म्हणून तकति (६८); ऋदूपे अर्दनपातिनौ गमनपतिनौ ( पान ५२४ ओ. १४ ) म्हणून अर्दति ( ७३ ); इषुः इषतेः गतिकर्मणः ( पा. ६७७ ओ. १० ) म्हणून इषति (१००); अनः वायुः अनितेः (पा. ९४९ ओ. ८ व ९) म्हणून अनिति ( १०७ ); चंद्रमाः चायन् द्रमति (पा. ८६० ओ. २२) म्हणून द्रमति ( ११६ ); शवतिः गतिकर्मा कम्बोजेषु ( पा. ८२ ओ. १७ ) म्हणून शवति ( १७ ). लोष्टः (पान ४२७ ओ. ९ ) लोटतेर्वा लोठतेर्वा, तुरीयं ( पा. ९८१ ओळ ३४ ) तुरीयतेः, गौः ( पान ९२ ओळ ६ ) गवतेः, ध्राजिः ( पान १००७ ओळ ३० ) ध्रजतेः, लाजाः ( पान ४५६ ओळ २ ) लजतेः आणि क्षुम्पं ( पान ३८८ ओळ ३१ ) क्षुम्पतेः अशा कोणी व्युत्पत्ति केल्या असतील म्हणून लोटते ( ३ ), लोठते ( ४ ), तुरीयति ( ३६ ), गवते ( २८ ), ध्रजति ( ४६ ), लजति ( ४८ ) आणि क्षुम्पति ( ९६ ). व्युत्पत्तींतले हे धातु निघंटूंत घातले गेले; ह्यावरून प्रस्तुत निघंटु अस्तित्वांत येण्याच्या आधीं निरुक्तकारांनीं शब्दांच्या व्युत्पत्ति देण्याचा प्रयत्न सुरू केला होता हें स्पष्ट आहे. १६ वाः—अम्बरे ऋग्वेदांत एकदांच आला असतांना

निघंटूकारानें तो एथें ( ३ ) व अंतरिक्षनामांत ( १।३।१ ) घातला आहे; ह्यावरून त्या शब्दाचा निश्चित अर्थ त्याला ठरवितां आला नाहीं असें दिसतें; त्याचप्रमाणें तळित् ( १ व २।१९।१ ) असा दोन ठिकाणीं घातला आहे; त्यावरून दूरे चित् सन् तळिदिवाति रोचसे एथें तळित् म्हणजे जवळ व वज्र असे दोन्ही अर्थ आहेत असें निघंटुकाराचें मत असावें; म्हणूनच तळिदिति अन्तिकवधयोः संसृष्टकर्म (पा. १८४ ओ. २९) म्हणजे तळित् ह्याचे अर्थ जवळ व वज्र असे दोन्हीही ह्या ऋचेंत आहेत असें यास्क म्हणतो. १७ वाः— भरे ( ५ ), आक्रन्दे ( ६ ), आहवे ( ७ ), आजौ ( ८ ), अभीके ( १० ), समीके ( ११ ), पृत्सु ( २१ ), समत्सु ( २२ ) वगैरे सप्तम्यंत शब्द दिले आहेत; पण रणः ( १ ), विवाक् ( २ ), विखादः ( ३ ), अज्म ( ४३ ) असे प्रथमांतही शब्द आहेत. स्पृधः ( १९ ) व मृधः ( २० ) ह्यांचा संग्राम असा अर्थ नसून शत्रु असा अर्थ आहे. १८ वाः— आनट् ( ४ ), आष्ट ( ५ ), आनशे ( ९ ) व अश्नुते ( १० ) हीं अश् धातूचीं रूपें आहेत. १९ वाः— वृणक्ति ( ५ ) व वृश्चति ( ६ ) हीं व्रश्च् धातूचीं रूपें आहेत. वधकर्मांत तळित् ( २१ ) व आखण्डल ( २२ ) हीं नामें घातलीं आहेत.

## अध्याय तिसरा.

**खंड १ लाः**— बहुनामांत बहु नाहीं. ३ राः— महन्नामांत ववक्षिथ (१४) व विवक्षसे (१५) हीं क्रियारूपें घातलीं आहेत. ५ वाः— ऋध्नोति ( ६ ) व ऋणद्धि ( ७ ) हीं ऋधूचीं रूपें आहेत. ६ वाः— सुखनामांत सुख नाहीं. ८ वाः— प्रशस्यनामांत पाकः (८) घातला आहे; पण त्याचा ज्ञानी असा अर्थ नसून अज्ञानी असा अर्थ आहे (पान १८९ ओळ २८ ). ११ वाः— ह्या खंडांत आचक्ष्म (३), चष्टे (४) व विचष्टे ( ५ ) हीं चक्ष् धातूचीं रूपें होत. पश्यतिकर्माणः ह्यांत विचर्षणिः ( ६ ) व विश्वचर्षणिः ( ७ ) हीं नामें घातलीं आहेत. ह्या गणांत पश्य्, दृश् व ईक्ष् नाहींत. १२ वाः— सर्वपदसमाम्नानाय ह्या खंडांत हिकं (१) व नुकं (२) हीं अव्ययें आहेत; आकीं ( ५ ), नकिः ( ६ ), माकिः ( ७ ), नकीं ( ८ ) हीं नामें होत. आहिकं ( ४ ) ऋग्वेदांत नाहीं. सर्व पदांचा संग्रह ह्या खंडांत नाहीं कारण त्यांत एकही क्रियारूप दिलें नाहीं. हा खंड व नंतरचा उपमाखंड ( १३ ) अप्रस्तुत होत; कारण त्यांत एकार्थवाचक शब्द नाहींत. १४ वाः— अर्चतिकर्मांत ह्वयते ( ८ ), पृच्छति ( १० ), धमति ( १२ ), यौति ( २७ ), रसति ( ४० ) व जल्पति ( ४४ ) हे शब्द घातले आहेत पण त्यांचा पूजा करणें हा अर्थ नाहीं. १७ वाः— यज्ञनामांत विष्णु शब्द घालण्याचें कारण विष्णुर्वै यज्ञः हें ब्राह्मणवचन होय. १८ वाः— ऋत्विङ्नामांतला वृक्तबर्हिषः ( ४ ) शब्द ऋत्विजः ह्याचें विशेषण आहे; कारण त्याचा अर्थ जे दर्भ कापून आसनें तयार करतात ते असा आहे. १९ वाः— याच्ञाकर्मांत दाद्धि ( ४ ), शग्धि ( ५ ), मिमिड्ढि ( ७ ), मिमीहि ( ८ ), रिरीहि

( १० ), यन्धि ( १३ ) हीं द्वितीयपुरुषीं आज्ञार्थी रूपें घातलीं आहेत; धन दे ही याचना आहे; पण दद्, मा, रा वगैरेंचा याचना करणें असा अर्थ कधींहि होणार नाहीं. ह्या गणांत यन्तारः ( १२ ) हें नाम असून त्याचा अर्थ दाते असा आहे. २० वाः— राति ( ४ ) व रासति ( ५ ) हीं रा धातूचीं रूपें होत. दानकर्मांत दिलेले दद्, शक्, मिह्, मा, रिह्, रा व यम् हे धातु द्यावयास पाहिजे होते. सा धातु कां दिला नाहीं ? २२ वाः— स्वपिति सस्ति इति स्वपितिकर्माणौ हें २९ व्या खंडांत घालावयास पाहिजे होतें; कारण त्या खंडांतील एकार्थवाची दोन-दोन शब्दांच्या जोड्यांप्रमाणें हीही जोडी आहे. २६ वाः— दूरनामांत दूर नाहीं. परावतः (५) चा दूर हा अर्थ चुकीचा आहे; परावतः = तीन स्वर्ग. २९ वाः— ऋक्षाः ( ९ ) स्तृभिः ( १० ) ह्या जोडींत ऋक्षाः ही प्रथमा आहे; पण स्तृभिः ही तृतीया आहे; स्तृभिः हें रूप घालण्याचें कारण स्तृ चें तेवढेंच रूप ऋग्वेदांत आहे; स्तृ चें प्रथमेचें बहुवचन द्यावयास पाहिजे होतें; तें कोणतें तें निघंटुकाराला माहीत नसावें. वम्रीभिः ( ११ ) उपजिह्विका ( १२ ) एथेंही वम्रीभिः बद्दल वम्र्यः घालावयास पाहिजे होतें. सिषक्तु ( २३ ) व सचते ( २४ ) ह्या दोहोंतही धातु सच्; तेव्हां ही जोडी कशी होईल ? सच् चीं सचस्व वगैरे आणखींही रूपें आहेत. ह्या खंडांतील कांहीं जोड्या उगाच बनविल्या आहेत; प्रपित्वे ( १ ) व अभीके ( २ ) त्याचप्रमाणें तिरः ( ५ ) व सतः ( ६ ) ह्या जोड्यांतले शब्द समानार्थक नाहींत. ३० वाः— मही (१८), उर्वी (१९), पृथ्वी (२०), दूरेअन्ते (२३) व अपारे (२४) हीं द्यावापृथिवी ह्या द्विवचनी शब्दाचीं विशेषणें होत; त्यांचा द्यावापृथिवी हा अर्थ नाहीं. अशा प्रकारचे निघंटूचे तीन अध्याय आहेत. त्यांत अर्वाचीन शब्द आहेत; शब्दांच्या व्युत्पत्तींत असलेले पण ऋग्वेदांत नसलेले कित्येक धातु घुसडले आहेत; नामांची व विशेषणांची भेसळ झाली आहे. विशिष्ट धातु दाखविण्याकरितां त्या धातूचें तृतीय पुरुषाचें एकवचन घालण्याचा प्रघात आहे; पण निघंटूंत एका धातूचीं अनेक रूपें घातलेलीं आढळतात. निघंटूच्या आधीं ऋग्वेदाचा अर्थ करण्याचे पुष्कळ प्रयत्न झाले असावेत; तशा प्रयत्नांशिवाय प्रस्तुत निघंटु अस्तित्वांत येणें अशक्य होतें. ऋग्वेदांत किंवा इतर वेदांत मागमूसही नाहीं अशा शेकडों शब्दांचा भरणा निघंटूंत आढळतो; निघंटूवरील टीकाकार देवराज त्यांतील शब्दांचीं उदाहरणें देत असतो; पण उदाहरण शोधून काढलें पाहिजे ( निगमः अन्वेषणीयः ) असें त्यानें ठिकठिकाणीं लिहिलें आहे. निघंटूंत प्रक्षिप्तें व अपभ्रंश बरेच असावेत; प्रक्षिप्तें कोणतीं तें ठरवितां येत नाहीं. व्युत्पत्तींतले धातु घुसडले आहेत असें वर म्हटलें आहे; ते निघंटुकारानें स्वतः होऊन घातले किंवा दुसऱ्या कोणी घुसडले तें कोण सांगेल ? निघंटुकाराचा अर्वाचीन संस्कृताशीं अत्यंत परिचय होता हें गोत्रा ( १।१।२१ ), कनक ( १।२।९ ), काञ्चन ( १।२।१० ), जातरूप ( १।२।१५ ), लोह ( १।२।८ ), किरण (१।५।२), बलाहक ( १।१०।२३ ), मनुष्यनामांतील ( २।३ ) पञ्चजन वगैरे शब्द घातले

आहेत यावरून स्पष्ट होतें. वर केलेल्या वर्णनावरून निघंटूंत निष्काळजीपणा बराच आहे असें म्हणावें लागतें. दाखविलेले दोष अपरिहार्य नाहींत; निघंटुकारानें थोडीशी काळजी घेतली असती तर ग्रंथ बराचसा निर्दोष झाला असता. एथपर्यंत एकार्थवाची शब्दांचा विचार झाला.

## अध्याय चवथा

ह्या अध्यायांत अनवगतसंस्कार व अनेकार्थ शब्द घातले आहेत; वास्तविक अनवगतसंस्कार शब्द घालण्याचें कांहींएक कारण दिसत नाहीं; मागें आलेले हिरण्य वगैरे शब्द व दैवतप्रकरणांत येणारे अग्नि वगैरे शब्द अनवगतसंस्कार होत. ह्या प्रकरणाला नैगमकांड म्हणणें हेंही बरोबर होणार नाहीं; कारण निघंटूंतला प्रत्येक शब्द निगमच आहे; नैगमबद्दल ऐकपदिक हेंच नांव योग्य होय; कारण एथें एकेक पदाचा विचार करावयाचा आहे; आधींच्या तीन अध्यायांप्रमाणें एथें एकवर्गीय शब्दांचा विचार करावयाचा नाहीं. अध्यायांतील बरेचसे शब्द अनेकार्थ आहेत; अनेकार्थ नसलेले इतर शब्द कां घातले व कोणी घातले तें सांगणें अशक्य आहे. कदाचित् दुसऱ्या एखाद्या निघंटूंतील अनवगतसंस्कार शब्द एथें कोणीतरी अविचारानें घातले असतील. अध्यायाचे तीन खंड केले असून पहिल्याच्या शेवटीं इति द्विषष्टिः पदानि, दुसऱ्याच्या इति चतुरुत्तरम् अशीतिः पदानि व तिसऱ्याच्या इति द्वात्रिंशच्छतं पदानि असे शब्द आहेत; असे खंड करण्याचें कारण समजत नाहीं. प्रत्येक खंडांत अनवगतसंस्कार व अनेकार्थ शब्द आहेत. अनवगतसंस्काराचा एक, अनवगतार्थाचा दुसरा व अनेकार्थाचा तिसरा असे तीन खंड केले असते तर निघंटुकाराच्या मनांत ह्या अध्यायांतील प्रत्येक शब्द देण्याचा काय हेतु होता तें सहज समजलें असतें; त्याच्या अभावीं यास्क व दुर्ग यांच्या हातून बऱ्याचशा चुका घडल्या आहेत व इतरांच्या हातूनही चुका घडण्याचा पुष्कळ संभव आहे. दुर्ग ह्या सर्व पदांचे दोन वर्ग करतो; ते दोन वर्ग म्हणजे अनवगत व अनेकार्थ; अनवगताचे अनवगतसंस्कार व अनवगतार्थ असे अवांतर दोन भाग केले आहेत. पहिल्या खंडांतील जहा ( १ ) दुसऱ्यांतील आहनः ( ११ ), ससं ( १८ ), काणुका ( ४२ ), अध्रिगुः ( ४३ ), आरितः (५७), केपयः ( ७३ ), बीरिटे ( ७७ ) व तिसऱ्यांतील अलातृणः ( ५ ), सलल्लूकं ( ६ ), अस्कृधोयुः ( ११ ), ऋदूदरः ( १४ ), कपना ( १८ ), किमीदिने ( ४४ ), जारयायि ( ६२ ), जबारु ( ७९ ), इलीबिशः ( ८५ ), प्रतद्वसू ( ९३ ), जह्नवः ( १०७ ), बेकनाटान् ( १०९ ), क्रिविर्दती ( १२२ ), करूळती ( १२३ ) हे व इतर आणखीही कित्येक शब्द अनवगतसंस्कार व अनवगतार्थ होत; हे शब्द कसे बनले व त्यांचा अर्थ काय तें खटपट केल्याशिवाय समजत नाहीं; अशा शब्दांची संख्या सुमारें १६० आहे. खंड १ लाः—जठरे ( ९ ) व तितउ ( १० ); २ राः— आङ्गूषः ( ४४ ) व उर्वशी ( ४७ ) हे अनवगतसंस्कार होत; कारण

त्यांच्या अर्थाविषयीं प्रश्न नाहीं. खंड २ राः— सर्नि ( १ ), असश्चन्ती ( ७ ), द्विता ( १९ ), स्वसराणि ( २२ ), शर्याः ( २३ ), वक्षः ( २६ ), सचा ( ३० ), आघृणिः ( ३९ ), पृथुज्रयाः ( ४० ), गर्ध्यं ( ५१ ), गधिता ( ५२ ), व्रन्दी ( ५८ ), पर्दि ( ६३ ), पादुः ( ६४ ), जोषवाकं (६६), अच्छ (७८); ३ राः— असिन्वती ( १७ ), भाऋजीकः ( १९ ), अभ्यर्धयज्वा ( २६ ), सप्रथाः ( ३२ ), श्रायन्तः ( ३४ ), देवो देवाच्या कृपा ( ३९ ), विजामातुः ( ४० ), रुशत् ( ५२ ), सुविदत्रः ( ५५ ), जञ्झतीः ( ६८ ), द्विबर्हाः ( ७४ ), तुञ्जः ( ८२ ), बर्हणा (८३), सुमत् (९७), दिविष्टिषु (९८), असामि (१०५), आधवः ( ११७ ), अनवब्रवः ( ११८ ) हे शब्द अनवगतार्थ म्हणून घातले आहेत; त्यांत व्युत्पत्तीची भानगड नसून त्यांचा अर्थ ठरवावयाचा आहे. खंड १ लाः— शिताम ( ३ ), मेहना ( ४ ), दमूनाः ( ५ ), इषिरेण ( ७ ); २ राः— वावशानः ( ४ ), हासमाने ( १६ ); ३ राः— अग्रिया ( ६३ ) ह्या शब्दांचे निरनिराळ्या व्युत्पत्तीं-मुळें एकाहून अधिक अर्थ होतात; त्यामुळें त्यांचा निश्चित अर्थ करतां येत नाहीं. जरते ( ४।१।५२ ), चयसे ( ४।१।५८ ) व जरूथं (४।३।८०) हे शब्द घालण्याचें कारण त्यांतील धातूंचा अर्थ अर्वाचीन धातुपाठांत नाहीं. १ लाः— श्यति बद्दल शिशीते ( ३४ ), च्यावनः बद्दल च्यवनः ( ३८ ), जुह्रिरे बद्दल जुहुरे ( ४१ ), आ + ईरांचक्रे बद्दल एरिरे ( ५० ), तुताव बद्दल तूताव ( ५७ ); २ राः— वोढृतमः बद्दल वाहिष्ठः ( २ ), वनुते बद्दल वनुष्यति ( ८ ), तरुते बद्दल तरुष्यति ( ९ ); ३ राः— रुजत्यः बद्दल रुजानाः ( २० ), ईशिषेबद्दल ईक्षे ( २७ ), प्रसवे बद्दल सवीमनि ( ३१ ), वेदनानि बद्दल विदथानि ( ३३ ), अगारीः बद्दल अजीगः ( ३६ ), असुसमीरिताः बद्दल असूर्ते ( ५९ ), सुसमीरिते बद्दल सूर्ते ( ५९ ), अमितः बद्दल अमिनः ( ६७ ), शाशायमानः बद्दल शाशदानः ( ७० ), रमणीयेषु बद्दल रंसु ( ७३ ), हिनुत बद्दल हिनोत ( ९४ ), अभिधावत बद्दल अभिधेतन ( ११० ), अंहस्वान् बद्दल अंहुरः ( १११ ) हीं रूपें अर्वाचीन व्याकरणदृष्ट्या अशुद्ध म्हणून घातलीं आहेत. निधिः बद्दल निधा ( ४।१।२ ) घालण्याचें कारण तो अर्वाचीन संस्कृतांत नाहीं एवढेंच; पण तेवढ्यानें तो अनवगतसंस्कार किंवा अशुद्ध ठरत नाहीं. १ लाः— मध्ये बद्दल मध्या ( १२ ); २ राः— पद्भिः बद्दल पड्भिः ( १७ ); ३ राः— पुरुकामः बद्दल पुलुकामः ( १६ ), प्रकलावित् बद्दल प्रकलवित् ( २५ ), अमूढः बद्दल अमूरः ( ३७ ), शंसमानः बद्दल शशमानः ( ३८ ), गीर्वाणः बद्दल गिर्वणाः ( ५८ ), अप्रतिष्कृतः बद्दल अप्रतिष्कुतः (६९), चोकूयमानः बद्दल चोष्कूयमाणः ( ९५ ), चोकूयते बद्दल चोष्कूयते ( ९६ ), अमात्रः बद्दल अमत्रः (१०१), ऋचा समः बद्दल ऋचीषमः ( १०२ ) हे शब्द प्रामादिक उच्चारांचीं उदाहरणें होत. शिशीते वगैरे अपाणिनीय रूपांना व प्रमादानें उच्चारलेले मध्या वगैरे शब्दांना अनवगत म्हणतां येणार नाहीं; त्यांतील संस्कार अर्वाचीन व्याकरणाच्या

व उच्चाराच्या विरुद्ध आहेत एवढेंच. १ लाः— गातुः (५५), दंसयः (५६), वियुते (५९); २ राः— वार्यं (५), मन्दनाः (१०), नदः (१२), ऊतिः (१५), इत्था (२९), विष्णुः (३८), वाजगन्ध्यं (५०), परि (७९), ईम् (८०), सीं (८१), एनं (८२), एनां ( ८३ ); ३ राः— ऋञ्जतिः ( ९१ ) हे शब्द ऐकपदिकांत कां घातले तें दुर्ग सांगत नाहीं. १ लाः— विद्रधे ( १८ ), द्रुपदे ( १९ ), वाहः ( २६ ), परितक्म्या ( २७ ), सुविते ( २८ ), दयते ( २९ ), नूचित् ( ३० ), नूच ( ३१ ), अकूपारस्य ( ३३ ), सुतुकः ( ३५ ), रजः ( ३९ ), हरः ( ४० ), व्यन्तः ( ४२ ), वाशीभिः ( निघंटूंत वाशी ४४ ), जामिः ( ४६ ), गौः ( ५४ ), ऋधक् ( ६० ), २ राः— अन्धः ( ६ ), सोमो अक्षाः ( १३ ), वराहः ( २१ ), अर्कः ( २४ ), चित् ( ३१ ), आ ( ३२ ), द्युम्नं ( ३३ ), पवित्रं ( ३४ ), शिपिविष्टः ( ३७ ), काणुका ( ४२ ), अध्रिगुः ( ४३ ), आपान्तमन्युः ( ४५ ), वयुनं ( ४८ ), निचुम्पुणः ( ६२ ), वृकः ( ६५ ), कृत्तिः ( ६७ ), समस्य ( ६९ ), अंसत्रं ( ७५ ), बीरिटे ( ७७ ); ३ राः— आशाभ्यः ( २ ), अस्मे ( २९ ), पाथः ( ३० ), आशीः ( ३५ ), अमवान् ( ४५ ), व्रतः ( ११२ ), शिरिम्बिठः ( १२० ), पराशरः ( १२१ ), इदंयुः ( १२६ ) ह्या शब्दांचे एकाहून अनेकार्थ आहेत असें यास्क व दुर्ग म्हणतात; पण त्यांपैकीं पहिल्यांतील परितक्म्या ( २७ ), दयते ( २९ ), नूचित् ( ३० ), रजः ( ३९ ), हरः ( ४० ), व्यन्तः ( ४२ ), वाशीभिः ( ४४ ), जामिः (४६), गौः (५४), ऋधक् (६०); दुसऱ्यांतील अर्कः (२४), चित् (३१), आ (३२), पवित्रं ( ३४ ), अध्रिगुः ( ४३ ), वयुनं (४८); तिसऱ्यांतील आशाभ्यः ( २ ), पाथः ( ३० ), आशीः ( ३५ ), पराशरः (१२१) व इदंयुः ( १२६ ) ह्यांतील यु ह्यांचे अनेकार्थ आहेत असें खात्रीनें म्हणतां येतें. पहिल्यांतील मन्दू (१३) विद्रधे (१८) व द्रुपदे (१९) ह्यांचा दोन तऱ्हेनें अन्वय होतो एवढेंच म्हणतां येईल. अस्मे (४।३।२९) हा शब्द सातही विभक्त्यर्थी असतो हें खरें आहे पण त्यामुळें तो अनेकार्थ होत नाहीं. पहिल्यांतील वाहः ( २६ ); दुसऱ्यांतील सोमो अक्षाः ( १३ ), कृत्तिः ( ६७ ) व समस्य ( ६९ ) हे शब्द विशिष्ट ऋचांत आले असून तेथें त्यांचा अर्थ काय आहे हा प्रश्न सोडवावयाचा आहे; त्याचप्रमाणें देवो देवाच्या कृपा ह्यांतील कृपा ह्याचाही अर्थ ठरवावयाचा आहे. दुसऱ्यांतील शिपिविष्टः ( ३७ ), काणुका ( ४२ ), आपान्तमन्युः ( ४५ ), निचुम्पुणः (६२), अंसत्रं ( ७५ ), बीरिटे ( ७७ ) व तिसऱ्यांतील शिरिम्बिठः (१२०) हे शब्द दुर्बोध आहेत. पहिल्यांतील सुविते (२८), अकूपारस्य ( ३३ ), सुतुकः ( ३५ ), वाशीभिः (४४) व दुसऱ्यांतील द्युम्नं ( ३३ ), वृकः (६५) ह्या शब्दांचे एकाहून अधिक अर्थ होत नाहींत. दुसऱ्यांतील अन्धः (६) अनेकार्थ नाहीं कारण अन्धस् व अन्ध हे भिन्न शब्द आहेत; अन्धः अन्धसी अन्धांसि असा अन्धस् शब्द चालतो; संदर्भावरून अन्धः ह्याचा सोम किंवा अंधळा असा अर्थ सहज लक्षांत येईल. वराहः (४।२।२१) ह्याचा डुकर असा अर्थ असून तो एक दोन ठिकाणीं

मरुतांना लक्षणेनें लाविला आहे; गौः ( ४।१।५४ ) संबंधानें हेंच विधान खरें आहे. पहिल्यांतील शिशीते ( ३४ ), मन्दी ( ५३ ), गातुः ( ५५ ), चयसे ( ५८ ); दुसऱ्यांतील सस्निं ( १ ), वनुष्यतिः ( ८ ), भन्दनाः ( १० ), ऊतिः ( १५ ), स्वसर ( २२ ), धन्व ( २७ ), सिनं ( २८ ), इत्था ( २९ ), सचा ( ३० ), चित् ( ३१ ), स्वञ्चाः ( ३६ ), अच्छ ( ७८ ), परि ( ७९ ), ईं ( ८० ), सीं ( ८१ ); तिसऱ्यांतील ईक्षे ( २७ ), अमीवा ( ४६ ), अमति ( ४९ ), श्रुष्टी ( ५० ), रुशत् ( ५१ ), चनस् ( ६४ ), शाशदान ( ७० ), सुशिप्र ( ७२ ), ऋञ्जति ( ९१ ), ऋजु ( ९२ ), चोष्कूय् ( ९५ ), जिन्वति ( १०० ), बुन्द ( १२८ ) हे शब्द अनेकार्थी आहेत असें त्या त्या ठिकाणीं सिद्ध केलें आहे; तथापि ते अनेकार्थ आहेत असें यास्काच्या ध्यानांत आलें नाहीं. पहिल्यांतील मूषः ( ६ ), सुप्रायणाः ( ३६ ), वियुते ( ५९ ), अस्याः ( ६१ ), अस्य ( ६२ ); दुसऱ्यांतील वार्यं ( ५ ), नदः ( १२ ), पविः ( २५ ), एनं ( ८२ ), एनां ( ८३ ); तिसऱ्यांतील दुरितं ( ४७ ), सुदत्रः ( ५४ ), ऋजुनीती ( ९२ ) हे शब्द अनवगतसंस्कार किंवा अनवगतार्थ नसल्यामुळें ते ऐकपदिकांत घालण्याचें कांहींएक कारण नाहीं. शिश्नं ( पा. २४७ ओ. २ ), सिलिक ( २६३।३२ ), शुन्ध्युः किंवा शुन्ध्यूः ( २७२।३३ ), अह्यः (३०७।१५), पियारुं ( ३०९।७ ), एमुषं (३४३।२९), उस्रा (३४६।४), मुक्षीजा (३९२।५), विन्धे ( ४८३।२८ ), ग्रंसः (४८४।३४), वायः ( ५११।१८ ) हे व असेच अनेक शब्द ऐकपदिकप्रकरणांत घालणें जरूर होतें. ह्या सर्व विवेचनावरून चौथ्या अध्यायांतील २७८ शब्द अमक्या एका उद्देशानें घातले गेले असें म्हणतां येत नाहीं. निघंटुकारानें ह्यांतील प्रत्येक शब्दाचें उदाहरण दिलें असतें तर त्याच्या मनांतला हेतु स्पष्ट कळला असता; उदाहरण न देणें हा ह्या ग्रंथाचा मोठा दोष होय. अर्थ व उदाहरणें न दिल्यामुळें यास्क दुर्ग वगैरे चुकले ह्यांत नवल नाहीं. पहिल्यांतीलः– इषिरेण ( ७ ), चयसे ( ५८ ); तिसऱ्यांतील शाशदानः ( ७० ), स्तियानां ( ७७ ), जरूथं ( ८० ), ततनुष्टिं ( ८४ ), प्रतद्वसू ( ९३ ), अनर्शरातिं ( १०३ ), गल्दया (१०६), बेकनाटान् (१०९),असक्रां(११६),सदान्वे(११९), कीकटेषु (१२७) ह्या शब्दांचीं प्रथमांतरूपें न देण्याचें कारण ते शब्द त्याच रूपांत व एकदांच ऋग्वेदांत आले आहेत. हें कारण जर खरें असेल तर तितउना ( ४।१।१० ), जसुरिं ( ४।१।५१ ), तुञ्जे (४।३।८२), इलीबिशस्य (४।३।८५), रास्पिनस्य (४।३।९०), बकुरेण (४।३।१०८) व शिरिम्बिठस्य (४।३।१२०) हीं रूपें त्याच कारणाकरितां तशींच द्यावयास पाहिजे होतीं; पण त्यांच्याबद्दल तितउ, जसुरिः, तुञ्जः, इलीबिशः, रास्पिनः, बकुरः, शिरिम्बिठः अशीं प्रथमान्त रूपें घातलीं आहेत. अकूपारः व अकूपारस्य अशीं दोनच रूपें व तीं एकएकदांच आलीं आहेत; तथापि ज्या ऋचेंत अकूपारस्य रूप आलें आहे तेथें त्याचा काय अर्थ होतो हें ठरविण्याकरितां अकूपारस्य हें रूप घातलें असेल. पण मन्दी, मन्दिनं, मन्दिनः, मन्दिना, मन्दिभिः व मन्दिने ह्यांपैकीं मन्दिने

( ४।१।५३ ) एवढेंच रूप कां घेतलें ? पहिल्यांतील जठरे ( ९ ), सुविते ( २८ ), वाशीभिः (४४); दुसऱ्यांतील सस्नि (१), स्वसराणि (२२) व तिसऱ्यांतील विदथानि ( ३३ ), रिशादसः ( ५३ ) अशा रूपांनीं कांहींसा गोंधळ होतो; त्यांच्या ऐवजीं प्रथमांत एकवचनी रूपें घालावयास पाहिजे होतीं; त्याचप्रमाणें अमवान् (४।३।४५) बद्दल अमः असें रूप घालणें जरूर होतें. प्रथमान्त एकवचनीं रूपें देऊन नंतर विशिष्ट रूपें विशिष्ट कारणाकरितां दिलीं असतीं तर गोंधळाला कारण उरलें नसतें. विष्पितस्य व विष्पिता अशीं दोनच रूपें ऋग्वेदांत आहेत; निघंटूंत विष्पितः(४।३।८८) असें पुल्लिंगी रूप दिलें आहे; पण विष्पिता ( = विष्पितानि ) ह्या रूपावरून विष्पितं असें नपुंसकरूप पाहिजे. निघंटु रचण्यांत फारसा विचार केला नाहीं हें विष्पितः ह्या रूपावरून व आरंभापासून एथपर्यंत केलेल्या विवेचनावरून सिद्ध होतें. अभिधेतन ( ४।३।११० ) हा शब्द घालण्याचें कारण त्याचा अभिधावत ( = धांवत या ) हा अर्थ पूर्वींच्या विवरणकारांनीं केला व तसा अर्थ करण्याला मत्स्यां-संबंधानें एक निदान म्हणजे गोष्टही आहे हें दाखविणें होय; ह्यावरून मंत्रद्रष्टे व निघंटुकार ह्यांच्यामध्यें विवरणकार होऊन गेले हें स्पष्ट आहे. निरुक्त १।२० ( पा. ६६ ) एथें मंत्रद्रष्टयांनीं पुढच्या पिढीला मंत्र सांगितले व ज्यांना मंत्रांचा उपदेश केला गेला त्यांनीं निघंटुग्रंथ रचला म्हणजे मंत्र अस्तित्वांत आल्यानंतर लगेच निघंटु-ग्रंथ रचला गेला असें म्हटलें आहे; हें म्हणणें खोडून टाकण्याला निघंटूंत दिलेला अभिधेतन हा एकच शब्द पुरेसा आहे. चौथ्या अध्यायांत वैदिक ग्रंथांत येणारे शब्द घातले आहेत; त्याला अपवाद वृन्दं ( ४।३।१२९ ) हा अर्वाचीन शब्द होय; तो ऋग्वेदांत किंवा इतर वेदांतही नाहीं (पा. ५२६ पहा). कुरुतन (४।१।८) व इदंयुः ( ४।३।१२६ ) हे शब्द ऋग्वेदांत नाहींत; ते निघंटूंत घालण्याचें कारण ज्या क्रिया-रूपांच्या शेवटीं तन किंवा थन हा प्रत्यय येतो व ज्या नामांच्या शेवटीं यु प्रत्यय येतो ते शब्द सूचित व्हावेत हें; कुरुतन ह्यानें कर्तन, हन्तन, शृणोतन, जुजुष्टन, अब्रवी-तन, याथन, गाथन अशीं क्रियापदें सूचित होतात ( पा. २५१ ); कदाचित् कुरुतन ह्यांतील नें महित्वनं सखित्वनं अशीं नामरूपेंही सुचविण्याचा हेतु असेल; हीं सर्व रूपें अर्वाचीन व्याकरणदृष्ट्या अशुद्ध होत. त्याचप्रमाणें युकारान्त शब्दांचें अनेकार्थ होतात हें इदंयुः ह्या शब्दानें सांगावयाचें असेल.

## अध्याय पांचवा

ऋचेंत ज्या वस्तूचें वर्णन केलें असेल ती वस्तु त्या ऋचेची देवता असा सिद्धांत आहे; तदनुरूप दुसऱ्या खंडांतील इध्म, बर्हिस्, यज्ञद्वारें, वनस्पति, स्वाहाकृति; तिसऱ्यांतील अश्व, शकुनि, मंडूक, अक्ष, ग्रावे, नाराशंसमंत्र, रथ, दुंदुभि, इषुधि ( भाता ), हस्तघ्न, अभीशु ( लगाम ), धनुष्य, ज्या, इषु, अश्वाजनी ( चाबूक), उखळ, वृषभ, द्रुघण ( लांकडी घण ), पितु ( सोम ), ओषधि, अरण्यानी, श्रद्धा,

मुसळ, हविर्धानशकट, आर्त्नी (धनुष्याचा एक भाग); पांचव्यांतील श्येन, सोम, देवांची कुत्री सरमा व वाक् हीं नांवें देवतावाचक म्हणून घातलीं आहेत. अग्नि व जातवेदस् ह्या नांवांविषयीं दुमत नसल्याकारणानें तीं नांवें पहिल्या प्रथम घातलीं व जातवेदस्पेक्षां अग्नि हें नांव अधिक प्रसिद्ध असल्यानें त्याला पहिलें स्थान दिलें गेलें. वैश्वानर व द्रविणोदस् ह्या नांवांसंबंधानें पुष्कळ वादविवाद झाला; वैश्वानर म्हणजे आदित्य असें पूर्वयाज्ञिक म्हणूं लागले व द्रविणोदस् हें इंद्राचेंच नांव असा एका पक्षानें आग्रह धरला; पण हे दोन्ही शब्द अग्निवाचकच होत असें शाकपूणीनें सिद्ध केलें व तेंच मत शेवटीं ग्राह्य ठरलें. आप्रीदेवतांसंबंधानेंही असाच वाद उत्पन्न झाला; इध्म, बर्हिस् वगैरे शब्द अग्निवाचक नाहींत हें त्या नांवावरूनच सिद्ध होतें असें कात्थक्याचें मत होतें; पण हीं नांवें अग्निवाचक होत असें शाकपूणीनें ठरविलें. तनूनपात् व नराशंस हे वगळून बाकीचे शब्द अग्निवाचक खास नव्हत; तथापि अग्नीशिवाय यज्ञ नाहीं व यज्ञांत आप्रीसूक्तांचा विनियोग केला असतो म्हणून हीं नांवें दुसऱ्या खंडांत घातलीं असावींत. अग्नि, जातवेदस् व वैश्वानर हे पहिल्या खंडांत घालण्याचें कारण ते सूक्तभाक् (सूक्तभाजः) असून हविर्भाक्ही (हविर्भाजः) आहेत. द्रविणोदस् ह्या नांवानें हवि कोठेंही दिलेला नाहीं म्हणून तो दुसऱ्या खंडांत घातला गेला व तदनंतर अग्निवाचक म्हणून आप्रीसूक्तांतील देवतांचीं नांवें घातलीं; ह्या देवता हविर्भाक् (हविर्भाजः) व ऋग्भाक् (ऋग्भाजः) होत. तनूनपात् व नराशंस वगळून बाकींच्यापैकीं प्रत्येक देवता दहा दहा ऋचांत आली आहे; तनूनपात् व नराशंस ह्यांच्या वाट्याला सहा सहा ऋचा येतात. दुसऱ्यांतील इध्म, इळ व स्वाहाकृति असे अग्निवाचक शब्द ऋग्वेदांत नसतांना ते अनुक्रमें समिद्ध, ईड्य व स्वाहाकृतं हविः (१०।११०।११) ह्यांतून निर्माण केले आहेत. तिसऱ्या खंडांत ३६ पदें आहेत; त्यांपैकीं अश्वः (१), शकुनिः (२), मण्डूकाः (३), अक्षाः (४), ग्रावाणः (५), पितुः (१९), नद्यः (२०), आपः (२१), ओषधयः (२२), अरण्यानी (२४), श्रद्धा (२५), विपाट्छुतुद्री (३२) हीं १२ पदें सूक्तभाक् व बाकीं राहिलेलीं पदें ऋग्भाक् होत. रथाला हवि द्यावा असें म्हटलेलें आढळत नाहीं; तथापि ६।४७।२८ त देव रथ प्रति हव्या गृभाय (= हे रथा, हवि घे) असें रथाला म्हटलें आहे; तेव्हां प्रघासास निघण्याच्या आधीं रथाला हवि देण्याचा प्रघात असेल. रथपासून अश्वाजनीपर्यंतचा शब्दांचा क्रम सोडल्यास बाकींच्या शब्दांचे क्रम कोणत्या तत्त्वावर केले आहेत तें समजत नाहीं. अश्वः, शकुनिः, मण्डूकाः, अक्षाः, ग्रावाणः हीं पदें खंडाच्या आरंभीं कां ? उलूखल (१६) शब्दाची पुनरुक्ति उलूखलमुसले (२९) ह्यांत झाली आहे. नाराशंसः (६) हें कोणत्याही देवतेचें नांव नसून ज्या ऋचेंत दानशूर पुरुषांचें वर्णन केलें असतें अशा ऋचांना लाविलें आहे. द्यावापृथिवी (३१) हें जोडपें ऋग्भाक् देवतांत घातलें आहे; पण द्यावापृथिवी सूक्तभाक्ही आहेत; ह्या खंडांत त्या सूक्तभाक् आहेत कीं नाहींत तें सांगतां येत

नाहीं; ह्या खंडांत सूक्तभाक् देवता १२ आहेत असें आधींच म्हटलें आहे; तेव्हां द्यावापृथिवी ह्याही सूक्तभाक् असतील. खंडाच्या प्रारंभीं सूक्तभाक् देवतापदें सांगून मग ऋक्भाक्पदें द्यावयास पाहिजे होतीं. राजेलोकांना युद्धसामुग्रीची जरूर लागते म्हणून नाराशंसः नंतर अश्व रथ धनुष्य वगैरे शब्द घातले आहेत. वृषभः (१७) व द्रुघणः ( १८ ) हे एका संग्रामरथाला विजय मिळविण्यासाठीं जोडले होते म्हणून त्यांचा समावेश केला असावा. आर्त्नी ( ३३ ) चा प्रत्यंचेशीं संबंध असल्यामुळें तो शब्द ज्या ( १३ ) नंतर घालावयास पाहिजे; पण तो द्विवचनी असल्याकारणानें द्विवचनी शब्दांत घातला आहे. अप्वे शब्द घालण्याचें कारण भय व रोग पृथ्वीवर असतात हें. एक ते तीन ह्या खंडांत ज्यांचा पृथिवीशीं संबंध आहे अशा देवतांचीं व वस्तूंचीं नांवें घातलीं आहेत; पण द्यावापृथिव्यौ व शुनासीरौ हे शब्द घालण्याचें कारण लक्षांत येत नाहीं; शुनासीरौ म्हणजे वायु व सूर्य किंवा सायणाचार्य म्हणतात त्याप्रमाणें इंद्र व वायु आणि द्यावापृथिव्यौ मधील द्यौ ह्या पृथ्वीवरील देवता नव्हत. हे शब्द एथें कां घातले तें समजण्याकरितां यज्ञाच्या इतिहासाची माहिती पाहिजे; पण तसा इतिहास यजुर्वेद व ब्राह्मणें ह्यांत कितीसा आहे हें मला सांगतां येत नाहीं. तिसऱ्या खंडांतला शब्दांचा क्रम कांहीं विशिष्ट कारणावर अवलंबून आहे किंवा शब्द हवे तसे मांडले आहेत हें कळणें जरूर आहे. ४ थाः— वायुः ( १ ), वरुणः ( २ ), रुद्रः ( ३ ), इन्द्रः ( ४ ), पर्जन्यः ( ५ ), बृहस्पतिः ( ६ ), ब्रम्हणस्पतिः ( ७ ), वास्तोष्पतिः ( ९ ), वाचस्पतिः ( १० ), अपां नपात् ( ११ ), यमः ( १२ ), मित्रः ( १३ ), कः ( १४ ), विश्वकर्मा ( १६ ), तार्क्ष्यः ( १७ ), मन्युः ( १८ ), दधिक्राः ( १९ ), सविता ( २० ), वातः ( २२ ), वेनः ( २४ ) हे सूक्तभाक् असून बाकीचे ऋक्भाक् होत. वायुः पासून इन्दुः पर्यंत २७ नांवें सूक्तभाक् व हविर्भाक् असून त्यांपैकीं वेनः, असुनीतिः, ऋतः व इन्दुः वगळून बाकीचीं २३ नांवें हविर्भाक् होत असें निरुक्त १०।४२ त ( पानें ८४४ व ८४५ पहा ) म्हटलें आहे; परंतु ह्या सत्ताविसांतील क्षेत्रस्यपतिः ( ८ ), सरस्वान् ( १५ ), त्वष्टा ( २१ ), असुनीतिः ( २५ ), ऋतः ( २६ ) व इन्दुः ( २७ ), ह्यांना व अंतरिक्षांतील अग्नीला ( २३ ) सूक्तभाक् म्हणतां येत नाहीं. वायुः ( १ ), वरुणः ( २ ), रुद्रः ( ३ ), इन्द्रः ( ४ ), पर्जन्यः ( ५ ) हा क्रम पाऊस कसा उत्पन्न होतो व पडतो ह्यावर अवलंबून आहे; वायु पाणी वाफेच्या रूपानें वाहून नेतो, वरुण त्या वाफेनें आकाश आच्छादितो, वाफेचे ढग बनतात व रुद्र त्यांना गर्जना करण्यास लावतो, इंद्र ढग वज्रानें फोडतो व नंतर पर्जन्य पाऊस पाडतो. तार्क्ष्यः ( १७ ), मन्युः ( १८ ), दधिक्राः ( १९ ) हीं इंद्राचीं नांवें म्हणून ह्या खंडांत घातलीं असावींत. बृहस्पति ( ६ ) व ब्रह्मणस्पति ( ७ ) हे इंद्राप्रमाणें मेघ फोडून जलाचा वर्षाव करतात व वेन ( २४ ) ह्याचाही उदकाशीं संबंध येतो म्हणून त्यांना अंतरिक्षपदांत स्थान दिलें आहे. वातः ( २२ ) म्हणजे वारा व

इन्दुः ( २७ ) म्हणजे चंद्र हे अंतरिक्षांत असतात. यमः ( १२ ) व असुनीतिः ( २५ ) हीं नांवें एथें घालण्याचें कारण प्राणी मरणानंतर अंतरिक्षलोकीं येऊन राहतात; ब्रह्मज्ञानाशिवाय द्युलोकाकडे त्यांना जातां येत नाहीं. बाकीचीं नांवें ह्या खंडांत कां घातलीं तें सांगतां येत नाहीं. वाचस्पतिः ( १० ), मित्रः ( १३ ), कः ( १४ ), विश्वकर्मा ( १६ ), सविता ( २० ), त्वष्टा ( २१ ), प्रजापतिः ( २८ ) हे देव द्युलोकांतले असावेत. क्षेत्रस्यपतिः ( ८ ), वास्तोष्पतिः ( ९ ), सरस्वान् (१५), अग्निः ( २३ ) ह्यांचें स्थान पृथ्वी असावें. ५ वाः— सोमः ( २ ), मरुतः ( ८ ), ऋभवः ( १० ), पितरः ( १२ ), अदितिः ( १६ ), सरस्वती ( १८ ) ह्या सूक्तभाक् व राहिलेल्या ऋक्भाक्. ह्या खंडांतलीं सोमः ( २ ) व चन्द्रमाः ( ३ ) हीं नांवें चौथ्या खंडांतील इन्दुः ( २७ ) ह्याच्या आधीं किंवा मागाहून कां घातलीं नाहींत ? इंदूप्रमाणें सोम ह्याचाही चंद्र असा अर्थ होतो. सरमा ( १७ ), वाक् ( १९ ), उर्वशी ( २५ ), गौरी ( २८ ), गौः ( २९ ), धेनुः ( ३० ), अघ्न्या ( ३१ ) हीं विजेचीं निरनिराळीं नांवें असल्यामुळें तीं अंतरिक्षगणांत घातलीं असावींत. पुरूरवस् ( ३२ ) ह्याचा उर्वशीशीं संबंध असल्याकारणानें त्याचेंही स्थान अंतरिक्ष. इंद्रानें श्येनाचें रूप घेऊन द्युलोकांतून सोम खालीं आणला म्हणून श्येन ( १ ) अंतरिक्षांतला. अनुमतिः ( २० ), राका ( २१ ), सिनीवाली ( २२ ) व कुहूः ( २३ ) ह्यांचा चंद्राशीं संबंध आहे. इन्द्राणी ( २७ ) इंद्राची, व रोदसी ( ३६ ) रुद्राची बायको म्हणून आणि यमी ( २४ ) यमाची बहीण म्हणून त्यांचें स्थान अंतरिक्ष. मृत्युः व यमः हीं नांवें एकाच देवाचीं; तेव्हां मृत्युः ( ४ ) हें नांव यमः ( ५।४।१२ ) ह्याच्या शेजारींच असावयास पाहिजे. आङ्गिरसः ( ११ ), पितरः ( १२ ), अथर्वाणः ( १३ ), भृगवः ( १४ ) हा पितृगण यमलोकीं असतो. धाता ( ६ ), विधाता ( ७ ), ऋभवः ( १० ), उषाः (३४) ह्यांचें स्थान अंतरिक्ष नसून द्युलोक होय; अदितिः ( १६ ) ही देवमाता असल्याकारणानें तिचेंही स्थान द्युलोकच. मरुतः ( ८ ) व रुद्राः ( ९ ) ह्या देवगणांचें स्थान अंतरिक्ष. सरस्वती ( १८ ), पृथिवी ( २६ ), पथ्या ( ३२ ), स्वस्तिः ( ३३ ) व इळा ( ३५ ) ह्यांचा पृथिवीशीं संबंध असावयास पाहिजे. विश्वानर ( ५ ) व आप्त्य ( १५ ) हीं देवांचीं नांवें नसून विशेषणें आहेत. ह्या दोन खंडांतील बरीचशीं नांवें तेथें कां घातलीं तें सांगतां येत नाहीं. अंतरिक्षगणांत अग्नि, उषा, सविता व पृथिवी हीं नांवें घालण्याचीं कारणें पुढीलप्रमाणें असावींतः— मरुतांसह ये असें अग्नीला (पान ८३० ओळ १३) म्हटलें आहे; मरुत् अंतरिक्षांतील म्हणून अग्नीही अंतरिक्षांतील; इंद्र उषेच्या रथाचा चुराडा करतो व उषा भीतीनें लांब पळून जाते (पान ९४९ ओळ ६); द्युलोकांतील उषेशीं इंद्राला कांहीं कर्तव्य नाहीं; तेव्हां उषा म्हणजे वीज व तिचा रथ म्हणजे मेघ; मेघ फुटल्याबरोबर त्यांत अडकलेली वीज निसटून जाते; सविता रज्जूंनीं पृथिवीला बांधून थांबवितो, आधार नाहीं अशा ठिकाणीं द्युलोकाला स्थिर करतो व

अंतरिक्षांत मेघाला गदगदा हलवितो ( पान ८२० ओळ ४ ); ह्या बलकृतींमुळें तो अंतरिक्षांतील देव; पृथिवी भूमीला पर्जन्यानें तृप्त करते ( पान ९२७ ओळ ९ ) असें म्हटलें आहे तेव्हां पृथिवी ही अंतरिक्षांतील वाक् होय. ६ वा:— अश्विनौ (१), उषाः ( २ ), सविता ( ७ ), सूर्यः ( ९ ), पूषा (१०), विष्णुः ( ११ ), आदित्याः ( २४ ), देवाः (२६) व विश्वेदेवाः (२७) ह्या देवता सूक्तभाक् व बाकीच्या ऋग्भाक्. अश्विनौ ( १ ) ह्यानें रात्रीच्या अंधकारांत प्रथम दिसणारा प्रकाश दर्शविला जातो; तो प्रकाश क्रमाक्रमानें वाढत जाऊन त्याचा कळस सूर्याच्या विष्णुरूपांत होतो; ही भर दुपारची वेळ होय; त्या वेळीं तो किरणांनीं पूर्ण भरला असतो. तदनंतर किरण कमी होऊं लागतात व वृषाकपिरूपांत ते अगदीं नाहींसे होतात. विश्वानरः (१२), वरुणः ( १३ ), केशी ( १४ ), केशिनः ( १५ ) ह्या सूर्यरूपांनीं रश्मींचा होत जाणारा ऱ्हास दर्शविला असला पाहिजे; पण यास्क व दुर्ग तत्संबंधानें कांहींएक सांगत नाहींत. ह्या चार नांवांनीं अस्ताला जाण्यापूर्वींच्या सूर्याच्या कोणत्या अवस्था दर्शविल्या जातात तें नैरुक्तांनीं ठरविलें असलेंच पाहिजे. दुपारनंतर दोन-दोन घटकांनीं विश्वानर, वरुण व केशी अशा कमी कमी होणाऱ्या सूर्यकिरणांच्या तीन अवस्था त्यांच्या मनांत असाव्यात. यास्कानें ह्या देवतांसंबंधानें ज्या ऋचा उदाहृत केल्या आहेत त्यांवरून अशा तऱ्हेचें अनुमान निघत नाहीं. निरु० १२।२१ तील ऋचेंत ( पान ९९५ ) इंद्राला विश्वानरस्य पतिं म्हटलें आहे; इंद्र द्युलोक व त्यांत असणारा सूर्य ह्यांना जिंकतो व त्यांचा राजा ( पतिः ) होतो म्हणून विश्वानर हा द्यु किंवा सूर्य. वरुण आपल्या नेत्रांनीं जगांत काय चाललें आहे तें पाहतो ( १२।२२ पान ९९९); डोळे वटारून पाहणें हें सूर्याचें काम म्हणून वरुण हा सूर्य. केशी = केसासारख्या रश्मींनीं युक्त; तेव्हां नुसत्या नांवावरूनच केशी म्हणजे सूर्य ठरतो. केशिनः म्हणजे अग्नि, वायु व सूर्य; तेव्हां ह्या शब्दानें सूर्याची कोणती अवस्था दर्शविली असावी? अश्विनौ ( १ ), त्वष्टा ( ६ ), भगः ( ८ ), पूषा ( १० ) हे स्वतंत्र देव होत; हीं नांवें सूर्याचींच होत हें कोणी कधीं व कां ठरविलें? उषाः व सूर्या ह्या सूर्योदयाच्या आधींच्या प्रकाशाच्या दोन अवस्था. वृषाकपिः ( १६ ) व वृषाकपायी ( ४ ) ह्यांचा इंद्राशीं दृढमैत्रीचा संबंध होता; हीं नांवें ज्या सूक्तांत आलीं आहेत तेथें सूर्याचें नांवही नाहीं; तथापि अस्तमेषि ( पान १०१० ओळ ९ ) ह्या शब्दांवरून सूर्य अस्ताला जातो असें नैरुक्तांनीं ठरविलें असावें. सरण्यूः ( ५ ) ही विवस्वताची म्हणजे सूर्याची बायको. नैरुक्तांच्या वेळच्या पुराणांत व इतिहासांत ह्या संबंधानें कांहींतरी कथा असाव्यात; त्याशिवाय त्यांनीं प्रकाशाचा वर सांगितलेला क्रम स्वतः होऊन लाविला नसता. अज एकपात् ( १८ ) हें सूर्याचें नांव होय. आदित्याः ( २४ ), देवाः ( २६ ), विश्वेदेवाः ( २७ ), साध्याः ( २८ ), वसवः ( २९ ), देवपत्न्यः ( ३१ ) हे द्युलोकांतले देवगण होत. यम ( १७ ) देवांच्यासह सोम पितो ( पान १०१२ ओळ १ ) म्हणून तो द्युलोकांतला. खंड ३१ मधील ऋचेंत

(पान १०१९ ओळ २१) परमस्यां पृथिव्यां शब्द आहेत; परमा पृथिवी (१९) म्हणजे द्युलोकच असला पाहिजे. समुद्र म्हणजे आदित्य; त्याला वरुण मेघांनीं झाकून टाकतो असा १२।३२ तील ऋचेचा (पान १०२०) दुर्ग अर्थ करतो म्हणून समुद्र द्युलो-कांतील. विश्वानरः ( १२ ) व वाजिनः ( ३० ) हीं देवांचीं नांवें नसून विशेषणें आहेत. दध्यङ् (२१), अथर्वा ( २२ ), मनुः (२३), सप्तऋषयः (२५) हे द्युलोकां-तले ऋषि. दैवतकांडाचे हे ६ खंड याज्ञिक व नैरुक्त ह्यांच्या मताला अनुसरून केले असावेत; पण याज्ञिक व नैरुक्त ह्यांचें मत असें कां झालें तें मला सांगतां येत नाहीं. ऋचेंत ज्या वस्तूचें वर्णन केलें असेल ती वस्तु त्या ऋचेची देवता असा सिद्धांत आहे असें आरंभीं म्हटलें आहे; त्या सिद्धांताप्रमाणें दैवतकांडांत नसलेल्या व ऋग्वेदांत असलेल्या देवता चाळीस पंचेचाळीस सांपडतील; त्यांपैकीं पर्वत ( ३।५३ ), गावः ( ६।२८ ), विद्वांसः ( १०।७१ ), पुरुषसूक्ताची देवता पुरुष ( १०।९० ), दक्षिणा व भोज ( १०।१०७ ), सपत्नी ( १०।१४५ ), राजयक्ष्म ( १०।१६१ व १६३ ), अपशकुनी कपोत ( १०।१६५ ), असपत्न राजा ( १०।१६६ ) हीं व अशींच इतर नांवें दैवतकांडांत न घालण्याचें कारण दिसत नाहीं. तिसऱ्या खंडांत अश्वाजनी ( चाबूक ), इषुधि ( भाला ), इषु वगैरे युद्धोपसामुग्रीसंबंधीं शब्द घातले आहेत; त्यांत वर्म ( ६।७५।१ ) म्हणजे कवच हा शब्द घालणें जरूर होतें.

निघंटुग्रंथ अस्तित्वांत येण्याच्या अगोदर ऋचांच्या विवरणाविषयीं व यज्ञा-संबंधानें कित्येक शतकें खल होत गेला असला पाहिजे. हल्लींचा निघंटु पहिला निघंटु नसून अगदीं शेवटला असावा; कारण त्यांत पुष्कळ भेसळ झाली आहे हें वर सांगितलें आहे. पहिल्या तीन अध्यायांत वेदांत न सांपडणारे अनेक शब्द व बरेचसे अर्वाचीन शब्द घातले आहेत. खंडांचा क्रम कोणत्याही एका तत्त्वाला अनुसरून केला नाहीं. कित्येक खंड अगदीं अनवश्यक दिसतात. एका-नेंच जर निघंटु रचला असता तर ही स्थिति उत्पन्न झाली नसती. एकाहून अधिक निघंटु अस्तित्वांत आले असले पाहिजेत व ते निरनिराळ्या उद्देशानें रचले गेले असा-वेत. एकांत अनवगतसंस्कार, दुसऱ्यांत अनेकार्थ, तिसऱ्यांत एकार्थक शब्दांचे वर्ग, चौथ्यांत देवतांचीं नांवें व पांचव्यांत अर्वाचीन शब्द असे भिन्न प्रकारचे निघंटु असले पाहिजेत; ह्या निरनिराळ्या निघंटूंतून पुष्कळ शब्द कारण नसतांना निघंटूंत घातले आहेत असें वाटतें. ऋग्वेदासारखा महत्त्वाचा व मोठा ग्रंथ ! त्याला प्रस्तु-तचा छोटेखानी निघंटु शोभत नाहीं. ऋग्वेदांतील प्रत्येक शब्द निघंटूंत घालणें इष्ट व आवश्यक वाटलें असलेंच पाहिजे; पण असा प्रचंड निघंटु अस्तित्वांत होता असें म्हणण्यास आकांक्षा व इच्छा ह्याशिवाय कोणताहि आधार नाहीं. प्रस्तुत निघंटूच्या आधीं शब्दांच्या व्युत्पत्ति देणारा ग्रंथ म्हणजे एखादें निरुक्त अस्तित्वांत असावें; कारण गत्यर्थक धातूंत वेदांत नसलेले व व्युत्पत्तींत आढळणारे कांहीं धातु घातले गेले आहेत असें वर म्हटलें आहे. हल्लींच्या निघंटूंत कांहीं अशुद्ध शब्द आढळतात;

ते मूळचेच अशुद्ध होते असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. कालांतरानें लेखक व पठण करणारे ह्यांच्या अज्ञानामुळें शुद्ध शब्द अशुद्ध बनतात; ह्या नियमाला अपवाद म्हणून संस्कृतांत फारच थोडे ग्रंथ असतील व निघंटूही अपवाद नाहीं. निघंटूची सद्यःस्थिति कालानें घडवून आणली असावी ह्यांत संशय नाहीं. असा अशुद्ध, प्रक्षिप्तांनीं व कोठेंही न सांपडणाऱ्या शब्दांनीं भरलेला ग्रंथ यास्काला मिळाला व श्रद्धेमुळें मनांत यत्किंचितही संशय न बाळगतां त्यानें त्या ग्रंथाचें निर्वचन केलें. निघंटूचे नैघंटुक, नैगम किंवा ऐकपदिक व दैवत असे तीन भाग मानले जातात; पण हीं नांवें निघंटूंत कोठेंही नाहींत; तीं नांवें पहिल्या प्रथम कोणी दिलीं व केव्हां दिलीं तें कळण्याला कोणतेंही साधन नाहीं. निरुक्त १।२० त (पान ६७) एतावन्ति अस्य सत्त्वस्य नामधेयानि व एतावन्तः समानकर्माणः धातवः ह्या शब्दांनीं निघंटूच्या पहिल्या तीन अध्यायांचा निर्देश केला आहे असें प्रथमदर्शनीं वाटतें; परंतु ह्या तीन अध्यायांत नामें व आख्यातें ह्यांशिवाय हिकं, नुकं वगैरे अव्ययें (३।१२) व उपमा (३।१३) घातल्या आहेत; तेव्हां १।२०तलें लक्षण प्रस्तुत तीन अध्यायांना लागू पडत नाहीं. ज्यांत नुसतीं नामें व आख्यातें दिलीं होतीं तोच निघंटु पहिल्याप्रथम रचला गेला असावा; ह्यालाच निरुक्तांत समाम्नायः व निघंटवः (पान ३) म्हटलें आहे. हे निघंटु सर्व वेदांतून शोधून काढून एकत्र केले आहेत असें औपमन्यव म्हणतो; पण प्रस्तुत निघंटूंत वेदांत नसलेले कित्येक शब्द आहेत. पहिल्याप्रथम समानार्थक शब्दांचें वर्गीकरण अशा निघंटूंत केलें असावें व त्याच वर्गीकरणाला निघंटु नांव शोभतें. एतावताम् अर्थानाम् इदम् अभिधानं (पान ६७) ह्यानें अनेकार्थवाची शब्दांचा निर्देश केला आहे; पण प्रस्तुत ऐकपदिकांत अनेकार्थ शब्द थोडे असून अनवगतसंस्कार व अनवगतार्थ शब्दांचा भरणा आहे. नैघंटुकम् इदं देवतानाम प्राधान्येन इदं (पान ६८) हें दैवतकांडाचें लक्षण प्रस्तुत दैवतकांडाला लागू पडत नाहीं; कारण ज्यांची प्रधान देवता म्हणून स्तुति केली जाते अशाच देवतांच्या एकत्र केलेल्या नांवांना दैवत म्हणतात असें पान ५३० ओळ ७त म्हटलें आहे; अप्रधानदेवताविचार नाहींच म्हटला तरी चालेल. तेव्हां १।२०त निर्दिष्ट केलेला निघंटु प्रस्तुत निघंटूहून अगदीं वेगळा होता हें स्पष्ट आहे. समाम्नायः समाम्नातः। स व्याख्यातव्यः असें म्हटलें आहे (पान ३ ओळ ५); हे शब्द जर प्रस्तुत निघंटूला लावले तर यास्कानें पहिल्या तीन अध्यायांतील सर्व म्हणजे १३४१ शब्दांचें विवरण केलें असा अर्थ निष्पन्न होईल; पण ह्या संख्येपैकीं सुमारें ४०० शब्दांचें विवरण केलें आहे; तेव्हां स व्याख्यातव्यः हे शब्द दुसऱ्या एखाद्या निघंटूला उद्देशून घातले असावेत. पहिला अध्याय यास्काचा नसून तो त्याच्या निरुक्ताला कोणीतरी डकविला असें मीं १।२० च्या शेवटीं (पान ७३) म्हटलें आहे. प्रस्तुत निघंटु आधींच्या भिन्न भिन्न निघंटूंच्या आधारानें कोणीतरी बनविला व तसें करण्यांत त्यानें

तारतम्यबुद्धि मुळींच वापरली नाहीं असें मीं वर म्हटलें आहे. प्रस्तुत निघंटु हा एक संक्षिप्त निघंटु असावा; ह्या संक्षिप्त निघंटूच्या पहिल्या तीन अध्यायांचा यास्कानें आणखी संक्षेप केला आहे.

सायण ऋग्भाष्याचा उपोद्घात :— अर्थावबोधे निरपेक्षतया पदजातं यत्रोक्तं तन्निरुक्तं = शब्दांचे अर्थ ठरविण्याकरितां ते शब्द वेदांत कोठें आले आहेत तें पाहण्याची आवश्यकता न ठेवतां ज्यांत शब्दांचा संग्रह अर्थ देऊन केला आहे तें निरुक्त. एथें निघंटूला निरुक्त म्हटलें आहे व या निरुक्तांत त्यांत घातलेल्या सर्व शब्दांचे अर्थ दिले आहेत असें सायणाचार्य म्हणतात. परंतु हें त्यांचें म्हणणें ऐकपदिकप्रकरणाला लागू पडत नाहीं; कारण ऐकपदिकांत नुसते शब्द दिले आहेत. दैवतकांडांतही द्रविणोदस्, नाराशंस, हस्तघ्न, पितु, अप्त्वा, शुनासीरौ, असुनीति, ऋत, अहिर्बुध्न्य, आप्त्य, रोदसी, केशी, केशिनः, वृषाकपि ह्यांचे अर्थ सांगितल्याशिवाय कळत नाहींत. निरुक्ताच्या तीन कांडांना अनुक्रमें नैघण्टुक, नैगम व दैवत अशा संज्ञा आहेत; प्रत्येक कांडांतला विषय अनुक्रमणिकाभाष्यांतील पुढील श्लोकांत दिला आहे:— गौराद्यपारपर्यन्तम् आद्यं नैघण्टुकं मतम् । जहाद्युल्बऋबीसान्तं नैगमं संप्रचक्षते ॥ अग्न्यादिदेवपत्न्यन्तं देवताकाण्डमुच्यते । अग्न्यादिदेवीऊर्जाहुत्यन्तः क्षितिगतो गणः ॥ वाय्वादयो भगान्ताः स्युः अन्तरिक्षस्थदेवताः । सूर्यादिदेवपत्न्यन्ताः द्युस्थाना देवता इति = गौः पासून अपारे पर्यन्तच्या शब्दसमूहाला नैघण्टुक, जहा पासून ऋबीसं पर्यंतच्या समूहाला नैगम व अग्निः पासून देवपत्न्यः पर्यंतच्या समूहाला दैवत म्हणतात; दैवतकांडांतील अग्नीपासून देवीऊर्जाहुतीपर्यंतचा देवतासमूह पृथ्वीवरील, वायूपासून भगापर्यंतचा अंतरिक्षांतील व सूर्यापासून देवपत्नीपर्यंतचा द्युलोकांतील अशी स्थानव्यवस्था आहे. अश्विनपासून भगपर्यंतचे देव अंतरिक्षांतील हें म्हणणें अथातो द्युस्थानाः देवताः । तासाम् अश्विनौ प्रथमागामिनौ भवतः (९५६।३) ह्याच्या विरुद्ध आहे. ज्यांत एकार्थवाची शब्दांचा संग्रह केलेला असतो त्याला निघंटु म्हणतात; अशा प्रकारचे अमर वैजयन्ती हलायुध वगैरे दहा निघंटु होत; पण निरुक्तांत (पा. ३) तीनही कांडांतल्या शब्दांना निघण्टवः म्हणतात व हे निघंटु वेदांतून शोधून काढून एकत्र केले आहेत असें म्हटलें आहे.

निघंटूंत क्वचित् येणाऱ्या व दुर्बोध अशा शब्दांचा संग्रह केला आहे असें मॅक्समुल्लर व वुइन्टरनिट्झ म्हणतात; परंतु निघंटूंतले पुष्कळ शब्द वारंवार येणारे आहेत व बरेचसे शब्द दुर्बोध नाहींत. बहुतेक देवतांचीं नांवें ऋग्वेदांत वारंवार येतात व ते उच्चारल्याबरोबर त्यांचा अर्थ एकदम लक्षांत येतो. त्याचप्रमाणें पहिल्या तीन अध्यायांतील हिरण्य, कांचन, कनक, भू, भूमि वगैरे अनेक शब्द वारंवार येणारे असून अर्थाच्या दृष्टीनें दुर्बोध नाहींत.

ज्यांनीं निघंटु रचले त्यांचा ते ग्रंथ तयार करण्यांत कोणता उद्देश होता हा प्रश्न महत्त्वाचा आहे. अमरकोशासारख्या कोशांचा मुख्य हेतु शब्दांचे अर्थ देणें हा

होय; व्युत्पत्ति देणें हा भाग अगदीं गौण होय; व्युत्पत्ति न दिल्या व दिलेल्या व्युत्पत्ति न पाहिल्या तरी काम भागतें. तेव्हां निघंटूंचा मुख्य उद्देश अमरकोशासारखा नुसते शब्दांचे अर्थ देणें हा होता किंवा शब्दांच्या व्युत्पत्ति देण्याचा होता हें ठरविलें पाहिजे. नुसते अर्थ देणें हा जर मुख्य हेतु असता तर औपमन्यव वगैरेनीं आपापलीं निरुक्तें रचिलीं नसतीं; तेव्हां व्युत्पत्ति देणें हा मख्य उद्देश होता असें वाटतें. ह्यावर कोणी म्हणेल कीं गतिवाचक धातु, हिकं नुकं वगैरे अव्ययें व उपमा हीं प्रकरणें घातलीं आहेत; पण त्यांचा व्युत्पत्तीशीं कांहींही संबंध नाहीं; त्यावरून शब्दांचे अर्थ देणें हाच निघंटुकारांचा मुख्य हेतु होता तर त्यांना असें सांगतां येईल कीं ऐकपदिक प्रकरणांत शब्दांचे अर्थ दिले नाहींत; ते अर्थ व्युत्पत्तींच्या द्वारें ठरवावयाचे आहेत; अनवगत संस्कार शब्दांचीं व्याकरणशुद्ध रूपें व्युत्पत्तिद्वारें बनविलीं आहेत. ह्यावरही कोणी म्हणेल कीं अनेकार्थ शब्द घालण्याचें प्रयोजन अनेकार्थ देणें हेंच होय; त्यालाही उत्तर निरनिराळ्या अर्थांप्रमाणें अनेकार्थी शब्दांच्या निरनिराळ्या व्युत्पत्ति केल्या आहेत हें. कुरुतन, इदंयुः, सुप्रायणाः वगैरे शब्द वरील कोणत्याही कोटींत बसत नाहींत हें खरें; तथापि तशांची संख्या फारच अल्प आहे. देवतावाचक नावांच्या अर्थांविषयीं मुळींच भानगड नाहीं; तथापि त्यांच्या व्युत्पत्ति करणें व त्या नांवांत असलेले सर्व अर्थ स्पष्ट करून दाखविणें हा हेतु मुख्य दिसतो; कोणत्या देवता सूक्तभाक्, ऋग्भाक् आणि हविर्भाक् व कोणत्या तशा नाहींत हा प्रश्न गौण दिसतो हें इंद्र शब्दाच्या केलेल्या चौदा व्युत्पत्तींवरून सिद्ध होतें; व्युत्पत्तींपेक्षां देवतानांवांचा क्रमही गौण आहे. औपमन्यव वगैरेनीं जीं निरुक्तें लिहिलीं तीं व्युत्पत्ति देण्याच्याच हेतूनें लिहिलीं; व्युत्पत्ति देणें हाच सर्व पुरातन निघंटूंचा उद्देश असावा.

निघंटूचा कर्ता यास्क नव्हेः—ऋचेंत अकूपारस्य दावने ( पान २८१ ओळ १५ ) असा क्रम असतांना निघंटूंत दावने अकूपारस्य असा बदल केला आहे; ह्यावरून दुर्गानें असें अनुमान काढलें आहे कीं निघंटु यास्कानें रचला नसावा; कारण निघंटूचा कर्ता जर यास्क असता तर त्यानें ऋचेंतलाच क्रम ठेविला असता. पण नुसत्या शब्दांच्या उलटापालटीनें यास्क निघंटूचा कर्ता नव्हता असें सिद्ध होत नाहीं; यास्काच्या हातूनही निष्काळजीपणा होणें शक्य आहे; किंवा त्यानें विशेष कारणाकरितां अदलाबदल केली असेंही म्हणतां येईल. दावने ( निघं० ४।१।३२ ) ऋग्वेदांत एकंदर ३१ वेळां आला आहे; निघंटुकाराला त्या शब्दाचें गूढ पडलें म्हणून त्यानें तो घातला व नंतर अकूपारस्य दावने हे शब्द आठवल्यामुळें त्यानें अकूपारस्य ( ४।१।३३ ) हाही शब्द घातला. यास्कानें निघंटु रचला नाहीं हें सिद्ध करण्याला ही उलटापालट मुळींच उपयोगी पडत नाहीं; कारण निघंटूच्या पहिल्या तीन अध्यायांत हवा तितका अव्यवस्थितपणा आहे; एकाच ऋचेंत ( पान १३६ ओळ २९ ) असलेल्या बृबूकं व पुरीषं ह्यांची उलटापालट केली असून ताटातूटही केली आहे; उदकनामांत पुरीषं १२ वा असून बृबूकं १९ वा आहे ( पान ११७०

ओळी १३ व १४ ). निघंटूचा कर्ता जर यास्क असता तर पृथ्वीवाचक गौः ( निरु० २।५ ) व वाक्वाचक सरस्वती ( निरु० २।२३ ) ह्यांचीं उदाहरणें त्यानें खात्रीनें दिलीं असतीं; पण तीं त्यानें दिलीं नाहींत. निघंटूंतले कित्येक शब्द अनेकार्थ असूनही त्यानें ते एकार्थ मानले आहेत (पान ११८७). वेदांत न येणारे शब्द यास्कानें निघंटूंत खात्रीनें घातले नसते. चौथ्या व पांचव्या अध्यायांतील प्रत्येक पदाचें विवरण व उदाहरण यास्कानें दिलें आहे; पण पाहिल्या तीन अध्यायांतील प्रत्येक शब्द न घेतां कांहीं निवडक शब्द व्युत्पत्तीकरितां घेतले आहेत; त्यानें जर निघंटु रचला असता तर प्रत्येक शब्दाचें विवरण व उदाहरण त्यानें दिलें असतेंच. यास्कानें निघंटु रचला नाहीं हें ह्या पुराव्यावरून स्पष्ट होतें. हल्लींच्या स्थितींत असलेले निघंटूचे पहिले तीन अध्याय यास्काच्या समोर होते असें म्हणण्यास भाष्यांत पुरेसें साधन नाहीं; तो खंडांतील एकाद् दुसरा शब्द देतो व कधीं कधीं एकही देत नाहीं. वज्रवाचक नामांत अर्क शब्द घातला आहे पण अर्क शब्दाचे अर्थ देतांना यास्कानें त्याचा वज्र हा अर्थ दिला नाहीं (पानें ३४७-३४८); तेव्हां त्याच्यापुढें असणाऱ्या निघंटूंत वज्रवाचक खंडांत तो शब्द नसावा. अन्नवाचक नामांत कांहीं प्रतींत प्रयः तर कांहींत श्रवः आहे; श्रवस् =अन्न (पान ७३१ ओ. १६) असें यास्क म्हणतो; तेव्हां त्याच्या प्रतींत श्रवः हाच पाठ होता; त्यानें प्रयः ची व्युत्पत्ति कोठेंही दिली नाहीं. ह्या थोड्या पुराव्यावरून यास्काच्या पुढें असलेला निघंटु प्रस्तुत निघंटूहून भिन्न असावा असें वाटतें. निरुक्त ७।१३ त ( पान ५५७ ) दैवतकांडांत कोणतीं नांवें घालावींत व कोणतीं घालूं नयेत ह्याचा थोडासा विचार केला आहे; कित्येकजण दैवतकांडांत अग्नि इंद्र वगैरेंचीं विशेषणें घालतात; हवि देतांना अग्नये नंतर वैश्वानराय, जातवेदसे, सुरभिमते, पवमानाय वगैरे विशेषणें घालून हवि दिला जातो; त्याचप्रमाणें इन्द्राय नंतर वज्रिणे, वृत्रघ्ने, वृत्रतुरे, अंहोमुचे वगैरे विशेषणें घालून हवि दिला जातो; वैश्वानर व जातवेदस् ह्या विशेषणांप्रमाणें बाकींचींही विशेषणें देवतागणांत घालण्यास हरकत नाहीं. ह्याला उत्तरः— देवतांना अनेक विशेषणें लाविलेलीं आढळतात; तीं सर्व निघंटूंत घालण्यानें ग्रंथ फार विस्तृत होईल. तर मग कोणतेंही विशेषण घालूं नये असें जर कोणी म्हणेल तर त्याला जीं विशेषणें अग्निवाचक म्हणून व इंद्रवाचक म्हणून भाषेंत रूढ झालीं असतील तेवढींच मी घालतों ( समामने ) असें म्हटलें आहे; त्यावरून असा समज होतो कीं निघंटु यास्कानें रचिला; पण तशी गोष्ट नाहीं हें वर सांगितलेंच आहे. खंड ७।१३ प्रक्षिप्त आहे ह्यांत संशय नाहीं; पण त्यावरून एक ठाम अनुमान निघतें तें हें कीं बरेचसे निघंटु प्रस्तुत निघंटूच्या आधीं रचले गेले असले पाहिजेत व प्रत्येकानें आपआपल्या मताप्रमाणें शब्दसंग्रह केला असावा. असे निघंटु रचण्याचें काम चढाओढीनें पुष्कळ काळ चालत गेलें असावें. तदनंतर इतक्या निरनिराळ्या निघंटूंचा सारांश म्हणून प्रस्तुत निघंटु अस्तित्वांत आला असावा आणि तोही सर्वमान्य होण्यास पुष्कळ काळ लोटला असावा; त्या-

शिवाय औपमन्यव, और्णवाभ, स्थौलाष्ठीवि, शाकपूणि, गालव, तैटीकि, क्रौष्टुकि व नैरुक्त यांनीं त्याच्यावर निरुक्तें रचिलीं नसतीं; ह्या सर्वांचीं नांवें यास्काच्या निरुक्तांत येतात; तेव्हां प्रस्तुत निघंटूही फार जुना ग्रंथ असला पाहिजे. निघंटूत पुष्कळ दोष असतांना त्यांपैकीं यास्कानें एकही दोष दाखविला नाहीं याचें नवल वाटण्याचें कारण नाहीं; एकदां ग्रंथ पूज्य झाला म्हणजे तो शिरसावंद्य होतो ही गोष्ट सर्वत्र सुप्रसिद्ध आहे; त्यांतले दोष दाखविणें म्हणजे आचार्यद्रोह व शास्त्रद्रोह होय.

## निरुक्तशास्त्राचे सिद्धांत

नामांत दिसणाऱ्या धातूचा अर्थ आणि त्या नामाचा अर्थ हे जर एकच असतील व दिसणाऱ्या धातूपासून व्याकरणाच्या नियमांनीं तें नाम जर बरोबर सिद्ध होत असेल तर त्या धातूपासून त्या नामाची व्युत्पत्ति करावी. गम्, रम्, नम्, यम्, दा, पा ह्यांपासून व्याकरणनियमांनीं गति, गमन, रति, रमण, नति, नमन, यम, यति, नियम, नियमन, दान, पान अशीं नामें तयार झालीं आहेत व धातूंचा अर्थ त्या नामांत आहे. पण अशा नामांची संख्या फारच थोडी आहे. नामांत दिसणाऱ्या धातूचा अर्थ व नामाचा अर्थ हे जेव्हां भिन्न असतात व नामाचा अर्थ ज्यांत आहे अशा धातू-पासून व्याकरणनियमांनीं जेव्हां तें नाम बनवितां येत नाहीं तेव्हां व्युत्पत्ति कशी करावी हा प्रश्न आहे. हा प्रश्न नैरुक्त पुढीलप्रमाणें सोडवितात; जेव्हां धातु व नाम यांच्यांत कोणताही मेळ नसतो तेव्हां व्युत्पत्ति करणाऱ्यानें त्या नामाचा अर्थ लक्षांत घ्यावा व अर्थावर भिस्त ठेवून ( अर्थनित्यः ) तदर्थक धातु शोधून काढून त्या धातूचें नामाला जवळ असणारें रूप कोणतें तें पाहून त्या नामाची व्युत्पत्ति करावी. उदाहरणार्थ वधू; ह्या शब्दांत वध् धातु दिसतो; पण वधूचा ठार मारण्याशीं कांहीं संबंध नसल्यानें दुसरा जवळचा धातु शोधून काढला पाहिजे; असा धातु वह्; कारण वधू माहेराहून सासरीं व सासरहून माहेरीं नेली जाते; वह् + ऊ = वहू = वधू. पण अशीही जेथें स्थिति नसेल तेथें तदर्थक धातूच्या रूपांत व नामांत एखादा समान स्वर किंवा एखादें समान व्यंजन असलें म्हणजे झालें. उदाहरणार्थ अग्नि शब्दाच्या व्युत्पत्ति पहा ( पान ५५९ ); एथें अग्नि शब्दानें जे जे अर्थ सूचित होतात त्या त्या अर्थांना अनुलक्षून व्युत्पत्ति दिल्या आहेत. अग्नीसंबंधानें आपल्या मनांत कोणते विचार येतात ? तो यज्ञांत एका कुंडांतून दुसऱ्या कुंडाकडे नेला जातो; किंवा आहुति म्हणून जें कांहीं त्याच्या तावडींत सांपडतें तें तो आत्मसात करतो; त्यावेळीं ओला पदार्थ आपला ओलावा टाकून देतो; किंवा अग्नि देवांचा सेनापति असल्यानें तो त्यांना अघाडीवर घेऊन जातो. ह्या अर्थानुरोधानें अग्नि शब्दाचे तुकडे पाडून व्युत्पत्ति केल्या आहेत. शब्द कितीही कठीण असो त्याची अशा रीतीनें व्युत्पत्ति केलीच पाहिजे अशी नैरुक्तांनीं आग्रहाची आज्ञा केली आहे. तदर्थक धातूपासून

व्याकरणनियमांनीं असा शब्द जरी सिद्ध होत नसेल तरी त्यामुळें घाबरूं नका; व्याकरणाच्या नियमांना झुगारून द्या; नामानें सुचविलेल्या अर्थावर भिस्त ठेवा असें ते ठामपणें सांगतात. ही आज्ञा शिरसावंद्य मानून यास्कानें व त्याच्या पूर्वीच्या निरुक्तकारांनीं शब्दांच्या व्युत्पत्ति केल्या आहेत. वैदिक शब्दांचा अर्थ संदर्भावरून ठरवा; जेथें जेथें त्या अर्थी तो शब्द आला असेल तेथें तेथें त्याची तीच व्युत्पत्ति द्यावी; पण जेव्हां शब्द अनेकार्थ असतो तेव्हां भिन्न भिन्न अर्थ लक्षांत घेऊन भिन्न भिन्न व्युत्पत्ति बिनदिक्कत कराव्या. अहि म्हणजे मेघ व सर्प. मेघाला अहि म्हणण्याचें कारण तो आकाशांत संचार करतो; जाणें या अर्थी अहि शब्दाला जवळचा धातु इ; अयन हें इ पासून नाम; अयनांतला अय् + इः ( नामकरण प्रत्यय ) = अयिः; कालांतरानें अयि शब्द अहि असा उच्चारला गेला. अहि म्हणजे सर्प ह्या अर्थीही त्या शब्दाची व्युत्पत्ति वरीलप्रमाणेंच; कारण सर्प सरपटत जातो. पण सर्प चावतोही; तेव्हां अर्थभेदामुळें दुसरी व्युत्पत्ति केली पाहिजे. आ + हन् = मारणें, दंश करणें; आ + हन् + इः; इः प्रत्ययामुळें हन् मधील अन् जाऊन व आ चा अ होऊन अ + ह् + इहिः = अहिः असा शब्द बनतो. कमलार्थी पुष्कर ( ३८०।१३ ) शब्द मूळचा वपुष्कर ( म्हणजे शरीराला सुंदर करणारें ); कमळें शरीरावर घातल्यानें शरीर सुंदर दिसतें म्हणून वपुष्कर ही व्युत्पत्ति; अंतरिक्षवाची पुष्कर ( ३७९।२७ ) शब्द पुष् ( = पोसणें ) यापासून; अंतरिक्षांतून पडलेला पर्जन्य प्राण्यांचें पोषण करतो; उदकवाची पुष्कर ( ३८०।५ ) शब्द पूज् ( = पूजाकरणें ) यापासून; पूजा करतांना देवांना पाण्यानें स्नान घालतात. याप्रमाणें पुष्कर शब्दाचे तीन भिन्न अर्थ असल्यामुळें तीन भिन्न व्युत्पत्ति. इन्द्र व इन्दु यांत जर कोणता एकादा धातु असेल तर तो इन्द् ( = सत्ता चालविणें ) असावा; पण सोमार्थी इंदूच्या हातांत कोणतीही सत्ता नसते म्हणून तो शब्द उन्द् ( = भिजविणें ) यापासून झाला असला पाहिजे; सोमरस प्यायल्यानें पोट भिजतें म्हणून उन्द् धातु. पण चंद्रालाही इन्दु म्हणतात; तेव्हां इन्ध् ( = प्रदीप्त होणें ) यापासून इन्दु ( ८४०।२८ ). हिरण्य शब्दानें कोणते अर्थ सूचित होतात? सोनार सोनें ठोकून त्याचे दागिने करतात व लोक ते दागिने घरीं घेऊन जातात ( ह्रियते आयम्यमानं ); किंवा नाण्याच्या रूपानें एक माणूस दुसऱ्या माणसाकडून तें घेऊन जातो ( ह्रियते जनात् जनं ); सोनें हितकर असून रमणीय असतें ( हित + रमणं ); तें हृदयाला रमवितें ( हृदय + रमणं ); तें लोकांना आवडतें ( हर्यतेः प्रेप्साकर्मणः ); हे अर्थ व्युत्पत्तींनीं बाहेर काढले पाहिजेत व त्याकरितां हिरण्य शब्दाचे निरनिराळ्या प्रकारांनीं तुकडे पाडले पाहिजेत. हृ ( = नेणें, हरण करणें ) यापासून किंवा हर्य् यापासून हिर्; किंवा हृदयपासून हिर् किंवा हितपासून हि व रमणपासून रण्य. अशा रीतीनें हिरण्य शब्द तयार केल्यानें त्यांत असलेले सर्व अर्थ निरुक्त म्हणजे निःशेषेण उक्त म्हणजे पूर्णपणें, बाकी न राहातां बोलले जातात (पा. १०६). सोनें चोर

घेऊन जातात; उंदीरही सोन्याचा दागिना पळवून नेतो; सोन्याच्या खाणींतून सोनें बाहेर काढलें जातें ( उत् ह्रियते ); राष्ट्रें सोन्याकरितां लक्षावधि लोकांचे प्राण हरण करितात ( अप ह्रियते ); हेही अर्थ लक्षांत घ्यावेत असें जर कोणी म्हणेल तर नैरुक्त त्याची वाहवाच करतील; कारण ह्रि मधील हृ धातूपासून हे सर्व अर्थ सिद्ध होतात. दुहितृ ( १५७।२६ ), कन्या ( २७०।२ ), मधु ( २५२।३१ व ८१८।२० ) व सानु ( १४०।२९ व ६८०।४ ) ह्यांच्या व्युत्पत्ति पहा. अशा या शास्त्राला निरुक्त किंवा निर्वचन म्हटलें आहे. व्युत्पत्तीकरितां एखादें अक्षर शब्दांत आणणें (वर्णागमः), शब्दांतील स्वर व व्यंजनें बदलणें ( वर्णविकारः ), वर्णाचा लोप करणें ( वर्णनाशः ) व शब्दांतील अवयवांची उलटापालट करणें ( वर्णविपर्ययः ) या गोष्टी बेलाशक कराव्यात असें नैरुक्त म्हणतात; हें त्यांचें म्हणणें पुढील श्लोकांत आहेः—वर्णागमो वर्णविपर्ययश्च द्वौ चापरौ वर्णविकारनाशौ । धातोस्तदर्थातिशयेन योगः तदुच्यते पञ्चविधं निरुक्तम् (काशिका); ह्या श्लोकाच्या उत्तरार्धाचा अर्थ पुढें दिला जाईल (१२०४।२३). निघण्टुः = निगन्तुः; एथें गच्या जागीं घ व तच्या जागीं ट आला आहे म्हणजे ग व त यांना विकार झाला आहे. निघण्टुः = समाहन्तुः; निच्या जागीं सम्; आ हें अधिक अक्षर; ग व त यांच्याबद्दल पूर्वीप्रमाणें घ व ट. सिकता हा मूळचा कासिता; कस् पासून कासि; कसि याची उलटापालट होऊन सिक व ता नामकरण प्रत्यय ( ७८।१४ ). यामि = याचामि; एथें चा लुप्त झाला आहे. ग्रावा ( ६५८।३ ) = सोम ठेचणारा दगड. ग्रावा सोम ठेचतो म्हणजे त्याच्यावर आघात करतो म्हणून हन् पासून ग्रावन्; धातु व नाम यांत समान अक्षर न्; ग्रा = घ्रा = घ् + रा; घ् = घ = ह; रा चा लोप; ह + न् = हन्; या व्युत्पत्तींत वर्णविकार व वर्णलोप झाले आहेत. सोम ठेचतांना ग्रावे आवाज करतात; तेव्हां गृ ( = शब्द करणें ) + आ + वन् = ग्रावन्. सोम ठेचतांना ग्रावे हातांत घेतले जातात; तेव्हां ग्रह् = ग्राह् = ग्राव्; ग्राव् + अन् = ग्रावन्. ग्रीवा ( १५०।३१ ) = मान; मान किंवा गळा काय करतो? तो अन्न वगैरे गिळतो ( गिरति ); गृ + ई + वा = ग्रीवा. शब्द हृदयांतून निघून गळ्याबाहेर पडतो; म्हणून गृ ( = शब्द करणें ) पासून ग्रीवा. किंवा चोराला पकडतांना त्याची मान धरली जाते म्हणून ग्रह् यांत निरनिराळे बदल होऊन ग्रीवा शब्द बनतो. स्तेन (२१४।३१), स्तूप (८२४।३४), स्त्री (२२८।९), तायुः ( ३०१।१२ ) व स्तुकः (९२०।२८ ) हे पांचही शब्द स्त्यै (= गठ्ठा होणें) पासून. चोराच्या ठिकाणीं पातकांचा गठ्ठा सांचलेला असतो म्हणून तो स्तेन किंवा तायु. स्तूप म्हणजे खांब; खांब लाकडाचा किंवा दगडाचा किंवा धातूचा संघातच. स्त्रीच्या पोटांत गर्भाचा गठ्ठा असतो. स्त्यै संप्रसारणानें स्ति; स्ति ला गुण होऊन स्ते व न हा नामकरण प्रत्यय; स्ते + नः = स्तेनः. पूर्वीप्रमाणेंच स्त्यै चें स्ति होऊन मग स्ति चें स्तू किंवा स्तु होतें; प व क हे नामकरण प्रत्यय; स्तू + पः = स्तूपः; स्तु + कः = स्तुकः ( = केशसंघात, बुचडा ). स्ति = स्ती = स् + त + ई; ई ला र्

मिळविल्यानें री; स् + त् + री = स्त्री. तायुः = स्तायुः = स्त्यायुः = स्त्यै + उः. अशा फेरफारांनीं हे पांच शब्द स्त्यै पासून झाले आहेत. रुच् = प्रकाशणें किंवा जळणें; ह्यापासून वर्णवाचक रुशत् ( ४६७।२८ ); कारण धातुपाठांत रुश् चा हिंसा करणें असा अर्थ आहे; तेव्हां रुशत् ह्यांत दिसणारा रुश् धातु नसून रुच् हाच धातु आहे. रूप ( ८९।२२ ) शब्दही रुच् पासून; कारण धातुपाठांत रूप् धातूचा प्रकाशणें असा अर्थ नाहीं. चन्द्रः चारु द्रमति ( ८६०।२३ ); चन् = चारु; द्र = द्रमति; प्रकाशत असतांना चंद्र आकाशांत संचार करतो; या व्युत्पत्तींत चारु शब्द आला आहे; त्याची व्युत्पत्ति चारु रुचेः विपरीतस्य; रुच् यांतील अक्षरांची उलटापालट केल्यानें च्रु; च्रु = चारु; चंद्र प्रकाशतो तेव्हां त्यांतील चारु हा जो अवयव तोही रुच् पासूनच. पण आविष्ट्यो वर्धते चारुः आसु ( ६२५।१९ ) असें अग्नीविषयीं म्हटलें आहे; एथें चारुः हें अग्नीचें विशेषण आहे; अग्नि रानें जाळतांना जिकडे तिकडे संचार करतो म्हणून चारु चर् पासून ( ६२४।२० ); संदर्भावरून शब्दाची व्युत्पत्ति केली पाहिजे या सिद्धांताचें हें उदाहरण होय; पण एथेंही रुच् ( = प्रकाशणें ) हा धातु कां नाहीं ? अग्नि प्रकाशतो हें सांगावयास नको. गौरी म्हणजे वीज; वीज झळकते म्हणून गौरी शब्द रुच् पासून; रुच् = र् + उ + च् = च् + उ + र् = चुर् = कुर् = गुर्; गुर् + ई = गौरी. गोरा या अर्थी लौकिक शब्द जो गौर तोही रुच् पासूनच. याप्रमाणें अर्थानुरोधानें रुशत्, रूप, चारु व गौरी हे शब्द रुच् पासून तयार केले आहेत. चित्रं = चायनीयम् ( २४३।६ ); चाय् ( = पूजा करणें ) यांतील य् ला संप्रसारण होऊन व आधींचा आ जाऊन च् + इ हीं अक्षरें शिल्लक राहतात; च् + इ + त्रं = चित्रम्; चित्रं हें राधः ( धन ) ह्याचें विशेषण; धन नेहमीं पूज्य असतें म्हणून चाय् पासून चित्रं. चन्द्र ह्यांतही चाय् धातु आहे ( ८६०।२२ ). शुच् ( = जळणें ) ह्यापासून शुचि ( ४२४।२९ ); अग्नीला शुचिः हें विशेषण लावण्याचें कारण तो जळत असतो. लौकिक शुचि शब्द याच धातूपासून; घाण जळून गेल्यानें जागा शुद्ध होते; पाप जळून गेल्यानें मनुष्य शुद्ध होतो; पण निःषिक्तम् अस्मात् पापकं ( ४२४।३० ) = शुद्धाचरणी मनुष्यापासून पाप धुवून गेलेलें असतें असें नैरुक्त म्हणतात; शुच् = सुच् = सिच् = पाण्यानें धुवून टाकणें; म्हणून सिच् पासून शुचिः. नैरुक्तांना पापाची किळस होती; स्तेन ( २१४।३२ ), तायु ( ३०१।१२ ) व तस्कर ( १९४।३३ ) यांच्या व्युत्पत्ति पहा. पन्थाः ( १५२।९ ) हा शब्द पत् किंवा पद् किंवा पन्थ् ( सर्वांचा अर्थ जाणें ) यापासून; शब्दांची व्युत्पत्ति करतांना समानार्थक धातु व्युत्पत्ति करणाकडे धांव घेतात व माझ्यापासून या शब्दाची व्युत्पत्ति कर असा प्रत्येकजण त्याला आग्रह करतो; तेव्हां या तीनही धातूंपासून पन्थाः शब्द झाला आहे असें त्याला म्हणावें लागतें. शरीर नश्वर आहे म्हणून तो शब्द शॄ किंवा शम् (=हिंसा करणें) यापासून; श्मन् = शरीर; तेव्हां श्मन् शब्दही शॄ किंवा

शम् यापासून. अशी धातुधातूंत चढाओढ सुरू होते असें निरुक्तकार म्हणतात. सिंधु वाहाते; म्हणून सिन्धु शब्द स्यन्द् ( ६९३।३० ) किंवा स्रु ( ४१२।३० ) यापासून; एथें स्यन्द् व स्रु यांच्यामध्यें स्पर्धा व्युत्पत्तीकरितां झाली आहे; सिन्धुः = सिन्दुः = स्यन्दुः; पण स्रु पासून सिन्धु शब्द बनविणें हें मुष्किलीचें काम आहे; तथापि त्या धातूपासून सिन्धु शब्द बनविलाच पाहिजे असा आग्रह आहे; दोहोंत स् हें समानाक्षर आहे; तेवढें पुरें आहे. रूप शरीराला आच्छादितें म्हणून रूपवाचक वर्ण ( ८९।१९ ) व वर्पस् ( ३६२।१ ) वृ ( = आच्छादणें ) पासून; न व पस् हे नामकरण प्रत्यय. इन्द्र ( ७५६।८ ) शब्दाच्या १४ व्युत्पत्ति दिल्या आहेत; इन्द्र शब्द जेथें जेथें आला असेल तेथल्या तेथल्या संदर्भावरून या व्युत्पत्ति केल्या आहेत. आणखीही एक दोन व्युत्पत्ति देणें जरूर होतें. ऐतरेयोपनिषदांत ( ७५८।१३ ) इन्द्र शब्द मूळचा इदन्द्र होता; त्याचें देवांनीं इन्द्र शब्दांत रूपांतर केलें; तसें करण्याचें कारण देवांना सरळ शब्द आवडत नाहींत, त्यांना शब्दांचीं विकृतरूपें आवडतात असें म्हटलें आहे. उलूखल शब्दाच्या व्युत्पत्ति देतांना शतपथब्राह्मणांतील वचन ( ६८३।२० ) दिलें आहे; देवांना सरळ शब्द आवडत नाहींत, त्यांना विकृत शब्द आवडतात असें म्हटलें आहे. ज्यांची व्युत्पत्ति देतां येत नाहीं त्या शब्दांची कशी तरी व्युत्पत्ति करावयाची असा ब्राह्मणकालीं प्रघात पडून गेला होता म्हणून तत्समर्थनार्थ परोक्षप्रियाः इव हि देवाः प्रत्यक्षद्विषः असें विधान केलें गेलें. पाहिजे ती खटपट करा पण शब्दाची व्युत्पत्ति कराच करा असें ब्राह्मणांनीं व उपनिषदांनीं आग्रहानें सांगितलें म्हणूच निरुक्तशास्त्र अस्तित्वांत आलें. अद् ( = खाणें ) ह्यापासून अन्न; पण यास्कानें या व्युत्पत्तीला दुय्यम स्थान दिलें आहे ( १७७।२१ ); अन्न भांड्यांतून घेऊन तोंडाकडे नेलें जातें व नंतर तोंडांत घातलें जातें म्हणून अन्नं = आन्नं = आ + न् + नं = आ + नी + तम्; ह्या व्युत्पत्तींतून पदार्थ तोंडाकडे व तोंडांत नेणें असे दोन्हीही अर्थ निघतात. यज् पासून यज्ञ असें नैरुक्तही म्हणतात; पण यास्काचें त्या व्युत्पत्तीनें समाधान होत नाहीं म्हणून यज्ञसंबंधीं सर्व अर्थ स्पष्ट करण्याकरितां तो निराळ्या चार व्युत्पत्ति देतो ( २१२-२१३ ). ज्या शब्दांच्या व्युत्पत्तींविषयीं कोणाला कधींही संशय येणार नाहीं अशा शब्दांच्या व्युत्पत्ति यास्कानें निरुक्तपद्धतीनें केल्या आहेत. चमत्कारिक व अनपेक्षित व्युत्पत्ति देण्याकडे त्याचा विशेष कटाक्ष होता हें आणखींही उदाहरणांनीं स्पष्ट करतां येईल; अशा निरनिराळ्या प्रकारच्या व्युत्पत्ति निरुक्तांत हव्या तितक्या सांपडतात; त्यांची पुनरुक्ति एथें करण्याची जरूर नाहीं. नैरुक्तांच्या सिद्धांताचा उलगडा करण्याकरितां वर दिलेलीं उदाहरणें पुरीं आहेत. निरुक्तांत एक द्वि त्रि वगैरेंच्या व्युत्पत्ति दिल्या आहेत (पान १८०); संस्कृताशीं संबंध असलेल्या अवेस्ता लॅटिन ग्रीक इंग्रजी वगैरे भाषांतही थोड्याफार फरकानें द्वि वगैरे संख्यावाचक शब्द आहेत; त्यांची व्युत्पत्ति यास्कानें दिलेल्या धातूंपासून करावयाची कीं त्या भाषांत असणाऱ्या धातूंपासून करावयाची ? द्वि त्रि

वगैरेंची व्युत्पत्ति करणें हा केवळ आग्रह होय; अशा व्युत्पत्तीनें कोणता लाभ होतो ? मनुष्य एकदां हट्टाला पेटला म्हणजे तो पाहिजे तो बरळूं लागतो. बऱ्याच पांखरांना त्यांच्या आवाजावरून नांवें पडलीं आहेत हें कोणीही मान्य करील; पण औपमन्यव हटवादी असल्यानें पाखरांचींही नांवें धातूंपासूनच झालीं आहेत असें तो म्हणतो ( पान २१० ). निरुक्तकारांना शब्दांची व्युत्पत्ति देण्याचा मोह आवरत नाहीं; शब्द पुढें आला कीं व्युत्पत्तीचा तडाखा त्यांनीं त्याला दिलाच. मेनाः मानयन्ति एनाः । ग्नाः गच्छन्ति एनाः ( २२८।९-१० ); मेनाः मूळचा मानाः व ग्नाः हा गनाः किंवा गमाः असा होता; गृहलक्ष्मी म्हणून स्त्रियांना नवरे मान देतात म्हणून त्या मानाः व पुरुष त्यांच्याकडे कामतृप्त्यर्थ जातात म्हणून त्या ग्नाः; परंतु मानाः ह्याचें मेनाः व गनाः किंवा गमाः ह्याचें ग्नाः हीं रूपांतरें केव्हां झालीं तें सांगणें जरूर होतें. अपभ्रंश कोणत्यातरी आधीं असलेल्या शब्दांचे होतात; मानाः व गनाः किंवा गमाः हे आधीं प्रचारांत होते असें मानण्यास आधार काय ? व्युत्पत्ति हाच सबळ पुरावा ! कीकट हा अनार्य देश व त्याचा राजा प्रमगंद हाही अनार्य; अनार्य हे आर्यांचे शत्रु म्हणून ह्या शब्दांच्या शत्रुत्वदर्शक व्युत्पत्ति केल्या आहेत (पानें ५२१ व ५२२); प्रमगंद शब्दाची व्युत्पत्ति तर किळसवाणी आहे. परुच्छेप ( ८४४।२ ). हें एका ऋषीचें नांव; त्या शब्दाची घाणेरडी व्युत्पत्ति केली आहे. असुर ( १७१।४ ), द्रप्स ( ३७९।२३ ), निष्षपी ( ३८७।२० ) व पसः ( ३८७।२४ ) ह्यांच्या व्युत्पत्ति पहा. निरुक्तशास्त्रानें कोणतेंही कार्य साधलें नाहीं; त्यानें कोठेंही अर्थ सुगम झाला नाहीं; उलट विवरणकारांनीं शब्दांचे चुकीचे अर्थ केले आहेत अशी त्या शास्त्रापासून मोठी हानि झाली आहे. निघंटूंत गतिवाचक शब्द दिले आहेत ( २।१४ ); गति हा सर्वांचा सामान्य अर्थ; पण संदर्भावरून गतीचा अर्थ वाढतो ( धातोः तदर्थातिशयेन योगः १२०१।१४ ). ईष्‌चा जाणें ( धा० १।६१२ ) हा सामान्य अर्थ; पण जहा को अस्मदीषते ( २३६।१६ ) एथें ईषते = पलायते असा अर्थ आहे; पलायन ही एक गतीच आहे; पण ती जोराची गति आहे. याप्रमाणें सामान्य अर्थाची विशिष्ट अर्थांत संदर्भानें परिणति होते असें नैरुक्तांचें मत आहे. अर्वाचीन धातुपाठ प्रमाणभूत मानल्यानें हें विधान केलें आहे. नैरुक्तांचें सर्व व्युत्पत्तिशास्त्र या प्रमाणावर आधारलें आहे. वैदिक शब्द अर्वाचीन व्याकरणशुद्धशब्दांचे अपभ्रंश होत असें जरी ते म्हणत नाहींत तरी त्यांच्या शास्त्राचा सर्व रोख असें म्हणण्याकडे आहे असें वरील विवेचनावरून सिद्ध होतें. धा छन्दसि सर्वे विधयः भवन्ति म्हणजे अष्टाध्यायींतील सर्व विधिवचनें म्हणजे सूत्रें वैदिक शब्दांना कधीं लागूं पडतात कधीं नाहींत असें पतंजलीच्या महाभाष्यांत म्हटलें आहे (१।४।९); पण हें म्हणणें योग्य नाहीं; वैदिक व्याकरण अगदीं भिन्न होतें; वेदाचा अर्थ करण्याला वैदिक व्याकरणाचीच जरूरी आहे व तें व्याक-

रण ऋग्वेदांतूनच काढलें पाहिजे. ऋग्वेदांतील शब्दांचे अर्थ ऋग्वेदावरूनच ठरविले पाहिजेत. ऋग्वेदकालची भाषा व्याकरणशुद्ध होती, तिला नियम होते हें ऋग्वेदाचा बारकाईनें अभ्यास केल्यानें लक्षांत येतें. ऋग्वेदाला अर्वाचीन व्याकरणाची कसोटी लावणें हा अन्याय होय व तसा अन्याय नैरुक्तांनीं केला आहे. नैरुक्तांचे सर्व सिद्धांत चुकीचे आहेत; शब्दानें जे अर्थ सूचित होतात तदनुरूप व्युत्पत्ति केली पाहिजे हें म्हणणें कोणालाही मान्य होणार नाहीं; शब्दाचा मूळ अर्थ एक असतो, कालांतरानें त्या शब्दाचे अनेक अर्थ होतात व ते लक्षणेनें अस्तित्वांत येतात. प्रत्येक अर्थाला निराळा शब्द तयार केल्यास शब्दांची संख्या अगणित होईल व कोणालाही असे बनलेले कोट्यावधि शब्द ध्यानांत ठेवतां येणार नाहींत. निरुक्त २।७ त ( १००।११-२८ ) लक्षणेनें एका शब्दाचे अनेक अर्थ बनतात ह्याचें पद हें उदाहरण दिलें आहे. जनावराला चार पाय असतात; त्यावरून चार पायांपैकीं एक पाय हा चार पायांचा चतुर्थांश होय; नंतर पाद शब्द भाग या अर्थीं वापरला गेला. अष्टाध्यायीच्या प्रत्येक अध्यायाचे चार चार पाद म्हणजे भाग केले आहेत; संहितेचीं पदें पाडतात; हीं पदेंही भागच होत; हीं पदें चार नसून संख्येनें हवीं तितकीं असतील; तथापि त्यांना पदें ही संज्ञा दिली आहे. भाषाविस्तराचें निदान या पद शब्दांत आहे; पण ह्या विधानाप्रमाणें नैरुक्त वागले नाहींत. प्रस्तुत ठिकाणीं यास्कानें तें विधान करावें हें नवल आहे; तें प्रक्षिप्त असावें असेंही म्हणतां येत नाहीं; कारण मधु सोमम् इति औपमिकं ( २५२।३१ ) व इयम् अपि इतरा कृत्तिः एत-स्मात् एव सूत्रमयी । उपमार्थे वा ( ३९९।२१–२४ ) ह्या वाक्यांत सोमा-ला मधु व कंथेला कृत्ति लक्षणेनें म्हटलें आहे असें यास्क म्हणतो; त्यावरून यास्काला लक्षणा माहित होती हें स्पष्ट आहे. लक्षणेची आठवण त्याला एखाद वेळेस होत असे एवढेंच म्हणतां येतें. निरुक्तशास्त्र हें शास्त्र नसून एक हास्यास्पद खटपट होय असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. डॉ. भांडारकर म्हणतात कीं यास्कानें घालून दिलेले व्युत्पत्तिचे नियम अगदीं योग्य आहेत; पण या म्हणण्याला एथपर्यंत केलेल्या-विवरणावरून आधार नाहीं असें म्हणणें भाग पडतें. निरुक्तग्रंथ काय आहे हें बहुतेकांना कळत नसतें; एम् ए ला जाणाऱ्या विद्यार्थ्यांना या ग्रंथाचा अभ्यास करावा लागतो; पण त्यांनां निरुक्ताचा अर्थ कळत नाहीं व निरुक्तांतल्या व्युत्पत्ति कशातरी भरकटल्या आहेत असें त्यांनां वाटतें आणि त्या व्युत्पत्ति वाचून हसूं येतें. निरुक्तशास्त्रानें सर्व विवरणकारांची फसगत झाली आहे. सायणाचार्यांनीं आपल्या ऋग्भाष्यांत पुष्कळ ठिकाणीं यास्काचा आधार घेतला आहे; आपल्या उपोद्घातात निरुक्तांत दिलेल्या अग्नि शब्दाच्या व्युत्पत्तींचें समर्थन त्यांनीं केलें आहे. एकैकस्य पदस्य संभाविताः अवयवार्थाः तत्र निःशेषेण उच्यन्ते इति निरुक्तं = ।निरुक्ताला निरुक्त म्हणण्याचें कारण शब्दांतील प्रत्येक अवयवाचे शक्य तितके अर्थ त्यांत पूर्णपणें उक्त म्हणजे दिलेले असतात; निरुक्त शब्दाच्या ह्या विवेचनावरून निरुक्तपद्धति त्यांना मान्य असून

तिला अनुसरून ऋग्वेदांतील शब्दांचे अर्थ त्यांनीं आपल्या भाष्यांत केले आहेत. चनस् ( ऋ० सं० १।३।१ ) = अन्न; अन्न सर्वांना पूज्य असतें म्हणून चनस् शब्द चाय् पूजा करणें ( धा० ४।१९८ ) यापासून; चाय् यांतील आ ह्रस्व होऊन चय्; च ला न् हा आगम लागतो; चन् + य् + अस्; न् पुढें य् आल्यानें लोपो व्योर्वलि (पा० ६।१।७६) या सूत्रानें य् नाहींसा होतो; असें केल्यानें चन् + अस् = चनस् असें नाम बनतें. सूर्याया वहतुः प्रागात् सविता यमवासृजत् । अघासु हन्यन्ते गावो अर्जुन्योः परि उह्यते ( १०।८५।१३ ); सवित्यानें सूर्येच्या भावी पतीला जो हुंडा देऊं केला होता तो वाट चालूं लागला आहे; हा पहिल्या अर्धाचा अर्थ; दुसऱ्या अर्धाचें सायणभाष्य पुढीलप्रमाणें:— अघासु । मघासु इत्यर्थः । मघानक्षत्रेषु गावः सवित्रा दत्ताः गावः सोमगृहं प्रति हन्यन्ते । दण्डैस्ताड्यन्ते प्रेरणार्थम् । अर्जुन्योः । फल्गुन्योः इत्यर्थः । तयोः नक्षत्रयोः सवितुः सकाशात् परि सोमगृहं प्रति उह्यते । नीयते रथेन = अघा म्हणजे मघा नक्षत्र; मघानक्षत्रावर सवित्यानें सोमाला दिलेले बैल बडवीत बडवीत सोमाच्या घराकडे हांकून नेले जातात; अर्जुनी म्हणजे फल्गुनीनक्षत्र; त्या नक्षत्रावर सूर्या सोमाकडे पाठविली जाते. हा ऋगर्ध खरोखर दुर्बोध आहे; अघासु व अर्जुन्योः ह्यांचा अर्थ कळत नाहीं. अघासु ह्यांतील अ च्या आधीं म् अक्षर घालून मघासु शब्द सायणाचार्यांनीं तयार केला व पूर्वाफल्गुनी व उत्तराफल्गुनी असा अर्जुनी शब्दाचा अर्थ केला; पण असा बदल करण्याला व त्या शब्दांचे ते अर्थ ठरविण्याला आधार दिला नाहीं. अघासु हा शब्द एथेंच आला आहे; म्हणून त्याचा अर्थ करतां येत नाहीं. ऋग्वेदांत उषेला अर्जुनी म्हटलें आहे; पण तो अर्थ एथें लागू पडत नाहीं. अर्जुन म्हणजे पांढरा; त्याचें स्त्रीलिंग अर्जुनी; अर्जुनी म्हणजे पांढरीशुभ्र सांडणी म्हणजे उंटीण किंवा हत्तीणही असेल. परि + उह् हा धातु १०।१७।१ या ऋचेंतील पर्युह्यमाना ह्यांत आहे; त्या ऋचेचा अर्थ पान ९७६ वर दिला आहे; पण तेथें पर्युह्यमाना = तिचा विवाह चालू असतांनाच असा मीं अर्थ केला आहे; तो चुकला आहे. परि + उह्यमाना = लांबच्या वाटेनें ( परि ) रथांत घालून नेली जाणारी. सवित्यानें जो हुंडा देऊं केला होता तो सूर्येचा हुंडा वाट चालूं लागला आहे असें मीं वर भाषांतर केलें आहे. पण हुंडा वाट कशी चालेल? तो कशावर तरी वाहून नेला पाहिजे; बैलांच्या पाठीवर वाहून नेल्यास रस्ता लांब असल्यामुळें ओझ्याच्या दडपणाखालीं बैल मेटाकुटीस येतील व त्यांचे मुडदे वाटेंतच पडतील ( हन्यन्ते ) म्हणून तो हुंडा सांडणींच्या किंवा हत्तिणींच्या पाठीवर लादून नवऱ्याच्या गांवाकडे जाणाऱ्या लांब रस्त्यानें ( परि ) वाहून नेला जात आहे ( उह्यते ). उंटिणींचा किंवा हत्तिणींचा उपयोग लांबच्या प्रवासांत केला जातो; तेव्हां अघासु म्हणजे विस्तृत वाळवंटांतून असा अर्थ असेल; वाळवंटांत बैलांचे हाल हाल होतील व ते वाटेंतच मरून पडतील म्हणून सांडणींचा किंवा हत्तिणींचा उपयोग करणें आवश्यक असेल. सूर्या स्वतः सुंदर

रथांत बसून नवऱ्याकडे जाते व त्याला हुंडा नजर करते (९६८।८-९). सायणाचार्य म्हणतात त्याप्रमाणें मघानक्षत्रावर गाडीला बैल जोडून ते बैल सोमाच्या घराकडे दामटीत नेले गेले असा जर अर्थ असेल तर ऋचेंत मघासु शब्द घालण्यास कोणती हरकत होती? कधीं कधीं शब्दांतील अक्षर गळतें ह्या निरुक्तसिद्धांताचें (७७।१२) अघासु हें उदाहरण होय. ऋघायमाणं (ऋ० सं० १।१०।८) = नृघायमाणम्; नृन् हन्ति इति नृहा; नृहा मधील न् चा लोप होतो व ह चा घ होतो असें सायणाचार्य म्हणतात. पण नृघायमाणं असाच शब्द कां घातला नाहीं? अस ह्या अर्थीं मूळ शब्द ऋघा असाच असेल; ऋघा शब्द कसा बनला तें ऋग्वेद-कालीन लोकांना माहीत असेल; चारपांच हजार वर्षांनंतर त्याची व्युत्पत्ति कशी करतां येईल? अघासु चें मघासु व ऋघायमाणं चें नृघायमाणं असें रूपांतर करण्याला निरुक्ताचा आधार आहे; ऋदूदरः = मृदूदरः (४३४।२१) व असुरत्वं = वसुरत्वं (८२७।१४) पहा. निरुक्तानें विवरणकारांची दिशाभूल केली आहे; त्यामुळें ऋचांतले शब्द अद्यापीही दुर्बोध राहिले आहेत. निरुक्त शब्द छांदोग्य व मुंडक ह्या उपनिषदांत आढळतो. अपरा व परा अशा दोन विद्या असून पहिलींत ऋग्वेद यजुर्वेद सामवेद अथर्व-वेद शिक्षा कल्प व्याकरण निरुक्त ज्योतिष व छन्दस् ह्यांचा अंतर्भाव होतो असें मुंड-कोपनिषदांत म्हटलें आहे (५); ह्यावरून वेदांगें फार जुनीं आहेत असें सिद्ध होतें. छांदोग्योपनिषदांत (८।३।३) हृदय शब्दाचें निर्वचन पुढीलप्रमाणें केलें आहे; स वै एष आत्मा हृदि। तस्य एतत् एव निरुक्तं हृद् अयम् इति तस्मात् हृदयं = हा (अयं) आत्मा हृदयांत (हृदि) असतो म्हणून ज्या ठिकाणीं तो असतो त्याला हृदय म्हण-तात; हृदयं = हृद् + अयं = हृदि + अयम्; असा हृदय शब्दाचा अर्थ निरुक्त म्हणजे स्पष्ट रीतीनें बाहेर काढला आहे. बृहदारण्यकांत (५।३।३) दिलेली हृदय शब्दाची व्युत्पत्तिः— तदेतत् त्र्यक्षरं हृदयम्। हृ इति एकम् अक्षरम्। अभिहरन्ति अस्मै स्वाश्च अन्ये च। द इति एकम् अक्षरम्। ददाति अस्मै स्वाश्च अन्ये च। यम् इति एकम् अक्षरम्। एति स्वर्गं लोकं यः एवं वेद = हृदय शब्द तीन अक्षरांचा आहे; हृ, द व य अशीं तीं तीन अक्षरें; इंद्रियें व शब्दादि विषय आपापलें कार्य ह्या आत्म्याकडे भोगण्याकरितां आणतात असा हृ अक्षराचा अर्थ; तीं आत्म्याला आपापलीं कार्यें भोगण्यासाठीं देतात असा द चा अर्थ; हें सर्व जो जाणतो तो स्वर्गाला जातो (एति) असा य चा अर्थ. शब्दाचे तुकडे पाडून प्रत्येक तुकड्याची व्युत्पत्ति करणें हा प्रघात ब्राह्मणें व उपनिषदें ह्यांनीं सुरू केला. ब्रह्मतत्त्व मनांत बिंबविण्याकरितां साम शब्दाचे सा व अम असे तुकडे पाडून सा म्हणजे पृथिवी अंतरिक्ष द्यौ नक्षत्रें वाक् चक्षु श्रोत्र वगैरे व अम म्हणजे अग्नि वायु आदित्य चंद्रमा प्राण आत्मा मन वगैरे; अशा साम शब्दावर कोट्या केल्या आहेत (छांदोग्य १।६।१). एतम् उ एव आङ्गिरसं मन्यन्ते आङ्गनां यत् रसः (छांदोग्य १।२।१०); प्राण हा सर्वांगांचा रस म्हणून त्याला आङ्गिरस् हें नांव; अङ्गिरस् = आङ्गि + रस् = अङ्ग + रस = अंगांचा रस. ह्या

सर्व व्युत्पत्ति नसून हृदय, साम व अंगिरस् ह्यांवर विशेष कारणांकरितां केलेल्या कोट्या होत; परंतु नैरुक्त व शाकटायन ह्यांना त्या व्युत्पत्ति वाटल्या व त्यांचें त्यांनीं अनुकरण केलें. शाकटायनानें सत्य शब्दाची केलेली व्युत्पत्ति पहा (३८।११). निरुक्तकारांना ही पद्धत मान्य होती हें त्यांनीं निरुक्तांत ब्राह्मणवचनें दिलीं आहेत त्यांवरून सिद्ध होतें; शक्वरी (२५।२४), ऋषि (१०९।३३), भृगु (२०८।३), अत्रि (२०८।१२) व रुद्र (७४२।२०) पहा. निरुक्त कोट्या करण्याचें शास्त्र आहे; तें व्युत्पत्तिशास्त्र नाहीं; त्यानें व्याकरणाची पूर्तता (व्याकरणस्य कार्त्स्न्यं ४५।११) कधींही होणार नाहीं; व्याकरणांत दिलेल्या व्युत्पत्ति नियमांना धरून आहेत; नैरुक्तांच्या व्युत्पत्तींना कसलाही धरबंद नसतो. निरुक्तशास्त्र हें शास्त्रच नव्हें असें निरुपायानें म्हणावें लागतें. शब्दांचे अपभ्रंश होतात हें खरें आहे; पण अपभ्रंशाला मागचा इतिहास असतो. कुह पासून क्व कसा झाला हें सिद्ध करतां येतें. राजन् शब्दाची राजनः राजना राजने राजनि अशीं मूळ रूपें होतीं हें राज्ञि राजनि ह्या वैकल्पिक रूपांवरून सिद्ध होतें; राज्ञि राजनि हा विकल्प भाषेंत राहिला; पण राज्ञः राजनः, राज्ञा राजना, राज्ञे राजने, राज्ञां राजनां हे विकल्प नाहींसे होण्याचें कारण उच्चाराची सोय; राजनः राजना राजने राजनां यांच्याबद्दल राज्ञः राज्ञा राज्ञे राज्ञां हीं रूपें उच्चाराकरितां आलीं. आत्मन् कर्मन् वगैरे शब्दांचीं वैकल्पिक रूपें न होण्याचें कारण सुलभ उच्चार हेंच होय. त्रि + ऋचः = त्र्यृचः; हा उच्चार अवघड आहे त्यामुळें तृचः असा उच्चार केला गेला. जगमतुः व जंगमुः ह्यांचीं जग्मतुः व जग्मुः हीं रूपांतरें उच्चाराकरतांच झालीं. मध्या यत् कर्त्वम् अभवत् अभीके (१०।६१।६); अग्निं दूतं प्रति अब्रवीतन अश्वः कर्त्वो रथ उतेह कर्त्वः। धेनुः कर्त्वा युवशा कर्त्वा द्वा (१।१६१।३); ह्यांपैकीं पहिल्या उताऱ्यांतील कर्त्वं व दुसऱ्यांतील अश्वः कर्त्वः आणि धेनुः कर्त्वा ह्यांतील कर्त्वः व कर्त्वा हीं रूपें शुद्ध होत; परंतु रथः उतेह कर्त्वः व युवशा कर्त्वा द्वा ह्यांतील कर्त्वः व कर्त्वा हे शब्द छंदाकरितां कर्तवः व कर्तवा असे वाचले पाहिजेत; म्हणजे रथः उतेह कर्तवः व युवशा कर्तवा द्वा अशीं वाक्यें पाहिजेत. कृतानि कर्त्वानि च (८।६३।६) = कृतानि कर्तवानि च. वीर्या कृधि यानि ते कर्त्वानि (२।३०।१०); एथें कर्तवानि असेंच वाचलें पाहिजे. सिन्धुभ्यः कर्त्वं हविः (१।२३।१८); कर्त्वं = कर्तवम्. ह्रदा इव स्नात्वा उ त्वे ददृश्रे (१०।७१।७ पान २७।११); स्नात्वाः हें शुद्ध रूप आहे; पण रिपवो हन्त्वासः (३।३०।१५) एथें हन्तवासः असें पाहिजे. हीं अशुद्ध रूपें जरी संहितेंत नाहींत तरी तीं बरोबर उच्चार केल्यानें स्पष्ट होतात. ह्याप्रमाणें शुद्धाचें अशुद्ध कसें होतें तें ऋग्वेदांतही आढळून येतें. मूळ प्रत्यय त्व; तो उच्चारानें तव झाला व त्याचेंच अर्वाचीन संस्कृतांत तव्य असें रूपांतर झालें; (१) कर्त्वं, (२) कर्तवं, (३) कर्तव्यं अशा ह्या पायऱ्या होत. शीरंची व्युत्पत्ति व अर्थ देतां येत नाहीं असें मीं म्हटलें आहे (२६९।१९); तथापि शीरं हा श्रीरं ह्याचा अपभ्रंश असावा; श्री = तेज; श्री + रं = श्रीरं

= देदीप्यमान, डोळे दिपविणारा ( अग्नि ). अश्रीरा तनूर्भवति रुशती ( १०।८५। ३० ) = ( वधूचें वस्त्र जर नवरा पांघरील तर ) त्याचें तेजस्वी ( रुशती ) शरीर (तनूः) तेजोहीन (अश्रीरा) होईल म्हणजे तें अगदीं फिकें पडेल; अ+श्रीरा = अश्रीरा. शब्द अपभ्रष्ट कसे होतात याचीं मराठींतील कांहीं उदाहरणें घेऊं.

| संस्कृत | पाली | अर्धमागधी | मराठी |
|---|---|---|---|
| अन्धकार | अंधकार | अंधियार | अंधार. |
| तडाक-ग | तडाग | तलाअ | तलाव. |
| भिक्षाचारी | भिक्खाचारी | भिक्खाआरी | भिकारी. |
| भगिनी | भगिनी | भहिणी | बहिणी;(गुजराथींत बेन किंवा बहेन). |
| मातृगृह | मातुघर | माइहर | माहेर. |
| उपानह् | उपाहन | पाहणा, वाहणा | वाहाणा. |
| चतुर्विंशतिः | चतुवीसति | चउवीसइ | चोवीस. |
| सोदरा | सोदरा | सोयरा | सोयरा. |

अपभ्रंशाचीं हीं उदाहरणें पालीचे प्रोफेसर डॉ० बापट यांच्या एका निबंधांतून घेतलीं आहेत. इष्टका ( सं० ) इट्ठका ( पाली ) ईंट ( हिंदी ) वीट ( मराठी ). मृदु (सं०) मुदु (पाली) मउए (अर्धमागधी) मऊ (मराठी). अशीं शेंकडों उदाहरणें देतां येतील. फारसींतून कितीतरी शब्द अपभ्रष्टरूपानें मराठींत आले आहेत; सिआइ दवात सिपाही ह्यांचे अपभ्रंश शाई दौत शिपाई; दस्तखत मूळचा शब्द; त्याचा अपभ्रंश दस्तुरखुद. हल्लींही इंग्रजी शब्दांचे अपभ्रंश प्रचारांत येत आहेत; waist-coat चे इंग्रजींतील उच्चार ( १ ) was-kōt, ( २ ) wes′-kōt, ( ३ ) wes′-kut; १ व ३ ह्यांपासून मराठींतील वास्कुट; sappers and miners ह्याचा मराठी अपभ्रंश छप्परमैनर; engineer चा विंजणीयर; office चा हापीस; man of war ला खलाशी मनवार म्हणतात. प्राकृतापासून संस्कृत बनविली गेली असें अलीकडे कित्येक म्हणूं लागले आहेत; त्यांचें म्हणणें असें कीं प्राकृत ही मूळ भाषा; तिचें शुद्धीकरण म्हणजे संस्कृत. पण नुसत्या शब्दांवर अवलंबून प्राकृतापासून संस्कृत असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. प्राकृत भाषा अनेक होत्या; तेव्हां कोणत्या विशिष्ट प्राकृतापासून संस्कृत बनविली गेली? एका संस्कृत भाषेचे निरनिराळ्या प्रांतांत बिघाड होऊन निरनिराळ्या प्राकृत भाषा जन्मल्या हें स्वाभाविक कीं अनेक प्राकृतांपासून संस्कृत बनविली गेली हें स्वाभाविक ? मराठी हिंदी गुजराथी बंगाली वगैरे भाषांपासून प्राकृत भाषा, प्राकृतांपासून संस्कृत व संस्कृतापासून ऋग्वेदकालीन भाषा असा उलटा क्रम करणें हास्यास्पद होय. फ्रेंच स्पॅनिश पोर्च्युगीज व इटॅलिअन भाषांपासून लॅटिन भाषा उत्पन्न झाली असें जर कोणी म्हणूं लागेल तर त्याला लोक वेड्यांतच काढतील. ऋग्वेदांत अपभ्रंश असतील पण ते ऋग्वेदाच्या

आधींच्या भाषेचेच अपभ्रंश असले पाहिजेत; परंतु ऋग्वेदाच्या आधींची भाषा कोणती होती तिचा तर्कसुद्धां करितां येत नाहीं. ऋग्वेदांतील अमका शब्द अमक्याचा अपभ्रंश असें भीतभीत म्हटलें पाहिजे; पण अशी भीति निरुक्तकार व इतर व्युत्पत्ति-कार कधींहि दाखवीत नाहींत. पुढील दिलेल्या व्युत्पत्ति भीतभीत केल्या आहेत. अर्वाचीन संस्कृतांतील अङ्गुलि शब्द ऋग्वेदांत अङ्गुरि असा आहे व तो स्वङ्गुरि या समासांत आहे; सवित्याला स्वङ्गुरिः ( ४।५४।४ ) म्हटलें आहे; स्वङ्गुरिः = उत्तम बोटें आहेत ज्याला असा. अङ्गुरिः = अङ्गु + रिः; पण अङ्गु ऋग्वेदांत किंवा अर्वाचीन संस्कृतांत नाहीं. तथापि अङ्गुं पाणिपादं लाति अङ्गुलिः । अङ्गौ तिष्ठति अङ्गुष्ठः ( अमर २।६।८२ ); अशा अङ्गुलि व अङ्गुष्ठ शब्दांच्या व्युत्प-त्तींत अङ्गु शब्द आला असून त्याचे हात व पाय असे अर्थ आधाराशिवाय क्षीर-स्वामी करतो. लॅटिनमध्यें unguis = हाताच्या किंवा पायाच्या बोटाचें नख; ungula = खूर किंवा खुराची नखी; तेव्हां अङ्गु याचाही तोच अर्थ असेल. अङ्गु म्हणजे नख आहे जिला ती अङ्गुरि; खरी व्युत्पत्ति कोणती असेल तर ती हीच असावी. निरुक्तांत दिलेल्या अङ्गुलि शब्दाच्या व्युत्पत्ति ( १७४।२७ ) व्युत्पत्ति नव्हत. ऋग्वेदांतील किंवा अर्वाचीन संस्कृतांतील शब्दांच्या व्युत्पत्तींना कधीं कधीं परभाषांचा उपयोग होतो. लॅटिनमधील aurum शब्द हिरण्य हरि व हिरि ह्यांसारखा दिसतो. शब्दाचे व्यवहारानें अनेक अर्थ कसे होत जातात तें लॅटिनमधील aurum शब्दाच्या निरनिराळ्या अर्थांवरून लक्षांत येईल; aurum ( १ ) सोनें, ( २ ) सोन्याचा केलेला पदार्थ, ( ३ ) सोन्याचीं भांडीं, ( ४ ) सोन्याचा पेला, ( ५ ) सांखळी, ( ६ ) माळ, ( ७ ) अंगठी, ( ८ ) सोन्याचें नाणें, पैका, ( ९ ) सुवर्णयुग, ( १० ) सोन्याचा रंग किंवा त्याची चकाकी, ( ११ ) एका विशिष्ट मेंढयावरची सोनेरी लोकर. ( निरुक्तकार म्हणतात त्याप्रमाणें प्रत्येक अर्थाला अनुसरून निरनिराळी व्युत्पत्ति करावी लागेल; पण तसें करणें अशास्त्रीय व असमंजसपणाचें होय असें कोणीही म्हणेल ). आकार कृति वगैरे कार-णांवरून वस्तूंना नांवें पडतात. इंग्रजींत सोन्याला पिवळा धातु ( yellow metal ) म्हणतात. गोल्ड् ( gold ) शब्दाचीं निरनिराळ्या भाषांतील रूपांतरें गुल्ड् ( guld ) गुल् ( gull ) गुल्थ् ( gulth ) गाउड् ( goud ) वगैरे; त्याचप्रमाणें यलो ( yellow ) शब्दाचीं गेलु ( gelu ) गओलु ( geolu ) गेल ( gel ) गाल् ( gal ) गील् (geel) गेल्स् (gels) गेलो (gelo) गेल्ब् (gelb) गुल्र् (gulr) गुळ् (gul) वगैरे; याप्रमाणें गोल्ड् व यलो ह्यांत साम्य आहे; यलो = पिवळें; सोन्याचा रंग पिवळा; यलो शब्दांतलें जें मूळ गुल् तेंच गोल्ड् शब्दांत आहे. सोन्याला गोल्ड् नांव पडण्याचें कारण त्याचा पिवळा रंग. वर दिलेल्या aurum शब्दाच्या अर्थांत सोन्याचा रंग असा एक अर्थ आहे. हळदीला हरिद्रा नांव पडण्याचें कारण तिचा रंग; हिरडा पिवळा असतो म्हणून त्याचें नांव हरीतकी. पिवळ्या रंगावरूनच सोन्याला हिरण्य हरि

हिरि हरित् व हिरण्यय किंवा हिरण्मय ह्यांतील हिरण् आणि aurum हीं नांवें पडलीं असावींत; एथें नांव पडण्याचें कारण रंग. धातूंपासूनच सर्व नांवें निघतात असें कधींही म्हणतां येणार नाहीं. सोन्याला सुवर्ण व कल्याणवर्ण हीं नांवें त्याच्या रंगावरूनच; सुंदर ( सु = कल्याण ) वर्ण आहे ज्याचा तें सुवर्ण किंवा कल्याणवर्ण. सुवर्ण शब्दाचेही सोनें ह्या अर्थाखेरीज नाणें व तोळा असेही अर्थ आहेत. अर्जेन्टम् (argentum)=रुपें; ह्या अर्थापासून रुप्याचीं भांडीं, रुप्याचीं नाणीं व पैका असे अर्थ व्यवहारामुळें उत्पन्न झाले. अर्जुन= पांढरें (अमर १।५।१३); अर्जुन म्हणजे अर्जुनसादडा नांवाचें झाड; तें झाड पांढरें असतें म्हणून त्याचें नांव अर्जुन ( अमर २।४।४५ ); एका प्रकारच्या पांढऱ्या गवताचें नांव अर्जुन ( २।५।१६७ ); पांढऱ्या रंगाच्या गाईला अर्जुनी म्हणतात ( २।९।६७ ). इन्द्रो हयन्तम् अर्जुनं वज्रं शुक्रैः अभीवृतम् । अपावृणोत् (ऋ० सं० ३।४४।५); अहश्च कृष्णम् अहरर्जुनं च ( ६।९।१ ); अत्यक्रमीत् अर्जुनं वारम् अव्ययं ( ९।६९।४ ); इंद्राचें वज्र पांढरें, दिवस पांढरा, मेंढीच्या केसाचें केलेलें गाळणें पांढरें म्हणून त्यांना अर्जुन हें विशेषण लाविलें आहे. भद्रा वस्त्राणि अर्जुना वसाना ( ३।३९।२ ) = उत्तम पांढरीं वस्त्रें अंगावर घालणारी (उषा); अर्जुनि उषः ( १।४९।३ ) = हे शुभ्रवर्ण उषे; पहाट झाल्याबरोबर फटफटलें असें म्हणतात; त्यावेळीं पूर्वेकडील क्षितिज पांढरें दिसतें म्हणून उषा पांढरी व तिनें अंगावर घेतलेलें वस्त्रही पांढरें. आ हर्यतो अर्जुने अत्के अव्यत ( ९।१०७।१३ ); सोमरसांत दूध मिसळतात; हें दूध सोमाचा पांढरा झगा होय. ह्यावरून अर्जुन म्हणजे पांढरा हा मूळ अर्थ; मग कांहीं पांढऱ्या वस्तूंना तो लाविला गेला. लॅटिनमध्यें तांब्याला सिप्रियं ( cyprium ) म्हणतात; तें नांव पडण्याचें कारण रोमन लोकांना तांब्याच्या खाणी साय्प्रस् ( Cyprus ) बेटांत सांपडल्या हें. संस्कृतांत ताम्रकं म्हणजे तांबें; त्याला म्लेच्छमुखं व उदुम्बरं हीं नांवें पडण्याचें कारण लालबुंद म्लेंच्छांचीं तोंडें रक्तासारखीं लाल असतात व उंबरही लाल असतें; तेव्हां ताम्रक म्लेच्छमुख व उदुम्बर हीं तांब्याचीं नांवें रंगावरून पडलीं आहेत (अमर २।९।९७). ह्या सर्व विवरणावरून नामांची उत्पत्ति धातूंशिवाय अन्य कारणावरही अवलंबून असते हें स्पष्ट होतें. एका शब्दाचे अनेक अर्थ होण्याचें कारण लक्षणा होय; लक्षणा म्हणजे अर्थांअर्थांतला एक सामान्य गुण म्हणजे कांहीं बाबतींतला सारखेपणा होय. अशा रीतीनें शब्दांचें मूळ शोधून काढणें हेंच खरें निरुक्तशास्त्र; शब्दांच्या आनुषंगिक अर्थांवरून तदनुरूप धातु शोधून काढणें हें खोटें निरुक्तशास्त्र. निरुक्तांत दिलेल्या बहुतेक व्युत्पत्ति ह्या खोट्या शास्त्रावर आधारलेल्या आहेत. वैय्याकरणांमध्यें शाकटायनानें शब्दाचे तुकडे पाडून प्रत्येक तुकडा विशिष्ट धातूपासून निघाला व अशा तुकड्यांपासून शब्द उत्पन्न झाला असा व्युत्पत्तिप्रघात सुरू केला ( ३७।३३ ); त्याची इतर वैयाकरणांनीं टर उडविली व त्याच्या नांवावर कोटीही केली. नाम च धातुजमाह निरुक्ते । व्याकरणे शकटस्य च तोकं = नाम धातूपासून झालें असें

निरुक्तांत यास्क म्हणाला व व्याकरणांत शक टाचें पोरही म्हणालें. शकटस्य पुत्र शाकटायनः; पण शकट शब्द कसा झाला? शकटं = शक + टं = शकृत् + अटं (पानें ४९२–४९३). वरील श्लोकार्धांत यति शक व टस्य ह्यांच्यामध्यें मुद्दाम म्हणजे शाकटायनाची टर उडविण्याकरितां केला आहे. महाभाष्यांत शाकटायनाची पुढील गोष्ट दिली आहे; भवति वै कश्चित् जाग्रदपि वर्तमानकालं नोपलभते। तत यथा। वैयाकरणानां शाकटायनः रथमार्गे आसीनः शकटसार्थं यान्तं नोपलेभे। किं पुनः कारणम्। जाग्रदपि वर्तमानकालं नोपलभते। मनसा संयुक्तानि इन्द्रियाणि उपलब्धौ कारणानि भवन्ति। मनसः असांनिध्यात् = असा एखादा मनुष्य असतो कीं जागा असूनही वर्तमानकालाचें म्हणजे आपल्याभोंवतीं किंवा समोर काय चाललें आहे त्याचें त्याला ज्ञान होत नसतें; उदाहरणार्थ वैयाकरणांमधील शाकटायन हा गाड्यांच्या जाण्यायेण्याच्या मार्गांत बसलेला असतांना जाणाऱ्या गाडयांच्या तांडयांचें ज्ञान त्याला झालें नाहीं. काय कारण हो? जागा असूनही त्याला वर्तमानकालाचें भान रहात नाहीं(हें); वर्तमानकालाचें ज्ञान होण्याला इंद्रियांचा मनाशीं संयोग झाला पाहिजे; पण शाकटायनाचें मन त्याच्याजवळ नसल्याकारणानें त्याच्या डोळ्यासमोर जाणारी शकटांची लांबट रांग त्याला दिसली नाहीं. तुझा बाप शकट, तूं शाकटायन असें असून तुला शकट दिसूं नयेत हें केवढें आश्चर्य! गाड्यांना जोडलेले बैल शेणाचे पो टाकीत जात आहेत हें कोणालाहि दिसेल पण तुला तें दिसत नाहीं हें नवल नाहीं का! तुझ्या डोळ्यांना व घ्राणेंद्रियाला तुझें मन जाग्यावर नसल्याकारणानें ज्ञान कसें होणार! व्युत्पत्ति करण्यांत शाकटायनाचें मन शहाणपणाला बाजूला ठेवून स्वैरपणें वहात जातें असें वरील काल्पनिक गोष्टीनें दर्शविलें आहे. अशी टर उडविली असतांनाही वैयाकरणांनीं तोच मार्ग स्वीकारला आहे. क्षीरस्वामी व देवराज ह्यांनीं दिलेल्या व्युत्पत्ति अशाच कोटीच्या आहेत. व्युत्पत्तिशास्त्र हें शब्दांवर कोट्या करण्याचें शास्त्र नव्हे. शब्दांच्या व्युत्पत्ति फार काळजीनें, पूर्ण शोध करून व कधीं कधीं निरनिराळ्या भाषांच्या आधारें केल्या पाहिजेत हें वर हिरण्य वगैरे शब्दांच्या केलेल्या व्युत्पत्तींवरून सिद्ध होतें. ऋग्वेदांतील शब्दांच्या व्युत्पत्ति ऋग्वेदांतूनच काढल्या पाहिजेत. अर्वाचीन संस्कृत ऋग्वेदीय संस्कृतांतून निघालें आहे तेव्हां अर्वाचीन संस्कृतांतील शब्दांची व्युत्पत्ति करतांना ऋग्वेदाचें साहाय्य घेतलें पाहिजे. सुन्दरं सुष्ठु नन्दयति इति नैरुक्ताः असें क्षीरस्वामी म्हणतो (अमर ३।१।५२); सुन्दरं = सु + न्द + रं; सु = सुष्ठु; न्द = नन्दयति; रं नामकरण प्रत्यय; उणादींत सुन्दर शब्द नाहीं. ऋग्वेदांत सूनर व सूनरी शब्द आहेत; अग्नीला सूनर व उषेला सूनरी म्हटलें आहे; सूनर ह्याचे कालांतरानें सुन्नर व नंतर सुन्दर असे अपभ्रंश झाले असावेत. ऋग्वेदीय संस्कृत व अर्वाचीन संस्कृत ह्यांत कालाचा मोठा खड्डा आहे; अर्वाचीन संस्कृताला इतर वेद व ब्राह्मणें यांपासून प्रारंभ होतो; त्यांच्या आधीं ग्रंथनिर्मिति झाली असलीच पाहिजे; ते ग्रंथ जर उपलब्ध असते तर ह्या दोन संस्कृतांतील दुवा खात्रीनें जोडतां आला

असता; तदभावीं अर्वाचीन संस्कृतांतील शब्दांच्या व्युत्पत्ति करणें साहसाचें होय. सूनृतं = सु + ऊन् + ऋतम्; सु = सुतराम्; ऊन् = ऊनयति; सुतराम् ऊनयति अप्रियम् इति सून् = अप्रिय गोष्ट पार नाहींशी करते म्हणून सून् म्हणजे प्रिय; जें प्रिय असतें त्यांत अप्रिय मुळीं नसतें; ऋतं = सत्यम्; सून् च ऋतं च इति सूनृतं अशी व्युत्पत्ति सायणाचार्य देतात ( ऋ० सं० ३।३१।१८ ). सूनृतं प्रिये सत्ये ( अमर १।५।१९ ); सुष्ठु ऊन्यते सून् । सून् च तत् ऋतं च ( क्षीरस्वामी ); अशी व्युत्पत्ति देण्याचें कारण सूनृतं शब्दाचा प्रिय व सत्य भाषण हा अर्थ. पण सूनृत शब्द ऋग्वेदांत आहे; सूनर व सूनृत ह्यांत सू दीर्घ आहे तो मूळचा सु होता; सु शोभनः नरः सूनरः; नृ = देणें; नृतं = दान, धन; ज्याच्याजवळ धन आहे व जो धन देतो तो सूनृत. उषेला सूनृता म्हटलें आहे; कारण ती धनवान् असून धन देते. व्यवहारांत असलेल्या अर्थावरून व्युत्पत्ति करणें हा कधीं कधीं फसविणारा मार्ग होय. हल्लीं अश्लीलसंबंधानें वाद चालू आहे; अश्रीर चा अपभ्रंश अश्लील (४९९।९); ज्यांत शोभा नाहीं, जें दिसावयाला घाणेरडें तें अश्रीर म्हणजे अश्लील. ह्याप्रमाणें अपभ्रंशाला कांहीं तरी पूर्व असतें; पण व्युत्पत्ति करतांना तसें पूर्व नैरुक्तांनीं कोठेंही दाखविलें नाहीं.

अर्थनित्यः परीक्षेत (७४।१३) हा उपदेश सर्वांना मान्य होण्याजोगा आहे; त्याचा निरुक्तकारांनीं जो अर्थ केला आहे तो मात्र कोणालाही संमत होणार नाहीं. नैकपदानि निर्ब्रूयात् ( ८९।२९ ) हा नियम हिरण्य वगैरे शब्दांना कसा लागू पडेल? हिरण्य म्हणजे सोनें असा सर्वत्र अर्थ असणारच. कदाचित् हिरण्य शब्दाच्या ज्या निरनिराळ्या व्युत्पत्ति निरुक्तांत दिल्या आहेत त्या ऋचांत होणाऱ्या हिरण्य शब्दाच्या भिन्नभिन्न अर्थांना अनुलक्षून केल्या असतील; पण हे भिन्न अर्थ त्या ऋचांत आहेत हें उदाहरणें देऊन ठरविणें पहिलें काम आहे. शब्द दिसण्यांत एक असतील; पण ते शब्द कोठें आले आहेत हें पाहिल्यावर त्यांचे अर्थ ठरविले पाहिजेत; कांहीं ठिकाणीं अर्थाअर्थामध्यें संबंध असेल तर कांहीं ठिकाणीं मुळींच नसेल; अशा दुसऱ्या प्रसंगी परस्परांशीं असंबद्ध अशा अर्थांपासून भिन्न व्युत्पत्ति केल्या पाहिजेत; अर्थांमध्यें संबंध आहे कीं नाहीं हें प्रथम ठरविल्यावर व्युत्पत्ति करावी; पण अर्थ ठरविल्यानंतरही पुष्कळ वेळां व्युत्पत्ति करतांच येणार नाहीं. व्युत्पत्तिशास्त्र अगदीं कठीण शास्त्र आहे; ज्यानें नानाप्रकारच्या भाषांचें अध्ययन केलें आहे त्यानेंच व्युत्पत्ति करण्याच्या खटपटीला लागावें; इतरांना अधिकारच नाहीं; त्याप्रमाणें मलाही तसा अधिकार नाहीं असें स्पष्ट सांगितलें पाहिजे. यथार्थं विभक्तीः संनमयेत् (७६।६) म्हणजे अर्थाकरितां शब्दांच्या विभक्ति बदलाव्यात; ह्या उपदेशाला अनुसरून पार्क चा पाकः (१८९।२८) आणि चित्र चा चित्रं व मेहन चा मंहनीयं (२४३।१०-१२) असे बदल केले आहेत. देवानां भद्रा सुमतिः ऋजूयतां = ऋजूयतां देवानां कल्याण्यां मतौ ( स्याम ) ( १०३४।२५ ); भाष्यांत मतौ नंतर स्याम नाहीं तथापि तो शब्द वाक्य पुरें करण्या-

करितां अध्याहृत घेतला पाहिजे; सुमतौ असा बदल करण्याचें कारण ऋजूयतां हें क्रियापद असतांना तें देवानां ह्याचें विशेषण मानलें हें. सायणाचार्यांनीं यास्काप्रमाणें ऋजूयतां हें विशेषण मानलें आहे; तथापि देवानां सुमतिः अस्तु अशी अस्तु शब्द अध्याहृत घेऊन त्यांनीं वाक्यसमाप्ति केली आहे. हे बदल अनवश्यक आहेत असें मीं तेथेंतेथें दाखविलें आहे.

## ऋग्वेदाचें व्याकरण

ऋग्वेदाला व्याकरण आहे असें वर म्हटलें आहे; तें विधान सिद्ध करणें अवश्य आहे. देवः दानाद्वा दीपनाद्वा द्योतनाद्वा द्युस्थानो भवति इति वा ( ५६१।४ ) अशा देव शब्दाच्या व्युत्पत्ति दिल्या आहेत. पण दि ( = देणें व प्रकाशणें ) असा धातु असून त्याचीं अनेक रूपें ऋग्वेदांत आहेत; जसें दीदयः दीदयत् दीदयतं दीदयति दीदयसि दीदाय दीदियुः दीदिवान् दीदिहि दीदेत दीदेथ. दि + वः = देवः = दाता, प्रकाशणारा. व प्रत्यय एव शेव आणि अश्व ह्यांतही आहे. इ + वः = एवः = घोडा, प्रवाह. शि ( = देणें ) + वः = शेवः. अश् + वः = अश्वः; अश्व शब्द व्याकरणनियमाला अनुसरून नाहीं. तो अष्टा ( अष्टृ शब्दाचें प्रथमेचें एकवचन ) असा पाहिजे ( ३७।५ ) असें आक्षेपक म्हणतो; त्याला व प्रत्यय ऋग्वेदांत होता एवढेंच उत्तर पुरें होतें; अर्वाचीन व्याकरणाचे नियम वैदिक शब्दाला लागू नाहींत असें जर उत्तर दिलें असतें तर आक्षेपकाचें तोंड बंद झालें असतें; पण ऋग्वेदाला मूळचें व्याकरण नव्हतें अशा समजुतीनें आक्षेपकाला भलतें उत्तर दिलें गेलें. अद्रिवन् शचीवन् हरिवन् अशा संबोधनांबद्दल ऋग्वेदांत अद्रिवः शचीवः हरिवः अशीं संबोधनें आहेत; ऋग्वेदकालीं तीं रूपें शुद्धच होतीं. ऋग्वेदांत कल्याणीः व गौरीः हीं प्रथमेचीं एकवचनी रूपें आहेत; अर्वाचीन संस्कृतांत नदीप्रमाणें कल्याणी व गौरी अशीं रूपें पाहिजेत; पण ऋग्वेदकालीन ईकारांत स्त्रीलिंगी शब्दांचीं प्रथमेचीं एकवचनी रूपें कल्याणीः गौरीः यांसारखींच सविसर्ग होतीं; कालांतरानें अशा पुष्कळ शब्दांचा विसर्ग गळला; तथापि अजूनही अवी लक्ष्मी तरी तन्त्री वगैरे शब्दांच्या शेवटीं तो घातला जातो. वैदिक शब्दांचें रूपांतर अर्वाचीन संस्कृतांत झालें आहे; अर्वाचीन संस्कृत शुद्ध व वैदिक अशुद्ध किंवा असंस्कृत म्हणणें योग्य नाहीं. ज्ञानेश्वरीचें व्याकरण वेगळें व प्रस्तुत मराठीचें व्याकरण वेगळें; ज्ञानेश्वरींतील व्याकरणप्रयोग चुकीचे आहेत असें म्हणण्यासारखेंच वैदिक शब्द अशुद्ध होत हें म्हणणें चुकीचें आहे. शुन्ध्युः ( पु० ) शुन्ध्यूः ( स्त्री० ) असे दोन शब्द ऋग्वेदांत आहेत; पुल्लिंगाचें शुन्ध्योः व स्त्रीलिंगाचें शुन्ध्युवः असें षष्ठीचें एकवचन होतें; तें यास्काला ( २७२।३१ ) व सायणाचार्यांनाही समजलें नाहीं. वधू व श्वश्रू शब्दांचीं षष्ठीचीं एकवचनी स्त्रीलिंगी रूपें वध्वाः व श्वश्र्वाः अशीं अर्वाचीन व्याकरणांत होतात; पण ऋग्वेदांत शुन्ध्यू चें शुन्ध्युवः असें रूप होतें. ऋग्वेदाचें

व्याकरण ऋग्वेदांतच आहे हेंच म्हणणें खरें ठरतें. अप्रायुवः ( २८६।६ ) = अप्रमाद्यन्तः ( यास्क ); अप्रायुवः = अप्रगच्छन्तः स्वकीयं रक्षितव्यं अपरित्यजन्तः (सायण); इ ( = जाणें ); ह्यापासून अय्; अय् + उः = अयुः = जाणारा; अ + प्र + अयुः = अप्रायुः ( = कधींहि न जाणारा ) असा शब्द बनवून त्याचें बहुवचन अप्रायवः असें झालें पाहिजे; पण वेदांत विकल्प असल्यामुळें अप्रायुवः हें रूप शुद्ध आहे असें सायणाचार्य म्हणतात. मलाही अप्रायुवः शब्दाचा अर्थ कळला नव्हता. अप्रायु ह्याचें स्त्रीलिंग अप्रायू; प्रा = देणें; प्रा + युः = दान, धन; अ + प्रायुः = दानाचा किंवा धनाचा अभाव म्हणजे दारिद्र्य; अप्रायुवः हें अप्रायू या स्त्रीलिंगी शब्दाचें षष्ठीचें एकवचन; अप्रायुवः रक्षितारः = दारिद्र्यापासून रक्षण करणारे असा खरा अर्थ आहे. अप्रायुवः हें देवाः ह्याचें विशेषण नाहीं. अमतिः प्रमाणें अप्रायूः ह्याचा दारिद्र्य हाच अर्थ आहे; अप्रायुवः हें रूप वर दिलेल्या शुन्ध्युवः सारखें आहे. ऊकारान्त स्त्रीलिंगी शब्द शून्ध्यू प्रमाणें चालत होते; तनूः तनुवौ तनुवः । तनुवम् । तनुवा । तनुवे । तनुवः । तनुवि असा तनू शब्द चालविला जात असे. एष स्य ते तन्वो नृम्णवर्धनः सह ओजः प्रदिवि बाह्वोर्हितः ( २।३६।५ ); हा ऋगर्ध मूळचा एष स्य ते तनुवो नृम्णवर्धनः सह ओजः प्रदिवि बाहवोः हितः असा होता; हें तो ऋगर्ध अर्वाचीन छंदांत मांडल्यानें सिद्ध होतें. प्रत्येक पादांत बारा अक्षरें आहेत. तुभ्यं सुतो मघवन् तुभ्यमा भृतः हा तिसरा पाद बारा अक्षरांचा आहे; त्वमस्य ब्राह्मणादा तृपत् पिब ह्या चौथ्या पादांत अकरा अक्षरें दिसतात पण कधीं कधीं छंदाकरितां त्वम् हें तुवम् असें वाचावें लागतें; तसें केल्यानें चौथ्या चरणांतही बारा अक्षरें होतात. बाहु शब्दाचें सप्तमीचें द्विवचन बाहवोः असें एकेकाळीं होत होतें; प्र बाहवा सिसृतं जीवसे नः ( ७।६२।५ ); एथें बाहू बद्दल बाहवा म्हणजे बहवौ असें रूप आहे. सुसंकाशा मातृमृष्टेव योषाविस्तन्वं कृणुषे दृशे कम् ( १।१२३।११ ); हा ऋगर्ध सुसंकाशा मातृमृष्टेव योषा । आविः तनुवं कृणुषे दृशे कम् असा वाचल्यानें प्रत्येक पादांत अकरा अक्षरें होतात. अरेपसा तन्वा शाशदाना । नार्भादीषते न महो विभाती ( १।१२४।६ ); दुसऱ्या पादांत अकरा अक्षरें आहेत; तन्वा बद्दल तनुवा वाचल्यानें पहिल्यांतही अकरा अक्षरें होतात. आपः पृणीत भेषजं । वरूथं तन्वे मम ( १।२३।२१ ); पहिल्या पादांत आठ अक्षरें पण दुसऱ्यांत सात; तनुवे वाचल्यानें तीं आठ होतात. अप्रक्षितं वसु बिभर्षि हस्तयोः । अषाह्ळं सहः तन्वि श्रुतो दधे (१।५५।८); पहिल्या पादांत आठ; तनुवि वाचल्यानें दुसऱ्यांतहि आठ. सिन्धवः हें प्रथमेचें बहुवचन एक ऋचा खेरीज करून सर्वत्र आहे; ती ऋचा पुढीलप्रमाणें:— अस्य त्वेषा अजरा अस्य भानवः सुसंदृशः सुप्रतीकस्य सुद्युतः । भात्वक्षसो अत्यक्तुर्न सिन्धवः अग्ने रेजन्ते असस्न्तो अजराः ( १।१४३।३ ); ह्या ऋचेंत सुसन्दृशः सुप्रतीकस्य सुद्युतः भात्वक्षसः हीं अग्नेः याचीं विशेषणें; अजराः व असस्न्तः हीं त्वेषाः व भानवः यांचीं; रेजन्ते = कम्पन्ते; रेजन्ते याला अक्तुर्न ह्यांतील न जोडून न रेजन्ते

= न कम्पन्ते = व्याप्नुवन्ति असा अर्थ सायणाचार्य करतात. सिन्धवः = स्यन्दमानाः = सर्वत्र व्याप्नुवन्तः = सर्व व्यापून टाकणाऱ्या; असा अर्थ करून सिन्धवः हें त्वेषाः व भानवः ह्यांचें विशेषण आहे असें ते म्हणतात; अक्तुः = अक्तुं = जगदञ्जकं नैशं तमः = जगाला माखून टाकणारा रात्रीचा अंधकार; अति = अतिक्रम्य. अग्नीच्या सर्वत्र पसरणाऱ्या ज्वाला रात्रीचा अंधकार ओलांडून म्हणजे नाहींसा करून सर्वत्र पसरतात असा अर्थ. किंवा भात्वक्षसः = आदित्यस्य; सिन्धवः = स्यन्दमानाः रश्मयः; न = इव; रेजन्ते = कम्पन्ते; देदीप्यमान आदित्याचे किरण रात्रीचा अंधकार नाहींसा करून जसे कांपतात म्हणजे सर्वत्र पसरतात तशा अग्नीच्या ज्वाला सर्वत्र पसरतात. दोन्ही विवरणांत सिन्धवः याचा नेहमींचा अर्थ न देतां तो शब्द विशेषण मानला आहे व तसा अर्थ सिन्धुः स्यन्दनात् ( ६९३।३० ) या व्युत्पत्तीच्या आधारें केला आहे; यथार्थं विभक्तीः संनमयेत् ( ७६।६ ) ह्या अनुज्ञेनें अक्तुः याची विभक्ति बदलली आहे; हा केवळ निरुक्ताचा परिणाम होय. एकेकाळीं सिन्धवः हें रूप सिन्धोः या शब्दाबद्दल वापरलें जात होतें त्याचें प्रस्तुत ऋचा हें उदाहरण होय; अक्तुः = प्रवाह; सिंधूचा प्रवाह जसा जोरानें धांवत सुटतो त्याप्रमाणें अग्नीच्या ज्वाला धांवत सुटतात असा खरा अर्थ आहे. रेज् = धांवणें; अस्मात् अहं तविषात् ईषमाणः इन्द्रात् भिया मरुतो रेजमानः ( १।१७१।४ ) = हे मरुतांनो, ह्या बलिष्ठ इंद्राला भिऊन ( भिया ) मीं धांवत सुटलों आहे ( ईषमाणः = रेजमानः ); रेज् चा धांवत सुटणें हाच अर्थ प्रस्तुत ऋचेंत आहे. ज्याला ऋग्वेदाचा खरा अर्थ कळण्याची इच्छा असेल त्यानें निघण्टु निरुक्त वगैरेंना बाजूस सारलें पाहिजे. सानु शब्दाचें सानवि हें सप्तमीचें एकवचन नउ वेळां व सानौ वीस वेळां आलें आहे; सानौ रूपाच्या आधीं सानवि हें रूप प्रचारांत होतें; अर्वाचीन व्याकरणांत सानवि हें अशुद्ध रूप ठरेल; पण वैदिक व्याकरणांत तें शुद्धच होतें. पाणिनिसूत्र ( ३।३०।१० ) ह्यांत कर्तुं गन्तुं वगैरे तुमन्त शब्द अव्ययें होत असें म्हटलें आहे; पण ऋग्वेदांत कर्तुः गन्तुः वगैरे नामें असून कर्तुं गन्तुं वगैरे त्यांचीं द्वितीयेचीं एकवचनें होत. असे शब्द उकरांत पुल्लिंगी शब्दांप्रमाणें चालतात. गातुं यातुं सोतुं दातुं असे थोडकेच तुमंत शब्द असून त्यांचा जाण्याकरितां, सोमरस काढण्याकरितां व देण्याकरितां असा अर्थ नाहीं; गातुं :--एषः स्तोमः इन्द्र तुभ्यमस्मे एतेन गातुं हरिवो विदो नः ( १।१७३।१३ ) = हे इंद्रा, आमच्याकडून ( अस्मे ) हा स्तोम तुला दिला जात आहे; ह्या स्तोमाबद्दल ( एतेन ) तूं आम्हांस धन ( गातुं ) दे ( विदः ); अध क्रतुं विदतं गातुमर्चते ( १।१५१।२ ) = स्तुति करणाऱ्याला ( अर्चते ) धनदान ( क्रतुं = गातुं ) द्या ( विदतं ). यातुः— नाहं यातुं सहसा न द्वयेन ऋतं सपामि अरुषस्य वृष्णः ( ५।१२।२ ) = हे अग्नि, तेजस्वी ( अरुषस्य ) दाता ( वृष्णः ) जो तूं त्या तूं केलेलें दान ( यातुं = ऋतं ) मी स्वीकारतों; पण तें मी खोट्या बुद्धीनें ( सहसा = द्वयेन ) स्वीकारीत नाहीं. सोतुंः— त इत् वेदिं सुभग त आहुतिं सोतुं चक्रिरे

दिवि ( ८।१९।१८ ) = हे अग्नि, तुला तेच लोक हवि (वेदिं = आहुतिं = सोतुं) द्युलोकांत देतात. दातुंः— स आ गमत् इन्द्रः यो वसूनां चिकेतत् दातुं दामनो रयीणाम् ( ५।३६।१ ) = जो इंद्र धनाचें ( रयीणां ) दान ( दातुं = दामनः ) देतो ( चिकेतत् ) तो आमचेकडे येवो. ह्या ऋचांत गातुं यातुं सोतुं दातुं हीं त्या त्या क्रियापदांचीं कर्में होत. तुकारांत शब्दांच्या एकवचनी चतुर्थ्यंत रूपांनीं ऋग्वेदांत तुमंत अव्ययांचा कार्यभाग केला जातो; जसें:— अभ्यर्ष धेनूः। भर्तवे नो हिरण्या अभि अश्वान् रथिनो देव सोम ( ९।९७।५० ) = हे दात्या सोमा, आम्हांला गाई, सोनें, रथ ओढणारे घोडे देण्याकरितां ( भर्तवे ) आमच्याकडे ( अभि ) धांव ( अर्ष ); भर्तवे = भर्तुम्. यत्र ग्रावा पृथुबुध्न ऊर्ध्वो भवति सोतवे (१।२८।१) = जेथें मोठ्या तळाचा ( पृथुबुध्नः ) ग्रावा सोमरस काढण्याकारितां ( सोतवे ) उंच होतो; सोतवे = सोमं सोतुम्. न वर्तवे प्रसवः ( ३।३३।४ ) = आमचा प्रवाह अडविणें शक्य नाहीं (असें नद्या म्हणतात); वर्तवे = वारयितुम्. यदिन्द्र हन्तवे मृधो वृषा वाजिन् चिकेतसि ( १।१३१।६ ) = हे धनवंता ( वाजिन् ) इंद्रा, जेव्हां दारिद्र्यरूपी शत्रूंना ( मृधः ) मारण्याकरितां ( हन्तवे ) तूं धन देतोस ( चिकेतसि ); हन्तवे = हन्तुम्. वृत्राय हन्तवे ( ३।३७।५ ) = वृत्रं हन्तुम्. देवान् अच्छा यातवे जातवेदसम् अग्निमीळे ( १।४४।४ ) = देवांकडे जाण्याकरितां मी अग्नीला प्रार्थितों; यातवे = यातुम्. हव्याय वोह्ळवे (४।९।६) = हव्यं वोढुम्. एतावत् वा इत् उषः त्वं भूयो वा दातुमर्हसि ( ५।७९।१० ) = हे उषे, तूं इतकेंच ( एतावत् इत् ) किंवा ज्यास्त ( भूयः ) देणें द्यावें ( दातुम् अर्हसि ); ह्या ऋचेंत दातुं हें तुमंत अव्ययासारखें दिसतें; असें तुमन्त अव्ययाचें एखाद दुसरेंच उदाहरण ऋग्वेदांत सांपडतें. तुकारांत शब्द नामें होत हें गन्तुकामः भोक्तुकामः हन्तुकामः अशा अर्वाचीन सामासिकशब्दांवरूनहि सिद्ध होतें; गन्तुं कामः यस्य, भोक्तुं कामः यस्य, हन्तुं कामः यस्य असा त्यांचा विग्रह करतात व समासांत तुम् चा म् गळला आहे असें म्हणतात; पण गन्तवे भोक्तवे हन्तवे कामः यस्य सः असा विग्रह आहे. तुकारान्त शब्दांचीं कर्तोः एतोः गन्तोः नृतुः नृतू नृतवः नृतो दातोः गातुः मन्तुः मन्तवः यातुः यातवः वहतुः वहतुना सोतुः सोतोः हन्तवे हन्तोः सेतुः सेतवः सेतुं सेतू सेतोः सेतौ अशीं निरनिराळ्या वचनांत व निरनिराळ्या विभक्तींत असणारीं रूपें ऋग्वेदांत आहेत. तुमंत अव्ययें केव्हां सुरू झालीं तें ऋग्वेदावरून ठरवितां येत नाहीं; बहुतकरून ऋग्वेद व ब्राह्मणें यांच्यामधील कालांत हे प्रयोग प्रचारांत आले.

अः औ ए किंवा आः किंवा आसः। अं औ आन्। एन आभ्यां ऐः किंवा एभिः। आय आभ्यां एभ्यः। आत् आभ्यां एभ्यः। अस्य अयोः आनाम्। ए अयोः एषु असा अ चालत होता; ऋग्वेदांत ह्यांतील एन आत् व अयोः हीं रूपें आढळतात; अर्वाचीन संस्कृतांत एन व अयोः यांबद्दल अनेन व अनयोः हीं रूपें ऋग्वेदानंतर आलीं; तीं केव्हां आलीं तें कोण सांगेल? देव वगैरे पुल्लिंगी अकारान्त

शब्द अ प्रमाणें चालतात; देवेन व देवयोः ह्यांत एन व अयोः हीं अ चीं रूपें आहेत; त्याचप्रमाणें देवासः देवेभिः व देवे ह्यांत आसः एभिः व ए हीं रूपें आहेत. सर्व शब्दाला आय आत् आनां व ए ह्यांच्याबद्दल स्मै स्मात् एषां व स्मिन् प्रत्यय लागतात; ते आय आत् आनां व ए ह्यांच्यानंतर आले किंवा त्यांच्यापूर्वींही अस्तित्वांत होते किंवा दोन्ही समकालीन होते तें सांगतां येत नाहीं; बहुतकरून सर्वाय सर्वात् सर्वाणां व सर्वे अशीं मूळचीं रूपें असावींत; पण अशीं रूपें ऋग्वेदांत नाहींत. विश्वे देवासो अस्रिधः एहिमायासो अद्रुहः। मेधं जुषन्त वह्नयः ( १।३।९ ); ह्यांतील एहिमायासः हें पदपाठांत एहिऽमायासः असें आहे; ह्या शब्दाचा सायणाचार्य पुढीलप्रमाणें अर्थ करतातः– सर्वतो व्याप्तप्रज्ञाः । यद्वा । सौचीकम् अग्निम् अप्सु प्रविष्टम् एहि मा यासीः इति यत् अवोचन् तदनुकरणहेतुकः अयं विश्वेषां देवानां व्यपदेशः एहिमायासः इति; माया = प्रज्ञा; एहि म्हणजे सर्वतो व्याप्त; ज्यांची प्रज्ञा सर्वव्यापी आहे असे; किंवा एहिमायासः = एहि + मा + यासः; यासः = यासीः; सौचीकनांवाचा अग्नि पाण्यांत लपून बसला होता; ये ( एहि ), जाऊं नकोस ( मा यासीः) असें देव त्याला म्हणाले म्हणून देव एहिमायासः; परंतु ए व अहिमायासः अशीं दोन पदें आहेत. ऋग्वेदांत अहिमायाः अहिमायान् व अहिमायस्य अशीं अहिमाय चीं रूपें आहेत;अहिमायाः(६।५२।१५)=आहन्तृप्रज्ञाः = ज्यांची बुद्धि सर्व संकटांना हाणून पाडते असे (देव); अहिमायाः (१०।६३।४)= कैश्चिदपि अहन्तव्यप्रज्ञाः = ज्यांची प्रज्ञा कोणालाही मारतां म्हणजे हटवितां येत नाहीं असे (देव). अहिमायान् (१।१९०।४)= आगत्य हन्त्र्यः अन्तरिक्षचारिण्यः वा मायाः येषां वृत्रादीनां तान् असुरान् = ज्यांचा घातकीपणा येऊन सर्वांना हाणतो किंवा अंतरिक्षांत संचार करतो अशा वृत्रादि असुरांना; अहिमायस्य ( ६।२०।७ ) = आहन्त्र्यः मायाः यस्य असुरस्य = ज्याचा घातकीपणा मारतो अशा असुराची. अहिः एति अन्तरिक्षे । आहन्ति इति वा अहिः ( १२७।१८ ) ह्या व्युत्पत्तींच्या आधारें अहि शब्दाचे वरील अर्थ सायणाचार्यांनीं केले आहेत. अहिनांवाचा एक बलिष्ठ देव किंवा असुर होऊन गेला; त्याच्यासारखी अद्भुत शक्ति आहे ज्यांची ते अहिमाय; ए अहिमायासः = हे अहीसारखे अद्भुत शक्तिमान् देव; ए हें अः चें प्रथमेचें बहुवचन.

ऋग्वेदांत अ शिवाय त य आणि क अशीं सर्वनामें होतीं व तीं अ प्रमाणेंच चालत होतीं;त चें तः हें प्रथमेचें एकवचनीं रूप ऋग्वेदाच्या आधींच नाहींसें झालें व त्याच्या जागीं सः आला. ते ये व के ह्यांच्या शेवटीं ए आणि येन येभिः व ययोः ह्यांच्या शेवटीं एन एभिः व अयोः आहेत; तस्मात् बद्दल तात् व यस्मात् बद्दल यात् अशीं रूपें ऋग्वेदांत आढळतात; त चें तात् दोनदां व य चें यात् पांचदां ऋग्वेदांत आढळतें; तात्=त्याहून त्यानंतर; यात्= ज्याहून ज्यानंतर. अ त य आणि क ह्यांचीं स्त्रीलिंगी रूपें आ ता या आणि का. आ ए आः । आं ए आः । अया आभ्यां आभिः । अयै आभ्यां आभ्यः । अयाः आभ्यां आभ्यः । अयाः अयोः आसाम् । अयां अयोः आसु; ह्यांपैकीं अया ऋग्वेदांत आहे (२३०।४).

आ बद्दल ता या आणि का घातल्यानें ता ते ताः, या ये याः व का के काः वगैरे रूपें तयार होतात. अयै ह्यांतील यै बद्दल स्यै, अयाः यांतील याः बद्दल स्याः व अयाम् यांतील याम् बद्दल स्याम् हे प्रत्यय येतात. तःच्या जागीं जसा सः आला तसा ता च्या जागीं सा आला. त व ता ह्यांसारखीं स व सा अशींही एके काळीं सर्वनामें असतील; त्यांचे अवशेष सः सस्मिन् व सा ह्यांत आढळतात. सस्मिन् एकंदर नऊ वेळां आलें आहे; सस्मिन् नंतर आजौ ( १।५२।१५ ), ऊधन् ( १।१५२।६; १।१८६।४; ४।७।७; ४।१०।८; ७।३६।३ ), योनौ ( १।१७४।४ ), अहन् ( ४।१२।१;१०।९५।११ ) हीं विशेष्यें आलीं आहेत. तस्मिन् किंवा सर्वस्मिन् ह्यांबद्दल सस्मिन् असावें असें सायणाचार्य म्हणतात; एके ठिकाणीं सस्मिन् = समाने व दुसऱ्या ठिकाणीं सस्मिन् = स्वकीये असे अर्थ दिले आहेत. पाणिनिसूत्रानें ( ७।२।१०६ ) तत् च्या पुढें प्रथमैकवचनाचा स् प्रत्यय आल्यास तत् च्या ठिकाणीं स येतो; पण तस्मिन् ह्यांतील त च्या जागीं स आला आहे; किंवा सर्वास्मिन् मधील र्व गळून सस्मिन् उरलें असावें असें ते म्हणतात. पण त प्रमाणें स हेंही एकेकाळीं सर्वनाम होतें व तें सः सौ से असें चालत असावें. अ त य आणि क हीं मूळचीं सर्वनामें होतीं हें अतः अथ किंवा अथा व अध किंवा अधा, ततः तथा व तदा, यतः यथा व यदा, कथा ( अर्वाचीन कथं ) कदा कध कतर व कतम ह्या शब्दांवरून सिद्ध होतें. अ त स य क ह्यांचीं नपुंसकें अत् तत् सत् यत् कत् म्हणजे अ वगैरेंना त् लाविल्यानें त्यांचें नपुंसकरूप बनतें. तत् व यत् ह्या रूपांविषयीं मुळींच प्रश्न उत्पन्न होत नाहीं; कारण तीं अर्वाचीन संस्कृतांतही आहेत. कत् ऋग्वेदांत आढळतें; किं नो अस्य द्रविणं कद्ध रत्नम् ( ४।६।१२ ); एथें कत् = किम् = कोणतें; क्व नूनं कत् वो अर्थं गन्ता ( १।३८।२ ); कत् अर्थं = कोणत्या ठिकाणाला; या दोन उताऱ्यांत कत् हें निःसंशय विशेषण आहे व त्याचीं विशेष्यें रत्नं व अर्थं होत. अत् ऋग्वेदांत कोठेंही नाहीं; त्यामुळें ऋग्वेदाच्या पूर्वीं तें भाषेंत होतें कीं नव्हतें तें सांगतां येत नाहीं. उदीराथाम् ऋतायते युञ्जाथाम् अश्विना रथम् । अन्ति षद् भूतु वाम् अवः ( ८।७३।१ ); एथें सत् हें अवः याचें विशेषण असून त्याचा तत् असा अर्थ आहे; तुमचें तें प्रसिद्ध ( सत् ) रक्षण किंवा धन ( अवः ) आमच्यापाशीं ( अन्ति ) असो ( भूतु ). किम् अस्य मदे किम् उ अस्य पीतौ इन्द्रः किम् अस्य सख्ये चकार ( ६।२७।१ ). = ह्या सोमाच्या मदानें, याच्या पिण्यानें, याच्या साहाय्यानें इंद्रानें काय केलें? उत्तरः— सत् अस्य मदे सत् उ अस्य पीतौ इन्द्रः सत् अस्य सख्ये चकार ( ६।२७।२ ) = इंद्र सत् म्हणजे तत् म्हणजे प्रसिद्ध, जगद्विख्यात कर्में करता झाला. ह्या दोन उताऱ्यांतील सत् अस् धातूपासून निघाला नसून स सर्वनामाला त् लागून उत्पन्न झाला आहे. सर्वस्य सः अन्यतरस्यां दि ( पा० ५।३।६ ) = दा प्रत्यय पुढें आला असतांना सर्व शब्दाला विकल्पानें स आदेश होतो; म्हणजे मूळ शब्द सर्वदा असून र्व गळल्यानें तो सदा होतो; पण स ह्यालाच दा

लागून सदा शब्द झाला आहे. किमः कः ( पा० ७।२।१०३ ) = विभक्ति पुढें आल्यास किं चें क होतें असें म्हटलें आहे; पण ऋग्वेदांत किं व कु हीं निराळीं सर्वनामें आहेत. कु तिहोः ( पा० ७।२।१०४ ) = तस् व ह पुढें आल्यास किं ला कु आदेश होतो; जसें कुतः; वेदांत कुह. क्वाति ( पा० ७।२।१०५ ) = किं च्या पुढें अ प्रत्यय आल्यास दोघांच्या बद्दल क्व आदेश होतो. ह्या तीन सूत्रांत किं सर्वनामाला क व कु आदेश होतात असें म्हटलें आहे; पण किं व कु हीं स्वतंत्र सर्वनामें ऋग्वेदांत आहेत. किं हें किः याचें द्वितीयेचें एकवचन आहे; किः हें सर्वनाम ऋग्वेदांत एकदांच आलें आहे; अयं यो होता किः उ स यमस्य ( ५२६। २७ ); किः = कर्ता ( यास्क ); पण किः = कः ( सायण ); किः म्हणजे कोण हाच अर्थ बरोबर आहे. किः हें नकिः व माकिः ह्या शब्दांत आढळतें; या दोहोंचा अर्थ न कोऽपि किंवा नकेऽपि असा आहे; त्यांचें मराठींत बरोबर भाषांतर करतां येत नाहीं; कारण न कोणी असा त्या शब्दांचा अर्थ आहे; इंग्रजींतल्या none ( नन् ) चा अर्थ ह्या दोन शब्दांत आहे; none हाही इंग्रजींत एकवचनीं व बहुवचनी वापरलेला आढळतो. नकिः त्वत् रथीतरो हरी यदिन्द्र यच्छसे । नकिः त्वानु मज्मना नकिः स्वश्व आनशे ( १।८४।६ ) = हे इंद्रा, ज्या अर्थी ( यत् ) हे तुझे दांडगे घोडे ( हरी ) तूं दाब्रांत ठेवतोस त्याअर्थी तुझ्याहून ( त्वत् ) दुसरा कोणीही अधिक चांगला रथ हांकणारा ( रथीतरः ) नाहीं; बलाच्या बाबतींत ( मज्मना ) कोणीही तुझ्यासारखा ( त्वाम् अनु ) नाहीं; ज्याच्याजवळ उत्तम घोडे आहेत ( स्वश्वः ) असा कोणीही तुझी बरोबरी करीत नाहीं; नकिः = न कोऽपि. यस्य शर्मन् नकिर्देवाः वारयन्ते न मर्ताः ( २।१७।१९ ) = ज्या इंद्राच्या रक्षणाखालीं ( शर्मन् ) असणाऱ्या स्तोत्याला देवांपैकीं किंवा मनुष्यांपैकीं कोणीही धनप्राप्तीपासून दूर हांकलून देत नाहीं; एथें नकिः हें देवाः ह्याचें विशेषण आहे; नकिः = न केऽपि; छंदाकरितां दुसऱ्या न च्या पुढचा किः गाळला आहे; न मर्ताः = नकिः मर्ताः. नकिष्टं घ्नन्ति अन्तितः न दूरात् य आदित्यानां भवति प्रणीतौ ( २।२७।१३ ) = आदित्यांच्या नेतृत्वाखालीं ( प्रणीतौ ) जो असतो त्याला जवळून किंवा दुरून कोणीही मारूं शकत नाहीं; नकिः व न ह्यांचा अर्थ वरीलप्रमाणें. माकिः :— आ नो वह रोदसी देवपुत्रे माकिर्देवानाम् अपभूः इह स्याः ( १०।११।९ ) = हे अग्नि, देव आहेत पुत्र ज्यांचे अशा द्यावापृथिवींना आमच्याकडे ( नः ) घेऊन ये ( आवह ); देवांपैकीं कोणीही दूर राहूं नये; प्रत्येक देव एथें असावा ( स्याः ); माकिः अपभूः = कोणीही दूर ( अप ) राहूं नये; स्याः ह्याचा कर्ता प्रत्येकः देवः ( अध्याहृत ); भूः = भूत्; स्याः = स्यात्; असे प्रयोग ऋग्वेदांत आढळतात; सायणाचार्यांनीं अपभूः हें नाम केलें आहे व स्याः याचा कर्ता त्वं मानला आहे. अग्ने मकिर्नो दुरिताय धायीः ( २।१४७।५ ) = हे अग्नि, आम्हांला संकटांत ( दुरिताय ) कोणीही न घालो ( धायीः ); धायीः = धायीत् = धात्. माकिर्न एना सख्या वि यौषुः तव चेन्द्र विमदस्य च ऋषेः ( १०।२३।७ )

= हे इंद्रा, तुझ्या व विमद ऋषीच्या मधील म्हणजे आपल्या दोघांमधील ( नः ) ही ( एना ) मैत्री ( सख्या ) कोणीही दूर करूं नये; माकिः = न केऽपि; वि यौषुः = वेगळी किंवा दूर करोत; वि + यु = दूर करणें. कु हें स्वतंत्र सर्वनाम आहे असें वर म्हटलें आहे ( १२२०।२ ); कु + ह = कुह. ( १ ) यस्ता चकार स कुह स्विदिन्द्रः कमा जनं चरति कासु विक्षु (६।२१।४); ह्या प्रत्येक पादांत अकरा अकरा अक्षरें आहेत. (२) कुह स्थः कुह जग्मथुः । कुह श्येनेव पेतथुः ( ८।७३।४ ); प्रत्येकांत आठ आठ. (३) कुह स्वित् दोषा कुह वस्तोरश्विना । कुहाभिपित्वं करतः कुहोषतुः ( १०।४०।२ ); प्रत्येकांत बारा बारा. ( ४ ) क्वेदानीं सूर्यः कश्चिकेत । कतमां द्यां रश्मिरस्या ततान ( १।३५।७ ); ह्यांतील पहिल्या पादांत नऊ व दुसऱ्यांत अकरा अक्षरें आहेत; कुहेदानीं सूरयः कश्चिकेत असें रूपांतर केल्यानें अकरा अक्षरें होतात. (५) क्व स्या वो मरुतः स्वधासीत् । यन्मामेकं समधत्ताहिहत्ये (१।१६५।६); पहिल्या पादांत नऊ व दुसऱ्यांत अकरा; कुह स्यया असें वाचल्यास पहिल्यांतही अकरा अक्षरें होतात. ( ६ ) क स्विदासां कतमा पुराणी । यया विधाना विदधुः ऋभूणाम् ( ४।५१।६ ); पहिल्यांत अक्षरें दहा व दुसऱ्यांत अकरा; कुह स्विदासां असें वाचल्यानें पहिल्यांत अकरा अक्षरें होतात. ( ७ ) यत्र क च ते मनो । दक्षं दधस उत्तरम् ( ६।१६।१७ ); पहिल्यांत सात व दुसऱ्यांत आठ; पहिल्यांत क बद्दल कुह वाचल्यानें आठ. ( ८ ) क्वेयथ क्वेदसि । पुरुत्रा चिद्धि ते मनः ( ८।१।७ ); पहिल्यांत सहा व दुसऱ्यांत आठ; दोन्हीं क कुह असें वाचल्यास आठ अक्षरें होतात. ( ९ ) क्व त्री चक्रा त्रिवृतो रथस्य । क्व त्रयो वन्धुरो ये सनीळाः ( १।३४।९ ); प्रत्येकांत अक्षरें दहा दहा. ( १० ) क वो अश्वाः क्वाभीशवः । कथं शेक कथा यय ( ५।६१।२ ); प्रत्येकांत आठ आठ अक्षरें. १ ते ३ हीं कुह चीं व राहिलेलीं क चीं उदाहरणें; त्यांपैकीं ४ ते ८ त कुह बद्दल क वाचलें गेलें; ९ व १० ह्यांत क ची विभागणी करावी लागत नाहीं. ऋग्वेदांत क ३३ वेळां आला आहे; त्यांपैकीं ९ व १० यांतील ३ क वगळल्यावर बाकीच्या तिसांतील क हा खरोखरचा क नसून कुह किंवा कुअ असा होता. मूळ शब्द कुह; तो ऋग्वेदांत १२ वेळां आला आहे; कुह ह्याचा उच्चार कांहीं काळानें कुअ झाला असावा; नंतर कुअ चें क्व मध्यें रूपांतर झालें असावें; हा सगळा चुकीच्या उच्चाराचा परिणाम होय. कू ष्ठो देवावश्विना । अद्या दिवो मनावसू (५।७४।१); एथें अक्षरपूर्तीकरितां कू बद्दल कुह वाचलें पाहिजे; कुह स्थो देवौ अश्विनौ असा मूळचा पाद असावा व दुरुच्चारानें कुह चा कू उच्चार केला असावा; हाच दुरुच्चार कूचित् ह्यांत कायम झाला. ( १ ) एषा ययौ परमादन्तरद्रेः । कूचित् सतीः ऊर्वे गा विवेद ( ९।८७।८ ) = उंच अद्रीच्या पोटांतून ही बाहेर गेली व कोंडवाड्यांत ( ऊर्वे ) कोठेंतरी ( कूचित् ) असलेल्या ( सतीः ) गायी पकडती झाली ( विवेद ). ( २ ) कूचिज्जायते सनयासु नव्यः ( १०।४।५ ) = जलांत ( सनयासु ) कोठेंतरी ( कूचित् ) लपून असलेला नवा अग्नि जन्मतो

म्हणजे बाहेर येतो. ( ३ ) एतं शंसम् इन्द्र अस्मयुः त्वं कूचित् सन्तं सहसावन् अभिष्टये सदा पाहि अभिष्टये ( १०।९३।११ ) = हे इंद्रा, कोठेंतरी असलेल्या या स्तोत्राचें त्यानें धनवान् व्हावें म्हणून (अभिष्टये) सतत रक्षण कर. मूळ शब्द कु; नंतर कु ला ह लागून कुह; दुरुच्चारानें त्याचीं कू व क्व अशीं रूपांतरें झालीं. ऊधसोऽनङ् (पा० ५।४।१३१ ) = स्त्रीलिंगी समासांत ऊधस् बद्दल ऊधन् होतें; जसें कुण्डोध्नी. धर्मात् अनिच् केवलात् (पा० ५।४।१२४)=बहुव्रीहींत धर्म शब्दाच्या आधीं एकच पद असल्यास धर्म चें धर्मन् होतें; जसें कल्याणधर्मा. धनुषश्च (पा० ५।४।१३२)= बहुव्रीहि-समासाच्या अंतीं असलेल्या धनुस् चें धन्वन् होतें; शार्ङ्गधन्वा अधिज्यधन्वा. जायाया निङ् (पा० ५।४।१३४)=बहुव्रीहिसमासाच्या अंतीं असणाऱ्या जाया शब्दाला जानि आदेश होतो; जसें युवजानिः सीताजानिः. ऋग्वेदांत ऊधस् व ऊधन् आणि धनुस् व धन्वन् असे दोन्ही तऱ्हेचे शब्द आहेत; त्यांपैकीं ऊधन् शब्द अर्वाचीन संस्कृतांत समासांतच घातलेला आढळतो; तीच गोष्ट धन्वन् शब्दाची. ऋग्वेदांत धर्मन् असाच शब्द आहे; भाषेंत कालांतरानें शब्दांचीं रूपें पालटतात त्याचें धर्मः हें उदाहरण होय. शब्दांच्या प्रयोगांतही बदल होतो ह्याचीं ऊधन् व धन्वन् हीं उदाहरणें. ऋग्वेदांत जनि आहे; तो अर्वाचीन संस्कृतांत जानि असा लांबविला गेला असावा. ऋचांत समासांतील पदें वेगळीं केलेलीं आढळतात; जसें:– इन्द्रा को वां वरुणा (४।४१।१ ); इन्द्रा न्वग्नी ( ५।४५।४ ); इन्द्रा नु पूषणा ( ६।५७।१ ); ह्यांत इन्द्रावरुणा इन्द्राग्नी इन्द्रापूषणा ह्या समासांचीं पदें छंदाकरितां पृथक् केलीं आहेत. एष स्य ते तन्वो नृम्णवर्धनः सह ओजः प्रदिवि बाह्वोर्हितः ( २।३६।५ ); ह्या ऋचेंत नृम्णवर्धनः ह्यांतील वर्धनः ह्याचा तन्वः सहः व ओजः ह्यांच्याशीं संबंध आहे; नृम्णवर्धनः प्रमाणें तनूवर्धनः सहोवर्धनः व ओजोवर्धनः असे सामासिक शब्द न घालतां वर्धन शब्द फक्त नृम्ण यालाच लाविला आहे; तनूनृम्णसहओजोवर्धनः असा अवजड समास ऋचेला पेलणार नाहीं म्हणून त्याचे तुकडे पाडले आहेत; ही गोष्ट लक्ष्यांत न आल्यामुळें पाश्चात्य व पौरस्त्य विवरणकारांनीं ऋचेचा भलता अर्थ केला आहे. ( १ ) आभरद्वसुः ( ५।७९।३ ) = आभरत् आभरति ददाति वसु असौ. परि द्युक्षः सनद्रयिः भरत् वाजं नः ( ९।५२।१ ) = धनवान् ( द्युक्षः ) व जो धन देतो तो ( सनद्रयिः ) आम्हांस ( नः ) धन ( वाजम् ) देतो ( भरत् ) किंवा देवो. सुपर्णो हव्यं भरत् मनवे देवजुष्टम् ( ४।२६।४ ) = श्येनपक्षी देवांना आवडणारा (देवजुष्टं ) सोमहवि ( हव्य ) मनुष्यांकरितां ( मनवे ) स्वर्गांतून आणता झाला ( भरत् ). या दोन ठिकाणीं भरत् हें क्रियापद असून वाजं व हव्यं हीं त्याचीं कर्में होत. सनत् सनति ददाति रयिम् असौ सनद्रयिः असा पहिल्या उताऱ्यांतील सनद्रयिःचा विग्रह. सायणः— आभरद्वसुः = आहृतधनः. ( २ ) क्षयद्वीरः ( १।११४।१० ) = क्षयत् क्षयति वीरस्य धनस्य असौ. यज्ञैर्य इन्द्रे दधते दुवांसि क्षयत् स रायः ( ७।२०।६ ) = जो इंद्राला आपल्या यज्ञांतील हवि ( दुवांसि ) देतो ( दधते ) तो

धनाचा (रायः) अधीश होतो (क्षयत्). सायणः– क्षयद्वीरः = क्षपितसर्वशत्रुजनः. (३) दातिवारः (१।१६७।८) = दाति ददाति वारं धनम् असौ. वाजी स्तुतः विदथे दाति वाजम् (६।२४।२) व सविता दाति वार्यम् (५।४८।५) एथें वाजं व वार्यं हीं दाति ह्याचीं कर्मे. सायणः– दातिवारः = प्रदेयजलः खण्डितमेघः वा। अथवा। दत्तवरणीयहविर्लक्षणधनः यजमानः. (४) यातयज्जनः (१।१३६।३) = यातयत् यातयति परस्परेण स्पर्धयति जनान् असौ. यातयत् ह्या क्रियारूपाचें उदाहरण ऋग्वेदांत नाहीं. सायणः– (अ) प्रातःप्रातः स्वस्वकर्माणि प्रवर्तनीयाः जनाः येन सः। यती प्रयत्ने (धा० १।३०); (आ) स्वस्वव्यापारनियेोजितसर्वजनाः येन सः; (इ) यातयन्ति लोकं यदीयाः जनाः प्रेष्याः सः; (ई) यात्यमानाः नरके निपात्यमानाः जनाः प्राणिनः अयष्टारः येन सः. (५) यावयद्द्वेषाः (१।११३।१२)= यावयत् यावयति दूरीकरोति द्वेषांसि या असौ. ऋग्वेदांत यावयत् ह्या क्रियारूपाचें उदाहरण नाहीं. सायणः– यावयत् यावयन्ति अस्मत्तः पृथक्कृतानि द्वेषांसि द्वेष्टृणि राक्षसादीनि यया सा. (६) विदद्वसुः (३।३४।१) = विदत् विदति ददाति वसु असौ. पुनान इन्दुः वरिवो विदत् प्रियम् (९।६८।९) = शुद्ध होणारा सोम प्रियधन देतो. सायणः– विदद्वसुः = वेदयद्भिः स्वमहिमप्रख्यापकैः वसुभिः युक्तः; विदद्वसुं (८।६६।१) = धनावेदकं (इन्द्रं); विदद्वसो (५।३९।१) = लब्धधन (इन्द्र). ह्या सर्व ठिकाणीं भरत् वगैरे क्रियारूपें असतांना सायणाचार्यांनीं तीं भूतभूतकाळचीं विशेषणें मानलीं आहेत व नवल हें कीं दाति ह्याचा प्रदेय असा अर्थ केला आहे; पण दाति हें विशेषण कसें होईल? ऋग्वेदांत प्रतद्वसू व कृतद्वसू असे समास आहेत; प्र+ तत् + वसू व कृ + तत् + वसू असे शब्द ह्या समासांत आहेत असें Words in Ṛgveda Vol. I च्या प्रस्तावनेंत (पान ६ ओळ २) मीं म्हटलें आहे; परंतु प्रतत् व कृतत् हीं भरत् वगैरेंसारखीं क्रियारूपें असलीं पाहिजेत; प्रतत् प्रतति वसु असौ प्रतद्वसुः व कृतत् कृतति वसु असौ कृतद्वसुः असा त्यांचा विग्रह असावा; पण ऋग्वेदांत प्रत् व कृत् ह्यांचीं रूपें आढळत नाहींत. आभरत् वगैरे वर्तमानकाळचीं विशेषणें आहेत; समासांखेरीज आभरत् वगैरे वर्तमानकालीन विशेषणें ऋग्वेदांत नाहींत; तथापि समासांत तीं तशीं विशेषणेंच होत व त्यांच्यापुढचे समासांतील शब्द त्यांचीं कर्में होत असें डॉ० मॅकडॉनेल् (Vedic Grammar Articles 292–293) म्हणतात; दातिवार समासांतील दाति हें नाम आहे असें त्यांचें मत आहे. पण आभरत् वगैरे क्रियारूपेंच आहेत असें मीं वर सिद्ध केलें आहे; ऋग्वेदांत दाति सात वेळां आलें असून सर्व ठिकाणीं तें क्रियारूपच आहे. ऋग्वेदांत कृ कर् कुर् व कुरु असे करणें या अर्थाचे चार धातु आहेत. कृ चीं कृधि कृष्व कृध्वं कृतं हीं विकरणरहित रूपें व कृणुष्व कृणुध्वं कृणु कृणुथ कृणुहि कृणुते कृणोत वगैरे सविकरण रूपें होत. कर् चीं कर् करत् करतं करतां करति करते करथः करन्ति अकरं अकर्म अकर्त कर्त कर्तन वगैरे. हाच धातु अर्वाचीन संस्कृतांत तन् सारखा चालतो; त्याचींच करोमि करोषि

करोति अकरवं अकरोः अकरोत् करवाणि करोतु वगैरे रूपें होत. ऋग्वेदांत कुर् चें कुर्मः एवढेंच रूप आहे; कुर्मस्ते आयुरजरम् अग्ने (१०।५१।७). अर्वाचीन व्याकरणांतील कुर्वः कुर्मः अकुर्व अकुर्म कुर्यां कुर्वहे कुर्महे अकुर्वहि अकुर्महि हीं कुर् चीं रूपें आहेत. कुरु चें कुरु हें एकच रूप ऋग्वेदांत आहे; पण अर्वाचीन संस्कृतांत कुरुथः कुरुथ कुरुतः कुर्वन्ति (कुरु + अन्ति) अकुरुतं अकुरुध्वं अकुरुतां अकुर्वन् (अ + कुरु + अन्) कुरु कुरुतं कुरुतां कुर्वन्तु (कुरु + अन्तु) आणि कुर्वीय पासून कुर्वीरन् पर्यंतचीं कुरु चीं रूपें आहेत. कृ धातूचीं रूपें द्वितीय भूतकाळ, तृतीय भूतकाळ आशिषि लिङ् वगैरेंत आहेत; कृत हें भूतभूतकाळचें विशेषण त्यापासूनच. ह्याप्रमाणें अर्वाचीन संस्कृतांत कृ कर् कुर् व कुरु यांचीं रूपें आढळतात; पाणिनीय व्याकरणांत हीं सर्व रूपें कृ धातूचींच होत असें म्हटलें आहे; पण चारही धातूंचीं अर्वाचीन संस्कृतांत भेसळ झाली आहे; ही भेसळ ऋग्वेदाचा अभ्यास केल्यानें नजरेस येते. दो दद् घोः (पाणिनी ७।४।४६) = घुसंज्ञक दा वगैरे धातूंना दद् आदेश होतो; पण ऋग्वेदांत दा व दद् हे भिन्न धातु आहेत; दा चीं ददाति ददातु ददाथ ददामहे ददामि ददासि ददात ददातन अदाः अदात् दाः दात् दात दाति दातु दातम्. दद् चीं दद ददत् ददतः ददति ददतुः ददते ददथुः ददे दद्रि ददसि दद्महे दत्त दत्तं दत्तात् दत्तां दत्ते दत्रं दत्त्वाय वगैरे. अर्वाचीन संस्कृतांत दद् व दि ह्यांचीं रूपें दा धातूचीं रूपें म्हणून गणलीं जातात. त्याचप्रमाणें धा खेरीज धत् व धि असे धातु ऋग्वेदांत आहेत; त्या सर्वांचीं रूपें धा चींच होत असें अर्वाचीन वैय्याकरण म्हणतात. अर्वाचीन व्याकरणांतील रूपें कशीं उत्पन्न झालीं तें ऋग्वेद वाचल्याशिवाय कळत नाहीं. दा ला यच्छ् आदेश होतो असें अष्टाध्यायींत (७।३।७८) म्हटलें आहे; पण हा आदेश कां होतो हा प्रश्न आहे. त्याचें उत्तर दा धातूचीं वर दिलेलीं रूपें ऋग्वेदांतच आढळतात हें. (१) देणें, (२) जाणें, (३) नियमन करणें असे यम् चे तीन अर्थ ऋग्वेदांत आहेत; देणें या अर्थाच्या यम् चीं रूपें यन्धि यंसि यंसते यंसत् यंसतः यंसन् यच्छ यच्छत यच्छतं यच्छतात् यच्छतां यच्छाति यच्छतु वगैरे; पण वरील तीन अर्थांपैकीं यम् चा नियमन करणें एवढाच अर्थ अर्वाचीन संस्कृतांत उरल्यामुळें दा ला यच्छ् आदेश होतो असें म्हटलें आहे. देणें या अर्थीं यम् धातु अर्वाचीन संस्कृतांत नसल्यामुळें अयामि ह्या रूपाचा सायणाचार्यांनीं भलता अर्थ केला आहे. (१) प्रस्तुतिः वां धाम न प्रयुक्तिः अयामि मित्रावरुणा सुवृक्तिः (१।१५३।२) = हे मित्रावरुणांनो, तुम्हांला स्तुति (प्रस्तुतिः = प्रयुक्तिः = सुवृक्तिः) हवीप्रमाणें (धाम न) दिली जात आहे (अयामि); पण हे मित्रावरुणौ वां युवयोः संबन्धिनः यागस्य प्रस्तुतिः प्रस्तावना करोमि इति संकल्पः एव न प्रयुक्तिः। कृत्स्नप्रयोगः न संपन्नः। तावतैव युवयोः धाम तेजःस्थानम् अयामि प्राप्नोमि। सुवृक्तिः युवयोः शोभनावर्जकश्च युष्मत्परिग्रहात् अस्मि = हे मित्रावरुणांनो, तुमच्या यागाची नुसती प्रस्तावना म्हणजे नुसता

उद्देश मीं मनांत धरला आहे; पण मीं तशा यागाचा प्रयोग केला नाहीं; तेवढ्यानेंच म्हणजे नुसत्या संकल्पानेंच मी तुमच्या तेजस्वी स्थानाला पोंचत आहें ( अयामि ); तुमच्या अनुग्रहानें मी तुमचें मन वळविणारा झालों आहें. असा सायणभाष्यांत अर्थ केला आहे. अकारि सारखें अयामि आहे; कृ पासून जसें अकारि तसें यम् पासून अयामि; अय् ( = जाणें ) चें अयामि हें रूप एथें नाहीं. यम् चा खरा अर्थ न कळल्यामुळें प्रस्तुतिः प्रयुक्तिः सुवृक्तिः व धाम यांचे भलते अर्थ केले आहेत. ( २ ) अयामि ते नमउक्तिं जुषस्व ( ३।१४।२ ) = हे अग्ने ते त्वद्विषयां नमउक्तिं नमस्कारवाक्यम् अहम् अयामि । प्रेरयामि । उच्चारयामि । तां जुषस्व । सेवस्व = हे अग्नि, तुझ्यासंबंधीं नमस्कारयुक्त स्तुति मी पाठवीत आहें म्हणजे उच्चारीत आहें; तिचा स्वीकार कर. नमउक्तिं ह्या द्वितीयेमुळें अर्थ भलता केला आहे; तुला नमउक्ति म्हणजे स्तुति दिली जात आहे ( अयामि ); त्या नमउक्तीचा स्वीकार कर; अयामि ह्याचा नमउक्तिः हा कर्ता अध्याहृत आहे; ते तुभ्यं नमउक्तिः अयामि दीयते। तां नमउक्तिं जुषस्व असा अन्वय आहे. ( ३ ) वृञ्जे ह यत् नमसा बर्हिः अग्नौ अयामि स्रुक् घृतवती सुवृक्तिः ( ६।११।५ ) = यदा नमसा हविषा सह अग्नौ अग्नि-समीपे बर्हिः वृञ्जे । छिद्यते । आह्रियते । सुवृक्तिः सुष्ठु दोषैर्वर्जिता घृतवती घृतपूर्णा स्रुक् अयामि । नियम्यते । बर्हिषि आसाद्यते; एथें अयामि कर्मणि क्रियारूप आहे असें भाष्यांत स्पष्ट आहे; तथापि यम् = नियंत्रित करणें असा त्याचा अर्थ करून अयामि = बर्हिषि आसाद्यते = दर्भांवर मांडली जाते असा अर्थ केला आहे. जेव्हां स्तुति करीत असतांना मी दर्भ कापतों तेव्हां स्तुतीसह घृतानें भरलेली पळी म्हणजे पळी-तलें घृत अग्नींत दिलें जातें असा खरा अर्थ आहे. ( ४ ) अयामि घोष इन्द्र ( ७। २३।२ ) = घोषः अयामि = स्तुतिरूपः घोषः अकारि; यम् = करणें. ( ५ ) नियु-त्वान् वायवा गहि अयं शुक्रो अयामि ते ( २।४१।२ ); अयामि = नियतः गृहीतः आसीत्; यम् = नियमित करणें म्हणजे हातांत धरणें. ( ६ ) वायो शुक्रो अयामि ते मध्वो अग्रं दिविष्टिषु ( ४।४७।१ ) = हे वायो ते तुभ्यं शुक्रः व्रतचर्यादिना दीप्तः अहं मध्वः मधुरं सोमरसम् अग्रम् इतरेभ्यः पूर्वं दिवः द्युलोकस्य एषणेषु अयामि । आययामि. हे वायु, ह्या यज्ञांत सोमाचा श्रेष्ठ भाग जो शुक्र तो तुला दिला जात आहे; असा खरा अर्थ आहे. ( ७ ) इन्द्रे नि अयामि सोमः ( ६।३४।४ ) = सोमः नि अयामि । नियतो अभूत्; यम् = नियंत्रित करणें. ( ८ ) एष स्तोमो वरुण मित्र तुभ्यं सोमः शुक्रो न वायवे अयामि ( ७।६४।५ ) = हे वरुण हे मित्र तुभ्यं युवयोः वायवे । वायुः गन्ता आदित्यः । स एव अर्यमा । तस्मै च एषः स्तोमः स्तवः अयामि । अकारि । शुक्रः दीप्तः सोमः न युष्मभ्यं प्रीतिकरो सोमः यथा दीयते तद्वत् = जसा झळकणारा सोम तुम्हांला दिला जातो त्याप्रमाणें हे वरुण हे मित्र, तुम्हां दोघांना व तुमच्या अर्यमाला हा स्तोम म्हणजे ही स्तुति दिली जात आहे. ह्या विवरणांत अयामि याचा अकारि म्हणजे

दिला जात आहे असा अर्थ केला आहे तो बरोबर आहे. पण वायवे याचा अगदीं भलता अर्थ केला आहे व तो अर्थ निरुक्तामुळें केला गेला आहे. अर्यमा म्हणजे आदित्य असें यास्क निरुक्तांत ( ८९७।३ ) म्हणतो; त्या शब्दांची उलटापालट करून आदित्य म्हणजे अर्यमा असें सायणाचार्य म्हणतात. पण यास्क व सायणाचार्य दोघेही चुकले आहेत. अर्थ करण्याच्या बाबतींत परंपरेचें अनुकरण करणें हा अक्षम्य दोष होय. वायूला दिल्या जाणाऱ्या सोमाचें नांव शुक्र; तो शुक्र जसा वायूला दिला जातो तसा हे वरुणा तुला, हे मित्रा तुला हा स्तोम दिला जात आहे; असा खरा अर्थ आहे. ( ९ ) उपो ते अन्धो मद्यम् अयामि यस्य देव दधिषे पूर्वपेयम् (७।९२। १) = ते तव मद्यं मदकरं सोमलक्षणम् अन्धः अन्नम् उप अयामि। उपयतं पात्रे गृहीतम् आसीत्। हे देव वायो यस्य सोमस्य पूर्वपेयं प्रथमपानं दधिषे दधासि धारयसि; अयामि = उपयतं पात्रे गृहीतम् आसीत् = उपयामनांवाच्या पात्रांत घातला गेला. हे वायु, ज्या मदकर सोमाचें प्रथमपान तूं धारण करतोस म्हणजे तुला दिलें जातें तो मदकर सोम तुला दिला जात आहे; असा खरा अर्थ आहे; उप = जवळ = जवळ आणलेला. (१०) अन्तः पवित्र उपरि श्रीणानः अयं शुक्रः अयामि ते ( ९।१०१।९ ) = अन्तः पवित्रे पवित्रस्य मध्ये उपरि श्रीणानः श्रयमाणः निषिच्यमानः अयं शुक्रः सोमः ते तुभ्यम् अयामि। नियतः आसीत् = हे वायु, गाळण्यांत ओतलेला हा सोम तुला नियंत्रित केला होता. ह्या दहा उताऱ्यांवरून ऋग्भाष्य एका व्यक्तीनें लिहिलें नसून निदान दोघांनीं तरी लिहिलें असावें असें अनुमान निघतें. १ २ व ६ ह्यांत अयामि हें कर्तरि क्रियारूप विवरणकारानें मानलें आहे व त्यामुळें ऋचांचा अर्थ करतांना पुष्कळ ओढाताण करावी लागली आहे. बाकीच्यांत अयामि हें कर्मणिरूप आहे हें जरी विवरणकाराला कळलें आहे तरी यम उपरमे ( धा० १।१००९ ) म्हणजे नियंत्रित करणें, थोपवून ठेवणे असा यम् चा अर्थ केला आहे; देणें हा अर्थ कोठेंही दिला नाहीं. धातुपाठ वगैरे बाजूला ठेवून जर स्वतंत्रपणें विचार केला असता व जेथें जेथें यम् धातूचीं रूपें आलीं आहेत त्या त्या ऋचा एकत्र केल्या असत्या तर त्या धातूचे तीन अर्थ खात्रीनें लक्षांत आले असते. त्याचप्रमाणें शुक्र म्हणजे वायूला देण्याचा सोम हा अर्थही शुक्र शब्दाच्या ऋचा एकत्र केल्यानें सहज ध्यानांत आला असता. वक्षि यक्षि यन्धि शग्धि पूर्धि यंसि हीं रूपें धातूला विकरणें न लावतां बनविलीं आहेत; तीं अर्वाचीन व्याकरणाच्या दृष्टीनें अशुद्ध वाटतात. अर्वाचीन संस्कृतांत तृतीय गणांतील धातूंनाच अभ्यास होतो; पण ऋग्वेदांत अभ्यास हव्या त्या धातूला होतो; जसें मुमुग्धि मुमुचः मुमुच्महे मुमोक्तु मुमुचे हीं मुच् धातूचीं व दिदिड्ढि दिदिष्ट दिदेष्टु हीं दिश् धातूचीं साभ्यास रूपें होत. तूताव ( ३०८।१८ ) हा शब्द अनवगतसंस्कार आहे व तो तुताव असा पाहिजे असें दुर्ग म्हणतो; पण दीर्घ अभ्यासाचीं शेंकडों उदाहरणें ऋग्वेदांत आहेत; जसें:— चाकशीति मामहे दीदाय दीध्ये पीपाय तूतुजानः चाकन्धि वावशानः सासह्याम दाधार दाधर्षि; हीं रूपें अर्वा-

चीन संस्कृतांत अशुद्ध असतील पण ऋग्वेदांत तीं शुद्धच होतीं. असा दीर्घ अभ्यास क्रियारूपांतच असतो असें नाहीं; जागृविः तूतुजिः दीदिविः सासहिः अशा नामांतही तो आढळतो; यावरून ऋग्वेदकालीं दीर्घ अभ्यास फार प्रचारांत होता असें दिसतें. या दीर्घ अभ्यासाचा अवशेष अर्वाचीन जागृ धातूंत आहे; गृ = जागें होणें अथवा जागें करणें असा ऋग्वेदांत अर्थ आहे. गृणीहि दैव्यं जनम् ( ९।८४।१ ) = हे सोमा, देवांना जागें कर. सं त्वा शिशामि जागृहि विप्र मन्मभिः ( १०।८७।२४ ) = हे दात्या ( विप्र ) अग्नि, मी स्तुतींनीं ( मन्वभिः ) तुला सारखा ( सं ) हलवीत आहें (शिशामि); जागा हो ( जागृहि ). उषा अजीगर् भुवनानि विश्वा ( १।१२४।४ ) = उषा सर्व प्राण्यांना उठवीत आहे ध्रुवे पदे तस्थतुः जागरूके ( ३।४४।७ ); एथें द्यावापृथिवींना जागरूके म्हणजे सदा जाग्या असणाऱ्या म्हटलें आहे. धातुपाठांत असलेल्या जागृचें द्वितीय भूतकाळचें रूप जजागार असें होतें; पण तें रूप ऋग्वेदांत नाहीं; कारण गृ ला अभ्यास होऊन जागृ बनला आहे. महाभाष्यांत पुढील मजकूर आहे; वा छन्दसि सर्वे विधयो भवन्ति (पा० १।४।९) = व्याकरणांतले नियम ऋग्वेदांत विकल्पेंकरून लागतात म्हणजे ते नियम कधींकधीं मोडले जातात. युक्ता मातासीत् धुरि दक्षिणायाः ( १।१६४।९ ); व्याकरणनियमानें दक्षिणायां असें रूप पाहिजे पण त्याबद्दल दक्षिणायाः हें घातलें आहे; दक्षिणायां धुरि = उजव्या जुंवावर म्हणजे जुंवाच्या उजव्या बाजूला. दक्षिणा म्हणजे उषा असा अर्थ ऋग्वेदांत आहे; जसें:—— पृथू रथो दक्षिणाया अयोजि ऐनं देवासो अमृतासो अस्थुः ( १।१२३।१ ) = दक्षिणेचा म्हणजे उषेचा प्रशस्त रथ अश्वयुक्त केला आहे ( व ) त्याच्यांत अमर देव बसले आहेत. ३।५८।१ व १०।१०७।१ ह्या ऋचांत दक्षिणायाः म्हणजे उषसः असाच अर्थ आहे. तेव्हां उषेच्या ( रथाच्या ) जुंवाला ( धुरि ) गाय ( माता ) जोडलेली होती असा अर्थ आहे. अरुण्यः गावः उषसः ( ११७१।५ ) = लाल गाई उषेच्या (वाहन होत असें म्हटलें आहे ). अधा स वीरैर्दशभिर्वि यूयाः ( ७।१०४।१५ ) । वियुयात् इति प्राप्ते; ह्या ऋचेंत वियुयात् ह्याबद्दल वियूयाः हें रूप व्याकरणविरुद्ध होय; पण द्वितीयपुरुषीं एकवचनीं रूपें तृतीयपुरुष एकवचनी रूपांच्या अर्थी ऋग्वेदांत आढळतात; जसें धायीः (१२२०।३३). देवता नो दाति प्रियाणि ( ४।८।३ ) । ददाति प्रियाणि; मघवा दातु ( ८।५२।५ ) । मघवा ददातु; स नः स्तुतो वीरवत् धातु ( १।१९०।८ ) । वीरवत् दधातु; ह्या तीन ठिकाणीं दाति दातु व धातु हीं ददाति ददातु व दधातु अशीं पाहिजेत. पण ऋग्वेदांत धातुरूपें अभ्यासरहित व अभ्याससहित अशीं दोन्हीं प्रकारचीं असतात. इन्द्रश्च विष्णो यदपस्पृधेथाम् ( ६।६९।८ ) । अस्पर्धेथामिति अपास्पर्धेथाम् इति वा भाषायाम्; अपस्पृधेथां हें अस्पर्धेथां किंवा अपास्पर्धेथां ( = अप + अस्पर्धेथां ) असें पाहिजे. पण स्पृध् चें अभ्यासानें पस्पृध् झालें आहे; पाहिजे त्या धातूला अभ्यास होतो असें वर म्हटलें आहे.

वाहिष्ठः बद्दल वोढृतमः ( ३२७।१९ ), सुदत्रः बद्दल सुदानः ( ४६९।३१ ),

गिर्वणाः बद्दल गीर्वाणः (४७१।९), हिनोत बद्दल हिनुत (४९२।१०), अंहुरः बद्दल अंहस्वान् (५०७।३४) अशीं व्याकरणशुद्ध रूपें पाहिजेत असें दुर्ग म्हणतो; पाणिनीय व्याकरणानें हीं रूपें अशुद्ध ठरतील; पण अर्वाचीन व्याकरणाचे नियम ऋग्वेदांतील रूपांना लावतां येणार नाहींत ही शंका त्याला यावयास पाहिजे होती. अर्वाचीन संस्कृतांत ईयस् व इष्ठ हे प्रत्यय धातूंना लावीत नाहींत; पण ते धातूंना लाविलेल्याचीं उदाहरणें ऋग्वेदांत पुष्कळ आहेत; जसें जवीयान् जविष्ठ, दवीयान् दविष्ठ, नवीयान् नविष्ठ, महीयान् महिष्ठ, वरीयान् वरिष्ठ, वहीयान् वहिष्ठ, करिष्ठ, प्रसिष्ठ, तवीयान्. उरु चीं वरीयस् वरिष्ठ, गुरु चीं गरीयस् गरिष्ठ, पृथु चीं प्रथीयस् प्रथिष्ठ, वृद्ध चीं ज्यायस् ज्येष्ठ, बाढ चीं साधीयस् साधिष्ठ, बहु चीं भूयस् भूयिष्ठ असें पाणिनीय व्याकरणांत म्हटलें आहे; वास्तविक हींही रूपें वृ गृ प्रथ् ज्या साध् भू ह्या धातूंपासूनच झालीं आहेत. दत्र अर्वाचीन संस्कृतांत नाहीं; पण दद् (=देणें) + त्रं = दत्रं असा तो शब्द आहे. गीः एव वाणः अस्ति येषां ते गीर्वाणाः (अमर १।१।९ क्षीरस्वामी) =वाणी हाच बाण आहे ज्यांचा असे; देवांच्या नुसत्या वाणीनें बाणाचें कार्य साधतें; पण गिरं वनोति असौ गिर्वणाः=धन देणारा असा अर्थ आहे; गीर्वाण हा गिर्वणस् चा अपभ्रंश होय; अपभ्रंश शुद्ध व गिर्वणस् अशुद्ध असें कसें म्हणतां येईल? अंहुः + रः = अंहुरः; अंहु शब्द अर्वाचीन संस्कृतांत नाहीं म्हणून तो अशुद्ध ठरत नाहीं; शक्र शुक्र प्रमाणें अंहुर. शृणोत सुनोत व हिनोत हीं ऋग्वेदांतील रूपें शुद्धच आहेत. शृणोतन सुनोतन व स्थन वगैरेंत न हें फुकट अक्षर होय असें नैरुक्त म्हणतात; मूळ प्रत्यय तन व थन असेच होते; कालांतरानें न गळला गेला; कर्त व कर्तन, गन्त व गन्तन, कृणोत व कृणोतन, शृणोत व शृणोतन, सुनोत व सुनोतन, यात व यातन, याथ व याथन अशीं दोन्ही तऱ्हेचीं रूपें ऋग्वेदांत आढळतात; नकारांत रूपें अशुद्ध असें म्हणतां येणार नाहीं; नकार गळलेलीं रूपेंच अशुद्ध असेंच म्हटलें पाहिजे. महित्वनं सखित्वनं वगैरे शब्दांतही न आहे; मूळ प्रत्यय त्वन; त्यांतला न जाऊन त्व प्रत्यय उरला; ऋग्वेदांत महित्वं व सखित्वं अशींही रूपें आहेत. दूतः बद्दल जूतः पाहिजे असें दुर्ग म्हणतो (३२८।१); पण दवीयः दविष्ठ हीं दू धातूपासूनच झालीं आहेत; दू + तः = दूतः; दू + रं = दूरम्; दू = धांवणें, धांवून लांब जाणें; दूतः = लांबवर धांवत जाणारा; दूरं = लांबवर धांवत गेलेलें. दूङ् परितापने (धा० ४।२७); दुःखित होणें किंवा दुःख देणें एवढाच अर्थ दू चा धातुपाठांत असल्यानें जू (= त्वरा करणें, धांवत जाणें) हा धातु दूत शब्दांत आहे असें दुर्गाला म्हणावें लागलें; पण द्रवतेर्वा वारयतेर्वा अशाही व्युत्पत्ति निरुक्तांत दिल्या आहेत (३२८।१); तेव्हां द्रुत शुद्ध रूप आहे असें दुर्ग कां म्हणत नाहीं? रुशत् (४६७।२८) बद्दल रोचनं पाहिजे (दुर्ग). कारण रुश हिंसायाम् (धा० ६।१३८) हा अर्थ धातुपाठांत आहे; रोचनं बद्दल रुशत् रूप अशुद्ध होय. पण रुश् चा हिंसा करणें हा अर्थ नसून झळकणें हाच अर्थ ऋग्वेदांत आहे. ऋग्वे-

दांतील शब्दांची व्युत्पत्ति ऋग्वेदांतूनच काढली पाहिजे. ऋचांचा अर्थ करतांना शब्दांचे अर्थ ठरविले पाहिजेत; इतकेंच नव्हे तर ऋचांचीं पदें बरोबर पाडलीं आहेत कीं नाहींत हेंही पाहिलें पाहिजे. पदकारावर अवलंबून राहिल्यास भलता अर्थ केला जातो ह्याचें एहिमायासः हें उदाहरण वर दिलेंच आहे (१२१८।७-२६). हें विधान पुढील दिलेल्या ऋचेच्या विवरणावरूनही स्पष्ट होईल. अश्रवं हि भूरिदावत्तरा वां विजामातुर् उत वा घा स्यालात्। अथा सोमस्य प्रयती युवभ्याम् इन्द्राग्नी स्तोमं जनयामि नव्यम् (१।१०९।२); ह्या ऋचेंत पदकारानें विजामातुः असें एक पद केलें आहे; त्याचा यास्कानें केलेला अर्थ पहा (४५४।२९). विजामातुः यांतील वि = विगुण म्हणजे ज्याच्यांत कोणताही गुण नाहीं असा; श्रुताभिरूप्यादिभिः गुणैः विहीनः जामाता यथा कन्यावते बहु धनं प्रयच्छति कन्यालाभार्थं ततः अपि (सायण) = विद्या (श्रुत) व सौंदर्य (आभिरूप्य) वगैरे गुण ज्याच्यांत नाहींत असा मनुष्य कन्येच्या बापाला पुष्कळ धन देतो; त्याच्याहूनही. स्याल = मेव्हणा (यास्क व सायण). इंद्र व अग्नि हे देव; त्यांची मनुष्याशीं — विशेषेंकरून गुणरहित मनुष्याशीं — तुलना करणें बरोबर नाहीं हें पदकार, यास्क व सायण ह्यांच्या लक्षांत यावयास पाहिजे होतें. वि ह्या उपसर्गाचा संबंध अश्रवं ह्याच्याशीं आहे; वि + अश्रवं = मीं सर्वत्र ऐकिलें आहे. जामाता मनुष्य नसून वायु आहे; तव वायवृतस्पते त्वष्टुर् जामातर् अद्भुत। अवांसि आ वृणीमहे (८।२६।२१); त्वष्टुर् जामातरं वयम् ईशानं राय ईमहे। सुतावन्तो वायुं द्युम्ना जनासः (८।२६।२२); ह्या उताऱ्यांत वायूला त्वष्ट्याचा जामाता म्हटलें आहे; तो ऋताचा म्हणजे धनाचा स्वामी आहे; त्याच्याजवळ अतिशय धन आहे; अद्भुतः = रायः ईशानः = अतिशय धनाचा पति; त्याच्याजवळ स्तोते धन (अवांसि = द्युम्नानि) याचितात; ईमहे = आवृणीमहे = आम्हीं मागतों. वायु इतका धनवान् असूनही इंद्र व अग्नि त्याच्याहूनही धनवान् आहेत (भूरिदावत्तरा). दा = दान, धन; भूरि + दा = अतिशय धन; भूरिदा + वत् = अतिशय धनवान्; भूरिदावत्तरौ = अधिक धनवान्. भाषांतरांत भूरिदावन् ह्याला तर प्रत्यय लागला आहे असें मीं म्हटलें आहे तें चुकीचें आहे. वायु त्वष्ट्याचा जामाता; तेव्हां स्याल हा शब्द एखाद्या देवासंबंधानेंच घातला असला पाहिजे; पण तो शब्द प्रस्तुत ऋचेंतच असल्याकारणानें त्याचा अर्थ ठरवितां येत नाहीं. त्वष्ट्याची मुलगी कोण व तिचा भाऊ कोण? स्याल म्हणजे पूषा असेल कारण तोही अतिशय धनवान् आहे. इंद्र व अग्नि ह्यांची योग्य स्तुति केल्यानेंच धनकामना तृप्त होईल; साधारण मनुष्याशीं तुलना करणें हा त्यांचा उपमर्द होय. अवसाय पद्वते रुद्र मृळ (५५।११); ह्यांतील अवसाय हें अवसं ह्याचें चतुर्थीचें एकवचन; पण अवसाय अश्वान् (५५।२५) ह्यांतील अवसाय हा शब्द अवऽसाय असा पदपाठांत आहे; म्हणजे अव + सो ह्याला य प्रत्यय लावून तो शब्द बनला आहे. मयोभूर्वातो अभि वातु उस्राः ऊर्जस्वतीः ओषधीः आ रिशन्ताम्। पीवस्वतीः जीवधन्याः पिबन्तु अवसाय पद्वते रुद्र मृळ (१०।१६९।१)=

आरोग्यदायक ( मयोभूः ) वारा ह्या गायींकडे ( उस्रः ) वहात येवो; ह्या गायी पुष्टि- कर ( ऊर्जस्वतीः ) वनस्पति ( ओषधीः ) खावोत ( आ रिशन्तां ); धष्टपुष्ट झालेल्या ( पीवस्वतीः ) त्या जिवाला आराम देणारें पाणी ( जीवधन्याः ) पिवोत; असा पहिल्या तीन पादांचा अर्थ आहे. चौथ्या पादांतील अवसाय हें पद सावग्रह कीं अवग्रहरहित हा प्रश्न आहे. रुद्र आपलें धनुष्य गाई वगैरेंवर सोडून त्यांचा नाश करतो; तसें त्यानें करूं नये म्हणून हे रुद्रा, आपलें धनुष्य प्रत्यंचेपासून मोकळें करून ( अवसाय ) आमच्या पादचारी जनावरांचें रक्षण कर अशी त्याला प्रार्थना केली आहे; पद्वते हें अवसाय ह्याचें विशेषण नसून नाम आहे; वृजनं पद्वदीयते उत्पातयति पक्षिणः ( १।४८।५ ) = चतुष्पाद जनावरें ( पद्वत् ) रानांत ( वृजनं ) पाठविलीं जात आहेत; उषा पांखरांना उडावयास लावीत आहे; वयो दधत् पद्वते ( १।१४०।९ ) = अग्नि पादयुक्त प्राण्यांना ( पद्वते ) अन्न ( वयः ) देतो ( दधत् ); नि ग्रामासो अविक्षत नि पद्वन्तो नि पक्षिणः ( १०।१२७।५ ) = गांवांत राहणारे लोक ( ग्रामासः ), चतुष्पाद् प्राणी ( पद्वन्तः ) व पांखरें झोंपलीं आहेत. या तीन ऋचांत पद्वत् हें नाम आहे. अव- साय ह्याचें धनुः ( अध्याहृत ) हें कर्म; सो = बांधणें, धनुष्यावर दोरी चढविणें; अव + सो = धनुष्याची दोरी काढणें. रुद्राचें धनुष्य नेहमीं सज्ज असतें; त्याचे बाण सदोदित फेंकले जातात; तो सगळ्यांवर हल्ला करतो पण त्याच्यावर कोणी हल्ला करूं शकत नाहीं ( ७४३।२६ व २७ ). अर्हन् बिभर्षि सायकानि धन्व ( २।३३।१० )= हे पूज्य रुद्रा ( अर्हन् ), तूं धनुष्यबाण सदोदित धारण करतोस. रुद्राला संताप न आणणें हें पहिलें कर्तव्य होय; संतापल्यास तो जनावरांचा व माणसांचा फन्ना उड- वितो; म्हणून धनुष्याची दोरी मोकळी सोड अशी त्याला विनंति केली आहे. अव- साय ह्या पदावरून वेदाचा अर्थ करण्याची खटपट पदकाराच्या आधीं पुष्कळ काळ चालत होती व त्याचा अर्वाचीन व्याकरणाशीं परिचय होता हें सिद्ध होतें.

सूक्तें रचणारे विद्वान् होते हें नेहमीं लक्ष्यांत बाळगलें पाहिजे. १०।७१ ह्या सूक्तांत विद्वान् कोण व अविद्वान् कोण तें सांगितलें आहे. सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत ( २५४।२ व ३ ) जसा कोणी सातूचें पीठ चाळून चाळून व त्यांतला कोंडा काढून तें स्वच्छ करतो तसे अलौकिक बुद्धीचे लोक ( धीराः ) कल्पनेच्या साहाय्यानें ( मनसा ) कविता ( वाचं ) निर्माण करतात ( अक्रत ); अशा काळजीपूर्वक निर्माण केलेल्या काव्यकृति ( सख्यानि ) सहृदय लोकच ( सखायः ) ओळखतात ( जानते ) म्हणजे परस्परांच्या काव्यकृतींतलें इंग्य सहृदय कवींनाच कळतें; कारण अशा कवींच्या वाणींत अतिशय अर्थसंपत्ति ( भद्रा लक्ष्मीः ) खच्चून भरलेली असते. अशी ही अभिमानाची उक्ति आहे. सूक्तें रचणारे गदळ नव्हते; ते प्रत्येक शब्द तोलीत व मगच त्याचा कवितेंत उपयोग करीत; असें असतांना त्यांचे शब्द व्याकर- णाला सोडून होते असें म्हणतां येणार नाहीं. सूक्ताच्या सातव्या ऋचेंत ( २७।१० व ११ ) डोळे व कान ह्या बाबतींत सारखेपणा असला तरी कल्पनेच्या भरारींत ( मनो-

जवेषु) कवि एकसारखे नसतात; कित्येकांच्या कवितेंत खोली थोडी असते, कांहींच्यांत ती थोडी जास्त असते; परंतु जे कांहीं थोडे खरे कवि आहेत त्यांच्या कवितेंत खोली फारच असते म्हणजे त्यांच्या काव्यकृतींत अर्थ खोल भरलेला असतो. तत्का-लीन कवि निःपक्षपातानें टीका करीत; त्यांना अधम किंवा मध्यम काव्यें टाकाऊ वाटत; उत्तम काव्य हेंच त्यांच्या पसंतीला पडे व त्याचीच ते वाखाणणी करीत. चौथ्या ऋचेंत (६०।१४ व १५) एकजण कविता पाहतो तथापि पुढें असलेली कविता त्याला खरोखर दिसत नाहीं; म्हटलेली कविता एकजण ऐकतो पण खरोखर तो ती ऐकत नाहीं; म्हणजे वाचणाऱ्याला व ऐकणाऱ्याला कवितेचें हृद्य कळत नाहीं; अंगावर उत्तम वस्त्रें घातलेली युवति जसें आपलें सर्व अंग कामतृप्तीच्या वेळीं पती-लाच उघड करून दाखविते तशी कविता आपलें खरें स्वरूप रसिकालाच प्रकट करते. एथें रसिक व अरसिक ह्यांमधला भेद मार्मिकपणें दाखविला आहे; उत्तम वस्त्रें परिधान केलेली स्त्री सगळ्यांना दिसते, कित्येकांना तिच्या पोषाखानें भूल पडते व त्यानेंच ते मोहित होऊन जातात; पण अशा स्त्रीचें खरें सौंदर्य काय आहे तें तिच्याशीं ज्याचा निकट संबंध येतो त्यालाच कळतें; त्याप्रमाणें रसिक कवींच्या श्रमाचें चीज रसिक कवींकडूनच केलें जातें असें सुचविलें आहे. डोळ्यापुढें असलेली कविता अर-सिकाला डोळे असूनही दिसत नाहीं हें वाक्य एका कारणाकरतां लक्षांत ठेविलें पाहिजे; ऋग्वेदकालीं लेखनकला माहीत नव्हती असें कित्येक प्रतिपादितात; पण जर कविता लिहिली नसेल तर ती दिसेल कशी तें त्यांना विचारलें पाहिजे; त्यावेळच्या लोकांना लिहितां येत होतें व कविता वगैरे लिहून ठेविल्या जात असत यांत यत्किं-चितही संशय नाहीं असें जातांजातां सांगितलें पाहिजे. अर्थ समजल्याशिवाय जो नुसता ऋचा पाठ म्हणतो त्याचें पठण निष्फल होय; तो नुसता भारवाही होय असें पांचव्या ऋचेंत म्हटलें आहे (६२।१४ व १५). अकराव्या ऋचेंत (२५।१३ व १४) एकजण ऋचांचा बडा संग्रह करण्यांत गुंतलेला असतो (तर) दुसरा जेथें पारितोषिक मिळतें अशा सभांत गायत्रगान करतो; (पण) ज्याला काव्यकौशल प्राप्त झालें आहे (जातविद्यः) तो अशा सभांत ब्रह्मनांवाची स्वतः रचलेली काव्यकृति म्हणून दाखवितो; वाग्यज्ञाचें खरें स्वरूप एकालाच म्हणजे फारच थोडक्या लोकांना कळतें असा या ऋचेचा खरा अर्थ दिसतो; ऋचेंत ऋत्विजांच्या कामाची वांटणी केली आहे असें विवरणकार म्हणतात; पण सबंध सूक्तांत त्याला कोणताही आधार नाहीं. एथेंही ऋचा पठण करणारे आणि ऋचा गाणारे ह्यांना गौण स्थान दिलें आहे. आठव्या ऋचेंत (१०७८।२९ व ३०) कविकल्पनेचे (मनसः) वेग (जवेषु) म्हणजे कल्पनेच्या भराऱ्या बुद्धीनें (हृदा) तासून तासून (तष्टेषु) तयार कराव्या लागतात व अशा मेहनतीनें कविता तयार करण्यांत रसिक कवींमध्यें स्पर्धा चालते; अशा ह्या काव्यरूपीं शर्यतींत कमी प्रतीचे कवि मागें टाकले जातात; खरे कवि काव्यप्रदेशांत स्वेच्छेनें संचार करतात असें म्हटलें आहे. उत्तम कविता रचणाऱ्यांना ब्राह्मणाः व

त्यांच्या काव्यकृतीला ब्रह्म म्हटलें आहे; ही ब्रह्मनांवाची कविता अत्युच्च कोटीला गेली होती असें स्पष्ट दिसतें. काव्यकृतींत रसिक कर्त्यांमध्यें स्पर्धा चाले; ह्या स्पर्धेंत कोणी भाग घ्यावा हें आधीं ठरलें जात असे; लेच्यापेच्याला स्पर्धेंत भाग घेण्याची मनाई असे ( ६२।१४ व १५ ). स्पर्धेंत भाग घेण्याला ज्या उत्तम कवीला पाठविला असेल तो सभा जिंकून व पारितोषिकें मिळवून आल्यावर त्याची वाहवा होत असे ( ऋचा दहावी ). असे अभिमानाचे उद्गार ह्या सूक्तांत आहेत. सूक्तांतील मनोजवेषु, मनसो जवेषु व मनसा वाचं हे शब्द विशेष अर्थीं वापरले आहेत; मन म्हणजे भरारी मारणारी कवि-कल्पना; अशा नुसत्या भरारीवर अवलंबून राहून कविता रचल्यास कवितेला कोणताही निर्बंध राहाणार नाहीं म्हणून हृद् किंवा धी ह्या शक्तीचा उपयोग केला पाहिजे; हृद् किंवा धी म्हणजे अध्यवसायिका बुद्धि म्हणजे चांगलें कोणतें वाईट कोणतें तें ठरविण्याचें सामर्थ्य; कल्पनेच्या भरारींतल्या चांगल्या वाईट गोष्टींची निवड बुद्धि करते व तसें झाल्यानें उत्तम निर्दोष काव्य तयार होतें. कवितेला नुसती कल्पनेच्या भरारींचा किंवा नुसत्या बुद्धीचा उपयोग होत नाहीं; दोघांच्या कार्याचें एकीकरण म्हणजेच उत्तम काव्यनिर्मिति; असें ह्या सूक्तांत म्हटलें आहे. तक्ष् हा धातु साभिप्राय आहे; सुतार ओबडधोबड लांकूड तासून तासून त्याची अगदीं गुळगुळीत व चकाकणारी फळी तयार करतो व अशा फळ्यांपासून दारें छतें सिंहासनें वगैरे सुबक कामें त्याला तयार करावीं लागतात आणि त्यांतच त्याचें कसब दिसून येतें; त्याचप्रमाणें कवीनें शब्द तासून तासून तयार केले पाहिजेत म्हणजे त्यानें ओबडधोबड कर्णकटु अशुद्ध शब्द वापरतां उपयोगी नाहीं; एवढेंच नव्हे तर शब्दांची जुळणीही मार्मिकपणें केली पाहिजे; त्याची कृति सर्व काव्यगुणांनीं भरून गेली पाहिजे; त्यांत व्यंग्यार्थ असलाच पाहिजे व ती कृति त्याला व वाचकांना आह्लाददायक, ब्रह्मानंद उत्पन्न करणारी असली पाहिजे. असला तत्कालीन कवींचा बाणा होता. तेव्हां त्यांच्या काव्यकृतींत भरलेला खोल अर्थ बाहेर काढणें हें प्रत्येक वेदाभिमान्याचें कर्तव्य आहे; ह्याच कर्तव्यजागरूकतेनें नवव्या अध्यायांतील बऱ्याचशा ऋचांचा खल केला आहे; तो प्रयत्न किती यशस्वी झाला आहे तें विचार करणाऱ्या वाचकांच्याच मतावर अवलंबून राहील; ह्याकरितां स्वतःच्या बुद्धिस्वातंत्र्याचा उपयोग केला पाहिजे; हा म्हणतो तो म्हणतो अशावर हवाला देण्यानें खरें मत ठरविणें अशक्य आहे; ऋग्वेदाचा अर्थ करण्याला ऋग्वेदाचेंच साहाय्य घेतलें पाहिजे; इतर साधनें फोल होत अशी माझी खात्री झाली आहे. अर्वाचीन संस्कृताप्रमाणें ऋग्वेदाच्या भाषेंत शब्दांच्या लिंगांवर फारच भर असे व त्यामुळें अनपेक्षित कोड्या केल्या जात ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. ऋग्वेदांतला बराचसा भाग खोल अर्थानें भरला आहे हें निःसंशय आहे.

## यास्काची विवरणपद्धति

( १ ) ऋचेंतील शब्दांचा क्रम जशाचा तसा ठेवणें, ( २ ) उपसर्ग व क्रिया-

रूपें एकत्र आणणें, ( ३ ) वैदिक शब्दांचे अर्वाचीन पर्याय देणें व अर्वाचीन संस्कृतांत असलेले शब्द जसेच्या तसे ठेवणें, (४) जातांजातां शब्दांच्या व्युत्पत्ति करणें ही पद्धत भाष्यांत सर्वत्र दिसून येते. कांहीं थोडक्या ठिकाणीं कारण नसतांना ऋचांतील शब्दांचा क्रम बदललेला आढळतो; जसें आ विवासेम धीतिभिः (हा ऋचेंतला क्रम) = कर्मभिः परिचरेम (१४१।२४). शब्दांच्या व्युत्पत्ति केल्याच पाहिजेत अशा दुराग्रहामुळें ऋचांतील शब्दांचा क्रम पुरा न करितां ज्याची व्युत्पति केली पाहिजे असा शब्द आल्याबरोबर त्याची व्युत्पत्ति यास्क देतो; ह्याचें ठळक उदाहरण ३।१० (पानें १७९-१८२) हें होय; ऋचेच्या पूर्वार्धांत एकः द्वा व त्रयः शब्द आले आहेत; त्यामुळें करन्ति = कुर्वन्ति असा पर्याय दिल्यानंतर एक शब्दापासून अर्बुद शब्दापर्यंतच्या व्युत्पत्ति दिल्या आहेत व व्युत्पत्ति संपल्यानंतर उत्तरार्धाचें भाष्य सुरू केलें आहे. या विधानाला ९।२६ ( पान ६९० ) असा एखाददुसरा अपवाद सांपडतो; एथें ऋचेंतील शब्दांचा क्रम पुरा केला आहे व त्याच्या शेवटीं इति समस्तार्थः हे शब्द घातले आहेत; नंतर अथ एकपदनिरुक्तं ( ६९१।२४ ) ह्या शब्दांनीं गंगा वगैरे शब्दांच्या व्युत्पत्ति देण्यास आरंभ केला आहे. ही योजना खात्रीनें इष्ट आहे; पण बहुतेक ठिकाणीं तिचा अभाव असल्याकारणानें ह्या खंडांतील योजना दुसऱ्या कोणीतरी केली असावी असा बळकट संशय येतो. व्युत्पत्ति देण्याच्या मोहांत सांपडल्यामुळें कांहीं ठिकाणीं ऋचेंतील शेवटले शेवटले शब्द भाष्यांत दिले जात नाहींत; २।११ ( पान १०९ ) ह्यावरील भाष्यांत अपो दिव्या असृजत् वर्ष्या अभि हे शब्द अजीबात गाळले आहेत; त्यांचें भाष्य देणें जरूर होतें; नहमींच्या पद्धतीप्रमाणें असृजत् व अभि हे शब्द अभ्यसृजत् असे एकत्र करावयास पाहिजे होते व दिव्याः आणि वर्ष्याः ह्यांचे पर्याय देणेंही जरूर होतें. डॉ०सरूप म्हणतात कीं शब्दांच्या व्युत्पत्ति देणें हा यास्काचा मुख्य उद्देश नसून ऋचांचा अर्थ करणें हा त्याचा मुख्य उद्देश होता; पण हें विधान वस्तुस्थितीला धरून नाहीं; जेथेंतेथें व्युत्पत्ति देणें हाच मुख्य उद्देश दृष्टोत्पत्तीस येतो व तो उद्देश समाम्नायः समाम्नातः । स व्याख्यातव्यः (३।५) ह्या शब्दांत स्पष्ट दिसतो. व्युत्पत्ति देण्यापासून ऋचेच्या अर्थाचा उलगडा करण्यास कोणतेंच साहाय्य होत नाहीं व व्युत्पत्ति दिल्या नसत्या तर फार बरें झालें असतें असें सारखें वाटत असतें. सायणाचार्य ऋचेंतील शब्दांचा अन्वय देतात पण यास्क अशा भानगडींत पडत नाहीं; त्यामुळें ऋचेचा अर्थ त्याच्या मनांत काय होता तें समजत नाहीं. ह्या विधानाला एकदोन अपवाद आहेत; ७।२२ (पान ५६९ ) ह्या खंडांतील ऋचेंत चार स्वतंत्र वाक्यें आहेत पण यः शब्द अध्याहृत घेऊन त्या सर्वांचें एक वाक्य यास्क करतो. ३।४ (पान १५७) ह्यांतील ऋचेच्या पूर्वार्धाचें भाष्य दिल्यावर दुहितेला दायभाग मिळावा कीं न मिळावा अशाविषयीं निरनिराळीं मतें व आधार यास्क देतो; तो वाद पांचव्या खंडांत संपविल्यावर खंडाच्या शेवटीं ऋचेच्या उत्तरार्धाचें भाष्य दिलें आहे (१६६।९-१५); म्हणजे पूर्वार्ध व उत्तरार्ध ह्यांच्या भाष्यांची मोठी ताटातूट झाली आहे. वैदिक शब्द

भाष्यांत न घालतां यास्क त्या शब्दांचे अर्वाचीन पर्याय देतो; तथापि कांहीं ठिकाणीं वैदिक शब्द व त्यांचे पर्याय हे दोन्हीही दिलेले आढळतात; जसें शवसा बलेन (९०२।३० व ३१). वैदिक शब्दांचे पर्याय न देतां एखादवेळेस ते जसेच्या तसेच भाष्यांत घातलेले आढळतात; जसें:— दुहे (५२१।२२) व कृणुष्व (४६२।१०). कधींकधीं शब्दांचे निघंटूंत न दिलेले अर्थ यास्क देतो; जसें केतुः = प्रज्ञा (निघंटु ३।६।२); पण केतुः = कर्म (यास्क ९११।११); श्रवः = अन्न (निघंटु २।७।४); अन्न हा अर्थ यास्कानें दिला आहे (७३१।१८); पण प्रशंसा किंवा यश असा त्या शब्दाचा अर्वाचीन अर्थही यास्क देतो (३०२।२९; ६६१।३४;८६८।३२); श्रवः म्हणजे धन असाही अर्थ निघंटूंत असतांना (२।१०। २६) यास्कानें तो अर्थ कोठेंही दिला नाहीं. ब्राह्मणें निदानें महाभारत पुराणें वगैरें-वर श्रद्धा असल्यामुळें शब्दांचे भलते अर्थ केलेले यास्काच्या निरुक्तांत आढळतात; हे अर्थ पूर्वींच्या निरुक्तकारांनीं केले असावेत व त्यांचाच अनुवाद यास्कानें केला असावा. ऐतरेयब्राह्मणांत मित्र म्हणजे दिवस व वरुण म्हणजे रात्र असे अर्थ दिले आहेत (८९८।२८); त्यांच्या आधारेंच दक्षस्य वादिते ह्या ऋचेचें भाष्य दिलें आहे (पान ८९७); तेथें अर्यमा म्हणजे सूर्य असा अर्थ दिला आहे त्याचें कारण मित्र व वरुण ह्यांचे ऐतरेयब्राह्मणांत दिलेले अर्थ होत; यास्काच्या मनांतील ह्या शब्दांचे अर्थ दुर्गानें स्पष्ट सांगितले आहेत (८९७।२५). शंयु म्हणजे बृहस्पतीचा पुत्र (२९९।१०) हा अर्थ ऋग्वेदांत नाहीं; तो एखाद्या पुराणांत यास्काला सांपडला असावा. च्यवन हें एका ऋषीचें नांव आहे असें महाभारतावरून यास्क म्हणतो; पण ऋग्वेदांत च्यवन हें विशेषण आहे (२८७।१४). जीवान्नो अभिधेतन (५०६।१५) ह्या ऋचेचा भलता अर्थ करण्याचें कारण तत्संबधानें निदानकारांनीं रचलेली गोष्ट होय. ऋबीसपक्वं नाश्नीयात् ह्या श्रौतवचनामुळें ऋबीस म्हणजे पृथिवी असा यास्कानें अर्थ केला आहे (५२८।३०) व त्यामुळें अत्रि म्हणजे अग्नि असा त्याला अर्थ करावा लागला; पण हें विवरण अगदीं चुकीचें आहे (पान ५२९). ऋचांचा अर्थ ऋग्वे-दाच्या साहाय्यानेंच केला पाहिजे; ब्राह्मणें वगैरेंचें साहाय्य घेतां कामा नये; ब्राह्मणें वगैरेंवर श्रद्धा ठेवल्यानें ऋचांचे भलते अर्थ केले गेले आहेत. ययाथ = याहि असा चुकीचा अर्थ यास्कानें केला आहे (१४७।३४); असा त्यानें अर्थ करावा ह्याचें नवल वाटतें व दुर्गानें त्याचें तसेंच विवरण करावें ह्याचें जास्त नवल वाटतें. असा दांडगाईचा अर्थ करण्याचें कारण आ हा उपसर्ग शृणवाम ह्याला जोडला आहे हें; पण आ ययौ वो दूरात् अनसा रथेन ह्याला आ ययाथ दूरात् अनसा रथेन ह्या शब्दांनीं कबुली दिली आहे म्हणजे नद्यांना कुशिकाच्या मुलाबद्दल आस्था वाटत आहे असें दर्शविलें आहे. अनसा रथेन दूरात् याहि = गाड्या व रथ घेऊन येथून लांब रस्त्यानें जा असा उद्दामपणानें भरलेला अर्थ निष्पन्न होतो; हा उद्दामपणाचा आरोप टाळण्याकरितां तूं दुरून आला आहेस (यस्मात् दूरात् आयातः त्वं) असा दुर्गाला दूरात् ह्याचा

अर्थ करावा लागला. तसे प्रमाणें शश्वचै हें क्रियारूप असतांना शश्वचै चा परिष्वजनाय असा त्यानें अर्थ केला आहे; असा अर्थ करण्याचें कारण श्वच् धातूचा अर्थ त्याला कळला नाहीं हें. सायणाचार्यही आ हा उपसर्ग शृणवाम ला जोडतात व ययाथ = आगतः असि असा अर्थ करतात; पण ययाथ ह्याचा गेला आहेस असा अर्थ होईल; आला आहेस असा अर्थ कसा होईल ? आधींच्या ऋचेंतही (३।३३।९) ययौ = प्राप्तः अस्मि असा अर्थ त्यांनीं केला आहे; पण दोन्ही ठिकाणीं आ उपसर्ग ययौ व ययाथ ह्यांनाच जोडला पाहिजे. यथा कन्या युवतिः मर्याय इव मनुष्याय पित्रे भ्रात्रे वा शश्वचै परिष्वजनाय नम्रा भवति अशी त्यांनींही चूक केली आहे; मर्याय = पित्रे भ्रात्रे वा असा दुर्ग अर्थ करीत नाहीं; मर्याय मनुष्याय कन्या नवोढा = मनुष्याकरितां म्हणजे नवऱ्याकरतां जशी नवीन लग्न झालेली असा त्यानें अर्थ केला आहे; मर्य म्हणजे मर्द, जवान असा अर्थ आहे. मूरा अमूर न वयं चिकित्वो महित्वमग्ने त्वमङ्ग वित्से ( ४५२।२३ ); चिकित्वः हें संबोधन असून तें सर्वत्र अग्नीला लावलेलें आढळतें; तथापि चिकित्वः = विद्मः असा यास्क अर्थ करतो व न वयं चिकित्वः = न वयं भवतः प्रभावस्य अन्तं विजानीमः असें दुर्ग म्हणतो. वयं ला क्रियापद पाहिजे हें खरें आहे पण तें क्रियारूप चिकित्वः यापासून कसें निघेल ? विद्मः अध्याहृत घेतलें पाहिजे कारण लगेच त्वमङ्ग वित्से असे शब्द आले आहेत. नैकपदानि निर्ब्रूयात् ( ८९।२९ ) = ज्यांचा संदर्भ माहीत नाहीं अशा शब्दांचें निर्वचन करूं नये; ह्या आज्ञेमुळें प्रस्तुत ऋचेंत चिकित्वः = विद्मः असा अर्थ केला गेला; पण विद्मः हें क्रियारूप अध्याहृत घेण्यास कोणती हरकत होती ? एका शब्दाचे अनेक अर्थ असतात; अमका अर्थ कोठें असतो तें संदर्भावरून ठरविणें योग्य आहे; पण चिकित्वः हा अनेकार्थी शब्द नाहीं; तें सर्वत्र संबोधनच आहे. सायणाचार्य चिकित्वः = चेतनवन् असा अर्थ करतात व तोच बरोबर आहे. ९।२० तल्या ( ६८०।२ ) ऋचेंतील आ जंघन्ति व उपजिघ्नते हीं संबोधनें आहेत असें यास्क म्हणतो; तीं बहुवचनीं क्रियारूपें आहेत असें सायणाचार्य म्हणतात व दुसऱ्या अर्धातील प्रचेतसः हा शब्द ते त्यांचा कर्ता मानतात. आ जंघन्ति व उपजिघ्नते हीं एकवचनीं क्रियारूपें आहेत ही गोष्ट युरोपीय विद्वानांना कळावी पण ती यास्काला व सायणाचार्यांना कळूं नये हें नवल आहे ! घन् धातूचीं ऋग्वेदांत असलेलीं क्रियारूपें एकत्र केल्यानें जंघन्ति व जिघ्नते हीं एकवचनी क्रियारूपें आहेत असें सहज ध्यानांत येतें. कदाचित् जंघन्ति हें संबोधन मानतां येईल; पण जिघ्नते हें संबोधन मानणें म्हणजे नुसतें अज्ञान होय. दनो विश इन्द्र मृध्रवाचः (५१९।२१); एथें दनः ह्याचा भलता अर्थ केल्यानें ऋचेचा भलता अर्थ केला गेला हें त्या ठिकाणीं दाखविलें आहे; असा अर्थ यास्कानें कां केला तें समजत नाहीं; सायणाचार्यांनीं बरोबर अर्थ केला आहे.

भूरि प्रभवति इति सतः(९८।३१),बहु प्रभवति इति सतः (१९०।७),वर्पः इति रूपनाम। वृणोति इत सतः (३६२।१०),उषाः उच्छति इति सत्याः (१२९।१२), गृहाः

गृह्णन्ति इति सतां (१९१।२०) असा व्युत्पत्ति करतांना सत् शब्दाचा उपयोग केला आहे; सत् शब्द घालण्याचें प्रयोजन त्या त्या ठिकाणीं सांगितलें आहे. निघंटु ऋचा भाष्यांत दिलेले पर्याय ह्यांत ज्या रूपांनीं शब्द आले असतील त्याच रूपांत ते शब्द व्युत्पत्ति करतांना यास्क देतो; जसें ओषधयः (६९६।३०), नराः व मनुष्याः ( ३२७।२३ ), कृष्टयः ( ७९५।५ ), पूरवः ( ५७०।१३ ), दीधितयः ( ३६६।११ ), वम्र्यः ( २२३।३९ ), बाहू ( १७४।१६ ), ऋक्षाः व स्तृभिः ( २२३।५ ). यास्कानें निघंटूंतला स्तृभिः असाच शब्द ठेवून त्याची स्तृभिः स्तीर्णानि इव ख्यायन्ते अशी व्युत्पत्ति केली आहे; म्हणजे स्तृभिः हें तृतीयाबहुवचनी रूप ख्यायन्ते ह्याचा कर्ता केला आहे; ही दांडगाई अक्षम्य होय. स्तृभिः एवढेंच रूप ऋग्वेदांत असल्यानें तेंच रूप हलगर्जीपणानें निघंटूंत घातलें आहे; पण यास्कानें असा हलगर्जीपणा करावयास नको होता; स्तीर्णानि हें विशेषण स्तृभिः ह्याला कसें लावतां येईल ? कदाचित् स्तृणि असें रूप यास्काच्या मनांत असेल; स्तृणि स्तीर्णानि असें म्हणणें बरोबर होईल व तेंच रूप घालणें जरूर होतें. ऋग्वेदांत वम्रीभिः एवढेंच रूप असून निघंटूंत त्याजबद्दल वम्र्यः आहे; निघंटूंत वम्रीभिः असेंच रूप असतें तर वम्रीभिः वमनात् असे शब्द यास्कानें घातले असते. निघंटूला चिकटून राहणें असमंजसपणा होय. ऋचांत उक्षणः ( ३०।१३ ), गिरः ( १९४।२५ ), वासराणि ( २५०।१३ ), हंसाः ( २६५।२१ ), मिथुनौ ( ५८८।१ ), वनर्गू ( ९७१।१७ ) अशीं रूपें उदाहृत केलेल्या ऋचांत आलीं आहेत म्हणून तशा रूपांतच असणाऱ्या त्या शब्दांची व्युत्पत्ति यास्कानें केली आहे. आप्रियः हें आप्री शब्दाचें बहुवचन ऐतरेयब्राह्मणांत ( ६।४ ) आहे; त्याचीच व्युत्पत्ति यास्कानें केली आहे ( ६०१।१ ). जरी ऋचेंत असुरान् ( १७०।१७ ) हें रूप आहे तरी व्युत्पत्तीकरितां असुराः हें रूप दिलें आहे; कारण तसें रूपांतर करण्याला निघंटूची आडकाठी नव्हती; निघंटूंत असुरः असा मेघवाची शब्द आहे पण तो अर्थ प्रस्तुत ऋचेंत नाहीं. भाष्यांत वयाः चा शाखाः ( १५।१८ ) पर्याय दिला आहे व उर्वीः चें उर्व्यः ( १४७।११ ) असें रूपांतर केलें आहे; व्युत्पत्ति करतांना शाखाः व उर्व्यः असे बहुवचनीच शब्द घातले आहेत. ६।२७ ( पान ५०६ ) ह्यांतील ऋचेच्या निदानांत मत्स्यानां रूप आलें असतांनाही व्युत्पत्तीकरितां त्याचें मत्स्याः असें रूपांतर यास्कानें केलें आहे; कारण तसें करण्यास त्याला कोणतीही आडकाठी नव्हती. यास्काला जर मुभा असती तर त्यानें वर दिलेल्या सर्व शब्दांचीं प्रथमांत एकवचनींच रूपें दिलीं असतीं; पण तशी मुभा त्याला नव्हती; शास्त्राकरितां पूर्वींचीं बंधनें टाकणें त्याच्या जिवावर आलें असतें.

चमत्कारिक व्युत्पत्तींचीं यास्कानें दिलेलीं कारणें:—कुत्स हें एका ऋषीचें नांव असून त्या शब्दाचा वज्र असाही अर्थ आहे; वज्रवाचक कुत्स शब्द कृन्त् ( = कापणें ) पासून; कारण वज्र मेघाला कापतें. विशिष्टऋषिवाचक कुत्स शब्द कृ

धातूपासून; कारण तो स्तोमांचा कर्ता होता असें औपमन्यव म्हणतो; पण यास्काला ही व्युत्पत्ति पसंत नसल्यामुळें विशिष्टऋषिवाचक शब्दांतही कृन्त् हाच धातु आहे असें तो म्हणतो; कोणी म्हणेल कीं कुत्साला वज्राशीं किंवा वज्राच्या कापण्याशीं काय करावयाचें आहे ? त्याला उत्तर कुत्साचा मित्र जो इंद्र तो शुष्णाला वज्रानें ठार करता झाला; तेव्हां परंपरेनें कुत्सानेंही इंद्राच्यामार्फत शुष्णाला मारलें असें अनुमान सहज निघतें. विहिरींतील पाणी ( पान ) कु म्हणजे अल्प असतें ( कुपानं भवति ); किंवा विहिरीवर पाणी आणण्याला येणारे लोक एकमेकांवर संतापतात म्हणून कुप् पासून कूप ( २१४।२३ ). अशा गमतीदार व्युत्पत्ति यास्क कधींकधीं देतो. प्रवतः उद्वतः निवतः इति। अवतिः गतिकर्मा ( ७८२।१ ); प्रवत उद्वत् व निवत् हे शब्द अव् ( = जाणें ) पासून. अवतिर्गतिकर्मा इत्येतदत्र निर्वचनं कथं संबध्यते इति विज्ञातव्यम् । अथवा । प्रवतः इति अवतिः एव अयम् आदिलुप्तः प्रपूर्वः इति भाष्यकाराभिप्रायः (दुर्ग) = ह्या तीन शब्दांत अव् धातु कसा असेल ? अथवा प्र नि उत् ह्या उपसर्गानंतर अव् चा अ गळून प्रवत् वगैरे शब्द झाले आहेत असें भाष्यकाराचें मत आहे. उपसर्गात् छन्दसि धात्वर्थे ( पा० ५।१।११८ ) ह्या सूत्रानें प्रवत् वगैरे शब्द सिद्ध होतात असें जरी दुर्गाचें ठाम मत होतें तरी यास्कापुढें त्याला नमतें घ्यावें लागलें. परावतः = प्रेरितवतः परागताद्वा ( ५८२।२९ व ९५०।१५ ) ह्यावरून उपसर्गांना वत् लावल्यानें परावत् प्रवत् उद्वत् निवत् शब्द बनतात हें यास्काला मान्य होतें; पण व्युत्पत्तीच्या वेडामुळें अव् पासून प्रवत् वगैरे शब्द झाले आहेत असें तो म्हणतो.

शब्दाच्या एकाहून अधिक व्युत्पत्ति करतांना यास्क दुसऱ्या व्युत्पत्तीच्या शेवटीं कधीं कधीं विकल्पदर्शक शब्द घालीत नाहीं; त्यामुळें दोन व्युत्पत्ति आहेत ही गोष्ट एकदम लक्ष्यांत येत नाहीं. अहि शब्दाच्या दोन व्युत्पत्ति दिल्या आहेत; निर्हसितोपसर्गः आहन्ति इति ह्या शब्दाच्या शेवटीं वा पाहिजे ( १२७।२४-२८ ). ऋषि शब्दाची औपमन्यवानें दिलेली व्युत्पत्ति व तैत्तिरीय आरण्यकांतील व्युत्पत्ति भिन्न आहेत; त्या व्युत्पत्ति भिन्न आहेत हें दाखविण्याकरितां वा पाहिजे. समाश्रितानि एतत् इन्द्रियाणि भवन्ति ( २६४।३२-३३ ) ही शिरस् शब्दाची दुसरी व्युत्पत्ति आहे म्हणून तिच्या शेवटीं इति वा शब्द पाहिजेत.

ज्या उदाहरणानंतर इत्यपि निगमो भवति हे शब्द येतात त्या उदाहरणाचें भाष्य यास्क देत नसतो म्हणून जेथें भाष्य असेल तेथें तें प्रक्षिप्त होय असेंच मानलें पाहिजे; उदा० तमूर्दरं न पृणता यवेन इत्यपि निगमो भवति यानंतरचें इन्द्रं सोमेन तम् ऊर्दरम् इव पूरयति यवेन हें भाष्य प्रक्षिप्त होय. पण या विधानाला एखाददुसरा अपवाद सांपडतो; नेदीय इत् सृण्यः पक्वमेयात् इत्यपि निगमो भवति ह्यानंतरचें अन्तिकतमम् अङ्कुशात् आयात् पक्वम् औषधम् आगच्छतु ( ४२२।१७-१९ ) हें भाष्य प्रक्षिप्त नसून आवश्यक आहे; कारण आगच्छतु शब्दाची द्विरुक्ति भाष्यांतील आगच्छतु शब्दामुळेंच केली आहे.

निरुक्ताच्या दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या तीन खंडांतील लोप, धातूंत होणारे निरनिराळे बदल, धातूंत येणारे आगम व धातूंना होणारें संप्रसारण यासंबंधीं नियम व त्यांचीं उदाहरणें व्याकरणांतून घेतलीं आहेत; त्याचप्रमाणें कांहीं शब्द धातूंच्या अक्षरांची उलटापालट केल्यानें सिद्ध होतात हें वैय्याकरणांचें मत दिलें आहे. यामुळें नैरुक्त वैय्याकरणांना म्हणतात कीं सिकता तर्कु वगैरे शब्द धातूंतील अक्षरांची उलटापालट झाल्यानें बनतात, धातूंत हवे ते फेरफार होतात असें तुमचें मत आहे व ह्या फेरफारांसंबंधानें तुम्हीं नियम केले आहेत; तेव्हां जे दुर्बोध शब्द आहेत त्यांनाही हे तुमचे नियम लागूं करण्यास कोणती हरकत आहे ? तुम्हीं कांहीं शब्दांच्या बाबतींत उलटापालट वगैरे बदल होतात असें कबूल करतां;पण सिकता कस् पासून, तर्कु कृत् पासून, स्तोक श्चुत् पासून व रज्जु सृज् पासून अशा व्युत्पत्ति करण्याला तुम्हांला काय आधार आहे ? तुम्ही जर हव्या तशा व्युत्पत्ति करतां तर आम्हीही तशा व्युत्पत्ति करणार. तुम्ही व्युत्पत्तीचें काम अर्धवट सोडून दिलेंत पण आम्ही तें तसेंच चालूं ठेवलें व तसें करून तुमच्याच व्याकरणाची पूर्तता केली ( व्याकरणस्य कात्स्‍र्न्यं ४५।११ ) तर तुम्हीं आम्हांस दोष कां द्यावा ? हें नैरुक्तांचें म्हणणें तोंड बंद करणारें आहे खास. २।३ च्या शेवटीं निरुक्तशास्त्र शिकण्याला कोण योग्य व कोण अयोग्य तें सांगितलें आहे; त्यांतील न अवैयाकरणाय हे शब्द लक्षांत ठेवण्याजोगे आहेत; ज्याला निरुक्तशास्त्र समजवून घ्यावयाचें असेल त्याला व्याकरणाचें ज्ञान असलेंच पाहिजे कारण निरुक्तशास्त्राची उभारणी व्याकरणांत घालून दिलेल्या नियमांवरच केली आहे असें म्हणावयाचें आहे. व्युत्पत्ति करतांना ज्या ज्या प्रकारांचा आम्हांला अवलंब करावा लागतो ते सर्व प्रकार व्याकरणांतच नमूद केले आहेत. जे वैयाकरण नैरुक्तांना दोष देतात त्यांची ह्या शब्दांनीं कानउघाडणी केली आहे. वैयाकरणांनीं सिकता वगैरे शब्दांच्या व्युत्पत्ति देतां येत नाहींत असेंच म्हणावयास पाहिजे होतें; तसें ते म्हणाले नाहींत त्यामुळेंच नैरुक्तांच्या मताला महत्त्व आलें; वैयाकरणांनीं मोठीच चूक केली यांत संशय नाहीं; दांडगाईच्या व्युत्पत्तींचीं द्वारें त्यांनींच खुलीं केलीं असें म्हणावें लागतें. यामि = याचामि; याचामि ह्यांतला चा गळून यामि रूप उरलें असें वैयाकरण म्हणाले; पण या व ई ह्यांचा याचना करणें असा अर्थ ऋग्वेदांत आहे; इतो वा सातिमीमहे ( १।६।१० ); ईमहे = आधिक्येन याचामहे । सप्तदशसु याच्ञाकर्मसु ईमहे यामि इति पठितं ( सायण ). वधू शब्दाचीही वह् पासून त्यांनीं केलेली व्युत्पत्ति करावयास नको होती; कारण तशी व्युत्पत्ति करण्याला कोणताही आधार नाहीं. उणादयः अव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि = ज्यांची व्याकरणाच्या नियमांनीं व्युत्पत्ति करतां येत नाहीं अशा प्रातिपदिकांचा संग्रह म्हणजे उणादि असें महाभाष्यांत म्हटलें आहे; तेव्हां प्रश्न असा उद्भवतो कीं अशा शब्दांच्या व्युत्पत्ति करण्याचें काय प्रयोजन ? व्युत्पत्ति केल्या नसत्या तर काय बिघडलें असतें ? नैरुक्तांचें व्युत्पत्तिशास्त्र अगदीं

खोटें आहे हें दाखविण्याकरितां एक दोन उदाहरणें देऊन हें प्रकरण पुरें करूं. स्याल ह्या ऋग्वेदांतील शब्दाचा अर्वाचीन उच्चार श्याल; श्यायते श्यालः। स्यम वितर्के। अस्मात् वा स्यालः ( अमर २।६।३२ क्षीरस्वामी ); स्यालः आसन्नः संयोगेन इति नैदानाः। स्यात् लाजान् आ वपति इति वा ( ४५६।१ व २ ). शुतुद्री चे शुतुद्रिः शितद्रुः सितद्रुः व शतद्रुः असे भिन्न उच्चार अर्वाचीन संस्कृतांत आहेत व त्या उच्चारांप्रमाणें त्यांच्या व्युत्पत्तीही केल्या आहेत (६९२।१५-३०). ऋग्वेदांतील शुतुद्री हेंही नांव एखाद्या पूर्वींच्या नांवाचा अपभ्रंश नसेल कशावरून ? आर्य बाहेरून हिंदुस्थानांत आले व त्यांनीं अस्तित्वांत असलेल्या नांवांचे सोईकरितां निराळे उच्चार केले नसतील कशावरून ?

यास्क बहुश्रुत होता, त्याचा नाना ग्रंथांशीं परिचय होता, सर्व वेद ब्राह्मणें आरण्यकें उपनिषदें इतिहासपुराणें प्रातिशाख्यें व्याकरण हीं त्याला चांगलीं अवगत होतीं हें डॉ० सरूपचें म्हणणें खरें आहे; पण त्याला ध्वनिशास्त्र उत्तम माहीत होतें हें त्यांचें म्हणणें मान्य करतां येत नाहीं; कारण शब्दांच्या व्युत्पत्ति करण्याची त्याची व नैरुक्तांची पद्धत अगदीं अशास्त्रीय होय असें मीं वर सिद्ध केलें आहे. उपधालोप (Syncope ), वर्णविपर्यय ( Metathesis ), वर्णागम ( Anaptyxis ), वर्णलोप ( Haplology ) असे जाडजाड ग्रीक शब्द त्यांनीं यास्कासंबंधीं वापरले आहेत व कुटस्य बद्दल कृतस्य असा जवळचा शब्द दिला आहे त्यामुळें शब्दसादृश्य ( Assimilation ) व अपभ्रंश ( Prākṛtization ) कसे होतात हें त्याला चांगलें माहीत होतें असें ते म्हणतात; पण हा शब्दावडंबर फुकट आहे. उपधालोप वगैरेंचे नियम यास्कानें तयार केले नसून ते पूर्वींच्या व्याकरणांतून घेतले आहेत असें मीं वर म्हटलें आहे; यास्कानें व नैरुक्तांनीं त्या नियमांचा दुरुपयोग केला आहे हेंच म्हणणें योग्य आहे. डॉ० सरूप वगैरेंनीं यास्काची जी स्तुति केली आहे तिला तो पात्र नाहीं असेंच म्हणणें भाग आहे.

ब्रह्मांडांत तीनच देवता आहेत असें नैरुक्त म्हणतात ( ५४०।२२ ) व त्या मताला अनुसरूनच पृथ्वीवरच्या देवांचा, अंतरिक्षांतील देवांचा व द्युलोकांतील देवांचा एकेक गट केला आहे व प्रत्येक गटांतील देवता एकाच देवतेचीं भिन्न भिन्न रूपें होत असें म्हटलें आहे. पण हें मत ऋषींचें नसावें असें वाटतें; अश्विन त्वष्टा भग विष्णु वरुण यम हे ऋषींच्या मतें स्वतंत्रच देव होते; ते सर्व एका सूर्याचीं भिन्न रूपें मानणें अगदीं अस्वाभाविक होय. वृषाकपि व वृषाकपायी ह्यांना देवगणांत घालण्याचें काय कारण झालें तें कळत नाहीं; इंद्र वृषाकपीच्या घरीं जाऊन सोमपान करीत असे एवढ्यावरून वृषाकपि देव होता हें ठरत नाहीं. नैरुक्त स्वतंत्र विचार करणारे होते हें कबूल केलें पाहिजे; पण ह्या विचारस्वातंत्र्यांत अस्वाभाविकपणा आहे हेंही त्या बरोबर सांगितलें पाहिजे. असंख्यदेवांचे तीन देव व तीहींचा एक देव व तोही सच्चिदानंदब्रह्म असा विचार उपनिषद् कालांतील होय; त्याची थोडीशी छटा ऋग्वे-

दांतील कांहीं ऋचांत दिसते; पण बहुतेक ऋचांत देवताबहुत्व दृष्टोत्पत्तीस येतें व तशा रीतीनेंच ऋचांचें विवरण केलें पाहिजे. देवतात्रयपर अर्थ केल्यानें ऋचांच्या अर्थाची आढाताण होते व तशी ओढाताण निरुक्तांत कांहीं ठिकाणीं झाली आहे. सविता यन्त्रैः ( ८२०।४-५ ) ह्या ऋचेंत सविता पाऊस वगैरे पाडतो म्हणजे बलाची कामें करतो म्हणून तो मध्यम लोकांतील देव. मरुद्भिरग्न आ गहि ( ८३०।१३ ) ह्या शब्दांनीं मरुतांना घेऊन ये असें अग्नीला म्हटलें आहे म्हणून अग्नि अंतरिक्षांतील. बहुधा रोरूयते ( ८५०।२३ ) = नानाप्रकारच्या गर्जना करतो म्हणून पावसाळ्याला पुरूरवस् म्हटलें आहे; दुर्गानें ह्या अर्थाला अनुलक्षून समस्मिन् जायमाने ( ८५०।२७-२८ ) ह्या ऋचेचा पर्जन्यपर अर्थ केला आहे. सविता व अग्नि हे अंतरिक्षांतील देव व पुरूरवस् म्हणजे पर्जन्य किंवा पावसाळा असे अस्वाभाविक अर्थ यास्कानें केले आहेत त्याचें कारण निघंटूंत केलेले देवतांचें वर्गीकरण; हें वर्गीकरण नैरुक्त व याज्ञिक ह्यांनीं केलें असल्यामुळें यास्क त्या वर्गीकरणानें बांधला गेला व त्याला ऋचांचे अनपेक्षित अर्थ करावे लागले. पूर्वपरंपरेला चिकटून राहण्याचा हा परिणाम होय.

ऋचांचे सृष्टिवर्णनपर केलेले अर्थही ओढाताणीचे होत. सूर्यकिरणांनीं पृथ्वीवरील पाण्याची वाफ होऊन तिचे मेघ बनतात व मेघांतून पाऊस पडतो ही गोष्ट ऋचा रचणारांनीं उपमेनें म्हणजे रूपकानें दर्शविली आहे असें नैरुक्तांप्रमाणें यास्काचेंही मत होतें. वृत्र कोण असा प्रश्न विचारून व नैरुक्तांच्या मतें वृत्र म्हणजे मेघ असें सांगून पाणी व वीज ह्यांच्या मिश्रणानें पाऊस पडतो अशी पावसाची उपपत्ति यास्क देतो ( १२५।१२ व २१ ). ऋषींच्या मनांत हा शास्त्रीय अर्थ होता कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं; बहुतकरून इंद्र वृत्र वगैरे खरोखरीच्या व्यक्ति होत्या असेंच त्यांचें मत असण्याचा संभव आहे; पण यास्क व नैरुक्त ह्यांनीं ऋचांतून सृष्टिवर्णनपर अर्थ काढला आहे. यदेदयुक्त हरितः सधस्थात् एथें हरितः = हरणान् आदित्यरश्मीन् (२५७। २७ व २८ ); हरयः सुपर्णाः = हरणाः आदित्यरश्मयः (५७७।९); पण हरित् व हरि ह्यांचा अर्थ घोडा असाच आहे; सूर्यकिरण हा अर्थ अस्वाभाविक दिसतो; जेव्हां तबेल्यांतले घोडे सूर्य रथाला जोडता झाला असा पहिल्या उताऱ्याचा व ज्यांना पंख आहेत असे घोडे असा हरयः सुपर्णाः ह्याचा अर्थ आहे. सुपर्णाः = सुपतनाः आदित्यरश्मयः ( १८८।४ ); पण सुपर्ण म्हणजे ज्यांना पंख आहेत म्हणजे पक्ष्यांप्रमाणें जे हवे तेथें संचार करतात असे देव असा अर्थ असावा; ज्या ठिकाणीं असे देव अमृत पिऊन राहातात तेथें सर्व ब्रह्मांडाचा कर्ता अज्ञानदशेंत असणारा जो मी त्या माझ्यांत शिरला व तसें करून त्यानें मला ज्ञानप्राप्ति करून दिली व अमृताचा भाग मला मिळवून दिला असें कवीस म्हणावयाचें आहे. वयः सुपर्णाः ( २३९।१६ ) ह्या ऋचेंतील वयः = जाणारे सूर्याचे किरण; सुपर्णाः = भराभर धांवणारे; इन्द्रं = आदित्याकडे; मुमुग्धि अस्मान् निधयेव बद्धान् = अंधकाररूपी जाळ्यांत बांधले गेलेल्या आम्हांला अंधकारांतून सोडीव; तसें करून अंधकारानें भरलेले लोकांचे

डोळे अंधकार हाकलून देऊन लोकांना परत दे असे अर्थ यास्कानें केले आहेत; पण हे अर्थ अस्वाभाविक व ओढाताणीचे आहेत.

सप्तयुञ्जन्ति रथमेकचक्रं ( ३२१।११-१२ ) ह्याचा यास्कानें केलेला अर्थ अस्वाभाविक आहे. ऋचा कूटासारखी असल्यानें तिचा खरा अर्थ कळत नाहीं; तथापि तो पुढीलप्रमाणें असावा:- सात अंगिरस एकचाकी रथ जोडतात; सप्त नांवाचा एकच घोडा त्या रथाला ओढून नेतो; त्या रथाच्या चाकाला तीन तुंबे असून तें ( चाक ) कधींही झिजत नाहीं व अडत नाहीं; त्यावर हीं सर्व भुवनें आधारलेलीं आहेत. सूर्यमंडल हा एकचाकी रथ; त्या रथाचा घोडा सप्त किंवा सप्ति; तो एकटा असूनही त्या रथाला ओढून नेतो; तीन ऋतु हे तीन तुंबे; हा रथ जर सतत चालणार नाहीं किंवा मोडून पडेल किंवा रस्त्यांत अडेल तर प्राणी जगणार नाहींत; सर्व प्राण्यांचें आयुष्य व चरितार्थ सूर्याच्या गतीवर अवलंबून आहे. अपोषा अनसः सरत् ( ९४९। ६ ) व एतदस्या अनः शये ( ९५०।१२-१३ ) ह्या ऋचांत इंद्रानें उषेचा रथ मोडून टाकला त्यामुळें भिऊन उषा स्वर्गाकडे पळून गेली असा अर्थ आहे. पण रथ म्हणजे मेघ; इंद्र मेघाला फोडतो तेव्हां त्यांत दडून बसलेली वीज इंद्राला भिऊन निसटून जाते असा अस्वाभाविक अर्थ यास्क करतो; त्याचें कारण ऋचांत सृष्टिवर्णन भरलें आहे अशी नैरुक्तांच्याप्रमाणें त्याची झालेली समजूत होय. अपागूहन् अमृतां मर्त्येभ्यः ( ९७३।२०-२१ ) ह्या ऋचेसंबंधानें यास्क म्हणतो:—मध्यमं च माध्यमिकां च वाचम् इति नैरुक्ताः। यमं च यमीं च इति ऐतिहासिकाः = ह्या ऋचेंत द्वौ मिथुनौ म्हणजे इंद्र ( मध्यमं ) व माध्यमिका वाक् असें नैरुक्त म्हणतात; पण द्वौ मिथुनौ म्हणजे यम व यमी असें इतिहासकार म्हणतात. नैरुक्तांचें मत दुर्गानें पुढील विवरणांत विशद केलें आहे:—सूर्यकिरण मनुष्यांपासून ( मर्त्येभ्यः ) वृषाकपायी-अवस्थेंत असलेल्या उषेला लपविते झाले ( अपागूहन् ) व तिला सूर्यासारखी ( सवर्णा ) करून मग ते तिला विवस्वताला म्हणजे सूर्याला देते झाले; ती उषा अश्विनांचा तो स्तुतिकाल असल्यामुळें त्यांना स्तुतींनीं युक्त करती झाली किंवा तो त्यांना हवि देण्याचा काल असल्याकारणानें ती त्यांना हवींनीं युक्त करती झाली; उषेचें किंवा सरण्यूचें जें रूप होतें तें रूप म्हणजे इंद्र व माध्यमिका वाक् ह्यांचें रूप उषा टाकून देती झाली; म्हणजे जोंपर्यंत उषा अंतरिक्षांत होती तोंपर्यंत तिचीं इंद्र व माध्यमिका वाक् अशीं दोन रूपें होतीं; सूर्यमंडलांत गेल्याबरोबर तिचीं तीं रूपें नाहींशीं झालीं ( ९७३। २९ ते ९७४।५ ). हा अर्थ अगदीं अस्वाभाविक व ओढाताणीचा आहे हें सांगावयाला नको; ऐतिहासिकांनीं केलेलाच अर्थ स्वाभाविक होय.

मनुष्यांत असलेले आई बाप भाऊ बहीण नवरा बायको वगैरे संबंध देवांना लागू नाहींत असें नैरुक्तांप्रमाणें यास्काचेंही मत होतें; त्यामुळें जेथेंजेथें माता पिता भ्राता स्वसा वगैरे शब्द ऋचांत येतात तेथेंतेथें त्या शब्दांच्या व्युत्पत्ति करून त्यांचे निराळे अर्थ केले आहेत. उषेला रुशद्वत्सा म्हणजे सूर्य आहे वत्स जीचा असें म्हटलें आहे

( १३२।८ ); सूर्य उषेचा खरोखरचा वत्स नसतांना तो उषःकालीं पृथिवीवर पडलेलें दंव वाफेच्या रूपानें शोषून घेतो किंव वासरूं जसें गाईबरोबर असतें तसा सूर्य उषे-बरोबर असतो म्हणून लक्षणेनें सूर्य उषेचा वत्स असें म्हटलें आहे. तस्य भ्राता मध्यमः ( ३१८।५ ) एथें भ्राता म्हणजे भाऊ नाहीं; भ्राता भरतेः हरति-कर्मणः। हरते भागम् ( ३१८।७ व १० ); पाण्याचा भाग जो हरण करतो तो भ्राता असा अर्थ आहे. द्यौर्मे पिता (२९५।२ व ३) ह्या ऋचेंत द्यु व पृथिवी खरोखरीचे आई बाप नाहींत; प्राण्यांमध्यें आईबाप हा संबंध तीं दोघें पर्जन्याच्याद्वारें उत्पन्न करतात म्हणून द्यूला बाप व पृथिवीला आई परंपरेनें म्हणजे लक्षणेनें म्हटलें आहे. जार आ भगं ( २०२।१० ) एथें सूर्याला जार म्हटलें आहे; जार म्हणजे रात्रीला म्हातारी करणारा ( रात्रेः जरयिता ) म्हणजे रात्रीचा अंधकार नाहींसा करणारा. जारः अपां ( ४०३।१३ ) = पाणी शोषून टाकणारा ( जरयिता ). हे सर्व अर्थ अस्वाभाविक आहेत. सूर्य उषेचा जार, उषेचा मुलगा असें कवीस म्हणावयाचें आहे. अपां जारः = जलदेवतांचा जार असाच अर्थ आहे; अग्नि जलदेवतांच्या पोटीं येतो असें कवि एके ठिकाणीं म्हणतो तर दुसऱ्या ठिकाणीं तो त्यांचा जार आहे असेंही तो विनोदानें म्हणतो. ऋग्वेदांत इंद्रादि देवांना वृष किंवा वृषभ व देवतांना गौ म्हटलेलें आढळतें; पण नैरुक्तांना देवांना व देवतांना बैल गाय वगैरे म्हणणें पसंत नसल्यामुळें त्यांनीं त्या शब्दांचे व्युत्पत्तीनें निराळे अर्थ केले आहेत; जसें:--वृषा = वर्षिता मध्यमः ( ९४९।११ ); वृषभस्य = वर्षितुः अपां ( ५७१।१२ ).

शासद्वह्निः ( १५७।१७-१८ ) व न जामये ( १६७।३०-३१ ) ह्या ऋचा अगदीं दुर्बोध आहेत; यास्क किंवा तत्कालीन स्मृतिकार ह्यांनीं केलेले अर्थ फारच ओढाताणीचे आहेत; ते अर्थ मनाला मुळींच पटत नाहींत.

## यास्काची भाषा

निरुक्तांतील भाषेंत हलगर्जीपणा बऱ्याच ठिकाणीं दिसून येतो; त्याचें एक कारण प्रचारांतील बोलण्याची पद्धत हें असेल. तेषां मनुष्यवत् देवताभिधानम् ( ७।९ ). स्वाङ्गाभ्युच्चयम् आचष्टे। सांयौगिकानां वा अर्थानाम् ( ८।१२-१४ ). ते चेत् ब्रूयुः ( ५८।२८ ). यथा० शृणोति ( ६१।१४ ). अभिमत्तः एनेन धनं भवति (९३।१५). चर्म च श्लेष्मा च ( ९४।२४ ). स्नाव च श्लेष्मा च ( ९४।३२ ). देवापिः० बभूवतुः ( १०८।१ ). वर्षशीतोष्णैः ( १३७।१७ ). पादेन बद्दल वाचा ( ६१।६ ). प्रविभज्य ( ८३।२४ ). अग्निरिति रूपोपमा ( २०५।५ ). लुप्तोपमानि अर्थोपमानि ( २०९।३२ ). एकार्थम् अनेकशब्दं ( २३४।७ ) व अनेकार्थानि एकशब्दानि ( २३४।१९ ). जामि अतिरेकनाम। बालिशस्य वा ( २९३।११ ). तीव्रार्थतरं व अल्पीयोऽर्थतरं (३१२।२७). पञ्चर्तुतया षळृतुतया पण मासानां (३२४।२०-३०). अपि वा प्रशासनम् एव अभिप्रेतं स्यात् ( ३७०।२१ ). आदिना अभ्यासेन उपहितेन

उपधाम् आदत्ते बभस्तिः अत्तिकर्मा ( ३७५।४ ). अपरे बद्दल अपरम् (३७५।२१ ). ततः इति संताननाम पितुः वा पुत्रस्य वा ( ४४०।५ ). स्थूरः समाश्रितमात्रः महान् भवति ( ४९६।२२ ) व अमत्रः अमात्रः महान् भवति ( ४९८।१२ ). यत्कामः० मन्त्रः भवति ( ५३०।२७–२८ ). मध्यमपुरुषयोगाः त्वम् इत्येतेन च सर्वनाम्ना ( ५३२।२९ ) व उत्तमपुरुषयोगाः अहम् इति च एतेन सर्वनाम्ना ( ५३३।२१ ). स न मन्येत आगन्तून् इव अर्थान् देवतानाम् ( ५३८।३० ). अपि च सत्त्वानां प्रकृतिभूमभिः ऋषयः स्तुवन्ति ( ५३९।२५ ). आकारचिन्तनं देवतानाम् ( ५४२।२८ ). रसादानं रश्मिभिश्च रसधारणम् ( ५५१।१५ ). सूक्तभाजः हविर्भाजः ऋग्भाजश्च भूयिष्ठाः । काश्चित् निपातभाजः ( ५५७।८ ). लुप्तादि बद्दल आदिलुप्तम् ( ८२७।१४ ). एकलिङ्गम् ( १०३७।९ ). एथें हलगर्जीपणा कोणत्या प्रकारचा झाला आहे तें तीं तीं स्थळें पाहिल्यानें लक्ष्यांत येईल.

## वाचोयुक्ति किंवा भाषेचे विशिष्ट प्रयोग

तत् यानि एतानि ( ४।९ ); तत् यत्र उभे ( ४।२० ); तत् यत्र स्वरसंस्कारौ ( ३३।१९ ); तत् यत् द्विवत् ( १४३।११ ). अपि उपमार्थे । अपि कर्मोपसंग्रहार्थे । अपि पदपूरणाः ( १२।३०–३४ ). निपातप्रकरणांतील ( पानें १२ ते १६ ) बरींचशीं उदाहरणें यास्ककालीन संस्कृतांतून घेतलीं आहेत; ते निपातांचे प्रयोग यास्कानंतरच्या संस्कृतांत सांपडत नाहींत. एतानि व इमानि ( ४।९ ); रम्भः पिनाकम् इति दण्डस्य । रम्भः आरभन्ते एनम् । पिनाकं प्रतिपिनष्टि एनेन ( २२७।२ व १३ ); एतानि व तेभ्यः ( ८०१।१५ ) आणि एषाम् इमानि व एभ्यः ( ८०२।२७ ). यथो हि नु वै एतद् ( ३९।४ ) आणि यथो एतत् ( ४०।१० ). न चेत् सुरां पिबन्ति ( ३२।२३ ). सा पृथिव्या संदिह्यते ( १०१।२६ ) व समुद्रः इति एतत् पार्थिवेन समुद्रेण संदिह्यते ( १०७।७ ). तां पप्रच्छ विविदिषाणि त्वा इति ( १०४।३ ) व पुरोहितः ते असानि याजयानि च त्वा ( १०८।२४ ). स शंतनुः कनीयान् अभिषेचयांचक्रे ( १०८।६ ). ज्येष्ठं भ्रातरम् अन्तरित्य अभिषेचितम् ( १०८।१४ ). तस्मात् ते देवो न वर्षति (१०८।१७). शंतनुः देवापिं शिशिक्ष राज्येन ( १०८।१९ ). हिमं पुनः ( ३२३।२३ ), षट् पुनः ( ३२४।२६ ), ऊर्णा पुनः ( ३९६।२७ ), स्वं पुनः ( ४००।६ ). इति उदेषि । इति अस्तम् एषि । इति विपर्येषि ( ५७६।११ ) व इति दहासि । इति वहासि । इति पचसि ( ५६७।१९ ). उपदेशाय ग्लायन्तः ( ६६।१४ ). अनिर्वचनं कपालानि भवन्ति ( ५७९।३१ ). तां० संबभूव ( ९७४।८ ). कालानुवादं परीत्य ( ९८०।१ व २ ). ताद्धितेन कृत्स्नवत् निगमाः भवन्ति ( ९२।२९ ); सरस्वती इत्येतस्य नदीवत् देवतावच्च निगमाः भवन्ति ( १३९।२५ ); द्विवत् व बहुवत् ( १४३।११ ); अश्ववत् व देवतावत् ( १५०।१० );

चेतनावद्भवत् ( ५४३।४ ). ततो नु मध्यमः ( ५६३।४ ) आणि कथं नु अयमेताभ्यां जायते ( ५७४।५ ).

## यास्ककालीन शब्द

निरुक्तांतले कांहीं शब्द तदनंतरच्या संस्कृतांत सांपडत नाहींत ते पुढील-प्रमाणें. बिल्म ( ६६।२४ ). विश्वकद्र ( ८७।१ ). कल्याणवर्ण ( ८९।२५ ). प्रणय ( ११८।२२ व १२०।१८ ). दाक्षिणाजा किंवा दाक्षिणाजी ( १६२।११ ) व दाक्षिणाजाः ( ४५५।१ ). पर्ष ( १८२।१० ). सीमिका ( २२३।२४ ). उपजिघ्री ( २२३।२९ ). प्रजनन ( २२९।८ ). पर्शु ( २४०।२५ ). परिपवन ( २५३।२२ ). शुन्ध्यु ( २७२।३१ ). उपदया ( २७९।१४ ). तुकन ( २८५।५ ). स्पाशन ( ३३८।२६ ). तुद ( ३६०।१ ). ह्वणि ( ३६५।१७ ). पसस् ( ३८७।२० ). वाशिनी किंवा वृद्धवाशिनी ( ३९७।१ ). विजञ्जप किंवा विविजंजप ( ३९८।२ ). आशीर्नामक ( ४०१।४ ). ईर्म ( ४०५।३० ). कोकुवा ( ४०८।५ ). आवह ( ४०८।२४ ). विजामाता व क्रीतापति ( ४५५।१ ). अभ्यमन ( ४६२।१३ ). सृप्र ( ४७७।१८ ). सनन ( ४९२।२९ ). सयन व ततन ( ३९२।५ व ५१०।२१ ). कालकर्णा ( ५१६।१६ ). उपपरीक्षा ( ५३०।२१ ). प्रकीर्तना ( ५४८।२० ). प्रवह्लित ( ५५१।२० ) व प्रवह्लिता ( १०६८।१० ). अथन ( ८८९।१४ ). परितकन ( ९०५।३१ ). तक्म ( ९०५।३२ ). आढ्यालु ( ९८१।३३ ). तूणव ( १०७१।५ ). मात्र ( १०७४।२ ).

## निरुक्तांत विशिष्टार्थी वापरलेले शब्द

इन्द्रियनित्य ( ६।१३ ) व अर्थनित्य ( ७४।१३ ). पदार्थ ( १०।४ व १०।८ ). उपेक्षितव्य ( १२।१७ ). नैरुक्तसमय ( ३३।११ ) व आख्यानसमय ( ५४५।२१ ). शव = गति ( ८२।३२ ). मत्सर = लोभ ( ९३।११ ). विभाग ( १०७।२९ ). आदित्यप्रवादाः स्तुतयः ( ११५।५ ) व आत्मप्रवादाः (१०७१।५). व्रत = अन्न ( ११६।२५ ). युद्धवर्णाः एथें वर्ण = वर्णन ( १२५।२५ ). अभिप्रेत्य (१३३।१०). बहुल (१४२।९ व ५३७।२६). आश्चर्य ( १४२।१२ व ८५५।३४ ). तुष्टाव (१४३।८). गृहाः (१९१।२०) व गृहेषु (६५९।१४). पिनाक (२२८।१२). अकूपार (२७२।२९). प्रेप्सा (५२१।८). संस्तूयते (५५०।१६). संस्तव (५५१।२६). शरीर व शरण ( ५७४।९–१० ). इव = संप्रति ( ५९१।३० ). कशा = वाणी (६८९।३१). वाल = पर्व (९२०।८). संप्रत्यय (१०५२।१). प्रसव (१०५७।७). अभ्यूढ ( १०७७।८ ). प्रवदति (१०८३।५ ). अभ्युक्त ( १५८।३१ ), अभिववाशे ( ६५२।१ ), तदभिवादिनी ( ६५३।३२ व ८०४।५ ) या तीनही ठिकाणीं अभि =

संबंधानें. स्वाङ्ग = शरीराचा भाग ( ८।१२ व २४७।१ ); ह्याच अर्थी स्वाङ्ग शब्द अष्टाध्यायींत आढळतो ( पा० ३।४।५४;३।४।६१;४।१।५४;५।२।६६;६।३।४० ).

लिंगभेदः– द्रोणं ( ४०८।१४ ) व मिथुनौ ( ५८८।२३ ); अमरांत द्रोणः ( २।९।८८ ) व मिथुनं ( २।५।३९ ).

भाषिक (८१।२४ ), भाष्यन्ते = व्युत्पाद्यन्ते ( ८१।२४ ), भाषन्ते (८२।३०), अभिभाषन्ते (८४।१० व ३३०।१), भाष्यते = चालू संस्कृतांत अर्थ होतो (८७।३४), भाष्यते = प्रयुज्यते ( ५२०।२० ). निराहुः ( ९।२९ ), प्राहुः ( १०।८ ), निर्वचनाय ( ६२।१० ), निर्वचन ( ७३।१८ ), निर्ब्रूयात् ( ७३।२८ ), निर्वचनानि ( १०१।३ व १५१।१३ ), निर्वक्तव्यानि ( १०१।६ ), अनिर्वचनं ( ५७९।३१ ), निरुच्यते ( ७४०।३ ), निराह ( १०८०।१९ ); ह्यांपैकीं निराहुः व प्राहुः = स्पष्टपणें सांगतात; निर्वचनाय = विषयाचें स्पष्टीकरण करण्याकरितां; अनिर्वचनं = निर्णायक नाहींत असें; असे ह्या शब्दांचे अर्थ आहेत; बाकीच्यांतील धातूचा अर्थ व्युत्पत्ति करणें असा आहे. वि + आ + ख्या = ( १ ) व्युत्पत्ति करणें, ( २ ) विवरण करणें, ( ३ ) पूर्णपणें सांगणें; पुरोहितः व्याख्यातः ( ५६०।३३ ), भद्रं भगेन व्याख्यातं ( १५१।२ ), उषाः व्याख्याता ( ६१३।३० ), द्यावापृथिव्यौ व्याख्याते ( ७१५।१४ ), स व्याख्यातव्यः ( ३।५ ), शिप्रे इति उपरिष्टात् व्याख्यास्यामः ( २५६।३३ ); ह्या ठिकाणीं पहिला अर्थ; अत्राह गोरमन्वत इति तत् उपरिष्टात् व्याख्यास्यामः ( ९८।१२-१३ ) व तत् यत् द्विवत् उपरिष्टात् तत् व्याख्यास्यामः ( १४३।११ ); ह्या दोन ठिकाणीं दुसरा; तासां भक्तिसाहचर्यं व्याख्यास्यामः ( ५४५।३१ ) एथें तिसरा. इति व्याख्यातं = हे शब्द इतके सोपे आहेत कीं त्यांचें विवरण करण्याची जरूरी नाहीं; जसें अपाहन् वृत्रं परिधिं नदीनाम् इति व्याख्यातम् ( १४६।२९ ) व अन्यम् इच्छस्व सुभगे पतिं मत् इति व्याख्यातम् ( २९४।२१ ); इति सा निगदव्याख्याता ( ५७६।३० ) याचा अर्थ इति व्याख्यातं प्रमाणेंच. निगम =( १ ) वैदिक शब्द ( १।६ ), ( २ ) वेदांतील ऋचा किंवा वेदांतलें उदाहरण ( ८७।२४ ), ( ३ ) प्रयोग ( ९२।२८ ), ( ४ ) रूप ( १५१।१३ व ४०३।१६ ). उपमा = ( १ ) तुलना ( १२।३० ), ( २ ) रूपक ( १२५।२५ ), ( ३ ) उत्प्रेक्षा ( ५५४।३१ ); ( ४ ) उपमार्थे = लक्षणेनें ( ३९९।२४ ) आणि औपमिकं = लाक्षणिक ( २५२।३१ ). भक्तिसाहचर्यं ( ५४५।३१ ) व अग्निभक्तीनि ( ५४६।५ ) एथें भक्ति = त्रांच्यास येणारी वस्तु; पण बहुभक्तिवादीनि ( ५८०।७ ) व भक्तिमात्रं ( ५९८।१६ व ६४१।२० ) एथें भक्ति म्हणजे गौण प्रयोग किंवा लक्षणा. नैघण्टुकं (६८।२ व १४२।१२)=गौण; पण नैघण्टुकानि ( ७१।१२ ) = निघंटूच्या पहिल्या तीन अध्यायांतील शब्द. शास्त्रीय ग्रंथांतल्या शब्दांचा अर्थ एकच असला पाहिजे; पण निर्वचन, व्याख्या, निगम, उपमा, भक्ति व नैघंटुक हे शब्द अनेकार्थी वापरले आहेत. त्याचप्रमाणें स्तुति, मंत्र व ऋक हे शब्द एकार्थीं वापरले आहेत. सस्थानैकत्वं व स्थानैकत्वं

(५४१।१६ व २९) असे दोन्ही शब्द न वापरतां एकच शब्द वापरणें जरूर होतें. हा एक प्रकारचा हलगर्जीपणाच होय.

## विशिष्ट व्याकरणप्रयोग

अप्रथयिष्यत् (३७।१५)=अप्रथयत्; अवक्ष्यत् (३५९।२० व ५७५।२२) =अवोचत्. भूते च (पा० ३।३।४०) ह्या सूत्रानें अप्रथयिष्यत् व अवक्ष्यत् अशीं रूपें भूतकालार्थीं होत असें पाणिनीचेंही मत दिसतें; पण महाभाष्यांत उत किंवा अपि ह्यांपैकीं कोणताही निपात आरंभीं असेल तेव्हांच अशीं रूपें घालावीत असें म्हटलें आहे (कीलहॉर्नची आवृत्ति भाग दुसरा पान १६३।६-८). उपपिपादयिषेत् (८१।८)=उपपादयेत्; मृदूभावकर्मणः (३८६।३) व अणूभावकर्मणः (५१४।२३). अभ्यापादं (५८२।२३). (१) अतिक्रामन्तः (४६४।५) व (२) त्रिधा (१०६३।१८) ह्यांचे पर्याय (१) अतिक्रममाणाः व (२) त्रेधा असे दिले आहेत; क्रामन्तः व त्रिधा हे शब्द यास्ककालीन संस्कृतांत नव्हते असें अनुमान निघतें.

## संक्षेपामुळें दुर्बोध भाषा

पुरुषविद्यानित्यत्वात्। कर्मसम्पत्तिः मन्त्रो वेदे (७।१३) व एकलिङ्गं (१०३७।९). हलगर्जीपणा (१२४२।२३) एथपासून निरुक्तांतील भाषेविषयीं आतांपर्यंत जें लिहिलें आहे त्यावरून निरुक्ताच्या वेळीं संस्कृतभाषा बोलण्याची भाषा होती असेंच सिद्ध होतें. व्यवहारार्थं लोके (७।४) ह्या शब्दांवरून व्यवहाराची संस्कृत भाषा होती असें अनुमान निघतें. यास्काला पाली वगैरे प्राकृत भाषा माहीत होत्या कीं नाहीं तें ठरविण्याला निरुक्तांत आधार सांपडत नाहीं.

## व्याकरणपरिभाषा

प्रदिशन्ति (४।१३ व ८०।१४). कर्म=अर्थ (२१।२४). संविज्ञात (३३।१९) व संविज्ञान (५५८।६). कर्म=क्रियावाचक धातु (३६।२७). कारित (३८।११). शुद्ध (३८।१५). प्रेक्षा (५६।१२-२९). दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या दोन खंडांतील (पानें ७३ ते ८५) स्वर, संस्कार, प्रादेशिक गुण, वृत्ति, वृत्तयः, निवृत्ति, उपधा, लोप, विपर्यय, व्यापत्ति, उपजन, अन्तस्था, प्रकृति, सिद्धाप्रकृति, इतराप्रकृति, निष्पत्ति, कृत्, विकृति, विकार, एकपर्व, अनेकपर्व, तद्धित, समास, नामकरण व अभ्यास. नैघंटुकवृत्त (१४२।१२). पूर्वाप्रकृति (१५१।१३). चर्करीत (१५२। १५). शब्दानुकृति (२१०।२७ व ४०१।४). उपदेश (२३०।४). प्रथमादेश व अन्वादेश (३१२।२१ व २४). वाक्यसंयोग (४२४।१९). चिकीर्षित (४२४।२३). प्रतिवचन (४७२।१२)=antecedent. सिद्धः (५१२।२६). ८०।४ एथें संप्र-

सारणाचें लक्षण दिलें आहे पण संप्रसारण हें नांव घातलें नाहीं.

समासविग्रहः—कल्याणवर्णस्य इव अस्य रूपं कल्याणवर्णरूपः ( ८९।१० ); हिरण्यवर्णस्य इव अस्य रूपं हिरण्यवर्णरूपः ( २०५।५ ); महान् अस्य वधः महावधः ( ७६६।२० ).

## अपाणिनीय रूपें

विनिग्रहार्थीय ( ११।१७ ). प्रतिषेधार्थीय (१३।१५). उपमार्थीय (१३।२७). एवमर्थीयौ (१५३।२४). माध्यमकाः (३४५।१७). कणेघातः व कणेहतः (३६८।१). परिग्रहार्थीयं ( ४०१।११ ). अग्निभक्तीनि ( ५४६।५ ). दार्ष्टिविषयिकं ( ५४६।२६ ). भक्तिसाहचर्यं ( ५४६।३१ ). आग्नापौष्णं ( ५४७।२३ ). अनग्निवैश्वानरीयः ( ५९३।१ ). अहोरात्रे ( ६२६।३३ व ६२७।१ ). समानी ( ७७३।१६ ).

कर्मोपमा (१९९।७), भूतोपमा (२०३।२४), रूपोपमा (२०५।४), सिद्धोपमा ( २०६।२३ ), लुप्तोपमा किंवा अर्थोपमा ( २०९।३२ ) असे उपमेचे पांच प्रकार दिले आहेत; त्यावरून अलंकारशास्त्राला थोडासा आरंभ झाला असावा असें वाटतें. जामि ( ७७२।२३ ) व अभ्यासे भूयांसम् अर्थं मन्यन्ते ( ८४४।१ ) ह्या शब्दांवरून शब्दप्रयोगांविषयीं विशेष खल होत असे असें सिद्ध होतें.

## यास्काचा धातुपाठ

मिष् ( ८८।३ ). स्त्यै ( २२८।९ ). शप् ( २२९।८ ). श्रोण् (२४०।३०). लज्ज् ( २५५।११ ). मथ् ( ३०१।७ ). जस् ( ३०२।१३ ). सस्ज् ( ३३०।२३ ). भद् (३३३।२० ). नद् ( ३३५।४ ). वि + पू ( ३५०।२० ). सप् ( ३८७।२५ ). शुच् ( ४२४।२९ ). सो ( ४५६।२ ). रुच् ( ४६७।२७ ). कण् ( ५१४।२४ ). नु ( ५१५।२१ ). रध् ( ५२३।७ ). स्निह् ( ५५४।२१ ). क्नूय् ( ५५९।२५ ). ईड् ( ५६०।२६ ). नस् ( ५६३।२१ ). धिष् ( ५९९।११ ). पिश् ( ६१८।२२ ). मद् ( ६५२।३२–३३ ). अभि + अश् ( ६५४।२० ). पन् ( ६७१।३२–३३ ). शिज् ( ६७५।१४ ). बन्ध् ( ७३५।२० ). तिज् ( ७४८।२० ). जॄ ( ७५३।२६ ). विष् ( ७५४।४ ). मूळ् ( ७७२।६ ). राध् ( ७८३।५ ). मन् ( ८१६।३ ). वेन् ( ८३२।२ ). चन्द् ( ८६१।१ ). मन्द् ( ८६९।४ ). दाश् ( ९०२।११ ). कु ( ९७७।२० ).

पाणिनीच्या धातुपाठांत नसलेले पण यास्कभाष्यांत असलेले धातुः— नक्ष् ( २२१।१५ ). मेथ् ( २३७।१ व २३८।३० ). पीय् ( ३०९।३४ ). वनु ( ३३२।१ ). गध् ( ३८३।२४ ). लत् ( ४१२।९ ). ओज् ( ४५०।१ ). स्थिर् ( ६६२।३२ ).

ध्वान्तं ध्वस् पासून ( २३९।२८ ) पण पाणिनिसूत्रानें ( ७।२।१८ ) ध्वन् पासून. रम्णाति ह्या रूपावरून रम् यास्ककालीं १ ल्या गणाशिवाय ९ व्या गणांतही होता (७६०।१८); पण पाणिनीय धातुपाठांत तो पहिल्या गणांतच आहे. इष् धातु यास्ककालीं आत्मनेपदी होता असें इषमाणे ( ७१६।१३ ) ह्या रूपावरून दिसतें. मृज् = जाणें ( ६९।२ ); पण मृजू शुद्धौ ( धा० २।५६ ).

## प्रक्षिप्तें

निरुक्ताचा पहिला अध्याय प्रक्षिप्त असावा असें १।२० च्या शेवटीं मी म्हटलें आहे व तसें म्हणण्याची कारणेंही तेथें नमूद केलीं आहेत. निघंटूंतील ऐकपदिक-प्रकरणाच्या प्रत्येक खंडाला निरुक्ताचा एकेक अध्याय दिला आहे; त्याचप्रमाणें दैवत-प्रकरणाच्या सहा खंडांपैकीं प्रत्येकाला उत्तरषट्कांतील एकेक अध्याय दिला आहे; तेव्हां नैघंटुक प्रकरणांतील प्रत्येक अध्यायाला निरुक्ताचा एकेक अध्याय देणें जरूर होतें; तथापि नैघंटुकप्रकरण दोनच अध्यायांमध्यें संपविलें आहे. यास्काच्या मूळच्या निरुक्ता-च्या अध्यायांची बारा संख्या कायम ठेवणें जरूर वाटल्यानें निघंटूच्या दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायांचें निरुक्ताच्या तिसऱ्या अध्यायांत एकीकरण केलें गेलें. वास्तविक निरु-क्ताच्या तिसऱ्या अध्यायाला बहुनामानि उत्तराणि ( १९०।७ ) ह्यानेंच प्रारंभ व्हावयास पाहिजे; तसा प्रारंभ केला नाहीं ह्याचें कारण निरुक्ताला पहिला अध्याय कोणीतरी मागाहून जोडला हें. ज्यानें हा अध्याय जोडला त्यानें यास्काच्या विवरणपद्धतीचें व भाषेचें बऱ्याच अंशानें अनुकरण केलें आहे; अथापि आह अदितिः सर्वमिति । तत् उपरिष्टात् व्याख्यास्यामः ( ४८।३० व ४९।१ ) ह्यानें पहिल्या अध्यायाचा चौथ्या अध्यायाशीं ( ४।२३ पृ. ३०० ) संबंध जोडला आहे; त्याचप्रमाणें अथ निपाताः पुरस्तादेव व्याख्याताः ( ३।१५ पृ. १९८ ) ह्यानें तिसऱ्या अध्यायाचा पहिल्या अध्यायाशीं संबंध जोडला आहे. तथापि पहिल्या अध्यायाच्या विसाव्या खंडांत जी विसंगति आहे ती त्याला दूर करतां आली नाहीं; ह्या विसंगतीवरूनच पहिला अध्याय यास्काचा नव्हे असें मीं अनुमान काढलें आहे. विसाव्या खंडांतील विसंगत मजकूर ह्या प्रक्षिप्त अध्यायांत दुसऱ्या कोणी घुसडला असण्याचाही संभव आहे; कारण निरुक्तांत वेळोंवेळीं प्रक्षिप्तें घातलीं गेलीं हें पुढें दाखविण्यांत येईल. शिवाय सामाम्नायः सामाम्नातः । स व्याख्यातव्यः ( ३।५ ) ह्या शब्दांनीं नैघंटुकप्रकरणांतील प्रत्येक शब्दाचें निर्वचन करावयाचें आहे असें अभिवचन दिलें आहे; परंतु त्या अभिवचनाची पूर्ति निरुक्ताच्या दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायांत व्हावयास पाहिजे होती तशी ती झाली नाहीं; नैघंटुकप्रकरणांतील १३४१ शब्दांपैकीं सुमारें ४०० शब्दांचें निर्वचन केलें आहे व तेंही दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायांत संपविलें नाहीं; बऱ्याचशा शब्दांचें निर्वचन इतर अध्यायांत ठिकठिकाणीं केलें आहे. खंड २।२७ त ( १४९।२३ ) पहिल्या अध्यायांतील अश्व शब्दाची व्युत्पत्ति (३६।८) देऊन

महाशनः भवति ही अधिक व्युत्पत्ति दिली आहे. सत्य शब्दाच्या १।१३ त (२८।११) दिलेल्या व्युत्पत्तीचा निर्देश ३।१३ त (१९२।९) दिलेल्या व्युत्पत्तींत मुळींच नाहीं. १।१३ त (३७।२) पुरुष शब्दाची पुरिशयः एवढीच व्युत्पत्ति दिली आहे. पण २।३ त (८६।२०-२९) आणखी दोन व्युत्पत्ति दिल्या आहेत. १।१२ त (३३।१९) तत् यत्र शब्द आहेत; पण २।१ त(७३।२४) यत्र बद्दल येषु पदेषु असें आहे. यास्कानेंच जर पहिला अध्याय लिहिला असता तर असे फरक त्याच्या हातून झाले नसते. प्रत्येक संस्कृतग्रंथाला अथ शब्दानें आरंभ होतो; तसा आरंभ पहिल्या अध्यायांत केला नाहीं; तो दुसऱ्या अध्यायांत अथ निर्वचनं ह्या शब्दांनीं केला आहे; तेव्हां यास्काच्या निरुक्ताचा आरंभ अथ निर्वचनं ह्या शब्दानींच झाला असें मानणें योग्य दिसतें. निरुक्ताचा १४ वा अध्याय प्रक्षिप्त होय ह्याविषयीं मुळींच वाद नाहीं. दुर्गानें निरुक्ताच्या प्रत्येक अध्यायाचा सारांश दिला आहे; तो सारांश १३ व्या अध्यायापर्यंतच आहे. विद्यापारप्राप्त्युपायोपदेशः मन्त्रार्थनिर्वचनद्वारेण । देवताभिधाननिर्वचनफलं देवतातादात्म्यं ह्या शब्दांनीं १३ व्या अध्यायाच्या शेवटल्या दोन खंडांचा म्हणजे १२ व १३ ह्यांचा सारांश दिला आहे. ह्यावरून ह्या दोन खंडांतील मजकूर १२ व्या अध्यायाच्या शेवटीं घातलेला असावा. देवतांच्या नांवांच्या व्युत्पत्तींपासून लाभ कोणता असा कोणी प्रश्न विचारल्यास तशा व्युत्पत्तींपासून देवतांचें खरें स्वरूप कळतें व तें कळल्यानें व्युत्पत्ति करणारा त्या त्या देवतेशीं तादात्म्य पावतो असें उत्तर दिलें आहे. व्युत्पत्ति करण्यापासून लाभच आहे असें निश्चयानें सांगितलें आहे. १३ व्या अध्यायाच्या ११ खंडांचा किंवा पांच ते आठ हे प्रक्षिप्त खंड वगळल्यास बाकींच्या ७ खंडांचा वरील शब्दांनीं सारांश दिला आहे असें म्हणतां येत नाहीं; कारण त्यांत कोणत्याही देवतेच्या नांवाची व्युत्पत्ति दिली नाहीं. अतिस्तुतिप्रकरण कोणीतरी मागाहून घातलें व त्याच्या शेवटीं १२ व्या अध्यायाच्या शेवटीं असलेला बारा व तेरा या खंडांतील मजकूर ११ व्या खंडाच्या नंतर घातला असावा. ह्या अनुमानाला बळकटी आणण्यास पुढील मजकूर पुरेसा आहे:— तस्य (निघण्टोः) गवाद्या देवपत्न्यन्ता पञ्चाध्यायी सूत्रसंग्रहः। इयं च तस्याः द्वादशाध्यायी भाष्यविस्तरः = गौः पासून देवपत्नीपर्यंतचे पांच अध्याय हे निघंटु होत; ह्या निघंटूंत समाम्नायः समाम्नातः वगैरे सूत्रांचा संग्रह केला आहे; यास्काची द्वादशाध्यायी हें त्या सूत्रसंग्रहावरील विस्तृत भाष्य होय. ह्या शब्दांवरून दुर्गानें यास्काच्या बारा अध्यायांवरच वृत्ति लिहिली असावी. निरुक्ताचा निघंटूशीं निगडित संबंध आहे; निघंटूचा शेवट देवपत्न्यः ह्या शब्दानें केला आहे; अतिस्तुतिप्रकरणाचा निघंटूशीं कांहींएक संबंध नाहीं; त्यामुळें १३ वा अध्याय यास्काचा नसावा असेंच सिद्ध होतें; कारण त्या अध्यायांत कोणत्याही देवतेच्या नांवाचें निर्वचन केलें नाहीं. कदाचित् असेंही म्हणतां येईल कीं देवतेच्या नांवाचें निर्वचन केल्यानें कोणती फलप्राप्ति होते असा प्रश्न यास्कानें विचारलाच नसता; निरुक्तशास्त्राचें समर्थन करणें हें यास्काचें काम नसून

तें पूर्वाचार्यांनींच केलें असलें पाहिजे. निघंटूंतील शब्दांचें निर्वचन करणें आपलें कर्तव्य आहे अशा जाणिवेनें यास्कानें आपला ग्रंथ लिहिला. पहिल्या अध्यायाप्रमाणें १३ वा अध्यायही यास्काचा नव्हे असेंच म्हटलें पाहिजे. तथापि सायणाचार्य आपल्या भाष्यांत १३ व्या अध्यायांतील उतारे घेतात व त्यांच्या आधीं यास्क असें म्हणतो अशी प्रस्तावना जोडतात; तेव्हां १३ वा अध्याय यास्काचाच अशी त्यांची पक्की समजूत होती. १३ व्या अध्यायावरील भाष्याची पद्धत व भाषा आणि आधींच्या अध्यायांवरील भाष्याची पद्धत व भाषा ह्या भिन्न आहेत; १३।१ चें भाषांतर पहा (पृ. १०५२–५३). पूर्वषट्क व उत्तरषट्क हेही शब्द लक्षांत घेतले पाहिजेत; निरुक्ताचे पहिले सहा अध्याय म्हणजे पूर्वषट्क व देवताकांडाचे सहा अध्याय म्हणजे उत्तरषट्क; ह्या उत्तरषट्कांत १३ व्या अध्यायाला कोठेंच जागा नाहीं; तेव्हां १३ वा अध्याय यास्काचा नव्हे असेंच म्हटलें पाहिजे. १३ व्या अध्यायावरील वृत्ति आधींच्या अध्यायाच्या वृत्तीहून बरीचशी निराळी वाटते. २।७ ह्यांतील ऋचेच्या वृत्तीला ता वां वास्तूनीति। दीर्घतमस आर्षम्। वैष्णवी। त्रिष्टुप्। यूपावधाने विनियुक्ता। सोमातिरेकशस्त्रे च असा आरंभ केला आहे; तसा आरंभ आधींच्या बारा अध्यायांतील प्रत्येक ऋचेच्या वृत्तीला केलेला आढळून येतो; पण तसा आरंभ १३ व्या अध्यायाच्या पहिल्या व तेराव्या खंडांतील ऋचांवरील वृत्तींना केला नाहीं. त्या अध्यायांतील पांच ते आठ खंडांवर वृत्ति मुळींच नाहीं; तेव्हां ते प्रक्षिप्त होत हें निर्विवाद आहे. १३ व्या अध्यायावरील वृत्तीची भाषा आधींच्या बारा अध्यायांच्या भाषेहून बरीचशी भिन्न वाटते. १३ व्या अध्यायाच्या शेवटीं इति श्रीमत्० निरुक्तवृत्तौ अष्टादशोऽध्यायः असे नेहमींचे शब्द आहेत; पण तशा शब्दांवर कोणतीही भिस्त ठेवतां येत नाहीं. १४ व्या अध्यायाच्या शेवटीं इति निरुक्ते उत्तरषट्कः समाप्तः असे शब्द आहेत; पण दैवतप्रकरणाचे ६ अध्याय व १३ व १४ असे दोन अध्याय मिळून ८ अध्याय होतात हें लिहिणाराच्या ध्यानांत आलें नाहीं. अध्यायाचे समाप्तिदर्शक शब्द लेखक भरकटीत असतात हें सांगावयास नको. दुर्गवृत्तीच्या निरनिराळ्या पोथ्यांत अध्यायाची समाप्ति बहुतेक एकसारखीच असते; कांहींत ऋज्वर्थायां निरुक्तवृत्तौ हे शब्द जम्बूमार्गाश्रम वगैरेंच्या आधीं तर कांहींत दुर्गस्य कृतौ ह्या शब्दांनंतर घातलेले आढळतात. समाप्तिवाचक शब्दांत निरुक्ताच्या पहिल्या अध्यायाला ६ वा अध्याय, दुसऱ्याला ७ वा वगैरे म्हटलें आहे; म्हणजे ह्या गणतींत निघंटूचे पांच अध्याय समाविष्ट केले आहेत; पण निघंटूवर दुर्गवृत्ति असल्याचें कोणाच्याही ऐकिवांत नाहीं; ह्यावरूनही समाप्तिवाचक शब्द दुर्गानें स्वतः लिहिले नसून दुसऱ्या कोणीतरी म्हणजे लेखकांनीं आपल्या मर्जीप्रमाणें लिहिले असावेत ह्या अनुमानाला बळकटी येते. डॉ० सरूप म्हणतात कीं ७ व्याच्या शेवटीं द्वादशोध्यायः, ८ व्याच्या शेवटीं इति निरुक्तवृत्तौ त्रयो० ध्यायः, ९ व्याच्या शेवटीं ऋज्वर्थायां निरु० समाप्तः, १० व्याच्या शेवटीं ऋज्व० पंचदशोध्यायः समाप्तः, पण ११ व्याच्या शेवटीं ऋज्वर्थायां निरुक्तवृत्तौ जंबूमार्गाश्रमनिवासिन आचार्यभगवद्दुर्गसिंहकृतौ षोडशस्या-

ध्यायस्य चतुर्थः पादः समाप्तः असे शब्द आहेत; त्यावरून अध्याय ७ ते १० ह्यांतील समाप्तिवाचक शब्द दुर्गानें स्वतः लिहिले असावेत व ११ व्याचे समाप्तिवाचक शब्द त्याच्या एखाद्या शिष्यानें लिहिले असावेत; कारण दुर्ग स्वतःला भगवद्दुर्ग असें कधींही म्हणणार नाहीं; दुर्गानें आपली वृत्ति ११ व्या अध्यायापर्यंतच लिहिली व १२ व्याची वृत्ति त्याच्या एखाद्या शिष्यानें लिहिली असें अनुमान निघतें. पण अध्यायाच्या शेवटीं असणाऱ्या समाप्तिलेखांवर मुळींच श्रद्धा ठेवतां येत नाहीं. आनंदाश्रमग्रंथावलींत छापलेल्या निरुक्ताच्या दुर्गवृत्तीच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं भगवद्दुर्ग हे शब्द आहेत; त्यांत ११ व्या अध्यायाची समाप्ति इतर अध्यायांप्रमाणेंच आहे; इतकेंच नव्हे तर १३ व्या अध्यायाच्या शेवटींही तसेच शब्द आहेत. समाप्तिवाचक शब्द बहुतकरून लेखकांचे असतात; निरुक्तवृत्तौ बद्दल निरुक्तटीकायां व निरुक्तपद्धतौ असे शब्द कांहीं पोथ्यांत आहेत; तेव्हां यास्कानें अमक्या अध्यायावर वृत्ति लिहिली व अमक्यावर लिहिली नाहीं असें अनुमान मुळींच काढतां येणार नाहीं. डॉ० सरूप ह्यांच्या एका पोथींत समाप्तिशब्दानंतर स्त्र्यभिलाषे यथा कामी करोत्यंगविचेष्टितम् । स्त्रीसमक्षं तथा कुर्यादयं शृंगारणक्रियाम् असा श्लोक आहे; दुर्ग संन्यासी असल्यामुळें तो असा श्लोक कधींही लिहिणार नाहीं व त्याचा शिष्यही तसें करणार नाहीं म्हणून १२ व्या अध्यायावरील वृत्ति त्याची नसावी असे ते म्हणतात; पण ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं; कारण लेखक पोथ्या लिहूनलिहून अगदीं कंटाळून गेलेले असतात व मान दुखेनोंपर्यंत, डोळे जाईतोंपर्यंत, कंबर मोडेतोंपर्यंत मीं पोथी लिहून काढली असें ते मधूनमधून म्हणतात आणि कधींकधीं वरीलप्रमाणें गंमतही करतात. समाप्तिलेखाशीं ग्रंथकर्त्याचा कांहींएक संबंध नसतो. डॉ० सरूपांनीं दिलेल्या ११ व्या अध्यायाच्या समाप्तिलेखांत ( Introduction to the Nirukta P. 52 ) जंबूमार्गाश्रमनिवासिनः आचार्यभगवद्दुर्गसिंहकृतौ असें अशुद्ध संस्कृत आहे; कारण निवासिनः ह्या विशेषणाला दुर्गसिंहस्य कृतौ असे शब्द पाहिजेत. ज्याचें संस्कृत अर्धवट असतें असाही लेखक समाप्तिलेख लिहितो.

१३ वा अध्याय दुर्गाच्या निरुक्तप्रतींत नव्हता असें म्हणण्याचीं कारणें एथपर्यंत दिलीं आहेत; पण त्या म्हणण्याच्या आड पुढें दिलेला मजकूर येईल असें वाटतें. १३।४ ह्यांतील ऋचेचा नेन्द्रं देवममंसत हा दुसरा पाद निरु० १।४ ( १३।१९ ) एथें आला आहे; नेन्द्रं देवम् आत्मनः दीपयितारम् अमन्यन्त आदित्यरश्मयः । दैवते शेषः असें दुर्ग म्हणतो. ते रश्मयः० नेन्द्रं देवममंसत । तमेव इन्द्रम् आदित्यं येन विसृष्टाः तम् एतम् आत्मनः दीपयितारं न मन्यन्ते असें विवरण १३।४ एथें दुर्ग करतो; दोन्हीं ठिकाणीं दुसऱ्या पादाचा अर्थ बहुतेक त्याच शब्दांत केला आहे; शिवाय दैवते शेषः म्हणजे ऋचेच्या राहिलेल्या तीन पादांचा अर्थ दैवतकांडांत केला आहे असें म्हटलें आहे; त्यावरून १३ वा अध्याय दुर्गाच्या निरुक्तप्रतींत होता असें सिद्ध होतें. द्वादशाध्यायी कोठून सुरू होते हा प्रश्न आहे. ही द्वादशाध्यायी गौः पासून सुरू होते; तेव्हां द्वादशाध्यायीला प्रारंभ दुसऱ्या अध्यायापासून होतो असेंच म्हटलें

पाहिजे. तसें असल्यास १३ वा अध्याय हा द्वादशाध्यायीचा १२ वा अध्याय होईल म्हणजे निघण्टूतील शब्दांचें विवेचन २ ऱ्या अध्यायांत सुरू होऊन तें १३ व्या अध्यायांत संपलें आहे असें म्हटलें पाहिजे. १३ वा अध्याय दुर्गाच्या निरुक्तप्रतींत नव्हता असें सिद्ध करण्याचा ह्याच्या आधीं जो प्रयत्न केला आहे तो फुकट होय असेंच म्हणावें लागतें.

१४ व्या अध्यायावर दुर्गवृत्ति नाहीं त्यावरून त्याच्या निरुक्तप्रतींत तो नसावा असें अनुमान निघतें. स्त्रियः सतीः (१४।२०) ह्यावरील दुर्गाच्या वृत्तीचा (११३३।१२ – १३) त्या खंडांतील भाष्याशीं कोणताही संबंध नाहीं; भाष्यांतील कोणत्याही शब्दाचें विवरण तेथें केलेलें आढळत नाहीं. त्याचप्रमाणें न वि जानामि (१४।२२ पान ११३८।१३ – १४) ह्या ऋचे-वरील भाष्य व दुर्गवृत्ति ह्यांचाही कांहींएक संबंध नाहीं. ह्याच एका गोष्टीनें दुर्गाच्या निरुक्तप्रतींत १४ वा अध्याय नव्हता ह्या विधानाला बळकटी येते. [पश्यदक्षण्वान् न वि चेतदन्धः (३२०।११) व न वि जानामि यदि वेदमस्मि (५३५।२०) ह्या उदाहरणांसंबंधानें वरील दोन ऋचांचीं विवरणें दुर्गवृत्तींत त्यात्या ठिकाणीं दिलीं आहेत]. हा अध्याय गुर्जरप्रतींत व महाराष्ट्रप्रतींत आढळतो. तो अध्याय बहुतेक मोक्षपर आहे. तिसऱ्या खंडांत आत्मविचाराला आरंभ केला आहे; सृष्टीचा उत्पत्तिक्रम व विलयक्रम देऊन (खंड४) शरीर कसें उत्पन्न होतें व शरीराच्या निरनिराळ्या भागांचें वजन काय तें सांगितलें आहे (खंड५व७); तत्संबंधानें अगदीं जुन्या अशा गर्भोपनिषदांतील उतारे देऊन जन्ममरणाच्या परंपरेंत सांपडलेल्या आत्म्याला असह्य क्लेश कसे होतात त्याचें वर्णन केलें आहे(खंड६); नंतर आत्म्याला कर्मफल भोगावें लागतें व कर्मामुळें जन्ममरणाचा फेरा त्याला सुटत नाहीं; ह्यास्तव सुटका करून घेण्याचा मार्ग सांगितला आहे व ती गोष्ट मनांत बिंबविण्याकरितां बृहदारण्यकोपनिषदासारख्या अगदीं पुरातन व हल्लीं उपलब्ध नस-लेल्या उपनिषदांतले उतारे दिले आहेत(खंड८ व ९). नंतर १२ व्या खंडापासून ऋचांचे आदित्यपर व आत्मपर अर्थ केले आहेत व ३७ व्या म्हणजे शेवटल्या खंडाच्या शेवटीं मीं शुक्लब्रह्म व्हावें अशी इच्छा प्रकट केली आहे. ऋचांचे आदित्यपर व आत्मपर अर्थ फारच ओढाताणीचे आहेत; असे अर्थ करण्याकरितां शब्दांच्या पाहिजे तशा व्युत्पत्ति केल्या आहेत; कोठेंकोठें शब्दांचें लिंगवचनही फिरविलें आहे; ह्यामुळें सर्वत्र अस्वाभाविकपणा दिसून येतो; खरा अर्थ कोठेंही दिला नाहीं. ऋचांचा आदित्यपर व आत्मपर अर्थ करण्याचा एक पंथच अस्तित्वांत असावा. सायणाचार्यांनींही ह्यांपैकीं कांहीं ऋचांचे ओढाताणीचे अर्थ केले आहेत व तसें करतांना त्यांनीं शब्दांच्या व्युत्पत्तींचें साहाय्य घेतलें आहे; मतयः = मन्तारः व ऊतयः = धूतयः असे अर्थ केले आहेत. ह्या अध्यायांतील कांहीं खंड (२६, २८, ३१, ३४, ३६ व ३७) प्रक्षिप्त असावेत कारण त्यांचें आदित्यपर किंवा आत्मपर भाष्य दिलें नाहीं; खंड ३१ गुर्जरप्रतींत नाहीं. कांहीं ऋचांच्या पूर्वार्धाचेंच भाष्य दिलें आहे (खंड १४, १६ व २२);

तथापि ऋचांचे उत्तरार्धही पूर्वार्धांना जोडले आहेत. १४ व्या अध्यायाचें भाष्य फारच अशुद्ध आहे; त्यांतल्या त्यांत २९ व्या खंडांतील भाष्य इतकें अशुद्ध व इतकें अप्रस्तुत आहे कीं त्याचा अर्थ करणें अशक्य आहे. ह्या अध्यायाचा पूर्वींच्या अध्यायांशीं संबंध आहे हें दाखविण्याकरितां त्या अध्यायांतील शब्द कांहीं ठिकाणीं घुसडले आहेत; उदा० तेषाम् इष्टानि ह्या नंतरचे वा कान्तानि० एकं भवन्ति ( १३।१।१६ ते १८ व २७ ते ३० ), महते च नो रणाय रमणीयाय दर्शनीयाय (११४७।१६), पाता वा पालयिता वा ( ११५१।१४ ), आपः आप्नोतेः । तासाम् एषा भवति ( ११६३।८-९ ) व मरुतः एनाः वर्धयन्ति ( ११६५।५ ); हे अप्रस्तुत शब्द कोठून घेतले तें त्यात्या ठिकाणीं सांगितलें आहे. ह्या अध्यायांतील ३३ वा खंड अगदीं अप्रस्तुत होय; तो गुर्जर-प्रतींत ७ व्या अध्यायाच्या १९ व २० ह्या दोन खंडांच्या मध्यें दिलेला आढळतो; त्यावर दुर्गाची वृत्ति नाहीं व तो महाराष्ट्रप्रतींतही नाहीं; ह्यावरून तो गुर्जरप्रतींत कोणीतरी घुसडला ह्यांत संशय नाहीं. तथापि जर कोठें तो प्रस्तुत असेल तर तो ७ व्या अध्यायाच्या १९ व २० ह्या खंडांच्या मध्येंच असला पाहिजे; ३३ व्या खंडाच्या शेवटीं तस्य एषा अपरा भवति (११६०।२५) हे शब्द आहेत; पण पुढील म्हणजे ३४ व्या खंडांतील ऋचेची देवता जातवेदस् नसून कोणती तरी एक विशिष्ट नदी आहे. ते शब्द ७।२० ह्या खंडांतील प्र नूनं जातवेदसं ह्या ऋचे-संबंधानें आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं; जातवेदस् संबंधानें दोन ऋचा देण्याचें कांहींएक कारण नाहीं एवढेंच दोषादाखल म्हणतां येईल. तथापि ७ व्या अध्यायांत तो अप्रस्तुत व १४ व्यांत तो प्रस्तुत असें डॉ० सरूप म्हणतात. खंड १०, १८ ते २३ व २५ ह्यांतील ऋचा आणि ३१ व्या खंडांतील ऋचेचा उत्तरार्ध अगदीं दुर्बोध आहेत; अतिशय प्रयत्न करूनही त्यांचा अर्थ करतां येत नाहीं. १४ वा अध्याय यास्काचा नाहीं असें बहुतेकांचें मत आहे; तथापि नारायणदीपिकेंत १३ व्या खंडां-तील ऋचेचें उद्धृत केलेलें भाष्य यास्काचें आहे असें म्हटलें आहे. सायणाचार्यांनीं १४ व्या अध्यायांतील एक ऋचा वगळून बाकींच्या कोणत्याही ऋचेचें भाष्य आपल्या भाष्यांत उद्धृत केलें नाहीं; खंड ३० ह्यांतील द्वा सुपर्णा ह्या ऋचेसंबंधानें अत्र द्वौ द्वौ प्रतिष्ठितौ धर्मकर्तारौ ( ११५६।१६ ); इत्यादि निरुक्ते गतम् अस्य मन्त्रस्य व्याख्यानमनुसंधेयम् असें म्हटलें आहे हे शब्द प्रक्षिप्त असावेत असें म्हणण्याचें कारण १४ व्या अध्यायांतील एवढेच शब्द घेतले आहेत हें. न वि जानामि यदि वेदमस्मि हे शब्द परिदेवनेचें उदाहरण म्हणून यास्क देतो एवढेंच सायणाचार्य म्हणतात; पण खंड २२ तील त्या ऋचेचें भाष्य ते आपल्या भाष्यांत उतारा म्हणून देत नाहींत.

निरुक्तांतले कांही उतारे महाभाष्यांत घेतले आहेत; ते निरुक्तांत पानें ७।२०, ६०-६२ व २५६ एथें दिले आहेत आणि प्रत्येक ठिकाणीं प्रस्तुत निरुक्तांतील यास्काचें भाष्य व महाभाष्यांतलें यास्काचें भाष्य ह्यांची तुलना करून यास्काच्या

प्रस्तुत भाष्यांत बरींचशीं प्रक्षिप्तें घुसडलीं आहेत हें दाखविलें आहे. निरुक्ताच्या ४ थ्या अध्यायांतील खंड ९ व १० महाभाष्यकारानें सोईकरतां एकत्र केले असावेत; त्या उताऱ्यांत निलमात्रतुन्नमिति या ही तितउ शब्दाची तिसरी व्युत्पत्ति व भद्र शब्दाच्या निरनिराळ्या व्युत्पत्ति नाहींत; लक्ष्मी शब्दाची लक्षणात् एवढीच व्युत्पत्ति दिली आहे. हल्लींच्या निरुक्तांत असलेल्या अधिक व्युत्पत्ति महाभाष्यकारानें मुद्दाम गाळल्या असें म्हणण्याचें कांहींएक कारण नाहीं; त्या व्युत्पत्ति महाभाष्यानंतर वेळोवेळीं घातल्या गेल्या ह्यांत संशय नाहीं. महाभाष्यांत आणखीही कांहीं निरुक्तासारखीं वाक्यें सांपडतात; तत्संबंधानें पानांचे आंकडे कीलहॉर्नच्या आवृत्तींतून घेतले आहेत. (१) गौरश्वः पुरुषो हस्ती शकुनिर्मृगो ब्राह्मण इति (भाग १ पृ. १ ओळ ४ व पृ. ५ ओ. २४ ); हल्लींच्या निरुक्तांत गौरश्वः पुरुषो हस्ती इति एवढेंच आहे ( निरुक्त ५।२९ व ३५।३० ). महाभाष्यांतला उतारा हल्लींच्या निरुक्ताहून निराळ्या निरुक्तांतून घेतला असेल किंवा महाभाष्यांत शकुनिः मृगः ब्राह्मणः हे अधिक शब्द घातले असतील.(२)यदधीतमविज्ञातं० न तत् ज्वलति कर्हिचित् हा श्लोक दोन्हीं ठिकाणीं ( भाग १ पा. २।१५ व निरुक्त ५९।२२–२६) सारखाच आहे. (३) एतस्मिन्नतिमहति शब्दस्य प्रयोगविषये ते ते शब्दाः तत्र तत्र नियतविषयाः दृश्यन्ते । तद्यथा । शवतिर्गतिकर्मा कम्बोजेष्वेव भाषितो भवति विकार एनमार्या भाषन्ते शव इति । हम्मतिः सुराष्ट्रेषु । रंहतिः प्राच्यमध्येषु । गमिमेव त्वार्याः प्रयुञ्जते । दातिर्लवनार्थे प्राच्येषु दात्रमुदीच्येषु ( भाग १ पा. ९ ओळी २५–२७ ). अथापि प्रकृतयः एव एकेषु भाष्यन्ते० दात्रम् उदीच्येषु ( निरुक्त पानें ८२–८३ ). महाभाष्यांतील उतारा व निरुक्त ह्यांत बराच फरक आहे; निरुक्तांतला उतारा घेतांना महाभाष्यकारानें आपणहून त्यांत फरक केला असल्याचा संभव आहे; तथापि कंबोज शब्दाची व्युत्पत्ति त्यानें मुद्दाम गाळली असें संभवत नाहीं. हम्मतिः सुराष्ट्रेषु० प्रयुञ्जते हे निरुक्तांत नसलेले शब्द स्वकालीन बोलल्या जाणाऱ्या संस्कृत भाषेच्या अनुरोधानें लिहिले असतील; त्याचप्रमाणें एतस्मिन्नतिमहति० दृश्यन्ते हे शब्द अथापि प्रकृतयः एव एकेषु भाष्यन्ते विकृतयः एकेषु ह्या निरुक्तांतील शब्दांबद्दल प्रस्तावना म्हणून घातले असावेत. ( ४ ) त्वष्टा तूर्णम् अश्नुते इति नैरुक्ताः । त्विषेः वा स्यात् दीप्तिकर्मणः । त्वक्षतेः वा स्यात् करोतिकर्मणः (६२२।२९--३०); ह्या व्युत्पत्तींपैकीं दुसरी व्युत्पत्ति महाभाष्यांत पुढील शब्दांत दिली आहे; त्विषेर्देवतायां तृन् वक्तव्यः अकारश्चोपधायाः अनिट्त्वं चेति त्वष्टा (भाग २ पा. १३१।७).(५) अक्षरं न क्षरति । न क्षीयते वा । अक्षयं भवति । वाचः अक्षः इति वा ( निरु० १०७६।८--९ ) व अथ किमिदमक्षरमिति । अक्षरं न क्षरं विद्यात् । न क्षीयते न क्षरतीति वाक्षरम् ॥ अश्नोतेर्वा सरोऽक्षरम् । अश्नुते इत्यक्षरम् ( भाग १ पा. ३६।५--९ ). यास्कभाष्यांत अश् + सरं = अक्षरं ही महाभाष्यांतील व्युत्पत्ति नाहीं व महाभाष्यांत वाचः अक्षः ही व्युत्पत्ति नाहीं; बाकीच्या अक्षर शब्दाच्या व्युत्पत्ति दोहोंत सारख्या आहेत. पुढील दिलेल्या तीन ऋचांच्या यास्कानें केलेल्या

( ४५१।५–१२ ) एथें देवराज दोन पाठ देतो; पण त्या दोन पाठांत फरक कोणता तें लक्षांत येत नाहीं; पहिल्यांत सामि शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे पण दुसऱ्यांत दिली नाहीं एवढाच काय तो फरक. शेवः इति सुखनाम ( ७७५।२५ ) ह्यांतील शेवः बद्दल शेवं ( ३१८।४ ); शी ( निजणें ) पासून शेव अशी उणादि ( १।१५० ) मधील व्युत्पत्ति देऊन मग निरुक्तामधील व्युत्पत्ति दिली आहे; शेवं असाच शुद्ध पाठ असावा. ग्रावाणः हन्तेर्वा । गृणातेर्वा । गृह्णातेर्वा ( ६५८।२४ ); पण देवराज गृह्णातेर्वा ही व्युत्पत्ति देत नाहीं ( पान ५९ व ६० ). सुप्रवृक्णं ( १७१।३४ ) बद्दल सुप्रवृक्तं ( २०९।९ ). कंतपः वा । कण्टतेर्वा स्यात् गतिकर्मणः ( ७०७।१८ ) बद्दल कंतपः वा । कृन्ततेर्वा । कण्टतेर्वा स्यात् गतिकर्मणः ( २४२।१० ); महाराष्ट्रपाठ देवराजासारखाच आहे. व्रतमिति कर्मनाम वृणोतीति सतः। इदमपीतरद् व्रतमेतस्मादेव वारयतीति सतः असा उतारा देवराजाच्या निघंटूंत आहे ( १६५।६–१२ ). जुन्या महाराष्ट्रप्रतींत व दुर्गाच्या निरुक्तप्रतींत एतस्मादेव व वारयतीति सतः ह्यांच्यामध्यें निवृत्तिकर्म अधिक आहे. हल्लीं प्रचारांत असलेला महाराष्ट्रपाठ पुढीलप्रमाणें आहेः– व्रतमिति कर्मनाम निवृत्तिकर्म वारयतीति सतः । इदमपीतरद् व्रतमेतस्मादेव वृणोतीति सतः (१२४।९-२४). टीकेच्या सोईकरतां क्रमही बदललेला आढळतो; जसें:—पृश्निः आदित्यो भवति । प्राश्नुते एनं वर्णः इति नैरुक्ताः । संस्प्रष्टा रसान् । संस्प्रष्टा भासं ज्योतिषाम् । संस्पृष्टो भासा इति वा असा निरुक्तांत क्रम आहे ( ११७।२४–३४ ); पण पृश्निरादित्यः हे शब्द संस्पृष्टो भासेतिवा ह्यानंतर देवराजाच्या टीकेंत आहेत ( ३७८।४ ).

## देवराजाचा काळ.

डॉ० सरूप म्हणतातः— देवराजाच्या निघंटूवरील टीकेंत स्कंदस्वामीचें नांव वारंवार येतें पण दुर्गाचें एकदांही आलें नाहीं; यावरून देवराजानंतर दुर्ग होऊन गेला असें अनुमान निघतें. पण देवराजाच्या निरुक्त उताऱ्यांत असलेली कृन्ततेर्वा ही कण्टक शब्दाची व्युत्पत्ति दुर्गवृत्तींत नाहीं; त्यावरून दुर्गानंतर देवराज झाला असेंही म्हणतां येईल. ग्रावन् ग्रह् धातूपासून झाला असें सर्व प्रतींत आढळतें; पण गृह्णातेर्वा ही व्युत्पत्ति देवराज देत नाहीं. त्याचप्रमाणें ग्रस्यन्ते अस्मिन् रसाः ही ग्रंस शब्दाची व्युत्पत्ति सर्व पाठांत आहे; पण देवराजाच्या उताऱ्यांत ग्रस्यन्ते बद्दल गृह्यन्ते आहे. अशा भेदांवरून काल विषयीं कांहींच अनुमान काढतां येत नाहीं. देवराजाच्या पुढें असलेल्या निरुक्तप्रतींत हे पाठ होते एवढेंच म्हणतां येतें; त्याच्या प्रतींत भिन्नपाठ असते तर ते त्यानें खात्रीनें दिले असते. देवराज आपल्या टीकेंत स्कंदस्वामीच्या ग्रंथांतील पुढील उतारे देतो. अन्तरिक्षं कस्मात् । अन्तरा मध्ये सर्वभूतानां क्षान्तं शान्तं निष्क्रियं वा शान्तम् अव्यूहं विष्कम्भस्थानात्मकत्वात् । अन्तरा इमे रोदस्यौ क्षियति इति वा । अन्तरा इमे क्षोण्यौ इति वा । शरीरेषु अन्तर् अक्षयम् इति वा । अन्तः शब्दात् पूर्वपदम् । अक्षयशब्दात् उत्तरपदम् । विनाशिषु अपि अविनाशि इत्यर्थः (पृ.२७ओळी८-१४). दुर्गवृत्तिः–

अन्तरा हि इदं द्यावापृथिव्योः अवस्थितं क्षान्तं च भवति । क्षान्तं पृथिव्यन्तम् इत्यर्थः । अथवा । अन्तरा द्यावापृथिव्यौ इमे क्षियति निवसति इति अन्तरिक्षम् । अथवा । शरीरेषु एतदेव अन्तर् मध्ये अवस्थितम् अक्षयम् । इतराणि पृथिव्यादीनि भूतानि क्षीयन्ते तस्मात् अक्षयत्वात् अन्तरिक्षम् ( अध्याय २ खंड १० ). स्कन्दस्वामी अन्तरा इमे इति वा ह्याचे दोन अर्थ करतो; अन्तरा इमे रोदस्यौ क्षियति = ह्या द्यावापृथिवींच्या मध्यें हें राहतें असा पहिला अर्थ; क्ष = क्षियति; अन्तरा इमे क्षोण्यौ = अन्तरिक्षांत ( अन्तरा ) ह्या दोन क्षोणी म्हणजे द्यावापृथिवी असा दुसरा अर्थ; क्ष = क्षोण्यौ. दुर्ग पहिलाच अर्थ देतो. ह्यावरून असें अनुमान निघतें कीं स्कन्दस्वामी दुर्गानंतर होऊन गेला. विपूर्वस्य यातयतेः वा ये प्रत्यये वियातयः इति भवति । तस्य सम्बोधनं वियातय इति । वियातयितर् इति वा पाठान्तरम् असें स्कंदस्वामी म्हणतो ( देवराज २८४ ।२-४ ). वियातयते नानाप्रकारं यातयते यः शत्रून् स वियातः । अथवा । वियातय एवम् उच्यते यः स्तोतृभिः स वियातः ( दुर्गवृत्ति ३।१० ); वियातयितर् हा पाठ दुर्ग देत नाहीं.

## यास्काचें मूळचें निरुक्त व हल्लींचें निरुक्त.

हल्लीं अस्तित्वांत असलेल्या निरुक्ताच्या दोन प्रकारच्या पोथ्या आहेत; ते दोन प्रकार म्हणजे गुर्जर व महाराष्ट्र. दुर्गाच्या वेळचें निरुक्त जरी उपलब्ध नाहीं तरी त्याच्या वृत्तीवरून तें कोणत्या स्थितींत होतें तें ठरविण्याचा प्रयत्न मीं आधीं केलाच आहे. महाभाष्यांत निरुक्तांतले फारच थोडे उतारे दिले असल्याकारणानें त्यावेळीं निरुक्त अमक्या स्थितींत होतें त्याचा तर्क करतां येत नाहीं. त्या उताऱ्यांवरून एवढच अनुमान काढतां येतें कीं, महाभाष्यानंतर वेळोंवेळीं निरुक्तांत पुष्कळ मजकूर घातला गेला. दुर्गाचा काळ क्रिस्ताचें १० वें शतक व हल्लीं प्रचारांत असलेल्या महाराष्ट्रप्रतींचा काळ सन १६०० गृहीत धरल्यास ६०० वर्षांच्या अवधींत दुर्गाच्या निरुक्तांत कितीतरी मजकूर घातला गेला; हा मजकूर एका विशिष्ट व्यक्तीनें घातला नसून पुष्कळांनीं आपापल्या परीनें प्रक्षिप्तें घातलीं असावींत. ६०० वर्षांच्या अवधींत जर इतकीं प्रक्षिप्तें निरुक्तांत घातलीं गेलीं तर महाभाष्यापासून दुर्गापर्यंत म्हणजे सुमारें १२ शतकांत दुप्पट प्रक्षिप्तें घातलीं गेलीं असण्याचा पुष्कळ संभव आहे. महाभाष्याच्या वेळींही नामाख्यातोपसर्गनिपाताश्च ह्या एका उदाहरणावरून निरुक्त ग्रंथ महाभाष्यकालीं मूळ स्थितींत नव्हता असें मीं म्हटलें आहे (१२५५।१६-१७).भारताचें जसें महाभारत कालावधीनें झालें तसें यास्काचें मूळ निरुक्त आरंभीं अगदीं लहान असून मग तें क्रमाक्रमानें विस्तार पावलें व त्या विस्ताराचा कळस महाराष्ट्रप्रतींत झाला. हें जरी खरें आहे तरी मूळ निरुक्त केवढें होतें तें कधींही ठरवितां येणार नाहीं.

## दुर्गाचा काळ.

डॉ. सरूप म्हणतात:-- बॉड्लिअन ( Bodleian ) पुस्तकालयांतील दुर्गवृत्तीच्या एका पोथीवर १३०९ ( इ. स. १३८७ ) शक आहे; तेव्हां दुर्ग शके १३०० च्या आधीं केव्हां तरी होऊन गेला एवढेंच म्हणतां येतें. काल ठरविणें ही गोष्ट हिंदुस्थानांत फारच कठीण आहे; नुसत्या अनुमानानें काल ठरविणें फारच धोक्याचें असतें; ही गोष्ट लक्ष्यांत घेऊन पुढील अनुमान मीं केलें आहे. दुर्गाची निरुक्तप्रत, गुर्जरप्रत व महाराष्ट्रप्रत असा क्रम मीं लाविला आहे; या प्रतींचे काळ कसे ठरवावयाचे हा प्रश्न आहे. दुर्गाच्या निरुक्तप्रतीनंतर १०० वर्षांनीं गुर्जरप्रत अस्तित्वांत आली व गुर्जरप्रतीनंतर १०० वर्षांनीं महाराष्ट्रप्रत अस्तित्वांत आली असें कोणी म्हणेल तर दुसरा १०० च्या ऐवजीं २०० वर्षांचा काल लोटला असें म्हणेल; तिसरा ५० वर्षांचा अवधी पुरा आहे असें विधान ठोकून देईल. तथापि मीं १०० वर्षांचा अवधी धरला आहे. सायणाचार्य इसवी सनाच्या १४ व्या शतकांत होऊन गेले हें सर्वांना मान्य आहे; त्यांनीं आपल्या भाष्यांत घेतलेले उतारे महाराष्ट्रपाठांतले आहेत; तेव्हां महाराष्ट्रपाठ त्यांच्या आधीं निदान १०० वर्षें अस्तित्वांत असला पाहिजे. महाराष्ट्रपाठ गुर्जरपाठाची अतिविस्तृत आवृत्ति होय म्हणजे गुर्जरपाठ महाराष्ट्रपाठाच्या आधीं अस्तित्वांत होता. सायणाचार्यांचा १४ वें शतक हा काल असल्यामुळें महाराष्ट्रपाठ १३ व्या शतकांत व गुर्जरपाठ १२ व्या शतकांत अस्तित्वांत होता असें म्हणणें अगदीं असंभवनीय नाहीं. दुर्गाच्या निरुक्तप्रतींत नसलेले अनेक पाठ गुर्जरप्रतींत आढळतात; इतके पाठ दुर्गाच्या निरुक्तप्रतींत घालण्याला निदान शंभर वर्षें तरी लागलीं असलीं पाहिजेत म्हणजे दुर्ग ११ किंवा १० व्या शतकाच्या आधीं होऊन गेला असें म्हणतां येईल; तो किती आधीं होऊन गेला हें सध्यां ठरवितां येत नाहीं.

## निरुक्तांतील प्रक्षिप्तें.

महाभाष्य, दुर्गवृत्ति, गुर्जरप्रत, सायणाचार्यांनीं आपल्या भाष्यांत दिलेले निरुक्तातले उतारे व महाराष्ट्रप्रत ह्यांचें विवेचन करून यास्काच्या निरुक्तांत किती प्रक्षिप्तें घातलीं गेलीं तें आतांपर्यंत दाखविलें आहे. याशिवाय निरुक्तांत आणखीही प्रक्षिप्तें आहेत असें तर्कानें म्हणतां येतें. तास्त्रिविधा ऋचः एथपासून मन्त्रदृष्टयो भवन्ति ( ५३११२ ते ५३६।९ ) एथपर्यंतचा मजकूर प्रक्षिप्त होय; कारण त्याचा देवतोपपरीक्षेशीं कांहींएक संबंध नाहीं; एथें मंत्राची मुख्य देवता कोण हा विषय नसून कोणत्या अर्थानें भरलेले मंत्र ऋषींस दिसले हा विषय आहे. ७।११ ह्यांतील एतेषु एव स्थानव्यूहेषु ( ५५१।३३ ) एथपासून तों ७।१३ च्या शेवटपर्यंतचा मजकूर निःसंशय प्रक्षिप्त होय; कारण अग्नि, इंद्र व सूर्य ह्यांचे भक्तिसाहचर्य सांगितल्यावर राहिलेला भक्तिशेष म्हणजे राहिलेले ऋतु वगैरे सांगण्याचें कांहींएक प्रयोजन नाहीं; त्याच-

प्रमाणें मंत्र यजुः साम गायत्री वगैरेंच्या व्युत्पत्ति देण्याचें कांहींएक कारण दिसत नाहीं. ७।१० तील अथापि मित्रः वरुणेन० पर्जन्यः (५५०।१६–३१) हाही मजकूर असंबद्ध असल्याकारणानें प्रक्षिप्त वाटतो. ३।१ मधील तद्यथा जनयितुः प्रजा (१५३।२३) एथपासून तों ६ व्या खंडाच्या शेवटपर्यंतचा मजकूर (१६९।२१) प्रक्षिप्त वाटण्याचें कारण त्याचा निरुक्ताच्या उद्देशाशीं कोणताही संबंध दिसत नाहीं; मुलगी बापाच्या मालमत्तेची वारस होते कीं नाहीं हा धर्मशास्त्राचा विषय आहे; त्याचा निरुक्ताच्या प्रदेशांत समावेश केल्यास धर्मशास्त्रांतील राजधर्म वगैरेंचा समावेश करण्यास कोणती हरकत होती ? अथ किं देवताः० तनूनपात्वन्ति (६३९।१५ ते ६४२।१९) आणि खंड ९।५ (पृ. ६४३) हेही भाग प्रक्षिप्त होत. याशिवाय बारीकसारीक प्रक्षिप्तें पुढीलप्रमाणें असावींत. प्र सीमादित्यो (२३।१८) हें सींचें उदाहरण दिल्यावर वि सीमतः (ओळ ३०) हें दुसरें उदाहरण देण्याचें कांहींएक कारण नव्हतें; वि सीमतः एथपासून खंडाच्या शेवटपर्यंतचा मजकूर प्रक्षिप्त असावा. प्रक्षिप्तांतही प्रक्षिप्तें घातलेलीं आढळतात त्याचें उदाहरण ह्याच खंडांत अनर्थकं किंवा पञ्चमीकर्माणं (२४।६ )हें होय. यजुर्वा (५१।१६-२०). १।२० ह्यांतील किञ्चित्पुष्पफला इति वा (६४।४), याज्ञदैवते पुष्पफले दैवताध्यात्मे इति वा (६६।३) आणि वेदं च वेदाङ्गानि च (६६।१८). अक्षरवर्णसामान्यात् ह्यांतील अक्षर (७५।१९). कक्ष्या रज्जुः अश्वस्य० बाहुमूलसामान्यात् अश्वस्य (८४।२३ ते ८६।१). २।५ ह्यांतील पशुनाम नंतरचा इह (९२।१९), इति रथस्तुतौ (९४।३०), इति इषुस्तुतौ (९५।४). तत् एतेन० इत्यपि निगमः भवति (९७।३१ ते ९८।७). यानि तु अस्य पासून खंडाचा शेवट (११३।२९ ते ११६); ह्या प्रक्षिप्तांतील अल्पप्रयोगं तु अस्य० अदितेः पुत्रं (११४।१५), तत् यथा एतत्० अंशस्य इति (११५।७) व इत्यपि निगमो भवति (११५।३२) हींही प्रक्षिप्तें आहेत. अहिवत्तु० ब्राह्मणवादाश्च (१२५।२८). ध्रुवीकरोति (१२९।२). स्त्रीयोनिः० गर्भः (१३०।१४). रुशदिति० ज्वलतिकर्मणः (१३१।३२). उपरमन्ते अस्मिन् अभ्राणि (१३६।११). अपि वा अन्वाप्० यथा प्राचीनम् इति (१३७।३३ व १३८।१). वाक् कस्मात्। वचेः (१३९।२). शब्दवत्यः (१४२।४). यावदभीक्ष्णं० कालः कालयतेः (१४५।६-१७). महाशनः भवति इति वा (१४९।२६). इत्याचक्षते साहचर्यज्ञानाय (१५२।२३). कर्म कस्मात्। क्रियते इति सतः (१५३।३). पुत्रदायाद्ये इत्येके (१५६।५). शरीरं शृणातेः शम्नातेः वा (१६३।१२). महान् नंतरचा बहुः (१८१।३२). अथ निपाताः पुरस्तादेव व्याख्याताः (१९८।१८). स एव भासां (२०२।१५). ब्राह्मणवत्० वृषाशीलः वा (२०६।२३ ते २०७।५). कण्वस्य पुत्रः (२०७।१९). स नः सेवतां यः तुरः (२३१।१३). जघान (२३६।१३), मूषिकाः (२४६।२२), सह (३५३।१७ व ३६७।२६) ह्या प्रत्येकानंतरचा व वयं वगैरे सातही ठिकाणचा इत्यर्थः (४४३-४४५). वेः बहुवचनं (२३९।१६). तत्र ब्रह्म० भवति (२४८।२४). आदित्यात् अश्वः निस्तष्टः (२६६।१५). शुन्ध्यु

( २७२।३१ ) आणि अकूपार, कच्छ व कच्छप ह्या शब्दांच्या व्युत्पत्ति ( २८१-२८३ ). असृगहनी एथील असृक् ( २८७।२८ ). तीव्रार्थतरम् उदात्तम् । अल्पीयोऽर्थतरम् अनुदात्तं ( ३१२।२७ ). सप्त एनम्० अभिसंनामात् ( ३२२।३ ). वारयतेर्वा ( ३२८।१ ). पात्रं पानात् ( ३२९।२७ ). अभ्युदस्यन्तौ इति वा ( ३३१।११ ). अनवगतसंस्कारः० निगमो भवति ( ३३२।१-२ ). पापधियं० पापत्यतेर्वा स्यात् ( ३३२।९ ). पुरुप्रियो० निगमो भवति ( ३३०।२० ). पूजयितव्यं ( ३८०।८ ). वीळयतिः० संप्रयुज्येते ( ३८७।१२ ). पापधियः ( ४०२।१४ ). ईर्मः इति० भवति ( ४०५।२९ ). एवम् अक्षसूक्ते० कृषिप्रशंसा च ( ५३६।३ ). इतरेतरप्रकृतयः ( ५४०।११ ). यज्ञो यजमानस्य ( ५४५।२६ ). स खलु० नीः परः ( ५६०।५ ). जातधनः व जातप्रज्ञानः ( ५६६।२६ ). इतः इमम् आदधाति ( ५७५।२० ). इति शाकपूणिः ( ५८५।२६ ). स्तुवन्ति वर्धयन्ति ( ५९५।१ ). आप्नोतेः हा शब्द व प्रीणातेः नंतरचा वा ( ६०१।१५ ). स्थिरतेः० विपरीतस्य ( ६६२।२१ ). वधकर्मणो वा ( ६७३।१५ ). मुद्गल व भार्म्यश्व ह्यांच्या व्युत्पत्ति ( ६८८।१ व १७ ). ऋजुगामिनी वा ( ६९३।२७ ). विषण्णे इति वा ( ७१६।१९ ). विक्ष्मापयन्ती चरति इति वा (७४९।२७). तीर्णे अन्तरिक्षे० अश्नोतेर्वा (८०९।३२). तथा च० प्रोवाच (८२४।५ ). तस्य० उदाहरिष्यामः ( ८५६।२१ ). चान्द्रं मानम् अस्य इति वा (८६०।२२). तत् एतत्० सूक्तानि भवन्ति ( ८८२।११ ). सप्त अस्मै० अभिसंनामयन्ति ( ८९७।४ ). आशास्तेर्वा ( ८९८।२० ). एनस् व किल्बिषं ह्यांच्या व्युत्पत्ति ( ९०२।८ ). अयमपि० प्रशस्यः भवति (९३२।१). सविता सूर्यो० इति च ब्राह्मणं (९७०।२५). कृकवाकुः सावित्रः० वचेः उत्तरं ( ९७९।३४ ते ९८०।२ ). अन्धो भगः० आदित्यः उदयेन ( ९८३।२०–२३ ). शरणं ( १०४७।३४ ). नानादेवतेषु च मन्त्रेषु ( १०७२।२८ ).

## बृहद्देवता व निरुक्त

देवतानामधेयानि मन्त्रेषु त्रिविधानि तु । सूक्तभाञ्ज्यथवर्भाञ्जि तथा नैपातिकानि तु ( १।१७ ). इति इमाः देवताः अनुक्रान्ताः । सूक्तभाजः हविर्भाजः । ऋग्भाजश्च भूयिष्ठाः । काश्चित् निपातभाजः ( ५५७।२-८ ). ह्या शब्दांचा सारांश वरील श्लोकांत दिला आहे; परंतु त्यांतील कांहीं मुख्य शब्द गाळले आहेत; श्लोकांत निष्काळजीपणा दिसून येतो; सूक्तभाज वगैरे शब्द देवताः ह्या शब्दाचीं विशेषणें आहेत; परंतु सूक्तभाञ्जि वगैरे शब्द नामधेयानि ह्याचीं विशेषणें केलीं आहेत. बृहद्देवता ग्रंथ ज्याला अर्धवट संस्कृत येत होतें त्यानें रचला असावा असें ठिकठिकाणीं प्रत्ययास येतें. ७।१३ हा खंड मूळच्या निरुक्तांत नव्हता असें माझें मत आहे; तो यास्काच्या निरुक्तांत घातला गेल्यानंतर बृहद्देवता ग्रंथ लिहिला गेला. चतुर्भ्य इति तत्राहुः यास्क-

गार्ग्यरथीतराः ( १।२६ ) = नामें चार कर्मांपासून उत्पन्न होतात असें यास्क, गार्ग्य व रथीतर म्हणतात. ह्या विधानाला निरुक्तांत कोणताही आधार नाहीं. नामें आख्यातांपासून उत्पन्न झालीं आहेत असें नैरुक्तांप्रमाणें यास्क म्हणतो ( ३३।१० ). चार क्रियांपासून नामें उत्पन्न होतात ह्याचा अर्थच कळत नाहीं. गार्ग्याचें मत यास्काच्या मताहून भिन्न असूनही बृहद्देवताकारानें त्यांना एका पंक्तीस बसविलें आहे. मन्त्रा नानाप्रकाराः स्युर् दृष्टा ये मन्त्रदर्शिभिः । स्तुत्या चैव विभूत्या च प्रभावाद्देवतात्मनः ॥ स्तुतिः प्रशंसा निन्दा च संशयः परिदेवना। स्पृहाशीः कल्पना याञ्चा प्रश्नः प्रैषः प्रवह्लिका॥ नियोगश्चानुयोगश्च श्लाघा विलपितं च यत् । आचिख्यासाथ संलापः पवित्राख्यानमेव च ॥ आहनस्या नमस्कारः प्रतिराधस्तथैव च । संकल्पश्च प्रलापश्च प्रतिवाक्यं तथैव च ॥ प्रतिषेधोपदेशौ च प्रमादापह्नवौ च ह । उपप्रैषश्च यः प्रोक्तः संज्वरो यश्च विस्मयः ॥ आक्रोशोऽभिष्टवश्चैव क्षेपः शापस्तथैव च । उपसर्गो निपातश्च नाम चाख्यातमित्यपि ॥ भूतं भव्यं भविष्यं च पुमान् स्त्री च नपुंसकम् । एवंप्रकृतयो मन्त्राः सर्ववेदेषु सर्वशः ( १।३४-४० ). ह्या श्लोक-मालिकेंत ऋचा कोणत्या अर्थांनीं भरल्या असतात तें सांगितलें आहे; ह्या अर्थांत स्तुति, प्रशंसा, निंदा, परिदेवना, आशीः, आचिख्यासा व शाप हे शब्द निरुक्त ७।३ (५३४-५३६ ) ह्यांतील स्तुति, आशीः, शपथ, अभिशाप, कस्यचित् भावस्य आचिख्यासा, परिदेवना, निंदा, प्रशंसा ह्यासारखे आहेत; कस्यचिद्भावस्य हे निरुक्तांतले आचिख्यासा ह्याच्या आधींचे शब्द बृहद्देवतेंत नाहींत व अभिशाप बद्दल शाप आहे. संलाप शब्द इन्द्रः वैकुण्ठः । लवसूक्तम् । वागाम्भृणीयम् ह्या निरुक्तांतील शब्दांचा ( ५३३।२४ ) सारांश आहे. बाकीचें भारूड निरुक्तांत नाहीं. शेवटल्या श्लोकांत उपसर्ग, निपात, नाम, आख्यात, भूत, भव्य, भविष्य, पुल्लिंग, स्त्रीलिंग, नपुंसकलिंग हे ऋचांचे विषय होत असें म्हटलें आहे; त्यावरून ग्रंथकार आचरट होता व त्यानें कांहींतरी भरकटलें आहे असें स्पष्ट दिसतें; भव्यं ह्याचा वर्तमानकालीं घडणारें असा अर्थ केला आहे. बरेच श्लोक च वै तु वगैरे निपातांनीं व इतर अनर्थक शब्दांनीं भरले आहेत. बृहद्देवतेंतील हें भारूड यास्काच्या निरुक्तांतून घेतलें नसून दुसऱ्या कोठून तरी घेतलें असावें किंवा ग्रंथकाराच्या सुपीक मेंदूतून तें बाहेर पडलें असावें. श्रद्धेळा पृथिवी तथा (१।११२) एथें निघंटूंतील श्रद्धा व पृथिवी ह्यांच्यामध्यें इळा हें अधिक नांव आहे; तें नांव निरुक्तांत श्रद्धा व पृथिवी ह्यांच्यामध्यें निर्दिष्ट केलें नाहीं. निघण्टु ५।३ या खंडांतील नांवांचा क्रम बृहद्देवतेंत पुष्कळ ठिकाणीं बदलला आहे व इळा ही अधिक देवता घातली आहे. निघंटूचें व निरुक्ताचें मूळस्वरूप ठरविण्याला बृहद्देवताग्रंथाचा कांहींएक उपयोग नाहीं. इन्द्रेण च मरुद्भिश्च सोमेन वरुणेन च । पर्ज्यन्येनर्तुभिश्चैव विष्णुना चास्य संस्तवः ( १।११७ ). निरुक्तांत मरुत् व विष्णु नाहींत ( ५४७।१ ); अग्नि व विष्णु या दोघांना मिळून हवि दिला जातो पण दोघांची स्तुति कोठेंही एकत्र केली नाहीं असें म्हटलें आहे ( ५४७।८ ); तेव्हां विष्णूसह अग्नीची स्तुति केली आहे हें

बृहद्देवतेचें म्हणणें बरोबर नाहीं. १।१९ ह्या सूक्तांतील प्रत्येक ऋचेच्या शेवटीं मरुद्भिरग्न आ गहि असे शब्द आहेत; पण ह्या शब्दांवरून मरुतांसह अग्नीची स्तुति केली आहे असें म्हणतां येत नाहीं. बृहद्देवतेंत श्लोकाची भरती करण्याकरितां हवे ते शब्द घुसडले जातात व कधींकधीं निरुक्तांत असलेले शब्द गाळले जातात. तस्य मुख्यतमौ देवौ अश्विनौ सूर्यमाश्रितौ। वृषाकपायी सूर्योषाः सूर्यस्यैव तु पत्नयः (२।८) = त्याचे म्हणजे सूर्याचे सर्वांत मुख्य असे अश्विन–देव सूर्यावर अवलंबून असतात; वृषाकपायी, सूर्या व उषा ह्या सूर्याच्या बायका होत. द्युलोकांतील देवतांत अश्विन हे पहिले होत असें निरुक्तांत म्हटलें आहे (९५६।३); सूर्याचे सर्व देवांत मुख्य देव व सूर्यावर अवलंबून राहणारे असें म्हटलें नाहीं; त्या शब्दांचा कांहीं अर्थ होत नाहीं. पत्नयः हें अशुद्ध रूप श्लोकाकरितां घातलें आहे; त्याचप्रमाणें त्याच कारणाकरितां २।११ ह्या श्लोकांत देवपत्नयः हें अशुद्ध रूप आहे. पुरोदयात्तामुषसं सूर्यां मध्यंदिने स्थिते (२।९) वृषाकपायीं सूर्यस्य तामेवाहुस्तु निम्रुचि (२।१०) = सूर्योदयाच्या आधीं सूर्याच्या बायकोला उषा म्हणतात; भर दुपारीं तिला सूर्या म्हणतात; सूर्य अस्ताला जातो तेव्हां तिला वृषाकपायी म्हणतात. निरुक्तांत अश्विनांचा काल सांगितला आहे (९५६।७-८ व ९६३।७) पण उषेचा काल सांगितला नाहीं; तथापि अश्विनांना जेव्हां हवि दिला जातो तेव्हां इतर देवतांनाही हवि दिला जातो असें म्हटलें आहे; म्हणजे उषा वगैरे देवतांचा अश्विनांत अंतर्भाव होतो असें सुचविलें आहे; तेव्हां उदयापूर्वीचें सूर्याचें रूप उषा हें म्हणणें बरोबर होय. सूर्याचें सूर्या हें रूप भर दुपारच्या वेळीं असतें व वृषाकपायी हें रूप अस्ताच्या वेळीं असतें हें म्हणणें निरुक्ताला धरून नाहीं; कारण सूर्या व वृषाकपायी हीं सूर्याचीं उदयानंतरचीं रूपें होत असें म्हटलें आहे (९६८।१ व ९७१।६). बृहद्देवतेंतील ही माहिती दुसऱ्या कोणत्यातरी ग्रंथांतून घेतली असावी किंवा बृहद्देवताकाराला यास्काचें म्हणणें समजलें नसावें. श्रद्धां प्रातर्हवामहे श्रद्धां मध्यंदिनं परि। श्रद्धां सूर्यस्य निम्रुचि (१०।१५१।५) ही ऋचा बृहद्देवताकाराच्या पुढें असावी; कारण त्या ऋचेंतील मध्यंदिने हा माध्यंदिनं परि ह्याचा पर्याय श्लोकांत घातला आहे व सूर्यस्य निम्रुचि हे शब्द त्यानें वरील श्लोकांत घातले आहेत. निम्रुच् अर्वाचीन संस्कृतांत नाहीं. बृहद्देवताकार श्लोकाची भरती करण्याकरितां हवे तेथले शब्द घेतो व हवें तें लिहितो. यत्तु प्रच्यावयन्नेति घोषेण महता मृतम्। तेन मृत्युमिमं सन्तं स्तौति मृत्युरिति स्वयम् (२।६०); ह्या श्लोकांत मृतं च्यावयति (८६४।१२) ह्या मृत्यु शब्दाच्या व्युत्पत्तीचा अर्थ दिला आहे व त्याकरितां श्लोकांत बऱ्याच शब्दांची भरती करावी लागली आहे. विष्णातेर्विशतेर्वा स्याद् वेवेष्टेर्व्याप्तिकर्मणः। विष्णुर्निरुच्यते सूर्यः सर्वं सर्वान्तरश्च यः (२।६९). यद् विषितः भवति तद् विष्णुः। विशतेर्वा। व्यश्नोतेर्वा (९९२।३१–३२). वरील श्लोकांतील विष्णातेः ही व्युत्पत्ति निरुक्तांत नाहीं व निरुक्तांतील व्यश्नोतेः ही व्युत्पत्ति तेथें नाहीं. विशेषवाचिनस्त्वन्ये सामान्ये

स्थापिताः क्वचित् । हिमेनाग्निमिति मन्त्रे हिमशब्दो निदर्शनम् (२।११०) = विशिष्टार्थी असलेले शब्द कधींकधीं सामान्यार्थी वापरले असतात; हिमेनाग्निं ह्या ऋचेंतील हिम शब्द ह्या विधानाचें उदाहरण होय निरुक्त ६।३६ त (५२८।२१) हिम शब्दाचा उदक असा अर्थ केला आहे; हीच गोष्ट वरील श्लोकांत सांगितली आहे. पदमेकं समादाय द्विधा कृत्वा निरुक्तवान् । पूरुषादः पदं यास्को वृक्षेवृक्ष इति त्वृचि (२।१११). पूरुषादः ह्या एका पदाचीं पुरुषान् अदनाय अशीं दोन पदें यास्कानें केलीं आहेत असें श्लोकांत म्हटलें आहे; परंतु पुरुषान् अदनाय असा पूरुषादः ह्याचा अर्थ यास्कानें केला आहे (९६।८). श्लोकांत पदं शब्द दोनदां आला आहे; त्यापैकीं दुसरा पदं शब्द, तु हा निपात व समादाय ह्यांतील सम् भरतीकरितां घातले आहेत. अनेकं सत्तथा चान्यद् एकमेव निरुक्तवान् । अरुणो मा सकृन्मन्त्रे मासकृद्विग्रहेण तु (२।११२)= मा व सकृत् अशीं दोन पदें असूनही यास्क मासकृत् असें एकपद करतो. मासानां च अर्धमासानां च कर्ता चन्द्रमाः (३९४।१३–१४) असा मासकृत् शब्दाचा विग्रह केला आहे. पदव्यवायेऽपि पदे एकीकृत्य निरुक्तवान् । गर्भं निधानमित्येते न जामय इति त्वृचि (२।११३) = न जामये ह्या ऋचेंत गर्भं व निधानं ह्या दोन पदांमध्यें सनितुः हें पद आहे; तथापि गर्भं निधानं ह्यांचा गर्भनिधानीं असा यास्क अर्थ करतो (१६८।१२). पदजातिरविज्ञाता त्वःपदेऽथ शितामनि । स्वरानवगमोऽधायि वने नेत्यृचि दर्शितः (२।११४) = त्वः हें पद कोणत्या जातीचें आहे तें माहीत नाहीं; शिताम शब्दाचा अर्थ कळत नाहीं; वने न वायो न्यधायि येथें अधायि ह्या क्रियारूपाचा स्वर कळत नाहीं. ह्या श्लोकांत शिताम (२४१।४) शब्द खेरीज करून यास्काचें म्हणणें बरोबर मांडलें नाहीं. त्व हें अव्यय आहे असें कांहींजण म्हणतात; पण तें नामासारखें चालतें तेव्हां तें अव्यय कसें होईल असा प्रश्न यास्क करतो (२६।२६-३१). वने न वायो न्यधायि चाकन् (५११।२०) एथें वायः हें एक पद आहे कीं दोन पदें आहेत असा प्रश्न आहे; अधायि ह्याच्या स्वरासंबंधानें प्रश्न नाहीं. बृहद्देवताकाराला यास्काचें म्हणणें कळलें नाहीं किंवा त्याला श्लोकांत यास्काचा अर्थ विशद करणारे शब्द घालतां आले नाहींत. श्लोकांत त्व बद्दल त्वः घालण्याचें कारण दीर्घ अक्षर पाहिजे हें; वास्तविक त्वपदे असेंच म्हणावयास पाहिजे होतें. बृहद्देवताकाराला श्लोक रचतां येत नव्हते ह्याचें हें उदाहरण होय. २।११० ते ११४ श्लोकांत बृहद्देवताकार यास्काचें मत खोडून टाकतो असें स्कूल्ड म्हणतो (The Nirukta by Sköld page 98); पण ह्या श्लोकांत यास्काचें मत दिलें आहे, खोडलें नाहीं. बह्वीनां सन्निपातस्तु यस्मिन्मन्त्रे प्रदृश्यते । आचार्यौ यास्कशाण्डिल्यौ वैश्वदेवं तदाहतुः (२।१३२) = ज्या मंत्रांत पुष्कळ देवतांचा समूह दिसतो त्या मंत्राला यास्क व शाण्डिल्य वैश्वदेव म्हणतात. तदाहतुः ह्यांतील तत् शब्दावरून एथें बृहद्देवताकाराला मन्त्रे ह्याबद्दल तृचे म्हणावयाचें होतें; परंतु श्लोकांत तृचे शब्द बसत नाहीं म्हणून मन्त्रे शब्द घालावा लागला. यत्तु किंचिद् बहुदैवतं तद्

वैश्वदेवानां स्थाने युज्यते (१०३७।७) ह्या निरुक्तांतील शब्दांचें वरील श्लोकांत वेडेवांकडें भाषांतर आहे. करूळतीति पूषोक्तोऽदन्तकः स इतिश्रुतेः (४।१३९). निरुक्तांत भगः पुरस्तात्। तस्य अन्वादेशः इत्येकम्। पूषा इति अपरम्। स अदन्तकः (५१९।६-९) असें आहे; पण वरील श्लोकांत भगाचें नांव नाहीं; ह्यावरून भगः० अन्वादेशः हे शब्द प्रक्षिप्त होत असें रोथ म्हणतो; पण निरुक्तांतले पुष्कळ शब्द बृहद्देवतेंत गाळले जातात हें लक्षांत ठेविलें पाहिजे. वायुः शुनः सूर्य एवात्र सीरः शुनासीरौ वायुसूर्यौ वदन्ति। शुनासीरं यास्क इन्द्रं तु मेने सूर्येन्द्रौ तौ मन्यते शाकपूणिः (५।८) = शुन म्हणजे वायु व सीर म्हणजे सूर्य; ह्याप्रमाणें वायु व सूर्य ह्यांना शुनासीरौ म्हणतात; परंतु शुनासीर म्हणजे इंद्र असें यास्काचें मत होतें; शुनासीरौ म्हणजे सूर्य व इंद्र असें शाकपूणि म्हणतो. पण शुन म्हणजे वायु व सीर म्हणजे आदित्य असें निरुक्तांत आहे (७२४।१). निघण्टूंत शुनासीरौ असें रूप आहे व त्याचेंच निर्वचन यास्कानें केलें आहे. बृहद्देवतेंत शुनासीरं असें एकवचनी रूप असून यास्क त्याचा इंद्र असा अर्थ करतो असें म्हटलें आहे; पण यास्क निघण्टूंतील शब्दांचें निर्वचन करीत असल्यामुळें शुनासीर म्हणजे इंद्र असें तो कधींही म्हणणार नाहीं. बृहद्देवतेंतील माहिती कोणत्या ग्रंथांतून घेतली तें सांगतां येत नाहीं. त्या ग्रंथावर विश्वास ठेवणें धोक्याचें आहे. पुरोहितः सन्निज्यार्थं सुदासा सह यन्नृषिः। विपाट्छुतुद्र्योः संभेदं शमित्येते उवाच ह (४।१०६)॥ प्रवादास्तत्र दृश्यन्ते द्विवद्बहुवदेकवत्। अच्छेत्यर्धर्चे पच्छो वा नदीष्वप्येकवान्नि ते (४।१०७). बृहद्देवतेंत विश्वामित्रः सर्वमित्रः० अभिश्रीभावगतिर्वा हे निरुक्तांतले शब्द नाहींत; त्यावरून ते शब्द निरुक्तांत प्रक्षिप्त असावेत असें रोथ म्हणतो; पण बृहद्देवतेंत निरुक्तांतला मजकूर कधीं वाढविला असतो तर कधीं तो कमी केला असतो व केव्हां केव्हां तो गाळलाही असतो; निरुक्तांतले खरे पाठ ठरविण्याला बृहद्देवतेचा आधार मुळींच उपयोगी नाहीं. वरील पहिल्या श्लोकांत इज्यार्थं हा अधिक शब्द असून पैजवनाचें नांव गाळलें आहे; निरुक्तांत गाधाः भवत (१४३।८) असे शब्द आहेत पण वरील श्लोकाच्या दुसऱ्या अर्धांत त्यांच्याबद्दल शं शब्द आहे. निरुक्तांत द्विवत् बहुवत् (१४३।११) एवढेंच आहे पण वरील दुसऱ्या श्लोकांत भरतीकरितां एकवत् हा अधिक शब्द घातला आहे व त्याचें उदाहरण म्हणून दुसऱ्या अर्धांत ३।३३ ह्या सूक्तांतील तिसऱ्या ऋचेचा निर्देश केला आहे. प्रत्युवाचाथ तानग्निः विश्वे देवा यदूच माम्। तत्करिष्ये जुषन्तां तु होत्रं पञ्चजना मम॥ शालामुख्यः प्रणीतश्च पुत्रो गृहपतेश्च यः। उत्तरो दक्षिणश्चाग्निः एते पञ्चजनाः स्मृताः॥ मनुष्याः पितरो देवा गन्धर्वोरगराक्षसाः। गन्धर्वाः पितरो देवा असुरा यक्षराक्षसाः॥ यास्कौपमन्यवावेतान् आहतुः पञ्च वै जनान्। निषादपञ्चमान् वर्णान् मन्यते शाकटायनः॥ ऋत्विजो यजमानं च शाकपूणिस्तु मन्यते। होताध्वर्युस्तथोद्गाता ब्रह्मा चेति वदन्ति तान्॥ चक्षुः श्रोत्रं मनो वाक् च प्राणश्चेत्यात्मवादिनः। गन्धर्वाप्सरसो देवा मनुष्याः पितरस्तथा॥ सर्पाश्च ब्राह्मणे चैव

श्रूयन्ते ह्यैतरेयके। ये चान्ये पृथिवीजाता देवाश्चान्येथ यज्ञियाः॥ आयुरस्तु च मे दीर्घं हवींषि विविधानि च। अरिष्टिः पूर्वजानां च भ्रातृणामध्वरेऽध्वरे (८।६६-७३). श्लोक ६६ नंतर ७२ वगैरे श्लोक घालावयास पाहिजेत; त्या दोहोमधील श्लोक उघड उघड प्रक्षिप्त होत. हे श्लोक प्रक्षिप्त नव्हत असें मानल्यास एक गोष्ट स्पष्ट होते ती ही कीं बृहद्देवताकाराच्या पुढें यास्काच्या निरुक्ताखेरीज दुसरेही ग्रंथ होते. कदाचित् त्याच्यापुढें यास्काचें मूळचें निरुक्त नसून त्यावरील विवरणें असतील; ह्या विवरणांत निरुक्तांत नसलेला पुष्कळ मजकूर त्याला सांपडला असावा. त्याच्यापुढें जर नुसतें निरुक्त असतें तर यास्काच्या नांवावर त्याला सम्मत नव्हतीं अशीं मतें घातलीं गेलीं नसतीं. गंधर्व, पितर, देव, असुर व राक्षस हे पञ्चजन होत असें कांहींजण म्हणतात; पण चार जाति व निषाद असे ते पञ्चजन होत असें औपमन्यव म्हणतो एवढेंच ३।८ त आहे (१७२।१० व ३२); यास्क स्वतःचें मत देत नाहीं. वरील ६९ व्या श्लोकांत निषाद व चारवर्ण पञ्चजन होत असें शाकटायन म्हणतो असें म्हटलें आहे व मनुष्य, पितर, देव, गंधर्व, सर्प व राक्षस किंवा गंधर्व, पितर, देव, असुर, यक्ष व राक्षस हे सहा पञ्चजन होत असें यास्क व औपमन्यव म्हणतात असें ६८ व ६९ श्लोकांत म्हटलें आहे; पण ह्या म्हणण्याला निरुक्तांत आधार मुळींच नाहीं. माझ्या मतें हे सर्व श्लोक प्रक्षिप्त होत. सूर्यः सरति भूतेषु सुवीरयति तानि वा। सु ईर्यत्वाय यात्येषु सर्वकार्याणि संदधत् (७।१२८). सूर्यः सर्तेर्वा। सुवतेर्वा। स्वीर्यतेर्वा (९८४।५) ह्या निरुक्तांतील व्युत्पत्तींचा अर्थ वरील श्लोकांत केला आहे; सुवति = सु + वि + ईरयति = चांगली प्रेरणा देतो. ईर्यत्व अर्वाचीन संस्कृतांत नाहीं; तो स्वीर्यतेः ह्या शब्दांतून निर्माण केला आहे. बृहद्देवताकार शुद्ध अशुद्ध, चांगलें संस्कृत, वाईट संस्कृत ह्याकडे लक्ष देत नाहीं; श्लोक कसे तरी भरून काढणें हा त्याचा मुख्य उद्देश होता. चारु द्रमति वा चायन् चायनीयो द्रमत्युत। चमेः पूर्वं समेतानि निर्मिमीतेऽथ चन्द्रमाः (७।१२९). चन्द्रमाः चायन् द्रमति। चन्द्रः माता। चान्द्रं मानम् अस्य इति वा। चन्द्रः चन्दतेः कान्तिकर्मणः। चारु द्रमति। चिरं द्रमति। चमेर्वा पूर्वम् (८६०।२२-२४). वरील श्लोकांत चारु द्रमति व चायन् द्रमति ह्या दोन व्युत्पत्ति घेतल्या आहेत; चायनीयो द्रमति हे निरुक्तांत नसलेले शब्द भरतीकरितां घातले आहेत; समेतानि निर्मिमीते हे शब्द चन्द्रः माता ह्यांबद्दल आहेत; चमेः पूर्वम् हे शब्द अर्धात्री आहेत; नुसत्या श्लोकावरून त्यांचा कांहीं एक अर्थ होत नाहीं. बृहद्देवताकार पाहिजे तें घेतो व पाहिजे तें गाळतो आणि तसें करून आपला निष्काळजीपणा व दांडगाई प्रकट करतो त्याचें हें उदाहरण होय.

बृहद्देवतेंत व्याकरणाचे नियम मोडल्याचीं उदाहरणें आढळतात; ७।१३० ह्यांत आरोहन्तीं बद्दल आरोहतीं असें अशुद्ध रूप आहे. त्या ग्रंथाला मान कां दिला जातो ह्याचें मला गूढ आहे; त्या ग्रंथांत आधाराबांचून पुष्कळसा मजकूर घातला

आहे; श्लोक हवे तसे रचले आहेत; भरतीकरितां निरर्थक शब्द घातले आहेत त्याप्रमाणें अशुद्धेंही घातलीं आहेत. अशा ग्रंथावर श्रद्धा ठेवणें बरोबर नाहीं असें माझें मत आहे. स्कूल्ड त्या ग्रंथावरून निरुक्तांतील पाठाविषयीं अनुमानें काढतो; पण तशीं अनुमानें काढण्याला तो ग्रंथ मुळींच पात्र नाहीं; कारण त्या ग्रंथांत शेंकडो दोष आहेत. बृहद्देवता ग्रंथ पाणिनीच्या आधीं म्हणजे क्रिस्ताच्या पूर्वी चौथ्या शतकांत रचला गेला असें प्रो० मॅक्डॉनेल म्हणतात.

## दुर्गाची विवरणपद्धति

दुर्गानें आपल्या वृत्तींत निरुक्ताचें विवरण केलें आहे; तें विवरण यास्कभाष्याला बहुतकरून सोडून नसतें; जेथें तें भाष्याहून निराळें आहे असें दिसतें तेथें दुर्गापुढें असलेलें भाष्य हल्लींच्या भाष्याहून निराळें असलें पाहिजे असेंच म्हणणें योग्य होय. उदाहरणार्थ सुदेवो असि (४१२।१९) या ऋचेवरील भाष्य व दुर्गवृत्ति ह्यांत फरक आहे; ह्यावरून दुर्गाचा पाठ निराळा असावा. य ईं चकार ह्या ऋचेचा परिव्राजकांनीं केलेला अर्थ दुर्ग देतो (१०३।२०-२४); तेव्हां त्याच्या निरुक्तप्रतींत तसें यास्कभाष्य असावें. भाष्यांतील शब्द वृत्तींत न घालतां त्यांचें तो विवरण करतो असें मागें सांगितलेंच आहे (१२५५।२९). इत्यपि निगमः भवति हे भाष्यांतले शब्द दुर्गवृत्तींत बहुतकरून आढळत नाहींत; त्या शब्दांच्या आधीं जें उदाहरण दिलेलें असतें तेवढेंच उदाहरण न घेतां तो सबंध ऋचा उदाहृत करून तिचें विवरण करतो. ज्या मंत्रांत केवळ स्तुतीच असते व कामना प्रदर्शित केलेली नसते (अथापि स्तुतिरेव भवति नाशीः) त्यांच्याही विवरणांत कामना प्रदर्शित करावी (तत्र पुनराशीर्योज्या) असें दुर्ग म्हणतो (निरुक्त ७।३); ह्या स्वतः घालून दिलेल्या निर्बंधाला अनुसरून त्यानें दैवतकांडांत ठिकाठिकाणीं इत्येतदाशास्महे हे शब्द घातले आहेत; जसें:-- सुप्रायणाः सुप्रगमनाः भवत इत्येतदाशास्महे (८।१०); स्वदयन्तु स्वादुताम् आपादयन्तु इत्येतदाशास्महे (८।१७); अपसेध अपकालय अपुनरागमनाय अस्मच्छत्रून् इत्येतदाशास्महे (९।१३); शत्रून् अपविध्यताम् इत्येतदाशास्महे (९।४०). रातिः दानम् इह अस्मिन् कर्माणि अस्मान् प्रति अस्तु इत्येतदाशास्महे (१२।१७). ९ व्या व १२ व्या अध्यायांत अशा इच्छा वारंवार प्रदर्शित केल्या आहेत; पण अशा इच्छा पूर्वषट्कांत चारपांच वेळांच प्रदर्शित केल्या आहेत; आशीःयोज्या हे शब्द तीनदां घातले आहेत परंतु इत्येतदाशास्महे हे शब्द एकदांच आले आहेत (निरुक्त ५।२८). कधींकधीं कामनेचा अर्थ ओढून ताणून काढलेला आढळतो. ८।२ मधील ऋचेंत यज्ञेषु देवमीळते असे शब्द आहेत व भाष्यांत ईळते ह्याचे याचन्ति वगैरे पर्याय दिले आहेत (४३५।१); तथापि यं० ऋत्विजः ईळते स देवः० स्वम् अंशं पिबतु इत्येतदाशास्महे अशी इच्छा उत्पन्न केली आहे. देवाः स्वदन्ति आस्वादयन्तु एतानि हवींषि इत्येतदाशास्महे (८।७); एथें

स्वदन्ति चा आस्वादयन्तु हा पर्याय आशा व्यक्त करण्याकारितां मुद्दाम दिला आहे. ९।१८ ह्यांतील ऋचेंत पारयन्ती ज्या शिङ्क्ते असे शब्द आहेत ( ६७५।१०-११ ); तथापि पारयन्ती पारं नयन्ती अस्तु इत्येतदाशास्महे अशी इच्छा प्रदर्शित करण्याकरितां पारयन्ती ह्याचें पारं नयन्ती अस्तु असें वाक्य बनविलें आहे. खंड ९।२९ ह्यांतील ऋचेच्या भाष्यांत या नाहीं; तथापि तें संबंधीसर्वनाम अध्याहृत घेऊन ऋचेचा दुर्गानें अर्थ केला आहे व शेवटीं तूं आम्हांस सुखप्रद हो हे शब्द इच्छा प्रदर्शित करण्याकारितां पदरचे घातले आहेत ( ६९९।३० ).

१।७ ह्यांत ऋचेचा अर्थ दिल्यावर मग अथैकपदनिरुक्तं या शब्दांनीं व्युत्पत्ति देण्याला सुरुवात केली आहे; ही योजना पूर्वषट्कांत १९ वेळां आढळते. १।८ त व्युत्पत्तींच्या आधीं जरी अथैकपदनिरुक्तं हे शब्द नाहींत तरी ऋचेच्या विवरणानंतर व्युत्पत्ति दिल्या आहेत. ९।२६ ह्यांतील भाष्यांत अथैकपदनिरुक्तं हे शब्द आले आहेत; तत्संबंधानें केलेलें विवेचन पहा ( ६९१।२०–२७ व १२१५।१०–१५ ).

८।२।६१ ह्या पाणिनिसूत्रांत सूर्त शब्दाची दिलेली व्युत्पत्ति यास्कानें दिलेल्या व्युत्पत्तीहून निराळी आहे; दुर्गाला अष्टाध्यायी चांगली अवगत होती तथापि तो यास्कानें दिलेल्या व्युत्पत्तीचेंच विवरण करतो. त्याला स्वतःची माहिती बाजूला ठेवावी लागते. प्रवतः निवतः उद्वतः ह्यांच्या व्युत्पत्तीसंबंधानें दुर्ग आश्चर्य प्रदर्शित करतो; तथापि यास्कानें दिलेली व्युत्पत्ति चुकली आहे असें तो म्हणत नाहीं ( ७८२।१०–१२ व १२३७।८–१५ ). ९।२६ ह्यांतील ऋचेंत परुष्ण्या हें पदकारानें एक पद केलें आहे; पण परुष्णि व आ अशीं दोन पदें यास्क करतो व दुर्ग यास्काप्रमाणेंच तीं दोन पदें आहेत असें मानतो; पदकारानें परुष्ण्या हें एक पद केलें आहे असें यास्कभाष्यामुळें त्याला म्हणतां आलें नाहीं. बळित्था पर्वतानां ह्या ११।३७ मधील ऋचेसंबंधानें दुर्ग म्हणतोः— ह्या ऋचेंत पृथिवी मुख्य देवता असून भूमि गौण आहे; पण मैत्रायणीसंहितेंत ही ऋचा याज्या असून तींतील भूमि शब्द प्रधान मानिला आहे; यास्क आपल्या भाष्यांत भूमि शब्द गौण मानतो पण मैत्रायणीसंहितेंत तो प्रधान मानिला आहे; हा विरोध मला दूर करतां येत नाहीं; तें काम बुद्धिमान लोकांचें आहे (९२७।२२-२९). दुर्ग श्रद्धाळू असल्यामुळें मैत्रायणीसंहितेंत ही ऋचा याज्या म्हणून घालावयास नको होती असें त्याला म्हणतां आलें नाहीं; इतका श्रद्धेचा जबरदस्त पगडा होय. अङ्गिरसोऽपि वराहाः उच्यन्ते (३४५।७) ह्या संबंधानें दुर्ग म्हणतोः–– यास्कानें उद्धृत केलेल्या ऋचेंत अंगिरसांचें नांव नाहीं; तें सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत आहे; तेथून तें यास्कानें अध्याहृत घेतलें आहे. अंगिरसांना वराह म्हटलें आहे ह्याचें उदाहरण यास्कानें दिलेली ऋचा होणार नाहीं असें त्याला म्हणतां आलें नाहीं. च्यवनः ऋषिः भवति (२८६।२७) या संबंधानें दुर्ग म्हणतोः– च्यवन हें नांव इतकें प्रसिद्ध आहे कीं, जींत तें नांव आलें आहे अशी ऋचा उदाहृत करण्याची यास्काला आवश्यकता वाटली नाहीं. पण यास्कानें तसें उदाहरण दिलें

नाहीं याचें कारण ऋषिवाचक च्यवन शब्द ऋग्वेदांत नाहीं; ही गोष्ट दुर्गाच्या लक्षांत आली असली पाहिजे; पण यास्काविषयींच्या आदरामुळें ऋग्वेदांत तसें उदाहरण नाहीं असें म्हणण्यास तो धजला नाहीं. दुर्ग निरुक्तांतील सर्व ऋचांचें विवरण करतो; पण ज्या ऋचेंत लोधं शब्द आला आहे त्या ऋचेचें विवरण तो करीत नाहीं; तो म्हणतोः—— यस्मिन्निगमे एष शब्दः सा वसिष्ठद्वेषिणी ऋक्। अहं च कापिष्ठलो वासिष्ठः। अतः तां न निर्ब्रवीमि (२६७।२२-२३); इतका त्याचा गोत्राभिमान होता. अर्वाचीन संस्कृताशीं परिचय असल्यामुळें सुपर्णं वस्ते ह्या ऋचेचा त्यानें भलता अर्थ केला आहे ( ६७८।३२-३३ ).

आ त्वा विशन्त्विन्दवः आगल्दा धमनीनाम् ह्यांतील त्वा बद्दल मूळपाठ मा होता व ते शब्द मानवश्रौतसूत्रांतून यास्कानें गल्दा व धमनी ह्यांचे अर्थ ठरविण्याकरितां उदाहृत केले. हे शब्द कोठून घेतले आहेत हें माहीत नसल्यामुळें कोणीतरी मा बद्दल त्वा शब्द घातला. मानवश्रौतसूत्र चांगलें अवगत असूनही ही गोष्ट दुर्गाच्या लक्षांत आली नाहीं; त्याला ही एखादी ऋचाच आहे असें वाटल्यामुळें राहिलेला भाग शोधून काढा असें त्यानें म्हटलें आहे. हा अशुद्ध पाठाचा परिणाम होय ( ५०१। १५ ते ३३ ). दुर्गाची वृत्ति पिनाकहस्तः कृत्तिवासा अवततधन्वा ह्या मैत्रायणीपाठावर आहे; पण प्रक्षेपकानें त्या पाठाबद्दल अवततधन्वा पिनाकहस्तः कृत्तिवासाः हा तैत्तिरीय पाठ घातला आहे ( २२७।१७-२० ).

## दुर्गानें केलेले ओढाताणीचे अर्थ.

बर्हिः, द्वारः, त्वष्टा व वनस्पति हे शब्द अग्निवाचक होत असें शाकपूणि म्हणतो; तदनुरोधानें ऋचांचें दुर्गानें केलेलें विवरण अगदीं अस्वाभाविक आहे (बर्हिः ६११।२१-३२; द्वारः ६१३।१९-२३; त्वष्टा ६२४।७-१६; वनस्पतिः ६३०।१९ -२३ ). हे अर्थ सिद्ध करण्याकरतां अतिशय ओढाताण करावी लागली आहे. मनुष्य एकदां हट्टाला पेटला म्हणजे तो पाहिजे तें बरळूं लागतो ह्याचें उदाहरण त्या त्या ऋचांचे दुर्गानें शाकपूणीच्या वतीनें केलेलें विवरण होय. य इमा विश्वा भुवनानि जुह्वत् ह्या ऋचेचा दुर्गानें केलेला अर्थ अगदीं अनपेक्षित वाटतो ( ८०४।१२- ८०५।५ ). सरमा म्हणजे देवशुनी एवढेंच यास्क म्हणतो; पण सरमा म्हणजे माध्यमिका वाक् म्हणजे वीज असाही अर्थ आहे असें दुर्ग म्हणतो; किमिच्छन्ती सरमा ह्या ऋचेचें केलेलें विद्युत्पर विवरण इतकें अस्वाभाविक आहे कीं तें वाचतांना नवल वाटतें; असा ओढाताणीचा अर्थ करण्याचें कारण वाक् वै सरमा हें ब्राह्मणवचन होय ( ९०७।१६ ). पावका नः सरस्वती ह्या ऋचेचा स्वाभाविक अर्थ देऊन सरस्वती म्हणजे माध्यमिका वाक् असाही अर्थ आहे असें दुर्ग म्हणतो; त्याकरतां माध्यमिका वाक् पृथ्वीवर पाऊस पाडते ( पावका ) व उदकानें युक्त असते ( वाजेभिर्वाजिनीवती ) असे अस्वाभाविक अर्थ केले आहेत ( ९१०।२१ ). अन्यमू षु ह्या

ऋचेचा विद्युत्पर अर्थ दुर्गानें केला आहे (९२३।२५); तो किती अस्वाभाविक, कृत्रिम व त्याज्य आहे हें तो अर्थ वाचल्याशिवाय लक्षांत येणार नाहीं. यमी म्हणजे उषा असा अर्थ करण्याचें कारण यमी हा शब्द अन्तरिक्षांतील देवतांच्या नामावलींत आला हें होय. उर्वशी म्हणजे वीज असा अर्थ विद्युन्न या पतन्ती ह्या ऋचेंत आहे असें तो म्हणतो (९२५।११–३३); तो अर्थ सिद्ध करण्याकरतां त्याला किती खटपट करावी लागली आहे तें ऋचेचा त्यानें केलेला अर्थ वाचल्याशिवाय कळणार नाहीं. त्वष्टा दुहित्रे ह्या ऋचेचा केलेला दुसरा अर्थ फारच ओढाताणीचा आहे (९७६।५–१२). वराहमिन्द्र एमुषम् ह्या ऋचेचा मैत्रायणीसंहितेंत दिलेल्या कथेच्या अनुरोधानें केलेला अर्थ अगदीं अस्वाभाविक आहे (३४४।४–२१). २।२० ह्यांतील ऋचेंत द्यावा शब्द आहे; द्यावा=द्यावौ=प्रकाशणाऱ्या (उषा व रात्र); उषा प्रकाशते ही गोष्ट सर्वांस ठाऊक आहे पण रात्र कशी प्रकाशेल असें कोणी विचारल्यास दुर्ग पुढील चमत्कारिक उत्तर देतो:—रात्रिरपि स्वेन तमोवीर्येण स्वम् अधिकारं प्रति द्योतते (१३३।१७–२०).

१३।३ व १३।४ ह्यांतील ऋचेच्या भाष्यांत तम् एतद् ब्रूमः आदित्यम् एवढेच शब्द आहेत; पण दुर्गानें सर्व ऋचेचा किरणपर अर्थ केला आहे (१०५५।३० वगैरे). ऋचांतील शब्दांचा सृष्टिवर्णनपर अर्थ करण्यांत दुर्गानें यास्कापुढेंही मजल मारली आहे. १२।३९ ह्यांतील ऋचेच्या भाष्यांत किरणवाची शब्द नाहीं तथापि देव म्हणजे रश्मि असा त्यानें अर्थ केला आहे (१०३३।३२). साध्य म्हणजे ज्यांनीं हें सर्व जग उत्पन्न केलें असे प्राणरूप ऋषि असा अध्यात्मविवरणांतला अर्थ; पण ऋचेचा जेव्हां देवतापर अर्थ करावयाचा तेव्हां साध्य म्हणजे सूर्यकिरण (निरुक्त १२।३९).

६।२८ ह्यांतील वने न वायो न्यधायि चाकन् (५११।२०) ह्यावरील दुर्गवृत्ति सायणाचार्यांनीं आपल्या भाष्यांत घेतली आहे; तथापि दुर्गवृत्तींतून हा उतारा घेतला आहे असें ते म्हणत नाहींत; वास्तविक तसें म्हणणें जरूर होतें. ऋचेचें स्वतःचें विवरण त्यांनीं दिलें नाहीं त्यावरून दुर्गानें केलेला अर्थ त्यांना मान्य होता. त्याचप्रमाणें ६।१२ तील हिनोता नो अध्वरं (४९२।९) ह्यावरील वृत्ति सायणाचार्यांनीं घेतली आहे व शेवटीं एतस्या ऋचो व्याख्यानं निरुक्तटीकाया उद्धृतं असें म्हटलें आहे. दुर्गवृत्तींतील आणखीही १–२ उतारे सायणाचार्यांनीं आपल्या भाष्यांत घेतले आहेत; त्या उताऱ्यांच्या आधीं कश्चिदाह एवढेच शब्द ते घालतात.

दुर्गाचा बहुश्रुतपणा त्याच्या वृत्तींत दिसून येतो. ऋचांचा यज्ञांत विनियोग कसा व कोठें केला आहे तें तो प्रत्येक ऋचेच्या वृत्तीच्या आरंभीं सांगतो; त्याचप्रमाणें ऋचांच्या ऋषि, देवता, छंद वगैरे गोष्टीही वृत्तीच्या आरंभीं तो घालतो. जो ऋत्विजाचें काम करतो किंवा जो शिष्यांना पढवितो त्याला जर ऋचांसंबंधीचें हें ज्ञान नसेल तर तो नरकांत पडतो किंवा मरतो हें ब्राह्मणवचनाचें बंधन त्यानें कोठेंही मोडलें नाहीं. भावप्रधानम् आख्यातम् ह्यांतील भाव शब्दाचें विवेचन करतांना त्यानें आपली अद्वैतमतावर असलेली श्रद्धा दाखविली आहे. पाणिनीची अष्टाध्यायी व महाभाष्य हीं

त्याला उत्तम अवगत होतीं; लोप निवृत्ति वगैरेंचे विवरण करतांना तो पाणिनीचीं सूत्रें उदाहृत करतो. त्याला सर्व वेद, ब्राह्मणें, उपनिषदें, श्रौत व स्मार्त ग्रंथ चांगले माहीत होते. त्यानें बृहद्देवताग्रंथांतून कांहीं उतारे विवरणासाठीं उदाहृत केलेले आढळतात.

डॉ. सरूप म्हणतात कीं ऑफ्रेट ( Aufrecht ) च्या बड्या पुस्तकनामावलींत ( Catalogus Catalogorum Vol. I, p. 217 ) उग्र ह्या टीकाकाराचें नांव आहे; पण नांवाखेरीज दुसरी कोणतीही माहिती कोठेंही उपलब्ध नाहीं.

## निरुक्तावरील महेश्वराची टीका

डॉ० सरूपांनीं निरुक्ताच्या पहिल्या ६ अध्यायांवरील महेश्वराच्या टीकेचे त्रुटित भाग छापले आहेत. बर्बरस्वामी भगवद्दुर्ग वगैरे टीकाकारांनीं निरुक्ताचें विस्तृत व्याख्यान केलें आहे; त्या व्याख्यानाचे कांहीं भाग विद्यार्थ्यांच्या सोईकरितां मीं जास्त स्पष्ट करीत आहें असें महेश्वर म्हणतो. महेश्वरानें स्कंदस्वामीच्या भाष्यावर टीका लिहिली असावी असें डॉ० सरूप म्हणतात; परंतु महेश्वर स्वत: तसें म्हणत नाहीं. महेश्वराच्या टीकेंत विशेष ध्यानांत घेण्याजोग्या गोष्टी फारच थोड्या आहेत. ऋचांचा सृष्टिवर्णनपर अर्थ करण्यांत दुर्गानें यास्कावर ताण केली आहे असें मीं दुर्गवृत्ती-संबंधानें लिहितांना म्हटलें आहे (१२८९।१५); महेश्वर या बाबतींत दुर्गावरही कधींकधीं ताण करतो. आर्ष्टिषेणो होत्र ( १०९।४ ) व यद्देवापि: ( ११२।४ ) ह्या दोन ऋचांत विद्युत्पर अर्थ आहे असें तो म्हणतो; पण ह्या अर्थाचा वासही दुर्गादिकांनां आला नव्हता. ह्या दोन ऋचांतून विद्युत्पर अर्थ काढणें ह्यापेक्षां जास्त अस्वाभाविकपणा कोणता असणार ! महेश्वर पुष्कळ ठिकाणीं दुर्गवृत्तींतले उतारे देतो; बर्बरस्वामीच्या टीकेंतले उतारे त्यानें दिले आहेत कीं नाहींत तें सांगतां येत नाहीं. निर्वचन ( ७३।१८ ) शब्दाचा तो पुढीलप्रमाणें अर्थ करतो:—सर्वशब्दस्य अवयवश: निष्कृष्टस्य वचनं = सबंध शब्दाचे तुकडे करून मग काढलेला त्या शब्दाचा अर्थ; किंवा, अविनष्टरूपस्य वा विनष्टरूपस्य वा (शब्दस्य) यत् अर्थस्य वचनं तत् निर्वचनं = धातूचें रूप ज्यांत अगदीं नाहींसें झालें नाहीं अशा शब्दाचे तुकडे पाडून अर्थ करणें किंवा धातुरूप ज्यांत अगदीं नष्ट झालें आहे अशा शब्दाचे तुकडे पाडून अर्थ करणें असा निर्वचन शब्दाचा अर्थ होईल. अपिहितस्य अर्थस्य परोक्षवृत्तौ अतिपरोक्षवृत्तौ वा शब्दे निष्कृष्य विगृह्य वचनं असा निर्वचन शब्दाचा दुर्ग अर्थ करतो; महेश्वरानें परोक्षवृत्तौ शब्दे ह्याचा अविनष्टरूपस्य व अतिपरोक्षवृत्तौ शब्दे ह्याचा विनष्टरूपस्य असा अर्थ केला आहे. ह्याप्रमाणें दुर्गवृत्तींतल्या कठीण शब्दांचा अर्थ महेश्वर देतो. रश्मि: यमनात् ( १२१।४ ) = यम् ( = ओढून धरणें ) पासून रश्मि; लगाम घोड्यांनां ओढून धरतो म्हणून त्याला रश्मि म्हणतात; पण यमनात् ही व्युत्पत्ति नसून तो रश्मि शब्दाचा अर्थ आहे व रश्मि शब्दांत रश्-

धातु आहे असें महेश्वर म्हणतो. परंतु धातुपाठांत रश् नाहीं; अश् पासून रश्मि असें उणादींत म्हटलें आहे (४।४७). ३।१७ (पान २०८) ह्यांतील अत्रि वगैरे शब्दांच्या व्युत्पत्तींसंबंधानें महेश्वर पुढील श्लोक देतो:- यज्ञे देवस्य वितते महतो वरुणस्य हि । ब्रह्मणोऽप्सरसं दृष्ट्वा रेतश्चस्कन्द कर्हिचित् ॥ तत्परीक्ष्य सवर्णो न स जुहाव विभावसौ । ततोऽर्चिषोऽभूत् भगवान् भृगुरङ्गारतोऽङ्गिराः ॥ अत्रैवान्वेषणादत्रिः खननाद्विखनो मुनिः । इत्थं प्रजापतेर्जाताः पुराणाः ऋषिसत्तमाः. लुप्ता उपमा येषु तानि पदानि वाक्यानि । अर्थवद्वाक्यसामर्थ्यात् असति उपमाशब्देऽपि येषु उपमा प्रतीयते तानि अर्थोपमानि । अथवा । अर्थे एव उपमा येषु तानि अर्थोपमानि; एथें पदानि वाक्यानि हे शब्द अध्याहृत घेतले आहेत; सिंहः हें पद होय; एकाद्या वीरपुरुषाला सिंह म्हणणें ही उपमा किंवा अलंकारशास्त्रांत अतिशयोक्ति होईल; सिंह लढत आहे ह्याचा सिंहासारखा शूरपुरुष लढत आहे असा अर्थ आहे. तेव्हां लुप्तोपम पद असेल किंवा वाक्य असेल. सिंह ह्याचा संदर्भानें अर्थ केल्यावर त्यांत उपमा आहे असें लक्ष्यांत येतें. महेश्वरानें लुप्तोपमानि अर्थोपमानि (२०९।३२) ह्याचें केलेलें हें विवरण बरोबर दिसतें.

## यास्कभाष्यांत निर्दिष्ट केलेल्या व्यक्ति व व्यक्तिसमूह.

यास्कभाष्यांत सतरा व्यक्तींची नांवें आलेलीं असून सहा व्यक्तिसमूह निर्दिष्ट केले आहेत. नैरुक्तांचीं तेवीस मतें दिलीं असून त्यांपैकीं अकरा व्युत्पत्तीसंबंधाचीं आहेत. नैरुक्तांना पापाची फार किळस होती हें स्तेन वगैरे शब्दांच्या त्यांनीं केलेल्या व्युत्पत्तींवरून स्पष्ट दिसतें. धातूंपासून नामें झालीं हा त्यांचा सिद्धांत होता व त्या सिद्धांताचा अम्मल आजपर्यंत चालू राहिला आहे. त्यांना असंख्य देवता मान्य नसून तीनच देवता मान्य होत्या व इतर देवता ह्या तिहींचीं निरनिराळ्या कारणानें उत्पन्न झालेलीं नांवें होत असें त्यांचें मत होतें (५४०।२१). वृत्र व इंद्र ह्या व्यक्ति नसून सृष्टींत घडणाऱ्या हालचाली होत असें ते म्हणत; वृत्र म्हणजे मेघ; वृत्राशीं इंद्र युद्ध करतो हें पावसावर रूपक होय (१२५।१२-२५). तीस तळीं म्हणजे कृष्णपक्षाचे व शुक्लपक्षाचे प्रत्येकीं तीस अहोरात्र; देव कृष्णपक्षाचे तीस अहोरात्र म्हणजे चंद्राचे तीस किरण पितात व शुक्लपक्षांत ते तीस अहोरात्र म्हणजे तीस किरण चंद्राला परत देतात असा 'अपिबत् साकं सरांसि त्रिंशतं' ह्या ऋचेचा ते अर्थ करतात (३६९।११-३०). य ई चकार ह्या ऋचेंत पाऊस कसा उत्पन्न होतो व पडतो ह्याचें वर्णन केलें आहे असें ते म्हणतात (१०२।७); प्रजोत्पत्तीनें संसारी मनुष्य गांजून जातो असा त्या ऋचेचा परिव्राजक अर्थ करतात तो त्यांना मान्य नाहीं. इतके सृष्टिवादी असूनही देवता तीन, अनुमति राका सिनीवाली व कुहू ह्या देवांच्या बायका होत (९१५।२५ व ९१९।२५), अंगिरस् हे अंतरिक्षांतील (८९२।८) व साध्य द्युलोकांतील देवगण असें त्यांनीं म्हणावें ह्याचें नवल वाटतें.

देवतांच्या नांवांचाही त्यांनीं सृष्टिपर अर्थ करावयास पाहिजे होता. सरण्यू दोन जुळ्यांना जन्म देऊन पळून जाते ह्याचा पर्जन्य व वीज आकाशांत उत्पन्न होतात ( ९७३।२३ ) असा खरा अर्थ आहे असें ते म्हणतात; तेव्हां सर्व देवता ह्या सृष्टींतील नाना प्रकारच्या हालचाली होत असें म्हणण्यास कोणती हरकत होती? देवतांच्या नांवांची अशाच प्रकारानें त्यांनीं निरुक्ति करावयास पाहिजे होती; तशी त्यांनीं केली नाहीं यावरून ते अर्धवट नैरुक्त होते असें म्हणावें लागतें. नैदानांच्या नांवावर स्याल ( ४५६।१ ) व साम ( ५५४।३ ) शब्दांच्या व्युत्पत्ति दिल्या आहेत; परंतु ऋचांचें निदान म्हणजे ऋषींना ऋचा दिसण्याचें कारण जे सांगतात ते नैदान असा त्या शब्दाचा अर्थ आहे. हा हवि इंद्राला द्यावयाचा असें म्हणून अगस्त्य तो हवि इंद्राला न देतां मरुतांना देता झाला; त्यामुळें इंद्र अगस्त्यापुढें जाऊन रडूं लागला ( १९।१३ ) ही गोष्ट १।६ तील ऋचेचें निदान म्हणून दिली आहे; तसें निदान वरील दोन व्युत्पत्तींत नाहीं ह्यावरून नैदानाः बद्दल नैरुक्ताः असा मूळ पाठ असावा असें वाटतें. ऐतिहासिक म्हणजे जें काय घडलें असेल तें कथन करणारे; वृत्र इंद्रावर सूड उगविण्याकरितां त्वष्ट्यानें उत्पन्न केलेला असुर होय असें ऐतिहासिक म्हणतात ( १२५।१४ ). यम आणि यमी हीं दोन जुळीं होत असें नैरुक्तांच्या उलट ते म्हणतात ( ९७४।५ ). ऋग्वेदांत जें कांहीं सांगितलें आहे तें सर्व खरोखरी घडलेल्या गोष्टींचें वर्णन होय असें त्यांचें मत होतें व सूक्तें रचणाऱ्यांचेंही तेंच मत असलें पाहिजे; ऋचांत वर्णिलेल्या गोष्टी रूपकें होत असें त्यांचें मत असण्याचा मुळींच संभव नाहीं. नैरुक्त तीन देव मानणारे होते पण देवतांचीं जीं जीं नांवें ऋचांतून आढळतात तीं तीन देवतांचीं नांवें नसून निरनिराळ्या देवतांचीं नांवें होत असें याज्ञिकांचें मत होतें ( ५४१।१० ). तीस तळीं म्हणजे माध्यंदिन सवनांत सोमरसानें भरलेलीं तीस पात्रें असें ते म्हणतात ( ३६८।२८ ). इंद्र खरोखरचा देव असून तो मनुष्यांप्रमाणें खातो पितो असेंच त्यांचें मत होतें. वैश्वानर हा वैद्युताग्नि होय असें आचार्य म्हणजे निरुक्तकार म्हणतात ( ५७०।५ ); पण पुरातनकालचे याज्ञिक वैश्वानर म्हणजे आदित्य असें म्हणतात ( ५७०।३२ ) व तसें म्हणण्याचीं कारणेंही देतात ( ५७१।२–५७३।२७ ). हीं कारणें शाकपूणि खोडून टाकतो ( ५७३।३४ -५८०।३३–३४ ) व वैश्वानर म्हणजे अग्नि असें खंड ( २५-३१ ) ह्यांतील ऋचांच्या विवरणानें सिद्ध करतो ( ५८१-५९३ ). द्रविणोदस् म्हणजे इंद्र असें कारणें देऊन क्रौष्टुकि सिद्ध करण्याचा प्रयत्न करतो ( ५९५।२६-५९७ ४ ); पण द्रविणोदस् म्हणजे अग्नि असें क्रौष्टुकीचीं प्रमाणें खोडून शाकपूणि सिद्ध करतो ( ५९७।८-६०० ). आप्रीसूक्तांच्या सर्व देवता अग्नि नव्हत असें कात्थक्याप्रमाणें कोणीही म्हणेल; परंतु शाकपूणि दुराग्रही असल्यामुळें आप्रीसूक्तांची देवता अग्नीच होय असें म्हणतो ( ६०१-६४१ ) व यास्क त्याच्या म्हणण्याला दुजोरा देतो ( ६४१।२१ ). सबंध ऋग्वेदांत वैश्वदेव तृच एकच आहे; तथापि वैश्व-

देव तृचांची यज्ञांत वारंवार गरज लागते तेव्हां ज्यांत पुष्कळ देवता आहेत अशा तृचांचा वैश्वदेव तृचा म्हणून विनियोग करावा असें याज्ञिकांनीं ठरविलें व यास्कही त्याच मताचा होता; पण ज्या तृचांत विश्व हें विशेषण असेल त्याच तृचांचा विनियोग केला पाहिजे असें शाकपूणि म्हणाला; ह्यावरूनही तो दुराग्रही होता हें स्पष्ट होतें. तडित् म्हणजे जवळ हा निघंटूंत दिलेला अर्थ यास्काला मान्य होता पण तडित् म्हणजे वीज असें शाकपूणीनें मत दिलें ( १८६।१२ ); हें त्याचें म्हणणें जरी खरें आहे तरी त्यावरूनही त्याचा स्वतंत्रपणा व स्वाभिमान व्यक्त होतो. इतर म्हणतील त्याला मान डोलविणारा तो नव्हता हें त्याला भूषणावह होतें यांत संशय नाहीं. कोणत्याही ऋचेची देवता मी सांगू शकतों असें तो एकदां अभिमानानें म्हणाला ( १०३। २८); पण ह्या बाबतींत त्याला हार खावी लागली (१०४।१). ह्या दंतकथेवरून शाकपूणि गर्विष्ठ होता व त्याची खोड जिरविण्याची इच्छा तत्कालीन विद्वानांच्या मनांत सतत वागत असावी असें दिसतें. शाकपूणि पुरातनकालचा मोठा विद्वान् होता असेंही ह्या दंतकथेवरून सिद्ध होतें. १३।१२ त ओम् संबंधानें शाकपूणि व त्याचा मुलगा ह्यांचीं भिन्न मतें दिलीं आहेत ( १०७२।२४ व १०७४।१ ); ह्यावरून बापलेकांना विद्वत्समाजांत फार मान होता असें दिसतें. शाकपूणि नुसता याज्ञिक नसून शब्दांच्या व्युत्पत्ति करण्यांतही प्रवीण होता; तडित् ( १८६।१२ ), महान् ( १९०। १६ ), ऋत्विज् ( २१३।२९ ), शिताम ( २४१।२१ ), अप्स ( ३७८।१२ ), अच्छ ( ४१७।१७ ), अग्नि (५५९।३२) ह्यांच्या व्युत्पत्ति पाहा. ४।१५ तील ऋचेंत विद्रधे नवे द्रुपदे अर्भके असे शब्द आहेत; त्यांपैकीं तीन शब्द द्रुपदे ह्याचीं विशेषणें होत असें शाकपूणीचें मत होतें ( २७०।२१ ); ह्याच्याविरुद्ध चारही शब्द कनीनके ह्या शब्दाचीं विशेषणें होत असें यास्काचें मत होतें; दोहोंत खरा अर्थ करणारा कोण तें ठरविणें कठीण आहे. सोमो अक्षाः ह्यांतील अक्षाः ह्यांत धातु कोणता असा प्रश्न उत्पन्न झाला; क्षर् चें तें रूप होय असें कांहींचें मत पडलें तर क्षि धातूचें तें रूप होय असें कांहीं म्हणाले; जेथें जेथें अक्षाः हें रूप आलें आहे तेथें क्षि धातूचेंच तें रूप होय असें शाकपूणीनें आपलें मत दिलें ( ३३६।२६ ). पण हें त्याचें म्हणणें चुकीचें आहे; कारण अक्षाः यांत क्षर् हाच धातु आहे. विष्णु तीन ठिकाणीं आपलें पाऊल टाकतो असें १२।१९ तील ऋचेंत म्हटलें आहे; हीं तीन ठिकाणें समारोहण, विष्णुपद व गयशिरस् होत असें और्णवाभ म्हणतो; पण पृथिवी, अंतरिक्ष व द्युलोक हीं तीं तीन ठिकाणें होत असें शाकपूणीचें मत होतें ( ९९३। १८ ); हें त्याचें मत ७।२८ तील ऋचेच्या भाष्यांतही दिलें आहे ( ५८५।१९ ). शाकपूणि जरी दुराग्रही असला तरी स्वतंत्र विचार करणारा होता ह्यांत संशय नाहीं. औपमन्यवाच्या नांवावर निघण्टवः ( ३।६-८ ), दण्ड ( ८४।१३ ), ऋषि ( ११०। २ ), कुत्स ( १८७।४ ), यज्ञ ( २१३।१७ ), काण ( ५१४।१६ ), विकट ( ५१५।१० ), इन्द्र ( ७५८।६ ) ह्या शब्दांच्या व्युत्पत्ति आहेत; त्या इतरांनीं

केलेल्या व्युत्पत्तींसारख्याच आहेत म्हणजे त्या अर्थानुरोधानें केल्या आहेत. पशुषि शब्दाची व्युत्पत्ति न देतां तो त्या शब्दाचा अर्थ देतो ( ९७।२१ ) व शिपिविष्ट शब्दाचा घाणेरडा अर्थ आहे एवढेंच म्हणतो ( ३६१।१४ ). पञ्चजन म्हणजे चार वर्ण व निषाद होत असें त्याचें मत होतें ( १७२।३२ ). पक्ष्यांना त्यांच्या आवाजावरून नांवें पडलीं असें सर्वसाधारण मत होतें; परंतु पक्ष्यांचीं नांवेंही धातूंपासूनच उत्पन्न झालीं असें त्यानें जोरानें प्रतिपादन केलें आहे ( २११।७ ). सर्व नामें धातूंपासून झालीं ह्या मताचा शाकटायन पुरस्कर्ता होता ( ३३।१० ), व प्रसंग पडल्यास शब्दांचे तुकडे पाडावेत व प्रत्येक तुकड्याला अनुरूप धातु शोधून काढावा असें तो निःशंकपणें म्हणे; सत्य शब्दाची त्यानें केलेली व्युत्पत्ति पाहा ( ३७।३३–३८।१५ ). वैयाकरण असून त्यानें असा आग्रह धरावा ह्याबद्दल इतर वैयाकरणांनीं त्याचा उपहास केला व त्याच्या नांवावर कोटीही केली ( १२११।३० ते १२१२।२० ). उपसर्गांना स्वतःचा अर्थ नसून धातूंत असलेले अर्थ बाहेर काढणें एवढाच उपसर्गांचा उपयोग होय असें इतर वैयाकरणांप्रमाणें त्याचेंही मत होतें ( ९।२९ ). गार्ग्याचीं मतें शाकटायनाच्या उलट होतीं; सर्व नामें धातूंपासून झालीं नसून कांहीं थोडीं झालीं आहेत असें त्याचें मत होतें ( ३३।१४ ). गौ, अश्व, पुरुष, हस्ती वगैरे शब्दांच्या व्युत्पत्ति करणें व्यर्थ खटाटोप होय असें त्यानें प्रतिपादन केलें आहे व नैरुक्तांचें मत प्रमाणें देऊन खोडून टाकलें आहे ( ३३।१४-३९।१ ). गार्ग्य समंजस मनुष्य होता हें या एकाच गोष्टीवरून सिद्ध होतें. उपसर्गांना स्वतःचे अर्थ आहेत ( १०।४ ) हें त्याचें मत ज्यांनीं ऋग्वेदाचा अभ्यास केला आहे त्यांना पटण्याजोगें आहे. उपमेचें जें छोटें लक्षण त्यानें दिलें आहे ( १९३।१८ ) त्यावरून तो मार्मिक होता असें स्पष्ट दिसतें. आग्रायण ( २७।१५ व २५ ), तैटीकि ( २४१।३२ व ४१४।१२ ), गालव ( २४२।१४ ), शतबलाक्ष मौद्गल्य ( ८६४।१२ ), चर्मशिरस् ( १९७।१८ ) व स्थौलाष्ठीवि ( ५५९।२६ व ७२९।४ ) ह्यांच्या नांवावर एकेक दोन दोन व्युत्पत्ति आहेत. और्णवाभानें उर्व्यः ( १४७।११ ), नासत्य (४६६।२०), होता (५६११।१७) व अश्विन (९५६।५) ह्या चार शब्दांच्या व्युत्पत्ति दिल्या आहेत. तीन ठिकाणें म्हणजे समारोहण, विष्णुपद व गयशिरस् होत हें त्याचें मत शाकपूणीसंबंधानें वर निर्दिष्ट केलें आहे (१२९३।२८). वा आणि यः अशीं दोन पदें पदकार शाकल्यानें केलीं आहेत; याच्या उलट वायः एकच पद होय असें यास्क कारणें देऊन सिद्ध करतो ( ५११।२५ ); यावरून यास्क एखादवेळेस स्वतंत्रपणें विचार करीत असे असें दिसतें; शाकल्य इतका पुरातन असूनही यास्क त्याचें मत खोडून टाकतो हें नवल आहे. वेदांना अर्थ नाहीं ह्या विधानाचीं कौत्सानें दिलेलीं कारणें १।१५ त दिलीं आहेत ( ४४–४९ ). भाव अथवा क्रिया सदा प्रकारची असते असें वार्ष्यायणीचें मत होतें ( ७।२० ); हें त्याचें मत ग्राह्य होण्याजोग नाहीं. शब्द इन्द्रियनित्य म्हणजे अनित्य किंवा नश्वर आहेत त्यामुळें पदें चार प्रका-

र्चीं आहेत वगैरे व्याकरणसिद्धांतांना अस्तित्वच नाहीं असें औदुंबरायणाचें मत होतें; बोलणारा शब्द उच्चारतो त्याच्या आधीं त्याच्या मनांत असलेला शब्द जागृत होतो व त्या जागृत झालेल्या शब्दानें उच्चारल्या जाणाऱ्या शब्दाला अस्तित्व येतें; त्याचप्रमाणें ऐकणारा जेव्हां एखादा शब्द ऐकतो तेव्हां त्याच्या मनांत असलेला शब्द जागृत होतो; ह्यावरून शब्द व्यापक म्हणजे नित्य आहे असें वरील आक्षेपाचें निरसन केलें आहे ( ६।१३-३३ ). नित्य शब्दाला स्फोट अशी संज्ञा आहे. शब्द नित्य कीं अनित्य हा वाद फार पुरातनकालचा आहे; यासंबंधानें पक्ष व प्रतिपक्ष ह्यांचें म्हणणें पतंजलीच्या महाभाष्यांत मांडलें आहे. प्रो. मॅक्सम्यूलर म्हणतात त्याप्रमाणें हिंदुस्थानांत व्याकरणशास्त्राचा आरंभ व वृद्धि ग्रीक व्याकरणकारांच्या आधीं कित्येक शतकें होऊन गेली; पदकार व ज्यानें ऋचांची संहिता बनविली त्या दोघांना व्याकरण चांगलें माहीत होतें असें संहितेंतील संधि व स्वर ह्यावरून व पदकारानें पदें पाडलीं ह्यावरून सिद्ध होतें. व्याकरणशास्त्र यास्काच्या आधीं परिणत स्थितीला गेलें होतें यांत संशय नाहीं. निरुक्तशास्त्र व्याकरणशास्त्रानंतर अस्तित्वांत आलें असावें; कारण निरुक्त व्याकरणाला पूर्णता आणतें असें म्हटलें आहे ( ४५।११ ). पण ह्याच्या उलट असेंही म्हणतां येईल कीं व्याकरणाचें ज्ञान नसूनही लोक शब्दांच्या व्युत्पत्ति करतात; ब्राह्मणें व उपनिषदें ह्यांतील व्युत्पत्ति व्याकरणावर आधारलेल्या नाहींत; व्याकरणशास्त्र अस्तित्वांत यावयास विचाराची जरूर असते; लौकिक व्युत्पत्ति केवळ गंमत म्हणून केल्या जातात; तेव्हां निरुक्तानंतर व्याकरणशास्त्र अस्तित्वांत आलें असेंच म्हटलें पाहिजे. यास्कानें नैरुक्त वगैरेंचीं मतें दिलीं आहेत; तेव्हां यास्क स्वतः नैरुक्त होता कीं नाहीं असा प्रश्न उत्पन्न होतो. ह्या प्रश्नाचें उत्तर देणें कठीण आहे. नैरुक्तांच्या व्युत्पत्ति व मतें सांगितल्यावर यास्क स्वतःच्या व इतरांच्या व्युत्पत्ति व मतें सांगतो ह्यावरून यास्क नैरुक्त नसावा असें वाटतें. देवता तीनच आहेत असें नैरुक्तांचें मत नमूद केल्यावर यास्क याज्ञिकांचें व वेदान्त्यांचेंही मत देतो; ह्यावरून नैरुक्तांहून तो निराळा असावा असें वाटतें. औपमन्यव वगैरेही यास्काप्रमाणें नैरुक्त नसावेत. यास्कानें आपल्या ग्रंथाला निरुक्त ही संज्ञा कोठेंही दिली नाहीं. पहिल्या अध्यायाच्या १५–१७ खंडांच्या आरंभीं अथापि इदमन्तरेण हे शब्द आहेत ( ४४–५९ ); पण इदं हें शास्त्राचें नांव नाहीं; तो शब्द मोघम आहे. कदाचित् निरुक्तशब्द लोकांना इतका परिचित झाला होता कीं इदं शब्दानें तो शब्द सूचित होत असेल. २।१ ह्याच्या आरंभीं अथ निर्वचनं हे शब्द आहेत ( ७३।१७ ); येथें निर्वचन म्हणजे व्युत्पत्ति करण्याचा मार्ग असा अर्थ घ्यावयाचा कीं निरुक्तशास्त्र असा अर्थ घ्यावयाचा असा प्रश्न आहे; बहुतकरून त्या शब्दाचा पहिलाच अर्थ असावा असें वाटतें; कारण लगेच व्युत्पत्ति कशी करावी वगैरे गोष्टी सांगितल्या आहेत. डॉ. बेलवलकर म्हणतात कीं, सर्व निरुक्तांत यास्काचें निरुक्त श्रेष्ठ होय; पण जोंपर्यंत इतर निरुक्तें उपलब्ध नाहींत तोंपर्यंत यास्काच्या निरुक्ताविषयीं कांहींच

म्हणतां येत नाहीं. पाणिनीविषयींही असेंच म्हटलें पाहिजे. यास्क व पाणिनि ह्यांच्या आधींचीं निरुक्तें व व्याकरणें जर अस्तित्वांत असतीं तर निरुक्तशास्त्र व व्याकरणशास्त्र ह्यांच्या इतिहासावर चांगला प्रकाश पडला असता व यास्क आणि पाणिनि ह्यांचें स्थान ठरवितां आलें असतें. हिंदुस्थानचें असेंच कांहीं दुर्दैव आहे कीं, ज्या मोठमोठ्या ग्रंथांची क्षणोक्षणीं आवश्यकता वाटते ते ग्रंथ उपलब्ध नसावेत. कदाचित् यास्काचें निरुक्त व पाणिनीची अष्टाध्यायी अस्तित्वांत आल्यामुळें पूर्वींचीं निरुक्तें व व्याकरणें प्रचारांतून जाऊन नामशेष झालीं. निरुक्तांतील शाकटायन, गार्ग्य, गालव, शाकल्य, व आचार्य हीं नावें अष्टाध्यायींत आलीं आहेत; तीं अशीं:—शाकटायन (३।४।११२; ८।३।१८; ८।४।५०); गार्ग्य (८।३।२०; ७।३।९९); गालव (६।३।६१; ७।१।७४; ८।४।६७); शाकल्य (१।१।१६; ६।१।१२७; ८।३।१९; ८।४।५१); आचार्य (७।३।४९; ८।४।५२). शाकटायन वैयाकरण होता ह्याविषयीं वाद नाहीं; बाकीच्यांनीं व्याकरणें लिहिलीं होतीं कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं. पदकार शाकल्य व अष्टाध्यायींतला शाकल्य हे एकच कीं दोन भिन्न व्यक्ति हें सांगतां येत नाहीं.

यास्कभाष्यांत ऋग्वेदाखेरीज इतर ग्रंथांतून जे उतारे घेतले आहेत ते हल्लीं उपलब्ध असलेल्या त्या ग्रंथांत जसेच्या तसे सांपडत नाहींत; जसेः— न उपरस्य आविष्कुर्यात्० यजमानः (१६३।२९–१६४।४) व अग्निर्वा इतो वृष्टिं० अथ वर्षति इति (५७८।६–५७९।१५). ह्या दुसऱ्या ब्राह्मणवचनासंबंधानें एक ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट सांगणें आवश्यक आहे; यजुर्वेदाच्या निरनिराळ्या शाखांत एक प्रकारची स्पर्धा होती; त्यामुळें प्रत्येक शाखा इतर शाखांहून निराळी आहे हें दाखविण्याकरितां शाखेशाखेंत फरक केले गेले आहेत. मानवश्रौतसूत्रांत अा गल्दा धमनीनां असें आहे; स्पर्धेमुळें आपस्तंबश्रौतसूत्रांत गल्दा बद्दल गल्गा आणि हिरण्यकेशिश्रौतसूत्रांत गग्ला असे निरर्थक शब्द घातले आहेत (५०१।२३–२६). सुगा वो देवा ही १२।४२ तील ऋचा कोठेंही सांपडत नाहीं; यास्कभाष्यावरून निरुक्तांत असलेली मूळची ऋचा निराळी असावी; दुर्गवृत्तीवरून त्याच्यापुढें असलेली ऋचा ह्या ऋचेहूनही वेगळी असावी; कदाचित् यास्कभाष्यांतही बदल झाला असावा. ही ऋचा निरुक्ताखेरीज मैत्रायणी, काठक, कपिष्ठल, तैत्तिरीय, वाजसनेयि व अथर्व ह्या संहि-तांत निरनिराळ्या शब्दांत आढळते. इतर शाखांहून आपली शाखा भिन्न आहे हें दाखविण्याकरितां व्याकरणाकडे लक्ष न देतां हवे ते पाठ घातले आहेत (१०४२।५-२२). तैत्तिरीयसंहितेमुळें ११।३० ह्यांतील अन्विदनुमते ह्या ऋचेंत गुर्जरप्रत व महाराष्ट्र प्रत ह्यांत कोणता बदल केला आहे तें तेथें सांगितलें आहे (९१६।२३–२५). तसा बदल करण्याचें कारण तैत्तिरीय व वाजसनेयि संहिता होत; हल्लींच्या मैत्रायणीसंहितेंत तो बदल तैत्तिरीयसंहितेमुळें झाला आहे (ओळी २५ ते ३३). यास्काच्या वेळचे कांहीं ग्रंथ हल्लीं उपलब्ध नाहींत. अविशेषेण पुत्राणां० मनुः स्वायंभुवोऽब्रवीत् हा श्लोक कोणत्याही स्मृतींत सांपडत नाहीं (१५९।७–११).

प्रोह्याणीति प्रोह्यति ( ४६।२१ ) हें वचन कोठेंही सांपडत नाहीं ( ओळ ३४ ).

स्कूल्ड नांवाच्या विद्वानानें निरुक्तावर एक विस्तृत टीकात्मक निबंध लिहिला आहे. बृहद्देवतेविषयीं लिहितांना त्याच्या मताचा मीं उल्लेख केला आहे ( १२८३।२८–२९ व १२८६।३–४ ). ते म्हणतातः— (१) निघंटूच्या पहिल्या चार अध्यायांचे कर्ते नैरुक्त असावेत व पांचव्याचे याज्ञिक असावेत. निघंटूचा कर्ता एक नसून अनेक होते. कित्येक वैदिकांनीं निरनिराळ्या वेळीं निघंटूंत शब्द घातले असावेत; हल्लीं अस्तित्वांत असलेला निघंटु प्राचीन वैदिकांच्या परिश्रमाचें फळ होय; हे पंडित कित्येक पिढ्या निघंटु तयार करण्यांत गुंतले होते तेव्हां निघंटु हा एकानें केलेला ग्रंथ नसून त्याचे कर्ते अनेक होते. महाभारताच्या मोक्षपर्वांत ( अध्याय ३४२, श्लोक ८६–८७ ) प्रजापति काश्यपानें निघंटु रचला असें म्हटलें आहे; पण ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. साक्षात्कृतधर्माणः ऋषयः (६६।५) वगैरे शब्दांवरून निघंटूचे कर्ते अनेक होते असें ठरतें. ह्यासंबंधीं माझें मत पाहा (११८४।२४ व २५; ११९४।१७–३४; ११९८।२९ ते ११९९।६). ( २ ) नैघंटुक व नैगमकांड ह्यांहून दैवतकांड अगदीं भिन्न आहे; त्याचें स्वरूप सर्वानुक्रमणीसारखें आहे. त्यांतील शब्दांच्या व्युत्पत्ति व अर्थ सोपे आहेत. त्या कांडाचा संबंध यजुर्वेदाशीं असावा असें स्पष्ट दिसतें. त्या कांडांत शब्दांच्या व्युत्पत्तीचें महत्त्व नाहीं. ह्याविषयीं माझें मत पहा ( ११९६।३३ ते ११९७।२० ). इंद्र, मरुत्, अश्विन वगैरे देवतांच्या नांवांच्या व्युत्पत्ति सोप्या आहेत असें कोणीही म्हणणार नाहीं; त्या सर्व पूर्वषट्कांत केलेल्या व्युत्पत्तींसारख्याच आहेत. नैघंटुक व नैगम ह्या कांडांतील शब्दांचे अर्थ संशयित आहेत पण देवतानामांच्या अर्थाविषयीं संशय नाहीं हें खरें आहे; तथापि तेवढ्यावरून आधींच्या दोन कांडांहून देवताकांड अगदीं भिन्न आहे असें म्हणतां येत नाहीं. देवतानामांची संख्या फारच थोडी असल्यामुळें व्युत्पत्तीही थोड्या असणें स्वाभाविक आहे. देवताकांडाचा यज्ञाशीं संबंध चारपांच ठिकाणींच आला आहे; तो संबंध लक्षांत घेतला नाहीं तरी चालण्याजोगें आहे. देवतानामांचें निर्वचन करणें हाच मुख्य उद्देश होय; त्या नामांचें निर्वचन केल्यानें निर्वचन करणारा देवतेशीं तादात्म्य पावतो असें १३।१३ च्या शेवटीं म्हटलें आहे ( १०८०।१९ ). देवताकांडाचें स्वरूप सर्वानुक्रमणीसारखें आहे हें म्हणणें बरोबर नाहीं. सर्वानुक्रमणींत सूक्तांतील ऋचांची संख्या, प्रत्येक ऋचेची देवता व ऋचेचा विनियोग दिलेला असतो; पण देवताकांडांत भिन्न भिन्न सूक्तांतल्या ऋचा दिल्या असून त्यांचा विनियोग वगैरे गोष्टी सांगितल्या नाहींत; त्या गोष्टी दुर्गवृत्तींत सांगितल्या आहेत. ( ३ ) रोथ म्हणतो त्याप्रमाणें निघंटूचे दोन प्रकारचे पाठ आहेत; एक पाठ विस्तारानें मोठा असून दुसरा लहान आहे; निरुक्त ह्यांपैकीं मोठ्या पाठाचें विवरण करतें. डॉ. सरूप ह्या दोन प्रकारच्या निघंटूंमध्यें पुढील भेद दाखवितातः— मोठ्यांत लहानापेक्षां जास्त शब्द असून प्रत्येक खंडाच्या शेवटीं शब्दांची संख्या

दिली आहे व अध्याय संपल्यावर त्यांतील खंडांची शृंखला दिली आहे. भांडारकर इन्स्टिटयूटमधील निघंटूच्या ज्या पोथ्या मला पाहावयास मिळाल्या त्यांपैकीं कांहींच्या शेवटीं संख्या दिली नाहीं; पण शब्द मोजून पाहातां ती संख्या इतर पोथ्यांत दिलेल्या संख्येइतकीच सांपडली. बडोदें सेंट्रल लायब्ररी एथें चौकशी करितां निघंटूच्या दोन प्रकारच्या पोथ्यांत खंडाच्या शेवटीं संख्या देणें व न देणें याखेरीज कोणताही फरक नाहीं असें कळलें. ( ४ ) नैरुक्त नुसती व्युत्पत्ति देत नाहींत तर ते देवतानामांविषयींही उहापोह करतात म्हणजे ते देवतांविषयीं विचार करणारे ( theologians ) होत. निरुक्त = विवरण ( an explanation ) व नैरुक्त = विवरणकार ( an explainer ) असे त्या शब्दांचे अर्थ आहेत. तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय ह्या शब्दांवरून निरुक्ताचा उद्देश शब्दांच्या व्युत्पत्ति देणें व ऋचांचा अर्थ लावणें असा दुहेरी होता; व्युत्पत्ति देणें हा मूळ उद्देश नसून शब्दांचा अर्थ देणें हा निरुक्ताचा मूळ उद्देश होय. ह्या संबंधानें माझें मत पहा ( १२३२।३२ ते १२३३।४ व २६ ). ( ५ ) डॉ. भांडारकर यास्काला कृष्णयजुर्वेदी म्हणतात; डॉ. गुणे म्हणतात कीं यास्क यजुर्वेदी असल्यामुळें यजुर्वेदाच्या निरनिराळ्या शाखांतून म्हणजे तैत्तिरीय, मैत्रायणि व काठक ह्या संहितांतून त्यानें उतारे घेतले आहेत. कीथ म्हणतो कीं बरेचसे उतारे तैत्तिरीयसंहितेंतील वाक्यांप्रमाणें दिसतात; कदाचित् ते मूळ न पाहातां घेतल्यामुळें त्यांत अशुद्धें व भिन्न शब्द शिरले असतील. वेबर म्हणतो कीं यास्कानें बरेचसे उतारे वाजसनेयिसंहितेच्या काण्वशाखेंतून घेतले आहेत. निरुक्तांत ऋग्वेदांतील संबंध ऋचा व ऋचांचे तुकडे मिळून ६७६ उदाहरणें घेतलीं आहेत; निघंटूचा ऋग्वेदाशीं निकट संबंध असल्यामुळें त्या वेदांतील इतकीं उदाहरणें निरुक्तांत असणें अगदीं स्वाभाविक आहे. निरनिराळ्या यजुःशाखांतूनही उतारे घेतले आहेत; त्यांपैकीं सर्वांत जास्त संख्या ( २६ ) मैत्रायणीसंहितेंतील उदाहरणांची होय. उदाहरणांवरून यास्काची शाखा ठरविणें बरोबर होणार नाहीं. यास्क ऋग्वेदी यजुर्वेदी किंवा इतर कोणत्याही शाखेचा ब्राह्मण असेल; त्याची शाखा कोणतीही असली तरी निघंटूचें निर्वचन करण्याला त्याला हवीं तेथलीं उदाहरणें घेण्याची आवश्यकता वाटणें अगदीं साहाजिक होतें.

निरुक्तांतील उदाहरणांची संख्या:— ऋग्वेद ६७६; इतर वेद ४२; लैलिक ५; अनुपलब्ध ऋचा १३; ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें १५; अनुपलब्ध वचनें २३; श्रौतसूत्रें, गृह्यसूत्रें वगैरे ६; किरकोळ १५; एकूण संख्या सुमारें ७९४.

११२० ह्यांतील वेदाङ्गानि ( ६६।१८ ) ह्याचा डॉ. रोथ निराळा अर्थ करतात; शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष हीं वेदांगें नसून निरनिराळीं प्रातिशाख्यें वेदांगें होत असें ते म्हणतात. पण प्रातिशाख्यांना वेदांगें म्हणणें बरोबर होणार नाहीं; वेदांग शब्दाचा नेहमींचाच अर्थ घेतला पाहिजे. वेदं च वेदाङ्गानि च हे शब्द खात्रीनें प्रक्षिप्त होत; कारण समाम्नासिषुः हें क्रियापद वेदं व वेदाङ्गानि ह्यांना लावितां येणार नाहीं; तें क्रियारूप इमं ग्रन्थं ( म्हणजे निघंटु ) ह्यालाच

लावणें योग्य आहे. पहिला अध्याय प्रक्षिप्त होय असें माझें मत आहे; पण तसें मत आजपर्यंत कोणीही प्रदर्शित केलें नाहीं. तो अध्याय निरुक्ताचा अवश्य भाग आहे असें समजूनच त्याच्यापासून अनुमानें काढलीं आहेत. प्रो. मॅक्डॉनेल्:–( १ ) निरुक्तांत उत्तम प्रतीचें संस्कृतगद्य पाहावयास मिळतें. ज्याअर्थी तत्कालीन किंवा त्याच्यापूर्वीचें इतर गद्य उपलब्ध नाहीं त्या अर्थी यास्काचें गद्य उत्तम होय असें म्हणतां येत नाहीं. यास्कभाषा प्रकरण पहा ( १२४२।२२–१२४६।१७ ). (२) सूत्रकालाला निरुक्तापासून प्रारंभ झाला. पण हें म्हणणें निराधार आहे. पाणिनीचीं पुष्कळ सूत्रें दुर्बोध आहेत कारण त्यांतील परिभाषा कृत्रिम आहे. यास्काच्या लिहिण्यांत कृत्रिमपणा नाहीं. सूत्रांत भाषेचा संक्षेप केलेला असतो; तसा संक्षेप निरुक्तांत नाहीं. निरुक्त सूत्रमय आहे असें मुळींच म्हणतां येत नाहीं. ( ३ ) निरुक्तांतील व्याकरणपरिभाषा पाणिनीच्या परिभाषेसारखी आहे. हेंही म्हणणें बरोबर नाहीं; यास्क व पाणिनि ह्यांच्या व्याकरणपरिभाषेंत महदंतर आहे. व्याकरणपरिभाषा पहा ( १२४६।२० वगैरे ); ही परिभाषा अगदीं स्वाभाविक आहे पण अष्टाध्यायींतील परिभाषा अगदीं कृत्रिम व सांगितल्याशिवाय न कळणारी आहे. ( ४ ) व्याकरण व विवरण या दृष्टीनें निरुक्त ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. हें म्हणणें बरोबर नाहीं कारण यास्कानें ऋचांचें विवरण बहुतेक केलेंच नाहीं; त्याचें सर्व लक्ष शब्दांच्या व्युत्पत्ति करण्याकडे होतें. निरुक्तानें व्याकरणाची पूर्ति केली ही केवळ निरुक्तकारांची बढाई होय; त्यांनीं व्याकरणनियमांचा भलता उपयोग केला असेंच म्हणणें भाग आहे. डॉ. विंटरनिट्झ्:— सर्व वेदांगांत निरुक्त हें पूर्णावस्थेला गेलेलें वेदांग होय. पूर्णावस्था कशी ठरवावयाची हा प्रश्न आहे; शिक्षा वगैरे इतर वेदांगें निरुक्तापेक्षां चांगलीं आहेत असें माझें मत आहे; वेदांग म्हणण्याला निरुक्त पात्र नाहीं असेंच मी म्हणतों.

## डॉ. पाठक, उणादिसूत्रें व यास्काचा काल

उणादिसूत्रांचा कर्ता पाणिनि नसून त्याच्या आधीं होऊन गेलेला वैयाकरण शाकटायन असावा किंवा वार्तिककार कात्यायन असावा असें कित्येकांचें मत आहे; हें मत कै० डॉ. काशीनाथ बापूजी पाठक ह्यांनीं भरपूर पुरावा देऊन खोडून टाकलें आहे व पाणिनीनेंच हीं सूत्रें रचिलीं असें सिद्ध केलें आहे ( Annals of the Bhandarkar Oriental Research Institute, Vol. IV pp. 111–136 ). यास्कानें केलेल्या कांहीं व्युत्पत्ति देऊन त्याच व्युत्पत्ति उणादिसूत्रांत आहेत हें खालील दिलेल्या तुलनेवरून त्यांनीं सिद्ध केलें आहे. निरुक्तः— (१) प्रथनात्पृथिवीत्याहुः (३७।१२). ( २ ) भीमः बिभ्यति अस्मात् । भीष्मः अपि एतस्मात् एव ( ६९।४ ). ( ३ ) गौरिति पृथिव्या नामधेयं० भूतानि गच्छन्ति ( ९२।६ ). ( ४ ) स्थाणुः तिष्ठतेः । अर्यः अर्तेः ( ६०।६ ). (५) अश्वः कस्मात् । अश्नुतेऽध्वानं ( १४९।२३ ).

( ६ ) घृतम् इति उदकनाम । जिघर्तेः सिञ्चतिकर्मणः ( ५७७।२० ). ( ७ ) रयिः इति धननाम रातेर्दानकर्मणः ( २२८।९ ). ( ८ ) स्त्रियः स्त्यायतेः अपत्रपणकर्मणः ( २२८।९ ). ( ९ ) इन्दुः इन्धेः उनत्तेः वा ( ८४०।२८ ). ( १० ) लक्ष्मीर्लक्षणात् ( २५५।११ ). ( ११ ) द्रविणं यत् अनेन अभिद्रवन्ति ( ५९४।३ ); दक्षिणा दक्षतेः ( २१।२५ ). ( १२ ) श्मश्रु श्मनि श्रितं भवति ( १६३।२१ ). ( १३ ) आपः आप्नोतेः ( ६९३।३० ). ( १४ ) रुद्रः रोदयतेः वा ( ७४२।२० ). ( १५ ) रात्रिः रातेर्वा स्यात् दानकर्मणः ( १२८।३० ). ( १६ ) राका रातेर्दानकर्मणः ( ९१७।८ ). अर्कः अर्चतेः ( ३४७।३२ ). ( १७ ) वृक्षो व्रश्चनात् ( ९५।२३ ). ( १८ ) तळित्० ताडयति इति सतः (१८४।२९). (१९) कृप् कृपतेर्वा कल्पतेर्वा (४४५।७). (२०) तस्करः तत्करः भवति यत् पापकम् इति नैरुक्ताः ( १९४।३१ ). बृहस्पतिः बृहतः पाता वा पालयिता वा ( ७६७।१० ). (२१) तत्राप्येके० कुणारुमिति ( ८१।९-१२ ). उणादिः —( १ ) प्रथेः षिवन् संप्रसारणं च, पृथिवी ( १। १५६ ). ( २ ) भियः षुग्वा, भीमः भीष्मः ( १।१५८ ). ( ३ ) गमेर्डोः (२।२३५). ( ४ ) स्थाणु ( ३।२२४ ); उषिकुषिगार्तिभ्यस्थन् ( २।४ ). ( ५ ) अशूप्रुषिलटिकणिखटिविशिभ्यः क्वन् ( १।१५१ ). ( ६ ) अंजिघृसिभ्यःक्तः ( ३।८९ ). ( ७ ) रातेर्डैः ( २।६६ ). ( ८ ) स्त्यायतेर्ड्रट्, स्त्री ( ४।१६५ ). ( ९ ) उन्देरिच्चादेः, इन्दुः ( १।१३ ). ( १० ) लक्षेर्मुट्च ( ३।१६० ). ( ११ ) द्रुदक्षिभ्यामिनन् ( २। ५० ). ( १२ ) श्मनि श्रयते डुन् ( ५।२८ ). ( १३ ) आप्नोतेर्ह्रस्वश्च (२।५८). ( १४ ) रोदेर्णिलुक्च ( २।२२ ). ( १५ ) रादादिभ्यां मिप् ( ४।६७ ). ( १६ ) कृदाधारार्चिकलिभ्यः कः (३।४०). (१७) स्नुव्रश्चिकृत्यृषिभ्यः कित् (सः) (३।६६). (१८) ताडेर्णिलुक्च (१।१००). (१९) कृपोरोलः (पाणिनि ८।२।१८). (२०) तद्बृहतोः करपत्योश्चोरदेवतयोः सुट् तलोपश्च तस्करश्चोरः। बृहस्पतिर्देवता (पाणिनि ६।१। १५७). (२१) प्रथिम्रदिभ्रस्जां (कुः) संप्रसारणं सलोपश्च (उणादि १।२९). पृ (प्र) षिरंजिभ्यां (आतच्) कित् (३।१११). उणादिसूत्रांत शब्दांतला धातु व त्यांत होणारे बदल एवढेच दिलें असतें; जसें:– प्रथ्+इव्+ई=पृथिवी; प्रथ् मधील र् ला संप्रसारण होतें. गम्+ओ=गौः; म् चा लोप. स्था+णुः=स्थाणुः. अश्+वः=अश्वः. पण यास्क अमक्या धातूपासून अमका शब्द कां झाला याचें नुसतें कारण देतो; प्रत्ययामुळें धातूंत होणारा बदल तो सांगत नाहीं; जसें:—गम् पासून गौ म्हणण्याचें कारण पृथिवी विस्तारानें दूर गेली असते व प्राणी तिच्यावर जातात. रा ( = देणें ) ह्यापासून रात्रि; कारण रात्रीं दंव दिलें जातें. निरुक्तांत शब्दाच्या एकाहून अधिक व्युत्पत्ति दिल्या असल्या तरी उणादींत एकच व्युत्पत्ति दिली जाते; गातेर्वा ही निरुक्तांत दिलेली गौ शब्दाची व्युत्पत्ति उणादींत नाहीं. इंद्र, अग्र, वज्र, विप्र, क्षुर, भद्र, उग्र, शुक्र, शुक्ल, गौर वगैरे रकारान्त १९ शब्द रूढ आहेत ( निपात्यन्ते ) एवढेंच उणादिसूत्रांत (२।२८) म्हटलें आहे म्हणजे ते शब्द साधण्याची खटपट फुकट आहे असें त्या सूत्रानें दर्शविलें

आहे; पण यास्कानें इंद्र शब्दाच्या त्या त्या अर्थानुरोधानें १४ व्युत्पत्ति दिल्या आहेत (पानें ७५६–७५८). हर्य् + अन्यम् = हिर् + अन्यं = हिरण्यम् (उणादि ५।४४); ही व्युत्पत्ति हर्यतेर्वा प्रेप्साकर्मगः ( २।१० ) ह्या यास्कानें दिलेल्या व्युत्पत्तीसारखी आहे. यास्क निरनिराळे अर्थ लक्षांत आणून हिरण्य शब्दाच्या निरनिराळया व्युत्पत्ति देतो (१०६।३वगैरे). अग् (= जाणें) + निः = अग्निः (उणादि ४।५०); ही व्युत्पत्ति न देतां यास्कानें अर्थानुरोधानें अग्नि शब्दाच्या पांच व्युत्पत्ति दिल्या आहेत ( पानें ५५९–५६० ). यास्कानें दिलेल्या व्युत्पत्ति व उणादिसूत्रांत दिलेल्या व्युत्पत्ति ह्यांच्या-मध्यें असा मोठा भेद आहे; यास्क किंवा नैरुक्त शब्दाचे निरनिराळे अर्थ लक्षांत घेऊन निरनिराळया व्युत्पत्ति देतात तर उणादिसूत्रें शब्दांत दिसणारा धातु घेऊन व अवश्य वाटल्यास त्यांत फरक करून त्याला प्रत्यय लावतात. वेदांतले शब्द ( नैगम ) व प्रचारांत असलेले शब्द ( रूढिभव ) हे व्याकरणाला धरून नसले तरी ते शुद्धच होत असें उणादिसूत्रकाराचें मत होतें; ते शब्द शास्त्रशुद्ध करणें हा व्यर्थ खटाटोप होय अशी त्यांची खात्री झाली असावी. उणादिसूत्रें नैरुक्तांच्या व्युत्पत्तींवर आधारलेलीं नसून तीं त्यांचें मत अशा रीतीनें खोडून टाकतात. उणादिसूत्रें नैरुक्तानंतर झालीं ह्यांत संशय नाहीं; तीं पाणिनीनें रचिलीं किंवा निदान त्यांचा पाणिनीच्या अष्टा-ध्यायीशीं अगदीं निकट संबंध आहे असें म्हटलेंच पाहिजे. नाम च धातुजमाह निरुक्ते व्याकरणे शकटस्य च तोकं = धातूंपासून नामें होतात असें यास्क निरुक्तांत म्हणतो व शकटाचें पोरही ( शाकटायन ) आपल्या व्याकरणांत तेंच म्हणतें. ह्या शब्दांवरून वैयाकरणांना सगळीं नामें धातूंपासून झालीं हें मत मुळींच मान्य नव्हतें. तर मग उणादिसूत्रें पाणिनीनें किंवा दुसऱ्या कोणी कां रचिलीं हा प्रश्न उत्पन्न होतो. त्याला उत्तर त्यांना ही व्युत्पत्तींची परंपरा झुगारून देतां आली नाहीं हें. पतंजलीनेंही कांहीं व्युत्पत्ति नैरुक्तांच्या धर्तीवर केल्या आहेत; त्वष्टा शब्दाची महाभाष्यांतील व्युत्पत्ति पहा ( ६२३।३ ). शब्दांच्या व्युत्पत्ति करणें हा मोह आहे; तो आवरून धरणें शहाण्या माणसांनासुद्धां जड जातें. यास्क पाणिनीच्या आधीं होऊन गेला ह्याला आणखी पुरावे पुढीलप्रमाणें:—(१) यास्कानें दिलेल्या कांहीं धातूंचे अर्थ पाणिनीय धातुपाठांतील अर्थाहून भिन्न आहेत; त्यानें दिलेले कांहीं धातु पाणि-नीय धातुपाठांत सांपडत नाहींत ( १२४७ ). ( २ ) यास्काची व्याकरणपरिभाषा पाणिनीय परिभाषेहून वेगळी म्हणजे अकृत्रिम आहे ( १२४६ ). ( ३ ) त्याचप्रमाणें यास्काच्या भाष्यांत कांहीं अपाणिनीय रूपें सांपडतात ( १२४७ ). पाणिनीच्या नांवाचा महिमा इतका मोठा आहे कीं त्यानें घालून दिलेले नियम मोडणें ही अक्षम्य गोष्ट समजली जाते; पाणिनीनंतर जर यास्क झाला असता तर त्यानें पाणिनीचे नियम खात्रीनें मोडले नसते. ( ४ ) नाक नक्षत्र व नासत्य हे शब्द अक, क्षत्र व असत्य ह्यांना आधीं न लावून झाले आहेत असें अष्टाध्यायींत ( ६।३।७५ ) म्हटलें आहे. ह्या तीन शब्दांच्या व्युत्पत्ति निरुक्तांत दिल्या आहेत (नाक ११८।१६;

नक्षत्र २२१।१५; नासत्य ४६६।२० ); ह्या व्युत्पत्ति पाणिनींपुढें असाध्यात.

(५) पाणिनि प्रस्कण्व हरिश्चन्द्र वगैरे शब्दांत स् आगम आला आहे असें म्हणतो ( ५।१।१५३ वगैरे ); पण निरुक्तांत दिलेला विश्वकद्र शब्द ( ८७।३० ) ह्या यादींत नाहीं; तो शब्द पाणिनीच्या वेळीं प्रचारांतून गेला असला पाहिजे; तो कोणत्याही कोशांत सांपडत नाहीं. ( ६ ) उपसर्गात् छन्दसि धात्वर्थे (पाणिनि ५।१।११८) ह्या सूत्रानें प्र परा वगैरेंचा प्रगत परागत असा जेव्हां अर्थ असतो तेव्हां त्यांना वत् प्रत्यय लागतो; पण उत् ह्याचा उद्धत असा अर्थ करून त्याला तर प्रत्यय लावला आहे असें उत्तर शब्दाची व्युत्पत्ति करतांना यास्क म्हणतो ( ११२।५ ). यास्ककालीन धात्वर्थवाचक उपसर्गांना 'तर' प्रत्ययही लाविला जात असे; पण पाणिनींचें सूत्र वत् प्रत्ययापुरतेंच आहे. निरुक्ताचा पहिला अध्याय यास्काचा नव्हे असें मीं म्हटलें आहे ( ७१-७३ ); तो अध्याय यास्काचाच असें धरून चालल्यास त्याच्या १७ व्या खंडांतील परः संनिकर्षः संहिता ( ५६।३३ ) ह्या पाणिनीय सूत्रावरून यास्क पाणिनींनंतर झाला असें म्हणणें भाग पडेल. परंतु मागला पुढला संदर्भ पाहातां परः संनिकर्षः संहिता हे शब्द असंबद्ध वाटतात. खंडाचा विषय पदविभाग असल्यामुळें पदप्रकृतिः संहिता। पदप्रकृतीनि सर्वचरणानां पार्षदानि ( ५७।३ व १० ) ह्याचा पदविभाग व त्यांचीं उदाहरणें ह्यांच्याशीं निकट संबंध आहे; त्यावरून परः संनिकर्षः संहिता हे शब्द प्रक्षिप्त असावेत. निरनिराळे विद्वान् यास्काचा काळ निरनिराळा ठरवितात; डॉ. भांडारकरः— क्रिस्तापूर्वी ९ वें शतक म्हणजे पाणिनीपूर्वी एक शतक; डॉ. बेलवलकरः— क्रिस्तापूर्वी ७ वें शतक; डॉ. मॅक्डॉनेल् व डॉ. सरूपः—क्रिस्तापूर्वी ५ वें शतक. यस्कादिभ्यो गोत्रे ( पा० २।४।६३ ) ह्या सूत्रावरून यास्क पाणिनीला माहीत होता असें म्हणतां येत नाहीं. यास्क पतञ्जलीच्या आधीं होऊन गेला याविषयीं वाद नाहीं; तो पाणिनीच्या आधीं होऊन गेला हें नुसत्या तर्कानें ठरवितां येतें. तो फार पुरातनकालचा ग्रंथकार होता हें महाभारतांत त्याच्याविषयीं जो उल्लेख आहे त्यावरून निश्चित होतें. ( पान ३६३।१६–३१ ).

दाक्षिणाजी ( १६२।११ ) व दाक्षिणाजाः (४५५।१) ह्या शब्दांवरून यास्क दाक्षिण हिंदुस्थानांत होऊन गेला असें डॉ. सरूप म्हणतात; पण त्या शब्दांवरून यास्क उत्तर हिंदुस्थानांत होऊन गेला असेंच अनुमान निघतें.

## डॉ० सरूप

डॉ. सरूप ह्यांनीं निरुक्त ग्रंथासंबंधानें फार परिश्रम केले आहेत. त्या ग्रंथासंबंधानें सर्व प्रकारच्या सूची अभ्यासकांकरितां त्यांनीं तयार केल्या आहेत; ह्या सूचींचा फारच उपयोग आहे हें सांगावयास नको. ह्या श्रमांबद्दल डॉ सरूप ह्यांची स्तुति केलीच पाहिजे. पण त्यांनीं निरुक्ताचें जें भाषांतर केलें आहे त्यांत अतिशय

दोष आहेत त्यामुळें तें टाकाऊ झालें आहे असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. यास्काची विवरणपद्धति त्यांच्या लक्षांत आली नाहीं असें ठिकठिकाणीं दिसून येतें. यास्काची विवरणपद्धति पहा (पान १२३२ वगैरे). डॉ. सरूप ऋचा न देतां तिचें इंग्रजी भाषांतर देतात व भाष्याचेंही भाषान्तर करतात; त्यामुळें इंग्रजी ऋचेचें इंग्रजी भाष्य दिलें आहे असें वाटतें. कधीं कधीं ऋचेचें भाषांतर व भाष्याचें भाषांतर हीं अगदीं एक असतात; त्यामुळें पुनरुक्ति ढळढळीत दिसते आणि सारख्याच शब्दांत असलेलीं दोन भाषांतरें कां घातलीं हा प्रश्न उत्पन्न होतो. यास्कानें दिलेल्या व्युत्पत्ति त्यांना कळल्या नाहींत हें जेथें तेथें स्पष्ट दिसतें. ऋचा जशीच्या तशी देऊन नंतर ऋचेंतील शब्दांचे यास्कानें दिलेले पर्याय आणि शब्दांच्या व्युत्पत्ति, त्या व्युत्पत्तींची फोड व शेवटीं यास्कानें केलेला ऋचेचा अर्थ असा क्रम अवश्य आहे; वाटल्यास कारणें देऊन स्वतःला योग्य वाटलेला ऋचेचा अर्थ द्यावा. ५।१६ ह्यांतील नि यद्वृणक्षि ह्या (३८।५) ऋचेचें भाषांतर वेगळें व ऋचेवरील भाष्याचें भाषांतर वेगळें असा प्रकार झाला आहे; हा दोष घडण्याचें कारण ऋचेचें भाषांतर हें होय; तें स्वतःचें म्हणून अगदीं शेवटीं द्यावयास पाहिजे होतें.

ऋचेचें भाषांतरः—When thou uprootest forests, roaring at the head of wind, and the draught which makes them soft.

भाष्याचें भाषांतरः—When thou causest the forests to fall with thy deadly weapon, or roaring at the head of the howling wind, and the draught, i. e. the sun who is the drying agent. हीं दोन्हीं भाषांतरें चुकलीं आहेत. ऋक् अर्चनी (२५।२) = A stanza is a means of worshipping. ऋक् शब्द अर्च् धातूपासून झाला आहे असें यास्कास म्हणावयाचें आहे. निकृत्तद्वारो भवति (२७।२३) = It has its entrance torn asnnder. कर्ण शब्दाचा कृत् (कृन्त्) ह्या धातूशीं काय संबंध आहे हें ह्या शब्दांनीं दाखविलें आहे; कानाचें दार म्हणजे भोंक हें खोल (नि) कापलेलें असतें (कृत्तं) हा तो संबंध होय; ब्रह्मदेवानें मुंडक्याच्या दोन बाजूकडील भाग कापून ते खोल केले व त्यामुळें कान तयार झाले. कृत् + त = कृत्त; नि + कृत्त = खोल कापलेलें, खोदून काढलेलें. न अस्मिन् रमणं स्थानम् अल्पम् अपि अस्ति (१।११) = It does not contain even slight room for happiness. नरकं = न + र + कम्; न = न अस्मिन् अस्ति; र = रमणं स्थानम्; कं = किंचित् अल्पम् अपि; असे तुकडे पाडून नरक शब्दाची व्युत्पत्ति केली आहे. वालाः दंशवारणार्था भवन्ति = Long hair is for warding off the gad-flies. वालाः = वाराः; वाल शब्द वार् (हांकलून देणें) ह्यापासून; घोड्याच्या शेपटीचे केस डांसांना (दंश) हांकलून देण्याकरितां असतात. भीमः बिभ्यति अस्मात्। भीष्मः अपि एतस्मादेव (६९।४-६) = Fierce, of whom all are afraid. Dreadful is derived from the same root also. एथें fierce व dreadful ह्या शब्दांच्या

व्युत्पत्ति द्यावयाच्या नसून भीम व भीष्म ह्यांच्या द्यावयाच्या आहेत; भीमाला व भीष्माला भीम व भीष्म हीं नांवें देण्याचें कारण त्यांना लोक भितात म्हणजे भी धातूपासून भीम व भीष्म शब्द निघाले आहेत. ज्या शब्दांच्या व्युत्पत्ति दिल्या आहेत त्या शब्दांचें व त्यांच्या व्युत्पत्तींचें भाषांतर करणें ही मोठी चूक होय व ही चूक जेथें तेथें घडली आहे. कल्याणवर्णरूपः। कल्याणवर्णस्य इव अस्य रूपम्। कल्याणं कमनीयं भवति ( ८९।१० ) = A beauty of auspicious colours, i. e. one whose beauty is like that of auspicious colours. Auspicious, it is desirable. कमनीयं ही कल्याणं ह्याची व्युत्पत्ति होय; कम् (= इच्छा करणें ) ह्यापासून कल्याण. कल्याणवर्ण हा एक समास व कल्याणवर्णरूपः हा दुसरा असा हा अनेकपर्व समास आहे. ह्या समासांतील प्रत्येक शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे; हें विशद करण्याकरिता संस्कृत शब्दांचें संस्कृतांतच विवरण केलें पाहिजे; मागाहून पाहिजे तर भाषांतर द्यावें; नुसतें भाषांतर अगदीं निरुपयोगी आहे; एवढेंच नव्हे तर त्यानें अज्ञान झांकलें जातें हा मोठा दोष होय. भूरीति बहुनो नामधेयं प्रभवति इति सतः (२।७) = The word *bhūri* is a synonym of 'many' (so called) because it produces much. प्र + भू ह्यापासून भूरि; पुष्कळ वस्तूंच्या समुदायाचा अम्मल म्हणजे मोठा परिणाम घडून येतो असा जेव्हां अर्थ मनांत असेल तेव्हांच बहु शब्दाऐवजीं भूरि शब्द वापरावा; एरव्हीं बहु शब्द घालावा. पण बहु कस्मात्। प्रभवति इति सतः ( १९०।६ ) असेंही म्हटलें आहे. From what ( root ) is bahu ( much ) derived? ( It is so called ) because it is produced on a large scale, असें भाषांतर सरूप करतात. प्र + भू पासून बहु असें म्हणावयाचें आहे. प्रभवति इति सतः ह्याचें It produces much व it is produced on a large scale असें भाषांतर केलें आहे; परंतु प्रभवति = अम्मल चालविते, मोठ्या संघाचें लहान संघापेक्षांही जास्त वर्चस्व असतें म्हणजे त्याचा मोठा परिणाम होतो असा अर्थ आहे. ज्याच्या पाशीं फार संपत्ति असते त्याचा अम्मल पुष्कळ लोकांवर चालतो. पुष्कळ दगडांच्या समुदायाचें वजन थोडक्या दगडांच्या समूहाच्या दगडापेक्षां जास्त असतें. ज्याच्याजवळ जास्त धन असतें त्याच्यापुढें निर्धन लोक फार गरीबीनें वागतात; हा संपत्तीचा परिणाम होय. उषाः कस्मात्। उच्छतीति सत्याः = ( It is so called ) because it shines ( १२९।१२ ) ( वस् ). उच्छ् ( = हांकलून देणें ) ह्यापासून उषस्; वस् पासून उषस् शब्द झाला नाहीं. जेव्हां उषा अंधकाराला हांकलून देते म्हणजे अंधकाराला हांकलून देण्याची क्रिया उषा करते तेव्हांच तिला उषस् म्हणतात. विभावरी, द्योतना, सूनरी, सूनृता वगैरे उषेचीं नांवें अन्यकारणांनीं पडलीं आहेत असें यास्कास म्हणावयाचें आहे ( १२३५।२३–१२३६।२ ); त्यांचा उषस् प्रमाणें विशिष्ट अर्थ आहे. ऋषिर्दर्शनात्। स्तोमान् ददर्श ( १०९।३३ व ११०।२ ) = A seer is ( so called ) from his having vision.

He saw the hymns. ऋषिः = दर्शिः; ऋषि हा खरोखर दर्शि होता. कारण त्याला सूक्तें दिसलीं; दृश् पासून ऋषि असें औपमन्यवास म्हणावयाचें आहे. २।१४ (११७-१२०) ह्यांत स्वर् वगैरेंच्या व्युत्पत्ति दिल्या आहेत हें नुसत्या भाषांतरावरून कळत नाहीं. स्वर् आदित्यो भवति। सु अरणः। सु ईरणः = Svar means the Sun; it is very distant, it has well dispersed ( the darkness ). स्वर् = सु + अर्; सूर्य चांगल्या रीतीनें आकाशांत जातो ( अरणः ) किंवा तो अंधकाराला हांकलून देतो ( ईरणः ) म्हणून तो स्वर्; म्हणजे स्वर् शब्द ऋ ( = जाणें ) किंवा ईर् ( = हांकलून देणें ) ह्यापासून. न वा अमुं लोकं जग्मुषे किंचनाकं = न वै अमुं लोकं गतवते किंचन असुखं; पहिलें वाक्य काठकसंहितेंतील उतारा होय; जग्मुषे = गतवते व अकं = असुखं असे पर्याय दिले आहेत व बाकीचे शब्द जसेच्या तसेच ठेविले आहेत; पण डॉ० सरूप ह्यांनीं उतारा व विवरण ह्या दोहोंचेंही भाषांतर केलें आहे; तें असें:— There is no misery for the man who has departed to the other world. There is no wretchedness for the man who has departed to the other world. काठकसंहितेंतील उतारा जशाचा तसाच द्यावयास पाहिजे व त्यावरचें भाष्य जसेंच्या तसेंच देऊन मग त्याचें भाषांतर केलें असतां चालेल. अवनयः, कक्ष्याः, योक्त्राणि, योजनानि, अभीशवः, धुरः ( १७५-१७६ ) हे शब्द अङ्गुलिवाचक म्हणून निघंटूंत ( २।५ ) घातले आहेत; यास्क ह्या शब्दांच्या व्युत्पत्ति देतो; अवनयः अङ्गुलयः भवन्ति। अवन्ति कर्माणि। कक्ष्याः ( अङ्गुलयः भवन्ति )। प्रकाशयन्ति कर्माणि। योक्त्राणि योजनानि च ( अङ्गुलयः भवन्ति। युज्यन्ते कर्मसु )। अभीशवः ( अङ्गुलयः भवन्ति )। अभ्यश्नुवते कर्माणि। धुरः ( अङ्गुलयः भवन्ति )। धूर्वन्ति कर्माणि असा अन्वय आहे; हा अन्वय लक्षांत न आल्यामुळें पुढीलप्रमाणें भाषांतर केलें गेलें आहे:— अवनयः means fingers; they promote actions. Girdling circles illumine actions. 'Yoke-straps' is explained by 'binding thong'. Reins penetrate actions. Who bear ten car-poles etc. ह्या भाषांतरांत चुका भरल्या आहेत. कक्ष्याः, अभीशवः व धुरः ह्यांचे भलते अर्थ केले आहेत. योक्त्राणि योजनानि इति व्याख्यातम् = योक्त्र व योजन ह्यांचा अंगुलि हा अर्थ कसा होतो हें इतकें स्पष्ट आहे कीं त्या शब्दांची व्युत्पत्ति देण्याची मुळींच जरूर नाहीं. यज्ञः कस्मात्। प्रख्यातं यजतिकर्म इति नैरुक्ताः (२१२।२८-२९) = It is a well-known act of worship, say the etymologists. याच्ञः भवति (२१३।१) = It is (an act of) supplication (to gods); यजुरुन्नः भवति (ओळ१३)=It is sprinkled with the Yajus formulas; बहुकृष्णाजिनः इति औपमन्यवः (ओळ१७)= It has a large number of the skins of black antelopes, says Aupamanyava; यजूंषि एनं नयन्ति(ओळ२३)= It is directed by the Yajus formulas. यज्ञ शब्द यज् किंवा याच् किंवा यजुस् + उन्द् किंवा अजिन किंवा

यजुस् + नि ह्यापासून झाला आहे असें यास्कास म्हणावयाचें आहे; ही गोष्ट लक्षांत न आल्यामुळें वरीलप्रमाणें भाषांतर केलें आहे. वृषभः वर्षिता अपां (२५२।४) = Bull, i. e. one who brings down rain. ऋचेंत इंद्राला वृषभः म्हटलें आहे; वृषभ म्हणजे बैल असा अर्थ नाहीं; वृष् (= पाऊस पाडणें) ह्यापासून वृषभ शब्द झाला आहे; देवांना बैल म्हटलेलें कोणाला आवडेल? इंद्र जल (अपां) वर्षतो (वर्षिता) म्हणून त्याला वृषभ म्हटलें आहे. अनर्शरातिम् अनश्लीलदानम्। अश्लीलं पापकम्। अश्रिमत्। विषमम् (४९९।३) = अनर्शरातिम् means one whose gifts are not vulgar. Vulgar, sinful, unpleasant, crooked. अनर्शरातिं = अन् + अर्श + रातिं; अर्शं = अश्लीलं; अनर्शं = अनश्लीलं; अश्लीलं = अश्रिमत्; रातिं = दानं. अश्रिमत् ही अश्लीलं ह्याची व्युत्पत्ति. अश्लीलं = अश्रीरं = अश्रिमत्. अश्लीलं चा पापकं व अश्रिमत् चा विषमं असा अर्थ आहे. ऋदूपे अर्दनपातिनौ गमनपातिनौ शब्दपातिनौ दूरपातिनौ वा = ऋदूपे means knocking down by movement, knocking down by motion, knocking down by sound, knocking down at great distance ऋदूवृधा मर्मणि अर्दनवेधिनौ गमनवेधिनौ शब्दवेधिनौ दूरवेधिनौ = Piercing the vital parts by movement, by motion, piercing from the sound, or piercing from a distance. ऋदूपे = ऋदू + पे; अर्द् (= जाणें) ह्यापासून ऋदू; अर्दन = गमन; पे=पातिनौ; अर्दनपातिनौ = गमनपातिनौ; ऋदू = एकप्रकारचा शब्द किंवा ऋदू = दूऋ = दूरु= दूर; शब्दपातिनौ = शब्द ऐकल्याबरोबर ज्या ठिकाणाहून तो शब्द आला असेल तेथें बरोबर बाण पाडणारे किंवा दुरून बाण पाडणारे. वृधा = वेधिनौ = भोसकणारे; ऋदूवृधौ = अर्दनवेधिनौ = गमनवेधिनौ = ज्याला मारावयाचें आहे त्याच्याकडे जाऊन त्याला मर्मस्थळीं भोसकणारे; किंवा शब्द ऐकल्याबरोबर भोसकणारे (शब्दवेधिनौ) किंवा दुरून भोसकणारे (दूरवेधिनौ). ह्यासंबंधानें श्रावणाची गोष्ट पहा (१२७०।२८-३१). असा हा व्युत्पत्तींचा चमत्कार आहे! तो लक्षांत येण्याचा फारसा संभव नाहीं; त्यामुळें वरील इंग्रजी भाषांतर झालें आहे. निरुक्तग्रंथ व्युत्पत्तींच्या भानगडीमुळें दुर्बोध झाला आहे; तो ग्रंथ समजून घेण्यास भाषांतर कुचकामाचें होय. पूर्ण विवरणावांचून अन्य उपाय नाहीं. (वनस्पतिः) वनानां पाता वा पालयिता वा (५९९।२१) = Protector or benefactor of forests. पति शब्द पा किंवा पालय् धातूपासून झाला आहे असा अर्थ आहे. नराः अस्मिन् आसीनाः शंसन्ति (६०६।२०) = Seated men praise gods in sacrifice. नराशंसः = नर + आ + शंसः; नर = नराः; आ = आसीनाः; शंसः = शंसन्ति अशी ही नराशंस शब्दाची व्युत्पत्ति होय; ऋत्विज् यज्ञांत (अस्मिन्) बसलेले असतांना (आसीनाः) शस्त्रें म्हणजे एक प्रकारच्या ऋचा म्हणतात असा व्युत्पत्तींचा अर्थ. वरतमम् अङ्गम् ऊरू (६१२।१३) =

The thighs are the most beautiful parts ( of the body ). वर ही ऊरू शब्दाची व्युत्पत्ति होय; वृ ( = पसंत करणें ) ह्यापासून ऊरू व वर; स्त्रियांच्या मांड्या हा त्यांच्या शरीराचा पसंत करण्याजोगा म्हणजे अतिशय श्रेष्ठ भाग असतो. आक्षि चष्टेः ( २७।१४ ) व कर्णः कृन्ततेः ( ओळ २३ ); आस्यम् अस्यतेः ( २८।४ ) व दध्नं दध्यतेः ( ओळ ५ ); मधु माद्यतेः ( २५२।३१ ); यजुः यजतेः ( २५३।१८ ); पितुः पानेर्वा पिबतेर्वा प्यायतेर्वा ( ६८९।३–४ ) अशा प्रकारच्या व्युत्पत्ति डॉ० सरूप ह्यांच्या ध्यानांत येतात; पण स्तोता स्तवनात् ( २१२। २६ ) = A praiser is ( so called ) from praising; येथें स्तवनात् बद्दल स्तौतेः असा जर शब्द असता तर स्तोता शब्दाची ही व्युत्पत्ति आहे असें त्यांच्या लक्षांत आलें असतें. दिशः दिशतेः । आसदनात् । अपि वा अभ्यशनात् ( १२१।१५–२२ ) = दिशः is derived from dis' ( to point out ), or they are ( so called ) from being within easy reach, or from pervading. आसदनात् व अभ्यशनात् ह्या दिशः शब्दाच्या व्युत्पत्ति आहेत; आ + सद किंवा अभि + अश् ह्यापासून दिश्. यास्क शब्दांच्या व्युत्पत्ति एकाच धर्तीनें देत नसतो ही गोष्ट डॉ० सरूप ह्यांच्या लक्षांत एखाद वेळेस येते; जसें:—उत्सः उत्सरणात् वा । उत्सदनात् वा । उत्स्यन्दनात् वा । उनत्तेः वा ( ७५९।२४ ) = utsa ( spring ) is ( so called ) from moving upwards ( उत् + सृ ), or from rising upwards ( उत् + सद् ), or from flowing upwards ( उत् + स्यन्द् ), or it is derived from the verb ud ( to issue out ).

भक्तिसाहचर्यं = Shares and Companions. भक्ति शब्दाचा खरा अर्थ पहा ( ५४५।३१ ). बहुभक्तिवादीनि ब्राह्मणानि ( ५८०।७ ) = Brāhmanas speak of many divisions. भक्ति = रूपक; ब्राह्मणग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं रूपकें असतात; पृथ्वी, संवत्सर व ब्राह्मण ह्यांना वैश्वानर रूपकानें म्हटलें आहे. भक्तिमात्रं तत् भवति यथा वायव्यानीति सर्वेषां सोमपात्राणां (५९८।१६-१७) = It is a mere apportionment as all the cups used in drininking Soma are called belonging to Vāyu. इंद्रपान ह्याचा मूळचा अर्थ इंद्राचें सोम पिण्याचें पात्र; पण इतर देवांच्या सोम-पात्रांनाही इंद्रपान म्हणण्याची रूढि पडून गेली; देवांना सोमग्रह द्यावयाचे असतात; ज्या पात्रांतून हे सोमग्रह दिले जातात त्या सर्वांना वायव्य ही संज्ञा आहे. वायव्य ग्रह = वायूला दिला जाणारा सोमग्रह असा मूळ अर्थ. विशिष्ट अर्थाचें सामान्य अर्थीं रूपांतर घडून येतें त्याला एथें भक्ति म्हटलें आहे; भक्ति = गौण प्रयोग हा अर्थ स्पष्ट करण्याकरितां वायव्यग्रहाची कथा देणें अवश्य आहे. यानि औत्तमिकानि भागानि वा ( ५७५।२७ ) = In those hymns and shares which are assigned to celestial deities. भाग शब्द पुल्लिंगी आहे नपुंसकलिंगी नाहीं; भागानि सूक्तानि = भगाचीं सूक्तें; भग, सवितृ, पूषन्, विष्णु हे उत्तम लोकांतले म्हणजे द्युलोकां-

तले देव होत; ते स्वतः औत्तमिक म्हणून तत्संबंधीं सूक्तेंही औत्तमिक. आग्नेयाः इति तु स्थितिः। भक्तिमात्रम् इतरत् (६४१।२२)=But the well considered view is that they are addressed to Agni. The rest is mere apportionment. स्थितिः = वास्तविकपणा, खरी गोष्ट; भक्ति = गौण प्रयोग; प्रयाजांची देवता अग्निच होय; इतर देवता प्रयाजांच्या देवता गौणत्वानें होत असें म्हटलें आहे. स्त्रियः (५४६।१८) = are the women. पण wives असा अर्थ आहे. नैदानाः (५५४।३) = Who are well versed in Vedic metres. निदान = विशिष्ट ऋचा अस्तित्वांत कां आल्या ह्याचें कारण; ऋचांच्या उत्पत्तींचीं कारणें ज्यांत दिलीं आहेत अशा ग्रंथाला निदान म्हणतात; हीं कारणें जे देतात ते नैदान; निदान म्हणजे छंद (metre) असा अर्थ कोठेंही नाहीं. यो देवः सा देवता (५६१।४-५)=He who is called god is also called deity. ह्या भाषांतराचा अर्थ काय? ऋचेंत ज्या देवाचें (देवः) वर्णन केलें असेल ती त्या ऋचेची देवता होय; ही देवता पुल्लिंगी स्त्रीलिंगी नपुंसकलिंगी अशी कोणत्याहि लिंगी असेल; अश्व, शकुनि, बेडूक, फासे वगैरेंचीं वर्णनें ऋचांतून येतात तेव्हां ह्या वस्तूही त्या त्या ऋचांच्या देवता. स देवान् एह वक्षति (५६२।७)=He shall bring the gods here. पण वक्षति हा वर्तमानकाळ आहे भविष्यकाळ नाहीं. घृतस्य (५६३।२३)=उदकस्य=of clarified butter i. e. water. पृथिवी घृतेन व्युद्यते(५७७।१९)=Earth is made wet with clarified butter; घृतेन (ओळ१९)=with clarified butter i.e.water.निघंटूंत घृत म्हणजे तूप असा अर्थ नसून उदक असा अर्थ आहे (१।१२।१०); पृथ्वी पावसाच्या पाण्यानें भिजते; ती तुपानें कोण भिजवील? मरुद्वृधाः सर्वाः नद्यः। मरुतः एनाः वर्धयन्ति (६९३।९)= Marudvrdha i. e. swollen by all other rivers and winds. सर्व नद्या मरुद्वृध होत कारण वारे त्यांना वाढवितात म्हणजे वारा जोरानें वाहूं लागला म्हणजे नद्यांचें पाणी उचंबळतें व त्यामुळें वाढलेलें दिसतें असा अर्थ आहे. दुसऱ्या नद्यांनीं आणि वाऱ्यांनीं फुगलेल्या गंगा वगैरे नद्या असा अर्थ नाहीं. नवग्वाः (८९०।१५) = of nine-fold gait (नवगतयः), or of nine gaits i. e. whose ways of going lead in nine directions (नवनीतगतयः). दुर्गानें ह्या शब्दांचे दिलेले अर्थः—नवगतयः पितृयज्ञान् आगन्तुं येषां प्रतिमासं नवा गतिर्भवति = दर महिन्याला पितृयज्ञाकडे येण्याला ज्यांची गति नवी म्हणजे ताजी असते असे; दर महिन्याला पितर मोठया उल्हासानें पितृयज्ञाला येतात; नवनीतं प्रति येषां मनसः गतिः इदम् अस्माकं = हें ताजें लोणी आम्हांला मिळो म्हणून ज्यांचें मन नवनीताकडे जातें ते; हाच अर्थ यास्काच्या मनांत असला पाहिजे. नऊ प्रकारची गति आहे ज्यांची किंवा ज्यांच्या गति नऊ मार्गांकडे जातात ते असा अर्थ करण्यास काय आधार आहे? नवग्वाः ह्या शब्दाची व्युत्पत्ति नवगतयः नवनीतगतयः ह्या शब्दांनीं केली आहे. काठकसंहितेंत (१३।१६) इषं तोकाय नो दधः असा तिसरा पाद आहे; अन्नं च नः अपत्याय धेहि

असें त्यावरील यास्कभाष्य आहे व दुर्ग इषम् अन्नम् अस्माकं तोकाय अपत्याय धेहि असा त्या पादाचा अर्थ करतो. क्रत्वे दक्षाय नो हिनु हे शब्द तिसऱ्या पादाबद्दल कोणीतरी मैत्रायणीसंहितेंतून ( ३।१६।४ ) किंवा तैत्तिरीयसंहितेंतून ( ३।३।११।३ ) किंवा वाजसनेयिसंहितेंतून ( ३४।८ ) अविचारानें घातले ( ९१६।२४ ); हा बदल लक्षांत घेणें जरूर होतें. डॉ० सरूप ऋचेचें भाषांतर करतांना क्रत्वे दक्षाय नो हिनु ह्याचा Impel us for expert judgement असा अर्थ करतात; पण भाष्यांतील अन्नं च नः अपत्याय धेहि ह्याचा Bestow food on our offspring असा त्यांनीं अर्थ केला आहे. तिसऱ्या पादाच्या ह्या दोन अर्थांमध्यें विसंगति आहे हें सहज लक्षांत येण्याजोगें होतें. कुटस्य = कृतस्य (४०३।२८); कृतस्य ह्याचें कुटस्य हें प्राकृत रूप ऋग्वेदांत घातलें आहे असें डॉ० सरूप म्हणतात ( This shows that he noticed this example of prakritization in the Ṛgevda). हें त्यांचें म्हणणें साहेबी तऱ्हेचें आहे. वेदांतल्या दुर्बोध शब्दांना उच्चारानें जे शब्द जवळ असतील ते यास्क घालीत असतो; ह्याचीं अनेक उदाहरणें आहेत; कुटस्य ह्याचा कधींही अर्थ करतां येणार नाहीं; पण कोणत्याही तऱ्हेनें ऋचांचा अर्थ केलाच पाहिजे असा निर्धार जे करतात त्यांना कुटस्य बद्दल कृतस्य पर्याय देणें भाग पडतें. ऋग्वेदकालीं प्राकृतभाषा अस्तित्वांत होत्या असें साहेबलोकांप्रमाणें डॉ० सरूप ह्यांचें मत आहे; पण तें सर्वथैव निराधार आहे. यथार्थं विभक्तीः संनमयेत् (७६।६) = One should interpret inflected cases according to the meaning. अर्थाकरितां शब्दांच्या व्युत्पत्ति बदलाव्यात; जसें पूरुषादः = पुरुषान् अदनाय (९६।८); पाकं बद्दल पाकः ( १८९।८ ); चित्र = चित्रं (२४३।६); आशुशुक्षणिः = आशुशुक्षणेः ( ४२४।१९ ); सुमतिः = कल्याण्यां मतौ (१०३३।२५); हीं ह्या नियमाचीं उदाहरणें होत. तायुः इति स्तेननाम । संस्त्यानम् अस्मिन् पापकम् इति ( ३०१।१३ ) = The word tayu is a synonym of thief : 'He is a storehouse of sin'. एथें व्युत्पत्तीचें भाषांतर केलें हा तर दोष आहेच पण संस्त्यानं हें भूतभूतकालीन विशेषण असतांना तें नाम समजून त्याचा a storehouse असा अर्थ केला आहे. पापकं हें संस्त्यानं ह्याचें विशेषण आहे ह्या समजुतीनें ही चूक झाली असावी; चोरांत ( अस्मिन् ) पाप ( पापकम् ) दाटून भरलें असतें ( संस्त्यानं = संहतं ). पर्याया इव त्वदाश्विनं ( २८।३६ ) = recurrences and po essions of Asvins; त्यावरील भाष्यः—आश्विनं च पर्यायाः च = Possessions cf Asivns, and recurrences. पर्यायाः व आश्विनं ह्यांचे अर्थ कळले नाहींत; त्यांचें विवरण पहा ( २९।३-८ ). उभयानि हवींषि = सोमं च इतराणि च । तान्त्राणि च आवापिकानि च इति वा ( ६०७।१३ ) = Oblations of both kinds, i. e. the soma and other oblations, or the mystical and the supplementary ones. अशा भाषांतराचा काय उपयोग? पर्याय, आश्विन, तान्त्राणि ( ६०७।२१ ) व आवापिकानि ( ओळी २७-२९ ) ह्यांचे विशिष्ट अर्थ आहेत. अध्याय सात ह्यांतील

तेवीस व चोवीस खंड याज्ञिक शब्दांनीं भरले आहेत, त्या शब्दांचें सविस्तर विवरण देणें आवश्यक आहे; नुसत्या भाषांतराचा कांहींएक उपयोग नाहीं. अशा तऱ्हेचें भाषांतर नवीन पदवीधरांकडून होणें साहजिक आहे; कारण निरुक्त कोणत्या प्रकारचा ग्रंथ आहे हें त्यांच्या ध्यानांत येणें अशक्य असतें; निरुक्तावर आजपर्यंत जें कांहीं लिहिलें गेलें आहे तें निरुक्ताचें खरें स्वरूप न कळल्यामुळें लिहिलें गेलें; खरें स्वरूप कळलें असतें तर निरुक्ताची अवास्तव स्तुति केली गेली नसती. डॉ० सरूपांचें निरुक्त एका दृष्टीनें फार उपयोगी आहे; कारण परीक्षक व परीक्ष्य ह्यांना लागणारी सर्व माहिती त्यांच्या प्रस्तावलेखांत दिली आहे. त्यांच्या भाषांतरावर विद्यार्थ्यांच्या उड्या पडतात ह्यावरून परीक्षेंत त्या भाषांतराचा चांगला उपयोग होतो असें दिसतें. मीं केलेलें भाषांतर व त्यावरील निबंध हीं कालहरण करणारीं आहेत हें मला कबूल केलें पाहिजे; विद्यार्थ्यांना एवढा ग्रंथ वाचणें बहुतेक अशक्य आहे व त्यांत दिलेली माहिती परीक्षेंत विचारली जाणार नाहीं हेंही खरें आहे. मीं डॉ० सरूप ह्यांच्या चुका दाखविल्या म्हणून माझ्या भाषांतरांत चुका नाहींत असें मला मुळींच म्हणतां येणार नाहीं. त्या चुका पुढीलप्रमाणें होत.

## अर्थाच्या चुका

पवमानो० ज्योतिर्वैश्वानरं बृहत् ( १३।३३ ) ह्या ऋचेंतील दिवश्चित्रं न तन्यतुं ह्याचा स्वर्ग जसा रंगीबेरंगी वीज उत्पन्न करतो असा अर्थ नसून स्वर्गांतील ( दिवः ) झळकणाऱ्या ( चित्रं ) विजेसारखें ( तन्यतुं न ) असा आहे. दक्षिणा मघोनी ( २२।२८ ) ह्याचा धनवान् उषा असा अर्थ नसून अतिशय धन किंवा मुबलक धन असा आहे. मृग ( ६८।२६ ) दैवतप्रकरणांत कोठेंही आला नाहीं. तेव्हां हें उदाहरण एथें लागू पडत नाहीं. हें माझें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ऋचेंत ज्या वस्तूचें वर्णन केलें असतें ती त्या ऋचेची देवता असा नियम आहे; प्रस्तुत ऋचेंत इंद्र व मृग हे दोघेही ऋचेच्या देवता असून इंद्र ही प्रधानदेवता व मृग गौण देवता होय. एकपर्वसु व अनेकपर्वसु ( ८३।१८ ) ह्यांचा अर्थः-राजपुरुषः हा एकपर्व समास होय म्हणजे राजन् व पुरुष ह्या दोन शब्दांचा समास झाला आहे; पण कल्याणवर्णरूपः ह्यांत दोन समास आहेत; कल्याणः वर्णः अस्य तत् कल्याणवर्ण हा एक समास; कल्याणवर्णस्य इव अस्य रूपं हा दुसरा समास; एका समासांत जेव्हां दुसऱ्या समासाचा अन्तर्भाव होतो तेव्हां तो अनेकपर्वसमास होय. दण्ड्य हा एकपर्व तद्धित होय; कारण ह्या शब्दांत य हा एकच तद्धित प्रत्यय आहे; पण विश्वकद्र ह्यांत वि व क असे दोन तद्धित प्रत्यय आहेत म्हणून तो अनेकपर्वतद्धित होय. पर्वन्=सांधा.तडित्० संसृष्टकर्म(१८४।२९)ह्याचा खरा अर्थ पहा(११८३।२-६). उपनिषद्वर्णः ( १८८।२५ ) = उपनिषदाचें म्हणजे गूढविद्येचें वर्णन असा अर्थ आहे; युद्धवर्ण ( १२५।२५ ) व मन्त्रवर्ण ( ओळ २८ ) पहा. दोघेही जमिनीवर पडलेले

दंव वगैरें वाफेच्या रूपानें हरण करतात ( २०२।२६ ) ह्याबद्दल उषःकालीं म्हणजे पांहाटेस जमिनीवर दंव पडतें; तें दंव सूर्य उगवतांच नाहींसें होतें; वांसरूं जसें गाईच्या स्तनांतला गोरस हरण करतें तसा सूर्य उषेचा रस म्हणजे पांहाटेस पडलेलें दंव हरण करतो; म्हणून सूर्य उषेचा वत्स. अदितिः अदीना देवमाता (२९९।२५)= अदिति म्हणजे अदीन अशी देवांची आई; दीन म्हणजे दरिद्री; अदीना = धनसंपन्न देवमाता. अदिति ही धनसंपन्न होती; अदीना ही अदिति शब्दाची व्युत्पत्ति व देवमाता हा त्या शब्दाचा अर्थ. अदीना = अदीनानि ( ओळ २६ ) हा अर्थ चुकला आहे व देवमाता नंतर वा पाहिजे हेंही म्हणणें चुकीचें आहे ( ओळ २८ ). देवाच्या कृपा ( ४५३।२० ) ह्यांतील देवाच्या ह्याचा देवांकडे जाणाऱ्या असा अर्थ नसावा; देवांवर प्रकाश पाडणाऱ्या म्हणजे सर्व द्युलोक प्रकाशित करणाऱ्या असा अर्थ दिसतो. विश्वान् नरान् नयति ( ५६८।३१ ) ह्यांतील नयति शब्द अध्याहृत आहे असें मी म्हटलें आहे ( ५६९।१ ). पण नृ नये ( धा० १।८११ ) ह्या धातूपासून नरति असें रूप होईल; विश्वान् नरति असौ विश्वानरः; विश्वान् हें नरान् ( अध्याहृत ) शब्दाचें विशेषण व नयति हा नरति ह्याचा अर्थ असावा; त्याचप्रमाणें विश्वे नरन्ति = विश्वे नराः एनं नरन्ति नयन्ति असा दुसरा अर्थ असावा. द्रविणोदाः द्रविणसः ( ५९४।२१ ) ह्या ऋचेचा धनपर अर्थ ओढाताणीचा आहे ( ५९५। १४–२५ ). खरा अर्थ पुढीलप्रमाणें असावाः–ऋत्विजः अत्र द्रविणोदसः उच्यन्ते हविषः दातारः ( ५९८।५–६ ) ह्या वाक्यावरून द्रविणस् म्हणजे हवि; द्रविणोदाः= हवि देणारे. द्रविणसः = हवि आहे ज्यांच्याजवळ असे. ज्यांच्या हातांत सोमरस काढण्याकरतां ग्रावे आहेत ( ग्रावहस्तासः ), ज्यांच्याजवळ सोमरस तयार आहे ( द्रविणसः ) व जे तो सोमरस देवांना देतात ( द्रविणोदाः ) असे ऋत्विज् यज्ञांत ( अध्वरे=यज्ञेषु ) देव जो अग्नि त्याला याचितात. इंदुः इन्धेः । उनत्तेर्वा (८४०।२८) एथें इंदु म्हणजे सोम नसून चंद्र असा अर्थ आहे; चंद्राला इंदु म्हणण्याचें कारण तो प्रकाशानें जग प्रज्वलित म्हणजे प्रकाशमय करतो ( इन्धे ) किंवा तो आपल्या रसानें पृथिवी भिजवितो ( उनत्ति ). कल्याण्यां मतौ ( १०३३।२५ ) ह्यासंबंधानें १२१३।३३–१२१४।५ पहा. अर्थाचें स्पष्टीकरणः—

दुरवाः भवन्ति ह्याचा कर्ता गृहाः (अध्याहृत); गृहाः = घर = घरांतील माणसें; गृहाः हा कर्ता गृहनाम ह्यांतून घ्यावयाचा ( २४५।९ ).

यास्क व दुर्ग ओढाताणीचे अर्थ करतात असें मीं बरेच वेळां म्हटलें आहे; पण पुष्कळ ऋचांचा मीं धनपर अर्थ केला आहे तोही ओढाताणीचा व कांहीं ठिकाणीं अगदीं टाकाऊ आहे असें माझें स्वतःचें मत भाषांतर पुन्हां वाचतांना झालें आहे; पुष्कळ ऋचांत धनपर अर्थ आहे अशा समजुतीनें ही ओढाताण झाली आहे.

# गळलेला किंवा घालावयास पाहिजे असा आवश्यक मजकूर

(२६।३१) परंतु ह्या शब्दाच्या आधीं गुर्जर व महाराष्ट्रपाठ द्रष्टव्ययं आहे. (२८।१६) थंड असतें ह्यानंतर दद्दश्रे = दद्दशिरे. (३२।५) स्वर्गाला जातात ह्या शब्दांच्या आधीं देवांना संतुष्ट करून (मदन्तः). (१२९।१४) उषस् म्हणतात ह्यानंतर उच्छ् (= उगवणें) ह्यापासून उषस्. (१३६।७) मेघ म्हणतात ह्यानंतर मिह् (= वर्षणें) ह्यापासून मेघ. (१३६।१५) थांबतें ह्यानंतर उपर = उप + र; र = रमन्ते किंवा रताः. (१३८।१४) आदेश होतो यानंतर अपि वा अन्वाप्० प्राचीनम् इति हे शब्द प्रक्षिप्त नसल्यास ते पुढीलप्रमाणें असले पाहिजेतः— अपि वा अन्वाप् इत्यस्मात् अनूपः स्यात्; अन्वाप्चें द्वितीयेचें बहुवचन अनूपः होतें ह्यांत मुळींच संशय नाही म्हणून अनूपः नंतरचे इति स्यात् हे शब्द गाळले पाहिजेत; पण अयमपि इतरः अनूपः ह्यांतील अनूपः प्रथमेचें एकवचन आहे; त्याचा अन्वाप्च्या द्वितीय बहुवचनीं अनूपः ह्या रूपाशीं कोणताही संबंध नाहीं; तेव्हां हे सर्व शब्द प्रक्षिप्त असावेत. (१४१।३१) ही सरस्वती नदी ह्यानंतर त्रिसखाप्रमाणें म्हणजे इंद्राप्रमाणें. (१९१।२४) नांवें यावींत. ह्यानंतर यास्ककालीं गृह शब्द पुल्लिंगी बहुवचनीं होता असें दिसतें; गृहाः पुंसि च भूम्न्येव (अमर २।२।५); निघंटूंत गृहनामांमध्यें गृह शब्द नाहीं पण तो ऋग्वेदांत आहे. (२१२।५) शेवटली व्युत्पत्ति ह्यानंतर (संपूर्वात् हन्तेः). (२१२।२५) ह्याच्यानंतर ह्या शब्दाच्या आधीं त्रयोदश. (२१४।२८) तहान भागत नाहीं ह्याच्यानंतर किंवा कुप् (= संतापणें) ह्यापासूनही कूप. (२१९।११) (८।३३।१४) ह्यानंतर = हे इंद्रा, शत्रूचीं सवनें ओलांडून तुझे घोडे तुला इकडे आणोत. (८।६६।१२) नंतर = हे धनवंता, शत्रूचीं सवनें टाकून देऊन इकडे ये. (२२०।३१) मोठा ह्यानंतर (ऋद्धतमः). (२२२।२९) ऋ = ऋ = ह्यानंतर ईर् = ईर्ण. (२२७।१४) पाहणें ह्यानंतर (२२६।७ ८). (२२८।२९) नाहीं. नंतर दुर्गवृत्तींत अतन्वत आहे. (२३०।३) त्रिः स्म माह्नः ह्याच्याआधीं यस्यामुशन्तः प्रहराम. (२३२।२७) पहा नंतर (२३०।८–१२). (२५७।७) कर्तोः ह्याच्या आधीं मध्या १२ = मध्ये. (२६३।१६) ईर्मान्ताः ह्याच्या आधीं ईर्मान्तासः (१४) =. (२७२।९–१०) नसन्त (२२) ह्या शब्दाचें विवरण पुढें देऊं (५६३।२४). ही ओळ नसन्ते इति वगैरे आणि ये ते मदा ह्यामध्यें घालावी. (२७४।९) म्हटलें आहे. ह्यानंतर नोधाः = नस् + धाः = धन देणारा; परीणस् ह्या शब्दांतील नस् चा अर्थ धन; नोधाः हें धन देणाऱ्या कोणत्याही देवाचें विशेषण होईल; प्रस्तुत ऋचेंत सूर्य हा नोधा असावा; सूर्याप्रमाणें उषा प्रिय वस्तु प्रकट करते असा अर्थ असावा. (२७५।१६) इष्मिणः नंतर (ऋ० सं० १।८७।६). (२७६।१७) सकाळच्या प्रमाणेंच नंतर होता. (२८६।३२) ऋचा आहेत. ह्यानंतर च्यवानः बद्दल च्यवानं असें म्हणण्याचें कारण पुढें दिलेल्या ऋचेंत च्यवानं हें रूप आहे; परंतु च्यवानः असेंच म्हणावयास पाहिजे. (३०१।३२)

होतात. ह्यानंतर न्यङ् ह्याचें नीचा हें तृतीयेचें एकवचन होय; नीचा = नीचा मार्गेण = खालच्या मार्गानें म्हणजे खालीं; नीचा अयमानः = खालीं झडप घालणारा; ह्या प्रयोग दिवा यान्ति मरुतः (ऋ० सं० १।१६१।१४) ह्यासारखा आहे. (३१०।३४) ही व्युत्पत्ति ह्याच्या आधीं अन्तः अततेः. (३११।१) म्हणतो. ह्यानंतर (निघ० ३।३०।२३). (३१३।१३) नाहींत. ह्यानंतर ररिवाँ अजाश्व ह्यानंतर श्रवस्यताम् अजाश्व असें महाराष्ट्रपाठांत अधिक आहे. (३२१।१४) करणारा. ह्यानंतर चक्र शब्द चर् ह्यापासून झाला आहे. (३२५।१) दिसतो. ह्यानंतर मासानां ह्या षष्ठ्यंत शब्दावरून पञ्चर्तुतायाः व षळृतुतायाः हे गुर्जरप्रतींतले पाठ मूळपाठ असावेत; परंतु सर्वाभिः मात्राभिः स्तौति ह्यावरून पंचर्तुतया व षळृतुतया हे पाठ योग्य दिसतात; कदाचित् पञ्चर्तुतया व षळृतुतया असें लिहिल्यावर द्वादशमासतया असें लिहिणें यास्कास योग्य वाटलें नसेल; किंवा यास्काच्या विसंगतपणाचें हें एक उदाहरण असेल. (३२५।३४) नाहींत. ह्याच्यानंतर म्हणून ते अचल. (३३३।२७) = ह्याच्या आधीं स भन्दनाः० इति च. (३८७।२१) अर्थ देतो. ह्यानंतर पूर्वेण संप्रयुज्येते हे शब्द १७।४ येथें आले आहेत व तेथेंच तें सार्थ आहेत; व्रीळयतिः० संप्रयुज्येते हें प्रक्षिप्त असावें. (३८७।२५) सर्पी नंतर=. ३८८।२५ व २६ मध्यें खंड १७. (४०२।९) पापधियः नंतर (३३२।८). (४०५।२४) ऋणांत रुतून ह्याच्या आधीं ऋणे ह =. (४११।३१) दुसरीचा अर्थ. ह्यानंतर कोकुवा शब्द अमरांत किंवा आपट्यांच्या कोशांत नाहीं. (४१२।२३) कल्याणकारक असतें नंतर असा. (४२३।७) येणार नाहींत. नंतर इत्यपि निगमः भवति हे शब्द बहुतकरून प्रक्षिप्त असतील. (४२४।१६) हें अग्नीचें ह्याच्या आधीं आशुशुक्षणिः. (४३४।२) आणणारा नंतर तो जनश्रीः.(४३९।३०) प्रक्षिप्त होय. ह्यानंतर इति सा निगदव्याख्याता हे शब्द नेहमीं ऋचासंबंधानें येतात; ते शब्द एथें श्लोकासंबंधानें घातले आहेत; तेव्हां प्रक्षेपक अडाणी किंवा अविचारी असला पाहिजे. (४४४।७) क्रमको दश ह्यानंतर (मान० श्रौ० २।१।४।११). (४४८।३४) तशी नंतर ते. (४५०।७) आश्रपणात् ह्यानंतर इन्द्राय गाव० निगमः भवति हें वाक्य पाहिजे; कारण आशीः शब्दाचा पहिला अर्थ ह्या ऋचेंत आला आहे. इयम्० आशास्तेः ह्यानंतर सा मे सत्याशीःदेवान् गम्यात् हा मंत्र पाहिजे. इति च ह्या शब्दानें दोन्ही मंत्रांत आशीः ह्याचा एकच अर्थ आहे असा भास होतो; पण आशीः शब्दाचे दोन भिन्न अर्थ आहेत हें स्पष्ट आहे. इत्यपि निगमः भवति असें म्हटल्यावर यास्क दुसरें उदाहरण देत नसतो; म्हणून इयम् अपि० आशास्तेः व सा मे० इति च हें प्रक्षिप्त असावें; तसें असल्यास यास्कानें आशीः ह्याचा आशिर असा एकच अर्थ केला असावा. (४५०।२३) (शुक्राः) नंतर सोम. (४५१।१७) (शृणोतु) ह्यानंतर असाही अर्थ होईल. (४५१।१८) अर्थ असेल. ह्यानंतर सत्या भवन्तु आशिषो नो अद्य (७।१७।५) = ह्या आमच्या आशा सफल होवोत. त्रिरस्मै सप्त धेनवो दुदुह्रे सत्यामाशिरं पूर्व्ये व्योमनि (९।७०।१);

एथें सत्यां हें आशिरं ह्याचें विशेषण आहे; आशिरं = सोमांत मिसळावयाचें दूध; एथें सत्य म्हणजे उत्तम असा अर्थ असावा. सत्या देवेषु आशिषः जगाम (१।१७९।६) = अगस्त्य देवांमध्यें उत्तम सोमपानाप्रत गेला म्हणजे देवलोकीं देवांप्रमाणें त्याला उत्तम सोमहवि मिळूं लागला. सत्यामाशिषं कृणुता वयोधै (१०। ६७।११) = हवि देणाऱ्याला (वयोधै) पुष्कळ (सत्यां) धन (आशिषं) द्या. मयि देवा द्रविणमा यजन्तां मय्याशीरस्तु मयि देवहूतिः (१०।१२८।३) = देव माझ्या ठायीं धन ठेवोत; त्यांनीं दिलेलें धन (आशीः = देवहूतिः) मजमध्यें असो. ह्याप्रमाणें सोमरसांत मिसळावयाचें दूध, प्रार्थना व धन असे आशिस् शब्दाचे तीन अर्थ आहेत. हल्लींच्या निरुक्तपाठांत देवान् गम्यात् ह्याबद्दल देवेषु भूयात् असे शब्द आहेत ते शब्द प्रक्षेपकानें सा मे सत्याशीर्देवेषु भूयात् ब्रह्मवर्चसं माऽऽगम्यात् (तैत्ति० सं० ३।२।७) ह्यांतून घेतले आहेत. दुर्गवृत्तींत पुढील मंत्र आहे: —सा मे सत्याशीर्देवान् गम्यात्। शृण्वन्तु ते समर्धयन्तु। जुष्टाज्जुष्टतरा वगैरे. हल्लींच्या मैत्रायणीसंहितेंत (१।४।१) शृण्वन्तु ते समर्धयन्तु हे शब्द नाहींत; ते मानवश्रौतसूत्रांतही (१।४।२।१७) नाहींत. यजुर्मन्त्रांत आशीः म्हणजे प्रार्थना; ती प्रार्थना देवांकडे जावो व देव ती ऐकोत आणि फलसंपन्न करोत; ती प्रार्थना अतिशय प्रिय व अतिशय स्तुत्य आहे. असा दुर्गवृत्तींतल्या मंत्राचा अर्थ आहे व तोच बरोबर आहे; भाषांतरांत दिलेला अर्थ चुकीचा आहे (ओळी २३ ते २७). (४५३।२१) गेलेल्या. ह्यानंतर दुर्गवृत्तींत अक्तयाबद्दल अश्वितया आहे. (४५४।२१) येत नाहीं; ह्याच्यानंतर दावने. (४६०।१८) दिली असावी. ह्यानंतर इति नैरुक्ताः दुर्गवृत्तींत नाहीं. (४८१। १६) दिसतो. नंतर अक्र शब्द पहा (Words in Rgeda Vol I p. p. 4–5). (४८३।१९) नपुंसकलिंगी आहे. ह्यानंतर अयमपि इतरः याबद्दल गुर्जरपाठ इदमपि इतरत् असा आहे. (४८३।३१) करते. ह्यानंतर कुलिशः = कुलि + शः; कुलि = कूल; शः = शातनः; शद् (= कापणें) ह्यापासून शः. ऋग्वेदांत कुलिश पुल्लिंगी आहे (३।२।१) पण अर्वाचीन संस्कृतांत तो नपुंसकलिंगी आहे (अमर १।१।४७); दुर्गवृत्तींत कुलिशम् आहे. ह्यानंतर अयमपि इतरः ह्याबद्दल गुर्जरपाठ इदमपि इतरत् असा आहे. (४८४।१७) बर्हणया ह्यानंतर) या. (५१७।३०) नाश करता झाला. ह्यानंतर पराशर हा शब्द इन्द्रवाचक नसून तो इन्द्र ह्याचें विशेषण आहे. ५६८।३० ह्या ओळीनंतर खंड १९ नंतर व त्रिसाव्याच्या आधीं गुर्जरप्रतींत जातवेतसे सुनवाम सोमं० तस्य एषा अपरा भवति असा अधिक खंड आहे; त्याचें विवरण १४।३३ एथें केलें आहे (११६०।२७–११६१।३). (५७६।१३) असा असेल. ह्यानंतर महाराष्ट्रप्रतींत इति दहासि हे शब्द इति पचासि ह्यानंतर आहेत. (५७८।२०) मार्ग नाहीं. नंतर दुर्गवृत्तींत वर्षति नसून मध्यस्थानम् आपादयति असा त्याचा अर्थ आहे. (५८१।७) आहुतं = ह्यानंतर अभिहुतं =. (५८२।१६) घेते झाले. ह्यानंतर दुर्गवृत्तींत अगृह्णत बद्दल अगृह्णन् आहे व तोच शब्द बरोबर आहे.

